केलें तें अद्याप आहे. त्या दिवसापासून नारायणभट्टांस 'जगद्गुरु' ही पदवी सर्वांनीं देऊन अग्रपूजासंमानही दिला आहे. विक्रम शके १६०० यांत याचा जन्मसमय असावा. त्या नारायणभट्टानें प्रयोगरत्न ( नारायणभट्टी ) आणि त्रिस्थलीसेतु असे दोन ग्रंथ केलेले आहेत.

नारायणभट्टाचा पुत्र **रामकृष्णभट्ट** झाला. तोही मोठा विद्वान् होता. त्यानें जीवत्पितृकनिर्णय केलेला आहे. त्या रामकृष्णभट्टाचा पुत्र **दिवाकरभट्ट** व **कमलाकरभट्ट.** या निर्णयसिंधूचा कर्ता हा कमलाकरभट्ट होय. यानें धर्मशास्त्रावर पूर्तकमलाकर, शांतिकमलाकर, कमलाकराह्निक, आणि शूद्रकमलाकर इत्यादि दुसरेही ग्रंथ केले आहेत. असा हा मोठा पिढीजादा विद्वान् होता.

या ग्रंथामध्यें कोणत्या कर्माचा कोणता काल, याचा मुख्यत्वेंकरून निर्णय केलेला आहे. व इतरही सर्व धर्मशास्त्राचे निर्णय आहेत. बाबापाध्ये यांनीं धर्मसिंधुसार ग्रंथ या ग्रंथाच्या आधारानें लिहिलेला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या ग्रंथकाराचा असा नियम आहे कीं, कोणतीही गोष्ट सांगावयाची किंवा निर्णय करावयाचा तो प्रमाणावांचून करावयाचा नाहीं. याकरितां प्रमाणभूत मूलवचनें सारीं यांत दिलेलीं आहेत. आणि कोणत्याही वचनाचा अर्थ करावयाचा तोही प्रमाण दिल्यावांचून केलेला नाहीं. एकादे ठिकाणीं इतर ग्रंथकारास दुसरा अर्थ इष्ट असला तरी, यानें धरलेल्या वचनावांचून त्यास दुसरें प्रमाण मिळणें फारच कठीण पडतें. हा प्रकार हा ग्रंथ व दुसरे ग्रंथ पाहिले असतां कळून येईल. अशा ह्या महत्त्वाच्या ग्रंथाचें मराठींत भाषांतर असावें, असें कैं० शेठ **जावजी दादाजी** यांचे मनांत आलें. नंतर वे० शा० सं० **बापूशास्त्री मोघे** यांनीं धर्मसिंधूचें भाषांतर केलें, तें लोकाश्रयास पात्र झालेलें समजून जावजी दादाजी यांनीं बापूशास्त्री यांस निर्णयसिंधूचें भाषांतर करण्यास सांगितलें. त्यांनीं निर्णयसिंधूचे भाषांतरास आरंभ केला व थोडें लिहिलें. नंतर कालगतीनें ते बापूशास्त्री कैलासवासी झाले. पुढें हें काम तसेंच अपुरें राहिलें त्यास बरेच दिवस सुमारें २० वर्षे झालीं. नंतर शेठ **तुकाराम जावजी** यांनीं हें निर्णयसिंधूचें भाषांतर करण्यास मला सांगितलें तें मी यथामति लिहून दिलें. छापण्याची व्यवस्था-वरती संस्कृत मूलग्रंथ, व खालीं त्याचें भाषांतर असें घेऊन छापलें आहे. कोणत्याही ग्रंथाचें व ग्रंथकाराचें नांव आलें तें जाड्या अक्षरांत घेतलें आहे. या ग्रंथांत ठिकठिकाणीं प्रायश्चित्तप्रकरण आलें आहे तेथें प्राजापत्य, कृच्छ्र, चांद्रायण इत्यादिक नांवें आलीं आहेत, त्यांचा अर्थ ग्रंथांत नसल्यामुळें वाचकांच्या ध्यानांत येणार नाहीं म्हणून ह्या ग्रंथाच्या शेवटीं त्या कृच्छ्रचांद्रायणांचीं लक्षणें स्मृतीचे आधार देऊन लिहिलीं आहेत. ह्या ग्रंथांतील विषय फार कठीण असल्यामुळें व ठिकठिकाणीं मीमांसेचे न्याय असल्यामुळें कित्येक ठिकाणीं अर्थामध्यें भ्रम होण्याचा संभव असणें शक्य आहे. तरी पण ईश्वरानें मजकडून हें भाषांतर माझ्या मतीप्रमाणें तडीस नेलेलें आहे; म्हणून विद्वानांजवळ चुकीची क्षमा मागून या ग्रंथास सर्वांनीं निर्मत्सरपणानें आश्रय द्यावा, अशी जगन्नियंत्याच्या चरणीं प्रार्थना करितों.

**नवरे इत्युपाभिध बाबाजीभट्टात्मज कृष्णशर्मा.**

---

## विशेष शोध.

लिंगप्रतिष्ठा पृष्ठ ३४८ यांत 'सहस्राणिसहस्रशो०' ह्या बारा ऋचा सांगितल्या आहेत. पण हल्लींच्या रुद्राच्या पाठांत 'सहस्राणिसहस्रशो०' ह्या अनुवाकाच्या १० ऋचा होतात, दोन ऋचा हल्लींच्या पाठांत नाहींत. त्यांचा शोध करितां एका जुन्या मदनमहार्णवाच्या लेखी प्रतींत दोन ऋचा आढळल्या, व तशाच शंभर वर्षांच्या जुन्या रुद्राच्या पोथींत सांपडल्या. त्या येथें देतों—**येतीर्थानिप्रचरंतिसृकावंतोनिषंगिणः। तेषा०० ॥ ९ ॥** याच्या पुढें—

**'येवनान्युपसर्पंतितेभ्योवृष्टिरुदार्यते ॥ तेषा०० ॥ १० ॥**

**येग्राम्यानुपसर्पंतितेभ्योभ्युष्टिमुपासते ॥ तेषा०० ॥ ११ ॥'**

श्रीः

# निर्णयसिंधूंतील विषयांची अनुक्रमणिका.

**अथ तृतीयपरिच्छेद उत्तरार्धाची अनुक्रमणिका.**

## परिशिष्टविषय.



इति अनुक्रमणिका समाप्ता.

# निर्णयसिंधु-
## प्राकृत भाषांतरसहित.

## प्रथम परिच्छेद.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

यन्नामग्रहणाद्देवा अपि मंगलमाप्नुवन् ॥ ऋद्धिसिद्ध्योः प्रदातारं तं नमामि गजाननम् ॥ १ ॥
अगाधं दुस्तरं सिंधुं तर्तुं निर्णयपूर्वकम् ॥ विरचिष्ये बालबोधां तरणिं देशभाषया ॥ २ ॥
अन्यादितरणीभिर्यः पारं गंतुं न शक्यते ॥ साधारणैः स हस्ताभ्यां तर्तुमिच्छेद्यथा पुमान् ॥ ३ ॥
उपहासास्पदं याति तथैवाहं निराश्रयः ॥ तरणिं कर्तुमुत्सेहे सहायो हरिरस्तु मे ॥ ४ ॥

अशी विज्ञापना करून निर्णयसिंधूच्या मराठी टीकेला आरंभ करितों.

कारुण्यैकनिकेतं रामं सीतालतायुक्तम् ॥ विश्वामित्रान्ववायव्रततिसमालंबिशाखिनं वंदे ॥ १ ॥

कारुण्याचें मुख्य आस्पद ( स्थान ), सीतारूप वल्लीनें समन्वित, विश्वामित्राची गोत्ररूप जी वल्ली तिला आश्रयभूत असा जो रामरूप वृक्ष त्याला नमस्कार करितों. ॥ १ ॥

लक्ष्मीसहायं कल्पद्रुतलरंजितगोकुलम् ॥ बर्हापीडं घनश्यामं महः किंचिदुपास्महे ॥ २ ॥

लक्ष्मीला सहायभूत किंवा लक्ष्मी आहे सहाय ( बरोबर ) ज्याच्या असें ( लक्ष्मीसहित ), कल्पवृक्षांच्या तलांनीं अनुरंजित केलें आहे गोकुळ ज्यानें असें, मयूरपिच्छ-भूषणानें युक्त, सजल मेघाप्रमाणें श्यामवर्ण, अशा एक प्रकारच्या तेजाची आम्हीं उपासना करितों. ॥ २ ॥

वेदार्थधर्मरक्षार्थं मायामानुषरूपिणम् ॥ पितामहं हरिं वंदे भट्टनारायणाह्वयम् ॥ ३ ॥

वेदप्रतिपाद्य धर्माच्या संरक्षणाकरितां मायेच्या योगानें मनुष्यरूप धारण करणारा साक्षात् हरि असा जो आमचा ( ग्रंथकर्त्याचा ) पितामह भट्टनारायण ( नारायणभट्ट ) त्याला नमस्कार करितों. ॥ ३ ॥

यत्पादसंस्मृतिः सर्वमंगलप्रतिभूर्मता ॥ तान् भट्टरामकृष्णाख्यान् श्रीतातचरणान्नुमः ॥ ४ ॥

ज्याच्या पायांचें स्मरण सर्व मंगलांना जामिनाप्रमाणें साधन करणारें आहे त्या भट्टरामकृष्णसंज्ञक पित्याला नमस्कार करितों. ॥ ४ ॥

सर्वकल्याणसंदोहनिदानं यत्पदद्वयम् ॥ द्युनदीसोदरीमंबामुमाख्यां नौमि सादरम् ॥ ५ ॥

जिचे पाय सर्व प्रकारच्या कल्याणांच्या समुदायांचें निदान ( आदिकारण ) आहे, व जी भागीरथीची सोदर भगिनीरूप ( परम पवित्र ) उमानामक माता तिला आदरपूर्वक नमस्कार करितों. ॥ ५ ॥

बिंदुमाधवपादाब्जगोलंबीकृतविग्रहम् ॥ ज्यायांसं भ्रातरं भट्टदिवाकरमुपास्महे ॥ ६ ॥

भगवान् बिंदुमाधवाच्या चरणकमलीं भृंगाप्रमाणें लुब्ध केला आहे देह ज्यानें असा जो आमचा ( ग्रंथकर्त्याचा ) ज्येष्ठ भ्राता दिवाकरभट्ट त्याची आम्हीं ( कमलाकरभट्ट ) उपासना करितों. ॥ ६ ॥

हेमाद्रिमाधवमते प्रविचार्य सम्यगालोच्य तत्त्वमथ तीर्थकृतां परेषाम् ॥
श्रीरामकृष्णतनयः कमलाकराख्यः काले यथामति विनिर्णयमातनोति ॥ ७ ॥

हेमाद्रि व माधव यांच्या मतांचा उत्तम प्रकारानें विचार करून व इतर धर्मशास्त्रकारांच्या तत्त्वांचें आलोचन करून श्रीरामकृष्णभट्टांचा पुत्र **कमलाकर** कालाविषयीं यथामति निर्णय करितो. ॥ ७ ॥

---

१ ह्या पहिल्या श्लोकार्थावरून ग्रंथकार ( कमलाकरभट्ट ) विश्वामित्रगोत्री व रामोपासक होता, असें समजतें. यावरून विश्वामित्रानें इतर धर्मांचा त्याग करून ब्राह्मणत्व संपादिलें असें जें उत्तम ब्राह्मणत्व तें राखण्याविषयीं व त्याच्या यातयामतेचा निरास होण्याविषयीं कारणभूत जे धर्म त्यांचा निर्णय त्या विश्वामित्रगोत्रीं उत्पन्न असे आम्ही करितों, आणि छिद्ररहित धर्माचरण करणारा जो राम त्याच्याच आश्रयानें आमच्या अभीष्ट अर्थाची ( अच्छिद्रधर्मप्रतिपादनाची ) सिद्धि होईल, इत्यादि सूचित होतें.

**संति यद्यपि विद्वांसस्तन्निबंधाश्च कोटिशः ।। तथाप्यमुष्य वैदग्धीं केचिद्विज्ञातुमीशते ।। ८ ।।**

जरी कालनिर्णय जाणणारे विद्वान् व त्या विद्वानांचे ग्रंथ कोट्यवधि आहेत तथापि या ग्रंथाची कौशल्यशैली जाणण्याविषयीं कितीएक विद्वान् समर्थ होतात. ॥ ८ ॥

**तत्रसंक्षेपतःकालःषोढा अब्दोयनमृतुर्मासःपक्षोदिवसइति तत्राब्दोमाधवमतेपंचधा सावनःसौरश्चांद्रो नाक्षत्रोबार्हस्पत्यइति गुरोर्मध्यमराशिभोगेनबार्हस्पत्यः सचज्योतिःशास्त्रेप्रसिद्धः हेमाद्रिस्त्वंत्ययोर्धर्मशास्त्रेऽनुपयोगात्त्रिविधएवविधाआह तत्रवक्ष्यमाणैःसावनादिद्वादशमासैस्तत्तदब्दम् मलमासेतुसतिषष्टिदिनात्मकएको मासइतिद्वादशमासत्वमविरुद्धम् तथाचव्यासः षष्ट्यातुदिवसैर्मासःकथितोबादरायणैरिति ।**

## यानंतर प्रथमतः काळाचे भेद सांगतो.

**संक्षेपेंकरून काल सहा प्रकारचा**—तो असा-वर्ष, अयन, ऋतु, मास, पक्ष आणि दिवस. त्यामध्यें **माधव**मतीं **वर्ष पांच प्रकारचें** तें असें-सावन, सौर, चांद्र, नाक्षत्र आणि बार्हस्पत्य. बृहस्पतीच्या मध्यमराशिभोगानें ( मध्यमगतीनें ) **जें वर्ष होतें** तें बार्हस्पत्य. ( म्हणजे मेषादिक बारा राशींतून कोणताही एक राशि बृहस्पतीनें मध्यम गतीकरून भुक्त असतां **जें वर्ष होतें** त्याला **बार्हस्पत्य** वर्ष म्हणतात. ) तें वर्ष ज्योतिःशास्त्रांत प्रसिद्ध आहे. हे जे वर वर्षांचे पांच प्रकार सांगितले त्यांपैकीं नाक्षत्र वर्ष व बार्हस्पत्य वर्ष ह्या दोहोंचा उपयोग धर्मशास्त्रांत फारसा नाहीं, यास्तव हेमाद्रि तर सावन, सौर व चांद्र हे तीनच प्रकार सांगतो. त्यांमध्यें एथें पुढें सांगावयाचे जे सावनादिक मास ते बारा बारा झाले म्हणजे तें तें वर्ष होतें. मलमास आला असतां साठ दिवसांचा एक मास होतो म्हणून बारा मास झाले असतांच वर्ष होतें, याला कोणताही विरोध नाहीं. तेंच व्यास सांगतो-"( अधिक मास असतां ) साठ दिवसांचा एक मास बादरायणांनीं सांगितला आहे."

**तत्रचांद्रोब्दःषष्टिभेदः तदाहगार्ग्यः "प्रभवोविभवःशुक्लःप्रमोदोथप्रजापतिः अंगिराःश्रीमुखोभावोयुवाधातेश्वरस्तथा बहुधान्यःप्रमाथीचविक्रमोऽथवृषस्तथा चित्रभानुःसुभानुश्चतारणःपार्थिवोव्ययः सर्वजित्सर्वधारीचविरोधीविकृतिःखरः नंदनोविजयश्चैवजयोमन्मथदुर्मुखौ हेमलंबोविलंबोऽथविकारीशार्वरीप्लवः शुभकृच्छोभनःक्रोधीविश्वावसुपराभवौ प्लवंगःकीलकःसौम्यःसाधारणविरोधकृत् परिधावीप्रमादीचआनंदोराक्षसोऽनलः पिंगलःकालयुक्तश्चसिद्धार्थीरौद्रदुर्मती दुंदुभीरुधिरोद्गारीरक्ताक्षीक्रोधनःक्षय" इति ॥**

त्यांमध्यें चांद्रवर्षाचे साठ भेद ( नामें ) आहेत. ते **गार्ग्य** सांगतो-"प्रभव, विभव, शुक्ल, प्रमोद, प्रजापति, अंगिरा, श्रीमुख, भाव, युवा, धाता, ईश्वर, बहुधान्य, प्रमाथी, विक्रम, वृष, चित्रभानु, सुभानु, तारण, पार्थिव, व्यय, सर्वजित्, सर्वधारी, विरोधी, विकृति, खर, नंदन, विजय, जय, मन्मथ, दुर्मुख, हेमलंब, विलंब, विकारी, शार्वरी, प्लव, शुभकृत्, शोभन, क्रोधी, विश्वावसु, पराभव, प्लवंग, कीलक, सौम्य, साधारण, विरोधकृत्, परिधावी, प्रमादी, आनंद, राक्षस, अनल, पिंगल, कालयुक्त, सिद्धार्थी, रौद्र, दुर्मति, दुंदुभि, रुधिरोद्गारी, रक्ताक्षी, क्रोधन, क्षय. ( याप्रमाणें संवत्सरांचीं नामें साठ जाणावीं ).

**यद्यपिज्योतिषेगुरोर्मध्यमराशिभोगेनप्रभवादीनांमाघादौप्रवृत्तिरुक्ता तथापिप्रभवादीनांचांद्रत्वमप्यस्ति चांद्राणांप्रभवादीनांपंचकेपंचकेयुगेइतिमाधवोक्तेः तेनचांद्रप्रभवादिश्चैत्रसितेप्रवर्तते बार्हस्पत्यस्तुमाघादौ ।**

जरी ज्योतिःशास्त्रांत बृहस्पतीच्या मध्यम राशिभोगेंकरून ( मध्यम गतीकरून ) प्रभवादि संवत्सरांची प्रवृत्ति ( आरंभ ) माघशुक्लप्रतिपदेपासून सांगितली आहे; तथापि प्रभव, विभव इत्यादिक जीं साठ संवत्सरनामें तीं चांद्रवर्षांचींही नामें आहेत. कारण, "प्रभव इत्यादिक जे चांद्र संवत्सर त्यांच्याच-संवत्सर, परिवत्सर, इडावत्सर, अनुवत्सर व इद्वत्सर अशा युग( समूह )संज्ञक पंचकापंचकाचे ठायीं" होतो असें **माधवाचें** वचन आहे. तेणेंकरून प्रभव, विभव इत्यादिक चांद्रवर्षांची प्रवृत्ति ( आरंभ ) होणें ती चैत्रशुक्लप्रतिपदेस होते. बार्हस्पत्य वर्षाची प्रवृत्ति तर माघशुक्लपक्षांत होते.

**तयोर्विनियोगोज्योतिर्निबंधेब्रह्मसिद्धांते व्यावहारिकसंज्ञोऽयंकालःस्मृत्यादिकर्मसु योज्यःसर्वत्र तत्रापिजैवोवानर्मदोत्तरे आर्ष्टिषेणः स्मरेत्सर्वत्रकर्मादौचांद्रंसंवत्सरंसदा नान्यंयस्माद्वत्सरादौप्रवृत्तिस्तस्यकीर्तितेति अयनंतुसौरर्तुत्रयात्मकं सौरर्तुत्रितयंप्रदिष्टमयनमितिदीपिकोक्तेः तद्विविधम् दक्षिणमुत्तरंचेति कर्कसंक्रांतिर्दक्षिणायनं मकरेंत्यम् अनयोर्विनियोगमाहमदनरत्नेसत्यव्रतः देवतारामवाप्यादिप्रतिष्ठोदङ्मुखेरवौ दक्षिणाशामुखेकुर्वन्नतत्फलमवाप्नुयात् वैखानसः मातृभैरववाराहनारसिंहत्रिविक्रमाः**

**महिषासुरहंत्र्यश्चस्थाप्यावैदक्षिणायने वैशब्दोप्यर्थे नतुदक्षिणायनएवेतिनियमः पूर्ववचनेदक्षिणायनेनिषिद्धायादेवप्रतिष्ठायादेवविशेषेप्रतिप्रसवमात्रात् ।**

चांद्र व बार्हस्पत्य वर्षांचा विनियोग ( उपयोग ) **ज्योतिर्निबंधांत-ब्रह्मसिद्धांतांत** सांगतो—"व्यावहारिक संज्ञक असा हा काल ( चांद्रवर्ष ) स्मृत्युक्तादि कर्माचेठायीं संकल्पकालीं सर्वदेशांत योजावा; नर्मदेच्या उत्तरप्रदेशीं चांद्र अथवा बार्हस्पत्य योजावा." **आर्ष्टिषेण** म्हणतो—"सर्वत्र ठिकाणीं कर्माच्या आरंभीं संकल्पांत चांद्र वर्षाचाच उच्चार करावा, इतर वर्षाचा करूं नये; कारण, चांद्रवर्षाची प्रवृत्ति चैत्रशुक्लप्रतिपदेस सांगितली आहे." सौरऋतु तीन म्हणजे एक अयन होतें. कारण, 'सौरऋतु तीन तें अयन म्हटलें आहे' अशी **दीपिके**ची उक्ति आहे. तें अयन दोन प्रकारचें—एक दक्षिणायन आणि दुसरें उत्तरायण. कर्कसंक्रांतीपासून सहा संक्रांति ( म्हणजे ४-९ ) पर्यंत **दक्षिणायन.** मकरसंक्रांतीपासून मिथुनसंक्रांतीपर्यंत **उत्तरायण.** **ह्या दोन अयनांचा उपयोग मदनरत्नांत-सत्यव्रत** सांगतो—देवता, आराम, वापी, कूप, तलाव इत्यादिकांची प्रतिष्ठा ( अर्चा व उत्सर्ग हीं कर्मे ) रवि उत्तरायणस्थ असतां करावीं. दक्षिणायनस्थ रवि असतां हीं पूर्वोक्त कर्मे करणारास त्याचें फल लाभत नाहीं." **वैखानस** म्हणतो—"मातृका, भैरव, वाराह, नारसिंह, त्रिविक्रम, देवी, ह्यांची ( उग्रदेवतांची ) दक्षिणायनांतही स्थापना करावी." ह्या वाक्यांत 'वै' शब्द आहे तो अप्यर्थी आहे, याकरून दक्षिणायनांतच स्थापना करावी असा नियम नाहीं. कारण 'देवतारामवाप्यादि' ह्या पूर्ववचनेंकरून दक्षिणायनांत निषिद्ध केलेल्या देवप्रतिष्ठेचा "मातृभैरववाराह" ह्या वाक्यानें प्रतिप्रसव ( निषेधबाध ) मात्र सांगितला. म्हणजे माता, भैरव, वाराह इत्यादिकांची प्रतिष्ठा दक्षिणायनांतही करावी, व उत्तरायणांत करावीच इतकें सूचित केलें आहे.

**रत्नमालायाम्** गृहप्रवेशत्रिदशप्रतिष्ठाविवाहचौलव्रतबंधपूर्वम् सौम्यायनेकर्मशुभंविधेयंयद्गर्हितंतत्खलुदक्षिणेचेति अस्यापवादः**काशीखंडे** सदाकृतयुगंचास्तुसदाचास्तूत्तरायणम् सदामहोदयश्चास्तुकाश्यां निवसतांसतां इत्ययनम् ।

**रत्नमालेंत**-"गृहप्रवेश, देवांची अर्चा, विवाह, चौल, उपनयन इत्यादिक शुभकर्मे उत्तरायणांत करावीं; आणि जीं अशुभ कर्मे तीं दक्षिणायनांत करावीं." **याचा अपवाद काशीखंडांत** सांगितला आहे—"काशीनिवासी लोकांना सदा कृतयुग असो, सदा उत्तरायण असो, आणि सदा महोदय पर्व असो." याप्रमाणें अयननिर्णय जाणावा.

**ऋतुर्मासद्वयात्मा मलमासेतुमासद्वयात्मकएकोमासस्तेनमासद्वयात्मकत्वमविरुद्धम् सद्वेधा चांद्रःसौरश्च चैत्रारंभोवसंतादिश्चांद्रः मीनारंभोमेषारंभोवासौरः मीनमेषयोर्मेषवृषयोर्वावसंतइतिबौधायनोक्तेः अनयोर्विनियोगमाह त्रिकांडमंडनः** श्रौतस्मार्तक्रियाःसर्वाःकुर्याच्चांद्रमसर्तुषु तदभावेतुसौरर्तुष्विति ज्योतिर्विदांमतम् सद्विविधोपिषोढा वसंतोग्रीष्मोवर्षाःशरद्धेमंतःशिशिरः इत्यृतुः ।

**आतां ऋतु सांगतो**—दोन मास म्हणजे एक ऋतु होतो. मलमास असतां शुद्ध व मलमास मिळून एक मास होतो, म्हणून दोन मास म्हणजे एक ऋतु असें जें सांगितलें तें विरुद्ध नाहीं. तो ऋतु दोन प्रकारचा—**चांद्र** आणि **सौर**— चैत्रापासून आरंभ करून दोन दोन महिन्यांचा एकेक ऋतु असा मासपरत्वें जो वसंतादिक ऋतु तो **चांद्र** ऋतु. मीनसंक्रांतीपासून किंवा मेषसंक्रांतीपासून दोन दोन राशींस सूर्य असतां एकेक ऋतु होतो, असा जो संक्रांतिपरत्वें ऋतु तो **सौर** ऋतु. कारण, "मीन व मेष मिळून वसंत ऋतु; किंवा मेष व वृषभ मिळून वसंत ऋतु होतो" अशी **बौधायनाची** उक्ति आहे. **ह्या सौर व चांद्र ऋतूंचा विनियोग त्रिकांडमंडन** सांगतो–"श्रौत, स्मार्त इत्यादिक सर्व कर्मांचेठायीं संकल्पांत उच्चार करणें तो चांद्र ऋतूचा करावा, हें प्रशस्त. चांद्र ऋतूच्या अभावीं सौर ऋतूचा उच्चार करावा असें ज्योतिःशास्त्रज्ञांचें मत आहे." तो दोन्ही प्रकारचा ऋतु प्रत्येक सहा प्रकारचा आहे, ते प्रकार असे-वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद्, हेमंत आणि शिशिर. याप्रमाणें ऋतुनिर्णय जाणावा.

**मासश्चतुर्धा सावनःसौरश्चांद्रोनाक्षत्रइति त्रिंशद्दिनःसावनः अर्कसंक्रांतेःसंक्रांत्यवधिःसौरः यद्यपि हेमाद्रिमाधवकालादर्शाद्यालोचनेनमेषसंक्रांत्यांसमाप्तामावास्यकत्वंचैत्रत्वमितिलक्षणाच्चमेषसंक्रांतेश्चैत्रत्वंप्रतीयते तथापि मेषसंक्रमेदर्शद्वयेसतिवैशाखस्यैवाधिक्यात्तत्पूर्वभावित्वेनमीनस्यैवचैत्रत्वंयुक्तं एवंमेषादयो वैशाखाद्याः अतोमीनसंक्रांत्यामधिगतपौर्णमासिकत्वम् आद्यतिथिकत्वंवाचैत्रत्वमितिलक्षणात् मीनएवसौरश्चैत्रः एवंवैशाखादयोपिमेषाद्याज्ञेयाः ।**

**आतां मास सांगतो-मास चार प्रकारचा**—सावनमास, सौरमास, चांद्रमास आणि नाक्षत्रमास. तीस दिव-

मास तो सावनमास. सूर्यसंक्रांतीला आरंभ करून पुढच्या सूर्यसंक्रांतीच्या आरंभापर्यंत जो मास तो **सौर**मास. जरी **हेमाद्रि, माधव, कालादर्श** इत्यादि ग्रंथांचें आलोचन ( विचार ) केल्यानें, आणि मेष संक्रांतींत समाप्त आहे अमावास्या ज्याची तो चैत्र, अशा लक्षणावरूनही मेष संक्रांतीला चैत्रत्व आहे, असें समजतें, तथापि मेषसंक्रांतींत दोन अमावास्या आल्या असतां, मेषसंक्रांतींत दुसरी अमावास्या आलेला जो मास तो अधिक वैशाखच आहे, म्हणून त्याच्या पूर्वींचा मीनसंक्रांति असलेला तो चैत्र आहे, म्हणून मीनाला चैत्र म्हणणें युक्त आहे. याचप्रमाणें मेषादिक ते वैशाखादि समजावे. आतां वरील लक्षणाला दोष येतो म्हणून, असें लक्षण करावें कीं, मीनसंक्रांतींत प्राप्त आहे पौर्णिमा ज्याची तो चैत्र—असें केलें तरी शुक्लपक्षांत मेषसंक्रांति झाली असतां, त्या ठिकाणीं हें लक्षण येणार नाहीं म्हणून निर्दोष लक्षण सांगतो–मीनसंक्रांतींत प्राप्त आहे आद्यतिथि ज्याची तो चैत्र, असें लक्षण केलें आहे म्हणून मीनच सौर चैत्र होतो, याप्रमाणें वैशाखादिकही मेषादिक जाणावे.

**सौरमासप्रसंगात्संक्रांतिनिर्णयउच्यते** तत्र पूर्वतोपिपरतोपिसंक्रमात्पुण्यकालघटिकास्तुषोडशेतिसामान्यतःपुण्यकालःसर्वैरुक्तः विशेषस्तूच्यते अत्रमामकाःसंग्रहश्लोकाः प्रागूर्ध्वादशपूर्वतःषडवमिश्रद्वत्पराःपूर्वतस्त्रिंशत्षोडशपूर्वतोथपरतःपूर्वाःपराःस्युर्दश पूर्वाःषोडशचोत्तराऋतुभुवःपश्चात्खवेदाःपुनः पूर्वाःषोडशचोत्तराःपुनरथोपुण्यास्तुमेषादितः अस्यार्थः मेषेप्रागूर्ध्वंचदशघटिकाःपुण्यकालः वृषेपूर्वाःषोडश मिथुने पराःषोडश कर्केपूर्वास्त्रिंशत् सिंहेपूर्वाःषोडश कन्यायांपराःषोडश तुलायांप्रागूर्ध्वादश वृश्चिकेपूर्वाःषोडश धनुषिपराःषोडश मकरेचत्वारिंशत्पराः इदंच**हेमाद्रिमते**नोक्तम् **माधवमते**त्वत्रपराविंशतिः पुण्याः कुंभेपूर्वाःषोडश मीनेपराःषोडशेति याप्युत्तरापुण्यतमामयोक्तासायंभवेत्सायदिसापिपूर्वा पूर्वातुयोक्तायदिसाविभातेसाप्युत्तरारात्रिनिषेधतःस्यात् अर्वाङ्निशीथाद्यदिसंक्रमःस्यात्पूर्वेह्निपुण्यंपरतःपरेह्नि आसन्नयामद्वयमेवपुण्यंनिशीथमध्येतुदिनद्वयंस्यात् कर्केझषेप्येवमितिह्युवाच**हेमाद्रिसूरिश्चतथापरार्कः** झषःप्रदोषेयदिवार्धरात्रेपरेह्निपुण्यंत्वथकर्कटश्चेत् प्रभातकालेयदिवानिशीथेपूर्वेह्निपुण्यंत्विति**माधवार्यः** अत्रमूलवचनानि**माधवापरार्कहेमाद्र्यादि**षुद्रष्टव्यानि ।

## सौर मासाच्या प्रसंगानें संक्रांतिनिर्णय सांगतो.

'संक्रांतिप्रवेशापासून पूर्वी व पश्चात् सोळा सोळा घटिका पुण्यकाल' याप्रमाणें सर्व ग्रंथकारांनीं सामान्येंकरून पुण्यकाळ सांगितला आहे. **विशेष सांगतो**–एथें माझे संग्रह श्लोक—"मेषसंक्रांतीच्या पूर्व दहा व पर दहा घटिका पुण्यकाळ. वृषभसंक्रांतीच्या पूर्व सोळा घटिका पुण्यकाळ. मिथुनसंक्रांतीच्या पुढच्या सोळा घटिका पुण्यकाळ. कर्कसंक्रांतीच्या पूर्वींच्या तीस घटिका पुण्यकाळ. सिंहसंक्रांतीच्या पूर्वींच्या सोळा घटिका पुण्यकाळ. कन्यासंक्रांतीच्या पुढच्या सोळा घटिका पुण्यकाळ. तुलासंक्रांतीच्या पूर्वींच्या १० व पुढच्या १० घटिका पुण्यकाळ. वृश्चिकसंक्रांतीच्या पूर्वींच्या १६ घटिका. धनुःसंक्रांतीच्या पुढच्या १६ घटिका पुण्यकाळ. मकरसंक्रांतीच्या पुढच्या ४० घटिका. ह्या मकरसंक्रांतीच्या पुण्यकाळ घटिका **हेमाद्रिमतीं** सांगितल्या. **माधवमतीं** तर पुढच्या वीस घटिका पुण्यकाळ. कुंभसंक्रांतीच्या पूर्वींच्या सोळा. मीनसंक्रांतीच्या पुढच्या सोळा घटिका पुण्यकाळ. ज्या संक्रांतीचा पुण्यकाळ, संक्रांति झाल्यावर पुढें सांगितला, ती संक्रांति सायंकाळीं होईल तर तिचाही पुण्यकाळ पूर्वीं समजावा. आणि जिचा पर्वकाळ संक्रांति होण्याच्या पूर्वीं सांगितला, ती प्रातःकाळीं होईल तर तिचा पर्वकाळ पुढें समजावा. कारण, पर्वकाळाचा रात्रीं निषेध आहे. मध्यरात्रीच्या पूर्वीं संक्रांत होईल तर पूर्वदिवसाचें उत्तरार्ध पुण्यकाळ. मध्यरात्रीच्या पुढें संक्रांत होईल तर दुसऱ्या दिवसाचें पूर्वार्ध पुण्यकाळ. मध्यरात्रींच संक्रांत होईल तर पूर्व दिवसाचें उत्तरार्ध आणि दुसऱ्या दिवसाचें पूर्वार्ध असा दोनही दिवशीं पुण्यकाळ. कर्क व मकर ह्या संक्रांतींचाही असाच निर्णय होतो, असें **हेमाद्रि** व **अपरार्क** सांगतात. मकरसंक्रांत प्रदोषकाळीं किंवा मध्यरात्रीं होईल तर दुसऱ्या दिवशीं पुण्यकाळ. कर्कसंक्रांत प्रातःकाळीं किंवा मध्यरात्रीं होईल तर पूर्वदिवशीं पुण्यकाळ, असें **माधवाचार्य** सांगतो." ह्यांचीं मूलवचनें **माधव, अपरार्क, हेमाद्रि** इत्यादिक ग्रंथांत पहावीं.

सर्वासुसंक्रांतिषुदानविशेषो**हेमाद्रौदानकांडेउक्तः विश्वामित्रः** मेषसंक्रमणेभानोर्मेषदानंमहाफलं वृषसंक्रमणेदानंगवांप्रोक्तंतथैवच वस्त्रान्नपानदानानिमिथुनेविहितानितु घृतधेनुप्रदानंचकर्कटेपिविशिष्यते ससुवर्णछत्रदानंसिंहेपिविहितंसदा कन्याप्रवेशेवस्त्राणांवेश्मनांदानमेवच तुलाप्रवेशेतिलानांगोरसानामपीष्टदं अन्नकीचलितेभानौदीपदानंमहाफलं अन्नकीवृश्चिकः धनुःप्रवेशेवस्त्राणांयानानांचमहाफलं झष-

प्रवेशेदारूणांदानमग्नेस्तथैवच कुंभप्रवेशेदानंतुगवामंबुतृणस्यच मीनप्रवेशेस्थानानांमालानामपिचोत्तममिति ।

## यानंतर मेषादिसंक्रांतींचे ठायीं दानें सांगतो.

**हेमाद्रींत-दानकांडांत—विश्वामित्र—**मेषसंक्रांतीचे ठायीं भानूच्या मेंढ्याचें दान करावें. वृषभसंक्रांतीचे ठायीं गोप्रदान सांगितलें आहे. मिथुनसंक्रांतीचे ठायीं वस्त्र, अन्न, पान इत्यादि दानें सांगितलीं आहेत. कर्कसंक्रांतीचे ठायीं घृतधेनूचें दान; सिंहसंक्रांतीचे ठायीं सुवर्ण व छत्र यांचें दान सदा विहित आहे. कन्यासंक्रांतीचे ठायीं वस्त्र, गृह यांचें दान; तुलासंक्रांतीचे ठायीं तिल, गोरस यांचें दान; वृश्चिकसंक्रांतीचे ठायीं दीपदान महाफल देणारें आहे. धनुःसंक्रांतीचे ठायीं वस्त्रें व वाहनें यांचें दान महाफल देणारें आहे. मकरसंक्रांतीचे ठायीं काष्ठें, अग्नि यांचें दान करावें. कुंभसंक्रांतीचे ठायीं गाई, उदक, तृण यांचें दान विहित आहे. मीनसंक्रांतीचे ठायीं राहण्याचीं स्थानें, पुष्पमाला यांचें दान उत्तम आहे.

अत्रोपवासमाह**हेमाद्रावापस्तंबः** अयनेविषुवेचैवत्रिरात्रोपोषितोनरः स्नात्वायस्त्वर्चयेद्भानुंसर्वकामफलंलभेत् अशक्तौतु**वृद्धवसिष्ठः** अयनेसंक्रमेचैवग्रहणेचंद्रसूर्ययोः अहोरात्रोषितःस्नात्वासर्वपापैःप्रमुच्यते अत्रोपवासःसंक्रमदिने दानादितुपुण्यकालदिन**इत्याचार्यचूडामणिः** विधिलाघवात् पुण्यकालदिनएवोभयमितिवृद्धाः इदंचपुत्रिगृहस्थातिरिक्तविषयं आदित्येहनिसंक्रांतौग्रहणेचंद्रसूर्ययोः उपवासोनकर्तव्यःपुत्रिणागृहिणातथेति**जैमिनि**वचनात् ।

**संक्रांतीचे ठायीं उपोषण सांगतो—हेमाद्रींत-आपस्तंब—**"अयन ( कर्क व मकर ) संक्रांति आणि विषुव ( मेष, तुला ) संक्रांति यांचे ठायीं जो मनुष्य त्रिरात्र उपोषण करून स्नान करून सूर्याची पूजा करील त्याला सर्व कामफल प्राप्त होईल." त्रिरात्र उपोषणाविषयीं शक्ति नसेल तर-**वृद्धवसिष्ठ** म्हणतो—"अयनसंक्रांति आणि चंद्रसूर्यांचें ग्रहण यांचे ठायीं अहोरात्र उपोषण करून स्नान करावें, म्हणजे सर्व पापांपासून मुक्त होतो." संक्रांतिनिमित्तानें उपवास करणें तो संक्रांतिदिवशीं करावा, आणि दानादिक करणें तीं पुण्यकालदिवशीं करावीं, असें **आचार्यचूडामणि सांगतो.** दोघांचा मिळून एक विधि केला असतां लाघव येतें, म्हणून पुण्यकालदिवशींच उपोषण व दानादिक करावें असें **वृद्ध** सांगतात. हें उपोषण पुत्रवान् गृहस्थाश्रमी यानें करूं नये; इतरांनीं करावें. कारण, "रविवार, संक्रांति, चंद्रसूर्यग्रहण, यांचे ठायीं पुत्रवान् गृहस्थाश्रम्यानें उपोषण करूं नये" असें **जैमिनीचें** वचन आहे.

अत्रश्राद्धमुक्तं**हेमाद्रौविष्णुधर्मे** श्राद्धंसंक्रमणेभानोःप्रशस्तंपृथिवीपते **अपरार्केपिविष्णुः** आदित्यसंक्रमणंविशेषेणायनद्वयंजन्मभमभ्युदयश्च एतांस्तुश्राद्धकालान्वैकाम्यानाहप्रजापतिरिति द्वादशाविदिनैरर्वागयनांशप्रवृत्तावपिपुण्यंवक्तुमयनग्रहणम् अन्यथासंक्रमेणसिद्धेरयनग्रहणंव्यर्थंस्यादित्य**परार्कः हेमाद्रावपिगालवः** अयनांशकतुल्येनकालेनैवस्फुटंभवेत् मृगकर्कादिगेसूर्येयाम्योदगयनेसति तदासंक्रांतिकालेस्युरुक्ताविष्णुपदादयइति अयनांशच्युतिरूपेसंक्रांतिकालेपिविष्णुपदादयःप्रवर्तंते तेनतत्प्रयुक्तंपुण्यकालादितत्रापिज्ञेयमितिसएवव्याचख्यौ तच्चमेषायनंवृषायनमित्यादिसर्वत्रज्ञेयं **माधवीयेपिजाबालिः** संक्रांतिपुयथाकालस्तदीयेप्ययनेतथा अयनेविंशतिःपूर्वामकरेविंशतिःपरेति मकरायणेपूर्वा विंशतिघटिकाःपुण्याः मकरसंक्रांतौतुपश्चाद्विंशतिपुण्याः अन्यत्रायनेतत्संक्रांतिवदित्यर्थः ।

संक्रांतीचे ठायीं श्राद्ध करावें, असें सांगितलें आहे. **हेमाद्रींत-विष्णुधर्मांत**—"सूर्यसंक्रांतीचेठायीं श्राद्ध करणें प्रशस्त होय." **अपरार्कांत**ही-**विष्णु** म्हणतो—"सूर्यसंक्रमण, विशेषेंकरून दोन अयनें, जन्मनक्षत्र, अभ्युदय (मांगलिक कर्म) हे श्राद्धकाल काम्य ( मनोरथ पूर्ण करणारे ) होत असें प्रजापति सांगतो." संक्रांतिप्रवेशापेक्षां बारा इत्यादि दिवस पूर्वी अयनांशप्रवृत्ति झाली असतांही त्या अयनांशप्रवृत्तीचे ठायीं पुण्य सांगण्यासाठीं वरील वचनांत अयनशब्दाचें ग्रहण केलें आहे. असें नसेल तर संक्रमशब्दानेंच संक्रांतीचें ग्रहण झालें असतां अयनग्रहण व्यर्थ होईल, असें **अपरार्क सांगतो.** **हेमाद्रींत**ही-**गालव** म्हणतो—मृग म्हणजे मकर राशीच्या आद्यक्षणीं व कर्क राशीच्या आद्यक्षणीं सूर्य गेला असतां जें उत्तरायण व दक्षिणायन होतें, त्यांत अयनांश वजा केले म्हणजे तें उत्तरायण व दक्षिणायन स्पष्ट होतें, त्या स्पष्ट केलेल्या अयनसंक्रांतीलाही ( जे अयनांश असतील ते भोगण्याच्या पूर्वी अयनसंक्रांति होते, तेथें देखील ) ( संक्रांतीस असलेल्या )

---

१ संक्रांतिप्रवेशकालाच्या पूर्वी बारा दिवस अयनांशप्रवृत्ति पूर्वकालीं होत असे, सांप्रतकालीं ग्रहलाघवाच्या आधारानें पाहिलें असतां संक्रांतिदिवसाच्या पूर्वी सुमारें २३ दिवस अयनांशप्रवृत्ति होते. तेंच उत्तरायण व दक्षिणायन स्पष्ट समजावें.

**विष्णुपदादिक** संज्ञा प्रवृत्त होतात, त्या विष्णुपदादिक संज्ञा असल्यामुळें जें पुण्यकालादि तें तेथेंही जाणावें, अशी "अयनांशक०" ह्या वचनाची व्याख्या त्यानेंच ( हेमाद्रीनेंच ) केली आहे. तीं अयनें मेषायन, वृषायन, इत्यादि सर्व जाणावीं. **माधवीयांत**ही—**जाबालि** म्हणतो—"जसा संक्रांतीचे ठायीं पुण्यकाळ तसाच संक्रांतीच्या अयनकालींही पुण्यकाळ जाणावा. मकरायणाचेठायीं पूर्वीच्या वीस घटिका पुण्यकाळ. आणि मकर संक्रांतीच्या पुढच्या वीस घटिका पुण्यकाळ इतका विशेष. इतर अयन पर्वकाल घटिका त्या त्या संक्रांतीप्रमाणें जाणाव्या.

विष्णुपदादिस्वरूपं**दीपिकायामुक्तम्** हर्यग्रिवृषसिंहवृश्चिकघटेष्वर्कस्यय:संक्रम:कन्यामीनधनुर्नृयुक्षुषडशीत्याख्यंतुलामेषयोः प्रोक्तंतद्विषुवंझषेयनमुदक्कर्कोटकेदक्षिणमिति हर्यग्रिर्विष्णुपदम् नृयुक्मिथुनं अत्रचपिंडरहितंश्राद्धंकुर्यात् तथा**चापरार्केमात्स्ये** अयनद्वितयेश्राद्धंविषुवद्वितयेतथा संक्रांतिषुचसर्वासु पिंडनिर्वपणादृतइति **श्राद्धशूलपाणि**स्त्वस्यनिर्मूलत्वात् समूलत्वेपि ततःप्रभृतिसंक्रांतावुपरागादिपर्वसु त्रिपिंडमाचरेच्छ्राद्धमेकोद्दिष्टंमृताहनीतिमात्स्योक्तेर्ग्रहणाग्रहणवद्विकल्पएवेत्याह तन्न अस्यपार्वणानुवादकत्वेनपिंडाविधायकत्वात् पिंडोव्यक्तिः अन्यथैकपदेपिंडानुवादेत्रित्वविधौवषट्कर्तुःप्रथमभक्षवद्वैरूप्यापत्तेः तथाचोभयसमूलत्वेपिंडरहितंपार्वणंकर्तव्यमित्युभयवचनयोरर्थः त्रिपिंडशब्देनैकोद्दिष्टव्यावर्तनमात्रम् ।

**विष्णुपदादिकांचें स्वरूप सांगतो—दीपिका**—वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ, ह्या संक्रांतींला **विष्णुपद**संज्ञा. मिथुन, कन्या, धनु, मीन ह्या संक्रांतींला **षडशीति**संज्ञा. मेष, तुला त्यांना **विषुव**संज्ञा. मकरसंक्रांतीला **उदगयन,** आणि कर्कसंक्रांतीला **दक्षिणायन** अशा संज्ञा आहेत. श्लोकांत 'नृयुक' पदाचा मिथुन हा अर्थ समजावा. त्या संक्रांतीचे ठायीं पिंडरहित श्राद्ध करावें तेंच **अपरार्कांत-मात्स्यांत** सांगतो—"दोन अयनें, दोन विषुवें, आणि सर्व संक्रांती यांचे ठायीं पिंडरहित श्राद्ध करावें." **श्राद्धशूलपाणि** तर असें म्हणतो कीं, हें वचन निर्मूळ आहे म्हणून पिंडनिषेध नाहीं. कदाचित् तें वचन समूल जरी असेल तथापि "सपिंडीच्या पुढें संक्रांति, ग्रहण इत्यादि पर्वणीचे ठायीं त्रिपिंडश्राद्ध करावें, आणि मृतदिवशीं एकोद्दिष्ट करावें[1]" असें **मात्स्य**वचन असल्यामुळें षोडशीपात्राच्या ग्रहणाचा जसा विकल्प आहे[2] तसा पिंडनिर्वपणाचाही विकल्पच होतो, असें सांगतो; तें बरोबर नाहीं; कारण, "ततःप्रभृति" हें वचन पार्वणाचें अनुवादक आहे, म्हणजे इतर वचनानें जें पार्वण प्राप्त झालें, त्याचाच या वाक्यानें 'त्रिपिंड' या पदानें अनुवाद केला, त्रिपिंड म्हणजे तीन व्यक्ति ( तीन पितर ) यांचें करावें, अशा रीतीनें पार्वणाचा अनुवाद करणारें असल्यामुळें तें वचन पिंडविधायक होत नाहीं. असें न मानितां जर पिंडविधायक आहे असें मानिलें तर, श्राद्धशब्दाचा अर्थच पिंडदान व ब्राह्मणभोजन हा असल्यामुळें पिंड सिद्धच आहे म्हणून त्याचें विधान होत नाहीं. आतां पिंडाचा अनुवाद न करून त्रित्वाचें विधान केलें तर जसा—'वषट्कर्तुः प्रथमभक्षः' असें वाक्य आहे, त्या वाक्यानें वषट्कर्ता म्हणजे होता त्याला हविःशेषाचें प्रथम भक्षण सांगितलें आहे, त्या ठिकाणीं इतर ऋत्विजांबरोबर होत्यालाही प्राप्त झालें जें भक्षण त्या भक्षणाला प्राथम्याचें विधान करावें, असें पूर्वपक्षी म्हणतो, परंतु तसें करणें म्हणजे 'प्रथमभक्ष' ह्या समास केलेल्या पदाचा 'जो प्राप्त झालेला भक्ष तो प्रथम' असा विच्छेद करून संबंध केला पाहिजे, तो केला तर, प्रथमभक्ष या पदाला विरूपता म्हणजे विच्छिन्नरूपता प्राप्त होईल, हें दूषण दिलें आहे[3], त्याचप्रमाणें एथें 'जे पिंड ते तीन' असा 'त्रिपिंड' याचा विच्छेद करून अन्वय केला असतां वैरूप्यता म्हणजे विच्छिन्नरूपतारूप दोष प्राप्त होईल हें तात्पर्य. ("अयनद्वितये श्राद्धं०;" "ततःप्रभृति संक्रांतौ"० ) हीं दोनही वचनें समूल होत असें मानून पिंडरहित व पार्वणरूप असें श्राद्ध करावें, याप्रमाणें दोन वचनांचा व्यवस्थित अर्थ समजावा. आतां वरील 'त्रिपिंड' शब्दानें पार्वणाचा जो अनुवाद केला आहे तेणेंकरून एकोद्दिष्ट करूं नये इतकेंच सूचित होतें.

मंगलकृत्येषुविशेषमाह**ज्योतिर्निबंधेनारदः** त्याज्याःसूर्यस्यसंक्रांतेःपूर्वतःपरतस्तथा विवाहादिषु कार्येषुनाड्यःषोडशषोडशेति एतत्पुण्यकालोपलक्षणं भानोःसंक्रांतिभोगश्चकुलिकश्चार्धयामकइति **ज्योतिःप्रकाशे**वर्ज्येषुपरिगणनात् ।

---

१ मृतदिवशीं एकोद्दिष्ट करावें किंवा पार्वण करावें त्याचा विचार उत्तरार्धांत क्षयाहश्राद्धनिर्णयप्रसंगीं केलेला आहे, त्यावरून विकल्प सिद्ध होतो. अर्थात् देशाचाराप्रमाणें करावें असें सिद्ध केलें आहे.

२ सोमरसाच्या पात्रांपैकीं एका पात्राला षोडशी हें नांव आहे. ज्योतिष्टोमाची संस्था अतिरात्र म्हणून आहे. तेथें "अतिरात्रे षोडशिनं गृह्णाति । नातिरात्रे षोडशिनं गृह्णाति । अशीं दोन प्रकारचीं वाक्यें असल्यामुळें अतिरात्रांत षोडशी पात्राच्या ग्रहणाचा विकल्प होतो. न्यायमाला अ० १० पा० ८ अधि. ३. ३ आद्यभक्षो वषट्कर्तुः० न्यायमाला अ० ३ पा० ५ अधि० १०.

**विवाहादि मंगलकार्याचेठायीं विशेष सांगतो-ज्योतिर्निबंधांत नारद** म्हणतो—"विवाहादि मंगलकार्याचेठायीं, सूर्यसंक्रांतीच्या पूर्व व पर अशा साधारणपक्षीं सोळा सोळा घटिका टाकाव्या." हें सांगणें पुण्यकालाचें उपलक्षण आहे; ( म्हणजे ज्या संक्रांतीचा जितका पुण्यकाल आहे तितक्या घटिका टाकाव्या असा अर्थ होतो ) कारण, सूर्याचा संक्रांतिभोग, व कुलिक अर्धयाम ( चार घटिका ) हा टाकावा" असें **ज्योतिःप्रकाश**ग्रंथांत वर्ज्य प्रकरणीं परिगणन केलें आहे. यावरून पुण्यकालाच्या सर्व घटिका टाकाव्या.

अयनव्यतिरिक्तासुदशसुसंक्रांतिषुरात्रौस्नानश्राद्धादिनकार्यं अह्निसंक्रमणेकृत्स्नमहःपुण्यंप्रकीर्तितं रात्रौसंक्रमणेभानोर्दिनार्धंस्नानदानयोः अर्धरात्रादधस्तस्मिन्मध्याह्नस्योपरिक्रिया ऊर्ध्वंसंक्रमणेचोर्ध्वमुदयात्प्रहरद्वयं पूर्णेचेदर्धरात्रेतुयदासंक्रमतेरविः प्राहुर्दिनद्वयंपुण्यंमुक्त्वामकरकर्कटाविति**वृद्धवसिष्ठा**दिवचनैरहःपुण्यत्वोक्त्या रात्रौसंक्रमणेभानोर्दिवाकुर्यात्तुतत्क्रियां पूर्वस्मात्परतोवापिप्रत्यासन्नस्यतत्फलमिति**वसिष्ठ**वचनाच्चार्थाद्रात्रौस्नानादिनिषेधप्रतीतेः यानितु विवाहव्रतसंक्रांतिप्रतिष्ठाऋतुजन्मसु तथोपरागपातादौ स्नानेदानेनिशाशुभेति राहुदर्शनसंक्रांतिविवाहात्ययवृद्धिषु स्नानदानादिकंकुर्युर्निशिकाम्यव्रतेषुचेत्यादीनि **विष्णुगोभिला**दिवचनानितानिमकरकर्कसंक्रांतिविषयाणि मुक्त्वामकरकर्कटाविवितितयोर्दिवानुष्ठानस्यपर्युदस्तत्वादिति**हेमाद्रिमाधवादयः** ।

अयन ( मकर व कर्क ) व्यतिरिक्त ज्या दहा संक्रांति त्यांविषयीं रात्रीं स्नान, दान, श्राद्धादिक करूं नये; कारण, "दिवसा संक्रांत झाली असतां संपूर्ण दिवस पुण्यकाळ; रात्रीं संक्रांत झाली असतां स्नानदानाविषयीं अर्धा दिवस पुण्यकाळ; मध्यरात्रीच्यापूर्वी संक्रांत झाली असेल तर पूर्व दिवसाचें उत्तरार्ध पुण्यकाळ; मध्यरात्रीच्या पुढें संक्रांत झाली असतां उत्तर दिवसाचें पूर्वार्ध पुण्यकाळ; पूर्ण मध्यरात्रीं संक्रांत झाली असतां दोन दिवस पुण्यकाळ म्हणजे पूर्वदिवसाचें उत्तरार्ध आणि उत्तर दिवसाचें पूर्वार्ध पुण्यकाळ, परंतु मकर व कर्क वर्ज्य करून हा निर्णय जाणावा" ह्या **वृद्धवसिष्ठादिकांच्या** वचनेंकरून दिवसा पुण्यकाल सांगितला असल्याकारणानें आणि "सूर्यसंक्रांत रात्रीं झाली असतां तत्संक्रांतिसंबंधी जें स्नानदान करणें तें दिवसा करावें; तो दिवस पूर्वीचा किंवा पुढचा जो सन्निध असेल तो घ्यावा" ह्या **वसिष्ठ**वचनावरूनही, अर्थात् रात्रीं स्नानदानादिक करूं नये, असा निषेध प्रतीयमान होतो. आतां जीं वचनें—"विवाह, व्रत, संक्रांति, प्रतिष्ठा, ऋतु, जन्म, ग्रहण, पात, इत्यादिनिमित्तक स्नान दान करण्याविषयीं रात्री शुभ आहे." हें आणि "ग्रहण, संक्रांति, विवाह, अत्यय, ( मरण ), वृद्धी ( पुत्रजन्म ) आणि काम्यव्रतें, एतन्निमित्तक स्नानदानादिक रात्रीं करावें." इत्यादिक **विष्णु—गोभिल** इत्यादिकांचीं वचनें तीं मकर व कर्कसंक्रांतिविषयक जाणावीं; कारण, वरील **वृद्धवसिष्ठ**वचनांत ( मुक्त्वा मकरकर्कटौ ) 'मकर व कर्क वर्ज्य करून' असें म्हटलें आहे, यास्तव रात्रीं झालेल्या मकर कर्कनिमित्तक स्नानदान दिवसा करण्याविषयीं पर्युदास ( निषेध ) आहे, असें **हेमाद्रि, माधव** इत्यादिक म्हणतात.

वस्तुतस्तु प्रागुक्तवचनेनतयोर्दिनद्वयपुण्यत्वादेरेवपर्युदासान्मकरकर्कटयोरपि स्नानंदानंपरेह्नीत्यादिभिरहःपुण्यत्वोक्तेः अहःपुण्यत्वानुपपत्त्याकल्प्यरात्रिनिषेधस्यचप्रत्यक्षरात्रिविधिनाबाधात्सर्वसंक्रांतिषुरात्रावनुष्ठानविकल्पः सचदेशाचाराद्व्यवतिष्ठतइतियुक्तःपंथाः अयनयोस्तुवक्तव्योविशेषःश्रावणेमाघेचवक्ष्यते **ज्योतिर्निबंधेगर्गः** यस्यजन्मर्क्षमासाग्ररविसंक्रमणंभवेत् तन्मासाभ्यंतरेतस्यवैरक्लेशधनक्षयाः तगरसरोरुहपत्रैरजनीसिद्धार्थलोध्रसंयुक्तैः स्नानंजन्मर्क्षगतेरविसंक्रमणेनृणांशुभदं **हेमाद्रौ** अह्निचेद्रात्रियुग्मंस्याद्रात्रौचेद्वासरद्वयं संक्रांतिःपक्षिणीज्ञेयादानाध्ययनकर्मसु **यत्तुगौडाः** संक्रांत्यांपक्षयोरंतेद्वादश्यांश्राद्धवासरे सायंसंध्यांनकुर्वीतकुर्वंश्चपितृहाभवेदिति**कर्मोपदेशिन्यांव्यासोक्तेः**सायंपुण्यकालेसंध्यानिषेधमाहुः तन्निर्मूलं अन्यच्चबहुवक्तव्यंविस्तरभीतेर्नोच्यते इतिसंक्रांतिनिर्णयः ।

वास्तविक म्हटलें तर पूर्वीच्या **वृद्धवसिष्ठाच्या** वचनानें, मकर व कर्क ह्या संक्रांतींला इतर संक्रांतींप्रमाणें दोन दिवस पुण्यकाळ प्राप्त झाला, तो दोन दिवस पुण्यकाळ यांना नाहीं, इतकाच निषेध असल्यामुळें; मकर व कर्क यांना देखील स्नान, दान दुसऱ्या दिवशीं करावें इत्यादि वचनांनीं दिवसा पुण्यकाळ सांगितला असल्यामुळें; दिवसा पुण्यकाळ सांगितल्यावरून, अर्थात् रात्रीं स्नानदानादिकांचा निषेध कल्पित होतो, त्या कल्पित केलेल्या निषेधाचा 'विवाहव्रतसंक्रांति०' 'राहुदर्शनसंक्रांति०' इत्यादि वचनांनीं प्रत्यक्ष सांगितलेल्या रात्रिविधीनें बाध होत असल्यामुळें, सर्व संक्रांतींचे ठिकाणीं रात्रौ स्नानदानादिकांचा विकल्प होतो, ( म्हणजे रात्रीं संक्रांत झाली असतां रात्रीं स्नानादिक करावें, अथवा न करावें;

असें सूचित होतें ) त्या विकल्पाची, ज्या देशांत जसा आचार असेल तदनुरूप व्यवस्था जाणावी, हाच योग्य मार्ग होय. कर्क व मकर या दोन संक्रांतींविषयीं कांहीं विशेष सांगावयाचा आहे तो, श्रावण व माघ यांच्या निर्णयप्रसंगीं पुढें सांगूं. ज्याच्या जन्मराशीस सूर्यसंक्रमण होतें त्याला त्या महिन्यांत वैर, क्लेश, द्रव्यनाश इत्यादि पीडा होतात. **त्याचा परिहार-** तगर व कमल यांचीं पत्रें, हळद, सर्षप, लोध्र यांच्या उदकानें स्नान करावें, तेणेंकरून जन्मस्थ सूर्यसंक्रमणसंबंधी पीडा दूर होऊन कल्याण होतें. **संक्रांतीचा अनध्याय-हेमाद्रींत** सांगितला आहे कीं—दिवसा संक्रांत झाली असतां पूर्व रात्र, पुढची रात्र आणि संक्रांतिदिवस यांचेठायीं दान व अध्ययन करूं नये. रात्रीं झाली असतां पूर्व दिवस, पुढचा दिवस आणि ती रात्र यांचे ठायीं दान व अध्ययनादि करूं नये." आतां जें **गौड** सांगतात-"संक्रांत, अमावास्या, पौर्णिमा, द्वादशी, श्राद्धदिवस यांचे ठायीं सायंसंध्या करूं नये, केली असतां पितृहा होतो असें **कर्मोपदेशिनी** ग्रंथांत **व्यास**वचन आहे, म्हणून 'सायंकाळीं संक्रांतिपुण्यकाळीं संध्या करूं नये' असें जें गौड सांगतात, तें निर्मूल होय. आणखी दुसरे निर्णय संक्रांतिविषयक बहुत सांगावयाचे आहेत परंतु ग्रंथविस्तार फार होईल याकरितां ते येथें सांगत नाहीं. **याप्रमाणें संक्रांतीचा निर्णय समाप्त झाला.**

**पक्षयुगजश्चांद्रोमासः सद्वेधा शुक्लादिरमांतः कृष्णादिःपूर्णिमांतश्चेति तथाच त्रिकांडमंडनः चांद्रोपि शुक्लपक्षादिःकृष्णादिर्वेतिचद्विधेत्युक्त्वा देशभेदेनतद्व्यवस्थामाह कृष्णपक्षादिकंमासंनांगीकुर्वंतिकेचन येपीच्छंतिनतेषामपीष्टोविंध्यस्यदक्षिणेइति विंध्यस्यदक्षिणेकृष्णादिनिषेधादुत्तरतोद्वयोरभ्यनुज्ञागम्यते तत्रापिशुक्लादिर्मुख्यः कृष्णादिर्गौणः शास्त्रेषुचैत्रशुक्लप्रतिपद्येवचांद्रसंवत्सरारंभोक्तेः तदुक्तंदीपिकायां चांद्रोब्दो-मधुशुक्लगप्रतिपदारंभइति नहियेकृष्णादिंमन्यंतेतेषांवत्सरारंभोभिद्यते अतःशुक्लादिर्मुख्यः कृष्णादिनामलमासासंभवाच्च चंद्रस्यसर्वनक्षत्रभोगेननाक्षत्रोमासः सावनादीनांव्यवस्थोक्ताहेमाद्रौब्रह्मसिद्धांते अमावास्यापरिच्छिन्नोमासःस्याद्ब्राह्मणस्यतु संक्रांतिपौर्णमासीभ्यांतथैवनृपवैश्ययोः अत्रब्राह्मणादीनांयत्रकर्मविशेषेवचनांतरेणवसंतेब्राह्मणोग्नीनादधीतेत्यादिवन्मासउक्तस्तत्रदर्शांतत्वमात्रंनियम्यते नतुसर्वकर्मसुदर्शांतएवेति वृष्ट्याद्यर्थसौभरेहीषादिनिधननियमवद्विधिलाघवात् त्रैवर्णिकानांसर्वकर्मसुमासविशेषविधेः सावनादीनांशूद्रानुलोमादिपरत्वापत्तेश्चेतिगुरुचरणाः ।**

**चांद्रमास**—दोन पक्ष मिळून एक चांद्रमास होतो. तो चांद्रमास दोन प्रकारचा-शुक्लप्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत किंवा कृष्णप्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत जो मास तो चांद्रमास. तेंच **त्रिकांडमंडन** सांगतो—"शुक्लपक्षप्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत, अथवा कृष्णपक्षप्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत जो मास तो चांद्रमास होय," याप्रमाणें चांद्रमास सांगून देशभेदानें त्याची व्यवस्था सांगतो. ती अशी—"कृष्णपक्षप्रतिपदेपासून पौर्णिमांत जो चांद्रमास त्याचें ग्रहण कोणी करीत नाहींत, जे कोणी ग्रहण करितात त्यांच्या मतेंही तो विंध्याद्रीच्या दक्षिणप्रदेशीं इष्ट नाहीं." विंध्याद्रीच्या दक्षिणप्रदेशीं कृष्णपक्षादि चांद्रमासाचा निषेध सांगितल्यावरून विंध्याद्रीच्या उत्तरप्रदेशीं ( नर्मदेच्या उत्तरप्रदेशीं ) दोनही प्रकारचा चांद्रमास घेण्याविषयीं शास्त्रसंमति मिळते, त्यांतही शुक्लप्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत जो चांद्रमास तो मुख्य; कृष्णप्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत जो चांद्रमास तो गौण होय, कारण, चैत्रशुक्लप्रतिपदेचेठायींच चांद्रवर्षाचा आरंभ होतो असें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे. तेंच **दीपिकेंत** सांगतो—"चांद्रवर्षाचा आरंभ चैत्रशुक्लप्रतिपदेस होतो." जे कोणी कृष्णादि चांद्रमास मानितात त्यांच्या वर्षाचा आरंभ भिन्न आहे काय? तर भिन्न नाहीं. यास्तव शुक्लादि चांद्रमास हाच मुख्य आहे, आणि दुसरें कारण, कृष्णादि चांद्रमासेंकरून मलमासाचा असंभव आहे. **नाक्षत्रमास**—अश्विनीपासून रेवतीपर्यंत सत्तावीस नक्षत्रें चंद्रानें भुक्त असतां जो मास तो **नाक्षत्रमास.** सावन, सौर, चांद्र, नाक्षत्र हे जे चार प्रकारचे मास, त्यांची व्यवस्था **हेमाद्रींत ब्रह्मसिद्धांत** सांगतो—"ब्राह्मणास अमांत मास प्रशस्त, क्षत्रियांस संक्रांतिमास ( सौरमास ) व वैश्यांस पौर्णिमांत मास प्रशस्त आहे. एथें असें समजावें कीं, ब्राह्मणानें अग्नीचें आधान वसंत ऋतूंत करावें, याप्रमाणें जेथें ब्राह्मणादिकांना ज्या विशेष कर्माविषयीं इतर वचनांनीं जो विशेष मास विहित आहे तेथें तो मास दर्शांतच घ्यावा, असा ह्या ( "अमावास्या०" ) वचनानें नियम केला आहे. सर्व कर्माविषयीं दर्शांतच घ्यावा, असें नाहीं. जसें—जो वृष्टिकाम, जो अन्नाद्यकाम, जो स्वर्गकाम, त्यानें सौभरसामानें स्तुति करावी, असें श्रौतांत सांगितलें आहे, त्यांमध्यें वृष्टिकामासाठीं 'हीष्' असें निधन करावें. निधन म्हणजे सामाचे पांच किंवा सात भाग असतात त्यांतील अंतिमभाग होय. अन्नाद्यकामासाठीं 'ऊर्क्' असें निधन करावें, आणि स्वर्गकामासाठीं 'ऊ' असें निधन करावें. त्या ठिकाणीं इतर वचनांनीं 'हीष्' इत्यादि निधनें प्राप्त असतां ह्या वचनानें जीं निधनें सांगितलीं, तीं विशेष कामासाठीं नियमित आहेत, म्हणजे वृष्टिकामाला 'हीष्' असेंच निधन करावें, दुसरें करूं नये, हा नियमविधि आहे; त्याप्रमाणें प्रकृतस्थलींही ब्राह्मणाला सर्व कर्माविषयीं दर्शांतच मास घ्यावा, असा अपूर्व

नियम करण्यापेक्षां पूर्वी इतर वचनांनीं प्राप्त जो मास तो दर्शांतच घ्यावा, असा नियम केला असतां लाघव येतें. आणि असा नियम न करितां, सर्व कर्मांविषयीं दर्शांतच घ्यावा, असा नियम केला तर ब्राह्मणादि तीन वर्णांला सर्व कर्मांविषयीं विशेष मास ( सावनादिकही ) सांगितले आहेत, त्यांचा विरोध येईल. तसेंच वर सांगितलेल्या नियमवचनांनीं ब्राह्मणांला दर्शांतच, क्षत्रियांला संक्रांत्यंतच, आणि वैश्यांला पौर्णमास्यंतच, असे नियमित झाल्यामुळें उर्वरित सावन व नाक्षत्र हे मास शूद्र, अनुलोमजाति इत्यादिकांनाच प्राप्त होतील, इतरांना प्राप्त होणार नाहींत. असें गुरुचरण ( रामकृष्णभट्ट ) म्हणतात.

**ज्योतिर्गर्गः** सौरोमासोविवाहादौयज्ञादौसावनःस्मृतः आब्दिकेपितृकार्येचचांद्रोमासःप्रशस्यते **ऋष्यशृंगः** विवाहव्रतयज्ञेषुसौरंमानंप्रशस्यते पार्वणेत्वष्टकाश्राद्धेचांद्रमिष्टंतथाब्दिके **स्मृत्यंतरे** एकोद्दिष्टविवाहादावृणादौसौरसावनौ **ज्योतिर्गर्गः** आयुर्दायविभागश्चप्रायश्चित्तक्रियातथा सावनेनैवकर्तव्या शत्रूणांचाप्युपासना **विष्णुधर्मे** नक्षत्रसत्राण्ययनानिचेंदोर्मासेनकुर्याद्भगणात्मकेनेति **ब्राह्मे** तिथिकृत्येच कृष्णादिंव्रतेशुक्लादिमेवच विवाहादौचसौरादिंमासंकृत्येविनिर्दिशेत् ।

**ज्योतिर्गर्ग**—"विवाह, उपनयन, चूडा, व्रत, नियम, प्रतिष्ठा, गृहकरण, महाषष्ठी, महासप्तमी, दशहरा इत्यादिकांविषयीं सौरमास विहितः यज्ञ, इत्यादिकांविषयीं सावन मास विहित होय. आब्दिक वर्षवृद्धिकर्म, ( वाढदिवस ) व पितृकार्ये यांविषयीं चांद्रमास प्रशस्त होय." **ऋष्यशृंग**—"विवाह, व्रत, यज्ञ, यांविषयीं सौरमास प्रशस्त आहे. पार्वणश्राद्ध, अष्टकाश्राद्ध आणि आब्दिक ( सांवत्सरिक ) श्राद्ध यांविषयीं चांद्रमास प्रशस्त होय." **स्मृत्यंतरांत**—"एकोद्दिष्टश्राद्ध, विवाहादिक, यांविषयीं व ऋण घेणें व देणें यांविषयीं सौरमास व सावनमास प्रशस्त होत." **ज्योतिर्गर्ग**—"आयुर्दायविभाग, प्रायश्चित्तक्रिया आणि शत्रूंची उपासना ( समयप्रतीक्षा ) हीं कर्मे सावनमासेंकरूनच करावीं." **विष्णुधर्मांत**—"नक्षत्रसत्रें, अयनकृत्यें हीं नाक्षत्रमासेंकरून करावीं. ( अश्विनीपासून रेवतीपर्यंत सत्तावीस नक्षत्रें चंद्रानें भुक्त असतां जो मास तो नाक्षत्रमास ) **ब्रह्मपुराणांत**—तिथिसंबंधी कृत्यांविषयीं **कृष्णादि**, व्रताविषयीं **शुक्लादिक** मास घ्यावा. विवाहादि कार्यांविषयीं **सौरादिक** मास घ्यावा."

**अथमलमासः** तत्रैकमात्रसंक्रांतिरहितःसितादिश्चांद्रोमासोमलमासः एकमात्रसंक्रांतिराहित्यमसंक्रांतत्वेनसंक्रांतिद्वयवत्त्वेनचभवतीतिमलमासोद्वेधा अधिमासःक्षयमासश्चेति तदुक्तं **काठकगृह्ये** यस्मिन् मासेनसंक्रांतिःसंक्रांतिद्वयमेववा मलमासःसविज्ञेयोमासःस्यात्तुत्रयोदश इति **सत्यव्रतोपि** राशिद्वयंयत्रमासंसंक्रमेतदिवाकरः नाधिमासोभवेदेषमलमासस्तुकेवलमिति अधिकमासस्यकालनियममाह **वसिष्ठः** द्वात्रिंशद्भिर्मितैर्मासैर्दिनैःषोडशभिस्तथा घटिकानांचतुष्केणपतत्यधिकमासक इति एतच्चसावनादिमानेनसंभवार्थंनतुनियमार्थम् अन्यथाषोडशदिनाधिकद्वात्रिंशन्मासानंतरंकृष्णपक्षनियमेनशुक्लादित्वभंगापत्तेः तेनन्यूनाधिककालेमलमासपातेपिनदोषः अतएवोक्तं**माधवीये** मासेत्रिंशत्तमेभवेदिति क्षयस्यापिज्योतिःशास्त्रे- असंक्रांतिमासोऽधिमासःस्फुटंस्याद्द्विसंक्रांतिमासःक्षयाख्यःकदाचित् क्षयःकार्तिकादित्रयेनान्यतःस्यात्तदावर्षमध्येधिमासद्वयंच एकःक्षयात्पूर्वपरतश्चैकइत्यधिमासद्वयंभवतीत्यर्थः ।

## आतां मलमासनिर्णय सांगतो.

एकाच संक्रांतीनें रहित जो शुक्लपक्षादिक मास तो चांद्रमास, मलमास होय. एकाच संक्रांतीनें रहित असें म्हटल्यानें ज्यांत संक्रांति नाहीं, तो होतो, आणि दोन संक्रांति ज्यांत आहेत तोही होतो; म्हणून तो मलमास दोन प्रकारचा—एक **अधिकमास** आणि दुसरा **क्षयमास.** तेंच **काठकगृह्यसूत्रांत सांगतो**-"ज्या मासांत संक्रांत नाहीं तो अथवा ज्या मासांत दोन संक्रांति तो मलमास होय आणि तो तेरावा मास जाणावा." **सत्यव्रतही**-"ज्या मासांत दोन संक्रांतींचें उल्लंघन सूर्य करितो तो अधिकमास नव्हे, तर तो केवल मलमास ( क्षयमास ) जाणावा. **अधिकमास किती कालानें होतो; या विषयीं कालनियम सांगतो-वसिष्ठ**-"३२ मास, १६ दिवस, ४ घटिका इतक्या कालानें अधिकमास होतो. हें वचन सावनादि मानेंकरून संभवार्थ आहे, नियमार्थ नव्हे. संभवार्थ न मानितां नियमार्थ मानिलें तर ३२ मास, १६ दिवसांनंतर नियमानें कृष्णपक्ष असल्यामुळें 'शुक्लादिक होतो' असें जें सांगितलें त्याचा भंग होईल, म्हणून तें वचन संभवार्थ मानिल्यानें पूर्वोक्त कालामध्यें न्यूनाधिकत्व होऊनही जरी मलमास झाला तथापि दोष नाहीं. म्हणूनच **माधवीयांत** सांगतो-"तिसाव्या मासांत मलमास होतो." क्षयमासाविषयींही ज्योतिःशास्त्रांत सांगतो-"संक्रांतिविरहित जो मास तो अधिक मास आणि दोन संक्रांतींनीं युक्त जो मास तो क्षयमास; हा क्वचित् होतो. क्षयमास होणें

तो कार्तिक, मार्गशीर्ष, पौष या महिन्यांतून कोणता तरी होतो, इतरांपैकीं होत नाहीं. ज्या वर्षी क्षयमास होतो त्या वर्षी क्षयमासाच्या पूर्वी एक, आणि क्षयमासानंतर एक असे दोन अधिक मास होतात.

**अत्रविशेषमाहजाबालिः** मासद्वयेब्दमध्येतुसंक्रांतिर्नयदाभवेत् प्राकृतस्तत्रपूर्वःस्यादधिमासस्तथोत्तरइति उत्तरएवकालाधिक्यंनपूर्वस्मिन्नित्यर्थः यत्तु**ब्रह्मसिद्धांते** चैत्रादर्वाङ्नाधिमासःपरतस्त्वधिकोभवेदिति तत्रचैत्रात्पूर्वंअसंक्रांतद्वयेपूर्वोनाधिकः किंतुपरइत्यर्थः यच्च **ज्योतिःसिद्धांते** घटकन्यागतेसूर्येवृश्चिकेवाथधन्विनि मकरेवाथकुंभेवानाधिमासोविधीयते इति तत् वृश्चिकादिचतुष्टयेमलमासेसति पूर्वं तुलाकन्यागतेसूर्येक्षयपूर्वभाव्यधिमासस्यकालाधिक्यनिषेधार्थंनत्वधिकमात्रस्य दशानांफाल्गुनादीनांप्रायोमाघस्यचक्कचित् नपुंसकत्वंभवतीत्येषशास्त्रविनिश्चय इति **हेमाद्रौविष्णुधर्म**विरोधात् मलमासेऽष्टकादिनिषेधानुपपत्तेश्च ।

## याविषयीं विशेष निर्णय सांगतो.

**जाबालि**—जेव्हां एका वर्षांत दोन मासांत संक्रांत होत नाहीं तेव्हां संक्रांतरहित अशा त्या दोन मासांमध्यें—जो दोन संक्रांतींनीं युक्त मास तो क्षयमास होतो, म्हणून—क्षयमासाच्या पूर्वीचा जो मास यो **प्राकृत** ( इतर मासांसारखा ) आणि क्षयमासाच्या पुढचा जो मास तो **अधिक**मास होय, म्हणजे पुढचा तोच अधिकमास, पहिला तो अधिक नाहीं, सर्व कर्मांला योग्य आहे असा अभिप्राय. आतां जें **ब्रह्मसिद्धांत**वचन-"चैत्राच्या पूर्वी अधिकमास नाहीं, पुढें अधिकमास होतो." त्याचा अर्थ-चैत्राच्या पूर्वी संक्रांतिरहित दोन मास असतां त्यांत पहिला अधिक नव्हे, तर पुढचा अधिक होय. आणि जें **ज्योतिःसिद्धांतां**त-"तूळ, कन्या यांस सूर्य असतां, तसाच वृश्चिक किंवा धन अथवा मकर किंवा कुंभ ह्या संक्रांतीस सूर्य असतां अधिकमास होत नाहीं." हें वचन, वृश्चिकादि चार संक्रांतींत मलमास आला असतां त्याच्या पूर्वी तुला व कन्या ह्या संक्रांतींस सूर्य असतां क्षयाच्या पूर्वी होणारा जो अधिकमास त्यानें कालाधिक्य नाहीं. ( अधिकमासनिमित्तक कर्मनिषेध नाहीं. ) इतकेंच सांगण्यासाठीं आहे, अधिकमासाचा निषेध करण्यासाठीं वचन नाहीं. कारण, फाल्गुनादिक दहा मासांला फारकरून नपुंसकत्व ( संक्रांतिरहितत्व ) होतें, आणि क्वचित् माघमासालाही नपुंसकत्व होतें, हा शास्त्रनिश्चय आहे. अशा **हेमाद्रींतील विष्णुधर्म**वचनाचा विरोध येतो. आणि मलमासांत अष्टकाश्राद्धाचा निषेध आहे, त्याचीही उपपत्ति होणार नाहीं.

क्षयस्यागमनकालउक्तः **सिद्धांतशिरोमणौ** गतोब्ध्यद्रिनंदैर्गतेशाककालेतिथीशैर्भविष्यत्यथांगाक्षसूर्यैः गजाद्यग्निभूभिस्तथाप्रायशोयंकुवेदेंदुवर्षैःक्कचिद्गोकुभिश्चेति अब्धयश्चत्वारः अद्रयःसप्त नंदा नव एषां प्रातिलोम्येनपाते ९७४ तैर्मितेवर्षेकश्चित्क्षयमासः पूर्वंजातइत्यर्थः तिथयःपंचदश १५ ईशाएकादश १११५ एवंमितेयातेकश्चिद्भविष्यतीत्यर्थः अंगा ६ क्ष ५ सूर्याः १२ एकत्र १२५६ गजाः ८ अद्रयः ७ अग्नयः ३ भूः १ एकत्र १३७८ कुः १ वेदाः ४ इंदुः १ एकत्र १४१ गावः ९ कुः १ एकत्र १९ एतैर्मितेवर्षेयातेकश्चिद्भविष्यतीत्यर्थः ।

## क्षयमास किती वर्षांनीं येतो त्याचा निर्णय सांगतो.

**सिद्धांतशिरोमणींत**—"९७४ गत शककालीं एक क्षयमास झाला. १११५ एतत्परिमित शककालीं एक होईल. १२५६ शककालीं होईल. १३७८ शककालीं होईल. हा क्षयमास बहुतकरून १४१ वर्षांनंतर होतो. क्वचित् १९ वर्षांनींही क्षयमास होतो".

**अथमलमासेकार्याकार्यंनिरूप्यते** तत्र**जाबालिः** नित्यनैमित्तिकेकुर्याच्छ्राद्धंकुर्यान्मलिम्लुचे तिथिनक्षत्रवारोक्तंकाम्यंनैवकदाचन अयंचकाम्यनिषेधःआरंभसमाप्तिविषयः असूर्योनामयेमासानतेषुमम संमतः व्रतानांचैवयज्ञानामारंभश्चसमापनमितितेनैवोक्तत्वात् असूर्योअधिकमासाइत्यर्थः तत्रमंडलंतपतेरविरितिवचनात् कारीर्यादेःकाम्यस्यत्वारंभसमाप्तीभवतएवेत्यादिरित्यन्यत्रविस्तरः **काठकगृह्येपि** मलेऽनन्यगतिंकुर्यान्नित्यांनैमित्तिकींक्रियामिति तानिनैमित्तिकानि**दीपिकायां**मुक्तानि यन्नैमित्तिकमग्निनष्टयनुगताग्न्याधानमर्चासुवासंस्कारादिविलोपनेसतिपुनःप्रोक्तंप्रतिष्ठादिकमिति गत्यंतरयुतंतुसोमादिहेयमेव ।

## आतां मलमासांत करण्याचीं व न करण्याचीं कर्मैं सांगतो.

**जाबालि**—"मलमसांत नित्य, नैमित्तिक कर्मैं करावीं: श्राद्ध करावें; तिथि, नक्षत्र, वार यांच्यावर सांगितलेलें काम्य कर्म कदापि करूं नये." हा जो काम्य कर्माचा निषेध सांगितला तो आरंभसमाप्तिविषयक जाणावा, ( म्हणजे काम्य कर्माचा आरंभ किंवा समाप्ति मलमासांत करूं नये ), कारण "असूर्य ( सूर्यसंक्रांतिरहित ) जे मास त्यांत व्रतें, यज्ञ यांचा आरंभ अथवा समाप्ति करूं नये." असें त्यानेंच ( जाबालीनेंच ) सांगितलें आहे. कारीरी ( वृष्टिनिमित्तक करावयाचा याग ) राक्षोघ्न, अभिचार, प्रत्यभिचार, रोग, ग्रहदौस्थ्य इत्यादिनिमित्तक जीं काम्य कर्मैं त्यांचा आरंभ व समाप्ति हीं करावींच; याविषयीं इतर ग्रंथीं विस्तार सांगितला आहे. **काठकगृह्यां**तही सांगतोः–"अनन्यगतिक ( जें केल्यावांचून गति नाहीं तें ) कर्म, नित्य कर्मैं व नैमित्तिक कर्मैं हीं मलमासांत करावीं." तीं नैमित्तिक कर्मैं सांगतो–**दीपिका**–"अग्नि नष्ट झाला असतां अग्न्याधान, देवाला चांडालादिकांचा स्पर्श झाला असतां अवश्य कर्तव्य पुनःप्रतिष्ठादिक हीं एथें नैमित्तिक कर्मैं जाणावीं." ज्या कर्माला दुसरा काल आहे असीं सोमयाग इत्यादिक कर्मैं तर करूं नयेच.

**तत्रकर्तव्यान्युक्तानिकालादर्शे** द्वादशाहसपिंडांतकर्मग्रहणजन्मनोः सीमांतेपुंसवेश्राद्धंद्वावेतौ जातकर्मेच रोगेशांतिरलभ्येचयोगेश्राद्धव्रतानिच प्रायश्चित्तनिमित्तस्यवशात्पूर्वेपरत्रच अब्दोदकुंभमन्वादि- महालययुगादिषु श्राद्धंदर्शेप्यहरहःश्राद्धमूनादिमासिकं मलिम्लुचान्यमासेषुमृतानांश्राद्धमाब्दिकं श्राद्धंतुपू- र्वदृष्टेषुतीर्थेष्वेवयुगादिषु मन्वादिषुचयद्दानंदानंदैनंदिनंचयत् तिलगोभूहिरण्यानांसंध्योपासनयोःक्रिया पर्व- होमश्चाग्रयणंसाग्नेरिष्टिश्चपर्वणि नित्याग्निहोत्रहोमश्चदेवतातिथिपूजनं स्नानंचस्नानविधिनाप्यभक्ष्यापेयवर्जनं तर्पणंवानिमित्तस्यनित्यत्वादुभयत्रचेति एतौपुंसवनंसीमंतौ एतच्चगर्भाधानाद्यन्नप्राशनांतसंस्कारोपलक्षणं सदु- क्तं**दीपिकायां** गर्भाधानमुखंचचौलविधितःप्राग्जातयागंविनाकृच्छ्रेष्वाग्रयणंगजेंद्रपुरतश्छायामघानंगयोः तीर्थेंदुक्षययोश्चपित्र्यमधिकेमास्येवमाद्याचरेदिति अलभ्ययोगेर्धोदयपद्मकादौकाम्यान्यपिव्रतादीनिकार्याणी- त्यर्थः पूर्वेपरत्रच मलेशुद्धेचेत्यर्थः महालयशब्देनमघात्रयोदश्युच्यतइति**माधवः** दर्शश्राद्धंमलेपिकार्यं ।

**मलमासांत कर्तव्यकर्मैं सांगतो-कालादर्शांत** म्हणतो—"प्रथम दिवसापासून सपिंडीकरणापर्यंत सर्व अंत्यकर्म, ग्रहणश्राद्ध, पुत्रजन्मनिमित्तक श्राद्ध, सीमंत व पुंसवन यांसंबंधी वृद्धिश्राद्ध, पुंसवन सीमंतसंस्कार, रोग असतां शांति अर्धो- दय पद्मकादि अलभ्य योग असतां तन्निमित्तक श्राद्ध, काम्य व्रतें, निमित्तवशानें प्रायश्चित्त, वर्षपर्यंत कर्तव्य उदकुंभश्राद्ध, मन्वादिश्राद्धें, महालय ( मघात्रयोदशी ) श्राद्ध, युगादिश्राद्ध, दर्शश्राद्ध, दररोजचें श्राद्ध, ऊनादि मासिकश्राद्ध, मलमासाहून अन्य मासांत मृत झाले त्यांचें प्रथमाब्दिकश्राद्ध, पूर्वदृष्ट तीर्थश्राद्ध, युगादि व मन्वादि तिथिसंबंधी दान, तिल, गाई, भूमि, सुवर्ण यांचें प्रतिदिवशीं ( नित्य ) कर्तव्य दान, स्नान संध्या, पर्वहोम ( दर्शपौर्णमासस्थालीपाक ), आग्रयण, साग्निकाची पर्वेष्टि, नित्याग्निहोत्रहोम, देवता व अतिथि यांची पूजा, स्नानविधिपूर्वक स्नान, अभक्ष्य व अपेय पदार्थवर्जन, तर्पण, यांचें निमित्त नित्य असल्यामुळें हीं सर्व नित्य कर्मैं होत; यास्तव तीं दोनही ( अधिक व शुद्ध ) मासांत करावीं. वरील वचनांत पुंसवन व सीमंत सांगितले ते गर्भाधानादि अन्नप्राशनांत संस्कारांचें उपलक्षण होय. तेंच **दीपिकेंतही सांगतो**— "जातकर्मावांचून गर्भाधानापासून चौलाच्या पूर्वीचे संस्कार, संकटकाळीं आग्रयण, गजच्छायाश्राद्ध, मघात्रयोदशीश्राद्ध, तीर्थश्राद्ध, दर्शश्राद्ध इत्यादि हीं अधिक मासांत करावीं. अलभ्ययोग म्हणजे अर्धोदय, पद्मक, कपिलाषष्ठी इत्यादियोग असतां काम्यही व्रतादिक करावीं. महालय शब्दानें मघात्रयोदशी घ्यावी असें **माधव** सांगतो. दर्शश्राद्ध मलमासांतही करावें.

यत्तु**ऋष्यशृंगः** संवत्सरातिरेकेणमासोयःस्यान्मलिम्लुचः तस्मिंस्त्रयोदशेश्राद्धंनकुर्यादिंदुसंक्षयइति तत्काम्यदर्शश्राद्धविषयं काम्यंनैवकदाचनेतिवचनात् दर्शेचकाम्यंश्राद्धं कन्यांकन्यावेदिनश्चेत्यादिना**याज्ञ- वल्क्येनोक्तं** नित्यंतुमलेपिभवत्येव दर्शेप्यहरहःश्राद्धंदानंचप्रतिवासरं गोभूतिलहिरण्यानांमासेपिस्यान्म- लिम्लुचेइति**मात्स्योक्ते**रिति**हेमाद्र्यादयः** **दिवोदासीये**पि अनिंदुरिंदुपूर्णोचहरिवारोबुधाष्टमी ना- धिमासेपरित्याज्याःसीमंतान्नाशनेशिशोरिति अनिंदुर्दर्शः द्विविधमप्यमाश्राद्धंनकार्यमिति**अपरार्कः** अत्र यद्विहितंकर्मउत्तरेमासिकारयेदित्युक्तेः षष्ट्यातुदिवसैर्मासइतिशुद्धमासकरणेपिशास्त्रार्थोपपत्तेर्दर्शश्राद्धंमले- नकार्यमिति**प्राचीनगौडाःशूलपाणिश्च** **संवत्सरप्रदीपे**पि एकराशिस्थितेसूर्येयदादर्शद्वयंभवेत् दर्शश्राद्धंतदादौस्यान्नपरत्रमलिम्लुचे अत्रापिप्रागवद्व्यवस्था ।

**आतां जें ऋष्यशृंग** सांगतो—"संवत्सरामध्यें अधिक जो मलमास होतो त्या तेराव्या मासांत दर्शश्राद्ध करूं नये" असें वचन तें काम्य दर्शश्राद्धविषयक होय; कारण, काम्यकर्म कदापि करूं नये, असें निषेधवचन आहे. "कन्यां कन्यावेदिनश्च" इत्यादि वचनेंकरून **याज्ञवल्क्यानें** दर्शाचे ठिकाणीं काम्यश्राद्ध सांगितलें आहे. नित्यश्राद्ध तर मलमासांतही करावें. कारण "दर्शश्राद्ध, नित्यश्राद्ध, गो, भूमि, तिल, सुवर्ण यांचें नित्यदान हीं मलमासांतही करावीं" असें मत्स्यपुराणवचन आहे, असें **हेमाद्रि** इत्यादिक ग्रंथकार सांगतात. **दिवोदासीयांत**ही-"दर्श, पौर्णिमा, द्वादशी, बुधाष्टमी, ह्या तिथि मलमासांत वर्ज्य करूं नयेत, म्हणजे ह्या तिथिसंबंधी श्राद्ध, दानादिक कृत्यें मलमासांतही करावीं; मुलांचे सीमंत व अन्नप्राशन संस्कारही करावे." काम्य व नित्य असें दोनही प्रकारचें दर्शश्राद्ध करूं नये, असें **अपरार्क** सांगतो. कारण, "मलमासांत जें विहित कर्म तें उत्तर मासांत करावें" असें वचन आहे. अधिकमास असतां साठ दिवसांचा एक मास होतो, असें आहे म्हणून शुद्ध मासांत केलें असतांही शास्त्रार्थाची उपपत्ति होते, यास्तव दर्शश्राद्ध मलमासांत करूं नये;" असें **प्राचीनगौड व शूलपाणि** सांगतात. **संवत्सरप्रदीपांत**ही–"एकराशिगत सूर्य असतां जेव्हां दोन दर्श प्राप्त होतात तेव्हां दर्शश्राद्ध पूर्व मासांत करावें, पुढच्या मलमासांत करूं नये;" असें जें वचन आहे, त्याविषयींही पूर्वीप्रमाणेंच ( वर सांगितल्याप्रमाणेंच ) व्यवस्था जाणावी.

यद्यपि**कालादर्शे**सर्ववार्षिकंमासद्वयेकार्यमित्युक्तं तथापि**हेमाद्रिमाधवापरार्कादि**मतात्प्रथमाब्दिकंत्रयोदशेमलमासेद्वितीयाद्याब्दिकंतुशुद्धमासएवकार्यं असंक्रांतेपिकर्तव्यमाब्दिकंप्रथमंद्विजैः तथैवमासिकंश्राद्धंसपिंडीकरणंतथेति**हारीतोक्तेः** आब्दिकंप्रथमंयत्स्यात्तत्कुर्वीतमलिम्लुचे चतुर्दशेतुसंप्राप्तेकुर्वीत पुनराब्दिकमिति**स्मृत्यंतरोक्ते**श्च पुनराब्दिकंद्वितीयादिवार्षिकंत्रयोदशेमासेऽतीतेचतुर्दशाद्यदिनेकुर्यादित्यर्थः यत्तु**सत्यव्रतः** वर्षेवर्षेतुयच्छ्राद्धंमातापित्रोर्मृतेहनि मलमासेनतत्कार्यंव्याघ्रस्यवचनंयथेति तद्द्वितीयादिवार्षिकविषयम् आब्दिकंप्रथमंयत्स्यात्तत्कुर्वीतमलिम्लुचे इतिपूर्वोक्तवचनात् ।

जरी सर्व वार्षिक श्राद्ध दोन मासांत करावें, असें **कालादर्शांत** सांगितलें आहे, तथापि **हेमाद्रि, माधव, अपरार्क** इत्यादिकांचे मतीं प्रथमाब्दिकश्राद्ध, तेरावा जो मलमास त्यांत करावें, आणि द्वितीयाब्दिक शुद्धमासांतच करावें; कारण, "द्विजांनीं असंक्रांत मासांत ( मलमासांत ) हि प्रथमाब्दिकश्राद्ध, मासिकश्राद्ध आणि सपिंडीकरण हीं करावीं" असें **हारीत**वचन आहे; आणि "प्रथमाब्दिक जें श्राद्ध तें मलमासांत करावें, व चवदाव्या मासांत पुनराब्दिक करावें" असें **स्मृत्यंतर**वचनही आहे. पुनराब्दिक म्हणजे द्वितीयादि वार्षिक, तें तेरावा महिना गेल्यावर चवदाव्या महिन्याच्या प्रथम दिवशीं करावें, असा वरील वचनाचा अर्थ आहे. आतां जें **सत्यव्रत** सांगतो–"प्रतिवर्षीं मातापितरांच्या मृतदिवशीं कर्तव्य जें श्राद्ध तें मलमासांत करूं नये, असें **व्याघ्रऋषीचें** वचन आहे" तें द्वितीयादि वार्षिकाचा निषेध करितें, प्रथमाब्दिकाचा निषेध करीत नाहीं. कारण, "प्रथमाब्दिकश्राद्ध मलमासांत करावें" असें पूर्वीं ( वर ) वचन सांगितलें आहे.

यत्रद्वादशंमासिकंशुद्धमासेभवति तत्रत्रयोदशेधिकएवाद्याब्दिकंकार्यम् यत्रत्वधिकमध्येद्वादशंमासिकंतत्रतस्यद्विरावृत्तिंकृत्वाचतुर्दशेशुद्धएवप्रथमाब्दिकमितिनिष्कर्षः तेनद्वितीयादिशुद्धमासएव **पृथ्वीचंद्रोदयेदिवोदासीयेमदनपारिजाते**चैवं मलमासमृतानांतुयदासएवाधिकःस्यात्तदातत्रैवप्रतिसांवत्सरिकं कार्यं यथा**पैठीनसिः** मलमासेमृतानांतुश्राद्धंयत्प्रतिवत्सरं मलमासेपिकर्तव्यंनान्येषांतुकथंचनेति **हेमाद्रौ**-**व्यासो**पि मलमासमृतानांतुसौरंमानंसमाश्रयेत् सएवदिवसस्तस्यश्राद्धपिंडोदकादिषु अत्राधिकमृतस्यनद्वितीयाद्यब्देपिसौरविधिः द्वितीयादावन्याधिकेवापूर्वनियमविधिवैरूप्यात्किंतुप्रथमाब्दिकस्यमलेनियमात्सत्यव्रतेन तद्भिन्नस्यसर्वस्याधिकेनिषेधेप्राप्तेप्रतिप्रसवमात्रंलाघवात् अतोनद्वितीयादौसौरमासप्रसंगः चांद्रमिष्टंतदाब्दिके मासपक्षतिथिस्पष्टेइत्यादिविरोधाच्च ।

जेथें बारावें मासिकश्राद्ध शुद्ध मासांत होतें तेथें तेराव्या अधिक मासांतच प्रथमाब्दिक करावें, आणि जेथें अधिक मासांत बारावें मासिक होईल तेथें अधिक व शुद्ध या दोन मासांत त्याची द्विरावृत्ति करून ( व ऊनाब्दकालीं ऊनाब्दिक करून ) चवदाव्या शुद्ध मासांतच प्रथमाब्दिक करावें असा फलितार्थ आहे. म्हणून द्वितीयाब्दिक वगैरे शुद्ध मासांतच करावें. **पृथ्वीचंद्रोदय, दिवोदासीय व मदनपारिजात** या ग्रंथांतही असेंच सांगितलें आहे. मलमासांत मृत झाले व कांहीं दिवसांनीं तोच मलमास प्राप्त झाला तर त्या अधिक मासांतच त्यांचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावें. **पैठीनसि**–"मलमासांत मृत झालेल्यांचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध मलमासांतही करावें, इतरांचें ( शुद्ध मासांत मृत झालेल्यांचें )

कधींही करूं नये." **हेमाद्रींत-व्यासही**-"मलमासांत जे मृत होतात त्यांच्याविषयीं सौरमान घ्यावें, म्हणजे त्यांचें श्राद्ध, पिंड, उदकदान यांविषयीं ज्या दिवशीं मृत असेल तोच दिवस घ्यावा." ह्या वचनानें अधिकमासांत मृतांच्या द्वितीयादि आब्दिकांविषयीं देखील सौरमान घ्यावयाचें नाहीं; कारण, द्वितीयादि आब्दिकाविषयीं जर सौरमान घेतलें तर कांहीं दिवसांनीं, ज्या मासांत मृत असेल त्याच्या पूर्वींचा महिना अधिक आला असतां त्या अधिकाच्या शुद्धमासांत सौरमानानें प्राप्त होत असल्यामुळें पूर्वोक्त जो नियमविधि ( द्वितीयादिवार्षिक श्राद्ध तेरावा महिना गेल्यावर चवदाव्या मासाच्या आद्य दिवशीं करावें इत्यादि ) तो असंगत होईल; तर प्रथमाब्दिकाविषयींच मलमास सांगितला आहे, म्हणून **सत्यव्रतवचनानें** प्रथमाब्दिकव्यतिरिक्त सर्व श्राद्धांचा अधिकांत निषेध प्राप्त असतां, मलमासमृताविषयीं तो मास प्राप्त असेल तर त्या निषेधाचा बाध, ह्या वचनानें केला आहे. असें केलें असतां लाघव येतें. तो मास प्राप्त असल्यावेळीं निषेधबाध केला आहे, म्हणूनच द्वितीयादि आब्दिकाविषयीं सौरमासाचा प्रसंग येत नाहीं. आणि सौरमान घेतलें तर "आब्दिकाविषयीं चांद्रमान इष्ट आहे." शिवाय "मास, पक्ष, तिथि यांनीं स्पष्ट काळीं करावें" इत्यादि वचनाचा विरोधही येईल.

यत्तु**वृद्धवसिष्ठः** श्राद्धीयाहनिसंप्राप्तेअधिमासोभवेद्यदि मासद्वयेपिकुर्वीतश्राद्धमेवंनमुह्यति यच्च**व्यासः** उत्तरेदेवकार्याणिपितृकार्याणिचोभयोरिति तन्मासिकादिविषयं यौगादिकंमासिकंचश्राद्धंचापरपक्षिकं मन्वादिकंतैर्थिकंचकुर्यान्मासद्वयेपिचेति**स्मृतिचंद्रिकोक्तेः** तैर्थिकंतीर्थश्राद्धं तच्चमासद्वयेपिकार्यमिति-**त्रिस्थलीसेतौभट्टाः** ।

आतां जें **वृद्धवसिष्ठ** म्हणतो-"अधिक मास प्राप्त असेल व त्यांत श्राद्धदिवस प्राप्त होईल तर दोनही मासांत श्राद्ध करावें," आणि जें **व्यास** म्हणतो "उत्तर मासांत देवकार्यें, व पूर्व, उत्तर अशा दोनही मासांत पितृकार्यें करावीं" अशीं वचनें तीं मासिकादि श्राद्धविषयक होत; कारण, "युगादितिथिनिमित्तश्राद्ध, मासिकश्राद्ध, अपरपक्षिकश्राद्ध ( प्रतिकृष्णपक्षविहित ), मन्वादितिथिनिमित्तक श्राद्ध आणि तीर्थश्राद्ध हीं दोनही मासांत करावीं" असें **स्मृतिचंद्रिकेंत** वचन आहे. तीर्थश्राद्ध दोनही मासांत करावें असें त्रिस्थलीसेतूंत **भट्ट** ( नारायणभट्ट ) सांगतात.

केचित्तु प्रतिमासंमृताहेचश्राद्धंयत्प्रतिवत्सरं मन्वादौचयुगादौचतन्मासोरुभयोरपीति**मरीचि**वचनात् वर्षेवर्षेतुयच्छ्राद्धंमातापित्रोर्मृतेहनि मासद्वयेपितत्कुर्याद्व्याघ्रस्यवचनंयथेति**गालवोक्तेश्च** प्रत्याब्दिकंमासद्वयेकार्यमित्याहुस्तत्तुच्छं प्रतिमासंमृताहेक्रियमाणंमासिकं प्रतिसंवत्सरंक्रियमाणंकल्पादिश्राद्धमिति**मरीचि**वचसो**मदनरत्नेन**व्याख्यानात् **गालवीयस्य**चमासद्वयात्मकेक्षयमासइति**माधवेन**व्याख्यानात् ।

कांहीं ग्रंथकार तर "मासिकश्राद्ध, प्रतिसांवत्सरिकश्राद्ध, मन्वादिश्राद्ध, आणि युगादिश्राद्ध हीं दोनही मासांत करावीं" असें **मरीचि**वचन आहे म्हणून; आणि "प्रतिवर्षीं मातापितरांच्या मृतदिवशीं कर्तव्य जें श्राद्ध तें दोन्ही मासांत करावें, असें **व्याघ्रऋषी** सांगतो' असें **गालवाचेंही** वचन आहे, म्हणून प्रत्याब्दिक श्राद्ध दोन मासांत करावें असें सांगतात; परंतु तें केचिन्मत तुच्छ आहे; कारण, 'प्रतिमासं मृताहे च श्राद्धं यत्प्रतिवत्सरं' ह्या **मरीचि**वचनांतील 'प्रतिमासं' व 'प्रतिसंवत्सरं' ह्या दोन पदांची व्याख्या क्रमानें, प्रतिमासांत मृतदिवशीं करावयाचें मासिक, व प्रतिवर्षीं करावयाचें कल्पादि श्राद्ध अशी **मदनरत्नानें** केली आहे आणि **गालववचनांतील** 'मासद्वये' या पदाची व्याख्या मासद्वयात्मक क्षयमासांत, अशी **माधवानें** केली आहे.

यच्चकैश्चिदुक्तम् प्रथमाब्दिकंमासद्वयेकार्यं आब्दिकंप्रथमंयत्स्यात्तत्कुर्वीतमलिम्लुचे त्रयोदशेचसंप्राप्ते-कुर्वीतपुनराब्दिकमिति**यमोक्तेः**रिति तदपिचिंत्यं पुनराब्दिकंद्वितीयादिवार्षिकंत्रयोदशेऽतीतेचतुर्दशेकुर्यात् अन्यथा सांवत्सरंनवर्धेतश्राद्धंतत्रमृतेहनीति**पैठीनसि**विरोधःस्यादिति**हेमाद्रौपृथ्वीचंद्रोदये**च एतेननवर्धेतनछिंद्याच्छुद्धेपिकुर्याद्देवेत्यनंतभट्टव्याख्यामानाभावात्परास्ता पूर्वव्याख्यायांतुहारीतीयेप्रथमग्रहणमेवमानम् ।

आणि जें कांहीं ग्रंथकार, प्रथमाब्दिक श्राद्ध दोन मासांत करावें; कारण, जें "प्रथमाब्दिक श्राद्ध तें मलमासांत करावें, तेरावा मास प्राप्त असतां पुनः आब्दिक करावें" असें **यमाचें** वचन आहे असें म्हणतात, परंतु तेंही केचिन्मत चिंत्य ( प्रमाणशून्य ) होय. कारण, पुनराब्दिक म्हणजे द्वितीयादिवार्षिक श्राद्ध, तें तेरावा मास गत झाल्यानंतर चवदाव्या मासाच्या प्रथमदिवशीं करावें, असा त्या वचनाचा अर्थ आहे. तसा अर्थ न मानल्यास 'मृतदिवशीं कर्तव्य जें सांवत्सरिक

१ अत्रापरपक्षिकंप्रतिकृष्णपक्षविहितंश्राद्धमित्यर्थः, नतुमहालयश्राद्धं, तस्याधिमासेनिषेधस्योक्तत्वात् ।

श्राद्ध त्याची वृद्धि ( द्विरावृत्ति ) करूं नये' ह्या **पैठीनसि**वचनाशीं विरोध येईल, असें **हेमाद्रींत** व **पृथ्वीचंद्रोदयांत**ही सांगितलें आहे. यावरून "श्राद्धाची वृद्धि करूं नये, ह्रासही करूं नये, परंतु शुद्ध मासांतही करावेंच" अशी जी अनंतभट्टाची व्याख्या ती प्रमाणरहित असल्यामुळें खंडित झाली. प्रथमाब्दिक तेराव्या मलमासांत करावें, अशी जी पूर्वीं केलेली व्याख्या तिच्याविषयीं, 'असंक्रांतेऽपि०' ह्या हारीतवचनांतील 'प्रथम' ग्रहणच प्रमाण आहे.

यदपिनिर्णयामृतेपूर्वोक्त**कालादर्श**वचनात् मलमासेश्राद्धदिनस्यवंध्यत्वनिरासार्थंपित्रुद्देशेनब्राह्मणान् भोजयित्वाशुद्धमासेसपिंडकंश्राद्धंकुर्यात् पिंडवर्जमसंक्रांतौ पिंडसंयुतंप्रतिसंवत्सरंश्राद्धमेवंमासद्वयेपिचेति **वृद्धपराशरोक्ते**रिति तदपिचिंत्यम् पूर्वोक्तवचनस्यक्षयपूर्वभाव्यधिकमासविषयत्वात् तत्रहि मासद्वयेश्राद्धमुक्तं तदाह**सत्यतपाः** एकएवयदामासःसंक्रांतिद्वयसंयुतः मासद्वयगतंश्राद्धंमलमासेपिशस्यतइति मासद्वयगतंपूर्वासंक्रांतिगतंक्षयगतंच मलमासेक्षयमासे अपिशब्दात्पूर्वाधिमासेचेति**हेमाद्रिः दीपिका**यामपि तत्प्राक्संग्यधिमासकोयदिभवेत्तत्रत्यसांवत्सरंतस्मिञ्छुद्धतयाक्षयेचवचनात्कुर्याद्वयोःकोविदइति **कालादर्शो**प्येतद्विषयएवेत्यलंबहुना ।

आतां जें निर्णयामृतांत-पूर्वोक्त **कालादर्श**वचनावरून मलमासांतील श्राद्धदिवस व्यर्थ जाऊं देऊं नये, म्हणून पित्रुद्देशानें ब्राह्मणाला नुसतें भोजन घालून शुद्धमासांत सपिंडक श्राद्ध करावें; कारण, "असंक्रांत मासांत पिंडवर्ज्य श्राद्ध व संक्रांतियुक्तमासांत सपिंडक श्राद्ध, याप्रमाणें प्रतिसांवत्सरिकश्राद्ध दोनही मासांत करावें" असें **वृद्धपराशराचें** वचन **निर्णयामृत**ग्रंथांत सांगितलें आहे, तेंही चिंत्य होय. कारण, तें **वृद्धपराशर**वचन क्षयमासाच्या पूर्वीं होणारा जो अधिकमास तद्विषयक आहे. क्षयमास व तत्पूर्वभावी अधिकमास ह्या दोन मासांत श्राद्ध करावें. असें सांगितलें आहे. तें **सत्यतपा** सांगतो—"ज्या वर्षीं एकच मास दोन संक्रांतींनीं युक्त असा प्राप्त होतो त्यावर्षीं मासद्वयगत ( पूर्वींच्या संक्रांतिरहित मासांतील व क्षयमासांतील अशीं दोन ) श्राद्धें मलमासांत ( क्षयमासांत ) करावीं. वरील सत्यतपोवचनांत 'मलमासेऽपि शस्यते' येथें 'अपि'शब्द आहे म्हणून पूर्व अधिकमासांतही करावें, असें **हेमाद्रि** सांगतो. **दीपिकेंत** असेंच सांगतो-"क्षयमास प्राप्त असतां, त्याच्या पूर्वींच्या अधिकमासांतील सांवत्सरिक श्राद्ध तो शुद्ध असल्यामुळें त्यांत आणि शास्त्रानें सांगितल्यामुळें क्षयमासांत, असें दोनही मासांत ज्ञात्या पुरुषानें श्राद्ध करावें." **कालादर्श**ही एतद्विषयकच आहे. इतका निर्णय पुरे. आतां याहून अधिक विचार नको.

**मलमासेवर्ज्यान्युक्तानिकालादर्शे** अनित्यमनिमित्तंचदानंचमहदादिकं अग्न्याधानाध्वरापूर्वतीर्थयात्रामरेक्षणं देवारामतडागादिप्रतिष्ठामौंजिबंधनं आश्रमस्वीकृतिःकाम्यवृषोत्सर्गश्चनिष्क्रमः राजाभिषेकःप्रथमश्चूडाकर्मव्रतानिच अन्नप्राशनमारंभोगृहाणांचप्रवेशनं स्नानंविवाहोनामातिपन्नंदेवमहोत्सवः व्रतारंभसमाप्तीचाकाम्यंकाम्यंचपाप्मनाम् प्रायश्चित्तंतुसर्वस्यमलमासेविवर्जयेत् उपाकर्मोत्सर्जनंचपवित्रदमनार्पणम् अवरोहश्चहेमंतःसर्पाणांबलिरष्टकाः ईशानस्यबलिर्विष्णोःशयनंपरिवर्तनं दुर्गेंद्रस्थापनोत्थानेध्वजोत्थानंचवज्रिणः पूर्वत्रप्रतिषिद्धानिपरत्रान्यच्चदैविकमिति अत्रमूलवचनानि**हेमाद्रिमाधवादि**भ्योज्ञेयानि **दिवोदासीयेपि** यात्रोत्सवंचदेवादिशपथंदिव्यमेवच मलमासेनकुर्वीत**व्याघ्रस्य**वचनंयथेति अयंनिर्णयःक्षयमासेपिज्ञेयः रविसंक्रमहीनेयोवर्ज्यावर्ज्यविधिःस्मृतः सएवतुद्विसंक्रांतेमलमासेप्युदीरितइति **काठकगृह्योक्तेः** ।

## मलमासांत वर्ज्य कर्मे सांगतो.

**कालादर्शांत** म्हणतो—"अनित्य व अनिमित्तक कर्म; महादानादिक; अग्न्याधान; याग; अपूर्व ( पूर्वीं न झालेली ) तीर्थयात्रा; अपूर्व देवदर्शन; देव, आराम, तलाव इत्यादिकांची प्रतिष्ठा ( अर्चा ); उपनयन; आश्रमस्वीकार; काम्यवृषोत्सर्ग; निष्क्रमणसंस्कार; प्रथम राजाभिषेक; चौलसंस्कार; व्रतें; ( महानाम्न्यादि, अनंत, शिवरात्रि इत्यादिक ); अन्नप्राशनसंस्कार; गृहारंभ; गृहप्रवेश; स्नान; विवाह; अतिक्रांत असे जातकर्मादिक संस्कार; देवमहोत्सव; व्रतांचा आरंभ व समाप्ति; अकाम्यकर्म; काम्यकर्म; सर्वप्रायश्चित्त; प्रथम उपाकर्म व उत्सर्जन; पवित्रारोपण; दमनारोपण; हेमंतऋतूंत कर्तव्य अवरोहण; सर्पबलि; अष्टकाश्राद्धें; ईशानबलि; विष्णूचा शयनोत्सव व परिवर्तनोत्सव; दुर्गा व इंद्र यांची स्थापना व विसर्जन; इंद्रध्वज उभारणें आणि दुसरेंही दैविककर्म; हीं सर्व कर्मे पहिल्या ( अधिक ) मासांत वर्ज्य करावीं. तींच कर्मे पुढच्या शुद्ध मासांत करावीं." याविषयींचीं मूलवचनें **हेमाद्रि, माधव** इत्यादिक ग्रंथांत पाहावीं. **दिवोदासीयांत**ही म्हणतो—"यात्रा, उत्सव,

देवादिकांची शपथ, दिव्यकर्म हीं कर्में मलमासांत करूं नयेत, असें **व्याघ्रकृषिवचन** आहे." हा **वर्ज्यनिर्णय क्षयमासा**विषयींही जाणावा; कारण, "सूर्यसंक्रांतिरहित ( अधिक ) मासांत जो वर्ज्यावर्ज्यनिर्णय सांगितला तोच निर्णय द्विसंक्रांत ( क्षय ) मासांतही जाणावा" असें **काठकगृह्यांत** वचन आहे.

**क्षयमासमृतानांप्रत्याब्दिकेविशेषोहेमाद्रौ** तिथ्यर्धेप्रथमेपूर्वोद्वितीयेर्धेतथोत्तरः मासावितिबुधैश्चिंत्यौक्षयमासस्यमध्यगौ ।

आब्दिकवर्धापनेपिज्ञेयं यन्मलमासेवर्ज्यमुक्तंतच्छुक्रगुर्वोरस्तादिष्वपिज्ञेयं तदाह**बृहस्पतिः** बालेवायदिवावृद्धेशुक्रेवास्तंगतेगुरौ मलमासइवैतानिवर्जयेद्देवदर्शनमिति अनादिदेवतांदृष्ट्वाशुचःस्युर्नष्टभार्गवे मलमासेप्यनावृत्ततीर्थयात्रांविवर्जयेत् आवृत्ततीर्थेदोषाभावमात्रंनतुफलमिति **वाचस्पतिमिश्राः** तन्न असतिबाधकेफलहेतुत्वाक्षतेः ।

## क्षयमासमृतांच्या प्रतिसांवत्सरिक श्राद्धाचा निर्णय सांगतो.

**हेमाद्रींत** सांगतो-"क्षयमासाच्या प्रतिपदादिक ज्या तिथि त्यांच्या पूर्वार्धीं मृत असेल तर पूर्वमास व उत्तरार्धीं मृत असेल तर पुढचा मास, याप्रमाणें त्या क्षयमासाच्या सर्व तिथि दोन मासांच्या आहेत, यास्तव क्षयमासांत तिथींच्या पूर्वार्धीं मृत झाला असेल तर त्याचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध पूर्वमासांत व तिथींच्या उत्तरार्धीं मृत असेल तर त्याचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध पुढच्या मासांत करावें."

**गुरुशुक्रास्तांचा निर्णय**—याप्रमाणें जन्म झाला असतां वाढदिवसाविषयींही असाच निर्णय जाणावा. मलमासांत जो वर्ज्यावर्ज्य निर्णय ( वर ) सांगितला तो गुरुशुक्रांचे अस्तादिविषयींही जाणावा. तेंच **बृहस्पति** सांगतो-"मलमासांत जें वर्ज्य सांगितलें तें व देवदर्शन हें, गुरु किंवा शुक्र यांचें अस्त, बाल्य किंवा वार्धक्य असतां वर्ज्य करावें. "शुक्र अस्तंगत असतां अपूर्व देवतेचें दर्शन केलें तर शोक होतो; मलमासांतही अपूर्व तीर्थयात्रा करूं नये." पूर्वीं ज्या तीर्थाची यात्रा केली असेल त्याची पुनः यात्रा मलमासांत केली असतां दोष मात्र नाहीं, परंतु फल नाहीं, असें **वाचस्पतिमिश्र** म्हणतात; तें बरोबर नाहीं; कारण, ज्यापेक्षां बाधक नाहीं त्यापेक्षां फल होणें निर्विवाद आहे.

**लल्लोपि** नीचस्थेवक्रसंस्थेप्यतिचरणगतेबालवृद्धास्तगेवासंन्यासोदेवयात्राव्रतनियमविधिःकर्णवेधस्तुदीक्षा मौंजीबंधोङ्गनानांपरिणयनविधिर्वास्तुदेवप्रतिष्ठावर्ज्याःसद्भिःप्रयत्नात्त्रिदशपतिगुरौसिंहराशिस्थितेचेति दीक्षायागदीक्षाआगमदीक्षाच तथा उद्यानचूडाव्रतबंधदीक्षाविवाहयात्राचवधूप्रवेशः तडागकूपत्रिदशप्रतिष्ठाबृहस्पतौसिंहगतेनकुर्यात् **दिवोदासीये** गुर्वादित्येगुरौसिंहेनष्टेशुक्रेमलिम्लुचे गृहकर्मव्रतंयात्रांमनसापिनचिंतयेत् ।

**लल्लही सांगतो**-"नीचस्थ ( मकरस्थ ), वक्रस्थ, किंवा अतिचारगत, अथवा बाल, वृद्ध, अस्तंगत असा गुरु असतां किंवा सिंहस्थ गुरु असतां संन्यास, देवयात्रा, व्रतें, नियमविधि, कर्णवेध, दीक्षा ( यज्ञदीक्षा व आगमदीक्षा ), मौंजीबंधन स्त्रियांचा विवाह, गृह बांधणें, देवाची अर्चा हीं सर्व कर्में ज्ञात्या पुरुषांनीं वर्ज्य करावीं-" दीक्षा म्हणजे यज्ञदीक्षा व मंत्रदीक्षा. तसेंच "सिंहस्थ गुरु असतां उद्यान, चौल, उपनयन, दीक्षा, विवाह, यात्रा, वधूप्रवेश, तडाग, कूप, देव, यांची अर्चा, हीं कर्में करूं नयेत." **दिवोदासीयांत** सांगतो—"अस्तंगत गुरु, सिंहस्थ गुरु, अस्तंगत शुक्र, मलमास यांचे ठायीं गृह बांधणें, व्रत, यात्रा हीं करण्याविषयीं मनांतही आणूं नये."

**अस्यापवादः** तत्रैवब्राह्मे मुंडनंचोपवासश्चगौतम्यांसिंहगेगुरौ कन्यागतेतुकृष्णायांनतुतत्तीरवासिनां तथा आद्यासौगौतमीगंगाद्वितीयाजाह्नवीस्मृता सर्वतीर्थफलंस्नानाद्गौतम्यांसिंहगेगुरौ ।

**याचा अपवाद**-तेथेंच **ब्राह्मांत** सांगतो—सिंहस्थ गुरु असतांही गोदावरीचे ठायीं आणि कन्यागत गुरु असतां कृष्णेचे ठायीं यात्रा करणाऱ्यांस क्षौर, उपवास आहेत; तीरवासी जनांस नाहींत." तसेंच "गौतमी पहिली गंगा व दुसरी जाह्नवी गंगा होय, यास्तव सिंहस्थ गुरु असतां गोदावरीचे ठायीं स्नान केल्यानें सर्वतीर्थस्नानाचें फल प्राप्त होतें."

**संहिताप्रदीपे** स्यात्सप्तरात्रंगुरुशुक्रयोश्चबालत्वमह्नांदशकंचवार्धम् वृद्धौसितेज्यावशुभौशिशुत्वेशुभौ यतस्तावुपचीयमानौ **वसिष्ठः** अतिचारगतेजीवेवर्जयेत्तदनंतरं व्रतोद्वाहादिकार्येषुअष्टाविंशतिवासरान् ।

**संहिताप्रदीपांत** सांगतो-"गुरु व शुक्र यांचे उदयानंतर सात दिवस बाल्य आणि अस्ताचे पूर्वीं दहा दिवस वार्धक्य; वार्धक्याचे अधिक दिवस सांगण्याचें कारण, गुरुशुक्रांचें वार्धक्य अशुभ व बाल्य शुभ होय, ते गुरु व शुक्र बाल्यापासून

पुढें अस्तंगत होणारे आहेत" **वसिष्ठ** म्हणतो-"अतिचारगत ( म्हणजे शीघ्र गतीनें पूर्वराशीचे शेष उल्लंघून दुसऱ्या राशींचे ठायीं जो संचार तो अतिचार, त्या अतिचाराप्रत गेलेला ) गुरु असतां उपनयन, विवाह इत्यादि शुभ कार्यांचे ठायीं अठ्ठावीस दिवस टाकावे."

**बाल्यादिलक्षणमुक्तंब्रह्मसिद्धांते** रविणासक्तिरन्येषांग्रहाणामस्तउच्यते ततोऽर्वाग्वार्धकंप्रोक्त-मूर्ध्वंबाल्यंप्रकीर्तितमिति **बाल्यादिपरिमाणंचवृत्तशते** बालःशुक्रोदिवसदशकंपंचकंचैववृद्धःपश्चा-त्प्रांत्रितयमुदितःपक्षमैद्यांक्रमेण जीवोवृद्धःशिशुरपितथापक्षमन्यैःशिशूतौवृद्धौप्रोक्तौदिवसदशकंचापरैः-सप्तरात्रम् पश्चिमतउदयेदशदिनानिबालः अस्तेपंचदिनानिवृद्धः पूर्वतोदिनत्रयंबालःपक्षंचवृद्धइत्यर्थः जीवो-गुरुः अन्यत्रत्वन्यथोक्तं प्राक्पश्चादुदितःशुक्रःपंचसप्तदिनंशिशुः विपरीतंतुवृद्धत्वंतद्वदेवगुरोरपीति **एषां-चपक्षाणांव्यवस्थामाहमिहिरः** बहवोदर्शिताःकालायेबाल्येवार्धकेपिवा ग्राह्यास्तत्राधिकाःशेषा-देशभेदादुतापदीति देशभेदश्च**मदनरत्नेगार्ग्यः** शुक्रोगुरुःप्राक्चपराक्चबालोविंध्येदशावंतिषुसप्तरात्रम् वंगेषुहूणेषुचषट्चपंचशेषेचदेशेत्रिदिनंवदंतीति ।

## शुक्र व गुरु यांचें बाल्यादि लक्षण सांगतो.

**ब्रह्मसिद्धांतांत**-"रवीसहवर्तमान जी अन्य ग्रहांची आसक्ति ( जवळ राहणें ) तें अस्त म्हटलें आहे. त्या अस्ताच्या पूर्वीची जी अवस्था तें वार्धक्य, उदयानंतर जी अवस्था तें बाल्य म्हटलें आहे." **बाल्यादिक दिवसांची संख्या सांगतो-वृत्तशतांत** म्हणतो. "शुक्र पश्चिमदिशेस उदय पावला असतां दहा दिवस बाल्य, अस्तंगत झाला असतां पांच दिवस वार्धक्य; पूर्व दिशेस उदय पावला असतां तीन दिवस बाल्य, आणि अस्तंगत झाला असतां पंधरा दिवस वृद्धत्व जाणावें; याचप्रमाणें गुरूचें बाल्य व वार्धक्य जाणावें. दुसरे म्हणतात-शुक्र व गुरु यांचें बाल्य आणि वार्धक्य पंधरा पंधरा दिवस आहे; अन्य म्हणतात दहा दहा दिवस; अपर म्हणतात सात सात दिवस आहे." **अन्य ग्रंथीं दुसऱ्या प्रकारें सांगतो**-' शुक्र पूर्व दिशेस उदय पावला असतां पांच दिवस बाल, आणि पश्चिम दिशेस उदय पावला असतां सात दिवस बाल; वार्धक्य तर याच्या उलट, म्हणजे पूर्व दिशेस अस्त असतां सात दिवस वार्धक्य, आणि पश्चिम दिशेस अस्त असतां पांच दिवस वार्धक्य होय. याप्रमाणेंच गुरूचेंही बाल्य व वार्धक्य जाणावें." ह्या सर्व पक्षांची व्यवस्था **मिहिर** सांगतो—"गुरुशुक्रांच्या बाल्यवार्धक्याविषयीं बहुत काल दाखविले, त्यांमध्यें जे अधिक काल ( १५।१० इत्यादि दिवस ) असतील ते घ्यावे, इतर ( न्यूनकाल ) देशभेदानें अथवा आपत्कालीं घ्यावे." **मदनरत्नांत गार्ग्य** देशभेद सांगतो-"शुक्र व गुरु हे पूर्वेस व पश्चिमेस उदित असतां विंध्यप्रदेशीं दहा दिवस बाल, अवंतिदेशांत सात दिवस, वंग देशांत सहा दिवस, हूणदेशांत पांच दिवस, इतर देशांत तीन दिवस बाल, असें विद्वान् म्हणतात."

**अस्तादेरपवादःकाशीखंडे** नग्रहास्तोदयकृतोदोषोविश्वेश्वरालये **त्रिस्थलीसेतौवायवीये** गोदावर्यांगयायांचश्रीशैलेग्रहणद्वये सुरासुरगुरूणांचमौढ्यदोषोनविद्यते ग्रहणद्वयेतन्निमित्तककुरुक्षेत्रयात्रा-दानादावित्यर्थः तदाह **त्रिस्थलीसेतौलल्लः** उपप्लवेशीतलभानुभान्वोरर्धोदयेवैकपिलाख्यषष्ठ्यां सुरा-सुरेज्यास्तमयेपितीर्थेयात्राविधिःसंक्रमणेचशस्तः नमूढदोषोनचरात्रिदोषोनचाधिमासोनमृतिर्नसूतिः एवम-प्युत्तरार्धंपठंति इत्यलंबहुना ।

**अस्तादिकाचा अपवाद—काशीखंडांत** सांगतो—"विश्वेश्वराचें स्थान जें काशीक्षेत्र यांत ग्रहांचा अस्तदोष नाहीं." **त्रिस्थलीसेतूंत—वायुपुराणांत** सांगतो "गोदावरी, गया, श्रीशैल, यांचे ठायीं गुरुशुक्रास्ताचा दोष नाहीं. आणि चंद्र-सूर्यग्रहणनिमित्तक कुरुक्षेत्रयात्रा, दान इत्यादिकांविषयीं अस्तदोष नाहीं." **तेंच त्रिस्थलीसेतूंत सांगतो—लल्ल** म्हणतो—"चंद्रसूर्यांचें ग्रहण, अर्धोदयपर्व, कपिलाषष्ठी, आणि संक्रांति ह्या पर्वदिवशीं गुरुशुक्रांच्या अस्तांत देखील तीर्थयात्रा विधि प्रशस्त आहे तो करावा, त्याला दोष नाहीं." **"न मूढदोषो नच रात्रिदोषो न चाधिमासो न मृतिर्न सूतिः"** असेंही वरील श्लोकाचें उत्तरार्ध कोणी पठन करितात. अर्थ—"अस्तदोष नाहीं, रात्रिदोष नाहीं, अधिक-मासदोष नाहीं, मृताशौच व जननाशौच यांचाही दोष नाहीं." इतका निर्णय पुरे करितों, फार सांगत नाहीं.

**मलमासेचव्रतविशेषउक्तोहेमाद्रौपाद्मे** अधिमासेतुसंप्राप्तेगुडसर्पिर्युतानिच त्रयस्त्रिंशदपूपानिदा-तव्यानिदिनेदिने साज्यानिगुडमिश्राणिअधिमासेनृपोत्तम अधिमासेतुसंप्राप्तेत्रयस्त्रिंशत्तुदेवताः उद्दिश्यापू-

पदानेनपृथ्वीदानफलंलभेत् त्रयस्त्रिंशदपूपान्नंकांस्यपात्रेनिधायच सघृतंसहिरण्यंचब्राह्मणायनिवेदयेत् विष्णुरूपीसहस्रांशुःसर्वपापप्रणाशनः अपूपान्नप्रदानेनममपापंव्यपोहतु नारायणजगद्बीजभास्करप्रतिरूपक व्रतेनानेनपुत्रांश्चसंपदंचाभिवर्धय यस्यहस्तेगदाचक्रेगरुडोयस्यवाहनं शंखःकरतलेयस्यसमेविष्णुःप्रसीदतु कलाकाष्ठादिरूपेणनिमेषघटिकादिना योवंचयतिभूतानितस्मैकालात्मनेनमः कुरुक्षेत्रमयंदेशःकालःपर्वद्विजोहरिः पृथ्वीसममिदंदानंगृहाणपुरुषोत्तम मलानांचविशुद्ध्यर्थंपापप्रशमनायच पुत्रपौत्राभिवृद्ध्यर्थंतवदास्यामिभास्कर मंत्रेणानेनयोदद्यात्रयस्त्रिंशदपूपकान् प्राप्नोतिविपुलांलक्ष्मींपुत्रपौत्रादिसंपदः इतिनिर्णयसिंधौ मलमासनिर्णयः ।

## मलमाससंबंधी विशेषव्रत सांगतो.

**हेमाद्रींत-पद्मपुराणांत** म्हणतो-"अधिकमास प्राप्त असतां गुड, घृत यांनीं युक्त असे तेहतीस अपूप दररोज द्यावे. अधिकमासांत तेहतीस देवतांच्या उद्देशेंकरून अपूपांचें दान केलें असतां पृथ्वीदानाचें फल मिळतें. कांस्यपात्रांत घृतयुक्त असे तेहतीस अपूप घालून ते हिरण्यसहित ब्राह्मणाला द्यावे. दानाचा मंत्र—"**विष्णुरूपी सहस्रांशुः सर्वपापप्रणाशनः ॥ अपूपान्नप्रदानेन मम पापं व्यपोहतु ॥ नारायण जगद्बीज भास्करप्रतिरूपक ॥ व्रतेनानेन पुत्रांश्च संपदं चाभिवर्धय ॥ यस्य हस्ते गदाचक्रे गरुडो यस्य वाहनं ॥ शंखः करतले यस्य स मे विष्णुः प्रसीदतु ॥ कलाकाष्ठादिरूपेण निमेषघटिकादिना ॥ यो वंचयति भूतानि तस्मै कालात्मने नमः ॥ कुरुक्षेत्रमयं देशः कालः पर्व द्विजो हरिः ॥ पृथ्वीसममिदं दानं गृहाण पुरुषोत्तम ॥ मलानां च विशुद्ध्यर्थं पापप्रशमनाय च ॥ पुत्रपौत्राभिवृद्ध्यर्थं तव दास्यामि भास्कर ॥**" "ह्या मंत्रेंकरून जो पुरुष तेहतीस अपूपांचें दान करितो त्याला विपुल लक्ष्मी व पुत्रपौत्रादिक संपत्ति हीं प्राप्त होतात." **इति निर्णयसिंधौ महाराष्ट्रटीकायां मलमासनिर्णयः ॥**

पक्षनिर्णयस्तु दैवेमुख्यःशुक्लपक्षःकृष्णःपित्र्येविशिष्यतइति**माधवे**नोक्तः ।

## पक्षनिर्णय सांगतो.

"देवकर्माविषयीं शुक्लपक्ष मुख्य आणि पितृकर्माविषयीं कृष्णपक्ष मुख्य आहे" असा **माधवानें** निर्णय सांगितला आहे, तो समजावा.

**अथतिथिनिर्णयः** तत्रतिथिर्द्वेधा शुद्धाविद्धाच दिनेतिथ्यंतरसंबंधरहिताशुद्धा तद्रहिताविद्धा तत्र शुद्धायामसंदेहाद्विद्धानिर्णीयते तत्रसामान्यतोवेधमाह**माधवीयेपैठीनसिः** पक्षद्वयेपितिथयस्तिथिंपूर्वांतथोत्तरां त्रिभिर्मुहूर्तैर्विध्यंतिसामान्योऽयंविधिःस्मृतइति **हेमाद्रिमदनरत्ना**दौतुद्विमुहूर्तोप्युक्तः उदिते दैवतंभानौपित्र्यंचास्तमितेरवौ द्विमुहूर्तात्रिरह्नश्चसातिथिर्हव्यकव्ययोरिति **विष्णुधर्मोक्तेः** द्विमुहूर्तत्वं चानुकल्पः द्विमुहूर्तापिकर्तव्यायातिथिर्वृद्धिगामिनीति**दक्षेणा**पिशब्दोक्तेः अयंवेधःप्रातरेव सायंतुत्रिमुहूर्तो वेधएव यांतिथिंसमनुप्राप्ययात्यस्तंपद्मिनीपतिः सातिथिस्तद्दिनेप्रोक्तात्रिमुहूर्तैवयाभवेदिति **स्कांदोक्तेः दीपिका**पि त्रिमुहूर्तगातुसकलासायेति ।

## आतां तिथिनिर्णय सांगतो.

तिथि दोन प्रकारची, एक **शुद्धा**तिथि आणि दुसरी **विद्धा**तिथि; ज्या तिथीस सार्‍या दिवसांत अन्यतिथीचा संबंध नाहीं ती शुद्धातिथि, म्हणजे सूर्योदयापासून अस्तमानापर्यंत असणारी-व शिवरात्र्यादिक व्रतांचे ठायीं मध्यरात्रीपर्यंत असणारी ती **शुद्धा**तिथि; तीहून भिन्न ती **विद्धा**तिथि जाणावी. शुद्धातिथीविषयीं संशय नसल्यामुळें निर्णयाचें प्रयोजन नाहीं. **विद्धातिथीचा निर्णय सांगतो**—त्या विद्धातिथीच्या निर्णयासाठीं सामान्यतः **वेध** सांगतो—**माधवीयांत-पैठीनसि** म्हणतो—"शुक्ल व कृष्ण ह्या दोनही पक्षांत सर्व तिथि, पूर्व तिथीला व उत्तर तिथीला तीन मुहूर्तांनीं विद्ध करितात, हा वेधाचा प्रकार सामान्य सर्व तिथींना सांगितला आहे." **हेमाद्रि, मदनरत्न** इत्यादिकांत तर द्विमुहूर्तही वेध सांगितला आहे. कारण "सूर्याच्या उदयकालीं दोन मुहूर्त दैवत ( देवदेवताक ), आणि सूर्याच्या अस्तसमयीं तीन मुहूर्त पित्र्य ( पितृदेवताक ) होत, यास्तव प्रातःकालीं दोन मुहूर्त असणारी तिथि हव्या ( देवकर्मा ) विषयीं घ्यावी. आणि सायंकालीं तीन मुहूर्त असणारी तिथि कव्या ( पित्र्यकर्मा ) विषयीं घ्यावी" असें **विष्णुधर्मांत वचन आहे.** प्रातःकालीं दोन मुहूर्त

असें जें सांगितलें, तो अनुकल्प ( गौणपक्ष ) आहे. कारण, "जी तिथि वाढणारी असेल ती जरी दोन मुहूर्तंही असली तरी घ्यावी" या **दक्षस्मृतींत** 'अपि' शब्द (दोन मुहूर्तंही) आहे. हा दोन मुहूर्तांचा वेध प्रातःकालींच ग्रहण करावा. सायंकालीं तर त्रिमुहूर्तंच वेध घ्यावा. कारण, "सूर्य ज्या तिथीला जाऊन अस्त पावतो ती तिथि अस्ताचे पूर्वी तीन मुहूर्त असतां संपूर्ण जाणावी" असें **स्कांद**वचन आहे. **दीपिकाही**—"सायंकालीं त्रिमुहूर्तव्यापिनी जी तिथि ती संपूर्ण तिथि होय."

यानितु व्रतोपवासस्नानादौघटिकैकापियाभवेत् उदयेसातिथिर्ग्राह्याविपरीतातुपैतृकइत्यादीनिस्कांदादिवचनानितानिवैश्वानराधिकरणन्यायेनावयवस्तुत्यात्रिमुहूर्तप्रशंसापराणि **तिथिविशेषेवेधविशेषः**-**स्कांदे** नागोद्वादशनाडीभिर्दिक्पंचदशभिस्तथा भूतोष्टादशनाडीभिर्दूषयत्युत्तरांतिथिमिति अयंचोपवासातिरिक्तविषयइतिवक्ष्यते इतिवेधः ।

आतां जीं "उदयकालीं एक घटिका जरी तिथि असली तरी ती व्रत, उपवास, स्नान इत्यादिक कर्माविषयीं घ्यावी; पितृकर्माविषयीं अस्तकालगामिनी घ्यावी" इत्यादिक स्कांदादिवचनें तीं, वैश्वानराधिकरणन्यायानें अवयवाच्या स्तुतिद्वारानें त्रिमुहूर्तप्रशंसापर आहेत. **विशेष तिथींना विशेष वेध स्कांदांत** सांगतो—"पंचमी बारा घटिकांनीं षष्ठीला विद्ध करिते. दशमी पंधरा घटिकांनीं एकादशीला विद्ध करिते. चतुर्दशी अठरा घटिकांनीं उत्तर तिथीला ( पौर्णिमेला ) विद्ध करिते." हा सर्व प्रकारचा वेध उपवासव्यतिरिक्तविषयक होय, असें पुढें सांगूं. याप्रमाणें वेधनिर्णय जाणावा.

तत्रसर्वातिथिर्येदहःकर्मकालव्यापिनीसैवग्राह्या कर्मणोयस्ययःकालस्तत्कालव्यापिनीतिथिः तयाकर्माणिकुर्वीतह्रासवृद्धीनकारणमिति**विष्णुधर्मोक्तेः** दिनद्वयेतद्व्याप्तावेकदेशव्याप्तौवायुग्मवाक्यान्निर्णयः तस्य पूर्वाबाधेनोपपत्तेः कर्मकालस्यप्रधानांगत्वाच्च ।

तिथि घ्यावयाची ती अशी—ज्या कर्माचा जो काल रात्री किंवा दिवसा असेल त्या कालीं व्यापून राहणारी ज्या दिवशीं जी तिथि असेल तीच घ्यावी. कारण, "ज्या कर्माचा जो काल तत्कालव्यापिनी तिथि घ्यावी. त्या तिथीनें कर्म करावीं; कर्मकालाविषयीं क्षय, वृद्धि हीं कारण नाहींत" असें **विष्णुधर्मांत** वचन आहे. दोन दिवशीं कर्मकालव्यापिनी तिथि असली किंवा एकदेशव्यापिनी असली तर युग्मवाक्यानें निर्णय करावा. तसा निर्णय केला असतां पूर्वोक्त कर्मकालाचा बाध न येतां वाक्याची उपपत्ति होते. कर्मकालाचा बाध होऊं द्या, असें म्हणतां कामा नये; कारण, कर्मकाल हें प्रधान अंग आहे.

**युग्मवाक्यंतुनिगमः** युग्माग्नियुगभूतानांषण्मुन्योर्वसुरंध्रयोः रुद्रेणद्वादशीयुक्ताचतुर्दश्याचपूर्णिमा प्रतिपद्यप्यमावास्यातिथ्योर्युग्मंमहाफलं एतद्व्यस्तंमहादोषंहंतिपुण्यंपुराकृतमिति अत्ररंध्रांताःशब्दाद्वितीयादिनवम्यंततिथिवाचकाः रुद्रएकादशी द्वितीयातृतीयायुतासाचद्वितीयायुतेतिसप्तयुग्मानीत्यर्थः इदंचशुक्लपक्षे अमाप्रतिपद्युग्मस्यपूर्णिमायाश्चतत्रैवसत्त्वादिति**केचित्** तत्त्वंत्वमावास्याप्रतिपद्युग्मात्कृष्णपक्षलिंगात्पक्षद्वयपरमिदंतत्तद्विशेषवाक्यैःकृष्णेतिथिविशेषोपोह्यतइति दशमीतूक्ता**पुराणसमुच्चये** संपूर्णेदशमीकार्यामिश्रितापूर्वयाथवेति संपूर्णेशुक्लपक्षे त्रयोदशीतु**सुमंतु**नोक्ता त्रयोदशीतुकर्तव्याद्वादशीसहितामुनेइति ।

**युग्मवाक्य असें—निगम**—"युग्म म्हणजे द्वितीया, अग्नि म्हणजे तृतीया, युग म्हणजे चतुर्थी, भूत म्हणजे पंचमी, षट् म्हणजे षष्ठी, मुनि म्हणजे सप्तमी, वसु म्हणजे अष्टमी, रंध्र म्हणजे नवमी, रुद्र म्हणजे एकादशी. द्वितीया तृतीयाविद्धा घ्यावी, तृतीया द्वितीयाविद्धा घ्यावी. याप्रमाणें द्वितीया व तृतीया यांचें युग्म, चतुर्थी व पंचमीचें युग्म, षष्ठी व सप्तमीचें युग्म, अष्टमी व नवमीचें युग्म, एकादशी व द्वादशीचें युग्म, चतुर्दशी व पौर्णिमेचें युग्म, अमावास्या व प्रतिपदेचें युग्म, याप्रमाणें सात युग्में होत. तिथींचें युग्म महाफल देणारें आहे. आणि याच्या उलट म्हणजे युग्मतिथि ज्या नसतील त्यांचा योग महादोषकारक असून पूर्वींचें पुण्य घालवितो." हीं युग्में शुक्लपक्षांतील आहेत. कारण, अमावास्या व

---

१. वैश्वानराधिकरणन्याय—पुत्र झाला असतां द्वादशकपाल ( बाराकपालांत संस्कार केलेल्या ) पुरोडाशाचा वैश्वानरदेवतेला होम करावा, असें सांगून पुढें अष्टाकपाल पुरोडाश पवित्र करितो, नवकपाल तेज धारण करितो, दशकपाल अन्नादिक देतो, एकादशकपाल इंद्रियें चांगलीं देतो, आणि द्वादशकपाल पशु देतो. जो पिता पुत्र झाला असतांही द्वादशकपाल इष्टि करितो, तो पुत्र पवित्र, तेजस्वी, अन्नाद्य, इंद्रियुक्त, आणि पशुयुक्त होतो. या ठिकाणीं द्वादशकपालांत अष्टाकपालादिपुरोडाशांचा अंतर्भाव होऊन त्या द्वादशकपालानेंच अष्टाकपालादिकांचीं फळें मिळतात, म्हणून त्या अष्टाकपालादि अवयवांच्या स्तुतीनें द्वादशकपाल जो अवयवी त्याची स्तुति केली जाते. त्या न्यायानें एथें त्रिमुहूर्तांचा अवयव जी एकादिघटिका तिच्या स्तुतीनें त्रिमुहूर्तांची प्रशंसा करणारीं हीं वचनें आहेत, असें समजावें.

प्रतिपदेचें युग्म, आणि चतुर्दशी व पौर्णिमेचें युग्म हीं शुक्लपक्षांतच आहेत असें कोणी म्हणतात. त्याचें तत्त्व म्हटलें तर, अमावास्या व प्रतिपदेचें युग्म हें कृष्णपक्षांतील घेण्यास लिंग (प्रमाण) असल्यामुळें हें युग्मवाक्य उभयपक्षपर आहे. आतां कृष्णपक्षांत ज्या ज्या युग्मतिथी इष्ट नसतील त्या त्या युग्मतिथींचें निराकरण त्या त्या विशेष वाक्यांनीं करावें, असें तात्पर्य. **पुराणसमुच्चयांत** दशमी सांगतो-"शुक्लपक्षांतील दशमीतिथि, पूर्वतिथीनें ( नवमीनें ) मिश्रित ( युक्त ) अशी घ्यावी. त्रयोदशी तर **सुमंतूनें** सांगितली आहे—ती अशी:—"हे मुने, त्रयोदशी तिथि, द्वादशीसहित असेल ती घ्यावी."

**कृष्णपक्षेत्वापस्तंबः** प्रतिपत्सद्वितीयास्याद्वितीयाप्रतिपद्युता चतुर्थीसंयुतायाचसातृतीयाफलप्रदा पंचमीचप्रकर्तव्यापष्ठ्यायुक्तातुनारद कृष्णपक्षेष्टमीचैवकृष्णपक्षेचतुर्दशी पूर्वविद्धाप्रकर्तव्यापरविद्धानकुत्रचित् दशमीचप्रकर्तव्यासदुर्गाद्विजसत्तम षष्ठ्यष्टमीअमावास्याकृष्णपक्षेत्रयोदशी एताःपरयुताःपूज्याःपराःपूर्वेण-संयुताइति ।

कृष्णपक्षांतील तिथींविषयीं सांगतो-**आपस्तंब**-"प्रतिपदा द्वितीयायुक्त घ्यावी. द्वितीया प्रतिपदायुक्त घ्यावी. तृतीया चतुर्थीयुक्त घ्यावी ती फलप्रदा होते. पंचमी षष्ठीयुक्त घ्यावी. कृष्णपक्षांतील अष्टमी, चतुर्दशी, त्या तिथि पूर्वविद्धा कराव्या, परविद्धा कदापि करूं नयेत. दशमी नवमीयुक्ता करावी. कृष्णपक्षांतील षष्ठी, अष्टमी, अमावास्या, त्रयोदशी त्या तिथि उत्तरविद्धा घ्याव्या. आणि उत्तरतिथि पूर्वतिथिविद्धा घ्याव्या."

यत्तु**व्याघ्रः** खर्वोदर्पस्तथाहिंसात्रिविधंतिथिलक्षणम् खर्वदर्पौपरौपूज्यौहिंसास्यात्पूर्वकालिकीति खर्वः साम्यम् दर्पोवृद्धिः तयोःपरा हिंसाक्षयस्तत्रपूर्वेत्यर्थः एतच्छ्राद्धादिविषयम् द्वितीयादिषुयुग्मानांपूज्यता नियमादिषु एकोद्दिष्टादिवृद्ध्यादौह्रासवृद्ध्यादिचोदनेति**व्यासोक्तेः** नियमादिषु व्रतदानादिकर्मसु एको-द्दिष्टादितिथेर्वृद्ध्यादावित्यर्थः ।

आतां जें **व्याघ्र** सांगतो—"खर्व, दर्प, आणि हिंसा असें तीन प्रकारचें तिथिस्वरूप आहे; खर्व व दर्प हे पर घ्यावे, व हिंसा पूर्व घ्यावी." खर्व म्हणजे साम्य, दर्प, म्हणजे वृद्धि, साम्य किंवा वृद्धि असतां परविद्धा घ्यावी, आणि हिंसा म्हणजे क्षयगामिनी असतां पूर्वविद्धा तिथि घ्यावी, असा फलितार्थ आहे. हें वचन श्राद्धादिविषयक आहे. कारण, "द्वितीयादिक तिथींचीं युग्में जीं सांगितलीं तीं व्रतें, दानें इत्यादिक देवकर्मांविषयीं जाणावीं, एकोद्दिष्टादिक पित्र्यकर्म, तिथीची वृद्धि, क्षय यांचे निर्णयानें करावीं, अशाकरितां क्षयवृद्धी सांगितली आहे" असें **व्यासवचन** आहे.

कर्मकालव्याप्त्यभावेतुकर्मोपक्रमकालगैवग्राह्या कर्मोपक्रमकालगातुकृतिभिर्ग्राह्यानयुग्मादरइति**दीपि-कोक्तेः यानितु** यांतिथिंसमनुप्राप्यउदयंयातिभास्करः सातिथिःसकलाज्ञेयादानाध्ययनकर्मस्वित्यादीनि-तानित्रिमुहूर्तादिस्तुतिरिति**निर्णयशैली ।**

कर्मकालव्यापिनी नसेल तर कर्माच्या उपक्रमाचा ( आरंभाचा ) जो काल त्या कालीं असेल तीच घ्यावी. कारण, "कर्मोपक्रमकालगामिनी घ्यावी, युग्मवाक्याचा आदर नाहीं ( म्हणजे युग्मवाक्यानें निर्णीत असून कर्मकालव्यापिनीच तिथि आवश्यक आहे असें नाहीं. )" असें **दीपिकावचन** आहे. आतां जीं "ज्या तिथीला जाऊन सूर्य उदय पावतो ती तिथि: दान, अध्ययन इत्यादि कर्मांविषयीं संपूर्ण जाणावी" इत्यादिक वचनें तीं त्रिमुहूर्तादि स्तुतिपर होत, याप्रमाणें **निर्णयशैली** आहे.

**अथैकभक्तं** तत्कालः**पाद्मे** मध्याह्नव्यापिनीग्राह्याएकभक्तेसदातिथिरिति मध्याह्नश्चपंचधाविभक्त-दिनतृतीयांशः तेनयद्यपिद्वादशदंडानंतरंप्राप्यते तथापि दिनार्धसमयेतीतेभुज्यतेनियमेनयत् एकभक्तमि-तिप्रोक्तमतस्तत्स्याद्दिवैवहीति**स्कांदोक्तेः**षोडशसप्तदशादिदंडामुख्यःकालः **दीपिकायांतु** मध्याह्नांत्य-दलेत्रिभागदिवसेस्यादेकभक्तमिति ततःसूर्यास्तपर्यंतंगौणः दिवैवहीत्यस्यवैयर्थ्यापत्त्यैतत्परत्वात् ।

## आतां एकभक्तव्रताचा निर्णय सांगतो.

**एकभक्तव्रताचा काल पाद्मांत सांगतो**-"एकभक्तव्रताविषयीं तिथि मध्याह्नव्यापिनी सर्वदा घ्यावी." दिवसाचे पांच भाग करून तिसरा जो भाग तो मध्यान्ह, यावरून तो जरी बारा घटिकांनंतर प्राप्त होतो तथापि "दिवसाचें अर्ध गेलें असतां नियमेंकरून जें भोजन करणें तें एकभक्त म्हटलें आहे, यास्तव तें दिवसासच करावें" असें स्कंदपुराणवचन आहे, म्हणून सोळावी, सतरावी इत्यादिक जी घटिका तो मुख्यकाळ. दीपिकेंत तर-"दिवसाचे तीन भाग करून त्यांच्या-

ऱ्हाचे शेवटचे भागीं एकभक्तव्रत करावें" असें आहे. मध्यान्हानंतर सूर्यास्तापर्यंत गौण काल. कारण, 'दिवसासच करावें' असें जें वरील वचनांत सांगितलें तें व्यर्थ होऊन गौणकालबोधक आहे.

अत्रपूर्वेद्युरेवव्याप्तिःपरेद्युरेवोभयेद्युर्व्याप्तिस्तदभावोंशव्याप्तिस्तत्रापिसाम्यंवैषम्यंचेति**षट्पक्षाः** तत्राद्ययोरसंदेहएव तृतीयेतुपूर्वेह्निगौणमुख्यव्याप्तेःसत्त्वात्पूर्वेति**माधवः** युग्मवाक्यान्निर्णयइति**हेमाद्रिः** चतुर्थपक्षेपूर्वैवगौणकालव्याप्तेःसत्त्वात् वैषम्येणांशव्याप्तौयाधिकासाग्राह्या साम्येपूर्वा अयंचस्वतंत्रैकभक्तनिर्णयः अन्यांगेउपवासप्रतिनिधौतदनुसारेणनिर्णयः ।

ह्या एकभक्त तिथीच्या व्याप्तीविषयीं सहा पक्ष आहेत, ते असेः-१ पूर्व दिवशींच ( मुख्यकालीं ) व्याप्ति, २ दुसऱ्या दिवशींच व्याप्ति, ३ दोनही दिवशीं व्याप्ति, ४ दोनही दिवशीं व्याप्ति नसणें, ५ दोनही दिवशीं सारखी एकदेशव्याप्ति, ६ दोन दिवशीं विषम एकदेशव्याप्ति, याप्रमाणें सहा पक्ष आहेत. त्यांमध्यें पहिल्या दोन पक्षांविषयीं संशयच नाहीं. तिसऱ्या पक्षीं पहिल्या दिवशीं गौणकालीं व मुख्यकालीं व्याप्ति असल्यामुळें पूर्वा करावी, असें **माधव** सांगतो. युग्मवाक्यानें निर्णय करावा, असें **हेमाद्रि** सांगतो. दोनही दिवशीं व्याप्ति नसणें, या चवथ्या पक्षीं गौणकालीं सायंकाळीं व्याप्ति आहे म्हणून पूर्वींचीच घ्यावी. वैषम्येंकरून एकदेशव्याप्ति असेल तर ज्या दिवशीं अधिक व्याप्ति असेल ती घ्यावी. सारखी एकदेशव्याप्ति असेल तर पूर्वींची घ्यावी. हा निर्णय, स्वतंत्र जें एकभक्तव्रत त्याविषयीं आहे उपवासाचा प्रतिनिधि, अन्य व्रताचें अंगभूत अशा एकभक्तव्रताविषयीं निर्णय त्या त्या व्रताच्या अनुसारेंकरून जाणावा.

**अथनक्तं** तच्चदिनानशनपूर्वरात्रिभोजनं तत्रप्रदोषव्यापिनीग्राह्या प्रदोषव्यापिनीग्राह्यातिथिर्नक्तव्रतेसदेति**वत्सोक्तेः** प्रदोषस्तु त्रिमुहूर्तंप्रदोषःस्याद्भानावस्तंगतेसति नक्तंतत्रतुकर्तव्यमितिशास्त्रविनिश्चयइति**मदनरत्नेव्यासोक्तः** तत्रापित्रिदंडोत्तरंकार्यं सायंसंध्यात्रिघटिकाअस्तादुपरिभास्वतइति**स्कांदोक्तेर्दं**डत्रयस्यसंध्यात्वात्तत्र चत्वारीमानिकर्माणिसंध्यायांपरिवर्जयेत् आहारंमैथुनंनिद्रांस्वाध्यायंचचतुर्थकमिति**मार्कंडेयेन**भोजननिषेधात् मुहूर्तोनंदिनंनक्तंप्रवदंतिमनीषिणः नक्षत्रदर्शनान्नक्तमहंमन्येगणाधिपेति**माधवीये भविष्योक्तेश्च** ।

## आतां नक्तव्रताचा निर्णय सांगतो.

नक्त म्हणजे दिवसा उपोषण करून रात्रीं भोजन करणें तें. त्या नक्तव्रताविषयीं प्रदोषकालव्यापिनी तिथि घ्यावी. कारण, "नक्तव्रताविषयीं तिथि प्रदोषव्यापिनी सदा घ्यावी" असें **वत्स**वचन आहे. **प्रदोषकाल**-"सूर्य अस्तंगत झाल्यानंतर त्रिमुहूर्त ( सहा घटिका ) जो काल तो प्रदोष होय, त्या कालीं नक्त करावें, असा शास्त्रनिश्चय आहे." असा **मदनरत्नांत व्यासोक्त** निर्णय समजावा. त्या प्रदोषकालाच्या पहिल्या तीन घटिका टाकून नंतर भोजन करावें. कारण, "सूर्यास्तानंतर तीन घटिका सायंसंध्या" ह्या **स्कंदपुराणवचना**वरून तीन घटिका हा संध्याकाळ आहे: म्हणून त्या कालीं "भोजन, निद्रा, मैथुन, अध्ययन हीं चार कर्में संध्याकाळीं वर्ज्य करावीं" ह्या **मार्कंडेय**वचनानें भोजनाचा निषेध केला आहे. "सायंकाळीं मुहूर्तापेक्षां कमी दिवस राहिला म्हणजे तो नक्ताचा काल, असें विद्वान् सांगतात: ( शिव म्हणतो ) हे गणाधिप! नक्षत्रदर्शनीं नक्त काल, असें मी मानितों" असें **माधवाच्या** ग्रंथांत **भविष्यपुराण वचन**ही आहे.

**गौडास्तु** प्रदोषोस्तमयादूर्ध्वंघटिकाद्वयमिष्यतइति वत्सोक्तःप्रदोषः संध्याच दिनराज्योःसंधौमुहूर्तः अर्धास्तमयात्संध्याव्यक्तीभूतानतारकायावत् तेजःपरिहानिवशाद्भानोरर्धोदयंयावदिति**वराहोक्ते**रित्याहुः तन्न अस्यसंध्यावंदनानध्यायादिपरत्वात् अतएवतत्रखंडमंडलस्यसंध्यात्वमुक्तं**विज्ञानेश्वरेण** यच्च**मदनरत्ने** नक्तस्यवैधत्वाद्रागप्राप्तभोजनगोचरोनिषेधइत्युक्तं तन्न विधेर्निषेधाविरोधात् अन्यथाकपिंजलानित्यत्र त्रिभ्योधिकानांहिंसनंस्यात् ।

**गौडग्रंथकार** तर—"सूर्यास्तानंतर दोन घटिका प्रदोषकाल म्हटला आहे" असा **वत्सानें** सांगितलेला प्रदोष होय. संध्या म्हणजे दिवस व रात्रि यांच्या संधीचा मुहूर्त होय; कारण, "सूर्याच्या अर्धास्तानंतर जोंपर्यंत सूर्याचें तेज कमी होऊन तारका स्पष्ट दृष्टिगोचर झाल्या नाहींत तो संध्याकाल होय, उदयकालींही असाच संध्यानिर्णय आहे" असें **वराह**वचन आहे, असें सांगतात. तें बरोबर नाहीं; कारण, हें वाक्य संध्यावंदन, अनध्याय इत्यादिविषयक आहे. म्हणूनच खंडमंडल ( अर्धमंडल ) काल तो संध्याकाल, असें **विज्ञानेश्वरानें** सांगितलें आहे. आतां जें **मदनरत्नांत**—नक्त विधिप्राप्त असल्यामुळें त्याला हा वरील ("आहारं मैथुनं०" ह्या मार्कंडेयवचनोक्त ) भोजननिषेध नाहीं, तर इच्छेनें प्राप्त जें

भोजन त्याला तो निषेध आहे. असें सांगितलें; तें बरोबर नाहीं: कारण, एथें निषेधकाल सोडून भोजनविधीला सार्थक्य येत असल्यामुळें विधीला ( भोजनाला ) निषेधाचा विरोध येत नाहीं, म्हणून तो निषेध विधिप्राप्त नक्ताविषयींही आहे. असें न मानिलं तर—अश्वमेध यज्ञांत असें सांगितलें आहे कीं, वसंत देवतेला कपिंजल पक्ष्यांचें आलभन ( याग ) करावें, त्या ठिकाणीं बहुवचन असल्यामुळें तिहींपेक्षां अधिकही पक्ष्यांचें आलभन ( हिंसा ) होईल, याकरितां त्या ठिकाणीं तीन पक्ष्यांची हिंसा करून शास्त्रार्थाची ( विधीची ) उपपत्ति झाली असतां अधिक हिंसा होईल तर दोषी होईल असें सांगितलें आहे—त्याप्रमाणें एथें निषेधकालाचें उल्लंघन करून भोजन करावें, असा भावार्थ.

सायंकालेनक्तंतुदिनद्वयेप्रदोषास्पर्शेज्ञेयं अतथात्वेपरत्रस्यादस्तादर्वाग्यतोहिसेति**जाबालि**वचनात् प्रदोषव्यापिनीनस्याद्दिवानक्तंविधीयते आत्मनोद्विगुणाछायामंदीभवतिभास्करे तन्नक्तंनक्तमित्याहुर्ननक्तंनिशिभोजनमिति**स्कांदाच्च** यत्यादीनामपिसायाह्ने नक्तंनिशायांकुर्वीतगृहस्थोविधिसंयुतः यतिश्चविधवाचैवकुर्यात्तत्सदिवाकरमिति तत्रैव**स्मृत्यंतर**रात् इदमपुत्रविधुरोपलक्षणं पुत्रवतस्तुरात्रावेव अनाश्रमोप्याश्रमीस्यादपत्नीकोपिपुत्रवानिति**संग्रहोक्तेः** ।

सायंकालीं नक्त करणें तें दोन दिवशीं प्रदोषकालीं तिथीचा स्पर्श नसेल तर करावें, कारण, "उभयदिनीं प्रदोषकालव्याप्ति नसेल तर परदिवशीं नक्त करावें. कारण, परदिवशीं सूर्यास्ताच्या पूर्वी व्याप्ति आहे" असें **जाबालि**वचन आहे; आणि "प्रदोषव्यापिनी नसेल तर दिवसा नक्त करावें. सूर्य मंद झाला असतां आपली छाया दुप्पट झाली म्हणजे त्या वेळीं जें नक्त करणें तें नक्त होय, रात्रीं भोजन करणें तें नक्त नव्हे, असें विद्वान् सांगतात" असें **स्कांद**वचनही आहे. यति, विधवा यांनींही नक्तभोजन सायंकालीं ( सूर्यास्तापूर्वी ) करावें. कारण, "विधियुक्त गृहस्थाश्रमी यानें रात्रीं नक्त करावें, यति व विधवा यांनीं नक्त सूर्य आहे तों करावें" असें तथेंच **स्मृत्यंतर**वचन आहे. हें वचन अपुत्र जो विधुर त्याचें उपलक्षण आहे, पुत्रवंतानें रात्रींच नक्त करावें. कारण, "पत्नीरहित असून जर पुत्रवान् असेल तर तो अनाश्रमी असून आश्रमी आहे" असें **संग्रह**वचन आहे. अर्थात् पुत्ररहित विधुर तो अनाश्रमी होय.

सौरनक्तंतुदिवैव त्रिमुहूर्तस्पृगेवाह्निनिशिचैतावतीतिथिः तस्यांसौरंभवेन्नक्तमहन्येवतुभोजनमिति**सुमंतूक्तेः** ।

सौर ( सूर्यदेवताक ) नक्त तर दिवसासच करावें: कारण, दिवसा त्रिमुहूर्त ( ६ घटिका ) व रात्रीं सहा घटिका असलेल्या तिथीचे ठायीं सौरनक्त करावें, व भोजन दिवसासच करावें" असें **सुमंतूचें** वचन आहे.

हरिनक्तेविशेषः **कालादर्शेस्कांदे** उदयस्थासदापूज्याहरिनक्तव्रतेतिथिरिति अन्यनक्तंतुसंक्रांत्यादावपिरात्रावेव निषेधस्यरागप्राप्तभोजनगोचरत्वेनवैधाबाधकत्वात् दिनद्वयव्याप्तौपरा उभयोर्यदिवातिथ्योःप्रदोषव्यापिनीतिथिः तत्रोत्तरत्रनक्तंस्यादुभयत्रापिसायतइति**कालादर्शेजाबालि**वचनात् अन्यपक्षेषुएकभक्तवन्निर्णयः ।

## हरिनक्ताविषयीं विशेष सांगतो.

**कालादर्शांत स्कंदपुराणांत**—"हरिनक्तव्रताविषयीं उदयकालव्यापिनी तिथि ग्रहण करावी." इतर नक्तव्रत तर, संक्रांति वगैरे असली तरी रात्रींच करावें. संक्रांति, रविवार इत्यादि दिवशीं रात्रिभोजनाचा जो निषेध, तो इच्छाप्राप्त भोजनविषयक असल्यामुळें त्यानें विधिप्राप्त भोजनाचा बाध होत नाहीं. दोन दिवशीं प्रदोषव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. कारण, "दोनदिवशीं प्रदोषव्यापिनी तिथि असेल तर उत्तरदिवशीं नक्त करावें. कारण, परदिवशीं सूर्यास्तापूर्वी व प्रदोषकालीं ती तिथि आहे" असें **कालादर्शांत जाबालि**वचन आहे. इतर पांच पक्षांविषयीं ( पूर्वदिवशींच व्याप्ति, परदिवशीं व्याप्ति, दोनीं दिवशीं व्याप्ति नसणें, अंशानें एकदेशव्याप्ति, सारखी एकदेशव्याप्ति, यांविषयीं ) एकभक्ताप्रमाणें निर्णय जाणावा.

**अत्रविशेषोमदनरत्नेगारुडे** हविष्यभोजनंस्नानंसत्यमाहारलाघवं अग्निकार्यमधःशय्यांनक्तभोजीषडाचरेत् अग्निकार्यंव्याहृतिहोमः **इतिनक्तं** अयाचितेतुविशेषवचनाभावात्पक्षेउपवासेप्राप्तेउपवासवन्निर्णयः ।

## या नक्तव्रताविषयीं विशेष सांगतो.

**मदनरत्नांत गरुडपुराणांत**-"हविष्यभोजन, स्नान, सत्यभाषण, अल्पाहार, अग्निकार्य ( व्याहृतिहोम ), भूमिशय्या,

हे सद्दा नियम नक्तव्रती यानें पाळावे." याप्रमाणें नक्तव्रताचा निर्णय समाप्त झाला. अयाचितव्रताविषयीं विशेषवचन नसल्यामुळें व अयाचित अन्न न मिळेल त्या दिवशीं उपवास प्राप्त असल्यामुळें त्याचा निर्णय उपवासाप्रमाणें समजावा.

**अथनक्षत्रव्रतकालनिर्णयः विष्णुधर्मे** उपोषितव्यंनक्षत्रंयस्मिन्नस्तमियाद्रविः युज्यतेयत्रवातारानिशीथेशनिनासहेति **माधवीयेस्कांदे** तत्रैवोपवसेदृक्षेयन्निशीथादधोभवेत् उपवासेयदृक्षंस्यात्तद्धिनक्तैकभक्तयोः ।

## आतां नक्षत्रव्रताच्या कालाचा निर्णय सांगतो.

**विष्णुधर्मांत**—"ज्या नक्षत्रीं सूर्याचें अस्त होतें तें नक्षत्र उपोषणास घ्यावें, अथवा अर्धरात्रीं चंद्राचा ज्या नक्षत्रास योग होतो तें नक्षत्र उपोषणास घ्यावें." **माधवीयांत—स्कंदपुराणांत** "जें नक्षत्र अर्धरात्रीच्यापूर्वी असेल त्याच नक्षत्रीं उपवास करावा. उपवासाविषयीं जें नक्षत्र तेंच नक्तव्रत व एकभक्तव्रत यांविषयीं ग्रहण करावें.

**अथव्रतपरिभाषा तत्राधिकारिणोमदनरत्नेभविष्ये** अनग्नयस्तुयेविप्रास्तेषांश्रेयोविधीयते व्रतोपवासनियमैर्नानादानैस्तथानृप अनग्निग्रहणमुपवासविषयम् अतएवदेवलः आहिताग्निरनड्वांश्च ब्रह्मचारीचतेत्रयः अश्नंतएवसिध्यंतिनैषांसिद्धिरनश्नतां एकादश्यादौतुवचनाद्भवतीतिवक्ष्यामः ।

## आतां व्रतपरिभाषा सांगतो.

**व्रताविषयीं अधिकारी सांगतो—मदनरत्नांत—भविष्यांत** "अग्निरहित जे विप्र त्यांचें कल्याण व्रतें, उपवास, नियम, नानाविध दानें यांहींकरून होतें" 'अग्निरहित' असें जें म्हटलें तें उपवासांविषयीं अधिकार सांगण्याकरितां आहे. म्हणूनच **देवल** म्हणतो—"आहिताग्नि ( अग्नियुक्त ब्राह्मण ), अनड्वान् ( बैल ), आणि ब्रह्मचारी हे तिघे भोजन करतील तरच कार्यसिद्धि करितील, हे उपोषण करतील तर स्वकीय कार्यसिद्धि करणार नाहींत." एकादशी इत्यादिक जीं नित्य उपवासव्रतें त्यांचेठायीं तर शास्त्रवचन आहे म्हणून उपवास होतो, असें पुढें सांगूं.

शूद्रस्याप्यधिकारः शूद्रोवर्णश्चतुर्थोपिवर्णत्वाद्धर्ममर्हति वेदमंत्रस्वधास्वाहावषट्कारादिभिर्विनेति**व्यासोक्तेः प्राच्यास्तु**वैश्यशूद्रयोर्द्विरात्राधिकोपवासनिषेधः वैश्याःशूद्राश्चयेमोहादुपवासंप्रकुर्वते त्रिरात्रंपंचरात्रंवातेषांव्युष्टिर्नविद्यते चतुर्थभक्तक्षपणंवैश्येशूद्रेविधीयते त्रिरात्रंतुनधर्मज्ञैर्विहितंब्रह्मवादिभिरिति **हेमाद्रौवचना**दित्याहुः यावदुक्तनिषेधइत्यन्ये **तत्त्वं**तुप्रकरणान्महातपोविषयइतियुक्तम् ।

उपवासाविषयीं शूद्रासही अधिकार आहे; कारण, "शूद्र हा चवथा वर्ण आहे म्हणून तो धर्माविषयीं अधिकारी आहे. वेदमंत्र, स्वधाकार, स्वाहाकार, वषट्कार यांविषयीं मात्र त्याला अधिकार नाहीं" असें **व्यास**वचन आहे. **प्राच्य** ( पूर्वेकडील ) विद्वान् तर, वैश्य व शूद्र यांला दोन दिवसांपेक्षां अधिक उपोषणाचा निषेध आहे. कारण, "वैश्य, शूद्र हे अज्ञानेंकरून तीन दिवस किंवा पांच दिवस उपवास करतील तर त्यांला उपवासफल मिळणार नाहीं. वैश्य व शूद्र यांना दोन दिवसपर्यंत उपोषण विहित होय. त्रिरात्र ( तीन दिवस ) उपवास विहित नाहीं, असें धर्मज्ञ ब्रह्मवेत्त्यांनीं सांगितलें आहे" असें **हेमाद्रींत** वचन आहे, असें सांगतात. **इतर ग्रंथकार** तर, जितक्याविषयीं निषेधवाक्य असेल तितक्याविषयीं निषेध मानावा, असें सांगतात. खरा प्रकार म्हटला तर हा ( वरील ) उपवासनिषेध प्रकरणवशेंकरून महातपोविषयक आहे, हें योग्य होय.

एवंस्त्रीणामपि **मत्स्यस्कांदे** नास्तिस्त्रीणांपृथग्यज्ञोनव्रतंनाप्युपोषणम् भर्तृशुश्रूषयैवैतालोकानिष्टान्व्रजंतिहि यद्देवेभ्योयच्चपित्रादिकेभ्यःकुर्याद्भर्ताभ्यर्चनंसत्क्रियांच तस्यार्धंवैसाफलंनान्यचित्तानारीभुंक्तेभर्तृशुश्रूषयैव **आदित्यपुराणे** नारीखल्वननुज्ञाताभर्त्रापित्रासुतेनवा विफलंतद्भवेत्तस्यायत्करोत्यौर्ध्वदेहिकमिति और्ध्वदेहिकंपारलौकिकं तद्भर्त्रननुज्ञाविषयं भार्यापत्युर्मतेनैवव्रतादीनाचरेत्सदेति**कात्यायनो**क्तेः अत्रविशेषो**हरिवंशे** स्नानंचकार्यंशिरसस्ततःफलमवाप्नुयात् स्नात्वास्त्रीप्रातरुत्थायपतिंविज्ञापयेत्सती तथा गृहीत्वौदुंबरंपात्रंसकुशंसाक्षतंतथा गोशृंगंदक्षिणंसिंच्यप्रगृह्णीयात्ततज्जलं औदुंबरंताम्रमयं ततोभर्तुःसतीवृषात्स्नातस्यप्रयतस्यच आत्मनश्चाभिषेक्तव्यंततःशिरसितज्जलं उपवासेषुकर्तव्यमेतद्धिव्रतकेषुचेति ।

याप्रमाणें स्त्रियांसही उपोषणाविषयीं अधिकार समजावा. आतां जें **स्कांदांत**—"स्त्रियांला वेगळा यज्ञ, व्रत, उपवास हीं नाहीं. भर्त्याची शुश्रूषा करूनच स्त्रियांला उत्तम लोक प्राप्त होतात. भर्ता देवाच्या व पितरांच्या उद्देशानें जें पूजन, व सत्कर्म करील त्या सत्कर्माचें अर्धफल, भर्त्याची एकनिष्ठेनें सेवा करणाऱ्या स्त्रियेला प्राप्त होतें". **आदित्यपुराणांत**—"पतीच्या किंवा पुत्राच्या आज्ञेवांचून स्त्री जें कांहीं पारलौकिक कर्म करील तें कर्म तिचें विफल होईल". ह्या वरील वचनावरून स्त्रियांला उपोषणादिकांविषयीं अधिकार नाहींच असें होतें, तें भर्त्याची अनुज्ञा नसतां समजावें. कारण, "स्त्रियेनें पतीच्या संमतीनेंच सर्वदा व्रतादिक आचरण करावें" असें **कात्यायन**वचन आहे. **व्रताविषयीं विशेष-हरिवंशांत**-"स्त्रियेनें डोक्यावरून स्नान करावें म्हणजे तिला व्रताचें फळ मिळेल. स्त्रियेनें प्रातःकाळीं उठून स्नान करून पतीची प्रार्थना करावी" तसेंच "उदकानें भरलेलें ताम्रपात्र घेऊन त्यांत कुश, अक्षता घालून त्यानें गाईचें उजवें शिंग सिंचन करून तेंच उदक ग्रहण करावें. नंतर त्या स्त्रियेनें स्नान केलेला नियमपर अशा भर्त्याचे मस्तकीं व आपले मस्तकीं तें उदक सिंचन करावें. उपवासरूप व्रतें, व इतर व्रतें ह्या सर्वांचे ठायीं हा विधि करावा.

**सर्वव्रतेषुसंकल्पविधिश्चभारते** गृहीत्वौदुंबरंपात्रंवारिपूर्णमुदङ्मुखः उपवासंतुगृह्णीयाद्यद्वासंकल्पयेद्बुधः हस्तेनैवेत्यर्थः ।

**सर्व व्रतांचे ठायीं संकल्पविधि—भारतांत**—"ज्ञात्यानें उकदकपूर्ण असें तांब्याचें पात्र हातांत घेऊन उत्तराभिमुख होऊन उपवास ग्रहण करावा; किंवा हातांत उदक घेऊनच संकल्प करावा."

**अथव्रतारंभकालः मदनरत्नेगार्ग्यः** अस्तगेचगुरौशुक्रेबालेवृद्धेमलिम्लुचे उद्यापनमुपारंभंव्रतानांनैवकारयेत् **रत्नमालायां** सोमसौम्यगुरुशुक्रवासराःसर्वकर्मसुभवंतिसिद्धिदाः भानुभौमशनिवासरेषुच प्रोक्तमेवखलुकर्मसिद्ध्यति **तथा** विरुद्धसंज्ञाइहयेचयोगास्तेषामनिष्टःखलुपादआद्यः सर्वैधृतिस्तुव्यतिपातनामासर्वोप्यनिष्टःपरिघस्यचार्धं तिस्रस्तुयोगेप्रथमेसवज्रेव्याघातसंज्ञेनवपंचशूले गंडेऽतिगंडेचषडेवनाड्यःशुभेषुकार्येषुविवर्जनीयाः ।

**आतां व्रताचे आरंभाचा काल सांगतो—मदनरत्नांत गार्ग्य**—"गुरुशुक्रांचें अस्त, बाल्य, वार्धक्य, मलमास, यांत व्रतांचा आरंभ व उद्यापन हीं करूं नयेत." **रत्नमालेंत**—"सोमवार, बुधवार, गुरुवार आणि शुक्रवार हे सर्व कर्मांविषयीं सिद्धि देणारे होत. रवि, भौम, आणि शनि ह्या वारीं सांगितलेलें जें कर्म तेंच सिद्ध होतें." तसेंच-"विरुद्धसंज्ञक योगांचा ( म्हणजे विष्कंभ, अतिगंड, शूल, गंड, व्याघात, वज्र ह्या योगांचा ) प्रथम पाद अनिष्ट होय. वैधृति, व्यतीपात हे सर्व अनिष्ट. परिघाचें पूर्वीचें अर्ध अनिष्ट". **पक्षांतर सांगतो**—"विष्कंभाच्या घटिका ३, वज्राच्या ३, व्याघाताच्या ९, शूलाच्या ५, गंडाच्या ६, अतिगंडाच्या ६, याप्रमाणें ह्या पहिल्या घटिका सर्व शुभकार्यांविषयीं वर्ज्य कराव्या.

**संग्रहे** कृष्णेन्गिविशयोरूर्ध्वंसप्तमीभूतयोरधः शुक्लेवेदेशयोरूर्ध्वंभद्राप्रागवसुपूर्णयोः **श्रीपतिः** न सिद्धिमायातिकृतंचविष्ट्यांविषारिघातादिकमत्रसिद्धं **व्यवहारसमुच्चये** दशम्यामष्टम्यांप्रथमघटिकापंचकपरंहरिद्गुःसप्तम्यांद्विदशघटिकांतेत्रिघटिकं तृतीयाराकायांखयमघटिकाभ्यःपरभवंशुभंविष्टेःपुच्छंशिवतिथिचतुर्थ्योस्तुविरमे **तत्रैव** सर्पिणीतुसितेपक्षेकृष्णेचैवतुवृश्चिकी सर्पिण्यास्तुमुखंत्याज्यंवृश्चिक्याःपुच्छमेवच **माधवीये** विष्टिर्यदाहनितिथेरपरार्धजातापूर्वार्धजानिशितदाशुभदाचपुच्छे **ब्रह्मयामले** दिनेभद्रायदारात्रौरात्रिभद्रायदादिवा नत्याज्याशुभकार्येषुप्राहुरेवंपुरातनाः **श्रीपतिः** षट्पौष्णतोद्वादशशांकराच्चपौरंदराद्वानिनवक्रमेण पूर्वार्धमध्यापरभागयुंजिचिरंतनज्योतिषिकैःस्मृतानि ।

**संग्रहांत—भद्रालक्षण**-"कृष्णपक्षीं तृतीया व दशमी यांच्या उत्तरार्धीं भद्रा; सप्तमी व चतुर्दशी यांचे पूर्वार्धीं भद्रा; शुक्लपक्षीं चतुर्थी व एकादशी यांचे उत्तरार्धीं भद्रा; अष्टमी, पौर्णिमा यांचे पूर्वार्धीं भद्रा" ( **हिलाच विष्टि व कल्याणी हीं** नामांतरें आहेत. ) **श्रीपति**-"भद्रेचे ठायीं केलेलें कार्य सिद्ध होत नाहीं. विषप्रयोग, शत्रुघात, इत्यादिक कर्म भद्रेवर केलेलें सिद्ध होतें." **व्यवहारसमुच्चयांत**-"दशमी व अष्टमी या तिथींचे ठायीं भद्रेच्या पहिल्या पांच घटिकांनंतर पुढच्या ३ घटिका भद्रापुच्छ; एकादशी व सप्तमी या भद्रेच्या बारा घटिकांच्या पुढें तीन घटिका भद्रापुच्छ; तृतीया व पौर्णिमा ह्यांच्या भद्रेच्या वीस घटिकांच्या पुढच्या तीन घटिका भद्रापुच्छ; आणि चतुर्दशी व चतुर्थी यांच्या भद्रेच्या शेव-

---

१. दिनभद्रेति दिनभद्रा तिथेःपूर्वार्धभद्रा. रात्रिभद्रा उत्तरार्धभद्रा.

टच्या तीन घटिका भद्रापुच्छ होय. हें भद्रापुच्छ शुभ होय." **व्यवहारसमुच्चयांत**-"शुक्लपक्षांतील भद्रा सर्पिणी, कृष्णपक्षांतील भद्रा वृश्चिकी म्हटली आहे, सर्पिणीचें मुख वर्ज्य करावें, आणि वृश्चिकीचें पुच्छ टाकावें." **माधवीयांत**-"जेव्हां तिथीच्या पुढच्या अर्धांतली विष्टि दिवसा असते, आणि तिथीच्या पूर्वार्धांतली विष्टि रात्रीं असते तेव्हां ती शुभकारक आहे. आणि भद्रेचें पुच्छही शुभ आहे." **ब्रह्मयामलांत**—"दिवसाची ( पूर्वार्धांतली ) भद्रा जेव्हां रात्रीं असेल व रात्रींची ( उत्तरार्धांतली ) भद्रा जेव्हां दिवसा असेल, तेव्हां ती शुभकार्यांविषयीं वर्ज्य करूं नये, असें प्राचीन विद्वान् सांगतात." **श्रीपति**-"( कोणत्याही कर्माविषयीं ) रेवतीपासून सहा नक्षत्रांचा पूर्वार्ध घ्यावा, आर्द्रापासून बारा नक्षत्रांचा मध्यभाग घ्यावा, आणि ज्येष्ठानक्षत्रापासून नऊ नक्षत्रांचा उत्तरार्ध घ्यावा, असें प्राचीन ज्योतिष्यांनीं सांगितलें आहे."

**व्रतारंभेचविशेषः मदनरत्नेसत्यव्रतेनोक्तः** उदयस्थातिथिर्याह्निनभवेद्दिनमध्यभाक् साखंडानव्रतानांस्यादारंभश्चसमापनमिति **देवलः** अभुक्त्वाप्रातराहारंस्नात्वाचम्यसमाहितः सूर्यायदेवताभ्यश्चनिवेद्यव्रतमाचरेत् **मदनरत्नेभविष्ये** क्षमासत्यंदयादानंशौचमिंद्रियनिग्रहः देवपूजाग्निहवनंसंतोषः-स्तेयवर्जनं सर्वव्रतेष्वयंधर्मःसामान्योदशधास्मृतः अग्निहोमस्तुदैवत्यःव्याहृतिहोमोवेति**वर्धमानः** ।

## व्रताचे आरंभाविषयीं विशेष सांगतो.

**मदनरत्नांत—सत्यव्रत**-"जी तिथि सूर्योदयव्यापिनी असून मध्यान्हीं नाहीं ती खंडा तिथि, त्या खंडातिथीचे ठायीं व्रतांचा आरंभ व समाप्ति हीं करूं नयेत." **देवल**-"प्रातःकालीं कांहीं न खातां स्नात करून व आचमन करून शांतपणानें सूर्य व अन्य देवता यांना निवेदन करून व्रत ग्रहण करावें." **मदनरत्नांत-भविष्यांत**-"क्षमा, सत्यभाषण, दया, दान, स्वच्छता, इंद्रियनिग्रह, देवपूजा, अग्निहोम, संतोष, चोरी न करणें हे दहा धर्म सामान्येंकरून सर्वव्रतांचे ठायीं जाणावे." अग्निहोम म्हणजे ज्या व्रताची जी देवता त्या देवतेच्या उद्देशानें होम, किंवा व्याहृतिहोम असें **वर्धमान** म्हणतो.

**यत्तुतेनोक्तं** सर्वपदमेतत्पुराणोक्तप्रकृतव्रतपरं व्रतांतरेतुविध्यंतरसत्त्वेहोमोऽन्यथान अतएवैकादश्यांशिष्टानांहोमानाचरणमिति **तन्न** जपोहोमश्चेतिवक्ष्यमाणैकवाक्यत्वेनास्यकाम्यव्रतसमाप्तिपरत्वात् तत्त्वंतुसप्तदशस्यपशुमित्रविंदादिप्रकरणस्थेनेवतत्तद्व्रतविशेषहोमविधिभिरस्योपसंहारइति ।

आतां जें त्यानें ( **वर्धमानानें** ) सांगितलें कीं, 'ह्या वचनांतील सर्वपद ह्या भविष्यपुराणोक्त जीं प्रकृत ( चाललेलीं ) व्रतें, त्यांविषयीं आहे, अन्यव्रतांत होमाविषयीं दुसरा विधि असेल तर होम करावा, नसेल तर होम करूं नये असें आहे, म्हणूनच एकादशीस शिष्ट होम करीत नाहींत, हें त्या वर्धमानाचें म्हणणें बरोबर नाहीं; कारण पुढें सांगावयाच्या 'जपो होमश्च०' या अग्निपुराणवचनाशीं एकवाक्यता पावून हें होमबोधक वचन काम्यव्रताच्या समाप्तिविषयक आहे. खरा प्रकार म्हटला तर—जसा-'सप्तदश सामिधेनीरनुब्रूयात्' हें वाक्य कोणत्याही प्रकरणांत पठित नाहीं, प्रकरणाच्या बाहेर आहे. सामिधेनी म्हणजे अग्नि पेटविण्याच्या ऋचा, त्या सतरा म्हणाव्या, असा त्याचा अर्थ. ज्या पशुयाग, मित्रविंदादिक इष्टि सांगितल्या आहेत, त्यांच्या प्रकरणामध्यें पठित जीं सप्तदशसामिधेनीबोधक वाक्यें त्यांच्याशीं हें वाक्य एकवाक्यता पावून त्या पशुयागादिकांतील सप्तदशसामिधेनीबोधक वाक्यांनीं या वाक्याचा उपसंहार ( संकोच ) केला, त्याप्रमाणें त्या त्या विशेषव्रताच्या होमविधायक वाक्यांनीं ह्या वाक्याचा उपसंहार ( संकोच ) केला आहे असें समजावें.

**विष्णुधर्मे** तज्जप्यजपनंध्यानंतत्कथाश्रवणादिकं तदर्चनंचतन्नामकीर्तनश्रवणादयः उपवासकृतामेतेगुणाःप्रोक्तामनीषिभिः **कौर्मे** बहिर्ग्रामांत्यजान्सूतिंपतितंचरजस्वलां नस्पृशेन्नाभिभाषेतनेक्षेतव्रतवासरे **पृथ्वीचंद्रोदयेअग्निपुराणे** स्नात्वाव्रतवतासर्वव्रतेषुव्रतमूर्तयः पूज्याःसुवर्णमय्याद्याःशक्त्यावैभूमिशायिना जपोहोमश्चसामान्यंव्रतांतेदानमेवच चतुर्विंशद्द्वादशवापंचवात्रयएवच विप्राभोज्यायथाशक्तितेभ्योदद्याच्चदक्षिणां अत्रविप्राइतिपुंलिंगनिर्देशात्पुमांसएवभोज्याः नतुस्त्रियः एवंसहस्रभोजनादावपि विरूपैकशेषस्यप्रमाणांतरंविनाऽयुक्तत्वात् अतएव द्वयोर्यजमानयोःप्रतिपदंकुर्यात्बहुभ्योयजमानेभ्यइत्यादौविरूपैकशेषायोगात्पक्षयभिप्रायंद्वित्वंबहुत्वंवानसंभवतीत्युक्त**माचार्यैः पार्थसारथिनाच** एतेनैकस्यब्राह्मणस्यावृत्त्याभोजनंपरास्तं बहुत्वस्यैकपदश्रुत्याब्राह्मणान्वितत्वेनभोजनान्वयाभावादित्य**न्यत्रविस्तरः** ।

---

१. या उदयगा तिथिर्मध्याह्नं न व्याप्नोति सा खंडा तस्यां व्रतारंभं समापनं च न कुर्यात्. दिनार्धानंतरसमाप्तायामारंभसमाप्ती कार्ये इत्यर्थः. २ मित्रविंदा इत्यादि नामाची इष्टि ही दर्शपूर्णमासेष्टीची विकृति आहे.

**विष्णुधर्मांत**—"ज्या देवतेचें उपोषणव्रत असेल त्या देवतेचा मंत्रजप, ध्यान, कथाश्रवण, पूजा, तन्नामाचें कीर्तन, श्रवण इत्यादिक हे उपवास करणारांचे गुण ऋषींनीं सांगितले आहेत." **कूर्मपुराणांत**—"व्रती यानें व्रतदिवशीं महार, अंत्यज, सूतिका, पतित, रजस्वला, यांला स्पर्श करूं नये व त्यांच्याशीं संभाषण करूं नये व त्यांना पाहूं नये." **पृथ्वीचंद्रोदयांत-अग्निपुराणांत**-"सर्व व्रतांचे ठायीं व्रती यानें स्नान करून ज्या व्रताच्या ज्या देवता असतील त्यांच्या सुवर्णादि प्रतिमा करून त्या व्रतमूर्तींची यथाशक्ति पूजा करावी: भूशयन करावें; जप, होम, व्रताच्या अंतीं दानें; चोवीस, बारा अथवा पांच किंवा तीन विप्रांला भोजन देऊन त्यांला यथाशक्ति दक्षिणा द्यावी. हे सर्व व्रतांचे सामान्य धर्म होत." ह्या वरील वाक्यांत 'विप्राः' असा पुल्लिंगनिर्देश केला आहे यास्तव पुरुषविप्रांलाच भोजन घालावें; स्त्रियांला घालूं नये. सहस्रभोजनादिविषयींही ह्याच निर्णय जाणावा. आतां, एथें 'विप्राः' म्हणजे विप्रस्त्रिया आणि विप्रपुरुष हे एकशेषसमास केला तर घेतां येतील; परंतु तसा एकशेषसमास करण्याविषयीं दुसरें प्रमाण असल्याशिवाय एकशेष करणें अयुक्त आहे. इतर प्रमाणावांचून स्त्रीवाचक व पुरुषवाचक यांचा एकशेष करितां येत नाहीं, म्हणूनच 'द्वयोर्यजमानयोः प्रतिपदं कुर्यात्, बहुभ्यो यजमानेभ्यः' म्हणजे दोन यजमानांला किंवा बहुत यजमानांला प्रतिपत् ( म्हणजे शस्त्र म्हणून ज्या ऋचा त्यांपैकीं पहिली ऋचा ती ) करावी. या ठिकाणीं यजमानांचें द्वित्व किंवा बहुत्व यजमानस्त्री व यजमानपुरुष असें धरून संभवत नाहीं, असें **आचार्यांनीं** सांगितलें आहे; व **पार्थसारथी**ही असेंच सांगतो. यावरून एका ब्राह्मणासच पुनः पुनः भोजन घातलें असतां संकल्पोक्त ब्राह्मणभोजन होतें, असें जें मत तें खंडित झालें. कारण, 'ब्राह्मणान् भोजयेत्' ह्या वाक्यांतील 'ब्राह्मण' या एकपदांत श्रुत जें बहुवचन त्याचा अन्वय ( संबंध ) ब्राह्मणासच असल्यामुळें भोजनाला बहुत्वाचा अन्वय होत नाहीं. इत्यादि विस्तार ग्रंथांतरीं आहे.

शूद्रस्यतुप्रतिष्ठादिषद्विप्रद्वाराव्याहृतिहोमइति**वर्धमानः** व्रतमूर्तयोव्रतदेवताप्रतिमाः **प्रतिमास्वरूपं** च**मदनरत्ने भविष्ये** अनुक्तद्रव्यतत्संख्यादेवताप्रतिमानृप सौवर्णीराजतीताम्रीवृक्षजामार्तिकीतथा चित्रजापिष्टलेखोत्थानिजवित्तानुरूपतः आमाषात्पलपर्यंतंकर्तव्याशाठ्यवर्जितैः ।

शूद्राला देवप्रतिष्ठादिक अनुष्ठानांत जसा ब्राह्मणद्वारा होम सांगितला आहे त्याप्रमाणें व्रतांतही ब्राह्मणद्वारा व्याहृतिहोम करावा, असें **वर्धमान** सांगतो. व्रतमूर्ति म्हणजे व्रतदेवताप्रतिमा. **प्रतिमास्वरूप सांगतो—मदनरत्नांत—भविष्यांत**—"ज्या ठिकाणीं अमुक द्रव्याची व अमुक मानाची देवताप्रतिमा सांगितली नाहीं, त्या स्थलीं सुवर्णमयी, रौप्यमयी, ताम्रमयी, काष्ठमयी, मृन्मयी, चित्रजा, पिष्टमयी किंवा भिंत इत्यादिकांवर लिहिलेली आपल्या वित्ताला अनुसरून एक माशापासून पलपर्यंत प्रतिमा करावी, वित्तशाठ्य करूं नये."

**तत्रैवब्राह्मे** आज्यंद्रव्यमनादेशेजुहोतिषुविधीयते मंत्रस्यदेवतायाश्चप्रजापतिरितिस्थितिः मंत्रानुक्तौसमस्तव्याहृतिरूपोमंत्रः प्रजापतिश्चदेवतेति**कल्पतरुः** ।

**मदनरत्नांत-ब्राह्मांत**—"जेथें द्रव्य सांगितलें नाहीं तेथें होमाविषयीं आज्य द्रव्य ग्रहण करावें; जेथें मंत्र उक्त नसेल तेथें समस्तव्याहृति मंत्र, व जेथें देवता उक्त नाहीं तेथें प्रजापति देवता घ्यावी" असा ब्राह्मवचनाचा अर्थ **कल्पतरु** सांगतो.

**वर्धमानधृतदेवीपुराणे** होमोग्रहादिपूजायांशतमष्टाधिकंभवेत् अष्टाविंशतिरष्टौवायथाप्राप्तिविधीयते **मदनरत्ने** अनुक्तसंख्यायत्रस्याच्छतमष्टोत्तरंस्मृतं **वर्धमानधृतवृद्धशातातपः** उपवासंद्विजःकृत्वाततोब्राह्मणभोजनं कुर्यात्तेनास्यसगुणउपवासोऽभिजायते ।

**वर्धमान**ग्रंथांत-**देवीपुराणांत**-"ग्रहमख इत्यादिक अनुष्ठानांत ज्या ठिकाणीं होमसंख्या उक्त नाहीं तेथें एकशेंआठ, अठ्ठावीस, आठ यांतून यथाशक्ति घ्यावी." **मदनरत्नांत**-"जेथें संख्या उक्त नाहीं तेथें १०८ संख्या घ्यावी." **वर्धमानग्रंथांत वृद्धशातातप**-"उपोषण केल्यावर व्रताचे सांगतेसाठीं ब्राह्मणभोजन करावें, तेणेंकरून त्याचा उपवास यथासांग होतो."

**व्रतोद्यापनानुक्तौपृथ्वीचंद्रोदयेनंदिपुराणे** कुर्यादुद्यापनंतस्यसमाप्तौयदुदीरितं उद्यापनंविनायत्तुतद्व्रतंनिष्फलंभवेत् यदिचोद्यापनंनोक्तंव्रतानुगुणतश्चरेत् वित्तानुसारतोदद्यादनुक्तोद्यापनेव्रते गाश्चैव कांचनंदद्याद्व्रतस्यपरिपूर्तये **अशक्तौनारदीये** सर्वेषामप्यलाभेतुयथोक्तकरणंविना विप्रवाक्यंस्मृतंशुद्धं व्रतस्यपरिपूर्तये यथाविप्रवचोयस्तुगृह्णातिमनुजःशुभं अदत्वादक्षिणांपापःसयातिनरकंध्रुवं **भारते** वेदोपनिषदेचैवसर्वकर्मसुदक्षिणा सर्वत्रतुमयोद्दिष्टाभूमिर्गावोथकांचनं **बैजवापः** शिवनेत्रोद्भवंयस्माद्रजतंपितृ-

वछभं अमंगलंतथ्मेनदेवकार्येषुवर्जयेत् **टोडरानंदेदेवीपुराणे** व्रतेचतीर्थेध्ययनेश्राद्धेपिचविशेषतः परान्नभोजमादेवियस्यान्नंतस्यतत्फलम् ।

ज्या व्रताचें उद्यापन सांगितलें नाहीं त्याविषयीं सांगतो—**पृथ्वीचंद्रोदयांत नंदिपुराणांत**—ज्या व्रताला जें उद्यापन उक्त असेल तें व्रताच्या समाप्तीस करावें. जें व्रत उद्यापनविरहित तें निष्फल होतें. जर उद्यापन उक्त नसेल तर त्या व्रताला योग्य असें उद्यापन करावें. व द्रव्यानुसार गोप्रदान व सुवर्णदान करावें, त्या योगें व्रताची सांगता होते."—अशक्ति असतां **नारदीयांत**–"सर्वांचाही अलाभ असेल तर यथाविधि केल्यावांचूनही केवळ ब्राह्मणाच्या वचनानें व्रताची सांगता होते. जो मनुष्य ब्राह्मणास दक्षिणा दिल्यावांचून ब्राह्मणवचन घेतो तो पापी होऊन नरकास जातो." **भारतांत**–"व्यास म्हणतो–सर्व कर्मांविषयीं वेदांत व उपनिषदांत उक्त भूमि, गाय, सुवर्ण ही दक्षिणा मी सांगितली आहे." **वैजवाप**–"शिवनेत्रापासून रौप्य उत्पन्न झालें आहे म्हणून तें पितरांला प्रिय व अमंगल आहे, यास्तव तें देवकार्यांत वर्ज्य करावें." **टोडरानंदांत-देवीपुराणांत**–"व्रत, तीर्थ, अध्ययन, श्राद्ध यांचे ठायीं परान्नभोजन केलें असतां ज्याचें अन्न त्याला त्याचें फल होतें."

**पृथ्वीचंद्रोदयेऽग्निपुराणे** नित्यस्नायीमिताहारोगुरुदेवद्विजार्चकः क्षारंक्षौरंचलवणंमधुमांसंचवर्जयेत् **क्षारास्तुतत्रैवोक्ताः** तिलमुद्गादृतेशैब्यंसस्यंगोधूमकोद्रवौ धान्यकंदेवधान्यंचशमीधान्यंतथैक्षवम् स्विन्नधान्यंतथापण्यंमूलंक्षारगणःस्मृतः गोधूमानांतु**तत्रैव**प्रतिप्रसवः व्रीहिपष्टिकमुद्गाश्चकलायःसतिलंपयः श्यामाकाश्चैवनीवारागोधूमाद्याव्रतेहिताः कूष्मांडालाबुवार्ताकपालंकीज्योत्स्निकाम्त्यजेत् चतुर्भैक्षंसक्तुकणाः-शाकंदधिघृतंमधु श्यामाकाःशालिनीवारायावकंमूलतंदुलं हविष्यव्रतनक्तादावग्निकार्यादिकेहितं मधुमांसंविहायान्यद्व्रतेवाहितमीरितमिति शमीधान्यंमाषादि पालंकीमध्यदेशेपोईइतिप्रसिद्धा ज्योत्स्निकाकोशातकी ।

**पृथ्वीचंद्रोदयांत-अग्निपुराणांत**—"व्रती यानें नित्यस्नायी: मिताहारी, गुरु, देव व द्विज यांची पूजा करणारा असें असावें; व क्षार, क्षौर, लवण, मद्य, मांस हीं वर्ज्य करावीं. **क्षारगण** त्याच ठिकाणीं सांगितला तो असा:—"तिल व मूग ह्यांवांचून शेंगेंत उत्पन्न होणारीं चवळ्या इत्यादिक धान्यें गहूं, कोद्रव, धणे, देवभाताचे तांदूळ, शमीधान्य ( माषादि ), गुळ, काकवी, भर्जित धान्य ( पृथुकादिक ), पण्य ( त्या दिवशीं विकत घेतलेलें ), मुळा हा क्षारगण जाणावा." गव्हांविषयीं त्याच ठिकाणीं प्रतिप्रसव ( निषेधबाध ) सांगतो–"साळी, षष्टिक[1] ( साठेंभात ) मूग, वाटाणे, तिल, दूध, सांवे, नीवार ( तृणधान्य ), गहूं इत्यादिक हे व्रताविषयीं हितकारक होत. कूष्मांड, भोपळा, वांगें, पालंकी ( पोईशाक ), कोशातकी ( घोसाळीं ) हीं वर्ज्य करावीं. चार घरांचें भिक्षान्न, पीठ, कण्या, शाक, दधि, घृत, मधु, श्यामाक, साळी, नीवार, यव, मुळा, तांदुळजा हे पदार्थ हविष्यव्रत, नक्त इत्यादिकांविषयीं व अग्निकार्य इत्यादिकांविषयीं हित होत. अथवा मधु व मांस वर्ज्य करून इतर पदार्थ व्रताचे ठायीं हित होत."

**मिताक्षरायांगौतमः** चतुर्भैक्षसक्तुकणयावकशाकपयोदधिघृतमूलफलोदकानिहवींष्युत्तरोत्तरप्रशस्तानि पयोदधिघृतंचगव्यमिति अन्येचविशेषाएकादशीचातुर्मास्यादिप्रकरणेवक्ष्यंते ।

**मिताक्षरेंत-गौतम**—"चार घरचें भिक्षान्न, पीठ, कण्या, यव, शाक, दूध, दधि, घृत, मुळें, फळें, उदक हीं हविष्यें होत, हीं उत्तरोत्तर प्रशस्त जाणावीं. दूध, दधि, घृत हीं गाईचीं प्रशस्त होत. इतर विशेष निर्णय एकादशी, चातुर्मास्य इत्यादि व्रतप्रसंगीं पुढें सांगूं.

**गृहीतव्रतत्यागेतुमदनरत्नेछागलेयः** पूर्वंव्रतंगृहीत्वायोनचरेत्काममोहितः जीवन्भवतिचांडालो मृतःश्वाचाभिजायते तत्रप्रायश्चित्तमुक्तं**पृथ्वीचंद्रोदये अग्निगारुडपुराणयोः** क्रोधात्प्रमादाल्लोभाद्वा व्रतभंगोभवेद्यदि दिनत्रयंनभुंजीतमुंडनंशिरसोथवेति प्रायश्चित्ताम्नानादतिक्रांतव्रतानुष्ठानंनास्तीतिगम्यते **यत्तु** प्रायश्चित्तंततःकृत्वापुनरेवव्रतीभवेदितिवचनात् यच्चातिक्रांतमपिव्रतंकार्यमेवेति**शूलपाणिः** तन्मध्येलोपेव्रतशेषसत्त्वेज्ञेयं एतच्चशक्तविषयम् ।

**व्रतग्रहण करून तें टाकिलें तर सांगतो-मदनरत्नांत—छागलेय**–"जो मनुष्य पूर्वीं व्रत ग्रहण करून नंतर काममोहित होऊन तें टाकितो तो जीवंत असेपर्यंत चांडालसदृश होऊन मृत झाल्यानंतर कुत्रा होतो." त्याविषयीं प्रायश्चित्त सांगतो-**पृथ्वीचंद्रोदयांत-अग्नि व गरुडपुराणांत**–"क्रोधानें, प्रमादानें, अथवा लोभानें जर व्रतभंग

---

१ षष्टिक म्हणजे साठ दिवसांनीं पिकणारें भात.

होईल तर तीन दिवस उपोषण करावें, अथवा शिरोमुंडन ( क्षौर ) करावें" असें प्रायश्चित्त सांगितलें आहे म्हणून जें व्रत अतिक्रांत झालें तें पुनः करावयास नको, असें बोधित होतें. आतां जें "व्रतभंग झाला असतां प्रायश्चित्त करून पुनः व्रत धारण करावें" ह्या वचनावरून अतिक्रांत असलेलेंही व्रत करावेंच, असें **शूलपाणि** सांगतो; तें मध्येंच व्रताचा लोप झाला व कांहीं शेष कर्तव्य राहिलें असेल तर त्याविषयीं जाणावें. हें पूर्वोक्त ( उपवास ) शक्तविषयक आहे.

अशक्तौतु**कालहेमाद्रौपुराणांतरे** उपवासासमर्थश्चेदेकविप्रंतुभोजयेत् । तावद्धनानिवादद्याद्भुक्तस्य द्विगुणंतथा भुक्तःकृतभोजनः ब्राह्मणभोजनंविनेतिशेषः सहस्रसंमितांदेवींजपेद्वाप्राणसंयमान् कुर्याद्द्वादशसंख्याकान्यथाशक्त्यातुरोनरइति **शुद्धितत्त्वेमात्स्ये** उपवासेत्वशक्तानांनक्तंभोजनमिष्यते **मदनरत्ने-वायवीये** द्रव्यदातोपवासस्यफलंप्राप्नोत्यसंशयं तथा**परार्केदेवलः** ब्रह्मचर्यंतथाशौचंसत्यमामिषवर्जनं व्रतेष्वेतानिचत्वारिवरिष्ठानीतिनिश्चयः **मात्स्ये** तस्मात्कृतोपवासेनस्नानमभ्यंगपूर्वकं वर्जनीयंप्रयत्नेनरूपघ्नंतत्परंनृप अन्येचनियमास्तत्रतत्रान्वेषणीयाः ।

**अशक्ताविषयीं सांगतो-कालहेमाद्रींत-पुराणांतरांत**-"जो मनुष्य रोगादिकानें उपोषण करण्याविषयीं असमर्थ असेल त्यानें एका ब्राह्मणाला भोजन द्यावें; अथवा तितकें द्रव्य द्यावें, ब्राह्मणाला भोजन दिल्यावांचून भोजन करील तर भोजनाचे द्विगुणित द्रव्य द्यावें. अथवा सहस्रगायत्रीजप किंवा बारा प्राणायाम, हें प्रायश्चित्त करावें." **शुद्धितत्त्वांत-मत्स्यपुराणांत**-"अहोरात्र उपवास करण्याविषयीं जे अशक्त त्यांनीं नक्तभोजन करावें." **मदनरत्नांत-वायुपुराणांत**-"द्रव्य देणारा याला उपवासाचें निःसंशय फल प्राप्त होतें." तसेंच **अपरार्कांत देवल**-"ब्रह्मचर्य, शुचिर्भूतपणा, सत्यभाषण, आमिषवर्जन हीं चार कर्में व्रताविषयीं श्रेष्ठ होत." **मत्स्यपुराणांत**-"तस्मात् ज्यानें उपवास केला असेल त्यानें अभ्यंगस्नान करूं नये, तें रूपाची हानिकारक होतें." इतर नियम त्या त्या व्रतप्रकरणीं पहावे.

अथ**स्त्रीव्रतेषु**विशेषउच्यते तत्र **हेमाद्रौ**व्रतकांडे **गारुडे** गंधालंकारतांबूलपुष्पमालानुलेपनं उपवासेनदुष्यंतिदंतधावनमंजनमिति इदंच**सभर्तृकोप**वासविषयं अंजनंचसतांबूलंकुंकुमंरक्तवाससी धारयेत्सोपवासापिअवैधव्यकरंयतः विधवायतिमार्गेणकुमारीवायदृच्छयेतितत्रैव**भविष्योक्तेः** तथा**विष्णुधर्मे** सर्वेपुतूपवासेषुपुमान्वाथसुवासिनी धारयेद्रक्तवस्त्राणिकुसुमानिसितानिच विधवाशुक्लवसनमेकमेवहिधारयेत् **मनु**रपि पुष्पालंकारवस्त्राणिगंधधूपानुलेपनं उपवासेनदुष्यंतिदंतधावनमंजनम् **मदनरत्ने-व्यासः** दंतधावनपुष्पादिव्रतेष्यस्यानदुष्यतीति ।

## आतां स्त्रीव्रताविषयीं विशेष निर्णय सांगतो.

**हेमाद्रींत**-व्रतकांडांत-**गरुडपुराणांत**-"सुगंधि द्रव्यें, अलंकार, तांबूल, पुष्पमाला ( पुष्पांची वेणी ), अनुलेपन ( उटी ), दंतधावन, आणि अंजन हीं उपवासाचे ठायीं सेवन केलीं असतां दोषकारक होत नाहींत." हें वरील वचन सौभाग्यवती स्त्रीच्या उपवासविषयक होय; कारण, "अंजन, तांबूल, कुंकुम आरक्त वस्त्रें हीं, उपवास करणाऱ्या स्त्रियेनेंही धारण करावीं, कारण, तीं अवैधव्यकारक होत. विधवा स्त्रीनें तर यतिमार्गेंकरून व्रत करावें. कुमारीनें तर इच्छानुरूप करावें." असें हेमाद्रींतच **भविष्यवचन** आहे. तसेंच **विष्णुधर्मांत**-"पुरुष किंवा सुवासिनी यांनीं सर्व उपवासव्रतांचे ठायीं आरक्त वस्त्रें, श्वेतपुष्पें धारण करावीं; विधवा स्त्रीनें एक श्वेतवस्त्र मात्र धारण करावें." **मनुही**-"पुष्पें, अलंकार, रंगीत वस्त्रें, सुगंधि पदार्थ, धूप, चंदनादिकांची उटी, दंतधावन, अंजन हीं उपवासाचे ठायीं दोषकारक नाहींत." **मदनरत्नांत-व्यास**-"दंतधावन, पुष्पादिक, हीं स्त्रीला व्रताचे ठायीं दोषकारक नाहींत."

यद्यपीदंसर्वोपवासविषयंप्रतीयतेतथापिशिष्टाचारात्सौभाग्याद्यर्थंक्रियमाणनवरात्रत्रिरात्राद्युपवासविषयमेव नत्वेकादश्यादिविषयं असकृज्जलपानाच्चसकृत्तांबूलचर्वणात् उपवासःप्रणश्येतदिवास्वापाच्चमैथुनादित्यपरार्केदेवलेनतन्निषेधात् नचास्यपुंविषयत्वेनसावकाशत्वात्स्त्रीणांतांबूलादिप्राप्नोतीति**वाच्यम्** तांबूलादिप्रापकस्यैवैकादशीतरविषयत्वेनवैपरीत्यस्यापिसुवचत्वात् ।

जरी हें वरील सांगणें सर्व उपवासविषयक आहे असें दिसून येतें, तथापि शिष्टाचारावरून, सौभाग्यादिकार्थ करावयाचीं जीं नवरात्र, त्रिरात्र, इत्यादिक काम्य उपवासव्रतें तद्विषयकच होय, एकादश्यादिव्रतविषयक नाहीं; कारण, "वारंवार उदकपान, एकवार तांबूलभक्षण, दिवानिद्रा, मैथुन यांहींकरून उपवास नाश पावतो." ह्या **अपरार्कांतील देवल**-

वचनानें तांबूलादिकांचा निषेध केला आहे. आतां हें वचन पुरुषपर मानिलें असतां वचनाला सार्थक्य येऊन स्त्रियांला तांबूलादिभक्षणाधिकार येईल असें म्हणूं नये; कारण, तांबूलादिप्रापक जें वचन तेंच एकादशी इत्यादि व्यतिरिक्तविषयक आहे, असें म्हटल्यानें तांबूलादिनिषेधही सांगण्यास शक्य आहे.

**यत्तुहरिवंशे** अंजनंरोचनंचैवगंधान्सुमनसस्तथा व्रतेचैवोपवासेचनित्यमेवविवर्जयेत् शिरसोभ्यंजनं सौम्येनैवमेतत्प्रशस्यते नपादयोर्नगात्रस्यस्नेहेनेतिस्थितिःस्मृतेति **तत्तत्रैवोक्तपुण्यकव्रतविषयं** नतुसर्वत्र पूर्वोक्तविरोधादिति **मदनरत्नेउक्तं तत्रैव** अश्रुप्रपातोरोषश्चकलहस्यकृतिस्तथा उपवासाद्व्रताद्वापि-सद्योभ्रंशयतिस्त्रियं स्त्रियमित्युपलक्षणं **मदनरत्नेशिवधर्मे** दानव्रतानिनियमाज्ञानंध्यानंहुतंजपः यत्नेनापिकृतंसर्वंक्रोधितस्यवृथाभवेत् ।

आतां जें **हरिवंशांत**—"अंजन, गोरोचन, सुगंधिद्रव्यें, पुष्पें, हीं व्रत, उपवास यांचे ठायीं नित्य वर्ज्य करावीं. स्नेहानें ( तैलादिकानें ) मस्तकाला अभ्यंग करणें प्रशस्त नाहीं, तसाच पाय व शरीर यांना स्नेहानें अभ्यंग प्रशस्त नाहीं; असी शास्त्रमर्यादा आहे" असें तें त्या ठिकाणींच उक्त जें पुण्यकव्रत तद्विषयक होय; सर्व व्रतांविषयीं नाहीं; कारण पूर्वोक्त वचनाशीं विरोध येतो, असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. तेथेंच सांगतो—"उपवास, व्रत यांचे ठायीं अश्रुपात, क्रोध, कलह हीं केलीं असतां स्त्रियेला व्रतापासून भ्रष्ट करितात." 'स्त्रियेला' असें जें पद तें व्रती याचें उपलक्षण आहे. **मदनरत्नांत**-**शिवधर्मांत**-" दानें, व्रतें, नियम, ज्ञान, ध्यान, होम, जप हीं यत्नानें जरी केलीं असतील तरी क्रोध आला असतां सर्व व्यर्थ होतात."

**अथसूतकादौनिर्णयः** तत्रशावसूत्याशौचयोःसर्वस्मार्तकर्मनिवृत्तिर्निबंधेषुस्पष्टैव गौडास्तुक्षताशौचादावपितामाहुः जानूर्ध्वंक्षतजेजातेनित्यकर्मनचाचरेत् नैमित्तिकंचतदधःस्रवद्रक्तोनवाचरेत् लोतकेचसमुत्पन्नेज्वरकर्मणिमैथुने धूमोद्गारेतथावांतौनित्यकर्माणिसंत्यजेत् द्रव्येभुक्तेत्वजीर्णेचनैवभुक्त्वापिकिंचन कर्मकुर्यान्नरोनित्यंसूतकेमृतकेतथेति**कालिकापुराणात्** ।

## आतां सूतकादिक प्राप्त झालें असतां निर्णय सांगतो.

मृताशौच व जननाशौच ह्यांत सर्व स्मार्तकर्मांचा प्रतिबंध निबंधग्रंथांत स्पष्टच सांगितला आहे. **गौड** ग्रंथकार तर-क्षताशौच ( क्षतानें आलेलें अशुचित्व ) इत्यादि प्राप्त असतांही सर्व स्मार्तकर्मांचा निषेध सांगतात; कारण, "गुडघ्यांचे वर क्षत झालें असतां नित्यकर्मेंही करूं नयेत. गुडघ्यांचे खालीं रक्तस्राव झाला असतां नैमित्तिक कर्म करूं नये. लोतक ( लूतासंपर्कजन्यस्फोट ), ज्वर, मैथुन, धुरकढ, ढेंकर, वांति हीं झालीं असतां नित्यकर्मे वर्ज्य करावींत. पदार्थ भक्षण केल्यावर अजीर्ण झालें असतां; कांहीं भक्षण करून; तसेंच जननाशौच व मृताशौच यांत कोणतेंही कर्म करूं नये." असें **कालिकापुराण** आहे.

**वस्तुतस्तु**पूर्वंदेवीपूजोपक्रमात्तन्मात्रविषयत्वमस्येतियुक्तंप्रतीमः तथा**हेमाद्रौपाद्मे** गर्भिणीसूतिकादिश्चकुमारीवाथरोगिणी यदाऽशुद्धातदान्येनकारयेत्प्रयतास्वयमिति पुंसोप्येषविधिः लिंगस्याविवक्षितत्वात् तेन यस्मिन्व्रतेयत्पूजाद्युक्तंतदन्येनकारयेत् शारीरनियमान्स्वयंकुर्यादिति**हेमाद्रिर्व्याचख्यौ** नव्रतिनांव्रतध्नति **विष्णूक्तेश्च** आरंभस्तुनभवत्येव ।

**वास्तविक** म्हटलें तर—कालिकापुराणांत एथें पूर्वीं देवीपूजेचा उपक्रम केलेला आहे, यास्तव हीं वरील निषेधक वचनें देवीपूजाविषयक होत, असें योग्य दिसतें. **तसेंच हेमाद्रींत-पद्मपुराणांत**-"गर्भिणी, बाळंतीण, रजस्वला, कुमारी, रोगिणी ह्या स्त्रिया अशुद्धावस्थेंत असतील तर त्यांनीं दुसऱ्याकडून व्रतादिक करवावें, आणि शुद्ध असतील तर स्वतः करावें." पुरुषाविषयींही हाच निर्णय समजावा; कारण, एथें 'पुरुषच' किंवा 'स्त्रियाच' अशी लिंगविवक्षा नाहीं, असें असल्यामुळें ज्या व्रतांचेठायीं जें पूजादिक उक्त आहे तें दुसऱ्याकडून करवावें; शारीरनियम ( उपोषणादिक ) स्वयमेव करावे असें **हेमाद्रि** सांगतो. आणि "व्रती जे त्यांला व्रताविषयीं आशौचदोष नाहीं" असें **विष्णुवचनही** आहे. प्रथमारंभ तर ( आशौचांत ) होतच नाहीं.

**शुद्धितत्त्वेविष्णुः** बहुकालिकसंकल्पोगृहीतश्चपुरायदि सूतकेमृतकेचैवव्रतंतन्नैवदुष्यति एतत्काम्य-

---

१. सौम्येदत्तिसंशुद्धिःस्पष्टैवेति ॥

परं नित्यंत्वनारब्धमपिकार्यमितिगौडाः **मदनरत्ने** पूर्वसंकल्पितंयच्चव्रतंसुनियतव्रतैः तत्कर्तव्यंनरैःशुद्धं-दानार्चनविवर्जितं **माधवीयेकौर्मे** काम्योपवासेप्रक्रांतेत्वंतरामृतसूतके तत्रकाम्यव्रतंकुर्याद्दानार्चनविव-र्जितमिति एतेनसांगेधिकाराद्व्रतांगदेवपूजादिकार्यमितिवर्धमानोक्तिः**परास्ता** प्रारब्धंपूजादिकार्यमेव नव-रात्रेतुतत्रैवविशेषंवक्ष्यामः एवंरजस्वलापि ।

**शुद्धितत्त्वांत-विष्णु**—जर बहुतकालपर्यंत व्रत करावयाचा पूर्वीं संकल्प केला आणि पश्चात् जननाशौच किंवा मृताशौच प्राप्त झालें तर तें संकल्पोक्तव्रत करावें, त्याविषयीं दोष नाहीं." हें वचन काम्यव्रतपर आहे. नित्यव्रत तर अनारब्ध ( आरंभ न केलेलें ) जरी असेल तथापि तें करावें असें **गौड** म्हणतात. **मदनरत्नांत**-"नियमानें व्रतें करणारे जे मनुष्य त्यांनीं पूर्वसंकल्पित व्रत करावें: परंतु दान, पूजा हीं मात्र करूं नयेत." **माधवीयांत-कूर्मपुराणांत**-"काम्यव्रतसंबंधी उपवासाचा आरंभ केला आणि मध्यें मृताशौच प्राप्त झालें तर दान, पूजा विरहित तें काम्यव्रत करावें." यावरून सांगव्रताविषयीं अधिकार आहे, यास्तव व्रताचें अंग जें देवपूजादिक तें करावें, असें जें वर्धमानानें उक्त तें खंडित झालें. आरंभिलेलें पूजादिक कर्म करावेंच. नवरात्राविषयीं तर विशेष निर्णय सांगणें आहे तो त्याच ठिकाणीं सांगूं. रजस्वले-विषयींही याप्रमाणेंच निर्णय समजावा.

**यत्तुसत्यव्रतः** प्रारब्धदीर्घतपसांनारीणांयद्रजोभवेत् नतत्रापिव्रतस्यस्यादुपरोधःकथंचनेति तत्प्रति-निधिनाकारयेदित्येतत्परं **तदुक्तंमदनरत्नेमात्स्ये** अंतरातुरजोयोगेपूजामन्येनकारयेदिति ।

आतां जें **सत्यव्रत**-"ज्यांनीं बहुत दिवस व्रत धारण केलें आहे अशा स्त्रिया रजस्वला झाल्या असतां रजस्वलावस्थेंतहीं व्रताचा प्रतिबंध होत नाहीं." असें वचन तें 'प्रतिनिधिद्वारा करावें' अशा अर्थाचें आहे; तें सांगतो-**मदनरत्नांत-मत्स्यपुराणांत**-"व्रतामध्यें रजस्वला झाली असतां पूजादिक अन्यद्वारा ( प्रतिनिधिद्वारा ) करवावें."

**प्रतिनिधयश्चनिर्णयामृतेपैठीनसिः** भार्यापत्युर्व्रतंकुर्याद्भार्यायाश्चपतिर्व्रतं असामर्थ्येपरस्ताभ्यां व्रतभंगोनजायते **स्कांदेपि** पुत्रंवाविनयोपेतंभगिनींभ्रातरंतथा एषामभावएवान्यंब्राह्मणंवानियोजयेत् **कात्यायनः** पितृमातृभ्रातृपतिगुर्वर्थेचविशेषतः उपवासंप्रकुर्वाणःपुण्यंशतगुणंलभेत् मातामहादीनुद्दिश्य-एकादश्यामुपोषणे कृतेतेतुफलंविप्राःसमग्रंसमवाप्नुयुः ।

**प्रतिनिधि सांगतो-निर्णयामृतांत-पैठीनसि**—"भार्येनें पतीचें व्रत करावें, व पतीनें भार्येचें व्रत करावें, उभयतां असमर्थ असतां तिसऱ्यानें करावें, असें केल्यानें व्रतभंग होत नाहीं." **स्कंदपुराणांत**ही-"विनययुक्त पुत्र, भ्राता, भगिनी यांतून कोणाकडूनही करवावें, यांच्या अभावींच दुसरा कोणी, अथवा ब्राह्मण यांजकडून करवावें." **कात्यायन**-"पिता, माता, भ्राता, पति, गुरु यांच्यासाठीं उपोषण करणारा त्याला शतगुण फल मिळतें. मातामह इत्या-दिकांच्या उद्देशानें एकादशीचें उपोषण करील तर त्याला व मातामहादिकांस समग्र फल मिळेल."

**मदनरत्नेप्रभासखंडे** भर्तापुत्रःपुरोधाश्चभ्रातापत्नीसखापिच यात्रायांधर्मकार्येषुजायंतेप्रतिहस्तकाः एभिःकृतंमहादेविस्वयमेवकृतंभवेत् **तत्रैववायवीये** स्वयंकर्तुमशक्तश्चेत्कारयीतपुरोधसा इदंचसर्ववर्ण-साधारणं अविशेषात् ।

**मदनरत्नांत-प्रभासखंडांत**-भर्ता, पुत्र, पुरोहित ( उपाध्याय ), भ्राता, पत्नी, मित्र हे यात्रा, धर्मकार्य, यांविषयीं प्रतिनिधि होतात, यास्तव यांच्याकडून केलेलें कर्म स्वयमेव केलेंसें होतें." त्याच ठिकाणीं **वायुपुराणांत**-"आपण कर-ण्यास असमर्थ असेल तर उपाध्यायाकडून कर्म करवावें." हें वचन ब्राह्मणादि सर्व वर्णांला लागू आहे. कारण, अमुक वर्णानें उपाध्यायाकडून करवावें, असें विशेष सांगितलें नाहीं.

**यत्तुकश्चिदाह** शूद्रस्यब्राह्मणादिरेवप्रतिनिधिर्युक्तोनशूद्रः जपस्तपस्तीर्थसेवाप्रव्रज्यामंत्रसाधनम् विप्रैः संपादितंयस्यसंपन्नंतस्यतत्फलमिति **मरीचिवचनादिति** **तत्तुच्छम्** प्रव्रज्यादीनांशूद्रेऽसंभवाद्विशये प्रायदर्शनादितिन्यायेनास्यब्राह्मणादिगोचरत्वात् यदापि उपवासोव्रतंहोमस्तीर्थस्नानजपादिकम्विप्रैःपूर्वैः

१. विशयेइति । विशये संशये प्रायः पदान्तरसमभिव्याहारस्तस्य दर्शनान्नियामकत्वोपगमादित्यर्थः । तथाच प्रव्रज्यासाहचर्येण ब्राह्मणाधिकारिकप्रातिनिध्यमेव तद्विषय इति भावः.

**पाठस्तदापिसएवदोषः स्त्रीशूद्रपतनानिषडिति मानवीये** जपनिषेधात् **वस्तुतस्तु** संपूर्णतावाचनमात्रमत्रो-च्यतइतिप्रतिनिधेःकावार्तेत्यलम् ।

**आतां जें कोणी** म्हणतो कीं शूद्राला ब्राह्मणादिकच प्रतिनिधि योग्य, शूद्र प्रतिनिधि योग्य नाहीं: कारण, "जप, तप, तीर्थसेवा, संन्यास, मंत्रसाधन हीं ब्राह्मणांनीं ज्याचीं संपादित केलीं त्याला त्यांचें संपूर्ण फल मिळतें." असें **मरीचि-वचन** आहे असें तें त्याचें म्हणणें तुच्छ आहे: कारण, संन्यास इत्यादिकांचा, शूद्राचे ठायीं असंभव असल्यामुळें 'विशये (संशये) प्रायदर्शनात्' ह्या न्यायानें हें मरीचिवचन ब्राह्मणादिविषयक आहे. 'जपस्तपस्तीर्थसेवा प्रव्रज्या मंत्रसाधनम्' या स्थानीं 'उपवासो व्रतं होमस्तीर्थस्नानजपादिकम्' असा पाठ जेव्हां आहे, तेव्हांही वर सांगितलेलाच दोष येतो. कारण, "**स्त्रिया व शूद्र यांस** जप, तप, तीर्थयात्रा, संन्यास, मंत्रसिद्धि, आणि देवताराधन हीं सहा कर्मे दोषावह आहेत." ह्या **मनुस्मृतींत** जपाचा निषेध आहे. वास्तविक म्हटलें तर 'केलेलें कर्म संपूर्ण होवो' इतकेंच ब्राह्मणाकडून म्हणवावयाचें, **असें वरील** मरीचिवचनांत सांगितलें आहे. तेथें प्रतिनिधीची वार्ता देखील नाहीं. आतां इतका विचार पुरे आहे.

**अत्रविशेषमाहत्रिकांडमंडनः** काम्येप्रतिनिधिर्नास्तिनित्येनैमित्तिकेचसः काम्येप्युपक्रमादूर्ध्वं **केचित्प्रतिनिधिंविदुः** नस्यात्प्रतिनिधिर्मंत्रस्वामिदेवाग्निकर्मसु सदेशकालयोर्नास्तिनारणेरग्निरेवसा नापिप्रति-निधातव्यंनिषिद्धंवस्तुकुत्रचित् **हिरण्यकेशिसूत्रेपि** नस्वामित्वस्यभार्यायाःपुत्रस्यदेशस्यकालस्याग्नेर्देव-तायाःकर्मणःशब्दस्यचप्रतिनिधिर्विद्यतेइति ।

**ह्या प्रतिनिधीविषयीं विशेष सांगतो त्रिकांडमंडन**-"काम्य कर्माचे ठायीं प्रतिनिधि नाहीं, नित्य व नैमि-त्तिक कर्माचे ठायीं तो प्रतिनिधि आहे. काम्यकर्माचे ठायीं देखील उपक्रम ( आरंभ ) केल्यावर प्रतिनिधि आहे, असें कोणी सांगतात. मंत्र, यजमान, देवता, अग्नि, कर्म, देश, काल, अरणि ( अग्निमंथनकाष्ठ ) यांविषयीं प्रतिनिधि होत नाहीं. निषिद्ध पदार्थ प्रतिनिधिस्थानीं कधींही योजूं नये". **हिरण्यकेशिसूत्रांतही** "यजमान, भार्या, पुत्र, देश, काल, अग्नि, देवता, कर्म, शब्द यांविषयीं प्रतिनिधि नाहीं." असें सांगितलें आहे.

**अथव्रतादिसन्निपातेनिर्णयः** तत्रतिथिद्वयसन्निपातेतत्रोक्तंदानहोमादिक्रमेणानुष्ठेयं अविरोधात् इदंपूर्वारब्धेष्वेव एकमध्येन्यकाम्यकर्मारंभस्तुनभवत्येवगुणफलादृते यस्ययज्ञेप्रततेंतरायज्ञस्तायतेतंयज्ञंनिर्ऋ-**तिर्गृह्णातीतिराणकधृतश्रुतेः** यज्ञः व्रतादिकर्ममात्रं अनंगनव्यवधानदोषस्यसर्वत्रसाम्यात् शिष्टास्तुमाघ-कार्तिकस्नानादिमध्येलक्षहोमतुलाभारतश्रवणाद्याचरंतितन्नित्यमध्येऽस्तु काम्यमध्येचिंत्यम् ।

## आतां एककालीं दोन तीन व्रतें किंवा उपोषणें प्राप्त असतां निर्णय सांगतो—

**दोन तिथि** एक दिवशीं प्राप्त झाल्या असतां त्या ठिकाणीं सांगितलेलें दान होमादिक असेल तें क्रमानें करावें. कारण, विरोध नाहीं. हा निर्णय पूर्वीं आरब्ध जीं व्रतें त्यांविषयीं होतो. पूर्वीं एक काम्यकर्म आरंभिलें असेल तर अंग काम्य-कर्मावांचून दुसऱ्या काम्यकर्माचा आरंभ ( पूर्वारब्धाची समाप्ति झाल्यावांचून ) होत नाहीं: कारण, "ज्याचा एक यज्ञ आरंभिला असतां ( त्याची समाप्ति झाल्यावांचून ) मध्यें दुसरा यज्ञ आरंभिला तर त्या यज्ञाला राक्षस ग्रहण करितो" अशी **राणकग्रंथांत** श्रुति आहे. यज्ञ म्हणजे व्रतादिक सर्व कर्मे जाणावीं: कारण, अंगावांचून इतर कर्मानें जो व्यवधान ( अंतरजन्य ) दोष येतो तो सर्वत्र तुल्य आहे. शिष्टजन तर माघस्नान, कार्तिकस्नान इत्यादिक कर्मे आरंभून त्यांमध्यें

---

१ स्त्रीशूद्रेति । 'जपस्तपस्तीर्थयात्रा प्रव्रज्या मंत्रसाधनं ॥ देवताराधनं चैव स्त्रीशूद्रपतनानि षडि'ति. २ वार्तेति । तादृशसंपादनेना-नुरूपमंपसाद्गुण्यमेवानेन बोध्यते नतु प्रतिनिधिरित्यर्थः. ३ ज्याच्या अर्थाचा संशय असेल तें ज्या बहुत अंगांमध्यें पठित असेल तदनुरूप त्याचा अर्थ समजावा. जसें—'वत्समालभेत' ( वत्साचें आलभन करावें ) आलभन म्हणजे हिंसा सर्वत्र अर्थ होतो, या ठिकाणींही तोच अर्थ आहे कीं काय ? असा संशय आला असतां, हें वाक्य अग्निहोत्रांग-संस्कारांमध्यें पठित असल्यामुळें इतर संस्कारांप्रमाणेंच एथेंही वत्साला आलभन म्हणजे स्पर्शरूप संस्कार करावा, असें आहे, त्या न्यायानें हें मरीचिवचन शूद्रविषयक आहे कीं काय ? असा संशय आला असतां प्रव्रज्यादिक असल्यामुळें हें वचन ब्राह्मणादिविषयक आहे. शूद्रविषयक नाहीं. ४ तस्यार्थः नित्यं नैमित्तिकं च प्रतिनिधिनाप्युपक्रम्य कारयेत् ॥ काम्यं तु सामर्थ्यं विचार्य स्वयमेवोपक्रम्य कुर्यात् । उपक्रमादूर्ध्वं असामर्थ्ये प्रतिनिधिनापि तत्कारयेत् ॥ ५ यावरून नित्य व नैमित्तिक, कर्मे प्रतिनिधीकडूनही आरंभ करून करवावें आणि काम्य कर्म तर आपल्या सामर्थ्याचा विचार करून स्वतःच आरंभ करून करावें; आरंभ केल्यावर स्वतः करण्याला शक्ति नसेल तर प्रतिनिधीकडून करवावें.

लक्षहोम, तुलादान, भारतपुराणश्रवण इत्यादिकांचा आरंभ करितात, तो नित्यकर्मांमध्यें आरंभ असो. काम्यकर्मांमध्यें आरंभ प्रमाणशून्य आहे.

यत्रतुनक्तैकभक्तादौविरोधस्तत्रप्राथम्यादेकभक्तंकार्यम् नक्तंतुपरेद्युस्तत्तिथौगौणकालेकार्यम् समकालीनविरुद्धव्रतादौत्वेकंस्वयंकृत्वान्यद्भार्यादिनाकारयेदिति**माधवः यत्रतु**शिवरात्र्यादौतिथिमध्येपारणयाऽह्निभोजनंप्राप्तं भूताष्टम्योर्दिवाभुक्त्वारात्रौभुक्त्वाचपर्वणि एकादश्यामहोरात्रंभुक्त्वाचांद्रायणंचरेदितितन्निषेधश्च तत्रपारणायाविधत्वाद्दिवैवभोजनम् निषेधस्तुरागप्राप्तभोजनविषयः एवमष्टम्यादिनक्तव्रतेसंक्रांत्यादौरवौसंकष्टचतुर्थ्यांचरात्रौभोजनम् ।

जेथें नक्तभोजन, एकभक्त इत्यादिक, परस्परविरुद्ध व्रतें असतात त्या ठिकाणीं प्रथम असल्यामुळें एकभक्त करावें, आणि नक्तव्रत करणें तें दुसऱ्या दिवशीं त्या तिथीचे ठायीं गौणकालीं करावें. दोहोंचा समान काल, समान कालीं दोन विरुद्ध ( नक्तभोजन, उपोषण इत्यादि ) व्रतादिक प्राप्त होतील तर एक आपण करून दुसरें भार्यादि प्रतिनिधिद्वारा करवावें असें **माधव** म्हणतो. ज्या स्थलीं शिवरात्रि इत्यादिक व्रतांचे ठायीं पारणाप्रयुक्त तिथीमध्यें दिवसा भोजन प्राप्त झालें, आणि "चतुर्दशीस व अष्टमीस दिवाभोजन व पर्वणीस रात्रिभोजन, एकादशीस अहोरात्र भोजन केलें असतां चांद्रायण करावें" ह्या वचनानें दिवाभोजनाचा निषेधही प्राप्त झाला, तेथें पारणा विधिप्राप्त असल्यामुळें दिवसासच भोजन करावें; दिवाभोजननिषेध तर राग ( इच्छा ) प्राप्त भोजनविषय आहे. याप्रमाणें अष्टम्यादिक नक्तव्रताच्या दिवशीं संक्रांति वगैरे असतां आणि रविवारीं संकष्टचतुर्थी असतां रात्रौ भोजन करावें.

यत्रत्वष्टम्यादौदिवाभुजिनिषेधः संक्रमेचरात्राविति निषेधद्वयंतत्रोपवासएवकार्यः यद्यपिपुत्रिणउपवासोनिषिद्धस्तथाप्युपवासनिषेधेतुभक्ष्यंकिंचित्प्रकल्पयेदितिवचनात्किंचिद्भक्षयित्वोपवासःकार्यः चांद्रायणमध्येएकादश्यादौतुग्राससंख्यानियमेनभोजनंकार्यमेव चांद्रायणस्यकाम्यत्वेननित्यबाधकत्वात् अबाधेनगत्यसंभवाच्च एकादश्यामेकांतरोपवासादिपारणायांजलपारणांकृत्वोपवसेन आपोवाअशितमनशितंचेति**श्रुतेः** एवंद्वादश्यां मासोपवासश्राद्धप्रदोषादिपुज्ञेयं एवंकाम्यनैमित्तिकनित्यत्वादिकृतंबलाबलंस्वयमूह्यमितिदिक्

**इतिकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौव्रतपरिभाषासमाप्ता ।**

जेथें अष्टम्यादिप्रयुक्त दिवाभोजननिषेध आणि संक्रांतिनिमित्त रात्रौ भोजननिषेध असे दोन निषेध प्राप्त होतात तेथें उपवासच करावा. जरी पुत्रवान् गृहस्थाला उपवास निषिद्ध आहे तथापि "उपवासनिषेध असतां कांहीं अल्प फलादि भक्षण करावें" असें वचन आहे यास्तव कांहीं अल्प उपहार करून उपवास करावा. चांद्रायण व्रतामध्यें एकादश्यादि उपोषण प्राप्त झालें असतां ग्राससंख्येच्या नियमाचें भोजनच करावें. कारण, चांद्रायण हें काम्यव्रत असल्यामुळें काम्यानें नित्याच म्हणजे एकादश्यादिकांचा बाध होतो; व बाध न करून दुसरी गतिही नाहीं. एकादशीस एकांतरोपवासादिव्रताची[1] पारणा प्राप्त होईल तर उदकानें पारणा करून उपोषण करावें; कारण, "उदकपान करणें हें उपोषण व पारणा असें द्विविध ( दोन प्रकारचें ) होय" अशी श्रुती आहे. याप्रमाणें द्वादशीचे दिवशीं मासोपवासव्रत ( एक महिनापर्यंत सतत उपवास ), श्राद्धदिनीं प्रदोषव्रत इत्यादि प्राप्त होतील तर उदकानें पारणा करावी. याप्रमाणें ( "काम्यं नित्यस्य बाधकं" काम्य कर्म नित्य कर्माचें बाधक होतें इत्यादि वचनांनीं ) काम्य, नैमित्तिक ( निमित्तप्राप्त ), नित्य यांचा प्रबल दुर्बल भाव स्वतः विचार करून आचरण करणें तें करावें.

**इति कमलाकरभट्टकृते निर्णयसिंधौ व्रतपरिभाषाप्रकरणे महाराष्ट्रभाषाटीका समाप्ता ॥**

**अथप्रतिपदादिनिर्णयः शुक्लप्रतिपद्**पराह्णव्यापित्वेपूर्वाग्राह्या युग्मवाक्यात् प्रतिपत्संमुखी कार्यायाभवेदापराह्णिकीति**स्कांदोक्तेः** शुक्लास्यात्प्रतिपत्तिथिःप्रथमतश्चेत्सापराह्णेभवेदिति**दीपिकोक्तेश्च** अपराह्णश्चपंचधाभक्तेदिनेचतुर्थोभागः तदभावेसायाह्नव्यापिनीग्राह्या तदभावेतुसायाह्नव्यापिनीपरिगृह्यतामिति **माधवोक्तेः** कृष्णातुपरा कृष्णानूत्तरतोखिलेति**दीपिकोक्तेः** कृष्णापिपूर्वैवेत्य**नंतभट्टाः ।**

## आतां प्रतिपदादिक तिथींचा निर्णय सांगतो.

शुक्लप्रतिपदा ( पूजा व्रतादिकांविषयीं ) अपराह्णकालव्यापिनी असतां पूर्वा ( पूर्वतिथीनें विद्धा ) घ्यावी. कारण, प्रतिपदा

१ एक दिवस उपोषण आणि दुसऱ्या दिवसी भोजन असें कांहीं दिवस व्रत करणें तें एकांतरोपवासव्रत म्हटलें आहे. असें धारणा, पारणा इत्यादि.

व अमावास्या यांचें युग्म असें पूर्वी युग्मवाक्य सांगितलें आहे. "जी शुक्ल प्रतिपदा अपराह्णकालव्यापिनी असेल ती करावी" असें **स्कंदपुराण**वचन आहे, व "शुक्लप्रतिपदा अपराह्णव्यापिनी असतां ती पूर्वविद्धा घ्यावी" असें **दीपिका**-वचनही आहे. अपराह्णकाल म्हणजे दिवसाचे पांच भाग करून चवथा जो भाग तो. अपराह्णकालव्यापिनी नसेल तर सायंकालव्यापिनी घ्यावी. कारण, "अपराह्णव्यापिनी नसेल तर सायंकालव्यापिनी घ्यावी" असें **माधवाचें** वचन आहे. कृष्णप्रतिपदा तर परा ( द्वितीयायुक्ता ) घ्यावी. कारण, "सर्व कृष्णपक्षप्रतिपदा उत्तरा ( परा ) घ्यावी" असें **दीपिका**-वचन आहे, कृष्णप्रतिपदाही पूर्वाच घ्यावी असें **अनंतभट्ट** म्हणतात.

**सर्वतिथिषुवर्ज्यान्युक्तानिमुहूर्तदीपिकायां** कूष्मांडंबृहतीफलानिलवणंवर्ज्यतिलाम्लंतथातैलं चामलकंदिवंप्रवसताशीर्षकपालांत्रकम् निष्पावांश्चमसूरिकान्फलमथोवृंताकसंज्ञंमधुद्यूतंस्त्रीगमनंक्रमात्प्रतिपदादिष्वेवमाषोडश शीर्पनारिकेलम् कपालंअलाबु अंत्रंपटोलकं **भूपालः** कूष्मांडंबृहतीक्षारंमूलकंपनसंफलम् धात्रीशिरःकपालांत्रंनखचर्मतिलानिच क्षुरकर्मांगनासेवांप्रतिपत्प्रभृतिपत्यजेन् नखंशिंबी चर्ममसूरिका।

**प्रतिपदादि सर्वतिथींचे ठायीं क्रमानें वर्ज्य पदार्थ सांगतो-मुहूर्तदीपिकेंत**—"कूष्माण्ड ( कोहळा ), डोरली ( वांगी ), लवण, तिल, आंबटपदार्थ, तेल, आंवळा, नारळ, भोपळा, पडवळ, निष्पाव ( पावटा, पांढरा पावटा, चवळी, काळा वाल, घेवडा इत्यादिक ), मसुरा, वृंताक ( वांगें ), मध, द्यूत, स्त्रीगमन हीं क्रमेंकरून प्रतिपदादि सोळातिथींचे ठायीं वर्ज्य करावीं." **भूपाल**-"कोहळा, डोरली ( वांगी ), क्षार, मुळा, फणस, फळ, आंवळा, नारळ, भोपळा, पडवळ, पावटे इत्यादिक, मसूरा, तिल, क्षौर, मैथुन हीं क्रमानें प्रतिपदादि तिथींस वर्ज्य करावीं."

**द्वितीयातु**कृष्णापूर्वाशुक्लोत्तरेति**हेमाद्रिः** कृष्णाद्वितीयादिमा पूर्वाह्णेयदिसासितातुपरतःसर्वेति**दीपिकोक्तेः माधवानंतभट्ट**मतेतुसर्वापिद्वितीयापरा तथाच**माधवः** पूर्वेद्युरसतीप्रातःपरेद्युस्त्रिमुहूर्तगा साद्वितीयापरोपोष्यापूर्वविद्धाततोन्यथेति ।

**द्वितीयानिर्णय**—कृष्णपक्षांतील द्वितीया पूर्वा ( पूर्वविद्धा ) घ्यावी, शुक्लपक्षांतील द्वितीया उत्तरा ( परविद्धा ) घ्यावी; असें **हेमाद्रि** म्हणतो. कारण, "कृष्णद्वितीया जर पूर्वाह्णकालव्यापिनी असेल तर पूर्वा घ्यावी, व सर्व शुक्लद्वितीया परविद्धा घ्यावी" असें **दीपिका**वचन आहे. **माधव, अनंतभट्ट** यांच्या मतीं तर-शुक्ल-कृष्ण पक्षांतील सर्व द्वितीया तिथि परा ( उत्तरविद्धा ) घ्यावी. तेंच **माधव** सांगतो-"पूर्व दिवशीं प्रातःकालीं नसून दुसऱ्या दिवशीं त्रिमुहूर्तव्यापिनी किंवा त्रिमुहूर्ताहूनही अधिकव्यापिनी असेल तर द्वितीया उपोषणाविषयीं दुसऱ्या दिवसाची घ्यावी तशी नसेल तर पूर्वविद्धा घ्यावी."

**तृतीयातु**सर्वमतेरंभाव्यतिरिक्तापरैव तेनयुग्मवाक्यंरंभाव्रतविषयं रंभाख्यांवर्जयित्वातुतृतीयांद्विजसत्तम अन्येषुसर्वकार्येषुगणयुक्ताप्रशस्यतइति**ब्रह्मवैवर्तात्** गौरीव्रतेतुविशेषमाह**माधवः** मुहूर्तमात्रसत्त्वेपिदिनेगौरीव्रतंपरे शुद्धाधिकायामप्येवंगणयोगप्रशंसनादिति ।

**तृतीयानिर्णय**—सर्वमतीं तृतीया, रंभाव्रत व्यतिरिक्त करून अन्य व्रतांविषयीं पराच घ्यावी. तेणेंकरून "तृतीया द्वितीयाविद्धा घ्यावी व द्वितीया तृतीयाविद्धा घ्यावी" असें जें युग्मवाक्य तें रंभाव्रतविषयक आहे; कारण, "रंभाख्यतृतीया वर्ज्य करून अन्य सर्व कार्यांविषयीं तृतीया चतुर्थीयुक्त घ्यावी" असें **ब्रह्मवैवर्त**वचन आहे, **गौरीव्रताविषयीं तर माधव विशेष सांगतो**—"एक मुहूर्तमात्र जरी दुसऱ्या दिवशीं तृतीया असेल तथापि तीच ( चतुर्थीयुक्त ) गौरीव्रताविषयीं घ्यावी. दिनवृद्धिवशेंकरून पूर्वदिवशीं साठ घटिका तृतीया असून दुसऱ्या दिवशीं शेष उरलेली दोन घटिका असेल त्या वेळीं देखील चतुर्थीयुक्त असेल तीच घ्यावी; कारण, चतुर्थीयोग प्रशस्त आहे."

**चतुर्थ्य**पिसर्वमतेगणेशव्रतातिरिक्तापरैव युग्मवाक्यात् एकादशीतथाषष्ठीअमावास्याचतुर्थिका उपोष्याः परसंयुक्ताःपराःपूर्वेणसंयुताः इति**माधवीये बृहद्वसिष्ठोक्तेश्च** नागचतुर्थीतुमध्याह्णव्यापिनीपंचमीयुताचग्राह्येति**निर्णयामृतेमाधवीये**चोक्तं युगंमध्यंदिनेयत्रतत्रोपोष्यफणीश्वरान् क्षीरेणाप्याय्यपंचम्यां-

---

१. गौरीव्रतेतुकलाकाष्ठादिपरिमितस्वल्पद्वितीयायुक्तापिनिषिद्धा । परदिनेकलाकाष्ठादिपरिमितास्वल्पापितृतीयापरिग्राह्या । यदातुदिनक्षयवशात्परदिनेस्वल्पापिचतुर्थीयुतातृतीयानलभ्यतेपूर्वदिनेचद्वितीयाविद्धातदा द्वितीयाविद्धैवग्राह्या । यदाचदिनवृद्धिवशात् पूर्वदिनेषष्टिघटिकातृतीयापरदिनेचघटिकादिशेषवतीतदा पूर्वांशुद्धांषष्टिघटिकामपित्यक्त्वाचतुर्थीयुक्तैव गौरीव्रतेग्राह्या इतिधर्मसिंधुः.

**पूजयेत्प्रयतोनरः विषाणितस्यनश्यंतिनतान्हिंसंतिपन्नगाइतिमाधवीयेदेवलोक्तेः युग्मंचतुर्थी पूर्वत्रम-ध्याह्नव्याप्तौपूर्वा अन्यपक्षेषुपरैव पंचम्यांपूजोक्तेः ।**

**चतुर्थीनिर्णय**—सर्व ग्रंथांच्या मतीं चतुर्थी, गणेशव्रत वर्ज्य करून अन्य सर्व व्रतांविषयीं पराच ( पंचमीयुक्त ) घ्यावी; कारण, चतुर्थी व पंचमी यांचें युग्म आहे. आणि "एकादशी, षष्ठी, अमावास्या, चतुर्थी ह्या तिथि उपोषणाविषयीं उत्तरतिथीनें विद्ध घ्याव्या, व ह्यांच्या पुढच्या तिथि पूर्व तिथीनें विद्ध घ्याव्या" असें **माधवीयांत बृहद्वसिष्ठ**वचनही आहे. नागचतुर्थी तर मध्याह्नव्यापिनी अशी पंचमीयुक्त घ्यावी, असें **निर्णयामृतांत** व **माधवीयांत** सांगितलें आहे; कारण, "ज्या दिवशीं चतुर्थी मध्याह्नीं असेल त्या दिवशीं मनुष्यानें उपोषण करून नागांना दूध पाजून पंचमीस त्यांची पूजा करावी. असें व्रत केल्यानें विषबाधा होत नाहीं व नाग त्या मनुष्यास दंश करीत नाहींत" असें **माधवीयांत देवल**वचन आहे. पूर्वदिवशीं मध्याह्नकालव्यापिनी असेल तर पूर्वा घ्यावी; परदिवशीं मध्याह्नव्याप्ति, दोन दिवशीं मध्याह्नव्याप्ति, दोनही दिवशीं मध्याह्नव्याप्ति नसणें, दोनही दिवशीं सारखी अथवा कमी ज्यास्ती एकदेशव्याप्ति असेल तर पंचमीयुक्तच घ्यावी; कारण, पंचमीस पूजा करण्याविषयीं वचन आहे.

गणेशव्रतेतृतीयायुतैवचतुर्थी चतुर्थीतुतृतीयायांमहापुण्यफलप्रदा कर्तव्याव्रतिभिर्वत्सगणनाथसुतोषिणीति **हेमाद्रौब्रह्मवैवर्तात् माधवीये**तुगणेशव्रते मध्याह्नव्यापिनीमुख्या चतुर्थीगणनाथस्यमातृविद्धाप्रशस्यते मध्याह्नव्यापिनीचेत्स्यात्परतश्चेत्परेहनीति **बृहस्पति**वचनात् प्रातःशुक्लतिलैःस्नात्वामध्याह्ने पूजयेन्नृपेतितत्**कल्पेभिधाना**च्च तेनपरदिनेतत्त्वेपरा अन्यथापूर्वेत्युक्तं **वस्तुतस्तु** यत्रभाद्रशुक्लचतुर्थ्यादौगणेशव्रतविशेषे मध्याह्नपूजोक्तातद्विषयाण्येवप्रागुक्तवचनानि नतुसार्वत्रिकाणि **संकष्टचतुर्थ्यादौबहूनां कर्मकालानांबाधापत्तेः** तेनसर्वत्रगणेशव्रतेपूर्वैवेतिसिद्धं **संकष्टचतुर्थीतुचंद्रोदयव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतत्त्वे मातृयोगस्यसत्त्वात्पूर्वेति**केचित् **अन्ये**तुदिनेमुहूर्तत्रयादिरूपस्यतृतीयायोगस्याभावात् परदिनेमाधवोक्तमध्याह्नव्यापिसत्त्वात्संपूर्णत्वाच्चपरेत्याचक्षते दिनद्वयेतदभावेतुपरैव गौरीव्रतेतुपूर्वैव गणेशगौरीबहुलाव्यतिरिक्ताःप्रकीर्तिताः चतुर्थ्यःपंचमीविद्धादेवतांतरयोगतइति**मदनरत्नेब्रह्मवैवर्तात्** ।

गणेशव्रताविषयीं चतुर्थी, तृतीयायुक्तच घ्यावी; कारण, "तृतीयायुक्त चतुर्थी महापुण्यफलप्रदा असून गणनाथाचा सुसंतोष करणारी आहे. यास्तव व्रती यांनीं तीच ( तृतीयायुक्त ) करावी" असें **हेमाद्रींत ब्रह्मवैवर्त**वचन आहे. **माधवीयांत** तर गणेशव्रताविषयीं चतुर्थी मध्याह्नकालव्यापिनी मुख्य होय. कारण, गणनाथचतुर्थी पूर्वदिवशीं मध्याह्नकालव्यापिनी असेल तर तृतीयायुक्त ती प्रशस्त होय, दुसऱ्या दिवशीं मध्याह्नकालव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची करावी" असें **बृहस्पति**वचन आहे; आणि "प्रातःकालीं शुक्ल तिल अंगास लावून स्नान करून मध्याह्नकालीं पूजा करावी" असें गणपतिकल्पांतही वचन आहे, तेणेंकरून दुसऱ्या दिवशीं मध्याह्नकालव्याप्ति असेल तर परा करावी; दुसऱ्या दिवशीं मध्याह्नकालव्याप्ति नसतां पूर्वा करावी, असें सांगितलें आहे. वास्तविक म्हटलें तर-ज्या भाद्रपदशुक्ल चतुर्थी इत्यादि विशेष व्रताचेठायीं मध्याह्नकालीं पूजा विहित आहे तद्विषयकच पूर्वोक्त वचनें आहेत. सर्वचतुर्थीव्रतविषयक नाहींत; कारण, सर्वत्र पंचमीयुक्त घेतली तर संकष्टचतुर्थी इत्यादि व्रतांच्या बहुत कर्मकालाचा बाध होईल; यास्तव सर्वत्र ठिकाणीं गणेशव्रताविषयीं चतुर्थी पूर्वाच घ्यावी, असें सिद्ध झालें. संकष्टचतुर्थी तर चंद्रोदयव्यापिनी घ्यावी. दोन दिवशीं चंद्रोदयव्यापिनी असेल तर, तृतीयायुक्त ती प्रशस्त असल्यामुळें पूर्वा घ्यावी, असें **केचित्** म्हणतात. **इतर ग्रंथकार** तर, दिवसा मुहूर्तत्रयादिरूप जो तृतीयायोग तो नसल्याकारणानें परदिवशीं माधवानें सांगितलेली मध्याह्नव्याप्ति असल्यामुळें व तिथि संपूर्ण असल्यामुळें दुसऱ्या दिवसाची घ्यावी, असें म्हणतात. दोन दिवशीं चंद्रोदयव्यापिनी नसेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. गौरीव्रताविषयीं तर पूर्वदिवसाचीच घ्यावी; कारण, "गणेशव्रत, गौरीव्रत ( श्रावण कृष्णचतुर्थी बहुला अशी प्रसिद्ध ती ) यांवाचून अन्य व्रताविषयीं चतुर्थी पंचमीविद्धा घ्यावी; कारण, अन्यदेवतायोग आहे" असें **मदनरत्नांत ब्रह्मवैवर्त**वचन आहे.

पंचमीतु**माधवमते**सर्वापिपूर्वा चतुर्थीसंयुताकार्यापंचमीपरयानतु दैवेकर्मणिपित्र्येचशुक्लपक्षेतथासितेति**हारीतोक्तेः हेमाद्रिमते**तुकृष्णापूर्वासितापरा कृष्णापूर्वयुतासितापरयुतास्यात्पंचमीतिदी**पिकोक्तेः**

---

१. उत्तरदिनमध्याह्नव्याप्त्यादिपक्षपंचकेपंचमीयुतैवग्राह्या. २. अत्र परतश्चेत्परेहनीत्यनेन पूर्वमध्याह्नव्याप्त्यपेक्षया द्वितीयमध्याह्ने अधिकव्याप्तावेव परविद्धाविधानं । इतरपक्षेषु तृतीयायुतैव गणनाथव्रते ग्राह्या । अतएव मातृविद्धा प्रशस्ता स्याच्चतुर्थी गणनायके । मध्याह्नात्परतश्चेत्स्यान्नागविद्धा प्रशस्यते इति मांधवीये स्मृत्यन्तरम्.

वस्तुतस्तुहारीतोक्तिरुपवासविषया प्रतिपत्पंचमीचैवसावित्रीभूतपूर्णिमा नवमीदशमीचैवनोपोष्याःपरसंयुताइतिब्रह्मवैवर्तात् यत्तु पंचमीतुप्रकर्तव्याषष्ठ्यायुक्तातुनारदेत्यापस्तंबीयंतत्स्कंदव्रतपरम् स्कंदोपवासेस्वीकार्यापंचमीपरसंयुतेतिवाक्यशेषादितिमाधवः तन्नागपूजाविषयमित्यनंतभट्टनिर्णयामृतादयः चमत्कारचिंतामणौच पंचमीनागपूजायांकार्याषष्ठीसमन्विता तस्यांतुतुषितानागाइतरासचतुर्थिकेति तेननागपूजादौपरैव यत्तुमदनरत्नदिवोदासीययोः श्रावणपंचम्यतिरिक्तापूर्वेत्युक्तं श्रावणे पंचमीशुक्लासंप्रोक्तानागपंचमी तांपरित्यज्यपंचम्यश्चतुर्थीसहिताहिताइतिसंग्रहोक्तेः गणेशस्कंदयोगाभ्यां क्रमान्नागःशुभाशुभः मित्रामित्रेतयोःपत्रेनागानामाखुबर्हिणावितिषट्त्रिंशन्मताच्च श्रावणपंचम्यतिरिक्तायानागपंचम्याश्चतुर्थीयुतत्वमुक्तंतदुपवासादिविषयं पत्रेवाहने ।

**पंचमीनिर्णय**-माधवाच्या मतीं शुक्ल व कृष्ण या दोनही पक्षांतील पंचमी चतुर्थीविद्ध घ्यावी; कारण, "दैवकर्म व पित्र्यकर्म या दोनही कर्माविषयीं शुक्ल व कृष्ण पक्षांतील पंचमी तिथि चतुर्थीविद्ध घ्यावी, परतिथीनें विद्ध ( षष्ठीविद्ध ) घेऊं नये" असें **हारीताचें** वचन आहे. **हेमाद्रीच्या** मतीं तर कृष्णपंचमी पूर्वा, आणि शुक्लपंचमी परा घ्यावी; कारण, "कृष्णपंचमी पूर्वविद्धा व शुक्लपंचमी परविद्धा घ्यावी" असें **दीपिका**वचन आहे. **वास्तविक म्हटलें तर** हारीतवचन उपवासविषयक आहे; कारण, "प्रतिपदा, पंचमी, वटपूर्णिमा, नवमी, दशमी, ह्या तिथि उपवासाविषयीं परतिथीनें विद्ध घेऊं नयेत" असें **ब्रह्मवैवर्त**वचन आहे. आतां जें "हे नारद, पंचमी तिथि षष्ठीयुक्त करावी" असें **आपस्तंब**वचन आहे, तें स्कंदव्रतविषयक होय; कारण, स्कंदोपवासाविषयीं पंचमी परतिथीनें युक्त घ्यावी, असा वाक्यशेष आहे, असें **माधव** सांगतो. **आपस्तंब**वचन नागपूजाविषयक होय, असें **अनंतभट्ट-निर्णयामृतादिक** म्हणतात. **चमत्कारचिंतामणीं**तही "नागपूजेविषयीं पंचमी षष्ठीयुक्त घ्यावी; कारण, षष्ठीयुक्त पंचमीचे ठायीं नाग संतुष्ट झाले आहेत. इतर पंचमी चतुर्थीयुक्त घ्यावी" तेणेंकरून नागपूजा इत्यादिकांविषयीं दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. आतां जें **मदनरत्नांत** व **दिवोदासीयांत**—श्रावणपंचमीहून अन्य पंचमी पूर्वा, असें सांगितलें आहे; कारण, "श्रावणशुक्लपंचमी ती नागपंचमी होय, ती वर्ज्य करून इतर सर्व पंचमीतिथि चतुर्थीसहित कराव्या, त्या हितकारक होत" ह्या **संग्रह**वचनावरून; आणि "गणेश व स्कंद यांचा योग असतां क्रमेंकरून नाग शुभ व अशुभ होतो, गणेशाचें वाहन आखु ( उंदीर ) व स्कंदाचें वाहन मयूर आहे, ते नागांचे मित्र व शत्रु होत" ह्या **षट्त्रिंशन्मत**वचनावरूनही श्रावणपंचमीवांचून अन्य नागपंचमी चतुर्थीयुक्त घ्यावी, असें सांगितलें तें उपवासादिविषयक होय.

षष्ठीसर्वमतेस्कंदव्रतातिरिक्तापरैव युग्मवाक्यात् नागविद्धानकर्तव्याषष्ठीचैवकदाचनेतिस्कांदाच्च निर्णयामृते षष्ठीचसप्तमीचैववारश्चेदंशुमालिनः योगोयंपद्मकोनामसूर्यकोटिग्रहैःसमः ।

**षष्ठीनिर्णय**-सर्वांच्या मतीं षष्ठी, स्कंदव्रत वर्ज्य करून अन्य व्रतांविषयीं पराच घ्यावी. कारण षष्ठी व सप्तमी यांचें युग्म आहे; आणि 'षष्ठी तिथि पंचमीयुक्त कदापि करूं नये" असें **स्कांद**वचनही आहे. **निर्णयामृतांत**-"षष्ठी, सप्तमी व रविवार यांचा योग आला असतां तो **पद्मकयोग** होतो, हा योग कोटिसूर्यग्रहणांशीं तुल्य आहे" असें सांगितलें आहे.

सप्तमी[२]पूर्वैव युग्मवाक्यात् षष्ठ्यायुतासप्तमीचकर्तव्यातातसर्वदेतिस्कांदाच्च ।

**सप्तमीनिर्णय**-सप्तमी षष्ठीयुक्तच करावी; कारण षष्ठी व सप्तमी यांचें युग्म आहे. ( जेव्हां पूर्व दिवशीं सूर्यास्तापर्यंत षष्ठी असल्यामुळें दिवसा षष्ठीविद्ध सप्तमी नसेल व दुसऱ्या दिवशीं अष्टमीविद्ध असेल तेव्हां अष्टमीविद्धच करावी. याप्रमाणें इतर तिथींच्या निर्णयाविषयींही समजावें. ) आणि "सर्वदा सप्तमी षष्ठीयुक्त करावी" असें **स्कांद**वचनही आहे.

अष्टमीतुसर्वमतेकृष्णापूर्वासितापरा व्रतमात्रेष्टमीकृष्णापूर्वाशुक्लाष्टमीपरेति माधवोक्तेः परयुक्शुक्लाष्टमीपूर्वयुक्कृष्णेतिदीपिकोक्तेश्च शिवशक्त्युत्सवेचकृष्णाप्युत्तरा पक्षद्वयेप्युत्तरैवशिवशक्तिमहोत्सवइति माधवोक्तेः दिवोदासीयेभविष्ये यदायदासिताष्टम्यांबुधवारोभवेत्कचित् तदातदाहिसाग्राह्याएकभक्ताशनेनृप संध्याकालेतथाचैत्रेप्रसुप्तेचजनार्दने बुधाष्टमीनकर्तव्याहंतिपुण्यंपुरातनं अंत्यपद्यंहेमाद्रौनधृतं ।

**अष्टमीनिर्णय**—सर्वांच्या मतीं कृष्णाष्टमी पूर्वा करावी; शुक्लाष्टमी परा करावी; कारण, "सर्व व्रतांविषयीं कृष्णाष्टमी पूर्वा आणि शुक्लाष्टमी परा करावी" असें **माधव** सांगतो; आणि शुक्लाष्टमी उत्तरविद्धा करावी, आणि कृष्णाष्टमी पूर्वविद्धा

---

१. पूर्वेद्युः षण्मुहूर्तन्यूनपंचम्या वेधे पूर्वापि. २. यदा पूर्वेद्युरस्तमयपर्यंता षष्ठीति दिवा षष्ठीविद्धा न लभ्यते परेद्युश्चाष्टमीविद्धा तदा चागत्या परैव एवं तिथ्यंतरनिर्णयेष्वप्यूह्यम्.

करावी" असें **दीपिका**वचनही आहे. शिवशक्तीच्या उत्सवाविषयीं, कृष्णपक्षांतील असली तथापि दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी घ्यावी; कारण, "दोनही पक्षांतील अष्टमी शिवशक्तीच्या उत्सवाविषयीं दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी" असें **माधव** सांगतो. **दिवोदासीयांत भविष्यांत**-"ज्या ज्या वेळीं शुक्लपक्षांतील अष्टमीचे ठायीं बुधवारयोग येईल ती ती बुधाष्टमी एकभक्तव्रताविषयीं ग्रहण करावी" "सायाह्नकालीं, चैत्रमासीं आणि चातुर्मास्यांत, बुधाष्टमी असेल ती घेऊं नये; कारण, ती पुरातन पुण्याचा नाश करिते." **"संध्याकाले तथा चैत्रे प्रसुप्ते च जनार्दने ॥ बुधाष्टमी न कर्तव्या हंति पुण्यं पुरातनं"** हा शेवटचा श्लोक **हेमाद्रींत** मिळत नाहीं.

**नवमी**तुसर्वमतेपूर्वा युग्मवाक्यात् नकुर्यान्नवमींतातदशम्यातुकदाचनेतिस्कांदाच्च ।

**नवमीनिर्णय**—नवमी तिथि सर्वांच्या मतीं पूर्वा ( अष्टमीविद्धा ) करावी; कारण, अष्टमी व नवमी यांचें युग्म आहे. आणि "नवमी दशमीयुक्त कदापि करूं नये" असें **स्कांद**वचनही आहे.

**दशमी**तुपूर्वापरावेति**हेमाद्रिः** कृष्णापूर्वोत्तराशुक्लादशम्येवंव्यवस्थितेति**माधवः** वस्तुतस्तुमुख्यानवमीयुतैवग्राह्या दशमीतुप्रकर्तव्यासदुर्गाद्विजसत्तमेत्या**पस्तंबोक्तेः** यत्तु संपूर्णादशमीकार्यापूर्वयापरयाथवेत्यं**गिरसोक्तं** तन्नवमीयुक्तालाभेऔदयिकीग्राह्येत्येवंनेयम् ।

**दशमीनिर्णय**—उपवासादिकांविषयीं दशमी पूर्वा ( नवमीयुक्ता ) किंवा परा ( उत्तरविद्धा ) करावी, असें **हेमाद्रि** म्हणतो. "कृष्णदशमी पूर्वा आणि शुक्लदशमी उत्तरा याप्रमाणें दशमीनिर्णय समजावा" असें **माधव** म्हणतो. **वास्तविक म्हटलें** तर-मुख्य दशमी नवमीयुक्तच घ्यावी; कारण, "दशमी नवमीयुक्त करावी" असें **आपस्तंब**वचन आहे. आतां जें "सर्व दशमी पूर्वविद्धा किंवा परविद्धा करावी" असें **आंगिरस**वचन आहे, तें नवमीयुक्त दशमी न मिळेल तर सूर्योदयव्यापिनी घ्यावी, एतद्विषयक जाणावें.

**अथैकादशी** तत्रैकादश्युपवासोद्वेधा निषेधपरिपालनात्मकोव्रतरूपश्च तत्राद्यः नशंखेनपिबेत्तोयंनखादेत्कूर्म[१]सूकरौ एकादश्यांनभुंजीतपक्षयोरुभयोरपीति**कौर्मदेवलाद्युक्तेः अग्निपुराणेपि** गृहस्थोब्रह्मचारीचआहिताग्निस्तथैवच एकादश्यांनभुंजीतपक्षयोरुभयोरपीति नचात्रपर्यु[२]दासेनव्रतविधिस्तद्धेतुव्रतादिशब्दाभावात् **व्रतरूपस्तु[३]ब्रह्मवैवर्ते** प्राग्हरिदिनेसम्यग्विधायनियमंनिशि दशम्यामुपवासस्यप्रकुर्याद्वैष्णवव्रतमिति इदंच**शिवभक्तादि**भिरपिकार्यं वैष्णवोवाथशैवोवाकुर्यादेकादशीव्रतमिति**शिवधर्मोक्तेः** वैष्णवोवाथशैवोवासौरोप्येतत्समाचरेदिति**सौरपुराणाच्च** ।

**आतां एकादशीनिर्णय**—एकादशीचा उपवास दोन प्रकारचा-एक भोजननिषेधपरिपालनात्मक, व दुसरा व्रतरूप. **त्यांमध्यें पहिला प्रकार**-"शंखानें उदकपान करूं नये, आणि कूर्म ( कणगरें ), सूकर ( कोन ) भक्षण करूं नयेत; व शुक्ल, कृष्ण या दोनही पक्षांतील एकादशीस भोजन करूं नये" याप्रमाणें कूर्मपुराण व देवलादिकांनीं सांगितला आहे तो. **अग्निपुराणांतही**-"गृहस्थाश्रमी, ब्रह्मचारी, व अग्निहोत्री, यांनीं शुक्ल व कृष्ण या दोनही पक्षांतील एकादशीस भोजन करूं नये." **शंका**-'एकादश्यां न भुंजीत' ह्या वाक्यांतील 'न' चा अर्थ पर्युदास करावा. म्हणजे-सिद्धांतीं 'भोजन करूं नये' असा निषेध केला आहे; येथें 'भोजनविरुद्ध संकल्प करावा' असा पर्युदास केला असतां ह्या वचनांनीं उक्त जो उपवास तो व्रतरूपच आहे? **समाधान**-तसा पर्युदास करण्याला व्रत, नियम इत्यादि शब्द किंवा दुसरें कांहींतरी प्रमाण असलें पाहिजे, तें येथें कांहीं नाहीं म्हणून पर्युदास होत नाहीं. **व्रतरूप हा दुसरा प्रकार सांगतो-ब्रह्मवैवर्तांत**-"दशमीचे रात्रीं उपवासाचा नियम करून एकादशीचे दिवशीं एकादशीव्रत यथाविधि करावें." हें एकादशीव्रत शैव, गाणपत्य इत्यादिकांनींही करावें; कारण, "वैष्णव, अथवा शैव, या सर्वांनीं एकादशीव्रत करावें" असें **शिवधर्म**वचन आहे; आणि वैष्णव अथवा शैव, सौर या सर्वांनींही हें एकादशीव्रत करावें" असें **सौरपुराण**वचनही आहे.

सोपिद्वेधा नित्यः काम्यश्च उपोष्यैकादशींनित्यंपक्षयोरुभयोरपीति**गारुडोक्तेः** पक्षेपक्षेचकर्तव्यमेका-

---

१. कूर्मसूकरौ महाराष्ट्रे कणगरें इति प्रसिद्धः कंदः कूर्मः । गोडारु इति कोन इति वा प्रसिद्धः कंदः सूकरः. २. पर्युदासः– विधेयेत्र प्रधानत्वं प्रतिषेधाप्रधानता । पर्युदासः स विज्ञेयो यत्रोत्तरपदेननञ् इतिरीत्या नञः संकल्पलक्षणायाः उत्तरपदेन स्वोत्तरनामधात्वर्थान्यतरान्वितार्थकतया. ३. व्रतरूप म्हणजे 'उपवास करितों' इत्यादि नियम करून किंवा संकल्प करून उपवास करणें तो व्रतरूप उपवास. आणि असा नियम किंवा संकल्प केल्यावांचून शास्त्रानें 'भोजन करूं नये' असें सांगितलें म्हणून केवळ भोजन न करणें ( ज्यांत आपण कांहीं करितों, असें नाहीं ) तो भोजननिषेधपालनरूप उपवास.

दश्यामुपोषणमितिनारदोक्तेश्चनित्यता यदीच्छेद्विष्णुसायुज्यंश्रियंसंततिमात्मनः एकादश्यांनभुंजीतपक्षयोरुभयोरपीतिकौर्मादिषुफलश्रुतेश्चकाम्यता ।

तो व्रतरूप उपवासही दोन प्रकारचा, नित्य व काम्य; कारण, "दोनही पक्षांतील एकादशीस नित्य उपोषण करावें" असें गरुडपुराणवचन आहे. आणि "प्रत्येक पक्षाच्या एकादशीस उपोषण करावें" असें नारदवचनही आहे, म्हणून हें नित्य आहे. विष्णूचें सायुज्य, संपत्ति, संतति हीं आपणांस प्राप्त व्हावीं अशी जर इच्छा असेल तर दोनही पक्षांच्या एकादशीस भोजन करूं नये" अशी कूर्मादि पुराणांत फलश्रुति आहे, म्हणून हें व्रत काम्यही आहे.

उभयैकादशीव्रतंगृहस्थातिरिक्तानामेवनित्यं गृहस्थस्यतुशुक्लायामेवव्रतंनित्यंनकृष्णायाम् एकादश्यांनभुंजीतपक्षयोरुभयोरपि वनस्थयतिधर्मोयंशुक्लामेवसदागृहीतिदेवलोक्तेः नचानेननिषेधपालनमेववनस्थयतिविषयेउपसंह्रियतेनतुव्रतमितिवाच्यं अस्यपर्युदासेनव्रतविधिपरत्वात् अन्यथापूर्वोक्ताग्निपुराणवचने निषेधपालनेगृहस्थस्याधिकारोक्त्याविरोधःस्यात् निषेधस्यनिवृत्तिमात्रफलत्वेनविशेषानपेक्षणादुपसंहारायोगात् अभावस्यधर्मत्वाभावाच्च तस्मादनेनसर्वेषामेकादशीव्रतविधायिनांसामान्यवाक्यानांवनस्थयतिविषयेउपसंहारान्नगृहस्थस्यकृष्णायांनित्यव्रतप्राप्तिः कथंतर्हि संक्रांत्यामुपवासंचकृष्णैकादशिवासरे चंद्रसूर्यग्रहेचैवनकुर्यात्पुत्रवान्गृहीतिनारदादिवचनेषुकृष्णानिषेधः प्राप्त्यभावादितिचेत् श्रूयतां शयनीबोधिनीमध्येयाकृष्णैकादशीभवेत् सैवोपोष्यागृहस्थेननान्याकृष्णाकदाचनेतिपाद्मे गृहस्थस्य आषाढीकार्तिकीमध्यस्थायाकृष्णाविहितासा पुत्रवतोनिषिध्यते अन्यकृष्णायांतुनविधिः सर्वविधीनांवनस्थयतिषूपसंहारात्ननिषेधः प्राप्त्यभावात् शयन्यादिवाक्यंत्वपुत्रगृहिगोचरमित्यनंतभट्टहेमाद्र्यादिग्रंथाः दीपिकापि असितातुशयनीबोधांतरस्थाप्यथोनस्यात्सात्मवतोपीति ।

शुक्ल व कृष्ण पक्षांतील दोन्ही एकादशींचें व्रत गृहस्थव्यतिरिक्तांसच नित्य आहे; गृहस्थाला तर शुक्ल एकादशीव्रत मात्र नित्य, कृष्णैएकादशीव्रत नित्य नाहीं; कारण, "दोनही पक्षांतल्या एकादशीस भोजन करूं नये, हा वानप्रस्थ व संन्यासी यांचा धर्म आहे. गृहस्थाश्रमी यानें तर शुक्लैकादशीच करावी" असें देवलवचन आहे. आतां पूर्वीं देवलादिवचनांनीं उक्त जो निषेधपालनरूप उपवास तो सर्वांना प्राप्त झाला असतां, हें ( वनस्थयतिधर्मो० ) देवलवचन वानप्रस्थ व संन्यासी त्यांविषयीं त्या उपवासाचा उपसंहार ( संकोच ) करणारें आहे; व्रताचा बोध करणारें नाहीं, असें म्हणूं नये; कारण, त्या वचनांतील 'न भुंजीत' या ठिकाणीं पर्युदास ( 'भोजनविरुद्ध संकल्प करावा' असा अर्थ ) करून हें वचन व्रतविधिरूप उपवासबोधक आहे; असें न मानिलें तर पूर्वोक्त जें अग्निपुराणस्थ वचन त्यांत निषेधपालनाविषयीं गृहस्थाला अधिकार सांगितला आहे, त्याच्याशीं विरोध येईल ! दुसरें असें कीं, निषेधपालनाचा उपसंहार ( संकोच ) करणारें हें वचन आहे, असेंही म्हणतां येत नाहीं; कारण, निषेधानें भोजनाची निवृत्ति ( अभाव ) च केवळ होत असल्यामुळें विशेष कांहीं कर्तव्य नाहीं म्हणून त्याचा उपसंहार ( संकोच ) करितां येत नाहीं; उपसंहार हा धर्माचा होत असतो, भोजनाभाव हा धर्म नव्हे म्हणून उपसंहार होत नाहीं. तस्मात् त्या देवलवचनानें एकादशीव्रतविधायक सामान्य सर्व वाक्यांचा वानप्रस्थ व यति त्यांविषयीं उपसंहार ( संकोच ) होत असल्यामुळें गृहस्थाश्रम्याला कृष्णैकादशीस नित्यव्रताची प्राप्ति होत नाहीं. शंका–जर गृहस्थाश्रम्यास कृष्णैकादशीव्रत नित्य नाहीं तर "संक्रांति, कृष्णैकादशी, चंद्रसूर्यग्रहण, यांचे ठायीं पुत्रवान् गृहस्थाश्रम्यानें उपवास करूं नये" असा नारदादिवचनांत कृष्णैकादशीव्रताचा निषेध कसा केला ? कारण, जें प्राप्त नाहीं त्याचा निषेध असंभवनीय आहे असें म्हणाल तर ऐका ! समाधान–"शयनीपासून बोधिनीपर्यंत ज्या कृष्णैकादशी त्यांचे ठायींच गृहस्थाश्रम्यानें उपोषण करावें, इतर कृष्णैकादशीस कदापि उपोषण करूं नये" त्या पद्मपुराणवचनांत आषाढीकार्तिकीमध्यवर्ती ज्या कृष्णैकादशी त्यांचें उपोषण गृहस्थाला जें प्राप्त झालें त्याचा पुत्रवंत गृहस्थाला निषेध केला आहे. इतर कृष्णैकादशीस तर व्रताचा विधि नाहीं; कारण, सर्व विधींचा वानप्रस्थ व यति यांविषयीं उपसंहार केला आहे, निषेधही नाहीं; कारण, प्राप्ति असल्यावांचून निषेध होत नाहीं. शयनी इत्यादि जें वाक्य तें तर अपुत्र गृहस्थाश्रमीविषयक होय, असें अनंतभट्ट व हेमाद्रि, इत्यादि ग्रंथ सांगतात. दीपिकाही–"शयनी व बोधिनी यांच्या मध्यवर्ती जी कृष्णैकादशी ती पुत्रवान् गृहस्थाश्रम्यानें करूं नये" असें म्हणते.

मदनरत्नेभविष्ये यथाशुक्लातथाकृष्णाद्वादशीमेसदाप्रिया शुक्लागृहस्थैःकर्तव्याभोगसंतानवर्धिनी

---

१ वनस्थेति ब्रह्मचारिविधवयोरुपलक्षणमित्यग्रे स्फुटम्. २ पर्युदासः न भुंजीतेत्यत्र भोजनाभावसंकल्पार्थकत्वम् । ३ अन्यथा पर्युदासानुपगमे.

मुमुक्षुभिस्तथाकृष्णानतेतेनोपदर्शितेइति निषेधपालनंकाम्यव्रतंचसर्वंकृष्णायांसर्वगृहिणांभवत्येव पुत्रवांश्चसभार्यश्चबंधुयुक्तस्तथैवच उभयोःपक्षयोःकाम्यव्रतंकुर्यात्तुवैष्णवमिति **नारदोक्तेः** एतत्सर्वं**कालादर्शे-उक्तं** विधवायावनस्थस्ययतेश्चैकादशीद्वये उपवासोगृहस्थस्यशुक्लायामेवपुत्रिणः भुजेर्निषेधःकृष्णायांसिद्धिस्तस्यततोव्रतेइति **प्राच्यास्तु**वैष्णवगृहस्थानांकृष्णापिनित्या नित्यंभक्तिसमायुक्तैर्नरैर्विष्णुपरायणैः पक्षेपक्षेचकर्तव्यमेकादश्यामुपोषणं सपुत्रश्चसभार्यश्चसुजनोभक्तिसंयुतः एकादश्यामुपवसेत्पक्षयोरुभयोरपीति-**नारदोक्तेरित्याहुः** पुत्रशब्दश्चापत्यमात्रवचनः **नारायणवृत्तौ** पुमांसएवमेपुत्राजायेरन्नित्यत्रापत्यमात्रवा**चित्वोक्तेः** जनयद्बहुपुत्राणीति**लिंगात्** पौत्रीमातामहस्तेनेति**मनूक्तेः** पुत्र्याअपत्यमित्यर्थेतुस्त्रीभ्योढगितिपौत्रेयइत्यापत्तेः पुमान्पुत्रोजायतेइतिच ।

**मदनरत्नांत—भविष्यांत**—"जशी शुक्लद्वादशी मला प्रिय आहे, तशी कृष्णद्वादशी सदा मला प्रिय आहे, त्यामध्यें भोग, संतति यांची वृद्धि करणारी शुक्लद्वादशी गृहस्थाश्रमी यांनीं करावी. मुमुक्षु जे त्यांनीं कृष्णा करावी." निषेधपालन आणि काम्यव्रत हें सर्व कृष्णैकादशीस सर्व गृहस्थाश्रम्यांना होतच आहे; कारण, "पुत्रवान्, सपत्नीक, सभ्रातृक, यांनीं दोनही पक्षांचे ठायीं विष्णुदेवताक काम्यव्रत करावें" असें **नारद**वचन आहे. हा सर्व प्रकार **कालादर्श**ग्रंथांत सांगितला आहे. तो असाः—"विधवा, वानप्रस्थ, यति यांना दोनही एकादशींस उपवास आहे. पुत्रवान् गृहस्थाश्रम्याला शुक्लैकादशीसच उपवास आहे, कृष्णैकादशीस भोजननिषेध आहे, यावरून त्याला व्रतसिद्धि होते." **प्राच्य** ( पूर्वदेशाकडील ) **ग्रंथकार** तर–वैष्णव गृहस्थाश्रम्याला कृष्णैकादशीही नित्य आहे; कारण, "विष्णुपरायण ( वैष्णव ) अशा भक्तिमान् पुरुषांनीं दोनही पक्षांचे ठायीं एकादशीचें उपोषण करावें; सपुत्र, सपत्नीक, सजन भक्तियुक्त अशा पुरुषानें दोनही पक्षांचे ठायीं एकादशीचें उपोषण करावें" असें **नारद**वचन आहे, असें म्हणतात. वरील वचनांत **'पुत्र'** शब्द आहे तो सामान्य अपत्याचा ( कन्यापुत्रांचा ) वाचक आहे; कारण, "अंगुष्ठमेव गृह्णीयाद्यदि कामयीत पुमांस एव मे पुत्रा जायेरन्" ह्या **गृह्यसूत्रा**वरील **नारायणवृत्तींत**-विवाहांत पाणिग्रहणसमयीं जर वराला 'पुरुषरूपच पुत्र व्हावे' अशी इच्छा असेल तर त्यानें स्त्रियेचा अंगुष्ठ ग्रहण करावा असें सांगितलें आहे. त्या ठिकाणीं पुत्रशब्द सामान्य अपत्याचा (कन्यापुत्रांचा) वाचक आहे. म्हणूनच त्याला 'पुमांसः' हें विशेषण सार्थक आहे. आणि 'जनयद्बहुपुत्राणि' ह्या **श्रुतींत** पुत्रशब्द अपत्यवाचक आहे म्हणून नपुंसक आहे. "पौत्री मातामहस्तेन दद्यात्पिंडं हरेद्धनम्" ह्या **मनूच्या** वचनाचा अर्थ—त्या कन्येच्या पुत्रानें मातामह 'पौत्री' होतो, येथें पुत्राचें ( कन्येचें ) अपत्य तो पौत्र, पौत्र आहे तो पौत्री असा अर्थ केला पाहिजे. पुत्रीचें अपत्य असा अर्थ केला तर 'स्त्रीभ्यो ढक्' या पाणिनीच्या सूत्रानें अपत्यार्थीं स्त्रीप्रत्ययांत शब्दाहून ढक् प्रत्यय होऊन 'पौत्रेय' असें रूप होऊन, तो पौत्रेय आहे ज्यास तो मातामह 'पौत्रेयी' असें होईल. म्हणून येथें पुत्रशब्द कन्यावाचक आहे. दुसऱ्या ठिकाणींही 'पुरुष पुत्र होतो' असें आहे.

**उपवासनिषेधेविशेषोवायवीयेउक्तः** उपवासनिषेधेतुभक्ष्यंकिंचित्प्रकल्पयेत् नदुष्यत्युपवासेनउपवासफलंलभेत् **भक्ष्यंचतत्रैवोक्तं** नक्तंहविष्यान्नमनोदनंवाफलंतिलाःक्षीरमथांबुचाज्यं यत्पंचगव्यंयदिवापिवायुःप्रशस्तमत्रोत्तरमुत्तरंचेत्यलं ।

**उपवासाच्या निषेधाविषयीं विशेष सांगतो—वायुपुराणांत**—"उपवासाचा निषेध ( संक्रांति, कृष्ण एकादशी इत्यादिकांस केलेला ) असतांही कांहीं अल्प भक्ष्य योजावें, तसें केलें असतां उपवास केल्यामुळें दोष न लागतां उपवासाचें फल मिळतें." **भक्ष्याचे प्रकार**—त्याच ठिकाणीं सांगतो—"नक्त, हविष्यान्न, अनोदन, भातावांचून इतर फल, तिल, दूध, उदक, घृत, पंचगव्य, वायु हीं एकाहून दुसरें प्रशस्त याप्रमाणें उत्तरोत्तर प्रशस्त होत." आतां हा विचार पुरे.

**तत्रदशमीवेधोद्वेधा** अरुणोदयवेधः सूर्योदयवेधश्चेति **आद्योगारुडे** दशमीशेषसंयुक्तोयदिस्यादरुणोदयः नैवोपोष्यंवैष्णवेनतद्दिनैकादशीव्रतमिति अरुणोदयस्वरूपंच**माधवीयेस्कांदे** उदयात्प्राक्चतस्रस्तुघटिकाअरुणोदयइति **यदपि** उदयात्प्राग्यदाविप्रमुहूर्तद्वयसंयुता संपूर्णैकादशीनामतत्रैवोपवसेद्गृहीति**गारुडसौरधर्मादिवचनं** यच्च **भविष्ये** आदित्योदयवेलायाःप्राङ्मुहूर्तद्वयान्विता एकादशीतुसंपूर्णाविद्धान्यापरिकीर्तितेति तदप्युपसंहारन्यायेनदंडचतुष्टयपरमेव **हेमाद्रावप्येवं** **यत्तुब्रह्मवैवर्ते** चतस्रोघटिकाःप्रातररुणोदयनिश्चयः चतुष्टयविभागोत्रवेधादीनांकिलोदितः अरुणोदयवेधःस्यात्सार्धंतुघ-

**टिकात्रयं अतिवेधोद्विघटिकःप्रभासंदर्शनाद्रवेः महावेधोपितत्रैवदृश्यतेर्कोनदृश्यते तुरीयस्तत्रविहितोयोगः- सूर्योदयेबुधैरिति तदप्यवयवद्वारारुणोदयवेधविशेषपरमेवेति माधवीयेमदनरत्नेच ।**

## आतां वेधाचा निर्णय सांगतो.

दशमीवेध दोन प्रकारचा-अरुणोदयकालीं दशमीवेध, आणि सूर्योदयकालीं दशमीवेध. त्यांमध्यें पहिला म्हणजे अरुणोदयवेध सांगतो-**गरुडपुराणांत**-"सूर्योदयाचे पूर्वी अरुणोदयकालीं दशमी शेष असेल तर त्या एकादशी तिथीस वैष्णवानें उपोषण करूं नये. कारण, तें एकादशीव्रत नव्हे" अरुणोदयाचें स्वरूप सांगतो-**माधवीयांत स्कांदांत**-"सूर्योदयाचे पूर्वी चार घटिका अरुणोदय म्हटला आहे." आतां जें "सूर्योदयाचे पूर्वी जेव्हां दोन मुहूर्त एकादशी असेल तेव्हां ती संपूर्ण एकादशी होय, त्याच दिवशीं गृहस्थाश्रम्यानें उपोषण करावें" असें **गरुडपुराणांत सौरधर्मा**दिवचन आहे तें; आणि जें **भविष्यपुराणांत**-"सूर्योदयाचे पूर्वी दोन मुहूर्त जी एकादशी, ती संपूर्ण एकादशी, इतर जी ती विद्धा म्हटली आहे" अशीं वचनें तीं उपसंहारन्यायेंकरून पूर्वोक्तांशीं एकवाक्यतेनें घटिकाचतुष्टयबोधकच आहेत. **हेमाद्रींत**ही असेंच आहे. आतां जें **ब्रह्मवैवर्तांत**-"प्रातःकालीं चार घटिका अरुणोदय आहे; त्यांत वेधादिकांचे चार विभाग केले आहेत, ते असे;—साडेतीन घटिका **अरुणोदय**वेध; सूर्याची प्रभा दिसूं लागल्यापासून दोन घटिका **अतिवेध**; सूर्य दिसतो न दिसतो त्या वेळीं तो **महावेध**; स्पष्ट सूर्योदय झाला असतां जो योग तो चतुर्थ उदयवेध" असें **ब्रह्मवैवर्त**-वचन; तेंही अवयवद्वारा म्हणजे अवयवाला वेध सांगून अरुणोदयवेधालाच महत्त्वबोधक आहे, असें **माधवीयांत** व **मदनरत्नांत** सांगितलें आहे.

**अंत्यस्तूदयवेधः तथान्येपिवेधाः हेमाद्रौमाधवीयेचगारुडे उदयात्प्राक्त्रिघटिकाव्यापिन्येकादशीयदा संदिग्धैकादशीनामवर्ज्येयंधर्मकांक्षिभिः उदयात्प्राङ्मुहूर्तेनव्यापिन्येकादशीयदा संयुक्तैकादशीनामवर्ज्येयंधर्मवृद्धये हेमाद्रौ रात्रेरंत्योष्टमोभागोप्यरुणोदयउक्तः निशःप्रांतेतुयामार्धेदेववादित्रवादने सारस्वतानध्ययनेचारुणोदयउच्यतइतिस्मृतेः अत्रेके एषांसर्वपक्षाणांमुहूर्तद्वयेनक्रोडीकारान्निशःप्रांतेइतिवचनाच्चरात्रिमानवशात्सार्धत्रिदंडादयोनेकेरुणोदयाः तदाहहेमाद्रिः सार्धघटिकात्रयोक्तिरष्टाविंशतिघटीमितरात्रिविषया महत्तरास्तुरात्रीरपेक्ष्यचतस्रोघटिकाइत्युक्तमितीत्याहुः तन्न अरुणोदयशब्दस्यानेकार्थत्वापत्तेः नचमुहूर्तद्वयमर्थः दंडद्वयैकमुहूर्तादिवेधानांतथाप्यनुपपत्तेः नहितेषांयामार्धत्वमरुणोदयत्वंचास्ति मुहूर्तद्वयस्ययामार्धस्यचचतस्रोघटिकाइत्यनेनोपसंहाराच्चनतदर्थः नचसार्धतुघटिकात्रयमित्यनेनापितदापत्तिःशंक्या तेनचतुर्दंडवेधस्यैवोक्तेः चतुर्दंडेऽर्धघटीदशमीसत्त्वेहिवेधस्तदर्थः द्विघटिकादौतदयोगाच्च ।**

दुसरा उदयवेध. तसेच आणखीहि दुसरे वेध सांगतो—**हेमाद्रींत** व **माधवीयांत**-**गरुडपुराणांत**-"ज्या कालीं उदयाच्यापूर्वी तीन घटिकाव्यापिनी एकादशी असेल ती संदिग्धनामक एकादशी होय, ती धर्मेच्छु पुरुषांनीं वर्ज्य करावी; जेव्हां उदयाच्या पूर्वी एक मुहूर्तव्यापिनी एकादशी असेल ती संयुक्तानामक एकादशी होय, ती धर्मवृद्धीसाठीं वर्ज्य करावी." **हेमाद्रींत**-रात्रीचा शेवटचा आठवा भाग तोही अरुणोदय सांगितला आहे; कारण, "रात्रीच्या शेवटच्या अर्धा प्रहरीं देववाद्यें वाजूं लागलीं म्हणजे तोही अरुणोदयकाल म्हटला आहे." असें स्मृतिवचन आहे. याविषयीं **कांहीं ग्रंथकार** म्हणतात—वर सांगितलेले हे जे सर्व पक्ष त्या सर्वांचा मुहूर्तद्वयांत अंतर्भाव असल्यामुळें आणि "रात्रीच्या शेवटचा अर्धा प्रहर अरुणोदय होय," असें वचन आहे म्हणूनही रात्रिमानवशेंकरून साडेतीन घटिका इत्यादिक अनेक अरुणोदयकाल होत, तेंच **हेमाद्रि** सांगतो—साडेतीन घटिकांस अरुणोदय, असें जें वचन तें अठ्ठावीस घटिका रात्रिमान असतां तद्विषयक आहे; चार घटिका अरुणोदयकाल जो सांगितला तो रात्रिमान मोठें असतां तद्विषयक होय, असें म्हणतात. तें त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं; कारण, '**अरुणोदय**' ह्या शब्दाचे अनेक अर्थ होऊं लागतील. आतां असें म्हणतों कीं, अरुणोदय म्हणजे दोन मुहूर्त असा अर्थ समजावा. बत्तीस घटिकांच्या रात्री असल्या तर दोन घटिकांचा मुहूर्त होतो, अठ्ठावीस घटिकांच्या रात्री असल्या तर पावणेदोन घटिकांचा मुहूर्त, मिळून अरुणोदयशब्दाचा अर्थ दोन मुहूर्तच आहे, असें मानलें म्हणजे अरुणोदयशब्दाचे अनेक अर्थ न होतां सर्व वाक्यांची संगति होते; असें म्हणतां येत नाहीं; कारण, दोन घटिकांचा वेध, एक मुहूर्ताचा वेध असे जे वेध सांगितले त्यांची उपपत्ति होत नाहीं; कारण, त्या दोन घटिकादि वेधांला यामार्धत्व, किंवा अरुणोदयत्व आहे काय? नाहीं. म्हणून अरुणोदय शब्दाचा दोन मुहूर्त हा अर्थ नाहीं. आणि दोन मुहूर्त, यामार्ध, ह्या वाक्यांचा, चार घटिकावेध ह्या वाक्यानें उपसंहार ( तात्पर्यार्थप्रतिपादन ) केला आहे, म्हणूनही अरुणोदयशब्दाचा दोन मुहूर्त हा अर्थ होत नाहीं. तर आतां एका वचनानें अरुणोदयवेध साडेतीन घटिका सांगितला आहे;

त्यामुळें अरुणोदयशब्दाचा साडेतीन घटिका अर्थ, व पूर्वीं सांगितलेला चार घटिका, मिळून अनेक अर्थांची आपत्ति येईल! अशी शंका करूं नये; कारण, 'साडेतीन घटिका' या वाक्यानें चार घटिका वेधच सांगितला आहे, तो असा— चार घटिका अरुणोदयामध्यें अर्ध घटिका दशमी असेल तर वेध होतो, असा त्या वाक्याचा अर्थ आहे. दोन घटिकांचे वगैरे जे वेध सांगितले त्या ठिकाणीं अरुणोदय शब्दाची प्रवृत्तीच नाहीं.

**यत्तुमतम्** कियतारुणोदयवेधइत्यपेक्षायांसार्धघटिकात्रयनियमादरुणोदयेर्धघटिकातोन्यूनदशमीसत्त्वेनदोषइति **तत्तुच्छम्** द्विदंडादावपितदापत्तेः दशमीशेषसंयुक्तोयदिस्यादरुणोदयः नैवोपोष्यंवैष्णवेनतद्दिनैकादशीव्रतमिति **गारुडेभविष्येच**योगमात्रनिषेधात् **नारदीयेपि** लववेधेपिविप्रेंद्रदशम्यैकादशींत्यजेत् सुरायाबिंदुनास्पृष्टंगंगांभइवनिर्मलं **स्कांदेपि** कलाकाष्ठादिगत्यैवदृश्यतेदशमीविभो एकादश्यांनकर्तव्यंव्रतंराजन्कदाचनेति **माधवोप्या**ह सोऽयंकलादिवेधोऽरुणोदयवेधेसूर्योदयवेधेचसमानइति **निगमेपि** सर्वप्रकारवेधोऽयमुपवासस्यदूषकइति अतएव**माधवेन**अरुणोदयाद्यदंडेऽल्पदशमीस्पर्शेसंपृक्ता कृत्स्नघटीयोगे संदिग्धा मुहूर्तव्याप्तौसंयुक्ता उदयेसंकीर्णेत्युक्त्वा अरुणोदयवेलायांदशमीयदिसंगता संपृक्तैकादशींतांतुमोहिन्यैदत्तवान्प्रभुरिति **गोभिलाद्युक्तेः** पूर्वोक्त**गारुडादेश्च** सामान्यतोविशेषतश्चारुणोदयवेधोनिषिद्धः ।

आतां जें कोणाचें मत—किती कालानें अरुणोदय वेध होतो, अशी आकांक्षा उत्पन्न असतां 'साडेतीन घटिकांस' असा नियम केल्यामुळें, अरुणोदयांत अर्ध घटिकेहून न्यून दशमी असेल तर दोष नाहीं, असें तें मत तुच्छ आहे; कारण, दोन घटिकांचे वगैरे जे वेध त्या ठिकाणींही असाच ( अरुणोदयांत दोन घटिकांहून न्यून दशमी असेल तर दोष नाहीं असा ) अर्थ होऊं लागेल! म्हणून तसा ( अर्धघटिकेहून न्यून दशमी असेल तर दोष नाहीं असा ) अर्थ नाहीं; कारण, "जर अरुणोदयकालीं दशमी शेष असेल तर त्या दिवशीं वैष्णवानें उपवास करूं नये; कारण, तें एकादशीव्रत नाहीं" असा **गारुडांत** व **भविष्यांत** सर्व योगाचा निषेध केला आहे. **नारदीयांतही** "जरी गंगोदक निर्मल आहे तथापि जर सुराबिंदूनें संस्पृष्ट असेल तर तें जसें त्याज्य तद्वत् दशमीनें एक लवमात्र वेध केला असतांही ती एकादशी टाकावी." **स्कंदपुराणांत**ही "कला, काष्ठा इत्यादिक अल्प कालानें जरी दशमी असेल तथापि अशा दशमीयुक्त एकादशीस कदापि व्रत करूं नये." **माधव**ही सांगतो-तो हा कला—काष्ठादिपरिमित वेध अरुणोदयवेध व सूर्योदयवेध यांचे ठायीं तुल्य आहे. **निगमांत**ही—"सर्व प्रकारचा हा वेध उपवासाला दूषक होतो" म्हणूनच **माधवानें** अरुणोदयाच्या पहिल्या घटिकेस अल्प दशमीचा स्पर्श असेल तर ती संपृक्ता एकादशी, एक घटिका योग असेल तर ती संदिग्धा एकादशी, दोन घटिका व्याप्ति असेल तर ती संयुक्ता एकादशी, उदयकालीं व्याप्ति असेल तर ती संकीर्णा एकादशी, असें सांगून "अरुणोदयकालीं जर दशमी प्राप्त असेल तर ती संपृक्ता एकादशी होते, ती एकादशी **प्रभूनें** मोहिनीला दिली आहे" ह्या **गोभिलादिकांचे** वचनावरून व पूर्वोक्त "दशमीशेषसंयुक्तो०" ह्या **गारुडादिक** वचनावरूनही सामान्येंकरून व विशेषेंकरूनही अरुणोदयवेध निषिद्ध केला आहे.

यत्त्वष्टमभागोरुणोदयइति**हेमाद्रिणोक्तं यच्च**महत्तरारात्रीरितितत्परमतंस्वयमेवदूषितं अंतेप्युक्तं वेधतारतम्यंचदोषतारतम्यादुपपद्यतइति दोषतारतम्यंचप्रायश्चित्ततारतम्यादवगम्यते **तच्चोक्तंहेमाद्रौस्मृत्यंतरे** अज्ञानाद्यदिवामोहात्कुर्वन्नेकादशींनरः दशमीशेषसंयुक्तांप्रायश्चित्तमिदंचरेत् कृच्छ्रपादंनरश्चीर्त्वागांचदद्यात्सवत्सकाम् सुवर्णस्यार्धकंदेयंतिलद्रोणसमन्वितम् विधानांतरं**तत्रैव** ब्राह्मणान्भोजयेत्रिंशत्गांचदद्यात्सवत्सकां धरणस्यार्धकंदेयंतिलद्रोणमथापिवेति अत्रवेधतारतम्याद्व्यवस्थेति**हेमाद्रिः** निशःप्रांतइत्यपिदोषाधिक्यार्थमेव तस्माच्चतुर्घटिकात्मकएवारुणोदयइतिसिद्धम् तेनषट्पंचाशद्दंडानंतरंदशमीप्रवेशेरुणोदयवेधउक्तोभवति ।

आतां जें रात्रीचा शेवटचा आठवा भाग तो अरुणोदय, असें **हेमाद्रीनें** सांगितलें तें, आणि जें रात्रिमान मोठें असतां चार घटिका अरुणोदयकाल तें दुसऱ्यांचें मत आपणच ( हेमाद्रीनेंच ) दूषित केलें व शेवटींही त्यानें सांगितलें कीं, वेधतारतम्य दोषतारताम्येंकरून उपपन्न होतें; तें दोषतारतम्य प्रायश्चित्ततारतम्येंकरून समजलें जातें, तें सांगतो— **हेमाद्रींत—स्मृत्यंतरांत**—"जर कोणी मनुष्य अज्ञानेंकरून किंवा मोहानें दशमीशेषयुक्त एकादशी करील तर त्यानें हें

( पुढें सांगितलेलें ) प्रायश्चित्त करावें." तें असेंः—"पादकृच्छ्र करून सवत्स गोप्रदान करावें. द्रोणपरिमित तिलांसहित अर्धे सुवर्ण दान करावें." **दुसरें विधान**-त्या ठिकाणींच सांगतो-"तीस ब्राह्मणांस भोजन द्यावें, सवत्स गाई द्यावी, अथवा द्रोणपरिमित तिल किंवा अर्ध धरणपरिमित सुवर्ण यांचें दान करावें." यांविषयीं वेधतारतम्येंकरून व्यवस्था करावी असें **हेमाद्रि** म्हणतो. 'निशः प्रांते' असें जें पूर्वोक्त स्मृतिवचन तेंही अधिक दोषप्रदर्शनार्थंच आहे, तस्मात् चार घटिकापरिमितच अरुणोदय असें सिद्ध झालें. म्हणून छप्पन्न घटिकांनंतर दशमीचा प्रवेश असेल तर तो अरुणोदयवेध होतो.

अंत्योपितत्रैव**कण्वेनोक्तः** उदयोपरिविद्धातुदशम्यैकादशीयदि दानवेभ्यःप्रीणनार्थंदत्तवान्पाकशासनइति **स्मृत्यंतरेपि** दशम्याःप्रांतमादाययदोदेतिदिवाकरः तेनस्पृष्टंहरिदिनंदत्तंजंभासुरायतदिति ।

अंत्य म्हणजे सूर्योदयवेधही त्याच ठिकाणीं **कण्वानें** सांगितला आहे. तो असाः—"जर उदयानंतर दशमीनें विद्ध एकादशी होईल तर ती एकादशी इंद्र दानवांना संतोषार्थ देता झाला." **स्मृत्यंतरांन**ही-"ज्या कालीं दशमीच्या शेवटच्या पलादि भागांत सूर्य उदय पावतो त्या उदयानें स्पर्श केलेली एकादशी जंभासुराला दिली आहे."

तत्रारुणोदयवेधो**वैष्णवविषयः** तद्वाक्येषुवैष्णवग्रहणात् तत्स्वरूपंतु**माधवीयेस्कांदे** परमापदमापन्नोहर्षेवासमुपस्थिते नैकादशींत्यजेद्यस्तुयस्यदीक्षास्तिवैष्णवी विष्णवर्पिताखिलाचारःसहिवैष्णवउच्यते-इति यद्यपिपित्रादेरागमदीक्षायांतन्मात्रस्यवैष्णवत्वंनतुपुत्रादेस्तथापिस्वपारंपर्यप्रसिद्धमेववैष्णवत्वंस्मार्तत्वंचमन्यंतेवृद्धाः **तत्त्वसागरभविष्ये** यथाशुक्लातथाकृष्णायथाकृष्णातथेतरा तुल्येतेमन्यतेयस्तुसवैवैष्णवउच्यते **केचित्तु**दशम्यांनवमीवेधमपित्यजंति तत्रमूलंमृग्यम् ।

त्या वेधांमध्यें अरुणोदयवेध वैष्णवांविषयीं आहेः कारण, अरुणोदयवेधप्रतिपादकवाक्यांत **'वैष्णव'** असें पद पठित आहे. **वैष्णवांचें स्वरूप-माधवीयांत-स्कांदांत**-"मोठी आपत्ति प्राप्त झाली, किंवा मोठा हर्ष झाला तरी जो एकादशी टाकीत नाहीं, ज्याला वैष्णवी दीक्षा ( उपदेश ) आहे, ज्यानें आपला सर्व आचार ( कर्म ) विष्णूला अर्पण केलें आहे, तो वैष्णव म्हटला आहे." पिता, पितामह इत्यादिकांनीं आगमदीक्षा ग्रहण केली असेल तर ते मात्र वैष्णव होतातः त्यांचे पुत्रादिक वैष्णव होत नाहींत, असें जरी आहे तथापि आपल्या परंपरेनें प्रसिद्ध जें वैष्णवत्व व स्मार्तत्व तें वृद्ध मानितात. **तत्त्वसागरांत-भविष्यांत**-"जशी शुक्लैकादशी तशीच कृष्णैकादशी. जशी कृष्णैकादशी, तशीच शुक्लैकादशी, याप्रमाणें उभय एकादशी जो समान मानितो तो वैष्णव होय." केचित् ग्रंथकार तर, दशमीचे ठायीं नवमीवेधही वर्ज्य करितात, परंतु त्याविषयीं मूळ ( प्रमाण ) नाहीं.

उदयवेधस्तुपरिशेषात्स्मार्तगोचरः **तदाहमाधवः** अरुणोदयवेधोत्रवेधःसूर्योदयेतथा उक्तौद्वौदशमीवेधौवैष्णवस्मार्तयोःक्रमात् ।

जो उदयकालिक वेध तो स्मार्तविषयक होय, तेंच **माधव** सांगतो-"ह्या एकादशीव्रताविषयीं अरुणोदयवेध आणि सूर्योदयवेध असे दोन दशमीवेध, वैष्णव व स्मार्त यांना क्रमेंकरून सांगितले आहेत." म्हणजे अरुणोदयवेध वैष्णवांनीं व सूर्योदयवेध स्मार्तांनीं घ्यावा.

**हेमाद्रि**स्तुकेषांचिदर्धरात्रेपिदशमीवेधमाह अर्धरात्रेकेषांचिद्दशम्यावेधउच्यते कपालवेधइत्याहुराचार्याहेहरिप्रियाः नतन्ममम्मतंयस्मात्त्रियामारात्रिरिष्यतइति**ब्रह्मवैवर्तात् अस्यार्थः** अनद्यतनेलङ् इत्यत्रातीतायारात्रेःपश्चिमयामद्वयमागामिन्यारात्रेःपूर्वयामद्वयंदिवसश्चसकालएषोद्यतनःसकलइत्युक्तं**महाभाष्ये** सएषवर्तमानःकालएकादश्यहोरात्रउपोष्यः तन्मध्येदशमीप्रवेशेविद्धासात्याज्या अतएव**हेमाद्रौ** दशम्याःसंगदोषेणअर्धरात्रात्परेणतु वर्जयेच्चतुरोयामान्संकल्पार्चनयोःसदेतिदोषउक्तः चतुरोयामान्दिवसस्येत्यर्थः **स्वमतेतु** रात्रेस्त्रियामत्वात्प्रहरत्रयंपूर्वशेषः तेनचतुर्थप्रहरएववेधोयुक्तः सोप्यरुणोदयएव सूर्योदयंविनानैवस्नानदानादिकःक्रमइति **मार्कंडेयपुराणात्** प्रत्यूषोऽहर्मुखंकल्यइतिकोशादरुणोदयमारभ्य सूर्यांशुप्रवृत्तेस्तत्रैवनिषेधः तेनमतभेदाद्व्यवस्थेति**केचित्** कैमुतिकन्यायेनारुणोदयवेधस्यैवेयंस्तुतिरितितु-

---

१ पादकृच्छ्रादिकांचीं लक्षणें ग्रंथाच्या शेवटीं देऊं. २ द्रोण म्हणजे चार प्रस्थ ( शास्त्रीय चार शेर ). ३ सुवर्ण म्हणजे ८० गुंजा सोन्यास नांव आहे. अर्ध सुवर्ण म्हणजे ४० गुंजा सोनें समजावें. ४ परिशेषादिति । अतिवेधादयः सर्वे ये वेधास्तिथिपु स्मृताः । सर्वेष्ववेधा विज्ञेया वेधः सूर्योदये स्मृत इत्युक्तेः वैष्णवान्प्रति अतिवेधादीनां वेधत्वनिराकरणबाधादित्यर्थः.

**माधवः** यस्तुदिक्पंचदशभिस्तथेतिवेधःसउपवासातिरिक्तविषयइति**माधवः** सर्वप्रकारवेधोयमुपवासस्य दूषकः सार्धसप्तमुहूर्तस्तुयोगोयंबाधतेव्रतमितिनिगमा**दित्यलम्** ।

**हेमाद्रि** तर कित्येकांस अर्धरात्रींही दशमीवेध सांगतो. तो असा—"कित्येकांस अर्धरात्रीं दशमीचा वेध उक्त आहे, तोच कपालवेध होय असें वैष्णव आचार्य म्हणतात. परंतु माझें मत तसें नाहीं; कारण, तीन प्रहरांची रात्र सांगितली आहे" असें **ब्रह्मवैवर्त**वचन आहे. या वचनाचा अर्थ असा-**"अनद्यतने लङ्"** या सूत्राचे ठिकाणीं, अतीत ( गत ) रात्रीचे पश्चिम ( पुढचे ) दोन प्रहर, आणि येणाऱ्या रात्रीचे पूर्व दोन प्रहर व मध्यवर्ती दिवस मिळून जो काल तो सर्व अद्यतनकाल होय, असें व्याकरणमहाभाष्यांत अद्यतनकालाचें विवरण केलें आहे, तो हा वर्तमानकाल, एकादशीचा अहोरात्र उपोष्य ( उपोषणास विहित ) होय; त्या कालांत दशमीचा प्रवेश असतां ती विद्धैकादशी टाकावी, असें आहे म्हणूनच **हेमाद्रींत**—"अर्ध रात्रीच्या पुढें दशमीचा संगदोष असेल तर तो एकादशीचा दिवस ( दिवसाचे चार प्रहर ) संकल्प व पूजा यांविषयीं सर्वदा वर्ज्य करावा" असा दोष सांगितला आहे. आपल्या मतें तर—रात्रि ही तीन प्रहरात्मक आहे, म्हणून तीन प्रहर हे पूर्व दिवसाचा शेष आहे. यावरून चवथ्या प्रहरींच वेध योग्य, व तोही अरुणोदयकालींच येतो, कारण, "सूर्योदयावांचून स्नानदानादिक क्रिया होत नाहींत" असें **मार्कंडेयपुराण**वचन आहे. प्रत्यूष, अहर्मुख हीं नांवें कोशकारानें त्यालाच सांगितलीं आहेत, म्हणून अरुणोदयापासून सूर्यकिरणांची प्रवृत्ति होते, याकरितां अरुणोदयकालींच दशमीचा निषेध आहे. यावरून मतभेदेंकरून वेधाची व्यवस्था जाणावी, असें **केचित्** ग्रंथकार म्हणतात. **कैमुतिकन्यायानें** ( दोन प्रहरांत दशमी असली तरी वेध आहे, मग अरुणोदयकालीं दशमी असेल तर वेध काय सांगावा? अशा न्यायानें ) अरुणोदयवेधाचीच स्तुति आहे असें तर **माधव** म्हणतो. आतां जो "दशमी पंधरा घटिकांनीं एकादशीला विद्ध करिते" असा वेध सांगितला तो उपवासव्यतिरिक्तविषयक होय असें **माधव** म्हणतो; कारण, "हा सर्व प्रकारचा वेध उपवासाचा दूषक होतो, पंधरा घटिकापरिमित दशमीयोग हा व्रतास बाध करितो" असें **निगम**वाक्य आहे. आतां हा विचार पुरे.

अत्र**माधवमते**वैष्णवैररुणोदयविद्धात्याज्या यदात्वेकादश्येवशुद्धासतीवर्धतेद्वादशीवाउभयंवातदापरोपोष्या एकादशीद्वादशीवाधिकाचेत्त्यज्यतांदिनम् पूर्वंग्राह्यंनुत्तरंस्यादितिवैष्णवनिर्णयः **इतिमाधवोक्तेः** ।

या विद्ध एकादशीमध्यें माधवाचे मतीं वैष्णवांनीं अरुणोदयविद्धा टाकावी. ज्या वेळीं एकादशीच शुद्धा असून वृद्धिंगत होते ( दुसऱ्या दिवशीं असते ), किंवा द्वादशी वृद्धिंगत होते, अथवा एकादशी व द्वादशी दोन्ही तिथि वृद्धिंगत असतात त्या वेळीं दुसऱ्या दिवसाची ती वैष्णवांनीं उपोषणास घ्यावी; कारण, "एकादशी किंवा द्वादशी वृद्धिगामिनी ( दुसऱ्या दिवशीं उर्वरित ) असेल तर वैष्णवांनीं पूर्वदिवसाची टाकून उत्तरदिवसाची घ्यावी, असा वैष्णवांचा निर्णय आहे" असें **माधवानें** सांगितलें आहे.

**स्मार्तैस्तु** सूर्योदयविद्धात्याज्या यदात्वेकादशीशुद्धासतीवर्धतेद्वादशीचसमान्यूनावातदागृहस्थैःपूर्वायतिभिरुत्तराकार्या प्रथमेहनिसंपूर्णाव्याप्याहोरात्रसंयुता द्वादश्यांचतथातातदृश्यतेपुनरेवच पूर्वाकार्यागृहस्थैश्चयतिभिश्चोत्तराविभोइति**स्कांदोक्तेः वर्धमानो**प्येवमेवाह ।

स्मार्तांनीं तर सूर्योदयविद्धा टाकावी. ज्या वेळीं एकादशी शुद्ध असून वाढते ( दुसऱ्या दिवशीं असते ), आणि द्वादशी तर समा किंवा न्यूना असते, त्या वेळीं गृहस्थाश्रमी यांनीं पूर्वा करावी. यति ( संन्यासी ) विधवा यांनीं उत्तरा करावी; कारण, "पूर्वदिवशीं अहोरात्र व्याप्ति संपूर्ण असून दुसऱ्या दिवशीं द्वादशीचे ठायीं एकादशी असेल तर गृहस्थांनीं पूर्वा आणि यतींनीं उत्तरा करावी." असें **स्कंदपुराण**वचन आहे. **वर्धमान**ही असेंच सांगतो.

उभयवृद्धौतुशुद्धाविद्धावासर्वेषांपरैव संपूर्णैकादशीयत्रप्रभातेपुनरेवसा सर्वैरेवोत्तराकार्यापरतोद्वादशीयदीति**नारदोक्तेः** द्वादशीमात्रवृद्धौतुशुद्धायांपूर्वैव नचेदेकादशीविष्णौद्वादशीपरतःस्थिता उपोष्यैकादशीतत्रयदीच्छेत्परमंपदमिति**नारदोक्तेः** द्वादशीमात्रवृद्धौतुशुद्धाविद्धेत्यवस्थिते शुद्धापूर्वोत्तराविद्धास्मार्तनिर्णय ईदृशइति**माधवोक्तेश्च मदनरत्ने**प्येवम् **यत्तु** विद्धाप्यविद्धाविज्ञेयापरतोद्वादशीनचेत् अविद्धापिच विद्धास्यात्परतोद्वादशीयदीति **हेमाद्रौपाद्म**वचनंतदेकादश्यावृद्धौज्ञेयम् **तदुक्तंमाधवेन** एकादशीद्वादशीचेत्युभयंवर्धतेयदा तदापूर्वदिनंत्याज्यंस्मार्तैर्ग्राह्यंपरंदिनमिति ।

---

१ पंचदशनाडीवेधस्तु स्कंदपुराणे दर्शितः ॥ नागो द्वादशनाडीभिर्दिक्पंचदशभिस्तथा ॥ भूतोष्टादशनाडीभिर्दूषयत्युत्तरांतिथिमिति ॥
२ एतद्वचनं परेद्युर्द्वादश्यभावविषयं ॥ ३ द्वादश्याधिक्ये पूर्वेद्युरुपवासमाह नारदः ॥

एकादशी व द्वादशी ह्या दोघांची वृद्धि असेल तर शुद्धा असो किंवा विद्धा असो, सर्वांनीं पराच करावी; कारण, "पूर्वदिवशीं संपूर्ण एकादशी असून दुसऱ्या दिवशीं पुनः वृद्धिगामिनी एकादशी व तिसऱ्या दिवशीं द्वादशी जर असेल तर सर्वांनीं उत्तराच करावी" असें **नारदवचन** आहे. द्वादशीची मात्र वृद्धि असेल तर शुद्धा असतां पूर्वाच करावी; कारण, "द्वादशीचे दिवशीं एकादशी अल्प सुद्धां नाहीं, आणि द्वादशी त्या दिवशीं असून पुढच्या दिवशीं आहे त्या वेळीं, एकादशीलाच उपोषण करावें" असें **नारद**वचन आहे; आणि "द्वादशीची मात्र वृद्धि असेल तर शुद्धा आणि विद्धा व्यवस्थित जाणाव्या, म्हणजे शुद्धा असतां पूर्वा, आणि विद्धा असतां उत्तरा करावी, याप्रमाणें स्मार्तनिर्णय समजावा" अशी **माधवाची**ही उक्ति आहे. **मदनरत्नां**तही असेंच आहे. आतां जें "दुसऱ्या दिवशीं द्वादशी नसेल तर, ती विद्धा असतांही अविद्धा जाणावी. आणि जर दुसऱ्या दिवशीं द्वादशी असेल तर अविद्धा असतांही विद्धा जाणावी" असें **हेमाद्रींत** **पाद्म**वचन, तें एकादशीची वृद्धि असतां जाणावें. तें **माधवानें** सांगितलें आहे. तें असें:—"ज्या कालीं एकादशी व द्वादशी ह्या दोनही तिथि वाढतात, त्या कालीं स्मार्तांनीं पूर्वदिवस टाकून दुसरा दिवस उपोषणाला घ्यावा."

विद्धैकादश्यांद्वादशीमात्रवृद्धौचसर्वेषांपरैव तत्रैवैकादशीमात्रवृद्धौगृहिणःपूर्वायतेरुत्तरा **पूर्वोक्तपाद्मोक्तेः** एकादशीविवृद्धाचेच्छुक्लेकृष्णेविशेषतः उत्तरांतुयतिःकुर्यात्पूर्वामुपवसेद्गृहीति**प्रचेतसोक्तेः** एतच्छुद्धाविद्धातुल्यमिति**माधवः** त्रयोदश्यांनलभ्येतद्वादशीयदिकिंचन उपोष्यैकादशीतत्रदशमीमिश्रितापिचेति**स्कांदात्** अविद्धानिनिषिद्धेश्चनलभ्यंतेदिनानितु मुहूर्तैःपंचभिर्विद्धाग्राह्यैवैकादशीतिथिरिति**ऋष्यशृंगोक्तेश्च** मुहूर्तपंचकमरुणोदयमारभ्यज्ञेयम् अन्यथोत्तरेऽह्निएकादश्यभावासंभवात् **यदपिहेमाद्रिणा** शुद्धसमाशुद्धन्यूनावाअधिकद्वादशिकाचेत्सर्वेषांपरैवेत्युक्तंतदपिवैष्णवविषयं स्मार्तानांतुपूर्वैवेत्यविरोधः ।

विद्धैकादशी असून द्वादशीची मात्र वृद्धि असतां सर्वांनीं दुसऱ्या दिवसाचीच उपोषणाला घ्यावी. विद्धैकादशी असून एकादशीची मात्र वृद्धि असतां गृहस्थाश्रमी यांनीं पूर्वा करावी; संन्यासी यांनीं उत्तरा करावी; कारण, "जर दुसऱ्या दिवशीं द्वादशी नसेल तर, ती विद्धा असतांही अविद्धा आणि जर दुसऱ्या दिवशीं द्वादशी असेल तर अविद्धा असतांही विद्धा जाणावी" असें पूर्वोक्त **पाद्म**वचन आहे. "शुक्लपक्षीं आणि कृष्णपक्षीं एकादशीची वृद्धि असेल तर गृहस्थाश्रम्यांनीं पूर्वा करावी, आणि यतींनीं उत्तरा करावी" असें **प्रचेतसाचें** वचन आहे. हें ( प्रचेतसाचें ) वचन शुद्धा व विद्धा यांविषयीं तुल्य आहे असें **माधव** म्हणतो; कारण, "त्रयोदशीस अल्पही द्वादशी नसेल तर दशमीयुक्तही एकादशी उपोषणाला घ्यावी" असें **स्कांद**वचन आहे. आणि "जर निषिद्ध अशा दशमीनें अविद्ध अशी एकादशी मिळत नाहीं, तर पांच मुहूर्तांनीं विद्ध अशी एकादशी ग्रहण करावी." असें **ऋष्यशृंगाचें**ही वचन आहे. येथें पांच मुहूर्त म्हटले ते अरुणोदयापासून समजावे. अरुणोदयापासून न समजतां सूर्योदयापासून घेतले तर दुसऱ्या दिवशीं एकादशी नाहीं, असें होणार नाहीं. आतां जें **हेमाद्रीनें** सांगितलें कीं, शुद्धसमा किंवा शुद्धन्यूना अशी एकादशी व दुसऱ्या दिवशीं अधिक द्वादशी असेल तर सर्वांनीं पराच करावी, तेंही **हेमाद्रि**मत वैष्णवविषयक समजावें. स्मार्तांनीं तर पूर्वाच करावी, म्हणजे कोणताही विरोध येत नाहीं.

**हेमाद्रिमतेतूच्यते** तत्र शुद्धाविद्धाद्वयीनंदात्रेधान्यूनसमाधिकैः षट्प्रकाराःपुनस्त्रेधाद्वादश्यूनसमाधिकैरित्यष्टादशैकादशीभेदाः तत्रशुद्धाधिकन्यूनद्वादशिकाशुद्धाधिकसमद्वादशिकाचसकामैःपूर्वानिष्कामैरुत्तराकार्या प्रथमेहनिसंपूर्णेतिपूर्वोक्त**स्कांदात्** ऊनद्वादशिकायांतुविष्णुप्रीतिकामैरुपवासद्वयंकार्यम् संपूर्णैकादशीयत्रप्रभातेपुनरेवसा लुप्यतेद्वादशीतस्मिन्नुपवासःकथंभवेत् उपोष्येद्वेतिथीतत्रविष्णुप्रीणनतत्परैरिति**वृद्धवसिष्ठोक्तेः** शुद्धन्यूनाशुद्धाधिकाशुद्धसमाविद्धन्यूनाविद्धसमावाधिकद्वादशिकाचेत्सर्वेषांपरैवेति**हेमाद्रिः** ।

**आतां हेमाद्रिमतीं तर सांगतो—शुद्धा भेद**—१ शुद्धन्यूनान्यूनद्वादशिका, २ शुद्धन्यूनासमद्वादशिका, ३ शुद्धन्यूनाऽधिकद्वादशिका, ४ शुद्धसमा न्यूनद्वादशिका, ५ शुद्धसमा समद्वादशिका, ६ शुद्धसमाऽधिकद्वादशिका, ७ शुद्धाधिकान्यूनद्वादशिका, ८ शुद्धाधिकासमद्वादशिका, ९ शुद्धाधिकाधिकद्वादशिका. **विद्धाभेद**—१ विद्धन्यूनान्यूनद्वादशिका, २ विद्धन्यूनासमद्वादशिका, ३ विद्धन्यूनाधिकद्वादशिका, ४ विद्धसमान्यूनद्वादशिका, ५ विद्धसमासमद्वादशिका, ६ विद्धसमा-

१ एथें न्यूनत्व म्हणजे साठ घटिकांत कांहीं कमी असणें. समत्व म्हणजे साठ घटिका बरोबर असणें, आणि अधिकत्व म्हणजे साठ घटिकांपेक्षां अधिक असणें असें समजावें. वैष्णवांची शुद्ध एकादशी म्हणजे पूर्वदिवशीं ५६ घटिकांनंतर पलमात्र देखील दशमी नाहीं ती होय. आणि स्मार्तांची शुद्ध एकादशी म्हणजे ज्या एकादशीस सूर्योदयाला दशमी नाहीं ती होय.

धिकद्वादशिका, ७ विद्धाधिकान्यूनद्वादशिका, ८ विद्धाधिकासमद्वादशिका, ९ विद्धाधिकाऽधिकद्वादशिका. याप्रमाणें शुद्धाभेद ९ व विद्धाभेद ९ मिळून एकादशीचे अठरा भेद होतात. त्यांमध्यें शुद्धाधिकान्यूनद्वादशिका व शुद्धाधिकासमद्वादशिका ह्या दोन एकादशी सकामांनीं पूर्वा व निष्कामांनीं उत्तरा कराव्या; कारण, "पूर्वदिवशीं अहोरात्रव्याप्तीनें संपूर्ण असून दुसऱ्या दिवशीं द्वादशीचे ठायीं व्याप्ति असेल तर गृहस्थांनीं पूर्वा आणि यतींनीं उत्तरा करावी" असें पूर्वोक्त **स्कांद**वचन आहे. ऊनद्वादशिका असेल तर वैष्णवांनीं दोन उपोषणें करावीं; कारण, "जर पूर्वदिवशीं संपूर्ण एकादशी असून दुसऱ्या दिवशींही वृद्धिगामिनी एकादशी असेल आणि द्वादशीचा क्षय झाला असेल तर उपवास कसा होतो ? अशा समयीं वैष्णवांनीं एकादशी व द्वादशी ह्या दोन दिवशीं उपोषण करावें" असें **वृद्धवसिष्ठाचें** वचन आहे. शुद्धन्यूना, शुद्धाधिका, शुद्धसमा, विद्धन्यूना, विद्धसमा अशी अधिकद्वादशिका असेल तर सर्वांनीं ( वैष्णव व स्मार्त यांनीं ) पराच उपोषणाला घ्यावी, असें **हेमाद्रि** सांगतो.

**मदनरत्ने**तुशुद्धाधिकापरा संपूर्णैकादशीयत्रेतिपूर्वोक्तेः अन्यापूर्वा शुद्धायदासमाहीनासमाहीनाधिकोत्तरा एकादशीमुपवसेत्रशुद्धांवैष्णवीमपीति**स्कांदात्** शुद्धाएकादशी उत्तराद्वादशी नचेदेकादशीविष्णौइति **नारदोक्तेश्च । यत्तु** अविद्धापिचविद्धास्यादितिपाद्मंतच्छुद्धाधिकापरम् **यत्तु** संपूर्णैकादशीत्याज्यापरतोद्वादशीयदि उपोष्याद्वादशीशुद्धाद्वादश्यामेवपारणमित्यादितद्वैष्णवपरम् स्मार्तानांतुपूर्वैवेत्युक्तं ।

**मदनरत्नाच्या** मतें तर शुद्धाधिका अधिकद्वादशिका असतां परा करावी. कारण, "पूर्वदिवशीं संपूर्ण एकादशी असून पुनः दुसऱ्या दिवशीं प्रभातकालीं एकादशीच आहे, व तिसऱ्या दिवशीं द्वादशी असेल तर सर्वांनीं ( स्मार्त व वैष्णवांनीं ) पराच करावी" असें पूर्वी ( **नारद** ) वचन सांगितलें आहे. अन्या म्हणजे शुद्धन्यूना किंवा शुद्धसमा अशी अधिकद्वादशिका असेल तर पूर्वा करावी; कारण, "जर एकादशी शुद्धा असून समा म्हणजे दुसऱ्या सूर्योदयापर्यंत किंवा त्याहून कमी अशी असेल तर आणि द्वादशी हीना, समा किंवा अधिका अशी असेल तर एकादशीसच उपोषण करावें, द्वादशीस करूं नये" असें **स्कंदपुराण**वचन आहे. आणि एकादशी दुसऱ्या दिवशीं नसून द्वादशी तिसऱ्या दिवशीं अधिक असेल तर त्या ठिकाणीं एकादशीस उपोषण करावें" असें पूर्वोक्त **नारद**वचनही आहे. आतां जें "अविद्धा जी एकादशी ती विद्धा होते, जर दुसऱ्या दिवशीं द्वादशी असेल तर" असें **पाद्म**वचन तें शुद्धाधिकाविषयक जाणावें. आणि जें "पूर्वदिवशीं संपूर्ण एकादशी असून दुसऱ्या दिवशीं व तिसऱ्या दिवशीं द्वादशी असेल तर ती एकादशी टाकून केवळ द्वादशीचे ठायीं उपोषण करून द्वादशीलाच पारणा करावी" इत्यादिक वचन तें वैष्णवपर जाणावें. स्मार्तांनीं तर पूर्वाच करावी असें सांगितलें आहे.

विद्धन्यूनासमद्वादशिकातुमुमुक्षूणांपुत्रवतांचपरा अन्येषांपूर्वा पुत्रवतोपिपूर्वेति**मदनरत्ने** विद्धन्यूनान्यूनद्वादशिकासैवसर्वैःकार्येति**हेमाद्रिः** मुमुक्षूणांपरान्येषांपूर्वेति**मदनरत्ने** विद्धसमासमद्वादशिकोनद्वादशिकाचमुमुक्षुभिःपराऽन्यैःपूर्वाकार्या दशमीमिश्रितापूर्वाद्वादशीयदिलुप्यते शुद्धैवद्वादशीराजन्नुपोष्यामोक्षकांक्षिभिरिति**व्यासोक्तेः** मोक्षकांक्षिग्रहणादन्येषांपूर्वैव सर्वत्रैकादशीकार्याद्वादशीमिश्रितानरैः प्रातर्भवतुवामावायतोनित्यमुपोषणमिति**पाद्मोक्तेः ।**

विद्धन्यूनासमद्वादशिका तर मोक्षेच्छु व पुत्रवंत यांनीं परा करावी, इतरांनीं पूर्वा करावी. पुत्रवंतांनींही पूर्वा करावी असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. विद्धन्यूनान्यूनद्वादशिका अशी असेल तर सर्वांनीं पूर्वाच करावी असें **हेमाद्रि** सांगतो. मोक्षेच्छूंनीं परा करावी, इतरांनीं पूर्वा करावी असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. विद्धसमा एकादशी समद्वादशिका किंवा ऊनद्वादशिका असेल तर मोक्षेच्छूंनीं परा करावी, अन्यांनीं पूर्वा करावी. कारण, "दशमीमिश्रित अशी पूर्वा एकादशी असून द्वादशी क्षयगामिनी असेल तर मोक्षेच्छूंनीं शुद्ध द्वादशीचे ठायींच उपोषण करावें" असें **व्यास**वचन आहे. व्यासवचनांत 'मोक्षेच्छूंनीं' असें म्हटलें आहे, यास्तव इतरांनीं पूर्वा करावी; कारण, द्वादशीमिश्रित एकादशी प्रातःकालीं असो अगर नसो, तथापि तीच सर्वांनीं करावी; कारण, एकादशीप्रयुक्त उपोषण नित्य आहे" असें **पाद्म**वचन आहे.

विद्धाधिकासमद्वादशिकाचसर्वेषांपूर्वैव पारणाहेनलभ्येतद्वादशीकलयापिचेत् तदानींदशमीविद्धाप्युपोष्यैकादशीतिथिरिति**ऋष्यशृंगोक्तेश्च माधवमतेतु** अत्रगृहिणःपूर्वायतेरुत्तरा विद्धाधिकान्यूनद्वादशिका मोक्षपापक्षयविष्णुप्रीतिकामैःपराकार्या गृहस्थेनतुनक्तंकार्यम् एकादशीद्वादशीचरात्रिशेषेत्रयोदशी उपवासंनकुर्वीतपुत्रपौत्रसमन्वितइति **कौर्मे**दिनक्षयेउपवासनिषेधात् दशम्यैकादशीविद्धाद्वादशीचक्षयंगता क्षीणासाद्वादशीज्ञेयानक्तंतुगृहिणःस्मृतमिति**वृद्धशातातपोक्तेश्च** गृहिणःपूर्वत्रोपवासः एकादश्याःशुद्ध-

न्यूनत्वे शुद्धसमत्वेवा द्वादश्याःन्यूनसमत्वयोरेकादश्यामुपवासः **यानितु** दशम्यनुगताहंतिद्वादशद्वादशीफलम् धर्मापत्यधनायूंषित्रयोदश्यांतुपारणमितिक**कौर्मादीनि**दशमीवेधत्रयोदशीपारणयोःनिषेधकानि तानिविहितभिन्नपराणि **अत्रमूलवचनानितद्व्यवस्थाचाकरेज्ञेया ।**

विद्धाधिकासमद्वादशिका ही सर्वांनीं पूर्वाच करावी. कारण, "जर पारणादिवशीं कलामात्रही द्वादशी नसेल तर दशमीविद्धा असली तरी पूर्वा उपोषणाला घ्यावी" असें **ऋष्यशृंग**वचनही आहे. **माधवाच्या** मतीं तर ही एकादशी गृहस्थाश्रम्यांनीं पूर्वा करावी. यतींनीं परा करावी. विद्धाधिकान्यूनद्वादशिका एकादशी असेल तर मोक्षेच्छु, पापक्षयेच्छु, आणि विष्णुप्रीतिकाम यांनीं परा करावी; गृहस्थाश्रम्यानें तर नक्त करावें; कारण, "एकादशी व द्वादशी एक दिवशीं असून रात्रिशेषकालीं त्रयोदशी असेल तर पुत्रपौत्रयुक्त पुरुषानें त्या दिवशीं उपोषण करूं नये" असें **कौर्म**वचन दिनक्षयाचे ठायीं उपवासाचें निषेधक आहे; आणि "एकादशी दशमीविद्ध असून द्वादशीचा क्षय असेल तर ती क्षीणा द्वादशी होय, यास्तव तिचे ठायीं गृहस्थाश्रम्यानें नक्त करावें" असें **वृद्धशातातप**वचनही आहे. एकादशी शुद्धन्यूना किंवा शुद्धसमा असेल तर गृहस्थाश्रम्यानें पूर्वदिवशीं ( त्याच दिवशीं ) उपोषण करावें. आणि द्वादशी न्यून किंवा सम असेल तर एकादशीस उपोषण करावें. आतां जीं "दशमीयुक्त एकादशी, बारा द्वादशींचें फल नष्ट करिते; त्रयोदशीचे ठायीं पारणा केली असतां धर्म, अपत्य, धन, आयुष्य यांचा नाश करिते" अशीं **कौर्मादि**वचनें दशमीवेध व त्रयोदशीपारणा यांचा निषेध करणारीं आहेत, तीं विहितभिन्नपर जाणावीं. याविषयींचीं मूलवचनें आणि त्या वचनांची व्यवस्था **आकर** ग्रंथांत पाहावी.

**यत्तुकालहेमाद्रौ** बहुवाक्यविरोधेनसंदेहोजायतेयदा द्वादशीतुतदाग्राह्यात्रयोदश्यांतुपारणमिति **मार्कंडेयोक्तेः** संदिग्धेषुचवाक्येषुद्वादशींसमुपोषयेत् तथा विवादेषुचसर्वेषुद्वादश्यांसमुपोषणम् पारणंचत्रयोदश्यामाज्ञेयंमामकीमुने **इतिपाद्मोक्तेश्च** वेधसंदेहेज्योतिर्विदांविप्रतिपत्तौवापराकार्येत्**युक्तं** तद्वैष्णवविषयमित्यलं**बहुना ।**

आतां जें **कालहेमाद्रींत**—"परस्परविरोधक अशीं बहुत वाक्यें असल्याकारणानें निर्णयाचा संदेह जेथें प्राप्त होतो तेथें द्वादशीस उपोषण करून त्रयोदशीस पारणा करावी" ह्या **मार्कंडेय**वचनावरून आणि "संदिग्ध वाक्यें असतां द्वादशीचे ठायीं उपोषण करावें." तसेंच "हे मुने, सर्व विवादस्थलीं द्वादशीचे ठायीं उपोषण करून त्रयोदशीस पारणा करावी, अशी ही माझी आज्ञा आहे" ह्या **पाद्म**वचनावरूनही वेधसंदेह असतां किंवा ज्योतिःशास्त्रज्ञांची विप्रतिपत्ति असतां परा करावी, असें सांगितलें तें वैष्णवविषयक होय. याप्रमाणें एकादशीविषयक इतका निर्णय पुरे आहे, याहून अधिक नको.

**अथात्रोपयुक्तंकिंचिदुच्यते** तत्रदशम्यामेकादशीयोगेदशमीमध्येएवभोजनंकार्यं एकादश्यांनभुंजीतेतितस्याएवनिमित्तत्वात् निषेधस्तुनिवृत्त्यात्माकालमात्रमपेक्षतेइति**देवलोक्तेश्च** केचित्तुएकादशीव्रतांगत्वेनपूर्वेद्युरेकभक्तविधानाद्विधिस्पृष्टेचनिषेधानवकाशान्नकाम्यव्रतांगेभोजननिषेधःप्रवर्तते तेनैकादशीमध्येपिपूर्वदिनेभोजनमित्या**हुः ।**

## आतां एकादशीव्रताविषयीं उपयुक्त असें कांहीं सांगतो.

दशमीचे दिवशीं एकादशीचा योग असेल तर दशमीमध्येंच भोजन करावें; "एकादशीचे ठायीं भोजन करूं नये" या वाक्यांतील भोजननिषेधाला एकादशीच निमित्त आहे; आणि "निषेध तर निवृत्तिरूप असल्यामुळें तो एकादशीकालमात्राचीच अपेक्षा करितो म्हणजे एकादशीतिथींत भोजननिषेध आहे" असें **देवल**वचनही आहे. **कोणी ग्रंथकार** तर— काम्य एकादशीव्रताच्या अंगत्वानें पूर्वदिवशीं एकभक्त करावें, असा विधि आहे, म्हणून विधिप्रयुक्ताविषयीं निषेध होत नसल्यामुळें काम्यव्रताचें अंग जें पूर्वदिवशीं भोजन त्याविषयीं निषेध प्रवृत्त होत नाहीं, याकरितां पूर्वदिवशीं एकादशीमध्येंही भोजन करावें, असें म्हणतात.

---

१ गार्ग्यः । निमित्तं कालमादाय वृत्तिर्विधिनिषेधयोः । विधौ पूज्यतिथौ तत्र निषेधः कालमात्रके ॥ तिथीनां पूज्यता नाम कर्मानुष्ठानयोग्यता ॥ निषेधस्तु निवृत्त्यात्मा कालमात्रमपेक्षते इति । अयमर्थः । निषेधवाक्येन कालविशेषे कर्मविशेषानुष्ठानस्यानर्थहेतुत्वबोधनाद्यदाकदापि तत्काले कर्मानुष्ठानेऽनर्थप्रसंगात्सर्वदैव तत्काले वर्जनीयमिति न तत्र निर्णयापेक्षा । विधिवाक्येनतु विधेयानुष्ठानस्याभ्युदयहेतुत्वबोधनात्सकृदनुष्ठानादेवाभ्युदयसिद्धेः साच पूज्यतिथावनुष्ठान एव भवति नापूज्यतिथाविति ॥ ततश्च कर्मायोग्यतिथौ कृतेपि कर्मणि अकाले यत्कृतं कर्म विधिशौचविवर्जितम् । अकृतं तद्विजानीयात्पुनारस्याश्रुतेर्बलादिति वचनेन तस्य वैयर्थ्यबोधनात्तिथिद्वैधे कस्मिन्कर्मणि का तिथिर्योग्येति निर्णयः कर्तव्य एव ॥

**अत्राधिकारीमाधवीयेकात्यायनेनोक्तः** अष्टवर्षाधिकोमर्त्योह्यशीतिन्यूनवत्सरः एकादश्यामुपवसेत्पक्षयोरुभयोरपीति **भविष्ये** ब्रह्मचारीचनारीचशुक्लामेवसदागृहीति **यत्तु विष्णुः** पत्यौजीवतियानारीउपोष्यव्रतमाचरेत् आयुष्यंहरतेभर्तुर्नरकंचैवगच्छतीति तद्भर्त्रननुज्ञाविषयमितिप्रागुक्तम् ।

**एकादशीव्रताविषयीं अधिकारी सांगतो—माधवीयांत कात्यायन**—"आठ वर्षांहून अधिक वयाचा आणि ऐंशीं वर्षांहून कमी वयाचा अशा मनुष्यानें शुक्ल व कृष्ण एकादशीचे ठायीं उपोषण करावें." **भविष्यपुराणांत—** "ब्रह्मचारी, सौभाग्यवती स्त्री आणि गृहस्थाश्रमी यांनीं शुक्लैकादशीच नित्य करावी." आतां जें **विष्णु**—"पति जीवंत असतां जी स्त्री उपोषण करून व्रताचरण करिते ती भर्त्याचें आयुष्य हरण करून नरकाप्रत जाते" असें वचन तें भर्त्याच्या आज्ञेविरहित व्रतविषयक होय, असें पूर्वी ( व्रतपरिभाषाप्रकरणीं ) सांगितलें आहे.

**उपवासासामर्थ्येतुमार्कंडेयकौर्मयोः** एकभक्तेननक्तेनतथैवायाचितेनच उपवासेनदानेननद्वादशिकोभवेत् अत्र एकभक्तेनयोमर्त्य उपवासव्रतंचरेदित्येकभक्तादिपूपवासशब्दस्तद्धर्मातिदेशार्थः तेनतत्प्रयुक्ताःसर्वेधर्माः संकल्पमंत्रेचैकभक्तादिपदेनोहःकार्यइति**मदनरत्ने** तथाऽसामर्थ्येप्रतिनिधिनाकारयेदितिप्रागुक्तम् व्रताकरणेप्रायश्चित्तमाह **माधवीये कात्यायनः** अर्कपर्वद्वयेरात्रौचतुर्दश्यष्टमीदिवा एकादश्यामहोरात्रंभुक्त्वाचांद्रायणंचरेदिति ।

उपवासाविषयीं सामर्थ्य नसेल तर **मार्कंडेय व कूर्मपुराणांत**—"एकभक्त, नक्त, अयाचित, उपवास, आणि दान, यांतून कोणतेंही एक करावें; परंतु एकादशीव्रताचा त्याग करूं नये." ह्या स्थलीं "जो मनुष्य एकभक्त करून उपवासव्रत करील" अशीं जीं एकभक्तादिक अनुकल्पविषयक वाक्यें त्यांमध्यें जो 'उपवास' शब्द तो त्या उपवासाच्या धर्माचा अतिदेश करण्याकरितां आहे, म्हणून उपवासप्रयुक्त सर्व धर्म करावे, व संकल्पमंत्रांत एकभक्तादिपदाचा ऊह करावा, असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. तसेंच सामर्थ्य नसतां प्रतिनिधीकडून करवावें असें पूर्वी सांगितलें आहे. **व्रत न केलें असतां प्रायश्चित्त सांगतो-माधवीयांत कात्यायन**-अर्क ( रविवार ), पौर्णिमा, अमावास्या, यांचे ठायीं रात्रीं भोजन केलें असतां; चतुर्दशी व अष्टमी यांचे ठायीं दिवा भोजन केलें असतां आणि एकादशीचे ठायीं दिवसा व रात्रीं भोजन केलें असतां चांद्रायण करावें.

**अथकाम्यव्रतविधिः लघुनारदीये** दशम्यादिमहीपालत्रिदिनंपरिवर्जयेत् गंधतांबूलपुष्पादिस्त्रीसंभोगंमहायशाः तत्रदशम्यांविधिः**कौर्मे** कांस्यंमांसंमसूरांश्चचणकान्कोरदूषकान् शाकंमधुपरान्नंच त्यजेदुपवसन्स्त्रियम् तथा शाकंमांसंमसूरांश्चपुनर्भोजनमैथुने द्यूतमत्यंबुपानंचदशम्यांवैष्णवस्त्यजेत् **मदनरत्ने नारदीये** [१]अक्षारलवणाःसर्वेहविष्यान्ननिषेविणः अवनीतल्पशयनाःप्रियासंगमवर्जिताः ।

## आतां काम्यव्रताचा विधि सांगतो.

**लघुनारदीयांत**-"दशमी, एकादशी, द्वादशी ह्या तीन दिवशीं सुगंध द्रव्यें, तांबूल, पुष्पें, स्त्रीसंभोग हीं वर्ज्य करावीं." **दशमीस विधि—कौर्मांत**—"कांस्यपात्र, मांस, मसूरा, चणे, कोद्रव, शाक, मधु ( मध ), परान्न, स्त्री हीं वर्ज्य करावीं." तसेंच "शाक, मांस, मसूरा, पुनर्भोजन, मैथुन, द्यूत, अति उदकपान हीं दशमीचे ठायीं वैष्णवानें वर्ज्य करावीं." **मदनरत्नांत-नारदीयांत**—"क्षार-लवणविवर्जित, हविष्यान्नभोजी, भूमिशायी, स्त्रीसंगविरहित असें असावें."

**व्रतघ्नान्याहहेमाद्रौदेवलः** असकृज्जलपानाच्चसकृत्तांबूलचर्वणात् उपवासःप्रणश्येतदिवास्वापाच्च[२]मैथुनात् अशक्तौतु**मदनरत्नेदेवलः** अत्ययेचांबुपानेननोपवासःप्रणश्यति अत्ययेकष्टे **विष्णुरहस्ये** गात्राभ्यंगंशिरोभ्यंगंतांबूलंचानुलेपनं व्रतस्थोवर्जयेत्सर्वं[३]यच्चान्यत्रनिराकृतं ।

**व्रतघ्नें सांगतो-हेमाद्रींत देवल**—"वारंवार उदकपान करणें, एकवार तांबूल चर्वण करणें, दिवानिद्रा, मैथुन, यांहींकरून उपोषणाचा नाश होतो." येथें मैथुनशब्देंकरून अष्टांगमैथुन. तें असें:—स्त्रीसंभोगाचें स्मरण करणें विषयाच्या

---

१ अक्षारालवणाइति पाठे क्षाराश्चालवणाश्चेति विग्रहः । अक्षारलवणा इति पाठेपि क्षाराश्च लवणानिचेति समासानंतरं नञ्समासः समान एवार्थः । क्षारलवणं खारेति प्रसिद्धं तन्निषेधोयमिति केचित् ॥ २ मैथुनादिति । स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणम् । संकल्पोऽध्यवसायश्च क्रियानिर्वृत्तिरेव च ॥ एतन्मैथुनमष्टांगं प्रवदंति मनीषिण इत्यष्टांगमैथुनस्यापि निषेधः ॥ ३ यच्चान्यद्धकराणकदिति वा पाठः ॥

गोष्टी सांगणें, स्त्रीशीं क्रीडा करणें, स्त्रीकडे विषयदृष्टीनें पाहाणें, स्त्रीशीं गुप्त गोष्टी करणें, मी विषयोपभोग करीन असा संकल्प करणें, उपभोगाचा निश्चय करणें, व प्रत्यक्ष मैथुन करणें; याप्रकारें अष्टविध मैथुनांतून कोणतेंही आचरण करूं नये. उपोषणानें व्याकुळ असतां **मदनरत्नांत देवल** सांगतो—"महासंकटकालीं वारंवार उदक प्राशन केलें असतां उपवास व्यर्थ होत नाहीं." **विष्णुरहस्यांत**—"शरीरास अभ्यंग, मस्तकास अभ्यंग, तांबूल, गंधाची उटी, आणि अन्यत्र ठिकाणीं निषिद्ध कर्मे सांगितलीं तीं व्रतस्थानें सर्व वर्ज्य करावीं."

**एषुप्रायश्चित्तमुक्तंनिर्णयामृते संग्रहे** स्तेनहिंसकयोःसख्यंकृत्वास्तैन्यंचहिंसनम् प्रायश्चित्तं व्रतीकुर्याज्जपेन्नामशतत्रयं मिथ्यावादेदिवास्वापेबहुशोंबुनिषेवणे अष्टाक्षरंव्रतीजप्त्वाशतमष्टोत्तरंशुचिः ॐनमो नारायणायेत्यष्टाक्षरः तत्रैव **पैठीनसिः** तांबूलचर्वणेस्त्रीसंभोगेमांसनिषेवणे व्रतलोपोनचेत्कुर्यात्कृष्णावद्भु-जिवर्जनमिति कृष्णैकादशीवद्भोजननिषेधमात्रपरिपालनेतुतांबूलचर्वणादावपिनदोषइत्यर्थः संभोगोऋतुका-लादन्यत्र रेतःसेकात्मसंभोगमृतेऽन्यत्रक्षयःस्मृतइति**कात्यायनोक्तेः हेमाद्रौवसिष्ठः** उपवासेतथा-श्राद्धेनकुर्याद्दंतधावनं दंतानांकाष्ठसंयोगोदहत्यासप्तमंकुलं काष्ठग्रहणान्मृल्लोष्टाद्यनिषेधइति**हेमाद्रिः विष्णु-रहस्ये** श्राद्धोपवासदिवसेखादित्वादंतधावनं गायत्र्याशतसंपूतमंबुप्राश्यविशुद्ध्यति **निर्णयामृतेव्यासः** वर्जयेत्पारणेमांसंव्रताहेप्यौषधंसदेति ।

**याविषयीं प्रायश्चित्त सांगतो—निर्णयामृतांत—संग्रहांत**—"चोर, हिंसक यांशीं सख्य केलें असतां किंवा अल्प चोरी, कीटादिक प्राण्यांची हिंसा केली असतां व्रती यानें विष्णूच्या नामाचा तीनशें जप करावा. मिथ्या भाषण, दिवा-निद्रा, बहुत वेळां उदकपान करणें, यांतून कोणतेंही एक करील तर त्यानें अष्टाक्षर मंत्राचा अष्टोत्तरशत जप करावा, म्हणजे तो शुद्ध होतो." "**ॐ नमो नारायणाय**" हा अष्टाक्षर मंत्र होय. त्याच ठिकाणीं **पैठीनसि**—"जर कृष्णैका-दशीप्रमाणें केवळ भोजननिषेध मात्र पालन करीत असेल तर त्यानें तांबूलचर्वण, स्त्रीसंभोग, मांससेवन यांतून कोणतेंही केल्यानें व्रतलोप होत नाहीं." स्त्रीसंभोग म्हणजे ऋतुकालाहून अन्य कालीं संभोग होय. **कारण** "रेतःसेकरूप संभोग ऋतुकालीं होतो, त्यावांचून अन्यकालीं संभोग तो केवळ रेतःक्षयरूप म्हटला आहे." असें **कात्यायन**वचन आहे. **हेमा-द्रींत वसिष्ठ**—"उपवासदिवस, श्राद्धदिवस, यांचे ठायीं दंतधावन करूं नये; कारण, त्या दिवशीं दंत व काष्ठ यांचा संयोग होईल तर तो सात कुलांचा नाशक होतो." ह्या वचनांत केवळ काष्ठाचें ग्रहण आहे. म्हणून मृत्तिका, ढेकूळ इत्या-दिकांनीं दंतधावन करण्यास निषेध नाहीं असें **हेमाद्रि** सांगतो. **विष्णुरहस्यांत**—"श्राद्धदिवशीं व उपवासदिवशीं काष्ठानें दंतधावन केलें असतां गायत्रीमंत्रानें शतवार अभिमंत्रित केलेलें उदक प्राशन करून शुद्ध होतो." **निर्णयामृतांत व्यास**—"पारणेच्या दिवशीं व व्रतदिवशीं मांस व औषध हीं नित्य वर्ज्य करावीं" असें म्हणतो.

**एकादश्यां श्राद्धप्राप्तौमाधवीये कात्यायन**आह उपवासोयदानित्यःश्राद्धंनैमित्तिकंभवेत् उप-वासंतदाकुर्यादाघ्रायपितृसेवितं मातापित्रोःक्षयेप्राप्तेभवेदेकादशीयदि अभ्यर्च्यपितृदेवांश्चआजिघ्रेत्पितृसेवि-तमिति **हेमाद्र्यादिसर्वनिबंधे**ष्वेवं एतेनएकादशीनिमित्तकंश्राद्धंद्वादश्यांकार्यमितिवदंतःपरास्ताः किंच **महालये** सपक्षःसकलःपूज्यःश्राद्धषोडशकंप्रतीतिश्रुतंषोडशत्वं पौषैकादश्यांचमन्वादिश्राद्धं क्षयाहापरि-ज्ञानेचतत्पक्षैकादश्यांविहितंश्राद्धंबाधितमेवस्यात् यदपि **स्मृतिचंद्रिकास्थं**पठंति अन्नाश्रितानिपापानित-द्भोक्तुर्दातुरेवच मज्जंतिपितरस्तस्यनरकेशाश्वतीःसमाइति तस्यापिरागप्राप्तभुजिगोचरस्यवैधंश्राद्धंगोचरयतां-महत्साहसमित्यलम् योपि अकृतश्राद्धनिचयाजलपिंडविनाकृताइति**लघुनारदीये**एकादश्यांश्राद्धादिनिषेधः समातापितृभिन्नविषयः पूर्ववाक्येतद्ग्रहणात् निचयःप्रतिग्रहः ।

**एकादशीचे दिवशीं श्राद्ध प्राप्त असतां माधवीयांत कात्यायन सांगतो**—"जेव्हां उपवास नित्य असून त्या दिवशीं नैमित्तिक श्राद्ध प्राप्त होईल तेव्हां श्राद्ध करून श्राद्धशेष सर्व प्रकारचें अन्न एका पात्रावर वाढवून तें सर्व अन्न अवघ्राण करून उपवास करावा. मातापितरांच्या श्राद्धदिवशीं एकादशी प्राप्त होईल तर यथाविधि श्राद्ध करून श्राद्धशेषा-न्नाचें अवघ्राण करावें." असें **हेमाद्रि** इत्यादि सर्व निबंधग्रंथांत सांगितलें आहे. येणेंकरून, एकादशीनिमित्तक श्राद्ध द्वादशीचे दिवशीं करावें, असें जे म्हणतात ते खंडित झाले. आणि असें कीं, जर एकादशीस श्राद्ध नाहीं तर महालयांत "षोडश श्राद्धाविषयीं तो सर्व पक्ष पूज्य होय" अशा वचनानें सांगितलेलीं सोळा महालयश्राद्धें, पौषैकादशीचे ठायीं करा-वयाचें मन्वादि श्राद्ध, आणि क्षयाहाचें अज्ञान असतां त्या पक्षांतील एकादशीचे ठायीं विहित श्राद्ध हीं बाधितच होतील

असें जाणावें. आतां जें **स्मृतिचंद्रिकें**तील वचन सांगतात कीं, "पापें अन्नाश्रित आहेत तीं अन्नदाता व भोक्ता या उभयतांस प्राप्त होतात, आणि त्यांचे पितर नरकांत शाश्वत कालपर्यंत वास करितात" असें वचन तें इच्छाप्राप्तभोजनविषयक असतां विधिप्राप्त श्राद्धभोजनविषयक मानितात, तस्मात् त्यांचें मोठें साहस होय. एथें इतका विचार पुरे आहे. आतां जो "एकादशीस श्राद्ध व प्रतिग्रह न करणारे व उदकदान, पिंडदानविरहित श्राद्ध करणारे ते उत्तम लोकास जातात" असा **लघुनारदीयांत** एकादशीचे दिवशीं श्राद्धादिकांचा निषेध आहे, तो मातापितृव्यतिरिक्तविषयक होय; कारण, पूर्ववाक्यांत मातापितरांचें श्राद्ध करण्याविषयीं उक्त आहे.

**अव्रतघ्नान्याह मदनरत्नेदेवलः** सर्वभूतभयंव्याधिःप्रमादोगुरुशासनं अव्रतघ्नानिपठ्यंतेसकृदेतानिशास्त्रतः **स्कांदेपि** अष्टौतान्यव्रतघ्नानिआपोमूलंफलंपयः हविर्ब्राह्मणकाम्याचगुरोर्वचनमौषधं इदंचातिसंकटविषयम् **नारदीये** अनुकल्पोनृणांप्रोक्तःक्षीणानांवरवर्णिनि मूलंफलंपयस्तोयमुपभोग्यंभवेच्छुभे नत्वेवभोजनंकैश्चिदेकादश्यांबुधैःस्मृतमिति अस्यापवादः शयनेचमदुत्थानेमत्पार्श्वपरिवर्तने नरोमूलफलाहारीहृदिशल्यंममार्पयेत् एतेचाविरोधिनोनिर्णयाःसर्वव्रतेषुज्ञेयाः ।

**अव्रतघ्नें सांगतो—मदनरत्नांत देवल**—"सर्व भूतांपासून भय, व्याधि, प्रमाद, गुरूची आज्ञा यांतून व्रतनाशक एकादी गोष्ट एकवार झाली असतां व्रत नष्ट होत नाहीं." **स्कंदपुराणांतही**—"उदक, मुळें, फळें, दूध, हवि, ब्राह्मणकामना, गुरुवचन, औषध, हीं आठ व्रतघ्न होत नाहींत." हें वचन अतिसंकटविषयक जाणावें. **नारदीयांत**—"शक्तिहीन मनुष्यांना गौणपक्ष उक्त आहे तो असा—मूल, फल, दूध, उदक, हीं शक्तिहीनास उपभोग्य होत; परंतु एकादशीस भोजन करण्याविषयीं कोणत्याही विद्वानांनीं सांगितलें नाहीं." **वरील वचनाचा अपवाद**—"शयनी, बोधिनी आणि परिवर्तिनी ह्या एकादशींचे ठायीं मूलफलाहारी जो मनुष्य तो माझ्या हृदयांत शल्य करणारा होतो. अर्थात् ह्या एकादशींस मूलफलाहारही करूं नये." हे पूर्वोक्त निर्णय अविरुद्ध असल्यामुळें सर्व व्रतांविषयीं जाणावे.

**तत्रैकादश्यांसंकल्पः** गृहीत्वौदुंबरंपात्रंवारिपूर्णमुदङ्मुखः उपवासंतुगृह्णीयाद्यद्वावार्येवधारयेदिति **माधवीये वाराहोक्तेः मंत्रस्तुविष्णूक्तः** एकादश्यांनिराहारःस्थित्वाहमपरेहनि भोक्ष्यामिपुंडरीकाक्षशरणंमेभवाच्युतेति शैवादीनांतु **हेमाद्रौसौरपुराणे** सावित्र्याप्यथवानाम्नासंकल्पंतुसमाचरेत् शिवादिगायत्र्योयजुर्वेदेप्रसिद्धाः **वाराहे** इत्युच्चार्यततोविद्वान्पुष्पांजलिमथार्पयेत् ततस्तज्जलंपिबेत् अष्टाक्षरेणमंत्रेणत्रिर्जप्तेनाभिमंत्रितं उपवासफलंप्रेप्सुःपिबेत्पात्रगतंजलमिति**कात्यायनोक्तेः** मध्यरात्रेउदयेवादशमीवेधेरात्रौसंकल्पइति**माधवः** दशम्याःसंगदोषेणअर्धरात्रात्परेणतु वर्जयेच्चतुरोयामान्संकल्पार्चनयोस्तदा विद्धोपवासेनश्चेत्तुदिनंत्यक्त्वासमाहितः रात्रौसंपूजयेद्विष्णुंसंकल्पंचतदाचरेदिति**नारदीयोक्तेः** तत्रैवपूजामभिधाय देवस्यपुरतःकुर्याज्जागरंनियतोव्रती ।

"एकादशीव्रताचा संकल्प उदकपूर्ण ताम्रपात्र हातांत घेऊन उत्तराभिमुख होत्साता उपवासाचा संकल्प करून उपवास ग्रहण करावा, अथवा हातांत उदक धारण करावें." असें **माधवीयांत वराहपुराणवचन** आहे. **संकल्पाचा मंत्र-विष्णु** सांगतो-"**एकादश्यां निराहारः स्थित्वाहमपरेऽहनि । भोक्ष्यामि पुंडरीकाक्ष शरणं मे भवाच्युत.**" **शैव, सूर्योपासक इत्यादिकांविषयीं** सांगतो-**हेमाद्रींत-सौरपुराणांत**—"शिवादि गायत्रीमंत्रानें[1] अथवा नाममंत्रानें संकल्प करावा." शिवादि गायत्रीमंत्र यजुर्वेदांत प्रसिद्ध आहेत. **वराहपुराणांत** "याप्रमाणें संकल्पमंत्र म्हणून विष्णूला पुष्पांजलि समर्पण करावी" नंतर तें पात्रस्थ उदक प्राशन करावें. कारण, "उपवासफलेच्छूनें पात्रगत उदक अष्टाक्षर मंत्रानें तीन वेळ अभिमंत्रित करून प्राशन करावें" असें **कात्यायन**वचन आहे. मध्यरात्रीं किंवा उदयकालीं दशमीचा वेध असेल तर व्रताचा संकल्प एकादशीचे रात्रीं करावा, असें **माधव** सांगतो. कारण, "मध्यरात्रीनंतर दशमीचा वेध असेल तर संकल्प, पूजा यांविषयीं चार प्रहर ( दिवसाचे चार प्रहर ) वर्ज्य करावे. विद्धैकादशीचें उपोषण करीत असेल तर त्यानें तो दिवस वर्ज्य करून रात्रीं विष्णुपूजन व संकल्पही त्याच वेळीं करावा" असें **नारदीय**वचन आहे. त्याच ठिकाणीं पूजा सांगून "व्रती यानें नियमेंकरून देवाच्या अग्रभागीं जागर करावा" असें सांगितलें आहे.

**द्वादश्यांनिवेदनमंत्रउक्तः कात्यायनेन** अज्ञानतिमिरांधस्यव्रतेनानेनकेशव प्रसीदसुमुखोनाथज्ञान-

---

१ तत्पुरुषायविद्महे महादेवाय धीमहि । तन्नो रुद्रः प्रचोदयात् । इत्यादि.

दृष्टिप्रदोभवेति **नारदीये** ब्राह्मणानभोजयेच्छक्त्यादद्याद्वैदक्षिणांततः **स्कांदेपि** कृत्वाचैवोपवासंतुयोभ्री-याद्वादशीदिने नैवेद्यंतुलसीमिश्रंहत्याकोटिविनाशनम् द्वादश्यांचवर्ज्यान्याह **बृहस्पतिः** दिवानिद्रापरान्नं चपुनर्भोजनमैथुने क्षौद्रंकांस्यामिषंतैलंद्वादश्यामष्टवर्जयेत् **हेमाद्रौ ब्रह्मांडपुराणे** पुनर्भोजनमध्यायो-भारआयासमैथुने उपवासफलंहन्युर्दिवानिद्राचपंचमी **स्कांदे** परान्नंकांस्यतांबूलेलोभंवितथभाषणम् वर्जये-दितिशेषः **विष्णुधर्मे** असंभाष्यान्हिसंभाष्यतुलस्यतसिकादलम् आमलक्याःफलंवापिपारणेप्राश्य-शुद्धयति **बृहन्नारदीये** रजस्वलांचचांडालंमहापातकिनंतथा सूतिकांपतितंचैव उच्छिष्टंरजकादिकं व्रतादि-मध्येश्रृणुयाद्ययेषांध्वनिमुत्तमः अष्टोत्तरसहस्रंतुजपेद्वैवेदमातरम् ।

द्वादशीचे दिवशीं प्रातःकालीं भगवंताला व्रत समर्पण करण्याचा मंत्र **कात्यायन** सांगतो. तो असा-"**अज्ञानतिमिरांधस्य व्रतेनानेन केशव। प्रसीद सुमुखो नाथ ज्ञानदृष्टिप्रदो भव.**" **नारदीयांत**-"यथाशक्ति ब्राह्मणांस भोजन घालून नंतर दक्षिणा द्यावी." **स्कंदपुराणांतही**-"एकादशीचे दिवशीं उपवास करून द्वादशीचे दिवशीं जो मनुष्य विष्णुनैवेद्य तुलसीमिश्रित भक्षण करील त्याच्या कोटिहत्यांचा नाश होईल." **द्वादशीचे दिवशीं वर्ज्य सांगतो-बृहस्पति**-"दिवा निद्रा, परान्नभोजन, पुनर्भोजन, मैथुन, मध, कांस्यपात्रभोजन, आमिष, तैल हे आठ प्रकार द्वादशीचे दिवशीं वर्ज्य करावे." **हेमाद्रींत ब्रह्मांडपुराणांत**-"पुनर्भोजन, स्वाध्याय, भार वाहणें, आयास, मैथुन, व पांचवी दिवानिद्रा हीं उपवासफलाचा नाश करितात." **स्कंदपुराणांत**-"परान्न, कांस्यपात्रांत भोजन, तांबूल, लोभ, व्यर्थ भाषण, हीं वर्ज्य करावीं." **विष्णुधर्मांत**-"असंभाष्य ( चांडालादिक ) यांच्याशीं संभाषण केलें असतां तुलसीपत्र किंवा आंवळा पारणाभोजनांत भक्षण केल्यानें शुद्ध होतो." **बृहन्नारदीयांत**-"रजस्वला स्त्री, चांडाल, महापातकी, सूतिका, पतित, उच्छिष्ट, रजक इत्यादिकांचा शब्द व्रतादिकांमध्यें श्रुत होईल तर एक हजार आठ ( १००८ ) गायत्रीजप करावा."

एतद्व्रतंसूतकेपिकार्यं सूतकेमृतकेचैवनत्याज्यंद्वादशीव्रतमिति**विष्णूक्तेः** तत्रत्यक्तंदानादिसूतकांतेकार्यं सूतकांतेनरःस्नात्वापूजयित्वाजनार्दनं दानंदत्वाविधानेनव्रतस्यफलमश्नुतइति**मात्स्योक्तेः** रजोदर्शनेपिकार्यम् एकादश्यांनभुंजीतनारीदृष्टरजस्यपीति **पुलस्त्योक्तेः** यदा द्वादश्यांश्रवणर्क्षंतदाशुद्धामप्येकादशींत्य-क्त्वातत्रैवोपवासःकार्यः शुक्लावायदिवाकृष्णाद्वादशीश्रवणान्विता तयोरेवोपवासश्चत्रयोदश्यांचपारणमिति **नारदीयोक्तेः** एतेचनियमाःकाम्यव्रतेनियताः नित्यव्रतेसतिसंभवेकार्याः शक्तिमांस्तुपुमान्कुर्यान्नियमंस विशेषणमिति**कात्यायनोक्तेः** अशक्तौतु**माधवीयेब्रह्मवैवर्ते** इतिविज्ञायकुर्वीतावश्यमेकादशीव्रतम विशेषनियमाशक्तोऽहोरात्रंभुजिवर्जितइति ।

हें व्रत सूतकांतही करावें; कारण, "जननाशौच व मृताशौच यांमध्येंही द्वादशीव्रत ( एकादशीव्रत ) टाकूं नये" असें **विष्णु**वचन आहे. त्या आशौचांत वर्ज्य केलेलें दानादिक सूतकांतीं करावें; कारण, "सूतकांतीं मनुष्यानें स्नान करून जनार्दनाची पूजा करून यथाविधि दान करावें, म्हणजे व्रताचें फल मिळतें" असें **मत्स्यपुराण**वचन आहे. रजस्वलावस्थेमध्येंही हें एकादशीव्रत करावें; कारण, "स्त्री रजस्वला असतांही तिनें एकादशीचे दिवशीं भोजन करूं नये" असें **पुलस्त्यवचन** आहे. ज्या कालीं द्वादशीचे ठायीं श्रवणनक्षत्राचा योग असेल त्या कालीं शुद्धा जरी एकादशी असेल, तरी ती टाकून द्वादशीसच उपोषण करावें; कारण, "शुक्लपक्षांतील किंवा कृष्णपक्षांतील द्वादशी श्रवणयुक्त असेल तर त्या दोघांचा ( श्रवण व द्वादशी यांचा ) च उपवास करून त्रयोदशीस पारणा करावी" असें **नारदीय**वचन आहे. हे सर्व नियम काम्यव्रताचे ठायीं अवश्य पाळावे, नित्यव्रताचे ठायीं संभव असतां पाळावे; कारण, शक्तिमान् पुरुषानें तर विशेषेंकरून नियम पाळावे" असें **कात्यायन**वचन आहे. अशक्त असेल तर त्याविषयीं **माधवीयांत ब्रह्मवैवर्तांत**—"असें जाणून अवश्य एकादशीव्रत करावें, विशेष नियम पाळण्याविषयीं जर अशक्त असेल तर त्यानें अहोरात्र भोजन वर्ज्य करावें."

**अथाष्टौमहाद्वादश्यः** तत्रशुद्धाधिकैकादशीयुताद्वादशीउन्मीलिनीसंज्ञा द्वादश्येवशुद्धाधिकावर्धते-चेत्सावंजुली वासरत्रयस्पर्शिनीत्रिस्पृशा अग्रेपर्वणःसंपूर्णाधिकत्वेपक्षवर्धिनी पुष्यर्क्षयुताजया श्रवणयुताविजया पुनर्वसुयुताजयंती रोहिणीयुतापापनाशिनी एताःपापक्षयमुक्तिकामउपवसेत् अत्रमूलं**हेमाद्रौज्ञेयं** ।

## आतां आठ महाद्वादशी सांगतो.

१ शुद्धाधिक एकादशीनें युक्त जी द्वादशी ती **उन्मीलिनी**संज्ञक. २ द्वादशीच शुद्धाधिका वाढती असेल तर ती

**वंजुली.** ३ सूर्योदयाच्या पूर्वी असून दुसऱ्या दिवशीं सूर्योदयोत्तर असलेली द्वादशी तीन दिवसांचा स्पर्श असल्यामुळें ती **त्रिस्पृशा.** ४ पक्षपर्यंत पुढच्या तिथि वाढल्या असतात तेव्हां **पक्षवर्धिनी.** ५ पुष्यनक्षत्रानें युक्त ती **जया.** ६ श्रवणयुक्त ती **विजया.** ७ पुनर्वसूनें युक्त ती **जयंती.** ८ रोहिणीयुक्त ती **पापनाशिनी.** पापक्षय आणि मुक्ति यांची इच्छा करणारानें ह्या आठ द्वादशींचे ठायीं उपोषण करावें. याविषयींचीं मूलवचनें **हेमाद्रींत** पाहावीं.

एकादशीद्वादश्योरेकत्वेतंत्रेणोपवासः पार्थक्येतुशक्तस्योपवासद्वयं एकादशीमुपोष्यैवद्वादशींसमुपोषयेदिति **विष्णुरहस्यात्** अशक्तौतुद्वादश्यामेव एवमेकादशींत्यक्त्वाद्वादशींसमुपोषयेत् पूर्ववासरजंपुण्यं सर्वंप्राप्नोत्यसंशयमितितत्रैवोक्तेः यदात्वल्पाद्वादशीतदोक्तं**मात्स्ये** यदाभवतिअल्पापिद्वादशीपारणादिने उषःकालेद्वयंकुर्यात्प्रातर्माध्याह्निकंतदा **नारदीयेपि** अल्पायामथविप्रेंद्रद्वादश्यामरुणोदये स्नानार्चनक्रियाःकार्यादानहोमादिसंयुताइति **संकटेतुमाधवीयेदेवलः** संकटेविषमेप्राप्तेद्वादश्यांपारयेत्कथं अद्भिस्तुपारणांकुर्यान्नपुनर्भुक्तंनदोषकृदिति संकटेत्रयोदशीश्राद्धप्रदोषादौ ।

ह्या आठ द्वादशींतून द्वादशी व एकादशी ह्या दोन एक दिवशीं प्राप्त असतां एकतंत्रानें उपवास करावा. निरनिराळ्या दोन दिवशीं असतील तर सशक्तानें दोन उपोषणें करावीं; कारण, "एकादशीचें उपोषण करूनच द्वादशीचें उपोषण करावें" असें **विष्णुरहस्य**वचन आहे. दोन उपोषणें करण्यास शक्ति नसेल तर द्वादशीचेंच उपोषण करावें; कारण, "अशक्तानें एकादशी टाकून द्वादशीचे ठायीं उपोषण केल्यानें एकादशीव्रताचें सर्व पुण्य प्राप्त होतें" असें त्याच ठिकाणीं वचन आहे. जेव्हां द्वादशी अल्प असेल तेव्हां त्याविषयीं सांगतो –**मत्स्यपुराणांत**—'जेव्हां द्वादशी पारणादिवशीं अल्प असेल तेव्हां प्रातःकालीन व माध्याह्निक सर्व कर्म उषःकालींच करावें." **नारदीयांतही**–"हे विप्रेंद्र, द्वादशी अल्प असेल तेव्हां स्नान, संध्या, दान, पूजा, होम, इत्यादिक सर्व क्रिया अरुणोदयकालीं कराव्या." **संकटविषयीं सांगतो–माधवीयांत देवल**—"संकट ( त्रयोदशीश्राद्ध, प्रदोषव्रत इत्यादि ) असतां द्वादशींत पारणेचा असंभव असेल तर उदकेंकरून पारणा करावी; म्हणजे पुनर्भोजन केलें असतां दोष नाहीं.

**अत्रकेचिदाहुः** अपकर्षवाक्यान्यनाहिताग्निविषयाणि अग्निहोत्रादीनांश्रौतत्वेनापकर्षायोगादिति द्वादश्यांचप्रथमपादमतिक्रम्यपारणंकार्यं द्वादश्याःप्रथमःपादोहरिवासरसंज्ञितः तमतिक्रम्यकुर्वीतपारणंविष्णुतत्परइति**निर्णयामृतेमदनरत्नेचविष्णुधर्मोक्तेः** अत्र**केचित्**संगिरंते यदाभूयसीद्वादशीतदापिप्रातर्मुहूर्तत्रयेपारणंकार्यं सर्वेषामुपवासानांप्रातरेवहिपारणमितिवचनादिति **अस्मद्गुरवस्तु** बहूनांकर्मकालानांविनाकारणंबाधापत्तेः प्रागुक्तवचनैश्चअल्पद्वादश्यामेवापकर्षविधानादपराह्णएवकार्यम् प्रातःशब्दस्तु सायंप्रातर्द्विजातीनामशनंश्रुतिचोदितमितिवदपराह्णवाचित्वेप्युपपन्नः नचवाक्यवैयर्थ्यं पुनर्भोजनसायंपारणानिवृत्त्यर्थत्वात्तस्येत्याहुः ।

याविषयीं **केचित् असें म्हणतात**—अपकर्षकरून कर्म करण्याविषयीं जीं वाक्यें, तीं अनाहिताग्निविषयक होत; कारण, अग्निहोत्रादिक हीं श्रौतकर्मे असल्यामुळें त्यांचा अपकर्ष होणार नाहीं. द्वादशीचा प्रथम पाद टाकून पारणा करावी. कारण, "द्वादशीचा प्रथम पाद तो **हरिवासर** होय, तो प्रथम पाद टाकून वैष्णवानें पारणा करावी" असें **निर्णयामृतांत व मदनरत्नांत विष्णुधर्म**वचन आहे. याविषयीं **केचित्** म्हणतात—जेव्हां पुष्कळ द्वादशी असेल तेव्हांही प्रातःकालीं सहा घटिकांमध्यें पारणा करावी; कारण, "सर्व उपवासांची पारणा प्रातःकालींच करावी" असें वचन आहे. आमचे गुरु **( रामकृष्णभट्ट )** तर, बहुतकर्मकालांचा कारणावांचून बाध होईल म्हणून, आणि पूर्वोक्त वचनांनीं अल्पद्वादशी असेल तरच कर्माचा अपकर्ष करण्याचें सांगितल्यावरून पुष्कळ द्वादशी असेल तेव्हां अपराह्णकालींच पारणा करावी. "सर्व उपवासाची पारणा प्रातःकालींच करावी" ह्या वचनांत जो प्रातःशब्द आहे, तो तर, "द्विजातींनीं सायंकालीं व प्रातःकालीं भोजन करणें, हें श्रुतिप्रणीत आहे" ह्या वचनांतील प्रातःशब्दासारखा अपराह्णकालवाची मानला असतांही उपपत्ति होते. आतां असें म्हटलें तर प्रातःकालींच पारणा करावी, हें वाक्य व्यर्थ होईल असें म्हणूं नये. कारण, पुनर्भोजन व सायंकालीं पारणा यांची निवृत्ति होण्यासाठीं तें वचन सार्थक आहे, असें म्हणतात.

प्रमादेनएकादश्युपवासातिक्रमे **अपरार्केवाराहे** एकादशीविलुप्ताचेद्द्वादशीपरतःस्थिता उपोष्याद्वादशीतत्रयदीच्छेत्परमंपदमिति कैश्चित्तुविष्णुनाचेदितिपठितम् अत्राविरोधिनोनियमाःसर्वव्रतेषुबोद्धव्याः अन्येचनवरात्रेवक्ष्यंतेइतिदिक् इतिश्रीरामकृष्णभट्टात्मजकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौएकादशीनिर्णयः ।

प्रमादेंकरून एकादशीचें उपोषण घडलें नसतां सांगतो—**अपरार्कांत वाराहपुराणांत**—"जर एकादशीस उपोषण झालें नाहीं आणि दुसऱ्या दिवशीं द्वादशी आहे तर द्वादशीस उपोषण करावें." कित्येकांनीं तर—**"एकादशी विप्लुताचेत्"** ह्या ठिकाणीं **"एकादशी विष्णुनाचेत्"** असा पाठ केलेला आहे. ह्या एकादशीव्रताचे ठायीं सांगितलेले नियम अविरुद्ध असतील ते सर्व व्रतांचे ठायीं जाणावे. इतर नियम नवरात्रप्रकरणीं पुढें सांगूं. ही दिशा दाखविली आहे. **इति श्रीएकादशीनिर्णयाची महाराष्ट्रीटीका समाप्त झाली ॥**

**द्वादशी**तुपूर्वैव युग्मवाक्यात् द्वादशीतुप्रकर्तव्याएकादश्यायुताप्रभो इति**स्कांदाच त्रयोदशी**तु सर्वमतेशुक्लापूर्वाकृष्णोत्तरा त्रयोदशतिथिःपूर्वःसितोथाऽसितःपश्चादिति**दीपिकोक्तेः** शुक्लात्रयोदशीपूर्वापराकृष्णत्रयोदशीति**माधवाच** चतुर्दशीसर्वमतेकृष्णापूर्वाशुक्लोत्तरा उपवासेतुद्वय्यपिपरेति**मदनरत्ने ।**

**द्वादशीचा निर्णय**—सामान्य कर्माविषयीं द्वादशी पूर्वा ( एकादशीयुक्त ) घ्यावीः कारण, एकादशी व द्वादशी यांचें युग्म आहे; आणि "एकादशीयुक्त द्वादशी करावी" असें **स्कंदपुराण**वचनही आहे. **त्रयोदशीचा निर्णय**—सर्वांचे मतीं शुक्लपक्षींची त्रयोदशी पूर्वा करावी; कृष्णपक्षींची उत्तरा करावीः कारण, "शुक्लपक्षींची त्रयोदशी तिथि पूर्वा आणि कृष्णपक्षींची त्रयोदशी तिथि परा करावी" असें **दीपिका**वचन आहे, व "शुक्ल त्रयोदशी पूर्वा आणि कृष्ण त्रयोदशी परा करावी" असें **माधव**वचनही आहे. **चतुर्दशीचा निर्णय**—सर्वमतीं कृष्णचतुर्दशी पूर्वा व शुक्लचतुर्दशी परा करावी. उपवासाविषयीं तर शुक्ल व कृष्ण दोनही चतुर्दशी परा कराव्या असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे.

पौर्णमास्यमावास्येतुसावित्रीव्रतंविनापरेग्राह्ये भूतविद्धेनकर्तव्येदर्शपूर्णेकदाचन वर्जयित्वामुनिश्रेष्ठसावित्रीव्रतमुत्तममिति **ब्रह्मवैवर्तात्** अमायांयोगविशेषमाहाऽ**परार्केशातातपः** अमावास्यांभवेद्वारोयदाभूमिसुतस्यवै जाह्नवीस्नानमात्रेणगोसहस्रफलंलभेत् अमावैसोमवारेणरविवारेणसप्तमी चतुर्थीभौमवारेणविषुवत्सदृशंफलं तत्रैव**व्यासः** सिनीवालीकुहूर्वापियदिसोमदिनेभवेत् गोसहस्रफलंदद्यात्स्नानंवैमौनिनाकृतम् **हेमाद्रौबृहन्मनुः** श्रवणाश्विधनिष्ठार्द्रानागदैवतमस्तके यद्यमारविवारेणव्यतीपातःसउच्यते नागदैवतंआश्लेषा मस्तकोमृगशिरः प्रथमपादइत्यन्ये सचसर्वेषाम् ।

**पौर्णिमा व अमावास्या** यांचा निर्णय—पौर्णिमा व अमावास्या ह्या दोन तिथि सावित्रीव्रत खेरीज करून परा घ्याव्या; कारण, "हे मुनिश्रेष्ठ, सावित्रीव्रताखेरीज अमावास्या, पौर्णिमा, ह्या तिथि चतुर्दशीविद्ध कधींही करूं नयेत" असें **ब्रह्मवैवर्त**वचन आहे. **अमावास्येचे ठायीं विशेष योग सांगतो—अपरार्कांत-शातातप**-"अमावास्येस भौमवार असेल तर भागीरथींत स्नान केल्यानें गोसहस्रदानाचें फल प्राप्त होतें, सोमवारयुक्त अमावास्या, रविवारयुक्त सप्तमी, आणि भौमवारयुक्त चतुर्थी यांचे ठायीं स्नान दान केलें असतां विषुवसंक्रांतीसारखें फल होतें." **अपरार्कांत-व्यास**-"जर सोमवारीं सिनीवाली किंवा कुहू अशी अमावास्या येईल आणि त्या दिवशीं मौनी होत्साता स्नान करील तर गोसहस्रदानफल प्राप्त होईल." **हेमाद्रींत-बृहन्मनु**-"रविवारयुक्त अमावास्येचे ठायीं श्रवण, अश्विनी, धनिष्ठा, आर्द्रा, आश्लेषा, मृग, यांतून कोणतेंही नक्षत्र असेल तर तो व्यतीपात म्हटला आहे." अन्य म्हणतात—मृगावांचून बाकीच्या वरील नक्षत्रांचा प्रथमपाद असेल तर व्यतीपात योग होतो.

**अथेष्टिकालः गोभिलः** पक्षांताउपवस्तव्याः पक्षादयोऽभियष्टव्याइति उपवासोन्वाधानम् तत्र मध्याह्नेतत्पूर्ववापर्वप्रतिपत्संधौतद्दिनेयागः पूर्वाह्णेवाऽथमध्याह्नेयदिपर्वसमाप्यते उपोष्यतत्रपूर्वेद्युस्तदहर्याग इष्यतइति**लौगाक्षि**वचनात् अत्रचद्वेधाविभागः आवर्तनात्तुपूर्वाह्णोह्यपराह्णस्ततःपरः मध्याह्नस्तुतयोः संधिर्यदावर्तनमुच्यतइति **मदनरत्ने**वचनात् मध्याह्नादूर्ध्वसंधौ **माधव**मतेपरेऽह्नियागः अपराह्णेऽथवा रात्रौयदिपर्वसमाप्यते उपोष्यतस्मिन्नहनिश्वोभूतेयागइष्यतइति **लौगाक्षिणोक्तेः हेमाद्रि**स्त्वपराह्णसंधावपिपरदिनेप्रतिपच्चतुर्थांशेचंद्रोदयेचसतिद्वितीयादिष्वत्यंतक्षयेसतिपूर्वेद्युर्यागः पर्वणोंशेद्वितीयेतुयष्टव्यंतुद्विजातिभिः द्वितीयासहितंयस्मात्दूषयंत्याश्वलायनाइति द्वितीयेत्विति कैमुतिकन्यायेनतुर्यांशपरम् तुरीयेत्विति**शूलपाणौ**पाठःस्पष्टार्थएव तथा भूतापंचदशीपूर्णाद्वितीयाक्षयगामिनी चरुरिष्टिरमायांस्याद्भूते-

१ सादृष्टेन्दुःसिनीवाली सानष्टेंदुकला कुहूरित्यमरः. अर्थ—ज्या अमावास्येस पहांटेस चंद्र दिसतो ती सिनीवाली, आणि चंद्र दिसत नाहीं ती कुहू होय.

कव्यादिकीक्रियेतिबौधायनवचनाच्चेत्यूचिवान् **मदनरत्नेपि** चतुर्दशीचतुर्यामाअमावास्यानदृश्यते श्वोभूतेप्रतिपच्चेत्स्यात्पूर्वातत्रैवकारयेदिति ।

## यानंतर इष्टिकालाचा निर्णय सांगतो.

**गोभिल**—"पक्षाच्या शेवटच्या तिथि ( अमावास्या व पौर्णिमा ) हे उपवासाचे ( अन्वाधानाचे ) काल आणि पक्षाच्या आद्य तिथि ( प्रतिपदा ) यागाचे काल होत." अन्वाधानाचें नांव उपवास. मध्याह्नकालीं किंवा त्याच्या पूर्वी पर्वाचा ( अमावास्यापौर्णिमांचा ) व प्रतिपदेचा संधि असेल तर त्या दिवशीं याग करावा. कारण, "पूर्वाह्णकालीं किंवा मध्याह्नकालीं जर पर्व समाप्त होत असेल, तर पूर्वदिवशीं अन्वाधान करून त्या दिवशीं याग करावा" असें **लौगाक्षिवचन** आहे. येथें दिवसाचे दोन भाग करावे, कारण "सूर्योदयापासून दोन प्रहर ( पहिला अर्धाभाग ) तो **पूर्वाह्णकाल,** आणि दिवसाचा पुढचा अर्धा भाग तो **अपराह्णकाल.** पूर्वाह्णाची शेवटची एक घटिका व अपराह्णाची प्रथमची एक घटिका मिळून संधिभूत ज्या दोन घटिका ( एक मुहूर्त ) तो मध्याह्न. त्यालाच **आवर्तन** असें म्हणतात" असें **मदनरत्नांत** वचन आहे. मध्याह्नोत्तर संधि असेल तर **माधवा**च्या मतीं परदिवशीं याग करावा. कारण "अपराह्णकालीं किंवा रात्रीं जर पर्व समाप्त होईल तर त्या दिवशीं अन्वाधान करून दुसऱ्या दिवशीं याग करावा" असें **लौगाक्षीचें** वचन आहे. **हेमाद्रि** तर-अपराह्णकालीं संधि असला तरी जर दुसऱ्या दिवशीं प्रतिपदेच्या चवथ्या अंशीं चंद्रोदय असेल आणि द्वितीयादि तिथि अत्यंत क्षीण झालेल्या असतील तर पूर्वदिवशीं याग करावा. कारण, "द्विजातींनीं पर्वाचे द्वितीय भागीं याग करावा. कारण, आश्वलायनशाखी द्वितीयासहित याग दूषित आहे. असें म्हणतात." 'द्वितीय भागीं' असें सांगितलें तें कैमुतिकन्यायानें चतुर्थभागीं जाणावें. **शूलपाणि**ग्रंथांत **'पर्वणोंशे तुरीये तु'** असा पाठ आहे, त्याचा अर्थ—"पर्वाचे चतुर्थभागीं" असाच होतो. **तसेंच** "चतुर्दशी पूर्णा असून अमावास्या किंवा पौर्णिमा पूर्णा आहे, आणि द्वितीया क्षयगामिनी आहे तर स्वल्प अमावास्यायुक्त चतुर्दशीस अन्वाधान व श्राद्ध करून अमावास्येस याग करावा" असें **बौधायनवचन** आहे, असें ( हेमाद्रि ) सांगता झाला. **मदनरत्नांतही** "पूर्वदिवशीं चवथ्या प्रहरपर्यंत चतुर्दशी आहे, अमावास्या अपराह्णांत नाहीं, आणि दुसऱ्या दिवशीं प्रतिपदा आहे तर ( अन्वाधानादिकांविषयीं ) पूर्वीची चतुर्दशीयुक्त अमावास्या घ्यावी."

**यत्तुमाधवः** यस्तुवाजसनेयीस्यात्तस्यसंधिदिनात्पुरा नकाप्यन्वाहितिःकिंतुसदासंधिदिनेहिसेत्याह **यच्चकालादर्शेप्युक्तं** आवर्तनादधःसंधिर्यत्रान्वाधायतद्दिने परेद्युरिष्टिरित्याहुर्विप्रावाजसनेयिनइति **यच्चमदनरत्ने** मध्यंदिनात्स्यादहनीह्यस्मिन्प्राक्पर्वणःसंधिरियंतृतीया साखर्विकावाजसनेयिमत्यातस्यामुपोष्याथपरेद्युरिष्टिरिति एतत्पौर्णमासीपरमितितत्रैव आवर्तनोर्ध्वमर्वागस्ताद्रात्रौवासमाप्तौद्वे मध्याह्नादर्वाक्समाप्तौतृतीयेत्यर्थः तत्कर्कभाष्यदेवजानीश्रीअनंतभाष्यादिसकलतच्छाखीयग्रंथविरोधात्वृद्धानादराच्चोपेक्ष्यम् ।

आतां जें **माधव**—"जो वाजसनेयी शाखेचा आहे त्याला संधिदिवसांच्या पूर्वदिवशीं कोठेंही अन्वाधान सांगितलें नाहीं, तर त्याला संधिदिवशींच अन्वाधान आहे" असें सांगता झाला. आणि जें **कालादर्शांतही** सांगितलें आहे कीं, "जर आवर्तनकालाचे पूर्वी संधि असेल तर त्या दिवशीं अन्वाधान करून दुसऱ्या दिवशीं याग करावा, असें वाजसनेयी ब्राह्मण सांगतात." आणि जें **मदनरत्नांत**—"ज्या दिवशीं मध्यंदिनाच्या पूर्वी पर्वसंधि असेल तर ही संधि तिसरी होय. वाजसनेयी यांच्या मतीं ती तिथि खर्विका आहे. त्या संधिदिवशीं अन्वाधान करून दुसऱ्या दिवशीं याग करावा." हें वचन पौर्णमासीविषयक होय असें त्याच ठिकाणीं सांगितलें आहे. आवर्तनानंतर आणि अस्ताच्या पूर्वी तिथि समाप्त होते ती एक, रात्रीं समाप्त होणारी ती दुसरी आणि आवर्तनाच्या ( मध्यंदिनाच्या ) पूर्वी समाप्त होते ती तिसरी संधि जाणावी. तें माधवादिकांनीं सांगितलेलें; **कर्कभाष्य, देवजानी, श्रीअनंतभाष्य** इत्यादिक तच्छाखीयग्रंथांशीं विरुद्ध असल्यामुळें आणि वृद्धांना तें अमान्य असल्यामुळें अग्राह्य होय.

पौर्णमास्यांविशेषमाह **कात्यायनः** संधिश्चेत्संगवादूर्ध्वं प्राक्पर्यावर्तनाद्रवेः सापौर्णमासीविज्ञेयासद्यस्कालविधौनरैः अमायांविशेषमाह **बौधायनः** द्वितीयात्रिमुहूर्ताचेत्प्रतिपद्यापराह्णिकी अन्वाधानंचतुर्दश्यांपरतःसोमदर्शनात् **कात्यायनश्च** यजनीयेऽह्निसोमश्चेद्वारुण्यांदिशिदृश्यते तत्रव्याहृतिभिर्हुत्वा-

---

१ चतुर्थे यामे अमावास्या संपूर्णा न दृश्यते किं त्ववसाने स्वल्पा सा च परदिने क्षीयते तदानीं चतुर्दश्यां श्राद्धमाचरेत् । चतुर्दश्याश्चतुर्यामे अमावास्या न दृश्यते । श्वोभूते प्रतिपच्चत्र भूते कव्यादिकी क्रियेति माधवीये पाठान्तरम् ॥

दंडंदद्याद्विजातयइति एतच्चबौधायनवाजसनेयिविषयं **तैत्तिरीयश्रुतौ**तुचंद्रदर्शनेऽपियागउक्तः एषावैसुमनानामेष्टिर्यमद्य[2]जानन् पश्चाच्चंद्रमाअभ्युदेत्यस्मिन्नेवास्मैलोकेऽर्धुकंभवतीति **श्रुत्यंतरेऽपि** यदहःपश्चाच्चंद्रमाअभ्युदेतितदहर्यजन्निमाँल्लोकानभ्युदेतीति इदंबह्वृचापस्तंबविषयं **मदनरत्नेप्येवं आपस्तंबभाष्यार्थसंग्रहेप्येवम्** अतःपक्षद्वयस्यस्वस्वसूत्राद्व्यवस्थेतितत्त्वम् दूषयंत्याश्वलायनाइतितुपूर्वाह्णसंधिविषयमिति **माधवः ।**

**पौर्णमासीविषयीं विशेष सांगतो-कात्यायन**-"संगवकालानंतर अर्ध्या दिवसाच्यापूर्वी संधि असेल तर ती पौर्णमासी सद्यस्काला होय, म्हणजे पौर्णिमेंत संधिदिवशींच अन्वाधान करून तत्कालींच याग करावा." **अमावास्येविषयीं विशेष सांगतो-बौधायन**-"प्रतिपदेचे दिवशीं अपराह्णकालीं त्रिमुहूर्तपरिमित द्वितीया असेल तर चतुर्दशीस अन्वाधान करून अमावास्येस याग करावा. कारण, दुसऱ्या दिवशीं चंद्रदर्शन आहे." **कात्यायन**ही "ज्या दिवशीं याग केला असेल त्या दिवशीं पश्चिमेस चंद्रदर्शन होईल तर चंद्रदर्शनप्रयुक्त दोषपरिहारार्थ व्याहृतिमंत्रांनीं प्रायश्चित्तहोम करून ब्राह्मणाला दंड द्यावा." हें वचन **बौधायन** व **वाजसनेयी** एतद्विषयक होय. **तैत्तिरीय**श्रुतींत तर चंद्रदर्शनयुक्त प्रतिपदेचे दिवशींही याग सांगितला आहे. तो असा:-"चंद्रदर्शनयुक्त दिवशीं जी इष्टि केली जाते ती सुमनानामक इष्टि जाणावी, तशी इष्टि करणाऱ्या यजमानास अभिलक्षून त्याच दिवशीं पश्चिमदिशेस चंद्र दृष्टिगोचर होतो, व तो यागकर्त्या यजमानास समृद्धिकारक होतो." दुसऱ्या **श्रुतीं**तही-"ज्या दिवशीं पश्चिमेस चंद्रोदय होतो त्या दिवशीं याग केला असतां यागकर्त्याचा अभ्युदय होतो." हें **श्रुति**वचन बह्वृच व आपस्तंब यांविषयीं आहे. **मदनरत्नां**तही असेंच सांगितलें आहे. **आपस्तंबभाष्यार्थसंग्रहां**तही असेंच आहे, म्हणून ह्या दोन पक्षांची आपापल्या सूत्राप्रमाणें व्यवस्था जाणावी, हें तत्त्व होय. "आश्वलायन, द्वितीयासहित याग दूषित आहे असें म्हणतात" असें जें पूर्वोक्त वचन तें तर पूर्वाह्णसंधिविषयक आहे असें **माधव** सांगतो.

शेषपर्वणीष्टौविशेषमाह **माधवीये गार्ग्यः** प्रतिपद्यप्रविष्टायांयदिचेष्टिःसमाप्यते पुनःप्रणीयकृत्स्नेष्टिः कर्तव्यायागवित्तमैः गृह्याग्नेर्नायंनियमइति**मदनपारिजातः** एवंपर्वांत्यांशःप्रतिपदश्चत्रयोंऽशायागकालउक्तः कचित्प्रतिपत्तुर्यांशेऽपियागः संधिर्यद्यपराह्णस्याद्यागंप्रातःपरेऽहनि कुर्वाणःप्रतिपद्भागेचतुर्थेपिनदुष्यतीति**वृद्धशातातपोक्तेः** एतत्पूर्णिमापरमिति**मदनरत्ने** पर्वणिप्रतिपदःक्षयस्यवृद्धेश्चार्धंप्रक्षिप्यसंधिर्ज्ञेयः तदाह**माधवः** वृद्धिःप्रतिपदोयास्तितदर्धंपर्वणिक्षिपेत् क्षयस्यार्धंतथाक्षिप्त्वासंधिर्निर्णीयतांसदेति **कात्यायनोपि** परेह्निघटिकान्यूनास्तथैवात्यधिकाश्चयाः तदर्धंकृष्यापूर्वस्मिन्ह्रासवृद्धीप्रकल्पयेदिति एवंस्मार्तस्थालीपाकेपिज्ञेयम् तत्रेष्टिस्थालीपाकावाधानगृहप्रवेशनीयहोमानंतरभाविन्यांपौर्णमास्यांप्रारंभणीयौनतुदर्शे यथारंभेमलमासपौषमासगुरुशुक्रास्तादिभवतितदाप्यारंभःकार्यः ।

**शेष ( उर्वरित ) पर्वाचे ठायीं इष्टीविषयीं विशेष सांगतो—माधवीयांत-गार्ग्य**-"प्रतिपदा तिथि प्रविष्ट झाली नसतां पर्वाचेठायीं यागाची समाप्ती होईल तर यागवेत्त्यांनीं पुनः अग्निप्रणयन करून सर्व इष्टि करावी." हा पुनः इष्टि करण्याचा नियम गृह्याग्नीला नाहीं, असें **मदनपारिजात** सांगतो. याप्रमाणें पर्वाचा शेवटचा अंश आणि प्रतिपदेचे पहिले तीन अंश मिळून यागकाल विहित होय. **कचिद्ग्रंथांत** प्रतिपदेच्या चतुर्थभागींही याग सांगितला आहे. कारण, "पौर्णिमेचा किंवा अमावास्येचा संधि जर अपराह्णकालीं असेल तर दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं प्रतिपदेच्या चतुर्थभागींही याग केला असतां दोष नाहीं" असें **वृद्धशातातपाचें** वचन आहे. हें वचन पूर्णिमाविषयीं होय असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. पर्व खंडित असेल तर पर्वापेक्षां प्रतिपदेच्या क्षयवृद्धींच्या घटिका मोजून निम्मे घटिका पर्वांत कमी जास्त करून संधि जाणावा. तेंच सांगतो-**माधव**-"पर्वापेक्षां प्रतिपदेची वृद्धि असतां वृद्धीच्या ज्या घटिका त्यांच्या निम्मे घटिका पर्वांत मिळवाव्या; आणि क्षय असतां जितक्या घटिका पर्वापेक्षां कमी असतील त्यांच्या निम्मे पर्वांत कमी कराव्या व त्यावरून संधिकालाचा निर्णय करावा." **कात्यायनही**-"दुसऱ्या दिवशीं प्रतिपदेच्या घटिका न्यून किंवा अधिक असतील त्यांतून अर्ध्या घटिका, क्षय असतां पर्वांत कमी कराव्या व वृद्धि असतां मिळवाव्या, याप्रमाणें पूर्वदिवशीं पर्वांत कमीज्यास्ती करून संधि जाणावा." **स्मार्त** स्थालीपाकाविषयींही याप्रमाणेंच संधिनिर्णय जाणावा. इष्टि आणि स्थालीपाक यांचा प्रथम आरंभ करणें तो आधान ( अग्न्याधान ) व विवाहांतील गृहप्रवेशनीयहोम हे झाल्यानंतर येणाऱ्या पौर्णिमेचे

---

१ तैत्तिरीयाश्वलायनयोश्चंद्रदर्शनदिनेपियागंध्वनयन्नाह तैत्तिरीयेति । २ 'र्यमद्य जानन्' इति प्राचीनपुस्तके पाठः ।

ठायीं करावा, दर्शाचे ठायीं प्रारंभ करूं नये. प्रथमारंभ जर जवळचे पौर्णिमेस कर्तव्य असेल आणि मलमास, पौषमास, गुरुशुक्रांचे अस्तादिक प्राप्त असतील तरी देखील आरंभ करावा.

यानितु उपरागोधिमासश्चयदिप्रथमपर्वणि तथामलिम्लुचेपौषेनान्वारंभणमिष्यते गुरुभार्गवयोर्मौढ्ये-चंद्रसूर्यग्रहेतथेति**संग्रह**वचनानि तानिआलस्यादिनातिक्रांतशुद्धकालप्रारंभविषयाणि नामकर्मचदर्शेष्टिंय-थाकालंसमाचरेत् अतिपातेसतितयोःप्रशस्तेमासिपुण्यभइत्य**परार्केगर्ग**वचनादिति**प्रयोगपारिजाते** उक्तंचैतत् **प्रयोगरत्नेभट्टैः कालादर्शेतु** नामकर्मचजातेष्टिमितिपाठः **याज्ञिकास्तु** आधानानंत-रापौर्णमासीचेन्मलमासगा तस्यामारंभणीयादीन्नकुर्वीतकदाचनेति**त्रिकांडमंडन**वचनाच्छुद्धकालएववि-भ्रष्टेष्टिंकृत्वारंभंकुर्यादित्याहुः **कालादर्शस्मृतिसंग्रहेपि** आरंभंदर्शपूर्णेष्ट्योरग्निहोत्रस्यचादिमं प्रतिष्ठाः पंचकूर्माद्यामलमासेविवर्जयेदिति ।

आतां जीं "ग्रहण, अधिकमास, मलिम्लुच ( क्षयमास ), पौष, गुरुशुक्रांचे अस्तादिक, चंद्रसूर्याचीं ग्रहणें यांतून कोणतेंही प्रथम पौर्णिमेचे ठायीं असेल तर त्या दिवशीं आरंभ करूं नये" अशीं **संग्रह**वचनें, तीं आलस्यादिकानें प्राप्तकालाचा अतिक्रम होऊन इतर कालीं आरंभ करावयाचा असेल तद्विषयक होत. कारण, "नामकर्म, दर्शेष्टि, हीं प्राप्तकालीं करावीं; त्या कालीं करावयाचीं राहतील तर प्रशस्तमासीं पुण्यनक्षत्रीं करावीं" असें **अपरार्कांत गर्ग**वचन आहे, असें **प्रयोगपारिजातांत** सांगितलें आहे. हें **नारायणभट्टांनीं**ही **प्रयोगरत्नांत** सांगितलें आहे. **कालादर्शांत** तर—"**नामकर्म च दर्शेष्टि**" एथें "**जातेष्टि**" असा पाठ आहे. **याज्ञिक** तर—"आधान केल्यानंतर जी सन्निहित पौर्णिमा ती मलमासगत असेल तर तिचे ठायीं आरंभणीय कर्मे ( ज्यांचा आरंभ पूर्वी केलेला नाहीं अशीं कर्मे ) कदापि करूं नयेत" ह्या **त्रिकांडमंडन**वचनावरून शुद्धकालींच विभ्रष्टेष्टि करून आरंभ करावा, असें म्हणतात. **कालादर्शांत-स्मृतिसंग्रहांत**ही "दर्शपौर्णमासेष्टि व अग्निहोत्र यांचा प्रथमारंभ, कूर्मादिकांच्या पांच प्रतिष्ठा, हीं मलमासांत करूं नयेत."

**अथविकृतीष्टिः तत्रापस्तंबः** यदीष्ट्यायदिपशुनायदिसोमेनयजेत सोमावास्यायांपौर्णमास्यांचेति अत्रप्रकृतितःकालेसिद्धेपिसयस्कालतार्थविधेया तृतीययासांगत्वेनोक्तेः अत्रपौर्णमास्यमावास्याशब्दाभ्यांतदंत्य-क्षणोगृह्यते तेनतद्वत्यहोरात्रइत्यर्थमाह**रामांडारः माधवोपि** इष्ट्यादिविकृतिःसर्वापर्वण्येवेतिनिर्णयइति ।

## आतां विकृतीष्टींच्या कालाचा निर्णय सांगतो.

त्याविषयीं **आपस्तंब**—"जर इष्टि, पशुयाग, किंवा सोमयाग करणें आहे, तर तो अमावास्या व पौर्णमासी यांतून कोणत्याही पर्वाचे ठायीं करावा." 'प्रकृतीप्रमाणें विकृति करावी' या वचनानें प्रकृतीचा ( दर्शपौर्णमासेष्टीचा ) काल त्या विकृतींविषयीं सिद्ध असतां हें वचन, त्या विकृतीस सद्यस्कालता ( अन्वाधान व याग यांना एककालता ) विधान करण्यासाठीं आहे. कारण, 'इष्ट्या, पशुना' ह्या पदांत तृतीयाविभक्ति असल्यामुळें सांगकर्म त्याच दिवशीं करावें, असें सूचित होतें. ह्या स्थलीं पौर्णमासी अमावास्या शब्दांनीं त्यांचा अंत्यक्षण घ्यावा, म्हणजे अंत्यक्षणयुक्त अहोरात्राचे ठायीं, असा अर्थ **रामांडार** सांगतो. **माधव**ही—"इष्ट्यादिक सर्व विकृति पर्वाचे ठायींच कराव्या असा निर्णय जाणावा."

**अत्रविशेषमाहत्रिकांडमंडनः कात्यायनश्च** आवर्तनात्प्राग्यदिपर्वसंधिःकृत्वातुतस्मिन् प्रकृतिंविकृत्याः तदैवयागःपरतोयदिस्यात्तस्मिन्विकृत्याःप्रकृतेःपरस्तुरिति **धूर्तस्वाम्यादयो**प्येवमाहुः यदीष्ट्येतिसांगायाविकृतेःपर्वकालत्वादावर्तनात्प्राक्संधौसंधिमभितोयजेतेतिप्रकृतेःप्रतिपदिसमाप्तिनियमात् प्रकृत्यनंतरंप्रतिपदिविकृत्ययोगात्पूर्वेद्युर्विकृतिरित्युक्तं**तंत्ररत्नेपार्थसारथिना** यद्यपिप्रकृतेःपूर्वत्वात्पूर्व-मंतेस्यादित्या**पस्तंबेनोक्तं** तथापि**हेतुवादेन**श्रुतिमूलत्वाभावा**द्गंवासमभिव्याहारा**दितिवदप्रा-माण्यमितितदाशयः **आग्रयणे**तुविशेषंवक्ष्यामः अन्वारंभणीयातुचतुर्दश्यांकार्येति**हिरण्यकेशिसूत्रे** **कौमातृदत्तीये** अन्येपांपर्वण्येव ।

**याविषयीं विशेष सांगतो—त्रिकांडमंडन व कात्यायन**—"आवर्तनाचे पूर्वी जर पर्वसंधि असेल तर त्या संधिदिवशीं प्रकृतियाग करून नंतर विकृतियाग त्याच दिवशीं करावा. जर आवर्तनकालापलीकडे पर्वसंधि असेल तर त्या दिवशीं विकृतियाग करावा; आणि प्रकृतियाग संधिदिवसाच्या दुसऱ्या दिवशीं करावा." **धूर्तस्वाम्यादिक ग्रंथकारही** असेंच सांगतात. "यदीष्ट्या यदि पशुना यदि सोमेन यजेत" ह्या **आपस्तंबवचनानें** सांग विकृतीचा काल पर्व ( अमा-

ह्मास्या पौर्णिमा ) सांगितल्यावरून व आवर्तनाच्या पूर्वीं संधि असतां "संधीच्या पूर्वीं व पलीकडे याग करावा" ह्या वचनावरून प्रकृतीची समाप्ति प्रतिपदेंत करावी असा शास्त्रनियम असल्यामुळें प्रकृतीनंतर प्रतिपदेंत विकृति होत नसल्यामुळें पूर्वदिवशीं विकृति करावी, असें **तंत्ररत्नांत पार्थसारथीनें** सांगितलें आहे. जरी "प्रकृति ही पहिली असल्यामुळें अपूर्व कर्म जें विकृति तें शेवटीं करावें" असें **आपस्तंबानें** सांगितलें आहे, तथापि त्या आपस्तंबवचनांत हेतुवाद ( म्हणजे प्रकृति पूर्वीं असण्याला हेतु प्रकृति पहिली आहे, आणि विकृति नवीन आहे, म्हणून ती नंतर असावी, असें कारण ) असल्यामुळें या सांगण्याला मूलश्रुति नाहीं म्हणून जसें—कात्यायन शाखेंत पिंडपितृयज्ञ दर्शश्राद्धाच्याबरोबर सांगितल्यामुळें तो दर्शाचें अंग आहे; पण अशा हेतूनें सांगितलेलें अंगत्व सर्वांना प्रमाणभूत होत नाहीं-तसें येथें प्रामाण्य नाहीं, असा **पार्थसारथीचा** आशय होय. आग्रयणाविषयीं विशेष निर्णय पुढें ( द्वितीय परिच्छेदांत ) सांगूं. अन्वारंभणीया इष्टि चतुर्दशीचे दिवशीं करावी, असें **हिरण्यकेशिसूत्राचे मातृदत्तीय**वृत्तींत आहे. इतरांनीं पर्वाचे ठायींच करावी.

**पशौसोमे**चकालांतरमप्याह**बौधायनः**आमावास्येनवाहविषेष्ट्वानक्षत्रेचेति शुक्लपक्षेकृत्तिकादिविशाखांतेषुदेवनक्षत्रेष्विति**केशवस्वामीव्याचख्यौ** चातुर्मास्येष्वपिद्वादशाहयथाप्रयोगपक्षयोर्नक्षत्रेष्वप्यारंभः यावज्जीवसांवत्सरप्रयोगयोस्तुफाल्गुन्यांचैत्र्यांवारंभः पशौतुविशेषमाह**कात्यायनः** अर्धादह्नोभवतिनियतंपर्वसंधिःपरस्तात्कृत्वातस्मिन्नहनितुपशुंसद्यएवद्व्यहंवा आरभ्याथप्रकृतिरथचेत्पर्वसंधिःपुरस्तात्कृत्वातस्मिन्प्रकृतिमथतुस्यात्पशुःसद्यएव **अधिकारपशुस्त्व**ग्नीषोमीयेणसवनीयेनवासमानतंत्रोवाकार्यइति **त्रिकांडमंडनः** ।

**पशुयाग व सोमयाग यांविषयीं दुसराही काल सांगतो—बौधायन**—"आमावास्येन वा हविषेष्ट्वा नक्षत्रे च" नक्षत्रे च याचा अर्थ—शुक्लपक्षांत कृत्तिकेपासून विशाखेपर्यंत जीं नक्षत्रें तीं देवनक्षत्रें होत, त्यांचे ठायीं पशुयाग व सोमयाग करावा असें **केशवस्वामी** सांगतो. **चातुर्मास्यांचा काल सांगतो**—चातुर्मास्यांच्या प्रयोगाचे चार पक्ष आहेत. ते असेः—द्वादशाहपक्ष, यथाप्रयोगपक्ष, यावजीवपक्ष आणि सांवत्सरप्रयोगपक्ष. प्रथम दिवशीं वैश्वदेवपर्व, चवथ्या दिवशीं वरुणप्रघासपर्व, आठवा व नववा ह्या दिवशीं साकमेधपर्व, बाराव्या दिवशीं शुनासीरीयपर्व, असा बारा दिवसांचा जो पक्ष तो **द्वादशाहपक्ष.** पांच दिवसांनीं समाप्ति करणें तो **यथाप्रयोगपक्ष.** द्वादशाहपक्ष व यथाप्रयोगपक्ष यांचा आरंभ उदगयनांत शुक्लपक्षीं देवनक्षत्राचे ठायींही ( कृत्तिकेपासून विशाखांपर्यंत जीं नक्षत्रें तीं देवनक्षत्रें त्यांचे ठायींही ) करावा. यावजीवपक्ष व सांवत्सरपक्ष यांचा आरंभ चैत्री किंवा फाल्गुनी पौर्णिमा यांतून कोणत्याही दिवशीं करावा. **पशुयागाविषयीं विशेष सांगतो-कात्यायन**—"जर दिवसाच्या उत्तरार्धांत पर्वसंधि असेल तर त्या संधिदिवशीं सद्यस्काल किंवा द्व्यहकाल ( दोन दिवस करणें तो ) असा पशुयाग करून प्रकृतीचा आरंभ करावा; आणि पर्वसंधि दिवसाच्या मध्याह्नीं किंवा पूर्वाह्णीं असेल तर संधिदिवशीं प्रकृति समाप्त करून सद्यस्कालिक पशुयाग करावा." **अधिकारपशुयाग** तर अग्नीषोमीय पशु अथवा सवनीय पशु यांसह समानतंत्र करावा, असें **त्रिकांडमंडन** सांगतो.

**सोमेत्वाहापस्तंबः** अमावास्यायांदीक्षायजनीयेवामावास्यायांयजनीयेवासुत्यमहः पौर्णमास्यांदीक्षायजनीयेवापौर्णमास्यांयजनीयेवासुत्यमहरिति **लाट्यायनसूत्रेपि** पूर्वपक्षस्यप्रथमेहनिदीक्षेतदष्वावानक्षत्रयोगेचेति पूर्वपक्षःशुक्लपक्षः नक्षत्रयोगेचेत्ययमर्थः चैत्र्यादिपूर्णिमायाश्चित्रानक्षत्रयोगेदीक्षेतेति ।

## सोमाविषयीं सांगतो.

**आपस्तंब**—"सोमयागाची दीक्षा अमावास्येस किंवा यजनीयदिवशीं ( प्रतिपदेस ) घ्यावी. अमावास्येस किंवा यजनीयदिवशीं सुत्य दिवस ( सोमरस तयार करण्याचा दिवस ) समजावा. पौर्णिमेस किंवा यजनीयदिवशीं दीक्षा घ्यावी. पौर्णिमेस किंवा यजनीयदिवशीं सुत्य दिवस समजावा." **लाट्यायनसूत्रांतही**—"शुक्लपक्षीं प्रतिपदेस दीक्षा घ्यावी, किंवा चैत्री इत्यादि पौर्णिमेस चित्रादि नक्षत्राचा योग असतां दीक्षा घ्यावी."

आधानंतुपर्वणिनक्षत्रेषुचोक्तम् तत्रपर्वनक्तंगार्हपत्यमादधीतेत्यादिकर्मकालव्यापिग्राह्यम् दिनद्वयेतत्त्वेपरं ग्राह्यं संकल्पस्यपर्वणिलाभात् पूर्वनक्षत्रयोगेतदेवग्राह्यम् यत्रत्रीणिसन्निपतितान्यृतुर्नक्षत्रंचपर्वेतत्समृद्धंविप्रतिषेधेऋतुर्नक्षत्रंचबलीयइति **हिरण्यकेशिसूत्रात्** ऋतुर्वसंतेब्राह्मणोग्नीनादधीतेत्यादिः **रेणुकारिकायांतु** माघादिपंचमासेषुश्रावणेवाश्विनेतथा मार्गशीर्षेशुक्लपक्षेआधानमथकारयेदित्युक्तं अत्रमूलंमृग्यम्

आधाननक्षत्राणितु**आपस्तंबसूत्रे**कृत्तिकारोहिणीमृगशीर्षपुनर्वसुपुष्यपूर्वोत्तरापूर्वाषाढोत्तराषाढाहस्तचित्राविशाखाऽनुराधाश्रवणोत्तराभाद्रपदाइति ।

**आधान**—आधान करणें तें पर्वदिवशीं आणि नक्षत्राचे ठायीं सांगितलें आहे. आधानासाठीं **पर्व** घेणें तें, "रात्रीं गार्हपत्याधान करावें" इत्यादि वाक्यानें प्रतिपादित जो कर्मकाल त्याला व्यापून असेल तें घ्यावें. दोन दिवशीं पर्व कर्मकालव्यापी असेल तर दुसऱ्या दिवसाचें घ्यावें. कारण, तसें घेतलें असतां पर्वांत संकल्प होतो. पूर्वदिवशीं नक्षत्रयोग असेल तर पूर्वदिवसाचेंच घ्यावें. कारण, "ऋतु ( वसंतऋतु ), पर्व, आणि उक्त नक्षत्र या तिहींचा एककालीं योग असेल तर तो अति उत्तम. पर्व एक दिवशीं आणि ऋतुनक्षत्र एक दिवशीं असेल तर पर्वापेक्षां ऋतु व नक्षत्र श्रेष्ठ" असें **हिरण्यकेशिसूत्र** आहे. ऋतु म्हणजे "ब्राह्मणानें वसंतऋतूंत आधान करावें." इत्यादिवाक्यप्रतिपादित वसंत ऋतु जाणावा. **रेणुकारिकें**तर—"माघादि पांच मास, श्रावण, आश्विन, मार्गशीर्ष, या मासांत शुक्लपक्षीं आधान करावें" असें सांगितलें आहे. याविषयीं मूळवचन शोधावें. **आधाननक्षत्रें सांगतो-आपस्तंबसूत्रांत**—"कृत्तिका, रोहिणी, मृगशीर्ष, पुनर्वसु, पुष्य, पूर्वा, उत्तरा, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, हस्त, चित्रा, विशाखा, अनुराधा, श्रवण, आणि उत्तराभाद्रपदा."

सोमपूर्वाधानेविशेषमाह**आपस्तंबः** सोमेनयक्ष्यमाणआदधानोनर्तूंन्सूर्क्षेन्ननक्षत्रमिति अत्रप्रकरणादाधानकालबाधः तेनसोमस्यवसंतकालतानबाध्यतइति**रुद्रदत्तवृत्तौनारायणवृत्तौ**चोक्तम् । **तंत्ररत्ने**-**वार्तिकेच** तेवाएतेउभयेअपहतपाप्मानोऋतवः एषवाउद्यन्नादित्यएषांपाप्मनोपहंता यदैवैनंकदाचनयज्ञमुपनमेत्‌थादधीतेत्यत्रोत्तरायणरूपंदैवंदक्षिणायनरूपंचपित्र्यमित्युभयमृतुत्रयंसोमाधाने**शतपथे**विशिष्यविहितम् तदेकवाक्यतया**शाखांतरे**नर्तूंनसूर्क्षेदित्यत्रसोमकालबाधएव आधानकालबाधस्ययदैवैनंश्रद्धोपनमेत्तदादधीतेत्यस्यांशाखायांवाक्यांतरेणसिद्धत्वात्सोमकालबाधार्थमेवेदमित्युक्तं ।

**सोमपूर्वाधानाविषयीं विशेष सांगतो—आपस्तंब**-"सोमयाग करण्याकरितां आधान करणारा यानें ऋतु, नक्षत्र यांचा विचार करूं नये." ह्या स्थलीं, प्रकरणवशेंकरून पूर्वोक्त आधानकालाचा बाध होतो, म्हणून सोमयागाविषयीं जो वसंतकाल सांगितला तो बाधित होत नाहीं, असें **रुद्रदत्तवृत्तींत** व **नारायणवृत्तींत** सांगितलें आहे. **तंत्ररत्नांत-वार्तिकांत** "दक्षिणायनांतील तीन व उत्तरायणांतील तीन असे हे सहा ऋतु निष्पाप होत, उदय पावणारा हा सूर्य या ऋतूंचीं पापें दूर करितो: ज्या कोणत्याही कालीं ( ऋतूंत ) यज्ञ करावयाचा असेल तत्कालीं आधान करावें" ह्या वाक्यांत उत्तरायणरूप तीन ऋतु देवकर्माचे आणि दक्षिणायनरूप तीन ऋतु पित्र्यकर्माचे, ते हे सहा ऋतु, सोमाच्या आधानाविषयीं **शतपथब्राह्मणांत** विशेषेंकरून सांगितले आहेत, त्यांची एकवाक्यता केली असतां, अन्य शाखेचे ठायीं "ऋतु, नक्षत्रें यांचा विचार करूं नये" असें जें सांगितलें, तेथें सोमकालाचा ( वसंताचा ) च बाध होतो. आधानकालाचा बाध "ज्या कालीं श्रद्धा उत्पन्न होईल त्या कालीं आधान करावें" ह्या शाखेच्या या दुसऱ्या वाक्यानें सिद्ध होतो, म्हणून सोमकालाचा बाध होण्यासाठींच हें वरील ( आपस्तंबाचें ) वाक्य होय, असें सांगितलें आहे.

**धूर्तस्वामी**तुसोमस्यापियऋतुस्तस्यापिनसूर्क्षेदितिलिखनादुभयकालबाधंमन्यते **श्रीरामांडारस्तु** कालांतरविधानंवासर्वकालानादरोवेतिपक्षद्वयमुक्तवान् तत्राद्येकृत्तिकादिकालांतरस्ययथाधानेवसंताद्यबाधेनविधानम् तथासोमेप्युदगयनपूर्वपक्षपुण्याहसन्निपातेयज्ञकालोनादेशइति**छंदोगसूत्रो**क्तोदगयनाबाधेनसोमाभिसंधिरूपकालांतरविधानादुदगयनंत्वपेक्षतइत्युक्तम् **द्वितीयपक्षे**तुयदैवैनंयज्ञउपनमेदितिसर्वकालानादरउक्तइति**भरद्वाज**सूत्रात्सर्वशब्दस्यचविश्वजित्सर्वपृष्ठइतिवद्द्वयोरप्रयोगात्सर्वकालबाधइति तेनदक्षिणायनेपिभवतीत्युक्तम् **षड्गुरुभाष्येदेवत्रातभाष्येतंत्ररत्ने**चपट्स्वपिऋतुषुभवतीत्युक्तमितिदिक् ।

**धूर्तस्वामी** ( म्हणजे आपस्तंबसूत्रावरील भाष्यकार ) तर "सोमयागाचाही जो ऋतु त्याचाही विचार करूं नये" असें सूत्र आहे म्हणून तो सोमकाल व आधानकाल या दोनही कालांचा बाध मानितो. **श्रीरामांडार** ( आपस्तंबसूत्रावरील भाष्याची व्याख्या करणारा ) तर ( आपस्तंबवचनानें ) इतरकालाचें विधान किंवा सर्व कालाचा अनादर केला आहे, असे दोन पक्ष सांगता झाला. त्यांमध्यें, प्रथमपक्षीं जसें आधानाविषयीं वसंतादिकालाचा बाध न करितां कृत्तिकादि इतरकालाचें विधान केलें, तसेंच सोमयागाविषयींही "जेथें काल सांगितला नाहीं तेथें उत्तरायण, शुक्लपक्ष, पुण्यदिवस हीं तीन प्राप्त असतां तो यज्ञकाल होतो" ह्या **छंदोगसूत्रांत** उक्त उत्तरायणाचा बाध न करितां सोमाभिसंधि ( सोमेच्छा ) रूप दुसऱ्या कालाचें विधान केल्यावरून उत्तरायण तर पाहिजे, असें सांगितलें. दुसऱ्या ( सर्वकालानादर ) पक्षीं तर, "ज्या कालीं त्याला यज्ञ करण्याची इच्छा होईल, या वाक्यानें सर्व कालाचा अनादर उक्त आहे" ह्या

"विश्वजित्सर्वपृष्ठः"[1] या वाक्याचे ठायीं जसा दोहोंविषयीं सर्वशब्दाचा प्रयोग संभवत नाहीं, तद्वत् येथेंही दोघांचा ( शुक्लपक्ष व पुण्यदिवस म्हणजे नक्षत्र यांचा ) बाध करण्यासाठीं सर्वशब्द नव्हे आहे, तर सर्व उक्त कालाचा बाध होण्याकरितां आहे. म्हणून दक्षिणायनांतही सोमाधान होतें असें सांगितलें. **षड्गुरुभाष्य, देवत्रातभाष्य, व तंत्ररत्न** या ग्रंथांतही सहाही ऋतूंचे ठायीं सोमाधान होतें असें सांगितलें आहे. याप्रमाणें हें दिक्प्रदर्शन केलें आहे.

श्राद्धेत्वमावास्यात्रेधाविभक्तदिनतृतीयांशेयोऽपराह्णभागस्तद्व्यापिनीसाग्निकैर्ग्राह्या पिंडान्वाहार्यकंश्राद्धं-क्षीणेराजनिशस्यते वासरस्यतृतीयेंऽशेनातिसंध्यासमीपतइति**कात्यायनोक्तेः** दर्शश्राद्धंतुयत्प्रोक्तंपार्वणंतत्प्रकीर्तितम् अपराह्णेपितृणांचतत्रदानंप्रशस्यतइति**शातातपोक्तेश्च** दिनद्वयेतत्रसत्त्वेसर्वापराह्णव्यापीदर्शो-ग्राह्यः यत्तुभयेद्युरेपविहितःसर्वापराह्णस्थितइति**दीपिकोक्तेः** यत्तु**कार्ष्णाजिनिः** भूतविद्धाममावास्यां-मोहादज्ञानतोपिवा श्राद्धकर्मणियेकुर्युस्तेषामायुःप्रहीयतइति तदपराह्णेचतुर्दशीवेधपरमिति**श्राद्धहेमाद्रिः** अपराह्णाव्याप्तिपरमिति**माधवः** दिनद्वयेऽपराह्णव्याप्त्यभावेंऽशतोव्याप्तौचतिथिक्षयेपूर्वेति**हेमाद्रिः** यदा-चतुर्दशीयामंतुरीयमनुपूरयेत् अमावास्याक्षीयमाणातदैवश्राद्धमिष्यतइति**कात्यायनोक्तेः** चतुर्दश्याश्चतु-र्थयामंदर्शःपूरयेत् चतुर्दशीयामत्रयंस्यादित्यर्थः क्षीयमाणापरदिनेऽपराह्णव्यापिनीनेत्यर्थः ।

## श्राद्धाविषयीं अमावास्येचा निर्णय सांगतो.

दिवसाचे तीन भाग करून तिसऱ्या भागांत जो अपराह्णकाल तत्कालव्यापिनी अमावास्या दर्शश्राद्धाविषयीं साग्निकांनीं घ्यावी; कारण, "पिंडान्वाहार्यकश्राद्ध ( दर्शश्राद्ध ) चंद्रमा क्षीण असेल त्या दिवशीं ( अमावास्येस ) दिवसाच्या तिसऱ्या भागांत करावें, संध्याकाळच्या फार जवळ करूं नये" असें **कात्यायन**वचन आहे. आणि "दर्शश्राद्ध जें तेंच पार्वणश्राद्ध म्हटलें आहे, त्याविषयीं जें पितरांस द्यावयाचें तें अपराह्णकालीं द्यावें हें प्रशस्त होय" असें **शातातपवचनही** आहे. दोन दिवशीं अमावास्येची अपराह्णव्याप्ति असेल तर सर्व अपराह्णकालव्याप्ति ज्या दिवशीं असेल ती घ्यावी. कारण, "जर दोन दिवशीं दर्श अपराह्णांत असेल तर सर्व अपराह्णांत असलेला घ्यावा" असें **दीपिकावचन** आहे. आतां जें **कार्ष्णाजिनि**-"मोहानें किंवा अज्ञानानें चतुर्दशीविद्ध अमावास्या श्राद्धकर्माविषयीं जे घेतात त्यांचें आयुष्य क्षीण होतें" असें वचन, तें अपराह्णकालीं चतुर्दशीवेध असेल तर तद्विषयक आहे असें **श्राद्धहेमाद्रि** सांगतो. अपराह्णकालीं दर्शाची अव्याप्ति असेल तर तद्विषयक तें वचन असें **माधव** सांगतो. दोन दिवशीं अपराह्णव्याप्ति नसेल, किंवा दोन दिवशीं अंशतः व्याप्ति असेल तर तिथिक्षय असतां पूर्वा घ्यावी असें **हेमाद्रि** सांगतो; कारण, "जेव्हां चतुर्दशी तीन प्रहर असून नंतर अमावास्या, व दुसऱ्या दिवशीं अपराह्णकालीं अमावास्या नसेल तेव्हां पूर्वदिवशींच श्राद्ध करावें" असें **कात्यायन**वचन आहे.

**व्यतिरेकमाह** वर्धमानाममावास्यांलक्षयेदपरेऽहनि यामांस्त्रीनधिकांवापिपितृयज्ञस्ततोभवेत् ततःश्रा-द्धंच दिनद्वयेऽपराह्णव्याप्त्यादौतिथिवृद्धौच**हारीतः** त्रिमुहूर्ताचकर्तव्यापूर्वाखर्वाचबह्वृचैः कुहूरध्वर्युभिः-कार्यायथेष्टंसामगीतिभिः त्रिमुहूर्ताभावेतुपूर्वानेत्यर्थः ।

१ 'विश्वजित्सर्वपृष्ठो भवति' असें श्रुतींत वाक्य आहे. पृष्ठ म्हणजे एका सूक्तांत असलेल्या तीन ऋचांचें ब्राह्मणोक्त विधानानें सतरावेळां गान करणें, त्या स्तोत्रांना पृष्ठ असें म्हणतात. रथंतरपृष्ठ व बृहत्पृष्ठ हीं दोन पृष्ठें ज्योतिष्टोमामध्यें विकल्पित आहेत, त्यांचा विश्वजित् यागामध्येंही अतिदेशानें विकल्प प्राप्त झाला असतां 'सर्वपृष्ठो' ह्या वाक्यांतील सर्वशब्दानें त्या दोघांचा समुच्चय ( दोन्ही करणें तें विधान ) केला आहे, असें पूर्वपक्षी म्हणतो. सर्वशब्द दोघांचा वाचक होत नाहीं म्हणून, ह्या वाक्यानें सहा पृष्ठांचा अतिदेश केला आहे. तीं सहा पृष्ठें येणेंप्रमाणें:-रथंतर, बृहत्, वैरूप, वैराज, शाक्वर आणि रैवत. ह्या सामांनीं निष्पाद्य ( निष्पन्न होणारीं ) तीं होत. त्याप्रमाणें येथेंही सर्वशब्दानें, छंदोगसूत्रांतील पूर्वपक्ष व पुण्याह या दोघांचेंच ग्रहण होत नाहीं, तर उदगयनाचेंही ग्रहण होतें, म्हणून त्या सर्वांचा बाध समजून दक्षिणायनांतही सोमाधान होतें असा भाव. २ पिंडानां पिंडपितृयज्ञांगभूतानामनु पश्चादाह्रियते क्रियत इति पिंडान्वाहार्यकं श्राद्धममावास्यायांतत् क्षीणे राजनीदौकर्तव्यं 'वासरस्य तृतीयेंऽश' इत्यनेनेषन्न्यूनोऽपराह्णःसायाह्नसहितोऽभिधीयते तत्रनातिसंध्यासमीपतइति सायाह्नस्य प्रतिषेधे सत्यपराह्णः कर्मकालत्वेन परिशिष्यते ॥ ३ खर्वो दर्पस्तथा हिंसा त्रिविधं तिथिलक्षणम् । खर्वदर्पौ परौ कार्यौ हिंसा स्यात्पूर्वकालिकीति ॥ खर्वः समतिथिः। दर्पो वृद्धियुक्ता । हिंसा क्षययुक्ता ॥ ४ दृष्टचंद्रासिनीवाली नष्टचन्द्राकुहूर्मतेति ॥ ५ पुरुषार्थचिंतामणौतुबह्वृचैस्तैत्तिरीयैश्चसाग्निकैर-पराह्णव्याप्त्यसत्त्वेपि इष्टिदिनात्पूर्वदिनेएवदर्शश्राद्धंकार्यं तथाचदिनद्वयेकात्स्न्येनापराह्णव्याप्तौ परैवदर्शः एकदेशेनापराह्णद्वयव्याप्तौ प्रति-पद्वृद्धया प्रतिपदीष्टावुत्तरत्रैवदर्शः द्वितीयदिनेएवापराह्णव्याप्तौतु यदिप्रतिपत्क्षयवशाद्दर्शदिनएवइष्टिप्राप्तिस्तदा बह्वृचानांसिनीवाली तैत्ति-रीयाणांकुहूर्ग्राह्या सामगानांविकल्पेनद्वयं । यदापूर्वदिनेऽपराह्णेऽधिकाव्याप्तिः परदिनेऽल्पा तदा सामगानांपूर्वा तैत्तिरीयाणामुत्तरा उभयत्रापराह्णस्पर्शाभावेपि सामगानांपूर्वा तैत्तिरीयाणांपरेत्याद्युक्तमिति धर्मसिंधुः ॥

**याच्या विपरीत सांगतो**–"दुसऱ्या दिवशीं तीन प्रहर किंवा अधिक अमावास्या असून वृद्धिगामिनी असेल तर त्या दिवशीं पिंडपितृयज्ञ करून दर्शश्राद्ध करावें. दोन दिवशीं अंशतः अपराह्णव्याप्ति असतां व तिथिवृद्धि असतां सांगतो–**हारीत**–"पूर्वदिवशीं अमावास्या तीन मुहूर्त असून समा किंवा वृद्धिगामिनी आहे तरी बह्वृक्शाखीयांनीं तीच चतुर्दशीयुक्त घ्यावी, तीन मुहूर्तांपेक्षां कमी असेल तर पूर्वा घेऊं नये. यजुर्वेद्यांनीं परा घ्यावी आणि सामवेद्यांनीं पूर्वा किंवा परा यथेष्ट घ्यावी."

पिंडपितृयज्ञस्तुकात्यायनैर्यागदिनात्पूर्वेद्युःकार्यः पूर्वोवांगत्वात्पिंडपितृयज्ञइतितत्सूत्रात् व्याख्यातंचैतत् **कर्काचार्यैः** पूर्वएवदर्शात्पिंडपितृयज्ञोनपश्चात् कुतः अंगत्वात् **तथाचश्रुतिः** तस्मात्पूर्वेद्युःपितृभ्यः क्रियतउत्तरमहर्देवान्यजंतइति पूर्वेद्युपितृभ्योयज्ञंनिप्रणीयप्रातर्देवेभ्यःप्रतनुतइतिच तेनतन्मतेअंगमेवासौ **तदुक्तम्** अंगंवासमभिव्याहारादिति तेनकर्कमतेचतुर्दशीयुक्तदर्शेपिंडपितृयज्ञइति **श्रीअनंतभाष्येतु** परेद्युरित्युक्तम् अत्रद्वेधाप्याचारोदृश्यते ।

कात्यायनशाखी यांनीं पिंडपितृयज्ञ तर यागदिवसाच्या पूर्वदिवशीं करावा; कारण, "पिंडपितृयज्ञ हा दर्शाचें अंग आहे यास्तव पूर्वी करावा" असें **कात्यायन**मत्र आहे. **कर्काचार्यांनीं** त्या सूत्राची व्याख्या केली आहे, ती अशीः— "दर्शश्राद्धाच्या पूर्वींच पिंडपितृयज्ञ करावा, पश्चात् करूं नये; कारण, तो पिंडपितृयज्ञ दर्शश्राद्धाचें अंग आहे." तशीच श्रुति आहे, ती अशीः—"यागाच्या पूर्वदिवशीं पितरांचें यजन व उत्तरदिवशीं देवांचें यजन करितात." "पूर्वदिवशीं पितरांस यजन करून दुसऱ्या दिवशीं देवांचा यज्ञ करावा" असेंही श्रुतिवाक्य आहे. म्हणून त्यांच्या मतानें पिंड-पितृयज्ञ हा अंगभूत आहे. तें सांगतो–"पिंडपितृयज्ञ हा पार्वणश्राद्धाच्या बरोबर सांगितला आहे, म्हणून तो त्याचें अंग आहे" तेणेंकरून **कर्काचार्यांचे** मतीं चतुर्दशीयुक्त दर्शाचे ठायीं पिंडपितृयज्ञ करावा. **श्रीअनंताचे भाष्यांत** तर पिंडपितृयज्ञ दुसऱ्या दिवशीं करावा असें सांगितलें आहे. याविषयीं दोनही प्रकारचा ( म्हणजे चतुर्दशीयुक्त दर्शाचे दिवशीं किंवा दुसऱ्या दिवशीं करण्याचा ) आचार दृष्टीस पडतो.

**आपस्तंबानांतु** परदिनेमुहूर्तमपिदर्शसत्त्वेतत्रैवपितृयज्ञः तदाह**आपस्तंबः** अमावास्यायांयदहश्चंद्रमसंनपश्यतितदहःपिंडपितृयज्ञंकुरुतइति अस्य**रुद्रदत्तीयाव्याख्या** पिंडैर्युक्तःपितृयज्ञःपिंडपितृयज्ञः सचकर्मांतरं नतुदर्शशेषः यथावक्ष्यति पितृयज्ञःस्वकालविधानादनंगंस्यादिति तंचयदहश्चंद्रमसंनपश्यति पंचदश्यांप्रतिपदिवातदहःकुरुते यदहस्तयोःसंधिस्तदहरित्यर्थइति **रामांडारोप्याह** पिंडपितृयज्ञस्तुपर्वसंधिमदहोरात्रापराह्णइति अतःपर्वसंधिदिनेपितृयज्ञः **शतपथश्रुति**रपि यदैवैपनपुरस्तान्नपश्चाद्दृश्यतेथपितृभ्योददातीति पर्वसंधिदिनेहिपूर्वतःपश्चाद्वाचंद्रोनदृश्यतइत्यर्थः **सत्याषाढोपि** पितृयज्ञंप्रक्रम्यदृश्यमानेतूपोष्यश्वोभूतेयजतइत्याह ।

**आपस्तंबांचा** तर दुसऱ्या दिवशीं मुहूर्तमात्र जरी अमावास्या असली तथापि त्याच दिवशीं पिंडपितृयज्ञ होतो. तें **आपस्तंब** सांगतो–"अमावास्येस ज्या दिवशीं चंद्रमा दृष्टीस पडत नाहीं त्या दिवशीं पिंडपितृयज्ञ करावा." याची **रुद्रदत्त** व्याख्या करितो ती अशीः—"पिंडांनीं युक्त जो पितृयज्ञ तो पिंडपितृयज्ञ, हा भिन्न कर्म आहे, दर्शाचें अंग नाहीं; कारण, तोच आपस्तंब पुढें सांगतो कीं, "पिंडपितृयज्ञ हा आपल्या कालीं विहित असल्यामुळें दुसऱ्याचें अंग होत नाहीं" तो पिंडपितृयज्ञ ज्या अमावास्येस किंवा प्रतिपदेस चंद्र दिसत नाहीं म्हणजे अमावास्या व प्रतिपदा यांच्या संधिदिवशीं करावा. **रामांडार**ही सांगतो—"पिंडपितृयज्ञ करणें तो पर्वसंधियुक्त जें अहोरात्र त्याचे अपराह्णकालीं करावा" असें आहे, म्हणून पर्वसंधिदिवशीं पिंडपितृयज्ञ करावा. **शतपथश्रुति**ही—"ज्या दिवशीं हा चंद्र, पूर्वेस व पश्चिमेसही दिसत नाहीं त्या दिवशीं पितरांस द्यावें." पर्वसंधीच्या दिवशीं पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे चंद्रदर्शन होत नाहींच असा अर्थ. **सत्याषाढ**ही–पितृयज्ञाचा उपक्रम करून "ज्या दिवशीं चंद्र दिसत असेल त्या दिवशीं अन्वाधान करून दुसऱ्या दिवशीं याग करावा" असें सांगतो.

**हेमाद्रिस्तु** अमावास्याशब्दस्तिथिवचनएव पूर्वोक्**तापस्तंबसूत्रे**यदुक्तंनपश्यतीति तत्रक्षयोभिप्रेतः अतश्चतुर्दश्यांचंद्रमसश्चक्षीणत्वात्तद्युक्तदर्शेपितृयज्ञः पितृयज्ञंतुनिर्वर्त्यविप्रश्चंद्रक्षयेऽग्निमानिति**मनूक्तेः** यदुक्तंयदहस्त्वेवदर्शनंनैतिचंद्रमाः तत्क्षयापेक्षयाज्ञेयंक्षीणेराजनिचेत्यपीति यदुक्तंदृश्यमानेपितश्चतुर्दश्यपेक्षयेतिच**कात्यायनोक्तेः** दृश्यमानेप्येकइति**गोभिलोक्तेः** यस्यांसंध्यागतःसोमोमृणालमिवदृश्यते अपरा-

**द्वेक्षयस्तस्यांपिंडानांकरणंध्रुवमितिहारीतोक्तेश्च** चंद्रक्षयकालश्चोक्तः**कात्यायनेन** अष्टमेंशेचतुर्दश्याः क्षीणोभवतिचंद्रमाः अमावास्याष्टमेंशेतुपुनःकिलभवेदणुरिति तेनपूर्वेद्युरेवपितृयज्ञइत्यूचिवान् **कर्काचार्यै-रपि** अपराह्णेपिंडपितृयज्ञचंद्रादर्शनेमावास्यायामिति**कात्यायनसूत्रे**ऽदर्शनेनक्षयएवोक्तः तस्मिन्क्षीणे यदातीतिश्रुतेः अतस्तन्मतेचतुर्दशीयुक्तदर्शेपितृयज्ञेसतिपरदिनेयागोर्थात्सिद्धः तदेतत्सर्वोत्कृष्टमपि**हेमाद्रिकर्कादि**व्याख्यानमापस्तंबैरनभ्युपगमात्**कातीयबौधायना**दिविषयम् ।

**हेमाद्रि** तर—अमावास्याशब्द तिथिवाचीच आहे, तदंत्यक्षणवाची नाहीं. पूर्वोक्तापस्तंबसूत्रांत, जें सांगितलें कीं, अमावास्येस ज्या दिवशीं चंद्र दिसत नाहीं, त्या ठिकाणीं चंद्राचा क्षय समजावयाचा. म्हणून चतुर्दशीस चंद्र क्षीण असल्यामुळें चतुर्दशीयुक्त अमावास्येस पिंडपितृयज्ञ होतो: कारण, "साग्निक ब्राह्मणानें चंद्रक्षययुक्त दिवशीं पिंडपितृयज्ञ करून" असें **मनूनें** सांगितलें आहे. आतां जें सांगितलें आहे कीं, "ज्या दिवशीं चंद्रमा दृष्टिगोचर होत नाहीं" इत्यादि, तें सांगणें चंद्राचा क्षय असल्यामुळें समजावें. दर्शश्राद्ध, राजा म्हणजे चंद्रमा क्षीण असतां प्रशस्त, असेंही सांगितलें आहेच. "चंद्र दृष्टिगोचर असतांही होतो" असें जें सांगितलें आहे तें चतुर्दशीविषयक होय, असें **कात्यायनानें** सांगितलें आहे. "चंद्र दिसत असतांही होतो असें कितीएक म्हणतात" असें **गोभिल**वचन आहे. "आणि ज्या अमावास्येस प्रातःकालीं चंद्रमा कमलाचे बिसासारखा दिसतो, त्याचा अपराह्णीं क्षय होतो, त्या अमावास्येस निश्चयें पिंडपितृयज्ञ करावा" असें **हारीत**वचनही आहे. **चंद्रक्षयाचा काल सांगतो-कात्यायन**—"चतुर्दशीच्या आठव्या अंशीं चंद्र क्षीण होतो, आणि अमावास्येच्या आठव्या अंशीं पुनः अणुप्रमाण होतो" अशा ह्या सर्व प्रमाणांवरून पूर्व दिवशींच पिंडपितृयज्ञ करावा असें ( हेमाद्रि ) सांगता झाला. **कर्काचार्यांनीं** देखील "अमावास्येस चंद्राचें अदर्शन असतां अपराह्णकालीं पिंडपितृयज्ञ होतो" ह्या कात्यायनसूत्रांत अदर्शनशब्देंकरून क्षयच घ्यावा, असें सांगितलें आहे. "चंद्र क्षीण असतां यावें" अशी **श्रुति** आहे, यावरून कर्काचार्यांचे मतीं चतुर्दशीयुक्त अमावास्येस पिंडपितृयज्ञ झाला असतां दुसऱ्या दिवशीं याग अर्थात्सिद्ध आहे. असें हें पूर्वोक्त **हेमाद्रि कर्काचार्य** इत्यादिक ग्रंथकारांचें व्याख्यान जरी सर्वोत्कृष्ट आहे, तथापि तें **आपस्तंबांनीं** परिगृहीत नसल्यामुळें तें **कात्यायन-बौधायनादि**विषयक जाणावें.

आश्वलायनानामपिशेषपर्वणिपिंडपितृयज्ञः **तथाचसूत्रम्** अमावास्यायामपराह्णेपिंडपितृयज्ञइति **अत्रनारायणवृत्तिः** अमावास्याशब्दःप्रतिपत्पंचदश्योःसंधिवचनोप्यत्रापराह्णशब्दसमन्वयात्तद्युक्तेहोरात्रेवर्तते तस्यापराह्णेऽह्नश्चतुर्थभागेपिंडपितृयज्ञःकार्यः औपवसथ्येयजनीयेवाहनि यदात्वहोरात्रसंधौतिथिसंधिःस्यात्तदौपवसथ्येएवाह्निक्रियतइति अतएव मुहूर्तमप्यमावास्याप्रतिपद्यपिचेद्भवेत् तद्दत्तमक्षयंज्ञेयंपर्वशेषंतुपर्ववदिति**हेमाद्रौ**वचनंपिंडपितृयज्ञपरमुक्तं**प्रयोगपारिजाते** अयंचस्मार्ताग्निमतासंपूर्णेदर्शेश्राद्धव्यतिषंगेणकार्यः व्यतिषंगोनामोभयोःसहानुष्ठानम् एतच्चस्थालीपाकेनसहपिंडार्थमुद्धृत्येतिसूत्रेवृत्तिकृतोक्तम् खंडपर्वणितु**केचिदाहुः** पूर्वेह्निपिंडपितृयज्ञव्यतिषंगेणश्राद्धंकृत्वापरेह्निकेवलःपिंडपितृयज्ञःकार्यः वृत्तिकृतात्वन्वष्टक्यंचपूर्वेद्युर्मासिमास्यथपार्वणं काम्यमाभ्युदयेष्टम्यामेकोद्दिष्टमथाष्टममित्युदाहृत्यपूर्वेपुचतुर्षुस्थालीपाकादुद्धृत्याग्नौकरणमित्युक्तेर्दर्शश्राद्धेस्थालीपाकोनियतइतिगम्यते स्थालीपाकश्चपितृयज्ञएवेतिपूर्वदिनेव्यतिषंगःसिद्धः **प्रयोगपारिजाते**तुवार्षिकश्राद्धादेरपिव्यतिषंगउक्तः किमुतदर्शश्राद्धस्य ।

**आश्वलायनांचा**ही शेष ( उर्वरित ) पर्वाचे ठायीं पिंडपितृयज्ञ होतो. त्याविषयीं **आश्वलायनसूत्र**—"अमावास्येस अपराह्णकालीं पिंडपितृयज्ञ करावा." या सूत्रावरची **नारायणवृत्ति** अशी—अमावास्या हा शब्द, प्रतिपदा व पंचदशी ( अमावास्या ) यांच्या संधीचा वाचक जरी आहे, तथापि ह्या स्थलीं अपराह्णशब्दाशीं त्याचा समन्वय ( संबंध ) असल्यामुळें संधियुक्त अहोरात्राचा वाचक होतो. त्या संधियुक्त दिवसाचे पांच भाग करून चवथा भाग जो अपराह्ण, त्यांत पिंडपितृयज्ञ करावा. तो पिंडपितृयज्ञ अन्वाधानाच्या दिवशीं किंवा यागाच्या दिवशीं होतो. ज्या कालीं दिवस आणि रात्र यांच्या संधीचे ठायीं तिथिसंधि होईल, त्या कालीं अन्वाधानाच्या दिवशींच पिंडपितृयज्ञ करावा. म्हणूनच "प्रतिपदेस मुहूर्तमात्र जरी अमावास्या असेल तरी त्या दिवशीं जें दिलें तें अक्षय होतें; कारण, पर्वशेष हें पर्वासारखेंच फलदायक होय" असें **हेमाद्रींतील** वचन पिंडपितृयज्ञविषयक होय, असें **प्रयोगपारिजातांत** सांगितलें आहे. संपूर्ण अमावास्या असतां दर्शश्राद्ध व पिंडपितृयज्ञ हे दोन्ही एका दिवशीं प्राप्त होतील तेव्हां दर्शश्राद्धाच्या व्यतिषंगानें ( बरोबर ) हा

१ तत्रेंदुक्षयस्य चतुर्दश्या अष्टमे प्रहरे प्रारंभः । अमावास्यायाः सप्तमे प्रहरे समाप्तिः ।

पिंडपितृयज्ञ करावा. व्यतिषंग म्हणजे दोहोंचें बरोबर अनुष्ठान करणें. हा प्रकार "स्थालीपाकेन सह पिंडार्थमुद्धृत्य" या सूत्रावर वृत्तिकारानें सांगितला आहे. खंडपर्व ( अमावास्या ) असतां कोणी असें म्हणतात कीं, पूर्व दिवशीं पिंडपितृयज्ञ व्यतिषंगेंकरून श्राद्ध करून दुसऱ्या दिवशीं केवळ पिंडपितृयज्ञ करावा: कारण, वृत्तिकारानें "१ अन्वष्टक्यश्राद्ध, २ पूर्वेद्युश्राद्ध, ३ मासिमासिश्राद्ध, ४ पार्वणश्राद्ध ( दर्शश्राद्ध ), ५ काम्यश्राद्ध, ६ अभ्युदयश्राद्ध, ७ अष्टमीश्राद्ध, ८ एकोद्दिष्ट," अशीं हीं आठ श्राद्धें सांगून पहिल्या चार श्राद्धांमध्यें स्थालीपाकांतून अन्न घेऊन अग्नौकरण करावें असें सांगितलें आहे. म्हणून दर्शश्राद्धाचे ठायीं स्थालीपाक निश्चित आहे असें सूचित होतें. तो स्थालीपाक पिंडपितृयज्ञांतच होत असल्यामुळें पूर्व दिवशीं पिंडपितृयज्ञ व दर्शश्राद्ध यांचा व्यतिषंग ( दोघांचें बरोबर अनुष्ठान ) सिद्ध झाला. **प्रयोगपारिजातांत** तर वार्षिक श्राद्धादिकांचाही व्यतिषंग सांगितला आहे, मग दर्शश्राद्धाचा व्यतिषंग आहे, हें काय सांगावें!

**न्यायविदस्त्वाहुः** सूत्रस्यवृत्तेश्चसंपूर्णदर्शविषयत्वात्खंडपर्वणिपूर्वदिनेकेवलंश्राद्धंपरदिनेचकेवलः पितृयज्ञःकार्यः अतएवोक्तं**वृत्तिकृता** नात्रापूर्वःस्थालीपाकश्चोद्यतेसर्वश्राद्धेषुप्रसंगादिति**प्रयोगपारिजातो**क्तिरप्येतद्विषयैव पूर्वदिनेचश्राद्धेग्नौकरणमेवनपाणिहोमः चतुर्ष्वाद्येषुसाग्नीनांवह्नौहोमोविधीयते पित्र्यब्राह्मणहस्तेस्यादुत्तरेषुचतुर्ष्वपीति**परिशिष्टे**नियमात् नचलौकिकाग्नौपकस्यकथंगृह्याग्नौहोमः नान्याग्नौपकमन्याग्नौजुहुयादितिनिषेधात् **मैवं** श्राद्धस्यगृह्यत्वेनस्मार्ताग्नौपचनाग्नौवाकर्तव्यत्वात् तस्मात्पूर्वेद्युःकेवलंश्राद्धंनव्यतिषंगः इदमेवचयुक्तं आहिताग्निनातुसर्वाधानिनार्धाधानिनावासंपूर्णेखंडेवादर्शेश्रौताग्नौपृथगेवपितृयज्ञःकार्योनतुदर्शश्राद्धव्यतिषंगेणेतिविस्तरभीतेर्विरमामः ।

**न्यायवेत्ते** तर असें म्हणतात कीं, "सूत्र आणि त्यावरनी वृत्ति ही पूर्ण दर्शविषयक आहे, म्हणून खंडपर्वे ( दर्श ) असतां पूर्व दिवशीं केवळ श्राद्ध करून दुसऱ्या दिवशीं पिंडपितृयज्ञ करावा. म्हणूनच वृत्तिकारानें सांगितलें कीं, "या दर्शश्राद्धाविषयीं अपूर्व स्थालीपाक सांगत नाहीं: जर सांगितला तर त्याची सर्व श्राद्धांमध्यें प्रसक्ति होईल!" **प्रयोगपारिजातांत** जो व्यतिषंग सांगितला तो देखील पूर्ण दर्शविषयकच समजावा. पूर्व दिवशीं करावयाच्या दर्शश्राद्धांत अग्नौकरणच करावें, ब्राह्मणाच्या हातावर होम करूं नये: कारण, "साग्निकांनीं पहिल्या चार श्राद्धांमध्यें अग्नींत होम करावा, आणि पुढच्या चार श्राद्धांमध्यें पित्रादिस्थानीं बसलेल्या ब्राह्मणाच्या हस्तावर होम करावा" असा **परिशिष्टांत** नियम आहे. **शंका**—लौकिकाग्नीवर जें पक्क झालें त्याचा होम गृह्याग्नीवर कसा होईल? कारण, एका अग्नीवर पक्क झालेल्याचा होम दुसऱ्या अग्नीवर करूं नये, असा निषेध आहे. **समाधान**—श्राद्ध गृह्य असल्यामुळें तें गृह्याग्नीवर किंवा पचनाग्नीवर करावें असें आहे. यास्तव पूर्वदिवशीं केवळ श्राद्ध करावें: व्यतिषंग ( दोन बरोबर ) करूं नये, हेंच योग्य आहे. जो आहिताग्नि ( श्रौताग्निमान् ) तो अर्धाधानी[१] असो किंवा सर्वाधानी असो, त्यानें पूर्ण किंवा खंड दर्श असला तथापि श्रौताग्नीवर निराळाच पिंडपितृयज्ञ करावा. दर्शश्राद्धाच्या व्यतिषंगानें करूं नये. आतां विस्तारभयास्तव पुरे करितों.

संपूर्णेदर्शेचविशेषमाह**लौगाक्षिः** पक्षांतंकर्मनिर्वर्त्यवैश्वदेवंचसाग्निकः पिंडयज्ञंततःकुर्यात्ततोन्वाहार्यकंबुधइति पक्षांतंकर्मान्वाधानं अन्वाहार्यकंदर्शश्राद्धं अयमेवसाग्नेर्जीवत्पितृकस्यपिंडपितृयज्ञकालोज्ञेयः तस्यापिकात्यायनेनहोमांतमनारंभोवेत्याम्नानात् ।

**संपूर्ण दर्श असतां विशेष सांगतो-लौगाक्षि**-श्रौताग्निमान यानें प्रथम अन्वाधान करून नंतर वैश्वदेव करावा, त्यानंतर पिंडपितृयज्ञ करून दर्शश्राद्ध करावें. साग्निक ( अग्निमान् ) अशा जीवत्पितृकाला पिंडपितृयज्ञाचा काल हाच आहे असें समजावें. साग्निक जीवत्पितृकानेंही होमापर्यंत पिंडपितृयज्ञ करावा, अथवा पिंडपितृयज्ञाला आरंभ करूं नये, असें **कात्यायनानें** सांगितलें आहे.

पिंडपितृयज्ञाकरणेप्रायश्चित्तमाह**पराशरमाधवीयेकात्यायनः** पितृयज्ञात्ययेचैववैश्वदेवात्ययेपिच भोजनेपतितान्नस्यचरुर्वैश्वानरोभवेदित्यलम् ।

**पिंडपितृयज्ञाचा लोप होईल तर प्रायश्चित्त सांगतो-पराशरमाधवीयांत-कात्यायन**-पिंडपितृयज्ञाचा लोप, वैश्वदेवलोप, पतितान्नभोजन यांतून कोणतें एक घडलें असतां वैश्वानर चरूचा होम हें प्रायश्चित्त करावें. हा इतका विचार पुरे आहे.

---

१ तृतीयपरिच्छेदाच्या उत्तरार्धांत श्राद्धप्रकरणीं पाकाग्नि सांगितला तेथें पचनाग्नि सांगितला आहे. १ श्रौताधानाच्या वेळीं गृह्याग्नि अर्धा श्रौतांत मिळवून अर्धा ठेवावयाचा आहे; तें अर्धाधान होय, तें केलें ज्यानें तो अर्धाधानी.

**प्रकृतमनुसराम:** निरग्निकादिभिस्त्वमावास्याऽपराह्णव्याप्त्यभावेतुकुतुपकालव्यापिनीग्राह्या भूतविद्धाप्यमावास्याप्रतिपन्मिश्रितापिवा पित्र्येकर्मणिविद्वद्भिर्ग्राह्याकुतुपकालिकीति**हारीतो**क्तेः इदंचनिरग्निकादिविषयं सिनीवालीद्विजैःकार्यासाग्निकैःपितृकर्मणि स्त्रीभिःशूद्रैःकुहूःकार्यातथाचानग्निकैर्द्विजैरिति**लौगाक्षिवचनात्** अत्रसाग्निरौपासनाग्निरपीति**मदनपारिजाते**उक्तम् कुतुपश्चापराह्णव्याप्त्यलाभेनुकल्पः अपराह्णद्वयाव्यापीयदिदर्शस्तिथिक्षयः आहिताग्नेःसिनीवालीनिरग्न्यादेःकुहूर्मतेति**जाबालिना**ऽभावेविधानात् तेनसाग्नीनांनिरग्नीनांवापराह्णव्यापिन्येवमुख्या तिथिसाम्यवृद्धिक्षयैःसमव्याप्तौखर्वादिनानिर्णयः वैषम्येधिका दिनद्वयेपराह्णास्पर्शेकुतुपव्यापिनीति**माधवः** इदमेवयुक्तम् ।

आतां प्रकृत विषयास अनुसरतों-निरग्निकादिकांनीं, श्राद्धाविषयीं अमावास्या पराह्णव्यापिनी नसेल तर कुतुपकालव्यापिनी घ्यावी; कारण, "विद्वानांनीं चतुर्दशीयुक्त अमावास्या, किंवा प्रतिपदायुक्त अमावास्या, पित्र्यकर्माविषयीं कुतुपकालव्यापिनी अशी घ्यावी" असें **हारीत**वचन आहे. हें ( प्रतिपदायुक्त सांगणें ) निरग्निकादिविषयक आहे; कारण: "साग्निक द्विजांनीं पित्र्यकर्माविषयीं सिनीवाली ( दृष्टचंद्रा ) अमावास्या करावी; आणि अग्निविरहितांनीं व स्त्रीशूद्रादिकांनीं कुहू ( नष्टचंद्रा ) अमावास्या करावी" असें **लौगाक्षि**वचन आहे. ह्या वचनांत 'साग्निक' ह्या शब्दानें औपासनाग्निही घ्यावा, असें **मदनपारिजातांत** सांगितलें आहे. कुतुपकाल हा अपराह्णव्याप्ति मिळत नसेल तर अनुकल्प आहे; कारण, "दोन दिवशीं अपराह्णकालीं व्याप्ति नसून अमावास्येचा क्षय असेल तर श्रौताग्निमानांनीं सिनीवाली करावी, आणि निरग्निकादिकांनीं कुहू अमावास्या करावी" असें **जाबालीनें** अपराह्णव्याप्ति नसेल तर निरग्न्यादिकांना कुहूचें विधान केलें आहे; यास्तव साग्निक अथवा निरग्निक यांस अपराह्णव्यापिनीच मुख्य होय. उभय दिवशीं सारखी एकदेशव्याप्ति असेल व तिथिक्षय असेल तर पूर्वीची घ्यावी, तिथीची वृद्धि असेल किंवा समा तिथि असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. ( दोन दिवशीं समव्याप्ति असेल तर वृद्धि, क्षय, समतिथि यांचीं क्रमानें उदाहरणें;-चतुर्दशी १९ घ०, अमावास्या २३ घ० दिनमान ३० घ० या उदाहरणीं दोनही दिवशीं सारखी पांच घटिका एकदेशव्याप्ति आहे व चतुर्दशीहून चार घटिकांनीं अमावास्येची वृद्धि आहे, म्हणून परा घ्यावी. चतुर्दशी २३ अमावास्या १९ या उदाहरणांत दोन्ही दिवशीं एक घटिका सारखी व्याप्ति आहे, पण चार घटिकांनीं अमावास्या तिथीचा क्षय आहे यास्तव पूर्वीची घ्यावी. उदाहरण:-चतुर्दशी २१ घ०, अमावास्या २१ घ० या उदाहरणीं दोन दिवशीं तीन घटिका सारखी अंशतः व्याप्ति आहे व तिथीची वृद्धि किंवा क्षय कांहींच नाहीं तर तिथि सम आहे याकरितां दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन दिवशीं पूर्ण अपराह्णव्याप्ति असेल तर तिथीची वृद्धि असल्यामुळें परा घ्यावी. दोन दिवशीं अपराह्णस्पर्श नसेल तेव्हां गृह्याग्नि व श्रौताग्नि यांनीं पहिली घ्यावी, इतरांनी परा, असें धर्मसिंधूंत आहे. ) दोन दिवशीं विषमव्याप्ति असेल तर जी अधिक असेल ती घ्यावी. दोन दिवशीं अपराह्णीं स्पर्श नसेल तर कुतुपव्यापिनी घ्यावी असें **माधव** सांगतो. हेंच मत युक्त आहे.

**हेमाद्र्यादिमते**कुतुपव्यापिन्येवनिरग्न्यादेर्मुख्या सिनीवालीदृष्टचंद्रा तथाच**व्यासः** दृष्टचंद्रासिनीवालीनष्टचंद्राकुहूःस्मृतेति पूर्वदिनेपरदिनएववातद्व्यापित्वेसैवग्राह्या अंशव्यापित्वेवैषम्येधिककालव्यापिनी ग्राह्या दिनद्वयेंशतःसमव्याप्तौतिथिक्षयेपूर्वा वृद्धौसाम्येचपरा तिथिक्षयेसिनीवालीतिथिवृद्धौकुहूःस्मृता साम्येपिचकुहूर्ज्ञेयावेदवेदांगवेदिभिरिति**प्रचेतोवचनात्** दिनद्वयेसंपूर्णकुतुपव्याप्तिस्तुतिथिवृद्धावेवभवतीत्यनंतरवचनात्परैवेति कुतुपस्त्वह्नोमुहूर्तोविज्ञेयादशपंचचसर्वदा तत्राष्टमोमुहूर्तोयःसकालःकुतुपःस्मृतइति**मात्स्योक्तः** तुलादानपितृदेवप्रीत्यर्थोपवासादौतुपराग्राह्येत्यन्यत्र**विस्तरः** ।

**हेमाद्र्यादि**कांच्या मतीं निरग्न्यादिकांना कुतुपव्यापिनीच मुख्य आहे. ज्या अमावास्येस चंद्रदर्शन होतें ती सिनीवाली. तेंच **व्यास** सांगतो-"ज्या अमावास्येस चंद्रदर्शन होतें ती सिनीवाली, आणि जी नष्टचंद्रा ती कुहू म्हटली आहे." पूर्व दिवशीं किंवा दुसऱ्या दिवशींच कुतुपकालव्यापिनी असतां तीच घ्यावी. दोन दिवशींही कमीजास्ती मानानें एकदेशव्याप्ति असेल तर जी अधिकव्याप्ति असेल ती घ्यावी. दोन दिवशीं सारखी एकदेशव्याप्ति असतां तिथिक्षय असेल तर पूर्वीची घ्यावी, आणि तिथिवृद्धि किंवा तिथिसाम्य असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. कारण, "तिथिक्षय असतां सिनीवाली

---

१ रौद्रः श्वेतस्तथा मैत्रः सारभद्रस्तथा स्मृतः । सावित्रो वैश्वदेवश्च गांधर्वः कुतुपस्तथा ॥ रोहिणस्तिलकश्चैव विभवो निर्ऋतिर्जयः । शंबरो विजयश्चैव भेदाः पंचदश स्मृताः ॥ कुतुप हा दिवसाच्या पंधरा मुहूर्तांपैकीं आठवा मुहूर्त होय. ते मुहूर्त येणेंप्रमाणें-१ रौद्र, २ श्वेत, ३ मैत्र, ४ सारभद्र, ५ सावित्र, ६ वैश्वदेव, ७ गांधर्व, ८ कुतुप, ९ रोहिण, १० तिलक, ११ विभव, १२ निर्ऋति, १३ जय, १४ शंबर, १५ विजय.

( चतुर्दशीमिश्रित ), तिथिवृद्धि असतां कुहू ( प्रतिपदामिश्रित ), तिथिसाम्य असतां कुहू घ्यावी" असें **प्रचेतसाचें** वचन आहे. दोन दिवशीं संपूर्ण कुतुपकालव्यापिनी तर तिथिवृद्धि असेल तेव्हांच असते म्हणून ह्या वचनावरून पराच घ्यावी. कुतुपकाल म्हणजे "दिवसाचे पंधरा मुहूर्त आहेत त्यांपैकीं जो आठवा मुहूर्त तो कुतुपकाल म्हटला आहे." असा **मात्स्योक्त** समजावा. तुलादान, पितृदेवप्रीत्यर्थ उपवासादिक यांविषयीं अमावास्या घेणें ती परा घ्यावी, याचा अन्य ग्रंथीं विस्तार आहे.

दर्शेचमासिकवार्षिकादिश्राद्धप्राप्तौ**कालादर्शे**विशेषउक्तः दर्शस्यचोदकुंभस्यदर्शमासिकयोरपि नित्यस्य चाब्दिकस्यापिदार्शिकाब्दिकयोरपीत्युक्त्वा संपातेदेवताभेदाच्छ्राद्धयुग्मंसमाचरेत् निमित्तानियतिश्चात्रपूर्वा- नुष्ठानकारणमिति अत्रक्रमो**निर्णयदीपेउक्तः** नष्टचंद्रेयदाकालेक्षयाहदिवसोभवेत् वैश्वदेवंक्षयश्राद्धंकुर्या- त्प्राग्दर्शकर्मणः ।

अमावास्येचे दिवशीं मासिक, वार्षिक इत्यादि श्राद्धें प्राप्त झालीं असतां **कालादर्शांत** विशेष सांगतो—"दर्शश्राद्ध व उदकुंभश्राद्धः किंवा दर्शश्राद्ध व मासिकश्राद्धः अथवा नित्यश्राद्ध व वार्षिकश्राद्धः किंवा दर्शश्राद्ध व वार्षिकश्राद्ध अशी एक दिवशीं दोन दोन प्राप्त असतां असें सांगून देवताभेद असल्यामुळें दोन्ही श्राद्धें करावीं, त्यांमध्यें ज्याचें निमित्त नियत ( ठरलेलें ) नाहीं तें पूर्वी करावें." याविषयीं क्रम **निर्णयदीपांत** सांगितला आहे तो असाः—"अमावास्येस जर क्षयदिवस ( वार्षिक ) प्राप्त होईल तर दर्शश्राद्धाचे पूर्वी वैश्वदेव व वार्षिकश्राद्ध करून नंतर दर्शश्राद्ध करावें."

अमाश्राद्धंचानुपनीतोपिकुर्यात् **श्राद्धशूलपाणौ** अमावास्याष्टकाकृष्णपक्षपंचदशीषुचेत्युपक्रम्य एत- च्चानुपनीतोपिकुर्यात्सर्वेषुपर्वसु श्राद्धंसाधारणंनामसर्वकर्मफलप्रदम् भार्याविरहितोप्येतत्प्रवासस्थोपिनित्यशः शूद्रोप्यमंत्रवत्कुर्यादनेनविधिनाबुधइति**मात्स्योक्तः** अमाश्राद्धातिक्रमेप्रायश्चित्तमुक्तम्**ऋग्विधाने** न्यूषु- वाचंजपेन्मंत्रंशतवारंदिनेदिने अमाश्राद्धंयदानास्तितदासंपूर्णमेतितत् ।

दर्शश्राद्ध हें अनुपनीतानें ( मौंजी न झालेल्यानें ) ही करावें. कारण, **श्राद्धशूलपाणिग्रंथांत**—अमावास्या, अष्टका, कृष्णपक्षांतील पंधरा तिथि ( महालयांतील ) यांचा उपक्रम करून सांगतो—"सर्व पर्वांचे ठिकाणीं होणारें हें साधारण श्राद्ध सर्व कर्मांचें फल देणारें असल्यामुळें अनुपनीतानेंही करावें. तसेंच विधुरानेंही प्रवासांत देखील नित्य करावें. शूद्रानें देखील उक्तविधीनें अमंत्रक करावें" अशी **मात्स्योक्ति** आहे. दर्शश्राद्धाचा लोप झाला असतां प्रायश्चित्त सांगतो—**ऋग्वि- धानांत**—"जेव्हां दर्शश्राद्ध घडलें नसेल तेव्हां 'न्यू३षुवाचं॰' या ऋचेचा शंभर वेळां जप करावा, तेणेंकरून दर्श- श्राद्धाचें संपूर्ण फल मिळतें."

अत्रपूर्वोक्तसाग्निकपदेनाहिताग्निःस्मार्ताग्निमांश्चगृह्यते विच्छिन्नाग्निकादिश्चनिरग्निकः तथाच**हेमाद्रि-** रग्नौकरणप्रकरणे साग्निरग्नावनग्निस्तुद्विजपाणावथाप्सुवा कुर्यादग्नौक्रियांनित्यंलौकिकेनेतिनिश्चितमितिस्मृति- वाक्यमुदाहृत्य यस्त्वस्वीकृतौपासनतयासमुच्छिन्नाग्नितयाभार्याविधुरतयावाग्निरहितस्तस्यद्विजपाणौजला- दौवाहोमइतिव्याचचक्षे **मदनपारिजातेप्येवम्** इदमेवसाग्निकानग्निकस्वरूपंसर्वत्रज्ञेयम् ।

ह्या प्रकरणांत पूर्वोक्त साग्निकशब्देंकरून श्रौताग्निमान् व स्मार्ताग्निमानही घ्यावा, ज्याचा अग्नि विच्छिन्न वगैरे असेल तो निरग्निक समजावा. तेंच **हेमाद्रि** अग्नौकरणप्रकरणीं सांगतो—"साग्निकानें सर्वदा अग्नौकरण अग्नींत करावें; अन- ग्निकानें ब्राह्मणाच्या हस्तावर किंवा उदकांत करावें; परंतु लौकिकाग्नीवर कदापि करूं नये" हें स्मृतिवाक्य घेऊन, गृह्या- ग्निस्वीकार केला नसल्यामुळें अथवा स्वीकार करून नष्ट झाल्यामुळें किंवा स्त्री नसल्यामुळें जो अग्निरहित त्यानें ब्राह्मणाच्या हस्तावर किंवा उदकादिकांत अग्नौकरण करावें, असा त्या वाक्याचा अर्थ सांगता झाला. **मदनपारिजात** ग्रंथांतही असेंच आहे. हेंच साग्निक व अनग्निक यांचें स्वरूप सर्वत्र ठिकाणीं समजावें.

**अथग्रहणंनिर्णीयते** तत्रचंद्रग्रहणेयस्मिन्यामेग्रहणंतस्मात्पूर्वंप्रहरत्रयंनभुंजीत सूर्यग्रहेतुप्रहरचतुष्ट- यंनभुंजीत सूर्यग्रहेतुनाश्नीयात्पूर्वंयामचतुष्टयं चंद्रग्रहेतुयामांस्त्रीन्बालवृद्धातुरैर्विनेति **माधवीयेवृद्धगौ- तमोक्तेः** [१]ग्रहणंतुभवेदिंदोःप्रथमादधियामतः भुंजीतावर्तनात्पूर्वंप्रथमेप्रथमादधइति**मार्कंडेयोक्तेश्च** अधि- ऊर्ध्वं ननुचंद्रग्रहेयामचतुष्टयनिषेधउचितोनतुसूर्यग्रहेसूर्योदयात्प्राक्भोजनाप्राप्तेः मैवं वचनस्यप्रथमयामे-

---

१ रात्रौ प्रथमयामादूर्ध्वं चंद्रग्रहणंचेत् आवर्तनान्मध्याह्नात्पूर्वं भुंजीत । रात्रौ प्रथमप्रहरे ग्रहणंचेत्प्रातः प्रथमप्रहरे भुंजीत. अहस्तृतीयप्रहरेचेद्रविग्रहस्तदा पूर्वदिनस्यार्धरात्रात्प्राग्भुंजीत । अहश्चतुर्थप्रहरेरविग्रहणंचेद्रात्रेश्चतुर्थप्रहरादधोभुंजीतेत्यर्थः ॥

**सूर्यग्रहेसतिपूर्वेद्युःपूर्वरात्रेभोजननिषेधपरत्वात् चंद्रग्रहेविशेषमाहमाधवीयेवृद्धवसिष्ठः** ग्रस्तोदयेविधोः-पूर्वनाहर्भोजनमाचरेदिति ।

## यानंतर ग्रहणाचा निर्णय सांगतो.

चंद्रग्रहण असेल तर ज्या प्रहरीं ग्रहण लागतें त्या प्रहरापासून पूर्वी तीन प्रहर भोजन करूं नये. सूर्यग्रहण असेल तर ज्या प्रहरीं ग्रहण, त्यापासून पूर्वी चार प्रहर भोजन करूं नये; कारण, "सूर्यग्रहणीं पूर्वी चार प्रहर भोजन करूं नये, व चंद्रग्रहणीं पूर्वी तीन प्रहर भोजन करूं नये, व हा निषेध बाल, वृद्ध, रोगी एतद्व्यतिरिक्त जाणावा" असें **माधवीयांत वृद्धगौतम**वचन आहे. "रात्रीं पहिल्या प्रहरानंतर चंद्रग्रहण असेल तर मध्याह्नाच्या पूर्वी भोजन करावें, आणि रात्रीच्या प्रथम प्रहरीं चंद्रग्रहण असतां दिवसाच्या प्रथम प्रहराच्या आंत भोजन करावें" असें **मार्कंडेय**वचनही आहे. **शंका**—चार प्रहरपर्यंत भोजनाचा जो निषेध तो चंद्रग्रहणीं योग्य आहे, सूर्यग्रहणीं चार प्रहर भोजननिषेध योग्य नाहीं, कारण, सूर्योदयाचे पूर्वी भोजनाची प्राप्ति नाहीं. **समाधान**—दिवसाच्या प्रथम प्रहरीं सूर्यग्रहण असेल तर पूर्व दिवशीं पूर्व रात्रीं भोजनाचा निषेध करणारें तें वचन आहे. चंद्रग्रहणाविषयीं विशेष सांगतो—**माधवीयांत-वृद्धवसिष्ठ**-"ग्रहण लागून चंद्राचा उदय होईल तर चार प्रहर दिवसा भोजन करूं नये."

द्वयोर्ग्रस्तास्तेतु**माधवीयेव्यासः** अमुक्तयोरस्तगयोरद्याद्दृष्ट्वापरेहनीति **विष्णुधर्मेपि** अहोरात्रंनभोक्तव्यंचंद्रसूर्यग्रहोयदा मुक्तिंदृष्ट्वातुभोक्तव्यंस्नानंकृत्वाततःपरं अहोरात्रनिषेधःसूर्यग्रस्तास्ते **मदनरत्नेगार्ग्यः** संध्याकालेयदाराहुर्ग्रसतेशशिभास्करौ तदहर्नैवभुंजीतरात्रावपिकदाचन सायंसंध्यायांसूर्यग्रस्तास्ते पूर्वेह्नि-रात्रौचनभोक्तव्यं प्रातःसंध्यायांचंद्रस्यग्रस्तास्तेपूर्वरात्रावुत्तरेह्निचनभोक्तव्यमित्यर्थः चंद्रग्रस्तास्तेउत्तरदिने-संध्याहोमादौनदोषः तदा**होशनाः** ग्रस्तेचास्तंगतेत्विंदौज्ञात्वामुक्त्यवधारणं स्नानहोमादिकंकार्यंभुंजीतेंदू-दयेपुनः एतदनाहिताग्निविषयं अपराह्णेव्रतोपायनीयमश्नीतेति**कात्यायनोक्ते**र्व्रतस्यश्रौतत्वेनविहितत्वेनच-प्रबलत्वात् अद्भिर्व्रतंकुर्यादिति**निर्णयदीपः** रागप्राप्तभोजनेकालनियमोयं तेनज्वरादाविवनभोजनमिति **कर्कानुसारिणः** ।

चंद्र व सूर्य यांचें ग्रस्तास्त होईल तर **माधवीयांत-व्यास**-सांगतो-"ग्रहणाचा मोक्ष झाल्यावांचून चंद्र व सूर्य अस्त पावतील तर दुसऱ्या दिवशीं शुद्ध बिंब पाहून भोजन करावें." **विष्णुधर्मांत**ही—चंद्रसूर्यग्रहण असतां अहोरात्र भोजन करूं नये, तर मोक्ष झालेला पाहून नंतर स्नान करून भोजन करावें." अहोरात्रीं भोजनाचा निषेध सूर्याचें ग्रस्तास्त असतां समजावा. **मदनरत्नांत—गार्ग्य**-"ज्या दिवशीं संध्याकालीं सूर्याला किंवा चंद्राला राहु ग्राशील त्या दिवशीं व त्या रात्रींही कदापि भोजन करूं नये." या वचनाचा अर्थ—सायंसंध्याकालीं सूर्याचें ग्रस्तास्त झालें असतां त्या दिवशीं व त्या रात्रीं भोजन करूं नये; प्रातःसंध्याकालीं चंद्राचें ग्रस्तास्त झालें असतां पूर्व रात्रीं व उत्तर दिवशीं भोजन करूं नये, असा समजावा. चंद्राचें ग्रस्तास्त झालें असतां दुसऱ्या दिवशीं संध्यावंदन, होम इत्यादि कर्माविषयीं दोष नाहीं. **तेंच उशना सांगतो**—"चंद्रग्रस्त असून अस्तंगत होईल तर मुक्तिनिश्चय शास्त्रावरून जाणून स्नानहोमादिक करावें, आणि भोजन उदयोत्तर करावें." हें वचन अनाहिताग्निविषयक होय. कारण, "व्रती यांनीं अपराह्णकालीं व्रतोपायनीय (व्रतविहित पदार्थ) भक्षण करावें" असें **कात्यायन**वचन आहे, यास्तव व्रत हें श्रौतकर्म व विहित असल्यामुळें प्रबल आहे. उदक प्राशन करून व्रत करावें, असें **निर्णयदीप** सांगतो. रागप्राप्त भोजनाविषयीं हा कालनियम सांगितला, यावरून ज्वरादिक अवस्थेंत जसा भोजननिषेध तद्वत् हा निषेध असें **कर्कानुसारी** म्हणतात.

बालवृद्धातुराणांतुग्रहणयामात्पूर्वमेकयामोनिषिद्धः सायाह्नेग्रहणंचेत्स्यादपराह्णेनभोजनं अपराह्णेनमध्याह्नेमध्याह्नेनतुसंगवे भुंजीतसंगवेचेत्स्यान्नपूर्वभोजनक्रियेति**मार्कंडेयोक्तेः** इदंचबालादिविषयं बालवृद्धातुरै-र्विनेतिपूर्वोक्तेः ।

बाल, वृद्ध व आतुर यांविषयीं तर, ज्या प्रहरीं ग्रहण असेल त्या प्रहरापूर्वी एक प्रहर निषिद्ध आहे; कारण, "सायंकालीं ग्रहण असेल तर अपराह्णकालीं भोजन करूं नये; अपराह्णकालीं ग्रहण असेल तर मध्याह्नीं भोजन करूं नये; मध्याह्नीं ग्रहण

१ संवत्सरप्रदीपेतु स्नानपाकादिकंकार्यमितिपाठः तेन ज्ञास्त्रावगतमुक्त्युत्तरमुदयात्पूर्वमपि पाकादि कार्यं भोजनंतूदयोत्तरमित्युक्तं । शिष्टास्तु उदयोत्तरमेव सर्वं कुर्वंति ॥

असेल तर संगवकालीं भोजन करूं नये; संगवकालीं ग्रहण असेल तर तत्पूर्वी भोजन करूं नये" असें **मार्कंडेयवचन आहे;** हें वचन बालादिविषयक जाणावें; कारण, "बाल, वृद्ध व आतुर यांवांचून तीन चार प्रहर निषेध असें पूर्वी सांगितलें आहे.

वेधकालेग्रहणेवापक्वमन्नंत्याज्यं सर्वेषामेववर्णानांसूतकंराहुदर्शने स्नात्वाकर्माणिकुर्वीतशृतमन्नंविवर्जये-दिति **हेमाद्रौषट्त्रिंशन्मतात्** श्रुतमितितदंतरितस्योपलक्षणं नवश्राद्धेषुयच्छिष्टंग्रहपर्युषितंचयदिति-**मिताक्षरायां**वचनात् **भार्गवार्चनदीपिकायांज्योतिर्निबंधेमेधातिथिः** आरनालंपयस्तक्रंद-धिस्नेहाज्यपाचितं मणिकस्थोदकंचैवनदुष्येद्राहुसूतके **मन्वर्थमुक्तावल्याम्** अन्नंपक्वमिहत्याज्यंस्नानंसव-सनंग्रहे वारितक्रारनालादितिलदर्भैर्नदुष्यति जलेत्वदोषोगांगविषयः ग्रहोषितंजलंपीत्वापादकृच्छ्रंसमाचरे-दितितत्रैव**चतुर्विंशतिमते**ऽन्यजलस्यदोषोक्तेः ।

वेधकालीं किंवा ग्रहणकालीं शिजवलेलें अन्न टाकावें. पूर्वी शिजवलेल्या अन्नावरून ग्रहण गेलें असतां तें टाकावें: कारण, "सर्व वर्णांना ग्रहणाचें सूतक आहे. यास्तव स्नान करून संध्या-देवपूजादिक कर्म करावीं आणि शिजलेलें अन्न टाकावें" असें **हेमाद्रींत षट्त्रिंशन्मत**वचन आहे. 'शिजवलेलें अन्न टाकावें' असें जें वचनांत आहे तें ग्रहणांतरिताचें उपलक्षण होय, म्हणजे शिजवलेल्या अन्नावरून ग्रहण गेलें असतां तेंही अन्न टाकावें असा अर्थ. कारण, "नवश्राद्धाचें अवशिष्ट, आणि ज्यावरून ग्रहण गेलें तें अन्न टाकावें" असें **मिताक्षरेंत** वचन आहे. **भार्गवार्चनदीपिकेंत-ज्योतिर्निबंधांत-मेधातिथि**-"आरनाल ( कांजिक ), दूध, ताक, दहीं, तेल व तूप यांत तळलेले वटकादिक, माठां-तलें उदक, यांवरून जरी ग्रहण गेलें तरी तें दुष्ट होत नाहींत." **मन्वर्थमुक्तावलींत**—"ग्रहणांत शिजवलेलें अन्न टाकावें; सचैल स्नान करावें: उदक, तक्र, कांजिक, यांवर तिल दर्भ टाकून ठेवावे म्हणजे ते घेण्यास दोष नाहीं." जलाविषयीं दोष नाहीं असें जें सांगितलें तें गंगाजलाविषयीं जाणावें: कारण, "आणलेल्या उदकावरून ग्रहण गेल्यावर तें प्राशन केलें असतां पादकृच्छ्र प्रायश्चित्त करावें" असा तेथेंच **चतुर्विंशतिमतांत** अन्यजलाविषयीं दोष सांगितला आहे.

वेधकालेग्रहणेवाभोजनेप्रायश्चित्तमुक्तम् **माधवीयेकात्यायनेन** चंद्रसूर्यग्रहेभुक्त्वाप्राजापत्येनशु-ध्यति तस्मिन्नेवदिनेभुक्त्वात्रिरात्रेणैवशुद्ध्यतीति ग्रहणेचत्रिरात्रमेकरात्रंवोपवासःश्रेयोर्थिनाकार्यः एकरात्र-मुपोष्यैवस्नात्वादत्वाचशक्तितः कंचुकादिवसर्पस्यनिर्मुक्तिःपापकोशतः त्रिरात्रंसमुपोष्यैवग्रहणेचंद्रसूर्ययोः स्नात्वादत्वाचविधिवन्मोदतेब्रह्मणासहेति**हेमाद्रौलैंगोक्तेः** इदंचपुत्र्यतिरिक्तविषयं आदित्येहनिसंक्रांतौ-ग्रहणेचंद्रसूर्ययोः पारणंचोपवासंचनकुर्यात्पुत्रवान्गृहीति**जैमिनि**वचनात् ।

**वेधकालीं किंवा ग्रहणांत भोजन केलें असतां प्रायश्चित्त सांगतो-माधवीयांत-कात्यायन**-"चंद्र-सूर्यांच्या ग्रहणकालीं भोजन केलें असतां प्राजापत्य कृच्छ्र ( बारा दिवस करावयाचें तें ) प्रायश्चित्त करावें म्हणजे शुद्ध होतो. वेधकालीं भोजन केलें असतां त्रिरात्र उपोषण करून शुद्ध होतो." कल्याणेच्छूनें ग्रहणाचे ठायीं त्रिरात्र किंवा एक-रात्र उपवास करावा: कारण, "एकरात्र उपोषण करून स्नान करून यथाशक्ति दान केलें असतां, सर्प जसा आपली मेंग टाकून देदीप्यमान होतो तद्वत् पापापासून मुक्त होतो. चंद्रसूर्याच्या ग्रहणाचे ठायीं त्रिरात्र उपोषण करून स्नान करून यथाशक्ति दान दिलें असतां ब्रह्मदेवासह आनंद पावतो" असें **हेमाद्रींत लिंगपुराण**वचन आहे. हें वचन, पुत्रवंताहून इतरविषयक जाणावें; कारण, "रविवार, संक्रांति व चंद्रसूर्यग्रहण यांचे ठायीं पुत्रवान् गृहस्थानें पारणा व उपवास करूं नये" असें **जैमिनि**वचन आहे.

यदातुरवेर्ग्रस्तास्तस्तदापुत्रिणःप्रहरद्वयंहित्वाबालादिवद्भोजनंनतूपवासः सायाह्नेग्रहणंचेत्स्यादितिपूर्वोक्त-**मार्कंडेय**वचनात् सायाह्नेसंगवेश्नीयाच्छारदेसंगवादधः मध्याह्नेपरतोश्नीयान्नोपवासोरविग्रहइतिस्मृतेश्चे-ति**हेमाद्रिः** शारदोऽपराह्णः **माधवमते**तु पुत्रिणोपितत्रोपवासएव अहोरात्रंनभोक्तव्यमितिपूर्वोक्तनिषे-धस्यतेनापिपालनीयत्वात् उपवासनिषेधस्तुव्रतरूपोपवासपरः कृष्णैकादशीनिषेधवदिति **मदनरत्नेप्येवम्** इदमेवचयुक्तम् ।

ज्या कालीं सूर्याचा ग्रस्तास्त असेल त्या कालीं पुत्रवंत गृहस्थाश्रम्यानें बालाप्रमाणें ग्रहणाच्या पूर्वी दोन प्रहर टाकून भोजन करावें, उपोषण करूं नये; कारण, "सायंकालीं ग्रहण असेल तर अपराह्णकालीं भोजन करूं नये" इत्यादिक पूर्वी **मार्कंडेय**वचन सांगितलें आहे. आणि "सायाह्नकालीं ग्रहण होईल तर संगवकालीं भोजन करावें, अपराह्णकालीं ग्रहण होईल तर संगवकालाच्या पूर्वी भोजन करावें, मध्याह्नीं ग्रहण होईल तर ग्रहणोत्तर भोजन करावें, सूर्यग्रहणीं उपवास करूं

नये" असें **स्मृतिवचनही** आहे असें **हेमाद्रि** सांगतो. **माधव**मतीं तर पुत्रवंतानेंही सूर्यग्रहणीं उपोषणच करावें; कारण, "चंद्रसूर्यग्रहणीं अहोरात्र भोजन करूं नये" हा जो भोजननिषेध सांगितला तो पुत्रवंतासही पाळणें अवश्य आहे. "पुत्रवंतानें उपवास करूं नये" असा जो निषेध तो कृष्णैकादशीनिषेधासारखा व्रतरूप उपवासविषयक आहे. **मदनरत्नांत**ही असेंच सांगितलें आहे. पुत्रवंतानेंही निषेधपालनरूप उपवास करावा हेंच योग्य होय.

**वर्धमानस्तु** अहोरात्रंनभोक्तव्यमिति**शातातपीयाग्रे** सूर्याचंद्रमसोर्लोकानक्षयानयातिमानवइतिफलश्रुतेर्मुक्त्यदर्शनेउपवासःकाम्यः नत्वयंनिषेधइत्याह तन्न अत्रव्रतत्वेपिप्रागुक्तविष्णुधर्मेनिषेधावश्यंभावात् तथा**व्यासः** रविग्रहःसूर्यवारेसोमेसोमग्रहस्तथा चूडामणिरितिख्यातस्तत्रदत्तमनंतकम् वारेष्वन्येपुयत्पुण्यंग्रहणेचंद्रसूर्ययोः तत्पुण्यंकोटिगुणितंयोगेचूडामणौस्मृतम् ।

**वर्धमान** तर "अहोरात्रांत भोजन करूं नये" ह्या **शातातप**वचनाच्या पुढें 'तो मनुष्य चंद्रसूर्याच्या अक्षय लोकांप्रत जातो' अशी फलश्रुति आहे, याकरितां ग्रहणमोक्ष न दिसल्यामुळें जो उपवास सांगितला तो कामनिक आहे. हा भोजननिषेध आहे असें नाहीं, असें सांगतो. तें वर्धमानाचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण, उपवास हा व्रतरूप जरी आहे, तथापि पूर्वोक्त **विष्णुधर्मस्थ**वचनांत भोजननिषेध सांगितला तो अवश्य आहे. **चूडामणियोग सांगतो-व्यास**- "रविवारीं सूर्यग्रहण व सोमवारीं चंद्रग्रहण असें असेल तर **चूडामणि** योग होतो. त्या योगावर दानादिक केलें असतां अनंतफल होतें. इतर वारीं चंद्रसूर्यग्रहण असतां जें पुण्य सांगितलें त्याच्या कोटिगुणित पुण्य चूडामणियोगावर प्राप्त होतें."

अत्रचाद्यंतयोःस्नानंकुर्यात् ग्रस्यमानेभवेत्स्नानंग्रस्तेहोमोविधीयते मुच्यमानेभवेद्दानंमुक्तेस्नानंविधीयतइति**हेमाद्रौ**वचनात् स्नानंस्यादुपरागादौमध्येहोमःसुरार्चनमिति**ब्रह्मवैवर्ताच्च** सर्वेषामेववर्णानांसूतकंराहुदर्शने सचैलंतुभवेत्स्नानंसूतकान्नंचवर्जयेदिति**वृद्धवसिष्ठोक्तेश्च** सचैलंमुक्तिस्नानपरमिति**मदनरत्ने** उक्तम् **भार्गवार्चनदीपिकायांचतुर्विंशतिमते** मुक्तौयस्तुनकुर्वीतस्नानंग्रहणसूतके ससूतकीभवेत्तावद्यावत्स्यादपरोग्रहः इदंचस्नानममंत्रकंकार्यमिति**स्मृतिरत्नावल्याम्** ।

ग्रहणाच्या स्पर्शकालीं व ग्रहण सुटल्यानंतर स्नान करावें; कारण, "ग्रहणाच्या स्पर्शकालीं स्नान, मध्यें होम, सुटण्यास आरंभ झाल्यावर दान, निःशेष सुटल्यावर स्नान करावें." असें **हेमाद्रींत** वचन आहे; व "ग्रहणाच्या आरंभीं स्नान, मध्यें होम व देवपूजा करावी" असें **ब्रह्मवैवर्त**वचनही आहे. "राहुदर्शन झालें असतां सर्व वर्णास अशौच आहे यास्तव सचैल स्नान करावें, आणि सूतकान्न वर्ज्य करावें" असें **वृद्धवसिष्ठाचें**ही वचन आहे. सचैल स्नान करावें असें जें सांगितलें तें मुक्तिस्नानाविषयीं होय, असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. **भार्गवार्चनदीपिकेंत-चतुर्विंशतिमतग्रंथांत** "ग्रहण सुटल्यानंतर जो मनुष्य मुक्तिस्नान करीत नाहीं तो दुसऱ्या ग्रहणापर्यंत सूतकी होतो असें जाणावें." हें ग्रहणसंबंधी स्नान अमंत्रक करावें, असें **स्मृतिरत्नावलींत** सांगितलें आहे.

तत्रतीर्थविशेषो**भारते** गंगास्नानंप्रकुर्वीतग्रहणेचंद्रसूर्ययोः महानदीषुवान्यासुस्नानंकुर्याद्यथाविधि महानदीष्वपिमासविशेषेकाश्चिच्छ्रेष्ठाः प्रयागंदेविकारेवासन्निहत्याचवारणम् सरस्वतीचंद्रभागाकौशिकीतापिका तथा सिंधुर्गंडकिकाचैवसरयूःकार्तिकादितः मूलं**हेमाद्रौ**स्पष्टम् ।

**ग्रहणस्नानाविषयीं विशेष तीर्थें सांगतो—भारतांत**—"चंद्रसूर्यग्रहणीं गंगास्नान करावें. किंवा इतर महानदीचे ठायीं यथाविधि स्नान करावें." महानद्यांपैकीं कोणत्या नदींत कोणत्या मासीं स्नान करावें तें सांगतो-"प्रयाग, देविका, रेवा, संनिहत्या, वारण, सरस्वती, चंद्रभागा, कौशिकी, तापिका, सिंधु, गंडकी, सरयू, ह्या महानदी क्रमेंकरून कार्तिकादिक मासक्रमानें होत. त्या ग्रहणाचे ठायीं स्नानाविषयीं प्रशस्त जाणाव्या." याविषयींचीं मूलवचनें **हेमाद्रींत** स्पष्ट सांगितलीं आहेत.

**व्यासः** इंदोर्लक्षगुणंपुण्यंरवेर्दशगुणंततः गंगातोयेतुसंप्राप्तइंदोःकोटीरवेर्दश गवांकोटिसहस्रस्ययत्फलंलभतेनरः तत्फलंलभतेमर्त्योग्रहणेचंद्रसूर्ययोः असंभवेतु**माधवीयेशंखः** वापीकूपतडागेषुगिरिप्रस्रवणेषुच नद्यांनदेदेवखातेसरसीषूद्धृतांबुनि उष्णोदकेनवास्नायाद्ग्रहणेचंद्रसूर्ययोः अत्रतारतम्यमाह**मार्कंडेयः**

---

१ हेमाद्रौयथा—कार्तिकेग्रहणंश्रेष्ठंगंगायमुनसंगमे । मार्गेतुग्रहणंप्रोक्तदेविकायांमहामुने ॥ पौषेतुनर्मदापुण्या माघेसन्निहिता शुभा । फाल्गुनेवारणापुण्याचैत्रेपुण्यासरस्वती ॥ वैशाखेतुमहापुण्याचंद्रभागासरिद्वरा । ज्येष्ठेतुकौशिकीपुण्याआषाढेतापिकानदी ॥ श्रावणेसिंधुनामातुभाद्रेतुगंडकी । आश्विनेसरयूःश्रेष्ठातथापुण्यातु[illegible] ॥

शीतमुष्णोदकात्पुण्यमपारक्यंपरोदकात् भूमिष्ठमुद्धृतात्पुण्यंततःप्रस्रवणोदकम् ततोपिसारसंपुण्यंततःपुण्यं-नदीजलम् तीर्थतोयंततःपुण्यंमहानद्यंबुपावनम् ततस्ततोपिगंगांबुपुण्यंपुण्यस्ततोंबुधिरिति उष्णोदकमातुर-विषयम् तथा गोदावरीमहापुण्याचंद्रेराहुसमन्विते सूर्येचराहुणाग्रस्तेतमोभूतेमहामुने नर्मदातोयसंस्पर्शेकृत-कृत्याभवंतिहि ।

व्यास—"चंद्रग्रहणीं स्नान केलें असतां लक्षगुणित पुण्य, सूर्यग्रहणीं त्याच्या दशगुणित पुण्य, गंगोदक प्राप्त असतां चंद्रग्रहणीं कोटिगुणित, सूर्यग्रहणीं दशकोटिगुणित पुण्य प्राप्त होतें. सहस्रकोटिसंख्याक गोदानें करून जें फल पुरुष पावतो तें फल भागीरथीच्या उदकांत चंद्रसूर्यग्रहणीं स्नान केलें असतां पावतो," गंगेचा असंभव असतां सांगतो—माधवीयांत—शंख—"चंद्रसूर्यग्रहणीं वापी, कूप, तडाग, गिरिप्रस्रवण ( झऱ्याचें उदक ), नदी, नद, देवखात, सरोवर, काढून आणलेलें उदक, यांतून कशानेंही स्नान करावें, अथवा उष्णोदकेंकरून स्नान करावें." याविषयीं तर-तमभाव सांगतो-मार्कंडेय-"उष्णोदकाहून शीतोदक श्रेष्ठ, परकीय उदकाहून स्वकीय उदक श्रेष्ठ, बाहेर काढलेल्या-हून भूमींतील श्रेष्ठ, त्याहून प्रस्रवणोदक श्रेष्ठ, त्याहून सरोवरांतील उदक पुण्यकारक, त्याहून नदीचें उदक पुण्यकारक, त्याहून तीर्थोदक पुण्यकारक, त्याहून महानदीचें उदक पवित्र, त्याहून गंगोदक पवित्र, त्याहून समुद्रोदक पवित्र." उष्णो-दकस्नान रोग्याविषयीं जाणावें. "चंद्रग्रहणीं गोदावरी महापुण्यकारक होय. सूर्य राहूनें ग्रासून तमोमय झाला असतां नर्मदोदकाच्या स्पर्शानें कृतकृत्य होतात."

पृथ्वीचंद्रोदयेप्रभासखंडे गावोनागास्तिलाधान्यंरत्नानिकनकंमही संप्रदायकुरुक्षेत्रेयत्फलंलभते नरः तदिंदुग्रहणेंभोधौस्नानाद्भवतिपड्गुणम् तत्रैवसौरपुराणेंबुधिस्नानमुपक्रम्य दानानियानिलोकेपुवि-ख्यातानिमनीषिभिः तेषांफलमवाप्नोतिग्रहणेचंद्रसूर्ययोः देवीपुराणे गंगाकनखलंपुण्यंप्रयागःपुष्करंतथा कुरुक्षेत्रंमहापुण्यंराहुग्रस्तेदिवाकरे स्नानासंभवेस्मरणंवाकार्यं स्मृत्वाशतक्रतुफलंदृष्ट्वासर्वाघनाशनं स्पृष्ट्वागोमे-धपुण्यंतुपीत्वासौत्रामणेर्लभेत् स्नात्वावाजिमखंपुण्यंप्राप्नुयादविचारतः रविचंद्रोपरागेचअयनेचोत्तरेतथेति मार्कंडेयोक्तेः ।

पृथ्वीचंद्रोदयांत—प्रभासखंडांत-"कुरुक्षेत्रीं गाई, हत्ती, तिल, धान्य, रत्नें, सुवर्ण, भूमि, यांचीं दानें करून जें फल मनुष्य पावतो त्याच्या सहापट फल, चंद्रग्रहणीं समुद्रस्नान केलें असतां पावतो." पृथ्वीचंद्रोदयांतच सौरपुराणीं समुद्रस्नानाचा उपक्रम करून सांगतो-"लोकांत ऋषींनीं जीं प्रख्यात दानें सांगितलीं, त्या सर्व दानांचें फल चंद्रसूर्यग्रहणीं समुद्रस्नान केलें असतां प्राप्त होतें." देवीपुराणांत—"सूर्यग्रहणीं गंगा, कनखल तीर्थ, प्रयाग, पुष्कर, कुरुक्षेत्र, हीं महापुण्यकारक होत." यांच्या स्नानाचा असंभव असतां त्याचें स्मरण करावें; कारण, "चंद्रसूर्यग्रहणीं व उत्तरायण संक्रां-तीचे ठायीं यांचें स्मरण केल्यानें शतक्रतुफल, दर्शन केल्यानें सर्व पातकांचा नाश, स्पर्श केल्यानें गोमेधयज्ञाचें पुण्य, उदकपान केल्यानें सौत्रामणि यज्ञाचें फल, स्नान केल्यानें अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होतें" असें मार्कंडेयवचन आहे.

अत्रश्राद्धमाहऋष्यशृंगः चंद्रसूर्यग्रहेयस्तुश्राद्धंविधिवदाचरेत् तेनैवसकलापृथ्वीदत्ताविप्रस्यवैकरे भारते सर्वस्वेनापिकर्तव्यंश्राद्धंवैराहुदर्शने अकुर्वाणस्तुनास्तिक्योत्पंकेगौरिवसीदति विष्णुः राहुदर्शन-दत्तंहिश्राद्धमाचंद्रतारकम् ।

ग्रहणाचे ठायीं श्राद्ध करण्याविषयीं सांगतो—ऋष्यशृंग—"जो चंद्रसूर्यग्रहणीं यथाविधि श्राद्ध करितो त्याला सर्व पृथ्वीचें दान ब्राह्मणाचे हातावर केल्यासारखें फल होतें." भारतांत—"ग्रहणकालीं अवश्य श्राद्ध करावें, नास्तिकपणानें न करणारा, जशी चिखलांत गाय रुतल्यानें कष्ट पावते, तसा तो कष्ट पावतो." विष्णु—"ग्रहणांत केलेलें श्राद्ध चंद्रतारका आहेत तोंपर्यंत राहातें.

इदंचामान्नेनहेम्नावाकार्यंनत्वन्नेन आपद्यनग्नौतीर्थेचचंद्रसूर्यग्रहेतथा आमश्राद्धंप्रकुर्वीतहेमश्राद्धमथापिवेति शातातपोक्तेरितिहेमाद्रिमाधवादयः ।

हें ग्रहणसंबंधी श्राद्ध आमान्नानें किंवा हिरण्यानें करावें, अन्नानें करूं नये; कारण, "आपत्कालीं, अग्नि नसतां ( भार्या नसतां ) तीर्थाचे ठायीं, तसेंच चंद्रसूर्यग्रहणांत आमान्नानें किंवा हिरण्यानें श्राद्ध करावें." असें शातातपवचन आहे, असें हेमाद्रि-माधवादिक सांगतात.

---

१ सर्वस्वेनापीति । यदिसंक्षेपेणापिसामग्रीसंपादनेसर्वस्वव्ययोभवतितदपीत्यर्थः । २ अकरणेप्रत्यवायमाह पंकेइत्यादि ।

**अपरार्कस्तु** एतद्द्विजातीनांपाकाभावेद्रष्टव्यंतीर्थश्राद्धवत् पाकाभावेद्विजातीनामामश्राद्धंविधीयतेइति **सुमंतूक्तेः** सैंहिकेयोयदासूर्यंग्रसतेपर्वसंधिषु गजच्छायातुसाप्रोक्तातस्यांश्राद्धंप्रकल्पयेत् घृतेनभोजयेद्विप्रान्घृतंभूमौसमुत्सृजेदिति**वायवीयोक्ते**श्चेत्याह **विज्ञानेश्वरो**प्याह ग्रहणश्राद्धेभोक्तुर्दोषोदातुस्त्वभ्युदयइति सूतकेमृतकेभुंक्तेगृहीतेशशिभास्करे छायायांहस्तिनश्चैवनभूयःपुरुषोभवेदि**त्यापस्तंबेन**भोजननिषेधाच्च अयंचनिषेधःश्राद्धभोक्तुर्हस्तिच्छायासाहचर्यात् अत्रग्रहणनिमित्तकश्राद्धेनैवामासंक्रांत्यादिनैमित्तिकानांसिद्धिः दर्शिकालभ्ययोरपीति**कालादर्शोक्तेः** ।

**अपरार्क** तर-हें **शातातप**वचन, द्विजांना पाकश्राद्धाच्या अभावीं समजावें, जसें पाकाच्या अभावीं तीर्थश्राद्ध आमादिकानें करावें तद्वत्; कारण, "पाकाच्या अभावीं द्विजातींना आमश्राद्ध विहित आहे." असें **सुमंतु**वचन आहे; आणि "ज्या पर्वकालीं राहु सूर्याला ग्रस्त करितो ती गजच्छाया पर्वणी होय, त्या पर्वणीचे ठायीं श्राद्ध करावें, ब्राह्मणांस घृतयुक्त भोजन द्यावें, भूमीवर घृत पाडवावें" असें **वायुपुराणांत**ही वचन आहे, असें सांगतो. **विज्ञानेश्वर**ही सांगतो— ग्रहणश्राद्धीं भोजन करणाऱ्या ब्राह्मणांस दोष, व श्राद्धकर्त्यास पुण्य होतें. आणि "जननाशौच, मृताशौच, चंद्रसूर्यग्रहण, गजच्छाया, यांचे ठायीं भोजन करणारा पुनः पुरुष होत नाहीं" असा **आपस्तंबानें**ही भोजननिषेध केला आहे. हा निषेध श्राद्धभोक्त्यास आहे; कारण, वचनांत गजच्छाया बरोबर सांगितली आहे. येथें ग्रहणनिमित्तक श्राद्ध केल्यानेंच दर्श, संक्रांति इत्यादिक नैमित्तिक श्राद्धांची सिद्धि होते; कारण, "दर्शश्राद्ध व अलभ्ययोगप्रयुक्त श्राद्ध हीं दोन एकदिवशीं प्राप्त असतां अलभ्ययोगप्रयुक्त श्राद्ध केल्यानें दर्शश्राद्धाची सिद्धि होते" असें **कालादर्शांत** वचन आहे.

अत्राशौचमध्येपिस्नानश्राद्धादिकार्यमेव सूतकेमृतकेचैवनदोषोराहुदर्शने तावदेवभवेच्छुद्धिर्यावन्मुक्तिर्नदृश्यतइति**माधवीयेवृद्धवसिष्ठोक्तेः** स्मार्तकर्मपरित्यागोराहोरन्यत्रसूतकइति**व्याघ्रपादोक्तेश्च** **कालादर्शेअंगिराः** सर्ववर्णाःसूतकेपिमृतकेराहुदर्शने स्नात्वाश्राद्धंप्रकुर्वीरन्दानंशाठ्यविवर्जितम् **मदनपारिजाते**प्येवम् तेन स्नानमात्रंप्रकुर्वीतदानश्राद्धविवर्जितमितिनिर्मूलंवदंतो**गौडाः**परास्ताः इयंचशुद्धिरविशेषात्मंत्रदीक्षापुरश्चरणादिसर्वस्मार्तकर्मविषया **मदनरत्ने**प्येवम् ।

येथें ( ग्रहणांत ) आशौचामध्येंही स्नान, श्राद्ध इत्यादि करावें; कारण, "ग्रहणांत जरी मृताशौच किंवा जननाशौच असलें तथापि दोष नाहीं. मुक्तिपर्यंत शुद्धता आहे" असें **माधवीयांत वृद्धवसिष्ठ**वचन आहे; आणि सूतकांत स्मार्तकर्मांचा जो निषेध आहे तो ग्रहण नसेल त्या वेळीं समजावा." असें **व्याघ्रपाद**वचनही आहे. **कालादर्शांत अंगिरा**—"मृताशौच, जननाशौच असतांही सर्व वर्णांनीं ग्रहणांत स्नान करून श्राद्ध करावें, व कार्पण्य सोडून दान करावें." **मदनपारिजातांत**ही असेंच सांगितलें आहे. यावरून, "आशौचांत ग्रहणसमयीं स्नान मात्र करावें, दान व श्राद्ध करूं नये" हें वचन निर्मूल असल्यामुळें स्नानही करूं नये असें म्हणणारे गौड खंडित झाले. ही शुद्धि सामान्यतः सांगितली असल्यामुळें मंत्रदीक्षा, पुरश्चरण इत्यादि सर्व स्मार्तकर्मांविषयीं जाणावी. **मदनरत्नांत**ही असेंच आहे.

रजस्वलायास्तु**भार्गवार्चनदीपिकायाम् सूर्योदयनिबंधे** नसूतकादिदोषोस्तिग्रहेहोमजपादिषु ग्रस्तेस्नायादुदक्यापितीर्थोद्धृतवारिणेति अत्रच स्नानेनैमित्तिकेप्राप्तेनारीयदिरजस्वला पात्रांतरिततोयेन स्नानंकृत्वाव्रतंचरेदित्यादि**र्मिताक्षरोक्तो**विधिर्ज्ञेयः ।

**रजस्वलास्त्रीविषयीं तर भार्गवार्चनदीपिकेंत सूर्योदयनिबंधांत**—"ग्रहणांत होम, जप, इत्यादि करण्याविषयीं सूतकादि दोष नाहीं; रजस्वलास्त्रियेनेंही ग्रहण लागल्यानंतर तीर्थांतून पात्रांत उदक घेऊन स्नान करावें." ह्या स्थलीं "स्त्री रजस्वला असून नैमित्तिक स्नान प्राप्त होईल तर भांड्यांत उदक घेऊन स्नान करून व्रत करावें" इत्यादिक, **मिताक्षरेंत** सांगितलेला विधि जाणावा.

तथाग्रहणेरात्रावपिश्राद्धादिकार्यम् ग्रहणोद्वाहसंक्रांतियात्रार्तिप्रसवेषुच दानंनैमित्तिकंज्ञेयंरात्रावपितदिष्यतइत्य**परार्केव्यासोक्तेः** चंद्रग्रहेतथारात्रौस्नानंदानंप्रशस्यतइति**देवलोक्तेश्च** यदातुज्योतिःशास्त्र-

१ अपरार्कस्त्वित्ति तुनाऽरुचिः । साचामहेमश्राद्धविधानात् । पाकाभावेइत्यस्य यत्रपाकासंभवस्तत्रामश्राद्धमितिनार्थः किंतु यत्रपाकोविहितोपिकेनचिद्धेतुनानसंभवति तत्रश्राद्धंनत्याज्यं किंतु आमश्राद्धंकार्यमित्यर्थः । ग्रहणेतुपाकोनविहित इतिनपाकश्राद्धप्राप्तिः ।
२ घृतेनेति । घृतस्यप्राचुर्यबोध्यं तेननपाकोत्पत्तिः । आमश्राद्धेबहुघृतस्य हेमश्राद्धेचतद्द्रव्यस्य दानार्थं । घृतमितितु आमहेमश्राद्धयोः प्रचुरद्रव्यघृतद्रव्यकपिंडदानार्थं तथाचान्ननिवेदनवाक्ये इदमन्नमित्यत्र पिंडदानवाक्ये चायंपिंडइत्यत्र इदंघृतमितिप्रयोगइत्यर्थंइतिकेचित् ।

गम्योदिनेचंद्रग्रहोरात्रौचसूर्यग्रहस्तदास्नानादिनकार्यं सूर्यग्रहोयदारात्रौदिवाचंद्रग्रहस्तथा तत्रस्नानंनकुर्वीतद्द्याद्दानंनचक्कचिदिति **षट्त्रिंशन्मतात्** ।

तसेंच ग्रहणांत रात्रींही श्राद्धादिक करावें; कारण, "ग्रहण, विवाह, संक्रांति, यात्रा, आर्ति ( संकटप्रसंग ), व पुत्रजनन यांतून कोणतेंही निमित्त प्राप्त असतां तन्निमित्तक दान रात्रींही करावें" असें **अपरार्कांत व्यासवचन आहे**; आणि "चंद्रग्रहणांत रात्रींही स्नान व दान प्रशस्त होय" असें **देवलवचनही आहे**. जेव्हां दिवसा चंद्रग्रहण आहे व रात्रौ सूर्यग्रहण आहे, हें केवळ ज्योतिःशास्त्रावरून मात्र समजतें तेव्हां स्नानादिक करूं नये; कारण, "जेव्हां रात्रीं सूर्यग्रहण व दिवसा चंद्रग्रहण असेल तेव्हां तन्निमित्तक स्नान व दान हें कधींही करूं नये" असें **षट्त्रिंशन्मतवचन** आहे.

ग्रहणदिनेवार्षिकश्राद्धप्राप्तौतु**प्रयोगपारिजातेगोभिलः** दर्शेरविग्रहेपित्रोःप्रत्याब्दिकमुपस्थितम् अन्नेनासंभवेहेम्नाकुर्यादामेनवासुतइति अत्रदर्शरविपितृसुतशब्दाःप्रदर्शनार्थाः न्यायसाम्यात् तेनचंद्रग्रहेपि सपिंडादिवार्षिकमन्नादिनातद्दिनएवकार्यमिति**मदनपारिजाते**व्याख्यातम् **पृथ्वीचंद्रोदये**प्येवम् तेन यानि आमश्राद्धंप्रकुर्वीतमासंवत्सरादृतइति अन्नेनैवाब्दिकंकुर्याद्धेम्नावामेननक्कचिदिति**मरीचिलौगाक्ष्यादि**वचनानि तानिग्रहणदिनातिरिक्तविषयाणि **निर्णयामृते**प्येवम् ।

ग्रहणदिवशीं वार्षिक श्राद्ध प्राप्त असेल तर **प्रयोगपारिजातांत गोभिल**–"अमावास्येस सूर्यग्रहण असून त्या दिवशीं मातापितरांचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध प्राप्त होईल तर पुत्रानें तें श्राद्ध अन्नानें करावें; अन्नाच्या असंभवीं आमान्नानें किंवा हिरण्यानें करावें." त्या वाक्यांत अमावास्या, सूर्यग्रहण, मातापितर, पुत्र हे जे शब्द आहेत ते प्रदर्शनार्थ आहेत; कारण, इतर श्राद्धाविषयींही तोच न्याय आहे. म्हणून पौर्णिमेस चंद्रग्रहण असतांही सपिंडादिकांचें वार्षिक श्राद्ध प्राप्त असतां तें अन्नादिकानें त्याच दिवशीं करावें, असें **मदनपारिजातांत** त्या वचनाचें व्याख्यान केलें आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत**ही असेंच आहे. यावरून जीं "मासिक, सांवत्सरिक यांवांचून इतर श्राद्धें आमान्नानें करावीं" "सांवत्सरिक श्राद्ध पक्कान्नानेंच करावें, हिरण्यानें किंवा आमान्नानें कदापि करूं नये" अशीं **मरीचि, लौगाक्षि** इत्यादिकांचीं वचनें तीं ग्रहणदिवसातिरिक्तविषयक होत. **निर्णयामृतांत**ही असेंच आहे.

यानितु ग्रहणात्तुद्वितीयेऽह्निरजोदोषात्तुपंचमे तथा ग्रस्तोदयेयदाचंद्रेप्रत्यब्दंसमुपस्थितं तद्दिनेचोपवासः स्यात्प्रत्यब्दंतुपरेहनि तथा ग्रस्तावेवास्तमानंतुरवींदूप्राप्नुतोयदि प्रत्यब्दंतुतदाकार्यंपरेहन्येवसर्वदा चंद्रसूर्योपरागेचतथाश्राद्धंपरेहनीत्यादीनिवचनानितानि महानिबंधेपुकाप्यनुपलंभान्निर्मूलानि प्रत्युतपूर्वोक्तनिबंधेषुतद्दिनएवश्राद्धमुक्तमित्यलम् ।

आतां जी "ग्रहण असतां दुसऱ्या दिवशीं, स्त्री रजस्वला असतां पांचव्या दिवशीं श्राद्ध करावें" तसेंच–"चंद्र ग्रस्त असून उदय होईल आणि त्या दिवशीं प्रतिसांवत्सरिक श्राद्ध प्राप्त असेल तर त्या दिवशीं उपवास करून दुसऱ्या दिवशीं सांवत्सरिक श्राद्ध करावें." तसेंच "जेव्हां सूर्य व चंद्र हे ग्रस्त असून अस्तंगत होतील त्या दिवशीं प्राप्त झालेलें सांवत्सरिक श्राद्ध सर्वदा दुसऱ्या दिवशीं करावें," "चंद्रसूर्यांला ग्रहण असतां श्राद्ध दुसऱ्या दिवशीं करावें" इत्यादिक वचनें, तीं मोठ्या निबंधग्रंथांत कोठें मिळत नसल्यामुळें तीं निर्मूल होत. याच्या उलट पूर्वोक्त ( मदनपारिजात, पृथ्वीचंद्रोदय, निर्णयामृत इत्यादि ) निबंधांत ग्रहणदिवशींच श्राद्ध करावें असें सांगितलें आहे. इतका निर्णय पुरे आहे.

ग्रहणादिसप्तदिनपर्यंतरामगोपालाद्यागमदीक्षोक्ता**शिवार्चनचंद्रिकायांज्ञानार्णवे** मंत्राद्यारंभणं कुर्याद्ग्रहणेचंद्रसूर्ययोः ग्रहणाद्वापिदेवेशिकालःसप्तदिनावधीति **रत्नसागरे** सत्तीर्थेऽर्कविधुग्रासेतंतुदामनपर्वणि मंत्रदीक्षांप्रकुर्वाणोमासर्क्षादीन्नशोधयेत् अत्रसूर्यग्रहणमेवमुख्यम् सूर्यग्रहणकालेतुनान्यदन्वेषितंभवेत् सूर्यग्रहणकालेनसमोनान्यःकदाचन नमासतिथिवारादिशोधनंसूर्यपर्वणीतितत्रैव**कालोत्तर**वचनात् चंद्रग्रहेतुयादीक्षायादीक्षाव्रतचारिणाम् वनस्थस्यचयादीक्षादारिद्र्यंसप्तजन्मस्वितितत्रैव**योगिनीतंत्रे**निषेधाच्च ।

**मंत्रदीक्षा**—ग्रहणदिवसापासून सात दिवसपर्यंत राम, गोपाल इत्यादिकांचे आगममंत्राची दीक्षा सांगतो–**शिवार्चनचंद्रिकेंत–ज्ञानार्णवांत**–"हे देवेशि! चंद्रसूर्यांचे ग्रहणकालीं मंत्रादि आरंभ करावा, अथवा ग्रहणदिवसापासून सात दिवसपर्यंत आरंभाचा काल समजावा." **रत्नसागरांत**—"उत्तमतीर्थ, चंद्रसूर्यग्रहण, तंतुदामनपर्व, यांचे ठायीं मंत्राची

१ चंद्रसूर्यग्रहेतीर्थेमहापर्वादिकेतथा इति पाठान्तरम् ।

दीक्षा ( उपदेश ) घेणें असतां मास, नक्षत्र इत्यादिक शोधूं नयेत." मंत्रदीक्षेविषयीं सूर्यग्रहणच मुख्य होय; कारण, "सूर्यग्रहणकालीं दुसरें कांहीं पाहूं नये; कारण, सूर्यग्रहणकालासारखा दुसरा काल नाहीं. सूर्यग्रहणपर्व असतां मास, तिथि, वार इत्यादिकांचे शुद्धीची अपेक्षा नाहीं" असें तेथेंच **कालोत्तर**वचन आहे; आणि "चंद्रग्रहणीं घेतलेली दीक्षा, व्रतस्थाची घेतलेली दीक्षा, वानप्रस्थाची घेतलेली दीक्षा, यांपासून सात जन्म दरिद्र प्राप्त होतें" असा तेथेंच **योगिनीतंत्रांत** चंद्रग्रहणीं दीक्षेचा निषेधही केला आहे.

ग्रहणंचजन्मराश्यादौनिषिद्धम् तदुक्तं**ज्योतिषे** त्रिषट्दशायोपगतंनराणांशुभप्रदंस्याद्ग्रहणंरवींद्वोः द्विसप्तनंदेषुचमध्यमंस्याच्छेषेष्वनिष्टंकथितंमुनींद्रैरिति आयएकादश नंदानव इषुःपंच **मदनरत्नेगर्गः** जन्मसप्ताष्टरिःफांकदशमस्थेनिशाकरे[१] दृष्टोरिष्टप्रदोराहुर्जन्मर्क्षेनिधनेपिच रिःफंद्वादशम् अंकानव निधनंसप्तमतारा **पृथ्वीचंद्रोदयेविष्णुधर्मे** यन्नक्षत्रगतोराहुर्ग्रसतेशशिभास्करौ तज्जातानांभवेत्पीडायेनराःशांतिवर्जिताः।

**जन्मराशीस वगैरे ग्रहण निषिद्ध ( अशुभ )** आहे, तें सांगतो—**ज्योतिषांत**—"जन्मराशीपासून ३।६। १०।११ या स्थानीं सूर्यचंद्रग्रहण शुभ; २।७।९।५ या स्थानीं मध्यम; १।४।८।१२ या स्थानीं अशुभः असें ऋषिवर्यांनीं सांगितलें आहे." **मदनरत्नांत गर्ग**—"जन्मराशि, व जन्मराशीपासून सात, आठ, बारा, नऊ, दहा, या राशीस: तसेंच जन्मनक्षत्र व जन्मनक्षत्रापासून सातवें नक्षत्र या ठिकाणीं ग्रहण असतां तें ग्रहण जर पाहिलें तर अरिष्टकारक होतें." **पृथ्वीचंद्रोदयांत-विष्णुधर्मांत**—"ज्या नक्षत्रीं ग्रहण असतें त्या नक्षत्रावर जे झालेले असतात त्यांनीं शांति केली नाहीं तर त्यांस पीडा होते."

तत्रैव**पुराणांतरे** सूर्यस्यसंक्रमोवापिग्रहणंचंद्रसूर्ययोः यस्यत्रिजन्मनक्षत्रेतस्यरोगोथवामृतिः तस्यदानंचहोमंचदेवार्चनजपौतथा उपरागाभिषेकंचकुर्याच्छांतिर्भविष्यति स्वर्णेनवाथपिष्टेनकृत्वासर्पस्यचाकृतिम् ब्राह्मणायददेत्तस्यनरोगादिश्चतत्कृतः जन्मनक्षत्रंतत्पूर्वोत्तरेचत्रिजन्मनक्षत्रमित्युच्यते[२] जन्मदशमैकोनविंशतिताराइति**केचित्** सर्पस्यतदाकारस्यराहोरित्यर्थः **अद्भुतसागरेभार्गवः** यस्यराज्यस्यनक्षत्रेस्वर्भानुरुपरज्यते राज्यभंगंसुहृन्नाशंमरणंचात्रनिर्दिशेत् राज्यस्यनक्षत्रंअभिषेकनक्षत्रमितितत्रैवव्याख्यातम् ।

**पृथ्वीचंद्रोदयांत-पुराणांतरांत**—"ज्याचे त्रिजन्मनक्षत्रावर, ( जन्मनक्षत्र, त्याच्या पूर्वीचे व पुढचे नक्षत्रावर ) सूर्याची संक्रांति अथवा चंद्रसूर्यग्रहण होईल त्यास रोग किंवा मरण प्राप्त होईल; त्याच्या परिहाराकरितां दान, होम, देवपूजा, जप, बिंबावर अभिषेक हीं करावीं म्हणजे शांति होते. सुवर्णाचा किंवा पिष्ठाचा सर्पाकृति राहु करून तो ब्राह्मणास द्यावा, म्हणजे रोगादिक होत नाहींत." **अद्भुतसागरांत-भार्गव**—"ज्या नक्षत्रीं राज्याभिषेक झाला त्या नक्षत्रीं राहु असून ग्रहण होईल तर राज्यभंग, सुहृन्नाश, मरण हीं प्राप्त होतात." 'राज्यस्य नक्षत्रे' याची राज्याभिषेकनक्षत्र अशी तेथेंच व्याख्या केली आहे.

**भार्गवार्चनदीपिकायांज्योतिःसागरे** सौवर्णंकारयेन्नागंपलेनाथपलार्धतः तदर्धेनतदर्धेनफणायांमौक्तिकंन्यसेत् ताम्रपात्रेनिधायाथघृतपूर्णेविशेषतः कांस्येवाकांतलोहेवान्यस्यदद्यात्सदक्षिणं चंद्रग्रहेतुरूप्यस्यबिंबंदद्यात्सदक्षिणम् नागंरुक्ममयंसूर्यग्रहेबिंबंचहेमजम् तुरंगरथगोभूमितिलसर्पिश्चकांचनम् **कालविवेकेपि** सुवर्णनिर्मितंनागंसतिलंकांस्यभाजनम् सदक्षिणंसवस्त्रंचब्राह्मणायनिवेदयेत् सौवर्णंराजतंवापिबिंबंकृत्वास्वशक्तितः उपरागभवक्लेशच्छिदेविप्रायकल्पयेत् **मंत्र**स्तु तमोमयमहाभीमसोमसूर्यविमर्दन हेमताराप्रदानेनममशांतिप्रदोभव विधुंतुदनमस्तुभ्यंसिंहिकानंदनाच्युत दानेनानेननागस्यरक्षमांवेधजाद्भयादिति ।

**भार्गवार्चनदीपिकेंत-ज्योतिःसागरांत**—पलें[३] किंवा अर्धपल, अथवा पावपल, किंवा अष्टमांशपल परिमित सुवर्णाचा नाग करावा, व त्याचे फणेवर मौक्तिक लावून तो घृतपूर्ण ताम्रपात्रांत किंवा कांस्यपात्रांत अथवा कांतलोहपात्रांत ठेवून त्याचें दक्षिणासहित दान करावें. चंद्रग्रहणीं रुप्याचें चंद्रबिंब, आणि सुवर्णाचा नाग करून दक्षिणासहित दान करावें.

---

१ दशमस्थेदिवाकरे इति पाठान्तरम्. २ त्रिजन्मनक्षत्र म्हणजे जन्मनक्षत्र व तत्पूर्वोत्तर नक्षत्रें २ मिळून नक्षत्रें ३. कोणाचे मतीं जन्मनक्षत्र, दशम नक्षत्र, आणि एकोनविंशति नक्षत्र मिळून नक्षत्रें ३. ३ पैशीं गुंजा म्हणजे एक कर्ष, ४ कर्ष म्हणजे १ पल होतें.

सूर्यग्रहणीं सुवर्णाचें सूर्यबिंब व सुवर्णाचा नाग करून दान करावें. अश्व, रथ, गाई, भूमि, तिल, घृत, सुवर्ण यांचींही दानें, करावीं.' **कालविवेकांतही** "सुवर्णाचा नाग करून तो कांस्यपात्रांत ठेवून तिल, वस्त्र, दक्षिणा यांहीं युक्त ब्राह्मणांस द्यावा. आपल्या शक्तीप्रमाणें सुवर्णाचें किंवा रुप्याचें बिंब करून ग्रहणजन्य क्लेश दूर करण्याविषयीं समर्थ अशा ब्राह्मणास द्यावें." **दानाचा मंत्र–"तमोमयमहाभीमसोमसूर्यविमर्दन ॥ हेमताराप्रदानेनममशांतिप्रदो भव ॥ विधुंतुद नमस्तुभ्यं सिंहिकानंदनाच्युत ॥ दानेनानेन नागस्य रक्ष मां वेधजाद्भयात्" ॥**

**अत्रशांतिरप्युक्तामात्स्ये** यस्यराशिंसमासाद्यभवेद्ग्रहणसंभवः स्नानंतस्यप्रवक्ष्यामिमंत्रौषधिसमन्वितम् चंद्रोपरागंसंप्राप्यकृत्वाब्राह्मणवाचनम् संपूज्यचतुरोविप्रान्छुक्लमाल्यानुलेपनैः पूर्वमेवोपरागस्यसमानीयौषधादिकम् स्थापयेच्चतुरःकुंभानव्रणानसलिलान्वितान् गजाश्वरथ्यावल्मीकसंगमाद्ध्रदगोकुलात् राजद्वारप्रदेशाच्चमृदमानीयनिक्षिपेत् पंचगव्यंपंचरत्नंपंचत्वक्पंचपल्लवम् रोचनंपद्मकंशंखंकुंकुमंरक्तचंदनम् शुक्तिस्फटिकतीर्थांबुसितसर्षपगुग्गुलून् मधुकंदेवदारुंचविष्णुक्रांतांशतावरीं बलांचसहदेवींचनिशाद्वितयमेवच गजदंतंकुंकुमंचतथैवोशीरचंदनं एतत्सर्वंविनिक्षिप्यकुंभेष्वावाहयेत्सुरान् सर्वेसमुद्राःसरितस्तीर्थानिजलदानदाः आयांतुयजमानस्यदुरितक्षयकारकाः योसौवज्रधरोदेवआदित्यानांप्रभुर्मतः सहस्रनयनःशक्रोग्रहपीडांव्यपोहतु मुखंयःसर्वदेवानांसप्तार्चिरमितद्युतिः चंद्रोपरागसंभूतामग्निःपीडांव्यपोहतु यःकर्मसाक्षीलोकानांधर्मोमहिषवाहनः यमश्चंद्रोपरागोत्थांग्रहपीडांव्यपोहतु रक्षोगणाधिपःसाक्षान्नीलांजनसमप्रभः खड्गहस्तोतिभीमश्चग्रहपीडांव्यपोहतु नागपाशधरोदेवःसदामकरवाहनः सजलाधिपतिर्देवोग्रहपीडांव्यपोहतु प्राणरूपोहिलोकानांसदाकृष्णमृगप्रियः वायुश्चंद्रोपरागोत्थांग्रहपीडांव्यपोहतु योसौनिधिपतिर्देवःखड्गशूलगदाधरः चंद्रोपरागकलुषंधनदोत्रव्यपोहतु योसाविंदुधरोदेवःपिनाकीवृषवाहनः चंद्रोपरागपापानिसनाशयतुशंकरः त्रैलोक्येयानिभूतानिस्थावराणिचराणिच ब्रह्मविष्ण्वर्करुद्राश्चदहंतुममपातकम् एवमावाह्येद्देवान्मंत्रैरेभिश्चवारुणैः एतानेवतथामंत्रान्स्वर्णपट्टेविलेखयेत् ताम्रपट्टेथवालिख्यनववस्त्रेतथैवच मस्तकेयजमानस्यनिदध्युस्तेद्विजोत्तमाः कलशान्द्रव्यसंयुक्तान्नानारूपसमन्वितान् गृहीत्वास्नापयेद्दृढंभद्रपीठोपरिस्थितम् पूर्वैरेवतुमंत्रैश्चयजमानंद्विजोत्तमः अभिषेकंततःकुर्यान्मंत्रैर्वारुणसूक्तकैः आचार्यंवरयेत्पश्चात्स्वर्णपट्टंनिवेदयेत् आचार्यदक्षिणांदद्याद्गोदानंचस्वशक्तितः होमंवापिप्रकुर्वीततिलव्याहृतिभिस्तथा दानंचशक्तितोदद्याद्यदीच्छेदात्मनोहितं सूर्यग्रहेसूर्यनामयुक्तान्मंत्रांश्चकीर्तयेत् अनेनविधिनायस्तुग्रहणेस्नानमाचरेत् नतस्यग्रहणेदोषःकदाचिदपिजायते इतिग्रहणशांतिः ।

**याविषयीं शांतिही सांगितली आहे मत्स्यपुराणांत**–"ज्याचे जन्मराशीस ग्रहण होतें त्यास मंत्रौषधियुक्त स्नान सांगतों. चंद्रग्रहण आलें असतां तें ब्राह्मणाच्या मुखापासून श्रवण करून ग्रहणाच्या पूर्वीच श्वेतपुष्प, श्वेतगंध यांहींकरून चार ब्राह्मणांचें पूजन करून त्यासह हें पुढचें कर्म करावें. तें असें—औषध्यादिक आणून उदकपूर्ण असे नूतन चार कलश घेऊन ते स्थापित करावे, नंतर त्या कलशांत हत्ती बांधण्याची जागा, अश्वशाला, राजमार्ग, वारूळ, दोन नद्यांचा संगम, डोह, गोठा, राजद्वार, या ठिकाणांहून मृत्तिका आणून ( कलशांत ) टाकावी. नंतर कलशांत पंचगव्य, पंचरत्न, पंचत्वचा, पंचपल्लव, गोरोचन, पद्मकाष्ठ, शंख, कुंकुम, ( केशर ), रक्तचंदन, शुक्ति, स्फटिक, तीर्थोदक, श्वेतसर्षप, गुग्गुल, ज्येष्ठमध, देवदारु, विष्णुक्रांता, शतावरी, चिकणा, सहदेवी, हळद, दारुहळद, गजदंत, कुंकू, वाळा, चंदन, हे सर्व पदार्थ कुंभांत टाकून पुढें सांगितलेल्या मंत्रांनीं देवतांचें कुंभांवर आवाहन करावें. ते मंत्र असे—"**सर्वे समुद्राः सरितस्तीर्थानि जलदा नदाः ॥ आयांतु यजमानस्य दुरितक्षयकारकाः ॥ योसौ वज्रधरो देव आदित्यानां प्रभुर्मतः ॥ सहस्रनयनः शक्रो ग्रहपीडां व्यपोहतु ॥ मुखं यः सर्वदेवानां सप्तार्चिरमितद्युतिः ॥ चंद्रोपरागसंभूतामग्निः पीडां व्यपोहतु ॥ यः कर्मसाक्षी लोकानां धर्मो महिषवाहनः ॥ यमश्चंद्रोपरागोत्थां ग्रहपीडां व्यपोहतु ॥ रक्षोगणाधिपः साक्षान्नीलांजनसमप्रभः ॥ खड्गहस्तोतिभीमश्च ग्रहपीडां व्यपोहतु ॥ नागपाशधरो देवः सदा मकरवाहनः ॥ स जलाधिपतिर्देवो ग्रहपीडां व्यपोहतु ॥ प्राणरूपो हि लोकानां सदा कृष्णमृगप्रियः ॥ वायुश्चंद्रोपरागोत्थां ग्रहपीडां व्यपोहतु ॥ योसौ निधिपतिर्देवः खड्गशूलगदाधरः ॥ चंद्रोपरागकलुषं धनदोत्र व्यपोहतु ॥ योसाविंदुधरो देवः पिनाकी वृषवाहनः ॥ चंद्रोपरागपापानि स नाशयतु शंकरः ॥ त्रैलोक्ये यानि भूतानि स्थावराणि चराणि च**

**ब्रह्मविष्णवर्करुद्राश्च दहंतु मम पातकम् ॥"** याप्रमाणें ह्या व वरुणदेवताक मंत्रांनीं वरील देवतांचें आवाहन कलशांवर करावें. तसेंच हे मंत्र सुवर्णपट्टावर किंवा ताम्रपट्टावर अथवा कोऱ्या वस्त्रावर लिहून यजमानाचे मस्तकावर ब्राह्मणांनीं तो पट्ट धरावा. नंतर ब्राह्मणांनीं नानाद्रव्यांसहित ते कलश हातांत घेऊन त्यांतील उदकानें भद्रपीठस्थित ( उच्च आसनावर बसलेल्या ) यजमानाला पूर्वोक्त मंत्रांनीं स्नान घालावें. नंतर वरुणसूक्तमंत्रांनीं अभिषेक करावा. नंतर आचार्याला सुवर्णपट्ट, आचार्यदक्षिणा, गोप्रदान, हीं यथाशक्ति द्यावीं. व्याहृति मंत्रांनीं तिलहोम करावा, व यथाशक्ति दान करावें. असें केलें असतां कल्याण होतें. सूर्यग्रहणीं सूर्यनामयुक्त मंत्र म्हणावे. ह्या पूर्वोक्त विधीनें जो मनुष्य ग्रहणांत स्नान करील त्याला ग्रहणसंबंधी कोणतीही पीडा होणार नाहीं." याप्रमाणें ग्रहणशांति जाणावी.

**भार्गवार्चनदीपिकायांब्रह्मसिद्धांते** सर्वैःपटस्थितंवीक्ष्यखस्थंतैलांबुदर्पणैः ग्रहणंगुर्विणीजातुनपश्येतपटंविना तथा मंगलकृत्येपुवेध**विशेषोहेमाद्रौ** त्रयोदश्यादितोवर्ज्यंदिनानांनवकंध्रुवम् मांगल्येषुसमस्तेषुग्रहणेचंद्रसूर्ययोः प्रकारांतरंतत्रैवोक्तं द्वादश्यादितृतीयांतोवेधइंदुग्रहेस्मृतः एकादश्यादिकःसौरे चतुर्थ्यंतःप्रकीर्तितः इदंचपूर्णग्रासे त्र्यहंखंडग्रहेतयोरितितत्रैवोक्तेः इदंचग्रस्तास्तेत्रिदिनंपूर्वमिति**नारदेन**ग्रस्तास्तेविशेषोक्तेर्ग्रस्तास्तभिन्नग्रहणपरं **ज्योतिर्निबंधेचयवनः** ग्रहणोत्पातभंत्याज्यंमंगलेपुऋतुत्रयं यावत्रविणाभुक्त्वामुक्तंभंदग्धकाष्ठवत् अन्यानिचाग्नेयादिमंडलानितत्फलंवर्णविकारादिफलंचदैवज्ञेभ्योज्ञेयम् ।

**भार्गवार्चनदीपिकेंत—ब्रह्मसिद्धांतांत**-"ग्रहण पाहणें तें सर्वांनीं वस्त्र, तैल, उदक, दर्पण ( आरसा किंवा भिंग ) यांतून पाहावें. गर्भिणी स्त्रीनें तर वस्त्र आड केल्यावांचून कदापि ग्रहण पाहूं नये. मांगलिककृत्यांविषयीं ग्रहणसंबंधीं वर्ज्य दिवस सांगतो-**हेमाद्रींत** "चंद्र सूर्य ग्रहण असतां सर्व मांगलिककृत्यांविषयीं त्रयोदशीपासून नऊ दिवस टाकावे." **दुसरा प्रकार**-तेथेंच सांगतो-"चंद्रग्रहणीं द्वादशीपासून तृतीयेपर्यंत सात दिवस टाकावे. सूर्यग्रहणीं एकादशीपासून चतुर्थीपर्यंत नऊ दिवस टाकावे" हा वेध पूर्ण ग्रास असतां जाणावा; कारण, "खंडग्रास असतां तीन दिवस टाकावे" असें तेथेंच सांगितलें आहे. हें वचनही, "ग्रस्तास्त असेल तर पूर्वीचे तीन दिवस टाकावे" असा **नारदानें** ग्रस्तास्त ग्रहणाचा विशेष सांगितला आहे म्हणून ग्रस्तास्तभिन्न ग्रहणविषयक जाणावें. **ज्योतिर्निबंधांत-च्यवन**-"ज्या नक्षत्रीं ग्रहणरूप उत्पात झाला असेल तें नक्षत्र सहा महिनेपर्यंत मंगलकार्याविषयीं वर्ज्य करावें. कारण, जोंपर्यंत रवीनें भोगून सोडलें नाहीं, तोंपर्यंत तें नक्षत्र दग्ध काष्ठाप्रमाणें आहे." ( तीन ऋतु वर्ज्य हें चंद्रग्रहणनक्षत्राविषयीं आहे, सूर्यग्रहणनक्षत्र बारा महिन्यांवांचून पुनः सूर्यभुक्त होत नाहीं. ) ग्रहणसमयीं चंद्रसूर्यांचे बिंबांचे ठायीं आग्नेयादि मंडलें होतात तीं व त्यांचीं फलें, वर्णविकारादि फलें हीं दैवज्ञां(जोशां)पासून जाणावीं.

**पुरश्चरणचंद्रिकायाम्** चंद्रसूर्योपरागेचस्नात्वाप्रयतमानसः स्पर्शादिमोक्षपर्यंतंजपेन्मंत्रंसमाहितः जपाद्दशांशतोहोमस्तथाहोमात्तुतर्पणम् तर्पणस्यदशांशेनमार्जनंकथितंकिल तत्रैवदेवतारूपंध्यात्वात्मानंप्रपूज्यच नमोंतंमंत्रमुच्चार्यतदंतेदेवताभिधाम् द्वितीयांतामहंपश्चादभिषिंचाम्यनेनतु तोयैरंजलिनाशुद्धैरेभिःसिंचेत्स्वमूर्धनि मार्जनस्यदशांशेनब्राह्मणानपिभोजयेत् जपोर्चापूर्वकोहोमस्तर्पणंचाभिषेचनम् भूदेवपूजनंपंचप्रकारोक्तापुरस्क्रिया तथा होमाशक्तौजपंकुर्याद्धोमसंख्याचतुर्गुणम् एवंकृतेतुमंत्रस्यजायतेसिद्धिरुत्तमा ।

**पुरश्चरणचंद्रिकेंत—**"चंद्रसूर्यांचें ग्रहण लागलें असतां स्नान करून एकाग्र मन करून स्पर्शकालापासून मोक्षापर्यंत मंत्राचा जप करावा. जपाचे दशांश होम, होमाचे दशांश तर्पण, तर्पणाचे दशांश मार्जन करावें. त्या मार्जनाचा प्रकार-ज्या देवतेचा जप केला असेल त्या देवतेच्या रूपाचें ध्यान आपल्या ठिकाणीं करून आपली पूजा करून मंत्राचे शेवटीं 'नमः' शब्द लावून त्या मंत्राचा उच्चार करून त्याचे शेवटीं द्वितीयाविभक्त्यंत असें देवतेचें नांव घेऊन 'अनेन अहमभिषिंचामि' असें म्हणून शुद्ध उदक अंजलींत घेऊन आपल्या मस्तकावर अभिषेक करावा. मार्जनाच्या दशांश ब्राह्मणभोजन घालावें. जप, पूजनपूर्वक होम, तर्पण, अभिषेक, ब्राह्मणपूजन, याप्रमाणें पांच प्रकार पुरश्चरणाचे होत." तसेंच-"होम करण्याविषयीं शक्ति नसतां होमाच्या चतुर्गुण जप करावा. याप्रमाणें पुरश्चरण केलें असतां मंत्राची उत्तम सिद्धि होते."

ग्रहणप्रसंगात्कुरुक्षेत्रप्रतिग्रहे**प्रायश्चित्तमुच्यते तत्रारुणस्मृतौ** प्रतिग्रहीकुरुक्षेत्रेनभूयःपुरुषोभवेत् तथापिमनसःशुद्ध्यैप्रायश्चित्तंसमाचरेत् तप्तकृच्छ्रद्वयंकुर्याद्देवेनसमन्वितम् सत्रेणवायजेताथजपेद्वालक्षसप्तकम् वापीकूपतडागादिखननैर्विसृजेद्धनमिति एतच्च यद्गर्हितेनार्जयंतिकर्मणाब्राह्मणाधनम् तस्योत्सर्गेणशुद्ध्यंतिदानेनतपसैवचेति**मनूक्ते**रुत्सर्गोत्तरंज्ञेयमितिदिक् ।

---

१ ग्रहणनक्षत्रं षण्मासं पूर्णग्रासे वर्ज्यं । पादादिग्रासे सार्धमासादितारतम्येन योज्यम् ।

ग्रहणाच्या प्रसंगेंकरून कुरुक्षेत्रीं प्रतिग्रह करणारास प्रायश्चित्त सांगतो—तेथें **अरुणस्मृतींत**—"कुरुक्षेत्रीं प्रतिग्रह करणारा पुनः पुरुष होणार नाहीं, म्हणजे अधोगतीस जाईल, तथापि त्यानें मनाची शुद्धि होण्यासाठीं प्रायश्चित्त करावें; चांद्रायणासह दोन तप्तकृच्छ्रें करावीं; किंवा सत्रयाग करावा: अथवा सात लक्ष जप करावा; निर्जल प्रदेशीं वापी, कूप, तलाव बांधून द्रव्याचा व्यय करावा." हें प्रायश्चित्त "ब्राह्मण निंद्य कर्म करून जें द्रव्य संपादन करितात त्याचा उत्सर्ग, दान व तपश्चर्या करून ते ब्राह्मण शुद्ध होतात" ह्या **मनु**वचनावरून घेतलेल्या द्रव्याचा उत्सर्ग ( त्याग ) केल्यावर जाणावें. ही दिशा दाखविली आहे.

**ग्रहणांतरितस्यपूर्वसंकल्पितद्रव्यस्यद्वैगुण्यंभवतीतिशिष्टाः पठंतिचलघुब्रह्मवैवर्ते** दातव्यमितिनोकाश्यांवक्तव्यंकुत्रचित्कचित् अहोरात्रमतिक्रम्यतद्दानंद्विगुणंभवेत् दशोत्तरंपर्वसुस्याच्छतंचंद्रग्रहेभवेत सूर्यग्रहेसहस्रंतन्मरणेनंतकंस्मृतमिति अत्रमूलंचिंत्यम् ।

ग्रहणाच्या पूर्वी संकल्पित जें द्रव्य तें ग्रहणोत्तर दिलें असतां द्विगुण देण्यास योग्य होतें, असें शिष्ट म्हणतात व **लघुब्रह्मवैवर्ता**तील वचन सांगतात—"काशीक्षेत्रीं 'दातव्यं' ( द्यावयाचें ) असें कोठें कधींही बोलूं नये. कारण, 'द्यावयाचें' असें बोलून तें न देतां अहोरात्र गेलें तर तें दान द्विगुण देण्यास योग्य होतें. पर्व ( अमावास्या अथवा पौर्णिमा ) गेल्यावर दसपट होतें. चंद्रग्रहण गेल्यावर शंभरपट देण्यास योग्य होतें. सूर्यग्रहण गेल्यावर सहस्रपट देण्यास योग्य आणि मेल्यावर अनंतपट होतें." याविषयीं मूल चिंत्य होय.

**अत्रकेचिद्बौद्धतुल्याआहुः** ग्रहणस्यनिमित्तत्वेनतन्निश्चयस्यप्रयोजकत्वाज्ज्योतिःशास्त्रादिनाज्ञानस्यनिमित्तत्वेप्राप्तेपि स्नानंदानंतपःश्राद्धमनंतंराहुदर्शने, चंद्रसूर्योपरागेतुयावद्दर्शनगोचरइतिजाबाल्यादिवचनेषुदृशिप्रयोगाच्चाक्षुषज्ञानस्यैवोपसंहारन्यायेननिमित्तत्वम् अन्यथादृशौलक्षणास्यात् तेनमेघाच्छादनेंऽधादीनांजन्मसप्ताष्टेत्यादिनिषिद्धदर्शनानांचस्नानश्राद्धादौनाधिकारइति **कल्पतरुरप्याह** दर्शनशब्देनचाक्षुषज्ञानंगृह्यतेनज्ञानमात्रम् अज्ञातस्यनिमित्तत्वासंभवान्निमित्तमहिम्नैवज्ञानलाभेनदर्शनपदवैयर्थ्यापत्तेः तेनचाक्षुषधीयोग्यःकालःपुण्यः योग्यत्वंचप्रयत्नानपनेयचाक्षुषज्ञानप्रतिबंधकराहित्यं तेनमेघच्छन्नेयोग्यताभावान्नस्नानादीति **निर्णयामृतेप्येवम्** ।

ह्या ग्रहणाविषयीं **केचित् बौद्धतुल्य** ग्रंथकार असें सांगतात—स्नानादिकांना ग्रहण हें निमित्त आहे खरें, परंतु तें निमित्त निश्चया ( खऱ्या ज्ञाना ) वांचून संभवत नाहीं. याकरितां ग्रहणाचें खरें ज्ञान निमित्त आहे, म्हणून ज्योतिःशास्त्रादिकांवरून झालेलें ज्ञान तें निमित्त असें प्राप्त झालें तरी तें निमित्त नाहीं. कारण, 'स्नानं दानं०', 'चंद्रसूर्यो०', ह्या **जाबालि**प्रभृतींच्या वचनांमध्यें दृश् धातूचा प्रयोग आहे. 'दृश्' याचा अर्थ 'चक्षूनें पाहणें' असा आहे, म्हणून उपसंहारन्यायानें ( पूर्वीं सांगितलेला विषय अनेक प्रकारचा असल्यामुळें शेवटीं त्याचें एका विषयावर पर्यवसान करणें ह्या न्यायानें ) त्या **जाबालि**प्रभृतींनीं चाक्षुष ज्ञानावर उपसंहार केला असल्यामुळें ग्रहणाचें चाक्षुषज्ञानच स्नानादिकांना निमित्त आहे. चाक्षुषज्ञान निमित्त नाहीं, सामान्य ज्ञान निमित्त असें मानलें तर 'दृश्' धातूचा मुख्यार्थ—डोळ्यांनीं झालेलें ज्ञान—हा सोडून लक्षणा करून सामान्यज्ञान असा लाक्षणिक अर्थ करावा लागेल, याकरितां चाक्षुषज्ञानच निमित्त आहे असें झालें. त्या योगानें असें झालें कीं, मेघाच्छादित असतां सर्वांना चाक्षुषज्ञान नसल्यामुळें स्नानादिकांविषयीं अधिकार नाहीं. अंधादिकांना व ज्यांच्या राशीस अथवा सातवें किंवा आठवें ग्रहण असेल त्यांना दर्शनाचा निषेध असल्यामुळें त्यांना स्नानादिकांविषयीं अधिकार नाहीं. **कल्पतरू**ही सांगतो—'दर्शन' या शब्दानें चाक्षुषज्ञान घ्यावयाचें, सामान्यज्ञान घ्यावयाचें नाहीं; कारण, ज्ञानावांचून निमित्तत्वाचा असंभव असल्यामुळें, ज्यापेक्षां ग्रहण हें निमित्त म्हणून शास्त्रानें सांगितलें, त्यापेक्षां त्याचें ज्ञान असलें पाहिजे. ( जसें संक्रांति स्नानादिकांना निमित्त सांगितलें त्यावरून संक्रांतीचें ज्ञान अर्थात् निमित्त तद्वत् ). यावरून ज्ञानाला निमित्तत्व सिद्ध झालें असतां पूर्वोक्त वचनांत दर्शनपद व्यर्थ होईल! याकरितां चाक्षुषज्ञान निमित्त असें झाल्यानें चाक्षुषज्ञानाला योग्य जो काळ तो पुण्यकाळ सिद्ध झाला. येथें योग्यता म्हणजे प्रयत्नानें दूर करण्यास न येणारें असें जें चाक्षुषज्ञानाला प्रतिबंधक तद्रहितत्व होय. ही योग्यता मेघाच्छादित नसतां येते. ती अशी—प्रयत्नानें दूर करण्यास येणारें वस्त्रादि, न येणारा असा जो मेघ चाक्षुषज्ञानाला प्रतिबंधक तद्रहितत्व आहे. मेघाच्छादित असतां तद्रहितत्व नाहीं, म्हणून ही योग्यता नसल्यामुळें स्नानादिक करूं नये. **निर्णयामृतां**तही असेंच आहे.

---

१ 'पुरोडाशं चतुर्धा करोति' या सामान्यवाक्यानें पुरोडाशाचें चतुर्धाकरण सांगितलें तें, 'आग्नेयं चतुर्धा करोति' या विशेष वाक्यानें आग्नेयपुरोडाशविषयक चतुर्धाकरण केलें आहे, तद्वत्.

तदेतत्तुच्छम् यदिचाक्षुषज्ञानंनिमित्तंस्यात्तदा सूर्यग्रहोयदारात्रौदिवाचंद्रग्रहस्तथा तत्रस्नानंनकुर्वीतदद्याद्दानंनचक्कचिदितिवाक्यंव्यर्थंस्यात् चाक्षुषज्ञानाभावेनप्राप्त्यभावात् तत्पूर्वकत्वाच्चनिषेधस्य नचेदंग्रस्तास्तपरं रविचंद्रयोरस्तानंतरंरात्रिदिवाग्रहत्वादितिवाच्यम् तत्रपदस्यग्रहपरत्वेऽधिकरणत्वायोगान्निमित्तपरत्वेचतद्ग्रहनिमित्तकस्नानादेरस्तात्प्रागप्यभावापत्तेः अथतत्रेतिरात्रिदिनेउच्येतेसावैश्वदेवीतिवद्गुणभूतेअपि तत्र तादृशमंत्रलिंगाभावात् तयोर्निमित्तत्वेऽधिकरणत्वेवाऽन्यप्रयुक्तस्नानाद्यभावापत्तेश्च किंच नेक्षेतोद्यंतमादित्यंनास्तंयंतंकदाचन नोपरक्तंनवारिस्थंनमध्यंनभसोगतमिति**मनुवचनं**बाध्येत दृष्टोरिष्टप्रदोराहुरित्यादिच नचात्रविहितेदर्शनेनिषेधाप्रवृत्तिवत्पर्युदसनीयतापिनयुक्तेतिवाच्यम् दर्शनस्यानुवादेनविधेयत्वाभावात् एतच्चाग्रेवक्ष्यामः तत्त्वेवाविरुद्धत्रिकद्वयापत्तेः अस्तुसकृद्दर्शनविधानेनसंकोचइतिचेन्न मुक्तिंदृष्ट्वाततःस्नायादितिमुक्तिस्नानेपिचाक्षुषज्ञानस्यनिमित्तत्वापत्तेः अस्तु किंनश्छिन्नमितिचेन् न ग्रस्तास्ते तयोःपरेद्युरुदयेदृष्ट्वाभ्यवहरेच्छुचिरितिदर्शनोत्तरंभोजनविधानादंधस्यपूर्ववेधकालइवयावद्दर्शनंभोजननिषेधापत्तिः मध्येऽधीभूतस्यसुतरांयावच्चक्षुःप्राप्त्युपवासप्रसंगश्च ।

तें हें सारें मत तुच्छ आहे. कारण, जर चाक्षुषज्ञान निमित्त होईल तर "जेव्हां सूर्यग्रहण रात्रीं आणि चंद्रग्रहण दिवसा असेल तेव्हां स्नान करूं नये व दानही देऊं नये" हें वाक्य व्यर्थ होईल; कारण, ह्या स्थलीं सूर्यचंद्रग्रहणांचें चाक्षुषज्ञान नसल्यामुळें स्नानादिकांची प्राप्तीच नाहीं; प्राप्ति असेल तर निषेध पाहिजे, प्राप्ति नसल्यामुळें निषेधाची गरज नाहीं. शंका—हें ( सूर्यग्रहोयदा० ) वाक्य ग्रस्तास्तविषयक आहे. ग्रस्तास्तस्थलीं चाक्षुषज्ञान असल्यामुळें स्नानादिकांची प्राप्ति येते, आणि सूर्यचंद्रांच्या अस्तानंतर रात्रीं व दिवसा ग्रहण असल्यामुळें या वचनानें स्नानादिकांचा निषेध केला आहे. असें म्हणूं; तर तसें म्हणतां येत नाहीं; कारण, त्या वचनांतील 'तत्र' या पदाचा अर्थ 'ग्रहण' असा घेतला तर तें स्नानादिकांना अधिकरण ( आधार ) होत नाहीं. 'निमित्त' असा घेतला तर तद्ग्रहणनिमित्तक स्नान करूं नये असा अर्थ झाल्यानें अस्त होण्यापूर्वीं देखील स्नानाचा अभाव ( निषेध ) होऊं लागेल. आतां 'तत्र' या पदानें रात्रीं व दिवसा घेतों. जसें—"तप्ते पयसि दध्यानयति सा वैश्वदेव्यामिक्षा" असें श्रुतिवाक्य आहे. त्याचा अर्थ—तापलेल्या दुधामध्यें दहीं घातलें म्हणजे ती विश्वेदेव देवांची आमिक्षा ( हवनीयद्रव्य ) होते. या स्थलीं दुधांत दहीं घालून जें द्रव्य होतें तें प्रधान व दूध हें गुण ( अप्रधान ) आहे तरी त्या वाक्यांतील 'सा' या पदानें दुधाचें ग्रहण केलेलें आहे, तसें—प्रकृत स्थलीं प्रधान ग्रहण व अप्रधान ( गुण ) रात्रि दिवस असले तरी 'तत्र' या पदानें ते घेतों, असें म्हणाल तर तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण, वरील श्रुतिवाक्यांत 'सा' शब्दानें गुणभूताचें ग्रहण करण्यास मंत्र प्रमाण आहे, या ठिकाणीं तसें घेण्यास मंत्र प्रमाण नाहीं. आणि असें असूनही जर 'तत्र' पदानें रात्रि दिवस घेतले तर त्यांना निमित्तत्व मानलें असतां त्या रात्रिदिवसांचे निमित्तानें अथवा अधिकरणत्व मानलें तर त्या दिवशीं स्नान करूं नये, असें झाल्यानें इतरप्रयुक्तही स्नानादिकांचा अभाव होऊं लागेल; आणखी चाक्षुषज्ञान निमित्त मानलें असतां अर्थात् राहुदर्शन करावें, असें झाल्यानें "उदय पावणारा, अस्तास जाणारा, राहूनें ग्रासलेला, उदकांत प्रतिबिंबित झालेला, आणि मध्यान्हीं असलेला असा सूर्य पाहूं नये" या मनूच्या वचनामध्यें राहुग्रस्त सूर्य पाहूं नये, असा जो निषेध त्याचा बाध होईल. तसाच "जन्मराशीस व जन्मनक्षत्रास वगैरे राहू असतां जर पाहिला तर अरिष्टकारक होतो, म्हणून पाहूं नये" या निषेधाचाही बाध होईल. **शंका**—या ठिकाणीं दर्शन विहित असल्यामुळें मनूनें केलेला ( राहुग्रस्त सूर्य पाहूं नये ) हा निषेध प्रवृत्तच होत नाहीं, मग त्या निषेधाचा बाध कोठून होणार? आतां त्याचा अर्थ कसा करावा असें म्हणाल तर 'उपरक्तं आदित्यं नेक्षेत' म्हणजे ग्रस्त आदित्यविषयक ईक्षणविरुद्ध व्यापार करावा, असा पर्युदास करावा असेंही म्हणतां येत नाहीं; कारण, जसा निषेध प्रवृत्त होत नाहीं, तसा येथें पर्युदासपक्षीं आर्थिक निषेध होतो म्हणून तोही करणें युक्त नाहीं, याकरितां चाक्षुषज्ञान निमित्त मानण्यास अडचण नाहीं. **समाधान**-दर्शनाचा अनुवाद करून स्नानादिकांचें विधान असल्यामुळें दर्शन विधेय ( विहित ) नाहीं. हा प्रकार पुढें सांगूं. ज्याचा अनुवाद त्याला विधेयत्वही मानलें तर विरुद्ध त्रिक[1]द्वय प्राप्त होईल. असूं या त्रिकद्वय, असें म्हटलें

---

१ विरुद्ध त्रिकद्वय म्हणजे-उपादेयत्व, विधेयत्व, गुणत्व, हें एक त्रिक. उद्देश्यत्व, अनुवाद्यत्व, मुख्यत्व, हें दुसरें त्रिक. दर्शनाच्या उद्देशानें स्नानाचें विधान असतां दर्शनावर उद्देश्यत्वादि त्रिक व स्नानावर उपादेयत्वादि त्रिक असें येतें आणि ग्रहणाच्या उद्देशानें दर्शनाचें विधान असतां ग्रहणावर उद्देश्यत्वादि त्रिक आणि दर्शनावर उपादेयत्वादि त्रिक येतें. एकसमयावच्छेदानें ग्रहणाच्या उद्देशानें दर्शनाचें विधान व दर्शनाच्या उद्देशानें स्नानाचें विधान केलें असतां दर्शनावर ग्रहणाकडून उपादेयत्वादि त्रिक येईल आणि स्नानाकडून उद्देश्यत्वादि त्रिक प्राप्त होईल. याप्रमाणें दर्शनावर विरुद्ध अशीं हीं दोन्हीं त्रिकें प्राप्त होतील असा भाव.

तरी पुनः मनूनें केलेला निषेध व्यर्थ होतो, म्हणून चाक्षुषज्ञान निमित्त मानितां येत नाहीं. असें जर आहे, तर मनूनें केलेला दर्शननिषेध ग्रहण आहे तोंपर्यंत आहे, म्हणून 'राहुदर्शने' इत्यादि वचनानें एकवार दर्शन विधान करून त्या मनूच्या निषेधाचा संकोच करितों, म्हणजे दर्शनक्षणव्यतिरिक्तक्षणीं निषेध प्रवृत्त होतो, असें झाल्यानें मनुवचन व्यर्थ होत नाहीं, असें जर म्हणाल, तर तसेंही म्हणतां येत नाहीं; कारण, 'मुक्ति पाहून नंतर स्नान करावें' असें वचन असल्यामुळें मुक्तिस्नानाविषयीं देखील चाक्षुषज्ञान निमित्त होऊं लागेल ! होऊं द्या ! आमचें काय नुकसान आहे, असें जर म्हणाल तर तसें म्हणतां येणार नाहीं; कारण, ग्रस्तास्तस्थलीं "त्या चंद्रसूर्यांचा दुसऱ्या दिवशीं उदय झाला असतां शुद्ध बिंब पाहून आपण स्नान करून शुद्ध होऊन नंतर भोजन करावें" या वचनानें दर्शनोत्तर भोजन विहित असल्यामुळें, अंधाला पूर्वी वेधकालीं जसा भोजननिषेध तसा दर्शन होईपर्यंत भोजननिषेध प्राप्त झाला ! ग्रस्तास्तानंतर त्याचा उदय होई इतक्या कालामध्यें जो अंध झाला असेल त्याला तर भोजनाचा अत्यंत निषेध प्राप्त झाल्यामुळें चक्षु प्राप्त होईपर्यंत उपवासप्रसंगही आला.

अथान्नलोलुपतयातत्रज्ञानमात्रंविवक्ष्येतत्पूर्वमपिनिर्लज्जेनस्वीक्रियताम् एतेनयत्केनचिदुक्तंस्पर्शस्नानं मुक्तिस्नानंचयस्यदर्शनंतेनैवकार्यम् नान्येन क्त्वाप्रत्ययेनसमानकर्तृकत्वावगतेरिति तन्निरस्तम् कातर्हितस्यगतिः दृशेरुद्देश्यविशेषणत्वाद्ग्रहैकत्ववदविवक्षयार्थतःसिद्धज्ञानमात्रानुवादत्वेसर्वंसुस्थम् अंगुलाद्यूनादेश्यग्रहव्यावृत्त्यावादर्शनस्यार्थवत्त्वम् नचोक्तयोग्यतापिसाध्वी दर्शनोत्तरंमेघच्छन्नेयोग्यताभावापत्त्यादानाद्यभावापत्तेः तेनतत्तद्रेखावच्छेदेनज्योतिःशास्त्रावेद्यत्वमेवयोग्यता किंच रजसोदर्शनेनारीत्रिरात्रमशुचिर्भवेदित्यत्राप्यंधस्त्रीणामाशौचाभावप्रसंगः ।

आतां तो अंध अन्नाविषयीं लोलुप ( लुब्ध ) असल्यामुळें त्या ठिकाणीं सामान्य ज्ञानच घ्यावयाचें असेल तर तें ज्ञान पूर्वी देखील निर्लज्जानें स्वीकारावें. यावरून ( सामान्य ज्ञानाला निमित्तत्व स्वीकारल्यानें ), जें कोणी सांगितलें कीं, स्पर्शस्नान व मुक्तिस्नान हें ज्याला ग्रहणाचें दर्शन असेल त्यानेंच करावें, इतरानें करूं नये; कारण, 'मुक्तिं दृष्ट्वा ततः स्नायात्' या वचनांत 'दृश्' धातूच्या पुढें असलेल्या 'क्त्वा' प्रत्ययानें, ज्यानें मुक्तीचें दर्शन केलें त्यानेंच स्नान करावें, म्हणजे दर्शनाचा जो कर्ता तोच स्नानाचा कर्ता आहे, असें बोधित झालें आहे; असें कोणाचें मत तें खंडित झालें. आतां सामान्यज्ञानाला निमित्तत्व मानलें म्हणजे 'राहुदर्शने' इत्यादि वाक्यांतील दर्शनपदाची गति कोणती ? असें म्हणशील तर सांगतों—'राहुदर्शने' याचा अर्थ 'राहुदर्शन असतां' म्हणजे दर्शनाला विषय राहू असतां असा आहे. 'यावद्दर्शनगोचरः' या ठिकाणीं तर 'जोंपर्यंत दर्शनाला विषय चंद्रसूर्यग्रहण ( राहु ) आहे, असा अर्थ स्पष्टच आहे. या ठिकाणीं स्नानाला उद्देश्य जो राहु त्याला 'दृश्' म्हणजे दर्शन हें विशेषण असल्यामुळें जशी ग्रहाची[१] एकत्व संख्या अविवक्षित तसें येथें उद्देश्याचें विशेषण जें दर्शन तें अविवक्षित ( सार्थकत्वेंकरून अप्रयुज्यमान ) असल्याकारणानें आर्थिक सिद्ध जें सामान्य ज्ञान त्याचेंच हें दर्शनपद अनुवादक आहे असें झालें असतां सर्व व्यवस्थित होतें, म्हणजे कोणतीही आपत्ति येत नाहीं. अथवा अंगुलादि न्यून असलेलें जें ग्रहण सांगण्यास योग्य नाहीं त्याची व्यावृत्ति ( निवारण ) होण्यासाठीं दर्शन पदाला सार्थकत्व येतें. वर सांगितलेली जी योग्यता ( प्रयत्नानें दूर करण्यास न येणारें असें जें चाक्षुषज्ञानाला प्रतिबंधक तद्रहितत्व ) तीही चांगली आहे असें नाहीं; कारण, दर्शनोत्तर मेघानें आच्छन्न असतां योग्यतेचा अभाव प्राप्त झाल्यामुळें दानादिकांचा अभाव प्राप्त होईल. म्हणून त्या त्या रेखांहींकरून ज्योति शास्त्रानें आसमंतात् जाणण्याला योग्य असणें हीच योग्यता समजावी. आणि सर्वत्र दर्शनपदानें चाक्षुषज्ञान घेतलें तर 'रजोदर्शन झालें असतां स्त्री तीन दिवस अशुचि होते' या स्थलींही आंधळया स्त्रियांना चाक्षुषज्ञान नसल्यामुळें अशुचित्वाच्या अभावाचा प्रसंग येईल.

---

१ सोमयागप्रकरणीं श्रुतिवचन असें आहे कीं; 'दशापवित्रेण ग्रहं संमार्ष्टि' दशापवित्र म्हणजे वस्त्राचा तुकडा. ग्रह म्हणजे सोमरस ठेवण्याची काष्ठाचीं पात्रें. वस्त्राच्या तुकड्यानें ग्रहाचें संमार्जन म्हणजे शोधन करावें, असा अर्थ. या ठिकाणीं पूर्वपक्षी म्हणतो—जसें 'पशुना यजेत' या वाक्यामध्यें पशु उपादेय ( विधेय ) आहे, त्या पशूची एकत्व संख्या विवक्षित आहे. म्हणून 'एक पशूनें याग करावा' असा अर्थ होतो, त्याप्रमाणें ग्रहाची एकत्व संख्या विवक्षित मानून 'एक ग्रहाचें संमार्जन करावें' असा अर्थ करावा. सिद्धांती म्हणतो—'ग्रहं' या द्वितीया विभक्तीनें, ग्रहाला उद्देश्यत्व असल्यामुळें प्राधान्य आहे असें होतें, संमार्ग ( शोधन ) हा गुण आहे, प्रतिप्रधानाला गुणाची आवृत्ति होते, असा न्याय आहे. म्हणून जितके ग्रह तितके शोधावे, असें झाल्यानें इयत्तेची आकांक्षा होत नाहीं, म्हणून उद्देश्याची एकत्व संख्या विवक्षित नाहीं. आतां तुम्हीं असें म्हणाल कीं, एकत्वाचें व संमार्गाचें दोघांचें विधान करावें, असें म्हटलें तर वाक्यभेद होतो तो असा—'ग्रहं संमृज्यात्' 'तं च एकम्' याप्रमाणें विधेयभिन्न असल्यामुळें भिन्नवाक्यें होतात, याकरितां उद्देश्यगत एकत्व संख्या विवक्षित नाहीं. आतां 'पशूनें याग करावा' या ठिकाणीं यागाला गुण ( अंग ) पशु आहे, प्रत्येक गुणाला प्रधानयागाची आवृत्ति नाहीं, म्हणून किती पशू अशी जाणण्याची इच्छा झाली याकरितां त्या पशुशब्दावर श्रूयमाण जें एकवचन तें विवक्षित आहे, म्हणून 'एक पशूनें याग करावा' असा अर्थ होतो.

यत्तु **वर्धमानेनोक्तम्** ज्ञानोत्तरंत्वधिकारोनज्ञानकाले स्नानकालेज्ञानाभावात् एवंदर्शनोत्तरंमुक्तिपर्यंतमस्त्येवयोग्यतेति तदपिप्रतिज्ञामात्रम् किंच ग्रस्तास्ते तयोःपरेद्युरुदयेदृष्ट्वाभ्यवहरेच्छुचिरित्यादिवाक्यवैयर्थ्यापत्तिः चाक्षुषज्ञानान्यथानुपपत्त्यैवार्थादुदयेस्नानसिद्धेः ननु मुक्तिस्नानेशास्त्रीयमेवज्ञानंनिमित्तंनचाक्षुषं चंद्रसूर्यग्रहेनाद्यात्तस्मिन्नहनिपूर्वतः राहोर्विमुक्तिंविज्ञायस्नात्वाकुर्वीतभोजनमिति **वृद्धगौतमे**नविज्ञायेतिज्ञानमात्रोक्तेः यत्तु मुक्तिंदृष्ट्वातुभोक्तव्यंस्नानंकृत्वाततःपरमिति तदपिज्ञानमात्रपरम् मेघमालादिदोषेणयदिमुक्तिर्नदृश्यते आकलय्यतुतंकालंस्नात्वाभुंजीतवाग्यतइति **गौडनिबंधे**वचनात् मैवम् अज्ञातस्यनिमित्तत्वाभावेन निमित्तमहिम्नैवज्ञानलाभेवाक्यवैयर्थ्यात् ग्रस्तास्तेपितदापत्तेश्च ।

आतां जें **वर्धमानानें** सांगितलें कीं, 'ज्ञानोत्तर स्नानादिकांविषयीं अधिकार, ज्ञानकालीं अधिकार नाहीं; कारण, ज्ञानकालीं अधिकार मानला तर स्नानकालीं ज्ञानाचा अभाव असल्यामुळें अधिकार नाहींसा होईल. याप्रमाणें 'दर्शनोत्तर मुक्तिपर्यंत योग्यता आहेच' असें तेंही सामान्यतः सांगणें आहे. आणखी 'मुक्तिं दृष्ट्वा ततः स्नायात्' म्हणजे 'मुक्ती पाहून नंतर स्नान करावें' या ठिकाणीं मुक्तिस्नानाला चाक्षुषज्ञान निमित्त असें मानलें असतां, ग्रस्तास्तस्थलीं "दुसऱ्या दिवशीं त्या चंद्रसूर्यांचा उदय झाल्यावर पाहून शुद्ध होऊन भोजन करावें" या वाक्याला व्यर्थत्व प्राप्त होईल; कारण, अन्यथा म्हणजे उदयावांचून चाक्षुषज्ञानाची अनुपपत्ति असल्यामुळें अर्थात् उदय झाल्यावर स्नान सिद्ध आहे; त्याकरितां वाक्याची गरज नाहीं. **शंका**—मुक्तिस्नानाविषयीं शास्त्रीयच ज्ञान निमित्त, चाक्षुषज्ञान निमित्त नाहीं; कारण, "चंद्रसूर्यग्रहण ज्या दिवशीं असेल त्या दिवशीं पूर्वी जेवूं नये; ग्रहणाची मुक्ति जाणून नंतर स्नान करून भोजन करावें," ह्या वचनांत **वृद्धगौतमानें** 'विज्ञाय' (जाणून) असें सामान्य ज्ञान सांगितलें आहे. आतां जें "मुक्ति पाहून नंतर स्नान करून भोजन करावें" असें वचन तेंही सामान्यज्ञानविषयक आहे; कारण, "मेघमाला इत्यादि दोषांमुळें जर मुक्ति झालेली दिसणार नाहीं, तर मुक्ति-कालाचें आकलन करून ( शास्त्रादिकानें ज्ञान करून घेऊन ) स्नान करून भोजन करावें" असें **गौडनिबंधांत** वचन आहे. अर्थात् मुक्तिस्नानाविषयीं सामान्य ज्ञान निमित्त असें म्हणतो? **समाधान**-असें म्हणतां येणार नाहीं; कारण, अज्ञात जो ग्रहणमोक्ष त्याला निमित्तत्वाचा अभाव असल्यामुळें ज्यापेक्षां निमित्त म्हणून सांगितलें त्यापेक्षां निमित्ताच्या महिम्यानेंच ज्ञान असलें पाहिजे असें झालें असतां 'राहोर्विमुक्तिं विज्ञाय' हें **वृद्धगौतमाचें** वचन व्यर्थ होईल. आणि ग्रस्तास्तस्थलीं देखील मुक्तिज्ञानानंतर भोजन प्राप्त होईल.

**किंच** दर्शनंपुंसोविशेषणमुपलक्षणंवा नाद्यः दर्शनावच्छिन्नेकालेस्नानतुलादानादेर्बाधात् दर्शनविच्छेदेकृतमपिस्नानादिनग्रहणनिमित्तंस्यात् नांत्यः यावद्दर्शनगोचरइतियावत्पदवैयर्थ्यप्रसंगात् दृष्टग्रहस्यग्रहणोत्तरमपिस्नानाद्यापत्तेश्च ज्ञानपक्षेप्येषदोषस्तुल्यइतिचेत् मूर्खोसि यदिज्ञानवाचकंपदंश्रूयेत ततस्तस्यान्वयोविचार्येत दृशिस्तुश्रूयतइतिवैषम्यम् कथंतर्हिज्ञानंलभ्यते संक्रांतौस्नायादितिवदर्थादित्यवेहि अश्रुतत्वादेवनोद्देश्यविशेषणविवक्षाकृतोवाक्यभेदोपि अस्तुतर्हिदृष्टंग्रहणंनिमित्तमितिचेन् ग्रस्तास्तेऽस्तोत्तरंस्नानापत्तेः विशिष्टोद्देशेवाक्यभेदाच्च तवाप्येतत्तुल्यमितिचेत् यावद्दर्शनगोचरइतिवचनेनतन्निषेधात् तवत्वन्यग्रहइवग्रस्तास्तेपिस्यात् ।

आणखी 'राहुदर्शने' या ठिकाणीं जर दर्शनपद विवक्षित आहे, तर तें दर्शन पुरुषाचें विशेषण आहे किंवा उपलक्षण आहे. विशेषण म्हटलें म्हणजे दर्शनयुक्त जो पुरुष त्यानें स्नानादि करावें, असा अर्थ होतो. पहिला पक्ष विशेषण म्हणतां येत नाहीं; कारण, दर्शनयुक्तकालीं स्नान, तुलादान इत्यादिकांचा बाध ( असंभव ) आहे. दर्शन नसतां स्नानादि केलें तरी तें ग्रहणनिमित्तक होणार नाहीं. दुसरा पक्ष उपलक्षण. तेंही म्हणतां येत नाहीं; कारण, 'यावद्दर्शनगोचरः' म्हणजे 'जोंपर्यंत दर्शनाला विषय आहे, तोंपर्यंत अधिकार' ह्या वाक्यांतील यावत्पद व्यर्थ होईल. आणि ज्यानें ग्रहण पाहिलें त्याला ग्रहणोत्तर कधींही स्नानादिक प्राप्त होईल. ज्ञानपक्षीं देखील हा दोष सारखाच आहे, म्हणजे ज्ञान विशेषण मानलें तर ज्ञानकालीं स्नानादिकांचा बाध व ज्ञानाचा विच्छेद झाला असतां केलेलें स्नानादिक ग्रहणनिमित्तक नाहीं. उपलक्षण मानलें तर यावत्पदाला व्यर्थत्व; आणि ज्ञान झाल्यावर कधींही स्नानादिक प्राप्त होतील. हा दोष येतोच असें म्हणशील तर तूं मूर्ख आहेस! कारण, जर ज्ञानवाचक पद असेल तर त्याच्या अन्वयाचा विचार केला जाईल! पण ज्ञानवाचकपद नाहीं. दर्शनपद

१ उपलक्षण म्हणजे व्यावर्तक. जसें–विशेषण इतरांची व्यावृत्ति करितें तसेंच उपलक्षणही इतराची व्यावृत्ति करितें, जसें–काकवद्देवदत्तस्य गृहम्' या ठिकाणीं देवदत्ताचें गृह कोणतें? असा प्रश्न केला असतां त्याला कोणी एकानें सांगितलें कीं, ज्या घरावर त्या दिवशीं अमक्या वेळीं कावळा बसला होता तें घर देवदत्ताचें होय. येथें काक हा उपलक्षण आहे, परंतु तो सर्वदा नाहीं. आणि विशेषण सर्वदा असतें.

प्रत्यक्ष श्रुत आहे असें ज्ञानपक्षाहून दर्शनपक्षीं वैषम्य आहे. जर ज्ञानवाचकपद नाहीं तर 'राहुज्ञान झालें म्हणजे स्नानादि करावें' या ठिकाणीं ज्ञान हा अर्थ कसा लब्ध होतो? असें म्हणशील तर 'संक्रांतीस स्नान करावें' ह्या स्थलीं जसें संक्रांति-निमित्तक स्नान सांगितल्यानें अर्थात् तिचें ज्ञान प्राप्त होतें त्याप्रमाणें येथेंही 'ज्ञान' हा अर्थ अर्थात् प्राप्त होतो, असें जाण. ज्ञानवाचकपद श्रुत नाहीं म्हणूनच उद्देश्याचें विशेषण विवक्षित असल्यानें जो वाक्यभेद होत असतो तोही येथें होत नाहीं. आतां पाहिलेलें जें ग्रहण तें स्नानादिकांला निमित्त असूं द्या? असें जर म्हटलें तर ग्रस्तास्तस्थलीं अस्तोत्तर स्नान प्राप्त होईल. आणि दर्शनविशिष्ट ग्रहणाचा उद्देश केला असतां 'दर्शन करावें' हें एक वाक्य आणि 'दर्शनयुक्त ग्रहण असतां स्नान करावें' हें दुसरें वाक्य. याप्रमाणें वाक्यभेदही होईल. तुला ही ( ज्ञातग्रहण निमित्त असें म्हणणारालाही ) हा दोष ( ग्रस्तास्तीं अस्तोत्तर स्नानापत्तिरूप ) सारखा आहे असें म्हणशील तर 'यावद्दर्शनगोचरः' ह्या वचनानें दर्शनपर्यंत अधिकार सांगितल्यानें अस्तोत्तर स्नानादिकाचा निषेध आहे. तुझ्या मतीं तर इतर ग्रहणाविषयीं जसें दृष्टग्रहण निमित्त तसें ग्रस्तास्तस्थलीं देखील दृष्टग्रहण असल्यामुळें स्नानादिक प्राप्त होईल. आमच्या मतीं "यावद्दर्शनगोचरः" याचा अर्थ जोंपर्यंत दृष्ट ( पाहिलेलें ) ग्रहण आहे तोंपर्यंत अधिकार असा केल्यामुळें या वचनानें निषेध होत नाहीं.

**किंच** दर्शनस्यविधिरनुवादोवा आद्ये ग्रहणोद्देशेनदर्शनविधिरुतदर्शनविशिष्टस्नानविधिरुतस्नानोद्देशेन-दर्शनविधिः नाद्यः ग्रहोद्देशेनस्नानविधानेदर्शनविधानेचवाक्यभेदात् एतेनद्वितीयोपिपरास्तः नतृतीयः स्नानस्याप्राप्तेः दर्शनस्यनिमित्तत्वेनाविधेयत्वाच्च अन्यथासोमवमनादौप्रसंजनविधिःकेनवार्येत ।

आणखी 'राहुदर्शने' येथें दर्शनाचा विधि आहे किंवा अनुवाद आहे. पहिल्यापक्षीं ( विधिपक्षीं ) ग्रहणोद्देशेंकरून दर्शनाचा विधि, किंवा दर्शनविशिष्ट स्नानविधि अथवा स्नानोद्देशेंकरून दर्शनाचा विधि. या तिघांमध्यें पहिला पक्ष युक्त नाहीं; कारण, 'ग्रहण असतां स्नान करावें' असें ग्रहणाच्या उद्देशानें स्नानाचें विधान आणि 'ग्रहण पाहावें' असें ग्रहणाच्या उद्देशानें दर्शनाचें विधान केलें असतां वाक्यभेद होतो. येणेंकरून दुसराही पक्ष खंडित झाला. तिसराही पक्ष युक्त नाहीं; कारण, स्नान अप्राप्त असल्यामुळें त्याचा उद्देश करितां येत नाहीं. आणि दर्शन निमित्त असल्यामुळें त्याचें विधानही होत नाहीं. अन्यथा म्हणजे जें निमित्त असतें त्याचें विधान मानलें तर 'सोमाचें वमन झालें असतां सोमेंद्र देवतेला श्यामाकचरूचा निर्वाप ( होम ) करावा' असें सांगितलें आहे. या ठिकाणीं श्यामाकचरूला निमित्त सोमवमन आहे. या स्थलीं 'सोमवमन करावें' असा सोमवमनाचा विधि प्रसक्त झाला त्याचें वारण कशानें होणार? याकरितां निमित्ताचें विधान होत नाहीं, असें म्हटलें पाहिजे.

अथनानावाक्येषुक्वचिद्दर्शनविशिष्टस्नानविधिः क्वचित्प्राप्तंदर्शनंनिमित्तीकृत्यस्नानमात्रविधिः तन्न स्नान-स्यप्रधानस्यप्राप्तौतदंगदर्शनप्राप्तिः तस्यांचनिमित्तेसतिस्नानमित्यन्योन्याश्रयात् एवंदर्शनविधौसतितन्निमित्त-कस्नानविधिः सतिचप्रधानस्नानविधौतदंगदर्शनविधिः एवमधिकारेप्रयोजकत्वेचयोज्यम् क्त्वार्थपूर्वकाल-त्वविधौचास्त्येववाक्यभेदः अन्यथास्नानोत्तरमपिदर्शनमंगंस्यात् नद्वितीयः तत्रापिदर्शनग्रहयोर्निमित्तत्वेस्ना-नद्वयापत्तेः दर्शनावृत्तौनैमित्तिकावृत्तिप्रसंगात् दर्शनविशिष्टग्रहस्याविशिष्टस्यानुवादेवाक्यभेदापत्तेः नचह्-विरार्तिवद्विशिष्टंनिमित्तमितिवाच्यम् आर्तिमात्रस्यहिनिमित्तत्वेनिमेषाद्यार्तेरपितत्त्वापत्तेर्नैमित्तिकत्वभंगा-द्युक्तंविशिष्टोद्देश्यत्वम् इहतुग्रहणमात्रस्यनिमित्तत्वेनकाचित्क्षतिः तस्माद्दर्शनवाक्यानांग्रस्तास्तविषयत्वादना-देश्यग्रहपरत्वाद्वाज्ञानस्यचार्थतःप्राप्तेस्तदेवनिमित्तं तेनमेघाद्याच्छादनेऽधादेश्चस्नानादिभवत्येवेत्यलंवेदबाह्यैः-संलापेन इतिग्रहणनिर्णयः ।

आतां नाना वाक्यांमध्यें क्वचित्स्थलीं ( 'मुक्तिं दृष्ट्वा ततः स्नायात्' मुक्ति पाहून स्नान करावें, इत्यादि स्थलीं ) दर्शनविशिष्ट स्नानाचा विधि. क्वचित्स्थलीं ( 'राहुदर्शने' इत्यादि स्थलीं ) प्राप्त जें दर्शन त्याला निमित्त करून स्नानाचाच विधि आहे. हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण, 'दर्शन करून स्नान करावें, असें झाल्यानें प्रधान स्नान त्याची प्राप्ति असेल त्या वेळीं त्याची अंगभूत जी दर्शनाची प्राप्ति ती येणार, आणि दर्शनाची प्राप्ति निमित्त झालें असतां स्नानाची प्राप्ति येणार, असा अन्योन्या-

१ उद्देश्याचें विशेषण विवक्षित असतां वाक्यभेद होतो तो असा—'रक्तवस्त्रमानय' या ठिकाणीं उद्देश्य वस्त्र त्याचें विशेषण रक्त हें जर विवक्षित म्हणजे सार्थक व्हावें असें असेल, तर 'वस्त्रमानय' या वाक्यानें आनयनाचें विधान. 'तच्च रक्तं' या वाक्यानें रक्तत्वाचें विधान. तसें येथें जर ज्ञानवाचकपद श्रुत असतें तर 'ग्रहणं ज्ञेयं' ह्या एक वाक्यानें ज्ञानविषयत्वाचें विधान करून नंतर 'तस्मिन् सति स्नायात्' या वाक्यानें स्नानाचें विधान. याप्रमाणें वाक्यभेद झाला असता तो होत नाहीं. २ वचनांतच दोघांचें विधान असल्यामुळें निराळा वाक्यभेद करण्याची गरज नाहीं. म्हणून वरील वाक्यभेदाची आपत्ति नाहीं.

श्रय ( परस्परसापेक्षत्व ) रूप दोष येतो. याप्रमाणें दर्शनविधि असतां दर्शननिमित्तक स्नानविधि, आणि प्रधान स्नानविधि असतां तदंग दर्शनविधि. यासारखेंच अधिकाराविषयीं योजावें. तें असें—दर्शनाधिकार असतां तन्निमित्तक स्नानाधिकार, प्रधानस्नानाधिकार असतां तदंग दर्शनाधिकार. असेंच प्रयोजकत्वाविषयींही योजावें. आतां या स्थलीं ( 'मुक्तिं दृष्ट्वा ततः स्नायात्' येथें ) वचनांत दोघांचें विधान असल्यामुळें वाक्यभेद नाहीं, असें म्हणशील तर 'दृश्' या धातूहून 'क्त्वा' प्रत्यय आहे, त्याचा अर्थ पूर्वकालत्व त्याचें विधान करतेवेळीं वाक्यभेद आहेच. तो असा—'मुक्ति पूर्वकालीं पाहावी' असें भिन्न वाक्य करून पूर्वकालाचें विधान केलेंच पाहिजे, नाहीं केलें तर स्नानोत्तरही त्या स्नानाचें अंग दर्शन होईल म्हणजे त्या वाक्याचा 'स्नानोत्तर दर्शन करावें' असाही अर्थ होईल. आतां दुसरा पक्ष म्हणजे प्राप्तदर्शनाला निमित्त करून स्नानाचाच विधि. हा पक्षही युक्त नाहीं; कारण, एक दर्शन निमित्त व दुसरें ग्रहण निमित्त अशीं दोन निमित्तें झालीं असतां दोन स्नानें प्राप्त होतील. दर्शनाची आवृत्ति झाली असतां नैमित्तिक जें स्नान त्याच्या आवृत्तीचा प्रसंग येईल. आतां दर्शनाचा अनुवाद या पक्षीं दर्शनविशिष्ट जें ग्रहण तें निमित्त, असा विशिष्टग्रहणाचा अनुवाद केला असतां ( म्हणजे 'दर्शन करावें, तें झालें असतां स्नान करावें' असा ) वाक्यभेद प्राप्त होतो. **शंका**—आतां असें म्हणतों कीं, जशी—हविरार्ति ( हविर्विशिष्ट आर्ति ) हें विशिष्टनिमित्त पंचशरावओदन यागाला आहे, तसें येथें दर्शनविशिष्टग्रहण असें विशिष्ट निमित्त आहे असें म्हणूं ? तर तसें म्हणतां येत नाहीं; कारण, त्या ठिकाणीं सामान्य आर्ति म्हणजे पीडा ही त्या यागाला निमित्त असें म्हटलें तर त्या मनुष्याच्या निमेषादि आर्तीलाही निमित्तत्व प्राप्त होईल, तसें झालें म्हणजे पंचशरावओदनयागाला नैमित्तिकत्व येणार नाहीं, म्हणून विशिष्टाला ( हविर्विशिष्ट आर्तीला ) उद्देश्यत्व ( निमित्तत्व ) युक्त आहे. येथें तर सामान्य ग्रहणाला निमित्तत्व मानलें असतां कोणताही दोष येत नाहीं; म्हणून दर्शनविशिष्ट ग्रहणाला निमित्तत्व नाहीं. या कारणास्तव दर्शनपदयुक्त जीं वाक्यें ( मुक्तिं दृष्ट्वा ततः स्नायात्' इत्यादि व 'स्नानंदानंततःश्राद्धमनंतंराहुदर्शने' इत्यादि ) तीं प्रस्तास्ताची व्यावृत्ति करणारीं अथवा अनादेश्य ( सांगण्यास अयोग्य ) असे जे अंगुलादि न्यूनग्रह त्यांची व्यावृत्ति करणारीं आहेत, व ज्ञान तर संक्रांत्यादिप्रमाणें अर्थात् प्राप्त आहे म्हणून अर्थात् प्राप्त झालेलें जें ज्ञान तेंच स्नानादिकांला निमित्त आहे. त्या कारणानें मेघादिकानें आच्छादित असतां व अंधादिकांना स्नानादि होतच आहे. आतां वेदबाह्यांशीं ( नास्तिकांबरोबर ) संलाप ( संभाषण ) पुरे करितों. याप्रमाणें ग्रहणाचा निर्णय समाप्त झाला.

**अथसमुद्रस्नानम् आश्वलायनः** समुद्रेपर्वसुस्नायादमायांचविशेषतः पापैर्विमुच्यतेसर्वैरमायां-स्नानमाचरन् भृगौभौमदिनेस्नानंनित्यमेवविवर्जयेत् **भारते** अश्वत्थसागरौसेव्यौनस्प्रष्टव्यौकदाचन अश्व-त्थंमंदवारेतुसागरंपर्वणिस्पृशेत् **पृथ्वीचंद्रोदयेस्कांदे** पुनातिपर्वणिस्नानात्तर्पणैःसरितांपतिः कदाचिद-पिनैवात्रस्नानंकुर्यादपर्वणि अस्यापवादस्तत्रैव**प्रभासखंडे** पर्वकालेचसंप्राप्तेनदीनांचसमागमे सेतुबंधेतथा-सिंधौतीर्थेष्वन्येषुसंयतः एवमादिषुसर्वेषुमेध्योऽन्येतुस्वकर्मणि तथा विनामंत्रंविनापर्वक्षुरकर्मविनानरैः कुशाग्रेणापिदेवेशिनस्प्रष्टव्योमहोदधिः तथा नकालनियमःसेतौसमुद्रस्नानकर्मणि ।

## आतां समुद्रस्नानाविषयीं निर्णय सांगतो.

**आश्वलायन**—"समुद्राचें स्नान करणें तें पर्वाचे ठायीं करावें. अमावास्यापर्वणीस तर अवश्य करावें. अमावास्येस समुद्रस्नान करणारा सर्वपापांपासून मुक्त होतो. शुक्रवार व मंगळवार या दिवशीं समुद्रस्नान सर्वदा वर्ज्य करावें." **भारतांत**—"अश्वत्थ आणि सागर हे सेव्य होत, परंतु त्यांना स्पर्श कधींही करूं नये. शनिवारीं अश्वत्थाला स्पर्श करावा व पर्वणीचे दिवशीं समुद्राला स्पर्श करावा." **पृथ्वीचंद्रोदयांत-स्कांदांत**—"पर्वाचे ठायीं समुद्रस्नान करून तर्पण करावें, तेणेंकरून समुद्र पवित्र करितो. पर्वावांचून अन्य कोणत्याही दिवशीं समुद्रस्नान करूं नये." **याचा अपवाद पृथ्वीचंद्रोदयांत-प्रभासखंडांत**—"पर्वकाल प्राप्ति, नदींचा समागम, सेतुबंध, सिंधु, व अन्य तीर्थें यांचे ठिकाणीं असलेला समुद्र पवित्र आहे. इतर तीर्थें विशेष आपआपल्या कर्मांविषयीं पवित्र आहेत." तसेंच "मंत्रावांचून, पर्वणीवांचून व क्षुरकर्मावांचून कुशाग्रानेंही समुद्राला स्पर्श करूं नये". तसेंच-सेतुबंधीं समुद्रस्नानाविषयीं कोणताही कालनियम नाहीं, अर्थात् सर्वकालीं स्नान करावें."

---

१ दर्शपूर्णमासयागप्रकरणीं असें श्रुतिवचन आहे कीं, "यस्योभयं हविरार्तिमार्च्छेत्-ऐंद्रं पंचशरावमोदनं निर्वपेत्" याचा अर्थ—ज्याचीं दोन वेळचीं हवि पीडित होतील त्यानें इंद्रदेवतेला पंचशरावओदनाचा होम करावा, या ठिकाणीं गाय दोहन करून काढलेलें दूध त्याला आर्ति ( पीडा, बिघडणें ) झाली असतां प्रायश्चित्तार्थ पंचशरावओदनाचा याग सांगितला आहे. तेथें हविरार्ति म्हणजे हविःपीडा हें विशिष्ट निमित्त पंचशरावयागाला सांगितलें आहे.

**तद्विधिश्च** तत्रैव पिप्पलादसमुत्पन्नेकृत्येलोकभयंकरे पाषाणस्तेमयादत्तआहारार्थेप्रकल्प्यतामितिपाषाणं प्रक्षिप्य विश्वाचीचघृताचीचविश्वयोनेविशांपते सान्निध्यंकुरुमेदेवसागरेलवणांभसि नमस्तेविश्वगुप्तायनमोविष्णोअपांपते नमोजलधिरूपायनदीनांपतयेनमः समस्तजगदाधारशंखचक्रगदाधर देवदेहिममानुज्ञांतवतीर्थनिषेवणे त्रितत्त्वात्मकमीशानंनमोविष्णुमुमापतिम् सान्निध्यंकुरुदेवेशसागरेलवणांभसि अग्निश्चयोनिरनिलश्चदेहोरेतोधाविष्णुरमृतस्यनाभिः एतद्ब्रुवन्पांडवसत्यवाक्यंततोऽवगाहेतपतिंनदीनामितिभारतोक्तमंत्रान्पठित्वाविधिवत्स्नात्वा सर्वरत्नोभवाञ्छ्रीमान्सर्वरत्नाकरोयतः सर्वरत्नप्रधानस्त्वंगृहाणार्घ्यंमहोदधे इत्यर्घ्यंदत्वातर्पयेत् यथोक्तंपृथ्वीचंद्रोदयेस्कांदे पिप्पलादंविकण्वंचकृतांतंजीवकेश्वरम् वसिष्ठंवामदेवंचपराशरमुमापतिं वाल्मीकिंनारदंचैववालखिल्यांस्तथैवच नलंनीलंगवाक्षंचगवयंगंधमादनम् जांबवंतंहनूमंतंसुग्रीवंचांगदंतथा मैंदंचद्विविदंचैवऋषभंशरभंतथा रामंचलक्ष्मणंचैवसीतांचैवयशस्विनीम् एतांस्तुतर्पयेद्विद्वाञ्जलमध्येविशेषतः आब्रह्मस्तंबपर्यंतंयत्किंचित्सचराचरम् मयादत्तेनतोयेनतृप्तिमेवाभिगच्छत्विति ॥ ॥ इतिश्रीमीमांसकनारायणभट्टसूरिसूनुरामकृष्णभट्टात्मजदिनकरभट्टानुजकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौप्रथमःपरिच्छेदःसमाप्तः ॥

**समुद्रस्नानाचा विधि—तेथेंच सांगतो—"पिप्पलादसमुत्पन्नेकृत्येलोकभयंकरे ॥ पाषाणस्तेमयादत्तआहारार्थेप्रकल्प्यताम्"** या मंत्रानें समुद्रांत पाषाण टाकून, **विश्वाचीचघृताचीचविश्वयोनेविशांपते ॥ सान्निध्यंकुरुमेदेवसागरेलवणांभसि ॥ नमस्तेविश्वगुप्तायनमोविष्णोअपांपते ॥ नमोजलधिरूपाय नदीनांपतयेनमः ॥ नमस्तेजगदाधारशंखचक्रगदाधर ॥ देवदेहिममानुज्ञांतवतीर्थनिषेवणे ॥ त्रितत्त्वात्मकमीशानंनमोविष्णुमुमापतिम् ॥ सान्निध्यंकुरुदेवेशसागरेलवणांभसि ॥ अग्निश्चयोनिरनिलश्चदेहोरेतोधाविष्णुरमृतस्यनाभिः ॥ एतद्ब्रुवन्पांडवसत्यवाक्यंततोवगाहेतपतिंनदीनाम्"** हे भारतोक्त मंत्र पठण करून यथाविधि स्नान करून **"सर्वरत्नोभवान्श्रीमान्सर्वरत्नाकरोयतः ॥ सर्वरत्नप्रधानस्त्वंगृहाणार्घ्यंनमोस्तुते."** या मंत्रानें अर्घ्य देऊन तर्पण करावें. तें तर्पण असें:-**पृथ्वीचंद्रोदयांत स्कंदपुराणांत**-"पिप्पलादं तर्पयामि, विकण्वंत०, कृतांतंत०, जीवकेश्वरंत०, वसिष्ठंत०, वामदेवंत०, पराशरंत०, उमापतिंत०, वाल्मीकिंत०, नारदंत०, वालखिल्यान्त०, नलंत०, नीलंत०, गवाक्षंत०, गवयंत०, गन्धमादनंत०, जांबवंतंत०, हनूमन्तंत०, सुग्रीवंत०, अंगदंत०, मैंदंत०, द्विविदंत०, ऋषभंत०, शरभंत०, रामंत०, लक्ष्मणंत०, यशस्विनीं सीतांत० ह्या देवतांचें तर्पण उदकांत करावें; नंतर **आब्रह्मस्तंबपर्यंतंयत्किंचित्सचराचरं ॥ मयादत्तेनतोयेनतृप्तिमेवाभिगच्छतु ॥** असें म्हणून पाणी सोडावें." **इति श्रीनिर्णयसिंधूच्या प्रथमपरिच्छेदाची महाराष्ट्रीका समाप्त झाली.**

## इति प्रथमपरिच्छेदः समाप्तः ॥

# द्वितीय परिच्छेद.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

अथसंवत्सरप्रतिपदमारभ्य तिथिकृत्येचकृष्णादिंव्रतेशुक्लादिमेवच विवाहादौचसौरादिंमासंकृत्येविनिर्दिशेदितिब्राह्मंप्रायशोनुसृत्यतिथिनिर्णयस्तत्कृत्यंचनिरूप्यते तत्रमीनसंक्रांतौपश्चात्षोडशघटिकाः**पुण्यकालः** रात्रौतुनिशीथात्प्राक्परतश्चसंक्रमेपूर्वोत्तरदिनार्धेपुण्यंनिशीथेतुदिनद्वयंपुण्यमितिसामान्यनिर्णयादवसेयम्।

आतां "तिथिकृत्याविषयीं कृष्णपक्षादि, व्रतांविषयीं शुक्लपक्षादि व विवाहादिकार्यांविषयीं सौरादि महिना घ्यावा" ह्या **ब्राह्म**वचनाला प्रायशः अनुसरून संवत्सरप्रतिपदेला आरंभ करून तिथिनिर्णय व तिथिकृत्यें सांगतो. **चैत्रमासनिर्णय—** त्यांत मीनसंक्रांतीचे ठिकाणीं पुढच्या सोळा घटका पुण्यकाळ. रात्रीं मीनसंक्रांत असतां मध्यरात्रीच्या पूर्वी असेल तर पूर्व दिवसाचें उत्तरार्ध पुण्यकाळ, मध्यरात्रीच्या पुढें संक्रांत असेल तर पुढच्या दिवसाचें पूर्वार्ध पुण्यकाळ, मध्यरात्रीं झाली तर पूर्व दिवशीं व पर दिवशीं दोन्ही दिवशीं पुण्यकाळ, असा सामान्य निर्णयावरून हा पुण्यकाळ समजावा.

**अथतिथिनिर्णयः** तत्रचैत्रशुक्लप्रतिपदिवत्सरारंभः तत्रौदयिकीग्राह्या चैत्रेमासिजगद्ब्रह्माससर्जप्रथमेहनि शुक्लपक्षेसमग्रंतुतदासूर्योदयेसतीति**हेमाद्रौब्राह्मोक्तेः** दिनद्वयेतद्व्याप्तावव्याप्तौवापूर्वैव तदुक्तं **ज्योतिर्निबंधे** चैत्रसितप्रतिपदियोवारोर्कोदयेसवर्षेशः उदयद्वितयेपूर्वोनोदययुगुलेपिपूर्वःस्यात् यस्माच्चैत्रसितादेरुदयाद्भानोःप्रवृत्तिरब्दादेरिति वत्सरादौवसंतादौबलिराज्येतथैवच पूर्वविद्धैवकर्तव्याप्रतिपत्सर्वदाबुधैरिति**वृद्धवसिष्ठोक्तेः** चैत्रमासस्ययाशुक्लप्रथमाप्रतिपद्भवेत् तदह्निब्रह्मणःकृत्वासोपवासस्तुपूजनं संवत्सरमवाप्नोतिसौख्यानिभृगुनंदनेति**हेमाद्रौविष्णुधर्मोक्तेः** यदातुचैत्रोमलमासोभवतितदादैव कार्यस्यतत्रनिषिद्धत्वाच्छुद्धेमासिसंवत्सरारंभःकार्यइतिकेचिदाहुः **निष्कर्षस्तु** शुक्लादेर्मलमासस्यसोंतर्भवतिचोत्तरइत्यादिवचनादग्रिमवर्षांतःपातान्मलमासमारभ्यैववर्षप्रवृत्तेःशुक्रास्तादाविवमलमासएवकार्यइतिवयंप्रतीमः ननुशुक्रास्तादौचैत्रशुक्लप्रतिपदंतरस्याभावाद्युक्तंतन्मध्यएवानुष्ठानं मलमासेतुशुद्धप्रतिपदंतरस्यसंभवात् शुद्धएववत्सरारंभोयुक्तइतिचेन भ्रांतोसि नहिप्रतिपदंतरसत्त्वंप्रयोजकं द्विःकरणापत्तेः वर्षेशद्वयापत्तेश्च अपितुवत्सरारंभःसतुमलमासेपीत्युक्तंप्राक् नहिचैत्रशुक्लादिर्मलमासःपूर्ववर्षेऽतर्भवतीतिब्रह्मणापिसुवचम् तत्रतैलाभ्यंगोनित्यः वत्सरादौवसंतादौबलिराज्येतथैवच तैलाभ्यंगमकुर्वाणोनरकंप्रतिपद्यतइति**वसिष्ठोक्तेः**।

**आतां तिथिनिर्णय सांगतो**—चैत्रशुक्लप्रतिपदेस संवत्सराचा आरंभ होतो, त्या विषयीं प्रतिपदा सूर्योदयव्यापिनी घ्यावी; कारण, "चैत्रमासीं शुक्लपक्षीं प्रथम दिवशीं सूर्योदयीं ब्रह्मदेवानें सर्व जग निर्माण केलें" असें **हेमाद्रींत ब्राह्म**वचन आहे. दोन दिवशीं उदयव्यापिनी असो किंवा नसो तथापि पूर्वदिवशींच करावी. तेंच **ज्योतिर्निबंधांत** सांगितलें, तें असें:-"चैत्रशुद्ध प्रतिपदेस सूर्योदयीं जो वार तो वर्षेश ( वर्षपति ) होय. दोन दिवशीं सूर्योदयीं प्रतिपदेस वार असतां पूर्व घ्यावा, व नसतांही पूर्व घ्यावा; कारण, चैत्रशुक्लाचा आदि जो सूर्योदय, त्यापासून वर्षाचे आदीची प्रवृत्ति ( आरंभ ) होते." "वर्षप्रतिपदा, वसंतऋतूचा आरंभ, बलिप्रतिपदा यांचे ठायीं पूर्वविद्धा प्रतिपदा घ्यावी" असें **वृद्धवसिष्ठ**वचन आहे. "चैत्रमासाचे शुक्लपक्षाची जी पहिली प्रतिपदा, त्या दिवशीं उपोषण करून ब्रह्मदेवाचें पूजन करावें. तेणेंकरून वर्षपर्यंत अनेक सुखें प्राप्त होतात" असें **हेमाद्रींत विष्णुधर्म**वचन आहे, यास्तव पूर्वविद्धाच करावी. जेव्हां चैत्र मलमास होईल तेव्हां देवकार्य त्या मलमासांत करण्याविषयीं निषिद्ध असल्यामुळें शुद्धमासीं संवत्सरारंभ करावा, असें **केचित्** सांगतात. खरोखर म्हटलें म्हणजे—"शुक्लपक्षादि मलमास प्राप्त असतां तो मलमास पुढच्या शुद्ध मासांत अंतर्भूत होतो" इत्यादि वचनांवरून तो मलमास पुढच्या वर्षांत पडल्यामुळें मलमास धरूनच वर्षाची प्रवृत्ति ( प्रारंभ ) झाल्यानें-शुक्र, गुरु यांचे अस्तादिकांमध्यें जसा संवत्सरारंभ होतो तसा-मलमासांतच संवत्सरारंभ करावा, असें आम्हीं (**कमलाकरभट्ट**) समजतों. **शंका**—शुक्रादिकांचे अस्तादिकांत दुसरी, चैत्रशुक्लप्रतिपदा नसल्याकारणानें अस्तादिकांमध्येंच वर्षारंभ करावा हें युक्त आहे. मलमासांत तर दुसऱ्या शुद्ध प्रतिपदेचा संभव असल्यामुळें शुद्धमासींच नवीन वर्षाला आरंभ करावा हें योग्य आहे, असें म्हणूं? **समाधान**—असें जर म्हणशील तर तूं भ्रांत आहेस. कारण, दुसऱ्या प्रतिपदेस वर्षारंभ करण्यास दुसरी प्रतिपदा असणें हें प्रयोजक आहे काय? नाहीं; कारण, तें प्रयोजक मानलें तर दोन वेळां संवत्सरारंभ करावा, असें प्राप्त होईल. आणि वर्षेशही दोन प्राप्त होतील. तर संवत्सराचा आरंभ तो

मलमासांतही होतो, असें पूर्वी सांगितलें आहे. चैत्रशुक्लादि मलमास पूर्व वर्षांत अंतर्भूत होतो, असें ब्रह्मदेवास तरी सांगतां येईल काय ? कोणासही सांगतां येणार नाहीं. चैत्रशुद्धप्रतिपदेस तैलाभ्यंग नित्य आहे; कारण, "वर्षाचा प्रथम दिवस, वसंताचा प्रथम दिवस, बलिराज्य ( बलिप्रतिपदा ) यांचे ठायीं तैलाभ्यंग न करणारा नरकास जातो" असें वसिष्ठवचन आहे.

अस्यामेवनवरात्रारंभः तदुक्तं **मार्कंडेयपुराणे** शरत्कालेमहापूजाक्रियतेयाचवार्षिकीति तत्रपरयुतैव ग्राह्या अमायुकानकर्तव्याप्रतिपच्चंडिकार्चने मुहूर्तमात्राकर्तव्याद्वितीयादिगुणान्वितेति **देवीपुराणात्** तिस्रोह्येताःपराःप्रोक्तास्तिथयःकुरुनंदन कार्तिकाश्वयुजोर्मासोश्चैत्रेमासिचभारतेति **हेमाद्रौब्राह्मोक्तेः** पराःपरयुताः अत्रविशेषःपारणानिर्णयश्चशारदनवरात्रेवक्ष्यते ।

याच प्रतिपदेस नवरात्रारंभ. तें **मार्कंडेयपुराणांत** सांगितलें आहे. तें असें—"शरत्कालीं व वर्षारंभकालीं महापूजा करितात." त्या नवरात्राविषयीं प्रतिपदा द्वितीयायुक्तच घ्यावी; कारण, "चंडिकार्चनाविषयीं अमायुक्त प्रतिपदा न करावी, मुहूर्तमात्र असली तरी द्वितीयायुक्त करावी" असें **देवीपुराणांत** वचन आहे; आणि "कार्तिक, आश्विन, व चैत्र ह्या तीन महिन्यांच्या प्रतिपदा तिथि परा कराव्या." असें **हेमाद्रींत ब्राह्म**वचन आहे. येथें सांगावयाचा विशेष व पारणानिर्णय हा आश्विनमासांत पुढें सांगूं.

अत्रप्रपादानमुक्तम**पराकें भविष्ये** अतीतेफाल्गुनेमासिप्राप्तेचैत्रमहोत्सवे पुण्येह्निविप्रकथितेप्रपादानंसमारभेदित्युपक्रम्य ततश्चोत्सर्जयेद्विद्वान्मंत्रेणानेनमानवः प्रपेयंसर्वसामान्याभूतेभ्यःप्रतिपादिता अस्याःप्रदानात्पितरस्तृप्यंतुहिपितामहाः अनिवार्यंततोदेयंजलंमासचतुष्टयमिति तथा प्रपांदातुमशक्तेनविशेषाद्धर्ममीप्सुना प्रत्यहंधर्मघटकोवस्त्रसंवेष्टिताननः ब्राह्मणस्यगृहेदेयःशीतामलजलःशुचिः **तत्रमंत्रः** एपधर्मघटो दत्तोब्रह्मविष्णुशिवात्मकः अस्यप्रदानात्सकलाममसंतुमनोरथाः अनेनविधिनायस्तुधर्मकुंभंप्रयच्छति प्रपादानफलंसोऽपिप्राप्नोतीहनसंशयइति ।

या प्रतिपदेस प्रपादान ( वाटसरांस पाणी देणें ) सांगतो—**अपरार्कांत-भविष्यांत** "फाल्गुनमास जाऊन चैत्रमहोत्सव प्राप्त झाला असतां ब्राह्मणानें सांगितलेल्या शुभ दिवशीं प्रपादानाचा आरंभ करावा." असा उपक्रम करून पुढें सांगतो "या ( पुढें सांगितलेल्या ) मंत्रानें तिचा उत्सर्ग करावा, तो मंत्र असा—**प्रपेयं सर्वसामान्या भूतेभ्यः प्रतिपादिता ॥ अस्याः प्रदानात्पितरस्तृप्यंतु हि पितामहाः ॥** या मंत्रानें उत्सर्ग करून चार महिने प्राणिमात्रांस जल द्यावें." तसेंच "चार महिने प्रपादान करण्याला शक्ति नाहीं, पण विशेष धर्म व्हावा अशी इच्छा करणारानें प्रतिदिवशीं वस्त्रानें मुखाला वेष्टन केलेला असा धर्मघट ब्राह्मणाच्या घरीं द्यावा, तो थंड स्वच्छ पाण्यानें भरलेला व शुद्ध असावा. त्याचा मंत्र—**एष धर्मघटो दत्तो ब्रह्मविष्णुशिवात्मकः ॥ अस्य प्रदानात्सकला मम संतु मनोरथाः ॥** या विधीनें जो धर्मघट देईल तोही प्रपादानाचें फल पावेल यांत संशय नाहीं."

चैत्रशुक्लतृतीयायां गौरीमीश्वरसंयुतांसंपूज्यदोलोत्सवंकुर्यात् तदुक्तं**निर्णयामृतेदेवीपुराणे** तृतीयायांयजेदेवींशंकरेणसमन्वितां कुंकुमागरुकर्पूरमणिवस्त्रसुगंधकैः स्रग्गंधधूपदीपैश्चदमनेनविशेषतः आंदोलयेत्ततोवत्सशिवोमातुष्टयेसदेति अत्रचतुर्थीयुताग्राह्या मुहूर्तमात्रसत्त्वेपिदिनेगौरीव्रतंपरइति**माधवोक्तेः** अत्रैवसौभाग्यशयनव्रतमुक्तं**मात्स्ये** वसंतमासमासाद्यतृतीयायांजनप्रिये सौभाग्यायसदास्त्रीभिःकार्यंपुत्रसुखेप्सुभिरिति तत्रापिपरयुतैव ।

**तृतीया**—चैत्रशुक्ल तृतीयेस ईश्वरयुक्त गौरीचें पूजन करून मासपर्यंत दोलोत्सव करावा. तो **निर्णयामृतांत देवीपुराणांत** उक्त आहे, तो असा—"तृतीयेस शिवयुक्तदेवीचें कुंकुम, अगुरु, कर्पूर, मणि, वस्त्र, सुगंधिद्रव्यें, माला, गंध, धूप, दीप व दमनक ( दवणा ) यांनीं पूजन करून शिवपार्वतींच्या संतोषार्थ शिवयुक्त देवीला पाळण्यांत घालून आंदोलन करावें." त्या दोलोत्सवाविषयीं चतुर्थीयुक्त तृतीया घ्यावी; कारण, "दुसऱ्या दिवशीं जरी तृतीया एक मुहूर्त उर्वरित असली तरी त्या दिवशींच गौरीव्रत करावें" असें **माधव**वचन आहे. याच तृतीयेस सौभाग्यशयनव्रत सांगतों—**मत्स्यपुराणांत**—"वसंतमास प्राप्त झाला असतां तृतीयेस पुत्रसुखेच्छु स्त्रियांनीं सौभाग्य प्राप्त होण्यासाठीं सौभाग्यशयनव्रत करावें." त्याविषयींही चतुर्थीयुक्तच तृतीया घ्यावी.

इयंचमन्वादिरपि अत्रैवप्रसंगात्सर्वमन्वादिनिर्णयउच्यते ताश्चोक्ता**दीपिकायां** तिथ्यग्नीनतिथिस्तिथ्याशेक्षणेभोनलोग्रहः तिथ्यर्कौनशिवोश्वोमातिथीमन्वादयोमधोरिति तिथिःपूर्णिमा अग्निस्तृतीया नेति-

**वैशाखेनास्तीत्यर्थः आशादशमी कृष्णोभःकृष्णाष्टमी अनलस्तृतीया ग्रहोनवमी अर्कोद्वादशी नेतिमार्गशीर्षेनास्तीत्यर्थः शिवएकादशी अश्वःसप्तमी मधोश्चैत्रादारभ्यैतामन्वादयइत्यर्थः अत्रमूलवचनानिहेमाद्याद्देर्ज्ञेयानि एताश्चमन्वादयोहेमाद्रिमतेशुक्लपक्षस्थाःपौर्वाह्णिकाः कृष्णपक्षस्थाआपराह्णिकाग्राह्याः पूर्वाह्णेतुसदाग्राह्याःशुक्लामनुयुगादयः दैवेकर्मणिपित्र्येचकृष्णेचैवापराह्णिकाइतिगारुडवचनात् अथोमन्वादियुगादिकर्मतिथयःपूर्वाह्णिकाःस्युःसितेविज्ञेयाअपराह्णिकाश्चबहुलेइतिदीपिकोक्तेश्च कालादर्शेत्वपराह्णव्यापित्वंमन्वादिषूक्तंतत्त्वयुक्तमितियुगादिनिर्णयेवक्ष्यामः ।**

ही तृतीया मन्वादिकही आहे. येथेंच प्रसंगेंकरून सर्व मन्वादितिथींचा निर्णय सांगतों. त्या सांगतो—**दीपिकेंत** "चैत्रांत शुक्लतृतीया व पौर्णिमासी, वैशाखांत नाहीं, ज्येष्ठांत पौर्णिमा, आषाढांत शुक्लदशमी व पौर्णमासी, श्रावणकृष्ण अष्टमी, भाद्रपदांत शुक्लतृतीया, आश्विनांत शुक्लनवमी, कार्तिकांत शुक्लद्वादशी व पौर्णिमा, मार्गशीर्षांत नाहीं, पौषांत शुक्ल एकादशी, माघांत शुक्लसप्तमी, फाल्गुनांत पौर्णमासी व अमावास्या, ह्या तिथि मन्वादिक होत. याविषयीं मूलवचनें **हेमाद्रि** इत्यादि ग्रंथीं पाहावीं. ह्या मन्वादितिथि **हेमाद्रि**मतीं शुक्लपक्षांतल्या पौर्वाह्णिका व कृष्णपक्षांतील आपराह्णिका घ्याव्या; कारण, "मन्वादि व युगादि तिथि दैवपित्र्यकर्माविषयीं शुक्लपक्षांतील पूर्वाह्णव्यापिनी व कृष्णपक्षांतील अपराह्णव्यापिनी घ्याव्या" असें **गरुडपुराणांत** वचन आहे. व "मन्वादि युगादि कर्मतिथि शुक्लपक्षीं पूर्वाह्णव्यापिनी व कृष्णपक्षीं अपराह्णव्यापिनी घ्याव्या" असें **दीपिकेंत**ही सांगितलें आहे. **कालादर्शांत** तर मन्वादितिथि अपराह्णव्यापिनी घ्याव्या असें सांगितलें आहे; परंतु तें योग्य नाहीं, असें युगादिनिर्णयांत पुढें सांगूं.

**अत्रचश्राद्धमुक्तंमात्स्ये कृतंश्राद्धंविधानेनमन्वादिषुयुगादिषु हायनानिद्विसाहस्रंपितॄणांतृप्तिदंभवेदिति मन्वादिश्राद्धंचमलमासेमतिमासद्वयेपिकार्यं मन्वादिकंतैर्थिकंचकुर्यान्मासद्वयेपिचेतिस्मृतिचंद्रिकोक्तेः अत्रपिंडरहितंश्राद्धंकुर्यात तदुक्तंकालादर्शे विषुवायनसंक्रांतिमन्वादिषुयुगादिषु विहायपिंडनिर्वापंसर्वंश्राद्धंसमाचरेदिति मन्वादिश्राद्धंनित्यं अकरणेप्रायश्चित्तदर्शनात् तदुक्तमृग्विधाने त्वंभुवःप्रतिमंत्रंचशतवारंजलेजपेत मन्वादयोयदान्यूनाःकुरुतेनैवचापियइति एवंयत्रप्रायश्चित्तवीप्सादिदर्शनंतानिषण्णवतिश्राद्धानिनित्यानि तानितु अमायुगमनुक्रांतिधृतिपातमहालयाः अन्वष्टक्यंचपूर्वेद्युःषण्णवत्यःप्रकीर्तिताइत्युक्तानि चकारादष्टकाग्रहणम् ।**

या मन्वादितिथींचे ठायीं श्राद्ध सांगितलें आहे—**मत्स्यपुराणांत**—"मन्वादि व युगादि तिथींचे ठायीं यथाविधि श्राद्ध केलें असतां दोन हजार वर्षेपर्यंत पितर तृप्त होतात." मन्वादिश्राद्ध मलमास असतां दोनही महिन्यांत करावें; कारण, "मन्वादिक व तीर्थसंबंधीं हीं श्राद्धें दोनही महिन्यांत करावीं" असें **स्मृतिचंद्रिकेंत** सांगितलें आहे. ह्या मन्वादितिथींचे ठायीं पिंडरहित श्राद्ध करावें, तें **कालादर्शांत** सांगतो—"विषुवसंक्रांति व अयनसंक्रांति ( मकर व कर्क ), मन्वादिक व युगादिक तिथि यांचे ठायीं पिंडदानावांचून सर्व श्राद्ध करावें." मन्वादिश्राद्ध नित्य; कारण, न केलें तर प्रायश्चित्त आहे. तें प्रायश्चित्त सांगतो—**ऋग्विधानांत** "मन्वादिश्राद्ध न केलें किंवा करून न्यून झालें तर जलांत बसून **"त्वंभुवः प्रति०"** हा मंत्र शंभर वेळ जपावा." असें जेथें अकरणें प्रायश्चित्त किंवा करण्याविषयीं पुनः पुनः सांगितलें आहे तीं षण्णवति ( ९६ ) श्राद्धें नित्य होत. **तीं षण्णवतिश्राद्धें** अशीं—"अमावास्या १२, युगादि ४, मन्वादि १४, संक्रांति १२, वैधृति १२, व्यतीपात १२, महालय १५, अन्वष्टक्य ५, पूर्वेद्यु ५, अष्टका ५, हीं होत."

**चैत्रशुक्लतृतीयैवमत्स्यजयंती अत्रैवप्रसंगाद्दशावतारजयंत्योनिर्णीयंते तत्रपुराणसमुच्चये मत्स्योभूद्भुतभुग्दिनेमधुसितेकूर्मोविधौमाधवेवाराहोगिरिजासुतेनभसियद्भूतेसितेमाधवे सिंहोभाद्रपदेसितेहरितिथौश्रीवामनोमाधवेरामोगौरितिथावतःपरमभूद्रामोनवम्यांमधोः कृष्णोष्टम्यांनभसिसितपरेचाश्विनेयद्दशम्यांबुद्धःकल्कीनभसिसमभूच्छुक्लपष्ठ्यांक्रमेण अह्नोमध्येवामनोरामरामौमत्स्यःक्रोडश्चापराह्णेविभागे कूर्मःसिंहोबौद्धकल्कीचसायंकृष्णोरात्रौकालसाम्येचपूर्वेति केचित्तुस्फुटानश्लोकान्पठंति तथा चैत्रेतुशुक्लपंचम्यां भगवान्मीनरूपधृक् ज्येष्ठेतुशुक्लद्वादश्यांकूर्मरूपधरोहरिः चैत्रेकृष्णेनवम्यांतुहरिर्वाराहरूपधृक् नरसिंहश्चतुर्दश्यांवैशाखेशुक्लपक्षके मासिभाद्रपदेशुक्लद्वादश्यांवामनोहरिः राधशुद्धतृतीयायांरामोभार्गवरूपधृक् चैत्र-**

शुक्लनवम्यांतुरामोदशरथात्मजः नभस्येतुद्वितीयायांबलभद्रोभवद्धरिः श्रावणेबहुलेऽष्टम्यांकृष्णोभूल्लोकरक्षकः ज्येष्ठेशुक्लद्वितीयायांबौद्धःकल्कीभविष्यतीति ।

## आतां दशावतारजयंत्या सांगतो.

चैत्रशुक्लतृतीया हीच मत्स्यजयंती होय. येथेंच प्रसंगेंकरून दशावतारांच्या जयंत्या ( जन्मदिवस ) सांगतों. **पुराणसमुच्चयांत**—चैत्रशुद्ध तृतीयेस मत्स्यावतार, वैशाखशुद्ध पौर्णिमेस कूर्मावतार, भाद्रपदशुक्ल तृतीयेस वराहावतार, वैशाखशुद्ध चतुर्दशीस नारसिंहावतार, भाद्रपदशुक्ल द्वादशीस वामनावतार, वैशाखशुद्ध तृतीयेस परशुरामावतार, चैत्रशुद्ध नवमीस रामावतार, श्रावणकृष्ण अष्टमीस कृष्णावतार, आश्विनशुक्ल दशमीस बौद्धावतार, श्रावणशुद्ध षष्ठीस कल्क्यवतार, असे हे दहा अवतार झाले. दिवसाच्या मध्यभागीं ( मध्याह्नीं ) वामन, परशुराम, आणि राम हे झाले. अपराह्णीं मत्स्य व वराह हे झाले. सायंकाळीं कूर्म, नारसिंह, बौद्ध व कल्की हे झाले. मध्यरात्रीस कृष्ण झाला. याप्रमाणें हे अवतारकाल होत. या जन्मतिथि दोनही दिवशीं जन्मकालीं सम असतां पूर्वतिथि घ्याव्या." या अवताराविषयीं **केचित् ग्रंथकार** स्फुट श्लोक म्हणतात—ते असे–"चैत्रशुक्लपंचमीस मत्स्यरूपधारणकर्ता भगवान् झाला. ज्येष्ठशुद्ध द्वादशीस कूर्म, चैत्रकृष्ण नवमीस वराह, वैशाखशुद्ध चतुर्दशीस नारसिंह, भाद्रपदशुद्ध द्वादशीस वामन, वैशाखशुद्ध तृतीयेस भार्गवराम, चैत्रशुद्ध नवमीस दाशरथीराम, भाद्रपदशुद्ध द्वितीयेस बलभद्र, श्रावणकृष्ण अष्टमीस कृष्ण, ज्येष्ठशुद्ध द्वितीयेस बौद्ध, हे अवतार या तिथींस झाले. व कल्की पुढें होईल."

**कोंकणास्तु वराहपुराण**स्थत्वेनवाक्यानिपठंति आषाढेशुक्लपक्षेतुएकादश्यांमहातिथौ जयंतीमत्स्यनाम्नीतितस्यांकार्यमुपोषणं नभोमासितृतीयायांहरिःकमठरूपधृक् नभस्यशुक्लपंचम्यांवराहस्यजयंतिका वैशाखेतुचतुर्दश्यांनृसिंहःसमपद्यत मासिभाद्रपदेशुक्लैकादश्यांवामनोहरिः वैशाखेशुक्लपक्षेतुतृतीयायांभृगूद्वहः चैत्रेनवम्यांरामोभूत्कौशल्यायांपरःपुमान् श्रावणेबहुलेष्टम्यांवासुदेवोजनार्दनः पौषशुक्लेतुसप्तम्यांकुर्याद्बौद्धस्यपूजनं माघशुक्लतृतीयायांकल्किनःपूजनंहरेः प्रातःप्रातस्तुमध्याह्नेसायंसायंतथानिशि मध्याह्नेमध्यरात्रेचसायंप्रातरनुक्रमादिति तदत्रसमूलत्वनिर्णयेसतिकल्पभेदेनव्यवस्थाद्रष्टव्या एताश्चतदुपासकानांनित्याः अन्येषांतुकाम्याः जन्माष्टम्यादौतुविशेषंवक्ष्यामः ।

**कोंकणस्थजन** तर **वराहपुराणांतील** म्हणून वाक्यें ( वचनें ) म्हणतात, तीं अशीं—"आषाढशुद्ध एकादशी ही मत्स्यजयंती, तिचेठायीं उपोषण करावें. श्रावणमासीं तृतीया ही कूर्मजयंती. भाद्रपदशुद्ध पंचमी ही वराहजयंती. वैशाखशुद्धचतुर्दशी ही नृसिंहजयंती. भाद्रपदशुद्ध एकादशी वामनजयंती. वैशाखशुद्ध तृतीया भार्गवजयंती. चैत्रशुक्ल नवमी दाशरथिरामजयंती. श्रावणकृष्ण अष्टमी कृष्णजयंती. पौषशुद्ध सप्तमीस बौद्धपूजन करावें. माघशुद्ध तृतीयेस कल्कीचें पूजन करावें. प्रातःकालीं मत्स्य व कूर्म, मध्याह्नीं वराह, सायंकालीं नारसिंह व वामन, रात्रीस भार्गवराम, मध्याह्नीं राम, मध्यरात्रीं कृष्ण, सायंकालीं बौद्ध, प्रातःकालीं कल्की, हे अवतार या कालीं झाले." येथें कितीएक जयंतींविषयीं पुराणसमुच्चयाचें मत वेगळें, स्फुटश्लोकांचें वेगळें आणि वराहपुराणस्थवाक्यांचें वेगळें अशीं मतें भिन्न आहेत. हीं सारीं वचनें समूल असतील तर त्या मतभेदांची व्यवस्था कल्पभेदानें समजावी. ह्या जयंत्या त्या त्या देवतांच्या उपासकांस नित्य व इतरांस काम्य होत. जन्माष्टमी इत्यादिक जयंत्यांविषयीं तर नित्य व काम्य याचा निर्णय पुढें सांगूं.

चैत्रशुक्लपंचमीकल्पादिः तदुक्तं**हेमाद्रौमात्स्ये** ब्रह्मणोयादिनस्यादिःकल्पादिःसाप्रकीर्तिता वैशाखस्यतृतीयायाकृष्णायाफाल्गुनस्यच पंचमीचैत्रमासस्यतथैवांत्यातथापरा शुक्लात्रयोदशीमाघेकार्तिकस्यतुसप्तमी नवमीमार्गशीर्षस्यसप्तैताःसंस्मराम्यहं कल्पानामादयोह्येतादत्तस्याक्षयकारकाः अत्रसर्वोपिनिर्णयोमन्वादिवज्ज्ञेयः **हेमाद्रौब्राह्मे** शुक्लायामथपंचम्यांचैत्रेमासिशुभानना श्रीर्ब्रह्मलोकान्मानुष्यंसंप्राप्ताकेशवाज्ञया ततस्तांपूजयेत्तत्रयस्तंलक्ष्मीर्नमुंचति ।

चैत्रशुद्ध पंचमी ही कल्पादि तिथि होय, तेंच सांगतो—**हेमाद्रींत-मत्स्यपुराणांत**—"ब्रह्मदेवाच्या दिवसाची जी आदि तिथि ती कल्पादि होय. त्या कल्पादि तिथि येणेंप्रमाणें—वैशाखशुद्ध तृतीया, फाल्गुनकृष्ण तृतीया, चैत्रशुद्ध पंचमी, चैत्रकृष्ण पंचमी, माघशुद्ध त्रयोदशी, कार्तिकशुद्ध सप्तमी, मार्गशीर्षशुद्ध नवमी ह्या सात तिथि कल्पादि होत. या तिथींचे ठायीं दान दिलें असतां तें अक्षय होतें." या तिथींचा सर्व निर्णय मन्वादितिथींसारखा जाणावा. **हेमाद्रींत-ब्राह्मपुराणांत**–"चैत्रशुक्ल पंचमीस शुभानना लक्ष्मी विष्णूच्या आज्ञेनें ब्रह्मलोकापासून मनुष्यलोकीं आली, यास्तव तिचें पूजन त्या दिवशीं जो करितो त्याला ती लक्ष्मी सोडीत नाहीं."

चैत्रेशुक्लाष्टम्यांभवान्याउत्पत्तिः तत्रनवमीयुताग्राह्या अष्टमीनवमीयुक्तानवमीचाष्टमीयुतेतिब्र**ह्मवैवर्तात्** अत्रभवानीयात्रोक्ता**काशीखंडे** भवानींयस्तुपश्येतशुक्लाष्टम्यांमधौनरः नजातुशोकंलभतेसदानंदमयोभवेदिति अत्रैवाशोककलिकाप्राशनमुक्तं**हेमाद्रौलैंगे** अशोककलिकाश्चाष्टौयेपिबंतिपुनर्वसौ चैत्रेमासिसितेष्टम्यांनतेशोकमवाप्नुयुः **प्राशनमंत्रस्तु** त्वामशोकवराभीष्टंमधुमाससमुद्भवं पिबामिशोकसंतप्तोमामशोकंसदाकुर्विति अत्रविशेषः **पृथ्वीचंद्रोदयेविष्णुः** पुनर्वसुबुधोपेताचैत्रेमासिसिताष्टमी प्रातस्तुविधिवत्स्नात्वावाजपेयफलंलभेदिति **तिथितत्त्वेकालिकापुराणे** चैत्रेमासिसिताष्टम्यांयोनरोनियतेंद्रियः स्नायाल्लौहित्यतोयेपुसयातिब्रह्मणःपदं चैत्रंतुसकलंमासंशुचिःप्रयतमानसः लौहित्यतोयेयःस्नायात्सकैवल्यमवाप्नुयात् लौहित्योब्रह्मपुत्रः मंत्रस्तु ब्रह्मपुत्रमहाभागशंतनोःकुलसंभव अमोघागर्भसंभूतपापंलौहित्यमेहर ।

चैत्रशुद्ध अष्टमीस भवानीची उत्पत्ति झाली, त्याविषयीं ती अष्टमी नवमीयुक्त घ्यावीः कारण, 'अष्टमी नवमीयुक्त व नवमी अष्टमीयुक्त घ्यावी." असें **ब्रह्मवैवर्त** पुराणवचन आहे. **काशीखंडांत** या तिथिस भवानीयात्रा सांगितली आहे, ती अशी—"जो मनुष्य चैत्रशुद्ध अष्टमीस भवानीचें दर्शन घेईल तो कदापि शोक पावणार नाहीं व सर्वकाल आनंदयुक्त होईल." याच तिथीचे ठायीं अशोककलिकाप्राशन सांगितलें आहे-**हेमाद्रींत-लिंगपुराणांत**-"जे मनुष्य चैत्रशुद्ध अष्टमीस पुनर्वसुनक्षत्रावर असोगीच्या कळ्या आठ प्राशन करितील ते शोक पावणार नाहींत." **प्राशनमंत्र—"त्वामशोकवराभीष्टं मधुमाससमुद्भवं । पिबामिशोकसंतप्तोमामशोकंसदाकुरु ॥"** येथें विशेष सांगतो—**पृथ्वीचंद्रोदयांत विष्णु**—"पुनर्वसुनक्षत्र, बुधवार यांहीं युक्त चैत्रशुद्ध अष्टमीस प्रातःकाळीं यथाविधि स्नान केलें असतां वाजपेययज्ञाचें फळ प्राप्त होतें." **तिथितत्वांत कालिकापुराणांत**-"चैत्रशुद्ध अष्टमीस जितेंद्रिय होऊन जो मनुष्य लौहित्य( ब्रह्मपुत्र )तीर्थांत स्नान करील तो ब्रह्मपदीं जाईल. जो पुरुष शुद्ध व नियतमन होऊन सारा चैत्रमहिना लौहित्यतीर्थादकांत स्नान करील त्यास मोक्ष प्राप्त होईल." **स्नानमंत्र—"ब्रह्मपुत्रमहाभागशंतनोःकुलसंभव। अमोघागर्भसंभूतपापंलौहित्यमेहर ॥"**

चैत्रशुक्लनवमीरामनवमी तदुक्त**मगस्त्यसंहितायां** चैत्रेनवम्यांप्राक्पक्षेदिवापुण्येपुनर्वसौ उदयेगुरुगौरांशोःस्वोच्चस्थेग्रहपंचके मेषेपूषणिसंप्राप्तेलग्नेकर्कटकाह्वये आविरासीत्सकलयाकौशल्यायांपरःपुमान् तस्मिन्दिनेतुकर्तव्यमुपवासव्रतंसदा तत्रजागरणंकुर्याद्रघुनाथपरोभुवीति इयंचमध्याह्नयोगिनीग्राह्या चैत्रशुक्लेतुनवमीपुनर्वसुयुतायदि सैवमध्याह्नयोगेनमहापुण्यतमाभवेदिति**तत्रैवोक्तेः** तथा चैत्रमासेनवम्यांतुजातोरामःस्वयंहरिः पुनर्वस्वृक्षसंयुक्तासातिथिःसर्वकामदा श्रीरामनवमीप्रोक्ताकोटिसूर्यग्रहाधिका तथा केवलापिसदोपोष्यानवमीशब्दसंग्रहात् तस्मात्सर्वात्मनासर्वैःकार्यंवैनवमीव्रतम् ।

चैत्रशुद्ध नवमी ही रामनवमी. तें सांगतो—**अगस्त्यसंहितेंत**-"चैत्रशुद्ध नवमीस दिवसास पुण्य पुनर्वसुनक्षत्रीं गुरु व चंद्र हे लग्नीं असतां व पांचग्रह उच्चांचे असतां, मेषास सूर्य असतां कर्कलग्नीं कौसल्येचे ठायीं परपुरुष ( नारायण ) अंशानें प्रकट झाला; यास्तव त्या दिवशीं भूमीवर राहणारानें उपोषणव्रत नित्य करावें व रामतत्पर होऊन जागरण करावें" ही नवमी मध्याह्नव्यापिनी घ्यावीः कारण, "चैत्रशुद्ध नवमी पुनर्वसुयुक्त असेल तर तीच मध्याह्नीं महापुण्यकारक होते" असें **अगस्त्यसंहितें**तच सांगितलं आहे. तसेंच "चैत्रमासीं नवमीस हरि स्वतः झाला, ती पुनर्वसुनक्षत्रानें युक्त सर्व मनोरथ देणारी होते. ही श्रीरामनवमी कोटि सूर्यग्रहणांहून अधिक आहे." तसेंच "नवमी या शब्दावरून ती तिथि केवळ (पुनर्वसुरहित) देखील उपोषणाला योग्य आहे. नक्षत्राचें प्रयोजन नाहीं, तस्मात् सर्वांनीं सर्वात्मभावानें नवमीव्रत करावें."

पूर्वेद्युरेवमध्याह्नयोगेकर्मकालव्याप्तेःसैवग्राह्या दिनद्वयेमध्याह्नव्याप्तौतदभावेवापूर्वदिनेपुनर्वस्वृक्षयुक्तामपित्यक्त्वापरैवकार्या तदुक्तं**माधवीयेऽगस्तिसंहितायां** नवमीचाष्टमीविद्धात्याज्याविष्णुपरायणैः उपोषणंनवम्यांचदशम्यांचैवपारणमिति अष्टमीविद्धासऋक्षापिनोपोष्येति**माधवः** **रामार्चनचंद्रिकायामपि** विद्धैवचेदृक्षयुक्ताव्रतंतत्रकथंभवेत् विद्धानिषिद्धश्रवणान्नवमीचेतिवाक्यतः वैष्णवानांविशेषात्तुतत्रविष्णुपरैरपि दशम्यादिषुवृद्धिश्चेद्विद्धात्याज्यैववैष्णवैः तदन्येपांचसर्वेपांव्रतंतत्रैवनिश्चितमिति अत्रदशम्यादिषुवृद्धिश्चेदितितदन्येपामितिचवदन् यदाप्रातस्त्रिमुहूर्तानवमीदशमीचक्षयवशात्सूर्योदयात्प्रागेवसमाप्यतेतदास्मार्तानांतत्रैवएकादशीनिमित्तोपवासान्नवमीव्रतांगपारणालोपःस्यात् अतोऽष्टमीविद्धैवस्मार्तैःकार्या वैष्णवानांतु-

**रुणोदयविद्धैकादश्याहेयत्वान्नपारणालोपप्रसंगइतिद्वितीयैवतैःकार्येतिसूचयति दशमीवृद्ध्यभावेष्टमीविद्धाया एवमध्याह्नव्यापित्वेक्षयेचवैष्णवैरपिविद्धैवोपोष्येत्यर्थसिद्धम् ।**

पूर्वदिवशीं मध्याह्नयोग असतां कर्मकालव्याप्ति आहे म्हणून तीच घ्यावी. दोनही दिवशीं मध्याह्नव्याप्ति असो किंवा दोन्हीं दिवशीं मध्याह्नव्याप्ति नसो, पूर्व दिवशीं पुनर्वसुयुक्त असली तरी ती सोडून पराच करावी, तें सांगतो-**माधवीयांत अगस्तिसंहितेंत**-"विष्णुभक्तांनीं अष्टमीविद्ध नवमी टाकावी. नवमीस उपोषण करून दशमीस पारणा करावी." अष्टमीनें विद्ध नवमी पुनर्वसुनक्षत्रयुक्त असली तरी तीस उपोषण करूं नये, असें **माधव** सांगतो. **रामार्चनचंद्रिकेंत**ही "अष्टमीविद्धाच पुनर्वसु नक्षत्रयुक्त असली तर तिचे ठायीं व्रत कसें होईल? कारण, अष्टमीविद्ध नवमी निषिद्ध असें पूर्वींच्या 'नवमी चाष्टमी०' या वाक्यानें सांगितलें आहे, म्हणून वैष्णवांस स्मार्तांहून विशेष असल्यामुळें विष्णुपर अशा वैष्णवांनीं दशम्यादिकांची वृद्धि असेल तर विद्धा सोडावीच. वैष्णवांवांचून इतर सर्वांस अष्टमीविद्ध नवमीदिवशींच व्रत निश्चित होय." येथें वरील वाक्यांत 'जर दशम्यादिकांची वृद्धि असेल तर वैष्णवांनीं विद्ध टाकावी व त्यांहून ( वैष्णवांवांचून ) अन्यांनीं करावी' असें सांगितलें, यावरून जेव्हां प्रातःकाळीं त्रिमुहूर्त नवमी असून दशमी, क्षयवशात् सूर्योदयापूर्वींच समाप्त होईल तेव्हां स्मार्तांस एकादशीनिमित्तक उपवासामुळें त्या ठिकाणीं नवमीव्रताचा पारणालोप होईल, म्हणून अष्टमीविद्धाच स्मार्तांनीं करावी. वैष्णवांस तर अरुणोदयविद्ध एकादशी त्याज्य असल्यामुळें पारणालोपप्रसंग येत नाहीं, यास्तव त्यांनीं ( वैष्णवांनीं ) दुसरे दिवशींच करावी असें सुचविलें आहे. दशमीची वृद्धि नसून अष्टमीविद्ध नवमीच मध्याह्नव्यापिनी असेल किंवा क्षय असेल तर वैष्णवांनींही विद्ध नवमीसच उपोषण करावें असें अर्थात् सिद्ध होतें.

**इदंचव्रतं**[1]**संयोगपृथक्त्व**न्यायेनकाम्यंनित्यंच तदुक्तं**हेमाद्रावगस्तिसंहितायां** उपोषणंजागरणंपितृनुद्दिश्यतर्पणं तस्मिन्दिनेतुकर्तव्यंब्रह्मप्राप्तिमभीप्सुभिः सर्वेषामप्ययंधर्मोभुक्तिमुक्त्यैकसाधनः अशुचिर्वापिपापिष्ठःकृत्वेदंव्रतमुत्तमं पूज्यःस्यात्सर्वभूतानांयथारामस्तथैवसः यस्तुरामनवम्यांतुभुंक्तेमोहाद्विमूढधीः कुंभीपाकेषुघोरेषुपच्यतेनात्रसंशयः तथा अकृत्वारामनवमीव्रतंसर्वव्रतोत्तमं व्रतान्यन्यानिकुरुतेन तेषांफलभाग्भवेत् प्राप्तेश्रीरामनवमीदिनेमर्त्योविमूढधीः उपोषणंनकुरुतेकुंभीपाकेषुपच्यते अत्र**केचित्** तदुपासकानामेवेदंव्रतंनित्यंनत्वन्येषामित्याहुः **अन्येतु** अकरणेदोषश्रवणात् तस्मात्सर्वात्मनासर्वैःकार्यं वैनवमीव्रतमितिपूर्वोक्तवचनाच्च जन्माष्टम्यादिवदिदमपिसर्वेषांनित्यं अन्यथाजन्माष्टम्यादावपितदुपासकानामेवनित्यतांवक्तुःकोवारयितेत्याहुः ।

हें व्रत संयोगपृथक्त्वन्यायानें काम्य व नित्यही आहे. तें **हेमाद्रींत अगस्त्यसंहितेंत** सांगतो—"ब्रह्मप्राप्ति इच्छिणाऱ्यांनीं रामनवमीस उपोषण व जागरण, पितरांच्या उद्देशानें तर्पण हीं करावीं, हा सर्वांना भुक्तिमुक्तिसाधन करणारा धर्म होय. अशुद्ध किंवा पापी असेल तोही हें उत्तम व्रत करून सर्व भूतांस पूज्य जसा राम तसाच तो होतो. जो मूर्ख मनुष्य रामनवमीस मोहानें ( अज्ञानानें ) भोजन करतो तो कुंभीपाक नरकास जातो यांत संशय नाहीं." तसेंच. "सर्व व्रतोत्तम असें रामनवमीव्रत न करितां अन्य व्रतें करील तर त्या व्रतांचें त्यास फल प्राप्त होणार नाहीं. श्रीरामनवमीदिवस प्राप्त झाला असतां जो मूर्ख मनुष्य उपोषण करीत नाहीं तो कुंभीपाकनरकांत पडतो." एथें **कोणी ग्रंथकार**—हें व्रत रामोपासकांसच नित्य आहे, इतरांस नाहीं, असें म्हणतात. **अन्यग्रंथकार** तर, अकरणीं दोषश्रवण असल्यामुळें व 'सर्वांनीं सर्वभावानें रामनवमीव्रत करावें' असें पूर्वी वचन सांगितल्या वरूनही जन्माष्टमीप्रभृति व्रतासारखें हेंही व्रत सर्वांस नित्य आहे. असें नसेल तर जन्माष्टम्यादिव्रतही कृष्णोपासकांसच नित्य, इतरांस नित्य नाहीं, असें बोलणाराचें कोण निवारण करील? असें सांगतात.

**अत्रविशेषोहेमाद्रावगस्त्यसंहितायां** आचार्यंचैवसंपूज्यवृणुयात्प्रार्थयेन्निशि श्रीरामप्रतिमादानंकरिष्येहंद्विजोत्तम भक्त्याचार्योभवप्रीतःश्रीरामोसित्वमेवच तथा स्वगृहेचोत्तरेदेशेदानस्योज्वलमंडपं शंख-

१ एकस्य उभयार्थत्वे संयोगपृथक्त्वन्यायः । एकाला दोन प्रयोजनें असलीं म्हणजे त्याला संयोगपृथक्त्वन्याय म्हणतात. जसें—नित्यअग्निहोत्र होमाचीं जीं द्रव्यें सांगितलीं आहेत त्यांत 'दध्ना जुहोति' म्हणजे नित्याग्निहोत्रहोम दह्यानेंही होतो, असें सांगितलें आहे. आणि 'दध्ना इंद्रियकामस्य जुहुयात्' इंद्रियकामना असेल त्यानें दह्यानें होम करावा; ह्या वाक्यानें दह्याच्या होमानें इंद्रियपाटवरूप कामना असेल तर ती पूर्ण होते. या ठिकाणीं संयोगपृथक्त्वन्याय येतो तो असा. नित्यत्व व काम्यत्व या दोहोंचा संयोग म्हणजे दोन्हीं पाहिजे असल्यास दधिहोमानें सिद्ध होतात. आणि इंद्रियकामना नसेल तर दधिहोमानें पृथक्त्वेंकरून नित्य होमाचीच सिद्धि होते.

चक्रहनूमद्भिःप्राग्द्वारेसमलंकृतं गरुत्मच्छार्ङ्गबाणैश्चदक्षिणेसमलंकृतं गदाखड्गांगदैश्चैवपश्चिमेसुविभूषितं पद्मस्वस्तिकनीलैश्चकौबेरेसमलंकृतं मध्येहस्तचतुष्काढ्यंवेदिकायुक्तमायतं ततःसंकल्पयेद्देवंराममेवस्मरन्मुने- अस्यांरामनवम्यांचरामाराधनतत्परः उपोष्याष्टसुयामेपुपूजयित्वायथाविधि इमांस्वर्णमयींरामप्रतिमांचप्रय- त्नतः श्रीरामप्रीतयेदास्येरामभक्तायधीमते प्रीतोरामोहरत्वाशुपापानिसुबहूनिमे अनेकजन्मसंसिद्धान्यभ्य- स्तानिमहांतिच ततःस्वर्णमयींरामप्रतिमांपलमात्रतः निर्मितांद्विभुजांदिव्यांवामांकस्थितजानकीम् बिभ्रतींद- क्षिणकरेज्ञानमुद्रांमहामुने वामेनाधःकरेणारात्देवीमालिंग्यसंस्थिताम् सिंहासनेराजतेत्रपलद्वयविनिर्मिते तथा अशक्तोयोमहाभागःस्तुवित्तानुसारतः पलेनार्धतदर्धार्धतदर्धार्धेनवामुने सौवर्णराजतंवापिकारयेद्रघुनंदनम् पार्श्वेभरतशत्रुघ्नौधृतच्छत्रकरावुभौ चापद्वयसमायुक्तंलक्ष्मणंचापिकारयेत् दक्षिणांगेदशरथंपुत्रावेक्षणतत्परम् मातुरंकगतंराममिंद्रनीलसमप्रभम् पंचामृतस्नानपूर्वंसंपूज्यविधिवत्ततः **कौशल्यामंत्रस्तु** रामस्यजननी- चासिरामरूपमिदंजगत् अतस्त्वांपूजयिष्यामिलोकमातर्नमोस्तुते नमोदशरथायेतिपूजयेत्पितरंततः अत्रद- शावरणपंचावरणादिपूजाऽन्यत्रज्ञेया अशोककुसुमैर्युक्तमर्घ्यंदद्याद्विचक्षणः दशाननवधार्थायधर्मसंस्थापना- यच राक्षसानांविनाशायदैत्यानांनिधनायच परित्राणायसाधूनांजातोरामःस्वयंहरिः गृहाणार्घ्यंमयादत्तंभ्रा- तृभिःसहितोनघ पुष्पांजलिंपुनर्दत्वायामेयामेप्रपूजयेत् दिवैवंविधिवत्कृत्वारात्रौजागरणंततः ततःप्रातःस- मुत्थायस्नानसंध्यादिकाःक्रियाः समाप्यविधिवद्रामंपूजयेद्विधिवन्मुने ततोहोमंप्रकुर्वीतमूलमंत्रेणमंत्रवित् पूर्वोक्तपद्मकुंडेवास्थंडिलेवासमाहितः लौकिकाग्नौविधानेनशतमष्टोत्तरंततः साज्येनपायसेनैवस्मरन्राममन- न्यधीः ततोभक्त्यागुरुंसंतोष्यआचार्यंपूजयेन्मुने ततोरामंस्मरन्दद्यादेवंमंत्रमुदीरयेत् इमांस्वर्णमयींरामप्रतिमां- समलंकृताम् चित्रवस्त्रयुगच्छन्नांरामोहंराघवायते श्रीरामप्रीतयेदास्येतुष्टोभवतुराघवः इतिदत्वाविधानेनदद्या- द्देदक्षिणांभुवम् ब्रह्महत्यादिपापेभ्योमुच्यतेनात्रसंशयइति ।

येथें विशेष विधि **हेमाद्रींत अगस्त्यसंहितेंत** सांगितला तो असा-"रात्रीं आचार्याला वरून त्याचें पूजन करून **"श्रीरामप्रतिमादानं करिष्येहं द्विजोत्तम । भक्त्याचार्यो भव प्रीतः श्रीरामोसि त्वमेव च ॥"** अशी प्रार्थना करावी." तसेंच "स्वगृहीं उत्तरभागीं प्रतिमादानासाठीं सुंदर मंडप करून तो पूर्वद्वारीं शंख, चक्र व हनूमान् यांहीं अलंकृत; दक्षिणद्वारीं गरुड, शार्ङ्गधनुष्य, बाण यांहीं अलंकृत; पश्चिमद्वारीं गदा, खड्ग, अंगद यांहीं विभूषित; उत्तरद्वारीं कमल, स्वस्तिक, नील यांहीं अलंकृत अशा मंडपामध्यें चारहातांची विस्तीर्ण वेदि करावी. नंतर रामाचेंच स्मरण करून उपो- षणाचा संकल्प करावा. संकल्पाचा मंत्र—**उपोष्ये नवमीं त्वद्य यामेष्वष्टसु राघव । तेन प्रीतो भवत्वं मे संसा- रात् त्राहिमांहरे ॥** ह्या मंत्रानें रामनवमीस रामाराधनतत्पर होऊन आठप्रहर उपोषण करून रामप्रतिमेचें यथाविधि पूजन करून नंतर प्रतिमादान करावें. दानाचा मंत्र—**इमां स्वर्णमयीं रामप्रतिमां च प्रयत्नतः । श्रीरामप्रीतये दास्ये रामभक्ताय धीमते ॥ प्रीतो रामो हरत्वाशु पापानि सुबहूनि मे । अनेकजन्मसंसिद्धान्यभ्यस्तानि महांति च ॥ दानाचा विधि**—एकपल ( चारकर्ष ) सुवर्णानें निर्माण केलेली, दोन, भुजांची, सुंदर, डाव्या मांडीवर सीता व उजव्या हातांत ज्ञानमुद्रा धारण करणारी, डाव्या हस्तानें सीतेला आलिंगणारी व दोनपलमित रुप्याच्या सिंहासनीं बसलेली अशी प्रतिमा करावी. अथवा **अशक्त** ( द्रव्यहीन ) असेल तर त्यानें आपल्या द्रव्यानुसार पलाची ( चारतोळ्यांची ), दोन कर्षाची, एक कर्षाची, किंवा अर्धकर्षाची करावी. सोन्याची किंवा रुप्याची रामचंद्रप्रतिमा करावी. दोहोंबाजूंस छत्र- धरणारे असे भरत व शत्रुघ्न करावे. दोन धनुष्यांनीं युक्त असा लक्ष्मण करावा. उजव्या अंगास रामाकडे दृष्टि ठेवणारा असा दशरथ करावा. मातेच्या मांडीवर बसलेला, इंद्रनीलमण्यासारखा नीलवर्ण अशा रामाचें पंचामृतस्नानपूर्वक शास्त्रोक्त विधीनें पूजन करावें. कौसल्येच्या पूजनाचा मंत्र—**"रामस्य जननी चासि रामरूपमिदं जगत् । अतस्त्वां पूजयिष्यामि लोकमातर्नमोस्तु ते ॥"** नंतर **'दशरथाय नमः'** ह्या नाममंत्रानें दशरथाची पूजा करावी. येथें दशावरण व पंचावरणादि पूजा सांगितली आहे ती अन्यग्रंथीं पहावी. "नंतर अशोकपुष्पांनीं युक्त असें अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र—**दशाननवधार्थाय धर्मसंस्थापनाय च । राक्षसानां विनाशाय दैत्यानां निधनाय च ॥ परित्राणाय साधूनां जातो रामः स्वयं हरिः ॥ गृहाणार्घ्यं मया दत्तं भ्रातृभिः सहितोऽनघ ॥** या मंत्रानें अर्घ्य देऊन पुनः पुष्पांजलि द्यावी. याप्रमाणें प्रहराप्रहराचे ठायीं पूजन करावें. याप्रमाणें दिवसास पूजन करून रात्रीस जागरण करावें. नंतर प्रातःकाळीं उठून स्नानसंध्यादि कर्मे समाप्त करून रामाचें यथाविधि पूजन करावें. नंतर मूलमंत्रानें

होम करावा. पूर्वोक्त ( अगस्तिसंहितेंत उक्त ) पद्मकुंडांत अथवा स्थंडिलावर लौकिकाग्नींत यथाविधि अष्टोत्तरशत आज्य-सहित पायसानें रामस्मरण करीत होम करावा. नंतर भक्तीनें आचार्याचें पूजन करून त्याला संतुष्ट करावें. नंतर रामस्मरण करून या ( पुढील ) मंत्राचा उच्चार करून रामप्रतिमादान करावें. दानाचा मंत्र—**इमां स्वर्णमयीं रामप्रतिमां समलंकृताम् । चित्रवस्त्रयुगच्छन्नां रामोहं राघवाय ते ॥ श्रीरामप्रीतये दास्ये तुष्टो भवतु राघवः ॥** या मंत्रानें प्रतिमा दान देऊन भूमि दक्षिणा द्यावी. तेणेंकरून ब्रह्महत्यादिपापांपासून मुक्त होतो यांत संशय नाहीं."

इयंमलमासेनकार्या सुजप्तमप्यजप्तंस्यान्नोपवासःकृतोभवेदिति नकुर्यान्मलमासेतुमहादानव्रतानिचेतिच **माधवीयेसंग्रह**वचनात् ननुरामनवमीव्रतस्यनित्यत्वादेकादशीवन्मलमासेपिकर्तव्यतास्यादितिचेन् अत्र-**ब्रूमः** नैकादश्युपवासस्यव्रतत्वेनप्राप्तिः किंतु एकादश्यांनभुंजीतपक्षयोरुभयोरपीत्यादिनिषेधस्यमलमासे-पिपालनीयत्वात्कृष्णैकादश्यांपुत्रवद्गृहिणइवार्थादुपवासःप्रसज्यते नत्विहतथेतिव्रतत्वेनप्राप्तिर्वाच्या साच-निषिद्धेत्यप्रसंगः स्पष्टमासविशेषाख्याविहितंवर्जयेन्मलइति**निषेधा**च्च एवंजन्माष्टम्यादावपिबोद्धव्यं **इति रामनवमी ।**

ही रामनवमी मलमासांत करूं नये; कारण, "मलमासांत उत्तम जप केला तरी तो न केल्यासारखा व उपवास केला तरी न केल्यासारखा होतो" असें व "महादानें, व्रतें हीं मलमासामध्यें करूं नयेत" असेंही **माधवाच्या** ग्रंथांत **संग्रह**-वचन आहे. **शंका**—रामनवमी हें व्रत नित्य असल्यामुळें एकादशीसारखें मलमासांतही कर्तव्य आहे असें कोणी म्हणेल तर त्याविषयीं सांगतों. एकादशीच्या उपवासाची व्रतत्वेंकरून प्राप्ति नाहीं, तर दोहीं पक्षांतील एकादशीस भोजन करूं नये." इत्यादि वचनानें जो भोजन निषेध केला तो मलमासांतही पालन करणें अवश्य आहे. म्हणून कृष्णैकादशीस पुत्रवान् गृह-स्थाला जसा उपवास येतो तसा मलमासांतील एकादशीस अर्थात् उपवास प्राप्त होतो तसा ह्या नवमीव्रताचे ठायीं उपवास प्राप्त होत नाहीं. येथें व्रतत्वेंकरून प्राप्ति सांगितली पाहिजे, ती तर मलमासांत निषिद्ध आहे. यास्तव ह्या स्थलीं त्याचा प्रसंग नाहीं. आणि "विशेषमासाचें स्पष्ट नांव घेऊन विहित जें कर्म तें मलमासामध्यें वर्ज्य करावें." असा **निषेध**ही आहे, यास्तव मलमासांत हें नवमीव्रत करूं नये. याप्रमाणें जन्माष्टमी इत्यादि स्थलींही निर्णय समजावा. **इतिरामनवमी.**

चैत्रशुक्लैकादश्यांदोलोत्सवउक्तो**ब्राह्मे** चैत्रमासस्यशुक्लायामेकादश्यांतुवैष्णवैः आंदोलनीयोदेवेशःसल-क्ष्मीकोमहोत्सवैरिति चैत्रशुक्लद्वादश्यांदमनोत्सवः द्वादश्यांचैत्रमासस्यशुक्लायांदमनोत्सवः बौधायनादि-भिःप्रोक्तःकर्तव्यःप्रतिवत्सरमिति**रामार्चनचंद्रिकोक्तेः** ऊर्जेव्रतंमधौदोलाश्रावणेतंतुपूजनं चैत्रेचदमना-रोपमकुर्वाणोव्रजत्यधइतितत्रैव**पाद्म**वचनाच्च शिवभक्तादिभिस्तुचतुर्दश्यादौकार्यं तत्रस्यात्स्वीयतिथिषुव-ह्न्यादेर्दमनार्पणमिति**तत्रैवोक्तेः ज्योतिःप्रकाशेपि** स्वस्वदेवप्रतिष्ठायांमंत्रसंग्रहणेतथा पवित्रदमना-रोपेग्राह्यातत्तत्तिथिर्बुधैः तिथयस्तु वह्निर्विरिंच्योगिरिजागणेशःफणीविशाखोदिनकृन्महेशः दुर्गांतको विश्वहरिःस्मरश्चशर्वःशशीचेतितिथीपुपूज्या इत्युक्ताः ।

चैत्रशुक्लैकादशीस दोलोत्सव सांगितला. **ब्रह्मपुराणांत**—"चैत्रमासाचे शुक्लएकादशीस वैष्णवांनीं मोठ्या उत्साहानें लक्ष्मीसहित विष्णूचें आंदोलन करावें." चैत्रशुक्ल द्वादशीस दमनोत्सव ( दवण्यानें पूजा ) करावा; कारण, "चैत्रशुद्ध द्वाद-शीस विष्णूचा दमनोत्सव बौधायनादिकांनीं सांगितला, तो प्रतिवर्षी करावा." असें **रामार्चनचंद्रिकेंत** वचन आहे. आणि "कार्तिकमासीं व्रत, चैत्रमासीं दोलोत्सव, श्रावणांत तंतुपूजन ( पवित्रारोपण ), चैत्रमासीं दमनारोपण ( दवण्यानें पूजा ) हीं न करणारा नरकास जातो." असें तेथेंच **पद्मपुराण**वचनही आहे. शिवभक्तादिकांनीं तर चतुर्दश्यादितिथींस दमनारोपण करावें; कारण, "स्वीय तिथींस ( म्हणजे ज्या देवतेची जी तिथि असेल त्या तिथीस ) अग्न्यादि देवतांना दमनार्पण करावें" असें येथेंच सांगितलें आहे. **ज्योतिःप्रकाशांत**ही "ज्या ज्या देवतेची देवप्रतिष्ठा, मंत्रग्रहण, पवित्रा-रोपण व दमनारोपण हीं करावयाचीं असतील त्या त्या देवतेची तिथि घ्यावी." तिथींच्या देवता सांगतो—"अग्नि, ब्रह्मा, गौरी, गणेश, सर्प, स्कंद, सूर्य, महेश, दुर्गा, अंतक ( यम ), विश्वेदेव, हरि, मदन, शिव, चंद्र, ह्या अनुक्रमानें प्रतिपदादि तिथींच्या देवता होत."

अथागमोक्तदीक्षावतोदमनारोपणविधिः**रामार्चनचंद्रिकायां** तत्रैकादश्यां क्रियालोपविघातार्थं यत्त्वयाविहितंप्रभो नमेविघ्नोभवेदत्रकुरुनाथदयांमयि सर्वथासर्वदाविष्णोममत्वंपरमागतिः उपवासेनत्वांदे-वतोषयामिजगत्पते कामक्रोधादयोप्येतेनमेस्युर्व्रतघातकाः अद्यप्रभृतिदेवेशयावद्वैशेषिकंदिनम् तावद्रक्षात्वया

कार्योसर्वस्यास्यजगत्पते इतिदेवंप्राथ्र्यदमनमादायपंचगव्येनप्रोक्ष्यवारिणाप्रक्षाल्याशोकमूलेदेवाग्रेवा अशोकायनमस्तुभ्यंकामस्त्रीशोकनाशन शोकार्तिंहरमेनित्यमानंदंजनयस्वमे **इत्यशोकं** त्रुट्यादिकालपर्यंतः कालरूपोमहाबलः कलतेचैवयःसर्वंतस्मैकालात्मनेनमइति**कालं** वसंतायनमस्तुभ्यंवृक्षगुल्मलताश्रय सहस्रमुखसंवासकामरूपनमोस्तुतइति**वसंतं** कामभस्मसमुद्भूतरतिबाष्पपरिप्लुत ऋषिगंधर्वदेवादिविमोहकनमोस्तुतइति**दमनं**चसंपूज्य नमोस्तुपंचबाणायजगदाह्लादकारिणे मन्मथायजगन्नेत्रेरतिप्रीतिप्रियायते इति **दमन**मुपस्थाय ॐ कामायनमइतिसंपूज्यनिशायांदेवताग्रेपंचवर्णैःचंदनेनवाअष्टदलंकृत्वाबहिश्चतुरस्रंतद्बहिर्वर्तुलत्रयंतद्बहिर्वृत्तंचतुरस्रंचकृत्वातत्रकुंभंसंस्थाप्योपरिदमनंपूजयित्वा पूजार्थंदेवदेवस्यविष्णोलक्ष्मीपतेप्रभो मदनत्वमिहागच्छसांनिध्यंकुरुतेनमः ॐ क्लींकामदेवायनमः ॐ ह्रींरत्यैनमइत्यावाह्य दिक्षुपूर्वादितः स्मरशरीरायनमः अनंगाय० मन्मथाय० कामाय० क्लींवसंतसख्याय० स्मराय० इक्षुचापाय० पुष्पास्त्रायनम इति पूजयित्वा ॐ तत्स्वरूपायविद्महेकामदेवायधीमहि तन्नोऽनंगःप्रचोदयात् इत्यष्टोत्तरशतंसंमंत्र्यपूजयित्वा ह्रींनमइतिपुष्पांजलिंदत्वा नमोस्तुपुष्पबाणायजगदाह्लादकारिणे मन्मथायजगन्नेत्रेरतिप्रीतिप्रियायतेइतिनत्वा आमंत्रितोसिदेवेशपुराणपुरुषोत्तम प्रातस्त्वांपूजयिष्यामिसान्निध्यंकुरुकेशव क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह प्रातस्त्वांपूजयिष्यामिसन्निधौभवतेनमः निवेदयाम्यहंतुभ्यंप्रातर्दमनकंशुभं सर्वदासर्वथाविष्णोनमस्तेस्तुप्रसीदमेइतिदेवंसंप्राथ्र्यपुष्पांजलिंदत्वा अस्त्रेणचक्रमंत्रेणवारक्षांकुर्यात् ततःप्रातर्नित्यपूजांकृत्वापुनर्देवंसंपूज्यगंधदूर्वाक्षतयुक्तंदमनमादायमूलमंत्रंपठित्वा देवदेवजगन्नाथवांछितार्थप्रदायक हृदिस्थानपूरयेःकामानममकामेश्वरीप्रिय इदंदमनकंदेवगृहाणमदनुग्रहात इमांसांवत्सरींपूजांभगवन्परिपूरयइतिमंत्रांतेपुनर्मूलमंत्रेणदेवेसमर्पयेत् ततः अंगदेवताभ्यःस्वस्वमंत्रेणदत्वाप्रार्थयेत मणिविद्रुममालाभिर्मंदारकुसुमादिभिः इयंसांवत्सरीपूजानवास्तुगरुडध्वज वनमालांयथाविष्णोकौस्तुभंसततंहृदि तद्वद्दामनकींमालांपूजांचहृदयेवह जानताजानतावापिनकृतंयत्तवार्चनम् तत्सर्वंपूर्णतांयातुत्वत्प्रसादाद्रमापते जितंतेपुंडरीकाक्षनमस्तेविश्वभावन नमस्तेस्तुहृषीकेशमहापुरुषपूर्वज मंत्रहीनमितिचसंप्राथ्र्य पंचोपचारैःपुनःसंपूज्यनीराज्यप्रार्थयेदिति ।

## आतां आगमोक्त दीक्षा ज्यास आहे त्यानें कर्तव्य दमनारोपणविधि सांगतो.

**रामार्चनचंद्रिकेंत**—एकादशीचे ठायीं "**क्रियालोपविघातार्थं यत्त्वया विहितं प्रभो । ममेविघ्नोभवेदत्र कुरु नाथ दयां मयि ॥ सर्वथा सर्वदा विष्णो मम त्वं परमा गतिः । उपवासेन त्वां देव तोषयामि जगत्पते ॥ कामक्रोधादयोप्येते न मे स्युर्व्रतघातकाः । अद्यप्रभृति देवेश यावद्वैशेषिकं दिनं ॥ तावद्रक्षा त्वया कार्या सर्वस्यास्य जगत्पते ॥**" अशी देवाची प्रार्थना करून दमनक ( दवणा ) आणून पंचगव्यानें प्रोक्षण करून उदकानें धुवावा. नंतर अशोकवृक्षाचे मूळीं किंवा देवाचे अग्रभागीं पूजा करावी, ती अशी–पूजामंत्र–"**अशोकाय नमस्तुभ्यं कामस्त्रीशोकनाशन । शोकार्तिं हर मे नित्यमानंदं जनयस्व मे ॥**" यानें अशोकाची पूजा करावी. "**त्रुट्यादिकलपर्यंतः कालरूपो महाबलः । कलते चैव यः सर्वं तस्मै कालात्मने नमः ॥**" यानें कालाची पूजा करावी. "**वसंताय नमस्तुभ्यं वृक्षगुल्मलताश्रय । सहस्रमुखसंवास कामरूप नमोस्तु ते ॥**" यानें वसंताची पूजा करावी. "**कामभस्मसमुद्भूत रतिबाष्पपरिप्लुत । ऋषिगंधर्वदेवादिविमोहकनमोस्तुते ॥**" यानें दवण्याची पूजा करावी. नंतर "**नमोस्तु पंचबाणाय जगदाह्लादकारिणे । मन्मथाय जगन्नेत्र रतिप्रीतिप्रियाय ते ॥**" या मंत्रानें दमनकाचें उपस्थान करून "**ॐकामाय नमः**" या नाममंत्रानें पूजन करून रात्रीं देवाचे पुढें पांच रंगांनीं किंवा चंदनानें अष्टदल करून त्याचे बाहेर चतुरस्र, त्याचे बाहेर तीन वर्तुलें, त्याचे बाहेर वृत्त व चतुरस्र असें मंडल करून त्यावर कलश स्थापन करून त्या कलशावर दमनाची पूजा करावी. ती अशी—"**पूजार्थं देवदेवस्य विष्णो लक्ष्मीपते प्रभो । दमनत्वमिहागच्छ सान्निध्यं कुरु ते नमः ॐक्लीं कामदेवाय नमः । ह्रीं रत्यै नमः**" या मंत्रानें आवाहन करून पूर्वादि अष्ट दिशांचे ठायीं–"**भस्मशरीराय नमः. अनंगाय० मन्मथाय० कामाय० क्लीं वसंतसखा० स्मराय० इक्षुचापाय० पुष्पास्त्राय नमः**" या नाम मंत्रांनीं अष्टदिशांचे ठायीं पूजन करून **ॐतत्स्वरूपाय विद्महे कामदेवाय धीमहि ॥ तन्नोऽनंगः प्रचोदयात् ॥** या मंत्रानें एकशें आठवेळ

दमनक मंत्रून "**ह्रींनमः**" ह्या मंत्रानें पुष्पांजलि देऊन "**नमोस्तु पुष्पबाणाय०**" या पूर्वोक्तमंत्रानें नमस्कार करून "**आमंत्रितोसि देवेश पुराणपुरुषोत्तम । प्रातस्त्वां पूजयिष्यामि सान्निध्यं कुरुकेशव ॥ क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह । प्रातस्त्वां पूजयिष्यामि सन्निधौ भव ते नमः ॥ निवेदयाम्यहं तुभ्यं प्रातर्दमनकं शुभम् । सर्वदा सर्वथा विष्णो नमस्तेस्तु प्रसीद मे ॥**" ह्या मंत्रांनीं देवाची प्रार्थना करून पुष्पांजलि द्यावी. अस्त्रानें किंवा चक्रमंत्रानें रक्षा करावी. नंतर प्रातःकाळीं नित्यपूजा करून पुनः देवाची पूजा करून गंध, दूर्वा, अक्षता यांनीं युक्त दमनक घेऊन मूलमंत्र पठन करून, "**देवदेव जगन्नाथ वांछितार्थप्रदायक । हृदिस्थान् पूरयेः कामान् मम कामेश्वरीप्रिय ॥ इदं दमनकं देव गृहाण मदनुग्रहात् । इमां सांवत्सरीं पूजां भगवन्परिपूरय ॥**" याप्रमाणें मंत्र म्हणून पुनः मूलमंत्रानें देवास दवणा अर्पण करावा. नंतर अंगदेवतांस त्यांच्या नाममंत्रानें दवणा अर्पण करून प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र—"**मणिविद्रुममालाभिर्मंदारकुसुमादिभिः ॥ इयं सांवत्सरी पूजा तवास्तु गरुडध्वज ॥ वनमालां यथाविष्णो कौस्तुभं सततं हृदि ॥ तद्वद्दामनकीं मालां पूजां च हृदये वह ॥ जानताजानता वापि न कृतं यत्तवार्चनम् ॥ तत्सर्वं पूर्णतां यातु त्वत्प्रसादाद्रमापते ॥ जितं ते पुंडरीकाक्ष नमस्ते विश्वभावन ॥ नमस्तेऽस्तु हृषीकेश महापुरुषपूर्वज ॥ मंत्रहीनं क्रियाहीनं०**" या मंत्रांनीं प्रार्थना करून पुनः पंचोपचारांनीं पूजा करून आरती करून पारणा करावी.

दीक्षारहितानांतुनाम्नैवसमर्पणं अत्रचद्वादशीमतंत्रीकृत्यपारणाहोग्राह्यं पारणाहेनलभ्येतद्वादशीघटिकापिचेत् तदात्रयोदशीग्राह्यापवित्रदमनार्पणइति**तत्रैवोक्तेः** गौणोपिकालउक्त**स्तत्रैव** हरौनदमनारोपः-स्यान्मधौविघ्नतोयदि वैशाखेश्रावणेवापितत्तिथौस्यात्तदर्पणम श्रावणावधिशुक्रास्तेकर्तव्यमितिनारदः इति **पाठांतरं** इदंचमलमासेनकार्यं उपाकर्मोत्सर्जनंचपवित्रदमनार्पणमिति**कालादर्शे**मलमासवर्ज्येषुपरिगणनात् उपाकर्मचहव्यंचकव्यंपर्वोत्सवंतथा उत्तरेनियतंकुर्यात्पूर्वेतन्निष्फलंभवेदिति**माधवीये प्रजापति**वचनाच्च शुक्रास्तादौतुकार्यमेव पूर्वोक्तवचनात उपाकर्मोत्सर्जनंचपवित्रदमनार्पणम् ईशानस्यबलिंविष्णोः शयनंपरिवर्तनम् कुर्याच्छुक्रस्यचगुरोर्मौढ्येऽपीतिविनिश्चयइति**ज्योतिर्निबंधेवृद्धगार्ग्य**वचनाच्च **इति दमनारोपः ।**

मंत्रदीक्षा ज्यांला नसेल त्यांनीं नाममंत्रानेंच दवणा समर्पण करावा. येथें द्वादशी मुख्य न धरतां एकादशीव्रताचा पारणादिवस घ्यावा; कारण, "पारणादिवशीं एक घटिकाही द्वादशी नसेल तर पवित्रारोपण व दमनार्पण यांविषयीं त्रयोदशी घ्यावी." असें **रामार्चनचंद्रिकें**तच सांगितलें आहे. दमनारोपणाविषयीं गौणकालही तेथेंच सांगितला आहे, तो असा—"चैत्रमासीं कांहीं विघ्नानें हरीचें दमनारोपण न झालें तर वैशाख, श्रावण यांतहीं त्या तिथीस ( द्वादशीस ) करावें", 'वैशाखे श्रावणे०' ह्या अर्धाच्या स्थानीं 'श्रावणावधिशुक्रास्ते कर्तव्यमिति नारदः' असा दुसरा पाठ आहे. अर्थ—श्रावणापर्यंत शुक्रास्त असलें तरी दमनारोपण करावें, असें नारद सांगतो. हें मलमासांत करूं नये; कारण, 'उपाकर्म, उत्सर्जन, पवित्रारोपण व दमनारोपण हीं मलमासांत वर्ज्य होत" असें **कालादर्शांत** मलमासवर्ज्यांमध्यें सांगितलें आहे. आणि "उपाकर्म, हव्य, कव्य, पर्वोत्सव हीं कर्में पुढील( शुद्ध )मासी निश्चयें करावीं, पूर्वमासीं ( अधिकमासीं ) केलीं तर निष्फल होतात." असें **माधवीयांत प्रजापति**वचन आहे. शुक्राचें अस्तादिक असलें तथापि करावेंच; कारण, 'श्रावणावधि०' असें वचन उक्त आहे. आणि "उपाकर्म, उत्सर्जन, पवित्रारोपण, दमनारोपण, ईशानबलि, विष्णूचें शयन व परिवर्तन हीं शुक्र व गुरु यांचे अस्तादिकांतही निश्चयानें करावीं." असें **ज्योतिर्निबंधांत वृद्धगार्ग्य**वचनही आहे.

चैत्रशुक्लत्रयोदश्यामनंगव्रतं तत्रसापूर्वाग्राह्या त्रयोदशतिथिःपूर्वःसितइति**दीपिकोक्तेः** चैत्रशुक्लचतुर्दशीपूर्वाग्राह्या मधोःश्रावणमासस्यशुक्लायातुचतुर्दशी सारात्रिव्यापिनीग्राह्यानान्याशुक्लाकदाचनेति**हेमाद्रौ-बौधायनोक्तेः** परापूर्वाह्णगामिनीतिवापाठः अत्रकेचिद्यथाश्रुतमेवार्थवर्णयंति निशिभ्रमंतिभूतानिशक्तयःशूलभृद्यतः अतस्तत्रचतुर्दश्यांसत्यांतत्पूजनंभवेदिति**ब्रह्मवैवर्तात् हेमाद्रिमाधवादि**लिखनमप्येवं **संप्रदायविदस्त्वाहुः** चतुर्दशीतुकर्तव्यात्रयोदश्यायुताविभोइतिस्कांदमुत्सर्गः तदपवादश्च तृतीयैकादशीषष्ठीशुक्लपक्षेचतुर्दशी पूर्वविद्धानकर्तव्याकर्तव्यापरसंयुतेतिनारदीयवचनं तदपवादश्च मधोःश्रावणमासस्येति तत्रापवादाभावेपुनरुत्सर्गस्यस्थितिरितिन्यायेनपूर्वविद्धैवग्राह्येतिसिध्यति **ब्रह्मवैवर्तं**तु सामान्यरूपमन्यत्रसावकाशमिति तेनपूर्वदिनेमुहूर्तत्रयवेधेपूर्वा अन्यथोत्तरेति ।

चैत्रशुद्ध त्रयोदशीस अनंगव्रत सांगितलें आहे. त्याविषयीं त्रयोदशी पूर्वविद्धा घ्यावी; कारण, "शुक्लपक्षीं त्रयोदशी तिथि पूर्वा घ्यावी" असें **दीपिकेंत** सांगितलें आहे, चैत्रशुक्लचतुर्दशी पूर्वा घ्यावी; कारण, "चैत्र व श्रावण या मासांतील जी शुक्लचतुर्दशी ती रात्रिव्यापिनी घ्यावी, इतर शुक्लचतुर्दशी रात्रिव्यापिनी कदापि घेऊं नये" असें **हेमाद्रींत बौधायनाचें** वचन आहे. ह्या वचनाच्या शेवटच्या चरणीं 'परा पूर्वाह्णगामिनी' म्हणजे अन्यमासांतील शुक्लचतुर्दशी पूर्वाह्णगामिनी ( उत्तरविद्धा ) घ्यावी असा पाठ आहे. येथें **केचित्** यथाश्रुत ( रात्रिव्यापिनी असाच ) अर्थ वर्णन करतात. पूर्वविद्धा असें म्हणत नाहींत; कारण, "भूतें, शक्ति, शूलभृत् ( शिव ) हे रात्रीं भ्रमण करितात, यास्तव रात्रीं चतुर्दशी असतां त्यांचें पूजन करावें" असें **ब्रह्मवैवर्त**वचन आहे. **हेमाद्रि, माधव** इत्यादिकांचाही लेख असाच आहे. **संप्रदायवेत्ते** तर असें सांगतात कीं, "त्रयोदशीनें युक्त अशी चतुर्दशी करावी" हें **स्कंदपुराणां**तील वचन उत्सर्ग ( सामान्यविधि ) आहे. त्याचा अपवाद—"शुक्लपक्षांतील तृतीया, एकादशी, षष्ठी, आणि चतुर्दशी ह्या पूर्वविद्धा करूं नयेत. परविद्धा कराव्या" हें **नारद**वचन होय. ह्या **नारद**वचनाचा अपवाद—"चैत्र व श्रावण यांची शुद्धचतुर्दशी रात्रिव्यापिनी घ्यावी" हें पूर्वोक्त **बौधायन**वचन होय. तेथें अपवादाचा ( नारदवचनाचा ) अपवादानें ( बौधायनवचनानें ) बाध केला असतां उत्सर्गाची ( स्कांदवचनाची ) स्थिति राहते, या न्यायानें पूर्वविद्धाच घ्यावी, असें सिद्ध होतें. **ब्रह्मवैवर्त**वचन तर सामान्य असल्यामुळें या चैत्र व श्रावण चतुर्दशीवांचून इतर ठिकाणीं प्रवृत्त होतें. तेणेंकरून पूर्व दिवशीं चतुर्दशीस तीन मुहूर्तपर्यंत त्रयोदशीचा वेध असेल तर पूर्वाची घ्यावी. अधिक वेध असेल तर उत्तरा घ्यावी.

चैत्रपूर्णिमासामान्यनिर्णयात्परैव अत्रविशेषो**निर्णयामृतेविष्णुस्मृतौ** चैत्रीचित्रायुताचेत्स्यात्तस्यांचित्रवस्त्रप्रदानेनसौभाग्यमाप्नोतीति तथा**ब्राह्मे** मंदेवार्केगुरौवापिवारेष्वेतेषुचैत्रिका तत्राश्वमेधजंपुण्यंस्नानश्राद्धादिभिर्लभेदिति अत्रसर्वदेवानांदमनपूजोक्ता **तत्रैववायवीये** संवत्सरकृतार्चायाःसाफल्यायाखिलान्सुरान् दमनेनार्चयेच्चैत्र्यांविशेषेणसदाशिवमिति अत्रस्वीयतिथ्यामसुत्रयइतिकेचित् स्वीयतिथ्यामकरणेत्रदमनपूजनमित्य**न्ये** दीक्षिततदितरविषयत्वेनव्यवस्थेत्य**परे** इयंमन्वादिरपि साचपूर्वमुक्ता ।

चैत्री पौर्णिमा सामान्य निर्णयेंकरून परान करावी. येथें विशेष विधि **निर्णयामृतांत विष्णुस्मृतींत** "चैत्री पौर्णिमा चित्रानक्षत्रानें युक्त असतां चित्रवस्त्रदान करावें, तेणेंकरून सौभाग्य प्राप्त होतें" तसेंच **ब्राह्मांत**–"शनि, रवि, गुरु या वारीं चैत्री पौर्णिमा असेल तर त्या दिवशीं स्नान व श्राद्धादिक करावें, तेणेंकरून अश्वमेधफल प्राप्त होतें." चैत्री पौर्णिमेस सर्व देवांची दमनपूजा सांगितली आहे. तेथेंच **वायुपुराणांत**–"वर्षपर्यंत केलेल्या पूजेच्या साफल्यार्थ सर्व देवांचें चैत्री पौर्णिमेस दमनकानें पूजन करावें. सदाशिवाचें तर विशेषेंकरून पूजन करावें." ही दमनकपूजा त्या त्या देवतांच्या तिथींस करून पौर्णिमेसही करावी, असें **केचित्** म्हणतात. स्वकीयतिथींस ( त्या त्या देवांच्या तिथीस ) न केलें तर याच पौर्णिमेस सर्व देवतांचें दमनकानें पूजन करावें असें **अन्य** म्हणतात. मंत्रदीक्षावंतांनीं त्या त्या तिथींस व इतरांनीं या पौर्णिमेस करावें, अशी व्यवस्था करावी, असें दुसरे आचार्य म्हणतात. ही पौर्णिमा मन्वादिकही आहे, ती पूर्वीं सांगितली.

चैत्रकृष्णत्रयोदश्यांमहावारुणीसंज्ञोयोगोगौडेषुप्रसिद्धः तदुक्तं**वाचस्पतिकृतौशूलपाणौचस्कांदे** वारुणेनसमायुक्तामधौकृष्णात्रयोदशी गंगायांयदिलभ्येतसूर्यग्रहशतैःसमा शनिवारसमायुक्तासामहावारुणीस्मृता गंगायांयदिलभ्येतकोटिसूर्यग्रहैःसमा शुभयोगसमायुक्ताशनौशतभिषायदि महामहेतिविख्यातात्रिकोटिकुलमुद्धरेत् तत्रैव**ज्योतिषे** चैत्रासितेवारुणऋक्षयुक्तात्रयोदशीसूर्यसुतस्यवारे योगेशुभेसामहतीमहत्यागंगाजलेर्कग्रहकोटितुल्येति **त्रिस्थलीसेतौब्रह्मांडपुराणे** वारुणेनसमायुक्तामधौकृष्णात्रयोदशी गंगायांयदिलभ्येतशतसूर्यग्रहैःसमेति **कल्पतरौब्राह्मे** मधौकृष्णत्रयोदश्यांशनौशतभिषायुता वारुणीतिसमाख्याताशुभेतुमहतीस्मृता चैत्रकृष्णचतुर्दश्यांविशेषः **पृथ्वीचंद्रोदयेपुलस्त्यः** चैत्रकृष्णचतुर्दश्यां यःस्नायाच्छिवसन्निधौ नप्रेतत्वमवाप्नोतिगंगायांतुविशेषतइति अत्रपूर्वामाह्या कृष्णपक्षस्थत्वात् **गौडस्त्वेतदेव**शुक्लचतुर्दश्यामित्येवंदेवलीयत्वेनपठितं इतिश्रीकमलाकरभट्टकृतेकालनिर्णयसिंधौचैत्रमासः ।

चैत्रकृष्णत्रयोदशीस महावारुणीसंज्ञक योग, हा गौडदेशांत प्रसिद्ध आहे. त्याचें स्वरूप **वाचस्पति**ग्रंथांत व **शूल-**

---

१ वारुणीयोगे कृष्णादिः पौर्णिमास्यंतोमासस्तेनामांतमासेफाल्गुनकृष्णत्रयोदशी ग्राह्येति **धर्मसिंधुः**. अर्थ—वारुणीयोगाविषयीं कृष्णप्रतिपदेपासून पौर्णिमांत मास घ्यावा. म्हणजे चाललेल्या अमावास्यांत मासाप्रमाणें फाल्गुनकृष्ण त्रयोदशी घ्यावी असें **धर्मसिंधूंत** सांगितलें आहे.

**पार्मीत स्कंदपुराणांत**-"शततारकानक्षत्रानें युक्त अशी चैत्रकृष्णत्रयोदशी गंगेचे ठायीं जर प्राप्त होईल तर शंभर सूर्यग्रहणांशीं समान होय. ती शनिवारानें युक्त असतां महावारुणी होते. ती गंगेचे ठायीं कोटिसूर्यग्रहणसमान आहे. शुभयोग, शनिवार व शततारकानक्षत्र यांनीं युक्त असतां महामहावारुणी होय. ही तीन कोटि कुलांचा उद्धार करील." **तेथेंच ज्योतिषांत**-"चैत्रकृष्णत्रयोदशी शनिवार, शततारकानक्षत्र, शुभयोग यांहीं युक्त असतां **महामहावारुणी.** ती गंगाजलाचे ठायीं कोटिसूर्यग्रहणतुल्य होय." **त्रिस्थलीसेतूंत ब्रह्मांडपुराणांत**-"शततारकानक्षत्रानें युक्त चैत्रकृष्णत्रयोदशी गंगेमध्यें जर मिळेल तर ती शंभर सूर्यग्रहणतुल्य होते." **कल्पतरूंत ब्राह्मांत**—"चैत्रकृष्णत्रयोदशी शनिवार व शततारकायुक्त असेल तर तिला **वारुणी** म्हणावें, त्यांत शुभयोग असेल तर तिला **महावारुणी** म्हणावें." चैत्रकृष्णचतुर्दशीस विशेष सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत पुलस्त्य**-"चैत्रकृष्ण चतुर्दशीस शिवाजवळ जो स्नान करील तो प्रेतत्व ( पिशाचत्व ) पावत नाहीं. गंगेमध्यें तर विशेषेंकरून स्नान करावें म्हणजे पिशाचत्व होणार नाहीं." ही चतुर्दशी कृष्णपक्षस्थ असल्यामुळें सामान्य तिथिनिर्णयावरून पूर्वा घ्यावी. **गौडांनीं** तर हें पुलस्त्यवचन 'चैत्रशुक्लचतुर्दश्यां' म्हणजे चैत्रशुद्धचतुर्दशीस स्नान करावें, अशा अर्थाचें **देवलाचें** म्हणून सांगितलें आहे. **इति श्रीचैत्रमासनिर्णयाची महाराष्ट्रभाषाटीका समाप्त झाली.**

मेषसंक्रमेप्रागपरादशदशघटिकाःपुण्यकालः रात्रौप्रागुक्तं अत्रधर्मघटादिदानमुक्तं**पृथ्वीचंद्रोदयेपाद्मे** तीर्थेचानुदिनंस्नानंतिलैश्चपितृतर्पणं दानंधर्मघटादीनांमधुसूदनपूजनं माधवेमासिकुर्वीतमधुसूदनतुष्टिदम् ।

**वैशाखमास**—मेषसंक्रांतीचेठायीं पूर्वीच्या १० व पुढें १० घटिका पुण्यकाळ होय. रात्रीं संक्रांत होईल तर पूर्वी प्रथमपरिच्छेदांत पर्वकाळ सांगितला आहे. या मासांत धर्मघटादिदान सांगतो—**पृथ्वीचंद्रोदयांत-पद्मपुराणांत**-"प्रतिदिवशीं तीर्थांत स्नान, तिलांनीं पितृतर्पण, धर्मघटादिकांचें दान व मधुसूदनपूजन हीं वैशाखमासीं मधुसूदनप्रीत्यर्थ करावीं."

अथवैशाखस्नानं तत्र**पृथ्वीचंद्रोदयेविष्णुस्मृतिपाद्मयोः** तुलामकरमेषेपुप्रातःस्नानंविधीयते हविष्यंब्रह्मचर्यंचमहापातकनाशनमितिसौरमासउक्तः अन्यत्पक्षद्वयमुक्तंतत्रैव**पाद्मे** मधुमासस्यशुक्लायामेकादश्यामुपोषितः पंचदश्यांचभोवीरमेषसंक्रमणेतुवा वैशाखस्नाननियमंब्राह्मणानामनुज्ञया मधुसूदनमभ्यर्च्येकुर्यात्संकल्पपूर्वकं **तत्रमंत्रः** वैशाखंसकलंमासंमेषसंक्रमणेरवेः प्रातःसनियमःस्नास्येप्रीयतांमधुसूदनः मधुहंतुःप्रसादेनब्राह्मणानामनुग्रहात् निर्विघ्नमस्तुमेपुण्यंवैशाखस्नानमन्वहं माधवेमेपगेभानौमुरारेमधुसूदन प्रातःस्नानेनमेनाथफलदोभवपापहन्निति तीर्थविशेपोपि**तत्रैवोक्तः** मेपसंक्रमणेभानोर्माधवेमासियत्नतः महानद्यांनदीतीर्थेनदेसरसिनिर्झरे देवखातेथवास्नायाद्यथाप्राप्तेजलाशये दीर्घिकाकूपवापीपुनियतात्माहरिंस्मरन्निति संकल्पेचतत्तत्तीर्थनामग्राह्यं अज्ञानेतुविष्णुतीर्थमितिवदेत् यदानज्ञायतेनामतस्यतीर्थस्यभोद्विजाः तत्रेत्युच्चारणंकार्यंविष्णुतीर्थमिदंत्विति तीर्थस्यदेवताविष्णुःसर्वत्रापिनसंशयइति**तत्रैवोक्तः** ।

**आतां वैशाखस्नान** सांगतो-**पृथ्वीचंद्रोदयांत विष्णुस्मृतीं**त व **पद्मपुरा**णांत-"तुला, मकर, मेप या संक्रांतीचे ठायीं प्रातःस्नान, हविष्यान्न, ब्रह्मचर्य हीं केलीं असतां महापातकाचा नाश होतो" याप्रमाणें सौरमास ( संक्रांतिमास ) सांगितला आहे. दुसरे दोन पक्ष एकादश्यादि व पौर्णिमादि तेथेंच **पद्मपुराणांत** सांगतो—"चैत्रमासाच्या शुक्लपक्षीं एकादशीस किंवा पौर्णिमेस किंवा मेषसंक्रांतीस उपोषण करून ब्राह्मणांच्या आज्ञेनें मधुसूदनाची पूजा करून संकल्पपूर्वक वैशाखस्नानाचा नियम धारण करावा." त्याचा मंत्र—"**वैशाखं सकलं मासं मेषसंक्रमणे रवेः ॥ प्रातःसनियमः स्नास्ये प्रीयतां मधुसूदनः ॥ मधुहंतुः प्रसादेन ब्राह्मणानामनुग्रहात् ॥ निर्विघ्नमस्तु मे पुण्यं वैशाखस्नानमन्वहं ॥ माधवे मेषगे भानौ मुरारे मधुसूदन ॥ प्रातःस्नानेन मे नाथ फलदो भव पापहन् ॥**" विशेष तीर्थेंही तेथेंच सांगतो—"सूर्याच्या मेषसंक्रांतींत वैशाखमासीं प्रयत्नानें महानदी, नदी, तीर्थ, नद, तळें, निर्झर, देवखात, अथवा कोणताही जलाशय, दीर्घिका, कूप, वापी इत्यादि तीर्थीं नियम धरून विष्णुस्मरण करून प्रातःस्नान करावें" संकल्पांत त्या त्या तीर्थाचें नाम ग्रहण करावें. तीर्थाचें नांव अज्ञात असेल तर विष्णुतीर्थ असें म्हणावें; कारण, "जेव्हां तीर्थाचें नांव अज्ञात असेल तेव्हां तेथें हें विष्णुतीर्थ असा उच्चार करावा. कारण, सर्वत्र तीर्थांची देवता विष्णु होय, यांत संशय नाहीं" असें तेथेंच सांगितलें आहे.

तथान्योपिविशेषस्तत्रैव**पाद्मे** तुलसीकृष्णगौराख्यातयाभ्यर्च्यमधुद्विषं विशेषेणतुवैशाखेनरोनारायणोभवेत् माधवंसकलंमासंतुलस्यायोर्चयेन्नरः त्रिसंध्यंमधुहंतारंनास्तितस्यपुनर्भवः **तथा** प्रातःस्नात्वाविधाने-

नमाधवेमाधवप्रियं योश्वत्थमूलमासिंचेत्तोयेनबहुनासदा कुर्यात्प्रदक्षिणंतंतुसर्वदेवमयंततः पितृदेवमनुष्यांश्च तर्पयेत्सचराचरं योश्वत्थमर्चयेदेवमुदकेनसमंततः कुलानामयुतंतेनतारितंस्यान्नसंशयः कंडूयपृष्ठतोगांतुस्नात्वापिप्पलतर्पणं कृत्वागोविंदमभ्यर्च्यनदुर्गतिमवाप्नुयात् **तथा** एकभक्तमथोनक्तमयाचितमतंद्रितः माधवेमासियःकुर्याल्लभतेसर्वमीप्सितं वैशाखेविधिनास्नानंदेवनद्यादिकेबहिः हविष्यंब्रह्मचर्यंचभूशय्यानियमस्थितिः व्रतंदानंदमोदेविमधुसूदनपूजनं अपिजन्मसहस्रोत्थंपापंदहतिदारुणं **मदनरत्नेस्कांदे** प्रपाकार्याचवैशाखेदेवेदेयागलंतिका उपानद्व्यजनच्छत्रसूक्ष्मवासांसिचंदनं जलपात्राणिदेयानितथापुष्पगृहाणिच पानकानिचचित्राणिद्राक्षारंभाफलान्यपि **तिथितत्त्वे** ददातियोहिमेषादौसक्तूनंबुघटान्वितान् पितृनुद्दिश्यविप्रेभ्यःसर्वपापैःप्रमुच्यतइति तथा वैशाखेयोघटंपूर्णंसभोज्यंवैद्विजन्मने ददातिसुरराजेंद्रसयातिपरमांगतिं एवंसंपूर्णस्नानाशक्तौत्र्यहंवास्नायात् तदुक्तं**तत्रैवपाद्मे** त्रयोदश्यांचतुर्दश्यांवैशाख्यांवादिनत्रयं अपिसम्यग्विधानेननारीवापुरुषोपिवा प्रातःस्नातःसनियमःसर्वपापैःप्रमुच्यते यदातुवैशाखोमलमासोभवतितदाकाम्यानांतत्रसमाप्तिनिषेधान्मासद्वयंस्नानंतन्नियमाश्चकर्तव्याः मासोपवासचांद्रायणादितुमलमासएवसमापयेत् तदुक्तं**दीपिकायां** नियतत्रिंशद्दिनत्वाच्छुभेमास्यारभ्यसमापयेतमलिनेमासोपवासव्रतमिति ।

तसाच दुसराही विशेष तेथेंच **पद्मपुराणांत** सांगतो "कृष्ण व श्वेत तुळशींनीं भगवंताचें पूजन करावें, वैशाखमासीं तर विशेषेंकरून करावें, तेणेंकरून पूजनकर्ता नारायणस्वरूप होतो. सर्व वैशाखपर्यंत तुळशींनीं जो नारायणाचें त्रिकाल पूजन करील त्यास पुनर्जन्म होत नाहीं." तसेंच "जो मनुष्य वैशाखमासीं प्रातःकाळीं विधिपूर्वक स्नान करून माधवप्रिय अश्वत्थाच्या मूलाचें बहुत उदकानें प्रत्यहीं सिंचन करून नंतर सर्व देवमय अशा अश्वत्थास प्रदक्षिणा करील त्यानें पितर, देव, मनुष्य यांचें व चराचरजगाचें तर्पण केलें, असें होतें. जो अश्वत्थाचे आसमंतात् भागीं उदकानें पूजन ( सिंचन ) करील त्यानें दहा हजार कुळें तारिलीं यांत संशय नाहीं. गाईच्या पाठीवर खाजवून स्नान करून पिंपळाचें तर्पण करून गोविंदाचें पूजन केलें तर दुर्गति प्राप्त होणार नाहीं." तसेंच "वैशाखमासीं आलस्यरहित होऊन एकभुक्त, नक्त, अयाचित यांतून कोणतें एक जो करील तो सर्व मनोरथ पावेल. वैशाखमासीं भागीरथी इत्यादि तीर्थी यथाविधि बाहेर स्नान करून हविष्यान्न, ब्रह्मचर्य, भूशय्या, नियमानें राहणें, व्रत, दान, इंद्रियनिग्रह, विष्णुपूजन हीं केलीं असतां हजारों जन्मांत केलेलें मोठें पापही दग्ध होतें." **मदनरत्नांत—स्कंदपुराणांत** "वैशाखमासीं प्रपा ( पाणपोई ) करावी, देवावर गळती ( पाण्याची धार ) धरावी, उपानत् ( वाहणा, जोडा ), विंजणा, छत्र, बारीक वस्त्रें, चंदन, उदकपात्रें, तशींच पुष्पयुक्त गृहें, नाना प्रकारचीं सुवासिक पानकें ( पन्हीं ), द्राक्षें, केळीं इत्यादिक द्यावीं." **तिथितत्त्वांत** "जो मनुष्य मेषसंक्रांतीच्या आरंभीं उदकयुक्त घटानें सहित सक्तु ( सातूचें पीठ ) पितरांच्या उद्देशानें ब्राह्मणांकारणें देतो तो सर्व पापांपासून मुक्त होतो." तसेंच "जो मनुष्य वैशाखमासीं भोजनासहित पूर्णघट ब्राह्मणास देतो तो उत्तम गति पावतो." अथवा महिनापर्यंत स्नान करण्यास शक्ति नसेल तर तीन दिवस तरी स्नान करावें. तें सांगतो तेथेंच **पाद्मांत**—"वैशाखांत त्रयोदशी, चतुर्दशी, पौर्णिमा या तीन दिवशीं तरी यथाविधि स्त्री किंवा पुरुष नियमानें प्रातःकाळीं स्नान करील तर तो सर्व पापांपासून मुक्त होईल." ज्या वर्षी वैशाख मलमास होतो त्या वर्षी, मलमासांत काम्यकर्मांच्या समाप्तीचा निषेध सांगितल्यामुळें दोन महिने स्नान व स्नानाचे नियम करावे. मासोपवास व चांद्रायणादिक व्रतें तर मलमासींच समाप्त करावीं. तें सांगतो **दीपिकेंत**—"तीस दिवस नियमानें करावयाचें असें मासोपवासव्रत शुद्ध मासांत आरंभून मलमासांत समाप्त करावें."

अत्रदानविशेषउक्तोऽ**परार्केवामनपुराणे** गंधाश्चमाल्यानितथावैशाखेसुरभीणिच देयानिद्विजमुख्येभ्योमधुसूदनतुष्टये एवंस्नानेकृतेतस्योद्यापनंकार्यं तदुक्तं**तत्रैव** मासमेवंबहिःस्नात्वानद्यादौविमलेजले एकादश्यांचद्वादश्यांपौर्णमास्यामथापिवा उपोष्यनियतोभूत्वाकुर्यादुद्यापनंबुधः मंडलंकारयेदादौकलशंतत्रविन्यसेत् निष्केणवातदर्धेनतदर्धार्धेनवापुनः शक्त्यावाकारयेद्देवंसौवर्णंलक्षणान्वितं लक्ष्मीयुक्तंजगन्नाथंपूजयेदासनेबुधः भूषणैश्चंदनैःपुष्पैर्दीपैर्नैवेद्यसंचयैः एवंसंपूज्यविधिवद्रात्रौजागरणंचरेत् श्वोभूतेकृतमैत्रोथग्रहवेद्यांग्रहान्यजेत् होमंकुर्यात्प्रयत्नेनपायसेनविचक्षणः तिलाज्येनयवैर्वापिसर्वैर्वापिस्वशक्तितः अष्टोत्तरस-

१ पिप्पलतर्पणं अश्वत्थसेचनं. २ गलंतिका सततंपतद्धारमुदकं. ३ मैत्रं मित्रदेवताकं संध्यादि.

**हस्त्रंवा**शतमष्टोत्तरंतुवा प्रतद्विष्णुरनेनैवइदंविष्णुरनेनवा व्रतसंपूर्तिसिद्ध्यर्थंधेनुमेकांपयस्विनीं पादुकोपानहौ· छत्रंगुरवेव्यजनंतथा शय्यांसोपस्करांदद्यादीपिकांदर्पणंतथा ब्राह्मणान्भोजयेत्रिंशत्तेभ्योदद्याच्चदक्षिणां कल· शाञ्जलसंपूर्णांस्तेभ्योदद्याद्यवांस्तथा एवंकृतेमाधवस्यचोद्यापनविधौशुभे फलमाप्नोतिसकलंविष्णुसायुज्यमा- प्नुयात् एतावत्यशक्तौ**तत्रैवोक्तं** वैशाख्यांविधिनास्नात्वाभोजयेद्ब्राह्मणान्दश कृसरंसर्वपापेभ्योमुच्यतेनात्र- संशयइति ।

ह्या वैशाखस्नानांत विशेष दानें सांगतो-**अपरार्कांत वामनपुराणांत**-"वैशाखमासीं सुगंध व सुरभि पुष्पें मधु- सूदनाच्या संतोषार्थ ब्राह्मणांस द्यावीं" याप्रमाणें स्नान केलें असतां त्याचें उद्यापन करावें. तें सांगतो तेथेंच—"याप्रकारें महिनापर्यंत बाहेर नद्यादिस्वच्छजलांत स्नान करून एकादशीस किंवा द्वादशीस अथवा पौर्णिमेस उपोषण करून नियम धारण करून उद्यापन करावें. तें असें—प्रथम सर्वतोभद्र मंडल करून त्याजवर कलश स्थापून त्यावर निष्क ( चारतोळे ) अथवा त्याचे निम्मे किंवा त्याचे अर्ध अथवा अर्ध तोळा अथवा शक्त्यनुसार सुवर्णाची लक्षणयुक्त लक्ष्मीसहित विष्णूची प्रतिमा करून आसनावर ठेवून भूषणें, चंदन, पुष्पें, दीप, अनेकप्रकारचे नैवेद्य यांहीं यथाविधि पूजन करून रात्रीस जागरण करावें. दुसरे दिवशीं स्नानसंध्यादि करून ग्रहवेदीवर ग्रहांचें पूजन करून पायस ( क्षीर ), तिल, घृत, यव यांतून एका द्रव्यानें अथवा सर्व द्रव्यांनीं आपल्या शक्तीप्रमाणें अष्टोत्तरसहस्र किंवा अष्टोत्तरशत संख्याक **"प्रतद्विष्णु०"** किंवा **"इदंविष्णु०"** या मंत्रानें होम करावा. व्रत संपूर्ण होण्याकरितां एक पयस्विनी धेनु, पादुका, उपानह, छत्र, व्यजन, उपसाहित्यसहित शय्या, दीप, आरसा हीं गुरुस ( उपाध्यायास ) द्यावीं व तीस ब्राह्मणांस भोजन देऊन दक्षिणा द्यावी. तसेंच जलपूर्ण कलश व यव ब्राह्मणांस द्यावे. असा वैशाखमासाचा शुभ उद्यापनविधि केला असतां सर्व फल प्राप्त होऊन विष्णुसायुज्य प्राप्त होतें." इतकें करण्यास शक्ति नसेल तर तेथेंच सांगतो—"वैशाखी पौर्णिमेस यथाविधि स्नान करून दहा ब्राह्मणांस कृसरान्नाचें ( खिचडीचें ) भोजन द्यावें, म्हणजे सर्व पापांपासून मुक्त होतो यांत संशय नाहीं."

वैशाखशुक्लतृतीयाअक्षय्यतृतीयोच्यते सापूर्वाह्णव्यापिनीग्राह्या दिनद्वयेपितद्व्याप्तौपरैव तदुक्तं**निर्णया- मृतेनारदीये** वैशाखेशुक्लपक्षेतुतृतीयारोहिणीयुता दुर्लभाबुधवारेणसोमेनापियुतातथा रोहिणीबुधयुक्ता- पिपूर्वविद्धाविवर्जिता भक्त्याकृतापिमांधातःपुण्यंहंतिपुराकृतं गौरीविनायकोपेतारोहिणीबुधसंयुताविनापि- रोहिणीयोगात्पुण्यकोटिप्रदासदेति इयंयुगादिरपि साचोक्ता**रत्नमालायां** माघेपंचदशीकृष्णानभस्येचत्र- योदशी तृतीयामाधवेशुक्लानवम्यूर्जेयुगादयइति यत्तु**गौडाः** माघस्यपौर्णमास्यांतुघोरंकलियुगंस्मृतमिति- **ब्राह्मोक्तेः** वैशाखमासस्यचयातृतीयानवम्यसौकार्तिकशुक्लपक्षे नभस्यमासस्यतमिस्रपक्षेत्रयोदशीपंचदशी- चमाघे इति**विष्णुपुराणे** चकारेणतमिस्रपक्षानुषंगेपिपूर्वानुरोधात्पौर्णमास्येवज्ञेया द्वेशुक्लइत्यादिकंतुनिर्मू- लमित्याहुः तन्न दर्शेतुमाघमासस्यप्रवृत्तंद्वापरंयुगमिति**भविष्य**विरोधात एतेनब्राह्मानुसारात्पूर्णिमायामे- वयुगादिश्राद्धंवदन्शूलपाणिःपरास्तः तेनकल्पभेदाद्युगभेदाद्वाव्यवस्थेति**तत्त्वं** एतेनकार्तिकेनवमीशुक्लामा- घमासेचपूर्णिमेति**बृहन्नारदीयं**व्याख्यातं निर्मूलत्वोक्तिर्नारदीयाज्ञानकृता ।

वैशाखशुद्ध तृतीया ही अक्षय्यतृतीया. ती पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. दोनही दिवशीं पूर्वाह्णव्यापिनी असतां पराच घ्यावी. तें सांगतो-**निर्णयामृतांत नारदीयांत** "वैशाखशुक्ल तृतीया ही रोहिणी व बुधवार किंवा सोमवारयुक्त असेल तर ती दुर्लभ होय. रोहिणी व बुधवार यांहीं युक्त असली तरी ती पूर्वविद्धा निषिद्ध आहे. ती भक्तीनें केली तरी पूर्वी केलेल्या पुण्याचा नाश करिते. तृतीया चतुर्थीनें युक्त व रोहिणी, बुधवार यांहीं युक्त अथवा रोहिणीयोगावांचूनही केली असतां कोटिपुण्य देणारी होय." ही तृतीया युगादिही आहे. ती सांगतो **रत्नमालेंत**-"माघमासाची अमावास्या, भाद्रपदकृष्ण त्रयोदशी, वैशाखशुक्ल तृतीया व कार्तिकशुक्ल नवमी ह्या चार तिथि युगादि होत." आतां जें **गौड**-"माघमासीं पौर्णिमेस घोर कलियुग प्रवृत्त झालें" ह्या **ब्राह्म**वचनावरून "वैशाखमासाची शुक्ल तृतीया, कार्तिकशुक्ल नवमी, भाद्रपदकृष्ण त्रयो- दशी व माघमासांत पंचदशी ह्या युगादि" या **विष्णुपुराण**वचनांत पंचदशीस चकारानें कृष्णपक्षाचा अनुषंग ( संबंध ) केला तरी पूर्वब्राह्मवचनानुरोधानें पौर्णमासीच युगादि जाणावी. 'शुक्लपक्षीं दोन युगादि' हें वचन तर निर्मूल होय असें म्हणतात. तें बरोबर नाहीं. कारण, "माघमासीं अमावास्येस द्वापरयुग प्रवृत्त झालें." या भविष्यवचनाशीं विरोध येतो. यावरून ब्राह्मवचनानुरोधानें पौर्णिमेसच युगादिश्राद्ध करावें असें सांगणारा जो **शूलपाणि** तो खंडित झाला. तेणेंकरून कल्पभेदानें किंवा युगभेदानें व्यवस्था करावी हें तत्त्व होय. यावरून ( कल्पभेदानें व्यवस्था सांगितल्यावरून ) "कार्तिकशुक्ल

नवमी, माघी पौर्णिमा ह्या युगादि" असें **वृद्धनारदीय**वचन व्याख्यात झालें. निर्मूलोक्ति तर नारदीयवचनाच्या अज्ञानामुळें समजावी.

अत्रश्राद्धमुक्तं**मात्स्ये** कृतंश्राद्धंविधानेनमन्वादिषुयुगादिषु हायनानिद्विसाहस्रंपितॄणांतृप्तिदंभवेदिति **भारतेपि** यामन्वाद्यायुगाद्याश्चतिथयस्तासुमानवः स्नात्वाहुत्वाचदत्वाचजप्त्वानंतफलंलभेदिति श्राद्धेपिपूर्वाह्णव्यापिनीग्राह्या पूर्वाह्णेतुसदाकार्याःशुक्लामनुयुगादयः दैवेकर्मणिपित्र्येचकृष्णेचैवापराह्णिकाइति **पाद्मोक्तेः** द्वेशुक्लेद्वेतथाकृष्णेयुगादीकवयोविदुः शुक्लेपौर्वाह्णिकेग्राह्येकृष्णेचैवापराह्णिके इति**हेमाद्रौनारदीय**वचनाच्च **दीपिकापि** अथोमन्वादियुगादिकर्मतिथयःपूर्वाह्णिकाःस्युःसितेविज्ञेयाअपराह्णिकाश्चबहुलेइति **स्मृत्यर्थसारेपि** युगादिमन्वादिश्राद्धेषुशुक्लपक्षेउदयव्यापिनीतिथिर्ग्राह्या कृष्णपक्षेऽपराह्णव्यापिनीति **दिवोदासीयेगोभिलः** वैशाखस्यतृतीयांयःपूर्वविद्धांकरोतिवै हव्यंदेवानगृह्णंतिकव्यंचपितरस्तथेति **गोविंदार्णवेप्येवं** तेनेयंपूर्वाह्णव्यापिनी दिनद्वयेतत्त्वेपरैवेतिधर्मतत्त्वविदो**हेमाद्याद्यः अनंतभट्टस्तु** सर्वेधृतिर्व्यतीपातोयुगमन्वादयस्तथा सन्मुखाउपवासेस्युर्दानादावंतिमाःस्मृताइत्याह दानादावितिश्राद्धसंग्रहः उपवासस्त्वग्रेवक्ष्यते **हेमाद्रावप्येवं माधव**स्तुव्यतीपातःश्राद्धेपराह्णव्यापीमाह्यइत्याह **स्मृत्यर्थसारे**तुकुतुपकालयोगीत्युक्तं यत्तु**मार्कंडेयः** शुक्लपक्षस्यपूर्वाह्णेश्राद्धंकुर्याद्विचक्षणः कृष्णपक्षापराह्णेहिरौहिणंतुनलंघयेत् रौहिणोनवमोमुहूर्तः अत्रशुक्लपक्षयुगादिश्राद्धंपूर्वाह्णेकार्यमिति**शूलपाणिः निर्णयामृतादयस्तुकालादर्शे**ऽमाश्राद्धमापराह्णिकमुक्त्वाएवमन्वंतरादीनांयुगादीनांविनिर्णयइत्युक्त्वाह्णेशुक्लइत्यादिवचनंविष्णुपूजनविषयं श्राद्धेत्वापराह्णिक्येवेतिव्यवस्थांजगदुः सेयंपूर्वोक्तानेकवचोविरोधात्पूर्वाह्णेदैविकंकुर्यादित्यादिवचनादेवसिद्धेवचनवैयर्थ्याश्चस्वाच्छंद्यविलसितमात्रमित्युपेक्षणीया किंच कालादर्शोक्ति**र्न्यायमूला वचोमूलावा नाद्यः** युगादिश्राद्धस्यामाश्राद्धविकृतित्वेनन्यायतो पराह्णव्याप्तावपिवचनेनचतस्यबाधात् **नांत्यः** अतिदेशादेवापराह्णप्राप्तेर्वचनवैयर्थ्यात् अप्राप्तेशास्त्रमर्थवदितिन्यायात् तेनयदिकालादर्शोक्तिःकथंचिच्छ्रद्धाजाड्येनसमाधित्सा तर्हिन्यायप्राप्तकृष्णपक्षयुगादिविषयत्वेनसाव्यवस्थापनीयेतिदिक् पूर्वाह्णस्त्वत्रद्वेधाभक्तदिनपूर्वार्धः द्वेधाभक्तदिनांशकोत्रगदितः प्राह्णापराह्णाविति **दीपिकोक्तेः माधवादयो**प्येवम् ।

या तृतीयेस श्राद्ध सांगतो. **मत्स्यपुराणांत**—"मन्वादि व युगादि तिथींस यथाविधि श्राद्ध केलें असतां दोन हजार वर्षे पितरांची तृप्ति होते." भारतांतही—"ज्या मन्वादि व युगादि तिथि त्यांचे ठायीं मनुष्यानें स्नान, हवन, दान, जप, हीं केलीं असतां त्यांचें अनंतफल प्राप्त होतें." ही तिथि श्राद्धाविषयींही पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. कारण, "शुक्लपक्षींच्या मन्वादि व युगादि तिथि देवपित्र्यकर्माविषयीं पूर्वाह्णव्यापिनी व कृष्णपक्षींच्या अपराह्णव्यापिनी घ्याव्या" असें **पद्मपुराणवचन** आहे. "युगादि तिथि दोन शुक्लपक्षांत व दोन कृष्णपक्षांत आहेत असें विद्वान् म्हणतात, त्या शुक्लपक्षांतील पूर्वाह्णव्यापिनी घ्याव्या, व कृष्णपक्षांतील अपराह्णव्यापिनी घ्याव्या" असें **हेमाद्रींत नारदीय**वचन ही आहे. **दीपिकाही** "मन्वादि व युगादि कर्मतिथि, शुक्लपक्षांतील पूर्वाह्णव्यापिनी व कृष्णपक्षांतील अपराह्णव्यापिनी घ्याव्या." **स्मृत्यर्थसारांतही**-युगादि मन्वादि श्राद्धाविषयीं शुक्लपक्षांतील उदयव्यापिनी तिथि घ्यावी. व कृष्णपक्षांतील अपराह्णव्यापिनी घ्यावी. **दिवोदासीयांत गोभिल**—"जो मनुष्य वैशाखशुद्धतृतीया पूर्वविद्धा करील त्याचें हव्य ( देवांना दिलेलें ) देव ग्रहण करीत नाहींत, व कव्य ( पितरांस दिलेलें ) पितरही ग्रहण करीत नाहींत." **गोविंदार्णवांत**ही असेंच आहे. तेणेंकरून ही तिथि पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी;-दोन दिवशीं पूर्वाह्णव्यापिनी असतां परच घ्यावी असें धर्मतत्त्ववेत्ते **हेमाद्यादिक** म्हणतात. **अनंतभट्ट** तर—"वैधृति, व्यतीपात, हे योग; व युगादि, मन्वादि, ह्या तिथि; उपवासाविषयीं संमुख घ्याव्या. व दान ( श्राद्ध ) इत्यादिकांविषयीं परविद्धा घ्याव्या" असें सांगतो. येथें उपवास पुढें सांगूं. **हेमाद्रींत**ही असेंच सांगितलें आहे. **माधव** तर—श्राद्धाविषयीं व्यतीपात अपराह्णव्यापी घ्यावा असें सांगतो. **स्मृत्यर्थसारांत** तर कुतुपकालव्यापि घ्यावा असें सांगितलें आहे. आतां जें **मार्कंडेय**—"शुक्लपक्षांत पूर्वाह्णीं श्राद्ध करावें, व कृष्णपक्षांत अपराह्णीं करावें. रौहिण ( नवम मुहूर्त ) तर उल्लंघन करूं नये" असें सांगतो त्याचा अर्थ-शुक्लपक्ष युगादिश्राद्ध पूर्वाह्णीं करावें, असें **शूलपाणि** सांगतो. **निर्णयामृतादिक** ग्रंथकार तर, **कालादर्शांत** अमावास्याश्राद्ध अपराह्णीं करावें, असें सांगून "ह्याच

निर्णय मन्वंतरादींचा व युगादींचा आहे" असें सांगितल्यामुळें "शुक्लपक्षीं,दोन युगादि" इत्यादि पूर्वोक्त नारदीयवचन विष्णुपूजनविषयक होय. श्राद्धाविषयीं तर अपराह्णव्यापिनीच घ्यावी, अशी व्यवस्था सांगते झाले. ती ही व्यवस्था पूर्वोक्त पाद्मादि अनेक वचनांशीं विरुद्ध असल्यामुळें आणि "पूर्वाह्णीं देवकार्य करावें व अपराह्णीं पित्र्य करावें" इत्यादि वचनानेंच सिद्ध असतां वचन व्यर्थ होत असल्यामुळें ही स्वच्छंदविलसित ( बडबड ) मात्र म्हणून उपेक्षणीय ( अग्राह्य ) होय. आणखी असें कीं, कालादर्शाचें सांगणें न्यायमूलक आहे किंवा वचनमूलक आहे ? पहिला पक्ष न्यायमूलक तो नाहीं. कारण, युगादि श्राद्ध हें अमावास्याश्राद्धाची विकृति असल्यामुळें प्रकृतीप्रमाणें विकृति करावी, या न्यायानें अपराह्णकालाची प्राप्ति युगादिश्राद्धाविषयीं प्राप्त झाली तरी पूर्वोक्तवचनांनीं त्याचा ( अपराह्णकालाचा ) बाध होतो. दुसरा पक्ष वचनमूलक तोही नाहीं. कारण, अतिदेशानें ( प्रकृतीप्रमाणें विकृति करावी अशा सांगण्यानेंच ) अपराह्णकालाची प्राप्ति असल्यामुळें नवीन वचनें व्यर्थ होतात. कारण, पूर्वीं अप्राप्तविषयाविषयीं जें शास्त्र ( वचन ) तें सार्थक होतें, असा न्याय आहे. यावरून जर कालादर्शाच्या सांगण्याविषयीं श्रद्धा असल्यामुळें कसें तरी तें त्याचें सांगणें लावून घ्यावयाचें असेल तर न्यायानें प्राप्त असलेल्या कृष्णपक्षयुगादि श्राद्धांविषयीं तें सांगणें व्यवस्थित करावें, ही दिशा समजावी. दिनमानाचे दोन भाग करून जो पूर्वभाग तो पूर्वाह्ण येथें समजावा. कारण, "दिनमानाचे दोन भाग केले असतां पूर्वभाग पूर्वाह्ण व दुसरा भाग अपराह्ण" असें **दीपिकेंत** सांगितलें आहे. **माधवादिक**ही असेंच सांगतात.

अत्रविशेषो**हेमाद्रौभविष्ये**वैशाखेशुक्लपक्षेतुतृतीयायांतथैवच गंगातोयेनरःस्नात्वामुच्यतेसर्वकिल्बिषैः तस्यांकार्योयवैर्होमोयवैर्विष्णुंसमर्चयेत् यवान्दद्याद्द्विजातिभ्यःप्रयतःप्राशयेद्यवानिति अत्रदानविशेषस्तत्रैव**भविष्ये** इमांप्रक्रम्य उदकुंभान्सकनकान्सान्नान्सर्वरसैःसह यवगोधूमचणकान्सक्तुदध्योदनंतथा ग्रैष्मिकंसर्वमेवात्रसस्यंदानेप्रशस्तइति **देवीपुराणे**पि तृतीयायांतुवैशाखेरोहिण्यृक्षेप्रपूज्यतु उदकुंभप्रदानेन शिवलोकेमहीयते **मंत्रस्तु** एषधर्मघटोदत्तोब्रह्मविष्णुशिवात्मकः अस्यप्रदानात्तृप्यंतुपितरोपिपितामहाः गंधोदकतिलैर्मिश्रंसान्नंकुंभंफलान्वितं पितृभ्यःसंप्रदास्यामिअक्षय्यमुपतिष्ठत्विति ।

ह्या तृतीयेविषयीं विशेष विधि सांगतो—**हेमाद्रींत भविष्यपुराणांत**-"वैशाखशुक्लपक्षीं तृतीयेस गंगोदकामध्यें जो नर स्नान करितो तो सर्व पातकांपासून मुक्त होतो. त्या तिथीस यवांनीं होम करावा व यवांनीं विष्णुपूजन करावें, आणि यव ब्राह्मणांस द्यावे व यव ( सातु ) प्राशन करावे." या तिथीस विशेष दान सांगतो. तेथेंच **भविष्यांत**—या तृतीयेचा उपक्रम करून "सुवर्ण व अन्न यांनीं युक्त सर्व रसांसहित उदककुंभ, यव, गोधूम, चणक, सक्तु, दध्योदन व ग्रीष्मऋतूंतील सर्व धान्यें हीं दानाविषयीं प्रशस्त होत." **देवीपुराणांत**ही-"वैशाखमासीं रोहिणीयुक्त तृतीयेस शिवाचें पूजन करून उदकुंभदान करावें, तेणेंकरून शिवलोकीं पूज्य होतो." उदकुंभदानाचा मंत्र-"**एष धर्मघटो दत्तो ब्रह्मविष्णुशिवात्मकः । अस्य प्रदानात्तृप्यंतु पितरोपि पितामहाः ॥ गंधोदकतिलैर्मिश्रं सान्नं कुंभं फलान्वितम् । पितृभ्यः संप्रदास्यामि अक्षय्यमुपतिष्ठतु ॥**"

अत्रचपिंडरहितंश्राद्धंकुर्यात् अयनद्वितयेश्राद्धंविषुवद्वितयेतथा युगादिषुचसर्वासुपिंडनिर्वपणादृतेइति **हेमाद्रौपुलस्त्य**वचनात् अत्ररात्रिभोजनेप्रायश्चित्तमृग्विधाने रात्रौभुक्तेवत्सरेतुमन्वादिषुयुगादिषु अभिस्ववृष्टिंमंत्रंचजपेद्दशनपातकमिति **अपरार्केयमः** कृतोपवासाःसलिलंयेयुगादिदिनेषुच दास्यंत्यन्नादि सहितंतेषांलोकामहोदयाइति वैशाखेमलमासेसतितत्रैवयुगादिःकार्या तथाच**हेमाद्रौऋष्यशृंगः** दशहरासुनोत्कर्षश्चतुर्ष्वपियुगादिषु उपाकर्मणिचोत्सर्गेह्येतदिष्टंवृषादितइति एतद्दशहरादिकंवृषादिसंक्रमेइष्टं कन्याचंद्रेवृषेरवावित्यादिनासौरमासोक्तेरित्यर्थः **कालादर्शेपि** अब्दोदकुंभमन्वादिमहालययुगादिष्वितिमलमासकर्तव्येषुपरिगणनाच्च महालयशब्देनमघात्रयोदश्युच्यतइति**माधवः स्मृतिचंद्रिकायां**तुमासद्वयेकर्तव्यमित्युक्तं यौगादिकंमासिकंचश्राद्धंचापरपक्षिकं मन्वादिकंतैर्थिकंचकुर्यान्मासद्वयेपिचेति अपरपक्षःकृष्णपक्षः नतुमहालयः तस्यतत्रनिषेधात् **मदनरत्नेपिमरीचिः** प्रतिमासंमृताहेचश्राद्धंयत्प्रतिवत्सरं मन्वादौचयुगादौचतन्मासोरुभयोरपीति प्रतिवत्सरंक्रियमाणंकल्पादिश्राद्धमितिसएवव्याचख्यौ अत्रश्राद्धाकरणेप्रायश्चित्तमुक्तम**ृग्विधाने** नयस्यद्यावामंत्रंचशतवारंतदाजपेत् युगादयोयदान्यूनाःकुरुतेनैवचापियइति अत्रसमुद्रस्नानंप्रशस्तं तदुक्तं**पृथ्वीचंद्रोदयेसौरपुराणे** युगादौतुनरःस्नात्वाविधिवल्लवणोदधौ

गोसहस्रप्रदानस्यकुरुक्षेत्रेफलंहियत् तत्फलंलभतेमर्त्योभूमिदानस्यचध्रुवमिति अयंनिर्णयःसर्वयुगादिषुबोद्धव्यः इतियुगादिनिर्णयः ।

या तिथीस पिंडरहित श्राद्ध करावें; कारण, "दोन अयनसंक्रांति, दोन विषुवसंक्रांति व सर्व युगादि तिथि यांचे ठायीं पिंडदानावांचून श्राद्ध करावें" असें **हेमाद्रींत पुलस्त्य**वचन आहे. या तिथीस रात्रिभोजन केलें तर प्रायश्चित्त सांगतो-**ऋग्विधानांत**-"मन्वादि व युगादि ह्या तिथींस रात्रिभोजन केलें तर तद्दोषनिवृत्त्यर्थ "अभिस्त्वापूर्व०" हा मंत्र दहावेळ जपावा." **अपरार्कांत यम**-"जे मनुष्य युगादि तिथींचे ठायीं उपवास करून अन्नादिसहित जलदान करितात त्यांस उत्तम लोक प्राप्त होतात." वैशाख मलमास असतां त्यांतच युगादि तिथि कराव्या. तेंच **हेमाद्रींत ऋष्यशृंग** सांगतो-"दशहरा, चार युगादि, उपाकर्म व उत्सर्जन यांचे ठायीं उत्कर्ष ( अधिकांतील कृत्य शुद्धांत नेणें हें ) नाहीं. कारण, हें वृषभादिसंक्रांतींत इष्ट होय." कारण, 'कन्येस चंद्र व वृषभास रवि असतां दशहरा होते' इत्यादि वचनेंकरून सौरमास सांगितला आहे, असा भाव. आणि **कालादर्शांत**ही—वर्षपर्यंत उदकुंभश्राद्ध, मन्वादिश्राद्ध, महालय व युगादिश्राद्ध, यांची मलमासांत कर्तव्यामध्यें गणना केलेलीही आहे. महालयशब्दानें मघात्रयोदशी घ्यावी असें **माधव** सांगतो. **स्मृतिचंद्रिकेंत** तर-दोनही महिन्यांत युगादि व मन्वादि करावें असें सांगितलें आहे-तें असें-"युगादि श्राद्ध, मासिक, आपरपक्षिक श्राद्ध, मन्वादिश्राद्ध, तीर्थश्राद्ध, हीं दोनही महिन्यांत ( मलमासांत व शुद्धमासांत ) करावीं." आपरपक्षिक म्हणजे कृष्णपक्षांतील श्राद्ध. महालय नव्हे. कारण, महालयाचा मलमासांत निषेध आहे. **मदनरत्नांतही मरीचि**—"दरएक महिन्यांत मृतदिवशीं करावयाचें श्राद्ध ( मासिक ), प्रतिवार्षिक श्राद्ध, मन्वादि व युगादि श्राद्ध हीं दोनही मासांत करावीं." प्रतिवत्सरं म्हणजे 'प्रतिवर्षी करावयाचें कल्पादिश्राद्ध' अशी तीच (मदनरत्नच) व्याख्या करिता झाला. या तृतीयेस श्राद्ध न केलें तर **ऋग्विधानांत** प्रायश्चित्त सांगितलें आहे तें असें-"ज्या वेळीं युगादिश्राद्ध यथायोग्य होणार नाहीं किंवा जो मनुष्य करीत नाहीं त्यानें 'नयस्ययावा०' या मंत्राचा शंभरवेळां जप करावा." या तिथीस समुद्रस्नान प्रशस्त. तें **पृथ्वीचंद्रोदयांत सौरपुराणांत** सांगतो-"जो मनुष्य युगादि तिथीस क्षारसमुद्रामध्यें स्नान करितो तो हजार गाई कुरुक्षेत्रामध्यें दिल्याचें जें फल तें फल पावतो व भूमिदानाचें फल पावतो" हा निर्णय सर्व युगादि तिथींचे ठायीं जाणावा. **इति युगादिनिर्णयः ॥**

इयमेवतृतीयापरशुरामजयंती साप्रदोषव्यापिनीग्राह्या तदुक्तं**भार्गवार्चनदीपिकायांस्कांदभविष्ययोः** वैशाखस्यसितेपक्षेतृतीयायांपुनर्वसौ निशायाःप्रथमेयामेरामाख्यःसमयेहरिः स्वोच्चगैःषड्ग्रहैर्युक्तेमिथुनेराहुसंस्थिते रेणुकायास्तुयोगर्भादवतीर्णोहरिःस्वयमिति दिनद्वयेतद्व्याप्तावंशतःसमव्याप्तौचपरा अन्यथापूर्वैव तदुक्तंतत्रैव**भविष्ये** शुक्लतृतीयावैशाखेशुद्धोपोष्यादिनद्वये निशायाःपूर्वयामेचेदुत्तरान्यत्रपूर्विकेति वैशाखशुक्लसप्तम्यांगंगोत्पत्तिस्तदुक्तं**पृथ्वीचंद्रोदयेब्राह्मे** वैशाखशुक्लसप्तम्यांजह्नुनाजाह्नवीपुरा क्रोधात्पीतापुनस्त्यक्ताकर्णरंध्रात्तुदक्षिणात् तांतत्रपूजयेद्देवींगंगांगगनमेखलामिति अत्रशिष्टाचारान्मध्याह्नव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्तावव्याप्तावेकदेशव्याप्तौवापूर्वा युग्मवाक्यात् वैशाखशुक्लद्वादश्यांयोगविशेषो **हेमाद्रौज्योतिःशास्त्रे** पंचाननस्थौगुरुभूमिपुत्रौमेषेरविःस्याद्यदिशुक्लपक्षे पाशाभिधानाकरभेणयुक्तातिथिर्व्यतीपातइतीहयोगः अस्मिंस्तुगोभूमिहिरण्यवस्त्रदानेनसर्वंपरिहायपापं सुरत्वमिंद्रत्वमनामयत्वंमर्त्याधिपत्यंलभतेमनुष्यइति पंचाननःसिंहः पाशाभिधानातिथिर्द्वादशी करभोहस्तः ।

हीच तृतीया परशुरामजयंती होय. ती प्रदोषव्यापिनी ( रात्रिप्रथमप्रहरव्यापिनी ) घ्यावी. तें सांगतो **भार्गवार्चनदीपिकेंत स्कांदांत भविष्यांत**-"वैशाखशुक्लपक्षीं तृतीयेस पुनर्वसुनक्षत्रावर रात्रीच्या प्रथमप्रहरीं सहा ग्रह उच्चीचे व मिथुनेचा राहु असतां रेणुकेच्या गर्भापासून परशुराम अवतार झाला". ही तृतीया दोन दिवशीं प्रदोषकालीं पूर्णव्यापिनी किंवा अंशतः समव्यापिनी असतां परा करावी. तशी नसतां पूर्वाच करावी. तें सांगतो तेथेंच **भविष्यांत**—"वैशाखशुक्ल तृतीया शुद्ध ( इतरानें अविद्ध ) असेल त्या दिवशीं उपोषण करावें. दोन दिवशीं रात्रीच्या प्रथम प्रहरीं असेल तर दुसरे दिवशीं उपोषण करावें. तशी नसेल तर पूर्वदिवशीं उपोषण करावें." वैशाखशुक्लसप्तमीस गंगोत्पत्ति ( गंगावतार ) झाली. तें सांगतो-**पृथ्वीचंद्रोदयांत ब्राह्मांत**-"जह्नुऋषीनें गंगा क्रोधानें प्राशन केली ती वैशाखशुक्ल सप्तमीस पुनः उजव्या कर्णरंध्रानें बाहेर टाकिली. त्या तिथीस गंगादेवीचें पूजन करावें." या गंगापूजनाविषयीं शिष्टाचारावरून मध्याह्नव्यापिनी सप्तमी घ्यावी. दोन दिवशीं मध्याह्नव्याप्ति, अव्याप्ति अथवा एकदेशव्याप्ति असतां युग्मवाक्यावरून पूर्वा घ्यावी. वैशाखशुक्ल द्वादशीचे ठायीं विशेष योग सांगतो—**हेमाद्रींत ज्योतिःशास्त्रांत**—"वैशाखशुक्लपक्षीं सिंहास गुरु

व भौम, मेषास सूर्य आणि हस्तनक्षत्रानें युक्त द्वादशी तिथि असेल तर व्यतीपात योग होतो. या योगावर गाई, भूमि, सुवर्ण, वस्त्र यांचें दान केल्यानें सर्व पाप घालवून देवत्व, इंद्रत्व, रोगरहितत्व आणि मनुष्याधिपत्य यांतें मनुष्य पावतो."

वैशाखशुक्लचतुर्दशी नृसिंहजयंती साप्रदोषव्यापिनीग्राह्या तदुक्तं **हेमाद्रौनृसिंहपुराणे** वैशाखेशुक्लपक्षेतुचतुर्दश्यांनिशामुखे मज्जन्मसंभवंपुण्यंव्रतंपापप्रणाशनं वर्षेवर्षेतुकर्तव्यंममसंतुष्टिकारणमिति दिनद्वयेपितद्व्याप्तावंशतःसमव्याप्तौचपरा विषमव्याप्तौत्वधिकव्याप्तिमती दिनद्वयेप्यव्याप्तौपरा परदिनेगौणकालव्याप्तेःसत्त्वात्पूर्वदिनेचतदभावात् यत्तु ततोमध्याह्नवेलायांनद्यादौविमलेजले इत्युपक्रम्य परिधाय ततोवासोव्रतकर्मसमारभेदितितत्रैवोक्तं तत्संकल्परूपव्रतोपक्रमविषयं नन्वेतावतामध्याह्नव्यापिनीग्राह्येति भ्रमितव्यं पूर्वोक्तवचनविरोधात् वैशाखस्यचतुर्दश्यांसोमवारेनिलर्क्षके अवतारोनृसिंहस्यप्रदोषसमयेद्विजा- **इतिटोडरानंदेस्कांदात्** कूर्मःसिंहोबौद्धकल्कींचसायमिति पूर्वोक्तपुराणसमुच्चयवचनाच्चेति**केचित्** **तत्त्वंतु**पूर्ववचसामनाकरत्वेननिर्मूलत्वात् **हेमाद्रौनृसिंहपुराणे** मज्जन्मसंभवंपुण्यंव्रतंपापप्रणाशनमित्युपक्रम्य स्वातीनक्षत्रयोगेचशनिवारेतुमद्व्रतं सिद्धयोगस्यसंयोगेवणिजेकरणेतथा पुंसांसौभाग्ययोगेनलभ्यते दैवयोगतः सर्वैरेतैस्तुसंयुक्तंहत्याकोटिविनाशनं एतदन्यतरेयोगेमद्दिनंपापनाशनं केवलेपिप्रकर्तव्यंमद्दिने- व्रतमुत्तमं अन्यथानरकंयातियावच्चंद्रदिवाकरावित्युक्त्वा ततोमध्याह्नवेलायांनद्यादौविमलेजलेइत्यादिना- मध्याह्नएवव्रतविधानाच्चतुर्दश्युत्तरार्धवणिजेकरणेमध्याह्नेचस्पष्टंजन्मप्रतीयते संध्यायांजन्मतुक्वाप्यनुक्तेर्मौर्ख्यकृतंतद्वशान्निर्णयश्चहेयएवेति ।

वैशाखशुक्ल चतुर्दशी ही नृसिंहजयंती. ती प्रदोषव्यापिनी घ्यावी. तें सांगतो-**हेमाद्रींत नृसिंहपुराणांत**-"वैशाखशुक्ल चतुर्दशीस प्रदोषकालीं माझें ( नृसिंहाचें ) जन्म झालें. तें पुण्यकारक, पापनाशक माझें व्रत प्रतिवर्षी करावें, तेणेंकरून माझा संतोष होतो." दोनही दिवशीं प्रदोषव्याप्ति असतां किंवा अंशतः समव्याप्ति असतां परा करावी. दोन दिवशीं विषमव्याप्ति असेल तर अधिक व्याप्ति असेल ती घ्यावी. दोनही दिवशीं व्याप्ति नसेल तर परा घ्यावी; कारण, दुसऱ्या दिवशीं गौणकालीं ( संकल्पकालीं ) व्याप्ति आहे, व पूर्वदिवशीं व्याप्ति नाहीं. आतां जें "मध्याह्नसमयीं नद्यादि स्वच्छ जलांत स्नान करून-असा उपक्रम करून सांगतो-वस्त्रधारण करून व्रतकर्मास प्रारंभ करावा" असें तेथेंच सांगितलें आहे, तें, संकल्परूप जो व्रतारंभ तद्विषयक होय. यावरून मध्याह्नव्यापिनी घ्यावी, अशा भ्रमांत पडूं नये. कारण, पूर्वोक्त नृसिंहपुराणवचनाशीं विरोध येईल. आणि "वैशाखशुक्ल चतुर्दशीस सोमवार व स्वाती नक्षत्र यांचा योग असतां प्रदोषसमयीं नृसिंहाचा अवतार झाला" असें **टोडरानंदांत स्कंदपुराणवचन** आहे. आणि "कूर्म, नृसिंह, बौद्ध, कल्की हे सायंकालीं अवतीर्ण झाले" असें पूर्वी चैत्रमासीं **पुराणसमुच्चय**वचनही सांगितलें आहे, असें केचित् म्हणतात. खरा प्रकार म्हटला तर, पूर्वीचीं वचनें मोठ्या प्रसिद्ध निबंधांत उपलब्ध नसल्यामुळें निर्मूल असल्याकारणानें; आणि **हेमाद्रींत नृसिंहपुराणांत**-"माझ्या जन्मानें उत्पन्न पुण्यव्रत पापनाशक आहे" असा उपक्रम करून "स्वातीनक्षत्र, शनिवार, सिद्धयोग, वणिजकरण यांचा योग असतां तें व्रत पुरुषांना सौभाग्ययोगानें व दैवयोगानें प्राप्त होतें. या सर्व योगांनीं युक्त असें माझें व्रत कोटिहत्या नाश करणारें होतें. यांतून एकादाही योग जरी असेल तथापि तो माझा दिवस पापनाश करणारा होय. ( केवल योगरहित ) ही माझ्या दिवशीं हें उत्तम व्रत करावें, न करतील तर चंद्र सूर्य आहेत तोंपर्यंत नरकाप्रत जातील."-असें सांगून "नंतर मध्याह्नीं नदी इत्यादि स्वच्छजलामध्यें स्नान करावें" इत्यादि वचनेंकरून मध्याह्नींच व्रत सांगितल्यावरून चतुर्दशीच्या उत्तरार्धीं वणिजकरण येतें त्या वेळीं मध्याह्नीं जन्म आहे असें स्पष्ट प्रतीतीस येतें. संध्यासमयीं जन्म झालें असें तर कोणत्याही ग्रंथांत सांगितलें नसल्याकारणानें तें वचन मूर्खपणानें कोणीतरी केलेलें आहे यास्तव त्याला अनुसरून जो निर्णय तोही त्याज्यच आहे.

तथाइयमेव योगविशेषेणातिप्रशस्ता तदुक्तं**तत्रैव** स्वातीनक्षत्रयोगेचशनिवारेचमद्व्रतं सिद्धयोगस्य संयोगेवणिजेकरणेतथा पुंसांसौभाग्ययोगेनलभ्यतेदैवयोगतः एभिर्योगैर्विनापिस्यान्मद्दिनंपापनाशनं सर्वेषामेववर्णानामधिकारोस्तिमद्व्रते मद्भक्तैस्तुविशेषेणकर्तव्यंमत्परायणैः **तथा** सिंहःस्वर्णमयोदेयोममसंतोषकारकः **तथा** विज्ञायमद्दिनंयस्तुलंघयेत्पापकृन्नरः सयातिनरकंघोरंयावच्चंद्रदिवाकरौ इदंचसंयोगपृथक्त्वन्यायेननित्यंकाम्यंच अथात्रविशेषः मध्याह्नेमृद्गोमयतिलामलकस्नानंकृत्वा नृसिंहदेवदेवेशतवजन्मदिनेशुभे

उपवासंकरिष्यामिसर्वभोगविवर्जितइतिमंत्रेणसंकल्पंकृत्वा आचार्यंवृत्वासायंकाले हैमीतुतत्रमन्मूर्तिःस्था- प्यालक्ष्म्यास्तथैवच पलेनवातदर्धेनतदर्धार्धेनवापुनः यथाशक्तितथाकुर्याद्वित्तशाठ्यविवर्जितइत्युक्तं नृसिंह- मूर्तिंशक्त्याकृतंसुवर्णसिंहंचकलशोपरिसंपूज्यरात्रौजागरणंकृत्वाप्रातःपुनःसंपूज्य नृसिंहाच्युतदेवेशलक्ष्मी- कांतजगत्पते अनेनार्चाप्रदानेनसफलाःस्युर्मनोरथाः इत्याचार्यायदत्वा मद्वंशेयेनराजातायेजनिष्यंतिचापरे तांस्त्वमुद्धरदेवेशदुस्तराद्भवसागरात् पातकार्णवमग्नस्यव्याधिदुःखांबुवारिभिः तीव्रैश्चपरिभूतस्यमहादुःख- गतस्यमे करावलंबनंदेहिशेषशायिन्जगत्पते श्रीनृसिंहरमाकांतभक्तानांभयनाशन क्षीरांबुधिनिवासिंस्त्वंच- क्रपाणेजनार्दन व्रतेनानेनदेवेशभुक्तिमुक्तिप्रदोभवेतिप्रार्थयेदितिसंक्षेपः ।

तशी हीच नृसिंहचतुर्दशी तिथि योगविशेषानें अतिप्रशस्त होय. तें तेथेंच सांगतो —"स्वातीनक्षत्र, शनिवार, सिद्धयोग, वणिजकरण, यांच्या योगानें युक्त चतुर्दशी प्राप्त होईल तर तो महादेवयोग होय, कदाचित् हे पूर्वोक्त योग जरी नसले तथापि माझा जन्मदिवस पापनाशक आहे. सर्व वर्णांस माझ्या व्रताचा अधिकार आहे. माझे जे भक्त मत्परायण त्यांनीं तर अवश्य करावें," तसेंच "सुवर्णाचा सिंह माझ्या संतोषार्थ द्यावा." तसेंच —"जो मनुष्य माझा दिवस जाणून त्या दिवशीं उपोषणादि करीत नाहीं तो चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत घोर नरकास जातो." हें व्रत संयोगपृथक्त्वन्यायानें[१] नित्य व काम्यही आहे. आतां या तिथीचे ठायीं विशेष विधि सांगतो. मध्याह्नीं मृत्तिका, गोमय, तिल, आंवळ्यांचा कल्क यांहीं स्नान करून "**नृसिंह देवदेवेश तव जन्मदिने शुभे ॥ उपवासं करिष्यामि सर्वभोगविवर्जितः**" या मंत्रानें व्रताचा संकल्प करून आचार्य वरून सायंकालीं "पलप्रमाण ( चार तोळे ) सुवर्णाची किंवा त्याचे अर्धानें अथवा अर्धाचे अर्धानें किंवा यथाशक्ति नृसिंह व लक्ष्मी यांची मूर्ति करून स्थापन करावी." असें सांगितलें आहे. नृसिंहमूर्ति व शक्ती- प्रमाणें केलेला सुवर्णसिंह यांची कलशावर पूजा करून रात्रीं जागरण करून प्रातःकालीं पुनः पूजा करून "**नृसिंहाच्युत देवेश लक्ष्मीकांत जगत्पते ॥ अनेनार्चाप्रदानेन सफलाः स्युर्मनोरथाः**" या मंत्रानें ती मूर्ति आचार्यास द्यावी आणि "**मद्वंशे ये नरा जाता ये जनिष्यंति चापरे ॥ तांस्त्वमुद्धर देवेश दुस्तराद्भवसागरात् ॥ पातकार्णवमग्नस्य व्याधिदुःखांबुवारिभिः ॥ तीव्रैश्च परिभूतस्य महादुःखगतस्य मे ॥ करावलंबनं देहि शेषशायिन् जगत्पते ॥ श्रीनृसिंह रमाकांत भक्तानां भयनाशन ॥ क्षीरांबुधिनिवासिंस्त्वं चक्र- पाणे जनार्दन ॥ व्रतेनानेन देवेश भुक्तिमुक्तिप्रदो भव**" या मंत्रांनीं प्रार्थना करावी. याप्रमाणें हें संक्षेपानें व्रत सांगितलें, असें समजावें.

वैशाखपौर्णमास्यांविशेषोऽ**परार्केजाबालिः** शृतान्नमुदकुंभंचवैशाख्यांचविशेषतः निर्दिश्यधर्मराजाय गोदानफलमाप्नुयान सुवर्णतिलयुक्तैस्तुब्राह्मणान्सप्तपंचच तर्पयेदुदपात्रैस्तुब्रह्महत्यांव्यपोहतीति उदकुंभदान मंत्रस्त्वक्षय्यतृतीयाप्रकरणेउक्तः **भविष्येपि** वैशाखीकार्तिकीमाघीतिथयोतीवपूजिताः स्नानदानविही- नास्नाननेयाःपांडुनंदन अत्रकृष्णाजिनदानंकार्यं तथाच**विष्णुः** कृष्णाजिनेतिलानकृष्णानहिरण्यंमधुसर्पिषी ददातियस्तुविप्रायसर्वंतरतिदुष्कृतमिति इतिश्रीकमलाकरभट्टकृतेकालनिर्णयसिंधौवैशाखमासःसमाप्तः ॥

वैशाखपौर्णमासीस विशेष सांगतो **अपरार्कांत जाबालि**—"वैशाखी पौर्णिमेस शिजविलेलें अन्न व उदकुंभ विशेषें- करून धर्मराजाला द्यावा, म्हणजे गोदानाचें फल प्राप्त होतें. सुवर्णतिलयुक्त उदकपात्रांनीं ( उदकुंभांनीं ) सात ब्राह्मणांस तृप्त करावें, म्हणजे ब्रह्महत्येचें पाप नाहींसें होतें." उदकुंभदानाचा मंत्र तर अक्षयतृतीयाप्रकरणीं पूर्वी सांगितला आहे. **भविष्यांतही**—"वैशाखी, कार्तिकी आणि माघी ह्या पौर्णिमा अत्यंत पूज्य आहेत ह्या तिथींस स्नान दान केल्याविरहित राहूं नये." या वैशाखी पौर्णमासीस कृष्णाजिन दान करावें. तेंच सांगतो **विष्णु**—"कृष्णाजिन, काळे तिळ, सुवर्ण, मध, तूप हीं जो ब्राह्मणास देतो त्याचें सर्व पातक नष्ट होतें." **इति वैशाखमासनिर्णयाची महाराष्ट्र टीका समाप्त झाली.**

वृषसंक्रांतौपूर्वाःषोडशघटिकाःपुण्यकालः रात्रौसंक्रमेसतिप्रागेवोक्तं ज्येष्ठशुक्लतृतीयायांरंभाव्रतमुक्तं **माधवीयेभविष्ये** भद्रेकुरुष्वयत्नेनरंभाख्यंव्रतमुत्तमं ज्येष्ठशुक्लतृतीयायांस्नातानियमतत्परेति सापूर्ववि- द्धाग्राह्या बृहत्तपातथारंभासावित्रीवटपैतृकी कृष्णाष्टमीचभूताचकर्तव्यासंमुखीतितिथिरिति**स्कांदोक्तेः** ।

---

१ संयोगपृथक्त्वन्याय चैत्रमासांत रामनवमीव्रतप्रसंगीं आम्हीं लिहिला आहे तो तेथें पाहा.

## आतां ज्येष्ठमास.

**वृषभसंक्रांतीच्या** पहिल्या सोळा घटिका पुण्यकाळ होय. रात्रीं संक्रांति झाली तर त्याचा निर्णय पूर्वींच ( **प्रथमपरिच्छेदांत** ) सांगितला आहे. ज्येष्ठशुक्ल **तृतीयेचे** ठायीं रंभा ( कदली ) व्रत सांगतो **माधवीयांत भविष्यांत**—"हे भद्रे, ज्येष्ठशुक्ल तृतीयेस स्नान करून नियमतत्पर होऊन यत्नानें उत्तम रंभाव्रत कर." त्या व्रताविषयीं तृतीया पूर्वविद्धा घ्यावी. कारण, "बृहत्तपा ( श्रावणकृष्ण द्वितीया ) रंभा, वटसावित्री ( वटपौर्णिमा ), वटपैतृकी ( सावित्रीव्रतसंबंधी अमावास्या ) कृष्ण पक्षांतली अष्टमी व चतुर्दशी, ह्या तिथि संमुख ( पूर्वविद्धा ) कराव्या" असें **स्कंदपुराणवचन** आहे.

ज्येष्ठशुक्लदशमीदशहरा तदुक्तं **हेमाद्रौब्राह्मे** ज्येष्ठेमासिसितेपक्षेदशमीहस्तसंयुता हरतेदशपापानि तस्माद्दशहरास्मृतेति **वाराहेपि** दशमीशुक्लपक्षेतुज्येष्ठेमासिकुजेहनि अवतीर्णायतःस्वर्गाद्धस्तर्क्षेचसरिद्वरा हरतेदशपापानितस्माद्दशहरास्मृतेति **स्कांदेतु**दशयोगाउक्ताः तथा ज्येष्ठेमासिसितेपक्षेदशम्यांबुधहस्तयोः व्यतीपातेगरानंदेकन्याचंद्रेवृषेरवौ दशयोगेनरःस्नात्वासर्वपापैःप्रमुच्यतइति अत्रबुधभौमयोःकल्पभेदेन व्यवस्था इयंचयत्रैवयोगबाहुल्यंसैवग्राह्या योगाधिक्येफलाधिक्यात् ज्येष्ठमलमासेसतितत्रैवदशहराकार्या नतुशुद्धे दशहरासुनोत्कर्षश्चतुर्ष्वपियुगादिष्विति **हेमाद्रौऋष्यशृंगोक्तेः** तथा**स्कांदे** यांकांचित्सरितं-प्राप्यदद्याद्दर्भतिलोदकं मुच्यतेदशभिःपापैःसमहापातकोपमैः ।

ज्येष्ठशुक्ल **दशमी** ही दशहरा होय. तें सांगतो **हेमाद्रींत ब्रह्मपुराणांत**—"ज्येष्ठमासीं शुक्लपक्षीं हस्तनक्षत्रयुक्त दशमी दहा* पापें हरण करिते म्हणून ती दशहरा होय." **वराहपुराणांत**ही सांगतो-"ज्येष्ठमासीं शुक्लपक्षीं भौमवारीं दशमीस हस्तनक्षत्रावर स्वर्गापासून भागीरथी अवतीर्ण झाली, ती त्या तिथीस स्नान करणारांचीं दहा पापें हरण करिते म्हणून ती दशहरा म्हटली आहे." **स्कंदपुराणांत** तर दहा योग सांगितले आहेत-ते हे—"ज्येष्ठमास १, शुक्लपक्ष २, दशमी ३, बुधवार ४, हस्तनक्षत्र ५, व्यतीपात ६, गरकरण ७, आनंदाख्ययोग ८, कन्येस चंद्र ९, वृषभास सूर्य १०, हे दहा योग असतां मनुष्यानें गंगेंत स्नान केलें तर तो सर्व पापांपासून मुक्त होतो." येथें वरील वचनांत भौमवार व या वचनांत बुधवार सांगितला त्यांची कल्पभेदानें व्यवस्था समजावी. ही दशमी ज्या दिवशीं बहुत योग असतील त्या दिवशींचीच घ्यावी; कारण, योग अधिक असतां अधिक फलप्राप्ति होते. ज्येष्ठ मलमास असेल तर मलमासांतच दशहरा दशमी करावी. शुद्ध मासांत करूं नये. कारण, "दशहरा, चार युगादि तिथि ह्यांविषयीं उत्कर्ष ( पुढील मासीं नेणें ) नाहीं" असें **हेमाद्रींत ऋष्यशृंग**वचन आहे. तसेंच **स्कंदपुराणांत**—"कोणत्याही नदींत स्नान करून या दशमीस अर्घ्य तिलोदक देईल तर तो महापातकांसारख्या दहा पातकांपासून मुक्त होतो."

अत्रविशेषः **काशीखंडे** ज्येष्ठेमासिसितेपक्षेप्राप्यप्रतिपदंतिथिं दशाश्वमेधकेस्नात्वामुच्यतेसर्वपातकैः एवंसर्वासुतिथिषुक्रमस्नायीनरोत्तमः आशुक्लपक्षदशमींप्रतिजन्माघमुत्सृजेत् तथा लिंगंदशाश्वमेधेशंदृष्ट्वादशहरातिथौ दशजन्मार्जितैःपापैस्त्यज्यतेनात्रसंशयः तथाच**भविष्योत्तरकाशीखंडयोः** निशायां जागरंकृत्वासमुपोष्यचभक्तितः पुष्पैर्गंधैश्चनैवेद्यैःफलैश्चदशसंख्यया तथादीपैश्चतांबूलैःपूजयेच्छ्रद्धयान्वितः स्नात्वाभक्त्यातुजाह्नव्यांदशकृत्वोविधानतः दशप्रसृतिकृष्णांश्चतिलानसर्पिश्चैवजले सक्तुपिंडान्गुडपिंडान्-दद्याद्दशसंख्यया ततोगंगातटेरम्येहेम्नारूप्येणवातथा गंगायाःप्रतिमांकृत्वावक्ष्यमाणस्वरूपिणीं संस्थाप्य-पूजयेद्देवींतदलाभेमृदापिच अथतत्राप्यशक्तश्चेल्लिखेत्पिष्टेनवैभुवि वक्ष्यमाणेनमंत्रेणकुर्यात्पूजांविशेषतः नारायणंमहेशंचब्रह्माणंभास्करंतथा भगीरथंचनृपतिंहिमवंतंनगेश्वरं गंधपुष्पादिभिःसम्यग्यथाशक्तिप्रपूज-येत् दशप्रस्थांस्तिलान्दद्याद्दशविप्रेभ्यएवच दशप्रस्थान्यवान्दद्याद्दशसंख्यगवीस्तथा प्रस्थः षोडशपलानि पलंतु मुष्टिमात्रंपलंस्मृतमितिमहार्णवेउक्तं मत्स्यकच्छपमंडूकमकरादिजलेचरान् हंसकारंडवबकचक्र-

१ सावित्रीव्रत ज्येष्ठ अमावास्येसही सांगितलें आहे, तें त्या व्रतनिर्णयप्रसंगीं पुढें पहावें. २ दश पापानि मनुनोक्तानि । पारुष्यमनृतं चैव पैशुन्यं चापि सर्वशः ॥ असंबद्धप्रलापश्च वाङ्मयं स्याच्चतुर्विधं ॥ अदत्तानामुपादानं हिंसा चैवाविधानतः ॥ परदारोपसेवा च कायिकं त्रिविधं स्मृतं ॥ परद्रव्येष्वभिध्यानं मनसानिष्टचिंतनं ॥ वितथाभिनिवेशश्च मानसं त्रिविधं स्मृतमिति ॥
* १ कठोरभाषण, २ अनृतभाषण, ३ पैशुन्य ( चहाडी करणें ), ४ बडबड, ५ न दिलेली वस्तु घेणें, ६ विधीवांचून हिंसा, ७ परस्त्रीसेवन, ८ परद्रव्याचा अभिलाष, ९ अनिष्टचिंतन, १० व्यर्थ आग्रह. ३ बुधवार व हस्तनक्षत्र यांचा योग आनंद होय.

टिट्टिभसारसान् कारयित्वायथाशक्तिस्वर्णेनरजतेनवा तदलाभेपिष्टमयानभ्यर्च्यकुसुमादिभिः गंगायांप्रक्षिपेदाज्यदीपांश्चप्रवाहयेत् पुष्पाद्यैःपूजयेद्गंगांमंत्रेणानेनभक्तितः ॐनमःशिवायैनारायण्यैदशहरायैगंगायैनमोनमः इतिमंत्रंतुयोमर्त्योदिनेतस्मिन्दिवानिशं जपेत्पंचसहस्राणिदशधर्मफलंलभेत् **काशीखंडे**त्वन्योमंत्रउक्तः नमःशिवायैप्रथमंनारायण्यैपदंततः दशहरायैपदमितिगंगायैमंत्रएषवै स्वाहांतःप्रणवादिश्चभवेद्विंशाक्षरोमनुः पूजादानंजपोहोमस्तेनैवमनुनास्मृतमिति ।

येथें विशेष सांगतो-**काशीखंडांत**-"ज्येष्ठमासीं शुक्लपक्षीं प्रतिपदा तिथीस दशाश्वमेधतीर्थांत स्नान केलें असतां सर्व पापांपासून मुक्त होतो. या प्रकारें प्रतिपदेपासून दशमीपर्यंत क्रमानें स्नान करणाऱ्या मनुष्याचें सर्व जन्मांचें पाप जातें." तसेंच "दशहरा तिथीस दशाश्वमेधलिंगाचें दर्शन केलें तर दशजन्मार्जित पापें जातात, यांत संशय नाहीं." तसेंच **भविष्योत्तरांत** व **काशीखंडांत**-"रात्रीस जागरण व उपोषण करून पुष्प, गंध, नैवेद्य, दहा फलें, तसेंच दीप, तांबूल यांहींकरून भक्तानें गंगेची पूजा करावी. भक्तानें भागीरथीमध्यें यथाविधि दहा वेळ स्नान करून दहा पळें काळे तीळ, घृत, सक्तुपिंड, गुडपिंड हे दहा दहा उदकामध्यें द्यावे. नंतर गंगेच्या तीरीं सुवर्णाची अथवा रुप्याची गंगेची प्रतिमा पुढें सांगितलेल्या स्वरूपाची स्थापन करून पूजा करावी. सुवर्णादिकांची नसेल तर मृत्तिकेची मूर्ति करून पूजा करावी. तशी मूर्ति करण्यास अशक्त असेल तर पिठानें भूमीवर मूर्ति लिहून पुढें सांगितलेल्या मंत्रानें पूजा करावी. तसेंच विष्णु, शिव, ब्रह्मा सूर्य, राजाभगीरथ, पर्वतश्रेष्ठ हिमालय, यांची गंधपुष्पादिकांनीं चांगली पूजा करून दहा प्रस्थ ( शेर ) तिल दहा ब्राह्मणांस द्यावे. व दहा प्रस्थ यव आणि दहा गाई द्याव्या." सोळा पळें म्हणजे एक प्रस्थ आणि एक मूठ म्हणजे एक पल, असें महार्णवांत उक्त आहे. "मत्स्य, कच्छप, बेडूक, मगर, इत्यादि जलचर व हंस, कारंडव, बक, चक्रवाक, टिट्टिभ, सारस हे पक्षी यथाशक्ति सुवर्णानें किंवा रुप्यानें करावे. सुवर्णरुप्याचे अभावी पिठानें करून पुष्पादिकांनीं पुजून गंगेमध्यें सोडावे आणि घृतदीपही गंगेंत सोडावे आणि पुष्पादिकांनी गंगेचें पूजन पुढें सांगितलेल्या मंत्रानें भक्तियुक्त होतसातां करावें. तो **मंत्र** असा—"**ॐनमः शिवायै नारायण्यै दशहरायै गंगायै नमोनमः**" या मंत्राचा जो मनुष्य त्या दिवशीं अहोरात्रीं पांच हजार जप करितो तो दशधर्मांचें फल पावतो." **काशीखंडांत** तर दुसरा मंत्र सांगितला आहे-तो असा—"**नमः शिवायै**" हें प्रथम पद, नंतर "**नारायण्यै**" हें दुसरें; पुढें "**दशहरायै**" नंतर "**गंगायै**" याच्या अंतीं '**स्वाहा**' शब्द व प्रथमारंभी 'ॐ' असा वीस अक्षरांचा मंत्र होय. पूजा, दान, जप, होम हे या मंत्रानेंच करावे असें समजावें."

अत्रगंगास्तोत्रपाठमपिदशवारंकुर्यात् तदुक्तं**भविष्ये** तस्यांदशम्यामेतच्चस्तोत्रंगंगाजलेस्थितः यःपठेद्दशकृत्वस्तुदरिद्रोवापिचाक्षमः सोपितत्फलमाप्नोतिगंगांसंपूज्ययत्नतइति स्तोत्रंचप्रतिपदादिदशमीपर्यंतंदिनवृद्धिसंख्ययापठनीयमितिशिष्टाः अत्रचसर्वोपिविस्तरःस्तोत्रादिच**भट्टकृतत्रिस्थलीसेतो**रवधेयः विस्तरभीतेस्तुनलिख्यते एवंकुर्वतःफलमुक्तं**काशीखंडे** एवंकृत्वाविधानेनवित्तशाठ्यविवर्जितः उपवासीवक्ष्यमाणैर्दशपापैःप्रमुच्यते सर्वान्कामानवाप्नोतिप्रेत्यब्रह्मणिलीयतइतिच अस्यांसेतुबंधरामेश्वरस्यप्रतिष्ठादिनत्वाद्विशेषेणपूजाकार्या तदुक्तं**स्कांदेसेतुमाहात्म्ये** ज्येष्ठमासेसितपक्षेदशम्यांबुधहस्तयोः गरानंदेव्यतीपातेकन्याचंद्रेवृषेरवौ दशयोगेसेतुमध्येलिंगरूपधरंहरम् रामोवैस्थापयामासशिवलिंगमनुत्तममिति इतिदशहरा ।

येथें गंगास्तोत्राचा पाठही दहा वेळ करावा, तें सांगतो. **भविष्यांत**—"जो दरिद्री किंवा पूर्वोक्त विधि करण्यास असमर्थ असेल त्यानें त्या दशमीस उदकांत उभें राहून दहा वेळ गंगास्तोत्राचा पाठ करावा म्हणजे त्यालाही पूर्वोक्त उत्तम फल प्राप्त होतें." प्रतिपदादि दशमीपर्यंत स्तोत्रपाठही दिनवृद्धिसंख्येनें ( पहिल्या दिवशीं एक पाठ, दुसऱ्या दिवशीं दोन पाठ असा ) करावा, असें शिष्ट म्हणतात. याविषयीं सर्व विस्तार व स्तोत्रादिक हें सर्व, नारायणभट्टांनी केलेल्या **त्रिस्थलीसेतूंत** पहावें. येथें ग्रंथविस्तारभयानें लिहीत नाहीं. असें हें पूर्वोक्त व्रत करणारास फल सांगतो-**काशीखंडांत**—"जो मनुष्य उपवास करून द्रव्याचें कार्पण्य न करितां पूर्वोक्त विधीनें व्रत करील तो पुढें सांगितलेल्या दहा पापांपासून मुक्त होऊन सर्व मनोरथांतें पावतो, व मरणानंतर ब्रह्मस्वरूपीं लीन होतो." ही दशमी सेतुबंधरामेश्वराचा प्रतिष्ठादिवस आहे, यास्तव या दशमीस विशेषेंकरून सेतुबंधरामेश्वराची पूजा करावी. तें सांगतो—**स्कंदपुराणांत सेतुमाहात्म्यांत**—"ज्येष्ठमास, शुक्लपक्ष, दशमी, बुधवार, हस्तनक्षत्र, गरकरण, आनंदयोग, व्यतीपात, कन्येस चंद्र व वृषभास सूर्य हे दहा योग असतां रामानें सेतूमध्यें उत्तम शिवलिंगाची स्थापना केली." इति दशहरा.

ज्येष्ठशुक्लैकादशीनिर्जला तत्रनिर्जलमुपोष्यविप्रेभ्योजलकुंभान्दद्यादिति**निर्णयामृतेउक्तम् मदनरत्ने**

**स्कांदे** ज्येष्ठेमासिनृपश्रेष्ठयाशुक्लैकादशीशुभा निर्जलंसमुपोष्यात्रजलकुंभान्सशर्करान् प्रदायविप्रमुख्येभ्यो मोदतेविष्णुसन्निधौ ।

ज्येष्ठशुक्ल एकादशी ही निर्जलासंज्ञक होय. ह्या एकादशीस उदकप्राशनावांचून उपोषण करून ब्राह्मणांस उदककुंभ द्यावे असें **निर्णयामृतांत** सांगितलें आहे. **मदनरत्नांत स्कंदपुराणांत** सांगतो–"ज्येष्ठमासीं शुक्लपक्षीं जी एकादशी तिचे ठायीं जलरहित उपोषण करून शर्करासहित उदककुंभ श्रेष्ठ ब्राह्मणांस द्यावे म्हणजे विष्णूजवळ आनंद पावतो."

ज्येष्ठपौर्णमास्यांसावित्रीव्रतम् तदुक्तं**स्कांदभविष्ययोः** ज्येष्ठेमासिसितेपक्षेद्वादश्यांरजनीमुखेइत्युपक्रम्य व्रतंत्रिरात्रमुद्दिश्यदिवारात्रिंस्थिराभवेदिति अंतेप्युपसंहृतम् ज्येष्ठेमासिसितेपक्षेपूर्णिमायांतथाव्रतम् चीर्णंपुरामहाभक्त्याकथितंतेमयानृपेति दाक्षिणात्याश्चैतदेवाद्रियंते एतच्चामावास्यायामप्युक्तं**निर्णयामृते भविष्ये** अमायांचतथाज्येष्ठेवटमूलेमहासती त्रिरात्रोपोषितानारीविधिनानेनपूजयेत् **मदनरत्ने**त्विदंवाक्यं पंचदश्यांतथाज्येष्ठे इतिपठित्वाज्येष्ठपौर्णमास्यामुक्तं तथा अशक्तौतुत्रयोदश्यांनक्तंकुर्याज्जितेंद्रिया अयाचितंचतुर्दश्याममायांसमुपोषणमिति तत्तुपाश्चात्याआद्रियंते **हेमाद्रिसमयोद्योतादि**पुतुभाद्रपदपूर्णिमायामुक्तं तत्तुनेदानींप्रचरति **गौडास्तु** मेषेवावृषभेवापिसावित्रींतांविनिर्दिशेत् ज्येष्ठकृष्णचतुर्दश्यांसावित्रीमर्चयंतियाः वटमूलेसोपवासानतावैधव्यमाप्नुयुरितिपराशरोक्तेश्चतुर्दश्यांप्रदोषेव्रतं दिनद्वयेतद्व्याप्तौपरैवेत्याहुः तन्निर्मूलं ।

ज्येष्ठमासीं पौर्णिमेस वटसावित्रीव्रत, तें सांगतो—**स्कांदांत भविष्यांत**—"ज्येष्ठमासीं शुक्लपक्षीं द्वादशीस प्रदोषकालीं" असा उपक्रम करून "त्रिरात्रव्रताचा उद्देश करून रात्रदिवस स्थिर व्हावें." असें सांगून अंतीं उपसंहार ( पूर्वोक्त विषयाचें या व्रताविषयीं पर्यवसान ) केला, तो असा–"ज्येष्ठमासीं शुक्लपक्षीं पौर्णिमेस तसें व्रत पूर्वी महाभक्तीनें आचरण केलेलें असें हे राजा! तुला मीं सांगितलें." दक्षिणदेशीय लोक हेंच ( या पौर्णिमेचे ठायींच ) व्रत करितात. हेंच व्रत अमावास्येसही सांगितलें आहे–**निर्णयामृतांत भविष्यांत**–"ज्येष्ठमासीं अमावास्येस महासती स्त्रीनें त्रिरात्र उपोषण करून यथाविधि वटमूलीं पूजा करावी." **मदनरत्नांत** तर हें वाक्य 'पंचदश्यां तथा ज्येष्ठे' असें पठन करून हें व्रत ज्येष्ठपौर्णिमेस करण्याविषयीं सांगितलें आहे. तसेंच–"त्रिरात्रउपोषणाविषयीं अशक्त असेल तर त्रयोदशीस नक्त करून जितेंद्रिय होऊन चतुर्दशीस अयाचित व अमावास्येस उपोषण करून व्रत करावें" तें अमावास्येस व्रत पाश्चात्य ( पश्चिमेकडचे लोक ) करितात. **हेमाद्री, समयोद्योत** इत्यादि ग्रंथांत तर भाद्रपद पौर्णिमेस हें व्रत सांगितलें आहे तें तर सांप्रत काळीं प्रचारांत नाहीं. **गौड**ग्रंथ तर "मेष किंवा वृषभ या संक्रांतींत ती सावित्री समजावी, ज्येष्ठकृष्णचतुर्दशीस ज्या स्त्रिया उपोषण करून वटमूलीं सावित्रीचें पूजन करितात, त्यांस वैधव्य प्राप्त होत नाहीं." ह्या **पराशर**वचनावरून चतुर्दशीस प्रदोषीं व्रत करावें. ती चतुर्दशी दोन दिवशीं प्रदोषकाळीं असतां परदिवशींच व्रत करावें असें म्हणतात, तें निर्मूल होय.

अत्रपूर्णिमामावास्येपूर्वविद्धेग्राह्ये भूतविद्धानकर्तव्याअमावास्याचपूर्णिमा वर्जयित्वानरश्रेष्ठसावित्रीव्रतमुत्तममिति**ब्रह्मवैवर्तात् स्कांदेपि** भूतविद्धासिनीवालीनतुतत्रव्रतंचरेत् वर्जयित्वातुसावित्रीव्रतंतुशिखिवाहनइति **मदनरत्नेब्रह्मवैवर्तेपि** प्रतिपत्पंचमीभूतसावित्रीवटपूर्णिमा नवमीदशमीचैवनोपोष्याःपरसंयुताइति यदात्वष्टादशघटिकाचतुर्दशीतदापराग्राह्या पूर्वविद्धैवसावित्रीव्रतेपंचदशीतिथिः नाड्योष्टादशभूतस्यस्युश्चेत्तत्परेऽहनीति**माधवः वस्तुतस्तु** भूतोऽष्टादशनाडीभिर्दूषयत्युत्तरांतिथिमित्यस्यव्रतांतरेसावकाशत्वाद्विशेषप्रवृत्तपूर्वविद्धाविधायकवचनेनतस्यबाधादष्टादशनाडीवेधेपिपूर्वैवेत्ययंपंथाःसाधुः अत्रपूर्णिमानुरोधेनैवयथात्रिरात्रसंपत्तिर्भवतितथात्रयोदश्यादिग्राह्यं तस्याःप्रधानत्वात् अयंनिर्णयोऽमायामपिज्ञेयः पारणंतुपूर्णिमांतेकार्यम् अत्रस्त्रीव्रतेषुविशेषाःपरिभाषायामुक्ताः ।

ह्या व्रताविषयीं पौर्णिमा व अमावास्या पूर्वविद्धा ( चतुर्दशीयुक्त ) घ्यावी; कारण, "अमावास्या व पौर्णिमा चतुर्दशीविद्धा घेऊं नये, हें सावित्रीव्रत वर्ज्य करून समजावें, अर्थात् सावित्रीव्रताविषयीं चतुर्दशीविद्धा घ्यावी" असें **ब्रह्मवैवर्तांत** वचन आहे. **स्कंदपुराणां**तही–"चतुर्दशीविद्ध अमावास्येस व्रत करूं नये, परंतु हें सावित्रीव्रतावांचून समजावें." **मदनरत्नांत ब्रह्मवैवर्तां**तही–"प्रतिपदा, पंचमी, चतुर्दशी, सावित्री, वटपूर्णिमा, नवमी, दशमी, ह्या तिथि उपोषणाविषयीं परयुक्त घेऊं नयेत." ज्या वेळीं अठरा घटिका चतुर्दशी असेल तेव्हां परा घ्यावी. कारण, "सावित्रीव्रताविषयीं पौर्णिमा पूर्वविद्धाच

घ्यावी. जर चतुर्दशी १८ घटिका असेल, तर दुसऱ्या दिवशीं करावी." असें **माधव** सांगतो. वास्तविक म्हटलें तर "चतुर्दशी १८ घटिकांनीं उत्तरतिथीस दूषित करते" असें जें वचन तें अन्यत्रनीं चरितार्थ असल्यामुळें विशेषेंकरून प्रवृत्त झालेल्या 'पूर्वविद्धा घ्यावी' या वचनानें 'भूतोष्टादश' या वचनाचा बाध होत असल्यानें अठरा घटिका वेध असला तरी पूर्वाच घ्यावी, हाच मार्ग उत्तम होय. येथें पूर्णिमेच्या अनुरोधानेंच जसें त्रिरात्र व्रत होईल तशा त्रयोदश्यादि तिथि घ्याव्या. कारण, पौर्णिमा मुख्य आहे. हाच निर्णय अमावास्येविषयींही जाणावा. पारणा तर पौर्णिमांतीं करावी. येथें स्त्रियांच्या व्रताविषयीं विशेष निर्णय ( म्हणजे स्त्रीला रजस्वला इत्यादि दोष प्राप्त होईल तर पूजादिक ब्राह्मणाकडून करवावीं; उपोषण इत्यादिक स्वतां करावें असे स्त्रीव्रताचे विशेष निर्णय ) व्रतपरिभाषेंत ( प्रथमपरिच्छेदांत ) सांगितले आहेत ते जाणावे.

अत्रविशेषो**भविष्ये** गृहीत्वावालुकांपात्रेप्रस्थमात्रांयुधिष्ठिर ततोवंशमयेपात्रेवस्त्रयुग्मेनवेष्टिते सावित्रीप्रतिमांकुर्यात्सौवर्णींवापिमृन्मयीम् सार्धंसत्यवतासाध्वींफलनैवेद्यदीपकैः रजन्याकंठसूत्रैश्चशुभैःकुंकुमकेशरैः पूजयेदितिशेषः रजनीहरिद्रा कंठसूत्रंसौभाग्यतंतुः सावित्र्याख्यानकंवापिवाचयीतद्विजोत्तमैः रात्रौजागरणंकृत्वाप्रभातेविमलेततः तामपिब्राह्मणेदत्वाप्रणिपत्यक्षमापयेत् मंत्रस्तु सावित्रीयंमयादत्तासहिरण्यामहासती ब्रह्मणःप्रीणनार्थायब्राह्मणप्रतिगृह्यताम् व्रतेनानेनराजेंद्रवैधव्यंनाप्नुयात्क्वचिदिति ।

या व्रताचे ठायीं विशेष विधि **भविष्यपुराणांत** सांगतो, तो असा–"प्रस्थ ( शेर ) प्रमाण वाळू पात्रांत घेऊन नंतर दोन वस्त्रांनीं वेष्टित अशा वेळूच्या पात्रांत सुवर्णाची किंवा मृत्तिकेची सावित्रीची प्रतिमा करून सत्यवानासहवर्तमान सावित्रीची पूजा फल, नैवेद्य, दीप, हळद, कंठसूत्र, कुंकुम, केशर, यांहींकरून करावी. नंतर सावित्रीव्रतकथा ब्राह्मणाकडून वाचवावी. व रात्रीस जागरण करून प्रातःकाळीं ती प्रतिमाही ब्राह्मणास देऊन नमस्कार करून क्षमा मागावी." दानाचा मंत्र—**"सावित्रीयं मया दत्ता सहिरण्या महासती ॥ ब्रह्मणः प्रीणनार्थाय ब्राह्मण प्रतिगृह्यतां"** ॥ "हें व्रत केलें असतां वैधव्य कधींही प्राप्त होणार नाहीं."

ज्येष्ठपौर्णमास्यांविशेष**आदित्यपुराणे** ज्येष्ठमासितिलान्दद्यात्पौर्णमास्यांविशेषतः अश्वमेधस्ययत्पुण्यं तत्प्राप्नोतिनसंशयः **विष्णुरपि** ज्येष्ठीज्येष्ठायुताचेत्स्यात्तस्यांछत्रोपानत्प्रदानेननरोनराधिपत्यमाप्नोतीति **हेमाद्रौज्योतिषे** ऐंद्रेगुरुःशशीचैवप्राजापत्येरविस्तथा पूर्णिमाज्येष्ठमासस्यमहाज्येष्ठीप्रकीर्तितेति इयं मन्वादिरपि सापौर्वाह्णिकीग्राह्या विशेषस्तुचैत्रउक्तः तथाऽ**परार्केवामनपुराणे** उदकुंभांबुदानंचतालवृंतं सचंदनम् त्रिविक्रमस्यप्रीत्यर्थंदातव्यंज्येष्ठमासित्विति इतिकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौज्येष्ठमासःसमाप्तः ।

ज्येष्ठपौर्णमासीस विशेष सांगतो **आदित्यपुराणांत**—"ज्येष्ठमासी पौर्णिमेस विशेषेंकरून तिळ द्यावे, तेणेंकरून अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होतें, यांत संशय नाहीं." **विष्णुही** "ज्येष्ठी पौर्णिमा ज्येष्ठा नक्षत्रानें युक्त असतां तिचे ठायीं छत्र व उपानत् ( चमेजोडा ) याचें दान करावें, तेणेंकरून पुरुषास राज्य मिळतें." **हेमाद्रींत ज्योतिषांत**–"ज्येष्ठानक्षत्रीं गुरु व चंद्र, रोहिणीस सूर्य अशी ज्येष्ठ पौर्णिमा असेल तर तिला **महाज्येष्ठी** म्हणतात." ही पौर्णिमा मन्वादिकही आहे, ती पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. तिचा विशेष निर्णय चैत्रमासांत सांगितला आहे. तसेंच **अपरार्कांत वामनपुराणांत**—"ज्येष्ठमासीं उदकुंभ, उदक, तालवृंत ( ताडाचा पंखा ), चंदन हीं त्रिविक्रमप्रीत्यर्थ द्यावीं." **इति श्रीज्येष्ठमासाची महाराष्ट्र टीका समाप्त झाली.**

मिथुनसंक्रांतौपराःषोडशघटिकाःपुण्यकालः रात्रौतुप्रागेवोक्तम् आषाढशुक्लद्वितीयायांरथोत्सवः तदुक्तं **निर्णयतत्त्वेस्कांदे** आषाढस्यसितेपक्षेद्वितीयापुष्यसंयुता तस्यांरथेसमारोप्यरामंवैभद्रयासह यात्रोत्सवं प्रवर्त्याथप्रीणयेतद्द्विजान्बहून् तथा ऋक्षाभावेतिथौकार्यायात्रासामममपुण्यदा आषाढशुक्लदशमीपौर्णमासीचमन्वादिः साचपूर्वाह्णव्यापिनीग्राह्येतिप्रागुक्तं आषाढशुक्लद्वादश्यामनुराधायोगरहितायांपारणंकुर्यात् तदुक्तं **भविष्ये** आभाकासितपक्षेषुमैत्रश्रवणरेवती संगमेनहिभोक्तव्यंद्वादशद्वादशीहरेत् अस्यार्थः आषाढभाद्रपदकार्तिकशुक्लद्वादशीष्वनुराधाश्रवणरेवतीयोगेपारणंनकुर्यादिति अत्रयद्यप्येतावदेवोक्तं तथाप्यनुराधाप्रथमपादएववर्ज्यः तदुक्तं**विष्णुधर्मे** मैत्राद्यपादेस्वपितीहविष्णुःपौष्णांत्यपादेप्रतिबोधमेति श्रुतेश्चमध्येपरिवर्तमेति सुप्तिप्रबोधपरिवर्तनमेववर्ज्यमिति वस्तुतस्तुपूर्ववचनमिदंचनिर्मूलम् ।

आतां **आषाढमास**—मिथुनसंक्रांतीच्या पुढील सोळा घटिका पुण्यकाळ होय. रात्रीं संक्रांत झाली असतां पुण्यकाळ-

निर्णय पूर्वीच ( प्रथम परिच्छेदांत ) सांगितला आहे. आषाढशुक्ल द्वितीयेचे रात्रीं श्रीरामाचा रथोत्सव करावा. तो सांगतो **तिथितत्त्वांत स्कंदपुराणांत**—"आषाढाच्या शुक्लपक्षीं पुष्य नक्षत्रयुक्त द्वितीयेस भद्रेसहित रामाला रथावर बसवून यात्रोत्सव करून ( द्रव्यादिकानें ) बहुत ब्राह्मणांस संतुष्ट करावें." तसेंच "माझी पुण्यकारक यात्रा पुष्यनक्षत्र नसतांही ह्या तिथीस करावी, असें राम सांगतो." आषाढशुक्ल दशमी व पौर्णिमा ह्या मन्वादि होत. त्या पूर्वाह्णव्यापिनी घ्याव्या असें पूर्वीच (चैत्रांत) सांगितलें आहे. आषाढशुक्ल द्वादशी अनुराधा नक्षत्ररहित असतां एकादशीची पारणा करावी. तें सांगतो **भविष्यांत**—"आषाढ, भाद्रपद, कार्तिक यांच्या शुक्लपक्षांतील द्वादशी अनुक्रमानें अनुराधा, श्रवण, रेवती या नक्षत्रांनीं युक्त असतां भोजन करूं नये, केलें तर बारा द्वादशींचें पुण्य व्यर्थ होतें." ह्या वचनांत सर्व नक्षत्रांचा योग जरी निषिद्ध सांगितला आहे तथापि अनुराधांचा पहिला चरणच वर्ज्य करावा. तें सांगतो **विष्णुधर्मांत**—"अनुराधांच्या पहिल्या चरणीं विष्णु निद्रा करितो. रेवतीच्या अंत्यचरणीं जागृत होतो. श्रवणाच्या मध्यभागीं कुशीस वळतो. यास्तव निजणें, जागृत होणें, व कुशीस वळणें हें ज्या भागांवर होतें ते भाग मात्र वर्ज्य करावे." वास्तविक म्हटलें तर पूर्ववचन व हें वचन हीं दोनही निर्मूल होत. ( कारण, महानिबंधांत हीं वचनें आढळत नाहींत. )

अत्रैवविष्णुशयनोत्सवउक्तो**हेमाद्रौब्राह्मे** एकादश्यांतुशुक्लायामाषाढेभगवान्हरिः भुजंगशयनेशेते क्षीरार्णवजलेसदेति **कल्पतरौयमः** क्षीराब्धौशेषपर्यंकेआषाढ्यांसंविशेद्धरिः निद्रांत्यजतिकार्तिक्यांतयोः संपूजयेत्सदा ब्रह्महत्यादिकंपापंक्षिप्रमेवव्यपोहति हिंसात्मकैस्तुकिंतस्ययज्ञैःकार्यंमहात्मनः प्रस्वापेचप्रबोधेचपूजितोयेनकेशवः **टोडरानंदेपिस्कांदे** आषाढशुक्लेकादश्यांकुर्यात्स्वप्नमहोत्सवं अयंद्वादश्यामप्युक्तः आभाकासितपक्षेषुमैत्रश्रवणरेवती आदिमध्यावसानेषुप्रस्वापावर्तनोत्सवाः निशिस्वापोदिवोत्थानंसंध्यायां परिवर्तनम् अन्यत्रपादयोगेपिद्वादश्यामेवकारयेत् आभाकाख्येषुमासेषुमिथुनेमाधवस्यच द्वादश्यांशुक्लपक्षेच प्रस्वापावर्तनोत्सवाइति**भविष्योक्तेः** द्वादश्यांसंधिसमयेनक्षत्राणामसंभवे आभाकासितपक्षेषुशयनावर्तनादिकमिति**वाराहोक्तेश्च** द्वादश्यामित्यत्रापिपारणाहोमात्रंविवक्षितं पारणाहपूर्वरात्रेघंटादीन्वादयन्मुहुरिति**रामार्चनचंद्रिकोक्तेः** अत्रैकादशीद्वादश्योर्देशभेदेनव्यवस्था ।

ह्या एकादशीसच विष्णुशयनोत्सव सांगतो **हेमाद्रींत ब्राह्मांत**—"आषाढशुक्ल एकादशीस भगवान् हरि क्षीरसमुद्राच्या उदकामध्यें शेषशयनावर निद्रा करतो." **कल्पतरूंत यम**—"आषाढ शुक्ल एकादशीस क्षीरसमुद्रांत शेषपर्यंकीं हरि निजतो व कार्तिक शुक्ल एकादशीस जागृत होतो, यास्तव त्या तिथींस हरीचें पूजन केलें असतां ब्रह्महत्यादि पापें तत्काल जातात. ज्यानें निद्राकाळीं व प्रबोधकाळीं हरीची पूजा केली त्या महात्म्याचें हिंसात्मक यज्ञांनीं काय करावयाचें आहे. यज्ञांपेक्षांही हें अधिक होय." **टोडरानंदांतही स्कांदांत**—"आषाढ शुक्ल एकादशीस निद्रामहोत्सव करावा." हा निद्रामहोत्सव द्वादशीसही सांगितला आहे-"आषाढ, भाद्रपद, कार्तिक यांच्या शुक्ल पक्षीं अनुक्रमानें अनुराधा, श्रवण, रेवती या नक्षत्रांच्या पहिल्या, मधल्या व शेवटच्या भागांवर निद्रा, परिवर्तन व जागर याचे उत्साह करावे. रात्रौ निद्रा, दिवसा उत्थापन, संध्यासमयीं परिवर्तन अशीं होतात. अनुराधा, श्रवण, रेवती यांचे प्रथमादिपाद अन्य तिथीस असले तरी द्वादशीसच निद्रादि उत्सव करावे. कारण, आषाढ, भाद्रपद, कार्तिक या मासांत शुक्ल पक्षांच्या द्वादशींस अनुक्रमें भगवंताचे प्रस्वाप, परिवर्तन, व प्रबोध हे उत्सव होतात" असें **भविष्य**वचन आहे. आणि "आषाढ, भाद्रपद, कार्तिक, या महिन्यांत शुक्लपक्षीं द्वादशीस संध्यासमयीं नक्षत्रें नसतांही शयन, परिवर्तन इत्यादि उत्सव होतात" असें **वाराहपुराणवचन**ही आहे. 'द्वादशीस उत्सव करावा' असें जें सांगितलें तेथें पारणादिवस मात्र विवक्षित आहे; कारण, "पारणादिवशीं पूर्वरात्रीं वारंवार घंटादि वाजवीत उत्सव करावे" असें **रामार्चनचंद्रिकेंत** वचन आहे. येथें एकादशी व द्वादशी या दोन तिथींस उत्साह सांगितला त्याची व्यवस्था देशभेदानें जाणावी.

इदंचमलमासेनकार्यं ईशानस्यबलिर्विष्णोःशयनंपरिवर्तनमिति**कालादर्शे**निषेधात् यदपि एकादश्यांतु गृह्णीयात्संक्रांतौकर्कटस्यच आषाढ्यांवानरोभक्त्याचातुर्मास्यव्रतक्रियामिति**हेमाद्रौब्रह्मवैवर्ते** तदपिमलमासेसतिद्रष्टव्यम् मिथुनस्थोयदाभानुरमावास्याद्वयंस्पृशेत् द्विराषाढःसविज्ञेयोविष्णुःस्वपितिकर्कटइतितत्रैव **मोहचूलोत्तरोक्तेः** ।

हा विष्णुशयनोत्सव मलमासांत करूं नये. कारण, "ईशानबलि, विष्णूचें शयन व परिवर्तन मलमासांत करूं नये, असा **कालादर्शां**त निषेध आहे. आतां जें "कर्कसंक्रांतींत एकादशीस किंवा आषाढी पौर्णिमेस मनुष्यानें भक्तियुक्त होऊन

१ 'मिथुने' असें जें पद तें आषाढमासाकडेच लावावें, भाद्रपद व कार्तिक यांजकडे त्याचा असंभव आहे.

चातुर्मास्यव्रतकर्म करावें" असें **हेमाद्रींत ब्रह्मवैवर्त**वचन तेंही मलमास असतां जाणावें. कारण, "ज्या काळीं मिथुनाचा सूर्य दोन अमावास्यांना स्पर्श करील त्या काळीं दोन आषाढ होतात, व तेव्हां कर्कसंक्रांतींत विष्णु निद्रा करतो." असें **तेथेंच मोहचूलोत्तराचें** वचन आहे.

अत्रैवचातुर्मास्यव्रतारंभउक्तो**भारते** आषाढेतुसितेपक्षेएकादश्यामुपोषितः चातुर्मास्यव्रतंकुर्याद्यत्किंचिन्नियतोनरइति अस्यनित्यत्वंतत्रैवोक्तम् वार्षिकांश्चतुरोमासानवाहयेत्केनचिन्नरः व्रतेननोचेदाप्नोतिकिल्बिषंवत्सरोद्भवम् असंभवेतुलार्केपिकर्तव्यंतत्प्रयत्नतइति तेनाषाढशुक्लैकादश्यांद्वादश्यांपौर्णमास्यांवारंभः समाप्तिस्तुकार्तिकशुक्लद्वादश्यामेवतदुक्तं**हेमाद्रौभारते** चतुर्धागृह्यवैचीर्णंचातुर्मास्यव्रतंनरः कार्तिकेशुक्लपक्षेतुद्वादश्यांतत्समापयेदिति अस्यारंभःशुक्रास्तादावपिकार्यः नशैशवंनमौढ्यंचशुक्रगुर्वोर्नवातिथेः खंडत्वंचिंतयेदादौचातुर्मास्यविधौनरइति**हेमाद्रौवृद्धगार्ग्योक्तेः** इदंचद्वितीयाद्यारंभविषयम् प्रथमारंभस्तुनभवत्येव आशौचमध्येपिद्वितीयाद्यारंभोभवति अशुचिर्वाशुचिर्वापियदिस्त्रीयदिवापुमान् व्रतमेतन्नरःकृत्वामुच्यतेसर्वपातकैरिति**भार्गवार्चनदीपिकायांस्कांदोक्तेः** आरब्धेसूतकंनस्यादनारब्धेतुसूतकमिति**विष्णु**वचनाच्च यत्तुअसंक्रांतंतथामासंदैवेपित्र्येचकर्मणि मलमासमशौचंचवर्जयेन्मतिमान्नरइति**हेमाद्रौ** चातुर्मास्यव्रतप्रकरणेभविष्यवचनं तत्पूषानुमंत्रणमंत्रवदसंबद्धंमध्येपठितमितिज्ञेयं अन्यथापित्र्यस्यपूर्वोक्तस्यविवाहादेश्चचातुर्मास्यव्रतेकःप्रसंगः प्रकरणनिवेशेपिवाप्रथमारंभविषयंज्ञेयं **केचित्तु**प्रतिवर्षंचातुर्मास्यव्रतप्रयोगानांभिन्नत्वादाशौचादिपातेद्वितीयादिप्रयोगोनभवत्येवेत्याहुः तन्न प्रतिवर्षंचयःकुर्यादेवंवैसंस्मरन्हरिं देहांतेऽतिप्रदीप्तेनविमानेनार्कवर्चसा मोदतेविष्णुलोकेसौयावदाभूतसंप्लवमिति**हेमाद्रौभविष्य**वचनादित्यास्तांविस्तरः।

त्या एकादशीसच चातुर्मास्यव्रताचा आरंभ सांगतो. **भारतांत**—"आषाढशुक्लपक्षीं एकादशीस उपोषण करून कोणत्याही चातुर्मास्यव्रताचा आरंभ नियमित होऊन मनुष्यानें करावा." चातुर्मास्यव्रत नित्य आहे, असें तेथेंच सांगतो— "वार्षिक (वर्षाकालाचे) चार महिने कोणत्याही व्रतानें घालवावे. असें न करील तर त्या मनुष्यास संवत्सराचें पाप लागतें. चार महिने व्रत न होईल तर तूळसंक्रांतीस सर्व असतांही तें व्रत यत्नानें करावें." यावरून आषाढशुक्ल एकादशी, द्वादशी, किंवा पौर्णिमा यांचे ठायीं आरंभ करावा. आणि समाप्ति तर कार्तिकशुक्ल द्वादशीसच करावी; तें सांगतो. **हेमाद्रींत भारतांत**—"मनुष्यानें चातुर्मास्यव्रत चार प्रकारचें (श्रावणांत शाक, भाद्रपदांत दहीं, आश्विनांत दूध, कार्तिकांत द्विदल हें वर्जनरूप) ग्रहण करून आचरण केलेलें तें कार्तिकशुक्ल द्वादशीस समाप्त करावें." चातुर्मास्यव्रताचा आरंभ गुरुशुक्रांच्या अस्तादिकांतही करावा. कारण, "शुक्र व गुरूचें शिशुत्व, अस्त व खंडातिथि यांचा विचार चातुर्मास्यव्रताचे आरंभाविषयीं मनुष्यानें करूं नये" असें **हेमाद्रींत वृद्धगार्ग्याचें** वचन आहे. हें वचन दुसऱ्या वगैरे आरंभाविषयीं होय. प्रथमारंभ तर होत नाहींच. आशौचामध्येंही दुसऱ्या वर्षीं वगैरे व्रतारंभ होतो. कारण "स्त्री किंवा पुरुष अशुचि किंवा शुचि असेल तथापि त्यानें हें व्रत केलें असतां सर्व पातकांपासून मुक्त होतो" असें **भार्गवार्चनदीपिकेंत स्कांद**वचन आहे. आणि प्रारंभ केलेल्याविषयीं सूतक नाहीं. आरंभ केला नसेल तर त्याविषयीं सूतक दोष होतो" असें **विष्णु**वचनही आहे. आतां जें "दैवपित्र्यकर्माचे ठायीं मलमास व अशौच वर्ज्य करावीं, म्हणजे मलमासांत व आशौचांत दैवपित्र्यकर्म करूं नये." असें **हेमाद्रींत** चातुर्मास्यव्रतप्रकरणीं **भविष्य**वचन आहे तें पूषानुमंत्रण[6] मंत्रासारखें असंबद्ध मध्यें पठित आहे, असें जाणावें. असंबद्ध म्हटलें नाहीं तर हेमाद्रींत पूर्वोक्त पित्र्यकर्म व विवाह यांचा चातुर्मास्यव्रतामध्यें काय प्रसंग आहे? अथवा चातुर्मास्यव्रतप्रकरणांत तें वचन सुसंबद्ध मानिलें तरी प्रथमारंभविषयक जाणावें. **केचित् विद्वान्** तर प्रतिवर्षी चातुर्मास्यव्रतप्रयोग भिन्न भिन्न असल्यामुळें दुसऱ्या वर्षीं आशौचादि प्राप्त

---

१ चातुर्मास्यव्रतारंभे चत्वारः पक्षाः, आषाढशुक्लैकादशी–तद्द्वादशी–तत्पौर्णिमासी–संक्रांतिभेदात्। २ पूर्वेति दर्शपौर्णमासप्रकरणे 'पूष्णोहं देवयज्यया प्रजयापशुभिश्च जनिषीयेति' पूषानुमंत्रणमंत्रः पठितोपि स तत्र न विनियुज्यते तत्र तद्देवविरहेण प्रकरणस्य दौर्बल्यात्। विनियोज्यस्वरूपसामर्थ्यमनपेक्ष्य विनियोगाभावात्। अतः स पूषयागे नेतव्य इत्यर्थः। ३ प्रकरणदौर्बल्यमाहान्यथेति। दैवं विवाहादि। ४ चातुर्मास्यव्रतदैवमितिमत्वाह प्रकरणेति। ५ प्रतिवर्षं चेति वस्तुतस्त्विदं पालनविशेषार्थावृत्तिबोधकं प्रयोगैक्यपक्षे मानाभावात्। ६ पूषानुमंत्रण म्हणजे दर्शपूर्णमासयागप्रकरणीं 'पूष्णोहं.' हा पूषानुमंत्रणाचा मंत्र पठित आहे. त्या प्रकरणांत पूषा देवता नाहीं म्हणून त्या मंत्राचा विनियोग तेथें होत नाहीं. पूषादेवतेच्या यागांत त्याचा विनियोग करावा असें आहे, त्याप्रमाणें येथें समजावें.

असतां द्वितीयादिप्रयोग ( द्वितीयादिव्रतारंभ ) होतच नाहीं असें म्हणतात., तें बरोबर नाहीं; कारण, "प्रतिवर्षीं हरीचें स्मरण करून असें जो व्रत करील तो देहांतीं सूर्यासारख्या तेजस्वी अशा विमानांत बसून कल्पपर्यंत विष्णुलोकीं आनंद पावतो." असें **हेमाद्रींत भविष्य**वचन आहे. यावरून द्वितीयादि आरंभ अवश्य आहे. आतां हा विस्तार राहूं दे.

**इदंचशिवभक्तादिभिरपिकार्यं शिवेवाभक्तिसंयुक्तोभानौवागणनायके कृत्वाव्रतस्यनियमंयथोक्तफलभाग्भवेदितिब्रह्मवैवर्तात्** व्रतग्रहणप्रकारस्तु**हेमाद्रौ भविष्ये** महा[1]पूजांततःकुर्याद्देवदेवस्यचक्रिणः जातीकुसुममालाभिर्मंत्रेणानेनपूजयेत् सुप्तेत्वयिजगन्नाथेजगत्सुप्तंभवेदिदं विबुद्धेचविबुद्ध्येतप्रसन्नोमेभवाच्युत एवं तांप्रतिमांविष्णोःपूजयित्वास्वयंनरः प्रभाषेताग्रतोविष्णोःकृतांजलिपुटस्तथा चतुरोवार्षिकान्मासान्देवस्योत्थापनावधि इमंकरिष्येनियमंनिर्विघ्नंकुरुमेच्युत इदंव्रतंमयादेवगृहीतंपुरतस्तव निर्विघ्नंसिद्धिमायातुप्रसादात्तवकेशव गृहीतेस्मिन्व्रतेदेवपंचत्वंयदिमेभवेत् तदाभवतुसंपूर्णंत्वत्प्रसादाज्जनार्दन गृहीतेस्मिन्व्रतेदेवयद्यपूर्णेमृतोह्यहं तन्मेभवतुसंपूर्णंत्वत्प्रसादाज्जनार्दनेति ।

हें चातुर्मास्यव्रत शिवभक्तादिकांनींही करावें. कारण, "शिव किंवा सूर्य अथवा गणपति यांचे ठायीं भक्तियुक्त असलेला मनुष्य व्रतनियम करील तर यथोक्त फल पावेल." असें **ब्रह्मवैवर्तांत** वचन आहे. व्रतग्रहणाचा प्रकार तर **हेमाद्रींत भविष्यपुराणांत** सांगतो—"देवांचाही देव असा जो विष्णु त्याची महापूजा करून जाईच्या पुष्पमालांनीं पुढें सांगितलेल्या मंत्रानें पूजा करावी." तो मंत्र—"**सुप्ते त्वयि जगन्नाथे जगत्सुप्तं भवेदिदम् ॥ विबुद्धे च विबुद्ध्येत प्रसन्नो मे भवाच्युत ॥**" या मंत्रानें त्या विष्णुप्रतिमेची पुरुषानें स्वतः पूजा करून हात जोडून विष्णूच्या पुढें प्रार्थना करावी. ती अशी—"**चतुरो वार्षिकान् मासान् देवस्योत्थापनावधि ॥ इमं करिष्ये नियमं निर्विघ्नं कुरु मेऽच्युत ॥ इदं व्रतं मया देव गृहीतं पुरस्तव ॥ निर्विघ्नं सिद्धिमायातु प्रसादात्तव केशव ॥ गृहीतेस्मिन्व्रते देव पंचत्वं यदि मे भवेत् ॥ तदा भवतु संपूर्णं त्वत्प्रसादाज्जनार्दन ॥ गृहीतेस्मिन् व्रते देव यद्यपूर्णे मृतो ह्यहं ॥ तन्मे भवतु संपूर्णं त्वत्प्रसादाज्जनार्दनेति ॥**"

**तत्रभार्गवार्चनदीपिकायांनृसिंहपरिचर्यायांचभविष्ये** श्रावणेवर्जयेच्छाकंदधिभाद्रपदे तथा दुग्धमाश्वयुजेमासिकार्तिकेद्विदलंत्यजेदिति **स्कांदेपिचातुर्मास्यकल्पे** चत्वार्येतानिनित्यानिचतुराश्रमवर्णिनां प्रथमेमासिकर्तव्यंनित्यंशाकव्रतंनरैः द्वितीयेमासिकर्तव्यंदधिव्रतमनुत्तमं पयोव्रतंतृतीयेतुचतुर्थेपिनिशामय द्विदलंबहुबीजंचवृंताकंचविवर्जयेत् नित्यान्येतानिविप्रेंद्रव्रतान्याहुर्मनीषिणः जंबीरंराजमाषांश्चमूलकंरक्तमूलकं कूष्मांडंचेक्षुदंडंचचातुर्मास्येत्यजेद्बुधः **तथा** विशेषाद्बदरींधात्रींकूष्मांडंतिंतिणींत्यजेत् जीर्णधात्रीफलंग्राह्यंकथंचित्कायशोधनमिति **तीर्थसौख्येस्कांदे** वार्षिकांश्चतुरोमासान्प्रसुप्तेवैजनार्दने मंचखट्वादिशयनंवर्जयेद्भक्तिमान्नरः अनृतौवर्जयेद्भार्यांमांसंमधुपरौदनं पटोलंमूलकंचैववृंताकंचनभक्षयेत् अभक्ष्यंवर्जयेद्दूरान्मसूरंसितसर्षपं राजमाषान्कुलित्थांश्चआशुधान्यंचसंत्यजेत् शाकंदधिपयोमाषान्श्रावणादिषुसंत्यजेत् अत्र त्यजेदितिवर्जनसंकल्परूपःपर्युदासोज्ञेयः व्रतोपक्रमात् ।

चातुर्मास्यव्रतांविषयीं **भार्गवार्चनदीपिकेंत नृसिंहपरिचर्येंत भविष्यांत**—"श्रावणमासीं शाक ( भाजी ), भाद्रपदांत दधि, आश्विनांत दुग्ध, कार्तिकांत द्विदल ( दोन डाळीचा ) हीं सोडावीं." **स्कांदांतही चातुर्मास्यकल्पांत**—"चार वर्णांच्या चारी आश्रमांतल्या मनुष्यांस हीं चार व्रतें नित्य होत. तीं अशीं–मनुष्यांनीं पहिल्या महिन्यांत नित्य शाकव्रत करावें. दुसऱ्या महिन्यांत उत्तम दधिव्रत करावें. तिसऱ्या महिन्यांत पयोव्रत करावें. चवथ्यांतही सांगतों, श्रवण कर–द्विदल, बहुबीज, वृंताक हीं वर्ज्य करावीं. हीं व्रतें नित्य होत असें विद्वान् म्हणतात. जंबीर, राजमाष ( चवळया ) मुळा, रक्तमूलक, कूष्मांड, इक्षुदंड हीं चातुर्मास्यांत वर्ज्य करावीं. तसेंच विशेषेंकरून बोर, आंवळा, कूष्मांड, चिंच, हीं वर्ज्य करावीं. परंतु जुने आंवळे देहशोधनार्थ कांहीं घ्यावे." **तीर्थसौख्यांत स्कंदपुराणांत**—"वार्षिक चार महिन्यांत जनार्दन निजला असतां मंचक, खट्वा इत्यादिकांवर शयन भक्तिमान् मनुष्यानें वर्ज्य करावें. ऋतुकाला- ( रजोदर्शनापासून १६ दिवस ) वांचून स्त्रीगमन वर्ज्य करावें. मांस, मध, परान्न, पडवळ, मुळा, वांगें हीं भक्षण करूं नयेत. अभक्ष्य पदार्थ मसूरा, पांढरे सर्षप ( मोहऱ्या ) हे अत्यंत सोडावे. चवळया, कुलित्थ, आशुधान्य ( तुषधान्य )

---

१ चातुर्मास्यव्रतारंभः शयनोत्सवं कृत्वा कार्य इति सूचयितुमाह महापूजामिति ।

हीं सोडावीं. शाक, दधि, पय, माष हीं श्रावणादि चार मासांत वर्ज्य करावीं." येथें वर्जन करणें हें व्रत असल्यामुळें 'त्यजेत्' हा वर्जनसंकल्परूप निषेध जाणावा.

अत्र**केचि**च्छाकाख्यंपत्रपुष्पादीत्यमरकोशस्यशक्यतेशितुमनेनेतिशाकइति**क्षीरस्वामिना**व्याख्यानात् व्यंजनमात्रस्यनिषेधमाचक्षते **अन्येतु**शाकशब्दस्यपत्रादिदशविधशाकेयोगरूढत्वात् योगाद्रूढेर्बलीयस्त्वात्सूपादीनामपित्यागापत्तेश्चतत्**प्रत्याचक्षते** तेन मूलपत्रकरीराग्रफलकांडाधिरूढकाः त्वक्पुष्पंकवचंचेति-शाकंदशविधंस्मृतं इतिक्षीरस्वामिनोक्तस्यशाकस्यनिषेधइति अधिरूढकअंकुरः **वस्तुनस्तु** तत्तत्कालोद्भवाः-शाकावर्जनीयाःप्रयत्नतः बहुबीजमबीजंचविकारिचविवर्जयेदितिभविष्यवचनात्तत्तत्कालोत्पन्नानांदशविध-शाकानांनिषेधः अत्रतत्कालोद्भवजातीयत्वंविवक्षितं तेनातपादिशोषितानांवर्षांतरोद्भवानामपिनिषेधः अत्र-तत्कालोद्भवत्वमात्रंविवक्षितंनतुतन्मात्रकालोद्भवत्वंगौरवात् तेनान्यकालोद्भवानांतत्कालोद्भवानांचबिंबादी-नांनिषेधः अत्रतत्तत्कालोद्भवाइतिवीप्सावशात्स्वस्वकालोद्भवानांसर्वेषांनिषेधइति**निष्कर्षः** बहुबीजमित्य-नेकबीजमिति**केचित्** इतरावयवापेक्षयाबीजावयवायत्रबहवस्तदित्य**न्ये** अबीजंकदलादि **वस्तुतस्तु** इदंमहानिबंधेष्वभावान्निर्मूलमेव **आचारप्रदीपे** वृंताकंचकलिंगंचबिल्वोदुंबरभिःसटाः उदरेयस्यजीर्य-तितस्यदूरतरोहरिः तथा**परार्केदेवलः** ब्रह्मचर्यंतथाशौचंसत्यमामिषवर्जनं व्रतेष्वेतानिचत्वारिवरिष्ठा-नीतिनिश्चयः ॥

येथें कोणी ग्रंथकार 'शाकाख्यं पत्रपुष्पादि' असें अमरांत आहे त्याची व्याख्या 'शक्यतेऽशितुं अनेन' म्ह० ज्यानें भोजन करण्यास शक्य होतें तें शाक अशी क्षीरस्वामीनें केली आहे म्हणून भोजनसमयीं तोंडास लावण्याच्या सर्व चटणी कोशिंबरी भाज्या यांचा निषेध करितात. **इतर** म्हणतात मूळ पत्र इत्यादि पुढें सांगावयाच्या दहा प्रकारच्या शाकांचेठायीं शाकशब्द योगरूढ आहे, व योगापेक्षा ( व्युत्पत्तीपेक्षा ) रूढी बलवत्तर असल्यामुळें; आणि असें न केलें तर वरण इत्या-दिकांचाही त्याग प्राप्त होत असल्यामुळें वरील मताचा त्याग करितात. तेणेंकरून असें सूचित होतें कीं, "मूळ, पत्र, करीर ( कोंब ), अग्र, फल, कांड, अधिरूढक ( मोड आलेलें धान्य ), साल, पुष्प, कवच ह्या दहा प्रकारच्या शाका होत." ह्या **क्षीरस्वामीनें** सांगितलेल्या दशविध शाकांचा निषेध होय. वास्तविक म्हटलें तर—"त्या त्या कालीं उत्पन्न ज्या शाका त्या प्रयत्नानें सोडाव्या. बहुबीज, बीजरहित व विकारी ही सोडावीं" ह्या **भविष्य**वचनावरून त्या त्या कालीं उत्पन्न दश-विध शाकाचा निषेध होय. येथें त्या कालीं उत्पन्न जातीच्या शाका वर्ज्य, असें असल्यामुळें पूर्ववर्षी उत्पन्न असून उन्हानें सुकवून ठेविलेल्यांचाही निषेध होतो. या वचनांत 'त्या कालीं उत्पन्न' इतकाच अर्थ करावयाचा आहे. 'त्याच कालीं उत्पन्न' असा नाहीं. कारण, तसा केला तर गौरव हा दोष येतो. यावरून असा अर्थ केल्यानें त्या कालीं उत्पन्न होत असून इतर कालीं होणाऱ्या तोंडल्या इत्यादिकांचा निषेध होतो. या वचनांत 'तत्तत्कालोद्भवाः' म्हणजे 'त्या त्या कालीं उत्पन्न' अशी वीप्सा ( द्विरुक्ति ) असल्यामुळें आपापल्या कालीं उत्पन्न झालेल्या सर्वांचा निषेध हा सारांश समजावा. बहुबीज म्हणजे अनेक बीज असें कोणी म्हणतात. इतर अवयवांपेक्षां बीजावयव ज्यांत अधिक तें बहुबीज, असें अन्य म्हणतात. वस्तुतः पाहिलें तर हें वचन महानिबंधांत नसल्यामुळें तें निर्मूळच होय. **आचारप्रदीपांत**—"वृंताक ( वांगे ), कलिंग, बिल्व, उंबर, भिःसटा ( दग्धान्न ) ही ज्याच्या पोटांत जिरतात त्याग हरि दूर होतो." तसेंच **अपरार्कांत देवल**—"ब्रह्मचर्य, शुचिर्भूतपणा, सत्यभाषण, आमिषवर्जन हीं चार, व्रतामध्यें वरिष्ठ होत हा निश्चय आहे."

आमिषानिचोक्तानि**रामार्चनचंद्रिकायांपाद्मे** प्राण्यंगचूर्णंचर्माबुजंबीरंबीजपूरकं अयज्ञशिष्टमाषा-दियद्विष्णोरनिवेदितं दग्धमन्नंमसूरंचमांसंचेत्यष्टधामिषं रूक्ष्यंतत्तद्देशलभ्यंसुप्रदेवेविवर्जयेत **पाद्मे कार्ति-कमाहात्म्ये** गोछागीमहिषीदुग्धादन्यद्दुग्धादिचामिषं धान्येमसूरिकाःप्रोक्ताअन्नंपर्युषितंतथा द्विजक्रीता-रसाःसर्वेलवणंभूमिजंतथा ताम्रपात्रस्थितंगव्यंजलंपल्वलसंस्थितं आत्मार्थपाचितंचान्नमामिषंतत्स्मृतंबुधैः **तथा** निष्पावानराजमाषांश्चमसूरंसंधितानिच वृंताकंचकलिंगंचसुप्रदेवेविवर्जयेत संधितानिलवणशाकादीनि

आमिषें सांगतो **रामार्चनचंद्रिकेंत पद्मपुराणांत**—"प्राण्यंगचूर्ण ( शिंपीचा चुना ), चर्मोदक ( पखाल इत्यादि-

१ अबीजं कदलादीति अनुदरा कन्येतिवत् अल्पबीजमित्यर्थात्. २ भिःसटा दग्धान्नं भःसटेतिपाठे श्लेष्मातकमिति धन्वंतरिनिघंटुः। ३ प्राण्यंगचूर्णं मौक्तिकशुक्त्यादिचूर्णम्।

कांतलें उदक ), जंबीर, बीजपूरक ( महाळुंग ), यज्ञशेष नसून विष्णूस निवेदित नाहीं तें माषादि अन्न, दग्धान्न, मसूरा, मांस हीं आठ प्रकारचीं आमिषें होत. आपआपल्या देशांत मिळणारा असा रुचकर पदार्थ तोही देव निजला असतां वर्ज्य करावा." **पद्मपुराणांत कार्तिकमाहात्म्यांत**—"गाय, बकरी, महिषी यांवांचून इतरांचें दुग्धादिक, व धान्यामध्यें मसूरा, पर्युषित अन्न, ब्राह्मणापासून विकत घेतलेले सर्व रस, भूमीपासून उत्पन्न झालेलें मीठ, तांब्याच्या पात्रांत ठेवलेलें गाईचें दुग्धादि, पल्वलोदक, आपणासाठींच शिजवलेलें अन्न हीं आमिषें होत, असें विद्वान् सांगतात." **तसेंच** "पावटे, चवळी, मसूरा, संधित ( लोणचें वगैरे ), वांगें, कलिंगडें हीं देव निद्रिस्थ असतां वर्ज्य करावीं."

**तत्रैवविष्णुधर्मे** चतुर्ष्वपीहमासेषुहविष्याशीनपापभाक् हविष्याणितु**पृथ्वीचंद्रोदयेभविष्ये** हैमंतिकंसितास्विन्नंधान्यंमुद्गायवास्तिलाः कलायकंगुनीवारावास्तुकंहिलमोचिका षष्टिकाकालशाकंचमूलकंकेमुकेतरत् कंदःसैंधवसामुद्रेगव्येचदधिसर्पिषी पयोनुद्धृतसारंचपनसाम्रहरीतकी पिप्पलीजीरकंचैवनागरंगंचतिंतिणी कदलीलवलीधात्रीफलान्यगुडमैक्षवं अतैलपक्वंमुनयोहविष्याणिप्रचक्षते इति सितास्विन्नंअनूष्मपक्वं धान्यंचतंडुलाः केमुकंकेमुनाइतिप्राच्येषुप्रसिद्धःकंदः कलायस्तुमतीनकइत्यमरः बटुरीइतिप्रसिद्धंधान्यं **मदनरत्नेप्येवं अगस्तिसंहितायां** हैमंताद्युक्त्वा नारीकेलफलंचैवकदलीलवलीतथा आम्रमामलकंचैवपनसंचहरीतकी व्रतांतरप्रशस्तंचहविष्यंमन्वतेवुधाः ।

तेथेंच **विष्णुधर्मांत**—"चातुर्मास्यांत जो हविष्य भक्षण करील तो पापी होत नाहीं." हविष्यें सांगतो—**पृथ्वीचंद्रोदयांत भविष्यांत**—हेमंत ऋतूंत उत्पन्न झालेलें असून ऊष्म्यावांचून पक्व, धान्य ( तंडुल ), मूग, यव, तिल, कलाय ( वाटाणे, मठरी ), कांग, नीवार ( देवभात ), वास्तुक ( वथुवा-चंदनबटुवा ), हिलमोचिका ( चाकवत ), षष्टिका ( साठेभात ), कालशाक (      ), मुळा, केमुकेतरत् ( केमुना असा प्राच्यदेशीं प्रसिद्धकंद ), संधेलोण, समुद्रमीठ, गाईचें दहीं व तूप, लोणी न काढलेलें दूध, फणस, आंबा, हरीतकी, पिंपळी, जिरें, नागरंग, चिंचा, केळें, लवलीफल, आंवळा, गुळावांचून इतर उंसाचे पदार्थ, हे सारे तेलांत पक्व न केलेले असले म्हणजे हविष्य आहेत, असें मुनि सांगतात." **मदनरत्नांत**ही असेंच सांगितलें आहे. **अगस्तिसंहितेंत**—'हैमंतिकं०' हें वरील वचन सांगून-"नारीकेलफळ, केळें, लवली (      ), आंबा, आंवळा, फणस, हरीतकी, आणि अन्यव्रतांत प्रशस्त तीं, यांस पंडित हविष्यें मानितात.

अन्यान्यपिव्रतान्युक्तानि**हेमाद्रौभविष्ये** स्त्रीवानरोवामद्भक्तोधर्मार्थंसुदृढव्रतः गृह्णीयान्नियमानेतान्दंतधावनपूर्वकान् तेषांफलानिवक्ष्यामितत्कर्तॄणांपृथक्पृथक् मधुरस्वरोभवेद्राजापुरुषोगुडवर्जनात् तैलस्यवर्जनाद्राजन्सुंदरांगःप्रजायते कटुतैलपरित्यागाच्छत्रुनाशःप्रजायते योगाभ्यासीभवेद्यस्तुसब्रह्मपदमाप्नुयात् तांबूलवर्जनाद्भोगीरक्तकंठश्चजायते घृतत्यागाच्चलावण्यंसर्वस्निग्धतनुर्भवेत् शाकपत्राशनाद्भोगीअपक्वादोऽमलोभवेत् भूमौप्रस्तरशायीचविप्रोमुनिवरोभवेत् एकांतरोपवासेनब्रह्मलोकेमहीयते धारणान्नखरोम्णांचगंगास्नानफलंलभेत् मौनव्रतीभवेद्यस्तुतस्याज्ञाऽस्खलिताभवेत् भूमौभुंक्तेसदायस्तुसपृथिव्याःपतिर्भवेत् प्रदक्षिणाशतंयस्तुकरोतिस्तुतिपाठकः हंसयुक्तविमानेनसचविष्णुपुरंव्रजेत् अयाचितेनप्राप्नोतिपुत्रान्धर्म्यान्विशेषतः षष्ठान्नकालभोक्तायःकल्पस्थायीभवेदिति पर्णेषुयोनरोभुंक्तेकुरुक्षेत्रफलंलभेत् गुडवर्जीनरोदद्यात्तद्भूतंताम्रभाजनं सहिरण्यंनरश्रेष्ठलवणस्याप्ययंविधिः सुप्तेदेवेतुयोविष्णोःशिवस्यांगणमर्चयेत् पंचवर्णैस्तुयोनित्यंस्वस्तिकैःपद्मकैस्तथा सयातिरुद्रलोकंहिगाणपत्यमवाप्नुयात् अथैषांसमाप्तौकार्तिक्यांदानानि एकभक्तव्रतेदंपतीसंपूज्यधेनुर्देया नक्तेवस्त्रयुगम् एकांतरोपवासेगौः भूशयनेशय्या षष्ठकालभोजनेगौः व्रीहिगोधूमादित्यागेहैमव्रीह्यादि कृच्छ्रेगोयुग्मं शाकाशनेगौः पयोव्रतेच दधिमधुघृतव्रतेषुवासोगौश्च ब्रह्मचर्येस्वर्णमूर्तिः तांबूलव्रतेवासोयुगं मौनेघृतकुंभोवस्त्रयुगंघंटाच देवाग्रेरंगमालिकाकरणेधेनुर्हेमपद्मंच दीपिकाव्रतेदीपिकावासोयुगंच भूमिभोजनेपर्णभोजनेचकांस्यपात्रंगौश्च चतुष्पथदीपेगोग्रासेचगोवृषौ प्रदक्षिणाशतेवस्त्रं अनुक्तेषुस्वर्णंगौश्चेत्यादि**हेमाद्रौ**ज्ञेयम् ।

इतरही व्रतें सांगतो **हेमाद्रींत भविष्यांत**—"स्त्री किंवा पुरुष जो माझा भक्त त्यानें दृढव्रत होऊन दंतधावन करून हे ( पुढें सांगावयाचे ) नियम ग्रहण करावे. ते ग्रहण करणारांस फळें निरनिराळीं सांगतो—गूळ वर्ज्य केल्यानें मधुरस्वरी राजा होतो. तेल वर्ज्य केल्यानें सुंदरांग होतो. कटुतैल वर्ज्य केल्यानें शत्रुनाश होतो. योगाभ्यास करील तो ब्रह्मपदातें

प्राप्त होतो. तांबूल वर्ज्य केल्यानें नानाविध भोगप्राप्ति व रक्तकंठ होतो. घृत वर्ज्य केल्यानें लावण्ययुक्त व स्निग्धशरीर होतो. शाकपानें भक्षण करून राहाणारा भोगी होतो. अपक्व खाणारा स्वच्छ होतो. भूमीवर किंवा प्रस्तरावर ( दर्भांवर ) निजणारा मुनिश्रेष्ठ ब्राह्मण होतो. एकांतरोपवासानें ब्रह्मलोकीं पूज्य होतो. नखें व रोम यांच्या धारणानें गंगास्नानाचें फल प्राप्त होतें. मौनव्रत जो करतो त्याची आज्ञा अस्खलित चालते. भूमीवर निरंतर जो भोजन करतो तो पृथ्वीपति होतो. जो स्तुतिपाठ करीत विष्णूला शंभर प्रदक्षिणा करितो तो हंसयुक्त विमानांत बसून वैकुंठीं जातो. अयाचित भोजनानें धर्म्य ( धर्मास हितकर ) पुत्रांतें प्राप्त होतो. सहाव्या अन्नकालीं ( दोन दिवस उपोषण करून तिसऱ्या दिवशीं सायंकाळीं ) जो भोजन करतो तो स्वर्गलोकीं चिरकाल राहतो. पानांवर जो मनुष्य भोजन करतो तो कुरुक्षेत्रफल पावतो. गूळ वर्ज्य करणाऱ्यानें गुडपूर्ण ताम्रपात्र सुवर्णसहित द्यावें. मीठ वर्ज्य करणारानेंही सहिरण्य ताम्रपात्र द्यावें. देव निजला असतां पांचरंगी स्वस्तिकें व कमलें यांहींकरून विष्णूचे किंवा शिवाचे अंगणाची पूजा करील तो रुद्रलोकीं जाऊन सागणफलातें पावेल." आतां या व्रतांच्या समाप्तीस कार्तिकीस दानें सांगतो—एकभुक्तव्रती यानें दंपत्याची पूजा करून धेनु ( गाय ) द्यावी. नक्तव्रताचे ठायीं दोन वस्त्रें. एकांतरोपवासास गाय. भूशयनास शय्या. षष्ठकालभोजनास गाय. व्रीहि-गोधूमादिकांच्या त्यागास सुवर्णव्रीह्यादिक. कृच्छ्रव्रत केलें तर दोन गायी. शाकभक्षणास व पयोव्रतास गाय. दधि, मध, घृत यांच्या व्रतास वस्त्र व गाय. ब्रह्मचर्यधारण केलें तर सुवर्णमूर्ति. तांबूलव्रतास दोन वस्त्रें. मौनव्रतास घृतकुंभ, दोन वस्त्रें, घंटा हीं द्यावीं. देवापुढें रंगमालिका करण्यास गाय व सुवर्णकमल. दीपिकाव्रतास दीपिका व दोन वस्त्रें. भूमिभोजनास व पर्णभोजनास कांस्यपात्र व गाय. चतुष्पथीं दीपदानास व गोग्रासास गाय व बैल. शतप्रदक्षिणाव्रतास वस्त्र. न सांगितलेल्या अन्यव्रतांविषयीं स्वर्ण व गोदान करावें, इत्यादि प्रकार **हेमाद्री**वरून जाणावा.

तथाच **भार्गवार्चनदीपिकायांपाद्मे** शयनीबोधिनीमध्येशमीदूर्वापमार्गकैः भृंगराजेनदेवांस्तुनार्चयीतकदाचन **हेमाद्रौपाद्मे** आषाढादिचतुर्मासानभ्यंगंवर्जयेन्नरः समाप्तौचपुनर्दद्यात्तिलतैलयुतंघटं आषाढादिचतुर्मासंवर्जयेन्नखकृंतनं वृंताकंगृंजनंचैवमधुसर्पिर्घटान्वितं कार्तिक्यांतत्पुनर्हैमंब्राह्मणायनिवेदयेत् अन्यान्यपिकेशकर्तनादिवर्जनसंकल्पानुरूपाणि **पृथ्वीचंद्रोदयेज्ञेयानि टोडरानंदेस्कांदे** एकांतरंत्र्यंतरंवाकुर्यान्मासोपवासकं अनोदनंफलाहारंनक्तव्रतमथापिवा ।

तसेंच **भार्गवार्चनदीपिकेंत पद्मपुराणांत** सांगतो—"शयनी व बोधिनी ह्या एकादशींमध्यें ( चातुर्मासांत ) शमी, दूर्वा, आघाडा, माका यांहींकरून देवाचें पूजन कधींही करूं नये" **हेमाद्रींत पद्मपुराणांत**—"आषाढादि चार महिन्यांत मनुष्यानें अभ्यंग वर्ज्य करावा. त्याच्या समाप्तीस तिळतेलानें युक्त घट द्यावा. आषाढादिक चार महिने नखें काढणें, व वांगें, गाजर, मध, हीं वर्ज्य करावा व त्याचे समाप्तीस सुवर्णाचा तो तो पदार्थ व घृतयुक्त घट ब्राह्मणास द्यावा." अन्यहो केशकर्तनादिवर्जनव्रतें **पृथ्वीचंद्रोदया**वरून जाणावीं. **टोडरानंदांत स्कंदपुराणांत**—"एकांतरोपवास, दोन दिवसांच्या अंतरानें उपवास, मासोपवास, अनोदन, फलाहार, अथवा नक्तव्रत हीं करावीं."

अत्रैवतप्तमुद्राधारणमुक्तं **रामार्चनचंद्रिकायांभविष्ये** शयन्यांचैवबोधिन्यांचक्रतीर्थेतथैवच शंखचक्रविधानेनवह्निपूतोभवेन्नरइति अतप्ततनूर्नतदामोअश्नुतेइति **ऋग्वेदात्** महोवाचयाज्ञवल्क्यस्तस्मात्पुमानात्महितायहरिंभजेत सुश्लोकमौलेर्वर्माण्यग्निनासंदधतइति **शतपथश्रुतेः** प्रतद्विष्णोअब्जचक्रेसुतप्तेजन्मांभोधींतर्तवेचर्षणींद्राः[१] मूलेबाह्वोर्दधत्यन्यपुराणात्तुलिंगान्यंगेतप्तायुधान्यर्पयंतइति **सामवेदात्** अग्निहोत्रंयथानित्यंवेदस्याध्ययनंयथा ब्राह्मणस्यतथैवेदंतप्तमुद्रादिधारणमिति **पद्मपुराणा**च्चेति ब्राह्मणःक्षत्रियोवैश्यःशूद्रोवायदिवेतरः शंखमुद्रांकिततनुस्तुलसीमंजरीधरः गोपीचंदनलिप्तांगोदृष्टश्चेत्तदघंकुतः इति**काशीखंडात्** तत्प्रकारस्तु**रामार्चनचंद्रिकातो**ज्ञेयः ।

याच एकादशीस तप्तमुद्राधारण सांगतो **रामार्चनचंद्रिकेंत भविष्यांत**—"शयनी व बोधिनी एकादशीस तसेंच चक्रतीर्थांत शंखचक्रविधानेंकरून मनुष्यानें अग्निपूत व्हावें." कारण, "ज्याची तनु तप्त झाली नाहीं त्याला परमेश्वरप्राप्ति होत नाहीं" असा **ऋग्वेदमंत्र** आहे. "त्या याज्ञवल्क्यानें असें सांगितलें आहे कीं, पुरुषानें आत्महिताकरितां हरीचें भजन करावें. भगवंताचीं चिन्हें अग्नीच्या योगानें धारण करितात." अशी **शतपथश्रुति** आहे. "श्रेष्ठ मनुष्य अंगावर तप्त आयुधें अर्पण करणारे जन्मसागर तरण्याकरितां विष्णूचीं कमलचक्रें तापवून बाहुमूलाचे ठायीं धारण करितात." असा

१ ततेंवे तरितुं चर्षणींद्राः मनुष्येंद्राः ।

**सामवेद** आहे, आणि "जसें अग्निहोत्र नित्य व वेदाध्ययन नित्य तसें तप्तमुद्रादिधारण ब्राह्मणाला नित्य आहे." असें **पद्मपुराण**वचनही आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, अथवा शूद्र किंवा दुसरा कोणी मनुष्य आपलें अंग शंखमुद्रेनें अंकित करून तुलसीमंजरी धारण करणारा व गोपीचंदनाचा अंगास लेप केलेला असा मनुष्य पाहिला असतां त्याला ( पाहाणाराला ) पातक कोठून होणार ?" असें **काशीखंड**वचन आहे. तो तप्तमुद्राधारणप्रकार तर **रामार्चनचंद्रिकेपासून** जाणावा.

**पृथ्वीचंद्रोदयादयस्तु** यस्तुसंतप्तशंखादिलिंगचिह्नतनुर्नरः ससर्वयातनाभोगीचंडालोजन्मकोटिपु द्विजंतुतप्तशंखादिलिंगांकिततनुंनरः संभाष्यरौरवंयातियावदिंद्राश्चतुर्दशेति**बृहन्नारदीयोक्तेः** शंखचक्राद्यंकनंचगीतनृत्यादिकंतथा एकजातेरयंधर्मोनजातुस्याद्द्विजन्मनः शंखचक्रेमृदायस्तुकुर्यात्तप्तायसेनवा सशूद्रवद्बहिःकार्यःसर्वस्माद्द्विजकर्मणःयथाश्मशानजंकाष्ठमनर्हंसर्वकर्मसु तथाचक्रांकितोविप्रःसर्वकर्मसुगर्हितः तथा शिवकेशवयोरंकांश्शूलचक्रादिकान्द्विजः नधारयेतमतिमान्वैदिकेवर्त्मनिस्थित इति**विष्णवाश्वलायना**दिवचनात् ऋग्वेदादिश्रुतीनामन्यार्थत्वादन्यश्रुतीनांचासत्त्वात् चक्रादिधारणंशूद्रविषयमित्यूचुः नृत्यंचोदरार्थंनिषिद्धमिति**श्रीधरस्वामी** यद्यपिनिषेधस्यप्राप्तिसापेक्षत्वाद्विधिंविनाचतदयोगादुपजीव्यविरोधेन नतौपशौकरोतीतिवद्विकल्पोयुक्तस्तथापि एकजातेरयंधर्मइत्यनेनविधिवाक्यानामुपसंहारान्नद्विजातिनिषेधोनित्यानुवादइतितदाशयः अत्रशिष्टाचारएवसंकटपाशनिःसरणसृणिरिति**संक्षेपः** ।

**पृथ्वीचंद्रोदयादिक** ग्रंथकार तर "जो तप्तशंखादिमुद्रायुक्तशरीर मनुष्य तो सर्व यातना भोगणारा व कोटि जन्माचे ठायीं चांडाल होतो. तप्तशंखादिचिह्नांनीं अंकित आहे शरीर ज्याचें अशा द्विजाशीं जो मनुष्य भाषण करितो तो चवदा इंद्र आहेत तोंपर्यंत रौरव नरकांत जातो" अशा **बृहन्नारदीय** वचनावरून; आणि "शंखचक्रादिकांनीं शरीर अंकित करणें व गीत, नृत्य इत्यादिक करणें हा एकजातीचा ( शूद्राचा ) धर्म होय. द्विजातींचा मुळींच धर्म नाहीं. जो मृत्तिकेनें किंवा तापविलेल्या लोखंडानें शरीरावर शंखचक्रें करील त्याला सर्व ब्राह्मणकर्मापासून शूद्राप्रमाणें बाहेर करावा. जसें स्मशानांतील काष्ठ सर्वकर्मास अयोग्य तसा चक्रांकित ब्राह्मण सर्व कर्माविषयीं निंद्य होय." तसेंच "वैदिकमार्गी स्थित अशा बुद्धिवान् ब्राह्मणानें शिव व विष्णु यांच्या शूलचक्रादिक मुद्रा धारण करूं नयेत" ह्या **विष्णु, आश्वलायन** इत्यादिकांच्या वचनांवरून व ऋग्वेदादिक श्रुतींचा अन्य अर्थ असल्यामुळें ( म्हणजे 'अतप्ततनूर्नतदामोअश्नुते' या मंत्राचा अर्थ—पयोव्रतादिकेंकरून ज्याची तनू तप्त झाली नाहीं त्याला सोमरसाची प्राप्ति नाहीं—इत्यादि अर्थ असल्यामुळें ) व इतर श्रुति मुळींच नसल्यामुळें चक्रादिकमुद्राधारण शूद्रविषयक आहे, असें सांगते झाले. नृत्य हें उदरभरणाकरितां निषिद्ध आहे, भगवंताकरितां निषिद्ध नाहीं, असें **श्रीधरस्वामी** सांगतो. आतां **बृहन्नारदीय-विष्णु-आश्वलायनादि** वचनांनीं तप्तमुद्राधारणाचा निषेध केला. यावरून तप्तमुद्राधारणाची प्राप्ति आहे असें होतें व ती प्राप्ति विधीवांचून संभवत नाहीं, म्हणून त्याचा विधि आहे, असें होतें. ज्याच्या आश्रयानें जो झाला तो त्याचा ( आश्रयाचा ) सर्वथा बाध करीत नाहीं असा न्याय आहे, जसें—'नतौ पशौ करोति' म्हणजे पशुयागाचे ठायीं आज्यभाग करीत नाहींं असा निषेध केला तरी तो निषेध आज्यभागांचा सर्वथा बाध करीत नाहीं. करील तर उपजीव्याचा ( आश्रयाचा ) विरोध होईल म्हणून एकवेळ बाध व एकवेळ आज्यभागांची प्रवृत्ति, याप्रमाणें विकल्प होतो, तसा येथें एकदां विधि एकदां निषेध अर्थात् विकल्प युक्त आहे, असें जरी आहे तरी 'एकजाति जो शूद्र त्याचा हा धर्म' या वाक्यानें तप्तमुद्राधारणाचीं जीं सामान्य वाक्यें त्यांचा उपसंहार म्हणजे—अनेकांविषयीं प्रवृत्त जीं तप्तमुद्राधारणाचीं सामान्य वाक्यें त्यांचा एक विषयावर म्हणजे ( शूद्रावर पर्यवसान ) केल्यामुळें द्विजातीला जो तप्तमुद्राधारणनिषेध केला तो अपूर्व नाहीं, तर नित्य जी अप्राप्ति त्याचाच अनुवाद ( सिद्धकथन ) आहे, असा **पृथ्वीचंद्रोदया**दि ग्रंथांचा आशय होय. ह्या वरील सर्व वाक्यांच्या तात्पर्यावरून तप्तमुद्राधारण केलें तरी दोष आणि न केलें तरी दोष असा संकटपाश आला त्यांतून सुटण्याला मार्ग म्हटला म्हणजे एक शिष्टाचारच आहे. म्हणजे जसा शिष्टाचार असेल तसें करावें, हा सारांश थोडक्यांत समजावा.

आषाढपौर्णमास्यांकोकिलाव्रतमुक्तं**हेमाद्रौभविष्ये** आषाढपौर्णमास्यांतुसंध्याकालेह्युपस्थिते संकल्पयेन्मासमेकंश्रावणेप्रत्यहंह्यहं स्नानंकरिष्येनियताब्रह्मचर्येस्थितासती भोक्ष्यामिनक्तंभूशय्यांकरिष्येप्राणिनां-

१ अन्यार्थत्वात् तप्तादिपदस्य कृच्छ्रचान्द्रायणादिपरत्वात् । २ सूतसंहितायां तु विष्णवागमादितंत्रेषु दीक्षितानां विधीयते । संखचक्रगदापद्मैरंकनं नान्यदेहिनां ॥ वेदमार्गैकनिष्ठस्तु मोहेनानंकितो यदि । पतत्येव न संदेहस्तथा पुण्ड्रात्तथापि चेत्युक्तम् ।

दयामिति अस्यनक्तव्रतत्वात्सायाह्नव्यापिनीग्राह्या अत्रैवशिवशयनोत्सवउक्तो **हेमाद्रौवामनपुराणे** पौर्णमास्यामुमानाथःस्वपतेचर्मसंस्तरे वैय्याघ्रेचजटाभारंसमुद्ग्रथ्याहिवर्मणा **मदनरत्नेप्येवं** इयंचप्रदोषव्यापिनी अत्रैवव्यासपूजोक्ता तत्रत्रिमुहूर्ताचेत्परैवेतिसंन्यासपद्धतौ त्रिमुहूर्ताधिकंग्राह्यंपर्वक्षौरप्रणामयोरितिवचनात् इतिश्रीरामकृष्णभट्टात्मजदिनकरभट्टानुजकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौ आषाढः समाप्तः ॥

आषाढपौर्णमासीस कोकिलाव्रत सांगतो **हेमाद्रींत भविष्यांत**—"आषाढ पौर्णमासीचे ठायीं संध्याकाल प्राप्त असतां असा संकल्प करावा कीं, 'श्रावणाचेठायीं एक महिना प्रत्यहीं स्नान करीन व नियम धारण करून ब्रह्मचर्यव्रतानें राहून नक्तभोजन करीन, भूशय्या करीन, व प्राण्यांवर दया करीन' अशा अर्थाचा संकल्प करावा." हें व्रत नक्तव्रत असल्यामुळें ही आषाढी सायाह्नव्यापिनी घ्यावी. याच तिथीस शिवशयनोत्सव सांगतो. **हेमाद्रींत वामनपुराणांत**—"आषाढ पौर्णमासीचेठायीं उमापति ( शंकर ) सर्पशरीरानें आपला जटाभार बांधून व्याघ्रचर्मावर शयन करितो." **मदनरत्नांतही** असेंच सांगितलें आहे. ही पौर्णिमा शिवशयनोत्सवाविषयीं प्रदोषव्यापिनी घ्यावी. याच तिथीला व्यासपूजा सांगितली आहे. व्यासपूजेविषयीं दुसऱ्या दिवशीं तीन मुहूर्त ( ६ घटिका ) असेल तर पराच घ्यावी, असें **संन्यासपद्धतींत** सांगितलें आहे. कारण, "क्षौर व नमस्कार याविषयीं पर्व घ्यावयाचें तें तीन मुहूर्तांहून अधिक असेल तें घ्यावें" असें **वचन** आहे.

**इति आषाढमासनिर्णयाची महाराष्ट्रीटीका समाप्त झाली.**

कर्कसंक्रांतौपूर्वत्रिंशद्दंडाःपुण्यकालः सूर्योदयोत्तरंसंक्रमेतुपरतएवपुण्यं रात्रौतुनिशीथात्प्राक्परतश्चसंक्रमे**ऽपरार्कहेमाद्र्यनंतभट्टादिमते**पूर्वोत्तरदिनयोःपंचनाड्यःपुण्यकालः धनुर्मीनावतिक्रम्यकन्यांचमिथुनंतथा पूर्वापरविभागेनरात्रौसंक्रमतेरविः दिनांतेपंचनाड्यस्तुतदापुण्यतमाःस्मृताः उदयेपितथापंचदैवेपित्र्येचकर्मणीति**स्कांदोक्तेः** पूर्वापरविभागेनेतिमकरकर्कभिन्नसंक्रांतिपरं वक्ष्यमाणवचोविरोधादित्युक्तं**मदनरत्ने** तेनायमर्थः रात्रौपूर्वभागेमकरे उदयेपंचनाड्यःपुण्यकालः रात्रावपरभागेकर्कटेदिनांतेपंचनाड्यःपुण्यकालः विषुवतोस्तु पूर्वदिनेपंचापरदिनेचपंचेतिवाक्यांतरानुरोधात् तेन**हेमाद्रिमाधवयोः**सर्ववचनानांचाविरोधः **माधवमते** अर्धरात्रेतदूर्ध्ववासंक्रांतौदक्षिणायने पूर्वमेवदिनंग्राह्यंयावन्नोदयतेरविरिति **वृद्धगार्ग्योक्तेः** मिथुनात्कर्कसंक्रांतिर्यदिस्यादंशुमालिनः प्रभातेवानिशीथेवातदापुण्यंतुपूर्वतइति**भविष्योक्तेश्च**पूर्वदिनएवपुण्यं **दाक्षिणात्यास्त्वेत**देवाद्रियंते अत्ररात्रावपिस्नानादिभवतीत्युक्तंप्राक् अत्रदानोपवासादिपूर्वमुक्तं तथाकर्के केशादिकर्तनंनिषिद्धं कुंभेकर्कटकेवापिकन्यायांकार्मुकेरवौ रोमखंडंगृहस्थस्यपितॄन्प्राशयतेयमइति **सुमंतु**वचनादित्युक्तं **जीवत्पितृकनिर्णयेगुरुभिः** ॥

आतां श्रावणमास—कर्कसंक्रांतीचे ठायीं पूर्वींच्या तीस घटिका पुण्यकाळ होय. सूर्योदयानंतर संक्रांति झाली तर पुढेंच पुण्यकाळ. रात्रीं तर मध्यरात्रीच्या पूर्वी किंवा नंतर संक्रांत असतां **अपरार्क, हेमाद्रि** व **अनंतभट्ट** इत्यादिकांचे मतीं पूर्व व उत्तर असा दोन दिवशीं पांच पांच घटिका पुण्यकाळ. कारण, "धनु, मीन, कन्या, मिथुन, या संक्रांती सोडून पुढील संक्रांतीस रात्रीच्या पूर्वभागीं सूर्य जाईल तर पूर्वदिवसाचे अंतीं पांच घटिका पुण्यकाळ. आणि रात्रीच्या अपरभागीं सूर्य जाईल तर परदिवसाच्या सूर्योदयकालीं पांच घटिका पुण्यकाळ दैव पित्र्य कर्माविषयीं जाणावा." असें **स्कंदपुराण**वचन आहे. "पूर्वापरविभागेकरून" असें जें वरील वचनांत म्हटलें तें मकर व कर्क या संक्रांतींवांचून इतर संक्रांतींविषयक होय. कारण, मकर व कर्क यांविषयींही म्हटलें तर पुढें सांगावयाच्या वचनाचा विरोध येईल असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. त्यावरून असा अर्थ होतो कीं, रात्रीच्या पूर्वभागीं मकरसंक्रांति होईल, तर परदिवशीं सूर्योदयीं पांच घ० पुण्यकाळ. रात्रीच्या उत्तरभागीं कर्कसं० तर पूर्वदिवसाच्या अंतीं पांच घ० पुण्यकाळ. विषुवसंक्रांतीचा तर पूर्वदिवशीं पांच व पुढील दिवशीं पांच घटिका असा अन्य वाक्यांच्या अनुरोधानें अर्थ समजावा. तेणेंकरून **हेमाद्रि, माधव** व इतर सर्ववचनांची एकवाक्यता होऊन विरोध नाहींसा होतो. माधवमतीं तर अर्धरात्रीं किंवा त्यापुढें संक्रांत झाली असतां दक्षिणायनाचेठायीं पूर्वीच दिवस पुण्यकाळ घ्यावा. कारण, "जोंपर्यंत सूर्योदय झाला नाहीं" असें **वृद्धगार्ग्याचें** वचन आहे व "सूर्याची मिथुनापासून कर्कसंक्रांति जर प्रातःकालीं किंवा मध्यरात्रीं होईल तर पूर्वी पुण्यकाळ" असें **भविष्य**वचनही आहे. म्हणून पूर्वदिवशींच पुण्यकाळ होतो. दक्षिणदेशीयलोक तर या पक्षाचाच स्वीकार करतात. या पुण्यकाळीं

१ केशादीति नखानामनुक्तत्वात्तत्खंडनेनदोषइत्याहुः । कर्तनमितिवपनस्यापिग्रहः । रोमखंडमितिसामान्योक्तेः । २ गृहस्थस्येति वर्णादिव्युदासः जीवत्पितृकस्यापिव्युदासइतिकेचित् ।

रात्रीसही स्नानदानादि करावें असें पूर्वी सांगितलें आहे. ह्या संक्रांतीचेठायीं दान उपवासादिक करणें तें पूर्वी ( प्रथमपरिच्छेदांत ) सांगितलें आहे. तसेंच कर्कसंक्रांतिस्थ रवि असतां केशादिकांचें कर्तन ( कापणें ) करूं नये. कारण, "कुंभ, कर्क, कन्या, धनु, यांस रवि असतां जर केशादिकर्तन केलें तर गृहस्थाचे रोमखंड पितरांकडून यम खाववितो" असें **सुमंतु**वचन आहे असें **जीवत्पितृकनिर्णयांत गुरूनीं सांगितलें आहे.**

अथनदीनांरजोदोषः **हेमाद्रावत्रिः** सिंहकर्कटयोर्मध्येसर्वानद्योरजस्वलाः नस्नानादीनिकर्माणितासु कुर्वीतमानवः इदंचक्षुद्रनदीपु सिंहकर्कटयोर्मध्येसर्वानद्योरजस्वलाः तासुस्नानंनकुर्वीतवर्जयित्वासमुद्रगाइति **व्याघ्रोक्तेः मात्स्ये**त्वगस्त्योदयावधित्वमुक्तं यावन्नोदेतिभगवान्दक्षिणाशाविभूषणः तावद्रजोमहानद्यः- करतोयाःप्रकीर्तिताः करतोयाअल्पतोयाः तथा**कात्यायनः** याःशोपमुपगच्छंतिग्रीष्मेकुसरितोभुवि तासु- प्रावृषिनस्नायादपूर्णेदशवासरे इदंचापदि **स्मृतिसंग्रहे** धनुःसहस्राण्यष्टौतुगतिर्यासांनविद्यते नतानदी- शब्दवहागर्तास्ताःपरिकीर्तिताः महानदीपुतु**भविष्ये**उक्तं आदौतुकर्कटेदेविमहानद्योरजस्वलाः त्रिदिनंच- चतुर्थेह्निशुद्धाःस्युर्जाह्नवीयथा महानद्यश्च**ब्राह्मे** गोदावरीभीमरथीतुंगभद्राचवेणिका तापीपयोष्णीविंध्यस्य- दक्षिणेतुप्रकीर्तिताः भागीरथीनर्मदाचयमुनाचसरस्वती विशोकाचविहस्ताचविंध्यस्योत्तरसंस्थिताः द्वादशै- तामहानद्योदेवर्षिक्षेत्रसंभवाः **मदनरत्नेपुराणांतरे** महानद्योदेविकाचकावेरीवंजरातथा रजसातुप्रदुष्टाः- स्युःकर्कटादौत्र्यहंनृप **कात्यायनः** कर्कटादौरजोदुष्टागोमतीवासरत्रयं चंद्रभागासतीसिंधुःसरयूर्नर्मदा- तथा इदंगंगाव्यतिरिक्तविषयं गंगाचयमुनाचैवप्लक्षजातासरस्वती रजसानाभिभूयंतेयेचान्येनदसंज्ञिताः शोण- सिंधुहिरण्याख्याःकोकलोहितघर्घराः शतद्रुश्चनदाःसप्तपावनाःपरिकीर्तिताः इति**देवलोक्तेः** यत्तु प्रथमं- कर्कटेदेवित्र्यहंगंगारजस्वलेत्यादिवचनं तज्जाह्नवीभिन्नगोदावर्यादिगंगांतरपरमिति**मदनरत्ने अन्ये**त्वंतर्ग- तरजोविषयं गंगाधर्मद्रवःपुण्यायमुनाचसरस्वती अंतर्गतरजोदोषाःसर्वावस्थासुचामला इति**निगमोक्तेः** ।

## आतां नदींस रजोदोष सांगतो.

**हेमाद्रींत अत्रि**—"सिंह व कर्क या संक्रांतींमध्यें सर्व नद्या रजस्वला होतात त्यांमध्यें मनुष्यानें स्नानादि कर्मे करूं नयेत." हें वचन क्षुद्रनदीविषयक आहे; कारण, "सिंह व कर्क या संक्रांतींत सर्व नद्या रजस्वला असतात, त्यांत स्नान करूं नये, हा निषेध समुद्रास पोंचणाऱ्या महानद्या सोडून समजावा." असें **व्याघ्र**वचन आहे. **मत्स्यपुराणांत** तर अगस्त्योदयापर्यंत नद्या रजस्वला असतात असें उक्त आहे—जोंपर्यंत दक्षिणदिशेला भूषणभूत भगवान् अगस्त्यऋषि उदय पावत नाहीं तोंपर्यंत अल्पोदक महानद्या रजस्वला असतात." तसेंच **कात्यायन** म्हणतो—"ग्रीष्मऋतूंत शुष्क होणाऱ्या ज्या लहान नद्या त्यांत वर्षाकालीं दहा दिवसपर्यंत स्नान करूं नये." हें वचन आपत्कालविषयक समजावें. आपत्काल नसतां वरील वचन समजावें. **स्मृतिसंग्रहांत** सांगतो—"ज्या नद्यांची आठ हजार धनुष्यें गति नाहीं त्यांस नद्या म्हणूं नयेत, तर त्या गर्त होत." महानदीविषयीं तर **भविष्यांत** सांगतो—"कर्कसंक्रांतींत प्रथम तीन दिवस महानद्या रजस्वला असून चवथ्या दिवशीं भागीरथीसारख्या शुद्ध होतात." महानद्या कोणत्या तें **ब्रह्मपुराणांत** सांगतो-"गोदावरी, भीमरथी, तुंगभद्रा, वेणिका, तापी, पयोष्णी ह्या विंध्याद्रीच्या दक्षिणेस होत. भागिरथी, नर्मदा, यमुना, सरस्वती, विशोका, विहस्ता ह्या विंध्याद्रीच्या उत्तरेस अशा ह्या बारा नद्या देवर्षिक्षेत्रांत उत्पन्न महानद्या आहेत." **मदनरत्नांत पुराणांतरांत**—"महानदी, देविका, कावेरी, वंजरा ह्या कर्कसंक्रांतींत प्रथम तीन दिवस रजोदूषित होतात." **कात्यायन**-"कर्कसंक्रांतीच्या आरंभीं तीन दिवस गोमती, चंद्रभागा, सती, सिंधु, सरयू, नर्मदा ह्या नद्या रजोदूषित होतात." हा रजोदोष गंगादिव्यतिरिक्त नद्यांस होय. कारण, "गंगा, यमुना, प्लक्षजाता, सरस्वती, या रजोदूषित होत नाहींत व जे नदसंज्ञक तेही रजोदूषित होत नाहींत. ते नद असे—शोण, सिंधु, हिरण्य, कोक, लोहित, घर्घर, शतद्रू हे सात नद पवित्र सांगितले आहेत." असें **देवलाचें** वचन आहे. आतां जें "हे देवि, कर्कसंक्रांतींत प्रथम तीन दिवस गंगा रजस्वला असते" इत्यादि वचन तें जाह्नवीव्यतिरिक्त ज्या गोदावर्यादि अन्य गंगा तद्विषयक होय, असें **मदनरत्नांत** आहे. अन्य ग्रंथकार तर तें वचन अभ्यंतर रजोविषयक आहे असें म्हणतात; कारण, "गंगा, धर्मद्रव, पुण्या, यमुना, सरस्वती, ह्या नद्या अंतर्गत रजोयुक्त असतात म्हणून सर्वदा स्वच्छ आहेत" असें **निगम**वचन आहे.

---

१ जाह्नवीति । यथा जाह्नवी सर्वकाले शुद्धा तथा तदन्या त्रिदिनानन्तरमित्यर्थः ।

तीरवासिनांतुरजोदोषोनास्ति नतुतत्तीरवासिनामिति**निगमोक्तेः** रजोदुष्टमपिजलंगंगाजलयोगेपावनं गंगांभसासमायोगाद्दुष्टमप्यंबुपावनमिति**मात्स्योक्तेः** नूतनकूपादौतु**योगियाज्ञवल्क्यः** अजागावोमहिष्यश्चब्राह्मणीचप्रसूतिका भूमेर्नवोदकंचैवदशरात्रेणशुध्यतीति क्वचित्त्वदोषमाह**व्याघ्रपाद्‌ः** अभावेकूपवापीनामनपायिपयोभृतां रजोदुष्टेपिपयसिग्रामभोगोनदुष्यति **गौडास्तु** अन्येनापिसमुद्धृतेइतिद्वितीयपादेपाठः तेनोद्धृतेनदोषः तथाचतासुस्नानंनेतिप्रागुक्तमित्याहुः **वसिष्ठोपि** उपाकर्मणिचोत्सर्गेप्रेतस्नानेतथैवच चंद्रसूर्यग्रहेचैवरजोदोषोनविद्यते इत्यलंविस्तरेण ।

तीरवासी लोकांस तर रजोदोष नाहीं. "कारण, त्या नद्यांच्या तीरवासीजनांस स्नानादिकांविषयीं दोष नाहीं" असें निगमवचन आहे. रजोदुष्टही उदक गंगाजलाच्या योगानें पवित्र होतें. कारण, "गंगाजलाशीं योग झाला म्हणजे दुष्ट असलेलेंही उदक पवित्र होतें" असें **मत्स्यपुराणांत** वचन आहे. नूतन कूपादिकांविषयीं तर **योगियाज्ञवल्क्य** म्हणतात— "बकरी, गाई, महिषी, ब्राह्मणी ह्या प्रसूत झाल्या असतां व भूमीचें नवोदक हीं दहा दिवसांनीं शुद्ध होतात." क्वचित् ठिकाणीं दोष नाहीं असें सांगतो—**व्याघ्रपाद्**—"शुष्क न होणाऱ्या अशा उदकानें युक्त असे कूप, वापी नसतील तर रजोदुष्टही उदक गांवांतील लोक सेवन करतील तर ते दूषित होणार नाहींत." **गौड** तर वरील व्याघ्रपादवचनाचे द्वितीयचरणीं '**अनपायिपयोभृतां**' या स्थानीं '**अन्येनापि समुद्धृते**' असा पाठ मानितात, तेणेंकरून काढलेल्या जलाविषयीं दोष नाहीं. त्यांमध्यें स्नान करूं नये, असें पूर्वीं सांगितलें आहे, असें सांगतात. **वसिष्ठही**—"उपाकर्म, उत्सर्जन, प्रेतस्नान व चंद्रसूर्यग्रहण, यांविषयीं रजोदोष नाहीं." याप्रकारें विस्तार केला इतका पुरे.

श्रावणशुक्लतृतीयामधुस्रवाख्यागुर्जरेषुप्रसिद्धा सापरयुताग्राह्येति**दिवोदासः** श्रावणशुक्लचतुर्थीपूर्वयुता मातृविद्धोगणेश्वरइत्यादिवचनात श्रावणशुक्लपंचमीनागपूजादौपरैवेति**सामान्यनिर्णये**उक्तं **चमत्कारचिंतामणौ** पंचमीनागपूजायांकार्यापष्ठीसमन्विता तस्यांतुतुपितानागाइतरासचतुर्थिकेति श्रावणेपंचमीशुक्लासंप्रोक्तानागपंचमी तांपरित्यज्यपंचम्यश्चतुर्थीसहिताहिताइति**मदनरत्नेभिधानाच्च** तेनपरैवेति अत्रविशेषो**हेमाद्रौभविष्ये** श्रावणमासिपंचम्यांशुक्लपक्षेनराधिप द्वारस्योभयतोलेख्यागोमयेनविषोल्बणाः पूजयेद्विधिवद्वीरदधिदूर्वांकुरैःकुशैः गंधपुष्पोपहारैश्चब्राह्मणानांचतर्पणैः येतस्यांपूजयंतीहनागान्भक्तिपुरःसराः नतेषांसर्पतोवीरभयंभवतिकुत्रचिदिति श्रावणशुक्लद्वादश्यांदधिव्रतंप्रागुक्तं तक्रादीनांत्वनिषेधः तत्रदधिव्यवहाराभावादितिवक्ष्यते ।

श्रावणशुक्ल तृतीया ही मधुस्रवानाम्नी गुर्जरदेशांत प्रसिद्ध आहे. ती चतुर्थीयुक्त घ्यावी असें **दिवोदास** सांगतो. श्रावणशुक्ल चतुर्थी ही तृतीयायुक्त घ्यावी; कारण, चतुर्थी तृतीयाविद्ध घ्यावी, इत्यादि वचन आहे. श्रावणशुक्ल पंचमी नागपूजादिकृत्यांविषयीं पराच घ्यावी, असें सामान्यनिर्णयांत ( प्रथमपरिच्छेदांत ) सांगितलें आहे. **चमत्कारचिंतामणींत**—"नागपूजेविषयीं पंचमी षष्ठीयुक्त करावी; कारण, तिचे ठायीं नाग संतुष्ट होतात. इतर कृत्यांविषयीं पंचमी चतुर्थीयुक्त घ्यावी." आणि "श्रावणशुक्ल पंचमी ही नागपंचमी म्हटली आहे, ती वर्ज्य करून सर्व पंचमी चतुर्थीयुक्त घ्याव्या त्या हितकारक होत." असें **मदनरत्नांत**ही सांगितलें आहे. तेणेंकरून पराच घ्यावी. या तिथीचे ठायीं विशेष सांगतो— **हेमाद्रींत भविष्यपुराणांत**—"श्रावणमहिन्यांत शुक्लपक्षीं पंचमीस गृहद्वाराच्या दोन बाजूंस गोमयानें भिंत सारवून सर्प काढावे आणि दधि, दूर्वांकुर, कुश, गंध, पुष्प, उपहार, ब्राह्मणभोजन यांहींकरून यथाशास्त्र पुजावे. जे मनुष्य या पंचमीस भक्तियुक्त नागपूजन करतील त्यांस सर्पापासून भय कोठेंही होणार नाहीं." श्रावणशुक्ल द्वादशीस दधिवर्जनरूप व्रत पूर्वीं सांगितलें आहे, त्यांत तक्रादिकांचा निषेध नाहीं. कारण, तक्राविषयीं दधिशब्दाचा व्यवहार नाहीं, असें पुढें सांगूं.

अत्रैवविष्णोःपवित्रारोपणमुक्तं **हेमाद्रौविष्णुरहस्ये** श्रावणस्यसितेपक्षेकर्कटस्थेदिवाकरे द्वादश्यां वासुदेवायपवित्रारोपणंस्मृतं द्वादश्यांश्रवणेवापिपंचम्यामथवाद्विज आनुकूल्येपुकर्तव्यंपंचदश्यामथापिवेति शिवेतु**तत्रैवकालोत्तरे** आषाढांतेचतुर्दश्यांनभस्यनभसोस्तथा अष्टम्यांचचतुर्दश्यांपक्षयोरुभयोःसममिति अन्यदेवतानांतुवक्ष्यते अधिवासनंतु**दीपिकायां** गोदोहांतरितेकालेपूर्वेद्युर्वाधिवासनमिति **गौणकालोरामार्चनचंद्रिकायां** पवित्रारोपणंविघ्नाच्छ्रावणेनभवेद्यदि कार्तिक्यवधिशुक्लास्तेकर्तव्यमितिनारदः

---

१ पूर्वंयुतेति मध्याह्नव्यापिनीतिनव्याः । २ शुक्लास्ते इति । शुक्लार्के इतिपाठे शुक्लद्वादश्यामित्यर्थः ।

हैमरौप्यताम्रक्षौमैःसूत्रैःकौशेयपद्मजैः कुशैःकाशैश्चकार्पासैर्ब्राह्मण्याकर्तितैःशुभैः कृत्वात्रिगुणितंसूत्रंत्रिगुणीकृत्यशोधयेत् तत्रोत्तमंपवित्रंतुषष्ट्यासहशतैस्त्रिभिः सप्तत्यासहितंद्वाभ्यांशताभ्यांमध्यमंस्मृतं साशीतिनाशतेनैवकनिष्ठंतत्समाचरेत् साधारणपवित्राणित्रिभिःसूत्रैःसमाचरेत् उत्तमंतुशतग्रंथिपंचाशद्ग्रंथिमध्यमं कनिष्ठंतुपवित्रंस्यात्षट्त्रिंशद्ग्रंथिशोभनं षट्त्रिंशच्चचतुर्विंशद्द्वादशेतिचकेचन चतुर्विंशद्द्वादशाष्टावित्येकेमुनयोविदुः **हेमाद्रौविष्णुरहस्ये**त्वन्यथोक्तं अष्टोत्तरशतंकुर्याच्चतुःपंचाशदेववा सप्तविंशतिरेवाथज्येष्ठमध्यकनीयसं अधमंनाभिमात्रंस्यादूरुमात्रंद्वितीयकं प्रलंबतोजानुमात्रंप्रतिमायांनिगद्यते शिवपवित्रंतु**तत्रैवशैवागमे** एकाशीत्यथवासूत्रैस्त्रिंशतावाष्टयुक्तया पंचाशतावाकर्तव्यंतुल्यग्रंथ्यंतरालकं द्वादशांगुलमानानिव्यासादष्टांगुलानिवा लिंगविस्तारमानानिचतुरंगुलकानिचेति ।

त्याच द्वादशीचेठायीं विष्णूचें पवित्रारोपण सांगितलें आहे—**हेमाद्रींत विष्णुरहस्यांत**—"श्रावणमासाच्या शुक्लपक्षीं कर्कास सूर्य असतां द्वादशीस विष्णूचें पवित्रारोपण करावें. द्वादशी किंवा श्रवणनक्षत्र किंवा पंचमी अथवा पौर्णिमा यांतून अनुकूल असेल त्या दिवशीं पवित्रारोपण करावें." शिवाचें पवित्रारोपण तर-**हेमाद्रींत कालोत्तरांत**—"आषाढाच्या शेवटीं चतुर्दशीस किंवा श्रावण, भाद्रपद यांच्या दोनही पक्षांच्या अष्टमी, चतुर्दशी या दोनही तिथींस पवित्रारोपण समान होय." अन्य देवतांचें पवित्रारोपण पुढें सांगूं. अधिवासन सांगतो—**दीपिकेंत**—"त्या दिवशीं गोदोहनसमयीं ( प्रातःकालीं ) किंवा पूर्वदिवशीं अधिवासन करावें." गौणकाल सांगतो—**रामार्चनचंद्रिकेंत**—"कांहीं विघ्नानें श्रावणांत जर पवित्रारोपण झालें नाहीं तर कार्तिकीपौर्णिमेपर्यंत शुक्रास्तांतही करावें, असें नारद सांगतो. सुवर्ण, रुपें, तांबें, जवस, रेशीम, कमल, कुश, काश, कापूस यांचें ब्राह्मणीनें काढलेलें सूत घेऊन तें सूत्र त्रिगुण करून पुनः तिप्पट करून शुद्ध करावें ( धुवावें ). त्या तीनशेंसाठ सूत्रांचें पवित्रक उत्तम, दोनशेंसत्तरांचें मध्यम. एकशेंएेंशीं सूत्रांचें कनिष्ठ होय, याप्रमाणें तें करावें. साधारण पवित्रकें तीन सूत्रांनीं करावीं. शंभर ग्रंथींचें पवित्रक उत्तम. पन्नास ग्रंथींचें मध्यम, छत्तीस ग्रंथींचें कनिष्ठ होय. छत्तीस, चोवीस, बारा ग्रंथींचें अनुक्रमानें उत्तम, मध्यम, कनिष्ठ असें कोणी म्हणतात. चोवीस, बारा, आठ ग्रंथींचें उत्तम, मध्यम, कनिष्ठ असें कितीएक मुनि म्हणतात." **हेमाद्रींत विष्णुरहस्यांत** तर निराळेंच सांगितलें आहे—तें असें-"एकशेंआठ, चौपन्न, सत्तावीस, नव सूत्रांचें उत्तम, मध्यम, कनिष्ठ होय. प्रतिमेच्या नाभीपर्यंत पोंचणारें कनिष्ठ, मांड्यांइतकें मध्यम, गुडघ्यांइतकें उत्तम." शिवपवित्रकें तर **हेमाद्रींत शैवागमांत** सांगतो—"एक्यायशीं, किंवा अडतीस अथवा पन्नास सुतांचीं व तितक्याच ग्रंथींनीं युक्त करावीं. बारा किंवा आठ अथवा चार अंगुळें लिंगाचा विस्तार असेल तशीं पवित्रकें करावीं."

अधिकारिणोपि**तत्रैवविष्णुरहस्ये** ब्राह्मणःक्षत्रियोवैश्यस्तथास्त्रीशूद्रएवच स्वधर्मावस्थिताःसर्वेभक्त्याकुर्युःपवित्रकं तथा अतोदेवेतिमंत्रेणद्विजोविष्णौनिवेदयेत् शूद्रस्यमूलमंत्रोवायेनवापूजयेद्धरिं एतच्चनित्यं नकरोतिविधानेनपवित्रारोपणंतुयः तस्यसांवत्सरीपूजानिष्फलामुनिसत्तम तस्माद्भक्तिसमायुक्तैर्नरैर्विष्णुपरायणैः वर्षेवर्षेप्रकर्तव्यंपवित्रारोपणंहरेरिति**तत्रैवोक्तेः** देवताविशेषेतिथयोपि**तत्रैव** धनदश्चरमागौरीगणेशःसोमराड्गुहः भास्करश्चंडिकांबाचवासुकिश्चतथर्षयः चक्रपाणिर्ह्यनंगश्चशिवोब्रह्मातथैवच प्रतिपत्प्रभृतिष्वेताःपूज्यास्तिथिषुदेवताः यथोक्ताःशुक्लपक्षेतुतिथयःश्रावणस्यचेति तथा**हेमाद्रौकालोत्तरे** चतुर्दश्यामथाष्टम्यांसर्वसाधारणंतुतदिति ।

**त्याविषयीं अधिकारीही** हेमाद्रींतच **विष्णुरहस्यांत** सांगतो-"स्वधर्मावस्थित असे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, स्त्री, शूद्र, या सर्वांनीं भक्तीनें पवित्रकें करावीं." तसेंच—"द्विजांनीं **'अतोदेवा०'** या मंत्रानें विष्णूस निवेदन करावें. शूद्रानें मूलमंत्रानें अथवा जेणेंकरून हरीचें पूजन करील त्या मंत्रानें पवित्र वाहावें." हें पवित्रारोपण नित्य आहे; कारण-"जो मनुष्य यथाविधि पवित्रारोपण करणार नाहीं त्याची संवत्सरपूजा व्यर्थ होते, यास्तव भक्तियुक्त व विष्णुपरायण मनुष्यांनीं प्रतिवर्षीं हरीचें पवित्रारोपण करावें." असें तेथेंच वचन आहे. इतर देवतांच्या पवित्रारोपणाविषयीं तिथीही तेथेंच सांगतो—"कुबेर, रमा, गौरी, गणेश, चंद्र, स्कंद, सूर्य, चंडिका, देवी, वासुकि, ऋषि, चक्रपाणि, काम, शिव, ब्रह्मा, ह्या देवतांचें पवित्रारोपण प्रतिपदादि तिथींचे ठायीं अनुक्रमें करावें. ह्या तिथि श्रावण शुक्लपक्षींच्या घ्याव्या. तसेंच **हेमाद्रींत कालोत्तरांत**—"चतुर्दशीस किंवा अष्टमीस सर्वधारण पवित्रारोपण करावें."

तत्प्रकारस्तु**रामार्चनचंद्रिकायां** यथा ततस्तानिपवित्राणिवैणवेपटलेशुभे संस्थाप्यशुचिवस्त्रेणपिधाय

पुरतोन्यसेत् अरत्निसंमितांवेणींकुर्यात्षट्त्रिंशताकुशैः क्रियालोपविघातार्थंयत्त्वयाविहितंप्रभो मयैतत्क्रियते-देवतवतुष्ट्यैपवित्रकं नमेविघ्नोभवेद्देवकुरुनाथदयांमयि सर्वथासर्वदाविष्णोममत्वंपरमागतिः उपवासेनदे-वत्वांतोषयामिजगत्पते कामक्रोधादयोप्येतेनमेस्युर्व्रतघातकाः अद्यप्रभृतिदेवेशयावद्वैशेषिकंदिनं तावद्रक्षा-त्वयाकार्यासर्वस्यास्यनमोस्तुते इतिदेवंसंप्रार्थ्यकुंभंसंस्थाप्यतत्रवंशपात्रे ॐसांवत्सरस्ययागस्यपवित्रीकरणा-यभो विष्णुलोकात्पवित्राद्यआगच्छेहनमोस्तुते अनेनमूलेनचावाह्योत्तममध्यमकनिष्ठेषुविष्णुब्रह्मरुद्रान् सत्व-रजस्तमांसि वेदत्रयं वनमालायां प्रकृतिं चावाह्य त्रिसूत्र्यांब्रह्मविष्णुरुद्रान् ग्रंथिषु क्रिया पौरुषी वीरा विजया ईशा अपराजिता मनोन्मनी जया भद्रा मुक्तिश्चेत्यावाह्य संपूज्य ॐसंवत्सरकृतार्चायाःसंपूर्णफल-दोपियत् पवित्रारोपणायैतत्कुरुकंधरतेनमः विष्णुतेजोद्भवंरम्यंसर्वपातकनाशनं सर्वकामप्रदंदेवतवांगेधार-याम्यहमितिदेवकरेमंगलसूत्रंबध्वा देवंसंपूज्यनिमंत्रयेत आमंत्रितोसिदेवेशपुराणपुरुषोत्तम प्रातस्त्वांपूजयि-ष्यामिसांनिध्यंकुरुकेशव क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह प्रातस्त्वांपूजयिष्यामिसन्निधौभवतेनमः निवेदयाम्यहंतुभ्यंप्रातरेतत्पवित्रकं सर्वथासर्वदाविष्णोनमस्तेस्तुप्रसीदमे ततःपुष्पांजलिंदत्वारात्रौजागरणं-कुर्यादिति **अधिवासनम्** ।

त्या पवित्रारोपणाचा प्रकार सांगतो—**रामार्चनचंद्रिकेंत**—पूर्वोक्तप्रमाणें पोवतीं तयार केल्यानंतर तीं **पवित्रकें** चांगल्या वेणिव (वेळूच्या) पात्रांत ठेवून शुद्ध वस्त्रानें आच्छादन देवापुढें ठेवावीं. अरत्निमानाची छत्तीस **दर्भाची वेणी करून** ती त्या पवित्रकांत ठेवून प्रार्थना करावी **प्रार्थनेचे मंत्र**—'क्रियालोपविघातार्थं यत्त्वया विहितं प्रभो ॥ मयैतत्क्रियते देव तव तुष्ट्यै पवित्रकं ॥ न मे विघ्नो भवेद्देव कुरु नाथ दयां मयि ॥ सर्वथा सर्वदा विष्णो मम त्वं परमा गतिः ॥ उपवासेन देव त्वां तोषयामि जगत्पते ॥ कामक्रोधादयोप्येते न मे स्युर्व्रतघातकाः ॥ अद्यप्रभृति देवेश यावद्वैशेषिकं दिन ॥ तावद्रक्षा त्वया कार्या सर्वस्यास्य नमोस्तु ते ॥' अशी देवाची प्रार्थना करून कुंभ स्थापन त्यावर वंशपात्रामध्यें—**'ॐ सांवत्सरस्य यागस्य पवित्रीकरणाय भो ॥ विष्णुलोकात्पवित्राद्य आगच्छेह नमोस्तु ते ॥'** या मंत्रानें व मूलमंत्रानें आवाहन करून उत्तम, मध्यम, कनिष्ठ पवित्रांचेठायीं विष्णु, ब्रह्मा, रुद्र तसेच सत्व, रज, तम व तीन वेद यांचें आवाहन आणि वनमालेवर प्रकृतीचें आवाहन करून त्रिसूत्रांचेठायीं ब्रह्मा, विष्णु, रुद्र व ग्रंथीचेठायीं क्रिया, पौरुषी, वीरा, विजया, ईशा, अपराजिता, मनोन्मनी, जया, भद्रा, मुक्ति यांचें आवाहन करून पूजा करून **'ॐ संवत्सरकृतार्चायाः संपूर्णफलदोपि यत् ॥ पवित्रारोपणायैतत् कुरु कंधर ते नमः ॥ विष्णुतेजोद्भवं रम्यं सर्वपातकनाशनं ॥ सर्वकामप्रदं देव तवांगे धारयाम्यहं ॥'** या मंत्रानें देवाचे हस्तांत मंगलसूत्र बांधून देवाची पूजा करून निमंत्रण करावें. तें असें—**'आमंत्रितोसि देवेश पुराणपुरुषोत्तम ॥ प्रातस्त्वां पूजयिष्यामि सांनिध्यं कुरु केशव ॥ क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह ॥ प्रातस्त्वां पूजयिष्यामि सन्निधौ भव ते नमः ॥ निवेदयाम्यहं तुभ्यं प्रातरेतत्पवित्रकं ॥ सर्वथा सर्वदा विष्णो नमस्तेस्तु प्रसीद मे ॥'** असें निवेदन करून नंतर पुष्पांजलि देऊन रात्रीं जागरण करावें-याप्रमाणें हें अधिवासन होय.

प्रातर्नित्यपूजांकृत्वागंधदूर्वाक्षतयुतंपवित्रमादाय ॐदेवदेवनमस्तुभ्यंगृहाणेदंपवित्रकं पवित्रीकरणार्थाय-वर्षपूजाफलप्रदं पवित्रकंकुरुष्वाद्ययन्मयादुष्कृतंकृतं शुद्धोभवाम्यहंदेवत्वत्प्रसादान्महेश्वर मूलसंपुटितेना-नेनदत्वांगदेवताभ्योनाम्नासमर्प्य महानैवेद्यंदत्वा नीराज्य मणिविद्रुममालाभिरित्यादिभिर्दमनारोपणोक्तमं-त्रैःप्रार्थयित्वा गुरवेब्राह्मणेभ्यश्चदत्वास्वयंधारयेत् तथा मासंपक्षमहोरात्रंत्रिरात्रंधारयेत्तथा देवेतंसूत्रसंदर्भ-देशकालविवक्षया अकरणेतुतत्रैव पवित्रारोपणंकालेनकरोतिकथंचन तदायुतंजपेन्मंत्रंस्तोत्रंवापिसमाहित इत्युक्तं **इति पवित्रारोपः** श्रावणशुक्लचतुर्दशीपूर्वयुताग्राह्या अत्रवक्तव्योविशेषश्चैत्रचतुर्दश्यामुक्तः ।

प्रातःकाळीं नित्यपूजा करून गंध, दूर्वा, अक्षतायुक्त पवित्रक घेऊन **"ॐ देवदेव नमस्तुभ्यं गृहाणेदं पवित्रकं ॥ पवित्रीकरणार्थाय वर्षपूजाफलप्रदं ॥ पवित्रकं कुरुष्वाद्य यन्मया दुष्कृतं कृतं ॥ शुद्धो भवाम्यहं देव त्वत्प्रसादान्महेश्वर ॥"** या मूलसंपुटित मंत्रानें पवित्रक अर्पण करून अंगदेवतांस नाममंत्रानें समर्पून महानैवेद्य

१ वनमालालक्षणं तत्रैव । आरभ्य मुकुटं यावत्सूत्रैर्विरचिता शुभा ॥ आपादलंबिनी माला वनमाला प्रकीर्तिता ॥ २ विस्तृत जी कनिष्ठांगुली, तिनें युक्त जी मुष्टि तद्युक्त जो हात तो अरत्नि होय.

देऊन आरती करावी. नंतर "**मणिविद्रुममालाभिः**" इत्यादिक दमनारोपणीं पूर्वीं सांगितलेल्या मंत्रांनीं प्रार्थना करून गुरु व ब्राह्मण यांसही पवित्रकें देऊन आपण स्वतां धारण करावें. तसेंच "महिना, पंधरा दिवस, अहोरात्र, किंवा त्रिरात्र देशकालानुसार देवाचेठायीं तें सूत्र ( पवित्रक ) ठेवावें." हें पवित्रारोपण न केलें तर **रामार्चनचंद्रिकेंत**च—"पवित्रारोपण उक्तकालीं न करील तर मंत्राचा ( त्या देवतेच्या मूलमंत्राचा ) दहा हजार जप किंवा स्तोत्राचा जप एकाग्रचित्तानें करावा" असें सांगितलें आहे. **इति पवित्रारोपणम्** ॥ श्रावणशुद्ध चतुर्दशी पूर्वतिथीनें विद्ध अशी घ्यावी. येथें सांगावयाचा विशेष प्रकार तो चैत्रचतुर्दशीस सांगितला आहे, तो तेथें पाहा.

**अथोपाकर्म** तत्रबह्वृचानां**प्रयोगपारिजातेशौनकः** अथातःश्रावणेमासेश्रवणर्क्षयुतेदिने श्रावण्यांश्रावणेमासिपंचम्यांहस्तसंयुते दिवसेविदधीततदुपाकर्मयथोदितं अध्यायोपाकृतिंकुर्यात्तत्रोपासनवह्निनेति अत्र पौर्णमास्युपसंहारन्यायेनयजुर्वेदिपरेति**हेमाद्रिः** अत्रहस्तयुक्तापंचम्युक्ता **कारिकापि** तन्मासेहस्तयुक्तायांपंचम्यांवातदिष्यते इति केवलपंचम्यांहस्तयुतेन्यस्मिनदिनेइतितु**हेमाद्रिः** उपासनवह्निनेतितु कर्मद्वयमिदंकेचिल्लौकिकाग्नौप्रकुर्वतेइतिकारिकोक्तलौकिकाग्निनाविकल्पते तत्राप्यध्याप्यैरन्वारब्धइति**सूत्रात्**सशिष्यत्वे तदधिकारिकस्याचार्याग्नौनान्यस्याग्नावन्योजुहुयादितिनिषेधाल्लौकिकएव तदभावेतुस्मार्तेइति[3] **निगर्वः** ।

## आतां उपाकर्म ( श्रावणी ) सांगतो.

**प्रयोगपारिजातांत शौनक**—"यानंतर श्रावणमासांत श्रवणनक्षत्रयुक्त दिवशीं, श्रावणीपौर्णिमेस, श्रावणमासाच्या पंचमीस, हस्तयुक्त दिवशीं हें उपाकर्म यथोक्त विधीनें करावें. वेदांचें उपाकरण ( स्वीकार ) उपासनाग्नीनें करावें." एथें श्रावणीपौर्णमासी सांगितली ती उपसंहारन्यायानें यजुर्वेदिविषयक आहे. असें **हेमाद्रि** सांगतो. या कर्माविषयीं हस्तयुक्त पंचमी सांगितली आहे. **कारिकाही**—"अथवा त्या पूर्वोक्तमासांत हस्तयुक्त पंचमीस तें उपाकर्म इष्ट आहे." केवळ पंचमीस व हस्तयुक्त इतर दिवशीं करावें, असें तर **हेमाद्रि** सांगतो. वरील वचनांत 'उपासनवह्निना' असें आहे तें तर "हीं दोन कर्में ( उपाकर्म व उत्सर्जन ) कितीएक लौकिकाग्नीवर करितात" ह्या कारिकेंत सांगितलेल्या लौकिकाग्नीशीं विकल्पित ( उपासनाग्नीनें किंवा लौकिकाग्नीनें करावें असें ) होतें तो विकल्प असतांही "शिष्यांनीं अन्वारब्ध अशा आचार्यानें करावें" ह्या सूत्रावरून शिष्यांसह करावयाचें असतां त्या उपकर्माविषयीं शिष्य अधिकारी असल्यामुळें 'दुसऱ्याच्या अग्नीवर अन्यानें होम करूं नये' या वचनानें आचार्याच्या अग्नीवर होमाचा निषेध असल्यामुळें लौकाग्नीवरच करावें असें झालें. शिष्यांच्या अभावीं तर स्मार्ताग्नीवर करावें, असें **निगर्व** सांगतो.

यद्यपि**दीपिकायां** वेदोपाकृतिरोषधिप्रजननेपक्षेसितेश्रावणेइति शुक्लपक्षोपिसर्वेषांमुख्यकालत्वेनोक्तः वक्ष्यमाण[4]**गार्ग्य**वचनेनछंदोगान्प्रतिविहितस्यतस्याविरोधिनःसर्वान्प्रतिप्रवृत्तिश्च तथापिश्रावणमाससंबंधस्यसूत्रोक्तत्वात्कृष्णपक्षेपिकार्यमितिवृद्धाः **तथाचसूत्रम्** अथातोध्यायोपाकरणमोषधीनांप्रादुर्भावेश्रवणेनश्रावणस्यपंचम्यांहस्तेनवा अत्रश्रवणोमुख्योन्येगौणाः तत्प्राथम्यात् तस्याहर्द्वययोगे**हेमाद्रौव्यासः** धनिष्ठासंयुतंकुर्याच्छ्रावणंकर्मयद्भवेत् तत्कर्मसफलंज्ञेयमुपाकरणसंज्ञितं श्रवणेनतुयत्कर्मह्युत्तराषाढसंयुतं संवत्सरकृतोध्यायस्तत्क्षणादेवनश्यतीति **गार्ग्योपि** उदयव्यापिनित्वेवविष्णवर्क्षेघटिकाद्वयं तत्कर्मसफलंज्ञेयंतस्यपुण्यंत्वनंतकं इति पूर्वेद्युरुत्तराषाढायोगेपरेद्युःश्रवणाभावेघटिकाद्वयन्यूनेवापंचम्यादौकार्यं नतुपूर्वविद्धायांसंगवमात्रे अपवादाभावात् किंच परेद्युःसंगवास्पर्शेनिषिद्धपूर्वाग्रहणेकिंमानं संगववाक्यंश्रवणवाक्यंचेतिचेत् तर्हि[5]व्रीहिवाक्यादश्वशफवाक्याच्चमाषमिश्राणामप्युपादानंस्यादितिमहत्पांडित्यं निषेधानुप्रवेशान्नैरपेक्ष्यबाधानेतिचेत् इहापितुल्यं एतेनपर्वाप्यौदयिकंव्याख्यातं निषेधानुप्रवेशस्योभयत्रतुल्यत्वात् ।

आतां जरी **दीपिकेंत**—"ओषधी उत्पन्न झाल्या असतां श्रावणशुक्लपक्षांत वेदांचें उपाकरण करावें" असा शुक्लपक्षही सर्वांस मुख्य काळ सांगितला आहे; आणि पुढें सांगावयाच्या 'शुक्लपक्षे तु हस्तेन उपाकर्मापराह्णिकं' ह्या गार्ग्यवचनानें

---

१ उपाकर्मेतिकर्मनामधेयं । अध्यायोपाकरणमित्यादेस्तु अधीयते यः सोध्यायो वेदस्तस्योपाकरणं उपक्रममित्यर्थः । २ अधीयंत इत्यध्यायावेदास्तेषामुपाकृतिरारंभः । ३ स्मार्ते इति शिष्याभावेपि स्मार्तासत्त्वे लौकिको बोध्यः । ४ शुक्लपक्षे तु हस्तेन उपाकर्मापराह्णिकम् । ५ व्रीहिभिर्यजेत, 'अश्वशफपरिमितैर्यजेत' इति वाक्ये ।

छंदोगशाख्यांना शुक्लपक्ष सांगितलेला असून तो अविरुद्ध असल्यामुळें सर्वशाख्यांना प्रवृत्तही होत आहे तरी श्रावणमासाचा संबंध सूत्रानें उक्त असल्यामुळें कृष्णपक्षांतही करावें, असें वृद्ध सांगतात. तेंच सूत्र सांगतो—"आतां अध्यायांचें ( वेदांचें ) उपाकरण ओषधींचा प्रादुर्भाव असतां श्रावणमासाचे श्रवणनक्षत्रावर, पंचमीस, किंवा हस्तनक्षत्रावर करावें." याविषयीं श्रवण मुख्य. इतर काल गौण होत. कारण, तो प्रथम सांगितला आहे. त्या श्रवणाचा दोन दिवस योग असतां सांगतो **हेमाद्रींत व्यास**—जें उपाकरण कर्म तें श्रवणयुक्त धनिष्ठा नक्षत्रावर करावें म्हणजे सफल होतें. आणि उत्तराषाढायुक्त श्रवणावर जें होतें त्या योगानें एकवर्षपर्यंत केलेलें अध्ययन तत्क्षणींच नष्ट होतें". **गार्ग्य**ही—"उदयव्यापि श्रवणनक्षत्र दोन घटिका असलें तरी त्या दिवशीं केलेलें कर्म सफल होतें व त्याचें पुण्य अनंत आहे." पूर्वदिवशीं उत्तराषाढायोग व दुसऱ्या दिवशीं श्रवण नाहीं किंवा दोनघटिकांहून न्यून असेल तर त्या वेळीं पंचमी इत्यादि कालीं करावें, पण उत्तराषाढाविद्ध अशा श्रवणावर संगवकालीं ( पांच भाग केलेल्या दिनाच्या दुसऱ्या भागीं ) करूं नये. कारण, उत्तराषाढाविद्ध निषेधाचा अपवाद नाहीं. आणखी असें कीं, दुसऱ्या दिवशीं श्रवणाचा संगवकालास स्पर्श नसतां निषिद्ध अशी पूर्वतिथि घेण्याविषयीं काय प्रमाण आहे? जर पुढें सांगावयाचें 'संगवकालीं करावें' हें वाक्य आणि 'श्रवणावर करावें' हें वाक्य प्रमाण आहे, असें म्हटलें तर 'व्रीहिभिर्यजेत' ( व्रीहींनीं होम करावा ), 'अश्वशफपरिमितैर्यजेत' ( घोड्याच्या पायांच्या खुरांत राहतील तितक्यांनीं होम करावा ) त्या दोन वाक्यांवरून, व्रीहि अल्प असल्यामुळें त्यांत माष ( उडीद ) मिश्रणानें घोड्याच्या खुर परिमिति करून घ्यावे, असें होईल, हें मोठें पांडित्य म्हणावयाचें आहे! आतां असें म्हणतों कीं, 'माषांनीं होम करूं नये' या निषेधाचा त्यांत प्रवेश असल्यामुळें माष येत नाहींत. असें म्हटलें तर एथेंही उत्तराषाढाविद्धाचा निषेध असल्यामुळें उत्तराषाढायुक्ताचें ग्रहण होत नाहीं हें समान आहे. यावरून पर्व ( पौर्णिमा ) देखील घ्यावयाचें तें उदयव्यापि घ्यावें, असें बोधित झालें. कारण, पूर्वाचा निषेध दोन्ही ठिकाणीं ( श्रवण व पर्व यांविषयीं ) समान आहे.

श्रवणयुतदिनेसंक्रांत्यादौतु उपाकर्मनकुर्वंतिक्रमात्सामर्ग्यजुर्विदः ग्रहसंक्रांतियुक्तेषुहस्तश्रवणपर्वस्विति**हेमाद्रौ**निषेधात्पंचम्यादयोग्राह्याः **मदनरत्नेपि** यदिस्याच्छ्रावणंपर्वग्रहसंक्रांतिदूषितं स्यादुपाकरणंशुक्लपंचम्यांश्रावणस्यतु **स्मृतिमहार्णवे** संक्रांतिर्ग्रहणंवापियदिपर्वणिजायते तन्मासेहस्तयुक्तायांपंचम्यांवातदिष्यते तत्रापि **प्रयोगपारिजाते वृद्धमनुकात्यायनौ** अर्धरात्रादधस्तात्चेत्संक्रांतिर्ग्रहणंतदा उपाकर्मनकुर्वीतपरतश्चेन्नदोषकृदिति **मदनरत्नेगार्ग्योपि** यद्यर्धरात्रादर्वाक्तुग्रहःसंक्रमणंवच नोपाकर्मतदाकुर्याच्छ्रावण्यांश्रवणेपिवा एतेनग्रहणसंक्रांतिकालश्रवणसत्त्वएवनिषेधोनान्यथेतिमूर्खशंकापरास्ता ग्रहविशिष्टानां हस्तश्रवणपर्वणांप्रत्येकंनिषेधेतद्युतोपाकर्मनिषेधेचविशिष्टोद्देशवाक्यभेदात् पंचम्यांसंक्रांतौनिषेधाभावापत्तेश्च तेनार्धरात्रात्पूर्वंग्रहसंक्रमसत्त्वएवोपाकर्मनिषेधोनतद्योगएव यत्तु प्रतिपन्मिश्रितेनैवनोत्तराषाढसंयुते श्रवणेश्रावणंकुर्युर्ग्रहसंक्रांतिवर्जिते इतिप्रतिपन्मिश्रनिषेधकंवचनंतन्निर्मूलम् ।

श्रवणयुक्त दिवशीं संक्रांति वगैरे असेल तर "ग्रहण किंवा संक्रांतियुक्त अशा हस्त-श्रवण-पर्वावर अनुक्रमानें सामवेदी, ऋग्वेदी, यजुर्वेदी हे उपाकर्म करीत नाहींत" असा **हेमाद्रींत** निषेध असल्यामुळें पंचम्यादिक काल घ्यावे. **मदनरत्नांत**ही—"जर श्रावणीपौर्णिमा ग्रहण किंवा संक्रांति यांनीं दूषित होईल तर श्रावणाच्या शुक्लपंचमीस उपाकरण होईल." **स्मृतिमहार्णवांत**—"जर पर्वाचे ठायीं संक्रांति किंवा ग्रहण होईल तर त्या मासांत हस्तयुक्त पंचमीस तें उपाकरण इष्ट आहे." संक्रांत्यादि असतांही सांगतो—**प्रयोगपारिजातांत वृद्धमनु व कात्यायन** "त्या दिवशीं मध्यरात्रीच्या आंत जर संक्रांति किंवा ग्रहण असेल तर उपाकर्म करूं नये. मध्यरात्रीच्या पुढें असेल तर दोष नाहीं." **मदनरत्नांत गार्ग्य**ही—"जर अर्धरात्रीच्या आंत ग्रहण किंवा संक्रांत असेल तर श्रावणपौर्णिमासीस किंवा श्रवणावर उपाकर्म करूं नये." यावरून ग्रहणकालीं व संक्रांतिकालीं श्रवण असेल तरच निषेध आहे. ग्रहण व संक्रांती होण्याच्या आंत श्रवण असतां निषेध नाहीं, अशी मूर्खशंका खंडित झाली. कारण, ग्रहणयुक्त हस्त, श्रवण, पर्व या प्रत्येकाचा निषेध केला असतां व तसल्या नक्षत्रादियुक्त उपाकर्माचा निषेध केला असतां विशिष्टाचा ( ग्रहणविशिष्ट श्रवणादिकांचा ) उद्देश करून निषेधाचें विधान झाल्यामुळें भिन्न भिन्न वाक्यें होतील, हा दोष समजावा. आणि ग्रहण व संक्रांतियुक्त श्रवणाचाच निषेध केला असतां पंचमीस संक्रांत असेल तर निषेध होणार नाहीं. तेणेंकरून अर्धरात्रीच्या पूर्वीं ग्रहण किंवा संक्रांत असेल तरच उपाकर्माचा निषेध आहे. ग्रहणादिकांचा योग श्रवणादिकांस असतांच निषेध नाहीं. आतां जें "ग्रहणसंक्रांतिरहित श्रवणावर श्रावणी करावी. प्रतिपदायुक्त किंवा उत्तराषाढायुक्त श्रवणावर करूं नये" असें प्रतिपदायुक्त श्रवणाचें निषेधकवाक्य तें निर्मूल आहे.

अत्रच वेदोपाकरणेप्राप्तेकुलीरेसंस्थितेरवौ उपाकर्मनकर्तव्यंकर्तव्यंसिंहयुक्तके इतिवचनंदेशांतरविषयंनर्म-

दोत्तरभागेतुकर्तव्यंसिंहयुक्तके कर्कटेसंस्थितेभानावुपाकुर्यात्तुदक्षिणइति**बृहस्पतिवचना**दिति**प्रयोगपारिजातेनोक्तं पराशरमाधवीयेप्येवं** सामगानांसिंहस्थरवावुक्तेस्तद्विषयइदं पुरोडाशचतुर्धाकरणवदुपसंह्रियते तेषामेवदेशव्यवस्था नतुबह्वृचादिपरं तेषांसूत्रेचांद्रश्रावणोक्तेः सौरेपंचम्ययोगान्इतितुवयंपश्यामः यत्तु**कालादर्शे** अध्यायानामुपाकर्मश्रावण्यांतैत्तिरीयकाः बह्वृचाःश्रवणेकुर्युःसिंहस्थोर्कोभवेद्यदि सहस्तशुक्लपंचम्यांवातद्ग्रहणसंक्रमे असिंहार्केप्रोष्ठपद्यांश्रवणेनव्यवस्थयेति तन्मूलालेखना**च्चिंत्यम्** ।

या ठिकाणीं "वेदांचें उपाकरण प्राप्त असतां सूर्य कर्काला असेल तर उपाकर्म करूं नये. सिंहराशीस सूर्य असतां करावें." असें वचन तें इतर देशविषयक आहे. कारण, "नर्मदेच्या उत्तरभागीं सिंहराशीस सूर्य असतां उपाकर्म करावें. आणि दक्षिणभागीं कर्कास सूर्य असतां करावें" असें **बृहस्पति**वचन आहे म्हणून **प्रयोगपारिजातानें** उक्त आहे. **पराशरमाधवीयांत**ही असेंच आहे. सामवेद्यांना सिंहस्थ रवि असतां उपाकर्म सांगितल्यामुळें त्यांविषयींच ह्या वचनानें—जसें 'पुरोडाशं चतुर्धा करोति' ह्या सामान्य पुरोडाशचतुर्धाकरणवाक्याचा 'आग्नेयं चतुर्धा करोति, ( आग्नेयपुरोडाश चतुर्धा करावा ) ह्या वाक्यानें उपसंहार ( एक विषयावर म्हणजे आग्नेयपुरोडाशावर चतुर्धाकरणाचें पर्यवसान ) केला आहे तसा—येथें उपसंहार केला आहे. त्यांना ( सामगांना ) च नर्मदोत्तरीं सिंहास सूर्य असतां इत्यादि पूर्वोक्त देशव्यवस्था समजावी. बह्वृचादिकांविषयीं नाहीं. कारण, यांच्या सूत्रांत चांद्रश्रावणमास सांगितला आहे. सौरमास श्रावण म्हटला तर पंचमी सांपडत नाहीं, असें तर आम्हीं ( कमलाकरभट्ट ) समजतों. आतां जें **कालादर्शांत**—"वेदांचें उपाकर्म तैत्तिरीयशाख्यांनीं सिंहराशीस सूर्य असेल तर श्रावणीपौर्णमासीस करावें. बह्वृचांनीं श्रवणावर करावें त्या दिवशीं ग्रहण किंवा संक्रांत असेल तर हस्तयुक्त पंचमीस करावें. सिंहराशीस सूर्य गेला नसेल तर प्रौष्ठपदी पौर्णमासीस व श्रवणावर पूर्वोक्त व्यवस्थेनें करावें" असें वचन आहे त्याचें मूळ ग्रंथकारानें लिहिलें नसल्यामुळें तें चिंत्य ( प्रमाणशून्य ) आहे.

श्रावणेसस्यानुद्गमादौतु**बह्वृचपरिशिष्टे** अवृष्ट्यौषधयस्तस्मिन्मासेतुनभवंतिचेत् तदाभाद्रपदेमासिश्रवणेनतदिष्यतेइति तत्राप्यनुद्गमेतु कुर्यादेवतद्वार्षिकमित्याचक्षतेइति**सूत्रात्** वर्षतौभववार्षिकं एतच्चशुक्रास्तादावपिकार्यं उपाकर्मोत्सर्जनंचपवित्रदमनार्पणमिति**दमनारोपे**लिखितवचनात् नित्यनैमित्तिकेजप्येहोमे यज्ञक्रियासुच उपाकर्मणिचोत्सर्गेग्रहवेधोनविद्यतइति **प्रयोगपारिजातेसंग्रहोक्तेः** पर्वणिग्रहणेसतिपूर्वत्रिरात्रादिवेधाभाववक्तुमिदं तेनपर्वणिग्रहणेपिचतुर्दश्यांश्रवणेकार्यमिति**हेमाद्रिः** अस्तंप्रथमारंभस्तुनभवति **गुरुभार्गवयोर्मौढ्ये**बाल्येवावार्धकेपिवा तथाधिमाससंसर्पमलमासादिपुद्विजे प्रथमोपाकृतिर्नस्यात्कृतंकर्मविनाशकृदितितत्रैव**कश्यपोक्तेः** अत्रप्रथमारंभेवृद्धिश्राद्धंकुर्यादिति**नारायणवृत्तौ** एतच्चाधिमासेनकार्यं उपाकर्मतथोत्सर्गःप्रसवाहोत्सवाष्टकाः मासवृद्धौपरंकार्यावर्जयित्वातुपैतृकमिति**ज्योतिःपराशरोक्तेः** उत्कर्षःकालवृद्धौस्यादुपाकर्मादिकर्मणि अभिषेकादिवृद्धीनांनतूत्कर्षोयुगादिष्विति**कात्यायनोक्तेश्च** यत्तु उपाकर्मणिचोत्सर्गेह्येतदिष्टंवृषादितइति**ऋष्यशृंग**वचनं तत्सामगविषयं तेषांसिंहार्कएवोक्तेः एतच्चापराह्णेकार्यं उपाकर्मापराह्णेस्यादुत्सर्गःप्रातरेवत्विति अध्यायानामुपाकर्मकुर्यात्कालेऽपराह्णिके पूर्वाह्णेतुविसर्गःस्यादितिवेदविदोविदुरितिच**हेमाद्रौगोभिलोक्तेः वस्तुतस्तु** भवेदुपाकृतिःपौर्णमास्यांपूर्वाह्णएवत्विति **प्रचेतसोवचनात्** पूर्ववाक्यंसामगविषयं तेषामपराह्णएवोक्तेरित्यनुपदंवक्ष्यते **दीपिकापि** अस्यतुविधेःपूर्वाह्णकालःस्मृतइति ।

श्रावणांत ओषधी न झाल्यावर सांगतो—**बह्वृचपरिशिष्टांत**—"वृष्टि न झाल्यामुळें त्या मासांत ओषधि उत्पन्न न होतील तर त्या वेळीं भाद्रपदांत श्रवणावर तें उपाकर्म इष्ट आहे." त्या भाद्रपदांतही ओषधी न होतील तर "तें वार्षिक म्हणजे वर्षाऋतूंत होणारें उपाकर्म करावेंच, असें सांगतात" असें सूत्र आहे. हें उपाकर्म शुक्रास्तादिकांतही करावें. कारण, "उपाकर्म, उत्सर्जन, पवित्रारोपण व दमनारोपण हें करावें" असें दमनारोपणाचे प्रसंगीं लिहिलेलें वचन आहे. "नित्य व नैमित्तिक कर्म, जप, होम, यज्ञकर्म, उपाकर्म, आणि उत्सर्जन यांविषयीं ग्रहवेध नाहीं." असें **प्रयोगपारिजातांत संग्रहवचन** आहे. पर्वाचे ठिकाणीं ग्रहण असतां पूर्वी त्रिरात्रादिवेधाचा अभाव सांगण्याकरितां हें वचन आहे. तेणेंकरून पर्वाचेठायीं ग्रहण असलें तरी चतुर्दशीस श्रवणावर करावें, असें **हेमाद्रि** सांगतो. गुरुशुक्रास्तांत प्रथमारंभ तर होत नाहीं

कारण, "गुरुशुक्रांचें अस्त, बाल्य किंवा वार्धक्य, अधिकमास, संसर्पमास, मलमास, इत्यादिकांत पहिलें उपाकर्म होत नाहीं. केलें तर तें नाश करणारें आहे" असें तेथेंच **कश्यप**वचन आहे. उपाकर्माच्या प्रथमारंभीं वृद्धिश्राद्ध करावें, असें **नारायणवृत्तींत** सांगितलें आहे. हें उपाकर्म ( प्रथमारंभावांचूनही ) अधिकमासांत करूं नये. कारण, "उपाकर्म, उत्सर्जन, वाढदिवस, अष्टकाश्राद्धें हीं अधिमास असतां पुढच्या मासांत करावीं. पित्र्यकर्म त्या मासांत ( अधिकांत ) करावें." असें **ज्योतिःपराशर**वचन आहे. आणि "अधिकमास असतां उपाकर्मादिकर्माविषयीं व राजाभिषेकादि संबंधी वृद्धींचा उत्कर्ष ( पुढच्या मासांत नेणें ) करावा. युगादिश्राद्धांचा उत्कर्ष नाहीं" असें **कात्यायन**वचनही आहे. आतां जें "दशहरा, चार युगादि, उपाकर्म व उत्सर्ग यांविषयीं उत्कर्ष नाहीं. कारण, हें दशहरादि कर्म वृषादि संक्रांतींत ( सौरमासांत ) इष्ट आहे" असें **ऋष्यशृंग**वचन तें **सामवेदि**विषयक आहे. कारण, त्यांचें उपाकर्म सिंहसंक्रांतींतच सांगितलें आहे. हें उपाकर्म अपराह्णीं करावें. कारण, "उपाकर्म अपराह्णीं होतें व उत्सर्जन प्रातःकालींच होतें. वेदांचें उपाकर्म अपराह्णकालीं करावें. पूर्वाह्णीं उत्सर्जन करावें असें वेदवेत्ते जाणतात." असेंही **हेमाद्रींत गोभिलवचन** आहे. वास्तविक म्हटलें तर "पौर्णिमासीस पूर्वाह्णींच उपाकरण होतें" ह्या **प्रचेतसाचे** वचनावरून पूर्वीचें ( अपराह्णबोधक ) वचन सामवेदिविषयक आहे. त्या सामगांना अपराह्णींच सांगितलें आहे, तें जवळच पुढें सांगूं. **दीपिकाही**—"ह्या विधीचा ( उपाकर्माचा ) पूर्वाह्णकाल स्मृतींत उक्त आहे."

**याजुषास्तु**पर्वणिकुर्युः तत्रापस्तंबैरौदयिकंग्राह्यमन्यैस्तुपूर्वं पर्वण्यौदयिकेकुर्युःश्रावणंतैत्तिरीयकाः बह्वृचाःश्रवणेकुर्युर्ग्रहसंक्रांतिवर्जितइति**गार्ग्योक्तेः** संप्राप्तवाक्छ्रुतीर्ब्रह्मापर्वण्योदयिकेपुनः अतोभूतदिनेतस्मिन्नोपाकरणमिष्यतइति**कालिकापुराणाच्च** अथचेद्दोषसंयुक्तेपर्वणिस्यादुपाक्रिया दुःखशोकामयग्रस्ताराष्ट्रेतस्मिन्द्विजातयइति **मदनरत्नहेमाद्र्यादौगार्ग्येणदोषोक्तेः** अत्र**शिंगाभट्टीयेविशेषः** श्रवणःश्रावणंपर्वसंगवस्पृग्यदाभवेत तदैवौदयिकंकार्यंनान्यदौदयिकंभवेत् **पराशरमाधवीयेपिगार्ग्यः** श्रावणीपौर्णमासीतुसंगवात्परतोयदि तदैवौदयिकीग्राह्यानान्यदौदयिकीभवेत् ।

यजुर्वेद्यांनीं तर पर्वाचे ठायीं करावें. तें पर्व आपस्तंबांनीं उदयव्यापि घ्यावें. इतरांनीं पूर्वदिवशींचें घ्यावें. कारण, "तैत्तिरीय शाखांनीं ग्रहणसंक्रांतिवर्जित अशा सूर्योदयव्यापि पर्वाचे ठायीं श्रावणी करावी. बह्वृचांनीं श्रवणावर करावी." असें **गार्ग्य**वचन आहे. आणि "उदयव्यापि पर्वाचे ठायीं ब्रह्मदेवाला श्रुति प्राप्त झाल्या म्हणून चतुर्दशीयुक्त पूर्वदिवशीं उपाकरण इष्ट नाहीं" असें **कालिकापुराण**वचनही आहे. "आतां जर दोषयुक्त पर्वाचे ठायीं उपाकरण होईल तर त्या राष्ट्रांत ब्राह्मण दुःख, शोक व रोग यांनीं ग्रस्त होतील" असा **मदनरत्न हेमाद्रि** इत्यादिकांत **गार्ग्यानें** दोष सांगितला आहे. या ठिकाणीं **शिंगाभट्टीयांत विशेष** सांगतो—"श्रवणनक्षत्र व श्रावणीपौर्णिमा ज्या वेळीं संगवकालीं असेल त्या वेळींच उदयकालव्यापि घ्यावी. अन्य म्हणजे संगवव्यापि नसता उदयव्यापि घेऊं नये." **पराशरमाधवीयांत**ही **गार्ग्य**—"श्रावणी पौर्णमासी संगवकालाच्या पुढें जर असेल तर त्या वेळींच उदयव्यापि घ्यावी. इतर उदयव्यापि घेऊं नये."

कर्मकालमाह **कालादर्शेनिगमः** श्रावण्यांप्रौष्ठपद्यांवाप्रतिपत्पणमुहूर्तकैः विद्धास्यात्छंदसांतत्रोपाकर्मोत्सर्जनंभवेत् अत्रपौर्णमासीश्रवणहस्तयोरुपलक्षणं तेनतावपिसंगवस्पृशौ उदयेसंगवस्पर्शश्रुतौपर्वणिचार्कभे कुर्युर्नभस्युपाकर्मऋग्यजुःसामगाःक्रमादिति**पृथ्वीचंद्रः** तेनोदयसंगवोभयव्यापिनीमुख्या परेद्युःसंगवाभावेपूर्वेद्युरुदयाभावेचैकैकसत्त्वेपूर्वेद्युश्चतुर्दशीवेधनिषेधात्सामान्यवाक्यादौदयिकीकर्मपर्याप्ताग्राह्यानपूर्वा संगवनिमित्तपूर्वविद्धापवादाभावात नान्यदौदयिकीत्यस्यपूर्वविद्धापरत्वाभावात् तेनभाद्रादौकालांतरेस्याननुनिषिद्धे नहिग्रीष्मलाभेनिषिद्धमापग्रहणंयुक्तं अतएवपरेद्युःसंगवव्याप्तौपूर्वविद्धानिषेधः तदभावेतुनेतिमूर्खव्यवस्थाप्ययुक्ता विधिवैषम्यात् मापनिषेधपितथापत्तेश्च पूर्वविद्धावचनसत्त्वेहिसायुज्यते एवंश्रवणेपिज्ञेयं तत्र विष्णवृक्षेघटिकाद्वयमितिपूर्वोक्तविरोधात् तेनप्राशस्त्यमात्रपरमिदं **तत्त्वंतु** एतच्छुद्धाधिकपरं तेनयथाग्निहोत्रादौसायंप्रातःकालबाधसामान्येजीवनावच्छिन्नकालेदर्शादौवानुष्ठानं यथावाग्रीष्मश्वशफाद्यभावेयागाक्षिप्तनिषिद्धवर्जद्रव्येण तथात्रसंगवाभावेनिषिद्धवर्जकर्मपर्याप्तौदयिकेकालांतरेवानुष्ठानंनतुकदाचिन्निषिद्धे अपवादाभावेउत्सर्गस्यैवप्राप्तेः कात्यायनादीनांतुदिनद्वयेपूर्वाह्णव्याप्तौएकदेशस्पर्शेवापूर्वैवेति**हेमाद्रिः** यदपि

---

१ क्षयमासाच्या पूर्वींचा अधिकमास तो संसर्पमास होय. २ याजुषास्त्विति। मैत्रायणीयानां गृह्ये श्रवणस्यैवोक्तेस्तदन्ये याजुषा ग्राह्याः।

श्रावणीदुर्गनवमीदूर्वाचैवहुताशनी पूर्वविद्धाप्रकर्तव्याशिवरात्रिर्बलेर्दिनमितिब्रह्मवैवर्ते तद्ब्रह्मपवित्रश्रवणाकर्मादिदैवकर्मविषयमितिहेमाद्रिः अतएववचनानुकुलधर्मव्रतादावपिपूर्वैव मदनरत्नेप्येवं मदनपारिजातेपि पूर्वविद्धायांश्रावण्यांवाजसनेयिनामुपाकर्मेत्युक्तम् ।

कर्मकाल सांगतो **कालादर्शांत निगम**—"श्रावणी किंवा प्रौष्ठपदी पौर्णमासीनें सहा मुहूर्तांनीं ( १२ घटिकांनीं ) विद्ध प्रतिपदा असेल त्या ठिकाणीं वेदांचें उपाकर्म व उत्सर्जन होतें." वरील गार्ग्यवचनांत पौर्णमासी सांगितली ती श्रवण व हस्त यांचें उपलक्षण ( बोधक ) आहे. तेणेंकरून ते श्रवणहस्तही संगवकालस्पर्शी घ्यावे. कारण, "सूर्योदयकालीं व संगवकालीं श्रवणनक्षत्र, पर्व आणि हस्तनक्षत्र यांवर अनुक्रमानें ऋग्वेदी, यजुर्वेदी, सामवेदी यांनीं उपाकर्म करावें" असें **पृथ्वीचंद्र** सांगतो. तेणेंकरून उदयकाल व संगवकाल या दोन कालीं व्यापणारी पौर्णिमा मुख्य आहे. दुसऱ्या दिवशीं संगवकालीं नाहीं, व पूर्व दिवशीं उदयकालीं नाहीं, दोन्ही दिवशीं एक एक कालीं असेल त्या वेळीं पूर्वदिवशीं चतुर्दशीवेधाचा निषेध असल्यामुळें सामान्यवचनावरून उदयव्यापिनी कर्मकालास पुरण्याइतकी असेल ती घ्यावी. पूर्वदिवसाची घेऊं नये. कारण, संगवकालीं असल्यामुळें पूर्वविद्धा घेण्याविषयीं अपवादवचन नाहीं. वर सांगितलेलें 'संगवाच्या पुढें असेल तरच औदायिकी घ्यावी, दुसरी औदायिकी घेऊं नये' हें **गार्ग्य**वचन पूर्वविद्धा घेण्याविषयीं सांगत नाहीं. तेणेंकरून अशा स्थलीं भाद्रपदादि इतर कालीं श्रावणी होईल. पण निषिद्ध अशा चतुर्दशीयुक्त पौर्णिमेस होत नाहीं. व्रीहि न मिळतील तर निषिद्ध अशा माषांचें होमाविषयीं ग्रहण युक्त आहे काय ? युक्त नाहीं. निषिद्ध पूर्वदिवसाचें ग्रहण नाहीं म्हणूनच 'दुसऱ्या दिवशीं संगवकालव्यापिनी पूर्णिमा असली म्हणजे पूर्वविद्धेचा निषेध, दुसऱ्या दिवशीं संगवव्यापिनी नसेल तर पूर्वविद्धेचा निषेध नाहीं' ही मूर्खानें केलेली व्यवस्थाही अयुक्त आहे. कारण, पूर्वोक्त विधि विषम होईल. आणि निषिद्धपूर्वा ग्रहण केली तर माषांचा निषेध असला तरी व्रीहि अश्वशफपरिमित असले तर माषांचा निषेध, नसले तर माषांचा निषेध नाहीं, अशी व्यवस्था प्राप्त होईल. पूर्वविद्धा ग्रहण करण्याविषयीं वचन असेल तर ती वरील व्यवस्था युक्त झाली असती. याप्रमाणें ऋग्वेद्यांना श्रवणाविषयींही समजावें. म्हणजे वरील मूर्खानें केलेल्या व्यवस्थेप्रमाणें दुसऱ्या दिवशीं संगवव्यापि श्रवण असेल तर उत्तराषाढायुक्त श्रवणाचा निषेध. अन्यथा नाहीं. ही व्यवस्था उत्तराषाढायुक्त घेण्याविषयीं वचन असतें तर युक्त झाली असती तें बरोबर नाहीं. कारण, 'उदयव्यापि दोन घटिका श्रवण असतां तें कर्म सफल होतें' ह्या पूर्वोक्त **गार्ग्य**वचनाशीं विरोध येतो. यावरून 'नान्यदौदयिकी भवेत्' हें वरील **गार्ग्य**वचन संगवकालाला प्राशस्त्यमात्रबोधक आहे. खरें म्हटलें तर—हें वचन, पूर्वदिवशीं शुद्ध पौर्णिमा असून दुसऱ्या दिवशीं उर्वरित जी पौर्णिमा तीविषयीं आहे. तेणेंकरून अग्निहोत्रहोमाचा सायंकाल व प्रातःकाल यांचा बाध झाला म्हणजे कोणत्याही अडचणीमुळें होम राहिले असतां जिवंत आहे तोंपर्यंत कधींही किंवा दर्शादिकालीं त्या होमांचें अनुष्ठान करावें. अथवा अश्वशफपरिमित व्रीहींच्या अभावीं यागाला कोणतें तरी द्रव्य पाहिजे म्हणून निषिद्धवर्ज्यद्रव्यानें होम करावा. तसा एथें संगवकालीं पौर्णिमा नसेल तर निषिद्ध वर्ज्य व कर्माला पुरे इतक्या उदयव्यापि पौर्णिमेस किंवा इतर कालीं उपाकर्म करावें. पण कधींही निषिद्ध दिवशीं करूं नये. कारण, अपवादवाक्य नसल्यामुळें उत्सर्ग ( सामान्य ) 'अतो भूतदिने०' हें निषेधक वचनच प्राप्त होतें. **कात्यायनादिकांना** तर दोन दिवशीं सकलपूर्वाह्णव्यापिनी पूर्णिमा असतां किंवा एकदेशव्यापिनी असतां पूर्वाच समजावी, असें **हेमाद्रि** सांगतो. आतां जें "श्रावणीपूर्णिमा, दुर्गानवमी, दूर्वाष्टमी, हुताशनीपूर्णिमा, शिवरात्रि आणि बलिप्रतिपदा ह्या पूर्वविद्धा कराव्या" असें **ब्रह्मवैवर्त**वचन तें ब्रह्मपवित्र, श्रवणाकर्म इत्यादि दैवकर्मविषयक आहे, असें **हेमाद्रि** सांगतो. याच वचनावरून कुलधर्म, व्रत इत्यादिकांविषयीं देखील पूर्वाच घ्यावी. **मदनरत्नांत**ही असेंच आहे. **मदनपारिजातांत**ही—पूर्वविद्ध अशा श्रावणीपूर्णिमेस वाजसनेयींचें उपाकर्म होतें, असें सांगितलें आहे.

**मदनरत्नेतु** पर्वण्यौदयिकेकुर्युःश्रावणंतैत्तिरीयकाइति**बह्वृचपरिशिष्टे**बह्वृचान्प्रतिकर्मविधानार्थंप्रवृत्ते तत्रतैत्तिरीयककर्मविध्ययोगात्पूर्वोक्तकालिकापुराणादौसामान्यतऔदयिकपर्वप्राप्तेस्तन्निषेधेनबह्वृचानांश्रवणविधानात्तैत्तिरीयकपदमनुवादत्वात्तस्यचप्राप्त्यधीनत्वात् प्राप्तेश्चयजुर्वेदिमात्रपरत्वात्सर्वयजुर्वेद्युपलक्षणार्थं अवयुत्यानुवादोवा[1] नतुविधायकं येनविशेषविधिनोपसंहारःस्यात अनुवादत्वाल्लक्षणानदोषः अन्यथात्वौदयिकपर्वविशिष्टोपाकर्मोद्देशेनकर्तृविधौ कर्तृविशिष्टंवाऔदयिकपर्वविधौवाक्यभेदापत्तेः तस्मात्तैत्तिरीयकपदाविवक्षयासर्वयजुर्वेदिनामौदयिकमेवपर्वेत्युक्तं तन्न नतावत्परिशिष्टेबह्वृचान्प्रत्येवविधिः धनिष्ठाप्रतिपद्युक्तत्वाष्ट्रऋक्षसमन्वितमित्यादितदुदाहृतेएवपरिशिष्टेवेदांतरधर्मविधीनांदर्शनात् नाप्यनुवादोयं कालिकापुराणा-

---

१ पृथक्कृत्यानुवादो वा.

बह्वृचादीनामपितदापत्तेः कुर्युरित्यस्यविधित्वेनतस्यैवार्थवादत्वेनैतत्प्राप्तानुवादित्वाच्च नचतैत्तिरीयकाणां-गृह्येतद्विधिरस्ति येनानुवादःस्यात् नचवाक्यभेदः तैत्तिरीयकमात्रस्यकर्ममात्रस्यवाउद्देश्यत्वायोगेनहविरार्तिवत् अष्टवर्षंब्राह्मणमुपनयीतइतिवच्चागत्याविशिष्टस्योद्देश्यत्वात् अन्यथोत्तरार्धेबह्वृचपदस्याप्यविवक्षापत्त्याश्रवणस्यसर्वसाधारण्यापत्तेः तस्मान्**हेमाद्रिमत**मेवयुक्तमितिदिक् ।

**मदनरत्नांत** तर—'उदयव्यापि पर्वाचे ठायीं तैत्तिरीय शाखयांनीं श्रावणी करावी' हें **बह्वृचपरिशिष्ट बह्वृचां**ना कर्म सांगण्याकरितां प्रवृत्त आहे. त्यांत तैत्तिरीय शाखयांचा कर्मविधि होत नसल्यामुळें पूर्वी सांगितलेल्या 'संप्राप्तवान् श्रुतीर्ब्रह्मा०' ह्या कालिकापुराणादिवाक्यांत सामान्येंकरून उदयव्यापि पर्व सर्वांना प्राप्त असल्यामुळें त्याचा ह्या परिशिष्टानें बह्वृचांना निषेध करून श्रवणाचें विधान केल्यामुळेः त्या परिशिष्टांत तैत्तिरीयकपद हें अनुवाद आहे. तो अनुवाद पूर्वी उदयव्यापि पर्वाची प्राप्ति असेल तर होतो. ती प्राप्ति कालिकापुराणवचनावरून सामान्य यजुर्वेद्यांना असल्यामुळें हें परिशिष्टांतील 'तैत्तिरीयक' पद सर्व यजुर्वेद्यांचें उपलक्षण आहे. अथवा यजुर्वेद्यांतून तैत्तिरीयकांना पृथक् करून अनुवाद केला आहे. ज्या विशेष विधीनें उपसंहार ( एक विषयावर पर्यवसान ) होईल असानें हें तैत्तिरीयक पद विधायक नाहीं. अनुवादक झाल्यामुळें, तैत्तिरीयक पदाची यजुर्वेद्यांवर लक्षणा. अशी लक्षणा केली असतां दोष नाहीं. विधायक मानिलें तर उदयव्यापि पर्वयुक्त उपाकर्माचा उद्देश करून तैत्तिरीयक कर्त्यांचें विधान केलें किंवा तैत्तिरीयक कर्तृयुक्त उपाकर्माचा उद्देश करून उदयव्यापि पर्वाचें विधान केलें असतां वाक्यभेद दोष येईल तो असा—'उदयव्यापिपर्वणि उपाकर्म, तच्च तैत्तिरीयकाणां' किंवा 'तैत्तिरीयका उपाकर्म कुर्युः, तच्च उदयव्यापिपर्वणि' अशीं भिन्नवाक्यें होतील. तस्मात् तैत्तिरीयक पद विवक्षित ( सार्थक ) न मानितां सर्व यजुर्वेद्यांना उदयव्यापीच पर्व समजावें. असें ( **मदनरत्नांत** ) सांगितलें आहे, तें बरोबर नाहीं. कारण, वर सांगितलें कीं, परिशिष्ट हें बह्वृचांनाच कर्मविधायक आहे असें नाहीं. कारण, "धनिष्ठा, प्रतिपदा, चित्रा यांनीं युक्त श्रावणी कर्म अनुक्रमें ऋग्यजुःसामवेद्यांनीं करावें" इत्यादि इतर वेदाच्या कर्माचे विधि त्याच परिशिष्टांत सांगितलेले दिसतात. हें वरील तैत्तिरीयक पद अनुवादही नाहीं. कालिकापुराणवचनावरून अनुवाद म्हटला तर 'संप्राप्तवान् श्रुतीर्ब्रह्मा०' ह्या कालिकापुराणवचनांत सामान्यश्रुतांना उदयव्यापि पर्वकाल सांगितल्यामुळें बह्वृचादिकांना देखील तोच काल प्राप्त होईल. आणि त्या परिशिष्टांतील 'कुर्युः' हें पद असल्यामुळें त्यानें युक्त जें वाक्य तेंच अर्थवाद ( अनुवाद ) झाल्यानें या परिशिष्टवचनानें प्राप्त जी गोष्ट तिचें अनुवादक तें वचन होईल, हाही दोष येतो. कारण, ज्या योगानें हा परिशिष्टांतील विधि अनुवाद होईल असा गृह्यांत तैत्तिरीयकाच्या गृह्यांत 'उदयव्यापि पर्वावर श्रावणी करावी' असा विधि आहे काय? नाहीं. आतां वर वाक्यभेद दोष सांगितला तो येत नाहीं. कारण, केवळ तैत्तिरीयकरूप कर्त्यांचा किंवा सामान्यकर्माचा उद्देश करून कशाचेंही विधान करीत नाहीं. तर 'तैत्तिरीयकांचें उपाकर्म' इतके विशिष्ट उद्देश करून उदयव्यापि पर्वाचें विधान, किंवा 'उदयव्यापिपर्वविशिष्ट उपाकर्म' इतके विशिष्ट उद्देश करून तैत्तिरीयक कर्त्यांचें विधान करितो, जसें—हविर्विशिष्टें[1] आर्तांचा उद्देश करून पंचशराव ओदनाचा विधि सांगितला आहे, तसें अथवा आठ वर्षांच्या ब्राह्मणाचें उपनयन करावें, या ठिकाणीं जशी दुसरी गति नसल्यामुळें अष्टवर्षविशिष्ट ब्राह्मणाचा उद्देश करून उपनयनाचें विधान,—तसें विशिष्टाला उद्देश्यत्व समजावें. असें केल्यानें वाक्यभेद नाहीं. असें न करितां तैत्तिरीयक पद वर सांगितल्याप्रमाणें अविवक्षित मानिलें तर त्याच परिशिष्टवचनाच्या उत्तरार्धांत 'बह्वृचाः श्रवणे कुर्युः' या ठिकाणीं बह्वृच पदही अविवक्षित झाल्यानें श्रवणकाल सर्वसाधारण ( इतरवेद्यांनाही ) होईल. तस्मात् हेमाद्रीचें मतच ( कात्यायनादिकांना पूर्वा इत्यादि ) युक्त आहे. ही दिशा समजावी.

इदंचशिष्यानध्यापयतआवश्यकंयस्मात् अनध्यापयतोनाधिकारइतिकर्कः श्रावण्यामपिग्रहणादिदुष्टायां-कार्तायभिन्नैःप्रौष्ठपद्यांकार्यं तैस्तुश्रावणपंचम्यां संक्रांतिर्ग्रहणंवापिपौर्णमास्यांयदाभवेत् उपाकृतिस्तुपंचम्यां-कार्यावाजसनेयिभिरितिस्मृ**तिमहार्णवे**वाजसनेयिग्रहणादिति**हेमाद्रिः** इदंचसूत्रोक्तकालपरत्वाद्बह्वृच-परमपि **सांख्यायनै**स्तुहस्तेकार्यं **आपस्तंबैराथर्वणै**श्चप्रौष्ठपद्यां **यत्तुबौधायनः** श्रावण्यांपौर्णमा-स्यामाषाढ्यांवोपाकृत्येत्यूचे तत्प्रौष्ठपद्यामपिदोषेआषाढ्यांकार्यमित्येवमर्थं तच्छाखीयविषयंवा ।

हें उपाकर्म शिष्यांना अध्ययन पढविणाराचें आवश्यक असें वर होतें. अध्यापन न करणाराला त्या असीवर अधिकार नाहीं, असें **कर्क** सांगतो. श्रावणी पौर्णमासी देखील ग्रहण, संक्रांति यांनीं दूषित असतां कात्यायनभिन्नांनीं प्रौष्ठपदीस करावें. कात्यायनांनीं तर श्रावणपंचमीस करावें. कारण, "पौर्णमासीला ज्या वेळीं संक्रांति किंवा ग्रहण असेल त्या वेळीं वाजसनेयींनीं उपाकर्म पंचमीस करावें" असें **स्मृतिमहार्णवांत** 'वाजसनेयी' पदाचें ग्रहण केलें आहे, असें **हेमाद्रि**

१ हविरार्तांचा विशिष्ट उद्देश याचा अर्थ प्रथमपरिच्छेदांत ग्रहणनिर्णयांत बौद्धतुल्यांच्या मतखंडनावसरीं लिहिला आहे तो पहा.

सांगतो. हें वचन सूत्रोक्त कालबोधक असल्यामुळें बह्वृचांविषयीं देखील आहे. सांख्यायनांनीं तर हस्तावर करावें. आपस्तंबांनीं व आथर्वणांनीं प्रौष्ठपदीस करावें. आतां जें **बौधायन**—"श्रावणी पौर्णमासीस किंवा आषाढीस उपाकरण करून" असें सांगता झाला, तें प्रौष्ठपदीसही दोष असतां आषाढीस करावें, अशाच अर्थाकरितां आहे. अथवा त्या बौधायनशाखीयांविषयीं आहे.

सामगास्तुश्रावणेहस्तेकुर्युः बह्वृचाःश्रवणेचैवहस्तर्क्षेसामवेदिनइति**निर्णयामृतेगोभिलोक्तेः** सोप्युत्तरः धनिष्ठाप्रतिपद्युक्तंत्वाष्ट्रऋक्षसमन्वितं श्रावणंकर्मकुर्वीरन्नृग्यजुःसामपाठकाः इति**मदनरत्नेपरिशिष्टोक्तेः गार्ग्योऽपि** सिंहेरवौतुपुष्यर्क्षेपूर्वाह्णेविवरेबहिः छंदोगामिलिताःकुर्युरुत्सर्गंस्वस्वछंदसां शुक्लपक्षेतुहस्तेनउपाकर्मापराह्णिकमिति अविवरेग्रहादिदोषहीने विचरेदितिपाठोऽज्ञानकृतः पुष्यर्क्षेपूर्वाह्णे उत्सर्गः अपराह्णिकमुपाकर्मेत्यन्वयः अन्यस्तुविशेषःपूर्वमेवोक्तः ।

सामवेद्यांनीं तर श्रावणांतील हस्तावर करावें. कारण, "बह्वृचांनीं श्रवणावर आणि सामवेद्यांनीं हस्तावर करावें" असें **निर्णयामृतांत गोभिल**वचन आहे. तो हस्तही दुसऱ्या दिवशींचा घ्यावा. कारण, "ऋग्वेदी, यजुर्वेदी, सामवेदी यांनीं अनुक्रमानें धनिष्ठा, प्रतिपदा, चित्रा यांनीं युक्त अशी श्रावणी करावी" असें **मदनरत्नांत परिशिष्ट**वचन आहे. **गार्ग्य**ही—"सिंहास सूर्य असतां अदूषित पुष्य नक्षत्रावर घराच्या बाहेर पूर्वाह्णीं छंदोगांनीं एकत्र मिळून आपापल्या वेदाचें उत्सर्जन करावें. आणि शुक्लपक्षांतील हस्तनक्षत्रावर अपराह्णकालीं उपाकर्म करावें." या वचनांत 'अविवरे' असें पद आहे त्याचा अर्थ—ग्रहणादिदोषरहित, असा समजावा. 'विचरेत्' असा पाठ अज्ञानानें केलेला आहे. पुष्यावर पूर्वाह्णीं उत्सर्जन व हस्तावर अपराह्णीं उपाकर्म, असा अन्वय ( संबंध ) समजावा. इतर विशेष पूर्वींच सांगितला आहे.

**प्रयोगपारिजातेगोभिलः** उपाकर्मोत्सर्जनंचवनस्थानामपीष्यते धारणाध्ययनांगत्वाद्गृहिणांब्रह्मचारिणां उत्सर्जनंचवेदानामुपाकरणकर्मच अकृत्वावेदजप्येनफलंनाप्नोतिमानवः सर्वथालोपेतुकृच्छ्रउपवासश्च वेदोदितानांनित्यानामिति**मनुना**ऽभोजनोक्तेः एवमुत्सर्गेऽपि ।

**प्रयोगपारिजातांत गोभिल**—"उपाकर्म व उत्सर्जन हें वेदांचें धारण व अध्ययन यांचें अंग असल्यामुळें वानप्रस्थांनाही इष्ट आहे. गृहस्थांना व ब्रह्मचाऱ्यांना आहेच. वेदांचें उत्सर्जन व उपाकर्म केल्यावांचून वेदाच्या जपाचें फल मनुष्याला प्राप्त होत नाहीं." उपाकर्माचा सर्वथा लोप झाला असतां कृच्छ्र आणि उपवास करावा. कारण, वेदविहित नित्यकर्में झालीं नसतां मनूनें उपवास सांगितला आहे. याप्रमाणें उत्सर्जनाविषयींही समजावें.

अथप्रसंगादत्रैवोत्सर्जनमुच्यते तच्चपौषमासेरोहिण्यांतत्कृष्णाष्टम्यांवाकार्यं पौषमासस्यरोहिण्यामष्टकायामथापिवा जलांतेछंदसांकुर्यादुत्सर्गंविधिवद्बहिरिति**याज्ञवल्क्योक्तेः** श्रावण्यांप्रौष्ठपद्यांवोपाकृतौक्रमेणपौषशुक्लप्रतिपदिमाघशुक्लप्रतिपदिवाकार्यं अर्धपंचमान्मासानधीयीतेतिते**नैवोक्तेः** अर्धःपंचमोयेषु सार्धचतुरइत्यर्थः यत्तु**हारीतः** अर्धपंचमान्मासानधीत्योर्ध्वमुत्सृजेत् पंचार्धपष्ठान्वेतितदाषाढ्युपाकर्मविषयं **बौधायनास्तु** पौष्यांमाघ्यांवाकुर्युः पौष्यांमाघ्यांचोत्सृजेदिति**तत्सूत्रात् तैत्तिरीयै**स्तु तैष्यांकार्यं तैष्यांपौर्णमास्यांरोहिण्यांवाविरमेदिति**तत्सूत्रात् बह्वृचै**स्तुमाघ्यांकार्यं अध्यायोत्सर्जनंमाघ्यांपौर्णमास्यांविधीयतइति**कारिकोक्तेः** कातीयास्तुभाद्रपदेकुर्युः उत्सर्गश्चैतिनंदादितिष्यांप्रौष्ठपदेपिवेति**कात्यायनोक्तेः** सामगास्तुसिंहार्केपुष्येकुर्युः तथाचसिंहेरवौत्विति**गार्ग्य**वचनंपूर्वमुक्तं सर्वैरुपाकर्मदिनेवाकार्यं पुष्येतूत्सर्जनंकुर्यादुपाकर्मदिनेथवेति**हेमाद्रौखादिरगृह्योक्तेः** यदासिंहस्थेसूर्येसतितन्मध्यस्थहस्तनक्षत्रात्प्राक्पुष्यःकर्कटस्थोभवति तदातस्मिन्पुष्येउत्सर्गंकृत्वातदुत्तरहस्तेउपाकर्मसामगाःकुर्युः मासेप्रौष्ठपदेहस्तात्पुष्यःपूर्वोभवेद्यदा तदाचश्रावणेकुर्यादुत्सर्गंछंदसांद्विजइतित**त्रैवपरिशिष्टोक्तेः** अत्रद्वावपिसौरौमासौज्ञेयौ तेषांसौरस्यैवोक्तेः ।

## आतां प्रसंगेंकरून एथेंच उत्सर्जन सांगतों.

तें पौषमासांत रोहिणीनक्षत्रावर किंवा पौष कृष्ण अष्टमीस करावें. कारण, "पौषमासीं रोहिणी नक्षत्रावर किंवा

१ ग्रामाद्बहिरित्यर्थः ।

कृष्णाष्टमीस वेदांचा यथाविधि उत्सर्ग बाहेर उदकाजवळ करावा" असें **याज्ञवल्क्यवचन आहे. श्रावणी किंवा भाद्रपदी** पौर्णिमेस उपाकरण केलें असतां अनुक्रमानें पौषशुक्लप्रतिपदेस किंवा माघशुक्लप्रतिपदेस उत्सर्जन करावें. कारण, "साडेचार महिने अध्ययन करावें" असें **याज्ञवल्क्यानें**च सांगितलें आहे. आतां जें **हारीत** "अर्धपंचम ( साडेचार ) किंवा अर्धषष्ठ ( साडेपांच ) महिने अध्ययन करून पुढें उत्सर्जन करावें," असें सांगतो, तें आषाढी पौर्णिमेस उपाकरण केलें असतां तद्विषयक होय. **बौधायनांनीं** तर पौषी किंवा माघी पौर्णिमेस करावें. कारण, "पौषी पौर्णिमेस किंवा माघी पौर्णिमेस उत्सर्जन करावें." असें बौधायनसूत्र आहे. तैत्तिरीयांनीं तर पौषी पौर्णिमेस करावें. कारण, "पौषी पौर्णिमेस किंवा रोहिणी नक्षत्रीं ( तैत्तिरीयांनीं ) उत्सर्जन करावें" असें त्यांचें सूत्र आहे. **ऋग्वेदीयांनीं** तर माघी पौर्णिमेस करावें. कारण, "वेदांचें उत्सर्जन माघी पौर्णिमेस करावें" असें **कारिकेंत** उक्त आहे. **कात्यायनशाखीयांनीं** तर भाद्रपदमासीं करावें. कारण, "भाद्रपदमासीं प्रतिपदादि तिथीस उत्सर्ग करावा" असें **कात्यायन**वचन आहे. सामगांनीं तर सिंहास सूर्य असतां पुष्यनक्षत्रीं करावें. कारण, "सिंहस्थ सूर्य असतां पुष्यनक्षत्रीं करावें" असें **गार्ग्यवचन** पूर्वीं सांगितलें आहे. अथवा सर्वांनीं उपाकर्मदिवशीं करावें. कारण, "पुष्यनक्षत्रीं अथवा उपाकर्मदिवशीं उत्सर्जन करावें" असें **हेमाद्रींत खादिरगृह्यसूत्र**वचन आहे. जेव्हां सिंहस्थ सूर्य असतां त्यांतील हस्तनक्षत्राच्या पूर्वीं पुष्यनक्षत्र कर्कसंक्रांतीनें होईल तेव्हां त्या पुष्यनक्षत्रीं उत्सर्जन करून पुढाल हस्तनक्षत्रावर उपाकर्म सामवेदीयांनीं करावें. कारण, "भाद्रपदमासीं हस्ताच्या पूर्वीं पुष्य जेव्हां होईल तेव्हां श्रावणांत वेदांचें उत्सर्जन द्विजानें करावें" असें **हेमाद्रींत**च **परिशिष्ट**वचन आहे. येथें श्रावण व भाद्रपद हे दोनही मास सौर घ्यावे. कारण त्यांना सौरच मास उक्त आहेत.

अत्रविशेषमाह**कार्ष्णाजिनिः** उपाकर्मणिचोत्सर्गेयथाकालंसमेत्यच ऋषीन्दर्भमयान्कृत्वापूजयेत्तर्पयेत्ततइति उपाकर्मण्युत्सर्गेचत्रिरात्रंपक्षिणीमहोरात्रंवानध्यायइति**मिताक्षरायामुक्तं** अत्रनदीनांरजोदोषोनास्ति उपाकर्मणिचोत्सर्गेरजोदोषोनविद्यतेइति**गार्ग्योक्तेः** ।

येथें **विशेष सांगतो-कार्ष्णाजिनि-**"उपाकर्म व उत्सर्जन यांचेठायीं यथाकालीं सर्वांनीं एकत्र मिळून दर्भमयऋषींचें पूजन करून तर्पण करावें." उपाकर्म व उत्सर्जन यांचेठायीं त्रिरात्र किंवा पक्षिणी किंवा अहोरात्र अनध्याय करावा असें **मिताक्षरेंत** सांगितलें आहे. या उपाकर्म उत्सर्जनाविषयीं नद्यांना रजोदोष नाहीं. कारण, "उपाकर्म व उत्सर्जन यांचेठायीं रजोदोष नाहीं" असें **गार्ग्य**वचन आहे.

अत्रैवरक्षाबंधनमुक्तं **हेमाद्रौभविष्ये** संप्राप्तेश्रावणस्यांतेपौर्णमास्यांदिनोदये **स्नानंकुर्वीतमतिमान्**श्रुतिस्मृतिविधानतः उपाकर्मादिकंप्रोक्तमृषीणांचैवतर्पणं शूद्राणांमंत्ररहितंस्नानंदानंचशस्यते उपाकर्मणिकर्तव्यमृषीणांचैवपूजनं ततोपराह्णसमयेरक्षापोटलिकांशुभां कारयेदक्षतैःशस्तैःसिद्धार्थैर्हेमभूषितैरिति अत्रोपाकर्मानंतर्यस्यपूर्णतिथावार्थिकस्यानुवादोनतुविधिः गौरवात्प्रयोगविधिभेदेनक्रमायोगाच्छूद्रादौतदयोगाच्च तेनपरत्रशुद्धुपाकरणेपिपूर्वैवग्राह्येत्यपराह्णेतत्करणंसिद्धं इदंभद्रायांनकार्यं भद्रायांद्वेनकर्तव्येश्रावणीफाल्गुनीतथा श्रावणीनृपतिंहंतिग्रामंदहतिफाल्गुनीतिसंग्रहोक्तेः तन्मस्त्वेतुरात्रावपितदंतेकुर्यादितिनिर्णयामृते इदंप्रतिपद्युतायांनकार्यं नंदायादर्शनेरक्षाबलिदानंदशासुच भद्रायांगोकुलक्रीडादेशनाशायजायते इति**मदनरत्नेब्रह्मवैवर्तात् भविष्ये** उपलिप्तेगृहमध्येदत्तचतुष्केन्यसेत्कुंभं पीठेतत्रोपविशेद्राजामात्यैर्युतश्चसुमुहूर्ते तदनुपुरोधानृपतेरक्षांबध्नीतमंत्रेण इदंरक्षाबंधनंनियतकालत्वाद्भद्रावर्ज्यग्रहणदिनेपिकार्यंहोलिकावत् ग्रहसंक्रांत्यादौरक्षानिषेधाभावात सर्वेषामेववर्णानांसूतकंराहुदर्शने इतितत्कालीनकर्मपरएवनत्वन्यत्र अन्यथाहोलिकायांकागतिः अतएव नित्यनैमित्तिकेजप्यहोमेयज्ञक्रियासुच उपाकर्मणिचोत्सर्गेग्रहवेधोनविद्यतइतिनियतकालीनेतदभावइतिदिक् उपाकर्मणितद्दिनभिन्नपरं तत्रतन्निषेधादित्युक्तंप्राक् मंत्रस्तु येनबद्धोबलीराजादानवेंद्रोमहाबलः तेनत्वामपिबध्नामिरक्षेमाचलमाचल ब्राह्मणैःक्षत्रियैर्वैश्यैःशूद्रैरन्यैश्चमानवैः कर्तव्योरक्षिताचारोद्विजान्संपूज्यशक्तितइति अत्रैवहयग्रीवोत्पत्तिः तदुक्तं **कल्पतरौ** श्रावण्यांश्रवणेजातः**पूर्वंहयशिराहरिः** जगादसामवेदंतुसर्वकल्मषनाशनं स्नात्वासंपूजयेत्तंतुशंखचक्रगदाधरम् ।

त्या पौर्णिमेचे ठायींच रक्षाबंधन करण्याविषयीं सांगितलें आहे. तें असें-**हेमाद्रींत भविष्यपुराणांत-"श्रावणमा**साच्या अंतीं पौर्णिमेस सूर्योदयीं झाल्यानें स्नान करून श्रुतिस्मृतिविधानानें उपाकर्म व ऋषींचें तर्पण करावें. **शूद्रांनीं मंत्ररहित**

स्नान, दान करावें, तें प्रशस्त होय. उपाकर्माचे ठायीं ऋषींचें पूजन करावें, नंतर अपराह्णीं शुभकारक रक्षापोटलिका ( राखी ) स्वच्छ तांदूळ व सुवर्णयुक्त सिद्धार्थ ( पांढरे शिरीष ) यांहींकरून करावी." येथें हें रक्षाबंधन उपाकर्मानंतर सांगितलें तें पूर्णतिथि असतां अर्थात् त्या दिवशीं प्राप्त झालें त्याचा अनुवाद आहे, उपाकर्मानंतरच करावें, असा विधि नाहीं. कारण तसा विधि केला असतां गौरव येतें. याचा प्रयोग भिन्न असल्यामुळें उपाकर्म केल्यावर हें रक्षाबंधन करावें, असा क्रमही होत नाहीं. आणि शूद्रादिकांना उपाकर्म नसल्यामुळें क्रमही संभवत नाहीं. तेणेंकरून दुसऱ्या दिवशीं उपाकरण असतांही पूर्वदिवशीं अपराह्णीं रक्षाबंधन करावें असें सिद्ध होतें. हें रक्षाबंधन भद्रेचे ठायीं करूं नये. कारण, "भद्रा ( कल्याणी ) असतां श्रावणी व फाल्गुनी ह्या दोन करूं नयेत. श्रावणी राजाचा नाश करिते, फाल्गुनी ग्रामदाह करिते" असें **संग्रहवचन** आहे. दिवसा भद्रा असतां भद्रा गेल्यावर रात्रीसही करावें, असें **निर्णयामृतांत** सांगितलें आहे. हें रक्षाबंधन प्रतिपदायुक्त पौर्णिमा तिथीस करूं नये. कारण, "प्रतिपदेंत रक्षाबंधन, दशमीस बलिदान, भद्रेला ( द्वितीयेला ) गोकुलक्रीडा ही देशनाशकारक होते" असें **मदनरत्नांत ब्रह्मवैवर्त**वचन आहे. **भविष्यपुराणांत** "सारवलेल्या घरांत चतुष्कोणी वेदीवर कुंभस्थापना करून तेथें आसनावर सुमुहूर्तीं राजानें बसावें. नंतर उपाध्यायानें राजास मंत्रानें रक्षाबंधन करावें." हें रक्षाबंधन नियमितकालीं सांगितल्यामुळें भद्रावर्ज्यग्रहणदिवशींही करावें. कारण, जशी होलिका तद्वत् हें रक्षाबंधन आहे. ग्रहण, संक्रांति इत्यादिक असतांही रक्षाबंधनाचा निषेध नाहीं. "सर्व वर्णास ग्रहणसंबंधी सूतक आहे" असें जें वचन तें तत्कालीन ( ग्रहणकालीन ) कर्मविषयक आहे, अन्यत्र नाहीं. असें नसेल तर होलिकेविषयीं गति काय? म्हणूनच "नित्य, नैमित्तिक, जप, होम, यज्ञक्रिया, उपाकर्म, उत्सर्जन यांचे ठायीं ग्रहणवेध नाहीं." यावरून नियतकालीं होणाऱ्या कर्माविषयीं ग्रहणदोष नाहीं, असें दिग्दर्शन केलें आहे. ह्या वचनांत 'उपाकर्माविषयीं ग्रहणवेध नाहीं' असें सांगितलें तें ग्रहणदिवसाहून भिन्नदिवशीं नाहीं, असें समजावें. कारण, ग्रहणदिवशीं उपाकर्माचा निषेध आहे, असें पूर्वी उक्त आहे. **रक्षाबंधनाचा मंत्र–येन बद्धो बलीराजा दानवेंद्रो महाबलः ॥ तेन त्वामपि बध्नामि रक्षे माचल माचल ॥** "ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व इतर मनुष्य यांनींही ब्राह्मणाचें यथाशक्ति पूजन करून जसा आचार असेल तसें रक्षाबंधन करावें." ह्याच पौर्णिमेचे ठायीं हयग्रीवाचा अवतार झाला, तो **कल्पतरूंत** सांगतो— "श्रावणी पौर्णिमेस श्रवणनक्षत्रावर पूर्वी हयग्रीव उत्पन्न झाला व त्यानें सर्व पापनाशक असा सामवेद सांगितला, म्हणून त्या दिवशीं स्नान करून शंख चक्र, गदा धारण करणाऱ्या हयग्रीवरूप हरीचें पूजन करावें."

अत्राश्वलायनेनश्रवणाकर्मोक्तं श्रावण्यांपौर्णमास्यांश्रवणाकर्मेति तत्रास्तमययोगिनीग्राह्या अस्तमितेस्थालीपाकंश्रपयित्वेति**सूत्रात्** अतएवनिशीष्टेर्दर्शप्रयोगांतःपातनियमात्तदंगैःप्रसंगसिद्धिरुक्ता**द्वादशे** अन्यथा परेद्युःप्राप्तौकःप्रसंगःप्रसंगस्य **याज्ञिकास्तु**पौर्णिमादर्शशब्दयोःपर्वांत्यक्षणवदहोरात्रवाचित्वात्तत्रैवकर्मकालव्याप्तिर्ग्राह्येतिविकृतित्वाच्छेषपर्वेच्छंति श्रावणादिमासचतुष्टयकृष्णपक्षद्वितीयासुअशून्यशयनव्रतं तत्रचंद्रोदयव्यापिनी दिनद्वयेतत्त्वेपरेति**निर्णयामृते** इतिकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौश्रावणमासः ।

ह्या पौर्णिमेस **आश्वलायनांनीं** श्रवणाकर्म सांगितलें आहे—"श्रावणी पौर्णिमेस श्रवणाकर्म करावें." ह्या श्रवणाकर्माविषयीं पौर्णिमा सूर्यास्तव्यापिनी घ्यावी. कारण, "सूर्यास्तीं स्थालीपाक श्रपण करून" असें **आश्वलायन** सूत्र आहे. सूर्यास्तव्यापिनी घ्यावी म्हणूनच रात्रीं इष्टीच्या दर्शप्रयोगामध्यें हें श्रवणाकर्म अंतर्भूत होत असल्यामुळें त्या दर्शप्रयोगाच्या अंगांनीं ह्या श्रवणाकर्माची प्रसंगसिद्धि बाराव्या अध्यायांत **जैमिनींनीं** सांगितली आहे. दुसऱ्या दिवसाची पौर्णिमा श्रवणाकर्माला घेतली तर प्रसंगसिद्धीचा प्रसंग काय आहे? **याज्ञिक** तर पौर्णिमा व दर्श ह्या शब्दांनीं पर्वाचे अंत्यक्षणानें युक्त असा **अहोरात्र** घ्यावयाचा असल्यामुळें त्याच दिवशीं कर्मकालव्यापिनी असेल ती घ्यावी, असें विकृतिइष्टीच्या कालांत सांगितलें आहे व ही विकृति असल्यामुळें शेष ( उर्वरित ) पर्व घ्यावें, असें इच्छितात. श्रावण इत्यादि चार महिन्यांच्या कृष्णपक्षांच्या द्वितीयांस अशून्यशयनव्रत सांगितलें आहे, त्याविषयीं चंद्रोदयव्यापिनी द्वितीया घ्यावी. दोन दिवशीं चंद्रोदयीं व्याप्ति असतां परा घ्यावी, असें **निर्णयामृतांत** सांगितलें आहे. **इति श्रावणमासाची महाराष्ट्र टीका समाप्त झाली.**

सिंहेपराःषोडशघटिकाःपुण्यकालः अन्यत्पूर्ववत् अत्रगोप्रसवेऽ**द्भुतसागरेनारदः** भानौसिंहगतेचैव

---

१ अस्तमयेति । कर्मकालशास्त्रात् दिनद्वयेतद्व्याप्तावव्याप्तौवापरा विकृतित्वात् एवंच सर्पबलावपीति । श्रवणाकर्मसर्पबल्यकरणे प्रायश्चित्तमाह प्रजापतिः । हविर्यज्ञेष्वशक्तस्यलुप्तमप्येकमादितः । प्राजापत्येनशुध्येतपाकसंस्थासुचैवहीति । एतच्च श्रवणाकर्म सर्पबल्याश्वयुजीकर्माग्रयणप्रत्यवरेषु प्रवर्तते तत्रप्रायश्चित्तांतरादर्शनात् । २ चंद्रोदयेति । एकभक्तेदिवाभक्तेनिशिचंद्रोदयव्रते । तिथिस्तात्कालिकीग्राह्यापारणेत्वपरातिथिरितिस्मृतिसंग्रहात् । इदंचंद्रोदयव्रतं चंद्रोदयेचंद्रार्घ्यदानविधानात् ।

यस्यगौःसंप्रसूयते मरणंतस्यनिर्दिष्टंपङ्क्भिर्मासैर्नसंशयः तत्रशांतिंप्रवक्ष्यामियेनसंपद्यतेशुभं प्रसूतांतत्क्षणादेवतांगांविप्रायदापयेत् ततोहोमंप्रकुर्वीतघृताक्तैराजसर्षपैः आहुतीनांघृताक्तानामयुतंजुहुयात्ततः व्याहृतिभिश्चायंहोमः सोपवासःप्रयत्नेनदद्याद्विप्रायदक्षिणामिति तथा सिंहराशौगतेसूर्येगोप्रसूतिर्यदाभवेत् पौषेचमहिषीसूतेदिवैवाश्वतरीतथा तदानिष्टंभवेत्किंचित्तच्छांत्यैशांतिकंचरेत् अस्यवामेतिसूक्तेनतद्विष्णोरितिमंत्रतः जुहुयाच्चतिलाज्येनशतमष्टोत्तराधिकं मृत्युंजयविधानेनजुहुयाच्चतथायुतं श्रीसूक्तेनततःस्नायाच्छांतिसूक्तेनवापुनः मध्यरात्रेनिशीथेवायदागौःक्रंदतेसदा ग्रामेवास्वगृहेवापिशांतिकंपूर्ववद्दिशेत् एवंश्रावणेवडवाप्रसवोदिनेनिषिद्धः तदुक्तमथर्ववेदिनां**गार्ग्यपरिशिष्टे** माघेबुधेचमहिषीश्रावणेवडवादिवा सिंहेगावःप्रसूयंतेस्वामिनोमृत्युदायकाइति अत्रतदुक्तामृताख्याशांतिःकार्या ।

**आतां भाद्रपद** सांगतो. सिंहसंक्रांतीला पुढच्या सोळा घटिका पुण्यकाळ. रात्रीं संक्रांत असतां पूर्वीप्रमाणें समजावें. सिंहसंक्रांतींत गाई व्याली असतां सांगतो—**अद्भुतसागरांत—नारद** "सूर्य सिंहसंक्रांतीस गेला असतां ज्याची गाय प्रसूत होईल त्यास सहा महिन्यांनीं मरण होतें, यांत संशय नाहीं. त्याविषयीं शांति सांगतो की जी केली असतां कल्याण होईल. प्रसूत झालेली गाय त्याच वेळीं ब्राह्मणास द्यावी, नंतर घृतयुक्त राजसर्षपांनीं होम करावा. घृतयुक्त आहुती अयुत ( १०००० ) द्याव्या. व्याहृतींनीं हा होम करावा. प्रयत्नानें उपवास करून ब्राह्मणांस दक्षिणा द्यावी." तसेंच "सिंहराशीस सूर्य गेला असतां जेव्हां गाय प्रसूत होईल, पौषमासांत महिषी प्रसूत होईल, तसेंच श्रावणांत दिवसास घोडी प्रसूत होईल तेव्हां कांहीं अनिष्ट होईल तें जाण्याकरितां शांति करावी. "**अस्यवाम०**" या सूक्तानें व "**तद्विष्णोः**" या मंत्रानें तिळयुक्तघृताचा अष्टोत्तरशत होम करावा. मृत्युंजयमंत्रानें विधानानें तसाच अयुत ( १०००० ) होम करावा. नंतर श्रीसूक्तानें अथवा शांतिसूक्तानें पुनः स्नान करावें. रात्रीचे तीन भाग करून मध्यभागीं किंवा दोनप्रहर रात्रीं जर गाई गांवांत किंवा स्वगृहांत निरंतर ओरडेल तर पूर्वाप्रमाणें शांति करावी." याप्रमाणेंच श्रावणमासांत दिवसा घोडी व्याली निषिद्ध होय. तें **अथर्ववेद्यांचे गार्ग्यपरिशिष्टांत** सांगतो. "माघमासांत किंवा बुधवारी महिषी, श्रावणांत दिवसा घोडी, सिंहसंक्रांतींत गाय प्रसूत होईल तर त्याच धन्यास मृत्यु येतो." येथें त्या ग्रंथांत सांगितलेली अमृताख्यशांति करावी.

भाद्रकृष्णतृतीयाकज्जलीसंज्ञा साऽपराह्णेति**दिवोदासीये**उक्तं वचनंतुहरितालिकाप्रकरणेवक्ष्यामः भाद्रकृष्णचतुर्थीबहुलाख्यामध्यदेशेप्रसिद्धा सासायाह्नव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतत्त्वेपूर्वाग्राह्या गौर्याश्चतुर्थीवटश्चेनुपूजादुर्गार्चनंदुर्भगहोलिकेच वत्समस्यपूजाशिवरात्रिंनाःपरान्वितान्नंतिनृपंसराष्ट्रमिति**दिवोदासीये**वचनात् अत्रवत्सपूजायाःपृथगुपादानाद्धेनुपूजाशब्देनबहुलाख्यागृह्यतइतिसएवव्याचख्यौ **मदनरत्नेप्येवं** अत्रगोपूजायवान्नाशनंच**तत्रैवोक्तं** भाद्रकृष्णषष्ठीहलषष्ठी सासप्तमीयुतेति**दिवोदासः** भाद्रकृष्णसप्तम्यांशीतलाव्रतं तत्रपूर्वाग्राह्येति**हेमाद्रौ** ।

भाद्रपदकृष्ण तृतीया ही **कज्जली**संज्ञक होय. ती परा घ्यावी, असें **दिवोदासीयांत** सांगितलें आहे. त्याविषयीं वचन तर हरितालिकाव्रतप्रकरणीं पुढें सांगूं. भाद्रकृष्णचतुर्थी ही बहुलानामक मध्यदेशीं प्रसिद्ध आहे. ती सायाह्नव्यापिनी घ्यावी. दोन दिवशीं सायाह्नव्यापिनी असतां पूर्वा घ्यावी. कारण, "गौरीचतुर्थी, वटपौर्णिमा, धेनुपूजा ( बहुला ), दुर्गाअष्टमी, दुर्भग, होलिका, गोवत्सद्वादशी, शिवरात्र ह्या परयुक्त घेतल्या तर राष्ट्रासहित राजाचा नाश होतो." असें **दिवोदासीयांत** वचन आहे. येथें वत्सपूजेचें पृथक् ग्रहण असल्यामुळें धेनुपूजाशब्दानें बहुलाख्या चतुर्थी घ्यावी, अशी त्यानेंच ( दिवोदासानेंच ) व्याख्या केली आहे. **मदनरत्नांत**ही असेंच आहे. या चतुर्थीचे दिवशीं गोपूजा व यवान्नप्राशन **दिवोदासीयांत** सांगितलें आहे. भाद्रकृष्ण षष्ठी ही हलषष्ठी होय. ती सप्तमीयुक्त घ्यावी असें **दिवोदास** सांगतो. भाद्रपदकृष्णसप्तमीस शीतलाव्रत सांगितलें. त्याविषयीं पूर्वा घ्यावी असें **हेमाद्रींत** आहे.

**अथजन्माष्टमी** साचकृष्णादिमासेनभाद्रपदकृष्णाष्टमी तथाभाद्रपदेमासिकृष्णाष्टम्यांकलौयुगे अष्टा-

---

१ तृतीया नभसः शुक्ला मधुश्रावणिका स्मृता । भाद्रस्य कज्जली कृष्णा शुक्ला च हरितालिका इति । २ भाद्रकृष्णेतिअमांतमासेन-श्रावणकृष्णेद्रष्टव्य भाद्रपदकृष्णचतुर्थ्यांसंकष्टचतुर्थीव्रतं स्कांदे । श्रावणेबहुलेपक्षे चतुर्थ्यांतुविधूदये । गणेशंपूजयित्वातुचंद्रायार्घ्यंप्रदीयते । श्रावणोऽमांतः व्रतंशुक्लादिमेवचेत्युक्तः । इयंचंद्रोदयव्यापिनीग्राह्या तत्कालेचंद्रार्घ्यदानोक्त्या चंद्रोदयव्रतत्वात् । चंद्रोदयव्रतेचैवतिथिस्तात्कालिकीस्मृतेत्युक्तेः । दिनद्वयेचंद्रोदयेसत्त्वेऽसत्त्वेवा पूर्वानिरूपितंसामान्यनिर्णये । ३ नव्यास्तु हलषष्ठीशीतलासप्तमीच शीतलाव्रतेमध्याह्नव्यापिनीग्राह्या पूजाव्रतेषुसर्वेषुमध्याह्नव्यापिनीतिथिरित्युक्तेः दिनद्वयेसत्त्वेऽसत्त्वे वा पूर्वा युग्मवाक्यादित्याहुः ।

विंशतिमेजातःकृष्णोसौदेवकीसुतइति**कल्पतरौब्राह्मोक्तेः** अत्रेदं**माधव**मतं अष्टमीद्वेधा जन्माष्टमीजयंतीचेति तत्राद्याकेवलाष्टमी येनकुर्वंतिजानंतःकृष्णजन्माष्टमीव्रतं तेभवंतिनराःप्राज्ञव्यालाव्याघ्राश्चकानन-इति**स्कांदात्** दिवावायदिवारात्रौनास्तिचेद्रोहिणीकला रात्रियुक्तांप्रकुर्वीतविशेषेणेंदुसंयुतामिति**पुराणांतरात्** श्रावणेवहुलेपक्षेकृष्णजन्माष्टमीव्रतं नकरोतिनरोयस्तुभवतिक्रूरराक्षसइति**भविष्योक्तेश्च**केवलाष्टम्याएवोपोष्यत्वावगतेः सैवरोहिणीयुक्ताजयंती कृष्णाष्टम्यांभवेद्यत्रकलैकारोहिणीयदि जयंतीनामसाप्रोक्ताउपोष्यासाप्रयत्नतइति**वह्निपुराणात्** अष्टमीकृष्णपक्षस्यरोहिणीऋक्षसंयुता भवेत्प्रौष्ठपदेमासिजयंतीनामसास्मृतेति**विष्णुरहस्यादि**वचनाच्च ज्योतिरादिवत्संज्ञयाकर्मभेदः रोहिणीयोगश्चाहोरात्रंमुख्यः निशीथमात्रेमध्यमः दिवसादावधमः अहोरात्रंतयोर्योगोह्यसंपूर्णोभवेद्यदि मुहूर्तमप्यहोरात्रेयोगश्चेत्तामुपोषयेदिति**वसिष्ठसंहितोक्तेः** अर्धरात्रेतुयोगोयंताराप त्युदयेसति नियतात्माशुचिःस्नातःपूजांतत्रप्रवर्तयेदिति**विष्णुधर्मोक्तेः** वासरेवानिशायांवायत्रस्वल्पापिरोहिणी विशेषेणनभोमासेसैवोपोष्यामनीषिभिरिति**पुराणांतराच्च** विशेषेणेतिश्रुतेर्भाद्रपदेपीदं श्रावणेवानभस्येवेतिवक्ष्यमाणान **गौडा**स्तुनिशीथएवरोहिणीयोगेजयंतीनान्यथेत्याहुः तन्न वासरेवानिशायांवेतिविरोधात् योगविशेषाद्गुणात्फलमित्यन्ये तेप्यकरणेदोषश्रुतेरुपेक्ष्याः ।

**आतां जन्माष्टमी** सांगतो—ती जन्माष्टमी कृष्णपक्षादिमासानें ( पौर्णिमांत मासानें ) भाद्रपदकृष्णाष्टमी जाणावी. कारण, "अठ्ठाविसाव्या कलियुगामध्यें भाद्रपदमासांत कृष्णपक्षीं अष्टमीस हा कृष्ण देवकीपुत्र झाला" असें **कल्पतरूंत ब्राह्म**वचन आहे. या व्रताविषयीं **माधव**मत असें—अष्टमी दोन प्रकारची. एक जन्माष्टमी व दुसरी जयंती. त्यांत पहिली केवल अष्टमी. कारण, "जे समजून कृष्णजन्माष्टमीव्रत करीत नाहींत ते मनुष्य अरण्यामध्यें व्याल किंवा व्याघ्र होतात" ह्या **स्कंदपुराण**वचनावरून, व "दिवसा किंवा रात्रीस जर रोहिणी कलामात्रही नाहीं तर रात्रियुक्त अष्टमी विशेषकरून चंद्रयुक्त असेल ती करावी" ह्या **पुराणांतर**वचनावरून, आणि "जो मनुष्य श्रावणमासीं कृष्णपक्षीं कृष्णजन्माष्टमीव्रत करीत नाहीं तो क्रूर राक्षस होतो" ह्या **भविष्यपुराण**वचनावरूनही केवळ अष्टमीसच उपोषण करावें असें समजतें. तीच अष्टमी रोहिणीयुक्त असतां जयंती होते. कारण, "कृष्णाष्टमीचे ठायीं जर एक कलामात्रही रोहिणीयोग असेल तर ती अष्टमी जयंतीनामक म्हटली आहे, तिचें उपोषण प्रयत्नानें करावें" असें **वह्निपुराण**वचन आहे आणि "भाद्रपदमासांत कृष्णपक्षाची अष्टमी, रोहिणीनक्षत्रयुक्त होईल तर ती जयंतीनामक होते" असें **विष्णुरहस्यादि**वचनही आहे. जसें— "अथैष ज्योतिः, अथैष विश्वज्योतिः, अथैष सर्वज्योतिः" ह्या वाक्यांत ज्योति, विश्वज्योति, सर्वज्योति ह्या भिन्न भिन्न संज्ञांनीं भिन्न भिन्न कर्मे होतात, तसें येथें जन्माष्टमी व जयंती ह्या संज्ञा निरनिराळ्या असल्यामुळे निरनिराळीं कर्मे आहेत असें समजावें. रोहिणीयोग रात्रदिवस असणें मुख्य, मध्यरात्रीसच असणें मध्यम, दिवसा प्रदोषकालीं वगैरे असणें अधम. कारण, "रोहिणीनक्षत्र व अष्टमी यांचा योग संपूर्ण अहोरात्रांत नाहीं तर अहोरात्रांत मुहूर्तमात्रही योग असला तरी तिचें उपोषण करावें" असें **वसिष्ठसंहितेंत वचन** आहे, आणि "हा नक्षत्रतिथियोग अर्धरात्रीं चंद्रोदयीं असता नियतात्मा शुद्ध होत्साता, स्नान करून त्या वेळीं पूजेस प्रारंभ करावा" असें **विष्णुधर्मांत** वचन आहे. "दिवसा किंवा रात्रीं जेव्हां स्वल्पही रोहिणी असेल तेव्हां विशेषकरून श्रावणमासीं त्याच दिवशीं बुद्धिमंतांनीं उपोषण करावें" असें **पुराणांतर**ही आहे. ह्या पुराणांतरवचनांत **'विशेषेण नभोमासे'** असें म्हटलें, यावरूनही भाद्रपदांतही हें व्रत होतें. कारण, "श्रावणांत किंवा भाद्रपदांत" असें वचन पुढें सांगावयाचें आहे, **गौड** तर मध्यरात्रीसच रोहिणीयोग असतां जयंती होते, मध्यरात्रीं नसतां जयंती नाहीं असें म्हणतात, तें बरोबर नाहीं. कारण, 'दिवसा किंवा रात्रीं अल्पही रोहिणी असतां उपोषण करावें.' असें जें पूर्वीचें पुराणांतरवचन त्याच्याशीं विरोध येईल. विशेष योगरूप जो गुण त्याचें विशेष फल आहे, असें अन्य ग्रंथकार म्हणतात. त्यांचें मतही उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे. कारण, केलें नसतां दोष सांगितला आहे.

तत्रजन्माष्टमीव्रतंनित्यं पूर्वोक्तवचनेषुअकरणेनिंदाश्रुतेः वर्षेवर्षेतुयानारीकृष्णजन्माष्टमीव्रतं नकरोतिमहाप्राज्ञव्यालीभवतिकाननइति**स्कांदे**वीप्साश्रुतेश्च नकरोतिनरोयस्त्वितिपूर्वमुक्तेरत्रस्त्रीलिंगमतंत्रं **मदनरत्ने स्कांदे**त्वत्रफलमप्युक्तं जन्माष्टमीव्रतंयेवैप्रकुर्वंतिनरोत्तमाः कारयंत्यथवालोकान्लक्ष्मीस्तेषांसदास्थिरा सिद्ध्यंतिसर्वकार्याणिकृतेजन्माष्टमीव्रतइति ।

---

१ हा प्रकार जैमिनीयन्यायमाला अध्याय ३ पाद २ अधिकरण ८ येथें पाहावा.

त्या दोन व्रतांमध्यें जन्माष्टमीव्रत नित्य आहे. कारण, पूर्वोक्त वचनांमध्यें न करणाऱ्यांची निंदा सांगितली आहे. आणि "जी स्त्री वर्षावर्षांचे ठायीं कृष्णजन्माष्टमीव्रत करीत नाहीं, ती अरण्यांत व्याली ( गर्भिणी ) होते" ह्या **स्कांद**वचनांत 'वर्षेवर्षे' अशी वीप्सा ( द्विरुक्ति ) ही आहे. आतां ह्या वचनांत स्त्रियेला दोष सांगितला तरी स्त्रियेलाच समजावयाचा नाहीं. तर 'जो मनुष्य करीत नाहीं तो क्रूर राक्षस होतो' ह्या वरील **भविष्य**वचनावरून पुरुषासही दोष समजावा. **मदनरत्नांत स्कंदपुराणांत** तर ह्या व्रताचें फलही सांगितलें आहे.—"जे मनुष्यश्रेष्ठ, जन्माष्टमीव्रत करितात किंवा लोकांकडून करवितात त्यांची लक्ष्मी निरंतर स्थिर होते व जन्माष्टमीव्रत केलें असतां सर्व कार्यें सिद्ध होतात."

जयंतीव्रतंतुनित्यंकाम्यंच महाजयार्थंकुरुतांजयंतींमुक्तयेनघ धर्ममर्थंचकामंचमोक्षंचमुनिपुंगव ददातिवांछितानर्थानयेचान्येप्यतिदुर्लभाइति**स्कांदादौ**फलश्रुतेः शूद्रान्नेनतुयत्पापंशवहस्तस्यभोजने तत्पापंलभतेकुंतिजयंतीविमुखोनरः नकरोतियदाविष्णोर्जयंतीसंभवंव्रतं यमस्यवशमापन्नःसहतेनारकींव्यथामित्यकरणे**निंदाश्रुतेश्च** यदाचपूर्वेद्युःपरेद्युर्वारोहिणीयोगस्तदाजन्माष्टमीजयंत्यामंतर्भूताज्ञेया नतुजन्माष्टमीव्रतंपृथक्कार्यं विष्णुशृंखलवत् तदुक्तं **माधवे**नैव यस्मिन्वर्षेजयंत्याख्योयोगोजन्माष्टमीतदा अंतर्भूताजयंत्यांस्यादृक्षयोगप्रशस्तितइति **मदनरत्ननिर्णयामृतगौडमैथिल**मतेप्येवं ।

जयंतीव्रत तर नित्य व काम्यही आहे. कारण, "महाजयार्थ व मुक्तिप्राप्त्यर्थ जयंतीव्रत करावें, तें जयंतीव्रत धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांना व इतर अति दुर्लभ मनोरथांना देतें" असें **स्कंदपुराणादिकांत** फल सांगितल्यावरून काम्य आहे. आणि "शवहस्तानें शूद्रान्नानें भोजन केलें असतां जें पाप लागतें तें पाप जयंतीव्रत न करणारास प्राप्त होतें. जेव्हां मनुष्य विष्णूचें जयंतीव्रत करीत नाहीं, तेव्हां तो यमाचे स्वाधीन होऊन नरकपीडा पावतो." अशा अकरणीं निंदाश्रवणावरून नित्य आहे. तर पूर्व दिवशीं किंवा दुसरे दिवशीं रोहिणीयोग असेल, त्या वेळीं जन्माष्टमी जयंतींत अंतर्भूत आणावी. जन्माष्टमीव्रत निराळें करूं नये. जसा एकादशीस विष्णुशृंखलयोग सांगितला आहे तसा हा योग होतो. तें **माधव**च सांगतो—"ज्या वर्षी जयंती योग होतो त्या वर्षी जन्माष्टमी, नक्षत्रयोगाच्या प्राशस्त्यामुळें जयंतींत अंतर्भूत होते." **मदनरत्न, निर्णयामृत, गौड, मैथिल** यांच्या मतीं असेंच आहे.

**हेमाद्र्यादय**स्तु रोहिणीसमयुतोपोष्यासर्वपापविनाशिनी अर्धरात्रादधश्चोर्ध्वंकलयावायदाभवेत् जयंतीनामसाप्रोक्तासर्वपापप्रणाशिनीत्य**ग्निपुराणा**दर्धरात्रएवरोहिणीयोगस्यप्राशस्त्यात् मुहूर्तमपिलभ्येतेत्यादीनांचार्धरात्रयोगेप्युपपत्तेर्नजयंतीव्रतंभिन्नं **नत्वं**तुहेमाद्रिमतेपि जयंतीव्रतंभिन्नमेव उदयेचाष्टमीत्यस्यतेनजयंतीपरत्वोक्तेः किंच रोहिण्यामर्धरात्रेचयदाकृष्णाष्टमीभवेत् तस्यामभ्यर्चनंशौरेर्हंतिपापंत्रिजन्मजमिति **विष्णुधर्मोक्तेः** समायोगेतुरोहिण्यांनिशीथेराजसत्तम समजायतगोविंदोबालरूपीचतुर्भुजः तस्मात्तंपूजयेत्तत्रयथावित्तानुरूपत इति**वह्निपुराणाच्चा**र्धरात्रस्यकर्मकालत्वमवसीयते अतःकर्मणोयस्ययःकालइत्यादिवचनात्पूर्वत्रैवप्राप्तेःपरदिनेसतोपिरोहिणीयोगस्यनप्रयोजकत्वं अन्यथाबुधवारादेरपितत्त्वापत्तेः किंच जयंतीशब्दोरात्रिविशेषवचनः अभिजिन्नामनक्षत्रंजयंतीनामशर्वरी मुहूर्तोविजयोनामयत्रजातोजनार्दन इति**ब्रह्मांडपुराणात्** तेनतद्योगेरोहिण्यांगौणत्वान्नव्रतभेदः यत्तुवामेरवानिशायांवर्ततत्वेमुतिकन्यायेननिशीथयोगस्यैववस्तुत्वर्थंपूर्वदिनेर्धरात्रयोगाभावेप्राशस्त्यार्थइत्याहुः यद्यपि दिवावायदिवारात्रौनास्तिचेद्रोहिणीकला रात्रियुक्तांप्रकुर्वीतविशेषेणेंदुसंयुतामित्यनेनरोहिणीयोगाभावेर्धरात्रव्याप्तेर्ग्राह्यतोक्ता तथापियस्मिन्वर्षेजयंतीयोगोनास्तितत्रजयंतीव्रतलोपप्राप्तेअष्टमीमात्रेपिजयंतीव्रतंकार्यमित्येवंपरमिदमितितदाशयः अत्रहिसत्रायागुर्यविश्वजितायजेत एषामसंभवेकुर्यादिष्टिंवैश्वानरींद्विजइतिवद्रोहिणीयोगाभावेविधानात्तत्कार्योपत्तिःस्यात् अतएवोक्तं जयंतीनामशर्वरीति ।

**हेमाद्रि**प्रभृति ग्रंथकार तर "रोहिणीयुक्त अष्टमी सर्व पातकांचा नाश करणारी असल्यामुळें तिचें उपोषण करावें. अर्धरात्रीच्या आंत किंवा बाहेर एक कलामात्रही रोहिणीचा योग जेव्हां होईल तेव्हां ती सर्वपातकनाश करणारी जयंती म्हटली आहे." ह्या **अग्निपुराणा**वरून अर्धरात्रींच रोहिणीयोग प्रशस्त असल्यामुळें, व 'मुहूर्तमात्र जरी प्राप्त होईल' इत्यादि वचनांची अर्धरात्रयोगाविषयींही उपपत्ति होत असल्यामुळें जयंतीव्रत भिन्न नाहीं. आतां यांत खरा प्रकार म्हटला तर हेमाद्रीमतीं देखील जयंतीव्रत भिन्नच आहे. कारण, 'उदये चाष्टमी किंचित्०' हें पुढील स्कांदवचन त्या हेमाद्रीनें

जयंतीपर सांगितलें आहे. हें असो; आणखी "रोहिणीनक्षत्रावर अर्धरात्रीं जेव्हां कृष्णाष्टमी होईल तेव्हां तिच्या ठिकाणीं कृष्णाचें पूजन करावें, म्हणजे तीन जन्मांचें पाप जातें" ह्या विष्णुधर्मवचनावरून, व "मध्यरात्रीं रोहिणीच्या व अष्टमीच्या योगावर बालरूपी चतुर्भुज असा गोविंद झाला, तस्मात् त्या वेळीं त्याची आपल्या द्रव्यानुरूप पूजा करावी" ह्या वह्निपुराणवचनावरूनही अर्धरात्र हा कर्मकाल आहे, असें समजतें. म्हणून 'ज्या कर्माचा जो काल तत्कालव्यापिनी तिथि घ्यावी. इत्यादि वचनावरून पूर्वदिवशींच प्राप्त असल्यामुळें दुसऱ्या दिवशीं रोहिणीयोग असला तरी तो जयंतीव्रताला प्रयोजक नाहीं. प्रयोजक आहे असें म्हटलें, तर बुधवारादिकांनाही प्रयोजकत्व प्राप्त होईल. आणखी जयंती हा शब्द विशेष रात्रीचा वाचक आहे. कारण, "ज्या वेळीं जनार्दन झाला त्या वेळचें नक्षत्र अभिजित्, रात्रि जयंती आणि मुहूर्त विजय होय" असें ब्रह्मांडपुराणवचन आहे. तेणेंकरून तादृशरात्रियुक्त रोहिणी गौण ( अमुख्य ) असल्यामुळें व्रतभेद नाहीं. आतां जें 'दिवसा किंवा रात्रीं अल्पही रोहिणी असेल' असें पूर्वी सांगितलेलें पुराणांतरवचन, तें कैमुतिकन्यायानें ( म्हणजे इतर वेळीं देखील अल्पही योग असला तरी उपोषणास योग्य होते मग मध्यरात्रीं योग असला तर काय सांगावें ? या न्यायानें ) मध्यरात्रीं योगाच्याच स्तुतीकरितां आहे व पूर्व दिवशीं अर्धरात्रीं योग नसतां व दिवसा योग असतां प्राशस्त्य बोधन करण्याकरितां आहे, असें सांगतात. जरी "दिवसा अथवा रात्रीं एक कलामात्रही रोहिणी नसेल तर रात्रियुक्त असेल ती करावी, विशेषेंकरून चंद्रोदयीं असेल ती घ्यावी" ह्या वचनानें रोहिणीयोग नसतां अर्धरात्रव्यापि ग्राह्य म्हणून सांगितली आहे. तरी ज्या वर्षी जयंतीयोग नाहीं त्या वर्षी जयंतीव्रतलोप प्राप्त असतां केवळ अष्टमीचे ठायींच जयंतीव्रत करावें, अशा अर्थाचें बोधक हें वचन आहे, असा त्यांचा आशय होय. या ठिकाणीं, जसें—"सत्रयाग करण्याविषयीं उद्युक्त होऊन तो सत्रयाग झाला नाहीं तर विश्वजित् याग करावा. त्यांच्या असंभवीं वैश्वानरी इष्टि करावी" असें सांगितलें आहे, त्याप्रमाणें अष्टमीस रोहिणीयोगाच्या अभावीं जयंतीव्रताचें विधान त्या दिवशीं केल्यामुळें जयंतीव्रताच्या कार्याची प्राप्ति होईल. म्हणूनच जयंती म्हणजे शर्वरी ( रात्रि ) असें सांगितलें आहे.

यच्च स्कांदे उदयेचाष्टमीकिंचिन्नवमीसकलायदि भवतेबुधसंयुक्ताप्राजापत्यर्क्षसंयुता अपिवर्षशतेनापि लभ्यतेवाथवानवेति यच्च पाद्मे प्रेतयोनिगतानांतुप्रेतत्वंनाशितंतुतैः यैःकृताश्रावणेमासिअष्टमीरोहिणीयुता किंपुनर्बुधवारेणसोमेनापिविशेषतः किंपुनर्नवमीयुक्ताकुलकोट्यास्तुमुक्तिदेतितद्दानादिविषयं उपवासाश्रवणादित्यनंतभट्टः जयंतीपरमितिहेमाद्रिः उदयेचंद्रोदयइतिकेचित् तन्न चंद्रोदयसत्त्वेऽसंदेहान्नवमीसकलत्वयोगान्मानाभावाच्च तेनपूर्वेद्युःसप्तमीवेधेपरदिनेसूर्योदयेघटिकापिग्राह्या पूर्वविद्धाष्टमीतिपाद्मोक्तेः इतियुक्तं अतोनव्रतभेदोनाप्यंतर्भावइत्यूचिवान् गौडास्तुनवमीक्षयपरमिदंवचनं नवमीसकलायदीतिविशिष्योक्तेः एतत्पूर्वदिनेजयंत्यभावपरमित्याहुः जयंत्यादिसर्वापवादोयमितिचूडामण्यादयः वयंतुसत्यंव्रतभेदः लोकास्तुजन्माष्टमीमेवानुतिष्ठंति नहि श्रावणेवानभस्येवारोहिणीसहिताष्टमी यदाकृष्णानरैर्लब्धासाजयंतीतिकीर्तिता श्रावणेनभवेद्योगोनभस्येतुभवेद्ध्रुवमितिमाधवीयेवसिष्ठसंहितोक्तापिभाद्रजयंतीकेनापिक्रियते अतःपूर्वेद्युरेवोपवासः यद्वागुणात्फलं सप्तमेब्रह्मवर्चसकाममुपनयेदितिवदित्यन्ये तन्न नित्यत्वानुपपत्तेः अत्र गौणमुख्यचांद्राभ्यामेकएवमासइत्यन्ये तन्न एकवाक्येउभयनिर्देशवाशब्दद्वयायोगात् अतोजयंतीव्रतस्यापिनित्यत्वादुपवासद्वयंकार्यमितिब्रूमः अतएवहेमाद्रिमदनरत्नादौजन्माष्टमीव्रतंजयंतीव्रतंचभिन्नमुक्तं भिन्नकालत्वात्सर्वथातावदंतर्भावोनेतिसिद्धं यद्यपि पूर्वापरावाल्पारोहिणीयुतैवकार्येतिग्रंथानांतत्त्वंप्रतीयतेतदपिजयंतीपरमेव इदंचकाम्यमेवेत्यनंतभट्टः तद्दूषणंहेमाद्रौज्ञेयं नित्यंकाम्यमितितुवयं।

आतां जें स्कांदांत—"जर उदयकालीं किंचित् अष्टमी असून सारा दिवस नवमी आहे व ती बुधवार व रोहिणीनक्षत्र यांनीं युक्त आहे तर असा उत्तम योग शेंकडों वर्षांनीं प्राप्त होईल किंवा न होईल." आणि जें पाद्मांत "ज्यांनीं श्रावणमासांत रोहिणीयुक्त अष्टमी केली त्यांनीं प्रेतयोनींत गेलेल्या मृतांचें प्रेतत्व नष्ट केलें असें समजावें. मग बुधवार किंवा विशेषेंकरून सोमवारयुक्त असेल तर काय सांगावें ? आणि ती नवमीयुक्त असली म्हणजे काय सांगावें ? ती अष्टमी कोटिकुलांना मुक्ति देणारी आहे." असें वचन तें दानादिविषयक आहे. कारण, ह्या वचनांत उपवासाचें श्रवण नाहीं, असें अनंतभट्ट सांगतो. हें वचन जयंतीविषयक आहे, असें हेमाद्री सांगतो. वरील स्कांदवचनांत 'उदये' याचा अर्थ चंद्रोदये, असें केचित् म्हणतात. तें बरोबर नाहीं. कारण, चंद्रोदयीं अष्टमी असेल तर संशय नाहीं, व सारा दिवस नवमी संभवत नाहीं आणि तसा अर्थ करण्याविषयीं प्रमाणही नाहीं. तेणेंकरून पूर्वदिवशीं सप्तमीवेध असतां दुसऱ्या दिवशीं सूर्योदयीं एक घटिका असली तरी ती, 'पूर्वाविद्धाष्टमी या तु' असें पुढें सांगावयाचे पाद्मवचनावरून घ्यावी, हें योग्य आहे.

म्हणून व्रतभेद नाहीं, व जयंतींत अष्टमीव्रताचा अंतर्भावही नाहीं, असें ( तो अनंतभट्ट ) सांगता झाला. **गौड** तर— नवमीचा क्षय असेल त्याविषयीं हें वचन आहे. कारण, 'उदयीं अष्टमी असून सारा दिवस नवमी असेल तर' असें विशेष करून सांगितलें आहे. त्याच्या पूर्वदिवशीं जयंती नाहीं, असा त्याचा अर्थ समजावा, असें सांगतात. जयंती, जन्माष्टमी या सर्वांचा अपवाद हें वचन आहे, असें **चूडामणि** इत्यादि ग्रंथकार सांगतात. **आम्हीं** तर—खरोखर दोन व्रतें भिन्न आहेत, असें सांगतों. आतां लोक तर जन्माष्टमीचेंच अनुष्ठान करितात. जरी जयंतीव्रत सांगितलें तरी करीत नाहींत. "श्रावणांत किंवा भाद्रपदांत ज्या वेळीं रोहिणीसहित कृष्णाष्टमी मनुष्यांस प्राप्त होईल त्या वेळीं ती जयंती अशी म्हटली आहे. श्रावणांत हा योग नसला तर भाद्रपदांत निश्चयानें योग होईल" याप्रमाणें **माधवीयांत वसिष्ठसंहितेंत** उक्त भाद्रपदांतील जयंती कोण करितात काय? कोणीही करीत नाहींत. मग जयंतीव्रत सांगितलेलें असून उपयोग काय? म्हणून पूर्वदिवशींच उपवास करावा. अथवा जयंतीरूप गुणानें विशेष फल होतें. जसें—ब्रह्मवर्चस ( वेदाध्ययनाचें तेज ) इच्छिणारानें सातव्या वर्षी उपनयन करावें. येथें सातवें वर्षरूप गुणानें ब्रह्मवर्चसरूप फल प्राप्त होतें, तसें जयंतीव्रत केल्यानें फल प्राप्त होतें, असें **अन्य** म्हणतात, तें बरोबर नाहीं. कारण, पूर्वीच्या वचनांनीं जयंतीव्रत नित्य सांगितलें आहे तें उपपन्न होणार नाहीं काम्यमात्र होईल. आतां त्या वरील वसिष्ठसंहितावचनांत श्रावण व भाद्रपद असे दोन मास म्हटले ते असे—कृष्णप्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत मास धरला तर गौण चांद्र भाद्रपद घ्यावा. आणि शुक्ल प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत मास धरला तर मुख्य चांद्र श्रावण घ्यावा. मिळून दोन सांगितले तरी तो एकच मास आहे, असें इतर म्हणतात, तें बरोबर नाहीं कारण, त्या एका वचनांत दोन मास सांगितले असून त्या ठिकाणीं दोन 'वा' हे शब्द आहेत ते लागत नाहींत. म्हणून जयंतीव्रतही नित्य असल्यामुळें दोन उपवास करावे, असें आम्हीं सांगतों. म्हणूनच **हेमाद्रि—मदनरत्न** इत्यादि ग्रंथांत जन्माष्टमीव्रत आणि जयंतीव्रत भिन्न सांगितलें आहे. दोघांचे काल भिन्न असल्यामुळें सर्वथा एकांत दुसऱ्याचा अंतर्भाव होत नाहीं. असें सिद्ध झालें. आतां जरी पूर्वा किंवा परा अल्प अष्टमी असली तरी रोहिणीयुक्त असेल तीच करावी, असें ग्रंथाचें तत्व प्रतीतीस येतें, तें देखील जयंतीविषयकच आहे. जन्माष्टमीविषयक नाहीं. हें जयंतीव्रत काम्यच आहे, असें **अनंतभट्ट** सांगतो त्याचें दूषण **हेमाद्रींत** पाहावें. नित्य व काम्य आहे असें तर बहुत लोक सांगतात.

ननुयथाविष्णुशृंखलयोगेनश्रवणद्वादशीवामनजयंत्यादिसर्वसिद्धिर्यथावैकादशीस्वल्पापिपरातथा कला-काष्ठामुहूर्तापियदाकृष्णाष्टमीतिथिः नवम्यांसैवग्राह्यास्यात्सप्तमीसंयुतानहि इत्यादिवचनादर्धोदयादिवद्योगाधिक्येफलाधिक्यात्परैवजन्माष्टमीयुक्तेतिचेन वार्तामात्र नहितत्रव्रतभेदोद्वयोर्नित्यत्वंद्वयोरकरणेदोषोवा-श्रुतः इहत्वेतैस्त्रिभिर्हेतुभिःसंज्ञाभेदाद्धर्मभेदात्कालभेदाच्चोपवासभेदःस्पष्टएव एकदैवतत्वाच्छ्रवणद्वादशीव-त्पारणालोपदोषोपि तेनव्रतद्वयमेवयुक्तं द्वयोरपिनित्यत्वात **केचित्तु** त्रेतायांद्वापरेचैवराजन्कृतयुगेतथा रोहिणीसहिताचेयंविद्वद्भिःसमुपोषिता अतःपरंमहीपालसंप्राप्तेतामसेकलौ जन्मनावासुदेवस्यभविताव्रतमु-त्तममिति**हेमाद्रौवह्निपुराणात्** कलौजन्माष्टमीव्रतमेवनजयंतीव्रतमित्याहुः तन्न तामसेकलावित्युक्तेः परमश्रेयोहेतोरस्यकलौप्राप्तिनांदुर्लभत्वमुच्यते तेनकलौतामसानकरिष्यंति किंतुधन्याएवेत्यर्थः अन्यथाशू-द्राश्चब्राह्मणाचारभविष्यंतियुगेकलौ इत्यादौविधिकल्पनापत्तेः अत्रनिशीथवेधएवग्राह्यः पूर्वोक्तवचनेपुतस्यै-वमुख्यकालत्वोक्तेः अष्टमीशिवरात्रिश्चह्यर्धरात्रादधोयदि दृश्यतेघटिकायामापूर्वविद्धाप्रकीर्तितेति**माधवी-यपुराणांतरात्** अर्धरात्रेतुरोहिण्यांयदाकृष्णाष्टमीभवेत तस्यामभ्यर्चनंशौरेर्हंतिपापंत्रिजन्मजमिति**भवि-ष्योक्तेः** अष्टमीरोहिणीयुक्तानिश्यर्धेदृश्यतेयदि मुख्यकालइतिख्यातस्तत्रजातोहरिःस्वयमिति**वसिष्ठसं-हितोक्तेश्च** ।

**शंका**—श्रवणद्वादशीप्रकरणीं विष्णुशृंखलयोग सांगितला आहे, तो योग असतां जशी-श्रवणद्वादशी, वामनजयंती इत्यादि सर्वांची सिद्धि होते, अथवा जशी-स्वल्प एकादशी असली तरी परा करावी, तशी—"ज्या वेळीं नवमींत कलामात्र, किंवा काष्ठा ( कलेचा तिसरा भाग ) मात्र अथवा मुहूर्तमात्र अष्टमी असेल त्या वेळीं, तीच घ्यावी; सप्तमीयुक्त घेऊं नये" इत्यादि वचनांवरून—जसें अर्धोदय, महोदय पर्वांचे ठायीं अधिक योग असतां अधिक फल आहे तसें अधिक योग असतां अधिक फल असल्यामुळें—पराच जन्माष्टमी युक्त आहे असें म्हणूं? **समाधान**—ही तर वार्ता बोलूं नकोस! कारण, त्या विष्णुशृंखलयोगाचे ठिकाणीं भिन्न व्रतें, किंवा दोन्ही नित्य अथवा दोन्ही न केलीं असतां दोष सांगितला आहे काय? सांगितला नाहीं. या ठिकाणीं भिन्न व्रतें, दोन्ही नित्य व दोन्ही न केलीं असतां दोष ह्या तीन कारणांनीं आणि

**दोन्ही व्रतांचीं नामें भिन्न, धर्म भिन्न, काल भिन्न** असल्यामुळें उपवास भिन्न स्पष्टच आहे. दोन्ही व्रतांची देवता एक असल्यामुळें पूर्वीच्या उपवासाचे पारणेचा लोपप्रयुक्त दोषही नाहीं. तेणेंकरून दोन व्रतेंच युक्त आहेत. कारण, दोन्ही नित्य आहेत. **केचित्** ग्रंथकार तर—"कृत, त्रेता आणि द्वापार ह्या तीन युगांमध्यें विद्वानांनीं रोहिणीसहित ह्या अष्टमीचें उपोषण केलें आहे. याउपर तामस असें कलियुग प्राप्त झालें असतां वासुदेवाच्या जन्मानें उत्तम व्रत होणार आहे" ह्या **हेमाद्रींतील वह्निपुराण**वचनावरून कलियुगांत जन्माष्टमीव्रतच आहे. जयंतीव्रत नाहीं, असें सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, 'तामस कलियुग प्राप्त असतां' असें सांगितल्यावरून हें व्रत परम कल्याणाला कारण असल्यामुळें पाप्यांना हें दुर्लभ, असें सुचविलें आहे. तेणेंकरून कलियुगांत तामस करणार नाहींत. तर धन्य असतील तेच करितील. असा त्याचा अर्थ आहे. असा अर्थ न करितां 'तामस कलि प्राप्त असतां रोहिणीसहित करणार नाहींत, तर जन्माष्टमीव्रत करितील' याचा अर्थ-रोहिणी सहित जयंतीव्रत करूं नये, असा विधि जर कराल तर "कलियुगांत शूद्र ब्राह्मणांचा आचार करतील" याचा अर्थ-शूद्रांनीं ब्राह्मणाचा आचार करावा, असा विधि होऊं लागेल. येथें सप्तमीवेधनिषेधक वचनांत वेध घ्यावयाचा तो मध्यरात्रींच वेध घ्यावा. कारण, पूर्वी सांगितलेल्या वह्निपुराणादिवचनांमध्यें मध्यरात्रच मुख्य काल सांगितला आहे. व "अष्टमी आणि शिवरात्रि जर अर्धरात्रीच्या आंत एक घटिका असेल तर ती पूर्वविद्धा म्हटली आहे" असें **माधवीयांत पुराणांतर**वचन आहे. "अर्धरात्रीं रोहिणीवर जेव्हां कृष्णाष्टमी होईल त्या वेळीं तिच्या ठिकाणीं कृष्णाचें पूजन केलें असतां तीन जन्मांचें पाप जातें." असें **भविष्य**वचन आहे. आणि "जर रोहिणीयुक्त अष्टमी मध्यरात्रीं दिसली तर तो मुख्य काल आहे, कारण, त्या कालीं हरि स्वतः उत्पन्न झाला आहे." असें **वसिष्ठसंहिता**वचनही आहे.

तत्राष्टमीद्वेधा रोहिणीरहितातद्युताच आद्यापिचतुर्धा पूर्वेद्युरेवनिशीथयोगिपरेद्युरेवोभयेद्युरनुभयेद्युश्चेति तत्राद्ययोरसंदेहएव कर्मकालव्याप्तेः जन्माष्टमीरोहिणीचशिवरात्रिस्तथैवच पूर्वविद्धैवकर्तव्यातिथिभांतेच-पारणमितिभृगूक्तेश्च अस्मात्केवलरोहिण्युपवासोपिसिद्धः अंत्ययोःपरैव प्रातःसंकल्पकालव्याप्तेराधि-क्यात् । वर्जनीयाप्रयत्नेनसप्तमीसंयुताष्टमीतिब्रह्मवैवर्ताच्च एवमंशतःसमव्याप्तावपि विषमव्याप्तौत्वा-धिक्येननिर्णयः ।

**आतां अष्टमीचे भेद सांगतो—**अष्टमी दोन प्रकारची—रोहिणीरहिता आणि रोहिणीसहिता. पहिली रोहिणी-रहिता, तिचेही चार प्रकार आहेत—पूर्वदिवशींच मध्यरात्रव्यापिनी, दुसऱ्या दिवशींच मध्यरात्रव्यापिनी, दोन्ही दिवशीं मध्यरात्रव्यापिनी, दोन्ही दिवशीं मध्यरात्रव्यापिनी नाहीं. असे चार पक्ष आहेत. त्यांमध्यें पहिल्या दोन पक्षांविषयीं संदेह नाहींच. कारण, कर्मकालव्याप्ति आहे. आणि "जन्माष्टमी, रोहिणी, व शिवरात्रि ह्या पूर्वविद्धाच कराव्या, तिथि व नक्षत्र यांच्या अंतीं पारणा करावी" असें **भृगु**वचनही आहे. या वचनावरून केवळ रोहिणीचा उपवासही सिद्ध झाला. पुढच्या दोन्ही पक्षीं पराच करावी. कारण, पूर्वदिवसापेक्षां परदिवशीं प्रातः संकल्पकालीं व्याप्ति अधिक आहे. आणि "सप्तमीयुक्त अष्टमी प्रयत्नानें वर्ज्य करावी" असें ब्रह्मवैवर्तवचनही आहे. याप्रमाणें अंशानें दोन्ही दिवशीं समव्याप्ति असतांही समजावें. अंशानें विषमव्याप्ति असेल तर जी अधिक व्याप्ति असेल ती घ्यावी.

रोहिणीयुतापिचतुर्धा पूर्वेद्युरेवनिशीथेरोहिणीयुतापरेद्युरेवोभयेद्युरनुभयेद्युश्च अत्राप्याद्ययोरसंदेहः कार्याविद्धापिसप्तम्यारोहिणीसहिताष्टमीतिपाद्मोक्तेः जयंत्यांपूर्वविद्धायामुपवासंसमाचरेदितिगारुडाच्च सप्तमीसंयुताष्टम्यांनिशीथेरोहिणीयदि भवितासाष्टमीपुण्यायावच्चंद्रदिवाकरावितिवह्निपुराणाच्च द्विती-येऽसंदेहएव तृतीयपक्षेपरैव वर्जनीयाप्रयत्नेनसप्तमीसंयुताष्टमी सऋक्षापिनकर्तव्यासप्तमीसंयुताष्टमीतिब्रह्म-वैवर्तात् चतुर्थ्येपित्रेधा पूर्वेद्युर्निशीथेष्टमीपरेह्निरोहिणी परेह्यष्टमीपूर्वेह्निरोहिणी उभयेद्युरुभयस्यनिशी-थासंबंधोवेति आद्येपरेद्युर्जयंतीयोगस्यसत्त्वात्परैवेतिमाधवः तदुक्तंतेनैव यस्मिन्वर्षेजयंत्याख्योयोगोज-न्माष्टमीतदा अंतर्भूताजयंत्यांस्यादृक्षयोगप्रशस्तितइति पूर्वविद्धाष्टमीयातुउदयेनवमीदिने मुहूर्तमपिसंयुक्ता-संपूर्णासाष्टमीभवेत् कलाकाष्ठामुहूर्तापियदाकृष्णाष्टमीतिथिः नवम्यांसैवग्राह्यास्यात्सप्तमीसंयुतानहीतिपा-द्मोक्तेश्च केचित्तुहेमाद्रौ अष्टम्याःप्राधान्यात्तस्याश्चपूर्वेद्युःकर्मकालव्याप्तित्वात्पूर्वैव पाद्मंतुपूर्वेह्निनिशी-थेष्टम्यभावेज्ञेयं अंतर्भावोक्तिस्तुमूर्खदंभ्रणमात्रमित्याहुः अन्येतुपूर्वविद्धाष्टमीवाक्येनजन्माष्टम्यांसूर्योदये-सप्तमीवेधनिषेधात् कलाघटीमात्राप्यौदयिकीग्राह्या कार्याविद्धापिसप्तम्येतिजयंतीपरं जयंत्यांपूर्वविद्धायामु-

पवासंसमाचरेदित्येकवाक्यत्वात् तत्राविद्धयोर्नित्यत्वात्कालभेदाच्चोपवासद्वयंभवत्येव यदातुकेवलाष्टमीशुद्धा-धिकातदात्यागहेतोःसप्तमीवेधस्याभावात्पूर्वैव यदिवाविद्धन्यूनातदापरदिनेग्राह्यतिथेरभावात्पूर्वैव एवंसर्वा-ण्यौदयिकेवाक्यानिसप्तमीवेधपराणि येतु जन्माष्टमींपूर्वविद्धांसऋक्षांसकलामपि विहायनवमींशुद्धामुपोष्य-व्रतमाचरेदितिव्यासोक्तेर्विद्धायाःक्षयेशुद्धनवम्यामुपवासः दशमीवेधेद्वादश्युपवासवदित्याहुः तेनिर्मूल-त्वादुपेक्ष्याः मुहूर्तमपिसंयुतेतिरोहिणीयोगेत्याज्यत्वोक्तेः तिथ्यंतपारणवाक्यानांनिर्विषयत्वापत्तेः नचज-यंतीपराणिशुद्धाधिकापराणिवाता निभृग्वाद्यैःपूर्वविद्धाष्टम्यामपितिथ्यंतेपारणोक्तेः तेनकलाकाष्ठेतिवाक्यां-तरवशाज्जयंतीपरमेतत् ।

रोहिणीयुक्त अष्टमी देखील चार प्रकारची—पूर्वदिवशींच मध्यरात्रीं रोहिणीयुक्त; दुसऱ्या दिवशींच मध्यरात्रीं रोहिणी-युक्त; दोन्ही दिवशीं मध्यरात्रीं रोहिणीयुक्त; दोन्ही दिवशीं मध्यरात्रीं रोहिणीरहित. येथें देखील पहिल्या दोन पक्षांविषयीं संदेह नाहीं. कारण, "सप्तमीविद्ध असली तरी रोहिणीयुक्त अष्टमी करावी" असें **पाद्म**वचन आहे. आणि "पूर्वविद्ध-जयंतीचे ठायीं उपवास करावा" असें **गारुड**वचनही आहे. आणि "सप्तमीयुक्त अष्टमीचे ठायीं जर मध्यरात्रीं रोहिणी असेल तर ती अष्टमी चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत पुण्य देणारी होते" असें **वह्निपुराण**वचनही आहे. हा प्रकार पूर्व दिवशीं रोहिणीयुक्त पक्षाविषयीं झाला. दुसऱ्या पक्षीं संदेह नाहींच. तिसऱ्या पक्षीं पराच करावी. कारण, "सप्तमीयुक्त अष्टमी, प्रयत्नानें वर्ज्य करावी. नक्षत्रयुक्त असली तरी सप्तमीयुक्त अष्टमी करूं नये" असें **ब्रह्मवैवर्त**वचन आहे. चवथा प्रकार ( दोन्ही दिवशीं मध्यरात्रीं रोहिणीयुक्त नाहीं ) त्याचेही तीन प्रकार आहेत–१ पूर्व दिवशीं मध्यरात्रीं अष्टमी परदिवशीं रोहिणी. २ परदिवशीं अष्टमी पूर्वदिवशीं रोहिणी. ३ दोन्ही दिवशीं दोघांचा मध्यरात्रीं संबंध नाहीं. यांत पहिल्या पक्षीं पर-दिवशीं जयंतीयोग असल्यामुळें पराच करावी, असें **माधव** सांगतो. तें त्यानेंच सांगितलें आहे–"ज्या वर्षी जयंतीयोग होतो, त्या वर्षी नक्षत्रयोगाच्या प्राशस्त्यामुळें जन्माष्टमी जयंतींत अन्तर्भूत होते" आणि "जी अष्टमी पूर्वविद्धा असून नव-मीच्या दिवशीं सूर्योदयीं मुहूर्त (दोन घटी) जरी असली तरी ती संपूर्ण अष्टमी होते. ज्या वेळीं कृष्णाष्टमी तिथि कला, काष्ठा, मुहूर्तमात्र जरी नवमीत असली तरी ती घ्यावी सप्तमीयुक्त घेऊं नये" असें **पाद्म**वचनही आहे. **केचित्** तर **हेमाद्री**त अष्टमीस प्राधान्य सांगितल्यामुळें ती पूर्वदिवशीं कर्मकालव्यापिनी असल्यामुळें पूर्वीचीच घ्यावी. वरील पाद्मवचन तर पूर्वदिवशीं मध्यरात्रीं अष्टमी नसतां जाणावें. जयंतींत अन्तर्भाव जो सांगितला तो केवळ मूर्खांची प्रतारणा मात्र आहे, असें सांगतात. **अन्यग्रंथकार** तर—'पूर्वविद्धाष्टमी या तु' या वरील पाद्मवचनानें जन्माष्टमीस सूर्योदयीं सप्तमीवेधनिषेध केल्यामुळें कलामात्र किंवा घटीमात्र असी देखील सूर्योदयव्यापिनी घ्यावी. 'कार्या विद्धापि सप्तम्या' हें वरील पाद्मवचन जयंतीविषयक आहे. कारण, "पूर्वविद्ध जयंतीच्या ठिकाणीं उपवासव्रत करावें, या वरील **गारुड**वचनाशीं एकवाक्यता होते. असें केलें असतांही दोन्ही व्रतें नित्य असल्यामुळें व दोघांचा काल भिन्न असल्यामुळेंही दोन उपवास होतातच. ज्या वेळीं केवळ अष्टमी शुद्धाधिक म्हणजे अष्टमीची वृद्धि असेल त्या वेळीं त्यागाला कारण सप्तमीवेध, तो पूर्व दिवशीं नसल्या-कारणानें पूर्वीच घ्यावी. अथवा विद्ध असून अष्टमीचा क्षय असेल त्या वेळीं पर दिवशीं ग्रहण करण्याच्या तिथीचा अभाव असल्यामुळें पूर्वीच घ्यावी. याप्रमाणें सारीं उदयव्यापि घेण्याविषयींचीं वाक्यें सप्तमीवेधविषयक आहेत. आतां जे कोणी "पूर्वविद्धा जन्माष्टमी रोहिणीयुक्त, सारी असली तरी ती टाकून शुद्ध नवमीस उपोषण करून व्रत करावें." या **व्यास**वचनावरून विद्धेचा क्षय असतां शुद्ध नवमीस उपवास करावा, दशमीविद्ध एकादशी असतां जसा द्वादशीस सांगितला तसा करावा, असें सांगतात. त्यांचें तें मत मूलरहित असल्यामुळें अग्राह्य आहे. 'मुहूर्तमपि संयुक्ता' या वचनानें रोहिणीयोग असतां त्याज्यत्व सांगितलें आहे. पूर्वविद्धाष्टमी टाकून पर अष्टमी केली असतां 'तिथीच्या अंतीं पारणा करावी' अशीं जीं वाक्यें त्यांना विषय सांपडणार नाहीं. तीं तिथीच्या अंतीं पारणाविधायक वचनें जयंतीविषयीं किंवा पूर्व दिवशीं शुद्ध असून दुसऱ्या दिवशीं वृद्धि असणाऱ्या तिथीविषयीं होत नाहींत. कारण, भृगु इत्यादिकांनीं पूर्वविद्ध अष्टमीचे ठायीं देखील तिथीच्या अंतीं पारणा सांगितली आहे. तेणेंकरून 'कला काष्ठा०' या वरील पाद्मवचनानुरोधानें हें व्यासवचन जयंतीविषयक आहे.

तत्त्वंतु अष्टम्याःकर्मकालव्याप्तेः दिवावायदिवारात्रौनास्तिचेद्रोहिणीकला रात्रियुक्तांप्रकुर्वीतविशेषेणेंदु-संयुतामितिपूर्वोक्तवाक्यैः रोहिणीयोगाभावेग्राह्यत्वोक्तेर्वचनात्कर्मकालव्यापिनीत्यक्त्वापूर्वापरावाल्पापिरो-हिणीयुताग्राह्या माधवमदनरत्ननिर्णयामृतानंतभट्टगौडमैथिलग्रंथादिष्वप्येवमिति युक्तंतुप-

१ उपवासद्वयं पूर्वंतुजयंतीप्रयुक्तमुत्तरेतुजन्माष्टमीप्रयुक्तं । २ औदयिकवाक्यानि उदयेचाष्टमी किंचिदित्यादीनि ॥

वासद्वयंकार्यंद्वयोर्नित्यत्वादितितुवयं अंत्ययोःपरैव सप्तमीसंयुताष्टम्यांभूत्वाऋक्षंद्विजोत्तम प्राजापत्यंद्वितीयेह्निमुहूर्तार्धंभवेद्यदि तदाष्टयामिकंपुण्यंप्रोक्तंव्यासादिभिःपुरेति**स्कांदात्** मुहूर्तेनापिसंयुक्तासंपूर्णासाष्टमीभवेत् किंपुनर्नवमीयुक्ताकुलकोट्यास्तुमुक्तिदेति**पाद्माच्चे**तिदिक् ।

खरा प्रकार म्हटला तर—"दिवसा किंवा रात्रीस एक कलामात्रही रोहिणीयोग नसेल तर रात्रियुक्त विशेषेंकरून चंद्रोदययुक्त असेल ती करावी" ह्या पूर्वोक्तवचनांनीं रोहिणीयोग नसतां कर्मकालव्यापिनी अष्टमीस ग्राह्यत्व सांगितल्यावरून पूर्वोक्त जयंतीवचनावरून कर्मकालव्यापिनी टाकून पूर्वा किंवा परा अल्प असली तरी रोहिणीयुक्त ती घ्यावी. **माधव—मदनरत्न—निर्णयामृत-अनंतभट्ट-गौड-मैथिल**-इत्यादि ग्रंथांतही असेंच आहे. युक्त म्हटलें तर दोन उपवास करावे. कारण, दोन्ही नित्य आहेत, असें तर आम्हीं ( कमलाकरभट्ट ) सांगतों. हा निर्णय पूर्व दिवशीं मध्यरात्रीं अष्टमी व पर दिवशीं रोहिणी या वरील पहिल्या प्रकारचा झाला. पुढच्या दोन प्रकारांविषयीं पराच अष्टमी करावी. कारण, "सप्तमीयुक्त अष्टमीस रोहिणी नक्षत्र असून दुसऱ्या दिवशीं एक घटिका असेल तर त्या दिवशीं आठ प्रहरांचें पुण्य व्यासादिकांनीं पूर्वी सांगितलं आहे" असें **स्कांद**वचन आहे, आणि "दुसऱ्या दिवशीं दोन घटिका अष्टमी असली तरी ती संपूर्ण अष्टमी होईल. मग नवमीयुक्त असली तर काय सांगावें ? ती कोटि कुलांना मुक्ति देणारी आहे" असें **पाद्म**वचनही आहे. ही दिशा दाखविली आहे.

निंबादित्योपासकास्तुजन्माष्टमीरामनवमीशिवरात्र्यादौपूर्वेह्निकर्मकालीनांतिथिंत्यक्त्वाद्वित्रिमुहूर्तापरैवतिथिर्ग्राह्या उदयव्यापिनीग्राह्याकुलेतिथिरुपोषणे निंबार्कोभगवान्येषांवांछितार्थफलप्रद इति**हेमाद्रौमात्स्योक्तमुक्ति**सप्तमीव्रते**भविष्योक्ते**रित्याहुः तन्न यदिद्वितीयेदिवसेतुऋक्षतिथ्योर्युतिःस्यान्नतदोपवासः पूर्वेप्रकुर्याद्दिवसेद्वितीयेदिनेशभक्तोथतदाव्रतायमिति**मात्स्य**वाक्येनतत्रैवउपसंहारात्सर्वार्थत्वेनमानाभावात् ऋक्षतिथ्योर्हस्तसप्तम्योः अन्यथाऋषिपंचम्यादौतदापत्तिः शिष्टाचारान्नेतिचेन् न तस्यन्यायवचोविरोधेनहेयत्वात् इदानींकापिनिंबार्कोपासनाभावाच्चेतिसंक्षेपः ।

**निंबादित्योपासक** तर—जन्माष्टमी, रामनवमी, शिवरात्रि इत्यादिक व्रतांविषयीं पूर्वदिवशीं कर्मकालव्यापिनी तिथि वर्ज्य करून दुसऱ्या दिवशीं दोन तीन मुहूर्तव्यापिनी तिथि असेल तीच घ्यावी. कारण, "ज्यांच्या कुलांत निंबार्क भगवान् वांछितार्थ फल देणारा आहे त्यांनीं उपोषणांविषयीं उदयव्यापिनी तिथि घ्यावी" असें **हेमाद्रींत** मात्स्योक्त मुक्तिसप्तमीव्रतांत **भविष्य**वचन आहे, असें सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, "जर दुसऱ्या दिवशीं नक्षत्र तिथि ( हस्त सप्तमी ) यांचा योग होईल तर सूर्यभक्तांना त्या दिवशीं उपवास नाहीं. पूर्व दिवशीं उपवास करावा, आणि दुसऱ्या दिवशीं व्रतादिक करावें." ह्या **मात्स्य**वचनानें त्याच व्रताविषयीं ( हस्तयुक्त सप्तमी व्रताविषयीं ) पूर्वोक्त ( उदयव्यापिनी घ्यावी, एतदर्थबोधक ) वचनाचा उपसंहार ( पर्यवसान ) केल्यामुळें वरील **भविष्य**वचन सर्व उपोषणांविषयीं आहे, असें म्हणण्यास प्रमाण नाहीं. सर्व उपोषणाविषयीं आहे असें म्हटलें, तर ऋषिपंचमी इत्यादिकांचे ठायीं तें वचन प्राप्त होईल. शिष्टाचारावरून तें प्राप्त होत नाहीं, असें म्हणू ? तर तसें नाहीं. तें म्हणणें न्यायविरुद्ध व वचनविरुद्ध असल्यामुळें त्याज्य आहे. आणि सांप्रत कालीं कोठेंही निंबार्कोपासनाही नाहीं. असें थोडक्यांत सांगून पुरे करितों.

पारणंतु तिथिरष्टगुणंहंतिनक्षत्रंचचतुर्गुणं तस्मात्प्रयत्नतःकुर्यात्तिथिभांतेचपारणमिति**ब्रह्मवैवर्तात्** तिथ्यर्क्षयोर्यदाछेदोनक्षत्रांतमथापिवा अर्धरात्रेथवाकुर्यात्पारणंत्वपरेहनीति**हेमाद्रौ**वचनाच्चार्धरात्रेप्युभयांतेन्यतरांतेवेतिमुख्यःपक्षः सर्वेष्वेवोपवासेषुदिवापारणमिष्यतइति**ब्रह्मवैवर्त**त्वन्यविषयं दिनेमुख्यकाललाभेन्यतरांतेवाज्ञेयं **गौडास्तु** नरात्रौपारणंकुर्यादृतेवैरोहिणीव्रतात् तत्रनिश्यपितत्कुर्याद्वर्जयित्वामहानिशामिति **ब्रह्मांडपुराणा**द्रात्रौसार्धप्रहरमध्येकार्यं महानिशातुविज्ञेयामध्यमंमध्ययामयोः तथा मध्यमप्रहरेरात्रेर्विज्ञेयातुमहानिशेति**स्मृत्यंतरात् कल्पतरौमदनरत्नेचैवं । कामधेनौगर्गस्तु** महानिशातुविज्ञेयामध्यमंप्रहरद्वयमित्याह **वृद्धशातातप**स्तु महानिशाद्वेघटिकेरात्रौमध्यमयामयोरित्याह वेदपाठपरमेतदित्यन्ये महानिशायामन्यतरांतेतृतीयदिनेपारणं अपरेह्नीतिपारणोत्तरदिनपरत्वात् उभयांतापेक्षणादित्याहुः **तत्त्वंतु**महानिशातोर्वागन्यतरांतलाभेमहानिशानिषेधः महानिशायामेवलाभेतत्रैवपारणमिति **दिवोदासस्तु** रजनीप्रहरंयावत्प्रवृत्तिःकर्मणोमता पारणंतावदेवेष्टंप्रमादान्नभवेद्यदीति**स्कांदा**दूर्ध्वंनिषेध-

माह तन्निर्मूलं अशक्तौतु **वह्निपुराणे** भांतेकुर्यात्तिथेर्वापिशस्तंभारतपारणमिति **गारुडेविष्णुधर्मेच** जयंत्यांपूर्वविद्धायामुपवासंसमाचरेत् तिथ्यंतेवोत्सवांतेवाव्रतीकुर्वीतपारणं अशक्तौतु तिथ्यंतेतिथिभांतेवा- पारणंयत्रचोदितं यामत्रयोर्ध्वगामिन्यांप्रातरेवहिपारणा सएवोत्सवांतइति**कालादर्शोक्तेश्चे**तिसंक्षेपः ।

**पारणा तर**-"तिथि अष्टगुण पुण्याचा नाश करिते व नक्षत्र चतुर्गुण पुण्याचा नाश करितें, यास्तव प्रयत्नानें तिथि व नक्षत्र यांच्या अंतीं पारणा करावी" ह्या **ब्रह्मवैवर्त**वचनावरून; आणि "तिथि व नक्षत्र यांचा अंत जेव्हां होईल अथवा नक्षत्राचा अंत जेव्हां होईल तेव्हां मध्यरात्रीं किंवा दुसऱ्या दिवशीं पारणा करावी" ह्या **हेमाद्रींतील** वचनावरूनही अर्धरात्रींही तिथि-नक्षत्रांच्या अंतीं किंवा दोहोंतून एकाचे अंतीं पारणा करावी" हा मुख्य पक्ष. "सर्व उपवासांचे ठायीं दिवसा पारणा इष्ट होय." असें जें **ब्रह्मवैवर्त**वचन तें तर अन्य व्रतविषयक होय. किंवा दिवसा मुख्यकाल मिळेल तर दोहोंतून एकाच्या अंतीं जाणावें. **गौड** तर "रोहिणीव्रतावांचून रात्रीं पारणा करूं नये, रोहिणीव्रताचे ठायीं रात्रींही पारणा करावी; परंतु महानिशा वर्ज्य करावी" ह्या **ब्रह्मांड**पुराणवचनावरून रात्रीं दीडप्रहरामध्यें पारणा करावी. कारण, "मध्यम दोन प्रहरांचा मध्यभाग ( मधल्या आठ घटी ) महानिशा जाणावी." तसेंच रात्रीच्या मध्यमप्रहराचे ठायीं महा- निशा जाणावी" असें **स्मृत्यंतर** आहे. **कल्पतरूंत** व **मदनरत्नांत**ही असेंच आहे. **कामधेनुग्रंथांत गर्ग** तर- "रात्रीचे मध्यम दोन प्रहर ती महानिशा होय" असें सांगतो. **वृद्धशातातप** तर—"रात्रीं मध्यम दोन प्रहरांच्या दोन घटिका ती महानिशा" असें सांगतो. हें वचन वेदपाठविषयक आहे, असें अन्य ग्रंथकार म्हणतात. महानिशेचे ठायीं तिथि किंवा नक्षत्र यांतून एकाचा अंत असेल तर तिसऱ्या दिवशीं पारणा करावी. कारण, 'अपरेऽहनि' हें वरील **हेमाद्रिवचन** तिसऱ्या दिवसाचें बोधक असल्यामुळे दोघांच्या अंताची अपेक्षा आहे, असें सांगतात. खरा प्रकार म्हटला तर महानिशेच्या अलीकडे एकाचा अंत असेल तर महानिशेचा निषेध. महानिशेमध्येंच एकाचा अंत असेल तर तेव्हांच पारणा करावी. **दिवोदास** तर "रात्रीं प्रहरपर्यंत कर्माची प्रवृत्ति सांगितली आहे, तोपर्यंतच पारणा इष्ट आहे" ह्या **स्कांद**वचनावरून प्रहरापुढें पारणेचा निषेध सांगतो, तें निर्मूल होय. अशक्त असेल तर सांगतो **वह्निपुराणांत**—"नक्षत्रांतीं किंवा तिथ्यंतीं पारणा प्रशस्त होय." **गारुडांत** व **विष्णुधर्मांत**—"व्रती यानें पूर्वविद्ध जयंतीचे ठायीं उपवास करावा आणि तिथीच्या अंतीं किंवा उत्सवाच्या अंतीं पारणा करावी." अशक्त असेल तर सांगतो—"ज्या ठिकाणीं तिथीच्या अंतीं किंवा तिथि व नक्षत्र यांच्या अंतीं पारणा सांगितली आहे, त्या ठिकाणीं तिथि तीन प्रहरांहून अधिक असेल तर प्रातःकालींच पारणा करावी." कारण, तोच उत्सवांत आहे, असें **कालादर्शाचें** वचनही आहे. याप्रमाणें हें संक्षेपानें सांगितलें आहे, असें समजावें.

अष्टम्यांविशेषो**हेमाद्रौ भविष्ये** ततोऽष्टम्यांतिलैःस्नानोनद्यादौविमलेजले सुदेशेशोभनंकुर्याद्देवक्याः सूतिकागृहं तन्मध्येप्रतिमास्थाप्यासाचाप्यष्टविधास्मृता कांचनीराजतीताम्रीपैत्तलीमृन्मयीतथा वार्क्षीमणि- मयीचैववर्णकैर्लिखिताथवा सर्वलक्षणसंपूर्णापर्यंकेचपटावृते देवकीतत्रचैकस्मिन्प्रदेशेसूतिकागृहे प्रसूतांच- प्रसूतांचस्थापयेन्मंचकोपरि मांतत्रबालकंसुप्तंपर्यंकेस्तनपायिनं यशोदांतत्रचैकस्मिन्प्रदेशेसूतिकागृहे तद्वत्क- ल्पयेत्पार्थप्रसूतवरकन्यकां कश्यपोवसुदेवोयमदितिश्चैवदेवकी शेषोवैबलभद्रोयंयशोदाक्षितिरन्वभूत् नंदः- प्रजापतिर्दक्षोगर्गश्चापिचतुर्मुखः गोर्धेनुःकुंजरश्चैवदानवाःशस्त्रपाणयः लेखनीयाश्चतत्रैवकालियोयमुनाह्रदे इत्येवमादियत्किंचिच्छक्यतेचरितंमम लेखयित्वाप्रयत्नेनपूजयेद्भक्तितत्परः मंत्रेणानेनकौंतेयदेवकींपूजयेन्नरः गायद्भिःकिन्नराद्यैःसततपरिवृतावेणुवीणानिनादैःश्रृंगारादर्शकुंभप्रवरकृतकरैःकिंकरैःसेव्यमाना पर्यंकेस्वा- स्तृतेयामुदिततरमुखीपुत्रिणीसम्यगास्तेसादेवीदेवमाताजयतिसुतनयादेवकीकांतरूपा पादौसंवाहयंतीश्रीर्दे- वक्याश्चरणांतिके निषण्णापंकजेपूज्यानमोदेव्यैश्रियेइति ।

अष्टमीचे दिवशीं विशेष विधि सांगतो—**हेमाद्रींत भविष्यांत**-"त्या जन्माष्टमीचे दिवशीं तिळ वाटून अंगास लावून नद्यादिकांच्या स्वच्छ जलामध्यें स्नान करून उत्तम प्रदेशीं देवकीचें सुंदर सूतिकागृह करावें, व त्यामध्यें कृष्णाची प्रतिमा ( मूर्ति ) स्थापावी. ती आठ प्रकारची सांगितली आहे ती अशी—सुवर्ण, रजत, ताम्र, पित्तल, मृत्तिका, वृक्ष, मणि यांची अथवा रंगांनीं लिहिलेली अशी सर्व लक्षणयुक्त ( कृष्णाची ) प्रतिमा वस्त्रावृत पलंगावर ठेवून, त्या सूतिका- गृहामध्यें एका प्रदेशीं मंचकावर प्रसूत झालेल्या व दुग्ध स्रवणाऱ्या अशा देवकीचें स्थापन करावें. त्या पर्यंकावर निजलेला व स्तनपान करणारा असा जो मी बालक याचें ( कृष्णाचें ) स्थापन करावें, व त्या सूतिकागृहामध्यें एका प्रदेशीं यशोदा व तिला झालेली कन्या अशीं पूर्वीप्रमाणेंच स्थापावीं. वसुदेव हा कश्यप, देवकी ही अदिति, बलराम हा शेष, यशोदा ही

पृथ्वी आहे, नंद हा प्रजापति दक्ष, गर्ग हा ब्रह्मदेव आहे. गाय ही धेनु, हत्ती, शस्त्र धरणारे दानव हे सर्व तेथें लिहावे. तसाच यमुनेचा ह्रद लिहून त्यामध्यें कालिया सर्प लिहावा. इत्यादिक जें कांहीं माझें चरित्र लिहिण्यास शक्य आहे तें लिहून प्रयत्नानें भक्तियुक्त होऊन पूजन करावें व देवकीचेंही पूजन करावें. पूजाध्यानमंत्रः—"**गायद्भिः किंनराद्यैः सततपरिवृता वेणुवीणानिनादैः शृंगारादर्शकुंभप्रवरकृतकरैः किंकरैः सेव्यमाना ॥ पर्यंके स्वास्तृते या मुदिततरमुखी पुत्रिणी सम्यगास्ते सा देवी देवमाता जयति सुतनया देवकी कांतरूपा ॥ १ ॥**" "देवकीचे चरणाजवळ ( कृष्णाचें ) पादसंवाहन करणाऱ्या व कमलांत बसलेल्या अशा लक्ष्मीचें "**नमो देव्यै श्रियै**" या मंत्रानें पूजन करावें."

अर्धरात्रेवसोर्धारांपातयेद्गुडसर्पिषा नाडीवर्धापनंषष्ठीनामादेःकरणंमम ततोमंत्रेणवैदद्याच्चंद्रायार्घ्यंसमाहितः शंखेतोयंसमादायसपुष्पकुशचंदनं जानुभ्यांधरणींगत्वाचंद्रायार्घ्यंनिवेदयेत् क्षीरोदार्णवसंभूतअत्रिगोत्रसमुद्भव गृहाणार्घ्यंशशांकेदंरोहिण्यासहितोमम ज्योत्स्नापतेनमस्तुभ्यंनमस्तेज्योतिषांपते नमस्तेरोहिणीकांतअर्घ्यंनःप्रतिगृह्यतां यथापुत्रंहरिंलब्ध्वाप्राप्ततेनिर्वृतिःपरा तामेवनिर्वृतिंदेहिसुपुत्रंदर्शयस्वमे इति**देवक्यर्घ्यः** ततःपुष्पांजलिंदत्वायामेयामेप्रपूजयेत् प्रभातेब्राह्मणान्शक्त्याभोजयेद्भक्तिमान्नरः ओंनमोवासुदेवायगोब्राह्मणहितायच शांतिरस्तुशिवंचास्तुइत्युक्त्वामांविसर्जयेत् इदंप्रतिमासकृष्णाष्टम्यामप्युक्तं **मदनरत्नेवह्निपुराणे** प्रतिमासंचतेपूजामष्टम्यांयःकरिष्यति ममचैवाखिलान्कामान्ससंप्राप्स्यत्यसंशयं **तथा** अनेनविधिनायस्तुप्रतिमासंनरेश्वर करोतिवत्सरंपूर्णंयावदागमनंहरेः दद्याच्छय्यांसुसंपूर्णांभोगीरत्नैरलंकृतां इतिजन्माष्टमीव्रतं ।

मध्यरात्रीं गुड व घृत यांची वसोर्धारा घालावी. नालच्छेदन, षष्ठीपूजन, नामकरण इत्यादिक माझें ( कृष्णाचें ) करावें. नंतर समाहितचित्त होऊन चंद्राला अर्घ्य द्यावें. त्याचा प्रकार—शंखामध्यें उदक घेऊन त्यांत पुष्प, दर्भ, चंदन घालून गुडघ्यांनीं भूमिस्पर्श करून ( गुडघे भूमीवर टेंकून ) चंद्राला अर्घ्य द्यावें." **त्याचा मंत्रः–"क्षीरोदार्णवसंभूत अत्रिगोत्रसमुद्भव ॥ गृहाणार्घ्यं शशांकेदं रोहिण्या सहितो मम ॥ ज्योत्स्नापते नमस्तुभ्यं नमस्ते ज्योतिषांपते ॥ नमस्ते रोहिणीकांत अर्घ्यं नः प्रतिगृह्यतां" ॥ "यथा पुत्रं हरिं लब्ध्वा प्राप्ता ते निर्वृतिः परा ॥ तामेव निर्वृतिं देहि सुपुत्रं दर्शयस्व मे"** ॥ हा देवकीच्या अर्घ्याचा मंत्र. "नंतर पुष्पांजलि देऊन प्रहराप्रहराचे ठायीं पूजन करावें. भक्तियुक्त होऊन प्रातःकालीं यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालावें. "**ॐनमो वासुदेवाय गोब्राह्मणहिताय च ॥ शांतिरस्तु शिवं चास्तु**" असें म्हणून माझें विसर्जन करावें" हें कृत्य प्रत्येक महिन्याच्या कृष्णपक्षाच्या अष्टमीस करण्याविषयीं सांगितलें आहे. **मदनरत्नांत वह्निपुराणांत**–"प्रत्येक मासाचे कृष्णाष्टमीचे ठायीं तुझी ( देवकीची ) पूजा जो करील व माझी ( कृष्णाची ) ही पूजा जो करील त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील यांत संशय नाहीं." तसेंच "या विधीनें जो प्रत्येक महिन्यामध्यें जोंपर्यंत हरीचें आगमन होईल ( जन्माष्टमी येईल ) तोंपर्यंत साऱ्या वर्षभर पूजन करील व पूर्वी सांगितलेली शय्या रत्नांनीं अलंकृत करून देईल त्याला सर्व भोग प्राप्त होतील." ॥ **इति जन्माष्टमीव्रताचा निर्णय समाप्त झाला ॥**

भाद्र[1]मावास्यायांकुशग्रहणमुक्तं **हेमाद्रौहारीतेन** मासेनभस्यमावास्यातस्यांदर्भोच्चयोमतः अयातयामास्तेदर्भाविनियोज्याःपुनःपुनः नभाःश्रावणः तेनदर्शांतमासेजन्माष्टम्यनंतरंदर्शोलभ्यते **मदनरत्ने[2]तु** मासेनभस्येमावास्यातस्यांदर्भोच्चयोमतइति**मरीचि**वाक्यमुक्तं नभस्योभाद्रपदः तेनमहालयांतर्गतदर्शोलभ्यते अत्रगौणमुख्यचांद्राभ्यामेकएवदर्शइत्यन्ये ।

भाद्रपद अमावास्येस नवीन दर्भ काढण्यास सांगतो **हेमाद्रींत–हारीत**–"श्रावणमासीं अमावास्येस नवीन दर्भसंचय करावा, ते दर्भ पर्युषित ( वासे ) होत नाहींत म्हणून त्यांचा आपआपल्या कर्माविषयीं वारंवार उपयोग करावा." येथें 'नभस्' या पदानें श्रावणमास समजावा, तेणेंकरून दर्शांत मास धरला असतां जन्माष्टमीनंतरचा दर्श येतो. **मदनरत्नांत** तर–"भाद्रपदांतील जी अमावास्या तिचे ठायीं दर्भग्रहण करावें" असें **मरीचि**वचन सांगितलें आहे. तेणेंकरून महालयांतील दर्श येतो. येथें गौण चांद्र ( पूर्णिमांत ) म्हटला म्हणजे भाद्रपद आणि मुख्य चांद्र ( अमावास्यांत ) म्हटला म्हणजे श्रावण असा समजून दोन्ही वचनांनीं एकच ( जन्माष्टमी नंतरचाच ) दर्श येतो, असें **अन्य** विद्वान् सांगतात.

---

१ समित्पुष्पकुशादीनांद्वितीयःप्रहरोमत इत्युक्तेस्तद्व्यापिनीअमामाह्या । २ मदनरत्नेत्विति तुनाऽरुचिः शुक्लादिकृष्णादिमासभेदेन एकस्यैवचांद्रस्यग्रहीतुंशक्यत्वात् ।

भाद्रपदशुक्लतृतीयायांहरितालिकाव्रतं तत्रपराग्राह्या मुहूर्तमात्रसत्त्वेऽपिदिनेगौरीव्रतंपरे शुद्धाधिकायामप्येवं गणयोगप्रशंसनादिति**माधवोक्तेः** चतुर्थीयुक्तायांफलाधिक्यं **माधवीयेआपस्तंबः** चतुर्थीसहितायातुसातृतीयाफलप्रदा अवैधव्यकरास्त्रीणांपुत्रपौत्रप्रवर्धिनी द्वितीयायोगेप्रत्यवायमाहसएव द्वितीयाशेषसंयुक्तांयाकरोतिविमोहिता सावैधव्यमवाप्नोतिप्रवदंतिमनीषिणइति आद्यामधुश्रावणिकाकज्जलीहरितालिका चतुर्थीमिश्रितास्त्रीभिर्दिवानक्तेविधीयते तृतीयानभसःशुक्लामधुश्रावणिकास्मृता भाद्रस्यकज्जलीकृष्णाशुक्लाचहरितालिकेति**दिवोदासो**दाहृतवचनाच्च ।

भाद्रपदशुक्ल तृतीयेस हरितालिकाव्रत आहे. त्या व्रताविषयीं तृतीया परा घ्यावी. कारण, "पर दिवशीं मुहूर्तमात्र तृतीया असली तरी गौरीव्रत पर दिवशीं होतें. पूर्व दिवशीं शुद्ध असून दुसऱ्या दिवशीं वृद्धि असली तरी पर दिवशींच समजावें, कारण, चतुर्थीयोग प्रशस्त आहे" असें **माधवाचें** वचन आहे. चतुर्थीयोग असतां फल अधिक आहे, असें सांगतो-**माधवीयांत**-**आपस्तंब**-"चतुर्थीयुक्त जी तृतीया ती स्त्रियांना फल देणारी, अवैधव्य करणारी व पुत्रपौत्र वाढविणारी अशी आहे." द्वितीयेचा योग असतां प्रत्यवाय तोच ( आपस्तंब ) सांगतो-"जी अविचारी स्त्री द्वितीयायुक्त तृतीयेचा उपवास करिते तिला वैधव्य प्राप्त होतें, असें विद्वान् सांगतात" आणि "स्त्रियांनीं मधुश्रावणिका, कज्जली व हरितालिका ह्या तिथि रात्रिदिवसाच्या व्रताविषयीं चतुर्थीयुक्त घ्याव्या. श्रावण शुक्ल तृतीया ही मधुश्रावणिका होय. भाद्रपदकृष्ण ( श्रावणकृष्ण ) तृतीया कज्जली आणि भाद्रपदशुक्ल तृतीया हरितालिका होय" असें **दिवोदासानें** दिलेलें वचनही आहे.

भाद्रशुक्लचतुर्थीवरदचतुर्थी सामध्याह्नव्यापिनीग्राह्या प्रातःशुक्लतिलैःस्नात्वामध्याह्नेपूजयेन्नृपेति**हेमाद्रौभविष्ये**तत्रैवपूजोक्तेः **मदनरत्नेप्येवं** परदिनेएवांशेनसाकल्येनवामध्याह्नव्याप्त्यभावेसर्वपक्षेषुपूर्वाग्राह्या तथाच**बृहस्पतिः** चतुर्थीगणनाथस्यमातृविद्धाप्रशस्यते मध्याह्नव्यापिनीचेत्स्यात्परतश्चेत्परेऽहनीति मातृविद्धाप्रशस्तास्याच्चतुर्थीगणनायके मध्याह्नपरतश्चेत्स्यान्नागविद्धाप्रशस्यतइति**माधवीयेस्मृत्यंतराच्च** तत्रगणेशरूपं**स्कांदे** एकदंतंशूर्पकर्णंनागयज्ञोपवीतिनं पाशांकुशधरंदेवंध्यायेत्सिद्धिविनायकमिति इयंरविभौमयोरतिप्रशस्ता भाद्रशुक्लचतुर्थ्यांभौमेनार्केणवायुता महतीमात्रविघ्नेशमर्चित्वेष्टंलभेन्नरइति**निर्णयामृतेवाराहोक्तेः** । अत्रचंद्रदर्शनंनिषिद्धं तथाचा**परार्केमार्कंडेयः** सिंहादित्येशुक्लपक्षेचतुर्थ्यांचंद्रदर्शनं मिथ्याभिदूषणंकुर्यात्तस्मात्पश्येन्नतंसदेति चतुर्थ्यांनपश्येदित्यन्वयः प्रधानक्रियान्वयलाभात् तेनचतुर्थ्यामुदितस्यपंचम्यांननिषेधः **गौडा**अप्येवमाहुः **पराशरोपि** कन्यादित्येचतुर्थ्यांतुशुक्लेचंद्रस्यदर्शनं मिथ्याभिदूषणंकुर्यात्तस्मात्पश्येन्नतंसदा तद्दोषशान्तयेसिंहःप्रसेनमितिवैपठेदिति श्लोकस्तु**विष्णुपुराणे** सिंहःप्रसेनमवधीत्सिंहोजांबवताहतः सुकुमारकमारोदीस्तवह्येषस्यमंतकइति ।

**भाद्रपदशुक्ल चतुर्थी वरदचतुर्थी**-ती मध्याह्नव्यापिनी घ्यावी. कारण, "प्रातःकाळीं पांढरे तिल अंगास लावून स्नान करून मध्याह्नीं पूजन करावें." अशी **हेमाद्रींत भविष्यांत** मध्याह्नींच पूजा उक्त आहे. **मदनरत्नांत**ही असेंच आहे. तिथीचे सहा पक्ष आहेत ते असे-१ पूर्व दिवशींच मध्याह्नव्यापिनी, २ पर दिवशींच मध्याह्नव्यापिनी ३ दोन्ही दिवशीं मध्याह्नव्यापिनी नाहीं, ४ दोन्ही दिवशीं सकल मध्याह्नव्यापिनी, ५ दोन्ही दिवशीं मध्याह्नीं अंशानें समव्यापिनी, ६ दोन्ही दिवशीं अंशानें विषमव्यापिनी. ह्या सहा पक्षांत पर दिवशींच मध्याह्नव्याप्ति आहे, मग ती सकल मध्याह्नव्याप्ति असो किंवा अंशतः मध्याह्नव्याप्ति असो, आणि पूर्व दिवशीं मुळींच मध्याह्नव्याप्ति नाहीं तर ह्या वरील दुसऱ्या पक्षीं पराच करावी. इतर सर्व पक्षीं पूर्वा करावी. तेंच सांगतो **बृहस्पति**—"गणेशचतुर्थी मध्याह्नव्यापिनी असेल तर मातृविद्धा ( तृतीयायुक्त ) प्रशस्त होय. पर दिवशींच मध्याह्नव्यापिनी असेल तर पर दिवशींच करावी." आणि "गणपतीचे पूजनाविषयीं चतुर्थी तृतीयायुक्त असून मध्याह्नीं असेल तर ती प्रशस्त होय; पर दिवशींच तशी ( मध्याह्नीं ) असेल तर पंचमीविद्धा प्रशस्त आहे" असें **माधवीयांत स्मृत्यंतर**ही आहे. त्या चतुर्थीचे ठायीं गणेशाच्या ध्यानाचें स्वरूप सांगतो-**स्कांदांत-"एकदंतं शूर्पकर्णं नागयज्ञोपवीतिनं ॥ पाशांकुशधरं देवं ध्यायेत्सिद्धिविनायकं." अर्थ-**

---

१ द्वितीयेचा योग अल्प असला तरी तो निषिद्ध आहे. कारण, "कला काष्ठापि वा यत्र द्वितीया संप्रदृश्यते ॥ सा तृतीया न कर्तव्या कर्तव्या गणसंयुता" अर्थ—ज्या दिवशीं कलाकाष्ठादिपरिमितही द्वितीया असेल ती तृतीया करूं नये, चतुर्थीयुक्त असेल ती करावी, असें स्कांदवचन आहे.

एकदंत, शूर्पकर्ण, सर्पाचें यज्ञोपवीत, पाश व अंकुश धरणारा, देव सिद्धिविनायक त्याचें ध्यान करावें. ह्या चतुर्थीस रवि किंवा भौम वार असतां अति प्रशस्त आहे. कारण, "भाद्रपदशुक्ल चतुर्थी जी भौम किंवा रविवार यांनीं युक्त ती महती होय. तिचे ठायीं गणपतीचें पूजन केलें असतां मनुष्यांस इष्टप्राप्ति होते" असें **निर्णयामृतांत वाराह**वचन आहे. ह्या चतुर्थीचे ठायीं चंद्रदर्शन निषिद्ध. तेंच सांगतो **अपरार्कांत-मार्कंडेय**-"सिंहराशीस सूर्य असतां शुक्लपक्षीं चतुर्थीस चंद्रदर्शन झालें तर मिथ्यापवाददोष येतो. म्हणून त्या चंद्रास चतुर्थीत पाहूं नये" चतुर्थीत पाहूं नये असा अन्वय करावा. असा केला असतां प्रधानक्रियेचा अन्वय होतो. तेणेंकरून चतुर्थीत उदय झालेल्या चंद्राचें दर्शन पंचमीत झालें असतां तो दिवस विनायकव्रताचा असला तरी निषेध नाहीं. **गौड**ही असेंच सांगतात. **पराशरही** "कन्याराशीस सूर्य जातो त्या मासांत शुक्लपक्षीं चतुर्थीस चंद्राचें दर्शन झालें असतां मिथ्याभिदूषण प्राप्त होतें, म्हणून त्या चतुर्थीस सर्वदा चंद्रास पाहूं नये. आणि पाहिला असतां त्या दोषाचे शांतीकरितां **'सिंहः प्रसेन०'** या श्लोकाचा जप करावा." तो श्लोक असा-**विष्णुपुराणांत**-"**सिंहः प्रसेनमवधीत्सिंहो जांबवता हतः ॥ सुकुमारक मा रोदीस्तव ह्येष स्यमंतकः**"

भाद्रपदशुक्लपंचमीऋषिपंचमी सामध्याह्नव्यापिनीग्राह्या पूजाव्रतेषुसर्वेषुमध्याह्नव्यापिनीतिथिरिति**माधवीयेहारीतोक्तेः** दिनद्वयेतत्त्वेहेमाद्रिमतेपरा सितापरयुतास्यात्पंचमीति**दीपिकोक्तेः माधवमते** पूर्वा सर्वत्रपंचमीपूर्वेत्युक्तेः युग्मवाक्यान्निर्णयस्तुयुक्तः ऋषिपंचमीषष्ठीयुतैवेति**दिवोदासः** अत्रऋषीन्प्रतिमासुपूजयित्वाऽकृष्टभूमिजशाकेनवर्तनं एवंसप्तवर्षाणिकृत्वासप्तकुंभेषुप्रतिमासुसंपूज्यापरेह्नितत्तन्मंत्रेणाष्टोत्तरशतंतिलान्हुत्वासप्तब्राह्मणान्भोजयेदिति**निर्णयामृते** ।

**भाद्रपदशुक्ल पंचमी** ही ऋषिपंचमी—ती मध्याह्नव्यापिनी घ्यावी. कारण, "सर्व पूजाव्रतांत मध्याह्नव्यापिनी तिथि घ्यावी." असें **माधवीयांत हारीत**वचन आहे. दोन दिवशीं मध्याह्नकालव्यापिनी असतां हेमाद्रिमतीं परा करावी. कारण, "शुक्लपंचमी परयुक्ता घ्यावी" असें **दीपिका**वचन आहे." **माधव**मतीं पूर्वा—कारण, "सर्वत्र पंचमी पूर्वा घ्यावी" असें वचन आहे. युग्मवाक्यानें निर्णय करणें म्हणजे चतुर्थीयुक्त घेणें हें योग्य आहे. ऋषिपंचमी षष्ठीयुक्तच घ्यावी असें **दिवोदास** सांगतो. या पंचमीचे ठायीं सप्तऋषींची प्रतिमेचे ठायीं पूजा करून न नांगरलेल्या भूमींत उत्पन्न झालेल्या शाकांचा आहार करावा. असें सात वर्षें व्रत करून सात कुंभांवर सात ऋषिप्रतिमा पुजून दुसरे दिवशीं त्या त्या मंत्रानें अष्टोत्तरशत संख्याक तिलहोम करून सात ब्राह्मणांस भोजन घालावें असें **निर्णयामृतांत** सांगितलें आहे.

भाद्रशुक्लषष्ठीसूर्यषष्ठी सासप्तमीयुतैवेति**दिवोदासः** शुक्लेभाद्रपदेषष्ठ्यांस्नानंभास्करपूजनं प्राशनंपंचगव्यस्यअश्वमेधफलाधिकमितिवचनात् **कल्पतरौभविष्ये** ययंभाद्रपदेमासिषष्ठीस्याद्भरतर्षभ योस्यांपश्यतिगांगेयंदक्षिणापथवासिनं ब्रह्महत्यादिपापैस्तुमुच्यतेनात्रसंशयः गांगेयःस्वामिकार्तिकेयः भाद्रपदशुक्लसप्तम्यांमुक्ताभरणव्रतं तत्रसप्तमीपूर्वायुताग्राह्या षण्मुन्योरितियुग्मवाक्यात् ।

भाद्रपदशुक्लषष्ठी **सूर्यषष्ठी.** ती सप्तमीयुक्तच घ्यावी, असें **दिवोदास** सांगतो. कारण, "भाद्रपदशुक्लषष्ठीस स्नान, सूर्यपूजन, आणि पंचगव्याचें प्राशन केल्यानें अश्वमेधाहून अधिक फल होतें" असें वचन आहे. **कल्पतरूंत भविष्यांत—** "भाद्रपदमासीं जी षष्ठी प्राप्त होते तिचे ठायीं जो मनुष्य गांगेय ( गंगापुत्र ) दक्षिणदिशेस राहणारा अशा कार्तिकस्वामीचें दर्शन घेतो तो ब्रह्महत्यादि पापांपासून मुक्त होतो, यांत संशय नाहीं." भाद्रपदशुक्लसप्तमीस **मुक्ताभरणव्रत.** त्या व्रताविषयीं सप्तमी षष्ठीयुक्त घ्यावी. कारण, "षष्ठी व सप्तमी यांचें युग्म" असें युग्मवाक्य ( प्रथमपरिच्छेदांत ) उक्त आहे.

भाद्रपदशुक्लाष्टमीदूर्वाष्टमी सापूर्वाग्राह्या श्रावणीदुर्गनवमीदूर्वाचैवहुताशनी पूर्वविद्धातुकर्तव्याशिवरात्रिर्बलेर्दिनमिति**हेमाद्रौबृहद्यमोक्तेः** शुक्लाष्टमीतिथिर्यातुमासिभाद्रपदेभवेत् दूर्वाष्टमीतुसाज्ञेयानोत्तरासाविधीयतइति**पुराणसमुच्चयाच्च** यत्तु मुहूर्तेरौहिणेष्टम्यांपूर्वावायदिवापरा दूर्वाष्टमीतुसाकार्याज्येष्ठामूलंचवर्जयेदितितत्रैवपराकार्येत्युक्तं तत्पूर्वेदिनेज्येष्ठादियोगेद्रष्टव्यं दूर्वाष्टमीसदात्याज्याज्येष्ठामूलर्क्षसंयुता **तथा** ऐंद्रर्क्षेपूजितादूर्वाहंत्यपत्यानिनान्यथा भर्तुरायुर्हरामूलेतस्मात्तांपरिवर्जयेदिति**तत्रैव**तन्निषेधात् इदमगस्त्योदयेकन्यार्केचनकार्यं शुक्लेभाद्रपदेमासिदूर्वासंज्ञातथाष्टमी सिंहार्कएवकर्तव्यानकन्यार्केकदाचन सिंहस्थेसोसमासूर्येनुदितेमुनिसत्तमइति**मदनरत्नेस्कांदोक्तेः** अगस्त्येउदितेतातपूजयेदमृतोद्भवं वैधव्यंपुत्रशोकंचदशवर्षाणिपंचचेति**तत्रैव**दोषोक्तेश्च भाद्रपदशुक्लाष्टम्यामगस्त्योदयेभाविनिसतिपूर्वकृष्णाष्टम्यामेव-

कुर्यादितिहेमाद्रिः **दीपिकाप्येवं** इदंचव्रतंस्त्रीणांनित्यं यानपूजयतेदूर्वांमोहादिहयथाविधि त्रीणिजन्मानिवैधव्यंलभतेनात्रसंशयः तस्मात्संपूजनीयासाप्रतिवर्षंवधूजनैरितिपुराणसमुच्चयात् यदाज्येष्ठादिकंविनाष्टमीनलभ्यतेतदातत्रैवोक्तं कर्तव्याचैकभक्तेनज्येष्ठामूलंयदाभवेत् दूर्वामभ्यर्चयेद्भक्त्यानवंध्यंदिवसंनयेदिति ।

भाद्रपद शुक्लाष्टमी ही **दूर्वाष्टमी** होय. ती पूर्व दिवसाचीच घ्यावी. कारण, "श्रावणी पौर्णिमा, दुर्गानवमी, दूर्वाष्टमी, हुताशनी, शिवरात्रि, व बलिप्रतिपदा, त्या पूर्वविद्धा कराव्या" असें **हेमाद्रींत बृहद्यमाचें** वचन आहे; आणि "भाद्रपदमासांत शुक्लपक्षीं जी अष्टमी तिथि ती दूर्वाष्टमी जाणावी, ती दुसरे दिवशींची घेऊं नये" असें **पुराणसमुच्चयांतही** वचन आहे. आतां जें रौहिण ( नवव्या ) मुहूर्तीं पूर्व दिवशीं किंवा पर दिवशीं जी अष्टमी असेल ती दूर्वाष्टमी करावी, परंतु ज्येष्ठा व मूळ हीं नक्षत्रें सोडावीं" असें **हेमाद्रींतच** परा करावी म्हणून सांगितलें तें पूर्व दिवशीं ज्येष्ठादि योग असतां जाणावें. कारण, "दूर्वाष्टमी, सर्वथा ज्येष्ठा व मूलनक्षत्रयुक्त टाकावी" तसेंच "ज्येष्ठा नक्षत्रावर दूर्वेचें पूजन अपत्यांचा नाश करितें. अन्यथा अपत्यनाश करीत नाहीं. मूलनक्षत्रावर दूर्वेचें पूजन पतीचें आयुष्य हरण करितें, यास्तव ज्येष्ठामूलनक्षत्रांनीं युक्त दूर्वाष्टमी टाकावी" असा हेमाद्रींतच ज्येष्ठादियोगांचा निषेध केला आहे. हें दूर्वापूजन व्रत अगस्त्योदय व कन्येचा सूर्य असतां करूं नये. कारण, "भाद्रपदमासीं शुक्लपक्षीं अष्टमी दूर्वासंज्ञक होय. ती सिंहाचा सूर्य असतांच करावी, कन्येचा सूर्य असतां कधींही करूं नये. सिंहाचा सूर्य व अगस्त्याचा अनुदय असतां ती अष्टमी उत्तम होय" असें **मदनरत्नांत स्कांदवचन** आहे. आणि "अगस्त्योदय असतां दूर्वेचें पूजन केलें तर पंधरा वर्षें वैधव्य व पुत्रशोक प्राप्त होतो." असा तेथेंच दोष उक्त आहे. भाद्रपदशुद्ध अष्टमीस अगस्त्योदय होणार असेल तर पूर्व कृष्णाष्टमीसच हें दूर्वाष्टमीव्रत करावें, असें **हेमाद्रि** सांगतो. **दीपिकेंतही** असेंच आहे. हें व्रत स्त्रियांस नित्य आहे. कारण, "जी स्त्री इहलोकीं यथाविधि दूर्वाष्टमीव्रत करीत नाहीं ती तीन जन्म वैधव्य पावते, यांत संशय नाहीं. यास्तव स्त्रियांनीं प्रतिवर्षी दूर्वापूजन करावें" असें **पुराणसमुच्चयांत** वचन आहे. जेव्हां ज्येष्ठा व मूळ यांवांचून अष्टमी न मिळेल तर तेथेंच सांगतो—"ज्येष्ठा किंवा मूळ नक्षत्र जेव्हां अष्टमीस असेल तेव्हां एकभुक्तव्रत करून भक्तीनें दूर्वापूजन करावें, परंतु वंध्य ( पूजारहित ) दिवस करूं नये.

अत्रविधिर्मदनरत्नेभविष्ये शुचौदेशेप्रजातायांदूर्वायांब्राह्मणोत्तम स्थाप्यलिंगंततोगंधैःपुष्पैर्धूपैःसमर्चयेत् दध्यक्षतैर्द्विजश्रेष्ठअर्घ्यंदद्यात्त्रिलोचने दूर्वाशमीभ्यांविधिवत्पूजयेच्छ्रद्धयान्वितः **मंत्रस्तु** त्वंदूर्वेऽमृतजन्मासिवंदितासिसुरासुरैः सौभाग्यंसंततिंदेहिसर्वकार्यकरीभव यथाशाखाप्रशाखाभिर्विस्तृतासिमहीतले तथाममापिसंतानंदेहित्वमजरामरमिति अत्रानग्निपक्वंभक्षयेत् अनग्निपक्वमश्नीयाद्दध्यन्नंदधिफलंतथा अक्षारलवणंब्रह्मन्नश्नीयान्मधुनान्वितमितितत्रैव**भविष्योक्तेः** भाद्रपदेऽधिमाससति**निर्णयदीपेस्कांदे** अधिमासेतुसंप्राप्तेनभस्यउदयेमुनेः अर्वाग्दूर्वाव्रतंकार्यंपरतोनैवकुत्रचित् ।

या व्रताचा विधि **मदनरत्नांत भविष्यांत**—"हे ब्राह्मणश्रेष्ठा ! शुद्ध प्रदेशीं उत्पन्न झालेल्या दूर्वेचे ठायीं लिंग स्थापून गंध, पुष्प, धूप इत्यादिकांनीं पूजन करावें, आणि शिवास दधि व अक्षतांनीं अर्घ्य द्यावें. श्रद्धायुक्त होऊन दूर्वा व शमी यांहींकरून यथाविधि पूजन करावें." प्रार्थनामंत्र—"**त्वं दूर्वेऽमृतजन्मासि वंदितासि सुरासुरैः ॥ सौभाग्यं संततिं देहि सर्वकार्यकरी भव ॥ यथा शाखाप्रशाखाभिर्विस्तृतासि महीतले ॥ तथा ममापि संतानं देहि त्वमजरामरं ॥**" या व्रताचे ठायीं अग्निपक्व ( शिजविलेलें ) नसेल तें भक्षण करावें. कारण, "अग्नीवर न शिजविलेलें असें अन्न व दहीं, फळें हीं भक्षण करावीं; हे ब्रह्मन ! मधानें युक्त, व क्षार लवणरहित भक्षण करावें" असें तेथेंच **भविष्यवचन** आहे. भाद्रपदमास अधिक असतां सांगतो—**निर्णयदीपांत स्कांदांत**—"भाद्रपद अधिकमास असतां शुद्धमासाच्या अष्टमीस अगस्तीचा उदय असल्यामुळें अधिकमासांत दूर्वाव्रत करावें, शुद्धांत कधींही करूं नये."

अत्रैववर्ज्यज्येष्ठापूजोक्तामाधवीयेस्कांदे मासिभाद्रपदेशुक्लपक्षेज्येष्ठर्क्षसंयुता रात्रिर्यस्मिन्दिनेकुर्याज्ज्येष्ठायाःपरिपूजनमिति इयंज्येष्ठायोगवशेनपूर्वापरावाग्राह्या दिनद्वययोगेपरा पूर्वेह्निरात्रियोगेपूर्वैव नवम्यासहकार्यास्यादष्टमीनात्रसंशयः मासिभाद्रपदेशुक्लपक्षेज्येष्ठर्क्षसंयुता रात्रिर्यस्मिन्दिनेकुर्याज्ज्येष्ठायाःपरिपूजनमितितत्रैवोक्तेः अस्यापवादः यस्मिन्दिनेभवेज्ज्येष्ठामध्याह्नादूर्ध्वमप्यणुः तस्मिन्हविष्यंपूजाचन्यूनाचे-

१ स्त्रीणामिति स्त्रीणामेवाधिकार इति मयूखः । २ ज्येष्ठामूलग्रहणं निषिद्धकालमात्रोपलक्षणं तत्राप्यपेक्षासत्त्वात् ।

स्पूर्ववासरइति इदंकेवलतिथौनक्षत्रेचोक्तं तत्राद्यंकेवलतिथौकार्यं अंत्यंकेवलर्क्षे तदुक्तं**मात्स्ये** प्रत्याब्दिकं-तिथावुक्तंयज्ज्येष्ठादैवतव्रतम् प्रतिज्येष्ठाव्रतंयच्चविहितंकेवलोडुनि तिथावेवाचरेदाद्यंद्वितीयंकेवलर्क्षतइति अत-एव**मदनरत्ने भविष्ये**नक्षत्रमात्रेउक्तम् मासिभाद्रपदेपक्षेशुक्लेज्येष्ठायदाभवेत् रात्रौजागरणंकृत्वाएभिर्मंत्रै-श्चपूजयेदिति **दाक्षिणात्या**स्त्वृक्षएवकुर्वंति **हेमाद्रौस्कांदेपि** मासिभाद्रपदेशुक्लपक्षेज्येष्ठर्क्षसंयुते यस्मि-न्कस्मिन्दिनेकुर्याज्ज्येष्ठायाःपरिपूजनमिति **तथा** मैत्रेणावाहयेद्देवींज्येष्ठायांतुप्रपूजयेत् मूलेविसर्जयेद्देवींत्रि-दिनंव्रतमुत्तममिति मंत्रस्तु एह्येहित्वंमहाभागेसुरासुरनमस्कृते ज्येष्ठेत्वंसर्वदेवानांमत्समीपगताभवेत्यावाह्य तामग्निवर्णामितिसंपूज्य ज्येष्ठायैतेनमस्तुभ्यंश्रेष्ठायैतेनमोनमः शर्वायैतेनमस्तुभ्यंशांकर्यैतेनमोनमः ज्येष्ठेश्रे-ष्ठेतपोनिष्ठेब्रह्मिष्ठेसत्यवादिनि एह्येहित्वंमहाभागेअर्घ्यंगृह्णसरस्वति **इत्यर्घ्यः ।**

त्या अष्टमीसच ज्येष्ठादेवीपूजा सांगतो **माधवीयांत-स्कंदपुराणांत**-"भाद्रपदमासांत शुक्लपक्षीं ज्या दिवशीं ज्येष्ठा-नक्षत्रयुक्त रात्रि असेल त्या दिवशीं ज्येष्ठादेवीचें पूजन करावें." ही अष्टमी ज्येष्ठानक्षत्रानें युक्त पूर्वा किंवा परा असेल ती घ्यावी. दोन दिवशीं ज्येष्ठानक्षत्रयोग असतां परा घ्यावी. पूर्वदिवशीं रात्रीस योग असतां पूर्वाच करावी. कारण, "नवमी-युक्त अष्टमीच करावी यांत संशय नाहीं. भाद्रपदमासांत शुक्लपक्षीं ज्या दिवशीं ज्येष्ठानक्षत्रयुक्त रात्रि असेल त्या दिवशीं ज्येष्ठादेवीचें पूजन करावें" असें तेथेंच सांगितलें आहे. याचा अपवाद—"ज्या दिवशीं मध्याह्नापुढें ज्येष्ठानक्षत्र अल्पही असेल त्या दिवशीं हविष्य व पूजा हीं करावीं. मध्याह्नांत न्यून असेल तर पूर्व दिवशीं करावी." हें व्रत केवलतिथीस व केवलनक्षत्रावरही करण्याविषयीं सांगितलें आहे. त्यांत पहिलें केवल तिथीस करावें. दुसरें केवल नक्षत्रावर करावें. तें सांगतो—**मत्स्यपुराणांत**-"प्रतिवर्षी करावयाचें जें ज्येष्ठादैवतव्रत तें तिथीस सांगितलें आहे. आणि प्रतिज्येष्ठानक्षत्रावर करावयाचें जें ज्येष्ठाव्रत तें केवल नक्षत्रावर सांगितलें आहे. पहिलें केवल तिथीसच करावें. आणि दुसरें केवल नक्षत्रावरच करावें." म्हणूनच **मदनरत्नांत भविष्यांत** नक्षत्रावर करण्याविषयीं सांगितलें आहे, तें असें-"भाद्रपदमासांत शुक्लपक्षीं ज्या दिवशीं ज्येष्ठा असेल त्या रात्रीस जागरण करून ज्येष्ठादेवीचें पुढील मंत्रानें पूजन करावें." दाक्षिणात्यलोक तर केवल नक्षत्रावरच करतात. **हेमाद्रींत स्कांदांत**ही "भाद्रपदमासांत शुक्लपक्षीं ज्येष्ठानक्षत्र कोणत्याही दिवशीं असेल त्या दिवशीं ज्येष्ठादेवीचें पूजन करावें." तसेंच "अनुराधानक्षत्रावर ज्येष्ठादेवीचें आवाहन, ज्येष्ठानक्षत्रावर पूजन व मूलनक्षत्रावर विसर्जन करावें, असें हें त्रिदिनात्मक व्रत होय." पूजेचा मंत्र—"**एह्येहि त्वं महाभागे सुरासुरनमस्कृते ॥ ज्येष्ठे त्वं सर्वदेवानां मत्समीपगता भव**" यानें आवाहन करून "**तामग्निवर्णा०**" यानें पूजन करून "**ज्येष्ठायै ते नमस्तुभ्यं श्रेष्ठायै ते नमो नमः ॥ शर्वायै ते नमस्तुभ्यं शांकर्यै ते नमो नमः ॥ ज्येष्ठे श्रेष्ठे तपोनिष्ठे ब्रह्मिष्ठे सत्यवादिनि ॥ एह्येहि त्वं महाभागे अर्घ्यं गृह्ण सरस्वति ॥**" यानें अर्घ्य द्यावें.

भाद्रपदशुक्लद्वादश्यांश्रवणयोगरहितायांपारणंकुर्यात् आभाकासितपक्षेष्विति**दिवोदासो**दाहृतवचनात् उपोष्यैकादशींमोहात्पारणंश्रवणेयदि करोतिहंतितत्पुण्यंद्वादशद्वादशीभवमिति तत्रैव**स्कांदा**च्च अस्यतत्रैव-प्रतिप्रसवः **मार्कंडेयः** विशेषेणमहीपालश्रवणंवर्धतेयदि तिथिक्षयेनभोक्तव्यंद्वादशींलंघयेन्नहीति **केचित्तु** यदात्वपरिहार्योयोगस्तदाश्रवणनक्षत्रेत्रेधाविभक्तेमध्यमविंशतिघटिकायोगंत्यक्त्वापारणंकार्यं तदुक्तं**विष्णु-धर्मे** श्रुतेश्चमध्येपरिवर्तमेतिसुप्तिप्रबोधपरिवर्तनमेववर्ज्यमिति **केचिच्च**तुर्धाविभज्यमध्यपादद्वयंवर्ज्यमाहुः अत्रमूलंचिंत्यम् ।

श्रवणयोगरहित भाद्रपदशुक्ल द्वादशीस एकादशीची पारणा करावी. कारण, "आ ( आषाढ ), भा ( भाद्रपद ), का ( कार्तिक ) यांच्या शुक्लपक्षाच्या द्वादशीस अनुक्रमानें अनुराधा, श्रवण, रेवती यांचा योग असतां पारणा करूं नये; कारण, पारणा केली तर बारा द्वादशींचें पुण्य जातें." असें **दिवोदासानें** वचन सांगितलें आहे. आणि "एकादशीचे ठायीं उपो-षण करून अज्ञानानें श्रवणनक्षत्रावर पारणा करील तर बारा द्वादशींपासून उत्पन्न झालेल्या पुण्याचा नाश होतो," असें तेथेंच **स्कांदवचन**ही आहे. याचा तेथेंच प्रतिप्रसव ( निषेधाचा अपवाद ) सांगतो-**मार्कंडेय**—"हे राजा ! विशेषेंकरून श्रवणनक्षत्र जर वाढेल व तिथीचा क्षय असेल तर श्रवणांत भोजन करूं नये; पण द्वादशीचें उल्लंघन करूं नये." **केचित्** ग्रंथकार तर-जेव्हां श्रवणनक्षत्राचा योग परिहार करण्यास अशक्य असेल तेव्हां श्रवणनक्षत्राचे तीन भाग करून मधल्या वीस घटिका सोडून पारणा करावी. तें सांगतो-**विष्णुधर्मांत** "भगवान् अनुराधेच्या प्रथमपादीं निजतो, रेवतीच्या अंत्यपादीं जागृत होतो, श्रवणाच्या मध्यभागीं परिवर्तन ( कुशीस वळणें ) करतो. यास्तव निद्रा, जागर, परिवर्तन हेच

काल सोडावे." **केचित्** ग्रंथकार तर, श्रवणाचे चार भाग करून मधले दोन पाद सोडावे असें सांगतात. या विष्णुधर्म-वचनाविषयीं मूळ चिंत्य आहे.

अत्रैवविष्णुपरिवर्तनोत्सवंकुर्यात् संध्यायांविष्णुंसंपूज्यप्रार्थयेत् मंत्रस्तु**तिथितत्त्वे**उक्तः ॐ वासुदेव-जगन्नाथप्राप्तेयंद्वादशीतव पार्श्वेनपरिवर्तस्वसुखंस्वपिहिमाधवेति अत्रैवशक्रध्वजोत्थापनमुक्त**मपरार्के गर्गेण** द्वादश्यांतुसितेपक्षेमासिप्रौष्ठपदेतथा शक्रमुत्थापयेद्राजाविश्वश्रवणवासवे ।

येथेंच विष्णुपरिवर्तनोत्सव करावा. संध्यासमयीं विष्णुपूजन करून प्रार्थना करावी. प्रार्थनामंत्र तर-**तिथितत्त्वांत** सांगतो-**वासुदेव जगन्नाथ प्राप्तेयं द्वादशी तव ॥ पार्श्वेन परिवर्तस्व सुखं स्वपिहि माधव."** या द्वादशीचे दिवशींच इंद्रध्वजाचें उत्थापन सांगतो **अपरार्कांत—गर्ग**-"भाद्रपद शुक्लपक्षाच्या द्वादशीस उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा या नक्षत्रांवर राजानें इंद्रध्वजाचें उत्थापन करावें."

इयमेवश्रवणद्वादशी तत्रैकादश्यांद्वादशीश्रवणयोगेमेवोपोष्या एकादशीद्वादशीचवैष्णव्यमपितत्रचेत् तद्विष्णुशृंखलंनामविष्णुसायुज्यकृद्भवेदिति **विष्णुधर्मोक्तेः नारदीये**पि संस्पृश्यैकादशींराजन्द्वादशीं-यदिसंस्पृशेत श्रवणंज्योतिषांश्रेष्ठंब्रह्महत्यांव्यपोहति द्वादशीश्रवणस्पृष्टास्पृशेदेकादशीयदि सएववैष्णवोयोगो-विष्णुशृंखलसंज्ञित इति**हेमाद्रौमात्स्योक्तेश्च** दिनद्वयेद्वादशीश्रवणयोगेपिपूर्वा **निर्णयामृते**त्वस्यपूर्वा-र्धमन्यथापठितं द्वादशीश्रवणर्क्षंचस्पृशेदेकादशींयदीति तेन**हेमाद्रि**मतेएकादश्याःश्रवणयोगाभावेपितद्युक्त द्वादशीयोगमात्रेणविष्णुशृंखलंभवति **निर्णयामृत**मतेतु श्रवणस्यैकादशीद्वादशीभ्यांयोगएवविष्णुशृंखलं-नान्यथेति यदानिशीथानंतरंसूर्योदयावधिद्विकलामात्रमपिश्रवणर्क्षंभवतितदापिपूर्वैव तदुक्तंतत्रैव**नारदीये** इमांप्रकृत्य तिथिनक्षत्रयोर्योगोयोगश्चैवनराधिप द्विकलोयदिलभ्येतसज्ञेयोह्यष्टयामिकइति द्वादशीश्रवणस्पृ-ष्टाकृत्स्नापुण्यतमातिथिः नंतुसातेनसंयुक्तातावत्येवप्रशस्यतइति**मदनरत्नेमात्स्याच्च दिवोदासीयेतु** रात्रेःप्रथमपादेचेच्छ्रवणंहरिवासरे तदापर्वामुपवसेत्प्रातर्भांतेचपारणमित्युक्तं इदंतुनिर्मूलत्वात्पूर्वविरोधाच्चो-पेक्ष्यं इयंबुधवारेतिप्रशस्ता बुधश्रवणसंयुक्तासैवचेद्द्वादशीभवेत् अत्यंतमहतीसास्याद्दत्तंभवतिचाक्षयमिति **हेमाद्रौस्कांदात्** ।

## श्रवणद्वादशी.

हीच श्रवणद्वादशी होय. त्या श्रवणद्वादशीचा निर्णय असा—एकादशीस श्रवणाचा आणि द्वादशीचा योग असतां त्या दिवशींच उपोषण करावें. कारण, "जर एक दिवशीं एकादशी, द्वादशी आणि श्रवणनक्षत्र हीं तीनही असतील, तर त्या योगाला विष्णुशृंखल म्हटलें आहे, तो योग विष्णूचें सायुज्य देणारा होतो, असें **विष्णुधर्मांत** वचन आहे. **नारदीयां-तही**—"सर्वांमध्यें श्रेष्ठ असें श्रवणनक्षत्र जर एकादशीस स्पर्श करून द्वादशीस स्पर्श करील तर तें—उपोषणाच्या योगानें-ब्रह्महत्या दूर करितें." "श्रवणानें स्पर्श केलेली द्वादशी जर एकादशीस स्पर्श करील तर तोच विष्णुशृंखल नांवाचा वैष्णवयोग आहे" असें **हेमाद्रींत मात्स्य**वचनही आहे. दोन दिवस द्वादशी व श्रवण यांचा योग असतांही पूर्वा करावी. **निर्णयामृतांत** तर 'द्वादशी श्रवणस्पृष्टा स्पृशेदेकादशीं यदि' या स्थानीं 'द्वादशी श्रवणर्क्षं च स्पृशेदेकादशीं यदि' असा पाठ केलेला आहे. म्हणजे द्वादशी आणि श्रवणनक्षत्र हीं दोन जर एकादशीस स्पर्श करतील तर तो विष्णुशृंखलयोग होतो. यावरून **हेमाद्रीच्या** मतीं एकादशीस श्रवणयोग नसला तरी श्रवणयुक्त द्वादशीचा योग एकादशीस असला म्हणजे विष्णुशृंखलयोग होतो. **निर्णयामृताच्या** मतीं तर श्रवणाचा एकादशी व द्वादशी या दोघांचा योग असेल तरच विष्णु-शृंखलयोग होतो, अन्यथा होत नाहीं. जेव्हां मध्यरात्रीनंतर सूर्योदयाच्या आंत दोन कलाही श्रवणनक्षत्र असेल तेव्हां देखील पूर्वाच करावी. तें तेथेंच **नारदीयांत**—या श्रवणद्वादशीचा उपक्रम करून सांगतो—"तिथि व नक्षत्र यांचा योग हा दोन कला योग जर मिळेल तर तो आठ प्रहर योग जाणावा." आणि 'श्रवणानें स्पर्श केलेली द्वादशी तिथि ती सारी पुण्यकारक आहे. श्रवणानें युक्त जितकी द्वादशी तितकीच पुण्यकारक आहे, असें नाहीं" असें **मदनरत्नांत मात्स्य-वचनही** आहे. **दिवोदासीयांत** तर—"जर एकादशीचे दिवशीं रात्रीच्या पहिल्या प्रहरीं श्रवण असेल—अर्थात् दुसऱ्या दिवशीं द्वादशी व श्रवण असेल—तर पूर्व दिवशीं उपवास करावा, आणि दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं नक्षत्र संपल्यावर

१ नत्विति यावती तेन संयुक्ता तावत्येव प्रशस्यते इति तु न तेन तावत्या यत्कर्तुं शक्यं स्नानादि तद्योगकालिकं तदेव स्यात् इह तु श्रवणसंबंधेन पूर्वोत्तरकालेपि उपवासादि सुकरमित्यर्थः ।

पारणा करावी" असें सांगितलें आहे. हें वचन निर्मूल असल्यामुळें व 'तिथिनक्षत्रयोर्योगो०' इत्यादि पूर्ववचनाचा विरोध येत असल्यामुळें उपेक्षणीय ( अस्वीकार्य ) आहे. ही श्रवणद्वादशी बुधवारीं असेल तर अतिप्रशस्त आहे. कारण, "तीच द्वादशी बुधवार व श्रवण यांनीं युक्त असेल तर ती अतिशय मोठी आहे. त्या दिवशीं दान केलेलें अक्षय होतें." असें **हेमाद्रींत स्कांद**वचन आहे.

यानितुपठंति उत्तराषाढसंयुक्ताश्रोणामध्याह्नगापिवा आसुरीसैवतारास्याद्धंतिपुण्यंपुराकृतं उदयव्यापिनीग्राह्याश्रोणाद्वादशिकायुता विश्वर्क्षसंयुतासाचनैवोपोष्याशुभेप्सुभिरित्यादीनि**विष्णुधर्मस्कांदभविष्यादि**वचनानि तानिनिर्मूलानि यदपि**स्मृत्यर्थसारे**उदयव्यापिनीग्राह्येत्युक्तं यच्च**बृहन्नारदीये**उदयव्यापिनीग्राह्याश्रवणद्वादशीव्रतइति तद्यदाशुद्धाधिकाद्वादशीपरदिनएवोदयेश्रवणयोगः पूर्वेह्निचतद्भिन्नेकालेयोगस्तत्परम् दिनद्वयेउदययोगेपूर्वैव बहुकर्मकालव्याप्तेरित्युक्तं**मदनरत्ने** यदात्वेकादश्येवश्रवणयुतानद्वादशीतदापिपूर्वैव यदानप्राप्यतेऋक्षंद्वादश्यांवैष्णवंक्वचित् एकादशीतदोपोष्यापापघ्नीश्रवणान्वितेति**मदनरत्नेनारदीयोक्तेः** यदापरैवर्क्षयुतातदापरा तत्रशक्तेनोपवासद्वयंकार्यं एकादशीमुपोष्यैवद्वादशींसमुपोषयेत् नचात्रविधिलोपःस्यादुभयोर्दैवतंहरिरिति**भविष्योक्तेः** यत्तु**विष्णुधर्मे** पारणांतंव्रतंज्ञेयंव्रतांतेविप्रभोजनं असमाप्तेव्रतेपूर्वेनैवकुर्याद्व्रतांतरमिति तदेतद्भिन्नपरं अत्र**गौडाः** शृणुराजन्परंकाम्यंश्रवणद्वादशीव्रतमिति**स्थूलशीर्ष**वचनात्काम्यमेवेदम् तेनाशक्तस्यनित्यैकादशीव्रतमेवेतिमन्यंते द्वादश्यामुपवासेनशुद्धात्मानृपसर्वशः चक्रवर्तित्वमतुलंसंप्राप्नोत्युत्तमांश्रियमिति**गौडनिबंधेमार्कंडेयोक्तेश्च दाक्षिणात्यास्तु** एकादश्यांनरोभुक्त्वाद्वादश्यांसमुपोषणात् व्रतद्वयकृतंपुण्यंसर्वंप्राप्नोत्यसंशयमिति **वराहवामनपुराणोक्तेः** श्रवणद्वादशीव्रतमेवेत्याहुः भुक्त्वेतिफलाद्याहारपरम् नत्वन्नपरं अन्नाश्रितानिपापानीतिनिषेधात् उपवासद्वयंकर्तुंनशक्नोतिनरोयदि प्रथमेऽह्निफलाहारीनिराहारोपरेहनीति**दिवोदासीयेभविष्योक्तेश्च** अशक्तौतुगृहीतैकादशीव्रतोयस्तंप्रत्युक्तंमात्स्ये द्वादश्यांशुक्लपक्षेतुनक्षत्रंश्रवणंयदि उपोष्यैकादशींतत्रद्वादश्यांपूजयेद्धरिमिति पूजयेन्नतूपवसेदित्यर्थः अगृहीतैकादशीव्रतश्चेदेकादश्यांभुक्त्वाद्वादश्यामुपवसेत् एवमेकादशींभुक्त्वाद्वादशींसमुपोषयेत् पूर्ववासरजंपुण्यंसर्वंप्राप्नोत्यसंशयमिति**नारदीयोक्तेः** ।

आतां जीं कोणी सांगतात कीं, "उत्तराषाढायुक्त श्रवणतारा मध्याह्नव्यापिनी असली तरी ती तारा आसुरी आहे, ती पूर्वी केलेलें पुण्य घालविते. द्वादशीनें युक्त श्रवणतारा ( नक्षत्र ) उदयव्यापिनी घ्यावी. तीच श्रवणतारा उत्तराषाढायुक्त अशी असतां तिचें उपोषण कल्याणेच्छूंनीं करूं नये." इत्यादिक **विष्णुधर्म-स्कंदपुराण-भविष्यपुराणादिक**वचनें तीं निर्मूल होत. आतां जें **स्मृत्यर्थसारांत** उदयव्यापिनी श्रवणद्वादशी घ्यावी असें सांगितलें आहे, आणि जें **बृहन्नारदीयांत**—"व्रताविषयीं श्रवणद्वादशी उदयव्यापिनी घ्यावी." तें सांगणें जेव्हां पूर्वदिवशीं द्वादशी संपूर्ण असून दुसऱ्या दिवशींच वाढलेल्या द्वादशीस सूर्योदयकालीं श्रवणयोग असेल व पूर्वदिवशीं उदयभिन्नकालीं श्रवणयोग असेल तद्विषयक आहे. दोन दिवस उदयकालीं श्रवण असतां पूर्वाच करावी. कारण, पूर्वदिवशीं बहुत कर्मकालाला श्रवणद्वादशीची व्याप्ति आहे, असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. जेव्हां तर एकादशीच श्रवणयुक्त आहे, द्वादशी श्रवणयुक्त नाहीं तेव्हां देखील पूर्वाच करावी. कारण, "जेव्हां श्रवणनक्षत्राचा योग द्वादशीस मुळींच नसेल तेव्हां श्रवणयुक्त एकादशीस उपोषण करावें, ती पापनाश करणारी आहे" असें **मदनरत्नांत नारदीय**वचन आहे. जेव्हां दुसऱ्या दिवशींच श्रवणयुक्त द्वादशी असेल तेव्हां पराच करावी. त्या वेळीं सशक्तानें दोन उपवास करावे. कारण, "एकादशीस उपोषण करूनच द्वादशीचें उपोषण करावें. आतां एकादशीव्रत व द्वादशीव्रत हीं दोन व्रतें भिन्न असल्यामुळें एकाची समाप्ति झाल्यावांचून दुसरें केलें असतां व्रतविधीचा विघात होईल? असें म्हणूं नये; कारण, दोन्ही व्रतांची देवता हरि ( विष्णु ) आहे." असें **भविष्य**पुराणवचन आहे. आतां जें **विष्णुधर्मांत**—"पारणा होईपर्यंत व्रत समजावें. व्रत समाप्त झाल्यावर ब्राह्मणभोजन करावें. पहिलें व्रत समाप्त झाल्यावांचून दुसरें व्रत करूं नयेच" असें वचन, तें हें व्रत सोडून इतरव्रतविषयक आहे. या स्थलीं **गौड** ग्रंथकार—"हे राजा! दुसरें काम्य असें श्रवणद्वादशीव्रत सांगतों, श्रवण कर." **त्या स्थूलशीर्ष**वचनावरून हें श्रवणद्वादशीव्रत काम्यच आहे. यावरून अशक्त मनुष्याला एकादशीव्रतच नित्य आहे. आणि द्वादशीव्रत काम्य आहे असें मानितात. आणि "हे राजा! द्वादशीस उपवास केल्यानें सर्व प्रकारानें आत्मा शुद्ध होऊन अनुपम चक्रवर्तित्व आणि उत्तम संपत्ति यांतें पावतो" त्या **गौडनिबंधांतील मार्कंडेय**वचनावरूनही हें

द्वादशीव्रत काम्य असें होत आहे. दक्षिणेकडील विद्वान् तर—"एकादशीस भोजन करून द्वादशीस उपवास केल्यानें दोन्ही व्रतांचें सारें पुण्य निःसंशय प्राप्त होतें" ह्या **वराह-वामन**पुराणवचनावरून श्रवणद्वादशीव्रतच नित्य आहे, असें सांगतात. आतां ह्या वचनांत "एकादशीस भोजन करून" असें सांगितलें तें 'फलादि आहार करून' असें समजावें. 'अन्नभोजन करून' असें समजूं नये. कारण, 'अन्नाश्रित पापें आहेत, तीं एकादशीस अन्न खाणारास प्राप्त होतात.' या वचनेंकरून एकादशीस भोजनाचा निषेध आहे. आणि "मनुष्यास दोन उपवास करण्याची शक्ति जर नसेल तर पहिल्या दिवशीं फलाहार करून दुसऱ्या दिवशीं निराहार करावा" असें **दिवोदासीयांत** भविष्यवचनही आहे. दोन उपवासांविषयीं अशक्त असून ज्यानें एकादशीव्रत घेतलें आहे त्याला सांगतो-**मात्स्यांत**—"शुक्लपक्षांतील द्वादशीस जर श्रवण नक्षत्र असेल तर त्या वेळीं एकादशीचें उपोषण करून द्वादशीचे दिवशीं हरीची पूजा करावी" अर्थात् द्वादशीस उपवास करूं नये. एकादशीव्रत ग्रहण केलेलें नसेल तर एकादशीस भोजन करून द्वादशीचें उपोषण करावें. कारण, "एकादशीस भोजन करून द्वादशीस उपवास करावा, म्हणजे पूर्व दिवसाचें सारें पुण्य निःसंशय प्राप्त होतें" असें **नारदीय**वचन आहे.

पारणंतूभयांतेन्यतरांतेवाकुर्यात तिथिनक्षत्रनियमेतिथिभांतेचपारणमिति**स्कांदात्** तिथिनक्षत्रसंयोग- उपवासोयदाभवेत पारणंतुनकर्तव्यंयावन्नैकस्यसंक्षयइति**नारदीयादितिहेमाद्रिः** यद्यप्यत्रनक्षत्रमात्रांते- पिपारणंप्रतिभाति तथापितिथिमात्रांतेज्ञेयम् नत्वृक्षांतेतिथिमध्येपि याःकाश्चित्तिथयःप्रोक्ताःपुण्यानक्षत्रयो- गतः ऋक्षांतेपारणंकुर्याद्विनाश्रवणरोहिणीमिति **विष्णुधर्मे** श्रवणांतमात्रेपारणनिषेधात रोहिण्यांतु भांते- कुर्यात्तिथेर्वापिइति**वह्निपुराणात्** तदंतेप्यस्तुनत्वत्रैवमस्तीतिनक्षत्रांतोनुकल्पइति**मदनरत्ने** असंभवेतु तिथ्यंतेतिथिभांतेवापारणंयत्रचोदितम् यामत्रयोर्ध्वगामिन्यांप्रातरेवहिपारणेतिज्ञेयम् यत्तु**मदनरत्ने** द्वाद- शीवृद्धौश्रवणवृद्धौवाश्रवणांतएवपारणंकुर्यात् पारणंतिथिवृद्धौतुद्वादश्यामुडुसंक्षयात् वृद्धौकुर्यात्त्रयोदश्यांतत्र- दोषोनविद्यतइति**वह्निपुराणा**दित्युक्तम् तत्प्रकरणादेतस्यामेवश्रवणयुक्तैकादश्यांविहितविजयैकादशीव्रतप- रंनतुश्रवणद्वादशीपरमिति**मदनरत्ने गौडा**स्तुश्रवणद्वादशीपरमाहुः ।

या श्रवणद्वादशीव्रताची पारणा तर—श्रवण व द्वादशी दोन्ही संपल्यावर किंवा दोघांपैकीं एक संपल्यावर करावी. कारण, "तिथि व नक्षत्र यांच्या निमित्तानें उपवास असता तिथि व नक्षत्र संपल्यावर पारणा करावी" असें **स्कांद**वचन आहे. आणि "जेव्हा तिथि व नक्षत्र यांच्या संयोगाचा उपवास असेल तेव्हा जोपर्यंत एकाची समाप्ति झाली नाहीं तोपर्यंत पारणा करूं नये" असें **नारदीय** वचन आहे, असें **हेमाद्रि** सांगतो. आतां जरी येथें या वचनावरून केवळ नक्षत्र संपल्यावरही पारणा करावा असें दिसतें, तरी एक संपल्यावर म्हणजे तिथि संपल्यावर पारणा जाणावी. नक्षत्र संपल्यावर तिथि असेल तर तिथीमध्यें ( द्वादशीमध्यें ) ही पारणा समजूं नये. कारण, "ज्या कोणत्या तिथि नक्षत्रयोगानें पुण्यकारक म्हणून सांगितल्या त्या तिथीची पारणा नक्षत्र संपल्यावर करावी; पण श्रवण व जन्माष्टमीसंबंधी रोहिणी हीं दोन नक्षत्रें वर्ज्य करून हा निर्णय समजावा" असा **विष्णुधर्मांत** केवळ श्रवण संपल्यावर द्वादशी असतां पारणेचा निषेध केला आहे. रोहिणीविषयीं तर "नक्षत्रांती पारणा करावी, किंवा जन्माष्टमीच्या अंतीं पारणा करावी" ह्या **अग्नि-पुराण**वचनावरून केवळ नक्षत्रांतीं सुद्धां पारणा असो. तरी या ठिकाणीं ( श्रवणद्वादशीव्रतांत ) केवळ नक्षत्रांतीच पारणा नाहीं; म्हणून नक्षत्रांतीं पारणा, हा अनुकल्प ( कनिष्ठपक्ष ) असें समजूं नये; अर्थात् श्रवणांतींच पारणा हा मुळींच पक्ष नाहीं, असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. आता जें **मदनरत्नांत**—द्वादशीची वृद्धि किंवा श्रवणाची वृद्धि असतां श्रवणांतींच पारणा करावी. कारण, "द्वादशीचे दिवशीं तिथीची वृद्धि असतां नक्षत्र संपल्यावर द्वादशींत पारणा करावी. आणि नक्षत्राची ( श्रवणाची ) वृद्धि असेल तर ( द्वादशी संपल्यावर ) त्रयोदशींत पारणा करावी, त्याविषयीं दोष नाहीं" असें **वह्निपुराण**वचन आहे, असें सांगितलें तें प्रकरणावरून याच श्रवणयुक्त एकादशीस विहित जें विजयैका-दशीव्रत तद्विषयक आहे. श्रवणद्वादशीव्रतविषयक नाहीं, असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. **गौड** तर—हें वचन श्रवणद्वादशीव्रतविषयक आहे, असें सांगतात.

**अत्रविधिर्मदनरत्नेविष्णुधर्मे तस्मिन्दिनेतथास्नानंयत्रक्वचनसंगमे तथा दध्योदनयुतंवस्त्रांजलपूर्णं घटंद्विजे वस्त्रसंवेष्टितंदत्वाछत्रोपानहमेवच नदुर्गतिमवाप्नोतिगतिमग्र्यांचविंदति मंत्रस्तुभविष्ये घटेज- नार्दनपूजामभिधाय नमोनमस्तेगोविंदबुधश्रवणसंज्ञक अघौघसंक्षयंकृत्वासर्वसौख्यप्रदोभव प्रीयतांदेवदेवे- शोममसंशयनाशनः ।**

त्या श्रवणद्वादशीव्रताचा विधि सांगतो—**मदनरत्नांत विष्णुधर्मांत**-"त्या दिवशीं कोठें तरी नद्यादिकांच्या संगमीं स्नान करावें" तसेंच-"त्या द्वादशीचे दिवशीं दधिमिश्रित ओदनानें युक्त व जलपूर्ण असा घट वस्त्रानें वेष्टित करून ब्राह्मणाला द्यावा. आणि छत्र, उपानह ( जोडा ) ब्राह्मणाला द्यावा, असें केल्यानें दुर्गति होत नाहीं व उत्तम गति प्राप्त होते." मंत्र सांगतो **भविष्यांत**-घटावर जनार्दनाची पूजा करून त्याचें दान करावें.-दानाचा मंत्र—**नमो नमस्ते गोविंद बुधश्रवणसंज्ञक ॥ अघौघसंक्षयं कृत्वा सर्वसौख्यप्रदो भव ॥ प्रीयतां देवदेवेशो मम संशयनाशनः ॥**

वामनावतारनिमित्तोपवासस्तु**व्रतहेमाद्रौ भविष्ये** द्वादश्यास्तेविधिःप्रोक्तःश्रवणेनयुधिष्ठिर सर्वपापप्रशमनःसर्वसौख्यप्रदायकः एकादशीयदासास्याच्छ्रवणेनसमन्विता विजयासातिथिःप्रोक्ताभक्तानांविजयप्रदेत्युपक्रम्य अथकालेबहुतिथेगतेसागुर्विणीभवेत् सुषुवेनवमेमासिपुत्रंसावामनंहरिमित्युक्त्वा एतत्सर्वंसमभवदेकादश्यांयुधिष्ठिर तेनेष्टादेवदेवस्यसर्वथाविजयातिथिः एषाव्युष्टिःसमाख्याताएकादश्यांमयातत्र पूर्वमेवसमाख्याताद्वादशीश्रवणान्वितेत्युपसंहारादेकादश्यामेव व्युष्टिः फलं **भागवतेऽष्टमस्कंधे**तुद्वादश्यांवामनोत्पत्तिरुक्ता श्रोणायांश्रवणद्वादश्यांमुहूर्तेभिजितिप्रभुः ग्रहनक्षत्रताराद्याश्चक्रुस्तज्जन्मदक्षिणम् द्वादश्यांसवितातिष्ठन्मध्यंदिनगतोनृप विजयानामसाप्रोक्तायस्यांजन्मविदुर्हरेः श्रोणायांचंद्रेऽभिजिच्छ्रवणप्रथमांशः **गौडा**अप्येवम् अत्रकल्पभेदाद्व्यवस्था ।

वामनावतारनिमित्तक उपवास सांगतो—**व्रतहेमाद्रींत भविष्यांत**-"हे युधिष्ठिरा ! श्रवणयुक्त द्वादशीचा विधि तुला सांगितला, तो सर्व पापांची शांति करणारा व सर्व सौख्य देणारा होय. एकादशी जर श्रवणानें युक्त असेल तर ती तिथि विजयासंज्ञक होय. ती भक्तांस विजय देणारी होते." असा उपक्रम करून-"यानंतर बहुत काल गेल्यावर ती ( अदिति ) गर्भिणी झाली आणि नवममासीं साक्षात् विष्णुरूप वामननांवाच्या पुत्रास प्रसवली" असें सांगून "हे धर्मा ! हा सर्व प्रकार एकादशीस झाला. तेणेंकरून भगवंतास ती विजया एकादशी सर्वथा इष्ट होय. हें फल एकादशीस आहे असें मी तुला सांगितलें. श्रवणयुक्त द्वादशी पूर्वींच सांगितली" अशा उपसंहारा(एकादशीविषयीं पर्यवसाना ) वरून एकादशीसच वामनावतार आहे. **भागवतांत** अष्टमस्कंधांत तर द्वादशीचे ठायीं वामनोत्पत्ति सांगितली आहे. "श्रवणयुक्त द्वादशीस श्रवणनक्षत्रीं चंद्र असतां श्रवणाच्या प्रथमांशीं अभिजिन्मुहूर्तावर भगवान् होता झाला. ग्रह, नक्षत्र, तारा इत्यादिक त्याचे जन्माला अनुकूल झाले. हे राजा ! ज्या द्वादशीस सूर्य दिनमध्यभागीं असतां हरीचा जन्म झाला ती विजयानामक तिथि होय." **गौड**ही असेंच सांगतात. पूर्वी एकादशीस वामनावतार सांगितला, येथें द्वादशीस सांगितला, याविषयीं कल्पभेदानें व्यवस्था जाणावी.

तद्विधिश्च**हेमाद्रौवह्निपुराणे** नदीनांसंगमेस्नायादर्चयेदत्रवामनम् सौवर्णवस्त्रसंयुक्तंद्वादशांगुलमुच्छ्रितम् ततोविधिवत्संपूज्य हिरण्मयेनपात्रेणदद्यादर्घ्यंप्रयत्नतः नमस्तेपद्मनाभायनमस्तेजलशायिने तुभ्यमर्घ्यंप्रयच्छामिबालवामनरूपिणे नमःकमलकिंजल्कपीतनिर्मलवाससे महाहरिवपुस्कंधधृतस्कंधायचक्रिणे नमःशार्ङ्गसीरबाणपाणयेवामनायच यज्ञभुक्फलदात्रेचवामनायनमोनमः देवेश्वरायदेवायदेवसंभूतिकारिणे प्रभवेसर्वदेवानांवामनायनमोनमः एवंसंपूजयित्वातंद्वादश्यामुदयेरवेः शृंगारसहितंतंतुब्राह्मणायनिवेदयेत् वामनःप्रतिगृह्णातिवामनोहंददामिते वामनंसर्वतोभद्रंद्विजायप्रतिपादयेइति **अनंतभट्टो**प्याह श्रवणद्वादश्यांजनार्दननामाविष्णुःपूज्यते श्रवणैकादश्यांवामनावतारइति श्रवणयुतशुद्धैकादश्यलाभेतुदशमीविद्धापिश्रवणर्क्षयुताकार्या दशम्यैकादशीयत्रसानोपोष्याभवेत्तिथिः श्रवणेनतुसंयुक्तासाचेत्स्यात्सर्वकामदेति **वह्निपुराणा**दित्युक्तं**मदनरत्ने** पूजाचमध्याह्नेकार्या अह्नोमध्येवामनोरामरामावितिपूर्वोक्तवचनात् ।

**वामनव्रताचा विधि—हेमाद्रींत—वह्निपुराणांत**—"नद्यांच्या संगमीं स्नान करून या तिथीस सुवर्णमय, वस्त्रयुक्त, बारा अंगुळें उंच अशा वामनप्रतिमेचें पूजन करावें. तदनंतर यथाविधि पूजन करून सौवर्णपात्रानें अर्घ्य द्यावें. त्याचा मंत्र-**नमस्ते पद्मनाभाय नमस्ते जलशायिने ॥ तुभ्यमर्घ्यं प्रयच्छामि बालवामनरूपिणे ॥ नमः कमलकिंजल्कपीतनिर्मलवाससे ॥ महाहरिवपुस्कंधधृतस्कंधाय चक्रिणे ॥ नमः शार्ङ्गसीरबाणपाणये वामनाय च ॥ यज्ञभुक्फलदात्रे च वामनाय नमो नमः ॥ देवेश्वराय देवाय देवसंभूतिकारिणे ॥ प्रभवे सर्वदेवानां वामनाय नमो नमः** ॥ या प्रकारें द्वादशीस सूर्योदयीं वामनाची पूजा करून अलंकारसहित ती मूर्ति ब्राह्मणाला द्यावी. **दानमंत्र—वामनः प्रतिगृह्णाति वामनोहं ददामि ते ॥ वामनं सर्वतोभद्रं द्विजाय**

**प्रतिपादये."** **अनंतभट्टही** सांगतो. श्रवणद्वादशीस जनार्दननामक विष्णूची पूजा करितात. श्रवणयुक्त एकादशीस वामनावतार झाला. श्रवणयुक्त शुद्धैकादशी न मिळेल तर दशमीविद्धही श्रवणयुक्त करावी. कारण, "दशमीविद्ध एकादशीस उपोषण करूं नये; परंतु ती श्रवणयुक्त जर असेल तर सर्व कामना देणारी होते," असें **वह्निपुराणवचन** आहे. असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. पूजा मध्याह्नीं करावी. कारण, "मध्याह्नीं वामन, परशुराम, आणि राम हे झाले" असें पूर्वीं चैत्रमासीं वचन सांगितलें आहे.

अत्रैवदुग्धव्रतंसंकल्पयेत् तदुक्तं दुग्धमाश्वयुजेमासीति अत्रेदंचिंत्यते दुग्धव्रतेपायसादिवर्ज्यंनवेति नेति केचित् नहिप्रकृतिवर्जनेविकारवर्जनंयुक्तं दधिघृतादीनामपिवर्जनापत्तेः नचयत्रप्रकृतिरसोपलंभस्तद्वर्जनमितिवाच्यम् मांसविकारस्यौष्ट्रदध्यादेश्चावर्जनापत्तेः तस्माद्दध्यादिवत्पायसादिभक्ष्यमिति अत्रब्रूमः यत्रविकारेप्रकृतिरसोपलंभस्तत्प्रत्यभिज्ञावातत्रविकारस्यापिनिषेधः अस्तिचमांसविकारेमांसप्रत्यभिज्ञामांसत्वानपायात् यत्तु औष्ट्रदध्यादेरनिषेधापत्तिरिति तन्न औष्ट्रमितिविकारतद्धितेननिषेधात् तथाच**विज्ञानेश्वरः** औष्ट्रमैकशफंस्त्रैणमारण्यकमथाविकमित्यत्रऔष्ट्रमितिविकारतद्धिताच्छकृन्मूत्रादीनामपिनिषेधइत्याह नन्वेवंसंधिन्यनिर्दशाऽवत्सागोपयःपरिवर्जयेदितिसंधिन्यादिक्षीरनिषेधेपिदध्यादिग्रहणंस्यात् सत्यंप्राप्तं वचनेनपरंनिषेधः तदाहा**परार्केशंखः** क्षीराणियान्यभक्ष्याणितद्विकाराशनेबुधः सप्तरात्रंव्रतंकुर्यात्प्रयत्नेनसमाहितइति व्रतंगोमूत्रयावकं तस्मात्पायसेदुग्धरसोपलंभाद्वर्जनं अतएवामिक्षायांदधिसत्त्वेपिमाधुर्योपलंभात्पयोरूपत्वमुक्तंमीमांसकैः तदुक्तं पयएवघनीभूतमामिक्षेत्यभिधीयतइति दध्यादिषुतुतदभावादवर्जनमिति एवंदध्यादिव्रते नतक्रादीनांनिषेधः उक्तोभयहेत्वभावादिति**केचित्** पूर्वोक्तशंखवचनात्सर्वविकारनिषेधइतियुक्तंप्रतीमः **इतिदुग्धव्रतम्** ।

या द्वादशीसच दुग्धव्रताचा संकल्प करावा. तें सांगतो—'आश्विनमासांत दुग्ध वर्ज्य करावें' असें पूर्वीं सांगितलें आहे. या दुग्धव्रताविषयीं असा ( पुढें लिहिल्याप्रमाणें ) विचार करितात—दुग्धवर्जनव्रताचे ठायीं पायसादिक वर्ज्य करावें किंवा न करावें? न करावें, असें **केचित्** म्हणतात. कारण, दूध ही प्रकृति व पायसादिक हे त्या दुधाचे विकार असल्यामुळें, प्रकृतीचें वर्जन सांगितलें असतां विकृतीचें ( विकाराचें ) वर्जन युक्त नाहीं. जर विकाराचें वर्जन केलें तर दधि, घृत इत्यादिकांचें देखील वर्जन प्राप्त होईल. आतां असें म्हणूं कीं, ज्यांत प्रकृतीचा रस ( मधुरादि ) उपलब्ध आहे, त्याचें वर्जन करावें. असें म्हणतां येणार नाहीं. कारण, मांसाचा विकार एकादा असेल व त्यांत मांसरसाचा उपलंभ नसेल तर त्याचें आणि उंटाचें दहीं वगैरे यांचें वर्जन होणार नाहीं. म्हणून प्रकृतिरसाचा उपलंभ ज्यांत आहे त्याचें वर्जन असें म्हणूं नका. तर दधि इत्यादिक जसें भक्ष्य आहेत तसें पायसादिक भक्षण करावें. येथें आम्हीं ( कमलाकरभट्ट ) असें सांगतों कीं, ज्या विकाराचे ठायीं प्रकृतिरसाचा उपलंभ होतो, किंवा तोच ( प्रकृतीच ) हा असें ज्ञान होतें त्या ठिकाणीं विकाराचाही निषेध आहे. मांसाच्या विकारांत मांसाचें ज्ञान आहे. कारण, मांसत्व नाहींसें होत नाहीं. आतां जें उंटाचें दहीं वगैरे त्याचें वर्जन होणार नाहीं, म्हणून सांगितलें, तें बरोबर नाहीं. कारण, 'औष्ट्र' हा विकारार्थीं तद्धित प्रत्यय असल्यामुळें त्याचा निषेध होतो. तेंच **विज्ञानेश्वर**—"उंटाचें, एकशफाचे पशूचें, स्त्रियेचें, अरण्यांतील प्राण्याचें, व मेंढ्याचें दूध वर्ज्य." या वचनांत 'औष्ट्रं' ह्या उष्ट्र शब्दाहून विकारार्थीं तद्धित प्रत्यय केल्यामुळें उष्ट्राचे ( उंटाचे ) विकार असे जे विष्ठा, मूत्र इत्यादिक त्यांचाही निषेध, असें सांगतो. **शंका**—"संधिनी ( वृषभानें मैथुनार्थ आक्रमिलेली गाय ), प्रसूत होऊन दहा दिवस न झालेली, वत्सरहित, अशा गाईचें दूध वर्ज्य करावें" असा संधिनी इत्यादिकांच्या दुधाचा निषेध असला तरी दधि इत्यादिकांचें ग्रहण होईल. असें प्राप्त झालें खरें; पण वचनानें त्याचा निषेध होतो. तें सांगतो—**अपरार्कांत शंख**—"जीं अभक्ष्य दुग्धें सांगितलीं त्यांचे विकार भक्षण केले असतां प्रयत्नानें सप्तरात्र व्रत करावें." व्रत म्हणजे गोमूत्रांत यव भिजवून खावे. तस्मात् पायसाचे ठायीं दुग्धरसाचा उपलंभ होत असल्यामुळें पायस वर्ज्य आहे. म्हणूनच आमिक्षेचे ठायीं ( कढत दुधांत दहीं घातल्यानें झालेल्या द्रव्याचे ठायीं ) दहीं असलें तरी मधुररस असल्यामुळें तें दुग्धरूप आहे, असें **मीमांसकांनीं** सांगितलें आहे. तें सांगतो—"दूधच घट्ट झालें म्हणजे त्याला आमिक्षा म्हणतात." दधि इत्यादिकांत दुग्धाचा रस ( माधुर्य ) नसल्यामुळें त्याचें वर्जन नाहीं. याप्रमाणें दधि इत्यादि व्रतांत तक्रादिकांचा निषेध नाहीं. कारण, वर सांगितलेले दोन हेतु ( प्रकृतिरसाचा उपलंभ किंवा तोच हा अशी प्रत्यभिज्ञा ) हे नाहींत, असें **केचित्** म्हणतात. वर सांगितलेल्या शंखवचनावरून सर्व विकारांचा निषेध युक्त आहे, असें आम्हीं ( कमलाकरभट्ट ) समजतों. इति दुग्धव्रतं. ॥

भाद्रपदशुक्लचतुर्दश्यामनंतव्रतं तत्रत्रिमुहूर्ताप्यौदयिकीग्राह्येति **माधवः** तदुक्तम् उदयेत्रिमुहूर्तापिग्रा- ह्यानंतव्रतेतिथिरिति मध्याह्नेभोज्यवेलायामितिकथायांश्रवणादुपरिहिदेवेभ्योधारयतीतिवद्विधिकल्पनात् पू- जाव्रतेषुसर्वेषुमध्याह्नव्यापिनीतिथिरिति **माधवीये**वचनात् मध्याह्नव्यापिनीग्राह्येतितु **दिवोदासः प्रता- पमार्तंडे**प्येवं इदमेवचयुक्तं **निर्णयामृते**तुघटिकामात्राप्यौदयिकीत्युक्तम् तथाभाद्रपदस्यांतेचतुर्दश्यां- द्विजोत्तम पौर्णमास्याःसमायोगेव्रतंचानंतकंचरेदिति **भविष्योक्तेः** मुहूर्तमपिचेद्भाद्रेपूर्णिमायांचतुर्दशी सं- पूर्णातांविदुस्तस्यांपूजयेद्विष्णुमव्ययमिति **स्कांदाच्चेति** अत्रमूलंचिंत्यम्[1] द्व्यहे[2]प्यौदयिकत्वेपूर्णत्वात्पूर्वेतियुक्तम् तत्त्वंतुविध्यर्थवादयोर्भिन्नार्थत्वेएकवाक्यतायोगात् संदिग्धेषुएकवाक्यत्वादितिन्यायेनपूर्वापरावामध्याह्न- व्यापिन्येवमुख्या **माधव**स्तुसामान्यवाक्यान्निर्णयंकुर्वन्भ्रांतएव अनंतव्रतस्यपुराणांतरेष्वभावान्निबंधांतरे- ष्वभावाच्चवचनंनिर्मूलमेवेति ।

भाद्रपदशुक्ल चतुर्दशीस **अनंतव्रत.** त्याविषयीं उदयकाळीं तीन मुहूर्तेही असली तरी ती चतुर्दशी घ्यावी, असें **माधव** सांगतो-तें असें—"उदयकाळीं त्रिमुहूर्तेही चतुर्दशी अनंतव्रताविषयीं घ्यावी." "मध्याह्नीं भोजनाच्या वेळीं कौंडिन्यऋषीच्या पत्नीनें नदीच्या कांठीं उतरून इत्यादि" अनंताचे कथेंत सांगितल्यावरून, 'उपरि हि देवेभ्यो धारयति' म्ह० देवतोद्देश्यक यागामध्यें जुहूचें उपभृतीवर धारण करितो, हें वेदांतील वाक्य अर्थवाद असतां याच वाक्यानें विधि आहे अशी कल्पना होते, तसें येथें या कथेंतील वचनावरून मध्याह्नकालाचे विधीची कल्पना होत असल्यामुळें, "सर्व पूजाव्रतांचे ठायीं मध्या- ह्नव्यापिनी तिथि घ्यावी" असें **माधवीयांत** वचन आहे म्हणून तोच विधि समजून मध्याह्नव्यापिनी घ्यावी, असें तर **दिवोदास** सांगतो. **प्रतापमार्तंडांत**ही असेंच आहे. हेंच युक्त आहे. **निर्णयामृतांत** तर घटिकामात्रही उदय- व्यापिनी घ्यावी, असें सांगितलें आहे. कारण, "हे द्विजोत्तमा! भाद्रपदाचे अंतीं चतुर्दशीस पौर्णिमेचा योग असतां अनंतव्रत करावें" असें **भविष्यपुराण**वचन आहे. व "भाद्रपदमासीं पौर्णिमेस मुहूर्तमात्रही चतुर्दशी असेल तर ती संपूर्ण जाणून तिचे ठायीं अनंतरूपी विष्णूची पूजा करावी" असें **स्कंदपुराणांत**ही वचन आहे. याविषयीं मूल चिंत्य आहे. दोन दिवशीं उदयकाळीं असतां पूर्वदिवशीं पूर्ण असल्यामुळें पूर्वा घ्यावी हें योग्य. खरा प्रकार म्हटला तर-'उदये त्रिमुहूर्तापि' हें माधववचन व 'मुहूर्तमपि' इत्यादि स्कांदवचन हीं विधिवाक्यें म्हटलीं असतां विधिवाक्यांचा आणि वरील कथेंतील अर्थवादवाक्याचा अर्थ भिन्नभिन्न झाला असतां दोघांची ( अर्थवाद व विधि यांची ) एकवाक्यता होणार नाहीं, म्हणून संदिग्धस्थळीं एकवाक्यतेनें अर्थ करावा, या न्यायानें पूर्वा किंवा परा मध्याह्नव्यापिनीच मुख्य आहे. **माधव** तर सामान्य वाक्यावरून निर्णय करितो म्हणून तो भ्रांतिष्ट झाला आहे. अनंतव्रत इतर पुराणांत व इतर निबंधांतही नसल्यामुळें वरील भविष्यादिवचन निर्मूलच आहे.

**अथागस्त्यार्घ्यः** तत्कालोव्रत**हेमाद्रौभविष्ये** कन्यायामागतेसूर्येअर्वाग्वैसप्तमेदिने कन्यायांस- मनुप्राप्तेह्यर्घकालोनिवर्तते तेनउदयोत्तरमपिसप्तदिनमध्येइत्यर्थः **यत्पाद्मे** आसप्तरात्रादुदयाद्यमस्यदातव्य- मेतत्सकलंनरेण यावत्समाःसप्तदशाथवास्युरथोर्ध्वमप्यत्रवदंतिकेचित् यमस्यागस्त्यस्य उदयकालश्च**दिवो- दासीये**उक्तः उदेतियाम्यांहरिसंक्रमाद्रवेरेकाधिकेविंशतिमेह्यगस्त्यः ससप्तमेस्तंवृषसंक्रमाच्चप्रयातिगर्गादि- भिरप्यभाणि ।

आतां **अगस्त्यार्घ्य** सांगतो—त्याचा काल **व्रतहेमाद्रींत भविष्यांत**—"कन्याराशीस सूर्य जाण्याचे पूर्वी सातव्या दिवशीं अगस्त्याचा अर्घ्यकाल प्राप्त आहे. कन्येस सूर्य गेला असतां अर्घ्यकाल निवृत्त होतो." या वचनावरून उदयोत्तरही सातदिवसांमध्यें अर्घ्य द्यावा, असा अर्थ. कारण, **पाद्मांत** सांगतो—"अगस्त्याच्या उदयापासून सातदिवसपर्यंत हें अग- स्तीला अर्घ्य सकल मनुष्यांनीं द्यावें. याप्रमाणें सतरावर्षेंपर्यंत करावें. अथवा सतरावर्षांनंतरही ह्या काळीं हें अर्घ्यदानादि करावें, असें केचित् म्हणतात." उदयकाल **दिवोदासीयांत** सांगतो—"सूर्याच्या सिंहसंक्रांतीपासून एकवीस दिवसांनीं दक्षिणेस अगस्ति उदय पावतो, आणि वृषसंक्रांतीपासून सातवे दिवशीं अगस्तीचें अस्त होतें, असें **गर्गादिकांनीं** सांगितलें आहे."

अत्रविधि**र्विष्णुरहस्ये** काशपुष्पमयींरम्यांकृत्वामूर्तिंतुवारुणेः प्रदोषेविन्यसेत्तांतुपूर्णकुंभेस्वलंकृताम् कुंभस्थांपूजयेत्तांतुपुष्पधूपविलेपनैः दध्यक्षतबलिंदद्याद्रात्रौकुर्यात्प्रजागरं पूजाचवक्ष्यमाणार्घ्यमंत्रेणकार्या

१ अत्रमूलं चिंत्यमिति योगमुहूर्तादिवचनानां त्रिमुहूर्तस्तावकत्वेनोपपत्तेः स्वार्थमात्रे मानाभावात्। २ द्व्यहे औदयिकत्वे इति यत्र परेद्यु न त्रिमुहूर्ता तत्र विद्धापि पूर्वा बोध्या।

प्रभातेतांसमादाययायात्पुण्यंजलाशयं निशावसानेतांपश्यन्जलांतेप्रतिमांमुनेः अर्घ्यंदद्यादगस्त्यायभक्त्या-सम्यगुपोषितः **मात्स्येतु** अंगुष्ठमात्रंपुरुषंतथैवसौवर्णमत्यायतबाहुदंडं पूर्वंकाशमयीत्वमशक्तौ चतुर्भुजंकुं-भमुखेनिधायधान्यानिसप्तांकुरसंयुतानि सकाशपुष्पाक्षतशुक्तियुक्तमंत्रेणदद्याद्द्विजपुंगवाय धेनुंबहुक्षीरवतीं-चदद्यात्सवस्त्रघंटाभरणांद्विजाय **भविष्ये** विरूढैःसप्तधान्यैश्चवंशपात्रनिधापितैः सौवर्णरूप्यपात्रेणताम्र-वंशमयेनवा मूर्ध्निस्थितेननम्रेणजानुभ्यांधरणींगतः **विष्णुरहस्ये** अगस्त्यःखनमानेतिपठन्मंत्रमिमंमुनेः अर्घ्यंदद्यादगस्त्यायशूद्रेमंत्रविधिस्त्वयं काशपुष्पप्रतीकाशवह्निमारुतसंभव मित्रावरुणयोःपुत्रकुंभयोनेनमो-स्तुते विंध्यवृद्धिक्षयकरमेघतोयविषापह रत्नवल्लभदेवेशलंकावासनमोस्तुते वातापीभक्षितोयेनसमुद्रःशोषि-तःपुरा लोपामुद्रापतिःश्रीमान्योसौतस्मैनमोनमः येनोदितेनपापानिविलयंयांतिव्याधयः तस्मैनमोस्त्वग-स्त्यायसशिष्यायचपुत्रिणे अगस्त्यःखनमानेतिविप्रोर्घ्यंविनिवेदयेत् राजपुत्रिमहाभागेऋषिपत्निवरानने लोपा-मुद्रेनमस्तुभ्यमर्घ्यंमेप्रतिगृह्यतां दत्वैवमर्घ्यंकौरव्यप्रणिपत्यविसर्जयेत् अर्चितस्त्वंयथाशक्त्यानमोगस्त्यमहर्षये ऐहिकामुष्मिकींदत्वाकार्यसिद्धिंव्रजस्वमे विसर्जयित्वागस्त्यंतंविप्रायप्रतिपादयेत् अगस्त्योमेमनस्थोस्तुअग-स्त्योस्मिन्घटेस्थितः आगस्त्योद्विजरूपेणप्रतिगृह्णातुसत्कृतः **दानमंत्रः** अगस्त्यःसप्तजन्माघंनाशयंत्वावयो-रयम् अतुलंविमलंसौख्यंप्रयच्छत्वंमहामुने प्रतिग्रहमंत्रः **विष्णुरहस्ये** त्यजेदगस्त्यमुद्दिश्यधान्यमेकंफलंर-सम् होमंकृत्वाततःपश्चाद्वर्जयेन्मानवःफलम् होमश्चार्घ्यमंत्रेणाज्येन **भविष्ये** दत्वार्घ्यंसप्तवर्षाणिक्रमेणाने-नपांडव ब्राह्मणःस्याच्चतुर्वेदःक्षत्रियःपृथिवीपतिः वैश्येचधान्यनिष्पत्तिःशूद्रश्चधनवान्भवेत् यावदायुश्चयः-कुर्यात्सपरंब्रह्मगच्छति इत्यगस्त्यार्घ्यः ।

अगस्त्यार्घ्याचा **विधि विष्णुरहस्यांत**—"अगस्त्याची मूर्ति काशतृण, पुष्पें यांनीं सुंदर करून तिला अलंकार घालून प्रदोषकालीं पूर्णकुंभावर ठेवावी आणि कुंभावर ठेविलेली ती मूर्ति पुष्प, धूप, गंध यांहींकरून पुजावी. दधियुक्त अक्षतांचा बलि द्यावा, व रात्रीस जागरण करावें." पूजा तर पुढें सांगितलेल्या अर्घ्यमंत्रानें करावी. "प्रातःकालीं ती मूर्ति घेऊन पुण्य अशा उदकाजवळ जावें. चांगलें उपोषण करून रात्र गेल्यानंतर उदकाच्या समीप त्या मुनीच्या प्रतिमेतें पाहात होत्साता भक्तीनें अगस्त्यास अर्घ्य द्यावें. **मत्स्यपुराणांत** तर "सुवर्णाचा अंगुष्ठप्रमाण पुरुष करावा, त्याचे बाहुदंड फार लांब असावे. पूर्वीं काशतृणाची मूर्ति करावी, म्हणून सांगितलें तें शक्ति नसतां समजावें. अंकुर आलेलीं सप्तधान्यें, काशपुष्पें, अक्षता, शिंप यांनीं सहित चतुर्भुज अशी प्रतिमा कुंभाच्या मुखावर ठेऊन ब्राह्मणश्रेष्ठाला द्यावी व बहुतदुधाची गाय वस्त्र, घंटा, अलंकार यांनीं सहित ब्राह्मणास द्यावी. **भविष्यांत** "वांवूचे पात्रांत ठेवून रुजलेल्या सप्तधान्यांनीं युक्त सोन्याचें, रुप्याचें, तांब्याचें अथवा वांवूचें पात्र मस्तकीं ठेऊन नम्र होऊन गुडघ्यांनीं भूमीला स्पर्श करावा." **विष्णुरहस्यांत** "**अगस्त्यः खनमानः**" हा मंत्र म्हणून अगस्त्यास अर्घ्य द्यावें. शूद्राविषयीं हा पुढें सांगितलेला **मंत्र—काशपुष्पप्रतीकाश वह्निमारुतसंभव ॥ मित्रावरुणयोः पुत्र कुंभयोने नमोस्तु ते ॥ विंध्यवृद्धिक्षयकर मेघतोयविषापह ॥ रत्नवल्लभदेवेश लंकावास नमोऽस्तु ते ॥ वातापी भक्षितो येन समुद्रः शोषितः पुरा ॥ लोपामुद्रापतिः श्रीमान् योऽसौ तस्मै नमो नमः ॥ येनोदितेन पापानि विलयं यांति व्याधयः ॥ तस्मै नमोस्त्वगस्त्याय सशिष्याय च पुत्रिणे** ॥ '**अगस्त्यः खनमानः**' ह्या मंत्रेंकरून ब्राह्मणानें अर्घ्य द्यावें. नंतर अगस्त्याचे पत्नीस अर्घ्य द्यावें. **त्याचा मंत्र-राजपुत्रि महाभागे ऋषिपत्नि वरानने ॥ लोपामुद्रे नमस्तुभ्यमर्घ्यं मे प्रतिगृह्यतां** असें अर्घ्य देऊन नमस्कार करून विसर्जन करावें. विसर्जनाचा मंत्र—**अर्चितस्त्वं यथाशक्त्या नमोगस्त्य महर्षये ॥ ऐहिकामुष्मिकीं दत्वा कार्यसिद्धिं व्रजस्व मे** ॥ याप्रमाणें अगस्त्याचें विसर्जन करून तो अगस्त्य ब्राह्मणाला द्यावा. दानाचा **मंत्र-अगस्त्यो मे मनस्थोस्तु अगस्त्योस्मिन् घटे स्थितः ॥ अगस्त्यो द्विजरूपेण प्रतिगृह्णातु सत्कृतः ॥ प्रतिग्रहाचा मंत्र—अगस्त्यः सप्तजन्माघं नाशयत्वावयोरयं ॥ अतुलं विमलं सौख्यं प्रयच्छ त्वं महामुने ॥" विष्णुरहस्यांत**–"अगस्त्याच्या उद्देशानें एक धान्य, एक फल, एक रस, हीं सोडावीं. नंतर होम करून मनुष्यानें फल वर्ज्य करावें." होमही अर्घ्योक्त मंत्रानें आज्याचा करावा. **भविष्यांत—"हे** पांडवा ! या क्रमानें सात वर्षे अर्घ्य दिलें असतां ब्राह्मण चतुर्वेदवेत्ता होतो. क्षत्रिय पृथिवीपति होतो. वैश्यास धान्यप्राप्ति, व शूद्र धनवान् होतो. आयुष्य आहे तोंपर्यंत जो अगस्त्याला अर्घ्यदान करितो तो परब्रह्मपदास जातो." ॥ **इत्यगस्त्यार्घ्यः** ॥

१ अगस्त्यइति। अगस्त्यःखनमानःखनित्रैःप्रजामपत्यंबलमिच्छमानः ॥ उभौवर्णावृषिरुग्रः पुपोषसत्यादेवेष्वाशिषोजगाम इति मंत्रः ॥

भाद्रपौर्णमास्यांप्रपितामहात्परांस्त्रीनुद्दिश्यश्राद्धंकार्यं तदुक्तं **हेमाद्रौब्राह्ममार्कंडेययोः** नांदीमुखानां प्रत्यब्दंकन्याराशिगतेरवौ पौर्णमास्यांतुकर्तव्यवराहवचनंयथेति नांदीमुखत्वंचोक्तं **ब्राह्मे** पितापितामहश्चैव तथैवप्रपितामहः त्रयोह्यश्रुमुखाह्येतेपितरःपरिकीर्तिताः तेभ्यःपूर्वतरायेचप्रजावंतःसुखैधिताः तेतुनांदीमुखानांदीसमृद्धिरितिकथ्यते एतच्चप्रत्यब्दमित्युक्तेः पक्षश्राद्धपक्षेसकृन्महालयपक्षेचावश्यकमिति **प्रयोगपारिजाते** अत्रमातामहाअपिकार्याः पितरोयत्रपूज्यंतेतत्रमातामहाअपीति **धौम्योक्तेः** पितृशब्दस्यचजनकपरत्वेबहुवचनविरोधेनपितृभावापन्नपरत्वात् वार्षिकेतुवचनान्निवृत्तिः नचजीवत्पितृकस्यान्वष्टकायांमातृश्राद्धेतदापत्तिः इष्टापत्तेः अतएवसउक्तश्राद्धेषुस्वमातृमातामहयोर्दद्यादिति **मदनरत्नकालादर्शौ** एतज्जीवत्पितृकश्राद्धेवक्ष्यामः **केचित्तु**अजहल्लक्षणयापित्रादयोयत्रतत्रमातामहास्तेनात्रनेत्याहुः नचात्रनाम्नानांदीश्राद्धधर्मातिदेशः वैष्णवादिशब्दवद्देवतापरस्यकर्मनामत्वाभावात् नापिनांदीमुखत्वंपितृविशेषणंपारिभाषिकत्वादितिदिक् तथा**निर्णयदीपेगार्ग्यः** पौर्णमासीषुसर्वासुनिषिद्धंपिंडपातनम् वर्जयित्वाप्रौष्ठपदींयथादर्शस्तथैवसेति इतिश्रीमीमांसकरामकृष्णभट्टात्मजभट्टकमलाकरकृतेनिर्णयसिंधौभाद्रपदमासः ।

भाद्रपदपौर्णिमेचे ठायीं प्रपितामहाच्या पूर्वींचे जे तीन पुरुष त्यांच्या उद्देशेंकरून श्राद्ध करावें. तें सांगतो **हेमाद्रींत ब्राह्मांत व मार्कंडेयांत**—"कन्याराशीस सूर्य गेला असतां पौर्णमासीस प्रतिवर्षीं नांदीमुखांचें श्राद्ध करावें, असें **वराहवचन आहे.**" नांदीमुख कोणते ते सांगतो **ब्राह्मांत**—"पिता, पितामह, प्रपितामाह हे तीन पितर अश्रुमुख होत; त्यांहून पूर्वींचे ( पलीकडचे ) जे प्रजावंत सुखानें वाढलेले ते नांदीमुख होत. नांदी म्हणजे समृद्धि म्हटली आहे." हें श्राद्ध प्रतिवर्षी करावें असें सांगितल्यावरून महालयश्राद्ध पंधरा दिवस करावयाचें ह्या पक्षीं व सकृन्महालयपक्षींही आवश्यक होय, असें **प्रयोगपारिजातांत** सांगितलें आहे. ह्या श्राद्धांत मातामहही घ्यावे; कारण, "पितरांची जेथें पूजा करावयाची, तेथें मातामहांचीही करावी" असें **धौम्य**वचन आहे. या ठिकाणीं पिता इत्यादिक पितर नसून वृद्धप्रपितामहादिक असल्यामुळें 'पितरो यत्र पूज्यंते' ह्या धौम्यवचनाची प्रवृत्ति कशी? असें कोणी म्हणेल तर, 'पितृ' हा शब्द जनकपित्याचा वाचक मानला तर बहुवचनाचा विरोध येत असल्यामुळें ज्यांना पितृत्व प्राप्त झालें आहे त्यांचा वाचक ( बोधक ) पितृ शब्द आहे. प्रतिवार्षिक श्राद्धांत मातामह कां येत नाहींत असें म्हटलें तर त्या ठिकाणीं मातामहश्राद्ध करूं नये, अशा वचनावरून मातामहांची निवृत्ति होते. आतां असें म्हटलें तर जीवत्पितृकाचे अन्वष्टकाचे ठायीं मातृश्राद्धांत मातामह प्राप्त होतील? तर ते इष्ट आहेत. मातृश्राद्धांत मातामह इष्ट आहेत म्हणूनच "त्यानें, उक्त श्राद्धांत आपल्या मातेला व मातामहाला द्यावें" असें **मदनरत्न** व **कालादर्श** सांगतात. हा प्रकार जीवत्पितृकश्राद्धप्रकरणीं ( तृतीयपरिच्छेदाच्या उत्तरार्धांत ) पुढें सांगूं. **केचित्** तर—'पितृ' या शब्दाची पिता व पित्याचे पूर्वींचे ह्यांच्यावर [1]अजहल्लक्षणा करून पिता धरून पूर्वींचे जेथें असतील तेथें मातामह पुजावे, असा अर्थ करावा. तेणेंकरून येथें ( या प्रौष्ठपदीश्राद्धांत ) पिता नसल्यामुळें मातामह नाहींत, असें सांगतात. आतां असें म्हणूं कीं, ह्या वृद्धप्रपितामहादिकांना नांदीमुख असें नांव असल्यामुळें नांदीश्राद्धाचे धर्म या श्राद्धांत येतील? असें म्हणतां येत नाहीं. कारण, जसे वैष्णव इत्यादिक शब्द देवताबोधक आहेत, तसा येथें नांदीमुख हा शब्द या श्राद्धांत जे पितर देवता त्यांचा बोधक आहे, म्हणून या श्राद्धरूप कर्माचा बोधक तो शब्द नाहीं. ह्या श्राद्धांतील पितरांना नांदीमुख हें विशेषणही नाहीं. ते पितर नांदीमुख आहेत, इतकाच संकेत आहे. ही दिशा समजावी. तसेंच **निर्णयदीपांत गार्ग्य**-"सान्या पौर्णिमेचे ठायीं पिंडदान निषिद्ध आहे. प्रौष्ठपदी पौर्णिमा वर्ज्य करून हें समजावें. कारण, जसा दर्श तशीच ती प्रौष्ठपदी आहे." **इतिभाद्रपदमासः** ॥

कन्यासंक्रमेपराःषोडशघटिकाःपुण्याः शेषंप्राग्वत् **अथमहालयः** तत्रपृथ्वीचंद्रोदये**वृद्धमनुः** आषाढीमवधिंकृत्वापंचमंपक्षमाश्रिताः कांक्षंतिपितरःक्लिष्टाअन्नमप्यन्वहंजलं कन्यायोगेपुण्यतमत्वमाह **शाट्यायनिः** कन्यास्थार्कान्वितःपक्षःसोत्यंतंपुण्यमुच्यतइति अत्रविशेषमाह**वृद्धमनुः** मध्येवायदिवाप्यंतेयत्रकन्यांव्रजेद्रविः सपक्षःसकलःश्रेष्ठःश्राद्धषोडशकंप्रति तथा**ब्रह्मांडमार्कंडेययोः** कन्यागतेसवितरिदिनानिदशपंचच पार्वणेनेहविधिनाश्राद्धंतत्रविधीयते तथातत्रैवषोडशदिनान्युक्तानि कन्यागतेसवितरि-

---

१ जसें—'काकेभ्यो दधि रक्ष्यतां' या वाक्यांत काक या पदाची दधिघातक जे त्यांच्यावर लक्षणा केली आहे. त्यांत काक सुटत नाहींत, व इतरही मार्जारादिक येतात, म्हणून ती अजहल्लक्षणा होय. तशी येथें 'पितृ' या शब्दाची पिता व त्याच्या पूर्वींचे यांच्यावर अजहल्लक्षणा होते, असा भाव.

यान्यहानितुषोडश क्रतुभिस्तानितुल्यानिदेवोनारायणोब्रवीत् अत्र**हेमाद्रिः**षोडशत्वंत्रेधाव्याचख्यौ तिथिवृद्ध्यापक्षस्यषोडशदिनात्मकत्वेश्राद्धवृद्ध्यर्थमेकःपक्षः भाद्रपदपूर्णिमयासहेतिद्वितीयः आश्विनशुक्लप्रतिपदासहेतितृतीयः अंत्यएवतुयुक्तः अहःषोडशकंयत्तुशुक्लप्रतिपदासह चंद्रक्षयाविशेषेणसापिदर्शात्मिकास्मृतेति**देवलोक्तेः**।

## आतां आश्विनमास.

कन्यासंक्रांतीच्या पुढच्या षोडश ( सोळा ) घटिका पुण्यकाळ. बाकीचा निर्णय ( रात्रीं संक्रांत असतां वगैरे ) पूर्वीप्रमाणें समजावा. **आतां महालय सांगतो—पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धमनु**—"क्लेशयुक्त झालेले पितर आषाढीपासून पांचव्या पक्षामध्यें दररोज अन्न व उदक यांची इच्छा करितात." कन्यासंक्रांतीचा योग असतां अतिशयेंकरून पुण्य सांगतो **शाट्यायनि**—"कन्यार्कानें युक्त जो पक्ष तो अत्यंत पुण्यकारक सांगितला आहे." येथें विशेष सांगतो **वृद्धमनु**—"ज्या पक्षाच्या मध्यें किंवा अंतीं सूर्य कन्येस जाईल तो सारा पक्ष सोळाश्राद्धांविषयीं श्रेष्ठ आहे." तसेंच **ब्रह्मांडांत** व **मार्कंडेयांत**—"सूर्य कन्येस गेला असतां जे पंधरा दिवस त्यांचे ठायीं पार्वणविधीनें श्राद्ध करावें." तसे तेथेंच सोळा दिवस सांगितले आहेत—"सूर्य कन्येस गेला असतां जे सोळा दिवस ते यज्ञसमान आहेत, असें देवनारायण सांगतात." या वचनांत सोळा दिवस सांगितले ते **हेमाद्रि** तीन प्रकारानें सांगतो — ह्या भाद्रपदकृष्णपक्षांत तिथीची वृद्धि होऊन पक्षाचे सोळा दिवस झाले असतां श्राद्धांची वृद्धि ( सोळा श्राद्धें ) होते हा एक पक्ष. भाद्रपदपूर्णिमेसह सोळा दिवस होतात, हा दुसरा पक्ष. आश्विन शुक्लप्रतिपदेसह सोळा दिवस होतात, हा तिसरा पक्ष. ह्या तीन पक्षांत शेवटचा तिसरा पक्षच युक्त आहे. कारण, "आश्विनशुक्लप्रतिपदेसह जे सोळा दिवस ते श्राद्धाला योग्य आहेत; कारण, शुक्लप्रतिपदेसही चंद्राचा क्षय असल्यामुळें ती देखील दर्शरूपी आहे" असें **देवल**वचन आहे.

तत्रपंचपक्षाः तदुक्तं**हेमाद्रौब्राह्मे** आश्वयुक्कृष्णपक्षेतुश्राद्धंकार्यंदिनेदिने त्रिभागहीनंपक्षंवात्रिभागंत्वर्धमेववा दिनेदिनेइतिपक्षपर्यंतत्वमुक्तम् त्रिभागहीनमितिपंचम्यादिपक्षः त्रिभागमितिदशम्यादिपक्षः त्रिभागहीनमितिचतुर्दशीसहितप्रतिपदादिचतुष्टयवर्जनाभिप्रायेणेति**कल्पतरुः** अत्रदिनपदंतिथिपरंवीप्सयातत्पक्षीयतिथित्वंश्राद्धव्याप्यतावच्छेदकम् तेनपंचदशतिथिव्यापिश्राद्धंसिध्यति तेनचतुर्दशीनिषेधोऽन्यकृष्णपक्षपरइति**गौडाः** तन्न श्राद्धंशस्त्रहतस्यैवचतुर्दश्यांमहालये इत्यादिविरोधात् यत्तु **कश्चित्** पूरणप्रत्ययलोपेनतृतीयभागहीनंपष्ठ्यादिपक्षं तृतीयभागमेकादश्यादि तदर्धंत्रयोदश्यादि उत्तरोत्तरंलघुकालोक्तेरिति तन्न गौतमादिवचनेनमूलकल्पनालाघवात् पक्षमित्यनन्वयापत्तेश्च पंचम्यूर्ध्वंचतत्रापिदशम्यूर्ध्वंततोप्यतीति **विष्णुधर्मोक्तेः**षष्ठ्याद्येकादश्यादिपक्षावपिज्ञेयावितितत्त्वम् **कालादर्शेपि** पक्षाद्यादिचदर्शांतंपंचम्यादिदिगादिच अष्टम्यादियथाशक्तिकुर्यादापरपक्षिकम् पक्षादिःप्रतिपत् दिक्दशमी दर्शांतमितिसर्वत्र **गौतमोपि** अथापरपक्षेश्राद्धंपितृभ्योदद्यात्पंचम्यादिदर्शांतमष्टम्यादिदशम्यादिसर्वस्मिन्श्चेति तथैकस्मिन्नपिदिने श्राद्धमुक्तं**हेमाद्रौनागरखंडे** आषाढ्याःपंचमेपक्षेकन्यासंस्थेदिवाकरे योवैश्राद्धंनरःकुर्यादेकस्मिन्नपिवासरे तस्यसंवत्सरंयावत्संतृप्ताःपितरोध्रुवमिति अत्रशक्ताशक्तपरात्व्यवस्थेति**प्रांचः** तन्न तद्वाचकपदाभावात् नत्रयोदश्यादिपक्षएवनित्यः तत्रैवनिंदाश्रुतेः **ब्राह्मे**एवकारेणतस्यैवपंचमपक्षयोगव्यवच्छेदोक्तेरिति**गौडाः** तन्न एकस्मिन्नपीतिविरोधात् तेनफलभूमार्थिनान्यानिकार्याणीति**तत्त्वम्** तत्रचतुर्दशीश्राद्धाभावेपंचम्यादिदशम्यादिपक्षौ तत्सत्वेषष्ठ्याद्येकादश्यादिकौ एवंचतुर्दश्यभावेद्वादश्यादिःतत्सत्वेत्रयोदश्यादिरितिव्यवस्था।

ह्या महालयश्राद्धांचे पांच पक्ष आहेत. ते सांगतो **हेमाद्रींत ब्राह्मांत**—"आश्विनकृष्णपक्षांत दररोज श्राद्ध करावें. अथवा तिथींच्या तिसऱ्या भागानें हीनपक्ष म्हणजे पंचमीपासून श्राद्ध करावें. किंवा तिसरा भाग म्हणजे दशमीपासून श्राद्ध करावें. अथवा निमे तिसरा भाग श्राद्ध करावें." या वचनांत दररोज करावें, असें सांगितलें तें सारा पक्ष समजावा. 'तिसऱ्या भागानें हीन' म्हटलें तें पंचमीपासून समजावें. 'तिसरा भाग' असें म्हटलें तें दशमीपासून समजावें. तिसऱ्या भागानें हीन पक्ष असें सांगितलें त्याचा अभिप्राय असा—प्रतिपदादि चार तिथि आणि चतुर्दशी ह्या पांच तिथि वर्ज्य करून, असें **कल्पतरु** सांगतो. या वचनांत 'दिने' हें पद तिथिवाचक आहे, त्या पदाची वीप्सा ( द्विरुक्ति ) असल्यानें असा अर्थ होतो कीं, त्या पक्षांतील जी जी तिथि त्या त्या तिथीस श्राद्ध होतें. असा अर्थ झाल्यानें पंधरा तिथींना व्यापून

श्राद्ध सिद्ध झालें आहे. तेणेंकरून चतुर्दशीला जो श्राद्धनिषेध तो इतर कृष्णपक्षाविषयीं आहे, असें **गौड** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, "शस्त्रानें मारलेल्याचेंच महालयांतील चतुर्दशीस श्राद्ध होतें" इत्यादि वचनाचा विरोध येईल. आतां जें कोणीएक सांगतो कीं, वरील वचनांत 'त्रिभागहीनं' या पदांत 'त्रि' शब्दापुढें पूरणप्रत्ययाचा लोप झालेला आहे. त्यावरून 'तृतीयभागहीनं' म्हणजे तिसऱ्या भागानें हीन असा पक्ष म्हटला म्हणजे षष्ठीपासून अमावास्येपर्यंत होय. तसाच 'त्रिभाग' म्हणजे तिसरा भाग होय, तो एकादशीपासून अमावास्येपर्यंत. त्याचा अर्ध म्हणजे त्रयोदशीपासून अमावास्येपर्यंत. कारण, उत्तरोत्तर अल्पकाल सांगितला आहे, असें सांगतो. तें बरोबर नाहीं. कारण, गौतमादिवचन पंचम्यादि पक्षांविषयीं असल्यामुळें वचनाचा असा अर्थ करण्यापेक्षां तशाविषयीं मूलवचनाची कल्पना केली तर लाघव येईल. आणि 'पक्षं' ह्या पदाला तिसऱ्या भागानें ( प्रतिपदादि पांच तिथींनीं ) हीन, असा अन्वयही होत नाहीं. "त्या कृष्णपक्षांतही पंचमीच्या पुढच्या तिथींस करावें. अथवा दशमीच्या पुढच्या तिथींस करावें." ह्या **विष्णुधर्म**वचनावरून षष्ठीपासून व एकादशीपासून तिथींस करावें, हे पक्षही आहेत असें समजावें, हें खरें तत्त्व होय. **कालादर्शांत**ही—"प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत आपरपक्षिकश्राद्ध ( महालय ) करावें. पंचमीपासून अमावास्येपर्यंत, दशमीपासून अमावास्येपर्यंत, अष्टमीपासून अमावास्येपर्यंत, आपल्या शक्तीप्रमाणें आपरपक्षिक श्राद्ध करावें." **गौतम**ही—"आतां अपरपक्षांत पितरांना श्राद्ध द्यावें. तें असें—पंचमीपासून दर्शापर्यंत, अष्टमीपासून दर्शापर्यंत, दशमीपासून दर्शापर्यंत, आणि पक्षाच्या सर्वतिथींस असे पक्ष आहेत." तसेंच एकाही दिवशीं श्राद्ध सांगतो **हेमाद्रींत नागरखंडांत**—"आषाढीपासून पांचव्या पक्षांत कन्याराशीस सूर्य गेला असतां जो मनुष्य एकाही दिवशीं श्राद्ध करील त्याचे पितर संवत्सरपर्यंत तृप्त होतात, यांत संशय नाहीं." ह्या वरील सर्व पक्षांविषयीं शक्ति व अशक्ति पाहून व्यवस्था करावी, असें प्राचीन पंडित सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, त्या वरील वचनांत शक्ति व अशक्तिबोधक पद नाहीं. त्रयोदशीपासून अमावास्येपर्यंत हाच पक्ष नित्य आहे, असें नाहीं. कारण, त्या त्रयोदशीसच निंदा पुढें केलेली आहे. वरील 'आश्वयुक् कृष्णपक्षे तु०' ह्या ब्राह्मवचनांत 'त्रिभागंलर्धमेव' म्हणजे तिसऱ्या भागाचा अर्धच ( त्रयोदशीपासून अमावास्येपर्यंतच ) करावें. येथें 'एव' काराच्या योगेंकरून त्या त्रयोदश्यादिपक्षालाच पांचव्या पक्षा ( ह्या वचनांत सांगितलेल्या चार पक्षांहून अधिक पक्षा ) चा योग नाहीं असें सांगितल्यावरून तो त्रयोदश्यादि पक्षच नित्य आहे, असें **गौड** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, 'एकस्मिन्नपि वासरे' ह्या वरील नागरखंडवचनाशीं विरोध येतो. यावरून सकृन्महालयच नित्य आहे. मोठें फल इच्छिणारानें सकृन्महालयावांचून इतर प्रतिपदादिश्राद्धें करावीं, हें तत्त्व होय. त्यांमध्यें चतुर्दशीश्राद्ध करावयाचें नसेल तर पंचमीपासून व दशमीपासून हे पक्ष घ्यावे. चतुर्दशीश्राद्ध करावयाचें असेल तर षष्ठीपासून व एकादशीपासून हे पक्ष घ्यावे. याप्रमाणें चतुर्दशीश्राद्धाभावीं द्वादश्यादि पक्ष, व चतुर्दशीश्राद्ध असेल तर त्रयोदशीपासून हा पक्ष होय, अशी वर सांगितलेल्या पक्षांची व्यवस्था समजावी.

विधवायास्तुविशेषः**स्मृतिसंग्रहे** चत्वारःपार्वणाःप्रोक्ताविधवायाःसदैवहि स्वभर्तृश्वशुरादीनांमातापित्रोस्तथैवच ततोमातामहानांचश्राद्धदानमुपक्रमेत् **तथा** श्वश्रूणांचविशेषेणमातामह्यास्तथैवचेति अशक्तौतु **स्मृतिरत्नावल्याम्** स्वभर्तृप्रभृतित्रिभ्यःस्वपितृभ्यस्तथैवच विधवाकारयेच्छ्राद्धंयथाकालमतंद्रिता विधवास्वयंसंकल्पंकृत्वान्यद्ब्राह्मणद्वाराकारयेदित्युक्तं **प्रयोगपारिजाते** ।

विधवाकर्तृक श्राद्धांत विशेष सांगतो **स्मृतिसंग्रहांत**—"विधवेला श्राद्धांत चार पार्वण सांगितले आहेत. ते असे—भर्तृतत्पित्रादिपार्वण, मातृपार्वण, पितृपार्वण, आणि मातामहपार्वण यांना श्राद्ध द्यावें." तसेंच "श्वश्रूपार्वण आणि मातामहीपार्वण यांनाही द्यावें." चार पार्वणाविषयीं अशक्ति असेल तर सांगतो **स्मृतिरत्नावलींत**—"भर्तृतत्पितृपितामहांना आणि आपल्या पितृपितामहप्रपितामहांना विधवेनें यथाकालीं श्राद्ध करावें." विधवेनें स्वतः आपण संकल्प करून इतर विधि ब्राह्मणाकडून करवावा, असें **प्रयोगपारिजातांत** सांगितलें आहे.

सकृन्महालयेचवर्ज्यतिथ्याद्युक्तंपृथिवीचंद्रोदयप्रयोगपारिजातादिषु **वसिष्ठः** नंदायांभार्गवदिनेचतुर्दश्यांत्रिजन्मसु एषुश्राद्धंनकुर्वीतगृहीपुत्रधनक्षयात् जन्मभंतत्पूर्वोत्तरेचत्रिजन्मानि **वृद्धगार्ग्यः** प्राजापत्येचपौष्णेचपित्र्यर्क्षेभार्गवेतथा यस्तुश्राद्धंप्रकुर्वीततस्यपुत्रोविनश्यति प्राजापत्यंरोहिणी पौष्णंरेवती पित्र्यंमघा अन्यान्यपिप्रत्यरादीनितत्रैवज्ञेयानि **केचित्तु** नंदाश्वकामरव्यारभृग्वग्निपितृकालभे गंडेवैधृतिपातेचपिंडास्त्याज्याःसुतेप्सुभिरिति**संग्रहात्** नंदाप्रतिपत्षष्ठ्येकादश्यः अश्वःसप्तमी कामस्त्रयोदशी आरोभौमः भृगुःशुक्रःअग्निभंकृत्तिका कालभंभरणी अत्रपिंडास्त्याज्याइत्याहुः तत्रमूलंमृग्यम् एतच्चसकृन्महालयविषयं सकृन्महालयेकाम्येपुनःश्राद्धेखिलेषुच अतीतविषयेचैवसर्वमेतद्विचिंतयेदितिपृथ्वीचंद्रोदयेनारदोक्तेः ।

१ जन्मभमिति आत्मभार्यापुत्राणां जन्मभानीति भट्टोजीदीक्षितः जन्मदशमैकोनविंशतिभानीति रघुनाथः ।

सकृन्महालयास वर्ज्य तिथि, वार इत्यादिक **पृथ्वीचंद्रोदय, प्रयोगपारिजात** इत्यादि ग्रंथांत सांगतो. **वसिष्ठ**—"नंदा तिथि ( १।६।११ ), भृगुवार, चतुर्दशी, त्रिजन्मनक्षत्रें ( जन्मनक्षत्र व त्याच्या पूर्वीचें आणि पुढचें ) यांचे ठायीं गृहस्थानें श्राद्ध करूं नये; केलें तर पुत्र व धन यांचा क्षय होतो." **वृद्धगार्ग्य**—"रोहिणी, रेवती, मघा, शुक्रवार यांचे ठायीं जो श्राद्ध करील त्याचा पुत्र नष्ट होतो." प्रत्यर ( जन्मनक्षत्राहून पांचवें नक्षत्र ) इत्यादिक अन्यही निषिद्ध आहेत तीं तेथेंच ( पृथ्वीचंद्रोदयादिकांतच ) जाणावीं. **केचित्** तर—"नंदा तिथि ( १।६।११ ), सप्तमी, त्रयोदशी, रविवार, भौमवार, शुक्रवार, कृत्तिका, मघा, भरणी, गंड, वैधृति, व्यतीपात यांचे ठायीं पुत्रेच्छूंनीं पिंड वर्ज्य करावे" **या संग्रह**-वचनावरून नंदादि तिथी आणि वर सांगितलेले वार, नक्षत्रें, योग यांच्यावर पिंड वर्ज्य करावे, असें सांगतात. त्याविषयीं मूल शोधावें. हा वर सांगितलेला तिथि इत्यादिकांचा निषेध सकृन्महालयविषयक आहे. कारण, "सकृन्महालय ( एकदिवशीं करावयाचा महालय ), काम्य श्राद्ध, दुसऱ्या वेळीं करावयाचें श्राद्ध, खिलश्राद्ध, अतिक्रांतमहालय, इतक्यांचे ठिकाणीं हा वर सांगितलेला सर्व तिथ्यादिविचार करावा" असें **पृथ्वीचंद्रोदयांत नारद**वचन आहे.

अस्यापवादो**हेमाद्रौपृथ्वीचंद्रोदयेच** अमापातेभरण्यांचद्वादश्यांपक्षमध्यके तथातिथिंचनक्षत्रंवारंचनविचारयेत् **पराशरमाधवीयेमदनपारिजातादिषु**चैवम् **निर्णयदीपिकायांतु** पितृमृताहेनिषिद्धदिनेपिसकृन्महालयःकार्यइत्युक्तम् आषाढ्याःपंचमेपक्षेकन्यासंस्थेदिवाकरे मृताहनिपितुर्योवैश्राद्धंदास्यतिमानवः तस्यसंवत्सरंयावत्संतृप्ताःपितरोध्रुवमिति**नागरखंडोक्तेः** यातिथिर्येस्यमासस्यमृताहेतुप्रवर्तते सातिथिःपितृपक्षेतुपूजनीयाप्रयत्नतः तिथिच्छेदोनकर्तव्योविनाशौचंयदृच्छया पिंडश्राद्धंचकर्तव्यंविच्छित्तिंनैवकारयेत् अशक्तःपक्षमध्येतुकरोत्येकदिनेयदा निषिद्धेपिदिनेकुर्यात्पिंडदानंयथाविधीति**कात्यायनोक्तेश्च** अत्रमूलंचिंत्यम् ।

त्याचा **अपवाद** सांगतो **हेमाद्रींत** व **पृथ्वीचंद्रोदयांत**—"अमावस्या, व्यतीपात, भरणी, द्वादशी, अष्टमी यांचे ठायीं तिथि, वार, नक्षत्र यांचा विचार करूं नये." **पराशरमाधवीयांत** व **मदनपारिजात** इत्यादिकांतही असेंच आहे. **निर्णयदीपिकेंत** तर—पित्याच्या मृतदिवशीं निषिद्ध दिवस असला तरी सकृन्महालय करावा, असें सांगितलें आहे. कारण, "आषाढीपासून पांचव्या पक्षांत सूर्य कन्याराशीस असतां पित्याच्या मृतदिवशीं जो मनुष्य श्राद्ध करील त्याचे पितर संवत्सरपर्यंत निश्चयानें तृप्त होतील" असें **नागरखंड**वचन आहे. आणि "ज्याच्या मृतदिवशीं मासाची जी तिथि असते ती तिथि पितृपक्षांत त्याच्याविषयीं पूज्य ( श्राद्धदानाला योग्य ) आहे. आशौचावांचून स्वेच्छेनें श्राद्धविरहित तिथि करूं नये. सपिंडक श्राद्ध करावें, विच्छेद करूंच नये. पक्षपर्यंत श्राद्ध करण्याविषयीं अशक्त असल्यामुळें जेव्हां पितृपक्षांत एकदिवशीं श्राद्ध करीत असेल तेव्हां निषिद्धदिवशीं देखील यथाविधि पिंडदान करावें" असें **कात्यायन**-वचनही आहे. यांविषयीं मूल चिंत्य ( विचारणीय ) आहे.

तथापक्षश्राद्धकरणेपिनंदादिषुपिंडनिषेधइत्याह **पराशरमाधवीयेकार्ष्णाजिनिः** नभस्यस्यापरेपक्षेश्राद्धंकार्यंदिनेदिने नैवनंदादिवर्ज्यंस्यान्नैवनिंद्याचतुर्दशीति अत्रश्राद्धमित्येकवचनाद्दिनेदिनइतिवीप्सावशाच्च सोमयागवदेकस्याभ्यासेनैकप्रयोगपरमिदं अतः प्रतिपत्प्रभृतिष्वेकांवर्जयित्वाचतुर्दशीमितियाज्ञवल्कीयंप्रयोगभेदपरम् नतुपंचम्यादिपक्षविषयम् प्रतिपत्प्रभृतिष्विति विशिष्योक्तेः **निर्णयदीपेपृथिवीचंद्रोदयेमदनपारिजातेचैवं** अन्यकृष्णपक्षपरंयाज्ञवल्कीयम् एतत्परत्वेनैवनिंद्याचतुर्दशीविरोधादिति**गौडाः** तन्न श्राद्धंशस्त्रहतस्यैवचतुर्दश्यांमहालयइतिविरोधात् **तत्त्वंतु** तिथिनक्षत्रवारादिनिषेधोय उदाहृतः सश्राद्धेतन्निमित्तेस्यान्नानुषंगकृतेह्यसाविति**दिवोदासीयेवृद्धगार्ग्योक्तेस्त**न्निमित्तेपक्षांतरेचज्ञेयः **सकृन्महालयेतुवचनान्निषेधः** अन्यत्रनकोपिनिषेधः कार्ष्णाजिनिस्मृतेरिति अतोनंदादौसपिंडकश्राद्धेपुत्रवतोप्यधिकारः **अत्रिरपि** महालयेक्षयाहेचदर्शेपुत्रस्यजन्मनि तीर्थेपिनिर्वपेत्पिंडानरविवारादिकेष्वपि पूर्वोक्तनंदादिनिषेधस्तुमृताहातिक्रमेसकृन्महालयेपौर्णमास्यादिमृतश्राद्धेतन्निमित्तेचज्ञेयः यत्तु**स्मृत्यर्थसारे** विवाहव्रतचूडासुवर्षमर्धंतदर्धकं पिंडदानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणमिति तस्यात्रापवादो**दिवोदासीयेबृहस्पतिः** तीर्थेसंवत्सरेप्रेतेपितृयागेमहालये पिंडदानंप्रकुर्वीतयुगादिभरणीमघे महालयेगयाश्राद्धेमातापित्रोः

१ प्राचीनपुस्तके 'अत्र मूलं चिंत्यं' एतन्नास्ति । २ जुन्या एका प्रतींत 'अत्र मूलं चिंत्यं' हें नाहीं.

क्षयेहनि कृतोद्वाहोपिकुर्वीतपिंडनिर्वपणंसदेति **निर्णयदीपे**तुनंदादिनिषेधःप्रत्यहभिन्नश्राद्धविषयः षोडशाहव्यापिश्राद्धप्रयोगैकत्वेतुप्रत्यहंपिंडदानंकार्यमेवेत्युक्तम् तदयमर्थःसंपन्नः षोडशाहव्यापिश्राद्धैक्ये नपिंडनिषेधः मृताहेसकृन्महालयेपितथाप्रत्यहंश्राद्धभेदेपिव्यतीपातादौतथा अन्यत्रमृताहातिक्रमेमहालयेचपिंडनिषेधइति संन्यासिनांतुद्वादश्यांश्राद्धंकार्यं यतीनांचवनस्थानांवैष्णवानांविशेषतः द्वादश्यांविहितंश्राद्धंकृष्णपक्षेविशेषतइति**पृथ्वीचंद्रोदयेसंग्रहोक्तेः**।

तसेंच पक्षश्राद्ध ( पंधरादिवस श्राद्ध ) कर्तव्य असतांही नंदादिकांचे ठायीं पिंडनिषेध नाहीं, असें सांगतो **पराशरमाधवीयांत कार्ष्णाजिनि**—"भाद्रपदाचे अपरपक्षांत दररोज श्राद्ध करावें. नंदादिक वर्ज्य नाहींत, व चतुर्दशी निंद्य नाहीं." या वचनांत 'श्राद्धं' असें एकवचन असल्यामुळें व 'दिने दिने' म्ह० दिवसादिवसाचे ठायीं अशी द्विरुक्ति असल्यामुळेंही पक्षश्राद्धाच्या एकप्रयोगपक्षविषयक हें वचन आहे. जसा—सोमयागाचा आवृत्तीनें एक प्रयोग होतो, तसा या श्राद्धाचा एक प्रयोग होतो. म्हणून "प्रतिपदादिक श्राद्धांचे ठायीं एक चतुर्दशी वर्ज्य करावी" हें **याज्ञवल्क्याचें** वचन भिन्नप्रयोगविषयक आहे. पंचमीपासून वगैरे जे पक्ष सांगितले तद्विषयक नाहीं. कारण त्याच वचनांत 'प्रतिपदादिक श्राद्धांत' असें विशेषेंकरून सांगितलें आहे. **निर्णयदीप—पृथ्वीचंद्रोदय—मदनपारिजात** या ग्रंथांतही असेंच आहे. वर सांगितलेलें याज्ञवल्क्यवचन भाद्रपदाहून इतर कृष्णपक्षांत श्राद्धें सांगितलीं त्यांविषयीं आहे. ह्या कृष्णपक्षाविषयीं याज्ञवल्क्यवचन म्हटलें तर 'चतुर्दशी निंद्य नाहीं' ह्या वर सांगितलेल्या कार्ष्णाजिनिवचनाचा विरोध येईल, असें **गौड** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, असें म्हटलें तर महालयांतील चतुर्दशीस पक्ष करावा, असें झालें म्हणजे "महालयांतील चतुर्दशीस शस्त्रानें मारलेल्याचेंच श्राद्ध करावें, इतराचें करूं नये" या वचनाचा विरोध येईल. म्हणून याज्ञवल्क्यवचन भिन्नप्रयोगविषयक आहे. **खरा प्रकार** म्हटला तर "तिथि, नक्षत्र, वार इत्यादिकांचा जो निषेध सांगितला, तो त्या तिथिनक्षत्रादिनिमित्तक श्राद्धाविषयीं होतो. इतराच्या अनुषंगानें प्राप्त झालेल्या श्राद्धाविषयीं तो निषेध नाहीं" असें **दिवोदासीयांत वृद्धगार्ग्य**वचन सांगितल्यावरून चतुर्दशीनिमित्तक श्राद्धाविषयीं व इतर पक्षांविषयीं तो निषेध जाणावा. सकृन्महालयाविषयीं तर वर सांगितलेल्या वसिष्ठ-नारदादिवचनांवरून चतुर्दशीचा निषेध आहे. वर सांगितलेल्या कार्ष्णाजिनिस्मृतीवरून प्रतिदिवशीं श्राद्धाविषयीं कोणताही निषेध नाहीं. ही कार्ष्णाजिनिस्मृति आहे म्हणूनच नंदादिकांचे ठायीं सपिंडक श्राद्धाविषयीं पुत्रवंतालाही अधिकार आहे. **अत्रिही**—"महालय, मृतदिवस, दर्श, पुत्रजन्म, तीर्थप्राप्ति, इतक्यांचे ठायीं रविवार इत्यादि निषिद्ध दिवस असतांही पिंडदान करावें." वसिष्ठादिवचनांनीं वर सांगितलेला नंदादिनिषेध तर मृतदिवस टाकून पुढें करावयाच्या सकृन्महालयाविषयीं, पौर्णमासीस वगैरे मृताच्या पुढें करावयाच्या श्राद्धाविषयीं आणि तिथ्यादिनिमित्तक श्राद्धाविषयीं जाणावा. आतां जें **स्मृत्यर्थसारांत**—"विवाह, उपनयन, चौल हीं झालीं असतां अनुक्रमानें एक वर्ष, अर्धे वर्ष, तीनमास पर्यंत पिंडदान, मृत्तिकास्नान आणि तिलतर्पण हीं करूं नयेत" असें सांगितलें, त्याचा **अपवाद** सांगतो **दिवोदासीयांत बृहस्पति**—"तीर्थश्राद्ध, सांवत्सरिक, मृतपित्याचें और्ध्वदेहिक, महालय, युगादिश्राद्ध, भरणीश्राद्ध, मघाश्राद्ध यांचे ठायीं पिंडदान करावें. विवाह केला असला तरी महालय, गयाश्राद्ध, मातापितरांचा मृतदिवस यांचे ठायीं सर्वदा पिंडदान करावें." **निर्णयदीपांत** तर नंदादिनिषेध सांगितला तो दररोज करावयाच्या श्राद्धावांचून इतर श्राद्धांविषयीं समजावा. वर सांगितलेलें एकप्रयोगानें सोळा दिवस व्यापून करावयाचें श्राद्ध असेल तर प्रतिदिवशीं पिंडदान करावेंच, असें पूर्वी सांगितलें, तस्मात् असा अर्थ निष्पन्न झाला कीं, सोळा दिवस व्यापून एकप्रयोगानें एक श्राद्ध असतां पिंडांचा निषेध नाहीं. मृतदिवशीं सकृन्महालय असतांही तसाच पिंडनिषेध नाहीं. भिन्नप्रयोगानें दररोज भिन्नश्राद्ध असतांही व्यतीपातादिक असतां तसाच पिंडनिषेध नाहीं. व्यतीपातादिक नसतां भिन्नप्रयोगाविषयीं आणि मृतदिवस टाकून महालय असतां वर सांगितलेला पिंडनिषेध आहे. संन्याशाचें तर द्वादशीस श्राद्ध करावें. कारण, "संन्याशी, वानप्रस्थ यांचें आणि विशेषेंकरून वैष्णवांचें श्राद्ध द्वादशीस विहित आहे. कृष्णपक्षांतील द्वादशीस विशेषेंकरून विहित आहे" असें **पृथ्वीचंद्रोदयांत संग्रह**वचन आहे.

अत्रपक्षेश्राद्धाकरणेगौणकालमाह**हेमाद्रौयमः** हंसेकन्यासुवर्षास्थेशाकेनापिगृहेवसन् पंचम्योरंतरेदद्यादुभयोरपिपक्षयोः आश्विनकृष्णशुक्लपंचम्योर्मध्यइत्यर्थः तत्राप्यसंभवे**भविष्ये** येयंदीपान्विताराजन्ख्यातापंचदशीभुवि तस्यांदद्यान्नचेद्दत्तंपितृणांवैमहालये तत्राप्यसंभवे**भारते** यावच्चकन्यातुलयोःक्रमादास्ते दिवाकरः शून्यंप्रेतपुरंतावद्वृश्चिकंयावदागतः **ब्राह्मे** वृश्चिकेसमतिक्रांतेपितरोदैवतैःसह निःश्वस्यप्रतिगच्छंतिशापंदत्वासुदारुणं यत्तु**जातूकर्ण्यः** आकांक्षंतिस्मपितरःपंचमंपक्षमाश्रिताः तस्मात्तत्रैवदातव्यंदत्तमन्यत्रनिष्फलमितितत्फलातिशयहानिपरम् कन्यांगच्छतुवानवेतितुर्यपादेवापाठः तेनकन्यायोगेप्राशस्त्यमात्रं अतःश्राद्धविवेकोक्तंश्राद्धद्वयंहेयम् ।

या पक्षांत श्राद्ध केलें नसतां गौणकाल सांगतो **हेमाद्रींत यम**—"घरांत राहणारानें वर्षाऋतूंत कन्येस सूर्य असतां भाद्रपदकृष्णपंचमी व आश्विनशुक्लपंचमी यांच्या मध्यें भाजीपाला यानें देखील श्राद्ध करावें." या वचनानें आश्विनाच्या शुक्लप्रतिपदेपासून शुक्लपंचमीपर्यंत काल सांगितला. त्या कालींही असंभव असतां सांगतो **भविष्यांत**-"जर महालयाचे ठायीं पितरांना श्राद्ध दिलें नसेल तर जी ही दीपयुक्त अमावास्या भूमीवर प्रसिद्ध आहे तिच्या ठिकाणीं श्राद्ध द्यावें." त्या कालीं देखील असंभव असतां सांगतो **भारतांत**-"जों कालपर्यंत कन्या व तूळ या संक्रांतींस सूर्य अनुक्रमानें प्राप्त आहे, तों काळपर्यंत प्रेतनगर शून्य झालेलें असतें. तें वृश्चिकास सूर्य येई तोंपर्यंत शून्य समजावें; म्हणजे प्रेतनगरांतून सारे पितर आपापल्याला श्राद्ध देणारांकडे जात असतात." **ब्राह्मांत**—"वृश्चिकापर्यंत श्राद्ध केलें नसून वृश्चिकसंक्रांति अतिक्रांत झाली असतां पितर देवतांसहित श्वासोच्छ्वास टाकून दारुण शाप देऊन निघून जातात." आतां जें **जातूकर्ण्य**-"आषाढीपासून पांचव्या पक्षांत पितर अन्नोदकाची इच्छा करितात, म्हणून पांचव्या पक्षांतच अन्नादिक द्यावें. इतर कालीं ( पुढें ) दिलेलें निष्फल होय." या वचनानें पुढें आश्विनादिकांत दिलेलें निष्फल होतें असें सांगितलें, तें अतिशय फलाच्या हानिबोधक समजावें. अथवा या वचनाच्या चवथ्या पादांत 'दत्तमन्यत्र निष्फलं' या स्थानीं 'कन्यां गच्छतु वा न वा' असा पाठ आहे. म्हणजे 'आषाढीपासून पांचव्या पक्षांत अन्नादिक द्यावें. सूर्य कन्येस जावो किंवा न जावो' असा अर्थ आहे. तेणेंकरून कन्यासंक्रांतीचा योग असतां श्राद्ध प्रशस्त इतकेंच समजावें. योग नसतां पुनः करावें असें नाहीं. म्हणून श्राद्धविवेकांत दोन श्राद्धें करावीं, असें सांगितलें तें त्याचें सांगणें त्याज्य आहे.

इदंचश्राद्धमन्नेनैवकार्यंनामान्नादिना मृताहंचसपिंडंचगयाश्राद्धंमहालयम् आपन्नोपिनकुर्वीतश्राद्धमामेनकर्हिचिदिति**स्मृतिदर्पणेगालवोक्तेः** ।

हें श्राद्ध अन्नानेंच करावें. आमान्न, हिरण्य इत्यादिकानें करूं नये. कारण, "सांवत्सरिकश्राद्ध, सपिंडीकरण, गयाश्राद्ध, महालय हीं श्राद्धें आपत्कालीं देखील कधींही आमान्नानें करूं नयेत" असें **स्मृतिदर्पणांत गालववचन** आहे.

अथात्रदेवताः **संग्रहे** तातांबात्रितयंसपत्नजननीमातामहादित्रयंसस्त्रीतनयादितातजननीस्वभ्रातरस्तत्स्त्रियः तातांबात्मभगिन्यपत्यधवयुग्जायापितासद्गुरुःशिष्याप्ताःपितरोमहालयविधौतीर्थेतथातर्पणे अस्यार्थः तातत्रयीपितृत्रयी अंबात्रयीच स्मृत्यर्थसारेपि महालयेमातृश्राद्धंपृथक्प्रशस्तमिति अत्रविशेषः**स्मृतिदर्पणे गालवः** अनेकामातरोयस्यश्राद्धेचापरपक्षिके अर्घ्यदानंपृथक्कुर्यात्पिंडमेकंतुनिर्वपेत् जीवन्मातृकस्तुसापत्नमातुरेकोद्दिष्टंकुर्यान्नपार्वणम् **श्राद्धदीपकलिकायां**तुपार्वणमुक्तं अन्वष्टक्यंचयन्मातुर्गयाश्राद्धंमहालयम् पितृपत्नीषुचश्राद्धंकार्यंपार्वणवद्बुधैरिति**बृहन्मनूक्तेः** मत्स्त्रीतिमातामहानांसपत्नीकत्वेपिविभवेसतिमातामहीनांपृथक्कार्यम् महालयेगयाश्राद्धेवृद्धौचान्वष्टकासुच ज्ञेयंद्वादशदैवत्यंतीर्थेप्रौष्ठमघासुचेतिनि**गमोक्तेः हेमाद्रि**मतेत्वत्रनवदैवत्यमेव महालयेगयाश्राद्धेवृद्धौचान्वष्टकासुच नवदैवत्यमत्रेष्टंशेषंषाट्पौरुषंविदुरिति**विष्णुधर्मोक्तेः** तातभ्रातापितृव्यः जननीभ्रातामातुलः तत्स्त्रियः पितृव्यस्त्रीमातुलानीभ्रातृजायाः पितृष्वसृमातृष्वसृस्वभगिन्योपत्यभर्तृयुक्ताः तेनसापत्यायैसधवायैइतिप्रयोगोज्ञेयः एतासुसतीषुनतद्भर्त्रादेर्दानम् द्वारलोपात् जायापिताश्वशुरः श्वश्रूरप्यत्रोपलक्ष्या अत्रमूलं**स्मृतिचंद्रिकायां**ज्ञेयम् ।

## आतां महालयश्राद्धाच्या देवता सांगतो.

**संग्रहांत**-"पितृत्रयी; मातृत्रयी; सापत्नमाता; मातामहत्रयी सपत्नीक; पत्नी; पुत्र; कन्या; पितृव्य, मातुल, भ्राता हे व यांच्या स्त्रिया ( म्हणजे पितृव्यस्त्री, मातुलानी व भ्रातृजाया ); पितृभगिनी, मातृभगिनी, आत्मभगिनी या सभर्तृक, व सापत्य; श्वशुर; गुरु; शिष्य; आप्त; हे पितर महालयश्राद्धांत, तीर्थश्राद्धांत आणि तर्पणाविषयीं समजावें" हा अर्थ सामान्य झाला. आतां विशेषेंकरून सांगतो—येथें मातृत्रयी पृथक् सांगितली. **स्मृत्यर्थसारांत**ही महालयांत मातृश्राद्ध पृथक् करणें प्रशस्त होय. येथें मातेविषयीं विशेष सांगतो **गालव**—"ज्याला अनेक माता आहेत त्यानें अपरपक्षश्राद्धांत अर्घ्यदान वेगवेगळें करावें. आणि पिंड सर्वांना एक द्यावा." जीवन्मातृकानें सापत्नमातेचें एकोद्दिष्ट करावें, पार्वण करूं नये. **श्राद्धदीपकलिकेंत** तर पार्वण सांगितलें आहे. कारण, "मातेचें जें अन्वष्टक्य, गयाश्राद्ध, महालय, आणि पित्याच्या पत्नीविषयीं करावयाचें श्राद्ध तें पार्वणयुक्त होतें" असें **बृहन्मनूचें** वचन आहे. वरील संग्रहवचनांत मातामह

---

१ पृथगिति-अन्वष्टकासुवृद्धौचप्रतिसांवत्सरेतथा ॥ महालयेगयायांचसपिंडीकरणात्पुरा ॥ मातुःश्राद्धंपृथक्कुर्यादन्यत्रपतिनासहेति वाक्यात् नवदैवतमत्रेष्टमितिवचनाच्च ॥ २ अनेका मातर इति सापत्नमातुर्मात्रासहैकतंत्रेणद्विपितृकश्राद्धवदित्यर्थः ॥

सपत्नीक सांगितले तरी द्रव्यानुकूल्य असतां मातामहींचें पृथक् करावें. कारण, "महालय, गयाश्राद्ध, वृद्धिश्राद्ध, अन्वष्टकाश्राद्ध, तीर्थश्राद्ध, प्रौष्ठपदीश्राद्ध आणि मघाश्राद्ध यांचे ठायीं बारा देवतांचें ( पितृत्रयी, मातृत्रयी, मातामहत्रयी मातामहीत्रयी यांचें ) श्राद्ध जाणावें." असें **निगम**वचन आहे. **हेमाद्रि**मतीं तर येथें नवदेवताकच आहे. कारण, "महालय, गयाश्राद्ध, वृद्धिश्राद्ध, अन्वष्टका यांचे ठायीं नवदेवताक श्राद्ध इष्ट आहे. इतर श्राद्ध षड्देवताक, असें सांगतात." असें **विष्णुधर्म**वचन आहे. 'तातजननीस्वभ्रातरस्तत्स्त्रियः' याचा अर्थ—तातभ्राता म्हणजे पितृव्य, जननीभ्राता म्हणजे मातुल, आणि स्वभ्राता, हे व यांच्या स्त्रिया म्हणजे पितृव्यपत्नी, मातुलानी, आणि भ्रातृजाया ह्या होत. 'तातांबात्मभगिन्यपत्यधवयुक्' याचा अर्थ-पितृष्वसा ( आत्या ), मातृष्वसा ( मावशी ), आत्मभगिनी, ह्या अपत्यभर्तृयुक्त होत. म्हणजे 'सापत्यायै सधवायै' असा प्रयोग समजावा. ह्या जीवंत असतां त्यांच्या भर्त्याला व अपत्यांना श्राद्धदान नाहीं. कारण, त्यांच्या द्वारानें भर्ता इत्यादिकांना दान सांगितलें, तें द्वार नसल्यामुळें भर्त्रादिकांला नाहीं. जायापिता म्हणजे श्वशुर. येथें उपलक्षणेंकरून श्वश्रू ( सासू ) ही समजावी. ह्या संग्रहवचनाला मूल **स्मृतिचंद्रिकेंत** जाणावें.

अत्रपार्वणैकोद्दिष्टव्यवस्थोक्ता**हेमाद्रौपुराणांतरे** उपाध्यायगुरुश्वश्रूपितृव्याचार्यमातुलाः श्वशुरभ्रातृतत्पुत्रपुत्रर्त्विक्शिष्यपोषकाः भगिनीस्वामिदुहितृजामातृभगिनीसुताः पितरौपितृपत्नीनांपितुर्मातुश्चयास्वसा सखिद्रव्यदशिष्याद्यास्तीर्थेचैवमहालये एकोद्दिष्टविधानेनपूजनीयाःप्रयत्नतइति इतरेषांपित्रादीनांपार्वणमर्थसिद्धम् अत्रक्रमान्यत्वेप्याचाराद्व्यवस्था अशक्तौतु**पृथिवीचंद्रोदयेचतुर्विंशतिमते** एकस्मिन्ब्राह्मणेसर्वानाचार्यादीन्प्रपूजयेत् दशद्वादशवापिंडान्दद्यादकरणंनतु एकोद्दिष्टस्वरूपंचाह**याज्ञवल्क्यः** एकोद्दिष्टंदेवहीनमेकार्घ्यैकपवित्रकम् आवाहनाग्नौकरणरहितंत्वपसव्यवदिति अत्रैकपाकोवैश्वदेवतंत्रंपिंडबर्हिश्चैकमिति **स्मृत्यर्थसारे**उक्तम् अत्रपाणिहोमः पिंडाश्चात्रद्विजांतिकइत्याह**प्रयोगपारिजातेआचार्यः** काम्यमभ्युदयेष्टम्यामेकोद्दिष्टमथाष्टमम् चतुर्ष्वेषुकरेहोमःपिंडाश्चात्रद्विजांतिकइति पार्वणैकोद्दिष्टयोःसमानतंत्रत्वेतुअग्निसमीपएव अत्रधुरिलोचनौवैश्वदेवौ अपिकन्यागतेसूर्येकाम्येचधुरिलोचनौइति**हेमाद्रावादित्यपुराणात्** अत्रप्रतिदिनंभिन्नप्रयोगत्वाद्दक्षिणाभेदोवाप्रयोगैक्यादंतेएववादक्षिणेति**हेमाद्रौ**उक्तम् ।

ह्या देवतांविषयीं पार्वण कोणाचें व एकोद्दिष्ट कोणाचें ती व्यवस्था सांगतो **हेमाद्रींत पुराणांतरांत**—"उपाध्याय, गुरु, श्वश्रू, पितृव्य, आचार्य, मातुल, श्वशुर, भ्राता, भ्रातृपुत्र, पुत्र, ऋत्विक् शिष्य, पोषक, भगिनी, स्वामी, कन्या, जामाता, भगिनीपुत्र, पित्याच्या पत्नीचे मातापितर, पितृष्वसा, मातृष्वसा, सखा, द्रव्यद, शिष्य इत्यादिकांची तीर्थांत, व महालयांत एकोद्दिष्टविधीकरून प्रयत्नानें पूजा करावी." इतर पिता इत्यादिकांचें पार्वण अर्थात् सिद्ध झालें. ह्या पुराणांतरवचनांत क्रम निराळा सांगितला आहे, तरी त्या क्रमाची आचारावरून व्यवस्था जाणावी. शक्ति नसेल तर सांगतो—**पृथ्वीचंद्रोदयांत चतुर्विंशतिमतांत**—"एका ब्राह्मणावर सर्व आचार्यादिकांची पूजा करावी. दहा किंवा बारा पिंड द्यावे. परंतु केल्यावांचून राहूं नये." एकोद्दिष्टाचें स्वरूप सांगतो **याज्ञवल्क्य**—"ज्यांत देव नाहींत, एक अर्घ्य व एक पवित्रक असतें, आवाहन व अग्नौकरण नाहीं, अपसव्यानें सारें होतें, तें एकोद्दिष्ट होय." एकोद्दिष्टांत पाक एक, वैश्वदेवाचें तंत्र, पिंड व बर्हि एक, असें **स्मृत्यर्थसारांत** सांगितलें आहे. एकोद्दिष्टांत ब्राह्मणाचे हातावर होम व पिंड ब्राह्मणाच्या समीप द्यावे, असें सांगतो **प्रयोगपारिजातांत आचार्य**—"काम्यश्राद्ध, आभ्युदयिकश्राद्ध, अष्टमीश्राद्ध, एकोद्दिष्ट ह्या चार श्राद्धांमध्यें ब्राह्मणाच्या हातावर होम आणि पिंड ब्राह्मणाच्या समीप द्यावे." पार्वण व एकोद्दिष्ट यांचें एक तंत्र असेल तर अग्निसमीपच होम होतो. ह्या महालयश्राद्धांत धुरिलोचन विश्वेदेव समजावे. कारण, "कन्यागतसूर्य असतां करावयाचें श्राद्धांत ( महालयांत ) व काम्यश्राद्धांत धुरिलोचन विश्वेदेव" असें **हेमाद्रींत आदित्यपुराण**वचन आहे. ह्या पक्षांत प्रतिदिवशीं भिन्न प्रयोगानें श्राद्ध असतां दक्षिणा वेगवेगळी द्यावी. अथवा एक प्रयोगानें श्राद्ध असतां अंतींच दक्षिणा, असें **हेमाद्रींत** सांगितलें आहे.

एतच्चसंन्यस्तपितृकादिनाजीवत्पितृकेणापिकार्यं वृद्धौतीर्थेचसंन्यस्तेतातेचपतितेसति येभ्यएवपितादद्यात्तेभ्योदद्यात्स्वयंसुतइति**कात्यायनोक्तेः** यत्तु**कौंडिन्यः** दर्शश्राद्धंगयाश्राद्धंश्राद्धंचापरपक्षिकम् नजीवत्पितृकःकुर्यात्तिलैस्तर्पणमेवचेति तत्संन्यस्तपित्राद्यतिरिक्तविषयम् काम्यश्राद्धपरंवा अत्रबहुवक्तव्यं**श्रीपितृ-**

१ अन्वष्टक्य, पूर्वेद्युःश्राद्ध, मासिमासिश्राद्ध, पार्वण, काम्य, आभ्युदयिक, अष्टमीश्राद्ध, एकोद्दिष्ट हीं आठ श्राद्धें गृह्यसूत्राच्या नारायणवृत्तींत चवथ्या अध्यायांत सांगितलीं आहेत तेथें पाहावीं.

**कृतजीवत्पितृकनिर्णये**ज्ञेयम् . एतच्चजीवत्पितृकेणपिंडरहितंकार्यम् मुंडनंपिंडदानंचप्रेतकर्मचसर्वशः नजीवत्पितृकःकुर्याद्गुर्विणीपतिरेवचेति**दक्षेण**तस्यपिंडनिषेधात् अन्वष्टक्यमातृवार्षिकादौतुवचनाद्भवतीति वक्ष्यामः तथा**छागलेयः** पिंडोयत्रनिवर्तेतमघादिषुकथंचन सांकल्पंतुतदाकार्यंनियमाद्ब्रह्मवादिभिः सांकल्पस्वरूपंचवक्ष्यते ।

हें श्राद्ध ( महालय ) ज्याचा पिता संन्याशी वगैरे आहे अशा जीवत्पितृकानें देखील करावें. कारण, वृद्धिकर्माचे ठायीं, तीर्थाचे ठायीं आणि पिता संन्यस्त ( संन्याशी ) व पतित असतां ज्यांचें श्राद्ध पित्यानें करावयाचें त्यांचें श्राद्ध स्वतः पुत्रानें करावें. असें **कात्यायन**वचन आहे. आतां जें **कौंडिण्य**–"दर्शश्राद्ध, गयाश्राद्ध, आपरपक्षिकश्राद्ध हीं जीवत्पितृकानें करूं नयेत. आणि जीवत्पितृकानें तिलतर्पणही करूं नये" असें सांगतो, तें ज्याचा पिता संन्यस्त वगैरे आहे त्यावांचून इतरविषयक किंवा काम्यश्राद्धविषयक समजावें. या ठिकाणीं बहुत सांगावयाचें तें पित्यानें ( रामकृष्णभट्टानें ) केलेल्या **जीवत्पितृकनिर्णयांत** जाणावें. हें महालयश्राद्ध जीवत्पितृकानें पिंडरहित करावें. कारण, "क्षौर, पिंडदान, आणि सर्वप्रेतकर्म हीं जीवत्पितृकानें व गर्भिणीपतीनें करूं नयेत." या **दक्ष**वचनानें जीवत्पितृकाला पिंडदानकर्माचा निषेध केला आहे. अन्वष्टक्य, व मातेचें वार्षिक इत्यादिकांत तर करण्याविषयीं वचन असल्यावरून जीवत्पितृकाला पिंडदान कर्म होतें, असें पुढें सांगूं. तसेंच **छागलेय** "ज्या मघादिश्राद्धांत पिंडाची निवृत्ति कशीही झालेली असो त्या ठिकाणीं ब्रह्मवेत्त्यांनीं नियमानें ( निश्चयानें ) सांकल्पश्राद्ध करावें." सांकल्पश्राद्धाचें स्वरूप पुढें ( तृतीयपरिच्छेदोत्तरार्धीं ) सांगूं.

अत्रश्राद्धांगतर्पणंपक्षश्राद्धेप्रतिदिनंश्राद्धोत्तरम् सकृन्महालयेतुपरेह्निकार्यम् तदुक्तं**नारदीये** पक्षश्राद्धंयदाकुर्यात्तर्पणंतुदिनेदिने सकृन्महालयेचैवपरेहनितिलोदकम् **गर्गोपि** पक्षश्राद्धेहिरण्येचअनुव्रज्यतिलोदकमिति तथा**प्रयोगपारिजाते गर्गः** कृष्णेभाद्रपदेमासिश्राद्धंप्रतिदिनंभवेत पितृणांप्रत्यहंकार्यंनिषिद्धाहेपितर्पणं सकृन्महालयेश्वःस्यादष्टकास्वंतएवहि इदंनिषिद्धदिनेपिकार्यम् तिथितीर्थविशेषेषुकार्यंप्रेतेचसर्वदेति **स्मृत्यर्थसारोक्तेः** तीर्थेतिथिविशेषेचगयायांप्रेतपक्षके निषिद्धेपि दिनेकुर्यात्तर्पणंतिलमिश्रितमिति**स्मृतिरत्नावल्यां**वचनाच्च ।

त्या महालयश्राद्धांत श्राद्धांगतर्पण पक्षश्राद्धाचे ठायीं प्रतिदिवशीं श्राद्धोत्तर करावें. सकृन्महालयाचे ठायीं तर दुसऱ्या दिवशीं करावें. तें सांगतो **नारदीयांत**—"ज्या वेळीं पक्षश्राद्ध करील त्या वेळीं दररोज तर्पण करावें. सकृन्महालयाचे ठायीं परदिवशीं तिलोदक द्यावें." **गर्ग**ही–"पक्षश्राद्धांत व हिरण्यश्राद्धांत श्राद्धोत्तर ब्राह्मणांस पोंचवून तिलोदक द्यावें." तसेंच **प्रयोगपारिजातांत गर्ग**—"भाद्रपदमासाचे कृष्णपक्षांत पितरांचें प्रतिदिवशींच श्राद्ध होतें, त्या ठिकाणीं प्रत्यहीं निषिद्धदिवशीं देखील पितरांचें तर्पण करावें. सकृन्महालयाचे ठायीं दुसऱ्या दिवशीं करावें. आणि अष्टकांत अंतींच होतें." हें महालयश्राद्धांगतर्पण निषिद्धदिवशींही करावें. कारण, "विशेष तिथि, विशेष तीर्थ यांचे ठायीं आणि मृत असतां सर्वदा तर्पण करावें." असें **स्मृत्यर्थसारांत** उक्त आहे. आणि "तीर्थ, विशेषतिथि, गया, पितृपक्ष यांचे ठायीं निषिद्धदिवशीं देखील तिलमिश्रित तर्पण करावें" असें **स्मृतिरत्नावलींत** वचनही आहे.

एतच्चश्राद्धंमलमासेनकार्यम तदाह**भृगुः** वृद्धिश्राद्धंतथासोममग्न्याधेयंमहालयम् राजाभिषेकंकाम्यंचन कुर्याद्भानुलंघितइति **हेमाद्रौनागरखंडे** नभोवाथनभस्योवामलमासोयदाभवेत् सप्तमःपितृपक्षःस्यादन्यत्रैवतुपंचमः ।

हें महालयश्राद्ध मलमासांत करूं नये. तें सांगतो **भृगु**—"वृद्धिश्राद्ध, सोमयाग, अग्न्याधान, महालय, राज्याभिषेक आणि काम्यकर्म हीं मलमासांत करूं नयेत." **हेमाद्रींत नागरखंडांत** "श्रावण किंवा भाद्रपद जेव्हां मलमास होईल तेव्हां आषाढीपासून सातवा पक्ष पितृपक्ष होतो. व मलमास नसतां पांचवा पितृपक्ष होतो."

एतच्चपित्रोर्मरणेप्रथमाब्देकृताकृतमिति**त्रिस्थलीसेतौभट्टाः** इदंचनित्यंकाम्यंच पुत्रानायुस्तथारोग्यमैश्वर्यमतुलंतथा प्राप्नोतिपंचमेदत्वाश्राद्धंकामान्सुपुष्कलानितिजा**बाल्युक्तेः** वृश्चिकेसमतिक्रांतेपितरोदैवतैःसह निःश्वस्यप्रतिगच्छंतिशापंदत्वासुदारुणमिति**कार्ष्णाजिनि**वचनाच्च तदतिक्रमेप्रायश्चित्तमुक्तम्-

१ नभोवेति नन्वत्रयदाश्विनोधिमासस्तदातत्रकन्यार्कसत्वात् श्राद्धप्रसंगः । अत्रनभ्यारतु यातुधानप्रियोमासःकन्यार्केबाधतेयदा ॥ दैवंपित्र्यंतदाकर्मउत्तरेमासियोजयेदितिवचनात्तुलार्केकार्यमित्याहुः ॥ २ कृताकृतमितिकृतेअभ्युदयः अकृतेनदोषः ॥

**ग्विधाने** दुरोअश्वस्यमंत्रंचदशमासंद्विमासयोः महालयंयदान्यूनंतद्धसंपूर्णमेतितदिति द्विमासयोःकन्यातुलयोर्महालयश्राद्धंयदाहीनमित्यर्थः अत्रभरण्यांश्राद्धमतिप्रशस्तम् । तदुक्तं**पृथिवीचंद्रोदयेमात्स्ये** भरणीपितृपक्षेतुमहतीपरिकीर्तिता अस्यांश्राद्धंकृतंयेनसगयाश्राद्धकृद्भवेत् **पृथिवीचंद्रोदयेश्रीधरीयेबृहस्पतिः** नभस्यापरपक्षस्यद्वितीयायदियाम्यभे तृतीयाचाग्नितारामिःसहिताप्रीतिदापितुः ।

हें महालयश्राद्ध मातापिता मृत असतां प्रथमवर्षी कृताकृत (केलें असतां फल आहे व न केलें तर दोष नाहीं) असें **त्रिस्थलीसेतूंत भट्ट** सांगतात. हें श्राद्ध नित्य व काम्य आहे. कारण, "पांचव्या पक्षांत श्राद्ध दिलें असतां पुत्र, आयुष्य, आरोग्य, अतुल ऐश्वर्य, आणि पुष्कळ मनोरथ यांची प्राप्ति होते" असें **जाबालि**वचन आहे, यावरून काम्य होतें. आणि वृश्चिकसंक्रांत अतिक्रांत झाली असतां (वृश्चिकसंक्रांतीपर्यंत श्राद्ध केलें नसतां) देवतासहित पितर श्वासोच्छ्वास टाकून दारुण शाप देऊन जातात" असें **कार्ष्णाजिनि**वचनही आहे. यावरून नित्य सिद्ध होतें. श्राद्धावांचून वृश्चिकसंक्रांत झाली असतां प्रायश्चित्त सांगतो **ऋग्विधानांत**—"ज्या वेळीं दोन मासांत (कन्या व तूळ या दोन संक्रांतींत) महालयश्राद्ध होणार नाहीं त्या वेळीं 'दुरोअश्वस्य०' ह्या मंत्राचा दहा महिने जप करावा, म्हणजे तें महालयश्राद्ध संपूर्ण होतें." ह्या पक्षांत भरणीवर श्राद्ध अतिप्रशस्त आहे. तें सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत मात्स्यांत**—"पितृपक्षांतील भरणी मोठी सांगितली आहे. हिच्या ठिकाणीं ज्यानें श्राद्ध केलें त्याला गयाश्राद्धाचें फल प्राप्त होतें." **पृथ्वीचंद्रोदयांत श्रीधरीयांत बृहस्पति**—"भाद्रपदाच्या कृष्णपक्षाची द्वितीया जर भरणीनक्षत्रावर असेल आणि तृतीया कृत्तिकायुक्त असेल तर ती पित्याला प्रीतिदायक आहे."

एतत्पक्षेषष्ठीयोगविशेषेणकपिलासंज्ञा तदुक्तं**वाराहे** नभस्यकृष्णपक्षेतुरोहिणीपातभूसुतैः युक्ताषष्ठीपुराणज्ञैःकपिलापरिकीर्तिता व्रतोपवासनियमैर्भास्करंतत्रपूजयेत् कपिलांचद्विजाग्र्यायदत्वाक्रतुफलंलभेत् **पुराणसमुच्चये** भाद्रेमास्यसितेपक्षेभानौचैवकरेस्थिते पातेकुजेचरोहिण्यांसाषष्ठीकपिलाभवेत् अत्रदर्शांतत्वेन महालयोभाद्रपदकृष्णपक्षोज्ञेयइत्युक्तं**निर्णयामृतेहेमाद्रौच** हस्तार्कस्तुफलातिशयार्थः संयोगेतुचतुर्णांवैनिर्दिष्टापरमेष्ठिनेति**तत्रैवोक्तेः** अत्रविशेषो**हेमाद्रौस्कांदे** देवदारुंतथोशीरंकुंकुमैलामनःशिलाम् पत्रकंपद्मकंयष्टिमधुगव्येनपेषयेत् क्षीरेणालोड्यकल्केनस्नानंकुर्यात्समंत्रकम् आपस्त्वमसिदेवेशज्योतिषांपतिरेवच पापंनाशयमेदेववाङ्मनःकायकर्मजम् पंचगव्यकृतस्नानःपंचभंगैस्तुमार्जयेत् पंचभंगैःपंचपल्लवैः **तथा** रत्नैर्नानाविधैर्युक्तंसौवर्णंकारयेद्रविं शक्तितस्तुपलादूर्ध्वंतदर्धकर्षतोपिवा सौवर्णमरुणंकुर्यान्नौकांचैवतथारथम् **तथा** अल्पवित्तोपियःकश्चित्सोपिकुर्यादिमंविधिम् **प्रभासखंडे** स्थापयेदव्रणंकुंभंचंदनोदकपूरितम् रक्तवस्त्रयुगच्छन्नंताम्रपात्रेणसंयुतम् रथोरौक्मपलस्यैवएकचक्रःसुचित्रितः सौवर्णपलसंयुक्तांमूर्तिंसूर्यस्यकारयेत् ततःसूर्यंकपिलांचषोडशोपचारैःसंपूज्यदद्यात् दिव्यमूर्तिर्जगच्चक्षुर्द्वादशात्मादिवाकरः कपिलासहितोदेवोममभुक्तिंप्रयच्छतु यस्मात्त्वंकपिलेपुण्यासर्वलोकस्यपावनी प्रदत्तासहसूर्येणममुक्तिप्रदाभवेति विशेषांतरं तत्रैवज्ञेयमितिदिक् ।

ह्या पक्षांतील षष्ठी विशेषयोगानें कपिलानांवाची होते. तें सांगतो **वराहांत**–"भाद्रपदाच्या कृष्णपक्षांत रोहिणीनक्षत्र, व्यतीपात, व भौमवार यांनीं युक्त जी षष्ठी ती प्राचीन ऋषींनीं कपिला म्हटली आहे. त्या षष्ठीस व्रत, उपवास, नियम यांहींकरून भास्कराची पूजा करावी. आणि कपिला गाई ब्राह्मणश्रेष्ठाला द्यावी म्हणजे यज्ञाचें फल प्राप्त होतें." **पुराणसमुच्चयांत**—"भाद्रपदमासीं कृष्णपक्षांत सूर्य हस्तनक्षत्रीं असतां व्यतीपात, भौमवार, रोहिणीनक्षत्र यांचे ठायीं जी षष्ठी ती कपिला होते." ह्या षष्ठीविषयीं दर्शांत चांद्रमानानें महालयरूप भाद्रपदकृष्णपक्ष जाणावा, असें सांगितलें आहे **निर्णयामृतांत व हेमाद्रींत**. हस्ताला सूर्य असला म्हणजे फल अतिशय आहे. पण नसला तरी "चवघांचा (षष्ठी, रोहिणी, व्यतीपात, भौमवार यांचा) योग असतां ब्रह्मदेवानें कपिला षष्ठी म्हणून सांगितली आहे." असें तेथेंच सांगितलें आहे. एथें विशेष सांगतो **हेमाद्रींत स्कांदांत**—"देवदार, वाळा, केशर, वेलची, मनशीळ, तमालपत्र, पद्मकाष्ठ, ज्येष्ठमध हे पदार्थ गाईच्या दुधांत वाटून अंगास लावून समंत्रक स्नान करावें. **स्नानमंत्र—आपस्त्वमसि देवेश ज्योतिषां पतिरेव च ॥ पापं नाशय मे देव वाङ्मनःकायकर्मजम् ॥** पंचगव्यानें स्नान करून पंचपल्लवांनीं मार्जन करावें."

---

१ द्विमासयोर्महालयंयदान्यूनमितिसंबंधः ॥ २ इयं षष्ठी योगविशेषेण पूर्वा परा वा ग्राह्या ॥

तसेंच "शक्तीच्या मानानें चार कर्षांहून अधिक सुवर्णाची किंवा दोन कर्षांची अथवा एक कर्षाची सूर्यमूर्ति नानाविधरत्नांनीं युक्त अशी करावी. सोन्याचा अरुण, नौका व रथ करावा." तसेंच "जो कोणी अल्पद्रव्यवान् असेल त्यानें देखील हा विधि करावा." **प्रभासखंडांत**—"चंदनोदकानें भरलेला छिद्ररहित कलश, दोन वस्त्रांनीं आच्छादित व ताम्रपत्रानें युक्त असा स्थापन करावा. चार कर्ष सुवर्णाचाच एकचक्री उत्तमचित्रयुक्त असा रथ असावा. चार कर्ष सुवर्णाची सूर्याची मूर्ति करावी." तदनंतर सूर्य व कपिला गाई यांची षोडशोपचार पूजा करून ब्राह्मणाला द्यावी. **दानमंत्र—"दिव्यमूर्तिर्जगच्चक्षुर्द्वादशात्मा दिवाकरः ॥ कपिलासहितो देवो मम मुक्तिं प्रयच्छतु ॥ यस्मात्त्वं कपिले पुण्या सर्वलोकस्य पावनी ॥ प्रदत्ता सह सूर्येण मम मुक्तिप्रदा भव ॥"** इतर विशेष तेथेंच जाणावा. ही दिशा समजावी.

इयमेव**चंद्रषष्ठी** साचंद्रोदयव्यापिनीग्राह्या उभयत्रतथात्वेपूर्वा तदुक्तं**भविष्ये** तद्वद्भाद्रपदेमासिषष्ठ्यांपक्षेसितेतरे चंद्रषष्ठीव्रतंकुर्यात्पूर्ववेधःप्रशस्यते चंद्रोदयेयदाषष्ठीपूर्वाह्नेवापरेहनि चंद्रषष्ठ्यसितेपक्षेसैवोपोष्याप्रयत्नतइति ।

हीच **चंद्रषष्ठी** होय. ती चंद्रोदयव्यापिनी घ्यावी. दोन दिवशीं चंद्रोदयव्यापिनी असेल तर पूर्वा घ्यावी. तें सांगतो **भविष्यांत**—"भाद्रपदांत कृष्णपक्षांत षष्ठीस चंद्रषष्ठीव्रत करावें. तेथें पूर्वविद्धा षष्ठी प्रशस्त आहे. कृष्णपक्षांत चंद्रोदयीं पूर्वदिवशीं किंवा परदिवशीं जेव्हां षष्ठी असेल तेव्हां ती चंद्रषष्ठी होय, तिचेंच उपोषण प्रयत्नानें करावें.

अष्टम्या**माश्वलायनेन**मघावर्षसंज्ञंश्राद्धमुक्तं एतेनमाध्यावर्षंप्रौष्ठपद्याअपरपक्षेइति इदंसप्तम्यादिषुत्रिष्वहःसुकार्यमिति**नारायणवृत्तिः हरदत्त**स्तुमघायुक्तवर्षासुभवंत्रयोदशीश्राद्धमितिव्याचख्यौ **पृथ्वीचंद्रोदयेब्राह्मे** आषाढ्याःपंचमेपक्षेगयामध्याष्टमीस्मृता त्रयोदशीगजच्छायागयातुल्यातुपैतृके ।

त्या पक्षांतील अष्टमीस **आश्वलायनानें** माध्यावर्ष नांवाचें श्राद्ध सांगितलें आहे, तें असें—"येणेंकरून प्रौष्ठपदीच्या अपरपक्षांत माध्यावर्षश्राद्ध व्याख्यान झालें." हें माध्यावर्ष सप्तमी, अष्टमी, नवमी या तीन दिवशीं करावें, अशी **नारायणवृत्ति** आहे. **हरदत्त** तर—मघायुक्त वर्षाकालीं होणारें तें माध्यावर्ष म्हणजे त्रयोदशीश्राद्ध असें व्याख्यान करिता झाला. **पृथ्वीचंद्रोदयांत ब्राह्मांत**—"आषाढीपासून पांचव्या पक्षांतील मधली अष्टमी गया म्हटली आहे. आणि त्रयोदशी गजच्छाया होय. ती पैतृककर्माविषयीं गयातुल्य फल देणारी आहे."

आश्विनकृष्णाष्टम्यांमहालक्ष्मीव्रतं तत्र**निर्णयामृते पुराणसमुच्चये** श्रियोर्चनंभाद्रपदेसिताष्टमींप्रारभ्यकन्यामगतेचसूर्ये समापयेत्तत्रतिथौचयावत्सूर्यस्तुपूर्वार्धगतोयुवत्याइति तत्रैव कन्यागतेर्केप्रारभ्यकर्तव्यंनश्रियोर्चनं हस्तप्रांतदलस्थेर्केतद्व्रतंनसमापयेत् पूजनीयागृहस्थानामष्टमीप्रावृषिश्रियः दोषैश्चतुर्भिःसंत्यक्ता सर्वसंपत्करीतिथिः **तथा** पुत्रसौभाग्यराज्यायुर्नाशिनीसाप्रकीर्तिता तस्मात्सर्वप्रयत्नेनत्याज्याकन्यागतेरवौ विशेषेणपरित्याज्यानवमीदूषितायदाति दोषचतुष्टयंतत्रैवोक्तं त्रिदिनंचावमंचैवअष्टमीनोपवासयेत् पुत्रहानवमीविद्धास्वर्गोहन्त्यार्धगेरवाविति त्रिदिनावमदिनलक्षणंच**रत्नमालायाम्** यत्रैकःस्पृशतितिथिद्वयावसानंवारश्चेदवमदिनंतदुक्तमार्यैः यःस्पर्शाद्भवतितिथित्रयस्यचाह्नांत्रिद्युस्पृक्कथितमिदंद्वयंचनेष्टम् एतेचसर्वेनिषेधाःप्रथमारंभविषयाः मध्येतुसतिसंभवेज्ञेयाः व्रतस्यषोडशाब्दसाध्यत्वेनमध्येत्यागायोगात् इयंचंद्रोदयव्यापिनीग्राह्या तत्रैवपूजाद्युक्तेः परदिनेचंद्रोदयादूर्ध्वंत्रिमुहूर्तव्यापित्वेपरैवकार्या अन्यथापूर्वैव पूर्वावापरविद्धावाग्राह्याचंद्रोदयेसदा त्रिमुहूर्तापिसापूज्यापरतश्चोर्ध्वगामिनीति**मदनरत्नेनिर्णयामृतेचसंग्रहोक्तेः** अर्धरात्रमतिक्रम्यवर्ततेयोत्तरातिथिः तदातस्यांतिथौकार्यंमहालक्ष्मीव्रतंसदेतिवचनाच्चेतिसंक्षेपः **इतिमहालक्ष्मीव्रतनिर्णयः ।**

आश्विनकृष्ण अष्टमीस **महालक्ष्मीव्रत** सांगितलें आहे. त्याविषयीं सांगतो **निर्णयामृतांत पुराणसमुच्चयांत**—"सूर्य कन्याराशीस गेला नसतां भाद्रपदशुक्लाष्टमीस लक्ष्मीपूजन आरंभून कन्याराशीच्या पूर्वार्धांत सूर्य आहे तोंपर्यंत त्या अष्टमी तिथीस समाप्त करावें-" तेथेंच-"कन्यागत सूर्य असतां लक्ष्मीपूजन आरंभून करूं नये. हस्तनक्षत्राच्या शेवटच्या अंशीं सूर्य असतां तें व्रत समाप्त करूं नये. प्रावृड्ऋतूंतील लक्ष्मीची अष्टमी गृहस्थांना पूजनीय आहे. ती तिथि चार दोषांनीं वर्जित असतां सर्वसंपत्ति देणारी होते." तसेंच—"सूर्य कन्यागत असतां पुत्र, सौभाग्य, राज्य, आयुष्य यांचा नाश करणारी म्हटली आहे: तस्मात् ती सर्वप्रयत्नानें त्याज्य आहे. जर नवमीनें दूषित असेल तर विशेषेंकरून टाकावी." ते चार

**दोष तेथेंच सांगतो**—"त्रिदिन, आणि अवम असतां अष्टमीचें उपोषण करूं नये. नवमीविद्ध असतां पुत्रहानि करणारी आणि **हस्तनक्षत्रा**र्धांत रवि असतां आपला नाश करणारी आहे म्हणून तिचेंही उपोषण करूं नये." त्रिदिन आणि अवमदिन यांचें लक्षण सांगतो **रत्नमालेंत**—"ज्या दिवशीं एक वार दोन तिथींच्या अंताला स्पर्श करितो त्या दिवसास अवमदिन ( क्षय-दिवस ) असें आर्य म्हणतात. तीन दिवसांना ( वारांना ) स्पर्श करणारी जी तिथि ती त्रिद्युस्पृक् ( त्रिदिन, वृद्धि ) म्हटली आहे, हीं दोन्ही ( क्षय आणि वृद्धि ) इष्ट नाहींत." हे सारे निषेध प्रथमारंभाविषयीं आहेत. द्वितीयादि वर्षी वर्ज्य करण्याचा संभव असेल तर वर्ज्य करावे. दोष असल्यामुळें व्रत टाकूं नये. कारण, हें व्रत सोळा वर्षांनीं साध्य होत असल्यामुळें मध्यें टाकतां येत नाहीं. ही अष्टमी चंद्रोदयव्यापिनी घ्यावी. कारण, चंद्रोदयींच पूजादिक सांगितलीं आहेत. दुसऱ्या दिवशीं चंद्रोदयानंतर तीन मुहूर्तव्यापिनी असेल तर पराच करावी. अन्यथा पूर्वाच करावी. कारण, "चंद्रोदयीं असलेली पूर्वा किंवा परा सर्वदा घ्यावी. दुसऱ्या दिवशीं चंद्रोदयानंतर तीन मुहूर्त असेल तर तीच घ्यावी." असें **मदनरत्नांत** व **निर्णयामृतांत संग्रह**वचन आहे. आणि "जी उत्तरातिथि अर्धरात्रीच्या पुढें आहे त्या वेळीं त्या तिथीस महालक्ष्मीव्रत सदा करावें" असें वचनही आहे. हें संक्षेपानें सांगितलें आहे असें समजावें. **असा महालक्ष्मीव्रताचा निर्णय समजावा.**

अथनवम्यामन्वष्टकाश्राद्धम् तत्र**कात्यायनः** अन्वष्टकासुनवभिःपिंडैःश्राद्धमुदाहृतं पित्रादिमातृमध्यंचततोमातामहांतकम् **पृथ्वीचंद्रोदयेब्रह्मांडे** पितॄणांप्रथमंदद्यान्मातॄणांतदनंतरम् ततोमातामहानांच आन्वष्टक्येक्रमःस्मृतः **श्राद्धहेमाद्रौछागलेयः** केवलास्तुक्षयेकार्यावृद्धावादौप्रकीर्तिताः अन्वष्टकासुमध्यस्थानांत्याःकार्यास्तुमातरः **दीपिकायां**तुमातृश्राद्धमादौकार्यमित्युक्तं मातृयजनंत्वन्वष्टकास्वादितइति **हेमाद्रौब्राह्मेपि** अन्वष्टकासुक्रमशोमातृपूर्वंतदिष्यतइति अत्रशाखाभेदेनव्यवस्थेति**पृथ्वीचंद्रोदयः** जीवत्पितृकविषयमिति**निर्णयदीपः** इदंचजीवत्पितृकेणापिकार्यम् तदुक्तं**निर्णयामृतेमैत्रायणीयपरिशिष्टे** आन्वष्टक्यंगयाप्राप्तौसत्यांचमृतेहनि मातुःश्राद्धंसुतःकुर्यात्पितर्यपिचजीवति यद्यपिजीवत्पितृकस्यपंचान्वष्टकाअवश्यंकर्तव्याः तथाप्यशक्तस्येयमावश्यकी प्रौष्ठपद्यष्टकाभूयःपितृलोकेभविष्यतीतिहेमाद्रौपाद्मोक्तेः सर्वासामेवमातॄणांश्राद्धंकन्यागतेरवौ नवम्यांहिप्रदातव्यंब्रह्मलब्धवरायतइतिसूतेनावश्यकत्वोक्तेश्च अत्रसर्वासामित्युक्तेःस्वमातरिजीवंत्यामपिसपत्नमातृभ्योदद्यात् तन्मरणेसतितस्यैताभ्यश्चदद्यादियुक्तं **जीवत्पितृकनिर्णयेगुरुभिः** अत्रसर्वासांनामनिर्देशेनैकोब्राह्मणोर्घ्यःपिंडश्च नामैक्येतुद्विवचनादिप्रयोगइत्युक्तं**नारायणवृत्तौ** अन्वष्टकाश्राद्धंतद्यागश्चगोभिलीयानांमध्यमायामेवनसर्वासु आन्वष्टक्यंमध्यमायामितिगोभिलगौतमाविति**छंदोगपरिशिष्टात्** अत्रभर्तृमरणोत्तरंपूर्वमृतमातृश्राद्धंनकार्यमितिकेचिदाहुः पठंतिच श्राद्धंनवम्यांकुर्यात्तन्मृतेभर्तरिलुप्यतइति तदेतन्निर्मूलत्वान्मूर्खप्रतारणमात्रं **श्राद्धदीपकलिकायांब्राह्मे** पितृमातृकुलोत्पन्नायाःकाश्चित्तुमृताःस्त्रियः श्राद्धार्हामातरोज्ञेयाःश्राद्धंतत्रप्रदीयतइति अत्रदेशाचाराद्व्यवस्था ।

## आतां नवमीस अन्वष्टकाश्राद्ध सांगतो.

त्याविषयीं **कात्यायन**—"अन्वष्टकांचे ठायीं नऊ पिंडांनीं श्राद्ध सांगितलें आहे. पहिली पितृत्रयी, मधली मातृत्रयी, अंतीं मातामहत्रयी असें नवदेवताक श्राद्ध करावें. **पृथ्वीचंद्रोदयांत ब्रह्मांडांत** "प्रथम पिता इत्यादिकांस द्यावें. नंतर मातांना द्यावें. तदनंतर मातामहांना द्यावें. आन्वष्टक्य श्राद्धांत असा क्रम समजावा." **श्राद्धहेमाद्रींत छागलेय**—"मृतदिवशीं केवळ मातेचेंच श्राद्ध करावें. वृद्धिकर्माचे ठायीं मातेचें आधीं करावें. अन्वष्टकांमध्यें मातेचें मध्यें करावें. मातेचें श्राद्ध अंतीं करूं नये." **दीपिकेंत** तर—मातृश्राद्ध आधीं करावें असें सांगितलें आहे—"अन्वष्टकांचे ठायीं मातृपूजन ( श्राद्ध ) आधीं करावें." **हेमाद्रींत ब्राह्मांत**ही—"अन्वष्टकांचे ठायीं क्रमानें मातृपूर्वक तें इष्ट आहे." येथें शाखाभेदानें[1] व्यवस्था जाणावी, असें **पृथ्वीचंद्रोदय** सांगतो. मातृपूर्वक यजन हें जीवत्पितृकाविषयीं आहे, असें **निर्णयदीप** सांगतो. हें अन्वष्टक्य श्राद्ध जीवत्पितृकानेंही करावें. तें सांगतो **निर्णयामृतांत मैत्रायणीयपरिशिष्टांत**—"पिता जीवंत असतांही अन्वष्टकाचे ठायीं, गया प्राप्त असतां आणि मृतदिवशीं मातेचें श्राद्ध पुत्रानें करावें." आतां जरी जीवत्पितृकाला पांच अन्वष्टका अवश्य कर्तव्य आहेत तरी अशक्ताला ही अन्वष्टका आवश्यक आहे. कारण, "भाद्रपदांतील

---

१ शाखेति । बह्वृचानां पितृपूर्वंतत्सूत्रेतथोक्तेः अन्येषांमातृपूर्वं.

अष्टका ( अन्वष्टका ) पितृलोकांत फार मोठी फलदायक होईल." असें **हेमाद्रींत पाद्मवचन आहे.** आणि "रवि कन्यागत असतां नवमीस सान्याच मातांना श्राद्ध द्यावें; कारण, त्यांना ब्रह्मदेवानें वर दिलेला आहे." **असें सूतानें** ह्या नवमीस श्राद्ध आवश्यक सांगितलेंही आहे. ह्या वचनांत 'सान्याच' असें सांगितल्यावरून आपली माता जीवंत असतांही सापत्नमातेला द्यावें, असें जीवत्पितृकनिर्णयांत **गुरूंनीं** सांगितलें आहे. ह्या श्राद्धांत सर्वांचें नांव घेऊन श्राद्ध करावें. एक ब्राह्मण, एक अर्घ्य व एक पिंड असावा. दोघांचें नांव एक असेल तर द्विवचनादिप्रयोग करावा, असें **नारायणवृत्तींत** सांगितलें आहे. अन्वष्टकाश्राद्ध आणि त्याचा याग गोभिलशाख्यांचा मधल्या ( पौषमासाचे ) अन्वष्टकेंतच होतो. सान्या पांचही अन्वष्टकांत होत नाहीं. कारण, "अन्वष्टका मध्यमेचे ठायीं होते, असें **गोभिल व गौतम** सांगतात." असें **छंदोगपरिशिष्ट** आहे. येथें भर्ता मेल्यावर पूर्वी मृत मातेचें श्राद्ध करूं नये, असें **केचित्** सांगतात. त्याविषयीं वचनही म्हणतात. "नवमीस श्राद्ध करावें. भर्ता मृत असतां तें लुप्त होतें." तें हें वचन निर्मूल असल्यामुळें मूर्खांची प्रतारणामात्र आहे. **श्राद्धदीपकलिकेंत ब्राह्मांत**—"पित्याच्या कुलांत व मातेच्या कुलांत उत्पन्न झालेल्या ज्या कांहीं स्त्रिया मृत असतील त्या सान्या माता श्राद्धाला योग्य आहेत, त्यांना नवमीस श्राद्ध देतात." हें कोणास द्यावें त्याविषयीं देशाचारावरून व्यवस्था जाणावी.

इदंचानुपनीतेनापिकार्यम् तदुक्तं**श्राद्धशूलपाणौमात्स्ये** अमावास्याष्टकाकृष्णपक्षपंचदशीपुचेत्यभिधाय एतच्चानुपनीतोपिकुर्यात्सर्वेपुपर्वसु श्राद्धंसाधारणंनामसर्वकामफलप्रदम् भार्याविरहितोप्येतत्प्रवासस्थोपिनित्यशः शूद्रोप्यमंत्रवत्कुर्यादनेनविधिनाबुधइति तेनसाग्नेरेवेदमितिपरास्तं अन्वष्टकातःपृथगेवेदंमातुःश्राद्धमित्यपिपरास्तं लाघवेनमूलैक्यादष्टकापदाविशेषाच्च तेनान्यत्रान्वष्टकाश्राद्धस्यांगस्याप्यत्रप्रधानत्वं वचनात् अवेष्टेरिवराजसूयांतर्गतायाएतयान्नाद्यकामंयाजयेदितिफलार्थत्वम् अत्राष्टकाऽन्वष्टका पूर्वानुरोधात् तथा**ग्निपुराणे** अन्वष्टकासुवृद्धौचगयायांचक्षयेहनि अत्रमातुःपृथक्श्राद्धमन्यत्रपतिनासह आपस्तंबानांत्वष्टकासुचवृद्धौचेतिभाष्यकारैःपाठादष्टकायांमातृकाश्राद्धं छंदोगैस्त्वत्रमातृमातामहश्राद्धेनकार्येकिंतुत्रिपुरुषमेवनयोपिद्भ्यःपृथक्दद्यादत्रमातादिनाहते कर्षूसमन्वितंमुक्त्वातथाद्यंश्राद्धषोडशं प्रत्याब्दिकंचशेषेषुपिंडाःस्युःषडितिस्थितिरिति**छंदोगपरिशिष्टात्** अन्वष्टकासुतेषांकर्पूविधानादिति**शूलपाणिः** यत्तु तमिस्रपक्षेनवमीपुण्याभाद्रपदेहिया चत्वारःपार्वणाःकार्याःपितृपक्षेमनीषिभिरितितद्देशाचारतोव्यवस्थितंज्ञेयम् इदंजीवत्पितृकेणापिसपिंडंकार्यम् **हेमाद्रौविष्णुधर्मोत्तरे** अन्वष्टकासुचस्त्रीणांश्राद्धंकार्यंतथैवचेत्युपक्रम्य पिंडनिर्वपणंकार्यंतस्यामपितृसत्तमेतिवचनंश्राद्धविधिनापिंडदानेप्राप्ते पुनस्तत्कीर्तनंयस्यजीवत्पितृकगर्भिणीपतित्वादिनापिंडदानंनिषिद्धंतस्यतत्प्राप्त्यर्थमिति**श्रीतातचरणाः** ।

हें नवमीश्राद्ध अनुपनीतानेंही करावें, तें सांगतो **श्राद्धशूलपाणींत मात्स्यांत**—"अमावास्या, अष्टका, कृष्णपक्षांतील पंधरा तिथि यांचे ठायीं श्राद्ध करावें." असें सांगून "हें सर्व काम फल देणारें साधारण श्राद्ध अनुपनीतानेंही ( मौंजी न झालेल्यानेंही ) सर्व पर्वांचे ठायीं करावें. भार्याविरहित असला तरी, व प्रवासांत असला तरी त्यानें नित्य करावें. शूद्रानेंही ह्या सांगितलेल्या विधीनें अमंत्रक करावें," यावरून हें अन्वष्टकाश्राद्ध साग्निकालाच आहे, असें म्हणणें खंडित झालें. अन्वष्टकेहून हें मातृश्राद्ध वेगळेंच आहे, असें म्हणणें तेंही खंडित झालें. कारण, अन्वष्टका आणि नवमीश्राद्ध या दोघांचें मूलवचन एक आहे, असें म्हटलें असतां लाघव येतें. आणि ह्या वरील मात्स्यवचनांत 'अष्टका' पद सामान्य सांगितलें आहे, त्यावरून नवमीश्राद्धही तेंच समजावें. तेणेंकरून इतर ठिकाणीं अन्वष्टकाश्राद्ध अंग असलें तरी येथें वरील वचनावरून प्रधान समजावें. जसा—राजसूययज्ञाच्या अंतर्गत अवेष्टीचा याग आहे, त्याला राजसूयांत अंगत्व असलें तरी 'एतया अन्नाद्यकामं याजयेत्' म्हणजे अन्नादिकांची इच्छा असेल त्याच्याकडून ह्या अवेष्टीचा याग करावा, या वचनावरून फलाकरितां प्रधानत्व सांगितलें आहे. तसें इतर अष्टकाश्राद्धांत अन्वष्टकाश्राद्धाला अंगत्व असलें तरी एथें प्रधानत्व समजावें. यावरील मात्स्यवचनांत पूर्वीच्या अनुरोधानें अष्टका म्हणजे अन्वष्टका समजावी. तसेंच—**अग्निपुराणांत** "अन्वष्टका, वृद्धिश्राद्ध, गया आणि मृतदिवस यांचे ठायीं मातेचें पृथक् श्राद्ध करावें. अन्यत्र ठिकाणीं पतीसह मातेचें श्राद्ध करावें." आपस्तंबांचें तर "अष्टकांचे ठायीं, आणि वृद्धीचे ठायीं" असें भाष्यकारांनीं वचन पठित असल्यामुळें अष्टकेचे ठायीं मातृश्राद्ध करावें. छंदोगांनीं ( सामगांनीं ) तर येथें अष्टकांचे ठिकाणीं माता व मातामह यांचीं श्राद्धें करूं नयेत. तर

१ छंदोगैः सामवेदिभिः ॥

पित्रादि तीन पुरुषांचेंच करावें. कारण, "मृतदिवसावांचून स्त्रियांना पृथक्श्राद्ध देऊं नये. कर्षूयुक्त श्राद्ध ( अन्वष्टक्य ), पहिल्या वर्षांतील षोडश श्राद्धें आणि प्रतिसांवत्सरिक हीं वर्ज्य करून इतर श्राद्धांचे ठायीं सहा पिंड द्यावे, अशी शास्त्रमर्यादा आहे. असें **छंदोगपरिशिष्ट** आहे. त्यांच्या अन्वष्टकाश्राद्धांत कर्षूचें विधान आहे, म्हणून कर्षूयुक्त श्राद्ध म्हणजे अन्वष्टकाश्राद्ध समजावें असें **शूलपाणी** सांगतो. आतां जें "भाद्रपदांत कृष्णपक्षाची जी पुण्यकारकनवमी तिचे ठायीं विद्वानांनीं चार पार्वण करावे." असें सांगितलें त्याची देशाचारावरून व्यवस्था जाणावी. हें श्राद्ध जीवत्पितृकानें देखील सपिंडक करावें. कारण, **हेमाद्रींत विष्णुधर्मोत्तरांत** "अन्वष्टकांचे ठायीं स्त्रियांचें श्राद्ध तसेंच करावें" असा उपक्रम करून "त्या ठिकाणींही पिंडप्रदान करावें" असें सांगितलें आहे. श्राद्धविधीनें पिंडदान प्राप्त असतां हें पुनः पिंडदान सांगितलें अशाकरितां कीं, जीवत्पितृक, गर्भिणीपति इत्यादि कारणांनीं ज्याला पिंडदान निषिद्ध आहे, त्याला तें पिंडदान प्राप्त होण्याकरितां आहे, असें आमचे वडील ( **रामकृष्णभट्ट** ) सांगतात.

अत्रसुवासिनीभोजनमुक्तं **मार्कंडेयपुराणे** मातुःश्राद्धेतुसंप्राप्तेब्राह्मणैःसहभोजनम् सुवासिन्यैप्रदातव्यमितिशातातपोऽब्रवीत् भर्तुरग्रेमृतानारीसहदाहेनवामृता तस्याःस्थानेनियुंजीतविप्रैःसहसुवासिनीं तत्रैव **मदालसा**वाक्यम् स्त्रीश्राद्धेपुत्रदेयाःस्युरलंकाराश्चयोषिते मंजरीमेखलादामकर्णिकाकंकणादयइति ।

येथें सुवासिनीभोजन सांगतो **मार्कंडेयपुराणांत**—"मातेचें श्राद्ध प्राप्त असतां ब्राह्मणांसह सुवासिनीला भोजन द्यावें, असें **शातातप** सांगता झाला. भर्त्याचे आधीं मृत झालेली स्त्री, किंवा पतीबरोबर सहगमनानें मृत झालेली स्त्री तिच्या स्थानीं ब्राह्मणांसह सुवासिनीची योजना करावी." तेथेंच **मदालसेचें वाक्य**—"स्त्रीश्राद्धाचे ठायीं सुवासिनीला मंजरी, मेखला ( कमरपट्टा ), सर, कर्णिका, कांकणें इत्यादि अलंकार द्यावे."

अत्राशक्तावनुकल्पमाह **आश्वलायनः** अनड्डुहेयवसमाहरेदग्निनावाकक्षमुपोषेदेषामेऽष्टकेतिनत्वेवानष्टकःस्यादिति **हेमाद्रौपितामहः** अमावास्याव्यतीपातपौर्णमास्यष्टकासुच विद्वान्श्राद्धमकुर्वाणोनरकंप्रतिपद्यते अकरणेचप्रायश्चित्तमुक्तम**ृग्विधाने** एभिर्द्युभिर्जपेन्मंत्रंशतवारंतुनद्दिने आन्वष्टक्यंयदान्यूनंसंपूर्णंयातिसर्वथेति एतत्पक्षेद्वादश्यांविशेषः**पृथिवीचंद्रोदयेवायवीये** संन्यासिनोप्याब्दिकादिपुत्रःकुर्याद्यथाविधि महालयेतुयच्छ्राद्धंद्वादश्यांपार्वणंतुतदिति ।

अन्वष्टकाश्राद्धाविषयीं अशक्ति असेल तर अनुकल्प सांगतो **आश्वलायन**—"वृषभाला गवत घालावें, अथवा अग्नीनें गवत जाळावें, आणि ही माझी अष्टका असें म्हणावें. पण अष्टका केल्यावांचून राहूं नये." **हेमाद्रींत पितामह**—"अमावास्या, व्यतीपात, पौर्णमासी, अष्टका यांचे ठायीं विद्वान् श्राद्ध न करणारा नरकास जातो." अन्वष्टक्य न केलें असतां प्रायश्चित्त सांगतो **ऋग्विधानांत**–"त्या अन्वष्टक्यदिवशीं 'एभिर्द्युभि०' ह्या मंत्राचा शंभर वेळां जप करावा, म्हणजे अन्वष्टक्य झालें नसेल तर तें संपूर्ण सर्वथा होतें." ह्या कृष्णपक्षांत द्वादशीस विशेष सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत वायवीयांत**—"पुत्रानें संन्याशाचेंही सांवत्सरिकादिक श्राद्ध यथाविधि करावें. महालयांत जें संन्याशाचें श्राद्ध तें द्वादशीस पार्वण करावें."

**अथत्रयोदशीश्राद्धं तत्रचंद्रिका** त्रयोदशीभाद्रपदीकृष्णामुख्यापितृप्रिया तृप्यंतिपितरस्तस्यांस्वर्पंचशतंसमाः मघायुतायांतस्यांतुजलाद्यैरपितोषिताः तृप्यंतिपितरस्तद्वद्वर्षाणामयुतायुतं **प्रयोगपारिजातेशंखः** प्रौष्ठपद्यामतीतायांमघायुक्तांत्रयोदशीम् प्राप्यश्राद्धंतुकर्तव्यंमधुनापायसेनच प्रजामिष्टांयशःस्वर्गमारोग्यंचधनंतथा नृणांश्राद्धेसदाप्रीताःप्रयच्छंतिपितामहाः एतन्नित्यमपि **पृथ्वीचंद्रोदयेविष्णुधर्मे** प्रौष्ठपद्यामतीतायांतथाकृष्णात्रयोदशीत्युक्त्वा एतांस्तुश्राद्धकालान्वैनित्यानाहप्रजापतिः श्राद्धमेतेष्वकुर्वाणोनरकंप्रतिपद्यतइत्युक्तेः एतच्चाविभक्तैरपिपृथक्कार्यं तथाच**हेमाद्रौ** विभक्तावाऽविभक्तावाकुर्युःश्राद्धंपृथक्सुताः मघासुचततोन्यत्रनाधिकारःपृथग्विनेति **अपरार्केवायवीये** हंसेहस्तस्थितेयातुमघायुक्तात्रयोदशी तिथिर्वैवस्वतीनामसाछायाकुंजरस्यतु अत्रच अपिनःसकुलेभूयाद्योनोदद्यात्त्रयोदशीम् पायसंमधुसर्पिर्भ्यांप्राक्छायेकुंजरस्यचेति**विष्णुमनु**वचनेकेवलत्रयोदशीश्रुतेर्मघागुणइति**कल्पतरुः** **शूलपाणिस्तु**-

१ कर्षू म्हणजे खळगे करून ते पायसादि पदार्थांनीं भरावे, इत्यादि प्रकार तृतीयपरिच्छेदाच्या उत्तरार्धांत सांगितला आहे, तो तेथें पाहावा.

केवलवाक्यानामर्थवादत्वाद्विधौचमघायोगश्रुतेर्विधिलाघवात्विशिष्टमेवनिमित्तमित्याह **वस्तुतस्तु** मधुमांसैश्चशाकैश्चपयसापायसेनच एषनोदास्यतिश्राद्धंवर्षासुचमघासुचेति**वसिष्ठ**वचनेकेवलमघाश्रुतेर्विनिगमकाभावादुभयंभिन्ननिमित्तं पूर्वोक्तवचनात्रयोगाधिक्येफलाधिक्यम् अतएव**याज्ञवल्क्यः** तथावर्षात्रयोदश्यांमघासुचविशेषतइति त्रयोदशीश्राद्धंनित्यम् अन्यत्काम्यं अत्रत्रयोदश्यां बहुपुत्रायुवमारिणस्तुभवंतीत्या**पस्तंबोक्ते**र्युवमारित्वमपत्यदोषंसहिष्णोरपत्यमात्रार्थिनः स्मृत्यंतरोक्तधनार्थिनोवाधिकारइति**कल्पतरुः** अपत्यनिंदयातदर्थिनोऽनधिकारात् फलांतरकामस्यैवाधिकारइति**हलायुधः** एतत्पिंडरहितंकार्यं मघायुक्तत्रयोदश्यांपिंडनिर्वपणंद्विजः ससंतानोनैवकुर्यान्नित्यंतेकवयोविदुरिति**बृहत्पराशरोक्तेः** इदंमलमासेपिकार्यं मघात्रयोदशीश्राद्धंप्रत्युपस्थितिहेतुकम् अनन्यगतिकत्वेनकर्तव्यंस्यान्मलिम्लुचेइति**काठकगृह्योक्तेः** ।

## आतां त्रयोदशीश्राद्ध सांगतो.

त्याविषयीं **चंद्रिका**–"भाद्रपदाची कृष्णत्रयोदशी मुख्य व पितरांना प्रिय आहे. तिच्या ठिकाणीं श्राद्ध केलें असतां पांचशें वर्षेपर्यंत पितर तृप्त होतात. मघायुक्त त्या त्रयोदशीस उदकादिकांनीं देखील तुष्ट केलेले पितर लाखोंवर्षेंपर्यंत तसेच तृप्त होतात." **प्रयोगपारिजातांत शंख**—"प्रौष्ठपदी पौर्णिमा अतिक्रांत झाल्यावर पुढें मघायुक्त त्रयोदशी प्राप्त असतां मधानें व पायसानें श्राद्ध करावें. श्राद्धाचे ठायीं संतुष्ट झालेले पितामह मनुष्याला अभीष्ट प्रजा, कीर्ति, स्वर्ग, आरोग्य आणि द्रव्य देतात." हें श्राद्ध नित्यही आहे. कारण, **पृथ्वीचंद्रोदयांत विष्णुधर्मांत**—"तशीच प्रौष्ठपदी गेली असतां त्रयोदशी" असें सांगून "हे श्राद्धकाल नित्य आहेत, असें प्रजापति सांगतो. यांचे ठायीं श्राद्ध न करणारा नरकास जातो" असें सांगितलें आहे. हें श्राद्ध अविभक्तांनीं देखील वेगवेगळें करावें. तसेंच **हेमाद्रींत**–"विभक्त किंवा अविभक्त अशा पुत्रांनीं मघांचे ठायीं श्राद्ध पृथक् करावें. अन्यत्र ठिकाणीं पृथक् करण्याविषयीं विभक्तावांचून अधिकार नाहीं." **अपरार्कांत वायवीयांत**—"सूर्य हस्तनक्षत्रास असतां जी मघायुक्त त्रयोदशी तिथि ती यमाची आहे, तिला गजच्छाया म्हणतात." या ठिकाणीं "पितर अशी आशा करितात कीं, त्रयोदशीस गजच्छायेचे ठायीं मधुघृतानें युक्त पायस देणारा असा कोणी आमच्या कुलांत उत्पन्न होईल काय!" ह्या **मनुवचनांत** व पूर्वोक्त **विष्णुधर्मवचनांत** केवळ त्रयोदशीचें श्रवण असल्यामुळें मघानक्षत्र हा गुण आहे, असें **कल्पतरु** सांगतो. **शूलपाणि** तर—केवळ त्रयोदशीचीं वाक्यें अर्थवाद असल्यामुळें ( शंख-हेमाद्र्यादि ) विधिवाक्यांत मघायोगश्रवण असल्यामुळें मघाविशिष्ट ( युक्त ) त्रयोदशीचा उद्देश करून श्राद्धाचें विधान केल्यानें लाघव येत असल्यामुळें श्राद्धाविषयीं मघाविशिष्टच त्रयोदशी निमित्त आहे, असें सांगतो. वास्तविक म्हटलें तर—"मधु, मांस, शाक, दूध, पायस यांहींकरून वर्षाऋतूंत आणि मघांवर हा ( पुत्र ) आम्हांस श्राद्ध देईल" असें पितर इच्छितात, ह्या **वसिष्ठवचनांत** केवळ ( त्रयोदशीशिवाय ) मघाश्रवण असल्यामुळें व पूर्वीच्या विष्णुधर्मवचनांत केवळ त्रयोदशीश्रवण असल्यामुळें त्रयोदशी किंवा मघा अमुकच निमित्त मानावें व अमुक मानूं नये, याविषयीं प्रमाण नसल्यामुळें दोन्ही वेगवेगळीं निमित्तें आहेत. आणि पूर्वीं सांगितलेल्या चंद्रिकादि वचनावरून अधिक योग असतां अधिक फल होतें. म्हणूनच सांगतो **याज्ञवल्क्य**—"तसेंच वर्षाकालीं त्रयोदशीस श्राद्ध करावें. मघांवर विशेषेंकरून फलदायक आहे." त्रयोदशीश्राद्ध नित्य आहे. दुसरें ( मघांवरचें ) काम्य आहे. "ह्या त्रयोदशीस श्राद्ध केलें असतां तारुण्यावस्थेंत मरणारे असे बहुत पुत्र होतात" ह्या **आपस्तंबवचनावरून** तारुण्यांत मरणरूप अपत्यदोष सहन करणारा व केवळ अपत्याचीच इच्छा करणारा अशाला ह्या त्रयोदशीश्राद्धाविषयीं अधिकार किंवा इतर स्मृतींत सांगितलेल्या धनाची इच्छा करणाराला ह्या श्राद्धाविषयीं अधिकार, असें **कल्पतरु** सांगतो. अपत्याची निंदा ( मरणरूप दोष ) सांगितल्यामुळें अपत्येच्छूला अधिकार नसल्यामुळें इतर फलेच्छूलाच अधिकार आहे, असें **हलायुध** सांगतो. हें श्राद्ध पिंडरहित करावें. कारण, "संतानयुक्त द्विजानें मघायुक्त त्रयोदशीस कधींही पिंडदान करूं नये, हें विद्वान् जाणतात." असें **बृहत्पराशर**वचन आहे. हें श्राद्ध मलमासांतही करावें. कारण, "मघात्रयोदशीश्राद्ध हें मघायुक्तत्रयोदशीप्राप्तिनिमित्तक असल्यामुळें दुसरी गति ( पुढच्या मासांत ) नसल्याकारणानें मलमासांत करावें." असें **काठकगृह्य**वचन आहे.

---

१ विशिष्टाला निमित्त मानलें नाहीं तर केवळ त्रयोदशीचा उद्देश करून श्राद्धाचें विधान. आणि मघारूपगुणाचें विधान असें केलें असतां गौरव येतें, असा अभिप्राय.

यानितु **अंगिराः** त्रयोदश्यांकृष्णपक्षेयःश्राद्धंकुरुतेनरः पंचत्वंतस्यजानीयाज्ज्येष्ठपुत्रस्यनिश्चितम् **वामनपुराणे** त्रयोदश्यांतुवैश्राद्धंनकुर्यात्पुत्रवान्गृहीत्यादीनिवचनानितानिपुत्रवद्विषयाणिवामहालयस्थभिन्नत्रयोदशीविषयाणिवाकाम्यश्राद्धविषयाणिवासपिंडकश्राद्धविषयाणिवेति**केचित्** **हेमाद्रि**प्रमुखास्त्वेकवर्गश्राद्धविषयाणि श्राद्धंनैवैकवर्गस्यत्रयोदश्यामुपक्रमेत् नतृप्तास्तत्रयेयस्यप्रजाहिंसंतितस्यतइति**कार्ष्णाजिनिस्मृतेः** यद्यपि पितरोयत्रपूज्यंतेतत्रमातामहाअपीतिधौम्योक्तेर्नकेवलपितृवर्गस्यप्राप्तिस्तथापिव्यामोहादिप्राप्तनिषेधोयमित्याहुः **वयंतु**पश्यामःपुत्रवद्विषयाण्येवेति असंतानस्तुयस्तस्यश्राद्धेप्रोक्तात्रयोदशी संतानयुक्तोयःकुर्यात्तस्यवंशक्षयोभवेदिति**हेमाद्रौनागरखंडोक्तेः** पूर्ववाक्यमप्यसंतानस्यैवैकवर्गनिषेधकमिति अत्रमघात्रयोदशीमहालययुगादिश्राद्धानांतंत्रेणप्रयोगः नतुप्रसंगसिद्धिरित्यन्यत्रविस्तरः ।

आतां जीं—**अंगिरा**-"त्रयोदशीस कृष्णपक्षांत जो मनुष्य श्राद्ध करितो, त्याचा ज्येष्ठ पुत्र निश्चयानें मरतो." **वामनपुराणांत**-"त्रयोदशीस पुत्रवंत गृहस्थानें श्राद्ध करूं नये" इत्यादिक वचनें तीं पुत्रवंतविषयक किंवा महालयांतील त्रयोदशीवांचून इतर त्रयोदशीविषयक, अथवा काम्यश्राद्धविषयक, किंवा सपिंडकश्राद्धविषयक समजावीं, असें **केचित्** सांगतात. **हेमाद्रि**प्रमुख ग्रंथकार तर—एक वर्ग श्राद्ध विषयक तीं वचनें आहेत. कारण, "त्रयोदशीस एक वर्गाचें श्राद्ध करूं नयेच. कारण, त्या श्राद्धांत ज्याचे जे पितर तृप्त होत नाहींत ते पितर त्याच्या प्रजेचा नाश करितात." अशी **कार्ष्णाजिनिस्मृति** आहे. जरी "ज्या ठिकाणीं पितरांची पूजा असते त्या ठिकाणीं मातामहांचीही पूजा करावी" ह्या **धौम्य**वचनावरून केवळ पितृवर्गाचेंच श्राद्ध प्राप्त होत नाहीं, तरी व्यामोहादिकेंकरून केवळ एक वर्गाचें श्राद्ध प्राप्त होईल त्याचा हा **कार्ष्णाजिनि**स्मृतीनें निषेध केला आहे, असें सांगतात. **आम्हीं** तर असें समजतों कीं, हीं वरील वचनें पुत्रवंतविषयकच आहेत. कारण, "जो संततिरहित असेल त्याला श्राद्धाविषयीं त्रयोदशी सांगितली आहे. जो संतानयुक्त मनुष्य त्या त्रयोदशीस श्राद्ध करील त्याचा वंशक्षय होईल" असें **हेमाद्रींत नागरखंड**वचन आहे. पूर्वीचें **कार्ष्णाजिनि**वाक्यही असंतानालाच एकवर्गश्राद्धाचें निषेधक आहे. येथें मघात्रयोदशीश्राद्ध, महालय, युगादिश्राद्ध ह्या तीन श्राद्धांचा तंत्रानें प्रयोग करावा. एकानें इतरांची प्रसंगसिद्धि होत नाहीं. त्याचा अन्यग्रंथीं विस्तार केलेला आहे. **इति त्रयोदशी ।**

अथचतुर्दशी **पृथ्वीचंद्रोदये प्रचेताः** वृक्षारोहणलोहाद्यैर्विद्युज्जलविषाग्निभिः नखिदंष्ट्रिविपन्नायंतेषांशस्ताचतुर्दशी **ब्राह्मे** युवानःपितरोयस्यमृताःशस्त्रेणवाहताः तेनकार्यंचतुर्दश्यांतेषांतृप्तिमभीप्सता **नागरखंडे** अपमृत्युर्भवेद्येषांशस्त्रमृत्युरथापिवा श्राद्धंतेषांप्रकर्तव्यंचतुर्दश्यांनराधिप एतच्च प्रायोनाशकशस्त्राग्निविषोदकोद्बंधनप्रपतनैश्चेच्छतामितिगौतमोक्तदुर्मरणोपलक्षणम् एकयोगनिर्देशात् सर्वेषांतुल्यधर्माणामेकस्यापियदुच्यते सर्वेषांतत्समंज्ञेयमेकरूपाहितेस्मृताइत्युशनसोक्तेश्च तच्चकृतक्रियाणामेवेतिवक्ष्यामः **मरीचिः** विषशस्त्रश्वापदाहितिर्यग्ब्राह्मणघातिनाम् चतुर्दश्यांक्रियाःकार्याअन्येषांतुविगर्हिताः अत्रब्राह्मणघातीतेनहतोनतुब्रह्महा तस्यपतितत्वादिति**शूलपाणिः** अत्रोद्देश्यविशेषणस्याविवक्षितत्वात् स्त्रीणामपिशस्त्रादिहतानामेकोद्दिष्टंकार्यंनपार्वणमिति**श्रीदत्तोपाध्यायः** इदंविषादिहतानामेवनप्रसवादिमृतानामिति**वाचस्पतिः** यत्तु**शाकटायनः** जलाग्निभ्यांविपन्नानांसंन्यासेवागृहेपथि श्राद्धंकुर्वीततेषांवैवर्जयित्वाचतुर्दशीमिति तत्प्रायश्चित्तार्थजलादिमृतविषयमित्या**करे**उक्तम् अतएववैधत्वात्सहगमनेपिनकार्यमिति**हेमाद्रिः** एतच्चदैवयुक्तमेकोद्दिष्टंकार्यमित्युक्तं**प्रयोगपारिजाते** प्रेतपक्षेचतुर्दश्यामेकोद्दिष्टंविधानतः दैवयुक्तंतुतच्छ्राद्धंपितॄणामक्षयंभवेत् तच्छ्राद्धंदैवहीनंचेत्पुत्रदारधनक्षयः एकोद्दिष्टंदैवयुक्तमित्येवंमनुरब्रवीत् **भविष्येपि** समत्वमागतस्यापिपितुःशस्त्रहतस्यच चतुर्दश्यांतुकर्तव्यमेकोद्दिष्टंमहालये चतुर्दश्यांतुयच्छ्राद्धंसपिंडीकरणेकृते एकोद्दिष्टविधानेनतत्कार्यंशस्त्रघातिनइति **संवत्सरप्रदीपेहारीतः** विश्वे-

---

१ एकवर्गस्य पितृपितामहप्रपितामहमात्रस्य. २ अत्रैवं भाति अंगानामैक्यं प्रधानमात्रभेदस्तंत्रं तेन विश्वेदेवपाकाद्यंगानामैक्यं विप्रार्घ्यपिंडादेर्भेद एव । प्रसंगसिद्धिस्थले तु प्रधानमपि न भिद्यते इति । त्रयोदशीश्राद्धेऽपरपक्षत्वाद्भूरिलोचना विश्वेदेवाः श्राद्धसागरे उक्ताः इति धर्मसिंधुसारम्.

देवांश्चतत्रापिपूजयित्वादितोमलान् ग्रेवैशस्त्रहतास्तेषांश्राद्धंकुर्यादतंद्रितः अत्रैकोद्दिष्टवचनानांनिर्मूलत्वम् समूलत्वेपिपार्वणाशक्तपराणि विष्ण्वादिवचनैःप्रकरणात्कृष्णपक्षीयपार्वणावगतेरिति**शूलपाणिः** तन्न वाक्येनप्रकरणस्यबाधात् पित्रादीनांपार्वणंभ्रात्रादीनामेकोद्दिष्टमिति**गौडार्वाचः** तन्न पितुरित्यनेनविरोधात् विशेषवाक्यवैयर्थ्योपत्तेश्च अत्रशस्त्रहतस्यैवचतुर्दश्यामितिनियमोनतुचतुर्दश्यामेवशस्त्रहतस्येति श्राद्धंशस्त्रहतस्यैवचतुर्दश्यांमहालये इति **कालादर्शात्** वार्षिकादीनामकरणापत्तेश्च तेनमहालयेएव**दिनांतरे**-पार्वणंमातामहादितृप्त्यर्थंकार्यमेव पितामहोपिशस्त्रहतश्चेदेकोद्दिष्टद्वयंकार्यं तदुक्तं**हेमाद्रौस्मृत्यंतरे** एकस्मिन्द्वयोर्वैकोद्दिष्टमिति त्रिपुशस्त्रहतेषुपार्वणमेवकार्यम् ।

## आतां चतुर्दशीश्राद्ध सांगतो.

**पृथ्वीचंद्रोदयांत प्रचेता**—"वृक्षावर चढणें, लोहादिक शस्त्रें, वीज, उदक, विष, अग्नि, नखांचे पशु, दाढांचे पशु इत्यादिकांनीं जे मृत झाले त्यांच्या श्राद्धाविषयीं चतुर्दशी प्रशस्त आहे." **ब्राह्मांत**—"ज्याचे पितर तरुण असतां मृत झाले किंवा शस्त्रानें मृत झाले असतील त्यानें त्यांच्या तृप्तीकरितां चतुर्दशीस श्राद्ध करावें." **नागरखंडांत**-"ज्यांना अपमृत्यु होईल, किंवा शस्त्रानें मृत्यु होईल, त्यांचें श्राद्ध चतुर्दशीस करावें." हें वरील वचनांनीं सांगितलेलें मरण, "प्रायोपवेशन, अनशन, शस्त्र, अग्नि, विष, उदक, फांस लावून घेणें, पर्वतादिकांवरून उडी घेणें, यांनीं मरण इच्छिणारांचें" या **गौतमानें** सांगितलेल्या दुर्मरणाचें उपलक्षण ( बोधक ) आहे. कारण, वरील वचनांत तरुणमरण, अपमृत्यु व शस्त्रमरण असें एका वचनांत सांगितलें आहे, म्हणून तरुणमरणादिकही दुर्मरण समजावें. आतां कोणी म्हणेल कीं, वरील वचनांनीं सांगितलेल्या मरणावांचून इतर मरणाला चतुर्दशी येत नाहीं, आणि उपलक्षण केलें असतां इतरही दुर्मरणाला चतुर्दशी येते ती इष्ट नाहीं, तर असें म्हणूं नये; कारण, "सारे समानधर्मी असतां त्यांमध्यें एकालाही जें सांगितलें तें त्या सर्वांना समजावें. कारण, ते सारे एकरूपी आहेत" या **उशनसाचे** वचनावरून इतरही दुर्मरणाला चतुर्दशी इष्ट आहे. तें चतुर्दशीस श्राद्ध ज्यांची क्रिया केली असेल त्यांचेंच होतें, हा प्रकार पुढें सांगूं. **मरीचि**-"विष, शस्त्र, श्वापद, सर्प, तिर्यग्योनि, ब्राह्मण यांनीं मारलेल्यांच्या क्रिया ( श्राद्धें ) चतुर्दशीस कराव्या. अन्यांच्या करूं नयेत" या वचनांत 'ब्राह्मणघाती' असें पद आहे त्याचा अर्थ-ब्राह्मणानें मारलेला, असा समजावा. ब्राह्मणमारणारा, असा समजूं नये; कारण, तो पतित आहे, असें **शूलपाणि** सांगतो. येथें वरील वचनांत शस्त्रादिमृत अशा पुल्लिंगी मनुष्यांचा उद्देश करून चतुर्दशीस श्राद्ध सांगितलें तेथें उद्देश्याचें विशेषण पुल्लिंग हें अविवक्षित असल्यामुळें स्त्रिया देखील शस्त्रादिमृत असतां त्यांचेंही एकोद्दिष्ट करावें. पार्वण करूं नये, असें **श्राद्धदत्तोपाध्याय** सांगतो. हें श्राद्ध विषादिमृतांचेंच समजावें, सूतिकादि मृतांचें नाहीं, असें **वाचस्पति** सांगतो. आतां जें **शाकटायन**—"संन्यास घेतलेला असतां किंवा घरांत अथवा मार्गांत असतां उदक व अग्नि यांनीं जे मृत झाले त्यांचें श्राद्ध चतुर्दशीस वर्ज्य करून इतर तिथीस करावें" असें सांगितलें तें, प्रायश्चित्ताकरितां उदकादिमृतविषयक समजावें, असें **आकरांत** सांगितलें आहे. म्हणूनच विधिविहित मरण असल्यामुळें स्त्रियांचें सहगमन असतांही चतुर्दशीस करूं नये, असें **हेमाद्रि** सांगतो. हें चतुर्दशीश्राद्ध दैवयुक्त एकोद्दिष्ट करावें, असें सांगितलें. **प्रयोगपारिजातांत**—"पितृपक्षांतील चतुर्दशीस विधीनें विहित जें एकोद्दिष्ट श्राद्ध तें दैवयुक्त केलें तर पितरांना अक्षय होतें. तें श्राद्ध दैवहीन केलें तर पुत्र, स्त्रिया, धन यांचा क्षय होतो. एकोद्दिष्ट दैवयुक्त करावें, असें मनु सांगता झाला." **भविष्यांत**—"शस्त्रानें मृत झालेला पिता समानत्व ( पितृत्व ) पावला असला तरी त्याचें महालयांत चतुर्दशीस एकोद्दिष्ट करावें. शस्त्रानें मारलेल्याचें सपिंडीकरण केल्यावर जें चतुर्दशीस श्राद्ध करावयाचें तें एकोद्दिष्ट विधीनें करावें." **संवत्सरप्रदीपांत हारीत**—"चतुर्दशीसही पूर्वीं निर्मल अशा विश्वेदेवांची पूजा करून जे शस्त्रानें मृत असतील त्यांचें श्राद्ध निरलसपणानें करावें." येथें एकोद्दिष्टबोधकवचनें निर्मूल आहेत. समूल असलीं तरी पार्वणाविषयीं अशक्त असेल त्याविषयीं आहेत. कारण, विष्णु इत्यादिकांच्या वचनांनीं प्रकरणावरून कृष्णपक्षांतील पार्वण येथें प्राप्त होतें, असें **शूलपाणि** सांगतो. तें बरोबर नाहीं. कारण, वचनानें प्रकरणाचा बाध होतो. पिता इत्यादिकांचें पार्वण, आणि भ्राता इत्यादिकांचें एकोद्दिष्ट करावें, असें अर्वाचीन **गौड** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, वरील भविष्यवचनांत 'पितुः' असें म्हटलें आहे त्याचा विरोध येईल. आणि हें विशेष वाक्य व्यर्थही होईल. या ठिकाणीं शस्त्रहताचेंच श्राद्ध चतुर्दशीस, असा नियम आहे. शस्त्रहताचें श्राद्ध चतुर्दशीसच करावें, असा नियम नाहीं. कारण, "शस्त्रहताचेंच श्राद्ध महालयांतील चतुर्दशीस करावें" असें **कालादर्शवचन** आहे. असा नियम केल्यानें महालयांतील चतुर्दशीस इतरांचें श्राद्ध करूं नये, असें झालें. असा नियम न करितां, शस्त्रहताचें श्राद्ध महालयांतील चतुर्दशीसच करावें, असा नियम केला तर इतर दिवशीं वार्षिकादिक श्राद्धें करूं नयेत, असेंही होईल, तें अनिष्ट आहे. तेणें-

करून ( शस्त्रहताचे श्राद्धाची इतरदिवशीं निवृत्ति नसल्यानें ) महालयांतच इतरदिवशीं मातामहादिकांच्या तृप्तीकरितां शस्त्रहताचें पार्वणश्राद्ध करावेंच. पितामह देखील शस्त्रहत असेल तर पित्याचें व पितामहाचें अशीं दोन एकोद्दिष्टें करावीं, तें सांगतो **हेमाद्रींत स्मृत्यंतरांत**—"एक किंवा दोघे शस्त्रानें मृत असतां एकोद्दिष्ट करावें." तिघे शस्त्रहत असतां पार्वणच करावें.

यत्तुदेवस्वामिनोक्तंत्रिष्वपिशस्त्रहतेपुपृथगेकोद्दिष्टत्रयंकार्यम् नतुपार्वणमाहत्यवचनाभावादितितदयुक्तम् पित्रादयस्त्रयोयस्यशस्त्रैर्यातास्त्वनुक्रमात् सभूतेपार्वणंकुर्यादाब्दिकानिपृथक्पृथगिति**बृहत्पराशरोक्तेः** एकस्मिन्वाद्वयोर्वापिविद्युच्छस्त्रेणवाहते एकोद्दिष्टंसुतःकुर्यात्त्रयाणांदर्शवद्भवेदिति**स्मृत्यंतराच्चेति पृथिवीचंद्रोदये**उक्तम् **अपरार्केहेमाद्रौ**चैवम् यस्तुअत्रैवशस्त्रादिनाहतस्तस्यवार्षिकमेवपार्वणमेकोद्दिष्टंवाकार्यंनतुश्राद्धद्वयं [१]प्रसंगसिद्धेरिति**पृथिवीचंद्रोदये** अत्र[२]श्राद्धाकरणेग्रिमापरपक्षेदिनांतरे[३]पार्वणेनैवकार्यमिति तत्रैवोक्तम् यद्यपि शस्त्रविप्रहतानांचशृंगिदंष्ट्रिसरीसृपैः आत्मनस्त्यागिनांचैवश्राद्धमेषांनकारयेदिति**छागलेयाद्यैः**शस्त्रादिहतानांश्राद्धंनिषिद्धं तथापिप्रमादमृतानांश्राद्धार्हत्वात्कार्यं वृद्धादिभिन्नबुद्धिपूर्वमृतानांतु नकार्यम् यत्तुचतुर्दश्यांतर्पणीयालुप्तपिंडोदकक्रियाइति**ब्राह्मे**तद्गौणमिति**शूलपाणिः** [४]लक्षणायांमानाभावात् [५]पतितेनापिकर्तव्यं कर्तव्यंपतितस्यचेति गयादिवद्विशेषविधिबलात्पतितानामपिकार्यमिति**नव्यगौडाः** तत्त्वंतुसमत्वमागतस्येत्यादिवशात्कृतक्रियाणांकार्यंनान्येषामितिवयंप्रतीमः यत्तु**मनुः** नपैतृयज्ञियोहोमोलौकिकाग्नौविधीयते नदर्शेनविनाश्राद्धमाहिताग्नेर्द्विजन्मनइति अत्रपूर्वार्धहेतुत्वेनोक्तम् तदयथाश्रुतमेवमन्यंते- **पृथ्वीचंद्रोदयादयः** आहिताग्नेःपिंडपितृयज्ञकल्पेनश्राद्धनिषेधार्थमिदंनतुसाकल्यादेरपीत्य**समद्गुरवः** कृष्णपक्षश्राद्धमन्यदिनेषुप्राप्तमाहिताग्नेर्दर्शेनियम्यतइति**तुवयम्** दर्शेनपार्वणेनविनाश्राद्धंन तेनक्वापिवार्षिकादावेकोद्दिष्टंनेति**हरिहरः इतिचतुर्दशी ।**

आतां जें **देवस्वामीनें** सांगितलें कीं, तिघेही शस्त्रहत असतां वेगवेगळीं तीन एकोद्दिष्टें करावीं. पार्वण करूं नये. कारण, पार्वण करून करण्याविषयीं विधि वचन नाहीं. तें अयुक्त आहे. कारण, "ज्याचे पिता, पितामह, प्रपितामह हे शस्त्रानें अनुक्रमानें मृत आहेत, त्यानें चतुर्दशीस पार्वण करावें. सांवत्सरिकें वेगवेगळीं करावीं." असें **बृहत्पराशरवचन** आहे. आणि "विजेनें किंवा शस्त्रानें एक किंवा दोन मृत असतां पुत्रानें एकोद्दिष्ट करावें. तीन असामी शस्त्रानें मृत असतां त्यांचें दर्शाप्रमाणें होईल." असें **स्मृत्यंतर**ही आहे, असें **पृथ्वीचंद्रोदयांत** सांगितलें आहे. **अपरार्कांत व हेमाद्रींत**ही असेंच आहे. जो मनुष्य ह्याच चतुर्दशीस शस्त्रादिकानें मृत असेल त्याचें सांवत्सरिकच पार्वण किंवा एकोद्दिष्ट करावें. दोन श्राद्धें ( सांवत्सरिक व अपरपक्षिक अशीं दोन ) करूं नयेत. कारण, सांवत्सरिकानें अपरपक्षिकाची प्रसंगसिद्धि होते, असें **पृथ्वीचंद्रोदयांत** सांगितलें आहे. ह्या चतुर्दशीस श्राद्ध केलें नसेल तर पुढच्या अपरपक्षांत चतुर्दशीभिन्न दिवशीं पार्वणानेंच करावें, असें तेथेंच ( पृथ्वीचंद्रोदयांतच ) सांगितलें आहे. आतां जरी "शस्त्र, ब्राह्मण, शृंगाचे व दाढांचे पशु, सर्प यांनीं मारलेल्यांचें आणि आत्महत्या करणारांचें श्राद्ध करूं नये" असें **छागलेया**दिकांनीं शस्त्रादिहतांचें श्राद्ध निषिद्ध आहे, तरी प्रमादानें मृत झालेले श्राद्धाला योग्य असल्यामुळें त्यांचें करावें. वृद्धादिमरण तृतीयपरिच्छेदोत्तरार्धांत सांगितलें आहे त्यावांचून इतर बुद्धिपूर्वक मृत असतील त्यांचें करूं नये. आतां जें "ज्यांची पिंडउदकक्रिया लुप्त असेल ( मृतदोषामुळें झालेली नसेल ) त्यांना चतुर्दशीस तृप्त करावें" हें **ब्राह्म**वचन दुर्मरणानें मृतांचें श्राद्ध चतुर्दशीस सांगतें, यांचा वरच्या सांगण्यास विरोध येईल, असें म्हणूं नका. कारण, तें ब्राह्मवचन गौण ( लाक्षणिक म्हणजे लुप्तपिंडोदकक्रिय हा शब्द लक्षणेनें प्रमादमृतांचा बोधक ) असें **शूलपाणि** सांगतो. लक्षणा करण्याविषयीं प्रमाण नसल्यामुळें, "गयेंत पतितानेंही करावें, आणि पतिताचेंही करावें' हें जसें गयादिकश्राद्ध विशेष विधीनें सांगितलें, तसें-दुर्मरणानें मृतांचें चतुर्दशीस श्राद्ध करण्याविषयीं विशेष विधि वर सांगितला आहे, त्याच्या बळानें पतितांचेंही करावें, असें **नवीन गौड** सांगतात. **खरा प्रकार म्हटला** तर-'समत्वमागतस्यापि०' ह्या वर सांगितलेल्या भविष्यादिवचनानुरोधानें ज्यांच्या क्रिया

---

१ प्रसंगसिद्धेरितिचतुर्दशीश्राद्धंनभवतीतिभावः । २ श्राद्धाकरणेइति यदिमहालयेचतुर्दशीश्राद्धंनकृतंतदावृश्चिकदर्शनपर्यंतं कस्मिंश्चिद्दिनेकार्यमित्यर्थः । ३ पार्वणेनैवेति संक्रातावुपरागे चपर्वोत्सवमहालये ॥ निर्वपेद्दत्तपिंडानामितिप्राहप्रजापतिरिति वाक्यस्य शस्त्रहतानांदिनांतरेपार्वणप्रापकत्वादितिमयूखाशयः । ४ लक्षणायामिति लुप्तपिंडोदकक्रिया इति पदं लक्षणया प्रमादादिमरणबोधकमित्यर्थः । ५ पतितेनापीति अपतितस्येतिशेषः पतितस्येति अपतितेनापीतिशेषः ॥

केल्या असतील त्यांचें करावें, इतरांचें करूं नये, असें आम्हीं समजतों. आतां जें मनु—"पिंडपितृयज्ञाचा होम लौकिकाग्नीवर होत नाहीं, म्हणून आहिताग्नीला दर्शावांचून इतर दिवशीं श्राद्ध सांगितलें नाहीं." या वचनांत पहिल्या अर्धांत दर्शावांचून श्राद्ध न होण्याला हेतु सांगितला आहे. पृथ्वीचंद्रोदयादिक या वचनांत सांगितलें तसेंच मानितात. आहिताग्नीला इतर दिवशीं पिंडपितृयज्ञ विधीनें श्राद्धनिषेधाकरितां हें वचन आहे. सकल श्राद्धादिकांच्या निषेधाकरितां नाहीं, असें आमचे गुरु सांगतात. कृष्णपक्षांतील श्राद्ध इतरदिवशीं प्राप्त झालें तें आहिताग्नीनें दर्शाचे ठायींच करावें. असा या वचनानें नियम केला आहे, असें आम्हीं ( कमलाकरभट्ट ) सांगतों. आहिताग्नीला दर्शावांचून म्हणजे पार्वणावांचून श्राद्ध नाहीं, तेणेंकरून कोठेंही सांवत्सरिकादिश्राद्धांत एकोद्दिष्ट नाहीं, असें हरिहर सांगतो. इति चतुर्दशी.

अमायांविशेषमाहापरार्केयमः हंसेकरस्थितेयातुअमावास्याकरान्विता साज्ञेयाकुंजरच्छायाइतिबौधायनोऽब्रवीत् वनस्पतिगतेसोमेछायायाप्राङ्मुखीभवेत् गजच्छायातुसाप्रोक्तातस्यांश्राद्धंप्रकल्पयेत् भारते अजेनसर्वलोहेनवर्षासुनियतव्रतः हस्तिच्छायासुविधिवत्कर्णव्यजनवीजितम् श्राद्धंदद्यादितिशेषः ।

अमावास्येस विशेष सांगतो अपरार्कांत यम—"सूर्य हस्तनक्षत्रावर असतां जी हस्तनक्षत्रयुक्त अमावास्या ती गजच्छाया जाणावी, असें बौधायन सांगता झाला." सोम वनस्पतींत गेला असतां जी प्राङ्मुख छाया होते ती गजच्छाया म्हटली आहे, तिच्या ठिकाणीं श्राद्ध करावें.[1] भारतांत "वर्षाकालीं व्रतनियम धारण करून गजच्छायेचे ठायीं म्हणजे हत्तीच्या ( हस्तनक्षत्राच्या ) कोनाची छाया जेथें पडली असेल अशा ठिकाणीं यथाविधि श्राद्ध करावें."

आश्विनशुक्लप्रतिपदिदौहित्रस्यमातामहश्राद्धमुक्तम् हेमाद्रौसंग्रहेच जातमात्रोपिदौहित्रोविद्यमानेपिमातुले कुर्यान्मातामहश्राद्धंप्रतिपद्याश्विनेसितइति इयंसंगवव्यापिनीग्राह्येतिनिर्णयदीपेउक्तम् प्रतिपद्याश्विनेशुक्लेदौहित्रस्त्वेकपार्वणम् श्राद्धंमातामहंकुर्यात्सपितासंगवेसदा जातमात्रोपिदौहित्रोजीवत्यपिचमातुले प्रातःसंगवयोर्मध्येआर्यस्यप्रतिपद्भवेदितिवचनात् अत्रसमूलत्वंविमृश्यम् इदंचमलमासेनकार्यं स्पष्टमासविशेषाख्याविहितंवर्जयेन्मलेइतिनिषेधात् इदंचजीवत्पितृकेणैवकार्यमितिशिष्टाः इदंचशिष्टाचारात्सपिंडकंकार्यमितिकेचित् पिंडरहितंतुयुक्तं जीवत्पितृकस्य मुंडनंपिंडदानंचप्रेतकर्मचसर्वशः नजीवत्पितृकःकुर्याद्गुर्विणीपतिरेवचेतिदक्षेणपिंडनिषेधात् आन्वष्टक्यवद्विशेषवचनाभावाच्चेतिसंक्षेपः[2] इतिश्रीकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौमहालयनिर्णयः ।

आश्विन शुक्ल प्रतिपदेस दौहित्राला मातामहश्राद्ध सांगितलें आहे—हेमाद्रींत व संग्रहांत—"मातुल विद्यमान असतांही उत्पन्न झालेल्याही ( बाल्य अवस्थेंत असलेल्याही ) दौहित्रानें आश्विनशुक्लप्रतिपदेस मातामहश्राद्ध करावें." ही प्रतिपदा दौहित्रश्राद्धाविषयीं संगवकालव्यापिनी घ्यावी, असें निर्णयदीपांत सांगितलें आहे. तें असें—"जीवत्पितृक दौहित्रानें आश्विनशुक्लप्रतिपदेस संगवकालीं एकपार्वण मातामहश्राद्ध सर्वदा करावें. मातुल जीवंत असतांही उत्पन्न होतांच दौहित्रानें प्रतिपदेस प्रातःकाल व संगवकाल यांच्यामध्यें आर्याचें ( मातामहाचें ) श्राद्ध करावें." असें वचन आहे. या वचनाविषयीं समूलपणाचा विचार करावा. हें मातामहश्राद्ध मलमासांत करूं नये. कारण, "विशेष महिन्यांचें स्पष्ट नांव घेऊन जें विहित कर्म तें मलमासांत वर्ज्य करावें." असा निषेध आहे. हें श्राद्ध जीवत्पितृकानेंच करावें, असें शिष्ट सांगतात. हें श्राद्ध शिष्टाचारावरून सपिंडक करावें असें केचित् म्हणतात. पिंडरहित करणें हें योग्य आहे. कारण, "क्षौर, पिंडदान, आणि सर्व प्रेतकर्म हें जीवत्पितृकानें व गर्भिणीपतीनें करूं नये" असा दक्षानें जीवत्पितृकाला पिंडनिषेध केला आहे. आणि आन्वष्टक्य ( नवमी ) श्राद्धांत पिंडाविषयीं विशेष वचन आहे, तसें येथें विशेष वचनही नाहीं. याप्रमाणें हा संक्षेपानें निर्णय समजावा. इति महालयनिर्णयः.

अथाश्विनशुक्लप्रतिपदिनवरात्रारंभः तन्निर्णयः तत्रभार्गवार्चनदीपिकायांदेवीपुराणेसुमेधाउवाच शृणुराजन्प्रवक्ष्यामिचंडिकापूजनक्रमम् आश्विनस्यसितेपक्षेप्रतिपत्सुशुभेदिने इत्युपक्रम्योक्तम् शुद्धे-

१ "त्रिमुहूर्तं वसेदर्के त्रिमुहूर्तं वसेज्जले त्रिमुहूर्तं वसेद्गोषु त्रिमुहूर्तं वनस्पतौ" ॥ हें वचन तृतीयाचे उत्तरार्धांत सांगितलेलें आहे. त्याचा अर्थ—सोम म्हणजे चंद्र नष्ट झाला असतां तीन मुहूर्त सूर्यांत असतो, तीन मुहूर्त उदकांत असतो, तीन मुहूर्त गाईंत असतो, आणि तीन मुहूर्त वनस्पतींत असतो. २ या वचनाचा अर्थ, असा समजावयाचा आहे. इतर रीतीनें होत असेल तर विद्वानांनीं करावा. ३ अत्र पुरूरवार्द्रवसंज्ञकाविश्वेदेवाः धूरिलोचना इतिकेचित् । इयं प्रतिपदपराह्णव्यापिनी ग्राह्येति केचन संगवव्यापिनीति केचित् । अस्य श्राद्धस्य यावद्दुश्चिकदर्शनं गौणकाल इति कालतत्त्वविवेचने इति धर्मसिंधुसारम् ॥

तिथौप्रकर्तव्यंप्रतिपच्चोर्ध्वगामिनी आद्यास्तुनाडिकास्त्यक्त्वाषोडशद्वादशापिवा अपराह्णेचकर्तव्यंशुद्धसंततिकांक्षिभिः इदंचापराह्णयोगिन्याःप्राशस्त्यंद्वितीयदिनेप्रतिपदोभावेज्ञेयम् तथातत्रैव**देवीपुराणेडामरतंत्रेचदेवीवचः** अमायुक्तानकर्तव्याप्रतिपत्पूजनेमम मुहूर्तमात्राकर्तव्याद्वितीयादिगुणान्विता आद्याःषोडशनाडीस्तुलब्ध्वायःकुरुतेनरः कलशस्थापनंतत्रह्यरिष्टंजायतेध्रुवं **मार्कंडेयदेवीपुराणयोः** पूर्वविद्धातुयाशुक्लाभवेत्प्रतिपदाश्विनी नवरात्रव्रतंतस्यांनकार्यंशुभमिच्छता देशभंगोभवेत्तत्रदुर्भिक्षंचोपजायते नंदायांदर्शयुक्तायांयत्रस्यान्ममपूजनमिति **स्कांदेपि** प्रतिपद्याश्विनेमासिसाशुद्धाशुभदाभवेत् भाद्रपंचदशीकृष्णातयायुक्तानशस्यते विरुद्धफलदासाहिपुत्रदारभयावहेति तथा वर्जनीयाप्रयत्नेनअमायुक्तातुपार्थिव द्वितीयाविगुणैर्युक्ताप्रतिपत्सर्वकामदा तथा**देवीपुराणे** योमांपूजयतेनित्यंद्वितीयादिगुणान्विताम् प्रतिपच्छारदीं[1]ज्ञात्वासोश्नुतेसुखमव्ययम् यदिकुर्यादमायुक्तांप्रतिपत्स्थापनेमम तस्यशापायुतंदत्वाभस्मशेषंकरोम्यहम् आग्रहात्कुरुतेयस्तुकलशस्थापनंमम तस्यसंपद्विनाशःस्याज्ज्येष्ठःपुत्रोविनश्यति अमायुक्तानकर्तव्याप्रतिपच्चंडिकार्चने धनार्थिभिर्विशेषेणवंशहानिश्चजायते नदर्शकलयायुक्ताप्रतिपच्चंडिकार्चने उदयेद्विमुहूर्तापिग्राह्यासोदयदायिनीति **देवीपुराणे** याचाश्वयुजिमासेस्यात्प्रतिपद्भद्रयान्विता शुद्धाममार्चनंतस्यांशतयज्ञफलप्रदम् **रुद्रयामले** अमायुक्तासदाचैवप्रतिपन्निंदितामता तत्रचेत्स्थापयेत्कुंभंदुर्भिक्षंजायतेध्रुवं प्रतिपत्सद्वितीयातुकुंभारोपणकर्मणीति यद्यपिरुद्रयामलडामरंचनिर्मूलंतथाप्यविरोधात्प्रचाराच्चतद्वचनानिलिख्यंते **तिथितत्त्वेदेवीपुराणेपि** [1]प्रातरावाहयेद्देवींप्रातरेवप्रवेशयेत् प्रातःप्रातश्चसंपूज्यप्रातरेवविसर्जयेत् **तत्रैव** शरत्कालेमहापूजाक्रियतेयाचवार्षिकी साकार्योदयगामिन्यांनतत्रतिथियुग्मता तथा कुहूकाष्ठोपसंयुक्तांवर्जयेत्प्रतिपत्तिथिम् राज्यनाशायसाप्रोक्तानिंदिताचाश्वपूजनइति ।

आतां आश्विनशुक्ल प्रतिपदेस **देवीनवरात्रारंभ** होय. त्याचा **निर्णय**—त्याविषयीं **भार्गवार्चनदीपिकेंत—देवीपुराणांत—सुमेधा** सांगतो—"हे राजा, चंडिकेच्या पूजनाचा क्रम सांगतों, श्रवण कर! आश्विन शुक्ल पक्षीं प्रतिपदेस शुभ दिवशीं" असा उपक्रम करून सांगतो—"तें नवरात्र शुद्ध तिथीस करावें. प्रतिपदा ऊर्ध्वगामिनी असतां शुद्ध संतति इच्छिणाऱ्यांनीं पहिल्या सोळा किंवा बारा घटिका सोडून अपराह्णीं करावें." ही जी अपराह्णव्यापिनी प्रतिपदा प्रशस्त सांगितली ती दुसऱ्या दिवशीं प्रतिपदा नसतां जाणावी. तसें तेथेंच ( भार्गवार्चनदीपिकेंत ) **देवीपुराणांत व डामरतंत्रांत देवीवाक्य**—"माझ्या पूजेविषयीं अमावास्यायुक्त प्रतिपदा घेऊं नये. द्वितीयादि गुणांनीं युक्त अशी मुहूर्तमात्र जरी प्रतिपदा असली तथापि तीच घ्यावी. पहिल्या सोळा घटिकांत जो मनुष्य कलशस्थापन करितो तेथें निश्चयानें अरिष्ट होतें." **मार्कंडेय व देवीपुराणांत**—"शुभ इच्छिणारानें पूर्वविद्धा ( अमावास्यायुक्त ) जी आश्विनशुक्ल प्रतिपदा तिचे ठायीं नवरात्रव्रत करूं नये; कारण, दर्शयुक्त प्रतिपदेस जेथें माझें पूजन होतें तेथें देशभंग होतो व दुर्भिक्षही होतें." **स्कंदपुराणांतही**—"आश्विनमासांत जी प्रतिपदा शुद्ध ती शुभदायक होईल. भाद्रपद कृष्ण अमावास्यायुक्त प्रतिपदा प्रशस्त नाहीं. कारण, ती विपरीत फल देणारी पुत्र, स्त्रिया यांस भयावह होते." तसेंच "हे राजा! अमायुक्त प्रतिपदा प्रयत्नानें वर्ज्य करावी. व द्वितीयादि गुणांनीं युक्त प्रतिपदा सर्व मनोरथ देणारी होय." तसेंच **देवीपुराणांत**—"द्वितीयादि गुणयुक्त अशी शारदीप्रतिपदा जाणून जो माझें पूजन नित्य करितो तो अविनाशी सुख पावतो. जर अमायुक्त प्रतिपदेस माझें स्थापन करील तर त्यास मी हजारों शाप देऊन भस्म करीन. जो आग्रहानें माझें कलशस्थापन ( अमायुक्त प्रतिपदेस ) करतो त्याच्या संपत्तीचा नाश होतो व ज्येष्ठपुत्राचा नाश होतो. चंडिकेच्या पूजनाविषयीं अमायुक्त प्रतिपदा करूं नये; धनाची इच्छा करणारांनीं तर विशेषेंकरून न करावी. केली तर वंशहानि होते. कलामात्र दर्शानें युक्तही प्रतिपदा चंडिकापूजनाविषयीं करूं नये. सूर्योदयीं दोन मुहूर्तही प्रतिपदा असेल ती घ्यावी. कारण, ती उत्कर्ष करणारी आहे." **देवीपुराणांत**—"आश्विनमासांत द्वितीयेनें युक्त जी प्रतिपदा ती शुद्ध, तिचेठायीं माझें पूजन केलें असतां तें शंभर यज्ञांचें फल देणारें होतें." **रुद्रयामलांत**—"अमायुक्त प्रतिपदा सर्वथा निंदित होय. अमायुक्त प्रतिपदेचे ठायीं जर कुंभस्थापन करील तर निश्चयानें दुर्भिक्ष होईल. द्वितीयासहित प्रतिपदा कुंभस्थापनकर्माविषयीं शुभ होय." जरी **रुद्रयामल व डामरतंत्र** हीं निर्मूल आहेत तरी तीं अविरुद्ध असल्यामुळें व प्रचारांत असल्यामुळें त्यांचीं वचनें लिहिलीं

१ प्रतिपत्सद्वितीयायांसदावाहनकालमाह प्रातरिति । यद्यपीदं पत्रिकापूजाविषयं तथापि देवीपूजायामपि योजितं बाधकाभावात् ॥
२ न तत्र तिथियुग्मतेति । युग्मवाक्यानुरोधेन दुर्गापूजाया न निर्णय इत्यर्थः ॥

आहेत. **तिथितत्त्वांत—देवीपुराणांतही**—"प्रातःकाळीं देवीचें आवाहन करावें व प्रातःकाळीं स्थापन करावें. दररोज प्रातःकाळीं पूजन करून प्रातःकालींच विसर्जन करावें." तेथेंच–"शरदृतूंत आणि वर्षप्रतिपदेस जी महापूजा करितात, ती उदयव्यापिनी तिथीस ( प्रतिपदेस ) करावी. त्या पूजेविषयीं युग्मवाक्यानें अमावास्यायुक्त प्रतिपदा घेऊं नये." तसेंच "काष्ठा ( कलेचा तिसावा भाग ) प्रमाणही अमावास्यायुक्त प्रतिपदा वर्ज्य करावी. कारण, ती राज्यनाशाकरितां होते, आणि अश्वपूजेविषयीं ती निंदित आहे."

एषुवचनेषुकलशस्थापनग्रहणात् तदेवप्रथमदिनेनिषिध्यतेनतूपवासादि तस्य प्रतिपद्यप्यमावास्येति युग्मवाक्यात् शुक्लास्यात्प्रतिपत्तिथिःप्रथमतइति **दीपिकोक्तेः** शुक्लपक्षेदर्शविद्धेति**माधवोक्तेश्च** पूर्वदिने प्राप्तस्यबाधेमानाभावादिति**केचित्** वस्तुतस्तुपूर्वोक्तवाक्येषुचंडिकार्चनपूजाग्रहणादुपवासादेश्चांगत्वात्प्रधानदेवीपूजादावपिपरेतियुक्तं कलशस्थापनग्रहणंतूपलक्षणम् अतएव**देवलः** [1]व्रतोपवासनियमेघटिकैकापियाभवेत् सातिथिस्तद्दिनेपूज्याविपरीतातुपैतृकइति अत्रघटिकामुहूर्तइति**गौडाः** यदातुपूर्वदिनेसंपूर्णाशुद्धाच भूत्वापरदिनेवर्धतेतदासंपूर्णत्वादमायोगाभावाच्चपूर्वैव यानिचद्वितीया[2]योगनिषेधकानिवचनानिकेचित्पठंति तान्यपिशुद्धाधिकनिषेधपराणि परदिनेप्रतिपदोत्यंतासत्त्वेतुदर्शयुतापिपूर्वैवग्राह्या तदाह**लल्लः** तिथिःशरीरं तिथिरेवकारणंतिथिःप्रमाणंतिथिरेवसाधनमिति यानि[3]त्वमायुक्ताप्रकर्तव्येत्यादीनिनृसिंहप्रसादेवचनानितानिसमूलत्वेसत्येतद्विषयाणि **अत्रेदंतत्त्वम्** पूर्वोक्तवाक्यानांसर्वेषांहेमाद्र्याद्यलिखितत्वेननिर्मूलत्वात्तैश्चान्यनिर्णयस्यानुक्तेःसामान्यनिर्णयात्पूर्वप्राप्तावपि गौडनिबंधेषुविशेषनिर्णयादौदयिकीग्राह्या तत्रापिघटिकैकेत्यस्य द्विमुहूर्तस्तुतित्वोक्तेर्द्विमुहूर्ताग्राह्या [4]उदितेदैवतंभानावित्यत्रद्विमुहूर्तत्रिरह्नश्चेतिऔदयिक्याद्विमुहूर्तत्वनियमात् तेनउदयेद्विमुहूर्तापीत्याद्यनुसारोपि मुहूर्तमात्राकर्तव्येतिद्विमुहूर्तस्तुतिः अन्यथाद्विमुहूर्तविधिवैयर्थ्यात् **केचित्तु**मुहूर्तमात्रेतिवचनात्ततोन्यूनत्वेपरानित्याहुः **गौडा**अप्येवम् ।

वरील वचनांत कलशस्थापन सांगितल्यामुळें तेंच अमावास्यायुक्त प्रतिपदेस निषिद्ध केलें आहे. उपवासादिक निषिद्ध केलें नाहीं. कारण, 'प्रतिपदा व अमावास्या यांचें युग्म महाफलदायक आहे.' असें युग्मवाक्य प्रथम परिच्छेदांत सांगितलें असल्यामुळें; आणि "शुक्लपक्षांतील प्रतिपदा अमायुक्त घ्यावी" असें **दीपिका**वचन असल्यामुळें; व "शुक्लपक्षीं ( प्रतिपदा ) दर्शविद्धा करावी" असें **माधवा**चें ही वचन असल्यामुळें पूर्वदिवशीं जें प्राप्त उपवासादिक त्याचा बाध करण्याविषयीं प्रमाण नाहीं, असें **केचित्** म्हणतात. वास्तविक म्हटलें तर–पूर्वोक्त वाक्यांत 'चंडिकेचें अर्चन–पूजन' असें सांगितल्यामुळें पूजा प्रधान व उपवासादिक त्याचें अंग असल्यामुळें प्रधान अशा देवीपूजादिकांविषयीं देखील परा घ्यावी, हें योग्य आहे. कलशस्थापन म्हटलें तें पूजेचें उपलक्षण होय. म्हणूनच **देवल** सांगतो—"व्रत, उपवास, नियम यांविषयीं प्रातःकाळीं एक घटिकाही जी तिथि असेल ती तिथि त्या दिवशीं पूज्य आहे. पैतृककर्माविषयीं याच्या विपरीत समजावी." या वचनांत घटिका म्हणजे मुहूर्त समजावा, असें **गौड** सांगतात. ज्या वेळीं पूर्वदिवशीं संपूर्ण शुद्ध ( ६० घटिका ) असून परदिवशीं वाढलेली असेल त्या वेळीं संपूर्ण असल्यामुळें व अमावास्येचा योग नसल्यामुळें पूर्वाच घ्यावी. जीं द्वितीयायोगनिषेधक वचनें **केचित्** सांगतात तीं देखील पूर्वदिवशीं शुद्ध असून दुसऱ्या दिवशीं वाढलेल्या तिथीचा निषेध करणारीं आहेत. दुसऱ्या दिवशीं प्रतिपदा मुळींच नसेल तर दर्शयुक्त असली तरी पूर्वाच घ्यावी. तें सांगतो **लल्ल**—"कर्माचें शरीर तिथि आहे. कर्माला कारण तिथि आहे. कर्माला प्रमाण तिथि आहे. आणि कर्माला साधन तिथिच आहे." ह्या चार हेतूंनीं ज्या कर्मास जी तिथि सांगितली ती अवश्य असलीच पाहिजे असें समजावें. आतां जीं "अमावास्यायुक्त प्रतिपदा करावी" इत्यादिक **नृसिंहप्रसादांत** सांगितलेलीं वचनें तीं समूल असतील तर त्या ( प्रतिपत्क्षया )विषयीं समजावीं. येथें खरा प्रकार असा कीं, पूर्वी सांगितलेलीं वाक्यें **हेमाद्रिप्रभृति** निबंधकारांनीं न लिहिल्यामुळें तीं सारीं निर्मूळ असल्याकारणानें, व त्या निबंधकारांनीं अन्य निर्णय सांगितला नसल्याकारणानें, सामान्य निर्णयावरून पूर्वाची प्राप्त असली तरी **गौड**निबंधांत विशेष निर्णय केल्यानें उदयव्यापिनी घ्यावी. त्या उदयव्यापिनींतही 'एक घटिका' असें सांगितलें तें द्विमुहूर्ताची स्तुति आहे, असें सांगितल्यावरून द्विमुहूर्ता घ्यावी. कारण, प्रथम परिच्छेदांत

---

१ व्रतोपवासस्नानादौ घटिकैका यदा भवेत् ॥ उदये सा तिथिस्तत्र विपरीता तु पैतृके इति पाठांतरं ॥ २ द्वितीयेति । द्वितीयाशेषसंयुक्ता प्रतिपच्चंडिकार्चने ॥ मोहादथोपदेशाद्वा यःकुर्यात्पुत्रविनाशनमित्यादीनीत्यर्थः ॥ ३ इदानीं अमायुक्तविधिं व्यवस्थापयति । अमेति । अमायुक्ता प्रकर्तव्या प्रतिपच्चंडिकार्चने । न ग्राह्या परसंयुक्ता शुद्धसंततिकांक्षिभिरित्यादीनीत्यर्थः ॥ ४ उदिते दैवतं भानौ पित्र्यं चास्तमिते रवौ ॥ द्विमुहूर्तं त्रिरह्नश्च सा तिथिर्हव्यकव्ययोः ॥

तिथिनिर्णय प्रकरणीं "उदिते दैवतं भानौ पित्र्यं चास्तमिते रवौ ॥ द्विमुहूर्तं त्रिरह्नश्च सा तिथिर्हव्यकव्ययोः" असें विष्णुधर्मवचन आहे. त्याचा अर्थ-"सूर्योदय झाला असतां दोन मुहूर्त देवांचे आहेत. आणि दिवसाचे शेवटचे तीन मुहूर्त पितरांचे आहेत, म्हणून जी तिथि प्रातःकाळीं दोन मुहूर्त असेल ती देवकर्माविषयीं घ्यावी, आणि जी सायंकालीं तीन मुहूर्त असेल ती पित्र्यकर्माविषयीं घ्यावी." या वचनानें उदयव्यापिनी म्हणजे द्विमुहूर्ता असा नियम सांगितला आहे. तेणेंकरून 'उदये द्विमुहूर्तापि ग्राह्या' ह्या वर सांगितलेल्या देवीपुराणवचनास अनुसरल्यासारखेंही झालें. 'मुहूर्तमात्रा कर्तव्या' हें वर सांगितलेलें देवीपुराण—डामरतंत्रांतील देवीवचन तें द्विमुहूर्ताची स्तुति आहे. असें नसेल तर ( मुहूर्तमात्र घ्यावयाची असेल तर ) देवीपुराणांत द्विमुहूर्ताचें विधान केलें तें व्यर्थ होईल. **केचित्** तर 'मुहूर्तमात्रा कर्तव्या' ह्या वचनावरून मुहूर्तापेक्षां न्यून असेल तर परा करूं नये, असें सांगतात. **गौडही** असेंच सांगतात.

अत्रदेवीपूजैवप्रधानम् उपवासादिस्त्वंगम् अष्टम्यांचनवम्यांचजगन्मातरमंबिकाम् पूजयित्वाश्विनेमासिविशोकोजायतेनरइतिहे**हेमाद्रौभविष्ये** तस्याएवफलसंबंधात् नवमीतिथिपर्यंतंवृद्ध्यापूजाजपादिकमितितत्रैव**देवीपुराणात्** शरत्कालेमहापूजाक्रियतेयाचवार्षिकीति**मार्कंडेयपुराणाच्च** पूर्ववचनादष्टमीनवमीपूजैवप्रधानमन्यत्सर्वमंगमिति**गौडाः** एकाहपक्षोपि**कालिकापुराणे** यस्त्वेकस्यामथाष्टम्यांनवम्यामथसाधकः पूजयेद्वरदांदेवींमहाविभवविस्तरैरिति **तत्त्वं**तुराजसूयेन्ययागैःसमप्रधानायाःसहितायाअप्यवेष्टेरेतयाभाद्यकामंयाजयेदित्येकत्वान्मध्येविधानाच्च यथाफलार्थोबहिःप्रयोगस्तथा नवरात्रमध्यस्थायाअष्टम्यानवम्यावाफलार्थःपृथक्प्रयोगः **रूपनारायणधृतदेवीपुराणे** महानवम्यांपूजेयंसर्वकामप्रदायिका सर्वेषुचैववर्णेषुतवभक्त्याप्रकीर्तिता कृत्वाप्रोतियशोराज्यपुत्रायुर्धनसंपदः साचकाम्यानित्याच एवमन्यैरपितथादेव्याःकार्यंप्रपूजनम् विभूतिमतुलांलब्धुंचतुर्वर्गप्रदायकमिति योमोहादथवालस्याद्देवींदुर्गांमहोत्सवे नपूजयतिदंभाद्वाद्वेषाद्वाप्यत्रभैरव क्रुद्धाभगवतीतस्यकामानिष्टान्निहंतिवै इति**कालिकापुराणे**फलनिंदाश्रुतेः वर्षेवर्षेविधातव्यंस्थापनंचविसर्जनमिति**तिथितत्त्वेदेवीपुराणाच्च** अत्रोपवासादिकमुक्तं**हेमाद्रौभविष्ये** एवंचविंध्यवासिन्यांनवरात्रोपवासतः एकभक्तेननक्तेनतथैवायाचितेनच पूजनीयाजनैर्देवीस्थानेस्थानेपुरेपुरे गृहेगृहेशक्तिपरैर्ग्रामेग्रामे**वनेवने** स्नातैःप्रमुदितैर्हृष्टैर्ब्राह्मणैःक्षत्रियैर्नृपैः वैश्यैःशूद्रैर्भक्तियुक्तैर्म्लेच्छैरन्यैश्चमानवैरिति यत्तु**रूपनारायणीयेभविष्ये** एवंनानाम्लेच्छगणैःपूज्यतेसर्वदस्युभिरिति तत्तामसपूजापरम् विनामंत्रैस्तामसीस्यात्किरातानांतुसंमतेतितत्रैवोक्तेः **मदनरत्ने देवीपुराणेपि** कन्यासंस्थेरवौशक्रशुक्लामारभ्यनंदिकां अयाचीह्यथवैकाशीनक्ताशीवाथवांब्वदः भूमौशयीतचामंत्र्यकुमारीर्भोजयेन्मुदा वस्त्रालंकारदानैश्चसंतोष्याःप्रतिवासरम् बलिंचप्रत्यहंदद्यादोदनंमांसमाषवत् त्रिकालंपूजयेद्देवींजपस्तोत्रपरायणइति नंदिकाप्रतिपत्तिथिरिति**मैथिलाः** षष्ठीति**गौडाः** ।

ह्या नवरात्राचे ठायीं देवीपूजाच प्रधान. उपवास, स्तोत्रपाठ, जप इत्यादिक तर अंग आहे. कारण, "आश्विनमासांत अष्टमी व नवमी या तिथीस जगन्माता अंबिकेचें पूजन केलें असतां मनुष्य शोकरहित होतो-" ह्या **हेमाद्रींतील भविष्य**वचनांत पूजेलाच फल सांगितलें आहे. व "नवमी तिथीपर्यंत वृद्धीनें ( पहिले दिवशीं एक, दुसऱ्या दिवशीं दोन असें ) पूजा व जप इत्यादि करावें," असें तेथेंच **देवीपुराण**वचन आहे: आणि "शरत्कालीं प्रतिवर्षी महापूजा करितात" असें **मार्कंडेय**पुराणवचनही आहे. वरील भविष्यवचनावरून अष्टमी-नवमीपूजाच प्रधान आहे; बाकीचें सर्व अंग होय असें **गौड** सांगतात. एक दिवसाचा पक्षही सांगतो, **कालिकापुराणांत**—"जो साधक असेल त्यानें एका अष्टमीस अथवा नवमीस वरदादेवीचें मोठ्या ऐश्वर्यविस्तारांनीं पूजन करावें." याचें तत्त्व म्हटलें तर असें कीं, राजसूययज्ञांत अवेष्टि नांवाचा याग व इतर याग सांगितले आहेत. इतर यागांत जीं प्रधानकर्मे तींच या अवेष्टियागांत आहेत. असें असून ती अवेष्टि सर्व यागांसह सांगितली असूनही 'जो अन्नादिकांची इच्छा करील त्याच्याकडून ही अवेष्टि करवावी' या अर्थाच्या

१ स्थाने स्थाने ब्राह्मणैः । पुरे पुरे क्षत्रियैः नृपैः । गृहे गृहे वैश्यैः । ग्रामे ग्रामे शूद्रैः ॥ वने वने म्लेच्छैः ॥ अथवा स्नानादिभिः सर्वत्र ब्राह्मणादिभिरित्यर्थः ॥ २ अन्यैः प्रतिलोमानुलोमैः ॥ ३ तामसेति पूजा त्रिविधा भविष्ये ॥ सात्विकी राजसी पूजा तामसी चेति सा त्रिधा ॥ सात्विकी जपयज्ञाद्यैर्नैवेद्यैश्च निरामिषैः ॥ राजसी बलिदानेन नैवेद्यैः सामिषैस्तथा ॥ सुरामांसाद्युपाहारैर्जपयज्ञैर्विना तु या ॥ विना मंत्रैस्तामसी स्यात्किरातानां तु संमतेति ॥ तत्र सात्विक्यां ब्राह्मणस्यैवाधिकारः राजस्यां क्षत्रियादेरिति ॥ ४ किरातानामिति म्लेच्छाद्युपलक्षणं साम्यात् ।

वचनांत 'एतया' असें एकवचन असल्यामुळें; आणि मध्यें विधान केल्यामुळें; त्या अष्टमीफलाकरितां राजसूययज्ञाच्या बाहेर जसा प्रयोग होतो, तसा नवरात्रामध्यें असलेल्या अष्टमीचा किंवा नवमीचा फलार्थ पृथक् प्रयोग होतो. रूपनारायणग्रंथांत—देवीपुराणांत—"महानवमीचे ठायीं ही पूजा सर्व मनोरथ देणारी होय. हे वत्सा! सर्व वर्णांविषयीं तुझ्या भक्तीस्तव सांगितली आहे, ही केली असतां यश, राज्य, पुत्र, आयुष्य, धन, संपत्ति, हीं प्राप्त होतात." ही पूजा काम्य व नित्यही आहे. कारण, "असेंच अन्यांनींही बहुत ऐश्वर्यप्राप्तीकरितां धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार वर्ग देणारें देवीचें पूजन करावें." "जो मनुष्य मोहानें अथवा आलस्यानें अथवा दंभानें किंवा द्वेषानें महोत्सवांत दुर्गादेवीचें पूजन करीत नाहीं त्यावर भगवती क्रुद्ध होऊन इष्ट मनोरथांचा नाश करिते." असें कालिकापुराणांत फल व निंदाश्रवण आहे. आणि "प्रतिवर्षी देवीचें स्थापन व विसर्जन करावें." असें तिथितत्वांत देवीपुराणांत वचनही आहे. तेथें उपवासादिक सांगतो—हेमाद्रींत—भविष्यांत—"याप्रमाणें विंध्यवासिनी देवीचेठायीं नवरात्र उपवास, किंवा एकभक्त, किंवा नक्त, अथवा अयाचित करून जनांनीं प्रत्येक स्थानीं, प्रत्येक नगरीं, प्रत्येक गृहीं, प्रत्येक ग्रामीं, प्रत्येक वनीं नवरात्र करावें. स्नान केलेले अत्यंत आनंदित असे ब्राह्मण, क्षत्रिय, राजे, वैश्य, शूद्र यांनीं व भक्तियुक्त म्लेच्छांनीं व अन्य मनुष्यांनींही देवीचें पूजन करावें." आतां जें रूपनारायणग्रंथांत भविष्यांत—"असेंच अनेक म्लेच्छ व भिल्ल इत्यादि चोर देवीची पूजा करितात" असें वचन तें तामसपूजापर होय. कारण, "मंत्रावांचून तामसीपूजा भिल्लांस विहित आहे." असें तेथेंच सांगितलें आहे. मदनरत्नांत देवीपुराणांतही—"कन्याराशीस सूर्य असतां शुक्ल प्रतिपदेस आरंभ करून अयाचित, अथवा एकभुक्त, किंवा नक्त, अथवा उदकभक्षण करून भूमीवर निद्रा करून कुमारींस आमंत्रण करून त्यांना आनंदानें भोजन घालावें. प्रतिदिवशीं वस्त्र अलंकार कुमारीला देऊन संतुष्ट करावें. प्रतिदिवशीं मांसमाषयुक्त भाताचा बलि द्यावा. जप व स्तोत्रपाठ करून त्रिकाल देवीचें पूजन करावें." या वचनांत नंदिका म्हणजे प्रतिपदा तिथि असें मैथिल सांगतात. नंदिका म्हणजे षष्ठी असें गौड म्हणतात.

तच्चपूजनंरात्रौकार्यम् आश्विनेमासिमेघांतेमहिषासुरमर्दिनीं निशासुपूजयेद्भक्त्यासोपवासादिकःक्रमादिति देवीपुराणात् संग्रहेपि आश्विनेमासिमेघांतेप्रतिपद्यातिथिर्भवेत् तस्यांनक्तंप्रकुर्वीतरात्रौदेवींचपूजयेत् रात्रिरूपायतोदेवीदिवारूपोमहेश्वरः रात्रिव्रतमिदंदेविसर्वपापप्रणाशनम् सर्वकामप्रदंनृणांसर्वशत्रुनिबर्हणं रात्रिव्रतमिदंतस्माद्रात्रौकर्तव्यतेष्यते नक्तव्रतमिदंयस्मादन्यथानरकेगतिरित्यादिवचनाच्च रात्रिव्रतत्वमेवाभिप्रेत्यमाधवेनोक्तम् तस्यनक्तव्रतत्वादिति नतुरात्रिभोजनात् ननु मासिचाश्वयुजेशुक्लेनवरात्रेविशेषतः संपूज्यनवदुर्गांचनक्तंकुर्यात्समाहितः नवरात्राभिधंकर्मनक्तव्रतमिदंस्मृतं आरंभेनवरात्रस्येत्यादिस्कांदात्माधवोक्तेश्चनक्तमेवप्रधानमितिचेत् न नवरात्रोपवासतइत्यादेरनुपपत्तेः तेनपाक्षिकनक्तानुवादोयं नित्यानित्यसंयोगविरोधात् नह्यग्निहोत्रेदशमपक्षेप्राप्तस्य दध्नाजुहोतीत्यस्येंद्रियकामहोमेनुवादोघटते नित्यवदनुवादायोगादित्युक्तंवार्तिके तथात्रापि तेनात्रतद्वदेवगुणात्फलमितिज्ञेयम् ननु रात्रेःकर्मकालत्वेतद्व्यापिनीपूर्वैवप्रतिपत्प्राप्नुयात् मैवम् न्यायतःप्राप्तावपिपूर्वोक्तवचनैर्बाधात् यथापूर्वेद्युःकर्मकालव्यापिनीमपित्यक्त्वास्वल्पापिपरैवरामनवमीतिप्रागुक्तम् यथावा निशीथेसतीमपिपूर्वांजन्माष्टमींत्यक्त्वा रोहिणीयुक्तापरैवेतिमाधवेनोक्तम् तथात्रापि वस्तुतस्तु रात्रेःकर्मकालत्ववचसांहेमाद्र्याद्यलिखनात्समूलत्वंविमृश्यमेव त्रिकालंपूजयेदित्यादिपूर्वविरोधाच्च माधवोक्तिस्तुपाक्षिकनक्तानुवादइत्युक्तं तस्मात्सर्वपक्षेषुपरैवप्रतिपदितिसिद्धम् अत्रकेचिन्नवरात्रशब्दोनवाहोरात्रपरः वृद्धौसमाप्तिरष्टम्यांह्रासेमाप्रतिपन्निशि प्रारंभोनवचंड्यास्तुनवरात्रमतोर्थवदितिदेवीपुराणादित्याहुः तन्न अतिह्रासवृद्ध्योर्न्यूनाधिकत्वापत्तेः अत्रमूलाभावाच्च तेनतिथिवाच्येवायं तदुक्तं तिथिवृद्धौतिथिह्रासेनवरात्रमपार्थकम् अष्टरात्रेनदोषोयंनवरात्रतिथिक्षयेइति सचनवरात्रशब्दःक्वचिल्लक्षणयाकर्मवाची यथाप्रारंभोनवरात्रस्येत्यत्रेतिदिक् ।

तें देवीपूजन रात्रीस करावें. कारण, "आश्विनमासीं मेघांनीं ( शरदृतूंत ) उपवासादियुक्त होऊन क्रमानें महिषासुरमर्दिनी देवीचें भक्तीनें रात्रीस पूजन करावें." असें देवीपुराणवचन आहे. संग्रहांतही—"आश्विनमासीं मेघांतीं जी प्रतिपदा तिथि होते तिचेठायीं नक्त करावें, आणि रात्रीस देवीचें पूजन करावें. कारण, देवी रात्रिरूपा व महेश्वर दिवारूप आहे. यास्तव हे देवि, हें रात्रिव्रत सर्व पापनाश करणारें व मनुष्यांस सर्व मनोरथ देणारें व सर्व शत्रुनाश करणारें असें आहे. हें रात्रिव्रत रात्रीं करावें, हें इष्ट आहे. कारण, हें नक्तव्रत आहे. हें केलें नाहीं तर नरकांत गति होते." इत्यादि

वचनही आहे. हें रात्रिव्रत आहे, अशाच अभिप्रायानें माधव सांगतो कीं, "तें नक्तव्रत आहे." रात्रिभोजनानें हें होत नाहीं. शंका—आश्विनमासांत शुक्लपक्षांत नवरात्रामध्यें विशेषेंकरून नवदुर्गेची पूजा करून समाधानपूर्वक नक्त करावें. नवरात्र नांवाचें हें कर्म नक्तव्रत म्हटलें आहे. नवरात्राच्या आरंभीं." इत्यादि स्कांदवचनावरून आणि वर माधवानें सांगितल्यावरून त्या नवरात्रांत नक्तच प्रधान ( मुख्य ) आहे, असें म्हणूं? समाधान—नक्तच प्रधान असें म्हणतां येत नाहीं. कारण "नवरात्रोपवासतः" म्हणजे नवरात्र उपवास किंवा एकभक्त अथवा नक्त इत्यादि वर सांगितलेलें ( भविष्यादि-वचन ) उपपन्न होणार नाहीं. तेणेंकरून ( भविष्यादि वचनाच्या अनुपपत्तीवरून ) असें समजतें कीं, स्कंदवचन, माधव इत्यादिकांनीं सांगितलेलें वैकल्पिक ( विकल्पानें होणाऱ्या ) नक्ताचा अनुवाद आहे, म्हणजे भविष्यादिकांनीं सांगितलेलें नक्तव्रत करावें, असें माधव, स्कांद इत्यादिकांनीं सांगितलें आहे. अपूर्व नक्त सांगितलें नाहीं. आतां याच्या उलट म्हणतों—म्हणजे स्कांद—माधव इत्यादिकांनीं सांगितलेल्या नित्य नक्ताचा वर भविष्यादिकांनीं सांगितलेलें अनित्य ( वैकल्पिक ) नक्त हा अनुवाद असें म्हटलें, तर नित्य तेंच अनित्य ( वैकल्पिक ) म्हटलें असतां नित्यत्वाचा विरोध येईल. कारण, नित्यत्व व अनित्यत्व एकत्र असत नाहींत. अग्निहोत्रांत दह्याच्या पक्षीं 'दध्ना जुहोति' म्हणजे अग्निहोत्राचा होम दह्यानें करावा. असें सांगितलें आहे. हा होम नित्य आहे; आणि 'दध्ना इंद्रियकामस्य जुहुयात्' या वाक्यानें इंद्रियें चांगलीं व्हावीं, असें इच्छिणारानें दह्यानें होम करावा, असें सांगितलें आहे. हा होम अनित्य आहे. हा अनित्य होम त्या नित्य होमाचा अनुवाद घडेल काय? अनुवाद घडत नाहीं. कारण, "नित्याचा अनित्य अनुवाद होत नाहीं." असें **वार्तिकांत** सांगितलें आहे. तसेंच येथें समजावें. तेणेंकरून त्या ठिकाणीं जसें इंद्रियेच्छूला दधिरूप गुणानें फल आहे. तसें येथें नक्तादिव्रत गुणानें फल आहे, असें समजावें. **शंका**—वरील **संग्रहादि**वचनावरून रात्री हा कर्मकाल झाला असतां रात्रिव्यापिनी पूर्वा ( अमवास्यायुक्त ) प्रतिपदा प्राप्त होईल? **समाधान**-प्राप्त होत नाहीं. कारण, न्यायानें 'कर्मणो यस्य यः काल-स्तत्कालव्यापिनी तिथिः' या वचनानें पूर्वीची प्राप्त झाली तरी पूर्वी सांगितलेल्या अमावास्यायुक्तनिषेधक वचनांनीं बाध होतो. जशी रामनवमी पूर्वदिवशीं कर्मकालव्यापिनी असली तरी ती टाकून पराच सांगितली आहे. अथवा जशी जन्माष्टमी मध्यरात्रीं असलेली देखील पूर्वीची टाकून रोहिणीयुक्त पराच करावी, असें माधवानें सांगितलें आहे, तसें येथेंही समजावें. वास्तविक म्हटलें तर, रात्रीं कर्मकाल आहे, असें बोधन करणारीं वचनें **हेमाद्रि**प्रभृति निबंधकारांनीं न लिहिल्यामुळें तीं समूल असल्याविषयींचा विचार करावयाचाच आहे. अर्थात् तीं निर्णयाविषयीं प्रमाण होतील असें म्हणतां येत नाहीं. आणि रात्रीच कर्मकाल म्हटला तर, वर सांगितलेल्या मदनरत्नांत धरलेल्या देवीपुराणांतील 'त्रिकालं पूजयेद्देवीं' इत्यादि वचनाचा विरोधही येतो. माधवोक्ति तर पाक्षिक नक्ताचा अनुवाद आहे, असें पूर्वी सांगितलें आहे. तस्मात् सर्व पक्षांचे ठायीं पराच प्रतिपदा घ्यावी असें सिद्ध झालें. या ठिकाणीं **केचित्** ग्रंथकार—'नवरात्र' हा शब्द नऊ अहोरात्रांचा बोधक आहे. कारण, "एकाद्या तिथीची वृद्धि असतां नवचंडीची समाप्ति अष्टमीस करावी. क्षय झाला असतां अमवास्यायुक्त प्रतिपदेस रात्रीं प्रारंभ करावा. म्हणून नवरात्र हा शब्द यथार्थ होतो" असें सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, अतिह्रास ( दोन तिथींचा क्षय ) किंवा अतिवृद्धि झाली असतां कमज्यास्ती होईल. आणि त्या वचनाविषयीं मूलही नाहीं. तेणेंकरून हा नवरात्रशब्द नऊ तिथींचा बोधक आहे. तें सांगतों—"तिथीची वृद्धि किंवा तिथीचा क्षय असतां नवरात्र निरर्थक होतें. नवरात्रांतील तिथीचा क्षय होऊन आठरात्री झाल्या असतां हा दोष येत नाहीं. कारण, नऊ तिथि आहेत." नऊ तिथींचा वाचक तो नवरात्र शब्द क्वचित् ठिकाणीं लक्षणेंकरून नवरात्रकर्मवाचक होतो. जसें 'नवरात्राचा प्रारंभ' या ठिकाणीं नवरात्रकर्माचा प्रारंभ, असा अर्थ आहे. ही दिशा समजावी.

प्रतिपदिचवैधृत्यादियोगनिषेधो**भार्गवार्चनदीपिकायांदेवीपुराणे** त्वाष्ट्र[१]वैधृतियुक्ताचेत्प्रतिपच्चंडिकार्चने तयोरंतेविधातव्यंकलशारोपणंगृहेति चित्रावैधृतियुक्तापिद्वितीयायुताचेत्सैवग्राह्येत्युक्तं**दुर्गोत्सवे**-भद्रान्विताचेत्प्रतिपत्तुलभ्यतेविरुद्धयोगैरपिसंगतासती सैवापराह्णेविबुधैर्विधेयाश्रीपुत्रराज्यादिविवृद्धिहेतुरिति यदातुवैधृत्यादिपरिहारेणप्रतिपन्नलभ्यते तदोक्तंतत्रैव**कात्यायनेन** प्रतिपद्याश्विनेमासिभवेद्वैधृति-चित्रयोः आद्यपादौपरित्यज्यप्रारभेन्नवरात्रकमिति **भविष्येपि** चित्रावैधृतिसंपूर्णाप्रतिपच्चेद्भवेन्नृप त्याज्या-ह्यंशाश्रयस्त्वाद्यास्तुरीयांशेतुपूजनमिति **रुद्रयामलेपि** वैधृतौपुत्रनाशःस्याच्चित्रायांधननाशनम् तस्मान्न-स्थापयेत्कुंभंचित्रायांवैधृतौतथा संपूर्णाप्रतिपदेवचित्रायुक्तायदाभवेत् वैधृत्यावापियुक्तास्यात्तदामध्यंदिने-रवौ अभिजित्तुमुहूर्तेयत्तत्रस्थापनमिष्यतइति चित्रादिनिषेधेमूलंचिंत्यम् ।

प्रतिपदेस वैधृति इत्यादि योगाचा निषेध सांगतो—**भार्गवार्चनदीपिकेंत देवीपुराणांत**—"चित्रानक्षत्र, वैधृति-

१ त्वाष्ट्रेति देवीपूजादौ कलशस्थापनमात्रेवेति मतभेदः ॥

योग यांनीं युक्त जर प्रतिपदा चंडिकापूजनदिवशीं असेल तर चित्रा, वैधृति संपल्यावर कलशस्थापन करावें," चित्रा व वैधृति यांहीं युक्त असली तरी द्वितीयायुक्त असेल तर तीच घ्यावी असें सांगितलें आहे, दुर्गोत्सवांत "द्वितीयायुक्त प्रतिपदा जर मिळत असेल, मग ती विरुद्ध ( निषिद्ध ) योगांनीं युक्त असली तरी तीच अपराह्णीं करावी. कारण, ती लक्ष्मी, पुत्र, राज्य इत्यादिकांच्या वृद्धीला कारण आहे." जेव्हां तर, वैधृत्यादि योग वर्ज्य करून प्रतिपदा मिळत नसेल तेव्हां सांगतो कात्यायन—"आश्विनमासांतील प्रतिपदा वैधृति व चित्रा यांवर असेल तेव्हां वैधृति व चित्रा यांचे पहिले दोन पाद सोडून नवरात्राचा प्रारंभ करावा. भविष्यांतही—"संपूर्ण प्रतिपदा चित्रा, वैधृति यांनीं युक्त होईल तर पहिले तीन भाग सोडून चातुर्थभागांत पूजन करावें." रुद्रयामलांतही—"वैधृतीचे ठायीं पुत्रनाश, व चित्रानक्षत्रावर धननाश होतो, यास्तव चित्रा व वैधृति यांचे ठायीं कुंभस्थापन करूं नये. जेव्हां संपूर्ण प्रतिपदा चित्रायुक्त होईल अथवा वैधृतियुक्त होईल तेव्हां मध्याह्नीं सूर्य असतां अभिजिन्मुहूर्तावर कलशस्थापन इष्ट आहे." या चित्रादिनिषेधाविषयीं मूल प्रमाण चिंत्य आहे.

इदंकलशस्थापनंरात्रौनकार्यम् नरात्रौस्थापनंकार्यंनचकुंभाभिषेचनमितिमात्स्योक्तेः भास्करोदयमारभ्ययावत्तुदशनाडिकाः प्रातःकालइतिप्रोक्तःस्थापनारोपणादिष्वितिविष्णुधर्मोक्तेश्च रुद्रयामले स्नानंमांगलिकंकृत्वाततोदेवींप्रपूजयेत् शुभाभिर्मृत्तिकाभिश्चपूर्वंकृत्वातुवेदिकाम् यवान्वैवापयेत्तत्रगोधूमैश्चापिसंयुतान् तत्रसंस्थापयेत्कुंभंविधिनामंत्रपूर्वकम् सौवर्णंराजतंवापिताम्रंमृन्मयजंतुवेति ।

हें कलशस्थापन रात्रीं करूं नये, कारण, "रात्रीस ( कलश ) स्थापन करूं नये, व कुंभाभिषेचनही करूं नये." असें मात्स्यवचन आहे. "सूर्योदयापासून आरंभ करून ज्या दहा घटिका तो प्रातःकाळ स्थापना आरोपण इत्यादिकर्माविषयीं सांगितला आहे." असें विष्णुधर्मवचनही आहे. रुद्रयामलांत—"मांगलिक स्नान करून नंतर देवीचें पूजन करावें. पूर्वीं शुद्धमृत्तिकेची वेदिका करून तिजवर गोधूम व यव पेरावे आणि त्या वेदीवर समंत्रक यथाविधि कुंभस्थापन करावें. तो कुंभ सोन्याचा, रुप्याचा, तांब्याचा, अथवा मातीचा करावा."

**अथपूजाविधिः** साचजयंतीमंत्रेणनवाक्षरेणवाकार्या तदुक्तंदुर्गाभक्तितरंगिण्यांदेवीपुराणे कुर्याद्देव्यास्तुमंत्रेणपूजांक्षीरघृतादिभिरित्युक्त्वा जयंतीमंगलाकालीभद्रकालीकपालिनी दुर्गाक्षमाशिवाधात्रीस्वधास्वाहानमोस्तुते अनेनैवतुमंत्रेणजपहोमौतुकारयेदिति ॐ दुर्गेदुर्गेरक्षिणिस्वाहेतिनवाक्षरः तत्रप्रतिपदि प्रातरभ्यंगंकृत्वादेशकालौसंकीर्त्य ममेहजन्मनिदुर्गाप्रीतिद्वारासर्वापच्छांतिपूर्वकदीर्घायुर्विपुलधनपुत्रपौत्राद्यनवच्छिन्नसंततिवृद्धिस्थिरलक्ष्मीकीर्तिलाभशत्रुपराजयसदभीष्टसिद्ध्यर्थंशारदनवरात्रप्रतिपद्विहितकलशस्थापनदुर्गापूजाकुमारीपूजादिकरिष्येइतिसंकल्प्य महीद्यौरितिभूमिंस्पृष्ट्वा ओषधयःसमितियवान्निक्षिप्य आकलशेष्वितिकुंभंसंस्थाप्य इमंमेगंगेइतिजलेनापूर्य गंधद्वारामितिगंधं याओषधीरितिसर्वौषधीः[2] कांडात्कांडादितिदूर्वाः अश्वत्थेवइतिपंचपल्लवान्[3] स्योनापृथिवीतिसप्तमृदः[4] याःफलिनीरितिफलम् सहिरत्नानीतिपंचरत्नानि हिरण्यंचक्षिप्त्वायुवासुवासाइतिवस्त्रेणावेष्ट्यपूर्णादर्वीतिपूर्णपात्रंनिधायतत्रवरुणंसंपूज्यजीर्णायांनूतनायांवाप्रतिमायांदुर्गामावाह्यपूजयेत् तद्यथा पूर्वोक्तंमंत्रमुक्त्वा आगच्छवरदेदेविदैत्यदर्पनिषूदनि पूजांगृहाणसुमुखिनमस्तेशंकरप्रिये सर्वतीर्थमयंवारिसर्वदेवसमन्वितं इमंघटंसमागच्छतिष्ठदेवगणैःसह दुर्गेदेविसमागच्छसान्निध्यमिहकल्पय बलिंपूजांगृहाणत्वमष्टाभिःशक्तिभिःसहेत्यावाह्यपूर्वोक्तमंत्रेणषोडशोपचारैःपूजयित्वा माषभक्तबलिंकूष्मांडादिबलिंवानिवेदयेत् ।

आतां **पूजाविधि सांगतो**—ती पूजा जयंतीमंत्रानें किंवा नवाक्षरानें करावी. तो प्रकार दुर्गाभक्तितरंगिणींत-देवीपुराणांत सांगतो—"देवीची पूजा देवीच्या मंत्रानें क्षीरघृतादिक उपचारांनीं करावी." असें सांगून, मंत्र सांगतो—"जयंती मंगला काली भद्रकाली कपालिनी ॥ दुर्गा क्षमा शिवा धात्री स्वधा स्वाहा नमोस्तु ते" ॥ याच मंत्रानें जप व होम करावे. "ॐ दुर्गे दुर्गे रक्षिणि स्वाहा." हा नवाक्षरमंत्र. तेथें प्रतिपदेस प्रातःकाळीं अभ्यंगस्नान करून

---

१ प्रातरिति प्रातःकालीनव्रतादिसंकल्पस्तु प्रातःसंध्यां कृत्वैव कार्यः ॥ प्रातःसंध्यां बुधः कृत्वा संकल्पं तत आचरेदितिवचनात् ॥ २ सर्वौषधीः । कुष्टंमासींहरिद्रेद्वे मुराशैलेयचंदनं ॥ वचाचंपकमुस्ताश्चसर्वौषध्यो दश स्मृताः ॥ ३ पंचपल्लवान् अश्वत्थोदुंबरप्लक्षचूतन्यग्रोधपल्लवाः ॥ पंचभंगा इतिप्रोक्ताः सर्वकर्मसु शोभना इत्युक्तान् ॥ ४ सप्तमृदः गजाश्वरथ्यावल्मीकसंगमाद्ध्रदगोकुलात् ॥ राजद्वारप्रदेशाच्चमृदमानीयनिक्षिपेत् इत्युक्ताः ॥

देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा—**"ममेहजन्मनि दुर्गाप्रीतिद्वारा सर्वापच्छांतिपूर्वकदीर्घायुर्विपुलधनपुत्रपौत्राद्यनवच्छिन्नसंततिवृद्धिस्थिरलक्ष्मीकीर्तिलाभशत्रुपराजयसदभीष्टसिद्ध्यर्थं शारदनवरात्रप्रतिपदि विहितकलशस्थापनदुर्गापूजाकुमारीपूजादिकरिष्ये"** असा संकल्प करून **"महीद्यौ०"** या मंत्रानें भूमीला स्पर्श करून, तीवर **"ओषधयः सं०"** या मंत्रानें यव पेरून **"आकलशेषु०"** या मंत्रानें कुंभ स्थापून **"इमंमेगंगे०"** या मंत्रानें उदक कलशांत भरावें. **'गंधद्वारां०"** गंध, **"याओषधीः०"** सर्वौषधी घालून, **"कांडात्कांडा०"** दूर्वा, **"अश्वत्थेव०"** पंचपल्लव, **"स्योनापृथिवि०"** सप्तमृत्तिका, **"याःफलिनी०"** फल, **"सहिरत्नानि०"** पंचरत्नें व हिरण्य घालून **"युवासुवासा०"** यानें वस्त्रानें वेष्टन करून **"पूर्णादर्वि०"** यानें पूर्णपात्र ठेऊन तेथें वरुणाची पूजा करावी. त्यावर जीर्ण किंवा नवीन प्रतिमा ठेऊन दुर्गादेवीचें आवाहन करून पूजन करावें. तें असें-वरील मंत्र उच्चारून-**"आगच्छ वरदे देवि दैत्यदर्पनिषूदनि । पूजां गृहाण सुमुखि नमस्ते शंकरप्रिये । सर्वतीर्थमयं वारि सर्वदेवसमन्वितं । इमं घटं समागच्छ तिष्ठ देवगणैः सह । दुर्गे देवि समागच्छ सान्निध्यमिह कल्पय । बलिं पूजां गृहाण त्वमष्टाभिः शक्तिभिः सह"** या मंत्रांनीं आवाहन करून पूर्वोक्त मंत्रानें षोडशोपचारांनीं पूजा करून माषभक्तबलि किंवा कूष्मांडादिबलि निवेदन करावा.

ततःकुमारीपूजा तदुक्तं**हेमाद्रौस्कांदे** एकैकांपूजयेत्कन्यामेकवृद्ध्यातथैवच द्विगुणंत्रिगुणंवापिप्रत्येकं नवकंतुवा तथा नवभिर्लभतेभूमिमैश्वर्यंद्विगुणेनतु एकवृद्ध्यालभेत्क्षेममेकैकेनश्रियंलभेत् एकवर्षांतुयाकन्यापूजार्थेतांविवर्जयेत् गंधपुष्पफलादीनांप्रीतिस्तस्यानविद्यते तेनद्विवर्षामारभ्यदशवर्षापर्यंताएवपूज्याः नत्वन्याःतासांचक्रमेण कुमारिकात्रिमूर्तिःकल्याणीरोहिणीकालीचंडिकाशांभवीदुर्गासुभद्रेतिनामभिःपूजाकार्या आसांचप्रत्येकंपूजामंत्राःफलविशेषाश्चतत्रैवज्ञेयाः सामान्यतस्तु मंत्राक्षरमयींलक्ष्मींमातृणांरूपधारिणीम् नवदुर्गात्मिकांसाक्षात्कन्यामावाहयाम्यहम् एवमभ्यर्चनंकुर्यात्कुमारीणांप्रयत्नतः कंचुकैश्चैववस्त्रैश्चगंधपुष्पाक्षतादिभिः नानाविधैर्भक्ष्यभोज्यैर्भोजयेत्पायसादिभिः **तथा** ग्रंथिस्फुटितशीर्ष्णांगीरक्तपूयव्रणांकिताम् जात्यंधांकेकरांकाणींकुरूपांतनुरोमशाम् संत्यजेद्रोगिणींकन्यांदासीगर्भसमुद्भवाम् **तथा** ब्राह्मणींसर्वकार्येषुजयार्थेनृपवंशजाम् लाभार्थेवैश्यवंशोत्थांसुतार्थेशूद्रवंशजाम् दारुणेचांत्यजातानांपूजयेद्विधिनानरइति ।

नंतर कुमारींची पूजा करावी. तो प्रकार सांगतो—**हेमाद्रींत—स्कांदांत—**"प्रतिदिवशीं एकेक कन्या पुजावी. अथवा एक वृद्धीनें, किंवा दोन अथवा तीन वृद्धीनें किंवा प्रतिदिवशीं नऊ अशा पुजाव्या." तसेंच "प्रतिदिवशीं नवांनीं भूमि प्राप्त होते. दोन वृद्धीनें ऐश्वर्य मिळतें. एक वृद्धीनें कल्याण प्राप्त होतें. प्रतिदिवशीं एकेक पुजली असतां लक्ष्मी प्राप्त होते. एक वर्षाची जी कन्या ती पूजेस वर्ज्य करावी. कारण, तिला गंध, पुष्प, फळ इत्यादिक पदार्थसेवनाची प्रीति नाहीं." म्हणून दोन वर्षांपासून दहा वर्षांपर्यंतच कन्या पुजाव्या. अन्य पुजूं नयेत. त्या कुमारिकांचीं अनुक्रमानें नांवें-१ द्विवर्षा ती कुमारिका २ त्रिवर्षा ती त्रिमूर्ति ३ चतुर्वर्षा ती कल्याणी ४ पंचवर्षा ती रोहिणी ५ षड्वर्षा ती काली ६ सप्तवर्षा ती चंडिका ७ अष्टवर्षा ती शांभवी ८ नववर्षा ती दुर्गा ९ दशवर्षा ती सुभद्रा या नामांनीं पूजा करावी. या कुमारिकांचे प्रत्येक पूजामंत्र व विशेष फळें हीं **हेमाद्रींतच** पाहावीं. सामान्यतः मंत्र तर हा-**"मंत्राक्षरमयीं लक्ष्मीं मातृणां रूपधारिणीम् । नवदुर्गात्मिकां साक्षात्कन्यामावाहयाम्यहम्."** "या मंत्रानें कुमारीचें प्रयत्नानें कंचुक ( चोळया ), वस्त्रें, गंध, पुष्प, अक्षता इत्यादिकांनीं पूजन करावें. नानाप्रकारचे भक्ष्य, भोज्य, पायस इत्यादि पदार्थांनीं भोजन घालावें." तसेंच "जिचें अंग ग्रंथियुक्त किंवा फुटलेलें आहे ती; मस्तक फुटलेली; रक्त, पू, व्रण यांतें वाहणारी; जन्मांध; केकरा; काणी; कुरूपा; शरीरावर केश अल्प किंवा बहुत असलेली; रोगिणी; दासीगर्भोत्पन्ना अशी कन्या पूजेविषयीं वर्ज्य होय." तसेंच "सर्व कार्यांविषयीं ब्राह्मणी पुजावी. जयाकरितां क्षत्रियवंशांतील पुजावी. लाभाकरितां वैश्यवंशोत्पन्ना पुजावी. पुत्राकरितां शूद्रवंशजा पुजावी. दारुणकर्माविषयीं अंत्यजापासून उत्पन्न अशा कन्येचें पूजन मनुष्यानें विधीनें करावें."

अत्रवेदपारायणमप्युक्तं**रुद्रयामले** एवंचतुर्वेदविदोविप्रान्सर्वान्प्रसादयेत् तेषांचवरणंकार्यंवेदपारायणायवैइति **तथा** एकोत्तराभिवृद्ध्यातुनवमीयावदेवहि चंडीपाठंजपेच्चैवजापयेद्वाविधानतः **तिथितत्त्वे वाराहीतंत्रे** प्रणवंचादितोजप्त्वास्तोत्रंवासंहितांपठेत् अंतेचप्रणवंदद्यादित्युवाचादिपूरुषः आधारेस्थापयित्वातुपुस्तकंप्रजपेत्सुधीः हस्तसंस्थापनादेवयस्माद्वैविफलंभवेत् स्वयंचलिखितंयच्चशूद्रेणलिखितंभवेत् अब्राह्मणेनलिखितंतच्चापिविफलंभवेत् ऋषिच्छंदादिकंन्यस्यपठेत्स्तोत्रंविचक्षणः स्तोत्रेनदृश्यतेयत्रप्रणवंतत्रविन्य-

---

१ शूद्रेणेति । कृतिनेति पाठः ॥ कारुणालेख्योपजीविनेति यावत् ॥

सेन् सर्वत्रपाठ्येविज्ञेयस्त्वन्यथाविफलंभवेत् एवंनवमीपर्यंतंप्रत्यहंकुर्यात् अत्रविशेषो**हेमाद्रौदेवीपुराणे** यदाद्येदिवसेकुर्याच्चंडिकापूजनादिकं द्विगुणंतद्द्वितीयेह्नित्रिगुणंतत्परेहनि नवमीतिथिपर्यंतंवृद्ध्यापूजाजपादिकमिति एतेननवरात्रेपूजैवप्रधानंउपवासादित्वंगमितिगम्यते तिथिह्रासेतुतिथिद्वयनिमित्तंपूजादिमहालयश्राद्धवदेकदिनेआवृत्त्याकार्यम् वृद्धौ[2]तद्वदेवावृत्तिः ततोनवरात्रोपवासादिसंकल्पंकुर्यात् स्वस्याशक्तावन्येनवापूजादिकारयेत् स्वयंवाप्यन्यतोवापिपूजयेत्पूजयीतवेति**तरंगिण्यांदेवीपुराणात्** इदंचदेवीपूजनंशुक्रास्तादावपिकार्यम् तदुक्तं**धर्मप्रदीपे** नष्टेशुक्रेतथाजीवेसिंहस्थेचबृहस्पतौ कार्याचैवस्वदेव्यर्चाप्रत्यब्दं[3]कुलधर्मतइति मलमासेतुवचनाभावान्नभवति ।

या नवरात्रांत वेदपारायणही सांगतो-**रुद्रयामलांत**-"असेंच चतुर्वेदवेत्त्या सर्व ब्राह्मणांस प्रसन्न करावें, आणि त्यांना वेदपारायणाकरितां वरावें." तसाच "एकोत्तरवृद्धीनें नवमीपर्यंत चंडीपाठाचा जप यथाविधि स्वतः करावा. अथवा दुसऱ्याकडून करवावा." **तिथितत्त्वांत वाराहीतंत्रांत**-"प्रथम प्रणवाचा जप करून स्तोत्र किंवा संहिता पठन करावी, नंतर अंतींही प्रणवाचा जप करावा, असें आदिपुरुष सांगता झाला, आधारावर पुस्तक ठेवून वाचन करावें. कारण, हस्तांत पुस्तक घेतल्यानें पाठ विफल होतो. स्वतां लिहिलेलें किंवा शूद्रानें लिहिलेलें व अब्राह्मणानें लिहिलेलें पुस्तक असेल तर तेंही वाचन विफल होतें. ऋषि, छंद, देवता यांचा त्याग करून स्तोत्रपाठ करावा. स्तोत्रांत जेथें प्रणव नसेल तेथें प्रणव योजावा. हा क्रम सर्व पाठांत जाणावा. प्रणवावांचून पाठ विफल होतो." असें नवमीपर्यंत प्रतिदिवशीं करावें. याविषयीं विशेष सांगतो-**हेमाद्रींत-देवीपुराणांत**-"जें प्रथमदिवशीं चंडिकेचें पूजनादिक करावें तें दुसरे दिवशीं द्विगुणित व तिसरे दिवशीं त्रिगुणित असें नवमीतिथिपर्यंत पूजा, जप इत्यादिक वृद्धीनें करावें." या वचनावरून नवरात्रांत पूजाच प्रधान आहे, उपवासादिक तर अंग होय, असें समजावें. तिथिक्षय असेल तर दोन तिथिनिमित्तानें करावयाच्या दोन पूजा वगैरे, महालयश्राद्धासारख्या एक दिवशींच आवृत्तीनें कराव्या. तिथीची वृद्धि असतां महालयासारखीच द्विरावृत्ती करावी. नंतर नवरात्रांत कर्तव्य जें उपवासादिक त्याचा संकल्प करावा. आपणास सामर्थ्य नसेल तर दुसऱ्याकडून पूजादिक करवावें. कारण, "स्वतां पूजन करावें किंवा दुसऱ्याकडून करवावें." असें **दुर्गाभक्तितरंगिणींत-देवीपुराणवचन** आहे. हें देवीपूजन शुक्रास्तादिकांतही करावें. तें सांगतो **धर्मप्रदीपांत**-"शुक्र व गुरु यांचें अस्त किंवा बृहस्पति सिंहस्थ असतांही प्रतिवर्षी कुलधर्मास्तव आपल्या देवीचें पूजन करावें." मलमासांत करण्याविषयीं वचन नसल्यामुळें होत नाहीं.

अत्रसाश्वस्याश्वपूजनमुक्तम **मदनरत्नेदेवीपुराणे** आश्वयुक्शुक्लप्रतिपत्स्वातीयोगेशुभेदिने पूर्वमुच्चैःश्रवानामप्रथमंश्रियमावहत् तस्मात्साश्वैर्नरैस्तत्रपूज्योसौश्रद्धयासह पूजनीयाश्चतुरगानवमीयावदेवहि शांतिःस्वस्त्ययनंकार्यंतदातेषांदिनेदिने धान्यंभल्लातकंकुष्ठंवचासिद्धार्थकास्तथा पंचवर्णेनसूत्रेणग्रंथितेषांतुबंधयेत् वायव्यैर्वारुणैःसौरैःशाक्तैर्मंत्रैःसवैष्णवैः वैश्वदेवैस्तथाग्नेयैर्होमःकार्योदिनेदिने **कल्पतरौ**त्वेतदग्रेन्यदपि ज्येष्ठायोगेपुरात्रगजाश्चाष्टौमहाबलाः पृथिवीमावहन्पूर्वंसशैलवनकाननाम कुमुदैरावणोपद्मःपुष्पदंतोथवामनः सुप्रतीकोंजनोनीलस्तस्मात्तांस्तत्रपूजयेत् शाक्राद्दक्षात्समारभ्यनवम्यंतंचपूर्ववत् अश्ववद्धोमादीत्यर्थः ।

ह्या प्रतिपदेचे ठायीं ज्याचे अश्व असतील त्यास अश्वपूजन सांगितलें आहे-**मदनरत्नांत—देवीपुराणांत**-"आश्विनशुक्ल प्रतिपदेस स्वातीनक्षत्राचा योग असतां शुभ दिवशीं पूर्वी उच्चैःश्रवानामक अश्वाला प्रथम शोभा प्राप्त झाली, या कारणास्तव अश्वयुक्त मनुष्यांनीं त्या तिथीस उच्चैःश्रव्याची पूजा करावी व अश्वांचीही पूजा नवमीपर्यंत करावी. प्रतिदिवशीं त्यांची शांति व स्वस्त्ययन ( मंगल ) करावें. धणे, भल्लातक ( बिबवे ), कोष्टकोलिंजन, वेखंड, सई ह्यांचा पंचवर्ण सूत्रानें ग्रंथि बांधून त्यांचे कंठांत बांधावीं. वायु, वरुण, सूर्य, शक्ति, विष्णु, विश्वेदेव, अग्नि यांच्या मंत्रांनीं प्रतिदिवशीं होम करावा." **कल्पतरूंत** तर याच्या पुढें दुसराही प्रकार सांगतो-"पूर्वी नवरात्रांतील ज्येष्ठानक्षत्रावर महाबलिष्ठ असे आठ हत्ती पर्वत, अरण्य यांसहवर्तमान पृथ्वीला वाहते झाले, म्हणून पृथ्वी वाहणाऱ्या कुमुद, ऐरावण, पद्म, पुष्पदंत, वामन, सुप्रतीक, अंजन, नील, ह्या आठ हत्तींची पूजा करावी. ती पूजा ज्येष्ठानक्षत्रावर आरंभ करून नवमीपर्यंत अश्वपूजेप्रमाणें होमादि करून करावी."

---

१ महालयेति एकस्मिन्दिने आवृत्त्या एकेन अनुष्ठानेन तंत्रेणेति यावत् । तथाच महालये यथा तंत्रं तथा देवीपूजायामपीत्यर्थः ॥ २ तद्वत् महालयवत् ॥ ३ प्रत्यब्दमित्यारंभनिषेधार्थं ॥ अस्तंगते गुरौ शुक्रे सिंहस्थे वमधाधिप ॥ देवीपूजनमुद्दिष्टं स्थविरे बालके तथा ॥ आद्यारंभे विरामः स्याद्द्वितीयादौ न चिंतयेदिति देवीपुराणात् ॥

अथप्रतिपदादिषुविशेषो**दुर्गाभक्तितरंगिण्यां भविष्ये** केशसंस्कारद्रव्याणिप्रदद्यात्प्रतिपद्दिने पक्कतैलंद्वितीयायांकेशसंयमहेतवे पट्टदोरमितिगौ**डपाठः** दर्पणंचतृतीयायांसिंदूरालक्तकंतथा मधुपर्कंचतुर्थ्यांतुतिलकंनेत्रमंडनं पंचम्यामंगरागंचशक्त्यालंकरणानिच षष्ठ्यांबिल्वतरौबोधंसायंसंध्यासुकारयेत् सप्तम्यांप्रातरानीयगृहमध्येप्रपूजयेत् उपोषणमथाष्टम्यामात्मशक्त्याचपूजनम् नवम्यामुग्रचंडायाःपूजांकुर्याद्बलिंतथा संपूज्यप्रेषणंकुर्याद्दशम्यांसारवोत्सवैः अनेनविधिनायस्तुदेवींप्रीणयतेनरः स्कंदवत्पालयेद्देवीतंपुत्रधनकीर्तिभिः **कृत्यतत्त्वार्णवेलैंगे** कन्यायांकृष्णपक्षेतुपूजयित्वार्द्रभेपिवा नवम्यांबोधयेद्देवींमहाविभवविस्तरैः शुक्लपक्षेचतुर्थ्यांतुदेवीकेशविमोक्षणम् प्रातरेवतुपंचम्यांस्नापयेत्सुशुभैर्जलैः षष्ठ्यांमायंप्रकुर्वीतबिल्ववृक्षेधिवासनम् सप्तम्यांपत्रिकापूजाअष्टम्यांचाप्युपोषणम् पूजाचजागरश्चैवनवम्यांविधिवद्बलिः विसर्जनंदशम्यांतुक्रीडाकौतुकमंगलैः अत्रनवम्यांबोधनासामर्थ्येषष्ठ्यांबोधनमिति**स्मार्ताः** फलभूमार्थिनःसमुच्चयइत्य**न्ये** नवम्यांमंत्रः **कालिकापुराणे** इषेमास्यसितेपक्षेनवम्यामार्द्रभेदिवा श्रीवृक्षेबोधयामित्वांयावत्पूजांकरोम्यहम् अत्रस्त्रीव्रतेविशेषःपरिभाषायांज्ञेयः ।

आतां प्रतिपदादि तिथींचे ठायीं विशेष सांगतो. **दुर्गाभक्तितरंगिणींत-भविष्यांत**-"केशसंस्कारद्रव्यें प्रतिपदेस द्यावीं. द्वितीयेस केशसंयमना ( बंधना ) करितां पक्व तैल द्यावें. **'पक्कतैल'** या स्थानीं **'पट्टदोर'** असा गौडपाठ आहे. तृतीयेस दर्पण, सिंदूर व अळता. चतुर्थीस नेत्रभूषण, तिलक व मधुपर्क. पंचमीस यथाशक्ति अलंकार व अंगराग द्यावे. षष्ठीस सायंसंध्यासमयीं बिल्ववृक्षाचे ठायीं बोध ( पुढें सांगावयाचा तो ) करावा. सप्तमीस प्रातःकालीं गृहामध्यें आणून पूजन करावें. अष्टमीस उपोषण व आपल्या शक्तीनें पूजन करावें. नवमीस चंडिकेची पूजा व बलिदान करावें. दशमीस सारवोत्सवांनीं पूजन करून देवी पोंचवावी. या विधीनें जो मनुष्य देवीतें संतुष्ट करतो त्याला देवी पुत्र, धन, कीर्ति हीं देऊन स्कंदासारखें त्याचें पालन करिते." **कृत्यतत्त्वार्णवांत-लिंगपुराणांत**-कन्यासंक्रांतींत आश्विन कृष्णपक्षांत ( दर्शांतमासानें भाद्रपदकृष्णपक्षांत ) आर्द्रानक्षत्रावर किंवा नवमीस मोठ्या ऐश्वर्यविस्तारांनीं देवीचा प्रबोधोत्सव करावा. आश्विन शुक्लपक्षांत चतुर्थीस देवीचें केशविमोक्षण करावें. पंचमीस प्रातःकालींच स्वच्छ जलानें स्नान घालावें. षष्ठीस सायंकालीं बिल्ववृक्षीं अधिवासन करावें. सप्तमीस पत्रिकापूजा. अष्टमीस उपोषण. नवमीस पूजा, जागरण व यथाशास्त्र बलिदान करावें. दशमीस क्रीडा-कौतुक-मंगलांनीं विसर्जन करावें." या ठिकाणीं आश्विनकृष्ण नवमीस प्रबोधोत्सवाचें सामर्थ्य नसेल तर आश्विनशुक्लषष्ठीस प्रबोध करावा, असें **स्मार्त** सांगतात. मोठ्या फलाची इच्छा असेल त्यानें नवमीस व षष्ठीसही प्रबोधोत्सव करावा, असें **अन्य** सांगतात. आश्विन कृष्ण नवमीस प्रबोधनाचा मंत्र-**कालिकापुराणांत**— **'इषेमास्यसिते पक्षे नवम्यामार्द्रभे दिवा । श्रीवृक्ष बोधयामि त्वां यावत्पूजां करोम्यहम् ।'** येथें स्त्रीव्रताविषयीं विशेष आहे तो परिभाषेंत ( प्रथमपरिच्छेदांत ) पाहावा.

अत्राशौचेविशेषो**निर्णयामृतेविश्वरूपनिबंधे** आश्विनेशुक्लपक्षेतुप्रारब्धेनवरात्रके शावाशौचेसमुत्पन्नेक्रियाकार्याकथंबुधैः सूतकेवर्तमानेचतत्रोत्पन्नेसदाबुधैः देवीपूजाप्रकर्तव्यापशुयज्ञविधानतः सूतकेपूजनंप्रोक्तंदानंचैवविशेषतः देवीमुद्दिश्यकर्तव्यंतत्रदोषोनविद्यतइति **कालादर्शेविष्णुरहस्येपि** पूर्वसंकल्पितंयच्चव्रतंसुनियतव्रतैः तत्कर्तव्यंनरैःशुद्धंदानार्चनविवर्जितमिति **गौडनिबंधेतिथितत्त्वे**प्युक्तम् आश्विनकृष्णनवम्यादिशुक्लप्रतिपदादिषष्ठ्यादिसप्तम्यादिचैकंकर्म अतश्चमध्येआशौचपातेपिनदोषः संकल्पोव्रतसत्रयोरिति**विष्णूक्ते**रिति आरब्धंस्वयमेवकार्यं अनारब्धंत्वन्येनकारयेदिति**दिवोदासः** रजस्वलात्वन्येनकारयेत् सूतकादिवद्विशेषवचनाभावात् स्त्रीणांचनवरात्रेतांबूलादिचवर्ज्यंभवति तदुक्तं**व्रतहेमाद्रौ गारुडे** गंधालंकारतांबूलपुष्पमालानुलेपनम् उपवासेनदुष्यंतिदंतधावनमंजनमिति एतत्सभर्तृकोपवासविषयम् अन्यश्चात्रविशेषःपरिभाषायामुक्तः ।

## आतां आशौचांत विशेष सांगतो.

**निर्णयामृतांत विश्वरूपनिबंधांत**—"आश्विनशुक्लपक्षांत नवरात्राचा प्रारंभ झाला असतां मृताशौच झालें तर ज्ञात्यांनीं तें नवरात्र कर्म कसें करावें? पूर्वी सूतक उत्पन्न असतां किंवा त्या नवरात्रांत सूतक उत्पन्न असतां निरंतर विद्वानांनीं पशुयज्ञविधीनें देवीपूजा करावी. सूतकामध्यें पूजन व विशेषेंकरून दान देवीच्या उद्देशानें करावें, त्याविषयीं दोष

नाहीं." **कालादर्शांत-विष्णुरहस्यांतही**-"पूर्वसंकल्पित जें व्रत तें नियमितव्रत करणाऱ्या मनुष्यांनीं केवळ दान व पूजन यांवांचून करावें." **गौडनिबंधांत तिथितत्त्वांतही** सांगतो-आश्विनकृष्ण नवमीपासून शुक्लनवमीपर्यंत, तसेंच शुक्लप्रतिपदेपासून, षष्ठीपासून, आणि सप्तमीपासून, नवमीपर्यंत जे नवरात्राचे पक्ष सांगितले आहेत त्यांतील कोणताही पक्ष स्वीकारला असतां तें एक कर्म आहे. म्हणून मध्यें आशौच आलें असतांही दोष नाहीं. कारण, "व्रत आणि सत्र यांचा संकल्प झाला म्हणजे आरंभ झाला, आरंभ झाला असतां आशौच नाहीं" असें **विष्णुवचन** आहे. आरंभलेलें तें स्वतांच करावें. आरंभ न केलेलें इतरांकडून करवावें, असें **दिवोदास** सांगतो. रजस्वलेनें तर दुसऱ्याकडून करवावें. कारण, सूतकांत करण्याविषयीं वचन आहे, तसें येथें विशेषवचन नाहीं, नवरात्रांत स्त्रियांना तांबूलादि भक्षण होत आहे, तेंच सांगतो-**व्रतहेमाद्रींत-गारुडांत**-"गंध, अलंकार, तांबूल, पुष्पमाला, अनुलेपन, दंतधावन, व अंजन हीं उपवासांत निषिद्ध नाहींत." हें वचन सभर्तृक स्त्रीच्या उपवासविषयक होय. एथें अन्यही विशेष आहे तो ( प्रथमपरिच्छेदांत ) परिभाषेंत सांगितला आहे.

आश्विनशुक्लपंचम्यामुपांगललिताव्रतं महाराष्ट्रेषुप्रसिद्धं तत्रयद्यपिकथायांकालविशेषोनोक्तस्तथापि रात्रौजागरणंकुर्याद्गीतवादित्रनिःस्वनैरितिरात्रौजागरोक्तेः शक्तिपूजायारात्रौप्राशस्त्याच्च रात्रिव्यापिनीग्राह्येतिकेचित् वस्तुतस्तुवचनंविनारात्रिपूजायांमानाभावात् जागरस्यचांगत्वात्युग्मवाक्यात् भुक्त्वाजागरणेनक्तेचंद्रार्घ्येव्रतेतथा ताराव्रतेषुसर्वेषुरात्रियोगोविशिष्यतइति**कालहेमाद्रौ**वचनाच्चपूर्वविद्धाग्राह्या रात्रिशब्दःपूर्वविद्धावचनइति**हेमाद्रिः** अस्यचभुक्त्वाजागरणरूपत्वादितिसाधुप्रतीमः भुक्त्वाजागरणंयत्रेत्येकंपदं तस्मिन्व्रतेइत्यर्थः अन्यथाभुक्त्वेत्यसंगतेः **दिवोदासीये**प्येवं ।

आश्विनशुक्लपंचमीस उपांगललिताव्रत महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे. त्याविषयीं जरी कथेमध्यें विशेष काल सांगितला नाहीं तथापि "रात्रीस गायन, वाद्यें यांच्या शब्दांनीं जागरण करावें." असें रात्रीस जागरण करण्याविषयीं सांगितलें असल्यामुळें व शक्तिपूजेस रात्रीं प्रशस्तपणाही असल्यामुळें पंचमी रात्रिव्यापिनी घ्यावी, असें कोणी म्हणतात. वास्तविक म्हटलें तर वचनावांचून रात्रिपूजेविषयीं प्रमाण नसल्यामुळें, जागरण सांगितलें तें व्रताचें अंग असल्यामुळें युग्मवाक्यावरून; आणि "भोजन करून जागरण ज्या व्रतांत आहे त्या व्रताविषयीं, नक्त व्रताविषयीं चंद्रादिकांस अर्घ्यव्रताविषयीं, आणि सर्व नक्षत्रव्रतांविषयीं रात्रियोग विशिष्ट आहे" या **कालहेमाद्रींतील** वचनावरूनही पूर्वविद्धा ( चतुर्थीविद्धा ) घ्यावी. या वचनांत 'रात्रि' हा शब्द पूर्वविद्धावाचक आहे, असें **हेमाद्रि** सांगतो. हें व्रत भुक्त्वाजागरणरूप आहे, म्हणून याविषयीं पंचमी, पूर्वविद्धा घ्यावी हें बरें, असें आम्हीं समजतों. कारण, 'भुक्त्वाजागरणं' हें एक पद आहे. भोजन करून जागरण ज्या व्रतांत आहे तें व्रत असा अर्थ आहे. असा अर्थ नाहीं केला तर 'भुक्त्वा' याची संगति लागणार नाहीं. **दिवोदासीयांत** असेंच आहे.

आश्विनशुक्लपक्षेमूलनक्षत्रेपुस्तकेषुसरस्वतीस्थापनम् यथोक्तं**निर्णयामृतेदेवीपुराणे** मूलेषुस्थापनंदेव्याःपूर्वाषाढासुपूजनम् उत्तरासुबलिंदद्याच्छ्रवणेनविसर्जयेदिति **रुद्रयामलेपि** मूलऋक्षेसुराधीशपूजनीयासरस्वती पूजयेत्प्रत्यहंदेवयावद्वैष्णवमृक्षकम् नाध्यापयेन्नचलिखेन्नाधीयीतकदाचन पुस्तकेस्थापितेदेवविद्याकामोद्विजोत्तमः **संग्रहे** आश्विनस्यसितेपक्षेमेधाकामःसरस्वतीम् मूलेनावाहयेद्देवींश्रवणेनविसर्जयेत् मूलस्याद्यपादेआवाहनमिति**शिष्टाः** श्रवणाद्यपादेचविसर्जयेत् आदिभागोनिशायांतुश्रवणस्ययदाभवेत् संप्रेषणंतदादेव्यादशम्यांचमहोत्सवइति**चिंतामणौब्रह्मांडपुराणात्** ।

आश्विनशुक्लपक्षांत मूलनक्षत्रावर सरस्वतीस्थापन सांगतो—**निर्णयामृतांत देवीपुराणांत**—"मूलनक्षत्रावर सरस्वतीदेवीचें स्थापन, पूर्वाषाढांवर पूजन, उत्तराषाढांवर बलिदान आणि श्रवणावर विसर्जन करावें." **रुद्रयामलांतही** "मूलनक्षत्रावर सरस्वतीचें पूजन करावें. पूजन तें श्रवणनक्षत्र येईपर्यंत प्रतिदिवशीं करावें. विद्येच्छु ब्राह्मणश्रेष्ठानें पुस्तकांचें स्थापन केलें असतां पढवूं नये, लिहूं नये, व अध्ययनही करूं नये." **संग्रहांत**—"धारणाबुद्धि इच्छा करणारानें आश्विनाच्या शुक्लपक्षीं मूलनक्षत्रावर सरस्वतीदेवीचें आवाहन करावें व श्रवणनक्षत्रावर विसर्जन करावें." मूलाच्या पहिल्या पादावर आवाहन करावें, असें **शिष्ट** सांगतात. श्रवणाच्या प्रथमपादावर विसर्जन करावें. कारण, "जेव्हां श्रवणाचा पहिला भाग रात्रीं असेल तेव्हां देवीचें संप्रेषण ( विसर्जन ) दशमी महोत्सवांत करावें." असें **चिंतामणींत ब्रह्मांडपुराणवचन** आहे. यावरून श्रवणाच्या प्रथमभागीं विसर्जन मुख्य आहे.

**अथषष्ठी गौडनिबंधे देवीपुराणे** ज्येष्ठानक्षत्रयुक्तायांषष्ठ्यांबिल्वाभिमंत्रणं सप्तम्यांमूलयुक्तायांपत्रिकायाःप्रवेशनम् पूर्वाषाढायुताष्टम्यांपूजाहोमाद्युपोषणम् उत्तरेणनवम्यांतुबलिभिःपूजयेच्छिवाम् श्रव-

णेनदशम्यांतुप्रणिपत्यविसर्जयेत् **कालिकापुराणे** बोधयेद्बिल्वशाखायांषष्ठ्यांदेवींफलेषुच सप्तम्यांबिल्वशाखांतामाहृत्यप्रतिपूजयेत् पुनःपूजांतथाष्टम्यांविशेषेणसमाचरेत् जागरंचस्वयंकुर्याद्बलिदानंमहानिशि प्रभूतबलिदानंतुनवम्यांविधिवच्चरेत् विसर्जनंदशम्यांतुकुर्याद्वैसारवोत्सवैः धूलिकर्दमनिक्षेपैःक्रीडाकौतुकमंगलैः अत्रसर्वत्रतिथिनक्षत्रयोगादरोमुख्यःकल्पः तदभावेतुतिथिरेवग्राह्या तिथिःशरीरंदेवस्यतिथौनक्षत्रमाश्रितम् तस्मात्तिथिंप्रशंसंतिनक्षत्रंनतिथिंविनेति**विद्यापति**लिखितवचनात् तिथिनक्षत्रयोर्योगेद्वयोरेवानुपालनम् योगाभावेतिथिर्ग्राह्यादेव्याःपूजनकर्मणीतितत्रैव**देवलोक्तेश्च** ।

आतां षष्ठी सांगतो—**गौडनिबंधांत-देवीपुराणांत**—"ज्येष्ठानक्षत्रयुक्त षष्ठीचेठायीं बिल्ववृक्षावर अधिवासनादि करावें. मूलनक्षत्रयुक्त सप्तमीचेठायीं पत्रिकेचें प्रवेशन करावें. पूर्वाषाढायुक्त अष्टमीचेठायीं पूजा, होम इत्यादि व उपोषण करावें. उत्तराषाढायुक्त नवमीचेठायीं बलिदानांनीं देवीचें पूजन करावें. श्रवणयुक्त दशमीचेठायीं देवीला नमस्कार करून विसर्जन करावें." **कालिकापुराणांत** "षष्ठीस बिल्ववृक्षाच्या शाखेचेठायीं व फलांचेठायीं देवीचा प्रबोधोत्सव करावा. सप्तमीचेठायीं ती बिल्ववृक्षाची शाखा आणून तिचें पूजन करावें. तशीच अष्टमीस विशेषेंकरून पुनः पूजा करावी. व मोठ्या रात्रीं स्वतां जागरण करून बलिदान करावें. नवमीस यथाशास्त्र मोठें बलिदान करावें. दशमीस सारवोत्सवांनीं, धूलिकर्दमनिक्षेपांनीं व क्रीडाकौतुकमंगलांनीं विसर्जन करावें." येथें सर्वत्र तिथिनक्षत्रयोग असावा हा मुख्य पक्ष आहे, तो नसेल तर तिथीच घ्यावी. कारण, "देवाचें शरीर तिथि आहे. तिथीचा आश्रय करून नक्षत्र राहतें; याकरितां तिथीची प्रशंसा करितात. तिथीवांचून नक्षत्र प्रशस्त नाहीं." असें **विद्यापतीनें** लिहिलेलें वचन आहे. आणि "तिथि व नक्षत्र यांचा योग असतां दोघांचेंही ग्रहण करावें. तिथि व नक्षत्र या दोघांचा योग नसेल तर देवीच्या पूजेविषयीं तिथि घ्यावी." असें तेथेंच **देवलवचनही** आहे.

अत्रचपत्रीप्रवेशात्पूर्वेद्युःसायंकालेषष्ठ्यभावेतत्पूर्वदिनेऽधिवासनंकार्यम् सायंकालेत्यंतासत्त्वेत्वधिवासनलोपः षष्ठ्यांसायंप्रकुर्वीतबिल्ववृक्षेधिवासनमितिपूर्ववचनादिति**कल्पतरुः** सायंश्रुतिःफलातिशयमात्रार्था नतुकर्मलोप**इत्याचार्यचूडामणिः** अत्रक्रमः बिल्वसमीपंगत्वादेवींबिल्वंचसंपूज्यप्रार्थयेत् तत्रमंत्रः रावणस्यवधार्थायरामस्यानुग्रहायच अकालेब्रह्मणाबोधोदेव्यास्त्वयिकृतःपुरा । अहमप्याश्रितःषष्ठ्यांसायाह्नेबोधयाम्यतः श्रीशैलशिखरेजातःश्रीफलःश्रीनिकेतनः नेतव्योसिसमागच्छपूज्योदुर्गास्वरूपतइति एवंदेवीमधिवास्यपरदिनेनिमंत्रितबिल्वशाखापत्रीप्रवेशपूजांकुर्यात् तदुक्तं**हेमाद्रौलैंगे** मूलाभावेतुसप्तम्यांकेवलायांप्रवेशयेत् युग्माभ्यांनवबिल्वस्यफलाभ्यांशाखिकांतथा तथैवप्रतिमांदेव्याःस्नात्वाभ्युक्ष्यप्रवेशयेत् ।

येथें पत्रीप्रवेशाच्या पूर्वदिवशीं सायंकालीं षष्ठी नसेल तर त्याचे पूर्वदिवशीं अधिवासन करावें. सायंकालीं मुळींच षष्ठी नसेल तर अधिवासनाचा लोप होतो. कारण, "षष्ठीस सायंकालीं बिल्ववृक्षावर अधिवासन करावें" असें पूर्वीं वचन सांगितलें आहे, असें **कल्पतरु** सांगतो. सायंकालीं षष्ठी असावी ही फलातिशयाकरितांच सांगितली आहे. ती नसेल तर कर्मलोप होत नाहीं, असें **आचार्यचूडामणि** सांगतो. याविषयीं क्रम सांगतो—बिल्ववृक्षाच्या समीप जाऊन देवी व बिल्व यांची पूजा करून प्रार्थना करावी. प्रार्थनेचा **मंत्र—"रावणस्य वधार्थाय रामस्यानुग्रहाय च । अकाले ब्रह्मणा बोधो देव्यास्त्वयि कृतः पुरा ॥ अहमप्याश्रितः षष्ठ्यां सायाह्ने बोधयाम्यतः । श्रीशैलशिखरे जातः श्रीफलः श्रीनिकेतनः । नेतव्योऽसि समागच्छ पूज्यो दुर्गास्वरूपतः"** इति. असें पूर्वदिवशीं देवीचें अधिवासन करून दुसऱ्या दिवशीं निमंत्रित बिल्वशाखेवर पत्रीप्रवेशपूजा करावी. तें सांगतो—**हेमाद्रींत लिंगपुराणांत**—"मूलनक्षत्र नसेल तर केवळ सप्तमीचेठायीं नूतन बिल्ववृक्षाच्या दोन फळांसहित शाखे(खांदी)चें आणि देवीच्या प्रतिमेचें अभ्युक्षण करून प्रवेशपूजा करावी."

अत्रचोपवासपूजादावौदयिकीसप्तमीग्राह्या नतुयुग्मवाक्यात्पूर्वा युगाद्यावर्षवृद्धिश्चसप्तमीपार्वतीप्रिया रवेरुदयमीक्षंतेनतत्रतिथियुग्मतेति**कृत्यतत्त्वार्णवो**दाहृतवचनात् भगवत्याःप्रवेशादिविसर्गांताश्चयाःक्रियाः तिथावुदयगामिन्यांसर्वास्ताःकारयेद्बुधइति**तिथितत्त्वेनंदिकेश्वरपुराणाच्च दुर्गाभक्तितरंगिण्यामप्येवम्** तत्रापिघटिकातोन्यूनत्वेपरानकार्या व्रतोपवासनियमेघटिकैकापियाभवेदितिदेवलोक्तेरिति**गौडाः दाक्षिणात्यास्तु**पूर्ववचनमदृष्ट्वायुग्मवाक्यात्पूर्वांकुर्वंति पत्रिकापूजाचपूर्वाह्णएवकार्यानतुमूला-

नुरोधान्मध्याह्नादाविति**कृत्यतत्त्वार्णवे**उक्तम् पत्रिकास्तु रंभाकवीहरिद्राचजयंतीबिल्वदाडिमौ अशोको-मानवृक्षश्चधान्यादिनवपत्रिकाइतित**त्रैवोक्ताः** ।

एथें उपवास, पूजा इत्यादिकांविषयीं उदयव्यापिनी सप्तमी घ्यावी. युग्मवाक्यावरून पूर्वीची (षष्ठीयुक्त) घेऊं नये. कारण, "युगादि तिथि, वाढदिवसाची तिथि, देवीसप्तमी, ह्या तिथि सूर्योदयव्यापिनी घ्याव्या. एथें युग्मवाक्याची प्रवृत्ति करूं नये." असें **कृत्यतत्त्वार्णवांत** सांगितलेलें वचन आहे. आणि "भगवतीदेवीच्या प्रवेशापासून विसर्जनापर्यंत ज्या क्रिया करावयाच्या त्या साऱ्या उदयव्यापिनी तिथिचेठायीं कराव्या." असें **तिथितत्त्वांत** नंदिकेश्वरपुराणवचनही आहे. **दुर्गाभक्तितरंगिणींत**ही असेंच सांगितलें आहे. त्यामध्येंही सूर्योदयकालीं घटिकेहून कमी असेल तर परा करूं नये. कारण, "व्रत, उपवास, नियम यांविषयीं एक घटिका जरी असेल तरी ती घ्यावी" असें **देवल**वचन आहे, असें **गौड** म्हणतात. **दाक्षिणात्य** तर, पहिलें वचन न पाहतां युग्मवाक्यावरून पहिली करितात. पत्रिकापूजाही पूर्वाह्णींच करावी. मूलनक्षत्रानुरोधानें मध्याह्नादिकालीं करूं नये, असें **कृत्यतत्त्वार्णवांत** सांगितलें आहे. पत्रिका तर—"धणे, रंभा (केळी), कवी, हरिद्रा, जयंती, बिल्व, दाडिम, अशोक, मानवृक्ष, त्यांच्या नऊ पत्रिका होत." अशा **कृत्यतत्त्वार्णवांत**च सांगितल्या आहेत.

अस्यामेवसप्तम्यांदेवीत्रिरात्रमुक्तं**हेमाद्रौ** प्रतिपदादिनवतिथिषुउपवासकरणासामर्थ्येसप्तम्यादिदिनत्र-येवाकुर्यात् तदाह**धौम्यः** आश्विनेमासिशुक्लेतुकर्तव्यंनवरात्रकम् प्रतिपदादिक्रमेणैवयावच्चनवमीभवेत् त्रिरात्रंवापिकर्तव्यंसप्तम्यादियथाक्रमम् अतएव**हेमाद्रौदेवीपुराणेमंगलाव्रते** आश्विनेवाथवामाघेचै-त्रेवाश्रावणेपिवा कृष्णाष्टम्यादिकर्तव्यंव्रतंशुक्लावधिहरेः यावच्छुक्लाष्टमीशक्रउपोष्यातुविधानतः दानंहोमो-जपःपूजाकन्याभोज्यास्तथान्वहम् महाभैरवरूपेणअस्थिमालाधराश्रये पूजनीयाविशेषेणवस्त्रैर्ग्रामपुरादिषु इतिमासचतुष्टयेभिधाय **अन्यत्रापि** अथवानवरात्रंचसप्तपंचत्रिकंदिवा एकभक्तेननक्तेनायाचितोपोषितैः-क्रमादिति पूजयेताश्विनेशक्रयावच्छुक्लाष्टमीभवेत् सर्वकार्याणिसिद्ध्यंतिशक्रनास्त्यत्रसंशयइत्युक्तम् त्रिरात्रै-करात्रमुक्तम् **गोविंदार्णवेदेवीपुराणे** नवरात्रव्रतेऽशक्तस्त्रिरात्रंचैकरात्रकं[1] व्रतंचरतियोभक्तस्तस्यैदास्या-मिवांछितमिति तत्रापिसप्तम्याःपूजनेपूर्वोक्तोनिर्णयः अत्रतिथियोगपक्षेतंत्रेणोपवासः तिथिद्वयनिमित्तंपूजा-दिकंतुभेदेन ।

याच सप्तमीपासून तीन दिवस देवीत्रिरात्र सांगतो **हेमाद्रींत**—प्रतिपदादिक नऊ तिथींस उपवास करण्यास सामर्थ्य नसेल तर सप्तम्यादि तीन दिवस उपोषण करून त्रिरात्र करावें. तें **धौम्य** सांगतो—"आश्विनमासांत शुक्लपक्षीं नवरात्र करावें. तें प्रतिपदेपासून क्रमानें नवमीपर्यंत करावें. अथवा अशक्तानें सप्तमीपासून त्रिरात्रही क्रमानें करावें." म्हणूनच **हेमाद्रींत—देवीपुराणांत** मंगलाव्रतांत–"आश्विनांत अथवा माघांत अथवा चैत्रांत किंवा श्रावणांत कृष्णाष्टमीपासून शुक्लाष्टमीपर्यंत यथाविधि व्रत करावें. म्हणजे शुक्लाष्टमीपर्यंत यथाविधि उपोषण करावें. व प्रतिदिवशीं दान, होम, जप, पूजा, आणि कन्याभोजन करावें. ग्राम, नगर इत्यादिकांचे ठायीं महाभैरवरूपानें जे अस्थिमाला धारण करणारे त्यांची वस्त्रादिकांनीं विशेषेंकरून पूजा करावी." असें चार मासांत व्रत सांगून अन्यत्रही सांगतो "अथवा नऊ, सात, पांच, तीन, किंवा एक दिवस एकभक्त, नक्त, अयाचित, किंवा उपोषण करून क्रमानें व्रत करावें. आश्विनशुक्लाष्टमी होईल तोंपर्यंत पूजन करावें. तेणेंकरून सर्वकार्ये सिद्ध होतात यांत संशय नाहीं." असें सांगितलें आहे. **गोविंदार्णवांत-देवीपुराणांत**—"जो भक्त नवरात्रव्रताविषयीं अशक्त असल्यामुळें त्रिरात्र किंवा एकरात्र व्रत आचरण करितो, त्यास मी इच्छित फल देतें." त्यांतही सप्तमीचे पूजेविषयीं पूर्वोक्त निर्णय जाणावा. एथें दोन तिथि एकदिवशीं प्राप्त असतां तंत्रानें उपवास करावा. दोन तिथींच्या निमित्तानें पूजादिक करणें तें तर वेगवेगळें करावें.

अत्रविशेषो**निर्णयामृतेभविष्ये** सप्तम्यांनवगेहानिदारुजानिनवानिच एकंवावित्तभावेनकारयेत्सु-समाहितः दुर्गागृहंप्रकर्तव्यंचतुरस्रंसुशोभनम् तन्मध्येवेदिकांकुर्याच्चतुर्हस्तांसमांशुभाम् तस्यांसिंहासनंक्षौ-मंकंबलाजिनसंयुतम् तत्रदुर्गांप्रतिष्ठाप्यसर्वलक्षणसंयुताम् भुजैश्चतुर्भीरुचिरैर्दशभिर्वाविभूषिताम् तप्तहाटक-वर्णाभांत्रिनेत्रांशशिशेखराम् अनेककुसुमाकीर्णांकपर्देनसुशोभिताम् नितंबबिंबसन्नद्धकिंकिणीक्वाणनादिनीम् शूलचक्रदंडशक्तिवज्रचापासिधारिणीम् घंटाक्षमालाकरकपानपात्रलसत्कराम् तदग्रेछिन्नशिरसंमाहिषंबधि-

---

[1] एकरात्रमिति अष्टम्यां नवम्यामेववेत्यर्थः ॥

राप्लुतम् निःसृतार्धतनुंकंठनालेचर्मासिधारिणम् देवीधृतकरग्रीवंशूलेनोरसिताडितम् नागपाशेनविक्षिप्तंहर्यक्षेणापिविद्रुतम् वमद्रुधिरवक्त्रेणधुन्वतोर्ध्वसटान्रुषा सर्वतोमातृचक्रेणसेव्यमानांसुरैस्तथेति तत्रदेवीप्रकर्तव्याहैमीवाराजतीतथा मृद्वार्क्षीलक्षणोपेताखड्गशूलेचपूजयेत् वार्क्षीदारुमयी ।

एथें विशेष सांगतो **निर्णयामृतांत भविष्यांत**—"सप्तमीचे दिवशीं समाहित होऊन काष्ठांचीं नऊ गृहें नवीं अशीं करावीं. अथवा एक करावें. अत्यंत सुंदर व चार कोनाचें असें दुर्गागृह करावें. त्यामध्यें सुंदर सारखी चार हात वेदिका करावी. तिचे ठायीं क्षौम ( पट्टवस्त्र ), कंबल व अजिन यांनीं युक्त सिंहासन करावें. त्या सिंहासनावर सर्वलक्षणयुक्त दुर्गेची प्रतिष्ठा करावी. ती दुर्गामूर्ति चार किंवा दहा सुंदर भुजांनीं भूषित; तप्तसुवर्णासारखी कांति; तीन नेत्रांची; चंद्रशेखरा; बहुतपुष्पांनीं व्याप्त; जटाजूटानें सुशोभित; कमरेस बांधलेल्या बारीकघंटांच्या शब्दानें युक्त; शूल, चक्र, दंड, शक्ति, वज्र, धनुष्य, तरवार यांतें धारण करणारी; घंटा, रुद्राक्षमाला, करक ( कमंडलु ), पानपात्र यांनीं सुशोभित आहेत हस्त जीचे अशी दुर्गामूर्ति करावी. तिच्या पुढें मस्तक तुटलेला, रक्तानें भरलेला, अर्धे शरीर बाहेर आलेला, कंठनालावर ढाल तरवार धरणारा, देवीनें धरली आहे हस्ताचे ठायीं ग्रीवा ज्याची असा, शूलानें उरावर ताडित, नागपाशानें बद्ध, सिंहानें पराभूत, मुखानें रक्त ओकणारा, क्रोधानें सटा ( मानेवरील केश ) वर उडवणारा असा महिषासुर करावा. आणि चहूंकडे देवींच्या समूहांनीं व देवांनींही सेवा केलेली अशी दुर्गादेवी करावी. दुर्गादेवीची मूर्ति करावयाची ती सोन्याची, रुप्याची, मातीची किंवा लांकडाची करावी आणि तरवार व शूल हीं आयुधें करून त्यांची पूजा करावी."

देवीमूर्तिस्थापनेविशेषो**दुर्गाभक्तितरंगिण्यांदेवीपुराणे** याम्यास्याशुभदादुर्गापूर्वास्याजयवर्धिनी पश्चिमाभिमुखीनित्यंनस्थाप्यासौम्यदिङ्मुखी प्रतिमाभावेविशेष**स्तत्रैव** हैमराजतमृद्धातुशैलचित्रार्पितापिवा खड्गेशूलेर्चितादेवीसर्वकामफलप्रदा यत्रयत्रास्यायुधंप्रोक्तंतस्मिंस्तांप्रतिपूजयेत् देवीभक्त्यार्चितापुंसांराज्यायुःसुतसौख्यदा **कृत्यतत्त्वार्णवेकालिकापुराणे** लिंगस्थांपूजयेद्देवींमंडलस्थांतथैवच पुस्तकस्थांमहादेवींपावकेप्रतिमासुच चित्रेचत्रिशिखेखड्गेजलस्थांवापिपूजयेत् बिल्वपत्रैर्यजेद्देवींतथाजातीप्रसूनकैः नानापिष्टकनैवेद्यैर्धूपदीपैर्मनोहरैः भगलिंगाभिधानैश्चभगलिंगप्रगीतकैः भगलिंगक्रियाभिश्चप्रीणयेद्वरचंडिकाम् परैर्नाक्षिप्यतेयस्तुयःपरान्नाक्षिपत्यपि तस्यक्रुद्धाभगवतीशापंदद्यात्सुदारुणम् चित्रमृन्मयादौस्नानाद्यसंभवे- तत्रैवोक्तम् अंतिकेस्थापितेखड्गेस्नापयेद्दर्पणेथवेति ।

देवीचे मूर्तिस्थापनाविषयीं विशेष सांगतो **दुर्गाभक्तितरंगिणींत-देवीपुराणांत**-"दुर्गा दक्षिणाभिमुख स्थापिली असतां शुभ देणारी होते. पूर्वाभिमुख जयवर्धिनी होते. पश्चिमाभिमुख व उत्तराभिमुख देवी स्थापूं नये." प्रतिमेच्या अभावीं. विशेष सांगतो-**तेथेंच** "सुवर्ण, रजत, मृत्तिका, धातु, शिला, चित्र, यांची केलेली अथवा खड्ग व शूल यांचे ठायीं पूजलेली देवी सर्व मनोरथ देणारी होते. जें जें जिचें आयुध सांगितलें त्याचे ठायीं तिचें पूजन करावें. भक्तानें देवीची पूजा केली असतां ती देवी पुरुषांस राज्य, आयुष्य, पुत्र, सौख्य देणारी होते." **कृत्यतत्त्वार्णवांत कालिकापुराणांत**-"लिंगाचे ठायीं देवीचें पूजन करावें. तसेंच स्थंडिल, पुस्तक, अग्नि, प्रतिमा, चित्र, त्रिशूल, किंवा खड्ग अथवा उदक यांचे ठायींही पूजन करावें. बिल्वपत्रांनीं देवीचें यजन ( पूजन ) करावें. तसेंच जाईच्या पुष्पांनीं, नानाप्रकारच्या पिठाच्या पदार्थांच्या नैवेद्यांनीं, सुंदर धूपदीपांनीं, पूजा करावी. आणि भग व लिंग यांच्या नामांनीं, भगलिंगगायनांनीं, आणि भगलिंगक्रियांनीं श्रेष्ठ चंडिकेला संतुष्ट करावी. दुसऱ्यांनीं ज्याचा आक्षेप केला नाहीं व जो दुसऱ्याला आक्षेप ( निंदा ) करीत नाहीं त्यास भगवती क्रुद्ध होऊन भयंकर शाप देते." चित्र किंवा मातीची वगैरे मूर्ति असतां स्नानादिकांचा असंभव असेल तर तेथेंच सांगतो—"देवीच्या जवळ स्थापन केलेल्या खड्गाला किंवा दर्पणाला स्नानादि उपचार करावे."

**अथसप्तमीपूजाविधिः** प्रतिपद्युक्तविधिनाफलसंकीर्तनांतेनवपत्रिकामृन्मयदुर्गापूजाबलिदानानि करिष्यइतिसंकल्प्यपूर्वनिमंत्रितबिल्वसमीपंगत्वासंपूज्य आगच्छसर्वकल्याणीतिपूर्वोक्तमंत्रंपठित्वा बिल्ववृक्षमहाभागसदात्वंशंकरप्रिय गृहीत्वातवशाखांचदेवीपूजांकरोम्यहम् शाखाछेदोद्भवंदुःखंनचकार्यंत्वयाप्रभो गृहीत्वातवशाखांचपूज्यादुर्गेतिचस्मृतिः उत्तिष्ठपत्रिकेदेविसर्वकल्याणहेतवे पूजांगृहाणसकलामस्माकंवरदाभव मेरुमांदारकैलासहिमवच्छिखरेगिरौ जातःश्रीफलवृक्षत्वमंबिकायाःसदाप्रियः इतिसंप्रार्थ्यॐछिंधिफट्फट् ॐहुंफट् स्वाहेतिछित्वासंपूज्य ॐचामुंडेचलचलइतिवाद्यघोषेणदेवींतांचगृहंप्रवेश्य आरोपितासिदुर्गे-

त्वंमृन्मय्यांश्रीफलेपिच स्थिरानितांतंभूत्वाचगृहेत्वंकामदाभवेति स्थिरीकृत्य रंभादिपत्रिकाः पंचगव्येनपंचामृतेनचस्नापयित्वावस्त्रेणावेष्ट्यसंस्थापयेत् ततःपूर्ववत्संकल्पंकृत्वाऽक्षतानादायदेवीमावाहयेत् तत्रमंत्रः आवाहयाम्यहंदेवींमृन्मय्यांश्रीफलेतथा कैलासशिखराद्देविविंध्याद्रेर्हिमपर्वतात् आगत्यबिल्वशाखायांचंडिकेकुरुसन्निधिम् स्थापितासिमयादुर्गेपूजयेत्वांप्रसीदमे आयुरारोग्यमैश्वर्यंदेहिदेविनमोस्तुते दुर्गेदुर्गस्वरूपासिसुरतेजोमयेर्चिते सदानंदकरेदेविप्रसीदममसिद्धये एह्येहिभगवत्यंबशत्रुक्षयजयप्रदे भक्तितःपूजयामित्वांदुर्गेदेविसुरार्चिते पल्लवैश्चफलोपेतैःपुष्पैश्चसुमनोहरैः पल्लवेसंस्थितेदेविपूजयेत्वांप्रसीदमे दुर्गेदेविइहागच्छसान्निध्यमिहकल्पय यज्ञभागान्गृहाणत्वं योगिनीकोटिभिःसहेति ततोमूलमंत्रेणपाद्यादिगंधांतोपचारैः अमृतोद्भवंचश्रीवृक्षंशंकरस्यसदाप्रियम् बिल्वपत्रंप्रयच्छामिपवित्रंतेसुरेश्वरीतिबिल्वपत्रम् ब्रह्मविष्णुशिवादीनांद्रोणपुष्पंसदाप्रियम् तत्तेदुर्गेप्रयच्छामिसर्वकामार्थसिद्धयइतिद्रोणपुष्पंनिवेद्य धूपादिदक्षिणांतांपूजांमूलेनकृत्वाप्रार्थयेत् ॐ महिषघ्निमहामायेचामुंडेमुंडमालिनि आयुरारोग्यमैश्वर्यंदेहिदेविनमोस्तुते कुंकुमेनसमालब्धेचंदनेनविलेपिते बिल्वपत्रकृतापीडेदुर्गेहंशरणंगतः रूपंदेहियशोदेहिभगंभगवतिदेहिमे पुत्रान्देहिधनंदेहिसर्वान्कामांश्चदेहिमे सर्वमंगलमांगल्येइतिचसंप्रार्थ्यपत्रिकाःपूजयेत् कदल्यांब्रह्माणीं दाडिमेरक्तदंतिकाम् धान्येलक्ष्मीं हरिद्रायांदुर्गां मानेचामुंडाम् कचौकालिकाम् बिल्वेशिवां अशोकेशोकरहिताम् जयंत्यांकार्तिकींचावाह्यसंपूज्यदुर्गायैबलिंदद्यात् अत्रशस्त्रादिपूजावक्ष्यते ततःस्तुतिंपठेत् तदुक्तं **शिवरहस्ये** दुर्गांशिवांशांतिकरींब्रह्माणींब्रह्मणःप्रियाम् सर्वलोकप्रणेत्रींचप्रणमामिसदाशिवाम् मंगलांशोभनांशुद्धांनिष्कलांपरमांकलाम् विश्वेश्वरींविश्वमातांचंडिकांप्रणमाम्यहम् सर्वदेवमयींदेवींसर्वरोगभयापहाम् ब्रह्मेशविष्णुनमितांप्रणमामिसदाउमाम् विंध्यस्थांविंध्यनिलयांदिव्यस्थाननिवासिनीम् योगिनींयोगमातांचचंडिकांप्रणमाम्यहम् ईशानमातरंदेवीमीश्वरीमीश्वरप्रियाम् प्रणतोस्मिसदादुर्गांसंसारार्णवतारिणीम् यइमंपठतेस्तोत्रंशृणुयाद्वापियोनरः समुक्तःसर्वपापैस्तुमोदतेदुर्गयासह ।

आतां **सप्तमीपूजाविधि** सांगतो-प्रातःकाल सांगितलेल्या विधीनें संकल्प संकीर्तनाच्या अंतीं "नवपत्रिका मृन्मयदुर्गापूजाबलिदानानि करिष्ये" असा संकल्प करून पूर्वी निमंत्रण दिलेल्या बिल्वाच्या समीप जाऊन पूजन करून. **'आगच्छ सर्वकल्याणि'** हा पूर्वोक्त मंत्र म्हणून—**"बिल्ववृक्ष महाभाग सदा त्वं शंकरप्रिय ॥ गृहीत्वा तव शाखां च देवीपूजां करोम्यहं ॥ शाखाच्छेदोद्भवं दुःखं न च कार्यं त्वया प्रभो ॥ गृहीत्वा तव शाखां च पूज्या दुर्गेति च स्मृतिः ॥ उत्तिष्ठ पत्रिके देवि सर्वकल्याणहेतवे ॥ पूजां गृहाण सकलामस्माकं वरदा भव ॥ मेरुमंदारकैलासहिमवच्छिखरे गिरौ ॥ जातः श्रीफलवृक्ष त्वमंबिकायाः सदा प्रियः ॥"** अशी प्रार्थना करून- **'ॐ छिंधि फट् फट् ॐ हुं फट् स्वाहा'** या मंत्रानें छेदन करून पूजन करावें. **"ॐचामुंडे चलचल"** या मंत्रानें वाद्यघोषानें देवी व ती शाखा घरांत आणून—**"आरोपितासि दुर्गे त्वं मृन्मय्यां श्रीफलेपि च । स्थिरा नितांतं भूत्वा च गृहे त्वं कामदा भव."** या मंत्रानें स्थिर ठेऊन, रंभादिपत्रिकांला पंचगव्यानें व पंचामृतानें स्नान घालून वस्त्रानें वेष्टन करून स्थापन कराव्या. नंतर पूर्वीप्रमाणें संकल्प करून अक्षता घेऊन देवीचें आवाहन करावें-त्याचा मंत्र—**"आवाहयाम्यहं देवि मृन्मय्यां श्रीफले तथा ॥ कैलासशिखराद्देवि विंध्याद्रेर्हिमपर्वतात् ॥ आगत्य बिल्वशाखायां चंडिके कुरु संनिधिं ॥ स्थापितासि मया दुर्गे पूजये त्वां प्रसीद मे ॥ आयुरारोग्यमैश्वर्यं देहि देवि नमोस्तु ते ॥ दुर्गे दुर्गस्वरूपासि सुरतेजोमयेऽर्चिते ॥ सदानंदकरे देवि प्रसीद मम सिद्धये ॥ एह्येहि भगवत्यंब शत्रुक्षयजयप्रदे ॥ भक्तितः पूजयामि त्वां दुर्गे देवि सुरार्चिते ॥ पल्लवैश्च फलोपेतैः पुष्पैश्च सुमनोहरैः ॥ पल्लवे संस्थिते देवि पूजये त्वां प्रसीद मे । दुर्गे देवि इहागच्छ सांनिध्यमिह कल्पय ॥ यज्ञभागान् गृहाण त्वं योगिनीकोटिभिः सह ॥"** नंतर मूलमंत्रानें पाद्यादि गंधापर्यंत उपचारांनीं पूजा करावी. नंतर—**"अमृतोद्भवं च श्रीवृक्षं शंकरस्य सदा प्रियं ॥ बिल्वपत्रं प्रयच्छामि पवित्रं ते सुरेश्वरि'** या मंत्रानें बिल्वपत्र, आणि **"ब्रह्मविष्णुशिवादीनां द्रोणपुष्पं सदा प्रियं ॥ तत्ते दुर्गे प्रयच्छामि सर्वकामार्थसिद्धये ॥"** यानें द्रोणपुष्प ( तुंब्याचें पुष्प ) निवेदन करावें. नंतर धूपदीपादि दक्षिणांत पूजा, मूलमंत्रानें करून प्रार्थना करावी. **"ॐ महिषघ्नि महामाये चामुंडे मुंडमालिनि । आयुरारोग्यमैश्वर्यं देहि देवि नमोस्तु ते ॥ कुंकुमेन समालब्धे चंदनेन विलेपिते ।**

**बिल्वपत्रकृतापीठे दुर्गेहं शरणं गतः ॥ रूपं देहि यशो देहि भगं भगवति देहि मे । पुत्रान् देहि धनं देहि सर्वान् कामांश्च देहि मे ॥ सर्वमंगलमांगल्ये०"** यानेंही प्रार्थना करून पत्रिका पुजाव्या. कदलीचे ठायीं ब्रह्माणी, दाडिमाचे ठायीं रक्तदंतिका, धणेच्या पत्रिकेचे ठायीं लक्ष्मी, हरिद्रेवर दुर्गा, मानवृक्षपत्रिकेवर चामुंडा, कचीचे ठायीं कालिका, बिल्वाचे ठायीं शिवा, अशोकावर शोकरहिता, जयंतीचे ठायीं कार्तिकी, असें आवाहन करून, व पुजन दुर्गादेवीस बलि द्यावा. येथें शस्त्रादि पूजा पुढें सांगूं. नंतर स्तुतिपाठ करावा, तो सांगतो-**शिवरहस्यांत**—"**दुर्गां शिवां शांतिकरीं ब्रह्माणीं ब्रह्मणः प्रियां । सर्वलोकप्रणेत्रीं च प्रणमामि सदाशिवां । मंगलां शोभनां शुद्धां निष्कलां परमां कलां । विश्वेश्वरीं विश्वमातां चंडिकां प्रणमाम्यहं ॥ सर्वदेवमयीं देवीं सर्वरोगभयापहां । ब्रह्मेशविष्णुनमितां प्रणमामि सदा उमां । विंध्यस्थां विंध्यनिलयां दिव्यस्थाननिवासिनीं । योगिनीं योगमातां च चंडिकां प्रणमाम्यहं । ईशानमातरं देवीमीश्वरीमीश्वरप्रियां । प्रणतोस्मि सदा दुर्गां संसारार्णवतारिणीं ।** जो मनुष्य हें स्तोत्र पठण करील किंवा श्रवण करील तो सर्वपातकांपासून मुक्त होऊन दुर्गादेवीसहवर्तमान आनंद पावेल."

**अथमहाष्टमी** साचपरयुता शुक्लपक्षेष्टमीचैवशुक्लपक्षेचतुर्दशी पूर्वविद्धानकर्तव्याकर्तव्यापरसंयुतेति **ब्रह्मवैवर्तात् मदनरत्नेस्मृतिसंग्रहे** शरन्महाष्टमीपूज्यानवमीसंयुतासदा सप्तमीसंयुतानित्यंशोकसंतापकारिणी जंभेनसप्तमीयुक्तापूजितातुमहाष्टमी इंद्रेणनिहतोजंभस्तस्माद्दानवपुंगवः तस्मात्सर्वप्रयत्नेनसप्तमीमिश्रिताष्टमी वर्जनीयाप्रयत्नेनमनुजैःशुभकांक्षिभिः सप्तमींशल्यसंयुक्तांमोहादज्ञानतोपिवा महाष्टमींप्रकुर्वाणोनरकंप्रतिपद्यते सप्तमीकलयायत्रपरतश्चाष्टमीभवेत् तेनशल्यमिदंप्रोक्तंपुत्रपौत्रक्षयप्रदम् **तथा** पुत्रान्हंतिपशून्हंतिहंतिराष्ट्रंसराजकम् हंतिजातानजातांश्चसप्तमीसहिताष्टमी तेननात्रत्रिमुहूर्तवेधः तदाघटिकामात्राप्यौदयिकीग्राह्या व्रतोपवासनियमेघटिकैकापियाभवेदिति**देवलोक्तेः गौडा**अप्येवमाहुः अतएवोक्तं **भोजराजेन** नचसप्तमीशल्यसमोपहतेति इयंभौमेतिप्रशस्ता अष्टम्यामुदितेसूर्येदिनांतेनवमीभवेत् कुजवारोभवेत्तत्रपूजनीयाप्रयत्नतइति**मदनरत्ने**वचनात् सप्तमीशल्यसंविद्धावर्जनीयासदाष्टमी स्तोकापिसामहापुण्यायस्यांसूर्योदयोभवेदिति**मदनरत्नेस्मृतिसमुच्चय**वचनात् अष्टमीनवमीयुक्तानवमीचाष्टमीयुतेति**पाद्म**वचनाच्च इयमेवमूलयुक्ताचेन्महानवमीसंज्ञा आश्वयुक्शुक्लपक्षेयाष्टमीमूलेनसंयुता सामहानवमीप्रोक्तात्रैलोक्येपिसुदुर्लभेति**हेमाद्रौस्कांदात्** मूलयुक्तापिसप्तमीयुताचेत्त्याज्यैवेत्युक्तं**निर्णयामृतेदुर्गोत्सवे** मूलेनापिहिसंयुक्तासदात्याज्याष्टमीबुधैः लेशमात्रेणसप्तम्याअपिस्याद्यदिदूषितेति महाष्टमीपूर्वेद्युःपूर्वाह्णव्यापित्वेपूर्वान्यथापरैवेति**निर्णयदीप**मतम् एतच्चतुच्छत्वादुपेक्ष्यम् **रूपनारायणधृतेदेवीपुराणे** सप्तमीवेधसंयुक्तायैःकृतातुमहाष्टमी पुत्रदारधनैर्हीनाभ्रमंतीहपिशाचवत् यत्तु सप्तम्यामुदितेसूर्येपरतोयाष्टमीभवेत् तत्रदुर्गोत्सवंकुर्यान्नकुर्यादपरेहनीति**विश्वरूपनिबंध**वचनंतदाश्विनकृष्णाष्टमीविषयम् कन्यायांकृष्णपक्षेतुपूजयित्वाष्टमीदिने नवम्यांबोधयेद्देवींगीतवादित्रनिःस्वनैरिति**देवीपुराणे**तत्रापिपूजोक्तेरिति**हेमाद्रौनिर्णयामृते**चोक्तम् ।

आतां महाष्टमी सांगतो—ती अष्टमी नवमीयुक्त घ्यावी. कारण, "शुक्लपक्षांतील अष्टमी व चतुर्दशी ह्या तिथि पूर्वविद्धा करूं नयेत, परयुक्ता कराव्या." असें **ब्रह्मवैवर्त**वचन आहे. **मदनरत्नांत—स्मृतिसंग्रहांत**—"शरदृतूंतील महाष्टमी नवमीयुक्त सर्वदा पूज्य होते. सप्तमीयुक्ता अष्टमी शोक व संताप करणारी आहे. जंभासुरानें सप्तमीयुक्त महाष्टमी पूजिली म्हणून तो जंभासुर सर्व दानवांत श्रेष्ठ असतांही इंद्रानें मारला. या कारणास्तव शुभेच्छु मनुष्यानीं सप्तमीयुक्त अष्टमी प्रयत्नानें वर्ज्य करावी. सप्तमीरूपशल्यानें युक्त महाष्टमी अविचारानें अथवा अज्ञानानें जो करितो तो नरकास जातो. जेव्हां सप्तमी एक कला असून पुढें अष्टमी असेल तेव्हां तें शल्य होतें, तें पुत्रपौत्रांचा क्षय करणारें होय." तसेंच—"सप्तमीसहित अष्टमी पुत्रांचा, पशूंचा, राजासहित राष्ट्राचा, आणि झालेले व होणारे यांचा नाश करिते." यावरून येथें सामान्य वाक्यावरून तीन मुहूर्त सप्तमी असेलतरच वेध समजूं नये. जेव्हां पूर्वीची सप्तमीयुक्त असेल तेव्हां घटिकामात्र देखील उदयव्यापिनी असेल ती घ्यावी. कारण, "व्रत, उपवास, नियम, यांविषयीं प्रातःकालीं एक घटिकामात्रही असलेली तिथि घ्यावी" असें **देवल**वचन आहे. **गौड**ही असेंच सांगतात. म्हणूनच **भोजराजानें** सांगितलें आहे, कीं "शल्यासारख्या सप्तमीनें उपहत ( दूषित ) अष्टमी करूं नये." ही भौमवारीं असतां अतिप्रशस्त. कारण, "अष्टमींत सूर्योदय असून

सायंकालीं नवमी असेल व त्या दिवशीं भौमवार होईल तर अशा योगावर देवीपूजन प्रयत्नानें करावें." असें **मदनरत्नांत** वचन आहे. आणि "सप्तमीशल्यानें विद्ध अष्टमी निरंतर वर्ज्य करावी: जीचेठायीं सूर्योदय असेल ती अल्पही असली तरी मोठी पुण्यकारक होते." असें **मदनरत्नांत स्मृतिसमुच्चय**वचन आहे. व "अष्टमी नवमीयुक्त करावी व नवमी अष्टमीयुक्त करावी." असें **पाद्म**वचनही आहे. हीच अष्टमी मूलनक्षत्रयुक्त असेल तर ती महानवमी होते. कारण, "आश्विनशुक्लपक्षांत मूलनक्षत्रानें युक्त जी अष्टमी ती महानवमी म्हटली आहे, ती त्रैलोक्यांतही अति दुर्लभ होय." असें **हेमाद्रींत स्कांद**वचन आहे. मूल नक्षत्रानें युक्त असली तरी सप्तमीयुक्त असेल तर ती वर्ज्य करावीच, असें **निर्णयामृतांत** दुर्गोत्सवांत सांगितलें आहे—"जर सप्तमीच्या लेशानेंही दूषित असलेली अष्टमी मूल नक्षत्रानें युक्त असली तरी ती विद्वानांनीं सर्वदा टाकावी." महाष्टमी. पूर्व दिवशीं पूर्वाह्णव्यापिनी असतां पूर्वा. पूर्व दिवशीं पूर्वाह्णव्यापिनी नसतां पराच करावी, असें **निर्णयदीपाचें** मत. हें तुच्छ असल्यामुळें उपेक्षणीय होय. **रूपनारायणधृत देवीपुराणांत**—"सप्तमीवेधयुक्त महाष्टमी ज्यांनीं केली ते पुत्र स्त्री, धन यांनीं हीन होऊन पिशाचासारखे इहलोकीं फिरतात." आतां जें "सप्तमींत सूर्योदय होऊन पुढें जी अष्टमी असते तिचे ठायीं दुर्गोत्सव करावा. दुसऱ्या दिवशीं करूं नये." असें **विश्वरूपनिबंध**वचन तें आश्विन कृष्णाष्टमीविषयक होय. कारण, "कन्यासंक्रांतींत कृष्णपक्षीं अष्टमीदिवशीं देवीचें पूजन करून नवमीस गीत, वाद्य शब्दांनीं देवी जागृत करावी." अशी **देवीपुराणांत** आश्विन कृष्णपक्षांतही पूजा सांगितली आहे, असें **हेमाद्रींत** व **निर्णयामृतांत** सांगितलें आहे.

यानितु भद्रायांभद्रकाल्याश्चमध्येस्यादर्चनक्रिया तस्माद्वैसप्तमीविद्धाकार्यादुर्गाष्टमीबुधैरिति यच्च **मोहचूलोत्तरेब्राह्मेच** आश्विनस्यसिताष्टम्यामर्धरात्रेतुपार्वती भद्रकालीसमुत्पन्नापूर्वाषाढासमायुतेति तथा तत्राष्टम्यांभद्रकालीदक्षयज्ञविनाशिनी प्रादुर्भूतामहाघोरायोगिनीकोटिभिःसहेति यच्च**मदनरत्ने** महाष्टम्याश्विनेमासिशुक्लाकल्याणकारिणी सप्तम्यापियुताकार्यामूलेनतुविशेषतइति तानिपरदिनेऽष्टम्यभावविषयाणीति **मदनरत्ने**उक्तं यत्तुतत्रैवपरदिनेष्टमीसत्त्वेपिपूर्वविद्धाविधायकंवचनम् यदाष्टमींतुसंप्राप्यास्तंयातिदिवाकरः तत्रदुर्गोत्सवंकुर्यान्नकुर्यादपरेहनि दुर्भिक्षंतत्रजानीयान्नवम्यांयत्रपूज्यतइतितत्परदिनेदशम्यांनवम्यभावविषयम् यदासूर्योदयेनस्यान्नवमीचापरेहनि तदाष्टमींप्रकुर्वीतसप्तम्यासहितांनृपेतितत्रैव**स्मृतिसंग्रहोक्तेः** उत्तरास्तिथयोयत्रक्षयंयांतिनराधिप पूर्वाष्टमींतदाकुर्यादन्यथात्वशुभंभवेदितिदुर्गोत्सवोक्तेश्चेति **मदनरत्ने** वस्तुतस्तुइदंवचनद्वयंअष्टमीनवम्योःसूर्योदयद्वयासंबंधपरम् अतएवनवमीचेतिचकारादष्टमीच तिथयइतिबहुवचनादष्टमीनवमीदशम्युक्ता अन्यथापूर्वोक्तविरोधादितिदिक् ।

आतां जीं "भद्रेवर मध्यें भद्रकालीची पूजा होते, यास्तव सप्तमीविद्ध दुर्गाष्टमी विद्वानांनीं करावी." आणि जें **मोहचूलोत्तरांत व ब्राह्मांत**"—आश्विनाच्या शुक्ल अष्टमीस पूर्वाषाढायोग असतां मध्यरात्रीं पार्वती भद्रकाली उत्पन्न झाली. तसेंच त्या अष्टमीस दक्षयज्ञनाशकर्त्री भद्रकाली कोट्यवधि योगिनींसहित महाभयंकर उत्पन्न झाली." आणि जीं **मदनरत्नांत**—"आश्विनमासांत शुक्लपक्षीं कल्याण करणारी महाष्टमी सप्तमीनें युक्त ही करावी. विशेषेंकरून मूल नक्षत्रानें युक्त ती करावी" अशीं वचनें तीं परदिवशीं अष्टमी सर्वथा नसेल तद्विषयीं होत असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. आतां जें तेथेंच पर दिवशीं अष्टमी असतांही पूर्वविद्धा घेण्याविषयीं, वचन "ज्या दिवशीं अष्टमींत सूर्य जाऊन अस्तास जातो, त्या दिवशीं दुर्गोत्सव करावा. पर दिवशीं करूं नये. ज्या देशांत नवमीस दुर्गापूजन केलें असेल त्या देशांत दुर्भिक्ष पडेल असें जाणावें." असें तें परदिवशीं दशमीचे ठायीं नवमीचा अभाव असेल त्याविषयीं समजावें. कारण, "ज्या वेळीं सूर्योदयीं अष्टमी नाहीं, आणि परदिवशीं नवमी असेल त्या वेळीं सप्तमीसहित अष्टमी करावी." असें तेथेंच **स्मृतिसंग्रह**वचन आहे. आणि "ज्या वेळीं पुढच्या तिथि क्षयगामिनी असतील त्या वेळीं पूर्वाष्टमी करावी. परदिवशीं केली असतां अशुभ होईल" असें **दुर्गोत्सव**वचनही आहे, असें **मदनरत्नांत** आहे. वास्तविक म्हटलें तर 'यदा सूर्योदये' व 'उत्तरास्तिथयो०' हीं दोन वचनें अष्टमी व नवमी ह्या दोन तिथींस दोन सूर्योदयांचा संबंध नसेल तद्विषयक आहेत. म्हणजे दोहोंपैकीं एकाचा क्षय असेल त्या वेळीं यांची प्रवृत्ति होते. म्हणूनच 'नवमीचापरेहनि' येथें 'च' शब्दानें अष्टमीही येते. म्हणजे—ज्या वेळीं नवमी आणि अष्टमी ह्या दोन तिथि सूर्योदयीं नाहींत, तर दोहोंपैकीं एकाचा क्षय आहे त्या वेळीं पूर्वाष्टमी करावी. असा अर्थ होतो. 'उत्तरास्तिथयो०' ह्या वचनांत 'तिथयः' ह्या बहुवचनानें अष्टमी, नवमी, दशमी, ह्या तीन तिथि जेव्हां क्षयगामिनी असतील त्या वेळीं पूर्वाष्टमी करावी, असा अर्थ होतो. असा अर्थ न केला तर पूर्वोक्त ( **स्मृतिसमुच्चयदुर्गोत्सव** ) वचनाचा विरोध येईल, अशी दिशा समजावी.

यत्तु अहंभद्राचभद्राहंनावयोरंतरंक्वचित् सर्वसिद्धिप्रदास्यामिभद्रायामर्चिताह्यहमितिदेवीपुराणे तद्वि-

ष्टिकरणमध्येपूजाविधानार्थम् विष्टिंत्यक्त्वामहाष्टम्यांममपूजांकरोतियः तस्यपूजाफलंनस्यात्तेनाहमवमानितेतितत्रैवोक्तेरिति **निर्णयामृते** तथा**कालिकापुराणे** सप्तम्यांपत्रिकापूजाअष्टम्यांचाप्युपोषणम् पूजाच जागरश्चैवनवम्यांविधिवद्बलिरिति अष्टम्युपवासश्चपुत्रवतानकार्यः उपवासंमहाष्टम्यांपुत्रवान्नसमाचरेत् यथातथावापूतात्मात्रतीदेवींप्रपूजयेदितितत्रैवोक्तेः **रूपनारायणीयेब्राह्मे** अत्यर्थंपूजनीयासातस्मिन्नहनिमानवैः उपोषितैर्वस्त्रधूपमाल्यरत्नानुलेपनैः पशुभिःपानकैर्हृद्यैरात्रौजागरणेनच दुर्गागृहेचशस्त्राणि पूजितव्यानिपंडितैः वाद्यभांडानिचिह्नानिकवचान्यायुधानिच ।

आतां जें "देवी म्हणते-मी देवी भद्रा ( कल्याणी ) आहें, आणि भद्रा जी ती मी देवी आहें. भद्रा ( कल्याणी, विष्टि ) व मी या दोघांमध्यें कांहीं अंतर नाहीं, म्हणून कल्याणीवर माझी पूजा केली असतां मी सर्व सिद्धि देतें" हें **देवीपुराणांतील** वचन विष्टि करणावर पूजा करण्यास सांगण्याकरितां आहे. कारण, "जो मनुष्य महाष्टमीचे ठायीं विष्टीचा त्याग करून माझी पूजा करितो त्याला पूजेचें फल प्राप्त होत नाहीं. कारण, त्यानें माझा अपमान केला आहे." असें तेथेंच सांगितलें आहे, असें **निर्णयामृतांत** आहे. तसेंच **कालिकापुराणांत**—"सप्तमीचे ठायीं पत्रिकापूजा करावी. अष्टमीचे ठायीं उपोषण, पूजा, जागर हीं करावीं. नवमीचे ठायीं यथाशास्त्र बलिदान करावें." अष्टमीचे ठायीं उपवास पुत्रवंतानें करूं नये. कारण, "पुत्रवंतानें महाष्टमीस उपवास करूं नये, जसा तसा पवित्र होऊन व्रतस्थ राहून देवीचें पूजन करावें." असें तेथेंच सांगितलें आहे. **रूपनारायणीयांत—ब्राह्मांत**—"अष्टमीचे दिवशीं मनुष्यांनीं उपोषण करून वस्त्र, धूप, माल्य, रत्नें, अनुलेपन, पशूंचें बलिदान, आवडणारीं पानकें ( मद्यें वगैरे ), रात्रीं जागरण इत्यादि उपचारांनीं देवीचें पूजन करावें. दुर्गा देवीच्या गृहांत पंडितांनीं शस्त्रें पुजावीं. व वाजविण्याचीं भांडीं, चिन्हें, कवचें, आयुधें हींही पुजावीं."

अत्रविशेषो**हेमाद्रौनिर्णयामृतेभविष्ये** आश्वयुक्शुक्लपक्षस्यअष्टमीमूलसंयुता सामहानवमीनाम त्रैलोक्येपिसुदुर्लभा कन्यागतेसवितरिशुक्लपक्षेष्टमीयुता मूलनक्षत्रसंयुक्तासामहानवमीस्मृता नवम्यांपूजितादेवीददात्यभिमतंफलम् सापुण्यासापवित्राचसाधन्यासुखदायिनी तस्यांसदापूजनीयाचामुंडामुंडमालिनी सदेत्युक्तेर्नित्यतापि तस्यांयेह्युपयुज्यंतेप्राणिनोमहिषादयः सर्वेतेस्वर्गतिंयांतिघ्नतांपापंनविद्यते यावन्नचालयेद्गात्रंपशुस्तावन्नहन्यते नतथाबलिदानेनपुष्पधूपविलेपनैः यथासंतुष्यतेमेषैर्महिषैर्विंध्यवासिनी एवंचविंध्यवासिन्यांनवरात्रोपवासतः एकभुक्तेननक्तेनस्वशक्त्यायाचितेनच पूजनीयाजनैर्देवीस्थानेस्थानेपुरेपुरे गृहेगृहेभक्तिपरैर्ग्रामेग्रामेवनेवने स्नातैःप्रमुदितैर्हृष्टैर्ब्राह्मणैःक्षत्रियैर्नृपैः वैश्यैःशूद्रैर्भक्तियुतैर्म्लेच्छैरन्यैश्चमानवैः स्त्रीभिश्चकुरुशार्दूलतद्विधानमिदंशृणु जयाभिलाषीनृपतिःप्रतिपत्प्रभृतिक्रमात् लौहाभिसारिकंकर्मकारयेद्यावदष्टमीति लौहाभिसारिककर्मविधानंतत्रैवोक्तम् प्रागुदक्प्रवणेदेशेपताकाभिरलंकृतम् मंडपंकारयेद्दिव्यंनवसप्तकरंपरम् षोडशहस्तमित्यर्थः आग्नेय्यांकारयेत्कुंडंहस्तमात्रंसुशोभनम् मेखलात्रयसंयुक्तंयोन्याश्वत्थदलाभया राजचिह्नानिसर्वाणिशस्त्राण्यस्त्राणियानिच आनीयमंडपेतानिसर्वाण्यत्राधिवासयेत् ततस्तुब्राह्मणःस्नातःशुक्लांबरधरःशुचिः ॐकारपूर्वकैर्मंत्रैस्तल्लिंगैर्जुहुयाद्घृतम् शस्त्रास्त्रमंत्रैर्होतव्यंपायसंघृतसंयुतम् हुतशेषंतुरंगाणांराजानमुपहारयेत् लोहाभिसारिकंकर्मतेनैवऋषिभिःस्मृतम् धृतपल्ययनानश्वान्गजांश्चसमलंकृतान् भ्रामयेन्नगरेनित्यंबंदिघोषपुरःसरम् प्रत्यहंनृपतिःस्नात्वासंपूज्यपितृदेवताः पूजयेद्राजचिह्नानिफलमाल्यविलेपनैः तस्याभिसरणाद्राज्ञोविजयःसमुदाहृतः पूजामंत्रान्प्रवक्ष्यामिपुराणोक्तानहंतव यैःपूजिताःप्रयच्छंतिकीर्तिमायुर्यशोबलम् ।

येथें विशेष सांगतो—**हेमाद्रींत** व **निर्णयामृतांत भविष्यांत**—"आश्विन शुक्लपक्षाची जी मूलनक्षत्रयुक्त अष्टमी ती महानवमी होय, ही त्रैलोक्यांत दुर्लभ आहे. सूर्य कन्याराशीस असतां शुक्लपक्षांतील अष्टमी व मूलनक्षत्र यांनीं युक्त जी नवमी ती महानवमी होय. नवमीस देवीचें पूजन केलें असतां ती देवी इच्छितफल देते. ती महानवमी पुण्य, पवित्र व सुख देणारी आहे. तिचे ठायीं मुंडांची माला धारण करणाऱ्या चामुंडादेवीचें सदा पूजन करावें." या वचनांत

---

१. दुर्गागृहेइति अष्टम्यामस्त्रादिपूजा । लोहाभिसारिकपूजा त्वन्यैव तस्याः प्रतिपद्येवारंभात् ॥

'सदा' असें सांगितल्यावरून हें देवीपूजन नित्यही आहे, असें होतें. त्या महानवमीचेठायीं ज्या महिषादिक प्राण्यांचा उपयोग केला जातो, ते सारे प्राणी स्वर्गास जातात. व त्यांची हिंसा करणारांना पाप लागत नाहीं. जोंपर्यंत पशु आपलें शरीर चाळवीत नाहीं तोंपर्यंत तो पशु मारूं नये. विंध्यवासिनी देवी जशी मेष व महिष यांनीं संतुष्ट होते तशी बलिदान, पुष्प, धूप, विलेपन, यांनीं संतुष्ट होत नाहीं. याप्रमाणें नवरात्रामध्यें उपवास, एकभुक्त, नक्त, अयाचित यांतून आपल्या शक्तीप्रमाणें कोणतें एक करून जनांनीं विंध्यवासिनी देवीचें पूजन जागोजागीं, नगरानगरांत, प्रतिगृहीं, प्रतिग्रामीं, प्रतिवनीं भक्तियुक्त होऊन करावें. स्नान करून आनंदित होऊन हर्षयुक्त अशा ब्राह्मण, क्षत्रिय, राजे, वैश्य, शूद्र, भक्तियुक्त म्लेच्छ, अन्यही मनुष्य व स्त्रिया यांनीं पूजा करावी. हे कुरुश्रेष्ठ! त्याचें विधान सांगतों, श्रवण कर. जयेच्छु राजानें प्रतिपदेस आरंभ करून क्रमानें लोहाभिसारिक कर्म अष्टमीपर्यंत करावें." लोहाभिसारिककर्माचें विधान तेथेंच सांगितलें आहे. तें असें—"प्रागुदक्प्रवण ( पूर्वेकडे व उत्तरेकडे सखल ) प्रदेशीं पताकांनीं अलंकृत, सुंदर सोळा हात लांब असा उत्कृष्ट मंडप करावा. त्याचे आग्नेयीस एकहातानें सुंदर, तीन मेखलांनीं युक्त, अश्वत्थपत्राकार योनीनें युक्त असें कुंड करावें. नंतर जीं राजचिन्हें, शस्त्र व अस्त्र असतील तीं सारीं या मंडपांत आणून अधिवासन करावें. नंतर ब्राह्मणानें स्नान करून पांढरें वस्त्र धारण करून शुद्ध होऊन त्या देवतेच्या लिंगांनीं युक्त अशा ॐकारपूर्वक मंत्रांनीं आज्यहोम करावा. शस्त्रास्त्रमंत्रांनीं घृतयुक्त पायसाचा होम करावा. हुतशेष असेल तें अश्वांच्या राजास द्यावें. यावरून हें लोहाभिसारिक कर्म ऋषींनीं सांगितलें आहे. जिन घातलेले अश्व व अलंकृत गज यांना वाद्यघोषासहित नित्य नगरांत फिरवावें. राजानें प्रतिदिवशीं स्नान करून पितर, देवता यांचें पूजन करून फलें, माल्यें, गंध यांहीकरून राजचिन्हांचें ( छत्रचामरादिकांचें ) पूजन करावें. त्याच्या अभिसरणानें ( गमनानें ) राजाचा विजय सांगितला आहे. आतां त्यांचे पूजेविषयीं पुराणोक्त पूजामंत्र मी तुला सांगतों. ज्या मंत्रांनीं पूजित केलेल्या छत्रादि देवता कीर्ति, आयुष्य, यश, व बल देतात."

अथमंत्राविष्णुधर्मोत्तरोक्ताः **छत्रस्य** यथांबुदश्छादयतिशिवायेमांवसुंधराम् तथाछादयराजानं विजयारोग्यवृद्धये **चामरस्य** शशांककरसंकाशक्षीरडिंडीरपांडुर प्रोत्सारयाशुदुरितंचामरामरदुर्लभ अश्वानांवृद्ध्यर्थंरेवंतपूजनमहंकरिष्ये सूर्यपुत्रमहाबाहोछायाहृदयनंदन शांतिंकुरुतुरंगाणांरेवंतायनमोनमः अनेनमंत्रेणपूजा **अथाश्वस्य** गंधर्वकुलजातस्त्वंमाभूयाःकुलदूषकः ब्रह्मणःसत्यवाक्येनसोमस्यवरुणस्यच प्रभावाच्चहुताशस्यवर्धयत्वंतुरंगमान् तेजसाचैवसूर्यस्यमुनीनांतपसातथा रुद्रस्यब्रह्मचर्येणपवनस्यबलेनच स्मरत्वंराजपुत्रत्वंकौस्तुभंचमणिंस्मर यांगतिंब्रह्महागच्छेन्मातृहापितृहातथा भ्रूणहानृतवादीचक्षत्रियश्चपराङ्मुखः सूर्याचंद्रमसौवायुर्यावत्पश्यंतिदुष्कृतम् व्रजाश्वतांगतिंक्षिप्रंतच्चपापंभवेत्तव निष्कृतोयदिगच्छेथायुद्धाध्वनितुरंगम रिपून्विजित्यसमरेसह भर्त्रासुखीभव ति अथ**ध्वजस्य** शक्रकेतोमहावीर्यश्यामवर्णाचयाम्यहम् पत्रिराजनमस्तेस्तुतथानारायणध्वज काश्यपेयारुणभ्रातर्नागारेर्विष्णुवाहन अप्रमेयदुराधर्षरणेदेवारिसूदन गरुत्मान्मारुतगतिस्त्वयिसंनिहितोयतः सारवंत्यायुधान्यत्ररक्षत्वंचरिपून्दह अथ**पताकायाः** हुतभुग्वसवोरुद्रावायुःसोमोमहर्षयः नागकिन्नरगंधर्वयक्षभूतगणग्रहाः प्रमथास्तुमहादित्यैर्भूतेशोमातृभिःसह शक्रःसेनापतिःस्कंदोवरुणश्चाश्रितास्त्वयि प्रदहंतुरिपून्सर्वान्राजाविजयमृच्छतु यानिप्रयुक्तान्यरिभिरायुधानिसमंततः पतंतूपरिशत्रूणांहतानितवतेजसा हिरण्यकशिपोर्युद्धेयुद्धेदेवासुरेतथा कालनेमिवधेयद्वद्यद्वत्त्रिपुरघातने शोभितासितथैवाद्यशोभयास्मांश्चसंस्मर नीलाञ्श्वेतानिमान्दृष्ट्वानश्यंत्वाशुनृपारयः व्याधिभिर्विविधैर्घोरैःशस्त्रैश्चयुधिनिर्जिताः पूतनारेवतीनाम्नाकालरात्रिश्चयास्मृता दहत्वाशुरिपून्सर्वान्पताकेत्वंमयार्चिता अथ**गजस्य** कुमुदैरावणौपद्मःपुष्पदंतोथवामनः सुप्रतीकोंजनोनीलएतेष्टौदेवयोनयः तेषांपुत्राश्चपौत्राश्च वनान्यष्टौसमाश्रिताः मंदोभद्रोमृगश्चैवगजःसंकीर्णएवच वनेवनेप्रसूतास्तेयूथानिसुमहांतिच पांतुत्वांवसवोरुद्राआदित्याःसमरुद्गणाः भर्तारंरक्षनागेंद्रस्वामिवत्प्रतिपाल्यताम् अवाप्नुहिजयंयुद्धेगमनेस्वस्तिनोव्रज श्रीस्तेसोमाद्बलंविष्णोस्तेजःसूर्याज्जवोनिलात् स्थैर्यंमेरोर्जयंरुद्राद्यशोदेवात्पुरंदरात् युद्धेरक्षंतुनागास्त्वांदिशश्चसहदैवतैः अश्विनौसहगंधर्वैःपांतुत्वांसर्वतःसदेति अथ**खड्गमंत्रः** असिर्विशसनःखड्गस्तीक्ष्णधारोदुरासदः श्रीगर्भोविजयश्चैवधर्मधारस्तथैवच एतानितवनामानिस्वयमुक्तानिवेधसा नक्षत्रंकृत्तिकातेतुगुरुर्देवोमहेश्वरः रोहिण्यश्चशरीरंतेदैवतंचजनार्दनः पितापितामहोदेवस्त्वंमांपालयसर्वदा नीलजीमूतसंकाशस्तीक्ष्णदंष्ट्रःकृशो-

दरः भावशुद्धोमर्षणश्चअतितेजास्तथैवच इयंयेनधृताक्षोणीहतश्चमहिषासुरः तीक्ष्णधारायशुद्धायतस्मैखड्गा-यतेनमः अथ**छुरिकायाः** सर्वायुधानांप्रथमंनिर्मितासिपिनाकिना शूलायुधाद्विनिष्कृष्यकृत्वामुष्टिग्रहंशुभम् चंडिकायाःप्रदत्तासिसर्वदुष्टनिबर्हिणी तयाविस्तारिताचासिदेवानांप्रतिपादिता सर्वसत्वांगभूतासिसर्वाशुभ-निबर्हिणी छुरिकेरक्षमांनित्यंशांतिंयच्छनमोस्तुते अथ**कट्टारकपूजा** रक्षांगानिगजान्रक्षरक्षवाजिधनानिच ममदेहंसदारक्षकट्टारकनमोस्तुते कट्टारकोमध्यदेशेकटारीतिप्रसिद्धा **धनुःपूजा** सर्वायुधमहामात्रसर्वदेवा-रिसूदन चापमांसमरेरक्षसाकंशरवरैरिह धृतंकृष्णेनरक्षार्थंसंहारायहरेणच त्रयीमूर्तिगतंदेवंधनुरस्त्रंनमाम्य-हम् **कुंतपूजा** प्रासपातयशत्रूंस्त्वमनयानाकमायया गृहाणजीवितंतेपांममसैन्यंचरक्षताम् **चर्मपूजा** शर्मप्रदस्त्वंसमरेचर्मसैन्येयशोद्यमे रक्षमांरक्षणीयोहंतापनेयनमोस्तुते अथ**कनकदंडमंत्रः** प्रोत्सारणाय दुष्टानांसाधुसंरक्षणायच ब्रह्मणानिर्मितश्चासिव्यवहारप्रसिद्धये यशोदेहिसुखंदेहिजयदोभवभूपतेः ताडय-स्वरिपून्सर्वान्हेमदंडनमोस्तुते अथ**दुंदुभिमंत्रः** दुंदुभेत्वंसपत्नानांघोरोहृदयकंपनः भवभूमिपसैन्यानांत-थाविजयवर्धनः यथाजीमूतघोषेणप्रहृष्यंतिचबर्हिणः तथास्तुतवशब्देनहर्षोस्माकंमुदावहः यथाजीमूतशब्दे-नस्त्रीणांत्रासोभिजायते तथात्रतवशब्देनत्रस्यंत्वस्मद्विषोरणे अथ**शंखमंत्रः** पुण्यस्त्वंशंखपुण्यानांमंगलानां-चमंगलम् विष्णुनाविधृतोनित्यमतःशांतिप्रदोभव ।

## आतां विष्णुधर्मोत्तरांतील मंत्र सांगतो.

छत्राचा मंत्र—"**यथांबुदश्छादयति शिवायेमां वसुंधरां ॥ तथा छादय राजानं विजयारोग्यवृद्धये.**" चामराचा मंत्र—"**शशांककरसंकाश क्षीरडिंडीरपांडुर ॥ प्रोत्सारयाशु दुरितं चामरामरदुर्लभ ॥**" "**अश्वानां वृद्ध्यर्थं रेवंतपूजां करिष्ये**" असा संकल्प करून "**सूर्यपुत्र महाबाहो छायाहृदयनंदन ॥ शांतिं कुरु तुरंगाणां रेवंताय नमोनमः ॥**" या मंत्रानें रेवंताची पूजा करावी. अश्वाचा पूजामंत्र—"**गंधर्वकुलजातस्त्वं मा भूयाः कुलदूषकः ॥ ब्रह्मणः सत्यवाक्येन सोमस्य वरुणस्य च ॥ प्रभावाच्च हुताशस्य वर्धय त्वं तुरंगमान् ॥ तेजसा चैव सूर्यस्य मुनीनां तपसा तथा ॥ रुद्रस्य ब्रह्मचर्येण पवनस्य बलेन च ॥ स्मर त्वं राजपुत्रत्वं कौस्तुभं च मणिं स्मर ॥ यां गतिं ब्रह्महा गच्छेन्मातृहा पितृहा तथा ॥ भ्रूणहाऽनृत-वादी च क्षत्रियश्च पराङ्मुखः ॥ सूर्याचंद्रमसौ वायुर्यावत्पश्यंति दुष्कृतं ॥ व्रजाश्व तां गतिं क्षिप्रं तच्च पापं भवेत्तव ॥ निष्कृतो यदि गच्छेथा युद्धाध्वनि तुरंगम ॥ रिपून् विजित्य समरे सह भ्रात्रा सुखी भव**" ॥ ध्वजाचा मंत्र—"**शक्रकेतो महावीर्य श्यामवर्णार्चयाम्यहं ॥ पत्रिराज नमस्तेस्तु तथा नारायणध्वज ॥ काश्यपेयारुणभ्रातर्नागारे विष्णुवाहन ॥ अप्रमेय दुराधर्ष रणे देवारिसूदन ॥ गरुत्मान्मारुतगतिस्त्वयि संनिहितो यतः ॥ सारवंत्यायुधान्यत्र रक्ष त्वं च रिपून् दह ॥**" पताकेचा मंत्र—"**हुतभुग्वसवो रुद्रा वायुः सोमो महर्षयः ॥ नागकिन्नरगंधर्वयक्षभूतगणग्रहाः ॥ प्रमथास्तु सहादित्यैर्भूतेशो मातृभिः सह ॥ शक्रः सेनापतिः स्कंदो वरुणश्चाश्रितास्त्वयि ॥ प्रदहंतु रिपून्स-र्वान् राजा विजयमृच्छतु ॥ यानि प्रयुक्तान्यरिभिरायुधानि समंततः ॥ पतंतूपरि शत्रूणां हतानि तव तेजसा ॥ हिरण्यकशिपोर्युद्धे युद्धे देवासुरे तथा ॥ कालनेमिवधे यद्वद्यद्वत्त्रिपुरघातने ॥ शोभितासि तथैवाद्य शोभयास्मांश्च संस्मर ॥ नीलान् श्वेतानिमान् दृष्ट्वा नश्यंत्वाशु नृपारयः ॥ व्याधिभिर्विविधै-र्घोरैः शस्त्रैश्च युधि निर्जिताः ॥ पूतना रेवती नाम्ना कालरात्रिश्च या स्मृता ॥ दहत्वाशु रिपून् सर्वान्पताके त्वं मयार्चिता ॥**" आतां गजाचा मंत्र—"**कुमुदैरावणौ पद्मः पुष्पदंतोऽथ वामनः ॥ सुप्रती-कोंऽजनो नील एतेष्टौ देवयोनयः ॥ तेषां पुत्राश्च पौत्राश्च वनान्यष्टौ समाश्रिताः ॥ मंदो भद्रो मृग-श्चैव गजः संकीर्ण एव च ॥ वने वने प्रसूतास्ते यूथानि सुमहांति च ॥ पांतु त्वां वसवो रुद्रा आदित्याः समरुद्गणाः ॥ भर्तारं रक्ष नागेंद्र स्वामिवत्प्रतिपाल्यतां ॥ अवाप्नुहि जयं युद्धे गमने स्वस्ति नो व्रज ॥ श्रीस्ते सोमाद्बलं विष्णोस्तेजः सूर्याज्जवोऽनिलात् ॥ स्थैर्यं मेरोर्जयं रुद्राद्यशो देवात्पुरंदरात् ॥ युद्धे रक्षंतु नागास्त्वां दिशश्च सह दैवतैः ॥ अश्विनौ सह गंधर्वैः पांतु त्वां सर्वतः सदा ॥**" आतां खड्गमंत्रः—"**असिर्विशसनः खड्गस्तीक्ष्णधारो दुरासदः ॥ श्रीगर्भो विजयश्चैव धर्मधारस्तथैव च ॥ एतानि एव नामानि स्वयमुक्तानि वेधसा ॥ नक्षत्रं कृत्तिका ते तु गुरुर्देवो महेश्वरः ॥ रोहिण्यश्च**

शरीरं ते दैवतं च जनार्दनः ॥ पिता पितामहो देवस्त्वं मां पालय सर्वदा ॥ नीलजीमूतसंकाशस्तीक्ष्णदंष्ट्रः कृशोदरः ॥ भावशुद्धो मर्षणश्च अतितेजास्तथैव च ॥ इयं येन धृता क्षोणी हतश्च महिषासुरः ॥ तीक्ष्णधाराय शुद्धाय तस्मै खड्गाय ते नमः ॥" छुरिकेचा मंत्र—"सर्वायुधानां प्रथमं निर्मितासि पिनाकिना ॥ शूलायुधाद्विनिष्कृष्य कृत्वा मुष्टिग्रहं शुभं ॥ चंडिकायाः प्रदत्तासि सर्वदुष्टनिबर्हिणी ॥ तया विस्तारिता चासि देवानां प्रतिपादिता ॥ सर्वसत्त्वांगभूतासि सर्वाशुभनिबर्हिणी ॥ छुरिके रक्ष मां नित्यं शांतिं यच्छ नमोस्तु ते ॥" कटारपूजा मंत्र—"रक्षांगानि गजान् रक्ष रक्ष वाजिधनानि च ॥ मम देहं सदा रक्ष कट्टारक नमोस्तु ते" कट्टारक म्हणजे मध्यदेशांत कटारी अशी प्रसिद्ध आहे. धनुष्याचा मंत्र—"सर्वायुधमहामात्र सर्वदेवारिसूदन ॥ चाप मां समरे रक्ष साकं शरवरैरिह ॥ धृतं कृष्णेन रक्षार्थं संहराय हरेण च ॥ त्रयीमूर्तिगतं देवं धनुरस्त्रं नमाम्यहं ॥" कुंतपूजा मंत्र—"प्रास पातय शत्रूंस्त्वमनया नाकमायया ॥ गृहाण जीवितं तेषां मम सैन्यं च रक्षतां" ॥ चर्म ( ढाल ) पूजा मंत्र—"शर्मप्रदस्त्वं समरे चर्म सैन्ये यशोद्यमे ॥ रक्ष मां रक्षणीयोहं तापनेय नमोस्तु ते ॥" कनकदंडपूजा मंत्र—"प्रोत्सारणाय दुष्टानां साधुसंरक्षणाय च ॥ ब्रह्मणा निर्मितश्चासि व्यवहारप्रसिद्धये ॥ यशो देहि सुखं देहि जयदो भव भूपतेः ॥ ताडयस्व रिपून् सर्वान् हेमदंड नमोस्तु ते ॥" दुंदुभिपूजा मंत्र—"दुंदुभे त्वं सपत्नानां घोरो हृदयकंपनः ॥ भवभूमिपसैन्यानां तथा विजयवर्धनः ॥ यथा जीमूतघोषेण प्रहृष्यंति च बर्हिणः ॥ तथास्तु तव शब्देन हर्षोस्माकं मुदावहः ॥ यथा जीमूतशब्देन स्त्रीणां त्रासोभिजायते ॥ तथात्र तव शब्देन त्रस्यंत्वस्मद्विषो रणे ॥" शंखाचा पूजामंत्र—"पुण्यस्त्वं शंख पुण्यानां मङ्गलानां च मंगलं ॥ विष्णुना विधृतो नित्यमतः शांतिप्रदो भव ॥"

अथ**सिंहासनमंत्रः** विजयोजयदोजेतारिपुघातीशुभंकरः दुःस्वहाधर्मदःशांतःसर्वारिष्टविनाशनः एतेवैसन्निधौयस्मात्तवसिंहामहाबलाः तेनसिंहासनेतित्वंदेवैर्मंत्रैश्चगीयसे त्वयिस्थितःशिवःशांतस्त्वयिशक्रःसुरेश्वरः नमस्तेसर्वतोभद्रभद्रदोभवभूपतेः त्रैलोक्यजयसर्वस्वसिंहासननमोस्तुते तथैवकर्मचिह्नानिस्वानिपूज्यानिशिल्पिभिः लोहाभिसारिकंकर्मकृत्वैवंमंत्रपूर्वकम् नियमंकृत्वातथाष्टम्यांपूर्वाह्णेस्नानमाचरेत् कुंकुमचंदनचंपकचतुःसमैःशैलपिष्टैश्च चर्चितगात्रींदेवींकुसुमैरभ्यर्चयेद्बहुभिः कुमुदैःसपद्मपुष्पैःसदीपधूपैःसनैवेद्यैः मांसैर्बल्युपहारैर्मंगलशब्दैःसमुच्छलितैः विहितच्छत्रैर्यानैःस्यंदनसितशस्त्रधारिजनलोकैः तुष्टैःपश्वश्वादितु निवेद्यतेसर्वमेवभगवत्यै दुर्गासापूजनीयाचतद्दिनेद्रोणपुष्पकैः ततःखड्गंनमस्कृत्यशत्रूणांवधसिद्धये इच्छेत विजयंराज्यंसुभिक्षंचात्मनोनृपः पुनःपुनःप्रणम्यार्यांसंस्मरन्हृदयेशिवाम् सर्वंकृत्वेतिकौरव्यअष्टम्यांजागरं निशि नटनर्तकगीतैश्चकारयेच्चमहोत्सवम् एवंहृष्टैर्निशांनीत्वाप्रभातेअरुणोदये घातयेन्महिषान्मेषानप्रतोनतकंधरान शतमर्धशतंवापितदर्धंवायथेच्छया सुरासवभृतैःकुंभैस्तर्पयेत्परमेश्वरीम् कापालिकेभ्यस्तद्देयंदासीदासजनेतथा ततोपराह्णसमयेनवम्यांवैरथेस्थिताम् भवानींभ्रामयेद्राष्ट्रेस्वयंराजामशब्दवान् कश्चिच्चोपोषितोवीरोविधृतोऽन्येनखड्गवान् भूतेभ्यस्तुबलिंदद्यान्मंत्रेणानेनसामिषम् सरक्तंसजलंचान्नंगंधपुष्पाक्षतैर्युतम् त्रींस्त्रीन्वारान्समूलेनदिग्विदिक्षुकिरेद्बलिम् **मंत्रश्च** बलिंगृह्णंत्विमंदेवाआदित्यावसवस्तथा मरुतश्चाश्विनौरुद्राःसुपर्णाःपन्नगाग्रहाः असुरायातुधानाश्चपिशाचोरगराक्षसाः डाकिन्योयक्षवेतालायोगिन्यःपूतनाःशिवाः जृंभकाःसिद्धगंधर्वामालाविद्याधरानगाः दिक्पालालोकपालाश्चयेचविघ्नविनायकाः जगतांशांतिकर्तारोब्रह्माद्याश्चमहर्षयः माविघ्नंमाचमेपापंमासंतुपरिपंथिनः सौम्याभवंतुतृप्ताश्चभूतप्रेताःसुखावहाइति

**इतिमहाष्टमी ।**

सिंहासनमंत्र—"विजयो जयदो जेता रिपुघाती शुभंकरः ॥ दुःस्वहा धर्मदः शांतः सर्वारिष्टविनाशनः ॥ एते वै संनिधौ यस्मात्तव सिंहा महाबलाः ॥ तेन सिंहासनेति त्वं देवैर्मंत्रैश्च गीयसे ॥ त्वयि स्थितः शिवः शांतस्त्वयि शक्रः सुरेश्वरः ॥ नमस्ते सर्वतोभद्र भद्रदो भव भूपतेः ॥ त्रैलोक्यजयसर्वस्व सिंहासन नमोस्तु ते ॥" "तशींच शिल्प्यांनीं आपआपल्या कामाचीं आयुधें असतील त्यांची पूजा करावी. या प्रकारें

---

१ विधृतोन्येनेति । उपवासैःपतनभयवारणाय ॥

लोहाभिसारिक कर्म मंत्रपूर्वक करून नंतर नियम करून अष्टमीच्या दिवशीं पूर्वाह्णीं स्नान करावें. केशर, चंदन, अगर, चंपक, ह्या चवघांबरोबर शैलपिष्ट घेऊन देवीच्या शरीरास उटी लावून बहुत पुष्पांनीं तिची पूजा करावी. चंद्रविकासी कमलें, सूर्यविकासी कमलें, धूप, दीप, नैवेद्य, मांस, बली, उपहार, मंगलशब्द या उपचारांनीं पूजा करावी, छत्र धारण करणारे, वाहनावर बसलेले, रथावर बसलेले, शस्त्र धरणारे अशा आनंदित जनांनीं पशु-अस्त्र इत्यादि सर्व भगवतीला अर्पण करावें. राजानें त्या दिवशीं त्या दुर्गेचें द्रोणपुष्पांनीं पूजन करावें. नंतर शत्रूंच्या वधाकरितां खड्गाला नमस्कार करून आपला विजय, राज्य व सुभिक्ष यांची इच्छा राजानें करावी. हृदयामध्यें कल्याणकारक देवीचें स्मरण करीत तिला वारंवार नमस्कार करून अष्टमीस रात्रीं जागरण करावें, नाच, तमाशा, गाणें यांहींकरून मोठा उत्सव करावा. याप्रमाणें आनंदानें रात्र घालवून प्रभातकाळीं अरुणोदयीं देवीच्या अग्रभागीं शंभर, किंवा पन्नास अथवा पंचवीस आपल्या इच्छेप्रमाणें महिष व मेंढे मारावे. त्यांच्या रक्तमांसांनीं, आणि मद्य, आसव यांनीं पूर्ण भरलेल्या कुंभांनीं परमेश्वरी देवीला तृप्त करावें. तें मद्यमांसादिक कापालिकांना व दासीदासांना द्यावें. नंतर नवमीचे दिवशीं अपराह्णीं स्वतः राजानें देवीला रथावर बसवून वाद्यघोष करीत नगरांत फिरवावें. अन्यानें धरलेल्या कोणी एका वीरानें उपोषित राहून हातांत खड्ग घेऊन मूलमंत्रासहित पुढें सांगावयाच्या मंत्रानें आमिष, रक्त, जल, गंध, पुष्पें, अक्षता यांनीं युक्त अन्नाचा बलि द्यावा. तो बलि दिशा विदिशांचे ठायीं तीन तीन वेळ द्यावा.'' बलिदानाचा मंत्र—''**बलिं गृह्णंत्विमं देवा आदित्या वसवस्तथा ॥ मरुतश्चाश्विनौ रुद्राः सुपर्णाः पन्नगा ग्रहाः ॥ असुरा यातुधानाश्च पिशाचोरगराक्षसाः ॥ डाकिन्यो यक्षवेताला योगिन्यः पूतनाः शिवाः ॥ जृंभकाः सिद्धगंधर्वा माला विद्याधरा नगाः ॥ दिक्पाला लोकपालाश्च ये च विघ्नविनायकाः ॥ जगतां शांतिकर्तारो ब्रह्माद्याश्च महर्षयः ॥ मा विघ्नं मा च मे पापं मा संतु परिपंथिनः ॥ सौम्या भवंतु तृप्ताश्च भूतप्रेताः सुखावहाः**'' ॥ इति महाष्टमी ॥

महानवमीतुपूर्वयुताग्राह्या[1] पूर्वोक्तवचनात्[2] नवमीदुर्गाव्रतेश्रावणीति**दीपिकोक्तेः** श्रावणीदुर्गनवमी दूर्वाचैवहुताशनी पूर्वविद्धाप्रकर्तव्याशिवरात्रिर्बलेर्दिनमिति**हेमाद्रौपाद्मोक्तेश्च भविष्येपि** आश्वयुक्शुक्लपक्षेतुअष्टमीमूलसंयुता सामहानवमीनामत्रैलोक्येपिसुदुर्लभेति मूलमुपलक्षणम् दुर्गापूजासुनवमीमूलाद्यृक्षत्रयान्विता महतीकीर्तितातस्यांदुर्गामहिषमर्दिनीइति **मदनरत्नेलैंगात्** अत्रपूजयेदित्यध्याहारः यानितु साकार्योदयगामिन्यामित्यादिप्रागुक्तानितानिनवमीभिन्नतिथिपराणि नवम्यांविशेषोक्तेः वेधश्चमुहूर्तत्रयेणैवज्ञेयः यद्यपिहेमाद्रिमतेमुहूर्तद्वयात्मापिवेधोस्तितथापिसूर्योदयएवसः सायंतुत्रिमुहूर्तएव तदुक्तं**दीपिकायाम्** त्रिमुहूर्तगातुसकलासायमिति **माधवोपि** सायंनूत्तरयातद्वद्व्यूनयानतुविध्यतइति तेनत्रिमुहूर्तयोगेपूर्वानवमी पूर्वोक्तवचनात् नकुर्यान्नवमींतातदशम्यांतुकदाचनेति**स्कांदे**परानिषेधाच्च त्रिमुहूर्तयोगाभावेतुनिषिद्धापिपरैवकार्येति**निष्कर्षः ।**

महानवमी तर अष्टमीयुक्त घ्यावी. कारण, ''अष्टमी नवमीयुक्त घ्यावी आणि नवमी अष्टमीयुक्त घ्यावी. असें पूर्वी पाद्मवचन सांगितलें आहे. ''दुर्गाव्रताविषयीं नवमी व श्रावणी पौर्णिमा ह्या पूर्वविद्धा घ्याव्या'' असें **दीपिका**ही आहे. आणि ''श्रावणी, दुर्गानवमी, दूर्वाअष्टमी, हुताशनी, शिवरात्रि, व बलिप्रतिपदा ह्या पूर्वविद्धा कराव्या.'' असें **हेमाद्रींत पाद्मवचन**ही आहे. **भविष्यांतही**-''आश्विनशुक्लपक्षांतली मूलनक्षत्रयुक्त अष्टमी ती महानवमी होय, ती त्रैलोक्यामध्येंही अत्यंत दुर्लभ.'' वरील वचनांत 'मूलसंयुता' असें जें पद तें मूलादि तीन नक्षत्रांचें उपलक्षण आहे, म्हणजे मूलादि तीन नक्षत्रांतून कोणत्या एकानक्षत्रानें युक्त अष्टमी ती महानवमी असा अर्थ. कारण, ''दुर्गापूजेविषयीं नवमी मूल पूर्वाषाढा व उत्तराषाढा या तीन नक्षत्रांनीं युक्त ती महती म्हटली आहे, तिचे ठायीं महिषासुरमर्दिनी दुर्गा पुजावी.'' असें **मदनरत्नांत लिंगपुराणवचन** आहे. आतां जीं ''शरत्काले महापूजा क्रियते या च वार्षिकी । सा कार्योदयगामिन्यां न तत्र तिथियुग्मता'' हें वचन प्रतिपदानिर्णयांत उक्त आहे; आणि ''तिथावुदयगामिन्यां सर्वास्ताः कारयेत्तु यः'' हें वचन सप्तमीनिर्णयांत उक्त आहे. इत्यादि वचनें ती नवमीभिन्न तिथिविषयक आहेत. कारण, नवमीस विशेष निर्णय ( अष्टमीविद्धा घ्यावी ) असा सांगितला आहे. वेध सांगितला तो तीन मुहूर्तांनींच जाणावा. जरी हेमाद्रिमतीं दोन मुहूर्तही वेध आहे तरी तो वेध सूर्योदयींच समजावा. सायंकालीं वेध तीन मुहूर्तच आहे. तें सांगतो—**दीपिकेंत**—''सायंकालीं त्रिमुहूर्तगामिनी तिथि ती संपूर्ण समजावी.'' **माधवही**—''सायंकालीं तर उत्तर तिथि त्रिमुहूर्ताहून न्यून असतां तिनें प्रातःकालीन तिथीप्रमाणें विद्ध होत नाहीं.'' तेणेंकरून सायंकालीं तीन मुहूर्त असतां पूर्वा नवमी घ्यावी. कारण, अष्टमीयुक्त नवमी घ्यावी, असें

१ महानवम्यां पूजाबलिदानंहोमश्चेतिकृत्यत्रयम ॥ २ अष्टमीनवमीयुक्तानवमीचाष्टमीयुतेतिपूर्वोक्तपाद्मवचनात् ॥

पूर्वी सांगितलेलें वचन आहे. आणि "दशमीचे दिवशीं नवमी कधींही करूं नये" असा **स्कांदांत** पर नवमीचा निषेधही केला आहे. त्रिमुहूर्त योग नसेल तर निषिद्ध असली तरी पराच करावी, हा निष्कर्ष ( मथितार्थ ) समजावा.

यत्तुनवम्यांचजपंहोमंसमाप्यश्रवणेपिवेति**संग्रहोक्तेः** व्रतंचजागरश्चैवनवम्यांविधिवद्बलिरिति**देवीपुराणाच्च** नवम्यांहोमबल्यादिविहितं तत्र आश्वयुक्शुक्लनवमीमुहूर्तंवाकलायदि सातिथिःसकलाज्ञेयालक्ष्मीविद्याजयार्थिभिरिति **सौरपुराणात्** सूर्योदयेपरंरिक्तापूर्णास्यादपरायदि बलिदानंप्रकर्तव्यंतत्रदेशेशुभावहम् बलिदानेकृतेष्टम्यांपुत्रभंगोभवेन्नृपेति**मदनरत्नेदेवीपुराणाच्च** बल्यादौपराकार्या उपवासादौतुपूर्वेतिमदनरत्ने उक्तम् प्रतापमार्तंडेप्येवम् यत्तु अष्टम्यांबलिदानेनपुत्रनाशोभवेद्ध्रुवमिति**कालिकापुराणं** तत्संधिपूजापरं अष्टमीनवमीसंधौतृतीयाबलुकथ्यतइति**तत्रैव**तदुक्तेः **कामरूपनिबंधे** अष्टम्याःशेषदंडश्चनवम्याःपूर्वएवच तत्रयाक्रियतेपूजाविज्ञेयासामहाफला अष्टमीमात्रेभवत्येव आश्विनेपूजयित्वातुअर्धरात्रेष्टमीषुच घातयंतिपशून्भक्त्यातेभवंतिमहाबलाः तथा कन्यासंस्थेरवावीपेशुक्लाष्टम्यांप्रपूजयेत् सोपवासोनिशार्धेतुमहाविभवविस्तरैः तथा पशुघातश्चकर्तव्योगवयाजवधस्तथेति**रूपनारायणीयेदेवीपुराणात्** तत्रैव**भविष्ये** तस्मादियंमहापुण्यानवमीपापनाशिनी उपोष्यासुप्रयत्नेनसततंसर्वपार्थिवैः **निर्णयदीपे**तुमहानवमीपरदिने पराह्णव्यापित्वेपरा अन्यथापूर्वा आवर्तनात्पूर्वकालेनवमीस्यात्परेहनि दुर्गार्चातत्रपूर्वेद्युःपूर्वाह्णेत्वष्टमीयदीतिधौम्यवचनादित्युक्तम् अस्यतुशारदानवमीविषयत्वंसमूलत्वंचविमृश्यम यानितु नंदायांज्वलतेवह्निःपूर्णायांपशुघातनम भद्रायांगोकुलक्रीडानत्रराज्यंविनश्यतीति नवम्यामपराह्णेतुबलिदानंप्रशस्यते दशमींवर्जयेत्तत्रनात्रकार्याविचारणेति नंदायादर्शनेरक्षाबलिदानंदशासुच भद्रायांगोकुलक्रीडादेशनाशायजायतइति**ब्रह्मवैवर्तनारदादि**वचनानितानिशुद्धाधिकनिषेधपराणीति**मदनरत्ने** तथा**कालिकापुराणे** नवम्यांबलिदानंतुकर्तव्यंवैयथाविधि जपंहोमंचविधिवत्कुर्यात्तत्रविभूतये **केचित्तु**पूर्वाषाढायुताष्टम्यांपूजाहोमाद्युपोषणमितिपूर्वोक्तदेवीपुराणादष्टम्यांहोममाहुः **अन्ये**तुद्विविधवाक्यवशादष्टम्यामारभ्यनवम्यांसमापयंति समुच्चयस्तुयुक्तः **रुद्रयामले**तुविकल्पउक्तः तत्तुनिर्मूलम **दुर्गाभक्तितरंगिण्या**दिगौडग्रंथेष्वपिनवम्यांहोमउक्तः ।

आतां जें "नवमीस किंवा श्रवणनक्षत्रावर जप, होम समाप्त करून" ह्या संग्रहवचनावरून; आणि "नवमीस व्रत, जागर, यथाविधि बलिदान हीं करावीं." ह्या **देवीपुराण**वचनावरूनही नवमींत बलि, होम इत्यादि विहित आहे, त्या ठिकाणीं "आश्विन शुक्ल नवमी मुहूर्तमात्र किंवा कलामात्र असेल तर ती तिथि लक्ष्मी, विद्या, जय, इच्छिणारांनीं सकल समजावी" ह्या **सौरपुराण**वचनावरून; आणि "जर सूर्योदयीं रिक्ता ( नवमी ) व पुढें पूर्णा ( दशमी ) असेल तर त्या दिवशीं बलिदान करावें, तें त्या देशीं शुभावह होतें. अष्टमींत बलिदान केलें असतां पुत्रनाश होईल" ह्या **मदनरत्नांतील देवीपुराण**वचनावरूनही बलि—होमादिकांविषयीं परा करावी उपवासादिकांविषयीं तर पूर्वा करावी, असें **मदनरत्नांत** उक्त आहे. **प्रतापमार्तंडां**तही असेंच आहे. आतां जें "अष्टमींत बलिदान केल्यानें निश्चयानें पुत्रनाश होईल" असें **कालिकापुराण**वचन तें संधिपूजाविषयक आहे. कारण, 'अष्टमी व नवमी यांच्या संधीचे ठायीं तृतीया पूजा सांगितली आहे." अशी तेथेंच ती संधिपूजा आहे. **कामरूपनिबंधांत**—"अष्टमीची शेवटची घटिका आणि नवमीची आद्य घटिका त्या ठिकाणीं जी पूजा केली जाते ती महाफलदायक जाणावी." केवळ अष्टमींत पूजा होतच आहे. कारण, "आश्विनमासीं अष्टमीचे ठायीं मध्यरात्रीं पूजन करून भक्तीनें पशूंचा घात करितात ते महाबल होतात." तसेंच कन्याराशीस सूर्य असतां "आश्विनमासीं शुक्लाष्टमीस उपवास करून मध्यरात्रीं मोठ्या विभवविस्तारांनीं पूजन करावें." तसेंच "पशुवध करावा, आणि गवय व अज ( बोकड ) यांचा वध करावा." असें **रूपनारायणीयांत—देवीपुराण**वचन आहे. तेथेंच **भविष्यांत**—"त्या कारणास्तव ही नवमी महापुण्या व पापनाशिनी आहे. सर्व राजांनीं हिचें प्रयत्नानें सतत उपोषण करावें." **निर्णयदीपांत** तर—महानवमी परदिवशीं अपराह्णव्यापिनी असतां परा करावी; परदिवशीं अपराह्णव्यापिनी नसतां पूर्वा करावी. कारण, "दुसऱ्या दिवशीं आवर्तनकालाच्या ( मध्याह्नीं सूर्य फिरण्याच्या ) पूर्वी नवमी संपत असेल व पूर्वदिवशीं पूर्वाह्णीं अष्टमी असेल तर दुर्गेची पूजा पूर्वदिवशीं करावी." असें **धौम्य**वचन आहे, असें सांगितलें. हें वचन

१ तृतीयेति । सायंपूजाप्रथमा निशीथपूजाद्वितीया संधिपूजातृतीयेत्यर्थः ॥ २ संधिपूजाविधिमाह अष्टम्या इति ॥

तर ह्या नवमीविषयक आहे व समूल आहे, याचा विचार करावा. आतां जीं—"नंदेवर ( प्रतिपदेंत ) अग्निप्रज्वलन ( होळी पेटविणें ), दशमींत पशुघात करणें, कार्तिकशुक्ल द्वितीयेचे ठायीं गोकुलक्रीडा अशीं जेथें होतात तेथें राज्यनाश होतो." "नवमींत अपराह्णीं बलिदान प्रशस्त आहे. बलिदानाविषयीं दशमी सोडावी, याविषयीं विचार करूं नये." "प्रतिपदेचे ठायीं रक्षाबंधन, दशमींत बलिदान, भद्रेचे ठायीं ( कार्तिकशुक्लद्वितीयेचे ठायीं ) गोकुलक्रीडा, हीं देशनाशास कारण होतात" अशीं **ब्रह्मवैवर्त—नारद** इत्यादिकांचीं वचनें आहेत तीं पूर्वदिवशीं शुद्ध असून परदिवशीं उर्वरित पूर्वतिथिनिषेधक आहेत, असें **मदनरत्नांत** उक्त आहे. तसेंच **कालिकापुराणांत—**"नवमीचे ठायीं यथाविधि बलिदान, जप, होम, हीं करावीं; तेणेंकरून ऐश्वर्य प्राप्त होतें." **कोणी** ग्रंथकार तर "पूर्वाषाढायुक्त अष्टमीस पूजा, होम, उपोषण इत्यादि करावीं" ह्या पूर्वोक्त **देवीपुराण**वचनावरून अष्टमीस होम करावा असें सांगतात. अन्य पंडित तर—दोन प्रकारचीं वाक्यें असल्यामुळें, अष्टमींत होम आरंभ करून नवमींत समाप्त करितात. अष्टमींत व नवमींत दोन्ही दिवशीं करणें हें तर युक्त आहे. **रुद्रयामलांत** तर अष्टमींत किंवा नवमींत असा विकल्प सांगितला आहे, तो तर निर्मूल आहे. **दुर्गाभक्तितरंगिण्यादिक गौड**ग्रंथांतही नवमींत होम सांगितला आहे.

**होमेचविशेषउक्तोडामरतंत्रे** पायसंसर्पिपायुक्तंतिलैःशुक्लैर्विमिश्रितम् होमयेद्विधिवद्भक्त्यादशांशेन- नृपोत्तम रुद्राध्यायेयथाहोमंमंत्रेणैकेनसाधयेत् तथास्तोत्रजपेहोमंश्लोकेनैकेनसाधयेत् यद्वासप्तशतींजप्त्वाहो- ममंत्रोनवाक्षरः ऐंह्रींक्लींचामुंडायैविच्चेइतिनवाक्षरइति**केचित्** पूजोक्तोग्राह्यइतितुयुक्तं **रुद्रयामलेपि** प्रधा- नद्रव्यमुद्दिष्टंपायसान्नंतिलास्तथा किंशुकैःसर्षपैःपूगैर्लाजदूर्वांकुरैरपि यवैर्वाश्रीफलैर्दिव्यैर्नानाविधफलैस्तथा रक्तचंदनखंडैश्चगुग्गुलैश्चमनोहरैः प्रतिश्लोकंचजुहुयात्सर्वद्रव्याणिचक्रमात् नवाक्षरेणवाहुत्वानमोदेव्याइ- तीतिचेति **रहस्येतु** प्रतिश्लोकंचजुहुयात्पायसंतिलसर्पिषेत्युक्तम् **दुर्गाभक्तितरंगिण्यां**तुतिलैर्जयंती- मंत्रेणचहोमउक्तः पुरश्चरणकार्येतुबिल्वपत्रयुतैस्तिलैरिति**कालिकापुराणा**द्बिल्वपत्रैश्चेतिस्मार्ताः तन्न अत्रमानाभावात् ।

**होमाविषयीं** विशेष प्रकार सांगतो—**डामरतंत्रांत**—"घृतयुक्त पायस, शुक्लतिलांनीं मिश्रित करून भक्तीनें यथाविधि जपाचे दशांशानें होम करावा. रुद्राध्यायाचा होम जसा एका मंत्रानें होतो तसा स्तोत्रजपाचा होम एका श्लोकमंत्रानें करावा. अथवा सप्तशतीचा जप करून नवाक्षर मंत्रानें होम करावा. **'ऐंह्रींक्लींचामुंडायैविच्चे'** हा नवाक्षर मंत्र असें **केचित्** म्हणतात. पूर्वी सांगितलेला पूजेचा नवाक्षर मंत्र घ्यावा हें तर योग्य होय. **रुद्रयामलांत** ही— "पायसान्न व तिळ हें प्रधानद्रव्य सांगितलें आहे. पळसाचीं फुलें, सर्षप ( राई ), पूग ( सुपाऱ्या ), लाह्या, दूर्वांकुर, यव, श्रीफल ( नारळ ), उत्तम नानाप्रकारचीं फळें, रक्तचंदनाचीं खंडें, सुंदर गुग्गुळ ह्या सर्व द्रव्यांचा अनुक्रमानें दर एक श्लोकमंत्रेंकरून होम करावा. अथवा नवाक्षरमंत्रानें किंवा 'नमोदेव्यै०' या मंत्रानें होम करावा." **रहस्यांत** तर—"दरएक श्लोकमंत्रानें तिल व घृत यांनीं युक्त पायसाचा होम करावा" असें सांगितलें आहे. **दुर्गाभक्तितरंगिणींत** तर-जयंती- मंत्रानें तिळांचा होम सांगितला आहे. "पुरश्चरण कार्याचे ठायीं तर बिल्वपत्रयुक्त तिलांनीं होम करावा." ह्या **कालिकापुराणा**वरून बिल्वपत्रांनींही होम करावा, असें स्मार्त म्हणतात. तें बरोबर नाहीं. कारण, येथें तो ( बिल्वपत्र होम ) करण्याविषयीं प्रमाण नाहीं.

**अथबलिदानम्** तत्राश्वमेषछागमहिषस्वमांसानामुत्तरोत्तरप्राशस्त्यंफलविशेषश्चान्यतोवसेयइतिदिक् बलिप्रकारस्तु**देवीपुराणे** कन्यासंस्थेरवौशक्तःशुक्लाष्टम्यांप्रपूज्यतु द्रोणपुष्पैश्चबिल्वाम्रजातीपुन्नागचंपकैः पंचाब्दंलक्षणोपेतंगंधपुष्पसमन्वितम् विधिवत्कालिकालीतिजप्त्वाखड्गेनघातयेत् ॐकालिकालियज्ञेश्वरिलो- हदंडायैनमइति**मंत्रः** तदुत्थरुधिरंमांसंगृहीत्वापूतनादिषु आदिशब्दात् चरकीविदारीपापराक्षस्यः नैर्ऋते- भ्यःप्रदातव्यंमहाकौशिकमंत्रितम् मंत्रस्तुवक्ष्यते तथा तस्याग्रतोनृपःस्नायात्कृत्वाशत्रुंतुपैष्टिकम् खड्गेनघा- तयित्वातुदद्यात्स्कंदविशाखयोः अशक्तौब्राह्मणेनचकूष्मांडादिभिर्बलिदानंकार्यम् तदुक्तंकालिकापुराणे कूष्मां- डमिक्षुदंडंचमांसंसारसमेवच एतेबलिसमाःप्रोक्तास्तृप्तौछागसमाःसदा **रुद्रयामलेपि** छागाभावेतुकूष्मां- डंश्रीफलवामनोहरं वस्त्रसंवेष्टितंकृत्वाछेदयेच्छुरिकादिना तथा ब्राह्मणेनसदादेयंकूष्मांडंबलिकर्मणि श्रीफ- लंवासुराधीशछेदंनैवतुकारयेत् छेदेविकल्पः माषान्नेनबलिर्देयोब्राह्मणेनविजानता **कालिकापुराणे** उत्त- राभिमुखोभूत्वाबलिंपूर्वमुखंतथा निरीक्ष्यसाधकःपश्चादिमंमंत्रमुदीरयेत् पशुस्त्वंबलिरूपेणममभाग्यादुप-

स्थितः प्रणमामिततःसर्वरूपिणंबलिरूपिणं चंडिकाप्रीतिदानेनदातुरापद्विनाशनम् चामुंडाबलिरूपायबलेतु-भ्यंनमोस्तुते यज्ञार्थेबलयःसृष्टाःस्वयमेवस्वयंभुवा अतस्त्वांघातयाम्यद्यतस्माद्यज्ञेवधोवधः ऐंह्रींश्रीमितिमं-त्रेणतंबलिंमत्स्वरूपिणम् चिंतयित्वान्यसेत्पुष्पंमूर्ध्नितस्यतुभैरव रसनात्वंचंडिकायाःसुरलोकप्रसाधकः ह्रींह्रीं-खड्गेतिमंत्रेणध्यात्वाखड्गंचपूजयेत् पूजयित्वाततःखड्गंओंहुंफडितिमंत्रकैः गृहीत्वाविमलंखड्गंछेदयेद्बलिमुत्तमं ॐह्रींऐंह्रीं कौशिकीतिरुधिरेणाप्यायतामिति बलिदानेतुदुर्गायाःसर्वत्रायंविधिःस्मृतः **मत्स्यसूक्ते** नव-म्यांपूर्ववत्पूजाकर्तव्याभूतिमिच्छता दक्षिणांवस्त्रयुग्मंचआचार्यायनिवेदयेत् ।

**आतां बलिदान सांगतो**—बलिदानाविषयीं घोडा, मेंढा, बकरा, महिष व स्वशरीरमांस हें पूर्वपूर्वाहून उत्तरोत्तर प्रशस्त व त्यांचीं विशेष फलें अन्य ग्रंथांतरून जाणावीं. ही दिशा समजावी. **बलिप्रकार तर देवीपुराणांत**—"पशु-बलिदानास समर्थ असेल त्यानें कन्यासंक्रांतीस सूर्य असतां शुक्लपक्षांत अष्टमीचे दिवशीं द्रोणपुष्पें, बिल्व, आम्र, जाई, पुन्नाग, चंपक, या पुष्पांनीं [ देवीची ] पूजा करून सर्व लक्षणांनीं युक्त व गंधपुष्पांनीं युक्त पांच वर्षांचा पूर्वोक्त अश्वादि पशु "**कालिकालि०**" या मंत्राचा यथाविधि जप करून खड्गानें मारावा. "**ॐ कालि कालि वज्रेश्वरि लोहदंडायै नमः**" हा मंत्र होय. त्या पशूचें रक्त व मांस घेऊन पूतना, चरकी, विदारी, पापराक्षसी यांना द्यावें. आणि महाकौशि-कीमंत्रानें मंत्रित असें रक्त मांस राक्षसांना द्यावें." मंत्र पुढें सांगूं. तसेंच—"त्या पशूच्या पुढें राजानें स्नान करावें आणि पिठाची शत्रूची मूर्ति करून खड्गानें ती तोडून स्कंद व विशाख यांस द्यावी." क्षत्रियादिकांस शक्ति नसतां कूष्मांडादिकानें बलिदान करावें. ब्राह्मणानें कूष्मांड, मापमिश्रित अन्न यांचें बलिदान करावें. तें सांगतो—**कालिकापुराणांत** "कूष्मांड, इक्षुदंड, मारस पक्ष्याचें मांस, हे बलिसमान असून तृप्तीविषयीं छागसमान सांगितले आहेत." **रुद्रयामलांतही** "छागाच्या अभावीं कूष्मांड किंवा सुंदर श्रीफल वस्त्रवेष्टित करून सुरी इत्यादिकानें छेदन करावें." तसेंच "**ब्राह्मणानें** बलिकर्माचे ठायीं सदा कूष्मांड द्यावा, अथवा श्रीफल द्यावें, छेद करूंच नये." यावरून छेदाविषयीं विकल्प **म्हणजे छेद** करावा किंवा न करावा. "ब्राह्मणानें मापान्नानें बलि द्यावा." **कालिकापुराणांत**-"साधकानें आपण **उत्तराभिमुख** होऊन पूर्वाभिमुख बलि करून त्याजकडे पाहून नंतर हा पुढील मंत्र म्हणावा. तो **मंत्रः-पशुस्त्वं बलिरूपेण मम-भाग्यादुपस्थितः ॥ प्रणमामि ततः सर्वरूपिणं बलिरूपिणं ॥ चंडिकाप्रीतिदानेन दातुरापद्विनाशनं ॥ चामुंडाबलिरूपाय बले तुभ्यं नमोस्तु ते ॥ यज्ञार्थे बलयः सृष्टाः स्वयमेव स्वयंभुवा ॥ अतस्त्वां घात-याम्यद्य तस्माद्यज्ञे वधोऽवधः** ॥ कालिका म्हणते-"**ऐं ऱ्हीं श्रीं**" या मंत्रानें तो बलि मत्स्वरूपी आहे असें चिंतन करून त्याच्या मस्तकावर पुष्प ठेवावें. देवलोकाचा साधक तूं चंडिकेची जिव्हा आहेस, असें ध्यान करून '**ऱ्हीं ऱ्हीं खड्ग**' या मंत्रानें खड्गाचें पूजन करावें. या प्रकारें खड्गाची पूजा करून '**ॐ हुं फट्**' या मंत्रानें खड्ग घेऊन उत्तमबलीचें छेदन करावें. **मंत्रः—"ॐऱ्हींऐंऱ्हीं कौशिकीति रुधिरेणाप्यायतां.**" दुर्गेच्या बलिदानाविषयीं सर्वत्र हा विधि सांगितला आहे." **मत्स्यसूक्तांत**—"ऐश्वर्य इच्छिणारानें नवमीस पूर्वीसारखी पूजा करावी आणि दक्षिणा व दोन वस्त्रें आचार्यास द्यावीं."

अथात्रप्रसंगाच्छतचंडीविधानमुच्यते **रुद्रयामले** शतचंडीविधानंचप्रोच्यमानंशृणुष्वतत् सर्वोपद्रवना-शार्थेशतचंडींसमारभेत् षोडशस्तंभसंयुक्तंमंडपंपल्लवोज्ज्वलम् वसुकोणयुतांवेदींमध्येकुर्यात्रिभागतः पक्वेष्टक-चितांरम्यामुच्छ्रायेहस्तसंमिताम् पंचवर्णरजोभिश्चकुर्यान्मंडलकंशुभम् पंचवर्णवितानंचकिंकिणीजालमंडितम् आचार्येणसमंविप्रान्वरयेद्दशसुव्रतान् ईशान्यांस्थापयेत्कुंभंपूर्वोक्तविधिनाचरेत् वारुण्यांचप्रकर्तव्यंकुंडंलक्षण-लक्षितम् मूर्तिंदेव्याःप्रकुर्वीतसुवर्णस्यपलेनवै तदर्धेनतदर्धेनतदर्धेनमहामते अष्टादशभुजांदेवींकुर्याद्वाष्टकरा-मपि पट्टकूलयुगच्छन्नांदेवींमध्येनिधापयेत् देवींसंपूज्यविधिवज्जपंकुर्युर्दशद्विजाः शतमादौशतंचांतेजपेन्मंत्रं-नवार्णवम् चंडींसप्तशतींमध्येसंपुटोयमुदाहृतः एकंद्वेत्रीणिचत्वारिजपेद्दिनचतुष्टयम् रूपाणिक्रमशस्तद्वत्पूज-नादिकमाचरेत् पंचमेदिवसेप्रातर्होमंकुर्याद्विधानतः गुडूचींपायसंदूर्वांतिलाञ्छुक्लान्यवानपि चंडीपाठस्य-होमंतुप्रतिश्लोकंदशांशतः होमंकुर्याद्ग्रहादिभ्यःसमिदाज्यचरून्क्रमात् हुत्वापूर्णाहुतिंदद्याद्विप्रेभ्योदक्षिणां-क्रमात् कपिलांगांनीलमणिंश्वेताश्वंछत्रचामरे अभिषेकंततःकुर्युर्यजमानस्यऋत्विजः एवंकृतेमरेशानसर्व-सिद्धिःप्रजायते ।

## आतां या स्थलीं प्रसंगेंकरून शतचंडीविधान सांगतों.

**रुद्रयामलांत** "शतचंडीविधान सांगतों. तें श्रवण कर! सर्व उपद्रवनाशाकरितां शतचंडी करावी. सोळा खांबांनीं

युक्त व पल्लवांनीं सुशोभित असा मंडप करून त्या मंडपाच्या तिसऱ्या भागांत आठकोनी वेदी करावी. ती वेदी भाजलेल्या विटांची सुंदर व एक हात उंच असावी. त्या वेदीवर पांच रंगी सुंदर मंडल करावें. त्यावर बारीक घंटांनीं सुशोभित पांच रंगी छत करावें. नंतर व्रतस्थ असे आचार्यासहित दहा ब्राह्मण वरावे. वेदीच्या ईशानीस कुंभस्थापना पूर्वोक्त विधीनें करावी. पश्चिमेस लक्षणयुक्त कुंड करावें. नंतर देवीची मूर्ति सोन्याची पल ( चार तोळे ) प्रमाण अथवा त्याचें अर्ध २ किंवा त्याचें अर्ध १ अथवा त्याचें अर्ध ( ६ मासे ) यांची, अष्टादश ( १८ ) भुजांची अथवा आठ भुजांची करावी. ती देवी दोन पीतांबरांनीं आच्छादित करून वेदीच्या मध्यभागीं स्थापावी. त्या देवीची पूजा यथाविधि करून दहा ब्राह्मणांनीं सप्तशतीचा जप करावा. जपाचे आदीं व अंतीं नवार्णमंत्राचा शंभर शंभर जप करावा आणि मध्यें सप्तशतीचंडीचा जप, हा संपुटित जप म्हटला आहे. याप्रमाणें प्रथमदिवशीं एक, दुसरे दिवशीं दोन, तिसरेदिवशीं तीन, चवथे दिवशीं चार, असे पाठ, चारदिवस प्रत्येक ब्राह्मणानें करावे. तसेंच पूजनादिकही वृद्धीनें करावें. पांचव्या दिवशीं प्रातःकाळीं यथाविधि होम करावा. गुडूची, पायस, दूर्वा, श्वेततिल व यव या द्रव्यांनीं चंडीपाठाचा होम पाठांच्या दशांशमानानें प्रतिश्लोकानें करावा. नंतर ग्रहादिकांना होम समिधा, घृत, चरु यांचा करून पूर्णाहुति द्यावी. नंतर ब्राह्मणांस दक्षिणा अनुक्रमानें द्यावी व कपिला गाय, नीलमणि, पांढरा घोडा, छत्र, चामर, हीं द्यावीं. नंतर ऋत्विजांनीं यजमानास अभिषेक करावा. असें शतचंडीविधान केलें असतां सर्व कार्यसिद्धि होते."

**अथसहस्रचंडी** साचतत्रैवोक्ता सहस्रचंडींविधिवच्छृणुविष्णोमहामते राज्यभ्रंशेमहोत्पातेजनमारेमहाभये गजमारेऽश्वमारेचपरचक्रभयेतथा इत्यादिविविधेदुःखेक्षयरोगादिजेभये सहस्रचंडिकापाठंकुर्याद्वाकारयेत्तथा जापकास्तुशतंप्रोक्ताविंशद्धस्तश्चमंडपः भोज्याःसहस्रंविप्रेंद्रागोशतंदक्षिणांदिशेत् गुरवेद्विगुणंदेयंशय्यादानंतथैवच सप्तधान्यंचभूदानंश्वेताश्वंचमनोहरम् पंचनिष्कमितामूर्तिःकर्तव्यावार्धमानतः अष्टादशभुजादेवीसर्वायुधविभूषिता अवारितान्नंदातव्यंसहस्रंप्रत्यहंप्रभो शतंवानियताहारःपयःपानेनवर्तयेत् एवंयश्चंडिकापाठंसहस्रंतुसमाचरेत् तस्यस्यात्कार्यसिद्धिस्तुनात्रकार्याविचारणेति एतद्वयंयद्यपिमहानिबंधेषुनास्तितथापिप्रचरद्रूपत्वादुक्तमितिदिक् ।

## यानंतर सहस्रचंडीविधान.

ती सहस्रचंडी तेथेंच सांगतो "सहस्रचंडीचें विधान यथाविधि सांगतों श्रवण कर. राज्यनाश, मोठा उत्पात, जनमार ( महामारी, ग्रंथिक संनिपात वगैरे ), महाभय, गजमार, अश्वमार, शत्रुभय इत्यादिक अनेक दुःखें, क्षयरोगादि भय यांतून कोणतेंही प्राप्त असतां सहस्रचंडीपाठ करावा किंवा करवावा. त्याविषयीं पाठकर्ते शंभर ब्राह्मण असावे. वीस हस्तपरिमित मंडप असावा. सहस्र ब्राह्मणभोजन करावें. शंभर गाई दक्षिणा द्यावी. गुरूस दुप्पट दक्षिणा द्यावी. व शय्या, सप्तधान्यें, भूमि, पांढरा सुंदर घोडा हीं द्यावीं. पांच निष्क ( २० तोळे ) सुवर्णाची देवीची मूर्ति करावी. अथवा त्याचे अर्ध ( १० तोळे ) सुवर्णाची करावी. ती अष्टादश ( १८ ) भुजांची व सर्व आयुधांनीं युक्त सुंदर करावी. प्रतिदिवशीं अवारित ( जो येईल त्यास ) व सहस्र ब्राह्मणांस अन्न द्यावें. आणि पाठाविषयीं वरलेल्या शंभर ब्राह्मणांस फलाहार व दुग्ध द्यावें. असा सहस्रचंडीपाठ जो करील त्याचीं सर्व कार्ये सिद्ध होतील यांत संशय नाहीं" हीं दोन ( शतचंडी व सहस्रचंडी ) जरी महानिबंधांमध्यें सांगितलीं नाहींत तथापि यांचा प्रचार असल्यावरून सांगितलीं आहेत. ही दिशा दाखविली आहे.

**वाराहीतंत्रे** संकटेसमनुप्राप्तेदुश्चिकित्स्यामयेतथा जातिभ्रंशेकुलोच्छेदेऽप्यायुषोनाशआगते वैरिवृद्धौव्याधिवृद्धौधननाशेतथाक्षये तथैवत्रिविधोत्पातेतथाचैवोपपातके कुर्याद्यत्नाच्छतावृत्तंततःसंपद्यतेशुभम् श्रेयोवृद्धिःशतावृत्ताद्राज्यवृद्धिस्तथापरा मनसाचिंतितंदेविसिद्ध्येदष्टोत्तराच्छतात् सहस्रावर्तनाल्लक्ष्मीरावृणोतिस्वयंस्थिरा भुक्त्वामनोरथान्कामान्नरोमोक्षमवाप्नुयात् चंड्याःशतावृत्तिपाठात्सर्वाःसिद्ध्यंतिसिद्धयः इति **शतचंडीसहस्रचंडीविधिः ।**

वाराहीतंत्रांत "संकट प्राप्त झालें असतां, चिकित्सा करण्यास कठिण रोग, जातिभ्रंश, कुलाचा उच्छेद, आयुष्यनाश, शत्रुवृद्धि, रोगवृद्धि, धननाश, क्षय, त्रिविध ( दिव्य, भौम, अंतरिक्ष ) उत्पात, उपपातक, हीं प्राप्त झालीं असतां शंभर पाठ करावे, तेणेंकरून शुभ होतें. शंभर पाठांनीं श्रेयोवृद्धि व राज्यवृद्धि होते. अष्टोत्तरशत ( १०८ ) पाठांनीं मनांतील चिंतितकार्य सिद्ध होतें. सहस्रपाठांनीं लक्ष्मी स्थिर होऊन राहते व मनोरथ भोगून मनुष्य मोक्षातें पावतो. चंडीच्या शंभर पाठांनीं सर्व सिद्धि होतात." असा शतचंडीचा व सहस्रचंडीचा विधि समजावा.

---

१ येथें प्रधानहोमानंतर ग्रहांचा होम लिहिला आहे तथापि तो पहिल्यानें करून नंतर प्रधानहोम इष्ट आहे.

अथनवरात्रपारणानिर्णयः साचदशम्यांकार्या आश्विनेमासिशुक्लेतुकर्तव्यंनवरात्रकम् प्रतिपदादिक्रमेणैव यावच्चनवमीभवेत् त्रिरात्रंवापिकर्तव्यंसप्तम्यादियथाक्रममितिहेमाद्रौधौम्यवचनात् नवमीतिथिपर्यंतंवृद्ध्यापूजाजपादिकमितिप्रागुक्तवचनैर्नवमीपर्यंतंप्रधानभूतपूजाद्युक्तेरुपवासादेश्चांगत्वेनतत्पर्यंतत्वात् आदिशब्देनोपवासोक्तेः पूर्वोक्तत्रिरात्रव्रतेनवम्याअप्युपोष्यत्वाच्च नचपारणांतत्वेनत्रिरात्रत्वं विष्णुत्रिरात्रादौतथा प्रसक्तेः नचात्रोपवासेमानाभावइतिवाच्यम् एवंचविंध्यवासिन्यांनवरात्रोपवासतः एकभक्तेननक्तेनतथैवायाचितेनच पूजनीयाजनैर्देवीस्थानेस्थानेपुरेपुरइतिहेमाद्रौभविष्योक्तेः नवरात्रसमाख्यातोनवम्याअप्युपोष्यत्वाच्च ननुतिथिह्रासेऽष्टावप्युपवासाभवंतीतिकथंसमाख्या तेनकर्मविशेषेनवरात्रशब्दोरूढः अतएवोक्तंदेवीपुराणे तिथिवृद्धौतिथिह्रासेनवरात्रमपार्थकमितिचेन्न तिथिह्रासेपिनवतिथीनामुपोष्यत्वान्नवरात्रत्वाक्षतेः एतेन रात्रीणांप्राधान्यान्नह्रासेअमामादायनवत्वमितिमूर्खोक्तिःपरास्ता यत्तुदेवीपुराणे कन्यासंस्थेरवौशक्रशुक्लामारभ्यनंदिकाम् अयाचीह्यथवैकाशीनक्ताशीप्यथवांब्वदइतिव्रतचतुष्टयमुक्तंतल्लौहाभिसारिकविषयम् तस्य जयाभिलाषीनृपतिःप्रतिपत्प्रभृतिक्रमात् लौहाभिसारिकंकर्मकारयेद्यावदष्टमीमितिभविष्येऽष्टमीपर्यंतत्वमेवोक्तेः रूपनारायणेनतुनंदादिव्रतप्रयोगंपृथगेवोक्त्वातस्यनवम्यांपारणमुक्तम् यदपिनिर्णयदीपे आश्विनेशुक्लपक्षेतुनवरात्रमुपोषितः नवम्यांपारणंकुर्याद्दशमीमिश्रितानचेत् दशमीमिश्रितायत्रपारणेनवमीभवेत् दुःखदारिद्र्यदाज्ञेयातथाव्रतविनाशिनीतिब्राह्मनाम्नालिखितंवचनं यच्चरुद्रयामलइतिवदंति अष्टम्यामहकार्यास्यान्नवमीपारणादिने योमोहाद्दशमीवेधेनवम्यांचंडिकांयजेत् पारणंचप्रकुर्याद्वैतस्यपुण्यंनिरर्थकम् नवम्यांपारितादेवीकुलवृद्धिंप्रयच्छति दशम्यांपारितादेवीकुलनाशंकरोतिवै तस्मात्तुपारणंकुर्यान्नवम्यांविबुधाधिपेत्यादीनि तानिर्यादिसमूलानितदालौहाभिसारिकनंदादिव्रतचतुष्टयविषयाणि तस्याऽष्टमीपर्यंतत्वमेवोक्तेरित्युक्तंप्राक् अन्यथामहाष्टम्यांपरविद्धायांपारणाविधानेपूर्वनिबंधैर्विरोधोदुर्वारःस्यात् यानितुकैश्चिल्लिखितानिनवम्यांपारणाविधायकानिवचनानितानिहेमाद्र्यादिविरुद्धत्वान्निर्मूलानि समूलत्वेपियदाविनेंद्वयेनवमीतदाद्वितीयेदिनउपोष्यतिथ्यंतेपारणान किंतुनवमीमध्येकार्येत्येवंनेयानि शिवरात्रिपारणावत् ।

## आतां नवरात्रपारणानिर्णय सांगतो.

ती पारणा दशमीचेठायीं करावी. कारण, "आश्विनमहिन्यामध्यें शुक्लपक्षांत नवरात्र करावें, तें प्रतिपदेपासून नवमीपर्यंत करावें. अथवा सप्तमीपासून त्रिरात्र करावें." ह्या हेमाद्रींतील धौम्यवचनावरून; व "नवमी तिथीपर्यंत वृद्धीनें पूजा, जप, उपवास इत्यादिक करावीं" ह्या पूर्वोक्त वचनांनीं नवमीपर्यंत मुख्य पूजादिक सांगितल्यावरून उपवासादिक अंगभूत कर्मे तेथपर्यंत करावीं, असें झालें आहे. 'जपादिक' येथें आदिशब्दानें उपवास सांगितला आहे. आणि पूर्वोक्त त्रिरात्रव्रतांत नवमीचेंही उपोषण सांगितलें आहे. आतां तें त्रिरात्रव्रत असें होतें कीं, दोन दिवस उपोषण व तिसऱ्या दिवशीं पारणा, असें केल्यानें पारणापर्यंत व्रत धरून तें त्रिरात्र होतें, असें म्हणूं ! तर तसें म्हणतां येणार नाहीं. कारण, विष्णुत्रिरात्रादि व्रताचेठायीं देखील तसा प्रसंग ( पारणासहित त्रिरात्र ) येईल. आतां ह्या नवरात्रव्रताचेठायीं उपवास करण्याविषयीं प्रमाण नाहीं, असें म्हणूं ! तर असें म्हणतां कामा नये; कारण, "नवरात्र उपवास किंवा एकभक्त किंवा नक्त अथवा अयाचितभक्षण करून नगरानगरामध्यें जागोजागां विंध्यवासिनी देवीचें पूजन करावें." असें हेमाद्रींत भविष्यवचन आहे आणि नवरात्र असें नाम असल्याकारणानें नवमीचे दिवशींही उपोषण आवश्यक आहे. शंका—तिथिक्षय असतां जर आठही उपवास होतात तर नवरात्र असें नाम कसें ? यावरून विशेष कर्माचे ठायीं नवरात्र शब्द रूढ आहे. नव रात्रींनीं होणारें तें नवरात्र असा यौगिक समजूं नये. म्हणूनच देवीपुराणांत सांगतो. "तिथिवृद्धि व तिथिक्षय असतां नवरात्र शब्द व्यर्थ आहे." यावरून नवरात्र शब्द अन्वर्थक होण्याकरितां नवमीचे दिवशींही उपोषण करावें, असें नाहीं ? समाधान—'नवरात्र' हा शब्द नऊ रात्रींचा बोधक यौगिकच आहे. रात्रि म्हणजे तिथि समजावी. तिथिक्षय असला तरी नऊ तिथींचें

१ साचेति । संपूज्यप्रेषणंकुर्याद्दशम्यांशास्त्रवित्सवैरित्युक्तभविष्यात् । पारणस्य नियमत्यागरूपस्य विसर्जनोत्तरकालत्वात् तद्विसर्जनोत्तरंदशम्यामेवकार्यमित्यर्थः ॥ तत्रनियमंनवमीपर्यंतंदर्शयति आश्विनेइति ॥ २ विरोधइति अष्टमीविद्धायांनवम्यामप्युपवासविधानादितिभावः ॥ ३ दिनद्वयेनवमीति अष्टमीविद्धानवमीपरेद्युश्चनवमीत्यर्थः ॥ ४ द्वितीयेति दशमीमिश्रितानचेदित्यनेन उत्तरनवम्यांनवम्यंतेप्राप्तायाः पारणाया बाधस्यैवोक्तेरितिभावः ।

उपोषण होत असल्यामुळें नवरात्रत्व नष्ट होत नाहीं. 'नवरात्र' या पदांत रात्र शब्द तिथिबोधक आहे. यावरून, रात्री प्रधान असल्यामुळें तिथिक्षय असतां अमावास्या धरून नऊ रात्रि कराव्या, असें मूर्खानें सांगितलें तें खंडित झालें. आतां जीं **देवीपुराणांत**—"कन्यासंक्रांतीस सूर्य असतां शुक्लप्रतीपदेस आरंभ करून अयाचित अथवा एकभुक्त किंवा नक्त अथवा उदकभक्षण करावें" अशीं चारप्रकारचीं व्रतें सांगितलीं; तीं पूर्वोक्त लौहाभिसारिक कर्मविषयक आहेत. कारण, तें लौहाभिसारिक कर्म "जयेच्छु राजानें प्रतिपदेपासून अनुक्रमानें अष्टमीपर्यंत लौहाभिसारिक कर्म करवावें" ह्या **भविष्य**वचनांत अष्टमीपर्यंतच सांगितलें आहे. **रूपनारायणानें** तर-प्रतिपदादि व्रतप्रयोग वेगळाच सांगून त्याची नवमींत पारणा सांगितली आहे. आणि जें **निर्णयदीपांत**—"आश्विनशुक्लपक्षांत नवरात्र उपोषण करून दशमीमिश्रित नसेल त्या नवमींत पारणा करावी. जेथें पारणाविषयीं दशमीमिश्रित नवमी असेल तेथें ती नवमी दुःखदारिद्र्य देणारी व व्रतनाश करणारी होते" असें ब्रह्मपुराणांतील म्हणून लिहिलेलें वचन तें; आणि जें **रुद्रयामलांत** म्हणून सांगतात कीं, "अष्टमीयुक्त नवमींत पारणा करावी. जो मोहानें दशमीयुक्त नवमींत चंडिकेचें पूजन करील व पारणाही करील त्याचें पुण्य निरर्थक होईल. देवीची पारणा नवमीस केली तर कुलवृद्धि होते, व दशमीस देवीची पारणा केली तर कुलनाश होतो; तस्मात् नवमीस पारणा करावी." इत्यादि वचनें तीं जर समूल असतील तर लौहाभिसारिक कर्मांत जीं चार व्रतें सांगितलीं तद्विषयक जाणावीं. तें लौहाभिसारिक कर्म अष्टमीपर्यंतच करावें, असें पूर्वीं सांगितलें आहे. तसें नसेल तर परविद्ध महाष्टमीचेठायीं ( नवमींत ) पारणाविधान केलें असतां वर सांगितलेल्या ग्रंथांशीं विरोध निवारण करण्यास अशक्य होईल. आतां जीं केचित् ग्रंथकारांनीं वचनें नवमीचेठायीं पारणा करण्याविषयीं लिहिलीं आहेत, तीं हेमाद्र्यादि ग्रंथविरुद्ध असल्यामुळें निर्मूल होत, समूल असलीं तरी जेव्हां दोनदिवशीं नवमी असेल तेव्हां दुसऱ्या ( उर्वरित ) नवमीदिवशीं उपोषण केलेल्या तिथीच्या अंतीं पारणा करूं नये, तर नवमीमध्यें करावी, अशाविषयीं लावावीं. जशी शिवरात्रीची पारणा दुसऱ्या दिवशीं चतुर्दशींत सांगितली, तद्वत्.

अत्र**केचि**त्पारणाहेसूतकादिप्राप्तौतदतिक्रम्यपारणांकुर्यादित्याहुः तन्मंदम् काम्योपवासेप्रक्रांतेत्वंतरामृतसूतके तत्रकाम्यव्रतंकुर्याद्दानार्चनविवर्जितमिति**माधवीयेकौर्मोक्तेः** [१]व्रतयज्ञविवाहेषुश्राद्धेहोमेर्चनेजपे प्रारब्धेसूतकंनस्यादनारब्धेतुसूतकमिति**विष्णु**वचनाच्चाशौचमध्येपितत्कर्तव्यतावगतेः पारणांतत्वाद्व्रतस्य-प्रारंभस्तुतेनैवोक्तः प्रारंभोवरणंयज्ञेसंकल्पोव्रतसत्रयोः नांदीमुखंविवाहादौश्राद्धेपाकपरिक्रियेति **रुद्रयामलेपि** सूतकेपारणंकुर्यान्नवम्यांहोमपूर्वकम् तदंतेभोजयेद्विप्रान्दानंदद्याच्चशक्तितइति तदंतेसूतकांते एवंस्त्रीभिरपिरजोदर्शनमध्येकर्तव्यमेवपारणम् संप्रवृत्तेपिरजसिनत्याज्यंद्वादशीव्रतमिति**माधवीयेऋष्यशृंग**वचनात् द्वादशीव्रतमित्युपलक्षणम् [२]प्रारब्धदीर्घतपसांनारीणांयद्रजोभवेत् नतत्रापिव्रतस्यस्यादुपरोधःकदाचनेतितत्रैव**सत्यव्रत**वचनात् किंच एकादश्यादौपंचषाशौचपातेमासांतेपारणापत्तिः मासोपवासांतेपंचषाशौचपातेजीवनासंभवश्च यत्तु नियमस्थायदानारीप्रपश्येदंतरारजः उपोष्यैवतुतारात्रीःस्नात्वाशेषंचरेद्व्रतमित्यंगिरोवचनम् यच्च**हारीत**वचनम् नियमस्थाव्रतस्थास्त्रीरजःपश्येत्कथंचन त्रिरात्रंतुक्षिपेदूर्ध्वंव्रतशेषंसमापयेत् तद्विधवोपवासविषयम् तासांतत्रभोजननिषेधादिति**केचित्** [३]वयंतुप्रागुक्तसत्यव्रतवचनेदीर्घतपसामिति विशेषणोपादानाद्द्वादशीव्यतिरिक्तसकलैकाहोपवासविपयोऽयंनिषेधः त्रिरात्रनवरात्रादिदीर्घव्रतेषुतुरजोमध्येपारणेतिभ्रमः आशौचमध्येतुसर्वापिपारणाभवतिप्रागुक्तकौर्मवचनादितिसिद्धम् अयंचोपवासपारणानिर्णयःसर्वव्रतेषुबोद्धव्यइत्यलंभूयसा ।

येथें केचित् ग्रंथकार—पारणादिवशीं सूतकादिक प्राप्त असतां तें गेल्यानंतर पारणा करावी असें म्हणतात. तें त्यांचें म्हणणें मंद आहे. कारण, "काम्य उपवासाचा आरंभ केल्यावर मध्यें मृताशौच येईल तर आशौचामध्यें काम्यव्रत करावें. दान व पूजन करूं नये." ह्या **माधवीयांतील** कौर्मवचनावरून; व "व्रत, यज्ञ, विवाह, श्राद्ध, होम, पूजन, जप यांचा आरंभ केला असतां सूतक असलें तरी सूतक नाहीं. प्रारंभ केला नसेल तर सूतक आहे" ह्या **विष्णु**वचनावरूनही आरंभिलेलें व्रत आशौचामध्येंही करावें असें होतें. व्रत पारणा होईपर्यंत आहे. प्रारंभ कोणता तो त्यानेंच सांगितला आहे—

१ व्रतशब्देन पारणाया अपि ग्रहणमिति भावः ॥ २ प्रारब्धेति यद्यपीदं दीर्घकालव्यापिमासोपवासाद्येकप्रयोगविषयं तथापि नियततिथ्यादिनिमित्तकेष्वपि प्रारब्धेषु योजयितुं शक्यमितिभावः ॥ ३ केचिदित्यरुचिः निषेधस्यरागप्राप्तगोचरत्वेन वैधपारणगोचरत्वायोगात् ॥ विधवायाभोजननिषेधादर्शनाच्चेति ॥

"यज्ञाचा प्रारंभ ब्राह्मणवरण; व्रत व सत्र यांचा प्रारंभ संकल्प; विवाहादिकांचा प्रारंभ नांदीश्राद्ध; आणि धाजाचा प्रारंभ पाकनिष्पत्ति होय." **रुद्रयामलांत**ही "सूतकामध्यें नवमीस होम करून पारणा करावी व सूतकाचे समाप्तीनंतर ब्राह्मण-भोजन करून यथाशक्ति दक्षिणा द्यावी." असेंच स्त्रियांनींही रजोदर्शनामध्यें पारणा करावी. कारण, "रजोदर्शन झालें असतांही द्वादशीव्रत सोडूं नये." असें **माधवीयांत ऋष्यशृंग**वचन आहे. द्वादशीव्रत म्हटलें तें इतर व्रतांचें उपलक्षण आहे. कारण, "दीर्घ तपास आरंभ केलेल्या स्त्रियांस त्या तपामध्यें जें रजोदर्शन होतें त्या अवस्थेंतही कधींच व्रतलोप होत नाहीं." असें **माधवीयांतच सत्यव्रत**वचन आहे. आणखी असें कीं, जर आशौचावस्थेंत पारणा होत नसेल तर एकादश्यादिक व्रताचेठायीं एकानंतर दुसरें, त्यानंतर तिसरें, असें आशौच एकावर एक पांच सहावेळ प्राप्त असतां आसाचे अंतीं पारणा प्राप्त होईल. मासोपवासव्रताचे अंतीं ( एकामागून दुसरें असें ) पांचसहावार आशौच प्राप्त असतां पारणाच असंभवही होईल. आतां जें "जेव्हां व्रतस्थ स्त्री असून मध्यें रजस्वला होईल तेव्हां ते विटाळाचे दिवस उपोषण करून स्नान केल्यानंतर राहिलेलं व्रत करावें" असें **अंगिराचें** वचन आणि जें **हारीत**वचन "नियम धरणारी व्रतस्थ स्त्री रजस्वला होईल तर तीन दिवस गेल्यानंतर तिनें शेष राहिलेलें व्रत समाप्त करावें" तें विधवेच्या उपवासाविषयीं जाणावें. कारण, त्यांस रजोदर्शनावस्थेंत भोजनाचा निषेध आहे; असें **केचित्** म्हणतात. आम्ही तर पूर्वोक्त सत्यव्रतवचनामध्यें 'दीर्घतपसां' असें विशेषण असल्यामुळें द्वादशीवांचून इतर सकल एकदिवस उपवासाचे पारणेविषयीं हा अंगिरानें व हारीतानें सांगितलेला निषेध होय. त्रिरात्र, नवरात्र इत्यादिक दीर्घव्रताविषयीं तर रजोदर्शनामध्येंही पारणा होते, असें सांगतों. पूर्वोक्त कौर्मवचनावरून आशौचामध्यें तर सारी पारणा होते, असें सिद्ध झालें. हा उपवासाचे पारणेचा निर्णय सर्व व्रतांविषयीं जाणावा. आतां बहुत सांगणें पुरे करितों.

दशम्यांदेवींविसर्जयेत् तदुक्तं**दुर्गाभक्तितरंगिण्यांदेवीपुराणे** ततःप्रातःपूजयित्वादशम्यांविधिपूर्वकम् संप्रेषणंतुकर्तव्यंगीतवादित्रनिःस्वनैः रूपंदेहियशोदेहिभगंभगवतिदेहिमे पुत्रान्देहिधनंदेहिसर्वकामांश्चदेहिमे महिषघ्निमहामायेचामुंडेमुंडमालिनि आयुरारोग्यमैश्वर्यंदेहिदेविनमोस्तुते इतिसंप्रार्थ्यदेवींतु-ततउत्थापयेद्बुधः उत्तिष्ठदेविचंडेशिशुभांपूजांप्रगृह्यच कुरुष्वममकल्याणमष्टाभिःशक्तिभिःसह गच्छगच्छपरंस्थानंस्वस्थानंदेविचंडिके व्रजस्रोतोजलंवृद्ध्यैस्थीयतांचजलेत्विहेति उत्थाप्यजलंनीत्वा दुर्गेदेविजगन्मातः-स्वस्थानंगच्छपूजिते संवत्सरेव्यतीतेतुपुनरागमनायवै इमांपूजांमयादेवियथाशक्त्योपपादिताम् रक्षार्थंत्वं-समादायव्रजस्वस्थानमुत्तममितिजलेप्रवाहयेत् ।

दशमीचेठायीं देवीचें विसर्जन करावें. तें सांगतो—**दुर्गाभक्तितरंगिणींत देवीपुराणांत**—"नंतर दशमीस प्रातःकाळीं यथाविधि पूजन करून गायन, वाद्यें यांच्या शब्दांनीं देवीचें संप्रेषण ( विसर्जन ) करावें. **प्रार्थनेचे मंत्र—रूपं देहि यशो देहि भगं भगवति देहि मे ॥ पुत्रान् देहि धनं देहि सर्वकामांश्च देहि मे ॥ महिषघ्नि महामाये चामुंडे मुंडमालिनि ॥ आयुरारोग्यमैश्वर्यं देहि देवि नमोस्तु ते ॥** अशी देवीची प्रार्थना करून नंतर उत्थापन करावें. उत्थापनाचा मंत्रः—**उत्तिष्ठ देवि चंडेशि शुभां पूजां प्रगृह्य च ॥ कुरुष्व मम कल्याणमष्टाभिः शक्तिभिः सह ॥ गच्छ गच्छ परं स्थानं स्वस्थानं देवि चंडिके ॥ व्रज स्रोतोजलं वृद्ध्यै स्थीयतां च जले त्विह** ॥ असें उत्थापन करून उदकाजवळ नेऊन—**दुर्गे देवि जगन्मातः स्वस्थानं गच्छ पूजिते ॥ संवत्सरे व्यतीते तु पुनरागमनाय वै ॥ इमां पूजां मया देवि यथाशक्त्योपपादितां ॥ रक्षार्थं त्वं समादाय व्रज स्वस्थानमुत्तमं** ॥ या मंत्रानें उदकांत वाहवावी."

इयमेवविजयादशमी साचद्वितीयदिनेश्रवणयोगाभावेपूर्वाग्राह्या तदुक्तं**हेमाद्रौस्कांदे** दशम्यांतुनरैः सम्यक्पूजनीयापराजिता ऐशानींदिशमाश्रित्यअपराह्णेप्रयत्नतः यापूर्णानवमीयुक्तातस्यांपूज्याऽपराजिता क्षेमार्थंविजयार्थंचपूर्वोक्तविधिनानरः नवमीशेषयुक्तायांदशम्यामपराजिता ददातिविजयंदेवीपूजिताजयवर्धिनी तथा आश्विनेशुक्लपक्षेतुदशम्यांपूजयेन्नरः एकादश्यांनकुर्वीतपूजनंचापराजितमिति यदातुपूर्वेद्युरश्रवणयोगाभावःपरदिनेचाल्पापितद्योगिनीतदापरैव तथाच**हेमाद्रौव्रतकांडेकश्यपः** उदयेदशमीकिंचित्संपूर्णैकादशीयदि श्रवणर्क्षंयदाकालेसातिथिर्विजयाभिधा श्रवणर्क्षेतुपूर्णायांकाकुत्स्थःप्रस्थितोयतः उल्लंघयेयुःसीमानंतद्दिनर्क्षेततोनराइति कालेऽपराह्णे परदिनेअपराह्णेश्रवणाभावेतुसर्वपक्षेषुपूर्वैव **मनुनरसेऽप्येवम्** **ज्योतिर्निबंधेरत्नकोशेचनारदः** ईषत्संध्यामतिक्रांतःकिंचिदुद्भिन्नतारकः विजयोनामकालोयंसर्व-

**कार्यार्थसिद्धिदः** इषस्यदशमींशुक्लांपूर्वविद्धांनकारयेत् श्रवणेनापिसंयुक्तांराज्ञांपट्टाभिषेचने सूर्योदयेयदाराजन् दृश्यतेदशमीतिथिः आश्विनेमासिशुक्लेतुविजयांतांविदुर्बुधाः अत्रायंनिर्गलितोर्थः अपराह्णोमुख्यःकर्मकालःतत्रैवपूजाद्युक्तेः प्रदोषोगौणः तत्रदिनद्वयेऽपराह्णव्यापित्वेपूर्वा प्रदोषव्याप्तेराधिक्यात् दिनद्वयेप्रदोषव्यापित्वेपरा अपराह्णव्याप्तेराधिक्यात् श्रवणस्तुरोहिणीवदप्रयोजकः दिनद्वयेऽपराह्णास्पर्शेतुपूर्वा तत्रापिपरदिनेऽपराह्णेश्रवणसत्त्वेपरैवेतिदिक् ।

आश्विनशुक्लदशमी हीच विजयादशमी. ती विजयादशमी दुसऱ्या दिवशीं श्रवणयोग नसतां पूर्वा घ्यावी. तें सांगतो **हेमाद्रींत स्कांदांत**–"पुरुषांनीं दशमीचेठायीं ईशानी दिशेस जाऊन अपराह्णीं यथाविधि अपराजिता देवीचें पूजन करावें. नवमीयुक्त दशमीचेठायीं कल्याणासाठीं व विजयासाठीं पूर्वोक्तविधीनें अपराजितेचें पूजन पुरुषांनीं करावें. नवमीयुक्त दशमीचेठायीं अपराजितेचें पूजन केलें असतां ती जय वाढविणारी देवी विजय देते." तसेंच "आश्विनशुक्लदशमीस अपराजितेचें पूजन करावें. एकादशीस अपराजितेचें पूजन करूं नये." जेव्हां पूर्वदिवशीं श्रवणयोग नसेल व परदिवशीं अल्पही दशमी श्रवणयुक्त असेल तेव्हां पराच करावी. तसेंच **हेमाद्रींत व्रतकांडांत कश्यप**–"उदयकाळीं किंचित् दशमी व सर्वदिवस एकादशी जर असेल आणि अपराह्णीं श्रवणनक्षत्र असेल ती तिथि विजया होय. कारण, दशमीचेठायीं श्रवणनक्षत्रावर रामानें प्रस्थान केलें आहे यास्तव त्या दिवशीं व त्या नक्षत्रावर मनुष्यांनीं सीमेचें उल्लंघन करावें." दुसऱ्यादिवशीं अपराह्णीं श्रवण नसेल तर सर्वपक्षीं पूर्वाच करावी. **मदनरत्नांत**ही असेंच सांगितलें आहे. **ज्योतिर्निबंधांत व रत्नकोशांत नारद**—"संध्यासमय किंचित् जाऊन कांहीं नक्षत्रें दिसूं लागलीं म्हणजे तो काल **विजय**नांवाचा आहे. हा सर्व कार्यांची सिद्धि करितो. आश्विनशुक्लदशमी श्रवणनक्षत्रानेंही युक्त असली तरी राजांच्या पट्टाभिषेकाविषयीं नवमीयुक्त घेऊं नये. आश्विनशुक्लपक्षांत सूर्योदयीं जेव्हां दशमी असेल तेव्हां तिला विजया असें पंडित म्हणतात." **या वरील वचनांवरून निघालेला अर्थ** असा आहे कीं,—अपराह्णकाल हा मुख्य कर्मकाल. कारण, त्या कालींच पूजादिक सांगितलीं आहेत. प्रदोषकाल हा गौणकाल. त्यांत दोनदिवशीं अपराह्णव्यापिनी दशमी असतां पूर्वा करावी. कारण, पूर्वदिवशीं प्रदोषव्याप्ति अधिक आहे. दोनदिवशीं प्रदोषव्यापिनी असतां परा करावी. कारण, परदिवशीं अपराह्णव्याप्ति अधिक आहे. श्रवणनक्षत्र तर रोहिणीसारखें अप्रयोजक आहे. म्हणजे श्रवणाच्या अनुरोधानें निर्णय करावयाचा नाहीं. दोनदिवशीं अपराह्णीं दशमीचा स्पर्श नसेल तर पूर्वा करावी. त्यामध्येंही परदिवशीं अपराह्णीं श्रवण असेल तर पराच करावी. ही दिशा दाखविली आहे.

अत्रविशेषो**भार्गवार्चनदीपिकायांभविष्ये** शमीयुक्तंजगन्नाथंभक्तानामभयंकरम् अर्चयित्वाशमीवृक्षमर्चयेत्ततःपुनः शमीमंत्रस्तु**हेमाद्रौगोपथब्राह्मणे** अमंगलानांशमनींशमनींदुष्कृतस्यच दुःस्वप्ननाशिनींधन्यांप्रपद्येहंशमींशुभाम् तथा**भविष्ये** शमीशमयतेपापंशमीलोहितकंटका धारिण्यर्जुनबाणानांरामस्यप्रियवादिनी करिष्यमाणयात्रायांयथाकालंसुखंमया तत्रनिर्विघ्नकर्त्रीत्वंभवश्रीरामपूजितेइति तथा गृहीत्वासाक्षतामार्द्रांशमीमूलगतांमृदम् गीतवादित्रनिर्घोषैरानयेत्स्वगृहंप्रति ततोभूषणवस्त्रादिधारयेत्स्वजनैः सहेति अत्रैवबलनीराजनमुक्तं**कृत्यरत्ने तत्रमंत्रः** चतुरंगंबलंमह्यंनिररित्वंव्रजत्विह सर्वत्रविजयोमेस्तुत्वत्प्रसादात्सुरेश्वरीति **गौडनिबंधेज्योतिषे** कृत्वानीराजनंराजाबलवृद्ध्यैयथाक्रमं शोभनंखंजनंपश्येज्जलगोगोष्ठसन्निधौ अस्यफलानिशुभाशुभदेशाश्चतत्रैवज्ञेयाः ।

या विजयादशमीचेठायीं विशेष सांगतो **भार्गवार्चनदीपिकेंत भविष्यांत**—"भक्तांना अभय करणाऱ्या अशा शमीयुक्त भगवंताचें पूजन करून नंतर शमीवृक्षाचें पुनः पूजन करावें." शमीच्या पूजनाचा मंत्र **हेमाद्रींत गोपथब्राह्मणांत** आहे तो असाः—"**अमंगलानां शमनीं शमनीं दुष्कृतस्य च ॥ दुःस्वप्ननाशिनीं धन्यां प्रपद्येऽहं शमीं शुभां ॥**" **तसेंच भविष्यांत मंत्रः—"शमी शमयते पापं शमी लोहितकंटका ॥ धारिण्यर्जुनबाणानां रामस्य प्रियवादिनी ॥ करिष्यमाणयात्रायां यथाकालं सुखं मया ॥ तत्र निर्विघ्नकर्त्री त्वं भव श्रीरामपूजिते ॥"** या मंत्रानें पूजन करून नंतर "शमीवृक्षाच्या मुळांतील ओली माती अक्षतासहित घेऊन गीतवाद्यें वाजवीत आपल्या घरीं आणावी. नंतर भूषणें व वस्त्रें स्वजनांसहित धारण करावीं." या दशमीचे दिवशींच सैन्यास नीराजनविधि सांगतो—**कृत्यरत्नांत**—नीराजनमंत्रः—"**चतुरंगं बलं मह्यं निररित्वं व्रजत्विह ॥ सर्वत्रविज-**

---

१ जसा रोहिणीनक्षत्रानें जन्माष्टमीचा निर्णय नाहीं तसा श्रवणनक्षत्रानें दशमीचा निर्णय नाहीं. २ शमीरहितदेशेअश्मंतकं पूजयेदाचारात् ॥ अश्मंतकमहावृक्ष महादोषनिवारण ॥ इष्टानांदर्शनंदेहि शत्रूणांचनिवारयेति प्रार्थयेत् ॥

योमेस्तु त्वत्प्रसादात्सुरेश्वरि ॥" **गौडनिबंधांत ज्योतिषांत** "राजानें सैन्यवृद्धीकरितां अनुक्रमानें नीराजनविधि करून शुभकारक खंजनपक्ष्याचें दर्शन, उदकाजवळ किंवा गाईच्या गोठ्याजवळ करावें." या खंजनपक्ष्याच्या दर्शनाचीं फळें व शुभाशुभ प्रदेश **गौडनिबंधांतच** पाहावे.

आश्विनपौर्णमासीपराग्राह्या सावित्रीव्रतमंतरेणभवतोमापौर्णमास्यौपरेइति**दीपिकोक्तेः** अत्रविशेष-स्तिथि**तत्त्वेलैंगे** आश्विनेपौर्णमास्यांतुचरेज्जागरणंनिशि कौमुदीसासमाख्याताकार्यालोकैर्विभूतये कौमु-द्यांपूजयेल्लक्ष्मीमिंद्रमैरावतस्थितम् सुगंधिर्निशिसद्वेषअक्षैर्जागरणंचरेत् तथा निशीथेवरदालक्ष्मीःकोजागर्ती-तिभाषिणी तस्मैवित्तंप्रयच्छामिअक्षैःक्रीडांकरोतियइति ।

आश्विनपौर्णमासी परा घ्यावी. कारण, "सावित्रीव्रतावांचून अमावास्या व पौर्णमासी ह्या दुसऱ्या दिवशींच्या घ्याव्या." असें **दीपिका**वचन आहे. या पौर्णिमेचे दिवशीं विशेष कृत्य सांगतो–**तिथितत्त्वांत लिंगपुराणांत**—"आश्विन पौर्णमासीचे दिवशीं रात्रौ जागरण करावें. ती पौर्णिमा कौमुदी म्हटली आहे. लोकांनीं ऐश्वर्यप्राप्तीकरितां ती करावी. या कौमुदीचे ठायीं रात्रौ लक्ष्मी व ऐरावतावर बसलेला इंद्र यांचें पूजन करून सुगंधि द्रव्यें अंगास लावून उत्तम वेष (पोषाक) करून फांशांनीं खेळून जागरण करावें." तसेंच "मध्यरात्रीं वरदालक्ष्मी, 'कोण जागरण करीत आहे, जो फांशांनीं खेळून जागरण करीत असेल त्यास मी द्रव्य देतें' असें बोलते."

अत्रैवाश्वयुजीकर्मोक्तम**आश्वलायनेन** आश्वयुज्यामाश्वयुजीकर्मेति तच्छेषपर्वणिकार्यम् विकृतित्वात् तत्रपूर्वाह्णव्यापिनीग्राह्या दैवकर्मत्वात् आग्रयणंतुपर्वणिकार्यम् शरद्याग्रयणंनामपर्वणिस्यात्तदुच्यतइति**शौन-कोक्तेः** तत्रापिशेषपर्वणिकार्यमितिप्रागुक्तं तच्चव्रीहिभिरिष्ट्वाव्रीहिभिरेवयजेतयवेभ्योयवैरिष्ट्वायवैरेवयजे-तव्रीहिभ्यइतिश्रुत्यादर्शपूर्णमासयोरेककर्मत्वेनैकद्रव्यनियमाद्दर्शेष्ट्याःपरंपौर्णमासेष्ट्याश्चप्राग्भवतीति**हेमा-द्र्यादयः** दर्शेष्ट्याःपरमुक्तमाग्रयणकंप्राक्पौर्णमासाच्चतदिति**दीपिकोक्तेश्च** तच्चाग्रयणंत्रेधा व्रीह्याग्रयणं-यवाग्रयणंश्यामाकाग्रयणंचेति एषांकालः**श्रुतौ** गृहमेधीव्रीहियवाभ्यांशरद्वसंतयोर्यजेतश्यामाकैर्नीवारैर्वर्षा-स्वापत्कालेनान्येनपुराणैर्वेति **आपस्तंबोपि** वर्षासुश्यामाकैर्यजेत शरदिव्रीहिभिर्वसंतेयवैर्यथर्तुवेणुय-वैरिति तत्रापिश्यामाकाग्रयणमनित्यमितरेतुअनाहिताग्नेर्नित्ये यवाग्रयणंचकार्यमिति**स्मार्तवृत्तावुक्तत्वात् सूत्रे**व्रीहियवदेवतासंबद्धानामेवमंत्राणामाम्नानाच्च आहिताग्नेस्तुयवाग्रयणस्याप्यनित्यत्वम् अपिवाक्रियाय-वेष्विति**सूत्रात्** यद्वाव्रीह्याग्रयणेनसमानतंत्रता श्यामाकैस्तुप्रस्तरंकुर्याच्चाग्रयणम् यदिवातदपिसमानतंत्र-मित्यादि**नारायणवृत्तौ**परिश्रमवतांसुलभमित्यलम् ॥

याच पौर्णिमेस आश्वयुजीकर्म **आश्वलायन** सांगतो—"आश्विनी पौर्णिमेचे ठायीं आश्वयुजीकर्म करावें." तें आश्वयुजी-कर्म शेष (उर्वरित) पर्वाचे ठायीं करावें. कारण, ही विकृति आहे. त्या आश्वयुजीकर्माविषयीं पूर्वाह्णव्यापिनी पौर्णिमा घ्यावी. कारण, हें दैवकर्म आहे. आग्रयण तर पर्वाचे ठायीं (अमावास्येस किंवा पौर्णिमेस) करावें. "शरदृतूंत आग्रयण पर्वाचे ठायीं होतें, तें सांगतो." असें **शौनक**वचन आहे. तेंही उर्वरित पर्वाचे ठायीं करावें, असें पूर्वी सांगितलें आहे. तें आग्रयण, "यव होण्याच्या पूर्वी (पौर्णिमेस) व्रीहींनी होम करून (अमावास्येस) व्रीहींनींच होम करावा. व्रीहि होण्याच्या पूर्वी (पौर्णिमेस) यवांनीं होम करून (अमावास्येस) यवांनींच करावा." ह्या श्रुतीवरून दर्शपूर्णमासयाग हें एक कर्म असल्यामुळें एक द्रव्याचा नियम असल्याकारणानें (आग्रयण) दर्शेष्टीनंतर आणि पौर्णमासेष्टीच्या पूर्वी होतें, असें **हेमाद्रि**प्रभृति ग्रंथकार सांगतात. आणि "दर्शेष्टीनंतर व पौर्णमासेष्टीच्या पूर्वी तें आग्रयण सांगितलें आहे." असें **दीपिका**वचनही आहे. त्या आग्रयणाचे प्रकार तीन आहेत. व्रीह्याग्रयण, यवाग्रयण, आणि श्यामाकाग्रयण. त्या आग्रयणांचा काल सांगतो **श्रुतींत**—"गृहस्थाश्रम्यानें शरदृतूंत व्रीहींनीं आणि वसंतऋतूंत यवांनीं होम करावा. श्यामाक (सांवे), नीवार (तृणधान्यें) यांहींकरून वर्षाऋतूंत व आपत्कालीं होम करावा. इतर द्रव्यानें किंवा जुन्या व्रीह्यादिकांनीं होम करूं नये." **आपस्तंबही**—"वर्षाऋतूंत श्यामाकांनीं यजन करावें. शरदृतूंत व्रीहींनीं, वसंतांत यवांनीं यजन करावें. वेणु-यवांनीं ज्या ऋतूंत उत्पन्न होतील त्या ऋतूंत यजन करावें." त्या तीन आग्रयणांमध्यें श्यामाकाग्रयण अनित्य आहे.

---

१ शरद् आश्विनकार्तिकौ । वसंतः चैत्रवैशाखौ । वर्षाः श्रावणभाद्रपदौ । २ यथर्तुवेणुयवैरिति कात्यायनेन तु वेण्वो ग्रीष्म इति वेणुयवाग्रयणे ग्रीष्म एवोक्तः ॥ ३ श्यामाकचरुर्मभवे श्यामाकतृणैः प्रस्तरं कृत्वा स्रुवादुत्तरत आस्तीर्य तत्र स्रुचो निधानं तावतैव श्यामाकाग्रयणसिद्धिरिति वृत्तिकृन्नारायणइति सिंधुसारम् ॥

इतर दोन आग्रयणें तर अनाहिताग्नि ( आधान न केलेल्या ) गृहस्थाला नित्य आहेत. कारण, "व्रीह्याग्रयण करून यवाग्रयणही करावें." असें स्मार्तवृत्तींत सांगितलें आहे. आणि सूत्राचे ठायीं व्रीहि-यव देवतायुक्तच मंत्रही सांगितले आहेत. आहिताग्नीला तर यवाग्रयणही अनित्य आहे. कारण, 'अथवा क्रिया ( कर्में ) यवांचे ठायीं होतात' असें सूत्र आहे. अथवा आहिताग्नीला यवाग्रयण व्रीह्याग्रयणाशीं समानतंत्रानें ( एकतंत्रानें ) होतें. श्यामाकांनीं तर प्रस्तर करावा. म्हणजे श्यामाक तृणांचा प्रस्तर ( मुष्टि ) करून स्रुवेच्या उत्तरेस पसरून त्यावर स्रुचा ठेवावी, आग्रयण करूं नये. अथवा तें श्यामाकाग्रयणही एकतंत्रानें करावें इत्यादि प्रकार **नारायणवृत्तींत** सांगितला आहे, तो पाहण्याचा वगैरे परिश्रम करणारांस समजण्यास सुलभ आहे. इतकें सांगून पुरे करितों.

इदंचपर्वाभावेशुक्लपक्षेदेवनक्षत्रेकृत्तिकादिविशाखांतेकार्यमिति**स्मृत्यर्थसारे**उक्तम् **बौधायनीयेकेशवस्वामिना**प्येवमुक्तम् **परिशिष्टे** श्यामाकैर्व्रीहिभिश्चैवयवैश्चान्योन्यकालतः प्राग्यष्टुंयुज्यतेवश्यंनह्यत्राग्रयणात्ययः **त्रिकांडमंडनो**प्येवम् यदात्वेतदाश्विनपौर्णमास्यांक्रियतेतदैककालत्वादाश्वयुजीकर्मणोस्यचसमानतंत्रताभवति तदेतद्वृत्तिकृताएकबर्हिरिध्माज्येतिसूत्रेस्पष्टमुक्तम् अस्याकरणेप्रायश्चित्तमुक्तं**स्मृतिचंद्रिकायांकात्यायनेन** नित्ययज्ञात्ययेचैववैश्वदेवद्वयस्यच अनिष्ट्वानवयज्ञेननवान्नप्राशनेतथा भोजनेपतितान्नस्यचरुर्वैश्वानरोभवेत् **कारिकापि** अकृताग्रयणोऽश्नीयान्नवान्नंयदिवैनरः वैश्वानरायकर्तव्यश्चरुः पूर्णाहुतिस्तुवेति **ऋग्विधानेतु** समिंद्ररायामंत्रंचवर्षेवर्षेजपेच्छतम् आग्रयणंयदान्यूनंतदासंपूर्णमेतितदित्युक्तम् एतच्चापदिमलमासेकार्यमन्यथानेतिप्रागुक्तम् अन्योप्याहिताग्न्यादिविशेषःशौनकादेर्ज्ञेयइत्यलंबहुना इत्याश्विनमासः ॥

हें आग्रयण पर्वाचे अभावीं शुक्लपक्षांत कृत्तिकांपासून विशाखांपर्यंत ह्या देवनक्षत्रांवर करावें, असें **स्मृत्यर्थसारांत** सांगितलें आहे. **बौधायनी**यांत ( बौधायनसूत्रव्याख्येंत ) केशवस्वामीनें देखील असेंच सांगितलें आहे. **परिशिष्टांत** "व्रीहिकालाच्या पूर्वीं श्यामाकांनीं, यवकालाच्या पूर्वीं व्रीहींनीं, श्यामाककालाच्या पूर्वीं यवांनीं होम करावा. असें केलें असतां आग्रयणाचा अतिक्रम होत नाहीं." **त्रिकांडमंडन**ही असेंच सांगतो. जेव्हां हें आग्रयण आश्विनपौर्णमासीस करावयाचें असेल तेव्हां आश्वयुजीकर्म व आग्रयण यांचा एक काल असल्यामुळें एकतंत्रानें होतें, तो हा प्रकार 'एकबर्हिरिध्माज्यस्विष्टकृतः' ह्या गृह्यसूत्रावर वृत्तिकारानें स्पष्ट सांगितला आहे. आग्रयण न केलें असतां प्रायश्चित्त सांगतो—**स्मृतिचंद्रिकेंत कात्यायन**—"नित्ययज्ञाचा लोप असतां, सायंप्रातर्वैश्वदेवांचा लोप असतां, नवान्नानें होम न करितां नवान्नभक्षण झालें असतां, आणि पतितान्नाचें भोजन केलें असतां वैश्वानरचरु करावा." **कारिकाही**—"आग्रयण केल्यावांचून जर मनुष्य नवान्न भक्षण करील तर वैश्वानरदेवतेला चरु करावा, किंवा पूर्णाहुति करावी." **ऋग्विधानांत** तर—"प्रतिवर्षी 'समिंद्रराया०' ह्या मंत्राचा शंभर जप करावा, म्हणजे जेव्हां आग्रयण न्यून झालें असेल तेव्हां तें संपूर्ण होतें" असें सांगितलें आहे. हें आग्रयण आपत्काल असतां मलमासांत करावें. आपत्काल नसतां मलमासांत करूं नये, असें पूर्वीं सांगितलें आहे. आहिताग्नि इत्यादिकांचा इतरही विशेष शौनकादि ग्रंथावरून जाणावा. आतां बहुत सांगत नाहीं. **इति आश्विनमासः** ॥

अथकार्तिकमासः तुलासंक्रमेप्रागपरादशघटिकाःपुण्याः रात्रौतुप्रागुक्तम् अथ**कार्तिकस्नानम्** तत्र **पृथ्वीचंद्रोदयेविष्णुस्मृतिपाद्मयोः** तुलामकरमेषेषुप्रातःस्नानंविधीयते हविष्यंब्रह्मचर्यंचमहापातकनाशनमितिसौरमासउक्तः प्राच्याश्चैतदेवाद्रियंते **दाक्षिणात्यास्तु** आश्विनस्यतुमासस्ययाशुक्लैकादशीभवेत् कार्तिकस्यव्रतानीहतस्यांवैप्रारभेत्सुधीरिति**पाद्मोक्तेः भार्गवार्चने**च प्रारभ्यैकादशींशुक्लामाश्विनस्यतुमानवः प्रातःस्नानंप्रकुर्वीतयावत्कार्तिकभास्करइति**विष्णुरहस्योक्तेः हेमाद्रावादित्यपुराणे** पूर्णआश्वयुजेमासिपौर्णमास्यांसमाहितइत्युक्त्वा मासंसमग्रंपरयाचभक्त्यासमाप्यतेकार्तिकपौर्णमास्यामित्यंतेभिधानाच्चाश्विनशुक्लैकादश्यांपौर्णमास्यांवारभ्यकार्तिकशुक्लद्वादश्यांपौर्णमास्यांवासमापयेदित्याहुः **मदनपारिजातेविष्णुः** कार्तिकंसकलंमासंनित्यस्नायीजितेंद्रियः जपन्हविष्यभुक्शांतःसर्वपापैःप्रमुच्यते अत्रदेशविशेषः**पाद्मे** कार्तिकंप्रक्रम्य कुरुक्षेत्रेकोटिगुणोगंगायामपितत्समः ततोधिकःपुष्करेस्याद्द्वारवत्यांचभार्गव पुण्याःपुर्यश्चसप्तैवमुनयोमथुराधिका दुर्लभःकार्तिकोविप्रमथुरायांनृणामिह यत्रार्चितःस्वकंरूपंभक्तेभ्यः-

संप्रयच्छतीति इदंचस्नानंकाशीस्थपंचनदेप्यतिप्रशस्तम् शतंसमास्तपस्तप्त्वाकृतेयत्प्राप्यतेफलम् तत्कार्तिके-पंचनदेसकृत्स्नानेनलभ्यते कार्तिकेबिंदुतीर्थेयोब्रह्मचर्यपरायणः स्नात्यनुदितेभानौभानुजात्तस्यभीःकुत इत्यादिकाशीखंडोक्तेः भानुजोयमः ॥

## आतां कार्तिकमासकृत्यें सांगतो.

तुलासंक्रांतीच्या पूर्वीच्या दहा व पुढच्या दहा घटिका पुण्यकाल. रात्रीं संक्रांत असतां पुण्यकाल पूर्वी ( **प्रथम परिच्छेदांत** ) सांगितला आहे. **आतां कार्तिकस्नान** सांगतो—**पृथ्वीचंद्रोदयांत विष्णुस्मृतींत व पद्मपुराणांत**—"तुला, मकर, मेष या संक्रांतींत प्रातःस्नान, हविष्यभक्षण व ब्रह्मचर्यव्रत हीं करावीं म्हणजे महापातकाचा नाश होतो." याप्रमाणें हा सौरमास ( संक्रांतिमास ) सांगितला आहे. **प्राग्देशीय** लोक हा सौरमासच घेतात. **दाक्षिणात्य** तर, "आश्विनमासाचे शुक्लपक्षांतील एकादशीस कार्तिकाचे व्रतांचा आरंभ करावा" ह्या **पाद्मवचनावरून व भार्गवार्चनांतही** "आश्विनशुक्ल एकादशीस प्रारंभ करून कार्तिकशुक्ल द्वादशीपर्यंत मनुष्यानें प्रातःस्नान करावें" ह्या **विष्णुरहस्यवचनावरून** आणि **हेमाद्रींत आदित्यपुराणांत** "आश्विनमास पूर्ण झाला असतां पौर्णिमेचे ठायीं समाहितपणानें' असें सांगून "सर्व महिनाभर परमभक्तानें स्नान करून कार्तिकपौर्णिमेचे ठायीं समाप्त करावें" असें अंतीं सांगितल्यावरूनही आश्विनशुक्ल एकादशीस किंवा पौर्णिमेस प्रारंभ करून कार्तिकशुक्ल द्वादशीस किंवा पौर्णिमेस समाप्त करावें, असें सांगतात. **मदनपारिजातांत विष्णु**—"सर्व कार्तिकमासामध्यें जितेंद्रिय व शांत होऊन नित्यस्नान, जप व हविष्यान्नभोजन करणारा सर्व पापांपासून मुक्त होतो." ह्या कार्तिकस्नानाविषयीं विशेष देश **पद्मपुराणांत** कार्तिकमासाचा उपक्रम करून सांगतो—"कुरुक्षेत्रांत कार्तिकमास कोटिगुणित फल देणारा आहे. गंगेमध्येंही त्याच्या समान आहे. पुष्करतीर्थाचे ठायीं व द्वारकेंत त्याच्याहून अधिक फल देणारा आहे. सात पुरी ( अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंतिका, आणि द्वारावती ह्या ) पुण्यकारक आहेत; पण त्या सातांमध्यें मथुरापुरी अधिक पुण्यकारक आहे. मनुष्यांना मथुरेमध्यें कार्तिकमास प्राप्त होणें दुर्लभ आहे. इहलोकीं ज्या मथुरेंत पूजिलेला भगवान भक्तांना आत्मस्वरूप देतो." हें कार्तिकस्नान काशीतील पंचनद तीर्थांतही अति प्रशस्त आहे. कारण, "कृतयुगामध्यें शंभर वर्षे तप करून जें फल प्राप्त होतें तें फल कार्तिकमासांत पंचनदतीर्थांत एकवेळ स्नान केल्यानें प्राप्त होतें. कार्तिकमासांत जो मनुष्य ब्रह्मचर्यव्रत धारण करून सूर्योदयापूर्वी बिंदुमाधवतीर्थामध्यें स्नान करील त्याला यमाचें भय कोठून होणार ?" इत्यादिक **काशीखंडवचनें** आहेत.

इदंचप्रातःस्नानंसंध्यांचकृत्वाकार्यम् तेनविनेतरकर्मानधिकारादितिवर्धमानः यद्यपिप्रातःसंध्यायाःसूर्योदयेसमाप्तिस्तथापिवचनबलादनुदितहोमवद्भविष्यति स्नानमंत्रश्चतत्रैव कार्तिकेऽहंकरिष्यामिप्रातःस्नानं जनार्दन प्रीत्यर्थंतवदेवेशदामोदरमयासह इमंमंत्रंसमुच्चार्यमौनीस्नायाद्व्रतीनरइति अर्घ्यमंत्रोपितत्रैव व्रतिनः कार्तिकेमासिस्नातस्यविधिवन्मम गृहाणार्घ्यंमयादत्तंदनुजेंद्रनिषूदन नित्यनैमित्तिकेकृष्णकार्तिकेपापनाशने गृहाणार्घ्यंमयादत्तंराधयासहितोहरे इमौमंत्रौसमुच्चार्ययोऽर्घ्यंसम्प्रयच्छति सुवर्णरत्नपुष्पांबुपूर्णशंखेनपुण्यवान् सुवर्णपूर्णापृथिवीतेनदत्तानसंशयइति एवंसंपूर्णस्नानाशक्तौत्र्यहंस्नायात् वाराणस्यांपंचनदेत्र्यहंस्नातास्तुकार्तिके अर्मातपुण्यवपुषःपुण्यभाजोऽतिनिर्मलाइतिकाशीखंडोक्तेः ॥

हें कार्तिकस्नान प्रातःस्नान व संध्या हीं करून करावें. कारण, प्रातःस्नान व संध्या हीं केल्यावांचून इतर कर्मांस अधिकार नाहीं, असें **वर्धमान** सांगतो. जरी प्रातःसंध्येची समाप्ति सूर्योदयकालीं होते असें आहे, तथापि वचनबलानें जसा सूर्योदयाच्या पूर्वी अग्निहोत्रहोम होतो तसें सूर्योदयाच्या पूर्वी प्रातःसंध्या समाप्त करून हें कार्तिकस्नान होतें. **स्नानाचा मंत्र** तेथेंच सांगतो—"**कार्तिकेऽहं करिष्यामि प्रातःस्नानं जनार्दन ॥ प्रीत्यर्थं तव देवेश दामोदर मया सह** ॥ हा मंत्र म्हणून व्रती मनुष्यानें मौन धारण करून स्नान करावें." **अर्घ्याचा मंत्र**ही तेथेंच सांगतो—"**व्रतिनः कार्तिके मासि स्नातस्य विधिवन्मम ॥ गृहाणार्घ्यं मया दत्तं दनुजेंद्रनिषूदन ॥ नित्यनैमित्तिके कृष्ण कार्तिके पापनाशने ॥ गृहाणार्घ्यं मया दत्तं राधया सहितो हरे** ॥ हे दोन मंत्र म्हणून सुवर्ण, रत्न, पुष्प, उदक हीं शंखांत घालून शंखानें जो पुण्यवान भगवंताला अर्घ्य देतो त्यानें सुवर्णपूर्ण पृथिवी दिली यांत संशय नाहीं." याप्रकारें सर्व महिना स्नान करण्याला शक्ति नसेल तर तीन दिवस करावें. कारण, "वाराणसीमध्यें पंचनदतीर्थांत कार्तिकमासीं तीन दिवस ज्यांनीं स्नान केलें ते हे पुण्यात्मे, पुण्य भोगणारे अतिनिर्मल होतात" असें **काशीखंडवचन आहे.**

अथमालाधारणम् तत्रस्कांदेद्वारकामाहात्म्ये निवेद्यकेशवेमालांतुलसीकाष्ठसंभवाम् वहतेयोनरोभक्त्यातस्यवैनास्तिपातकम् नजह्यात्तुलसीमालांधात्रीमालांविशेषतः महापातकसंहर्त्रींधर्मकामार्थदायिनीम्

**विष्णुधर्मे** स्पृशेत्तुयानिलोमानिधात्रीमालाकलौनृणाम् तावद्वर्षसहस्राणिवैकुंठेवसतिर्भवेत् मालायुग्मंतुयोनित्यंधात्रीतुलसिसंभवम् वहतेकंठदेशेतुकल्पकोटिर्दिवंवसेन् तुलसीकाष्ठसंभूतेमालेकृष्णजनप्रिये बिभर्मित्वामहंकंठेकुरुमांकृष्णवल्लभम् एवंसंप्रार्थ्यविधिवन्मालांकृष्णगलेऽर्पिताम् धारयेत्कार्तिकेयोवैसगच्छेद्वैष्णवंपदमिति अत्रमूलंचिंत्यम् ॥

**आतां तुलसीकाष्ठमालाधारण.** त्याविषयीं **स्कंदपुराणांत द्वारकामाहात्म्यांत सांगतो**—"तुलसीकाष्ठांची माला भगवंताला निवेदन करून जो मनुष्य भक्तीनें धारण करितो त्याला पातक खरोखर नाहीं. तुलसीकाष्ठमाला व विशेषें-करून धात्री ( आमलकी ) काष्ठमाला टाकूं नये. कारण, ती महापापाचा नाश करणारी व धर्म, काम, अर्थ यांतें देणारी आहे." **विष्णुधर्मांत**—"कलियुगामध्यें आमलकीकाष्ठमाला मनुष्याच्या अंगावरील जितक्या रोमांला स्पर्श करील तितकीं सहस्र वर्षें वैकुंठांत वास होईल. धात्री व तुलसी यांच्या दोन माला जो नित्य कंठामध्यें धारण करितो तो कोटि-कल्पपर्यंत स्वर्गवास करितो. मालाधारणाचा **मंत्रः—तुलसीकाष्ठसंभूते माले कृष्णजनप्रिये ॥ बिभर्मि त्वामहं कंठे कुरु मां कृष्णवल्लभं** ॥ अशी प्रार्थना करून यथाविधि कृष्णाच्या कंठामध्यें अर्पण केलेली अशी माला कार्तिक-मासामध्यें जो धारण करील तो विष्णुलोकाप्रत जाईल." या मालाधारणवचनाविषयीं मूल प्रमाणाचा विचार करावा.

तथा**काशीखंडे** कार्तिकेमासिमेयात्रायैःकृताभक्तितत्परैः बिन्दुतीर्थकृतस्नानैस्तेषांमुक्तिर्नदूरतः **भार्गवार्चनदीपिकायांनृसिंहपुराणे** अगस्तिकुसुमैर्देवंयोऽर्चयेच्चजनार्दनं दर्शनात्तस्यदेवर्षेनरकंनाश्रुतेनरः विहायसर्वपुष्पाणिमुनिपुष्पेणकेशवम् कार्तिकेयोऽर्चयेद्भक्त्यावाजपेयफलंलभेत् **स्कांदेकार्तिकमाहात्म्ये** मालतीमालयाविष्णुःकेतक्याचैवपूजितः समाःसहस्रंसुप्रीतोभवेत्तेमधुसूदनः **पृथ्वीचंद्रोदयेपाद्मे** कार्तिकेनार्चितोयैस्तुकमलैःकमलेक्षणः जन्मकोटिषुविप्रेंद्रनतेषांकमलागृहे तथा कार्तिकेकेशवेपूजायेषांनाम्नासुतैःकृता तेनिर्भर्त्स्यरवेःपुत्रंवसंतित्रिदिवेसदा तुलसीदललक्षेणकार्तिकेयोऽर्चयेद्धरिम् पत्रेपत्रेमुनिश्रेष्ठमौक्तिकंलभतेफलम् तथा**स्कांदेकार्तिकमाहात्म्ये** धात्रीच्छायेतुयःकुर्यात्पिंडदानंमहामुने मुक्तिंप्रयांतिपितरःप्रसादान्माधवस्यतु धात्रीफलविलिप्तांगोधात्रीफलविभूषितः धात्रीफलकृताहारोनरोनारायणोभवेत् धात्रीच्छायांसमाश्रित्ययोऽर्चयेच्चक्रधारिणम् पुष्पेपुष्पेऽश्वमेधस्यफलंप्राप्नोतिमानवः तथा**स्कांदे** कार्तिकेमासिविप्रेंद्रधात्रीवृक्षोपशोभिते वनेदामोदरंविष्णुंचित्रान्नैस्तोषयेद्विभुम् मूलेनपायसेनाथहोमंकुर्याद्विचक्षणः ब्राह्मणान्भोजयेच्छक्त्यास्वयंभुंजीतबंधुभिरिति ॥

तसेंच **काशीखंडांत** "कार्तिकमासामध्यें भक्तियुक्त होऊन बिंदुमाधवतीर्थांत स्नान करून ज्यांनीं माझी ( भगवंताची ) यात्रा केली त्यांस मुक्ति दूर नाहीं." **भार्गवार्चनदीपिकेंत नृसिंहपुराणांत**—"अगस्तिपुष्पांनीं जनार्दन देवाचें जो पूजन करील त्याच्या दर्शनानें मनुष्यास नरक प्राप्त होत नाहीं. कार्तिकमासीं सर्व पुष्पें सोडून अगस्तिपुष्पानें केशवाचें जो भक्तीनें पूजन करील त्यास वाजपेययज्ञाचें फल प्राप्त होईल." **स्कंदपुराणांत—कार्तिकमाहात्म्यांत**—"मालती ( जाई, चमेली ) पुष्पांच्या मालेनें व केतकीपुष्पानें पूजिलेला भगवान् विष्णु हजार वर्षें संतुष्ट होतो." **पृथ्वीचंद्रोदयांत पद्मपुराणांत**—"कमलनेत्र भगवान् कार्तिकमासामध्यें ज्यांनीं कमलांनीं पूजिला नाहीं त्यांच्या घरीं लक्ष्मी कोटिजन्मपर्यंत राहाणार नाहीं." तसेंच "कार्तिकमासामध्यें केशवाची पूजा ज्यांच्या नांवानें पुत्रांनीं केली ते यमाची अवज्ञा करून ( यमलोक सोडून ) निरंतर स्वर्गवास करतात. कार्तिकमासीं लक्ष तुलसीपत्रांनीं जो हरीचें पूजन करील त्याला एक एक पत्राला मौक्तिक दानाचें फल प्राप्त होतें." तसेंच **स्कंदपुराणांत कार्तिकमाहात्म्यांत**—"आंवळीच्या छायेमध्यें जो पिंडदान करील त्याचे पितर भगवंताच्या प्रसादानें मुक्तीस जातात. धात्रीफलें वाटून अंगास लावणारा, धात्रीफलांनीं भूषित व धात्रीफलें भक्षण करणारा मनुष्य नारायण होतो. धात्री ( आमलकी ) छायेचा आश्रय करून जो भगवंताचें पूजन करितो तो मनुष्य पुष्पापुष्पाचे ठायीं अश्वमेधाचें फल पावतो." तसेंच **स्कंदपुराणांत**—"कार्तिकमासीं धात्रीवृक्षांनीं सुशोभित वनामध्यें दामोदर नामक विष्णूला नानाप्रकारच्या अन्नांनीं संतुष्ट करून ( नैवेद्य दाखवून ) मूलमंत्रानें पायसाचा होम करावा, आणि यथाशक्ति ब्राह्मणभोजन करून आपण बंधूंसह भोजन करावें.

तथा कार्तिकेद्विदलव्रतंप्रागुक्तं कार्तिकेद्विदलंत्यजेदिति **पाद्मेपिकार्तिकमाहात्म्ये** राजिकामाढकंचैवनैवाद्यात्कार्तिकव्रती द्विदलंतिलतैलंचतथान्यन्मतिदूषितम् **स्कांदेपि** कार्तिकेवर्जयेत्तद्वद्द्विदलंबहु-

बीजकम् मापमुद्गमसूराश्चचणकाश्चकुलित्थकाः निष्पावाराजमाषाश्चआढक्योद्विदलंस्मृतम् नूतनान्यपिजीर्णानिमर्वाण्येतानिवर्जयेत् अत्रकेचित्दुत्पत्तिसमयेदलद्वयंयस्यभवतितद्भूतपूर्वगत्याद्विदलमित्युच्यतइत्याहुः उदाहरंतिच बीजमेवसमुद्भूतंद्विदलंचांकुरंविना दृश्यतेयत्रसस्येपुद्विदलंतन्निगद्यतइति **अन्येतु**लक्षणायांमानाभावाद्वचनस्यनिर्मूलत्वाद्विदलात्मकंयस्यस्वरूपंतदेववर्जयेदित्याहुः तथा**नारदीये** कार्तिकेवर्जयेत्तैलंकार्तिकेवर्जयेन्मधु कार्तिकेवर्जयेत्कांस्यंकार्तिकेशुक्तसंधितम् कांस्यंतत्पात्रभोजनम् शुक्तंपर्युपितम् संधितंलवणशाकः तत्रैव कार्तिकेविष्णुमूर्त्यग्रेदीपदानाद्दिवंव्रजेत् तथा कार्तिकेतुकृतादीक्षानृणांजन्मविमोचनी तथा कार्तिकेकृच्छ्रसेवीयःप्राजापत्यपरोथवा एकांतरोपवासीवात्रिरात्रोपोपितोपिवा पड्वाद्वादक्षपक्षंवामासंवावरवर्णिनि एकभक्तेननक्तेनतथैवायाचितेनच उपवासेनभैक्षेणव्रजतेपरमंपदम् अन्येपिनियमाःप्रागुक्ताः ।

तसेंच कार्तिकमासीं द्विदलव्रत, म्हणजे 'कार्तिके द्विदलं त्यजेत्' ( कार्तिकांत द्विदल सोडावें ) असें पूर्वी चातुर्मास्यव्रत प्रकरणीं सांगितलें आहे. **पद्मपुराणांतही कार्तिकमाहात्म्यांत**—"राजिका ( राई, मोहरी ), तुरी, द्विदल ( दोन डाळिंबीचा पदार्थ ), तिळांचें तेल, आणि बुद्धीला दूषित करणारा दुसरा कोणताही पदार्थ हे कार्तिकव्रत करणारानें भक्षण करूं नयेत." **स्कंदपुराणांत**ही "कार्तिकमासामध्यें द्विदल व बहुबीज सोडावें. उडीद, मूग, मसुरा, चणे, कुळीथ, पावटे, चवळया, तुरी हीं धान्यें द्विदल होत. हीं नवीं किंवा जुनीं असलीं तरी सोडावीं". या द्विदलाविषयीं **केचित्** ग्रंथकार-उत्पत्तिसमयीं ज्याचीं दोन दलें होतात, तें भूतपूर्वगतीनें ( पूर्वी द्विदल असल्यामुळें ) द्विदल म्हटलें आहे, असें सांगतात. उदाहरणही देतात—"ज्या धान्यामध्यें अंकुरावांचून बीजच द्विदल झालेलें दृष्टीस पडतें तें द्विदल म्हटलें आहे." **अन्य ग्रंथकार** तर—असा अर्थ, द्विदलशब्दानी उत्पत्तिसमयीं द्विदलावर लक्षणा करून करावयाचा आहे, व या ठिकाणीं तशी लक्षणा करण्याविषयीं प्रमाण नसल्यामुळें 'बीजमेव समुद्भूतं०' हें वचन मूलरहित असल्यामुळें ज्याचें स्वरूप द्विदलात्मक आहे तेंच वर्ज्य करावें, असें सांगतात. तसेंच **नारदीयांत**—"कार्तिकमासांत तेल, मधु, कांस्यपात्रभोजन, शुक्त ( पर्युषित, शिळें ), संधित ( लवणयुक्त शाक, लोणचें ) हीं सोडावीं." तसेंच "कार्तिकमासीं विष्णुमूर्तीच्या पुढें दीप लावला असतां स्वर्गास जातो." तसेंच "कार्तिकमासांत मंत्रदीक्षा घेतली असतां मनुष्यास जन्मापासून सोडविते." तसेंच "कार्तिकमासीं कृच्छ्रव्रत करणारा किंवा प्राजापत्यव्रत करणारा किंवा एकांतरोपवासी अथवा त्रिरात्र उपोषण करणारा, अथवा सहा, बारा, पंधरा दिवस किंवा एक महिना एकभक्त, नक्त, अयाचित, उपवास अथवा भिक्षान्न भक्षण करणारा परमपदास जातो." अन्यही नियम पूर्वी चातुर्मास्यारंभीं सांगितले आहेत.

ग्राह्यमुक्तं**स्कांदे** व्रीहयोयवगोधूमाःप्रियंगुतिलशालयः एतेहिसात्त्विकाःप्रोक्ताःस्वर्गमोक्षफलप्रदाः **काशीखंडे** ऊर्जेयवान्नमश्नीयाद्देवान्नमथवापुनः वृंताकंसूरणंचैवशूकशिंबीश्चवर्जयेत् **पृथ्वीचंद्रोदयेपाद्मे** नोर्जोवंध्योविधातव्योव्रतिनाकेनचित्क्वचित् तथा**नारदीये** अव्रतेनक्षपेद्यस्तुमासंदामोदरप्रियम् तिर्यग्योनिमवाप्नोतिनात्रकार्याविचारणा अन्यान्यपितांबूलतैलकेशकर्तनादिवर्जनसंकल्परूपाणिप्रागुक्तानि ।

कार्तिकमासांत ग्राह्य पदार्थ सांगतो—**स्कंदपुराणांत**—"व्रीहि, यव, गहूं, कांग, तिळ, शालि हीं धान्यें सात्विक सांगितलीं आहेत, तीं स्वर्गमोक्षरूप फल देणारीं होत." **काशीखंडांत**—"कार्तिकमासीं यवान्न अथवा शालि, गहूं इत्यादि देवांचें अन्न भक्षण करावें. वृंताक ( वांगें ), सुरण, शूकधान्यें व शेंगेंतील धान्यें हीं सोडावीं." **पृथ्वीचंद्रोदयांत पाद्मांत**—"कोणत्याही व्रतस्थ मनुष्यानें कधींही कार्तिकमास व्रतावांचून व्यर्थ दवडूं नये." तसेंच **नारदीयांत** "दामोदराला प्रिय असा कार्तिकमास व्रतावांचून जो दवडील तो तिर्यग्योनींत जातो यांत संशय नाहीं." इतरही तांबूल, तैल, केशकर्तन इत्यादि वर्ज्य करण्याचीं व्रतें पूर्वी आषाढमास प्रकरणीं सांगितलीं आहेत.

तथा कार्तिकेआकाशदीपउक्तो **निर्णयामृतेपुष्करपुराणे** तुलायांतिलतैलेनसायंकालेसमागते आकाशदीपंयोदद्यान्मासमेकंहरिंप्रति महतींश्रियमाप्नोतिरूपसौभाग्यसंपदमिति तद्विधिश्च**हेमाद्रावादिपुराणे** दिवाकरेस्ताचलमौलिभूतेगृहाददूरेपुरुषप्रमाणम् यूपाकृतिर्यज्ञियवृक्षदारुमारोप्यभूमावथतस्यमूर्ध्नि यवांगुलच्छिद्रयुतान्तुमध्येद्विहस्तदीर्घाअथपट्टिकास्तु कृत्वाचतस्रोऽष्टदलाकृतीस्तुयाभिर्भवेदष्टदिशानुसारी तत्कर्णिकायांतुमहाप्रकाशोदीपःप्रदेयोदलगास्तथाष्टौ निवेद्यधर्मायहरायभूम्यैदामोदरायाप्यथधर्मराज्ञे प्रजापतिभ्यस्त्वथसत्पितृभ्यःप्रेतेभ्यएवाथतमःस्थितेभ्यइति **अपरार्के**त्वन्योमंत्रउक्तः यथा दामोदरायनभसितुलायांलोलयासह प्रदीपंतेप्रयच्छामिनमोनंतायवेधसइति ।

तसाच कार्तिकमासामध्यें आकाशदीप सांगतो—**निर्णयामृतांत पुष्करपुराणांत**—"तुलासंक्रांतींत तिलतैलानें सायंकालीं एक महिना हरीला जो आकाशदीप देईल तो मोठी लक्ष्मी व रूप सौभाग्य संपत्ति पावेल. त्या आकाशदीपाचा विधि-**हेमाद्रींत आदिपुराणांत**-"सूर्य अस्ताचलाप्रत गेला असतां गृहाजवळ एकपुरुष उंच यज्ञस्तंभासारखें यज्ञियवृक्षाचें ( खदिरादिकाचें ) काष्ठ भूमींत पुरून त्याचे मस्तकावर दोन हात लांबीच्या चार पट्ट्या त्या, मध्यभागीं यवपरिमित एक अंगुल लांब असें छिद्र पाडलेल्या अष्टदलाकृति बसवाव्या. तीं अष्टदलें आठ दिशांस येतील असें दीपयंत्र करावें. त्याच्या कर्णिकेमध्यें मोठा दीप लावावा. आणि आठ दलांवर आठ दीप लावावे. ते दीप **धर्माय, हराय, भूम्यै, दामोदराय, धर्मराजाय, प्रजापतिभ्यः, पितृभ्यः, तमःस्थितेभ्यः प्रेतेभ्यः** ह्या नाममंत्रांनीं समर्पण करावे". **अपरार्कांत** तर दुसरा मंत्र सांगितला, तो असा:—"**दामोदराय नभसि तुलायां दोलया सह ॥ प्रदीपं ते प्रयच्छामि नमोनंताय वेधसे.**"

कार्तिककृष्णचतुर्थी करकचतुर्थी साचंद्रोदयव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतत्त्वेपूर्वा तत्रैवपूजाद्याम्नानात् कार्तिककृष्णद्वादशीगोवत्ससंज्ञा साप्रदोषव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतत्त्वेपूर्वा **युग्मवाक्यात्** वत्सपूजावटश्चैव कर्तव्याप्रथमेहनीति**निर्णयामृते**भिधानाच्च अत्रविशेषो**मदनरत्ने भविष्ये** सवत्सांतुल्यवर्णांचशीलिनीं गांपयस्विनीम् चंदनादिभिरालिप्यपुष्पमालाभिरर्चयेत् अर्घ्यंताम्रमयेपात्रेकृत्वापुष्पाक्षतैस्तिलैः पादमूलेतुदद्याद्वैमंत्रेणानेनपांडव क्षीरोदार्णवसंभूतेसुरासुरनमस्कृते सर्वदेवमयेमातर्गृहाणार्घ्यंनमोनमः ततोमाषादिसंसिद्धान्वटकान्विनिवेदयेत् सुरभित्वंजगन्मातर्देविविष्णुपदेस्थिता सर्वदेवमयेग्रासंमयादत्तमिमंग्रस ततः-सर्वमयेदेविसर्वदेवैरलंकृते मातर्ममाभिलषितंसफलंकुरुनंदिनि इतिप्रार्थयेत् तथा तद्दिनेतैलपक्वंचस्थालीपक्वंयुधिष्ठिर गोक्षीरंगोघृतंचैवदधितक्रंचवर्जयेत् ।

कार्तिककृष्णचतुर्थी करकचतुर्थी. ती चंद्रोदयव्यापिनी घ्यावी. दोन दिवस चंद्रोदयव्यापिनी असतां पूर्वा घ्यावी. कारण, चंद्रोदयकालींच पूजादि कृत्य सांगितलें आहे. कार्तिककृष्ण द्वादशी ही गोवत्सद्वादशी होय. ती गोवत्सद्वादशी प्रदोषकालव्यापिनी घ्यावी. दोन दिवशीं प्रदोषव्यापिनी असतां युग्मवाक्यावरून पूर्वा करावी. आणि "गोवत्सपूजा, आणि वटपूजा हीं पूर्वदिवशीं करावीं" असें **निर्णयामृतां**तही सांगितलें आहे. हा गोवत्सद्वादशीचे ठायीं विशेषविधि—**मदनरत्नांत भविष्यांत**—"सवत्स गाई वत्सतुल्य वर्णाची उत्तम स्वभावाची बहुत दूध देणारी अशी आणून तिला चंदनादिकांनीं लेप करून पुष्पमालांनीं पूजन करावें. आणि ताम्रपात्रामध्यें पुष्प, अक्षता, तिल यांनीं अर्घ्य करून पायांजवळ पुढील मंत्रानें द्यावें. तो मंत्रः—**क्षीरोदार्णवसंभूते सुरासुरनमस्कृते ॥ सर्वदेवमये मातर्गृहाणार्घ्यं नमो नमः ॥** नंतर माषादिकानें केलेले वटक गाईस द्यावे. देण्याचा मंत्रः—**सुरभि त्वं जगन्मातर्देवि विष्णुपदे स्थिता ॥ सर्वदेवमये ग्रासं मया दत्तमिमं ग्रस. ॥** नंतर प्रार्थना करावी. प्रार्थनामंत्रः—**ततः सर्वमये देवि सर्वदेवैरलंकृते ॥ मातर्ममाभिलषितं सफलं कुरु नंदिनि. ॥** तसेंच, त्या दिवशीं तेलांत तळलेला, स्थालींत शिजवलेला पदार्थ आणि गाईचें दूध, तूप, दहीं, ताक हीं वर्ज्य करावीं."

**ज्योतिर्निबंधेनारदः** आश्विनेकृष्णपक्षेतुद्वादश्यादिपुपंचसु तिथिषूक्तःपूर्वरात्रेनृणांनीराजनाविधिः नीराजयेयुर्देवांस्तुविप्रान्गाश्चतुरंगमान् ज्येष्ठान्श्रेष्ठान्जघन्यांश्चमातृमुख्याश्चयोषितइति **निर्णयामृतेस्कांदे** कार्तिकस्यासितेपक्षेत्रयोदश्यांनिशामुखे यमदीपंबहिर्दद्यादपमृत्युर्विनश्यति **मंत्रस्तु** मृत्युनापाशदंडाभ्यांकालेनश्यामयासह त्रयोदश्यांदीपदानात्सूर्यजःप्रीयतांममेति ।

**ज्योतिर्निबंधांत नारद**—"आश्विनकृष्णद्वादशीपासून कार्तिकशुद्धप्रतिपदेपर्यंत पांचदिवस पूर्वरात्रीं मनुष्यांस नीराजनविधि सांगितला आहे तो असा—देव, ब्राह्मण, गाई, घोडे, ज्येष्ठ, श्रेष्ठ, लहान या सर्वांस मातृप्रमुख स्त्रियांनीं नीराजन करावें ( दिवे ओंवाळावे )." **निर्णयामृतांत स्कांदांत**—"कार्तिककृष्णपक्षीं त्रयोदशीचे दिवशीं प्रदोषकाळीं घराबाहेर यमाला दीप द्यावा, तेणेंकरून अपमृत्यूचा नाश होतो." त्याचा मंत्रः—"**मृत्युना पाशदंडाभ्यां कालेन श्यामया सह ॥ त्रयोदश्यां दीपदानात्सूर्यजः प्रीयतां मम.**"

कार्तिककृष्णचतुर्दश्यांप्रभातेचंद्रोदयेऽभ्यंगंकुर्यात् तदुक्तं **हेमाद्रौनिर्णयामृतेचभविष्योत्तरे** कार्तिकेकृष्णपक्षेतुचतुर्दश्यामिनोदये अवश्यमेवकर्तव्यंस्नानंनरकभीरुभिः इनश्चंद्रः **मदनरत्ने**विधूदयइति पाठः दिनोदयइतिपाठात्सूर्योदयोत्तरंत्रिमुहूर्तेस्नानंवदतांगौडानांतदनुसारिणांचाज्ञतैव पूर्वविद्धचतुर्दश्यां-

कार्तिकस्यासितेतरे पक्षे प्रत्यूषसमये स्नानं कुर्यात्प्रयत्नतः इति **स्मृतिदर्पणे**पि चतुर्दशीचाश्वयुजस्य कृष्णा स्वात्यृक्षयुक्ताचभवेत्प्रभाते स्नानंसमभ्यज्य नरैस्तु कार्यं सुगंधतैलेनविभूतिकामैरिति **पृथ्वीचंद्रोदये पाद्मे** आश्वयुकृष्णपक्षस्यचतुर्दश्यांविधूदये तिलतैलेनकर्तव्यं स्नानंनरकभीरुणेति कर्तव्यंमंगलस्नानंनरैर्निरयभीरुभिरिति **कालादर्शे** पाठः उभयत्राश्वयुगित्यमावास्यांतंमासमभिप्रेत्योक्तम् तथा तैलेलक्ष्मीर्जलेगंगादीपावल्याश्चतुर्दशीं प्राप्येतिशेषः प्रातःस्नानंतुयःकुर्याद्यमलोकंनपश्यतीति ।

कार्तिककृष्णचतुर्दशीचेठायीं प्रभातकाळीं चंद्रोदयीं तैलाभ्यंग करावा. तें सांगतो **हेमाद्रींत** व **निर्णयामृतांत भविष्योत्तरांत**—"कार्तिककृष्णपक्षामध्यें चतुर्दशीचेठायीं चंद्रोदयीं नरकास भिणारांनीं अवश्य स्नान करावें." **मदनरत्नांत** 'इनोदये' याच्याठायीं 'विधूदये' असा पाठ आहे. 'दिनोदये' अशा पाठावरून सूर्योदयानंतर तीन मुहूर्तांत स्नान करावें, असें सांगणारे गौड व त्यांचे अनुयायी अजाणतेच म्हटले पाहिजेत. "कार्तिकाच्या कृष्णपक्षांत त्रयोदशीयुक्त चतुर्दशीचे ठायीं उषःकालीं प्रयत्नानें स्नान करावें" असें वचन आहे. **स्मृतिदर्पणांत**ही "आश्विनकृष्णचतुर्दशी स्वातीनक्षत्रानें युक्त असतां ऐश्वर्येच्छु नरांनीं प्रातःकाळीं सुगंधितैलानें अभ्यंग करून स्नान करावें." **पृथ्वीचंद्रोदयांत पाद्मांत**—"आश्विनकृष्णपक्षाच्या चतुर्दशीस चंद्रोदयीं नरकास भिणारानें तिळांचें तेल लावून स्नान करावें." वरील वचनांत 'कर्तव्यं मंगलस्नानं नरैर्निरयभीरुभिः' असा **कालादर्शांत** पाठ आहे. मंगलस्नान करावें, असा अर्थ. त्यावरील दोन्हीं वचनांमध्यें आश्विन असें पद आहे तें अमावास्यान्त मास घेऊन सांगितलें आहे. तसेंच "दीपावळीची चतुर्दशी प्राप्त झाली म्हणजे तैलांत लक्ष्मी व उदकांत गंगा असते, म्हणून तैलाभ्यंग करून प्रातःस्नान जो करील त्याच्या दृष्टीस यमलोक पडत नाहीं."

दिनद्वयेपिचंद्रोदयेचतुर्दशीसत्वेनदभावेप्यरुणोदयसंपूर्णखंडव्याप्त्यादिनद्वयेचतुर्दशीसमत्वेचपूर्वदिनेभ्यंगंकुर्यात् पूर्वविद्धचतुर्दश्यामितिवचनात् पूर्वदिनेपरदिनएववास्त्वेसैवग्राह्या दिनद्वयेप्यसत्त्वेअरुणोदयव्यापिनीग्राह्या पक्षेप्रत्यूषसमयइत्युक्तः वक्ष्यमाणवचनाच्च तदभावेतुचतुर्दशीह्रासंपूर्वेद्युःप्रवेश्यपूर्वेऽह्नित्रयोदशीमध्यएवाभ्यंगंकुर्यादिति**दिवोदासः** केचिदत्रवचनमपिसाधकत्वेनवदंति तिथ्यादौतुभवेद्यावान्ह्रासोवृद्धिःपरेऽहनि तावानग्राह्यःसपूर्वेद्युरदृष्टोपिस्वकर्मणीति तन्मंदम् नहीदंवचनंपूर्वदिनस्यापूर्वग्राह्यत्वंविधत्ते नक्तैकभक्तजन्माष्टम्यादौदिनद्वयेकर्मकालव्याप्त्यभावेसर्वत्रपूर्वदिनस्यग्राह्यत्वप्रसंगात् किंतु यत्रैकभक्तादौदिनद्वयेकर्मकालव्याप्त्यभावेवाक्यांतरेणन्यायेनवापूर्वदिनस्यग्राह्यत्वमुक्तम् तत्रमुख्यकालेतत्तिथेरभावेपितत्रैवानुष्ठानबोधकमिदम् नचात्रतदस्तीतियत्किंचिदेतत् तेनचतुर्थयामगामिनीग्राह्या अतएव**सर्वज्ञनारायणः** तथाकृष्णचतुर्दश्यामाश्विनेऽर्कोदयात्पुरा यामिन्याःपश्चिमेयामेतैलाभ्यंगोविशिष्यतइति मृगांकोदयवेलायांत्रयोदश्यांयदाभवेत् दर्शेवामंगलस्नानंदुःखशोकभयप्रदमिति **कालादर्शे**त्रयोदशीनिषेधाच्च तेनायमर्थः यथाग्निहोत्रेयावज्जीवंसायंप्रातःकालपुण्याप्यकालस्यगुरुत्वम् तथात्रचतुर्दशीचतुर्थयामारुणोदयचंद्रोदयानामुत्तरोत्तरस्यव्याप्त्यात्वाद्गुरुत्वमिति यदपि**दिवोदासीये** त्रयोदशीयदाप्रातःक्षयंयातिचतुर्दशी रात्रिशेषेत्वमावास्यातदाभ्यंगेत्रयोदशीतिवचनं तद्धे**माद्रिनिर्णयामृता**द्यलिखितत्वेननिर्मूलम् समूलत्वेपिनचतुर्दश्याःसूर्योदयद्वयासंबंधित्वरूपःक्षयोत्रविवक्षितः सूर्योदयात्प्राक्समाप्तौचंद्रोदयकालसत्त्वेचत्वयैवांगीकारात् किंतु अभ्यंगकालात्प्राक्समाप्तिरूपोऽत्रह्रासःक्षयशब्देनविवक्षितः सचारुणोदयाच्चतुर्थयामाद्वाप्राक्यदाह्रासस्तत्परमिदम् अतएवसर्वज्ञनारायणेनचतुर्थयाममात्रेस्नानमुक्तम् तथाचोदाहृतम् तथाकृष्णचतुर्दश्यामिति **ज्योतिर्निबंधेनारदोपि** इषासितचतुर्दश्यामिंदुक्षयतिथावपि ऊर्जादौस्वातिसंयुक्तेतदादीपावलीभवेत् कुर्यात्संलग्नमेतच्चदीपोत्सवदिनत्रयम् येतुत्रयोदशीमध्येस्नानमाहुस्तेपामाशयंनविद्मइत्यलंभूयसा यदपि अरुणोदयतोऽन्यत्ररिक्तायांस्नातियोनरः तस्याब्दिकभवोधर्मोनश्यत्येवनसंशयइति**दिवोदासीये भविष्य**वचनंतन्मुख्यकालेऽरुणोदयेचतुर्दश्यभावेपितत्रैवस्नानंत्यमित्येवंपरमितिसर्वंसिद्धम् चतुर्घटिकात्मकोऽरुणोदयइतितत्रैवोक्तम् ।

दोन्ही दिवशीं चंद्रोदयीं चतुर्दशी असतां, दोन्हीं दिवशीं चंद्रोदयीं नसेल तर अरुणोदयीं संपूर्ण अथवा खंड व्याप्ति असतां आणि दोन्हीं दिवशीं चतुर्दशीची सम व्याप्ति असतां पूर्वदिवशीं अभ्यंग करावा. कारण, "त्रयोदशीयुक्त चतुर्दशीचे

ठायीं स्नान करावें." असें वचन येथेंच वर सांगितलें आहे. पूर्वदिवशींच चंद्रोदयव्यापिनी असतां पूर्वाच घ्यावी. परदिवशींच चंद्रोदयव्यापिनी असतां पराच घ्यावी. दोन्हीं दिवशीं चंद्रोदयीं नसेल तर अरुणोदयव्यापिनी घ्यावी. कारण, **"पक्षे प्रत्यूषसमये."** म्हणजे वरील वचनांत उषःकालीं ( अरुणोदयीं ) स्नान करावें, असें सांगितलें आहे. आणि "आश्विनमासीं कृष्णचतुर्दशीस रात्रीच्या चतुर्थप्रहरीं तैलाभ्यंग विशेष फलदायक आहे." असें **सर्वज्ञनारायण**वचन पुढें सांगावयाचेंही आहे. दोन्हीं दिवशीं अरुणोदयव्यापिनी नसेल तर चतुर्दशीचा जितका क्षय असेल तितका पूर्वदिवसांत मिळवून तितकी चतुर्दशी पूर्वदिवशीं आहे असें समजून त्या कालीं वस्तुतः त्रयोदशीमध्येंच अभ्यंग करावा, असें **दिवोदास** सांगतो. **केचित्** ग्रंथकार असें करण्याविषयीं साधकवचन देखील सांगतात—"जितक्या घटी तिथिक्षय झालेला असेल तितकी तिथि त्या तिथीच्या आदीं नसली तरी कर्माविषयीं घ्यावी. आणि जितकी वृद्धि असेल तितकी परदिवशीं घ्यावी." तें सांगणें मंद आहे. कारण, इतर वचनानें पूर्वी ग्रहण अप्राप्त असतां हें वचन पूर्वदिवस ग्रहण करण्याविषयीं सांगत नाहीं. जर हें वचन पूर्वदिवस ग्रहण करण्याविषयीं सांगल तर नक्त, एकभक्त, जन्माष्टमी इत्यादिकांविषयीं दोन दिवस कर्मकालव्याप्ति नसतां सर्वत्र ठिकाणीं पूर्वदिवसाला ग्रहण करण्याचा प्रसंग येईल ! तर ज्या एकभक्तादि व्रताचे ठायीं दोन दिवस कर्मकालव्याप्ति नसतां इतर वाक्यानें किंवा न्यायानें पूर्वदिवस घ्यावा म्हणून सांगितलें आहे, त्या ठिकाणीं मुख्यकालीं त्या तिथीचा अभाव असला तरी त्याच कालीं त्या कर्माचें अनुष्ठान बोध करणारें हें वचन आहे. ह्या प्रकृतस्थलीं त्रयोदशी ग्रहण करण्याविषयीं वचन नसल्यामुळें हें वचन एथें लागू होत नाहीं, म्हणून हें कांहींतरी सांगणें आहे. तेणेंकरून अरुणोदयीं नसेल तर रात्रीच्या चतुर्थप्रहरांत असणारी चतुर्दशी घ्यावी. म्हणूनच **सर्वज्ञनारायण** सांगतो-"आश्विनमासीं कृष्णचतुर्दशींत सूर्योदयाच्या पूर्वी रात्रीच्या शेवटच्या प्रहरीं तैलाभ्यंग विशिष्ट फलदायक आहे." आणि "ज्या वेळीं चंद्रोदयकालीं त्रयोदशींत अथवा दर्शांत मंगलस्नान होईल त्या वेळीं तें दुःख, शोक, भय यांतें देणारें आहे." असा **कालादर्शात** त्रयोदशीचा निषेधही आहे. ह्या वरील वचनावरून असा अर्थ झाला कीं, जसा—अग्निहोत्रहोमाविषयीं यावज्जीवपर्यंत असलेल्या सायंप्रातःकालामध्यें सायंप्रातःकालांनीं व्यापलेल्या अशा उदितादि कालाला गुरुत्व ( श्रेष्ठत्व ) आहे. तसें-येथें चतुर्दशी, चतुर्थप्रहर, अरुणोदय, चंद्रोदय हे पूर्वपूर्वांनीं उत्तरोत्तर व्यापलेले असल्यामुळें उत्तरोत्तराला गुरुत्व ( श्रेष्ठत्व ) आहे. आतां जें **दिवोदासीयांत**—"ज्या वेळी त्रयोदशी प्रातःकालीं असून चतुर्दशीचा क्षय होतो आणि त्या दिवशीं पहांटेस अमावास्या असते त्या वेळीं अभ्यंगाविषयीं त्रयोदशी होते." असें वचन तें **हेमाद्रि-निर्णयामृत** इत्यादिकांनीं लिहिलेलें नसल्यामुळें निर्मूल आहे. समूल मानिलें तरी पूर्वदिवशींचा सूर्योदय व परदिवशींचा सूर्योदय या दोघांलाही चतुर्दशीचा संबंध नसणें अशा प्रकारचा तिथिक्षय एथें क्षयशब्दानें घ्यावयाचा नाहीं. कारण, तसा तिथिक्षय घेतला तर परदिवशीं सूर्योदयाच्या पूर्वी चतुर्दशी समाप्त असतां व चंद्रोदयीं असतां त्याच चतुर्दशीचा तूंच ( दिवोदासानेंच ) स्वीकार केलेला आहे. तर अभ्यंगकालाच्या पूर्वी समाप्ति होणें हा क्षय एथें क्षयशब्दानें घ्यावयाचा आहे. तो ह्रास ( क्षय ) अरुणोदयाच्या किंवा चतुर्थप्रहराच्या पूर्वी जेव्हां असेल तद्विषयक हें वचन आहे. म्हणजे जेव्हां परदिवशीं अरुणोदयाच्या किंवा चतुर्थप्रहराच्या पूर्वी चतुर्दशी समाप्त होईल तेव्हां त्रयोदशीचे दिवशीं पहांटेस चतुर्दशीमध्येंच अभ्यंग करावा. पहांटेस सूर्योदयाच्या आंत चतुर्दशी नसेल तर परदिवशीं रात्रीचे चतुर्थप्रहरीं असलीच पाहिजे, त्या वेळीं अभ्यंग करावा. असें आहे म्हणूनच **सर्वज्ञनारायणानें** चवथ्या प्रहरीं अभ्यंगस्नान सांगितलें आहे. तेंच सांगतो.—"आश्विनकृष्णचतुर्दशीचे ठायीं सूर्योदयाचे पूर्वी रात्रीच्या चतुर्थप्रहरीं तैलाभ्यंग करावा." हें वचन वर लिहिलें आहे. **ज्योतिर्निबंधांत नारदही**-"आश्विनकृष्ण चतुर्दशी, अमावास्या व स्वातियुक्त कार्तिकशुक्ल प्रतिपदा हे तीन दिवस दीपावलि होते. ह्या तीन दिवशीं दीपोत्सव करावा." जे ग्रंथकार त्रयोदशीमध्यें स्नान करावें असें सांगतात त्यांचा आशय आम्हांला कळत नाहीं, असेंच म्हणतों. याहून ज्यास्त सांगत नाहीं. आतां जें "जो मनुष्य चतुर्दशीचे दिवशीं अरुणोदयावांचून इतरकालीं स्नान करितो, त्याचा एक वर्षांत उत्पन्न झालेला धर्म नष्ट होतो, यांत संशय नाहीं." असें **दिवोदासीयांत भविष्य**वचन तें स्नानाचा मुख्य काल जो अरुणोदय त्यावेळीं चतुर्दशी नसली तरी त्याचवेळीं स्नान करावें, अशा अर्थाचें बोधक आहे. तात्पर्य-वरील सर्व वचनांवरून सूर्योदयाच्या पूर्वी पहांटेस चतुर्दशी नसतां त्रयोदशींत स्नान करावें, असा अर्थ होत नाहीं. याप्रमाणें सर्व अभीष्ट सिद्ध झालें आहे. अरुणोदय कोणता म्हणाल तर सूर्योदयाच्या पूर्वी चार घटिका जो काल तो अरुणोदय, असें तेथेंच सांगितलें आहे.

**मदनरत्नेपाद्मे** अपामार्गमथोतुंबींप्रपुन्नाटमथापरम् भ्रामयेत्स्नानमध्येतुनरकस्यक्षयायवै प्रपुन्नाटश्चक्रमर्दः **मंत्रस्तु** सीतालोष्ठसमायुक्तसकंटकदलान्वित हरपापमपामार्गभ्राम्यमाणःपुनःपुनरिति अस्यामेवप्रदोषेदीपान्दद्यादित्युक्तं**हेमाद्रौस्कांदे** ततःप्रदोषसमयेदीपान्दद्यान्मनोरमान् ब्रह्मविष्णुशिवादीनांभवनेषुमठेषुचेति **दिवोदासीयेब्राह्मे** अमावास्याचतुर्दश्योःप्रदोषेदीपदानतः यममार्गाधिकारेभ्योमुच्यते

कार्तिकेनरः खंडतिथौतुपूर्वेह्निप्रदोषेदीपानदत्वापरेद्युःस्नायादिति दिवोदासीयेउक्तम् अत्रनरकोद्देशेनचतुर्वर्तियुक्तंदीपदानंकार्यम् तत्रमंत्रः दत्तोदीपश्चतुर्दश्यांनरकप्रीतयेमया चतुर्वर्तिसमायुक्तःसर्वपापापनुत्तये तत्रैवलैंगे माषपत्रस्यशाकेनभुक्त्वातत्रदिनेनरः प्रेताख्यायांचतुर्दश्यांसर्वपापैःप्रमुच्यते ।

मदनरत्नांत पाद्मांत-"आघाडा किंवा भोपळ्याचें पान अथवा टाकळा हा स्नानकालीं नरकनाशार्थ अंगावरून फिरवावा." फिरविण्याचा मंत्रः-"सीतालोष्टसमायुक्त सकंटक दलान्वित ॥ हर पापमपामार्ग भ्राम्यमाणः पुनः पुनः" या चतुर्दशीचे दिवशींच प्रदोषकालीं दीप लावावे असें सांगतों-हेमाद्रींत स्कांदांत "नंतर प्रदोषसमयीं ब्रह्मा, विष्णु, शिव, इत्यादिकांच्या मंदिरांत व मठांत दीप लावावे." दिवोदासीयांत ब्राह्मांत "कार्तिकमासामध्यें अमावास्या व चतुर्दशी या दिवशीं प्रदोषकालीं दिवे लावल्यानें मनुष्य यममार्गाच्या अधिकारांपासून मोकळा होतो." खंडतिथि चतुर्दशी असेल तर पूर्वदिवशीं प्रदोषकालीं दिवे लावून परदिवशीं स्नान करावें. असें दिवोदासीयांत सांगितलें आहे. या चतुर्दशीचे ठायीं नरकासुराचे उद्देशानें चार वातींनीं युक्त दीप लावावा. त्याविषयीं मंत्रः-"दत्तो दीपश्चतुर्दश्यां नरकप्रीतये मया ॥ चतुर्वर्तिसमायुक्तः सर्वपापापनुत्तये." दिवोदासीयांत लैंगांत "नरकचतुर्दशीचे दिवशीं उडदांच्या पानांच्या भाजीनें भोजन केलें असतां मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो."

अत्रयमतर्पणमुक्तंमदनपारिजातेवृद्धमनुना दीपोत्सवचतुर्दश्यांकार्यंतुयमतर्पणम् मदनरत्नेब्राह्मे अपामार्गस्यपत्राणिभ्रामयेच्छिरसोपरि ततश्चतर्पणंकार्यंधर्मराजस्यनामभिः यमायधर्मराजायमृत्यवेचांतकायच वैवस्वतायकालायसर्वभूतक्षयायच औदुंबरायदध्नायनीलायपरमेष्ठिने वृकोदरायचित्रायचित्रगुप्तायवैनमइति तर्पणप्रकारस्तुहेमाद्रौ एकैकेनतिलैर्मिश्रान्दद्यात्त्रींस्त्रीनजलांजलीन् संवत्सरकृतंपापंतत्क्षणादेवनश्यति तथामदनरत्नेस्कांदे दक्षिणाभिमुखोभूत्वातिलैःसव्यंसमाहितः देवतीर्थेनदेवत्वात्तिलैःप्रेताधिपोयतः तथा यज्ञोपवीतिनाकार्यंप्राचीनावीतिनाथवेति इदंजीवत्पितृकेणापिकार्यम् जीवत्पितापिकुर्वीततर्पणंयमभीष्मयोरितिपाद्मोक्तेः अत्रभीष्मतर्पणमप्युक्तंदिवोदासीये तत्प्रकारस्तुमाघेवक्ष्यते इतिनरकचतुर्दशी ।

या चतुर्दशीचे ठायीं यमतर्पण सांगतो मदनपारिजातांत वृद्धमनु-"दीपोत्सवचतुर्दशीचे ठायीं यमतर्पण करावें." मदनरत्नांत ब्राह्मांत-"आघाड्याचीं पानें मस्तकावर फिरवावीं. नंतर (स्नानानंतर) यमाच्या नांवांनीं तर्पण करावें" तें असें—"यमाय नमः यमंतर्पयामि, धर्मराजाय नमः धर्मराजंत०, मृत्यवेनमः मृत्युंत०, अंतकाय नमः अंतकंत०, वैवस्वताय नमः वैवस्वतंत०, कालाय नमः कालंत०, सर्वभूतक्षयाय नमः सर्वभूतक्षयंत०, औदुंबराय नमः औदुंबरंत०, दध्नाय नमः दध्नंत०, नीलाय नमः नीलंत०, परमेष्ठिने नमः परमेष्ठिनंत०, वृकोदराय नमः वृकोदरंत०, चित्राय नमः चित्रंत०, चित्रगुप्ताय नमः चित्रगुप्तंत०, याप्रमाणें तर्पण करावें." तर्पणाचा प्रकार हेमाद्रींत सांगतो—"एकेक नाम घेऊन तिलांनीं मिश्र अशा तीन तीन जलांजली द्याव्या, म्हणजे वर्षपर्यंत केलेलें पाप त्याच क्षणीं नाश पावतें." तसेंच मदनरत्नांत स्कांदांत-"दक्षिणाभिमुख होऊन सव्य करून तिलसहिततर्पण करावें. यम हा देव असल्यामुळें देवतीर्थानें करावें. आणि तो प्रेताधिप असल्यामुळें तिलसहित करावें." तसेंच "सव्यानें किंवा अपसव्यानें करावें." हें यमतर्पण जीवत्पितृकानेंही करावें. कारण, "पिता जीवंत असतांही यम व भीष्म यांचें तर्पण करावें" असें पाद्मवचन आहे. या चतुर्दशीस भीष्मतर्पणही दिवोदासीयांत सांगितलें आहे. त्या भीष्मतर्पणाचा प्रकार माघमासप्रकरणीं पुढें सांगूं. इति नरकचतुर्दशी.

कार्तिकामावास्यायांप्रातरभ्यंगंकुर्यात् तदुक्तंकालादर्शे प्रत्यूषआश्वयुग्दर्शेकृताभ्यंगादिमंगलः भक्त्याप्रपूजयेद्देवीमलक्ष्मीविनिवृत्तये अस्यव्याख्यानेआदिशब्दात्पंचत्वगुदकस्नानादेरुपसंग्रहः तदुक्तंपुष्करपुराणे स्वातीस्थितेरवाविंदुर्यदिस्वातीगतोभवेत् पंचत्वगुदकस्नायीकृताभ्यंगविधिर्नरः नीराजितोमहालक्ष्मीमर्चयन्श्रियमश्नुते आश्वयुग्दर्शइतिदर्शशब्दःप्रत्यूषेस्वातियुक्ततिथिपरः 'तदुक्तंब्राह्मे ऊर्जेशुक्लद्वितीयायामतिथिपुस्वातिकृक्षगे मानवोमंगलस्नायीनैवलक्ष्म्यावियुज्यते नत्रैव इषेभूतेचदर्शेचकार्तिकप्रथमेदिने यदास्वातीतदाभ्यंगस्नानंकुर्याद्दिनोदये कश्यपसंहितायांतुदीपावलिदर्शप्रक्रम्य इंदुक्षयेपिसंक्रांतौरवौपातेदिन-

१ ततश्चेति । स्नानानंतर यमतर्पणं कार्यं ॥ स्नानोत्तरं यमतर्पणविधानात् ॥ नत्र कालविशेषानुक्तेश्च ॥

क्षये तत्राभ्यंगोनदोषायप्रातःपापापनुत्तयइतिस्वातियोगंविनाप्यभ्यंगउक्तः **मात्स्ये** दीपैर्नीराजनादत्रसैषा-दीपावलीस्मृता ।

कार्तिक अमावास्येस प्रातःकाळीं अभ्यंग करावा. तें सांगतो **कालादर्शांत** "आश्विनमासाचे अमावास्येचे ठायीं प्रातः-काळीं अभ्यंगादि मंगल करून अलक्ष्मी जाण्याकरतां भक्तीनें लक्ष्मीदेवीचें पूजन करावें." या वचनाची व्याख्या करतेवेळीं 'अभ्यंगादि' यांतील आदिशब्दानें पंचवल्कलसहित उदकस्नानादिकांचा संग्रह करावा. तें पंचवल्कलसहित उदकस्नान **पुष्करपुराणांत** सांगतो—"स्वातीनक्षत्रीं सूर्य असतां जेव्हां चंद्र स्वातीनक्षत्रास असेल त्या दिवशीं अभ्यंगविधि करून पंचत्वक् ( अश्वत्थ, उदुंबर, प्लक्ष, आम्र, वट यांच्या त्वचांनीं युक्त ) उदकानें स्नान करणारा व स्त्रियांनीं नीराजित होऊन महालक्ष्मीचें पूजन करणारा मनुष्य लक्ष्मीतें पावतो." **'आश्वयुग्दर्शे'** ह्या वचनांत जो दर्शशब्द तो प्रातःकाळीं स्वाती नक्षत्रानें युक्त तिथीचा बोधक आहे. तेंच सांगतो-**ब्राह्मांत** "कार्तिकशुक्लद्वितीयापर्यंत तिथींमध्यें ज्या तिथीस स्वातीनक्षत्र असेल त्या तिथीचे ठायीं स्वातीनक्षत्रावर मंगलस्नान करणारा लक्ष्मीविरहित होतच नाहीं." तसेंच—"आश्विनमासाची चतुर्दशी व अमावास्या आणि कार्तिकशुक्लप्रतिपदा यांमध्यें जेव्हां स्वातीनक्षत्र असेल तेव्हां मर्यादेचीं अभ्यंगस्नान करावें." **कश्यपसंहितेंत** तर दीपावली दर्शाचा उपक्रम करून "अमावास्या, संक्रांति, रविवार, व्यतीपात, दिनक्षय हे असले तरी प्रातःकाळीं अभ्यंग दोषाकारणें न होतां पाप दूर करणारा होतो." असा स्वातियोगावांचूनही अभ्यंग सांगितला आहे. **मत्स्यपुराणांत**-"हे तीन दिवस दीपांनीं आरती करतात म्हणून ही दीपावली म्हटली आहे."

अत्रविशेषो**हेमाद्रौभविष्ये** दिवातत्रनभोक्तव्यमृतेबालातुराज्जनात प्रदोषसमयेलक्ष्मींपूजयित्वाततः क्रमात् दीपवृक्षाश्चदातव्याःशक्त्यादेवगृहेषुच तत्रैवाभ्यंगमभिधाय एवंप्रभातसमयेत्वमावास्यांनराधिप कृत्वातुपार्वणश्राद्धंदधिक्षीरघृतादिभिः दीपान्दत्वाप्रदोषेतुलक्ष्मींपूज्ययथाविधि स्वलंकृतेनभोक्तव्यंसितव-स्त्रोपशोभिना अयंप्रदोषव्यापीग्राह्यः तुलासंस्थेसहस्रांशौप्रदोषेभूतदर्शयोः उल्काहस्तानराःकुर्युःपितॄणांमा-र्गदर्शनमिति **ज्योतिषोक्तेः** दिनद्वयेसत्त्वेपरः दंडैकरजनीयोगेदर्शःस्यात्तुपरेहऽनि तदाविहायपूर्वेद्युःप-रेऽह्निसुखरात्रिकेइति**तिथितत्त्वेज्योति**र्वचनात् **दिवोदासीये**तुप्रदोषस्यकर्मकालत्वात अर्धरात्रेभव-त्येवलक्ष्मीराश्रयितुंगृहान् अतःस्वलंकृतालिप्तादीपैर्जाग्रज्जनोत्सवाः सुधाधवलिताःकार्याःपुष्पमालोपशो-भिता इति**ब्राह्मोक्तेश्च** प्रदोषार्धरात्रव्यापिनीमुख्या एकैकव्याप्तौपरैव प्रदोषस्यमुख्यत्वादर्धरात्रेऽनुष्ठेया-भावाच्च यत्तु अपराह्णेप्रकर्तव्यश्राद्धंपितृपरायणैः प्रदोषसमयेराजनकर्तव्यादीपमालिकेतिक्रमः स संपूर्ण-तिथावेवप्राप्तेरनुवादोनविधिः तत्तत्कर्मकालव्याप्तेर्बलवत्त्वात्संपूर्णतिथौप्राप्त्याखंडतिथावप्राप्त्याविध्यनुवाद-विरोधाच्चेत्युक्तं अत्रैवदर्शेऽपररात्रेऽलक्ष्मीनिःसारणमुक्तं**मदनरत्नेभविष्ये** एवंगतेनिशीथेतुजनेनिद्रार्ध-लोचने तावन्नगरनारीभिःशूर्पडिंडिमवादनैः निष्काश्यतेप्रहृष्टाभिरलक्ष्मीःस्वगृहांगणात् ।

या अमावास्येचे ठायीं विशेष सांगतो **हेमाद्रींत—भविष्यांत**-"त्या आश्विन अमावास्येचे दिवशीं बाल व रोगी यांवांचून इतरांनीं दिवसा भोजन करूं नये. प्रदोषकाळीं लक्ष्मीचें पूजन करून नंतर क्रमानें देवालयामध्यें यथाशक्ति दीपवृक्ष लावावे." त्याच ग्रंथांत अभ्यंग सांगून "याप्रमाणें अमावास्येचे ठायीं प्रातःकाळीं दधि, दुग्ध, घृत, इत्यादिकेंकरून पार्वण श्राद्ध करून प्रदोषकाळीं दीप लावून यथाविधि लक्ष्मीपूजन करून श्वेतवस्त्रानें शोभित व उत्तम अलंकारयुक्त होऊन भोजन करावें." ही अमावास्या प्रदोषव्यापिनी घ्यावी. कारण, "तुलाराशीस सूर्य असतां चतुर्दशी व अमावास्या ह्या दोन दिवशीं प्रदोषकाळीं मनुष्यांनीं चूड हातांत घेऊन पितरांस मार्ग दाखवावा." असें **ज्योतिष**ग्रंथांत वचन आहे. दोन दिवशीं प्रदोषकाळीं असेल तर परा करावी. कारण, "जर दुसऱ्या दिवशीं रात्रीं अमावास्या एक घटिका असेल तर पूर्व दिवस सोडून परदिवशीं सुखरात्रि ( लक्ष्मीपूजनादि ) करावी" असें **तिथितत्त्वांत ज्योति**र्वचन आहे. **दिवोदासीयांत** तर-प्रदोषकाल हा कर्मकाल असल्यामुळें; आणि "लक्ष्मी ही मध्यरात्रीं घरांत येऊन राहते म्हणून घरें स्वच्छ सारवून चुना लावून शुभ्र करावीं; व त्यांस रंग देऊन पुष्पें, माला यांनीं सुशोभित करावीं; दिवे लावावे. आणि मनुष्यांनीं जागृत राहून उत्सव करावा", ह्या **ब्राह्म**वचनावरून अर्धरात्रीं लक्ष्मी येत असल्यामुळें प्रदोष व अर्धरात्रव्यापिनी अमावास्या मुख्य आहे. म्हणजे वरील ज्योतिषवचनांनीं प्रदोष कर्मकाल सांगितल्यामुळें प्रदोषव्यापिनी असावी, आणि **ब्राह्म**वचनानें मध्यरात्रव्यापिनी असावी, असें आहे म्हणून दोन्हीं कालव्यापिनी मुख्य होय. एक एक कालीं व्याप्ति असतां पराच करावी. कारण, प्रदोषकाल मुख्य आहे. आणि मध्यरात्रीं कांहीं कर्तव्यही नाहीं. आतां जें "पितृभक्तांनीं अपराह्णीं श्राद्ध करावें. प्रदोषकाळीं दीपांची माला करावी" असा क्रम सांगितला आहे. वर सांगितल्याप्रमाणें प्रदोष व अर्धरात्रव्यापिनी

पूर्व दिवशींची घेतली असतां पर दिवशीं अपराह्णव्यापिनींत श्राद्ध असल्यामुळें या क्रमाचा बाध आला, असें म्हणूं नये. कारण, संपूर्ण तिथीचे ठायींच त्या क्रमाची प्राप्ति असल्यामुळें त्याचा अनुवाद केला आहे. त्या क्रमाचा अपूर्वविधि नाहीं. कारण, त्या क्रमविधायक वाक्यापेक्षां त्या त्या कर्मकालव्याप्तिशास्त्राला बलिष्ठत्व आहे. आणि जर हें वाक्य क्रमाचें विधायक म्हटलें तर संपूर्ण तिथि असतां क्रमप्राप्त असल्यामुळें त्याविषयीं अनुवादक म्हटलें पाहिजे, व खंड तिथीचे ठायीं अप्राप्त असल्यामुळें त्याविषयीं विधायक म्हटलें असतां जें विधिवाक्य तेंच अनुवादक झाल्यानें विधीचा व अनुवादाचा एकत्र विरोधही येतो, असें सांगितलें आहे. त्याच अमावास्येस अपररात्रीं अलक्ष्मीचें निःसारण सांगतो मदनरत्नांत भविष्यांत—"याप्रमाणें मध्यरात्र गेली असतां निद्रेनें लोकांचे अर्धे डोळे मिटले असतां त्या वेळीं नगरांतील स्त्रियांनीं सूप व डिंडिम ( दवंडी ) वाजवून मोठ्या आनंदानें आपआपल्या गृहांगणांतून अलक्ष्मी बाहेर घालवावी.

कार्तिकशुक्लप्रतिपदिगोक्रीडनमुक्तं**निर्णयामृते** अस्यामेवरात्रौबलेःपूजोक्ता**हेमाद्रौभविष्ये** कृत्वैतत्सर्वमेवेहरात्रौदैत्यपतेर्बलेः पूजांकुर्यान्नृपःसाक्षाद्भूमौमंडलकेशुभे बलिमालिख्यदैत्येंद्रंवर्णकैःपंचरंगकैः गृहस्यमध्येशालायांविशालायांततोऽर्चयेत् लोकैश्चापिगृहस्यांतःशय्यायांशुक्लतंदुलैः संस्थाप्यबलिराजानंफलैःपुष्पैश्चपूजयेत् मंत्रस्तु**पाद्मे** बलिराजनमस्तुभ्यंदैत्यदानववंदित इंद्रशत्रोऽमराराते विष्णुसान्निध्यदोभवेति तथा बलिमुद्दिश्यदीयंतेदानानिकुरुनंदन यानितान्यक्षयाण्याहुर्मयैवंसंप्रदर्शितमिति तदेतत्पूर्वविद्धप्रतिपदिकर्तव्यम् पूर्वविद्धाप्रकर्तव्याशिवरात्रिर्बलेर्दिनमिति**हेमाद्रौपाद्मोक्तेः माधवोपि** बल्युत्सवंचपूर्वेद्युरुपवासवदाचरेदिति **निर्णयामृतेपि** याकुहूःप्रतिपन्मिश्रातत्रगाःपूजयेन्नृप पूजनात्त्रीणिवर्धंतेप्रजागावोमहीपतिरिति तथा भद्रायांगोकुलक्रीडास्देशोवैविनश्यति भद्रायांद्वितीयायाम् तथा प्रतिपद्यग्निकरणंद्वितीयायांतुगोर्चनम् छत्रच्छेदंकरिष्यंतेवित्तनाशंकुलक्षयमिति तथा प्रतिपद्दर्शसंयोगेक्रीडनंतुगवांमतम् परविद्धेषुयःकुर्यात्पुत्रदारधनक्षयइति**देवलवचनाच्च** एतेचविधिप्रतिषेधाःपूर्वदिनेप्रतिपदःसायाह्नव्यापित्वेद्वितीयदिनेचंद्रदर्शनसंभवेचज्ञेयाः गवांक्रीडादिनेयत्ररात्रौदृश्येतचंद्रमाः सोमोराजापशून्हंतिसुरभेःपूजकांस्तथेति **पुराणसमुच्चयात्** दिनद्वयेसायाह्नव्यापित्वेतुपरैवग्राह्या वर्धमानतिथौनंदायदासार्धत्रियामिका द्वितीयावृद्धिगामित्वादुत्तरातत्रचोच्यतइति तथा त्रियामगादर्शतिथिर्भवेच्चेत्सार्धत्रियामाप्रतिपद्विवृद्धौ दीपोत्सवेतेमुनिभिःप्रदिष्टअतोन्यथापूर्वयुतेर्विधेयइति**पुराणसमुच्चयादिति निर्णयामृतकारः** सार्धत्रियामिकेत्यनेनचंद्रदर्शनाभावउक्तः द्वितीयायाःपंचधाविभक्तदिनचतुर्थांशरूपापराह्णव्यापावेवचंद्रदर्शनसंभवात् वयंत्वेतद्वचनद्वयंपूर्वविद्धासंभवेवेदितव्यमितिब्रूमः दिनद्वयेप्रतिपदःसायाह्नव्याप्त्यभावेतुपूर्वैव रात्रौबलिपूजाविधानेनकर्मकालव्यापित्वात् परदिनेचंद्रोदयेतन्निषेधादितिदिक् ।

कार्तिक शुक्ल प्रतिपदेस गोक्रीडन **निर्णयामृतांत** सांगितलें आहे. त्याच प्रतिपदेस रात्रीं बलिपूजा सांगतो **हेमाद्रींत भविष्यांत**—"त्या प्रतिपदेस हें पूर्वोक्त सारें कृत्य करून रात्रीचे ठायीं दैत्यांचा पति जो बलिराजा त्याची पूजा, भूमीचे ठायीं मंडलावर स्वतां राजानें करावी. गृहामध्यें मोठ्या विस्तृत शाळेचे ठायीं पांच रंगांच्या वर्णांनीं दैत्यांचा राजा बलि काढून पूजा करावी. लोकांनींही गृहामध्यें शय्येचे ठायीं श्वेत तंदुलांनीं बलिराजाला स्थापून फलपुष्पांनीं पूजन करावें." पूजेचा मंत्र **पद्मपुराणांतः—"बलिराज नमस्तुभ्यं दैत्यदानववंदित ॥ इंद्रशत्रोऽमराराते विष्णुसान्निध्यदो भव"** तसेंच "बलीच्या उद्देशानें जीं दानें देतात तीं अक्षय होतात असें सांगतात. कृष्ण म्हणतात धर्मा ! हें मी तुला दाखविलें आहे." हें कृत्य पूर्वविद्ध ( अमावास्याविद्ध ) प्रतिपदेचे ठायीं करावें. कारण, "शिवरात्रि व बलिप्रतिपदा ही पूर्वविद्धा करावी." असें **हेमाद्रींत पाद्मवचन** आहे. **माधवही** "बलीचा उत्सव उपवासासारखा पूर्व दिवशीं करावा." **निर्णयामृतांतही** "अमावास्यायुक्त प्रतिपदेचे ठायीं गाईचें पूजन करावें. त्या पूजनानें प्रजा, गाई, राजा हीं तीन वृद्धिंगत होतात." तसेंच—"ज्या देशांत द्वितीयेचे ठायीं गोकुलक्रीडा होते, तो देश नष्ट होतो." तसेंच—"प्रतिपदेचे ठायीं होलिका पेटविणें व द्वितीयेचे ठायीं गोपूजन, हीं झालीं असतां छत्रच्छेद, वित्तनाश व कुलक्षय करतात." तसेंच—"प्रतिपदा व अमावास्या यांच्या योगाचे ठायीं गोक्रीडन मान्य आहे. तें द्वितीयाविद्ध प्रतिपदेचे ठायीं जो करील त्याचा पुत्र, स्त्री, धन यांचा नाश होईल." असें देवलवचनही आहे. ह्या वरील वचनांनीं अमावास्यायुक्त प्रतिपदेस गोक्रीडनाचा विधि व द्वितीयायुक्त प्रतिपदेस निषेध केला तो पूर्व दिवशीं प्रतिपदा सायाह्नव्यापिनी असून दुसऱ्या दिवशीं चंद्रदर्शनाचा संभव असतां जाणावा. कारण, "ज्या दिवशीं गोक्रीडा त्या दिवशीं रात्रीं चंद्रदर्शन होईल तर सोमराजा पशूंना व गोपूजक-

कर्त्याचा नाश करितो" असें **पुराणसमुच्चय**वचन आहे. दोन दिवशीं प्रतिपदेची सायाह्नकालव्याप्ति असेल तर पराच घ्यावी. कारण, "वाढणारी तिथि असतां जेव्हां प्रतिपदा साडेतीन प्रहर असेल तेव्हां द्वितीया वृद्धिगामिनी असल्यामुळें परा सांगितली आहे." तसेंच—"तिथि वाढल्या असतां तीन प्रहरपर्यंत जर अमावास्या असेल व दुसऱ्या दिवशीं प्रतिपदा साडेतीन प्रहर असेल तर त्या तिथि दीपोत्सवाविषयीं मुनींनीं सांगितल्या आहेत. अशा नसतील तर पूर्वयुक्त घ्याव्या" असें **पुराणसमुच्चय**वचन आहे, असें **निर्णयामृतकार** सांगतो. 'प्रतिपदा साडेतीन प्रहर' असें सांगितल्यावरून चंद्रदर्शनाचा अभाव सांगितला आहे. कारण, दिनमानाचे पांच भाग करून त्याच्या चवथ्या भागीं अपराह्णीं द्वितीयेची व्याप्ति असतांच चंद्रदर्शनाचा संभव असतो. आम्हीं ( कमलाकरभट्ट ) तर हीं दोन वचनें पूर्वविद्धेचा असंभव असतां जाणावीं असें सांगतों. दोन दिवशीं प्रतिपदेची सायाह्नव्याप्ति नसेल तर पूर्वाच करावी. कारण, रात्रीं बलिपूजा सांगितल्यामुळें पूर्वदिवशीं कर्मकालव्यापिनी आहे. आणि परदिवशीं चंद्रोदय असल्यामुळें गोपूजनाचा वगैरे निषेध आहे. ही दिशा दाखविली आहे.

**मदनरत्ने**तुपूर्वविद्धायांगोक्रीडा नीराजनमंगलमालिकेतूत्तरत्रकार्ये कार्तिकेशुक्लपक्षेतुविधानद्वितयंभवेत् नारीनीराजनंप्रातःसायंमंगलमालिका यदाचप्रतिपत्स्वल्पानारीनीराजनंभवेत् द्वितीयायांतदाकुर्यात्सायंमंगलमालिकामिति**ब्राह्मोक्तेः** लभ्यतेयदिवाप्रातःप्रतिपद्घटिकाद्वयम् तस्यांनीराजनंकार्यंसायंमंगलमालिकेति**भविष्योक्तेः** प्रातर्वायदिलभ्येतप्रतिपद्घटिकाशुभा द्वितीयायांतदाकुर्यात्सायंमंगलमालिकाम् कार्तिकेशुक्लपक्षादौत्वमावास्याघटीद्वयम् देशभंगभयान्नैवकुर्यान्मंगलमालिकामिति**देवीपुराणा**चेत्युक्तम् ।

**मदनरत्नांत** तर—पूर्वविद्ध प्रतिपदेचे ठायीं गोक्रीडा आणि नीराजन ( दिवे ओवाळणें ) व मंगलमालिका हीं कृत्यें तर परदिवशीं करावीं. कारण, "कार्तिकशुक्लपक्षांत दोन कृत्यें आहेत तीं अशीं:—प्रातःकालीं स्त्रियांनीं करावयाचा नीराजनविधि व सायंकालीं मंगलमालिका हीं होत. जेव्हां प्रतिपदा स्वल्प असून स्त्रियांचा नीराजनविधि प्रातःकालीं होईल तेव्हां द्वितीयेंत सायंकालीं मंगलमालिका करावी." असें **ब्राह्म**वचन आहे. आणि "प्रातःकालीं जर दोन घटिका प्रतिपदा मिळेल तर तिचे ठायीं नीराजनविधि करून सायंकालीं मंगलमालिका करावी." असें **भविष्य**वचन आहे. व "अथवा प्रातःकालीं जर प्रतिपदा एक घटिका चांगली असेल, तर द्वितीयेमध्यें सायंकालीं मंगलमालिका करावी. कार्तिकशुक्लपक्षाच्या प्रतिपदेचे दिवशीं दोन घटिका जर अमावास्या असेल तर देशभंगाच्या भीतीनें त्यादिवशीं मंगलमालिका करूच नये." असें **देवीपुराण**वचनही आहे, असें सांगितलें आहे.

अत्रविशेषो**हेमाद्रौब्राह्मे** बलिप्रतिपदंप्रक्रम्य तस्माद्द्यूतंप्रकर्तव्यंप्रभातेतत्रमानवैः तस्मिन्द्यूतेजयोयस्यतस्यसंवत्सरंजयः पराजयोविरुद्धश्चलाभनाशकरोभवेत् दयिताभिश्चसहितैर्नेयासाचभवेन्निशेति अत्रगोवर्धनपूजादिमार्गपालीबंधनादिचोक्तं**हेमाद्रौनिर्णयामृतेचस्कांदे** प्रातर्गोवर्धनंपूज्यद्यूतंचापिसमाचरेत् भूषणीयास्तथागावःपूज्याश्चावाहदोहनाः गोवर्धनश्चगोमयेनकार्यश्चित्रेणवा **मंत्रस्तु** गोवर्धनधराधारगोकुलत्राणकारण विष्णुबाहुकृतच्छायगवांकोटिप्रदोभव गोमंत्रस्तु लक्ष्मीर्यालोकपालानांधेनुरूपेणसंस्थिता घृतंवहतियज्ञार्थेममपापंव्यपोहतु तत्रैव**स्कांदे** ततोऽपराह्णसमयेपूर्वस्यांदिशिभारत मार्गपालींप्रबध्नीयात्तुंगेस्तंभेथपादपे कुशकाशमयींदिव्यांलंबकैर्बहुभिर्मुने दर्शयित्वागजानश्वान्सायमस्यास्तलेनयेत् कृतेहोमेद्विजेंद्रैस्तुबध्नीयान्मार्गपालिकाम् नमस्कारंततःकुर्यान्मंत्रेणानेनसुव्रत मार्गपालिनमस्तेस्तुसर्वलोकसुखप्रदे विधेयैःपुत्रदाराद्यैःपुनरेहिव्रतस्यमे नीराजनंचतत्रैवकार्यंराष्ट्रजयप्रदं राजानोराजपुत्राश्चब्राह्मणाःशूद्रजातयः मार्गपालींसमुल्लंघ्यनीरुजःस्युःसुखान्विताः तत्रैवा**दित्यपुराणे** कुशकाशमयींकुर्याद्वष्टिकांसुदृढांनवाम् तामेकतोराजपुत्राहीनवर्णास्तथान्यतः गृहीत्वाकर्षयेयुस्तांयथासारंमुहुर्मुहुः जयेऽत्रहीनजातीनांजयोराज्ञस्तुवत्सरमिति ।

या प्रतिपदेचे ठायीं विशेष **हेमाद्रींत ब्राह्मांत** बलिप्रतिपदेचा उपक्रम करून सांगतो—"तस्मात् प्रतिपदेचे दिवशीं प्रातःकालीं मनुष्यांनीं द्यूत करावें, त्या द्यूतामध्यें ज्याचा जय होईल त्याचा वर्षपर्यंत जय होईल. व पराजय झाला असतां तो लाभाचा नाश करणारा होईल. ती रात्र स्त्रियांसहित मोठ्या आनंदांत घालवावी." या प्रतिपदेचे ठायीं गोवर्धनपूजा, द्यूत इत्यादिक व मार्गपालीबंधन वगैरे कृत्यें सांगतो—**हेमाद्रींत** व **निर्णयामृतांत स्कांदांत**—"प्रातःकालीं गोवर्धनाची पूजा करून द्यूतही करावें. तसेंच गाईला व वृषभांला अलंकार घालून त्यांची पूजा करावी. आणि त्या दिवशीं दूध काढणें

व भार वाहविणें वर्ज्य करावें." गोवर्धन पर्वत गोमयानें करावा किंवा रंगानें लिहावा. **पूजेचा मंत्रः—"गोवर्धन धराधार गोकुलत्राणकारण ॥ विष्णुबाहुकृतच्छाय गवां कोटिप्रदो भव." गोपूजनमंत्रः—"लक्ष्मीर्या लोकपालानां धेनुरूपेण संस्थिता ॥ घृतं वहति यज्ञार्थे मम पापं व्यपोहतु." तेथेंच स्कांदांत**—"नंतर **अपराह्णकालीं** कुशांची व काशतृणांची सुंदर मार्गपाली नांवाची रज्जु बहुत लंबकांनीं युक्त करून ती उच्च स्तंभास व वृक्षास बांधावी. सायंकालीं तिच्या खालून हत्ती घोडे न्यावे. ब्राह्मणांनीं होम केल्यावर ती मार्गपालिका ( कुशकाशमय दोरी ) पूर्वी सांगितल्याप्रमाणें बांधावी. नंतर या पुढील मंत्रानें तिला नमस्कार करावा. **मंत्रः—मार्गपालि नमस्तेस्तु सर्वलोकसुखप्रदे ॥ विधेयैः पुत्रदाराद्यैः पुनरेहि व्रतस्य मे ॥** राज्यास जय देणारा असा नीराजनविधिही **तेथेंच** करावा. राजे, राजपुत्र, ब्राह्मण व शूद्रजाति हे सारे मार्गपालीचें उल्लंघन करून गेले असतां निरोगी व सुखी होतात." **तेथेंच आदित्यपुराणांत**—"कुश व काशतृण यांची नवी घट्ट अशी वष्टिकानांवाची दोरी करून ती, एकीकडे राजपुत्र व दुसरीकडे हीनजातीचे लोक यांनीं धरून तिचें आपल्या बलाप्रमाणें वारंवार आकर्षण करावें. त्यांत हीनजातींचा जय झाला असतां वर्षभरपर्यंत राजाचा जय होईल, असें समजावें."

यमद्वितीयातुप्रतिपद्युताग्राह्येत्युक्तं**निर्णयामृतादौ** यमद्वितीयामध्याह्नव्यापिनीपूर्वविद्धाचेति**हेमाद्रिः** अत्रविशेषो**हेमाद्रौस्कांदे** ऊर्जेशुक्लद्वितीयायामपराह्णेऽर्चयेद्यमम् स्नानंकृत्वाभानुजायांयमलोकंनपश्यतीति ऊर्जेशुक्लेद्वितीयायांपूजितस्तर्पितोयमः वेष्टितःकिन्नरैर्हृष्टैस्तस्मैयच्छतिवांछितम् तथा**भविष्ये** प्रथमाश्रावणेमासितथाभाद्रपदेपरा तृतीयाश्वयुजेमासिचतुर्थीकार्तिकेभवेत् श्रावणेकलुषानामतथाभाद्रेचगीर्मला आश्विनेप्रेतसंचाराकार्तिकेयाम्यकामतेत्युक्त्वा प्रथमायांव्रतंद्वितीयायांसरस्वतीपूजांतृतीयायांश्राद्धमुक्त्वा चतुर्थ्यामुक्तम् कार्तिकेशुक्लपक्षस्यद्वितीयायांयुधिष्ठिर यमोयमुनयापूर्वंभोजितःस्वगृहेऽर्चितः अतोयमद्वितीयेयंत्रिषुलोकेषुविश्रुता अस्यांनिजगृहेविप्रनभोक्तव्यंततोनरैः स्नेहेनभगिनीहस्ताद्भोक्तव्यंपुष्टिवर्धनम् दानानिचप्रदेयानिभगिनीभ्योविधानतः स्वर्णालंकारवस्त्रान्नपूजासत्कारभोजनैः सर्वाभगिन्यःसंपूज्याअभावेप्रतिपन्नकाः[1] प्रतिपन्नाःमताभगिन्यइति**हेमाद्रिः** पितृव्यभगिनीहस्तात्प्रथमायांयुधिष्ठिर मातुलस्यसुताहस्ताद्द्वितीयायांतथानृप पितुर्मातुःस्वसुःकन्येतृतीयायांतयोःक्रमात् भोक्तव्यंसहजायाश्चभगिन्याहस्ततःपरम् सर्वासुभगिनीहस्ताद्भोक्तव्यंबलवर्धनं यस्यांतिथौयमुनयायमराजदेवःसंभोजितःप्रतिजगत्स्वसृसौहृदेन तस्यांस्वसुःकरतलादिहयोभुनक्तिप्राप्नोतिरत्नसुखधान्यमनुत्तमंसः **गौडास्तु** यमंचचित्रगुप्तंचयमदूतांश्चपूजयेत् अर्घ्यश्चात्रप्रदातव्योयमायसहजद्वयैः **मंत्रः** एह्येहिमार्तंडजपाशहस्तयमांतकालोकधरामरेश भ्रातृद्वितीयाकृतदेवपूजांगृहाणचार्घ्यंभगवन्नमस्ते भ्रातस्तवानुजाताहंभुंक्ष्वभक्तमिदंशुभं प्रीतयेयमराजस्ययमुनायाविशेषतः ज्येष्ठाग्रजातेनिवदेदिति**स्मार्ताः** इत्यन्नदानमित्यप्याहुः **ब्रह्मांडपुराणेपि** यातुभोजयतेनारीभ्रातरंयुग्मकेतिथौ अर्चयेच्चापितांबूलैर्नसावैधव्यमाप्नुयात् भ्रातुरायुःक्षयोराजन्नभवेत्तत्रकर्हिचिदिति ।

यमद्वितीया तर प्रतिपदायुक्त घ्यावी, असें **निर्णयामृतादिकांत** सांगितलें आहे. यमद्वितीया मध्याह्नव्यापिनी व पूर्वविद्धा ( प्रतिपदाविद्धा ) घ्यावी, असें **हेमाद्रि** सांगतो. या यमद्वितीयेचे ठायीं विशेष सांगतो—**हेमाद्रींत स्कांदांत**—"कार्तिकशुक्लद्वितीयेचे ठायीं अपराह्णीं यमुनेमध्यें स्नान करून यमाचें पूजन करणारा यमलोक पहात नाहीं." "कार्तिकशुक्लद्वितीयेचे ठायीं पूजा करून तृप्त केलेला असा यम आनंदित किन्नरांनीं वेष्टित होऊन पूजाकर्त्यास इच्छित फल देतो." **तसेंच भविष्यांत**—"पहिली श्रावणांतील द्वितीया; दुसरी भाद्रपदांतील द्वितीया; तिसरी आश्विनांतील द्वितीया; आणि **चवथी** कार्तिकांतील द्वितीया आहे. श्रावणांतील द्वितीया कलुषा नांवाची होय. भाद्रपदांतील गीर्मला. आश्विनांतील प्रेतसंचारा. आणि कार्तिकांतील याम्यका होय." असें सांगून पहिलीस व्रत, दुसरीस सरस्वतीपूजा, तिसरीस श्राद्ध सांगून **चवथीस** सांगतो—"पूर्वी कार्तिकशुक्ल द्वितीयेचे ठायीं यमुनेनें आपल्या घरीं यमाचें पूजन करून भोजन घातलें, म्हणून ही यमद्वितीया तीन लोकांमध्यें प्रसिद्ध झाली, या कारणास्तव या द्वितीयेचे ठायीं आपल्या घरीं पुरुषांनीं भोजन करूं नये. प्रीतीनें भगिनीच्या हातचें पुष्टिकारक भोजन करावें. आणि भगिनीला यथाशास्त्र दानेंही द्यावीं; सोन्याचे दागिने, वस्त्र, अन्न, पूजा, सत्कार व भोजन यांहींकरून सर्व भगिनींचें पूजन करावें. भगिनी नसतील तर प्रतिपन्न ( मानलेल्या ) भगिनींचें पूजन

१ प्रतिपन्नकाः भगिनीत्वेन कल्पिता इत्यर्थः ॥

करावें." प्रतिपन्न म्हणजे मानलेल्या भगिनी, असें हेमाद्रि सांगतो. "पहिल्या ( श्रावणांतल्या ) द्वितीयेस चुलतबहिणीच्या हातचें जेवावें. दुसऱ्या द्वितीयेस मातुलकन्येच्या हातचें जेवावें. तिसऱ्या द्वितीयेस आत्याच्या व मावशीच्या कन्येच्या हातचें भोजन करावें. चवथ्या ( कार्तिक ) द्वितीयेस सोदरभगिनीच्या हातचें जेवावें. वर सांगितलेल्या चारही द्वितीयांचे ठायीं भगिनींच्या हातचें भोजन करावें, तें बलवर्धक आहे. प्रत्येक जगांत ज्या तिथीचे ठायीं यमुनेनें भगिनीपणाच्या मैत्रीनें देव यमराजाला भोजन घातलें त्या तिथीचे ठायीं या लोकीं जो मनुष्य भगिनीच्या हातचें भोजन करितो त्याला रत्नें, सुख, धान्यें हीं उत्तम प्राप्त होतात." गौड तर—"यम, चित्रगुप्त, यमदूत यांचें पूजन करून सहजद्वय ( भ्राता व बहीण ) यांनीं या द्वितीयेचे ठायीं यमाला अर्घ्यही द्यावें." मंत्रः—"एह्येहि मार्तंडज पाशहस्त यमांतकालोकधरामरेश ॥ भ्रातृद्वितीयाकृतदेवपूजां गृहाण चार्घ्यं भगवन्नमस्ते" ॥ "भ्रातस्तवानुजाताहं भुंक्ष्व भक्तमिदं शुभं ॥ प्रीयते यमराजस्य यमुनाया विशेषतः" ॥ वडील भगिनीनें 'भ्रातस्तवाग्रजाताऽहं' असें म्हणावें असें स्मार्त सांगतात. या मंत्रानें अन्नदान करावें असेंही ( गौड ) सांगतात. ब्रह्मांडपुराणांतही "जी स्त्री द्वितीयेचे ठायीं भ्रात्याला भोजन देते व तांबूलादिकानें पूजन करिते तिला वैधव्य प्राप्त होत नाहीं, व तसें केल्यानें भ्रात्याच्या आयुष्याचा क्षय कधींही होत नाहीं."

कार्तिकशुक्लनवमीयुगादिः सापौर्वाह्णिकीग्राह्या शुक्लपक्षस्थत्वान् अत्रपिंडरहितंश्राद्धंकर्तव्यम् अन्यत्प्रागुक्तम् अत्रैवविष्णुत्रिरात्रमुक्तंहेमाद्रौपाद्मे कार्तिकेशुक्लनवमीमवाप्यविजितेंद्रियः हरिंविधायसौवर्णंतुलस्यासहितंविभुम् पूजयेद्विधिवद्भक्त्याव्रतीतत्रदिनत्रयम् एवंयथोक्तविधिनाकुर्याद्वैवाहिकंविधिमिति ।

कार्तिकशुक्लनवमी ही युगादि तिथि होय. ती पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. कारण, शुक्लपक्षांतील युगादि पूर्वाह्णव्यापिनी घ्याव्या, असें सांगितलें आहे. या नवमीचे ठायीं पिंडरहित श्राद्ध करावें. अन्य सर्व प्रकार पूर्वी वैशाखमासांत अक्षयतृतीयाप्रसंगीं सांगितला आहे. एथेंच विष्णुत्रिरात्रव्रत सांगतो-हेमाद्रींत पाद्मांत—"कार्तिकशुक्लनवमी प्राप्त असतां व्रत धारण करून जितेंद्रिय होऊन तुलसीसहित हरीची सुवर्णाची मूर्ति करून तीन दिवस भक्तीनें यथाशास्त्र पूजा करावी आणि शास्त्रोक्त विधीनें तुलसीसहित हरीचा विवाह करावा."

कार्तिकशुक्लैकादश्यांभीष्मपंचकव्रतमुक्तंनारदीये अतोनरैःप्रयत्नेनकर्तव्यंभीष्मपंचकम् कार्तिकस्यामलेपक्षेस्नात्वासम्यग्यतव्रतः एकादश्यांतुगृह्णीयाद्व्रतंपंचदिनात्मकमिति तद्विधिस्तुगोमयेनस्नात्वामौनीपंचामृतैःपंचगव्यैर्विष्णुंसंस्नाप्यसंपूज्यपायसंनिवेद्यद्वादशाक्षरमष्टोत्तरशतंजप्त्वा ओंनमोविष्णवइतिषडक्षरेणघृताक्तान्यवान्व्रीहींश्चाष्टोत्तरशतंहुत्वाभूमौस्वपेत् एवंपंचदिनेपुकुर्यात् विशेषस्त्वाद्येऽह्निहरेःपादौकमलैःसंपूज्यत्रिर्गोमयंप्राश्यम् द्वितीयेऽह्निबिल्वपत्रैर्जानुनीसंपूज्यगोमूत्रम् त्रयोदश्यांभृंगराजेननाभिंसंपूज्यक्षीरम् चतुर्दश्यांकरवीरैः स्कंधंसंपूज्यदधि पौर्णमास्यांहोमांतेलौहींपापप्रतिमांखड्गचक्रहस्तांकृष्णवस्त्रेणवेष्टितांप्रस्थतिलोपरिस्थांकृत्वाधर्मराजनामभिःकरवीरैःसंपूज्य यदन्यजन्मनिकृतमिहजन्मनिवापुनः तत्सर्वंप्रशमंयातुमत्पापंतवपूजनादितिपुष्पांजलिंक्षिप्त्वाकृष्णप्रतिमांचसंपूज्यविप्रायदत्वाविप्रान्संभोज्यदक्षिणांदत्वापंचगव्यंप्राश्यपौर्णमास्यांनक्तंभुंजीतेतिलघुनारदीये पंचगव्यप्राशनंपडक्षरेणेतिहेमाद्रिः हेमाद्रौभविष्येतु शाकैर्मुन्यन्नैर्वापंचाहंवर्तनमुक्तम् अंतेप्युक्तम् यद्भीष्मपंचकमितिप्रथितंपृथिव्यामेकादशीप्रभृतिपंचदशीनिरुद्धम् मुन्यन्नभोजनपरस्यनरस्यतस्मिन्निष्टंफलंदिशतिपांडवशार्ङ्गधन्वेति तथापाद्मे पंचाहंपंचगव्याशीभीष्मायाध्र्यंचपंचसु अहःस्वपितथादद्यान्मंत्रेणानेनसुव्रत सत्यव्रतायशुचयेगांगेयायमहात्मने भीष्मायैतद्ददाम्यर्घ्यमाजन्मब्रह्मचारिणे वैयाघ्रपद्यगोत्रायेतिच सव्येनानेनमंत्रेणतर्पणंसार्ववर्णिकमिति ।

कार्तिकशुक्ल एकादशीस भीष्मपंचक व्रत सांगतो नारदीयपुराणांत-"मनुष्यांनीं प्रयत्नानें भीष्मपंचकव्रत करावें. व्रताचा चांगला निश्चय करून कार्तिकशुक्ल पक्षाच्या एकादशीस स्नान करून पांचदिवसांचें व्रत घ्यावें." त्या व्रताचा विधि—गोमय अंगास लावून स्नान करून मौन करून पंचामृतें व पंचगव्यें यांनीं विष्णूला स्नान घालून पूजन करून पायसाचा नैवेद्य अर्पण करून द्वादशाक्षर मंत्राचा अष्टोत्तरशत ( १०८ ) जप करून "ॐ नमो विष्णवे" या षडक्षर मंत्रानें घृतयुक्त यव व व्रीही यांचा अष्टोत्तरशत होम करून भूमीवर निद्रा करावी. असें पांचदिवस व्रत करावें. आतां प्रतिदिवशीं विशेष म्हटला म्हणजे-पहिल्या दिवशीं हरीचे पाय कमलांनीं पुजून तीन वेळ गोमय प्राशन करावें. दुसऱ्या

१ वैयाघ्रपद्यगोत्रायसांकृत्यप्रवराय च ॥ गंगापुत्रायभीष्मायप्रदास्येऽहं तिलोदकम् ॥ अपुत्रायददाम्येतत्सलिलंभीष्मवर्मणे ॥

दिवशीं बिल्वपत्रांनीं जानूंची पूजा करून गोमूत्र भक्षण करावें. त्रयोदशीस भृंगराज ( माका ) यानें नाभीचें पूजन करून दुग्ध प्राशन करावें. चतुर्दशीस करवीर ( कण्हेर ) पुष्पांनीं स्कंधांची पूजा करून दधि प्राशन करावें. पौर्णिमेस होम झाल्यावर लोखंडाची पापाची प्रतिमा खड्गचक्रयुक्त हस्ताची करून कृष्णवस्त्रानें वेष्टित करून प्रस्थ ( शास्त्रीय शेर ) प्रमाण तिलांवर ठेऊन धर्मराज्याच्या नामांनीं करवीरपुष्पांनीं पूजा करून **"यदन्यजन्मनि कृतमिह जन्मनि वा पुनः ॥ तत्सर्वं प्रशमं यातु मत्पापं तव पूजनात्."** या मंत्रानें पुष्पांजलि देऊन कृष्णप्रतिमेचेंही पूजन करून ब्राह्मणाला तिचें दान करून ब्राह्मणभोजन घालून दक्षिणा देऊन पंचगव्य प्राशन करून पौर्णमासीच्या दिवशीं नक्त ( रात्रि ) भोजन करावें. असें हें व्रत **लघुनारदीयां**त सांगितलें आहे. पंचगव्य प्राशन षडक्षरमंत्रानें करावें, असें **हेमाद्रि** सांगतो. **हेमाद्रींत भविष्यपुराणांत** नर-शाक भक्षण करून किंवा मुनींचीं अन्नें, देवभात वगैरे भक्षण करून हें पंचदिनात्मक व्रत करावें, असें सांगितलें आहे. याप्रमाणें व्रत सांगून अंतींही असें सांगतो कीं,—"एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत करावयाचें म्हणून जें भीष्मपंचक व्रत पृथ्वीवर प्रसिद्ध आहे त्या व्रताचेठायीं मुन्यन्न भक्षण करणाऱ्या मनुष्याला शार्ङ्गधन्वा भगवान् इष्ट फल देतो." तसेंच **पाद्मांत**—"पांच दिवस पंचगव्य प्राशन करून राहावें व पांचही दिवस या पुढील मंत्रानें भीष्माला अर्घ्य द्यावें." अर्घ्य**मंत्रः—"सत्यव्रताय शुचये गांगेयाय महात्मने ॥ भीष्मायैतद्ददाम्यर्घ्यमाजन्मब्रह्मचारिणे."** आणि "वैयाघ्रपद्यगोत्राय सांकृत्यप्रवराय च ॥ गंगापुत्राय भीष्माय प्रदास्येहं तिलोदकं ॥ हा मंत्र म्हणून सव्यानें तर्पण सर्व वर्णांनीं करावें."

कार्तिशुक्लद्वादश्यांरेवतीनक्षत्रयोगरहितायांपारणंकार्यम् तदुक्तम् आभाकासितपक्षेषुमैत्रश्रवणरेवती संगमेनहिभोक्तव्यंद्वादशद्वादशीर्हरेदिति यदातुरेवतीयोगरहिताद्वादशीसर्वथानलभ्यतेतदारेवत्याश्चतुर्थपादं- वर्जयेत् वचनंतुप्रागुक्तम् **लघुनारदीये** कार्तिकेशुक्लपक्षस्यकृत्वाचैकादशींनरः प्रातर्दत्वाशुभान्कुंभान्प्र- यातिहरिमंदिरम् **मदनरत्नेवाराहे** एकादशीसोमयुक्ताकार्तिकेमासिभामिनि उत्तराभाद्रसंयोगेअनंतासा- प्रकीर्तिता तस्यांयत्क्रियतेभद्रेसर्वमानंत्यमश्नुते ।

कार्तिकशुक्ल द्वादशीचे दिवशीं पारणा करणें ती रेवतीनक्षत्ररहित द्वादशीचे ठायीं करावी. तेंच सांगतो—"आषाढ, भाद्रपद, कार्तिक यांच्या शुक्लपक्षांतील द्वादशींत अनुक्रमानें अनुराधा, श्रवण, रेवती ह्या नक्षत्रांच्या योगावर भोजन करूं नये; केलें तर बारा द्वादशींचें पुण्य जातें." जेव्हां रेवतीयोगरहित द्वादशी सर्वथा मिळणार नाहीं तेव्हां रेवतीचा चतुर्थ चरण सोडावा. याविषयीं वचन तर पूर्वी ( आषाढशुक्लद्वादशीपारणाप्रसंगीं ) सांगितलें आहे. **लघुनारदीयांत**—"कार्तिकशुक्ल एकादशी करून प्रातःकालीं शुभ उदकुंभ देणारा वैकुंठास जातो." **मदनरत्नांत वाराहांत**—"कार्तिकमासाची एकादशी सोमवार व उत्तराभाद्रपदा नक्षत्र यांनीं युक्त असेल ती अनंता म्हटली आहे. तिचे ठायीं जें व्रतादि केलें असेल तें सर्व अनंत होतें."

अस्यामेवरात्रौदेवोत्थापनमुक्तं**हेमाद्रौब्राह्मे** एकादश्यांचशुक्लायांकार्तिकेमासिकेशवम् प्रसुप्तंबोधयेद्रा- त्रौश्रद्धाभक्तिसमन्वितइति **मदनरत्नेभविष्ये** कार्तिकेशुक्लपक्षेतुएकादश्यांप्रथामुत मंत्रेणानेनराजेंद्रदेव- मुत्थापयेद्द्विजः **रामार्चनचंद्रिकादौ**तुद्वादश्यामुक्तम् पारणाहेपूर्वरात्रेघंटादीन्वादयेन्मुहुरिति अत्रदे- शाचारतोव्यवस्था तत्रैवदेवदेवस्यस्नानंपूर्वमहद्भवेन महापूजांततःकृत्वादेवमुत्थापयेत्सुधीः मंत्रास्तु**वाराह- पुराणे**उक्ताः ॐब्रह्मेंद्ररुद्राग्निकुबेरसूर्यसोमादिभिर्वंदितवंदनीय बुध्यस्वदेवेशजगन्निवासमंत्रप्रभावेणसुखे- नदेव इयंतुद्वादशीदेवप्रबोधार्थविनिर्मिता त्वयैवसर्वलोकानांहितार्थंशेषशायिना उत्तिष्ठोत्तिष्ठगोविंदत्यजनि- द्रांजगत्पते त्वयिसुप्तेजगन्नाथजगत्सुप्तंभवेदिदम् उत्थितेचेष्टतेसर्वमुत्तिष्ठोत्तिष्ठमाधव गतामेघावियच्चैवनि- र्मलंनिर्मलादिशः शारदानिचपुष्पाणिगृहाणममकेशव इदंविष्णुरितिप्रोक्तोमंत्रउत्थापनेहरेरिति एवंदेवमुत्था- प्यतदग्रेचातुर्मास्यव्रतसमाप्तिंकुर्यात् तदुक्तं**भारते** चतुर्धागृह्यवैचीर्णंचातुर्मास्यव्रतंनरः कार्तिकेशुक्लपक्षेतुद्वा- दश्यांतत्समापयेत् **लघुनारदीये** चातुर्मास्यव्रतानांचसमाप्तिःकार्तिकेस्मृता मंत्रश्च**निर्णयामृतेसन- त्कुमारेणोक्तः** इदंव्रतंमयादेवकृतंप्रीत्यैतवप्रभो न्यूनंसंपूर्णतांयातुत्वत्प्रसादाज्जनार्दनेति ।

याच एकादशीस रात्रीं देवोत्थापन ( देवास जागृत करणें ) सांगतो—**हेमाद्रींत ब्राह्मांत** "निजलेल्या भगवंताला कार्तिकशुक्ल एकादशीचे दिवशीं रात्रीं श्रद्धा व भक्तियुक्त होऊन उठवावें." **मदनरत्नांत भविष्यांत**—"कार्तिकशुक्ल एकादशीचे दिवशीं ब्राह्मणानें पुढील मंत्रानें देवाला जागृत करावें." **रामार्चनचंद्रिकादि**ग्रंथांत तर द्वादशीचे दिवशीं

जागृत करणें सांगितलें आहे. तें असें—"पारणादिवशीं पूर्वरात्रीं वारंवार घंटादिक वाजवावीं." वरील वचनांवरून एकादशीस प्रबोधोत्सव करावा, असें होतें, आणि रामार्चनचंद्रिकेवरून द्वादशीस करावा, असें होतें, आतां करावा कधीं म्हणाल तर ज्या देशांत जसा आचार असेल तसा करावा. त्या उत्थापनसमयींच देवाला पूर्वी मोठें स्नान घालावें नंतर महापूजा करून देवाला उठवावें." मंत्र तर **वराहपुराणांत** सांगितले आहेत. ते असे:—"**ब्रह्मेंद्ररुद्राग्निकुबेरसूर्यसोमादिभिर्वंदित वंदनीय ॥ बुध्यस्व देवेश जगन्निवास मंत्रप्रभावेण सुखेन देव ॥ इयं तु द्वादशी देव प्रबोधार्थं विनिर्मिता ॥ त्वयैव सर्वलोकानां हितार्थं शेषशायिना ॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ गोविंद त्यज निद्रां जगत्पते ॥ त्वयि सुप्ते जगन्नाथ जगत्सुप्तं भवेदिदम् ॥ उत्थिते चेष्टते सर्वमुत्तिष्ठोत्तिष्ठ माधव ॥ गता मेघा वियच्चैव निर्मलं निर्मला दिशः ॥ शारदानि च पुष्पाणि गृहाण मम केशव.**" "**इदं** विष्णु०" हा मंत्रही भगवंताच्या उत्थापनाविषयीं सांगितला आहे." याप्रमाणें देवाला उठवून त्याच्या पुढें चातुर्मास्यव्रतांची समाप्ति करावी. तें सांगतो—**भारतांत**—"आषाढांत चारप्रकारचें व्रत घेऊन आचरण केलें असेल त्याची समाप्ति कार्तिकशुक्ल द्वादशीस करावी." **लघुनारदीयांत**—"चातुर्मास्यव्रतांची समाप्ति कार्तिकमासांत सांगितली आहे." त्याचा मंत्र **निर्णयामृतांत सनत्कुमारानें** सांगितला, तो असा—"**इदं व्रतं मया देव कृतं प्रीत्यै तव प्रभो ॥ न्यूनं संपूर्णतां यातु त्वत्प्रसादाज्जनार्दन.**"

अथ**वाराहोक्तो**बोधिनीविधिः एकादश्यांरात्रौकुंभेघृतपात्रोपरिहैमंमाषमितंमत्स्यंपंचामृतेनसंस्नाप्यकुंकुमपीतवस्त्रयुगपद्माद्यैःसंपूज्यमत्स्यादिदशावतारान्संपूज्यजागरंकृत्वाप्रातर्देवमाचार्यंचवस्त्राद्यैःसंपूज्य जगदादिर्जगद्रूपोजगदादिरनादिमान् जगदाद्योजगद्योनिःप्रीयतांमेजनार्दन इतिनत्वादक्षिणांदत्वाब्राह्मणान्भोजयेदिति तथा**ब्राह्मे** महातूर्यरवैरात्रौभ्रामयेत्स्यंदनेस्थितम् उत्थितंदेवदेवेशंनगरेपार्थिवःस्वयम् चतुरोवार्षिकान्मासान्नियमंयस्ययत्कृतम् कथयित्वाद्विजेभ्यस्तद्दद्याद्भक्त्यासदक्षिणम यस्यभक्ष्यस्यनियमःकृतस्तद्द्रव्यंदद्यादित्यर्थः इदंशुक्रास्तादावपिकार्यम आशौचेतुपूजामन्येनकारयेत् कार्तिकशुक्लद्वादशीपौर्णमासीचमन्वादिः सापौर्वाह्णिकीग्राह्या अन्यत्प्रागुक्तम् ।

**आतां वाराहपुराणोक्त बोधिनीविधि** सांगतो—एकादशीचे दिवशीं रात्रीं कुंभावर घृतपात्र ठेऊन त्याजवर माषप्रमाण सुवर्णाचा मत्स्य ठेवून त्याला पंचामृतानें स्नान घालून केशर, पिंवळीं दोन वस्त्रें, कमळें इत्यादिकांनीं त्या मत्स्याची पूजा करून व मत्स्यादिदशावतारांची पूजा करून जागरण करून प्रातःकालीं देव आणि आचार्य यांची वस्त्रादिकांनीं पूजा करून, "**जगदादिर्जगद्रूपो जगदादिरनादिमान् ॥ जगदाद्यो जगद्योनिः प्रीयतां मे जनार्दनः**" या मंत्रानें नमस्कार करून दक्षिणा देऊन ब्राह्मणभोजन करावें. तसेंच **ब्राह्मांत**—"रात्रीं वाद्यांचा मोठा गजर करून उत्थित देवाला रथावर बसवून तो रथ स्वतां राजानें नगरामध्यें फिरवावा." "चार महिने ज्यानें ज्या पदार्थाचा नियम केला असेल तो पदार्थ ब्राह्मणाला सांगून भक्तीनें दक्षिणासहित तो द्यावा." म्ह० जो भक्ष्य पदार्थ वर्ज्य केला असेल तो द्यावा असा अर्थ. हा सर्व विधि शुक्र, गुरु यांचें अस्त वगैरे असतांही करावा. आशौच असेल तर पूजा अन्याकडून करवावी. इतर नियम स्वतः करावे. कार्तिकशुक्लद्वादशी व पौर्णिमा ह्या मन्वादिक होत. ती मन्वादिक तिथि पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. इतर निर्णय पूर्वी ( चैत्र शुक्लतृतीयाप्रसंगीं ) सांगितला आहे.

कार्तिशुक्लचतुर्दशीवैकुंठसंज्ञा साविष्णुपूजायांरात्रिव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्तौनिशीथप्रदोषोभयव्यापिनीग्राह्या तदुक्तं**हेमाद्रौभविष्ये** कार्तिकस्यसितेपक्षेचतुर्दश्यांनराधिप सोपवासस्तुसंपूज्यहरिंरात्रौजितेंद्रियइति अस्याएवविश्वेश्वरप्रतिष्ठादिनत्वात्तत्प्रीत्यर्थंयदोपवासादिक्रियतेतदाऽरुणोदयव्यापिनीग्राह्या तदुक्तं**त्रिस्थलीसेतौसनत्कुमारसंहितायाम्** वर्षेचहेमलंबाख्येमासेश्रीमतिकार्तिके शुक्लपक्षेचतुर्दश्यामरुणाभ्युदयंप्रति महादेवतिथौब्राह्मेमुहूर्तेमणिकर्णिके स्नात्वाविश्वेश्वरोदेव्याविश्वेश्वरमपूजयदिति तत्पूर्वदिनेचोपवासःकार्यः ततःप्रभातेविमलेकृत्वापूजांमहाद्भुताम् दंडपाणेर्महाधाम्निवनेस्मिन्कृतपारणइतित**त्रैवोक्तेः शिवरहस्येपि** पूजाजागराद्युक्त्वोक्तम् ततोऽरुणोदयेजातेस्नात्वास्नात्वाचभस्मना संध्यांसमाप्यविश्वेशंमामभ्यर्च्ययथाविधि मद्भक्तान्भोजयामासुर्रूपयोबुभुजुस्ततइति ।

कार्तिकशुक्लचतुर्दशी ही वैकुंठचतुर्दशी होय. ती विष्णुपूजेविषयीं रात्रिव्यापिनी घ्यावी. दोन दिवशीं रात्रिव्यापिनी असतां मध्यरात्रीं व प्रदोषकालीं जी असेल ती घ्यावी. तें सांगतो—**हेमाद्रींत भविष्यांत**—"कार्तिकशुक्लचतुर्दशीस

उपवास करून जितेंद्रिय होऊन रात्रीं हरीचें पूजन करावें." यास्त चतुर्दशीचे दिवशीं **विश्वेश्वराची प्रतिष्ठा ( स्थापना )** झाली असल्यामुळें त्याच्या प्रीत्यर्थ जेव्हां उपवासादिक कर्तव्य असेल तेव्हां त्याविषयीं **अरुणोदयव्यापिनी घ्यावी. तें** सांगतो **त्रिस्थलीसेतूंत सनत्कुमारसंहितेंत**—"हेमलंब नांवाच्या संवत्सरीं श्रीमान् **कार्तिकमासाचे शुक्लपक्षाची** शिवतिथि जी चतुर्दशी तिचे ठायीं अरुणोदयकालीं ब्राह्ममुहूर्तावर मणिकर्णिकेमध्यें विश्वेश्वरानें **स्नान करून देवीसहवर्तमान** विश्वेश्वराचें पूजन केलें आहे." त्याचे पूर्वदिवशीं उपवास करावा. कारण, "नंतर स्वच्छ प्रातःकालीं **मोठी अद्भुत पूजा** करून दंडपाणीचें मोठें वसतिस्थान अशा या वनामध्यें पारणा केली." असें तेथेंच सांगितलें आहे. **शिवरहस्यांतही—** पूजा, जागर इत्यादिक सांगून सांगतात—"नंतर ते ऋषि अरुणोदय झाला असतां स्नान व भस्मस्नान हीं करून संध्या समाप्त करून माझी विश्वेश्वराची यथाविधि पूजा करून माझ्या भक्तांला भोजन देऊन नंतर ऋषि भोजन करिते झाले."

अत्रकार्तिकव्रतोद्यापनं**पाद्मे कार्तिकमाहात्म्ये**उक्तम् अथोर्जव्रतिनःसम्यगुद्यापनविधिंशृणु ऊर्जे-शुक्लचतुर्दश्यांकुर्यादुद्यापनंव्रती तुलस्याउपरिष्टात्तुकुर्यान्मंडपिकांशुभाम् तुलसीमूलदेशेचसर्वतोभद्रमेवच तस्योपरिष्टात्कलशंपंचरत्नसमन्वितम् पूजयेत्तत्रदेवेशंसौवर्णंगुर्वनुज्ञया रात्रौजागरणंकुर्याद्गीतवाद्यादिमंगलैः ततस्तुपौर्णमास्यांवैसपत्नीकान्द्विजोत्तमान त्रिंशन्मितानथैकंवास्वशक्त्यावानिमंत्रयेत् अतोदेवाइतिद्वाभ्यांजु-हुयात्तिलपायसम् ततोगांकपिलांदद्यात्पूजयेद्विधिवद्गुरुमिति ।

या चतुर्दशीस कार्तिकव्रताचें उद्यापन सांगतो—**पद्मपुराणांत कार्तिकमाहात्म्यांत**—"यानंतर **कार्तिकव्रताचा** उद्यापनविधि सांगतो, श्रवण कर! कार्तिकव्रत करणारानें कार्तिक शुक्ल चतुर्दशीस त्या व्रताचें उद्यापन करावें. **तुलसीवर** सुंदर मंडप घालावा. तुलसीच्या मूलप्रदेशीं सर्वतोभद्र मंडल करून त्याजवर पंचरत्नयुक्त कलश स्थापन करावा. त्या कलशावर गुरूच्या आज्ञेनें सुवर्णाच्या विष्णुप्रतिमेचें पूजन करावें. रात्रीं गीत, वाद्यें इत्यादिमंगल शब्दांनीं जागरण **करावें.** नंतर पौर्णिमेचे दिवशीं प्रातःकालीं उत्तम सपत्नीक अशा एकतीस ब्राह्मणांस अथवा आपणास शक्ति असेल **तितक्या** ब्राह्मणांस निमंत्रण द्यावें. **'अतोदेवा०'** व **'इदंविष्णु०'** या दोन मंत्रांनीं तिलयुक्तपायसाचा होम करावा. नंतर **कपिला** गाय देऊन यथाविधि गुरूचें पूजन करावें."

कार्तिकीपौर्णमासीपराग्राह्या अमापौर्णमास्यौपरेइति**दीपिकोक्तेः** अत्रविशेषो**हेमाद्रौब्राह्मे** पुण्या महाकार्तिकीस्याज्जीवेंद्वोःकृत्तिकासुच तथा आग्नेयंतुयदाऋक्षंकार्तिक्यांभवतिक्वचित् महतीसातिथिर्ज्ञेया-स्नानदानेषुचोत्तमा यदातुयाम्यंभवतिऋक्षंतस्यांतिथौक्वचित् तिथिःसापिमहापुण्यामुनिभिःपरिकीर्तिता प्राजापत्यंयदाऋक्षंतिथौतस्यांनराधिप सामहाकार्तिकीप्रोक्तादेवानामपिदुर्लभेति **पाद्मे** विशाखासुयदाभानुः-कृत्तिकासुचचंद्रमाः सयोगःपद्मकोनामपुष्करेष्वतिदुर्लभः पद्मकंपुष्करेप्राप्यकपिलांयःप्रयच्छति सहित्वा-सर्वपापानिवैष्णवंलभतेपदम् **यमः** कार्तिक्यांपुष्करेस्नातःसर्वपापैःप्रमुच्यते माघ्यांस्नातःप्रयागेतुमुच्यतेसर्व किल्बिषैः अस्यामेवसायंकालेमत्स्यावतारोजातइत्युक्तं**पाद्मेकार्तिकमाहात्म्ये** वरान्दत्वायतोविष्णुर्म-त्स्यरूपोभवत्ततः तस्यांदत्तंहुतंजप्तंतदक्षय्यफलंस्मृतमिति अत्रत्रिपुरोत्सवउक्तो**भार्गवार्चनदीपिका-याम्** पौर्णमास्यांतुसंध्यायांकर्तव्यस्त्रिपुरोत्सवः दद्यादनेनमंत्रेणप्रदीपांश्चसुरालये कीटाःपतंगामशकाश्च-वृक्षाजलेस्थलेयेविचरंतिजीवाः दृष्ट्वाप्रदीपंनचजन्मभागिनोभवंतिनित्यंश्वपचाहिविप्राः अत्रवृषोत्सर्गोतिप्र-शस्तः तदुक्तं**मात्स्ये** कार्तिक्यांयोवृषोत्सर्गंकृत्वानक्तंसमाचरेत् शैवंपदमवाप्नोतिशिवव्रतमिदंस्मृतमिति अत्रकार्तिकेयदर्शनमुक्तं**काशीखंडे** कार्तिक्यांकृत्तिकायोगेयःकुर्यात्स्वामिदर्शनम् सप्तजन्मभवेद्विप्रोधना-ढ्योवेदपारगः इतिश्रीकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौद्वितीयपरिच्छेदेकार्तिकमासः ।

कार्तिकपौर्णमासी परा ( दुसऱ्यादिवसाची ) घ्यावी. कारण, "अमावास्या व पौर्णिमा परा घ्याव्या" असें **दीपिकेंत** सांगितलें आहे. या पौर्णिमेचे दिवशीं विशेष सांगतो **हेमाद्रींत ब्राह्मांत**—"गुरु व चंद्र कृत्तिकानक्षत्रास **असतां पुण्य-**कारक महाकार्तिकी होते." तसेंच—"जेव्हां कार्तिकी पौर्णिमेस कृत्तिक नक्षत्र कधीं असेल तर ती **महातिथि जाणावी, ती** स्नानदानाविषयीं उत्तम होय. जेव्हां कार्तिकपौर्णिमेस भरणीनक्षत्र क्वचित् असेल तेव्हां देखील ती **तिथी महापुण्यकारक** म्हणून मुनींनीं सांगितली आहे. जेव्हां रोहिणीनक्षत्र त्या पौर्णिमेस असेल तेव्हां ती महाकार्तिकी **म्हटली आहे, ती देवांसही** दुर्लभ होय." **पाद्मांत**—"विशाखानक्षत्रास सूर्य व कृत्तिकानक्षत्रास चंद्र असा योग **जेव्हां असेल तेव्हां तो पद्मक नांवाचा**

योग पुष्करतीर्थाचे ठायीं अतिदुर्लभ होय. पद्मकयोग पुष्करतीर्थाचे ठायीं प्राप्त असतां कपिला गाई जो देतो तो सर्व पापांपासून मुक्त होऊन विष्णुपदास जातो." **यम**—"कार्तिकी पौर्णिमेस पुष्करतीर्थांत स्नान केलें असतां सर्व पापें जातात. माघी पौर्णिमेस प्रयागतीर्थांत स्नान केलें असतां सर्व पापांपासून मुक्त होतो." या कार्तिकपौर्णिमेचे ठायींच सायंकालीं मत्स्यावतार झाला असें सांगतो—**पद्मपुराणांत कार्तिकमाहात्म्यांत**—"ज्या कारणास्तव ऋषींला वर देऊन कार्तिकी पौर्णिमेस विष्णु मत्स्यरूपी झाला म्हणून त्या तिथीचे ठायीं दान, होम, जप हे केले असतां अक्षय्य फल प्राप्त होतें." या पौर्णिमेचे ठायीं त्रिपुरोत्सव सांगतो—**भार्गवार्चनदीपिकेंत**—"कार्तिकपौर्णिमेचे ठायीं संध्यासमयीं त्रिपुरोत्सव करावा. यापुढें सांगितलेल्या मंत्रानें देवालयामध्यें दीप लावावे." तो मंत्रः—"**कीटाः पतंगा मशकाश्च वृक्षा जले स्थले ये विचरंति जीवाः ॥ दृष्ट्वा प्रदीपं न च जन्मभागिनो भवंति नित्यं श्वपचा हि विप्राः ॥**" या पौर्णिमेचे ठायीं वृषोत्सर्ग करणें अति प्रशस्त होय; तें सांगतो—**मत्स्यपुराणांत**—"जो मनुष्य कार्तिकीपौर्णिमेस वृषोत्सर्ग करून नक्त करील तो शिवपदास जाईल. कारण, हें शिवव्रत म्हटलें आहे." या पौर्णिमेस कार्तिकेयस्वामीचें दर्शन सांगतो—**काशीखंडांत**—"कार्तिकी पौर्णिमेस कृत्तिकानक्षत्र असतां जो कार्तिकस्वामीचें दर्शन करील तो सात जन्मपर्यंत धनवान् आणि वेदपारंगत असा ब्राह्मण होईल." **इति कार्तिकमास समाप्त झाला.**

वृश्चिकेपूर्वाःषोडशघटिकाःपुण्याः शेषंप्राग्वत् मार्गशीर्षकृष्णाष्टमीकालाष्टमी साचरात्रिव्यापिनीग्राह्या मार्गशीर्षासिताष्टम्यांकालभैरवसन्निधौ उपोष्यजागरंकुर्वन्सर्वपापैःप्रमुच्यते इति**काशीखंडात्**रात्रिव्रतत्वावगतेः रुद्रव्रतेषुसर्वेषुकर्तव्यासंमुखीतिथिरिति**ब्रह्मवैवर्ताच्च** दिनद्वयेंऽशतोरात्रिव्याप्तावुत्तरैव भैरवोत्पत्तेःप्रदोषकालीनत्वादिति**केचित्** तन्न शिवरहस्येमध्याह्नेभैरवोत्पत्तेःश्रवणात् तथाच**तत्रैव** नित्ययात्रादिकंकृत्वामध्याह्नेसंस्थितेरवावित्युपक्रम्यब्रह्मणारुद्रेवज्ञातेउक्तम् तदोग्ररूपादनवद्यान्मत्तःश्रीकालभैरवः आविरासीत्तदालोकान्भीषयन्नखिलानपीति अत्रोपवासएवप्रधानमित्युक्तं**तत्रैव** उपोषणस्यांगभूतमर्घ्यदानमिहस्मृतम् तथाजागरणंरात्रौपूजायामचतुष्टये संध्यायामपिपूजैवोक्ता तेनमध्याह्नव्यापिनीयुक्ता दिनद्वयेंऽशतःसंपूर्णायांवातद्व्याप्तौपूर्वैव पूर्वोक्तवचनात् पारणातुप्रातरेव यामत्रयोर्ध्वगामिन्यांप्रातरेवहिपारणेतिवचनात् अत्रचकालभैरवपूजोक्ता**त्रिस्थलीसेतौ** कृत्वाचविविधांपूजांमहासंभारविस्तरैः नरोमार्गासिताष्टम्यांवार्षिकंविघ्नमुत्सृजेत् तथा तीर्थेकालोदकेस्नात्वाकृत्वातर्पणमत्वरः विलोक्यकालराजानंनिरयादुद्धरेत्पितॄनिति इयंचकार्तिक्यनंतरागौणचांद्राभिप्रायेण ।

## आतां मार्गशीर्षमासकृत्यें सांगतो.

वृश्चिकसंक्रांतीच्या पहिल्या सोळा घटिका पुण्यकाल होय. इतर निर्णय पूर्वीसारखा जाणावा. मार्गशीर्षकृष्ण अष्टमी ही कालाष्टमी होय. ती रात्रिव्यापिनी घ्यावी. कारण, "मार्गशीर्षकृष्ण अष्टमीचे ठायीं कालभैरवाच्या संनिध उपोषण करून जागरण करणारा मनुष्य सर्वपापांपासून मुक्त होतो." ह्या **काशीखंडस्थ** वचनावरून हें कालाष्टमीव्रत रात्रिव्रत असें बोधित होतें. आणि "साऱ्या रुद्रव्रतांचे ठायीं संमुखी ( पुढें येणारी ) तिथि करावी." असें **ब्रह्मवैवर्त**वचनही आहे. दोन दिवशीं अंशानें रात्रिव्याप्ति असतां पराच करावी. कारण, भैरवाची उत्पत्ति प्रदोषकालीं आहे, असें **केचित्** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, शिवरहस्यांत मध्याह्नीं भैरवाची उत्पत्ति श्रुत आहे. तसेंच तेथेंच सांगतो—"नित्ययात्रादिक करून मध्याह्नीं सूर्य आला असतां" असा उपक्रम करून ब्रह्मदेवानें रुद्राचा अपमान केला असतां सांगतो.—"त्या काळीं उग्रस्वरूप धरणारा व दोषरहित अशा मजपासून श्रीकालभैरव सर्वलोकांस भय करणारा प्रगट झाला." ह्या कालाष्टमीव्रताचे ठायीं उपवासच प्रधान असें तेथेंच सांगितलें आहे—"उपोषणाचें अंगभूत अर्घ्यदान येथें सांगितलें आहे. तसेंच रात्रीं जागरण व चार प्रहरांचे ठायीं पूजा सांगितली आहे." संध्यासमयींही पूजाच सांगितली आहे. यावरून ( कालभैरवाची मध्याह्नीं उत्पत्ति असल्यावरून ) मध्याह्नव्यापिनी अष्टमी घ्यावी, हें युक्त होय. दोन दिवशीं अंशानें किंवा संपूर्ण मध्याह्नव्यापिनी असतां पूर्वाच घ्यावी. कारण, त्याविषयीं पूर्वी सांगितलेलें ब्रह्मवैवर्तवचन आहे. पारणा तर प्रातःकालींच करावी. कारण, "तीन प्रहर होऊन गेलेल्या तिथींत प्रातःकालींच पारणा करावी" असें वचन आहे. या अष्टमीचे ठायीं कालभैरवाची पूजा सांगतो-**त्रिस्थलीसेतूंत**—"मार्गशीर्षकृष्ण अष्टमीचे ठायीं मोठ्या सामग्रीच्या विस्तारांनीं अनेकप्रकारची कालभैरवाची पूजा मनुष्यानें केली असतां त्याचें वर्षांत उत्पन्न होणारें विघ्न दूर होतें." तसेंच—"कालोदकतीर्थांत स्नान करून तर्पण करून कालभैरवाचें दर्शन घेईल तो तत्काल पितरांचा नरकापासून उद्धार करील." ही अष्टमी कार्तिकी पौर्णिमेच्या पुढची जाणावी. गौण ( पौर्णिमांत ) चांद्रमासानें मार्गशीर्षकृष्णअष्टमी असें सांगितलें आहे.

मार्गशीर्षशुक्लपंचम्यांनागपूजोक्ता**हेमाद्रौस्कांदे** शुक्लामार्गशिरेपुण्याश्रावणेयाचपंचमी स्नानदानैर्बहुफलानागलोकप्रदायिनीति इयंनागपूजायांषष्ठीयुतैवग्राह्या पंचमीनागपूजायांकार्याषष्ठीसमन्विता तस्यांतुतुपितानागाइतरासचतुर्थिकेति**मदनरत्ने**वचनात् ।

मार्गशीर्षशुक्लपंचमीस नागपूजा सांगतो.-**हेमाद्रींत स्कांदांत**—"मार्गशीर्षांतील शुक्लपंचमी आणि श्रावणांतील शुक्लपंचमी ह्या पुण्यकारक आहेत; स्नानदानेंकरून बहुफलदायक व नागलोक प्राप्त करून देणाऱ्या आहेत." ही पंचमी नागपूजेविषयीं षष्ठीयुक्तच घ्यावी. कारण, "नागपूजेविषयीं पंचमी षष्ठीयुक्त घ्यावी. त्या षष्ठीयुक्त पंचमीस नाग संतुष्ट होतात. इतर पंचमी चतुर्थीयुक्त घ्यावी." असें **मदनरत्नांत** वचन आहे.

मार्गशीर्षशुक्लषष्ठी चंपाषष्ठीतिमहाराष्ट्रेषुप्रसिद्धा सोत्तरयुताग्राह्या षण्मुन्योरितियुग्मवाक्यात् पूर्वाह्णेदैविकंकुर्यादितिवचनादस्यचदैवकर्मत्वात् इयमेवयोगविशेषेणचंपेत्युच्यते तदुक्तं**ब्रह्मांडपुराणेमल्लारिमाहात्म्ये** मार्गभाद्रपदेशुक्लाषष्ठीवैधृतिसंयुता रविवारेणसंयुक्तामाचंपेतीहकीर्तितेति विशाखाभौमयोगेनसाचंपेतीहकीर्तितेति**मदनरत्ने**पाठः मार्गशीर्षेऽमलेपक्षेषष्ठ्यांवारेंऽशुमालिनः शततारागतेचंद्रेलिंगंस्याद्दृष्टिगोचरमिति इयंचयोगवशेनपूर्वापरावाकार्या चंपाषष्ठीसप्तमीयुतेति**दिवोदासः** इयमेवस्कंदषष्ठी सापूर्वयुता कृष्णाष्टमीस्कंदषष्ठीशिवरात्रिश्चतुर्दशी एताःपूर्वयुताःकार्यास्तिथ्यंतेपारणंभवेदिति**भृगूक्तेः** परेऽह्निरात्रावाद्ययाममध्येपारणासंभवेइदम् अन्यथोत्तरैवेति**दिवोदासः** अब्दपर्यंतंषष्ठीषु सेनाविदारकस्कंदमहासेनमहाबल रुद्रोमाग्निजषड्वक्त्रगंगागर्भनमोस्तुते इतिराजतंस्कंदंसंपूज्यविप्रायदद्यादिति**दिवोदासः** ।

मार्गशीर्षशुक्लषष्ठी ही **चंपाषष्ठी**, म्हणून महाराष्ट्रदेशांत प्रसिद्ध आहे. ती सप्तमीयुक्त घ्यावी. कारण, "षष्ठी व सप्तमी यांचें युग्म" असें युग्मवाक्य प्रथमपरिच्छेदांत सांगितलें आहे. आणि "पूर्वाह्णीं देवाचें कर्म करावें" असें वचन आहे, व हें देवकर्म आहे. हीच षष्ठी विशेषयोगानें **चंपा** अशी म्हटली आहे. तें सांगतो **ब्रह्मांडपुराणांत मल्लारिमाहात्म्यांत**—"मार्गशीर्षांतील व भाद्रपदांतील शुक्लषष्ठी वैधृतियोग व रविवार यांनीं युक्त असतां **चंपा** अशी म्हटली आहे." 'रविवारेण संयुक्ता' याच्याऐवजीं 'विशाखाभौमयोगेन' असा **मदनरत्नांत** पाठ आहे. अर्थ—"विशाखानक्षत्र व भौमवार यांच्या योगानें ही **चंपा** अशी प्रसिद्ध आहे." "मार्गशीर्षशुक्लषष्ठीस रविवार असून शततारकानक्षत्रीं चंद्र असतां लिंगदर्शन होतें." ही षष्ठी अधिक योग मिळतील तशी पूर्वा किंवा परा करावी. ( म्हणजे ही चंपाषष्ठी दोन दिवस असेल तर रविवार, भौमवार, शततारकानक्षत्र, वैधृतियोग यांतून अधिकाचा योग ज्या दिवशीं येईल ती त्रिमुहूर्तव्यापिनी पूर्वदिवसाची किंवा दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोनही दिवशीं वर सांगितलेल्या योग नसेल तर सहा घटिकाव्यापिनी अशी दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. असें **धर्मसिंधुसारांत** आहे ) चंपाषष्ठी सप्तमीयुक्त करावी असें **दिवोदास** सांगतो. हीच स्कंदषष्ठी होय. ती पंचमीयुक्त घ्यावी. कारण, "कृष्णजन्माष्टमी, स्कंदषष्ठी आणि शिवरात्र चतुर्दशी ह्या तिथि पूर्वयुक्त कराव्या व तिथीचे अंतीं पारणा करावी" असें **भृगुवचन** आहे. दुसरे दिवशीं रात्राच्या पहिल्या प्रहराच्या आंत पारणेचा संभव असतां हें वचन जाणावें. रात्राच्या प्रथम प्रहरीं पारणासंभव ( तिथीचा अंत ) नसतां पराच घ्यावी, असें **दिवोदास** सांगतो. वर्षपर्यंत प्रत्येक मासाचे षष्ठीस "**सेनाविदारक स्कंद महासेन महाबल ॥ रुद्रोमाग्निज षड्वक्त्र गंगागर्भ नमोस्तु ते ॥**" या मंत्रानें रुप्याच्या स्कंदप्रतिमेची पूजा करून शेवटीं ती प्रतिमा ब्राह्मणाला द्यावी, असें **दिवोदास** सांगतो.

मार्गशीर्षशुक्लचतुर्दश्यांपिशाचविमोचनीतीर्थेश्राद्धं**त्रिस्थलीसेतौभट्टचरणै**रुक्तम् तत्रप्राप्तपैशाच्यस्वपित्राद्युद्देश्यकत्वेपार्वणत्वादपराह्णव्यापिनीग्राह्या अज्ञातनामपिशाचाद्युद्देश्यकत्वेत्वेकोद्दिष्टत्वान्मध्याह्नव्यापिनीति कुलधर्मव्रतादौतूत्तरैव चैत्रनभोगतेतरसितान्याद्ध्र्वमिति**दीपिकोक्तेः** ।

मार्गशीर्षशुक्ल चतुर्दशीस पिशाचमोचनी तीर्थाचे ठायीं श्राद्ध **त्रिस्थलीसेतूंत नारायणभट्टांनीं** सांगितलें आहे. तें श्राद्ध पिशाचयोनि प्राप्त झालेल्या स्वकीय पित्रादिकांच्या उद्देशानें कर्तव्य असतां तें पार्वण असल्यामुळें त्याविषयीं अपराह्णव्यापिनी चतुर्दशी घ्यावी. नांव माहीत नाहीं अशा पिशाचादिकांच्या उद्देशानें कर्तव्य असेल तर तें श्राद्ध एकोद्दिष्टरूप असल्यामुळें त्याविषयीं मध्याह्नव्यापिनी घ्यावी. कुलधर्म, व्रत इत्यादिकांविषयीं तर पराच घ्यावी. कारण, "चैत्र व श्रावण यांवांचून शुक्लपक्षींची चतुर्दशी परा करावी" असें **दीपिकेंत** सांगितलें आहे.

---

१ वैधृतियोग व विशाखानक्षत्र हीं भाद्रपदांतील शुक्लषष्ठीस असतात. मार्गशीर्षांतील शुक्लषष्ठीस असण्याचा संभव नाहीं, असें समजावें.

मार्गशीर्षपौर्णमास्यांदत्तात्रेयोत्पत्तिः तदुक्तं**स्कांदेसह्याद्रिखंडे** मार्गशीर्षेतथामासिदशमेऽह्निसुनिर्मले मृगशीर्षयुतेपौर्णमास्यांब्रह्मस्यचवासरे जनयामासदेदीप्यमानंपुत्रंसतीशुभम् तंविष्णुमागतंज्ञात्वाअत्रिर्नामाकरोत्स्वयम् दत्तवान्स्वस्यपुत्रत्वाद्दत्तात्रेयइतीश्वरइति इयंप्रदोषव्यापिनीग्राह्येति**वृद्धाः** ।

मार्गशीर्षपौर्णिमेचे ठायीं दत्तात्रेयाचा अवतार झाला, तें सांगतो **स्कांदांत सह्याद्रिखंडांत**–"गर्भधारणापासून दहाव्या मार्गशीर्षमासांत पौर्णिमेस मृगशीर्षनक्षत्रानें युक्त पुण्यकारक दिवशीं बुधवारीं देदीप्यमान अशा कल्याणकारक पुत्रास अत्रिऋषीची पत्नी अनुसूया प्रसवती झाली. अत्रिऋषीनें तो प्रत्यक्ष विष्णू जन्माला आला आहे, असें जाणून त्याचें नामकरण केलें, तें असें–ईश्वर स्वतः आपणातें देता झाला म्हणून तो दत्तः आणि स्वस्य ( अत्रीचा ) पुत्र असल्यामुळें आत्रेय. मिळून **दत्तात्रेय** होय. ही पौर्णिमा प्रदोषव्यापिनी घ्यावी, असें **वृद्ध** सांगतात.

मार्गशीर्षपौर्णिमानंतराष्टमीअष्टका एवंपौषादिमासत्रयेपि हेमंतशिशिरयोश्चतुर्णामपरपक्षाणामष्टमीष्वष्टका एकस्यांवेत्या**श्वलायनोक्तेः** एकस्यामष्टम्यांवैकाकार्येति**हरदत्तः** कचित्पंचम्यप्युक्ता प्रौष्ठपद्यष्टकाभूयःपितृलोकेभविष्यतीति**पाद्म**वचनात् तत्पूर्वसप्तमीषुपूर्वेद्युःतत्परनवमीष्वन्वष्टकाचश्राद्धमुक्तम् **कालादर्शे** मार्गशीर्षेचपौषेचमाघेप्रौष्ठेचफाल्गुने कृष्णपक्षेचपूर्वेद्युरन्वष्टक्यंतथाष्टकाइति यत्तु**विष्णुः** अमावास्यास्तिस्रोऽष्टकास्तिस्रोऽन्वष्टकाइति यच्च**कौर्मे** अमावास्याष्टकास्तिस्रःपौषमास्यादिषुत्रिष्विति तच्चतुर्थ्यामनावश्यकत्वार्थं याचाप्यन्याचतुर्थीस्यात्तांचकुर्यात्प्रयत्नतइति**वायुब्रह्मांडपुराणात्** श्राद्धमेतेष्वकुर्वाणोनरकंप्रतिपद्यतइति**विष्णूक्ते**रिति**शूलपाणिः** शाखाभेदाद्व्यवस्थेति**तत्त्वम्** **वायुब्रह्मांडयोः** आद्यापूपैःसदाकार्यामांसैरन्यासदाभवेत् शाकैःकार्यातृतीयास्यादेषद्रव्यगतोविधिः पौषादिक्रमः अन्वष्टकातुप्रागेवनिर्णीता तत्राष्टम्यपराह्णव्यापिनीग्राह्या अथाच्छादनपर्यंतंश्राद्धंपार्वणवद्धवेदित्या**श्वलायनकारिकोक्ते**रपराह्णकालत्वाच्चपार्वणस्य पूर्वेद्युरन्वष्टकाश्राद्धयोस्तुअष्टम्यनुरोधेननिर्णयः अतएव**सूत्रम्** पूर्वेद्युःपितृभ्योदद्यात् अपरेद्युरन्वष्टक्यमितिच अत्रकामकालौविश्वेदेवौ इष्टिश्राद्धेक्रतुदक्षावष्टम्यांकामकालावितिसायणीये**शंखोक्तेः** अत्रश्राद्धाकरणेप्रायश्चित्तमुक्तं**ऋग्विधाने** एभिर्द्युभिर्जपेन्मंत्रंशतवारंतुतद्दिने आन्वष्टक्यंयदान्यूनंसंपूर्णंयातिसर्वथेति अशक्तौ**त्वाश्वलायनः**--अथश्वोभूतेष्टकाःपशुनास्थालीपाकेनचाप्यनड्डुहोयवसमाहरेदग्निनावाकक्षमुपोषेदेपामेष्टकेतिनत्वेवानष्टकःस्यादिति मार्गशीर्षादिषुमलमासेसतितत्राष्टकानकार्याचतुर्णामितिग्रहणादित्युक्तं**नारायणवृत्तौ** तथा**काठकगृह्येपि** महालयाष्टकाश्राद्धोपाकर्माद्यपिकर्मयत् स्पष्टमासविशेषाख्याविहितंवर्जयेन्मलेइति ।

मार्गशीर्षपौर्णिमेच्या पुढील ( कृष्णपक्षांतील ) अष्टमीस अष्टकाश्राद्ध होतें. अशाच पौषादिक तीनमासामध्येंही कृष्ण अष्टमीस अष्टका होतात. कारण, "हेमंत व शिशिर या ऋतूंचे जे चार महिने त्यांच्या कृष्णपक्षांतील अष्टमीचे ठायीं अष्टका कराव्या. अथवा एका अष्टमीचे ठायीं अष्टका ( श्राद्ध ) करावी." असें **आश्वलायनां**नीं सूत्रांत सांगितलें आहे. सूत्रांतील 'एकस्यां' याचा अर्थ-एका अष्टमीचे ठायीं एक अष्टका करावी, असें **हरदत्त** सांगतो. क्वचित् ठिकाणीं पांचवीही अष्टका सांगितली आहे. कारण, "भाद्रपदांतील अष्टका पितृलोकांत मोठी होईल" असें **पाद्म**वचन आहे. त्या अष्टकांच्या पूर्वदिवशीं सप्तमीचे ठायीं पूर्वेद्युःश्राद्धें, आणि अष्टकांच्या दुसऱ्या दिवशीं नवमीचे ठायीं अन्वष्टकाश्राद्ध सांगतो **कालादर्शांत**— "मार्गशीर्ष, पौष, माघ, फाल्गुन आणि भाद्रपद या मासांमध्यें कृष्णपक्षांत पूर्वेद्युः, अन्वष्टका आणि अष्टका हीं श्राद्धें होतात." आतां जें **विष्णु**—"अमावास्या, तीन अष्टका, आणि तीन अन्वष्टका अशीं श्राद्धें होतात." आणि जें **कौर्मांत**—"अमावास्या बारा आणि पौषादि तीन मासांमध्यें तीन अष्टका कराव्या" असें सांगितलें तें चवथी आवश्यक नाहीं, असें सुचविण्याकरितां आहे. सर्वथा चवथी नाहीं असें नाहीं. कारण, "जी इतर चवथी अष्टका आहे तीसुद्धां प्रयत्नानें करावी." असें **वायुपुराण** व **ब्रह्मांडपुराण**वचन आहे. यावरून चवथी अष्टका आहे. पण तीन अष्टका जशा अवश्य आहेत, तशी चवथी नाहीं. कारण, "ह्या वर सांगितलेल्या अमावास्या व तीन अष्टका यांचे ठायीं श्राद्ध न करणारा नरकास जातो" असें **विष्णु**वचन आहे, असें **शूलपाणि** सांगतो. तीन कोणास व चार कोणास

---

१ एक अष्टका करावयाची ती माघ पूर्णिमेनंतर येणाऱ्या कृष्ण पक्षाच्या सप्तमी, अष्टमी, नवमी या तीन दिवस करावी. तीन दिवस करण्यास अशक्त असेल तर माघ कृष्ण अष्टमीश्राद्धच करावें. असें **धर्मसिंधुसारांत** आहे.

याची शाखाभेदानें व्यवस्था करावी, हें तत्त्व होय. **वायु व ब्रह्मांडपुराणांत**—"पहिली अष्टका अपूपांनीं सदा करावी. दुसरी अष्टका मांसांनीं सदा करावी. तिसरी अष्टका शाकांनीं करावी. ह्या अष्टकांस लागणाऱ्या पदार्थांचा विधि समजावा. ह्या तीन अष्टका पौष, माघ, फाल्गुन ह्या मासांतील अनुक्रमानें समजाव्या. अन्वष्टकेचा निर्णय तर पूर्वीच ( भाद्रपदप्रकरणीं ) केला आहे. ह्या अष्टकाश्राद्धाविषयीं अष्टमी अपराह्णव्यापिनी घ्यावी. कारण "आच्छादनपर्यंत श्राद्ध पार्वणासारखें होतें" असें **आश्वलायन**कारिकेंत पार्वण सांगितलें आहे. पार्वणाचा अपराह्णकाल आहे. पूर्वेद्युःश्राद्ध व अन्वष्टकाश्राद्ध यांचा निर्णय अष्टमीच्या अनुरोधानें म्हणजे अष्टकाश्राद्धाच्या पूर्व दिवशीं पूर्वेद्युःश्राद्ध व अष्टकाच्या दुसऱ्या दिवशीं अन्वष्टक्य असा समजावा. म्हणूनच **सूत्रकार** सांगतो—"अष्टकाच्या पूर्वदिवशीं पितरांला द्यावें, आणि परदिवशीं अन्वष्टका श्राद्ध करावें" ह्या श्राद्धांत कामकाल विश्वेदेव होतात. कारण, "दर्शश्राद्धाचे ठायीं क्रतुदक्ष विश्वेदेव, आणि अष्टमीश्राद्धाचे ठायीं कामकाल विश्वेदेव समजावे" असें **सायणीय**ग्रंथांत **शंखवचन** आहे. अन्वष्टकाश्राद्ध न केलें तर प्रायश्चित्त सांगतो **ऋग्विधानांत**— "त्या दिवशीं 'पभिर्द्युभिः०' या मंत्राचा शंभरवेळां जप करावा, म्हणजे अन्वष्टकाश्राद्ध जर न्यून असेल तर तें सर्वथा संपूर्ण होतें" ह्या अष्टकाश्राद्धाविषयीं शक्ति नसेल तर सांगतो **आश्वलायन**—"दुसऱ्या दिवशीं अष्टका पशुयागानें व स्थालीपाकानें करावी. अथवा उदकाला तृण द्यावें किंवा अग्नीनें तृण जाळावें. आणि ही माझी अष्टका असें म्हणावें; पण अष्टका केल्यावाचून राहूं नये." मार्गशीर्षादि चार मासांत मलमास आला असतां त्या मलमासांत अष्टका करूं नये. कारण, वर सांगितलेल्या आश्वलायनसूत्रांत 'चतस्रः' म्हणजे चार मासांचे कृष्णपक्षांत असें म्हटलें आहे, असें **नारायणवृत्तींत** सांगितलें आहे. असेंच **काठकगृह्यांत**ही—"अष्टका, अन्वष्टका, उपाकर्म इत्यादिक जें कर्म स्पष्ट मासाचें नांव घेऊन सांगितलें तें मलमासांत वर्ज्य करावें."

मार्गादिरविवारेषु काम्यं व्रतमुक्तं **हेमाद्रौ** तत्र भक्ष्याण्युक्तानि **संग्रहे सौरधर्मे** पत्रत्रितयं तुलस्यास्त्रिपलमथ घृतं मार्गशीर्षादि भक्ष्यं मुष्टीनां त्रितयं तिलानां त्रिपलं दधि तथा दुग्धकं गोमयं च त्रितयं तोयांजलीनां त्रिमरिचकमथो त्रिःपला सक्तवः स्युर्गोमूत्रं शर्करास्युर्विधिरिति विहिता भानुवारे क्रमेणेति इति श्रीकमलाकरभट्टकृते निर्णयसिंधौ द्वितीयपरिच्छेदे मार्गशीर्षमासः समाप्तः ॥

मार्गशीर्षापासून बारा महिन्यांत रविवारी काम्य व्रत **हेमाद्रींत** सांगितलें आहे. त्या व्रताचे ठायीं भक्ष्य पदार्थ सांगतो—**संग्रहांत सौरधर्मांत** मार्गशीर्षांत तुलसीचीं तीन पानें भक्षण करावीं. पौषांत तीनपलें घृत. माघांत तीन मुष्टि तीळ. फाल्गुनांत तीन पलें दहीं. चैत्रांत तीन पलें दूध. वैशाखांत तीन पलें गोमय. ज्येष्ठांत तीन उदकांजलि. आषाढांत तीन मिरें. श्रावणांत तीन पलें सातु. भाद्रपदांत गोमूत्र. आश्विनांत शर्करा. आणि कार्तिकांत उत्तम हविष्य, याप्रमाणें रविवारी भक्षण करावें." इति मार्गशीर्षमासनिर्णय समाप्त झाला.

धनुःसंक्रमे पराःषोडशघटिकाःपुण्याः अन्यत्प्रागुक्तम् अत्रोत्सर्जननिर्णयोवक्तव्योप्युपाकर्मप्रसंगात्प्रागेवोक्तः **कल्पतरौ भविष्ये** पौषमासियदार्दविशुक्लाष्टम्यांबुधोभवेत् तस्यांस्नानंजपोहोमस्तर्पणंविप्रभोजनम् मत्प्रीतयेकृतंदेवशतसाहस्रिकंभवेत् अत्ररोहिण्यार्द्रायोगेपुण्यतमत्वंतत्रैवज्ञेयम् पौषशुक्लैकादशीमन्वादिः साचोक्ताप्राक् पौषपौर्णिमानंतरःसप्तम्यष्टमीनवम्योष्टकाश्राद्धाःप्रागुक्ताः ।

## आतां पौषमासकृत्यें सांगतो.

धनुःसंक्रांतीच्या पुढच्या सोळा घटिका पुण्यकाळ जाणावा. इतर सर्व निर्णय पूर्वी ( प्रथमपरिच्छेदांत ) सांगितल्याप्रमाणें समजावा. एथें उत्सर्जनाचा निर्णय सांगावयाचा पण तो उपाकर्माच्या प्रसंगानें पूर्वीच सांगितला आहे. **कल्पतरूंत भविष्यपुराणांत**—"शंकर म्हणतात हे देवि! पौषशुक्ल अष्टमीस जेव्हां बुधवार असेल तेव्हां स्नान, जप, होम, तर्पण, ब्राह्मणभोजन हीं माझ्या प्रीत्यर्थ करावीं, तीं लक्षपट होतात." या अष्टमीस रोहिणी व आर्द्रा नक्षत्र यांचा योग अतिशय पुण्यकारक होतो. असें तेथेंच सांगितलें आहे. पौषशुक्लएकादशी ही **मन्वादि** होय. तिचा निर्णय पूर्वी सांगितला आहे. पौषपौर्णिमेच्या पुढच्या सप्तमी, अष्टमी, नवमी ह्या अष्टकादिक श्राद्धतिथि पूर्वी ( मार्गशीर्षांत ) सांगितल्या आहेत.

पौषामावास्यायामर्धोदययोगविशेषः तदुक्तं **मदनरत्ने महाभारते** अमार्कपातश्रवणैर्युक्ताचेत्पौषमाघयोः अर्धोदयःसविज्ञेयःकोटिसूर्यग्रहैःसमइति पौषमाघयोर्मध्यवर्तिनीपौषीपौर्णमास्युत्तरामावास्येत्यर्थइति भट्टाः **मदनरत्ने**पौषस्यचमाघस्यचेत्यर्थउक्तः तन्न हेमाद्रिविरोधात् तत्रहिमाघएवोक्तः तथा विष्णुयोगःशस्तोयंनतुरात्रौकदाचनेति इदमर्धमन्यनिबंधेष्वभावान्निर्णयामृतमात्रोक्तेर्निर्मूलमेव तेनहेमाद्र्यादिमते-

रात्रावर्धोदयोभवत्येव **केचित्तु**किंचिदूनोमहोदयइत्याहुस्तन्निर्मूलम् **हेमाद्रौमदनरत्नेचस्कांदे** माघामायांव्यतीपातेआदित्येविष्णुदैवते अर्धोदयंतदित्याहुःसहस्रार्कग्रहैःसमम् **तत्रैव** माघमासेकृष्णपक्षेपंचदश्यांरवेर्दिने वैष्णवेनतुऋक्षेणव्यतीपातेसुदुर्लभे व्रतंकुर्यादित्यग्रेऽन्वयः **तत्रैव** ब्रह्मविष्णुमहेशानांसौवर्णीःपलसंख्यया प्रतिमास्तुप्रकर्तव्यास्तदर्धेनद्विजोत्तम सार्धशतत्रयंशंभोर्द्रोणानांतिलपर्वतः कर्तव्यौपर्वतौविष्णुरुद्रयोःपूर्वसंख्यया शंभुरत्रब्रह्मा शय्यात्रयंततःकुर्यादुपस्करसमन्वितम् तिलैर्होमंकृत्वाप्रतिमांदद्यादित्युक्तम् **स्कांदे** अर्धोदयेतुसंप्राप्तेसर्वंगंगासमंजलम् शुद्धात्मानोद्विजाःसर्वेभवेयुर्ब्रह्मसंमिताः यत्किंचिद्दीयतेदानंतद्दानंमेरुसन्निभमिति ।

पौष अमावास्येस अर्धोदय म्हणून विशेष योग होतो. तो सांगतो—**मदनरत्नांत महाभारतांत**—"पौषमाघांची अमावास्या रविवार, व्यतीपात, श्रवणनक्षत्र यांनीं युक्त झाली तर तो अर्धोदय योग जाणावा. तो कोटि सूर्यग्रहणांशीं समान आहे." पौष व माघ या दोन मासांच्या मधली म्हणजे पौषीपौर्णिमेच्या पुढची अमावास्या, असा अर्थ, असें **नारायणभट्ट** सांगतात. **मदनरत्नांत** पौषाची आणि माघाची अमावास्या, असा अर्थ सांगितला आहे. तो बरोबर नाहीं. कारण, **हेमाद्रीचा** विरोध येतो. त्या हेमाद्रींत माघमासाचेच अमावास्येस अर्धोदय योग सांगितला आहे, तो पौर्णिमांत मास धरून समजावा. तसेंच—"हा योग दिवसासच प्रशस्त आहे. रात्रीं कधींही प्रशस्त नाहीं." हा अर्धा श्लोक इतर निबंधग्रंथांत नसून केवळ निर्णयामृतांत सांगितल्यामुळें निर्मूलच आहे. यावरून हेमाद्र्यादिमतें रात्रीं अर्धोदय योग होतच आहे. **केचित** तर "किंचित् न्यून ( कांहीं योग कमी ) असेल तर तो महोदय होतो" असें सांगतात. तें निर्मूल आहे. **हेमाद्रींत व मदनरत्नांत स्कांदांत**—"माघअमावास्येस व्यतीपात, रविवार, श्रवणनक्षत्र हीं असतां त्याला अर्धोदय असें म्हणतात. तो सहस्र सूर्यग्रहणांशीं समान आहे." तेथेंच—"माघमासांत कृष्णपक्षीं अमावास्येस रविवार, श्रवणनक्षत्र, आणि व्यतीपात असतां व्रत करावें." तेथेंच—"ब्रह्मा, विष्णु, महेश्वर यांच्या पलप्रमाण सुवर्णाच्या प्रतिमा कराव्या अथवा त्याच्या अर्धानें कराव्या. आणि साडेतीनशें द्रोणपरिमित तिलांचा पर्वत ब्रह्मदेवप्रीत्यर्थ करावा. विष्णु व रुद्र यांचेकरितां दोन तिलपर्वत वरील प्रमाणानें करावे. नंतर उपसाहित्यासहित तीन शय्या कराव्या. त्यांजवर प्रतिमांचें पूजन करून तिलांनीं होम करून प्रतिमांचें दान करावें" असें सांगितलें आहे. **स्कांदांत**-"अर्धोदय प्राप्त झाला असतां सर्व उदक गंगासम होय. सर्व ब्राह्मण ब्रह्मतुल्य शुद्धात्मे होत. जे कांहीं दान द्यावें, तें मेरुतुल्य होतें"

अत्रदानविशेषो**निर्णयामृतेस्कांदे** चतुःषष्टिपलंमुख्यममत्रंतत्रकारयेत् चत्वारिंशत्पलंवाथपंचविंशतिरेववा अमत्रंपात्रम् तच्चकांस्यमयमित्युक्तंतत्रैव एवंसुघटितंकार्यंकांस्यभाजनमुत्तममिति तथा निधायपायसंतत्रपद्ममष्टदलंलिखेत् पद्मस्यकर्णिकायांतुकर्षमात्रंसुवर्णकम् तदभावेतदर्धंवातदर्धंवापिकारयेत् भूमौतुतंडुलैःशुद्धैःकृत्वाष्टदलमुत्तमम् अमत्रंस्थापयेत्तत्रब्रह्मविष्णुशिवात्मकम् तेषांपूजाततःकार्याश्वेतमाल्यैस्तुशोभनैः वस्त्रादिभिरलंकृत्यब्राह्मणायनिवेदयेत् **मंत्रस्तु** सुवर्णपायसामत्रंयस्मादेतत्त्रयीमयम् आपत्तेस्तारकंयस्मात्तद्गृहाणद्विजोत्तम समुद्रमेखलांपृथ्वींसम्यग्दातुश्चयत्फलम् तत्फलंलभतेमर्त्यःकृत्वेदंदानमुत्तममिति इतिश्रीकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौपौषमासः ॥

या अर्धोदयीं विशेष दान सांगतो—**निर्णयामृतांत स्कांदांत**-त्या अर्धोदयीं पर्वाचेठायीं चौसष्ट पलप्रमाण मुख्य पात्र करावें. अथवा चाळीस पलांचें किंवा पंचवीस पलांचें पात्र करावें." "तें पात्र कांस्यमय असावें असें तेथेंच सांगितलें आहे तें असें—"असें चांगलें घडलेलें कांस्यपात्र उत्तम करावें." तसेंच "त्या पात्रांत पायस ठेऊन त्यांत अष्टदल कमल काढावें. त्याच्या कर्णिकेचे ठायीं एककर्ष[1] सुवर्ण ठेवावें. तितकें नसेल तर त्याचें अर्ध अथवा अर्धाचें अर्ध ठेवावें. भुईवर शुद्ध तंदुलांनीं उत्तम अष्टदल करून त्यावर तें ब्रह्म-विष्णु-शिवात्मक पात्र ठेऊन नंतर त्या ब्रह्मविष्णुशिवांची ( म्हणजे कांस्यपात्रावर ब्रह्माची, पायसावर विष्णूची, सुवर्णावर शिवाची ) पूजा सुंदर श्वेतपुष्पांनीं करावी, आणि वस्त्रादिकांनीं अलंकृत करून तें ब्राह्मणाला द्यावें. दानमंत्रः—**सुवर्णपायसामत्रं यस्मादेतत्त्रयीमयं ॥ आपत्तेस्तारकं यस्मात्तद्गृहाण द्विजोत्तम ॥** समुद्रवलयांकित पृथ्वीच्या उत्तम दानानें दात्याला जें फल प्राप्त होतें तें फल मनुष्यास हें उत्तम दान करून प्राप्त होतें" **इति पौषमासनिर्णय समाप्त झाला.**

---

१ ऐशीं गुंजा म्हणजे एक कर्ष. चार कर्ष म्ह० एक पल होय. २ द्रोण म्हणजे कोठें चार आढकांचा, कोठें आठ आढकांचा सांगितला आहे. चार शेर म्हणजे एक आढक होतो.

अथमाघस्नानम् तत्र**विष्णुः** तुलामकरमेषेषुप्रातःस्नायीसदाभवेत् हविष्यंब्रह्मचर्यंचमाघस्नानेमहाफ- लमिति सौरमासउक्तः **ब्राह्मे**तुमावनउक्तः एकादश्यांशुक्लपक्षेपौषमासेसमारभेत् द्वादश्यांपौर्णमास्यांवाशु- क्लपक्षेसमापनमिति **पाद्मेपि** पौषस्यैकादशींशुक्लामारभ्यस्थंडिलेशयः मासमात्रंनिराहारस्त्रिकालंस्नानमाच- रेत् त्रिकालमर्चयेद्विष्णुंत्यक्तभोगोजितेंद्रियः माघस्यैकादशींशुक्लांयावद्विप्राधरोत्तमेति त्रिकालस्नानंमासोप- वासविषयम् निराहारइत्युक्तेः **पृथ्वीचंद्रोदये**त्वन्यथोक्तम् **विष्णुः** दर्शंवापौर्णमासींवाप्रारभ्यस्नान- माचरेत् पुण्यान्यहानित्रिंशत्तुमकरस्थेदिवाकरइति अत्रदर्शमितिशुक्लादिमुख्यचांद्राभिप्रायेण **अयंतुपक्षो-** नेदानींप्रचरति ।

## आतां माघमासांतील कृत्यें सांगतों.

**माघस्नान**—त्याविषयीं **विष्णु**—"तुळ, मकर आणि मेष या संक्रांतींत दररोज प्रातःस्नान करावें. **मकरसंक्रांतिरूप** माघांत स्नान करणाराला हविष्यभक्षण व ब्रह्मचर्यव्रतधारण हीं मोठें फळ देणारीं आहेत." **ह्या वचनानें स्नानाविषयीं** मकरसंक्रांतिरूप सौर माघमास सांगितला आहे. **ब्रह्मपुराणांत** तर स्नानाविषयीं सावन ( तीस दिवसांचा ) माघमास सांगितला आहे, तो असा—"पौषमासाचे शुक्ल एकादशीस माघस्नानाचा आरंभ करावा. आणि माघ शुक्लपक्षाचे द्वादशीस किंवा पौर्णिमेस माघस्नानाची समाप्ति करावी." **पद्मपुराणांत**ही—"पौष शुक्ल एकादशीपासून माघ शुक्ल एकादशीपर्यंत एक महिनाभर दररोज भूमीवर शयन व निराहार करून त्रिकाल स्नान करावें. आणि सारे उपभोग टाकून जितेंद्रिय होऊन त्रिकाल विष्णूचें पूजन करावें." या वचनांत त्रिकाल स्नान सांगितलें तें जो मासपर्यंत उपवास करणारा असेल त्याला समजावें. कारण, तेथेंच 'निराहार करून' असें सांगितलें आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत** तर वेगळ्याच प्रकारानें सांगितलें आहे, तें असें—**विष्णु**—"पौषी अमावास्येस किंवा पौर्णिमेस प्रारंभ करून तीस दिवस स्नान करावें. सूर्य मकरास ज्या मासांत असतो त्या मासाचे तीस दिवस पुण्यकारक आहेत." या वचनांत अमावास्येस आरंभ करून असें जें सांगितलें तें शुक्ल प्रतिपदेपासून मुख्य चांद्रमास धरून सांगितलें आहे. स्नानाविषयीं मुख्य चांद्रमास धरणें हा पक्ष सांप्रत प्रचारांत नाहीं.

अत्राधिकारिणो**भविष्ये** ब्रह्मचारीगृहस्थोवावानप्रस्थोर्थभिक्षुकः बालवृद्धयुवानश्चनरनारीनपुंसकाः स्नात्वामाघेशुभेतीर्थेप्राप्नुवंत्यीप्सितंफलम् **पाद्मे** सर्वेऽधिकारिणोह्यत्रविष्णुभक्तौयथानृप **ब्राह्मे** उष्णोदके- नवास्नानमशक्येसतिकुर्वते दृढेपुसर्वगात्रेपुउष्णोदंनविशिष्यते **वैष्णवामृतेगौडनिबंधेचस्कांदे** पौष्यांतुसमतीतायांयावद्भवतिपूर्णिमा माघमासस्यतावद्धिपूजाविष्णोर्विधीयते पितॄणांदेवतानांचमूलकंनैव- दापयेत् ब्राह्मणोमूलकंभुक्त्वाचरेच्चांद्रायणंव्रतम् अन्यथायातिनरकंक्षत्रविट्शूद्रएवच वर्जनीयंप्रयत्नेनमूलकं- मदिरोपमम् यदातुमाघोमलमासोभवतितदाकाम्यानांतत्रसमाप्तिनिषेधान्मासद्वयेस्नानंतन्नियमाश्चकार्याः मासोपवासचांद्रायणादितुमलमासएवसमापयेत् तदुक्तं**दीपिकायाम्** नियतत्रिंशद्दिनत्वाच्छुभेमास्यार- भ्यसमापयेतमलिनेमासोपवासव्रतमिति मासोपवासपदंचांद्रायणादेरुपलक्षणम् ।

या माघस्नानाविषयीं अधिकारी सांगतो **भविष्यांत**—"ब्रह्मचारी, गृहस्थाश्रमी, वानप्रस्थ, संन्याशी, बालक, वृद्ध, तरुण, पुरुष, स्त्रिया, नपुंसक हे सारे माघमासांत शुभ तीर्थाचे ठायीं स्नान करून अभीष्ट फल पावतात." **पाद्मांत**— "जसे विष्णूची भक्ति करण्याविषयीं सारे अधिकारी आहेत तसे माघस्नानाविषयीं सारे अधिकारी आहेत." **ब्राह्मांत**— "शीतोदकानें स्नानाविषयीं शक्ति नसतां उष्णोदकानें स्नान करितात. सारे शरीरावयव दृढ असतां उष्णोदक विशेष फलदायक होत नाहीं." **वैष्णवामृतांत** व **गौडनिबंधांत स्कांदांत**—"पौषी पौर्णिमेपासून माघी पौर्णिमा येई तोंपर्यंत दररोज विष्णूची पूजा करावी. ह्या माघमासांत पितरांला व देवांला मुळा अर्पण करूं नये. ब्राह्मणानें मुळा भक्षण केला असतां चांद्रायण व्रत करावें. चांद्रायण केलें नाहीं तर नरकास जाईल. क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांनीं देखील मद्यासारखा मुळा असल्यामुळें तो प्रयत्नानें वर्ज्य करावा." ज्यावेळीं माघ मलमास येईल त्यावेळीं, मलमासांत काम्य व्रतांचे समाप्तीचा निषेध असल्यामुळें दोन मासांत स्नान व स्नानाचे नियम करावे. मासपर्यंत उपवासव्रत आणि चांद्रायणव्रत इत्यादिकांची समाप्ति तर मलमासांतच करावी. तें सांगतो **दीपिकेंत**—"मासोपवासव्रताचे दिवस नियमित ( ठरलेले ) तीस असल्यामुळें शुद्धमासांत तें आरंभून मलमासांत समाप्त करावें" ह्या दीपिकेच्या वचनांतील 'मासोपवास' या पदानें उपलक्षणेंकरून चांद्रायणादिक घ्यावें.

स्नानारंभेचमंत्रो**विष्णुनोक्तः** तत्रचोत्थायनियमंगृह्णीयाद्विधिपूर्वकम् माघमासमिमंपूर्णंस्नास्येऽहं

देवमाधव तीर्थस्यास्यजलेनित्यमितिसंकल्प्यचेतसीति प्रत्यहंमंत्रश्चपाद्मे दुःखदारिद्र्यनाशायश्रीविष्णोस्तोषणायच प्रातःस्नानंकरोम्यद्यमाघेपापविनाशनम् मकरस्थेरवौमाघेगोविंदाच्युतमाधव स्नानेनानेनमेदेवयथोक्तफलदोभव इमंमंत्रंसमुच्चार्यस्नायान्मौनसमन्वितइति प्रत्यहंसूर्यार्घ्यम् मंत्रस्तुपृथ्वीचंद्रोदयेपाद्मे सवित्रेप्रसवित्रेचपरंधामजलेमम त्वत्तेजसापरिभ्रष्टंपापंयातुसहस्रधेति ।

स्नानारंभाविषयीं मंत्र सांगतो **विष्णु**—"ज्या दिवशीं स्नानाचा आरंभ करावयाचा त्या दिवशीं पहांटेस उठून स्नानाचा नियम धरावा, तो असा—'**माघमासमिमं पूर्णं स्नास्येहं देव माधव ॥ तीर्थस्यास्य जले नित्यमिति संकल्प्य चेतसि.**" प्रतिदिवशीं स्नानाचा मंत्र सांगतो **पद्मपुराणांत**—"**दुःखदारिद्र्यनाशाय श्रीविष्णोस्तोषणाय च ॥ प्रातःस्नानं करोम्यद्य माघे पापविनाशनम् ॥ मकरस्थे रवौ माघे गोविंदाच्युत माधव ॥ स्नानेनानेन मे देव यथोक्तफलदो भव ॥**' ह्या मंत्राचा उच्चार करून मौन धारण करून स्नान करावें." स्नान केल्यावर प्रतिदिवशीं सूर्याला अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र पृथ्वीचंद्रोदयांत पाद्मांत—'**सवित्रे प्रसवित्रे च परं धाम जले मम ॥ त्वत्तेजसा परिभ्रष्टं पापं यातु सहस्रधा**'

स्नानकालश्चसूर्योदयः **त्रिस्थलीसेतौ** मकरस्थेरवौयोहिनस्नात्यभ्युदितेरवाविति माघमासेरटंत्यापः-किंचिदभ्युदितेरवावितिच**पाद्म**वचनात् संप्राप्तेमाघमासेतुतपस्विजनवल्लभे कोशंतिसर्ववारीणिसमुद्र्च्छलतिभास्करे पुनीमःसर्वपापानित्रिविधानिनसंशयइति**नारदीयोक्तेः** योमाघमास्युपसिसूर्यकराभितप्तेस्नानंसमाचरतिचारुनदीप्रवाहे उद्धृत्यसप्तपुरुषान्पितृमातृवंश्यानस्वर्गंप्रयात्यमरदेहधरोनरोऽसौ इति**भविष्योत्तरवचनाच ब्राह्मे**त्वरुणोदयउक्तः अरुणोदयेतुसंप्राप्तेस्नानकालेविचक्षणः माधवांघ्रियुगंध्यायनयःस्नातिसुरपूजितइति तथा अरुणोदयमारभ्यप्रातःकालावधिंप्रभो माघस्नानवतांपुण्यंक्रमात्तत्रावधारणा उत्तमंतुसनक्षत्रंमध्यमंलुप्ततारकम् सवितर्युदितेभूपततोहीनंप्रकीर्तितमिति तेनात्रशक्त्यपेक्षयाव्यवस्था इदंचस्नानंप्रयागेऽतिप्रशस्तम् काश्याःशतगुणंप्रोक्तंगंगायामुनसंगमे सहस्रगुणितासापिभवेत्पश्चिमवाहिनी पश्चिमाभिमुखीगंगाकालिंद्यासहसंगता हंतिकल्पकृतंपापंमामावेनृपदुर्लभेत्यादि**पाद्मादि**वचोभ्यः विस्तरस्तुमत्पितामहकृत**प्रयागसेतौ**ज्ञेयः **ब्राह्मे** यत्रकुत्रापियोमाघेप्रयागस्मरणान्वितः करोतिमज्जनंतीर्थेसलभेद्गांगमज्जनम् तथासमुद्रेप्यतिप्रशस्तम् तदुक्तं**पृथ्वीचंद्रोदयेप्रभासखंडे** माघेमासिचयःस्नायान्नैरंतर्येणभावतः पौंडरीकफलंतस्यदिवसेदिवसेभवेत् माघस्नानंकाम्यमेवेति**भट्टाः** विष्णवादिवाक्येसदावश्यशब्दान्नित्यत्वावगतेर्नित्यकाम्यमितितुयुक्तम् ।

स्नानाचा काल म्हटला म्हणजे सूर्योदय होय. कारण, **त्रिस्थलीसेतूंत**—"मकरास सूर्य असतां जो मनुष्य सूर्योदयकालीं स्नान करीत नाहीं त्यास पाप लागतें." व "माघमासांत किंचित् सूर्योदय झाला असतां उदकें शब्द करितात. कीं, ब्रह्महत्या करणारा किंवा सुरापान करणारा अशा कोणा कोणा महापाप्यास पवित्र करूं ?" असेंही **पाद्म**वचन आहे. आणि "तपस्वी लोकांस प्रिय असा माघमास प्राप्त असतां सूर्य उदय पावतेवेळीं सारीं उदकें ओरडतात कीं, आम्हीं त्रिविध ( कायिक, वाचिक, मानसिक ) अशा सान्या पापांस पवित्र करितों, यांत संशय नाहीं" असें **नारदीय** वचन आहे. आणि "जो मनुष्य माघ मासांत प्रातःकालीं सूर्यकिरण पडलेल्या अशा सुंदर नदीप्रवाहांत स्नान करितो तो मनुष्य पित्याच्या व मातेच्या वंशांतील सात पुरुषांचा उद्धार करून देवशरीर प्राप्त होऊन स्वर्गास जातो." असें **भविष्योत्तर** वचनही आहे. **ब्रह्मपुराणांत** तर स्नानाचा काल अरुणोदय सांगितला आहे. तो असा—"स्नानाचा काल अरुणोदय प्राप्त झाला असतां जो मनुष्य भगवंताच्या चरणकमलद्वंद्वाचें ध्यान करून स्नान करितो त्याची देव पूजा करितात." तसेंच—"अरुणोदयाला आरंभ करून प्रातःकालपर्यंत माघस्नान करणाऱ्यांला पुण्य प्राप्त होतें; त्या पुण्याचा उत्तम मध्यम कनिष्ठ भाव अनुक्रमानें सांगतो—नक्षत्रें दिसत आहेत त्या वेळीं स्नान उत्तम पुण्यकारक. नक्षत्रें दिसेनाशीं झाल्यावर जें स्नान तें मध्यम पुण्यकारक. आणि सूर्याचा उदय झाल्यावर जें स्नान तें कनिष्ठ पुण्यकारक सांगितलें आहे." या स्नानाचा वर सांगितलेल्या पाद्म-नारदीय-भविष्योत्तर वचनांत सूर्योदय काल सांगितला. आणि ब्राह्मांत अरुणोदय काल सांगितला. यावरून या दोन कालांची शक्तीप्रमाणें व्यवस्था जाणावी. म्हणजे सशक्तांस अरुणोदय काल व अशक्तांस सूर्योदय काल समजावा. हें माघस्नान प्रयागाचेठायीं अति प्रशस्त आहे. कारण, "गंगायमुनेच्या संगमाचे ठायीं काशीपेक्षां शंभरपटीनें अधिक आहे. ती गंगा जेथें पश्चिमवाहिनी आहे येथें सहस्रपट पुण्य देणारी आहे. यमुनेस मिळून पश्चिमाभिमुखी झालेली गंगा कल्पपर्यंत केलेल्या पापाचा नाश करिते. ती

पश्चिमाभिमुखी गंगा माघमासांत मिळणें दुर्लभ आहे" इत्यादिक **पद्मपुराणादि** वचनें आहेत. याचा विस्तार आमच्या पितामहांनीं ( नारायणभट्टांनीं ) केलेल्या **प्रयागसेतूंत** पाहावा. **ब्राह्मांत**—"जो मनुष्य माघमासांत कोणत्याही तीर्थांत प्रयागाचें स्मरण करून स्नान करितो, त्याला गंगास्नानाचें फल प्राप्त होतें." तसेंच हें माघस्नान समुद्रांतही अति प्रशस्त आहे. तें सांगतो—**पृथ्वीचंद्रोदयांत प्रभासखंडांत**—"जो मनुष्य माघमासांत शुद्ध भावानें निरंतर स्नान करितो त्यास प्रतिदिवशीं कमलार्पणाचें फल प्राप्त होतें." हें माघस्नान काम्यच आहे, असें **नारायणभट्ट** सांगतात. विष्णु इत्यादिकांच्या वचनांत 'सदा' 'अवश्य' असे शब्द असल्यावरून नित्यत्वाचें बोधन असल्यामुळें आणि इतर बहुत वचनांत फल सांगितल्यामुळें नित्य व काम्य, असें म्हणणें युक्त आहे.

मासपर्यंतंस्नानासंभवेतुत्र्यहमेकाहंवास्नायात् महामाघींपुरस्कृत्यसस्नौतत्रदिनत्रयमिति**लिंगात्** अस्मिन् योगेत्वशक्तोपिस्नायादपिदिनत्रयम् प्रयागेमाघमासेतुत्र्यहंस्नातस्ययत्फलम् नाश्वमेधसहस्रेणतत्फलंलभतेभुवीति**पाद्मादि**वचनात् अत्रमकरसंक्रमोरथसप्तमीमाघीतित्र्यहमित्**येके** माघशुक्लदशम्यादीत्यन्ये मकराद्यत्र्यहइत्यपरे माघमासाद्यत्र्यहइति**केचित्** त्रयोदश्यादीतिबहवः महामाघींपुरस्कृत्यसस्नौतत्रदिनत्रयमिति**पाद्मोक्तेः** एतस्यार्थवादत्वाद्यत्किंचिद्दिनत्रयमिति**भट्टाः तत्त्वंतु**संदिग्धेषुवाक्यशेषादितिन्यायात्त्रयोदश्याद्येवेति प्रयागंविनापि**पाद्मे** अस्मिन्योगेत्वशक्तोपिस्नायादपिदिनत्रयमिति ।

एक मासपर्यंत स्नानाचा असंभव असेल तर तीन दिवस किंवा एक दिवस स्नान करावें. कारण, "महामाघी पौर्णिमा पुढें करून तीन दिवस स्नान करिता झाला" असें **पाद्मांत** तीन दिवस स्नान केल्याचें बोधक वचन आहे. "महामाघी व प्रयाग या योगाचे ठायीं स्नानाविषयीं अशक्त असेल त्यानेंही माघमासांत तीन दिवस स्नान करावें. माघमासांत प्रयागाचे ठायीं तीन दिवस स्नान केल्यानें जें फल प्राप्त होतें तें फल सहस्र अश्वमेध केल्यानें भूमीवर प्राप्त होत नाहीं." असें **पद्मपुराणादि** वचन आहे. या माघस्नानाविषयीं तीन दिवस स्नानाचे ते मकरसंक्रांति, रथसप्तमी, माघी पौर्णिमा हे होय, असें **कितीएक** सांगतात. माघ शुक्लदशमी, एकादशी, द्वादशी, असें **अन्य** सांगतात. मकराचे पहिले तीन दिवस, असें इतर म्हणतात. माघ मासाचे पहिले तीन दिवस, असें कोणी म्हणतात. त्रयोदशी, चतुर्दशी, पौर्णिमा, असें बहुत विद्वान् सांगतात. कारण, 'महामाघी पुढें करून तीन दिवस स्नान करिता झाला' हें वर सांगितलेलें **पाद्म** वचन आहे. हें वचन अर्थवाद ( आलेल्या अर्थाचें प्रतिपादक ) असल्यामुळें कोणते तरी तीन दिवस स्नान करावें, असें **भट्ट** सांगतात. खरा प्रकार म्हटला तर—'संदिग्धस्थलीं वाक्यशेषानें निर्णय समजावा' ह्या न्यायानें 'महामाघीं पुरस्कृत्य०' ह्या वर सांगितलेल्या **पाद्म** लिंगावरून त्रयोदश्यादि पौर्णिमापर्यंत तीन दिवस समजावे. प्रयागावांचूनही सांगतो **पाद्मांत**—ह्या योगावर ( प्रयागाचे ठायीं ) स्नानाविषयीं अशक्त असेल त्यानेंही तीन दिवस स्नान करावें.

माघस्नाननियमास्तु**नारदीये** नवह्निंसेवयेत्स्नातोह्यस्नातोपिवरानने होमार्थंसेवयेद्वह्निंशीतार्थंनकदाचन अहन्यहनिदातव्यास्तिलाःशर्करयान्विताः त्रिभागस्तुतिलानांहिचतुर्थःशर्करान्वितः अनभ्यंगीवरारोहेसर्वंमासंनयेद्व्रती तथा अप्रावृतशरीरस्तुयःकुर्यात्स्नानमाचरेत् पदेपदेश्वमेधस्यफलंप्राप्नोतिमानवः तथा शंखचक्रधरंदेवंमाधवंनामपूजयेत् वह्निंहुत्वाविधानेनततस्त्वेकाशनोभवेत् भूशय्याब्रह्मचर्येणशक्तःस्नानंसमाचरेत् अशक्तोब्रह्मचर्यादौस्वेच्छासर्वत्रकथ्यते तथा तिलस्नायीतिलोद्वर्तीतिलहोमीतिलोदकी तिलभुक्तिलदाताचषट्तिलाःपापनाशनाइति प्रयागासंभवेकाश्यांदशाश्वमेधोत्तरस्थप्रयागतीर्थेस्नानमुक्तं**काशीखंडे** काश्युद्भवेप्रयागेयेतपसिस्नांतिमानवाः दशाश्वमेधजनितंफलंतेषांभवेद्ध्रुवमिति ।

माघस्नानाविषयीं **नियम** सांगतो, **नारदीयांत**—"स्नान केल्यावर किंवा स्नान करण्याचे पूर्वी देखील अग्नीचें सेवन ( अग्नीचा शेक ) करूं नये. होमाकरितां अग्निसेवन करावें. शीत जाण्याकरितां कधींही अग्नि सेवन करूं नये. दररोज शर्करायुक्त तीळ द्यावे. त्यांत तीन भाग तीळ आणि एक भाग साखर असावी. व्रतस्थानें अभ्यंग केल्यावांचून सारा महिना घालवावा." तसेंच—"जो मनुष्य शरीरावर प्रावरण न घेतां कष्टानें जाऊन स्नान करील त्याला पदापदाचे ठायीं अश्वमेधाचें फल प्राप्त होईल." तसेंच—"शंख, चक्र धारण करणाऱ्या देव माधवाचें पूजन करावें. यथाविधि अग्नीत होम करून नंतर एकभुक्त करावें. सशक्त असेल त्यानें भूमीवर शयन व ब्रह्मचर्य धारण करून स्नान करीत असावें. ब्रह्मचर्य, भूशयन इत्या-

१ महामाघी कोणती त्याचा निर्णय माघीपौर्णिमेच्या निर्णयप्रसंगीं पहावा. २ तिलस्नायीपदेन तिलयुक्तोदकेनस्नानं तिलहोमपदेनायुतलक्षतिलहोमात्मकस्यग्रहमखस्यापिसंग्रहः तिलोदकीति तिलयुक्तोदकेनदेवपूजातर्पणसंध्यादिकंपानंचकार्यमित्यर्थः इति धर्मसिंधुः.

दिकांविषयीं अशक्त असेल त्यानें यथेच्छ वर्तन करावें." तसेंच-"तिलयुक्त उदकानें स्नान, तीळ वाटून अंगास लावणें, तिळांचा होम, तिलोदकतर्पण, तिल भक्षण, आणि तिळांचें दान याप्रमाणें सहा प्रकारचा तिळांचा उपयोग पापनाश करणारा आहे." माघ मासांत प्रयागास जाणें न घडेल तर काशींत दशाश्वमेध तीर्थाचे उत्तरेस असणाऱ्या प्रयागतीर्थांत स्नान सांगतो **काशीखंडांत**—"काशींतील प्रयागतीर्थांत माघमासामध्यें जे स्नान करितात त्यांस निश्चयानें दशाश्वमेधाचें फल प्राप्त होतें."

स्नानोत्तरं**मदनपारिजातेविष्णुः** काष्ठमौनान्नमस्कृत्यपूजयेत्पुरुषोत्तमम् अवश्यमेवकर्तव्यंमाघस्नानमितिश्रुतिः **भविष्ये** तैलमामलकाश्चैवतीर्थेदेयास्तुनित्यशः ततःप्रज्वालयेद्वह्निंसेवनार्थंद्विजन्मनाम् एवं स्नानावसानेतुभोज्यंदेयमवारितम् भोजयेद्द्विजदांपत्यंभूषयेद्वस्त्रभूषणैः कंबलाजिनरत्नानिवासांसिविविधानिच चोलकानिचदेयानिप्रच्छादनपटास्तथा उपानहौतथागुप्तमोचकौपापमोचकौ अनेनविधिनादद्यान्माधवःप्रीयतामितिपाद्मे भूमौशयीतहोतव्यमाज्यंतिलसमन्वितम् तथा अन्नंचैवयथाशक्त्यादेयंमाघेनराधिप सुवर्णरक्तिकामात्रंदद्याद्वेदविदेतथा माघांतेतुविशेषो**नारदीये** माघावसानेसुभगेषड्रसंभोजनंस्मृतम् सूर्योमेप्रीयतांदेवोविष्णुमूर्तिर्निरंजनः दंपत्योर्वाससीसूक्ष्मेसप्तधान्यसमन्विते त्रिंशत्तुमोदकादेयाःशर्करातिलसंयुताइति अत्रैकादशीविधानेनव्रतस्योद्यापनंतथेति **पाद्म**वचनात् पूर्वेऽह्निउपवासपूजनादिकृत्वापरेऽह्नितिलचर्वाज्यैरष्टोत्तरशतंहोमंकृत्वासवित्रेप्रसवित्रेचेतिपूर्वोक्तमंत्रमुक्त्वा दिवाकरजगन्नाथप्रभाकरनमोस्तुते परिपूर्णंकुरुष्वेहमाघस्नानमुषःपतेइति समापयेदितिसंक्षेपः ।

स्नान केल्यानंतर कर्तव्य सांगतो—**मदनपारिजातांत विष्णु**—"काष्ठमौनांला नमस्कार करून पुरुषोत्तमाची पूजा करावी. हें माघस्नान अवश्य करावें, असें वेदांत सांगितलें आहे." **भविष्यपुराणांत**—"स्नानानंतर तीर्थाचे ठायीं तेल व आंवळे हे दररोज द्यावे. नंतर ब्राह्मणांला शेकण्याकरितां अग्नि पेटवावा. याप्रमाणें एकमास स्नान समाप्त झाल्यानंतर मुक्तद्वार भोजन घालावें. ब्राह्मणाचे दांपत्यास भोजन घालावें, आणि वस्त्रें व भूषणें यांनीं भूषित करावें. धाबळी, कृष्णाजिन, रत्नें, नाना प्रकारचीं वस्त्रें, चोळणे, प्रावरणवस्त्रें, पायांतील जोडा, पलंगपोस हे सर्व, देव माधवाच्या प्रीत्यर्थ ब्राह्मणास द्यावे." **पाद्मांत**—"भूमीवर शयन करावें. तिलसहित घृताचा होम करावा." तसेंच—"माघमासांत आपल्या शक्तीप्रमाणें अन्न समर्पण करावें. वेदवेत्त्या ब्राह्मणास एक गुंज सुवर्ण द्यावें." माघमासाचे अंतीं विशेष सांगतो **नारदीयांत**—"माघमासाचे शेवटीं **'सूर्यो मे प्रीयतां देवो विष्णुमूर्तिर्निरंजनः'** असें म्हणून षड्रसांचें भोजन द्यावें. आणि दंपत्याला सप्त धान्यांसहित दोन सूक्ष्म वस्त्रें द्यावीं. शर्करा व तीळ यांचे तीस लाडू करून ते द्यावे." "एकादशी व्रताच्या विधीनें माघस्नानरूप व्रताचें उद्यापन करावें." ह्या **पद्मपुराण** वचनावरून माघस्नानसमाप्तीच्या पूर्वदिवशीं उपवास, पूजा इत्यादि करून दुसऱ्या दिवशीं तिल, चरु, आज्य ह्या तीन द्रव्यांनीं अष्टोत्तरशत होम करून **'सवित्रे प्रसवित्रे च परं धाम जले मम ॥ त्वत्तेजसा परिभ्रष्टं पापं यातु सहस्रधा ॥'** ह्या पूर्वोक्त मंत्राचा उच्चार करून **'दिवाकर जगन्नाथ प्रभाकर नमोस्तुते ॥ परिपूर्णं कुरुष्वेदं माघस्नानमुषःपते'** ह्या मंत्रानें समाप्त करावें. असा हा माघस्नानविधि संक्षेपानें सांगितला आहे.

मकरसंक्रांतौ**हेमाद्रि**मतेपरतश्चत्वारिंशद्घटिकाःपुण्याः त्रिंशत्कर्काटकेनाड्योमकरेतुदशाधिकाइति**ब्रह्मवैवर्तात् माधवमते**तुविंशतिः त्रिंशत्कर्काटकेपूर्वामकरेविंशतिःपरेति**वृद्धवसिष्ठोक्तेः** यदातुसूर्यास्तात्पूर्वंसंक्रांतिर्भवतितदोभयमतेपूर्वमेवपुण्यकालः रात्रौतुप्रदोषेनिशीथेवामकरसंक्रमे**माधव**मतेद्वितीयदिनएवपुण्यम् यद्यस्तमयवेलायांमकरंयातिभास्करः प्रदोषेवार्धरात्रेवास्नानंदानंपरेहनीतिवृद्ध**गार्ग्य**वचनात् अस्तमयंप्रदोषः प्रदोषेपूर्वरात्रे कार्मुकंतुपरित्यज्यझषंसंक्रमतेरविः प्रदोषेवार्धरात्रेवास्नानंदानंपरेऽहनीति**भविष्योक्तेश्च** तदाभोगःपरेहनीतिहेमाद्रौपाठः **कालादर्शनिर्णयामृतमदनपारिजाताद**योप्येवमूचुः **दाक्षिणात्याश्चै**तदेवाद्रियंते यत्तुहेमाद्रिणाऽऽद्योवाशब्दोयथार्थे द्वितीयस्तथार्थे यथाप्रदोषेपूर्वेद्युस्तथार्धरात्रेपरेऽह्नीत्युक्तम् तस्मैनमोस्तु तेनपरेऽह्निपुण्यंवक्तुंप्रदोषेइति दिनद्वयेपुण्यनिरासार्थंअर्धरात्रग्रहणम् **हेमाद्रिस्मृत्यर्थसारानंतभट्टादिमते**तुनिशीथात्पूर्वंपश्चाद्वासंक्रांतौपूर्वदिनेपरदिनेवापुण्यं धनुर्मीनावतिक्रम्यकन्यांचमिथुनंतथा पूर्वापरविभागेनरात्रौसंक्रमणंयदा दिनांतेपंचनाड्यस्तुतदापुण्यतमाः-

स्मृताः उदयेपितथापंचदैवेपित्र्येचकर्मणीतिस्कांदवचनात् पूर्वापरविभागेनेतिमकरकर्कभिन्नविषयम् पूर्वोक्तवचोविरोधादितिमदनरत्ने उक्तम् षडशीतिमुखेऽतीतेअतीतेचोत्तरायणे इत्यादिविरोधाच्च तेन वैक-वाक्यतयाऽयमर्थः रात्रौपूर्वभागेमकरसंक्रमेपरेऽह्नि उदयेपंचनाड्यःपुण्याः रात्रावपरभागेकर्कसंक्रमेपूर्वेदि-नांतेपंचनाड्यइति एवंसर्वेषामविरोधः मकरेसामान्येनपरदिनेपुण्यत्वेपिपुण्यातिशयार्थमिदम् ।

मकरसंक्रांतीचे ठायीं **हेमाद्रीच्या** मतीं पुढच्या चाळीस घटिका पुण्यकाळ. कारण, "कर्कसंक्रांतीचे ठायीं तीस घटिका पुण्यकाळ. आणि मकराचे ठायीं दहा घटिका अधिक पुण्यकाळ" असें **ब्रह्मवैवर्त** वचन आहे. **माधवाच्या** मतीं तर मकराचे ठायीं वीस घटिका पुण्यकाळ. कारण, "कर्कसंक्रांतीचेठायीं पहिल्या तीस घटिका आणि मकराचेठायीं पुढच्या वीस घटिका पुण्यकाळ." असें **वृद्धवसिष्ठाचें** वचन आहे. ज्या वेळीं सूर्याच्या पूर्वी दिवसा संक्रांत होते त्या वेळीं दोघांच्या ( हेमाद्रीच्या व माधवाच्या ) मतीं पूर्वीच पुण्यकाळ. आतां रात्रीं संक्रांत झाली तर मग ती प्रदोषकालीं झालेली असो किंवा मध्यरात्रीं झालेली असो, मकरसंक्रांतीचे ठायीं **माधवाच्या** मतीं दुसऱ्या दिवशींच पुण्यकाळ. कारण, "जर प्रदोषकालीं किंवा पूर्वरात्रीं अथवा मध्यरात्रीं सूर्य मकरास जाईल तर स्नान व दान परदिवशीं करावें" असें **वृद्धगार्ग्य-**वचन आहे. ह्या वचनांतील 'अस्तमय' शब्दाचा अर्थ प्रदोष, आणि 'प्रदोष' शब्दाचा अर्थ पूर्वरात्र समजावा. आणि 'प्रदोषकालीं अथवा अर्धरात्रीं सूर्य धनुःसंक्रांतीला सोडून मकरास गेला तर स्नान, दान परदिवशीं करावें" असें **भविष्यपुराण**वचनही आहे. 'स्नानं दानं परेऽहनि' या स्थानीं 'तदा भोगः परेहनि' असा **हेमाद्रींत** पाठ आहे. अर्थ—त्या वेळीं भोगी परदिवशीं करावी. **कालादर्श, निर्णयामृत, मदनपारिजात** इत्यादिक ग्रंथकारही असेंच सांगते झाले. दाक्षिणात्य लोक हेंच मत ( परदिवशींच पुण्यकाळ ) घेतात. आतां जें **हेमाद्रीनें** सांगितलें कीं, 'प्रदोषे वाऽर्धरात्रे वा' या ठिकाणचा पहिला 'वा' शब्द 'यथा' शब्दाच्या अर्थी आहे, व दुसरा 'वा' शब्द 'तथा' शब्दाच्या अर्थी आहे, म्हणजे जसा प्रदोषकालीं संक्रांत असता पर्वदिवशीं पुण्यकाळ तसा अर्धरात्रीं संक्रांत असतां परदिवशीं पुण्यकाळ: असें सांगितलें, त्या हेमाद्रीला नमस्कार असो. वाशब्दाचा असा अर्थ करणें बरोबर नसल्यामुळें प्रदोषकालीं संक्रांत झाली असतां इतर वचनानें अप्राप्त असा परदिवशीं पुण्यकाळ सांगण्याकरितां 'प्रदोष' या पदाचें ग्रहण केलें आहे. अर्धरात्रीं संक्रांत असतां इतर सामान्य वचनांनीं दोन दिवस ( पूर्व व पर ) पुण्यकाळ प्राप्त आला त्याच्या निराकरणार्थ 'अर्धरात्र या पदाचें ग्रहण केलें आहे. **हेमाद्रि, स्मृत्यर्थसार, अनंतभट्ट** इत्यादिकांच्या मतीं तर मध्यरात्रीच्या पूर्वी व पश्चात् संक्रांत झाली असतां पूर्वदिवशीं किंवा परदिवशीं पुण्यकाळ. कारण, "धनु, मीन, कन्या, मिथुन या संक्रांतीला सोडून पूर्वरात्रीं किंवा अपररात्रीं जर पुढच्या संक्रांतीस ( मकर, मेष, तूळ, कर्क यांस ) सूर्य जाईल तर पूर्वदिवसाचे अंतीं पांच घटिका व पर दिवसाचे उदयीं तशाच पांच घटिका देव पित्र्य कर्मांविषयीं पुण्यकाळ सांगितला आहे" असें **स्कांद**वचन आहे. आता 'पूर्वरात्रीं व अपररात्रीं' असें जें म्हटलें तें मकर व कर्क यांवांचून इतरविषयक आहे. कारण, पूर्वी सांगितलेल्या 'प्रदोषे वार्धरात्रे वा स्नानं दानं परेहनि' या वचनाशीं विरोध येतो: असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. आणि 'षडशीति-मुख व उत्तरायण अतिक्रांत असतां पुण्यकाळ नाहीं' इत्यादि वचनांचा विरोध येतो. तेणेंकरून 'प्रदोषे वार्धरात्रे वा' या पूर्ववचनाची व 'पूर्वापरविभागेन' ह्या वचनाची एकवाक्यता ( एक अन्वय ) करून असा अर्थ होतो कीं, रात्रीच्या पूर्वभागीं मकरसंक्रांत झाली असतां परदिवशीं उदयकालीं पांच घटिका पुण्यकाळ. आणि रात्रीच्या अपरभागीं कर्क संक्रांत झाली असतां पूर्व दिवसाचे अंतीं पांच घटिका पुण्यकाळ, असा अर्थ केला म्हणजे सर्व वाक्यांचा विरोध येत नाहीं. मकराचे ठायीं वरील वचनांनीं सामान्यतः पुढचा दिवस पुण्यकाळ सांगितला तरी अतिशय पुण्य पांच घटिका, असें सांगण्याकरितां हें वचन आहे.

यत्तु **देवलयज्ञपार्श्वौ** आसन्नसंक्रमंपुण्यंदिनार्धंस्नानदानयोः रात्रौसंक्रमणेभानोर्विषुवत्ययनेदिवेति अत्र**माधवः** अयनेदिवाजातेतदर्धंपुण्यम् कर्कपूर्वमकरेऽन्यम् एतन्मध्यंदिनायनपरमिति **हेमाद्रिस्तु** रात्रौविषुवत्यासन्नदिनार्धंपुण्यम् अयनेत्वासन्नदिनंपुण्यम् दिनेइतिपाठेउभयत्रदिनार्धंपुण्यमित्याह एतदेवोक्तं-**दीपिकायाम्** अथायनमधःपश्चान्निशीथाद्ध्वेद्यासन्नमहस्तदर्धमथवापुण्यमिति **तत्त्वंतु** आसन्नसंक्रम-मित्यस्यविषुवत्येवान्वयः अयनेरात्रौसतिदिनेपुण्यम् कस्मिन्नित्यपेक्षायांकर्केपूर्वेऽह्निमकरेऽपरेह्निइतिवाक्यां-तरवशादर्थेउच्यमानेनकोपिविरोधः **यत्त्वनंतभट्टः** अथसंक्रमणंभानोर्निशीथात्प्राग्यदाभवेत् अयनंविषुवं तत्रप्राग्दिनांतिमनाडिकाः पंचपुण्यतमाःपश्चान्निशीथाचेद्भवेत्तथा आद्याःपरदिनस्यापितद्वदित्येषनिर्णयइति **अपरार्केप्येवम्** असंगतेयदासूर्योन्नसंयातिदिवाकरः प्रदोषेवार्धरात्रेवातदापुण्यं[illegible]

**वचनाद्दिनद्वयंवापुण्यकालः तदापुण्यंदिनांतरमितिमदनरत्नेपाठः गुर्जरप्राच्योदीच्यास्त्विदमेवाद्रियंते अत्रापिपूर्ववद्व्याख्येयम् तिथितत्त्वाद्योगौडग्रंथास्तुप्रदोषार्धरात्रभिन्नेरात्रेःपूर्वभागेपूर्वदिनेपरभागेचपरदिनेपुण्यमन्यसंक्रांतिवद्विशिष्यतयोर्निर्देशात् प्रदोषश्च प्रदोषोऽस्तमयादूर्ध्वंघटिकाद्वयमिष्यते इतिवत्सोक्तइत्याहुः तन्न अस्तंगतइतित्रितयवैयर्थ्यापत्तेः अतःप्रदोषपदेनतद्भिन्नैवरात्रिरुच्यते अतएवयावन्नोदयते रविरितिवृद्धगार्ग्यादिभिर्दक्षिणायनेपूर्वरात्रौसंक्रमेपूर्वदिनमुक्तम् वत्सोक्तिरप्यध्ययनादिपरा इहतुत्रिमुहूर्त एवप्रदोषः ।**

आतां जें **देवल व यज्ञपार्श्व** सांगतात—"संक्रांतीच्या जवळचें दिवसाचें अर्ध स्नानदानांविषयीं पुण्य आहे. रात्रीं विषुव ( मेष, तुला ) संक्रांत असतां व अयन ( मकर, कर्क ) असतां दिवसा पुण्यकाळ." येथें **माधव**—अयनसंक्रांति दिवसा झाली असतां दिवसाचें अर्ध पुण्यकाळ. त्यांत कर्कसंक्रांत असतां पहिलें अर्ध आणि मकर असतां पुढचें अर्ध पुण्य. हें सांगणें दोनप्रहरीं अयनसंक्रांत असतां तद्विषयक समजावें, असें सांगतो. **हेमाद्रि** तर—रात्रीं विषुवसंक्रांत असतां जवळचे दिवसाचें अर्ध पुण्य. आणि अयनसंक्रांत रात्रीं असेल तर जवळचा दिवस पुण्यकाळ. वरील वचनांत 'अयने दिने' असा पाठ असतां दोन्ही ठिकाणीं ( विषुवसंक्रांती व अयनसंक्रांतीचे ठायीं ) दिवसाचें अर्ध पुण्यकाळ असें सांगतो. हेंच सांगतो—**दीपिकेंत**—"मध्यरात्रीच्या आंत किंवा बाहेर अयनसंक्रांति होईल तर जवळचा दिवस किंवा जवळच्या दिवसाचें अर्ध पुण्यकाळ." **खरा प्रकार** म्हटला तर—वरील देवल-यज्ञपार्श्ववचनांत 'आसन्नसंक्रमं' याचा अन्वय 'विषुवति' याजकडेसच करावयाचा आहे. म्हणजे रात्रीं विषुवसंक्रांति झाली असतां जवळचें दिनार्ध पुण्य, असा अर्थ. आणि रात्रीं अयनसंक्रांति झाली असतां दिवसा पुण्य. आतां कोणत्या दिवशीं अशी आकांक्षा झाली असतां कर्काचे ठायीं पूर्वदिवशीं व मकराचे ठायीं परदिवशीं, असा इतर वाक्यानुरोधानें अर्थ केला असतां कोणताही विरोध येत नाहीं. आतां जें **अनंतभट्ट** सांगतो कीं, "ज्या वेळीं सूर्याची अयन किंवा विषुव संक्रांति मध्यरात्रीच्या पूर्वी होईल त्यावेळीं पूर्व दिवसाच्या शेवटच्या पांच घटिका पुण्यकाळ. आणि मध्यरात्रीच्या पुढें होईल त्या वेळीं पुढच्या दिवसाच्या तशाच पहिल्या पांच घटिका पुण्यकाळ, हा निर्णय समजावा." **अपरार्कांत**ही असेंच आहे. "ज्या वेळीं सूर्य अस्तंगत असतां मकरास जातो किंवा प्रदोषकाळीं अथवा अर्धरात्रीं मकरास जातो त्या वेळीं पूर्व व पर दोनदिवशीं पुण्यकाळ." त्या **बौधायन**वचनावरून अथवा दोन दिवस पुण्यकाळ. 'तदा पुण्यं दिनद्वयं' या ठिकाणीं 'तदा पुण्यं दिनांतरं' असा **मदनरत्नांत** पाठ आहे **गुर्जर, प्राच्य व उदीच्य** लोक तर हेंच मत स्वीकारितात. या अनंतभट्टादि मताची देखील पूर्वीप्रमाणें ( म्हणजे रात्रीं कर्कसंक्रांति असतां पूर्वदिवशीं व मकर असतां परदिवशीं पुण्यकाळ अशी ) व्याख्या करावी. **तिथितत्त्व—**इत्यादि **गौड** ग्रंथकार तर-प्रदोष व अर्धरात्र वर्ज्य करून रात्रीच्या पूर्वभागीं संक्रांत असतां पूर्वदिवशीं पुण्य, आणि रात्रीच्या परभागीं संक्रांत असतां परदिवशीं पुण्य; इतर संक्रांतीप्रमाणें समजावें. आणि प्रदोषीं किंवा मध्यरात्रीं दोन दिवस पुण्यकाळ. कारण, विशेषेंकरून प्रदोष व अर्धरात्र यांचें ग्रहण वरील वचनांत आहे. प्रदोष म्हणजे 'अस्तानंतर दोन घटिका प्रदोषकाळ आहे' या **वत्स**वचनानें सांगितलेला प्रदोषकाळ समजावा, असें सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, त्याच वचनांत 'अस्तंगते' हें तिसरें पद व्यर्थ होईल. म्हणून 'प्रदोष' या पदानें प्रदोषभिन्नच पूर्व रात्रि समजावी. म्हणूनच-"जोंपर्यंत सूर्याचा उदय झाला नाहीं तोंपर्यंत संक्रांत असतां" त्या **वृद्धगार्ग्या**दि वचनांनीं दक्षिणायनाचे ठायीं ( कर्काचे ठायीं ) पूर्वरात्रीं संक्रांत असतां पूर्व दिवस पुण्यकाळ सांगितला आहे. वत्सानें सांगितलेला प्रदोष तो देखील अध्ययनादिविषयक आहे. या ठिकाणीं तर तीन मुहूर्तच प्रदोष समजावा.

**मकरेदानविशेषोहेमाद्रौस्कांदे धेनुंतिलमयींराजन्दद्याद्यश्चोत्तरायणे सर्वान्कामानवाप्नोतिविंदतेपरमंसुखम् विष्णुधर्मे उत्तरेत्वयनेविप्रावस्त्रदानंमहाफलम् तिलपूर्णमनड्वाहंदत्वारोगैःप्रमुच्यते इति शिवरहस्येपि तस्यांकृष्णतिलैःस्नानंकार्यंचोद्वर्तनंशुभैः तिलादेयाश्चविप्रेभ्यःसर्वदैवोत्तरायणे तिलतैलेनदीपाश्चदेयाःशिवगृहेशुभाः कल्पतरौकालिकापुराणे होमंतिलैःप्रकुर्वीतसर्वदैवोत्तरायणे तान्योदेवायविप्रेभ्योहाटकेनसमंददेत् उत्तरायणमासाद्यनरःकस्मात्सशोचति तथा मकरेरात्रावपिश्राद्धादिभवतीत्युक्तंप्राक् ।**

मकरसंक्रांतीचे ठायीं विशेष दान सांगतो **हेमाद्रींत स्कांदांत**—"जो मनुष्य उत्तरायणांत तिलमय धेनूचें दान करितो त्याला सर्व काम प्राप्त होतात व तो परमसुख पावतो." **विष्णुधर्मांत**-"उत्तरायणसमयीं वस्त्रदान मोठें फल देणारें आहे. तिळांच्या वृषभाचें दान केलें असतां रोगांपासून मुक्त होतो." **शिवरहस्यांतही—**"मकरसंक्रांतीचे ठायीं चांगले काळे तीळ वाटून अंगास लावून तिलयुक्त उदकानें स्नान करावें. उत्तरायणसंक्रांतीचे ठायीं सर्वदा ब्राह्मणास तीळ

द्यावे. शिवमंदिरांत तिळांच्या तेलाचे दीप सुंदर लावावे" **कल्पतरूंत कालिकापुराणांत**—"उत्तरायणांत सर्वदा तिळांनीं होम करावा. जो मनुष्य उत्तरायण प्राप्त असतां देवाला व ब्राह्मणांना सुवर्णसहित तीळ देईल त्याला शोक कों होईल! अर्थात् त्याला शोक होणार नाहीं." तसेंच मकरसंक्रांतीचे ठायीं रात्रीं देखील श्राद्धादिक होतें, असें पूर्वी प्रथमपरिच्छेदांत सांगितलें आहे.

माघामायांयोगविशेषोर्धोदयःप्रागेवोक्तः माघकृष्णचतुर्दश्यांयमतर्पणमुक्तं **हेमाद्रौयमेन** अनर्कोभ्युदितेकालेमाघकृष्णचतुर्दशीम् स्नातःसंतर्प्यतुयमंसर्वपापैःप्रमुच्यत इति ।

माघी अमावास्येस ( शुक्लपक्षादि मासानें पौषी अमावास्येस ) अर्धोदय योग होत असतो त्याचा निर्णय येथेंच पूर्वी पौषमासांत सांगितला आहे. माघ कृष्णचतुर्दशीस यमतर्पण सांगतो **हेमाद्रींत यम**—"माघकृष्णचतुर्दशीस पहांटेस उठून सूर्योदयाचे पूर्वी स्नान करून यमाचें तर्पण करणारा सर्व पापांपासून मुक्त होतो."

माघशुक्लचतुर्थीतिलचतुर्थी साप्रदोषव्यापिनीग्राह्या माघशुक्लचतुर्थ्यांतुनक्तव्रतपरायणाः येत्वांढुंढेऽर्चयिष्यंतितेचर्याःस्युरसुरद्रुहामिति **काशीखंडात्** माघमासेचतुर्थ्यांतुतस्मिन्कालउपोषितः अर्चयित्वातुयोदेविजागरंतत्रकारयेदिति **त्रिस्थलीसेतौलैंगाच** इयमेवकुंदचतुर्थी साप्रदोषव्यापिनीग्राह्या माघशुक्लचतुर्थ्यांतुकुंदपुष्पैःसदाशिवम् संपूज्ययोहिनक्ताशीसप्राप्नोतिश्रियंनर इति **कालादर्शेकौर्मोक्तेः** माघशुक्लपंचमीश्रीपंचमी तदुक्तं **हेमाद्रौवाराहे** माघशुक्लचतुर्थ्यांतुवरमाराध्यचश्रियः पंचम्यांकुंदकुसुमैःपूजां कुर्यात्समृद्धये इयं **माधव**मतेपूर्वा **हेमाद्रि**मतेपरा चैत्रशुक्लेश्रीपंचमीति **दिवोदासः** ।

माघशुक्ल चतुर्थी ही तिलचतुर्थी. ती प्रदोषव्यापिनी घ्यावी. कारण, "हे ढुंढादेवि! माघ शुक्लचतुर्थीस नक्तव्रत करणारे असून तुझी पूजा करितील ते देवांस पूज्य होतील" असें **काशीखंड**वचन आहे. आणि "हे देवि! माघमासांत चतुर्थीस प्रदोषकालीं उपोषित राहून पूजन करून त्या कालीं जागरण करावें" असें **त्रिस्थलीसेतूंत लिंगपुराणवचनही** आहे. हीच कुंदचतुर्थी होय. ती प्रदोषव्यापिनी घ्यावी. कारण "जो मनुष्य माघशुक्ल चतुर्थीस कुंदपुष्पांनीं सदाशिवाची पूजा करून नक्तभोजन करितो त्याला लक्ष्मी प्राप्त होते" असें **कालादर्शांत कूर्मपुराण**वचन आहे. माघशुक्ल पंचमी ही श्रीपंचमी होय. तें सांगतो **हेमाद्रींत वाराहांत**—"माघशुक्ल चतुर्थीस लक्ष्मीचें उत्तम आराधन करून पंचमीस कुंदपुष्पांनीं पूजा करावी, म्हणजे समृद्धि प्राप्त होते." ही पंचमी **माधवा**च्या मतीं पहिली (चतुर्थीयुक्त) घ्यावी. **हेमाद्रीच्या** मतीं परा ( षष्ठीयुक्त ) घ्यावी. चैत्र शुक्ल पक्षांत श्रीपंचमी होते, असें **दिवोदास** सांगतो.

माघशुक्लसप्तमीरथसप्तमी साअरुणोदयव्यापिनीग्राह्या सूर्यग्रहणतुल्यातुशुक्लामाघस्यसप्तमी अरुणोदयवेलायांतस्यांस्नानंमहाफलमिति **चंद्रिकायांविष्णु**वचनात् अरुणोदयवेलायांशुक्लामाघस्यसप्तमी प्रयागेयदिलभ्येतकोटिसूर्यग्रहैःसमेतिवचनाच्च यत्तु **दिवोदासीये** अचलासप्तमीदुर्गाशिवरात्रिर्महाभरः द्वादशीवत्सपूजायांसुखदाप्राग्युतामदेतिषष्ठीयुतत्वमुक्तम् तद्यदापूर्वेऽह्निघटिकाद्वयंषष्ठीसप्तमीचपरेद्युःक्षयवशादरुणोदयात्पूर्वंसमाप्यतेतत्परंज्ञेयम् तत्रपप्रयागसप्तमीक्षयंप्रवेश्यारुणोदयेस्नानंकार्यम् **मदनरत्ने भविष्योत्तरे** माघेमासिसितेपक्षेसप्तमीकोटिभास्करा कुर्यात्स्नानार्घ्यदानाभ्यामायुरारोग्यसंपदः ।

माघशुक्ल सप्तमी ही रथसप्तमी होय. ती अरुणोदयव्यापिनी घ्यावी. कारण, "माघमासाची शुक्ल सप्तमी सूर्यग्रहणासारखी पुण्यकारक आहे. त्या सप्तमीस अरुणोदयकालीं स्नान केल्यानें मोठें फल प्राप्त होतें." असें **चंद्रिकेंत विष्णुवचन आहे.** आणि "प्रयागाचे ठायीं अरुणोदयकालीं माघशुक्ल सप्तमी जर प्राप्त होईल तर ती कोटि सूर्यग्रहणांशीं समान आहे" असें वचनही आहे. आतां जें **दिवोदासीयांत**—"रथसप्तमी, दुर्गाष्टमी, शिवरात्रि चतुर्दशी, महाभर, आणि गोवत्सद्वादशी ह्या तिथि सर्वदा पूर्वयुक्त घ्याव्या, त्या सुखदायक होतात." ह्या वचनानें रथसप्तमी षष्ठीयुक्त घ्यावी असें सांगितलें, तें ज्या वेळीं पूर्वदिवशीं षष्ठी दोन घटिका आणि त्याच दिवशीं सप्तमी असून दुसऱ्या दिवशीं अरुणोदयाचे पूर्वी समाप्त होत असेल त्या वेळीं षष्ठीयुक्त घ्यावी, असा त्याचा अभिप्राय समजावा. त्या ठिकाणीं 'तिथ्यादौ तु भवेद्यावान् ह्रासो वृद्धिः परेऽहनि । तावान् ग्राह्यः स पूर्वेद्युरदृष्टोपि स्वकर्मणि' या वचनावरून सप्तमीच्या क्षयघटिका जितक्या असतील तितक्या घटिका षष्ठींत

---

१ प्रदोषव्यापिनीति नक्ताशीत्युक्तेः । वस्तुतस्तु मध्याह्नव्यापिनीति बहुपुस्तकपाठो युक्तः पूजाव्रतत्वात् । नक्तंतुननिर्णायकमंगत्वात् । २ माघशुक्ल चतुर्थीस ढुंढिराजाच्या उद्देशानें नक्तव्रत, ढुंढिराजाची पूजा, तिळांचे लाडूंचा वगैरे नैवेद्य, आणि तिलभक्षण सांगितलें आहे. असें धर्मसिंधुसारांत आहे. ३ हें वचन नरकचतुर्दशीप्रसंगीं लिहिलें आहे, तेथें पाहावें.

सप्तमी आहे असें समजून षष्ठींतच अरुणोदयकालीं स्नान करावें. **मदनरत्नांत भविष्योत्तरांत**—"माघमासांत शुक्ल पक्षांतील सप्तमी कोटिभास्करतुल्य आहे; ती स्नान व अर्घ्यदान केल्यानें आयुष्य, आरोग्य व संपत्ति यांना देते."

अत्रविधि**र्भविष्ये** स्नात्वाषष्ठ्यामेकभक्तंसप्तम्यांनिश्चलंजलम् रात्र्यंतेचालयेथास्त्वंदत्वाशिरसिदीपकम् तथाजलंप्रक्रम्य नकेनचाल्यतेयावत्तावत्स्नानंसमाचरेत् सौवर्णेराजतेपात्रेभक्त्यालावुमयेथवा तैलेनवर्तिर्दातव्यामहारजनरंजिता महारजनंकुसुंभम् समाहितमनाभूत्वादत्वाशिरसिदीपकम् भास्करंहृदयेध्यात्वा इमंमंत्रमुदीरयेत् नमस्तेरुद्ररूपायरसानांपतयेनमः वरुणायनमस्तेस्तुहरिवासनमोस्तुते जलेपरिहरेद्दीपंध्यात्वासंतर्प्यदेवताइति चंदनेनलिखेत्पद्ममष्टपत्रंसकर्णिकम् मध्येशिवंसपत्नीकंप्रणवेनचसंयुतम् पूर्वादिदलेषुरविभानुविवस्वद्भास्करसवित्रर्कसहस्रकिरणसर्वात्मकान्संपूज्यगृहंगच्छेदिति स्नानमंत्रश्च**काशीखंडे** यद्यज्जन्मकृतंपापंमयासप्तसुजन्मसु तन्मेरोगंचशोकंचमाकरीहंतुसप्तमी एतज्जन्मकृतंपापंयच्चजन्मांतरार्जितम् मनोवाक्कायजंयच्चज्ञाताज्ञातेचयेपुनः इतिसप्तविधंपापंस्नानान्मेसप्तसप्तिके सप्तव्याधिसमायुक्तंहरमाकरिसप्तमि एतन्मंत्रत्रयंजप्त्वास्नात्वापादोदकेनरः केशवादित्यमालोक्यक्षणान्निःकल्पषोभवेत् ।

या सप्तमीचे दिवशीं विधि सांगतो **भविष्यांत**—"षष्ठीचे दिवशीं स्नान करून एकभक्त करावें. आणि रात्रीच्या अंतीं ( पहांटेस ) सप्तमींत मस्तकावर दीप ठेऊन निश्चल ( कोणी न चाळविलेलें ) जल चाळवावें." तसेंच—उदकाचा उपक्रम करून सांगतो—"जोंपर्यंत कोणीही उदक चाळविलें नाहीं तोंपर्यंत उदकांत जाऊन स्नान करावें. सोन्याच्या किंवा रुप्याच्या अथवा भोपळ्याच्या पात्रांत तेल घालून कुसुंभाच्या रंगानें रंगविलेली वात घालून दीप लावावा. आणि मन स्वस्थ करून मस्तकावर दिवा धरून हृदयाचेठायीं भास्कराचें ध्यान करून हा पुढील मंत्र म्हणावा." तो मंत्र असाः-"**नमस्ते रुद्ररूपाय रसानां पतये नमः ॥ वरुणाय नमस्तेस्तु हरिवास नमोस्तुते.**" या मंत्रानें ध्यान करून उदकामध्यें दीप द्यावा, व देवतांचें तर्पण करावें." चंदनानें अष्टदलांचें कर्णिकायुक्त कमल काढावें. मध्यें पत्नीसहित ओंकारयुक्त शिवाची आणि पूर्वादि आठ पत्रांचे ठायीं रवि, भानु, विवस्वान्, भास्कर, सविता, अर्क, सहस्रकिरण, सर्वात्मा, यांची पूजा करून गृहास जावें. स्नानमंत्र सांगतो—**काशीखंडांतः**-"**यद्यज्जन्मकृतं पापं मया सप्तसु जन्मसु ॥ तन्मे रोगं च शोकं च माकरी हंतु सप्तमी ॥ १ ॥ एतज्जन्मकृतं पापं यच्च जन्मांतरार्जितं ॥ मनोवाक्कायजं यच्च ज्ञाताज्ञाते च ये पुनः ॥ २ ॥ इति सप्तविधं पापं स्नानान्मे सप्तसप्तिके ॥ सप्तव्याधिसमायुक्तं हर माकरि सप्तमि ॥ ३ ॥** हे तीन मंत्र जपून पादोदका ( गंगे ) मध्यें स्नान करून केशवादित्याचें दर्शन घेईल तो मनुष्य क्षणांत निष्पाप होईल."

**दिवोदासीये मदनरत्ने**च इक्षुदंडेनजलंचालयित्वासप्तार्कपत्राणिबदरीपत्राणिचशिरसिनिधायपूर्वोक्तैर्मंत्रैःस्नात्वातिलपिष्टमयापूपैर्हैमंसूर्यंसंपूज्यविप्रायदद्यात् अर्घ्यमंत्रो**मदनरत्ने** सप्तसप्तिवहप्रीतसप्तलोकप्रदीपन सप्तमीसहितोदेवगृहाणार्घ्यंदिवाकर ततः जननीसर्वलोकानांसप्तमीसप्तसप्तिके सप्तव्याहृतिकेदेविनमस्तेसूर्यमंडलइतिप्रार्थयेत् **सौरागमे** अर्कपत्रैःसबदरैर्दूर्वाक्षतसचंदनैः अष्टांगविधिनाचार्घ्यंदद्यादादित्यतुष्टये अत्रदानविशेषो**मदनरत्ने भविष्ये** ताम्रपात्रेयथाशक्त्यामृन्मयेवाथभक्तिमान् स्थापयेत्तिलपिष्टंचसघृतंसगुडंतथा कांचनंतालकंकृत्वाअशक्तस्तिलपिष्टजम् संच्छाद्यरक्तवस्त्रेणपुष्पैर्धूपैरथार्चयेत् **दानमंत्र**स्तु आदित्यस्यप्रसादेनप्रातःस्नानफलेनच दुष्टदौर्भाग्यदुःस्वप्नंमयादत्तंतुतालकम् तालकंकर्णाभरणमितितत्रैवोक्तम् दीपपात्रमिति**हेमाद्रौ** तत्रैव**भविष्योत्तरे** एवंविधंरथवरंरथवाजियुक्तंहैमंचहैमशतदीधितिनासमेतम् दद्याच्चमाघसितसप्तमिवासरेयःसोसंगचक्रगतिरेवमहींभुनक्ति इयंमन्वादिरपि इयंचशुक्लपक्षस्थत्वात्पौर्वाह्णिकीग्राह्या यदामाघोमलमासोभवतितदामासद्वयेमन्वादिश्राद्धंकुर्यात् मन्वादिकंतैर्थिकंचकुर्यान्मासद्वयेपिचेति**स्मृतिचंद्रिकोक्तेः** ।

**दिवोदासीयांत व मदनरत्नांत**ही सांगतो—उंसाचे दंडानें उदक चाळवून रुईचीं सात पानें व बोरीचीं सात पानें मस्तकावर ठेवून वर सांगितलेल्या मंत्रांनीं स्नान करून तिलपिष्टाच्या अपूपांनीं सुवर्णाच्या सूर्यप्रतिमेची पूजा करून ती प्रतिमा ब्राह्मणाला द्यावी. अर्घ्यमंत्र-**मदनरत्नांत सांगतो**—"**सप्तसप्तिवहप्रीत सप्तलोकप्रदीपन ॥ सप्तमीसहितो देव गृहाणार्घ्यं दिवाकर. ॥**" नंतर "**जननी सर्वलोकानां सप्तमी सप्तसप्तिके ॥ सप्तव्याहृतिके**

**देवि नमस्ते सूर्यमंडले ॥"** या मंत्रानें प्रार्थना करावी. **सौरागमांत**—"आदित्याच्या **संतोषार्थ रुईचीं पानें, बोरें,** दूर्वा, अक्षता, चंदन यांहींकरून अष्टांगविधीनें[१] अर्घ्य द्यावें." या सप्तमीस विशेष दान सांगतो **मदनरत्नांत भविष्यांत**— "भक्तिमान् मनुष्यानें तांब्याच्या पात्रांत किंवा आपल्या शक्तीप्रमाणें मृन्मयपात्रांत घृतगुडसहित तिळांचें पीठ ठेवावें, त्याजवर सोन्याचें तालक ( कर्णभूषण, तानवड ) करून व अशक्तानें तिलपिष्टाचें करून रक्तवस्त्रानें आच्छादित करून ठेवावें आणि त्याची पुष्पांनीं व धूपांनीं पूजा करावी." त्याच्या दानाचा मंत्र—**"आदित्यस्य प्रसादेन प्रातःस्नानफलेन च ॥ दुष्टदौर्भाग्यदुःस्वप्नं मया दत्तं तु तालकम् ॥"** तालक म्हणजे कर्णभूषण असें तेथेंच सांगितलें आहे. तालक म्हणजे दीपपात्र, असें **हेमाद्रींत** आहे. तेथेंच **भविष्योत्तरांत**—"याप्रमाणें सोन्याचा उत्तम रथ घोड्यांसहित करून त्यांत सुवर्णाचा सूर्य ठेऊन जो मनुष्य माघ शुद्ध सप्तमीच्या दिवशीं ब्राह्मणास देईल त्याच्या रथाच्या गतीचा कोठेंही प्रतिबंध न होतां तो पृथ्वीचा उपभोग घेईल. म्हणजे निष्कंटक पृथ्वीचें राज्य करील." ही सप्तमी मन्वादिही आहे. ही शुक्लपक्षस्थ असल्यामुळें पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. जेव्हां माघ मलमास असेल तेव्हां मलमास व शुद्धमास या दोन्ही मासांत मन्वादिश्राद्ध करावें. कारण, "मन्वादिक श्राद्ध आणि तीर्थश्राद्ध हें दोन्ही मासांत करावें असें **स्मृतिचंद्रिकावचन** आहे.

माघशुक्लाष्टमीभीष्माष्टमी तदुक्तं**हेमाद्रौपाद्मे** माघेमासिसिताष्टम्यांसतिलंभीष्मतर्पणम् श्राद्धंचयेनराःकुर्युस्तेस्युःसंततिभागिनइति **भारतेपि** शुक्लाष्टम्यांतुमाघस्यदद्याद्भीष्माययोजलम् संवत्सरकृतंपापंतत्क्षणादेवनश्यतीति **धवलनिबंधेस्मृतिः** अष्टम्यांतुसितेपक्षेभीष्मायतुतिलोदकम् अन्नंचविधिवद्दद्युःसर्वेवर्णाद्विजातयः सर्ववर्णोक्तिर्द्विजातयइतिसंबोधनम् तर्पणमंत्रस्तत्रैव भीष्मःशांतनवोवीरःसत्यवादीजितेंद्रियः आभिरद्भिरवाप्नोतिपुत्रपौत्रोचितांक्रियाम् वैयाघ्रपद्यगोत्रायसांकृत्यप्रवरायच अपुत्रायददाम्येतज्जलंभीष्मायवर्मणे वसूनामवतारायशंतनोरात्मजायच अर्घ्यंददामिभीष्मायआबालब्रह्मचारिणे इति एतज्जीवत्पितृकस्यापिभवति जीवत्पितापिकुर्वीततर्पणंयमभीष्मयोरिति**पाद्मोक्तेः**रिति**जीवत्पितृकनिर्णयेपितृचरणैरुक्तम्** एतच्चापसव्येनकार्यमिति**दिवोदासीये** अत्रश्राद्धंकाम्यंतर्पणंचनित्यम् ब्राह्मणाद्याश्चयेवर्णादद्युर्भीष्मायनोजलम् संवत्सरकृतंतेषांपुण्यंनश्यतिसत्तमेति**मदनरत्ने**वचनात् ।

माघ शुक्ल अष्टमी ही भीष्माष्टमी होय. तें सांगतो **हेमाद्रींत पद्मपुराणांत**—"माघमासांतील शुक्लअष्टमीस भीष्माच्या उद्देशानें तिलतर्पण व श्राद्ध जे मनुष्य करितील ते संततियुक्त होतील." **भारतांत**ही—"जो मनुष्य माघ शुक्ल अष्टमीस भीष्माला उदक देईल त्यानें एका वर्षांत केलेलें पाप तत्क्षणीं नष्ट होईल." **धवलनिबंधांत स्मृति**—"हे द्विजाति ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ) हो ! शुक्ल पक्षाच्या अष्टमीस सार्या वर्णांनीं ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांनीं ) भीष्माला तिलोदक व अन्न ( श्राद्ध ) यथाविधि द्यावें." भीष्माला तर्पण करावें म्हणून सांगितलें त्या तर्पणाचा मंत्र तेथेंच सांगतो—**"भीष्मः शांतनवो वीरः सत्यवादी जितेंद्रियः ॥ आभिरद्भिरवाप्नोति पुत्रपौत्रोचितां क्रियाम् ॥ वैयाघ्रपद्यगोत्राय सांकृत्यप्रवराय च ॥ अपुत्राय ददाम्येतज्जलं भीष्माय वर्मणे ॥"** या दोन मंत्रांनीं अपसव्यानें तर्पण करून सव्यानें अर्घ्य द्यावें. अर्घ्यमंत्र—**"वसूनामवताराय शंतनोरात्मजाय च ॥ अर्घ्यं ददामि भीष्माय आबालब्रह्मचारिणे ॥"** हें भीष्मतर्पण जीवत्पितृकालाही[२] आहे. कारण, "यमाचें तर्पण व भीष्माचें तर्पण हें जीवत्पितृकानें देखील करावें" असें **पद्मपुराणवचन** आहे, असें **जीवत्पितृकनिर्णयांत** आमच्या वडिलांनीं **( रामकृष्णभट्टांनीं )** सांगितलें आहे. हें तर्पण अपसव्यानें करावें, असें **दिवोदासीय ग्रंथांत** सांगितलें आहे. येथें श्राद्ध[३] सांगितलें तें कामनिक आहे. तर्पण सांगितलें तें नित्य आहे. कारण, "जे ब्राह्मणादिक चारी वर्ण भीष्माला उदक देत नाहींत त्यांचें एका वर्षांत केलेलें पुण्य नष्ट होतें." या **मदनरत्नांतील** वचनांत उदक न दिलें तर पुण्यनाश सांगितला आहे.

माघशुक्लद्वादशीभीष्मद्वादशी त्वयाकृतमिदंवीरत्वनाम्नाभविष्यति साभीष्मद्वादशीत्येपासर्वपापहराशुभेति**हेमाद्रौपाद्म**वचनात् इयंपूर्वयुता युग्मवाक्यात् माघीपूर्णिमापरेत्युक्तंप्राक् तथा**हेमाद्रौ ब्राह्मे** मघास्थयोश्चजीवेंद्वोर्महामाघीतिकथ्यते **तत्रैवज्योतिषे** मेषे[४]पृष्ठेतथासौरिःसिंहेचगुरुचंद्रमाः भास्करः श्रवणर्क्षेचमहामाघीतिसास्मृता तथा**भविष्ये** वैशाखीकार्तिकीमाघीतिथयोऽतीवपूजिताः स्नानदानविही-

---

१ अर्घ्याचा अष्टांगविधि असा 'आपः क्षीर कुशाग्राणि दध्यक्षततिलास्तथा ॥ यवाः सिद्धार्थकाश्चेति अर्घ्योष्टांगः प्रकीर्तितः ॥' अर्थ–उदक, दूध, कुशाग्रें, दहीं, अक्षता, तिळ, जव, श्वेत सर्षप हे पदार्थ एकत्र करून जो अर्घ्य होतो तो अष्टांगअर्घ्य म्हटला आहे. २ अत्र जीवत्पितृकस्य नाधिकार इति कौस्तुभः । ३ अत्र मध्याह्नव्यापिनी अष्टमी ग्राह्या श्राद्धस्यैकोद्दिष्टत्वादिति । ४ मेषपृष्ठे मेषराशौ । सौरिः शनिः ।

नास्नानेनेयाःपांडुनंदन तथा तिलपात्राणिदेयानिकंचुकाःकंबलास्तथेति माघपूर्णिमानंतराष्टमीमाघीअष्टका तन्निर्णयः पूर्वेद्युरन्वष्टकानिर्णयश्चपूर्वमुक्तः मलमासेचैतानभवंतीत्येतत्सर्वंमार्गशीर्षप्रकरणेऽभिहितम् तथा-चतसृष्वष्टकास्वशक्तावेषाआवश्यकी हेमंतशिशिरयोश्चतुर्णामपरपक्षाणामष्टमीष्वष्टकाएकस्यांवेत्याश्वला-यनोक्तेः तथा माघाष्टकांप्रक्रम्य तामेकाष्टकेत्याचक्षतइत्यापस्तंबवचनाच्चेत्यादिप्रयोगपारिजातेज्ञेयम् इतिश्रीकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौद्वितीयपरिच्छेदेमाघमासःसमाप्तः ।

माघशुक्ल द्वादशी ही भीष्मद्वादशी होय. कारण, 'हे वीरा भीष्मा ! हें व्रत तूं केलेंस म्हणून तुझ्या नांवानें प्रसिद्ध होईल. ती ही भीष्मद्वादशी सर्व पाप हरण करणारी कल्याणकारक आहे.'' असें **हेमाद्रींत पाद्म**वचन आहे. ही द्वादशी युग्मवाक्यावरून पूर्वा करावी. माघी पूर्णिमा परा घ्यावी, असें पूर्वी सांगितलें आहे. तसेंच **हेमाद्रींत ब्राह्मांत**–''गुरु व चंद्र हे मघानक्षत्रास असले म्हणजे त्या पौर्णिमेस महामाघी असें म्हटलें आहे.'' तेथेंच **ज्योतिषांत**—''मेषराशीस शनि, सिंहास गुरु व चंद्र, आणि श्रवणनक्षत्रास सूर्य असे असले म्हणजे ती पौर्णिमा महामाघी म्हटली आहे.'' तसेंच **भविष्यांत**—'हे पांडुपुत्रा ! वैशाखी, कार्तिकी आणि माघी ह्या पौर्णिमा अतीव पूज्य आहेत. ह्या तिथींस स्नान व दान केल्यावांचून राहूं नये.'' तसेंच—''ह्या माघी पौर्णिमेस तिलपात्रें द्यावीं. आंगरखे द्यावे. घोंगड्या द्याव्या.'' माघी पूर्णिमेच्या पुढची अष्टमी ही माघी अष्टका, तिचा निर्णय व पूर्वेद्युःश्राद्धाचा आणि अन्वष्टकाश्राद्धाचा निर्णय पूर्वी मार्गशीर्षांत सांगितला आहे. आणि मलमासांत हीं अष्टकादि श्राद्धें होत नाहींत, हें सारें मार्गशीर्षमासप्रकरणांत सांगितलें आहे. तसेंच मार्गशीर्ष, पौष, माघ, फाल्गुन ह्या चार मासांतील चार अष्टका करण्यास अशक्त असेल त्यानें ही माघी अष्टका अवश्य करावी. कारण, ''हेमंतऋतु व शिशिरऋतु यांच्या चार कृष्ण पक्षांतील अष्टमींचे ठायीं चार अष्टका कराव्या. अथवा एका अष्टमीस एक अष्टका करावी.'' असें **आश्वलायन**सूत्र आहे. तसेंच माघी अष्टकेचा उपक्रम करून ''ती एक अष्टका आहे, असें विद्वान सांगतात'' असें **आपस्तंब**वचनही आहे, इत्यादि प्रकार **प्रयोगपारिजातांत** पाहावा.

इति माघमास समाप्त झाला.

कुंभेषोडशघटिकाःपुण्याः शेषंप्राग्वत् फाल्गुनकृष्णाष्टम्यांविशेषः**कल्पतरौ** फाल्गुनस्यचमासस्यकृ-ष्णाष्टम्यांमहीपते इत्युपक्रम्य जातादाशरथेःपत्नीतस्मिन्नहनिजानकी उपोषितोरघुपतिःसमुद्रस्यतटेतदा रामपत्नीचसंपूज्यासीताजनकनंदिनीति ।

## आतां फाल्गुनमासाचीं कृत्यें सांगतो

कुंभसंक्रांतीला पूर्वीच्या सोळा घटिका पुण्यकाल. इतर सर्व निर्णय प्रथमपरिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें समजावा. फाल्गुन कृष्ण अष्टमीस विशेष सांगतो **कल्पतरूंत**—''हे राजा ! फाल्गुन कृष्णअष्टमीचे दिवशीं'' असा उपक्रम करून ''दाशरथि रामाची पत्नी जानकी त्या दिवशीं झाली. त्या दिवशीं रघुपति राम समुद्राच्या तीरीं उपोषित राहिला होता. रामाची पत्नी व जनकाची कन्या जी सीता तिची त्या दिवशीं पूजा करावी.''[1]

फाल्गुनकृष्णचतुर्दशीशिवरात्रिः साचकेषुचिद्वचनेषुप्रदोषव्यापिनीग्राह्येत्युक्तम् केषुचिन्निशीथव्यापिनी तत्राद्यामाधवीये त्रयोदश्यस्तगेसूर्येचतसृष्वेवनाडिषु भूतविद्धातुयातत्रशिवरात्रिव्रतंचरेत् **स्मृत्यंतरेपि** प्रदोषव्यापिनीग्राह्याशिवरात्रिचतुर्दशी रात्रौजागरणंयस्मात्तस्मात्तांसमुपोषयेत् अत्रप्रदोषोरात्रिः उत्तरार्धे-तस्याहेतुत्वोक्तेः **कामिकेपि** आदित्यास्तमयेकालेअस्तिचेद्याचतुर्दशी तद्रात्रिःशिवरात्रिःस्यात्साभवेदुत्त-मोत्तमेति द्वितीयापितत्रैव**नारदसंहितायाम्** अर्धरात्रियुतायत्रमाघकृष्णचतुर्दशी शिवरात्रिव्रतंतत्रसोऽ-श्वमेधफलंलभेत् **स्मृत्यंतरेपि** भवेद्यत्रत्रयोदश्यांभूतव्याप्तामहानिशा शिवरात्रिव्रतंतत्रकुर्याज्जागरणंतथेति **ईशानसंहितायाम्** माघकृष्णचतुर्दश्यामादिदेवोमहानिशि शिवलिंगतयोद्भूतःकोटिसूर्यसमप्रभः तत्कालव्यापिनीग्राह्याशिवरात्रिव्रतेतिथिरिति अर्धरात्रादधश्चोर्ध्वंयुक्तायत्रचतुर्दशी तत्तिथावेवकुर्वीतशिव-रात्रिव्रतंव्रती नाधरात्रादधश्चोर्ध्वंयुक्तायत्रचतुर्दशी नैवतत्रव्रतंकुर्यादायुरैश्वर्यहानितः अर्धरात्रश्चद्वितीययामां-

---

१ या ठिकाणीं शंका उत्पन्न होते ती अशी —सीता त्या दिवशीं झाली आणि राम समुद्रतीरीं उपोषित राहिला याचा संबंध कसा लावावा. कारण, जेव्हां राम समुद्रतीरीं गेला तेव्हां सीता पूर्वीच रावणानें नेलेली होती. असा संशय येतो याचें वारण असें कीं, सीतेचा जन्मदिवस तो असल्यामुळें त्या दिवशीं रामानें उपोषण केलें असावें असें मला वाटतें.

स्यतृतीययामाद्यघटीद्वयरूपइति**माधवः** वचनंतूक्तंप्राक् एवंसतिपूर्वेद्युरेवोभयव्याप्तौपूर्वैव त्रयोदशीय-दादेविदिनभुक्तिप्रमाणतः जागरेशिवरात्रिःस्यान्निशिपूर्णाचतुर्दशीति**स्कांदोक्तेः** दिनभुक्तिरस्तमयः जयंतीशिवरात्रिश्चकार्येभद्राजयान्वितेइति**स्कांदाच्च** दिनद्वयेनिशीथव्याप्तौ**हेमाद्रि**मतेपूर्वा अर्धरात्रात्पुरस्ताच्चेज्जयायोगोयदाभवेत् पूर्वविद्धैवकर्तव्याशिवरात्रिःशिवप्रियैरिति**पाद्म**वचनात् **मदनरत्ने**प्येवम् **गौडा**अप्येवमाहुः ।

**आतां शिवरात्रिनिर्णय**—फाल्गुन कृष्ण चतुर्दशी ( तीच अमावास्यांत मास या मानानें माघ कृष्ण चतुर्दशी ही ) शिवरात्रि आहे. ती कितीएक वचनांत प्रदोषव्यापिनी घ्यावी, असें आहे. आणि कितीएक वचनांत निशीथ मध्यरात्र, ( रात्रीचा मध्य मुहूर्त ) व्यापिनी घ्यावी, असें आहे. त्या दोहोंपैकीं पहिली ( प्रदोषव्यापिनी ) सांगतो **माधवीयांत**—"सूर्यास्तापासून चार घटिकांचे आंतच चतुर्दशीयुक्त जी त्रयोदशी तिचेठायीं शिवरात्रिव्रत करावें." **स्मृत्यंतरांत**ही—"शिवरात्रि चतुर्दशी प्रदोषव्यापिनी घ्यावी. ज्या कारणास्तव रात्रीं जागरण आहे म्हणून रात्रीं असलेल्या त्या चतुर्दशीस उपोषण करावें." ह्या वचनांत प्रदोष म्हणजे रात्रि समजावी. कारण, पुढच्या अर्धांत रात्रीं जागरण हा हेतु सांगितला आहे. **कामिकांत**ही—"सूर्याच्या अस्तकालीं जी चतुर्दशी असेल ती रात्र शिवरात्रि होय. ती उत्तमोत्तम आहे." दुसरी ( निशीथव्यापिनी ) देखील तेथेंच **नारदसंहितेंत** सांगतो—"ज्या दिवशीं माघकृष्णचतुर्दशी अर्धरात्रीं असेल त्या दिवशीं जो शिवरात्रिव्रत करील त्याला अश्वमेधफल प्राप्त होईल." **स्मृत्यंतरांत**ही—"ज्या दिवशीं त्रयोदशीचे ठायीं चतुर्दशीनें व्याप्त महानिशा ( मध्यरात्र ) होईल त्या दिवशीं शिवरात्रिव्रत व जागरण करावें." **ईशानसंहितेंत**—"माघकृष्ण चतुर्दशीचे ठायीं मोठ्या रात्रीं आदिदेव भगवान कोटिसूर्याप्रमाणें देदीप्यमान असा शिवलिंगरूपानें उत्पन्न ( प्रगट ) झाला, म्हणून शिवरात्रिव्रताचे ठायीं तत्कालव्यापिनी तिथि घ्यावी." "ज्या दिवशीं अर्धरात्राच्या पूर्वीं व पुढें चतुर्दशी असेल त्या तिथीचेठायींच शिवरात्रिव्रत व्रती यानें करावें. ज्या दिवशीं अर्धरात्राच्या पूर्वी व पुढें चतुर्दशी नसेल त्या तिथीस शिवरात्रिव्रत, करूं नयेच. कारण, आयुष्य, ऐश्वर्य यांची हानि होते." अर्धरात्र म्हणजे दुसऱ्या प्रहराची शेवटची एक घटिका आणि तिसऱ्या प्रहराची पहिली एक घटिका मिळून दोन घटिकारूप काल होय, असें **माधव** सांगतो. त्याविषयीं वचन पूर्वीं जन्माष्टमीप्रकरणीं सांगितलें आहे. असें असतां पूर्वदिवशींच मध्यरात्रव्यापिनी व प्रदोषव्यापिनी चतुर्दशी असेल तर पूर्वाच करावी कारण, "हे देवि, जेव्हां अस्तमयपर्यंत त्रयोदशी असून रात्रीं संपूर्ण चतुर्दशी असेल तेव्हां ती शिवरात्रि जागराविषयीं समजावी" असें **स्कांद**वचन आहे. आणि "कृष्णजयंती सप्तमीयुक्त करावी, व शिवरात्रि त्रयोदशीयुक्त करावी" असें **स्कांद**वचनही आहे. दोन दिवस मध्यरात्रव्याप्त असतां **हेमाद्री**च्या मतीं पूर्वा करावी. कारण, "जर अर्धरात्राच्या पूर्वी जेव्हां त्रयोदशीचा योग असेल तेव्हां तीच पूर्वविद्ध शिवरात्रि शिवभक्तांनीं करावी" असें **पाद्म**वचन आहे. **मदनरत्नांत**ही असेंच आहे. **गौड**ही असेंच सांगतात.

**निर्णयामृते**तुसर्वापिशिवरात्रिःप्रदोषव्यापिन्येव अर्धरात्रवाक्यानिकैमुतिकन्यायेनप्रदोषस्तावकानी-त्युक्तम् तन्न अर्धरात्रस्यपूर्वकर्मकालत्वोक्तेः परदिनेप्रदोषनिशीथोभयव्याप्तिसत्त्वात्परैवेतितु**माधवः** इदमेवचयुक्तंप्रतीमः परेद्युःप्रागुक्तार्धरात्रस्यैकदेशव्याप्तौपूर्वेद्युःसंपूर्णतद्व्याप्तौच सत्यपिपरेद्युःप्रदोषनिशीथोभ-ययोगे पूर्वेद्युःसंपूर्णव्याप्तेःपूर्वैव व्याप्याधरात्रंयस्यांतुलभ्यतेयाचतुर्दशी तस्यामेवव्रतंकार्यंमत्प्रसादार्थिभिर्नरैः तदूर्ध्वाधोन्विताभूतासाकार्यात्रतिभिःसदेति**माधवधृतेशानसंहितोक्तेः** पूर्वेद्युर्निशीथस्यपरेद्युःप्रदोष-स्येत्येकैकव्याप्तौतुपूर्वैव जयायोगस्यप्राशस्त्यात् तत्रोक्तं**नागरखंडे** माघफाल्गुनयोर्मध्येअसितायाचतुर्दशी अनंगेनसमायुक्ताकर्तव्यासासदातिथिरिति **पाद्मे** अर्धरात्रात्पुरस्ताच्चेज्जयायोगोयदाभवेत् पूर्वविद्धैवकर्तव्याशिवरात्रिःशिवप्रियैरिति **स्कांदेपि** भवेद्यत्रत्रयोदश्यांभूतव्याप्तामहानिशा शिवरात्रिव्रतंतत्रकुर्याज्जा-गरणंतथेति महतामपिपापानांदृष्टावैनिष्कृतिःपरा नदृष्टाकुर्वतांपुंसांकुहूयुक्तांतिथिंशिवामिति**स्कांदे**दर्शयोग-स्यनिंदितत्वाच्च यदाचतुर्दशीपूर्वेद्युर्निशीथादूर्ध्वंप्रवृत्तापरेद्युश्चनिशीथादर्वागेवसमाप्तातदापरेद्युरेकव्याप्ति-सत्त्वात्परैव माघासितेभूतदिनंहिराजन्नुपैतियोगंयदिपंचदश्याः जयाप्रयुक्तांनतुजातुकुर्याच्छिवस्यरात्रिंप्रियकृ-च्छिवस्येतिवचनात् एवंदिनद्वयेप्रदोषव्याप्त्यभावेनिशीथव्याप्तिसत्त्वात्पूर्वैव तेनेदिनद्वयेनि[3]शीथव्याप्तौप्रदोष-

१ निशीथस्तु रात्रेरष्टमोमुहूर्त इत्युक्तम् ॥ २ तदेतदुपसंहरति तेनेति । ३ निशीथव्याप्ताविति निशीथस्पर्शेनेतिशेषः । ४ प्रदोष-व्याप्त्येति परेद्युरेवेत्यर्थः ।

व्याप्यानिर्णयः दिनद्वयेप्रदोषव्याप्तौनिशीथेननिर्णयः एकैकव्याप्तौतुनिशीथेननिर्णयइति इयंचरविभौमसोमवारेषुशिवयोगेचातिप्रशस्ताहेमाद्रौतीर्थखंडेलैंगे फाल्गुनस्यचतुर्दश्यांकृष्णपक्षेसमाहिताः कृत्तिवासेश्वरंलिंगमर्चयंतिशिवंशुभे तेयांतिपरमंस्थानंसदाशिवमनामयम् ।

**निर्णयामृतांत** तर—सर्व मासांतील शिवरात्रि प्रदोषव्यापिनीच घ्यावी. अर्धरात्रव्यापिनी घ्यावी अशीं जीं वाक्यें तीं कैमुतिकन्यायानें प्रदोषस्तुतिबोधक आहेत, असें सांगितलें आहे, तें बरोबर नाहीं. कारण, पूर्वीं अर्धरात्र हा कर्मकाल सांगितला आहे. ज्या वेळीं दोन्ही दिवशीं अर्धरात्रव्याप्ति असेल त्या वेळीं पर दिवशीं प्रदोषकालीं व अर्धरात्रीं व्याप्ति असल्यामुळें पराच करावी, असें तर **माधव** सांगतो. हेंच युक्त आहे, असें आम्हीं समजतों. परदिवशीं पूर्वीं सांगितलेल्या-द्विघटिकात्मक-अर्धरात्राच्या एकदेशीं व्याप्ति असतां आणि पूर्वदिवशीं संपूर्ण अर्धरात्रव्याप्ति असतां परदिवशीं प्रदोष व अर्धरात्र या दोघांचा योग असला तरी पूर्वदिवशीं संपूर्ण अर्धरात्रव्याप्ति असल्यामुळें पूर्वाच करावी. कारण, "ज्या तिथीचे ठायीं चतुर्दशी अर्धरात्रीला व्यापून मिळते त्या तिथीचे ठायींच शिवप्रसादेच्छु मनुष्यांनीं व्रत करावें. अर्धरात्राच्या पूर्वीं व पश्चात् असलेली चतुर्दशी व्रतकरणारांनीं सदा घ्यावी." असें माधवानें धरलेलें **ईशानसंहिता**वचन आहे. पूर्वदिवशीं निशीथ ( अर्धरात्र ) व्याप्ति आणि परदिवशीं प्रदोषव्याप्ति अशी एक एक काल व्याप्ति असेल तर पूर्वाच करावी. कारण, जया ( त्रयोदशी ) योग प्रशस्त आहे. तें सांगतो **नागरखंडांत**—"माघ व फाल्गुन यांच्या मध्यें जी कृष्णचतुर्दशी त्रयोदशीनें युक्त असेल ती सदा करावी." **पाद्मांत**—"ज्या वेळीं अर्धरात्राच्या पूर्वी त्रयोदशीचा योग होईल त्या वेळीं शिवभक्तांनीं पूर्वविद्धाच ( त्रयोदशीयुक्ताच ) शिवरात्रि करावी." **स्कांदांत**ही—" ज्या त्रयोदशीचे ठायीं चतुर्दशीव्याप्त महानिशा ( मध्यरात्र ) होईल त्या तिथीस शिवरात्रिव्रत व तसेंच जागरण करावें." आणि "महापातकांना देखील उत्कृष्ट निष्कृति ( प्रायश्चित्त ) पाहिली आहे; पण अमावास्यायुक्त चतुर्दशी करणाऱ्या पुरुषांस निष्कृति ( प्रायश्चित्त ) कोठें पाहिली नाहीं." अशी **स्कांदांत** अमावास्यायोगाची निंदाही केलेली आहे. ज्या वेळीं पूर्वदिवशीं चतुर्दशी मध्यरात्रीच्या पुढें प्रवृत्त झाली व परदिवशीं मध्यरात्रीच्या पूर्वीच समाप्त झाली त्या वेळीं परदिवशीं एकप्रदोषकालीं व्याप्ति असल्यामुळें पराच करावी. कारण, "माघमासाचे कृष्णचतुर्दशीस जर अमावास्येचा योग असेल तर शिवभक्तानें त्रयोदशीयुक्त शिवरात्रि कधींही करूं नये" असें वचन आहे. याप्रमाणें दोन दिवशीं प्रदोषव्याप्ति नसेल तर पूर्वदिवशीं निशीथ ( अर्धरात्र ) व्याप्ति असल्यामुळें पूर्वाच करावी. ह्या सर्व वरील अर्थावरून असा सारांश झाला कीं, दोन दिवशीं मध्यरात्रव्याप्ति असतां प्रदोषव्याप्तीनें निर्णय म्हणजे ज्या दिवशीं प्रदोषव्याप्ति ती करावी. दोन दिवशीं प्रदोषव्याप्ति असतां मध्यरात्रव्याप्तीनें निर्णय म्हणजे ज्या दिवशीं मध्यरात्रव्याप्ति असेल ती करावी. एक एक व्याप्ति म्हणजे प्रदोषव्याप्ति किंवा मध्यरात्रव्याप्ति असेल तर मध्यरात्रव्याप्ति असेल ती घ्यावी, ह्या चतुर्दशीस रवि, भौम व सोम यांतील वार व शिवयोग असतां ही चतुर्दशी अति प्रशस्त आहे. **हेमाद्रींत तीर्थखंडांत लिंगपुराणांत**—"फाल्गुनकृष्णचतुर्दशीचेठायीं जे मनुष्य स्वस्थचित्त होऊन कृत्तिवासेश्वर शिवलिंगाची पूजा करितात ते उत्तम व रोगरहित अशा सदाशिवस्थानाप्रत जातात."

**अथ पारणानिर्णयः ॥** शिवरात्रिपारणेतुविरुद्धवाक्यानिदृश्यंते **स्कांदे** कृष्णाष्टमीस्कंदषष्ठीशिवरात्रिचतुर्दशी एताःपूर्वयुताःकार्यास्तिथ्यंतेपारणंभवेत् जन्माष्टमीरोहिणीचशिवरात्रिस्तथैवच पूर्वविद्धैवकर्तव्यातिथिभांतेचपारणमिति तिथिमध्येपिपारणं**स्कांदे** उक्तम् उपोषणंचतुर्दश्यांचतुर्दश्यांतुपारणम् कृतैःसुकृतलक्षैश्चलभ्यतेवाथवानवा ब्रह्मांडोदरमध्येतुयानितीर्थानिसंतिवै संस्नातानिभवंतीहभूतायांपारणेकृते तिथीनामेवसर्वासामुपवासव्रतादिषु तिथ्यंतेपारणंकुर्याद्विनाशिवचतुर्दशीमिति अत्रयामत्रयादर्वाक्चतुर्दशीसमाप्तौ तदंतेतदूर्ध्वगामिन्यांतुप्रातस्तिथिमध्यएवेति**हेमाद्रिमाधवाद्यो**व्यवस्थामाहुः तन्न तिथ्यंतेतिथिभांतेवापारणंयत्रचोदितम् यामत्रयोर्ध्वगामिन्यांप्रातरेवहिपारणेत्यादिसामान्यवचनैरेवव्यवस्थासिद्धेरुभयविधवाक्यवैयर्थ्यापत्तेः **वयं**तुतिथ्यंतेपारणंभवेदितिकृष्णाष्टम्यादिविषयमेव नतुशिवरात्रिविषयम् तदुपादानंतुपूर्वयुतत्वमात्रकथनार्थम् कथमन्यथास्कांदेएवशून्यहृदयवाक्यवत्तिथिमध्येपारणविधानंघटते तस्माद्विना शिवचतुर्दशीमितिपर्युदस्तत्वाच्छिवरात्र्याःसर्वप्रकारेषुतिथिमध्यएवपारणेतिब्रूमः शिष्टाचारोप्येवमेव **दीपिकायां**तुरात्रावपितिथ्यंतएवोक्तम् व्रततिथेरंतेनिशीथेपिवाऽश्नीयादिति **मदनरत्नकालादर्शयो**स्तु

---

१ निशीथेनेति पूर्वेद्युरेवेत्यर्थः । २ कैमुतिकन्याय म्हणजे—अर्धरात्रव्यापिनी देखील घ्यावी, मग प्रदोषव्यापिनी घ्यावी, हें काय सांगावें. यावरून प्रदोषाची स्तुति बोधित होते.

साह्नस्तमयपर्यंतंव्यापिनीचेत्परेहनि दिवैवपारणंकुर्यात्पारणेनैवदोषभागित्युक्तम् तन्न तिथिमध्येपारणविधानान्निषेधेफलायोगात्तिथ्यंतानपेक्षणाद्दोषाप्रसक्त्याचतुर्थपादासंगतेः तेनेदंशिवरात्रिभिन्नव्रतपरंज्ञेयम् ।

आतां शिवरात्रीच्या पारणेविषयीं तर विरुद्ध वाक्यें दिसतात. तीं अशीं **स्कांदांत**—"कृष्णजन्माष्टमी, स्कंदषष्ठी, शिवरात्रि चतुर्दशी, ह्या तिथि पूर्वयुक्त कराव्या, आणि तिथीच्या अंतीं पारणा करावी. जन्माष्टमी, रोहिणी ( कृष्णजयंती ), आणि शिवरात्रि, ह्या पूर्वविद्धाच कराव्या. तिथि व नक्षत्र ( रोहिणी ) यांचे अंतीं पारणा करावी." तिथीमध्येंही पारणा सांगतो **स्कांदांत**—"चतुर्दशींत उपोषण व चतुर्दशींत पारणा हें लक्षावधि सुकृतें केल्यानें प्राप्त होईल किंवा न होईल असें आहे. चतुर्दशींत पारणा केली असतां ह्या ब्रह्मांडांत जितकीं तीर्थें आहेत तितक्या तीर्थांचें स्नान केल्यासारखें होतें. सर्व तिथींच्या उपवासव्रतादिकांत तिथींच्या अंतीं पारणा करावी. शिवरात्रिचतुर्दशी वर्ज्य करून हा निर्णय समजावा." या पारणेविषयीं दिवसा तीन प्रहरांच्या आंत चतुर्दशी समाप्त असेल तर चतुर्दशीच्या अंतीं पारणा. तीन प्रहरांच्या पुढें चतुर्दशी असेल तर प्रातःकाळीं तिथीमध्येंच पारणा, अशी **हेमाद्रि, माधव** इत्यादि ग्रंथकार व्यवस्था सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, "तिथीच्या अंतीं किंवा तिथि व नक्षत्र यांच्या अंतीं पारणा जेथें सांगितली आहे, तेथें तीन प्रहरांच्या पुढें तिथि असतां प्रातःकाळींच पारणा करावी." इत्यादि सामान्य वचनांनींच व्यवस्था सिद्ध असल्यामुळें तिथीच्या अंतीं व तिथीच्या मध्यें अशीं दोन प्रकारचीं पारणा सांगणारीं वाक्यें व्यर्थ होतील. **आम्ही ( कमलाकरभट्ट )** तर—वर स्कांदवचनांत 'तिथ्यंते पारणं भवेत्' म्हणजे तिथीच्या अंतीं पारणा करावी, असें सांगितलें तें कृष्णाष्टमी इत्यादिविषयींच समजावें. शिवरात्रिविषयीं समजूं नये. त्या वचनांत 'शिवरात्रि' ग्रहण अशा करितां कीं, पूर्वयुक्त करावी, इतकेंच सांगण्याकरितां आहे. असें जर नसेल [ चतुर्दशीविषयीं देखील तिथीच्या अंतीं पारणा इष्ट असेल ] तर स्कांदांतच विचारशून्य हृदयाच्या वाक्याप्रमाणें तिथीच्या मध्यें पारणा सांगणें कसें घडतें ? तस्मात् 'तिथ्यंते पारणं कुर्याद्विना शिवचतुर्दशीं' या वरील वचनानें चतुर्दशी वगळल्यामुळें यामत्रयोर्ध्वगामिनी व यामत्रयाच्या पूर्वसमाप्ति इत्यादि सर्व प्रकारचेठायीं शिवरात्रिव्रताची तिथिमध्येंच पारणा करावी, असें सांगतो. शिष्टाचारही असाच आहे. **दीपिकेंत** तर—रात्रीं देखील तिथीच्या अंतींच पारणा सांगितली आहे—"व्रततिथीच्या अंतीं अथवा ती व्रततिथि मध्यरात्रीपर्यंत असेल तर समाप्त झाल्यावर मध्यरात्रीं भोजन करावें." **मदनरत्न** व **कालादर्श** यांत तर "ती चतुर्दशी परदिवशीं अस्तमयपर्यंत असेल तर दिवसासच पारणा करावी. दिवसा पारणा केली असतां दोष लागत नाहीं" असें सांगितलें आहे. तें बरोबर नाहीं. कारण, तिथीच्या मध्यें पारणा सांगितली असल्यामुळें व तिथीच्या मध्यें पारणेच्या निषेधाविषयीं फलही नसल्यामुळें तिथीच्या अंताची ( समाप्तीची ) अपेक्षा नसल्याकारणानें तिथीमध्यें पारणेला दोषाचा प्रसंग नसल्यानें वरील वचनांतील 'पारणे नैव दोषभाक्' म्हणजे तिथीमध्यें पारणा केली असतां दोष लागत नाहीं, हा चवथा पाद असंगत होईल. कारण, दोषाची प्रसक्ति नसल्यामुळें, दोष लागत नाहीं हें सांगणें नको आहे. तेणेंकरून हें वचन शिवरात्रिभिन्नव्रतविषयक समजावें.

इदंचव्रतंसंयोगपृथक्त्वन्यायेननित्यंकाम्यंच तथाच**माधवीयेस्कांदे** परात्परतरंनास्तिशिवरात्रिव्रतात्परम् नपूजयतिभक्त्येशंरुद्रंत्रिभुवनेश्वरम् जंतुर्जन्मसहस्रेषुभ्रमतेनात्रसंशयइत्यकरणेप्रत्यवायश्रवणात् वर्षेवर्षेमहादेविनरोनारीपतिव्रता शिवरात्रौमहादेवंनित्यंभक्त्याप्रपूजयेदिति**वीप्साश्रुतेः** अर्णवोयदिवाशुष्येत क्षीयेतहिमवानपि चलंत्येतेकदाचिद्विनिश्चलंहिशिवव्रतमितिवचनाच्चनित्यता ममभक्तस्तुयोदेविशिवरात्रिमुपोषकः गणत्वमक्षयंदिव्यमक्षयंशिवशासनम् सर्वान्भुक्त्वामहाभोगांस्ततोमोक्षमवाप्नुयादिति**स्कांदात्** द्वादशाब्दिकमेतत्स्याच्चतुर्विंशाब्दिकंतुवेतितत्रैव**वैशानसंहिता**वचनात्काम्यता तत्रैव शिवरात्रिव्रतंनामसर्वपापप्रणाशनम् आचंडालमनुष्याणांभुक्तिमुक्तिप्रदायकं अत्रजागरोपवासपूजाःसमुदिताःव्रतं नतुप्रत्येकम् समुदितानांफलसंबंधात् यत्तु अथवाशिवरात्रिंचपूजाजागरणैर्नयेत् तथा अखंडितव्रतोयोहिशिवरात्रिमुपोषयेत् सर्वान्कामानवाप्नोतिशिवेनसहमोदते कश्चित्पुण्यविशेषेणव्रतहीनोपियःपुमान् जागरंकुरुतेतत्रसरुद्रसमतांव्रजेदित्यादि**स्कांदं**तदनुकल्पत्वादशक्तपरम् ।

हें शिवरात्रिव्रत [1]संयोगपृथक्त्वन्यायानें नित्य व काम्य आहे. कारण, तसेंच **माधवीयांत स्कांदांत**—"शिवरात्रिव्रताहून दुसरें कांहीं अत्यंत श्रेष्ठ नाहीं. त्या व्रतदिवशीं जो प्राणी भक्तीनें त्रिभुवनेश्वर रुद्रातें पूजीत नाहीं तो या संसारांत हजारों जन्मपर्यंत फिरतो, यांत संशय नाहीं." न केलें तर असा दोष सांगितल्यावरून; पुरुष अथवा स्त्री यांनीं वर्षावर्षाचे ठायीं

१ संयोगपृथक्त्वन्यायस्तु अस्मिन्नेव परिच्छेदे चैत्रमासे रामनवमीव्रतप्रसंगे प्रतिपादितः स तत्रैव द्रष्टव्यः. २ आचांडालेति शिवरात्रिव्रते चांडालपर्यंतमधिकार इति भावः.

शिवरात्रीचे दिवशीं महादेवाची भक्तीनें पूजा करावी" या वचनांत 'वर्षे वर्षे' अशी द्विरुक्ति असल्यावरून; आणि "कदाचित् समुद्र शुष्क होईल व हिमवान् पर्वतही क्षीण होईल व ते कदाचित् चलित होतील; पण शिवव्रत कधींही चलित होणार नाहीं" या वचनावरूनही नित्य आहे. "भगवान् शिव म्हणतात—हे देवि! जो माझा भक्त शिवरात्रीचें उपोषण करितो त्याला दिव्य (उत्कृष्ट) नाशरहित कोठेंही शिवाज्ञाभग्न न होणारें असें गणत्व (आधिपत्य) प्राप्त होऊन सारे मोठे भोग भोगून तो मोक्षास जाईल." असें **स्कांद**वचन असल्यावरून; आणि "हें शिवरात्रिव्रत द्वादशाब्दिक होतें, अथवा चतुर्विंशाब्दिक (चोवीस वर्षेपर्यंत) होतें" असें तेथेंच **ईशानसंहिता**वचनावरूनही काम्यत्व आहे. तेथेंच—"शिवरात्रिव्रत सर्व पाप नाश करणारें व चांडालापर्यंत मनुष्यांना भुक्ति व मुक्ति देणारें होय." ह्या शिवरात्रिव्रताचे ठायीं जागरण, उपवास, पूजा हीं सर्व मिळून व्रत होतें. जागरण, उपवास, पूजा यांतून एक करणें हें व्रत होत नाहीं. कारण, फलसंबंध सर्वांना मिळून सांगितला आहे. आतां जें—"अथवा शिवरात्रि पूजा व जागरण यांनीं करावी." तसेंच—"जो अखंडितव्रत होत्साता शिवरात्रीचें उपोषण करितो तो सर्व मनोरथ पावून शिवासहवर्तमान आनंद पावतो. कोणी एकादा पुरुष व्रतहीन असतांही कांहीं पुण्यविशेषानें त्या शिवरात्रीचे ठायीं जागरण करितो तो रुद्रसमान होतो." इत्यादिक जें **स्कंदपुराणांतील** वचन तें अनुकल्प (कनिष्ठ पक्ष) असल्यामुळें अशक्तविषयक जाणावें.

माघेतरप्रतिमासशिवरात्रिस्तु शिवरात्रिशब्दस्यमाघकृष्णचतुर्दश्यामेवरूढत्वात् माघमासस्यशेषेयाप्रथमाफाल्गुनस्यच कृष्णाचतुर्दशीसातुशिवरात्रिःप्रकीर्तितेति **हेमाद्रौ**वचनाच्च नायंनिर्णयस्तत्रेति रात्रौयामचतुष्टयेपूजाविधानाद्यस्मिन्दिनेअधिकारात्रिव्याप्तिःसाग्राह्या साम्येतुपूर्वैवेति**हेमाद्रि**रुचिवान् वस्तुतस्तुप्रतिमासकृष्णचतुर्दश्यामपि सर्वकामप्रदंकृष्णचतुर्दश्यांशिवव्रतमित्युपक्रम्यचतुर्दशाब्दंकर्तव्यंशिवरात्रिव्रतंशुभमिति**हेमाद्रौकालोत्तरे**शिवरात्रिशब्दप्रयोगात् कौंडपायिनामयनाग्निहोत्रेनैत्यकाग्निहोत्रधर्माइवतद्धर्मप्राप्तिःस्यादेव अतःप्रदोषनिशीथोभयव्याप्त्यैवनिर्णयइति**वयं**प्रतीमः ।

माघावांचून इतर प्रतिमासांतील शिवरात्रि तर—'शिवरात्रि' हा शब्द माघकृष्णचतुर्दशीचे ठायींच रूढ असल्यामुळें; आणि "माघमासाच्या शेवटीं आणि फाल्गुनमासाच्या पूर्वी जी कृष्णचतुर्दशी ती शिवरात्रि म्हटली आहे" ह्या **हेमाद्रींतील** वचनावरूनही हा (माघकृष्णचतुर्दशीचा) निर्णय त्या इतर चतुर्दशींविषयीं नाहीं. म्हणून रात्रीं चार प्रहरांचे ठायीं पूजा सांगितल्यावरून ज्या दिवशीं अधिक रात्रिव्याप्ति असेल ती घ्यावी. दोन्ही दिवशीं रात्रीं समानव्याप्ति असेल तर पूर्वाच घ्यावी, असें **हेमाद्रि** सांगता झाला. वास्तविक म्हटलें तर-प्रत्येक मासीं कृष्णचतुर्दशीचे ठायीं देखील "कृष्णचतुर्दशीचे ठायीं शिवव्रत सर्व काम देणारें आहे" असा उपक्रम करून "कल्याणकारक शिवरात्रिव्रत चवदा वर्षे करावें" असा **हेमाद्रींत कालोत्तरांत** शिवरात्रि या शब्दाचा प्रयोग केलेला असल्यामुळें; जसें—कौंडपायीशाखेच्या अयनाग्निहोत्राचे ठायीं नित्य अग्निहोत्राचे धर्म प्राप्त होतात—तसे शिवरात्रीचे सारे धर्म प्रतिमासशिवरात्रीचे ठायीं प्राप्त होतच आहेत. म्हणून प्रदोष व निशीथ (अर्धरात्र) या दोन व्याप्तींनेंच निर्णय करावा. असें आम्हीं (कमलाकरभट्ट) समजतों.

अस्यारंभो**हेमाद्रौ स्कांदे** आदौमार्गशिरेमासिदीपोत्सवदिनेपिवा गृह्णीयान्माघमासेवाद्वादशैवमुपोषयेत् तथा दीपोत्सवेतथामाघेकृष्णायातुचतुर्दशी द्वादशस्वपिमासेषुप्रकुर्यादिहजागरम् एवंद्वादशवर्षेषुद्वादशैवतपोधनान् वरयेदितिशेषः चतुर्दशवाविप्रान्आचार्यंचवृत्वा कुंभोपरिन्यसेद्देवमुमयासहितंशिवम् सौवर्णेप्यथवारौप्येवृषभेसंस्थितंशुभेइत्युक्तम् हैमींमूर्तिंसंपूज्यस्थिरंचरंवालिंगंपंचामृतसहस्रशतपंचाशत्तदर्धान्यतरकुंभैःसंस्नाप्यसंपूज्यजागरंकृत्वापरेद्युस्तिलान्सहस्रंशतंवाहुत्वाविप्रेभ्योवस्त्राणिद्वादशगाश्चदत्वाआचार्यायधेनुंशय्यांचदत्वाविप्रान्भोजयेदिति**मदनरत्ने**उक्तम् ।

या प्रतिमासशिवरात्रिव्रताचा आरंभ सांगतो—**हेमाद्रींत स्कांदांत**—"मार्गशीर्षमासांत अथवा दीपावलींतील चतुर्दशीस, किंवा माघमासांत, प्रथम व्रत घ्यावें, व याप्रमाणें बारा चतुर्दशींचे ठायीं उपोषण करावें." तसेंच "दीपावलींत किंवा माघांत जी कृष्णचतुर्दशी तिचे ठायीं आरंभ करून बाराही महिन्यांत जागरण करावें. याप्रमाणें बारा वर्षे व्रत करून बारा तपोधन ब्राह्मण वरावे." अथवा चवदा ब्राह्मण आणि आचार्य वरून "कलशावर सोन्याच्या किंवा रुप्याच्या सुंदर वृषभावर बसलेल्या उमासहित शिवाची स्थापना करावी" असें सांगितलें आहे. याप्रमाणें सुवर्णाचे शिवमूर्तीची पूजा करून अथवा स्थिरलिंगाला किंवा चरलिंगाला पंचामृतांच्या सहस्र कलशांनीं किंवा शंभर कलशांनीं अथवा पन्नास कलशांनीं किंवा पंचवीस कलशांनीं स्नान घालून पूजा करून जागरण करून दुसऱ्या दिवशीं तिलांचा सहस्रसंख्य किंवा शतसंख्य होम करून ब्राह्मणांना वस्त्रें व बारा गाई देऊन आचार्याला धेनु आणि शय्या देऊन ब्राह्मणभोजन करावें; असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे.

माघामावास्यायुगादिः तदुक्तम् माघमासेत्वमावास्येति अन्यत्प्राग्वत् तथान्योपिविशेषोविष्णुपुराणे माघासितेपंचदशीकदाचिदुपैतियोगंयदिवारुणेन ऋक्षेणकालःसपरःपितॄणांनह्यल्पपुण्यैर्नृपलभ्यतेऽसाविति वारुणंशतभिषक् इदंचकुंभादित्येज्ञेयमितिहेमाद्रिः भारते कालेधनिष्ठायदिनामतस्मिन्भवेत्तुभूपालतदा पितृभ्यः दत्तंतिलान्नंप्रददातितृप्तिंवर्षायुतंतत्कुलजैर्मनुष्यैरिति ।

माघमासाची अमावास्या ही युगादि आहे. तें सांगतो—"माघमासांत अमावास्या युगादि समजावी." युगादीविषयीं इतर निर्णय पूर्वी ( वैशाखशुक्लतृतीयानिर्णया )प्रमाणें समजावा. तसाच अन्यही विशेष सांगतो **विष्णुपुराणांत**—"माघकृष्ण अमावास्येस शततारका नक्षत्राचा योग जर कदाचित् प्राप्त होईल तर तो काल पितरांना अति पुण्यकारक आहे. हा योग अल्पपुण्याच्या मनुष्यांस प्राप्त होत नाहीं." हा योग कुंभराशीस सूर्य असतां जाणावा, असें **हेमाद्रि** सांगतो. **भारतांत**—"माघकृष्ण अमावास्येस जर धनिष्ठा नक्षत्र असेल तर त्या कालीं आपआपल्या कुलोत्पन्न मनुष्यांनीं पितरांना दिलेलें तिळांसहित अन्न त्या पितरांची दहा हजार वर्षेपर्यंत तृप्ति करितें."

फाल्गुनपौर्णमासीहोलिका साचसायाह्नव्यापिनीग्राह्या सायाह्नेहोलिकांकुर्यात्पूर्वाह्णेक्रीडनंगवामितिवचनादितिनिर्णयामृतेउक्तम् ज्योतिर्निबंधेतु प्रतिपद्भूतभद्रासुयार्चिताहोलिकादिवा संवत्सरंचतद्राष्ट्रंपुरंदहतिसाद्भुतम् प्रदोषव्यापिनीग्राह्यापौर्णिमाफाल्गुनीसदा तस्यांभद्रामुखंत्यक्त्वापूज्याहोलानिशामुखइति नारदवचनात्प्रदोषव्यापिनीत्युक्तम् हेमाद्रौमदनरत्नेचभविष्ये अस्यांनिशागमेपार्थसंरक्ष्याःशिशवोगृहे गोमयेनोपलिप्तेचसचतुष्केगृहांगणेइत्यादिनानत्रैवतद्विधानाच्च तेनेयंपूर्वविद्धा श्रावणीदुर्गानवमीदूर्वाचैवहुताशनी पूर्वविद्धैवकर्तव्याशिवरात्रिर्बलेर्दिनमितिब्रह्मवैवर्तोक्तेश्च दिनद्वयेप्रदोषव्याप्तौपरैव पूर्वदिनेभद्रासत्त्वात्तत्रचहोलिकानिषेधात् तदुक्तंनिर्णयामृतेमदनरत्नेचपुराणसमुच्चये भद्रायांदीपिताहोलीराष्ट्रभंगंकरोतिवै नगरस्यचनैवेष्टातस्मात्तांपरिवर्जयेत् तथा भद्रायांद्वेनकर्तव्येश्रावणीफाल्गुनीतथा श्रावणीनृपतिंहंतिग्रामंदहतिफाल्गुनी तथा दिनार्धात्परतोपिस्यात्फाल्गुनीपौर्णिमायदि रात्रौभद्रावसानेतुहोलिकादीप्यतेतदेति यदातुपूर्वदिनेचतुर्दशीप्रदोषव्यापिनीपरदिनेचक्षयवशात्सायाह्नात्प्रागेवपूर्णिमासमाप्यते तदापूर्वदिनेसंपूर्णरात्रौभद्रासत्त्वात्तत्रचतन्निषेधात्परेऽहनिप्रतिपद्येवकुर्यात् सार्धयामत्रयंवास्याद्द्वितीयदिवसेयदा प्रतिपद्वर्धमानातुतदासाहोलिकास्मृतेति भविष्यवचनादितिनिर्णयामृतकारः मदनरत्नेऽप्येवम् यत्तु वह्नौवह्निंपरित्यजेदिति भविष्यम् व ह्नौहोलिकायांवह्निंप्रतिपदंवर्जयेदित्यर्थः तदुक्तभिन्नविषयमितितत्रैवोक्तम् अन्येतुतस्यांभद्रामुखंत्यक्त्वेत्यर्थः प्रदोषव्यापिनीचेत्स्यात्तदापूर्वदिनेतदा भद्रामुखंवर्जयित्वाहोलिकायाःप्रदीपनमितिनारदवचनात् निशागमेप्रपूज्येतहोलिकासर्वदाबुधैः नदिवापूजयेद्ढुंढांपूजितादुःखदाभवेदितिदिवोदासीयेवचनात् यामत्रयोर्ध्वयुक्ताचेत्प्रतिपत्तुभवेत्तिथिः भद्रामुखंपरित्यज्यकार्याहोलामनीषिभिरितिविद्याविनोदेऽभिधानाच्च भद्रामुखंविहायपूर्वदिनएवकार्येत्याहुः भद्रामुखंतु नाड्यस्तुपंचवदनंगलकस्तथैकेतिरत्नमालोक्तंज्ञेयम् शिष्टाचारोप्येवमेव ।

फाल्गुनपौर्णमासी ही होलिका होय. होलिकेविषयीं ही पौर्णिमा सायाह्नीं ( पांच भाग केलेल्या दिवसाचे पांचव्या भागीं ) असलेली घ्यावी. कारण, "होलिका सायाह्नीं करावी, आणि बलिप्रतिपदेस गोक्रीडन करणें तें पूर्वाह्णीं करावें" असें वचन आहे, असें **निर्णयामृतांत** सांगितलें आहे. **ज्योतिर्निबंधांत** तर—"प्रतिपदा, चतुर्दशी व भद्रा ( कल्याणी, पूर्णिमेचें पूर्वार्ध ) यांचे ठायीं आणि दिवसा केलेली जी होळी ती एका वर्षाचे आंत त्या नगरास व राष्ट्रास जाळितें; म्हणून फाल्गुनी पौर्णिमा सर्वदा प्रदोषव्यापिनी घ्यावी. त्या पौर्णिमेंत भद्रामुख वर्ज्य करून प्रदोषकालीं होळी पुजावी" ह्या **नारदवचनावरून**

१ पूर्णिमेचें पूर्वार्ध भद्रा. त्या भद्रेच्या तिसऱ्या पादाच्या शेवटच्या तीन घटिका भद्रापुच्छ. आणि चवथ्या पादाच्या पहिल्या पांच घटिका भद्रामुख. म्हणजे मध्यम मानानें ६० घटिका पूर्णिमा असेल तर पूर्णिमा सुरू झाल्यापासून साडेएकोणीस घटिकांनंतर तीन घटिका भद्रापुच्छ. आणि साडेबावीस घटिकांनंतर पांच घटिका भद्रामुख होय. तिथि ६४ घटिका असेल तर पूर्णिमा सुरू झाल्यापासून २१ घटिकांनंतर ३ घटिका पुच्छ. आणि २४ घटिकानंतर ५ घटिका मुख. याप्रमाणें तिथीच्या इतरही मानाविषयीं जाणावें. धर्मसिंधुसार.

प्रदोषव्यापिनी पूर्णिमा होळीविषयीं घ्यावी, असें सांगितलें आहे. **हेमाद्रींत** व **मदनरत्नांत भविष्यांत**—"ह्या पौर्णिमेच्या दिवशीं प्रदोषकालीं बालक बाहेर जातील त्यांना घरांत संरक्षण करून ठेवावें. आणि गोमयानें सारविलेल्या चतुष्कोण गृहाच्या अंगणांत होळी करावी" इत्यादि वचनानें प्रदोषकालींच होळीचें विधानही आहे. यावरून ही होलिका पूर्णिमा चतुर्दशीयुक्त घ्यावी, असें होतें. आणि "श्रावणी पूर्णिमा, दुर्गानवमी, दूर्वाष्टमी, होलिकापूर्णिमा, शिवरात्रि चतुर्दशी आणि बलिप्रतिपदा ह्या पूर्वविद्धाच कराव्या" असें **बृहद्यमाचें** व **ब्रह्मवैवर्त**पुराणाचें वचनही आहे. दोन दिवस प्रदोषव्याप्ति असतां पराच करावी. कारण, पूर्वदिवशीं प्रदोषकालीं भद्रा ( कल्याणी ) असल्यामुळें त्या कल्याणीवर होळीचा निषेध आहे. तें सांगतो **निर्णयामृतांत** व **मदनरत्नांत पुराणसमुच्चयांत**—"भद्रेवर पेटविलेली होळी राष्ट्राचा नाश करिते. आणि त्या नगरासही ती इष्ट नाहीं. म्हणून होळीविषयीं भद्रा वर्ज्य करावी." तसेंच—"श्रावणी पौर्णिमेस सांगितलेलें रक्षाबंधन, आणि फाल्गुनी पौर्णिमेस सांगितलेलें होलिका पेटविणें हीं दोन कृत्यें भद्रेवर करूं नयेत. कारण, रक्षाबंधन भद्रेवर केलें असतां राजाचा नाश करितें. आणि होळी पेटविली असतां गांवाला जाळिते." तसेंच—"जेव्हां दिवसा दोन प्रहरांनंतर फाल्गुनी पौर्णिमा असेल तेव्हां रात्रीं भद्रा संपल्यानंतर होळी पेटवावी." ज्या वेळीं पूर्वदिवशीं प्रदोषकालीं चतुर्दशी असेल व दुसऱ्या दिवशीं पूर्णिमा तिथि क्षीण झालेली असल्यामुळें सायाह्नाच्या ( पांच भाग केलेल्या दिवसाचे पांचव्या भागाच्या ) पूर्वींच संपत असेल त्या वेळीं पूर्वदिवशीं साऱ्या रात्रींत भद्रा असल्यामुळें त्या भद्रेचे ठायीं होळीचा निषेध असल्याकारणानें परदिवशीं प्रतिपदेंतच होळी करावी. कारण, "दुसऱ्या दिवशीं जेव्हां साडेतीन प्रहर पौर्णिमा असून प्रतिपदा वाढती असेल तेव्हां ती होलिका म्हटली आहे" असें **भविष्य**वचन आहे, असें **निर्णयामृतकार** सांगतो. **मदनरत्नांत**ही असेंच आहे. आतां जें—"अग्नीविषयीं अग्नि वर्ज्य करावा, म्हणजे होळीविषयीं प्रतिपदा वर्ज्य करावी" असें **भविष्य**वचन तें वर सांगितलेल्या व्यतिरिक्त पौर्णिमाव्याप्तिविषयीं आहे, असें तेथेंच सांगितलें आहे. **इतर ग्रंथकार** तर—तिचे ठायीं भद्रामुख टाकून, असा अर्थ सांगतात. कारण, "जेव्हां पूर्वदिवशीं प्रदोषव्यापिनी पूर्णिमा असेल तेव्हां भद्रामुख वर्ज्य करून होळी पेटवावी" ह्या **नारद**वचनावरून; व "सर्वदा प्रदोषकालीं विद्वानांनीं होलिका पुजावी. दिवसा होलिका पुजूं नये. कारण, दिवसा पुजली तर दुःख देणारी होईल." ह्या **दिवोदासीयांतील** वचनावरून; आणि "तीन प्रहरांपुढें प्रतिपदा तिथि असेल तर पूर्व दिवशीं भद्रामुख वर्ज्य करून विद्वानांनीं होलिका करावी" असें **विद्याविनोदांत** सांगितल्यावरूनही भद्रामुख टाकून पूर्वदिवशींच होलिका करावी, असें सांगतात. भद्रामुख कोणतें म्हणाल तर सांगतो—"पूर्णिमेचें पूर्वार्ध भद्रा होय. त्या भद्रेच्या चवथ्या पादाच्या पहिल्या पांच घटिका भद्रामुख होय. आणि एक घटिका गलक ( गळा ) म्हटला आहे" असें **रत्नमालेंत** सांगितलेलें भद्रामुख समजावें. शिष्टाचारही असाच ( भद्रामुख सोडून पूर्वदिवशींच करण्याचा ) आहे.

अत्रचेच्चंद्रग्रहणंतदाततोर्वाङ्निशिभद्रावर्ज्यपौर्णमास्यांहोलिकादीपनम् अथपरेह्निग्रस्तोदयस्तदापूर्वदिनेभद्रावर्ज्यरात्रौचतुर्थयामेविष्टिपुच्छेवाहोलिकाकार्या ग्रहोत्तरंप्रतिपत्सत्त्वात्तत्पूर्वंचदिवाहोलानिषेधादिति- **दिवोदासचंद्रप्रकाशौ** वस्तुतस्तुपरदिनेप्रदोषेपौर्णमासीसत्त्वेकर्मकालस्पर्शेचतुर्थयामादिगौणकालग्रहणेमानाभावाद्भद्राभावाच्चग्रहणकालएवहोलाकार्या नच सर्वेषामेववर्णानांसूतकंराहुदर्शने स्नात्वाकर्माणिकुर्वीतशृतमन्नंविवर्जयेदितिनिषेधात् कथंसूतकेहोलेतिवाच्यम् तस्योत्तरार्धशेषत्वात् **पूजामंत्रस्तु** असृक्पाभयसंत्रस्तैःकृतात्वंहोलिबालिशैः अतस्त्वांपूजयिष्यामिभूतेभूतिप्रदाभवेति * **यत्तुवार्तिककारैर्हो**लिकाआचारप्राप्तेत्युक्तम् तत्रहेमाद्याद्युदाहृतभविष्यवचनान्यसिद्धानिकृत्वाचिंताज्ञेया आद्यधिकरणवत् * हुताशनीमलमासेनभवति इयंमन्वादिरपि सातुपौर्वाह्णिकीग्राह्या मलमासेसतिमन्वादिश्राद्धंमासद्वयेकार्यमित्युक्तंप्राक् **कृत्यचिंतामणौब्राह्मे** नरोदोलागतंदृष्ट्वागोविंदंपुरुषोत्तमं फाल्गुन्यांसंयतोभूत्वागोविंदस्यपुरंव्रजेत्।

ह्या पौर्णिमेस जर चंद्रग्रहण असेल तर चंद्रग्रहणाच्या पूर्वी रात्रीं भद्रारहित पौर्णिमेंत होळी पेटवावी. आतां जेव्हां दुसऱ्या दिवशीं चंद्राचा ग्रस्तोदय असेल तेव्हां पूर्वदिवशीं रात्रीं भद्रा टाकून चवथ्या प्रहरीं किंवा भद्रापुच्छावर होलिका करावी. कारण, दुसऱ्या दिवशीं ग्रहण संपल्यानंतर प्रतिपदा असल्यामुळें प्रतिपदेंत होळीचा निषेध आहे. आणि ग्रहणापूर्वी म्हटलें तर दिवसा होळीचा निषेध आहे, असें **दिवोदास** व **चंद्रप्रकाश** सांगतात. वास्तविक म्हटलें तर—दुसऱ्या दिवशीं प्रदोषकालीं पौर्णिमा असतां व तिचा कर्मकालाला स्पर्श असतां पूर्वरात्रीं पहांटेस चवथा प्रहर व भद्रापुच्छ इत्यादि गौण कालाचें ग्रहण करण्याविषयीं प्रमाण नसल्यामुळें व प्रदोषकालीं भद्रा नसल्यामुळें ग्रहणकालींच होळी करावी. आतां

---

टीप—* * या दोन चिन्हांमधील ग्रंथ जुन्या लेखी प्रतींत नसल्यामुळें बाहेरचा प्रक्षिप्त असावा, म्हणून त्याचें भाषांतर दिलें नाहीं.

"राहुदर्शन झालें असतां ब्राह्मणादि सर्वही वर्णांना सूतक आहे, म्हणून स्नान करून विहित कर्में करावीं, आणि शिजविलेलें अन्न असेल तें टाकावें" ह्या वचनानें निषेध असल्यामुळें सूतकांत होळी कशी होईल? अर्थात् होणार नाहीं; असें बोलूं नये. कारण, तें राहुदर्शननिमित्त सूतक पुढच्या अर्धांत सांगितलेल्या कर्मविषयक आहे. होळीविषयीं नाहीं. होळीच्या पूजेचा मंत्र—**'असृक्पाभयसंत्रस्तैः कृता त्वं होलि बालिशैः ॥ अतस्त्वां पूजयिष्यामि भूते भूतिप्रदा भव ॥'** होलिका मलमासांत होत नाहीं. ही फाल्गुनी पूर्णिमा मन्वादिही आहे. ती तर मन्वादिश्राद्धाविषयीं पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. फाल्गुन मलमास असतां मन्वादिश्राद्ध दोन्ही मासांत करावें, असें पूर्वीं सांगितलें आहे. **कृत्यचिंतामणींत ब्रह्म-पुराणांत**—"फाल्गुनी पौर्णिमेस मनुष्यानें नियमित होऊन गोविंद पुरुषोत्तमाला दोलेंत बसवून त्याला झोंपी काढून त्याचें दर्शन घेतल्यानें तो मनुष्य वैकुंठास जाईल."

चैत्रकृष्णप्रतिपदिवसंतोत्सवः साचौदयिकीग्राह्या प्रवृत्तेमधुमासेतुप्रतिपद्युदितेरवाविति **भविष्योक्तेः** दिनद्वयेतथात्वेपूर्वा वत्सरादौवसंतादौबलिराज्येतथैवच पूर्वविद्धैवकर्तव्याप्रतिपत्सर्वदाबुधैरिति **वृद्धवसि-ष्ठवचनात** अत्रविशेषो **हेमाद्रौभविष्ये** चैत्रेमासिमहाबाहोपुण्येतुप्रतिपद्दिने यस्तत्रश्वपचंस्पृष्ट्वास्नानंकुर्या-न्नरोत्तमः नतस्यदुरितंकिंचिन्नाधयोव्याधयोनृपेति तथा प्रवृत्तेमधुमासेतुप्रतिपद्युदितेरवौ कृत्वाचावश्य-कार्याणिसंतर्प्यपितृदेवताः वंदयेद्धोलिकाभूमिंसर्वदुःखोपशांतये **मंत्रश्च** वंदितासिसुरेंद्रेणब्रह्मणाशंकरेणच अतस्त्वंपाहिनोदेविभूतेभूतिप्रदाभवेति अत्रचूतकुसुमप्राशनमुक्तंतत्रैव **पुराणसमुच्चये** वृत्तेतुपारसमयेसि-तपंचदश्यांप्रातर्वसंतसमयेसमुपस्थितेच संप्राश्यचूतकुसुमंसहचंदनेनसत्यंहिपार्थपुरुषोऽथसमाःसुखीस्यात् मंत्रस्तु चूतमग्र्यंवसंतस्यमाकंदकुसुमंतव सचंदनंपिबाम्यद्यसर्वकामार्थसिद्धयइति **चैत्रामावास्यामन्वादिः** साचापराह्णव्यापिनीग्राह्या कृष्णपक्षस्थत्वात् इतिफाल्गुनमासः समाप्तः ॥

चैत्रकृष्णप्रतिपदेस वसंतोत्सव करावा. ती प्रतिपदा सूर्योदयव्यापिनी घ्यावी. कारण, "प्रतिपदेंत सूर्योदयकालीं मधुमास (चैत्रमास) प्रवृत्त झाला असतां" असें **भविष्यपुराण**वचन आहे. दोन दिवस सूर्योदयकालीं प्रतिपदा असतां पहिली घ्यावी. कारण, "संवत्सरारंभाची प्रतिपदा, वसंतारंभाची प्रतिपदा आणि बलिप्रतिपदा ह्या सर्वदा विद्वानांनीं पूर्वविद्धाच कराव्या." असें **वृद्धवसिष्ठाचें** वचन आहे. ह्या प्रतिपदेस विशेष सांगतो **हेमाद्रींत भविष्यांत**—"चैत्रमासांत पुण्य-कारक प्रतिपदेच्या दिवशीं जो मनुष्य अंत्यजास (चांडालादिकांस) स्पर्श करून स्नान करील त्याला कोणतेंही पातक असणार नाहीं, आणि मनोव्यथा व शारीरव्याधि होत नाहींत." तसेंच—"प्रतिपदेंत सूर्योदयकालीं मधुमास प्रवृत्त झाला असतां स्नानसंध्यादि आवश्यक कृत्यें करून पितर व देवता यांचें तर्पण करून सर्व दुःखांच्या शांतीसाठीं होळीच्या भूमीला नमस्कार करावा." नमस्काराचा मंत्र—**"वंदितासि सुरेंद्रेण ब्रह्मणा शंकरेण च ॥ अतस्त्वं पाहि नो देवि भूते भूतिप्रदा भव."** या प्रतिपदेस आम्रकुसुमप्राशन सांगतो तेथेंच **पुराणसमुच्चयांत**—"फाल्गुनशुक्लपौर्णिमेस शिशिर ऋतु संपल्यावर प्रातःकालीं वसंत ऋतु प्राप्त झाला असतां आंब्याचा मोहर चंदनासह वाटून प्राशन केल्यानें तो पुरुष वर्षपर्यंत सुखी होईल." आम्रकुसुमप्राशनाचा मंत्र—**'चूतमग्र्यं वसंतस्य माकंद कुसुमं तव ॥ सचंदनं पिबाम्यद्य सर्वकामार्थसिद्धये ॥'** चैत्री अमावास्या ही मन्वादि आहे. ती कृष्णपक्षांतील मन्वादि असल्यामुळें अपरा-ह्णव्यापिनी घ्यावी. **याप्रमाणें फाल्गुनमासाचा निर्णय समाप्त झाला.**

एवंनिरूपितमिदंगहनंतुकालतत्त्वंविचार्यवचनैश्चनयैश्चसम्यक् तद्दोषदृष्टिमपहायविवेचनीयंविद्वद्भिरित्य विरतंप्रणतोस्मितेषु १ मयासद्वाऽसद्वायदिहगदितंमंदमतिनाकिमेतच्छक्यंवाध्यवसितुमपिस्वल्पमतिना तदे-वंयत्किंचिद्गदितमिहविख्यातमहिमाप्रतापोऽयंसर्वोविकसतितुपित्रोश्चरणयोः २ योभाट्टतंत्रगहनार्णवकर्ण-धारःशास्त्रांतरेपुनिखिलेष्वपिमर्मभेत्ता योऽत्रश्रमःकिलकृतःकमलाकरेणप्रीतोऽमुनाऽस्तुसुकृतीबुधरामकृष्णः ३ इतिश्रीमन्नारायणभट्टसूरिसूनुरामकृष्णभट्टसुतदिनकरभट्टानुजकमलाकरभट्टकृते निर्णयसिंधौसंवत्सर-कृत्यनिरूपणंनामद्वितीयपरिच्छेदः समाप्तः ।

**या प्रकारानें हें गहन (समजण्यास कठीण) असें कालाचें तत्त्व ऋषिवचनांनीं व न्यायांनीं चांगला विचार करून निरूपण केलें आहे. विद्वानांनीं दोषदृष्टि दूर करून त्याचें विवेचन करावें. म्हणून विद्वानांचे ठिकाणीं सतत मी नम्र झालों आहें. ॥ १ ॥ मीं मंदमति कमलाकरानें येथें चांगलें किंवा वाईट जें सांगितलें आहे तें स्वल्पमति अशा मला मनांत आणण्याविषयीं तरी**

शक्य आहे काय ? तस्मात् या ग्रंथांत जें कांहीं मीं निरूपण केलें हा सारा मातापितरांच्या चरणांचा विख्यातमहिमा प्रताप प्रफुल्लित झालेला आहे, असें समजावें. ॥ २ ॥ या ग्रंथांत जो मी कमलाकरानें श्रम केला आहे त्या श्रमानें, जो मीमांसारूप गहन ( खोल ) समुद्राचा नावाडी व इतर सर्वशास्त्रांचेंही मर्म जाणणारा असा धन्य पंडित रामकृष्ण ( माझा पिता ) संतुष्ट असो ॥ ३ ॥

इति द्वितीय परिच्छेदाची महाराष्ट्र टीका समाप्त झाली.

इति द्वितीयपरिच्छेदः समाप्तः ॥

# तृतीयपरिच्छेद पूर्वार्ध—

## ॥ श्रीगणेशाय नमः ॥

**अथप्रकीर्णकनिर्णयः** श्रीरामकृष्णतनयःकमलाकरसंज्ञितः निरूप्यतिथिकृत्यंतुप्रकीर्णंवक्तुमुद्यतः १

## आतां प्रकीर्णकनिर्णय सांगतो.—

श्रीरामकृष्णभट्टाचा पुत्र कमलाकरभट्ट पूर्वी ( द्वितीय परिच्छेदांत ) तिथिकृत्य निरूपण करून प्रकीर्णक ( मिश्रप्रकरण ) सांगण्याकरितां उद्युक्त ( उत्कंठित ) झालेला आहे.

तत्रादौसंस्कारेपुगर्भाधानम् तत्रप्रथमरजोदर्शने दुष्टमासग्रहणसंक्रमादिफलंतत्रशांत्यादिचपितृकृतंभट्टकृतप्रयोगरत्नेज्ञेयम किंचित्तूच्यते **मदनरत्नेनारदः** अमारिक्ताष्टमीषष्ठीद्वादशीप्रतिपत्स्वपि परिघस्यतुपूर्वार्धे व्यतीपातेचवैधृतौ संध्यासूपप्लवेविष्ट्यामशुभंप्रथमार्तवं रोगीपतिव्रतादुःखीपुत्रिणीभोगभोगिनी पतिव्रताक्लेशभागीसूर्यवारादिपुक्रमात् वैधव्यंसुतलाभश्चमैत्रंशत्रुविवर्धनम् मित्रलाभःशत्रुवृद्धिःकुलर्द्धिर्बंधुनाशनम् मरणंवंशवृद्धिश्चनिराहारःकुलक्षयः तेजश्चसुतनाशश्चकुलहानिस्तिथिक्रमात् **गर्गः** सुभगाचैवदुःशीलावंध्यापुत्रसमन्विता धर्मयुक्ताव्रतघ्नीचपरसंतानमोदिनी सुपुत्राचैवदुःपुत्रापितृवेश्मरतासदा दीनाप्रजावतीचैवपुत्राढ्याचित्रकारिणी साध्वीपतिप्रियानित्यंसुपुत्राकष्टचारिणी स्वकर्मनिरताहिंस्रापुण्यपुत्रादिसंयुता नित्यंधनचयासक्तापुत्रधान्यसमन्विता मूर्खाचाज्ञापुण्यवतीदस्रर्क्षादिःक्रमात्फलम् **नारदः** कुलीरवृषचापांत्यनृयुक्कन्यातुलाघटाः राशयःशुभदाज्ञेयानारीणांप्रथमार्तवे **गर्गः** सुभगाश्वेतवस्त्रास्याद्दृढवस्त्रापतिव्रता क्षौमवस्त्राक्षितीशास्यान्नववस्त्रासुखान्विता दुर्भगाजीर्णवस्त्रास्याद्रोगिणीरक्तवाससा नीलांबरधरानारीपुष्पिताविधवाततः वस्त्रेस्युर्विपमारक्तविंदवःपुत्रमाप्नुयात् समाश्चेत्कन्यकाश्चेतिफलंस्यात्प्रथमार्तवे ।

त्यांत आधीं संस्कार सांगावयाचे त्या संस्कारांपैकीं गर्भाधानसंस्कार सांगतों—त्या गर्भाधानसंस्कारांत प्रथम रजोदर्शनाचे ठायीं दुष्टमास, ग्रहण, संक्रांति इत्यादिकांचें फल व त्याविषयीं शांति वगैरे करणें तो सर्व निर्णय आमच्या वडिलांनीं केलेला आहे तो **नारायणभट्टांनीं** केलेल्या **प्रयोगरत्नांतून** जाणावा. थोडेंसें येथें सांगतों-**मदनरत्नांत नारद**—"अमावास्या, रिक्ता ( ४।९।१४ ) तिथि, अष्टमी, षष्ठी, द्वादशी, प्रतिपदा, परिघयोगाचा पूर्वार्ध, व्यतीपात, वैधृति, संध्यासमय, उपप्लव, विष्टि, यांचे ठायीं प्रथम रजोदर्शन झालें असतां तें अशुभ होय. रविवारीं रोगी, सोमवारीं पतिव्रता, मंगळवारीं दुःखी, बुधवारीं पुत्रवती, गुरुवारीं भोग भोगणारी, शुक्रवारीं पतिव्रता, शनिवारीं क्लेश भोगणारी याप्रमाणें वारांचे ठायीं प्रथम रजोदर्शनाचें फल समजावें. प्रतिपदेस वैधव्य, द्वितीयेस पुत्रलाभ, तृतीयेस मित्रत्व, चतुर्थीस शत्रुवृद्धि, पंचमीस मित्रलाभ, षष्ठीस शत्रुवृद्धि, सप्तमीस कुलवृद्धि, अष्टमीस बंधुनाश, नवमीस मरण, दशमीस वंशवृद्धि, एकादशीस उपवास, द्वादशीस कुलक्षय, त्रयोदशीस तेज, चतुर्दशीस पुत्रनाश, पंचदशीस ( अमावास्या पौर्णिमेस ) कुलहानि याप्रमाणें प्रथमरजोदर्शनाचे ठायीं तिथिफलें समजावीं." **गर्ग**—"अश्विनीस सुभगा, भरणीस दुःशीला, कृत्तिकेस वंध्या, रोहिणीस पुत्रवती, मृगास धर्मयुक्त, आर्द्रास व्रतघातकी, पुनर्वसूस परसंतानानें हर्ष पावणारी, पुष्यास सुपुत्रवती, आश्लेषांस दुष्टपुत्रवती, मघांस पितृगृहीं सदा राहणारी, पूर्वांस दीना, उत्तरांस प्रजायुक्त, हस्तास बहुत पुत्रयुक्त, चित्रांस चित्रकरणारी, स्वातीस साध्वी, विशाखांस नित्य पतिप्रिया, अनुराधांस सुपुत्रा, ज्येष्ठांस कष्ट करणारी, मूळास आपल्या कर्माविषयीं तत्पर, पूर्वाषाढांस हिंसाकरणारी, उत्तराषाढांस पुण्यकारक पुत्रादिकांनीं युक्त, श्रवणास सतत द्रव्यसंचय करणारी, धनिष्ठांस आसक्त, शततारकांस पुत्रधान्ययुक्त, पूर्वाभाद्रपदांस मूर्ख, उत्तराभाद्रपदांस ज्ञानशील, रेवतीस पुण्यवती याप्रमाणें प्रथम रजोदर्शनाविषयीं नक्षत्रांचें फल समजावें." **नारद**—"कर्क, वृषभ, धनु, मीन, मिथुन, कन्या, तूळ, कुंभ, त्या राशी स्त्रियांच्या प्रथम रजोदर्शनाविषयीं शुभ आहेत." **गर्ग**—"शुभवस्त्र परिधान केलेलें असतां प्रथम रजोदर्शन झालें तर सुभगा होते. दृढवस्त्रावर झालें तर पतिव्रता होते. पाटाव नेसलेली असून झालें तर पृथिवीपति होते. नव्या वस्त्रावर झालें तर सुखयुक्त होते. जीर्णवस्त्रावर रजोदर्शन प्रथम झालें तर दुर्भगा ( दुर्भाग्यवती ) होते. रक्तवस्त्रावर प्रथम रजोदर्शन असतां रोगिणी होते. नीलवस्त्रावर

---

१ संमार्जनीकाष्ठतृणादिशूर्पान् हस्ते दधाना कुलटा तदा स्यात् ॥ तल्पोपभोगे तपसि स्थिता चेद्दृष्टं रजो भाग्यवती तदा स्यात् ॥ स्मृतिरत्ने । शुभं चैत्र तु पूर्वाह्णे मध्याह्ने मध्यमं फलं ॥ अपराह्णे तु वैधव्यं पूर्वरात्रे शुभं भवेत् इत्यादि.

प्रथम रजोदर्शन झालें तर ती स्त्री विधवा होते. वस्त्रावर आर्तवाचे बिंदु विषम पडले असतां पुत्र होतो. आणि सम बिंदु पडले असतां कन्या होते. याप्रमाणें प्रथमरजोदर्शनाचें फल समजावें."

**अथस्त्रीसंसर्गवर्जनमाह वसिष्ठः** प्रभूतदोषेयदिदृश्यतेतत्पुष्पंतदाशांतिककर्मकार्यम् विवर्जयेदेवतदैकशय्यांयावद्रजोदर्शनमुत्तमेहि **ज्योतिर्निबंधेवसिष्ठः** आद्यर्तौपौषशुक्रोर्जमधुशुचिनभस्याः कुयुक्पापवारारिक्तामार्कोष्टषष्ठ्यः पितृपरसदनेरात्रिसंध्यापराह्णे मिश्रोग्रामूलतीक्ष्णंविवरमनरुणाल्पाधिकास्रंगराष्टोत्पातःपापस्यलग्नंनसदरुणजरन्नीलचित्रांबरंच आद्यर्तौदुर्भगानारीविष्कंभेचेद्रजस्वला वंध्याचैवातिगंडेचशूलेशूलवतीभवेत् गंडेतुपुंश्चलीनारीव्याघातेचात्मघातिनी वज्रेचस्वैरिणीप्रोक्तापातेचपतिघातिनी परिघेमृतवंध्याचवैधृतौपतिमारिणी शेषाःशुभावहायोगायथानामफलप्रदाः ।

आतां स्त्रीसंबंध वर्ज्य सांगतो. **वसिष्ठ**—"जेव्हां पुष्कळ दोष असतां प्रथम रजोदर्शन होईल तेव्हां शांति करावी, जोंपर्यंत उत्तम दिवशीं रजोदर्शन होई तोंपर्यंत स्त्रीसंयोग वर्ज्यच करावा." **ज्योतिर्निबंधांत वसिष्ठ**—"पौष, ज्येष्ठ, कार्तिक, चैत्र, आषाढ, भाद्रपद हे मास; निंद्य योग; पापवार ( रविवार, मंगळवार, शनिवार ); रिक्ता तिथि ( ४।९।१४ ), अमावास्या, द्वादशी, अष्टमी, षष्ठी, ह्या तिथि; पितृगृह; परगृह; रात्रि; संध्यासमय; अपराह्णकाल; मिश्र ( कृत्तिका, विशाखा ), उग्र ( पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, मघा, भरणी ), तीक्ष्ण ( आश्लेषा, ज्येष्ठा, आर्द्रा ) हीं नक्षत्रें; तिथि, वार इत्यादिकांचा संधि; अरुण भिन्न वर्णाचें अल्प किंवा अधिक असें रक्त; गरजकरणापासून पुढचीं आठ करणें; उत्पात; पापग्रहाच्या राशीचें लग्न; अरुण, जीर्ण, नील व चित्र असें वस्त्र; हीं प्रथम रजोदर्शनाचे ठायीं चांगलीं नाहींत." "स्त्री विष्कंभयोगावर प्रथम रजस्वला झाली तर दुर्भाग्ययुक्त होते. अतिगंडावर वंध्या होते. शूलयोगावर झाली तर शूलयुक्त होते. गंडयोगावर झाली तर जारिणी होते. व्याघातयोगावर झाली तर आत्मघातकी होते. वज्रयोगावर झाली तर जारिणी होते. व्यतीपातावर झाली तर पतिघातकी होते. परिघावर झाली तर मृतवंध्या ( मुलें मरणारी, मरतवांझ ) होते. वैधृतीवर झाली तर पतीस मारणारी होते. बाकीचे शुभकारक योग आपल्या नांवासारखें फल देणारे आहेत."

**शांतिमाहप्रयोगपारिजातेशौनकः** सार्तवानांतुनारीणांशांतिंवक्ष्यामिशौनकः पंचमेह्निचतुर्थेवाग्रहयज्ञपुरःसरम् तस्मिन्नहनिकर्तव्योऋतुहोमोविधानतः आचार्यंवरयेत्प्राज्ञोभुवनेश्वरितुष्टये । होमार्थंचजपार्थंचवरयेदृत्विजोबहून् । यजमानोद्विजैःसार्धंशांतिहोमंसमाचरेत् । गृहादीशानदिग्भागे देवतापूजनायच द्रोणप्रमाणधान्येनव्रीहिराशित्रयंभवेत् कुंभत्रयंन्यसेद्राशौतंतुवस्त्रादिवेष्टितम् पूरयेत्तीर्थसलिलैःप्रतिकुंभंपृथक्पृथक् सूक्तेनाथनवर्चेनप्रसुवआपइत्यथ ऋचायाःप्रवतस्तद्वद्गायत्र्याचततःक्रमात् मध्यकुंभेक्षिपेद्धान्यमौषधानिचहेमच ततश्चपंचरत्नानिगंधपुष्पाक्षतादिकान् औषधानिचवक्ष्यंतेमुनिभिःशांतिकारणात् उदुंबरःकुशोदूर्वाराजीववटबिल्वकाः विष्णुक्रांताथतुलसीबर्हिर्षशंखपुष्पिका शतावर्यश्वगंधाचनिर्गुंडीसर्षपद्वयम् अपामार्गःपलाशश्चपनसोजीवकस्तथा प्रियंगवश्चगोधूमाव्रीहयोऽश्वत्थएवच क्षीरंदधिचसर्पिश्चपद्मपत्रंतथोत्पलम् कुरंटकत्रयंगुंजावचाभद्रकमुस्तकाः द्वात्रिंशदौषधानीहयथासंभवमाहरेत् मृत्तिकाश्चौषधादीनितन्मंत्रेणक्षिपेत्क्रमात् कुंभोपरिन्यसेत्पात्रंकांस्यंमृद्वेणुताम्रजम् भुवनेश्वरींन्यसेत्तत्रइंद्राणींचपुरंदरं जपेद्गायत्रिमाहोमाच्छ्रीसूक्तंचजपेत्ततः स्पृशन्वैदक्षिणंकुंभमृत्विगेकोजपेदथ चत्वारिरुद्रसूक्तानिचतुर्मंत्रोत्तराणिच संस्पृशन्नुत्तरंकुंभंश्रीरुद्रंरुद्रसंख्यया शंनइंद्राग्नीसूक्तंचतत्रैवसंस्पृशन्जपेत् कुंभस्यपश्चिमेदेशेशांतिहोमंसमाचरेत् दूर्वाभिस्तिलगोधूमैःपायसेनघृतेनच तिसृभिश्चैवदूर्वाभिरेकैकाचाहुतिर्भवेत् अष्टोत्तरसहस्रंवाशतमष्टोत्तरंतुवा गायत्र्यैवतुहोतव्यंहविरत्रचतुष्टयम् ततःस्विष्टकृतंहुत्वासमुद्रादूर्मिसूक्ततः संततामाज्यधारांतांपूर्णाहुतिमथाचरेत् अथाऽभिषेकंकुर्वीतप्रतिकुंभस्थितोदकैः आपोहिष्ठेतिनवभिःसूक्तेनचततःपरम् इंद्रोअंगतृचेनैवपावमानैःक्रमेणतु उभयंश्रृणवच्चनःस्वस्तिदाविशएकया त्रैयंबकेनमंत्रेणजातवेदसएकया समुद्रज्येष्ठाइत्यादित्रायंतांचत्रिभिःक्रमात् इमाआपस्तृचेनैवदेवस्यत्वेतिमंत्रतः मंत्रेणाथतमीशानंत्वमग्नेरुद्रइत्यथ तमुष्टुहीतिमंत्रेणभुवनस्यपितरंतथा यातेरुद्रेतिमंत्रेणशिवसंकल्पमंत्रतः इंद्रत्वावृषभंपंचमंत्रैश्चैवाभिषेचयेत् धेनुंपयस्विनींदद्यादाचार्यायचभूषणैः सदक्षिणमनड्वाहंप्रदद्याद्रुद्रजापिने महाशांतिंप्रजप्याथब्राह्मणान्भोजयेत्ततइति ।

## दुष्टरजोदर्शनाविषयीं शांति सांगतो.—

**प्रयोगपारिजातांत शौनक**—"मी शौनक रजस्वला स्त्रियांची शांति सांगतों—पांचव्या किंवा चवथ्या दिवशीं ग्रहयज्ञपूर्वक शांति करावी. त्या दिवशीं यथाविधि ऋतुहोम करावा. भुवनेश्वरीच्या संतोषाकरितां होमासाठीं व जपासाठीं बहुत ऋत्विज वरावे. ब्राह्मणासहवर्तमान यजमानानें शांतिहोम करावा. घराच्या ईशान दिशेकडे देवतापूजनासाठीं एक द्रोण ( चार पायली ) भाताच्या तीन राशी कराव्या. त्या राशींवर सूत, वस्त्र इत्यादिकांनीं वेष्टिलेले असे तीन कुंभ स्थापावे. त्या प्रत्येक कुंभांत 'प्रसुव आप०' ह्या नऊ ऋचांनीं आणि 'याःप्रवतो०' या एक ऋचेनें व गायत्रीमंत्रानें अनुक्रमानें शुद्ध उदक भरावें. आणि गंधादिक घालावीं. मध्यकुंभांत धान्यें ( यव, व्रीहि, तिल, उडीद, राळे, सांवे, मूग, ); ओषधी म्हणजे— उंबर, कुश, दूर्वा, रक्तकमळ, वड, बेल, विष्णुक्रांता, तुळस, बर्हिष्, शंखपुष्पी, शतावरी, अस्कंध, निर्गुंडी, दोन प्रकारचे सर्षप, आघाडा, पळस, फणस, जीवक, राळे, गहूं, व्रीहि, अश्वत्थ, कमळपत्र, कमळ, तीन प्रकारचा कोरांटा ( पांढरा, तांबडा, पिंवळा ), गुंजा, वेखंड, भद्रमोथा, मोथा, ह्या बत्तीस ओषधी मिळतील त्या मिळवून घालाव्या. आणि दूध, दहीं, तूप घालावें. नंतर तीन कलशांत मृत्तिका ( हत्तीची जागा, अश्वशाला, राजरस्ता, वारुळ, नदीसंगम, पाण्याचा डोह, गोठा यांतील सात मृत्तिका ), ओषधी इत्यादि म्ह० दूर्वा, पंचपल्लव, ( अश्वत्थ, उंबर, पायरी, आम्र, वट यांचे पल्लव ), पूगीफलें, पंचरत्नें ( सुवर्ण, हिरा, नील, पद्मराग, मौक्तिक ), हीं त्या त्या मंत्रानें अनुक्रमानें टाकावीं. गंध, पुष्पें, अक्षता, इत्यादिक टाकावीं. नंतर तीन कलशांवर कांशाचीं, किंवा मातीचीं, अथवा वेळूचीं किंवा तांब्याचीं तीन पात्रें ठेवावीं. त्यांत मध्यकलशावर भुवनेश्वरीची, दक्षिणकलशावर इंद्राणीची आणि उत्तरकलशावर इंद्राची अशा सुवर्णप्रतिमा स्थापून त्यांच्या त्यांच्या मंत्रांनीं षोडशोपचारांनीं पूजा करावी. नंतर आचार्यानें मध्यकुंभाला स्पर्श करून अष्टसहस्र किंवा अष्टशत गायत्रीजप करून श्रीसूक्तजप करावा. एका ऋत्विजानें दक्षिणकुंभाला स्पर्श करून रुद्रसूक्तें चार ( कद्रुद्राय० हें नऊ ऋचांचें सूक्त पहिलें, इमारुद्राय० हें अकरा ऋचांचें सूक्त दुसरें, आतेपितर्० हें पंधरा ऋचांचें सूक्त तिसरें, इमारुद्रायस्थिर० हें चार ऋचांचें चवथें ), पुढचे चार मंत्र ( आवोराजा०, तमुष्टुहि०, भुवनस्य पितरं०, त्र्यंबकं० ), यांचा जप करावा. दुसऱ्या ऋत्विजानें उत्तरकुंभाला स्पर्श करून रुद्राच्या अकरा आवर्तनें करावीं. आणि त्याच कुंभाला स्पर्श करून इतरानें, शंन इंद्राग्नी० सूक्ताचा जप करावा. कुंभाच्या पश्चिमभागीं स्थंडिल घालून त्यावर शांतिहोम करावा. तो असा—नवग्रहांचा होम समिधा, तिल, आज्य ह्या द्रव्यांनीं करावा. भुवनेश्वरीला गायत्रीमंत्रानेंच दूर्वा, तिलमिश्र गोधूम, पायस, घृत, ह्या चार द्रव्यांचा अष्टोत्तर सहस्र ( १००८ ) किंवा अष्टोत्तरशत ( १०८ ) संख्याक होम करावा. तीन तीन दूर्वांची एक एक आहुति होते. नंतर स्विष्टकृताचा होम करून 'समुद्रादूर्मि०' या सूक्तानें संतत आज्यधारा ती पूर्णाहुति करावी. नंतर प्रत्येक कुंभांतील उदक एका पात्रांत घेऊन 'आपोहिष्ठा०' या नऊ ऋचांच्या सूक्तानें, 'इंद्रोअंग०' ह्या तीन ऋचा, पवमानमंत्र, 'उभयं शृणवच्चन०' ही एक ऋचा, 'स्वस्तिदाविशस्पतिः०' ही एक ऋचा, 'त्र्यंबकं०' हा एक मंत्र, 'जातवेदसे०' ही एक ऋचा, 'समुद्रज्येष्ठाः०' ह्या चार ऋचा, 'त्रायंतां०' ह्या तीन ऋचा, 'इमाआपः०' ह्या तीन ऋचा, 'देवस्यत्वा०' हे आपस्तंब शाखेंतील तीन मंत्र, 'तमीशानं०' हा एक मंत्र, 'त्वमग्नेरुद्र०' हा एक मंत्र, 'तमुष्टुहि०' हा एक मंत्र, 'भुवनस्य पितरं०' हा एक मंत्र, 'याते रुद्र०' हा एक मंत्र, 'यज्जाग्रत०' हे सहा शिवसंकल्प मंत्र, 'इंद्र त्वा वृषभं०' हे पांच मंत्र, यांनीं यजमान व पत्नी यांजवर अभिषेक करावा. नंतर आचार्याला अलंकारसहित पुष्कळ दूध देणारी धेनु द्यावी. रुद्रजप करणाराला दक्षिणासहित वृषभ द्यावा. व इतर ऋत्विजांना दक्षिणा द्यावी. नंतर ब्राह्मणाकडून महाशांतिजप करवावा. महाशांति म्हणजे 'आनोभद्रा०' ह्या दहा ऋचा, 'स्वस्तिनोमिमीतां०' ह्या पांच ऋचा, 'शंनइंद्राग्नी०' ह्या पंधरा ऋचा, ही होय. महाशांतीचा जप झाल्यावर ब्राह्मणांना भोजन घालावें."

**नारदः** तत्रशांतिंप्रकुर्वीतघृतदूर्वातिलाक्षतैः प्रत्येकाष्टशतंचैवगायत्र्याजुहुयात्ततः स्वर्णगोभूतिलान्दद्यात्सर्वदोषापनुत्तये प्रकारांतरं**मदनरत्ने**ज्ञेयम् विस्तरभयान्नोच्यते ग्रहणेरजोदर्शनेतुजातकर्मप्रस्तावेशांतिं वक्ष्यामः । अथप्रथमर्तौविशेषः**स्मृतिचंद्रिकायाम्** प्रथमर्तौतुपुष्पिण्याःपतिपुत्रवतीस्त्रियः अक्षतैरासनंकृत्वातस्मिंस्तामुपवेशयेत् हरिद्रागंधपुष्पादिदद्युस्तांबूलकंस्रजम् दीपैर्नीराजनंकुर्यात्सदीपेवासयेद्गृहे लवणापूपमुद्गादिदद्यात्ताभ्यःस्वशक्तितइति ।

**नारद**—"रजोदर्शनाविषयीं सर्व दोषनाशनाकरितां शांति करावी. घृत, दूर्वा, तिल, अक्षता, ह्या प्रत्येक द्रव्याचा गायत्रीमंत्रानें अष्टशत होम करावा; नंतर सुवर्ण, गाई, भूमि, तिल, हीं ब्राह्मणांस द्यावीं." दुसरा प्रकार **मदनरत्नांतून** आणावा. येथें फार विस्तार होईल म्हणून सांगत नाहीं. ग्रहणांत रजोदर्शन झालें असेल तर त्याची शांति जातकर्मप्रकरणीं पुढें सांगूं. प्रथम रजोदर्शनाचे ठायीं विशेष सांगतो **स्मृतिचंद्रिकेंत**—"स्त्रियेला प्रथम रजोदर्शन झालें असतां पतिपुत्रवती स्त्रियांनीं

अक्षतांचें आसन करून त्या आसनावर तिला बसवावी. आणि हळद, गंध, पुष्पें, तांबूल, स्रक् ( माळा ) हीं तिला द्यावीं. दिवे लावून नीरांजन करावें. दीपयुक्त घरांत तिला बसवावी. त्या स्त्रियांना आपल्या शक्तीप्रमाणें लवण, अपूप, मूग इत्यादिक द्यावे."

द्वितीयाद्यतुंषुतुतन्नियममाह **पारिजातेदक्षः** अंजनाभ्यंजनेस्नानंप्रवासंदंतधावनं नकुर्यात्सार्तवानारी ग्रहाणामीक्षणंतथा **अत्रिरपि** वर्जयेन्मधुमांसंचपात्रेखर्वेचभोजनं गंधमाल्येदिवास्वापंतांबूलंचास्यशोधनं दग्धेशरावेभुंजीतपेयंचांजलिनापिबेत् **मदनरत्नेहारीतः** रजःप्राप्तावधःशयीतभूमौकार्ष्णायसेपाणौ मृन्मयेवाऽश्नीयादिति **विष्णुधर्मे** आहारंगोरसानांचपुष्पालंकारधारणं अंजनंकंकतंगंधान्पीठशय्याधिरोहणं अग्निसंस्पर्शनंचैववर्जयेत्सादिनत्रयमिति ।

दुसऱ्या ऋतूपासून पुढें रजस्वला स्त्रियांचा नियम सांगतो **पारिजातांत दक्ष**—"डोळ्यांत काजळ घालणें, तेल लावणें, स्नान, प्रवास, दंतधावन, आणि ग्रहणाचें दर्शन हीं रजस्वला स्त्रियेनें करूं नयेत." **अत्रिही**—"रजस्वला स्त्रियेनें मध व मांस वर्ज्य करावें. खर्व ( लहान ) पात्रांत भोजन, गंध, माल्य, दिवसा निद्रा, तांबूल, मुखशोधन, हीं वर्ज्य करावीं. परळांत भोजन करावें. आणि पेय पदार्थ अंजलीनें प्यावा." **मदनरत्नांत हारीत**—"रजोदर्शन प्राप्त असतां स्त्रियेनें भूमीवर शयन करावें. कृष्णलोहपात्रांत, हातावर किंवा मातीच्या पात्रांत भोजन करावें." **विष्णुधर्मांत**—"रजस्वला स्त्रियेनें गोरसभक्षण, पुष्प व अलंकार यांचें धारण, डोळ्यांत अंजन, कंकत ( फणीनें केशसंस्कार ), गंध, आसन व शय्या यांवर बसणें, अग्नीचा स्पर्श, हीं तीन दिवस वर्ज्य करावीं."

तथाचप्रथमर्तोःपूर्वंस्त्रीगमनंनकार्यम् प्राग्रजोदर्शनात्पत्नींनेयाद्गत्वापतत्यधः व्यर्थीकारेणशुक्रस्यब्रह्महत्यामवाप्नुयादितितत्रैवाश्वलायनोक्तेः एतत्तुदशवर्षात्प्राक्ज्ञेयम् प्रथमर्तौगमनेगौतमेनविशेषोदर्शितः गौरीमपिचरत्यर्थंगच्छेत्पुरुषआकुलः अन्यथावीर्यपातोहिसहस्रकुलपातकः अन्यथापितदिच्छयाभवतीति **विज्ञानेश्वरः** तत्रऋतौगमनमाह**याज्ञवल्क्यः** षोडशर्तुर्निशास्त्रीणांतस्मिन्युग्मासुसंवसेदिति अनृतावप्याह**गौतमः** ऋतावुपेयात्सर्वत्रवाप्रतिषिद्धवर्जमिति **मनुः** ऋतुःस्वाभाविकःस्त्रीणांरात्रयःषोडशस्मृताः तासामाद्याश्चतस्रस्तुनिंदितैकादशीतथा त्रयोदशीचशेषाःस्युःप्रशस्तादशरात्रयः **मदनरत्नेदेवलः** तस्मात्त्रिरात्रंचांडालींपुष्पितांपरिवर्जयेदिति ।

तसेंच प्रथम ऋतुदर्शनाच्या पूर्वीं स्त्रीगमन करूं नये. कारण, "रजोदर्शनाच्या पूर्वीं स्त्रीयेप्रत गमन करूं नये. गमन करील तर अधःपात ( नरकपात ) होईल. कारण, निरर्थक शुक्रपात केल्यानें ब्रह्महत्येचा दोष प्राप्त होईल" असें तेथेंच **विष्णुधर्मांत आश्वलायन**वचन आहे. हें स्त्रीगमन वर्ज्य सांगितलें तें दहा वर्षांच्या आंतील स्त्री असतां समजावें. कारण, ऋतुदर्शनाच्या पूर्वीं गमनाविषयीं **गौतम** विशेष दाखवितो—"स्त्रीसंगाविषयीं आकुल ( कामातुर ) झालेल्या पुरुषानें सुरतासाठीं गौरी ( दहावर्षांचे ) देखील स्त्रियेप्रत गमन करावें. कारण, स्त्रीसंगावांचून इतर प्रकारानें वीर्यपात झाला तर तो हजारों कुलांना अधःपात करणारा आहे." स्त्रीसंगावांचूनही स्त्रियेची इच्छा झाल्यानें वीर्यपात होतो, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. आतां ऋतूचे ठायीं गमन सांगतो. **याज्ञवल्क्य**—"स्त्रियांना रजोदर्शनापासून सोळा रात्रि ऋतुकाल म्हटला आहे. त्या ऋतुकालांत समरात्रींचेठायीं ( सहाव्या, आठव्या इत्यादि रात्रीं ) गमन करावें." ऋतुभिन्नकालीं देखील सांगतो **गौतम**—"ऋतुकालीं स्त्रियेप्रत गमन करावें. अथवा निषिद्ध दिवस वर्ज्य करून सर्वकालीं ( ऋतुकालीं व अनृतुकालीं ) गमन करावें." **मनु**—"स्त्रियांचा स्वाभाविक ऋतुकाल सोळा रात्री म्हटला आहे. त्या सोळा रात्रींमध्यें पहिल्या चार रात्री, अकरावी आणि तेरावी रात्र ह्या निंदित आहेत. बाकीच्या दहा रात्री प्रशस्त आहेत." **मदनरत्नांत देवल**—"तस्मात् कारणात् रजस्वला स्त्री तीन दिवस चांडालीप्रमाणें वर्ज्य करावी."

तत्रतिथ्यादीनाह**श्रीधरः** षष्ठ्यष्टमींपंचदशींचतुर्थींचतुर्दशीमप्युभयत्रहित्वा शेषाःशुभाःस्युस्तिथयोनिषेकेवाराःशशांकार्यसितेंदुजानाम् उभयत्रपक्षद्वये आर्योगुरुः सितःशुक्रः इंदुजोबुधः विष्णुप्रजेशरविमित्रसमीरपौष्णमूलोत्तरावरुणभानिनिषेककार्ये पूज्यानिपुष्यवसुशीतकराश्विचित्रादित्यश्चमध्यमफलाविफलाःस्युरन्ये विष्ण्वादिदैवत्यनक्षत्राण्युक्तानि**रत्नमालायां** भेशादस्रयमाग्निधातृशशिनःशर्वोदितिर्वाक्पतिःकद्रूजाःपितरोभगोर्यमरवीत्वष्ट्राह्वयोमारुतः शक्राग्नीत्वथमित्रइंद्रनिर्ऋतीतोयंचविश्वेविधिर्गोविंदोवसवोंबुपा-

जचरणाहिर्बुध्न्यपूषाभिधाः उत्तराशब्देनोत्तरात्रयं अत्रमूलस्यपूज्यत्वमुक्तम् **याज्ञवल्क्येनतु** एवंगच्छन्स्त्रियंक्षामांमघांमूलंचवर्जयेदित्युक्तं तेनपूर्वत्रमूलंचिंत्यम् ।

त्या गमनाविषयीं तिथि, वार इत्यादिक सांगतो **श्रीधर**—"षष्ठी, अष्टमी, पंचदशी ( पंधरावी तिथि ), चतुर्थी आणि चतुर्दशी ह्या शुक्ल व कृष्ण दोन्ही पक्षांतील तिथि वर्ज्य करून उरलेल्या बाकीच्या तिथि आणि सोम, गुरु, शुक्र, बुध हे वार स्त्रीगमनाविषयीं प्रशस्त आहेत. विष्णु ( श्रवण ), प्रजापति ( रोहिणी ), रवि ( हस्त ), मित्र ( अनुराधा ), वायु ( स्वाती ), पूषा ( रेवती ), मूल, उत्तरा ( उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा ), वरुण ( शततारका ) हीं नक्षत्रें गर्भाधानाविषयीं शुभ आहेत. पुष्य, वसु ( धनिष्ठा ), चंद्र ( मृगशीर्ष ), अश्विनी, चित्रा, अदिति ( पुनर्वसु ), हीं नक्षत्रें मध्यम आहेत. आणि बाकीचीं नक्षत्रें अशुभ आहेत." वरील श्लोकांत विष्णु इत्यादिक नक्षत्रें सांगितलीं आहेत तीं कोणतीं, हें समजण्याकरितां नक्षत्रांच्या देवता सांगतो **रत्नमालेंत**—"अश्विनीकुमार, यम, अग्नि, धाता ( प्रजापति ), चंद्र, शंकर, अदिति, बृहस्पति, सर्प, पितर, भग, अर्यमा, रवि, त्वष्टा, वायु, इंद्राग्नी, मित्र, इंद्र, निर्ऋति, उदक, विश्वेदेव, विधि, विष्णु, वसु, वरुण, अजचरण, अहिर्बुध्न्य, आणि पूषा, त्या अश्विनीपासून अठ्ठावीस नक्षत्रांच्या देवता अनुक्रमानें आहेत." ह्या वरील श्लोकांत मूल नक्षत्र गर्भाधानाविषयीं शुभ सांगितलें आहे. **याज्ञवल्क्यानें** तर—"याप्रकारें स्त्रियेप्रत गमन करणारानें मघा व मूल नक्षत्र वर्ज्य करावें. असें मूल नक्षत्र वर्ज्य सांगितलें आहे. तेणेंकरून पूर्ववचनांत मूल नक्षत्र उक्त सांगितलें तें चिंत्य ( प्रमाणशून्य ) होय.

अत्रसमासुपुत्राः विषमासुकन्यकेतिज्ञेयम् युग्मासुपुत्राजायंतेस्त्रियोऽयुग्मासुरात्रिष्वितिहेमाद्रौशंखोक्तेः तत्राप्युत्तरोत्तराःप्रशस्ताः तदाह**आपस्तंबः** तत्राप्युत्तरोत्तराप्रशस्तेति तत्रैव**व्यासः** रात्रौचतुर्थ्यांपुत्रःस्यादल्पायुर्धनवर्जितः पंचम्यांपुत्रिणीनारीषष्ठ्यांपुत्रस्तुमध्यमः सप्तम्यामप्रजायोषिदष्टम्यामीश्वरः पुमान् नवम्यांसुभगानारीदशम्यांप्रवरःसुतः एकादश्यामधर्मास्त्रीद्वादश्यांपुरुषोत्तमः त्रयोदश्यांसुतापापावर्णसंकरकारिणी धर्मज्ञश्चकृतज्ञश्चआत्मवेदीदृढव्रतः प्रजायतेचतुर्दश्यांपंचदश्यांपतिव्रता आश्रयःसर्वभूतानांषोडश्यांजायतेपुमानिति अत्रचतुर्थदिननिषेधेपि स्नातांचतुर्थदिवसेरात्रौगच्छेद्विचक्षणइति**महाभारतोक्तेः** चतुर्थेहनिस्नातायांयुग्मासुवागर्भंसंदधातीति**हारीतोक्तेः**विकल्पोज्ञेयः तत्रापि स्नानंरजस्वलायास्तुचतुर्थेहनिशस्यते गम्यानिवृत्तेरजसिनानिवृत्तेकथंचनेत्या**पस्तंबोक्तेः**र्व्यवस्थाज्ञेया ।

ह्या ऋतुकालांत समरात्रीं गमन केलें तर पुत्र व विषम रात्रीं गमन केलें तर कन्या होतात असें जाणावें. कारण, "युग्म ( सम ) रात्रीं पुत्र होतात व विषम रात्रीं कन्या होतात" असें **हेमाद्रींत शंख**वचन आहे. त्यांतही उत्तरोत्तर रात्री प्रशस्त आहेत. तें सांगतो **आपस्तंब**—"त्यांतही उत्तरोत्तर रात्रि प्रशस्त आहेत." तेथेंच **व्यास**—"चवथ्या रात्रीं पुत्र होतो, तो अल्पायुषी व धनरहित होतो. पांचव्या रात्रीं गमन केलें तर पुत्रवती कन्या होते. सहाव्या रात्रीं मध्यम पुत्र होतो. सातव्या रात्रीं प्रजा न होणारी कन्या होते. आठव्या रात्रीं ईश्वरतुल्य पुत्र होतो. नवव्या रात्रीं सुभग कन्या होते. दहाव्या रात्रीं श्रेष्ठ पुत्र होतो. अकराव्या रात्रीं अधर्म करणारी कन्या होते. बाराव्या रात्रीं पुरुषश्रेष्ठ होतो. तेराव्या रात्रीं पापी कन्या वर्णसंकर करणारी अशी होते. चवदाव्या रात्री धर्मवेत्ता उपकार जाणणारा आत्मवेत्ता दृढ व्रत धरणारा असा पुत्र होतो. पंधराव्या रात्रीं पतिव्रता कन्या होते. सोळाव्या रात्रीं सर्व प्राण्यांना आश्रयरूप असा पुरुष होतो." येथें वरील मनु इत्यादिवचनांत चवथ्या दिवसाचा निषेध केला तरी "चवथ्या दिवशीं स्नान केलेल्या स्त्रियेप्रत रात्रीं गमन करावें." ह्या **महाभारत**वचनावरून; व चवथ्या दिवशीं स्नान केलेल्या स्त्रियेचे ठायीं अथवा युग्म ( सम ) रात्रीं पति गर्भसंधान ( स्थापन ) करितो" ह्या **हारीत**वचनावरून चवथ्या रात्रीं विकल्प जाणावा. त्या विकल्पामध्यें देखील "रजस्वलेचें स्नान चवथ्या दिवशीं प्रशस्त आहे. रजाची निवृत्ति झाली असतां स्त्रीप्रत गमन करावें. रजाची निवृत्ति झाली नसेल तर कदापि गमन करूं नये." ह्या **आपस्तंब**वचनावरून व्यवस्था जाणावी.

अत्रसर्वासुयुग्मासुगमनमावश्यकम् युग्मास्वितिबहुवचननिर्देशादिति**विज्ञानेश्वरः** तथैकस्यांरात्रौसकृदेवकार्यं सुस्थइंदौसकृत्पुत्रंलक्षण्यंजनयेत्पुमानिति**याज्ञवल्क्योक्तेः** इदंचर्तौगमनमन्यकालेप्रतिबंधादिनागमनासंभवेश्राद्धैकादश्यादावपिकार्यं ब्रह्मचार्येवपर्वाण्याद्याश्चतस्रश्चवर्जयेदिति**याज्ञवल्क्योक्तेः** व्याख्यातंचेदंमिताक्षरायां यत्रश्राद्धादौब्रह्मचर्यंविहितंतत्राप्यृतौगच्छतोनब्रह्मचर्यस्खलनदोषइति पर्वाणीति बहुत्वेनाष्टमीचतुर्दश्योर्ग्रहणमितिच **मदनरत्नेप्येवं** यत्तुहेमाद्रौशिवरहस्ये दिवाजन्मदिनेचैवतु-

योन्मैथुनंव्रती श्राद्धंदत्वाचभुक्त्वाचश्रेयोर्थीनचपर्वस्विति तदनृतुविषयं ब्रह्मचार्येवभवतियत्रतत्राश्रमेवस-न्निति**मनूक्तेः** दर्शादौतुनभवत्येव पर्वणांपर्युदस्तत्वात् **माधवीयेतु** ऋतुकालंनियुक्तोवानैवगच्छेत्स्त्रियं क्वचित् तत्रगच्छन्समाप्नोतिह्यनिष्टफलमेवत्विति**वृद्धमनूक्तेः** श्राद्धेब्रह्मचर्यंनियतमित्युक्तम् **पृथ्वीचंद्रोद**-येप्येवं एतत्सतिसंभवेज्ञेयं अनेकभार्यस्यर्तुयौगपद्ये**हेमाद्रौकश्यपः** यौगपद्येतुतीर्थानांविवाहक्रमशोव्र-जेत् रक्षणार्थमपुत्रांवाग्रहणक्रमशोपिवेति ग्रहणमृतुग्रहणं **ऋग्विधाने** विष्णुर्योनिंजपेत्सूक्तंयोनिंस्पृष्ट्वात्रि-भिर्व्रती गर्भाधानंततःकुर्यात्सुपुत्रोजायतेध्रुवम् ।

ह्या ऋतुकालीं साऱ्या युग्मरात्रीं गमन अवश्य आहे. कारण, वरील याज्ञवल्क्यवचनांत 'तस्मिन् युग्मासु संवसेत्' म्हणजे ऋतुकालीं युग्म ( सम ) रात्रीं गमन करावें. यांत 'युग्मासु' समरात्रीं, असें बहुवचन केलेलें आहे, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. तें गमन एका रात्रीं एकवारच करावें. कारण, चंद्रबळ असतां पुरुष एकवार गमन करून सुलक्षणी पुत्र उत्पन्न करील" असें **याज्ञवल्क्य**वचन आहे. हें ऋतुकालीं गमन इतर दिवशीं प्रतिबंध वगैरे असल्यामुळें झालें नसेल तर श्राद्धाचा दिवस, एकादशी इत्यादिकांचे ठायीं देखील करावें. कारण, "पर्व दिवस आणि पहिल्या चार रात्री वर्ज्य करून गमन करणारा ब्रह्मचारीच समजावा" असें **याज्ञवल्क्याचें** वचन आहे. या वचनाची व्याख्या **मिताक्षरेंत** केली आहे, ती अशी—जेथें श्राद्धादिकांत ब्रह्मचर्य सांगितलें आहे तेथें देखील ऋतुकालीं गमन करणाराला ब्रह्मचर्यहानिरूप दोष होत नाहीं. आणि त्या वचनांत 'पर्वाणि' ह्या बहुवचनानें अष्टमी व चतुर्दशी यांचें ग्रहण होतें, असेंही **मिताक्षरेंत** सांगितलें आहे. **मदनरत्नां**तही असेंच आहे. आतां जें **हेमाद्रींत शिवरहस्यांत**—"दिवसा, व जन्मदिवशीं मैथुन करूं नये. व्रतस्थानें मैथुन करूं नये. दुसऱ्याच्या श्राद्धांत भोजन करून व आपण श्राद्ध करून मैथुन करूं नये. आणि कल्याणेच्छूनें पर्वांचे ठायीं मैथुन करूं नये" असें सांगितलें तें ऋतुभिन्नकालविषयक आहे. कारण, "कोणत्याही आश्रमांत ( गृहस्थाश्रमांतही ) राहाणारा ऋतुकालीं गमन करील तर तो ब्रह्मचारीच होतो म्हणजे ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट होत नाहीं" असें **मनु**वचन आहे. दर्शादि पर्वांचे ठायीं तर ऋतुकालीं गमन नाहींच. कारण, वरील याज्ञवल्क्यवचनांत पर्वें वगळलीं आहेत. **माधवीयांत** तर—ऋतुकालीं स्त्रीगमनाविषयीं वडिलांनीं नियोग ( आज्ञा ) केली असली तरी श्राद्धदिवशीं स्त्रीगमन कदापि करूं नये. कारण, श्राद्धदिवशीं गमन करणारास अनिष्ट फलच प्राप्त होतें" ह्या **वृद्धमनु**वचनावरून श्राद्धाचे ठायीं ब्रह्मचर्य नियमित आहे, असें सांगितलें आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत**ही असेंच आहे. हें नियमित ब्रह्मचर्य संभवत असतां जाणावें. ज्याला अनेक भार्या आहेत त्याचे अनेक स्त्रियांना एक समयीं ऋतु प्राप्त असतां सांगतो **हेमाद्रींत कश्यप**—"अनेक स्त्रियांना एक समयीं ऋतु प्राप्त असेल तर त्या स्त्रियांप्रत विवाहक्रमानें ( ज्या क्रमानें विवाह झालेला असेल त्या क्रमानें ) गमन करावें. अथवा जिला पुत्र नसेल तिच्या संतोषार्थ पूर्वी तिजप्रत गमन करावें." किंवा ज्या क्रमानें ऋतु प्राप्त असेल त्या क्रमानें गमन करावें." **ऋग्विधानांत**—"व्रतस्थ पुरुषानें स्त्रियेला ऋतु प्राप्त असतां तीन अंगुलींनीं योनीला स्पर्श करून 'विष्णुर्योनिं०' या सूक्ताचा जप करावा, नंतर गर्भाधान ( स्त्रीसंभोग ) करावें, म्हणजे उत्तम पुत्र निश्चयानें होतो."

अगमनेदोषमाह**पराशरः** ऋतुस्नातांतुयोभार्यांसन्निधौनोपगच्छति घोरायांभ्रूणहत्यायांपच्यतेनात्रसं-शयः अस्यापवादमाह**मदनरत्नेव्यासः** व्याधितोबंधनस्थोवाप्रवासेष्वथपर्वसु ऋतुकालेपिनारीणांभ्रूण-हत्याप्रमुच्यते वृद्धांवंध्यामसद्वृत्तांमृतापत्यामपुष्पिणीं कन्यासूंबहुपुत्रांचवर्जयेन्मुच्यतेभयात् वृद्धांगतरजस्कां गर्भाधानांगहोमाकरणेप्रायश्चित्तमाह**पारिजाते आश्वलायनः** गर्भाधानस्याकरणात्तस्यांजातस्तुदुष्यति अकृत्वागांद्विजेदत्वाकुर्यात्पुंसवनंपतिः गर्भाधानंमलमासगुरुशुक्रास्तादावपिकार्यं उत्सवेषुचसर्वेषुसीमंतेऋ-तुजन्मसु सुरासुरेज्ययोश्चैवमौढ्यदोषोनविद्यत इति **ज्योतिर्निबंधेभृगूक्तेः** ऋतुगमने**पराशरः** ऋतौतुगर्भशंकित्वात्स्नानंमैथुनिनःस्मृतं अनृतौतुयदागच्छेच्छौचंमूत्रपुरीषवत् स्त्रीणांतुनस्नानं उभावप्यशु-चीस्यातांदंपतीशयनंगतौ शयनादुत्थितानारीशुचिःस्यादशुचिःपुमानिति **वृद्धशातातपोक्तेः** ।

ऋतुकालीं गमन न केलें असतां दोष सांगतो **पराशर**—"जो मनुष्य संनिध असलेल्या ऋतुस्नात भार्येप्रत गमन

---

१ शौचद्वयं कार्यमित्यर्थः । तच्च वसिष्ठः–एका लिंगे करे तिस्र उभयोर्मृत्तिकाद्वयम् ॥ एकैकया मृदा पादौ प्रक्षाल्य तु शुचिर्भवेत् ॥ मूत्रशौचं समाख्यातं शुक्रे तु द्विगुणं स्मृतं । भृगुः–द्वे लिंगे मृत्तिके देये गुदे पंच करे दश । उभयोः सप्त दातव्या विट्शौचे मृत्तिकाः स्मृताः ॥ शंखः–तिस्रस्तु पादयोर्देयाः शौचकामस्य नित्यशः । शौचे तु वामपूर्वं स्यादन्यत्र स्यात्तु दक्षिणं ॥ शौचादृते वामपादपूर्वं प्रक्षालनं नास्तीत्यर्थः ॥

करीत नाहीं, तो भयंकर अशा भ्रूणहत्या दोषाचे ठायीं पक्क होतो, यांत संशय नाहीं." याचा अपवाद सांगतो **मदनरत्नांत व्यास**—"व्याधिग्रस्त, बंदींत असलेला, किंवा प्रवासांत असलेला, आणि पर्व दिवस असतां पुरुष स्त्रियांच्या ऋतुकालीं देखील गमन न करील तरी त्याला भ्रूणहत्या दोष सुटलेला आहे. वृद्धा ( विटाळ गेलेली ), वांझोटी, असत् वर्तन करणारी, मुलं मरणारी, रजोदर्शन नसलेली, कन्या प्रसवणारी, बहुत पुत्र झालेली, अशा स्त्रियेला वर्ज्य करणारा दोषापासून मुक्त होतो." गर्भाधानांग होम न केला तर प्रायश्चित्त सांगतो **पारिजातांत आश्वलायन**—"गर्भाधान न केल्यानें तिच्या ठिकाणीं झालेला दुष्ट होतो. तें गर्भाधान न करितां गर्भिणी झाली तर पतीनें ब्राह्मणाला गाई देऊन पुंसवन संस्कार करावा." गर्भाधान मलमास, गुरुशुक्रांचें अस्त इत्यादिकांतही करावें. कारण, "सर्व उत्सव, सीमंतसंस्कार, ऋतुदर्शनसंस्कार यांविषयीं गुरुशुक्रांच्या अस्ताचा दोष नाहीं." असें **ज्योतिर्निबंधांत भृगु**वचन आहे. ऋतुगमनाविषयीं सांगतो **पराशर**—"ऋतुकालीं मैथुन करणाऱ्या पुरुषास शंका अगत्यामुळें स्नान सांगितलें आहे. जेव्हां ऋतुभिन्नकालीं गमन करील तेव्हां मूत्र व पुरीष केल्याप्रमाणें शुद्धि करावी." हें ऋतुकालीं स्नान सांगितलें तें पुरुषास समजावें. स्त्रियांना तर स्नान नाहीं. कारण, "एकत्र शयनावर निजलेलीं स्त्री-पुरुष दोघेही अशुचि होतात. शयनापासून उठलेली स्त्री शुद्ध आहे. पुरुष अशुद्ध आहे" असें **वृद्धशातातप**वचन आहे.

अत्रकश्चिद्विशेषउच्यते तत्ररात्रौरजसिजननादौचरात्रिंत्रिभागांकृत्वा आद्यभागद्वयेचेत्पूर्वदिनंग्राह्यं परतस्तूत्तरदिनमिति**मिताक्षरायां** यत्तुप्रागर्धरात्रात्प्राग्वासूर्योदयात्पूर्वदिनंग्राह्यमित्युक्तं तत्रदेशाचाराद्व्यवस्था तथासप्तदशदिनपर्यंतंपुनारजोदर्शनेस्नानमात्रं अष्टादशेएकरात्रं एकोनविंशेद्व्यहः विंशतिप्रभृति त्रिरात्रमितिततएवज्ञेयं यत्तु चतुर्दशदिनादर्वागशुचित्वंनविद्यतइति तत्रस्नानप्रभृतित्वमभिप्रेतं एतच्चयस्याविंशतिदिनोत्तरंप्रायशोरजस्तत्रैव यस्यास्त्वर्वाक्प्रायशोरजस्तत्रोक्तं **स्मृत्यर्थसारे** त्रयोदशदिनादूर्ध्वंप्रायोरजोवतीनामेकादशदिनात्प्रागशुचित्वंनास्ति एकादशदिनेएकरात्रम् द्वादशेद्विरात्रं ऊर्ध्वंत्रिरात्रमिति **प्रयोगपारिजातेप्येवं** रोगजेतुतत्रैवविशेषः **संग्रहे** रोगेणयद्रजःस्त्रीणामन्वहंहिप्रवर्तते नाशुचिस्तुभवेत्तेनयस्माद्वैकारिकंमतमिति कर्माधिकारस्तुरजोनिवृत्तावेव माधवाचारगतावत्स्यात्स्नातापिस्त्रीरजस्वला यावत्प्रवर्तमानंहिरजोनैवनिवर्ततइति**श्राद्धहेमाद्रौशंखोक्तेः** तत्रापिस्वकालेअशुचिरेवेत्याह**ऋष्यशृंगः** रोगजेवर्तमानेपिकालेनिर्यातिकालजं तस्मात्कालेप्रमत्तास्यादन्यथासंकरोभवेत् तथारजस्वलायाःरजस्वलांतरस्पर्शेअकामतःस्नानं कामतःउपवासः पंचगव्याशनंच असवर्णानांतु ब्राह्मण्याःक्षत्रियादिस्पर्शेक्रमेणकृच्छ्रार्धपादोनकृच्छ्रकृच्छ्राः क्षत्रियादीनांतुकृच्छ्रपादएव क्षत्रियादीनांहीनवर्णास्पर्शेत्रिरात्रमुपवासः वैश्याशूद्र्योःपूर्वयास्पर्शेहोरात्रंद्विरात्रंच एतच्चकामतः अकामतस्तुप्राक्शुद्धेरनशनं अकामतःचांडालादिस्पर्शेष्वनशनमेवप्राक्शुद्धेः कामतस्तुप्रथमेह्नित्र्यहः द्वितीयेद्व्यहः तृतीयएकाहः श्वस्पर्शेतुद्व्यहएकाहोवा भुंजानायाश्चांडालादिस्पर्शेषड्रात्रं उच्छिष्टयोःस्पर्शेतुकृच्छ्रइत्यादि**मिताक्षरायांज्ञेयं स्मृत्यर्थसारेतु** सर्वत्रबालापत्यायाःस्पर्शेस्नानेकृतेभुक्तिः पश्चादनशनप्रत्याम्नायइति स्नानविधिंचाह**पराशरः** स्नानेनैमित्तिकेप्राप्तेनारीयदिरजस्वला पात्रांतरिततोयेनस्नानंकृत्वाव्रतंचरेत् सिक्तगात्राभवेदद्भिःसांगोपांगाकथंचन नवस्त्रपीडनंकुर्यान्नान्यद्वासश्चधारयेत्।

ह्या रजोदर्शनाविषयीं कांहीं विशेष सांगतो—रात्रीं रजोदर्शन आणि जननादिक आशौच प्राप्त असतां रात्रीचे तीन भाग करून पहिल्या दोन भागांमध्यें असेल तर पूर्व दिवस धरावा. तिसऱ्या भागांत असेल तर पुढचा दिवस धरावा, असें **मिताक्षरेंत** सांगितलें आहे. आतां जें 'अर्धरात्रीच्या पूर्वी रज वगैरे प्राप्त असतां पहिला दिवस किंवा सूर्योदयापूर्वी प्राप्त असतां पहिला दिवस धरावा, असें सांगितलें आहे, तेथें देशाचारावरून व्यवस्था जाणावी. तसेंच रजोदर्शनदिवसापासून पुनः सतराव्या दिवसापर्यंत रज प्राप्त झालें असतां स्नान मात्र करावें. अठराव्या दिवशीं रज प्राप्त असतां एक दिवस धरावा. एकोणिसाव्या दिवशीं प्राप्त असतां दोन दिवस धरावे. विसाव्या दिवसापासून पुढें प्राप्त असतां तीन दिवस अशुचित्व धरावें, हें सर्व मिताक्षरा ग्रंथापासूनच जाणावें. आतां जें "चवदाव्या दिवसापूर्वी रज प्राप्त झालें असतां अशुचित्व नाहीं" असें सांगितलें आहे, तेथें स्नानादिक जाणावें. म्हणजे चवदाव्या दिवशीं असेल तर स्नान, पंधराव्या दिवशीं असेल तर एक दिवस, सोळाव्या दिवशीं असेल तर दोन दिवस, आणि सतराव्या दिवसापासून पुढें असेल तर तीन दिवस, असा अभिप्राय. हा प्रकार जिला विसाव्या दिवसापुढें प्रायशः रज प्राप्त होत असेल तीविषयींच जाणावा. जिला बहुतकरून लवकर रज प्राप्त

१ रजोवतीनामष्टादशदिनेपि त्रिरात्रमशुचित्वमित्युक्तं ॥

होत असतें तीविषयीं सांगतो **स्मृत्यर्थसारांत**—तेराव्या दिवसापुढें फार करून रजस्वला होणाऱ्या स्त्रियांना अकराव्या दिवसाच्या पूर्वी प्राप्त होईल तर अशुचित्व नाहीं. अकराव्या दिवशीं प्राप्त असतां एक दिवस. बाराव्या दिवशीं प्राप्त असतां दोन दिवस. याच्या पुढें प्राप्त असतां तीन दिवस. **प्रयोगपारिजातांत**ही असेंच आहे. रोगापासून झालेल्या रजाविषयीं तर तेथेंच विशेष सांगतो **संग्रहांत**—"स्त्रियांना रोगानें जें प्रत्यहीं रज प्रवृत्त होतें, त्या योगानें ती स्त्री अशुचि होत नाहीं. कारण, तें रज वैकारिक ( विकारानें झालेलें ) आहे." कर्माविषयीं अधिकार तर रजाची निवृत्ति झाल्यावरच समजावा. कारण, "रजस्वला स्त्री स्नान केली तरी जोंपर्यंत प्रवृत्त झालेलें ( स्रवणारें ) रज निवृत्त ( बंद ) झालें नाहीं, तोंपर्यंत तिनें चांगला आचार ( कर्म ) करूं नये" असें **श्राद्धहेमाद्रींत शंख**वचन आहे. रोगजन्य रज प्रत्यहीं असतां देखील कालिक रजाच्या कालीं अशुचित्व आहे, असें सांगतो **ऋष्यशृंग**—"रोगजन्य रज प्रवृत्त असतांही आपल्या कालीं कालज रज प्रवृत्त होतें तस्मात् त्या कालिक रजाच्या कालीं हें रज रोगज किंवा कालिक, असें जाणण्याविषयीं स्त्रियेनें सावध असावें. सावध नसेल तर कालिक व रोगज यांचा संकर होईल." तसेंच रजस्वलेला दुसऱ्या रजस्वलेचा स्पर्श न समजून झाला असतां स्नान करावें. मुद्दाम स्पर्श करील तर उपवास करावा, आणि पंचगव्य प्राशन करावें. भिन्न जातीच्या स्त्रियांना तर सांगतो—रजस्वला ब्राह्मणीला रजस्वला क्षत्रियेचा स्पर्श झाला तर अर्ध कृच्छ्र, वैश्येचा स्पर्श झाला तर पाऊण कृच्छ्र, शूद्रेचा स्पर्श झाला तर एक कृच्छ्र[1]. आणि क्षत्रियेला, वैश्येला, व शूद्रेला ब्राह्मणीचा स्पर्श असतां पादकृच्छ्रच आहे. रजस्वला क्षत्रियादि स्त्रियांना हीन जातीच्या रजस्वलेचा स्पर्श असतां तीन दिवस उपवास सांगितला आहे. वैश्या व शूद्रा यांना क्षत्रियेचा स्पर्श असतां अनुक्रमानें अहोरात्र आणि द्विरात्र उपवास. हें प्रायश्चित्त मुद्दाम होऊन स्पर्श असतां समजावें. साहजिक स्पर्श होईल तर शुद्धीपर्यंत भोजन करूं नये. साहजिक चांडालादिकांचा स्पर्श झाला तर शुद्धीच्या पूर्वी अभोजनच सांगितलें आहे. चांडालादिकांना मुद्दाम स्पर्श केला तर प्रथम दिवशीं स्पर्श असतां तीन दिवस उपवास. दुसऱ्या दिवशीं स्पर्श केला तर दोन दिवस उपवास करावा. तिसऱ्या दिवशीं स्पर्श केला तर एक दिवस उपवास. कुत्र्याचा स्पर्श झाला तर दोन किंवा एक दिवस उपवास करावा. रजस्वला भोजन करीत असतां चांडालादिकांचा स्पर्श होईल तर सहा दिवस व्रत ( उपवासादि ) करावें. रजस्वला स्त्रिया उच्छिष्ट असतां त्यांचा परस्पर स्पर्श झाला तर कृच्छ्र प्रायश्चित्त करावें, इत्यादि प्रकार **मिताक्षरें**तून जाणावें. **स्मृत्यर्थसारांत** तर—मूल लहान असलेल्या रजस्वलेला वर सांगितलेल्या सर्व स्पर्शांविषयीं स्नान केल्यावर भोजन आहे. नंतर उपवासाचा प्रतिनिधि सांगितला आहे. नैमित्तिक स्नानाचा विधि सांगतो **पराशर**—"नैमित्तिक स्नान प्राप्त असतां जर स्त्री रजस्वला असेल तर तिनें बुडी न मारतां पात्रांत उदक घेऊन स्नान करून व्रत ( रजस्वलाधर्म ) करावें. तिचीं मुख्य अंगें व उपांगें उदकानें भिजतील असें कसेंही तिनें स्नान करावें. वस्त्र पिळूं नये व दुसरें वस्त्र नेसूं नये."

**अथरजस्वलास्नानं दैवज्ञवल्लभः** ब्रह्मानुराधाश्विनसोमभेपुहस्तानिलाखंडलवासवेपु विश्वार्यमर्क्षोत्तरभाद्रभेषुवरांगनास्नानविधिःप्रदिष्टः **ज्वरेतूशनाः** ज्वराभिभूतायानारीरजसाचपरिप्लुता कथंतस्याभवेच्छौचंशुद्धिःस्यात्केनकर्मणा चतुर्थेहनिसंप्राप्तेस्पृशेदन्यातुतांस्त्रियं सासचैलावगाह्यापःस्नात्वास्नात्वापुनःस्पृशेत् दशद्वादशकृत्वोवाआचामेच्चपुनःपुनः अंतेचवाससांत्यागस्ततःशुद्धाभवेत्तुसेति इदंचातुरमात्रेज्ञेयं आतुरेस्नानउत्पन्नेदशकृत्वोह्यनातुरइति**पराशरोक्तेः** रजसोज्ञानेतु**पराशरमाधवीयेप्रजापतिः** अविज्ञातेमलेसाचमलवद्वसनायदि कृतंगृहेषुदुष्टंस्याच्छुद्धिस्तस्यास्त्रिरात्रतः **देवजानीयेकारिकायां** उच्छिष्टातुद्विजातीनांरजःस्त्रीयदिपश्यति उपवासमधोच्छिष्टेऊर्ध्वोच्छिष्टेत्र्यहंक्षिपेदिति ।

## आतां रजस्वलास्नान सांगतो.

**दैवज्ञवल्लभ**—"रोहिणी, अनुराधा, अश्विनी, मृगशीर्ष, हस्त, स्वाती, ज्येष्ठा, धनिष्ठा, उत्तराषाढा, उत्तरा, उत्तराभाद्रपदा, या नक्षत्रांचे ठायीं श्रेष्ठ स्त्रियांना स्नान सांगितलें आहे." ज्वर असेल तर सांगतो **उशना**—"जी स्त्री ज्वरानें व्याप्त असून रजस्वला झाली असेल तिचें शौच कसें होईल ? व कोणत्या कर्मानें तिची शुद्धि होईल ? चवथा दिवस प्राप्त झाल्यावर दुसऱ्या स्त्रियेनें तिला स्पर्श करून उदकांत वस्त्रसहित बुडी मारून पुनः स्पर्श करून स्नान करावें. याप्रमाणें दहावेळां किंवा बारावेळां स्नान करावें आणि वारंवार ( प्रत्येक स्नानानंतर ) आचमन करावें. रजस्वला स्त्रियेनें प्रत्येक वेळीं वस्त्र पालटावें. अंतीं सारीं वस्त्रें टाकून द्यावीं. असें केल्यानें ती रजस्वला स्त्री शुद्ध होईल." हा स्नानप्रकार सर्व आतुरांच्या स्नानाविषयीं समजावा. कारण, "आतुरांना नैमित्तिक स्नान प्राप्त असतां अनातुर ( निरोगी ) असेल त्यानें दहावेळां स्नान करावें" असें **पराशर**वचन आहे. रजाचें अज्ञान असेल तर सांगतो **पराशरमाधवीयांत प्रजापति**—"स्त्रियेला रजाचें ज्ञान झालें नसतां तिचें वस्त्र जर रजानें भरलें असेल तर तिनें घरांत केलेलें कर्म दूषित होईल. व तिची शुद्धि

१ कृच्छ्र इत्यादिकांचीं लक्षणें ग्रंथाच्या शेवटीं सांगणार आहों. तीं तेथें पाहावीं.

तीन दिवसांनीं होईल." **देवजानीयांत कारिकेंत**—"ब्राह्मणादिकांची स्त्री उच्छिष्ट असून रजस्वला होईल तर सांगतो—अधरोच्छिष्ट असून झाली तर उपवास. आणि ऊर्ध्वोच्छिष्ट असून झाली तर तिनें तीन दिवस उपवासव्रत करावें."

**अथपुंसवनं प्रयोगपारिजातेजातूकर्ण्यः** द्वितीयेवातृतीयेवामासिपुंसवनंभवेत् व्यक्तेगर्भे भवेत्कार्यंसीमंतेनसहाथवा **बृहस्पतिः** तृतीयेमासिकर्तव्यंगृष्टेरन्यत्रशोभनं गृष्टेश्चतुर्थेमासेतुषष्ठेमास्यथवाष्टमे सकृत्प्रसूतागृष्टिः एतेनप्रतिगर्भमपिभवतीतिविज्ञायते **बह्वृचकारिकापि** कर्तास्याद्देवरस्तस्यायस्याःपत्युरसंभवः आवर्ततइदंकर्मप्रतिगर्भमितिस्थितिः **ब्राह्मे** गर्भाधानादिसंस्कर्तापतिः[२]श्रेष्ठतमःस्मृतः अभावेस्वकुलीनःस्याद्बांधवोवान्यगोत्रजः **मदनरत्नेसत्यव्रतः** मृतोदेशांतरगतोभर्तास्त्रीयद्यसंस्कृता देवरोवागुरुर्वापिवंश्योवापिसमाचरेत् **हेमाद्रौयमः** प्रथमेमासिद्वितीयेवायदापुंनक्षत्रेणचंद्रमायुक्तःस्यादितिव**राहः** हस्तोमूलंश्रवणःपुनर्वसुर्मृगशिरस्तथापुष्यः पुंसंज्ञकेषुकार्येष्वेतानिशुभानिधिष्ण्यानि अनूराधापिपुंनक्षत्रं अनूराधान्हविषावर्धयंतइतिश्रुतेः **गर्गोपि** पुन्नामाश्रवणस्तिष्योहस्तश्चैवपुनर्वसुः अभिजित् प्रोष्ठपाच्चैवअनूराधास्तथाश्वयुक् **नृसिंहः** रिक्तांपर्वचनवमीत्यक्त्वापुंसवनेशुभाः **ज्योतिर्निबंधेवसिष्ठः** मृत्युश्चसौरेस्तनहानिरिंदोर्मृतप्रजापुंसवनेबुधस्य काकीववंध्याभवतीहशुक्रेस्त्रीपुत्रलाभोरविभौमजीवैः अन[३]वलोभनस्याप्ययमेवकालः **दीपिकायांतुचतुर्थेऽनवलोभनमित्युक्तम् ।**

## आतां पुंसवन सांगतो.

**प्रयोगपारिजातांत जातूकर्ण्य**—"गर्भधारणापासून दुसऱ्या किंवा तिसऱ्या मासांत पुंसवन संस्कार होतो. पुंसवन संस्कार गर्भ व्यक्त ( स्पष्ट ) झाल्यावर करावा. किंवा सीमंतोन्नयनासह करावा." **बृहस्पति**—"गृष्टि ( एकवार प्रसूत स्त्री ) वर्ज्य करून इतर स्त्रियेचें पुंसवन तिसऱ्या मासांत करावें, तें शुभ आहे. गृष्टीचें चवथ्या किंवा सहाव्या अथवा आठव्या मासांत करावें." या वचनावरून पुंसवन संस्कार प्रत्येक गर्भालाही होतो, असें समजतें. **बह्वृचकारिका ही**—"जिच्या पतीचा असंभव असेल तिच्या त्या संस्काराचा कर्ता दीर होईल. त्या पुंसवनकर्माची प्रत्येक गर्भाला आवृत्ति होते, अशी शास्त्रमर्यादा आहे." **ब्राह्मांत**—"गर्भाधानादिक संस्काराचा कर्ता पति मुख्य आहे. पतीच्या अभावीं आपल्या कुलांतील पुरुष, अथवा अन्यगोत्रज बांधव कर्ता होय." **मदनरत्नांत सत्यव्रत**—"भर्ता मृत झाला किंवा देशांतरीं गेला असून जर स्त्रियेचा संस्कार झाला नसेल तर तिचा दीर किंवा गुरु अथवा वंशांतील पुरुष यानें तिचा संस्कार करावा." **हेमाद्रींत यम**—"पहिल्या मासांत किंवा दुसऱ्या मासांत ज्या वेळीं पुरुष नक्षत्रानें युक्त चंद्रमा असेल त्या वेळीं पुंसवन करावें." **वराह**—"हस्त, मूल, श्रवण, पुनर्वसु, मृगशीर्ष, पुष्य हीं पुरुषनांवाच्या कर्माविषयीं शुभ आहेत." अनुराधा देखील पुंनक्षत्र आहे. कारण, "अनूराधा जे त्यांना हवीनें वाढविणारे" अशी श्रुति आहे. या श्रुतींत 'अनूराधान्' असा पुल्लिंगनिर्देश आहे. **गर्गही**—"श्रवण, पुष्य, हस्त, पुनर्वसु, अभिजित्, प्रोष्ठपदा ( अषाढा ), अनुराधा, आणि अश्विनी हीं पुंनक्षत्रें होत." **नृसिंह**—"रिक्ता तिथि, पर्व ( अमा, पूर्णिमा ), नवमी ह्या तिथि टाकून बाकीच्या तिथि पुंसवनाविषयीं शुभ आहेत." **ज्योतिर्निबंधांत वसिष्ठ**—"शनिवारीं पुंसवन झालें असतां मृत्यु येतो. इंदुवारीं स्तनहानि होते. बुधवारीं पुंसवन असतां प्रजा मरते. शुक्रवारीं काकवंध्या ( एकवार प्रसवणारी ) होते. रविवारीं, भौमवारीं, गुरुवारीं पुंसवन केलें असतां कन्या व पुत्र होतात." अनवलोभन संस्काराचा देखील हाच काल आहे. **दीपिकेंत** तर चवथ्या मासांत अनवलोभन होतें, असें सांगितलें आहे.

**अथसीमंतः हेमाद्रौबैजवापः** अथसीमंतोन्नयनंचतुर्थेपंचमेषष्ठेचेति **वसिष्ठः** चतुर्थेसप्तमेमासिषष्ठेवाप्यथवाष्टमे **हेमाद्रौशंखः** गर्भस्पंदनेसीमंतोन्नयनंयावद्वानप्रसवः **कार्ष्णाजिनिः** गर्भलंभनमारभ्ययावन्नप्रसवस्तदा सीमंतोन्नयनंकुर्याच्छंखस्यवचनंयथा मासश्चात्रसौरःसावनोवा **कालविधाने** चतुर्थषष्ठाष्टममासभाजिसौरेणगर्भेप्रथमेविधेयं सीमंतकर्मद्विजभामिनीनांमासेष्टमेविष्णुबलिंचकुर्यात् **वसिष्ठः** चतुर्थेसावनेमासिषष्ठेवाप्यथवाष्टमे **ज्योतिर्निबंधेनारदः** अरिक्तापर्वदिवसेकुजजीवार्कवासरे

---

१ मूत्रपुरीष केल्यावर प्रक्षालनादि शौच करण्याच्या पूर्वीच्या स्थितीला अधरोच्छिष्ट म्हणतात. आणि भोजनोत्तर मुख प्रक्षालनादि करण्याच्या पूर्वीच्या स्थितीला ऊर्ध्वोच्छिष्ट म्हणतात. २ पिता श्रेष्ठतमः स्मृतः इति पाठांतरं. ३ नावलुप्यते गर्भोऽनेनेति व्युत्पत्त्या अनवलोभनकर्मणः गर्भाविनाशकत्वलाभात् प्रतिगर्भमावृत्तिर्लभ्यते. सकृत् संस्कृतानामपि सर्वगर्भेषु संस्कृतेति देवजानीयं तु सीमंतविषयमितितदाशयः विज्ञानेश्वरादिभिः अनयोः सकृत्करणसिद्धांतितत्वादेते सकृदेव कुर्वंति ॥

**कालविधाने** सीमंतेतिष्यहस्तादितिहरिशशभृत्पौष्णविध्युत्तराख्याःपक्षच्छिद्रंचरिक्तांपितृतिथिमपहायापराःस्युःप्रशस्ताः अदितिःपुनर्वसुः पक्षच्छिद्रंचाह **वसिष्ठः** चतुर्दशीचतुर्थीचअष्टमीनवमी तथा षष्ठीचद्वादशीचैवपक्षच्छिद्राःप्रकीर्तिताः क्रमादेतासुतिथिषुवर्जनीयाश्चनाडिकाः भूता ५ ष्ट ८ मनु १४ तत्वां २५ क ९ दश १० शेषास्तुशोभनाः **कालनिर्णये** शुभसंस्थेनिशानाथेचतुर्थींचचतुर्दशीं पौर्णमासींप्रशंसंतिकेचित्सीमंतकर्मणि **बृहस्पतिः** पूर्वपक्षःशुभःप्रोक्तःकृष्णश्चांत्यत्रिकंविना चतुर्दशीचतुर्थीचशुक्लपक्षेशुभप्रदे **नारदः** विप्रक्षत्रिययोःकुर्याद्दिवासीमंतकर्मतत् वैश्यशूद्रकयोरेतद्दिवानिश्यपिकेचन वाराःपूर्वोक्ताएव।

## आतां सीमंत संस्कार सांगतो—

**हेमाद्रींत बैजवाप**—"आतां सीमंतोन्नयन चवथ्या, पांचव्या व सहाव्या मासांत करावें." **वसिष्ठ**—"चवथ्या किंवा सातव्या अथवा सहाव्या किंवा आठव्या मासांत सीमंतोन्नयन करावें." **हेमाद्रींत शंख**—"गर्भाचें चलन होऊं लागलें असतां सीमंतोन्नयन करावें. अथवा जोंपर्यंत प्रसूत झाली नाहीं तोंपर्यंत करावें." **कार्ष्णाजिनि**—"गर्भधारणाला आरंभ करून जोंपर्यंत प्रसूती झाली नाहीं तोंपर्यंत सीमंतोन्नयन करावें, असें शंखाचें वचन आहे." ह्या सीमंतोन्नयनाविषयीं वर सांगितलेला मास तो सौर ( संक्रांतिमास ) किंवा सावन ( तीस दिवसांचा ) घ्यावा. **कालविधानांत**—"द्विजस्त्रियांचा सीमंत संस्कार सौरमानानें चवथा किंवा सहावा अथवा आठवा मास प्रथम गर्भाला असतां करावा. आणि आठव्या मासांत विष्णुबलि करावा." **वसिष्ठ**—"सावन ( तीस दिवसांच्या ) चवथ्या किंवा सहाव्या अथवा आठव्या मासांत सीमंतसंस्कार करावा." **ज्योतिर्निबंधांत नारद**—"रिक्ता तिथि, पर्वदिवस वर्ज्य करून भौम, गुरु, रवि, यांच्या वारीं सीमंत करावा." **कालविधानांत**—"सीमंताविषयीं पुष्य, हस्त, पुनर्वसु, श्रवण, मृगशीर्ष, रेवती, अभिजित् तीन उत्तरा हीं नक्षत्रें प्रशस्त आहेत. पक्षच्छिद्र ( पुढील श्लोकांत उक्त ), रिक्ता व पितृतिथि ह्या वर्ज्य करून बाकीच्या तिथि प्रशस्त आहेत." पक्षछिद्र सांगतो **वसिष्ठ**—"चतुर्दशी, चतुर्थी, अष्टमी, नवमी, षष्ठी आणि द्वादशी ह्या तिथि पक्षच्छिद्र म्हटल्या आहेत. ह्या तिथींच्या अनुक्रमानें ५।८।१४।२५।९।१० ह्या घटिका वर्ज्य करून शेष घटिका शुभ आहेत." **कालनिर्णयांत**—"चंद्र शुभ राशीस असतां चतुर्थी, चतुर्दशी व पौर्णमासी ह्या सीमंतकर्माविषयीं प्रशस्त आहेत, असें केचित् सांगतात." **बृहस्पति**—"शुक्लपक्ष शुभ आहे. आणि कृष्णपक्ष शेवटचे पांच दिवस वर्ज्य करून शुभ आहे. शुक्लपक्षांतील चतुर्थी व चतुर्दशी ह्या शुभ आहेत." **नारद**—"ब्राह्मण व क्षत्रिय यांचें सीमंतकर्म दिवसा करावें. वैश्य व शूद्र यांचें सीमंतकर्म दिवसा व रात्रींही करावें, असें कोणी सांगतात." वार पूर्वीं सांगितले आहेतच.

एतच्चसकृत्कार्यमिति **विज्ञानेश्वरः** सकृच्चसंस्कृतानारीसर्वगर्भेषुसंस्कृतेति **देवलोक्तेः** सकृत् प्रतिगर्भंवाकार्यमिति **हेमाद्रिः** सकृच्चकृतसंस्काराःसीमंतेनद्विजस्त्रियः यंयंगर्भंप्रसूयंतेससर्वःसंस्कृतोभवेदिति **हारीतोक्तेः** सीमंतोन्नयनंकर्मनस्त्रीसंस्कारइष्यते केचिद्गर्भस्यसंस्कारात्प्रतिगर्भंप्रयुंजतइति **हेमाद्रौविष्णुवचनाच्च** सएव स्त्रीयद्यकृतसीमंताप्रसूयेतकथंचन गृहीतपुत्राविधिवत्पुनःसंस्कारमर्हति सीमंतेभोजनेप्रायश्चित्तमुक्तं **पराशरमाधवीयेधौम्येन** ब्रह्मौदनेचसोमेचसीमंतोन्नयनेतथा जातकर्मनवश्राद्धेभुक्त्वाचांद्रायणंचरेत् **ऋग्विधानेतु** अराइवेजपेन्मंत्रंशतवारंनसंशयः सीमंतेचयदाभुंक्तेमुच्यतेकिल्बिषात्तदेति।

हें सीमंतकर्म एकवार करावें, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. कारण, "एकवार संस्कृत झालेली स्त्री सर्व गर्भाचे ठायीं संस्कृत आहे" असें **देवल**वचन आहे. एकवार करावें किंवा प्रतिगर्भाला करावें, असें **हेमाद्रि** सांगतो. कारण, "सीमंत संस्कारानें एकवार संस्कार केलेल्या द्विजस्त्रिया ज्या ज्या गर्भाला प्रसवतात तो तो गर्भ संस्कृत होतो" असें **हारीत**वचन आहे. यावरून एकवार करावें असें झालें. आणि "सीमंतोन्नयन हें कर्म स्त्रीसंस्कार होत नाहीं, म्हणून केचित् विद्वान गर्भसंस्कार असल्यामुळें प्रतिगर्भाला सीमंत करितात" असें **हेमाद्रींत विष्णु**वचनही आहे. तोच सांगतो—"स्त्रियेचा सीमंत केलेला नसून ती जर प्रसूत होईल तर पुत्रासहित त्या स्त्रियेचा पुनः यथाविधि संस्कार करावा." सीमंत संस्काराचे ठायीं भोजन केलें असतां प्रायश्चित्त सांगतो **पराशरमाधवीयांत धौम्य**—"ब्रह्मौदन, सोमयाग, सीमंतोन्नयन, जातकर्म, नवश्राद्ध यांचे ठायीं भोजन केलें असतां चांद्रायण करावें." **ऋग्विधानांत** तर—"जेव्हां सीमंताचे ठायीं भोजन करील तेव्हां 'अराइवे०' या मंत्राचा शंभरवेळां जप करावा, म्हणजे पातकापासून मुक्त होईल, यांत संशय नाहीं."

---

१ कात्यायनानां तु प्रतिगर्भमावर्तनीयमिति धर्मसिंधुः. २ जातश्राद्धे तथाभुक्त्वा भोक्ता चांद्रायणं चरेदिति पाठांतरं धर्माब्धिसारे.

## अथगर्भिणीतत्पतिधर्माः

**वराहः** सामिषमशनंयत्नात्प्रमदापरिवर्जयेदतःप्रभृति **गृह्यकारिका** अंगारभस्मास्थिकपालचुल्लीशूर्पादिकेषूपविशेन्ननारी सोलूखलाद्येदृषदादिकेवायंत्रेतुपाद्येनतथोपविष्टा नोमार्जनीगोमयपिंडकादौकुर्याज्ञवारिण्यवगाहनंसा अंगारभूत्याननखैर्लिखेत्क्ष्मांकलिंवपुर्भंगमथोनकुर्यात् नोमुक्तकेशीविवशाथवास्यान्नुंक्तेनसंध्यावसरेनशेते नामंगलंवाक्यमुदीरयेत्साशून्यालयंवृक्षतलंनयायात् **विष्णुधर्मोत्तरे** कटुतीक्ष्णकषायाणिअत्युष्णलवणानिच आयासंचव्यवायंचगर्भिणीवर्जयेत्सदेति **हेमाद्रौकौंडिण्यः** मुंडनंपिंडदानंचप्रेतकर्मचसर्वशः नजीवत्पितृकःकुर्याद्गुर्विणीपतिरेवच **मिताक्षरायां** उदन्वतोंभसिस्नानंनखकेशादिकर्तनं अंतर्वत्न्याःपतिःकुर्यान्नप्रजाजायतेध्रुवं **पृथ्वीचंद्रोदयेगारुडे** गयायांपिंडदानस्यनकदाचिन्निराक्रिया अत्रकालेदाप्रत्ययस्मृतेर्निषिद्धकालस्यैवापवादोनतुजीवत्पितृकगर्भिणीपत्याशौचादिनिमित्तस्य निमित्तसंयोगस्यकालसंयोगाद्भेदेनापवादाभावात् अग्निहोत्रवन्यावज्जीवपरत्वाभावात् अन्यथाऽऽशौचेपिगयायात्राश्राद्धंचस्यात् यत्रनिमित्तसंयोगस्यापवादोयथाशौचेग्निहोत्रादेर्यथावाजीवत्पितृकस्यापवादोमातुर्गयान्वष्टक्यादौतदेवभवतिनान्यदितिसंक्षेपः ।

**आतां गर्भिणी व गर्भिणीपति यांचे धर्म सांगतो—वराह—**"गर्भधारण झाल्यापासून स्त्रियेनें मांसभक्षण यत्नानें वर्ज्य करावें." **गृह्यकारिका—**"कोळसे, भस्म, हाडें, खापऱ्या, चूल, शूर्प इत्यादिकांचे ठायीं गर्भिणीनें बसूं नये. तसेंच पाषाण-काष्ठ इत्यादिकांचें उखळ, मुसळ, जातें यांच्यावर; तुष, केश इत्यादिकांवर तिनें बसूं नये. केरसुणी, शेणी इत्यादिकांचे ठायीं गर्भिणीनें बसूं नये. उदकांत बुडी मारूं नये. कोळसे, भस्म, नखें, यांनीं भुईवर रेषा काढूं नये. कलह, अंग पिळणें हें गर्भिणीनें करूं नये. केश मोकळे सोडून राहूं नये. व उद्विग्न असूं नये. संध्यासमयीं भोजन व शयन करूं नये. अमंगळ वाक्य उच्चारूं नये. गर्भिणीनें शून्य घरीं व झाडाखालीं जाऊं नये. **विष्णुधर्मोत्तरांत—**"तिखट, तीक्ष्ण, तुरट, अतिउष्ण, अतिखारट, आयास, मैथुन हीं गर्भिणीनें सदा वर्ज्य करावीं." **हेमाद्रींत कौंडिण्य—**"मुंडन (क्षौर), पिंडदान, आणि सर्व प्रेतकर्म हें जीवत्पितृकानें व गर्भिणीपतीनें करूं नये." **मिताक्षरेंत—**"समुद्राच्या उदकांत स्नान आणि नखें व केश यांचें छेदन गर्भिणीपति करील तर प्रजा होणार नाहीं." **पृथ्वीचंद्रोदयांत गारुडांत—**"गयेंत पिंडदानाचा कदापि निषेध नाहीं." येथें 'कदा' या पदांत काल, या अर्थी 'दा' प्रत्यय श्रुत असल्यामुळें इतर वचनानें पिंडदानाला निषिद्ध जो काल ( तिथिवारादि ) त्याचाच अपवाद हें वचन आहे. जीवत्पितृकत्व, गर्भिणीपतित्व, आशौच इत्यादिनिमित्तक जो निषेध त्याचा अपवाद हें वचन नाहीं. कारण, निमित्तसंयोग ( जीवत्पितृकत्वादि ) आणि कालसंयोग ( तिथ्यादि ) हे भिन्न असल्यामुळें कालबोधक वचन विजातीय असल्यानें निमित्तसंयोगाचा अपवाद होत नाहीं. जसें—'ब्राह्मणेभ्यो दधि दीयतां, तक्रं कौंडिन्याय' येथें कौंडिन्याला तक्रदान सांगितल्यानें त्या तक्रदानाचें सजातीय जें दधिदान त्याचा बाध होतो. इतर दानाचा बाध होत नाहीं—तसें येथें समजावें. अग्निहोत्रहोम जसा यावज्जीवपर्यंत आहे, तसें गयेंतील पिंडदान यावज्जीवपर्यंत असतें तर सर्व निषेधांचा अपवाद हें वचन झालें असतें; पण यावज्जीवपर्यंत हें पिंडदान नाहीं. असें न मानिलें तर आशौचांत देखील गयायात्रा व गयाश्राद्ध होईल. म्हणून हें वचन निमित्तसंबंधी निषेधाचा अपवाद नाहीं. ज्या ठिकाणीं निमित्तसंबंधी निषेधाचा अपवाद सांगितला आहे, जसा—आशौचांत अग्निहोत्रादिकांविषयीं अपवादवचन आहे. अथवा जीवत्पितृकाला मातृगया, अन्वष्टक्य इत्यादिकांत पिंडदानाविषयीं अपवाद आहे तेंच होतें. इतर होत नाहीं. अर्थात् जीवत्पितृक, गर्भिणीपति इत्यादिकांना गयेंत पिंडदानाविषयीं अपवाद वचन नाहीं, हें संक्षेपानें सांगितलें आहे असें समजावें.

**प्रयोगपारिजातेकश्यपः** गर्भिणीकुंजराश्वादिशैलहर्म्यादिरोहणम् व्यायामंशीघ्रगमनंशकटारोहणं त्यजेत् शोकंरक्तविमोक्षंचसाध्वसंकुक्कुटासनं व्यवसायंदिवास्वापंरात्रौजागरणंत्यजेत् **मदनरत्नेस्कांदे** हरिद्रांकुंकुमंचैवसिंदूरंकज्जलंतथा कूर्पासकंचतांबूलंमांगल्याभरणंशुभं केशसंस्कारकबरीकरकर्णविभूषणं भर्तुरायुष्यमिच्छंतीवर्जयेद्गर्भिणीनहि **बृहस्पतिः** चतुर्थमासिषष्ठेवाप्यष्टमेगर्भिणीयदा यात्रानित्यंविवर्ज्यास्यादाषाढेतुविशेषतः **याज्ञवल्क्यः** दौहृदस्याप्रदानेनगर्भोदोषमवाप्नुयात् वैरूप्यंमरणंवापितस्मात्कार्यं प्रियंस्त्रियाः दौहृदंगर्भिणीप्रियम् **तत्रैवाश्वलायनः** वपनंमैथुनंतीर्थंवर्जयेद्गर्भिणीपतिः श्राद्धंचसप्तमान्मासादूर्ध्वंनान्यत्रवेदवित् श्राद्धंतद्भोजनमितिप्रयोगपारिजातः **कालविधानेमुहूर्तदीपिकायांच**

क्षौरंशवानुगमनंनखकृंतनंचयुद्धादिवास्तुकरणंत्वतिदूरयानं उद्वाहमौपनयनंजलधेश्चगाहमायुःक्षयार्थमिति-गर्भिणिकापतीनां **रत्नसंग्रहेगालवः** दहनंवपनंचैवचौलंवैगिरिरोहणं नावआरोहणंचैववर्जयेद्गर्भिणी-पतिः अन्यत्रापि प्रव्यक्तगर्भापतिरब्धियानंमृतस्यवाहंक्षुरकर्मसंगं तस्यांतुयत्नेनगयादितीर्थयागादिकंवास्तु-विधिंनकुर्यात् प्रव्यक्तगर्भावनिताभवेन्मासत्रयात्परं षण्मासात्परतःसूतिर्नवमेरिष्टवासिनी ।

**प्रयोगपारिजातांत कश्यप**—"गर्भिणीनें हत्ती, घोडा, पर्वत, घराचा उच्च प्रदेश यांजवर चढूं नये. व्यायाम करणें, जलद चालणें, गाडीवर बसणें हें गर्भिणीनें वर्ज्य करावें. तसेंच शोक, रक्तस्राव, भीति, कुक्कुटासन, व्यवसाय, दिवसा निद्रा, आणि रात्रीं जागरण, हीं वर्ज्य करावीं." **मदनरत्नांत स्कांदांत**—"हळद, कुंकू, सेंदूर, काजळ, कूर्पासक, तांबूल, मांगल्याभरण, केशसंस्कार, केशांतील हातांतील व कानांतील अलंकार, हीं भर्त्याचें आयुष्य इच्छिणाऱ्या गर्भिणीनें वर्ज्य करूं नयेत." **बृहस्पति**—"गर्भिणीनें चवथ्या किंवा सहाव्या अथवा आठव्या मासांत यात्रा ( परगांवीं जाणें ) सदा वर्ज्य करावी. आषाढ मासांत तर विशेषेंकरून वर्ज्य करावी." **याज्ञवल्क्य**—"डोहाळे न पुरविल्यामुळें गर्भाला दोष प्राप्त होईल. त्या योगानें गर्भ विरूप होईल किंवा मरेल, म्हणून स्त्रियेला प्रिय असेल तें करावें." दौहृद म्हणजे डोहाळे, तेंच गर्भिणीप्रिय होय. तेथेंच **आश्वलायन**—"गर्भिणीच्या पतीनें वपन, मैथुन, तीर्थ व श्राद्धभोजन हीं गर्भिणीस सातवा महिना लागल्यावर वर्ज्य करावीं. पूर्वी वर्ज्य नाहींत." येथें श्राद्ध म्हणजे श्राद्धभोजन, असें **प्रयोगपारिजात** सांगतो. **कालविधानांत** आणि **मुहूर्तदीपिकेंत**–"क्षौर, प्रेताबरोबर गमन, नखें काढणें, युद्धादि करणें, घर बांधणें, अति दूर गमन करणें, विवाह, उपनयन, समुद्रस्नान, हीं कर्मे गर्भिणीपतीला आयुष्य नाश करणारीं आहेत." **रत्नसंग्रहांत गालव**—"दाह, वपन, चौल, पर्वतावर चढणें, नावेवर चढणें, हीं गर्भिणीपतीनें वर्ज्य करावीं." **अन्य ग्रंथांत**ही—"जी प्रव्यक्तगर्भा ( जिचा गर्भ चांगला व्यक्त झाला ) तिच्या पतीनें समुद्रयान, प्रेत वाहणें, श्मश्रुकर्म, गर्भिणीचा संग, गयादि-तीर्थगमन, यज्ञादिकर्मे, घर बांधणें, हीं करूं नयेत." तीन महिन्यांच्या पुढें स्त्रियेचा गर्भ चांगला व्यक्त होतो म्हणून ती प्रव्यक्तगर्भा म्हटली आहे. सहा मासांपुढें सूति म्हटली आहे. आणि नवव्या मासांत अरिष्ट ( सूतिकागृह ) वास करणारी होय."

**अथसूतिकागृहप्रवेशः गर्गः** रोहिण्यैंदवपौष्णेषुस्वातीवरुणयोरपि पुनर्वसौपुष्यहस्तधनिष्ठात्र्युत्तरासुच मैत्रेत्वाष्ट्रेतथाश्विन्यांसूतिकागारवेशनम् एतच्चसंभवे प्रसूतिसमयेकालेसद्यएवप्रवेशयेदिति **वसिष्ठोक्तेः** तच्चनैर्ऋत्यांकार्यं वारुण्यांभोजनगृहंनैर्ऋत्यांसूतिकागृहमिति **वसिष्ठोक्तेः विष्णुधर्मे** दशाहंसूतिकागारमायुधैश्चविशेषतः वह्निनातिंदुकालातैःपूर्णकुंभैःप्रदीपकैः मुसलेनतथावारिवर्णकैश्चित्रितेनचेति ।

## आतां प्रसूतिघरांत प्रवेश सांगतो.

**गर्ग**—"रोहिणी, मृग, रेवती, स्वाती, शततारका, पुनर्वसु, पुष्य, हस्त, धनिष्ठा, तीन उत्तरा, अनुराधा, चित्रा, अश्विनी या नक्षत्रांवर गर्भिणीनें प्रसूतिघरांत प्रवेश करावा." हीं नक्षत्रें मिळण्याचा संभव असेल तर घ्यावीं. कारण, "प्रसूतिसमय प्राप्त झाला असतां तत्कालींच प्रसूतिगृहांत प्रवेश करवावा" असें **वसिष्ठ**वचन आहे. तें प्रसूतिगृह नैर्ऋति दिशेस करावें. कारण, "पश्चिमदिशेस भोजनगृह आणि नैर्ऋतीस सूतिकागृह करावें." असें **वसिष्ठ**वचन आहे. **विष्णुधर्मांत**—"सूतिकागृह दहा दिवसपर्यंत विशेषेंकरून आयुधें, अग्नि, टेंभुरणीचीं पेटतीं लांकडें, पाण्यानें भरलेले कुंभ, दीप, मुसळ, उदक यांनीं युक्त करावें. आणि त्यांत अनेक वर्णांचें रंगवल्यादि काढावें."

**अथजातकर्म पारिजातेवसिष्ठः** श्रुत्वाजातंपितापुत्रंसचैलंस्नानमाचरेत् **मनुः** प्राङ्नाभिवर्धनात्पुंसोजातकर्मविधीयते वर्धनंच्छेदनं **हेमाद्रौबैजवापः** जन्मतोनंतरंकार्यंजातकर्मयथाविधि दैवादतीतकालंचेदतीतेसूतकेभवेत् **पृथ्वीचंद्रोदयेविष्णुधर्मे** अच्छिन्ननाभिकर्तव्यंश्राद्धंवैपुत्रजन्मनि पुत्रपदेन कन्यापिगृह्यते तदाहतत्रैव**कार्ष्णाजिनिः** प्रादुर्भावेपुत्रपुत्र्योर्ग्रहणेचंद्रसूर्ययोः स्नात्वानंतरमात्मीयान्पितॄन्श्राद्धेनतर्पयेत् एतच्चरात्रावपिकार्यं पुत्रजन्मनियात्रायांशर्वर्यांदत्तमक्षयमिति तत्रैव**व्यासोक्तेः बैजवापः** जातमात्रकुमारस्यजातकर्मविधीयते स्तनप्राशनतःपूर्वंनाभिकर्तनतोपिवा एतेननैमित्तिकमपीदंजातेष्टिवदाशौचांतेकार्यमितिशंकापरास्ता जातेकुमारेपितॄणामामोदात्पुण्यंतदहरितिहा**रितोक्तेश्च** ।

## आतां जातकर्म सांगतो—

**पारिजातांत वसिष्ठ**—"पुत्र झालेला श्रवण करितांच पित्यानें वस्त्रसहित स्नान करावें." **मनु**—"नाभिच्छेदनाचे पूर्वी पुत्राचें जातकर्म करावें." **हेमाद्रींत बैजवाप**—"जन्म झाल्यानंतर त्या वेळीं जातकर्म यथाविधि करावें. दैवानें त्या

कालीं झालें नाहीं तर जननाशौच गेल्यावर जातकर्म होईल." **पृथ्वीचंद्रोदयांत विष्णुधर्मांत**—"पुत्रजन्मसमयीं नाभिच्छेदन झालें नाहीं तोंपर्यंत श्राद्ध करावें." या वचनांत पुत्रपदानें कन्या देखील घ्यावयाची आहे. तें सांगतो **तेथेंच कार्ष्णाजिनि**—"पुत्र व कन्या यांच्या उत्पत्तिकालीं, व चंद्रसूर्यांच्या ग्रहणांत, स्नान करून नंतर आपल्या पितरांना श्राद्धानें तृप्त करावें." हें श्राद्ध रात्रीं सुद्धां करावें. कारण, "पुत्रजन्मकालीं, आणि यात्रेचे ठायीं रात्रीं दिलेलें अक्षय होतें" असें तेथेंच **व्यास**वचन आहे. **बैजवाप**—"उत्पन्न होतांक्षणीं पुत्राचें जातकर्म स्तनप्राशनाच्या पूर्वीं किंवा नाभिच्छेदनाच्या पूर्वीं करावें." हें जातकर्म नैमित्तिक असलें तरी तत्कालीं आशौचांतही करावें, असें सांगितल्यावरून—जशी पुत्रजातेष्टि आशौचांतीं करावयाची, तसें हें जातकर्म आशौचांतीं करावें, अशी शंका होती ती खंडित झाली. आणि "पुत्र झाला असतां पितरांना हर्ष होत असल्यामुळें तो दिवस पुण्य आहे" असें **हारीत**वचनही आहे. या वचनावरूनही तत्कालीं करावें, असें होतें.

अत्रश्राद्धमामेनहेम्नावाकार्यमित्युक्तं **पृथ्वीचंद्रोदयेआदित्यपुराणे** जातश्राद्धेतुपक्वान्नंनदद्याद्ब्राह्मणेष्वपीति **हेमाद्रिस्तु** पुत्रजन्मनिकुर्वीतश्राद्धंहेम्नैवबुद्धिमान् नपक्वेननचामेनकल्याणान्यभिकामयन्निति **संवर्तो**क्तेर्हेम्नैवेत्याह एतच्चजननाशौचेमरणाशौचेचकार्यमित्याह**मिताक्षरायांप्रजापतिः** आशौचेतुसमुत्पन्नेपुत्रजन्मयदाभवेत् कर्तुस्तात्कालिकीशुद्धिःपूर्वाशौचेनशुध्यति **केचित्तु** मृताशौचस्यमध्येतुपुत्रजन्मयदाभवेत् आशौचापगमेकार्यंजातकर्मयथाविधीति **स्मृतिसंग्रहोक्ते**राशौचांतेकार्यमित्याहुः **स्मृत्यर्थसारे**पिविकल्पउक्तः मृदुध्रुवचरक्षिप्रभेष्वेषामुदयेपुच गुरौशुक्रेथवाकेंद्रेजातकर्मचनामच मृद्वादिलक्षणमाह**श्रीधरः** रोहिण्युत्तरभंस्थिरंगिरिशमूलेंद्रोरगादारुणंक्षिप्रंचाश्विदिनेशपुष्यमनलेंद्राग्नीतुसाधारणं उग्रंपूर्वमघांतकंमृदुगतित्वाष्ट्रांत्यमैत्रंचरंविष्णुस्वातिशतोडुवस्वादितयःकुर्युःस्वसंज्ञाफलं अत्रसर्वत्रजातकर्मनामकर्मोदावुक्तकालातिक्रमेनक्षत्रादिकंज्ञेयम् देशकालोपघाताद्यैःकालातिक्रमणंयदि अनस्तगेज्येंदुसितेतत्कार्यंचोत्तरायणे इति**मदनरत्नेनारदोक्तेः बृहस्पति**रपि मुख्यालाभेविधिज्ञेनविधिश्चिंत्योऽप्रमादतः नक्षत्रतिथिलग्नानांविचार्यैवंपुनःपुनः सूतकेसंध्यादौविशेषंवक्ष्यामः ।

ह्या जातकर्माचे ठायीं आमानें किंवा हेमानें ( सुवर्णानें ) श्राद्ध करावें, असें सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत आदित्यपुराणांत**—"जातकर्मश्राद्धांत ब्राह्मणांना देखील पक्वान्न देऊं नये." **हेमाद्रि** तर—"पुत्रजन्माचे ठायीं श्राद्ध हेमानेंच करावें. कल्याण इच्छिणारानें पक्वान्नानें किंवा आमान्नानें करूं नये" ह्या **संवर्त**वचनावरून हेमानेंच करावें असें सांगतो. हें श्राद्ध जननाशौचांत व मरणाशौचांतही करावें, असें सांगतो **मिताक्षरेंत प्रजापति**—"आशौच उत्पन्न असतां जेव्हां पुत्रजन्म होईल तेव्हां कर्त्याची तात्कालिक शुद्धि होते. म्हणजे कर्ता पूर्वी असलेल्या आशौचानें शुद्ध होतो." **केचित्** विद्वान् तर —मृताशौचामध्यें जेव्हां पुत्रजन्म होईल तेव्हां आशौचसमाप्तीनंतर जातकर्म यथाविधि करावें" ह्या **स्मृतिसंग्रह**वचनावरून आशौचांतीं करावें, असें सांगतात. **स्मृत्यर्थसारांत**ही मृताशौच असतां त्यांत किंवा आशौचांतीं करावें, असा विकल्प सांगितला आहे. "मृदु, ध्रुव, चर, क्षिप्र, ह्या नक्षत्रांवर; आणि ह्या नक्षत्रांच्या उदयकालींही; गुरु किंवा शुक्र केंद्रीं ( १।४।७।१० या स्थानीं ) असतां जातकर्म व नामकर्म करावें." मृदु इत्यादि नक्षत्रें कोणतीं तीं सांगतो **श्रीधर**—"रोहिणी व तीन उत्तरा ( उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा ) हीं **स्थिर** होत. आर्द्रा, मूल, ज्येष्ठा, आश्लेषा, हीं **दारुण** होत. अश्विनी, हस्त, पुष्य, हीं **क्षिप्र** होत. कृत्तिका, विशाखा हीं **साधारण** होत. पूर्वा तीन, मघा, भरणी हीं **उग्र** होत. मृग, चित्रा, रेवती, अनुराधा हीं **मृदु** होत. श्रवण, स्वाती, शततारका, धनिष्ठा, पुनर्वसु हीं **चर** होत. हीं नक्षत्रें आपापल्या नांवाप्रमाणें फल करितात." येथें जातकर्म, नामकर्म इत्यादि सर्व कर्मांविषयीं उक्तकालाचा अतिक्रम झाला असतां नक्षत्रादिक पाहावें. कारण, "देशाचा उपघात ( उच्छेद, अशुद्धि वगैरे ), कालाचा उपघात ( विघ्नादि ) इत्यादि कारणांनीं जर मुख्य कालाचें अतिक्रमण ( उल्लंघन ) होईल तर उत्तरायणांत गुरु, चंद्र, शुक्र हे अस्तंगत नसतां तें कर्म करावें" असें **मदनरत्नांत नारद**वचन आहे. **बृहस्पति**ही—"मुख्य कालाचा लाभ नसतां नक्षत्र, तिथि, लग्न यांचा पुनःपुनः विचार करून अप्रमादानें काल ( मुहूर्त ) पहावा." सूतकांत संध्यादि कर्मांविषयीं विशेष विचार पुढें ( आशौचप्रकरणीं ) सांगूं.

## अथजन्मनि दुष्टकालाः

**तत्रगंडांतः ज्योतिर्निबंधेनारदः** पूर्णानंदाख्ययोस्तिथ्योःसंधिर्नाडीद्वयंतथा गंडांतंमृत्युदं जन्मयात्रोद्वाहव्रतादिषु कुलीरसिंहयोःकीटचापयोर्मीननमेषयोः गंडांतमंतरालंस्याद्घटिकार्धंमृतिप्रदं सार्पेंद्रपौ-

अन्त्यभेष्वंत्यषोडशांशाभसंधयः तदग्रभेष्वाद्यपादाभानांगंडांतसंज्ञकाः **रत्नमालायां** पौष्णाऽश्विन्योःसार्पपित्रर्क्षयोश्चयच्चज्येष्ठामूलयोरंतरालं स्याद्गंडांतंस्याच्चतुर्नाडिकंहियात्राजन्मोद्वाहकालेष्वनिष्टम् **रत्नसंग्रहेन-वनीतारिष्टे** सर्वेषांगंडजातानांपरित्यागोविधीयते वर्जयेद्दर्शनंश्रावंतच्चषाण्मासिकंभवेत् तिथ्यर्क्षगंडेपितृमातृनाशोलग्नेतुसंधौतनयस्यनाशः सर्वेषुनोजीवतिहंतिबंधून्जीवन्पुनःस्याद्बहुवारणाश्वः अथैषांदानमुत्त-**रगार्ग्ये** तिथिगंडेत्वनड्वाहंनक्षत्रेधेनुरुच्यते कांचनंलग्नगंडेतुगंडदोषोविनश्यति उत्तरेतिलपात्रंस्यात्पुष्येगोदानमुच्यते अजाप्रदानंत्वाष्ट्रेस्यात्पूर्वाषाढेचकांचनं उत्तरापुष्यचित्रासुपूर्वाषाढोद्भवस्यच कुर्याच्छांतिंप्रयत्नेननक्षत्राकरजांबुधः ।

## आतां जन्मसमयीं दुष्टकाल सांगतो—

त्यामध्यें प्रथम **गंडांत** सांगतो **ज्योतिर्निबंधांत नारद**—"पूर्णा ( पूर्णिमा, अमावास्या ) व प्रतिपदा यांच्या संधीच्या दोन घटिका गंडांत होय, हें गंडांत जन्म, यात्रा, विवाह, उपनयन इत्यादिकांचे ठायीं असलें तर मृत्युदायक आहे. कर्क व सिंह, वृश्चिक व धन, मीन व मेष या लग्नांचा संधि अर्धघटिका गंडांत, हें मृत्युदायक आहे. आश्लेषा, ज्येष्ठा, रेवती, या नक्षत्रांचे शेवटचे सोळावे अंश नक्षत्रसंधि आणि त्यांच्या पुढच्या ( मघा, मूल आश्विनी या ) नक्षत्रांचे पहिले चरण हे नक्षत्रगंडांत होत." **रत्नमालेंत**-"रेवती व अश्विनी, आश्लेषा व मघा, ज्येष्ठा व मूल यांच्या संधीच्या चार घटिका गंडांत आहे. हें यात्रा, जन्म, विवाह यांचे ठायीं अनिष्ट आहे." **रत्नसंग्रहांत नवनीतारिष्टांत**—गंडांतांवर उत्पन्न झालेल्या सर्वांचा परित्याग सांगितला आहे. सहा महिनेपर्यंत त्यांचें दर्शन व श्रवण वर्ज्य करावें." तिथींच्या व नक्षत्रांच्या गंडांतावर उत्पन्न झाला असतां पिता व माता यांचा नाश होतो. लग्नाच्या गंडांतावर उत्पन्न पुत्रांचा नाश होतो. सर्व गंडांतावर उत्पन्न झालेला जीवंत राहात नाहीं व बांधवांचा नाश करितो. तो जीवंत असेल तर बहुत हत्ती, घोडे यांनीं युक्त होतो." आतां यांच्या दोषाविषयीं दानें सांगतो **उत्तरगार्ग्यांत**—"तिथिगंडांतावर उत्पन्न असतां वृषभदान करावें. नक्षत्रगंडांतावर उत्पन्न असतां धेनुदान करावें. लग्नगंडांतावर सुवर्णदान करावें. म्हणजे गंडदोष नष्ट होतो. उत्तरा नक्षत्रावर उत्पन्न असतां तिलपात्रदान. पुष्यावर उत्पन्न असतां गोदान. चित्रांवर उत्पन्न असतां बकरीदान. पूर्वाषाढांवर उत्पन्न असतां सुवर्णदान. उत्तरा, पुष्य, चित्रा, पूर्वाषाढा यांच्यावर उत्पन्न झालेल्याची नक्षत्राकरांत सांगितलेली शांति प्रयत्नानें करावी."

**अथाश्लेषाफलं** मूर्धास्यनेत्रगलकांसयुगंचबाहूहृज्जानुगुह्यपदमित्यहिदेहभागः बाणाद्रिनेत्रहुतभुक्श्रुतिनागरुद्रषण्णंदपंचशिरसःक्रमशस्तुनाड्यः राज्यंपितृक्षयोमातृनाशःकामक्रियारतिः पितृभक्तोबलीस्वघ्नस्त्यागीभोगीधनीक्रमात् **अथज्येष्ठाफलंब्रह्मयामले** ज्येष्ठादौजननीमाताद्वितीयेजननीपिता तृतीयेजननीभ्रातास्वयंमाताचतुर्थके आत्मानंपंचमेहंतिषष्ठेगोत्रक्षयोभवेत् सप्तमेचोभयकुलंज्येष्ठभ्रातरमष्टमे नवमेश्वशुरंहंतिसर्वंहंतिदशांशकइति ।

## आतां आश्लेषा नक्षत्राचें फल सांगतो—

आश्लेषांची देवता सर्प त्याचा देह—५ घ० मस्तक, ७ घ० मुख, २ घ० नेत्र, ३ घ० गळा, ४ घ० दोन स्कंध, ८ घ० दोन बाहु, ११ घ० हृदय, ६ घ० जानु, ९ घ० गुह्य, ५ घ० घटी पद याप्रमाणें सर्व देहाचे अवयव आहेत. या अवयवांवर उत्पन्न असतां अनुक्रमानें राज्य, पितृनाश, मातृनाश, कामक्रियारति, पितृभक्त, बली, स्वकीयनाशक, दानशील, भोगवान्, धनवान्, अशीं फलें होतात." आतां ज्येष्ठा नक्षत्राचें फल सांगतो. **ब्रह्मयामलांत**—"ज्येष्ठा नक्षत्राचे दहा भाग करून पहिल्या भागांत उत्पन्न असतां जननीची माता मरते. दुसऱ्या भागांत उ० जननीचा पिता मरतो. तिसऱ्या भागांत उ० मातुल मरतो. चवथ्या भागांत उ० पुत्राची माता मरते. पांचव्या भागांत उ० आपण मरतो. सहाव्या भागांत उ० गोत्राचा क्षय होतो. सातव्या भागांत उ० दोन्ही कुलांचा ( मातृपितृकुलांचा ) नाश होतो. आठव्या भागांत उ० ज्येष्ठ भ्राता मरतो. नवव्या भागांत उ० श्वशुर मरतो आणि दहाव्या भागांत उ० सर्वांना मारितो.

**अथमूलफलं भल्लाटः** अभुक्तमूलसंभवंपरित्यजेत्तुबालकं समाष्टकंपिताथवानतन्मुखंविलोकयेत् तदाद्यपादकेपिताद्वितीयकेजनन्यथ धनक्षयस्तृतीयकेचतुर्थकःशुभावहः प्रतीपमंत्यपादतःफलंतदेवसार्पभे **अभुक्तमूलंत्वाहवृद्धवसिष्ठः** ज्येष्ठांतेघटिकाचैकामूलादौघटिकाद्वयं अभुक्तमूलमित्याहुस्तत्रजातंशिशुं-

त्यजेत् **केचिज्ज्येष्ठांत्यंमूलाद्यंचपादमभुक्तमूलमाहुः कश्यपसंहितायांत्वन्यथोक्तं मूलाद्यपादजोहंतिपि-** रंतुद्वितीयजः मातरंस्वांतृतीयोर्थान्सुहृदंततुरीयजः फलंतदेवसार्पर्क्षेप्रतीपंत्वंत्यपादतः ।

## आतां मूल नक्षत्राचें फल सांगतो—

**भल्लाट**—"अभुक्त मूलावर उत्पन्न झालेल्या बालकाचा त्याग करावा, अथवा पित्यानें आठ वर्षेपर्यंत त्या बालकाचें मुख पाहूं नये. मूलाच्या पहिल्या पादावर झाला असतां पिता, व दुसऱ्या पादावर माता, तिसऱ्या पादावर धन यांचा नाश होतो. चवथा पाद शुभकारक आहे. आश्लेषा नक्षत्राच्या अंत्य पादापासून उलट प्रथम पादापर्यंत तेंच फल समजावें. अभुक्त मूल सांगतो **वृद्धवसिष्ठ**—"ज्येष्ठा नक्षत्राची शेवटची एक घटिका व मूलाच्या पहिल्या दोन घटिका याला अभुक्त मूल असें म्हणतात. त्या अभुक्त मूलावर झालेला शिशु टाकावा." **केचित्**—ज्येष्ठाचा अंत्य पाद व मूलाचा पहिला पाद अभुक्तमूल म्हणतात. **कश्यपसंहितेंत** तर—निराळें सांगितलें आहे—"मूलाच्या पहिल्या पादावर झालेला पित्याला मारितो. दुसऱ्या पादावर झालेला स्वकीय मातेला मारितो. तिसऱ्या पादावर झालेला द्रव्याचा नाश करितो. चवथ्या पादावर झालेला सुहृदांना मारितो. आश्लेषा नक्षत्रावर अंत्य पादापासून उलट प्रथम पादापर्यंत तेंच फल समजावें."

**अथमूलवृक्षः जयार्णवे** मूलंस्तंभंत्वचाशाखापत्रंपुष्पंफलंशिखा वेदाश्चमुनयश्चैवदिशश्चवसवस्तथा नंदाबाणारसारुद्रामूलभेदःप्रकीर्तितः मूलेमूलविनाशायस्तंभेहानिर्धनक्षयः त्वचिभ्रातृविनाशायशाखामातृ-विनाशकृत् पत्रेसपरिवारःस्यात्पुष्पेपुनृपवल्लभः फलेपुलभतेराज्यंशिखायामल्पजीवितं **अन्यत्रत्वन्यथोक्तं** मूलेमप्रघटीपुमूलहननंस्तंभेष्टसुस्वक्षयंत्वग्दिग्बंधुविनाशनंचविटपेरुद्रैर्हतोमातुलः पत्रेर्कैःसुकृतीतुबाणकुसुमे-मंत्रीफलेमार्गैरगजावह्निशिखाल्पमायुरितिमन्मूलांघ्रिपेस्यात्फलं **भूपालवल्लभः** वृषालिसिंहेपुघटेचमूलं-दिविस्थितंयुग्मतुलांगनांत्ये पातालगंमेषधनुःकुलीरनक्रेपुमर्त्येष्वितिसंस्मरंति स्वर्गेमूलेभवेद्राज्यंपातालेचेद्ध-नागमः मर्त्यलोकेयदामूलंतदाशून्यंसमादिशेत ।

**आतां मूलवृक्ष सांगतो जयार्णवांत**—"मूळ, स्तंभ, त्वचा, शाखा, पत्र, पुष्प, फल, शिखा, हे मूलवृक्षाचे अवयव अनुक्रमानें ४ । ७ । १० । ८ । ९ । ५ । ६ । ११ । अशा घटिकांनी सांगितले आहेत. मूळावर झालेला मूलनाशक होतो. स्तंभावर झालेला हानि व धननाश करितो. त्वचेवर झालेला भ्रात्याचा नाश करितो. शाखेवर झालेला मातृनाशक होतो. पत्रावर झालेला परिवारांसहित होतो. पुष्पावर झालेला राजप्रिय होतो. फलांवर झालेला राज्य पावतो. शिखेवर झालेला अल्पदिवस वांचतो." इतर ग्रंथांत तर निराळें सांगितलें आहे तें असें—"मूलनक्षत्राच्या पहिल्या ७ घटिका मूळ, त्यांजवर मूलनाश होतो. पुढच्या ८ घटि० स्तंभ, त्यांजवर धनक्षय. पुढच्या १० घ० त्वचा, त्यांजवर बंधुनाश. पुढच्या ११ घ० विटप, त्यांजवर मातुलनाश. पुढच्या १२ घ० पत्र, त्यांजवर पुण्यवान. पुढच्या ५ घ० पुष्प, त्यांजवर मंत्री. पुढच्या ४ घ० फल, त्यांजवर राजा. पुढच्या ३ घ० शिखा, त्यांजवर अल्पायुष्य असा होतो हें मूलवृक्षाचें फल होय." **भूपालवल्लभ**—"वृषभ, वृश्चिक, सिंह, कुंभ, या लग्नांचे ठायीं मूलनक्षत्र स्वर्गांत असतें. मिथुन, तूळ, कन्या, मीन, या लग्नांचे ठायीं मूल पातालांत असतें. मेष, धन, कर्क, मकर, या लग्नांचे ठायीं मूलनक्षत्र मनुष्यलोकीं असतें असें मुनि सांगतात. स्वर्गांत मूल असेल तर राज्यप्राप्ति होते, पातालांत असेल तर द्रव्यप्राप्ति होते. जेव्हां मनुष्यलोकीं मूल असेल तेव्हां शून्य समजावें."

**वसिष्ठः** नैर्ऋत्यभोद्भूतसुतःसुतावाक्षिप्राद्यश्यंश्वशुरंनिहंति तदंत्यपादेजनितोनहंतितस्योत्क्रमेणाहि-भवेकलत्रं सुरेशताराजनिताधवाग्रजंद्विदैवताराजनितातुदेवरं पुरंदरर्क्षेजनितःसुतस्तथास्वस्याग्रजंहंतिनपुत्रि-कायदि **प्रयोगपारिजाते** मूलजाश्वशुरंहंतिव्यालजाचतदंगनां माहेंद्रजाग्रजंहंतिदेवरंतुद्विदैवजा **नृसिं-हप्रसादे** धवाग्रजंहंतिसुरेंद्रजातानथैवपत्न्याभगिनींपुमांश्च द्विदैवजादेवरमाशुहन्याद्भार्यानुजामाशुनिहंति-सूनुः पत्न्यग्रजामग्रजंवाहंतिज्येष्ठर्क्षजःपुमान् तथाभार्यास्वसारंवाशालकंवाद्विदैवजः कन्यकादेवरंहंतिविशा-खांत्यसमुद्भवा आद्यपादत्रयेनैवआद्यभेतुपुमान्भवेत् नहन्यादेवरंकन्यातुलामिश्राद्विदैवजा तद्दक्षांतोद्भवा-वर्ज्यादुष्टावृश्चिकपुच्छवत् चित्राद्यर्धेपुष्यमध्येद्विपादेपूर्वाषाढाधिष्ण्यपादेतृतीये जातःपुत्रश्चोत्तराद्येविधत्तेमा-तापित्रोर्भ्रातरंबालनाशं द्विमासंचोत्तरादोषःपुष्येचैवत्रिमासकः पूर्वाषाढाष्टमेमासिचित्राषाण्मासिकंफलं नव-मासंतथाश्लेषामूलेचाष्टकवर्षकं ज्येष्ठापंचदशेमासिपुत्रदर्शनवर्जिता ।

---

१ 'पित्रोर्भ्रातुः स्वस्य चापि प्रणाश'मिति पाठांतरं तदेव साधु इति प्रतिभाति.

**वसिष्ठ**—"मूल नक्षत्रावर उत्पन्न झालेला पुत्र किंवा कन्या श्वशुराचा अवश्य लवकर नाश करितो. मूलाच्या शेवटच्या चरणावर उत्पन्न झालेला मारीत नाहीं. आश्लेषांवर उत्पन्न ( पुत्र, कन्या ) मूलाच्या उलट रीतीनें म्हणजे आश्लेषा प्रथम पाद वर्ज्य करून इतर पादांवर झालेला श्वशुराचे स्त्रियेला मारितो. ज्येष्ठांवर उत्पन्न कन्या वडील दीरास मारिते. विशाखांवर झालेली कन्या दीरास मारिते. ज्येष्ठांवर उत्पन्न पुत्र वडील भ्रात्याला मारितो. वडील कन्या असेल तर तिला मारीत नाहीं." **प्रयोगपारिजातांत**—"मूळावर झालेली कन्या श्वशुरास मारिते. आश्लेषांवर झालेली श्वशुरस्त्रियेला ( सासूला ) मारिते. ज्येष्ठांवर झालेली वडील भ्रात्यास मारिते. विशाखांवर झालेली दीरास मारिते." **नृसिंहप्रसादांत**—"ज्येष्ठांवर झालेली कन्या वडील दीरास मारिते. ज्येष्ठांवर उत्पन्न पुत्र पत्नीच्या वडील बहिणीस मारितो. विशाखांवर झालेली कन्या कनिष्ठ दीरास मारिते आणि पुत्र भार्येच्या कनिष्ठ भगिनीस मारितो. ज्येष्ठानक्षत्रावर झालेला पुत्र पत्नीच्या ज्येष्ठ भगिनीस किंवा बंधूस मारितो. विशाखांवर झालेला भार्येच्या भगिनीस ( कनिष्ठेस ) किंवा शालकास मारितो. विशाखांच्या अंत्यपादावर झालेली कन्या दीरास मारिते. विशाखांच्या पहिल्या तीन पादांवर म्हणजे तूळराशीस चंद्रमा असतां झालेला पुत्र शालकास मारीत नाहीं. तुलाराशियुक्त विशाखानक्षत्रावर झालेली कन्या दीरास मारीत नाहीं. विशाखानक्षत्राच्या अंत्यपदावर झालेली कन्या विंचवाच्या नांगीप्रमाणें दुष्ट असल्यामुळें वर्ज्य करावी. चित्रा नक्षत्राचें पहिलें अर्ध, आणि पुष्याचे मधले दोन पाद, पूर्वाषाढांचा तिसरा पाद, आणि उत्तरा नक्षत्राचा पहिला पाद यांजवर झालेला पुत्र मातापितरांच्या बंधूचा व बालांचा नाश करितो. उत्तरानक्षत्राचा दोष दोन महिने. पुष्याचा दोष तीन महिने. पूर्वाषाढांचा दोष आठ महिने. चित्रांचा दोष सहा महिने. आश्लेषांचा दोष नऊ मास. मूलाचा दोष आठ वर्षे. ज्येष्ठा नक्षत्राचा दोष पंधरा मासपर्यंत आहे. याकरितां जोंकाल-पर्यंत दोष आहे तोंपर्यंत पुत्रदर्शन वर्ज्य करावें."

**वसिष्ठः** व्यतीपातेंगहानिःस्यात्परिघेमृत्युमादिशेत् वैधृतौपितृहानिःस्यान्नष्टेंदावंधतांव्रजेत् मूलेसमूलनाशःस्यात्कुलनाशोधृतौभवेत् विकृतांगश्चहीनश्चसंध्ययोरुभयोरपि पर्वण्यपिप्रसूतौचसर्वारिष्टभयप्रदः तद्वत्सदंतजातश्चपादजातस्तथैवच विपरीतप्रसूतौतुनाभिनालेनवेष्टितः राष्ट्रस्यनृपतेश्चैवस्वस्यापिचविनाशकः तस्माच्छांतिंप्रकुर्वीतग्रहाणांक्रूरचेतसां **गर्गः** कृष्णांचतुर्दशींषोढाकुर्यादादौशुभंस्मृतं द्वितीयेपितरंहंतितृतीयेहंतिमातरं चतुर्थेमातुलंहंतिपंचमेवंशनाशनं षष्ठेतुधननाशःस्यादात्मनोवंशनाशनं तस्मात्सर्वप्रयत्नेनशांतिंकुर्याद्विधानतः ।

**वसिष्ठ**—"व्यतीपातावर झालेल्याची अंगहानि होते. परिघावर मृत्यु. वैधृतीवर पितृनाश. नष्टचंद्र असतां झालेल्याला अंधत्व प्राप्त होतें. मूलावर समूलनाश होतो. धृतीवर कुलनाश. दोन्ही संध्यासमयीं झालेल्याचे अंगाला विकृति आणि हीनत्व प्राप्त होतें. पर्वावर ( अमा पूर्णिमेस ) प्रसूति असतां सर्व अरिष्ट व भयदायक होतो. दंतसहित व पायांकडून जन्मास आलेला तसाच समजावा. विपरीत प्रसूति झाली असतां व नाभिनालानें वेष्टित उत्पन्न झाला असतां राष्ट्राचा, राजाचा व आपला नाश करणारा होतो. तस्मात् क्रूर ग्रहांची शांति करावी." **गर्ग**—"कृष्णचतुर्दशीस जन्म झालें असतां त्या चतुर्दशीचे सहा भाग करावे. पहिल्या भागावर शुभ म्हटलें आहे. दुसऱ्या भागावर पित्याचा नाश. तिसऱ्या भागावर मातेचा नाश. चवथ्या भागावर मातुलाचा नाश. पांचव्या भागावर वंशनाश. सहाव्या भागावर धननाश व आपल्या वंशाचा नाश होतो. तस्मात् सर्व प्रयत्नानें विधियुक्त शांति करावी."

**अथपित्रोर्नक्षत्रेजन्मदोषः तत्रदेवकीर्तिः** यद्येकस्मिन्धिष्ण्येजायंतेदुहितरोथवापुत्राः पितुरंतकराह्येतेयद्यपरेप्रीतिरतुलास्यात् **गर्गः** एकस्मिन्नेवनक्षत्रेभ्रात्रोर्वापितृपुत्रयोः प्रसूतिश्चेत्तयोर्मृत्युर्भवेदेकस्यनिश्चितं **शौनकः** ग्रहणेचंद्रसूर्यस्यप्रसूतिर्यदिजायते व्याधिपीडातदास्त्रीणामादौतुऋतुदर्शनात् इत्थंसंजायतेयस्यतस्यमृत्युर्नसंशयः **शांतिस्तु** तद्दक्षाधिपतेरूपंसुवर्णेनप्रकल्पयेत् सूर्यग्रहेसूर्यरूपंहैमंचंद्रंतुराजतं राहुरूपंप्रकुर्वीतनागेनैवविचक्षणः नागःसीसं त्रयाणांचैवरूपाणांस्थापनंतत्रकारयेत् आकृष्णेनाप्यायस्वस्वर्भानोरितिपूजामंत्राः नक्षत्रदेवतायास्तन्मंत्रेण संपूज्यतुयजेत्सूर्यंसमिद्भिश्चार्कसंभवैः चंद्रग्रहेचपालाशैर्दूर्वाभीराहुमेवच समिद्भिर्ग्रहवृक्षस्यभेशायजुहुयाद्बुधः आज्येनचरुणाचैवतिलैश्चजुहुयात्ततः पंचगव्यैःपंचरत्नैःपंचत्वक्पंचपल्लवैः जलैरोषधिकल्कैश्चअभिषेकंसमाचरेत् मंत्रैर्वारुणसंभूतैरापोहिष्ठादिभिस्त्रिभिः इमंमेगंगेपुरतस्तत्त्वायामीतिमंत्रकैः यजमानस्ततोदद्याद्भक्त्याप्रतिकृतित्रयमिति ।

## आतां मातापितरांच्या नक्षत्रीं जन्म असतां सांगतो.

देवकीर्ति—"पित्याचें अथवा मातेचें जें जन्मनक्षत्र त्या नक्षत्रावर कन्या किंवा पुत्र होतील तर ते मातापितरांचा नाश करणारे होतात. इतर नक्षत्रांवर होतील तर अपरिमित प्रीति होईल." गर्ग—"भ्राते किंवा पिता पुत्र यांचें जन्म एकाच नक्षत्रावर होईल तर त्या दोघांमध्यें एकाला निश्चयानें मृत्यु प्राप्त होईल." शौनक—"चंद्रसूर्यांच्या ग्रहणांत जर प्रसूति होईल तर स्त्रियांना ऋतुदर्शनाच्या पूर्वी ( प्रसूतिअवस्थेंत ) रोगपीडा होते. याप्रमाणें ज्याचें जन्म ग्रहणांत होतें त्याला मृत्यु येतो, यांत संशय नाहीं." शांति सांगतो—"ग्रहणकालिक जें नक्षत्र असेल त्या नक्षत्राधिपतीची सुवर्णप्रतिमा करावी. सूर्यग्रहणाची शांति असतां सूर्याची सुवर्णप्रतिमा करावी. चंद्रग्रहणाची शांति असतां रुप्याची चंद्रप्रतिमा करावी. राहूची प्रतिमा शिशाचीच करावी. त्या तीन प्रतिमांचें स्थापन त्या शांतीचे ठायीं करावें. 'आकृष्णेन०' 'आप्यायस्व०' 'स्वर्भानो०' हे पूजामंत्र होत. नक्षत्रदेवतेची पूजा त्या नक्षत्रदेवतामंत्रानें करावी. याप्रमाणें पूजा करून अर्कसमिधांनीं सूर्याला होम, पालाशसमिधांनीं चंद्राला होम, दूर्वांनीं राहूला होम, ब्रह्मवृक्षाच्या ( पळसाच्या ) समिधांनीं नक्षत्राधिपतीला होम करावा. आणि सूर्य, चंद्र, राहू, नक्षत्राधिपति यांना आज्य, चरु, तिल यांचाही होम करावा. नंतर पंचगव्यें, पंचरत्नें, उंबर, वट, पिंपळ, पायरी, आम्र या पंचवृक्षांच्या पांच साली व पांच पल्लव, यांनीं युक्त उदकांनीं वरुण देवतेचे मंत्र, 'आपोहिष्ठा०' ह्या तीन ऋचा, 'इमंमेगंगे०' ही एक ऋचा, 'तत्वायामि०' ही एक ऋचा यांहींकरून अभिषेक करावा. नंतर यजमानानें त्या तीन प्रतिमा ब्राह्मणांस याव्या."

**मात्स्ये** अकालप्रसवानार्यःकालातीतप्रजास्तथा विकृतप्रसवाश्चैवयुग्मप्रसवकास्तथा अमानुषाअमुंडाश्चअजातव्यंजनास्तथा हीनांगाअधिकांगाश्चजायंतेयदिवास्त्रियः पशवःपक्षिणश्चैवतथैवचसरीसृपाः विनाशंतस्यदेशस्यकुलस्यचविनिर्दिशेत् निर्वासयेत्तांनगरात्ततःशांतिंसमाचरेत् **पाद्मे** उपरिप्रथमंयस्यजायंतेचशिशोर्द्विजाः दंतैर्वासहयस्यस्याज्जन्मभार्गवसत्तम द्वितीयेचतृतीयेचचतुर्थेपंचमेतथा यदादंताश्चजायंतेमासेचैवमहद्भयं मातरंपितरंवाथखादेदात्मानमेवच गजपृष्ठगतंबालंनौस्थंवास्थापयेद्विज तदभावेतुधर्मज्ञकांचनेवावरासने सर्वौषधैःसर्वगंधैर्बीजैःपुष्पैःफलैस्तथा पंचगव्येनरत्नैश्चपताकाभिश्चभार्गव स्थालीपाकेनधातारंपूजयेत्तदनंतरं सप्ताहंचात्रकर्तव्यंतथाब्राह्मणभोजनं भद्रासनेनिवेश्यैनंमृद्भिर्मूलैःफलैस्तथा सर्वौषधैःसर्वगंधैःसर्वबीजैस्तथैवच स्नापयेत्पूजयेच्चात्रवह्निंसोमंसमीरणं पर्वतांश्चतथाख्यातान्देवदेवंचकेशवं एतेषामेवजुहुयाद्घृतमग्नौयथाविधि ब्राह्मणानांतुदातव्याततःसंपूज्यदक्षिणा ॥

मात्स्यांत—"अकालीं प्रसूत झालेल्या स्त्रिया, प्रसवकालाचें अतिक्रमण होऊन झालेल्या प्रजा, विकृतियुक्त झालेले, जुंवळ झालेले, मनुष्य स्त्रियांला अमानुष, अमुंड, जातिलक्षणवर्जित, अंगहीन व अधिकांग असे पुरुष किंवा कन्या आणि पशु, पक्षी व सर्प यांच्या आकृतीचे गर्भ, हे ज्याच्या देशांत व कुलांत होतील त्या देशाचा व कुलाचा नाश सांगावा. ज्या स्त्रियेला असे गर्भ होतील त्या स्त्रियेस नगरांतून बाहेर घालवून नंतर शांति करावी." पाद्मांत—"ज्या शिशूला प्रथम वरचे दंत उत्पन्न होतात अथवा ज्याचें जन्म दंतांसह होतें, आणि दुसऱ्या, तिसऱ्या, चवथ्या, किंवा पांचव्या मासांत जेव्हां दंत उत्पन्न होतात तेव्हां मोठें भय समजावें. तो बाल मातेला किंवा पित्याला अथवा आपल्याला खाईल. त्या बालकास गजपृष्ठावर किंवा नौकेवर बसावें. त्याच्या अभावीं सुवर्णाच्या उत्तम आसनावर बसवावें. आणि सर्वौषधि, सर्वगंध, बीजें, पुष्पें, फळें, पंचगव्यें, रत्नें, पताका यांनीं अलंकृत करावा. तदनंतर स्थालीपाकविधीनें धात्याची पूजा करावी. सात दिवस ब्राह्मणभोजन करावें. त्या बालकास भद्रासनावर बसवून मृत्तिका, मुळें, फळें, सर्वौषधें, सर्वगंध, सारीं बीजें, यांनीं युक्त उदकांनीं स्नान घालून त्या ठिकाणीं अग्नि, सोम, वायु, प्रसिद्ध पर्वत आणि देवांचा देव केशव यांची पूजा करावी. आणि याच देवतांना यथाविधि अग्नींत घृताचा होम करावा. तदनंतर ब्राह्मणांची पूजा करून दक्षिणा द्यावी."

**ब्रह्मयामले** प्रथमंदंतनिर्मुक्तिरूर्ध्वंबालस्यचेद्भवेत् क्लेशायमातुलस्येहतदाप्रोक्तामनीषिभिः सौवर्णंराजतंवापिताम्रंकांस्यमयंतुवा दध्योदनेनसंपूर्णपात्रंदद्याच्छिशोःकरे समंत्रंभाजनंदत्वासपश्येन्मातुलःशिशुं सालंकारंसवस्त्रंचशिशुमालिंग्यसादरं **तत्रमंत्रः** रक्षमांभागिनेयत्वंरक्षमेसकलंकुलं गृहीत्वाभाजनंवाक्यंसन्नोभवसर्वदा निर्विघ्नंकुरुकल्याणंनिर्विघ्नांचस्वमातरं मय्यात्मानमधिष्ठाप्यचिरंजीवमयासह एवंकृतेविधाने तुविघ्नःकोपिनजायतइति ॥

**ब्रह्मयामलांत**—"बालकास प्रथम वरचे दंत जर उत्पन्न होतील तर मातुलास क्लेश सांगितले आहेत. म्हणून मातुलानें सोन्याचें, रुप्याचें, किंवा तांब्याचें अथवा कांशाचें पात्र दधिमिश्र ओदनानें परिपूर्ण भरून बालकाच्या हातांत पुढील मंत्रें-करून द्यावें. आणि अलंकार, वस्त्र यांनीं युक्त त्या बालकास आदरपूर्वक आलिंगन करून पाहावें. त्याविषयीं **मंत्र—'रक्ष मां भागिनेय त्वं रक्ष मे सकलं कुलं ॥ गृहीत्वा भाजनं सान्नं प्रसन्नो भव सर्वदा ॥ निर्विघ्नं कुरु कल्याणं निर्विघ्नां च स्वमातरं ॥ मय्यात्मानमधिष्ठाप्य चिरं जीव मया सह ॥'** याप्रमाणें विधान केलें असतां कोणतेंही विघ्न होत नाहीं."

## अथ त्रिकप्रसवशांतिः ।

**शांतिसर्वस्वे** सुतत्रयेसुताचेत्स्यात्तत्रयेवासुतोयदि मातापित्रोःकुलस्यापितदानिष्टंमहद्भवेत् ज्येष्ठनाशोधनेहानिर्दुःखंवासुमहद्भवेत् तत्रशांतिंप्रकुर्वीतवित्तशाठ्यविवर्जितः जातस्यैकादशाहेवाद्वादशाहेशुभेदिने आचार्यमृत्विजोवृत्वाग्रहयज्ञपुरःसरं ब्रह्मविष्णुमहेशेंद्रप्रतिमाःस्वर्णतःकृताः पूजयेद्धान्यराशिस्थकलशोपरिशक्तितः पंचमेकलशेरुद्रंपूजयेद्रुद्रसंख्यया रुद्रसूक्तानिचत्वारिशांतिसूक्तानिसर्वशः द्विजएकोजपेद्धोमकालेशुचिसमाहितः आचार्योजुहुयात्तत्रसमिदाज्यतिलांश्चरुं अष्टोत्तरसहस्रंवाशतंवात्रिशतंतुवा देवताभ्यश्चतुर्वक्रादिभ्योग्रहपुरःसरं ब्रह्मादिमंत्रैरिंद्रस्ययतइंद्रभयामहे ततःस्विष्टकृतंहुत्वाबलिंपूर्णाहुतिंततः अभिषेकंकुटुंबस्यकृत्वाचार्यंप्रपूजयेत् हिरण्यंधेनुरेकाचऋत्विजांदक्षिणाततः आज्यस्यवीक्षणंकृत्वाशांतिपाठंतुकारयेत् प्रतिमागुरवेदत्वाउपस्करसमन्विताः ब्राह्मणान्भोजयेच्छक्त्यादीनानाथांश्चतर्पयेत् एवंशांतिविधानेनसर्वारिष्टंप्रलीयतइति अन्येषुमूलाद्यृक्षेषुशांत्यादि **प्रयोगपारिजाते** मत्कृते **शांतिरत्ने** च ज्ञेयम् ॥

## आतां त्रिकप्रसवशांति सांगतो—

**शांतिसर्वस्वांत**—"तीन पुत्रांवर जर कन्या होईल अथवा तीन कन्यांवर जर पुत्र होईल तर मातापितरांना व कुलालाही अनिष्ट मोठें होईल. ज्येष्ठाचा नाश, धनाची हानि अथवा मोठें दुःख होईल. त्याविषयीं, वित्तकार्पण्य वर्ज्य करून शांति करावी. मूल उत्पन्न झाल्यापासून अकराव्या किंवा बाराव्या शुभ दिवशीं आचार्य आणि ऋत्विज वरून ग्रहयज्ञपूर्वक शांति करावी. ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, इंद्र यांच्या सुवर्णप्रतिमा करून धान्यराशींवर कलश स्थापून त्यांजवर त्या प्रतिमांची यथाशक्ति पूजा करावी. पांचव्या कलशावर रुद्राची पूजा करावी. आणि होमकालीं एका ब्राह्मणानें शुचिर्भूत व समाहित होऊन चार रुद्रसूक्तें ( गर्भाधानप्रकरणीं उक्त ) अकरावेळ जपावीं व सर्व शांतिसूक्तें जपावीं. आचार्यानें ग्रहयज्ञपूर्वक ब्रह्मादिक देवतांना ब्रह्मादिकांच्या मंत्रांनीं व इंद्राला 'यतइंद्र भयामहे०' या मंत्रानें समिधा, आज्य, तिल, चरु या चार द्रव्यांचा अष्टोतर सहस्र किंवा अष्टोत्तर शत अथवा त्रिशत होम करावा. तदनंतर स्विष्टकृताचा होम करून बलिदान व पूर्णाहुति द्यावी. कुटुंबाला अभिषेक करून आचार्याची पूजा करावी. आणि हिरण्य व एक धेनु द्यावी. नंतर ऋत्विजांना दक्षिणा द्यावी. आज्यावलोकन करून शांतिपाठ करवावा. त्या देवतांच्या प्रतिमा उपस्करसहित गुरूस द्याव्या. यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालावें. दीन व अनाथ यांना तृप्त करावें. याप्रमाणें शांतिविधान केल्यानें सर्व अरिष्ट नाहींसें होतें." इतर मूलादिक नक्षत्रांविषयीं शांत्यादि प्रकार **प्रयोगपारिजातांत** व मी ( कमलाकरानें ) केलेल्या **शांतिरत्नांत** पाहावा.

**मिताक्षरायांमार्कंडेयः** रक्षणीयातथाषष्ठीनिशातत्रविशेषतः रात्रौजागरणंकार्यंजन्मदानांतथा बलिः पुरुषाःशस्त्रहस्ताश्चनृत्यगीतैश्चयोषितः रात्रौजागरणंकुर्युर्दशम्यांचैवसूतके **व्यासः** सूतिकावासनिलयाजन्मदानामदेवताः तासांयागनिमित्तंतुशुद्धिर्जन्मनिकीर्तिता प्रथमेदिवसेषष्ठेदशमेचैवसर्वदा त्रिष्वेतेषुनकुर्वीतसूतकंपुत्रजन्मनि **अपरार्केब्राह्मे** कन्याश्चतस्रोराकाद्यावातघ्नीचैवपंचमी क्रीडनार्थाचबालानांषष्ठीचशिशुरक्षिणी खड्गेतुपूजनीयावैवैश्यैर्त्रोयैर्द्विजातिभिः राकाऽनुमतिः सिनीवाली कुहूरिति चतस्रः कन्याइत्यर्थः ॥

**मिताक्षरेंत मार्कंडेय**—"सूतिकाघरांत सहावी रात्र विशेषेंकरून रक्षण करावी. रात्रीं जागरण करावें आणि जन्मदा देवतांना बलि द्यावा. पुरुषांनीं हातांत शस्त्र ग्रहण करून आणि स्त्रियांचें नर्तन व गायन करून रात्रीं जागरण करावें. व जननाशौचांत दहाव्या रात्रींही जागरण करावें." **व्यास**—"सूतिकागृहांत जन्मदा नांवाच्या देवता असतात त्यांच्या पूजेनिमित्त जननाशौचांत शुद्धि सांगितली आहे. पुत्रजन्म असतां प्रथम दिवस, सहावा दिवस, आणि दहावा दिवस या तीन दिवसांचे ठायीं जननाशौच करूं नये. म्हणजे दानादिकांविषयीं शुद्धि समजावी." **अपरार्कांत ब्राह्मांत**—"राका,

अनुमति, सिनीवाली, कुहू ह्या चार कन्या; बालांस खेळविणारी अशी पांचवी वातघ्नी; आणि शिशुरक्षण करणारी षष्ठी; या देवतांची वैश्यांनीं व व्रात्य द्विजातींनीं खड्गावर पूजा करावी."

## अथ दत्तपुत्रपरिग्रहविधिः ॥

**पारिजातेशौनकः** अपुत्रोमृतपुत्रोवापुत्रार्थंसमुपोष्यच वाससीकुंडलेदत्त्वाउष्णीषंचांगुलीयकं बंधूनन्नेनसंभोज्यब्राह्मणांश्चविशेषतः अन्वाधानादियत्तंत्रंकृत्वाज्योत्पवनांतकं दातुःसमक्षंगत्वातुपुत्रंदेहीतियाचयेत् दानेसमर्थोदातास्मैयेयज्ञेनेतिपंचभिः देवस्यत्वेतिमंत्रेणहस्ताभ्यांपरिगृह्यच अंगादंगेत्यृचंजप्त्वाआघ्राय‍शिशुमूर्धनि गृहमध्येतमादायचरुंहुत्वाविधानतः यस्त्वाहृदात्यृचाचैवतुभ्यमग्रऋचैकया सोमोदददित्येताभिःप्रत्यृचंपंचभिस्तथा स्विष्टकृदादिहोमंचकृत्वाशेषंसमापयेत् सच ब्राह्मणानांसपिंडेषुकर्तव्यःपुत्रसंग्रहः तदभावेऽसपिंडोवाअन्यत्रतुनकारयेत् **मिताक्षरादौ**तु व्याहृतिभिराज्येनहोमउक्तः सचहोमोत्तरंजलपूर्वकंदेयः नवाङ्मात्रेण व्याहृतिभिर्हुत्वाप्रतिगृह्णीयादिति**वसिष्ठोक्तेः** मातापितावादद्यातांयमद्भिःपुत्रमापदि सदृशंप्रीतिसंयुक्तंसज्ञेयोदत्रिमःसुतइति**मनूक्तेः** ।

## आतां दत्तक पुत्राचा परिग्रहविधि सांगतो—

**पारिजातांत शौनक**—"अपुत्रकानें किंवा मृतपुत्रकानें पुत्राकारणें उपोषण करून दोन वस्त्रें, दोन कुंडलें, पागोटें, अंगुलीयक हीं देऊन बांधव आणि विशेषंकरून ब्राह्मण यांस अन्नानें भोजन घालून ( किंवा भोजनसंकल्प करून ) अन्वाधानादिक आज्योत्पवनापर्यंत स्थालीपाकतंत्र करून दात्याच्या समक्ष ( समीप ) जाऊन 'पुत्रं देहि' अशी याचना करावी. दानाविषयीं समर्थ जो दाता त्यानें 'येयज्ञेन०' ह्या पांच मंत्रांनीं पुत्र द्यावा. ग्राहकानें 'देवस्यत्वा०' ह्या मंत्रेंकरून दोन हातांनीं ग्रहण करून 'अंगादंगात्०' ह्या ऋचेचा जप करून पुत्राच्या मस्तकाचें अवघ्राण करून घरांत आणून यथाविधि चरुहोम करावा. तो असा—'यस्त्वाहृदा०' ह्या दोन ऋचांनीं एक आहुति, 'तुभ्यमग्रे०' ह्या एक ऋचेनें एक आणि 'सोमोददत्०' ह्या पांच ऋचांनीं पांच चरूच्या आहुति द्याव्या व स्विष्टकृदादि होम करून शेषकृत्य समाप्त करावें." तोच **शौनक**—"ब्राह्मणांनीं सपिंडांतील पुत्र घ्यावा. सपिंडाच्या अभावीं असपिंड ( सपिंडसदृश आपल्या जातींतील ) घ्यावा. इतरांतील ( भिन्न जातींतील ) घेऊं नये." **मिताक्षरादिकांत** तर व्याहृतिमंत्रांनीं आज्यहोम सांगितला आहे. तो पुत्रग्राहकानें होम केल्यावर दात्यानें उदकपूर्वक द्यावा. केवल वाणीनेंच देऊं नये. कारण, "व्याहृतींनीं होम करून प्रतिग्रह करावा" असें **वसिष्ठ**वचन आहे. "आपत्कालीं माता व पिता जो ग्राहकाच्या सदृश व प्रीतियुक्त असा उदकानें पुत्र देतात तो दत्तक पुत्र जाणावा" असें मनुवचन आहे.

**तत्रैववसिष्ठः** नत्वेवैकंपुत्रंदद्यात्प्रतिगृह्णीयाद्वानस्त्रीपुत्रंदद्यात्प्रतिगृह्णीयाद्वा अन्यत्रानुज्ञानाद्भर्तुरिति इदंचभर्तृसत्त्वे अन्यथा दद्यान्मातापितावायंसपुत्रोदत्रिमःस्मृतइति**वत्सव्यास**वचोविरोधःस्यात् दानंप्रतिग्रहोपलक्षणं यत्तु समंत्रकहोमस्यपुत्रप्रतिग्रहांगत्वात् व्याहृत्यादिमंत्रपाठेचस्त्रीशूद्रयोरनधिकारात् तयोर्दत्तकःपुत्रोनभवत्येवेति**शुद्धिविवेकेरुद्रधरे**णोक्तं **वाचस्पति**श्चैवमेवाह तन्न भर्तुरनुज्ञयास्त्रियाअपिप्रतिग्रहोक्तेः यद्यपि**मेधातिथिना**भार्यात्ववददृष्टरूपंदत्तकत्वंहोमसाध्यमुक्तं स्त्रियाश्चहोमासंभवस्तथापिव्रतादिवद्विप्रद्वाराहोमादिकारयेदिति**हरिनाथादयः संबंधतत्त्वे**प्येवं एवंशूद्रस्यापि स्त्रीशूद्राश्चसधर्माणइति**स्मृतेः** अतएवशूद्रकर्तृकहोमोविप्रद्वारैव**पराशरेणोक्तः** दक्षिणार्थंतुयोविप्रःशूद्रस्यजुहुयाद्धविः ब्राह्मणस्तुभवेच्छूद्रःशूद्रस्तुब्राह्मणोभवेत् अत्र **माधवाचार्यः** योविप्रःशूद्रदक्षिणामादायतदीयंहविःशांतिपुष्ट्यादिसिद्ध्येवैदिकैर्मंत्रैर्जुहोतितस्यविप्रस्यैवदोषः शूद्रस्तुहोमफलंलभेतैवेतिव्याचचक्षे ।

तेथेंच **वसिष्ठ**—"एक पुत्र असेल तो दात्यानें देऊं नये, व घेणारानें घेऊं नये. स्त्रियेनें भर्त्याच्या आज्ञेवांचून पुत्र देऊं नये किंवा घेऊं नये." हा प्रकार भर्ता असतां समजावा. अन्यथा ( भर्ता नसतां स्त्रियेला अधिकार नाहीं, असें म्हटलें तर ) "माता पिता ज्या पुत्राचें दान करितो तो दत्तक पुत्र म्हटला आहे."' ह्या वत्स व व्यासवचनाचा विरोध येईल. या वचनांत 'दान' म्हटलें तें प्रतिग्रहाचें उपलक्षण आहे. आतां जें 'पुत्रप्रतिग्रहाचा अंगभूत समंत्रकहोम असल्या‍मुळें व्याहृतिप्रभृति मंत्रांच्या पठनाविषयीं स्त्रीशूद्रांना अधिकार नसल्याकारणानें स्त्रीशूद्रांना दत्तक पुत्र होत नाहींच' असें **शुद्धिविवेकांत रुद्रधरानें** सांगितलें आहे, आणि **वाचस्पतिही** असेंच सांगतो, तें बरोबर नाहीं. कारण, भर्त्याच्या अनुज्ञेनें स्त्रियेला देखील प्रतिग्रह सांगितला आहे. आतां जरी **मेधातिथीनें**, जसें—स्त्रीचे ठायीं अदृष्टरूप भार्यात्व

होमानें साध्य होतें तसें—पुत्राचे ठायीं दत्तकत्व होमानें साध्य आहे असें सांगितलें. स्त्रीयेला तर होम नाहीं. तरी जसें व्रतादिकांत स्त्रिया ब्राह्मणद्वारा होमादि करवितात, तसें येथें ब्राह्मणद्वारा स्त्रियेनें[1] होमादि करवावें, असें **हरिनाथादिक** सांगतात. **संबंधतत्त्वांतही** असेंच आहे. याप्रमाणें शूद्रालाही समजावें. कारण, "स्त्रिया व शूद्र हे समानधर्मी आहेत" अशी **स्मृति** आहे. म्हणून शूद्रानें करावयाचा होम ब्राह्मणद्वाराच **पराशरानें** सांगितला आहे. "जो ब्राह्मण दक्षिणा मिळविण्यासाठीं शूद्राच्या हवीचा होम करील तो ब्राह्मण शूद्र होईल. व तो शूद्र ब्राह्मण होईल." येथें **माधवाचार्य**— जो ब्राह्मण शूद्राची दक्षिणा घेऊन त्याचे हवीचा शांति, पुष्टि इत्यादि सिद्धीकरितां वैदिकमंत्रांनीं होम करितो त्या ब्राह्मणालाच दोष आहे, शूद्र तर होमाचें फल पावेलच, असें व्याख्यान करिता झाला.

**दत्तकेविशेषः कालिकापुराणे** पितुर्गोत्रेणयःपुत्रःसंस्कृतःपृथिवीपते आचूडांतंनपुत्रःसपुत्रतांयातिचान्यतः चूडोपायनसंस्कारानिजगोत्रेणवैकृताः दत्ताद्यास्तनयास्तेस्युरन्यथादासउच्यते ऊर्ध्वंतुपंचमाद्वर्षान्नदत्ताद्याःसुतानृप गृहीत्वापंचवर्षीयंपुत्रेष्टिंप्रथमंचरेत् पंचमोर्ध्वंतुस्वदानेच्छोरेवदानंनान्यथा विक्रयंचैवदानंचननेयाःस्युरनिच्छवः दाराःपुत्राश्चसर्वस्वमात्मनैवतुयोजयेदिति **हेमाद्रिमाधव**धृत**व्यासदक्षा**दिवचनात् यच्च**याज्ञवल्क्यः** स्वकुटुंबाविरोधेनदेयंदारसुताहतइति तदूर्ध्वंस्वदानानिच्छुपुत्रपरम् तेनसर्वस्वदानेस्वदानेच्छुदारपुत्रदानंसिद्धम् यत्तु विश्वजिदधिकरणं**षष्ठे** तत्रपुत्रादीनांज्ञातित्वेनस्वशब्दवाच्यत्वात्पुत्रत्वेनदानमाशंक्यनिराकृतम् जन्यपुंस्त्वस्यदानेनानिष्पत्तेः दासत्वेनदानंभवत्येव तस्माद्यथेष्टविनियोगार्हत्वंस्वत्वंभवत्येव पुत्रेस्वत्वाभावंवदन्पुत्रक्रयविक्रयादिशुनःशेपविक्रयादि श्रौतलिंगाद्दासक्रयविक्रयादिव्यवहारायोगात्मूर्खएव योपि नहिग्रभायारणःसुशेवोन्योदर्योमनसामंतवाउइति**श्रुतौ**दत्तकनिषेधःसोप्यौरसातिशयार्थः अन्यथाशुनःशेपादिप्रतिग्रह**श्रौतलिंग**विरोधापत्तेः उपेयांतवपुत्रतामित्**युक्तेः** इदंचश्रौतलिंगंस्वयंदत्तक्रीतपरं नदत्तकपरं द्वादशविधपुत्रमध्ये दत्तात्मातुस्वयंदत्तः क्रीतश्चताभ्यांविक्रीतइति **याज्ञवल्क्ये**नतयोर्दत्तकाद्भेदोक्तेः तयोश्च दत्तौरसेतरेषांतुपुत्रत्वेनपरिग्रहइति**कलौ**निषेधात्तेनसंस्कारोत्तरंदत्तकोनभवत्येवेतिसिद्धम् ।

दत्तकाविषयीं विशेष सांगतो **कालिकापुराणांत**—"ज्या पुत्राचे चौलापर्यंत संस्कार पित्याच्या गोत्रानें झाले आहेत तो पुत्र दुसऱ्याचा होत नाहीं. ज्यांचे चौल, उपनयन संस्कार आपल्या ( ग्राहकांच्या ) गोत्रानें केलेले आहेत ते **दत्तादिक** पुत्र होतात. आपल्या गोत्रानें संस्कार ज्याचे झाले नसतील तो **दास** म्हटला आहे. पांच वर्षांहून अधिक वयाचे दत्तादिक पुत्र होत नाहींत. पांच वर्षांचे वयाचा पुत्र घेऊन प्रथम पुत्रेष्टि करावी." पांचव्या वर्षाहून अधिक वयाचा असेल तर आपलें दान इच्छिणाराचेंच दान होतें. न इच्छिणाराचें दान होत नाहीं. कारण, "विक्रय आणि दान हें न इच्छिणाऱ्या स्त्रीपुत्रांचें करूं नये. दानविक्रयप्रसंगीं सर्वस्व आपल्यासहच दान विक्रयाविषयीं योजावें." असें **हेमाद्रि—माधवांनीं** धरलेलें **व्यास व दक्ष** इत्यादिकांचें वचन आहे. यावरून इच्छिणारांचेंच दान होतें. आणि जे **याज्ञवल्क्य**–"आपल्या कुटुंबाच विरोध न होईल त्या रीतीनें स्त्रीपुत्रांवांचून इतर वस्तूंचें दान करावें." यांत पुत्राचें दान करूं नये असें सांगतो, तें पांचवर्षांनंतर आपलें दान न इच्छिणाऱ्या पुत्रविषयक आहे. तेणेंकरून सर्वस्वदानप्रसंगीं आपलें दान इच्छिणाऱ्या स्त्रीपुत्रांचें दान सिद्ध झालें. आतां जें **जैमिनिसूत्रांच्या** सहाव्या अध्यायांत सातव्या पादांत विश्वजित् अधिकरण सांगितलें आहे, तें असें—"विश्वजिति सर्वस्वं ददाति" अशी **श्रुति** आहे. त्याचा अर्थ—विश्वजित् यागामध्यें सर्वस्व द्यावें. तेथें असें आहे कीं, पुत्र इत्यादिक आप्त हे ज्ञाति असल्यामुळें 'स्वो ज्ञातावात्मनि स्वं त्रिष्वात्मीये' या कोशावरून 'सर्वस्वं' यांतील 'स्व' शब्दाचा अर्थ ज्ञाति ( पुत्र इत्यादिक ) होत असल्यामुळें पुत्राचें पुत्रत्वेंकरून दान होईल ? अशी शंका करून त्या शंकेचें निराकरण केलें आहे. कारण, 'पुत्रत्व' म्हणजे 'जन्यपुंस्त्व' म्ह० उत्पत्तिसहित पुरुषधर्म, तो दानेंकरून निष्पन्न होत नाहीं. अर्थात् ज्याला दान केलें त्याचा तो पुत्र होत नाहीं. दासत्वेंकरून दान होतच आहे. तस्मात् पुत्राचे ठायीं आपल्या इच्छेनुरूप विनियोगयोग्यत्वरूप स्वत्व होतच आहे. पुत्राचे ठिकाणीं स्वत्व नाहीं, असें जो सांगणारा तो मूर्खच आहे. कारण, पुत्राचा क्रय, विक्रय इत्यादि प्रकार श्रुतींत सांगितला आहे. शुनःशेप ऋषीचा विक्रयादि प्रकार ब्राह्मणांत उक्त आहे. आणि स्वत्व नाहीं असें म्हटलें तर दासत्वेंकरून क्रय–विक्रय इत्यादि व्यवहार सांगितला आहे, तो उपपन्न होणार नाहीं. आतां जो "रममाण व अत्यंत सुखकारक असा अन्याच्या उदरांत उत्पन्न झालेला पुत्र ग्रहण करण्यासाठीं मनांत देखील आणूं नये" या **श्रुतींत** पुत्र घेण्याचा निषेध केलेला आहे, तो देखील औरसाच्या स्तुतीसाठीं आहे. खरोखर

1 हा मंत्र ऋक्संहिता अष्टक ५ अध्याय २ यांत पाहावा.

निषेध मानिला तर शुनःशेप इत्यादिकांचा प्रतिग्रह श्रुतींत ( ब्राह्मणांत ) सांगितला आहे, त्याचा विरोध येईल. 'मुख्य ( विश्वामित्राच्या ) पुत्रत्वाप्रत प्राप्त झालों'* असें शुनःशेपानें म्हटलें आहे. हा शुनःशेप संस्कारोत्तर झालेला असल्यामुळें दत्तक पुत्र संस्कारोत्तर होतो, असें म्हणूं नये. कारण, हा श्रुतींत सांगितलेला प्रकार स्वयंदत्त ( आपलें आपण दान केलेला ) व क्रीत ( विकत घेतलेला ) अशा पुत्रविषयक आहे. दत्तकविषयक नाहीं. कारण, बारा प्रकारच्या पुत्रांमध्यें 'आपलें आपण दान केलेला तो दत्त. आणि आईबापांनीं विकलेला तो क्रीत' असें याज्ञवल्क्यानें दत्तकाहून दत्त व क्रीत हे भिन्न आहेत, असें सांगितलें आहे. आतां दत्तक संस्कारोत्तर होत नाहीं तर दत्त व क्रीत हे संस्कारोत्तर होतील ? असें म्हणतां कामा नये. कारण, "दत्तक व औरस ह्यांवांचून इतरांचें पुत्रत्वेंकरून ग्रहण करूं नये. या वचनानें इतरांचा कलियुगांत निषेध केलेला ( पुढें कलिवर्ज्यांत ) आहे. यावरून संस्कार झाल्यावर दत्तक होतच नाहीं, असें सिद्ध झालें आहे.

अथयमलयोःसंस्कारक्रमार्थंज्येष्ठकनिष्ठभावउच्यते **मनुः** पुत्रःकनिष्ठोज्येष्ठायांकनिष्ठायांचपूर्वजः कथंतयोर्विभागःस्यादितिचेत्संशयोभवेत् सदृशस्त्रीप्रजातानांपुत्राणामविशेषतः नमातृतोज्यैष्ठ्यमस्तिजन्मतोज्यैष्ठ्यमुच्यते तेनकनिष्ठायांपूर्वजातएवज्येष्ठोनज्येष्ठायांपश्चाज्जातइत्यर्थः सएवश्राद्धाधिकारी जन्मज्येष्ठेनचाह्वानंसुब्रह्मण्यास्वपिस्मृतं यमयोश्चैवगर्भेषुजन्मतोज्येष्ठतामता **देवलः** यस्यजातस्ययमयोःपश्यंतिप्रथमंमुखं संतानःपितरश्चैवतस्मिन्ज्यैष्ठ्यंप्रतिष्ठितम् **भागवते** तु द्वौ¹तदाभवतोगर्भौसूतिर्वंशविपर्ययादित्युक्तेः पश्चादुत्पन्नस्यज्यैष्ठ्यमुक्तं अत्रदेशाचारतोव्यवस्था पूर्वमेवतुयुक्तं गर्भाष्टमइत्यादौविशेषनिर्देशेएवगर्भग्रहणंनान्यत्र अन्यथातद्वैयर्थ्यात् ।

आतां जुंवळ पुत्राच्या संस्कारक्रमासाठीं ज्येष्ठत्व कनिष्ठत्व कोणावर तें सांगतां-**मनु**—'एका पुरुषाला दोन भार्या असतां वडील भार्येचा पुत्र तो वयानें कनिष्ठ आणि धाकट्या भार्येचा पुत्र तो वयानें ज्येष्ठ असेल तर त्या दोन पुत्रांचा दायविभाग कर्तव्य असतां ज्येष्ठाला अधिक अंश द्यावयाचा तो कोणाला द्यावा ? असा जर संशय उत्पन्न होईल तर सांगतो-समान जातीच्या स्त्रियांचे ठायीं उत्पन्न झालेल्या पुत्रांना माता ज्येष्ठ असल्याकारणानें ज्येष्ठत्व सांगितलें नाहीं; तर जन्मानें ज्येष्ठत्व सांगितलें आहे. म्हणजे ज्याचें जन्म आधीं झालें तो ज्येष्ठ समजावा." यावरून कनिष्ठेला पूर्वी झालेला तोच ज्येष्ठ. वडील स्त्रियेला नंतर झालेला तो ज्येष्ठ नाहीं, आणि तोच पहिला पुत्र श्राद्धाचा अधिकारी होतो. आणि **मनु** "सुब्रह्मण्या नांवाच्या इष्टींत जन्मानें जो ज्येष्ठ त्यानें आह्वान ( देवतेचें आवाहन ) करावें, असें सांगितलें आहे. आणि जुंवळ गर्भाचे ठायीं, ज्याचें पूर्वी जन्म, त्याला ज्येष्ठत्व विद्वानांस मान्य आहे" **देवल**—"जावळे जन्मले असतां वंशज व माता पिता हे ज्याचें मुख प्रथम पाहतात त्याला ज्येष्ठत्व सांगितलें आहे." **भागवतांत** तर-"तेव्हां दोन गर्भ राहिले त्यांत जो गर्भाधान समयीं प्रथम गर्भ राहिला तो मागाहून जन्मला. आणि मागाहून राहिलेला गर्भ प्रथम जन्मला" असें सांगितल्यावरून पश्चात् उत्पन्नाला ज्येष्ठत्व सांगितलें आहे. या ठिकाणीं ( जावळ्यांविषयीं ) ज्या देशांत जसा आचार असेल तशी व्यवस्था जाणावी. परंतु यांत पहिला पक्षच ( पूर्वी उत्पन्न झालेला ज्येष्ठ हा पक्षच ) युक्त आहे. गर्भापासून काल धरावयाचा तो 'गर्भाष्टमे' म्हणजे गर्भापासून आठव्या वर्षी उपनयन करावें, असा विशेष सांगितला असेल त्या ठिकाणींच गर्भापासून काल धरावा. अन्यत्र ठिकाणीं गर्भापासून धरावयाचा नाहीं. सर्वत्र ठिकाणीं गर्भापासून काल धरला तर 'गर्भाष्टमे' या सूत्रांत 'गर्भ'ग्रहण व्यर्थ होईल.

अथसूतिकास्नानं **ज्योतिषे** करेंद्रभाग्यानिलवासवांत्यमैत्रैंदवाश्विध्रुवभेऽह्निपुंसां तिथावरिक्तेशुभमामनंतिप्रसूतिकास्नानविधिंमुनींद्राः ।

## आतां सूतिकास्नान सांगतो—

**ज्योतिषांत**—"हस्त, ज्येष्ठा, पूर्वा, स्वाती, धनिष्ठा, रेवती, अनुराधा, मृग, अश्विनी, तीन उत्तरा, रोहिणी, या नक्षत्रांवर रिक्ता तिथि वर्ज्य करून अन्यतिथींचे ठायीं प्रसूतिकास्नान शुभ, असें मुनींद्र सांगतात."

अथनामकर्म **मदनरत्ने बृहस्पतिः** द्वादशेदशमेवापिजन्मतोऽपित्रयोदशे षोडशेविंशतौचैवद्वात्रिंशेवर्णतःक्रमात् **याज्ञवल्क्यः** अहन्येकादशेनाम **हेमाद्रौ भविष्ये** नामधेयंदशम्यांतुद्वादश्यांवामासिकेचन अष्टादशेहनितथावदंत्यन्येमनीषिणः दशम्यामतीतायामितिज्ञेयं आशौचापगमेनामधेयमिति

---

१ 'द्वौ तदा भवतो०' हा श्लोक श्रीमद्भागवत स्कंध ३ हिरण्यकशिपु व हिरण्याक्ष जन्मप्रसंगीं 'यः प्राक्स्वदेहाद्यमयोरजायत' या श्लोकाच्या श्रीधरटीकेंत आढळतो.

**विष्णूक्तेः गृह्यपरिशिष्टेपि** जननाद्दशरात्रेव्युष्टेशतरात्रेसंवत्सरेवानामकरणं व्युष्टेऽतीते **ज्योतिर्निबंधेगर्गः** अमासंक्रांतिविष्ट्यादौप्राप्तकालेपिनाचरेत् **श्रीधरः** मित्रादित्यमघोत्तराशतभिषक्स्वातीधनिष्ठाच्युतप्राजेशाश्विशशांकपौष्णदिनकृत्पुष्येषुराशौस्थिरे छिद्रांपंचदशींविहायनवमींशुद्धेष्टमेभार्गवज्ञाचार्योमृतपादभागदिवसेनामानिकुर्याच्छिशोः **मनुः** शर्मांतंब्राह्मणस्यस्याद्वर्मांतंक्षत्रियस्यतु वैश्यस्यधनसंयुक्तंशूद्रस्यप्रेष्यसंयुतं **मदनरत्ने नारदीये** सूतकांतेनामकर्मविधेयंस्वकुलोचितम् नामपूर्वंतुमासस्यमंगलंसुसमाक्षरैः **तत्रैवगार्ग्यः** मासनामगुरोर्नामदद्याद्बालस्यवैपिता ।

## आतां नामकरण सांगतो.

**मदनरत्नांत बृहस्पति**—"जन्मदिवसापासून अकराव्या किंवा बाराव्या दिवशीं ब्राह्मणाचें; तेराव्या दिवशीं क्षत्रियाचें; सोळाव्या किंवा विसाव्या दिवशीं वैश्याचें; बत्तिसाव्या दिवशीं शूद्राचें; याप्रमाणें नामकरण करावें." **याज्ञवल्क्य**—"जन्मदिवसापासून अकराव्या दिवशीं नामकर्म करावें." **हेमाद्रींत—भविष्यांत**—"अकराव्या किंवा बाराव्या दिवशीं नाम करावें. मासांतीं करावें, असें कोणी सांगतात. इतर विद्वान् अठराव्या दिवशीं करावें असें सांगतात." या वचनांतील 'दशम्यां' याचा अर्थ दहावी रात्र गेली असतां अकराव्या दिवशीं करावें, असा आहे. कारण, आशौच दूर झाल्यानंतर नामकर्म करावें" असें **विष्णु**वचन आहे. **गृह्यपरिशिष्टांत**ही—"जन्मदिवसापासून दहा रात्री गेल्यानंतर अथवा शंभर रात्री किंवा संवत्सर गेल्यावर नामकरण करावें." **ज्योतिर्निबंधांत—गर्ग**—"अमावास्या, संक्रांति, भद्रा ( कल्याणी ) इत्यादि दुष्ट दिवस असतां प्राप्तकाल असला तरी करूं नये." **श्रीधर**—"अनुराधा, पुनर्वसु, मघा, तीन उत्तरा, शततारका, स्वाती, धनिष्ठा, श्रवण, रोहिणी, अश्विनी, मृग, रेवती, हस्त, पुष्य या नक्षत्रांवर; स्थिरलग्नीं; छिद्रातिथि[1], पौर्णिमा, अमावास्या, नवमी ह्या तिथि वर्ज्य करून; आठवें लग्न शुद्ध असतां; शुक्र, बुध, गुरु, सोम ह्या वारीं बालांचीं नामें करावीं." **मनु**—शर्मशब्द ज्याच्या अंतीं असें ब्राह्मणाचें नाम, जसें—**शिवशर्मा**; वर्मशब्द ज्याच्या अंतीं आहे असें क्षत्रियाचें नाम, जसें—**बलवर्मा**; धनवाचक शब्द ज्याच्या अंतीं आहे असें वैश्याचें नाम, जसें—**वसुभूति**; प्रेष्यवाचक शब्द ज्याच्या अंतीं आहे असें शूद्राचें नाम, जसें—**दीनदास**; याप्रमाणें नामें ठेवावीं." **मदनरत्नांत नारदीयांत**—"जननाशौच गेल्यानंतर स्वकुळाला उचित असें नाम ठेवावें, प्रथमतः सम अक्षरांनीं युक्त असें मंगलकारक मासनाम ठेवावें." **मदनरत्नांत गार्ग्य**—"पित्यानें बालकास मासनाम व गुरूचें नाम ठेवावें."

**स्मृतिसंग्रहे** कृष्णोनंतोच्युतश्चक्रीवैकुंठोथजनार्दनः उपेंद्रोयज्ञपुरुषोवासुदेवस्तथाहरिः योगीशःपुंडरीकाक्षोमासनामान्यनुक्रमात् अत्रमार्गशीर्षादिश्चैत्रादिर्वाक्रमइति**मदनरत्ने** तन्मासनामप्रथमंदद्यात्संबुध्यंतंवहि देवालयगजाश्वानांवृक्षाणांवापिकूपयोः सर्वापणानांपण्यानांचिह्नार्थयोषितांनृणां काव्यानांचकवीनांचपश्वादीनांचसर्वशः राजप्रासादवास्तूनांनामकर्मविशिष्यते नाक्षत्रमपिनामकार्यं अभिवादनीयंचसमीक्षेत तन्मातापितरौविद्यातामोपनयनादित्या**श्वलायनोक्तेः** कुलदेवतानक्षत्रसंबद्धंपितानामकुर्यादिति**मदनरत्नेशंखोक्तेः** तच्चनक्षत्रपादाक्षराद्याक्षरंकुर्यादित्युक्तं**परिशिष्टे** तदक्षरादिकंनामयस्मिन्धिष्ण्येदक्षरमिति **सुदर्शनभाष्येतु** रोरेमभृज्येचिषुवृद्धिरादौठांत्येचवांत्यश्रवशाश्वयुक्षु शेषेषुनाम्नोंःकपरःस्वरोंत्यः स्वाप्वोरदीर्घःसविसर्गइष्टः इत्युक्तं ठांत्येतिप्रोष्ठपदेत्यत्रादौठात्परेचवृद्धिः प्रौष्ठपादइति । अंत्यमपभरणीशब्दः श्रुतावुक्तः तत्रश्रवणादौच वादिवृद्धिः अपभरणः आपभरण इत्यादि **मदनरत्नेवसिष्ठः** जन्माद्वैद्वादशाहेवादशाहेवाविशेषतः उत्तरारेवतीहस्तमूलपुष्याःसवारुणाः श्रवणादितिमैत्रंचस्वातीमृगशिरस्तथा प्राजापत्यंधनिष्ठाचप्रशस्तानामकर्मणि ।

**स्मृतिसंग्रहांत**—"कृष्ण, अनंत, अच्युत, चक्री, वैकुंठ, जनार्दन, उपेंद्र, यज्ञपुरुष, वासुदेव, हरि, योगीश, पुंडरीकाक्ष, याप्रमाणें अनुक्रमानें मासनामें जाणावीं." ह्या नामकरणाविषयीं मार्गशीर्षापासून किंवा चैत्रापासून क्रम धरावा, असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. "प्रथमतः मासनाम ठेवावें. व तें संबुद्धि विभक्ति अंतीं ज्याच्या असें म्हणजे-कृष्णा, अच्युत, असें ठेवावें. देवालय, गज, अश्व, वृक्ष, वापी, कूप, सर्व बाजार, विकण्याचे पदार्थ, स्त्रिया, पुरुष, काव्य, कवि,

---

१ चतुर्दशी, चतुर्थी, अष्टमी, नवमी, षष्ठी, द्वादशी ह्या पक्षच्छिद्रतिथि सीमंतोन्नयनसंस्कारप्रसंगीं सांगितल्या आहेत. त्यांच्या त्याज्य घटिका तेथेंच पहाव्या.

पशु वगैरे, राजवाडे, घरें, यांचीं नांवें व्यवहारासाठीं ठेवावीं." नाक्षत्रनामही ठेवावें. कारण, "पुत्र ज्या नामाच्या उच्चार करून मातापितरांस पादग्रहणपूर्वक अभिवादन ( नमस्कार ) करितो तें अभिवादनीय नाम, तें उपनयन होईपर्यंत मातापितरांस मात्र ज्ञात असें गुप्त ठेवावें." असें **आश्वलायनानें** ( गृह्यसूत्र अ. १ खं. १५ यांत ) सांगितलें आहे. आणि "कुलदेवतानाम ( श्रीहरेश्वरभक्त वगैरे ), व नक्षत्रनाम हें पित्यानें ठेवावें." असें **मदनरत्नांत शंखाचें** वचन आहे. तें नक्षत्रनाम, नक्षत्राचे पादाचें अक्षर प्रथम आहे ज्यास असें ठेवावें." असें **परिशिष्टांत** सांगितलें आहे. तें असें:—"ज्या नक्षत्राचे पादाचें जें अक्षर तें ज्याला प्रथम आहे तें नक्षत्रनाम जसें—चूचेचोला अश्विनी इत्यादि अक्षरांवरून चूडामणिः, चेदीशः, चोलेशः, लक्ष्मणः इत्यादिक नांव समजावें." **सुदर्शनभाष्यांत** तर, ज्या नक्षत्रीं जन्म झालें असेल त्या नक्षत्रवाचक शब्दाहून 'तत्र जातः' ह्या पाणिनीच्या सूत्रानें तद्धित प्रत्यय करून जीं नामें सिद्ध होतात त्यांच्या संग्रहाचा हा पुढें सांगितल्याप्रमाणें श्लोक आहे:—तो श्लोक असा:—"रोरेममृज्येचिषु वृद्धिरादौ ठात्पे च वांत्यश्रवशाश्वयुक्षु ॥ शेषेषु नाम्नीः कपरः खरौल्यः स्वाप्वोरदीर्घः सविसर्ग इष्टः" इति ॥ रो ( रोहिणी ), रे ( रेवती ), म ( मघा ), मृ ( मृगशीर्ष ), ज्ये ( ज्येष्ठा ), चि ( चित्रा ) यांचे ठायीं आदिवृद्धि करून रौहिणः, रैवतः, माघः, मार्गशीर्षः, ज्यैष्ठः, आणि चैत्रः, अशीं सहा नामें सिद्ध होतात. पूर्वाप्रोष्ठपदा व उत्तराप्रोष्ठपदा ह्या दोन शब्दांचे ठायीं ठकाराहून पुढचें जें अक्षर प त्याला वृद्धि करून प्र यालाही वृद्धि करावी म्हणजे पूर्वाप्रौष्ठपादः, उत्तराप्रौष्ठपादः, अशीं दोन नक्षत्रनामें सिद्ध होतात. अंत्य ( अपभरणी ), श्रव ( श्रवण ), श ( शतभिषक् ), अश्वयुक् यांचे ठायीं आदिवृद्धि वैकल्पिक करून अपभरणः, आपभरणः, श्रवणः, श्रावणः, शतभिषक्, शातभिषः, अश्वयुक्, आश्वयुजः अशीं चार नक्षत्रांचीं नामें सिद्ध होतात. शेष जीं श्रविष्ठः, पूर्वाफल्गुनः, उत्तराफल्गुनः, अनुराधः, तिष्यः, आश्लेषः, हस्तः, विशाखः, पूर्वाषाढः, उत्तराषाढः, कृत्तिकः, यांचे ठायीं वृद्धि होत नाहीं. **आर्द्रौः** म्हणजे आर्द्रा आणि मूल यांचे ठायीं ठञ् प्रत्ययाचा ककार होऊन ककाराहून पर अंत्य स्वर होऊन आर्द्रकः, मूलकः, अशीं नामें सिद्ध होतात. **स्वाप्वोः** म्हणजे स्वाती व पुनर्वसू यांचा जो अंत्य स्वर तो ह्रस्व विसर्गयुक्त करून स्वातिः, पुनर्वसुः, अशीं दोन नामें सिद्ध होतात. याप्रमाणें नक्षत्रनामांची सिद्धि जाणावी, असें सांगितलें आहे. **मदनरत्नांत—वसिष्ठ**—"जन्मदिवशीं किंवा बाराव्या दिवशीं अथवा दहाव्या दिवशीं नामकरण करावें. तीन उत्तरा, रेवती, हस्त, मूल, पुष्य, शततारका, श्रवण, पुनर्वसु, अनुराधा, स्वाती, मृगशीर्ष, रोहिणी, आणि धनिष्ठा हीं नक्षत्रें नामकर्माविषयीं प्रशस्त जाणावीं."

**अथदोलारोहः पारिजातेबृहस्पतिः** दोलारोहस्तुकर्तव्योदशमेद्वादशेपिवा षोडशेदिवसेवापिद्वाविंशेदिवसेपिवा **ज्योतिर्निबंधे** करत्रयेवैष्णवरेवतीष्वदितिद्वयेवाश्विनकध्रुवेषु कुर्याच्छिशूनांनृपतेश्चतद्वदांदोलनंवैसुखिनोभवंति तत्रैव आंदोलाशयनेपुंसोद्वादशोदिवसःशुभः त्रयोदशस्तुकन्यायाननक्षत्रविचारणा अन्यस्मिन्दिवसेचेत्स्यात्तिर्यगास्येप्रशस्यते **अथ दुग्धपानं नृसिंहः** एकत्रिंशद्दिनेचैवपयःशंखेनपाययेत् अन्नप्राशननक्षत्रेदिवसोदयराशिषु ।

## आतां दोलारोह ( मुलास पाळण्यांत घालणें ) सांगतो.

**पारिजातांत बृहस्पति—**"जन्मदिवसापासून दहाव्या किंवा बाराव्या, अथवा सोळाव्या, किंवा बेविसाव्या दिवशीं दोलारोह करावा." **ज्योतिर्निबंधांत**-"हस्त, चित्रा, स्वाती, श्रवण, रेवती, पुनर्वसु, पुष्य, अश्विनी, रोहिणी, तीन उत्तरा, ह्या नक्षत्रांवर शिशूंचें व राजाचें आंदोलन करावें, म्हणजे ते सुखी होतात." **ज्योतिर्निबंधांतच**—"पाळण्यांत घालण्याविषयीं पुरुषास बारावा दिवस शुभ होय; आणि कन्येस तेरावा दिवस शुभ, त्या दिवशीं नक्षत्रविचार करण्यास नको. याहून इतर दिवशीं पाळण्यांत घालणें असेल तर तिर्यङ्मुख नक्षत्रांवर प्रशस्त जाणावें." **आतां दुग्धपान सांगतो— नृसिंह**—"जन्मदिवसापासून एकतिसाव्या दिवशीं, व अन्नप्राशनोक्त नक्षत्रांवर, दिवसा उदय झालेल्या लग्नावर शंखानें मुलास दूध पाजावें."

**अथकर्णवेधः मदनरत्नेवसिष्ठश्रीधरौ** मासेषष्ठेसप्तमेवाष्टमेवावेध्यौकर्णौद्वादशेषोडशेह्नि मध्येनाह्नःपूर्वभागेनरात्रौनक्षत्रेद्वेद्वेतिथीवर्जयित्वा अत्रजन्ममासोवर्ज्यः **ज्योतिर्निबंधेगर्गः** मासेषष्ठेसप्तमेवाप्यष्टमेमासिवत्सरे कर्णवेधंप्रशंसंतिपुष्ट्यायुःश्रीविवृद्धये **मदनरत्ने** प्रथमेसप्तमेमासिअष्टमेदशमेथवाद्वादशेचतथाकुर्यात्कर्णवेधंशुभावहं **हेमाद्रौव्यासः** कार्तिकेपौषमासेवाचैत्रेवाफाल्गुनेपिवा कर्णवेधंप्रशंसंतिशुक्लपक्षेशुभेदिने **श्रीधरः** हरिहयकरचित्रासौम्यपौष्णोत्तरार्यादितिवसुपुघटालीसिंहवर्ज्येसुलग्ने शशिगुरुबुधकाव्यानांदिनेपर्वरिक्तारहिततिथिषुशुद्धेनैधनेकर्णवेधः **मदनरत्नेबृहस्पतिः** द्वितीयातृतीयापंची-

सप्तमीचत्रयोदशी द्वादशीपंचमीशस्तातृतीयाकर्णवेधने सौवर्णीराजपुत्रस्यराजतीविप्रवैश्ययोः शूद्रस्यचाय- सीसूचीमध्यमाष्टांगुलात्मिका **हेमाद्रौदेवलः** कर्णरंध्रेरवेश्छायानविशेदग्रजन्मनः तंदृष्ट्वाविलयंयांति- पुण्यौघाश्चपुरातनाः **शंखः** अंगुष्ठमात्रसुषिरौकर्णौनभवतोयदि तस्मैश्राद्धंनदातव्यंदत्तंचेदासुरंभवेत् ।

## आतां कर्णवेध सांगतो.

**मदनरत्नांत—वसिष्ठ व श्रीधर**—"जन्मदिवसापासून बाराव्या किंवा सोळाव्या दिवशीं बालकाचे कान टोंचावे. अथवा सहाव्या, सातव्या, किंवा आठव्या, मासांत कान टोंचावे. दिवसाच्या मध्यभागीं, पूर्वभागीं व रात्रीं कान टोंचूं नयेत. कर्णवेधास नक्षत्रवृद्धि व दिनवृद्धि वर्ज्य करावी." कर्णवेधाविषयीं जन्ममास वर्ज्य करावा. **ज्योतिर्निबंधांत—गर्ग**— "सहाव्या, सातव्या किंवा आठव्या मासांत अथवा बाराव्या मासांत कर्णवेध प्रशस्त आहे. त्यापासून पुष्टि, आयुष्य, श्री यांची वृद्धि होते." **मदनरत्नांत**—"पहिला, सातवा, आठवा, दहावा किंवा बारावा ह्या मासांत कर्णवेध करावा, तो शुभ होय.', **हेमाद्रींत—व्यास**—"कार्तिक, पौष, चैत्र, अथवा फाल्गुन या मासांत शुक्लपक्षांत शुभदिवशीं कर्णवेध प्रशस्त होय." 'कर्णवेध विषमवर्षीं करावा, समवर्षीं करूं नये. त्यांत प्रथमवर्षीं कर्तव्य असतां वर सांगितलेले मास घ्यावे. तृतीयादिवर्षीं कर्तव्य असतां हे कार्तिकादिक मास समजावे, असें **धर्मसिंधुसारां**त आहे.' **श्रीधर**—"श्रवण, अश्विनी, हस्त, चित्रा' मृग, रेवती, तीन उत्तरा, पुष्य, पुनर्वसु, धनिष्ठा ह्या नक्षत्रांवर; चंद्र, गुरु, बुध, शुक्र ह्या वारीं; अमा, पूर्णिमा, चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ह्या तिथि वर्ज्य करून अन्य तिथींचे ठायीं; कुंभ, वृश्चिक, सिंह हीं लग्नें वर्ज्य करून अन्य लग्नीं; अष्टमस्थान शुद्ध असतां कर्णवेध शुभ होय." **मदनरत्नांत—बृहस्पति**—"द्वितीया, दशमी, षष्ठी, सप्तमी, त्रयोदशी, द्वादशी, पंचमी आणि तृतीया, ह्या तिथि कर्णवेधाविषयीं शुभ होत. बालकाच्या आठ अंगुळें लांबीची सूची ( कर्णवेधाची तार ) असावी. ती अशी—राजपुत्राच्या कर्णवेधाविषयीं सुवर्णाची; ब्राह्मण, वैश्य यांना रुप्याची; शूद्राला लोखंडाची, याप्रमाणें तार करावी." **हेमाद्रींत—देवल**—"ज्या ब्राह्मणाच्या कानाच्या छिद्रांतून सूर्याचे किरण बाहेर पडत नाहींत त्या ब्राह्मणाला पाहिलें असतां पाहणाराचे पुरातन पुण्यसमुदाय नाश पावतात. अर्थात् मोठें छिद्र वाढवावें." **शंख**—"ज्याचे कर्ण, अंगुष्ठमात्र छिद्र नाहींत अशा ब्राह्मणास श्राद्धास सांगूं नये. सांगितलें असतां तें श्राद्ध आसुर ( असुरांनीं भक्षित ) [१]होतें,"

**अथतांबूलभक्षणं चंडेश्वरः** सार्धमासद्वयेदद्यात्तांबूलंप्रथमंशिशोः कर्पूरादिकसंमिश्रंविलासाय- हितायच मूलार्कचित्रकरतिष्यहरींद्रभेषुपौष्णेतथामृगशिरोदितिवासवेपु अर्केंदुजीवभृगुबोधनवासरेषुतां- बूलभक्षणविधिर्मुनिभिःप्रदिष्टः ।

## आतां तांबूलभक्षण सांगतो.

**चंडेश्वर**—बालकास अडीच महिने झाल्यानंतर प्रथम तांबूलभक्षण करवावें. तें तांबूल कर्पूरादि सकल पदार्थांनीं युक्त असें करून भक्षण करवावें, तें विलास ( शोभा ) कारक व हितकारक होतें. मूल, अनुराधा, चित्रा, हस्त, पुष्य, श्रवण, ज्येष्ठा, रेवती, मृग, पुनर्वसु, धनिष्ठा ह्या नक्षत्रांवर, रवि, इंदु, गुरु, शुक्र, बुध ह्या वारीं तांबूलभक्षणाचा विधि ऋषींनीं सांगितला आहे."

**अथनिष्क्रमणं ज्योतिर्निबंधेयमः** तृतीयेवाचतुर्थेवामासिनिष्क्रमणंभवेत् **यमः** ततस्तृतीये कर्तव्यंमासिसूर्यस्यदर्शनं चतुर्थेमासिकर्तव्यंशिशोश्चंद्रस्यदर्शनं अत्र सूर्येंद्वोःकर्मणीयेचतयोःश्राद्धंनविद्यत- इति **छंदोगपरिशिष्टात्** छंदोगानांनिष्क्रमणेवृद्धिश्राद्धंनास्तीतिकल्पतरुः **व्यासः** मैत्रेपुष्यपुनर्वसुप्र- थमभेपौष्णेनुकूलेविधौहस्तेचैवसुरेश्वरेचमृगभेतारासुशस्तासुच कुर्यान्निष्क्रमणंशिशोर्बुधगुरौशुक्रेविरिक्तेति- थौकन्याकुंभतुलामृगारिभवनेसौम्यग्रहालोकिते **मदनरत्ने** अन्नप्राशनकालेवाकुर्यान्निष्क्रमणक्रियां **विष्णु-**

---

१ अर्थात् ब्राह्मणाचे कर्ण अंगुष्ठमात्रच्छिद्र असावे असें झालें आहे. हें वचन परिसंख्यारूप नियमविधीनें अंगुष्ठाहून अधिक छिद्राचा निरास करण्याकरितां आहे. अधिकछिद्र कशानें प्राप्त झालें, असें म्हटलें तर सांगतो—**संस्कारकौस्तुभांत विष्णु- धर्मांत**—"शिशोर्विवर्धनं कार्यं यावदाभरणक्षमं" अर्थ—बालकाचें कर्णछिद्र जितकें आभरणाला योग्य होईल तितकें वाढवावें. या वचनावरून कदाचित् अंगुष्ठाहूनही अधिक होण्याचा संभव आला तर त्याचा निरास करण्याकरितां हें शंखाचें वचन समजावें. ब्राह्मणाचे कर्ण अंगुष्ठाहून कमी छिद्राचे असूं नयेत, अशा अर्थाचें तें शंखवचन म्हटलें तर—'ब्राह्मणाच्या कर्णांचे छिद्रांत सूर्याची छाया ( किरण ) प्रविष्ट होईल इतकें मोठें तें छिद्र असावें. अशा अर्थाचें वरील **देवलाचें** वचन व्यर्थ होईल. तात्पर्य—अंगुष्ठाहून अधिक मोठें छिद्र असूं नये, असा भाव.

**घर्मे** दिगीशानांदिनेतत्रतथाचंद्रार्कयोर्द्विजः पूजनंवासुदेवस्यगगनस्यचकारयेत् बहिर्निष्कासयेद्गेहाच्छंख-पुण्याहनिस्वनैः चंद्रार्कयोर्दिगीशानांदिशांचगगनस्यच निक्षेपार्थमिमंदद्मितेमेरक्षंतुसर्वदा अप्रमत्तंप्रमत्तंवा-दिवारात्रमथापिवा रक्षंतुसततंसर्वेदेवाःशक्रपुरोगमाः **माधवीयेमार्कंडेयः** अग्रतोथप्रविन्यस्यशिल्प-भांडानिसर्वशः शस्त्राणिचैववस्त्राणिततःपश्येत्तुलक्षणं प्रथमंयत्स्पृशेद्बालस्ततोभांडंस्वयंतदा जीविकातस्य-बालस्यतेनैवतुभविष्यतीति ।

## आतां निष्क्रमण सांगतो.

**ज्योतिर्निबंधांत—यम—**"तिसऱ्या किंवा चवथ्या मासांत निष्क्रमण करावें." **यम—**"तिसऱ्या मासांत सूर्याचें दर्शन बालकास करवावें. चवथ्या मासांत बालकास चंद्राचें दर्शन करवावें." ह्या ठिकाणीं "सूर्य व चंद्र ह्यांचीं दर्शनरूप जीं कर्मे त्यांचे ठायीं श्राद्ध करूं नये" ह्या **छंदोगपरिशिष्ट**वचनावरून छंदोगांना निष्क्रमणसंस्कारीं वृद्धिश्राद्ध नाहीं, असें **कल्पतरु** सांगतो. **व्यास—**"अनुराधा, पुष्य, पुनर्वसु, अश्विनी, रेवती, हस्त, ज्येष्ठा, मृग, ह्या नक्षत्रांवर; शोभन तारा असतां; बुध, गुरु, शुक्र, ह्या वारीं; रिक्ताविरहित तिथीचे ठायीं; कन्या, कुंभ, तुला, सिंह ह्या लग्नीं शुभ ग्रहांची दृष्टि लग्नावर असतां बालकाचा निष्क्रमणसंस्कार करावा." **मदनरत्नांत—**"अथवा अन्नप्राशनकालीं निष्क्रमण संस्कार करावा." **विष्णुधर्मांत**—"निष्क्रमणदिवशीं ब्राह्मणानें दिक्पति, चंद्र, सूर्य, वासुदेव, आकाश यांची पूजा करून शंख, मंगलवाद्यें, वेदमंत्र यांचा घोष करीत बालकाला घरांतून बाहेर आणून सूर्यादि देवतांचें दर्शन करवून प्रार्थना करावी. **प्रार्थनामंत्र—**'**चंद्रार्कयोर्दिगीशानां दिशां च गगनस्य च ॥ निक्षेपार्थमिमं दद्मि ते मे रक्षंतु सर्वदा ॥ अप्रमत्तं प्रमत्तं वा दिवारात्रमथापि वा ॥ रक्षंतु सततं सर्वे देवाः शक्रपुरोगमाः ॥**" **माधवीयांत—मार्कंडेय—**"बालकाच्या पुढें कलाकौशल्याचे सर्व पदार्थ, शस्त्रें, वस्त्रें इत्यादिक ठेऊन त्यांवरून त्या बालकाचें लक्षण पाहावें. पुढें ठेवलेल्या पदार्थांतून ज्या पदार्थाला बालक स्पर्श करील त्या पदार्थानेंच त्याची उपजीविका होईल."

**अथोपवेशनं प्रयोगपारिजाते पाद्मे विष्णुधर्मेच** पंचमेचतथामासिभूमौतमुपवेशयेत् तत्र सर्वेग्रहाःशस्ताभौमोप्यत्रविशेषतः उत्तरात्रितयंसौम्यंपुष्यर्क्षंशक्रदैवतं प्राजापत्यंचहस्तश्चशस्तमाश्विनमित्रभं वाराहंपूजयेद्देवंपृथिवींचतथाद्विजः रक्षैनंवसुधेदेविसदासर्वगतेशुभे आयुःप्रमाणंसकलंनिक्षिपस्वहरिप्रिये अचिरादायुषस्त्वस्ययेकेचित्परिपंथिनः जीवितारोग्यवित्तेषुनिर्दहस्वाचिरेणतान् वरेण्याशेषभूतानांमातात्व-मसिकामधुक् अजराचाप्रमेयाचसर्वभूतनमस्कृता चराचराणांभूतानांप्रतिष्ठानाव्ययाह्यसि कुमारंपाहिमा-तस्त्वंब्रह्मातदनुमन्यतां ।

## आतां उपवेशन सांगतो.

**प्रयोगपारिजातांत—पाद्मांत व विष्णुधर्मांत—**"पांचव्या मासीं त्या बालकास भूमीवर बसवावें. त्या समयीं सारे ग्रह शुभस्थानीं असावे आणि मंगळ तर विशेषेंकरून योग्य स्थानीं असावा. **नक्षत्रें** सांगतो—तीन उत्तरा, मृग, पुष्य, ज्येष्ठा, रोहिणी, हस्त, अश्विनी, अनुराधा, ह्या नक्षत्रांवर भूमीवर उपवेशन करवावें. द्विजानें वराह देव, पृथ्वी यांची पूजा करून बालकाला भूमीवर ठेऊन पुढें सांगितलेल्या मंत्रानें भूमीची प्रार्थना करावी. **प्रार्थनामंत्र—'रक्षैनं वसुधे देवि सदा सर्वगते शुभे ॥ आयुःप्रमाणं सकलं निक्षिपस्व हरिप्रिये ॥ अचिरादायुषस्त्वस्य ये केचित्परिपंथिनः ॥ जीवितारोग्यवित्तेषु निर्दहस्वाचिरेण तान् ॥ वरेण्याशेषभूतानां माता त्वमसि कामधुक् ॥ अजरा चाप्रमेया च सर्वभूतनमस्कृता ॥ चराचराणां भूतानां प्रतिष्ठानाव्यया ह्यसि ॥ कुमारं पाहि मातस्त्वं ब्रह्मा तदनुमन्यतां ॥**"

**अथान्नप्राशनं पारिजाते नारदः** जन्मतोमासिषष्ठेस्यात्सौरेणान्नाशनंपरं तदभावेऽष्टमेमासिन-वमेदशमेपिवा द्वादशेवापिकुर्वीतप्रथमान्नाशनंपरं संवत्सरेवासंपूर्णेकेचिदिच्छंतिपंडिताः **मदनरत्नेलौ-गाक्षिः** षष्ठेन्नप्राशनंजातेषुदंतेषुवेति **शंखः** संवत्सरेऽन्नप्राशनमर्धसंवत्सरेवेति **ज्योतिर्निबंधेना-रदः** षष्ठेवाप्यष्टमेमासिपुंसांस्त्रीणांतुपंचमे सप्तमेमासिवाकार्यंनवान्नप्राशनंशुभं रिक्तांदिनक्षयंनंदांद्वादशींम-

१ जन्म, संपत्, विपत्, क्षेम, प्रत्यरि, साधक, वध, मैत्र, अतिमैत्र याप्रमाणें नऊ तारा होत. ह्या नऊ झाल्यावर पुनः जन्म संपत् याप्रमाणें समजाव्या. यांचीं फलें नामासारखीं जाणावीं.

शुभमसौ हस्त्यान्यतिथयःप्रोक्ताःसितजीवज्ञवासराः चंद्रवारंप्रशंसंतिकृष्णेचांत्यत्रिकंविना **श्रीधरः** आदित्यतिष्यवसुसौम्यकरानिलाश्विचित्राजविष्णुवरुणोत्तरपौष्णमित्राः बालान्नभोजनविधौदशमेविशुद्धेछिद्रांविहायनवमींतिथयःशुभाःस्युः **वसिष्ठः** बालान्नभुक्तौव्रतबंधनेचराजाभिषेकेखलुजन्मधिष्ण्यं शुभंस्वनिष्टंसततंविवाहेसीमंतयात्रादिषुमंगलेषु **मार्कंडेयविष्णुधर्मयोः** ब्रह्माणंशंकरंविष्णुंचंद्रार्कौचदिगीश्वरान् भुवंदिशश्चसंपूज्यहुत्वावह्नौतथाचरुं देवतापुरतस्तस्यधात्र्युत्संगगतस्यच अलंकृतस्यदातव्यमन्नंपात्रेसकांचनं मध्वाज्यदधिसंयुक्तंप्राशयेत्पायसंतुवेति ।

## आतां अन्नप्राशन संस्कार सांगतो.

**पारिजातांत—नारद**—"जन्ममासापासून सौरमानानें सहाव्या मासांत अन्नप्राशन करावें. त्याच्या अभावीं आठव्या, नवव्या, दहाव्या अथवा बाराव्या मासांत बालकाला प्रथम अन्नप्राशन करावें, अथवा वर्ष संपूर्ण झाल्यावर अन्नप्राशन करावें असें केचित् विद्वान् सांगतात." **मदनरत्नांत—लौगाक्षि**—"सहाव्या मासांत किंवा दंतोत्पत्ति झाल्यानंतर अन्नप्राशन करावें." **शंख**—"वर्षांतीं अन्नप्राशन करावें. किंवा सहाव्या मासांत करावें." **ज्योतिर्निबंधांत—नारद**—"सहाव्या किंवा आठव्या मासीं पुरुषाचें प्रथम अन्नप्राशन करावें. स्त्रियांचें पांचव्या किंवा सातव्या मासीं अन्नप्राशन करावें. चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, दिनक्षय, प्रतिपदा, द्वादशी, अष्टमी, अमावास्या, ह्या तिथि वर्ज्य करून अन्य तिथि शुभ होत. बुध, गुरु, शुक्र, हे वार अन्नप्राशनाविषयीं प्रशस्त होत. कृष्ण पक्षांतील शेवटचे पांच दिवस टाकून इतर दिवशीं चंद्रवार प्रशस्त आहे." **श्रीधर**—"पुनर्वसु, पुष्य, धनिष्ठा, मृग, हस्त, स्वाती, अश्विनी, चित्रा, रोहिणी, श्रवण, शततारका, तीन उत्तरा, रेवती, अनुराधा, हीं नक्षत्रें अन्नप्राशनाविषयीं शुभ होत. धरलेल्या लग्नापासून दशम लग्न शुद्ध असावें. छिद्रा तिथि, व नवमी वर्ज्य करून इतर तिथि शुभ होत." **वसिष्ठ**—"बालकाचें अन्नप्राशन, उपनयन, राजाभिषेक, यांचे ठायीं जन्मनक्षत्र शुभ आहे. विवाह, सीमंतसंस्कार आणि यात्रादिक मंगल कृत्यें यांविषयीं जन्मनक्षत्र अशुभ जाणावें." **मार्कंडेयांत व विष्णुधर्मांत**—"ब्रह्मा, शंकर, विष्णु, चंद्र, सूर्य, दिक्पाल, भूमि, दिशा, यांची पूजा करून अग्नीमध्यें चरुहोम करून कुलदेवतेच्या अग्रभागीं मातेच्या मांडीवर बसलेला असून अलंकारयुक्त अशा बालकाला, पात्रांत दधि, मध, घृत यांनीं मिश्रित असें अन्न किंवा क्षीर, सुवर्णयुक्त हस्तानें घेऊन प्राशन करवावें."

**अथाब्दपूर्तिः व्यवहारनिर्णये** नवांबरधरोभूत्वापूजयेच्चचिरायुषं मार्कंडेयंनरोभक्त्यापूजयेत्प्रयतस्तथा ततोदीर्घायुषंव्यासंरामंद्रौणिंकृपंबलिम् प्रह्लादंचहनूमंतंबिभीषणमथार्चयेत् स्वनक्षत्रंजन्मतिथिंप्राप्यसंपूजयेन्नरः षष्ठींचदधिभक्तेनवर्षेवर्षेपुनःपुनः **तिथितत्त्वे**एतन्नामभिस्तिलहोमोप्युक्तः **आदित्यपुराणे** सर्वैश्चजन्मदिवसेस्नातैर्मंगलवारिभिः गुरुदेवाग्निविप्राश्चपूजनीयाःप्रयत्नतः स्वनक्षत्रंचपितरौतथादेवःप्रजापतिः प्रतिसंवत्सरंयत्नात्कर्तव्यश्चमहोत्सवः **कृत्यचिंतामणौ** गुडदुग्धतिलान्दद्याद्धस्तेग्रंथींच बंधयेत् गुग्गुलंनिंबसिद्धार्थदूर्वागोरोचनादिकं संपूज्यभानुविघ्नेशौमहर्षिंप्रार्थयेदिदं चिरंजीवीयथात्वंभोभविष्यामितथामुने रूपवान्वित्तवांश्चैवश्रियायुक्तश्चसर्वदा मार्कंडेयनमस्तेस्तुसप्तकल्पांतजीवन आयुरारोग्यसिद्ध्यर्थंप्रसीदभगवन्मुने चिरंजीवीयथात्वंतुमुनीनांप्रवरद्विज कुरुष्वमुनिशार्दूलतथामांचिरजीविनं मार्कंडेयमहाभागसप्तकल्पांतजीवन आयुरारोग्यसिद्ध्यर्थमस्माकंवरदोभव सतिलंगुडसंमिश्रमंजल्यर्धमितंपयः मार्कंडेयाद्वरंलब्ध्वापिबाम्यायुर्विवृद्धयइतिपयःपिबेत् **तिथितत्त्वेस्कांदे** खंडनंनखकेशानांमैथुनाध्वागमौतथा आमिषंकलहंहिंसांवर्षवृद्धौविवर्जयेत् **तत्रैवदीपिकायां** कृतांतकुजयोर्वारेयस्यजन्मतिथिर्भवेत् अनृक्षयोगसंप्राप्तौविघ्नस्तस्यपदेपदे कृतांतःशनिः तस्यसर्वौषधिस्नानंगुरुदेवाग्निपूजनं **वृद्धमनुः** मृतेजन्मनिसंक्रांतौश्राद्धेजन्मदिनेतथा अस्पृश्यस्पर्शनेचैवनस्नायादुष्णवारिणा अत्रजन्मतिथिरौदयिकीग्राह्या युगाद्या-

---

१ मात्रुत्संगगतस्यचेति पाठांतरं. २ छिद्रातिथि सीमंतोन्नयनप्रकरणीं पहाव्या. ३ कुष्ठं मांसी हरिद्रे द्वे मुरा शैलेयचंदनं ॥ वचाचंपकमुस्ताश्च सर्वौषध्यो दश स्मृताः ॥. ४ जन्मतिथिरिति तद्वैधेराजमातलिः ॥ घस्रद्वयेजन्मतिथिर्यदिस्यात्कुर्यात्तदाजन्मभसंयुतायाम् । भसंगतातेनदिनद्वयेचेत्पूज्यापराया भवतीह यत्नादिति ॥ खट्वारोहदुग्धपानकर्णवेधनिष्क्रमणजीविकापरीक्षोपवेशनवराहादिपूजान्नप्राशनाब्दपूर्तिकटिसूत्राणि मयूखकौस्तुभप्रयोगपारिजातादौ धर्मसिंधौच विस्तृतानिबोध्यानि ॥

वर्षवृद्धिश्वसप्तमीपार्वतीप्रिया रवेरुदयमीक्षंतेनतत्रतिथियुग्मतेतिकृत्यतत्त्वार्णवेवचनात् विशेषोमत्कृत-शूद्रधर्मेज्ञेयः ॥

## आतां अब्दपूर्ति ( वर्षापन, वाढदिवसाचा विधि ) सांगतो.

**व्यवहारनिर्णयांत**—"पुरुषानें प्रतिवर्षी आपलें जन्मनक्षत्र, व जन्मतिथि प्राप्त असतां नूतन वस्त्रादिकांनी युक्त चिरायु मार्कंडेयाची भक्तीनें पूजा करावी. नंतर व्यास, परशुराम, अश्वत्थामा, कृप, बलि, प्रल्हाद, हनूमान्, बिभीषण, आणि षष्ठी देवी ह्या देवतांची ( नाममंत्रानें ) पूजा करून षष्ठी देवीला दहींभाताचा नैवद्य समर्पण करावा." **तिथितत्त्वांत**—ह्या देवतांच्या नाममंत्रांनीं तिलहोमही सांगितला आहे. **आदित्यपुराणांत**—"सर्वांनीं आपापल्या जन्मदिवशीं तैला-भ्यंग करून मांगलिक उदकानें स्नान करून तिलक करावा. आणि गुरु, देव, अग्नि, ब्राह्मण, आपलें जन्मनक्षत्र, माता, पिता, देव प्रजापति, यांची पूजा करावी. याप्रमाणें प्रतिवर्षी मोठा उत्सव करावा." **कृत्यचिंतामणींत**—"गूळ, दूध, तीळ यांचें दान करावें. आणि गुग्गुळ, निंब, राई, दूर्वा, गोरोचन इत्यादिक पदार्थ वस्त्राच्या ग्रंथींत घालून ते हातांत बांधावे. नंतर भानु, व गणपति यांची पूजा करून मार्कंडेयाची प्रार्थना करावी. **प्रार्थनामंत्र**—'चिरंजीवी यथा त्वं भो भविष्यामि तथा मुने ॥ रूपवान् वित्तवांश्चैव श्रिया युक्तश्च सर्वदा ॥ मार्कंडेय नमस्तेस्तु सप्तकल्पांतजीवन ॥ आयुरारोग्य-सिद्ध्यर्थं प्रसीद भगवन्मुने ॥ चिरंजीवी यथा त्वं तु मुनीनां प्रवर द्विज ॥ कुरुष्व मुनिशार्दूल तथा मां चिरजीविनं ॥ मार्कंडेय महाभाग सप्तकल्पांतजीवन ॥ आयुरारोग्यसिद्ध्यर्थमस्माकं वरदो भव ॥' याप्रमाणें प्रार्थना केल्यानंतर 'सतिलं गुडसंमिश्र-मंजल्यर्धमितं पयः ॥ मार्कंडेयाद्वरं लब्ध्वा पिबाम्यायुर्विवृद्धये ॥' ह्या मंत्रानें दुग्ध प्राशन करावें." **तिथितत्त्वांत स्कांदांत**—"नखें व केश यांचें छेदन, मैथुन, प्रयाण, मांसभक्षण, कलह, हिंसा हीं वाढदिवसाचे दिवशीं वर्ज्य करावीं." तेथेंच **दीपिकेंत** "शनिवारीं व भौमवारीं ज्याची जन्मतिथि प्राप्त झाली असेल व जन्मनक्षत्र, जन्मयोग नसेल त्याला पदोपदीं विघ्न प्राप्त होतें, त्याच्यापरिहारासाठीं सर्वौषधियुक्त[1] उदकानें स्नान व गुरु, देव अग्नि यांचें पूजन हीं करावीं." **वृद्ध-मनु**—"सपिंडादिकांचें मरण, पुत्र कन्या यांचे जन्म, सूर्याची संक्रांति, श्राद्ध, वाढदिवस चांडालादिकांचा स्पर्श यांतून कोणतेंही असतां जें स्नान करणें तें उष्णोदकानें करूं नये." ह्या वर्षापनाविषयीं जन्मतिथि घ्यावयाची ती सूर्योदयव्यापिनी घ्यावी. कारण, "युगादितिथि, वर्षापनाची तिथि, नवरात्रांतील सप्तमी, ह्या तिथि सूर्योदयव्यापिनी घ्याव्या. युग्मवाक्यानें प्राप्त झालेल्या घेऊं नयेत." असें **कृत्यतत्त्वार्णवांत** वचन आहे. याविषयींचा विशेष विचार मी ( कमलाकरानें ) केलेल्या शूद्रकमलाकरांत पाहावा.

**अथकटिसूत्रं प्रयोगपारिजाते ब्राह्मे** प्रतिसंवत्सरांतर्क्षेवक्ष्येनृणांविधिंपरं दत्वागोभूहिरण्या-दितथास्वर्णादिनिर्मितं बध्नीयात्कटिसूत्रंचवासःसंगृह्यनूतनं दूर्वांकुरैरथाज्येनचरुणावापिनाकिनं आयुष्य-होमंकृत्वाचतर्पयेत्पितृदेवताः ।

## आतां कटिसूत्रबंधन सांगतो.

**प्रयोगपारिजातांत ब्राह्मांत**—"प्रत्येक वर्षाचे अंतीं जन्मनक्षत्रीं मनुष्यांना कर्तव्य विधि सांगतो—गाई, भूमि, हिरण्य इत्यादि दान करून नवीन वस्त्र परिधान करून सुवर्णादिकांचा केलेला कटिदोरा[2] बांधावा; दूर्वांकुर किंवा घृत अथवा चरु यांचा रुद्रदेवतेच्या उद्देशानें आयुष्यहोम करून पितरांचें व देवतांचें तर्पण करावें."

**अथचौलं प्रयोगपारिजातेषड्गुरुशिष्यः** जाताधिकाराज्जन्मादितृतीयेब्देतुचौलकं आद्येब्दे-कुर्वतेकेचित्पंचमेब्देद्वितीयके उपनीत्यासहैवेतिविकल्पाःकुलधर्मतः **बृहस्पतिः** तृतीयेब्देशिशोर्गर्भाज्जन्म-तोवाविशेषतः पंचमेसप्तमेवापिस्त्रियाःपुंसोपिवासमं **तत्रैवनारदः** जन्मतस्तुतृतीयेब्देश्रेष्ठमिच्छंतिपंडिताः पंचमेसप्तमेवापिजन्मतोमध्यमंभवेत् अधमंगर्भतःस्यात्तुनवमैकादशेपिवेति **पारिजातेबृहस्पतिः** उत्त-रायणगेसूर्येविशेषात्सौम्यगोलके शुक्लपक्षेशुभंप्रोक्तंकृष्णपक्षेशुभेतरत् अशुभोंत्यत्रिभागःस्यात्कृष्णपक्षेत्रिधा-कृते **तत्रैववसिष्ठः** द्वित्रिपंचमसप्तम्यामेकादश्यांतथैवच दशम्यांचत्रयोदश्यांकार्यंक्षौरंविजानता **श्रुति-र्हीये** षष्ठयष्टमीचतुर्थीचनवमीचचतुर्दशी द्वादशीदर्शपूर्णेद्वेप्रतिपच्चैवनिंदिताः **वसिष्ठः** रवेरंगारकस्यैव-

---

१ कुष्ठ, जटांमासी, हळद, आंबेहळद, मुरा, शैलेय, चंदन, वेखंड, चांफा, नागरमोथा ह्या सर्वौषधि होत. २ जें कोणतेंही कर्म, कटिबंधन करून केलें असतां तें सर्व निष्फळ होतें. रुप्याचा, कापसाचा, सुवर्णाचा अथवा रेशमाचा कटिदोरा कमरेंत धारण करावा, असें गृहस्थधर्मप्रकरणीं आश्वलायन सांगतो.

सूर्यशुक्रमवीवहि निंदितादिवसाःक्षौरेशेषाःकार्यकराःस्मृताः **ज्योतिर्निबंधे बृहस्पतिः** पापग्रहाणां वारार्कौविप्राणांशुभदंरवौ क्षत्रियाणांक्षमासूनौविट्शूद्राणांशनौशुभं हस्ताश्विविष्णुपौष्णाश्वश्रविष्ठादित्यपुष्यर्क्षं सौम्यचित्रेनवक्षौरेउत्तमानवतारकः त्रीण्युत्तराणिवायव्यंरोहिणीवारुणंतथा क्षौरेषणमध्यमाःप्रोक्ताःशेषाद्वादशगर्हिताः निधनेजन्मनक्षत्रेवैनाशेचंद्रमेष्टमे विपत्करेवधेक्षौरंप्रत्यरेचविवर्जयेत् अत्रलग्नशुद्धिरन्येषयोगाज्योतिर्विद्भ्योज्ञेयाः अन्येचविशेषाः श्मश्रुकर्मनिर्णयेवक्ष्यंते ।

## आतां चौलसंस्कार सांगतो.

**प्रयोगपारिजातांत—षड्गुरुशिष्य**—"चौलाविषयीं तिसऱ्या वर्षी अधिकार प्राप्त झालेला असल्यामुळें जन्मापासून तिसऱ्या वर्षी चौल संस्कार करावा. कितीएक विद्वान् प्रथम वर्षी किंवा पांचव्या वर्षी अथवा दुसऱ्या वर्षी अथवा मौंजीसहवर्तमान करितात. हे विकल्प कुलधर्मावरून जाणावे." **बृहस्पति**—"गर्भापासून किंवा जन्मापासून तिसऱ्या वर्षी मुलाचा चौलसंस्कार विशेषेंकरून करावा. अथवा पांचव्या किंवा सातव्या वर्षी करावा. हा कन्येचा व पुत्राचाही समान आहे." तेथेंच **नारद**—"जन्मापासून तिसऱ्या वर्षी करावा तो श्रेष्ठ आहे, असें पंडित सांगतात. जन्मापासून पांचव्या किंवा सातव्या वर्षी मध्यम होय. गर्भापासूनही नवव्या व अकराव्या वर्षी अधम होय." **पारिजातांत बृहस्पति**—"सूर्य उत्तरायणांत असतां व विशेषेंकरून उत्तर गोलांत असतां, शुक्लपक्षीं शुभ होय. कृष्णपक्षीं शुभ नाहीं, अर्थात् मध्यम. कृष्णपक्षाचे शेवटचे पांच दिवस अशुभ होत." तेथेंच **वसिष्ठ**—"द्वितीया, तृतीया, पंचमी, सप्तमी, एकादशी, दशमी, त्रयोदशी ह्या तिथींचे ठायीं ज्ञात्या पुरुषानें क्षौर करावें." **नृसिंहाच्या ग्रंथांत**—"षष्ठी, अष्टमी, चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, द्वादशी, अमावास्या, पूर्णिमा आणि प्रतिपदा ह्या तिथि क्षौरकर्माविषयीं निंदित होत." **वसिष्ठ**—"रवि, मंगळ, शनि हे वार क्षौराविषयीं निषिद्ध होत. इतर वार शुभ जाणावे." **ज्योतिर्निबंधांत बृहस्पति**—"पापग्रहांचे जे वार त्यांपैकीं रविवार ब्राह्मणांस शुभ; भौमवार क्षत्रियांस शुभ; आणि शनिवार वैश्य व शूद्र यांना शुभ. हस्त, अश्विनी, श्रवण, रेवती, धनिष्ठा, पुनर्वसु, पुष्य, मृग, चित्रा हीं नऊ नक्षत्रें नवीन क्षौराविषयीं उत्तम होत. तीन उत्तरा, स्वाती, रोहिणी, शततारका हीं सहा नक्षत्रें क्षौराविषयीं मध्यम. बाकीचीं बारा नक्षत्रें निंदित होत." निधनतारा, जन्मतारा, वैनाशतारा, अष्टमचंद्र, विपत्तारा, वधतारा आणि प्रत्यरितारा ह्या क्षौराविषयीं वर्ज्य कराव्या." ह्या चौल संस्काराविषयीं लग्नशुद्धि व इतर योग ज्योतिष ग्रंथांतून जाणावे. इतर विशेष निर्णय श्मश्रुकर्माचे निर्णयप्रसंगी पुढें सांगूं.

एतच्चशिशोर्मातरिगर्भिण्यांनकार्यम् तदाह**ज्योतिर्निबंधेमदनरत्नेचवृद्धगार्ग्यः** पुत्रचूडाकृतौमातायदिसागर्भिणीभवेत् शस्त्रेणमृत्युमाप्नोतितस्मात्क्षौरंविवर्जयेत् अस्यापवादमाहतत्रैव**नारदः** सूनोर्मातरिगर्भिण्यांचूडाकर्मनकारयेत् पंचाब्दात्प्रागथोर्ध्वंतुगर्भिण्यामपिकारयेत् यदिगर्भविपत्तिःस्याच्छिशोर्वामरणंयदि सहोपनीत्याकुर्याच्चेत्तदादोषोनविद्यते **बृहस्पतिः** गर्भिण्यांमातरिशिशोःक्षौरकर्मनकारयेत् व्रताभिषेकेप्येवंस्यात्कालोवेदव्रतेष्वपि अभिषेकः समावर्तनं गर्भिण्यामपिपंचममासपर्यंतंनदोषइत्युक्तं**मुहूर्तदीपिकायांगर्गेण** पंचममासादूर्ध्वंमातुर्गर्भस्यजायतेमृत्युरिति **मदनरत्नेबृहस्पतिः** पुत्रचूडाकृतौमातागर्भिणीयदिवाभवेत् विपद्यतेगुरुस्तत्रदंपतीशिशुरब्दतः गर्भेमातुःकुमारस्यनकुर्याच्चौलकर्मतु पंचमासादधःकुर्यादतऊर्ध्वंनकारयेत् **गर्गः** ज्वरस्योत्पादनंयस्यलग्नंतस्यनकारयेत् दोषनिर्गमनात्पश्चात्तस्योधर्मंसमाचरेत् लग्नमितिमंगलोपलक्षणम् **ज्योतिर्गर्गः** विवाहोत्सवयज्ञेषुमातायदिरजस्वला तदास्मृत्युमाप्नोतिपंचमंदिवसंविना **वसिष्ठः** यस्यमांगलिकंकार्यंतस्यमातारजस्वला अर्धतदेव तत्रैव**बृहस्पतिः** प्राप्तमभ्युदयश्राद्धंपुत्रसंस्कारकर्मणि पत्नीरजस्वलाचेत्स्यान्नकुर्यात्तत्पितातदा पितेतिकर्तृमात्रोपलक्षणं संकटेतु **वाक्यसारे**उक्तं अलाभेसुमुहूर्तस्यरजोदोषेह्युपस्थिते श्रियंसंपूज्यविधिवत्ततोमंगलमाचरेत् ।

हा चौलसंस्कार ज्याचा करावयाचा त्याची माता गर्भिणी असतां करूं नये; तें सांगतो—**ज्योतिर्निबंधांत** व **मदनरत्नांत वृद्धगार्ग्य**—"माता गर्भिणी असतां पुत्राचा चौलसंस्कार केला तर तिला शस्त्रापासून मृत्यु प्राप्त होतो;

---

१ निधनादितारा: मुहूर्तग्रंथेभ्यो ज्ञेयाः ॥ २ मातेति जननीविषयकं तेन सापत्नमातरि गर्भिण्यामपि न दोषः । तदुक्तं भट्टोजिना। भिन्नभार्यासुतस्येह न दोषश्चौलकर्मणीति ॥ ३ सहोपनीत्येति । यत्तु सूनोर्मातरि गर्भिण्यां मौंजीचूडे न कारयेदिति तत्प्रत्येकं निषेधकं न तु सहितस्येति ॥

यास्तव चौल करूं नये." याचा अपवाद सांगतो— तेथेंच **नारद**—"माता गर्भिणी असेल तर पुत्राचें चौल करूं नये. पुत्राचें वय पांच वर्षांहून अधिक असल्यास माता गर्भिणी असतांही करावें. जर गर्भाला विपत्ति प्राप्त होईल किंवा विवाह मरण प्राप्त होईल, असा दोष सांगितला आहे, असें कोणी म्हणेल तर मौंजीसह चौल करावें, म्हणजे तो दोष नाहीं." **बृहस्पति**—"माता गर्भिणी असतां पुत्राचें क्षौर ( चौल ) करूं नये. मौंजीचें समावर्तन, वेदव्रतें ( ब्रह्मचाऱ्यानें करावयाचीं तीं ) यांविषयींही असाच काल जाणावा." माता गर्भिणी असली तरी पांच मासपर्यंत दोष नाहीं, असें सांगतो **दीपिकेंत गर्ग**—"गर्भिणीला पांच महिने होऊन गेल्यानंतर ( पुत्राचें चौल केलें असतां ) मातेच्या गर्भाला मृत्यु प्राप्त होतो." **मदनरत्नांत बृहस्पति**-"माता गर्भिणी असतां पुत्राचा चौल संस्कार होईल तर गुरु ( आचार्य ), दंपती, आणि शिशु हे एका वर्षांत नाश पावतात, यास्तव माता गर्भिणी असतां पुत्राचें चौल करूं नये. पांच महिन्यांचे पूर्वी करावें, पांच महिन्यांनंतर करूं नये." **गर्ग**—"ज्याला ज्वर उत्पन्न होईल त्याचें लग्न ( मंगलकार्य ) करूं नये. ज्वरादिक दोष दूर झाल्यानंतर स्वस्थ झाल्यावर धर्म ( मंगलकार्य ) करावा." **ज्योतिर्गर्ग**—"विवाह, उत्सव, यज्ञ, यांमध्यें जर माता रजस्वला होईल तर कर्त्याला मृत्यु प्राप्त होतो. पांचव्या दिवशीं विवाहादि केलें असतां दोष नाहीं." **वसिष्ठ**—"ज्याचें मंगलकार्य करावयाचें आहे त्याची माता रजस्वला असेल आणि पांचव्या दिवसावांचून पूर्वीच मंगल केलें असेल तर त्याला मृत्यु प्राप्त होईल. पांचव्या दिवशीं दोष नाहीं." तेथेंच **बृहस्पति**—"पुत्राच्या संस्कारकर्मांत प्राप्त झालेलें नांदीश्राद्ध, जर पत्नी रजस्वला असेल तर पित्यानें तें नांदीश्राद्ध करूं नये." 'पित्यानें' म्हणजे जो कोणी कर्ता असेल त्यानें, असें समजावें. संकटविषय असतां **वाक्यसारांत** सांगतो—"कर्त्याची पत्नी रजस्वला झाली असून सन्निध सुमुहूर्त नसेल तर श्रीशांति करून मंगलकार्य करावें."

एतच्चमंडनोत्तरंनकार्यं नमंडनाच्चापिहिमुंडनंचगोत्रैकतायांयदिनाब्दभेद इति **मदनरत्नेवसिष्ठोक्तेः** तत्रैव**कात्यायनः** कुलेऋतुत्रयादर्वाङ्मंडनान्नतुमुंडनं प्रवेशान्निर्गमोनेष्टोनकुर्यान्मंगलत्रयं तथा**वृद्धमनुः** एकमातृजयोरेकवत्सरेपुरुषस्त्रियोः नसमानक्रियांकुर्यान्मातृभेदेविधीयते आशौचेतु**संग्रहे** संकटेसमनुप्राप्तेसूतकेसमुपागते कूष्मांडीभिर्घृतंहुत्वागांचदद्यात्पयस्विनीम् चूडोपनयनोद्वाहप्रतिष्ठादिकमाचरेदिति **ज्योतिर्निबंधे** षष्ठेब्देषोडशेवर्षेविवाहाब्देतथैवच अंतर्वत्न्यांचजायायांनेष्यतेमुंडनंक्वचित् अन्योपिविशेषोविवाहप्रकरणेवक्ष्यते **दीपिकायां** नचूडाजन्मभाग्नेयदारुणेषुज्ञनौकुजे प्रतिपद्भद्ररिक्तासुविद्यारंभस्तुपंचमे ।

हें चौल मंडनोत्तर ( मंगल कार्य केल्यानंतर ) करूं नये. कारण, "एक गोत्रांत ( त्रिपुरुषांत ) मंगलकार्य केल्यानंतर वर्ष भिन्न झाल्यावांचून मुंडन ( चौलादि ) करूं नये. वर्षभेद झाला असतां दोष नाहीं." असें **मदनरत्नांत वसिष्ठवचन** आहे. तेथेंच **कात्यायन**—"एका कुलांत ( त्रिपुरुषांत ) सहा महिन्यांच्या आंत मंगलकार्योत्तर मुंडन करूं नये. आणि प्रवेश ( पुत्रविवाह ) केल्यावर निर्गम ( कन्याविवाह ) इष्ट नाहीं. आणि तीन मंगलकार्यें करूं नयेत." तसाच **वृद्धमनु**—एका संवत्सरांत सहोदर अशा कन्यापुत्रांचे समान संस्कार करूं नयेत. माता भिन्न असतील तर करावे." आशौच प्राप्त असेल तर सांगतो **संग्रहांत**—"मृताशौच अथवा जननाशौच प्राप्त असेल तर कूष्मांडी ऋचांनीं घृताचा होम करून दुभती गाय ब्राह्मणाला द्यावी. आणि चौल, मुंज, विवाह, प्रतिष्ठा इत्यादि शुभ कार्य करावें" **ज्योतिर्निबंधांत**—"सहाव्या वर्षी, सोळाव्या वर्षी, विवाह केला असेल त्या वर्षी आणि स्त्री गर्भिणी असतां कधींही मुंडन करूं नये." इतरही विशेष निर्णय पुढें विवाहप्रकरणीं सांगूं. **दीपिकेंत**—"जन्मनक्षत्र, कृत्तिका, मूल, ज्येष्ठा, आर्द्रा, आश्लेषा ह्या नक्षत्रांवर; शनि, मंगळ ह्या वारीं; प्रतिपदा, भद्रा ( द्वितीया, सप्तमी, द्वादशी ), रिक्ता ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ) ह्या तिथींचे ठायीं चौलसंस्कार करूं नये. विद्यारंभ पांचव्या वर्षी करावा."

**प्रयोगरत्ने** मध्येशिरसिचूडास्याद्वासिष्ठानांतुदक्षिणे उभयोःपार्श्वयोरत्रिकश्यपानांशिखामता **माधवीयेप्येवं आपस्तंबस्त्वाह** तूर्ष्णींकेशान्विनीययथर्षिशिखानिदधाति यथर्षिप्रवरसंख्यया तासांमध्यशिखावर्जमुपनयनेवपनंकार्यं प्रतिदिशंप्रवपतीत्युपनयने**तत्रैवोक्तेः** रिक्तोवाएषोनपिहितोयन्मुंडस्तस्यैतदपिधानंयच्छिखेति **श्रुतेः** विशिखोव्युपवीतश्चयत्करोतिनतत्कृतमितिनिषेधाच्च सत्रेतुवचनात्सशिखंवपनमिति **सुदर्शनभाष्येउक्तं** यत्तुकुमाराविशिखाइवेतिलिंगंतच्छंदोगपरं **अपरार्केमदनरत्नेचलौगाक्षिः** दक्षिणतःकमुंजावसिष्ठानामुभयतोत्रिकश्यपानांमुंडाभृगवः पंचचूडाअंगिरसोवाजिमेकेमंगलार्थंशिखिनोऽ-

१ पुत्रोद्वाहः प्रवेशाख्यः कन्योद्वाहस्तु निर्गमः । मुंडनं चौलमित्युक्तं व्रतोद्वाहौ तु मंगलं ॥ चौलं मुंडनमेवोक्तं [illegible] वरणात्तदुपक्रमकालादिल्यर्थः । मौंजी चोभयतः कार्या यतो मौंजी न मुंडनं ॥ उभयतो विवाहात्प्रागूर्ध्वं चेत्यर्थः ॥ इति [illegible]

न्येयथाकुलधर्मवेति कमुंजाशिखा वाजिःकेशपंक्तिः **स्मृतिदर्पणे** एकाशिखादक्षिणतोवसिष्ठगोत्रस्यपंचांगिरसोभृगोस्तु नैकाशिखाकश्यपगोत्रजानांशिखोभयत्रापियथाकुलंच एतच्छूद्रातिरिक्तविषयम् शूद्रस्यानियताःकेशवेशाइतिव**सिष्ठोक्तेः** यत्तुपाद्मे नशिखीनोपवीतीस्यान्नोच्चरेत्संस्कृतांगिरमितिशूद्रमुपक्रम्योक्तं तदसच्छूद्रस्येतिके**चित्** विकल्पइतितुयुक्तं अतएव**हारीतः** स्त्रीशूद्रौतुशिखांछित्त्वाक्रोधाद्वैराग्यतोपिवा प्राजापत्यंप्रकुर्यातांनिष्कृतिर्नान्यथाभवेत् एतत्परिग्रहपक्षे अत्रदेशभेदाद्व्यवस्थेतिदिक् ।

**प्रयोगरत्नांत**—"मस्तकाच्या मध्यभागीं शिखा राखावी. वासिष्ठांची शिखा दक्षिणेस राखावी. अत्रि आणि कश्यप यांची शिखा दोन्ही बाजूंस राखावी." **माधवीयां**तही असेंच सांगितलें आहे. **आपस्तंब** तर सांगतो—"जितके प्रवराचे ऋषि तितक्या शिखा ठेवाव्या आणि इतर केश काढून टाकावे. त्याविषयीं मंत्र नाहीं." चौलसंस्कारांत ज्या शिखा राखल्या असतील त्यांपैकीं एक मध्यशिखा ठेऊन इतर शिखांसह मस्तकाचें वपन उपनयनकालीं करावें. कारण, "मस्तकाच्या प्रत्येक बाजूस वपन करावें" असें उपनयनसंस्कारांत त्यानेंच ( **आपस्तंबानेंच** ) सांगितलें आहे. यावरून साऱ्या बाजूंच्या शिखा काढाव्या असें झालें. आणि "ज्यानें डोक्याचे सर्व केश काढले तो आच्छादित नसल्यामुळें रिक्त ( सर्वरहित ) आहे. त्याला शिखा ही आच्छादन आहे." अशी **श्रुति** आहे. आणि "जो शिखारहित व उपवीतरहित असून कर्म करितो, त्याचें तें कर्म केल्यासारखें होत नाहीं" असा शिखारहित असण्याचा निषेधही असल्यामुळें मध्यशिखा राखावी, असें सिद्ध होतें. सत्रयागामध्यें तर शिखासहित वपनाविषयीं वचन असल्यामुळें सर्वशिखांचें वपन होतें, असें **सुदर्शनभाष्यांत** सांगितलें आहे. आतां जें "शिखारहित जसे कुमार शोभतात" या मंत्रावरून शिखारहित कुमार असतात असें होतें, तें छंदोगशाखाविषयक आहे. **अपरार्कांत** आणि **मदनरत्नांत लौगाक्षि**—"वसिष्ठांची शिखा दक्षिणेकडे राखावी. अत्रि व कश्यप यांची शिखा दोन्ही बाजूंस राखावी. भृगूला शिखा राखूं नये. आंगिरसांना पांच शिखा राखाव्यात. कितीएक मंगलाकरितां केशपंक्ति राखितात. इतरांनीं आपल्या कुलधर्माप्रमाणें शिखा राखाव्या." **स्मृतिदर्पणांत**—"वसिष्ठगोत्राला दक्षिणेकडे एक शिखा असावी. आंगिरसांना पांच शिखा. भृगूंना एकही शिखा नाहीं. कश्यपगोत्रजांना दोन्ही बाजूंस शिखा असाव्यात. आणि आपल्या कुलधर्माप्रमाणें शिखा राखाव्यात." हे शिखांचे विधि शूद्रव्यतिरिक्तविषयक आहेत. कारण, "शूद्रांचे केशवेष अनियत ( नियमरहित ) आहेत" असें **वसिष्ठ**वचन आहे. आतां जें **पाद्मांत**—"शूद्रानें शिखा राखूं नये, उपवीत धारण करूं नये, आणि संस्कृतवाणीचा उच्चार करूं नये" असें सांगितलें तें असच्छूद्राला समजावें, असें केचित् सांगतात. शूद्राला शिखेविषयीं विकल्प समजावा, हें तर युक्त आहे. म्हणूनच सांगतो **हारीत**—स्त्रिया व शूद्र हे क्रोधाच्या आवेशानें अथवा वैराग्यानें शिखा तोडतील तर त्यांनीं प्राजापत्य प्रायश्चित्त करावें. त्यावांचून त्यांची निष्कृति होणार नाहीं", हें वचन शिखाधारणपक्षीं जाणावें. शूद्राला शिखाधारणाचा विकल्प आहे. कोणता पक्ष घ्यावा याची देशभेदानें व्यवस्था जाणावी. याप्रमाणें ही दिशा दाखविली आहे.

**ज्योतिर्निबंधे** नर्मदोत्तरदेशेतुसिंहस्थेदेवमंत्रिणि शुभकर्मनकुर्वीतनिषेधोनास्तिदक्षिणे अत्रभोजने प्रायश्चित्तमुक्तं**पराशरमाधवीये** निवृत्तेचूडहोमेतुप्राङ्नामकरणात्तथा चरेत्सांतपनंभुक्त्वाजातकर्मणिचैवहि अतोन्येषुतुसंस्कारेषूपवासेनशुध्यति एतेसंस्काराःस्त्रीणाममंत्रकाःकार्याः होमस्तुसमंत्रकइति **प्रयोगपारिजाते आश्वलायनोपि** होमकृत्यंतुपुंवत्स्यात्स्त्रीणांचूडाकृतावपीति **मनुरपि** अमंत्रिकातुकार्येयंस्त्रीणामावृदशेषतइति होमोप्यमंत्रकइत्येके संस्काराःस्त्रीणामहोमकास्तूष्णींस्युरितिस्**मृत्यर्थसारे**होमोनेतिवृत्तिकृत् ।

**ज्योतिर्निबंधांत**—"सिंहस्थ गुरु असतां नर्मदेच्या उत्तर देशीं मंगलकार्य करूं नये. नर्मदेच्या दक्षिणदेशीं निषेध नाहीं." ह्या चौलसंस्कारीं भोजन केलें असतां प्रायश्चित्त सांगतो **पराशरमाधवीयां**त—"चौलसंस्कार व नामकरणाचे पूर्वी जातकर्म, यांचे ठायीं भोजन केलें असतां सांतपनकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. यांहून जे इतर संस्कार त्यांचे ठायीं भोजन केलें असतां उपवास करून शुद्ध होतो." हे जातकर्मापासून चौलपर्यंत संस्कार स्त्रियांचे अमंत्रक करावे, होम मात्र समंत्रक करावा, असें **प्रयोगपारिजातांत** सांगितलें आहे. **आश्वलायनही**—"स्त्रियांचे चौलसंस्कारांतही होमकृत्य, पुरुषासारखें समंत्रक करावें." **मनुही**—"स्त्रियांचे सर्व संस्कार ( विवाहावांचून ) मंत्रविरहित करावे." होमही अमंत्रक करावा, असें कितीएक सांगतात. स्त्रियांचे संस्कार होमविरहित अमंत्रक होतात, असें **स्मृत्यर्थसारांत** सांगितलें आहे. होम करूं नये. असें **वृत्तिकार** सांगतो.

**अथविद्यारंभः मदनरत्ने नृसिंहः** अक्षरस्वीकृतिंकुर्यात्प्राप्तेपंचमहायने उत्तरायणगेसूर्येकुंभमा-

संविवर्जयेत् **दीपिकायाम्** वर्षेपर्जन्यकेकालेषष्ठीरिक्तांशनिंकुजं अनध्यायान्विनानत्वादेवंग्रंथकृद्गुरुं **श्रीधरः** हस्तादित्यसमीरमित्रपुरंजित्पौष्णाश्विचित्राच्युतेष्वाराकर्यंशदिनोदयादिरहितेराशौस्थिरेचोभये पक्षेपूर्णनिशाकरेप्रतिपदंरिक्तांविहायाष्टमींषष्ठीमष्टमशुद्धभाजिभवनेप्रोक्ताक्षरस्वीकृतिः **विष्णुधर्मोत्तरे** पूजयित्वाहरिंलक्ष्मींतथादेवींसरस्वतीं स्ववेदंसूत्रकारांश्चस्वांविद्यांचविशेषतः एतेषामेवदेवानांनाम्नातुजुहुया-द्धृतम् दक्षिणाभिर्द्विजेंद्राणांकर्तव्यंचात्रपूजनमिति ।

## यानंतर विद्यारंभकाल सांगतो.

**मदनरत्नांत**—नृसिंह—"पांचव्या वर्षी उत्तरायणांत कुंभसंक्रांति वर्ज्य करून अक्षर लिहिण्यास आरंभ करावा." **दीपिकेंत**—"पर्जन्यविरहित अशा कालीं षष्ठी, रिक्ता ह्या तिथि आणि शनि व मंगळ हे वार वर्ज्य करून अनध्यायरहित दिवशीं कुलदेवता, व गुरु यांना नमस्कार करून लेखनारंभ करावा.' **श्रीधर**—"हस्त, पुनर्वसु, स्वाती, अनुराधा, आर्द्रा, रेवती, अश्विनी, चित्रा, श्रवण ह्या नक्षत्रांवर; मंगळ व शनि ह्यांचे वार, अंश, व लग्न वर्ज्य करून अन्यवारीं स्थिरलग्नीं शुक्लपक्षांत व कृष्णपक्षांत चंद्रक्षीण नसतां प्रतिपदा, रिक्ता, षष्ठी, अष्टमी ह्या तिथि वर्ज्य करून अन्य तिथींचे ठायीं; अष्टमस्थान शुद्ध असतां अक्षरलेखनाला आरंभ करावा" **विष्णुधर्मोत्तरांत**—"विद्यारंभकालीं हरि, लक्ष्मी, सरस्वती, आपला वेद आपले सूत्रकार व आपली विद्या यांची विशेषतः पूजा करून, त्याच, देवतांच्या नाममंत्रांनीं घृताचा होम करून ब्राह्मणांची पूजा करून त्यांना दक्षिणा द्यावी."

**अथधनुर्विद्या दीपिकायां** अदितिगुरुयमार्कस्वातिचित्राग्निपित्र्यध्रुवहरिवसुमूलेष्विंदुभागांत्य-भेषु शनिशशिबुधवारेविष्णुबोधेविपौषेसुसमयतिथियोगेचापविद्याप्रदानम ।

**आतां धनुर्विद्या सांगतो दीपिकेंत**—"पुनर्वसु, पुष्य, भरणी, हस्त, स्वाती, चित्रा, कृत्तिका, मघा, तीन उत्तरा, रोहिणी, श्रवण, धनिष्ठा, मूल, मृग, पूर्वा, रेवती ह्या नक्षत्रांवर; शनि, सोम, बुध ह्या वारीं; विष्णुशयन ( चार मास ) व पौषमास वर्ज्य करून इतरमासांत शुभतिथि व शुभयोग पाहून धनुर्विद्येचा आरंभ करावा."

अथानुपनीतस्यविशेषः **गौतमः** प्रागुपनयनात्कामचारवादभक्षाइति भक्षणंलशुनादेरपीति**हरदत्तः** **अपरार्केवृद्धशातातपः** शिशोरभ्युक्षणंप्रोक्तंबालस्याचमनंस्मृतं रजस्वलादिसंस्पर्शेस्नानमेवकुमारके प्राक्चूडाकरणाद्बालःप्रागन्नप्राशनाच्छिशुः कुमारकस्तुविज्ञेयोयावन्मौंजीनिबंधनं **आपस्तंबोपि** अन्नप्राशनात्प्रयतोभवत्यासंवत्सरादित्येकेइति **गौतमोपि** नतदुपस्पर्शनादाशौचम् तस्यानुपनीतस्यचांडालादि-स्पृष्टस्यापिस्पर्शान्नस्नानं इदंचपञ्चवर्षात्प्राक् ऊर्ध्वंतुस्नानंभवत्येव बालस्यपंचमाद्वर्षाद्रक्षार्थंशौचमाचरेदिति **स्मृतेः** कामचारादिकेप्येवं ऊनैकादशवर्षस्यपंचवर्षात्परस्यच चरेद्गुरुःसुहृद्वापिप्रायश्चित्तंविशुद्धये अतोबा-लतरस्यास्यनापराधोनपातकमितिस्मृतेरिति**हरदत्तः स्मृत्यर्थसारे**प्येवं ।

## आतां अनुपनीताला विशेष सांगतो—

**गौतम**—"मुंज होण्याच्या पूर्वी मुलानें आपल्या इच्छेप्रमाणें आचरण, भाषण व भक्षण करावें." भक्षण म्हणजे लसूण, कांदा इत्यादि पदार्थांचेंही भक्षण करावें, असें **हरदत्त** सांगतो. **अपरार्कांत वृद्धशातातप**—"रजस्वला इत्यादिकांचा स्पर्श झाला असतां **शिशूला** प्रोक्षण सांगितलें आहे. **बालाला** आचमन आणि **कुमाराला** स्नानच सांगितलें आहे. अन्नप्राशनाच्या पूर्वी मुलाला **शिशु** म्हणावें. अन्नप्राशनानंतर चौल होण्याच्यापूर्वी **बाल** आहे. चौलापासून मौंजीबंध होण्याच्या पूर्वी **कुमार** हें नांव आहे." **आपस्तंबही**—"अन्नप्राशन झाल्यावर प्रयत ( आचमनयोग्य ) होतो. कितीएक आचार्य असें सांगतात कीं, एक वर्षानंतर आचमनाला योग्य होतो." **गौतमही**—"ज्याचें उपनयन झालें नाहीं त्याला चांडालादिकांचा स्पर्श झाला असला तरी त्याचा स्पर्श झाला म्हणून स्नान करूं नये." हा निर्णय सहाव्या वर्षाच्या पूर्वी आहे. सहाव्या वर्षापासून पुढें स्नान अवश्य आहेच. कारण, "बालकाकडून पांचव्या वर्षापासून पुढें संरक्षणार्थ शौच आचरण करवावें." अशी **स्मृति** आहे. ऐच्छिक आचार, ऐच्छिक भाषण, आणि ऐच्छिक भक्षण यांविषयींही असाच निर्णय समजावा. कारण, "पांचवर्षांपुढें व अकरावर्षांहून कमी वयाचा जो कुमार त्यानें पापाचरण केलें असतां त्याचे शुद्ध्यर्थ कुमाराचे गुरुनें ( पित्यानें ) किंवा आप्तानें प्रायश्चित्त करावें. याहून अल्पवयाचा जो बाल त्याच्याकडून एकादें वाईट कृत्य घडलें असतां त्याला अपराध नाहीं व पाप नाहीं" अशी **स्मृति** आहे, असें **हरदत्त** सांगतो. **स्मृत्यर्थसारांतही** असेंच सांगितलें आहे.

**अथोपनयनं आश्वलायनः** गर्भाष्टमेष्टमेवाब्देपंचमेसप्तमेपिवा द्विजत्वंप्राप्नुयाद्विप्रोवर्षेत्वेकादशे-नृपः **मनुः** ब्रह्मवर्चसकामस्यकार्यंविप्रस्यपंचमे राज्ञोबलार्थिनःषष्ठेवैश्यस्यार्थार्थिनोष्टमे **विष्णुः** षष्ठेतुधन-कामस्यविद्याकामस्यसप्तमे अष्टमेसर्वकामस्यनवमेकांतिमिच्छतः **आपस्तंबः** गर्भाष्टमेषुब्राह्मणमुपनयीत बहुवचनंगर्भषष्ठगर्भसप्तमयोःप्राप्त्यर्थमितिसुदर्शनभाष्ये **केचित्तु**विप्रस्यषष्ठंनमन्यंते **आपस्तंबः** अथ काम्यानि सप्तमेब्रह्मवर्चसकाममष्टमआयुष्कामंनवमेतेजस्कामंदशमेऽन्नाद्यकाममेकादशइंद्रियकामंद्वादशेप-शुकाममुपनयेत् गौणकालमाह**मनुः**आषोडशाद्ब्राह्मणस्यसावित्रीनातिवर्तते आद्वाविंशात्क्षत्रबंधोराचतुर्विंश-तेर्विशः **ज्योतिर्निबंधे** अग्रजाबाहुजावैश्याःस्वावधेरूर्ध्वमब्दतः अकृतोपनयाःसर्वेवृषलाएवतेस्मृताः[१] ।

## आतां उपनयन ( मौंजी ) संस्कार सांगतो.

**आश्वलायन**—"गर्भापासून आठव्या वर्षीं किंवा जन्मापासून आठव्या वर्षीं, अथवा पांचव्या किंवा सातव्या वर्षीं ब्राह्मणाची मौंजी करावी. क्षत्रियाची अकराव्या वर्षीं करावी." **मनु**—"वेदाध्ययनाचे समृद्धीची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणाची मौंजी पांचव्या वर्षीं करावी. बलाची इच्छा करणाऱ्या क्षत्रियाची सहाव्या वर्षीं, आणि धनाची इच्छा करणाऱ्या वैश्याची आठव्या वर्षीं मौंजी करावी." **विष्णु**-"धनाची इच्छा करणाऱ्याची सहाव्या वर्षीं, विद्येची इच्छा करणाऱ्याची सातव्या वर्षीं, सर्वकामाची इच्छा करणाऱ्याची आठव्या वर्षीं, आणि कांतीची इच्छा करणाऱ्याची नवव्या वर्षीं मौंजी करावी." **आपस्तंब**—"गर्भापासून आठव्या वर्षीं ब्राह्मणाची मौंजी करावी." ह्या **आपस्तंब**वचनांत 'गर्भाष्टमेषु' ह्या बहुवचना-वरून गर्भापासून सहाव्या व गर्भापासून सातव्या वर्षीं ब्राह्मणाची मौंजी करावी, असें **सुदर्शनभाष्यांत** सांगितलें आहे. **केचित्** तर सहावे वर्षीं ब्राह्मणाची मौंजी करावी, असें मानीत नाहींत. **आपस्तंब**—"आतां काम्य उपनयनें सांगतो-ब्रह्मवर्चस कामाचें सातव्या वर्षीं, आयुष्कामाचें आठव्या वर्षीं, तेजस्कामाचें नवव्या वर्षीं, अन्नादिकामाचें दहाव्या वर्षीं इंद्रियकामाचें अकराव्या वर्षीं, आणि पशुकामाचें बाराव्या वर्षीं उपनयन करावें." **गौणकाल सांगतो मनु**—"ब्राह्मणाची सोळा वर्षेंपर्यंत, क्षत्रियाची बेवीस वर्षेंपर्यंत आणि वैश्याची चोवीस वर्षेंपर्यंत, गायत्री अतिक्रांत ( गत ) होत नाहीं." **ज्योतिर्निबंधांत**—"ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे आपापल्या वर्षांच्या अवधीनंतर उपनयनविरहित राहतील तर ते सर्व वृषलच ( शूद्रच ) म्हटले आहेत."

**गर्गः** विप्रंवसंतेक्षितिपंनिदाघेवैश्यंघनांतेव्रतिनंविदध्यात् माघादिशुक्रांतिकपंचमासाःसाधारणावास कलद्विजानां **हेमाद्रौज्योतिषे** माघादिषुचमासेषुमौंजीपंचसुशस्यते **कालादर्शेवृद्धगार्ग्यः** माघा-दिमासषट्केतुमेखलाबंधनंमतं चूडाकरणमन्नंचश्रावणादौविवर्जयेत् **मैत्रेयसूत्रेपि** वसंतोग्रीष्मःशरदित्यृ-तवोवर्णानुपूर्व्येणमाघादिषण्मासावासर्ववर्णानामेतदुदगयनमनयोर्विकल्पइति अत्रेदंतत्त्वं नात्रवसंतेनोत्त-रायणस्यसंकोचः श्राद्धेदर्शस्यापराह्णविधिनेवाधानेवसंतादेःकृत्तिकादिनेवसायंप्रातर्विधिनायावज्जीवविधेरि-वयुक्तः आद्ययोःपरस्परव्यभिचारान्नियमः अंत्येनिमित्तेसांगकर्मोक्तेःकालापेक्षा इहतूत्तरायणंविनावसंत-स्याभावान्ननियमः नवानिमित्तत्वं नचैकंवृणीतइतिवदवयुत्यानुवादः तद्वद्वाक्यभेदापरिहारात् उत्तरायणवि-धिवैयर्थ्यात्त्वनुकल्पोयमिति माघआदिर्येषांपंचानांएवंषट् ।

**गर्ग**—"वसंतऋतूंत ब्राह्मणाची, ग्रीष्मऋतूंत क्षत्रियाची, शरदृतूंत वैश्याची, मौंजी करावी. अथवा माघापासून ज्येष्ठा-पर्यंत पांच मास सर्व द्विजातींस साधारण विहित होत." **हेमाद्रींत ज्योतिषांत**—"माघादि पांच मासांचे ठायीं मौंजी प्रशस्त आहे." **कालादर्शांत वृद्धगार्ग्य**—"माघादि सहा मासांचे ठायीं मेखलाबंधन ( मौंजी ), चौल, अन्नप्राशन हे संस्कार करावे. श्रावणादि मासांत करूं नयेत." **मैत्रेयसूत्रांतही**—"वसंतऋतु, ग्रीष्मऋतु, आणि शरदृतु हे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांना अनुक्रमानें सांगितले आहेत. अथवा माघापासून आषाढापर्यंत सहा मास सर्ववर्णांना ( ब्राह्मणादिकांना ), सांगितले आहेत. हे माघादिक सहा मास म्हटले हें उदगयन समजावें. वसंतादि ऋतु व उदगयन यांचा विकल्प समजावा" याचें तत्त्व असें आहे कीं, ब्राह्मणादिकांना वसंतादि ऋतु आणि उत्तरायण असें सांगितलें आहे. त्यांत वसंत ऋतूनें

---

१ वृषला एवेति । न चेत्प्रायश्चित्तमनुतिष्ठंतीति शेषः ॥ अत ऊर्ध्वं पतंत्येते सर्वधर्मबहिष्कृताः ॥ सावित्रीपतिता व्रात्या व्रात्यस्तो-माहृते क्रतोरिति याज्ञवल्क्यवचनात् । आषोडशादित्यत्र गर्भादिः संख्या । तथाच जन्मतः पंचदशवर्षपर्यंतं विप्रस्य न विशेषतः प्रायश्चित्तं । षोडशवर्षे सशिखवपनं कृत्वा एकविंशतिरात्रं यावकाशनमन्ते द्वादशब्राह्मणभोजनमितिप्रायश्चित्तं । सप्तदशादिवर्षेषु कृच्छ्रत्रया-दिप्रायश्चित्तपूर्वकमुपनयनं बोध्यं । इति धर्मसिंधुसारं ।

उत्तरायणाचा संकोच होतो ( म्हणजे वसंत ऋतु असतां उत्तरायण घ्यावें. इतर उत्तरायण नाहीं. ) असें म्हणूं ! जसें— श्राद्धाविषयीं दर्श (अमावास्या) सांगितला आणि अपराह्ण काल सांगितला आहे. तेथें अपराह्णानें दर्शाचा संकोच होतो, म्हणजे अपराह्णावांचून इतर दर्श घ्यावयाचा नाहीं तसें. आणि जसें—अग्नीच्या आधानाविषयीं वसंतादिक ऋतु आणि कृत्तिकादिक नक्षत्रें सांगितलीं आहेत. तेथें कृत्तिकादिक नक्षत्रांनीं वसंतादिकांचा संकोच होतो तसा. आणि अग्निहोत्राविषयीं सायंप्रातःकाल व यावज्जीवपर्यंत काल सांगितला आहे, तेथें सायंप्रातःकालानें यावज्जीव कालाचा संकोच होतो तसा. या तीन दृष्टांतांप्रमाणें येथें वसंतानें उत्तरायणाचा संकोच होतो, असें म्हणूं नये. कारण, दृष्टांतांत व यांत वैषम्य आहे, तें असें—श्राद्धविषयीं व आधानाविषयीं जे दोन दोन काल सांगितले त्यांचा परस्पर व्यभिचार असल्यामुळें त्या ठिकाणीं नियम केला आहे. म्हणजे—श्राद्धाविषयीं दर्श व अपराह्ण असे दोन काल सांगितले आहेत. तेथें परस्पर व्यभिचार असा—दर्श नसलेल्या काळीं अपराह्ण असतो व अपराह्ण नसलेल्या काळीं दर्श असतो, म्हणून त्या ठिकाणीं अपराह्णयुक्त दर्शच घ्यावा, असा नियम झाल्यामुळें इतर दर्शाची व्यावृत्ति झाल्यानें अर्थात् संकोच झाला आहे. तसेंच आधानाविषयीं वसंतादि ऋतु व कृत्तिकादि नक्षत्रें यांचाही परस्पर व्यभिचार आहे. म्हणजे वसंतादि ऋतु नसल्या काळीं कृत्तिकादिक नक्षत्रें आहेत आणि कृत्तिकादिरहित काळीं वसंतादिक ऋतु आहेत. म्हणून त्या ठिकाणींही कृत्तिकादियुक्त वसंतादिकाल घ्यावा, असा नियम झाल्यानें अर्थात् इतर वसंतादिकांचा व्यावृत्तिरूप संकोच झाला आहे. शेवटच्या दृष्टांतांत सायंप्रातःकालनिमित्तानें सांग कर्म होतें असें सांगितल्यामुळें सायंप्रातःकालाची अग्निहोत्रहोमाविषयीं अपेक्षा आहे. प्रकृतस्थलीं उत्तरायणावांचून इतर कालीं वसंत ऋतु नसल्याकारणानें परस्पर व्यभिचार येत नाहीं. म्हणून नियम होत नाहीं. अथवा उपनयनाला वसंत ऋतु निमित्तही नाहीं. आतां 'एकं वृणीते' म्हणजे एक ऋषि वरावा, या वाक्यांत जसा अनेकांतून एक ऋषि पृथक् करून त्याला वरण सांगितलें आहे. तो जसा अवयुत्य ( पृथक्करून ) अनुवाद केला आहे, तसा येथें अवयुत्यानुवाद समजूं ! असें म्हणतां येत नाहीं. कारण, त्या ठिकाणीं वाक्यभेद ( भिन्नवाक्यें ) झाला आहे. तसा येथेंही वाक्यभेद होईल ! म्हणजे उत्तरायणाचा विधि वेगळा आणि वसंतऋतूचा विधि वेगळा होईल ! तसें झालें असतां उत्तरायणविधि व्यर्थ होईल ! म्हणून वसंतावांचून उत्तरायणविधि हा अनुकल्प आहे, असें समजावें.

**पारिजातेबृहस्पतिः** झषचापकुलीरस्थोजीवोप्यशुभगोचरः अतिशोभनतांदद्याद्विवाहोपनयादिषु **वृत्तशते** नजन्मधिष्ण्येनचजन्ममासेनजन्मकालीयदिनेविदध्यात् ज्येष्ठेनमासिप्रथमस्यसूनोर्दुहितुर्वा अपिमंगलानि **राजमार्तंडः** जातंदिनंदूषयतेवसिष्ठोह्यष्टौचगर्गोनियतंदशात्रिः जातस्यपक्षंकिलभागुरिश्च शेषाःप्रशस्ताःखलुजन्ममासि जन्ममासेतिथौभेचविपरीतदलेसति कार्यंमंगलमित्याहुर्गर्गभार्गवशौनकाः जन्ममासनिषेधेपिदिनानिदशवर्जयेत् आरभ्यजन्मदिवसाच्छुभाःस्युस्तिथयोपरे **ग्रंथांतरे** प्रतेजन्मत्रिखा-रिस्थोजीवोपीष्टोर्चनात्सकृत् शुभोतिकालेतुर्योष्टव्ययस्थोद्विगुणार्चनात् शुद्धिर्नैवगुरोर्यस्यवर्षेप्राप्तेष्टमेयदि चैत्रेमीनगतेभानौतस्योपनयनंशुभं जन्मभादष्टमेसिंहेनीचेवाशत्रुभेगुरौ मौंजीबंधःशुभःप्रोक्तश्चैत्रेमीनगतेरवौ **नारदः** बालस्यबलहीनोपिशांत्याजीवोबलप्रदः यथोक्तवत्सरेकार्यमनुक्तेचोपनायनं शांतिपूर्वमेववक्ष्यते ।

**पारिजातांत बृहस्पति**—"मीन, धनु, कर्क या स्थानींचा गुरु गोचरीं ( राशीस ) जरी अशुभ असला तरी तो विवाह, उपनयन इत्यादिकांविषयीं अति शुभकारक होय." **वृत्तशतांत**—"जन्मनक्षत्रांवर, जन्ममासांत, आणि जन्म-दिवशीं, मंगल कार्यें करूं नयेत. ज्येष्ठपुत्र व ज्येष्ठकन्या यांचीं मंगल कार्यें ज्येष्ठ मासांत करूं नयेत." सारा जन्ममास टाकण्यास अशक्य असेल तर अपवाद सांगतो—**राजमार्तंड**—"जन्मदिवस निषिद्ध आहे, असें वसिष्ठ सांगतो. जन्मदिवसापासून आठ दिवस वर्ज्य करावे, असें गर्ग सांगतो. जन्मदिवसापासून दहा दिवस वर्ज्य करावे, असें अत्रि सांगतो. आणि **भागुरी**च्या मतीं पक्ष वर्ज्य करावा. जन्ममासांतील अवशेष राहिलेले दिवस प्रशस्त होत. जन्ममास, जन्मतिथि, आणि जन्मनक्षत्र यांचे ठायीं मंगलकार्य कर्तव्य असतां उत्तर भागांत करावें; असें गर्ग, भार्गव शौनक हे सांगतात. सर्व जन्ममासाचा निषेध जरी आहे तथापि जन्मदिवसापासून दहा दिवस वर्ज्य करावे. शेष दिवस शुभ होत." **ग्रंथांतरांत**—"जन्मराशीपासून प्रथम, तृतीय, दशम, षष्ठ, या स्थानींचा गुरु असतां एकवार पूजा ( बृहस्पतिशांति ) केल्यानें शुभकारक जाणावा. अतिकाल झाला असतां ४ । ८ । १२ या स्थानींचा असतांही द्विवार पूजेनें शुभकारक होतो; आठवें वर्ष प्राप्त झालें असतां जरी गुरुबल नसलें तरी चैत्र मासांत मीनराशीचा सूर्य असतां त्याचें उपनयन करावें. जन्म-

---

१ मृगकुंभगते भानौ मध्यमं मीनमेषयोः ॥ उत्तमं गोयुगस्थेर्के अधमं चोपनायनमिति बृहस्पत्युक्तेः तथापि मीनार्कस्तुत्यैव प्रशस्ततमः अनेकनिषेधापवादकत्वात् । अत्र शुक्रे नष्टे तथा जीवे दुर्बले चंद्रभास्करे ॥ व्रतोपनयनं कार्यं चैत्रे मीनगते रवौ ॥ जीवभार्गवयोरस्ते सिंहस्थे देवतागुरौ ॥ मेखलाबंधनं शस्तं चैत्रे मीनगते रवावित्यादयोप्यपवादा द्रष्टव्याः ॥

राशीपासून अष्टमस्थ, सिंहस्थ, नीचस्थ ( मकरस्थ ) अथवा शत्रुस्थानस्थित असा गुरु असला तथापि मीनराशीचा सूर्य असतां चैत्रमासांत मौंजीबंध शुभ होय." **नारद**—"कुमाराला गुरु जरी बलहीन असला तथापि बृहस्पतिशांति केली असतां तो बल देणारा होतो. मुख्य कालीं व अमुख्यकालीं कधींही मौंजी कर्तव्य असतां गुरुबल नसेल तर बृहस्पतिशांति करून मौंजी करावी." बृहस्पतिशांति पुढें ( विवाहप्रकरणीं ) सांगूं.

**ज्योतिर्निबंधेनृसिंहः** तृतीयापंचमीषष्ठीद्वितीयाचापिसप्तमी पक्षयोरुभयोश्चैवविशेषेणसुपूजिताः धर्मकामौसितेपक्षेकृष्णेचप्रथमातथा शुक्लत्रयोदशींकेचिदिच्छंतिमुनयस्तथा **टोडरानंदेवसिष्ठः** नैमित्तिकमनध्यायंकृष्णेचप्रतिपद्दिनं मेखलाबंधनेशस्तंचौलेवेदव्रतेष्वपि प्रशस्ताप्रतिपत्कृष्णेनपूर्वापरसंयुता एतदतीतकालस्यार्तस्यबटोरुपनयनविषयम् प्रशस्ताप्रतिपत्कृष्णेकदाचिच्छुभगेविधौ चंद्रेबलयुतेलग्नेवर्षाणामतिलंघनइति**व्यासोक्ते**रित्याहुः एवंसप्तम्यपि तस्यागलग्रहत्वोक्तेः ।

**ज्योतिर्निबंधांत नृसिंह**—"शुक्ल व कृष्ण दोन्ही पक्षांतील द्वितीया, तृतीया, पंचमी, षष्ठी, सप्तमी ह्या तिथि विशेषेंकरून ( उपनयनाविषयीं ) प्रशस्त जाणाव्या. शुक्ल पक्षांतील दशमी व एकादशी प्रशस्त. कृष्णपक्षांतील प्रतिपदा प्रशस्त. केचित् मुनि शुक्लत्रयोदशी प्रशस्त असें सांगतात." **टोडरानंदांत वसिष्ठ**—"नैमित्तिक अनध्याय, व कृष्णप्रतिपदा दिवस हे मौंजी, चौल, आणि वेदव्रतें ह्यांविषयीं प्रशस्त आहेत. कृष्णपक्षांतील प्रतिपदा प्रशस्त सांगितली ती पौर्णिमायुक्त प्रशस्त नाहीं. द्वितीयायुक्त प्रशस्त आहे." हें वचन ज्याचा उपनयनकाल गेला असेल त्याच्या मौंजीविषयीं जाणावें. कारण, "लग्नाला शुभस्थानीं चंद्र, राशीस चंद्रबळ व लग्न बलिष्ठ असें असून ज्याच्या उपनयनाच्या काळाचीं वर्षे फार गेलीं असतील त्याच्या उपनयनाविषयीं कृष्णप्रतिपदा कदाचित् प्रशस्त आहे." असें व्यासवचन आहे, असें विद्वान् सांगतात. याचप्रमाणें सप्तमीही समजावी. कारण, ती सप्तमी गलग्रह म्हणून सांगितली आहे.

**बृहस्पतिः** शुक्लपक्षःशुभःप्रोक्तःकृष्णश्चांत्यत्रिकंविना तथा मिथुनेसंस्थितेभानौज्येष्ठमासोनदोषकृत् **मदनरत्नेनारदः** विनर्तुनावसंतेनकृष्णपक्षेगलग्रहे अपराह्णेचोपनीतःपुनःसंस्कारमर्हति अपराह्णस्त्रेधाविभक्तदिनतृतीयांशइत्युक्तंतत्रैव वसंतेगलग्रहोनदोषायेत्यर्थः **नारदः** कृष्णपक्षेचतुर्थीचसप्तम्यादिदिनत्रयम् त्रयोदशीचतुष्कंचअष्टावेतेगलग्रहाः **वसिष्ठः** पापांशकगतेचंद्रेअरिनीचस्थितेपिच अनध्यायेचोपनीतःपुनः संस्कारमर्हति अनध्यायस्यपूर्वेद्युस्तस्यचैवापरेहनि व्रतबंधंविसर्गंचविद्यारंभंनकारयेत् **राजमार्तंडः** आरंभानंतरंयत्रप्रत्यारंभोनसिध्यति गर्गादिमुनयःसर्वेतमेवाहुर्गलग्रहं **ज्योतिर्निबंधे** अष्टकासुचसर्वासुयुगमन्वंतरादिषु अनध्यायंप्रकुर्वीततथासोपपदास्वपि सोपपदास्तु**स्मृत्यर्थसारे** सिताज्येष्ठेद्वितीयाचआश्विनेदशमीसिता चतुर्थीद्वादशीमाघेएताःसोपपदाःस्मृताः एवंप्रदोषदिनंवर्ज्यं प्रदोषस्वरूपमाह**गोभिलः**[१] षष्ठीचद्वादशीचैवअर्धरात्रोननाडिका प्रदोषमिहकुर्वीततृतीयातूनयामिका **ज्योतिर्निबंधेव्यासः** याचैत्रवैशाखसितातृतीयामाघस्यसप्तम्यथफाल्गुनस्य कृष्णेद्वितीयोपनयेप्रशस्ताप्रोक्ताभरद्वाजमुनींद्रमुख्यैः अत्रापिकृष्णप्रतिपद्वज्ज्ञेयम् यत्तु**बृहद्गार्ग्यः** अनध्यायेप्रकुर्वीतयस्तुनैमित्तिकोभवेत् सप्तमीमाघशुक्लेतुतृतीयाचाक्षयातथा बुधत्रयेंदुवाराश्चशस्तानिव्रतबंधनइति तत्प्रायश्चित्तार्थोपनयनविषयम् स्वाध्यायवियुजोघस्राःकृष्णप्रतिपदादयः प्रायश्चित्तनिमित्तेतुमेखलाबंधनेमता इतितेनैवोक्तेरिति**निर्णयामृतकालादर्शौ** यद्यप्यथोपेतपूर्वस्येत्युक्त्वा अनिरुक्तंपरिदानंकालश्चेत्या**श्वलायनेन**पुनरुपनयनेकालानियमउक्तस्तथापिनिमित्तानंतरमेवसः तदानीमकरणेतुपूर्वोक्तकालोज्ञेयः प्रतिवेदमुपनयनेकालानियमइतितुयुक्तम् **गर्गः** ग्रहेरवींद्वोरवनिप्रकंपेकेतूद्गमोल्कापतनादिदोषे व्रतेदशाहानिवदंतितज्ज्ञास्त्रयोदशाहानिवदंतिकेचित्[२] संकटेतु**चंडेश्वरः** दाहेदिशांचैवधराप्रकंपेवज्रप्रपातेथ विदारणेच केतौतथोल्कांशुकणप्रपातेत्र्यहंनकुर्याद्व्रतमंगलानि तत्रैव वेदव्रतोपनयनेस्वाध्यायाध्ययनेतथा नदोषोयजुषांसोपपदास्वध्ययनेपि च ॥

---

१ तत्र तृतीयाषष्ठीद्वादशीषु प्रदोषसत्त्वे मौंजी न कार्या । रात्रेः प्रथमयामे चतुर्थी सार्धयामे सप्तमी यामद्वये त्रयोदशीचेत्तदा प्रदोषः । दिनद्वये प्रथमयामादिषु चतुर्थ्यादि व्याप्तौ पूर्वदिने प्रदोषो नोत्तरदिने इति कौस्तुभे उक्तं ॥ २ दशाहानीति चंद्रसूर्योपरागे तु त्र्यहं प्रागशुभं भवेत् । सप्ताहमशुभं पश्चात्स्मृतं ग्रहणसूतकमिति गर्गोक्तानि ।

**बृहस्पति**—"शुक्लपक्ष शुभ होय. शेवटचे पांच दिवस वर्ज्य करून कृष्णपक्ष शुभ होय." तसेंच—"मिथुनस्थ रवि असतां ज्येष्ठमास दोषकारक होत नाहीं." **मदनरत्नांत नारद**—"वसंतव्यतिरिक्त ऋतूंत कृष्णपक्ष, गलग्रह व अपराह्न काल, यांचे ठायीं ज्याचें उपनयन झालें तो पुनरुपनयनास योग्य होतो." अपराह्न काल म्हणजे दिवसाचे तीन भाग करून त्यांपैकीं तिसरा भाग होय, असें तेथेंच ( मदनरत्नांतच ) सांगितलें आहे. वसंत ऋतूंत गलग्रहाचा दोष नाहीं, असा भाव. **नारद**—"कृष्णपक्षांतील चतुर्थी, दोन्ही पक्षांतील सप्तमी, अष्टमी, नवमी, आणि त्रयोदशीपासून ४ तिथि ह्या आठ तिथि **गलग्रह** होत." **वसिष्ठ**—'पापांशीं किंवा षष्ठस्थानीं, व नीचस्थानीं[1] चंद्र असतां अथवा अनध्याय असतां ज्याचें उपनयन होईल तो पुनःसंस्कारास योग्य होतो. अनध्यायाचे पूर्वदिवशीं किंवा दुसऱ्या दिवशीं मौंजी, समावर्तन ( सोडमुंज ), आणि वेदारंभ हे करूं नयेत." **राजमार्तंड**—"जेथें आरंभ झाल्यानंतर प्रत्यारंभ ( दुसऱ्या दिवशीं अध्ययन ) होत नाहीं तो दिवस **गलग्रह** होय, असें गर्गादि मुनि सांगतात." **ज्योतिर्निबंधांत**—"सर्व **अष्टका**[2], **युगादि** तिथि, **मन्वादि** तिथि, आणि **सोपपदा** तिथि यांचे ठायीं अनध्याय करावा, म्हणजे वेदाध्ययन करूं नये." **सोपपदा तिथि सांगतो स्मृत्यर्थसारांत**—"ज्येष्ठशुक्ल द्वितीया, आश्विनशुक्ल दशमी, माघशुक्लांतील चतुर्थी व द्वादशी ह्या तिथि **सोपपदा** जाणाव्या." याप्रमाणें प्रदोषदिवसही वर्ज्य करावा. **प्रदोषाचें स्वरूप सांगतो गोभिल**—"षष्ठी व द्वादशी ह्या तिथि मध्यरात्रीच्या आंत संपल्या असतां त्या दिवशीं प्रदोष होतो. आणि तृतीया एक प्रहर रात्रीच्या आंत संपली असतां त्या दिवशीं प्रदोष होतो." **ज्योतिर्निबंधांत व्यास**—"चैत्र व वैशाख या मासांतील शुक्लपक्षींच्या तृतीया, माघमासांतील सप्तमी, आणि फाल्गुन मासांतील कृष्णपक्षाची द्वितीया, ह्या तिथि मौंजीविषयीं प्रशस्त आहेत, असें भरद्वाज मुनि सांगतात." ह्या तिथींचाही निर्णय कृष्णप्रतिपदेप्रमाणें, म्हणजे ज्याचा अतीत काल झाला असेल त्याच्या मौंजीविषयीं ह्या तिथि प्रशस्त होत असें जाणावें. आतां जें **वृद्धगार्ग्य**—"नैमित्तिक अनध्यायदिवशीं मौंजी करावी. माघशुक्ल सप्तमी, अक्षय्यतृतीया, आणि बुध, गुरु, शुक्र, इंदु हे वार मौंजीविषयीं प्रशस्त होत" असें सांगतो तें प्रायश्चित्तार्थ उपनयनाविषयीं आहे. कारण, "कृष्णप्रतिपदाप्रभृति जे अनध्याय दिवस उपनयनाविषयीं सांगितले, ते अध्ययनाचा वियोग करणारे असल्यामुळें पहिल्या उपनयनाविषयीं प्रशस्त नाहींत. प्रायश्चित्ताकरितां जें उपनयन त्याविषयीं प्रशस्त होत." असें त्याच ग्रंथकारानें सांगितलें आहे, असें **निर्णयामृत** व **कालादर्श** सांगतात. आतां जरी "ज्याचें उपनयन पूर्वीं झालें आहे त्याला" असें सांगून "पुनरुपनयनाविषयीं परिधान व काल सांगितला नाहीं" असा **आश्वलायन** सूत्रकारानें पुनरुपनयनाविषयीं कालाचा अनियम सांगितला आहे, तथापि तो अनियम उपनयनाचें निमित्त उत्पन्न झाल्यावर लगेच उपनयन कर्तव्य असतां समजावा. निमित्त उत्पन्न झाल्यावर त्या वेळीं पुनरुपनयन केलें नसेल तर पूर्वीं सांगितलेला काल जाणावा. प्रत्येक वेदाचें उपनयन कर्तव्य असतां कालाचा नियम नाहीं, असें म्हणणें तर युक्त आहे. **गर्ग**—"चंद्रसूर्यांचें ग्रहण, भूकंप, धूमकेतूची ( शेंडेनक्षत्राची ) उत्पत्ति, उल्कापात ( आकाशांतून अग्निरूप तारा पडणें ), इत्यादि दोष उपस्थित झाले असतां दहा दिवसपर्यंत मौंजी करूं नये. तेरा दिवसपर्यंत करूं नये असें केचित् सांगतात." **संकट असेल तर** सांगतो **चंडेश्वर**—"दिशा पेटणें, भूकंप, वज्रपात ( वीज पडणें ), भूविदारण, केतु ( शेंडें नक्षत्र ) उगवणें, उल्कापात ( आकाशांतून अग्निरूप तारा पडणें ) हीं झालीं असतां तीन दिवसपर्यंत उपनयन मंगल कार्यें करूं नयेत." तेथेंच सांगतो—"वेदव्रतें, उपनयन, वेदाचें अध्ययन, यांविषयीं यजुर्वेद्यांना सोपपदा तिथींचा दोष नाहीं."

**हेमाद्रौज्योतिषे** हस्तत्रयेपुष्यधनिष्ठयोश्चपौष्णाश्विसौम्यादितिविष्णुभेषु शस्तेतिथौचंद्रबलेनयुक्ते कार्यौद्विजानांव्रतबंधमोक्षौ **ज्योतिर्निबंधेनारदः** श्रेष्ठान्यर्कत्रयांत्येज्यचंद्रादित्युत्तराणिच विष्णुत्रयाश्विमित्राब्जयोनिभान्युपनायने **बृहस्पतिः** त्रिपूत्तरेपुरोहिण्यांहस्तेमैत्रेचवासवे त्वाष्ट्रेसौम्यपुनर्वस्वोरुत्तमंह्युपनायनं **ज्योतिर्निबंधे** पूर्वाहस्तत्रयेसार्पश्रुतिमूलेपुबह्वृचां यजुषांपौष्णमैत्रार्कादित्यपुष्यमृदुध्रुवैः सामगानांहरीशार्कवसुपुष्योत्तराश्विभैः धनिष्ठादितिमैत्रार्केष्विदुपौष्णेष्वथर्वणां **राजमार्तंडस्तु** ब्राह्मणस्यपुनर्वसुं निषेधति ताराचंद्रानुकूलेपुग्रहाब्देपुशुभेष्वपि पुनर्वसौकृतोविप्रःपुनःसंस्कारमर्हति ।

**हेमाद्रींत ज्योतिषांत**—"हस्त, चित्रा, स्वाती, पुष्य, धनिष्ठा, रेवती, अश्विनी, मृग, पुनर्वसु, श्रवण या नक्षत्रीं; पूर्वोक्त तिथींस चंद्रबल असतां द्विजातींची मौंजी व समावर्तन ( सोडमुंज ) हीं करावीं." **ज्योतिर्निबंधांत—नारद**—"हस्त, चित्रा, स्वाती, रेवती, पुष्य, मृग, पुनर्वसु, तीन उत्तरा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, अश्विनी, अनुराधा, रोहिणी हीं नक्षत्रें उपनयनाविषयीं श्रेष्ठ होत." **बृहस्पति**—"तीन उत्तरा, रोहिणी, हस्त, अनुराधा, धनिष्ठा, चित्रा, मृग,

---

१ वृश्चिकस्थानीं. २ अष्टका, युगादि, मन्वादि ह्या तिथि द्वितीयपरिच्छेदांत सांगितल्या आहेत. ३ परिधान म्ह० प्रजापतीला वस्त्रदान.

पुनर्वसु, ह्या नक्षत्रांवर उपनयन उत्तम होय." **ज्योतिर्निबंधांत**—"पूर्वा, हस्त, चित्रा, स्वाती, आश्लेषा, श्रवण, मूल ह्या नक्षत्रांवर ऋक्शाख्यांची मौंजी करावी. रेवती, अनुराधा, हस्त, पुनर्वसु, पुष्य, मृग, चित्रा, तीन उत्तरा, रोहिणी ह्या नक्षत्रांवर यजुःशाख्यांची मौंजी करावी. श्रवण, आर्द्रा, हस्त, धनिष्ठा, पुष्य, तीन उत्तरा, अश्विनी ह्या नक्षत्रांवर सामवेद्यांची मौंजी करावी. धनिष्ठा, पुनर्वसु, अनुराधा, हस्त, मृग, रेवती, ह्या नक्षत्रांवर अथर्वणवेद्यांची मौंजी करावी." **राजमार्तंड** तर—ब्राह्मणांविषयीं पुनर्वसूचा निषेध करितो. तो असा—"तारा, चंद्र, ग्रह, वर्ष हीं सर्व शुभ असतांही जर पुनर्वसु नक्षत्रावर मौंजी होईल तर तो ब्राह्मण पुनरुपनयनास योग्य होतो."

**ज्योतिर्निबंधेनारदः** सर्वेषांजीवशुक्रज्ञवाराःप्रोक्ताव्रतेशुभाः चंद्रार्कौमध्यमौज्ञेयौसामबाहुजयोः- कुजः शाखाधिपतिवारश्चशाखाधिपबलंतथा शाखाधिपतिलग्नंचदुर्लभंत्रितयंव्रते **शाखाधिपाश्चरत्नसंग्रहे** ऋगथर्वसामयजुषामधिपागुरुसौम्यभौमसिताः जीवसितौविप्राणांक्षत्रस्यारोष्णगूविशांचंद्रइति **पारिजातेबृहस्पतिः** बह्वृचानांगुरोर्वारेयजुर्वेदजुषांबुधे सामगानांधरासूनोरथर्वविदुपांरवेः अत्रलग्नशुद्ध्यादिदैवज्ञेभ्योज्ञेयम् विस्तरभयान्नोच्यते ।

**ज्योतिर्निबंधांत नारद**—"गुरु, शुक्र, बुध हे वार सर्वांस उपनयनाविषयीं श्रेष्ठ होत. रविवार व सोमवार हे मध्यम होत. सामवेदी व क्षत्रिय यांना भौमवार प्रशस्त आहे. शाखाधिपतीचा वार, शाखाधिपतीचें बल, आणि शाखाधिपतीचें लग्न हीं तीन, मौंजीविषयीं दुर्लभ होत." **शाखाधिपति सांगतो रत्नसंग्रहांत**—ऋग्वेदाचा अधिपति गुरु, अथर्वण वेदाचा अधिपति बुध, सामवेदाचा अधिपति भौम, यजुर्वेदाचा अधिपति शुक्र, याप्रमाणें वेदाधिपति होत. गुरु व शुक्र हे ब्राह्मणांचे अधिपति. मंगळ व रवि हे क्षत्रियांचे अधिपति. चंद्र हा वैश्यांचा अधिपति. याप्रमाणें वर्णाधिपति जाणावे." **पारिजातांत बृहस्पति**—"ऋक्शाख्यांची गुरुवारीं, यजुःशाख्यांची बुधवारीं, सामवेद्यांची भौमवारीं, आणि अथर्वणवेद्यांची रविवारीं मौंजी करावी." ह्या मौंजीविषयीं लग्नशुद्धि, षड्वर्गशुद्धि इत्यादि निर्णय ज्योतिष्यांकडून जाणावा. ग्रंथविस्तर होईल म्हणून मी सांगत नाहीं.

**लल्लः** व्रतेऽह्निपूर्वसंध्यायांवारिदोयदिगर्जति तद्दिनेस्यादनध्यायोव्रतंतत्रविवर्जयेत् **ज्योतिर्निबंधे** नांदीश्राद्धंकृतंचेत्स्यादनध्यायस्त्वकालिकः तदोपनयनंकार्यंवेदारंभंनकारयेत् एतद्बह्वृचातिरिक्तानां तेषांतद्दिनेवेदारंभाभावात् अतस्तेषामुपनयनंनभवत्येव **ऐतरेयोपनिषदि** मृगादिज्येष्ठांतंवर्षर्तुः तंविनावर्षादौ त्रिरात्रमनध्यायइति**वेदभाष्येउक्तं** एतच्चप्रातस्तनिते सायंस्तनितेतुदिवैवचरुंश्रपयित्वासायंसंध्योत्तरंहोमंकुर्यात् नसंध्यागर्जितेकालेनवृष्ट्युत्पातदूषिते ब्रह्मौदनंपचेदग्नौपक्वंचेन्ननिवर्तते ब्रह्मौदनंपचेदग्नौपकमन्नंनदुष्यतीति**संग्रहोक्तेरितिप्रयोगरत्नेभट्टचरणाः** अत्रशांतिरप्युक्ता**नृसिंहप्रसादे** ब्रह्मौदनविधेःपूर्वंप्रदोषेगर्जितंयदि तदाविघ्नकरंज्ञेयंबटोरध्ययनस्यतत् तस्यशांतिप्रकारंतुवक्ष्येशास्त्रानुसारतः प्रधानंपायसंसाज्यंद्रव्यंशांतियजौभवेत् सूक्तंबृहस्पतेर्विद्वान्पठेत्प्रज्ञाविवृद्धये गायत्रीचैवमंत्रःस्यात्प्रायश्चित्तंतुसर्पिषा धेनुंसवत्सकांदद्यादाचार्यायपयस्विनीं ब्राह्मणान्भोजयेत्पश्चात्ततोब्रह्मौदनंचरेत् ।

**लल्ल**—"ज्या दिवशीं उपनयन करावयाचें त्या दिवशीं पूर्वसंध्येचे ठायीं मेघ गर्जना करील तर तो अनध्याय दिवस आहे म्हणून त्या दिवशीं उपनयन करूं नये." **ज्योतिर्निबंधांत**—"नांदीश्राद्ध केल्यानंतर जर अकालिक ( अकालीं मेघगर्जनारूप ) अनध्याय प्राप्त होईल तर उपनयन करावें; पण वेदारंभ करूं नये." हें वचन ऋक्शाखिव्यतिरिक्तविषयक जाणावें. कारण, ऋक्शाख्यांचा वेदारंभ उपनयनदिवशीं होत नाहीं, मग वेदारंभ करूं नये, हें सांगणें त्यांना लागू होत नाहीं. म्हणून ऋक्शाख्यांचें उपनयन ( नांदीश्राद्धोत्तर अकालिक अनध्याय असतां ) होत नाहींच. **ऐतरेय उपनिषदांत**—मृगनक्षत्रापासून ज्येष्ठानक्षत्रापर्यंत जो काल तो वर्षाकाल सांगितला आहे. त्यावांचून अन्य कालीं वृष्टि, गर्जना इत्यादि असतां त्रिरात्र अनध्याय होतो, असें **वेदभाष्यांत** सांगितलें आहे. हा ( उपनयन करूं नये असा ) जो पूर्वी निर्णय सांगितला तो प्रातःकालीं गर्जना असतां समजावा. सायंकालीं गर्जना होण्याचा संभव असेल तर दिवसासच चरु शिजवून ठेवून सायंसंध्योत्तर अनुप्रवचनीय होम करावा. कारण, "संध्यागर्जित काल, वृष्टि व उत्पात यांनीं दूषित काल, अशा कालीं अग्नीवर ब्रह्मौदन ( चरु ) शिजवूं नये. गर्जना, वृष्टि वगैरे होण्याचे पूर्वी शिजविलेला चरु असेल तर व्यर्थ होत नाहीं. म्हणून अशा समयीं ब्रह्मौदन ( चरु ) पूर्वी शिजवावा. शिजविलेला चरु दुष्ट होत नाहीं." असें **संग्रहकाराचें** वचन आहे, असें **प्रयोगरत्नांत नारायणभट्ट** सांगतात. चरु शिजवून ठेविला नसतां गर्जना इत्यादि निमित्त उपस्थित होईल तर

त्याविषयीं शांतिही सांगतो नृसिंहप्रसादांत—"ब्रह्मौदनविधीचे पूर्वीं प्रदोषकालीं जर गर्जना होईल तर ती गर्जना बटूचे विद्येला विघ्नकारक आहे, यास्तव त्याची शांति शास्त्रानुसार सांगतो—ह्या शांतियज्ञाचे ठायीं घृतयुक्त पायस हें प्रधानद्रव्य, त्याचा होम करावा. प्रज्ञावृद्धीसाठीं बृहस्पतिसूक्ताचा पाठ करावा. गायत्रीमंत्रेंकरून प्रधान होम करून प्रायश्चित्ताहुति घृताच्या घालाव्या. नंतर दूध देणारी सवत्स अशी गाई आचार्याला देऊन ब्राह्मणांना भोजन देऊन नंतर ब्रह्मौदन चरु शिजवावा."

**उपनयनेचाधिकारिणः माधवीयेवृद्धमनुनोक्ताः** पितापितामहोभ्राताज्ञातयोगोत्रजाग्रजाः[1] उपायनेधिकारीस्यात्पूर्वाभावेपरःपरः **प्रयोगरत्ने** पितैवोपनयेत्पुत्रंतदभावेपितुःपिता तदभावेपितुर्भ्रातातदभावेतुसोदरः पितेतिविप्रपरं नक्षत्रियादेः तेषांपुरोहितएव उपनयनस्यदृष्टार्थत्वात् तेषांचाध्यापनेऽनधिकारात् अत्रपितृव्यस्यज्येष्ठभ्रात्रभावेधिकारः असंस्कृतास्तुसंस्कार्याभ्रातृभिःपूर्वसंस्कृतैरिति**याज्ञवल्क्योक्तेः** तेनेदमविभक्तपरं पूर्वंतुविभक्तपरं मातूरजोदोषेतुप्रागुक्तम् ।

## आतां उपनयन करण्याचे अधिकारी सांगतो.

**माधवीयांत वृद्धमनु**—"पिता, त्याच्या अभावीं पितामह, तदभावीं भ्राता, भ्रात्याचे अभावीं ज्ञाति ( सगोत्र सपिंड ), ज्ञातीचे अभावीं गोत्रज, याप्रमाणें पूर्वाच्या अभावीं पुढचा अधिकारी जाणावा. हा अधिकारी कुमारापेक्षां वयानें ज्येष्ठ असावा." **प्रयोगरत्नांत**—"पित्यानेंच पुत्राचें उपनयन करावें, पित्याचे अभावीं पितामह, पितामहाचे अभावीं पितृव्य, पितृव्याचे अभावीं सोदर भ्राता." 'पित्यानेंच उपनयन करावें' असें जें सांगितलें तें ब्राह्मणविषयक आहे. क्षत्रियादिविषयक नाहीं. कारण, क्षत्रियादिकांचें उपनयन पुरोहितानेंच करावें. त्यांच्या पित्यानें करूं नये; कारण, उपनयन हें अध्ययनासाठीं आहे. क्षत्रियादिकांना अध्ययन पढविण्याचा अधिकार नाहीं. येथें उपनयनाविषयीं ज्येष्ठ भ्रात्याला पूर्वी अधिकार. त्याच्या अभावीं पितृव्याला अधिकार समजावा. कारण, "असंस्कृत भ्रात्यांचे संस्कार पूर्वी संस्कार झालेल्या भ्रात्यांनीं करावे" असें **याज्ञवल्क्याचें** वचन आहे. यावरून **प्रयोगरत्नांत** भ्रात्याच्या पूर्वी पितृव्याला अधिकार सांगितला तो पितृव्यादिक अविभक्त असतां समजावा. आणि विभक्त असतील तर वृद्धमनूनें सांगितलेला भ्रात्याला अधिकार समजावा. माता रजस्वला झाली असतां तद्विषयक निर्णय पूर्वी ( चौलप्रकरणीं ) सांगितला आहे.

**अथषंढमूकादीनांविशेषः प्रयोगपारिजातेब्राह्मे** ब्राह्मण्यांब्राह्मणाज्जातोब्राह्मणःसइतिश्रुतिः तस्माच्चपंढबधिरकुब्जवामनपंगुषु जडगद्गदरोगार्तशुष्कांगविकलांगिषु मत्तोन्मत्तेषुमूकेषुशयनस्थेनिरिंद्रिये ध्वस्तपुंस्त्वेषुचैतेषुसंस्काराःस्युर्यथोचितं मत्तोन्मत्तौनसंस्कार्याविति केचिन्प्रचक्षते कर्मस्वनधिकाराच्चपातित्यंनास्तिचैतयोः तदपत्यंचसंस्कार्यमपरेत्वाहुरन्यथा संस्कारमंत्रहोमादीन्करोत्याचार्यएवतु उपनेयांश्चविधिवदाचार्यस्यसमीपतः आनीयाग्निसमीपंवासावित्रींस्पृश्यवाजपेत् कन्यास्वीकरणादन्यत्सर्वंविप्रेणकारयेत् एवमेवद्विजैर्जातौसंस्कार्यौकुंडगोलकौइति **स्मृत्यर्थसारे**प्येवं कुंडगोलकयोःसंस्कार्यत्वंश्राद्धेनिषेधश्चक्षेत्रजपुत्रविषयः अन्यस्य विन्नास्वेपविधिःस्मृतइतिवचनात् अब्राह्मण्येनोपनयनाद्यप्राप्तेरित्य**परार्कः** ।

## आतां षंढ, मूक इत्यादिकांचा विशेष सांगतो.

**प्रयोगपारिजातांत ब्राह्मांत**—"ब्राह्मणापासून ब्राह्मणी स्त्रीचे ठायीं झाला तो ब्राह्मण अशी श्रुति आहे, यास्तव षंढ, बधिर, कुब्ज ( कुबडा ), वामन ( खुजा, ऱ्हस्व ), पंगु, जड, गद्गदवाक्, रोगार्त, शुष्कांग, विकलांग ( ज्यास स्वभावतः कांहीं अवयव कमी आहे तो ), मत्त, उन्मत्त, मूक, शयनस्थित, इंद्रियरहित, पुरुषत्वहीन, ह्यांचे यथायोग्य संस्कार करावे. मत्त व उन्मत्त ह्यांचे संस्कार करूं नयेत. कारण, मत्त व उन्मत्त यांना कर्माविषयीं अधिकार नाहीं, म्हणून त्यांचें उपनयन झालें नाहीं, तरी त्यांना पतितपणा नाहीं. त्यांच्या अपत्यांचे संस्कार करावे, असें केचित् सांगतात. दुसरे विद्वान् असें सांगतात कीं, पूर्वोक्त सर्वांचें उपनयन करावें. ज्यांना मंत्रोच्चार, होम इत्यादिक होत नाहींत त्यांचे ते मंत्रोच्चारादिक आचार्यानेंच करावे. उपनयन करावयाच्या वटूंना आचार्याच्या समीप यथाविधि नेऊन अथवा अग्नीच्या समीप नेऊन त्यांना स्पर्श करून गायत्री जपावी. विवाहसमयीं कन्यास्वीकारावांचून बाकीचें सर्व कृत्य ब्राह्मणद्वारा करवावें. असाच ब्राह्मणापासून झालेल्या कुंडगोलकांचा संस्कार करावा." **स्मृत्यर्थसारांत**ही असेंच सांगितलें आहे. कुंड व गोलक यांचे संस्कार करावे

---

१ इदं वचनं वृद्धगार्ग्यस्येत्युक्तं कौस्तुभे । २ गोत्रजाग्रजा इत्यत्राकारलोपश्छांदसः पित्राद्युक्ताधिकार्यभावे कर्तारमाह शौनकः कुमारस्योपनयनं श्रुताभिजनवृत्तवान् । तपसा धूतनिःशेषपाप्मा कुर्याद्द्विजोत्तमः ।

हा निर्णय व त्या कुंडगोलकांचा श्राद्धभोजनाविषयीं जो निषेध केला तो, हे दोनही निर्णय क्षेत्रज[1] पुत्रविषयक आहेत. कारण, "हा जो सवर्णमूर्धावसिक्तादि संज्ञाविधि सांगितला तो विवाहित स्त्रियांविषयीं जाणावा." असें ( आचाराध्यायांत ) **याज्ञवल्क्य**वचन आहे. यास्तव अन्य ( क्षेत्रज पुत्रावांचून कुंड, गोलक ) जो पुत्र तो ब्राह्मण्यविरहित असल्यामुळें त्यास उपनयनादिक संस्कार प्राप्त होत नाहींत, असें **अपरार्क** सांगतो.

उपनयनंचकुमारंभोजयित्वाकार्यम् प्रागेवैनंतदहर्भोजयंतीति**मदनपारिजातेगोभिलोक्तेः** गायत्र्युपदेशश्चोत्तरतोग्नेःकार्यः उत्तरेणाग्निमुपविशतःप्राङ्मुखआचार्यःप्रत्यङ्मुखइतरोऽधीहिभोइति **शांखायनसूत्रोक्तेः** यद्यपि **कात्यायनेना**थास्मैसावित्रीमन्वाहोत्तरतोग्नेःप्रत्यङ्मुखायेत्युक्त्वादक्षिणतस्तिष्ठतआसीनायवैकेइतिविकल्पउक्तस्तथापि **कातीयाना**मेवसः बह्वृचानांतूत्तरएववेदैक्यात् भिक्षायांविशेषमाह **कात्यायनः** मातरमेवाग्रेभिक्षेत **पराशरमाधवीये** मातरंवास्वसारंवामातुर्वाभगिनींनिजाम् भिक्षेत-भिक्षांप्रथमंयाचैनंनविमानयेत् ।

मौंजी करावयाची ती कुमाराला भोजन घालून करावी. कारण, "मौंजीच्या दिवशीं पूर्वी त्याला ( कुमाराला ) भोजन घालितात" असें **मदनपरिजातां**त **गोभिला**चें वचन आहे. गायत्रीमंत्राचा उपदेश अग्नीच्या उत्तर प्रदेशीं करावा. कारण, "अग्नीच्या उत्तर प्रदेशीं बसणारा कुमार पूर्वाभिमुख आचार्य व कुमार पश्चिमाभिमुख बसून, भो आचार्य, मला गायत्रीचा उपदेश करा" असें **शांखायन**सूत्रवचन आहे. जरी **कात्यायना**नें "आतां अग्नीच्या उत्तरेस पश्चिमाभिमुख असलेल्या त्याला ( कुमाराला ) गायत्री सांगावी" असें सांगून नंतर अग्नीच्या दक्षिणेस उभ्या राहिलेल्या किंवा बसलेल्या कुमारास गायत्री सांगावी, असें कितीएक आचार्य सांगतात." याप्रमाणें अग्नीच्या उत्तरेस किंवा दक्षिणेस असा विकल्प सांगितला आहे, तथापि तो विकल्प कातीयांनाचे[2] समजावा. बह्वृचांना तर अग्नीच्या उत्तरेसच उपदेश समजावा. कारण, शांखायन व बह्वृच यांचा वेद एक आहे. **भिक्षेविषयीं विशेष सांगतो कात्यायन**—"मातेजवळच प्रथमतः भिक्षा मागावी." **पराशरमाधवीयां**त—"माता, किंवा मावशी, अथवा आपली भगिनी यांच्या जवळ प्रथम भिक्षा मागावी. किंवा जी ह्या ब्रह्मचाऱ्याचा अपमान करणार नाहीं तिच्याजवळ भिक्षा मागावी."

**अथसंस्कारलोपेशौनकः** आरभ्याधानमाचौलात्कालेतीतेतुकर्मणाम् व्याहृत्याग्नितुसंस्कृत्यहुत्वाकर्मयथाक्रमं एतेष्वेकैकलोपेतुपादकृच्छ्रंसमाचरेत् चूडायामर्धकृच्छ्रंस्यादापदित्वेवमीरितं अनापदितुसर्वत्रद्विगुणंद्विगुणंचरेत् **पारिजातेकात्यायनः** लुप्तेकर्मणिसर्वत्रप्रायश्चित्तंविधीयते प्रायश्चित्तेकृतेपश्चाल्लुप्तंकर्मसमाचरेत् **स्मृत्यर्थसारेचैवं कारिकायां**तुप्रायश्चित्तेकृतेतीतंलुप्तंकर्मकृताकृतमित्युक्तं प्रायश्चित्तेकृतेपश्चादतीतमपिकर्मवै कार्यमित्येकआचार्यानेत्यन्येतुविपश्चितइति **त्रिकांडमंडने**तुकालातीतेषुकार्येषुप्राप्तवत्स्वपरेषुच कालातीतानिकृत्वैवविदध्यादुत्तराणितु तत्रसर्वेषांतंत्रेणनांदीश्राद्धंकुर्यात् देशकालकर्त्रैक्यात् गणशःक्रियमाणानांमातृणांपूजनंसकृत् सकृदेवभवेच्छ्राद्धमादौनपृथगादिव्वितिछंदोगपरिशिष्टात् एतद्बहूनामपत्यानांयुगपत्संस्कारकरणविषयमिति **बोपदेवः** अतीतसंस्काराणांयुगपत्करण**इत्यन्ये** तत्रापिचौलस्योपनीत्यासहेतिपक्षेउपनीतिदिनएवानुष्ठानंनपूर्वदिने सहत्वस्यदिवसैक्येसन्निकृष्टतरत्वात् वृद्धाचारोप्येवं ।

**आतां संस्कारांचा लोप झाला असतां सांगतो शौनक**—गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, विष्णुबलि, जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण, अन्नप्राशन आणि चौल ह्या संस्कारांचा काल अतीत[3] झाला असतां अग्निसंस्कार करून समस्तव्याहृतिमंत्रांनीं प्रतिसंस्काराला क्रमेंकरून एकेक आज्याहुतिरूप कौलातिपत्तिनिमित्तक प्रायश्चित्त करावें. आणि चौलव्यतिरिक्त गर्भाधानादि संस्कारांपैकीं प्रमादानें एकेकाचा लोप असेल तर प्रत्येक संस्काराविषयीं **पादकृच्छ्र**[4] प्रायश्चित्त करावें. चौलसंस्काराविषयीं **अर्धकृच्छ्र** करावें. याप्रमाणें हें प्रायश्चित्त करून नंतर चौलसंस्कार करावा. आपत्ति असतां हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. आपत्ति नसेल तर सर्वत्र द्विगुण करावें. **पारिजातांत कात्यायन**—"कर्मांचा लोप असतां सर्वत्र लोपनिमित्त प्रायश्चित्त करावें. प्रायश्चित्त केल्यानंतर लुप्तकर्म करावें." **स्मृत्यर्थसारांत**ही असेंच सांगितलें आहे, **कारिकेंत**-तर अतीताचें प्रायश्चित्त केलें असतां अतीत कर्म कृताकृत आहे असें सांगितलें आहे. तें असें:—"प्रायश्चित्त

---

१ क्षेत्रज पुत्र म्हणजे स्वकीय स्त्रियेचे ठायीं जो सपिंडापासून किंवा दिरापासून उत्पन्न तो. २ कात्यायनशाखा यजुर्वेदांतर्गत आहे व यजुर्वेदाच्या शाखा बहुत असल्यामुळें सूत्रेंही अनेक आहेत. ३ म्हणजे संस्कारांचा विहितकाल टळून गेला तन्निमित्तक. ४ कृच्छ्रांचीं लक्षणें ग्रंथाच्या शेवटीं सांगूं.

केल्यानंतर अतीत कर्म( संस्कार )ही करावें. असें कोणी आचार्य सांगतात. इतर विद्वान अतीत कर्म करूं नये, असें सांगतात." **त्रिकांडमंडनां**त तर-"पहिलीं संस्कारादि कार्यें अतिक्रांत ( राहिलीं ) असून दुसरीं कार्यें प्राप्त झालीं असतां पूर्वींचीं ( म्हणजे ज्यांचा काळ टळून गेला आहे तीं ) केल्यानंतर पुढचीं प्राप्त झालेलीं कार्यें करावीं. त्या स्थलीं सर्व संस्कारांचें नांदीश्राद्ध तंत्रेंकरून करावें. कारण, सर्व संस्कारांचा देश, काल व कर्ता एक आहे. "बहुत संस्कार एक समयीं करावयाचे असतां त्यांमध्यें मातृकापूजन, व नांदीश्राद्ध हीं एकवारच ( एकतंत्रानें ) करावीं. पृथक् पृथक् करूं नयेत." असें **छंदोगपरिशिष्ट** वचन आहे. हें वचन बहुत अपत्यांचे एकाकालीं संस्कार कर्तव्य असतां तद्विषयक आहे, असें **बोपदेव** सांगतो. अतीत संस्कार एककालीं एकदम कर्तव्य असतां हें वचन आहे, असें इतर ग्रंथकार सांगतात. त्यांतही चौलसंस्कार, मौंजीसहकरणपक्षीं मौंजीच्या दिवशींच करावा. पूर्वदिवशीं करूं नये. कारण, सहपणास मौंजीचा दिवस हाच फार जवळ आहे. आणि वृद्धाचारही असाच मौंजीच्या दिवशींच चौल करण्याचा आहे.

उपनीतिदिनेमध्याह्नसंध्यामाह**पारिजातेजैमिनिः** यावद्ब्रह्मोपदेशस्तुतावत्संध्यादिकंचन ततोमध्याह्नसंध्यादिसर्वंकर्मसमाचरेदिति ब्रह्म गायत्री यत्तुवचनम् उपायनेतुकर्तव्यंसायंसंध्येउपासनं आरभेद्ब्रह्मयज्ञंतुमध्याह्नेतुपरेहनीति तच्छाखांतरविषयमितिपारिजातः विकल्पइतियुक्तंपश्यामः उपनयनाग्निस्त्रिरात्रंधार्यः त्र्यहमेतमग्निंधारयंतीत्यापस्तंबोक्तेः **बौधायनसूत्रे**तुसदाधारणमप्युक्तं उपनयनादिरग्निस्तमौपासनमित्याचक्षते पाणिग्रहणादित्येकेनित्योधार्योनुगतोनिर्मंथ्यइति इदंजातारणिपक्षे अन्यथामंथनासंभवात् ब्रह्मयज्ञेविशेषमाहतत्रैवजैमिनिः अनुपाकृतवेदस्यकर्तव्योब्रह्मयज्ञकः वेदस्थानेतुसावित्रीगृह्यतेतत्समायतइति येषांतद्दिनएववेदारंभस्तेषांनेदमितिदिक् ।

**उपनयनदिवशीं मध्याह्नसंध्या सांगतो-पारिजातांत जैमिनि**—"जोंपर्यंत गायत्रीचा उपदेश झाला नाहीं तोंपर्यंत संध्यादिक कर्म नाहीं. गायत्रीचा उपदेश झाल्यानंतर माध्याह्नसंध्यादिक सर्व कर्म करावें." आतां जें "उपनयनदिवशीं सायंकालीं संध्योपासन करावें, आणि दुसऱ्या दिवशीं ब्रह्मयज्ञाला आरंभ करावा" असें वचन, तें अन्यशाखाविषयक आहे, असें **पारिजात** सांगतो. त्या दिवशीं मध्याह्नसंध्येपासून किंवा सायंसंध्येपासून आरंभ करावा, असा विकल्प युक्त आहे, असें आम्हीं समजतों. उपनयनाग्नि तीन दिवस पर्यंत धारण करावा. कारण, "हा उपनयनाग्नि तीन दिवस धारण करितात" असें **आपस्तंब**वचन आहे. **बौधायनसूत्रां**त तर—उपनयनाग्नीचें सदा धारणही सांगितलें आहे, तें असें:—"उपनयनाचा जो अग्नि तो **औपासनाग्नि** असें म्हणतात. कित्येक आचार्य विवाहापासून जो अग्नि तो औपासनाग्नि असें म्हणतात. तो औपासनाग्नि नित्य धारण करावा. गेला असतां मंथन करून उत्पन्न करावा." 'अग्नि नष्ट झाला असतां मंथन करून उत्पन्न करावा' असें जें सांगितलें तें अरणी सिद्ध असतां जाणावें. अरणी सिद्ध नसेल तर मंथनाचा असंभव आहे. **ब्रह्मयज्ञाविषयीं विशेष सांगतो. पारिजातांत—जैमिनि**—"ज्याच्या वेदाचें उपाकरण झालें नाहीं त्यानेंही ब्रह्मयज्ञ करावा. त्यानें वेदस्थानीं गायत्रीमंत्राचा पाठ करावा. कारण, गायत्रीमंत्रानें सर्व वेदाचें फल प्राप्त होतें." ज्यांचा उपनयनदिवशींच वेदारंभ असेल त्यांना हें सांगितलें नाहीं. याप्रमाणें ही दिशा दाखविली आहे.

अथब्रह्मचारिधर्माः[1] **याज्ञवल्क्यः** मधुमांसांजनोच्छिष्टशुक्तस्त्रीप्राणिहिंसनं भास्करालोकनाश्लीलपरिवादादिवर्जयेत् **मनुः** अभ्यंगमंजनंचाक्ष्णोरुपानच्छत्रधारणं वर्जयेदितिप्रकृतं **पारिजातेकौर्मे** नादर्शंचैववीक्षेतनाचरेद्दंतधावनं गुरूच्छिष्टंभेषजार्थंप्रयुंजीतनकामतः एतन्निषिद्धमध्वादिविषयं अन्यस्यगुरूच्छिष्टस्यसर्वदाप्राप्तेः सचेद्व्याधीयीतकामंगुरोरुच्छिष्टंभेषजार्थमर्वप्राश्नीयादिति**वसिष्ठोक्तेः** ज्येष्ठभ्रातुरित्यपिज्ञेयम् पितुर्ज्येष्ठस्यचभ्रातुरुच्छिष्टंभोज्यमित्यापस्तंबोक्तेः गुरुपुत्रेतुस्मृत्यंतरेउक्तं गुरुवद्गुरुपुत्रःस्यादन्यत्रोच्छिष्टभोजनात् **प्रचेताः** तांबूलाभ्यंजनंचैवकांस्यपात्रेचभोजनं यतिश्चब्रह्मचारीचविधवाचविवर्जयेत् ।

## आतां ब्रह्मचारिधर्म सांगतो.

**याज्ञवल्क्य** ( आचाराध्याय )—"मधु, मांस, अंजन ( डोळ्यांत काजळ ), गुरूवांचून इतरांचें उच्छिष्ट, आंबलेला पदार्थ, स्त्रीसेवन, प्राणिहिंसा, सूर्याचें उदयकालीं व अस्तकालीं अवलोकन, ग्राम्य भाषण, परनिंदा इत्यादि वर्ज्य करावीं."

१ ऋक्शाखीयांचा वेदारंभ उपनयनकालीं होत नाहीं. उपाकरणसमयीं त्यांचा वेदारंभ होतो, असें सांगितलें आहे म्हणून वेदाचा तावत्पर्यंत अभाव असल्याकारणानें ब्रह्मयज्ञाचाही अभावप्रसंग येईल यास्तव हा निर्णय सांगितला आहे.

**मनु**—"तैलादि अभ्यंग, डोळ्यांत अंजन ( काजळ ) घालणें, पायांत जोडा घालणें, छत्री घेणें, हीं ब्रह्मचाऱ्यानें वर्ज्य करावीं." **पारिजातांत कूर्मपुराणांत**—"आरशांत पाहूं नये. दंतधावन करूं नये. गुरूचें उच्छिष्ट औषधाकरितां असेल तर भक्षण करावें. लोभानें भक्षण करूं नये." हें सांगणें ब्रह्मचाऱ्याला निषिद्ध जो मधु इत्यादि पदार्थ त्याचें भक्षण सुचविण्याकरितां आहे. कारण, इतर ( निषिद्धभिन्न ) गुरूच्छिष्टाचें भक्षण सर्वदा प्राप्त आहे. "तो ब्रह्मचारी जर व्याधिग्रस्त होईल तर गुरूचें सर्व ( निषिद्ध मद्यादिकही ) उच्छिष्ट औषधाकरितां यथेच्छ भक्षण करावें" असें **वसिष्ठ**वचन आहे. ज्येष्ठ भ्रात्याचेंही उच्छिष्ट असेंच जाणावें. कारण, "पिता व ज्येष्ठ भ्राता यांचें उच्छिष्ट भक्षण करावें" असें **आपस्तंब**-वचन आहे. गुरुपुत्राविषयीं तर **स्मृत्यंतरांत** सांगतो—"जसा गुरु तसाच गुरुपुत्र आहे. गुरुपुत्राचें उच्छिष्ट मात्र भक्षण करूं नये." **प्रचेता**—"तांबूल, काजळ, आणि कांस्यपात्रांत भोजन, हीं यति ( संन्यासी ), ब्रह्मचारी आणि विधवा यांनीं वर्ज्य करावीं."

**यमः** मेखलामजिनंदंडमुपवीतंचनित्यशः कौपीनंकटिसूत्रंचब्रह्मचारीतुधारयेत् अग्नींधनंभैक्ष्यचर्यामधःशय्यांगुरोर्हितं कुर्यादितिशेषः **मेखलामाहाश्वलायनः** तेपांमेखलामौंजीब्राह्मणस्यधनुर्ज्याक्षत्रियस्यावीवैश्यस्येति **आचार्यः** त्रिवृतामेखलाकार्यात्रिवारंस्यात्समावृता तद्ग्रंथयस्त्रयःकार्याःपंचवासप्तवापुनः **मनुः** मौंजीत्रिवृत्समाश्लक्ष्णाकार्याविप्रस्यमेखला त्रिवृताग्रंथिनैकेनत्रिभिःपंचभिरेववा मौंज्यभावेतुकर्तव्याःकुशाश्मंतकबल्वजैः अत्रप्रवरसंख्यानियमइतिवृद्धाः **अथदंडाः मनुः** ब्राह्मणोबैल्वपालाशौक्षत्रियोवाटखादिरौ पैप्पलौदुंबरौवैश्योदंडानर्हतिधर्मतः एषामभावे **गौतमः** यज्ञियोवासर्वेषांमूर्धललाटनासाप्रमाणइति **अजिनमाहाश्वलायनः** अहतेनवाससासंवीतमैणेयेनवाजिनेनब्राह्मणंरौरवेणक्षत्रियमाजेनवैश्यमिति यद्यप्यैणेयशब्देनमृगीचर्मैवोच्यते एण्याढञितिपाणिनिस्मृतेः ऐणेयमेण्याश्चर्माद्यमेणस्यैणमुभेत्रिष्वितिअमरकोशाच्च तथापिकृष्णरुरुबस्तान्यजिनानीतिशंखोक्तेः सर्वेषांवारौरवमितियमोक्तेश्च मृगचर्मणासहविकल्पोज्ञेयः वस्त्राजिनयोस्तुविकल्पः कार्पासंवाविकृतमितिगौतमोक्तेः ।

**यम**—"मेखला, अजिन, दंड, यज्ञोपवीत, कौपीन, कटिसूत्र हीं ब्रह्मचाऱ्यानें नित्य धारण करावीं. अग्नींत समिधा देणें, भिक्षा मागणें, भूमिशयन, आणि गुरूचें हित, हीं करावीं." **मेखला सांगतो-आश्वलायन**—"ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या मेखला—ब्राह्मणाची मेखला मौंजी ( मुंजतृणाची ), क्षत्रियाची मेखला धनुर्ज्या ( मूर्वा तृणाची ), वैश्याची मेखला आवी ( मेंढ्याचे लोंकरीची ), समजावी." **आचार्य**—"मेखला तिपेड करावी; त्या मेखलेचे कमरेस तीन फेरे घालून तीन, पांच अथवा सात गांठी द्याव्या." **मनु**—"मोळाच्या तिपेडासारखी मृदु अशी ब्राह्मणाची मेखला करावी. त्या मेखलेचे तीन फेरे घालून एक, तीन किंवा पांच ग्रंथि द्यावे. वर सांगितलेल्या मोळ इत्यादिकांच्या अभावीं ब्राह्मणादि तीन वर्णांनीं अनुक्रमानें कुश, अश्मंतक ( आपटा ) आणि लवाळा यांच्या मेखला कराव्या." ह्या मेखलेस जे ग्रंथि द्यावयाचे ते जितके प्रवराचे ऋषि असतील तितके द्यावे, असें **वृद्ध** सांगतात. आतां **दंड सांगतो मनु**—"ब्राह्मणानें बेलाच्या किंवा पळसाचा, क्षत्रियानें वडाचा किंवा खदिराचा, वैश्यानें पिंपळाचा किंवा उंबराचा, याप्रमाणें धर्मेकरून दंड धारण करावे." हे दंड न मिळतील तर सांगतो **गौतम**—"अथवा सर्वांनीं उदुंबरादिक यज्ञियवृक्षाचे दंड धारण करावे. ब्राह्मणानें मस्तकापर्यंत उंचीचा, क्षत्रियानें ललाटापर्यंत उंचीचा आणि वैश्यानें नासिकापर्यंत उंचीचा दंड धारण करावा." **अजिन सांगतो आश्वलायन**—"अहत म्हणजे नवें असून वापरलेलें नसेल अशा वस्त्रानें प्रावृत कुमार अथवा मृगीचर्मानें प्रावृत ब्राह्मणकुमार, रुरुमृगचर्मानें प्रावृत क्षत्रियकुमार, आणि बोकडाच्या चर्मानें प्रावृत वैश्यकुमार, यांना आणून होम करावा." आतां जरी 'ऐणेयेन वाऽजिनेन ब्राह्मणं' ह्या वरील आश्वलायन सूत्रांतील 'ऐणेय' शब्दानें मृगीचेंच चर्म सांगितलें आहे. कारण, "एण्याढञ्" ह्या **पाणिनि**सूत्रावरून एणी म्ह० मृगी तिचें चर्म विवक्षित असतां 'ऐणेय' असा शब्द सिद्ध होत आहे. आणि "एणीचें ( मृगीचें ) चर्मादिक तें ऐणेय होय. आणि एणाचें ( मृगाचें ) चर्मादिक तें ऐण होय." असा **अमरकोश**ही आहे. तथापि "कृष्णसार, रुरु मृग आणि बोकड यांचीं चर्मे तीं अजिनें वर्णानुक्रमानें घ्यावीं." ह्या **शंख**-वचनावरून; "अथवा सर्वांनीं रुरुमृगाचें चर्म धारण करावें" ह्या **यम**वचनावरूनही मृगचर्मासह त्या मृगीच्या चर्माचा विकल्प जाणावा. वस्त्र आणि अजिन यांचा तर विकल्प आहेच. कारण, "अथवा रंगविलेलें कार्पासवस्त्र धारण करावें." असें **गौतमाचें** वचन आहे.

---

१ अहतं नवमपुराणं अनुपभुक्तमित्यर्थः । प्रचेताः—ईषद्धौतं नवं श्वेतं सदशं यन्न धारितं । अहतं तद्विजानीयात्सर्वकर्मसु पावनमिति ।

**अथयज्ञोपवीतं मनुः** कार्पासमुपवीतंस्याद्विप्रस्योर्ध्ववृतंत्रिवृत् **पारिजातेदेवलः** कार्पासक्षौम गोवालशणबल्वतृणादिकं यथासंभवतोधार्यमुपवीतंद्विजातिभिः शुचौदेशेशुचिःसूत्रंसंहतांगुलिमूलके आव-र्त्यपण्णवत्यातत्रिगुणीकृत्ययत्नतः अब्लिंगकैस्त्रिभिःसम्यक्प्रक्षाल्योर्ध्ववृतंत्रिवृत् अप्रदक्षिणमावृत्यसावित्र्या-त्रिगुणीकृतं ततःप्रदक्षिणावर्तंसमंस्यान्नवसूत्रकं त्रिरावेष्ट्यदृढंबध्वाब्रह्मविष्णवीश्वरान्नमेत् तन्नवतंतुकार्यं सावित्र्यात्रिगुणंकुर्यान्नवसूत्रंतुतद्भवेदितितेनैवोक्तः **छंदोगपरिशिष्टे** त्रिवृदूर्ध्ववृतंकार्यंतंतुत्रयमधोवृतं त्रिवृतंचोपवीतंस्यात्तस्यैकोग्रंथिरिष्यते ऊर्ध्ववृतंदक्षिणंकरमूर्ध्वंकृत्वावलितं **भृगुः** वामावर्तवलितंत्रिगुणंकृ-त्वादक्षिणावर्तवलितंत्रिगुणंकार्यं सएकस्तंतुरेवंत्रितंतुकमित्यर्थः **कात्यायनः** पृष्ठदेशेचनाभ्यांचधृतंयद्वि-दतेकटिं तद्धार्यमुपवीतंस्यान्नातिलंबंनचोच्छ्रितं **वसिष्ठः** नाभेरूर्ध्वमनायुष्यमधोनाभेस्तपःक्षयः तस्मान्ना-भिसमंकुर्यादुपवीतंविचक्षणः **पारिजातेदेवलः** उपवीतंबटोरेकंद्वेतथेतरयोःस्मृते एकमेवयतीनांस्यादि-तिशास्त्रस्यनिश्चयः **सएव** बहूनिवायुष्कामस्य तत्रमंत्रमाह **सएव** यज्ञोपवीतमितिवाव्याहृत्यावापिधार-येत् **हेमाद्रौ** यज्ञोपवीतेद्वेधार्येश्रौतेस्मार्तेचकर्मणि तृतीयमुत्तरीयार्थे[2]वस्त्राभावेतदिष्यते **देवलः** सावित्र्या-दशकृत्वोद्भिर्मंत्रिताभिस्तदुक्षयेत् विच्छिन्नंचाप्यधोयातंभुक्त्वानिर्मितमुत्सृजेत् **मनुः** मेखलामजिनंदंडमु-पवीतंकमंडलुं अप्सुप्रास्यविनष्टानिगृह्णीतान्यानिमंत्रतः ॥

## आतां यज्ञोपवीन सांगतो.

**मनु**—"ब्राह्मणाला यज्ञोपवीत कापसाचें असावें, तें असें कीं, सूत त्रिगुण करून उजवा हात वर करून वळलेलें करावें." **पारिजातांत देवल**—"कार्पास ( कापसाचें सूत ), क्षौम ( अळशीचें सूत ), गोवाल ( अरण्य गाईचे केश ), शण ( तागाचें सूत ), वल्व ( लव्ह्याचें सूत ), यांपैकीं ज्याचें मिळेल व होईल त्याचें यज्ञोपवीत ब्राह्मणादिकांनीं धारण करावें. शुचिर्भूत ब्राह्मणानें शुद्ध भूमीवर बसून सूत काढावें. नंतर हाताचीं गारखीं चार बोटें एकत्र करून त्या बोटांना ( चवंगाला ) त्रिगुणित केलेल्या गुनाचे ( तिगुतीचे ) शाण्णव फेरे घालावे, म्हणजे तिसुती तयार झाली. नंतर "आपो-हिष्ठा०" हे तीन मंत्र म्हणून उदकानें चांगलें धुवून ती तिगुनी ऊर्ध्ववृत रीतीनें अप्रदक्षिण वळून गायत्रीमंत्रानें त्रिगुणित करून प्रदक्षिण वळावें. ती नवसुती गारखी होते. तिचे तीन फेरे करून घट्ट ग्रंथि बांधावी. त्या ग्रंथीचे ठायीं ब्रह्मा, विष्णु, महेश्वर यांना नमस्कार करावा." तें यज्ञोपवीत नवसुती करावें. कारण, "तिसुती गायत्रीमंत्रानें त्रिगुणित ( तिपेड ) करावी, म्हणजे नवसुती होते." असें त्यानें ( **देवलानें** ) च सांगितलें आहे. **छंदोगपरिशिष्टांत**—"तिसुती करून ऊर्ध्ववृत वळावें. पुनः तिपेड करून अधोवृत वळावें. म्हणजे नवगुती झाली. त्याचे तीन फेरे करून त्याला एक ग्रंथि ( गांठ ) द्यावा, म्हणजे यज्ञोपवीत होतें." ऊर्ध्ववृत याचा अर्थ—डावा हात खालीं आणि उजवा हात वर करून त्या उजव्या हातानें वळलें तें ऊर्ध्ववृत, याच्या उलट म्हणजे उजवा हात खालीं करून वळलेलें तें अधोवृत होय. **भृगु**—"वामावर्त ( अप्रदक्षिण ) वळलेली तिसुती करून पुनः प्रदक्षिण वळलेलें असें त्रिगुणित करावें." तो एक तंतु ( नवसुती ) होतो, त्याच्या तीन तंतूंचें यज्ञोपवीत होतें, असा भाव. **कात्यायन**—"जें यज्ञोपवीत घातलें असतां स्कंधावरून पाठीवर आणि पुढें नाभीवर येऊन कटिप्रदेशापर्यंत पोहोंचतें, तें यज्ञोपवीत धारण करावें. फार लांब व फार आंखूड असूं नये." **वसिष्ठ**—"नाभीच्या वरती राहणारें यज्ञोपवीत आयुष्यहानि करणारें होतें. नाभीच्या खालीं जाणारें यज्ञोपवीत तपाचा क्षय करणारें होतें; म्हणून ज्ञात्या पुरुषानें नाभिसमान यज्ञोपवीत धारण करावें." **पारिजातांत देवल**—"बटूनें ( ब्रह्मचाऱ्यानें ) एक यज्ञोपवीत धारण करावें. गृहस्थाश्रमी व वानप्रस्थ यांनीं दोन. यतींनीं ( त्रिदंडी यांनीं ) एक यज्ञोपवीत धारण करावें, असा शास्त्राचा निश्चय आहे." **देवलच**—"अथवा आयुष्कामानें बहुत ( तीन, चार ) धारण करावीं." त्या यज्ञोपवीतधारणाविषयीं मंत्र सांगतो **देवल**–"यज्ञोपवीतं परमं०" ह्या मंत्रानें किंवा व्याहृति मंत्रानें धारण करावें." **हेमाद्रींत**—"श्रौतकर्म व स्मार्तकर्म यांचेठायीं दोन यज्ञोपवीतें धारण करावीं. तिसरें यज्ञोपवीत, उत्तरीय किंवा वस्त्र यांच्या अभावीं धारण करावें." **देवल**—"गायत्रीमंत्रानें दशवार अभिमंत्रित केलेल्या उदकानें तें प्रोक्षण करावें. तुटलें असतां किंवा खालीं गळलें असतां तें टाकावें. व भोजन करून निर्माण केलेलें टाकावें." **मनु**—"मेखला, अजिन, दंड, यज्ञोपवीत, कमंडलु हीं छिन्न भिन्न झालीं असतां तीं उदकांत टाकून मंत्रानें नवीं धारण करावीं."

---

१ ऊर्ध्ववृतमाहसंग्रहकारः । करेण दक्षिणेनोर्ध्वंगतेन त्रिगुणीकृतं । वलितं मानवैः सूत्रं शास्त्रे ऊर्ध्ववृतं स्मृतम् ॥ संस्कारकौस्तुभ.

२ उत्तरीयार्थे इति जीवत्पितृकस्य तु उत्तरीयं निषिद्धं ॥ पादुके चोत्तरीयं च तर्जन्यां रौप्यधारणं ॥ न जीवत्पितृकः कुर्याज्ज्येष्ठे भ्रातरि जीवतीति स्मृतेः ॥

अथैतल्लोपेप्रायश्चित्तंमनुः अकृत्वाभैक्ष्यचरणमसमिध्यचपावकं अनातुरःसप्तरात्रमवकीर्णिव्रतंचरेत् अमत्या आपदित्यागेतु **याज्ञवल्क्यः** भैक्ष्याग्निकार्येत्यक्त्वातुसप्तरात्रमनातुरः कामावकीर्णइत्याभ्यांजुहुयादाहुतिद्वयं उपस्थानंततःकुर्यात्संमासिंचंत्वनेनतु मंत्रास्तु **मिताक्षरायांज्ञेयाः** सकृल्लोपेतु**ऋग्विधाने** मानस्तोकेजपेन्मंत्रंशतसंख्यंशिवालये अग्निकार्यंविनाभुक्त्वानपापंब्रह्मचारिणः **स्मृत्यर्थसारेतु** संध्याग्निकार्यलोपेस्नात्वाऽष्टसहस्रंजपः भिक्षालोपेष्टशतं अभ्यासेद्विगुणंपुनःसंस्कारश्चेत्युक्तं **अपरार्केसंवर्तः** यःसंध्यांचैवनोपास्तेअग्निकार्यंयथाविधि गायत्र्यष्टसहस्रंतुजपेत्स्नात्वासमाहितः ।

## आतां ब्रह्मचारिधर्मांचा लोप झाला असतां प्रायश्चित्त सांगतो—

**मनु—**"ब्रह्मचारी आतुर ( रोगपीडित ) नसून त्यानें सात दिवसपर्यंत भिक्षा मागितली नाहीं व अग्नींत समिधा दिली नाहीं तर अवकीर्णिव्रत[1] सांगितलें आहे तें त्यानें करावें." ( हें प्रायश्चित्त, जाणतेपणानें भिक्षाचरणादि केलें नसतां समजावें ). अजाणतेपणानें व आपत्कालीं भिक्षादिकांचा त्याग असेल तर सांगतो **याज्ञवल्क्य—**"स्वस्थ ( निरोगी ) असतां जो ब्रह्मचारी भिक्षा मागणें, अग्निकार्य हीं सप्तरात्रपर्यंत टाकील त्यानें **'कामावकीर्णोस्म्यवकीर्णोस्मि कामकामाय स्वाहा' 'कामावपन्नोस्म्यवपन्नोस्मि कामकामाय स्वाहा'** ह्या दोन मंत्रांनीं दोन आज्याहुतिहोम करून नंतर 'संमा सिंचंतु मरुतः समिंद्रः संबृहस्पतिः समायमग्निः सचतां यशसा ब्रह्मवर्चसा.' ह्या मंत्रेंकरून अभ्युपस्थान करावें." हे मंत्र मिताक्षरेंत पहावे. एकवार लोप झाला असेल तर सांगतो **ऋग्विधानां**त—"ब्रह्मचारी अग्निकार्य केल्यावांचून भोजन करील तर त्यानें शिवालयांत 'मानस्तोके०' ह्या मंत्राचा शतवार जप करावा, तेणेंकरून ब्रह्मचारी निर्दोषी होतो." **स्मृत्यर्थसारां**त तर—संध्या व अग्निकार्य यांचा लोप झाला असतां स्नान करून गायत्रीमंत्राचा अष्टसहस्र जप करावा. भिक्षालोप असतां अष्टशत जप करावा. अभ्यास असतां ( हेंच प्रायश्चित्त )द्विगुणित करून पुनःसंस्कार करावा, असें सांगितलें आहे. **अपरार्कां**त **संवर्त—**"जो संध्या व अग्निकार्य हीं यथाविधि करीत नाहीं त्यानें स्नान करून स्वस्थचित्तपणानें गायत्रीमंत्राचा अष्टसहस्र जप करावा."

अग्निकार्यंसंध्याद्वयेकार्यं अग्निकार्यंततःकुर्यात्संध्ययोरुभयोरपीति **याज्ञवल्क्योक्तेः** सायमेववा सायमेववाग्निमिंधीतेत्येकेइति **लौगाक्षिणोक्तेः पारिजातेवृद्धशातातपः** ब्रह्मचारीतुयोश्नीयान्मधुमांसंतथैवच प्राजापत्यंचरेत्कृच्छ्रंव्रतशेषंसमापयेत् **ऋग्विधाने** तंवोधियाजपेन्मंत्रंलक्षंचैवशिवालये ब्रह्मचारीस्वधर्मेषुन्यूनंचेत्पूर्णमेतितत् ।

अग्निकार्य ( अग्नींत समिधाहोम ) सायंकालीं व प्रातःकालीं असें द्विवार करावें. कारण, "नंतर दोन संध्याकालींही अग्निकार्य करावें." असें **याज्ञवल्क्या**चें वचन आहे. अथवा सायंकालीं मात्र अग्निकार्य करावें. कारण, "अथवा सायंकालीं मात्र अग्नींत समिधा द्यावी, असें कितीएक आचार्य सांगतात" असें **लौगाक्षीचें** वचन आहे. **पारिजातां**त **वृद्धशातातप—**"जो ब्रह्मचारी मधु व मांस भक्षण करितो त्यानें प्राजापत्य कृच्छ्र प्रायश्चित्त करून शेष ब्रह्मचर्यव्रत समाप्त करावें." **ऋग्विधानां**त—"ब्रह्मचारी हा स्वकीय धर्मात न्यून असेल तर त्यानें शिवालयांत 'तंवोधिया०' ह्या मंत्राचा एक लक्ष जप करावा, तेणेंकरून धर्माचा न्यूनपणा पूर्ण होतो."

**स्त्रीसंगेतुमनुः** अवकीर्णीतुकाणेनगर्दभेनचतुष्पथे स्थालीपाकविधानेनयजेद्वैनिर्ऋतिंनिशि विस्तरस्तु **मिताक्षरादौज्ञेयःउपवीतनाशेतुहारीतः** मनोव्रतपतीभिश्चतस्रआज्याहुतीर्हुत्वापुनःप्रतीयात् तत्रैव **मरीचिः** ब्रह्मसूत्रंविनाभुंक्तेविण्मूत्रेकुरुतेथवा गायत्र्यष्टसहस्रेणप्राणायामेनशुध्यति ।

## स्त्रीसंग घडला असतां सांगतो.

**मनु—**"अवकीर्णी[2] ब्रह्मचाऱ्यानें चवाठ्यावर स्थालीपाकविधानेंकरून रात्रीं निर्ऋति देवतेला उद्देशून काण अशा गर्दभ पशूनें याग करावा." याचा याहून विस्तार पहावयाचा असल्यास मिताक्षरादि ग्रंथांत पहावा. यज्ञोपवीताचा नाश झाला

१ अवकीर्णिव्रत म्हणजे ब्रह्मचाऱ्यानें स्त्रीसंग केला असतां जें प्रायश्चित्त सांगितलें आहे, तें अवकीर्णिव्रत होय. २ ब्रह्मचार्युपकुर्वाणो नैष्ठिकश्चासौ योषितं गत्वावकीर्णी भवति । चरमधातोर्विसर्गोवकीर्णं तदस्यास्ति सोवकीर्णी ॥ ब्रह्मचारीचेत् स्त्रियमुपेयादरण्ये चतुष्पथे लौकिकेऽग्नौ रक्षोदेवतं गर्दभं पशुमालभेतेतिवसिष्ठस्मरणात् । पशोरभावे चरुणा यष्टव्यं । नैर्ऋतं वा चरुं निर्वपेत्तस्य जुहुयात्कामायस्वाहा कामकामायस्वाहा निर्ऋत्यैस्वाहा रक्षोदेवताभ्यःस्वाहा इति वासिष्ठात् । ३. चरम धातूचा जो विसर्ग ( पतन ) तें अवकीर्ण, तें ज्या ब्रह्मचाऱ्याला आहे तो अवकीर्णी, म्हणजे ज्या ब्रह्मचाऱ्यानें स्त्रीसंग केला तो अवकीर्णी म्हटला आहे.

असतां सांगतो **हारीत**—"**मनोज्योति०**" ह्या एका मंत्रानें व '**व्रतपतीभिः०**' ह्या तीन मंत्रांनीं अशा चुताच्या चार आहुतींनीं होम करून पुनः दुसरें यज्ञोपवीत यथाविधि समंत्रक धारण करावें." यज्ञोपवीतावांचून भोजनादि केलें असतां तेथेंच सांगतो **मरीचि**—"यज्ञोपवीतावांचून जर भोजन किंवा मलमूत्रोत्सर्ग करील तर प्राणायाम व अष्टसहस्र गायत्री-जप करून शुद्ध होतो."

**मनुः** भोःशब्दंकीर्तयेदंतेस्वस्यनाम्नोभिवादने आयुष्मान्भवसौम्येतिवाच्योविप्रोभिवादने अकारश्चा-स्यनाम्नोंतेवाच्यःपूर्वाक्षरःप्लुतः शर्मन्नितिनकारात्पूर्वइत्यर्थः अभिवादनप्रत्यभिवादनादौविशेषःस्मृत्यर्थ-**सारे पारिजातादौज्ञेयः यमः** ज्यायानपिकनीयांसंसंध्यायामभिवादयेत् विनाशिष्यंचपुत्रंचदौहित्रं-दुहितुःपतिं ।

## अभिवादन व प्रत्यभिवादन सांगतो.

**मनु**—"अभिवादन ( प्रणाम ) करतेसमयीं आपल्या नामाच्या अंतीं '**भोः**' असा शब्द उच्चारावा. कारण, **भोः**शब्द हा नामाचें स्वरूप होय, असें ऋषींनीं सांगितलें आहे. म्हणजे—'रामशर्माऽहंभोः अभिवादये' असें शिष्यानें अभिवादन केल्यावर गुरूनें प्रत्यभिवादन ( आशीर्वाद ) देण्याचे समयीं 'आयुष्मान् भव राम शर्म३न्' असा ब्राह्मणास आशीर्वाद द्यावा. नामाच्या अंतींचा व नकाराचे पूर्वींचा जो अकारादि स्वर तो प्लुत ( त्रिमात्रात्मक ) उच्चारावा." म्हणजे 'आयुष्मान्भव राम शर्म३न्' असा प्रयोग होतो. अभिवादन व प्रत्यभिवादन इत्यादिकांचा विशेष प्रकार **स्मृत्यर्थसार, पारिजात** इत्यादि ग्रंथांत पाहावा. **यम**—"ज्येष्ठानेंही संध्यासमयीं कनिष्ठाला ( पितृव्यादिकांना ) अभिवादन करावें; परंतु शिष्य, पुत्र, दौहित्र, जामाता यांना मात्र अभिवादन करूं नये."

**अथपुनरुपनयनं पारिजाते शातातपः** लशुनंगृंजनंजग्ध्वापलांडुंचतथाशुनः उष्ट्रमानुषके-भाश्वरासभीक्षीरभोजनात् उपायनंपुनःकुर्यात्तप्तकृच्छ्रंचरेन्मुहुरिति **हेमाद्रौवृद्धमनुः** जीवन्यदिसमा-गच्छेद्घृतकुंभेनिमज्ज्यच उद्धृत्यस्नापयित्वास्यजातकर्मादिकारयेत् तत्रैव**पाद्मे** प्रेतशय्याप्रतिग्राहीपुनःसंस्का-रमर्हति **चंद्रिकायांबौधायनः** सिंधुसौवीरसौराष्ट्रांस्तथाप्रत्यंतवासिनः अंगवंगकलिंगांध्रान्गत्वासंस्का-रमर्हति **हेमाद्रौप्रायश्चित्तकांडे वृद्धगौतमः** खरमुष्ट्रंचमहिषमनड्वाहमजंतथा बस्तमारुह्यमुख्यजः-क्रोशेचांद्रंविनिर्दिशेत् **मार्कंडेयः** खरमारुह्यविप्रस्तुयोजनंयदिगच्छति तप्तकृच्छ्रत्रयंप्रोक्तंशरीरस्यविशोधनं पुनर्जन्मप्रकुर्वीतघृतगर्भविधानतः **मदनरत्नेमिताक्षरायांच**स्नानमात्रमुक्तं **मनुः** अज्ञानात्प्राश्यवि-ण्मूत्रंसुरासंसृष्टमेवच पुनःसंस्कारमर्हंतित्रयोवर्णाद्विजातयः **मिताक्षरायांपराशरः** यःप्रत्यवसितो-विप्रःप्रव्रज्यातोविनिर्गतः अनाशकनिवृत्तश्चगार्हस्थ्यंचेच्चिकीर्षति सचरेत्त्रीणिकृच्छ्राणित्रीणिचांद्रायणानिच जातकर्मादिभिःसर्वैःसंस्कृतःशुद्धिमाप्नुयात् ।

## यानंतर पुनरुपनयन सांगतो.

**पारिजातांत शातातप**—"लसूण, गाजर, पलांडु, हीं भक्षण केलीं असतां; आणि शुनी, उंट, मनुष्य स्त्री, हस्तिनी, घोडी, गाढवी यांचें दूध प्राशन केलें असतां तप्तकृच्छ्रे[1] प्रायश्चित्त व पुनः उपनयन करावें." **हेमाद्रींत वृद्धमनु**—"देशांतरीं गेलेला 'मृत झाला' अशी वार्ता ऐकून त्याची और्ध्वदेहिक क्रिया केली असतां तो जर पुनः जीवंत आला तर त्याला घृताच्या कुंभांत बुडवून नंतर बाहेर काढून स्नान घालून त्याचे जातकर्मापासून मौंजीपर्यंत संस्कार करावे." तेथेंच **पद्मपुराणांत**—"मृतशय्येचें दान घेणारा पुनःसंस्काराला पात्र होतो." **चंद्रिकेंत बौधायन**"—( तीर्थयात्रा इत्यादि कारणावांचून ) सिंधु, सौवीर, सौराष्ट्र, प्रत्यंतवासी ( म्लेच्छदेश ), अंग, वंग, कलिंग, ह्या देशांमध्यें गमन केलें असतां तो पुनःसंस्काराला योग्य होतो." **हेमाद्रींत प्रायश्चित्तकांडांत—वृद्ध गौतम**—"गाढव, उंट, टोणगा, बैल, बोकड, एडका, यांच्यावर ब्राह्मण बसून एक कोशपर्यंत गमन करील तर त्याला चांद्रायण प्रायश्चित्त सांगावें." **मार्कंडेय**—"ब्राह्मण गाढवावर बसून एक योजनपर्यंत जर जाईल तर त्याच्या शरीरशुद्धीसाठीं तीन तप्तकृच्छ्रें प्रायश्चित्त सांगावें. नंतर घृतकुंभांत बुडवून पुनः बाहेर काढून स्नान घालावें." **मदनरत्नांत व मिताक्षरेंत** स्नान मात्र सांगितलें आहे. **मनु**—"अज्ञानें-करून विष्ठा, मूत्र व सुरा लागलेला पदार्थ यांतून कोणतें एक भक्षण करतील तर ते तीनही वर्ण द्विजाति पुनःसंस्काराला पात्र होतील." **मिताक्षरेंत पराशर**—"जो ब्राह्मण संन्यास घेऊन नंतर त्या आश्रमांतून निवृत्त होऊन गृहस्थाश्रमपर्यंत

१. कृच्छ्रांचीं लक्षणें ग्रंथाच्या शेवटीं सांगूं.

द्वितीया, मन्वादि, युगादि, आणि सोपपदा तिथि यांचेठायीं अनध्याय करावा." चातुर्मास्यद्वितीया सांगतो **गर्ग**— "आषाढ, कार्तिक, फाल्गुन मासांतील कृष्णपक्षींच्या ज्या द्वितीया त्या चातुर्मास्यद्वितीया होत, असें विद्वान् सांगतात." **स्मृत्यर्थसारांत**ही—आषाढी पौर्णिमा, कार्तिकी पौर्णिमा, आणि फाल्गुनी पौर्णिमा ह्यांच्या जवळच्या द्वितीयांसही अनध्याय करावा, असें सांगितलें आहे. **मनु**—"उपाकर्म व उत्सर्जन यांचे ठायीं त्रिरात्र अनध्याय; **अष्टका** आणि ऋतूचे शेवटचे दिवस यांचेठायीं एक अहोरात्र अनध्याय करावा." **मनूच्या** मतीं उत्सर्गाचे ठायीं पक्षिणी किंवा अहोरात्र अनध्याय आहे. त्यासह ह्या तीन दिवस अनध्यायाचा विकल्प समजावा, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. अष्टका म्ह० मार्गशीर्ष, पौष, माघ यांतील कृष्ण पक्षांतील सप्तमी, अष्टमी, आणि नवमी ह्या तीन तिथि जाणाव्या. कारण, "अष्टका तीन आहेत, म्हणून त्रिरात्र अनध्याय करावा. कितीएक आचार्य शेवटचे अष्टकेला अनध्याय करितात." असें **गौतम**वचन आहे. ऋतूचे शेवटचे दिवस म्हणजे सौरऋतूचे शेवटचे दिवस समजावे. कारण, चांद्रऋतूचे शेवटीं पर्वदिवस असल्यामुळें त्यांचा निषेध सिद्धच आहे, असें **सर्वज्ञनारायण** सांगतो. हे नित्य अनध्याय समजावे.

नैमित्तिकानप्याह **याज्ञवल्क्यः** त्र्यहंप्रेतेष्वनध्यायःशिष्यर्त्विग्गुरुबंधुषु उपाकर्मणिचोत्सर्गेस्वशाखाश्रोत्रियेतथा संध्यागर्जितनिर्घातभूकंपोल्कानिपातने समाप्यवेदंद्युनिशमारण्यकमधीत्यच पंचदश्यांचतुर्दश्यामष्टम्यांराहुसूतके ऋतुसंधिषुभुक्त्वावाश्राद्धिकंप्रतिगृह्यच पशुमंडूकनकुलश्वाहिमार्जारमूषकैः कृतेंतरेत्वहोरात्रंशक्रपातेतथोच्छ्रये ग्रहणेद्युनिशोक्तावपिग्रस्तास्तेत्र्यहमित्युक्तंप्राक् ।

**नैमित्तिक (निमित्तानें प्राप्त) ही अनध्याय सांगतो—याज्ञवल्क्य**—"शिष्य, ऋत्विक्, गुरुबंधु, स्वशाखेचा श्रोत्रिय ( वैदिक ) यांतून कोणी मृत असतां तीन दिवस अनध्याय. उपाकर्म व उत्सर्जन यांचे ठायींही तीन दिवस अनध्याय. संध्यासमयीं मेघगर्जना, निर्घात ( वीज पडणें ), भूमिकंप, उल्कापात ( आकाशांतून अग्निरूप तारा पडणें ), आवृत्तीची समाप्ति, अरणांचें अध्ययन, हीं झालीं असतां एक अहोरात्र अनध्याय करावा. पौर्णिमा, अमावास्या, चतुर्दशी, अष्टमी, ग्रहणदिवस, ऋतुसंधि, उत्सवांतील भोजन, श्राद्धीय द्रव्याचा प्रतिग्रह, इतक्या ठिकाणीं एक अहोरात्र अनध्याय. पशु, बेडूक, मुंगुस, कुत्रा, सर्प, मार्जार, उंदीर ह्यांतून एकादें दोघां अध्ययन करणारांचे मधून गेलें असतां एक अहोरात्र अनध्याय. इंद्रध्वज उतरविला किंवा चढविला असतां एक अहोरात्र अनध्याय." ग्रहणाचे दिवशीं अहोरात्र अनध्याय असें जरी वर सांगितलें तथापि ग्रस्तास्त असतां त्रिरात्र अनध्याय, असें पूर्वी सांगितलें आहे.

**स्मृत्यर्थसारे**तुरात्रौतुग्रहेतिस्रोरात्रीः दिवाचत्र्यहमित्युक्तं ऋतुःसौरः भुक्त्वेत्युत्सवविषयं ऊर्ध्वंभोजनादुत्सवेइति **गौतमोक्तेः** श्राद्धिकंमहैकोद्दिष्टभिन्नं तत्रतुत्र्यहमिति**मनुः स्मृत्यर्थसारे**चैवं यत्तु पश्वाद्यंतरायेत्र्यहमुपवासोविप्रवासश्चेति**गौतमोक्तं**तत्प्रथमाध्ययने ।

**स्मृत्यर्थसारांत** तर—रात्रीं ग्रहण असतां तीन रात्रि आणि दिवसा ग्रहण असतां तीन दिवस अनध्याय, असें सांगितलें आहे. वरील याज्ञवल्क्यवचनांत ऋतुसंधि सांगितले, त्या ठिकाणीं ऋतु म्हणजे सौरऋतु घ्यावा. 'भोजन करून' असें जें सांगितलें तें विवाहादि उत्सवांतील भोजन समजावें. कारण, "उत्सवाचे ठायीं भोजनोत्तर अहोरात्र अनध्याय" असें **गौतमाचें** वचन आहे. **'श्राद्धीय द्रव्याचा प्रतिग्रह'** असें जें वर सांगितलें तें महैकोद्दिष्टभिन्न श्राद्धाविषयीं समजावें. कारण, महैकोद्दिष्ट श्राद्धाचा प्रतिग्रह असतां तीन दिवस अनध्याय, असें **मनु** सांगतो. **स्मृत्यर्थसारांत**ही असेंच सांगितलें आहे. **आतां जें**—"पशु इत्यादिकांनीं विघ्न असतां तीन दिवस उपवास करून तेथून निघून जावें" असें **गौतमानें** सांगितलें, तें प्रथमाध्ययनाविषयीं समजावें.

**याज्ञवल्क्यः** श्वक्रोष्टृगर्दभोलूकसामबाणार्तनिःस्वने अमेध्यशवशूद्रांत्यश्मशानपतितांतिके देशेशुचावात्मनिचविद्युत्स्तनितसंप्लवे भुक्त्वार्द्रपाणिरंभोंतरर्धरात्रेतिमारुते पांसुप्रवर्षेदिग्दाहेसंध्यानीहारभीतिषु धावतःपूतिगंधेचशिष्टेचगृहमागते खरोष्ट्रयानहस्त्यश्वनौवृक्षगिरिरोहणे सप्तत्रिंशदनध्यायानेतांस्तात्कालिकान्विदुः बाणोवंशः शततंतुर्वीणेतिहरदत्तः अमेध्याःसूतिकादयः स्तनितंगर्जः वर्षातोन्यत्रगर्जवृष्टिविद्युतांयौगपद्येआकालिकः वर्षासुतात्कालिक इतिनारायणः संध्यागर्जेतुहारीतः सायंसंध्यास्तनितेरात्रिः

१ यत्तुत्र्यहंनकीर्तयेद्ब्रह्मराज्ञोराहोश्चसूतकइति तद्ग्रस्तास्तविषयं ॥ २ मासिभाद्रपदेराजन् शक्रयष्टिनिपातनं । पौर्णमास्यांतुकर्तव्यमिति शंखः । गार्ग्यस्तु द्वादश्यांतुसितेपक्षेमासिप्रोष्ठपदेतथा ॥ शक्रमुत्थापयेद्राजाविश्वश्रवणवासवे ॥ ३ इंद्रध्वजोत्थापन भाद्रपदशुक्लद्वादशीस सांगितलें आहे. ४ प्रतिगृह्य द्विजो विद्वानेकोद्दिष्टस्य केतनं ॥ त्र्यहंनकीर्तयेद्ब्रह्मराज्ञोराहोश्चसूतकइति एकोद्दिष्टस्य मनूक्तेः ॥ ५ सामवेदश्रवणकालेवेदांतरानध्यायः । सामध्वनावृग्यजुषीनाधीयीतकदाचनेतिमनुवचनात् ॥

प्रातःसंध्यास्तनितेहोरात्रं रात्रौविद्युत्परराज्यवधिः विद्युतिनक्तंचापररात्रादितिगौतमोक्तेः तृतीयविनां-शोत्तरंतुविद्युतिसर्वरात्रमित्याहसएव त्रिभागादिप्रवृत्तौसर्वमिति अर्धरात्रेमध्ययामद्वयमितिविज्ञानेश्वरः मध्यदंडचतुष्टयइतिनिर्णयामृते मनुः नविवादेनकलहेनसेनायांनसंगरे नभुक्तमात्रेनाजीर्णेनवमित्वान-सूतके रुधिरेचस्रुतेगात्राच्छस्त्रेणचपरिक्षते कौर्मे श्लेष्मातकस्यच्छायायांशाल्मलेर्मधुकस्यच कदाचिदपिना-ध्येयंकोविदारकपित्थयोः मनुः शयानःप्रौढपादश्चकृत्वाचैवावसक्थिकाम् नाधीयीतामिषंजग्ध्वासूतकान्ना-द्यमेवच प्रौढपादःपादोपरिपाददाता आसनारूढपादोवेतिहरदत्तः सोपपदास्वपिप्रागुक्तं स्मृत्यर्थसारे श्रवणद्वादशीमहाभरण्योः प्रेतद्वितीयायांरथसप्तम्यामाकाशेशवदर्शनेचाहोरात्रं असपिंडेगुरौमृतेत्रिरात्रं आचार्येउपाध्यायेचपक्षिणी आचार्यभार्यापुत्रशिष्येष्वहोरात्रम् अग्न्युत्पातेनगोविप्रमृतौत्रिरात्रम् अयनेविषु-वेचपक्षिणी अकालवृष्टौच आरण्यमार्जारसर्पनकुलपंचनखादेरंतरागमनेत्रिरात्रम् आरण्यश्वसृगालादिवा-नररजकादौद्वादशरात्रं खरवराहोष्ट्रचांडालसूतिकोदक्याशवादौमासम् गोगवयाजानास्तिकादौत्रिमासम् शशमेषश्वपाकादौषण्मासं गजगंडसारससिंहव्याघ्रमहापापिकृतन्नादावब्दमनध्यायः शोभनदिनेचानध्यायः विवाहप्रतिष्ठोद्यापनादिष्वासमाप्तेःसगोत्राणामनध्यायः उदयेस्तमयेवापिमुहूर्तत्रयगामियत् तद्दिनंतदहोरात्रं-चानध्यायविदोविदुः केचिदाहुःक्वचिद्देशेयावत्तद्दिननाडिकाः तावदेवत्वनध्यायोनतन्मिश्रेदिनांतरे ।

## तात्कालिक ( तें निमित्त आहे तोंपर्यंत ) अनध्याय सांगतो.

**याज्ञवल्क्य**—"कुत्रा, कोल्हा, गाढव, घुबड, सामवेद, वंशवाद्य, आर्त ( दुःखित ) प्राणी यांचा शब्द ऐकूं येत असतां तात्कालिक अनध्याय. अपवित्र ( सूतिकादिक ), शव, शूद्र, अंत्यज, स्मशान, पतित हे संनिध असतां तात्कालिक अनध्याय. अपवित्रप्रदेश, अपवित्र देह, वीज चमकणें, मेघगर्जना, हीं असतां तात्कालिक अनध्याय. भोजन करून हात ओले आहेत तोंपर्यंत अध्ययन करूं नये. जलामध्यें, मध्यरात्रीं, अति वारा सुटणें, धूळ उडत असतां, दिशा पेटल्या असतां, दोन संध्याकालीं, धुकें असतां, व भीति असतां तात्कालिक अनध्याय. धांवत असतां, दुर्गंध आला असतां तात्कालिक अनध्याय. शिष्ट म्हणजे श्रोत्रियादिक महाविद्वान् आला असतां तात्कालिक अनध्याय. गाढव, उंट, रथादियान, हत्ती, घोडा, नौका, वृक्ष, पर्वत यांच्यावर आरोहण केलें असतां तात्कालिक अनध्याय. याप्रमाणें हे सदतीस तात्कालिक अनध्याय विद्वानांनीं सांगितले आहेत." या वचनांतील 'वाण' याचा अर्थ—वंश ( वेळू ) होय. शंभर तारांची वीणा, असें **हरदत्त** सांगतो. स्तनित म्हणजे मेघगर्जना. वर्षाकालावांचून अन्यकालीं गर्जना, वृष्टि, वीज हीं एकदम उत्पन्न झालीं असतां आकालिक अनध्याय. आकालिक म्हणजे ज्या वेळीं अनध्यायाचें निमित्त ( गर्जनादिक ) उत्पन्न झालें असेल त्यावेळेपासून दुसऱ्या दिवशीं त्यावेळेपर्यंत जो अनध्याय तो आकालिक अनध्याय होय. वर्षाकालीं गर्जना, वृष्टि हीं उत्पन्न असतां तात्कालिक ( तीं आहेत तोंपर्यंत ) अनध्याय, असें **नारायण** सांगतो. संध्याकालीं गर्जना असेल तर सांगतो **हारीत**—"सायंसंध्येचे ठायीं गर्जना झाली असतां रात्रीं अनध्याय. प्रातःसंध्येचे ठायीं गर्जना झाली असतां तो दिवस आणि ती रात्र अनध्याय." रात्रीं वीज उत्पन्न असतां दुसरी रात्र येईपर्यंत अनध्याय. कारण, "रात्रीं वीज उत्पन्न असतां दुसरी रात्र येईपर्यंत अनध्याय" असें **गौतमाचें** वचन आहे. दिवसाच्या तिसऱ्या भागानंतर वीज उत्पन्न झाली असतां सारी रात्र अनध्याय, असें तोच ( गौतम ) सांगतो—"दिवसाच्या तिसऱ्या भागापासून पुढें वीज प्रवृत्त झाली असतां सारी रात्र अनध्याय." अर्धरात्रीं वीज प्रवृत्त झाली असतां मधले दोन प्रहर अनध्याय, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. मधल्या चार घटिका अनध्याय, असें **निर्णयामृतांत** सांगितलें आहे. **मनु**—"विवाद चालला असतां, कलह चालला असतां, सेनेमध्यें, युद्धांत, भोजनोत्तर, त्या वेळीं अजीर्ण झालें असतां, वमन झालें असतां, सूतकांत, शरीरापासून रक्तस्राव झाला असतां, शस्त्रानें क्षत पडलें असतां, अध्ययन करूं नये." **कूर्मपुराणांत**—"श्लेष्मातक ( भोंकर ), सांवरी, मधुक ( मोहाचा वृक्ष ), कांचनवृक्ष, कंवठीचा वृक्ष यांच्या छायेला बसून अध्ययन करूं नये." **मनु**—"शयान ( निजलेला ), पायांवर पाय चढवून बसलेला, वस्त्रादिकेंकरून जानु बंधन करून बसलेला, अशा अवस्थेंत अध्ययन करूं नये. मांस व सूतकान्न भक्षण करून वेदाध्ययन करूं नये." प्रौढपाद म्हणजे पायांवर पाय चढविणारा अथवा आसनावर पाय ठेवणारा असें **हरदत्त** सांगतो. सोपपदा-तिथींचेठायींही अनध्याय पूर्वी सांगितला आहे. **स्मृत्यर्थसारांत**—श्रवणद्वादशी, महाभरणी, यमद्वितीया, रथसप्तमी, यांचेठायीं अहोरात्र अनध्याय. आकाशांत शवाचें दर्शन असतांही अहोरात्र अनध्याय. असपिंड गुरु मृत असतां त्रिरात्र अनध्याय. आचार्य व उपाध्याय मृत असतां पक्षिणी अनध्याय. आचार्याची भार्या, पुत्र मृत असतां अहोरात्र अनध्याय. शिष्य मृत असतांही अहोरात्र अनध्याय. अग्नीचा उत्पात होऊन गाई, ब्राह्मण मृत असतां त्रिरात्र अनध्याय. अयन-

संक्रांति, विषुवसंक्रांति, अकालवृष्टि यांचे ठायीं पक्षिणी अनध्याय. रानमांजर, सर्प, मुंगुस, पंचनखांचे प्राणी वगैरे, हे दोघांच्या मधून गेले असतां तीन दिवस अनध्याय. अरण्यांतील कुत्रा, कोल्हा वगैरे, वानर, रजक इत्यादिक दोघांच्या मधून गेले असतां बारा दिवस अनध्याय. गर्दभ, वराह, उंट, चांडाल, सूतिका, रजस्वला, प्रेत इत्यादिक दोघांच्या मधून गेले असतां एक मासपर्यंत अनध्याय. गाई, गवय, शेळी, नास्तिक इत्यादिक दोघांच्या मधून गेले असतां तीन महिने अनध्याय. ससा, मेंढा, श्वपाक इत्यादिक दोघांच्या मधून गेले असतां सहा मास अनध्याय. हत्ती, गेंडा, सारस, सिंह, व्याघ्र, महापातकी, कृतघ्न इत्यादिक दोघांच्या मधून गेले असतां एक वर्षपर्यंत अनध्याय. शुभदिवशीं अनध्याय. विवाह, देवादिकांची प्रतिष्ठा, व्रतादिकांचीं उद्यापनादि कार्ये यांचेठायीं समाप्तीपर्यंत सगोत्रांना अनध्याय. "जी अनध्यायतिथि सूर्याच्या उदयकालीं व अस्तकालीं त्रिमुहूर्तव्यापिनी असेल त्या दिवशीं तो अहोरात्र अनध्याय आहे, असें अनध्यायवेत्ते सांगतात." "क्वचित् देशांत अनध्यायदिवसाच्या जितक्या घटिका असतील तोंपर्यंतच अनध्याय होतो. अनध्यायदिवसानें मिश्रित स्वाध्यायदिवशीं अनध्याय होत नाहीं असें केचित् सांगतात."

प्रदोषंत्वाह **प्रजापतिः** षष्ठीचद्वादशीचैवअर्धरात्रोननाडिका प्रदोषेनत्वधीयीततृतीयानवनाडिका **निर्णयामृतेगर्गः** रात्रौयामद्वयादर्वाक्सप्तमीवात्रयोदशी प्रदोषःसतुविज्ञेयःसर्वविद्याविगर्हितः रात्रौनवसुनाडीषुचतुर्थीयदिदृश्यते प्रदोषःसतुविज्ञेयःसर्वविद्याविगर्हितः **कौर्मे** अनध्यायस्तुनांगेषुनेतिहासपुराणयोः नधर्मशास्त्रेष्वन्येषुपर्वण्येतानिवर्जयेत् **शौनकः** नित्येजपेचकाम्येचक्रतौपारायणेपिच नानध्यायोऽस्तिवेदानांग्रहणेग्राहणेस्मृतः इत्यनध्यायाः ।

प्रदोष सांगतो **प्रजापति**—"षष्ठी, आणि द्वादशी अर्धरात्रीच्या आंत संपली असतां प्रदोष. आणि तृतीया रात्रीं नऊ घटिकांचे आंत संपली असतां प्रदोष. त्या प्रदोषरात्रीं अध्ययन करूं नये." **निर्णयामृतांत गर्ग**—"सप्तमी किंवा त्रयोदशी तिथि रात्रीं दोन प्रहरांचे आंत असली म्हणजे तो प्रदोष समजावा. तो वेदाध्ययनाला निंद्य आहे. रात्रीं नऊ घटिकांचे आंत जर चतुर्थी असेल तर तो प्रदोष समजावा. तो सर्व अध्ययनाला निंद्य आहे." **कौर्मांत**—"वेदांचीं अंगें, इतिहास ( भारतादिक ), पुराण, धर्मशास्त्रें आणि इतर शास्त्रें यांच्या अध्ययनाविषयीं अनध्याय करूं नये. हीं वेदांगादिक अमावास्या पौर्णिमा पर्वाचे ठायीं वर्ज्य करावीं." **शौनक**—"नित्यकर्म, जप, काम्यकर्म, यज्ञकर्म, पारायण, यांविषयीं वेद म्हणणें व वेद सांगणें असतां अनध्याय नाहीं."

॥ इति अनध्यायाः ॥

**अथमहानाम्न्यादिव्रतानि श्रीधरः** तिथिनक्षत्रवारांशवर्गोदयनिरीक्षणं चौलवत्सर्वमाख्यातंसगोदानव्रतेषुच एषांलोपे**शौनकः** व्रतानिविधिनाकृत्वास्वशाखाध्ययनंचरेत् अकृत्वाभ्यस्यतेयेनसपापीविधिघातकः प्रत्येकंकृच्छ्रमेकैकंचरित्वाज्याहुतीःशतं हुत्वाचैवतुगायत्र्यास्नायादित्याह**शौनकः स्मृत्यर्थसारेतु** त्रीन्षट्द्वादशवाकृच्छ्रान्कृत्वापुनर्व्रतंचरेदित्युक्तं ।

## आतां महानाम्न्यादि व्रतें सांगतो—

**श्रीधर**—"महानाम्नीव्रत, महाव्रत, उपनिषद्व्रत, आणि गोदान हीं चार व्रतें क्रमानें जन्मापासून तेराव्या, चवदाव्या, पंधराव्या आणि सोळाव्या वर्षी उत्तरायणांत चौलास सांगितलेली तिथि, नक्षत्र, वार, अंश, वर्ग, लग्न यांची शुद्धि पाहून करावीं, असें सांगितलें आहे." या व्रतांचा लोप झाला असतां सांगतो **शौनक**—"ब्रह्मचाऱ्यानें यथाविधि व्रतें करून आपल्या शाखेचें अध्ययन करावें. व्रतें केल्यावांचून जो वेदाचा अभ्यास करितो तो विधिघातक असल्यामुळें पापी समजावा. प्रत्येक व्रताच्या लोपनिमित्तक एक एक कृच्छ्र प्रायश्चित्त करून गायत्रीमंत्रानें शंभर आज्याहुति देऊन स्नान ( समावर्तन ) करावें, असें शौनक सांगतो." **स्मृत्यर्थसारांत** तर—तीन, सहा किंवा बारा कृच्छ्र करून पुनः व्रत करावें, असें सांगितलें आहे.

---

१ बृहन्मनुः—चतुर्थ्यांचत्रयोदश्यांसप्तम्यामर्धरात्रतः । अर्वाङ्नाध्ययनंकुर्याद्यदीच्छेत्तस्य धारणं ॥ स्मृत्यर्थसारे—चतुर्थ्याःपूर्वरात्रेतुनवनाडीषुदर्शने ॥ नाध्येयंपूर्वरात्रेस्यात्सप्तमीचत्रयोदशी ॥ अर्धरात्रात्पुरा चेत्स्यान्नाध्येयंपूर्वरात्रके ॥ २ अनध्यायस्त्विति । चतुर्दश्यष्टमीपर्वप्रतिपद्वर्जितेषुच । वेदांगन्यायमीमांसाधर्मशास्त्राणिचाभ्यसेत् ॥ ३ नित्येनैमित्तिकेकाम्ये व्रतेयज्ञेक्रतौतथा ॥ प्रवृत्ते काम्यकार्येचनानध्यायाःस्मृतास्तथा ॥ देवतार्चनमंत्राणांनानध्यायःकदाचन ॥ शौनकः—नानध्याये जपेद्वेदान्रुद्रांश्चैवविशेषतः ॥ पौरुषंपावमानंचगृहीतनियमावृते ॥ नारदः—द्यूतंपुस्तकशुश्रूषानाटकासक्तिरेवच ॥ स्त्रियस्तंद्राचनिद्राच विद्याविघ्नकराणि षट् ॥ ४ द्योते-यजुर्वेदिनांप्राजापत्यैंद्राग्नेयसौम्यानि । सामवेदिनांकेशांतगोदानमहानाम्नीज्येष्ठसामव्रतानि । अथर्वणानां गोदानसावित्रीव्रवेदव्रततविसर्जनव्रतानि ॥ आश्वलायनः—प्रथमंस्यान्महानाम्नीद्वितीयंस्यान्महाव्रतं ॥ तृतीयंस्यादुपनिषद्गोदानाख्यंततःपरमिति ॥

**अथसमावर्तनं सुरेश्वरः** भौमभानुजयोर्वारे[1]नक्षत्रेचव्रतोदिते ताराचंद्रविशुद्धौचस्यात्समावर्तन-क्रिया **बौधायनसूत्रेतु** रोहिण्यांतिष्येउत्तरयोःफाल्गुन्योर्हस्तेचित्रायामैंद्रेविशाखायांवास्नायादित्युक्तं **वसिष्ठः** स्नानंमध्याह्नकालेतुहोरायांकारयेच्छुभं पूर्वाह्णेतदभावेतुकुर्यात्स्नानंयथाविधि **सर्वऋतवोविवाह-स्येतिसूत्रात्** यदादक्षिणायनेविवाहस्तदासमावर्तनमपितत्रैवअन्यथोदगयनेसमावर्तनेअनाश्रमीनतिष्ठेतेति-विरोधःस्यादित्युक्तं **सुदर्शनभाष्ये** एतच्चब्रह्मचारिव्रतलोपप्रायश्चित्तंकृत्वाकार्यं तदाह **बौधायनः** शौचसंध्यादर्भभिक्षाग्निकार्यराहित्यकौपीनोपवीतमेखलादंडाजिनाधारणदिवास्वापच्छत्रपादुकास्रग्विधारणां-गोद्वर्तनानुलेपनांजनद्यूतनृत्यगीतवाद्याभिरतौब्रह्मचारीकृच्छ्रत्रयंचरेत् महाव्याहृतिहोमंपाहित्रयोदशहोमंच-कुर्यात् समावर्तनोत्तरंपूर्वमृतानांत्रिरात्रमाशौचंकार्यम् आदिष्टीनोदकंकुर्यादाव्रतस्यसमापनात् समाप्तेतूद-कंदत्वात्रिरात्रमशुचिर्भवेदितिमनू**क्तेः** आदिष्टीब्रह्मचारीति **विज्ञानेश्वरः** ब्रह्मचर्येयदिकश्चिन्मृतस्तदा-त्रिरात्रमध्येविवाहःकार्योऽन्यथानेतिसिध्यति जननेतुसत्यपिनत्रिरात्रम् तत्रातिक्रांताशौचाभावादुदकंदत्वे-तिवचनाच्चेतिदिक् तत्रापिविकल्पः पितर्यपिमृतेनैषांदोषोभवतिकर्हिचित् आशौचंकर्मणोंतेस्यात्त्र्यहंवाब्रह्म-चारिणामिति **छंदोगपरिशिष्टात्** ।

## आतां समावर्तन सांगतो—

**सुरेश्वर**—"भौम आणि शनिवारी, उपनयनोक्त नक्षत्रावर, तारावळ आणि चंद्रबळ असतां समावर्तन संस्कार करावा." **बौधायन**सूत्रांत तर—रोहिणी, पुष्य, उत्तराफल्गुनी, हस्त, चित्रा, ज्येष्ठा, विशाखा, या नक्षत्रांवर समावर्तन करावें, असें सांगितलें आहे. **वसिष्ठ**—"मध्याह्नकाली शुभ होरेवर समावर्तन करावें. त्याच्या अभावीं पूर्वाह्णीं यथाविधि समावर्तन करावें." "विवाहाला सारे ऋतु सांगितले आहेत" या सूत्रावरून जेव्हां दक्षिणायनांत विवाह करावयाचा असेल तेव्हां समावर्तनही दक्षिणायनांतच होतें. अन्यथा म्हणजे दक्षिणायनांत समावर्तन होत नसल्यामुळें दक्षिणायनांत विवाह करावयाचा असतां त्याच्या पूर्वी उदगयनांत समावर्तन केलें तर 'द्विजानें आश्रमावांचून एक दिवसही राहूं नये' या वचनाचा विरोध येईल, असें **सुदर्शनभाष्यांत** सांगितलें आहे हें समावर्तन ब्रह्मचारिव्रतलोपप्रायश्चित्त करून करावें. तें सांगतो **बौधायन**—"ब्रह्मचाऱ्यास शौच, संध्या, दर्भग्रहण, भिक्षा आणि अग्निकार्य हीं झालीं नाहींत; कौपीन, यज्ञोपवीत, मेखला, दंड, अजिन हीं धारण केलीं नाहींत. दिवसा निद्रा, छत्री, जोडा, स्रक्, हीं धारण केलीं; अंगाला उद्वर्तन व उटी लावली; डोळ्यांत काजळ घातलें; द्यूत, नर्तन, गायन, वाद्यवादन यांविषयीं आसक्त झाला असतां ब्रह्मचाऱ्यानें प्रायश्चित्तार्थ तीन कृच्छ्र करावे. आणि महाव्याहृति होम ( भूरग्नये च पृथिव्यै० इत्यादि ) व 'पाहिनो अग्न एनसे०' इत्यादि होम करावा. ब्रह्मचाऱ्याचें समावर्तन झाल्यानंतर, पूर्वी ब्रह्मचर्यावस्थेंत मृत झालेल्या सपिंडांचें त्रिरात्र आशौच करावें. कारण, "ब्रह्म-चर्यव्रत समाप्त होईपर्यंत मृत झालेल्या सपिंडांस ब्रह्मचाऱ्यानें उदक देऊं नये. व्रत समाप्त झाल्यावर पूर्वी मृत सपिंडांस उदक देऊन तीन दिवस आशौच करावें" असें **मनूचें** वचन आहे. या वचनांतील 'आदिष्टी' या पदाचा अर्थ ब्रह्मचारी, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. ब्रह्मचर्यावस्थेंत जर सपिंडांतील कोणी मृत नसेल तर तीन दिवसांचे आंत विवाह करण्यास हरकत नाहीं. मृत असेल तर तीन दिवसांत विवाह होत नाहीं, असें सिद्ध होतें. ब्रह्मचर्यावस्थेंत जननाशौच उत्पन्न असलें तरी त्रिरात्र आशौच नाहीं. कारण, त्या जननाशौचांत अतिक्रांताशौच नाहीं. आणि वरील मनुवचनांत 'उदक देऊन त्रिरात्र आशौच करावें.' असें सांगितल्यावरून जननाशौचांत उदकदान नसल्यामुळें आशौचही नाहीं. ही दिशा दाखविली आहे. समावर्तनोत्तर पूर्वी मृत झालेल्या सपिंडांचें त्रिरात्र आशौच सांगितलें त्याचाही विकल्प आहे. कारण, "पिता मृत झाला तरी ब्रह्मचाऱ्यांना कधींही दोष ( आशौच ) नाहीं. अथवा ब्रह्मचाऱ्यांना व्रताच्या अंतीं तीन दिवस आशौच आहे." असें **छंदोगपरिशिष्टाचें** वचन आहे.

**स्नातकव्रतान्याहव्यासः** यज्ञोपवीतद्वितयंसोदकंचकमंडलुम् . छत्रंचोष्णीषममलंपादुकेचाप्युपा-नहौ रौक्मेचकुंडलेवेदःकृत्तकेशनखःशुचिः वेदोदर्भवटुः **मनुः** उपानहौचवासश्चधृतमन्यैर्नधारयेत् उप-वीतमलंकारंस्रजंकरकमेवच अन्यान्यपिबह्वृचगृह्यस्मृत्यादिभ्योज्ञेयानि ।

---

१ विभौमभानुजेवारेइतिपाठांतरं ॥

## आतां स्नातकाचीं ( समावर्तन केलेल्याचीं ) व्रतें सांगतो.

**व्यास**—"दोन यज्ञोपवीतें, उदक भरलेला कमंडलु, छत्री, पागोटें, खडावा, चर्मीजोडा, सोन्याचीं कुंडलें, दर्भमुष्टि, केश व नखें काढणें, शुचिर्भूतपणा, हीं स्नातकानें नित्य धारण करावीं." **मनु**—"उपानह ( चर्मीजोडा ), वस्त्र, यज्ञोपवीत, अलंकार, स्रक् आणि कमंडलु, हीं दुसऱ्यानें वापरलेलीं स्नातकानें वापरूं नयेत." इतरही व्रतें बह्वृचगृह्यसूत्र आणि **स्मृति** इत्यादिकांतून जाणावीं.

**अथछुरिकाबंधः ज्योतिर्निबंधेनारदः** छुरिकाबंधनंवक्ष्येनृपाणांप्राक्करग्रहात् विवाहोक्तेषुमासेषुशुक्लपक्षेप्यनस्तगे जीवेशुक्रेचभूपुत्रेचंद्रताराबलान्विते मौंजीबंधर्क्षतिथिषुकुजवर्जितवासरे **संग्रहे** शूद्राणांराजपुत्राणांमौंज्यभावेऽस्त्रबंधनं मौंजीबंधोक्ततिथ्यादौकार्यंभौमदिनंविना ।

## आतां छुरिकाबंध सांगतो—

**ज्योतिर्निबंधांत नारद**—"राजांना ( क्षत्रियांना ) विवाहाच्या पूर्वीं छुरिकाबंधन सांगतों-विवाहास उक्त मासांत शुक्लपक्षांत गुरु, शुक्र, भौम यांचें अस्त नसतां, चंद्रबळ व ताराबळ असतां, मौंजीबंधाम सांगितलेल्या नक्षत्रांवर व तिथींस, भौमवर्जितवारीं छुरिकाबंधन करावें." **संग्रहांत**—"शूद्र आणि राजपुत्र यांचें मौंजीबंधन नसल्यामुळें मौंजीबंधास सांगितलेल्या तिथिनक्षत्रादिकांवर, भौमवार वर्ज्य करून इतर वारीं अस्त्रबंधन ( छुरिकाबंधन ) करावें."

**अथविवाहः याज्ञवल्क्यः** अविप्लुतब्रह्मचर्योलक्षण्यांस्त्रियमुद्वहेत् अनन्यपूर्विकांकांतामसपिंडांयवीयसीम् आरोगिणींभ्रातृमतीमसमानार्षगोत्रजाम् लक्षण्यांबाह्याभ्यंतरलक्षणैर्युक्ताम् बाह्यानि **काशीखंडादौ**प्रसिद्धानि आंतराण्याश्वलायनोक्तान्यष्टौपिंडान्कृत्वेत्यादीनि **मनुः** असपिंडाचयामातुरसगोत्राचयापितुः साप्रशस्ताद्विजातीनांदारकर्मणिमैथुने दत्रिमभमातुर्गृहीताअसपिंडासगोत्रा तत्कुलनिवृत्तयेचकारान्मातुरसगोत्रा दत्तस्यपितुर्जनककुलेपितुरसगोत्रापिसपिंडत्वान्निषिद्धेत्यन्यश्चकारः असपिंडांसापिंड्यरहिताम् तच्चैकशरीरावयवान्वयेनभवति एकस्यहिपितुर्मातुर्वाशरीरस्यावयवाःपुत्रपौत्रादिषुसाक्षात्परंपरयावाशुक्रशोणितादिरूपेणानुस्यूताः यद्यपिपत्न्याःपत्यासहभ्रातृपत्नीनांचपरस्परंनैतत्संभवति तथापिआधारत्वेनैकशरीरावयवान्वयोस्त्येव अस्थिभिरस्थीनीति**मंत्रलिंगात्** एकस्यहिपितृशरीरस्यावयवाःपुत्रद्वारातास्वाहिताइति**मदनरत्नपारिजातविज्ञानेश्वरादयः वाचस्पतिशुद्धिविवेकशूलपाण्यादि** गौडमैथिलादयोप्येवम् **श्रुतावपि** एतत्पाट्कौशिकंशरीरं त्रीणिपितृतस्त्रीणिमातृतोऽस्थिस्नायुमज्जानःपितृतस्त्वङ्मांसरुधिराणिमातृतइति प्रजामनुप्रजायसेइतिच ।

## आतां विवाह सांगतो-

**याज्ञवल्क्य**—"ज्याचें ब्रह्मचर्य अस्खलित आहे अशा पुरुषानें समावर्तन केल्यावर चांगल्या लक्षणांनीं युक्त अशी स्त्री वरावी. ती स्त्री कशी असावी ती सांगतो—जिला पूर्वीं कोणी वरलेली नाहीं अशी, आपल्याला आवडणारी, आपल्या सपिंडांतील नसलेली, वयानें व शरीरानें धाकटी, रोगरहित, जीचा भ्राता आहे अशी, जिचा प्रवर व गोत्र पतीच्या प्रवर व गोत्राहून भिन्न आहेत अशा प्रकारची स्त्री वरावी." येथें लक्षणांनीं युक्त स्त्री वरावी, असें सांगितलें, तीं लक्षणें दोन प्रकारचीं—बाह्य लक्षणें आणि आभ्यंतर लक्षणें. बाह्य लक्षणें ( शारीर लक्षणें ) **काशीखंडादिकांत** प्रसिद्ध आहेत. आभ्यं-

---

१ गृह्यसूत्रोक्त व्रतें आणि स्मृत्युक्त व्रतें धारण करावीं. तीं दोन्ही धारण करण्यास अशक्त असेल त्यानें गृह्यसूत्रोक्तच करावीं. तीं गृह्यसूत्रोक्त व्रतें येणेंप्रमाणें:-निमित्तावांचून रात्रीं स्नान करणार नाहीं. नग्न असून स्नान करणार नाहीं. नग्न स्त्रियेला मैथुनवर्ज्यकालीं पाहणार नाहीं. पर्जन्य पडत असतां धांवणार नाहीं. विहिरींत उतरणार नाहीं. वृक्षावर चढणार नाहीं. बाहूंनीं नदींत पोहणार नाहीं. प्राणसंशय उत्पन्न होणारें कार्य करणार नाहीं. हीं सूत्रोक्त व्रतें समजावीं. स्मृत्युक्त व्रतें धर्मसिंधुसारांत सांगितलीं आहेत, तीं तेथें पाहावीं. २ काशीखंड-कूर्मपृष्ठाकृति, हत्तीच्या स्कंधासारखा, असा गुप्त अवयव (योनि) शुभ होय. वामोन्नत असेल तर कन्या देणारा, व दक्षिणोन्नत असेल तर पुत्र देणारा होय. आणि आखुरोमा, गूढमणि, सुश्लिष्ट, संहत, पृथु, तुंग, कमलवर्णसदृश, अश्वत्थपर्णसदृश, हरिणाच्या खुरासारखा, इत्यादि शुभ होय. वाग्भट स्त्री-पुरुषांचीं लक्षणें सांगतो-अंगावर फार रोम किंवा सर्वथा रोमरहित, काळा वर्ण किंवा अति पांढरा, अतिस्थूल किंवा अति कृश, उंच किंवा ऱ्हस्व हीं लक्षणें वाईट समजावीं. स्निग्ध, मृदु, सूक्ष्म, अनेकांचीं मूळें एकत्र नसलेले असे केश चांगले आहेत. उन्नत असें अर्धचंद्राकार ललाट शुभ. कान मागच्या बाजूस मोठे

तर लक्षणें म्हणजे शरीरावरून न समजणारीं पुढील शुभाशुभसूचक चिन्हें आश्वलायनांनीं सूत्रांत सांगितलीं तीं अशीं— चहूंकडे शेत असलेल्या मधल्या क्षेत्रांतील मातीचा एक पिंड, गोठ्यांतील मातीचा एक पिंड, अग्निहोत्राच्या शाळेंतील भस्माचा एक पिंड, पाणी न आटणाऱ्या डोहांतील मातीचा एक पिंड, जुगार खेळण्याच्या जाग्यावरील मातीचा एक पिंड, चवाठ्यावरील मातीचा एक पिंड, गवत व शेत न रुजणाऱ्या जागेच्या मातीचा एक पिंड, आणि स्मशानांतील मातीचा एक पिंड, असे आठ पिंड ( गोळे ) करून "ऋतमग्रे प्रथमं जज्ञ ऋते सत्यं प्रतिष्ठितं ॥ यदियं कुमार्यभिजाता तदियमिह प्रतिपद्यतां यत्सत्यं तद्दृश्यतां" या मंत्रेंकरून पिंडांचें अभिमंत्रण करून, कन्येला सांगावें कीं, 'या आठ पिंडांतून एक पिंड तूं घे.' त्या कन्येनें क्षेत्राच्या मातीचा पिंड घेतला तर तिची प्रजा अन्नवती ( अन्नसमृद्ध ) होईल असें समजावें. गोठ्यांतील मातीचा घेईल तर गाई, महिषी इत्यादि पशूंनीं समृद्ध होईल. अग्निहोत्राच्या भस्माचा घेईल तर वेदाध्ययनसंपन्न होईल. डोहाच्या मातीचा घेईल तर पूर्वोक्त सर्व संपन्न होईल. जुगार खेळण्याच्या भूमीच्या मातीचा घेईल तर कपटी होईल. चवाठ्यावरील मातीचा घेईल तर दोन्ही कुलांतून बाहेर ( व्यभिचारिणी ) होईल. ईरिणस्थानच्या ( गवत शेत न होणाऱ्या स्थलाच्या ) मातीचा घेईल तर अभाग्या होईल. आणि स्मशानांतील मातीचा घेईल तर पतिघातकी होईल. **मनु**—"मातेच्या सपिंडांतील नसलेली व पित्याच्या गोत्रांतील नसलेली अशी जी कन्या ती द्विजातींना ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, यांना ) दारकर्माविषयीं ( स्त्रीत्वप्रयुक्त श्रौतस्मार्तकर्माविषयीं ) आणि मैथुनाविषयीं प्रशस्त आहे." या मनुवचनांत दोन चकार आहेत त्यावरून दत्तकाच्या मातेच्या कुलांतील घेतली तर ती असपिंडा व सगोत्रा होते त्या कुलांतील कन्येचा निषेध करण्याकरितां पहिला चकार आहे. आणि दत्तकाला जनककुलांतील कन्या पित्याची असगोत्रा होते तिचा सपिंडत्वानें निषेध करण्याकरितां दुसरा चकार आहे. वरील दोन्ही वचनांत 'असपिंडा' असें पद आहे त्याचा अर्थ-समान म्हणजे एक आहे पिंड म्हणजे देह ( देहाचे अवयव ) जीचा ती सपिंडा होय. सपिंडा नव्हे ती असपिंडा होय. असपिंडा म्हणजे सापिंड्यरहित. तें सापिंड्य एक शरीराचे अवयव असल्यानें होतें तें असें—एक पिता किंवा एक माता यांच्या शरीराचे अवयव पुत्र कन्या इत्यादिकांचे ठायीं साक्षात् शुक्र-शोणित इत्यादिरूपानें अनुगत ( आलेले ) असतात. पौत्र-दौहित्र इत्यादिकांचे ठायीं परंपरासंबंधानें म्हणजे यांचे शुक्र-शोणितादि अवयव पुत्र-कन्यांचे ठायीं व पुत्र-कन्यांचे शुक्र-शोणितादि अवयव पौत्र-दौहित्र यांचे ठायीं असे परंपरेनें असतात. हें एकशरीरावयवरूप सापिंड्य जरी पतीसह पत्नीला येत नाहीं. म्हणजे पतीच्या शरीराचे शुक्र-शोणितादि अवयव भिन्न आणि पत्नीच्या शरीराचे शुक्र-शोणितादि अवयव भिन्न असल्यामुळें दोघांना ( पतिपत्नीला ) परस्पर सापिंड्य संभवत नाहीं. तसेंच अनेक भ्रात्यांच्या पत्नीला परस्पर सापिंड्य संभवत नाहीं. तथापि एक शरीराच्या शुक्र-शोणितादि अवयवांना त्या स्त्रिया आधार असल्यामुळें आधारत्वेंकरून सापिंड्य संबंध आहेच. "पित्याच्या अस्थींनीं पुत्राचे अस्थि उत्पन्न झाले" असें **मंत्रांत** सांगितलें आहे. यावरून एका पितृशरीराचे अस्थ्यादि अवयव पुत्राच्या द्वारानें त्या भ्रातृपत्न्यादिकांचे ठायीं स्थापित आहेत, असें **मदनरत्न—पारिजात—विज्ञानेश्वर** इत्यादि ग्रंथकार सांगतात. **वाचस्पति—शुद्धिविवेक—शूलपाणि**—इत्यादि **गौड—मैथिला**दि ग्रंथकारही असेंच सांगतात. श्रुतींतही—"ह्या शरीरांत सहा कोश ( अंश ) आहेत. मातेचे तीन अंश व पित्याचे तीन अंश. अस्थि, स्नायू, मज्जा, हे तीन पित्याचे अंश. त्वचा, मांस, रुधिर, हे तीन मातेचे अंश होत." असें सांगितलें आहे. "हे भगवंता! प्रजेला अनुसरून तूं उत्पन्न होतोस." असेंही श्रुतींत आहे. ह्या वरील प्रमाणावरून एकशरीरावयवरूप सापिंड्य सिद्ध होतें.

**चंद्रिकापरार्कमेधातिथिमाधवादयस्तु** एकपिंडदानक्रियान्वयित्वंसापिंड्यम् लेपभाजश्चतुर्थाद्याःपित्राद्याःपिंडभागिनः पिंडदःसप्तमस्तेषांसापिंड्यंसाप्तपौरुषमिति**मात्स्योक्तेः** । नचपितृव्यादिष्वेत-

---

व मांसल असून पुढच्या बाजूस उन्नत असावे. डोळ्यांतील पांढरा भाग व काळा भाग हे दोन्ही भाग व्यक्त म्हणजे स्पष्ट असावेत. आणि पापण्यांचे केश घट्ट असावेत. नासिका पुष्ट, सरळ, मोठा श्वास सोडणारी व तिचें अग्र वर उचलेलें अशी असावी. ओंठ लाल न उचललेले असे असावेत. हनुवटी मोठी असूं नये. तोंड मोठें असावें. दांत दाट, स्निग्ध, गुळगुळीत, शुभ्र व सारखे असावेत. जीभ लाल, लांब, पातळ अशी असावी. चिबुक पुष्ट मोठें असावें. ग्रीवा ( मान ) आखूड, घट्ट, वर्तुल अशी असावी. खांदे वर उचललेले, पुष्ट असावे. उदर वर उचललेलें, दक्षिणावर्त व गुप्त अशा नाभियुक्त असावें. हातापायांचीं नखें पातळ, [illegible], उन्नत अशीं असावींत. हातपाय स्निग्ध, तांबूस, व मांसभरित मोठे असावेत. अंगुल्या लांब, छिद्ररहित अशा असाव्यात. [illegible] गंभीर, वर्ण स्निग्ध असावा. स्वाभाविक सत्त्व ( स्वभाव ) स्थिर असावें. हीं स्त्रियांचीं व पुरुषांचीं शुभ लक्षणें वैद्यकांत ( अष्टांगहृदयांत ) सांगितलीं आहेत. आश्वलायन गृह्यसूत्रांत सांगतात—बुद्धिमती, रूपसंपन्न, सुस्वभावाची व चांगल्या लक्षणाची अशी कन्या वरावी. लक्षणें सांगतो मनु—"जीच्या अंगांत व्यंग नाहीं अशी, जीचें नांव सौम्य ( अकठोर ) ती; हंस, हत्ती [illegible] सारखें गमन करणारी; जीचे केश, लोम, दांत हे लहान आहेत ती; आणि जीचीं अंगें मृदु आहेत अशी स्त्री वरावी. हीं [illegible] ( शारीर ) लक्षणें होत.

नास्तीतिवाच्यम् तत्कर्तृकश्राद्धेदैवतैक्येनतत्सत्त्वात् देवदत्तकर्तृश्राद्धेहियेदेवताभूतास्तेषांमध्येयःकश्चिदन्यकर्तृकश्राद्धेऽनुप्रविशतितेषांसापिंड्यं तद्भार्याणामपिभर्तृकर्तृकश्राद्धेसहाधिकारित्वेनतदन्वयात् एकत्वंसागताभर्तुःपिंडेगोत्रेचसूतकेइतिस्मृतेश्च श्रुतीनांचवैराग्यार्थत्वात्तस्य सापिंड्यनिमित्तत्वेमानाभावात् नचमातुलादिष्वेतन्नास्तीतिवाच्यम् मातामहरूपदैवतैक्यात् ननुगुरुशिष्यादेरपिश्राद्धदेवतात्वात्सपिंडत्वंस्यात् किंबहुना सर्वाभावेतुनृपतिःकारयेत्तस्यरिक्थतइतिमार्कंडेयपुराणाद्राज्ञोपिश्राद्धकर्तृत्वात्सापिंड्यप्रसंगः सत्यम् पंचमात्सप्तमादूर्ध्वंमातृतःपितृतस्तथेतियाज्ञवल्क्यवचनेनमातापितृसंबंधएवतत्सत्त्वात् ऊर्ध्वंसापिंड्यंनिवर्ततइतिशेषः ननुपंचमत्वाद्यत्रनियम्यतेनमातृतइत्यादि वाक्यभेदात् मैवं मातृकुलेपंचमत्वस्यपितृकुलेसप्तमत्वस्यचबोधनेतुल्यत्वात् पौरुषेयत्वाददोषइतिचेत्तुल्यमन्यत्रापि अन्यकर्तृकेराज्ञस्तत्पितृणांवादेवतात्वाभावाच्च किंच अवयवान्वयपक्षेयथायोगरूढ्यापरिहारस्तथेहापि तेनमातृकुलेपितृकुलेचैकपिंडदानक्रियान्वयित्वंसापिंड्यमित्याहुः तेनैकस्यपित्रादयःषट् पुत्रादयश्चषट्सपिंडाभवंति ।

**चंद्रिका—अपरार्क—मेधातिथि—माधव**—इत्यादि ग्रंथकार तर—सापिंड्य म्हणजे एकपिंडदानक्रियान्वयित्व होय. समान म्हणजे एक आहे पिंड म्हणजे पिंडदानक्रियासंबंध ज्यास तो सपिंड. त्याचा धर्म सापिंड्य होय. हें सापिंड्य सात पुरुषांपर्यंत येतें तें असें—एकानें केलेल्या पिंडदानक्रियेमध्यें एक दाता, पित्रादि तिघे पिंडभागी, आणि वृद्धप्रपितामहादिक तिघे लेपभागी आहेत म्हणून त्या पिंडदानक्रियेचा संबंध सातांना आहे. कारण, "चवथ्यापासून ( वृद्धप्रपितामहापासून ) पुढचे तिघे लेपभागी व पित्रादिक तिघे पिंडभागी आहेत. आणि पिंड देणारा सातवा आहे, म्हणून सात पुरुषांपर्यंत सापिंड्य आहे." असें **मात्स्य**वचन आहे. आतां हें एकपिंडदानक्रियान्वयित्वरूप सापिंड्य चुलता, चुलतबंधु इत्यादिकांचे ठायीं येत नाहीं, असें म्हणूं नये. कारण, चुलता इत्यादिकांनीं करावयाचे श्राद्धांत जी देवता ती देवता आपले पितामहादिक असल्यामुळें आपण केलेली जी पिंडदानक्रिया तिचा संबंध पितामहाला आहे, व चुलत्यानें केलेल्याचाही संबंध त्याला आहे, म्हणून एकपिंडदानक्रियासंबंधरूप सापिंड्य येतें. यावरून असें होतें कीं, देवदत्तानें—(अ) मनुष्यानें—करावयाच्या श्राद्धांत जे पितर देवता झालेले आहेत त्यांपैकीं कोणी तरी (क) मनुष्यानें करावयाचे श्राद्धांत प्रविष्ट असेल तर त्या (अ) चें व (क) चें परस्पर सापिंड्य येतें. त्या श्राद्धकर्त्यांच्या पत्नींना देखील भर्त्यानें करावयाच्या श्राद्धांत सहाधिकार असल्यामुळें त्या सापिंड्याचा संबंध आहे. आणि "जीचा विवाह झाला ती स्त्री पिंडाविषयीं, गोत्राविषयीं, व सूतकाविषयीं भर्त्याशीं एकत्व पावली, म्हणजे भर्त्याचा पिंड, गोत्र, सूतक, तींच तिचीं झालीं." या स्मृतीवरूनही स्त्रियांना तेंच सापिंड्य आहे. वर सांगितलेल्या 'ह्या शरीराचे सहा कोश आहेत इत्यादिक' श्रुति वैराग्य उत्पन्न करण्याकरितां असल्यामुळें ती श्रुती एकशरीरावयवरूप सापिंड्य मानण्याविषयीं प्रमाण आहे, असें म्हणतां येत नाहीं. आतां हें ( एकपिंडदानक्रियान्वयित्व ) सापिंड्य मातुल इत्यादिकांचे ठायीं येणार नाहीं, असें म्हणूं नये. कारण, आपण करावयाच्या श्राद्धांत मातामहरूप जी देवता तीच मातुलकर्तृक श्राद्धांत देवता असल्यामुळें वर सांगितलेल्या रीतीनें एकपिंडदानक्रियान्वयित्वरूप सापिंड्य मावळ्याचें व भाच्याचें येत आहे. **शंका**—गुरु, शिष्य, आप्त, हे देखील श्राद्धांत देवता असल्यामुळें त्यांचें ( गुरु, शिष्यादिकांचें ) सापिंड्य येईल. फार काय सांगावें कीं, "सर्व अधिकाऱ्यांच्या अभावीं राजानें मृताची जिंदगी घेऊन श्राद्धादि क्रिया करावी." ह्या **मार्कंडेय** पुराणावरून राजा देखील श्राद्धकर्ता झाल्यामुळें त्याचेंही सापिंड्य प्राप्त होईल. शंका खरी आहे. **समाधान**—"मातेकडून पांचांपलीकडे आणि पित्याकडून सातांपलीकडे सापिंड्य निवृत्त होतें" ह्या **याज्ञवल्क्य**वचनावरून मातेचा किंवा पित्याचा संबंध असतांच सापिंड्य आहे, अन्यथा नाहीं, असें होतें. अर्थात् गुरुशिष्यादिकांना माता-पितृसंबंध नसल्यामुळें त्यांचें सापिंड्य नाहीं. **शंका**—ह्या याज्ञवल्क्यवचनांत पंचमत्वादिकांचा नियम करितों, म्हणजे मातेकडे पांचव्यानंतरच आणि पित्याकडे सातव्या नंतरच सापिंड्यनिवृत्ति, अर्थात् पूर्वी सापिंड्यनिवृत्ति नाहीं, असें याज्ञवल्क्यवचनानें बोधन केलें आहे. माता-पितृसंबंध असतांच सापिंड्य आहे, अन्यथा नाहीं. असें बोधन केलें नाहीं. कारण, नियम न करितां वर लिहिल्याप्रमाणें यथाश्रुत अर्थ केला तर वाक्यभेद ( मातेकडून पांचांपलीकडे सापिंड्य निवृत्त होतें आणि पित्याकडून सातांपलीकडे सापिंड्य निवृत्त होतें-अशीं दोन वाक्यें रूप दोष ) होतो. असें म्हणूं नये. कारण, नियम केला असतांही मातृकुलांत पंचमत्व आणि पितृकुलांत सप्तमत्व यांचा बोध होण्याकरितां भिन्नवाक्यें होत असल्यामुळें वाक्यभेदरूप दोष नियमपक्षीं व यथाश्रुतपक्षीं समान आहे. हें याज्ञवल्क्यवचन पौरुषेय असल्यामुळें वाक्यभेद हा दोष नाहीं, असें नियमपक्षीं म्हटलें तर यथाश्रुतपक्षींही तो दोष नाहीं. तस्मात् यथाश्रुत अर्थावरून माता-पितृसंबंध असतांच सापिंड्य आहे, अन्यथा नाहीं, असें झालें आहे. आणि राजाला श्राद्धाला अधिकार असल्यामुळें राजाला सापिंड्यप्रसंग येईल असें म्हटलें तो प्रसंग येत नाहीं. कारण, अन्यानें करावयाच्या श्राद्धांत राजा किंवा

राजाचे पितर देवता होत नाहींत. आणखी असें आहे कीं, प्रथम सांगितलेलें एकशरीरावयवान्वयिलरूप सापिंड्य मानलें तर शंभर पुरुष झाले तरी एकशरीरावयवांचा संबंध असल्यामुळें निवृत्त न झाल्याकारणानें जसा योगरूढीनें त्याचा परिहार केला पाहिजे आहे, तसा येथेंही योगरूढीनें गुरुशिष्यादिकांच्या सापिंड्याचा परिहार करावा. तेणेंकरून मातृकुलांत व पितृकुलांत एकपिंडदानक्रियान्वयिलरूप सापिंड्य आहे, असें सांगतात. तेणेंकरून ( सात पुरुषांपर्यंत सापिंड्य सांगितल्यावरून ) एकाचे पिता इत्यादिक सहा आणि पुत्र इत्यादिक सहा हे सपिंड होतात.

अत्रकेचिदुभयतःसापिंड्यनिवृत्तावेवोद्वाहोनान्यथेत्याहुः **शुद्धिचिंतामणिवाचस्पतिहरदत्ता-दयस्तु** सगोत्रत्ववत्सापिंड्यस्यसप्रतियोगिकत्वेनसंयोगवदुभयनिरूप्यत्वान्एकतोनिवृत्तावन्यतोनिवृत्तेरावश्यकत्वान्मूलपुरुषमारभ्याष्टमोवरोमूलपुरुषमारभ्यद्वितीयातृतीयादिकांकन्यामुद्वहेदित्याहुः **शिष्टास्तु** नवधूवरयोःस्वतःसापिंड्यं किंतु कूटस्थसंततित्वात्तत्सापिंड्येनैव अतोष्टमवरंप्रतिकन्यायाअसापिंड्येपिकन्यायाःकूटस्थेनसापिंड्यात्तत्संततित्वाद्वरस्तांप्रतिसपिंडएवेत्यविवाहः सापिंड्यासापिंड्ययोःप्रतियोगिभेदेनाविरोधादित्याहुः इदमेवचयुक्तं आशौचेप्येवंसापिंड्यंज्ञेयम् यत्रतुमध्येविच्छिन्नमपिसापिंड्यंमंडूकप्लुतिवत्पुनरनुवर्तते यथा कूटस्थात्पंचम्योःकन्ययोःपुत्रौतत्रनिवृत्तिः तदपत्ययोस्त्वनुवृत्तिस्तत्रापिनसापिंड्यासापिंड्ययोर्दोषः संबंधिभेदात् तेनतत्रनविवाहः ।

येथें **कोणी पंडित**—दोघांकडून ( वधूकडून व वराकडून ) सापिंड्यनिवृत्ति असतांच विवाह होतो, अन्यथा होत नाहीं, असें सांगतात. **शुद्धिचिंतामणि—वाचस्पति—हरदत्त**—इत्यादिक तर—जसें—सगोत्रत्व सप्रतियोगिक आहे तसें सापिंड्य सप्रतियोगिक आहे. म्हणजे ज्याचें सगोत्रत्व येतें त्याच्यावर त्याचें प्रतियोगित्व असतें. एकावर सगोत्रत्व आणि तत्प्रतियोगित्व हे दोन्ही धर्म येत असतात. जसें—देवदत्ताचें व यज्ञदत्ताचें गोत्र एक असतां देवदत्ताचें सगोत्रत्व यज्ञदत्तावर आणि यज्ञदत्ताचें देवदत्तावर आलें म्हणजे यज्ञदत्तावर देवदत्ताचें सगोत्रत्व आलें व यज्ञदत्ताचें सगोत्रत्व देवदत्तावर असल्यामुळें त्याचें प्रतियोगत्वही यज्ञदत्तावर आलें. तसेंच सापिंड्य सप्रतियोगिक असल्यामुळें संयोगरूप धर्म जसा दोघांवर राहतो, तसें सापिंड्य दोघांवर राहतें. दोन पदार्थांवर संयोग राहतो. याचा संयोग त्याच्यावर नाहीं तर त्याचा संयोग याच्यावर नाहीं. त्याप्रमाणें—देवदत्ताचा सपिंड यज्ञदत्त होईल तर यज्ञदत्ताचा सपिंड देवदत्त होईल. त्याचा तो सपिंड नाहीं तर त्याचा हा सपिंड नाहीं. म्हणून एकीकडून ( वराकडून किंवा वधूकडून ) सापिंड्यनिवृत्ति असतां दुसरीकडून निवृत्ति अवश्य असल्यामुळें मूळपुरुषापासून आठव्या वरानें मूलपुरुषापासून दुसरी, तिसरी, इत्यादिक कन्या वरावी, असें सांगतात. **शिष्ट** तर—वधूवरांचें स्वतः सापिंड्य नाहीं तर—वधूवर हे कूटस्था ( मूलपुरुषा ) ची संतति असल्यामुळें कूटस्थ पुरुषाच्या सापिंड्यानेंच त्या वधूवरांना सापिंड्य आहे. म्हणून आठव्या वराला द्वितीया-तृतीयादि कन्येचें असापिंड्य असलें तरी कन्येला कूटस्थाशीं सापिंड्य असल्याकारणानें त्या कूटस्थाच्या संततींतील वर असल्यामुळें तो त्या कन्येला सपिंड होतच आहे, म्हणून त्यांचा विवाह होत नाहीं. सापिंड्याचा प्रतियोगि भिन्न आणि असापिंड्याचा प्रतियोगि भिन्न असल्यामुळें विरोध नाहीं, असें सांगतात. हेंच मत युक्त आहे. आशौचाविषयींही असेंच सापिंड्य जाणावें. आतां ज्या ठिकाणीं मध्यें निवृत्त झालेलेंही सापिंड्य मंडूकाच्या ( बेडकाच्या ) उड्डाणाप्रमाणें पुनः अनुवृत्त होतें. जसें—मूलपुरुषापासून पांचव्या कन्येच्या पुत्राचें व दुसऱ्या पांचव्या कन्येच्या पुत्राचें सापिंड्य निवृत्त होतें. त्या पुत्रांच्या अपत्यांचें सापिंड्य अनुवृत्त होतें. म्हणजे पुत्रांच्या मातेकडून मूळ पुरुष पांचवा असल्यामुळें सापिंड्य निवृत्त होतें. आणि पुत्राच्या अपत्याचें म्हटलें तर पित्याकडून मूल पुरुष सहावा झाल्यामुळें सापिंड्य अनुवृत्त होतें, त्या ठिकाणीं देखील सापिंड्य व असापिंड्य यांचा दोष ( विरोध ) नाहीं. कारण, सापिंड्य व असापिंड्य यांचा संबंधि भिन्न ( कन्यापुत्र व पुत्रापत्य असा ) आहे. तेणेंकरून त्या ठिकाणीं विवाह होत नाहीं.

अत्रकूटस्थमारभ्यगणनाकार्या तदुक्तं वध्वावरस्यवाताताःकूटस्थाद्यदिसप्तमः पंचमीचेत्तयोर्माताततत्सापिंड्यंनिवर्ततइति कूटस्थोमूलपुरुषः **विश्वरूपनिबंधे** एवमुक्तप्रकारेणपितृबंधुपुसप्तमात् ऊर्ध्वमेवविवाह्यत्वंपंचमान्मातृबंधुतः संतानोभिद्यतेयस्मात्पूर्वजादुभयत्रच तमादायगणेद्धीमान्वरंयावत्कन्यकाम् **स्मृतितत्त्वेनारदः** आसप्तमात्पंचमाच्चबंधुभ्यःपितृमातृतः अविवाह्यासगोत्राचसमानप्रवरातथा अत्रबंधुभ्यइतिपंचमीनिर्देशात् पितुःपितृष्वसृपुत्रात्सप्तमीं मातुःपितृष्वसृपुत्राच्चपंचमीमपित्यजेत् एवमन्यबंधुष्वूह्यम् तत्रापि त्रिगोत्रात्ययेवांगपिविवाहंकुर्यात् वक्ष्यमाणवचनात् त्रिगोत्रगणनाचमातामहगोत्रापेक्षया नतुस्वापेक्षया अन्यथा पितुःपितामहदुहितुर्दौहित्रीपुत्रीपरिणेयास्याद्वध्वाःमातामहगोत्रापेक्षयातुत्रिगोत्रांतर्-

तेनविवाहप्रसंगइतिसंबंधतत्त्वादयोगौडग्रंथाः **संबंधविवेकेशूलपाणिर**प्याह पंचमात्सप्तमादर्वागपित्रिगोत्रांतरिताविवाह्या असंबद्धाभवेन्मातुःपिंडेनैवोदकेनवा साविवाह्याद्विजातीनांत्रिगोत्रांतरिताचयेति**बृहन्मनूक्तेः** सन्निकर्षेपिकर्तव्यंत्रिगोत्रात्परतोयदीति**देवलोक्तेश्चे**ति एतच्च**दाक्षिणात्या**नमन्यंते यत्तु**वसिष्ठः** पंचमींसप्तमींचैवमातृतःपितृतस्तथेति यच्च**विष्णुपुराणम्** पंचमींमातृपक्षाच्चपितृपक्षाच्चसप्तमीं गृहस्थउद्वहेत्कन्यांन्याय्येनविधिनानृपेतितत्पंचमींसप्तमीमतीत्येतिव्याख्येयम् पंचमेसप्तमेचैवयेषांवैवाहिकीक्रिया क्रियापराअपिहितेपतिताःशूद्रतांगताइत्य**परार्के**मरीचिवचनात् **हारलतायां शंखलिखितौ** सपिंडतातुसर्वेषांगोत्रतःसाप्तपौरुषी पिंडश्चोदकदानंचआशौचंचतदानुगं गोत्रंसंतानं आशौचंतानभिव्याप्यगच्छतीत्यर्थः ।

ह्या सापिंड्याविषयीं पिढ्यांची गणना करावयाची ती कूटस्थ ( मूलपुरुष ) धरून गणना करावी. तें सांगतो—"वधूचा व वराचा पिता जर मूल पुरुषापासून सातवा होईल तर त्यांचें सापिंड्य निवृत्त होतें. आणि वधूवरांची माता जर मूलपुरुषापासून पांचवी होईल तर त्यांचें सापिंड्य निवृत्त होतें." **विश्वरूपनिबंधांत**—"याप्रमाणें पूर्वोक्त प्रकारेंकरून वधूवरांच्या पित्याकडून मोजून सप्तमाच्या पुढेंच ( अष्टमादिकालाच ) विवाहाला योग्यत्व येतें, आणि मातेकडून मोजून पंचमापुढेंच ( षष्ठालाच ) विवाहयोग्यत्व येतें. ज्या पूर्वजापासून संतति भिन्न होते त्याला घेऊन दोहींकडे वरापर्यंत आणि वधूपर्यंत पिढ्यांची गणना करावी." **स्मृतितत्त्वांत नारद**—"पित्याकडून सप्तमापर्यंत आणि मातेकडून पंचमापर्यंत जी कन्या तिच्याशीं विवाह करूं नये. आणि सगोत्रा व सप्रवरा तिच्याशींही विवाह करूं नये" या वचनांत 'बंधुभ्यः' असा पंचमी विभक्तीचा निर्देश केल्यामुळें पित्याच्या आतेच्या पुत्रापासून सातवी आणि मातेच्या मातेच्या पुत्रापासून पांचवी ह्या देखील टाकाव्या. याप्रमाणें ईतर बंधूंविषयीं जाणावें. त्यांतही असें आहे कीं, पुढें सांगावयाच्या **बृहन्मनु—देवल** वचनावरून तीन गोत्रांच्या पलीकडची कन्या असेल तर पांचांच्या आंतल्याही कन्येशीं विवाह करावा. त्रिगोत्रगणना करावयाची ती वराचें मातामहगोत्र धरून करावी. वराचें गोत्र धरून करूं नये. कारण, वराचें गोत्र धरून केली तर वराला पित्याच्या पितामहकन्येच्या दौहित्रीच्या कन्येशीं विवाह प्राप्त होईल. तो अनिष्ट आहे. आणि वधूच्या मातामहाचें गोत्र धरून गणना केली तर तीन गोत्रांच्या आंत विवाहप्रसंग येईल. असें **संबंधतत्त्व** इत्यादि गौडग्रंथ सांगतात. **संबंधविवेकांत शूलपाणिही** सांगतो—मातेकडून पंचम व पित्याकडून सप्तम यांच्या आंतली असली तरी तीन गोत्रांतून पलीकडची असली तर विवाह करावा. कारण, "जी कन्या मातृकुलांत पिंडानें किंवा उदकक्रियेनें संबद्ध नसेल तिच्याशीं द्विजांनीं विवाह करावा. आणि पिंडादिसंबद्ध असली तरी जी त्रिगोत्रान्तरित असेल तिच्याशीं विवाह करावा." असें **बृहन्मनु**वचन आहे. आणि "जर तीन गोत्रांच्या पलीकडची असेल तर जवळची असली तरी विवाह करावा" असें **देवल**वचनही आहे. हें मत दाक्षिणात्य मानीत नाहींत. आतां जें **वसिष्ठ**—"मातेकडून पांचवी आणि पित्याकडून सातवी कन्या वरावी." आणि जें **विष्णुपुराण**—"मातृपक्षाकडून पांचवी आणि पितृपक्षाकडून सातवी कन्या गृहस्थानें योग्य विधीनें वरावी" असें आहे तेथें पांचवी व सातवी टाकून वरावी असें व्याख्यान करावें. कारण, "पांचव्या आणि सातव्या पुरुषांत ज्यांचा विवाह होतो, ते मनुष्य श्रुतिस्मृतिकर्में करणारे असले तरी पतित होऊन शूद्रत्वाला पावतात" असें **अपरार्कांत मरीचि**वचन आहे. **हारलतेंत शंख व लिखित**—"सर्वांचें सापिंड्य संततीनें सात पुरुषांपर्यंत आहे. पिंड व उदकदान हें सात पुरुषांपर्यंत प्राप्त होतें. आशौच हें संततीला सात पुरुषांपर्यंत व्यापून राहतें."

**शुद्धिविवेके शुद्धिचिंतामणौचब्राह्मे** सर्वेषामेववर्णानांविज्ञेयासाप्तपौरुषी सपिंडताततःपश्चात्समानोदकधर्मता ततःकालवशात्तत्रविस्मृतौनामगोत्रतः समानोदकसंज्ञातुतावन्मात्रापिनश्यति सप्तोर्ध्वंत्रयःसोदकास्ततोगोत्रजाः तत्रैव**ब्राह्मे** अविभक्तधनास्त्वेतेसपिंडाःपरिकीर्तिताः तेनाविभक्तधनाभावेविभक्तःसपिंडोधनहारी नान्यथेत्यर्थः तेनविवाहेआशौचेधनग्रहणेचत्रिधासापिंड्यंसिद्धं यत्तु पंचमींमातृतः-

---

१ आत्मबंधु ३, पितृबंधु ३ आणि मातृबंधु ३ असे नऊ बंधु सांगितले आहेत–ते असे—"आत्मपितृष्वसुः पुत्रा आत्ममातृष्वसुः सुताः । आत्ममातुलपुत्राश्च विज्ञेया आत्मबांधवाः ॥ पितुः पितृष्वसुः पुत्राः पितुर्मातृष्वसुः सुताः । पितुर्मातुलपुत्राश्च विज्ञेयाः पितृबांधवाः । मातुःपितृष्वसुः पुत्रा मातुर्मातृष्वसुः सुताः । मातुर्मातुलपुत्राश्च विज्ञेया मातृबांधवाः ॥ अर्थ–आपल्या आत्याचे पुत्र, आपल्या मावशीचे पुत्र व आपल्या मावळ्याचे पुत्र हे तीन आत्मबंधु. पित्याच्या आतेचे पुत्र, पित्याच्या मावशीचे पुत्र, व पित्याच्या मावळ्याचे पुत्र हे तीन पितृबंधु. मातेच्या आत्याचे पुत्र, मातेच्या मावशीचे पुत्र, व मातेच्या मावळ्याचे पुत्र हे तीन मातृबंधु होत.

परिहरेत्सप्तमीपितृतस्त्रीन्मातृतःपंचपितृतोवेति**पैठीनसिस्मृतौ** त्रीनित्यनुकल्पइति**माधवोक्तेः** पंचमींसप्तमींचैवमातृतःपितृतस्तथा दशभिःपुरुषैःख्यातांच्छ्रोत्रियाणांमहाकुलात् उद्वहेत्सप्तमावूर्ध्वंतदभावेतुसप्तमीम् पंचमींतदभावेतुपितृपक्षेप्ययंविधिः सप्तमींचतथाषष्ठींपंचमींचतथैवच एवमुद्वाहयेत्कन्यांनदोषःशाकटायनः तृतीयांवाचतुर्थींवापक्षयोरुभयोरपि विवाहयेन्मनुःप्राहपाराशर्योंगिरायमः यस्तुदेशानुरूपेणकुलमार्गेणचोद्वहेत् नित्यंसव्यवहार्यःस्याद्वेदाच्चैतत्प्रदृश्यतइति**चतुर्विंशतिमतात्** [१]चतुर्थीमुद्वहेत्कन्यांचतुर्थःपंचमोपिवा पराशरमतेषष्ठींपंचमोनतुपंचमीमिति**पराशरोक्तेश्चा**नुकल्पत्वेनापदिपंचम्यादिपरिणयनंकार्यमितिप्रतीयते अत्रहितदभावेइतिस्पष्टमेवानुकल्पत्वमुक्तम् तन्नयथाश्रुतंज्ञेयम् पूर्वोक्त**मरीचिवचो**विरोधात् वस्तुनिविकल्पासंभवात् पंचमात्सप्तमाद्धीनांयःकन्यामुद्वहेद्द्विजः गुरुतल्पीसविज्ञेयःसगोत्रांचैवमुद्वहन्निति**विष्णूक्तेः** पराशरस्यमूलाभावाच्च तस्मान्**मदनपारिजाता**द्युक्तदिशादत्तकसापत्नसंबंधाद्यनुप्रवेशेब्राह्मणादीनांक्षत्रियादिसपिंडविषयेवापूर्वोक्तानिनेयानि नत्वनुकल्पइतिभ्रमितव्यं ।

**शुद्धिविवेकांत व शुद्धिचिंतामणींत ब्राह्मांत**—"साऱ्या वर्णांना सापिंड्य सात पुरुषांपर्यंत जाणावें. सातांपुढें समानोदकत्व जाणावें. तदनंतर कांहीं कालानें नांवांची व गोत्रांची विस्मृति झाली असतां तेथपर्यंत असलेलें समानोदकत्वही नष्ट होतें." म्हणजे सातांपुढें तीन पुरुषांपर्यंत समानोदक होतात. पुढें गोत्रज समजावे." तेथेंच **ब्राह्मांत**—"हे सपिंड अविभक्तधन म्हटले आहेत. म्हणजे सपिंडांच्या धनाचा विभाग झाला तरी ते विभक्त समजूं नयेत" यावरून मृताचे जिंदगीचा वारस अविभक्त नसेल तर विभक्त झालेला सपिंड वारस होतो. सपिंडावांचून दुसरा होत नाहीं, असा भाव. तेणेंकरून विवाहाविषयीं, आशौचाविषयीं आणि धनग्रहणाविषयीं असें तीन प्रकारचें सापिंड्य सिद्ध झालें. आतां जें "मातेकडून पांचवी वर्ज्य करावी आणि पित्याकडून सातवी वर्ज्य करावी, अथवा मातेकडून तीन आणि पित्याकडून पांच पुरुष वर्ज्य करावे" ह्या **पैठीनसि**स्मृतींत तीन पुरुष वर्ज्य करावे, हा अनुकल्प आहे, अशा माधवाच्या सांगण्यावरून; "मातेकडून पांचवी आणि पित्याकडून सातवी वरावी. दहा पुरुषांनीं प्रख्यात असलेल्या श्रोत्रियांच्या मोठ्या अशा कुलांतून सातव्या पुरुषांपलीकडची कन्या वरावी. तिच्या अभावीं सातवी वरावी. तिच्या अभावीं पांचवी वरावी. पितृपक्षीं देखील हाच विधि समजावा. सातवी, सहावी व पांचवी कन्या वरावी, याविषयीं दोष नाहीं, असें शाकटायन ऋषि सांगतो. दोन्ही पक्षीं ( मातृपक्षीं व पितृपक्षीं ) तिसरी किंवा चवथी कन्या वरावी, असें मनु, व्यास, यम, अंगिरा हे सांगतात. जो मनुष्य देशाच्या अनुरोधानें व कुलपरंपरागत चालीप्रमाणें विवाह करील त्या मनुष्याशीं व्यवहार सतत करावा. वेदावरूनही असा आचार दिसत आहे." ह्या **चतुर्विंशतिमता**वरून; आणि "चतुर्थ किंवा पंचम वरानें चवथी कन्या वरावी. पराशरमतीं सहावी वरावी. पंचमानें पांचवी वरूं नये" ह्या **पराशर**वचनावरूनही अनुकल्प म्हणून समजून आपत्कालीं पांचवी इत्यादि कन्येशीं विवाह करावा, असें समजतें. ह्या वरील चतुर्विंशतिमतांत सातव्या पलीकडच्या अभावीं सातवी, तिच्या अभावीं पांचवी, असें सांगितल्यावरून स्पष्टपणानेंच हा अनुकल्प असें सांगितल्यासारखें होत आहे. तें तसेंच समजूं नये. कारण, वर सांगितलेल्या 'पंचमे सप्तमे चैव०' ह्या मरीचिवचनाशीं विरोध येतो. वस्तूविषयीं विकल्प संभवत नाहीं. आणि "मातेकडून पांचव्या व पित्याकडून सातव्या पुरुषांतील कन्या जो ब्राह्मण वरील तो, आणि सगोत्रा वरील तो, गुरुपत्निगामी समजावा" असें **विष्णुवचनही** आहे. आणि वर सांगितलेल्या 'चतुर्थीमुद्वहेत्कन्यां०' ह्या पराशरवचनास मूलही नाहीं. तस्मात् **मदनपारिजातादिकांनीं** सांगितलेल्या रीतीनें दत्तकसंबंध—सापत्नसंबंध वगैरे असतां किंवा ब्राह्मणादिकांना क्षत्रियादिकांचा सापिंड्यसंबंध असतां त्याविषयीं वर सांगितलेलीं वचनें समजावीं. हा पंचम्यादि कन्याविवाह अनुकल्प आहे, अशा भ्रमांत पडूं नये. अर्थात् पंचम्यादि कन्याविवाह अनुकल्प देखील नाहीं.

---

१ सापिंड्यदीपिकाकारादयोऽर्वाचीनास्तु चतुर्थीमुद्वहेत्कन्यां चतुर्थः पंचमोऽपि वा । पराशरमते षष्ठीं पंचमो नतु पंचमीमित्यादिवचनानां समूलत्वं निश्चित्य अशक्तैः संकटे समाश्रयणीयस्य सापिंड्यसंकोचस्य व्यवस्थामूचुः । तथाहि । चतुर्थी कन्या पितृपक्षे मातृपक्षे च चतुर्थेन पंचमेन वा पुंसा विवाह्या । द्वितीयतृतीयषष्ठाद्यैश्चतुर्थी नोद्वाह्या । पराशरमते पंचमः षष्ठीमुद्वहेत् । द्वितीयतृतीयचतुर्थादिः षष्ठीं नोद्वहेत् । पंचमः पंचमीं नोद्वहेत् । मातृतः पितृतश्चापि षष्ठः षष्ठीं समुद्वहेदिति वचनांतरात्षष्ठेनापि षष्ठी विवाह्या । पंचमषष्ठभिन्नैः षष्ठी न विवाह्येति पर्यवसन्नं । तथा पितृपक्षे सप्तमी मातृपक्षे पंचमी च तृतीयाद्यैः सर्वैः परिणेया इत्यादि धर्मसिंधुः ।

२ आश्वलायनश्रौतसूत्रांत नवव्या अध्यायांत दशमेय प्रकरणीं असें सांगितलें आहे कीं, मातृकुलांतील पांच पुरुष आणि पितृकुलांतील पांच पुरुष, हे विद्या, तप, पुण्य कर्म यांनीं संपन्न आहेत ज्या कुलांत, तें कुल होय. त्यांतील ऋत्विज् वरावे. ही ऋत्विज् वरण्याकरितां जी कुलपरीक्षा सांगितली आहे, तीच परीक्षा कन्या वरण्याकरितां करावी. अर्थात् मातेकडील पांच पुरुष आणि पित्याकडील पांच पुरुष हे प्रसिद्ध विद्वान् असलेल्या कुलांतील कन्या वरावी, असा भाव.

यत्तु**स्मृतिचन्द्रिकामाधवादय**आहुः तृतीयेसंगच्छावहैचतुर्थेसंगच्छावहाइति**शतपथश्रुतेः** तृप्रांजहुर्मातुलस्येवयोषाभागस्तेपैतृष्वसेयीवपामिवेति गर्भेनुनौजनितादंपतीकरितिच**मंत्रवर्णात्** मातृष्वसृसुतांकेचित्पितृष्वसृसुतांतथा विवहंतिक्वचिद्देशेसंकोच्यापिसपिंडतामिति**शातातपोक्तेश्च**मातुलकन्योद्वाहःकार्यः। यद्यपिपितृष्वसृकन्योद्वाहोपिप्राप्तस्तथाप्यस्वर्ग्यंलोकविद्विष्टंधर्म्यमप्याचरेन्नत्विति निषेधाद्वचनांतरेणतदुद्वाहस्याविधानाच्चनकार्यः अयंतुदाक्षिणात्यशिष्टाचारात्कार्यइति नचपूर्वोक्तश्रुतीनामर्थवादमात्रता मानांतरेणासिद्धौ **उपरिहिदेवेभ्योधारयती**तिवदनुवादानुपपत्त्याविधिकल्पनात् यत्तु**शातातपः** मातुलस्यसुतामूढ्वामातृगोत्रांतथैवच समानप्रवरांचैवत्यक्त्वाचांद्रायणंचरेत् यच्च**मनुः** पैतृष्वसेयीभगिनीं स्वस्रीयांमातुरेवच मातुश्चभ्रातुराप्तस्यगत्वाचांद्रायणंचरेत् एतास्तिस्रस्तुभार्यार्थेनोपयच्छेतबुद्धिमान् यच्च**व्यासः** मातुःसपिंडायत्नेनवर्जनीयाद्विजातिभिरिति तद्गांधर्वादिविवाहोढमातृविषयम् तत्रपितृगोत्रानिवृत्तेः अतएव**मार्कंडेयपुराणं** गांधर्वादिविवाहेषुपितृगोत्रेणधर्मविदिति ब्राह्मादिविवाहेतुपरिणेत्रैवेति **भट्टसोमेश्वरो**पि **तृतीयेध्याये वाक्यपादे**मातुलकन्योद्वाहमुदाहृत्यस्मृतिविरोधेनाचारप्राप्तस्यास्यवार्तिकेबाधोक्तावपिपूर्वोक्तश्रौतलिंगबलीयस्त्वादस्यकर्तव्यतामाह तदेतद्दत्तकस्यपालकदत्रिममातृसोदरकन्याविषयत्वेनासवर्णमातुलकन्याविषयत्वेनयुगांतरपरत्वेनचोपपन्नमपिअविचारितरमणीयंयथातथास्तु तथापिकलौतावन्निषिद्धमेव गोत्रान्मातुःसापिंड्याच्चविवाहोगोवधस्तथेत्या**दिपुराणात् माधवीये बौधायनो**क्त्यस्यनिंदामाह पंचधाविप्रतिपत्तिर्दक्षिणतस्तथोत्तरतऊर्णाविक्रयोनुपेतेनस्त्रियाचसहभोजनंपर्युषितभोजनं मातुलपितृष्वसृदुहितृपरिणयनमिति अथोत्तरतस्सीधुपानादिकमुक्त्वाइतरइतरस्मिन्कुर्वन्दुष्यतिइतरइतरस्मिन्निति **भट्टसोमेश्वरेणा**पिस्मृतिविरुद्धानांमातुलकन्योद्वाहादीनामस्माद्वचनादप्रामाण्यमित्युक्तम् **बृहस्पतिर**पि उद्वह्यतेदाक्षिणात्यैर्मातुलस्यसुताद्विजैः मत्स्यादाश्चनराःपूर्वेव्यभिचाररताःस्त्रियः उत्तरेमद्यपाश्चैवस्पृश्यानृणांरजस्वलाइत्यनाचारत्वमाह अतएव**हेमाद्रौमात्स्ये** कर्नाटकादीनांतत्कारिणांश्राद्धेनिषेधः **बोपदेवे**नापिलिखितं**ब्राह्मम्** यत्रमातुलजोद्वाहीयत्रवैवृषलीपतिः श्राद्धंनगच्छेत्तद्विप्रःकृतंयच्चनिरामिषमिति तस्मान्मातृतःपंच पितृतःसप्तत्यक्त्वोद्वहेदितिसिद्धम्।

आतां जें **स्मृतिचंद्रिका माधव**—"इत्यादिक सांगतात कीं, तिसऱ्या पिढींत आम्हीं उभयतां ( वधूवर ) संगत होतों. चवथ्या पिढींत आम्हीं उभयतां संगत होतों" ह्या **शतपथश्रुती**वरून; आणि "मातुलाची कन्या आपल्याच्या पुत्राचा जसा भाग आहे, तसा हे इंद्रा! ही पशूची वपा तुझा भाग आहे, तो तूं ग्रहण कर" ह्या मंत्रार्थावरून; आणि "गर्भे नु नौ जनिता दंपतीकः०" अर्थ—"यमी यमास म्हणते—सर्वांचें शुभाशुभप्रेरक असा सर्वात्मक देव गर्भावस्थेचेठायींच आम्हांला दंपती करिता झाला. म्हणजे एका उदरांत दोघांचा सहवास झाल्यामुळें दंपती झालों. ह्या प्रजापतीचीं कर्में कोणीही लोपवीत नाहींत, या कारणास्तव गर्भावस्थेचे ठायींच प्रजापतीनें दांपत्य केलें असतां संभोग कर! आणखी— आमचें हें मातेच्या उदरांत सहवासपणानें झालेलें दंपतित्व पृथिवी जाणते. आणि द्युलोकही जाणतो." ह्या मंत्रार्थावरून; आणि "माता आहे स्वसा म्हणजे भगिनी ज्याची तो ( अर्थात् मातुल ) त्याची कन्या आणि आपल्याची कन्या यांच्याशीं क्वचित् देशांत कोणी सापिंड्याचा संकोच करून विवाह करितात" ह्या **शातातप**वचनावरून मातुलकन्येशीं विवाह

---

१ मातृष्वसृसुतामिति। माता स्वसा यस्य स मातृष्वसा मातुलस्तत्सुतामित्यर्थः। मातुलस्य सुतामितिपाठांतरात्। २ लोकविद्विष्टमिति लोचृ दर्शने–लोक्यते इति लोकं इष्टानिष्टसाधनतया ज्ञायमानं सदसत्कर्म तद्वेदिभिर्द्विष्टं द्वेषविषयीकृतं विहितमपि नाचरेदित्यर्थः। ३ दाक्षिणात्येति उद्वहेद्दक्षिणे विद्वान् मातुलस्य च वै सुताम्। उत्तरे नोद्वहेद्विप्रो ह्येष धर्मः सनातनः। मातुलस्य सुतां विप्रो दक्षिणे तां समुद्वहेत्। वर्जनीया प्रयत्नेन सैव वाजसनेयिभिरिति आचारानुरोधिवाक्यात्। ४ असिद्धाविति अप्राप्तार्थस्य स्तावकत्वासंभवात्। ५ गांधर्वादीति। ब्राह्मादिषु विवाहेषु उढा कन्या यदा भवेत्। भर्तृगोत्रेण कर्तव्यास्तयाः पिंडोदकक्रिया इति। गोत्ररिक्थेजनयितुर्नभजेद्दत्रिमःसुत इति मनुवाक्ये उद्देशविशेषणस्य पुंस्त्वस्याविवक्षितत्वेन दानकर्मणा जनककुले संबंधनिवृत्तेः सापिंड्यस्यापि निवृत्तिरुक्ता। एवं च ब्राह्मादिविवाहे कन्यादानसत्त्वेन सापिंड्यनिवृत्तिस्तत्परं मातुलकन्यापरिणयनवचनं आसुरादिषु तदभावान्न सापिंड्यनिवृत्तिरिति तत्पराणि प्रायश्चित्तवचांसीत्यर्थः। ६ योषापत्यं मातुलीयं यथाभागः पितृष्वसुः। पुत्रस्यैवं वपातेंऽशं जुषस्वेंद्रेत्यृषिर्जगौ॥ महाभारतटीका चतुर्धारी.

करावा. आतां जरी ह्या वचनावरून आत्याच्या कन्येशीं देखील विवाह प्राप्त झाला, तथापि "जें कर्म अस्वर्ग्य ( स्वर्गप्रतिबंधक ) व ज्या कर्माचा लोक द्वेष करितात, तें कर्म धर्माला हितकारक असें समजलें तरी आचरण करूं नये." असा निषेध असल्यावरून; व इतर वचनानें आत्याच्या कन्येशीं विवाह सांगितला नसल्याकारणानेंही तो करूं नये. ह्या मातुलकन्योद्वाह दाक्षिणात्य लोकांच्या आचारावरून करावा. आतां पूर्वी सांगितलेल्या मातुलकन्याविवाहबोधक श्रुति अर्थवादमात्र ( स्तुतिमात्रबोधक ) आहेत. मातुलकन्याविवाहविधायक नाहींत, असें म्हणूं नये; कारण, दुसऱ्या प्रमाणानें सिद्ध न झालेल्या अर्थाविषयीं अनुवाद ( अर्थवाद ) अनुपपन्न ( असंगत ) असल्यामुळें 'उपरि हि देवेभ्यो धारयति' या श्रुतिवाक्याप्रमाणें वरील श्रुतींचे ठायीं "मातुलकन्योद्वाहः कार्यः" असा विधि कल्पित होतो. आतां जें **शातातप**—"मातुलाची कन्या, तशीच मातेच्या गोत्रांतील कन्या, आणि सप्रवरकन्या, ह्यांच्याशीं विवाह केला असतां त्यांचा त्याग करून चांद्रायण प्रायश्चित्त करावें," आणि जें **मनु**—"आत्याची कन्या, मावशीची कन्या, मातुलाची कन्या यांच्या ठिकाणीं गमन केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें. ह्या तीन भगिनी आहेत, शाहाण्या मनुष्यानें ह्या तिघांचा भार्येकरितां स्वीकार करूं नये," आणि जें **व्यास**—"ब्राह्मणादिकांनीं मातेच्या सपिंडांतील कन्या प्रयत्नानें वर्ज्य करावी" असें सांगतात, तीं वचनें गांधर्वादिक विवाहविधीनें विवाह केलेल्या मातृविषयक आहेत. कारण, गांधर्वादि विवाहानें विवाहित स्त्रियांचे ठायीं पित्याच्या गोत्राची निवृत्ति होत नाहीं. म्हणूनच **मार्कंडेयपुराण**—"गांधर्वादि विवाहांचे ठायीं पितृगोत्रानें धर्मवेत्त्यानें व्यवहार करावा." ब्राह्म, दैव इत्यादि विवाह झालेल्या मातृगोत्रांतील वरावीच. **भट्टसोमेश्वर**ही तिसऱ्या अध्यायांत **वाक्यपादांत** मातुलकन्याविवाहाचें उदाहरण देऊन स्मृतीला विरुद्ध असून आचारानें प्राप्त झालेल्या ह्या मातुलकन्याविवाहाचा वार्तिकांत निषेध सांगितला तरी पूर्वी सांगितलेल्या व स्मृतीपेक्षां बलिष्ठ अशा श्रुत्यर्थावरून ह्या मातुलकन्याविवाह करावा, असें सांगतो. तें हें मत दत्तकाची पालक जी माता तिच्या सहोदर भ्रात्याच्या कन्याविषयक, किंवा असवर्ण मातुलकन्याविषयक अथवा इतर युगविषयक म्हणून उपपन्न असलें तरी अविचारानें जसें तसें रमणीय असो. तरी पण कलियुगांत तर निषिद्ध आहे. कारण, "मातेच्या गोत्रांतील व सपिंडांतील कन्येशीं विवाह, आणि मधुपर्कांत गोवध हे कलियुगांत करूं नयेत" असें **आदिपुराण**वचन आहे. **माधवीयांत बौधायन**ही त्याची निंदा सांगतो—"पांच प्रकारचा अनाचार दक्षिणेकडे आहे. तसाच उत्तरेकडेही आहे. दक्षिणेकडे अनाचार असा—ऊर्णावस्त्राचा विक्रय, अनुपनीतमुलासह व स्त्रीसह भोजन, शिळ्या अन्नाचें भोजन, मातुलकन्येशीं विवाह, आणि आतेच्या कन्येशीं विवाह. आतां उत्तरेकडे आसवपान" इत्यादिक सांगून पुढें सांगतो—"इतर ( दक्षिणेकडचा ) मनुष्य उत्तर देशांत तसें करील तर तो दोषी होईल. आणि उत्तरेकडचा मनुष्य दक्षिण देशांत तसें करील तर तो दोषी होईल." **भट्ट सोमेश्वरानें** देखील—स्मृतिविरुद्ध अशा मातुलकन्याविवाहादिकांना ह्या ( बौधायन ) वचनावरून अप्रामाण्य, असें सांगितलें आहे. **बृहस्पति**ही—"दाक्षिणात्य ब्राह्मण मातुलकन्येशीं विवाह करितात. पूर्व देशांत मनुष्य मांसे खातात, आणि स्त्रिया व्यभिचार करितात. उत्तर देशांत मद्यपान करितात, आणि पुरुषाला रजस्वला स्पर्श करितात" असा ह्या अनाचार आहे असें सांगतो. ह्या मातुलकन्याविवाह अनाचार आहे, म्हणूनच **हेमाद्रींत मात्स्यांत** मातुलकन्योद्वाह करणाऱ्या कर्नाटकादि ब्राह्मणांचा श्राद्धांत निषेध केला आहे. बोपदेवानेंही **ब्रह्मपुराणांतील** वचन लिहिलें आहे, तें असें—"ज्या ठिकाणीं मातुलकन्याविवाह केलेला ब्राह्मण असेल, व जेथें वृषली ( शूद्रा ) पति ब्राह्मण असेल त्या श्राद्धांत भोजनाला जाऊं नये. आणि जें आमिषरहित श्राद्ध तेथें भोजनास जाऊं नये." तस्मात् मातेकडून पांच आणि पित्याकडून सात पुरुष टाकून विवाह करावा, असें सिद्ध झालें.

---

१ 'उपरि हि देवेभ्यो धारयति' या वेदवाक्याचा अर्थ-यज्ञांची पात्रें सांगितलीं आहेत, त्यांत, ध्रुवा, उपभृत्, जुहू हीं तीन पात्रें आहेत. ध्रुवा या पात्रांत घृत ठेवावयाचें असतें. तें पात्र हालवावयाचें नाहीं. त्यांतील घृत उपभृतींत घेऊन त्याजवर जुहू धरावयाची असते. तेथें-देवोद्देश्यक याग असतां उपभृतीवर जुहू धरितो, असा अर्थ 'उपरि०' ह्या वरील वाक्याचा झाला आहे. ह्या वाक्यांत 'हि' शब्द आहे, व विधिबोधक प्रत्यय नाहीं, म्हणून हें विधिवाक्य म्हणतां येत नाहीं. अनुवादक आहे, तरी इतर वाक्यानें जुहूचें उपभृतीवर धारण सांगितलें नसल्यामुळें, ह्या वाक्यानेंही विधि कल्पित होतो. म्हणजे जुहूचें उपभृतीवर धारण करावें, असा अर्थ ह्या वाक्याचा होतो. तसा 'मातुलाची कन्या आत्याच्या पुत्राचा जसा भाग आहे' या श्रुत्यर्थावरून 'मातुलकन्याविवाह करावा' असा विधि कल्पित होतो, असा भाव. २ येथें **कौस्तुभकार** असें सांगतो कीं, "दशभिः पुरुषैः ख्याताच्छ्रोत्रियाणां महाकुलात्। उद्वहेत्सप्तमादूर्ध्वं तदभावे तु सप्तमीं ॥ पंचमीं तदभावे तु पितृपक्षेप्ययं विधिः ॥ सप्तमीं च तथा षष्ठीं पंचमीं च तथैव च ॥ एवमुद्वाहयेत्कन्यां न दोषः शाकटायनः ॥ तृतीयां वा चतुर्थीं वा पक्षयोरुभयोरपि ॥ विवाहयेन्मनुः प्राह पाराशर्योंगिरा यमः ॥" ह्या चतुर्विंशतिस्मृतीमध्यें सप्तमीं, पंचमीं, षष्ठीं, तृतीयां, चतुर्थीं, ह्या प्रत्येक पदाशीं 'महाकुलात्' ह्या पदाचा संबंध करावयाचा आहे. म्हणजे महाकुलांतील कन्या सांपडत असेल तर सापिंड्यसंकोच करून विवाह करावा. सापिंड्यसंकोचाच्या भीतीनें महाकुल टाकून अधमकुलांतून कन्या वरूं नये. असें आहे म्हणूनच आश्वलायनानें प्रथम कुल-

**संबंधविवेके सुमंतुः** ब्राह्मणानामेकपिंडस्वधानामादशमाद्धर्मविच्छित्तिर्भवति आसप्तमाद्रिक्थविच्छित्तिर्भवति आतृतीयात्पिंडविच्छित्तिरन्यथा पिंडशौचक्रियाविच्छेदाद्ब्रह्महतुल्योभवति अस्यार्थमाह **शूलपाणिः** जीवत्पित्रादित्रिकस्यवृद्धप्रपितामहादयस्त्रयःश्राद्धदेवतात्वात्पिंडभाजोभवंति तदूर्ध्वंत्रयोनवपुरुषपर्यंतालेपभाजः श्राद्धकर्ताचदशमइतिदशमादूर्ध्वंसापिंड्यनिवृत्तिः दशमादित्युपलक्षणं तेनपितृपितामहजीवनेनवपुरुषपर्यंतंपितृजीवनेचाष्टपुरुषपर्यंतंसापिंड्यमितिज्ञेयम् अपुत्रधनग्रहणेसन्निहिताभावेसप्तपुरुषपर्यंतमधिकारः धनग्राहिणमारभ्यतृतीयःपौत्रः तदूर्ध्वंश्राद्धविच्छेदः अन्यथाधनहारित्वेऽपुत्रश्राद्धाद्यकरणेब्रह्महेत्यर्थः आतृतीयादित्यनूढकन्याविषयं अप्रत्तानांतुस्त्रीणांत्रिपुरुषीविज्ञायतइतिवसिष्ठोक्तेः एतच्चाशौचविषयंसापिंड्यं नतुविवाहादौ तत्रपूर्वोक्तवचनैःपंचमत्वसप्तमत्वनियमादिति**मेधातिथि**प्रमुखा**दाक्षिणात्याः** वाग्दानोत्तरमेतदिति**शुद्धिविवेकः** मातृकुलविषयंकानीनकन्यकाविषयंचैतत् अन्यथा अप्रत्तानांतथास्त्रीणांसापिंड्यंसाप्तपौरुषं प्रत्तानांभर्तृसापिंड्यंप्राहदेवःप्रजापतिरिति**कौर्मेण**विरोधःस्यादिति **रत्नाकरस्मृतितत्त्वादिगौडग्रंथाः** युक्तंचैतत् अन्यथाकन्योत्पत्तौपुरुषत्रयपर्यंतमेवसूतकंस्यान्नोर्ध्वम् ।

**संबंधविवेकांत सुमंतु**—"एक आहे पिंडदान व श्राद्धक्रिया ज्यांस अशा ब्राह्मणांचे दहाव्या पुरुषापलीकडे धर्मविच्छेद ( पिंडादि निवृत्ति ) होतो. सातव्या पुरुषापलीकडे जिंदगीवरचा वारसा नष्ट होतो. तिसऱ्या पुरुषापलीकडे पिंडविच्छेद होतो. अन्यथा पिंड, शौच, क्रिया यांचा विच्छेद केल्यानें ब्रह्मघातकीतुल्य होतो" ह्या **सुमंतु**वचनाचा अर्थ सांगतो **शूलपाणि**—"ज्या पुरुषाचे पिता, पितामह, प्रपितामह, हे तिघे जीवंत आहेत त्याला, वृद्धप्रपितामहादिक तिघे श्राद्धदेवता असल्यामुळें ते वृद्धप्रपितामहादिक तिघे पिंडभागी होतात. त्यांच्या पूर्वीचे तिघे नव पुरुषपर्यंत लेपभागी होतात. आणि श्राद्धकर्ता दहावा. त्याच्यापुढें सापिंड्यनिवृत्ति होते. दहाव्या पुरुषापलीकडे हें उपलक्षण आहे. तेणेंकरून ज्याचे पिता व पितामह दोघे जीवंत आहेत त्याचें नऊ पुरुषांपर्यंत सापिंड्य. पिता जीवंत असेल त्याचें आठ पुरुषांपर्यंत सापिंड्य असें जाणावें. निपुत्रकाच्या धनग्रहणाविषयीं जवळचा वारस नसेल तर सात पुरुषांपर्यंत अधिकार आहे. निपुत्रकाची जिंदगी ग्रहण करणारा धरून त्यापासून तिसरा म्हणजे त्याचा पौत्र तेथपर्यंत निपुत्रकाचें श्राद्ध करावें. त्या पौत्राच्यापुढें म्हणजे चवथ्यास त्या निपुत्रकाचें श्राद्ध करावयास नको. अन्यथा म्हणजे धनग्रहण करून त्या निपुत्रकाचें श्राद्ध न करील तर तो ब्रह्मघातकी होतो, असा इत्यर्थ समजावा. ह्या सुमंतुवचनांत 'आतृतीयात्' म्हणजे तृतीय पुरुषापलीकडे सापिंड्य नाहीं, असें सांगितलें तें अविवाहितकन्याविषयक समजावें. कारण, "अविवाहित स्त्रियांना त्रिपुरुषसापिंड्य जाणावें" असें **वसिष्ठ**वचन आहे. हें त्रिपुरुषसापिंड्य आशौचाविषयीं समजावें. विवाहादिकांविषयीं समजूं नये. कारण, विवाहादिकांविषयीं पूर्वी सांगितलेल्या वचनांनीं मातेकडून पंचमत्व व पित्याकडून सप्तमत्व यांचा नियम केला आहे, असें **मेधातिथि**प्रमुख दाक्षिणात्य ( दक्षिणेकडील पंडित ) सांगतात. हें त्रिपुरुषसापिंड्य वाग्दानोत्तर कन्याविषयक समजावें, असें **शुद्धिविवेक** सांगतो. हें त्रिपुरुषसापिंड्य मातृकुलाविषयीं व अविवाहित स्त्रियेचे कन्येविषयीं समजावें. असें न समजतां अविवाहित कन्याविषयक समजलें तर "दान न केलेल्या स्त्रियांना सात पुरुषांपर्यंत सापिंड्य. आणि दान केलेल्या स्त्रियांना भर्त्याचें सापिंड्य आहे, असें देव प्रजापति सांगतो." ह्या **कूर्मपुराण**वचनाशीं विरोध येईल, असें **रत्नाकर—स्मृतितत्त्व** इत्यादि गौड ग्रंथकार सांगतात. हें मत युक्त आहे. अन्यथा ( अविवाहित कन्यांना त्रिपुरुषसापिंड्य मानलें तर ) कन्या उत्पन्न झाली असतां तीन पुरुषांपर्यंतच जननाशौच होईल. तीन पुरुषांपुढें ( सात पुरुषांपर्यंत ) होणार नाहीं.

सापत्नमातामहकुलेत्वाह **मिताक्षरायां शंखः** यद्येकजातावहवःपृथक्क्षेत्राःपृथक्जनाः एकपिंडाः पृथक्शौचाःपिंडस्त्वावर्ततेत्रिषु पृथक्क्षेत्राःभिन्नजातीयस्त्रीषुजाताः पृथक्जनाः सजातीयभिन्नमातृषुजाताः अत्रत्रिपुरुषंसापिंड्यमितिविज्ञानेश्वरोव्याचख्यौ **पृथ्वीचंद्रोदये सापिंड्यदीपिकायांचैवम् मद-**

---

परीक्षाच सांगितली आहे. म्हणजे वधूवरगुणापेक्षां प्रधान कुलपरीक्षाच आहे. याविषयीं वर सांगितलेल्या श्रुतीही प्रमाण आहेत. यावरून कलियुगांतही ज्यांच्या कुलांत व देशांत सापिंड्यसंकोच परंपरागत आला असेल, त्यांचा तसा विवाह झाला असतां दोष नाहीं. त्या स्त्रियेचे ठायीं भार्यात्व उत्पन्न होतें. त्यासहवर्तमान इतरांना व्यवहार करण्यास दोष नाहीं. आपल्या कुलाचारास व देशाचारास विरुद्ध असा सापिंड्यसंकोच करून विवाह केला असतां दोष होतच आहे. व तिच्या ठिकाणीं भार्यात्वही उत्पन्न होत नाहीं. म्हणूनच मातुलकन्याविवाह करणाऱ्याला हेमाद्रिप्रभृति ग्रंथांत श्राद्धाविषयीं निषेध केला आहे, तो देखील आपल्या कुलांत व देशांत तसा आचार नसून सापिंड्यसंकोच करणाऱ्याविषयीं आहे, असें जाणावें.

**नपारिजातेतु** पृथक्क्षेत्रजाःभिन्नमातृजाः पृथग्जनाःभिन्नजातीयाः एतद्विजातीयसापत्नमातृकुलविषयम् सवर्णसापत्नमातृकुलेचतुःपुरुषंसापिंड्यं पंचमींसप्तमींचैवमातृतःपितृतस्तथेति **वसिष्ठोक्तेः** सप्तमीमिति ब्राह्मणादीनांक्षत्रियादिदारोत्पन्नपितृकुलविषयंचेत्युक्तं तत्स्वकपोलकल्पितत्वाद्ग्रंथांतरविरोधाच्चनिर्मूलम् पितृपत्न्यःसर्वामातरइत्युक्त्वा**सुमंतुना**तदपत्यानिभागिनेयानीतिपृथङ्निषेधाच्च अन्यथासपिंडत्वेननिषेधात् सापत्नमातुलत्वादिनिर्देशोव्यर्थः अतएवतेन**स्मृतिकौमुद्यां**सवर्णसापत्नमातामहकुलपरत्वेनतथैवशंखवचनंव्याख्यातम् तेन**वासिष्ठं**पंचमींसप्तमीमतीत्येतिव्याख्येयम् तस्मात्प्राच्यैवव्याख्यायुक्ता **प्रयोगरत्नेभट्टः** **स्मृतितत्त्वादि**गौडग्रंथेषुचसापत्नमातामहकुलेयावदुक्तंवाचनिकमेवसापिंड्यमुक्तम् यथाह**सुमंतुः** मातृपितृसंबद्धाआसप्तमादविवाह्याभवंति आपंचमादन्येषां पितृपत्न्यःसर्वामातरस्तद्भ्रातरोमातुलास्तद्भगिन्योमातृष्वसारस्तद्दुहितरश्चभगिन्यस्तदपत्यानिभागिनेयानि अन्यथासंकरकारिणःस्युस्तथाध्यापयितुरेतदेवेति आपंचमादितिमातृकुलेत्रिगोत्रांतरितविषयंवेति**प्राच्याः मात्स्ये** समानप्रवराचैवशिष्यसंततिरेवच ब्रह्मदातुर्गुरोश्चैवसंततिःप्रतिषिध्यते तद्भगिन्योमातृष्वसारइतितुआकरेनपठितम् क्वचिद्वचनादविवाहः यथा**गृह्यपरिशिष्टे** अविरुद्धसंबंधामुपयच्छेतेत्युक्त्वाविरुद्धसंबंधःस्वयमेवोक्तः यथाभार्यास्वसुर्दुहितापितृव्यपत्नीस्वसाचेति **बौधायनः** मातुःसपत्न्याभगिनींतत्सुतांचविवर्जयेत् पितृव्यपत्न्याभगिनींतत्सुतांचविवर्जयेत् अतोमातृष्वसुःसापत्नपुत्रकन्याप्यविवाह्या सापत्नमातृकुलजातमिति**मदनपारिजातोक्तेः**रितिकेचित् ।

सापत्नमातामहाच्या कुळांत तर सांगतो **मिताक्षरेंत शंख**—"अपेकजाता बहवः पृथक्क्षेत्राः पृथग्जनाः ॥ एकपिंडाः पृथक्शौचाः पिंडस्त्वावर्तते त्रिषु" याचा अर्थ—एका ब्राह्मणादिकापासून बहुत उत्पन्न झाले ते असे—'पृथक्क्षेत्र' म्हणजे भिन्न जातींच्या स्त्रियांचे ठायीं उत्पन्न झाले, आणि 'पृथगजन' म्हणजे समानजातीच्या भिन्न भिन्न स्त्रियांचे ठायीं झाले ते सारे सपिंड होतात. पण त्यांचें आशौच वेगवेगळें आहे, तें आशौचप्रकरणीं पाहावें. आणि त्यांचें सापिंड्य त्रिपुरुषपर्यंतच आहे. अशी **विज्ञानेश्वरानें** व्याख्या केली आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत व सापिंड्यदीपिकेंत**ही असेंच आहे. **मदनपारिजातांत** तर—'पृथक्क्षेत्र' म्हणजे भिन्न मातांचे ठायीं झालेले. 'पृथकजन' म्हणजे भिन्न जातीचे होत. हें त्रिपुरुषसापिंड्य विजातीय सापत्नमातेच्या कुलविषयक आहे समान जातीच्या सापत्नमातेच्या कुळांत चार पुरुषांपर्यंत सापिंड्य आहे. कारण, "मातेकडून पांचवी आणि पित्याकडून सातवी कन्या वरावी" असें **वसिष्ठ**वचन आहे. पांचवी सांगितली ही सापत्नमातेकडून समजावी. सातवी असें सांगितलें तें ब्राह्मणादिकांना क्षत्रियादिस्त्रियांच ठायीं उत्पन्न पितृकुलविषयक समजावें, असेंही सांगितलें आहे. तें **मदनपारिजातानें** स्वकपोलकल्पित सांगितल्यामुळें व इतर ग्रंथांचा विरोध येत असल्यामुळें निर्मूल आहे. आणि "पितृपत्न्यः सर्वा मातरः" असें सांगून "तदपत्यानि भागिनेयानि" असा **सुमंतूनें** भागिनेयांचा वेगळा निषेध केलेलाही आहे. जर सापत्नमातृकुळांत चतुःपुरुषपर्यंत सापिंड्य असेल तर सापिंड्यानेंच भागिनेयांचा निषेध सिद्ध असल्यानें सापत्नमातुलत्वादि निर्देश व्यर्थ होईल. सापत्नमातृकुळांत चतुःपुरुषसापिंड्य नाहीं म्हणूनच त्यानें **स्मृतिकौमुदींत** समान जातीच्या सापत्नमातामहकुलविषयक तें शंखवचन असें म्हणून त्या वचनाची तशीच ( विज्ञानेश्वरासारखीच ) व्याख्या केली आहे. तेणेंकरून 'पंचमीं सप्तमीं चैव०' ह्या वसिष्ठवचनाची 'पांचवी' व 'सातवी' टाकून वरावी, अशी व्याख्या करावी. तस्मात् त्या शंखवचनाची पूर्वीचीच ( विज्ञानेश्वरानें केलेलीच ) व्याख्या युक्त आहे. **प्रयोगरत्नांत नारायणभट्ट**—आणि **स्मृतितत्त्वादि** गौडग्रंथांत ते ते **ग्रंथकार**—सापत्नमातामहकुळांत जितकें सांगितलें तितकें वाचनिकच ( वचनानें उक्तच ) सापिंड्य समजावें, असें सांगतात. तें वाचनिक सापिंड्य **सुमंतु** सांगतो, तें असें—"मातृसंबंधी आणि पितृसंबंधी कन्या सात पुरुषांपर्यंत अविवाह्य होतात. अन्यांच्या मतीं पांच पुरुषांपर्यंत अविवाह्य होतात. पित्याच्या साऱ्या पत्नी आपल्या माता होतात. त्यांचे भ्राते ते आपले मातुल होतात. त्यांच्या भगिनी त्या आपल्या मावशी होतात. त्यांच्या ( मातुलांच्या व मावशींच्या ) कन्या त्या आपल्या भगिनी होतात. व त्या भगिनींचीं मुलें तीं आपलीं भागिनेय होतात. असें मानलें नाहीं तर विवाहादि संबंध करून संकरकारी होतील. तसेंच वेदादिक पढविणारा जो गुरु त्याचें हेंच सापिंड्य समजावें." या **सुमंतु**वचनांत 'आपंचमात्' असें पद आहे त्याचा अर्थ—अन्याच्या मतीं पांचपर्यंत अविवाह्य होतात, पुढें विवाह्य आहेत. अथवा मातृकुलसंबंधी तीन गोत्रांतून चवथ्या गोत्रांत उत्पन्न झालेली कन्या पांचांच्या पुढची करावी, अशाविषयीं 'आपंचमात्' हें पद आहे, असें **प्राच्य** सांगतात. **मात्स्यांत**—"सप्रवर, शिष्यांची संतति, आणि वेदाध्ययन सांगणाऱ्या गुरूची संतति

१ हें सुमंतूचें वचन जवळच पुढें येणार आहे, तेथें त्याचा अर्थ पाहावा.

विवाहाविषयीं निषिद्ध केली आहे." ह्या वरील सुमंतुवचनांत 'तद्भगिन्यो मातृष्वसारः' हें वाक्य आकरांत (हेमाद्र्यादिकांत) पठित नाहीं. क्वचित्स्थलीं ( सापिंड्य नसलें तरी ) वचनावरून अविवाह ( विवाहनिषेध ) आहे. जसें **गृह्यपरिशिष्टांत**— "जीचा विरुद्ध संबंध होईल तिला वरूं नये." असें सांगून विरुद्ध संबंध कसा तो स्वतःच परिशिष्टकारांनीं सांगितला आहे. जशी भार्येच्या बहिणीची कन्या. आणि चुलत्याच्या पत्नीची वहीण. पहिल्या उदाहरणांत कनिष्ठपणाचें ( कन्येचें ) नातें येतें. आणि दुसऱ्या उदाहरणांत चुलत्याची मेहुणी म्हणजे वरिष्ठ नातें येतें. **बौधायन**—"मातेच्या सवतीची भगिनी आणि तिची कन्या वर्ज्य करावी. पितृव्यपत्नीची भगिनी आणि तिची कन्या वर्ज्य करावी" यावरून मावशीच्या सापत्न पुत्रांची कन्या देखील अविवाह्य आहे. कारण, "सापत्नमातेच्या कुलांतील कन्या वर्ज्य करावी" असें **मदनपारिजातांत** उक्त आहे, असें **केचित्** सांगतात.

**केचित्तु**ज्येष्ठोभ्रातापितुःसमइति**मनूक्ते**स्तत्पत्न्याःमातृत्वात्तत्पितुर्मातामहत्वात् ज्येष्ठभ्रातृपत्नीभगिनीनविवाह्या तथा उत्पादकब्रह्मदात्रोर्गरीयान्ब्रह्मदःपितेति**मनूक्ते**र्गुरुणात्रिपुरुषंसापिंड्यंसखापिनिर्वाप्यः अतस्तेषांकन्यानोद्वाह्याः गायत्र्याउपदेष्टुश्चकन्यांनैवोद्वहेद्द्विजः गुरोश्चकन्यांशिष्योवातत्संतत्यापिनेष्यते पुरुषत्रयपर्यंतंभ्रात्रादेर्नैतदिष्यते वाक्संबंधकृतानांतुस्नेहसंबंधभागिनां विवाहोत्रनकर्तव्योलोकगर्हाप्रसज्यतइतिवचनाच्चेत्याहुः तत्रमूलंचिंत्यम् ।

**केचित्** विद्वान् तर—"ज्येष्ठ भ्राता पित्यासमान आहे" ह्या **मनु**वचनावरून त्या ज्येष्ठ भ्रात्याची पत्नी माता झाल्यामुळें तिचा पिता मातामह असल्यामुळें ज्येष्ठ भ्रात्याच्या पत्नीची भगिनी विवाहाला योग्य नाहीं. तसेंच "जनक पिता आणि ब्रह्म ( वेद ) दाता पिता ( गुरु ) ह्या दोघांमध्यें ब्रह्मदाता पिता श्रेष्ठ आहे" ह्या **मनु**वचनावरून गुरुसहवर्तमान त्रिपुरुषसापिंड्य आहे. आणि सख्यालाही पिंडनिर्वपण असल्यामुळें निर्वाप्यलक्षण सापिंड्य आहे, म्हणून त्यांच्या कन्या विवाहाला योग्य नाहींत. "गायत्रीचा उपदेश करणाराची कन्या द्विजानें वरूं नये. गुरूची कन्या शिष्यानें वरूं नये. गुरुच्या संततीबरोबरही विवाह इष्ट नाहीं. तीन पुरुषांपर्यंत भ्राता इत्यादिकांना गुरुसंततीशीं संबंध इष्ट नाहीं. वाक्संबंध झालेले व स्नेहसंबंधी यांचा विवाहसंबंध करूं नये. कारण, केला असतां लोकांत निंदा होते" असें वचनही आहे, असें सांगतात. या केचिन्मताविषयीं मूल चिंत्य ( अनुपलब्ध ) आहे.

दत्तकविषयेतूच्यते तत्र**गौतमः** ऊर्ध्वंसप्तमात्पितृबंधुभ्योबीजिनश्चमातृबंधुभ्यःपंचमादिति बंधुग्रहणाद्दत्तकमात्रपरमिदम् किंतुसंतानेपिएतत्क्षेत्रजादिसर्वद्व्यामुष्यायणपरमिति**हरदत्तः** अत्र**स्मृतिचंद्रिका** नियोगात्प्रयउत्पादयतितस्माद्बीजिनोप्यूर्ध्वंसप्तमादित्यर्थइति दत्तकस्यजनकविषयमेतदिति**सापिंड्यमीमांसायाम्** तेनदत्तकस्यजनककुलेसाप्तपौरुषंजननीकुलेपांचपौरुषंसापिंड्यं दत्तक्रीतादिपुत्राणांबीजवपुःसपिंडता सप्तमीपंचमीचैवगोत्रित्वंपालकस्यचेति**बृहन्मनूक्तेः** बीजिनश्चेति**गौतमोक्तेश्च** पालकपितृकुलेतुपंचपुरुषं पालकमातृकुलेत्रिपुरुषं तथाचा**परार्के पैठीनसिः** त्रीन्मातृतःपंचपितृतःपुरुषानतीत्योद्वहेदिति एतत्सएवव्याचख्यौदत्तकादीन्पुत्रान्पितृपक्षतोनिवृत्तपिंडगोत्रार्षेयान्प्रत्येतदुच्यतेपंचपितृतइतिनान्यान्प्रतीति यत्तु**वृद्धगौतमः** स्वगोत्रेपुकृतायेस्युर्दत्तक्रीतादयःसुताः विधिनागोत्रमायांतिनसापिंड्यंविधीयते यच्च**वसिष्ठः** अन्यशाखोद्भवोदत्तःपुत्रश्चैवोपनायितः स्वगोत्रेणस्वशाखोक्तविधिनास्यात्स्वशाखभागिति यच्च**नारदः** धर्मार्थंवर्धिताःपुत्रास्तत्तद्गोत्रेणपुत्रवत् अंशपिंडविभागित्वंतेषुकेवलमीरितमिति तत्पालककुलेसाप्तपौरुषसापिंड्यंनेत्येवंपरं नतुसर्वथासापिंड्यनिषेधपरमिति**सापिंड्यमीमांसायाम् मदनपारिजाता**दपिदत्तकानुप्रवेशेऽल्पंसापिंड्यंप्रतिभाति तथाहि तेनत्रीनतीत्येत्युदाहृत्ययस्यमातादत्तपुत्रीप्रतिग्रहीत्रापुत्रीकृतातस्याःप्रतिग्रहीतृकुलेत्रीनतीत्येति पंचपितृतइतियस्यदत्तपुत्रःपितातस्यदत्तस्यजनककुलंतद्विषयमित्युक्तम् वस्तुतस्तुपूर्ववचसांमहानिबंधेषुक्वाप्यनुपलंभाद**परार्कादि**लिखनाभावात् पूर्वोक्तव्यवस्थायाश्चप्रातिभज्ञानतुल्यत्वाच्चैरेतल्लिखितंतेषामेवशोभते ।

दत्तकाविषयीं तर सापिंड्य सांगतो—**गौतम**—"पितृबंधु व बीजी ( जनक ) यांच्याकडून सातव्या पुरुषापलीकडे सापिंड्य निवृत्त होतें. मातृबंधूकडून पांचव्या पुरुषापलीकडे सापिंड्य निवृत्त होतें." ह्या वचनांत 'बंधु' ह्या पदाचें ग्रहण केल्यावरून हें वचन केवळ दत्तकाविषयींच समजूं नये; तर त्याच्या संततीविषयींही समजावें. द्व्यामुष्यायण ( दोन पित्यांचे

पुत्र ) जे क्षेत्रज, दत्तक इत्यादिक पुत्र त्या सर्वांविषयीं सापिंड्यबोधक हें वचन आहे, असें हरदत्त सांगतो. येथें 'ऊर्ध्व सप्तमात्०' ह्या गौतमवचनाचा अर्थ **स्मृतिचंद्रिका**कार सांगतो कीं, परस्त्रियेचे ठायीं नियोगानें जो उत्पन्न करितो त्या बीजी ( जनक ) पित्याकडे देखील सातव्या पुरुषापलीकडे विवाहयोग्यत्व आहे, असा अर्थ समजावा. दत्तकाच्या जनकविषयक हें गौतमवचन आहे, असें **सापिंड्यमीमांसेंत** सांगितलें आहे. तेणेंकरून दत्तकाच्या जनककुलांत सात पुरुषांपर्यंत सापिंड्य. आणि जननीकुलांत पांच पुरुषांपर्यंत सापिंड्य. कारण, "दत्त, क्रीत, इत्यादि पुत्रांना जनक पित्याचें सात पुरुषांपर्यंत सापिंड्य. जननी मातेचें पांच पुरुषांपर्यंत सापिंड्य. आणि गोत्रित्व पालक पित्याचेंच आहे" असें **बृहन्मनुवचन** आहे. आणि "बीजी ( जनक ) पित्याच्या कुलांत सात पुरुषांपलीकडे सापिंड्य निवृत्त होतें" असें **गौतमाचेंही** वचन आहे. पालक पित्याच्या कुलांत तर पांच पुरुषपर्यंत आणि पालक मातृकुलांत त्रिपुरुषपर्यंत सापिंड्य समजावें. तसेंच सांगतो **अपरार्कांत पैठीनसि**—"मातेकडून तीन आणि पित्याकडून पांच पुरुष सोडून विवाह करावा" ह्या पैठीनसिवचनाची व्याख्या त्याच अपरार्कानें केली आहे, ती अशी—पितृपक्षाकडून सापिंड्य सगोत्र सप्रवररहित कुलांत जे दत्तकादिक पुत्र झाले असतील त्यांना पितृकुलांत पांच पुरुष सापिंड्य, असें सांगितलें आहे. इतरांना हें सांगितलें नाहीं. अर्थात् जनकपितृकुलसंबंधी सात पुरुषपर्यंत आहेत. आतां जें **वृद्धगौतम**—"परगोत्रांतील दत्तक—क्रीत इत्यादिक पुत्र जे स्वगोत्रांत केले असतील ते दत्तकादि विधीनें गोत्र पावतात, त्यांना सापिंड्य येत नाहीं." आणि जें **वसिष्ठ**—"अन्य शाखेंत उत्पन्न झालेला पुत्र दत्तक घेऊन त्याचें स्वगोत्रानें स्वशाखोक्त विधीकरून उपनयन केलें असतां स्वशाखाभागी होतो." आणि जें **नारद**—"जे धर्मार्थ त्या त्या गोत्रानें वाढविलेले पुत्र ते जिंदगीचे वारस व पिंडविभागी केवळ होतात. अर्थात् सपिंड होत नाहींत." ह्या वचनावरून पालककुलांत सापिंड्य नाहीं असें दिसतें, पण तीं वचनें सर्वथा सापिंड्यनिषेधक नाहींत, तर पालककुलांत साप्तपुरुष सापिंड्य नाहीं, इतक्याच अर्थाचीं बोधक आहेत; असें **सापिंड्यमीमांसेंत** सांगितलें आहे. **मदनपारिजाता**वरूनही दत्तकाचा संबंध असतां अल्प सापिंड्य भासतें. तेंच उपपादन करितो—त्या ग्रंथकारानें—"मातेकडून तीन पुरुष टाकून कन्या वरावी" हें उदाहरण देऊन ज्याची माता दत्तकपुत्री घेणारानें पुत्री केली असेल तिचे तीन पुरुष टाकून कन्या प्रतिग्रहीत्याच्या कुलांत वरावी, असा अर्थ होय. 'पंच पितृतः पुरुषान् अतीत्योद्वहेत्' हें वचन—ज्याचा पिता दत्तक असेल त्या दत्तकाचें जें जनककुल तद्विषयक आहे, असें सांगितलें आहे. वास्तविक म्हटलें तर पूर्वी सांगितलेलीं वृद्धगौतमादि वचनें महानिबंधांत ( हेमाद्र्यादिकांत ) कोठेंही अनुपलब्ध असल्यामुळें व **अपरार्का**दिकांनीं न लिहिल्यामुळें पूर्वोक्त जी ( पालककुलांत साप्तपुरुष सापिंड्य नाहीं इतकाच अर्थ इत्यादि ) व्यवस्था ती प्रातिभ ज्ञान ( बुद्धितरंग ज्ञान )-तुल्य असल्याकारणानें ज्यांनीं हें असें लिहिलें त्यांनाच तें शोभतें.

ममतुपालककुलेएकपिंडदानक्रियान्वयित्वरूपंसाप्तपौरुषमेवसापिंड्यं बीजिनश्चेति**गौतमोक्ते**र्जनककुलेपितावदेव त्रीन्मातृतइत्यादितुसवर्णसापत्नमातृकुलपरं यद्येकजाताबहवइति**शांखैक**वाक्यत्वादितियुक्तंप्रतिभाति अतएवास्यद्व्यामुष्यायणत्वं**हेमाद्रिप्रवरमंजरीवृत्तिकृन्नाराय**णादिभिरुक्तम् **भट्टसोमेश्वरेणा**पिपृथायाःकुंतिभोजस्यपालककन्यात्वेपि ऊर्ध्वसप्तमात्पितृबंधुभ्योबीजिनश्चेति**गौतमोक्ते**र्दत्रिमायाःपृथायाःजनकस्यशूरसेनस्यकुलेपिसाप्तपौरुषंपालककुलेपितावदेवसापिंड्यमुक्त**मपिवाकारणाग्रहणे**इत्यत्र **सापिंड्यदीपिकायां**तुदत्तक्रीतादीनांजनकगोत्रेणोपनयनेकृतेजनककुलेसाप्तपौरुषंसापिंड्यम् पालकमातापितृकुलेत्रिपुरुषं पिंडनिर्वापान्निर्वाप्यलक्षणंत्रिपुरुषंसापिंड्यम् पालकगोत्रेणोपनयनेतत्कुलेसाप्तपौरुषमित्युक्तम् तन्न चूडोपायनसंस्कारानिजगोत्रेणवैकृताः दत्ताद्यास्तनयास्तेस्युरन्यथादासउच्यतइति**कालिकापुराणा**दुपनयनोत्तरंदत्तकनिषेधात् त्रिपुरुषमित्यत्रापिमूलंमृग्यमित्यलंबहुना ।

मला तर—पालककुलांत एक पिंडदान क्रिया संबंधरूप सात पुरुषपर्यंतच सापिंड्य आहे. 'बीजिनश्च' ह्या गौतमाच्या उक्तीवरून जनक पित्याच्या कुलांतही तितकेंच ( सात पुरुषपर्यंतच ) सापिंड्य आहे. 'त्रीन्मातृतः०' इत्यादि पैठीनसिवचन तर सवर्ण ( सजातीय ) जी सापत्न माता तिच्या कुलाविषयीं आहे. कारण, असें म्हटलें असतां "यद्येकजाता बहवः पृथक्क्षेत्राः पृथग्जनाः ॥ एकपिंडाः पृथक्शौचाः पिंडस्त्वावर्तते त्रिषु" ह्या शंखवचनांत 'पृथक्क्षेत्र' म्हणजे सजातीय भिन्न मातांचे ठायीं झालेले, त्यांचें त्रिपुरुष सापिंड्य, असें सांगितलें आहे, त्याच्याशीं एकवाक्यता होते; हें युक्त आहे, असें भासतें. म्हणूनच **हेमाद्रि-प्रवरमंजरीकार—वृत्तिकार नारायण** इत्यादिकांनीं हा दत्तकादिक द्व्यामुष्यायण ( दोन पित्यांचा पुत्र ) आहे असें सांगितलें आहे. **भट्टसोमेश्वरानें** देखील—'अपिवाकारणाग्रहणे०' ह्या जैमिनीच्या सूत्रावर—पृथा ( कुंती ) ही कुंतिभोजराजाची पालककन्या असली तरी 'ऊर्ध्व सप्तमात् पितृबंधुभ्यो बीजिनश्च' ह्या गौतमाच्या उक्तीवरून त्या दत्तक कुंतीचा जनकपिता जो शूरसेन त्याच्या कुलांत साप्तपौरुष सापिंड्य, आणि पालक कुलांतही तितकेंच ( साप्तपौरुष )

सापिंड्य असें सांगितलें आहे. **सापिंड्यदीपिकेंत तर**—दत्त—क्रीत इत्यादिकांचें जनक गोत्रानें उपनयन केलें असतां जनककुलांत साप्तपौरुष सापिंड्य. आणि पालक मातापितृकुलांत पिंडनिर्वपण असल्यामुळें निर्वाप्यरूपी त्रिपुरुष सापिंड्य आहे. दत्तकादिकांचें पालक गोत्रानें उपनयन केलें असेल तर पालककुलांत साप्तपौरुष सापिंड्य आहे, असें सांगितलें आहे. तें बरोबर नाहीं. कारण, "चौल, उपनयन हे संस्कार आपल्या ( पालकाच्या ) गोत्रानें ज्यांचे केले असतील ते दत्तकादिक पुत्र होतात. अन्यथा ( पालकगोत्रानें संस्कार झाले नसतील तर ) ते दास म्हटले आहेत" ह्या **कालिका**पुराणवचनावरून उपनयनोत्तर दत्तकाचा निषेध आहे. आणि पालककुलांत त्रिपुरुष सापिंड्य, असें जें सांगितलें त्याविषयीं देखील मूल शोधावें. आतां बहुत सांगणें पुरे करितों.

मातापितृद्वारकसापिंड्यवतीनांकन्यानामियंसंख्या**रामवाजपेयिनोक्ता** उद्वोढुःपितरौपितुश्चपितरौतज्जन्मकृद्दंपतीद्वंद्वंतस्यचतुष्कमष्टचततोप्यस्यक्रमात्षोडश वंशारंभकदंपतीप्रमितिरित्यासप्तकक्षंरदाएकैकान्वयकन्यकाःपितृकुलेत्वासप्तकक्षंत्रुवे यद्यप्येकस्यबहवःसुताःस्युस्तदपीहतु संबंधसाम्यादेकैवगणितेत्यवधार्यताम् एकस्मान्मिथुनात्सुतोथदुहिताद्वंद्वद्वयंतद्द्वयात्तस्माद्द्वंद्वचतुष्कमष्टचततनोतःपोडशाऽतोरदाः यावत्सप्तमकक्षमभ्रिऋतवःकन्याइहैकान्वयेतादंतैर्गुणितारसैकखदृशोवंशेसपिंडाःपितुः मातुर्जन्मददंपतीचमिथुनद्वंद्वंतयोःसागरास्तस्याःपंचमकक्षमष्टमितिरित्येकान्वयःपुंसुते द्वंद्वाद्द्वंद्वयुगंभतोऽध्ययइतोऽष्टौपंचकक्षंशरक्ष्मोण्यः सप्तगुणाःशराभ्रविधवोमातुःसपिंडाःकुले कुलद्वयस्यकन्यकायुतामिथःसपिंडकाः हिमांशुदृग्धरादृशोविवाहकर्मवर्जिताइति एतच्चसर्ववर्णसाधारणं सर्वत्रसापिंड्यसद्भावादिति**विज्ञानेश्वरोक्तेः** पंचमात्सप्तमादूर्ध्वंमातृतःपितृतःक्रमात् सपिंडतानिवर्ततेसर्ववर्णेष्वयंविधिरिति**हरनाथधृतदेवल**वचनाच्च **संबंधतत्त्वे सुमंतुः** पितृष्वसृसुतांमातृष्वसृसुतांमातुलसुतांमातृसगोत्रांसमानार्षेयींविवाह्यचांद्रायणंचरेत्परित्यज्यैनांमातृवद्बिभृयादितिदिक् ।

**रामवाजपेयीनें**, मातृ-पितृद्वारक सापिंड्यवती कन्यांची संख्या सांगितली आहे. ती अशी—"उद्वोढा (वर) त्याचे मातापितर दोन. त्यांपैकीं पित्याचें जनकदांपत्य १, त्यांचे जनक दंपती २, त्यांचे जनकदंपती ४, त्यांचे जनकदंपती ८, त्यांचे जनकदंपती १६, आणि त्यांचे जनकदंपती ३२ याप्रमाणें पितृकुलांत सात पुरुषांपर्यंत कन्या होतात, त्या सांगतों. जरी एका पुरुषाचे बहुत पुत्र असतात, तरी त्या बहुतांचा संबंध सारखा असल्यामुळें एक एकच धरून येथें गणना करितो, असें समजावें. ह्या बत्तीस दांपत्यांपैकीं एका दांपत्यापासून एक पुत्र व एक कन्या अशीं दोन झालीं. त्या दोघांपासून ४ म्हणजे दोन द्वंद्वें झालीं. त्या दोन द्वंद्वांपासून ४ द्वंद्वें झालीं. त्या चार द्वंद्वांपासून ८ द्वंद्वें झालीं. त्या आठ द्वंद्वांपासून १६ द्वंद्वें. व त्या सोळा द्वंद्वांपासून ३२ द्वंद्वें झालीं. ह्यांची गणना केली असतां वर सांगितलेल्या बत्तीस दांपत्यांपैकीं एका दांपत्याच्या कन्या त्या मूळ दांपत्यास धरून सातव्या पिढीपर्यंत ६३ होतात. त्यांस बत्तीसांनीं गुणिलें असतां २०१६ इतक्या कन्या पितृवंशांत सपिंड होतात. हा प्रकार पित्याकडे समजावा. आतां मातेचें उत्पादक दांपत्य १, त्या दांपत्यांचीं जनक दांपत्यें २, त्या दोन दांपत्यांचीं जनकदांपत्यें ४, त्या चार दांपत्यांचीं जनकदांपत्यें ८, याप्रमाणें मातृकुलांत पांच पुरुषांपर्यंत कन्या होतात, त्या सांगतो—त्या आठ दांपत्यांपैकीं एका दांपत्यापासून एक पुत्र व एक कन्या अशीं दोन झालीं. त्या दोघांपासून २ द्वंद्वें झालीं. त्यांपासून ४ द्वंद्वें आणि त्यांपासून ८ द्वंद्वें झालीं. मिळून माता धरून पांच पिढीपर्यंत एका मूळ दांपत्याच्या ह्या सार्‍या कन्यांची गणना केली असतां १५ कन्या होतात. त्यांस सातांनीं गुणिलें असतां १०५ इतक्या कन्या मातेच्या कुलांत सपिंड होतात. पितृकुलांतील व मातृकुलांतील सपिंड कन्या एकत्र मिळविल्या असतां २१२१ इतक्या होतात. ह्या विवाहकर्माविषयीं वर्ज्य आहेत. हें सापिंड्य ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, ह्या सर्व वर्णांना साधारण सांगितलें आहे. कारण, 'सर्वांचे ठायीं सापिंड्य आहे' असें **विज्ञानेश्वराचें** सांगणें आहे. आणि "मातेकडून पांचव्या पिढीपुढें व पित्याकडून सातव्या पिढीपुढें सापिंड्य निवृत्त होतें; हा प्रकार सार्‍या वर्णांविषयीं समजावा" असें **हरनाथानें** धरलेलें **देवल**वचनही आहे. **संबंधतत्त्वांत सुमंतु**—"आत्याची कन्या, मावशीची कन्या, मातुलाची कन्या, मातृगोत्रांतील कन्या, सप्रवर कन्या, यांच्याशीं विवाह केला असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें. आणि तिचा भोगाविषयीं त्याग करून तिचें मातेप्रमाणें पालन करावें." याप्रमाणें ही दिशा दाखविली आहे.

**ऋषेरिदमार्षंप्रवरः गोत्रंप्रसिद्धं समानेआर्षगोत्रेयस्यतस्माज्जातायानभवतिताम् ।**

विवाहप्रकरणाच्या आरंभीं दिलेल्या याज्ञवल्क्यवचनांत सापिंड्यरहित कन्या वरावी, असें आहे, त्या सापिंड्याचा निर्णय

सांगितला. आतां 'असमानार्षगोत्रजां' या पदाचा अर्थ—ऋषीचें हें तें आर्ष म्हणजे प्रवर होय. समान ( एक ) आहे आर्ष ( प्रवर ) व गोत्र ज्याचें त्यापासून झालेली नसेल ती कन्या वरावी, असा आहे.

अथसंक्षेपेणगोत्रप्रवरनिर्णयः तौचभिन्नौनिषेधेनिमित्तम् सगोत्रायदुहितरंनप्रयच्छेदित्याप- स्तंबोक्तेः असमानप्रवरैर्विवाह इतिगौतमोक्तेश्च तत्रगोत्रलक्षणमाहप्रवरमंजर्यां बौधायनः विश्वामित्रोजमदग्निर्भरद्वाजोथगौतमः अत्रिर्वसिष्ठःकश्यपइत्येतेसप्तऋषयः सप्तानामृषीणामगस्त्याष्टमानांय- दपत्यंतद्गोत्रमिति यद्यपिकेवलभार्गवेष्वार्ष्टिषेणादिषुकेवलांगिरसेषुहारितादिषुचनैतत् भृग्वंगिरसोरुक्तेष्वनं- तर्गतेः तथाप्यत्रेष्टापत्तिरेवेतिकेचित् अतएवस्मृत्यर्थसारे प्रवरैक्यादेवात्राविवाहउक्तः यद्यपिवसिष्ठा- दीनांनगोत्रत्वंयुक्तं तेषांसप्तर्षित्वेनतदपत्यत्वाभावात् तथापितत्पूर्वभाविवसिष्ठाद्यपत्यत्वेनगोत्रत्वंयुक्तम् अत- एवपूर्वेषांपरेषांचैतद्गोत्रम् अत्रविशेषोऽस्मत्कृतप्रवरदर्पणेज्ञेयः ।

## आतां संक्षेपानें गोत्रप्रवरनिर्णय सांगतो—

गोत्र आणि प्रवर हे विवाहाच्या निषेधाविषयीं वेगवेगळे कारण आहेत. म्हणजे वधूवरांचें गोत्र एक असलें तर विवाह होत नाहीं. आणि गोत्र भिन्न असून प्रवर एक असला तरी विवाह होत नाहीं. कारण, "सगोत्राला कन्या देऊं नये" असें आपस्तंबाचें वचन आहे. आणि "प्रवर समान नसेल त्यांच्याशीं विवाह होतो" असें गौतमाचें वचनही आहे. आतां गोत्र म्हणजे काय ? अशी आकांक्षा झाली असतां त्याचें लक्षण सांगतो प्रवरमंजरींत बौधायन—"विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गौतम, अत्रि, वसिष्ठ, कश्यप, हे सात ऋषि आणि आठवा अगस्त्यऋषि यांचें जें अपत्य म्हणजे पुत्र, पौत्र वगैरे तें गोत्र होय." येथेंच पुढें वत्स, बिद, आर्ष्टिषेण, यास्क, मित्रयु, वैन्य, आणि शुनक हे सात गण भृगुकुलांतील सांगितले आहेत त्यांत पहिले वत्स, बिद, हे दोन गण भृगुकुलांतील असून जमदग्नीच्या वंशांतील असल्यामुळें त्यांना गोत्रत्व आहे. आतां जरी आर्ष्टिषेण इत्यादिक जे पांच गण ते केवळ भृगुवंशांतील असल्यामुळें त्यांना हें वरील गोत्रलक्षण येत नाहीं. याचप्रमाणें आंगिरसाच्या वंशांतील गौतम, भरद्वाज आणि केवलांगिरस असे तीन मुख्य भेद पुढें सांगावयाचे आहेत, त्यांपैकीं केवल आंगिरस जे हारीतादिक त्यांना देखील हें वरील बौधायनोक्त गोत्रलक्षण येत नाहीं. कारण, भृगु आणि अंगिरा हे त्या बौधायनवचनांत नाहींत. तात्पर्य—आर्ष्टिषेण इत्यादिक आणि हारीतादिक यांना गोत्रत्व नाहीं, असें झालें. तथापि तें इष्ट आहे, असें कितीएक विद्वान् सांगतात. त्यांना गोत्रत्व नाहीं म्हणूनच स्मृत्यर्थसारांत त्यांचा एक प्रवर असल्यामुळेंच त्यांचा परस्पर विवाह होत नाहीं, असें सांगितलें आहे. ते सगोत्र आहेत म्हणून विवाह होत नाहीं, असें सांगितलें नाहीं. आतां जरी वसिष्ठ, कश्यप इत्यादिक हे वर सांगितलेल्या सात ऋषींमध्यें असल्यामुळें ते त्यांचे अपत्य नसल्याकारणानें त्यांना गोत्रत्व असणें युक्त होत नाहीं. म्हणजे गोत्रांमध्यें त्यांची गणना पुढें आहे ती अयुक्त होते, असें आलें, तरी ती अयुक्त होत नाहीं. कारण, त्यांच्या पूर्वीं झालेल्या वसिष्ठादिकांचे हे वसिष्ठादिक अपत्य होत असल्यामुळें त्या वसिष्ठादिकांना गोत्रत्व म्हटलें तें युक्तच आहे. म्हणूनच त्या ऋषींच्या पूर्वींचे जे त्यांचें आणि पुढच्यांचेंही हें गोत्र आहे. या विषयाचा विशेष निर्णय आम्हीं ( कमलाकरभट्टानें ) केलेल्या प्रवरदर्पणांत पाहावा.

प्रवरास्तुप्रवरणानिप्रवराः कल्पकाराहिवासिष्ठेतिहोतावसिष्ठवदित्यध्वर्युरित्यादिनायेषांप्रवरणमामनं- तितेप्रवराः तच्चवरणंयद्यपिगोत्रभूतस्यापिक्वचिद्दृश्यते तथापिपूर्ववदृषिभेदोद्रष्टव्यः अन्यथा तेषांत्र्यार्षेये- एकार्षेइत्यादिनिर्देशानुपपत्तेः अन्येतुतद्गोत्राणांत्र्यार्षेयइतिभेदमाहुरितिदिक् तत्त्वंतुगोत्रभूतस्यपितृपितामह- प्रपितामहाएवप्रवराः पितैवाग्रेथपुत्रोथपौत्रइतिशतपथश्रुतेः परंपरंप्रथममित्याश्वलायनोक्तेश्च अत्र- विशेषमाहबौधायनः एकएवऋषिर्यावत्प्रवरेष्वनुवर्तते तावत्समानगोत्रत्वमन्यत्रभृग्वंगिरसांगणादिति स्मृत्यर्थसारे ध्रियमाणतयावापिसत्तयावानुवर्तनम् एकस्यदृश्यतेयत्रतद्गोत्रंतस्यकथ्यते भृग्वंगिरोगणेषुतु- माधवीयेस्मृत्यंतरे पंचार्षेत्रिषुसामान्यादविवाहस्त्रिषुद्वयोः भृग्वंगिरोगणेष्वेवशेषेष्वेकोपिवारयेत् शेष- गोत्रेषुएकोपिसमानःप्रवरोविवाहंवारयेदित्यर्थः बौधायनोपि भृग्वंगिरसावधिकृत्यत्र्यार्षेयसन्निपातेऽ- विवाहस्त्र्यार्षेयाणांत्र्यार्षेयसन्निपातेऽविवाहःपंचार्षेयाणामिति भृग्वंगिरोगणेष्वपिजमदग्निगौतमभरद्वाजेष्वे- कप्रवरसाम्येसर्वेषामप्यसाम्येवासगोत्रत्वादेवाविवाहइतिदिक् ।

## प्रवर म्हणजे काय तें सांगतो—

प्रवर म्हणजे वरण होय. **कल्पसूत्रकारांनीं** 'वासिष्ठेति होता वसिष्ठवदित्यध्वर्युः' इत्यादि वाक्यानें ज्यांचा उच्चार करून यज्ञामध्यें ऋत्विजांचें वरण सांगितलें आहे ते प्रवर होत. आतां जरी तें वरण क्वचित् ठिकाणीं गोत्राचाही उच्चार करून सांगितलेलें दृष्टीस पडतें तरी त्या ठिकाणीं तो गोत्रऋषि वेगळा आहे आणि प्रवरऋषि वेगळा आहे, असें समजावें. जसें—वर सांगितलें आहे कीं, पूर्वीच्या वसिष्ठादिकांचे हे वसिष्ठादिक अपत्य होत, त्याप्रमाणें इतर ऋषीचे हे प्रवर आहेत, असें समजावें. अन्यथा म्हणजे ऋषींचे प्रवर मानिले नाहींत तर "त्या ऋषींचे तीन[1] प्रवर, एक प्रवर" इत्यादि जें सांगितलें त्याची संगति होणार नाहीं. इतर विद्वान् तर 'त्या गोत्रांचे त्रिप्रवर असतां' असा गोत्रऋषि व प्रवरऋषि यांचा भेद सांगतात. ही दिशा दाखविली आहे. याचा खरा प्रकार म्हटला तर असा आहे कीं, गोत्ररूप ऋषीचे पिता, पितामह, प्रपितामह हेच प्रवर होत. कारण, प्रवर वरण्याच्या वेळीं "प्रथम पिताच येतो, नंतर पुत्र, तदनंतर पौत्र येतो" अशी **शतपथश्रुति** आहे. आणि "पलीकडचा पलीकडचा तो प्रथम येतो" असें **आश्वलायना**च्या सूत्रांतही सांगितलें आहे. गोत्रप्रवरांविषयीं विशेष सांगतो **बौधायन**—"प्रवर सांगत असतां त्या प्रवरांमध्यें जोंपर्यंत एकच ऋषि चाललेला आहे तोंपर्यंत त्या साऱ्या प्रवरांचें एक गोत्र समजावें. हा प्रकार केवळ भृगुगण ( आर्ष्टिषेणादिक ) आणि केवलांगिरसगण ( हरितादिक ) हे वगळून समजावा." **स्मृत्यर्थसारांत**—"ज्या गणामध्यें वरण होत असल्यामुळें अथवा आपल्या सत्तेच्या योगानें एकाची अनुवृत्ति ( संबंध, विद्यमानता ) दृष्टीस पडते त्या गणाचें तें गोत्र म्हटलें आहे." भृगुगण आणि आंगिरसगण यांविषयीं तर सांगतो **माधवीयांत स्मृत्यंतरांत**—"भृगुगण आणि आंगिरसगण यांचे ठायीं पंचप्रवरी वधूवरांचे तीन प्रवर समान असतां विवाह होत नाहीं. आणि त्रिप्रवरी वधूवरांचे दोन प्रवर समान असतां विवाह होत नाहीं. भृगु व आंगिरस यांवांचून इतर गोत्रांचे ठायीं एकही समान प्रवर असतां विवाह होत नाहीं." **बौधायन**ही—भृगुगण व आंगिरसगण यांचा उद्देश करून सांगतो—"त्रिप्रवऱ्यांचे दोन प्रवर समान असतां विवाह होत नाहीं. आणि पंचप्रवऱ्यांचे तीन प्रवर समान असतां विवाह होत नाहीं." भृगुगणांतील जामदग्न्य ( वत्स, बिद ), आणि आंगिरस गणांतील गौतम आणि भरद्वाज यांचे ठायीं एक प्रवर समान असला तरी अथवा सारे प्रवर समान नसले तरी त्यांना सगोत्रत्व असल्यामुळेंच त्यांचा विवाह होत नाहीं. ही दिशा दाखविली आहे.

**अथगोत्राणिप्रवराश्चोच्यंते** तत्र**बौधायनः** गोत्राणांतुसहस्राणिप्रयुतान्यर्बुदानिच ऊनपंचाशद्देवैषांप्रवराऋषिदर्शनात् तत्र**सप्तभृगवः** वत्साबिदाआर्ष्टिषेणायस्कामित्रयुवोवैन्याःशुनकाइति वत्सानां भार्गवच्यावनाप्रवानौर्वजामदग्न्येति भार्गवौर्वजामदग्न्येतिवा भार्गवच्यावनाप्रवानेतिवा बिदानांपंच भार्गवच्यावनाप्रवानौर्वबैदेति भार्गवौर्वजामदग्न्येतिवा एतौद्वौजामदग्न्यसंज्ञौ आर्ष्टिषेणानां भार्गवच्यावनाप्रवानार्ष्टिषेणानूपेति भार्गवार्ष्टिषेणानूपेतिवा एषांत्रयाणांपरस्परमविवाहः वात्स्यानाम् भार्गवच्यावनाप्रवानेति वत्सपुरोधसयोःपंच भार्गवच्यावनाप्रवानवात्स्यपौरोधसेति बैजमथितयोःपंच भार्गवच्यावनाप्रवानबैजमथितेति **एतेत्रयःक्वचित् एषा**मपिपूर्वैरविवाहः अत्रतत्तद्गुणस्थाऋषयोऽन्यश्चविशेषो**मत्कृते प्रवरदर्पणेज्ञेयः** यस्कानां भार्गववैतहव्यसावेतसेति मित्रयुवां भार्गववाध्र्यश्वदैवोदासेति भार्गवच्यावनदैवोदासेतिवा वाध्र्यश्वेत्येकोवा वैन्यानांभार्गववैन्यपार्थेति एतएवश्येताः शुनकानांशुनकेतिवा गार्त्समदेतिवा भार्गवगार्त्समदेतिद्वौवा भार्गवशौनहोत्रगार्त्समदेतित्रयोवा वेदविश्वज्योतिषांभार्गववेदवैश्वज्योतिषेति शाठरमाठराणांभार्गवशाठरमाठरेति **एतौद्वौ क्वचित्** यस्कादीनांस्वगणंत्यक्त्वासर्वैर्विवाहः तदुक्तं**स्मृत्यर्थसारे** यस्कामित्रयवोवैन्याःशुनकाःप्रवरैक्यतः स्वंस्वंहित्वागणंसर्वेविवहेयुःपरावरैरिति ।

## आतां गोत्रें आणि प्रवर सांगतो—

याविषयीं **बौधायन**—"गोत्रें किती आहेत असें म्हटलें तर तीं सहस्रावधि, लक्षावधि, कोट्यवधि आहेत त्यांची संख्या करावयास येणार नाहीं. त्यांच्या प्रवरांचे ऋषि पाहिले असतां त्या सहस्रावधि गोत्रांचे प्रवरभेद एकूणपन्नासच होतात." गोत्रें अनंत असलीं तरी त्यांचे प्रवरभेद ४९ आहेत; ते येणेंप्रमाणें—भृगुगण ७, अंगिरसगण १७, अत्रिगण ४, विश्वामित्रगण १०, कश्यपगण ३, वसिष्ठगण ४, अगस्तिगण ४, हे सारे मिळून ४९ गण होतात. त्या एकेका गोत्रगणामधील अंतर्गत गोत्रें बहुत आहेत, परंतु त्यांचे प्रवर एक असल्यामुळें तो एक गोत्रगण समजावा. याप्रमाणें बौधायनांनीं ४९

१ हें वाक्य कोणत्या ठिकाणचें आहे तें सांपडलें नसल्यामुळें त्याचा अर्थ बरोबर झाला नाहीं.

गोत्रगण सांगितले आहेत; तरी इतर ग्रंथांतून सांगितलेले अधिकही गोत्रगण आहेत ते त्या त्या प्रसंगीं सांगूं. कोणकोणाचा विवाह होतो आणि कोणकोणाचा विवाह होत नाहीं हें स्पष्ट समजावयासाठीं प्रवरांचीं कोष्टकें देतों. एका कोष्टकांत असलेल्यांचीं भिन्न गोत्रें व भिन्न प्रवर असले तरी विवाह होत नाहीं. ज्या ठिकाणीं भिन्न कोष्टकांत असलेल्या गोत्रांचाही विवाह होत नाहीं, असें असेल त्या ठिकाणीं टीप दिलेली आहे.

## भृगुगण ७ ते असे—

**वत्स**—मार्कंडेय इत्यादिक दोनशेंहून अधिक गोत्रें आहेत ते सारे वत्स त्यांचे 'भार्गवच्यावनाप्रवानौर्वजामदग्न्येति' हे पांच प्रवर आहेत. अथवा 'भार्गवौर्वजामदग्न्येति' हे तीन प्रवर किंवा 'भार्गवच्यावनाप्रवानेति' हे तीन आहेत.

**बिद**—शैल, अवट इत्यादिक विसांहून अधिक गोत्रें आहेत ते सारे बिद होत. त्यांचे—'भार्गवच्यावनाप्रवानौर्वबैदेति' पांच प्रवर. अथवा 'भार्गवौर्वजामदग्न्येति' तीन प्रवर.

**आर्ष्टिषेण**—नैर्ऋति, याम्यायण इत्यादिक विसांहून अधिक आर्ष्टिषेण होत. त्यांचे—'भार्गवच्यावनाप्रवानार्ष्टिषेणानूपेति' पांच प्रवर. अथवा 'भार्गवार्ष्टिषेणानूपेति' तीन प्रवर. वत्स, बिद, आर्ष्टिषेण या तिघांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, दोन किंवा तीन प्रवर समान आहेत.

**वात्स्यांचे**—'भार्गवच्यावनाप्रवानेति' तीन प्रवर.

**वत्सपुरोधसांचे**—'भार्गवच्यावनाप्रवानवत्सपौरोधसेति' पांच.

**बैजमथितांचे**—'भार्गवच्यावनाप्रवानबैजमथितेति' पांच. वात्स्य, वत्सपुरोधस आणि बैजमथित हे तीन गण अधिक क्वचित् आहेत. या तिघांचा परस्पर आणि वर सांगितलेल्या तीन गणांशीं विवाह होत नाहीं.

**यस्क**—मौन, मूक इत्यादि त्रेपन्नांहून अधिक यस्क आहेत. त्यांचे—'भार्गव वैतहव्य सावेतसेति' तीन प्रवर.

**मित्रयु**—रौक्ष्यायन सापिंडिन इत्यादि तिसांहून अधिक मित्रयु आहेत. त्यांचे—'भार्गववाध्र्यश्वदैवोदासेति' तीन अथवा 'भार्गवच्यावनदैवोदासेति' तीन. किंवा 'वाध्र्यश्वेति' एक प्रवर.

**वैन्य**—पार्थ, बाष्कल, श्येत, हे वैन्य होत. यांचे—'भार्गव वैन्य पार्थेति' तीन प्रवर.

**शुनक**—गार्त्समद, यज्ञपति इत्यादिक सत्तरांहून अधिक शुनक होत. त्यांचे—'शौनकेति' एक अथवा 'गार्त्समदेति' एक किंवा 'भार्गव गार्त्समदेति' दोन. अथवा 'भार्गवशौनहोत्रगार्त्समदेति' तीन आहेत.

## क्वचित् ठिकाणीं दोन गण अधिक आहेत ते असे—

**वेदविश्वज्योतिष**—यांचे 'भार्गववेदवैश्वज्योतिषेति' तीन.

**शाठरमाठर**—यांचे—'भार्गव शाठर माठरेति' तीन.

वर सांगितलेले यस्क, मित्रयु, वैन्य, शुनक, यांचे आपआपले गण सोडून बाकीच्या सर्वांशीं विवाह होतो. तें सांगतो **स्मृत्यर्थसारांत**—"यस्क, मित्रयु, वैन्य, आणि शुनक यांचा आपआपल्या गणाचा प्रवर एक असल्यामुळें आपआपला गण सोडून पुढच्या व मागच्या सर्वांशीं विवाह होतो" याचप्रमाणें वेदविश्वज्योतिष आणि शाठरमाठर यांचाही परस्पर व पूर्वांशीं विवाह होतो.

इति भृगुगण.

**अथांगिरसः ते गौतमाः भरद्वाजाः केवलांगिरसश्चेतित्रिधा अत्रगौतमादश आयास्याः शारद्वताः कौमंडाः दीर्घतमसः औशनसाः कारेणुपालेयाः राहूगणाः सोमराजकाः वामदेवाः बृहदुक्थाश्चेति तत्रायास्यानां आंगिरसायास्यगौतमेति शारद्वतानां आंगिरसगौतमशारद्वतेति कौमंडानां आंगि-**

१ आणि वत्स व बिद हे जामदग्न्य असल्यामुळें ते सगोत्रही आहेत. आतां जरी त्रिप्रवरी आर्ष्टिषेणांला वत्सबिदांसह दोन किंवा तीन प्रवर समान होत नाहींत, व आर्ष्टिषेण हे जामदग्न्य नसल्यामुळें सगोत्रत्वही नाहीं तथापि एक पक्षीं पंचप्रवरी आर्ष्टिषेण असल्यामुळें त्यांतील त्रिप्रवरसाम्य विवाहबाधक आहे.

रसौतथ्यकाक्षीवतगौतमकौमंडेतिवा आंगिरसायास्यौशिजगौतमकाक्षीवतेतिवा आंगिरसौतथ्यगौतमौशिजकाक्षीवतेतिवा आंगिरसौशिजकाक्षीवतेतित्रयोवा दीर्घतमसां आंगिरसौतथ्यकाक्षीवतगौतमदैर्घतमसेति आंगिरसौतथ्यदैर्घतमसेतित्रयोवा औशनसानां आंगिरसगौतमौशनसेतित्रयः कारेणुपालेयानां आंगिरसगौतमकारेणुपालेतित्रयः राहूगणानां आंगिरसराहूगणगौतमेति सोमराजकानां आंगिरससोमराजकगौतमेति वामदेवानां आंगिरसवामदेव्यगौतमेति बृहदुक्थानां आंगिरसबार्हदुक्थगौतमेति आंगिरसवामदेवबार्हदुक्थेतिवा उतथ्यानामांगिरसौतथ्यगौतमेति औशिजानामांगिरसौशिजकाक्षीवतेत्यापस्तंबः आंगिरसायास्यौशिजगौतमकाक्षीवतेतिकात्यायनः एतौद्वौक्वचित् रघुवानां आंगिरसराघुवगौतमेतिकेचित् तत्रमूलंचिंत्यम् एषांसर्वेषांगौतमानामविवाहः ।

## आतां आंगिरसगण सांगतो—

ते आंगिरस गण तीन प्रकारचे—गौतम, भरद्वाज, आणि केवलांगिरस.

### गौतम १० ते येणेंप्रमाणें—

**आयास्य**—श्रोणिवेध, मूढरथ, इत्यादि अठरांहून अधिक आयास्य होत. त्यांचे—'आंगिरसायास्यगौतमेति' तीन.

**शारद्वत**—अभिजित, रौहिण्य इत्यादि सत्तरांहून अधिक शारद्वत होत. त्यांचे 'आंगिरसगौतमशारद्वतेति तीन.

**कौमंड**—मामंथरेषण, मासुराक्ष, इत्यादि दहांहून अधिक कौमंड होत. त्यांचे 'आंगिरसौतथ्यकाक्षीवतगौतमकौमंडेति' पांच, किंवा 'आंगिरसायास्यौशिजगौतमकाक्षीवतेति' पांच, किंवा आंगिरसौतथ्यगौतमौशिजकाक्षीवतेति' पांच अथवा 'आंगिरसौशिजकाक्षीवतेति' तीन.

**दीर्घतमस्**—यांचे 'आंगिरसौतथ्यकाक्षीवतगौतमदैर्घतमसेति' पांच. अथवा 'आंगिरसौतथ्यदैर्घतमसेति तीन.

**औशनस्**—दिश्य, इत्यादि नवांहून अधिक औशनस होत. त्यांचे 'आंगिरसगौतमौशनसेति' तीन.

**करेणुपालि**—वास्तव्य, श्वेतीय इत्यादि सातांहून अधिक करेणुपालि होत. त्यांचे—आंगिरसगौतमकारेणुपालेति' तीन.

**राहूगण**—यांचे 'आंगिरसराहूगणगौतमेति' तीन.

**सोमराजक**—यांचे 'आंगिरससोमराजकगौतमेति' तीन.

**वामदेव**—यांचे 'आंगिरसवामदेव्यगौतमेति' तीन.

**बृहदुक्थ**—यांचे 'आंगिरसबार्हदुक्थगौतमेति' तीन. अथवा 'आंगिरसवामदेव्यबार्हदुक्थेति' तीन.

### क्वचित् दोन गण अधिक आहेत ते असे—

**उतथ्य**—यांचे 'आंगिरसौतथ्यगौतमेति' तीन.

**औशिज**—यांचे 'आंगिरसौशिजकाक्षीवतेति' तीन, असें **आपस्तंब** सांगतो. 'आंगिरसायास्यौशिजगौतमकाक्षीवतेति' पांच, असें **कात्यायन** सांगतो.

**राघुव**—यांचे 'आंगिरसराघुवगौतमेति' तीन, असें केचित् सांगतात. याविषयीं मूळ ( प्रमाण ) चिंत्य आहे. या सर्व गौतमांचा परस्पर विवाह होत नाहीं.

**अथभरद्वाजाः तेचत्वारः** भरद्वाजाःगर्गाःऋक्षाःकपय इति भरद्वाजानामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजेतित्रयः गर्गाणामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजसैन्यगार्ग्येतिपंच आंगिरससैन्यगार्ग्येतित्रयोवा अंत्ययोर्व्यत्ययोवा भारद्वाजगार्ग्यसैन्येतिवा गर्गभेदानां आंगिरसतैत्तिरिकापिभुवेति ऋक्षाणांकपिलानांचांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजवांदनमातवचसेतिपंच आंगिरसवांदनमातवचसेतित्रयोवा कपीनामांगिरसामहीयवौरुक्षयसेति आत्मभुवाम् आंगिरसभारद्वाजबार्हस्पत्यमंत्रवरात्मभुवेतिपंच अयंक्वचित् भरद्वाजानांसर्वेषामविवाहः ।

---

१ सैन्येतिताळव्यादि पाठांतरम् । २ तितिरि, कापिभूति, आणि खंडित हे तीन गर्गभेद आहेत.

## आतां भरद्वाज गण ४ ते येणेंप्रमाणें—

**भरद्वाज**—क्षाम्यायण, देवाश्व इत्यादि १६० हून अधिक भरद्वाज आहेत. त्यांचे—'आंगिरसबार्हस्पत्यभारद्वाजेति' तीन प्रवर.

**गर्ग**—सांभरायण, सखीनय इत्यादि ५० हून अधिक गर्ग. त्यांचे—'आंगिरसबार्हस्पत्यभारद्वाजसैन्यगार्ग्येति पांच अथवा 'आंगिरससैन्यगार्ग्येति' तीन. किंवा 'आंगिरसगार्ग्यसैन्येति' तीन. अथवा 'भारद्वाजगार्ग्यसैन्येति' तीन. गर्गभेदांचे[1]—'आंगिरसतैत्तिरिकापिभुवेति' तीन.

**ऋक्ष**—रौक्षायण, कपिल इत्यादि ९ हून अधिक ऋक्ष. त्यांचे—'आंगिरसबार्हस्पत्यभारद्वाजवांदनमातवचसेति' पांच. अथवा 'आंगिरसवांदनमातवचसेति' तीन.

**कपि**—स्वस्तितरि, दंडिन् इत्यादि २५ हून अधिक कपि. त्यांचे—'आंगिरसामहीयवौरुक्षयसेति' तीन.

**आत्मभुव्**—यांचे—'आंगिरमभारद्वाजबार्हस्पत्यमंत्रवरात्मभुवेति' पांच. हा गण क्वचित् आहे.

ह्या सर्व भरद्वाजांचा परस्पर विवाह होत नाहीं.

**अथकेवलांगिरसः** तेच षट् हारिताः कुत्साः कण्वाः रथीतराः मुद्गलाः विष्णुवृद्धाश्चेति हारितान आंगिरसांबरीषयौवनाश्वेति आद्योमांधातावा कुत्सानां आंगिरसमांधातृकौत्सेति कण्वानामांगिरसाजमीढकाण्वेति आंगिरसघोरकाण्वेतिवा रथीतराणामांगिरसवैरूपराथीतरेति आंगिरसवैरूपपार्षदश्वेतिवा अष्टादंष्ट्रपार्षदश्ववैरूपेतिवा अंत्ययोर्व्यत्ययोवा मुद्गलानामांगिरसभार्म्याश्वमौद्गल्येति आद्यस्तार्क्ष्योवा आंगिरसतार्क्ष्यमौद्गल्येतिवा विष्णुवृद्धानामांगिरसपौरुकुत्स्यत्रासदस्यवेति एषांस्वगणंविहायसर्वैर्विवाहोभवति हारितकुत्सयोस्तुनभवति ।

## आतां केवल आंगिरस गण ६ ते येणेंप्रमाणें—

**हारित**—सौभग, नैयगव इत्यादि ३२ हून अधिक हारित. त्यांचे—'आंगिरसांबरीषयौवनाश्वेति' तीन. किंवा या तीन प्रवरांमध्यें पहिल्या स्थानीं 'मांधाता' आहे.

**कुत्स**—यांचे 'आंगिरस मांधातृ कौत्सेति' तीन.

**कण्व**—औपमर्कट, बाष्कलायन इत्यादि २१ हून अधिक कण्व. त्यांचे-'आंगिरसाजमीढकाण्वेति' तीन. अथवा आंगिरसघोरकाण्वेति' तीन.

**रथीतर**—हस्तिद, नैतिरक्षि इत्यादि १४ हून अधिक रथीतर. त्यांचे—'आंगिरसवैरूपराथीतरेति', अथवा 'आंगिरसवैरूपपार्षदश्वेति' किंवा 'अष्टादंष्ट्रवैरूपपार्षदश्वेति', किंवा शेवटच्या दोघांचा विपर्यास आहे.

**मुद्गल**—सात्यमुग्रिय इत्यादि १८ हून अधिक मुद्गल. त्यांचे—'आंगिरसभार्म्याश्वमौद्गल्येति' तीन. किंवा पहिला 'तार्क्ष्य.' अथवा 'आंगिरसतार्क्ष्यमौद्गल्येति' तीन.

**विष्णुवृद्ध**—शठ, भरण, इत्यादि २५ हून अधिक विष्णुवृद्ध. त्यांचे—'आंगिरसपौरुकुत्स्यत्रासदस्यवेति' तीन.

ह्या केवलांगिरसांचा आपआपला गण वेगळून सर्वांशीं विवाह होतो. हारित आणि कुत्स यांचा मात्र परस्पर होत नाहीं.

**अथात्रयः तेचत्वारः**[2] अत्रयः वाद्भुतकाः गविष्ठिराः मुद्गलाइति आद्यानामात्रेयार्चनानसश्यावाश्वेति वाद्भुतकानां आत्रेयार्चनानसवाद्भुतकेति धनंजयानां आत्रेयार्चनानसधानंजयेतिकचित् गविष्ठिराणामात्रेयार्चनानसगाविष्ठिरेति आत्रेयगाविष्ठिरपौर्वातिथेतिवा मुद्गलानामात्रेयार्चनानसपौर्वातिथेति वामरथ्यसुमंगलबैजवापानामात्रेयार्चनानसातिथेति आत्रेयार्चनानसगाविष्ठिरेतिवा सुमंगलानांअत्रिसुमंगलश्यावाश्वेति केचित् अत्रेःपुत्रिकापुत्राणाम् आत्रेयवामरथ्यपौत्रिकेति अत्रीणांसर्वेषामविवाहः[3] ।

१ तित्तिरि, कापिभूति, आणि खंडित हे तीन गर्गभेद आहेत.　२ चत्वारोऽत्रय आद्यात्रिवाद्भुतकगविष्ठिराः । मुद्गलाश्चेति गोत्रैक्यात्प्रवरैक्याच्च नान्वयुः ॥

### आतां अत्रि गण ४ ते येणेंप्रमाणें—

**अत्रि**—भूरि इत्यादि ९४ हून अधिक अत्रि. त्यांचे—'आत्रेयार्चनानसश्यावाश्वेति' तीन प्रवर.

**वाद्भुतक**—यांचे—'आत्रेयार्चनानसवाद्भुतकेति' तीन.

**धनंजय**—यांचे 'आत्रेयार्चनानसधानंजयेति' तीन. हा गण क्वचित् आहे.

**गविष्ठिर**—दक्षि, भलंदन इत्यादि २४ हून अधिक गविष्ठिर. त्यांचे—'आत्रेयार्चनानसगाविष्ठिरेति' तीन. किंवा 'आत्रेयगाविष्ठिरपौर्वातिथेति' तीन.

**मुद्गल**—शालिसंधि, अर्णव इत्यादि १० हून अधिक मुद्गल. त्यांचे—'आत्रेयार्चनानसपौर्वातिथेति' तीन.

**वामरथ्य, सुमंगल, बैजवाप,** यांचे 'आत्रेयार्चनानसातिथेति' तीन. किंवा आत्रेयार्चनानसगाविष्ठिरेति' तीन.

**सुमंगल**—यांचे—'अत्रिसुमंगलश्यावाश्वेति' तीन. हे चार गण केचित् सांगतात.

**वालेय**—कौद्रेय, शौभ्रेय, वामरथ्य इत्यादि अत्रीचे पुत्रिकापुत्र. त्यांचे—'आत्रेयवामरथ्यपौत्रिकेति' तीन प्रवर.

साऱ्या अत्रींचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, सगोत्र आहे आणि सप्रवर आहे. अत्रीच्या पुत्रिकापुत्रांचा वसिष्ठ आणि विश्वामित्र यांच्याशींही विवाह होत नाहीं.

**अथविश्वामित्राः तेदश** कुशिकाः लोहिताः रौक्षकाः कामकायनाः अजाः कताः धनंजयाः अघमर्षणाः पूरणाः इंद्रकौशिका इति कुशिकानांवैश्वामित्रदेवरातौदलेति लोहितानांवैश्वामित्राष्टकलौहितेति अंत्ययोर्व्यत्ययोवा वैश्वामित्रमाधुच्छंदसाष्टकेतिवा वैश्वामित्राष्टकेतिद्वौवा रौक्षकाणांवैश्वामित्रगाथिनरैवणेति वैश्वामित्ररौक्षकरैवणेतिवा कामकायनानांवैश्वामित्रदेवश्रवसदैवतरसेति अजानांवैश्वामित्रमाधुच्छंदसाजेति वैश्वामित्राश्मरथवाधूलेतिवा धनंजयानांवैश्वामित्रमाधुच्छंदसधानंजयेति वैश्वामित्रमाधुच्छंदसाघमर्षणेतिवा कतानांवैश्वामित्रकात्यात्कीलेति अघमर्षणानांवैश्वामित्राघमर्षणकौशिकेति पूरणानांवैश्वामित्रपौरणेतिद्वौ वैश्वामित्रदेवरातपौरणेतिवा इंद्रकौशिकानांवैश्वामित्रेंद्रकौशिकेतिद्वौ एते**बौधायनोक्ताः** ॥ रौहिणानांवैश्वामित्रमाधुच्छंदसरौहिणेति रेणूनांवैश्वामित्रगाथिनरैणवेति वेणूनांवैश्वामित्रगाथिनवैणवेति जह्नूनांवैश्वामित्रशालंकायनकौशिकेति आश्मरथ्यानां वैश्वामित्राश्मरथ्यवाधूलेति उदवेणूनांवैश्वामित्रगाथिनवैणवेति **एते आश्वलायनमात्स्योक्ताः** अन्यैस्त्वन्येपिषड्गणाउक्ताः तेऽन्यत्रमत्कृतौज्ञेयाःऐषांविश्वामित्राणामविवाहः ॥

### आतां विश्वामित्र गण १० ते येणेंप्रमाणें—

**कुशिक**—पर्णजंघ, नारक्य इत्यादि ७० हून अधिक कुशिक. त्यांचे—'वैश्वामित्रदेवरातौदलेति' तीन प्रवर.

**लोहित**—कुडक्य, चाक्रवर्णायन इत्यादि ५ हून अधिक लोहित. त्यांचे—'वैश्वामित्राष्टकलौहितेति' तीन. किंवा शेवटच्या दोहोंचा विपर्यास आहे. अथवा 'वैश्वामित्रमाधुच्छंदसाष्टकेति' तीन. किंवा 'वैश्वामित्राष्टकेति' दोन प्रवर.

**रौक्षक**—यांचे—'वैश्वामित्रगाथिनरैवणेति तीन. अथवा 'वैश्वामित्ररौक्षकरैवणेति' तीन.

**कामकायन**—देवश्रवस्, देवतरस इत्यादि ५ हून अधिक कामकायन. त्यांचे—'वैश्वामित्रदेवश्रवसदैवतरसेति' तीन.

**अज**—यांचे—'वैश्वामित्रमाधुच्छंदसाजेति' तीन. किंवा 'वैश्वामित्राश्मरथवाधूलेति' तीन.

१ साहुलाः हिरण्यरेतसः सुवर्णरेतसः कपोतरेतसः घृतकौशिकाः कथकाः इति षट्गणाः साहुलानां वैश्वामित्रसाहुलमाहुलेति त्रयः हिरण्यरेतसां वैश्वामित्रहैरण्यरेतसेतिद्वौ । सुवर्णरेतसां वैश्वामित्रसौवर्णरेतसेतिद्वौ कपोतरेतसां वैश्वामित्रकापोतरेतसेतिद्वौ । घृतकौशिकानां वैश्वामित्रघृतकौशिकेतिद्वौ । कथकानां वैश्वामित्रकाथकेति प्रवरदर्पणं. २ विश्वामित्रगणानां सर्वेषां परस्परमविवाहः सगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च । कुशिकानां देवरातप्रवरसाम्येन देवरातात्प्रदानिर्णयाद्वक्ष्यमाणदेवरातवदेव जामदग्न्यैरप्यविवाह इति भाति । धनंजयानांविश्वामित्रैरत्रिभिश्चाविवाहः कतानां भरद्वाजैर्विश्वामित्रैश्चाविवाहः द्विगोत्रत्वात् । इतिधर्मसिंधुसारे ।

**कत**[1]—औदुंबरि, शैशिरि इत्यादि २० हून अधिक कत. त्यांचे—'वैश्वामित्रकात्यात्कीलेति' तीन.

**धनंजय**[2]—पार्थिव, बंधुल, इत्यादि ७ हून अधिक धनंजय. त्यांचे—वैश्वामित्रमाधुच्छंदसधानंजयेति' तीन. किंवा वैश्वामित्रमाधुच्छंदसाघमर्षणेति' तीन.

**अघमर्षण**—यांचे—'वैश्वामित्राघमर्षणकौशिकेति' तीन.

**पूरण**—यांचे—'वैश्वामित्रपौरणेति' दोन. किंवा 'वैश्वामित्रदेवरातपौरणेति' तीन.

**इंद्रकौशिक**—यांचे—'वैश्वामित्रेंद्रकौशिकेति' दोन.

हे वरील १० गण **बौधायनानें** सांगितले आहेत.

**रौहिण**—यांचे—'वैश्वामित्रमाधुच्छंदसरौहिणेति' तीन प्रवर.

**रेणु**—यांचे—'वैश्वामित्रगाथिनरैणवेति' तीन.

**वेणु**—यांचे—'वैश्वामित्रगाथिनवैणवेति' तीन.

**जन्हु**—यांचे—'वैश्वामित्रशालंकायनकौशिकेति' तीन.

**आश्मरथ्य**—यांचे—'वैश्वामित्राश्मरथ्यवाधूलेति' तीन.

**उदवेणु**—याचे—'वैश्वामित्रगाथिनवैणवेति' तीन.

हे वरील ६ गण आश्वलायनांनी व मात्स्यांत सांगितलेले आहेत. इतर ग्रंथकारांनीं दुसरेही ६ गण सांगितले आहेत. ते कमलाकरभट्टानें केलेल्या **प्रवरदर्पणांत** आहेत ते वर संस्कृत टीपेंत दिले आहेत.

ह्या सर्व विश्वामित्रगणांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, हे सगोत्र आणि सप्रवर आहेत.

**अथकश्यपाः**[3] **तेपंच** निध्रुवाः कश्यपाः रेभाः शांडिलाः लौगाक्षयश्च निध्रुवाणांकाश्यपावत्सारनैध्रुवेति कश्यपानांकाश्यपावत्सारासितेति रेभाणांकाश्यपावत्साररैभ्येति शांडिलानांकाश्यपावत्सारशांडिल्येति अंत्यस्थानेदेवलोवासितोवा शांडिलासितदेवलेतिवा काश्यपासितदेवलेतिवा अंत्ययोर्व्यत्ययोवा देवलासितेतिद्वौवा लौगाक्षीन्वक्ष्यामः एषांकश्यपानामविवाहः ॥

## आतां कश्यप ५ ते येणेंप्रमाणें—

**निध्रुव**—हे १४० हून अधिक आहेत. त्यांचे—'काश्यपावत्सारनैध्रुवेति' तीन.

**कश्यप**—यांचे—'काश्यपावत्सारासितेति' तीन प्रवर.

**रेभ**—याचे—'काश्यपावत्साररैभ्येति' तीन.

**शांडिल**—कोहल, उदमेव इत्यादि ६० हून अधिक शांडिल. त्यांचे 'काश्यपावत्सारशांडिल्येति' तीन. अथवा शेवटच्या स्थानीं देवल किंवा असित. किंवा 'शांडिलासितदेवलेति', अथवा 'काश्यपासितदेवलेति' अथवा शेवटच्या दोहोंचा विपर्यास, अथवा 'देवलासितेति' दोन प्रवर.

**लौगाक्षि**—हे द्विगोत्रांत पुढें सांगूं.

ह्या सर्व कश्यपांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, हे सगोत्र व सप्रवर आहेत.

**अथवसिष्ठाः**[4] **तेपंच** वसिष्ठाः कुंडिनाः उपमन्यवः पराशराःजातूकर्ण्याश्चेति वसिष्ठानां वासिष्ठेंद्रप्रमदाभरद्वस्विति वासिष्ठेत्येकोवा कुंडिनानां वासिष्ठमैत्रावरुणकौंडिन्येति उपमन्यूनां वासिष्ठेंद्रप्रमदाभरद्वस्विति वासिष्ठाभरद्वस्विंद्रप्रमदेतिवा आद्ययोर्व्यत्ययोवा पराशराणांवासिष्ठशाक्त्यपाराशर्येति जातूकर्ण्यानां वासिष्ठात्रिजातूकर्ण्येति वसिष्ठानांसर्वेषामविवाहः अंत्यस्यात्रिभिश्च ॥

---

१ कतांचा भरद्वाज व विश्वामित्र यांच्याशीं विवाह होत नाहीं. कारण, ते द्विगोत्री आहेत, असें धर्मसिंधुसारांत आहे. २ धनंजयांचा विश्वामित्र व अत्रि यांच्याशीं विवाह होत नाहीं. दोन्ही गोत्रें त्यांस (धनंजयांस) आहेत. ३ एषांकश्यपानां परस्परं अविवाहः सगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च । तदुक्तं । सर्वेच कश्यपगणानिध्रुवारेभशांडिलाः । गोत्रैक्यात्प्रवरैक्याच्चनोद्वहेयुःपरस्परम्भिति ॥ ४ वसिष्ठानामितिगोत्रैक्यात्प्रवरैक्याच्च । तदुक्तं । वसिष्ठाःकुंडिनाश्चैवउपमन्युपराशराः ॥ वसिष्ठावसिचत्वारो गोत्रैक्यात्[illegible] ।

**आतां अत्रि गण ४ ते येणेंप्रमाणें—**

**अत्रि**—भूरि इत्यादि ९४ हून अधिक अत्रि. त्यांचे—'आत्रेयार्चनानसश्यावाश्वेति' तीन प्रवर.

**वाद्भुतक**—यांचे—'आत्रेयार्चनानसवाद्भुतकेति' तीन.

**धनंजय**—यांचे 'आत्रेयार्चनानसधानंजयेति' तीन. हा गण क्वचित् आहे.

**गविष्ठिर**—दक्षि, भलंदन इत्यादि २४ हून अधिक गविष्ठिर. त्यांचे—'आत्रेयार्चनानसगाविष्ठिरेति' तीन. किंवा 'आत्रेयगाविष्ठिरपौर्वातिथेति' तीन.

**मुद्गल**—शालिसंधि, अर्णव इत्यादि १० हून अधिक मुद्गल. त्यांचे—'आत्रेयार्चनानसपौर्वातिथेति' तीन.

**वामरथ्य, सुमंगल, बैजवाप,** यांचे 'आत्रेयार्चनानसातिथेति' तीन. किंवा आत्रेयार्चनानसगाविष्ठिरेति' तीन.

**सुमंगल**—यांचे—'अत्रिसुमंगलश्यावाश्वेति' तीन. हे चार गण केचित् सांगतात.

**वालेय**—कौंद्रेय, शौभ्रेय, वामरथ्य इत्यादि अत्रीचे पुत्रिकापुत्र. त्यांचे—'आत्रेयवामरथ्यपौत्रिकेति' तीन प्रवर.

साऱ्या अत्रींचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, सगोत्र आहे आणि सप्रवर आहे. अत्रीच्या पुत्रिकापुत्रांचा वसिष्ठ आणि विश्वामित्र यांच्याशींही विवाह होत नाहीं.

**अथविश्वामित्राः तेदृश** कुशिकाः लोहिताः रौक्षकाः कामकायनाः अजाः कताः धनंजयाः अघमर्षणाः पूरणाः इंद्रकौशिका इति कुशिकानांवैश्वामित्रदेवरातौदलेति लोहितानांवैश्वामित्राष्टकलौहितेति अंत्ययोर्व्यत्ययोवा वैश्वामित्रमाधुच्छंदसाष्टकेतिवा वैश्वामित्राष्टकेतिद्वौवा रौक्षकाणांवैश्वामित्रगाथिनरैवणेति वैश्वामित्ररौक्षकरैवणेतिवा कामकायनानांवैश्वामित्रदेवश्रवसदैवतरसेति अजानांवैश्वामित्रमाधुच्छंदसाजेति वैश्वामित्राश्मरथवाधूलेतिवा धनंजयानांवैश्वामित्रमाधुच्छंदसधानंजयेति वैश्वामित्रमाधुच्छंदसाघमर्षणेतिवा कतानांवैश्वामित्रकात्यात्कीलेति अघमर्षणानांवैश्वामित्राघमर्षणकौशिकेति पूरणानांवैश्वामित्रपौरणेतिद्वौ वैश्वामित्रदेवरातपौरणेतिवा इंद्रकौशिकानांवैश्वामित्रेंद्रकौशिकेतिद्वौ एते**बौधायनोक्ताः** ॥ रौहिणानांवैश्वामित्रमाधुच्छंदसरौहिणेति रेणूनांवैश्वामित्रगाथिनरैणवेति वेणूनांवैश्वामित्रगाथिनवैणवेति जह्नूनांवैश्वामित्रशालंकायनकौशिकेति आश्मरथ्यानां वैश्वामित्राश्मरथ्यवाधूलेति उद्वेणूनांवैश्वामित्रगाथिनवैणवेति **एते आश्वलायनमात्स्योक्ताः** अन्यैस्त्वन्येपिषट्गणाउक्ताः[1] तेऽन्यत्रमत्कृतौज्ञेयाः[2]एषां विश्वामित्राणामविवाहः ॥

**आतां विश्वामित्र गण १० ते येणेंप्रमाणें—**

**कुशिक**—पर्णजंघ, नारक्य इत्यादि ७० हून अधिक कुशिक. त्यांचे—'वैश्वामित्रदेवरातौदलेति' तीन प्रवर.

**लोहित**—कुडक्य, चाक्रवर्णायन इत्यादि ५ हून अधिक लोहित. त्यांचे—'वैश्वामित्राष्टकलौहितेति' तीन. किंवा शेवटच्या दोहोंचा विपर्यास आहे. अथवा 'वैश्वामित्रमाधुच्छंदसाष्टकेति' तीन. किंवा 'वैश्वामित्राष्टकेति' दोन प्रवर.

**रौक्षक**—यांचे—'वैश्वामित्रगाथिनरैवणेति तीन. अथवा 'वैश्वामित्ररौक्षकरैवणेति' तीन.

**कामकायन**—देवश्रवस्, देवतरस इत्यादि ५ हून अधिक कामकायन. त्यांचे—'वैश्वामित्रदेवश्रवसदैवतरसेति' तीन.

**अज**—यांचे—'वैश्वामित्रमाधुच्छंदसाजेति' तीन. किंवा 'वैश्वामित्राश्मरथवाधूलेति' तीन.

१ साहुलाः हिरण्यरेतसः सुवर्णरेतसः कपोतरेतसः घृतकौशिकाः कथकाः इति षट्गणाः साहुलानां वैश्वामित्रसाहुलमाहुलेति त्रयः हिरण्यरेतसां वैश्वामित्रहैरण्यरेतसेतिद्वौ । सुवर्णरेतसां वैश्वामित्रसौवर्णरेतसेतिद्वौ कपोतरेतसां वैश्वामित्रकापोतरेतसेतिद्वौ । घृतकौशिकानां वैश्वामित्रघृतकौशिकेतिद्वौ । कथकानां वैश्वामित्रकाथकेति प्रवरदर्पणं. २ विश्वामित्रगणानां सर्वेषां परस्परमविवाहः सगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च । कुशिकानां देवरातप्रवरसाम्येन देवरातान्देदानिर्णयाद्वक्ष्यमाणदेवरातवदेव जामदग्न्यैरप्यविवाह इति भाति । धनंजयानांविश्वामित्रैरत्रिभिश्चाविवाहः कतानां भरद्वाजैर्विश्वामित्रैश्चाविवाहः द्विगोत्रत्वात् । इतिधर्मसिंधुसारे ।

**कत**—औदुंबरि, शैशिरि इत्यादि २० हून अधिक कत. त्यांचे—'वैश्वामित्रकात्यात्कीलेति' तीन.

**धनंजय**—पार्थिव, बंधुल, इत्यादि ७ हून अधिक धनंजय. त्यांचे—वैश्वामित्रमाधुच्छंदसधानंजयेति' तीन. किंवा वैश्वामित्रमाधुच्छंदसाघमर्षणेति' तीन.

**अघमर्षण**—यांचे—'वैश्वामित्राघमर्षणकौशिकेति' तीन.

**पूरण**—यांचे—'वैश्वामित्रपौरणेति' दोन. किंवा 'वैश्वामित्रदेवरातपौरणेति' तीन.

**इंद्रकौशिक**—यांचे—'वैश्वामित्रेंद्रकौशिकेति' दोन.

हे वरील १० गण **बौधायनानें** सांगितले आहेत.

**रौहिण**—यांचे—'वैश्वामित्रमाधुच्छंदसरौहिणेति' तीन प्रवर.

**रेणु**—यांचे—'वैश्वामित्रगाथिनरैणवेति' तीन.

**वेणु**—यांचे—'वैश्वामित्रगाथिनवैणवेति' तीन.

**जन्हु**—यांचे—'वैश्वामित्रशालंकायनकौशिकेति' तीन.

**आश्मरथ्य**—यांचे—'वैश्वामित्राश्मरथ्यवाधूलेति' तीन.

**उदवेणु**—याचे—'वैश्वामित्रगाथिनवैणवेति' तीन.

हे वरील ६ गण आश्वलायनांनी व मात्स्यांत सांगितलेले आहेत. इतर ग्रंथकारांनीं दुसरेही ६ गण सांगितले आहेत. ते कमलाकरभट्टानें केलेल्या **प्रवरदर्पणांत** आहेत ते वर संस्कृत टीपेंत दिले आहेत.

ह्या सर्व विश्वामित्रगणांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, हे सगोत्र आणि सप्रवर आहेत.

**अथकश्यपाः तेपंच** निध्रुवाः कश्यपाः रेभाः शांडिलाः लौगाक्षयश्च निध्रुवाणांकाश्यपावत्सारनैध्रुवेति कश्यपानांकाश्यपावत्सारासितेति रेभाणांकाश्यपावत्साररैभ्येति शांडिलानांकाश्यपावत्सारशांडिल्येति अंत्यस्थानेदेवलोवासितोवा शांडिलासितदेवलेतिवा काश्यपासितदेवलेतिवा अंत्ययोर्व्यत्ययोवा देवलासितेतिद्वौवा लौगाक्षीन्वक्ष्यामः एषांकश्यपानामविवाहः ॥

## आतां कश्यप ५ ते येणेंप्रमाणें—

**निध्रुव**—हे १४० हून अधिक आहेत. त्याचे—'काश्यपावत्सारनैध्रुवेति' तीन.

**कश्यप**—याचे—'काश्यपावत्मारासितेति' तीन प्रवर.

**रेभ**—याचे—'काश्यपावत्माररैभ्येति' तीन.

**शांडिल**—कोहल, उदमेव इत्यादि ६० हून अधिक शांडिल. त्याचे 'काश्यपावत्सारशांडिल्येति' तीन. अथवा शेवटच्या स्थानीं देवल किंवा असित. किंवा 'शाडिलासितदेवलेति', अथवा 'काश्यपासितदेवलेति' अथवा शेवटच्या दोहोंचा विपर्यास, अथवा 'देवलासितेति' दोन प्रवर.

**लौगाक्षि**—हे द्विगोत्रांत पुढें सांगूं.

ह्या सर्व कश्यपांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, हे सगोत्र व सप्रवर आहेत.

**अथवसिष्ठाः तेपंच** वसिष्ठाः कुंडिनाः उपमन्यवः पराशराःजातूकर्ण्याश्चेति वसिष्ठानां वासिष्ठेंद्रप्रमदाभरद्वस्विति वासिष्ठेत्येकोवा कुंडिनानां वासिष्ठमैत्रावरुणकौंडिन्येति उपमन्यूनां वासिष्ठेंद्रप्रमदाभरद्वस्विति वासिष्ठाभरद्वस्विंद्रप्रमदेतिवा आद्ययोर्व्यत्ययोवा पराशराणांवासिष्ठशाक्त्यपाराशर्येति जातूकर्ण्यानां वासिष्ठात्रिजातूकर्ण्येति वसिष्ठानांसर्वेषामविवाहः अंत्यस्यात्रिभिश्च ॥

---

१ कतांचा भरद्वाज व विश्वामित्र यांच्याशीं विवाह होत नाहीं. कारण, ते द्विगोत्री आहेत, असें धर्मसिंधुसारांत आहे.

२ धनंजयांचा विश्वामित्र व अत्रि यांच्याशीं विवाह होत नाहीं. दोन्ही गोत्रें त्यास ( धनंजयांस ) आहेत.

३ एषांकश्यपानां परस्परं अविवाहः सगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च । तदुक्तं । सर्वेच कश्यपगणानिध्रुवारेभशांडिलाः । गोत्रैक्यात्प्रवरैक्याच्चनोद्वहेयुःपरस्परमिति ॥

४ वसिष्ठानामितिगोत्रैक्यात्प्रवरैक्याच्च । तदुक्तं । वसिष्ठाःकुंडिनाश्चैवउपमन्युपराशराः ॥ वसिष्ठादयिचत्वारो गोत्रैक्यात्[illegible] इति ।

## आतां वसिष्ठ ५ ते येणेंप्रमाणें—

**वसिष्ठ**—वैतालकवि, रकि इत्यादि ६० हून अधिक वसिष्ठ. त्यांचे—'वासिष्ठैंद्रप्रमदाभरद्वस्विति' तीन. अथवा 'वासिष्ठेति' एक प्रवर.

**कुंडिन**—लोहितायन, गुग्गुलि इत्यादि २५ हून अधिक कुंडिन. त्यांचे—'वासिष्ठमैत्रावरुणकौंडिन्येति' तीन प्रवर.

**उपमन्यु**—औदलि, इत्यादि ७० हून अधिक उपमन्यु. त्यांचे—'वासिष्ठैंद्रप्रमदाभरद्वस्विति' तीन. किंवा 'वासिष्ठाभरद्वस्विंद्रप्रमदेति' अथवा पहिल्या दोघांचा विपर्यास.

**पराशर**—कांडशय, वाजि इत्यादि ४७ हून अधिक पराशर. त्यांचे—'वासिष्ठशाक्त्यपाराशर्येति' तीन.

**जातूकर्ण्य**—यांचे—'वासिष्ठात्रिजातूकर्ण्येति' तीन.

ह्या सर्व वसिष्ठांचा परस्पर विवाह होत नाहीं. आणि जातूकर्ण्यांचा अत्रींशींही विवाह होत नाहीं.

**अथागस्त्याः तेचत्वारः** इध्मवाहाः सांभवाहाः सोमवाहाः यज्ञवाहाश्चेति आद्यानां आगस्त्यदार्ढ्यच्युतैध्मवाहेति आगस्त्येत्येकोवा सोमवाहानां आगस्त्यदार्ढ्यच्युतसोमवाहेति सांभवाहानांसांभवाहोऽन्त्यः यज्ञवाहानांयज्ञवाहोऽन्त्यः आद्यौपूर्वोक्तावेव सारवाहानांतदंतास्त्रयः दर्भवाहानांतदंतास्त्रयः अगस्तीनामागस्त्यमाहेंद्रमायोभुवेति पूर्णमासानां आगस्त्यपौर्णमासपारणेति हिमोदकानां आगस्त्यहैमवर्चिहैमोदकेति पाणिकानामागस्त्यपैनायकपाणिकेति **एतेषट्क्वचित्** अगस्तीनांसर्वेषामविवाहः ॥

## आतां अगस्त्य ४ ते येणेंप्रमाणें—

**इध्मवाह**—विशालाद्य, स्फालायन इत्यादि ५० हून अधिक इध्मवाह. त्यांचे—'आगस्त्यदार्ढ्यच्युतैध्मवाहेति' तीन, अथवा 'आगस्त्येति' एक.

**सांभवाह**—यांचे—'आगस्त्यदार्ढ्यच्युतसांभवाहेति' तीन.

**सोमवाह**—यांचे—'आगस्त्यदार्ढ्यच्युतसोमवाहेति' तीन.

**यज्ञवाह**—यांचे—'आगस्त्यदार्ढ्यच्युतयज्ञवाहेति' तीन.

**सारवाह**—यांचे—'आगस्त्यदार्ढ्यच्युतसारवाहेति' तीन.

**दर्भवाह**—यांचे—'आगस्त्यदार्ढ्यच्युतदर्भवाहेति' तीन.

**अगस्ति**—यांचे—'आगस्त्यमाहेंद्रमायोभुवेति' तीन.

**पूर्णमास**—यांचे—'आगस्त्यपौर्णमासपारणेति' तीन.

**हिमोदक**—यांचे—'आगस्त्यहैमवर्चिहैमोदकेति' तीन.

**पाणिक**—यांचे—'आगस्त्यपैनायकपाणिकेति' तीन.

सारवाहांपासून पुढचे ६ गण क्वचित् आहेत.

ह्या सर्व अगस्त्यांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, हे सगोत्र आणि सप्रवर आहेत.

**अथद्विगोत्राः** शौंगशैशिरीणां[1] आंगिरसबार्हस्पत्यभारद्वाजकात्याक्षीलेतिपंच कात्याक्षीलयोःस्थानेशौंगशैशिरिर्वा आंगिरसकात्याक्षीलेतित्रयोवा एषांभरद्वाजैर्विश्वामित्रैश्चाविवाहः एवंकपिलानांकतानांचसंकृतिपूतिमाषादीनां आंगिरसगौरिवीतिसांकृत्येति शाक्त्यगौरिवीतिसांकृत्येतिवा अंत्ययोर्व्यत्ययोवा एषांस्वगणस्थैर्वसिष्ठैः शौंगशैशिरैर्लौगाक्षिभिश्चाविवाहः कश्यपैरपीति**प्रयोगपारिजाते** लौगाक्षीणांकाश्यपावत्सारवासिष्ठेति काश्यपावत्साराासितेतिवा एतेहर्वसिष्ठानक्तंकश्यपाः[2] एषांवसिष्ठैःकश्यपैःसंकृतिभिश्चाविवाहः देवरातस्यजामादग्न्यैर्विश्वामित्रैश्चाविवाहइति **प्रयोगपारिजाते** तदयुक्तं बह्वृचश्रुतौयथैवांगिरसःसन्नुपेयां

---

१ तत्रभारद्वाजाच्छुंगात् वैश्वामित्रस्य शैशिरेः क्षेत्रेजातः शौंगशैशिरिर्ऋषिस्तस्य सगोत्रलक्षणाक्रांतत्वाद्‌द्विगोत्रत्वं ॥ २ अहर्वसिष्ठाः दिनकर्मणि वासिष्ठस्यप्रयुक्तकार्यभाजः रात्रिकर्मणि काश्यपस्यप्रयुक्तकार्यभाजइत्यर्थः ॥

तवपुत्रतां आंगिरसोजन्मनाख्याजीगर्तिःश्रुतःकविरित्यंगिरोगणस्थत्वेनभार्गवजामदग्न्यत्वस्मृतेर्हरिवंशादिस्मृतेश्चबाधात् तेनद्वौदेवरातौ एकआंगिरसःश्रुत्युक्तः अन्योभार्गवः तयोःकल्पभेदेप्यांगिरसेनदेवरातेन जामदग्न्यैर्भवत्येवविवाहः भार्गवेणतुनेतितत्त्वम् धनंजयानांविश्वामित्रैरत्रिभिश्चाविवाहः जातूकर्ण्यानां वसिष्ठैरत्रिभिश्चाविवाहः एवंदत्तक्रीतकृत्रिमस्वयंदत्तपुत्रिकापुत्रादीनांउत्पादकपालकयोःपित्रोर्गोत्रप्रवरावर्ज्यो इतिप्रवरमंजरीनारायणवृत्तिप्रयोगपारिजातादयः अत्रसर्वत्रोपपत्तयःमूलंच मत्कृतेप्रवरदर्पणेज्ञेयमितिदिक् ॥

## आतां द्विगोत्री सांगतो—

भरद्वाज गोत्रांतल्या शुंगऋषीपासून विश्वमित्रगोत्री शैशिरऋषीच्या क्षेत्राचे ठायीं ( पत्नीचे ठायीं ) झालेला शौंगशैशिरि नांवाचा ऋषि. त्याजवर गोत्राचें लक्षण येत असल्यामुळें तो गोत्र आहे. त्या शौंगशैशिरि गोत्राचे 'आंगिरसबार्हस्पत्यभारद्वाजकात्याक्षीलेति' पांच प्रवर. अथवा 'आंगिरसबार्हस्पत्यभारद्वाजशौंगशैशिरेति' पांच प्रवर. किंवा 'आंगिरसकात्याक्षीलेति' तीन प्रवर. यांचा सर्व भरद्वाजांशीं आणि सर्व विश्वामित्रांशीं विवाह होत नाहीं.

याचप्रमाणें **कपिल, कत, संकृति, पूतिमाष** इत्यादिकांचे—'आंगिरसगौरिवीतिसांकृत्येति' तीन प्रवर. अथवा 'शाक्त्यगौरिवीतिसांकृत्येति' तीन प्रवर. यांचा आपआपल्या गणाशीं, सर्व वसिष्ठांशीं, शौंगशैशिरींशीं आणि लौगाक्षींशीं विवाह होत नाहीं. कश्यपांशीं देखील विवाह होत नाहीं असें **प्रयोगपारिजातांत** सांगितलें आहे.

**लौगाक्षि,** दार्भायण, इत्यादि ३८ हून अधिक लौगाक्षि. त्यांचे 'काश्यपावत्सारवासिष्ठेति' तीन. किंवा 'काश्यपावत्सारासितेति' तीन प्रवर. हे अहर्वसिष्ठ आणि नक्तंकश्यप म्हणजे दिवसा कर्माविषयीं वासिष्ठगोत्री आणि रात्रीं कर्माविषयीं काश्यपगोत्री आहेत. यांचा वसिष्ठांशीं, कश्यपांशीं, आणि संकृतींशीं विवाह होत नाहीं.

**देवरात** गोत्राचा जामदग्न्य व विश्वामित्र यांच्याशीं विवाह होत नाहीं, असें **प्रयोगपारिजातांत** सांगितलें आहे. तें अयुक्त आहे. कारण, **बह्वृचश्रुतींत** ( ब्राह्मणांत ) "देवरात म्हणतो—मी आंगिरस असून तुझा ( विश्वामित्राचा ) पुत्र झालों आहें. तो अजीगर्ताचा पुत्र विद्वान व जन्मानें आंगिरस होता." या श्रुतीवरून आंगिरस गणांतील असल्यामुळें 'हा भार्गव जामदग्न्य आहे' या स्मृतीचा व हरिवंशादि स्मृतीचा बाध होत आहे. ह्या श्रुतीवरून व हरिवंशादि स्मृतीवरून दोन देवरात आहेत. श्रुतींत सांगितलेला एक आंगिरस देवरात. आणि दुसरा स्मृतींत सांगितलेला भार्गव देवरात. ते दोन निरनिराळ्या कल्पांत झालेले असले, तरी आंगिरस देवरात गोत्राचा जामदग्न्यांशीं विवाह होतच आहे. भार्गव देवराताचा जामदग्न्यांशीं विवाह होत नाहीं. हें तत्त्व समजावें.

**धनंजय** गोत्राचा विश्वामित्र आणि अत्रि यांच्याशीं विवाह होत नाहीं. **जातूकर्ण्यांचा** वसिष्ठ व अत्रि यांच्याशीं विवाह होत नाहीं. याचप्रमाणें दत्तक, क्रीत ( विकत घेतलेला ), स्वयंदत्त ( आपलें आपण दान केलेला ), पुत्रिकापुत्र इत्यादिकांचा जनक पित्याचे आणि पालक पित्याचे गोत्रप्रवरांशीं विवाह होत नाहीं, असें **प्रवरमंजरी, नारायणवृत्ति, प्रयोगपारिजात** इत्यादि ग्रंथांत सांगितलें आहे. या सर्वांविषयीं उपपत्ति व मूलप्रमाण हें मी ( कमलाकरभट्टानें ) केलेल्या **प्रवरदर्पणांत** पाहावें. ही दिशा दाखविली आहे.

क्षत्रियवैश्ययोस्तुपुरोहितगोत्रप्रवरावेवेतिसर्वसिद्धांतः यद्यपिबह्वृचपरिशिष्टेकपिभरद्वाजयोर्विवाहउक्तस्तथापि भरद्वाजाश्चकपयोगर्गारौक्षायणाइतिचत्वारोपि भरद्वाजगोत्रैक्यान्नान्वयुर्मिथः कपिगर्गभरद्वाजामिथोरौक्षायणाद्विजाः नोद्वहेयुःसगोत्रत्वात्प्रवरैक्याच्चकुत्रचिदितिस्मृत्यर्थसाराद्युक्तेरविवाहएवतयोरिति प्रवरमंजरी स्वगोत्राद्यज्ञानेतुसत्याषाढः अथाज्ञातबंधोःपुरोहितप्रवरेणाचार्यप्रवरेणवेति आचार्यगोत्रप्रवरानभिज्ञस्तुद्विजःस्वयम् दत्वात्मानंतुकस्मैचित्तद्गोत्रप्रवरोभवेत् यद्वास्वगोत्रप्रवरविधुरोजमदग्निजः

---

१ धनंजयानां विश्वामित्रमाधुच्छंदसधानंजयेति त्रयः प्रवराः आत्रेयार्चनानसधानंजयेतिपक्षांतरेप्रवरसाम्यात् सगोत्रत्वात् विश्वामित्रानुवृत्तेश्च । तदुक्तं आत्रेयस्यगणस्यापिविश्वामित्रगणस्य च ॥ धानंजयाख्यगोत्रेण नान्योन्यंपाणिपीडनमिति । अन्येतुपुत्रिकापुत्रा वामरथ्यादयस्तथा ॥ विश्वामित्रात्रिगोत्राभ्यां नोद्वहेयुर्धनंजया । इति वामरथ्याधनंजयाश्वविश्वामित्रात्रिभ्यांनोद्वहेयुरित्यर्थः ॥ २ जातूकर्ण्यानामिति । वासिष्ठात्रेयजातूकर्ण्येति त्रयः प्रवराः वसिष्ठात्र्योरनुवृत्तेः तदुक्तं । तथैवजातूकर्ण्याश्च वसिष्ठैरत्रिभिः सह ॥ नोद्वहेयुरितिशेषः ॥ ३ अनेनैव न्यायेन परगोत्रोत्पन्नदत्तकादीनामिदानींतनानामपिद्विगोत्रत्वात् जनकप्रतिग्रहीतृपित्रोर्द्वयोरपि सगोत्रैः सह अविवाहो ज्ञेयः ॥ नात्र पुरुषसंख्या तेन शतपुरुषोत्तरमपि द्विगोत्रत्वं तापैति इति धर्मसिंधुसारे ॥

**विवाहंचनतेनैवगोत्रेणतुसमाचरेदितिकश्चित् दिवोदासीयेपि स्वगोत्रप्रवराज्ञानेजमदग्निमुपाश्रयेत् ॥**

क्षत्रिय आणि वैश्य यांचें स्वतःचें गोत्र व प्रवर नाहीं. पुरोहिताचे गोत्र-प्रवर जे असतील तेच क्षत्रियवैश्यांचे गोत्रप्रवर समजावे, हा सर्व ग्रंथांचा सिद्धांत आहे. आतां जरी **बह्वृचपरिशिष्टांत** कपि आणि भरद्वाज यांचा परस्पर विवाह सांगितला आहे, तरी "भरद्वाज, कपि, गर्ग, आणि रौक्षायण ह्या चौघांचें भरद्वाज गोत्र एक असल्यामुळें यांचा परस्पर विवाह होणार नाहीं. कपि, गर्ग, भरद्वाज, व रौक्षायण ह्या द्विजांचें एक गोत्र व एक प्रवर असल्यामुळें ह्यांनीं परस्पर विवाह करूं नये" अशा **स्मृत्यर्थसारा**दिकांच्या उक्तीवरून कपि व भरद्वाज ह्यांचा विवाह होतच नाहीं, असें **प्रवरमंजरी**कार सांगतो. आपले गोत्रप्रवर माहीत नसतील तर सांगतो **सत्याषाढ**—"आतां ज्याचे प्रवर माहीत नसतील त्यांचीं विवाहादि कार्यें पुरोहिताच्या प्रवरानें अथवा उपनयनकर्त्या आचार्याच्या प्रवरानें करावीं." "आचार्याचे गोत्रप्रवर जाणत नसेल अशा द्विजानें कोणाला तरी आपलें आपण दान करून त्याचे गोत्रप्रवरी आपण व्हावें. अथवा आपले गोत्रप्रवर जाणत नसेल तो जमदग्नि-गोत्रप्रवरी समजावा. त्याच जमदग्नि गोत्रप्रवराशीं त्यानें विवाह करूं नये" असें कोणी एक सांगतो. **दिवोदासीयांत**ही— "आपल्या गोत्रप्रवरांचें ज्ञान नसेल तर जमदग्निगोत्राचा आश्रय करावा."

**अथमातृगोत्रवर्जननिर्णयः शातातपः** मातुलस्यसुतामूढ्वामातृगोत्रांतथैवच समानप्रवरांचैव गत्वाचांद्रायणंचरेत् यद्यपि सगोत्रांमातुरप्येकेनेच्छंत्युद्वाहकर्मणि जन्मनाम्नोरविज्ञानेप्युद्वहेदविशंकितइति **व्यासोक्ते**रज्ञातनामत्वेनसगोत्रत्वदोषस्तथापिनेदंकलौप्रवर्तते गोत्रान्मातुःसपिंडाच्चविवाहोगोवधस्तथेति कलिवर्ज्यत्वोक्तेः इदंमातृगोत्रवर्जनंमाध्यंदिनीयानामेव मातृगोत्रंमाध्यंदिनीयानामपुत्रायाश्चेति **सत्याषाढोक्ते**रितिकश्चित्तन्निर्मूलम् अतएवआह**प्रवरमंजरीकारः** दोषस्यातिगुरुत्वात्सर्वेषांमातृगोत्रंवर्ज्यमिति यत्तु एकस्मिन्प्रवरेतुल्येमातृगोत्रेवरस्यच तमुद्वाहंनकुर्वीतसाकन्याभगिनीस्मृतेतिमातृकुलेप्रवरचिंतनमुक्तम् तदासुरादिविवाहोढापरमितिदिक् । विस्तरस्तुग्रंथांतरेभ्योज्ञेयः ।

## आतां मातृगोत्रवर्जनाचा निर्णय सांगतो—

**शातातप**—"मातुलाची कन्या, मातेच्या गोत्रांतील ( मातामहाच्या गोत्रांतील ) कन्या आणि सप्रवर कन्या यांच्याशीं विवाह करून गमन करील तर चांद्रायण प्रायश्चित्त करावें." आतां जरी "किती एक विद्वान् विवाहाविषयीं मातेच्या गोत्रांतली देखील कन्या इच्छीत नाहींत. त्या मातृगोत्रांतील कन्येच्या वडिलांचें, अमुकापासून अमुक झाला इत्यादि जन्म, आणि त्यांचें नांव बरोबर माहीत नसेल तर कोणतीही शंका न धरितां तिच्याशीं विवाह करावा" ह्या **व्यास**वचनावरून नांवाचें ज्ञान नसेल तर त्या कन्येला मातृसगोत्रत्वरूप दोष नाहीं: तरी हें वचन कलियुगांत प्रवृत्त होत नाहीं. कारण, "मातेच्या गोत्रांतील व मातेच्या सपिंडांतील कन्येशीं विवाह आणि मधुपर्कांत गोवध हे कलियुगांत वर्ज्य करावे" असें पुढें ( तृतीयपरिच्छेद-पूर्वार्धाच्या शेवटीं ) कलिवर्ज्यप्रकरणांत सांगितलें आहे. ही मातृगोत्रांतील कन्या वर्ज्य सांगितली ती माध्यंदिन शाख्यांनाच आहे. इतरांना वर्ज्य नाहीं. कारण, "मातृगोत्र वर्ज्य सांगितलें तें माध्यंदिनांनाच समजावें" असें **सत्याषाढाचें** वचन आहे, असें कोणी एक सांगतो. तें निर्मूल आहे. म्हणूनच **प्रवरमंजरीकार** सांगतो—"मातृगोत्रांतील कन्या वरणें हा दोष फार मोठा असल्यामुळें सर्वांना मातृगोत्र वर्ज्य आहे." आतां जें "वराच्या मातेचें गोत्र व प्रवर आणि वधूचें गोत्र व प्रवर एक झाला असतां त्या वधूवरांचा विवाह करूं नये. कारण, ती कन्या त्या वराची भगिनी म्हटली आहे." ह्या वचनानें मातेच्या कुलांतील प्रवर पहावा, म्हणून सांगितलें आहे. तो प्रकार आसुर, गांधर्व इत्यादि विवाहानें विवाहित मातेविषयीं समजावा. ही दिशा दाखविली आहे. याचा विस्तार पाहणें असल्यास इतर ग्रंथांतून पाहावा.

**सगोत्रादिविवाहेप्रायश्चित्तंस्मृत्यर्थसारे** इत्थंसगोत्रसंबंधविवाहविषयेस्थिते यदिकश्चिज्ज्ञानतस्तांकन्यामूढ्वोपगच्छति गुरुतल्पव्रताच्छुद्ध्येद्गर्भस्तज्जोऽन्त्यतांव्रजेत् भोगतस्तांपरित्यज्यपालयेज्जननीमिव अज्ञाना-

---

१ मातृगोत्रामितिसगोत्रानिषेधेनैवमातृगोत्रानिषेधसिद्धेर्मातुर्विवाहात्पूर्वगोत्रमित्यर्थात्सिद्धं मातामहगोत्रामित्यर्थः ॥ २ आसुरादीति पुत्रिकापुत्रोपलक्षणमिदम् ॥ ३ मातामहगोत्रांतील कन्या वर्ज्य सांगितली ती गांधर्व, आसुर इत्यादि विवाहानें विवाहित स्त्रियेच्या पुत्रांना वर्ज्य समजावी. कारण, त्या गांधर्वादि विवाहांत विधिपूर्वक दान नसल्यामुळें पित्याच्या गोत्रापासून ती स्त्री सुटत नाहीं. ब्राह्म विवाहानें विवाहित स्त्रियेच्या पुत्रांना तर सर्वांना मातामहगोत्र वर्ज्य नाहीं. किंतु माध्यंदिनशाखयांनाच वर्ज्य आहे. कारण, 'मातृगोत्र माध्यंदिनांना वर्ज्य' असें सत्याषाढवचन आहे. आणि तसाच शिष्टाचारही आहे. असा **धर्मसिंधुसाराचा** अभिप्राय आहे. ४ चांद्रायण, कृच्छ्र यांचीं स्वरूपें ग्रंथाच्या शेवटीं देऊं.

दैंदवैःशुद्ध्येत्रिभिर्गर्भस्तुकाश्यपः एवंसापिंड्येपि सपिंडापत्यदारेषुप्राणत्यागोविधीयतइतिबृहद्यमोक्तेः तिथितत्त्वेबौधायनः सपिंडांसगोत्रांचेदमत्योपयच्छेन्मातृवदेनांबिभृयात् ।

सगोत्र सपिंड कन्येशीं विवाह झाला असतां प्रायश्चित्त सांगतो **स्मृत्यर्थसारांत**—"याप्रमाणें सगोत्रसंबंधी विवाहविषय उपस्थित झाला असतां जर कोणी जाणून त्या सगोत्र कन्येशीं विवाह करून तिजप्रत गमन करील तर त्यानें गुरुपत्नीगमनाचें प्रायश्चित्त करावें, म्हणजे तो शुद्ध होईल. आणि त्यापासून झालेला गर्भ असेल तो चांडाल होईल. याकरितां सगोत्र कन्येशीं विवाह झाला असतां संभोगाविषयीं तिचा त्याग करून मातेसारखें तिचें पालन करावें. न जाणून सगोत्र कन्येशीं विवाह करील व तिचा संभोग करील तर तीन चांद्रायणांनीं त्याची शुद्धि होईल आणि त्यापासून झालेला गर्भ काश्यप गोत्री होईल." हाच प्रकार सपिंडांतील कन्येविषयीं देखील समजावा. कारण, "सपिंडांतील कन्या व स्त्रिया यांचे ठायीं गमन केलें असतां प्राणत्याग होईल असें प्रायश्चित्त सांगितलें आहे" असें **बृहद्यमाचें** वचन आहे. **तिथितत्त्वांत बौधायन**—"सगोत्र व सपिंड कन्येशीं न जाणून जर विवाह करील तर तिचें मातेसारखें पालन करावें."

**कन्याविवाहकालउक्तोज्योतिर्निबंधे** षडब्दमध्येनोद्वाह्याकन्यावर्षद्वयंयतः सोमोभुंक्तेततस्तद्वद्गंधर्वश्चतथाऽनलः **राजमार्तंडः** अयुग्मेदुर्भगानारीयुग्मेतुविधवाभवेत् तस्माद्गर्भान्वितेयुग्मेविवाहेसा पतिव्रता मासत्रयादूर्ध्वमयुग्मवर्षेयुग्मेपिमासत्रयमेवयावत् विवाहशुद्धिंप्रवदंतिसंतोवात्स्यादयःस्त्रीजनिजन्ममासात् **पराशरमाधवीयेतु** जन्मतोगर्भाधानाद्वापंचमाब्दात्परंशुभं कुमारीवरणंदानंमेखलाबंधनं तथेत्युक्तम् **संबंधतत्त्वेयमः** कन्याद्वादशवर्षाणियाऽप्रदत्तावसेद्गृहे ब्रह्महत्यापितुस्तस्याःसाकन्यावरयेत्स्वयं **भारते** त्रिंशद्वर्षःषोडशाब्दांभार्यांविंदेतनग्निकां त्र्यष्टवर्षोऽष्टवर्षांवाधर्मेसीदतिसत्वरः अतोऽप्रवृत्तेरजसिकन्यांदद्यात्पितासकृत् **तत्रैव** सप्तसंवत्सरादूर्ध्वंविवाहःसार्ववर्णिकः कन्यायाःशस्यतेराजन्नन्यथाधर्मगर्हितः **राजमार्तंडः** राहुग्रस्तेतथायुद्धेपितृणांप्राणसंशये अतिप्रौढाचयाकन्याचंद्रलग्नबलेनतु **मनुः** त्रिंशद्वर्षोवहेत्कन्यांहृद्यांद्वादशवार्षिकीं त्र्यष्टवर्षोष्टवर्षांवाधर्मेसीदतिसत्वरः यद्यपि विवाहस्त्वष्टवर्षायाःकन्यायाःशस्यतेबुधैरिति**संवर्तोक्तेः**रतऊर्ध्वंरजस्वलेत्यादेश्चदशवर्षादूर्ध्वंविवाहोनिषिद्धः तथापिदातुरभावेद्वादशषोडशाब्देज्ञेयेत्रीणिवर्षाण्यृतुमतीकांक्षेतपितृशासनमिति **पराशरमाधवीयेबौधायनोक्तेश्च मनुः** स्त्रीसंबंधे दशैतानिकुलानिपरिवर्जयेत् हीनक्रियंनिःपुरुषंनिश्छंदोरोमशार्शसम क्षय्यामयाव्यपस्मारिश्वित्रिकुष्ठिकुलानिच नर्क्षवृक्षनदीनाम्नींनांत्यपर्वतनामिकां नपक्ष्यहिप्रेष्यनाम्नींनविभीषणनामिकाम् **यमः** तस्मादुद्वाहयेत्कन्यांयावन्नर्तुमतीभवेत् तथामूलजादीनांफलंप्रागुक्तम् **तथा** वर्णवश्यग्रहमैत्र्यादिघटितविचारोज्योतिर्विद्भ्योज्ञेयःविस्तरात्तुनोच्यते ।

कन्येचा विवाहकाल सांगतो **ज्योतिर्निबंधांत**—"सहा वर्षांच्या आंत कन्येचा विवाह करूं नये. कारण, दोन वर्षें सोम तिला भोगतो, नंतर दोन वर्षें गंधर्व भोगतो, पुढें दोन वर्षें अग्नि भोगतो." **राजमार्तंड**—"कन्येचा विषमवर्षीं विवाह केला असतां ती स्त्री दुर्भगा होईल. आणि समवर्षीं विवाह केला असतां ती स्त्री विधवा होईल. तस्मात् गर्भापासून समवर्षीं विवाह करावा, म्हणजे ती पतिव्रता होईल. कन्येचें जन्म ज्या मासांत असेल त्या जन्ममासापासून अयुग्म ( विषम ) वर्षीं तीन महिन्यांनंतर आणि समवर्षीं तीन महिनेपर्यंत विवाहाचा काल शुद्ध आहे, असें वात्स्यादिमुनि सांगतात." **पराशरमाधवीयांत** तर "कन्येचें वरण, कन्येचें दान आणि मौंजीबंधन हें जन्मापासून किंवा गर्भस्थापनापासून पांचव्या वर्षाच्या पुढें शुभ आहे" असें सांगितलें आहे. **संबंधतत्त्वांत यम**—"बारा वर्षेपर्यंत जी अविवाहित कन्या पित्याच्या घरीं राहील तिच्या पित्याला ब्रह्महत्या दोष प्राप्त होईल. म्हणून त्या कन्येनें आपण होऊन पति वरावा." **भारतांत**—"तीस वर्षांच्या पुरुषानें ऋतुप्राप्त न झालेली अशी सोळा वर्षांची स्त्री वरावी. अथवा सोळा वर्षांच्या पुरुषानें आठ वर्षांची भार्या वरावी. म्हणजे धर्माचे ठायीं तो राहतो. नग्निका ( ऋतु प्राप्त न झालेली ) वरावी, असें आहे म्हणून कन्येला ऋतु प्राप्त झाला नसेल तोंपर्यंत तिचें दान पित्यानें एकवार करावें." तेथेंच—"सात वर्षांच्या पुढें कन्येचा विवाह ब्राह्मणादि सर्व वर्णांना प्रशस्त आहे. असा न होईल तर तो धर्मानें निंदित होईल." **राजमार्तंड**—"चंद्रसूर्यग्रहणांत सांगितलेल्या कर्माविषयीं, युद्धांत करावयाच्या कार्याविषयीं, मातापितरांच्या वांचण्याचा संशय उत्पन्न असतां कन्येच्या विवाहाविषयीं आणि अति प्रौढ झालेल्या कन्येच्या विवाहाविषयीं चंद्रबळ व लग्नबळ पाहावयाचें कारण नाहीं." **मनु**—"तीस वर्षांच्या पुरुषानें आपणास आवडणारी बारा वर्षांची कन्या वरावी. अथवा चोवीस वर्षांच्या वरानें आठ वर्षांची कन्या वरावी. म्हणजे तो धर्माचे ठायीं स्थिर होतो."

आतां जरी "आठ वर्षांच्या कन्येचा विवाह विद्वानांनीं प्रशस्त सांगितला आहे" ह्या **संवर्त**वचनावरून; आणि "आठ वर्षांची गौरी, नऊ वर्षांची रोहिणी, दहा वर्षांची कन्या, याच्या पुढें रजस्वला म्हटली आहे[१]" इत्यादि **बृहस्पति**वचनावरूनही दहा वर्षांच्या पुढें कन्येचा विवाह निषिद्ध आहे; तथापि दात्याच्या अभावीं बारा वर्षांच्या व सोळा वर्षांच्या कन्येचा विवाह सांगितला आहे, असें समजावें. आणि "विवाहाच्या पूर्वीं ऋतु प्राप्त झालेल्या कन्येनें, पित्यानें करावयाच्या विवाहाची तीन वर्षें प्रतीक्षा करावी, नंतर स्वतः आपण होऊन योग्य वराला वरावें" असें **पराशरमाधवीयांत बौधायन**वचनही आहे. **मनु**—"स्त्रीसंबंध ( विवाह ) करावयाचा असतां दहा कुलांतील कन्या वर्ज्य करावी. तीं दहा कुलें येणेंप्रमाणें—ज्या कुलांत वेदशास्त्रविहित कर्मे होत नाहींत असलें कुल, ज्या कुलांत पुरुष उत्पन्न होत नाहींत असलें कुल, वेदाध्ययनरहित कुल, अंगावर बहुत केश उत्पन्न होणारें कुल, ज्यांत मुळव्याधीचा रोग उत्पन्न होत आहे असलें कुल, ज्यांत क्षयरोगी होतात असलें कुल, ज्यांत दीर्घकालपर्यंत रोगी असतात असलें कुल, ज्यांत अपस्मार ( फेपरें ) येत असतो असलें कुल, ज्या कुलांत अंगावर पांढरें कोड होतें तें कुल, आणि ज्या कुलांत कुष्ठ ( महारोग ) उत्पन्न आहे तें कुल, ह्या दहा कुलांतील कन्या वर्ज्य करावी. तसेंच—आस्वल, वृक्ष, नदी, अंत्यज, पर्वत, पक्षी, सर्प, दास, यांच्या नांवाची आणि भयकारक नांवाची कन्या वरूं नये." **यम**—"तस्मात् जोंपर्यंत ऋतुमती झाली नसेल तोंपर्यंत कन्येशीं विवाह करावा." तसेंच मूलनक्षत्र, आश्लेषा-नक्षत्र इत्यादिकांवर झालेल्या कन्यांचें फल पूर्वीं जातकनिर्णयप्रसंगीं सांगितलें आहे, त्याचा विचार करावा. तसेंच वर्ण, वश्य, ग्रहमैत्री इत्यादि वधूवरांचा घटित विचार ज्योतिर्वेत्त्यांपासून जाणावा. फार विस्तार होईल म्हणून येथें सांगत नाहीं.

**अथगुर्वर्कबलं ज्योतिर्निबंधेगर्गः** स्त्रीणांगुरुबलंश्रेष्ठंपुरुषाणांरवेर्बलम् तयोश्चंद्रबलंश्रेष्ठमितिगर्गेणभाषितम् जन्मत्रिदशमारिस्थःपूजयाशुभदोगुरुः विवाहेऽथचतुर्थाष्टद्वादशस्थोमृतिप्रदः **देवलः** नष्टात्मजाधनवतीविधवाकुशीलापुत्रान्विताहतधवासुभगाविपुत्रा स्वामिप्रियाविगतपुत्रधवाधनाढ्यावंध्याभवेत्सुरगुरौक्रमशोभिजन्मा **बृहस्पतिः** झपचापकुलीरस्थोजीवोप्यशुभगोचरः अतिशोभनतांदद्याद्विवाहोपनयादिषु **लल्लः** द्वादशदशमचतुर्थेजन्मनिषष्ठाष्टमेतृतीयेच प्राप्तेपाणिग्रहणेजीवेवैधव्यमाप्नोति **गर्गः** सर्वत्रापिशुभंदद्याद्द्वादशाब्दात्परंगुरुः पंचषष्ठाब्दयोरेवशुभगोचरतामता सप्तमात्पंचवर्षेपुस्वोच्चस्वर्क्षगतोयदि अशुभोपिशुभंदद्याच्छुभर्क्षेपुकिंपुनः रजस्वलायाःकन्यायागुरुशुद्धिंनचिंतयेत् अष्टमेपिप्रकर्तव्योविवाहस्त्रिगुणार्चनात् अर्कगुर्वोर्बलंगौर्यारोहिण्यर्कबलास्मृता कन्याचंद्रबलाप्रोक्तावृषलीलग्नतोबला अष्टवर्षाभवेद्गौरीनववर्षाचरोहिणी दशवर्षाभवेत्कन्याअतऊर्ध्वंरजस्वला ।

## आतां गुरु व रवि यांचें बल सांगतो—

**ज्योतिर्निबंधांत गर्ग**—"स्त्रियांना गुरुबळ श्रेष्ठ आणि पुरुषाला रविबळ श्रेष्ठ. स्त्रिया व पुरुष या दोघांना चंद्रबळ श्रेष्ठ आहे, असें गर्गानें सांगितलें आहे. विवाहकालीं गोचरींचा जन्मस्थ, तिसरा, दहावा. आणि सहावा गुरु असतां पूजेनें ( बृहस्पतिशांति केल्यानें ) शुभकारक होतो. आणि चवथा, आठवा, व बारावा असला म्हणजे तो मृत्युदायक आहे." **देवल**—"स्त्रियेच्या विवाहकालीं गुरु जन्मराशीस असतां नष्टपुत्रा, दुसरा असतां धनयुता, तिसरा असतां विधवा, चवथा असतां निंद्यशीला, पांचवा असतां पुत्रयुता, सहावा असतां मृतभर्तृका, सातवा असतां सुभगा, आठवा असतां पुत्ररहिता, नववा असतां पतिप्रिया, दहावा असतां पतिपुत्ररहिता, अकरावा असतां धनाढ्य, आणि बारावा असतां वंध्या अशी स्त्री होते." **बृहस्पति**—"मीन, धनु आणि कर्क या स्थानींचा गुरु जन्मराशीस अशुभ असला तरी विवाह, उपनयन इत्यादि मंगलकार्याचे ठायीं तो अति शुभकारक होईल." **लल्ल**—"स्त्रियेच्या पाणिग्रहण ( विवाह ) समयीं बारावा, दहावा, चवथा, जन्मराशिस्थ, सहावा, आठवा, व तिसरा गुरु प्राप्त झाला असतां त्या स्त्रियेला वैधव्य प्राप्त होतें." **गर्ग**—"कन्येचा विवाह बारा वर्षांच्या पुढें करावयाचा असतां कोणत्याही ठिकाणीं गुरु असला तरी तो शुभदायक होतो. पांचव्या व सहाव्या दोन वर्षांत विवाह कर्तव्य असतां गोचरींचा गुरु शुभस्थानीं असावा, असें सांगितलें आहे. सात वर्षांपासून बाराव्या वर्षापर्यंत पांच वर्षांत विवाह कर्तव्य असतां जर स्वोच्चींचा किंवा स्वस्थानींचा गुरु असेल तर मग तो गोचरीं अशुभस्थानीं असला तरी शुभदायक होईल, मग शुभस्थानीं असला म्हणजे शुभदायक होईल हें काय सांगावें? ऋतु प्राप्त झालेल्या कन्येचा विवाह कर्तव्य असतां गुरुबलाचा विचार करूं नये. गोचरीं आठवा गुरु असला तरी तीन

---

१ द्वादशेवृषलीस्मृतेतिपाठांतरं । अस्यफलश्रुतिमाह । मात्स्यः—गौरींददद्ब्रह्मलोकंसावित्रंरोहिणींददत् ॥ कन्यांददत्स्वर्गलोकमतः परमसद्गतिम् ॥ प्राप्नोतीतिशेषः ॥ गौरीविवाहितासौख्यसंपन्नास्यात्पतिव्रता ॥ रोहिणीधनधान्यादिपुत्राढ्यासुभगाभवेत् ॥ कन्याविवाहितासंपत्समृद्धास्वामिपूजितेति ॥

वेळां गुरुपूजा ( बृहस्पतिशांति ) करून विवाह करावा. गौरीला रविगुरूंचें बळ पाहावें. रोहिणीला रवीचें बळ पाहावें. कन्येला चंद्रबळ पाहावें. आणि वृषलीला ( ऋतुमतीला ) लग्नबळ पाहावें. आठ वर्षांची कन्या गौरी म्हटली आहे, नऊ वर्षांची रोहिणी, दहा वर्षांची ती कन्या म्हटली आहे. याच्यापुढें रजस्वला म्हटली आहे."

**अथबृहस्पतिशांतिः शौनकः** कन्यकोद्वाहकालेतुआनुकूल्यंनविद्यते ब्राह्मणस्योपनयनेगुरोर्विधिरुदाहृतः सुवर्णेनगुरुंकृत्वापीतवस्त्रेणवेष्टयेत् ईशान्यांधवलंकुंभंधान्योपरिनिधायच दमनंमधुपुष्पंचपालाशंचैवसर्षपान् मांसीगुडूच्यपामार्गीविडंगीशंखिनीवचा सहदेवीहरिक्रांतासर्वौषधिशतावरी बलाचसहदेवीचनिशाद्वितयमेवच कृत्वाज्यभागपर्यंतंस्वशाखोक्तविधानतः ग्रहोक्तमंडलेभ्यर्च्यपीतपुष्पाक्षतादिभिः देवपूजोत्तरेकालेततःकुंभानुमंत्रणम् अश्वत्थसमिधश्चाज्यंपायसंसर्पिषायुतं यवव्रीहितिलाःसाज्यामंत्रेणैवबृहस्पतेः अष्टोत्तरशतंसर्वंहोमशेषंसमापयेत् पुत्रदारसमेतस्यअभिषेकंसमाचरेत् कुंभाभिमंत्रणोक्तैश्चसमुद्रज्येष्ठमंत्रतः प्रतिमांकुंभवस्त्रंचआचार्यायनिवेदयेत् ब्राह्मणान्भोजयेत्पश्चाच्छुभदःस्यान्नसंशयः **इतिबृहस्पतिशांतिः।**

## आतां बृहस्पतिशांति सांगतो—

**शौनक—**"कन्येच्या विवाहकालीं आणि ब्राह्मणाच्या उपनयनकालीं गुरूचें आनुकूल्य ( बळ ) नसेल तर विधि सांगितला आहे, तो असा—सुवर्णाची गुरुप्रतिमा करून पीतवस्त्रानें वेष्टित करावी. स्थंडिलाचे ईशानी दिशेस धान्यराशीवर श्वेतकलश स्थापून त्यांत पंचगव्य आणि कुशोदक घालून दवणा, मोहाचें पुष्प, पलाशपुष्प, सर्षप, जटामांसी, गुळवेल, आघाडा, वावडिंग, शंखिनी, वेखंड, सहदेवी, विष्णुक्रांता, सर्वौषधि, शतावरी, चिकणा, सहदेवी, हळद, आंबेहळद, ह्या सर्व औषधि घालून त्याजवर पूर्णपात्र ठेऊन त्याजवर ग्रहमखांत सांगितल्याप्रमाणें पीताक्षतांनीं निर्मित दीर्घ चतुरस्र पीठावर सांगितलेली गुरुप्रतिमा स्थापून स्थंडिलावर अग्निस्थापनादिक कृत्य आपल्या शाखेंत सांगितल्याप्रमाणें आज्यभागापर्यंत करून नंतर त्या प्रतिमेवर पीत वस्त्रें दोन, पीत यज्ञोपवीत, पीतचंदन, पीताक्षता, पीतपुष्पें, घृतदीप, दध्योदननैवेद्य, सुवर्णदक्षिणा इत्यादि षोडशोपचारांनीं गुरुपूजा करावी. नंतर ग्रहमखांत सांगितलेल्या रीतीनें कुंभानुमंत्रण करावें. नंतर बृहस्पतीच्या मंत्रानें अश्वत्थसमिधा, आज्य, घृतयुक्त पायस, घृतयुक्त मिश्रित यवव्रीहितिल, ह्या चार द्रव्यांचा वेगवेगळा अष्टोत्तरशत होम करावा. नंतर प्रायश्चित्तादि होमशेष समाप्त करून पीतगंधाक्षतपुष्पयुक्त ताम्रपात्रस्थ उदकानें अर्घ्य द्यावें. नंतर त्या कुंभांतील उदक घेऊन कुंभाभिमंत्रणाला सांगितलेल्या मंत्रांनीं, आणि समुद्रज्येष्ठा० ह्या मंत्रांनीं पुत्रस्त्रीसहित यजमानाला अभिषेक करावा. नंतर ती प्रतिमा, कलश, वस्त्रें हीं आचार्याला द्यावीं. नंतर ब्राह्मणांस भोजन घालावें. असें केलें असतां गुरु शुभदायक होईल, यांत संशय नाहीं." याप्रमाणें बृहस्पतिशांति समजावी.

**शौनकः** गुर्वादित्ये[1]व्यतीपातेवक्रातीचारगेगुरौ नष्टेशशिनिशुक्रेवाबालेवृद्धेथवागुरौ पौषेचैत्रेऽथवर्षासुशरद्यधिकमासके केतूद्गमेनिरंशे[2]र्केसिंहस्थेमरमंत्रिणि विवाहव्रतयात्रादिपुरहर्म्यगृहादिकं क्षौरंविद्योपविद्यांचयत्नतःपरिवर्जयेत् **मदनपारिजातेज्योतिःसागरे** बालेशुक्रेवृद्धेशुक्रेवृद्धेजीवेनष्टेजीवे बालेजीवेजीवेसिंहेसिंहादित्येजीवादित्ये तथामलिम्लुचेमासिसुराचार्येतिचारगे वापीकूपविवाहादिक्रियाःप्रागुदितास्त्यजेत् सिंहस्थंमकरस्थंचगुरुंयत्नेनवर्जयेत् **लल्लः** अतिचार[3]गतोजीवस्तंराशिंनैवचेत्पुनः लुप्तःसंवत्सरो ज्ञेयःसर्वकर्मबहिष्कृतः सिंहस्थगुरोरपवाद[4]माह**पराशरः** गोदाभागीरथीमध्येनोद्वाहःसिंहगेगुरौ मघास्थेसर्वदेशेषुतथामीनगतेरवौ **वसिष्ठोपि** विवाहोदक्षिणेकूलेगौतम्यानेतरत्रतु भागीरथ्युत्तरेकूलेगौतम्यादक्षिणेतथा विवाहोव्रतबंधश्चसिंहस्थेज्येनदुष्यति ।

**शौनक—**"व्यतीपात, गुर्वादित्य ( ह्म० गुरूचे राशीस ( धन-मीनास ) सूर्य, आणि सूर्याचेराशीस ( सिंहास ) गुरु तो गुर्वादित्य ), गुरूचा वक्र, अतिचार ( शीघ्रगतीनें एका वर्षांत एक राशी उल्लंघन करून दुसऱ्या राशीस जाणें ), नष्टचंद्र, शुक्राचें व गुरूचें अस्त, बालत्व आणि वृद्धत्व, पौषमास, चैत्रमास, वर्षाकाल, शरदृतु, अधिकमास, धूमकेतूचा उदय, निरंशीं रवि, सिंहस्थगुरु, यांतून कोणतेंही असतां विवाह, मौंजीबंधन, यात्रा, नगर, बंगला, गृह, चौल, विद्या, उपविद्या हीं कृत्यें यत्नानें वर्ज्य करावीं." **मदनपारिजातांत ज्योतिःसागरांत—**"शुक्राचें बालत्व आणि वृद्धत्व, गुरूचें अस्त, बाल्य

---

१ गुरुक्षेत्रगतोभानुर्भानुक्षेत्रगतोगुरुः । गुर्वादित्यःसविज्ञेयोगर्हितःसर्वकर्मसु ॥ २ निरंशेके राशिप्रथमभागस्थेइत्यर्थः । ३ शीघ्रगत्यापूर्वराशिशेषमतिक्रम्यराश्यंतरसंचारोतिचारस्तंप्राप्तोगुरुः पुनःपूर्वराशिंवक्रगत्यायदिनायातितदासलुप्तसंवत्सरःसर्वकर्मसुवर्ज्यः । तत्र मेषवृषभवृश्चिककुंभमीनराशिषुनदोषः । ४ अपवादमितिआवश्यकेकर्मणीत्यर्थः ।

आणि वार्धक्य, सिंहस्थगुरु, सिंहस्थरवि, गुर्वादित्य, मलमास, गुरूचा अतिचार, यांतून कांहींएक असतां पूर्वी सांगितलेल्या वापी, कूप, विवाह इत्यादि क्रिया करूं नयेत. ह्या क्रियांविषयीं सिंहाचा गुरु आणि मकराचा गुरु यत्नानें टाकावा." **लल्ल**—"शीघ्रगतीनें एक राशि भोगून पुढच्या राशीस गेलेला गुरु जर पुनः मागच्या राशीस न येईल तर तो संवत्सर लुप्त जाणावा. तो संवत्सर सर्व कर्मांना बहिष्कृत आहे." सिंहस्थ गुरूचा अपवाद सांगतो **पराशर**—"सिंहस्थ गुरु असतां गोदा आणि भागीरथी यांच्या मध्यप्रदेशीं विवाह होत नाहीं. मघा नक्षत्राग गुरु असतां सर्व देशांत विवाह होत नाहीं. आणि मीनाग रवि असतां विवाह होत नाहीं." **वसिष्ठ**ही—"सिंहस्थ गुरु असतां गोदेच्या दक्षिणतीरास विवाह होतो. इतर ठिकाणीं होत नाहीं. सिंहस्थ गुरु असतां भागीरथीच्या उत्तरेस आणि गोदेच्या दक्षिणेस विवाह आणि मौंजीबंधन दूषित होत नाहीं."

कन्यादातृक्रममाह**याज्ञवल्क्यः** पिता[1]पितामहोभ्रातासकुल्योजननीतथा कन्याप्रदःपूर्वनाशेप्रकृतिस्थः परःपरः अप्रयच्छन्समाप्नोतिभ्रूणहत्यामृतावृतौ गम्यं[2]त्वभावेदातॄणांकन्याकुर्यात्स्वयंवरं भ्रातॄणांसंस्कृतानामेवाधिकारमाहसएव**याज्ञवल्क्यः** असंस्कृतास्तुसंस्कार्याभ्रातृभिःपूर्वसंस्कृतैः भगिन्यश्चनिजादंशाद्दत्वांशंतुतुरीयकम्[3] अत्रचकारेणपूर्वसंस्कृतैरित्यस्यानुवृत्तेर्विवाहपर्याप्तद्रव्यदानेस्वांशचतुर्थभागदानेवासंस्कृतग्रहणं व्यर्थंस्यात् अतःकर्तृनियमोऽयं तेनानुपनीतभ्रातृमात्रादिसत्त्वेमात्रादेरेवाधिकारोनभ्रातुरित्युक्तं**संबंधतत्त्वादौ** कन्यास्वयंवरेमातुर्दातृत्वेचताभ्यामेवनांदीश्राद्धंकार्यम् तत्रचस्वयंप्रधानसंकल्पमात्रंकृत्वान्यद्ब्राह्मणद्वाराकारयेदिति**प्रयोगपारिजाते** वरस्तुसंस्कृतभ्रात्राद्यभावेस्वयमेवनांदीश्राद्धंकुर्यान्न नमाता पुत्रेषुविद्यमानेषुनान्यंवैकारयेत्स्वधामितिनिषेधात् उपनयनेनकर्माधिकारस्यजातत्वाच्चेति**पृथ्वीचंद्रोदयः माधवीयेपरार्केचनारदः** पितादद्यात्स्वयंकन्यांभ्रातावानुमतेपितुः मातामहोमातुलश्चसकुल्योबांधवस्तथा मातात्वभावेसर्वेषांप्रकृतौयदिवर्तते तस्यामप्रकृतिस्थायांकन्यांदद्युःस्वजातयः सकुल्यःपितृपक्षीयोबांधवोमातृवंशजः **मदनपारिजाते कात्यायनः** स्वयमेवौरसींदद्यात्पित्रभावेस्वबांधवाः मातामहस्ततोन्यांहिमातावाधर्मजांसुताम् ततोन्यामौरसीभिन्नां धर्मजांनियोगान्क्षेत्रजांमातामहोमातामातुलोवादद्यात् तेनौरसीदाने पितृबंधुषुसत्सुमातामहादीनांनाधिकारः अनुमतिंविना अस्यापवादस्तत्रैव दीर्घप्रवासयुक्तेषुपौगंडेषुचबंधुषु मातातुसमयेदद्यादौरसीमपिकन्यकां **मनुः** यदातुनैवकश्चित्स्यात्कन्याराजानमात्रजेत् ।

कन्यादानाचे अधिकारी क्रमानें सांगतो **याज्ञवल्क्य**—"कन्येचा पिता प्रथम अधिकारी, त्याच्या अभावीं तिचा पितामह, त्याच्या अभावीं तिचा भ्राता, त्याच्या अभावीं सकुल्य ( पितृकुलांतील पितृव्यादिक, त्याच्या अभावीं मातृकुलांतील मातामह, मातुल इत्यादिक ), त्याच्या अभावीं माता हे कन्येच्या दानाविषयीं अधिकारी होत. हे सांगितलेले अधिकारी स्वस्थचित्त असतील तर समजावे. कोणत्याही कारणानें अस्वस्थचित्त असतील तर पुढचा पुढचा अधिकारी होतो. यांतून कोणता अधिकारी असेल त्यानें कन्येचा विवाह केला नाहीं तर तिच्या प्रत्येक ऋतुकालीं त्याला भ्रूणहत्यादोष प्राप्त होईल. ह्या वर सांगितलेल्या सर्व अधिकाऱ्यांच्या अभावीं कन्येनें विवाहसंबंध करण्यास योग्य अशा पतीला स्वतः आपण होऊन वरावें." भ्रात्यांना अधिकार सांगितला तो संस्कार झालेल्याच भ्रात्यांना अधिकार, असें सांगतो तोच **याज्ञवल्क्य**—"पूर्वी संस्कृत भ्रात्यांनीं संस्कार न झालेल्या भ्रात्यांचे संस्कार करावे. आणि पूर्व संस्कृत भ्रात्यांनीं आपल्या विभागास आलेल्या द्रव्यांतून चतुर्थांश द्रव्य काढून त्या द्रव्यानें भगिनींचे संस्कार करावे." या वचनांत 'भगिन्यश्च' येथील चकारानें पूर्वार्धांतील '**पूर्वसंस्कृतैः**' या पदाची अनुवृत्ति ( संबंध ) होत असल्यामुळें, जर भगिनींच्या विवाहाला पुरेल इतकें द्रव्य देण्याविषयीं **किंवा** आपल्या विभागांतून चतुर्थांश द्रव्य देण्याविषयीं भ्रात्यांना सांगितलें आहे असें म्हटलें तर, चकारानें 'पूर्वसंस्कृतैः' या पदाची अनुवृत्ति केलेली व्यर्थ होईल. म्हणून पूर्वी संस्कृत असलेल्याच भ्रात्यांना भगिनीविवाहाचें कर्तृत्व आहे. असंस्कृत भ्रात्यांना कर्तृत्व नाहीं. असा कर्तृत्वाचा नियम या वचनानें केलेला आहे. यावरून अनुपनीत भ्राता आणि माता इत्यादिक असतां माता इत्यादिकांनाच अधिकार आहे. अनुपनीत भ्रात्याला भगिनीच्या विवाहाचा अधिकार नाहीं, असें **संबंधतत्त्व** इत्यादि ग्रंथांत सांगितलें आहे. कन्या आपण होऊन पतीला वरणारी असतां किंवा कन्यादान करणारी माता असतां त्यांनींच नांदीश्राद्ध करावें. ह्या नांदीश्राद्धांत प्रधान संकल्पमात्र स्वतः करून बाकीचें कृत्य ब्राह्मणद्वारा करवावें, असें **प्रयोगपारिजातांत** सांगितलें आहे. वराचा विवाहकर्ता संस्कृत भ्राता वगैरे नसेल तर त्यानें स्वतःच नांदीश्राद्ध करावें. मातेनें नांदीश्राद्ध

१ पितेति प्रकृतिस्थःउन्मादादिदोषहीनः सकुल्यःपितृव्यतत्पुत्रादिः । २ गम्यं स्वयंवरंकुर्यादित्यन्वयः । गम्यंगमनार्हं सावर्ण्यादिगुणयुक्तं । ३ तुरीयांशस्यात्याधिक्येऽतिन्यूनत्वेवादोष इति विवाहपर्याप्तपरंतुरीयपदमितिभावः ।

करूं नये. कारण, "पुत्र विद्यमान असतां इतराकडून श्राद्ध करवूं नये" या वचनानें पुत्रव्यतिरिक्तांना श्राद्धाचा निषेध आहे. पुत्राला अधिकार नसला म्हणजे मातेनें करावें, असें आहे तरी या ठिकाणीं वराला अधिकार नाहीं असें नाहीं. कारण, वराचें उपनयन झालेलें असल्यामुळें सर्व कर्मांचा अधिकार झालेला आहे, असें **पृथ्वीचंद्रोदय** सांगतो. **माधवीयांत** व **अपरार्कांत नारद**—"आपल्या कन्येचें दान स्वतः पित्यानें करावें. अथवा पित्याच्या संमतीनें भ्रात्यानें करावें. त्याच्या अभावीं मातामह, मातुल, सकुल्य ( पितृव्यादिक ), बांधव ( मातृवंशांतील ) यांनीं कन्यादान करावें. सर्वांच्या अभावीं कन्येची माता जर स्वस्थचित्त असेल, तर तिनें कन्यादान करावें. माता अस्वस्थचित्त असेल तर आपल्या जातींतील लोकांनीं कन्या द्यावी. वरती आलेल्या 'सकुल्य' व 'बांधव' या पदांचे अर्थ सांगतो—सकुल्य म्हणजे पितृवंशांतील पितृव्य, पितृव्यपुत्र इत्यादि. आणि बांधव म्हणजे मातृवंशांतील मातामहभ्राता, मातुलपुत्र इत्यादिक समजावे." **मदनपारिजातांत कात्यायन**—"औरसी कन्येचें दान स्वतः पित्यानेंच करावें. पित्याच्या अभावीं पितृकुलांतील बांधवांनीं करावें. औरसीभिन्न असून धर्मजा म्हणजे परकीय क्षेत्राचे ठायीं परपुरुषापासून उत्पन्न झालेली कन्या तिचें दान मातामहानें किंवा मातेनें अथवा मातुलानें करावें." यावरून औरस कन्येच्या दानाविषयीं पितृकुलांतील बांधव असतां मातामहादिकांना अधिकार नाहीं. याचा अपवाद तेथेंच सांगतो—"कन्येचे वडील फार दिवस प्रवासांत आहेत, व बंधु बालक आहेत, आणि कन्येचा विवाहकाल प्राप्त झाला असेल तर औरस कन्या असली तरी तिचें दान योग्यसमयीं मातेनें करावें." **मनु**—"ज्या वेळीं कन्येचें दान करणारा कोणी नसेल त्या वेळीं कन्येनें राजाजवळ जाऊन आपला विवाह करण्यास सांगावें."

परकीयकन्यादानेविशेषो**मदनरत्नेस्कांदे** आत्मीकृत्यसुवर्णेनपरकीयांतुकन्यकाम् धर्मेणविधिनादानमसगोत्रेपियुज्यते अत्रप्रकृतिस्थग्रहणादप्रकृतिस्थेनकृतमकृतमेव स्वतंत्रोयदितत्कार्यंकुर्यादप्रकृतिंगतः तदप्यकृतमेवस्यादस्वातंत्र्यस्यहेतुतइत्य**परार्के नारदोक्तेः** यदितुसप्तपदीविवाहहोमादिप्रधानंजातंतदंगवैकल्येपिनावृत्तिर्विवाहस्य **गौडा**अप्येवमाहुः तत्रैव**मरीचिः** गौरींददन्नाकपृष्ठंवैकुंठंरोहिणींददत् कन्यांददद्ब्रह्मलोकंरौरवंतुरजस्वलाम् ॥

परकीयकन्यादानाविषयीं विशेष सांगतो **मदनरत्नांत स्कांदांत**—"परकीयकन्या असली तर तिच्या वडिलांस द्रव्य देऊन ती आपलीशी करून धर्मानें यथाविधि तिचें दान करावें. याप्रमाणें भिन्न गोत्रांतील कन्या असली तरी त्या कन्येचें दान युक्त आहे." या कन्यादानप्रकरणीं वरील याज्ञवल्क्यवचनांत आणि नारदवचनांत 'प्रकृतिस्थ' असें पद आहे. त्याचा अर्थ स्वस्थचित्त असा आहे. यावरून अस्वस्थचित्तानें केलेलें तें न केल्यासारखेंच समजावें. कारण, "कोणतेंही कार्य करावयाचें असतां कोणताही मनुष्य जर स्वतंत्र असेल ( पराधीन नसेल ) तर त्यानें तें कार्य करावें. जर तो अस्वस्थचित्त ( पराधीन ) असून कोणतेंही कार्य करील तर तो पराधीन असल्याकारणानें त्यानें केलें तें न केल्यासारखें होईल" असें **अपरार्कांत नारद**वचन आहे. जर सप्तपदीक्रमण, विवाहहोम इत्यादि प्रधान कर्म झालेलें असेल, आणि त्यांत एकादें अंग विकल झालेलें असेल, तरी विवाहाची ( विवाहप्रयोगाची ) पुनः आवृत्ति होत नाहीं. **गौड**ही असेंच सांगतात. तेथेंच **मरीचि**—"गौरी ( आठवर्षांची ) कन्या देणारा स्वर्गास जातो. रोहिणी ( नऊवर्षांची ) कन्या देणारा वैकुंठास जातो. दहा वर्षांची कन्या देणारा ब्रह्मलोकास जातो. रजस्वला कन्या देणारा रौरव नरकास जातो."

**अथमासनिर्णयः** तत्रजन्ममासेविशेषःप्रागुक्तः **ज्योतिःप्रकाशेव्यासः** माघफाल्गुनवैशाखेयदूढामार्गशीर्षके ज्येष्ठेवाषाढमासेचसुभगावित्तसंयुता श्रावणेवापिपौषेवाकन्याभाद्रपदेतथा चैत्राश्वयुक्कार्तिकेषुयातिवैधव्यतांलघु **नारदः** माघफाल्गुनवैशाखज्येष्ठमासाःशुभप्रदाः कार्तिकोमार्गशीर्षश्चमध्यमौनिंदिताःपरे **वसिष्ठः** पौषेपिकुर्यान्मकरस्थितेर्केचैत्रेभवेन्मेषगतेयदास्यात् प्रशस्तमाषाढकृतंविवाहंवदंतिगर्गामिथुनस्थितेर्के **आचार्यचूडामणौज्योतिर्गर्गराजमार्तंडौ** मांगल्येषुविवाहेषुकन्यासंवरणेषुच दशमासाःप्रशस्यंतेचैत्रपौषवर्जिताः **आपस्तंबः** सर्वकृतवोविवाहस्य शैशिरौमासौपरिहाप्योत्तमंचनैदाघम् अत्रमाघफाल्गुनापाढवर्जनवमासामुख्यःकालइति **सुदर्शनभाष्येइडबिलायांब्रह्मविधातीर्थैश्चोक्तम्** **बौधायनसूत्रेपि** सर्वेमासाविवाहस्यशुचितपस्तपस्यवर्ज्यमित्येके तेनपूर्वोक्तरौशिशिरसंबंधिनौमासौपौषचैत्रौविहायइति **निर्णयामृतव्याख्यानं**मौख्यकृतमित्युपेक्ष्यं निशिचेत्सर्वेषुद्वादशस्वपिमासेषूद्वहेदितिकालादर्शः येतुज्योतिषेमाघादिविधयस्तेगृह्यसूत्राणांद्विजपरत्वेनप्राबल्याच्छूद्रादिपराः ज्यो-

१ अत्रविहितप्रतिषिद्धानां आषाढादीनां देशभेदेन व्यवस्थेति मदनरत्ने ॥

**तिथे** वात्स्योवर्षमनूनमिच्छतितथारैभ्योयनंचोत्तरंश्रीवासंतमृतुंविहायमुनयोमांडव्यशिष्याजगुः चैत्रंप्रोज्झ्यपराशरःपरिणयेपौषंचदौर्भाग्यदंह्याषाढादिचतुष्टयंनहितदंकैश्चित्प्रदिष्टंबुधैः **चंडेश्वरः** मार्गेमासितथाज्येष्ठेक्षौरंपरिणयंव्रतम् ज्येष्ठपुत्रदुहित्रोस्तुयत्नेनपरिवर्जयेत् कृत्तिकास्थंरविंत्यक्त्वाज्येष्ठपुत्रस्यकारयेत् उत्सवादिषुकार्येषुदिनानिदशवर्जयेत् **रत्नकोशे** जन्मर्क्षेजन्मदिवसेजन्ममासेशुभंत्यजेत् ज्येष्ठेमास्याद्यगर्भस्यशुभंवर्ज्यंस्त्रियाअपि **पराशरः** अज्येष्ठाकन्यकायत्रज्येष्ठपुत्रोवरोयदि व्यत्ययोवातयोस्तत्रज्येष्ठमासःशुभप्रदः **मिहिरः** ज्येष्ठस्यज्येष्ठकन्यायाविवाहोनप्रशस्यते तयोरन्यतरेज्येष्ठेज्येष्ठोमासःप्रशस्यते द्वौज्येष्ठौमध्यमौप्रोक्तावेकंज्येष्ठंशुभावहं ज्येष्ठत्रयंनकुर्वीतविवाहेसर्वसंमतम् यत्तुसार्वकालमेकेविवाहमिति तदासुरादिविवाहविषयम् धर्म्येषुविवाहेषुकालपरीक्षणंनाधर्म्येष्विति**गृह्यपरिशिष्टात् रत्नमालायामप्येवं** ( तेनासुरादयोमाघचैत्रादिनिषिद्धकालेष्वपिभवंति मासाः सौराः सौरोमासोविवाहादावित्युक्तेः झषोनर्निंद्योयदिफाल्गुनेस्यादजस्तुवैशाखगतोनानिंद्यइतित्वपवादः ॥ )

## आतां विवाहाविषयीं मासनिर्णय सांगतो—

त्यांत जन्ममासाविषयीं विशेष निर्णय पूर्वी ( उपनयनप्रकरणीं ) सांगितला आहे. **ज्योतिःप्रकाशांत व्यास**— "माघ, फाल्गुन, वैशाख, मार्गशीर्ष, ज्येष्ठ आणि आषाढ, या मासांत विवाह केला असतां ती स्त्री सुभगा आणि द्रव्ययुक्त अशी होते. श्रावण, पौष, भाद्रपद, चैत्र, आश्विन आणि कार्तिक या मासांत विवाह केला असतां तिला वैधव्य प्राप्त होतें." **नारद**—"माघ, फाल्गुन, वैशाख आणि ज्येष्ठ हे मास विवाहाविषयीं शुभकारक आहेत. कार्तिक आणि मार्गशीर्ष दोन मध्यम आहेत. बाकीचे मास निंदित आहेत." **वसिष्ठ**—"मकरराशीस सूर्य असतां पौषांतही विवाह करावा. मेषराशीस सूर्य असतां चैत्रांत विवाह करावा. मिथुनराशीस सूर्य असतां आषाढांत विवाह करावा तो प्रशस्त आहे, असें गर्गमुनि सांगतात." **आचार्यचूडामणींत ज्योतिर्गर्ग** आणि **राजमार्तंड** सांगतात—"मांगलिक विवाह आणि कन्यावरण ह्या कृत्यांविषयीं चैत्र आणि पौष हे दोन मास वर्ज्य करून बाकीचे दहा मास प्रशस्त आहेत." **आपस्तंब**—"शिशिरऋतूचे दोन मास व ग्रीष्मऋतूंतील अंत्य मास हे तीन मास वर्ज्य करून सारे ऋतु विवाहास सांगितले आहेत." ह्या आपस्तंबसूत्रावरून माघ, फाल्गुन, व आषाढ, हे तीन मास वर्ज्य करून बाकीचे नऊ मास विवाहाचा मुख्यकाल आहे, असें **सुदर्शनभाष्यांत** आणि **इडबिलाग्रंथांत ब्रह्मविद्यातीर्थांनीं** सांगितलें आहे. **बौधायन**सूत्रांतही—"आषाढ आणि फाल्गुन हे दोन मास वर्ज्य करून बाकीचे सारे मास विवाहाचा काल आहे, असें कितीएक आचार्य सांगतात." यावरून ( सुदर्शनभाष्य, इडबिला, बौधायनसूत्र, यांवरून ) 'शैशिरौ मासौ परिहाप्य' ह्या आपस्तंबसूत्राचें, 'शिशिरऋतुसंबंधी दोन मास वर्ज्य करून म्हणजे शिशिरऋतूच्या पूर्वीचा एक तो पौष आणि शिशिरऋतूच्या पुढचा एक तो चैत्र हे दोन मास वर्ज्य करून' असें **निर्णयामृतकारानें** केलेलें व्याख्यान मूर्खत्वानें केलेलें असल्यामुळें तें उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे. रात्रीं जर विवाह करावयाचा असेल, तर तो बाराही मासांत करावा, असें **कालादर्श**कार सांगतो. आपस्तंब-बौधायनसूत्रांवरून माघ, फाल्गुन, आषाढ हे विवाहास वर्ज्य आहेत, असें झालें. आतां जे ज्योतिषांत माघ, फाल्गुन, आषाढमास विवाहास उक्त आहेत ते शूद्रादिकांना समजावे. कारण, द्विजांचे धर्म सांगण्याकरितां गृह्यसूत्रें प्रवृत्त असल्यामुळें ते धर्म प्रबळ असल्याकारणानें गृह्यसूत्रोक्त विधि द्विजांना समजावे. आणि इतर ग्रंथांत सांगितलेले विधि शूद्रादिकांना समजावे. **ज्योतिषांत**—"वात्स्यमुनि सारें वर्ष ( बाराही मास ) विवाहाचा काल सांगतो, रैभ्यमुनि उत्तरायण विवाहकाल सांगतो. मांडव्यमुनीचे शिष्य वसंतऋतु वर्ज्य करून विवाहकाल सांगतात. पराशर मुनि चैत्र वर्ज्य करून विवाहकाल सांगतो. कितीएक विद्वान् विवाहाविषयीं पौषमास दुर्भाग्यदायक आहे, आणि आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन हे चार मास हितकारक नाहींत, असें सांगतात." **चंडेश्वर**—"मार्गशीर्ष आणि ज्येष्ठ या मासांत ज्येष्ठ पुत्र व ज्येष्ठ कन्या यांचें चौलादि मुंडन, विवाह व उपनयन हीं यत्नानें वर्ज्य करावीं. कृत्तिका नक्षत्राचा रवि सोडून ज्येष्ठ पुत्राचें उपनयनादिक मंगल करावें. उत्सवादिकार्यांविषयीं, कृत्तिकानक्षत्रास रवि असतां दहा दिवस वर्ज्य करावे." **रत्नकोशांत**—"जन्मनक्षत्रावर, जन्मदिवशीं व जन्ममासांत शुभकार्य करूं नये. ज्येष्ठ मासांत ज्येष्ठ पुत्राचें व ज्येष्ठ कन्येचें मंगल कार्य वर्ज्य करावें." **पराशर**—"ज्या विवाहांत वधू ज्येष्ठ नाहीं आणि वर ज्येष्ठ आहे किंवा वर ज्येष्ठ नाहीं आणि वधू ज्येष्ठ आहे त्या विवाहांत ज्येष्ठ मास शुभदायक आहे." **मिहिर**—"ज्येष्ठ वर आणि ज्येष्ठ वधू यांच्या विवाहास ज्येष्ठ मास प्रशस्त नाहीं. त्या वधूवरांमध्यें एक ज्येष्ठ असेल तर ज्येष्ठ मास प्रशस्त आहे. दोन ज्येष्ठ मध्यम सांगितले आहेत. एक ज्येष्ठ शुभदायक आहे. विवाहाविषयीं तीन ज्येष्ठ ( वधू ज्येष्ठ, वर ज्येष्ठ, मास ज्येष्ठ )

१ सौरोमासोविवाहादौयज्ञादौसावनःस्मृतः इतिप्रथमपरिच्छेदे ॥ हा कंसांतील ग्रंथ प्रक्षिप्त आहे. जुन्या प्रतींत नाहीं.

करूं नयेत, हें मत सर्वांना मान्य आहे." आतां जें "कितीएक आचार्य सर्वकालीं विवाह करावा, असें सांगतात" असें **आश्वलायन**गृह्यसूत्राचें वचन आहे, तें आसुर, पैशाच, राक्षस ह्या विवाहांविषयीं समजावें. कारण, "धर्मयुक्त विवाहांविषयीं मुहूर्त पाहावा. अधर्मयुक्त विवाहांविषयीं मुहूर्त पाहण्याचें कारण नाहीं" असें **गृह्यपरिशिष्टांत** सांगितलें आहे. **रत्नमालेंत**ही असेंच सांगितलें आहे.

**अथदशदोषाः व्यवहारोच्चये** वेधश्चलत्ताचतथैवपातःखर्जूरवेधोदशयोगचक्रं युतिश्चजामित्रमुपग्रहश्चबाणाख्यवज्रेचदशैवदोषाः एषांलक्षणंज्योतिषेज्ञेयम् अतिचारगेगुरौतु**वसिष्ठः** अतिचारगतेजीवेवर्जयेत्तदनंतरं विवाहादिपुकार्येपुअष्टाविंशतिवासरान् **रत्नमालायाम्** एकपंचनवयुग्मषड्दशत्रीणिसप्तचतुरष्टलाभगः द्वादशाजवृषभादिराशितोघातचंद्रइतिकीर्तितोबुधैः **नारदः** भूबाणनंदहस्ताश्वरसदिग्वह्निशैलजाः वेदावसुशिवादित्याघातचंद्रोयथाक्रमम् यात्रायांयुद्धकार्येषुघातचंद्रंविवर्जयेत् विवाहेसर्वमांगल्येचौलादौव्रतबंधने घातचंद्रोनैवचिंत्यइतिपाराशरोब्रवीत् **ज्योतिर्निबंधे** विवाहचौलव्रतबंधयज्ञेपट्टाभिषेकेचतथैवराज्ञां सीमंतयात्रासुतथैवजातेनोचिंतनीयःखलुघातचंद्रः **नारदः** अकालजाभवेयुश्चेद्विद्युन्नीहारवृष्टयः प्रत्यर्कपरिवेषेंद्रचापाभ्रध्वनयोयदि दोषायमंगलेनूनंनदोषायैवकालजाः अकालवृष्टिस्वरूपमाह **लल्लः** पौषादिचतुरोमासानप्रोक्तावृष्टिरकालजेति **शार्ङ्गधरः** निर्घातेक्षितिचलनेग्रहयुद्धेराहुदर्शनेचैव आपंचदिनात्कन्यापरिणीतानाशमुपयाति उल्कापातेंद्रचापप्रबलघनरजाधूमनिर्घातविद्युद्वृष्टिप्रत्यर्कदोषादिषुसकलबुधैस्त्याज्यमेवैकरात्रम् दुःस्वप्नेदुर्निमित्तेह्यशुभफलदशोदुर्मनोभ्रांतबुद्धौचौलेमौंजीनिबंधेपरिणयनविधौसर्वदात्याज्यमेव **ज्योतिःप्रकाशे** अर्वाक्पोडशनाड्यःसंक्रांतेःपुण्यदाःपरतः उपनयनव्रतयात्रापरिणयनादौविवर्ज्यास्ताः **गर्गः** दिग्दाहेदिनमेकंचग्रहेसप्तदिनानितु भूकंपेचसमुत्पन्नेत्र्यहमेवतुवर्जयेत् उल्कापातेत्रिदिवसंधूमेपंचदिनानिच वज्रपातेचैकदिनंवर्जयेत्सर्वकर्मसु दर्शनादर्शनाद्राहुकेत्वोःसप्तदिनंत्यजेत् यावत्केतूद्गमस्तावदशुभःसमयोभवेत् अस्यापवादो**ऽद्भुतसागरे** अथदिवसत्रयमध्येमृदुपानीयंयदाभवति उत्पातदोपशमनंतदैवसंप्राहुराचार्याः **संबंधतत्त्वे** भूकंपादेर्नदोषोऽस्तिवृद्धिश्राद्धेकृतेसति ॥

## आतां दशदोष सांगतो—

**व्यवहारोच्चयांत**— वेध, लत्ता, पात, खर्जूरवेध, दशयोगचक्र, युति, जामित्र, उपग्रह, बाणयोग आणि वज्रयोग हे दहा दोष मुहूर्तांत असतात." ह्या दहा दोषांचें लक्षण ज्योतिषग्रंथांतून पाहावें. गुरूचा अतिचार असेल तर सांगतो **वसिष्ठ**—"गुरूचा अतिचार ( शीघ्र गतीनें एक राशि भोगून दुसऱ्या राशीस जाणें तो ) झाला असतां विवाहादि मंगलकार्याविषयीं अठ्ठावीस दिवस वर्ज्य करावे." **रत्नमालेंत**—'मेषराशीस पहिला, वृषभास पांचवा, मिथुनास नववा, कर्कास दुसरा, सिंहास सहावा, कन्येस दहावा, तुळास तिसरा, वृश्चिकास सातवा, धनुराशीस चवथा, मकरास आठवा, कुंभास अकरावा, आणि मीनास बारावा, याप्रमाणें असलेला चंद्र घातचंद्र म्हणून विद्वानांनीं सांगितला आहे." **नारद**—"अर्थ तसाच आहे. तो असा—मेषादि १२ राशींपासून अनुक्रमानें १।५।९।२।६।१०।३।७।४।८।११।१२। या स्थानीं असलेला चंद्र यात्रेचे ठायीं आणि युद्धकार्यांत घातचंद्र वर्ज्य करावा. विवाह, चौल, मौंजीबंधन इत्यादि सर्व मंगल कार्याविषयीं घातचंद्र पाहूं नये, असें पाराशर ऋषि सांगतो." **ज्योतिर्निबंधांत**—"विवाह, चौल, उपनयन, यज्ञ, राजांचा पट्टाभिषेक, सीमंतोन्नयन, यात्रा, आणि जातकर्म यांविषयीं घातचंद्र पाहूं नये." **नारद**—"वीज, धुकें, वृष्टि, सूर्याच्या सभोंवतीं परिवेष ( खळें ) पडणें, इंद्रधनुष्य, मेघगर्जना हीं जर अकालीं होतील, तर तीं मंगलकार्याचे ठायीं दोषकारक आहेत असें समजावें. आणि आपल्या कालीं जर होतील तर दोषकारक नाहींत." अकालवृष्टीचें स्वरूप सांगतो **लल्ल**—"पौष, माघ, फाल्गुन, चैत्र ह्या चार मासांत झालेली वृष्टि अकालीं वृष्टि समजावी. **शार्ङ्गधर**—"वीज वगैरे पडणें, भूकंप होणें, ग्रहांचें युद्ध, चंद्रसूर्याचें ग्रहण, हीं झालीं असून पांच दिवसांचे आंत कन्येचा विवाह केला असतां ती कन्या नाश पावते. **आकाशांतून** अग्निरूपी तारा पडणें, इंद्रधनुष्य उगवणें, प्रबळ दाट धूलि उडणें, धूम होणें, वीज वगैरे पडून पाषाण वगैरे फुटणें, वीज होणें, पर्जन्य पडणें, सूर्यास परिवेष पडणें, इत्यादि दोष उत्पन्न झाले असतां चौल, उपनयन, विवाह या कार्याविषयीं सकल विद्वानांनीं एक दिवस टाकावा. चौल, उपनयन, विवाह या कार्यांमध्यें दुष्टस्वप्नाचें दर्शन झालें, एकादें दुष्ट निमित्त उत्पन्न झालें, अशुभफलसूचक चिन्हें दृष्टीस पडलीं, दुश्चित्त झालें, किंवा बुद्धि भ्रांतिष्ट झाली असतां त्या वेळीं तीं कार्यें वर्ज्य करावीं." **ज्योतिःप्रकाशांत**—"संक्रांतीच्या पहिल्या सोळा घटिका आणि पुढच्या सोळा घटिका पर्वकाळ आहे. त्या घटिका उप-

नयन, यात्रा, विवाह इत्यादि कार्याचे ठायीं वर्ज्य कराव्या." **गर्ग**—"दिशा पेटल्या असतां एक दिवस टाकावा. ग्रहण झालें असतां सात दिवस टाकावे. आणि भूकंप झाला असतां तीन दिवस टाकावे. सर्व कार्याविषयीं, उल्कापात ( आकाशांतून अग्निरूप तारा पडणें ) झाला असतां तीन दिवस टाकावे. धूम उत्पन्न असतां पांच दिवस टाकावे. आणि वीज पडली असतां एक दिवस टाकावा. चंद्रसूर्याचें ग्रहण असून तें दृष्टीस पडलें किंवा दृष्टीस पडलें नाहीं तरी सात दिवस टाकावे. धूमकेतु ( शेंडेनक्षत्र ) उत्पन्न झाला असतां त्याचा उदय जोंपर्यंत आहे तोंपर्यंतचा काल अशुभ आहे." याचा अपवाद सांगतो **अद्भुतसागरांत**—"उत्पात उत्पन्न झाल्यानंतर तीन दिवसांत समुद्राचें किंवा नद्यादिकांचें पाणी जेव्हां शांत व निर्मळ होईल तेव्हांच उत्पात दोष शांत होतो, असें आचार्य सांगतात." **संबंधतत्त्वांत**—"नांदीश्राद्ध केल्यावर भूकंपादि झालें असतां त्याचा दोष नाहीं."

अथापरिहार्येकन्यायावैधव्ययोगेविशेषउच्यते **मार्कंडेयपुराणे** बालवैधव्ययोगेतुकुंभद्रुप्रतिमादिभिः कृत्वालग्नंरहःपश्चात्कन्योद्वाह्येतिचापरे अत्रपुनर्भूदोषाभावउक्तो **विधानखंडे** स्वर्णांबुपिप्पलानांचप्रतिमा विष्णुरूपिणी तयासहविवाहेतुपुनर्भूत्वंनजायते **सूर्यारुणसंवादे** विवाहात्पूर्वकालेचचंद्रताराबलान्विते विवाहोक्तेचतांकन्यांकुंभेनसहचोद्वहेत् सूत्रेणवेष्टयेत्पश्चाद्दशतंतुविधानतः कुंकुमालंकृतंदेहंतयोरेकांतमंदिरे ततःकुंभंचनिःसार्यप्रभञ्ज्यसलिलाशये ततोभिषेचनंकुर्यात्पंचपल्लववारिभिः कुंभप्रार्थनातत्रैव वरुणांगस्वरूपायजीवनानांसमाश्रय पतिंजीवयकन्यायाश्चिरंपुत्रसुखंकुरु देहिविष्णोवरंदेवकन्यांपालयदुःखतः ततोलंकारवस्त्राढ्यांवरायप्रतिपादयेत् **इतिकुंभविवाहः** ॥

आतां कन्येचा वैधव्ययोग अपरिहार्य ( परिहार करण्यास अशक्य ) असतां विशेष सांगतो—**मार्कंडेयपुराणांत**— "कन्येला बालवैधव्ययोग असेल तर उदकानें भरलेला कुंभ, अश्वत्थादिवृक्ष, सुवर्णाची विष्णुप्रतिमा इत्यादिकांसह तिचा विवाह करून नंतर त्या कन्येचा वराशीं विवाह करावा. असें कित्येक विद्वान् सांगतात." असा विवाह केला असतां पुनर्विवाहाचा दोष उत्पन्न होत नाहीं, असें सांगतो **विधानखंडांत**—"सुवर्ण, उदक, आणि पिंपळ यांची जी प्रतिमा ती विष्णुरूपिणी आहे. तिच्यासह विवाह करून वरासह विवाह केला असतां ती स्त्री पुनर्भू ( द्विवारविवाहित ) होत नाहीं." **सूर्यारुणसंवादांत**—"घरांत एकांतस्थळीं कन्येच्या अंगास व कुंभास हळदकुंकूं लाऊन विवाहाच्या पूर्वी चंद्रबळ व ताराबळ यांनीं युक्त विवाहोक्त मुहूर्तावर त्या कन्येचा कुंभासह विवाह करावा. नंतर त्या कन्येला व कुंभाला 'परिला०' इत्यादि मंत्रांनीं खालीं आणि वरती सूत्रानें वेष्टन करावें. तदनंतर कुंभ नेऊन जलाशयांत फोडून पंचपल्लवांनीं शुद्ध उदक घेऊन 'समुद्रज्येष्ठा०' इत्यादि मंत्रांनीं कन्येवर अभिषेक करावा. आणि ब्राह्मणभोजन घालावें." कुंभाशीं विवाह करतेसमयीं कुंभाची षोडशोपचार पूजा करून त्याची प्रार्थना करावी. ती कुंभप्रार्थना तेथेंच सांगतो—**प्रार्थनामंत्र**—"**वरुणांगस्वरूपाय जीवनानां समाश्रय ॥ पतिं जीवय कन्यायाश्चिरं पुत्रसुखं कुरु ॥ देहि विष्णो वरं देव कन्यां पालय दुःखतः ॥**' याप्रमाणें कुंभविवाह केल्यानंतर त्या कन्येवर अलंकार आणि वस्त्रें घालून ती कन्या वराला द्यावी." इति कुंभविवाह.

**मूर्तिदानमपितत्रैवोक्तं** ब्राह्मणंसाधुमामंत्र्यसंपूज्यविविधार्हणैः तस्मैदद्याद्विधानेनविष्णोर्मूर्तिंचतुर्भुजां शुद्धवर्णसुवर्णेनवित्तशक्त्याथवापुनः निर्मितांरुचिरांशंखगदाचक्राब्जसंयुताम् दधानांवाससीपीतेकुमुदोत्पलमालिनीं सदक्षिणांचतांदद्यान्मंत्रमेतमुदीरयेत् यन्मयाप्राचिजनुषिघ्नंत्यापतिसमागमम् विषोपविषशस्त्राद्यैर्हतोवातिविरक्तया प्राप्यमानंमहाघोरंयशःसौख्यधनापहम् वैधव्याद्यतिदुःखौघनाशायशुभलब्धये बहुसौभाग्यलब्ध्यैचमहाविष्णोरिमांतनुम् सौवर्णींनिर्मितांशक्त्यातुभ्यंसंप्रददेद्विज अनघाद्याहमस्मीतित्रिवारंप्रजपेदिति एवमस्त्वितितस्याशीर्गृहीत्वास्वगृहंविशेत् ततोवैवाहिकंकुर्याद्विधिंदातामृगीदृशः अन्येप्यश्वत्थविवाहवृक्षसेचनादयस्तत्रैवज्ञेयाः विस्तरभयान्नोच्यंते ॥

**मूर्तिदान**ही तेथेंच सांगतो—"उत्तम ब्राह्मणाला बोलावून त्याची अनेक उपचारांनीं पूजा करून त्याला, सांगितलेल्या विधीनें विष्णूची चतुर्भुजमूर्ति द्यावी. ती अशी—उत्तम शंभरनंबरी सोनें आपल्या शक्तीप्रमाणें ४ कर्ष किंवा त्याहून कमी घेऊन त्याची सुंदर चतुर्भुज विष्णुमूर्ति करावी. ती शंख, चक्र, गदा, पद्म या आयुधांनीं युक्त करावी. व त्या मूर्तीची आचार्यानें अभ्युत्तारणादिपूर्वक षोडशोपचारांनीं पूजा करावी. पूजेंत वस्त्रार्पणसमयीं दोन पीत वस्त्रें द्यावीं. आणि पुष्पार्पणकालीं श्वेतकमलांची माला अर्पण करावी. पूजा झाल्यानंतर कन्येनें देवाला नमस्कार करून पुढील मंत्र म्हणून सुवर्णदक्षिणासहित ती प्रतिमा त्या ब्राह्मणास द्यावी. **दानमंत्र**—"यन्मया प्राचि जनुषि घ्नंत्या पतिसमागमम् ॥ विषोपविषशस्त्राद्यैर्हतो

वापि विरक्तया ॥ प्राप्यमाणं महाघोरं यशःसौख्यधनापहम् । वैधव्याद्यतिदुःसौघं तं नाशय सुखाप्तये ॥ बहुसौभाग्यलब्ध्यै च महाविष्णोरिमां तनुम् ॥ सौवर्णी निर्मितां शक्त्या तुभ्यं संप्रददे द्विज ॥' याप्रमाणें विष्णुमूर्तीचें दान करून कन्येनें 'अनघाद्याहमस्मि' असें त्रिवार म्हणावें. ब्राह्मणानें 'एवमस्तु' असें त्रिवार म्हणावें. नंतर कन्येनें घरांत जावें. नंतर ब्राह्मणभोजन घालावें. तदनंतर त्या कन्येचा विवाह करावा." वैधव्यनाशक अश्वत्थविवाह, वृक्षसेचन इत्यादिक दुसरेही विधि सांगितले आहेत ते तेथेंच पाहावे. विस्तार फार होईल या भीतीनें येथें सांगत नाहीं.

**अथप्रतिकूलादि ज्योतिर्निबंधेगर्गः** कृतेतुनिश्चयेपश्चान्मृत्युर्भवतिकस्यचित् तदानमंगलंकुर्यात्कृतेवैधव्यमाप्नुयात **ज्योतिर्मेधातिथिः** वधूवरार्थेघटितेसुनिश्चितेवरस्यगेहेप्यथकन्यकायाः मृत्युर्यदिस्यान्मनुजस्यकस्यचित्तदानकार्यंखलुमंगलंबुधैः मंगलं विवाहः **स्मृतिचंद्रिकायाम्** कृतेवाङ्निश्चयेपश्चान्मृत्युर्भवतिगोत्रिणः तदानमंगलंकार्यंनारीवैधव्यदंध्रुवं **भृगुः** वाग्दानानंतरंयत्रकुलयोःकस्यचिन्मृतिः तदोद्वाहोनैवकार्यःस्ववंशक्षयदोषतः **शौनकः** वरवध्वोःपितामातापितृव्यश्चसहोदरः एतेषांप्रतिकूलंचमहाविघ्नप्रदंभवेत् पितापितामहश्चैवमातानैवपितामही पितृव्यःस्त्रीसुतोभ्राताभगिनीचाविवाहिता एभिरत्रविपन्नैश्चप्रतिकूलंबुधैःस्मृतं अन्यैरपिविपन्नैस्तुकेचिदूचुर्नतद्भवेत् **मांडव्यः** वाग्दानानंतरंमातापिताभ्राताविपद्यते विवाहोनैवकर्तव्यःस्ववंशस्थितिमिच्छता ।

## आतां प्रतिकूलादिविचार सांगतो—

**ज्योतिर्निबंधांत गर्ग**—"वधूवरांचा विवाहाचा निश्चय केल्यावर त्यांच्या कुळांत कोणा एकाला मृत्यु प्राप्त होईल तर त्यांचा विवाह करूं नये. कारण, केला असतां वधूस वैधव्य प्राप्त होईल." **ज्योतिर्मेधातिथि**—"वधूवरांचा ज्योतिःशास्त्रोक्त नाडीगणादिक घटितविचार होऊन विवाहाचा निश्चय झाल्यानंतर वराच्या घरांत किंवा कन्येच्या घरांत कोणाएका मनुष्याला जर मृत्यु प्राप्त होईल तर त्या वधूवरांचा विवाह आणखी करूं नये." **स्मृतिचंद्रिकेंत**—"वधूवरांचा वाङ्निश्चय झाल्यानंतर गोत्रांतील मनुष्य मरेल तर त्यांचा विवाह करूं नये. कारण, केला असतां वधूला तो वैधव्यदायक आहे." **भृगु**—"ज्या विवाहांत वाग्दान केल्यानंतर वधूवरांच्या कुळांत कोणाला मृत्यु प्राप्त होईल तर तो विवाह करूं नये. केला असतां वंशाचा क्षय होईल." **शौनक**—"वधूचा व वराचा पिता, माता, पितृव्य, सहोदर भ्राता यांपैकीं एकादा मरेल तर तें विवाहप्रतिकूल महाविघ्नदायक होईल. कोणाचें मरण विवाहाला प्रतिकूल होतें तें सांगतो—"वधूवरांचा पिता, पितामह, माता, पितामही, पितृव्य, वराची धर्मपत्नी व धर्मपुत्र, भ्राता, अविवाहित भगिनी, यांपैकीं कोणा एकाचें मरण आलें असतां तें विवाहाला प्रतिकूल असें विद्वानानीं सांगितलें आहे. वधूवरांच्या कुळांत इतराचेंही मरण आलें असतां प्रतिकूल होतें, असें कित्येक सांगतात; परंतु इतरांचें मरण प्रतिकूल होत नाहीं." **मांडव्य**—"वाग्दान केल्यानंतर माता, पिता किंवा भ्राता मृत होईल तर, आपला वंश सुरक्षित असावा, अशी इच्छा करणारानें त्यांचा तो विवाह करूं नये."

संकटेतु**मेधातिथिः** वाग्दानानंतरंयत्रकुलयोःकस्यचिन्मृतिः तदासंवत्सरादूर्ध्वंविवाहःशुभदोभवेत् **स्मृतिरत्नावल्याम्** पितुरब्दमशौचंस्यात्तदर्धंमातुरेवच मासत्रयंतुभार्यायास्तदर्धंभ्रातृपुत्रयोः अन्येषांतु सपिंडानामाशौचंमाससम्मितं तदंतेशांतिकंकृत्वाततोलग्नंविधीयते **ज्योतिःप्रकाशे** प्रतिकूलेपिकर्तव्योविवाहोमासतःपरम् शांतिंविधायगांदत्वावाग्दानादिचरेत्पुनः शांतिर्विनायकशांतिः तथाच**मेधातिथिः** संकटेसमनुप्राप्तेयाज्ञवल्क्येनयोगिना शांतिरुक्तागणेशस्यकृत्वातांशुभमाचरेदिति प्रतिकूलेनकर्तव्योयावच्छेद्यावद्गतुत्रयं प्रतिकूलेपिकर्तव्यमित्याहुर्बहवोबुधाः प्रतिकूलेसपिंडस्यमासमेकंविवर्जयेत् **ज्योतिःसागरे** दुर्भिक्षेराष्ट्रभंगेचपित्रोर्वाप्राणसंशये प्रौढायामपिकन्यायांनानुकूल्यंप्रतीक्ष्यते **मेधातिथिः** पुरुषत्रयपर्यंतंप्रतिकूलंस्वगोत्रिणां प्रवेशान्निर्गमस्तद्वत्तथामंडनमुंडने प्रेतकर्माण्यनिर्वर्त्यचरेन्नाभ्युदयक्रियां आचतुर्थंततःपुंसिपंचमेशुभदंभवेत् ।

संकट ( दुसरा योग्य वर न मिळणें वगैरे ) प्राप्त असेल तर सांगतो **मेधातिथि**—"ज्या वेळीं वाग्दान केल्यानंतर वधूवरांच्या कुलांत कोणाएकाला मरण प्राप्त होईल त्या वेळीं तो विवाह करूं नये. संवत्सर गेल्यावर त्या वधूवरांचा विवाह करावा, तो शुभदायक होईल." **स्मृतिरत्नावलींत**—"पित्याचें आशौच एकवर्ष; मातेचें आशौच सहा महिने; भार्येचें

---

१ प्रतिकूलेनकर्तव्यंलग्नंयावदृतुत्रयमितिपाठांतरं तदेव साधुइतिप्रतिभाति ।

आशौच तीन महिने; भ्राताचें व पुत्राचें आशौच दीड महिना; आणि इतर सपिंडांचें आशौच एक महिना सांगितलें आहे. याप्रमाणें सांगितलेलें आशौच संपल्यावर शांति करून नंतर विवाह करावा." **ज्योतिःप्रकाशांत**—"प्रतिकूल ( सपिंडादिमरण ) झालें असलें तरी एक मास गेल्यावर विवाह करावा. विवाहाचे वेळीं विनायकशांति करून गोप्रदान करून पुनः वाग्दानादि कृत्य करावें." येथें शांति सांगितली ती विनायकशांति समजावी. तेंच सांगतो **मेधातिथि**—"संकटसमय प्राप्त असतां, योगियाज्ञवल्क्यानें विनायकशांति सांगितली आहे ती करून नंतर मंगलकार्य करावें. प्रतिकूल झालें असतां सहा महिने गेल्यावांचून विवाह करूं नये. चोर, दुष्काळ, देशभंग इत्यादिक बहुत उपद्रव उत्पन्न झाले असतां प्रतिकूल झालेलें असलें तरी विवाहादि मंगलकार्य करावें, असें कितीएक सांगतात. सपिंडाचें प्रतिकूल झालें असतां एकमास वर्ज्य करावा." **ज्योतिःसागरांत**—"दुर्भिक्ष पडलें, राष्ट्रभंग झाला, मातापितरांच्या वांचण्याचा संशय उत्पन्न झाला, अथवा कन्या प्रौढ झाली, यांपैकीं कोणतेंही झालें असतां आनुकूल्याची ( प्रतिकूल झाल्यापासून वर्ज्य दिवस सोडून पुढें येणाऱ्या अनुकूलदिवसांची ) वाट पाहूं नये. अर्थात् अनुकूल दिवस येण्यापूर्वीच विवाह करावा." **मेधातिथि**—"आपल्या गोत्रांत तीन पुरुषांचे आंत कोणी मरेल तर प्रतिकूल होतें. तसेंच प्रवेश ( पुत्रविवाह ) झाल्यावर निर्गम ( कन्याविवाह ) करूं नये, हा निषेध आणि मंडन ( मौंजी, विवाह ) केल्यावर मुंडन ( चौलादि ) करूं नये हा निषेध तीन पुरुषांपर्यंत समजावा. सपिंडांत चार पुरुषांचे आंत प्राप्त झालेलीं प्रेतकर्मे ( सपिंडीकरण, मासिकें वगैरे ) केल्यावांचून वृद्धिश्राद्ध करूं नये. पांचव्या पुरुषाचे ठायीं, प्रेतकर्में केल्यावांचून वृद्धिश्राद्ध झालें तरी तें शुभदायक होईल."

**अथरजोदोषेनिर्णयः माधवीये** प्रारंभात्प्राग्विवाहस्यमातायदिरजस्वला निवृत्तिस्तस्यकर्तव्यासम्यक्त्वश्रुतिचोदनात् प्रारंभाननांदीश्राद्धात् नांदीमुखंविवाहादावित्यादिनातस्यैवप्रारंभोक्तेः **मेधातिथिः** चौलेचव्रतबंधेचविवाहेयज्ञकर्मणि भार्यारजस्वलायस्यप्रायस्तस्यनशोभनं वधूवरान्यतरयोर्जननीचेद्रजस्वला तस्याःशुद्धेःपरंकार्यंमांगल्यंमनुरब्रवीत् **वृद्धमनुः** विवाहव्रतचूडासुमातायदिरजस्वला तदानमंगलंकार्यंशुद्धौकार्यंशुभेप्सुभिः **गर्गः** यस्योद्वाहादिमांगल्येमातायदिरजस्वला तदानतत्प्रकर्तव्यमायुःक्षयकरंयतः नांदीश्राद्धोत्तरंरजोदोषेतु**कपर्दिकारिकासु** सूतिकोदक्ययोःशुद्ध्यैगांदद्याद्धोमपूर्वकम् प्राप्तकर्मणिशुद्धिःस्यादितरस्मिन्नशुध्यति अलाभेसुमुहूर्तस्यरजोदोषेचसंगते श्रियंसंपूज्यतत्कुर्यात्पाणिग्रहणमंगलं हेम्नीमाषमितांपद्मांश्रीसूक्तविधिनार्चयेत् प्रत्यृचंपायसंहुत्वाअभिषेकंसमाचरेदिति **सूतकादिसंकटेतु** कूष्मांडीभिर्घृतंहुत्वापयस्विनींगांचदत्वाविवाहादिकुर्यादितिचवक्ष्यते ।

## आतां रजोदोषाविषयींचा निर्णय सांगतो—

**माधवीयांत**—"विवाहाचा प्रारंभ होण्याच्या पूर्वी जर वधूची किंवा वराची माता रजस्वला होईल, तर रजाची निवृत्ति होईपर्यंत विवाह होत नाहीं. कारण, माता व पिता या दोघांना मिळून अपत्याच्या संस्काराचा अधिकार श्रुतीनें सांगितला आहे." येथें विवाहाचा प्रारंभ म्हणजे नांदीश्राद्ध समजावें. कारण, "विवाहादि मंगल कार्याचे आधीं नांदीश्राद्ध हा प्रारंभ." इत्यादि वचनानें नांदीश्राद्ध हाच प्रारंभ सांगितला आहे. **मेधातिथि**—"चौल, उपनयन, विवाह, यज्ञ, या कर्मांमध्यें ज्याची भार्या रजस्वला होईल त्याचें फारकरून शुभ होत नाहीं. वधूची किंवा वराची माता जर रजस्वला होईल तर ती शुद्ध झाल्यानंतर मंगल कार्य करावें असें मनु सांगतो." **वृद्धमनु**—"विवाह, उपनयन, चौल हीं कर्तव्य असतां जर माता रजस्वला होईल तर तें विवाहादि मंगल करूं नये. कल्याणेच्छूंनीं तिची शुद्धि झाल्यानंतर तें मंगल करावें." **गर्ग**—"ज्याचें विवाहादि मंगल कार्य करावयाचें असतां जर त्याची माता रजस्वला होईल तर त्या वेळीं तें मंगल कार्य करूं नये. कारण, त्या वेळीं केलेलें तें मंगलकार्य त्याच्या आयुष्याचा क्षय करणारें आहे." नांदीश्राद्ध झाल्यानंतर रजोदोष उपस्थित झाला असेल तर सांगतो **कपर्दिकारिकेंत**—"सूतिका आणि रजस्वला यांच्या शुद्धीसाठीं होम करून गोप्रदान करावें. म्हणजे प्राप्त असलेल्या कर्माविषयीं शुद्धि होते. इतर कर्माविषयीं शुद्धि होत नाहीं. रजोदोष प्राप्त झालेला असून दुसरा चांगला मुहूर्त मिळत नसेल, तर लक्ष्मीची यथाविधि पूजा करून उपस्थित झालेलें विवाहादि मंगल करावें. लक्ष्मीच्या पूजेचा प्रकार असा—माषपरिमित सुवर्णाची लक्ष्मीप्रतिमा करून श्रीसूक्तविधीनें तिची पूजा करावी. नंतर श्रीसूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें पायसाचा होम करून अभिषेक करावा." सूतकादि संकट उपस्थित झालें असेल तर तैत्तिरीयशाखेंतील कूष्मांडी ऋचांनीं घृताचा होम करून दूध देणारी गाई ब्राह्मणाला देऊन विवाहादि मंगल कार्य करावें, असें पुढें विवाहभेद सांगितल्यावर सांगावयाचें आहे.

**अथैकक्रियानिर्णयः ज्योतिर्निबंधेवृद्धमनुः** एकमातृजयोरेकवत्सरेपुरुषस्त्रियोः नसमान-

१ एकमातृजयोः पुत्रयोः कन्ययोर्वा पुत्रकन्ययोः समानक्रिया समानसंस्कारः न कार्य इत्यर्थः ॥

क्रियांकुर्यान्मातृभेदेविधीयते एतेनएकस्यपुंसोविवाहद्वयमेकदिनेनिषिद्धं मातृभेदाभावात् **नारदः** पुत्रोद्वाहात्परंपुत्रीविवाहोनऋतुत्रये नतयोर्व्रतमुद्वाहान्मंडनादपिमुंडनं **वराहः** विवाहस्त्वेकजातानांषण्मासाभ्यंतरेयदि असंशयंत्रिभिर्वर्षैस्तत्रैकाविधवाभवेत् **मदनरत्नेवसिष्ठः** नपुंविवाहोर्ध्वमृतुत्रयेपिविवाहकार्यंदुहितुःप्रकुर्यात् नमंडनाच्चापिहिमुंडनंचगोत्रैकतायांयदिनाब्दभेदः एकोदरभ्रातृविवाहकृत्यंस्वसुर्नपाणिग्रहणंविधेयं षण्मासमध्येमुनयःसमूचुर्नमुंडनंमंडनतोपिकार्यं **एतदपवादस्तत्रैव** ऋतुत्रयस्यमध्येचेदन्याब्दस्यप्रवेशनं तदाह्येकोदरस्यापिविवाहस्तुप्रशस्यते **सारावल्याम्** फाल्गुनेचैत्रमासेतुपुत्रोद्वाहोपनायने भेदाद्ब्दस्यकुर्वीतनर्तुत्रयविलंघनं **संहिताप्रदीपे** ऊर्ध्वंविवाहात्तनयस्यनैवकार्योविवाहोदुहितुःसमार्धं अप्राप्यकन्यांश्वशुरालयंचवधूःप्रवेश्यास्वगृहंचनादौ **मदनरत्नेवसिष्ठः** द्विशोभनंत्वेकगृहेपिनेष्टंशुभंतुपश्चान्नवभिर्दिनैस्तु आवश्यकंशोभनमुत्सवोवाद्वारेथवाचार्यविभेदतोवा एकोदरप्रसूतानांनाग्निकार्यत्रयंभवेत् भिन्नोदरप्रसूतानांनेतिशातातपोब्रवीत् **ज्योतिर्निबंधेकात्यायनः** कुलेऋतुत्रयादर्वाग्मंडनान्नतुमुंडनं प्रवेशान्निर्गमोनेष्टोनकुर्यान्मंगलत्रयम् कुर्वंतिमुनयःकेचिदन्यस्मिन्वत्सरेलघु लघुवागुरुवाकार्यंप्राप्तंनैमित्तिकंतुयत् पुत्रोद्वाहःप्रवेशाख्यःकन्योद्वाहस्तुनिर्गमः मुंडनंचौलमित्युक्तंव्रतोद्वाहौतुमंगलं चौलंमुंडनमेवोक्तंवर्जयेन्मंडनात्परम् मौंजीचोभयतःकार्यायतोमौंजीनमुंडनम् अभिन्नवत्सरेपिस्यात्तदहस्तत्रभेदयेत् अभेदेतुविनाशःस्यान्नकुर्यादेकमंडपे ।

## आतां एकक्रियेचा निर्णय सांगतो—

**ज्योतिर्निबंधांत वृद्धमनु**—"एका मातेपासून उत्पन्न अशा पुत्र व कन्या यांचे समान संस्कार एका संवत्सरांत करूं नयेत. त्या दोघांच्या माता भिन्न असतील तर करावे." यावरून एका पुरुषाचे दोन विवाह एका दिवशीं निषिद्ध आहेत. कारण, भिन्न माता नाहींत. **नारद**—"पुत्राच्या विवाहानंतर सहा महिन्यांच्या आंत कन्येचा विवाह करूं नये. पुत्राच्या किंवा कन्येच्या विवाहानंतर सहा महिन्यांच्या आंत मौंजीबंधन करूं नये. मंडन ( मौंजी किंवा विवाह ) केल्यावर सहा महिन्यांच्या आंत मुंडन ( चौलादि ) करूं नये." **वराह**—"एकापासून झालेल्या अपत्यांचा एक विवाह झाल्यावर सहा महिन्यांच्या आंत दुसरा विवाह होईल तर त्यांपैकीं एक स्त्री तीन वर्षांत विधवा होईल, यांत संशय नाहीं." **मदनरत्नांत वसिष्ठ**—"एका गोत्रांत ( त्रिपुरुषांत ) पुरुषाचा विवाह झाल्यानंतर सहा महिन्यांच्या आंत कन्येचा विवाह करूं नये. आणि मंडनानंतर सहा महिन्यांत मुंडन करूं नये, हा निषेध वर्षभेद झाला नसेल तर समजावा. एका उदरांत उत्पन्न झालेल्या भ्रात्याचा विवाह केल्यावर सहा मासांचे आंत भगिनीचा विवाह करूं नये. आणि मंडन ( मौंजी, विवाह ) झाल्यावर मुंडनही करूं नये, असें मुनि सांगतात." याचा अपवाद सांगतो तेथेंच—"एक विवाह केल्यावर सहा महिन्यांच्या आंत जर दुसरें संवत्सर प्राप्त होईल, तर सहोदराचा देखील सहा महिन्यांच्या आंत दुसरा विवाह प्रशस्त आहे." **सारावलींत**—"फाल्गुनमासांत पुत्राचा विवाह केल्यावर चैत्रमासांत वर्षभेद झाल्यामुळें दुसऱ्या पुत्राचें उपनयन करावें. या ठिकाणीं तीन ऋतु ( सहा महिने ) टाकावे, असें नाहीं." **संहिताप्रदीपांत**—"पुत्राचा विवाह झाल्यावर सहा महिन्यांच्या आंत कन्येचा विवाह करूं नये. कन्या श्वशुरगृहीं पोंचविण्याचे पूर्वीं आपल्या घरांत वधूप्रवेश करूं नये." **मदनरत्नांत वसिष्ठ**—"एका घरांत दोन मंगल कार्यें इष्ट नाहींत. एक मंगल कार्य झाल्यावर नऊ दिवस गेल्यानंतर दुसरें मंगल कार्य करावें. आवश्यक मंगल कार्य किंवा उत्सव कर्तव्य असेल तर द्वारभेदानें किंवा आचार्यभेदानें करावें. सहा महिन्यांच्या आंत सहोदरांचीं अग्निकार्यें ( अग्निप्रापक कार्यें म्हणजे मौंजी आणि विवाह हीं ) तीन करूं नयेत. भिन्नोदरांचीं तीन अग्निकार्यें सहा महिन्यांच्या आंत करूं नयेत, असें शातातप सांगतो." **ज्योतिर्निबंधांत कात्यायन**—"त्रिपुरुषात्मक कुलांत मंडन झाल्यानंतर सहा महिन्यांच्या आंत मुंडन करूं नये. प्रवेश ( पुत्रविवाह ) झाल्यावर सहामासांत निर्गम ( कन्याविवाह ) इष्ट नाहीं. आणि सहा महिन्यांच्या आंत तीन मंगलें करूं नयेत. त्रिपुरुषात्मक कुलांत ज्येष्ठ मंगल झाल्यावर सहा महिन्यांच्या आंत लघुमंगल करूं नये. कितीएक मुनि ज्येष्ठ मंगल झाल्यानंतर वर्षभेद झाला असतां लघु मंगल करितात. लघुमंगल किंवा गुरुमंगल जें नैमित्तिक प्राप्त असेल तें करावें. ( बाहेर मंडपांत जें विहित तें ज्येष्ठ मंगल होय. त्याच्याहून इतर तें लघुमंगल होय ). प्रवेश म्हणजे पुत्रविवाह. निर्गम म्हणजे कन्याविवाह. मुंडन म्हणजे चौल. आणि मंडन म्हणजे उपनयन आणि विवाह होत. मुंडन म्हणजे चौल तें मंडनानंतर वर्ज्य करावें. मौंजीबंधन हें विवाहाच्या पूर्वी व पश्चात्‌ही करावें. कारण, मौंजीबंधन हें मुंडन होत नाहीं. संकट असेल तर सोदरांचेही समानसंस्कार एका वर्षांतही

करावे. दिवस मात्र भिन्न असावा. एका दिवशीं सोदरांचे समान संस्कार होतील तर त्या एकाचा विनाश होईल. तसेंच सोदरांचे समान संस्कार एका मंडपांत करूं नयेत."

संकटेतु **कपर्दिकारिका वराहमिहिरश्च** उद्वाह्यपुत्रींनपिताविदध्यात्पुत्र्यंतरस्योद्वहनंकदाचित् यावच्चतुर्थदिनमत्रपूर्वंसमाप्यचान्योद्वहनंविदध्यात् **कश्यपः** मौंजीबंधस्तथोद्वाहःषण्मासाभ्यंतरेपिवा पुत्र्युद्वाहंनकुर्वीतविभक्तानांनदोषकृत् **ज्योतिर्निबंधे** विवाहमारभ्यचतुर्थिमध्येश्राद्धंदिनंदर्शदिनंयदिस्यात् वैधव्यमाप्नोतितदाशुकन्याजीवेत्पतिश्चेदनपत्यतास्यात् **तथा** विवाहमध्येयदिचेत्क्षयाहस्तत्रस्वमुख्याःपितरोनयांति वृत्तेविवाहेपरतस्तुकुर्याच्छ्राद्धंस्वधाभिर्नतुदूषयेत्तम् येवाभद्रंदूषयंतिस्वधाभिरिति**श्रुतेश्च** मासिकविषये**कालहेमाद्रौशाट्यायनिः** प्रेतश्राद्धानिसर्वाणिसपिंडीकरणंतथा अपकृष्यापिकुर्वीनकर्तुंनांदीमुखंद्विजः वृद्धिविनापकर्षेदोषमाहतत्रैव**ोशनाः** वृद्धिश्राद्धविहीनस्तुप्रेतश्राद्धानियश्चरेत् सश्राद्धीनरके घोरेपितृभिःसहमज्जतीति **मेधातिथिः** प्रेतकर्माण्यनिर्वर्त्यचरेन्नाभ्युदयक्रियां आचतुर्थंततःपुंसिपंचमेशुभदंभवेत् **स्मृत्यंतरे** सपिंडीकरणादर्वागपकृष्यकृतान्यपि पुनरप्यपकृष्यंतेवृद्ध्युत्तरनिषेधनात् ।

संकट असेल तर सांगतो **कपर्दिकारिका** आणि **वराहमिहिर**—"पित्यानें एका कन्येचा विवाह करून चार दिवसांचे आंत दुसऱ्या कन्येचा विवाह कधींही करूं नये. पूर्वीचें विवाहकृत्य समाप्त करून दुसरा विवाह करावा." **कश्यप**—"त्रिपुरुषात्मक कुलांत विवाह केल्यावर सहा मासांचे आंत मौंजीबंधन होत नाहीं तसाच पुत्रविवाह केल्यावर सहा महिन्यांच्या आंत कन्याविवाह करूं नये. हा निषेध एकत्र असतील तर समजावा विभक्तांना नाहीं." **ज्योतिर्निबंधांत**—"विवाहाचा आरंभ ( नांदीश्राद्ध ) केल्यावर चतुर्थीकर्म ( मंडपोद्वासन ) होईपर्यंत मध्यें श्राद्धदिवस किंवा अमावास्या जर प्राप्त होईल तर त्या कन्येचा पति लवकर मरेल. जर कदाचित पति वांचेल तर तिला अपत्य होणार नाहीं." तसेंच—"विवाहकर्मामध्यें जर वडिलांचे सांवत्सरिक श्राद्धाचा दिवस प्राप्त असेल तर त्या दिवशीं स्वधामुख्य पितर येत नाहींत. विवाहादि मंगल कर्म समाप्त झाल्यावर त्रिपुरुषसपिंडांनीं श्राद्ध करावें कारण ते मंगल कार्य स्वधा शब्दांनीं दूषित करूं नये." आणि "जे राक्षस मंगलास स्वधांनीं दूषित करितात त्या सर्व राक्षसास सोमदेव सपाकाणें देवो. अथवा निर्ऋतीच्या ( पापदेवतेच्या ) उत्संगावर त्यांना टाको." अशी **श्रुति**ही ( ऋ सं. अ. ० अ ० व ० ) आहे मासिकांविषयीं सांगतो **कालहेमाद्रींत शाट्यायनि**—"नांदीश्राद्ध करावयाचें असेल तर सारी प्रेतश्राद्धें आणि सपिंडीकरणश्राद्ध हीं अपकर्ष करून देखील करावीं." वृद्धिश्राद्ध करावयाचें नसतां प्रेतश्राद्धांना अपकर्ष केल्या तर दोष सांगतो तेथेंच **उशना**—"जो मनुष्य वृद्धिश्राद्ध करावयाचें नसतां प्रेतश्राद्धें अपकर्षानें करील तो श्राद्ध करणारा पितरांसह घोर नरकांत पडतो." **मेधातिथि**—"चार पुरुषांच्या सपिडांत प्रेतकर्म केल्यावांचून वृद्धिश्राद्ध करूं नये पांचव्या पुरुषांत केलें असेल तर शुभदायक होईल." **स्मृत्यंतरांत**—"सपिंडीकरणाच्या पूर्वी मासिकश्राद्धें अपकर्ष करून केलेलीं असलीं तरी तीं पुनः आपआपल्या कालीं करावयाचीं असल्यामुळें व त्यांचा वृद्धिश्राद्ध झाल्यावर निषेध असल्याकारणानें वृद्धिश्राद्धाच्या पूर्वी पुनः देखील अपकर्ष करून तीं करावीं.

**स्मृतिसारावल्याम्** भ्रातृयुगेस्वसृयुगेभ्रातृस्वसृयुगेतथा एकस्मिन्मंडपेचैवनकुर्यान्मंडनद्वयं सोदरविषयमेतत् **यमः** एकोदरप्रसूतानामेकस्मिन्वासरेपुनः विवाहोनैवकुर्वीतमंडनोपरिमुंडनं **गार्ग्यः** भ्रातृयुगेस्वसृयुगेभ्रातृस्वसृयुगेतथा नकुर्यान्मंगलंकिंचिदेकस्मिन्मंडपेहनि एकस्मिन्वासरेप्राप्तंकुर्याद्यमलजातयोः क्षौरंचैवविवाहंचमौंजीबंधनमेवच **ज्योतिर्विवरणे** एकोदरयोरेकदिनोद्वहनेभवेन्नाशः नयंतर एकदिनेकेप्याहुःसंकटेचशुभं ऊर्ध्वंविवाहाच्छुभदोनरस्यनारीविवाहोनकृतुत्रयेस्यात् नारीविवाहात्तदहेपिशस्तं नरस्यपाणिग्रहमाहुरार्याः भिन्नमातृजयोस्तुएकवासरेविवाहमाह**मेधातिथिः** पृथङ्मातृजयोःकार्योविवाहस्त्वेकवासरे एकस्मिन्मंडपेकार्यःपृथग्वेदिकयोस्तथा पुष्पपट्टिकयोःकार्यंदर्शनंनशिरस्थयोः भगिनीभ्यामुभाभ्यांचयावत्सप्तपदीभवेत् यमयोस्तुविशेषः **भट्टकारिकायाम्** एकस्मिन्वत्सरेचैकवासरेमंडपेतथा कर्तव्यंमंगलंस्वस्रोर्भ्रात्रोर्यमलजातयोः **ज्योतिर्निबंधेनारदः** प्रत्युद्वाहोनैवकार्योनैकस्मैदुहितृद्वयं नचैक-

---

१ चतुर्थीकर्मंहोम संस्कारकौस्तुभांत पहावा.

जन्ययोःपुंसोरेकजन्येतुकन्यके नैवंकदाचिदुद्वाहोनैकदामुंडनद्वयं नैकजन्येतुकन्येद्वेपुत्रयोरेकजन्ययोः नपुत्रीद्वयमेकस्मैप्रदद्यात्तुकदाचनेति[१]।

**स्मृतिसारावलींत**—"दोन भ्राते, दोन भगिनी, किंवा भ्राता व भगिनी यांचीं दोन मंडनें ( विवाह व उपनयन ) एका मंडपांत करूं नयेत." हा निषेध सहोदरांविषयीं आहे. **यम**—"सहोदर अपत्यांचे एक दिवशीं विवाह करूं नयेत. तसेंच मंडनानंतर मुंडन करूं नये." **गार्ग्य**—"दोन भ्राते, दोन भगिनी, आणि भ्राता व भगिनी यांचीं कोणतींही मंगल कार्यें एका मंडपांत एक दिवशीं करूं नयेत. जुंवळ अपत्यांचें चौल, विवाह, आणि मौंजीबंधन हें एकदिवशीं करावें." **ज्योतिर्विवरणांत**—"एक दिवशीं सहोदरांचे विवाह झाले असतां नाश होईल. दोघांच्या मध्यें नदीचें अंतर असेल व संकटसमय असेल तर सहोदरांचे एक दिवशीं विवाह शुभ होतील, असें कितीएक आचार्य सांगतात. पुरुषाच्या विवाहानंतर तीन ऋतूंच्या आंत कन्येचा विवाह शुभदायक होत नाहीं. कन्याविवाह झाल्यानंतर त्या दिवशीं देखील पुरुषाचा विवाह प्रशस्त आहे, असें आर्य सांगतात." भिन्नमातेच्या अपत्यांचे विवाह एक दिवशीं सांगतो **मेधातिथि**—"वेगवेगळ्या स्त्रियांपासून झालेल्या अपत्यांचे विवाह एक दिवशीं एका मंडपांत वेगवेगळ्या वेदींवर करावे. दोन भगिनींनीं परस्परांच्या मस्तकावर असलेल्या पुष्पपट्टिका ( मंडावळ्या ) सप्तपदीक्रमण होईपर्यंत परस्परांनीं पाहूं नयेत." जुंवळांना तर विशेष सांगतो **भट्टकारिकेंत**—"जुंवळ झालेल्या दोन भगिनींचीं किंवा दोन भ्रात्यांचीं मंगल कार्यें एका वर्षांत एकदिवशीं एका मंडपांत करावीं. **ज्योतिर्निबंधांत नारद**—"प्रत्युद्वाह ( ह्याची कन्या त्याच्या पुत्राला व त्याची कन्या ह्याच्या पुत्राला देणें तो ) करूं नयेच. एका पुरुषाला दोन कन्या देऊं नयेत. सहोदर दोन भ्रात्यांना सहोदर दोन कन्या देऊं नयेत. तसेंच एकापासून उत्पन्न अशा दोघांचे विवाह एक कालीं करूं नयेत. दोघांचें मुंडन ( चौलादि ) एक कालीं करूं नये. एकापासून झालेल्या दोन कन्या एकापासून झालेल्या दोन पुत्रांस देऊं नयेत. दोन कन्या एका पुरुषाला कधींही देऊं नयेत."

कन्यायारजोदर्शनेतु**अपरार्केसंवर्तः** माताचैवपिताचैवज्येष्ठभ्राततथैवच त्रयस्तेनरकंयांतिदृष्ट्वा कन्यांरजस्वलां **हारीतः** पितुर्गेहेतुयाकन्यारजःपश्यत्यसंस्कृता साकन्यावृषलीज्ञेयातत्पतिर्वृषलीपतिः **देवलात्रिकश्यपाः** पूर्वार्धंतदेव भ्रूणहत्यापितुस्तस्याःसाकन्यावृषलीस्मृता यस्तांसमुद्वहेत्कन्यांब्राह्मणो ज्ञानदुर्बलः अश्राद्धेयमपांक्तेयंतंविद्याद्वृषलीपतिम् **माधवीयेबौधायनः** त्रीणिवर्षाण्यृतुमतीकांक्षेतपितृशासनम् **विष्णुः** ऋतुत्रयमुपास्यैवकन्याकुर्यात्स्वयंवरम् अत्रवरस्यदोषाभावमाह **यमः** कन्याद्वादशवर्षाणियाप्रदत्तावसेद्गृहे भ्रूणहत्यापितुस्तस्याःसाकन्यावरयेत्स्वयं एवंचोपनतांपत्नींनावमन्येत्कदाचन नतुतांबंधकींविद्यान्मनुःस्वायंभुवोब्रवीत् **मनुः** अलंकारंनाददीतपितृदत्तंस्वयंवरे भ्रातृदत्तंमातृदत्तंस्तेयीस्याद्यदितं हरेत्[२] वरंप्रत्याह पित्रेनदद्याच्छुल्कंतुकन्यामृतुमतींहरन् सहिस्वाम्यादतिक्रामेदृतूनांप्रतिरोधनात् ।

कन्येला रजोदर्शन प्राप्त झालें असेल तर सांगतो—**अपरार्कांत संवर्त**—"माता, पिता आणि ज्येष्ठ भ्राता हे तिघे विवाहाच्या पूर्वी कन्या रजस्वला झालेली पाहतील तर नरकास जातील." **हारीत**—"पित्याच्या घरीं अविवाहित कन्या रजस्वला होईल तर ती वृषली ( शूद्रा ) जाणावी. आणि तिचा पति तो वृषलीपति होय." **देवल अत्रि व कश्यप**—"पित्याच्या घरीं अविवाहित कन्या ऋतुमती होईल तर तिच्या पित्याला भ्रूणहत्यादोष प्राप्त होईल. आणि ती कन्या वृषली म्हटली आहे. जो ज्ञानशून्य ब्राह्मण त्या कन्येशीं विवाह करील तो ब्राह्मण वृषलीपति झाल्यामुळें अपांक्तेय ( पंक्तीस बसण्याला अयोग्य ) व श्राद्धास अयोग्य जाणावा." **माधवीयांत बौधायन**—"ऋतुमती झालेल्या कन्येनें पित्याच्या आज्ञेची तीन वर्षेंपर्यंत प्रतीक्षा करावी." **विष्णु**—"ऋतुमती झालेल्या कन्येनें तीन ऋतूंपर्यंत वाट पाहून नंतर कन्येनें आपणास योग्य स्वयंवर करावा." ऋतुमतीकन्येच्या वराला हारीतादिकांनीं सांगितलेला जो वृषलीपतित्वरूप दोष तो दोष स्वयंवराला नाहीं, असें सांगतो **यम**—"जी कन्या बारा वर्षेंपर्यंत अविवाहित असून पित्याच्या घरीं राहते, तिच्या पित्याला भ्रूणहत्या दोष प्राप्त होतो. त्या कन्येनें स्वतः योग्य वराला वरावें, याप्रमाणें अविवाहित असून स्वतः वरण्याला आलेली जी पत्नी तिचा वरानें अपमान करूं नये. ती स्वतः आल्यामुळें स्वैरिणी आहे, असें समजूं नये. असें स्वायंभुव मनु सांगतो

---

१ वृषलीति । त्रिधा वृषली देवलेनोक्ता–वंध्या च वृषली ज्ञेया वृषली च मृतप्रजा । अपरा वृषली ज्ञेया कुमारी या रजस्वलेति । तत्र रजस्वलापरिणये दोषः रजोदर्शनाभावे तु द्वादशाब्दाया अपि विवाहे न दोषः । यतः द्वादशी वृषली भवेदित्यादौ वृषलीपदं रजस्वलार्थकं । तथा च विवाहात्पूर्वं रजोदर्शनं यथा न भवति तथा कार्यमिति न तु द्वादशे वर्षे तस्या वृषलीसंज्ञा । अन्यथा—त्रिंशद्वर्षोद्वहेत्कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीमिति मनुवाक्यं विरुध्येत. २ अलंकारं नाददीत पित्र्यं कन्या स्वयंवरे । मातृकं भ्रातृदत्तं वा स्तेना स्याद्यदि तं हरेत् इति पाठांतरम् ।

झाला." **मनु**—"स्वयंवर करणाऱ्या कन्येनें; पित्यानें, मातेनें, किंवा भ्रात्यानें पूर्वी दिलेला अलंकार असेल तो ग्रहण करूं नये; तो अलंकार ग्रहण करील तर ती चोर होईल." वराला सांगतो **मनु**—"ऋतु प्राप्त झालेल्या कन्येला हरण करणारानें तिच्या पित्याला शुल्क ( तिचें मूल्य ) देऊं नये. कारण, तिच्या ऋतूंचा प्रतिबंध केल्यामुळें ( म्ह० ऋतुकालीं योग्य वराचा संयोग करून न दिल्यामुळें ) पित्याची तिच्यावरची सत्ता नष्ट होते."

अत्रप्रायश्चित्तमुक्तम**आश्वलायनेन** कन्यामृतुमतींशुद्धांकृत्वानिष्कृतिमात्मनः शुद्धिंचकारयित्वातामुद्वहेदानृशंस्यधीः पिताऋतून्स्वपुत्र्यास्तुगणयेदादितःसुधीः दानावधिगृहेयत्नात्पालयेच्चरजोवतीं दद्यात्तदृतुसंख्यागाःशक्तःकन्यापितायदि दातव्यैकापिनिःस्वेनदानेतस्यायथाविधि दद्याद्वाब्राह्मणेभ्यश्चान्नमतिनिःस्वःसदक्षिणं तस्यातीततुसंख्येषुवरायप्रतिपादयेत् उपोष्यत्रिदिनंकन्यारात्रौपीत्वागवांपयः अदृष्टरजसेदद्यात्कन्यायैरत्नभूषणम् तामुद्वहन्वरश्चापिकूष्मांडैर्जुहुयाद्द्विजइति **मदनपारिजाते यज्ञपार्श्वः** विवाहेवितेतेतंत्रे होमकालउपस्थिते कन्यामृतुमतींदृष्ट्वाकथंकुर्वंतियाज्ञिकाः स्नापयित्वातुतांकन्यामर्चयित्वायथाविधि युंजानामाहुतिंहुत्वाततस्तंत्रंप्रवर्तयेत **बौधायनसूत्रे** अथयदिकन्योपसाद्यमानाचोह्यमानावारजस्वलास्यात्तामनुमंत्रयेत् पुमांसौमित्रावरुणौपुमांसावश्विनावुभौ पुमानिंद्रश्चसूर्यश्चपुमांसंचदधात्वियमिति अथद्वादशरात्रमलंकृत्यप्राशयेत्पंचगव्यमथशुद्धांकृत्वाविवहेत् ।

अविवाहित कन्या ऋतुमती झाली असतां प्रायश्चित्त सांगतो **आश्वलायन**—"कन्यादात्यानें ऋतुमती कन्येची शुद्धि करून आपण प्रायश्चित्त करावें, म्हणजे तो कन्यादानाला योग्य होतो. वरानें, कन्यादात्याकडून कन्येची शुद्धि करवून तिच्यावर कोणताही दोषारोप न करितां तिच्याशीं विवाह करावा. तो शुद्धिप्रकार येणेंप्रमाणें—पित्यानें ऋतुमती झालेल्या कन्येचा विवाह होईपर्यंत आपल्या घरांत तिचें प्रयत्नानें रक्षण करावें. आणि पहिल्यापासून त्या कन्येला किती ऋतु प्राप्त झाले यांची गणना करावी. कन्येचा पिता समर्थ असेल तर कन्येला जितके ऋतु प्राप्त झाले असतील तितक्या गाई त्यानें ब्राह्मणांस द्याव्या. दरिद्री पिता असल्यास तिचें यथाविधि दान करण्याकरितां एक गाई तरी ब्राह्मणास द्यावी, अथवा फार दरिद्री असल्यास त्या कन्येचे जितके ऋतु गेले असतील तितक्या ब्राह्मणांस दक्षिणासहित भोजन द्यावें नंतर ती कन्या वराला द्यावी. ही कन्यादात्याची निष्कृति ( प्रायश्चित्त ) होय. आतां कन्येची शुद्धि अशी—कन्येनें तीन दिवस उपवास करून रात्रौ गाईचें दूध प्राशन करून जिला रजोदर्शन झालें नसेल अशा ब्राह्मणकुमारीला रत्न व भूषणें द्यावीं, असें केल्यावर ती कन्या विवाहाला योग्य होते. वरानें कूष्मांडमंत्रांनीं होम करून तिच्याशीं विवाह करावा म्हणजे तो दोषी होत नाहीं." **मदनपारिजातांत यज्ञपार्श्व**—"विवाहाचें तंत्र ( प्रयोग ) चाललें असून त्यांत होमकाल प्राप्त झाला असतां त्यासमयीं कन्येला रजोदर्शन झालें तर याज्ञिकांनीं कसें करावें ? त्या कन्येला स्नान घालून यथाविधि अलंकृत करून 'युंजाना०' ह्या तैत्तिरीय शाखेच्या मंत्रानें प्रायश्चित्तहोम करून तदनंतर होमतंत्र चालवावें." **बौधायनसूत्रांत**—"आतां विवाहांत कन्या वराचे जवळ बसविलेली असतां किंवा तिजकडून विवाहप्रापक सप्तपदीक्रमणादि कर्म करवीत असतां ती जर रजस्वला होईल तर तिला अनुमंत्रण करावें. अनुमंत्रणाचा मंत्र—'**पुमांसौ मित्रावरुणौ पुमांसावश्विनावुभौ ॥ पुमानिंद्रश्च सूर्यश्च पुमांसं च दधात्वियम् ॥**' याप्रमाणें अनुमंत्रण केल्यावर बारा दिवस तिला अलंकृत करून पंचगव्य प्राशन करवावें. याप्रमाणें शुद्ध करून तिच्याशीं विवाह करावा."

अत्रगांधर्वाद्यष्टौविवाहास्तद्व्यवस्थाचाकरेज्ञेया **मनुः** षडानुपूर्व्याविप्रस्यक्षत्रस्यचतुरोवरान् विट्शूद्रयोस्तुतानेवविद्याद्धर्म्यानराक्षसान् चतुरः आसुरगांधर्वराक्षसपैशाचान् तान्राक्षसवर्ज्यान्वैश्यशूद्रयोः **स्एव** आसुरंवैश्यशूद्रयोः **हेमाद्रौपैठीनसिः** राक्षसोवैश्यस्य पैशाचःशूद्रस्य **प्रचेताः** पैशाचोसंस्कृतप्रसूतानांप्रतिलोमजानांच **मनुः** राक्षस्तथासुरोवैश्येशूद्रेचांत्यस्तुगर्हितः क्षत्रियादेःसंकटेपैशाचमाह**माधवीये वत्सः** सर्वोपायैरसाध्यास्यात्सुकन्यापुरुषस्यया चौर्येणापिविवाहेनसाविवाह्यारहःस्थिता गांधर्वादिविवाहेष्वप्युदकपूर्वकंदानमाहतत्रैव**यमः** नोदकेननवावाचाकन्यायाःपतिरुच्यते पाणिग्रहणसंस्कारात्पतित्वंसप्तमेपदे **पराशरमाधवीयेदेवलोपि** गांधर्वादिविवाहेषुपुनर्वैवाहिकोविधिः कर्तव्यश्चत्रिभिर्वर्णैःसमर्थे-

१ ततः कर्मणि योजयेत् इति पाठांतरं ॥ यद्वा विवाहहोमे प्रक्रांते यदि कन्या रजस्वला ॥ त्रिरात्रं दंपती स्यातां पृथक्शय्यासनाशनौ ॥ चतुर्थेहनि संस्नातौ तस्मिन्नग्नौ यथाविधि । विवाहहोमं कुर्यातामित्यादि संग्रहः ॥

नाग्निसाक्षिकः त्रैवर्णोक्तेर्गांधर्वादौविप्रवर्जमधिकारउक्तः तत्रैवपरिशिष्टे गांधर्वासुरपैशाचाविवाहाराक्षसश्चयः पूर्वंपरिश्रयस्तेषुपश्चाद्धोमोविधीयते अतोहोमादावकृतेभार्यात्वाभावाद्वरांतरायदेया तथाचतत्रैव **वसिष्ठबौधायनौ** बलादपहृताकन्यामंत्रैर्यदिनसंस्कृता अन्यस्मैविधिवद्देयायथाकन्यातथैवसेति अत्रमंत्रसंस्काराभावेऽन्यस्मैदानस्यसर्वविवाहेषुसाम्याद्बलादपहारेराक्षसपैशाचयोर्विशेषवचनंव्यर्थं तेनतयोर्यदिनसंस्कृतासंस्कृतावेत्यावृत्यकन्यानुमत्यभावेन्यस्मैदेयेतिव्याख्येयं **मदनपारिजातेनारदः** पाणिग्रहणिकामंत्रानियतंदारलक्षणं तेषांचनिष्ठाविज्ञेयाविद्वद्भिःसप्तमेपदे **स्मृतिचंद्रिकायामपरार्केचैवं**।

ब्राह्मादिक आठ विवाह आणि ते कोणाकोणाला उक्त इत्यादिक त्यांची व्यवस्था आकरांतून पाहावी. थोडीशी येथें सांगतो—**मनु**—"पहिल्यापासून अनुक्रमानें सहा विवाह ब्राह्मणाला उक्त आहेत. क्षत्रियाला शेवटचे चार ( गांधर्व, आसुर, पैशाच, राक्षस हे ) उक्त आहेत. वैश्य आणि शूद्र यांना तेच चार विवाह राक्षस वर्ज्य करून उक्त आहेत." **मनुच** सांगतो—"वैश्य व शूद्र यांना आसुरविवाह श्रेष्ठ आहे." **हेमाद्रींत पैठीनसि**—"राक्षस विवाह वैश्याला सांगितला आहे. आणि पैशाच शूद्राला सांगितला आहे." **प्रचेता**—"विवाहादि संस्कारावांचून स्त्रीचे ठायीं उत्पन्न आणि प्रतिलोमज ( उत्तम वर्णाचे स्त्रीचे ठायीं कनिष्ठ वर्णाच्या पुरुषापासून उत्पन्न ) यांना पैशाच विवाह उक्त आहे." **मनु**—"क्षत्रियांना आसुर विवाह निंद्य आहे. आणि वैश्य व शूद्र यांना राक्षस विवाह निंद्य आहे." क्षत्रियादिकांना संकटसमयीं पैशाच विवाह सांगतो—**माधवीयांत वत्स**—"जी चांगली कन्या सर्व उपायांनीं पुरुषास साध्य होत नसेल, ती चोरून आणूनही एकांतीं तिच्याशीं विवाह करावा." गांधर्वादिक जे पुढचे चार विवाह सांगितले, त्यांमध्यें देखील कन्येचे उदकपूर्वक दानादिसंस्कार सांगतो **तेथेंच यम**—"केवळ उदकानें किंवा केवळ वाणीनें कन्येचा पति होतो, असें सांगितलें नाहीं. सातव्या पदाचेठायीं पाणिग्रहणरूप संस्कार झाल्यानें कन्येचा पति होतो." **पराशरमाधवीयांत देवलही**—"ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णांनीं गांधर्वादि विवाहानें कन्या ग्रहण केली असतां पुनः अग्नीच्या समक्ष पाणिग्रहणादि विवाहविधि करावा." **तेथेंच परिशिष्टांत**—"गांधर्व, आसुर, पैशाच आणि राक्षस ह्या चार विवाहांमध्यें पूर्वी कन्येचा स्वीकार करून पश्चात् होम करावा, असें सांगितलें आहे." यावरून होमादि विवाहविधि झाला नसेल तर तिच्याठिकाणीं भार्यात्व झालेलें नसल्यामुळें ती कन्या इतर वराला द्यावी. तसेंच सांगतात तेथेंच **वसिष्ठ** आणि **बौधायन**—"एकाद्या पुरुषानें बलात्कारानें कन्या हरण केलेली असून जर मंत्रांनीं संस्कार केलेली नसेल, तर ती कन्या दुसऱ्या वराला यथाविधि द्यावी. कारण, जशी कन्या ( अविवाहित ) तशीच ती आहे." या ठिकाणीं मंत्रांनीं संस्कार झालेली नसतां ती कन्या इतर योग्यवराला देणें, हा प्रकार सर्व विवाहांमध्यें समान असल्यामुळें, बलात्कारानें अपहृत केलेली ( अर्थात् राक्षस व पैशाच विवाहांतील ) कन्या मंत्रांनीं संस्कार झालेली नसेल तर इतर वराला द्यावी असें विशेष सांगणें व्यर्थ होईल. म्हणून या वचनांतील 'संस्कृता' या पदाची आवृत्ति करून राक्षस व पैशाच विवाहांत संस्कार झालेली नसली किंवा संस्कार झालेली असली तरी त्या कन्येची अनुमति नसेल तर ती कन्या इतराला द्यावी, अशी व्याख्या करावी. **मदनपारिजातांत नारद**—"पाणिग्रहणाचे मंत्र ( मंत्रांनीं केलेला संस्कार ) हें भार्यात्वाचें निश्चित लक्षण होय. म्हणजे पाणिग्रहणाच्या मंत्राचा संस्कार जिच्यावर झाला आहे, ती भार्या समजावी. त्या मंत्रांचा संस्कार स्थिर केव्हां होतो, असें म्हटलें तर सातव्या पदाचे ठायीं तो संस्कार स्थिर होतो, असें विद्वानांनीं समजावें." **स्मृतिचंद्रिकेंत** आणि **अपरार्कांत**ही असेंच सांगितलें आहे.

आशौचेतु**याज्ञवल्क्यः** दानेविवाहेयज्ञेचसंग्रामेदेशविप्लवे आपद्यपिचकष्टायांसद्यःशौचंविधीयते

---

१ ब्राह्म, दैव, प्राजापत्य, आर्ष, गांधर्व, आसुर, पैशाच, आणि राक्षस असे आठ विवाह आहेत त्यांची लक्षणें सांगतो **आश्वलायन-गृह्यसूत्रांत**—"कन्येला अलंकार घालून योग्य वराला तिचे उदकपूर्वक दान करणें तो **ब्राह्म**विवाह म्हटला आहे. तिच्या ठिकाणीं झालेला पुत्र बारा पूर्वींच्या आणि बारा पुढच्या पुरुषांना पवित्र करितो. यज्ञांत ऋत्विजाचें कर्म करणाराला अलंकृत करून कन्या देणें तो **दैव**विवाह. तिचा पुत्र दहा पूर्वींच्या आणि दहा पुढच्या पुरुषांना पवित्र करितो. तूं हिच्यासह गृहस्थाश्रम धर्म आचरण करावा. ही जीवंत असेपर्यंत दुसरा विवाह किंवा चतुर्थाश्रम घेऊं नये, अशी बोली करून कन्या देणें तो **प्राजापत्य**विवाह होय. तिचा पुत्र आठ पूर्वींच्या आणि आठ पुढच्या पुरुषांना पवित्र करितो. वरापासून एक गोमिथुन ( गाई व बैल ) घेऊन त्याला कन्या देणें तो **आर्ष**विवाह. तिचा पुत्र सात पूर्वींच्या आणि सात पुढच्या पुरुषांना पवित्र करितो. वर आणि वधू यांचा परस्परांच्या इच्छेनें संयोग होणें तो **गांधर्व**विवाह. कन्येच्या ज्ञातीला यथेच्छ द्रव्य देऊन विवाह करणें तो **आसुर**विवाह. चौर्यकर्मानें कन्या हरण करणें तो **पैशाच**विवाह. आणि युद्धादिक करून ज्ञातीला रडवून कन्या रोदन करीत असतां तिचें हरण करणें तो **राक्षस**विवाह. या आठ विवाहांमध्यें पहिल्या चार विवाहांत पहिला पहिला श्रेष्ठ. आणि पुढच्या चार विवाहांत पुढचा पुढचा निंद्य होय.

केषामित्यपेक्षितेब्रह्मपुराणेउक्तं दातुःप्रतिग्रहीतुश्चकन्यादानेचनोभवेत् विवाहयिष्णोःकन्यायालाजहोमादिकर्मणीति व्रतयज्ञविवाहेषुश्राद्धेहोमेर्चनेजपे आरब्धेसूतकंनस्यादनारब्धेतुसूतकमिति **विष्णुवचनाच्च** आरंभस्तेनैवोक्तः प्रारंभोवरणंयज्ञेसंकल्पोव्रतसत्रयोः नांदीमुखंविवाहादौश्राद्धेपाकपरिक्रियेति वरणमितिमधुपर्कपरं गृहीतमधुपर्कस्ययजमानाच्चऋत्विजः पश्चादशौचेपतितेनभवेदितिनिश्चयइति **ब्राह्मोक्तेः** मधुपर्कात्पूर्वंतुभवत्येवाशौचमिति**शुद्धिविवेकः रामांडारभाष्ये**ऽप्येवम् नांदीमुखावधिश्च**स्मृत्यंतरे** एकविंशत्यहर्यज्ञेविवाहेदशवासराः त्रिषट्चौलोपनयनेनांदीश्राद्धंविधीयते आरंभाभावेपिलग्नांतराभावे**गदविष्णुः** नदेवप्रतिष्ठाविवाहयोःपूर्वसंभृतयोरपीति अत्रप्रायश्चित्तमाह**मदनपारिजाते विष्णुः** अनारब्धविशुद्ध्यर्थंकूष्मांडैर्जुहुयाद्धृतम् गांदद्यात्पंचगव्याशीततःशुध्यतिसूतकी **संग्रहेपि** संकटेसमनुप्राप्तेसूतकेसमुपागते कूष्मांडीभिर्घृतंहुत्वागांचदद्यात्पयस्विनीम् चूडोपनयनोद्वाहप्रतिष्ठादिकमाचरेत् यदैवसूतकप्राप्तिस्तदैवाभ्युदयक्रिया ।

विवाहांत आशौच उत्पन्न झालें असतां सांगतो **याज्ञवल्क्य**—"दान, विवाह, यज्ञ, युद्ध, देशाचा विध्वंस, आणि दुःख देणारी आपत्ति यांमध्यें आशौच प्राप्त असतां सद्यः ( तत्काल ) शुद्धि सांगितली आहे." कोणाची सद्य शुद्धि म्हटली तर सांगतो **ब्रह्मपुराणांत**—"कन्यादानाचे ठायीं कन्यादाता, आणि प्रतिग्रहीता यांना आशौच नाहीं. आणि विवाहित होणाऱ्या कन्येला लाजहोमादि कर्माचेठायीं आशौच नाहीं." आणि "व्रत, यज्ञ, विवाह, श्राद्ध, होम, पूजा जप, यांचे ठायीं आरंभ झाल्यावर सूतक प्राप्त असलें तरी तें सूतक नाहीं. आरंभ होण्याच्या पूर्वी प्राप्त असेल तर सूतक आहे" असें **विष्णु**वचनही आहे. प्रारंभ कोणता तें तोच ( विष्णुच ) सांगतो—"यज्ञाचा प्रारंभ ऋत्विग्वरण, व्रत आणि सत्र यांचा प्रारंभ संकल्प होय, विवाहादिकांचा प्रारंभ नांदीश्राद्ध, आणि श्राद्धाचा प्रारंभ पाकप्रोक्षण" ऋत्विजांचें वरण म्हणजे मधुपर्क समजावा. कारण, "यजमानापासून ऋत्विजांनी मधुपर्कपूजा घेतल्यावर पश्चात् आशौच प्राप्त असता तें आशौच त्या ऋत्विजांना नाहीं असा निश्चय आहे." असें **ब्राह्म**वचन आहे. मधुपर्काच्या पूर्वी आशौच होतच आहे असें **शुद्धिविवेक** सांगतो. **रामांडारभाष्यांत**ही असेंच सांगितलें आहे. नांदीश्राद्धाचा अवधि सांगतो **स्मृत्यंतरांत**—"यज्ञामध्यें एकवीस दिवस पूर्वी नांदीश्राद्ध होतें. विवाहांत दहा दिवस होतें. चौलांत तीन दिवस आणि उपनयनांत सहा दिवस पूर्वी नांदीश्राद्ध होतें." आरंभ झालेला नसला तरी दुसरा मुहूर्त नसेल तर गदरूपाने सांगतो **विष्णु**—"देवप्रतिष्ठा आणि विवाह यांचें सर्व साहित्य संपादन केलें असतां जर सूतक प्राप्त असेल तर तें सूतक नाहीं." आरंभ नसून सूतक प्राप्त असेल तर प्रायश्चित्त सांगतो **मदनपारिजातांत विष्णु**—"आरंभ झालेला नसून सूतक प्राप्त असेल तर शुद्धीसाठीं कूष्मांडमंत्रांनीं घृताचा होम करून गोप्रदान करावें, आणि पंचगव्य प्राशन करावें म्हणजे सूतकी शुद्ध होतो." **संग्रहांत**ही—"संकट ( मृताशौच ) प्राप्त झालें किंवा जननाशौच प्राप्त झालें असतां तैत्तिरीयशाखेंतील कूष्मांडी ऋचांनीं घृताचा होम करून दूध देणारी गाई ब्राह्मणास द्यावी, नंतर चौल, उपनयन, विवाह, देवप्रतिष्ठा इत्यादि कार्य करावें. मात्र ज्या दिवशीं सूतक प्राप्त असेल त्याच दिवशीं वृद्धिश्राद्धादिक आभ्युदयिक कर्म करावें."

**अन्नादिषुविशेषः षट्त्रिंशन्मते** विवाहोत्सवयज्ञेषुत्वंतरामृतसूतके परैरन्नंप्रदातव्यंभोक्तव्यंचद्विजोत्तमैः परैरसगोत्रैः भुंजानेषुतुविप्रेषुत्वंतरामृतसूतके अन्यगेहोदकाचांताःसर्वेतेशुचयःस्मृताः एतदाशौचात्पूर्वमपृथक्कृतान्नविषयं तत्रशेषमन्नंत्याज्यमित्यर्थः पृथक्कृतेषुतु**बृहस्पति**राह विवाहोत्सवयज्ञेषुत्वंतरामृतसूतके पूर्वसंकल्पितान्नेषुनदोषःपरिकीर्तितइति ।

ह्या आशौचांत अन्नादिकांविषयीं विशेष सांगतो **षट्त्रिंशन्मतांत**—"विवाह, उत्सव, यज्ञ या कर्मामध्यें मृताशौच प्राप्त होईल तर असगोत्रांनीं अन्न द्यावें, तें अन्न ब्राह्मणश्रेष्ठांनीं भोजन करावें. ब्राह्मण भोजन करीत असतां मध्यें यजमानाला मृताशौच प्राप्त होईल तर ब्राह्मणांनीं उठून दुसऱ्याच्या घरांतील उदकानें आचमन करावें, म्हणजे ते सारे ब्राह्मण शुद्धच आहेत." हें वचन आशौचाच्या पूर्वी वेगळें न केलेल्या अन्नाविषयीं समजावें. या ठिकाणीं शेष अन्न असेल तें ब्राह्मणांनीं टाकावें, असा भाव. आशौचाच्या पूर्वी पृथक् केलेलें अन्न असेल तर सांगतो **बृहस्पति**—"विवाह, उत्सव, यज्ञ, या कर्मांचे ठायीं मध्यें मृताशौच प्राप्त होईल तर पूर्वी संकल्पित असलेल्या अन्नाविषयीं दोष नाहीं, असें सांगितलें आहे."

**धर्मार्थविवाहकरणेफलमुक्तंमहाभारते** ज्ञात्वास्ववित्तसामर्थ्यमेकंचोद्वाहयेद्द्विजं तेनाप्याप्नोतितत्स्थानंशिवभक्तोनरोध्रुवम् **अपरार्केदक्षः** मातापितृविहीनंतुसंस्कारोद्वाहनादिभिः यःस्थापयतितस्येह

पुण्यसंख्यानविद्यते **मदनरत्ने भविष्ये** विवाहादिक्रियाकालेतत्क्रियासिद्धिकारणं यःप्रयच्छतिधर्मज्ञः सोश्वमेधफलंलभेत् कन्यागृहेभोजननिषेधोपि**तत्रैव** अप्रजायांतुकन्यायांनभुंजीतकदाचन दौहित्रस्यमुखं दृष्ट्वाकिमर्थमनुशोचति **अपरार्केआदित्यपुराणे** विष्णुंजामातरंमन्येतस्यकोपंनकारयेत् अप्रजायांतु-कन्यायांनाश्नीयात्तस्यवैगृहे ब्रह्मदेयांनवैकन्यांदत्वाश्नीयात्कदाचन अथभुंजीतमोहाच्चेत्पूयाशेनरकेवसेत् **तत्रैवकश्यपः** अहतंयंत्रनिर्मुक्तंवासःप्रोक्तंस्वयंभुवा शस्तंतन्मांगलिक्येषुतावत्कालंनसर्वदा यंत्रनिर्मुक्तंनूतनं विवाहमध्येस्त्रियासहभोजनेपिनदोषइत्याह**हेमाद्रौप्रायश्चित्तकांडेगालवः** विवाहकालेयात्रायांपथिचौरसमाकुले असहायोभवेद्विप्रस्तदाकार्यंद्विजन्मभिः एकयानसमारोहएकपात्रेचभोजनम् विवाहेपथियात्रायांकृत्वाविप्रोनदोषभाक् अन्यथादोषमाप्नोतिपश्चाच्चांद्रायणंचरेत् **मितक्षरायामप्येवम् रत्नमालायां** मूलमैत्रमृगरोहिणीकरैःपौष्णमारुतमघोत्तरान्वितैः भौमसौररविवारवर्जितेपाणिपीडनविधिर्विधीयते अत्रानिष्टनक्षत्रादौदानमुक्तं**ज्योतिषे** विपत्तारेगुडंदद्यान्निधनेतिलकांचनम् प्रत्यरेलवणंदद्याच्छागंदद्यात्रिजन्मसु चंद्रेचशंखंलवणंचनारेतिथौविरुद्धेत्वथतंदुलांश्च धान्यंचदद्यात्करणेचवारेयोगेविरुद्धेकनकंप्रदेयम ।

धर्मार्थविवाह करण्याचें फल सांगतो **महाभारतांत**—"आपलें द्रव्यसामर्थ्य पाहून एका ब्राह्मणाचा विवाह करावा. त्या योगानें त्या शिवभक्त मनुष्याला तें उत्तम स्थान निश्चयानें प्राप्त होतें." **अपरार्कांत दक्ष**—"माता, पिता यांनीं रहित अशा ब्राह्मणाला उपनयन, विवाहादि संस्कार करून धर्माचे ठायीं जो स्थापन करील त्याच्या पुण्याची संख्या करितां येत नाहीं." **मदनरत्नांत भविष्यांत**—"विवाहादि कार्यसमयीं त्या कार्याच्या सिद्धीचें जें कारण द्रव्यादिक असेल, तें जो करून देईल त्याला अश्वमेधाचें फल प्राप्त होईल." कन्येच्या घरीं भोजनाचा निषेधही तेथेंच सांगतो—"कन्येला पुत्र झालेला नसतां तिच्या घरीं कधींही भोजन करूं नये. दौहित्राचें ( कन्यापुत्राचें ) मुख पाहिल्यावर शोक करण्याचें ( भोजननिषेध मानण्याचें ) कारण नाहीं." **अपरार्कांत आदित्यपुराणांत**—"जांवई हा विष्णुरूपी आहे, असें मानून त्याला कोप येईल असें करूं नये. कन्येला प्रजा झालेली नसतां जामात्याच्या घरीं भोजन करूं नये. ब्रह्म देणारी अशी जी कन्या ती देऊन जामात्याच्या घरीं कधींही भोजन करूं नये. आतां मोहाच्या ( अज्ञानाच्या ) योगानें जर भोजन करील तर पूयाश ( पुवाच्या ) नरकांत जाईल." तेथेंच **कश्यप**—"यंत्रांतून निघालेलें नूतन वस्त्र तें ब्रह्मदेवानें अहत म्हणून सांगितलें आहे. तें अहतवस्त्र मंगलकार्यामध्यें तावत्कालपर्यंत प्रशस्त म्हणून सांगितलें आहे. सर्वदा प्रशस्त नाहीं." विवाहांत स्त्रियेसह भोजन केलें तरी दोष नाहीं, असें सांगतो **हेमाद्रींत प्रायश्चित्तकांडांत गालव**—"विवाहकालीं, यात्रासमयीं, मार्गांत, आणि चोर असतील त्या वेळीं दुसरा कोणी साहाय्य नसेल तर ब्राह्मणादिकांनीं स्त्रियेसहवर्तमान एका यानांत बसावें, आणि एका पात्रांत भोजन करावें. याप्रमाणें विवाहकालीं, यात्रासमयीं, आणि मार्गांत स्त्रीसह एका पात्रांत भोजन केलें असतां तो ब्राह्मण दोषी होत नाहीं. इतर वेळीं एका पात्रांत स्त्रियेसह भोजन करील तर दोषी होईल. त्या दोषाच्या निवारणासाठीं चांद्रायणप्रायश्चित्त[3] करावें." **मिताक्षरेंत**ही असेंच सांगितलें आहे.

**रत्नमालेंत**—"मूल, अनुराधा, मृग, रोहिणी, हस्त, रेवती, स्वाती, मघा, तीन उत्तरा, ह्या नक्षत्रांवर; भौम, शनि, रवि हे वार वर्ज्य करून इतर वारीं विवाह करावा." ह्या विवाहकालीं तारा वगैरे अनिष्ट असतां दान सांगतो **ज्योतिषांत**—"विपद्तारा[4] असतां गुड द्यावा. निधनतारा असतां तिल व सुवर्ण द्यावें. प्रत्यरतारा असतां लवण द्यावें. आणि त्रिजन्मतारा ( जन्मनक्षत्र, त्यापासून दहावें आणि एकोणिसावें नक्षत्र ) असतां बोकड द्यावा. चंद्र अनिष्ट असतां शंख द्यावा. तारा अनिष्ट असतां लवण द्यावें. तिथि अनिष्ट असतां तंदुळ द्यावे. करण, आणि वार अनिष्ट असतां धान्य द्यावें. योग अनिष्ट असतां सुवर्ण द्यावें."

विवाहमंडपमाह**वसिष्ठः** षोडशारत्निकंकुर्याच्चतुर्द्वारोपशोभितम् मंडपंतोरणैर्युक्तंतत्रवेदिंप्रकल्पयेत् अष्टहस्तंतुरचयेन्मंडपंवाद्विषट्करं **दैवज्ञमनोहरः** चित्राविशाखाशततारकाश्विनीज्येष्ठाभरण्यौशिवभा-

१ ईषद्धौतं नवं श्वेतं सदशं वस्त्रमहतसंज्ञं । २ न दोष इति अन्यथा तु दोष एव नाश्नीयात् भार्ययासार्धमिति **मनुवचनात् सह** सार्धं एकपात्रे इत्यर्थः । यत्तु ब्राह्मण्या सह योश्नीयादुच्छिष्टं वा कदाचन । न तस्य दोषमिच्छंति नित्यमेव मनीषिण **इत्यंगिरोवचनं** तद्विवाहपरं । एतेन–ब्राह्मण्या भार्यया सार्धं क्वचिद्भुंजीत चाध्वनि । अधोवर्ण्या स्त्रिया सार्धं भुक्त्वा पतति तत्क्षणादिति **व्याख्यातं तद्वि-द्विवाहेऽध्वनि च.** ३ **चांद्रायणाचें स्वरूप ग्रंथाच्या शेवटीं सांगूं.** ४ **विपद्तारा वगैरे पूर्वीं सीमंतसंस्कारप्रकरणीं सांगितल्या आहेत.**

केषामित्यपेक्षितेब्रह्मपुराणेउक्तं दातुःप्रतिग्रहीतुश्चकन्यादानेचनोभवेत् विवाहयिष्णोःकन्यायालाजहोमादिकर्मणीति व्रतयज्ञविवाहेषुश्राद्धेहोमेर्चनेजपे आरब्धेसूतकंनस्यादनारब्धेतुसूतकमिति**विष्णुवचनाच्च** आरंभस्तेनैवोक्तः प्रारंभोवरणंयज्ञेसंकल्पोव्रतसत्रयोः नांदीमुखंविवाहादौश्राद्धेपाकपरिक्रियेति वरणमितिमधुपर्कपरं गृहीतमधुपर्केस्ययजमानाच्चऋत्विजः पश्चादशौचेपतितेनभवेदितिनिश्चयइति **ब्राह्मोक्तेः** मधुपर्कात्पूर्वंतुभवत्येवाशौचमिति**शुद्धिविवेकः रामांडारभाष्ये**ऽप्येवम् नांदीमुखावधिश्च**स्मृत्यंतरे** एकविंशत्यहर्यज्ञेविवाहेदशवासराः त्रिषट्चौलोपनयनेनांदीश्राद्धंविधीयते आरंभाभावेपिलग्नांतराभावे**गद्य-विष्णुः** नदेवप्रतिष्ठाविवाहयोःपूर्वसंभृतयोरपीति अत्रप्रायश्चित्तमाह**मदनपारिजातेविष्णुः** अनारब्धविशुद्ध्यर्थंकूष्मांडैर्जुहुयाद्घृतम् गांदद्यात्पंचगव्याशीततःशुध्यतिसूतकी **संग्रहेपि** संकटेसमनुप्राप्तेसूतकेसमुपागते कूष्मांडीभिर्घृतंहुत्वागांचदद्यात्पयस्विनीम् चूडोपनयनोद्वाहप्रतिष्ठादिकमाचरेत यदैवसूतकप्राप्तिस्तदैवाभ्युदयक्रिया ।

विवाहांत आशौच उत्पन्न झालें असतां सांगतो **याज्ञवल्क्य**—"दान, विवाह, यज्ञ, युद्ध, देशाचा विध्वंस, आणि दुःख देणारी आपत्ति यांमध्यें आशौच प्राप्त असतां सद्यः ( तत्काल ) शुद्धि सांगितली आहे." कोणाची सद्यःशुद्धि म्हटली तर सांगतो **ब्रह्मपुराणांत**—"कन्यादानाचे ठायीं कन्यादाता, आणि प्रतिग्रहीता यांना आशौच नाहीं. आणि विवाहित होणाऱ्या कन्येला लाजहोमादि कर्माचेठायीं आशौच नाहीं." आणि "व्रत, यज्ञ, विवाह, श्राद्ध, होम, पूजा, जप, यांचे ठायीं आरंभ झाल्यावर सूतक प्राप्त असलें तरी तें सूतक नाहीं. आरंभ होण्याच्या पूर्वी प्राप्त असेल तर सूतक आहे" असें **विष्णुवचनही** आहे. प्रारंभ कोणता तें तोच ( विष्णुच ) सांगतो—"यज्ञाचा प्रारंभ ऋत्विग्वरण, व्रत आणि सत्र यांचा प्रारंभ संकल्प होय, विवाहादिकांचा प्रारंभ नांदीश्राद्ध, आणि श्राद्धाचा प्रारंभ पाकप्रोक्षण." ऋत्विजांचें वरण म्हणजे मधुपर्क समजावा. कारण, "यजमानापासून ऋत्विजांनीं मधुपर्कपूजा घेतल्यावर पश्चात् आशौच प्राप्त असतां तें आशौच त्या ऋत्विजांना नाहीं, असा निश्चय आहे." असें **ब्राह्म**वचन आहे. मधुपर्काच्या पूर्वी आशौच होतच आहे, असें **शुद्धिविवेक** सांगतो. **रामांडारभाष्यांत**ही असेंच सांगितलें आहे. नांदीश्राद्धाचा अवधि सांगतो **स्मृत्यंतरांत**—"अहर्गणामध्यें एकवीस दिवस पूर्वी नांदीश्राद्ध होतें. विवाहांत दहा दिवस होतें. चौलांत तीन दिवस. आणि उपनयनांत सहा दिवस पूर्वी नांदीश्राद्ध होतें." आरंभ झालेला नसला तरी दुसरा मुहूर्त नसेल तर गद्यरूपानें सांगतो **विष्णु**—"देवप्रतिष्ठा आणि विवाह यांचें सर्व साहित्य संपादन केलें असतां जर सूतक प्राप्त असेल तर तें सूतक नाहीं." आरंभ नसत सूतक प्राप्त असेल तर प्रायश्चित्त सांगतो **मदनपारिजातांत विष्णु**—"आरंभ झालेला नसून सूतक प्राप्त असेल तर शुद्धीसाठीं कूष्मांडमंत्रांनीं घृताचा होम करून गोप्रदान करावें, आणि पंचगव्य प्राशन करावें, म्हणजे सूतकी शुद्ध होतो." **संग्रहांत**ही—"संकट ( मृताशौच ) प्राप्त झालें किंवा जननाशौच प्राप्त झालें असतां तैत्तिरीयशाखेंतील कूष्मांडी ऋचांनीं घृताचा होम करून दूध देणारी गाई ब्राह्मणास द्यावी, नंतर चौल, उपनयन, विवाह, देवप्रतिष्ठा इत्यादि कार्य करावें. मात्र ज्या दिवशीं सूतक प्राप्त असेल त्याच दिवशीं वृद्धिश्राद्धादिक आभ्युदयिक कर्म करावें."

**अन्नादिषुविशेषः षट्त्रिंशन्मते** विवाहोत्सवयज्ञेपुत्वंतरामृतसूतके परैरन्नंप्रदातव्यंभोक्तव्यंचद्विजोत्तमैः परैरसगोत्रैः भुंजानेषुतुविप्रेषुत्वंतरामृतसूतके अन्यगेहोदकाचांताःसर्वेतेशुचयःस्मृताः एतदाशौचात्पूर्वमपृथक्कृतान्नविषयं तत्रशेषमन्नंत्याज्यमित्यर्थः पृथक्कृतेषुतु**बृहस्पति**राह विवाहोत्सवयज्ञेपुत्वंतरामृतसूतके पूर्वसंकल्पितान्नेषुनदोषःपरिकीर्तितइति ।

ह्या आशौचांत अन्नादिकांविषयीं विशेष सांगतो **षट्त्रिंशन्मतांत**—"विवाह, उत्सव, यज्ञ या कर्मांमध्यें मृताशौच प्राप्त होईल तर असगोत्रांनीं अन्न द्यावें, तें अन्न ब्राह्मणश्रेष्ठांनीं भोजन करावें. ब्राह्मण भोजन करीत असतां मध्यें यजमानाला मृताशौच प्राप्त होईल तर ब्राह्मणांनीं उठून दुसऱ्याच्या घरांतील उदकानें आचमन करावें, म्हणजे ते सारे ब्राह्मण शुद्धच आहेत." हें वचन आशौचाच्या पूर्वी वेगळें न केलेल्या अन्नाविषयीं समजावें. या ठिकाणीं शेष अन्न असेल तें ब्राह्मणांनीं टाकावें, असा भाव. आशौचाच्या पूर्वी पृथक् केलेलें अन्न असेल तर सांगतो **बृहस्पति**—"विवाह, उत्सव, यज्ञ, या कर्मांचे ठायीं मध्यें मृताशौच प्राप्त होईल तर पूर्वी संकल्पित असलेल्या अन्नाविषयीं दोष नाहीं, असें सांगितलें आहे."

धर्मार्थविवाहकरणेफलमुक्तं**महाभारते** ज्ञात्वास्ववित्तसामर्थ्यमेकंचोद्वाहयेद्द्विजं तेनाप्याप्नोतितत्स्थानंशिवभक्तोनरोध्रुवम् **अपरार्केदक्षः** मातापितृविहीनंतुसंस्कारोद्वाहनादिभिः यःस्थापयतितस्येह

पुण्यसंख्यानविद्यते **मदनरत्ने भविष्ये** विवाहादिक्रियाकालेतत्क्रियासिद्धिकारणं यःप्रयच्छतिधर्मज्ञः सोश्वमेधफलंलभेत् कन्यागृहेभोजननिषेधोपि**तत्रैव** अप्रजायांतुकन्यायांनभुंजीतकदाचन दौहित्रस्यमुखं दृष्ट्वाकिमर्थमनुशोचति **अपरार्केआदित्यपुराणे** विष्णुंजामातरंमन्येतस्यकोपंनकारयेत् अप्रजायांतु-कन्यायांनाश्नीयात्तस्यवैगृहे ब्रह्मदेयांनवैकन्यांदत्वाश्नीयात्कदाचन अथभुंजीतमोहाच्चेत्पूयाशेनरकेवसेत् **तत्रैवकश्यपः** अ[1]हतंयंत्रनिर्मुक्तंवासःप्रोक्तंस्वयंभुवा शस्तंतन्मांगलिक्येषुतावत्कालंनसर्वदा यंत्रनिर्मुक्तंनू-तनं विवाहमध्येस्त्रियासहभोजनेपिनदोषं[2]इत्याह**हेमाद्रौप्रायश्चित्तकांडेगालवः** विवाहकालेयात्रायांप-थिचौरसमाकुले असहायोभवेद्विप्रस्तदाकार्यंद्विजन्मभिः एकयानसमारोहएकपात्रेचभोजनम् विवाहेपथि-यात्रायांकृत्वाविप्रोनदोषभाक् अन्यथादोषमाप्नोतिपश्चाच्चांद्रायणंचरेत् **मिताक्षरायामप्येवम् रत्न-मालायां** मूलमैत्रमृगरोहिणीकरैःपौष्णमारुतमघोत्तरान्वितैः भौमसौररविवारवर्जितेपाणिपीडनविधि-र्विधीयते अत्रानिष्टनक्षत्रादौदानमुक्तं**ज्योतिषे** विपत्तारेगुडंदद्यान्निधनेतिलकांचनम् प्रत्यरेलवणंदद्याच्छा-गंदद्यात्रिजन्मसु चंद्रेचशंखंलवणंचतारेतिथौविरुद्धेत्वथतंदुलांश्च धान्यंचदद्यात्करणेचवारेयोगेविरुद्धेक-नकंप्रदेयम ।

धर्मार्थविवाह करण्याचें फल सांगतो **महाभारतांत**—"आपलें द्रव्यसामर्थ्य पाहून एका ब्राह्मणाचा विवाह करावा. त्या योगानें त्या शिवभक्त मनुष्याला तें उत्तम स्थान निश्चयानें प्राप्त होतें." **अपरार्कांत दक्ष**—"माता, पिता यांनीं रहित अशा ब्राह्मणाला उपनयन, विवाहादि संस्कार करून धर्माचे ठायीं जो स्थापन करील त्याच्या पुण्याची संख्या करितां येत नाहीं." **मदनरत्नांत भविष्यांत**—"विवाहादि कार्यसमयीं त्या कार्याच्या सिद्धीचें जें कारण द्रव्यादिक असेल, तें जो करून देईल त्याला अश्वमेधाचें फल प्राप्त होईल." कन्येच्या घरीं भोजनाचा निषेधही तेथेंच सांगतो—"कन्येला पुत्र झालेला नसतां तिच्या घरीं कधींही भोजन करूं नये. दौहित्राचें ( कन्यापुत्राचें ) मुख पाहिल्यावर शोक करण्याचें ( भोजननिषेध मानण्याचें ) कारण नाहीं." **अपरार्कांत आदित्यपुराणांत**—"जांवई हा विष्णुरूपी आहे, असें मानून त्याला कोप येईल असें करूं नये. कन्येला प्रजा झालेली नसतां जामाताच्या घरीं भोजन करूं नये. ब्रह्म देणारी अशी जी कन्या ती देऊन जामात्याच्या घरीं कधींही भोजन करूं नये. आतां मोहाच्या ( अज्ञानाच्या ) योगानें जर भोजन करील तर पूयाश ( पुवाच्या ) नरकांत जाईल." तेथेंच **कश्यप**—"यंत्रांतून निघालेलें नूतन वस्त्र तें ब्रह्मदेवानें अहत म्हणून सांगितलें आहे. तें अहतवस्त्र मंगलकार्यामध्यें तावत्कालपर्यंत प्रशस्त म्हणून सांगितलें आहे. सर्वदा प्रशस्त नाहीं." विवाहांत स्त्रियेसह भोजन केलें तरी दोष नाहीं, असें सांगतो **हेमाद्रींत प्रायश्चित्तकांडांत गालव**—"विवाहकालीं, यात्रासमयीं, मार्गांत, आणि चोर असतील त्या वेळीं दुसरा कोणी साहाय्य नसेल तर ब्राह्मणादिकांनीं स्त्रियेसहवर्तमान एका यानांत बसावें, आणि एका पात्रांत भोजन करावें. याप्रमाणें विवाहकालीं, यात्रासमयीं, आणि मार्गांत स्त्रीसह एका पात्रांत भोजन केलें असतां तो ब्राह्मण दोषी होत नाहीं. इतर वेळीं एका पात्रांत स्त्रियेसह भोजन करील तर दोषी होईल. त्या दोषाच्या निवारणासाठीं चांद्रायणप्रायश्चित्त करावें." **मिताक्षरेंत**ही असेंच सांगितलें आहे.

**रत्नमालेंत**—"मूल, अनुराधा, मृग, रोहिणी, हस्त, रेवती, स्वाती, मघा, तीन उत्तरा, ह्या नक्षत्रांवर; भौम, शनि, रवि हे वार वर्ज्य करून इतर वारीं विवाह करावा." ह्या विवाहकालीं तारा वगैरे अनिष्ट असतां दान सांगतो **ज्योतिषांत**—"विपद्तारा असतां गुड द्यावा. निधनतारा असतां तिल व सुवर्ण द्यावें. प्रत्यरतारा असतां लवण द्यावें. आणि त्रिजन्मतारा ( जन्मनक्षत्र, त्यापासून दहावें आणि एकोणिसावें नक्षत्र ) असतां बोकड द्यावा. चंद्र अनिष्ट असतां शंख द्यावा. तारा अनिष्ट असतां लवण द्यावें. तिथि अनिष्ट असतां तंदुल द्यावे. करण, आणि वार अनिष्ट असतां धान्य द्यावें. योग अनिष्ट असतां सुवर्ण द्यावें."

विवाहमंडपमाह**वसिष्ठः** षोडशारत्निकंकुर्याच्चतुर्द्वारोपशोभितम् मंडपंतोरणैर्युक्तंतत्रवेदिंप्रकल्पयेत् अष्टहस्तंतुरचयेन्मंडपंवाद्विषट्करं **दैवज्ञमनोहरः** चित्राविशाखाशततारकाश्विनीज्येष्ठाभरण्यौशिवभा-

---

१ ईषद्धौतं नवं श्वेतं सदशं वस्त्रमहतसंज्ञं । २ न दोष इति अन्यथा तु दोष एव नाश्नीयात् भार्ययासार्धमिति मनुवचनात् सह सार्धं एकपात्रे इत्यर्थः । यत्तु ब्राह्मण्या सह योश्नीयादुच्छिष्टं वा कदाचन । न तस्य दोषमिच्छंति नित्यमेव मनीषिण इत्यंगिरोवाक्यं तद्विवाहपरं । एतेन—ब्राह्मण्या भार्यया सार्धं क्वचिद्भुंजीत चाध्वनि । अधोवर्ण्या स्त्रिया सार्धं भुक्त्वा पतति तत्क्षणादिति व्याख्यातं क्वचि-द्विवाहेऽध्वनि च. ३ चांद्रायणाचें स्वरूप ग्रंथाच्या शेवटीं सांगूं. ४ विपद्तारा वगैरे पूर्वी सीमंतसंस्कारप्रकरणीं सांगितल्या आहेत.

केषामित्यपेक्षितेब्रह्मपुराणेउक्तं दातुःप्रतिग्रहीतुश्चकन्यादानेचनोभवेत् विवाहयिष्णोःकन्यायालाजहोमादिकर्मणीति व्रतयज्ञविवाहेषुश्राद्धेहोमेर्चनेजपे आरब्धेसूतकंनस्यादनारब्धेतुसूतकमिति **विष्णुवचनाच्च** आरंभस्तेनैवोक्तः प्रारंभोवरणंयज्ञेसंकल्पोव्रतसत्रयोः नांदीमुखंविवाहादौश्राद्धेपाकपरिक्रियेति वरणमितिमधुपर्कपरं गृहीतमधुपर्कस्ययजमानाच्चऋत्विजः पश्चादशौचेपतितेनभवेदितिनिश्चयइति **ब्राह्मोक्तेः** मधुपर्कात्पूर्वंतुभवत्येवाशौचमिति**शुद्धिविवेकः रामांडारभाष्ये**ऽप्येवम् नांदीमुखावधिश्च**स्मृत्यंतरे** एकविंशत्यहर्यज्ञेविवाहेदशवासराः त्रिषट्चौलोपनयनेनांदीश्राद्धंविधीयते आरंभाभावेपिलग्नांतराभावेगद्य**विष्णुः** नदेवप्रतिष्ठाविवाहयोःपूर्वसंभृतयोरपीति अत्रप्रायश्चित्तमाह**मदनपारिजातेविष्णुः** अनारब्धविशुद्ध्यर्थंकूष्मांडैर्जुहुयाद्धृतम् गांदद्यात्पंचगव्याशीततःशुध्यतिसूतकी **संग्रहेपि** संकटेसमनुप्राप्तेसूतकेसमुपागते कूष्मांडीभिर्घृतंहुत्वागांचदद्यात्पयस्विनीम् चूडोपनयनोद्वाहप्रतिष्ठादिकमाचरेत् यदैवसूतकप्राप्तिस्तदैवाभ्युदयक्रिया ।

विवाहांत आशौच उत्पन्न झालें असतां सांगतो **याज्ञवल्क्य**—''दान, विवाह, यज्ञ, युद्ध, देशाचा विध्वंस, आणि दुःख देणारी आपत्ति यांमध्यें आशौच प्राप्त असतां सद्यः ( तत्काल ) शुद्धि सांगितली आहे.'' कोणाची सद्यःशुद्धि म्हटली तर सांगतो **ब्रह्मपुराणांत**—''कन्यादानाचे ठायीं कन्यादाता, आणि प्रतिग्रहीता यांना आशौच नाहीं. आणि विवाहित होणाऱ्या कन्येला लाजहोमादि कर्माचेठायीं आशौच नाहीं.'' आणि ''व्रत, यज्ञ, विवाह, श्राद्ध, होम, पूजा, जप, यांचे ठायीं आरंभ झाल्यावर सूतक प्राप्त असलें तरी तें सूतक नाहीं. आरंभ होण्याच्या पूर्वी प्राप्त असेल तर सूतक आहे'' असें **विष्णु**वचनही आहे. प्रारंभ कोणता तें तोच ( विष्णुच ) सांगतो—''यज्ञाचा प्रारंभ ऋत्विग्वरण, व्रत आणि सत्र यांचा प्रारंभ संकल्प होय, विवाहादिकांचा प्रारंभ नांदीश्राद्ध, आणि श्राद्धाचा प्रारंभ पाकप्रोक्षण.'' ऋत्विजांचें वरण म्हणजे मधुपर्क समजावा. कारण, ''यजमानापासून ऋत्विजांनीं मधुपर्कपूजा घेतल्यावर पश्चात् आशौच प्राप्त असतां तें आशौच त्या ऋत्विजांना नाहीं, असा निश्चय आहे.'' असें **ब्राह्म**वचन आहे. मधुपर्काच्या पूर्वी आशौच होतच आहे, असें **शुद्धिविवेक** सांगतो. **रामांडारभाष्यांत**ही असेंच सांगितलें आहे. नांदीश्राद्धाचा अवधि सांगतो **स्मृत्यंतरांत**—''अहर्यज्ञामध्यें एकवीस दिवस पूर्वी नांदीश्राद्ध होतें. विवाहांत दहा दिवस होतें. चौलांत तीन दिवस. आणि उपनयनांत सहा दिवस पूर्वी नांदीश्राद्ध होतें.'' आरंभ झालेला नसला तरी दुसरा मुहूर्त नसेल तर गद्यरूपानें सांगतो **विष्णु**—''देवप्रतिष्ठा आणि विवाह यांचें सर्व साहित्य संपादन केलें असतां जर सूतक प्राप्त असेल तर तें सूतक नाहीं.'' आरंभ नसून सूतक प्राप्त असेल तर प्रायश्चित्त सांगतो **मदनपारिजातांत विष्णु**—''आरंभ झालेला नसून सूतक प्राप्त असेल तर शुद्धीसाठीं कूष्मांडमंत्रांनीं घृताचा होम करून गोप्रदान करावें, आणि पंचगव्य प्राशन करावें, म्हणजे सूतकी शुद्ध होतो.'' **संग्रहांत**ही—''संकट ( मृताशौच ) प्राप्त झालें किंवा जननाशौच प्राप्त झालें असतां तैत्तिरीयब्राह्मणांतील कूष्मांडी ऋचांनीं घृताचा होम करून दूध देणारी गाई ब्राह्मणास द्यावी, नंतर चौल, उपनयन, विवाह, देवप्रतिष्ठा इत्यादि कार्य करावीं. मात्र ज्या दिवशीं सूतक प्राप्त असेल त्याच दिवशीं वृद्धिश्राद्धादिक आभ्युदयिक कर्म करावें.''

अन्नादिषुविशेषः **षट्त्रिंशन्मते** विवाहोत्सवयज्ञेषुत्वंतरामृतसूतके परैरन्नंप्रदातव्यंभोक्तव्यंचद्विजोत्तमैः परैरसगोत्रैः भुंजानेषुतुविप्रेषुत्वंतरामृतसूतके अन्यगेहोदकाचांताःसर्वेतेशुचयःस्मृताः एतदाशौचात्पूर्वमपृथक्कृतान्नविषयं तत्रशेषमन्नंत्याज्यमित्यर्थः पृथक्कृतेषुतु**बृहस्पति**राह विवाहोत्सवयज्ञेषुत्वंतरामृतसूतके पूर्वसंकल्पितान्नेषुनदोषःपरिकीर्तितइति ।

या आशौचांत अन्नादिकांविषयीं विशेष सांगतो **षट्त्रिंशन्मतांत**—''विवाह, उत्सव, यज्ञ या कर्मांमध्यें मृताशौच प्राप्त होईल तर असगोत्रांनीं अन्न द्यावें, तें अन्न ब्राह्मणश्रेष्ठांनीं भोजन करावें. ब्राह्मण भोजन करीत असतां मध्यें यजमानाला मृताशौच प्राप्त होईल तर ब्राह्मणांनीं उठून दुसऱ्याच्या घरांतील उदकानें आचमन करावें, म्हणजे ते सारे ब्राह्मण शुद्धच आहेत.'' हें वचन आशौचाच्या पूर्वी वेगळें न केलेल्या अन्नाविषयीं समजावें. या ठिकाणीं शेष अन्न असेल तें ब्राह्मणांनीं टाकावें, असा भाव. आशौचाच्या पूर्वी पृथक् केलेलें अन्न असेल तर सांगतो **बृहस्पति**—''विवाह, उत्सव, यज्ञ, या कर्मांचे ठायीं मध्यें मृताशौच प्राप्त होईल तर पूर्वी संकल्पित असलेल्या अन्नाविषयीं दोष नाहीं, असें सांगितलें आहे.''

धर्मार्थविवाहकरणेफलमुक्तं**महाभारते** ज्ञात्वास्ववित्तसामर्थ्यमेकंचोद्वाहयेद्विजं तेनाप्नोतितत्स्थानंशिवभक्तोनरोध्रुवम् **अपरार्केदक्षः** मातापितृविहीनंतुसंस्कारोद्वाहनादिभिः यःस्थापयतिसस्नेह

पुण्यसंख्यानविद्यते **मदनरत्नेभविष्ये** विवाहादिक्रियाकालेतत्क्रियासिद्धिकारणं यःप्रयच्छतिधर्मज्ञः सोश्वमेधफलंलभेत् कन्यागृहेभोजननिषेधोपि**तत्रैव** अप्रजायांतुकन्यायांनभुंजीतकदाचन दौहित्रस्यमुखं दृष्ट्वाकिमर्थमनुशोचति **अपरार्केआदित्यपुराणे** विष्णुंजामातरंमन्येतस्यकोपंनकारयेत् अप्रजायांतुकन्यायांनाश्नीयात्तस्यवैगृहे ब्रह्मदेयांनवैकन्यांदत्वाश्नीयात्कदाचन अथभुंजीतमोहाच्चेत्पूयाशेनरकेवसेत् **तत्रैवकश्यपः** अहतंयंत्रनिर्मुक्तंवासःप्रोक्तंस्वयंभुवा शस्तंतन्मांगलिक्येषुतावत्कालंनसर्वदा यंत्रनिर्मुक्तंनूतनं विवाहमध्येस्त्रियासहभोजनेपिनदोषइत्याह**हेमाद्रौप्रायश्चित्तकांडेगालवः** विवाहकालेयात्रायांपथिचौरसमाकुले असहायोभवेद्विप्रस्तदाकार्यंद्विजन्मभिः एकयानसमारोहएकपात्रेचभोजनम् विवाहेपथियात्रायांकृत्वाविप्रोनदोषभाक् अन्यथादोषमाप्नोतिपश्चाच्चांद्रायणंचरेत् **मिताक्षरायामप्येवम् रत्नमालायां** मूलमैत्रमृगरोहिणीकरैःपौष्णमारुतमघोत्तरान्वितैः भौमसौररविवारवर्जितेपाणिपीडनविधिर्विधीयते अत्रानिष्टनक्षत्रादौदानमुक्तं**ज्योतिषे** विपत्तारेगुडंदद्यान्निधनेतिलकांचनम् प्रत्यरेलवणंदद्याच्छागंदद्यात्त्रिजन्मसु चंद्रेचशंखंलवणंचतारेतिथौविरुद्धेत्वथतंदुलांश्च धान्यंचदद्यात्करणेचवारेयोगेविरुद्धेकनकंप्रदेयम् ।

धर्मार्थविवाह करण्याचें फल सांगतो **महाभारतांत**—"आपलें द्रव्यसामर्थ्य पाहून एका ब्राह्मणाचा विवाह करावा. त्या योगानें त्या शिवभक्त मनुष्याला तें उत्तम स्थान निश्चयानें प्राप्त होतें." **अपरार्कांत दक्ष**—"माता, पिता यांनीं रहित अशा ब्राह्मणाला उपनयन, विवाहादि संस्कार करून धर्माचे ठायीं जो स्थापन करील त्याच्या पुण्याची संख्या करितां येत नाहीं." **मदनरत्नांत भविष्यांत**—"विवाहादि कार्यसमयीं त्या कार्याच्या सिद्धीचें जें कारण द्रव्यादिक असेल, तें जो करून देईल त्याला अश्वमेधाचें फल प्राप्त होईल." कन्येच्या घरीं भोजनाचा निषेधही तेथेंच सांगतो—"कन्येला पुत्र झालेला नसतां तिच्या घरीं कधींही भोजन करूं नये. दौहित्राचें ( कन्यापुत्राचें ) मुख पाहिल्यावर शोक करण्याचें ( भोजननिषेध मानण्याचें ) कारण नाहीं." **अपरार्कांत आदित्यपुराणांत**—"जांवई हा विष्णुरूपी आहे, असें मानून त्याला कोप येईल असें करूं नये. कन्येला प्रजा झालेली नसतां जामात्याच्या घरीं भोजन करूं नये. ब्रह्म देणारी अशी जी कन्या ती देऊन जामात्याच्या घरीं कधींही भोजन करूं नये. आतां मोहाच्या ( अज्ञानाच्या ) योगानें जर भोजन करील तर पूयाश ( पुवाच्या ) नरकांत जाईल." तेथेंच **कश्यप**—"यंत्रांतून निघालेलें नूतन वस्त्र तें ब्रह्मदेवानें अहत म्हणून सांगितलें आहे. तें अहतवस्त्र मंगलकार्यामध्यें तावत्कालपर्यंत प्रशस्त म्हणून सांगितलें आहे. सर्वदा प्रशस्त नाहीं." विवाहांत स्त्रियेसह भोजन केलें तरी दोष नाहीं, असें सांगतो **हेमाद्रींत प्रायश्चित्तकांडांत गालव**—"विवाहकालीं, यात्रासमयीं, मार्गांत, आणि चोर असतील त्या वेळीं दुसरा कोणी साहाय्य नसेल तर ब्राह्मणादिकांनीं स्त्रियेसहवर्तमान एका यानांत बसावें, आणि एका पात्रांत भोजन करावें. याप्रमाणें विवाहकालीं, यात्रासमयीं, आणि मार्गांत स्त्रीसह एका पात्रांत भोजन केलें असतां तो ब्राह्मण दोषी होत नाहीं. इतर वेळीं एका पात्रांत स्त्रियेसह भोजन करील तर दोषी होईल. त्या दोषाच्या निवारणासाठीं चांद्रायणप्रायश्चित्त करावें." **मिताक्षरेंत**ही असेंच सांगितलें आहे.

**रत्नमालेंत**—"मूल, अनुराधा, मृग, रोहिणी, हस्त, रेवती, स्वाती, मघा, तीन उत्तरा, ह्या नक्षत्रांवर; भौम, शनि, रवि हे वार वर्ज्य करून इतर वारीं विवाह करावा." ह्या विवाहकालीं तारा वगैरे अनिष्ट असतां दान सांगतो **ज्योतिषांत**—"विपद्तारा असतां गुड द्यावा. निधनतारा असतां तिल व सुवर्ण द्यावें. प्रत्यरतारा असतां लवण द्यावें. आणि त्रिजन्मतारा ( जन्मनक्षत्र, त्यापासून दहावें आणि एकोणिसावें नक्षत्र ) असतां बोकड द्यावा. चंद्र अनिष्ट असतां शंख द्यावा. तारा अनिष्ट असतां लवण द्यावें. तिथि अनिष्ट असतां तंदुल द्यावे. करण, आणि वार अनिष्ट असतां धान्य द्यावें. योग अनिष्ट असतां सुवर्ण द्यावें."

विवाहमंडपमाह**वसिष्ठः** षोडशारत्निकंकुर्याच्चतुर्द्वारोपशोभितम् मंडपंतोरणैर्युक्तंतत्रवेदिंप्रकल्पयेत् अष्टहस्तंतुरचयेन्मंडपंवाद्विषट्करं **दैवज्ञमनोहरः** चित्राविशाखाशततारकाश्विनीज्येष्ठाभरण्यौशिवभा-

---

१ ईषद्धौतं नवं श्वेतं सदशं वस्त्रमहतसंज्ञं । २ न दोष इति अन्यथा तु दोष एव नाश्नीयात् भार्ययासार्धमिति मनुवचनात् तत्र सार्धं एकपात्रे इत्यर्थः । यत्तु ब्राह्मण्या सह योश्नीयादुच्छिष्टं वा कदाचन । न तस्य दोषमिच्छंति नित्यमेव मनीषिण इत्यंगिरोवाक्यं तद्विवाहपरं । एतेन–ब्राह्मण्या भार्यया सार्धं क्वचिद्भुंजीत चाध्वनि । अधोवर्ण्या स्त्रिया सार्धं भुक्त्वा पतति तत्क्षणादिति व्याख्यातं क्वचिद्विवाहेऽध्वनि च. ३ चांद्रायणाचें स्वरूप ग्रंथाच्या शेवटीं सांगूं. ४ विपद्तारा वगैरे पूर्वीं सीमंतसंस्कारप्रकरणीं सांगितल्या आहेत.

**चतुष्टयम्** हित्वाप्रशस्तंफलतैलवेदिकाप्रदानकंकंडनमंडपादिकम् **हेमाद्रौव्यासः** कंडनदलनयवारकमंडपमृद्वेदिवर्णकाद्यखिलं तत्संबंधिगतागतमृक्षेवैवाहिकेकुर्यात् यवारकंचिकसाइतिप्रसिद्धम् वैवाहिकेतुदिवसेशुभेवाथतिथौशुभे चतुर्थिकंप्रकुर्वीतविधिदृष्टेनकर्मणा **वेदिमाहनारदः** हस्तोच्छ्रितांचतुर्हस्तैश्चतुरस्रांसमंततः स्तंभैश्चतुर्भिःसुश्लक्ष्णांवामभागेतुसद्मनि समांतथाचतुर्दिक्षुसोपानैरतिशोभिताम् प्रागुदक्प्रवणारंभास्तंभैर्हंसशुकादिभिः एवंविधामारुरुक्षेन्मिथुनंसाग्निवेदिकामिति **सप्तर्षिमते** मंगलेषुचसर्वेषुमंडपोगृहमानतः कार्यःषोडशहस्तोवाद्विपद्हस्तोदशावधि स्तंभैश्चतुर्भिरेवात्रवेदीमध्येप्रतिष्ठिता हस्तोवध्वाः सोपानं पश्चिमतः उपरिभागेउक्तपरिमाणाद्भिन्नम् ।

विवाहास मंडप सांगतो **वसिष्ठ**—"कनिष्ठ अंगुलीपर्यंत जो हात तो अरत्नि म्हटला आहे. अशा सोळा हातांचा लांब रुंद मंडप करावा. तो चार द्वारांनीं सुशोभित करावा. आणि तोरणें बांधावीं. नंतर त्या मंडपांत वेदी करावी. अथवा आठ हात किंवा बारा हात लांब व रुंद मंडप करावा." **दैवज्ञमनोहर**—"चित्रा, विशाखा, शततारका, अश्विनी, ज्येष्ठा, भरणी, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा हीं नक्षत्रें सोडून बाकीच्या नक्षत्रांवर फल, तैल, वेदिका, हळद, कांडणें, मंडप इत्यादिक विवाहसंबंधीं कर्में करावीं." **हेमाद्रींत व्यास**—"कांडण, दळण, यवारक ( चिकसा ), मंडप, मृत्तिकाहरण, वेदी, चित्रें वगैरे काढणें, आणि जाणें येणें हीं विवाहसंबंधीं सारीं कृत्यें विवाहनक्षत्रावर करावीं. विवाहोक्त शुभदिवशीं शुभतिथीस चैतुर्थीकर्म यथाविधि करावें." वेदी सांगतो **नारद**—"घराच्या वामभागीं एक हात उंचीची चार हात लांबीची व चार हात रुंदीची अशी चतुरस्र वेदी करावी. तिच्या चार बाजूंस केळीचे चार स्तंभ असावे. ती वेदी चारी दिशांस सारखी असून तिला पायऱ्या असाव्यात. ती वेदी पूर्वेस व उत्तरेस किंचित् उतरती असावी. आणि त्या वेदीवर केळीचे स्तंभ, व हंस, शुक इत्यादि पक्षी असावेत. अशा प्रकारच्या वेदीवर अग्नीसह वधूवरांनीं चढावें." **सप्तर्षिमतांत**—"सर्व मंगलकार्यांत घराच्या मानानें सोळा हात, किंवा चवदा हात, अथवा बारा हात किंवा दहा हात मंडप घालावा त्या मंडपांत चारी बाजूंस चार स्तंभ लावून वेदी करावी." या ठिकाणीं हात वधूचा घ्यावा. वेदीला पायऱ्या सांगितल्या त्या पश्चिमदिशेस कराव्या. वर सांगितलेलें जें वेदीचें प्रमाण त्याच्या बाहेर पायऱ्या असाव्यात.

**अथमृदाहरणं ज्योतिर्निबंधेनारदः** कर्तव्यंमंगलेष्वादौमंगलायांकुरार्पणम् नवमेसप्तमेवापि पंचमेदिवसेपिवा तृतीयेबीजनक्षत्रेशुभवारेशुभोदये सम्यग्गृहाण्यलंकृत्यवितानध्वजतोरणैः सहवादित्रनृत्याद्यैर्गत्वाप्रागुत्तरांदिशम् तत्रमृत्तिकतांश्लक्ष्णांगृहीत्वापुनरागतः मृन्मयेष्वथवावेणवेपुपात्रेपुयोजयेत् अनेकबीजसंयुक्तांतोयपुष्पोपशोभिताम् **शौनकः** आधानंगर्भसंस्कारंजातकर्मचनामच हित्वान्यत्रविधातव्यं मंगलेंकुरवापनम् **बृहस्पतिः** आत्यंतिकेपुकार्येपुकार्यंसद्योऽकुरार्पणम् तत्रैववाग्दानंहरिद्रावंदनंचकार्यम् **ज्योतिःप्रकाशे** चतुर्थोमंडपःश्रेष्ठःसप्तमःपंचमस्तथा नवमैकादशौश्रेष्ठौनेष्टौपष्ठतृतीयकौ विवाहभेस्वोदयेवाकन्यावरणमाचरेत् वरस्यापिवरणमाह**चंडेश्वरः** उपवीतंफलंपुष्पंवासांसिविविधानिच देयंवरायवरणेकन्याभ्रात्राद्विजेनवेति ॥

## आतां अंकुरार्पणाकरितां मृत्तिकाहरण सांगतो—

**ज्योतिर्निबंधांत नारद**—"मंगलकार्यांमध्यें आधीं मंगलासाठीं नवव्या, सातव्या, पांचव्या, किंवा तिसऱ्या दिवशीं, बीज पेरण्यास सांगितलेल्या नक्षत्रावर शुभवारीं शुभलग्नावर अंकुरार्पण करावें. पताका, ध्वज, तोरणें लावून घरें चांगलीं भूषित करून वाद्यगजर, वारांगनांचा नाच करीत ईशान्यदिशेस जाऊन त्या ठिकाणची चांगली मृदु माती घेऊन पुनः घरीं यावें. नंतर ती माती मातीच्या पात्रांत किंवा वेळूच्या पात्रांत ठेवून त्यांत अनेक धान्यांचीं बीजें पेरून पाणी घालावें, आणि वर फुलें घालावीं. हें अंकुरार्पण होय." **शौनक**—"गर्भाधान, गर्भाचे संस्कार, जातकर्म, नामकरण, हीं कर्में वर्ज्य करून बाकीच्या मंगलकार्यांत अंकुरार्पण करावें." **बृहस्पति**—"थोड्या अवकाशांत करावयाच्या कार्यांत सद्यः ( तत्कालीं ) अंकुरार्पण करावें." या वेळींच वाग्दान आणि हरिद्रावंदन हीं करावीं. **ज्योतिःप्रकाशांत**—"चैवथा मंडप श्रेष्ठ आहे.

---

१ साग्नीतिभिन्नंपदं मिथुनस्यविशेषणं. २ व्रतबंधे बटोः संस्कार्यत्वात् बटुहस्तेनवेदिनिर्मितिः विवाहे तु कन्यागृहेएव वरपूजनस्योक्तत्वात् गृहस्थाश्रमस्य तदायत्तत्वाच्च कन्याहस्तेनैव वेदिनिर्माणं । ३ चतुर्थीकर्माचा होमादिक विधि संस्कारकौस्तुभांत सांगितला आहे, तो तेथें पहावा. ४ वरणं प्रार्थना—वाचा दत्ता त्वया कन्या पुत्रार्थं स्वीकृता मया । वरावलोकनविधौ निश्चितस्त्वं सुखी भवेत्येवंरूपा वाग्दानाख्येति यावत् । ५ येथें चवथा मंडप म्हटला यावरून किती तरी मंडप आहेत असें होतें; ते मंडप

तसाच सातवा आणि पांचवा श्रेष्ठ आहे. नववा आणि अकरावा हेही श्रेष्ठ आहेत. सहावा आणि तिसरा हे दोन इष्ट नाहींत. विवाहनक्षत्रावर किंवा विवाहनक्षत्राच्या उदयावर कन्यावरण करावें." वराचेंही वरण सांगतो **चंडेश्वर**—"वराच्या वरणकालीं कन्येच्या भ्रात्यानें किंवा ब्राह्मणानें वराला यज्ञोपवीत, फलें, पुष्पें आणि अनेक प्रकारचीं वस्त्रें हीं द्यावीं."

वाग्दानोत्तरंवरमरणेऽ**परार्केस्मृतिचंद्रिकायांवसिष्ठः** अद्भिर्वाचाचदत्तायांम्रियेतोर्ध्वंवरोयदि नचमंत्रोपनीतास्यात्कुमारीपितुरेवसा यत्तु**नारदः** उद्वाहितापिसाकन्यानचेत्संप्राप्तमैथुना पुनःसंस्कारमर्हेतयथाकन्यातथैवसेति यच्च**कात्यायनः** वरोयद्यन्यजातीयःपतितःक्लीबएवच विकर्मस्थःसगोत्रोवादासो दीर्घामयोपिवा ऊढापिदेयासान्यस्मैसहावरणभूषणेति इदंकलौनिषिद्धम् देवरेणसुतोत्पत्तिर्दत्ताकन्यानदीयतेइत्या**दित्यपुराणेकलौ**निषेधात् दत्ताशब्दऊढापरः ऊढायाःपुनरुद्वाहमिति**हेमाद्रा**वुक्तेः अतएवसगोत्रासपिंडादिविवाहेपि भोगतस्तांपरित्यज्यपालयेज्जननीमिवेत्युक्तम् ।

**वाग्दानोत्तर वर मृत झाला** असतां सांगतो **अपरार्कांत** व **स्मृतिचंद्रिकेंत वसिष्ठ**—"उदकानें आणि वाणीनें कन्या दिली असतां नंतर जर वर मरेल आणि कन्या पाणिग्रहणाच्या मंत्रांनीं संस्कार केलेली नसेल तर ती कन्या पित्याचीच आहे." आतां जें **नारद**—"विवाहित झालेली कन्या असली तरी जर तिचा संभोग ( मैथुन ) केलेला नसेल तर ती पुनः संस्काराला ( विवाहाला ) योग्य होते. जशी कन्या ( अविवाहित ) तशीच ती समजावी." आणि जें **कात्यायन**—"जर वर अन्यजातीचा असेल, अथवा पतित किंवा षंढ असेल, अथवा वेदशास्त्रविरुद्ध कर्म करणारा, किंवा सगोत्री अथवा दास किंवा दीर्घरोगी असा असेल तर विवाहित कन्या असली तरी ती कन्या वस्त्रालंकारसहित दुसऱ्याला द्यावी." असें सांगतो. हें करणें कलियुगांत निषिद्ध आहे. कारण, "स्त्रियेनें भर्त्याच्या अभावीं दिरापासून पुत्रोत्पत्ति करणें, आणि दिलेली कन्या पुनः दुसऱ्याला देणें." या वचनानें ह्या कर्मांचा **आदित्यपुराणांत** कलियुगांत निषेध केलेला आहे. ह्या आदित्यपुराणांतील वचनांत 'दत्ता' असें पद आहे, त्याचा अर्थ विवाहित समजावा. कारण, "विवाहित कन्येचा पुनः विवाह कलियुगांत निषिद्ध असें **हेमाद्रींत** सांगितलें आहे. म्हणूनच सगोत्रा, सपिंडा इत्यादि कन्येचा विवाह झाला असेल तर "संभोगाविषयीं तिचा त्याग करून मातेप्रमाणें तिचें पालन करावें" असें सांगितलें आहे.

**देशांतरगमनेतुकात्यायनः** वरयित्वातुयःकश्चित्प्रणश्येत्पुरुषोयदा ऋत्वागमांस्त्रीनतीत्यकन्यान्यंवरयेद्वरम् **अपरार्केनारदोपि** प्रतिगृह्यतुयःकन्यांवरोदेशांतरंव्रजेत् त्रीनृतूनसमतिक्रम्यकन्याऽन्यंवरयेद्वरम् शुल्कदानेतु**मनुवसिष्ठौ** कन्यायांदत्तशुल्कायांम्रियतेयदिशुल्कदः देवरायप्रदातव्यायदिकन्यानुमन्यते **चंद्रिकायांकात्यायनः** प्रदायशुल्कंगच्छेद्यःकन्यायाःस्त्रीधनंतथा धार्यासावर्षमेकंतुदेयान्यस्मैविधानतः अनेकेभ्योहिदत्तायामनूढायांतु**तत्रैव** पूर्वागतश्चसर्वेपांलभेताद्यवरस्तुताम् पश्चाद्वरेणयद्दत्तं तस्याःप्रतिलभेतसः अथागच्छेन्नवोढायांदत्तंपूर्ववरोहरेत **याज्ञवल्क्यः** सकृत्प्रदीयतेकन्याहरंस्तांचौरदंडभाक् दत्तामपिहरेत्पूर्वाच्छ्रेयांश्चेद्वरआव्रजेत् पूर्वस्यदोषसत्त्वेइदमिति**विज्ञानेश्वरः संबंधतत्त्वेवसिष्ठः** कुलशीलविहीनस्यपश्चाद्धिपतितस्यच अपस्मारिविधर्मस्थरोगिणांवेषधारिणाम् दत्तामपिहरेत्कन्यांसगोत्रोढांतथैवच **मनुः** षंढांधबधिरादीनांविवाहोस्तियथोचितम् विवाहासंभवेतेषांकनिष्ठोविवहेत्तदा पितृव्यपुत्रेसापत्नेपरदारसुतेषुच विवाहाधानयज्ञादौपरिवेदोनदूषणम् अन्यद्वक्तव्यंविस्तरभीतेर्नोच्यतेइतिदिक् ।

**वर देशांतरीं गेला** असेल तर सांगतो **कात्यायन**—"जेव्हां जो कोणी पुरुष कन्येला वरून नाहींसा होईल तेव्हां त्याची तीन ऋतु ( सहा महिने ) पर्यंत प्रतीक्षा करून नंतर त्या कन्येनें दुसरा वर वरावा." **अपरार्कांत नारदही**—"जो वर कन्येचा प्रतिग्रह ( वाग्दानादि कर्मे ) करून देशांतरीं जाईल त्याची सहा महिनेपर्यंत प्रतीक्षा करून कन्येनें दुसरा वर वरावा." कन्येला मूल्य दिलें असेल तर सांगतात **मनु** आणि **वसिष्ठ**—"कन्येला शुल्क ( मूल्य ) दिलेलें असून जर मूल्य देणारा मरेल तर ती कन्या त्याच्या ( मूल्य देणाराच्या ) भ्रात्याला द्यावी. पण कन्येची जर संमति असेल तर

टीकेंत सांगितले आहेत, ते असे—१ ला आठ हातांचा, २ रा दहा हातांचा, ३ रा बारा हातांचा, ४ था चवदा हातांचा, ५ वा सोळा हातांचा, ६ वा अठरा हातांचा, ७ वा वीस हातांचा, ८ वा पंचवीस हातांचा, ९ वा पन्नास हातांचा, १० वा शंभर हातांचा, ११ वा सहस्र हातांचा, याप्रमाणें अकरा मंडप सांगितले आहेत. त्यांपैकीं पहिले दोन आणि आठवा हे विहितही नाहींत व निषिद्धही नाहींत.

द्यावी. अर्थात् नसेल तर देऊं नये." **चंद्रिकेंत कात्यायन**—"जो पुरुष कन्येला शुल्क ( मूल्य ) आणि स्त्रीधन देऊन देशांतरीं जाईल त्याची प्रतीक्षा करीत एक वर्षपर्यंत ती कन्या ठेवावी; नंतर दुसऱ्या वराला ती कन्या यथाविधि द्यावी. अनेक वरांला कन्या दिलेली असून तिचा कोणाशीं विवाह झालेला नसेल तर त्या सर्वांमध्यें प्रथम आलेल्या पहिल्या वराला ती कन्या प्राप्त होईल. मागांहून आलेल्या वरानें जें कांहीं द्रव्यादिक दिलें असेल तें त्याला परत मिळेल. आतां जर तिचा दुसऱ्या वराशीं विवाह झाल्यावर पहिला वर प्राप्त होईल तर त्यानें जें कांहीं द्रव्यादिक दिलें असेल तें त्याला परत मिळेल." **याज्ञवल्क्य**—"कन्येचें दान एकवार होतें. एकवार दिलेली कन्या जो पुरुष हरण करून आणील त्याला चोराची शिक्षा प्राप्त होईल. जर उत्तम वर प्राप्त होईल तर पूर्वीं दिलेली कन्या असली तरी त्यापासून हरण करून आणावी." हें सांगणें पूर्ववराला दोष असेल तर समजावें, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. **संबंधतत्त्वांत वसिष्ठ**—"हीन कुलांतील, दुःशील, पतित, अपस्मार ( फेंपरें ) असलेला, वेदशास्त्रविरुद्ध आचरण करणारा, रोगी, स्त्रियादिकांचे वेषधारी, आणि सगोत्री यांना दिलेली असली तरी ती कन्या हरण करून आणावी." **मनु**—"षंढ, आंधळा, बेहरा, इत्यादिकांचा यथायोग्य विवाह होतो. यांचा विवाह न होईल तर त्याच्या कनिष्ठ भ्रात्यानें विवाह करावा. पितृव्याचा पुत्र, सापत्नभ्राता, परस्त्रियांचे पुत्र ( दत्तकादिक ) हे ज्येष्ठ असून अविवाहित असतां कनिष्ठानें विवाह, अग्न्याधान, यज्ञ इत्यादि केलें तरी त्याला परिवेदनरूप[1] दोष प्राप्त होत नाहीं." इतर कांहीं सांगावयाचें आहे, परंतु विस्तार फार होईल या भीतीनें सांगत नाहीं. ही फक्त दिशा दाखविली आहे.

अत्रनांदीश्राद्धेविशेषंतदधिकारिविशेषंचाग्रेवक्ष्यामः इदंचाद्यविवाहेपिताकुर्याद्द्वितीयादौवरएव नांदीश्राद्धंपिताकुर्यादाद्येपाणिग्रहेपुनः अतऊर्ध्वंप्रकुर्वीतस्वयमेवतुनांदिकमितिस्मृतेः **त्रिकांडमंडनो**पि पित्रोस्तुजीवतोःकुर्यात्पुनःपाणिग्रहंयदा पितुर्नांदीमुखंश्राद्धंनोक्तंतस्यमनीषिभिरिति **रेणुकारिका** उक्तकालेविवाहांगंकुर्यान्नांदीमुखंपिता देशांतरेविवाहश्चेत्तत्रगत्वाभवेदिदम् अथलग्नघटीस्थापनमाह**नारदः** षडंगुलमितोत्सेधंद्वादशांगुलमायतम् कुर्यात्पातालवत्ताम्रपात्रंतद्दशभिःपलैः ताम्रपात्रजलैःपूर्णेमृत्पात्रेवाथवाशुभे मंडलार्धोदयंवीक्ष्यरवेस्तत्रविनिक्षिपेत् तत्र**मंत्रः** मुख्यंत्वमसियंत्राणांब्रह्मणानिर्मितंपुरा भवभावायदंपत्योः कालसाधनकारणमिति ।

या विवाहांत नांदीश्राद्धाविषयीं विशेष विचार आणि त्याच्या अधिकाऱ्यांचा विशेष निर्णय पुढें ( उत्तरार्धांत श्राद्धप्रकरणीं ) सांगूं. हें नांदीश्राद्ध पहिल्या विवाहांत पित्यानें करावें. द्वितीयादि विवाहांत वरानेंच करावें. कारण, "पहिल्या विवाहांत नांदीश्राद्ध पित्यानें करावें. पहिला विवाह झाल्यावर पुढें नांदीश्राद्ध करावयाचें असतां तें स्वतःच करावें." अशी **स्मृति** आहे. **त्रिकांडमंडन**ही—"माता पिता जीवंत असतां जर पुनः विवाह करील तर त्या विवाहाचें नांदीश्राद्ध करण्याग विद्वानांनीं पित्यास सांगितलें नाहीं." **रेणुकारिका**—"विवाहकालीं विवाहाचें अंगभूत नांदीश्राद्ध पित्यानें करावें, देशांतरीं विवाह होईल तर त्या ठिकाणीं पित्यानें जाऊन हें नांदीश्राद्ध करावें." आतां लग्नघटीस्थापन सांगतो **नारद**—"दहा पलें ( ४० कर्ष ) तांबें घेऊन त्याचें सहा अंगुलें उंच आणि बारा अंगुलें विस्तृत असें वैद्यकशास्त्रोक्त पातालयंत्राप्रमाणें मध्यें छिद्र पाडलेलें असें ताम्रपात्र करावें. तें घटिकासाधण्याचें यंत्र होय. उदकानें भरलेल्या तांब्याच्या भांड्यांत अथवा चांगल्या मातीच्या भांड्यांत, सूर्याच्या अर्धमंडलाचा उदय झालेला पाहून त्या वेळीं तें घटिकायंत्र[2] ठेवावें. त्याविषयीं **मंत्र—"मुख्यं त्वमसि यंत्राणां ब्रह्मणा निर्मितं पुरा ॥ भव भावाय दंपत्योः कालसाधनकारणम् ॥"**

---

१ 'परि' उपसर्गपूर्वक 'विद्लृ लाभे' ह्या धातूपासून 'परिवेद' 'परिवेदन' 'परिवेत्ता' इत्यादिक शब्द होतात. त्याचा अर्थ—'परि' म्हणजे ज्येष्ठाचा परित्याग करून 'वेद' म्हणजे कनिष्ठाला स्त्रियेचा व अग्नीचा लाभ होणें, हा आहे. **मनु**—"ज्येष्ठ अविवाहित असतां जो कनिष्ठभ्राता स्त्रियेचा व अग्निहोत्राचा संयोग करितो तो परिवेत्ता आहे. आणि ज्येष्ठ तो परिवित्ति होय." हें परिवेदन झालें असतां कन्यादाता, वर, आणि आचार्य या तिघांला प्रायश्चित्त सांगितलें आहे. हा दोष सहोदर भ्रात्याविषयीं आहे.

२ 'द्वादशार्धपलोन्मानं चतुर्भिश्चतुरंगुलैः ॥ स्वर्णमाषैः कृतच्छिद्रं यावत्प्रस्थजलप्लुतम्' श्रीमद्भागवत तृतीयस्कंध. याचा अर्थ—५ गुंजा ह्म० १ मासा. १६ मासे ( ८० गुंजा ) ह्म० एक कर्ष. ४ कर्ष ह्म० एक पल होय. १६ पलें ह्म० एक प्रस्थ होतो. सहा पलें ताम्राचें पात्र करून त्याला चार मासे ( २० गुंजा ) सोन्याची चार अंगुलें लांब शलाका करून त्या शलाकेनें मध्यें छिद्र करावें. म्हणजे ती शलाका जाण्याजोगें छिद्र करावें. त्या पात्राचा ( घटिकायंत्राचा ) आकार केवढा असावा तें सांगतो—जेवढा आकार केल्यानें त्या छिद्रांतून एक प्रस्थ ( १६ पलें ) उदक आंत भरून नंतर तें पात्र पाण्यांत बुडेल एवढ्या आकाराचें करावें. त्या पात्राला घटिकायंत्र ( घटिका ) म्हणतात. कोणी असें सांगतात कीं, गुरुअक्षरें ६० उच्चार करण्याला जो काल लागतो त्या कालास पल हें नांव आहे. ६० पलें म्हणजे एक घटिका होते.

**वरस्यमधुपर्कमाहयाज्ञवल्क्यः** प्रतिसंवत्सरंत्वर्च्याःस्नातकाचार्यपार्थिवाः प्रियोविवाह्यश्चतथा यज्ञंप्रत्यृत्विजःपुनः अत्रविशेषोगृह्यपरिशिष्टे वरस्ययाभवेच्छाखातच्छाखागृह्यचोदितः मधुपर्कःप्रदातव्योह्यन्यशाखेपिदातरि अत्रवरदातृशब्दौऋत्विगाद्युपलक्षणम् **तदाहुः** अर्च्यशाखयामधुपर्कइति अर्च्यस्य यच्छाखीयंकर्मतच्छाखयामधुपर्कइति**याज्ञिकाः** **जयंत**स्तुवरणवत्सर्वत्रयजमानशाखयैवमधुपर्कइत्याह तत्तुनाद्रियंते**वृद्धाः** अत्र पंचाशताभवेद्ब्रह्मातदर्धेनतुविष्टरइत्यादिगृह्यपरिशिष्टादेर्विष्टरादिलक्षणंमधुपर्कादिविधिश्चस्वगृह्यादेर्ज्ञेयः ।

वराला मधुपर्क सांगतो **याज्ञवल्क्य**—"स्नातक, आचार्य आणि राजा यांची प्रतिवर्षी मधुपर्कानें पूजा करावी. श्रेष्ठ ब्राह्मण आणि विवाहाला प्राप्त झालेला जो वर त्याची मधुपर्कानें तशीच पूजा करावी. यज्ञामध्यें ऋत्विजांची मधुपर्कानें पूजा करावी." या मधुपर्काविषयीं विशेष सांगतो **गृह्यपरिशिष्टांत**—"कन्यादाता इतर शाखेचा असला तरी वराची जी शाखा असेल त्या शाखेच्या गृह्यसूत्रानें सांगितलेला मधुपर्क वराला द्यावा." या वचनांत 'वर' आणि 'दाता' हे शब्द 'ऋत्विक्' 'यजमान' इत्यादिकांचे उपलक्षक आहेत. तेंच सांगतात—"ज्याची पूजा करावयाची त्याच्या शाखेनें मधुपर्क होतो." म्हणजे ज्याची पूजा करावयाची असेल त्याचें कर्म ज्या शाखेनें होतें त्या शाखेनें मधुपर्क होतो, असें याज्ञिक सांगतात. **जयंत** तर—यज्ञांत ऋत्विजांचें वरण जसें यजमानशाखेनें होतें तसा मधुपर्क यजमानाच्या शाखेनेंच होतो, असें सांगतो. तें जयंताचें सांगणें वृद्ध स्वीकारीत नाहींत. या ठिकाणीं 'पन्नास दर्भांनीं ब्रह्मा होतो' 'पंचवीस दर्भांनीं विष्टर होतो' इत्यादि विष्टरादिकांचें लक्षण गृह्यपरिशिष्टादिकांतून आणि मधुपर्कादिकाचा विधि आपल्या गृह्यसूत्रादिकांतून जाणावा.

कन्यादानेप्रपितामहपूर्वकमित्युक्तं**स्मृत्यर्थसारे** नांदीमुखेविवाहेचप्रपितामहपूर्वकं नामसंकीर्तयेद्विद्वानन्यत्रपितृपूर्वकम् नांदीमुखेइतिबह्वृचाद्यतिरिक्तविषयम् **गृह्यपरिशिष्टे** पित्राद्यानुलोम्याम्नानात् **व्यासः** भुक्त्वासमुद्वहेत्कन्यांसावित्रीग्रहणंतथा उपोषितःसुतांदद्यादर्चितायद्विजायतु भुक्त्वेतिमधुपर्केवैधभोजनपरं **गृह्यपरिशिष्टे** कन्यांवरयमाणानामेषधर्मोविधीयते प्रत्यङ्मुखावरयंतिप्रतिगृह्णंतिप्राङ्मुखाः **मदनरत्ने ऋष्यशृंगः** वरगोत्रंसमुच्चार्यप्रपितामहपूर्वकं नामसंकीर्तयेद्विद्वान्कन्यायाश्चैवमेवहि तिष्ठेत्पूर्वमुखोदातावरःप्रत्यङ्मुखोभवेत् मधुपर्कार्चितायैनांतस्मैदद्यात्सदक्षिणाम् उदपात्रंततोगृह्यमंत्रेणानेनदापयेत् गौरींकन्यामिमांविप्रयथाशक्तिविभूषिताम् गोत्रायशर्मणेतुभ्यंदत्तांविप्रसमाश्रयेति भूमिंगांचैवदासींचवासांसिचस्वशक्तितः महिषींवाजिनश्चैवदद्यात्स्वर्णमणीनपि ततःस्वगृह्यविधिनाहोमाद्यंकर्मकारयेत् यथाचारंविधेयानि मांगल्यकुतुकानिच एतत्कन्यादानंत्रिःकार्यमिति**शौनकः** ।

कन्यादानप्रयोगांत प्रपितामहपूर्वक उच्चार सांगतो **स्मृत्यर्थसारांत**—"नांदीश्राद्धांत आणि विवाहांत कन्यादानप्रसंगीं पूर्वी प्रपितामहाचे, नंतर पितामहाचे, तदनंतर पित्याचे नांवाचा उच्चार करावा. इतर ठिकाणीं पितृपूर्वक नांवाचा उच्चार करावा." नांदीश्राद्धांत प्रपितामहपूर्वक उच्चार सांगितला तो ऋक्शाखी वगैरे वगळून इतरांविषयीं समजावा. कारण, **गृह्यपरिशिष्टांत** पित्रादिक्रमानें उच्चार सांगितला आहे. **व्यास**—"वरानें भोजन करून कन्याप्रतिग्रह करावा. आणि वटूनें भोजन करून गायत्रीचा उपदेश घ्यावा. कन्यादात्यानें उपोषित राहून पूजा केलेल्या वराला कन्या द्यावी." या वचनांत 'वरानें भोजन करून' असें जें सांगितलें तें मधुपर्कांत विधिप्राप्तभोजनविषयक समजावें. **गृह्यपरिशिष्टांत**—"कन्या वरणाऱ्यांचा असा धर्म सांगितला आहे कीं, पश्चिमेकडे मुख करून राहून वरते. आणि प्राङ्मुख होऊन कन्याग्रहण करितात." **मदनरत्नांत ऋष्यशृंग**—"वराचे गोत्राचा उच्चार करून प्रपितामहपूर्वक नांवाचा उच्चार करावा. कन्येचाही याप्रमाणेंच गोत्राचा उच्चार करून प्रपितामहपूर्वक नांवाचा उच्चार करावा. कन्यादाता पूर्वमुख असावा, आणि वर प्रत्यङ्मुख असावा. मधुपर्कानें पूजित अशा त्या वराला दक्षिणासहित कन्या द्यावी. आणि उदकपात्र द्यावें. याप्रमाणें दान केल्यावर कन्यादात्यानें पुढचा मंत्र म्हणावा. तो **मंत्र—'गौरीं कन्यामिमां विप्र यथाशक्ति विभूषितां ॥ गोत्राय शर्मणे तुभ्यं दत्तां विप्र समाश्रय ॥'** नंतर आपल्या शक्तीप्रमाणें भूमि, गाई, दासी, वस्त्रें, महिषी, घोडे, आणि सुवर्णाचे मणी इत्यादिक द्यावे. तदनंतर आपल्या गृह्योक्तविधीनें होमादि कर्म करवावें. जसा आचार असेल तशीं मांगल्य कौतुकेंही करावीं." हें कन्यादान त्रिवार करावें, असें **शौनक** सांगतो.

**गृहप्रवेशनीयहोमे**विशेषमाहा**श्वलायनः** अर्धरात्रेव्यतीतेतुपरेद्युःप्रातरेवहि गृहप्रवेशनीयःस्यादितियज्ञविदोविदुरिति औपासनहोमेविशेषमाह **शौनकः** यदिरात्रौविवाहाग्निरुत्पन्नःस्यात्तथासति

उपक्रम्योत्तरस्याह्नःसायंपरिचरेदमुम् यदिरात्रौनवनाडीमध्येऽग्न्युत्पत्तिस्तदातदैवहोमारंभः तदुत्तरंचेत्परदिने सायमारंभइति**सुदर्शनभाष्ये**उक्तम् ।

गृहप्रवेशनीय होमाविषयीं विशेष सांगतो **आश्वलायन**—"अर्धरात्रीच्या पुढें विवाहहोम झाला असतां गृहप्रवेशनीय होम प्रातःकालींच करावा, असें यज्ञवेत्ते सांगतात." औपासनहोमाविषयीं विशेष सांगतो **शौनक**—"जर रात्रीं विवाहाग्नि उत्पन्न झाला असेल तर दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं उपासनारंभाचा संकल्प करून औपासन होम करावा." जर रात्रीं नऊ घटिकांचे आंत अग्नि उत्पन्न झाला असेल तर त्यावेळींच औपासनहोमाचा आरंभ करावा. नऊ घटिकांचे पुढें जर अग्नि उत्पन्न असेल तर दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं औपासनहोमाचा आरंभ करावा, असें **सुदर्शनभाष्यांत** सांगितलें आहे.

**अथदेवकोत्थापनं** यदाह**नारदः** समेचदिवसेकुर्याद्देवकोत्थापनंबुधः षष्ठंचविषमंनेष्टंमुक्त्वापंचमसप्तमौ **निर्णयदीपेगार्ग्यः** नांदीश्राद्धेकृतेपश्चाद्यावन्मातृविसर्जनम् दर्शश्राद्धंक्षयश्राद्धंस्नानंशीतोदकेनच अपसव्यंस्वधाकारंनित्यश्राद्धंतथैवच ब्रह्मयज्ञंचाध्ययनंनदीसीमातिलंघनम् उपवासंव्रतंचैवश्राद्धभोजनमेवच नैवकुर्युःसपिंडाश्चमंडपोद्वासनावधि **बृहस्पतिः** तीर्थेविवाहेयात्रायांसंग्रामेदेशविप्लवे नगरग्रामदाहेच-स्पृष्टास्पृष्टिर्नदुष्यति **योगियाज्ञवल्क्यः** नस्नायादुत्सवेतीतेमंगलंविनिवर्त्यच अनुव्रज्यसुहृद्बंधूनर्चयित्वेष्टदेवताम् **ज्योतिषे** स्नानंसचैलंतिलमिश्रकर्मप्रेतानुयानंकलशप्रदानम् अपूर्वतीर्थामरदर्शनंचविवर्जयेन्मंगलतोब्दमेकम् मासषट्कंविवाहादौव्रतप्रारंभणेपिच जीर्णभांडादिनत्याज्यंगृहसंमार्जनंतथा ऊर्ध्वंविवाहात्पुत्रस्यतथाचव्रतबंधनात् आत्मनोमुंडनंनैववर्षंवर्षार्धमेवच अभ्यंगेसूतकेचैवविवाहेपुत्रजन्मनि मांगल्येषुचसर्वेषुनधार्यंगोपिचंदनं **ज्योतिर्निबंधे** उद्वाहात्प्रथमेशुचौयदिवसेद्भर्तुर्गृहेकन्यकाहन्यात्तज्जननींक्षयेनिजतनुंज्येष्ठेपतिर्ज्येष्ठकम् पौषेचश्वशुरंपतिंचमलिनेचैत्रेस्वपित्रालयेतिष्ठंतीपितरंनिहंतिनभयंतेषामभावेभवेत् **निबंधे** विवाहात्प्रथमेपौषेआषाढेचाधिमासके नसाभर्तुर्गृहेतिष्ठेच्चैत्रेपितृगृहेतथा **हेमाद्रौस्मृत्यंतरे** विवाहव्रतचूडासुवर्षमर्धंतदर्धकम् पिंडदानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणम् **तथा** अर्धपूर्ववत् संपिंडानैवकुर्वीरन्द्विःस्नानमृतुत्रये तीर्थेसंवत्सरेप्रेतेपितृयज्ञेमहालये कृतोद्वाहोपिकुर्वीतपिंडनिर्वपणंसदा ।

## आतां देवकोत्थापन सांगतो—

**नारद**—"सहावा दिवस वर्ज्य करून बाकीच्या समदिवशीं देवकोत्थापन करावें. विषम दिवसांत पांचव्या आणि सातव्या दिवशीं देवकोत्थापन करावें. बाकीचे विषम दिवस वर्ज्य आहेत." **निर्णयदीपांत गार्ग्य**—"नांदीश्राद्ध केलें असतां जोंपर्यंत मातृकाविसर्जन (देवकोत्थापन) होई तोंपर्यंत दर्शश्राद्ध, सांवत्सरिकश्राद्ध, शीतोदकानें स्नान, अपसव्य, स्वधाशब्दोच्चार, नित्यश्राद्ध, ब्रह्मयज्ञ, अध्ययन, नदीचें व सीमेचें उल्लंघन, उपवास, व्रत आणि श्राद्धभोजन हीं कृत्यें त्रिपुरुषसपिंडांनीं करूं नयेत." **बृहस्पति**—"तीर्थाचे ठायीं, विवाहांत, यात्रेमध्यें, युद्धामध्यें, देशाचा विनाश होत असेल त्या समयीं, आणि नगर किंवा गांव जळत असेल त्या वेळीं इतर जातीच्या स्पर्शास्पर्शाचा दोष नाहीं." **योगियाज्ञवल्क्य**—"देवादिकांचा उत्सव केल्यावर, मंगलकार्य समाप्त केल्यावर, सुहृत् व प्रिय यांना पोंचवून आल्यावर आणि इष्टदेवतेची पूजा केल्यावर सचैल स्नान करूं नये." **ज्योतिषांत**—"सचैलस्नान, तिलयुक्त कर्म (तर्पणादि), प्रेताबरोबर जाणें, उदकुंभदान, पूर्वीं न पाहिलेल्या तीर्थांचें व देवाचें दर्शन हीं कृत्यें मंगलकार्य केल्यापासून एकवर्षपर्यंत वर्ज्य करावीं. विवाहादि मंगलकार्य केलें असतां आणि व्रताचा प्रारंभ केला असतां सहा महिनेपर्यंत जीर्णभांडीं वगैरे असतील तीं टाकूं नयेत. तसेंच घराचें संमार्जन करूं नये. पुत्राचा विवाह केल्यापासून एक वर्षपर्यंत आपलें मुंडन करूं नये. आणि पुत्राचा व्रतबंध केल्यापासून सहा महिनेपर्यंत आपलें मुंडन करूं नये. अभ्यंग केला असतां, सूतकांत, विवाहांत, पुत्रजन्म झाला असतां, आणि सर्व मंगलकार्यांत गोपीचंदन लावूं नये." **ज्योतिर्निबंधांत**—"विवाह झाल्यापासून पहिल्या आषाढांत जर पतीच्या घरीं कन्या वास करील तर ती सासूचा नाश करील. क्षयमासांत जर पतिगृहीं राहील तर ती आपला नाश करील. ज्येष्ठ मासांत जर पतीच्या घरीं राहील तर ती पतीच्या ज्येष्ठ भ्रात्याचा नाश करील. पौषांत जर पतिगृहीं राहील तर ती श्वशुराचा नाश करील. अधिक मासांत जर पतिगृहीं राहील तर ती पतीचा नाश करील. चैत्रांत जर बापाच्या घरीं राहील तर ती बापाचा नाश करील.

---

१ समे इति विवाहोत्तरं समे दिवसे इत्यर्थः इतिपीयूषधारायामुक्तं । धर्मसिंधौतु स्थापनदिनात्समदिवसेइत्युक्तं. २ अत्र स्वधाकारग्रहणं तत्सहचरितवैश्वदेवनिषेधार्थं. ३ अत्र सपिंडास्त्रिपुरुषपर्यंता इति पुरुषार्थचिंतामणौ । ४ आत्मनो मुंडनमिति । कर्मांगतया प्राप्तं रामभासं च मुंडनं निषिध्यते ।

सासू इत्यादिकांचा अभाव असेल तर हा दोष नाहीं." **निबंधांत**—"विवाह झाल्यापासून पहिल्या पौषांत, आषाढांत, आणि अधिक मासांत पतीच्या घरीं कन्येनें राहूं नये. आणि चैत्रांत बापाच्या घरीं राहूं नये." **हेमाद्रींत स्मृत्यंतरांत**—"विवाह, व्रतबंध, चौल हीं कार्यें झालीं असतां अनुक्रमानें एक वर्ष, सहा महिने, तीन महिनेपर्यंत पिंडदान, मृत्तिकास्नान आणि तिलतर्पण करूं नये." तसेंच विवाहादिक मंगल झालें असतां त्रिपुरुषसपिंडांनीं सहा महिनेपर्यंत शीतोदक स्नान करूं नये." अपवाद—"विवाह केलेला असला तरी तीर्थाचे ठायीं, मातापितरांच्या सांवत्सरिकांत, प्रेतश्राद्धांत, पित्याच्या और्ध्व-देहिक कर्मांत, आणि महालयांत सर्वदा पिंडप्रदान करावें."

**अथवधूप्रवेशः जयतुंगे** मार्गशीर्षेतथामाघमाधवेज्येष्ठसंज्ञके सुप्रशस्तेभवेद्वेश्मप्रवेशोनवयोषिताम् **नारदः** आरभ्योद्वाहदिवसात्षष्ठेवाप्यष्टमेदिने वधूप्रवेशःसंपत्त्यैदशमेथसमेदिने **संग्रहे** विवाहमारभ्य वधूप्रवेशोयुग्मेदिनेषोडशवासरांतात ऊर्ध्वंततोऽब्देऽयुजिपंचमांतादतःपरस्तान्नियमोनचास्ति **नारदः** समेवर्षेसमेमासियदिनारीगृहंव्रजेत् आयुष्यंहरतेभर्तुःसानारीमरणंव्रजेत् **प्रयोगरत्नेतु** वधूप्रवेशःप्रथमे तृतीयेशुभप्रदःपंचमकेथवाह्नि द्वितीयकेवाथचतुर्थकेवापष्ठेवियोगामयदुःखदःस्यादित्युक्तं तत्रमूलंचिंत्यम् **वृद्धवसिष्ठोपि** षष्ठाष्टमेवादशमेदिनेवाविवाहमारभ्यवधूप्रवेशः पंचांगसंशुद्धदिनंविनापिविधावसद्दोष-रगेपिकार्यः **लल्लः** स्वभवनपुरप्रवेशेदेशानांविप्लवेतथोद्वाहे नववध्वागृहगमनेप्रतिशुक्रविचारणानास्ति **मांडव्यः** नित्ययानेगृहेजीर्णेप्राशनांतेषुसप्तसु वधूप्रवेशेमांगल्येनमौढ्यंगुरुशुक्रयोः **ज्योतिःप्रकाशे** वामेशुक्रेनवोढायाःसुखंहानिश्चदक्षिणे धनंधान्यंचपृष्ठस्थेसर्वनाशःपुरःस्थिते नवोढायास्तुवैधव्यंयदुक्तंसंमुखे भृगौ तदेवविबुधैर्ज्ञेयंकेवलंतुद्विरागमे पूर्वतोभ्युदितेशुक्रेप्रयायाद्दक्षिणापरे पश्चादभ्युदितेचैवयायात्पूर्वोत्तरे-दिशौ **व्यवहारतत्त्वे** पौष्णानकभाच्चश्रवणाच्चयुग्मेहस्तत्रयेमूलमघोत्तरासु पुष्येचमैत्रेचवधूप्रवेशोरिक्तेत-रेव्यर्ककुजेचशस्तः **गर्गः** व्यतीपातेचसंक्रांतौग्रहणेवैधृतावपि श्राद्धंविनाशुभंनैवप्राप्तकालेपिमानवः **तथा** अमासंक्रांतिविष्ट्यादौप्राप्तकालेपिनाचरेदिति ॥

## आतां वधूप्रवेश सांगतो—

**जयतुंगांत**—"मार्गशीर्ष, माघ, वैशाख, आणि ज्येष्ठ या मासांत नूतनविवाहित स्त्रियांचा गृहप्रवेश प्रशस्त आहे." **नारद**—"विवाहदिवसापासून सहाव्या, किंवा आठव्या अथवा दहाव्या व इतर सम दिवशी वधूप्रवेश संपत्तिदायक होतो." **संग्रहांत**—"विवाहदिवसापासून सोळा दिवसांचे आंत सम दिवशी वधूप्रवेश शुभ आहे. सोळा दिवसांचे पुढें पांच वर्षांचे आंत विषमवर्षी शुभ आहे पांच वर्षांच्या पुढें हा समविषमाचा नियम नाहीं." **नारद**—"विवाहापासून समवर्षी व सममासांत जर स्त्री गृहप्रवेश करील तर ती भर्त्याचें आयुष्य हरण करील आणि ती स्त्री मरेल." **प्रयोगरत्नांत** तर—"विवाहापासून पहिल्या, तिसऱ्या, अथवा पांचव्या दिवशी, तसाच दुसऱ्या किंवा चवथ्या दिवशीं वधूप्रवेश शुभदायक आहे. सहाव्या दिवशी वधूप्रवेश वियोग, व्याधि इत्यादि दुःखदायक आहे." असें सांगितलें आहे. या वचनांविषयीं मूलवचन चिंत्य ( प्रमाणशून्य ) आहे. **वृद्धवसिष्ठ**ही—"विवाहदिवसापासून सहाव्या किंवा आठव्या, अथवा दहाव्या दिवशीं पंचांगशुद्धि नसली तरी, आणि चंद्रबळ नसले तरी वधूप्रवेश करावा." **लल्ल**—"आपल्या घरी व आपल्या नगरीं जावयाचें असतां, देशाचा विध्वंस होतेसमयीं कोठें गमन करावयाचें असतां, विवाहाकरितां जाणें असतां, नववधूचा गृहप्रवेश करावयाचा असतां, संमुख शुक्रदोषाचा विचार करूं नये." **मांडव्य**—"नेहमींचें जाणें, जीर्णगृहाची दुरुस्ती करणें, गर्भाधानादिक अन्नप्राशनापर्यंतचे सात संस्कार करणें, वधूप्रवेश, आणि मांगलिक कृत्य यांविषयीं गुरुशुक्रांचा अस्तदोष नाहीं." **ज्योतिः-प्रकाशांत**—"नूतनविवाहित स्त्रियेच्या गृहप्रवेशसमयीं वामभागीं शुक्र असतां सुख होतें. दक्षिणभागीं शुक्र असतां हानि होते. पृष्ठभागीं शुक्र असतां धनधान्यप्राप्ति होते. आणि संमुख शुक्र असतां सर्वनाश होतो. संमुख शुक्र असतां नूतन विवाहित स्त्रियेला वैधव्य प्राप्त होतें, असें जें सांगितलें तेंच विद्वानांनी केवळ द्विरागमनाविषयीं समजावें. शुक्राचा उदय पूर्वेस असतां दक्षिणेस आणि पश्चिमेस जावें. शुक्राचा उदय पश्चिमेस असतां पूर्वेस आणि उत्तरेस जावें." **व्यवहारत-त्त्वांत**—सोळा दिवसांच्या पुढें वधूप्रवेशास दिवस—"रेवती, अश्विनी, रोहिणी, मृग, श्रवण, धनिष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, मूळ, मघा, तीन उत्तरा, पुष्य, अनुराधा, ह्या नक्षत्रांवर; रिक्ता तिथि सोडून बाकीच्या तिथींस; रवि आणि भौमवार वर्ज्य करून बाकीच्या वारीं वधूप्रवेश शुभ आहे." **गर्ग**—"व्यतीपात, संक्रांति, सूर्यचंद्रांचें ग्रहण, वैधृति यांचेवर श्राद्धा-वांचून इतर कर्म शुभदायक होत नाहीं; म्ह० इतर कर्मांचा काल प्राप्त असला तरी तें कर्म त्या दिवशीं मनुष्यानें करूं नये."

तसेंच—"अमावास्या, संक्रांति, विष्टि इत्यादि दुष्ट दिवस असतां कर्माचा काल प्राप्त असला तरी तें कर्म त्यादिवशीं करूं नये."

**अथद्विरागमनम् ऋक्षोच्चये** माघफाल्गुनवैशाखेशुक्लपक्षेशुभेदिने गुर्वादित्यविशुद्धौस्यान्नियं पत्नीद्विरागमः **बादरायणः** नीहारांशुदिनोत्तरादितिगुरुब्राह्मानुराधाश्विनीशक्रेभास्करवायुविष्णुवरुणत्वाष्ट्रेप्रशस्तेतिथौ कुंभाजालिगतेरवौशुभकरेप्राप्तोदयेभार्गवेजीवज्ञास्फुजितांदिनेनववधूवेश्मप्रवेशःशुभः ।

## आतां द्विरागमन सांगतो—

**ऋक्षोच्चयांत—**"माघ, फाल्गुन, वैशाख या मासांत शुक्लपक्षीं शुभ दिवशीं गुरु आणि रवि हे लग्नास शुभस्थानीं असतां वधूचें द्विरागमन करावें." **बादरायण—**"कुंभ, मेष, वृश्चिक, या संक्रांतीस रवि असतां आणि शुक्राचा उदय असतां तीन उत्तरा, पुनर्वसु, पुष्य, रोहिणी, अनुराधा, अश्विनी, ज्येष्ठा, हस्त, स्वाती, श्रवण, शततारका, चित्रा, ह्या नक्षत्रांवर; शुभतिथीस; शुभलग्नावर चंद्र, गुरु, बुध, शुक्र, यांच्या वारीं नववधूचा गृहप्रवेश शुभ आहे."

**अथपुनर्विवाहः श्रीधरीये** पुनर्विवाहंवक्ष्यामिदंपत्योःशुभवृद्धिदम् लग्नेंदुलग्नयोर्दोषेग्रहतारादिसंभवे अन्येष्वशुभकालेषुदुष्टयोगादिसंभवे विवाहेचापिदंपत्योराशौचादिसमुद्भवे तस्यदोपस्यशांत्यर्थंपुनर्वैवाह्यमिष्यते **याज्ञवल्क्यः** सुरापीव्याधिताधूर्तावंध्यार्थघ्न्यप्रियंवदा स्त्रीप्रसूश्चाधिवेत्तव्यापुरुषद्वेषिणी तथा **मनुः** वंध्याष्टमेधिवेत्तव्यादशमेतुमृतप्रजा एकादशेस्त्रीजननीसद्यस्त्वप्रियवादिनी **संग्रहेतु** अप्रजांदशमेवर्षेस्त्रीप्रजांद्वादशेत्यजेत् मृतप्रजांपंचदशेसद्यस्त्वप्रियवादिनीम **याज्ञवल्क्यः** एकामुत्क्रम्यकामार्थमन्यांलब्धुंयइच्छति समर्थस्तोषयित्वार्थैःपूर्वोढामपरांव्रजेत आज्ञासंपादिनींदक्षांवीरसूंप्रियवादिनीम त्यजन्दाप्यस्तृतीयांशमद्रव्योभरणंस्त्रियाः **मनुः** अधिविन्नातुयानारीनिर्गच्छेद्रोषितागृहात सासद्यःसन्निरोद्धव्यात्याज्यावाकुलसन्निधाविति **हेमाद्रौकात्यायनः** अग्निशिष्टादिशुश्रूषांबहुभार्यःसवर्णया कारयेत्तद्बहुत्वंचेज्ज्येष्ठयागर्हितानचेदिति **याज्ञवल्क्यः** सत्यामन्यांसवर्णायांधर्मकार्यंनकारयेत सवर्णासुविधौधर्म्येज्येष्ठयानविनेतरा ॥

## आतां पुनर्विवाह सांगतो—

**श्रीधरीयांत—**"दंपतीला शुभवृद्धि करणारा असा पुनर्विवाह सांगतो—दुष्टलग्नावर, राशीस दुष्टचंद्रावर; ग्रह, तारा इत्यादिकांचें आनुकूल्य नसतां; इतरही दुष्ट योगादिकांनीं अशुभ असलेल्या कालीं; विवाह झाला असेल आणि सूतकादिकांत कूष्मांड होमादिविधीवांचून विवाह झाला असेल तर त्या दोषाच्या शांतीसाठीं त्याच वधूवरांचा सुमुहूर्तावर पुनः विवाह करावा." **याज्ञवल्क्य—**"सुरापान करणारी, व्याधिष्ट, धूर्त, वांझोटी, द्रव्यनाश करणारी अप्रियभाषण करणारी, कन्या प्रसवणारी, आणि पुरुषाचा द्वेष करणारी, अशी स्त्री असेल तर दुसरी स्त्री करावी." **मनु—**"वांझोटी स्त्री असेल तर आठव्या वर्षी दुसरी स्त्री करावी. मुलें मरणारी असेल तर नऊ वर्षे वाट पाहून दहाव्या वर्षी दुसरी स्त्री करावी. कन्या प्रसवणारी असेल तर अकराव्या वर्षी दुसरी स्त्री करावी. अप्रिय भाषण करणारी असेल तर तत्काल दुसरी स्त्री करावी." **संग्रहांत** तर—"वांझोटी स्त्रियेला दहाव्या वर्षी सोडावी. कन्या प्रसवणारीला बाराव्या वर्षी सोडावी. मुलें मरणारीला पंधराव्या वर्षी सोडावी. आणि अप्रियभाषण करणारीला सद्यः सोडावें." **याज्ञवल्क्य—**"जो पुरुष एका स्त्रीला टाकून कामासाठीं दुसरी स्त्री मिळविण्याविषयीं इच्छितो तो पुरुष समर्थ असल्यास द्रव्यादिकांच्या योगानें पहिल्या स्त्रियेला संतुष्ट करून दुसऱ्या स्त्रियेप्रत जावें. पतीची आज्ञा संपादन करणारी, कार्याविषयीं दक्ष, वीरपुरुष प्रसवणारी, प्रियभाषण करणारी अशा स्त्रियेचा त्याग करील तर राजानें त्याजकडून त्याच्या द्रव्यांतून तिसरा हिस्सा त्या स्त्रियेला देववावा. द्रव्यरहित असेल तर त्या स्त्रियेचें पोषण करवावें." **मनु—**"ज्या स्त्रियेवर दुसरी स्त्री केल्यामुळें ती पहिली स्त्री रुष्ट होऊन जर घरांतून बाहेर पडेल तर तिला तत्काल घरांत कोंडून ठेवावी. अथवा बापाच्या घरीं तिला पोंचवावी." **कात्यायन—**"ज्या पुरुषास अनेक जातींच्या बहुत स्त्रिया असतील त्यानें अग्नि, शिष्ट इत्यादिकांची शुश्रूषा सजातीच्या स्त्रियेकडून

१ द्विरागमे षोडशवासरांतरेकादशाहे समवासरेषु ॥ नचात्र ऋक्षं न तिथिर्न योगो न वारशुद्ध्यादि विचारणीयम् ॥' अर्थ—द्विरागमन विवाहदिवसापासून सोळा दिवसांचे आंत अकराव्या दिवशी आणि सम दिवशी करावयाचें असतां त्या ठिकाणीं नक्षत्र, तिथि, योग, वार इत्यादिकांचे शुद्धीचा विचार करूं नये. धर्मसिंधुसार. २ अत्राप्रियवादोऽव्यभिचारः प्रतिकूलभाषणरूपस्य तस्य प्रायः कलौ सार्वत्रिकत्वात् । धर्मसिंधुसारः ।

करवावी. सजातीच्या स्त्रिया बहुत असतील तर ज्येष्ठ स्त्री निंद्य नसल्यास तिजकडून करवावी." **याज्ञवल्क्य**—"सजातीची स्त्री असतां धर्मकार्य इतर जातीच्या स्त्रियेकडून करवूं नये. सजातीच्या स्त्रिया बहुत असतील तर धर्मकार्याविषयीं ज्येष्ठ स्त्रियेवांचून इतर स्त्रियेची योजना करूं नये."

द्वितीयविवाहहोमेऽग्निमाह **कात्यायनः** सदारोऽन्यान्पुनर्दारानुद्वोढुंकारणांतरात् यदीच्छेदग्निमान्कर्तुंकहोमोस्यविधीयते स्वेग्नावेवभवेद्धोमोलौकिकेनकदाचन **त्रिकांडमंडनोपि** आद्यायांविद्यमानायांद्वितीयामुद्वहेद्यदि तदावैवाहिकंकर्मकुर्यादावसथेऽग्निमान् **सुदर्शनभाष्येतु** द्वितीयविवाहहोमोलौकिकएवनपूर्वोपासनेइत्युक्तम् इदंचासंभवे तत्रचाग्निद्वयसंसर्गःकार्यस्तदाह **शौनकः** अथाग्न्योर्गृह्ययोर्योगंसपत्नीभेदजातयोः सहाधिकारसिद्ध्यर्थमहंवक्ष्यामिशौनकः अरोगामुद्वहेत्कन्यांधर्मलोपभयात्स्वयं कृतेतत्रविवाहेचव्रतांतेतुपरेहनि पृथक्स्थंडिलयोरग्निंसमाधाययथाविधि तंत्रंकृत्वाज्यभागांतमन्वाधानादिकंततः जुहुयात्पूर्वपत्न्यग्नौतयान्वारब्धआहुतीः अग्निमीळेपुरोहितंसूक्तेननवर्चेनतु समिध्यैनंसमारोप्यअयंतेयोनिरित्यृचा प्रत्यवरोहेत्यनयाकनिष्ठाग्नौनिधायतम् आज्यभागांततंत्रादिकृत्वारभ्यतदादितः समन्वारब्धएताभ्यांपत्नीभ्यांजुहुयाद्धृतम् चतुर्गृहीतमेताभिर्ऋग्भिःपड्भिर्यथाक्रमम् अग्नावग्निश्चरतीत्यग्निनाग्निःसमिध्यते अस्तीदमितितिसृभिःपाहिनोअग्नएकया ततःस्विष्टकृदारभ्यहोमशेषंसमापयेत् गोयुगंदक्षिणांदेयाश्रोत्रियायाहिताग्नये पत्न्योरेकायदिमृतादग्ध्वातेनैवतांपुनः आदधीतान्ययासार्धमाधानविधिनागृहीति ॥

दुसऱ्या विवाहाच्या होमाविषयीं अग्नि सांगतो **कात्यायन**—"सपत्नीक व अग्नि धारणकरणारा पुरुष असून कोणत्याहीकारणानें जर दुसरा विवाह करण्याविषयीं इच्छील तर त्या दुसऱ्या विवाहाचा होम कोठें होईल? त्याच्या पूर्वीच्या अग्नीवरच दुसऱ्या विवाहाचा होम होईल. लौकिकाग्नीवर कधींही होणार नाहीं." **त्रिकांडमंडन**ही—"पहिली स्त्री विद्यमान असतां जर दुसरी स्त्री करील तर अग्निमान् पुरुषानें त्या दुसऱ्या विवाहाचें कर्म पहिल्या औपासनाग्नीवर करावें." **सुदर्शनभाष्यांत** तर—दुसऱ्या विवाहाचा होम लौकिकाग्नीवरच होतो, पूर्वीच्या औपासनावर होत नाहीं, असें सांगितलें आहे. हें सांगणें पूर्वीच्या औपासनाग्नीवर असंभव असतां समजावें. लौकिकाग्नीवर दुसऱ्या विवाहाचा होम केला असतां तो उत्पन्न झालेला अग्नि गृह्याग्नि असल्यामुळें पहिला गृह्याग्नि व दुसरा गृह्याग्नि यांचा संसर्ग करावा. तें सांगतो **शौनक**—"आतां दोनी पत्नींला सहाधिकाराची सिद्धि होण्याकरितां दोन पत्नीच्या दोन गृह्याग्नींचा एकत्र योग मी शौनक सांगतों. विवाह केला नाहीं तर धर्माचा लोप होईल या भीतीनें रोगरहित अशा कन्येशीं विवाह करावा. तें विवाहकृत्य समाप्त झाल्यावर दुसऱ्यादिवशीं वेगवेगळीं दोन स्थंडिलें घालून दक्षिणेकडच्या स्थंडिलावर ज्येष्ठ पत्नीचा गृह्याग्नि आणि उत्तरेकडच्या स्थंडिलावर कनिष्ठपत्नीचा गृह्याग्नि यथाविधि प्रतिष्ठित करून पहिल्या अग्नीवर ज्येष्ठपत्नीनें अन्वारब्ध होऊन अन्वाधानादिक आज्यभागांत तंत्र करून त्याच अग्नीवर त्या ज्येष्ठ पत्नीनें अन्वारब्ध होऊन 'अग्निमिळे०' ह्या नऊ ऋचांनीं आज्यहोम करावा. नंतर होमशेष समाप्त करावा. नंतर 'अयंतेयोनि०' ह्या मंत्रानें त्या ज्येष्ठाग्नीचा समिधेवर समारोप करून 'प्रत्यवरोह०' या मंत्रानें कनिष्ठाग्नीवर ती समिधा द्यावी. म्हणजे पहिल्या अग्नीचा प्रत्यवरोह करावा. नंतर अग्निध्यान करून दोन पत्नींनीं अन्वारब्ध होऊन अन्वाधानादिक आज्यभागांत तंत्र करून दोन पत्नींनीं अन्वारब्ध होऊन पुढें सांगितलेल्या सहा ऋचांनीं अनुक्रमानें प्रत्येक ऋचेस स्रुचेवर चार वेळ आज्य घेऊन होम करावा. त्या ऋचा ( मंत्र ) येणेंप्रमाणें—'अग्नावग्निश्चरति०' ही एक ऋचा, 'अग्निनाग्निः समिध्यते०' ही एक ऋचा 'अस्तीदमधि०' ह्या तीन ऋचा, 'पाहिनो अग्न०' ही एक ऋचा मिळून ह्या ६ ऋचा समजाव्या. नंतर स्विष्टकृदादिक होमशेष समाप्त करावा. नंतर अग्निहोत्री ब्राह्मणाला दोन गाई द्याव्या, आणि ब्राह्मणभोजन करावें. जर दोन पत्नींतून कोणतीही एक पत्नी मरेल तर त्याच अग्नीनें तिचें दहन करून त्या गृहस्थानें दुसऱ्या स्त्रियेसह आधानविधीनें अग्न्याधान करावें."

**बौधायनसूत्रेतु** अथयदिगृहस्थोद्वेभार्येविंदेतकथंतत्रकुर्यादितियस्मिन्कालेविंदेतोभावग्नीपरिचरेदपराग्निमुपसमाधायपरिस्तीर्याज्यंविलाप्यस्रुचिचतुर्गृहीतंगृहीत्वाऽन्वारब्धायांजुहोतिनमस्तऋषेरादाव्यधायैत्वास्वधायैत्वामानइंद्राभिमतस्त्वदृद्धारिष्टांसएवब्रह्मन्वेदसुस्वाहेत्यथाऽयंतेयोनिर्ऋत्वियइतिसमिधिसमारोपयेत् पूर्वाग्निमुपसमाधायाजुह्वान उद्बुध्यस्वाग्नइतिसमिधमाधायपरिस्तीर्यस्रुचिचतुर्गृहीत्वाद्वयोर्भार्ययोरन्वारब्धयोर्यजमानोभिमृशतियोब्रह्माब्रह्मणइत्येतेनसूक्तेनैकंचतुर्गृहीतंजुहोत्याग्निमुखात्कृत्वापकाज्जुहोतिसंमितंसंकल्पेथामिति पुरोनुवाक्यामनूच्याग्नेपुरीष्येइतियाज्ययाजुहोत्यथाज्याहुतीरुपजुहोतिपुरीष्यमग्निमित्यादि

**स्रुवाकल्पस्विष्टकृत्प्रभृतिसिद्धमाधेनुवरदानादथाग्रेणाग्निंदर्भस्तंबेहुतशेषंनिदधातिब्रह्मजज्ञानंपिताविराजामि- तिद्वाभ्यामितिसंसर्गविधिःकार्यः ॥**

**बौधायनसूत्रांत** तर—"आतां जर गृहस्थाश्रमी दोन भार्या करील तर त्यानें कोणत्या गृह्याग्नीची उपासना करावी? ज्या कालीं दोन भार्या करील त्या कालापासून पुढें दोन अग्नींची उपासना करावी. ती अशी—दुसऱ्या अग्नीची स्थंडिलावर स्थापना करून परिस्तरणादि तंत्र करून आज्य पातळ करून स्रुचेवर चारवेळ घेऊन कनिष्ठ पत्नीनें अन्वारब्ध होऊन 'नमस्त ऋषेराद्यव्यधायैत्वा० स्वाहा' ह्या मंत्रानें होम करावा, नंतर 'अयंते योनिर्ऋत्विय०' ह्या मंत्रानें त्या कनिष्ठाग्नीचा समिधेवर समारोप करावा. नंतर दुसऱ्या स्थंडिलावर पहिल्या अग्नीची स्थापना करून 'आजुह्वान उद्बुध्यस्वाग्ने०' ह्या मंत्रानें त्याजवर ती समिध देऊन परिस्तरणादि तंत्र करून स्रुचेवर चार वेळ आज्य घेऊन दोन भार्यांनीं अन्वारब्ध होऊन यजमानानें स्पर्श करावा. आणि 'यो ब्रह्मा ब्रह्मण०' ह्या सूक्तानें चतुर्गृहीत आज्याचें एक अवदान द्यावें. नंतर अग्निमुखापर्यंत तंत्र करून चरूचा होम करावा. 'संमितं संकल्पेथां०' ह्या पुरोनुवाक्येचा अनुवाद करून 'अग्ने पुरीष्ये०' ह्या याज्येनें होम करावा. नंतर 'पुरीष्यमस्त्वं०' हा अनुवाक समाप्त होईपर्यंत जे मंत्र असतील त्यांनीं आज्याहुतींचा होम करावा. नंतर स्विष्टकृदादि गोप्रदानापर्यंतचें तंत्र करून नंतर अग्नीच्या अग्रभागीं 'ब्रह्मजज्ञानं०' 'पिताविराजां०' ह्या दोन मंत्रांनीं हुतशेष असेल तें दर्भस्तंबावर ठेवावें." याप्रमाणें दोन अग्नींचा संसर्गविधि करावा.

**द्वितीयादिविवाहेकालउक्तःसंग्रहे** प्रमदामृतिवासरादितःपुनरुद्वाहविधिर्वरस्यच विषमेपरि- **वत्सरेशुभोयुगलेचापिमृतिप्रदोभवेत्** तृतीयविवाहेनिषेधो**मात्स्ये** उद्वहेद्रतिसिद्ध्यर्थंतृतीयांनकदाचन मोहा- **दज्ञानतोवापियदिगच्छेत्तुमानुषीम्** नश्यत्येवनसंदेहोगर्गस्यवचनंयथेति **संग्रहे** तृतीयांयदिचोद्वाहेत्तर्हिसा- **विधवाभवेत् चतुर्थादिविवाहार्थंतृतीयेऽर्कंसमुद्वहेत् ॥**

## द्वितीयादिविवाहाविषयीं काल सांगतो—

**संग्रहांत**—"भार्या मृत झालेल्या वराचा पुनः विवाह करावयाचा तो भार्यामृतदिवसापासून विषम वर्षीं करावा, तो शुभ आहे. समवर्षीं केला असतां मृत्युदायक होईल." तिसऱ्या स्त्रियेशीं विवाहाचा निषेध सांगतो—**मात्स्यांत**—"सुरत- सिद्धीसाठीं तिसरी स्त्री कधींही विवाहूं नये. मोहित होऊन किंवा अज्ञानानें जर तिसरी मनुष्यजातीची स्त्री विवाहील तर तो विनाश पावेल, यांत संदेह नाहीं, असें गर्गमुनीचें वचन आहे". **संग्रहांत**—"पुरुष तिसऱ्या स्त्रियेशीं जर विवाह करील तर ती स्त्री विधवा होईल. चवथा वगैरे विवाह करण्यासाठीं तिसरा अर्कासह ( रुईसह ) विवाह करावा."

**तद्विधिस्तु** रविशन्योर्हस्तेवावरःसंकल्प्यस्वतिवाचनंनांदीश्राद्धंकृत्वाचार्यंवृत्वा आकृष्णेनेतिछायायु- **तंसूर्यमर्केसंपूज्यगुडौदनंदत्वा वस्त्रेणतंतुभिरावेष्ट्य** त्रिलोकवासिन्सप्ताश्वछाययासहितोरवे तृतीयोद्वाहजं **दोषंनिवारयसुखंकुर्वितिसंप्रार्थ्यजलेनत्रिःसिंचेत् ममप्रीतिकरायेयंमयासृष्टापुरातनी अर्कजाब्रह्मणासृष्टाअ- स्माकंप्रतिरक्षतु नमस्तेमंगलेदेविनमःसवितुरात्मजे त्राहिमांकृपयादेविपत्नीत्वंमइहागता अर्कत्वंब्रह्मणासृष्टः सर्वप्राणिहितायच वृक्षाणामादिभूतस्त्वंदेवानांप्रीतिवर्धनः तृतीयोद्वाहजंपापंमृत्युंचाशुविनाशयेति ततआ- चार्यःकाश्यपगोत्रामादित्यस्यप्रपौत्रींसवितुःपौत्रीमर्कस्यपुत्रीमर्ककन्याममुकगोत्रायवरायदास्येइति वाग्दानं- कृत्वावरस्यमधुपर्कंकृत्वांऽतःपटंधृत्वास्वस्तिनइतिसूक्तंजप्त्वापूर्ववत्कन्यांदत्वा अर्ककन्यामिमामित्यूहेनकन्या- दानमंत्रमुक्त्वादक्षिणांदद्यात् ततोगायत्र्यावेष्टितसूत्रेणबृहत्सामेतिमंत्रेणकंकणंबध्वाऽर्कस्यचतुर्दिक्षुकुंभेषुवि- ष्णुंसंपूज्याग्निंप्रतिष्ठाप्याघारांतेसंगोभिरितिबृहस्पतये यस्मैत्वाकामकामायेत्यृचाऽग्नयेव्यस्तसमस्तव्याहृतिभि- राज्यंहुत्वाचार्यायगोयुगंदत्वा मयाकृतमिदंकर्मस्थावरेषुजरायुणा अर्कापत्यानिनोदेहितत्सर्वंक्षंतुमर्हसीतिन- मेतिदिक् इतिनिर्णयसिंधौविवाहः ॥**

**त्या अर्कविवाहाचा विधि असा**—वरानें रविवारीं किंवा शनिवारीं अथवा हस्त नक्षत्रावर पुष्पफलांनीं युक्त अशा अर्क ( रुईचे ) वृक्षाजवळ जाऊन संकल्प करून आचार्य वरून स्वस्तिपुण्याहवाचन आणि नांदीश्राद्ध करून अर्ककन्यादाता आचार्य वरावा. नंतर 'आकृष्णेन०' या मंत्रानें अर्कवृक्षावर छायासहित सूर्याची पूजा करून गुडौदनाचा नैवेद्य समर्पण करून

१ हा बौधायनांनीं सांगितलेला अग्निद्वयसंसर्गप्रयोग त्या शाखेचे असतील त्यांनीं सुधारून घ्यावा. त्या मंत्रांची व प्रयोगाची प्रतिसी बरोबर नसल्याकारणानें यथाश्रुत लिहिलें आहे त्याची विद्वानांनीं क्षमा करावी.

त्या वृक्षाला श्वेतवस्त्रानें आणि सुतानें वेष्टन करून 'त्रिलोकवासिन् सप्ताश्व छायया सहितो रवे ॥ तृतीयोद्वाहजं दोषं निवारय सुखं कुरु' ह्या मंत्रानें त्याची प्रार्थना करून उदकानें त्रिवार सिंचन करावें. 'मम प्रीतिकरा येयं मया सृष्टा पुरातनी ॥ अर्कजा ब्रह्मणा सृष्टा अस्माकं प्रतिरक्षतु । नमस्ते मंगले देवि नमः सवितुरात्मजे ॥ त्राहि मां कृपया देवि पत्नी त्वं म इहागता ॥ अर्क त्वं ब्रह्मणा सृष्टः सर्वप्राणिहिताय च ॥ वृक्षाणामादिभूतस्त्वं देवानां प्रीतिवर्धनः ॥ तृतीयोद्वाहजं पापं मृत्युं चाशु विनाशय ॥' ह्या मंत्रानीं प्रदक्षिणा करावी. नंतर कन्यादात्या आचार्यानें 'काश्यपगोत्रां आदित्यस्य प्रपौत्रीं सवितुः पौत्रीं मम पुत्रीमर्ककन्याममुकगोत्रवराय दास्ये' असें वाग्दान करून वराला मधुपर्क करून अं.:पट धरून 'स्वस्तिनो०' या सूक्ताचा जप करून वर सांगितल्याप्रमाणें कन्यादान करून 'अर्ककन्यामिमां विप्र यथाशक्ति विभूषितां ॥ गोत्राय शर्मणे तुभ्यं दत्तां विप्र समाश्रय ॥' असा कन्यादानमंत्र म्हणून दक्षिणा द्यावी नंतर गायत्रीमंत्रेंकरून वेष्टित सूत्रानें 'बृहत्साम०' ह्या मंत्रानें अर्क आणि वर यांना कंकण बांधून अर्कवृक्षाच्या चारही दिशांस चार कलशांवर विष्णूची पूजा करून अग्नीची स्थापना करून आघारान्त तंत्र करून 'संगोभिरांगिरसो०' या मंत्रानें बृहस्पतीला, 'यस्मैत्वाकामकामाय०' या ऋचेनें अग्नीला, आणि व्यस्तसमस्तव्याहृतींनीं अग्नि, वायु, सूर्य, प्रजापति यांना आज्यहोम करून आचार्याला दोन गाई देऊन 'मया कृतमिदं कर्म स्थावरेषु जरायुणा ॥ अर्कापत्यानि नो देहि तत्सर्वं क्षंतुमर्हसि ॥' ह्या मंत्रानें नमस्कार करावा. ही दिशा दाखविली आहे.

### इति विवाहप्रकरणं संपूर्णम्.

**अथाधानम् रत्नमालायाम्** प्राजापत्येपूषभेसद्विदैवेपुष्येज्येष्ठाख्यैंदवेकृत्तिकासु अभ्याधानंह्युत्तराणांत्रयेपिचित्रादित्येकीर्तितंगर्गमुख्यैः **आश्वलायनः** अग्न्याधेयंकृत्तिकासुरोहिण्यांमृगशिरसिफल्गुनीषुविशाखयोरुत्तरयोःप्रोष्ठपदयोरेतेषांकस्मिंश्चिद्वसंतेपर्वणिब्राह्मणआदधीतग्रीष्मवर्षाशरत्सुक्षत्रियवैश्योपकृष्टायस्मिन्कस्मिंश्चिदृतावादधीतसोमेनयक्ष्यमाणोनर्तुंपृच्छेन्ननक्षत्रम् सोमाधानेऋत्वाद्यनालोचनमार्तपरम् अथोखलुयदैवैनंश्रद्धोपनमेदथादधीतसैवास्यर्द्धिरिति सोमेनयक्ष्यमाणोनर्तुंपृच्छेन्ननक्षत्रंतदेतदार्तस्यातिवेलंवाश्रद्धायुक्तस्यभवतीति**बौधायनोक्तेरिति मदनरत्नेवृद्धगार्ग्यः** पुष्याग्नेयत्र्युत्तरादित्यपौष्णज्येष्ठाचित्रार्कद्विदैवेंदुभेषु कुर्युर्वह्न्याधानमाद्यंवसंतग्रीष्मोष्मांतेष्वेवविप्रादिवर्णाः **कालादर्शे** अग्निहोत्रंदर्शपूर्णमासावप्युत्तरायणे उपक्रम्ययथाकालमुपासीरन्द्विजातयः सोमंचपशुबंधंचसर्वाश्चविकृतीरपि सौम्यायनेयथाकालंविदध्युर्गृहमेधिनः अत्रविशेषःपूर्वमुक्तः ॥

## आतां आधान सांगतो—

**रत्नमालेंत**—"रोहिणी, रेवती, विशाखा, पुष्य, ज्येष्ठा, मृग, कृत्तिका, तीन उत्तरा, चित्रा, हस्त, ह्या नक्षत्रांवर गर्गादि मुनींनीं अभ्याधान करावें असें सांगितलें आहे." **आश्वलायन**—"कृत्तिका, रोहिणी, मृगशीर्ष, पूर्वाफल्गुनी, उत्तराफल्गुनी, विशाखा, उत्तराप्रोष्ठपदा हीं नक्षत्रें अग्नीच्या आधानास सांगितलीं आहेत. ह्यांतून कोणत्याही नक्षत्रावर वसंतऋतूंत पर्वाचे ठायीं ब्राह्मणानें आधान करावें. आणि ग्रीष्मऋतु, वर्षाऋतु, शरत्ऋतु यांचे ठायीं अनुक्रमानें क्षत्रिय, वैश्य, उपकृष्ट यांनीं आधान करावें. सोमयाग करावयाचा असेल तर कोणत्याही ऋतूंत आधान करावें. त्याविषयीं ऋतु व नक्षत्र यांचा विचार करूं नये." सोमासाठीं आधानाविषयीं ऋतु वगैरे पाहूं नयेत, असें जें सांगितलें तें आर्ताविषयीं समजावें. कारण, "आतां ज्या वेळीं आधानाची श्रद्धा उत्पन्न होईल त्या वेळी आधान करावें. तोच काल चांगला आहे. सोमाचा याग करावयाचा असेल तर ऋतु, नक्षत्र यांचा प्रश्न करूं नये. हें सांगणें आर्ताला किंवा फार दिवस श्रद्धायुक्त असेल त्याला आहे." असें **बौधायनवचन** आहे. **मदनरत्नांत वृद्धगार्ग्य**—"ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, यांनीं वसंत, ग्रीष्म, वर्षा या ऋतूंत पुष्य, कृत्तिका, तीन उत्तरा, पुनर्वसु, रेवती, ज्येष्ठा, चित्रा, रोहिणी, विशाखा, मृगशीर्ष, ह्या नक्षत्रांवर पहिलें अभ्याधान करावें." **कालादर्शांत**—"अग्निहोत्र, दर्शपूर्णमास यांचा उत्तरायणांत उपक्रम करून द्विजातींनीं यथाकालीं ते करावे. गृहस्थाश्रम्यांनीं सोम, पशुबंध, आणि साऱ्या विकृति ह्या उत्तरायणांत यथाकालीं कराव्या." या विषयाचा विशेषनिर्णय पूर्वी ( प्रथम परिच्छेदांत ) सांगितला आहे.

अग्निहोत्रकालउक्तः **छंदोगपरिशिष्टे** उदितेनुदितेचैवसमयाध्युषितेतथा सर्वथावर्ततेयज्ञइतीयंवैदिकीश्रुतिः एतेषांस्वरूपंतत्रैव रात्रेस्तुषोडशेभागेग्रहनक्षत्रभूषिते कालंत्वनुदितंज्ञात्वाहोमंकुर्याद्विचक्षणः सत्प्रभातसमयेनष्टेनक्षत्रमंडले रविर्यावन्नदृश्येतसमयाध्युषितंचतत् रेखामात्रंप्रदृश्येतरश्मिभिश्चसमन्वितः उदितंतद्विजानीयात्तत्रहोमंप्रकल्पयेत् **आश्वलायनः** उषोदयंव्युषितउदितेवा सायंतुत्रपम प्रादुष्कृतो-

**मइति गौणकालमाहसएव** प्रदोषांतोहोमकालःसंगवांतःप्रातरिति **छंदोगपरिशिष्टे** यावत्सम्यङ्नभाव्यंतेनभस्यृक्षाणिसर्वतः नचलोहितिमापैतितावत्सायंतुहूयते औपासनेऽप्येवम् तस्याग्निहोत्रेणप्रादुष्करणहोमकालौव्याख्यातावित्याश्वलायनोक्तेः ॥

**अग्निहोत्राचा काल** सांगतो **छंदोगपरिशिष्टांत**—"उदित, अनुदित आणि समयाध्युषित ह्या तीन कालीं सर्व प्रकारचा यज्ञ ( होम ) होतो, असें हें वेदांतील श्रुतीनें सांगितलें आहे." ह्या उदितादिकालांचें स्वरूप तेथेंच सांगतो—"ग्रह व नक्षत्रें यांनीं युक्त असा रात्रीच्या शेवटचा सोळावा भाग तो **अनुदित** काल समजावा. त्या कालीं विद्वानानें होम करावा. तसाच प्रभातकालीं सारीं नक्षत्रें अदृश्य झालीं असून जोंपर्यंत सूर्य दिसूं लागला नाहीं, तो काल **समयाध्युषित** समजावा. फक्त रेखा व किरण दिसूं लागले असतां तो **उदित** काल समजावा. त्या कालीं होम करावा." **आश्वलायन**—"उषःकालीं, व्युषितकालीं किंवा उदितकालीं होम करावा." सायंहोमाचा काल तोच सांगतो—"सूर्य अस्तंगत झाला असतां होम करावा." गौणकाल तोच सांगतो—"सायंकालीं प्रदोषापर्यंत होमकाल आहे. आणि प्रातःकालीं संगवकालापर्यंत होमकाल आहे." **छंदोगपरिशिष्टांत**—"आकाशांत सर्व बाजूंस जोंपर्यंत चांगलीं नक्षत्रें दिसूं लागलीं नाहींत, आणि आकाशाचा लालपणा गेला नाहीं तोंपर्यंत सायंकालीं होम करावा." औपासनाच्या होमाविषयीं देखील असाच काल समजावा. कारण, "त्या औपासनाचा प्रादुष्करणकाल, आणि होमकाल हे अग्निहोत्राच्या कालानें सांगितले आहेत" असें **आश्वलायनगृह्यसूत्र** आहे.

**अथावसथ्याधानम् पारस्करः** आवसथ्याधानंदारकालेदायाद्यकालएकेषामिति दायाद्यकालोविभागकालः **मदनरत्नेव्यासः** अग्निर्वैवाहिकोयेननगृहीतःप्रमादिना पितर्युपरतेतेनगृहीतव्यःप्रयत्नतः योऽगृहीत्वाविवाहाग्निंगृहस्थइतिमन्यते अन्नंतस्यनभोक्तव्यंवृथापाकोहिसस्मृतः ज्येष्ठभ्रातरिपितरिवासाग्नौ कनिष्ठस्यपुत्रस्यवाऽग्न्यभावेपिनदोषः तदाहतत्रैव**गार्ग्यः** पितृपाकोपजीवीवाभ्रातृपाकोपजीविकः ज्ञानाध्ययननिष्ठोवानदुष्येताग्निनाविना गृहस्थस्याप्यध्ययनमाह**सत्यव्रतः** अनधीत्यद्विजोवेदंस्नात्वोद्वाह्ययथातथा अधीतेब्रह्मचर्येणसांगंवेदंगुरोर्गृहे इदंचाधानंज्येष्ठेऽकृताधानेनकार्यम् दाराग्निहोत्रसंयोगंकुरुतेयोग्रजेस्थिते परिवेत्तासविज्ञेयःपरिवित्तिस्तुपूर्वजइति**मनुशातातपोक्तेः** स्मार्तेप्येवम् सोदर्येतिष्ठतिज्येष्ठेनकुर्याद्दारसंग्रहम् आवसथ्यंतथाधानंपतितस्तुतथाभवेदितितत्रैव**गार्ग्योक्तेः** आज्ञायांत्वदोषमाह**सुमंतुः** ज्येष्ठोभ्रातायदातिष्ठेदाधानंनैवचाश्रयेत् अनुज्ञातस्तुकुर्वीतशंखस्यवचनंयथा **वृद्धवसिष्ठः** अग्रजस्तुयदाऽनग्निरादध्यादनुजःकथम् अग्रजानुमतःकुर्यादग्निहोत्रंयथाविधि **हारीतः** सोदरगणांतुसर्वेषांपरिवेत्ताकथंभवेत् दारैस्तुपरिविद्यंतेनाग्निहोत्रेणनेज्यया अधिकारिणोपिभ्रातुरनुज्ञयाकुर्यादिति**मदनपारिजातः** विवाहस्त्वनुज्ञयापिनेत्यर्थः सोदरोक्तेरसोदराणांसापत्नदत्तकादीनांनदोषः तदाह**हेमाद्रौ वसिष्ठः** पितृव्यपुत्रान्सापत्नान्परनारीसुतांस्तथा दाराग्निहोत्रसंयोगेनदोषःपरिवेदने परनारीसुतादत्तकादयः देशांतरे विशेषमाह**सएव** अष्टौदशद्वादशवर्षाणिवाज्येष्ठभ्रातरमनिविष्टमप्रतीक्षमाणःप्रायश्चित्तीभवतीति ॥

## आतां औपासनाग्नीचें आधान सांगतो—

**पारस्कर**—"औपासनाग्नीचें आधान विवाहकालीं होतें. कितीएकांच्या मतीं दायविभागकालीं होतें." **मदनरत्नांत व्यास**—"ज्या पुरुषानें प्रमादाच्या योगानें विवाहाग्नि धारण केला नसेल त्यानें पिता मृत झाल्यावर मोठ्या प्रयत्नानें घ्यावा. जो मनुष्य विवाहाग्नि ग्रहण केल्यावांचून आपण गृहस्थ असें मानितो त्याचें अन्न भक्षण करूं नये; कारण, तो वृथापाक म्हटला आहे." ज्येष्ठ भ्राता किंवा पिता हे साग्निक असतील तर कनिष्ठ भ्राता किंवा पुत्र यांचा अग्नि नसला तरी दोष नाहीं. तें सांगतो तेथेंच **गार्ग्य**—"पित्याच्या पाकानें उपजीवन करणारा अथवा भ्रात्याच्या पाकानें उपजीवन करणारा किंवा ज्ञान व अध्ययन यांविषयीं तत्पर असलेला पुरुष विवाहाग्नि नसला तरी दूषित होत नाहीं." गृहस्थाश्रम्यालाही अध्ययन सांगतो **सत्यव्रत**—"द्विजाचें समावर्तनाच्या पूर्वी वेदाध्ययन झालें नसेल तर जसें तसें समावर्तन करून विवाह करून नंतर गुरूच्या घरीं ब्रह्मचर्य धारण करून सांगवेदाचें अध्ययन करावें." हें वर सांगितलेलें श्रौताग्नीचें आधान ज्येष्ठ भ्रात्यानें आधान केलें नसेल तर कनिष्ठानें करूं नये. कारण, "ज्येष्ठ भ्राता अनाहिताग्नि असतां जो कनिष्ठ भ्राता पत्नी आणि अग्निहोत्र यांचा संयोग करितो तो परिवेत्ता जाणावा. आणि ज्येष्ठ भ्राता परिवित्ति होय." असें **मनु, शातातप** यांचें वचन आहे. स्मार्ताधानाविष-

यींही असेंच समजावें. कारण, "सहोदर ज्येष्ठ भ्राता अविवाहित असतां कनिष्ठानें पत्नीसंग्रह आणि आवसथ्याग्नीचें ( स्मार्ताग्नीचें ) आधान करूं नये. करील तर पतित होईल." असें तेथेंच ( **मदनरत्नांतच** ) **गार्ग्यवचन आहे. ज्येष्ठाची आज्ञा** असेल तर दोष नाहीं, असें सांगतो **सुमंतु**—"जेव्हां ज्येष्ठ भ्राता असेल आणि आधान करणार नाहीं तेव्हां त्याची आज्ञा घेऊन कनिष्ठानें आधान करावें, असें शंखाचें वचन आहे." **वृद्धवसिष्ठ**—"जेव्हां ज्येष्ठ भ्राता अनग्निक असेल तेव्हां कनिष्ठानें कसें करावें ? अग्रजाची आज्ञा घेऊन कनिष्ठानें यथाविधि अग्निहोत्र करावें." **हारीत**—"सर्व सहोदर भ्रात्यांमध्यें परिवेत्ता कसा होईल ? ज्येष्ठाला सोडून कनिष्ठ विवाह करील तर तो परिवेत्ता होईल. अग्निहोत्र किंवा यज्ञ केल्यानें परिवेत्ता होत नाहीं." ज्येष्ठ भ्राता अधिकारी असला तरी त्याच्या अनुज्ञेनें कनिष्ठानें आधान करावें, असें **मदनपारिजात** सांगतो. विवाह तर अनुज्ञेनें देखील करूं नये, असें तात्पर्य. वरील हारीतवचनांत 'सोदराणां' म्हणजे सोदरांना दोष, असें सांगितल्यावरून असहोदरांना दोष नाहीं. तेंच सांगतो **हेमाद्रींत वसिष्ठ**—"पितृव्याचे पुत्र, सापत्न भ्राते, परनारीसुत ( दत्तकादिक ), यांना सोडून भार्या आणि अग्निहोत्र यांचा संयोग केला असतां परिवेदनाचा दोष नाहीं." देशांतरीं असेल तर तोच विशेष सांगतो—"देशांतरीं गेलेल्या ज्येष्ठ भ्रात्याची आठ, दहा, किंवा बारा वर्षेंपर्यंत प्रतीक्षा न करणारा ( म्ह० तितक्या वर्षांच्या आंत विवाह करणारा ) प्रायश्चित्ताला योग्य होतो.

क्लीबादावप्यदोषमाह**कात्यायनः** देशांतरस्थक्लीबैकवृषणानसहोदरान् वेश्यानिष्ठांश्चपतितशूद्रतुल्यातिरोगिणः जडमूकांधबधिरकुब्जवामनखंजकान् अतिवृद्धानभार्यांश्चकृषिसक्तान्नृपस्यच धनवृद्धिप्रसक्तांश्चकामतोकारिणस्तथा कुटिलोन्मत्तचोरांश्चपरिविंदन्नदुष्यति **आशार्केपि** उन्मत्तःकिल्बिषीकुष्ठीपतितःक्लीबएववा राजयक्ष्मामयावीचनन्याय्यःस्यात्प्रतीक्षितुम् एवंज्येष्ठेछिन्नहस्तादावपिनपरिवेत्तृत्वम् तदाह**त्रिकांडमंडनः** दर्शेष्टिपौर्णमासेष्टिसोमेज्यामग्निसंग्रहम् अग्निहोत्रंविवाहंचप्रयोगेप्रथमेस्थितम् नकुर्याज्जनकेज्येष्ठेसोदरेचाप्यकुर्वति क्षेत्रजादावनीजानेविद्यमानेपिसोदरे नाधिकारविघातोस्तिभिन्नोदर्येपिचौरसे पंग्वंधमूकबधिरपतितोन्माददूषणे संन्यस्तेच्छिन्नहस्तादौयद्वाषंढादिदूषणे जनकेसोदरेज्येष्ठेकुर्यादेवेतरःक्रियामिति आरोहतंदशतंशकरीर्ममेत्याधाने**मंत्रवर्णाच्च** शकरीरंगुलीः **तंत्ररत्ने**प्युक्तम् अंगवैकल्यात्पूर्वमाहिताग्नित्वेऽधिक्रियैवनित्येषु आधानंतुनकुर्यात्तस्यनैमित्तिकत्वादिति एवंचतुरंगुलेपि षडंगुलकाणविवर्णादेस्त्वस्त्येवाधिकारः एकादशसुदशांतर्गतेः शरीरकार्श्यवाविप्रतिपिद्धमिति**हिरण्यकेशिसूत्रे**कर्माशक्तिहेतोरेवांगवैकल्यस्यनिषेधात् अतएव**कात्यायन**सूत्रेयाज्यश्चप्रथमैस्त्रिभिर्गुणैरितिन्यूनांगस्याप्यधिकारउक्तः **अपरार्के-उशनाः** पितापितामहोयस्यअग्रजोवाथकस्यचित् तपोग्निहोत्रमंत्रेपुनदोषःपरिवेदने पितुराज्ञायामप्यदोषमाह**मदनरत्नेसुमंतुः** पित्रायस्यतुनाधातंकथंपुत्रस्तुकारयेत् अग्निहोत्रेधिकारोस्तिशंखस्यवचनंयथेति नाधातंनाधानंकृतमित्यर्थः एतदाज्ञायामेवेति**हेमाद्रिः** यत्तु पितुःसत्यप्यनुज्ञानेनादधीतकदाचनेति तत्सत्यधिकारेज्ञेयम् ॥

ज्येष्ठभ्राता षंढ वगैरे असताही दोष नाहीं, असें सांगतो **कात्यायन**—"देशांतरीं गेलेला, षंढ, एकवृषण, सहोदरभिन्न, वेश्यासक्त, पतित, शूद्रतुल्य, अतिरोगी, मूर्ख, मुका, आधळा, बहिरा, कुबडा, खुजा, लंगडा, अतिवृद्ध, मृतपत्नीक, कृषिकर्माविषयीं आसक्त, राजाच्या द्रव्यवृद्धीविषयीं आसक्त, स्वेच्छेनें विवाह न करणारा, कुटिल, उन्मत्त, चोर, अशा प्रकारच्या ज्येष्ठास सोडून कनिष्ठ विवाह करील तर तो दोषी होणार नाहीं." **आशार्कांत**ही—"उन्मत्त, पापी, कुष्ठी, पतित, षंढ, आणि राजयक्ष्मी ( क्षयी ) अशा प्रकारच्या ज्येष्ठाची प्रतीक्षा करणें न्याय्य होणार नाहीं." याप्रमाणें ज्येष्ठ हात तुटलेला वगैरे असतांही परिवेत्तृत्व दोष होत नाहीं. तें सांगतो **त्रिकांडमंडन**—"दर्शेष्टि, पौर्णमासेष्टि, सोमयाग, अभ्याधान, अग्निहोत्र, विवाह, यांचा प्रथम प्रयोग जनकपिता व सहोदर ज्येष्ठभ्राता करीत नसतां कनिष्ठानें करूं नये. सहोदर क्षेत्रजादि भ्राता विद्यमान असून तो अग्निहोत्रादि होम करीत नसेल अथवा सापत्न भ्राता असून तो करीत नसेल तर कनिष्ठाला अधिकार नाहीं, असें नाहीं. पांगळा, आंधळा, मुका, बहिरा, पतित, उन्मादरोगी, संन्यास घेतलेला, हात वगैरे तुटलेला अथवा षंढत्व इत्यादि दूषणानें युक्त असा जनक पिता किंवा सहोदर भ्राता असतां कनिष्ठादिकानें अग्निहोत्रादि कर्म करावेंच." आणि आधानाच्या मंत्रांत 'माझ्या दहा अंगुलींप्रत' असेंही सांगितलें आहे, यावरून आधानकालीं दहा अंगुली अवश्य असल्या पाहिजेत असेंही होतें. **तंत्ररत्नांत**ही सांगतो—"अंग विकल ( छिन्नादि ) होण्याच्या पूर्वीं अग्नीचें आधान केलेलें असेल तर पुढें अंग विकल झालें तरी नित्यकर्माविषयीं अधिकारी होईलच. आधान तर अंगवैकल्य असतां करूं नये. कारण, आधान हें नैमित्तिक आहे. याप्रमाणें छिन्न हस्त असतां जसें आधान होत नाहीं.

असेंच एका हातास चार अंगुलि असतांही आधान होत नाहीं. एका हातास सहा अंगुलि असलेला, काणा, वर्णरहित इत्यादिकांना तर अधिकार आहेच. कारण, अकरा अंगुलींत दहा अंगुलि आहेत. "अथवा शरीरकार्य हें प्रतिषिद्ध सांगितलें आहे." या हिरण्यकेशिसूत्रांत ज्या अंगाच्या विकलत्वानें (राहिल्यानें) त्या कर्माविषयीं असमर्थ होईल त्याच अंगविकलत्वाचा निषेध केलेला आहे. म्हणूनच कात्यायनसूत्रांत—"पहिल्या तीन गुणांनीं जो युक्त त्याच्याकडून यजन करावें." असा अंगन्यून असलेल्या पुरुषासही अधिकार सांगितला आहे. अपरार्कात उशना—"ज्याचा पिता, पितामह, आणि ज्येष्ठ भ्राता यांनीं केलेलें नसून जर कोणीं तप, अग्निहोत्र, आणि वेदाध्ययन करील तर त्याला परिवेदनरूप दोष प्राप्त होत नाहीं." पित्याची आज्ञा असतांही दोष नाहीं, असें सांगतो मदनरत्नांत सुमंतु—"ज्याच्या पित्यानें आधान केलें नसेल त्याचा पुत्र आधान कसें करील? त्याला अग्निहोत्राविषयीं अधिकार आहे, असें शंखाचें वचन आहे." हा पुत्राला अग्निहोत्राविषयीं अधिकार पित्याची आज्ञा असतांच आहे, असें हेमाद्रि सांगतो. आतां जें "पित्याची आज्ञा असली तरी पुत्रानें कधींही आधान करूं नये" असें सांगितलें आहे, तें पित्याला अधिकार असतां समजावें.

**अथशूद्रसंस्काराः यमः** शूद्रोप्येवंविधःकार्योविनामंत्रेणसंस्कृतः नकेनचित्समसृजच्छंदसातं प्रजापतिः छंदसामंत्रेण **व्यासोपि** गर्भाधानंपुंसवनंसीमंतोजातकर्मच नामक्रियानिष्क्रमोन्नप्राशनंवपनक्रिया कर्णवेधोव्रतादेशोवेदारंभक्रियाविधिः केशांतःस्नानमुद्वाहोविवाहाग्निपरिग्रहः त्रेताग्निसंग्रहश्चैवसंस्काराःषोडशस्मृताइत्युक्त्वाह नवैताःकर्णवेधांतामंत्रवर्जंस्त्रियाःक्रियाः विवाहोमंत्रतस्तस्याःशूद्रस्यामंत्रतोदशेति **मदनरत्नेहिरण्यगर्भदानेतु** गर्भाधानंपुंसवनंसीमंतोन्नयनंतथा कुर्युर्हिरण्यगर्भस्यततस्तेद्विजपुंगवा इत्युक्त्वा जातकर्मादिकाःकुर्यात्क्रियाःषोडशचापराइत्यत्रस्त्रियाजातकर्मनामकरणनिष्क्रमणान्नप्राशनचूडाविवाहाःषट् शूद्राणांतुषडेतेपंचमहायज्ञाश्चेत्येकादशेत्युक्तम् **रूपनारायणहरिहरभाष्ययोरप्येवम्** **शार्ङ्गधरस्तु** द्विजानांषोडशैवस्युःशूद्राणांद्वादशैवहि पंचैवमिश्रजातीनांसंस्काराःकुलधर्मतः वेदव्रतोपनयनमहानाम्नीमहाव्रतम् विनाद्वादशशूद्राणांसंस्कारानाममंत्रतइत्याह **अपरार्कस्तु** गर्भाधानमृतौपुंसइत्यत्राह एतच्चातुर्वर्ण्यपरम् नद्विजातिमात्रपरम् तथासत्युपनयनंविधायवाच्यंस्यादिति तेनतन्मतेष्टौभवंति **ब्राह्मेतु** विवाहमात्रसंस्कारंशूद्रोपिलभतांसदेत्युक्तम् अत्रसदसच्छूद्रगोचरत्वेनदेशभेदाद्व्यवस्था **यत्तुमनुः** नशूद्रेपातकंकिंचिन्नचसंस्कारमर्हतीति तदर्थमाह**मेधातिथिः** यत्सामान्यतोनिषिद्धंस्तेयानृतादिनतदतिक्रमेस्यपापंयथाद्विजानाम् उपनयनरूपंसंस्कारंचनार्हतीति तेचतूष्णींकार्याः शूद्रोवर्णश्चतुर्थोपिवर्णत्वाद्धर्ममर्हति वेदमंत्रस्वधास्वाहावषट्कारादिभिर्विनेति**व्यासोक्तेः** अमंत्रस्यतुशूद्रस्यमंत्रोविप्रेणगृह्यतेइति **मरीच्युक्तेश्च** इयंपरिभाषासर्वार्था तेनशूद्रधर्मेषुसर्वत्रविप्रेणमंत्रःपठनीयः सोपिपौराणएवेति**शूलपाणिः** एवंस्त्रीणामपीतिदिक् इतिरामकृष्णभट्टात्मजकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौसंस्कारनिर्णयः ॥

## आतां शूद्राचे संस्कार सांगतो—

**यम**—"याप्रमाणें शूद्राचेही संस्कार मंत्रावांचून (अमंत्रक) करावे, प्रजापतीनें कोणत्याही मंत्रासह त्यास उत्पन्न केलेला नाहीं." **व्यासही**—"गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन, चौल, कर्णवेध, व्रतबंध, वेदारंभविधि, केशांत, समावर्तन, विवाह, गृह्याग्नीचें आधान, श्रौताग्नीचें आधान, हे सोळा संस्कार म्हटले आहेत" असें बोलून सांगतो—"यांपैकीं कर्णवेधापर्यंतचे नऊ संस्कार स्त्रियांचे मंत्ररहित करावे. आणि स्त्रियेचा विवाहसंस्कार मंत्रांनीं करावा. शूद्राचे हे दहा संस्कार अमंत्रक करावे." **मदनरत्नांत हिरण्यगर्भदान**प्रकरणांत तर—"हिरण्यगर्भाचे गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, हे संस्कार त्या ब्राह्मणश्रेष्ठांनीं करावे." असें सांगून "इतर जातकर्मादिक षोडश संस्कारही करावे." या ठिकाणीं स्त्रियांना जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन, चौल, विवाह हे सहा संस्कार सांगितले आहेत. शूद्रांना तर—हे सहा संस्कार आणि पंचमहायज्ञ पांच मिळून अकरा आहेत, असें सांगितलें आहे. **रूपनारायण**ग्रंथांत आणि **हरिहरभाष्यांत**ही असेंच सांगितलें आहे. **शार्ङ्गधर** तर—"द्विजांनाच सोळा संस्कार होतात. शूद्रांना बाराच होतात. मिश्रजातींना कुलधर्मानें पांचच संस्कार होतात. वेदव्रत, उपनयन महानाम्नी आणि महाव्रत हे चार वर्ज्य करून बाकीचे बारा संस्कार शूद्रांचे नाममंत्रानें होतात" असें सांगतो. **अपरार्क** तर—"ऋतुकालीं गर्भाधान इत्यादि संस्कार करावे" या वचनावर सांगतो—हें वचन चारी वर्णांविषयीं आहे. द्विजातिविषयक नाहीं. द्विजातिविषयक आहे असें म्हटलें तर, उपनयन विधान करून सांगावयाचें होतें. यावरून **अपरार्काचे मतीं** गर्भाधान, पुंसवन, जातकर्म,

नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन, चूडा, विवाह, हे आठ संस्कार शूद्रांचे होतात. ब्राह्मांत तर "विवाह मात्र संस्कार शूद्रालाही प्राप्त व्हावा." असें सांगितलें आहे. ह्या वर सांगितलेल्या प्रकारांची व्यवस्था सच्छूद्रांना व असच्छूद्रांना धरून करावी, किंवा देशभेदानें करावी. आतां जें मनु—"शूद्राला कोणतेंही पातक नाहीं. आणि तो शूद्र संस्कारास योग्य होत नाहीं." या वचनाचा अर्थ सांगतो मेधातिथि—'जें चौर्य, अनृत इत्यादिक सामान्यतः निषिद्ध म्हणून सांगितलें आहे, त्याचा अतिक्रम ( उलंघन ) केला असतां जसें द्विजांना पाप आहे तसें शूद्राला पाप नाहीं. आणि शूद्र उपनयनरूप संस्काराला योग्य होत नाहीं.' ते शूद्रांचे संस्कार अमंत्रक करावे. कारण, "चवथा शूद्रवर्ण हा वर्ण असल्यामुळें धर्माला योग्य होतो. हा प्रकार वेदमंत्र, स्वधा, स्वाहा, वषट्कार इत्यादिकांवांचून समजावा" असें व्यासवचन आहे. "मंत्ररहित अशा शूद्रांचा मंत्र ब्राह्मणानें उच्चारावा." असें मरीचिवचनही आहे. ही परिभाषा ( नियम ) सर्वत्र लागू आहे. यावरून शूद्रधर्मांचे ठायीं सर्वत्र ठिकाणीं ब्राह्मणानें मंत्र पठण करावा, तो मंत्रही पौराणिकच असावा, असे शूलपाणी सांगतो. याचप्रमाणें स्त्रियांना देखील समजावें. ही दिशा दाखविली आहे.

इति निर्णयसिंधौ भाषाटीकायां संस्कारनिर्णयः ॥

**अथक्षुद्रकालाः तत्रजलाशयस्य वराहः** हस्तेचांबुपपौष्णकेशवमघामित्रोत्तरारोहिणीदेवेज्येषुचशुक्रसौम्यशशभृद्वागीशवारांशके रिक्तांछिद्रतिथिंविहायवृषभेनक्रेकुलीरेघटेमीनेकूपतडागकर्ममुनयःशंसंतिशुद्धेष्टमे हस्तोमृगानुराधापुष्यधनिष्ठोत्तराणिरोहिण्यः शतभिषगित्यारंभेकूपानांशस्यतेभगणः **हेमाद्रौ भविष्ये** तस्मिन्सलिलसंपूर्णेकार्तिकेतुविशेषतः मुनयःकेचिदिच्छंतिव्यतीतेचोत्तरायणे नकालनियमस्तत्रसलिलंतत्रकारणम् **दीपिकापि** मार्तंडेंदूड्डुशुद्धौमुरजिदशयनेमाघपट्कस्यशुक्लेमूलाषाढोत्तराश्विश्रवणगुरुकरेपौष्णशक्राप्यचांद्रे मैत्रेब्राह्मेचपूर्णामदन १३ रवि १२ तिथौसद्वितीयातृतीयेकार्यातोयप्रतिष्ठाज्ञगुरुसितदिनेकालशुद्धेसुलग्ने **वराहः** आग्नेयेयदिकोणेग्रामस्यपुरस्यवाभवतिकूपः नित्यंसकरोतिभयंदाहंचसमानसंप्रायः नैर्ऋत्येबालभयंवनिताक्षयंचवायव्ये दिक्त्रयमेतत्त्यक्त्वाशेषास्तुशुभावहाःकूपाः **वास्तुशास्त्रे** भूतिंपुष्टिंपुत्रहानिंपुरंध्रीनाशंमृत्युंसंपदंशत्रुबाधाम् किंचित्सौख्यंशंभुकोणादिकुर्यात्कूपोमध्येगेहमर्थक्षयंच ॥

## आतां क्षुद्रकाल सांगतो—

त्यांत प्रथम जलाशयाचा काल सांगतो **वराह**—"हस्त, शततारका, रेवती, श्रवण, मघा, अनुराधा, तीन उत्तरा, रोहिणी, पुष्य, ह्या नक्षत्रांवर; शुक्र, बुध, चंद्र, गुरु यांच्या वारी व यांच्या अंशी, रिक्तातिथि आणि छिद्रातिथि वर्ज्य करून बाकीच्या तिथींवर; वृषभ, मकर, कर्क, कुंभ, मीन या लग्नांवर, अष्टमस्थान शुद्ध असतां कूप, तलाव यांचें कर्म प्रशस्त आहे, असें मुनि सागतात." "हस्त, मृग, अनुराधा, पुष्य, धनिष्ठा, तीन उत्तरा, रोहिणी, आणि शततारका हीं नक्षत्रें कूपांच्या आरंभास प्रशस्त आहेत." **हेमाद्रींत भविष्यांत** "तो जलाशय उदकानें संपूर्ण भरलेला असतां विशेषेंकरून कार्तिक मासांत त्या जलाशयाची प्रतिष्ठा करावी. कितीएक मुनि उत्तरायण गेलें असतां प्रतिष्ठा इच्छितात. प्रतिष्ठेविषयीं कालनियम नाहीं. प्रतिष्ठेला कारण उदक आहे. अर्थात् उदक असेल त्या वेळीं प्रतिष्ठा करावी." **दीपिका**ही—"विष्णुशयन ( चातुर्मास्य ) वर्ज्य करून माघापासून सहा मासांच्या शुक्लपक्षांत सूर्य, चंद्र, नक्षत्रे यांची शुद्धि असतां; मूळ, पूर्वाषाढा, तीन उत्तरा, अश्विनी, श्रवण, पुष्य, हस्त, रेवती, ज्येष्ठा, शततारका, मृग, अनुराधा, रोहिणी या नक्षत्रांवर; पंचमी, दशमी, पूर्णिमा, त्रयोदशी, द्वादशी, द्वितीया, तृतीया, या तिथींवर; बुध, बृहस्पति, यांच्या वारीं; शुद्ध कालीं; शुभ लग्नावर; उदकप्रतिष्ठा करावी." **वराह**—"गांवाच्या किंवा नगराच्या आग्नेय दिशेस जर कूप असेल तर तो नेहमीं भय आणि प्रायः मनाला त्रास उत्पन्न करील. नैर्ऋत्य कोणास असेल तर बालकांस भीति होईल. वायव्य कोणास असेल तर स्त्रियांना भीति होईल. म्हणून आग्नेय, नैर्ऋति आणि वायव्य ह्या तीन दिशा सोडून बाकीच्या दिशांस असलेले कूप शुभ आहेत." **वास्तुशास्त्रांत**—"ईशानी दिशेस भूति, पूर्वेस पुष्टि, आग्नेयीस पुत्रनाश, दक्षिणेस स्त्रीनाश, नैर्ऋतीस मृत्यु, पश्चिमेस संपत्ति, वायव्येस शत्रूपासून बाधा, आणि उत्तरेस अल्पसौख्य याप्रमाणें प्रत्येक दिशांस असलेल्या कूपांचीं फळें समजावीं. आणि घरामध्यें असेल तर द्रव्यनाश होईल."

---

१ या अर्थाचा श्लोक जुन्या लेखी प्रतींत नाहीं. २ चतुर्दशी, चतुर्थी, अष्टमी, नवमी, षष्ठी, द्वादशी ह्या पक्षच्छिद्र तिथी सीमंतसंस्कारप्रकरणीं सांगितल्या आहेत, त्यांच्या त्याज्य घटिका तेथेंच पाहाव्या.

**उत्सर्गविधिश्चोक्तोबह्वृचपरिशिष्टे** अथातोवापीकूपतडागयज्ञंव्याख्यास्यामः पुण्येह्न्युदकसमीपेऽग्निंसमाधायवारुणंचरुंश्रपयित्वाज्यभागांतेआज्याहुतीर्जुहुयात् समुद्रज्येष्ठेतिप्रत्यृचं ततोहविषाष्टौतत्त्वायामीतिपंचत्वंनोअग्नेइतिद्वेइमंमेवरुणेतिच स्विष्टकृतंनवमम् मार्जनांतेधेनुंतारयेत् अवतीर्यमाणामनुमंत्रयेत इदंसलिलंपवित्रंकुरुष्वशुद्धाःपूताअमृताःसंतुनित्यम् मांतारयंतीकुरुतीर्थाभिषेकंलोकाल्लोकंतरतेतीर्येतेचेति पुच्छाग्रेन्वारब्धउत्तीर्यापोअस्मान्मातरःशुंधयंत्वित्यथापराजितायांदिश्युत्थापयेत् सूयवसाद्भगवतीतिहिंकृतंचेद्धिंकृण्वतीत्यलंकृतांविप्रायदद्यादितरांवाशक्त्यादक्षिणांततउत्सृजेद्देवपितृमनुष्याःप्रीयंतामितिब्राह्मणान्भोजयित्वास्वस्त्ययनंवाचयीत विस्तरस्तुमात्स्योक्तोऽ**स्मत्कृतजलाशयोत्सर्गविधौ**ज्ञेयः कूपादेरुत्सर्गाकरणेदोषउक्तो**भविष्ये** सदाजलंपवित्रंस्यादपवित्रमसंस्कृतं कुशाग्रेणापिराजेंद्रनस्प्रष्टव्यमसंस्कृतं **तथा** वापीकूपतडागादौयज्जलंस्यादसंस्कृतम् अपेयंतद्भवेत्सर्वंपीत्वाचांद्रायणंचरेत् ।

## कूपादिकांचा उत्सर्गविधि सांगतो—

**बह्वृचपरिशिष्टांत—**"आतां वापी, कूप, तलाव यांचा उत्सर्गसंस्कार सांगतों—शुभ दिवशीं वापी इत्यादि जलाच्या समीप अग्निस्थापना करून त्याजवर वरुणदेवताक चरु शिजवून, आज्यभागापर्यंत तंत्र झाल्यावर 'समुद्रज्येष्ठा०' या सूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें आज्याहुतींचा होम करावा. नंतर चरूच्या आठ आहुति द्याव्या. त्या येणेंप्रमाणें—'तत्त्वायामि०' ह्या पांच, 'त्वंनोअग्ने०' ह्या दोन, आणि 'इमंमेवरुण०' ही एक, मिळून आठ आहुति झाल्यावर स्विष्टकृताची नववी आहुति देऊन प्रायश्चित्तादि होमशेष समाप्त झाल्यावर मार्जनांतीं त्या उदकांत धेनूला तरवावी. त्या तरविण्याचा **मंत्र—'इदं सलिलं पवित्रं कुरुष्व शुद्धाः पूता अमृताः संतु नित्यम् ॥ मां तारयंती कुरु तीर्थाभिषेकं लोकाल्लोकं तरते तीर्यते च ॥'** या मंत्रानें तिचें पुच्छाग्र धरून आंत उतरून 'आपो अस्मान०' या मंत्रानें मार्जन करून नंतर ईशानी दिशेस तिला वर काढावी. वर काढावयाचा **मंत्र—**'सूयवसाद्भगवती०' हा समजावा. ती धेनु हुंकार करूं लागली असेल तर 'हिंकृण्वती०' हा मंत्र म्हणून वर काढावी. नंतर तिला अलंकृत करून ब्राह्मणास द्यावी. अथवा आपल्या शक्तीप्रमाणें इतर दक्षिणा द्यावी. नंतर 'देवपितृमनुष्याः प्रीयंतां' असें म्हणून त्या जलाशयाचा उत्सर्ग करावा. नंतर ब्राह्मणांस भोजन घालून त्यांच्याकडून पुण्याहवाचन म्हणवावें." याचा विस्तार पहावयाचा असेल तर मत्स्यपुराणोक्त आम्हीं ( कमलाकरभट्टानें ) केलेल्या **जलाशयोत्सर्गविधींत** पाहावा. कूपादिकांचा उत्सर्ग केला नसेल तर दोष सांगतो **भविष्यांत—**"उदक हें सर्वदा पवित्र आहे. पण, संस्कार केलेलें नसेल तर तें अपवित्र आहे. हे राजश्रेष्ठा ! असंस्कृत उदकाला कुशाग्रानें देखील स्पर्श करूं नये." तसेंच—"वापी, कूप, तलाव इत्यादिकांत जें संस्कार केलेलें उदक नसेल तें सारें अपेय ( प्राशनास अयोग्य ) होईल. तें प्राशन केलें तर चांद्रायण प्रायश्चित्त करावें."

**अथवृक्षारोपणं चंडेश्वरः** आदित्यचांद्रपितृतिष्यविशाखपौष्णमूलोत्तरात्रयतुरंगमवारुणाश्च एतेषुतारकगणेषुहितंनराणांवृक्षादिरोपणमिहोपदिशंतिधीराः ।

## आतां वृक्षारोपण सांगतो—

**चंडेश्वर—**"पुनर्वसु, मृग, मघा, पुष्य, विशाखा, रेवती, मूल, तीन उत्तरा, अश्विनी, शततारका, ह्या नक्षत्रांवर वृक्षादिक लावणें मनुष्यांस प्रशस्त आहे, असें विद्वान् सांगतात."

**अथमूर्तिप्रतिष्ठा वसिष्ठः** हस्तत्रयेमित्रहरित्रयेचपौष्णद्वयादित्यसुरेज्यभेषु तिस्रोत्तराधातृशशांकभेषुसर्वामरस्थापनमुत्तमंस्यात् **मात्स्ये** चैत्रेवाफाल्गुनेवापिज्येष्ठेवामाधवेतथा माघेवासर्वदेवानांप्रतिष्ठा शुभदाभवेत् **नारद**स्तुचैत्रंनिषेधति विचैत्रेष्वेवमासेषुमाघादिषुचपंचस्विति तेनात्रविकल्पः अत्रमाघमासो विष्णुप्रतिष्ठाव्यतिरिक्तविषयः माघेकर्तुर्विनाशायफाल्गुनेशुभदाभवेदिति **विष्णुधर्मोक्तेरितिहेमाद्रिः मात्स्ये** इढाधनकरीस्फीतातथाप्रतिपदिस्मृता द्वितीयायांधनोपेतातृतीयायांधनप्रदा चतुर्थ्यांनाशमाप्नोति यमस्यस्यात्सुखावहा विनायकस्यदेवस्यतथातत्रहितप्रदा पंचम्यांश्रीयुताकर्तुर्वरदाचतथाभवेत् षष्ठ्यांलक्ष्मीयुतानित्यंसप्तम्यांरोगनाशिनी अष्टम्यांधान्यबहुलानवम्यांचविनश्यति भद्रकाल्याःकृतातत्रकर्तुर्भवतितुष्टये धर्मवृद्धिकरीज्ञेयादशम्यांतुतथातिथौ एकादश्यांतथायुक्ताद्वादश्यांसर्वकामदा त्रयोदश्यांतथाज्ञेयाचतुर्दश्यां-

विनश्यति कृष्णपक्षेपंचदश्यांकर्तुःक्षयकरीभवेत् पंचदश्यांतथाशुक्लेसर्वकामकरीभवेत् अषाढेद्वेतथामूल-मुत्तरात्रयमेवच ज्येष्ठाश्रवणरोहिण्यःपूर्वाभाद्रपदातथा हस्तोश्विनीरेवतीचपुष्योमृगशिरास्तथा अनूराधा-तथास्वातीप्रतिष्ठासुप्रशस्यते **श्रीपतिः** रोहिण्युत्तरपौष्णवैष्णवकरादित्याश्विनीवासवानूराधैंदवजीवभेषुग-दितंविष्णोःप्रतिष्ठापनम् पुष्यश्रुत्यभिजित्सुरेश्वरकयोर्वित्ताधिपस्कंदयोर्मैत्रेतिग्मरुचेःकरेनिर्ऋतिभेदुर्गादिका-नांशुभम् गणपरिवृढरक्षोयक्षभूतासुराणांप्रमथफणिसरस्वत्यादिकानांचपौष्णे श्रवसिसुगतनाम्नोवासवेलोक-पानांनिगदितमखिलानांस्थापनंचस्थिरेषु तेजस्विनीक्षेमकृदग्निदाहविधायिनीस्याद्धनदादृढाच आनंदकृत्कल्प-विनाशिनीचसूर्यादिवारेषुभवेत्प्रतिष्ठा **माधवीयेवैखानसः** मातृभैरववाराहनरसिंहत्रिविक्रमाः महि-षासुरहश्रीचस्थाप्यावैदक्षिणायने वैशब्दोप्यर्थे ।

## आतां मूर्तिप्रतिष्ठा सांगतो—

**वसिष्ठ**—"हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, श्रवण, धनिष्ठा, शततारका, रेवती, अश्विनी, पुनर्वसु, पुष्य, तीन उत्तरा, रोहिणी, मृग या नक्षत्रांवर सर्व देवांची प्रतिष्ठा उत्तम म्हटली आहे." **मात्स्यांत**—"चैत्रांत, फाल्गुनांत किंवा ज्येष्ठांत, अथवा वैशाखांत किंवा माघांत सर्व देवांची प्रतिष्ठा शुभ होईल." **नारद** तर चैत्राचा निषेध करितो, तो असा—"माघादिक जे पांच मास त्यांमध्यें चैत्र वर्ज्य करून इतरांत देवप्रतिष्ठा शुभ होईल." चैत्र मात्स्यवचनानें घेतला आणि नारदानें निषिद्ध केला यावरून चैत्राविषयीं विकल्प समजावा. येथें माघमास जो सांगितला तो विष्णुप्रतिष्ठेवांचून इतरांविषयीं समजावा. कारण, "माघांत केलेली प्रतिष्ठा कर्त्याचा विनाश करणारी होईल. फाल्गुनांत केलेली प्रतिष्ठा शुभ-दायक होईल." असें **विष्णुधर्मांत** वचन आहे, असें **हेमाद्रि** सांगतो. **मात्स्यांत**—"प्रतिपदेस केलेली प्रतिष्ठा धन देणारी, वृद्धि करणारी व दृढ अशी होते. द्वितीयेस धन देणारी होते. तृतीयेस धनप्रद होते. चतुर्थीस प्रतिष्ठा केली असतां नाश होतो. यमाची प्रतिष्ठा शुभावह होते. तशीच चतुर्थीस विनायकाची प्रतिष्ठा हितकारक होते. पंचमीस कर्त्याला वरदायक व लक्ष्मीयुक्त अशी होते. षष्ठीस सदा लक्ष्मीयुक्त होते. सप्तमीस रोगनाश करणारी होते. अष्टमीस बहुत धान्य देणारी होते. नवमीस विनाश करणारी होते. त्या नवमीस भद्रकाली देवीची प्रतिष्ठा केली असतां कर्त्याला आनंद करणारी होते. दशमीस धनवृद्धि करणारी होते. एकादशीस तशीच आहे. द्वादशीस सर्व मनोरथ देणारी होते. त्रयो-दशीस तशीच समजावी. चतुर्दशीस विनाश करणारी होते. अमावास्येस केलेली प्रतिष्ठा कर्त्याचा क्षय करणारी होईल. आणि पौर्णिमेस केलेली प्रतिष्ठा सर्व काम पूर्ण करणारी होईल पूर्वाषाढा, मूल, तीन उत्तरा, ज्येष्ठा, श्रवण, रोहिणी, पूर्वाभाद्रपदा, हस्त, अश्विनी, रेवती, पुष्य, मृगशीर्ष, अनुराधा, स्वाती, हीं नक्षत्रें देवांच्या प्रतिष्ठेविषयीं प्रशस्त आहेत." **श्रीपति**—"रोहिणी, उत्तरा, रेवती, श्रवण, हस्त, पुनर्वसु, अश्विनी, धनिष्ठा, अनुराधा, मृग, पुष्य, ह्या नक्षत्रांवर विष्णूची प्रतिष्ठा शुभ आहे. पुष्य, श्रवण, अभिजित्, या नक्षत्रावर इंद्र व ब्रह्मदेव यांची; अनुराधांवर कुबेर व कार्तिकस्वामी यांची; हस्तावर सूर्याची; आणि मूळावर दुर्गादेवी इत्यादिकांची प्रतिष्ठा शुभ आहे. गणाधिप, राक्षस, यक्ष, भूतें, दैत्य, प्रमथ, शेष, सरस्वती, इत्यादिकांची प्रतिष्ठा रेवतीवर; बुद्धाची प्रतिष्ठा श्रवणावर; लोकपालांची प्रतिष्ठा धनिष्ठांवर; आणि सर्वांची प्रतिष्ठा स्थिर नक्षत्रांवर सांगितली आहे. रविवारीं तेजस्विनी; सोमवारीं कल्याणकारी; मंगळवारीं अग्निदाहकारी; बुधवारीं धन देणारी; गुरुवारीं दृढ; शुक्रवारीं आनंदकारी; शनिवारीं कल्पांतीं विनाश पावणारी अशी प्रतिष्ठा होते." **माधवीयांत वैखानस**—"मातृका, भैरव, वराह, नारसिंह, त्रिविक्रम आणि देवी यांची प्रतिष्ठा दक्षिणायनांतही करावी."

**लिंगप्रतिष्ठायां**विशेषः **हेमाद्रौलक्षणसमुच्चये** उत्तराशागतेभानौलिंगस्थापनमुत्तमम् दक्षिणेत्व-यनेपूज्यत्रिवर्षाधेभयावहम् स्वगृहेस्थापनंनेष्टंतस्माद्वैदक्षिणायने स्थापनंतुप्रकर्तव्यंशिशिरादावृतुत्रये प्रावृषि-स्थापितंलिंगंभवेद्वरदयोगदम् हेमंतेज्ञानदंचैवलिंगस्यारोपणंमतम् **रत्नावल्याम्** माघफाल्गुनवैशाखज्ये-ष्ठाषाढेषुपंचसु मासेषुशुक्लपक्षेषुलिंगस्थापनमुत्तमम् विष्णोरप्याहतत्रैव**वैखानसः** मार्गशीर्षादिमासौद्वौनिं-दितौब्रह्मणापुरा मासेषुफाल्गुनःश्रेष्ठश्चैत्रोवैशाखएवच वृषेवाप्यश्वयुङ्मासेश्रावणेमासिवाभवेत् **बौधायन-सूत्रे**विष्णुप्रतिष्ठामुपक्रम्यद्वादश्यांश्रोणायांवायानिचान्यानिपुण्यनक्षत्राणीति कृत्तिकादिविशाखांतेष्वित्यर्थः सर्वदेवेषु**मासविशेषोहेमाद्रौविष्णुधर्मे** माघेकर्तुर्विनाशायफाल्गुनेशुभदाभवेत् लोकानंदकरीचैत्रे-वैशाखेवरसंयुता आज्ञायुतासदाज्येष्ठेआषाढेधर्मवृद्धिदा श्रावणेधनहीनास्यात्प्रोष्ठपादेविनश्यति आश्विने-नाशमाप्नोतिवह्निनाकार्तिकेतथा सौम्येसौभाग्यमतुलंपौषेपुष्टिरनुत्तमा दोषान्विताधिमासेस्यात्कर्तुरात्मनएव-

वेति अत्रश्रावणाश्विनयोर्निषेधोमार्गशीर्षविधिश्चविष्णुव्यतिरिक्तविषयः पूर्वोक्तवचनादितिहेमाद्रिः माघश्रावणभाद्रपदनिषेधःशिवव्यतिरिक्तविषयः तत्रतस्योक्तेः **देवीस्थापने**तत्रैवविशेषो**देवीपुराणे** देव्यामाघेश्विनेमासेउत्तमासर्वकामदा **तथा** नतिथिर्नचनक्षत्रंनोपवासोत्रकारणम् सर्वकालंप्रकर्तव्यंकृष्ण- पक्षेविशेषतः अन्यश्चात्रविचारोहेमाद्रौज्ञेयः **नारदः** हंत्यर्थहीनाकर्तारंमंत्रहीनातुऋत्विजम् स्त्रियंलक्षण- हीनातुनप्रतिष्ठासमोरिपुः ॥

**लिंगप्रतिष्ठेविषयीं**—विशेष सांगतो **हेमाद्रींत लक्षणसमुच्चयांत**—"सूर्याचे उत्तरायणांत लिंगाचें स्थापन उत्तम आहे. दक्षिणायनांत लिंगाचें स्थापन केलें असतां दीड वर्षाचे आंत भय उत्पन्न करणारें होतें. तस्मात् कारणात् दक्षिणायनांत आपल्या घरीं लिंगस्थापना इष्ट नाहीं. शिशिर, वसंत, ग्रीष्म या तीन ऋतूंत लिंगाचें स्थापन करावें. प्रावृड् ऋतूंत लिंगस्थापन केलें असतां तें वरदायक आणि योगदायक होतें. आणि हेमंत ऋतूंत लिंगाचें स्थापन ज्ञानदायक होतें." **रत्नावलींत**—"माघ, फाल्गुन, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, या पांच मासांत शुक्लपक्षीं लिंगाचें स्थापन उत्तम आहे." विष्णूचेंही स्थापन सांगतो तेथेंच **वैखानस**—"मार्गशीर्ष आणि पौष हे दोन मास ब्रह्मदेवानें पूर्वी निंदित केले आहेत. मासांमध्यें फाल्गुन, चैत्र आणि वैशाख हे श्रेष्ठ आहेत. अथवा ज्येष्ठ किंवा आश्विन किंवा श्रावण या मासांत विष्णूची स्थापना करावी." **बौधायनसूत्रांत**—विष्णुप्रतिष्ठेचा उपक्रम करून सांगतो—"द्वादशीस श्रवणावर किंवा जीं इतर पुण्यनक्षत्रें ( कृत्तिकादिक विशाखांपर्यंत ) त्यांजवर विष्णूची स्थापना करावी. सर्व देवांविषयीं विशेष मास सांगतो **हेमाद्रींत विष्णुधर्मांत**—"माघांत केलेली प्रतिष्ठा कर्त्याचा नाश करणारी होते. फाल्गुनांत शुभदायक होते. चैत्रांत लोकांना आनंद करणारी, वैशाखांत वर देणारी, ज्येष्ठांत आज्ञाधारक, आषाढांत धर्म वाढविणारी, श्रावणांत धनरहिता, भाद्रपदांत विनाश पावणारी, आश्विनांत नाश पावणारी, कार्तिकांत अग्नीच्या योगानें नाश पावणारी, मार्गशीर्षांत अतुल सौभाग्यदायक आणि पौषांत उत्तम पुष्टिदायक अशी होते. अधिक मासांत केलेली प्रतिष्ठा स्वतः दोषयुक्त होऊन कर्त्याला दोषकारक होते." या वचनांत श्रावण आणि आश्विन यांचा निषेध ( नियत्व ) केला आणि मार्गशीर्ष व पौष यांचा विधि केला तो विष्णूवांचून इतरांविषयीं समजावा. कारण, याविषयीं वर सांगितलेलें वैखानसवचन आहे, असें **हेमाद्रि** सांगतो. माघ, श्रावण, भाद्रपद यांचा निषेध शिवव्यतिरिक्तविषयक आहे. कारण, त्या मासांत शिवलिंगाची स्थापना सांगितली आहे. देवी- स्थापनाविषयीं तेथेंच सांगतो—**देवीपुराणांत**—"माघांत व आश्विनांत देवीची स्थापना सर्वकाल उत्तम आहे." तसेंच— "देवीच्या स्थापनाविषयीं तिथि, नक्षत्र, उपवास यांचें कारण नाहीं. सर्वकाल देवीचें स्थापन करावें. कृष्णपक्षांत विशेषेंकरून करावें," याविषयींचा इतर विशेष विचार **हेमाद्रीं**तून पाहावा. **नारद**—"अर्थ ( द्रव्य ) हीन प्रतिष्ठा कर्त्याचा नाश करिते. मंत्रहीन प्रतिष्ठा ऋत्विजांचा नाश करिते. लक्षणहीन प्रतिष्ठा स्त्रियेचा नाश करिते. यास्तव प्रतिष्ठेसारखा दुसरा रिपु नाहीं."

**अत्राधिकारिणउक्ताः कृत्यकल्पतरौदेवीपुराणे** वर्णाश्रमविभेदेनदेवाःस्थाप्यास्तुनान्यथा ब्रह्मातुब्राह्मणैःस्थाप्योगायत्रीसहितःप्रभुः चतुर्वर्णैस्तथाविष्णुःप्रतिष्ठाप्यःसुखार्थिभिः भैरवोपिचतुर्वर्णैरंत्य- जानांतथामतः मातरःसर्वलोकैस्तुस्थाप्याःपूज्याःसुरोत्तमाः लिंगंगृहीयतिर्वापिसंस्थाप्यतुयजेत्सदा **शिव- सर्वस्वेभविष्ये** यस्तुपूजयतेलिंगंदेवादिंमांजगत्पतिम् ब्राह्मणःक्षत्रियोवैश्यःशूद्रोवामत्परायणः तस्य- प्रीतःप्रदास्यामिशुभाँल्लोकाननुत्तमान् **तिथितत्त्वेस्कांदे** शूद्रःकर्माणियोनित्यंस्वीयानिकुरुतेप्रिये तस्याह- मर्चांगृह्णामिचंद्रखंडविभूषिते ब्रह्मचारीगृहस्थोवावानप्रस्थश्चसुव्रते एवंदिनेदिनेदेवंपूजयेदंबिकापतिम् संन्या- सीदेवदेवेशंप्रणवेनैवपूजयेत् नमोंतेनशिवेनैवस्त्रीणांपूजाविधीयते एतच्चपुराणप्रसिद्धजीर्णलिंगपूजाविषयम् **यानितु त्रिस्थलीसेतौनारदीये** यःशूद्रेणार्चितंलिंगंविष्णुंवाप्रणमेन्नरः नतस्यनिष्कृतिर्दृष्टाप्रायश्चित्ता- युतैरपि नमेद्यःशूद्रसंस्पृष्टंलिंगंवाहरिमेववा ससर्वयातनाभोगीयावदाचंद्रतारकम् पाखंडपूजितंलिंगंनत्वा पाखंडतांव्रजेत् आभीरपूजितंलिंगंनत्वानरकमश्नुते योषिद्भिःपूजितंलिंगंविष्णुंवापिनमेत्तुयः सकोटिकुलसं- युक्तमाकल्पंरौरवंवसेदित्यादीनि**तानि**नूतनस्थापितलिंगादिविषयाणि यदाप्रतिष्ठितंलिंगंमंत्रविद्भिर्यथाविधि- तदाप्रभृतिशूद्रश्चयोषिद्वापिनसंस्पृशेदितितत्रैवोक्तेः ।

## मूर्तिप्रतिष्ठेविषयीं अधिकारी सांगतो.

**कृत्यकल्पतरूंत देवीपुराणांत**—"ज्या वर्णास व आश्रमास ज्या देवाची प्रतिष्ठा सांगितली असेल त्या वर्णानें त्या आश्रमांत त्या देवाची प्रतिष्ठा करावी. इतरानें करूं नये. गायत्रीसहित ब्रह्मदेवाची स्थापना ब्राह्मणांनीं करावी. विष्णूची

स्थापना सुखेच्छु अशा चारही वर्णांनीं करावी. आणि भैरवाची स्थापना चार वर्णांनीं व अंत्यजांनीं करावी. मातांची स्थापना सर्व लोकांनीं करावी आणि पूजा करावी. लिंगाची स्थापना गृहस्थाश्रम्यानें किंवा संन्याशानें करून त्याचें सतत पूजन करावें." **शिवसर्वस्वांत भविष्यांत**—भगवान् शंकर म्हणतात—"सकल देवांचा आदिभूत व जगताचा पति अशा माझी पूजा लिंगाचे ठायीं जो करितो; मग तो ब्राह्मण असो, क्षत्रिय असो, वैश्य असो किंवा मत्परायण शूद्र असो, त्याला मी संतुष्ट होऊन उत्तमोत्तम असे शुभ लोक देतों." **तिथितत्त्वांत स्कांदांत**—भगवान् शंकर म्हणतात—"हे प्रिये, जो शूद्र आपणास सांगितलेलीं कर्मे नित्य करितो त्यानें केलेली पूजा मी घेतों. चांगलें व्रत धारण करणारा ब्रह्मचारी, किंवा गृहस्थाश्रमी अथवा वानप्रस्थ यानें प्रतिदिवशीं भवानीपति शंकराची पूजा करावी. संन्याशानें शंकराची पूजा प्रणवानेंच करावी. स्त्रियांना शंकराची पूजा 'शिवायनमः' याच मंत्रानें सांगितली आहे." स्त्रिया, शूद्र इत्यादिकांस जो पूजेचा प्रकार सांगितला तो पुराणप्रसिद्ध जें पुरातन लिंग त्याच्या पूजेविषयीं समजावा. आतां जीं **त्रिस्थलीसेतूंत नारदीयांत**—"शूद्रानें पूजित लिंगास किंवा विष्णूस जो मनुष्य नमस्कार करील त्याची निष्कृति ( पापनिरास ) दहा हजार प्रायश्चित्तांनीं देखील कोठें पाहिली नाहीं. जो मनुष्य शूद्रानें स्पर्श केलेल्या लिंगास किंवा विष्णूस नमस्कार करील तो मनुष्य चंद्र व तारका आहेत तोंपर्यंत सर्व यातना भोगणारा होईल. पाखंडानें पूजित लिंगास नमस्कार केल्यानें पाखंडी होईल. गवळयानें पूजित लिंगास नमस्कार केल्यानें नरकप्राप्ति होते. स्त्रियांनीं पूजित लिंगास किंवा विष्णूस जो नमस्कार करील तो कोटि कुलांनीं सहित कल्पपर्यंत रौरव नरकांत वास करील." इत्यादिक वचनें तीं नवीन स्थापित लिंग, प्रतिमा इत्यादिविषयक समजावीं. कारण, "ज्या वेळीं मंत्रवेत्त्या ब्राह्मणांनीं यथाविधि लिंगाची प्रतिष्ठा केली असेल त्या वेळेपासून पुढें शूद्र किंवा स्त्रिया यांनीं त्याला स्पर्श करूं नये" असें तेथेंच सांगितलें आहे.

प्रतिष्ठायांतुशूद्रादीनांनाधिकारः स्त्रीणामनुपनीतानांशूद्राणांचजनेश्वर स्थापनेनाधिकारोस्तिविष्णोर्वाशंकरस्यवा यःशूद्रसंस्कृतंलिंगंविष्णुंवापिनमेन्नरः इहैवानंतदुःखानिपश्यत्यामुष्मिकेकिमु शूद्रोवानुपनीतोवास्त्रियोवापतितोपिवा केशवंवाशिवंवापिस्पृष्ट्वानरकमश्नुतेइति **बृहन्नारदीयस्कांदोक्तेरितित्रिस्थलीसेतौपितामहचरणाः** चतुर्वर्णैरितिपूर्वोक्तवचनाद्विष्णवादिप्रतिष्ठायांशूद्रस्यविकल्पइतियुक्तंपश्यामः तत्रैव**गौतमः** शिवार्चनंसदाप्येवंशुचिःकुर्यादुदङ्मुखः **वाचस्पतिधृतम्** प्राक्पश्चिमोदगास्यस्तुप्रातःसायंनिशासुचेति **प्रयोगपारिजातेगृह्यपरिशिष्टे** प्रतिमाःप्राङ्मुखीरुदङ्मुखोयजेताऽन्यत्रप्राङ्मुखः एतच्चस्थिरप्रतिमाविषयं अन्यत्र चलार्चासु ।

प्रतिष्ठेविषयीं तर शूद्रादिकांना अधिकार नाहीं. कारण, "स्त्रिया, उपनयन न झालेले, आणि शूद्र यांना विष्णूच्या किंवा शंकराच्या स्थापनाविषयीं अधिकार नाहीं. जो मनुष्य शूद्रानें स्थापित लिंगास किंवा विष्णूस नमस्कार करील तो येथेंच अत्यंत दुःखें अनुभवितो; मग परलोकीं गेल्यावर अनुभवील हें काय सांगावयाचें आहे? शूद्र किंवा अनुपनीत अथवा स्त्री किंवा पतित यांनीं विष्णूला किंवा शंकराला स्पर्शल्यानें त्यांस नरकप्राप्ति होते" असें **बृहन्नारदीयांत स्कांद**वचन आहे, असें **त्रिस्थलीसेतूंत** आमच्या पितामहांनीं (नारायणभट्टांनीं) सांगितलें आहे. 'चतुर्वर्णैस्तथा विष्णुः प्रतिष्ठाप्यः' ह्या वर सांगितलेल्या **देवीपुराण**वचनावरून विष्णु इत्यादिकांचे प्रतिष्ठेविषयीं शूद्राला विकल्प योग्य आहे, असें आम्हीं ( कमलाकरभट्ट ) समजतों. तेथेंच **गौतम** 'याप्रमाणें शुचिर्भूत होऊन उत्तरेकडे मुख करून सर्वदा शिवपूजा करावी." वाचस्पतीनें धरलेलें वचन—"प्रातःकालीं प्राङ्मुख होऊन पूजा करावी. सायंकालीं पश्चिमाभिमुख होऊन पूजा करावी. रात्रीं उत्तराभिमुख होऊन पूजा करावी." **प्रयोगपारिजातांत गृह्यपरिशिष्टांत**—"प्राङ्मुखप्रतिमांची पूजा उदङ्मुख बसून करावी. चलप्रतिमांची पूजा प्राङ्मुख होऊन करावी." या वचनांत उदङ्मुख बसून जी पूजा सांगितली ती स्थिर प्रतिमांची समजावी.

**अथप्रतिमाः भार्गवार्चनदीपिकायांभविष्ये** सौवर्णीराजतीताम्रीमृन्मयीचयथाभवेत्पाषाणधातुयुक्तावारीतिकांस्यमयीतथा रीतिःपित्तलं शुद्धदारुमयीवापिदेवतार्चाप्रशस्यते अंगुष्ठपर्वादारभ्यवितस्तियावदेवतु गृहेषुप्रतिमाकार्यानाधिकाशस्यतेबुधैः **पंचरात्रेतु** मृद्दारुलाक्षागोमेदमधूच्छिष्टमयींनत्विति निषेधउक्तः **भागवते** शैलीदारुमयीलौहीलेप्यालेख्याचसैकती मनोमयीमणिमयीप्रतिमाष्टविधास्मृता काष्ठंमधुकस्यैव तत्रकाष्ठेषुमधुकमानीयचवसुंधरे कृत्वातत्प्रतिमांचैवप्रतिष्ठाविधिनार्चयेदिति**वाराहोक्तेः** **देवीपुराणे** सप्तांगुलंसमारभ्ययावद्द्वादशांगुलम् गृहेष्वर्चासमाख्याताप्रासादेवाधिकाशुभा ।

## आतां देवतांच्या प्रतिमा सांगतो.

**भार्गवार्चनदीपिकेंत भविष्यांत**—"सोन्याची, रुप्याची, तांब्याची, मातीची, किंवा पाषाणाची, पितळेची ...

कांस्याची अथवा शुद्ध काष्ठाची देवताप्रतिमा प्रशस्त आहे. अंगुष्ठपर्वापासून एक वितीचे आंत उंचीची प्रतिमा घरांत असावी. वितीपेक्षां अधिक उंचीची प्रतिमा घरांत प्रशस्त नाहीं, असें विद्वान् सांगतात." **पंचरात्रांत** तर—"माती, काष्ठ, लाक्षा, गोमेद, मेण यांची प्रतिमा करूं नये" असा निषेध सांगितला आहे. **श्रीमद्भागवतांत**—"पाषाणाची, काष्ठाची, लोहाची (धातूची), मृत्तिकेनें वगैरे लिंपलेली, रंगांनीं काढलेली, वाळूची, मनांत आणलेली, आणि मण्याची केलेली अशी प्रतिमा आठ प्रकारची सांगितली आहे." काष्ठाची प्रतिमा सांगितली, तें काष्ठ मोहाचेंच असावें. कारण, "त्या काष्ठांमध्यें मधुकाचें ( मोहाचें ) काष्ठ आणून त्याची प्रतिमा करून प्रतिष्ठाविधीनें तिची पूजा करावी." असें **वराहपुराण**वचन आहे. **देवीपुराणांत**—"सात अंगुलांपासून बारा अंगुलेंपर्यंत उंचीची घरांत अर्चा करावी. याच्याहून मोठी प्रतिमा मंदिरांत शुभकारक होते.

**तिथितत्त्वेकालिकापुराणे** प्रतिमायाःकपोलौद्वौस्पृष्ट्वादक्षिणपाणिना प्राणप्रतिष्ठांकुर्वीततस्यदेवस्य- **वाहरेः** अन्येपामपिदेवानांप्रतिमासुचपार्थिव प्राणप्रतिष्ठाकर्तव्यातस्यांदेवत्वसिद्धये वासुदेवस्यबीजेनतद्वि- ष्णोरित्यनेनच तथैवहृदयेंगुष्ठंदत्वाशश्वन्मंत्रवित् एभिर्मंत्रैःप्रतिष्ठांतुहृदयेपिसमाचरेत् अस्यैप्राणाःप्रतिष्ठंतु- अस्यैप्राणाःक्षरंतुच अस्यैदेवत्वमर्चायैमामहेतिचकश्चन **हयशीर्षपंचरात्रे** अर्चकस्यतपोयोगादर्चनस्या- तिशायनात् आभिरूप्याच्चबिंबानांदेवःसान्निध्यमृच्छति **प्रयोगपारिजातेव्यासः** प्रतिमापट्टयंत्राणां नित्यंस्नानंनकारयेत् कारयेत्पर्वदिवसेयदावामलधारणम् ।

**तिथितत्त्वांत कालिकापुराणांत**—"प्रतिमेच्या दोन कपोलांस (गालांस) दक्षिण हस्तानें स्पर्श करून त्या प्रतिमे- वर हरीची प्राणप्रतिष्ठा करावी. इतरही देवनांच्या प्रतिमांचे ठायीं देवपणा सिद्ध होण्यासाठीं प्राणप्रतिष्ठा करावी. मंत्रवेत्त्या ब्राह्मणानें वासुदेवाचें बीज आणि 'तद्विष्णोः०' हा मंत्र उच्चारून अर्चेच्या हृदयाचे ठायीं वारंवार हात देऊन प्राणप्रतिष्ठा करावी. तशीच पुढील मंत्रानेंही हृदयाचे ठायीं हात देऊन प्राणप्रतिष्ठा करावी. तो **मंत्र—"अस्यै प्राणाः प्रतिष्ठंतु अस्यै प्राणाः क्षरंतु च ॥ अस्यै देवत्वमर्चायै मामहेति च कश्चन ॥" हयशीर्षपंचरात्रांत**—"अर्चा कर- णाऱ्याच्या तपःसामर्थ्यानें, पूजेचा अतिशय झाल्यानें आणि प्रतिमांच्या सौंदर्यानें प्रतिमांचे ठायीं देवाचें सांनिध्य होतें." **प्रयोगपारिजातांत व्यास**—"प्रतिमा, पट्ट आणि यंत्रें यांना नित्य स्नान घालूं नये. पर्वदिवशीं स्नान घालावें. किंवा जेव्हां त्यांच्यावर मळ धरेल तेव्हां स्नान घालावें."

लिंगेविशेष**स्तिथितत्त्वेभविष्ये** मृद्भस्मगोशकृत्पिष्टताम्रकांस्यमयंतथा कृत्वालिंगंसकृत्पूज्यवसेत्क- ल्पायुतंदिवि वार्क्षंवित्तप्रदंलिंगंस्फाटिकंसर्वकामदं कृत्वापूजयविप्रेंद्रलप्स्यसेवांछितंफलम् तत्रैव**कालकौ- मुद्यांस्कांदे** अक्षादल्पपरीमाणंनलिंगंकुत्रचिन्नरः कुर्वीतांगुष्ठतोह्रस्वंनकदाचित्समाचरेत् अक्षोऽशीति- गुंजाः गुंजाःपंचाल्पमापकः तेषोडशाक्षःकर्षोस्त्रीत्यमरकोशात् **प्रयोगपारिजातेक्रियासारे** नवाष्टस- प्तांगुलिकंलिंगंश्रेष्ठमिहोच्यते पट्पंचकचतुर्मानंमध्यमंत्रिविधंस्मृतम् त्रिद्व्येकांगुलिमानंयत्त्रिविधंतत्कनीयसम् एवंनवविधंप्रोक्तंचरलिंगंयथाक्रमम् ।

लिंगाविषयीं विशेष सांगतो **तिथितत्त्वांत भविष्यांत**—"मृत्तिका, भस्म, गोमय, पीठ, तांबें, कांसें यांपैकीं कोणत्याही पदार्थाचें लिंग करून एकवार त्याची पूजा केल्यानें अयुत (दहाहजार) कल्पपर्यंत स्वर्गांत त्याचा वास होईल. वृक्षाचें लिंग द्रव्य देणारें आहे. स्फटिकाचें लिंग सर्व काम देणारें आहे. हे राजश्रेष्ठा ! तें लिंग तूं करून त्याची पूजा कर म्हणजे वांछित फल पावशील." तेथेंच **कालकौमुदींत स्कांदांत**—"मनुष्यानें अक्षाहून अल्प प्रमाणाचें लिंग कोठेंही करूं नये. आणि अंगुष्ठाहून आंखूड लिंग कधींही करूं नये." अक्ष म्ह० ८० गुंजा. कारण, "पांच गुंजा म्हणजे १ मासा. आणि ते सोळा मासे म्हणजे एक अक्ष. त्यालाच कर्ष असें म्हणतात." असा **अमरकोश** आहे. **प्रयोगपारिजातांत क्रियासारांत**— "नऊ, आठ, किंवा सात अंगुलें प्रमाणाचें तीन प्रकारचें लिंग श्रेष्ठ म्हटलें आहे. सहा, पांच आणि चार अंगुलें प्रमाणाचें तीन प्रकारचें लिंग मध्यम म्हटलें आहे. आणि तीन, दोन, व एक अंगुल प्रमाणाचें तीन प्रकारचें लिंग कनिष्ठ म्हटलें आहे. याप्रमाणें चरलिंग अनुक्रमानें नऊ प्रकारचें सांगितलें आहे."

**अथपंचसूत्रीनिर्णयः गौतमीतंत्रे** लिंगमस्तकविस्तारोलिंगोच्छ्रायसमोमतः परिधिस्तत्त्रिगुणि- तस्तद्वत्पीठंव्ययस्थितम् प्रनालिकातथैवस्यात्पंचसूत्रविनिर्णयः **अत्रेदंतत्त्वम्** लिंगमस्तकविस्तारंलिंगोच्छ्र- तासमंकृत्वातत्त्रिगुणसूत्रवेष्टनार्हंलिंगस्थौल्यंकृत्वातत्समंवृत्तंचतुरस्रंवापीठविस्तारमधश्चोर्ध्वंचकुर्यात् पीठोच्छ्र-

तातुलिंगोच्चतातोद्विगुणा पीठमध्येलिंगाद्विगुणस्थूलंपीठोच्चता तृतीयांशेनकंठंकृत्वातस्योर्ध्वंअधश्चसमंवप्रद्वयं- त्रयंवाकृत्वालिंगविस्तारषष्ठांशेनपीठोपरिबाह्यमेखलांकृत्वातदंतःसंलग्नंतत्समंखातंकृत्वा पीठाद्बहिर्लिंगसम- दीर्घांपीठार्धदीर्घांवामूलेदैर्घ्यसमविस्तारांअग्रेतदर्धविस्तारांतृतीयांशेनमध्येखातांपीठवत्समेखलांप्रनालिकांकु- र्यादिति अत्रमूलं**सिद्धांतशेखरेशैवागमे**चज्ञेयम् ।

## आतां पंचसूत्रीनिर्णय सांगतो—

**गौतमीतंत्रांत**—"लिंगाचे मस्तकाचा विस्तार, लिंगाची उंची, लिंगाचें स्थूलत्व, पीठविस्तार आणि प्रणालिका यांच्या मानाचीं पांच सूत्रें म्हटलीं आहेत. लिंगाचे मस्तकाचा विस्तार लिंगाचे उंचीइतका असावा. त्याच्या तिप्पट परिधि (लिंग- स्थौल्य) असावा. तसेंच पीठ आणि प्रणालिकाही तशीच असावी. हा पंचसूत्रांचा निर्णय होय." याचें तत्त्व असें आहे कीं, एका सूत्रानें लिंगाचे मस्तकास वेष्टन करावें. त्या सूत्राइतकें उंच लिंग करावें. त्याच्या तिप्पट सूत्राचें वेष्टन होईल इतकें स्थूल लिंग करावें. लिंगाच्या स्थौल्याइतका पीठाचा विस्तार वर्तुल किंवा चतुरस्र खालीं आणि वरती करावा. लिंगाचे उंचीचे दुप्पट पीठाची उंची करावी. पीठाच्या मध्यभागीं लिंगाहून दुप्पट स्थूल व पीठाच्या उंचीचे तृतीयांशानें कंठ करावा. कंठाच्या ऊर्ध्वभागीं आणि अधोभागीं समान असे दोन किंवा तीन वप्र करून पीठावरती लिंगविस्ताराच्या षष्ठांशानें बाह्य मेखला करून त्याच्या आंत संलग्न असें त्याच्या समान खात करावें. पीठाच्या बाहेर उत्तरेकडे लिंगाचे उंचीइतक्या लांबीची किंवा पीठाच्या उंचीच्या निंमे लांबीची, मुळाश लांबीचे समान विस्ताराची, अग्रभागीं त्याच्या निम्मे विस्ताराची, मध्यभागीं खात केलेली, पीठाप्रमाणें मेखलासहित अशी प्रणालिका करावी. याचीं मूलवचनें **सिद्धांतशेखरांत** आणि **शैवागमांत** पाहावीं.

**तिथितत्त्वेब्राह्मे** सर्वत्रैवप्रशस्तोब्जःशिवसूर्यार्चनंविना तत्रैव**वाराहपाद्मयोः** गृहेलिंगद्वयंनार्च्यं शालग्रामद्वयंतथा द्वेचक्रेद्वारकायास्तुनार्च्येसूर्यद्वयंतथा शक्तित्रयंतथानार्च्यंगणेशत्रयमेवच द्वौशंखौनार्चयेच्चैवभग्नांचप्रतिमांतथा नार्चयेच्चतथामत्स्यकूर्मादिदशकंतथा गृहेग्निदग्धाभग्नाश्चनार्चाःपूज्यावसुंधरे एतासां पूजनान्नित्यमुद्वेगंप्राप्नुयाद्गृही शालग्रामाःसमाःपूज्याःसमेषुद्वितयंनहि विषमानैवपूज्यास्तुविषमेष्वेकएवहि शालग्रामशिलाभग्नापूजनीयासचक्रका खंडिताःस्फुटितावापिशालग्रामशिलाशुभा **वाराहे** दद्याद्भक्ताययो देविशालग्रामशिलांनरः सुवर्णसहितांदिव्यांपृथ्वीदानफलंलभेत् **तत्रैव** यःपुनःपूजयेद्भक्त्याशालग्रामशिला- शतम् तत्फलंनैवशक्तोहंवक्तुंवर्षशतैरपि **विष्णुपुराणे** ब्राह्मणःक्षत्रियोवैश्यःशूद्रश्चपृथिवीपते स्वधर्मतत्परो विष्णुमाराधयतिनान्यथा ।

**तिथितत्त्वांत ब्राह्मांत**—"शिवपूजा आणि सूर्यपूजा यांवाचून इतर सर्वत्र ठिकाणीं पूजासमयीं शंख असणें प्रशस्त आहे." तेथेंच **वराहपुराणांत पद्मपुराणांत**—"घरांत दोन लिंगांची पूजा करूं नये. तशीच दोन शालग्रामांची पूजा करूं नये. द्वारकेंतील दोन चक्रांकांची पूजा करूं नये. तशीच दोन सूर्यकांतांची पूजा करूं नये. तशीच तीन शक्तींची (देवींची) आणि तीन गणपतींची पूजा करूं नये. दोन शंखांची पूजा करूं नये. भग्न झालेल्या प्रतिमेची पूजा करूं नये. मत्स्य, कूर्म इत्यादिक दहा अवतारांची पूजा करूं नये. अग्नीनें जळालेल्या व भग्न झालेल्या (फुटलेल्या) प्रतिमा घरांत पुजूं नयेत. यांच्या पूजनानें गृहस्थाश्रम्याला नित्य उद्वेग प्राप्त होईल. शालग्राम सम पुजावे. समांमध्यें दोन पुजूं नयेत. विषम पुजूं नयेत. पण विषमामध्यें एकच पुजावा. शालग्रामशिला भग्न झालेली असली तरी चक्रयुक्त असली म्हणजे ती पुजावी. शालग्रामशिला तुकडे झालेली किंवा फुटलेली असली तरी ती शुभकारक आहे." **वाराहांत**—"जो मनुष्य सुवर्णसहित शालग्रामशिला भक्तास देईल त्याला पृथ्वीदानाचें फळ मिळेल." तेथेंच—"जो मनुष्य मोठ्या भक्तीनें शंभर शालग्रामांची पूजा करील त्याचें फळ शेंकडों वर्षांनीं देखील सांगण्यास मी समर्थ नाहीं." **विष्णुपुराणांत**—"ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे स्वधर्मतत्पर होऊन विष्णूची आराधना करितात. स्वधर्मविमुख होऊन करीत नाहींत."

**अविभक्तानामपिपृथग्देवपूजामाह प्रयोगपारिजाते आश्वलायनः** पृथगप्येकपाकानांब्रह्म- यज्ञोद्विजातिनाम् अग्निहोत्रंसुरार्चाचसंध्यानित्यंभवेत्पृथक् तत्रैव**विष्णुधर्मे** शालग्रामशिलांवापिचक्रांकि- तशिलांतथा ब्राह्मणःपूजयेन्नित्यंक्षत्रियादिर्नपूजयेत् इदंस्पर्शसहितपूजाविषयम् शूद्रोवानुपनीतोवास्त्रियो- वापतितोपिवा केशवंवाशिवंवापिस्पृष्ट्वानरकमश्नुते ब्राह्मण्यपिहरंविष्णुंनस्पृशेच्छ्रेयइच्छती सनाथासुतनया-

वातस्यानास्तीहनिष्कृतिः स्त्रीणामनुपनीतानांशूद्राणांचजनेश्वर स्पर्शनेनाधिकारोस्तिविष्णोर्वाशंकरस्यचेति- **स्कांदात्** स्पर्शरहितातुतयोर्भवत्येव शालग्रामंनस्पृशेत्तुहीनवर्णोवसुंधरे स्त्रीशूद्रकरसंस्पर्शोवज्रस्पर्शाधिको- मतः मोहाद्यःसंस्पृशेच्छूद्रोयोषिद्वापिकदाचन स्वपतेनरकेघोरेयावदाभूतसंप्लवम् यदिभक्तिर्भवेत्तस्यस्त्रीणां- वापिवसुंधरे दूरादेवास्पृशन्पूजांकारयेत्सुसमाहितइति **वाराहोक्तेः** शालग्रामशिलामात्रेनिर्बंधोनप्रति- मादौ सर्ववर्णैस्तुसंपूज्याःप्रतिमाःसर्वदेवताः लिंगान्यपितुपूज्यानिमणिभिःकल्पितानिचेति**तत्रैवोक्तेः** चत्वारोब्राह्मणैःपूज्यास्त्रयोराजन्यजातिभिः वैश्यैर्द्वावेवसंपूज्यौतथैकःशूद्रजातिभिरिति**स्कांदात् अन्येतु-** दीक्षितविषयत्वेनव्यवस्थामाहुः **विष्णुधर्मे** तयोरसंभवेचार्चाविसाचेहनवधास्मृता रत्नजाहेमजाचैवराजती- ताम्रजातथा रैतिक्यर्चातथालौहीशैलजाद्रुमजातथा अधमाधमाचविज्ञेयामृन्मयीप्रतिमाचया एषांफलानि- तत्रैवज्ञेयानि नार्च्यागृहेऽश्मजामूर्तिश्चतुरंगुलतोधिका नवितस्त्यधिकाधातुसंभवाश्रेयइच्छता एवंलक्षणसंप- न्नापारंपर्यक्रमागता उत्तमासातुविज्ञेयागुरुदत्तापितत्समा **तत्रैवपाद्मे** शालग्रामंप्रक्रम्य तत्राप्यामलकीतु- ल्यापूज्यासूक्ष्मैवयाभवेत् यथायथाशिलासूक्ष्मातथास्यात्तुमहत्फलम् **तथा** यवमात्रंतुगर्तःस्याद्यवार्धंलिंग- मुच्यते शिवनाभिरितिख्यातस्त्रिपुलोकेषुदुर्लभः **तत्रैव** शालग्राममयीमुद्रासंस्थितायत्रकुत्रचित् वाराणस्या- यवाधिक्यंसमंताद्योजनत्रयम् योमृतस्तत्समीपेतुमृतोवानीयतेंतिकम् सवैमोक्षमवाप्नोतिसत्यंसत्यंनचान्यथा **तत्रैव** चक्रांकमिथुनंपूज्यंनैकंचक्रांकमर्चयेत् चक्रांकमिथुनात्सार्धंशालग्रामंप्रपूजयेत् तत्रैव**वाराहे** म्लेच्छ- देशेशुचौवापिचक्रांकोयत्रतिष्ठति योजनानांतथात्रीणिममक्षेत्रंवसुंधरे **तत्रैव**शालग्रामंप्रक्रम्य क्रयक्रीतापरि- ज्ञेयामध्यमायाचिताधमा **प्रयोगपारिजाते वाराहे** एवंलक्षणसंपन्नापारंपर्यक्रमागता उत्तमासातु- विज्ञेयागुरुदत्तापितत्समा ।

अविभक्तांना देखील पृथक् देवपूजा सांगतो **प्रयोगपारिजातांत आश्वलायन**—"एकत्र ठिकाणीं पाक करून भोजन करणाऱ्याही द्विजांस ब्रह्मयज्ञ, अग्निहोत्र, देवपूजा, संध्या हीं नित्य वेगवेगळीं सांगितलीं आहेत." तेथेंच **विष्णु- धर्मांत**—"शालग्रामशिला आणि चक्रांकितशिला यांची पूजा ब्राह्मणानें नित्य करावी. क्षत्रियानें करूं नये." हा क्षत्रि- यादिकांस निषेध सांगितला तो स्पर्श करून पूजेविषयीं समजावा. कारण, "शूद्र, किंवा मुंज न झालेला किंवा स्त्रिया अथवा पतित हे विष्णूला किंवा शिवाला स्पर्श करितील तर नरकास जातील. कल्याण इच्छिणाऱ्या ब्राह्मणाच्या स्त्रियेनें देखील शिवाला आणि विष्णूला स्पर्श करूं नये. मग ती सभर्तृका असो किंवा मृतभर्तृका असो, ती जर शिवाला किंवा विष्णूला स्पर्श करील तर त्या पापाची ह्या लोकीं निष्कृति होणार नाहीं. स्त्रिया, मुंज न झालेले, आणि शूद्र यांस विष्णूच्या किंवा शंकराच्या स्पर्शाविषयीं अधिकार नाहीं," असें **स्कांद**वचन आहे. विष्णूची व शंकराची स्पर्शरहित पूजा तर स्त्रीशूद्रांना होतच आहे. कारण, "हीनजातीच्या मनुष्यानें शालग्रामास स्पर्श करूं नये. शालग्रामास स्त्रियेच्या किंवा शूद्राच्या हाताचा स्पर्श वज्राच्या स्पर्शाहून अधिक मानला आहे. जो कोणी शूद्र किंवा स्त्री मोहाच्या योगें ( अविवेकानें ) जर कधीं स्पर्श करील तर तो प्रलयकालपर्यंत नरकांत पडेल. जर त्या शूद्राची किंवा स्त्रियांची शालग्रामावर भक्ति असेल तर स्पर्श केल्यावांचून दुरूनच समाधान अंतःकरणानें पूजा करावी." असें **वराह**वचन आहे. हा स्पर्शाचा निषेध शालग्रा- माविषयीं समजावा. प्रतिमादिकांविषयीं स्पर्शाचा निषेध नाहीं. कारण, "सर्व देवतांच्या प्रतिमा साऱ्या वर्णांनीं पुजाव्या. आणि मण्यांचीं केलेलीं लिंगें देखील साऱ्या वर्णांनीं पुजावीं," असें तेथेंच सांगितलें आहे. आणि "ब्राह्मणांनीं चार पुजावे, क्षत्रियांनीं तीन पुजावे, वैश्यांनीं दोनच पुजावे. आणि शूद्रांनीं एक पुजावा," असें **स्कांद**वचन आहे. इतर विद्वान् तर— ज्यानें दीक्षा घेतली असेल त्या हीनवर्णानेंही पूजा करावी. दीक्षा घेतली नसेल त्यानें पूजा करूं नये. अशी वरील वचनाची व्यवस्था सांगतात. **विष्णुधर्मांत**—"शालग्राम व बाण यांचा असंभव असेल तर अर्चा ( प्रतिमा ) करावी. ती प्रतिमा नऊ प्रकारची सांगितली आहे, ती अशी—रत्नाची, सुवर्णाची, रुप्याची, तांब्याची, पितळेची, लोहाची, पाषाणाची, काष्ठाची, आणि सर्वांत कनिष्ठ मातीची प्रतिमा करावी." या प्रतिमांचीं फलें तेथेंच जाणावीं. "पाषाणाची मूर्ति चार अंगु- ळांहून मोठी घरांत पूजूं नये. आणि धातूची मूर्ति वितीहून मोठी घरांत पूजूं नये." तेथेंच पाद्मांत शालग्रामाचा उपक्रम करून सांगतो—"त्यांत देखील जी आंवळ्यासारखी सूक्ष्म असेल तीच पूजावी. शालग्रामशिला जशी जशी सूक्ष्म असेल तसें तसें मोठें फल प्राप्त होतें. तसेंच—ज्या शालग्रामास यवाएवढा गर्त ( छिद्र ) असून त्यांत यवार्धाएवढें लिंग असेल तो शालग्राम **शिवनाभि** म्हटला आहे. तो तीन लोकांत दुर्लभ आहे." तेथेंच—"जेथें कोठें शालग्रामाची

शिला असेल तें स्थळ आसमंतात् भागीं तीन योजनेंपर्यंत वाराणसीहून अधिक फलदायक आहे. त्या शालग्रामाच्या समीप जो मरेल किंवा मेल्यावर शालग्रामाच्या समीप नेला जाईल, तो मोक्षास जाईल हें सत्य सत्य आहे. असत्य होणार नाहीं." तेथेंच—"दोन चक्रांकितांची पूजा करावी. एक चक्रांकित पुजूं नये. दोन चक्रांकितांसह शालग्रामाची पूजा करावी." तेथेंच **वाराहांत**—"म्लेच्छदेशांत किंवा अशुचि प्रदेशांतही जेथें चक्रांक असेल तें तीन योजनेंपर्यंत माझें ( भगवंताचें ) क्षेत्र आहे." तेथेंच शालग्रामाचा उपक्रम करून सांगतो.—"द्रव्य देऊन विकत घेतलेली शालग्रामशिला मध्यम आहे. याचना करून आणलेली कनिष्ठ आहे." **प्रयोगपारिजातांत वाराहांत**—"या लक्षणांनीं युक्त परंपरेनें प्राप्त झालेली ती उत्तम समजावी. आणि गुरूनें दिलेली असेल तर तीही त्याच्यासारखी उत्तम जाणावी."

**अथपार्थिवपूजा नंदिपुराणे** आयुष्मान्बलवान्श्रीमान्पुत्रवान्धनवान्सुखी वरमिष्टंलभेल्लिंगंपार्थिवंयःसमर्चयेत् तस्मात्तुपार्थिवंलिंगंज्ञेयंसर्वार्थसाधकं **तत्रैव** गोभूहिरण्यवस्त्रादिबलिपुष्पनिवेदने ज्ञेयोनमःशिवायेतिमंत्रःसर्वार्थसाधकः सर्वमंत्राधिकश्चायमोंकाराद्यःपडक्षरः **भविष्ये** मूर्तयोष्टौशिवस्यैताःपूर्वादिक्रमयोगतः आग्नेय्यंताःप्रपूज्यास्तुवेद्यांलिंगेशिवंयजेत् अत्रनप्राचीमग्रतःशंभोरितिरुद्रयामलेनिषेधात् नांतरालंप्राची किंतुप्रसिद्धैव **तिथितत्त्वेदेवीपुराणे** मृदाहरणसंघट्टप्रतिष्ठाह्वानमेवच स्नपनंपूजनंचैवविसर्जनमतःपरं हरोमहेश्वरश्चैवशूलपाणिःपिनाकधृक् शिवःपशुपतिश्चैवमहादेवइतिक्रमः **स्कांदे** शुष्काण्यपिचपत्राणिश्रीवृक्षस्यनिवेदयेत् **तत्रैवभविष्ये** धत्तूरकैश्चयोलिंगंसकृत्पूजयतेनरः सगोलक्षफलंप्राप्यशिवलोकेमहीयते **योगिनीतंत्रे** शिवागारेझल्लकंचसूर्यागारेचशंखकं दुर्गागारेवंशवाद्यंमधूरींचनवादयेत् **श्राद्धहेमाद्रौस्कांदे** स्पृष्ट्वारुद्रस्यनिर्माल्यंवाससाआप्लुतःशुचिः **प्रयोगपारिजातेक्रियासारे** मध्यमानामिकामध्येपुष्पंसंगृह्यपूजयेत् अंगुष्ठतर्जन्यग्राभ्यांनिर्माल्यमपनोदयेत् अपनीतंचनिर्माल्यंचंडेशायनिवेदयेत् अशून्यमस्तकंलिंगंसदाकुर्वीतपूजकः **शूलपाणौलैंगे** वरंप्राणपरित्यागःशिरसोवापिकर्तनम् नचैवापूज्यभुंजीतशिवलिंगेमहेश्वरम् सूतकेमृतकेचैवनत्याज्यंशिवपूजनम् **तिथितत्त्वेलैंगे** विनाभस्मत्रिपुंड्रेणविनारुद्राक्षमालया पूजितोपिमहादेवोनस्यात्तस्यफलप्रदः तस्मान्मृदापिकर्तव्यंललाटेवैत्रिपुंड्रकम् ।

## आतां पार्थिवपूजा सांगतो—

**नंदिपुराणांत**—"जो पार्थिवलिंगाची पूजा करील तो आयुष्यवान् बलवान् श्रीमान् पुत्रवान् धनवान् सुखी असा होऊन अभीष्ट वर पावेल. तस्मात् कारणात् पार्थिवलिंग सर्वार्थांचें साधक आहे, असें जाणावें." तेथेंच सांगतो—"गाई, भूमि, सुवर्ण, वस्त्रें वगैरे, बलि, पुष्पें यांच्या निवेदनाविषयीं 'नम शिवाय' हा मंत्र जाणावा. हा मंत्र सर्वार्थसाधक आहे. या मंत्राच्या आधीं 'ॐकार लावून पडक्षर ( सहा अक्षरांचा ) मंत्र होतो, तो सर्व मंत्रांहून अधिक आहे." **भविष्यांत**—"क्षिति, जल, अग्नि, वायु, आकाश, यजमान, सोम, सूर्य, ह्या आठ मूर्ति शिवाच्या आहेत. पूर्वेपासून ( प्राचीपासून ) अनुक्रमानें आग्नेयीपर्यंत आठ दिशांस यांची क्रमानें पूजा करावी. आणि वेदीचे ठायीं लिंगावर शिवाची पूजा करावी." येथें प्राची दिशा कोणती समजावी ? कारण, 'पूज्य आणि पूजक यांच्या मधील दिशा प्राची कल्पावी,' या वचनावरून मधली प्राची आली आहे, ती घ्यावी कीं काय ? असा संशय आला म्हणून सांगतो—'शिवाच्या अग्रभागीं प्राची कल्पूं नये' असा **रुद्रयामलांत** निषेध असल्यामुळें येथें पूज्यपूजकांच्या मधली दिशा प्राची समजूं नये. तर प्रसिद्ध जी प्राची तीच येथें घ्यावी. **तिथितत्त्वांत देवीपुराणांत**—"माती आणणें, ती मळून तिचें लिंग करणें, प्रतिष्ठा करणें, आवाहन करणें, स्नानादिक उपचार करणें, पूजा करणें, आणि विसर्जन करणें; हे सर्व उपचार अनुक्रमानें हर, महेश्वर, शूलपाणि, पिनाकधृक्, शिव, पशुपति, महादेव, ह्या नाममंत्रांनीं करावे." **स्कांदांत**—"बिल्ववृक्षाचीं शुष्क पत्रें असलीं तरी तीं निवेदन करावीं." तेथेंच **भविष्यांत**—"जो मनुष्य धत्तूरपुष्पांनीं एकवार लिंगाची पूजा करितो तो लक्ष गोप्रदानांचें फल पावून शिवलोकीं पूज्य होतो." **योगिनीतंत्रांत**—"शिवमंदिरांत झांज, सूर्यमंदिरांत शंख, आणि देवीच्या मंदिरांत पांवरी, मधूरी हीं वाजवूं नयेत." **श्राद्धहेमाद्रींत स्कांदांत**—"शिवनिर्माल्यास स्पर्श केला असतां वस्त्रसहित स्नान करावें, म्हणजे शुद्ध होतो." **प्रयोगपारिजातांत क्रियासारांत**—"मध्यमा व अनामिका ह्या दोन अंगुलींमध्यें पुष्प घेऊन पूजा करावी. अंगुष्ठ व तर्जनी यांच्या अग्रांनीं निर्माल्य काढावा. काढलेला निर्माल्य चंडेशाला निवेदन करावा. पूजकानें सर्वकालीं लिंगाचें मस्तक शून्य करूं नये." **शूलपाणींत लिंगपुराणांत**—"प्राणत्याग किंवा मस्तकच्छेद झालेला श्रेष्ठ आहे; पण शिवलिंगावर शिवाची पूजा केल्यावांचून भोजन करूं नये. जननाशौचांत किंवा मृताशौचांतही

शिवपूजन टाकूं नये." **सिधितस्वांत लिंपुराणांत**—"भस्माचा त्रिपुंड्र केल्यावांचून व रुद्राक्षमाळा धारण केल्यावांचून महादेवाची पूजा केली तरी ती त्यास फलप्रद होणार नाहीं. तस्मात् मृत्तिकेचा तरी ललाटावर त्रिपुंड्र करावा."

**रुद्राक्षधारणेविशेषः शिवरहस्ये** एकवक्त्रःशिवःसाक्षाद्ब्रह्महत्यांव्यपोहति अवध्यत्वंप्रतिस्रोतोवह्निस्तंभंकरोतिच द्विवक्त्रोहरगौरीस्याद्गोवधाद्यघनाशकृत् त्रिवक्त्रोह्यग्निजन्माथपापराशिंप्रणाशयेत् चतुर्वक्त्रःस्वयंब्रह्मानरहत्यांव्यपोहति पंचवक्त्रस्तुकालाग्निरगम्याभक्ष्यपापनुत् षड्वक्त्रस्तुगुहोज्ञेयोभ्रूणहत्यादिनाशयेत् सप्तवक्त्रस्त्वनंतःस्यात्स्वर्णस्तेयादिपापहृत् विनायकोष्टवक्त्रःस्यात्सर्वानृतविनाशकृत् भैरवोनववक्त्रस्तुशिवसायुज्यकारकः दशवक्त्रःस्मृतोविष्णुर्भूतप्रेतभयापहः एकादशमुखोरुद्रोनानायज्ञफलप्रदः द्वादशास्यस्तथादित्यःसर्वरोगनिबर्हणः त्रयोदशमुखःकामःसर्वकामफलप्रदः चतुर्दशास्यःश्रीकंठोवंशोद्धारकरःपरइति ।

**रुद्राक्षधारणाविषयीं** विशेष सांगतो—शिवरहस्यांत—"एकमुखी रुद्राक्ष साक्षात् शिव आहे, त्याचें धारण केल्यानें ब्रह्महत्यापाप जातें, उदकांत मरण येत नाहीं, अग्नींत पडला असतां अग्नीचें स्तंभन होतें. द्विमुखी रुद्राक्ष हा हरगौरीस्वरूपी आहे, तो गोवधादि पाप दूर करितो. त्रिमुखी रुद्राक्ष हा अग्निजन्मा ( कार्तिकस्वामी ) आहे, तो पापराशीचा नाश करितो. चतुर्मुखी रुद्राक्ष स्वतः ब्रह्मदेव आहे, तो मनुष्यहत्येचें पाप दूर करितो. पंचमुखी रुद्राक्ष हा कालाग्नि आहे, तो अगम्यागमनादि पाप दूर करितो. षण्मुखी रुद्राक्ष गुह आहे, तो भ्रूणहत्यादि पाप घालवितो. सप्तमुखी रुद्राक्ष अनंत आहे, तो सुवर्णस्तेयादि पाप दूर करितो. अष्टमुखी रुद्राक्ष विनायक आहे, तो सर्व्या अनृतपातकांचा नाश करितो नवमुखी रुद्राक्ष भैरव आहे, तो शिवसायुज्य देणारा आहे. दशमुखी रुद्राक्ष विष्णु आहे, तो भूतप्रेतभयाला दूर करितो. एकादशमुखी रुद्राक्ष रुद्र आहे, तो अनेक यज्ञांचें फल देणारा आहे. द्वादशमुखी रुद्राक्ष आदित्य आहे, तो सर्व रोग दूर करणारा आहे. त्रयोदशमुखी रुद्राक्ष काम आहे, तो सर्व कामना पूर्ण करणारा आहे. चतुर्दशमुखी रुद्राक्ष हा श्रीकंठ आहे, तो वंशाचा उद्धार करणारा आहे."

**तथा** विनामंत्रेणयोधत्तेरुद्राक्षंभुविमानवः सयातिनरकानघोरान्यावदिंद्राश्चतुर्दश पंचामृतंपंचगव्यं स्नानकालेप्रयोजयेत् रुद्राक्षस्यप्रतिष्ठायांमंत्रंपंचाक्षरंतथा त्र्यंबकादिमंत्रंचतथातत्रप्रयोजयेत् **यद्वा** ॐ अघोर ॐह्रैं अघोरतर ॐ ह्रौंह्रांनमस्तेरुद्ररूपह्रैंस्वाहा अनेनाभिमंत्र्यधारयेत् **तथा** अष्टोत्तरशतंकार्याचतुःपंचाशदेववा सप्तविंशतिमानावातनोहीनाधमास्मृता **प्रजापतिः** मोक्षार्थीपंचविंशत्याधनार्थीत्रिंशताजपेत् पुष्ट्यर्थीपंचविंशत्यापंचदश्याभिचारके सप्तविंशतिरुद्राक्षमालयादेहसंस्थया यत्करोतिनरःपुण्यंसर्वंकोटिगुणंभवेत् योददातिद्विजेभ्यश्चरुद्राक्षंभुविसन्मुखम् तस्यप्रीतोभवेद्रुद्रःस्वपदंचप्रयच्छतीति **पदार्थादर्शे बोपदेवः** रुद्राक्षानकंठदेशेदशनपरिमितानमस्तकेविंशतीद्वेषट्षट्कर्णप्रदेशेकरयुगुलकृतेद्वादशद्वादशैव बाह्वोरिंदोःकलाभिर्नयनयुगकृतेएकमेकंशिखायांवक्षस्यष्टाधिकंयःकलयतिशतकंसस्वयंनीलकंठः ॥

**तसेंच**—" जो मनुष्य भूलोकीं मंत्रावांचून रुद्राक्ष धारण करितो तो मनुष्य चवदा इंद्र आहेत तोंपर्यंत घोर नरकांत जातो. रुद्राक्षाला स्नान घालण्याच्या समयीं पंचामृतें आणि पंचगव्यें हीं घालावीं. रुद्राक्षाच्या प्रतिष्ठेविषयीं पंचाक्षर मंत्र योजावा. तसाच त्या ठिकाणीं 'त्र्यंबकं०' हा मंत्रही योजावा." अथवा—'ॐ अघोर ॐ ह्रैं अघोरतर ॐ ह्रौं ह्रां नमस्ते रुद्ररूप ह्रैं स्वाहा' ह्या मंत्रानें रुद्राक्षाचें अभिमंत्रण करून धारण करावें. तसेंच—"एकशें आठ रुद्राक्षांची माळा करावी. किंवा चौपन्न रुद्राक्षांची करावी. अथवा सत्तावीस रुद्राक्षांची करावी. याहून कमी रुद्राक्षांची माला अधम म्हटली आहे." **प्रजापति**—"मोक्षाची इच्छा करणारानें पंचवीस रुद्राक्षांच्या मालेनें जप करावा. धनेच्छूनें तीस रुद्राक्षांच्या मालेनें जप करावा. पुष्टीच्या इच्छेनें पंचवीस रुद्राक्षांच्या मालेनें जप करावा. अभिचार ( जारणादि ) कर्माविषयीं पंधरा रुद्राक्षांच्या मालेनें जप करावा. सत्तावीस रुद्राक्षांची माला अंगावर घालून मनुष्य जें पुण्यकर्म करितो तें सारें कोटिपट होतें. भूलोकीं जो मनुष्य उत्तममुखाचा रुद्राक्ष ब्राह्मणांना देतो त्याला रुद्र संतुष्ट होऊन आपलें पद देतो." **पदार्थादर्शांत बोपदेव**—"कंठांत बत्तीस, डोक्यांत चाळीस, एकएका कानांत सहा सहा, एका एका हातांत बारा बारा, एकएका बाहूवर सोळा सोळा, दोन डोळयांस एक, शेंडींत एक आणि वक्षस्थलावर १०८ रुद्राक्ष असे जो रुद्राक्ष धारण करितो तो स्वतः नीलकंठ ( महादेव ) आहे, असें समजावें."

**हेमाद्रौशिवधर्मे** स्नानंपलशतंज्ञेयमभ्यंगःपंचविंशतिः पलानांद्वेसहस्रेतुमहास्नानंप्रकीर्तितम् पंचविंशत्पलंलिंगेअभ्यंगंकारयेदथ शिवस्यसर्पिषास्नानंप्रोक्तंपलशतेनच तावतामधुनाचैवदध्नाचैवततःपुनः ताव-

तैवचक्षीरेणगव्येनैवभवेत्ततः भूयःसार्धसहस्रेणपलानामैक्षवेणच रसेनकारयेत्स्नानंभक्त्याचोष्णांबुनाततः **विष्णवादौतुस्कांदे** क्षीराद्दशगुणंदध्नाघृतेनैवदशोत्तरम् घृताद्दशगुणंक्षौद्रंक्षौद्राद्वैक्षवजंतथा **ब्राह्मे** देवानांप्रतिमायत्रघृताभ्यंगक्षमाभवेत् पलानितत्रदेयानिश्रद्धयापंचविंशतिः इदंक्रोडीकृताभिप्रायेण **तत्रैव संग्रहे** विष्वक्सेनायदातव्यंनैवेद्यस्यशतांशकम् पादोदकंप्रसादंचलिंगेचंडेश्वरायतु ।

**हेमाद्रींत शिवधर्मांत**—"दूध, दहीं इत्यादि द्रव्यांचें स्नान शंभर पलांनीं ( म्ह० ८० गुंजांचा एक कर्ष अशा ४०० कर्षांनीं ) होतें. पंचवीस पलांनीं घृतादिकांचा अभ्यंग होतो. दोन हजार पलांनीं महास्नान होतें. लिंगावर अभ्यंग करावयाचा तो पंचवीस पलें द्रव्य घेऊन करावा. शिवाला घृताचें स्नान शंभर पलांनीं सांगितलें आहे. तितक्याच मधानें व दह्यानें स्नान होतें. तितक्याच गोदुग्धानें स्नान होतें. उंसांचा रस १५०० पलें घेऊन मोठ्या भक्तीनें स्नान घालावें. नंतर उष्णोदकानें स्नान घालावें." विष्णु इत्यादि देवतांविषयीं तर सांगतो **स्कांदांत**—"दुधाच्या दसपट दहीं दह्यांच्या दसपट घृत, घृताच्या दसपट मध, आणि मधाच्या दसपट उंसाचा रस असें स्नानाविषयीं योजावें." **ब्राह्मांत**—"ज्या ठिकाणीं देवांची प्रतिमा घृताच्या अभ्यंगाविषयीं शक्त असेल त्या ठिकाणीं घृताचीं पंचवीस पलें ( १०० कर्ष ) श्रद्धेनें द्यावीं." हें, सर्व वचनांचा अभिप्राय एकवट करून सांगितलें आहे. तेथेंच **संग्रहांत**—"विष्णूच्या नैवेद्याचा शंभरावा अंश विष्वक्सेनाला द्यावा. पादोदक आणि प्रसादही द्यावा. शिवलिंगाचा नैवेद्य, प्रसाद आणि पादोदक चंडेश्वराला द्यावें."

पंचायतनसन्निवेशमाह **बोपदेवः पदार्थादर्शश्च** शंभौमध्यगतेहरीनहरभूदेव्योहरौशंकरेभास्येनागसुतारवौहरगणेशाजांबिकाःस्थापिताः देव्यांविष्णुहरेभवक्त्रवयोलंबोदरेजेश्वरेनांबाःशंकरभागतोऽतिसुखदाव्यस्तास्तुहानिप्रदाः शंकरभागतः ईशानकोणादारभ्यप्रदक्षिणमित्यर्थः अत्रदिक्स्वरूपमुक्तं **प्रयोगपारिजातेमंत्रशास्त्रे** देवस्यमुखमारभ्यदिशंप्राचींप्रकल्पयेत तदादिपरिवाराणामंगाद्यावरणस्थितिः तत्र**क्रमः पाद्मे** रविर्विनायकश्चंडीईशोविष्णुस्तुपंचमः अनुक्रमेणपूज्यंतेव्युत्क्रमेतुमहद्भयम् **तथा** पूज्यपूजकयोर्मध्येप्राचीप्रोक्ताविचक्षणैः ।

## पंचायतनाची मांडणी सांगतो—

**बोपदेव** आणि **पदार्थादर्श**—"**शिवपंचायतन** मध्यभागीं शिव, ईशान्येस विष्णु, आग्नेयीस सूर्य, नैर्ऋतीस गणपति, वायव्येस देवी. **विष्णुपंचायतन**—मध्यभागीं विष्णु, ईशान्येस शिव, आग्नेयीस गणपति, नैर्ऋतीस सूर्य, वायव्येस देवी. **सूर्यपंचायतन**—मध्यभागीं सूर्य, ईशान्येस शिव, आग्नेयीस गणपती, नैर्ऋतीस विष्णु, वायव्येस देवी. **देवीपंचायतन**—मध्यभागीं देवी, ईशान्येस विष्णु, आग्नेयीस शिव, नैर्ऋतीस गणपति, वायव्येस सूर्य. **गणपतिपंचायतन**—मध्यभागीं गणपति, ईशान्येस विष्णु, आग्नेयीस शिव, नैर्ऋतीस सूर्य, वायव्येस देवी. याप्रमाणें ईशानकोणापासून आरंभ करून प्रदक्षिण मांडावे, म्हणजे अतिसुखदायक होतात. याच्या विपरीत मांडले असतां हानिदायक होतात." येथें दिशेचें स्वरूप सांगतो **प्रयोगपारिजातांत मंत्रशास्त्रांत**—"जिकडे देवाचें मुख तिकडे प्राची दिशेची कल्पना करावी. ती प्राची दिशा धरून तदनुसारानें त्या देवाचे परिवार, अंगदेवता, उपांगदेवता, आवरणदेवता, यांची स्थापना करावी." पंचायतन देवतांच्या पूजेचा क्रम सांगतो **पाद्मांत**—"सूर्य, गणपति, देवी, शिव आणि पांचवा विष्णु हे अनुक्रमानें पुजावे. विपरीत क्रमानें पूजिले असतां मोठें भय होतें." तसेंच—"पूज्य आणि पूजक यांच्या मध्यें प्राची दिशा विद्वानांनीं सांगितली आहे."

**अथकेशवादिमूर्तयः बोपदेवः** केविगोवादापुहुपेप्रजाच्युकृममात्रिना वाधोनृहसानिश्रीपाशाचगेविगपेचपे अत्रकेविगवित्याद्यैःकेशवविष्णवादिचतुर्विंशतिमूर्तयोऽभिधीयंते शात्शंखात् **चगे** चक्रगदे ज्ञेयेइत्यर्थः शिष्टेभुजेपद्मंत्वर्थतःसिद्धं अत्रदक्षिणोर्ध्वकरक्रमेणज्ञेयम् दक्षिणोर्ध्वकरक्रमादितिहेमाद्रीवचनात् तेनहेमाद्रिणासंवादः विशब्देनविपरीतंगचेइत्यर्थः अत्रापिशादनुवृत्तिः शंखाद्गदाचक्रेइत्यर्थः **गपे**इत्यत्रापिशादनुवर्तते शंखाद्गदापद्मेइत्यर्थः विपरीतेपद्मगदेइत्यत्रापिशंखाज्ज्ञेये **चपे**चक्रपद्मे शंखाच्चक्रपद्मेइत्यर्थः विइत्यत्रापि पद्मचक्रेइत्यर्थः तेनचगेइत्यष्टौमूर्तयः गपेइत्यष्टौमूर्तयः चपेइत्यत्रच अत्रमूलंहेमाद्रौज्ञेयम् ।

१ 'दक्षिणाधःकरक्रमेणज्ञेयं दक्षिणधःकरक्रमात् इति हेमाद्रौ वचनात्' असा जुन्या लेखी व छापीप्रतींतून पाठ आढळतो. तोच पाठ बरा आहे, असें वाटतें. त्याचा अर्थ—आयुधांचा क्रम दक्षिण खालच्या हस्तापासून धरावा. व तो प्रदक्षिण क्रम धरलें युक्त आहे-असा होतो.

## आतां केशवादि चोवीस मूर्तींचीं लक्षणें सांगतो—

**बोपदेव**—"केविगोवादापुहृउपेप्रजाच्युकृममात्रिना ॥
वाधोनृहसानिश्रीपा शाचगे वि गपे चपे ॥

अर्थ—"के ( केशव ), वि ( विष्णु ), गो ( गोविंद ), वा ( वासुदेव ), दा ( दामोदर ), पु ( पुरुषोत्तम ), हृ ( हृषीकेश ), उपे ( उपेंद्र ), प्र ( प्रद्युम्न ), ज ( जनार्दन ), अच्यु ( अच्युत ), कृ ( कृष्ण ), म ( मधुसूदन ), मा ( माधव ), त्रि ( त्रिविक्रम ) ना ( नारायण ), वा ( वामन ), अधो ( अधोक्षज ) नृ ( नृसिंह ) ह ( हरि ) स ( संकर्षण ), अनि ( अनिरुद्ध ) श्री ( श्रीधर ), प ( पद्मनाभ ) याप्रमाणें चोवीस मूर्ति सांगितल्या आहेत. त्या कोणत्या रीतीनें समजाव्या, तें सांगतो—शात् म्हणजे शंखापासून आरंभ करून चगे म्हणजे चक्र आणि गदा हीं दोन आयुधें जाणावीं. याप्रमाणें तीन आयुधें तीन हातांत सांगितलीं. अवशिष्ट राहिलेल्या चवथ्या हातांत अवशिष्ट असलेलें पद्म अर्थात् सिद्ध होतें. आतां ह्या आयुधांचा क्रम कोणत्या हातापासून समजावा, असें म्हणाल तर उजव्या खालच्या हातापासून वरती करीत यावा. कारण, 'दक्षिणोर्ध्वकरक्रमात्' असें **हेमाद्रींत** वचन आहे. यावरून ह्या श्लोकाचा हेमाद्रीबरोबर संवाद आहे. विवाद ( विरुद्धपणा ) नाहीं. येथें ऊर्ध्वक्रमानें सांगितलें यावरून प्रथम दक्षिण खालच्या हस्तापासून शंख, चक्र, गदा, पद्म, हीं आयुधें **केशवाचीं.** नंतर तींच आयुधें दक्षिण ऊर्ध्व हस्तापासून **विष्णूचीं.** तींच आयुधें डाव्या ऊर्ध्व हस्तापासून **गोविंदाचीं.** तींच आयुधें डाव्या खालच्या हस्तापासून वासुदेवाचीं होत. याप्रमाणें 'चगे' ह्यांच्या चार मूर्ति झाल्या. 'वि' विपरीत 'चगे' म्हणजे 'गचे' गदा व चक्र हीं समजावीं. या रीतीनें 'गचे' ह्यांच्या चार मिळून आठ मूर्ति होतात. अशाच रीतीनें 'गपे' ह्यांच्या आठ आणि 'चपे' ह्यांच्या आठ समजाव्या." त्या चोवीस मूर्ति स्पष्ट येथें लिहितों—आयुधांचा क्रम धरणें तो दक्षिण खालच्या हस्तापासून ऊर्ध्वहस्तक्रमानें धरावा. तो असाः—शंख, चक्र, गदा, पद्म यांनीं युक्त तो **केशव.** पद्म, शंख, चक्र, गदा यांनीं युक्त तो **विष्णु.** गदा, पद्म, शंख, चक्र यांनीं युक्त तो **गोविंद.** चक्र, गदा, पद्म, शंख, यांनीं युक्त तो **वासुदेव.** शंख, गदा, चक्र, पद्म, यांनीं युक्त तो **दामोदर.** पद्म, शंख, गदा, चक्र यांनीं युक्त तो **पुरुषोत्तम.** चक्र, पद्म, शंख, गदा यांनीं युक्त तो **हृषीकेश.** गदा, चक्र, पद्म, शंख यांनीं युक्त तो **उपेंद्र.** शंख, गदा, पद्म, चक्र यांनीं युक्त तो **प्रद्युम्न.** चक्र, शंख, गदा, पद्म यांनीं युक्त तो **जनार्दन.** पद्म, चक्र, शंख, गदा यांनीं संपन्न तो **अच्युत.** गदा, पद्म, चक्र, शंख, यांनीं युक्त तो **कृष्ण.** शंख, पद्म, गदा, चक्र, यांनीं युक्त तो **मधुसूदन.** चक्र, शंख, पद्म, गदा यांनीं युक्त तो **माधव.** गदा, चक्र, शंख, पद्म यांनीं युक्त, तो **त्रिविक्रम.** पद्म, गदा, चक्र, शंख यांनी युक्त तो **नारायण.** शंख, चक्र, पद्म, गदा यांनीं युक्त तो **वामन.** गदा, शंख, चक्र, पद्म यांनीं युक्त तो **अधोक्षज.** पद्म, गदा, शंख, चक्र यांनीं युक्त तो **नारसिंह.** चक्र, पद्म, गदा, शंख यांनीं युक्त तो **हरि.** शंख, पद्म, चक्र, गदा यांनीं युक्त तो **संकर्षण.** गदा, शंख, पद्म, चक्र यांनीं युक्त तो **अनिरुद्ध.** चक्र, गदा, शंख, पद्म यांनीं युक्त तो **श्रीधर.** पद्म, चक्र, गदा, शंख, यांनीं युक्त तो **पद्मनाभ.** याप्रमाणें चोवीस मूर्तींचीं लक्षणें जाणावीं.

**अथबौधायनसूत्रं**त्रैविक्रमींचानुसृत्य **लिंगार्चाप्रतिष्ठोच्यते** यजमानःपूर्वोक्तकालेपूर्वेद्युः दशद्वादशषोडशान्यतरहस्तंमंडपंकृत्वाग्नेयेहस्तमात्रंचतुरस्रंकुंडं स्थंडिलंवापूर्वतोहस्तमात्रांवेदींनैर्ऋतेवास्तुमंडपं मध्येवेदींतदुपरिसर्वतोभद्रंकृत्वाप्राणानायम्यास्यांमूर्तौलिंगेवादेवस्यसान्निध्यसिद्ध्यर्थं दीर्घायुर्लक्ष्मीसर्वकामसमृद्ध्यक्षय्यसुखकामोऽमुकमूर्तिप्रतिष्ठांकरिष्येइतिसंकल्प्य गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजननांदीश्राद्धानिकृत्वाचार्यंचतुरोऽष्टौवाऋत्विजश्चवृत्वावस्त्राद्यैःपूजयेत् अथाचार्यः यदत्रसंस्थितमितिसर्षपानविकीर्यापोहिष्ठेतिकुशोदकेनभूमिंप्रोक्ष्य देवाआयांतु यातुधानाअपयांतु विष्णोदेवयजनंरक्षस्वेतिभूमौप्रादेशंकृत्वाऽस्मत्कृततुलापद्धतिमार्गेणमंडपप्रतिष्ठांकृत्वाऽकृत्वावापूर्वरात्रौहिरण्योपधानंदेवंपंचगव्यहिरण्ययवदूर्वाश्वत्थपलाशपर्णान्युदकुंभेप्रक्षिप्यताभिरद्भिरापोहिष्ठेतितिसृभिर्हिरण्यवर्णाइतिचतसृभिः पवमानःसुवर्जनइत्यनुवाकेनाभिषिच्यव्याहृतिभिरिदंविष्णुरितिफलयवदूर्वाःसमर्प्यरक्षोहणमितिहस्तेकंकणंबध्वावाससाच्छाद्य अवतेहेळउदुत्तममितिजलेऽधिवासयेत् **इदंबौधायनोक्तम्** ॥

आतां **बौधायनसूत्र व त्रिविक्रमपद्धति** यांना अनुसरून लिंगप्रतिष्ठा व मूर्तिप्रतिष्ठा सांगतों—पूर्वी सांगितल्याप्रमाणें देवप्रतिष्ठेचा मुहूर्त पाहून त्या मुहूर्ताच्या पूर्वदिवशीं यजमानानें दहा, बारा किंवा सोळा हातांचा मंडप करून त्या मंडपांत आग्नेयीदिशेस एक हाताचें चतुरस्र ( चतुष्कोण ) कुंड किंवा स्थंडिल करावें. आणि पूर्वेस एक हाताची वेदी, नैर्ऋतीस वास्तुमंडप, मध्यभागीं वेदी, व त्या वेदीवर सर्वतोभद्र करून प्राणायाम करून संकल्प करावा. तो असा—'अस्यां मूर्तौ

देवस्य सांनिध्यसिध्यर्थं वीर्यायुर्लक्ष्मीसर्वकामसमृद्ध्यक्षय्यसुखकामोमुकमूर्तिप्रतिष्ठां करिष्ये' असा संकल्प करून गणपतिपूजन, पुण्याहवाचन, मातृकापूजन, आणि नांदीश्राद्ध करून आचार्य आणि चार ऋत्विज वरून वस्त्रादिकांनीं त्यांची पूजा करावी. नंतर आचार्यानें 'यदत्रसंस्थितं०' या मंत्रानें सर्षप टाकून 'आपोहिष्ठा०' या मंत्रांनीं कुशोदकानें भूमीचें प्रोक्षण करून नंतर "देवा आयांतु, यातुधाना अपयांतु, विष्णो देवयजनं रक्षस्व" असें म्हणून भूमीवर प्रादेश करावा. मंडपप्रतिष्ठा करावयाची असल्यास आम्हीं ( कमलाकरभट्टानें ) केलेल्या तुलापद्धतीच्या रीतीनें करावी. किंवा न करावी. नंतर मंडपांत प्रवेश करून वेदीच्या उत्तरेकडे जलाधिवास करावा. तो असा-पूर्वरात्रीं देवाला हिरण्यावर ठेऊन, पंचगव्य, हिरण्य, यव, दूर्वा, अश्वत्थपर्णें व पलाशपर्णें कलशांत टाकून त्या उदकांनीं 'आपोहिष्ठा०' ह्या तीन ऋचांनीं, 'हिरण्यवर्णा०' ह्या चार ऋचांनीं, 'पवमानः सुवर्जनः०' ह्या अनुवाकानें अभिषेक करून व्याहृतिमंत्रांनी आणि 'इदंविष्णु०' ह्या मंत्रानें फळें, यव आणि दूर्वा समर्पण करून 'रक्षोहणं०' ह्या मंत्रानें हातांत कंकण बांधून वस्त्रानें आच्छादन घालून 'अवतेहेळो०, उदुत्तमं०' ह्या मंत्रांनीं उदकांत अधिवासन करावें. हा प्रकार **बौधायनानें** सांगितलेला आहे.

ततश्चललिंगेअर्चायांवाअत्राग्निंप्रतिष्ठाप्य गोक्षीरेनीवारचरुंकृत्वाविष्णुश्चेत्कृसरमपिश्रपयित्वाज्यभागांतेपलाशोदुंबराश्वत्थशम्यपामार्गसमिद्भिः आज्येनचरुणातिलैर्वाप्रत्येकमष्टाविंशतिमष्टौवाहुतीर्लोकपालमूर्तिमूर्तिपतिभ्योहुत्वास्थाप्यदेवमंत्रेणपूर्वोक्तसमित्तिलनैवारचर्वाज्यैरष्टसहस्रमष्टशतमष्टाविंशतिंवाहुत्वा अग्निर्येजुर्भिरित्यनुवाकेनदशाहुतीर्जुहुयात् प्रतिद्रव्यहोमांतेदेवंपादनाभिशिरसिस्पृशेत् आज्यहोमेचोत्तरतःसजलकुंभेसंपातान्नयेत् तेषांमंत्राः इंद्रायेंदोइतींद्रस्य स्योनेतिपृथिवीमूर्तेः अघोरेभ्यइतितत्पतेःशर्वस्य अग्नआयाहीत्यग्नेः अग्निंदूतमित्यग्निमूर्तेः नमःशर्वायचपशुपतयेचेतिपशुपतेः यमायसोमंयमस्य असिहिवीरितियजमानमूर्तेः स्तुहिश्रुतंतत्पतेःउग्रस्य असुन्वंतंनिर्ऋतेः आकृष्णेनसूर्यमूर्तेः योरुद्रोअग्नौइतितत्पतेरुद्रस्य इमंमेवरुणस्य शंनोदेवीजलमूर्तेः नमोभवायेतिभवस्य आनोनियुद्भिरितिवायोः वातआवातुवायुमूर्तेः तमीशानंतत्पतेरीशानस्य आप्यायस्वेतिकुबेरस्य वयंसोमेतिसोममूर्तेः तत्पुरुषायमहादेवस्य अभित्वाईशानस्य आदित्प्रत्नस्येत्याकाशस्य नमउग्रायचेतितत्पतेर्भीमस्य ततोदेवस्यपादौस्पृशेत् एवंद्वितीयेहुत्वानाभिंतृतीयेमध्यंचतुर्थेउरःपंचमेशिरःस्पृष्ट्वा प्रतिपर्यायंसंपातजलेनदेवंअभिषिंचेत् ततःस्विष्टकृदादिहोमशेषंसमाप्यार्चांशोधयेत् स्थिरलिंगार्चादौतुनेदानीमग्निस्थापनहोमादिकार्यम् ॥

आतां लिंगाची किंवा मूर्तीची चलप्रतिष्ठा असल्यास या वेळीं अग्निस्थापन करून गोक्षीरांत नीवारचरु शिजवून विष्णुमूर्ति असेल तर कृसर ( तिलमिश्रओदन ) देखील शिजवून आज्यभागांच्या अंतीं पळस, उंबर, अश्वत्थ, शमी, अपामार्ग यांच्या समिधा, आज्य, चरु किंवा तिल या प्रत्येक द्रव्याच्या अष्टशत, अष्टविंशति किंवा आठ आहुति लोकपाल, मूर्ति आणि मूर्तिपति यांना होम करून स्थापन करावयाच्या देवाच्या मंत्रानें वर सांगितलेल्या समिधा, तिल, नैवारचरु, आणि आज्य या द्रव्यांनीं अष्टसहस्र, अष्टशत किंवा अष्टाविंशति आहुति होम करून 'अग्निर्यजुर्भिः०, ह्या अनुवाकानें दहा आहुति द्याव्या. प्रत्येक द्रव्याचा होम झाल्यावर देवाच्या पादांना, नाभीला आणि मस्तकाला स्पर्श करावा. आज्यहोम झाल्यावर उत्तरेकडे असलेल्या उदकयुक्त कलशांत आज्याचें संपात पाडवावें. आतां वर सांगितलेल्या लोकपालादिकांचे मंत्र येणेंप्रमाणें— 'इंद्रायेंदो०' हा इंद्राचा मंत्र. 'स्योना०' हा पृथिवीमूर्तीचा मंत्र. 'अघोरेभ्यो०' हा पृथिवीपतिशर्वाचा मंत्र. 'अग्नआयाहि०' हा अग्नीचा मंत्र. 'अग्निंदूतं' हा अग्निमूर्तीचा मंत्र. 'नमः शर्वायच पशुपतयेच' हा अग्निपति पशुपतीचा मंत्र. 'यमायसोमं०' हा यमाचा मंत्र. 'असिहिवीर०' हा यजमानमूर्तीचा मंत्र. 'स्तुहिश्रुतं०' हा यजमानपतिउग्राचा मंत्र. 'असुन्वंतं०' हा निर्ऋतीचा मंत्र. 'आ कृष्णेन०' हा सूर्यमूर्तीचा मंत्र. 'योरुद्रो अग्नौ०' हा सूर्यपतिरुद्राचा मंत्र. 'इमंमे०' हा वरुणाचा मंत्र. 'शंनोदेवी०' हा जलमूर्तीचा मंत्र. 'नमोभवाय०' हा जलपतिभवाचा मंत्र. 'आनोनियुद्भिः०' हा वायूचा मंत्र. 'वातआवातु०' हा वायुमूर्तीचा मंत्र. 'तमीशानं०' हा वायुपति ईशानाचा मंत्र. 'आप्यायस्व०' हा कुबेराचा मंत्र. 'वयंसोम०' हा सोममूर्तीचा मंत्र. 'तत्पुरुषाय०' हा महादेवाचा मंत्र. 'अभित्वा०' हा ईशानाचा मंत्र. 'आदित्प्रत्नस्य०' हा आकाशाचा मंत्र. 'नमउग्राय०' हा आकाशपति भीमाचा मंत्र. असा एक पर्याय झाल्यावर देवाच्या पादांना स्पर्श करावा. याप्रमाणें दुसरा पर्याय झाल्यावर देवाच्या नाभीला स्पर्श करावा. तिसरा पर्याय झाल्यावर देवाच्या मध्याला स्पर्श करावा. चवथा पर्याय झाल्यावर देवाच्या उराला स्पर्श करावा. पांचवा पर्याय झाल्यावर देवाच्या मस्तकाला स्पर्श करावा. आणि प्रत्येक पर्यायाला संपातजलानें देवाला अभिषेक करावा. तदनंतर स्विष्टकृदादि होमशेष समाप्त करून मूर्तीचें शोधन करावें. हा प्रकार चलार्चाविधीचा समजावा. स्थिरलिंग किंवा स्थिरमूर्ति यांची प्रतिष्ठा असेल तर या वेळीं अग्निस्थापन, होम इत्यादि करूं नये.

ततोदेवंनत्वा स्वागतंदेवदेवेशविश्वरूपनमोस्तुते शुद्धेपित्वदधिष्ठानेशुद्धिंकुर्मःसहस्वतामितिसंप्रार्थ्य उत्तिष्ठब्रह्मणस्पतेइतिसऋत्विगुत्थाप्य पूर्वमकृतेभ्युत्तारणेअधुनावाकार्यम् अग्निःसप्तिमितिसूक्तमग्निपदहीनंपठित्वातत्सहितंपुनःपठेत् एवमष्टसहस्रमष्टशतमष्टाविंशतिंवापठन्जलंपातयेत् ततोर्चांद्वादशवारंमृदाजलेनचप्रक्षाल्यमंत्रवत्पंचगव्यंकृत्वा पयःपृथिव्यामावोराजानमितिचसंस्नाप्य आप्यायस्वदधिक्राव्णस्तेजोसिमधुवाताआयंगौरितिपंचामृतैःसंस्नाप्य लिंगंचेन्नमस्तेरुद्रमन्यवइत्यष्टाभिःसंस्नाप्य घृतेनाभ्यज्योद्वर्तनेनोद्वर्त्योष्णोदकेनप्रक्षाल्यगंधंदत्वासंपातोदकेनाभिषिच्य सपल्लवैश्चतुर्भिःकुंभैरापोहिष्ठेतित्रिभिराकलशेष्वितिचप्रत्येकं समुद्रज्येष्ठाइतिचतुर्भिराकलशेष्वितिचमिलितैःसंस्नाप्यौदुंबरादिपीठेर्चामुपवेश्यपरितोऽष्टदिक्षुसजलकुंभान् संस्थाप्यतेषुगंधपुष्पदूर्वाःक्षिप्त्वाऽऽद्येसप्तमृदः द्वितीयेपुष्करपर्णशमीविकंकताश्मंतकत्वचःपल्लवांश्च तृतीयादिषु सप्तधान्यं पंचरत्नफलपुष्पाणिकुशदूर्वागोरोचनसंपातोदकगंधफलसर्वौषधीःक्षिप्त्वा क्रमेणापोहिष्ठेतितिसृभिर्हिरण्यवर्णाइतिचतसृभिः पवमानानुवाकेनचाभिषिच्यैककुंभेशमीपलाशवटखदिरबिल्वाश्वत्थविकंकतपनसाम्रशिरीषोदुंबराणांपल्लवान्कषायांश्चक्षिप्त्वा अश्वत्थेवइत्यभिषिच्य पंचरत्नोदकेनहिरण्यवर्णाइतिसंस्नाप्य वाससीदत्वा उपवीतादिदीपांतंकृत्वा हिरण्यगर्भः यआत्मदा यःप्राणतः यस्येमे येनद्यौः यंक्रंदसी आपोहयत् यश्चिदापो इत्यष्टौपिष्टदीपान्दत्वा सुवर्णशलाकयातैजसपात्रस्थंमधुघृतंचगृहीत्वाचित्रंदेवानांतेजोसीतिमंत्राभ्यां ॐनमोभगवतेतुभ्यंशिवायहरयेनमः हिरण्यरेतसेविष्णोविश्वरूपायतेनमइतिचदक्षिणसव्येदेवनेत्रेमंत्रावृत्त्यालिखेत् अंजंतित्वेत्यंजनेनमधुनाचाक्त्वादेवस्यत्वासवितुःप्रसवे० इंद्रस्येंद्रियेणानज्मीतिमध्वाज्यशर्कराभिरक्त्वातेनैवांजनेनपुनरंजयेत् स्थिरलिंगेतुस्वर्णसूच्यागंधेन ॐनमोभगवतेरुद्रायहिरण्यरेतसेपरायपरमात्मनेविश्वरूपायोमाप्रियायनमइत्यंजनादिनांजयेत् ततःआदर्शभक्ष्यादिदर्शयेत ततःकर्ताआचार्यायगामृत्विग्भ्यश्चदक्षिणांदद्यात् अथाचार्यः प्रत्यृचमादौप्रणवंवदन् पुरुषसूक्तेनस्तुत्वा वंशपात्रेपंचवर्णौदनेनदेवस्यनीराजनंकारयित्वारुद्रायचतुष्पथादौदद्यात् मंत्रस्तु ॐनमोरुद्रायसर्वभूताधिपतयेदीप्तशूलधरायोमादयितायविश्वाधिपतयेरुद्रायवैनमोनमः शिवमगर्हितंकर्मास्तुस्वाहेति अश्वत्थपर्णेभूतेभ्योनमइति केचिदेतद्रात्रौस्थिरप्रतिष्ठायामिच्छंति ॥

तदनंतर देवाला नमस्कार करून 'स्वागतं देव देवेश विश्वरूप नमोस्तु ते ॥ शुद्धेपि त्वदधिष्ठाने शुद्धिं कुर्मः सहस्व तां ॥' अशी प्रार्थना करून 'उत्तिष्ठब्रह्मणस्पते०' ह्या मंत्रानें ऋत्विजांसहित यजमानानें देवाला उठवून अभ्युत्तारण पूर्वी केलेलें नसेल तर या वेळीं करावें. तें असें—'अग्निःसप्तिं०' हें सूक्त अग्निपदरहित म्हणून पुनः अग्निपदसहित म्हणावें. असें अष्टसहस्र, किंवा अष्टशत अथवा अष्टाविंशतिवार म्हणत असून देवावर उदकधार धरावी. याप्रमाणें अभ्युत्तारण झाल्यावर मूर्तीला बारा वेळां मृत्तिका लावून उदकानें प्रक्षालन करावें. नंतर समंत्रक पंचगव्य करून 'पयः पृथिव्यां पय ओषधीषु०' या मंत्रानें व 'आवोराजानं०' ह्या मंत्रानें, मूर्तीला स्नान घालून 'आप्यायस्व०, दधिक्राव्णो०, तेजोसि०, मधुवाता०, आयंगौः०' ह्या पांच मंत्रांनीं पंचामृतांचें स्नान घालावें. लिंग असेल तर 'नमस्तेरुद्रमन्यव०' ह्या आठ ऋचांनीं स्नान घालावें. नंतर घृताचा अभ्यंग करून उटणें लावून उष्णोदकानें प्रक्षालन करावें. नंतर गंध लावून संपातोदकानें अभिषेक करून पल्लवसहित चार कलशांनीं अनुक्रमानें 'आपोहिष्ठा०, योवः शिव०, तस्मा०, आकलशेषु०' ह्या चार मंत्रांनीं स्नान घालून 'समुद्रज्येष्ठा०' ह्या चार ऋचा, आणि 'आकलशेषु०' ही एक ऋचा यांनीं एकत्र मीलित चार कलशांनीं स्नान घालून उदुंबरादिक पीठावर मूर्ती बसवून सभोंवतीं आठ दिशांना आठ उदक कलश स्थापून त्यांत गंध, पुष्पें, दूर्वा घालून; पहिल्या कलशांत सप्तमृत्तिका; दुसऱ्या कुंभांत कमलपत्र, शमीपत्र, विकंकत व आपटा यांच्या साली आणि पल्लव; तिसऱ्या कलशांत सप्त धान्यें; चवथ्या कलशांत पंचरत्नें; पांचव्या कलशांत फळें व पुष्पें; सहाव्या कलशांत कुश, दूर्वा, व गोरोचन; सातव्या कलशांत संपातोदक; आठव्या कलशांत सर्वौषधि टाकून अनुक्रमानें 'आपोहिष्ठा०' ह्या तीन ऋचा, 'हिरण्यवर्णाः शुचयः०' ह्या चार ऋचा, आणि 'पवमानः सुवर्जनः०' हा अनुवाक ह्या मंत्रांनीं अभिषेक करून, एका कलशांत शमी, पळस, वट, खदिर, बिल्व, अश्वत्थ, विकंकत, पनस, आम्र, शिरीष, उदुंबर, यांचे पल्लव आणि कषाय टाकून 'अश्वत्थेवो०' ह्या मंत्रानें अभिषेक करून पंचरत्नोदकानें 'हिरण्यवर्णा०' ह्या मंत्रानें स्नान घालून दोन वस्त्रें देऊन यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप, आणि दीप देऊन 'हिरण्यगर्भः०, य आत्मदा०, यः प्राणतो०, यस्येमे०, येनद्यौ०, यंक्रंदसी०, आपोहयत्०, यश्चिदापो०' ह्या आठ मंत्रांनीं

आठ पिठाचे दीप देऊन सुवर्णशलाकेनें तैजस पात्रांतील मध व घृत घेऊन 'चित्रं देवानां०, तेजोसि०' हे दोन मंत्र आणि 'ॐनमोभगवते तुभ्यं शिवाय हरये नमः ॥ हिरण्यरेतसे विष्णो विश्वरूपाय ते नमः ॥' हा मंत्र यांची आवृत्ति करून दक्षिण, व वाम नेत्रांना लेखन करावें. 'अंजंतित्वा०' ह्या मंत्रानें अंजन व मध डोळ्यांत घालून 'देवस्यत्वा० हस्ताभ्यामभेस्ते-जसासूर्यस्यवर्चसेंद्रस्येंद्रियेणानज्मि' हा मंत्र म्हणून मध, आज्य, शर्करा यांचें अंजन घालून वरील अंजन पुनः घालावें. स्थिर लिंगप्रतिष्ठा असेल तर सुवर्णाचे सूचीनें गंध घेऊन 'ॐनमो भगवते रुद्राय हिरण्यरेतसे पराय परमात्मने विश्वरूपा-योमाप्रियाय नमः' ह्या मंत्रानें डोळ्यांत अंजनादिक घालावें. तदनंतर आरसा व भक्ष्यादि पदार्थ दाखवावे. तदनंतर यजमानानें आचार्याला गोप्रदान आणि ऋत्विजांना दक्षिणा द्यावी. तदनंतर आचार्यानें पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेच्या आधीं प्रणव म्हणून पुरुषसूक्तानें स्तुति करून वेळूच्या पात्रांत पंचवर्ण ओदन घालून देवाला ओंवाळून रुद्राला चवाठ्यावर वगैरे द्यावें. त्याचा मंत्र—'ॐनमो रुद्राय सर्वभूताधिपतये दीप्तशूलधरायोमादयिताय विश्वाधिपतये रुद्राय वै नमोनमः शिवमगर्हितं कर्मास्तु स्वाहा' आणि अश्वत्थपर्णावर 'भूतेभ्यो नमः' असें द्यावें. केचित् विद्वान् हें रुद्राला पंचवर्णौदनदान रात्रीं स्थिरप्रतिष्ठेचे ठायीं करावें असें सांगतात.

अथाचार्यः सर्वतोभद्रेदेवानावाहयेत् मध्येब्रह्माणम् पूर्वादिदिक्षुइंद्रादिलोकपालान् ईशानेंद्राद्यंतरालेषु वसून् रुद्रान् आदित्यान् अश्विनौ विश्वान्देवान् पितॄन् नागान् स्कंदवृषौ ब्रह्मेशानाद्यंतरालेषु दक्षं विष्णुं दुर्गां स्वधाकारं मृत्युरोगान् समुद्रान् सरितः मरुतः गणाधिपंचेति मध्येएव पृथिवीमेरुंसंस्थाप्यदेवंचावाह्य प्रागादि वज्रं शक्तिं दंडं खड्गं पाशं अंकुशं गदां शूलं तद्बाह्ये गौतमं भरद्वाजं विश्वामित्रं कश्यपं जमदग्निं वसिष्ठं अत्रिं अरुंधतींच तद्बाह्येनवग्रहान् तद्बाह्ये ऐंद्रीं कौमारीं ब्राह्मीं वाराहीं चामुंडां वैष्णवीं माहेश्वरीं वैनायकीमिति एताःनामभिरावाह्यसंपूज्य अर्चायांदेवंतन्मंत्रेणावाह्य मंडलमध्येर्चांसुप्रतिष्ठोभवेतिनिवेश्यसं-पूज्य वह्नौमंडलदेवतानांनामभिस्तिलाज्येनदशदशाहुतीर्हुत्वापुष्पांजलिंसमर्प्यनमोमहदितिदेवंनत्वामंडलादु-त्तरतःस्वस्तिकेमंचकं तदुपरिशय्यांकृत्वा उत्तिष्ठेतिदेवमुत्थाप्यमंगलघोषैःशय्यायांदेवमारोप्य पुरुषसूक्तोत्तर नारायणाभ्यांस्तुत्वादेवेन्यासंकुर्यात तद्यथा पुरुषात्मनेनमः प्राणात्मनेन० प्रकृतितत्त्वाय० बुद्धितत्त्वाय० अहंकारतत्त्वाय० मनस्तत्त्वाय० इतिसर्वांगे प्रकृतितत्त्वाय० बुद्धितत्त्वाय० हृदि शब्दतत्त्वाय० शिरसि स्पर्शतत्त्वाय० त्वचि रूपतत्त्वाय० हृदि एवंहृद्येवरसगंधश्रोत्रत्वक्चक्षुर्जिह्वाघ्राणवाक्पाणिपादपायूपस्थपृ-थिव्यप्तेजोवाय्वाकाशसत्वरजस्तमोदेहतत्वानिविन्यसेत् ततःपुरुषसूक्तस्याद्यमृग्द्वयंकरयोः तदुत्तरंजान्वोः तदुत्तरंकट्योः तंयज्ञमितितिस्रःनाभिहृत्कंठेषु तस्मादश्वेतिद्वयंबाह्वोः ब्राह्मणोस्येतिद्वयंनासयोः नाभ्येतिद्वय-मक्ष्णोः अंत्यांशिरसि केचित्तत्त्वन्यासमन्यथाआहुः पुरुषप्रकृतिमहदहंकारतत्त्वानि शब्दस्पर्शरूपरसगंधत-न्मात्राणि आकाशवायुतेजोप्पृथिवीश्रोत्रत्वक्चक्षूरसनाघ्राणवाक्पाणिपादपायूपस्थमनस्तत्त्वानीति केचिदेता-निस्थिरलिंगादावेवेच्छंति ततःसुखशायीभवेतिशय्यायांदेवंस्वापयित्वा मंडलशय्ययोरंतरालेनगंतव्यमितिप्रै-षंदत्वास्विष्टकृदादिहोमशेषंसमाप्यमंडलदेवताभ्योनामभिःपायसेनचरुणावाबलीन्दद्यात् नीवारचरुशेषेण-दिग्बलिम् नेदंस्थिरप्रतिष्ठायाम् ।

तदनंतर आचार्यानें सर्वतोभद्रावर देवांचें आवाहन करावें. तें असें—मध्यें ब्रह्मा, पूर्वादि आठ दिशांचे ठायीं इंद्रादिक आठ लोकपाल, ईशान व इंद्र यांच्यामध्यें वसु, इंद्र अग्नि यांच्या मध्यें रुद्र, अग्नि यम यांच्यामध्यें आदित्य, यम नैर्ऋति यांच्यामध्यें अश्विनौ, नैर्ऋति व वरुण यांच्यामध्यें विश्वेदेव, वरुण वायु यांच्यामध्यें पितर, वायु सोम यांच्यामध्यें नाग, सोम ईशान यांच्यामध्यें स्कंद वृष यांचें आवाहन करावें. आतां ब्रह्मा आणि ईशानादिक आठ लोकपाल यांच्यामध्यें अनुक्रमानें दक्ष, विष्णु, दुर्गा, स्वधाकार, मृत्युरोग, समुद्र, सरित्, मरुत्, गणाधिप ह्या आठांचें आवाहन करावें. आणि मध्यभागींच पृथिवी, मेरु व स्थापन करावयाचा देव यांचें आवाहन करावें. पूर्वादि आठ दिशांचे ठायीं वज्र, शक्ति, दंड, खड्ग, पाश, अंकुश, गदा, शूल यांचें आवाहन करावें. त्यांच्या बाहेर गौतम, भरद्वाज, विश्वामित्र, कश्यप, जमदग्नि, वसिष्ठ, अत्रि, अरुंधती यांचें आवाहन करावें. त्यांच्या बाहेर नवग्रहांचें आवाहन करावें. त्यांच्या बाहेर ऐंद्री, कौमारी, ब्राह्मी, वाराही, चामुंडा, वैष्णवी, माहेश्वरी, वैनायकी यांचें नाममंत्रानें आवाहन करून सर्वांची पूजा करून मूर्तीचे ठायीं स्थापन करावयाच्या देवाचें त्याच्या मंत्रानें आवाहन करून मंडलामध्यें 'सुप्रतिष्ठितो भव' असें म्हणून मूर्ति ठेवून पूजा करावी. नंतर अग्नीमध्यें मंडल-देवतांच्या नाममंत्रांनीं तिल आणि आज्य यांच्या दहादहा आहुति देऊन पुष्पांजलि समर्पण करून 'नमोमह०' या मंत्रानें

देवाला नमस्कार करून मंडलाच्या उत्तरेस स्वस्तिकावर मंचक आणि मंचकावर शय्या करून 'उत्तिष्ठ०' या मंत्रानें देवाला उठवून मंगलघोषांनीं शय्येवर बसवून पुरुषसूक्त व उत्तरनारायण ह्या दोन सूक्तांनीं स्तुति करून देवाचे ठायीं न्यास करावा. तो असा—पुरुषात्मनेनमः प्राणात्मने० प्रकृतितत्त्वाय० बुद्धितत्त्वाय० अहंकारतत्त्वाय० मनस्तत्त्वाय० असा सर्वांगाचे ठायीं न्यास करावा. प्रकृतितत्त्वाय० बुद्धितत्त्वाय० हृदि. शब्दतत्त्वाय० शिरसि. स्पर्शतत्त्वाय० त्वचि. रूपतत्त्वाय० हृदि. याप्रमाणें हृदयाचे ठायींच रस, गंध, श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा, घ्राण, वाक्, पाणि, पाद, पायु, उपस्थ, पृथिवी, अप्, तेज, वायु, आकाश, सत्त्व, रज, तम या तत्त्वांचा न्यास करावा. तदनंतर पुरुषसूक्तन्यास येणेंप्रमाणें—'सहस्र०' वामकरे. 'पुरुष०, दक्षिण करे. 'एतावा०' वामजानुनि. 'त्रिपादूर्ध्वं०' दक्षिणजानुनि. 'तस्माद्विराळ०' वामकट्यां. 'यत्पुरुषेण०' दक्षिणकट्यां. 'तंयज्ञं०' नाभौ. 'तस्माद्यज्ञा०' हृदि. 'तस्माद्य०' कंठे. 'तस्मादश्वा०' वामबाहौ. 'यत्पुरुषं०' दक्षिणबाहौ. 'ब्राह्मणो०' वामनासायां. 'चंद्रमा०' दक्षिणनासायां. 'नाभ्या०' वामनेत्रे. 'सप्तास्या०' दक्षिणनेत्रे. 'यज्ञेनयज्ञ०' शिरसि. तदनंतर 'सुखशायीभव' असें म्हणून शय्येचे ठायीं देवाला निजवून 'मंडलशय्ययोरंतराले न गंतव्यं' असा प्रैष देऊन स्विष्टकृदादि होमशेष समाप्त करून मंडलदेवतांना नाममंत्रांनीं पायसाचे किंवा चरूचे बलि द्यावे. नीवारचरुशेषानें दिग्बलि द्यावा. हें बलिदान स्थिरप्रतिष्ठेचे ठायीं करावयाचें नाहीं.

**स्थिरलिंगार्चादौत्वयंविशेषः** अग्निस्थापनहोमवर्ज्यंसर्वंपूर्ववत्कृत्वा इदानीमग्निस्थापनंकृत्वा-पूर्वोक्तहोमंकुर्यात् नात्रनैवारश्चरुः विष्णुश्चेत्पूर्वोक्तहोमंकृत्वापुरुषसूक्तेनप्रत्यृचमाज्यंहुत्वाइदंविष्णुरितिपादौ-स्पृष्ट्वापुनस्ताएवहुत्वाविष्णोर्नुकमितिनाभिंस्पृष्ट्वापुनस्ताएवहुत्वाअतोदेवेतिशिरःस्पृष्ट्वा पुनस्ताएवहुत्वापुरुषसू-क्तेनसर्वांगंस्पृशेत् स्थिरलिंगंचेदग्निस्थापनादिपूर्वोक्तसमिदाज्यतिलाहुतीर्हुत्वा यातइषुरित्यनुवाकांतेनद्रापेसह-स्राणीत्यनुवाकाभ्यांचप्रत्यृचमाज्यंहुत्वासर्वोवैरुद्रइतिमूलंस्पृशेत् पुनस्ताएवहुत्वाकद्रुद्रायेतिमध्यं पुनस्ताएव-हुत्वानमोहिरण्यबाहवइत्यग्रम् पुनस्ताएवहुत्वासर्वरुद्रेणसर्वांगंस्पृशेत ततोधामंतइतिपूर्णाहुतिंजुहुयान्नवा एवमधिवासनंकृत्वापरेद्युःसद्योवापीठिकांस्नापयित्वामहीमूष्वित्यावाह्य अदितिर्द्यौरितिस्तुत्वा ह्रींनमइतिसंपू-ज्य तेनैवपूर्णाहुतिंहुत्वा उत्तिष्ठब्रह्मणस्पतइतिदेवमुत्थाप्यपुष्पांजलिंदत्वा पुरुषसूक्तेनस्तुत्वाउदुत्यमित्युत्थाप्य-कनिक्रददितिसूक्तेनविष्णुं सद्योजातमितिपंचानुवाकैर्लिंगंगृहंप्रवेश्य पीठिकायांइंद्रादिनामभिरष्टरत्नानिक्षि-प्त्वासप्तधान्यरूप्यवृक्षमनःशिलाःक्षिप्त्वापायसेनसंलिप्य प्रणवेनांगन्यासंकृत्वा सुवर्णशलाकामंतरितांकृत्वा ॐसुलग्नेप्रतितिष्ठपरमेश्वरेत्युक्त्वा अतोदेवेतिविष्णुं रुद्रेणचलिंगंस्थापयेत् ततःप्राणप्रतिष्ठा ॥

लिंग व मूर्ति इत्यादिकांची स्थिरप्रतिष्ठा असेल तर पूर्वीं सांगितल्या प्रकारांत विशेष आहे, तो असा—अग्निस्थापन व होम वर्ज्य करून बाकीचें सारें कृत्य पूर्वींप्रमाणें करावें. ( म्हणजे संकल्पादिक जलाधिवासापर्यंतचें कृत्य करून देवाला नमस्कार करून 'स्वागतं देवदेवेश०' इत्यादि प्रार्थना, उत्थापन, अग्न्युत्तारण इत्यादि नेत्रोन्मीलनापर्यंत करून पुरुषसूक्तस्तुति इत्यादि करावें. नंतर मंडलदेवतास्थापनापर्यंतचें कृत्य करून मंडलाचे ठायीं मूर्तिनिवेश, शय्येचे ठायीं देवतारोहण, नंतर स्तुति, पूर्वोक्तन्यास, आणि शय्येवर देवशयन करवावें. ) इतकें झाल्यावर अग्निस्थापन करून पूर्वीं सांगितलेला होम करावा. स्थिर-प्रतिष्ठेचे ठायीं स्थाप्यदेवताहोमाविषयीं नैवारचरु नाहीं. विष्णूची स्थिरप्रतिष्ठा असेल तर पूर्वीं सांगितलेला; लोकपाल, मूर्ति, मूर्तिपति यांस समिधा, तिल, आज्यहोम झाल्यावर पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें आज्यहोम करून 'इदंविष्णुः०' ह्या मंत्रानें देवाच्या पायांना स्पर्श करावा. पुनः त्याच आहुति देऊन 'विष्णोर्नुकं०' ह्या मंत्रानें नाभीला स्पर्श करावा. पुनः त्याच आहुति देऊन 'अतोदेवा०' ह्या मंत्रानें मस्तकाला स्पर्श करावा. पुनः त्याच आहुति देऊन पुरुषसूक्तानें सर्वांगाला स्पर्श करावा. लिंगाची स्थिरप्रतिष्ठा असेल तर अग्निस्थापनादि करून पूर्वीं सांगितलेल्या समिधा, आज्य, तिल यांचा होम करून 'यातइषुः०' हा अनुवाकसमाप्तीपर्यंतचे मंत्र, 'द्रापे०' हा अनुवाक आणि 'सहस्राणि०' हा अनुवाक ह्यांच्या प्रत्येक ऋचेनें आज्यहोम करून 'सर्वोवैरुद्रः०' ह्या मंत्रानें लिंगाच्या मुळास स्पर्श करावा. पुनः त्याच आहुतींचा होम करून 'कद्रुद्राय०' ह्या मंत्रानें लिंगाच्या मध्याला स्पर्श करावा. पुनः त्याच आहुतींचा होम करून 'नमो हिरण्यबाहवे०' ह्या मंत्रानें लिंगाच्या अग्राला स्पर्श करावा. पुनः त्याच आहुतींचा होम करून साऱ्या रुद्रानें सर्वांगाला स्पर्श करावा. तदनंतर 'धामंते०' ह्या मंत्रानें पूर्णाहुति द्यावी. किंवा पूर्णाहुति देऊं नये. याप्रमाणें पूर्वदिवशीं अधिवासन करून दुसऱ्या दिवशीं, अथवा सद्यःपक्ष असेल तर त्याच दिवशीं, पीठिकेला स्नान घालून 'महीमूषु०' ह्या मंत्रानें आवाहन करून 'अदितिर्द्यौ०' ह्या मंत्रानें स्तुति करून 'ऱ्हीं नमः' ह्या मंत्रानें पूजा करून त्याच मंत्रानें पूर्णाहुति देऊन 'उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते०' ह्या मंत्रानें देवाला उठवून पुष्पांजलि देऊन पुरुषसूक्तानें स्तुति करून 'उदुत्यं०' ह्या मंत्रानें उठवून 'कनिक्रदत्०' ह्या सूक्तानें विष्णुमूर्तीला आणि 'सद्योजातं०' ह्या पांच अनुवाकांनीं

लिंगाला गृहांत प्रवेश करवून पीठिकेवर इंद्रादि नांवांनीं आठ रत्नें टाकून, सप्तधान्यें, रौप्य, मनःशिला टाकून पायसानें लेप करून प्रणवानें अंगन्यास करून सुवर्णशलाका अंतरित करून चांगल्या लग्नावर ( मुहूर्तावर ) 'प्रतितिष्ठ परमेश्वर' असें उच्चारून 'अतो देवा०' ह्या मंत्रांनीं विष्णूची आणि रुद्रानें लिंगाची स्थापना करावी. तदनंतर प्राणप्रतिष्ठा करावी.

चलार्चादौत्वधिवासनांतेपरेद्युरुत्तिष्ठब्रह्मणस्पतइतिदेवमुत्थाप्यपुरुषसूक्तोत्तरनारायणाभ्यांस्तुत्वाघृतेव्रीहिचरुंकृत्वातद्देवतामंत्रेणदशाहुतीर्हुत्वानामभिर्जुहुयात् अग्नयेस्वाहा सोमायस्वाहा धन्वंतरयेस्वाहा कुह्वैस्वाहा अनुमत्यैस्वाहा प्रजापतयेस्वाहा परमेष्ठिनेस्वाहा ब्रह्मणेस्वाहा अग्नयेस्वाहा सोमायस्वाहा अग्नयेन्नादायस्वाहा अग्नयेन्नपतयेस्वाहा प्रजापतयेस्वाहा विश्वेभ्योदेवेभ्यःस्वाहा सर्वेभ्योदेवेभ्यःस्वाहा भूर्भुवःस्वःस्वाहा अग्नयेस्विष्टकृतेइति ततः सप्तमेअग्नेपुनस्त्वेत्याभ्यांपूर्णाहुतिः ततःआचार्योयाओषधीरितिपुष्पफलसर्वौषधीःसमर्प्य संपातोदकंताम्रपात्रेआदायदेवमंत्रेणशतवारमभिमंत्र्य तेनैवाभिषिंचेत् ततः उत्तिष्ठेतिदेवमुत्थाप्य विश्वतश्चक्षुरित्युपस्थायदेवंध्यात्वाजपेत् ब्रह्मणेनमः एवंविष्णवेरुद्राय० इंद्रादीनष्टौ वसुभ्योरुद्रेभ्यआदित्येभ्योऽश्विभ्यांमरुद्भ्यः कुबेरायगंगादिमहानदीभ्योऽग्नीषोमाभ्यामिंद्राग्निभ्यांद्यावापृथिवीभ्यांधन्वंतरयेसर्वेशायविश्वेभ्योदेवेभ्योब्रह्मणेनमइति ततः संपातोदकेनयजमानमभिषिच्य देवंध्यात्वाप्रतितिष्ठपरमेश्वरेतिपुष्पांजलिंनिवेद्य सच्चिदानंदंब्रह्मैवभक्तानुग्रहायगृहीतविग्रहंकरचरणाद्यवयविनंशंखचक्राद्यायुधवंतंनिजवाहनाद्युपेतंनिजहृत्कमलेऽवस्थितंसर्वलोकसाक्षिणमणीयांसंपरमेष्ठ्यसिपरमांश्रियंगमयेतिमंत्रेणपुष्पांजलावागतंविभाव्याऽर्चायांविन्यस्यप्राणप्रतिष्ठांकुर्यात् ॥

मूर्तीची वगैरे चलप्रतिष्ठा असेल तर अधिवासन झाल्यावर दुसऱ्या दिवशीं 'उत्तिष्ठब्रह्मणस्पते०' ह्या मंत्रानें देवाला उठवून पुरुषसूक्त आणि उत्तरनारायणसूक्त यांनीं स्तुति करून घृतांत व्रीहिचरु करून त्या देवतेच्या मंत्रानें दहा आहुति होम करून पुढच्या नाममंत्रांनीं होम करावा. तो असा—अग्नये स्वाहा, सोमाय०, धन्वंतरये०, कुह्वै०, अनुमत्यै०, प्रजापतये०, परमेष्ठिने०, ब्रह्मणे०, अग्नये०, सोमाय०, अग्नयेऽन्नादाय०, अग्नयेऽन्नपतये०, प्रजापतये०, विश्वेभ्योदेवेभ्यः०, सर्वेभ्योदेवेभ्यः०, भूर्भुवःस्वः०, अग्नयेस्विष्टकृते०. तदनंतर 'सप्ततेअग्ने०', 'पुनस्त्वा०' ह्या दोन मंत्रांनीं पूर्णाहुति द्यावी. तदनंतर आचार्यानें 'या ओषधीः०' ह्या मंत्रानें पुष्पें, फलें, आणि सर्वौषधि समर्पण करून संपातोदक ताम्रपात्रांत घेऊन देवमंत्रानें शंभर वेळां अभिमंत्रण करून त्या उदकानें देवावर अभिषेक करावा. तदनंतर 'उत्तिष्ठ ब्रह्मण०' ह्या मंत्रानें देवाला उठवून 'विश्वतश्चक्षु०' ह्या मंत्रानें उपस्थान करावें. तदनंतर देवाचें ध्यान करून जप करावा, तो असा—ब्रह्मणे नमः विष्णवे नमः रुद्राय नमः इंद्रादि अष्टलोकपालांस नमस्कार करावा. वसुभ्यो नमः रुद्रेभ्यो० आदित्येभ्यो० अश्विभ्यां० मरुद्भ्यो० कुबेराय० गंगादिमहानदीभ्यो० अग्नीषोमाभ्यां० इंद्राग्निभ्यां० द्यावापृथिवीभ्यां० धन्वंतरये० सर्वेशाय० विश्वेभ्यो देवेभ्यो० ब्रह्मणे नमः तदनंतर संपातोदकानें यजमानाला अभिषेक करावा. नंतर देवाचें ध्यान करून 'प्रतितिष्ठ परमेश्वर' असें म्हणून पुष्पांजलि निवेदन करून 'सच्चिदानंदं ब्रह्मैव भक्तानुग्रहाय गृहीतविग्रहं करचरणाद्यवयविनं शंखचक्राद्यायुधवंतं निजवाहनाद्युपेतं निजहृत्कमलेऽवस्थितं सर्वलोकसाक्षिणमणीयांसं परमेष्ठ्यसि परमांश्रियं गमय' ह्या मंत्रानें पुष्पांजलीचेठायीं सच्चिदानंदब्रह्म आलेलें आहे, अशी भावना करून तो पुष्पांजलि मूर्तीचेठायीं ठेऊन नंतर प्राणप्रतिष्ठा करावी.

**यथा** अस्यश्रीप्राणप्रतिष्ठामंत्रस्यब्रह्मविष्णुरुद्राऋषयः ऋग्यजुःसामानिच्छंदांसि क्रियामयवपुःप्राणाख्यादेवता आंबीजम् क्रोंशक्तिः प्राणप्रतिष्ठायांविनियोगः ततोऋष्यादीन्क्रमेणशिरोमुखहृदयगुह्यपादेषुविन्यस्य ॐकंखंगंघंङं अंपृथिव्यप्तेजोवाय्वाकाशात्मने आंहृदयायनमः ॐचंछंजंझंञं इंशब्दस्पर्शरूपरसगंधात्मनेईंशिरसेस्वाहा ॐटंठंडंढंणंउंश्रोत्रत्वक्चक्षुर्जिह्वाघ्राणात्मनेऊंशिखायैवषट् ॐतंथंदंधंनं एंवाक्पाणिपादपायूपस्थात्मनेऐंकवचायहुम् ॐ पंफंबंभंमंओंवचनादानविहरणोत्सर्गानंदात्मने औंनेत्रत्रयायवौषट् ॐयंरंलंवंशंषंसंहंळंक्षं अंमनोबुद्ध्यहंकारचित्तात्मने अः अस्त्रायफट् एवंआत्मनिदेवेचकृत्वादेवंस्पृष्ट्वाजपेत् ॐआंह्रींक्रोंअंयंरंलंवंशंषंसंहंसः देवस्यप्राणाइहप्राणाः ॐ आंह्रींक्रोंअंयंरंलंवंशंषंसंहंसः देवस्यजीवइहस्थितः ॐ आंह्रींक्रोंअंयंरंलंवंशंषंसंहंसः देवस्यसर्वेंद्रियाणि ॐ आंह्रींक्रोंअंयंरंलंवंशंषंसंहंसः देवस्यवाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिह्वाघ्राणप्राणाइहागत्यस्वस्तयेसुखेनसुचिरंतिष्ठंतुस्वाहेति ततोऽर्चाहृदयंगुष्ठंदत्वाजपेत् अस्यैप्राणाःप्रतिष्ठंतुअस्यैप्राणाःक्षरंतुच अस्यैदेवत्वमर्चायैमामहेतिचकश्चनेति ततः प्रणवेनसंरुध्यसजीवंध्यात्वा मुखादीनिस्पृ-

जप्त्वाकर्णेगायत्रींदेवमंत्रंचजप्त्वापुरुषसूक्तेनोपस्थायपादनाभिशिरःस्पृष्ट्वा इहैवैधीतित्रिर्जपेत् ततः कर्ता स्वागतं देवदेवेशमद्भाग्यात्त्वमिहागतः प्राकृतंत्वमदृष्ट्वामांबालवत्परिपालय धर्मार्थकामसिद्ध्यर्थंस्थिरोभवशुभायनः सान्निध्यंतुसदादेवस्वार्चायांपरिकल्पय यावच्चंद्रावनीसूर्यास्तिष्ठंत्यप्रतिघातिनः तावत्त्वयात्रदेवेशस्थेयंभक्तानुकंपया भगवन्देवदेवेशत्वंपितासर्वदेहिनाम् येनरूपेणभगवंस्त्वयाव्याप्तंचराचरम् तेनरूपेणदेवेशस्वार्चायांसन्निधौभवेतिनमेत् एतदंतंसर्वदेवानांसमानं देवमंत्रश्चमूलमंत्रोवैदिकोवाग्राह्यः अथाचार्यःकर्तावालिंगमर्चांवा ॐभूःपुरुषमावाहयामि ॐभुवःपुरुषमावाहयामि ॐसुवःपुरुषमावाहयामि ॐभूर्भुवःसुवःपुरुषमावाहयामीत्यावाह्य प्रणवेनासनंदत्त्वा तेनैवदूर्वाश्यामाकविष्णुक्रांतापद्ममिश्रंपाद्यम् इमाआपःशिवतमाःपूताःपूततमामेध्यामेध्यतमाअमृताअमृतरसाःपाद्यास्ताजुषतांप्रतिगृह्यतांप्रतिगृह्णातुभगवान्महाविष्णुर्विष्णवेनमइतिपाद्यम् भगवान्महादेवोरुद्रायनमइतिलिंगे एवंदेवतांतरेपूह्यं इमाआपआचमनीयास्ताजुषतामित्याचमनीयम् अर्घ्याइत्यर्घ्यम् ततोवेदमंत्रैःसंस्नाप्य इदंविष्णुरितिविष्णौ नमोअस्तुनीलग्रीवायेतिलिंगे[1]प्रतिसरंविसृस्य वस्त्रंयज्ञोपवीतंचदत्वा इमेगंधाःशुभादिव्याःसर्वगंधैरलंकृताः पूताब्रह्मपवित्रेणपूताःसूर्यस्यरश्मिभिः इतिगंधम् इमेमाल्याःशुभादिव्याःसर्वमाल्यैरलंकृताः पूताइत्यादिमाल्यम् इमेपुष्पाःशुभाइत्यादिपुष्पम् वनस्पतिरसोद्भूतोगंधाढ्योधूपउत्तमः आघ्रेयःसर्वदेवानांधूपोयंप्रतिगृह्यताम् प्रतिगृह्णात्वित्यादिधूपम् ज्योतिःशुक्रंचतेजश्चदेवानांसततंप्रियः प्रज्योतिःसर्वभूतानांदीपोयंप्रतिगृह्यताम् इतिदीपंदत्वा विष्णौसंकर्षणवासुदेवप्रद्युम्नानिरुद्धपुरुषोत्तमाधोक्षजनृसिंहाच्युतजनार्दनोपेंद्रहरिश्रीकृष्णेतिद्वादशनामभिः केशवादिद्वादशनामभिर्वा पुष्पाणिसमर्प्य तैरेवतर्पणंकृत्वा पायसगुडौदनचित्रौदनानि पवित्रंतेविततमितिनिवेद्य संकर्षणादिपूर्वोक्तनामभिर्द्वादश[2]कृसराहुतीर्हुत्वा तैनेवशार्ङ्गिणेश्रियैसरस्वत्यैविष्णवेइतिहुत्वा विष्णोर्नुकंवीर्याणि० तदस्यप्रियमभिपाथो० प्रतद्विष्णुस्तवतेवीर्येण० परोमात्रयातन्वावृधान० विचक्रमेपृथिवीमेपएतां० त्रिर्देवःपृथिवीमेपएतां० इतिजुहुयात् पुनःद्वादशनामभिर्जुहुयात् ॥

ती अशी—'प्राणप्रतिष्ठामंत्रस्य ब्रह्माविष्णुरुद्राऋषयः०' याला आरंभ करून 'स्वस्तये सुखेन सुचिरंतिष्ठंतुस्वाहा' एथपर्यंत झाल्यावर प्रतिमेच्या हृदयावर अंगुष्ठ देऊन पुढील मंत्र जपावा. तो मंत्र—'अस्यै प्राणाः प्रतिष्ठंतु अस्यै प्राणाः क्षरंतु च ॥ अस्यै देवत्वमर्चायै मामहेति च कश्चन ॥' तदनंतर प्रणवानें रोधून मूर्ति सजीव आहे असें ध्यान करून 'ध्रुवाद्यौः०' ह्या तीन ऋचांचा जप करून कर्णांत गायत्रीचा व देवमंत्राचा जप करून पुरुषसूक्तानें उपस्थान करून पाद, नाभि व मस्तक यांना स्पर्श करून 'इहैवैधि' याचा त्रिवार जप करावा. तदनंतर कर्त्यानें 'स्वागतं देवदेवेश मद्भाग्यात्त्वमिहागतः ॥ प्राकृतं त्वमदृष्ट्वा मां बालवत्परिपालय ॥ धर्मार्थकामसिद्ध्यर्थ०' इत्यादि प्रार्थना करून नमस्कार करावा. प्राणप्रतिष्ठेला आरंभ करून येथपर्यंत कृत्य सर्व देवांचें समान आहे. या ठिकाणीं देवमंत्र ध्यावयाचा तो मूलमंत्र किंवा वैदिकमंत्र घ्यावा. तदनंतर आचार्यानें किंवा यजमानानें त्या लिंगाची किंवा मूर्तीची पूजा करावी. ती अशी—'ॐ भूः पुरुषमावाहयामि०' इत्यादि मंत्रानें आवाहन करून प्रणवानें आसन देऊन प्रणवाचा उच्चार करून 'इमा आपः शिवतमाः पूताः पूततमा मेध्या मेध्यतमा अमृता अमृतरसाः पाद्यास्ताजुषतांप्रतिगृह्यतां प्रतिगृह्णातुभगवान्महाविष्णुर्विष्णवेनमः' ह्या मंत्रानें दूर्वा, श्यामाक, विष्णुक्रांता, कमल, यांनीं मिश्रित असें पाद्य द्यावें. लिंग असेल तर त्याच मंत्रांत 'महाविष्णुर्विष्णवेनमः' त्याच्या स्थानीं 'महादेवोरुद्रायनमः' असें म्हणावें. याप्रमाणें इतर देवता असेल तर तसा ऊह करावा. आचमनीयाविषयीं 'इमा आपः शिवतमाः०' ह्या मंत्रांत 'आचमनीयास्ताजुषतां०' असा ऊह करून आचमनीय द्यावें. 'इमाआपः०' ह्याच मंत्रांत 'अर्घ्यास्ता०' असा ऊह करून अर्घ्य द्यावें. नंतर देवाला वेदमंत्रांनीं स्नान घालून 'इदंविष्णु०' या मंत्रानें विष्णूच्या प्रतिमेचे ठिकाणीं आणि 'नमो अस्तु नीलग्रीवाय०' ह्या मंत्रानें लिंगाचे ठिकाणीं प्रतिसर (कंकण) सोडावा. 'इमे गंधाः शुभा दिव्याः सर्वगंधैरलंकृताः ॥ पूता ब्रह्मपवित्रेण पूताः सूर्यस्य रश्मिभिः ॥ पूताः पूततमा०' हा मंत्र पूर्वीप्रमाणें म्हणून गंध द्यावें. 'इमे माल्याः शुभा दिव्याः सर्वमाल्यैरलंकृताः ॥ पूताः पूततमा०' इत्यादि म्हणून माला द्याव्या. 'इमे पुष्पाः शुभा०' इत्यादिमंत्रानें पुष्पें द्यावीं. 'वनस्पतिरसो० धूपोयं प्रतिगृह्यतां ॥ प्रतिगृह्णातुभगवान्०' इत्यादि म्हणून धूप द्यावा. 'ज्योतिः शुक्रं च तेजश्च देवानां सततं प्रियः ॥ प्रज्योतिः सर्वभूतानां दीपोयं प्रतिगृह्यतां ॥ प्रतिगृह्णातु भगवान्०' इत्यादि मंत्र म्हणून दीप द्यावा. विष्णूचे ठिकाणीं 'संकर्षणायनमः

१ प्रतिसरं नाम कंकणमित्यर्थः. २ तिलमिश्रौदनः कृसरः.

वासुदेवायनमः' इत्यादि बारा नांवांनीं किंवा 'केशवायनमः' इत्यादिक बारा नांवांनीं पुष्पें समर्पण करून त्याच नांवांनीं तर्पण करून पायस, गुडौदन, चित्रौदन यांचा 'पवित्रंतेविततं०' ह्या मंत्रानें नैवेद्य समर्पण करून पूर्वीं सांगितलेल्या संकर्षणादिक बारा नांवांनीं गृहसिद्धकृसराच्या ( तिलमिश्र ओदनाच्या ) बारा आहुति अग्नींत देऊन त्याच कृसरानें 'शार्ङ्गिणे० श्रियै० सरस्वत्यै० विष्णवेस्वाहा' ह्या आहुतींचा होम करून 'विष्णोर्नुकं०, तदस्यप्रिय०, प्रतद्विष्णु०, परोमात्रया०, विचक्रमे०, त्रिर्देवः पृथिवी०' ह्या सहा मंत्रांनीं सहा आहुति द्याव्या. नंतर पुनः बारा नांवांनीं होम करावा.

लिंगेतुदीपांतंकृत्वा भवायदेवाय० शर्वाय० ईशानाय० पशुपतये० रुद्राय० उग्राय० भीमाय० महतेदेवायनमइति पुष्पाणिदत्वा तैरेवतर्पणंकृत्वा पवित्रंतेइतिपायसंगुडौदनंचनिवेद्यपूर्वोक्तनामभिःकृसरंहुत्वा भवस्यदेवस्यपत्न्यैस्वाहेत्याद्यष्टभिर्गुडौदनंहुत्वा भवस्यदेवस्यसुतायस्वाहेत्याद्यैर्हरिद्रौदनंहुत्वा त्र्यंबकंयजामहे० मानोमहांतमुतमानो० मानस्तोकेतनये० आरात्तेगोघ्नमुतपूरुषघ्ने० विकिरिदविलोहित० सहस्राणिसहस्र० इतिद्वादशएतैर्हुत्वा शिवाय० शंकराय० सहमानाय० शितिकंठाय० कपर्दिने० ताम्राय० अरुणाय० अपगुरमाणाय० हिरण्यबाहवे० सस्पिंजराय० बभ्लुशाय० हिरण्यायेतिचजुहुयात् ततःस्विष्टकृदादिहोमशेषंसमाप्य पूर्वोक्तसर्वहविर्भिर्विष्णवेलिंगायवाबलिंदद्यात् **मंत्रस्तु** त्वामेकमाद्यंपुरुषंपुरातनंनारायणंविश्वसृजंयजामहे त्वमेवयज्ञोविहितोविधेयस्त्वमात्मनात्मनप्रतिगृह्णीष्वहव्यमिति लिंगेतुनारायणपदेरुद्रंशिवमितिवदेत् ततोऽश्वत्थपर्णेभूर्भुवःस्वरोमितिहुतशेषंनिधायप्रदक्षिणीकृत्यविश्वभुजेआत्मनेपरमात्मनेनमइतिनत्वा आचार्यायशतंतदर्धंतदर्धंद्वादशतिस्रएकांवागांदत्वाऋत्विग्भ्योपिदक्षिणांदत्वाशतंद्वादशवाब्राह्मणान्भोजयेदितिसंक्षेपः प्रासादमात्रेनूतनेतुमात्स्योक्तजलाशयप्रतिष्ठाविधिमेवकुर्यात् गोरुत्तारणपात्रीप्रक्षेपादितुनभवति द्वारलोपात् वारुणहोमस्थानेवास्तुहोमः अन्यत्तद्वदेव इतिभट्टकमलाकरकृतौलिंगार्चाप्रतिष्ठाविधिः ॥

लिंग असेल तर दीपापर्यंत पूजा करून 'भवायदेवायनमः' इत्यादि आठ नाममंत्रांनीं पुष्पें समर्पण करून त्याच नाममंत्रांनीं तर्पण करून 'पवित्रंते०' ह्या मंत्रानें पायस आणि गुडौदन नैवेद्य समर्पण करून 'भवाय देवाय स्वाहा' ह्या आठ नाममंत्रांनीं कृसराचा होम करून नंतर 'भवस्य देवस्य पत्न्यै स्वाहा' इत्यादिक आठ मंत्रांनीं गुडौदनाचा होम करून 'भवस्य देवस्य सुताय स्वाहा' इत्यादिक आठ मंत्रांनीं हरिद्रौदनाचा होम करून 'त्र्यंबकं०, मानोमहांत०, मानस्तोके०, आरात्तेगोघ्न०' ह्या चार आणि 'विकिरिदविलोहित०, सहस्राणि सहस्रधा०' ह्या बारा ऋचा त्यांनीं होम करून 'शिवाय०, शंकराय०,' ह्या बारा नामांनीं होम करावा. तदनंतर स्विष्टकृदादि होमशेष समाप्त करून पूर्वींच्या साऱ्या हवींनीं विष्णूला किंवा लिंगाला बलि द्यावा. बलिदानाचा **मंत्र**—'त्वामेकमाद्यं पुरुषं पुरातनं नारायणं विश्वसृजं यजामहे ॥ त्वमेव यज्ञो विहितो विधेयस्त्वमात्मनात्मन् प्रतिगृह्णीष्व हव्यम् ॥' लिंग असेल तर त्या मंत्रांत 'नारायणं' ह्या स्थानीं 'रुद्रंशिवं' असें म्हणावें. तदनंतर अश्वत्थाच्या पानावर 'भूर्भुवःस्वरोम्' ह्या मंत्रानें हुतशेष ठेवून प्रदक्षिणा करून 'विश्वभुजे सर्वभुजे आत्मने परमात्मनेनमः' असें म्हणून नमस्कार करून आचार्याला शंभर, पन्नास, पंचवीस, बारा, तीन, किंवा एक गाई देऊन ऋत्विजांनाही दक्षिणा देऊन शंभर किंवा बारा ब्राह्मणांना भोजन घालावें. असा हा थोडक्यांत प्रयोग सांगितला आहे. देवप्रतिष्ठा पूर्वींची असून केवळ प्रासाद नवीन केलेला असेल तर मात्स्योक्त जलाशयप्रतिष्ठाविधिच करावा. त्या प्रयोगांत गाईचें उत्तारण वगैरे सांगितलेलें आहे तें वर प्रासादप्रतिष्ठेंत होत नाहीं. कारण, त्याचें येथें द्वार नाहीं. वारुणहोमाच्या स्थानीं वास्तुहोम करावा, बाकीचें सारें कृत्य त्यासारखेंच-समजावें.

इति लिंगार्चाप्रतिष्ठाविधिः ॥

**अथपुनःप्रतिष्ठा** तामधिकृत्य**हयशीर्षपंचरात्रे** चांडालमद्यसंस्पर्शदूषितावह्निनाथवा अपुण्यजनसंस्पृष्टाविप्रक्षतजदूषिता संस्कार्येतिशेषः **पदार्थादर्शेब्राह्मे** खंडितेस्फुटितेदग्धेभ्रष्टेमानविवर्जिते यागहीनेपशुस्पृष्टेपतितेदुष्टभूमिषु अन्यमंत्रार्चितेचैवपतितस्पर्शदूषिते दशस्वेतेषुनोचक्रुःसन्निधानंदिवौकसः यागःपूजा पशुर्गर्दभादिः **पंचरात्रे** खंडितास्फुटितादग्धायस्मादर्चाभयावहा तस्मात्समुद्धरेत्तांतुपूर्वोक्तविधिनानरः अर्चाभंगादावुपवासःकार्यः नराज्ञोविप्लवेश्नीयात्सुरार्चाविप्लवेतथेति **विष्णुधर्मोक्तेः सिद्धांतशेखरे**चौरचंडालपतितश्वोदक्यास्पर्शनेसति शवाद्युपहतौचैवप्रतिष्ठांपुनराचरेत् **पंचरात्रे** अंगादंगादिसंधानेप्रतिष्ठांपुनराचरेत् जलाधिवासविहितनेत्रोन्मीलनवर्जिताम् **शुद्धिविवेकेविष्णुः** द्रव्यव्रतस-

शौचादौदेवतार्चानांभूयःप्रतिष्ठापनेनशुद्धिरिति अर्चाःप्रतिमाः तद्द्रव्यस्यताम्रादेरुक्तशौचंकृत्वा पुनःप्रतिष्ठां-कुर्यादित्यर्थः **स्मृत्यर्थसारे**ऽप्येवम् ॥

## आतां पुनःप्रतिष्ठा सांगतो—

पुनःप्रतिष्ठेचा उपक्रम करून सांगतो—**हयशीर्षपंचरात्रांत**—"देवाची मूर्ति चांडाल, मद्य यांच्या स्पर्शानें दूषित झाली, अथवा अग्नीनें दग्ध झाली, किंवा पापीजनांच्या स्पर्शानें दूषित झाली, अथवा ब्राह्मणाच्या रक्तानें दूषित झाली तर त्या मूर्तींची पुनःप्रतिष्ठा करावी." **पदार्थादर्शांत ब्राह्मांत**—"देवाच्या मूर्तींचे तुकडे उडाले, मूर्ति फुटली, दग्ध झाली, स्थानभ्रष्ट झाली, अपमानित झाली, पूजारहित झाली, कुत्रा गर्दभ इत्यादिक नीच पशूनें स्पष्ट झाली, दूषित भुईवर पडली, शूद्रादिकांनीं पूजित झाली, पतित-रजस्वला इत्यादिकांच्या स्पर्शानें दूषित झाली, त्या दहा प्रकारांतून कोणताही प्रकार झाला असतां त्या मूर्तींचे ठायीं देव राहात नाहींत." **पंचरात्रांत**—"ज्या कारणास्तव खंड झालेली, फुटलेली, व दग्ध झालेली प्रतिमा भय उत्पन्न करणारी आहे त्या कारणास्तव पूर्वीं सांगितलेल्या विधीनें तसल्या प्रतिमेचा उद्धार करावा." देवाच्या मूर्तींचा भंग वगैरे झाला असतां उपवास करावा. कारण, "राजाचा नाश झाला असतां भोजन करूं नये. तसेंच देवाच्या मूर्तींचा भंग झाला असतां भोजन करूं नये" असें **विष्णुधर्मांत** वचन आहे. **सिद्धांतशेखरांत**—"चोर, चांडाल, पतित, कुत्रा, रजस्वला, आणि शव इत्यादिकांचा स्पर्श झाला असतां पुनःप्रतिष्ठा करावी." **पंचरात्रांत**—"अंगादिकांचें संधान झालें असतां जलाधिवासांत विहित जें नेत्रोन्मीलन तें वर्ज्य करून पुनःप्रतिष्ठा करावी." **शुद्धिविवेकांत विष्णु**—"ताम्रादि धातूंच्या प्रतिमा दूषित झाल्या असतील तर त्या त्या धातूंची जी शुद्धि सांगितली असेल ती शुद्धि त्या प्रतिमांची करून पुनःप्रतिष्ठा करावी, म्हणजे शुद्धि होते." म्हणजे त्या ताम्रादि धातूला सांगितलेली शुद्धि करून त्या प्रतिमांची पुनः प्रतिष्ठा करावी, असा भाव. **स्मृत्यर्थसारांत**ही असेंच सांगितलें आहे.

**तद्विधिर्बौधायनसूत्रे** पूर्वप्रतिष्ठितस्याबुद्धिपूर्वमेकरात्रंद्विरात्रमेकमासंद्विमासंवार्चनादिविच्छेदेशूद्ररजस्वलाद्युपस्पर्शनेपूर्वोक्तेकालेपुण्याहंवाचयित्वायुग्मानब्राह्मणानभोजयित्वानिशायांजलाधिवासंकृत्वाश्वोभूतेकलशपूर्णेनपंचगव्येनतत्तन्मंत्रैःस्नापयित्वाऽन्यंकलशंशुद्धोदकेनापूर्यतस्मिन्नवरत्नानिप्रक्षिप्य तंकलशंतत्तद्गायत्र्याष्टसहस्रमष्टशतमष्टाविंशतिवारंवाभिमंत्र्यतेनोदकेनदेवंस्नापयेत्ततः शुद्धोदकेनस्नापयेदष्टसहस्रमष्टशतमष्टाविंशतिंवापुरुषसूक्तेनमूलमंत्रेणच ततःपुष्पाणिदत्वायथासंभवमर्चयित्वागुडौदनंनिवेदयेदिति बुद्धिपूर्वंतुविच्छेदेपूर्वोक्तांप्रतिष्ठांपुनःकुर्यात् पूर्वोक्त**विष्णु**वचनात् इदंमलमासशुक्रास्तादावपिकार्यमिति**मदनरत्ने**-**हेमाद्रौ**च देवार्चाप्रासादभेदनेतु **शूलपाणौकाश्यपः** वापीकूपारामसेतुसभातडागवप्रदेवतायतनभेदनेप्रायश्चित्तंचतस्रआज्याहुतीर्जुहुयात् इदंविष्णुर्मानस्तोकेविष्णोःकर्माणिपादोस्येति यांदेवतामुत्सादयति तस्यैदेवतायैब्राह्मणान्भोजयेदिति **शंखलिखितौ** प्रतिमारामकूपसंक्रमध्वजसेतुनिपातभंगेषुतत्समुत्थानंप्रतिसंस्कारोऽष्टशतंचनिपातितानामिति समुत्थानं प्रतिक्रिया प्रतिसंस्कारः पुनःप्रतिष्ठा अष्टशतंपणादंडश्चेत्यर्थः ॥

## पुनःप्रतिष्ठेचा विधि सांगतो—

**बौधायनसूत्रांत**—"पूर्वीं प्रतिष्ठित देवाची साहजिक ( मुद्दाम होऊन नव्हे ) एक दिवस, दोन दिवस, किंवा एक महिना दोन महिनेपर्यंत पूजा वगैरे झालेली नसेल; अथवा शूद्र, रजस्वला इत्यादिकांचा स्पर्श झाला असेल; तर पूर्वीं सांगितलेल्या सुमुहूर्तावर पुण्याहवाचन करून युग्म ब्राह्मणांना भोजन घालून रात्रीं जलाधिवास करून दुसऱ्या दिवशीं कलश करून पंचगव्य घेऊन त्या पंचगव्यानें त्या त्या मंत्रांनीं स्नान घालून दुसरा कलश शुद्धोदकानें भरून त्या कलशांत नवरत्नें टाकून त्या कलशाचें त्या त्या देवतेच्या गायत्रीनें अष्टसहस्र, अथवा अष्टशत, किंवा अष्टाविंशतिवार अभिमंत्रण करून त्या उदकानें देवाला स्नान घालावें. नंतर शुद्धोदक घेऊन पुरुषसूक्तानें आणि मूलमंत्रानें अष्टसहस्र, किंवा अष्टशत अथवा अष्टाविंशतिवार स्नान घालावें. तदनंतर पुष्पें समर्पण करून यथासंभव पूजा करून गुडौदनाचा नैवेद्य दाखवावा." पूजादिकांचा विच्छेद मुद्दाम होऊन केलेला असेल तर वर सांगितलेल्या विष्णुवचनावरून पूर्वीं सांगितलेली प्रतिष्ठा पुनः करावी. ही पुनःप्रतिष्ठा मलमासांत व शुक्रादिकांच्या अस्तादिकांतही करावी, असें **मदनरत्नांत** व **हेमाद्रींत** सांगितलें आहे. देवाची मूर्ति, देवाचा प्रासाद यांचा भेद केला असेल तर सांगतो. **शूलपाणींत काश्यप**—"वापी, कूप, आराम ( उपवन ), पूल, सभा, तलाव, प्राकार, देवालय यांचा भेद केला असेल तर प्रायश्चित्त करावें; तें असें—'इदंविष्णु:०, मानस्तोके०, विष्णोः

कर्माणि०, पादोस्य०' ह्या चार मंत्रांनीं चार आज्याहुतींचा होम करावा. आणि ज्या देवतेचा उच्छेद करील त्या देवतेच्या उद्देशानें ब्राह्मणांना भोजन घालावें." शंख व लिखित—"देवाची प्रतिमा, आराम, कूप, किल्ल्याचा मार्ग, ध्वज, सेतु हीं पाडलीं असतां त्यांची दुरुस्ती करावी. व त्यांची पुनःप्रतिष्ठा करावी. आणि ज्यांनीं तीं पाडलीं असतील त्यांना आठशें पण दंड करावा."

**अथजीर्णोद्धारः** सचलिंगादौदग्धेभग्नेचलितेवाकार्यः अयंचानादिसिद्धप्रतिष्ठितलिंगादौभंगादिदुष्टेपिनकार्यः तत्रतुमहाभिषेकंकुर्यादिति**त्रिविक्रमः** कर्तामुकदेवस्यजीर्णोद्धारंकरिष्येइत्युक्त्वा पुण्याहंवाचयित्वानांदीश्राद्धांतंकृत्वाआचार्यमृत्विजश्चवृत्वापीठेमंडलदेवताआवाह्य लिंगेॐव्यापकेश्वरहृदयायनमः ॐव्यापकेश्वरशिरसेस्वाहेत्येवंषडंगंकृत्वा देवतांतरेमूलमंत्रेणषडंगंकृत्वाअर्चयेत् अघोरमंत्रंअष्टोत्तरशतंजप्त्वाऽग्निंप्रतिष्ठाप्याघोरेणघृतसर्षपैःसहस्रंहुत्वा इंद्रादिभ्योनाम्नाबलिंदत्वाजीर्णदेवंप्रणवेनसंपूज्यसाज्यतिलैर्ब्रह्मादिमंडलदेवतानांहोमंपूर्वोक्तंकृत्वादेवंप्रार्थयेत् जीर्णभग्नमिदंदेवसर्वदोषावहंनृणाम् अस्योद्धारेकृतेशांतिःशास्त्रेऽस्मिन्कथितात्वया जीर्णोद्धारविधानंचनृपराष्ट्रहितावहम् तदधस्तिष्ठतांदेवप्रहरामितवाज्ञयेति ततःक्षीराज्यमधुदूर्वाभिःसमिद्भिश्चाष्टोत्तरसहस्रंअष्टोत्तरशतंवादेवमंत्रेणहुत्वांऽगानांदशांशेनलिंगचालनार्थंसहस्रंशतंवापायसेनहुत्वालिंगंप्रार्थयेत् लिंगरूपंसमागत्ययेनेदंसमधिष्ठितम् यायास्त्वंसमितंस्थानंसंत्यज्यैवशिवाज्ञया अत्रस्थानेचयाविद्यासर्वविद्येश्वरैर्युता शिवेनसहसंतिष्ठेतिमंत्रितजलेनाभिषिच्यविसर्जयेत् ततोऽस्त्रमंत्रितखनित्रेणखात्वा लिंगमादायनद्यादौवामदेवेनलिंगंप्रणवेनमूर्तिंक्षिपेत् दारुजंतुमधुनाऽभ्यज्याघोरेणदहेत् स्वर्णरत्नादिमयंतुदग्धंचलितंवापुनस्तत्रैवस्थापयेत् ततःशांत्यैअघोरेणतिलैःसहस्रंहुत्वाप्रार्थयेत् भगवन्देवदेवेशलोकनाथजगत्पते जीर्णलिंगसमुद्धारःकृतस्तवाज्ञयामया अग्निनादारुजंदग्धंक्षिप्तंशैलादिकंजले तत्सर्वंक्षमतायदेवेशअघोरास्त्रेणतर्पितम् ज्ञानतोऽज्ञानतोवापियथोक्तंनकृतंयदि तत्सर्वंपूर्णमेवास्तुत्वत्प्रसादान्महेश्वर इति ततोयजमानःप्रार्थयेत् गोविप्रशिल्पिभूनानामाचार्यस्यचयज्वनः शांतिर्भवतुदेवेशअच्छिद्रंजायताम् **मूर्तौतु**विशेषः त्वत्प्रसादेननिर्विघ्नंदेहंनिर्माययत्यसौ वासंकुरुसुरश्रेष्ठतावत्त्वंचाल्पकेगृहे वसन्क्लेशंसहमूर्तिंवैतवपूर्ववत् यावत्कारयतेभक्तःकुरुतस्यचवांछितमिति ततोनवांमूर्तिंलिंगंवाकृत्वोक्तविधिनाप्रतिष्ठापयेत् मूलंत्व**ग्निपुराणे**स्पष्टम् इतिजीर्णोद्धारः ॥

## आतां जीर्णोद्धार सांगतो—

जीर्णोद्धार लिंग किंवा प्रतिमा दग्ध, भग्न किंवा चलित झाली असतां करावा. हा जीर्णोद्धार, अनादि व सिद्धानें प्रतिष्ठित असें लिंग वगैरे असेल तर त्या ठिकाणीं भंगादि दोष उत्पन्न झाला असला तरी करूं नये. त्या ठिकाणीं महाभिषेक करावा असें **त्रिविक्रम** सांगतो. जीर्णोद्धाराचा प्रयोग—कर्त्यानें 'अमुकदेवस्य जीर्णोद्धारं करिष्ये' असा संकल्प करून पुण्याहवाचन नांदीश्राद्ध करून आचार्य आणि ऋत्विज यांना वरून लिंगाचे ठायीं 'ॐव्यापकेश्वर हृदयायनमः,' 'ॐव्यापकेश्वर शिरसे स्वाहा' याप्रमाणें षडंगन्यास करून इतर देवतेचे ठायीं मूलमंत्रानें षडंगन्यास करून पूजा करावी. नंतर 'अघोर०' ह्या मंत्राचा एकशेंआठ जप करून अग्निस्थापन करून 'अघोर०' ह्या मंत्रानें घृतयुक्त सर्षपांनीं एक सहस्र होम करून इंद्रादि देवतांना नाममंत्रानें बलि देऊन जीर्णदेवाची प्रणवानें पूजा करून ब्रह्मादिमंडलदेवतांचा पूर्वी ( प्रतिष्ठेंत ) सांगितलेला होम करून देवाची प्रार्थना करावी. ती अशी—'जीर्णभग्नमिदं देव सर्वदोषावहं नृणां ॥ अस्योद्धारे कृते शांतिः शास्त्रेस्मिन् कथितात्वया ॥ जीर्णोद्धारविधानं च नृपराष्ट्रभयावहम् ॥ तदधस्तिष्ठतां देव प्रहरामि तवाज्ञया ॥' नंतर दूध, आज्य, मध, दूर्वा यांचा आणि समिधांचा अष्टोत्तरसहस्र किंवा अष्टोत्तरशत देवमंत्रानें होम करून अंगांचा दशांशानें होम करून लिंगचालनासाठीं सहस्र किंवा शत पायसाचा होम करून लिंगाची प्रार्थना करावी. 'लिंगरूपं समागत्य येनेदं समधिष्ठितम् ॥ यायास्त्वं संमितं स्थानं संत्यज्यैव शिवाज्ञया ॥ अत्रस्थाने च या विद्या सर्वविद्येश्वरैर्युता ॥ शिवेन सह संतिष्ठ' याप्रमाणें मंत्रण करून मंत्रितजलानें अभिषेक करून विसर्जन करावें. नंतर अस्त्रानें मंत्रित असें खनित्र ( कुदळ वगैरे ) घेऊन खणून तें लिंग घेऊन वामदेवमंत्रानें तें लिंग, मूर्ति असेल तर प्रणवानें ती मूर्ति नदीच्या वगैरे उदकांत टाकावी. काष्ठाचें वगैरे असेल तर मधानें भिजवून अघोरमंत्रानें दहन करावें. सुवर्णादि धातूचें किंवा रत्नाचें असेल तर मीट करून त्याच ठिकाणीं स्थापन करावें. तदनंतर शांतीकरितां अघोरमंत्रानें तिळांचा सहस्र होम करून प्रार्थना करावी. ती

अशी—'भगवन् भूतभव्येश लोकनाथ जगत्पते ॥ जीर्णलिंगसमुद्धारः कृतस्त्वाज्ञया मया ॥ अग्निना दारुजं दग्धं क्षितं शैलादिकं जले ॥ प्रायश्चित्ताय देवेश अघोरास्त्रेण तर्पितम् ॥ ज्ञानतोऽज्ञानतो वापि यथोक्तं न कृतं यदि ॥ तत्सर्वं पूर्णमेवास्तु त्वत्प्रसादान्महेश्वर ॥" तदनंतर यजमानानें प्रार्थना करावी, ती अशी—"गोविप्रशिल्पिभूतानामाचार्यस्य च यज्वनः ॥ शांतिर्भवतु देवेश अच्छिद्रं जायतामिदम् ॥". **नवी मूर्ति करावयाची असेल तर विशेष** सांगतो—'त्वत्प्रसादेन निर्विघ्नं देहं निर्मापयत्यसौ ॥ वासं कुरु सुरश्रेष्ठ तावत्त्वं चाल्पके गृहे ॥ वसन्क्लेशं सहिलैव मूर्तिं वै तव पूर्ववत् ॥ यावत्कारयते भक्तः कुरु तस्य च वांछितम् ॥' अशी प्रार्थना करून नवी मूर्ति किंवा नवें लिंग करून पूर्वी सांगितलेल्या विधीनें स्थापन करावें. या जीर्णोद्धाराचीं मूलवचनें अग्निपुराणांत सांगितलीं आहेत.

**इति जीर्णोद्धारविधि समाप्त झाला.**

**अथतुलसीग्रहणम् देवयाज्ञिककृते स्मृतिसारे** वैधृतौचव्यतीपातेभौमभार्गवभानुषु पर्वद्वयेचसंक्रांतौद्वादश्यांसूतकद्वये तुलसींयेविचिन्वंतितेछिंदंतिहरेःशिरः **विष्णुधर्मोत्तरे** रविवारंविनादूर्वांतुलसींद्वादशींविना जीवितस्याविनाशायप्रविचिन्वीतधर्मवित् **तथा** संक्रांतावर्कपक्षांतेद्वादश्यांनिशिसंध्ययोः येश्छिन्नंतुलसीपत्रंतैश्छिन्नंहरिमस्तकम् **पाद्मे** द्वादश्यांतुलसीपत्रंधात्रीपत्रंचकार्तिके लुनातिमनरोगच्छेन्निरयानतिगर्हितान् **रुद्रयामले** द्वादश्यांचदिवास्वापंतुलस्यवचयस्तथा विष्णोश्चैवदिवास्नानंवर्जनीयंसदाबुधैः **विष्णुधर्मे** नछिंद्यात्तुलसींविप्रोद्वादश्यांवैष्णवःक्वचित् देवार्थेतुलसीच्छेदोहोमार्थेसमिधांतथा इंदुक्षयेनदुष्येतगवार्थेतुतृणस्यच **ग्रहणमंत्रस्तुपाद्मे** तुलस्यमृतजन्मासिसदात्वंकेशवप्रिये केशवार्थंविचिन्वामिवरदाभवशोभने इति **पारिजातेदक्षः** समित्पुष्पकुशादीनांद्वितीयःप्रहरोमतः ॥

## आतां तुलसीग्रहणाचा प्रकार सांगतो—

देवयाज्ञिककृत **स्मृतिसारांत**—"वैधृति, व्यतीपात, भौमवार, भृगुवार, रविवार, अमावास्या, पौर्णिमा, संक्रांति, द्वादशी, जननाशौच, मृताशौच यांपैकीं कोणतेंही असतां जे मनुष्य तुलसीचा छेद करितात ते भगवंताचें मस्तक तोडतात." **विष्णुधर्मोत्तरांत**—"रविवारीं दूर्वा तोडली, आणि द्वादशीस तुळस तोडली तर आयुष्याचा नाश होतो, म्हणून धर्मवेत्त्यानें दूर्वा रविवारीं काढूं नये. आणि द्वादशीस तुळस काढूं नये." तसेंच—"संक्रांति, रविवार, पौर्णिमा, अमावास्या, द्वादशी, रात्र, आणि रात्रिदिवसांचे दोन संध्यासमय यांचे ठायीं ज्यांनी तुळसीपत्र तोडलें त्यांनी भगवंताचें मस्तक तोडलें म्हणून समजावें." **पाद्मांत**—"द्वादशीस तुलसीपत्र, आणि कार्तिकमासांत आंवळीचें पान जो तोडतो, तो मनुष्य अतिनिंद्य अशा नरकांस जातो." **रुद्रयामलांत**—"द्वादशीस दिवानिद्रा, तुळशी तोडणें, आणि विष्णूला दिवसा स्नान घालणें हीं तीन कृत्यें विद्वानांनीं सदा वर्ज्य करावीं." **विष्णुधर्मांत**—"विष्णुभक्त ब्राह्मणानें द्वादशीस कधींही तुळस काढूं नये. अमावास्येस वनस्पतीची हिंसा निषिद्ध आहे त्याचा अपवाद सांगतो—अमावास्येस देवाकरिता तुळशी तोडणें, होमाकरितां समिधा तोडणें आणि गाईकरितां गवत तोडणें दोषावह होत नाहीं." तुळसी काढण्याचा मंत्र सांगतो **पाद्मांत**—'तुलस्यमृतजन्मासि सदा त्वं केशवप्रिये ॥ केशवार्थं विचिन्वामि वरदा भव शोभने ॥' **पारिजातांत दक्ष**—"समिधा, पुष्पं, कुश इत्यादि काढण्याला दुसरा प्रहर सांगितला आहे."

**अथपुष्पादेःपर्युषितत्वम् भार्गवार्चनेभविष्ये** प्रहरंतिष्ठतेजातीकरवीरमहर्निशम् तुलस्यांबिल्वपत्रेषुसर्वेषुजलजेषुच नपर्युषितदोषोस्तिमालाकारगृहेपिच **बृहन्नारदीये** वर्ज्यंपर्युषितंपुष्पंवर्ज्यंपर्युषितंजलम् नवर्ज्यंतुलसीपत्रंनवर्ज्यंजाह्नवीजलम् तत्रैव**पाद्मे** तुलसीपर्युषितानैवबिल्वंतुत्रिदिनावधि पद्मंपंचदिनात्त्याज्यंशेषंपर्युषितंविदुः **स्कांदे** पालाशंदिनमेकंतुपंकजंचदिनत्रयम् पंचाहंबिल्वपत्रंचदशाहंतुलसीदलम् **पदार्थादर्शेबोपदेवस्त्वन्यथाह** बिल्वापामार्गजातीतुलसिशमिशताकेतकीभृंगदूर्वामंदांभोजाहिदर्भामुनितिलतगरब्रह्मकल्हारमल्लयः चंपाश्वारातिकुंभीदमनमरुबकाबिल्वतोहानिशस्ताक्रिंश ३० द्ये ३ का १ ये ६ री ६ शो ११ दधि ४ निधि ९ वसु ८ भू १ भू १ यमा २ भूयएवम् अस्यार्थः शताशतावरी मंदःमंदारः अहिर्नागकेशरः मुनिरगस्त्यः अश्वारातिःकरवीरः कुंभीपाटलेतिकैदेवनिघंटुः अरयःषट् ईशाःएकादश उदधयश्चत्वारः निधयोनव वसवोऽष्टौ भूःएकः यमौद्वौ बिल्वमारभ्याऽहिपर्यंतंगणयित्वादर्भमारभ्यपुनस्त्रिंशदादिगणयेदित्यर्थः एतद्दिनोत्तरंपर्युषितानीत्यर्थः **टोडरानंदे स्कांदे** दमनमुपक्रम्य तस्यमालाभगवतःपरम-

प्रीतिकारिणी शुष्कापर्युषितावापिनदुष्टाभवतिकर्हिचित् **तिथितत्त्वेमात्स्ये** बिल्वपत्रंचमाध्यंचतमालामलकीदले कल्हारंतुलसीचैवपद्मंचमुनिपुष्पकम् एतत्पर्युषितंनस्यात्कुशाश्चकलिकास्तथा **स्मृतिसारावल्याम्** जलजानांचसर्वेषांपत्राणामहतस्यच कुशपुष्पस्यरजतसुवर्णकृतयोरपि नपर्युषितदोषोस्तितीर्थतोयस्यचैवहि मुकुलैर्नार्चयेद्देवंपंकजैर्जलजैर्विना ॥

## आतां पुष्पें, पत्रें हीं किती कालानें पर्युषित ( बाशीं ) होतात तें सांगतो–

**भार्गवार्चनांत भविष्यांत**—"जाईचीं फुलें एक प्रहर राहतात, नंतर पर्युषित होतात. कण्हेरीचीं फुलें अहोरात्रपर्यंत राहतात. तुलसी, बिल्वपत्रें आणि सारीं कमलें यांना पर्युषित दोष नाहीं. आणि माळ्याच्या घरीं असलेल्या पुष्पांना देखील पर्युषित दोष नाहीं." **बृहन्नारदीयांत**—"पर्युषित ( बासें ) पुष्प आणि पर्युषित उदक वर्ज्य करावें. पण तुलसीपत्र आणि भागीरथीचें उदक हें पर्युषित असलें तरी वर्ज्य करूं नये." तेथेंच **पाद्मांत**—"तुळस पर्युषित होतच नाहीं. बिल्वपत्र तीन दिवस पर्युषित होत नाहीं. कमल पांच दिवस पर्युषित होत नाहीं. इतर पुष्पें वगैरे एकरात्र गेल्यावर पर्युषित होतात." **स्कांदांत**—"पळसाचें पुष्प एक दिवस राहतें. कमळ तीन दिवस राहतें. बिल्वपत्र पांच दिवस राहतें. आणि तुलसीपत्र दहा दिवस राहतें." **पदार्थादर्शांत बोपदेव** तर वेगळ्याच रीतीनें सांगतो—"बिल्वपत्र ३० दिवस, आघाडा ३ दिवस, जाईचें पुष्प १ दिवस, तुळसी ६ दिवस, शमीपत्र ६ दिवस, शतावरी ११ दिवस, केतकी ४ दिवस, माका ९ दिवस, दूर्वा ८ दिवस, मंदारपुष्प १ दिवस, कमळ १ दिवस, नागचांफ्याचें पुष्प २ दिवस, दर्भ ३० दिवस, अगस्त्यपुष्प ३ दिवस, तिलपुष्प १ दिवस, तगर ६ दिवस, पळसाचें पुष्प ६ दिवस, कल्हार (संध्याविकासी शुक्लकमल) ११ दिवस, मोगरी ४ दिवस, चांफा ९ दिवस, कण्हेर ८ दिवस, पाटला १ दिवस, दवणा १ दिवस, श्वेतमर्वा २ दिवस, येथपर्यंत पर्युषित होत नाहींत. याच्यापुढें पर्युषित होतात." **टोडरानंदांत स्कांदांत**—दवण्याचा उपक्रम करून सांगतो—"त्या दवण्याची माळा भगवंताला अतिशय आनंद करणारी आहे. ती शुष्क झाली किंवा पर्युषित झाली तरी कधींही दुष्ट होत नाहीं." **तिथितत्त्वांत मात्स्यांत**—"बिल्वपत्र, कुंदपुष्प, तमालवृक्षाचें पत्र, आंवळीचें पत्र, कल्हारकमल, तुलसीपत्र, कमल, अगस्त्यपुष्प, कुश आणि पुष्पांच्या कळ्या हीं पूर्वीच्या दिवसाचीं असलीं तरी पर्युषित होत नाहींत." **स्मृतिसारावलींत**—"सारीं कमलें, सारीं पत्रें, कुश, पुष्पें हीं कुजलीं किंवा सडलीं नसतील तर त्यांना पर्युषित दोष नाहीं. आणि सोन्यारुप्याचीं केलेलीं असतील त्यांना पर्युषितदोष नाहीं. तसाच तीर्थोदकाला पर्युषितदोष नाहीं. जलकमळांवांचून इतर पुष्पांच्या कळ्यांनीं देवाची पूजा करूं नये."

**अथशिवनिर्माल्यनिर्णयः सिद्धांतशेखरे** धराहिरण्यगोरत्नताम्ररौप्यांशुकादिकान् विहायशेषंनिर्माल्यंचंडेशायनिवेदयेत् अन्यदन्नादिपानीयंतांबूलंगंधपुष्पकम् दद्याच्चंडायनिर्माल्यंशिवभुक्तंतुसर्वशः आचार्यशिवचंडानामाज्ञाभंगेतुलक्षकम धनस्यभक्षणेतेपांपादोनंलक्षमीरितम् निर्माल्येभक्षितेलक्षपादतः शुद्धिरीरिता दानंचभक्षणसमंतदर्धंतदुपेक्षणे अकामाद्भक्षणेयद्वानिर्माल्यस्यजपेत्सुधीः ब्रह्मपंचकसाहस्रंधर्मेण सहितंततः कामतोभक्षणेदीक्षाप्रायश्चित्तंनचान्यतः निर्माल्यलंघनेघोरंप्रजपेदयुतंततः स्पर्शश्चलंघनसमोविक्रयोभक्षणेनच **स्मृत्यर्थसारेपि** शैवसौरनिर्माल्यनैवेद्यभक्षणेचांद्रम् अभ्यासेद्विगुणं मत्याभ्यासेप्रतपनम् अन्यनिर्माल्येप्यनापद्येवमिति इदंचज्योतिर्लिंगाद्यतिरिक्तविषयम तथाच**पुरुषार्थप्रबोधेभविष्ये** ज्योतिर्लिंगंविनालिंगंयःपूजयतिसत्तमः तस्यनैवेद्यनिर्माल्यभक्षणात्तप्तकृच्छ्रकम् शालग्रामोद्भवेलिंगेबाणलिंगेस्वयंभुवि रसलिंगेतथार्षेचसुरसिद्धप्रतिष्ठिते हृदयेचंद्रकांतेचस्वर्णरौप्यादिनिर्मिते शिवदीक्षावताभक्तेनेदंभक्ष्यमितीर्यते **तथा** बाणलिंगेस्वयंभूतेचंद्रकांतेहृदिस्थिते चांद्रायणसमंज्ञेयंशंभोर्नैवेद्यभक्षणं लिंगेस्वयंभुवेबाणेरत्नजेरसनिर्मिते सिद्धप्रतिष्ठितेचैवनचंडाधिकृतिर्भवेत् यत्रचंडाधिकारोस्तितद्भोक्तव्यंनमानवैः चंडाधिकारोनोयत्रभोक्तव्यंतत्रभक्तितः **त्रैविक्रम्याम्** बाणलिंगेचलौहेचसिद्धलिंगेस्वयंभुवि प्रतिमासुचसर्वासुनचंडोधिकृतोभवेत् अत्र ब्रह्महापिशुचिर्भूत्वानिर्माल्यंयस्तुधारयेत् तस्यपापंमहच्छीघ्रंनाशयिष्येमहाव्रते **इतिस्कांदात्** शुचिनानग्राह्यंशिवनिर्माल्यं किंतुस्नात्वेति**स्मार्ताः** अनुपनीतेननग्राह्यमिति**श्रीदत्तः शिवदीक्षाहीनै**र्नग्राह्यमिति**शैवाः तिथितत्त्वेहेमाद्रौपरिशिष्टे** अग्राह्यंशिवनैवेद्यंपत्रंपुष्पंफलंजलं **शालग्रामशिला**संगात्सर्वंयातिपवित्रताम् पंचायतनपूजायांतंत्रेणचनिवेदितमित्यर्थः **शिवपुराणे** येवीरभद्रशपिताःशिव-

भक्तिपराङ्मुखाः शंभोरन्यत्रदेवेषुयेभक्तायेनदीक्षिताः तेषामनर्हमीशस्यतत्प्रसादचतुष्टयम् **काशीखंडे** जलस्यधारणंमूर्ध्निविश्वेशस्नानजन्मनः एषजालंधरोबंधःसमस्तसुरवल्लभः **तथा** स्नापयित्वाविधानेनयो लिंगस्नपनोदकं त्रिःपिबेत्त्रिविधंपापंतस्येहाशुविनश्यति लिंगस्नपनवार्भिर्यःकुर्यान्मूर्ध्न्यभिषेचनं गंगास्नानफलंतस्यजायतेऽत्रविपाप्मनः इदंपूर्ववाक्यवशाद्विश्वेश्वरविषयमितिकेचित् काशीस्थपुराणप्रसिद्धसर्वलिंगविषयम् **काशीखंडेरत्नेश्वराख्याने** तथैवदर्शनादित्यन्ये ॥

## आतां शिवनिर्माल्याचा निर्णय सांगतो—

**सिद्धांतशेखरांत**—"भूमि, हिरण्य, गाई, रत्नें, ताम्र, रौप्य, वस्त्रें इत्यादि वेगळून इतर शिवनिर्माल्य चंडेशाला निवेदन करावा. इतर शिवनिर्माल्य कोणता तें सांगतो—अन्नादि भोज्य व भक्ष्य पदार्थ, पाणी, तांबूल, गंध, पुष्पें इत्यादि शिवानें उपभुक्त म्हणून निर्माल्य झालेले सर्व पदार्थ चंडाला द्यावे. आचार्य, शिव आणि चंड ह्यांच्या आज्ञेचा भंग केला असतां लक्ष गायत्रीजप करावा. त्या आचार्यादिकांचें द्रव्य खाल्लें असतां पाऊण लक्ष गायत्रीजप करावा. निर्माल्य भक्षण केला असतां पंचवीस हजार जप करावा, म्हणजे शुद्धि होते. दान करणें हें भक्षणासमान आहे. आणि कोणी भक्षण किंवा दान करीत असतां त्याची उपेक्षा केली असतां त्याच्या निम्में प्रायश्चित्त करावें. अथवा इच्छा नसून साहजिक निर्माल्य भक्षण केला असतां सांगितलेल्या विधीनें पांच हजार गायत्रीचा जप करावा. आणि मुद्दाम होऊन भक्षण केलें असतां दीक्षा घ्यावी. त्यावांचून दुसरें प्रायश्चित्त नाहीं. निर्माल्याचें उल्लंघन केलें असतां अघोरमंत्राचा दहा हजार जप करावा. निर्माल्यास स्पर्श करणें तो उल्लंघनासारखा आहे. आणि विक्रय करणें तो भक्षणासारखा आहे." **स्मृत्यर्थसारांत**ही—शिवाचा व सूर्याचा निर्माल्य आणि नैवेद्य भक्षण केला असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें. वारंवार भक्षण केला असतां द्विगुणित करावें. मुद्दाम होऊन वारंवार भक्षण केला असतां प्रतपन ( सांतपन ) कृच्छ्र करावें. इतर देवांच्या निर्माल्याविषयीं देखील आपत्काल नसतां असेंच समजावें. हा शिवनिर्माल्याचा निषेध ज्योतिर्लिंगादिव्यतिरिक्त लिंगविषयक आहे. तेंच सांगतो **पुरुषार्थप्रबोधांत भविष्यांत**—"जो भक्त ज्योतिर्लिंगावांचून इतर लिंगाची पूजा करितो, त्यानें त्या लिंगाच्या नैवेद्याचें व निर्माल्याचें भक्षण केलें तर तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. शालग्रामाचें लिंग, बाणलिंग, स्वयंभूलिंग, पारदाचें लिंग, ऋषिलिंग, देवांनीं व सिद्धांनीं प्रतिष्ठित लिंग, मानसपूजेंत हृदयांतील लिंग, चंद्रकांताचें लिंग, सुवर्ण-रौप्य इत्यादिकांचें लिंग, यांचा नैवेद्य व निर्माल्य शिवदीक्षा घेतलेल्या भक्तानें भक्षण करावा, असें सांगितलें आहे. तसेंच—बाणलिंग, स्वयंभूलिंग, चंद्रकांतलिंग, हृदयस्थलिंग, यांच्या नैवेद्याचें भक्षण चांद्रायणासमान पवित्र करणारें आहे. स्वयंभूलिंग, बाणलिंग, रत्नाचें लिंग, पारदलिंग, आणि सिद्धानें स्थापितलिंग यांच्या निर्माल्यग्रहणाविषयीं चंडाला अधिकार नाहीं. ज्या ठिकाणीं चंडाचा अधिकार असेल त्या लिंगाचा नैवेद्य वगैरे मनुष्यांनीं भक्षण करूं नये. ज्या ठिकाणीं चंडाचा अधिकार नसेल त्या ठिकाणचा नैवेद्य वगैरे भक्तिपूर्वक भक्षण करावा." **त्रिविक्रमपद्धतींत**—"बाणलिंग, धातुलिंग, सिद्धलिंग, स्वयंभूलिंग, आणि सान्या प्रतिमा, इतक्या ठिकाणीं चंडाला अधिकार असत नाहीं." ह्या विषयावर ग्रंथकार असें सांगतो की, "महादेव म्हणतात हे पार्वति! ब्रह्मघातकी असला तरी शुद्ध होऊन जो माझा निर्माल्य धारण करील, त्याच्या मोठ्या पापाचा मी लवकर नाश करीन," ह्या **स्कंदपुराणां**तील वचनावरून अशुचि अवस्थेंत शिवनिर्माल्य ग्रहण करूं नये. तर स्नान करून ग्रहण करावा, असें **स्मार्त** सांगतात. उपनयन झालें नसेल त्यानें शिवनिर्माल्य ग्रहण करूं नये, असें **श्रीदत्त** सांगतो. शिवदीक्षा घेतली नसेल त्यांनी शिवनिर्माल्य ग्रहण करूं नये, असें **शैव** सांगतात. **तिथितत्त्वांत** आणि **हेमाद्रींत परिशिष्टांत**—"शिवाचा नैवेद्य, पत्र, पुष्प, फल आणि उदक हीं ग्रहण करण्याला योग्य नाहींत. पंचायतनपूजेमध्यें व एकतंत्रानें अर्पण केलेलीं असतील तर शालग्रामाच्या संगतीनें तीं सारीं ग्रहण करण्याला योग्य होतात." **शिवपुराणांत**—"जे मनुष्य वीरभद्रानें शापित असल्यामुळें शिवभक्तीविषयीं पराङ्मुख असतील, जे मनुष्य शंकरावांचून इतर देवांचे भक्त असतील, ज्यांनीं शिवदीक्षा घेतली नसेल, त्यांना शिवाचे चार प्रसाद ( नैवेद्य, निर्माल्य, तीर्थ, गंध ) ग्रहण करण्यास योग्य होत नाहींत." **काशीखंडांत**—"विश्वेश्वराला स्नान घालून तें उदक मस्तकावर धारण करणें हा जालंधरबंध सर्व देवांना आवडणारा आहे." तसेंच "जो मनुष्य लिंगाला यथाविधि स्नान घालून तें स्नानोदक त्रिवार प्राशन करील त्याचें त्रिविध ( कायिक, वाचिक, मानसिक ) पाप तत्काल नष्ट होतें. जो मनुष्य लिंगाला स्नान घालून तें उदक आपल्या मस्तकावर सिंचन करील, तो पापरहित होऊन त्याला गंगास्नानाचें फळ प्राप्त होतें." ह्या दोन वचनांनीं स्नानोदकाचें प्राशन व सिंचन सांगितलें तें पूर्वीच्या वचनावरून विश्वेश्वराविषयीं समजावें, असें **केचित्** सांगतात. काशींतील पुराणप्रसिद्ध जीं लिंगें, त्या सर्वांविषयीं समजावें, कारण, **काशीखंडांत रत्नेश्वराच्या** आख्यानांत तसेंच दृष्टीस पडतें, असें इतर सांगतात.

**अथकृषिः राजमार्तंडः** ऋक्षेषूत्तरपौष्णवैष्णवमघामूलानुराधाश्विनीप्राजापत्यकरद्विदैवतगुरु-

प्रालेयपादेषुच निर्दोषैर्वृषभैर्हलैश्चसुमनोमालाभिरभ्यर्चितैर्दत्वाक्षेत्रपतेर्बलिंहलधरःक्षेत्रंततःकर्षयेत् प्राजेश-श्रवणोत्तरादितिमघामार्तंडतिष्याश्विनीपौष्णानुष्णमरीचयःशतभिषक्स्वातीविशाखातथा जीवार्केंदुसितेंदु-नंदनदिनेलग्नेचसौम्योदयेसस्यानांवपनेतथैवलवनेशस्तास्तथारोपणे **चंडेश्वरः** हस्तचित्रादितिस्वातीरेवत्यां-श्रवणत्रये स्थिरलग्नेगुरोर्वारेबीजंधार्यंज्ञशुक्रयोः ॐधनदायसर्वलोकहितायदेहिमेधान्यंस्वाहा लेखयित्वाइमं-मंत्रंधान्यागारेनिधापयेत् सस्यवृद्धिंपरांकुर्यात्पूजितंप्रतिपूजयेत् दक्षिणदिङ्मुखगमनंगमनमभिनवासुनारीषु व्ययमपिसस्यधनानांनबुधाबुधवासरेकुर्युः शनिवारेचनोकार्योधनधान्यव्ययोबुधैः ॥

## आतां कृषिकर्म ( शेती ) सांगतो—

**राजमार्तंड**—"तीन उत्तरा, रेवती, श्रवण, मघा, मूळ, अनुराधा, अश्विनी, रोहिणी, हस्त, विशाखा, पुष्य, मृगशीर्ष, या नक्षत्रांवर; क्षेत्रपतीला बलि देऊन नंतर दोषरहित वृषभ घेऊन त्यांना पुष्पांच्या मालांनीं आर्चित ( अलंकृत ) करून नांगर बांधून शेतकऱ्यानें शेत नांगरावें. रोहिणी, श्रवण, तीन उत्तरा, पुनर्वसु, मघा, हस्त, पुष्य, अश्विनी, रेवती, मृगशीर्ष, शततारका, स्वाती, विशाखा, ह्या नक्षत्रांवरः गुरु, रवि, चंद्र, शुक्र, बुध या वारीं; शुभलग्नावर; शेतें पेरावीं, शेतें लावावीं आणि शेतें कापावीं." **चंडेश्वर**—"हस्त, चित्रा, पुनर्वसु, स्वाती, रेवती, श्रवण, धनिष्ठा, शततारका, या नक्षत्रांवर; गुरु, बुध, शुक्र, यांच्या वारीं; स्थिरलग्नावर धान्य सांठवावें. 'ॐधनदाय सर्वलोकहिताय देहि मे धान्यं स्वाहा' हा मंत्र लिहून धान्याच्या कोठारांत ठेवावा, म्हणजे धान्याची अत्यंत वृद्धि करील; कारण, धान्यदेवतेची आपण पूजा केली असतां ती देवता आपली पूजा करील. दक्षिण दिशेस गमन, नव्या स्त्रियेप्रत गमन, धान्याचा व धनाचा व्यय हे विद्वानांनीं बुधवारीं करूं नयेत. तसाच धनाचा व धान्याचा व्यय शनिवारीं करूं नये."

**अथवस्त्रं श्रीपतिः** रोहिणीपुकरपंचकेश्विभेत्र्युत्तरासुचपुनर्वसुद्वये रेवतीषुवसुदैवतेचभेनव्यवस्त्र-परिधानमिष्यते जीर्णंरवौसततमंबुभिरार्द्रमिंदौभौमेशुचेबुधदिनेतुभवेद्धनाय ज्ञानायमंत्रिणिभृगौप्रियसंगमा-यमंदेमलायचनवांबरधारणंस्यात् रोहिणीगुरुपुनर्वसूत्तरेयाबिभर्तिनववस्त्रभूषणे सानयोषिदवलंबतेपतिंस्ना-नमाचरतिवारुणेपिया ॥

## आतां वस्त्रधारण सांगतो—

**श्रीपति**—"रोहिणी, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, अश्विनी, तीन उत्तरा ( उत्तरा, उत्तराषाढा, उत्तरा-भाद्रपदा ), पुनर्वसु, पुष्य, रेवती, धनिष्ठा, या नक्षत्रांवर नवें वस्त्र धारण करावें. नव्या वस्त्राचें धारण रविवारीं केलें असतां तें लवकर जीर्ण होतें, सोमवारीं सतत उदकानें आर्द्र होतें, भौमवारीं शोककारक होतें, बुधवारीं धन देणारें होतें. गुरुवारीं ज्ञान देणारें होतें, शुक्रवारीं प्रियसंगतिदायक होतें, मंदवारीं मलदायक होतें. जी स्त्री रोहिणी, पुष्य, पुनर्वसु, आणि उत्तरा या नक्षत्रांवर नवें वस्त्र व नवा अलंकार धारण करिते, आणि शततारका नक्षत्रावर स्नान करिते, ती स्त्री पतीचा आश्रय करीत नाहीं."

**अथालंकारवलयादि दैवज्ञवल्लभः** नासत्यपूषवसुभिःकरपंचकेनमार्तंडभौमगुरुदानवमंत्रिवारे मुक्तासुवर्णमणिविद्रुमशंखदंतरक्तांबराणिविधृतानिभवंतिसिद्ध्यै **ज्योतिर्निबंधे** हस्तानुराधमृगपूषधनिष्ठ-युक्तचित्रोत्तरासुचपुनर्वसुरोहिणीपु लग्नेस्थिरेरविसुतेंदुजजीववारेहेमादिधारणविधिःकथितोनराणाम् **तत्रै-वश्रीपतिः** पौष्णाश्विनीवसुकरादिपुपंचकेपुकौसुंभहेममणिविद्रुमकाचशंखाः नार्याधृताःसुतसुखार्थकरा-भवंतिब्राह्मोत्तरादितिगुरुष्वसुखायभर्तुः **तत्रैव** शंखादिवररत्नानिपुष्यादित्युत्तरासुच रोहिण्यांनैवगृह्णीत-भर्तुर्जीवितकांक्षिणी ॥

## आतां अलंकार, वलय इत्यादि धारण सांगतो—

**दैवज्ञवल्लभ**—"अश्विनी, रेवती, धनिष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, या नक्षत्रांवर; रवि, भौम, गुरु, शुक्र, या वारीं; मोतीं, सुवर्ण, मणि, पोंवळीं, शंखाचे व हस्तिदंताचे अलंकार, आणि रक्तवस्त्रें धारण केलीं असतां सिद्धि-कारक होतात." **ज्योतिर्निबंधांत**—"हस्त, अनुराधा, मृगशीर्ष, रेवती, धनिष्ठा, चित्रा, उत्तरा, पुनर्वसु, रोहिणी, या नक्षत्रांवर; स्थिरलग्नावर; शनि, बुध, गुरु, या वारीं; मनुष्यांना सुवर्णादिकांचें धारण सांगितलें आहे." **तेथेंच श्रीपति**—"रेवती, अश्विनी, धनिष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, या नक्षत्रांवर; कुसुंभानें रंगविलेलें वस्त्र, सुवर्ण, मणि,

पोंवळीं, काचेचे व शंखाचे अलंकार, स्त्रियेनें धारण केले असतां पुत्र, सुख, द्रव्य देणारे होतात. आणि रोहिणी, तीन उत्तरा, पुनर्वसु, पुष्य, या नक्षत्रांवर धारण केले असतां भर्त्याला दुःखदायक होतात." तेथेंच—"भर्त्याचें आयुष्य इच्छिणाऱ्या स्त्रियेनें पुष्य, पुनर्वसु, तीन उत्तरा, आणि रोहिणी या नक्षत्रांवर शंखादिकांचे अलंकार आणि श्रेष्ठ रत्नें ग्रहण करूं नयेत."

**अथसूचीकर्म** वासवादितिभत्वाष्ट्रमैत्रचांद्राश्विनीपुच सूचीकर्मतनुत्राणमेभिर्ऋक्षैःप्रशस्यते **अथशय्या** हस्तादितिब्राह्मगुरूत्तराणिपौष्णाश्विमूलेंदुभचित्रभानि वारेषुजीवेंदुसितेंदुजानांशय्यासनारंभणमुत्तमंस्यात् **अथशस्त्रधारणम्** पुष्येचादितिचित्रपद्मतनयेशक्रोत्तरारेवतीस्वातीवाजिविशाखमित्रसहिते भानौगुरौभार्गवे कुंभेकीटगृहेवृषेमृगपतौचेंदौशुभैर्वीक्षितेसन्नाहःशरखड्गकुंतछुरिकाधार्यानृपाणांहिताः **अथस्वामिसेवा चंडेश्वरः** रोहिण्युत्तरपौष्णेषुवसुवारुणयोरपि सेवेतस्वामिनंभृत्यःशुभवारोदयेतथा **ज्योतिर्निबंधे** दासीदासादिभृत्यानांकुर्यात्संग्रहणंबुधैः स्थिरलग्नेशुभैर्दृष्टेमंदवारेविशेषतः ॥

**आतां सूचीकर्म** सांगतो—"धनिष्ठा, पुनर्वसु, चित्रा, अनुराधा, मृगशीर्ष, अश्विनी, या नक्षत्रांवर आंगरखा चिलखत वगैरे शिवण्याचें काम करणें प्रशस्त आहे." आतां **शय्या** सांगतो—"हस्त, पुनर्वसु, रोहिणी, पुष्य, तीन उत्तरा, रेवती, अश्विनी, मूळ, मृगशीर्ष, चित्रा या नक्षत्रांवर: गुरु, चंद्र, शुक्र, बुध, यांच्या वारीं: शय्या, आसन यांचा आरंभ करणें उत्तम आहे." आतां **शस्त्रधारण** सांगतो—"पुष्य, पुनर्वसु, चित्रा, रोहिणी, ज्येष्ठा, तीन उत्तरा, रेवती, स्वाती, अश्विनी, विशाखा, अनुराधा, या नक्षत्रांवर: रवि, गुरु, शुक्र या वारीं: वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ या लग्नांवर: चंद्र शुभग्रहावलोकित असतां राजांनीं चिलखत वगैरे चढविणें: बाण, खड्ग, कुंत, छुरिका इत्यादि शस्त्रें धारण करणें; हितकारक आहेत." आतां **स्वामिसेवा** सांगतो—**चंडेश्वर**—"रोहिणी, तीन उत्तरा, रेवती, धनिष्ठा, शततारका, या नक्षत्रांवर; शुभवारीं व शुभ लग्नावर चाकरानें धन्याची सेवा करण्यास आरंभ करावा." **ज्योतिर्निबंधांत**—"विद्वानांनीं दासी, दास, चाकर इत्यादिकांचा संग्रह शुभग्रहांनीं अवलोकित अशा स्थिर लग्नावर विशेषेंकरून मंदवारीं करावा."

**अथगजाश्वदोलाः सएव** पौष्णप्रजेशादितिभद्वयानिहस्तादिपट्कश्रवणोत्तराणि दोलादिमातंगतुरंगमाणामारोहणेभीष्टफलप्रदानि **अथनृत्यम्** हस्तःपुष्योवासवंरोहिणीचज्येष्ठापौष्णंवारुणंचोत्तराश्च पूर्वाचार्यैःकीर्तितश्चक्रवर्तीनृत्यारंभेशोभनोऽयंभवर्गः **अथराजदर्शनं श्रीपतिः** मृगाश्विपुष्यश्रवणश्रविष्ठाहस्तध्रुवत्वाष्ट्रभपूषभानि मैत्रेणयुक्तानिनरेश्वराणांविलोकनेभानिशुभप्रदानि **अथक्रयविक्रयौ** भाद्रद्वयत्रिदशमंत्रिदिवाकरेषुमूलानिलोत्तरतुरंगमरेवतीषु सारंगपाणिरजनीकरमैत्रभेषुलाभःसदैवभवतिक्रयविक्रयाभ्यां **वस्त्रेतु** चित्राशतभिषास्वातीरेवतीचाश्विनीशुभा श्रवणश्चतथाप्रोक्तावस्त्राणांक्रयणेशुभाः **अथसेतुः** स्वातीयुक्तेमंदवारेवृषलग्नेशुभेदिने सेतूनांबंधनंकार्यंध्रुवभेचार्कजीवयोः ॥

## आतां हत्ती, घोडे, मेणा यांच्यावर आरोहण सांगतो—

**तोच चंडेश्वर**—"रेवती, अश्विनी, रोहिणी, मृग, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा, श्रवण, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, हीं नक्षत्रें डोली, मेणा, हत्ती, घोडे इत्यादिकांवर बसण्यास प्रशस्त आहेत." **आतां नृत्य सांगतो**—"हस्त, पुष्य, धनिष्ठा, रोहिणी, ज्येष्ठा, रेवती, शततारका, तीन उत्तरा हीं श्रेष्ठ नक्षत्रें नृत्याच्या आरंभाविषयीं प्रशस्त आहेत." **आतां राजदर्शन** सांगतो—**श्रीपति**—"मृग, अश्विनी, पुष्य, श्रवण, धनिष्ठा, हस्त, रोहिणी, तीन उत्तरा, चित्रा, रेवती, अनुराधा, हीं नक्षत्रें राजांच्या दर्शनाविषयीं शुभकारक आहेत." **आतां क्रय आणि विक्रय सांगतो**—"पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, पुष्य, हस्त, मूल, स्वाती, तीन उत्तरा, अश्विनी, रेवती, श्रवण, मृगशीर्ष, अनुराधा, या नक्षत्रांवर खरेदी आणि विक्री केली असतां सर्वदा लाभ होतो." वस्त्राविषयीं तर सांगतो—"चित्रा, शततारका, स्वाती, रेवती, अश्विनी आणि श्रवण, हीं नक्षत्रें वस्त्रांची खरेदी करण्याविषयीं शुभ आहेत." आतां **सेतुबंधन** सांगतो—"स्वातीनक्षत्रयुक्त मंदवारीं शुभदिवशीं वृषभ लग्नावर सेतुबंधन करावें. आणि रविवारीं व गुरुवारीं ध्रुव ( रोहिणी, तीन उत्तरा ) नक्षत्रावर सेतुबंधन करावें."

**अथपशुकृत्यम् श्रीपतिः** चित्रोत्तरावैष्णवरोहिणीषुचतुर्दशीदर्शदिनाष्टमीषु स्थानप्रवेशोगमनंविदध्यात्पुमान्पशूनांनकदाचिदेव **चंडेश्वरः** हस्तमूलविशाखासुरेवत्यांश्रवणेतथा मैत्रेचवारुणेश्रेष्ठंपशुक्रयणमुच्यते पूर्वात्रयामृतमयूखहुताशनेषुइंद्राग्निवाजिवसुवारुणशंकरेषु एतेषुगोमहिषदंतितुरंगमादिनानाप्रकारपशुजातिगतिःप्रशस्ता ॥

## आतां पशुकृत्य सांगतो—

**श्रीपति**—"चित्रा, तीन उत्तरा, श्रवण, रोहिणी, या नक्षत्रांवर; आणि चतुर्दशी, अमावास्या, अष्टमी या तिथींस पशूंचा गोठ्यांत प्रवेश आणि हिकडून तिकडे नेणें हें कधींही करूं नये." **चंडेश्वर**—"हस्त, मूल, विशाखा, रेवती, श्रवण, अनुराधा, शततारका या नक्षत्रांवर पशु विकत घ्यावे. पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, मृगशीर्ष, कृत्तिका, विशाखा, अश्विनी, धनिष्ठा, शततारका, आर्द्रा, या नक्षत्रांवर: गाई, महिषी, हत्ती, घोडे इत्यादि नाना प्रकारच्या पशूंच्या जातींचें गमन प्रशस्त आहे."

**अथगजदंतच्छेदः ज्योतिर्निबंधे** त्वाष्ट्रेवैष्णवअश्विन्यामादित्येवसुदैवते दंतिनांशुभदंकर्मपुष्ये-हस्तेचकर्तनम् **अथनिक्षेपः** भरणीत्रीणिपूर्वाणिआर्द्राश्लेषामघातथा चित्राज्येष्ठाविशाखाचमूलंमृगपुनर्वसू एभिर्दत्तंप्रयुक्तंचयद्यन्निक्षिप्यतेधनम् पृष्ठतोधावमानस्यधनिनोनोपपद्यते ॥

**आतां हस्तिदंतच्छेद सांगतो—ज्योतिर्निबंधांत**—"चित्रा, श्रवण, अश्विनी, पुनर्वसु, धनिष्ठा, पुष्य, हस्त, या नक्षत्रांवर हत्तीच्या दंताचें छेदन शुभदायक आहे." आतां **ठेव ठेवणें,** व्याजास लावणें वगैरे सांगतो—"भरणी, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, आर्द्रा, आश्लेषा, मघा, चित्रा, ज्येष्ठा, विशाखा, मूल, मृग, पुनर्वसु, या नक्षत्रांवर एकाद्यास द्रव्य दिलें, व्याजास लाविलें, किंवा एकाद्यापाशीं ठेविलें असतां तें पुनः परत मिळणार नाहीं."

**अथ ऋणमोक्षः श्रीधरः** वागीशमंददिवसांशकलग्नयुक्तेरिक्तासुमंददिवसेकुलिकोदयेच मैत्रद्वितीय-पदमैत्रमुहूर्तयुक्तेराश्युद्गमेचऋणमोक्षमुशंतिसंतः **अथराजमुद्रा** मृदुध्रुवक्षिप्रचरेषुभेषुयोगेप्रशस्तेशनि चंद्रवर्ज्ये वारेतिथौपूर्णजयाह्वयेचमुद्राप्रतिष्ठाशुभदाहिराज्ञाम् **अथनौः चंडेश्वरः** पौष्णाश्विनीतुरगवारु-णमित्रचित्राशीतोष्णरश्मिवसवोनलवंत्यमूनि वारेचजीवभृगुनंदनकेप्रशस्तेनौकादिसंघटनवाहनमेषुकुर्यात् **अथभोगः** गुरुभरविभानुराधाविधातृपौष्णाश्विरोहिणीपुस्यान् स्वात्युत्तरासुकुर्याच्छयनासनभोगभोगादि।

## आतां ऋणमोक्षाविषयीं मुहूर्त सांगतो—

**श्रीधर**—"गुरु, शनि, हे वार व ह्या वारांचीं लग्नें आणि लग्नांचे अंश, रिक्तातिथि, कुलिक मुहूर्त (ज्योतिषांत प्रसिद्ध), अनुराधा नक्षत्राचा द्वितीयपाद, आणि मैत्रमुहूर्त ( दिवसाचा तृतीय मुहूर्त ) युक्त लग्न, यांचे ठायीं ऋणमोक्ष करावा, असें पंडित सांगतात." **आतां नाणें पाडण्याचा मुहूर्त सांगतो**—"**मृदु** ( मृग, रेवती, चित्रा, अनुराधा, ) **ध्रुव** ( रोहिणी, उत्तरात्रय ), **क्षिप्र** ( हस्त, अश्विनी, पुष्य, अभिजित् ), **चर** ( स्वाती, पुनर्वसु, श्रवण, धनिष्ठा, शततारका ) ह्या नक्षत्रीं; शुभ योग असतां: शनि व चंद्र हे वार वर्ज्य करून अन्य वारीं: ३।८।१२।५।१०।१५ ह्या तिथींचे ठायीं राजांनीं टांकशाळेंत नाणें पाडावें." **आतां नौका ( गलबतें ) बांधण्याचा मुहूर्त सांगतो—चंडेश्वर**—"रेवती, अश्विनी, शततारका, अनुराधा, चित्रा, मृग, हस्त, धनिष्ठा, कृत्तिका ह्या नक्षत्रांवर: गुरु व शुक्र ह्या वारीं नौका इत्यादिक बांधण्यास व हाकारण्यास आरंभ करावा." **आतां पलंग इत्यादि भोग्यवस्तूंचा उपभोग घेण्याविषयीं मुहूर्त सांगतो**—"पुष्य, हस्त, अनुराधा, अभिजित्, रेवती, अश्विनी, रोहिणी, स्वाती, उत्तरात्रय, ह्या नक्षत्रांवर पलंग, आसन, इत्यादि भोग्यवस्तूंचा उपयोग करावा."

**अथश्मश्रुकर्म श्रीपतिः** पुष्येपौष्णेचाश्विनीष्वैंदवेचशाक्रेहस्तादित्रिकेभेप्यदित्याः क्षौरंकार्यंवैष्ण-वादित्रयेचमुक्त्वाभौमादित्यपातंगिवारान नस्नातभुक्तोत्कटभूषितानामभ्यक्तयात्रासमरोत्सुकानां क्षौरंविद-ध्यान्निशिसंध्ययोर्वाजिजीविपूर्णांनवमेनचाह्नि **त्रिस्थलीसेतौवृद्धगार्ग्यः** रव्यारसौरवारेषुरात्रौपातेव्र-ताहनि श्राद्धाहःप्रतिपद्रिक्ताभद्राःक्षौरेपुवर्जयेत् **गार्ग्यः** पष्ठ्यमापूर्णिमापातचतुर्दश्यष्टमीतथा आसुसन्नि-हितंपापंतैलेमांसेभगेक्षुरे **राजमार्तंडः** देवकार्येपितुःश्राद्धेरवेंशपरिक्षये क्षौरकर्मनकुर्वीतजन्ममासेचज-न्मभे **बृहस्पतिः** राजकार्येनियुक्तानांनराणांभूपजीविनाम् श्मश्रुलोमनखच्छेदेनास्तिकालविशोधनम् **तथा** क्षौरंनैमित्तिकंकार्यंनिषेधेसत्यपिध्रुवम् पित्रादिमृतिदीक्षासुप्रायश्चित्तेन्नतीर्थके **केचित्तूत्तरार्धमन्यथा पठंति** मुंडनस्यनिषेधेपिकर्तनंतुविधीयतइति **नारदः** नृपविप्राज्ञयायज्ञेमरणेबंधमोक्षणे उद्वाहेखिलवारर्क्ष-तिथिषुक्षौरमिष्टदम् **भारते** प्राङ्मुखःश्मश्रुकर्माणिकारयेतसमाहितः उदङ्मुखोवाथभूत्वातथायुर्विंदतेमहत् **अपरार्के** उदङ्मुखःप्राङ्मुखोवावपनंकारयेत्सुधीः केशश्मश्रुलोमनखान्युदक्संस्थानिवापयेत् दक्षिणंकर्ण-

मारभ्यधर्मार्थंपापसंक्षये शिखाद्यंनवसंस्कारेशिखाद्यंतंशिरोवपेत् **यतीनांतुविशेषोनिगमे** कक्षोपस्थशिखावर्जमृतुसंधिषुवापयेदिति अन्येपिविधिप्रतिषेधाःप्रागुक्ताः ।

## आतां श्मश्रुकर्माविषयीं मुहूर्त सांगतो—

**श्रीपति**—"पुष्य, रेवती, आश्विनी, मृग, ज्येष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, पुनर्वसु, श्रवण, धनिष्ठा, शततारका, ह्या नक्षत्रीं श्मश्रुकर्म करावें. मंगळ, रवि, शनि हे वार वर्ज्य करावे. स्नात, भुक्त, उत्तम भूषित, तैलाभ्यंग केलेला, देशांतरीं व युद्धास निघणारा यांनीं श्मश्रुकर्म करूं नये; आणि रात्रीं, संध्याकाळीं, नवव्या दिवशीं श्मश्रु करूं नये." **त्रिस्थलीसेतूंत—वृद्धगार्ग्य**—"रवि, मंगळ, शनि, ह्या वारीं श्मश्रु करूं नये. रात्रीं, व्यतीपातादि दुर्योगाचे ठायीं व व्रतदिवशीं श्मश्रु करूं नये. श्राद्धदिवस, प्रतिपदा, रिक्तातिथि, भद्रा हे दिवस श्मश्रुकर्माविषयीं वर्ज्य करावे. **गार्ग्य**—"षष्ठी, अमावास्या, पूर्णिमा, व्यतीपात, चतुर्दशी, अष्टमी, ह्या तिथींचे ठायीं तैलाभ्यंग, मांसभक्षण, स्त्रीसेवन, आणि श्मश्रुकर्म हीं करूं नयेत." **राजमार्तंड**—"देवकार्य, मातापितरांचा श्राद्धदिवस, ग्रहण, जन्ममास, जन्मनक्षत्र यांचे ठायीं क्षौर करूं नये." **बृहस्पति**—"राजकार्याविषयीं नेमलेले राजाचे सेवक यांस श्मश्रुकर्माविषयीं कालविचार नाहीं. तसेंच—वरील निषेध असला तरी नैमित्तिक क्षौर प्राप्त होईल तर तें करावें, तें असें—मातापितर इत्यादिकांचें मरण, दीक्षा, प्रायश्चित्त व तीर्थ यांचेठायीं क्षौर अवश्य करावें." केचित् ग्रंथकार '**पित्रादिमृतिदीक्षासु प्रायश्चित्ते च तीर्थके**' ह्या स्थानीं '**मुंडनस्य निषेधेपि कर्तनं तु विधीयते**' असा पाठ करितात. त्याचा अर्थ "मुंडन करूं नये असा जरी निषेध आहे, तथापि केशांचें कर्तन करावें." **नारद**—"क्षौराविषयीं राजाची आज्ञा, ब्राह्मणांची आज्ञा, यज्ञ, मरण, बंधांतून मुक्ति, विवाह ह्यांतून कोणतेंही एक निमित्त असतां सर्व तिथि, सारे वार, सारीं नक्षत्रें यांजवर श्मश्रुकर्म करावें." **भारतांत**—"पूर्वाभिमुख व सावधान होऊन श्मश्रुकर्म करवावें. अथवा उत्तराभिमुख होऊन श्मश्रुकर्म करवावें; तसें केलें असतां दीर्घायुष्य प्राप्त होतें." **अपरार्कांत**—"श्मश्रुकर्म करविणें तें पुरुषानें उत्तराभिमुख किंवा पूर्वाभिमुख होऊन करवावें. केश, श्मश्रु, लोम आणि नखें यांचा छेद उदक्संस्थ करवावा. धर्मासाठीं कर्तव्य असतां उजव्या कर्णापासून आरंभ करून श्मश्रुकर्म करवावें. पापनाशाकरितां कर्तव्य असतां शिखाद्य करावें. नवीन संस्कार असतां शिखेस आरंभ व शिखेवर समाप्ती होईल असें करावें. **संन्याशांविषयीं विशेष सांगतो निगमांत**—' संन्यासी यांनीं ऋतूचे संधिकालीं कक्ष, उपस्थ, शिखा वर्ज्य करून क्षौर करवावें." ह्या श्मश्रुकर्माविषयीं इतर विधिप्रतिषेध पूर्वी चौलप्रसंगीं सांगितले आहेत ते तेथें पाहावे.

**अथेंधनसंग्रहः** ब्रह्मानिलार्कमघमूलत्रिपूर्वरौद्रपौष्णानुराधगुरुविष्णुविशाखयुक्ते वारेकुजार्कभृगुनंदनसोमजानांश्रेष्ठेंधनस्यकरणंभवतिप्रशस्तम् **अथनवान्नम् श्रीपतिः** रेवतीश्रुतिपुनर्वसुहस्तब्राह्मतःपृथगपिद्वितयेच त्र्युत्तरेषुगदितंपृथुकानांप्राशनंनवनवान्नविधानं **अथनवभोजनपात्रम् ज्योतिर्निबंधे** भोज्यपात्रंसुधासिंधौघटयेद्वासमाहरेत् तत्रान्नप्राशनप्रोक्तेकालेभोजनमाचरेत् **अथनवपर्णफलादिभक्षणम् चंडेश्वरः** मूलाश्विमैत्रकरतिष्यहरींद्रभेषुपौष्णोत्तरैंदवपुनर्वसुवासवेषु वारेषुभूमितनयार्कजवारवर्जंतांबूलनूतनफलाद्यशनंहिताय ।

## आतां काष्ठें, गोवऱ्या इत्यादिकांचे संग्रहाविषयीं मुहूर्त सांगतो—

"रोहिणी, स्वाती, हस्त, मघा, मूल, तीन पूर्वा, आर्द्रा, रेवती, अनुराधा, पुष्य, श्रवण, विशाखा ह्या नक्षत्रांवर; मंगळ, रवि, शुक्र, सोम ह्या वारीं काष्ठें, गोवऱ्या यांचा संग्रह करावा." **आतां नवान्नभक्षणाविषयीं मुहूर्त सांगतो श्रीपति**—"रेवती, अश्विनी, श्रवण, धनिष्ठा, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, रोहिणी, मृग, तीन उत्तरा ह्या नक्षत्रीं नवान्न भक्षण करावें." **भोजनपात्राविषयीं मुहूर्त सांगतो ज्योतिर्निबंधांत**—"नवें भोजनपात्र सोमवारीं घडावें किंवा विकत घ्यावें. व त्या भोजनपात्रांत भोजन करणें तें अन्नप्राशनाला सांगितलेल्या दिवशीं करावें." **आतां नवीं पानें, सुपाऱ्या वगैरे भक्षणाचा मुहूर्त सांगतो. चंडेश्वर**—"मूल, अश्विनी, अनुराधा, हस्त, पुष्य, श्रवण, ज्येष्ठा, रेवती, तीन उत्तरा, मृग, पुनर्वसु, धनिष्ठा ह्या नक्षत्रांवर; मंगळ, शनि हे वार वर्ज्य करून अन्य वारीं; नवीन नागवेलीपत्रें, नवीन सुपाऱ्या इत्यादि फळें भक्षण करावीं."

**अथहोमेआहुतिपातः ज्योतिषे** तरणिविद्भृगुभास्करिचंद्रमाःकुजसुरेज्यविधुंतुदकेतवः रविभतोदिनभंगणयेत्क्रमात्प्रतिखगंत्रितयंत्रितयंन्यसेत् दिनकरार्कितमःकुजकेतवोहुतभुजेनशुभास्त्वितरेशुभाः हवनचक्रमिदंप्रविलोक्यवांहवनकर्मणिसर्वसमृद्धये **अत्रशांतिरुक्ताविष्णुधर्मे** क्रूरग्रहमुखेचैवसंजाते-

हवनेशुभे शांतिंविधायगांदद्याद्ब्राह्मणायकुटुंबिने आयसींप्रतिमांकृत्वानिक्षिपेत्तामधोमुखीं गोमूत्रमधुगंधाद्यैरर्चितांप्रतिमांततः स्वस्थांनिधायसंपूज्यतत्रहोमोविधीयते **अत्रापवादःक्रियासारे** नित्येनैमित्तिके-दुर्गाहोमादौनविचारयेत् ।

## आतां होमाविषयीं आहुति पाहण्याचा प्रकार सांगतो—

**ज्योतिषांत**—"सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजून तीन तीन नक्षत्रें एकेक ग्रहावर बसवावीं; तीं अशीं:—पहिल्या तीन नक्षत्रांवर सूर्याचे मुखीं, दुसऱ्या तीन नक्षत्रांवर बुधाचे मुखीं, तिसऱ्या तीन नक्षत्रांवर शुक्राचे मुखीं, चवथ्या तीन नक्षत्रांवर शनीचे मुखीं, पांचव्या तीन नक्षत्रांवर चंद्राचे मुखीं, सहाव्या तीन नक्षत्रांवर मंगळाच्या मुखीं, सातव्या तीन नक्षत्रांवर बृहस्पतीच्या मुखीं, आठव्या तीन नक्षत्रांवर राहुमुखीं, नवव्या तीन नक्षत्रांवर केतुमुखीं, याप्रमाणें आहुति पडतात. रवि, शनि, राहु, मंगळ, केतु या ग्रहांच्या मुखीं आहुति पडते ती अशुभ; व इतर ग्रहांचे मुखीं पडते ती शुभ होय. हें आहुतिचक्र सर्व होमकर्माविषयीं पहावें, तेणेंकरून सर्व समृद्धि होते." **पापग्रहाच्या मुखीं आहुति पडली असतां शांति सांगतो विष्णुधर्मांत**—"पापग्रहाचे मुखीं होमाहुति पडली असतां शांति करून कुटुंबी ब्राह्मणाला गोप्रदान करावें. लोहाची प्रतिमा करून ती अधोमुखी स्थापन करून गोमूत्र, मधु, गंध इत्यादिक उपचारांनीं पूजा करून नंतर उताणी करून यथाविधि पूजा करून शांतिहोम करावा." **ह्या आहुतिचक्राविषयीं अपवाद सांगतो क्रियासारांत**—"नित्यहोम, नैमित्तिकहोम, दुर्गाहोम, आदिशब्देंकरून संस्कारहोम यांविषयीं आहुतिचक्र व अग्निचक्र[१] यांचा विचार करूं नये."

**अथज्वरादौफलम् श्रीपतिः** स्वात्याश्लेषारौद्रपूर्वासुशाक्रेरोगोत्पत्तिर्जायतेयस्यपुंसः तद्भैषज्यव्याप्तोनिःप्रयत्नःस्याद्धुधाव्धेलेब्धजन्मापिवैद्यः व्याध्युत्पत्तिर्यस्यपौष्णेसमैत्रेप्राणत्राणंजायतेतस्यकृच्छ्रात् वैश्वेसौम्येरोगमुक्तिस्तुमासाद्विंशत्यास्याद्वासराणांमघासु पश्चाद्धस्तेवासवेमद्विदैवेमूलाश्विन्योरग्निधिष्ण्येनवाहात् याम्येत्वाष्ट्रेवैष्णवेवारुणेचनैरुज्यंस्यान्नूनमेकादशाहात् अहिर्बुध्न्येतिष्यसंज्ञेयमाख्येप्राजापत्यादित्ययोःसप्तरात्रात् रोगान्मुक्तिर्जायतेमानवानांनिःसंदिग्धंजल्पितंगर्गमुख्यैः **ज्योतिषे** एकाहोनिधनंदशाहमनिलाबाणाविपत्पर्वताःसप्तांगाविलयश्चमासयुगुलंमासोमृतिःपक्षकः द्वौमासावथविंशतिर्दशनिशाःपक्षांतपक्षानखामासौपक्षदशांतपक्षककुभःपीडादिनान्यश्विभात् **दैवज्ञः** उरगवरुणरौद्रावासवेंद्रत्रिपूर्वायमदहनविशाखापापवारेणयुक्ताः तिथिषुनवमिषष्ठीद्वादशीवाचतुर्थीभवतिमरणयोगोरोगिणांकालहेतुः अत्रकुंभेहैमींनक्षत्रदेवताप्रतिमांसंपूज्यद्वादशदलेपुसंकर्षणादिद्वादशमूर्तीर्द्वादशादित्यानवासंपूज्यदूर्वासमित्तिलक्षीराज्यैर्गायत्र्यातद्देवतायैअष्टोत्तरशतंहुत्वादध्योदनंबलिंदत्वाचार्यायगांप्रतिमांचदत्वाविप्रानभोजयेदितिसंक्षेपः विशेषस्तुव्रतहेमाद्रौपदार्थादर्शेचज्ञेयः ॥

## आतां अश्विन्यादि नक्षत्रांवर ज्वरादिक रोगोत्पत्ति असतां फल सांगतो—

**श्रीपति**—"**स्वाती, आश्लेषा, आर्द्रा**, तीन **पूर्वा, ज्येष्ठा** ह्या नक्षत्रांवर ज्या पुरुषाला रोगोत्पत्ति होते त्याला औषधसेवनादि उपाय करण्याविषयीं वैद्य प्रयत्न करील तर ते व्यर्थ होतील. **रेवती, अनुराधा** ह्या नक्षत्रांवर ज्वरादिक उत्पन्न होईल तर संकटानें त्याचें प्राणरक्षण होईल. **उत्तराषाढा, मृग** ह्या नक्षत्रांवर रोगोत्पत्ति असतां तीस दिवस पीडा होईल. **मघा**नक्षत्रावर रोगोत्पत्ति असतां वीस दिवस पीडा. **हस्त, धनिष्ठा, विशाखा** ह्या नक्षत्रांवर रोगोत्पत्ति असतां पंधरा दिवस पीडा. **मूळ, अश्विनी, कृत्तिका** ह्या नक्षत्रांवर रोगोत्पत्ति असतां नऊ दिवस पीडा. **भरणी, चित्रा, श्रवण, शततारका** ह्या नक्षत्रांवर रोगोत्पत्ति असतां निश्चयें अकरा दिवसांनीं निरोगी होईल. **उत्तराभाद्रपदा, पुष्य, भरणी, रोहिणी, पुनर्वसु** या नक्षत्रांवर रोगोत्पत्ति असतां निश्चयें सात दिवसांनीं रोगनिरसन होतें असें गर्गप्रभृति ऋषि सांगतात." **ज्योतिषांत**—"अश्विन्यादि नक्षत्रांवर रोगोत्पत्ति झाली असतां क्रमेंकरून पीडा दिवस सांगतो—अश्विनीवर रोग असतां एक दिवस पीडा, भरणीवर रोग असतां मरण, कृत्तिकांवर दहा दिवस, रोहिणी—सात दिवस, मृग—पांच

१ शुक्लप्रतिपदेपासून वर्तमानतिथीपर्यंत तिथि मोजून जी संख्या येईल तींत एक मिळवावा आणि जो वर्तमानवार असेल तितके अंक त्यांत मिळवून त्या संख्येस ४ यांनीं भागून शेष अंक उरेल त्यावरून अग्नि पहावा. शून्य किंवा ३ शेष असतां भूमीवर अग्नि असतो, एक शेष असतां स्वर्गलोकीं, दोन शेष असतां पाताळांत अग्नि. भूमीवर अग्नि शुभ. स्वर्ग व पाताळ लोकीं असतां तो अशुभ जाणावा. हें अग्निचक्र होय.

दिवस, आर्द्रा—मृत्यु, पुनर्वसु—सात दिवस, पुष्य—सात दिवस, आश्लेषा—सहा दिवस, मघा—मरण, पूर्वा—दोन महिने, उत्तरा—एक महिना, हस्त—मरण, चित्रा—पंधरा दिवस, स्वाती—दोन महिने, विशाखा—वीस दिवस, अनुराधा—दहा दिवस, ज्येष्ठा—पंधरा दिवस, मूळ—मृत्यु, पूर्वाषाढा—पंधरा दिवस, उत्तराषाढा—वीस दिवस, श्रवण—दोन महिने, धनिष्ठा—पंधरा दिवस, शततारका—दहा दिवस, पूर्वाभाद्रपदा—मृत्यु, उत्तराभाद्रपदा—पंधरा दिवस, रेवती—दहा दिवस पीडा होते." **दैवज्ञ**—"आश्लेषा, शततारका, आर्द्रा, धनिष्ठा, ज्येष्ठा, तीनपूर्वा, भरणी, कृत्तिका, विशाखा यांतून कोणतें एक नक्षत्र असून त्या दिवशीं पापवार ( रवि, मंगळ, शनि ) असेल व नवमी, षष्ठी, द्वादशी, चतुर्थी ह्या तिथींपैकीं कोणती एक तिथि ह्या तिहींचा योग असतां त्या दिवशीं जर रोगोत्पत्ति होईल तर निश्चयानें मृत्यु येतो." **यांविषयीं शांति**—ज्या नक्षत्रावर ज्वरादि रोग उत्पन्न झाला असेल त्या नक्षत्रदेवतेची सुवर्णप्रतिमा करून तिची कलशावर स्थापना करून पूजा करावी. नंतर द्वादशदलकमलावर संकर्षणादिक बारा मूर्ति, किंवा बारा आदित्य यांची पूजा करून दूर्वा, समिधा, तिल, दुग्ध आणि आज्य यांहींकरून गायत्रीमंत्रानें त्या देवतेच्या उद्देशानें १०८ होम करून दधिभाताचा बलि देऊन आचार्याला गोप्रदान व प्रतिमादान करावें. आणि ब्राह्मणांना भोजन घालावें. याप्रमाणें हा संक्षेपानें प्रयोग सांगितला आहे. याचा विशेष विचार **व्रतहेमाद्रि** व **पदार्थादर्श** ह्या ग्रंथांत पाहावा.

**अथभेषजं चंडेश्वरः** मूलानुराधमृगतिष्यपुनर्वसौचपौष्णाश्विनीश्रवणशक्रकरत्रयेच वारेषुवाक्पतिसितेंदुदिनेषुशस्तंभैषज्यभक्षणममीषुहितंनराणाम् **अथारोग्यस्नानम् श्रीपतिः** इंदोर्वारेभार्गवेच ध्रुवेषुसार्पादित्यस्वातियुक्तेषुभेषु पित्र्येचांतेवापिकुर्यात्कदाचिन्नैवस्नानंरोगनिर्मुक्तजंतुः चरेविलग्नेरविभौमवारेरिक्तेतिथौस्याद्गहुलेचपक्षे धिष्ण्येचरेरोगनिपीडितानांस्नानंनराणांनिरुजत्वकारि **अथदंतधावनम् पृथ्वीचंद्रोदयेविष्णुः** प्रतिपद्दर्शषष्ठीषुचतुर्दश्यष्टमीषुच नवम्यांभानुवारेचदंतकाष्ठंविवर्जयेत् **नारदः** चतुर्दश्यष्टमीपौर्णमासीसंक्रमणेषुच नंदासुचनवम्यांचदंतकाष्ठंविवर्जयेत् श्राद्धेयज्ञेचनियमेतथाप्रोषितभर्तृका व्यतीपातेचसंक्रांत्यांनंदाभूताष्टपर्वसु तैलंक्षौरंरतिंमांसंदंतकाष्ठंचवर्जयेत् **वसिष्ठः** शन्यर्कशुक्रवारेषुकुजाहेव्रतवासरे जन्माहेश्राद्धदिवसेदंतकाष्ठंविवर्जयेत् **हेमाद्रौस्कांदे** अभ्यंगेजलधिस्नानेदंतधावनमैथुने जातेचनिधनेचैवतत्कालव्यापिनीतिथिः **संवर्तः** रवौविवाहआशौचेवर्जयेद्दंतधावनं **व्यासः** अलाभेदंतकाष्ठानांनिषिद्धानांतथातिथौ अपांद्वादशगंडूषैर्विदध्याद्दंतधावनम् ॥

## आतां औषध सेवनाविषयीं मुहूर्त सांगतो—

**चंडेश्वर**—"मूल, अनुराधा, मृग, पुष्य, पुनर्वसु, रेवती, अश्विनी, श्रवण, ज्येष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, ह्या नक्षत्रांवर गुरु, शुक्र, सोम ह्या वारीं औषधभक्षण शुभ होय." आतां **आरोग्यस्नान श्रीपति**—"तीन उत्तरा, रोहिणी, आश्लेषा, पुनर्वसु, स्वाती, मघा, रेवती, ह्या नक्षत्रीं; सोम व शुक्र ह्या वारीं रोगमुक्त मनुष्यानें कदापि स्नान करूं नये. चर लग्न; रवि व भौमवार; रिक्ता तिथि; श्रवण, धनिष्ठा, शततारका नक्षत्रें; व शुक्रपक्ष अशा कालीं रोगमुक्त मनुष्यांनीं स्नान करावें." **आतां दंतधावन सांगतो—पृथ्वीचंद्रोदयांत विष्णु**—"प्रतिपदा, अमावास्या, षष्ठी, चतुर्दशी, अष्टमी, नवमी, रविवार ह्या दिवशीं काष्ठानें दंतधावन करूं नये." **नारद**—"चतुर्दशी, अष्टमी, पौर्णिमा, संक्रांति, प्रतिपदा, षष्ठी, एकादशी, आणि नवमी, श्राद्धदिवस, यज्ञ, व्रतदिवस, ह्या दिवशीं काष्ठानें दंतधावन करूं नये. ज्या स्त्रियेचा पति प्रवासांत असेल तिनेंही करूं नये." व्यतीपात, संक्रांति, प्रतिपदा, षष्ठी, एकादशी, चतुर्दशी, अष्टमी, अमावास्या, पौर्णिमा ह्या दिवशीं तैलभक्षण, क्षौर, मैथुन, मांसभक्षण, काष्ठानें दंतधावन हीं करूं नयेत. **वसिष्ठ**—"शनि, रवि, शुक्र, मंगळ ह्या वारीं; व्रतदिवशीं, जन्मदिवशीं, श्राद्धदिवशीं, काष्ठानें दंतधावन करूं नये." **हेमाद्रींत स्कंदपुराणांत**—"अभ्यंग, समुद्रस्नान, दंतधावन, मैथुन, उत्पत्ति, मरण, ह्यांविषयीं तिथि घ्यावयाची ती त्या वेळीं असलेली घ्यावी." **संवर्त**—"रविवारीं, विवाहांत, व आशौचांत दंतधावन वर्ज्य करावें." **व्यास**—"दंतधावनाचीं काष्ठें मिळत नसतील त्यावेळीं किंवा निषिद्धतिथि असतां त्या दिवशीं उदकाचे बारा चूळ करून दंतांचें धावन करावें."

**अथामलकस्नानं व्यासः** श्रीकामःसर्वदास्नानंकुर्वीतामलकैर्नरः सप्तमींनवमींचैवपर्वकालंविवर्जयेत् चंद्रसूर्योपरागेचस्नानमामलकैस्त्यजेत् **क्रतुः** षष्ठीचसप्तमीचैवनवमीचत्रयोदशी संक्रांतौरविवारेचस्नानमामलकैस्त्यजेत् **यत्तु** नवमीदशमीचैवतृतीयाचत्रयोदशी प्रतिपद्द्वादशीकृष्णास्नानंतासुविवर्जयेत् **यच्च** दर्शेस्नानंनकुर्वीतमातापित्रोःसुजीवतोः पुत्रःकुर्वन्निराचष्टेपित्रोरुन्नतिजीवितेइतिकण्वयमाद्यैःस्नानमात्रंनिषिद्धं तद्भोगार्थस्नानपरं ननित्यनैमित्तिकपरमितिहेमाद्रिः ॥

## आतां आमलकस्नान सांगतो—

**व्यास**—"संपत्तीची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें सर्वदा आंवळे वाटून अंगास लावून स्नान करावें; परंतु सप्तमी, नवमी, पर्वकाल, चंद्रसूर्यांचें ग्रहण या दिवशीं आमलकस्नान करूं नये." **ऋतु**—"षष्ठी, सप्तमी, नवमी, त्रयोदशी, संक्रांति, रविवार ह्या दिवशीं आमलकस्नान करूं नये." आतां जें "नवमी, दशमी, तृतीया, त्रयोदशी, प्रतिपदा, कृष्णद्वादशी या दिवशीं स्नान ( आमलकस्नान ) वर्ज्य करावें," आणि जें "ज्याचे मातापिता जीवंत आहेत अशा पुरुषानें अमावास्येच्या दिवशीं स्नान करूं नये, केलें असतां मातापितरांचा आयुर्दाय व उत्कर्ष यांचा क्षय होतो," याप्रमाणें **कण्व, यम** इत्यादिकांच्या वचनांनीं सामान्य स्नानाचा निषेध केला आहे, तो भोगार्थ जें स्नान तद्विषयक आहे. नित्यनैमित्तिक स्नानाविषयीं नाहीं, असें **हेमाद्रि** सांगतो.

**अथतैलस्नाननिषेधः कात्यायनः** पक्षादौचरवौषष्ठ्यांरिक्तायांचतथातिथौ तैलेनाभ्यज्यमानस्तु चतुर्भिःपरिहीयते **गर्गः** पंचदश्यांचतुर्दश्यामष्टम्यांरविसंक्रमे द्वादश्यांसप्तमीषष्ठयोस्तैलस्पर्शंविवर्जयेत् नचकुर्यात्तृतीयायांत्रयोदश्यांतिथौतथा शाश्वतींगतिमन्विच्छनदशम्यामपिपंडितः **तत्रैवायुर्वेदे** षष्ठ्यांदिनक्षयेष्टम्यामेकादश्यांचपर्वसु द्वादश्यांचचतुर्दश्यांपंचम्यांप्रतिपत्तिथौ व्रतेश्राद्धदिनेजन्मत्रितयेश्रवणार्द्रयोः ज्येष्ठोत्तराफल्गुनीषुव्यतीपातेचवैधृतौ विष्टियोगेचसंक्रांतौमन्वादिषुयुगादिषु नाभ्यंगंतत्रबालानांवृद्धानांतुनदोषकृदिति **व्यवहारतत्त्वे** संक्रांतिभद्राव्यतिपातवैधृतिषष्ठ्यष्टमीपर्वसुनार्कभूसुते स्नानेद्वितीयादशमीचगर्हिताःषष्ठ्यादिमाद्यारदधावनेधमाः **अस्यापवादमाहतत्रैवप्रचेताः** सार्षपंगंधतैलंचयत्तैलंपुष्पवासितं अन्यद्रव्ययुतंतैलंनदुष्यतिकदाचन **आयुर्वेदे** निषिद्धतिथिवारर्क्षग्रहणेष्वपिरात्रिषु किंचिद्गोघृतयुक्तंवाविप्रपादरजोन्वितं भानौदूर्वान्वितंभौमेभूयुक्तंपुष्पयुग्गुरौ सर्वेषांसर्वदातैलमभ्यंगेषुनदुष्यति मंगलेष्वप्यदोषः मांगल्यंविघ्नतेस्नानंवृद्धिपूर्वोत्सवेषुच स्नेहमात्रसमायुक्तंमध्याह्नात्प्राक्तदिष्यते **इतिमदनपारिजातेकात्यायनोक्तेः हेमाद्रौबृहन्मनुः** तैलाभ्यंगोनार्कवारेनभौमेनोसंक्रांतौवैधृतौविष्टिषष्ठ्योः पर्वस्वष्टम्यांचनेष्टःसइष्टःप्रोक्तानमुक्त्वावासरेसूर्यसूनोः **तिलस्नाननिषेधस्तुषट्त्रिंशन्मते** तथासप्तम्यमावास्यासंक्रांतिग्रहजन्मसु धनपुत्रकलत्रार्थीतिलपिष्टंनसंस्पृशेत् ॥

## आतां तैलाभ्यंगपूर्वक स्नानाचा निषेध सांगतोः—

**कात्यायन**—"प्रतिपदा, रविवार, षष्ठी, रिक्ता तिथि यांचे ठायीं तैलाभ्यंग करणारा चतुर्विधपुरुषार्थांपासून हीन होतो." **गर्ग**—"पौर्णिमा, अमावास्या, चतुर्दशी, अष्टमी, सूर्यसंक्रांति, द्वादशी, सप्तमी, षष्ठी, या दिवशीं तैलस्पर्श वर्ज्य करावा. शाश्वत गति इच्छिणारानें तृतीया, त्रयोदशी, आणि दशमी या तिथींचेठायींही तैलस्पर्श करूं नये." **तेथेंच आयुर्वेदांत सांगतो**—"षष्ठी, दिनक्षय, अष्टमी, एकादशी, पर्वदिवस, द्वादशी, चतुर्दशी, पंचमी, प्रतिपदा, व्रतदिवस, श्राद्धदिवस, जन्मनक्षत्र, जन्मनक्षत्राहून दहावें व एकोणिसावें नक्षत्र, श्रवण, आर्द्रा, ज्येष्ठा, उत्तराफल्गुनी, व्यतीपात, वैधृति, भद्रा, संक्रांति, मन्वादितिथि, युगादितिथि, ह्यांचे ठायीं बालकांस अभ्यंग करूं नये, वृद्ध जे त्यांनीं केला असतां दोष नाहीं." **व्यवहारतत्त्वांत**—"संक्रांति, भद्रा, व्यतीपात, वैधृति, षष्ठी, अष्टमी, पर्वदिवस, रविवार, मंगळवार, द्वितीया, दशमी ह्यांचे ठायीं तैलाभ्यंगस्नान करूं नये. षष्ठी, अष्टमी, पर्व तिथि ह्या दंतधावनाविषयीं निषिद्ध होत." **याचा अपवाद सांगतो तेथेंच प्रचेता**—"सार्षपतेल, सुगंधितेल, जें पुष्पांनीं सुवासित केलेलें ( मोगरा चमेली इत्यादि ) तेल, दुसरें द्रव्य घालून मिश्र केलेलें तेल ह्या तेलानें निषिद्धदिवशींही अभ्यंग केला असतां दोष नाहीं." **आयुर्वेदांत**—"निषिद्ध अशा तिथि, वार, नक्षत्रें, ग्रहण, रात्रि यांचे ठायीं तैलाभ्यंग कर्तव्य असतां त्या तेलांत गाईचें घृत किंवा ब्राह्मणाची पादधूलि घालून त्या तेलानें अभ्यंग करावा. रविवारीं तेलांत दूर्वा, भौमवारीं मृत्तिका, गुरुवारीं पुष्प तेलांत टाकून त्या तेलानें सर्वांनीं अभ्यंग करावा असें केलें असतां निषिद्ध दिवसाचा दोष नाहीं." मंगलकार्यांतही तैलाभ्यंगाविषयीं दोष नाहीं. कारण, "नांदीश्राद्धपूर्वक जीं मांगलिककृत्यें त्यांचेठायीं तैलाभ्यंगपूर्वक मांगलिक स्नान आहे, तें कोणत्याही तेलानें मध्याह्नकालाचे पूर्वी करावें" असें **मदनपारिजातांत कात्यायनाचें** वचन आहे **हेमाद्रींत बृहन्मनु**—"रविवार, भौमवार, संक्रांति, वैधृति, भद्रा, षष्ठी, पर्वदिवस, अष्टमी, यांचेठायीं तैलाभ्यंग करूं नये. निषिद्ध दिवस वर्ज्य करून शनिवारीं तैलाभ्यंग करावा." **तिलस्नानाचा निषेध** सांगतो—**षट्त्रिंशन्मतांत**—"धन, पुत्र, स्त्री यांची इच्छा करणाऱ्या पुरुषानें सप्तमी, अमावास्या, संक्रांति, ग्रहण, आणि जन्मदिवस यांचेठायीं तिलपिष्टस्नान करूं नये."

**अथगृहारंभः ज्योतिर्निबंधेबादरायणः** वैशाखेफाल्गुनेपौषेश्रावणेमार्गशीर्षके सूत्रारंभःशिलान्यासःस्तंभारंभःप्रशस्यते **नारदः** सौम्यफाल्गुनवैशाखमाघश्रावणकार्तिकाः मासाःस्युर्गृहनिर्माणेपुत्रारोग्यधनप्रदाः अत्रवृषसिंहवृश्चिकाः वैशाखश्रावणकार्तिकाः सौराज्ञेयाइति**कालादर्शः** तत्रैव**कारणतंत्रे**स्थिरमासेस्थिरेराशौस्थिरेंशेनववेश्मनाम् कुर्वीतस्थापनंशंकोःस्तंभस्थापनमेववा कार्तिकनिषेधस्तुलापरः कुंभेमासेऽपिसर्वेषांमंदिराणामुपक्रमम् महर्षयःप्रशंसंतिधान्यागारंविहायच निषेधोधान्यगृहपरः पाकभोजनशालादौमार्गशीर्षश्चफाल्गुनः रथ्यागेहमठादौचसहस्यःशुचिरेवतु पौषाषाढनिषेधस्तुप्रधानगृहपरः नप्रधानगृहारंभंकुर्यात्पौषेशुचावपीतित**त्रैवोक्तेः ज्योतिस्तत्त्वे** पूर्वापरास्यंतुनभोंत्यपौषेयाम्योत्तरास्यंसहसिद्वितीये कार्यंगृहंजीवबुधर्क्षगार्कनीचास्तगौजीवसितौचहित्वा **रत्नमालायां** कर्कनक्रहरिकुंभगतेऽर्केपूर्वपश्चिममुखानिगृहाणि तौलिमेषवृषवृश्चिकयातेदक्षिणोत्तरमुखानिवदंति **दैवज्ञवल्लभः** शोकंधान्यंपंचतांनिःपशुत्वंस्वाप्तिंनैःस्वंसंगरंभृत्यनाशम् स्वंश्रीप्राप्तिंवह्निभीतिंचलक्ष्मींकुर्युश्चैत्राद्यागृहारंभकाले ॥

## आतां गृहारंभाविषयीं मुहूर्त सांगतो—

**ज्योतिर्निबंधांत बादरायण**—"वैशाख, फाल्गुन, पौष, श्रावण, मार्गशीर्ष, या मासांत सूत्रारंभ, शिलान्यास, स्तंभारोपण हीं प्रशस्त होत." **नारद**—"मार्गशीर्ष, फाल्गुन, वैशाख, माघ, श्रावण, कार्तिक, हे मास गृह बांधण्याविषयीं शुभ होत; ते पुत्र, आरोग्य, धन, यांतें देणारे होतात." येथें वृषभ, सिंह, वृश्चिक या संक्रांतींस रवि असतां क्रमेंकरून वैशाख, श्रावण, कार्तिक, हे मास सौरमानानें घ्यावे, असें **कालादर्श** सांगतो. तेथेंच **कारणतंत्रांत** सांगतो—"स्थिरमासांत स्थिरलग्नावर आणि स्थिरांशीं नूतन गृहाचें शंकुस्थापन, व स्तंभस्थापन हीं कृत्यें करावीं." कार्तिकमासाचा जो निषेध सांगितला तो तुलासंक्रांतिरूप कार्तिकविषयक आहे. "कुंभसंक्रांतीस रवि असतां सर्व प्रकारचे गृहांचा आरंभ करावा, धान्यागाराचा ( कोठाराचा ) मात्र आरंभ करूं नये, असें महर्षि सांगतात." कुंभमासाचा निषेध सांगितला आहे तो धान्यगृहविषयक समजावा. "स्वयंपाकगृह, भोजनगृह, इत्यादि गृहांविषयीं मार्गशीर्ष, फाल्गुन हे मास शुभ होत. रथ्यागृह ( धर्मशाळा ), मठ, इत्यादिकांविषयीं पौष, आषाढ हे मास उक्त होत." पौष व आषाढ यांचा निषेध आहे तो मुख्य गृहाविषयीं जाणावा. कारण, "पौष व आषाढ या मासांत मुख्य गृह बांधूं नये" असें तेथेंच सांगितलें आहे. **ज्योतिस्तत्त्वांत**—"श्रावण, फाल्गुन, पौष या मासांत गृह पूर्वाभिमुख व पश्चिमाभिमुख बांधावें. मार्गशीर्ष, वैशाख या मासांत गृह दक्षिणाभिमुख व उत्तराभिमुख बांधावें. धन, मीन, मिथुन, कन्या, ह्या राशींत रवि वर्ज्य करून व नीचस्थानगत आणि अस्तंगत गुरु व शुक्र वर्ज्य करून गृह बांधावें." **रत्नमालेंत**—"कर्क, मकर, सिंह, कुंभ ह्या राशींस रवि असतां पूर्वाभिमुख व पश्चिमाभिमुख गृहें बांधावीं. तुला, मेष, वृषभ, वृश्चिक या स्थानीं रवि असतां दक्षिणोत्तरमुख गृहें बांधावीं." **दैवज्ञवल्लभ**—"शोक, धान्य, मरण, पशुराहित्य, द्रव्यवृद्धि, द्रव्यनाश, युद्ध, भृत्यनाश, धनप्राप्ति, लक्ष्मीप्राप्ति, अग्निभीति, लक्ष्मीप्राप्ति, याप्रमाणें क्रमेंकरून चैत्रादिमासांचीं फलें जाणावीं."

**गर्गः** त्र्युत्तरामृगरोहिण्यांपुष्येमैत्रेकरत्रये धनिष्ठाद्वितयेपौष्णेगृहारंभःप्रशस्यते रोहिण्यांश्रवणत्रयेदितियुगेहस्तत्रयेमूलकेरेवत्युत्तरफल्गुनीष्वुरगभेमैत्रोत्तराषाढयोः शस्तंवास्तुकुजार्कवर्जितदिनेगोकुंभसिंहेमुखेकन्यायांमिथुनेनभःशुचिसहोराधोर्जकेफाल्गुने **कालादर्शेसनत्कुमारः** आदित्यभौमवर्जंतुसर्वेवाराःशुभप्रदाः **वास्तुशास्त्रे** मार्गशीर्षेतथापौषेवैशाखेश्रावणेतथा फाल्गुनेचकृतंवेश्मसर्वसंपत्प्रदंभवेत् कार्तिकेमाघमासेचचैत्रेज्येष्ठेतथाश्विने मास्याषाढेभाद्रपदेनकुर्यात्सर्वथागृहं द्वितीयाचतृतीयाचपंचमीसप्तमीतथा त्रयोदशीचदशमीपूर्णाचैकादशीतथा वेश्मारंभेशुभायस्युर्विशेषाच्छुक्लपक्षगाः **व्यवहारसारे** शिलान्यासःप्रकर्तव्योगृहाणांश्रवणेमृगे पौष्णेहस्तेचरोहिण्यांपुष्याश्विन्युत्तरात्रये **वास्तुप्रदीपे** अधोमुखैर्भैर्विदधीतखातंशिलास्तथैवोर्ध्वमुखैश्चपट्टम् तिर्यङ्मुखैर्द्वारकपाटयानंगृहप्रवेशोमृदुभिर्ध्रुवैश्च **लल्लः** स्नानंचपाकंशयनंच भोज्यंगजालयंवाजिगृहंधनस्य देवस्यपूर्वादिदिशिक्रमेणमध्येसभाभूपनिवेशनाय **शिल्पशास्त्रे** कन्यासिंहेतुलायांभुजगपतिमुखंशंभुकोणेग्निखातंवायव्येस्यात्तदास्यंत्वलिधनमकरेईशखातंवदंति कुंभेमीनेचमेषेनिर्ऋतिदिशिमुखंखातवायव्यकोणेचाग्नेःकोणेमुखंवैवृषमिथुनगतेकर्कटेरक्षखातं **तत्त्वचिंतामणौ** यत्रदैर्घ्यंगृहा-

दीनांद्वात्रिंशद्धस्ततोधिकं नतत्रचिंतयेद्धीमान्गुणानायव्ययादिकान् **राजमार्तंडः** आयव्ययौमासशुद्धिंतृणागारेनचिंतयेत् शिलान्यासादिनोकुर्यात्तथागारेपुरातने **व्यवहारतत्त्वे** निषिद्धेष्वपिकालेषुस्वानुकूलेशुभेदिने तृणकाष्ठगृहारंभेमासदोषोनविद्यते **चंडेश्वरः** पूर्णादित्वष्टमींयावत्पूर्वास्यंवर्जयेद्गृहं उत्तरास्यंनकुर्वीतनवम्यादिचतुर्दशीं अमावास्याष्टमींयावत्पश्चिमास्यंविवर्जयेत् नवम्यादौतथायाम्यंयावत्कृष्णचतुर्दशीं ध्रुवं दृष्ट्वाथवास्मृत्वाकर्तव्यंवास्तुरोपणम् सायाह्नवर्जेदिवसेरात्रौत्यक्त्वामहानिशाम् **वराहः** दक्षिणपूर्वेकोणेकृत्वापूजांशिलांन्यसेत्प्रथमाम् शेषाःप्रदक्षिणेनस्तंभाश्चैवंसमुत्थाप्याः **कालादर्शेवास्तुशास्त्रे** खातेचैवशिलान्यासेवृषचक्रंप्रशस्यते **तच्चोक्तंशांतिरत्ने** चतुर्हस्तप्रमाणंतुखात्वागर्तंसमंततः कुंभोदकैःसेचयेयुःशांतिपाठपुरःसरं ततईशानदिग्भागेसाक्षतंरत्नपंचकम् साज्यंकुंभंस्थिरंमुक्त्वावास्तुपूजनपूर्वकं कुंभोपरिशिलान्यासःकर्तव्यस्तदनंतरम् ॥

**गृहाविषयीं नक्षत्रादि सांगतो गर्ग**—"तीन उत्तरा, मृग, रोहिणी, पुष्य, अनुराधा, हस्त, चित्रा, स्वाती, धनिष्ठा, शततारका, रेवती ह्या नक्षत्रांवर गृह बांधण्यास आरंभ करावा. रोहिणी, श्रवण, धनिष्ठा, शततारका, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, मूळ, रेवती, उत्तराफल्गुनी, आश्लेषा, अनुराधा, उत्तराषाढा, ह्या नक्षत्रांवर; मंगळ व रवि वर्ज्य करून इतर वारीं; वृषभ, कुंभ, सिंह, कन्या, मिथुन ह्या लग्नांवर; श्रावण, आषाढ, मार्गशीर्ष, वैशाख, कार्तिक; फाल्गुन, ह्या मासांत गृहारंभ प्रशस्त होय." **कालादर्शांत सनत्कुमार**—"आदित्य व भौम हे वर्ज्य करून इतर सर्व वार शुभ होत." **वास्तुशास्त्रांत**—"मार्गशीर्ष, पौष, वैशाख, श्रावण, फाल्गुन या मासांत घर बांधलें असतां तें सर्वसंपत्तिदायक होतें. कार्तिक, माघ, चैत्र, ज्येष्ठ, आश्विन, आषाढ, भाद्रपद या मासांत कदापि गृह बांधूं नये. द्वितीया, तृतीया, पंचमी, सप्तमी, त्रयोदशी, दशमी, पूर्णिमा, एकादशी, ह्या तिथी गृहारंभ करण्याविषयीं शुभ होत. त्याच तिथि शुक्लपक्षींच्या विशेष शुभ होत." **व्यवहारसारांत**—"श्रवण, मृग, रेवती, हस्त, रोहिणी, पुष्य, अश्विनी, तीनउत्तरा ह्या नक्षत्रांवर गृहांचा शिलान्यास ( जोतें बांधण्यास आरंभ ) करावा." **वास्तुप्रदीपांत**—"अधोमुख नक्षत्रांवर गृहाचा खात ( म्हणजे भूमि खणून शुद्धि करणें तो ), व शिलान्यास हीं कृत्यें करावीं. ऊर्ध्वमुख नक्षत्रांवर पट्टबंधन ( पाटबंध ) करावें. तिर्यङ्मुख नक्षत्रांवर द्वार, कपाट, यात्रा, हीं कृत्यें करावीं. मृग, रेवती, अनुराधा, चित्रा, तीन उत्तरा, रोहिणी ह्या नक्षत्रांवर गृहप्रवेश करावा." **लल्ल**—"राजानें स्नानगृह, पाकगृह, शयनगृह, भोजनगृह, हस्तिगृह, अश्वगृह, कोशगृह, देवगृह, हीं आठ गृहें पूर्वादि आठ दिशांस अनुक्रमानें बांधावीं, आणि मध्यभागीं सभागृह करावें." **शिल्पशास्त्रांत**—"कन्या, सिंह तुला ह्या राशींस रवि असतां शेषाचें मुख ईशानदिशेस असतें. खात आग्नेयदिशेस करावें. वृश्चिक, धन, मकर ह्या राशींस रवि असतां शेषमुख वायव्यदिशेस असतें. खात ईशानकोणीं करावें. कुंभ, मीन, मेष, ह्या राशींस रवि असतां निर्ऋतिदिशेस शेषमुख आहे. खात वायव्य कोणीं करावें, आणि वृषभ, मिथुन, कर्क ह्या राशींस रवि असतां आग्नेयीस शेषमुख आहे. खात निर्ऋतिदिशेकडे करावें." **तत्त्वचिंतामणींत**—"बत्तीस हातांहून अधिक लांबीचीं गृहें, राजवाडे, धर्मशाळा यांविषयीं बुद्धिमान् पुरुषानें आय, व्यय इत्यादि गुण पाहूं नयेत." **राजमार्तंड**—"जुनें घर व गवताचें घर यांविषयीं आय, व्यय, आणि महिना यांची शुद्धि पाहण्याचें प्रयोजन नाहीं, व शिलान्यासादि कृत्येंही करूं नयेत." **व्यवहारतत्त्वांत**—"तृण, काष्ठें यांचविण्यासाठीं गृह कर्तव्य असतां मास वगैरे निषिद्ध असले तरी आपणास अनुकूल चंद्र, व शुभदिवस पाहून त्याचा आरंभ करावा. मास पाहण्याचें कारण नाहीं." **चंडेश्वर**—"पौर्णिमेपासून कृष्णाष्टमीपर्यंत पूर्वाभिमुख गृह बांधूं नये. नवमीपासून चतुर्दशीपर्यंत उत्तराभिमुख गृह बांधूं नये. अमावास्येपासून शुक्ल अष्टमीपर्यंत पश्चिमाभिमुख गृह वर्ज्य करावें. शुक्ल नवमीपासून शुक्ल चतुर्दशीपर्यंत दक्षिणाभिमुख गृह बांधूं नये. वास्तुपुरुष पुरावयाचा त्या कालीं ध्रुवाचें दर्शन अथवा स्मरण करावें. वास्तुपुरुष दिवसा पुरणें असेल तर सायंकाल वर्ज्य करावा. रात्रीं वास्तुपुरुष पुरणें असेल तर महानिशा ( मध्यरात्रीचा १ प्रहर ) टाकावी." **वराह**—"दक्षिणपूर्व कोणीं ( आग्नेय दिशेस ) पूजा करून प्रथम

---

१ आय पाहण्याचा प्रकार—गृहाची लांबी आणि रुंदी यांचा गुणाकार करून आठांनीं भागून शेष अंक राहील तो आय होय. १ ध्वज, २ धूम, ३ सिंह, ४ शुनक, ५ वृष, ६ गर्दभ, ७ गज, ८ काक हे आय अनुक्रमानें पूर्वादिदिशांचे ठायीं बलिष्ठ होत. हे यथायोग्य घ्यावे. ध्वजआय आल्यास सर्व दिशांकडे गृहमुख ( ओटीचें द्वार ) करावें. सिंहायीं पूर्वदक्षिणोत्तर दिशांकडे गृहद्वारें करावीं, पश्चिमदिशेकडे करूं नये. वृषायीं पूर्वदिशेकडेच गृहद्वार करावें. गजायीं पूर्वेकडे अथवा दक्षिणेकडे गृहमुख करावें. हे ४ आय सर्ववर्णांस प्रशस्त होत. २ व्यय पाहण्याचा प्रकार—गृहाचे लांबीरुंदीचा गुणाकार आठांनीं गुणून २७ नीं भागून शेष राहील तें गृहनक्षत्र जाणावें. तें नक्षत्र ८ नीं भागून शेष राहील तो व्यय होतो. स्वल्प आय आणि बहुत व्यय असें गृह नसावें, तर बहु आय व स्वल्प व्यय गृह असावें.

शिळा पुरावी. बाकीच्या सर्व शिळा प्रदक्षिणक्रमानें पुराव्या. स्तंभारोपणही याप्रमाणेंच करावें." **कालादर्शांत—वास्तुशास्त्रांत**—"खात व शिलान्यास यांविषयीं वृषवास्तुचक्र प्रशस्त होय. तें **शांतिरत्नांत** सांगितलें आहे. ( तें असें— सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतों नक्षत्रें मोजावीं. पहिलीं सात नक्षत्रें अशुभ. आठव्या नक्षत्रापासून अकरा नक्षत्रें शुभ. अवशिष्ट दहा तीं अशुभ. याप्रमाणें वृषवास्तुचक्र पाहून ज्या दिवशीं शुभनक्षत्र असेल त्या दिवशीं आरंभ करावा. अथवा नवव्या नक्षत्रापासून, पंधराव्या नक्षत्रापासून, आणि तेविसाव्या नक्षत्रापासून क्रमानें ४।४।५ हीं नक्षत्रें गृहारंभ व प्रवेश यांविषयीं अशुभ होत. ) "आसमंतात् चार हस्तप्रमाण असा खाडा खणून तो खाडा, कुंभोदकानें शांतिसूक्तांचा पाठ करीत ब्राह्मणांनीं सिंचन करावा. नंतर त्यांत ईशानी दिशेस तंडुलसहित पंचरत्नें घालून घृतयुक्त कलश स्थापन करून त्या कलशावर वास्तुपूजन करून त्यावर मुहूर्तशिला पुरावी."

**अथगृहप्रवेशः बृहस्पतिः** नंदायांदक्षिणद्वारंभद्रायांपश्चिमेनतु जयायामुत्तरद्वारंपूर्णायांपूर्वतोविशेत् **वसिष्ठः** कृत्वाशुक्रंपृष्ठतोवामतोऽर्कंविप्रान्पूज्यानग्रतःपूर्णकुंभं हर्म्यंरम्यंतोरणस्रग्वितानैःस्त्रीभिःस्रग्वीगीतवाद्यैर्विशेच्च **व्यवहारतत्त्वे** सौम्यायनेश्रावणमार्गपौषेजन्मर्क्षलग्नोपचयोदयेंशे वामंगतेर्केगृहवास्तुपूजांकृत्वाविशेद्वेश्मभकूटशुद्धम् **वास्तुशास्त्रे** लग्नात्प्रागादितोदिक्षुद्वौद्वौराशीनियोजयेत् एकमेकंन्यसेत्कोणेसूर्यंवामंविचिंतयेत् **वसिष्ठः** चंद्रजार्यसितवासरेषुचश्रीकरंसुतमहार्थलाभदं सूर्यसूनुदिवसेस्थिरप्रदंकिंतुचौरभयमत्रनिर्दिशेत् **रत्नकोशे** पुष्येधनिष्ठामृगवारुणेषुस्वायंभुवर्क्षेत्रिषुचोत्तरासु अक्षीणचंद्रेशुभदोनृपस्यतिथावरिक्तेचगृहप्रवेशः **नारदः** प्रवेशोमध्यमोज्ञेयःसौम्यकार्तिकमासयोः माघफाल्गुनवैशाखज्येष्ठमासेषुशोभनः अकपाटमनाच्छन्नमदत्तबलिभोजनं गृहंनप्रविशेद्धीमानापदामाकरोहितत् ज्येष्ठःक्षुद्रग्रहपरः **वृद्धगार्ग्यः** भानोश्चभौमस्यविहायवारौशूलादियोगानशुभान्नवापि रिक्तातिथिश्चापिमृदुध्रुवर्क्षेसौम्यायनेचप्रविशेद्गृहाणि **रत्नमालायाम्** त्वाष्ट्रमित्रशशिपूषदैवतान्यामनंतिमुनयोमृदून्यथ मैत्रगेहरतिभूषणांबरोद्गीतमंगलविधानमेषुच रोहिण्युत्तरात्रयंचध्रुवाणि प्रवेशश्चवास्तुपूजांकृत्वाकार्यः जीर्णोद्धारेतथोद्यानेतथा गृहनिवेशने नवप्रासादभवनेप्रासादपरिवर्तने द्वाराभिवर्तनेतद्वत्प्रासादेषुगृहेषुच वास्तूपशमनंकुर्यात्पूर्वमेव विचक्षणइतिमात्स्योक्तेः **तत्रैव** कृत्वाग्रतोद्विजवरानथपूर्णकुंभंदध्यक्षताम्रदलपुष्पफलोपशोभम् दत्वाहिरण्यवसनानितथाद्विजेभ्योमांगल्यशांतिनिलयंस्वगृहंविशेच्च गृह्योक्तहोमविधिनाबलिकर्मकुर्यात्प्रासादवास्तुशमनेचविधिर्यउक्तः संतर्पयेद्द्विजवरानथभक्ष्यभोज्यैःशुक्लांबरःस्वभवनंप्रविशेत्सुरूपम् ॥

## आतां गृहप्रवेशास मुहूर्त सांगतो—

**बृहस्पति**—"नंदा ( प्रतिपदा, षष्ठी, एकादशी ) तिथींचे ठायीं दक्षिणद्वारानें गृहांत प्रवेश करावा. भद्रा ( द्वितीया, सप्तमी, द्वादशी ) तिथींचे ठायीं पश्चिमद्वारानें प्रवेश करावा. जया ( म्हणजे तृतीया, अष्टमी, त्रयोदशी ) तिथींचे ठायीं उत्तरद्वारानें प्रवेश करावा. आणि पूर्णा ( म्हणजे पंचमी, दशमी, पौर्णिमा ) तिथींचे ठायीं पूर्वद्वारानें गृहांत प्रवेश करावा." **वसिष्ठ**—"शुक्र पृष्ठभागीं करून आणि सूर्य वामभागीं करून गृहप्रवेश करावा. ( म्हणजे जर शुक्र पूर्वदिशेस उदय पावणारा आहे तर पूर्वद्वारानें गृहांत प्रवेश करावा. शुक्र पश्चिम दिशेस उदय पावणारा आहे तर पश्चिमद्वारानें प्रवेश करावा. ( **वामभागीं सूर्य**—प्रवेश लग्नाच्या अष्टमस्थानापासून पांचलग्नीं सूर्य असतां पूर्वाभिमुख गृहप्रवेशीं वामभागीं सूर्य होतो. प्रवेशलग्नाच्या द्वितीयस्थानापासून पांचलग्नांस सूर्य असतां पश्चिमाभिमुख गृहीं वामभागीं सूर्य होतो. प्रवेशलग्नाच्या पंचमस्थानापासून पांचलग्नांस सूर्य असतां दक्षिणाभिमुख गृहीं वामभागीं सूर्य होतो. आणि प्रवेशलग्नाच्या एकादशस्थानापासून पांचलग्नांस सूर्य असतां उत्तराभिमुख गृहीं वामभागीं सूर्य होतो. ) ज्या नूतन गृहांत प्रवेश करावयाचा तें गृह तोरणें, पुष्पमाला, चांदवे यांनीं सुशोभित करून नंतर ब्राह्मणांची पूजा करून अग्रभागीं उदकपूर्णकुंभ करून ब्राह्मण, सुवासिनी स्त्रिया यांसहित मंगल वाद्यांनीं युक्त, माला धारण करणाऱ्या यजमानानें गृहांत प्रवेश करावा." **व्यवहारतत्त्वांत**—"उत्तरायणांत, आणि श्रावण, मार्गशीर्ष, पौष, या मासांत, जन्मलग्न व जन्मराशीपासून शुभ लग्नीं व शुभ लग्नांशीं; वामरवि असतां, वास्तुपूजा करून शुद्ध राशिकूटावर गृहांत प्रवेश करावा." **वामरवि पाहण्याचा प्रकार—वास्तुशास्त्रांत**—"प्रवेशलग्नापासून प्रत्येक दिशेस दोन दोन आणि विदिशेस एक एक असे राशी अप्रदक्षिण क्रमानें योजावे. आणि वामभागीं सूर्य पाहावा." ( म्हणजे प्रवेशलग्न मेष असेल तर मेष वृषभ पूर्वेस, मिथुन ईशानीस, कर्क सिंह उत्तरेस, कन्या वायव्येस. येथें वृषभापासून कन्याराशीपर्यंत कोणत्याही राशीस सूर्य असतां पश्चिमद्वारानें प्रवेश असल्यास वामभागीं सूर्य होतो.

याप्रमाणें इतर राशींचाही जाणावा. ) **वसिष्ठ**—"बुध, गुरु, शुक्र ह्या वारीं गृहप्रवेश केला असतां तें गृह संपत्ति, पुत्र व अर्थलाभ देणारें होतें. शनिवारीं स्थैर्यकारक होतें, पण चोरभय प्राप्त होतें असें समजावें." **रत्नकोशांत**—"पुष्य, धनिष्ठा, मृग, शततारका, रोहिणी, तीन उत्तरा, ह्या नक्षत्रांवर; चंद्र पूर्ण असतां रिक्तारहिततिथींचे ठायीं गृहप्रवेश शुभदायक आहे." **नारद**—"मार्गशीर्ष व कार्तिक या मासांत गृहप्रवेश मध्यम होय. माघ, फाल्गुन, वैशाख, आणि ज्येष्ठ या मासांत गृहप्रवेश शुभ होय. दरवाजे, भिंती, आच्छादन यांहीं विरहित अशा गृहांत बुद्धिमान् पुरुषानें कदापि प्रवेश करूं नये. तसेंच वास्तुशांति, व ब्राह्मणभोजन हीं केल्यावांचून गृहप्रवेश करूं नये. केला असतां अनेक आपत्ति प्राप्त होतात." ज्येष्ठमास प्रवेशाविषयीं शुभ सांगितला तो अल्पगृहाविषयीं समजावा. **वृद्धगार्ग्य**—"रवि, भौम हे वार; शूलादिक अशुभ नक्र योग; आणि रिक्तातिथि हे सर्व वर्ज्य करून मृग, रेवती, चित्रा, अनुराधा, तीन उत्तरा, रोहिणी ह्या नक्षत्रांवर उत्तरायणांत गृहप्रवेश करावा." **रत्नमालेंत**—"चित्रा, अनुराधा, मृग, रेवती हीं मृदुनक्षत्रें; ह्या नक्षत्रांवर मित्रकार्य, गृहप्रवेश, क्रीडा, अलंकार, वस्त्र, गायन, मंगलकृत्यें, हीं करावीं." गृहप्रवेश वास्तुशांति करून करावा. कारण, "जीर्णोद्धार, उद्यान ( बाग ), गृहप्रवेश, नवीन प्रासाद ( राजवाडा, देवालय ) करणें, प्रासाद फिरवणें, द्वार फिरवणें, प्रासादगृह करणें, यांचेठायीं पूर्वीच वास्तुपूजा ( वास्तुशांति ) करावी" असें **मत्स्यपुराण**वचन आहे. तेथेंच सांगतो—"दधि, अक्षता, आम्रपल्लव, पुष्पें, फळें यांहीं सुशोभित असा उदकपूर्णकुंभ व ब्राह्मण यांना अग्रभागीं करून व ब्राह्मणांना सुवर्ण आणि वस्त्रें देऊन मांगल्य व शांतिमंत्रांचा घोष करीत गृहाप्रत प्रवेश करावा. आपापल्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधीनें होम व बलि द्यावे, आणि प्रासादवास्तुशमनाविषयीं जो विधि सांगितला आहे तो करावा. भक्ष्यभोज्य पदार्थांनीं ब्राह्मणांना तृप्त करून श्वेतवस्त्र धारण करून स्वगृहांत प्रवेश करावा."

**अथकलिवर्ज्यानि बृहन्नारदीये** समुद्रयातुःस्वीकारःकमंडलुविधारणं द्विजानामसवर्णासुकन्यासूपयमस्तथा देवराच्चसुतोत्पत्तिर्मधुपर्केपशोर्वधः मांसदानंतथाश्राद्धेवानप्रस्थाश्रमस्तथा दत्ताक्षतायाःकन्यायाःपुनर्दानंपरस्यच दीर्घकालंब्रह्मचर्यंनरमेधाश्वमेधकौ महाप्रस्थानगमनंगोमेधश्चतथामखः इमान्धर्मान्कलियुगेवर्ज्यानाहुर्मनीषिणः कमंडलुःसोदकंचकमंडलुमित्युक्तः मृन्मयोवा दत्ताऊढा ऊढायाःपुनरुद्वाहंज्येष्ठांशंगोवधस्तथा कलौपंचनकुर्वीतभ्रातृजायांकमंडलुमिति **हेमाद्रौ**वचनात ऊढायाः पुरापुरुषसंयोगान्मृतेदेयेतिकेचनेत्यादिभिर्विवाह्यतोक्ता **हेमाद्रौब्राह्मे** गोत्रान्मातुःसपिंडाच्चविवाहोगोवधस्तथा नराश्वमेधौमद्यंचकलौवर्ज्यंद्विजातिभिः गोत्राद्गोत्रजायाः पितृष्वसुः मातृसपिंडान्मातुलात्तत्कन्यायाविवाहः कलौनकार्यः तेनयानितद्विधायकानितानियुगांतरविषयाणि **तथाव्यासः** तृतीयांमातृतःकन्यांतृतीयांपितृतस्तथा शुल्केनचोद्वहिष्यंतिविप्राःपापविमोहिताइतिकलौतन्निंदामाह मातृतस्तृतीयांमातुलकन्यामित्यर्थः उक्तंचैतत्प्राक् मद्यंस्त्रीभ्यश्चसुरामाचाममित्यादिनाविहितमपिवर्ज्यम् ॥

## आतां कलियुगांत वर्ज्य कर्में कोणतीं तीं सांगतो—

**बृहन्नारदीय पुराणांत**—"गलबतांत बसून समुद्रपर्यटन करणाऱ्याला जातींत घेणें, उदकयुक्त किंवा मृन्मय कमण्डलु धारण करणें, भिन्न जातीच्या कन्यांशीं द्विजांनीं विवाह करणें, दिरापासून पुत्र उत्पन्न करणें, मधुपर्कामध्यें पशूचा वध, श्राद्धांत मांस देणें, वानप्रस्थाश्रम स्वीकारणें, दत्ता ( दान केलेली ) जी कन्या ती अभुक्त असतां तिचें दान पुनः दुसऱ्यास करणें, दीर्घकाल ब्रह्मचर्यधारण, नरमेध, अश्वमेध, महाप्रस्थानगमन ( उत्तरदिग्गमन ), गोमेध, राजसूययज्ञ हे धर्म कलियुगांत वर्ज्य होत, असें पंडित सांगतात." वरील वचनांत 'दत्ता' म्हणजे ऊढा ( विवाहिता ) समजावी. कारण, "ऊढाकन्येचा पुनर्विवाह, ज्येष्ठ भ्रात्याला उद्धाररूप श्रेष्ठ भाग देणें, मधुपर्कामध्यें गोवध, भ्रातृपत्नीचा स्वीकार, कमंडलुधारण हीं पांच कर्में करूं नयेत" असें **हेमाद्रींत** वचन आहे. ऊढाकन्येचा "पुरुषसंयोग होण्याचे पूर्वी पति मृत झाला असतां दुसऱ्या वराला ती द्यावी, असें **केचित्** सांगतात. इत्यादिक वचनांनीं पुनर्विवाह सांगितला आहे, तो येथें निषिद्ध केला. **हेमाद्रींत**—ब्राह्मांत—"आतेबहीण व मामेबहीण यांच्याशीं विवाह, मधुपर्कामध्यें गोवध, नरमेध, अश्वमेध, आणि मद्यपान हीं कलियुगांत द्विजातींनीं वर्ज्य करावीं." यावरून जीं मातुलकन्यादि विवाहविधायक वचनें तीं इतर युगविषयक होत. तसेंच **व्यास**—"मातृकुलाकडून तिसरी व पितृकुलाकडून तिसरी कन्या वरणारे आणि कन्येला मोल देऊन विवाह करणारे विप्र ते पापी होत." अशी मामेबहीण व आतेबहीण यांच्याशीं विवाह करणारांची, व्यास निंदा सांगतो. मातृकुलाकडून तिसरी म्हणजे मातुलकन्या, हा प्रकार पूर्वी ( विवाहप्रकरणीं ) सांगितला आहे. अन्वष्टक्यश्राद्धाचेठायीं पिंडप्रदानीं "स्त्रियांचे पिंडाला सुरा, आचाम ( भाताची पेज ) अर्पण करावीं." असें आश्वलायनसूत्रांत विहित जें मद्य तेंही वर्ज्य होय.

**हेमाद्रौ आदित्यपुराणे** विधवायांप्रजोत्पत्तौदेवरस्यनियोजनं बालायाःक्षतयोन्यास्तुवरेणान्येनसंस्कृतिः कन्यानामसवर्णानांविवाहश्चद्विजन्मभिः आततायिद्विजाग्र्याणांधर्मयुद्धेनहिंसनम् द्विजस्याब्धौतुनौयातुःशोधितस्यापिसंग्रहः सत्रदीक्षाचसर्वेषांकमंडलुविधारणम् महाप्रस्थानगमनंगोसंज्ञप्तिश्चगोसवे सौत्रामण्यामपिसुराग्रहणस्यचसंग्रहः अग्निहोत्रहवन्याश्चलेहोलीढापरिग्रहः वृत्तस्वाध्यायसापेक्षमघसंकोचनंतथा प्रायश्चित्तविधानंचविप्राणांमरणांतिकं संसर्गदोषस्तेयान्यमहापातकनिष्कृतिः संसर्गदोषस्तत्संसर्गीचपंचमइत्युक्तःस्तेयंच तदन्यानिमहापातकानि ब्रह्महत्यासुरापगुरुतल्पानित्रीणि तेषांकामकृतानांमरणांतिकंप्रायश्चित्तंविप्राणांकलौनेत्यर्थः मरणांतिकेहि जातिवधनिमित्तंद्वादशाब्दद्विगुणंब्रह्मवधनिमित्तंचद्विगुणंभवति तत्रतुर्थेनास्तिनिष्कृतिरितिनिषिद्धम् नचात्महत्याविधिनातद्बाधः तेनह्यात्महत्यानिमित्तस्यैवबाधोनजातिवधनिमित्तस्य भिन्नविषयत्वात् संसर्गिणस्तुकामतोपिव्रतस्यैवोक्तेर्नमरणांतिकम् नापिस्तेये तत्रराज्ञोवधकर्तृत्वात् तेनतयोर्मरणांतिकाभावात् तयोरेवनिष्कृतिर्नान्येषांत्रयाणां युगान्तरेतुकलौनिषेधबलात्प्रवृत्तिः एतद्विप्रपरम् न क्षत्रियादेः तदुक्तं विप्राणांमरणांतिकमिति **विशेषोस्मत्कृतेप्रायश्चित्तरत्नेज्ञेयः** वरातिथिपितृभ्यश्चपशूपाकरणक्रिया दत्तौरसेतरेषांतुपुत्रत्वेनपरिग्रहः सवर्णान्यांगनादुष्टैःसंसर्गःशोधितैरपि अयोनौसंग्रहेवृत्तेपरित्यागोगुरुस्त्रियः परोद्देशात्मसंत्यागउद्दिष्टस्यापिवर्जनम् प्रतिमाभ्यर्चनार्थायसंकल्पश्चसधर्मकः अस्थिसंचयनादूर्ध्वमंगस्पर्शनमेवच शामित्रंचैवविप्राणांसोमविक्रयणंतथा षड्भक्तानशनेचान्नहरणंहीनकर्मणा **माधवीयेपृथ्वीचंद्रोदयेच** शूद्रेषुदासगोपालकुलमित्रार्धसीरिणां भोज्यान्नतागृहस्थस्यतीर्थसेवातिदूरतः शिष्यस्यगुरुदारेषुगुरुवद्वृत्तिशीलता आपद्वृत्तिर्द्विजाग्र्याणामश्वस्तनिकतातथा प्रजार्थंतुद्विजाग्र्याणांप्रजारणिपरिग्रहः ब्राह्मणानांप्रवासित्वंमुखाग्निधमनक्रिया बलात्कारादिदुष्टस्त्रीसंग्रहोविधिचोदितः यतेश्चसर्ववर्णेषुभिक्षाचर्याविधानतः नवोदकेदशाहंचदक्षिणागुरुचोदिता ब्राह्मणादिषुशूद्रस्यपचनादिक्रियापिच भृग्वग्निपतनैश्चैववृद्धादिमरणंतथा गोतृप्तिशिष्टेपयसिशिष्टैराचमनक्रिया पितापुत्रविरोधेषुसाक्षिणांदंडकल्पनं यतेःसायंगृहत्वंचसूरिभिस्तत्त्वदर्शिभिः एतानिलोकगुप्त्यर्थंकलेरादौमहात्मभिः निवर्तितानिविद्वद्भिर्व्यवस्थापूर्वकंबुधैः सुराग्रहणस्यतत्कर्तुःसंग्रहोव्यवहारकः नवमद्यंचेतिसामान्येननिषिद्धस्याऽनेनोपसंहारइतिवाच्यम् निषेधस्यनिवृत्तिमात्रफलत्वेनविशेषानपेक्षत्वात् नहिंस्यादित्यस्यनब्राह्मणंहन्यादित्यनेनोपसंहारेहिंसांतरस्यादोषत्वापत्तेश्च निरूपितंचैतद्धे**माद्रिणा**ऽन्यत्रेत्युपरम्यते सुराग्रहस्योद्देश्यस्यसौत्रामणिविशेषणाविवक्षयावाजपेयेपिनिषेधः सौत्रामण्यांतुपयोग्रहावास्युरित्या**पस्तंबोक्ते**र्वैकल्पिकपयोग्रहैरप्यधिकारः वाजपेयेतुतत्प्राप्तौमानाभावात्सोमसुरयोः सहत्यागेनांशेसुराद्रव्यत्वात्तत्प्रख्यतयायागनामत्वेनतांविनासंज्ञायोगानकलौनाधिकारइतियुक्तंप्रतीमः **त्रिकांडमंडना**दिलिखनंतुनिर्मूलमनाकरंच वृत्तेति एकाहाद्ब्राह्मणःशुध्येद्योग्निवेदसमन्वितइतिउक्तः अघस्याशौचस्यसंकोचः नतस्यनिष्कृतिर्दृष्टाभृग्वग्निपतनादृतेइत्युक्तस्यप्रायश्चित्तस्यविधानंउपदेशः कलौकर्तैवलिप्यतेइति**व्यासोक्तेः** पतितसंसर्गेदोषसत्त्वेपिपातित्यंनेत्यर्थः अन्यथासंसर्गःशोधितैरपीतिविरोधापत्तेःस्तेयभिन्नेमहापापेरहस्यकृतेप्रायश्चित्तंनेत्यर्थः सवर्णान्याअसवर्णाक्षत्रियादिस्तयादुष्टैःअयोनौशिष्यादौ चतस्रस्तुपरित्याज्याःशिष्यगागुरुगाचयेत्युक्तस्त्यागः परोद्देशेनब्राह्मणाद्यर्थंआत्मत्यागः यद्वा परोद्देशात्मत्यागः गोदानंमनसापात्रमुद्दिश्येत्युक्तं उद्दिष्टस्यत्यक्तस्यवर्जनंप्रतिग्रहसमर्थोपीत्युक्तम् वेतनग्रहणेनप्रतिमापूजा स्वाशौचकालाद्विज्ञेयंस्पर्शनंतुत्रिभागतइत्युक्तःस्पर्शः षडिति उपोषितस्त्र्यहंस्थित्वाधान्यमब्राह्मणाद्धरेदित्युक्तमन्नचौर्यम् आपदिक्षात्रादिवृत्तिः मुखेनैवधमेदग्निमित्युक्तंधमनं दशाहेनैवशुध्येतभूमिष्ठंच-

---

१ अग्निहोत्रेति अग्निहोत्रंहूयतेययावैकंकतस्रुचा साग्निहोत्रहवनी तस्या अग्निहोत्रहोमानंतरहुतावशिष्टप्राशनार्थंजिह्वया लेहः कथंचिल्लीढायाः पुनर्ग्रहोऽग्निहोत्रसाधनत्वम् ॥ २ भोज्यान्नानापितश्चैवयश्चात्मानंनिवेदयेदितिपाठांतरम् ॥ ३ प्रजार्थंत्विति । कश्चिच्छाखायां जातकर्महोमेप्रजाजीवनार्थं अरणिपरिग्रहोविहितः ॥

नवोदकमित्युक्तोदशाहः गुरवेतुवरंदत्वेत्युक्तादक्षिणा शूद्रेषुदासगोपालेति कंदूपक्कस्नेहपक्कंयच्चदुग्धेनपाचितम् एतान्यशूद्रान्नभुजोभोज्यानिमनुरब्रवींदित्यपरार्केसुमंतूक्ताशूद्रस्यपाकक्रिया पितापुत्रविवादेतुसाक्षिणां-त्रिपणोदमइत्युक्तः सायंगृहत्वं विधूमेसन्नमुसलेइत्युक्तं पृथ्वीचंद्रेणतु अटंतिवसुधांविप्राःपृथिवीदर्श-नायच अनिकेताह्यनाहारायत्रसायंगृहास्तुतेइतिविष्णुपुराणोक्तंनिषिद्धम् तेनाज्ञातशीलपांथादेःश्रा-द्धादौविनियोगोनकार्यःकलावित्यर्थउक्तः एतानिवर्ज्यानीत्यर्थः ॥

**हेमाद्रींत आदित्यपुराणांत**—"प्रजोत्पत्तीसाठीं विधवा भ्रातृपत्नीशीं दिराची योजना ( नियोग ), विवाहित असून क्षतयोनी ( उपभुक्त ) अशा कन्येचा दुसऱ्या वराशीं विवाहसंस्कार करणें, द्विजातींचा असवर्ण कन्यांशीं विवाह, आततायी ब्राह्मणांची धर्मयुद्धांत हिंसा, गलबतांत बसून समुद्रपर्यटन करणाराला प्रायश्चित्त देऊनही त्याचा स्वीकार करणें, सर्वांना मंत्रदीक्षा, कमंडलुधारण, यावद्देहपातपर्यंत उत्तरदिग्गमन, गोमेध, सौत्रामणीयज्ञाचेठायींही सुरापान करणाराचा स्वीकार, अग्निहोत्रांत स्रुचीपात्रानें होम दिल्यानंतर अवशिष्ट घृतादिक हवनीय द्रव्य जिव्हेनें चाटणें, व चाटलेली स्रुची पुनः घेणें, अग्निहोत्री वेदाध्ययन करणारा एकदिवस आशौच धरून शुद्ध होतो इत्यादि सांगितल्यावरून आशौचसंकोच करणें तो, ब्राह्मणांना मरणांतिक प्रायश्चित्तविधि, संसर्गदोष व सुवर्णस्तेय यांवांचून इतर जीं महापातकें ( ब्रह्महत्या, सुरापान, गुरुपत्नी-गमन ) त्यांची निष्कृति, हीं कृत्यें कलियुगांत नाहींत." "प्रायश्चित्तविधानं च विप्राणां मरणांतिकम् । संसर्गदोषस्तेयान्यमहा-पातकनिष्कृतिः" या वचनाचा अर्थ—संसर्गदोष म्हणजे "ब्रह्महत्यादि चार महापाप्यांचा संसर्गी पांचवा तोही महापापी होतो" या वचनानें सांगितलेला दोष, आणि चोरी, यांवांचून इतर तीन ( ब्रह्महत्या, सुरापान, गुरुपत्नीगमन ) हीं पापें बुद्धिपूर्वक करणाऱ्या ब्राह्मणाला मरणांतिक प्रायश्चित्त कलियुगांत नाहीं. कारण, मरणांतिक प्रायश्चित्त केलें असतां जातिवध झाला, ब्रह्महत्या झाली, आणि आत्महत्या घडली. त्यांत जातिवधनिमित्तक द्वादशाब्द द्विगुण प्रायश्चित्त. ब्रह्मवधनिमित्तक द्वादशाब्द द्विगुण प्रायश्चित्त आहे. आणि पूर्वीचें केलेलें महापाप व आत्महत्या हीं झाल्यामुळें 'चतुर्थे नास्ति निष्कृतिः' म्हणजे चवथ्या पापाला निष्कृति नाहीं, ह्या वचनानें मरणांतिक प्रायश्चित्त निषिद्ध केलें आहे. आतां मरणांतिक प्रायश्चित्त करावें, अशा विधीनें जातिवधादिप्रयुक्त पापाचा बाध होईल ! असें म्हणतां येणार नाहीं. कारण, त्यानें आत्महत्यानिमित्तक दोषाचा बाध होतो. जातिवधनिमित्तक दोषाचा बाध होत नाहीं. त्याचा विषय वेगळा आणि याचा विषय वेगळा आहे. संसर्गदोष तर बुद्धिपूर्वक घडला तरी त्याला व्रतच ( कृच्छ्रादिकच ) सांगितल्यामुळें त्याला मरणांतिक प्रायश्चित्त नाहीं. चोरीविषयींही मरणांतिक प्रायश्चित्त नाहीं. कारण, चोरीविषयीं राजानें वध करावयाचा आहे. यावरून संसर्गदोष व चोरी यांविषयीं मरणांतिक प्रायश्चित्त नसल्यामुळें त्या दोषांचीच निष्कृति ( शुद्धि ) होते, इतर तीन महापाप्यांची शुद्धि होत नाहीं. कलियुगांत मरणांतिक प्रायश्चित्ताचा निषेध केल्यामुळें इतर युगांत मरणांतिक प्रायश्चित्ताची प्रवृत्ति आहे. हा मर-णांतिक प्रायश्चित्तनिषेध ब्राह्मणांना आहे, क्षत्रियादिकांस नाहीं. तेंच सांगतो—'विप्राणां मरणांतिकं' याचा विशेष निर्णय आम्हीं ( कमलाकरभट्टानें ) केलेल्या **प्रायश्चित्तरत्नांत** पहावा. "वर, अतिथि, पितर यांच्यासाठीं पशु अभिमंत्रित करून मारणें, दत्तक व औरस यांवांचून इतर क्रीत इत्यादिक ( मनु-याज्ञवल्क्य इत्यादिकांनीं सांगितलेल्या ) दशविध पुत्रांचें पुत्रत्वेंकरून ग्रहण ( मानणें ), ब्राह्मणादि उत्कृष्ट जातीच्या स्त्रियांच्या संभोगानें दुष्ट झालेल्या शूद्रादिकांचा प्रायश्चित्त देऊनही संसर्ग करणें, गुरुस्त्रियेशीं शिष्यादिकांचा संयोग झाला असतां त्या गुरुस्त्रियेचा त्याग करणें, परोद्देशेंकरून ( गाई, ब्राह्मण यांच्याकरितां ) प्राणत्याग करणें, दान सोडून ठेविलेलेंही वर्ज्य करणें ( न घेणें ), द्रव्यप्राप्तीसाठीं ( वेतन घेऊन ) प्रतिमापूजा करणें, कार्यसिद्धीकरितां देवपूजा इत्यादिकांचा संकल्प करणें, दशाहाशौचांत अस्थिसंचयन झाल्यानंतर ( आशौच कमी झाल्यामुळें ) स्पर्श करणें, ब्राह्मणांनीं यज्ञांत पशु मारणें, व सोमक्रय करणें, तीन दिवस उपोषित राहणारानें पाप्या-पासूनही धान्य चोरून आणणें, हे धर्म कलियुगांत वर्ज्य आहेत." **माधवीयांत** आणि **पृथ्वीचंद्रोदयांत**—"शूद्रांमध्यें दास, गोपाल ( गौळी ) कुलमित्र ( कुलपरंपरेचा मित्र ), अर्धसीरी ( अर्ध्या वांट्यानें शेती करणारा ), यांचें अन्न गृहस्थाश्रमी ब्राह्मणानें भक्षण करणें; अतिदूर तीर्थसेवा करणें; गुरुपत्नीचे ठिकाणीं शिष्यानें गुरुप्रमाणें वर्तन करून राहाणें; श्रेष्ठ ब्राह्मणांनीं आपत्कालीं क्षत्रिय-वैश्यादि वृत्ती ( उपजीविका ) स्वीकारणें; एक दिवस निर्वाहापुरतें धान्य संग्रह करून राहाणें ( अधिक धान्यसंग्रह न करणें ), कोणत्याएका शाखेंत प्रजा जीवंत राहण्यासाठीं जातकर्म होमांत अरणिस्वीकार सांगितला आहे तो; ब्राह्मणांनीं प्रवास करणें; मुखानें ( फुंकणीवांचून ) अग्नि पेटवणें; बलात्कारादिकानें दुष्ट झालेल्या स्त्रियांना जातींत घेणें; संन्याशांनीं सर्व वर्णांची ( ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादिकांची ) भिक्षा घेणें; भूमीवर नवें उत्पन्न झालेलें उदक दहा दिवसांनीं शुद्ध म्हणून सांगितलें आहे, त्याच्यापूर्वी तें न स्वीकारणें; गुरूनें सांगितलेली दक्षिणा देणें; ब्राह्मणादिकांची अन्नपाकादिक्रिया शूद्रानें करणें; वृद्धादिकांना पर्वताच्या कड्यावरून उडी टाकून किंवा अग्नींत उडी टाकून मरण विहित आहे तें मरण; गाईनीं प्राशन करून अवशिष्ट राहिलेल्या सांचीव उदकांत शिष्टांनीं आचमन करणें; पितापुत्रांच्या विवादांत असलेल्या साक्ष्यांना

दंड सांगितला आहे, तो दंड करणें; संन्याशांनीं दिवसाच्या सायंकालीं भिक्षा मागावी, अशी सांगितलेली सायंकालिकभिक्षा; हे धर्म कलियुगांत करूं नयेत, असें तत्त्वद्रष्टे महात्मे अशा विद्वानांनीं कलियुगाच्या आरंभीं व्यवस्थापूर्वक सांगितलें आहे." वर सांगितलेल्या 'सौत्रामण्यामपि सुराग्रहणस्य च संग्रहः' या वचनाचा अर्थ—सौत्रामणि यज्ञांतही सुरा( मद्य )ग्रह करणाराशीं व्यवहारसंबंध कलियुगांत वर्ज्य आहे. आतां असें म्हणतों कीं, 'नराश्वमेधौ मद्यं च कलौ वर्ज्यं द्विजातिभिः' ह्या वर सांगितलेल्या हेमाद्रिस्थ ब्राह्मवचनानें सर्वसाधारण मद्याचा निषेध केलेला आहे, त्या निषेधाचा ह्या वचनानें उपसंहार ( संकोच ) केला आहे. म्हणजे मद्य वर्ज्य म्हणून जें सांगितलें तें सौत्रामणि यज्ञांत समजावें. अर्थात् इतर वर्ज्य नाहीं; असें म्हणतां येणार नाहीं. कारण, निषेधाचें तात्पर्य निवृत्ति होणें इतकेंच असल्यामुळें, कोणत्या ठिकाणीं निवृत्ति होते व कोणत्या ठिकाणीं नाहीं इत्यादि विशेष अर्थाची त्या निषेधाला गरज नाहीं. आणि याप्रमाणें सामान्य निषेधाचा विशेष निषेधानें उपसंहार केला तर 'सर्वभूतांची हिंसा करूं नये' ह्या सामान्य निषेधाचा 'ब्राह्मणाला मारूं नये' ह्या विशेष वचनानें उपसंहार होईल. तसा उपसंहार झाला असतां इतर हिंसा निर्दोषीही होईल ! हा सर्व निर्णय **हेमाद्रीनें** इतर ग्रंथांत सांगितलेला आहे, म्हणून मी याविषयीं विशेष निर्णय सांगत नाहीं. सौत्रामणियागांत सुराग्रहणाचा उद्देश करून संग्रहनिषेधाचें विधान केलें आहे. येथें उद्देश्य जें सुराग्रहण त्याचें विशेषण जें सौत्रामणि त्याची अविवक्षा[1] असल्यामुळें वाजपेययज्ञांतही सुराग्रहणाचा निषेध होतो. सौत्रामणि यागांत तर "अथवा दुधाचे ग्रह ( पात्रें ) होतील" ह्या **आपस्तंब** वचनावरून विकल्पानें पयोग्रह सांगितले असल्यामुळें त्यांनींही सौत्रामणीयागाविषयीं अधिकार येतो. वाजपेयांत तर दुग्धप्राप्ति असल्याविषयीं प्रमाण नसल्यामुळें सोम व सुरा यांचा महत्याग ( आहुति ) असल्यानें त्याच्या अंशांत सुरा द्रव्य असल्यामुळें त्या योगानेंच त्या यागाला **वाजपेय** असें नांव असल्याकारणानें ती सुरा नसेल तर **वाजपेय** नांव येणार नाहीं, म्हणून कलियुगांत वाजपेययागाविषयीं अधिकार नाहीं, हें म्हणणें युक्त आहे असें आम्ही ( कमलाकरभट्ट ) समजतों. **त्रिकांडमंडना**दिकांचा लेख तर मूलरहित व आकरग्रंथ सोडून आहे. "प्रायश्चित्तविधानं च विप्राणां मरणांतिकं" या पूर्वीच्या वाक्याचा अर्थ—"पर्वताचा कडा किंवा अग्नि यांत देहत्यागावांचून दुसरें त्या महापापांना प्रायश्चित्त नाहीं" याप्रमाणें जें प्रायश्चित्त सांगणें, तें कलियुगांत सांगूं नये. हें वाक्य पंचमहापापांविषयीं आहे. त्यांत संसर्गपापाविषयीं असें आहे कीं, 'कलौ कर्तैव लिप्यते' या **व्यास**वचनावरून कलियुगांत कर्त्यालाच पातित्य आहे. संसर्गी पाप्याला नरकादि प्राप्ति असली तरी पातित्य नाहीं. संसर्ग्याला सर्वथा दोष नाहीं असें म्हटलें, तर 'सवर्णान्यांगनादुष्टैः संसर्गः शोधितैरपि' या पूर्वोक्त वचनांत संसर्गाचा निषेध सांगितला आहे, त्याचा विरोध येईल. म्हणून संसर्गाला दोष नाहीं असें म्हणतां येत नाहीं. तर स्तेयभिन्न एकांतीं घडलेल्या महापापाविषयीं प्रायश्चित्त सांगूं नये, असा भाव. लोकांत प्रसिद्ध बुद्धिपूर्वक घडलेल्या महापापाविषयीं निष्कृति नाहीं. व तो पापी व्यवहारांतही येत नाहीं, हें पूर्वींच सांगितलें आहे. शूद्रामध्यें दास, गोपाळ, कुलाचा मित्र, अर्ध्या शेतीचा वांटेकरी यांचें अन्न गृहस्थानें भक्षण करूं नये.' हा निषेध कोणाचा असें म्हटलें तर—"निखाऱ्यांवर भाजलेले, घृतादिक पक्व केलेले, आणि दुग्धामध्यें शिजविलेले हे पदार्थ: शूद्रान्न न खाणाराला भक्षण करण्यास योग्य आहेत असें मनु सांगतो." याप्रमाणें **अपरार्कांत सुमंतूनें** सांगितलेला शूद्रपाक तो 'शूद्रेषु दासगोपाल०' या वचनानें कलींत निषिद्ध केला आहे. 'पितापुत्रांचा विवाद असतां साक्ष्यांना तीन पण ( कार्षापण, ६ पैसे ) दंड करावा' असा सांगितलेला दंड तो 'साक्षिणां दंडकल्पनं' या वचनानें निषिद्ध केला आहे. 'यतेः सायंगृहत्वं च०' याचा अर्थ—"लोकांच्या घरांतील धूर गेला, मुसळांचा शब्द नाहींसा झाला, चुलींतील निखारे विझाले, सर्व लोकांचें भोजन झालें म्हणजे तीन प्रहर दिवस होऊन गेल्यावर संन्याशांनीं भिक्षेस जावें" असें **मनूनें** सांगितलेलें सायंकाळीं भिक्षाटन तें 'यतेः सायंगृहत्वं०' या वचनानें निषिद्ध केलें आहे. **पृथ्वीचंद्र**ग्रंथकारानें तर—"पृथ्वी पाहण्याकरितां भूमीवर ब्राह्मण फिरतात. त्यांना गृह नसून आहारही मिळत नाहीं, ते सायंकाळीं ज्या घरीं जातील तीं घरें त्यांचीं आहेत अर्थात् ते सायंगृह होत" ह्या **विष्णुपुराण**वचनानें सांगितलेलें सायंगृहत्व तें कलियुगांत निषिद्ध केलें आहे यावरून ज्या ब्राह्मणाचा स्वभाव, आचरण वगैरे माहीत नसेल अशा पांथादिकाला कलियुगांत श्राद्धादिकांत सांगूं नये, असा अर्थ सांगितला आहे.

**निगमः** अग्निहोत्रंगवालंभंसंन्यासंपलपैतृकं देवराच्चसुतोत्पत्तिःकलौपंचविवर्जयेत् अग्निहोत्रंतदर्थमाधानं एतच्चसर्वाधानपरं अर्धाधानंस्मृतंश्रौतस्मार्ताग्न्योस्तुपृथक्कृतिः सर्वाधानंतयोरैक्यकृतिःपूर्वयुगाश्रितेतिलौगाक्षिवचनादिति**स्मृतिचंद्रिकायाम्** एतेन चत्वार्यब्दसहस्राणिचत्वार्यब्दशतानिच कलेर्यदागमिष्यंतितदात्रेतापरिग्रहः[2] संन्यासश्चनकर्तव्योब्राह्मणेनविजानतेति**व्यास**वचनंव्याख्यातम् **सर्वाधानेपि विशेषमाहदेवलः** यावद्वर्णविभागोस्तियावद्वेदःप्रवर्तते संन्यासंचाग्निहोत्रंचतावत्कुर्यात्कलौयुगेइति

---

१ मीमांसेंत उद्देश्यविशेषणाची अविवक्षा होते, असें आहे. प्रथमपरिच्छेदांत ग्रहप्रकरणीं बौद्धतुल्यमतखंडनावसरीं त्याचें दिग्दर्शन आहे, तें पहावें. २ त्रेतापरिग्रहोनामसर्वाधानम् ।

अत्रपूर्वयुगाश्रितेतिलौगाक्षिवाक्येपूर्वयुगानिकृतादीनीत्येकोर्थः अन्येतु युगस्यपूर्वं कलेःपूर्वोभागः सच-त्वार्यब्दसहस्राणीतिपूर्वोक्तवाक्याच्चतुश्चत्वारिंशच्छतवर्षावच्छिन्नः तस्मिन्भागेसर्वाधानंकार्यम् तदुत्तरंतुया-वद्वर्णविभागोस्तीतिवाक्यात् वर्णविभागपर्यंतमर्धाधानमित्याहुः संन्यासस्त्रिदंडः इतिश्रीमन्नारायणभट्टसूरि-सूनुरामकृष्णभट्टात्मजदिनकरभट्टानुजकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौतृतीयपरिच्छेदेकलिवर्ज्यानिसमाप्तानि।

**निगम**—"अग्निहोत्र, मधुपर्कांत गोवध, संन्यास, मांसानें श्राद्ध करणें, दिरापासून पुत्रोत्पत्ति, हीं पांच कर्में कलियुगांत वर्ज्य करावीं." अग्निहोत्र म्हणजे अग्निहोत्रासाठीं आधान करणें. हा निषेध सर्वाधानविषयक आहे. कारण, "श्रौताग्नि व स्मार्ताग्नि हे वेगवेगळे राखणें ( अर्धा स्मार्ताग्नि श्रौताग्नींत मिळवून अर्धा वेगळा राखणें ) हें अर्धाधान म्हटलें आहे. आणि श्रौताग्नींत स्मार्ताग्नि मिळविणें ( वेगळा न ठेवणें ) हें सर्वाधान पूर्वयुगांत सांगितलें आहे. कलियुगांत नाहीं." असें कलियुगांत सर्वाधाननिषेधक **लौगाक्षि**वचन आहे, असें **स्मृतिचंद्रिकें**त सांगितलें आहे. यावरून "कलियुगाचीं ४४०० वर्षें गेल्या-नंतर झाल्या ब्राह्मणानें त्रेतापरिग्रह ( सर्वाधान ) आणि संन्यास हे करूं नयेत" या **व्यास**वचनाची व्यवस्था केल्यासारखी झाली. तात्पर्य—त्रेतापरिग्रह म्हणजे सर्वाधान तें निषिद्ध आहे. अर्धाधान निषिद्ध नाहीं. सर्वाधानाविषयींही विशेष सांगतो **देवल** "जोंपर्यंत ब्राह्मणादिक वर्णांचा ( जातींचा ) विभाग आहे, जोंपर्यंत वेदविहित कर्में चाललेलीं आहेत, तोंपर्यंत कलि-युगांत संन्यास आणि अग्निहोत्र ( अर्धाधान व सर्वाधान ) करावें." वर सांगितलेल्या लौगाक्षिवाक्यांत 'पूर्वयुगाश्रिता' याचा अर्थ—पूर्वयुगें म्हणजे कृत, त्रेता, द्वापार यांमध्यें सर्वाधान आहे असा एक अर्थ झाला. **इतर ग्रंथकार** तर—'युगस्य पूर्वं पूर्वयुगं' म्हणजे कलियुगाचा पूर्वभाग होय. तो किती म्हटला तर 'चत्वार्यब्दसहस्राणि०' ह्या पूर्वोक्त व्यासवचनावरून ४४०० वर्षेंपर्यंत समजावा. तेथपर्यंत कलियुगांत सर्वाधान करावें. त्याच्यापुढें तर 'यावद्वर्णविभागोस्ति०' ह्या देवलवचना-वरून वर्णविभाग आहे तोंपर्यंत अर्धाधान करावें, असें सांगतात. वरील व्यासवचनांत संन्यासाचा जो निषेध केला, तो त्रिदंड संन्यासाचा समजावा. इति कलिवर्ज्य प्रकरणाची प्राकृत टीका समाप्त झाली.

**इति तृतीयपरिच्छेदपूर्वार्धः समाप्तः**

# निर्णयसिंधु-

## तृतीयपरिच्छेद उत्तरार्ध.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

**अथश्राद्धनिर्णयः** नानानिबंधवैमत्यभ्रांतचित्तोद्दिधीर्षया कमलाकरसंज्ञेनक्रियतेश्राद्धनिर्णयः तत्स्वरूपमाह **पृथ्वीचंद्रोदयेमरीचिः** प्रेतंपितॄंश्चनिर्दिश्यभोज्यंयत्प्रियमात्मनः श्रद्धयादीयतेयत्रतच्छ्राद्धंपरिकीर्तितम् ब्राह्मणस्वीकारांतश्चतुर्थ्यंतपदोपनीतपित्राद्युद्देश्यकस्त्यागःश्राद्धमित्यर्थः तत्रयद्यपिहोमपिंडभोजनानिप्रधानमितिहेमाद्रिः होमश्चपिंडदानंचतथाब्राह्मणभोजनम् श्राद्धशब्दाभिधेयंस्यादेकस्मिन्नौपचारिकमिति **श्रीधरश्च** तथापिक्वचिद्विशेषंवक्ष्यामः निमित्तभेदेभोजनस्यपिंडानांवानिषेधोनप्राधान्यंविरुणद्धि असोमयाजिनोदधिपयोयागवत् यच्च**शूलपाणिः** नित्यश्राद्धमदैवंस्यादर्घ्यपिंडविवर्जितमिति**हारीत**येनित्यश्राद्धमघादौपिंडनिषेधोस्ति नचप्राप्तिंविनासः नचातिदेशंविनाप्राप्तिः नचांगत्वेनविनातिदेशः प्रधानस्यानतिदेशात् **सप्तमे**उपकारकत्वेनातिदेशोक्तेः तेनभोजनंप्रधानंपिंडोंगम् पिंडदानमात्रविधिस्त्वंगभूतानुकर्मांतरमेव प्रकरणांतरन्यायादिति तन्न जातश्राद्धेनदद्यात्तुपक्वान्नंब्राह्मणेष्वपि नपक्वंभोजयेद्विप्रानसच्छूद्रोपिकदाचनेत्यादौजातश्राद्धशूद्रश्राद्धादौभोजनस्यनिषेधेनांगत्वापत्तेः **नतौपशौकरोती**तिवदुपजीव्यविरोधेन विकल्पापत्तेश्च तेनश्राद्धशब्दाभिधेयत्वेनोभयप्राप्तौनिषेधःपर्युदासोवा **दीक्षितोनददातिनजुहोतिना सोमयाजीसन्नये**दितिवदितितत्त्वम् **धर्मप्रदीपेपि** यजुषांपिंडदानंतुबह्वृचानांद्विजार्चनम् श्राद्धशब्दाभिधेयंस्यादुभयंसामवेदिनां तच्चपितॄनयजेतपितृभ्योदद्यादित्युभयप्रयोगदर्शनाद्यागदानोभयात्मकम् पितरोदेवताइतिपित्रुद्देश्यकत्वाद्यागत्वंविप्रापेक्षयाचदानत्वमित्यविरुद्धम् एतेन नायंयागः देवतोद्देशेनत्यागोयागः यागोद्देश्याचदेवतेत्यात्माश्रयादितिगौडमतमपास्तं वैधशब्दविशेषोद्देश्यत्वस्यतस्येदमितिस्वत्वारोपप्रतियोगित्वस्यवादेवतात्वात् तत्रैव**सुमंतुः** श्राद्धात्परतरंनान्यच्छ्रेयस्करमुदाहृतम् **आदित्यपुराणे** नसंतिपितरश्चेतिकृत्वामनसियोनरः श्राद्धंनकुरुतेतत्रतस्यरक्तंपिबंतिते ॥

## आतां श्राद्धनिर्णय सांगतो—

नानाप्रकारच्या निबंधांतील विरुद्ध मतांच्या वाक्यांनीं भ्रांति उत्पन्न झालेल्या पुरुषांच्या चित्ताचा उद्धार ( भ्रांतिनिवारण ) करण्याच्या इच्छेनें **कमलाकर** नांवाचा मी ( ग्रंथकार ) श्राद्धनिर्णय करितों.

श्राद्धाचें स्वरूप **पृथ्वीचंद्रोदय** ग्रंथांत **मरीचि** सांगतो, तें असें—"आपल्याला प्रिय असलेलें भोज्य ( भक्षण करण्यास योग्य वस्तु ), प्रेत व पितर यांच्या उद्देशानें ज्यांत ब्राह्मणाला श्रद्धेनें दिलें जातें, त्या कर्माला **श्राद्ध** असें म्हटलें आहे." म्हणजे चतुर्थ्यंत पदानें ( 'पितृपितामहप्रपितामहेभ्यः' इत्यादि पदानें ) उपस्थापित जे पित्रादिक त्यांच्या उद्देशानें केलेलें दान ब्राह्मणानें स्वीकारलें म्हणजे तें श्राद्ध होतें, असा श्राद्ध शब्दाचा इत्यर्थ होय. आतां त्या श्राद्धामध्यें होम, पिंडदान आणि ब्राह्मणभोजन हीं तीन प्रधान आहेत असें **हेमाद्रि** सांगतो; आणि "श्राद्धशब्दाचा अर्थ म्हटला म्हणजे होम, पिंडदान आणि ब्राह्मणभोजन हीं तीन मिळून होतो; या तिहींतून एकावर श्राद्धशब्दार्थत्व मुख्य येत नाहीं, तर औपचारिक ( गौण ) येतें." असें **श्रीधर**ही सांगतो. या दोन्ही ग्रंथकारांच्या ( हेमाद्रिश्रीधरांच्या ) मतानें होम, पिंडदान आणि ब्राह्मणभोजन या तिघांना प्राधान्य सांगितलें; असें जरी आहे, तरी पुढें क्वचित्स्थळीं आम्हीं विशेष सांगूं. भिन्न भिन्न निमित्तानें एकादे ठिकाणीं भोजनाचा किंवा पिंडांचा निषेध केलेला असला तरी तो निषेध ( त्या भोजनपिंडांच्या ) प्राधान्याचा विरोध करीत नाहीं; म्हणजे एकादे ठिकाणीं पिंडांचा किंवा भोजनाचा निषेध असला तरी श्राद्धांतील त्यांच्या प्राधान्याचा तो विघातक होत नाहीं. जसें—अग्निहोत्र्यानें असोमयाजी असतां म्हणजे सोमयाग केला नसतां दधियाग, पयोयाग करूं नयेत; असा जरी दधिपयोयागांचा निषेध केला आहे, तरी त्या त्या यागांमध्यें त्या दधिपयोयागांचें प्राधान्य नष्ट होत नाहीं; कारण,

असोमयाजित्वनिमित्तापुरताच निषेध आहे. तें निमित्त नसेल तर त्यांना प्राधान्य आहे. त्याप्रमाणें भोजन व पिंड यांविषयीं समजावें. आतां जें **शूलपाणि** सांगतो,"'नित्यश्राद्ध देव, अर्घ्य आणि पिंड यांनीं विरहित करावें." या **हारीतवचनात** नित्यश्राद्धांत व मघादिश्राद्धांत पिंडनिषेध सांगितला आहे. तो निषेध पूर्वीं पिंडांची प्राप्ति असल्याशिवाय होत नाहीं. अतिदेशावांचून पिंडांची प्राप्ति नाहीं, आणि तो अतिदेश अंगत्वावांचून होत नाहीं; कारण, प्रधानाचा अतिदेश सांगितला नाहीं. जैमिनींनीं पूर्वमीमांसेंत सातव्या अध्यायांत अंगांचा अतिदेश सांगितला आहे. प्रधानाचा अतिदेश सांगितला नाहीं. तात्पर्य—पिंडांचा निषेध केल्यावरून अतिदेश व अतिदेशामुळें अंगत्व सिद्ध झालें आहे म्हणून श्राद्धामध्यें भोजन प्रधान व पिंड अंग होतें. आतां ज्या कर्मांत केवळ पिंडदानाचाच विधि सांगितला आहे, भोजन नाहीं; तें कर्म या अंगभूत पिंडदान असलेल्या कर्माहून भिन्न आहे; कारण, तें प्रकरण भिन्न व हें प्रकरण भिन्न आहे; प्रकरणभेदानें कर्मभेद होतो, असें मीमांसेंत सांगितलें आहे असें जें **शूलपाणि** म्हणतो, तें बरोबर नाहीं. कारण, एकाद्या ठिकाणीं पिंडांचा निषेध केल्यामुळें जर श्राद्धामध्यें पिंडांना अंगत्व प्राप्त होतें, तर "जातकर्मांतील श्राद्धाचे ठायीं ब्राह्मणांना देखील ( अपिशब्दानें दर्भवटूंनाही ) पक्कान्न देऊं नये. तसेंच सच्छूद्र जरी असेल तरी त्यानें ब्राह्मणांना कधींही शिजविलेल्या अन्नानें भोजन घालूं नये;" इत्यादिवाक्यांनीं जातश्राद्ध, शूद्रश्राद्ध इत्यादिकांचे ठिकाणीं भोजनाचा निषेध असल्यामुळें ( पिंडांप्रमाणें ) भोजनालाही अंगत्व प्राप्त होईल. दुसरा दोष असा कीं, पशुयाग म्हणून एक याग सांगितलेला आहे, त्या ठिकाणीं, चोदकानें अतिदेशानें आज्यभाग प्राप्त होतात, आणि "न तौ पशौ करोति" या वाक्यानें ते आज्यभाग पशुयागाचे ठिकाणीं करूं नयेत असा निषेध केला आहे; तो निषेध उपजीव्यविरोधामुळें ( ज्यानें आपलें उपजीवन झालें त्याचा विरोध होत असल्यामुळें ) सर्वथा त्यांचा प्रतिबंध न करितां एकवेळां प्रतिबंध व एकवेळां त्या आज्यभागांची प्रवृत्ति, मिळून विकल्प होत असतो; त्याप्रमाणें या ठिकाणींही अतिदेशानें प्रवृत्ति व वचनानें निषेध असें केलें असतां प्रवृत्तीनें निषेधाचें उपजीवन असल्यामुळें उपजीव्यविरोधानें त्या पिंडांच्या प्रवृत्तीचा सर्वथा बाध न करितां एकवेळ प्रवृत्ति व एकवेळ निषेध अशा रीतीनें विकल्प प्राप्त होईल. म्हणून आतिदेशिक प्रवृत्ति मानणें योग्य नाहीं. तर श्राद्धामध्यें भोजन व पिंड या दोघांनाही प्राधान्य असल्यामुळें वरील उदाहरणांत ( नित्यश्राद्ध-मघादि श्राद्धादिकांचे ठायीं ) श्राद्धशब्दानें दोन्ही ( भोजन व पिंड ) प्राप्त झालीं असतां निषेध किंवा पर्युदास करावा. जसें-"दीक्षितो न ददाति न जुहोति" या ठिकाणीं दीक्षितानें क्रतूच्या अंगत्वेंकरून विहितव्यतिरिक्त पुरुषार्थत्वेंकरून विहित जीं दानादिक तीं करूं नयेत. असा त्या नकाराचा अर्थ निषेध करावा. किंवा पर्युदास करावा. तो असा कीं, दीक्षितानें पुरुषार्थ जीं दानादिक कर्में त्यांवांचून इतर कर्में क्रतुकालीं करावीं, असा अर्थ केला असतां निषेध आर्थिक होतो. तसाच "नासोमयाजी संनयेत्" या वाक्यानें सोमयाग केल्यावांचून सान्नाय्ययाग करूं नये; या निषेधानें सोमयागानंतर सान्नाय्ययागाचा उत्कर्ष प्रतिपादित केला जातो. या वरील दोन्ही उदाहरणांप्रमाणें श्राद्धामध्यें निमित्तविशेषीं भोजनाचा किंवा पिंडदानाचा निषेध किंवा पर्युदास करावा, असें वरील वाक्यांचें तत्त्व होय. **धर्मप्रदीप**ग्रंथांतही "यजुर्वेद्यांना पिंडदान हें श्राद्ध होतें. बह्वृचांना ( ऋग्वेद्यांना ) द्विजार्चन म्हणजे अन्नादिकांनीं ब्राह्मणपूजन हें श्राद्ध होतें. आणि सामवेद्यांना तीं दोन्हीं ( पिंडदान व द्विजार्चन ) मिळून श्राद्ध होतें." असें सांगितलें आहे. **"पितॄन् यजेत, पितृभ्यो दद्यात्"** अशीं दोन्ही प्रयोगांचीं वाक्यें दृष्ट आहेत, म्हणून तें श्राद्ध यागदान उभयरूपी आहे. एका श्राद्धावर उभयरूपत्व विरुद्ध कां होत नाहीं, असें म्हणाल तर "पितरो देवता" या वाक्यानें पितरांच्या उद्देशानें विहित असल्यामुळें त्या श्राद्धकर्मावर यागरूपत्व येतें आणि ब्राह्मणांना दिलें जातें म्हणून दानरूपत्वही येतें. ते दोन्ही धर्म पृथक्संबंधानें आलेले असल्यामुळें विरुद्ध होत नाहींत, अशा वरील व्यवस्थेनें श्राद्धाला यागत्व सिद्ध झाल्यामुळें 'जे गौड म्हणतात कीं, हा याग नव्हे, कारण, देवतेच्या उद्देशानें जो केलेला त्याग तो याग, आणि यागाला जी उद्देश्य ती देवता म्हणजे पितरांना देवतात्व सिद्ध झाल्यावांचून श्राद्धाला यागत्व सिद्ध होत नाहीं, आणि श्राद्धाला यागत्व सिद्ध झाल्यावांचून पितरांना देवतात्व नाहीं; अर्थात् देवताज्ञानाला यागज्ञान पाहिजे व यागज्ञानाला देवताज्ञान पाहिजे. यावरून "स्वज्ञाने स्वज्ञानापेक्षा" म्हणजे आपल्या ज्ञानाला आपलेंच ज्ञान पाहिजे, असा **आत्माश्रय** दोष येतो; म्हणून हा याग होत नाहीं' असें जें गौडांचें मत तें खंडित होतें. कारण, यागाला उद्देश्य ती देवता, असें आम्हीं म्हणत नाहीं; तर विधिवाक्यांतील विशेषशब्दानें जिचा उद्देश केला असेल ती देवता; अथवा देयपदार्थाचेठायीं 'त्याचें हें' असा स्वकीय स्वत्वनिवृत्तिपूर्वक ज्याच्या स्वत्वाचा आरोप केला जातो ती देवता समजावी; असें देवतेचें

---

१ अतिदेश म्हणजे त्याच्यासारखें हें करावें, असें सांगणें होय. पार्वणश्राद्धांत पिंडादिक सर्व श्राद्धधर्म सांगितले आहेत. त्याच्यासारखें हें असल्यामुळें या ठिकाणीं ते सारे धर्म आले आहेत, म्हणूनच त्या धर्माला अंगत्व आहे असा भाव. २ म्हणजे श्राद्धावर पितरांच्या संबंधानें यागत्व आणि ब्राह्मणांच्या संबंधानें दानरूपत्वही येतें. जसें एकच स्त्री असून ती बापाची कन्या होते, पतीची पत्नी होते, भ्रात्याची बहीण होते, तिजवर कन्यात्व पत्नीत्व भगिनीत्व हे धर्म वेगवेगळ्या संबंधानें आलेले असल्यामुळें जसे विरुद्ध होत नाहींत, तसें हें श्राद्ध पितरांस याग होतो, ब्राह्मणांस दान होतें, म्हणजे पितृनिरूपित यागत्व आणि ब्राह्मण-निरूपित दानत्व हे दोन्ही धर्म अविरोधानें असतात.

लक्षण केल्यानें वरील आत्माश्रयदोष येत नाहीं, असें समजावें. त्याच ग्रंथांत ( पृथ्वीचंद्रोदयांत ) **सुमंतु** सांगतो-"श्राद्धा-वांचून दुसरें अत्यंत श्रेयस्कर असें कोणतेंही कर्म सांगितलें नाहीं." **आदित्यपुराणांत**-"पितर नाहींत असें मनांत आणून जो मनुष्य श्राद्ध करीत नाहीं त्या समयीं ( श्राद्धकालीं ) आलेले त्याचे ते पितर त्याचें ( श्राद्ध न करणाऱ्या मनुष्याचें ) रक्त पितात."

तद्भेदानाह**विश्वामित्रः** नित्यंनैमित्तिकंकाम्यंवृद्धिश्राद्धंसपिंडनम् पार्वणंचेतिविज्ञेयंगोष्ठ्यांशुद्ध्यर्थमष्टमं कर्मांगंनवमंप्रोक्तंदैविकंदशमंस्मृतम् यात्रास्वेकादशंप्रोक्तंपुष्ट्यर्थंद्वादशंस्मृतमिति एषांलक्षणानि**भविष्ये** अहन्यहनियच्छ्राद्धंतन्नित्यमितिकीर्तितम् वैश्वदेवविहीनंतदशक्तावुदकेनतु एकोद्दिष्टंतुयच्छ्राद्धंतन्नैमित्तिकमुच्यते तदप्यदैवंकर्तव्यमयुग्मान्भोजयेद्द्विजान् कामायविहितंकाम्यमभिप्रेतार्थसिद्धये वृद्धौयत्क्रियतेश्राद्धंवृद्धिश्राद्धंतदुच्यते गंधोदकतिलैर्मिश्रंकुर्यात्पात्रचतुष्टयं अर्घ्यार्थंपितृपात्रेषुप्रेतपात्रंप्रसेचयेत् येसमानाइतिद्वाभ्यामेतज्ज्ञेयंसपिंडनं नित्येनतुल्यशेषंस्यादेकोद्दिष्टंस्त्रियाअपि एतदुभयमेवस्त्रियाः तेनस्त्रीकर्तृकंस्त्रीसंप्रदानकंचेत्युभयनियमइति**कल्पतरुः** अमावास्यायांयत्क्रियतेतत्पार्वणमितिस्मृतम् क्रियतेवापर्वणियत्ततपार्वणमितिस्थितिः अत्रपर्व चतुर्दश्यमष्टमीचैवअमावास्याचपौर्णिमा पर्वाण्येतानिराजेंद्ररविसंक्रमणंतथेति **विष्णुपुराणो**क्तसंक्रांत्यादि गोष्ठ्यांयत्क्रियतेश्राद्धंगोष्ठीश्राद्धंतदुच्यते बहूनांविदुषांसंपत्सुखार्थंपितृतृप्तये क्रियते शुद्धयेयत्तुब्राह्मणानांतुभोजनम् शुद्ध्यर्थमितितत्प्रोक्तंवैनतेयमनीषिभिः निषेककालेसोमेचसीमंतोन्नयनेतथा ज्ञेयंपुंसवनेचैवश्राद्धंकर्मांगमेवच देवानुद्दिश्ययच्छ्राद्धंतत्तुदैविकमुच्यते गच्छन्देशांतरंयस्तुश्राद्धंकुर्यात्तुसर्पिषा यात्रार्थमितितत्प्रोक्तंप्रवेशेचनसंशयः शरीरोपचयेश्राद्धमर्थोपचयएवच पुष्ट्यर्थमेतद्विज्ञेयमौपचायिकमुच्यते गोष्ठ्यांश्राद्धकर्तृसमुदायेसंभूयसामग्रीसंपादनेनश्राद्धमित्यर्थः युगपत्तीर्थादिप्राप्तौविदुषांश्राद्धसंपदासुखार्थंभिन्नपाकाशक्तौबहुपितृकश्राद्धमेकःकुर्यादिति**कल्पतरुः शंखधरश्च** शुद्धिश्राद्धंप्रायश्चित्तांगमिति**मैथिलाः** अत्र पार्वणैकोद्दिष्टवृद्धिसपिंडीकरणात्मकंचतुर्विधमेवमुख्यम् तस्यैवायंप्रपंचः ॥

## आतां श्राद्धांचे भेद सांगतो—

**विश्वामित्र**—"नित्यश्राद्ध १ नैमित्तिकश्राद्ध २, काम्यश्राद्ध ३, वृद्धिश्राद्ध ४, सपिंडनश्राद्ध ५, पार्वणश्राद्ध ६, गोष्ठीश्राद्ध ७, शुद्धिश्राद्ध ८, कर्मांगश्राद्ध ९, दैविकश्राद्ध १०, यात्राश्राद्ध ११, आणि पुष्टिश्राद्ध १२ बारावें असे श्राद्धाचे भेद बारा आहेत." ह्या बारा श्राद्धांचीं लक्षणें सांगतो **भविष्यांत**—"प्रतिदिवशीं (दररोज) जें श्राद्ध करावयाचें म्हणून सांगितलें तें **नित्यश्राद्ध** म्हटलें आहे. तें श्राद्ध विश्वेदेवरहित होतें. तितकेंही (एका ब्राह्मणानें देखील) करावयास सामर्थ्य नसेल तर केवळ उदकानें देखील तें नित्यश्राद्ध होतें. जें श्राद्ध **एकोद्दिष्ट** (सपिंडनाच्यापूर्वी) म्हणून सांगितलें आहे, तें नैमित्तिक श्राद्ध होय. तेंही विश्वेदेवरहित करावें. या श्राद्धांत अयुग्म (तीन, किंवा एक) ब्राह्मणांना भोजन घालावें. कामनेला विहित श्राद्ध म्ह० आपली मनकामना सिद्ध होण्यासाठीं जें करावयाचें तें श्राद्ध **काम्य** होय. वृद्धिकर्माचेठायीं[1] जें श्राद्ध करितात, तें **वृद्धिश्राद्ध** म्हटलें आहे. ज्या श्राद्धामध्यें अर्घ्याकरितां गंध, उदक, तीळ यांनीं युक्त अशीं चार पात्रें करून "येसमाना०" इत्यादि दोन मंत्रांनीं त्यांतील एका प्रेतपात्रांतील उदक तीन्ही पितृपात्रांमध्यें प्रसेचन करावें म्हणजे मिळवावें, म्हणून सांगितलें आहे, तें **सपिंडनश्राद्ध** होय. सपिंडनश्राद्धाच्या प्रसंगानें एकोद्दिष्टाचें लक्षण सांगतो-तें असें कीं, एकाच्या उद्देशानें करावयाचें श्राद्ध तें **एकोद्दिष्ट** होय. या एकोद्दिष्टाचीं अंगें नित्यश्राद्धासारखीं असतात. हें एकोद्दिष्ट दोन प्रकारचेंच स्त्रियेला श्राद्ध होय; म्हणजे श्राद्धकर्त्री स्त्री असेल तर एकोद्दिष्टच करावें, हा एक नियम आणि श्राद्धभोक्त्री स्त्री असेल तर एकोद्दिष्टच करावें, असा दुसरा नियम, असा दोन प्रकारचा नियम आहे असें **कल्पतरु** सांगतो. जें श्राद्ध अमावास्येला करावयाचें म्हणून सांगितलें तें **पार्वणश्राद्ध** म्हटलें आहे; अथवा पर्वाचेठिकाणीं करावयाचें तें **पार्वण**; अशी शास्त्रमर्यादा आहे. श्राद्धाला **पर्वें सांगतो**—'चतुर्दशी, अष्टमी, अमावास्या, पौर्णिमा, आणि तशीच संक्रांति हीं पर्वें आहेत, अशीं **विष्णु**पुराणांत सांगितलेली संक्रांति वगैरे पर्वें श्राद्धप्रकरणीं घ्यावीं. गोष्ठी म्हणजे बहुत ब्राह्मणसमुदाय बहुत विद्वान् एकत्र मिळून पितरांची तृप्ति होऊन आपणांस संपत्ति व सुख प्राप्त व्हावें; म्हणून श्राद्ध करितात तें **गोष्ठीश्राद्ध** म्हटलें आहे. आपली शुद्धि होण्यासाठीं जें ब्राह्मणभोजन करितात, तें **शुद्ध्यर्थश्राद्ध** होय, असें विद्वानांनीं सांगितलें आहे. गर्भाधान, सोमयाग, सीमंतोन्नयनसंस्कार, आणि पुंसवनसंस्कार, इतक्या ठिकाणीं जें नांदीश्राद्ध करितात, तें **कर्मांगश्राद्ध** होय. देवांच्या

१ विवाहादि मंगलकार्यांत.

उद्देशानें जें श्राद्ध करितात तें **दैविकश्राद्ध** म्हटलें आहे. देशांतरीं जाण्यासाठीं घरांतून निघतेवेळीं घृतानें श्राद्ध करावयाचें तें **यात्रार्थश्राद्ध** म्हटलें आहे. तसेंच देशांतराहून घरीं आल्यावरही घृतश्राद्ध करावें म्हणून सांगितलें तेंही **यात्रार्थश्राद्ध**च होय याविषयीं संशय नाहीं. शरीरवृद्धि होण्याविषयीं तसेंच अर्थाची ( द्रव्यादिसंपत्तीची ) वृद्धि होण्याविषयीं जें श्राद्ध सांगितलें आहे तें **पुष्ट्यर्थश्राद्ध** होय. हेंच **औपचारिक** श्राद्ध म्हटलें आहे." वरील गोष्ठीश्राद्ध लक्षणवचनाचा इत्यर्थ—अनेक ब्राह्मणांच्या समुदायामध्यें श्राद्धकर्ते बहुत ब्राह्मण एकत्र सामग्री संपादन करून श्राद्ध करितात, तें होय असा समजावा. **कल्पतरु** आणि **शंख** हे ग्रंथकार, अनेक विद्वान् ब्राह्मणांना एकदम तीर्थादिक प्राप्त झालें असतां अनेकांना भिन्न भिन्न पाक होणें अशक्य असल्यामुळें, फार आयासावांचून यथास्थित श्राद्ध संपादन व्हावें, म्हणून सर्वांच्या पितरांचें श्राद्ध एकानें करावें: असें सांगतात. शुद्धिश्राद्ध हें प्रायश्चित्तांग आहे, असें **मैथिल** सांगतात. ह्या वरील द्वादशश्राद्धांमध्यें पार्वण, एकोद्दिष्ट, वृद्धि आणि सपिंडीकरण हें चार प्रकारचेंच श्राद्ध मुख्य आहे, त्याचाच हा प्रपंच म्हणजे वर सांगितलेले बारा प्रकार होत.

**अथश्राद्धदेशाः मनुः** शुचिदेशंविविक्तंतुगोमयेनोपलेपयेत् दक्षिणाप्रवणंचैवप्रयत्नेनोपपादयेत् **पृथ्वीचंद्रोदयेविष्णुधर्मे** दक्षिणाप्रवणेदेशेतीर्थादौचगृहेपिवा भूसंस्कारादिसंयुक्तेश्राद्धंकुर्यात्प्रयत्नतः तत्रैव**प्रभासखंडे** तीर्थादष्टगुणंपुण्यंस्वगृहेददतःशुभे **भारते** तस्यदेशाःकुरुक्षेत्रंगयागंगासरस्वती प्रभासं पुष्करंचेतितेषुश्राद्धंमहाफलं **स्कांदे** तुलसीकाननच्छायायत्रयत्रभवेद्द्विज तत्रश्राद्धंप्रदातव्यंपितॄणांतृप्तिहेतवे **माधवीये**श्राद्धोपक्रमे**व्यासः** महोदधौप्रयागेचकाश्यांचकुरुजांगले **शंखः** गंगायमुनयोस्तीरेपयोष्णीअमरकंटके नर्मदाबाहुदातीरेभृगुलिंगेहिमालये गंगाद्वारेप्रयागेचनैमिषेपुष्करेतथा सन्निहत्यांगयायांचदत्तमक्षय्यतांव्रजेत् अपिजायेतसोस्माकंकुलेकश्चिन्नरोत्तमः गयाशीर्षेवटेश्राद्धंयोनोदद्यात्समाहितः एष्टव्याबहवःपुत्रायद्येकोपिगयांव्रजेत् यजेतवाश्वमेधेननीलंवावृषमुत्सृजेत् **आदित्यपुराणे** पंचक्रोशंगयाक्षेत्रंक्रोशमेकंगयाशिरःमहानद्याःपश्चिमेनयावद्गृध्रेश्वरोगिरिः उत्तरेब्रह्मयूपस्ययावद्दक्षिणमानसम् एतद्गयाशिरोनामत्रिषुलोकेषुविश्रुतमिति **शूलपाणौबृहस्पतिः** गंगायांधर्मपृष्ठेचसरसिब्रह्मणस्तथा गयाशीर्षेक्षयवटेपितॄणांदत्तमक्षयम् धर्मारण्यंधर्मपृष्ठंधेनुकारण्यमेवच दृष्ट्वैतानिपितॄंश्चार्चनवंशान्विंशतिमुद्धरेत् **त्रिस्थलीसेतौवायवीये** शमीपत्रप्रमाणेनपिंडंदद्याद्गयाशिरे उद्धरेत्सप्तगोत्राणिकुलमेकोत्तरंशतं सप्तगोत्राणितु पितामाताचभार्याचभगिनीदुहितानथा पितृमातृष्वसाचैवसप्तगोत्राणिवैविदुरिति एषांगोत्राणामेकोत्तरशतंकुलंपुरुषाइत्यर्थः तेचोक्तास्तत्रैव तत्त्वानिविंशतिनृपाद्वादशैकादशादश अष्टाविंतिचगोत्राणांकुलमेकोत्तरंशतं तत्त्वानिचतुर्विंशतिः तेचद्वादशपूर्वाद्वादशपराः एवमग्रेपि **प्रयोगपारिजातेपाद्मे** शालग्राममयीमुद्रासंस्थितायत्रकुत्रचित् वाराणस्यांयवाधिक्यंसमंताद्योजनत्रयं तथा यत्किंचित्पैतृकंकुर्यात्सपिंडंव्रातदंतिके विष्णुलोकंसगच्छेत्तुलभतेशाश्वतंपदम् तत्रैव**वाराहे** म्लेच्छदेशेशुचौवापिचक्रांकोयत्रतिष्ठति । योजनानांतथात्रीणिममक्षेत्रंवसुंधरे । चक्रांकस्यतुसान्निध्येयत्कर्मक्रियतेनरैः स्नानंदानंतपःश्राद्धंसर्वमक्षयतांव्रजेत् ॥

## आतां श्राद्धाला देश सांगतो—

**मनु**—"श्राद्धाला जागा एकांतीं, शुद्ध अशी पाहून ती गोमयानें सारवावी; ती जागा दक्षिणेकडून उतरती अशी यत्नानें ( खणून वगैरे ) तयार करावी." **पृथ्वीचंद्रोदयांत विष्णुधर्मांत**—"गोदावर्यादितीर्थाचे ठायीं अथवा गृहाचे ठिकाणीं दक्षिणेकडे उतरती असून संस्कारादिकांनीं शुद्ध केलेल्या अशा भूमीवर प्रयत्नानें श्राद्ध करावें." तेथेंच **प्रभासखंडांत**— "आपल्या घरीं श्राद्ध करणाराला तीर्थाहून आठपट पुण्य प्राप्त होतें." **भारतांत** "श्राद्धाचे देश म्हटले म्हणजे कुरुक्षेत्र, गया, गंगा, सरस्वतीनदी, प्रभासतीर्थ, पुष्करतीर्थ, हे होत; यांचेठायीं श्राद्ध केलें असतां मोठें फळ मिळतें." **स्कांदांत**— "तुळशीच्या वनाची छाया ज्या ज्या ठिकाणीं असेल त्या त्या ठिकाणीं पितरांच्या तृप्तीसाठीं श्राद्ध करावें." **माधवीयांत** श्राद्धोपक्रम असतां **व्यास** सांगतो—"महोदधि ( मोठा समुद्र ), प्रयाग, काशी, आणि कुरुजांगल, यांचे ठिकाणीं श्राद्ध करावें." **शंख**—"गंगातीर, यमुनेचें तीर, पयोष्णीनदी, अमरकंटक, नर्मदातीर, बाहुदातीर, भृगुलिंग, हिमालयपर्वत, गंगाद्वार, प्रयाग, नैमिषक्षेत्र, पुष्करतीर्थ, संनिहति, गया, इतक्या ठिकाणीं दिलेलें अक्षय होतें. पितर आशा करितात कीं, गयाशीर्षाचे ठायीं आणि अक्षयवटाखालीं समाधानांतःकरणानें आमचें श्राद्ध करणारा असा कोणी नरश्रेष्ठ आमच्या कुळांत उत्पन्न होईल काय ? बहुत पुत्र व्हावे म्हणून इच्छा करावी; कारण, त्यांतून एकादा तरी गयेस जाईल, अर्थात् त्या ठिकाणीं

श्राद्ध करील अथवा अश्वमेध याग करील, किंवा नीलवृषाचा उत्सर्ग करील." **आदित्यपुराणांत**—"गयाक्षेत्र पांच कोश आहे, आणि गयाशिर एक कोश आहे. महानदीच्या पश्चिमेकडे गृध्रेश्वरगिरीपर्यंत आणि ब्रह्मयूपाच्या उत्तरेकडे दक्षिणमानसापर्यंत जें क्षेत्र तें हें गयाशिर नांवानें तीन्ही लोकांत प्रसिद्ध आहे." **शूलपाणींत बृहस्पति**—"गया, धर्मपृष्ठ, ब्रह्मसरोवर, गयाशीर्ष, आणि अक्षयवट इतक्या ठिकाणीं पितरांना दिलेलें अक्षय होतें. धर्मारण्य, धर्मपृष्ठ, आणि धेनुकारण्य यांना पाहून पितरांची पूजा करणारा वीस वंशांचा उद्धार करील." **त्रिस्थलीसेतूंत वायवीयांत**—"गयाशिराचे ठायीं शमीपत्रप्रमाणानें पिंड द्यावे, म्हणजे सात गोत्रांचा ह्म० एकशें एक कुलांचा उद्धार होईल." तीं सात गोत्रें येणेंप्रमाणें—"पितृगोत्र, मातृगोत्र ( मातामहगोत्र ), भार्येचें गोत्र ( श्वशुरगोत्र ), बहिणीचें गोत्र, कन्येचें गोत्र, आत्येचें गोत्र, आणि मावशीचें गोत्र, हीं सात गोत्रें होत. ह्या सात गोत्रांचें एकशेंएक कुल म्हणजे पुरुष समजावे." ते पुरुष त्याच ठिकाणीं सांगितले आहे ते असे—"पितृगोत्राचे २४ पुरुष, मातृगोत्राचे २० पुरुष, भार्यागोत्राचे १६ पुरुष, भगिनीगोत्राचे १२ पुरुष, कन्यागोत्राचे ११ पुरुष, आत्याचे गोत्राचे १० पुरुष, आणि मावशीचे गोत्राचे ८ पुरुष, मिळून सात गोत्रांचे एकशेंएक १०१ पुरुष होतात. हे सांगितलेले पुरुष निम्मे पूर्वींचे व निम्मे पुढचे समजावे, जसे पितृगोत्राचे २४ पुरुष म्हणून सांगितले ते बारा पूर्वींचे व बारा पुढचे म्हणून समजावे. याचप्रमाणें इतर गोत्रांचेही पुरुष समजावे." **प्रयोगपारिजातांत पाद्मांत**—"शालग्रामरूपी मुद्रा ( शिला ) जेथें कोठें आहे, त्याच्या आसमंतात् तीन योजनेंपर्यंतचा प्रदेश वाराणसीहून किंचित् अधिक आहे, म्हणून समजावें. तसेंच त्या शालग्रामाच्या संनिध जो मनुष्य थोडें बहुत पैतृक ( पितरांच्या उद्देशानें ) कर्म करील अथवा सपिंडक श्राद्ध करील तो विष्णुलोकास जाईल व त्याला शाश्वतपद प्राप्त होईल." तेथेंच **वाराहांत**—"म्लेच्छ देशांत अथवा दुसऱ्या अशुद्ध देशांतही चक्रांकित शिला ज्या ठिकाणीं आहे, तेथें तीन योजनेंपर्यंत [ भगवान् म्हणतात ] माझें क्षेत्र आहे. त्या चक्रांकाच्या संनिध स्नान, दान, तप, श्राद्ध इत्यादिक जें कर्म मनुष्य करितात तें सर्व कर्म अक्षय होतें."

**अथनिषिद्धदेशाः पृथ्वीचंद्रोदयेस्कांदे** त्रिशंकोर्वर्जयेद्देशंसर्वंद्वादशयोजनं उत्तरेणमहानद्यादक्षिणेनतुकीकटान् देशस्त्रैशंकवोनामश्राद्धकर्मणिवर्जितः **वायवीये** प्रनष्टाश्रमधर्माश्चदेशावर्ज्याःप्रयत्नतः **यमः** रूक्षंकृमिहतंक्लिन्नंसंकीर्णानिष्टगंधिकं देशंत्वनिष्टशब्दंचवर्जयेच्छ्राद्धकर्मणि तत्रैव**शंखः** गोगजाश्वादिजुष्टेषुकृत्रिमायांतथाभुवि नकुर्याच्छ्राद्धमेतेषुपारक्यासुचभूमिषु **यमः** परकीयप्रदेशेषुपितॄणांनिर्वपेत्तुयः तद्भूमिस्वामिपितृभिःश्राद्धकर्मविहन्यते **ब्राह्मभारतयोर**पि परकीयगृहेयस्तुस्वान्पितॄंस्तर्पयेद्यदि तद्भूमिस्वामिनस्तस्यहरंतिपितरोबलात् अग्रभागंततस्तेभ्योदद्यान्मूल्यंचजीवितम् श्राद्धार्हाणामग्रभागंश्राद्धंतदनर्हाणांशूद्राणांतुमूल्यमितिकेचित् षोडशीपिंडेऽबांधवानामपिपिंडोक्तेः येऽबांधवाबांधवावेत्यादितर्पणबाधापत्तेश्च नामगोत्रपूर्वंश्राद्धनिषेधोनान्यत्रेति**गौडाः** विप्रासुतस्यशूद्रापुत्रश्राद्धनिषेधोनान्यत्र अग्रदानंचान्नत्यागात्पूर्वकार्यमिति**मैथिलाः** तन्न अग्रभागस्यश्राद्धपरत्वेमानाभावात् अन्नदानेचनिषेधाभावात् त्यागात्पूर्वंकरणेऽनंगेनव्यवधानापत्तेः अंगत्वेचमानाभावात् इदंचस्वाम्यनुज्ञाभावे तदुक्तंतत्रैव**ब्राह्मे** स्वनुलिप्तेषुगेहेषुस्वेष्वनुज्ञापितेषुच श्राद्धमेतेषुदातव्यंवर्ज्यमेतेषुनोच्यते किरातेषुकलिंगेषुकोंकणेषुखसेष्वपि सिंधोरुत्तरकूलेषुनर्मदायाश्चदक्षिणे पूर्वेणकरतोयायानदेयंश्राद्धमुच्यते इदंकाम्यविषयं अन्यथातत्रत्यानां सर्वश्राद्धाकरणापत्तेः नर्मदादक्षिणेऽपवादः**स्कांदे** सह्यस्यचोद्भवोयत्रयत्रगोदावरीनदी पृथिव्यामपिकृत्स्नायांसप्रदेशोतिपावनः परकीयत्वापवाद**आदित्यपुराणे** अटवीपर्वताःपुण्यानदीतीराणियानिच सर्वाण्यस्वामिकान्याहुर्नहितेषुपरिग्रहः वनानिगिरयोनद्यस्तीर्थान्यायतनानिच देवखाताश्चगर्ताश्चनस्वाम्यंतेषुविद्यते **स्मृतिसारे** नैकवासानचद्वीपेनांतरिक्षेकदाचन श्रुतिस्मृत्युदितंकर्मनकुर्यादशुचिःक्वचित् **दिवोदासीये** म्लेच्छदेशेतथारात्रौसंध्यायांविप्रवर्जिते नश्राद्धमाचरेद्विद्वान्नचाकाशेकथंचन ।

## आतां श्राद्धाला निषिद्ध देश सांगतो.—

**पृथ्वीचंद्रोदयांत स्कांदांत**—"त्रिशंकूचा देश बारा योजनेंपर्यंत आहे, तो सर्व वर्ज्य करावा. तो असा—महानदीच्या उत्तरेस व कीकट देशाच्या दक्षिणेस दोहोंच्या मध्यभागीं असलेला देश त्रिशंकूचा म्हणून प्रसिद्ध आहे. तो श्राद्धकर्माविषयीं वर्ज्य करावा." **वायवीयांत**—"ज्या देशांत आश्रमधर्म नष्ट झाले आहेत ते देश प्रयत्नानें वर्ज्य करावे." **यम**—"रूक्ष, कृमींनीं व्यापलेला, चिखल असलेला, अनेकप्रकारच्या दुर्गंधींनीं व्याप्त, आणि ज्या ठिकाणीं बहुत अपशब्द

ऐकूं येतात, ते सारे देश श्राद्धकर्माविषयीं वर्ज्य करावे." **तेथेंच शंख**—"गुरांचा गोठा, हत्ती बांधण्याची जागा, घोड्यांची पागा, दगडांनीं वगैरे बांधलेली भूमि, आणि परकीय ( दुसऱ्याची ) भूमि इतक्या ठिकाणीं श्राद्ध करूं नये." **यम**—"परकीय भूमीवर जर श्राद्ध केलें तर, त्या भूमीच्या मालकांचे पितर त्या श्राद्धकर्माचा विघात करितात." **ब्राह्मांत व भारतांतही** सांगतात—"दुसऱ्याच्या घरीं जर आपल्या पितरांचें श्राद्ध केलें तर त्या भूमीच्या मालकांचे पितर बलात्कारानें तें श्राद्ध हरण करून घेतात. याकरितां त्या भूमिस्वामीच्या पितरांना अग्रभाग द्यावा, आणि जीवनसाधनमूल्य ( जागेचें भाडें ) द्यावें." एथें असें समजा कीं, श्राद्धाला योग्य असतील त्यांना अग्रभाग श्राद्ध द्यावें; आणि श्राद्धाला अयोग्य शूद्र असतील तर त्यांना मूल्य द्यावें, असें कोणी सांगतात. आतां हे परकीय असल्यामुळें यांना श्राद्धयोग्यता कशी येईल असें कोणी म्हणेल तर षोडशीश्राद्धांत ( काम्यवृषोत्सर्गांत ) अबांधवांनाही पिंड सांगितले आहेत यावरून अबांधवांना म्ह० परकीयांना देखील श्राद्धयोग्यता आहे. परकीयांना श्राद्धयोग्यता मानली नाहीं तर त्याच षोडशीप्रयोगांत "येऽबांधवा बांधवा वा०" अशा मंत्रानें तर्पण सांगितलें आहे त्याचा बाध होईल. याकरितां परकीयांचें नाम व गोत्र यांचा उच्चार करून श्राद्ध करूं नये. असा श्राद्धनिषेध आहे; नामगोत्रोच्चारावांचून परकीयांचें श्राद्ध करण्याचा निषेध नाहीं, असें **गौड** सांगतात. ब्राह्मणीपुत्राला शूद्रास्त्रीपुत्राच्या श्राद्धाविषयीं निषेध आहे. अन्यश्राद्धाविषयीं ब्राह्मणीपुत्राला निषेध नाहीं. आतां त्या अग्रभाग श्राद्धांत अन्नदान करावयाचें तें अन्नत्यागाच्या ( अन्न निवेदनाच्या ) पूर्वीं करावें, असें **मैथिल** सांगतात; तें बरोबर नाहीं. कारण, अग्रभाग हें श्राद्ध आहे अशाविषयीं प्रमाण नाहीं. अन्नदान करण्याविषयीं निषेध नाहीं; अर्थात् केव्हांही करा. पण, श्राद्धामध्यें अन्ननिवेदनाच्या पूर्वीं अन्नदान करावें, असें जें मैथिल म्हणतात, तें तसें केलें असतां श्राद्धाचें अनंग ( अंग नव्हे ) जें परकीयांना अन्नदान त्यानें व्यवधान येऊं लागेल. आतां हें अन्नदान श्राद्धांगच आहे, म्हणून त्यानें व्यवधान आलें तरी दोष नाहीं, असें म्हणतां येत नाहीं; कारण, हें अन्नदान श्राद्धांग आहे, असें म्हणण्यास प्रमाण नाहीं. हें जें अग्रभागरूप अन्नदान सांगितलें तें, भूमीच्या मालकाची अनुज्ञा नसेल तर समजावें. अनुज्ञा असेल तर श्राद्धाचा निषेधच नाहीं, असें त्याच ठिकाणीं **ब्राह्मांत** सांगतात—"गोमयादिकानें स्वच्छ सारवून शुद्ध केलेल्या आपल्या घरीं व परकीय असेल तर त्याची अनुज्ञा घेऊन सारवून शुद्ध केलेल्या अशा दुसऱ्याच्या घरीं देखील पितरांचें श्राद्ध करावें. अशा घरीं श्राद्ध वर्ज्य करावें असें सांगितलें नाहीं. किरातदेश, कलिंगदेश, कोंकणदेश, खसदेश, सिंधुनदीच्या उत्तरेकडचे देश, नर्मदेच्या दक्षिणेकडचे देश, आणि करतोयानदीच्या पूर्वेकडील देश इतक्या देशांत श्राद्ध करूं नये असें सांगितलें आहे." कामनिक श्राद्धाविषयीं हा निषेध समजावा; सर्व श्राद्धाविषयीं जर हा निषेध मानला तर त्या त्या देशांत राहणारांनीं सर्व प्रकारचीं ( नित्यनैमित्तिक देखील ) श्राद्धें करतां कामा नयेत, अशी आपत्ति प्राप्त होईल. नर्मदेच्या दक्षिणेकडील देशाचा जो निषेध त्याचा अपवाद सांगतात **स्कांदांत**—"ज्या ठिकाणीं सह्याद्रीचा उद्भव झालेला आहे, व ज्या ठिकाणीं गोदावरी नदी आहे, तो प्रदेश साऱ्या पृथिवीमध्यें अति पावन ( अति पवित्र ) आहे." परकीय भूमीवर श्राद्ध करूं नये, म्हणून जें सांगितलें त्याचा अपवाद **आदित्यपुराणांत**—"पुण्यकारक अशीं जीं अरण्यें, पर्वत आणि नद्यांचीं तीरें तीं सारीं अस्वामिक ( स्वामिरहित ) सांगितलीं आहेत; कारण, तीं कोणीं ग्रहण केलेलीं नाहींत. वनें, पर्वत, नदी, तीर्थें, देवालयें, देवखात, आणि गर्त ( मोठीं सरोवरें ) यांचेठिकाणीं कोणाची मालकी नाहीं." **स्मृतिसारांत**—"श्रुतीनें व स्मृतीनें सांगितलेलें कर्म; अंगावर दुसरें वस्त्र घेतल्यावांचून, तसेंच द्वीपावर ( चहूंकडून पाणी असलेल्या भूमीवर ), आणि अंतरिक्षांत ( भूमीला सोडून मध्यंतरीं कधींही ) करूं नये. आणि तें कर्म आपण अशुद्ध असतां कधींही करूं नये." **दिवोदासीयांत**—"म्लेच्छदेशांत, रात्रीं, संध्याकाळीं, ब्राह्मणरहितदेशीं, आणि आकाशांत, कधींही विद्वानानें श्राद्ध करूं नये."

**अथश्राद्धकालाः** तेचसंक्रांतियुगादिमहालयादयःप्रायेणपूर्वपरिच्छेदद्वयेउक्ताएव केचित्तूच्यंते **पृथ्वीचंद्रोदयेवृद्धपराशरः** श्राद्धंवृद्धावचंद्रेभच्छायाग्रहणसंक्रमे नवोदकेनवान्नेचनवच्छन्नेतथागृहे नवैक्षवेषुचेहंतेपितरोहिमघास्वपि पितरःस्पृहयंत्यन्नमष्टकासुमघासुचेति**शातातप**पाठः नवोदके नवकूपवाप्यादाविति केचित् वर्षोपक्रमेआर्द्राप्रवेशइति**गौडाः** नवान्नश्राद्धेविशेषो**ज्योतिषे** ज्येष्ठाशेषार्धगेसूर्येमृगनेत्रानिशात्मके नवान्नैर्भोजनश्राद्धंजन्मचंद्रतिथौनच आश्लेषाकृत्तिकाज्येष्ठामूलाजपदगेषुच **गुरुभौमदिने**-रिक्तेतिथौनाद्यान्नवोदनं तत्रैव वृश्चिकेशुक्लपक्षेतुनवान्नंशस्यतेबुधैः अतःकृष्णपक्षेनेति**गौडाः** **मैथिलास्तु** अकृताग्रयणंचैवधान्यजातंनरोत्तमइति**वाराहोक्तेः** प्रतिधान्यंश्राद्धमाहुः तन्न· जातपदस्यश्राद्धयोग्यसमूहपरत्वात् **हेमाद्रौजातूकर्ण्यः** ग्रहोपरागेचसुतेचजातेपित्र्येगयायामयनद्वयेच नित्यंचशंखेचतथैवपद्मे दत्तंभवेन्निष्कसहस्रतुल्यम् शंखंप्राहुरमावास्यांक्षीणचंद्रांद्विजोत्तमाः अष्टकासुभवेत्पद्मंतत्रदत्तंतथाक्षयम् **तत्रैवशंखः** यदाविष्टिर्व्यतीपातोभानुवारस्तथैवच पद्मकंनामतत्प्रोक्तमयनाच्चचतुर्गुणम् ॥

## आतां श्राद्धाचे काळ सांगतों—

**ते काळ** संक्रांति, युगादि, महालय इत्यादिक फार करून पहिल्या दोन परिच्छेदांत सांगितले आहेतच; कांहींसे येथें सांगतो—**पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धपराशर**—"वृद्धि ( जातकर्म, विवाह वगैरे ), अमावास्या, गजच्छाया, ग्रहण, संक्रांति, नवोदक, नवें अन्न, नवीन घर शाकारणें, नवा गूळ झाला असतां, आणि मघा नक्षत्र आलें असतां, इतक्या वेळीं पितर श्राद्धाची इच्छा करितात." शातातपानें 'नवेक्षवेषु०" या ठिकाणीं 'पितरःस्पृहयंत्यन्नं०' असा पाठ केलेला आहे. त्याच्या मतीं नवा गूळ वर्ज्य करून बाकीच्या वेळीं आणि अष्टका प्राप्त झाल्या असतां, पितर अन्नाची इच्छा करितात, असा अर्थ होतो. नवोदक म्हणजे नवा कूप ( विहीर ), नवी वापी वगैरे घ्यावी असें कोणी सांगतात. वर्षोपक्रम म्हणजे आर्द्राप्रवेश झाला असतां असें **गौड** म्हणतात. नवान्नश्राद्धाविषयीं **ज्योतिषांत** विशेष सांगितला आहे, तो असा—"मृगनक्षत्रावर रात्रि आल्या असतां ( मार्गशीर्षमासीं ) ज्येष्ठा नक्षत्राच्या उत्तरार्धांत सूर्य गेला असतां नवान्नांनीं भोजन व श्राद्ध करूं नये. तसेंच जन्मस्थचंद्र व जन्मतिथि असतां नवान्नभोजन व श्राद्ध करूं नये. आश्लेषा, कृत्तिका, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाभाद्रपदा, या नक्षत्रांवर; शुक्र व मंगळ या वारीं; आणि रिक्तातिथि ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ) या तिथींवर नवान्न भोजन करूं नये. **त्याचठिकाणीं** "वृश्चिकसंक्रांतींत शुक्लपक्षामध्यें नवान्न विद्वानांनीं प्रशस्त केलें आहे." असें आहे म्हणून कृष्णपक्षांत प्रशस्त नाहीं, असें **गौड** सांगतात. **मैथिल** तर—"आग्रयण केल्यावांचून धान्यजात ( कोणतेंही धान्य ) भक्षण करूं नये." असें **वाराहांत** सांगितलें आहे, म्हणून प्रत्येक धान्याला श्राद्ध करावें, असें सांगतात; त्यांचें ( मैथिलांचें ) तें म्हणणें बरोबर नाहीं. कारण, 'धान्यजात' यांतील जात पदाचा अर्थ—श्राद्धाला योग्य समुदाय, असा आहे. **हेमाद्रींत जातूकर्ण्य**—"ग्रहण, पुत्र झाला असतां, पितृपक्ष, गयातीर्थ, दोन अयनें ( मकर व कर्क ह्या दोन संक्रांति ), शंख, पद्म इतक्या ठिकाणीं ब्राह्मणाला दिलें असतां सहस्र निष्क दिल्यासारखें होतें. चंद्राचा क्षय झालेल्या अमावास्येला शंख, असें ब्राह्मण म्हणतात, आणि अष्टकांला पद्म असें म्हणतात, त्या शंख व पद्माचे ठायीं दिलेलें अक्षय होतें." तेथेंच **शंख**—"ज्या दिवशीं विष्टि, व्यतीपात आणि रविवार या तिघांचा योग होतो, तेव्हां त्याला पद्मक योग म्हणतात, हा योग अयनाहून ( मकर कर्कसंक्रांतींहून ) चौंपट अधिक आहे."

**याज्ञवल्क्यः** अमावास्याष्टकावृद्धिःकृष्णपक्षोऽयनद्वयं द्रव्यंब्राह्मणसंपत्तिर्विषुवत्सूर्यसंक्रमः व्यतीपातोगजच्छायाग्रहणंचंद्रसूर्ययोः श्राद्धंप्रतिरुचिश्चैवश्राद्धकालाःप्रकीर्तिताः कृष्णपक्षःसर्वोपि शाकेनाप्यपरपक्षं नातिक्रामेत् मासिमासिवाशनमितिश्रुतेः ऊर्ध्वंवाचतुर्थ्यायदहःसंपद्यतेऽतेचतुर्दशीमिति**कात्यायनोक्तेः** मासिमासिकार्यमपरपक्षस्यापराह्णःश्रेयानित्या**पस्तंबोक्तेश्च** वीप्सयासर्वकृष्णपक्षेपुनित्यम् तेनोपसंहारान्महालयपरत्वंपरास्तं अत्रप्रत्यहंपंचम्यादियदहःसंपत्तिर्वेतित्रयःपक्षाः यदैकदिनेश्राद्धंतदादार्शंपृथगेव याज्ञवल्क्येनामावास्यायाःपृथङ्निर्देशात् एतेनकृष्णपक्षेयदहःसंपद्यते अमावास्यायांतुविशेषेणेति**निगमोक्तेर्गुणोपरपक्षश्राद्धस्यामावास्येति** **शूलपाणिम**तमप्यपास्तम् अशक्तौदर्शेनापिमासिश्राद्धसिद्धिरिति**नारायणवृत्तिः** निरग्निकानांकस्मिंश्चिद्दिने आहिताग्नेस्तुदर्शएव नदर्शेनविनाश्राद्धमाहिताग्नेर्द्विजन्मनइति**मनूक्तेः** सर्वकृष्णपक्षाशक्तौ**मात्स्ये** अनेनविधिनाश्राद्धंत्रिरब्दस्येहनिर्वपेत् कन्याकुंभवृषस्थेर्केकृष्णपक्षेच सर्वदा **कर्कोपि** आहिताग्नेःसंवत्सरेत्रिःश्राद्धनियमइति **देवलः** अनेनविधिनाश्राद्धंकुर्यात्संवत्सरंसकृत् द्विश्चतुर्वायथाश्राद्धंमासेमासेदिनेदिने कृष्णपक्षेष्वपिमहालयस्यश्रेष्ठत्वम् तच्चोक्तंप्राक् व्यतीपातेविशेषमाह**हेमाद्रौशंखः** फलंलक्षंसमुत्पत्तौभ्रमणेकोटिरुच्यते पतनेशतकोट्यस्तुपातेवैदत्तमक्षयम् **ज्योतिःशास्त्रे** द्वाविंशतिस्तथोत्पत्तौभ्रमणेचैकविंशतिः पतनेदशनाड्यस्तुपतितेसप्तनाडिकाः अंत्यौचद्वौव्यतीपातौप्रागुक्तौ **हेमाद्रौमार्कंडेयः** यदाचश्रोत्रियोभ्येतिगृहंवेदविदग्निचित् तेनैकेनापिकर्तव्यंश्राद्धंचविषुवच्छुभे इदंचापिंडकार्यमिति**हेमाद्रिः** एतज्जीवत्पितृकोपिकुर्यात् उद्वाहेपुत्रजननेपित्र्येष्ट्यांसौमिकेमखे तीर्थेब्राह्मणआयातेषडेतेजीवतःपितुरिति**मैत्रायणीयपरिशिष्टोक्तेः** ॥

**याज्ञवल्क्य**—"अमावास्या, अष्टका, वृद्धि, कृष्णपक्ष, दोन्हीं अयनें, अपूर्वद्रव्यप्राप्ति, उत्तम ब्राह्मणप्राप्ति, विषुवसंक्रांति ( मेष व तुला ), व्यतीपात, गजच्छाया, चंद्रसूर्यांचें ग्रहण, आणि श्राद्धाविषयीं श्रद्धा होणें, हे इतके श्राद्धाचे काळ आहेत." याज्ञवल्क्यांनीं कृष्णपक्ष जो सांगितला तो बाराही मासांतला कृष्णपक्ष श्राद्धकाळ आहे, म्हणून समजावा; कारण, "शाकेनें तरी अपरपक्षाचें उल्लंघन करूं नये; महिन्यामहिन्यांत पितरांस भोजन आहे" अशी **श्रुति** आहे. "अथवा चतुर्थीच्या

पुढें चतुर्दशी वर्ज्य करून ज्या दिवशीं सामग्रीसंपन्न होईल त्या दिवशीं करावें." असें **कात्यायनानें** सांगितलें आहे. "महिन्यामहिन्याचे ठायीं करावें, कृष्णपक्षाचा अपराह्णकाळ श्रेयस्कर आहे" असें **आपस्तंबानेंही** सांगितलें आहे. ह्याव-रच्या वचनांत "मासिमासि" महिन्यामहिन्याचे ठायीं, अशी वीप्सा केलेली आहे, म्हणून साऱ्या ( बाराही महिन्यांच्या ) कृष्णपक्षांत श्राद्ध नित्य आहे. वरील वचनांनीं सर्व कृष्णपक्षांत श्राद्धाला नित्यत्व प्रतिपादन केल्यानें; एथें याज्ञवल्क्यवच-नांतील कृष्णपक्ष शब्द उपसंहार न्यायानें ( संकोच करून ) महालयापरपक्षबोधक समजावा, असें कित्येकांचें म्हणणें खंडित झालें. या कृष्णपक्षांत श्राद्धाचे तीन पक्ष आहेत, ते असे—कृष्ण प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत दररोज श्राद्ध करावें हा एक पक्ष पंचमीपासून अमावास्येपर्यंत करावें हा दुसरा, आणि जो दिवस सामग्रीसंपन्न असेल त्या दिवशीं करावें हा तिसरा पक्ष, त्यांतून तिसरा पक्ष घेऊन जेव्हां एक दिवशीं श्राद्ध करावयाचें असेल तेव्हां तें करून दर्शश्राद्ध वेगळेंच करावें. कारण, वरील **याज्ञवल्क्याच्या** वचनांत अमावास्या पृथक् सांगितली आहे. दर्शश्राद्ध पृथक् सांगित-ल्यानें; "कृष्ण पक्षांत जो दिवस संपन्न असेल त्या दिवशीं करावें, अमावास्येला तर विशेषतः करावें" असें **निगमानें** सांगितलें आहे, म्हणून अमावास्या ही अपरपक्ष श्राद्धाचाच गुण आहे, स्वतंत्र नाहीं, असें जें **शूलपाणीचें** मत तेंही परास्त ( खंडित ) झालें. सामर्थ्य नसेल तर दर्शश्राद्धानेंच मासिश्राद्धाची ( प्रतिमासांत करावयाच्या श्राद्धाची ) सिद्धि होते, असें **नारायणवृत्तिकार** सांगतो. निरग्निक ( भार्यारहित ) असतील त्यांनीं कृष्णपक्षांत कोणत्याही दिवशीं करावें. आहिताग्नि ( अग्निहोत्री ) यांनीं दर्शींच करावें; कारण, "आहिताग्नि ब्राह्मणाला दर्शावांचून श्राद्ध नाहीं" असें **मनूनें** सांगितलें आहे. साऱ्या ( बारा ) कृष्णपक्षांत श्राद्ध करणें अशक्य असेल तर **मात्स्यांत** सांगतो—"अशा ( पूर्वोक्त ) विधीनें वर्षांतून तीन वेळां श्राद्ध करावें, तें कन्या, कुंभ आणि वृषभ ह्या तीन संक्रांतींचे ठायीं कृष्णपक्षांत सर्वदा ( प्रति-वर्षीं ) श्राद्ध करावें." **कर्कही** सांगतो—आहिताग्नीला संवत्सरांत तीन वेळां श्राद्धाचा नियम ( आवश्यकता ) आहे. **देवल**—"अशा ( पूर्वोक्त ) विधीनें संवत्सरांत एक वेळां श्राद्ध करावें, अथवा दोन वेळां किंवा चार वेळां, अथवा महिन्यामहिन्याला, किंवा प्रतिदिवशीं करावें." साऱ्या ( बारा ) ही कृष्णपक्षांत महालय ( भाद्रपद कृष्णपक्ष ) श्रेष्ठ आहे, तें आम्हीं पूर्वीं ( द्वितीयपरिच्छेदांत ) सांगितलें आहे. व्यतीपाताविषयीं विशेष सांगतो—**हेमाद्रींत शंख**—"उत्पत्तीचे ठायीं दानाचें फळ लक्षपट होतें, **भ्रमणाचे** ठायीं कोटिपट होतें, **पतनाचे** ठायीं शतकोटिपट होतें, आणि **पाताचे** ठायीं दान केलेलं अक्षय होतें." वरील उत्पत्त्यादि शब्दांचा अर्थ **ज्योतिःशास्त्रांत** सांगतात—"व्यतीपाताच्या पहिल्या बावीस घटिका **उत्पत्ति** होय, पुढच्या एकवीस घटिका **भ्रमण,** त्याच्या पुढें दहा घटिका **पतन,** पुढें सात घटिका **पतित,** शेवटच्या दोन घटिका **व्यतीपात,** ते पूर्वीं सांगितले आहेत. **हेमाद्रींत मार्कंडेय**—"ज्या दिवशीं आपल्या घरीं वेदवेत्ता अग्निचयन[1] केलेला असा श्रोत्रिय ब्राह्मण येईल त्या एका ब्राह्मणावरही श्राद्ध करावें, तो दिवस विषुवायनसं-क्रांतीप्रमाणें[2] शुभकारक आहे." हें श्राद्ध अपिंडक करावें, असें **हेमाद्रि** सांगतो. हें श्राद्ध जिवत्पितृकानेंही करावें. कारण, "विवाह, पुत्रोत्पत्ति, पितरांची इष्टि, सोमयाग, गयादि तीर्थ, आणि वेदवेत्ता ब्राह्मण घरीं येणें, हे सहा काळ पिता जीवंत असतां मुलांस श्राद्ध करण्याविषयीं सांगितले आहेत." असें **मैत्रायणीयपरिशिष्टांत** सांगितलें आहे.

तिथिविशेषेफलविशेषो**याज्ञवल्क्येनो**क्तः कन्यांकन्यावेदिनश्चपशून्वैसत्सुतानपि द्यूतंकृषिंचवाणिज्यं-द्विशफैकशफांस्तथा ब्रह्मवर्चस्विनःपुत्रान्स्वर्णरौप्येसकुप्यके ज्ञातिश्रैष्ठ्यंसर्वकामानाप्नोतिश्राद्धदःसदा प्रतिप-त्प्रभृतिष्वेकांवर्जयित्वाचतुर्दशीं एताःकृष्णपक्षस्थाएव महालयेतुफलभूमेति**पृथ्वीचंद्रोदयः** पौर्णमास्यां-**हेमाद्रौपितामहः** अमावास्याव्यतीपातपौर्णमास्यष्टकासुच विद्वान्श्राद्धमकुर्वाणोनरकंप्रतिपद्यते एतन्मा-घ्यादिपरम् व्रीहिपाकेचकर्तव्यंयवपाकेचपार्थिव पौर्णमासीतथामाघीश्रावणीचनृपोत्तम प्रौष्ठपद्यामतीतायां-तथाकृष्णत्रयोदशी एतांस्तुश्राद्धकालान्वैनित्यानाहप्रजापतिरिति**विष्णुधर्मोक्तेः विष्णुः** माघीप्रौष्ठप-द्यूर्ध्वंकृष्णात्रयोदशीति अत्रमाघीपौर्णमासीति**कल्पतरुः** श्रावण्यूर्ध्वमपिमघायोगसंभवात्त्रयोदशी विशे-षणमिति**गौडाः** नक्षत्रेष्वपि**याज्ञवल्क्यः** स्वर्गंह्यपत्यमोजश्चशौर्यंक्षेत्रंबलंतथा पुत्रान्श्रैष्ठ्यंचसौभाग्यंस-मृद्धिंमुख्यतांशुभम् प्रवृत्तचक्रतांवातिवाणिज्यप्रभृतीनपि अरोगित्वंयशोवीतशोकतांपरमांगतिं धनंवेदान्भि-षक्सिद्धिंकुप्यंगामप्यजाविकं अश्वानायुश्चविधिवद्यःश्राद्धंसंप्रयच्छति कृत्तिकादिभरण्यंतंसकामान्प्राप्नुयादि-मान् फलांतराण्यपि**महाभारतकौमोदेर्ज्ञे**यानि **माधवीयेमरीचिः** कृत्तिकादिपुऋक्षेषुश्राद्धेयत्फल-मीरितम् विष्कंभादिषुयोगेषुतद्देवफलमिष्यते **बृहस्पतिः** आरोग्यंचैवसौभाग्यंशत्रूणांचपराजितं सर्वान्-

---

१ चयन म्हणून यज्ञ आहे. २ मेष व तुला संक्रांति विषुवायन होत.

कामान्प्रियांविद्यांधनमायुर्यथाक्रमम् सूर्यादिदिवसेष्वेतच्छ्राद्धकृल्लभतेफलं बवादिकरणेष्वेतत्श्राद्धकृल्लभते-फलम् अन्यानिचषण्णवतिश्राद्धादीनिप्रागुक्तानि **मार्कंडेयपुराणे** 'श्राद्धार्हद्रव्यसंपत्तौतथादुःस्वप्नदर्शने जन्मर्क्षेग्रहपीडासुश्राद्धंकुर्वीतचेच्छया ॥

विशेष तिथीला विशेष फल **याज्ञवल्क्य** सांगतो—"कन्या, कन्यापाणिग्रहण करणारे पशु ( गाई वगैरे ) उत्तम पुत्र, द्यूत कौशल, कृषि ( शेतकी ), व्यापार, द्विशफ ( दोन गेळांचे पशु गोमहिष्यादिक ), एकशफ ( अश्वादिक ), ब्रह्मवर्चस्वी ( वेदाध्ययनसंपन्न ) पुत्र, सोनें, रुपें, सोन्यारुप्यावांचून इतर द्रव्य, ज्ञातींमध्यें श्रेष्ठपणा, आणि इच्छित सर्व काम, हे अनुक्रमानें प्राप्त होतात. एक चतुर्दशी वर्ज्य करून प्रतिपदेपासून चवदा तिथींच्या श्राद्धांचें वेगवेगळें हें फल समजावें," ह्या तिथि कृष्णपक्षांतीलच होत. महालयाचें तर फल फार मोठें आहे, असें **पृथ्वीचंद्रोदय** सांगतो. पौर्णमासीविषयीं **हेमाद्रींत पितामह** सांगतो—"अमावास्या, व्यतीपात, पौर्णमासी, आणि अष्टका[१] यांचेठायीं श्राद्ध न करणारा विद्वान ( जाणता ) नरकास जातो." हें जें पौर्णमासीला श्राद्ध सांगितलें तें माघ्यादि पौर्णमासीला समजावें. कारण, "व्रीहि ( शालि ) पिकले, म्हणजे श्राद्ध करावें. जव पिकले म्हणजे श्राद्ध करावें आणि माघीपौर्णमासी, श्रावणीपौर्णमासी, तशीच प्रौष्ठपदीच्या पुढची कृष्णत्रयोदशी, हे श्राद्धकाल नित्य आहेत, असें प्रजापति सांगतो." असें **विष्णुधर्मांत** सांगितलें आहे. **विष्णु**—"माघी व प्रौष्ठपदीच्या पुढची कृष्णत्रयोदशी, श्राद्धकाल आहे." या वाक्यांत माघी म्हणजे माघांतील पौर्णमासी समजावी, असें **कल्पतरु** सांगतो. श्रावणी पौर्णिमेच्या पुढच्याही त्रयोदशीला मघानक्षत्रयोगाचा संभव असल्यामुळें **माघी** हें त्रयोदशीचें विशेषण करावें, असें **गौड** सांगतात. नक्षत्रांविषयींही **याज्ञवल्क्य** सांगतो—"स्वर्ग, अपत्य, ओज ( तेज ), शौर्य क्षेत्र, बळ, पुत्र, श्रेष्ठपणा, सौभाग्य, समृद्धि, मुख्यपणा, कल्याण, अप्रतिहित आज्ञा, व्यापार वगैरे, रोगराहित्य, यश, शोकराहित्य, परमगति, धन, वेद, वैद्यकी, सोन्यारुप्यावांचून इतर द्रव्य, गाई, शेळया, मेंढ्या, अश्व, आणि आयुष्य हीं सत्तावीस; कृत्तिकांपासून भरणीपर्यंत वेगवेगळ्या नक्षत्रावर श्राद्धाचीं अनुक्रमानें फळें समजावींत." दुसरीं देखील फळें **महाभारत, कूर्मपुराण** इत्यादिकांतून जाणावीं. **माधवीयांत मरीचि**—"कृत्तिकादि नक्षत्रांवर श्राद्ध केलें असतां जें फळ सांगितलें, तेंच विष्कंभादि योगांवर श्राद्धाचें फळ समजावें." **बृहस्पति**—"आरोग्य, सौभाग्य, शत्रुपराभव, सर्वमनोरथप्राप्ति, आवडती विद्या, धन, आणि आयुष्य, हीं सात; सूर्यादि वारांचेठायीं श्राद्धकरणाराला अनुक्रमानें फळें प्राप्त होतात. आणि बवादिकरणाचेठायीं श्राद्ध करणारालाही हींच फळें प्राप्त होतात." दुसरीं षण्णवति ( ९६ ) श्राद्धें वगैरे पूर्वीं सांगितलीं आहेत. **मार्कंडेय पुराणांत** सांगतो—"श्राद्धाला योग्य द्रव्यें प्राप्त झालीं असतां, दुष्ट स्वप्न पडलें असतां, जन्मनक्षत्र प्राप्त झालें असतां, ग्रहांची पीडा झाली असतां, इतक्यावेळीं आपल्या इच्छेनें ( कोणाच्या अनुज्ञेवांचून ) श्राद्ध करावें."

**अथश्राद्धाधिकारिणः चंद्रिकायांसुमंतुः** मातुःपितुःप्रकुर्वीतसंस्थितस्यौरसःसुतः पैतृमेधिक संस्कारंमंत्रपूर्वकमादृतः तत्रैव**हेमाद्रौशंखः** पितुःपुत्रेणकर्तव्यापिंडदानोदकक्रिया पुत्राभावेतुपत्नीस्यात्तदभावेतुसोदरः अत्रयद्यपिपुत्रपदंक्षेत्रजादिद्वादशविधपुत्रपरम् तेचद्वादशपुत्रा**याज्ञवल्क्ये**नोक्ताः औरसोधर्मपत्नीजस्तत्समःपुत्रिकासुतः क्षेत्रजःक्षेत्रजातस्तुसगोत्रेणेतरेणवा गृहेप्रच्छन्नउत्पन्नोगूढजस्तुसुतःस्मृतः कानीनःकन्यकाजातोमातामहसुतःस्मृतः अक्षतायांक्षतायांवाजातःपौनर्भवस्तथा दद्यान्मातापितावायंसपुत्रोदत्तकोभवेत् क्रीतश्चताभ्यांविक्रीतःकृत्रिमःस्यात्स्वयंकृतः दत्तात्मातुस्वयंदत्तोगर्भेविन्नःसहोढजः उत्सृष्टोगृह्यतेयस्तुसोपविद्धोभवेत्सुतः पिंडदोंशहरश्चैषांपूर्वाभावेपरःपरइति तथापि दत्तौरसेतरेषांतुपुत्रत्वेनपरिग्रहइति **हेमाद्रावादित्यपुराणे**कलावितरेषांपुत्रत्वनिषेधादौरसदत्तकपरमेव यद्यपि पिंडदोंशहरश्चैषांपूर्वाभावेपरःपरइति **याज्ञवल्क्यो**क्तेरौरसाभावेदत्तकप्राप्तिस्तथाप्यौरसाभावेपौत्रःतदभावेप्रपौत्रस्तदभावेदत्तकादयइतिज्ञेयं पुत्रेणलोकान्जयतिपौत्रेणानंत्यमश्नुते अथपुत्रस्यपौत्रेणब्रध्नस्याप्नोतिविष्टपमितिजीमूतवाहनधृत**वसिष्ठहारीतशंखलिखितोक्तेः** लोकानंत्यंदिवःप्राप्तिंपुत्रपौत्रप्रपौत्रकैरिति**याज्ञवल्क्योक्ते**श्च पुत्रःपौत्रश्चतत्पुत्रःपुत्रिकापुत्रएवच पत्नीभ्राताचतज्जश्चपितामातास्नुषातथा भगिनीभागिनेयश्चसपिंडःसोदकस्तथा असन्निधानेपूर्वेषामुत्तरेपिंडदाःस्मृता इति**स्मृतिसंग्रहे** प्रपौत्रानंतरंपुत्रिकापुत्रोक्तेस्तत्समत्वाच्च दत्तकस्य यद्यपि**बृहस्पतिना** पौत्रश्चपुत्रिकापुत्रःस्वर्गप्राप्तिकरावुभौ रिक्थेचपिंडदानेचसमौतौपरिकीर्तिता-

[१] मार्गशीर्षादि चार मासांच्या कृष्णाष्टमी अष्टका होत.

विति पौत्रसाम्यमुक्तं **याज्ञवल्क्येनच** औरसोधर्मपत्नीजस्तत्समःपुत्रिकासुतइतिऔरससाम्यम् तथापि लोकेराजसमोमंत्रीत्यादौकिंचिन्न्यूनेसमशब्दप्रयोगात् गौणमुख्ययोःसाम्यायोगाच्चस्तुत्यर्थंतत् नतुसमविकल्प इतिभ्रमितव्यं पुत्रःपौत्रःप्रपौत्रोवाभ्रातावाभ्रातृसंततिः सपिंडसंततिर्वापिक्रियार्हानृपजायते तेषामभावेस-र्वेषांसमानोदकसंततिः मातृपक्षसपिंडेनसंबंधोयोजलेनवा कुलद्वयेपिचोच्छिन्नेस्त्रीभिःकार्याक्रियानृप तत्सं-घातगतैर्वापितद्रिक्थात्कारयेन्नृपइति **विष्णुपुराणा**च्चेतिप्रपौत्रानंतरंदत्तकादयइति **पृथ्वीचंद्रमदनरत्न-कालादर्शादयः मदनपारिजाते**प्येवम् ॥

## आतां श्राद्धाचे अधिकारी ( कर्ते ) सांगतो—

**चंद्रिकेंत सुमंतु**—"माता, पिता मृत झाले असतां त्यांचा प्रेतसंस्कार औरसपुत्रानें आदरपूर्वक समंत्रक करावा." त्याचठिकाणीं **हेमाद्रींत शंख**—"पित्याची पिंडदान-उदकदानादिक सर्वक्रिया पुत्रानें करावी. पुत्र नसेल तर पत्नीनें करावी. पत्नी नसेल तर सहोदर ( सख्या ) भ्रात्यानें करावी." या वचनांत पुत्रपद बाराप्रकारच्या पुत्रांचें बोधक आहे, व ते बाराप्रकारचे पुत्र याज्ञवल्क्यानें सांगितले आहेत, ते असे—"धर्मपत्नीचे ठिकाणीं उत्पन्न झालेला तो **औरस** पुत्र. त्याच्या सारखा **पुत्रिकापुत्र**[1] होय. आपल्या क्षेत्रांत ( स्त्रियेचेठिकाणीं ) सगोत्रापासून अथवा इतरापासून झालेला तो **क्षेत्रज** होय. घरामध्यें गुप्तपणानें ( कोणास नकळतां ) झालेला तो **गूढज** पुत्र होय. कन्येला ( विवाहाच्यापूर्वीं ) झालेला तो **मातामह-पुत्र** ( कन्येच्या बापाचा पुत्र ) म्हटला आहे. कन्या, पतीनें भुक्त असो अथवा अभुक्त असो तिला बापाच्या घरीं परपुरुषा-पासून झालेला पुत्र **पौनर्भव** होय. हाही कन्येच्या बापाचा पुत्र. आईबापांनीं जो दिला तो **दत्तक** पुत्र होय. आईबापांनीं जो विकत दिला तो घेणाराचा **क्रीत** पुत्र होय. आपण पुत्रलेंकरून केलेला तो **कृत्रिम** पुत्र. आपण आपलें दान केलेला तो **दत्त** पुत्र. गर्भिणी कन्येचा विवाह झाला असतां विवाहानंतर झालेला पुत्र तो **सहोढज** होय. टाकून दिलेला घेतला असतां तो **अपविद्ध** पुत्र होतो. त्या बारा प्रकारच्या पुत्रांमध्यें पहिला पहिला नसेल तर पुढच्या पुढच्यानें पित्याची पिंड-दानादिक क्रिया करावी आणि त्याची जिंदगी घ्यावी." असें जरी आहे तथापि **दत्तक** व **औरस** यावांचून इतरांचा पुत्रलेंकरून परिग्रह ( ग्रहण ) होत नाहीं, असें **हेमाद्रींत आदित्यपुराणांत** कलियुगांत इतरांला पुत्रत्वाचा निषेध आहे म्हणून "पितुः पुत्रेण कर्तव्या०" त्या वचनांतील पुत्रपद औरस व दत्तक यांचेंच बोधक आहे. आतां जरी पिंडदेणारा व जिनगीचा वारस पहिला पहिला नसेल तर पुढचा आहे, या अर्थाच्या "पिंडदोंशहरश्चैषां पूर्वाभावे परः परः" या याज्ञव-ल्क्याच्या वचनानें **औरस** पुत्राच्या अभावीं **दत्तक** प्राप्त होतो; तथापि औरसाच्या अभावीं पौत्र व पौत्राच्या अभावीं प्रपौत्र आणि त्या प्रपौत्राच्या अभावीं दत्तकादिक अधिकारी जाणावे. कारण, "पुत्राच्या योगानें स्वर्गादि लोक स्वाधीन करितो, पौत्राच्या योगानें आनंत्य ( अनंतलोक ) पावतो, आणि प्रपौत्राच्या योगानें ब्रह्मलोक प्राप्त होतो." अशाप्रकारचीं **जीमूत-वाहनानें** ग्रहण केलेलीं **वसिष्ठ, हारीत, शंख** व **लिखित** यांचीं वचनें आहेत. आणि "पुत्र, पौत्र, प्रपौत्र यांच्या-योगानें अनंतलोक व स्वर्ग यांची प्राप्ति होते" असें **याज्ञवल्क्यानें**ही सांगितलें आहे. पुत्र, पौत्र, त्याचा पुत्र, पुत्रिकापुत्र, पत्नी, भ्राता, भ्रातृपुत्र, पिता, माता, स्नुषा ( सून ), भगिनी, भागिनेय ( भगिनीपुत्र ), सपिंडै[2], आणि सोदैक[3] यांमध्यें पूर्वीच्या अभावीं पुढचे पिंड देणारे ( और्ध्वदेहिक कर्माचे अधिकारी ) होतात." त्या **स्मृतिसंग्रहांत** प्रपौत्रानंतर पुत्रि-कापुत्र सांगितला आहे. आणि **दत्तक** हा त्याच्या सारखा ( पुत्रिकापुत्रासारखा ) आहे व कलियुगांत इतर पुत्रांचा निषेध आहे, म्हणून प्रपौत्रानंतर **दत्तक** समजावा. आतां यद्यपि **बृहस्पतीनें**—"पौत्र व पुत्रिकापुत्र हे दोघे स्वर्गप्राप्ति करून देणारे आहेत, जिंदगी घेण्याविषयीं व पिंडदानाविषयीं ते दोघे सारखे आहेत" या वचनांत पुत्रिकापुत्राला पौत्रसाम्य सांगितलें, आणि याज्ञवल्क्यानें, धर्मपत्नीला झालेला तो औरस व त्याच्या सारखा पुत्रिकापुत्र, या वचनांत औरससाम्य सांगितलें, तथापि लोकांत प्रधान राजासारखा आहे इत्यादि वाक्यांत किंचिन्न्यूनावर समशब्दाचा प्रयोग करितात. आणि गौण व मुख्य त्यांचें वास्तविक साम्य येत नाहीं, म्हणून पुत्रिकापुत्रावर वरील वचनांनीं जें औरससाम्य किंवा पौत्रसाम्य सांगितलें तें त्याच्या स्तुतीकरितां समजावें. दोघे ( पुत्रिकापुत्र आणि औरसपौत्र ) सम असल्यामुळें विकल्प ( ज्याच्याशीं साम्य सांगितलें त्याच्याशीं पुत्रिकापुत्राला अधिकाराचा वगैरे विकल्प म्हणजे एकवेळा तो व एकवेळा पुत्रिकापुत्र ) असा भ्रम करूं नये. आणि "पुत्र, पौत्र, प्रपौत्र, भ्राता, भ्रातृपुत्र, सपिंडाची संतति, हे क्रियेला योग्य आहेत. त्या सर्वांच्या अभावीं समानोदकाची संतति अधिकारी, अथवा मातृपक्षांतील सपिंड किंवा ज्याचा उदकसंबंध असेल तो अधिकारी. दोन्हीं ( पितृ-मातृ ) कुलांचा उच्छेद झाला असतां ( पुरुष नसतां ) स्त्रियांनीं क्रिया करावी. अथवा त्याच्या संघांतील पुरुषां-कडून मृताच्या द्रव्यानें राजानें क्रिया करवावी." असें **विष्णुपुराण**वचन आहे म्हणून प्रपौत्रानंतर दत्तकादिक अधिकारी

१ पुत्रिकापुत्र म्हणजे दौहित्र. २ सात पिढ्यांचे आंतले तें सपिंड. ३ सात पिढ्यांच्या पलीकडचे ते सोदक व समानोदक समजावे.

होतात, असें **पृथ्वीचंद्र, मदनरत्न, कालादर्श,** इत्यादिक ग्रंथकार सांगतात. **मदनपारिजातां**तही, असेंच सांगितलें आहे.

**बोपदेवरुद्रधरादयस्तु** पुत्रेषुविद्यमानेषुनान्यंवैकारयेत्स्वधामिति **सुमंतूक्तौ** पितामहःपितुःपश्चात्पंचत्वंयदिगच्छति पौत्रेणैकादशाहादिकर्तव्यंश्राद्धषोडशं नैतत्पौत्रेणकर्तव्यंपुत्रवांश्चेत्पितामहइति **छंदोगपरिशिष्टेच** पुत्रशब्दस्यद्वादशविधसुतपरत्वात्पूर्वाभावेपरःपरइत्यस्यानन्यपरत्वाच्च दत्तकाद्यभावे पौत्रादीनामप्यधिकारइत्याहुः तद्गौणमुख्ययोःसाम्यायोगाद्दत्तकेसतिपौत्रस्यांशहरत्वस्याप्यभावापत्तेः पुत्रपदस्यौरसमात्रपरत्वाच्चिंत्यम् अतएवनिषेधादुपनीतपौत्रसत्त्वेप्यनुपनीतपुत्रस्यैवाधिकारः औरसश्चानुपनीतोपि कुर्यादित्याह **पृथ्वीचंद्रोदयेसुमंतुः** श्राद्धंकुर्यादवश्यंतुप्रमीतपितृकोद्विजः व्रतस्थोवाव्रतस्थोवाएकएवभवेद्यदि **वृद्धमनुः** कुर्यादनुपनीतोपिश्राद्धमेकोहियःसुतः पितृयज्ञाहुतिंपाणौजुहुयाद्ब्राह्मणस्यसः एकोमुख्य औरसइत्यर्थः **मनुः** नह्यस्मिन्युज्यतेकर्मकिंचिदामौंजिबंधनात् नाभिव्याहारयेद्ब्रह्मस्वधानिनयनादृते ब्रह्म वेदः **सुमंतुरपि** नाभिव्याहारयेद्ब्रह्मयावन्मौंजीनबध्यते मंत्राननुपनीतोपिपठेदेवैकऔरसः अयंमंत्रपाठः-त्रिवर्षकृतचूडस्यैव अनुपनीतोपिकुर्वीतमंत्रवत्पैतृमेधिकम् यद्यसौकृतचूडःस्याद्यदिस्याच्चत्रिवत्सरइति **सुमंतूक्तेः** यत्तु**व्याघ्रः** कृतचूडस्तुकुर्वीतउदकंपिंडमेवच स्वधाकारंप्रयुंजीतवेदोच्चारंनकारयेदिति **यच्च स्मृतिसंग्रहे** कृतचूडोनुपेतश्चपित्रोःश्राद्धंसमाचरेत् उदाहरेत्स्वधाकारंनतुवेदाक्षराण्यसाविति तन्प्रथमवर्षचूडाविषयमिति**माधवमदनरत्नपृथ्वीचंद्राः** त्रिवर्षोर्ध्वंमंत्रवत्त्वस्यविकल्पइति**चंद्रिकाबोपदेवश्च** दत्तकादिपरोनिषेधइति**वयम्** ॥

**बोपदेव, रुद्रधर** इत्यादिक तर "पुत्र विद्यमान असतां दुसऱ्याकडून स्वधाकार ( और्ध्वदेहिक ) करवूं नये." ह्या **सुमंतु**वाक्यांत; आणि "पित्याच्या मागांहून पितामह मृत झाला असेल तर त्याची एकादशाहादिक सर्व क्रिया व षोडश श्राद्धें पौत्रानें करावीं. परंतु पितामहाला जर पुत्र असेल तर ती और्ध्वदेहिक क्रिया पौत्रानें करूं नये." ह्या छंदोग**परिशिष्टांतही** पुत्रपद द्वादश प्रकारच्या पुत्रांचें बोधक असल्यामुळें आणि पूर्वीचा नसेल तर पुढचा पुढचा अधिकारी अशा अर्थाचें **याज्ञवल्क्याचें**ही वचन अनन्यपर ( दत्तकाचेंच बोधक ) असल्यामुळें दत्तकादिकांचा अभाव असेल तर पौत्रादिकांचा अधिकार, असें सांगतात. तें त्यांचें सांगणें गौण ( दत्तकादिक ) व मुख्य ( औरसपुत्र, पौत्र वगैरे ) यांचें साम्य होत नसल्यामुळें; आणि दत्तक असतां पौत्राला जिंदगीचा वारसाही मिळणार नाहीं, अशी आपत्ति प्राप्त झाल्यामुळें; आणि 'पुत्रेषु विद्यमानेषु०' ह्या वचनांतील पुत्रपद औरसाचेंच केवळ बोधक असल्यामुळें; ( बोपदेवादिकांचें मत ) चिंत्य आहे. या वरील वाक्यांनीं पुत्र असतां इतरांचा निषेध केला म्हणूनच उपनीत ( मुंज केलेला ) पौत्र असतांही अनुपनीत ( मुंज न केलेला ) पुत्र असला तरी पुत्रालाच अधिकार आहे. औरसपुत्र अनुपनीत असला तरी त्यानें श्राद्ध करावें, अशाविषयीं सांगतो—**पृथ्वीचंद्रोदयांत सुमंतु**—"बाप मेला आहे व त्याचा पुत्र जर मुख्य औरसच आहे, मग तो व्रतस्थ ( ब्रह्मचारी ) असो किंवा व्रतस्थ नसो, त्यानें अवश्य श्राद्ध करावें." **वृद्धमनु**—"जो मुख्य ( औरस ) पुत्र आहे तो अनुपनीत असला तरी त्यानें श्राद्ध करावें. त्या औरस पुत्रानें ब्राह्मणाच्या हातावर पितृयज्ञाच्या ( अग्नौकरण्याच्या ) आहुतींचा होम करावा." या वरील दोन वचनांत 'एक' पद आहे त्याचा अर्थ, मुख्य म्हणजे औरस हा आहे. **मनु**—"मौंजीबंधन होईपर्यंत ह्या मुलाला कोणतेंही कर्म उक्त नाहीं. स्वधानिनयनावांचून ( श्राद्धावांचून ) यानें वेदाचा उच्चार करूं नये." **सुमंतुही** सांगतो—"जोंपर्यंत मुंज बांधली नाहीं, तोंपर्यंत वेदाचा उच्चार करूं नये. परंतु एक औरस पुत्र अनुपनीत असला तरी त्यानें बापाच्या श्राद्धांत मंत्र म्हणावे." हा जो मंत्रांचा अधिकार सांगितला तो तीन वर्षांचा असून चौलसंस्कार झालेल्यासच आहे. कारण, "अनुपनीत असतांही जर चूडासंस्कार झालेला आहे व तीन वर्षांच्या वयाचा आहे तर त्यानें बापाचें और्ध्वदेहिक कर्म समंत्रक करावें." असें **सुमंतूनें** सांगितलें आहे. आतां जें **व्याघ्र** म्हणतो कीं, "चौलसंस्कार झालेल्या मुलानें उदकदान व पिंडदान करावें, स्वधाशब्दाचा उच्चार करावा, वेदोच्चार करूं नये." आणि जें **स्मृतिसंग्रहांत** सांगितलें आहे कीं, "चौल केलेला व अनुपनीत अशा पुत्रानें आईबापांचें श्राद्ध करावें, स्वधा शब्दाचा उच्चार करावा, पण वेदाक्षरांचा उच्चार करूं नये." असा जो दोन वचनांनीं वेदोच्चाराचा निषेध सांगितला तो निषेध पहिल्यावर्षी चूडासंस्कार झालेल्या पुत्राविषयीं आहे, असें **माधव, मदनरत्न** आणि **पृथ्वीचंद्र** हे सांगतात. तीन वर्षांनंतर मंत्रोच्चाराचा विकल्प ( म्हणजे केला तर ठीकच आहे, न केला तरी दोष नाहीं ), असें **चंद्रिका** आणि **बोपदेव** सांगतात. वरील वचनांनीं वेदोच्चाराचा जो निषेध केला तो दत्तकादिकांना आहे, असें **आम्हीं** सांगतों.

**मदनरत्नेस्कांदे** यज्ञेषुमंत्रवत्कर्मपत्नीकुर्याद्यथानृप तथौर्ध्वदेहिकंकर्मकुर्यात्साधर्मसंस्कृता अशक्तौतु **कात्यायनः** असंस्कृतेतुपत्न्याचह्यग्निदानंसमंत्रकम् कर्तव्यमितरत्सर्वंकारयेदन्यमेवहि पुत्रश्चनजन्मतोधिकारी किंतु वर्षोत्तरमित्याह**कालादर्शः** चौलादाद्याब्दिकादर्वाक्नकुर्यात्पैतृमेधिकम् **मदनरत्नेसुमंतु**रपि पुत्रश्चोत्पत्तिमात्रेणसंस्कुर्याद्दणमोचनात् पितरंनाब्दिकाच्चौलात्पैतृमेधेनकर्मणा एतच्चौरसस्यैव दत्तकादीनांतूपनीतानामेवाधिकारइति**कालादर्शः** **पृथ्वीचंद्रोदयेपिस्कांदे** पित्रोरनुपनीतोपिविदध्यादौरसःसुतः और्ध्वदेहिकमन्येतुसंस्कृताःश्राद्धकारिणइति अन्यत्रापिदर्शमहालयादावनुपनीतस्याधिकारोस्माभिःपूर्वमुक्तः प्रपौत्राभावेदत्तकादयएकादशपुत्राः तदभावेभर्तुःपत्नीतस्याश्चसः अपुत्राशयनंभर्तुःपालयंतीव्रतेस्थिता पत्न्येवदद्यात्तत्पिंडंकृत्स्नमंशंलभेतचेति **वृद्धमनूक्तेः** भार्यापिंडंपतिर्दद्याद्भर्त्रेभार्यातथैवच श्वश्र्वादेश्चस्नुषाचैवतदभावेसपिंडकाइति पुत्राभावेतुपत्नीस्यात्पत्न्यभावेतुसोदरइतिच**हेमाद्रौशंखोक्तेः** **पृथ्वीचंद्रोदयस्तु** कानीनगूढसहजपुनर्भूतनयाश्चये पत्न्यभावेधिकुर्युस्तेअप्रशस्ताःस्मृताहितेइति**स्मृतिसंग्रहात्** पत्न्यभावेकानीनादयइत्याह ॥

**मदनरत्नांत स्कांदांत**—"धर्मानें विवाहित पत्नी यज्ञामध्यें जसें समंत्रक कर्म करिते, तसेंच तिनें पतीचें और्ध्वदेहिक कर्म समंत्रक करावें." और्ध्वदेहिकाविषयीं शक्ति नसेल तर सांगतो **कात्यायन**—"पुत्र असंस्कृत आहे तर पत्नीनें पतीला समंत्रक अग्नि द्यावा, व इतर सारें कर्म दुसऱ्याकडून करवावें." पुत्र हा जन्मतः अधिकारी नाहीं, तर एक वर्षानंतर अधिकारी, असें **कालादर्श** सांगतो—"चौल होण्याच्या पूर्वीं व एक वर्ष होण्याच्या पूर्वीं त्यानें पित्याचें और्ध्वदेहिक कर्म करूं नये." **मदनरत्नांत सुमंतु**ही सांगतो—"पुत्र उत्पन्न झाल्याबरोबर त्यानें बापाला पितृऋणापासून मुक्त केल्यामुळें त्याच्यावर तो एकतऱ्हेचा संस्कार करील. पण एक वर्ष होण्याच्या पूर्वीं व चौलसंस्कार होण्याच्या पूर्वीं और्ध्वदेहिक कर्मानें बापाला संस्कार करणार नाहीं." ही गोष्ट औरस पुत्रालाच लागू आहे. दत्तकादिकांला तर उपनयन झाल्यावरच अधिकार असें **कालादर्श** सांगतो. **पृथ्वीचंद्रोदयांत**ही **स्कांदांत**—"औरसपुत्र अनुपनीत असतांही त्यानें आईबापांचें और्ध्वदेहिक कर्म करावें, अन्य जे कोणी असतील ते उपनयन संस्कार झाल्यावरच श्राद्धाधिकारी होतात." दुसऱ्याठिकाणीं देखील दर्श, महालय इत्यादिकांविषयीं अनुपनीताला अधिकार आम्हीं पूर्वीं सांगितला आहे. प्रपौत्राच्या अभावीं दत्तकादिक अकरा प्रकारचे पुत्र अधिकारी होतात. त्यांच्या अभावीं भर्त्याच्या श्राद्धादिकांची अधिकारिणी पत्नी व पत्नीचा श्राद्धाधिकारी पति आहे. कारण, "भर्त्याचें शयन पालन करणारी म्हणजे परपुरुष मनांत न आणणारी व ब्रह्मचर्यव्रतीं राहणारी अशी जी अपुत्र स्त्री तिनेंच पतीला पिंड द्यावा आणि त्याची सारी इस्टेट घ्यावी." असें **वृद्धमनूनें** सांगितलें आहे. "भार्येला पिंड पतीनें द्यावा, तसाच भर्त्याला पिंड भार्येनें द्यावा, सासूइत्यादिकांना पिंड सुनेनें द्यावा, त्यांच्या अभावीं सपिंडांनीं द्यावा. पुत्रांच्या अभावीं पत्नी व पत्नीच्या अभावीं सोदर अधिकारी." असेंही **हेमाद्रींत शंखानें** सांगितलें आहे. **पृथ्वीचंद्रोदय** तर—"कानीन, गूढ, सहोढ, आणि पौनर्भव हे जे पुत्र सांगितले ते पत्नीच्या अभावीं अधिकारी आहेत. कारण, ते अप्रशस्त पुत्र म्हटले आहेत." असें **स्मृतिसंग्रहांत** सांगितलें आहे, म्हणून पत्नीच्या अभावीं **कानीना**दिक पुत्र अधिकारी, असें सांगतो.

पत्युरपिसपत्नीपुत्रेसतिनाधिकारः पितृपत्न्यःसर्वामातरः इति**सुमंतूक्तेः** विदध्यादौरसःपुत्रोजनन्या और्ध्वदेहिकं तदभावेसपत्नीजःक्षेत्रजाद्यास्तथास्मृताः तेषामभावेतुपतिस्तदभावेसपिंडकाइति**मदनरत्ने**- **कात्यायनोक्तेश्च** बह्वीनामेकपत्नीनामेषएवविधिःस्मृतः एकाचेत्पुत्रिणीतासांसर्वासांपिंडदस्तुसइति **बृहस्पतिवचनाच्च** **अपरार्के**प्येवम् तेनयच्छुद्धिविवेकेउक्तंसत्यपिसपत्नीपुत्रेपत्युरेवाधिकारइति तन्निरस्तम् यच्चतत्रैव**कात्यायनः** नभार्यायाःपतिर्दद्यादपुत्रायाअपिकचित् यच्च**विष्णुपुराणं** कुलद्वयेपिचोत्सन्नेस्त्रीभिःकार्याक्रियानृपेति यच्च**मार्कंडेयपुराणम्** सर्वाभावेस्त्रियःकुर्युःस्वभर्तृणाममंत्रकमिति तदासुरादिविवाहोढाविषयम् धर्मैर्विवाहैरूढायासापत्नीपरिकीर्तिता क्रयक्रीतातुयानारीनसापत्न्यभिधीयते नसादैवेनेवापित्र्येदासींतांमुनयोविदुरिति **माधवीयेशातातपोक्तेः** यत्तु**शुद्धिरत्नाकरः** **शूलपाणिश्च** अपुत्रस्यचयापुत्रीसापिपिंडप्रदाभवेत् तस्यपिडान्दशैकंवाएकाहेनैवनिक्षिपेदितिजा**बालोक्तेः** भर्तुर्धनहरापत्नीतांविनादुहितास्मृता अंगादंगात्संभवतिपुत्रवद्दुहितानृणामिति**बृहस्पति**नादुहितुर्धनहारित्वोक्तेरपुत्रा-

भावेकन्यातदभावेसपत्नीपुत्रइत्याहतुः तत्पूर्वविरोधात् मातुर्दुहितरःशेषमृणात्ताभ्यऋतेन्वयइतिदुहितुर्मातृधनग्राहित्वेनपुत्रस्यतच्छ्राद्धानधिकारापत्तेश्चोपेक्ष्यम् वचनंतुभ्रातृपुत्राद्यभावविषयम् पत्यभावेअविभक्तश्चसोदरः पूर्वोक्तशंखवचनात् विभक्तस्यतुदुहिता धनहारित्वात् पूर्वोक्त**जाबालवचनाच्च** तत्राप्यूढानूढसमवायेऊढैव दुहितापुत्रवत्कुर्यान्मातापित्रोस्तुसंस्कृता आशौचमुदकंपिंडमेकोद्दिष्टंसदातयोरिति**भरद्वाजोक्तेः** तदभावेदौहित्रः धनहारित्वात् मातापित्रोरुपाध्यायाचार्ययोरौर्ध्वदेहिकं कुर्वन्मातामहस्यापिव्रतीनभ्रश्यतेव्रतादितिचं**द्रिकायांवृद्धमनूक्तेः** यथाव्रतस्थोपिसुतःपितुःकुर्यात्क्रियांनृप उदकाद्यांमहाबाहोदौहित्रोपि तथार्हतीत्य**परार्के भविष्योक्तेश्च** एतद्धनहारिणआवश्यकंनान्यस्येत्याहतत्रैव**स्कंदः** श्राद्धंमातामहानांतुअवश्यंधनहारिणा दौहित्रेणार्थनिष्कृत्यैकर्तव्यंपूर्वमुत्तरमिति तेनदौहित्रोऽत्रपुत्रीकृतइति**देवयाज्ञिकोक्तिः**परास्ता अत्रपत्नीदौहित्रसमवायेंशहरत्वात्पत्न्येवकुर्यात् ॥

पत्नीच्या श्राद्धाविषयीं सापत्न पुत्र असेल तर पतीला देखील अधिकार नाहीं. कारण, "पित्याच्या सार्‍या स्त्रिया पुत्राच्या माता आहेत." असें **सुमंतूनें** सांगितलें आहे. आणि "मातेचें और्ध्वदेहिक कर्म औरसपुत्रानें करावें, त्याच्या अभावीं सापत्न पुत्रानें करावें, त्याच्या अभावीं क्षेत्रजादिक पुत्रांनीं करावें, त्यांच्या अभावीं पतीनें व त्याच्या अभावीं सपिंडांतील पुरुषांनीं करावें" असें **मदनरत्नांत कात्यायनानें**ही सांगितलें आहे. आणि " एकाच्या अनेक स्त्रिया असतील त्याठिकाणीं हाच विधि आहे. त्यांतून एकीला जर पुत्र असेल तर त्या सर्वांना पिंड देणारा तोच आहे." असें **बृहस्पतिचें**ही वचन आहे. **अपरार्कांत**ही असेंच आहे. ह्या सर्व प्रमाणांवरून 'जें **शुद्धिविवेकांत** सांगितलें कीं, सापत्न पुत्र असला तरी पतीलाच अधिकार आहे' त्याचा निरास झाला. आतां जें त्याचठिकाणीं **कात्यायन** सांगतो किं, "अपुत्र जरी भार्या असेल तरीं तिला पतीनें कधींही पिंड देऊं नये." आणि जें **विष्णुपुराण**–"दोन्हीं कुलांचा उच्छेद झाला असतां स्त्रियांनीं क्रिया करावी, अर्थात् पूर्वी करूं नये." आणि जें **मार्कंडेयपुराण**–"सर्वांचा अभाव असेल तर स्त्रियांनीं आपआपल्या पतींच्या क्रिया अमंत्रक कराव्या." तीं सारीं वचनें औसुरादि विवाहानें विवाहित ज्या स्त्रिया तद्विषयक आहेत. कारण, "धर्मविवाहांनीं विवाहित जी ती **पत्नी** म्हटली आहे. द्रव्य देऊन विकत घेतलेली जी स्त्री ती पत्नी होत नाहीं, म्हणून ती दैवकर्माविषयीं अथवा पित्र्यकर्माविषयीं अधिकारी होत नाहीं, मुनि तिला दासी असें म्हणतात." अशी **माधवीयांत शातातपाची** उक्ति आहे. आतां जें **शुद्धिरत्नाकर** व **शूलपाणि** –"निपुत्रकाची जी कन्या ती देखील पिंड देणारी आहे; तिनें त्याचे दहा व एक पिंड एकाच दिवशीं द्यावे अशी **जाबालाची** उक्ति आहे. आणि "भर्त्याचें धन घेणारी पत्नी आहे, तिच्या अभावीं कन्या वारस. कारण पुत्राप्रमाणें कन्या पुरुषाच्या अंगापासूनच उत्पन्न होते." याप्रमाणें **बृहस्पतीनें** कन्येला धनहारित्व ( वारसा ) सांगितलें आहे, म्हणून पुत्राच्या अभावीं कन्या अधिकारी, तिच्या अभावीं सापत्न पुत्र, असें ते दोघे ( शुद्धिरत्नाकर व शूलपाणि ) सांगते झाले. त्याला पूर्वीचा ( 'तदभावे सपत्नीजः०' ह्या कात्यायनोक्तीचा व एका चेत्पुत्रिणी तासां०' ह्या बृहस्पतिवचनाचा वगैरे ) विरोध येतो म्हणून आणि "मातेचें ऋण देऊन शेष उरलेलें द्रव्य कन्यांनीं घ्यावें, त्या नसतील तर इतरांनीं घ्यावें." या वचनानें कन्येला मातृधनहारित्व सांगितल्यानें पुत्राला मातृश्राद्धाचा अनधिकार येऊं लागेल! याकरितां त्यांचें ( शुद्धिरत्नाकरादिकांचें ) तें म्हणणें उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे. आतां 'अपुत्रस्य च या पुत्री०' हें वचन तर भ्रातृपुत्रादिकांच्या अभावविषयक आहे, असें समजावें. पत्नीच्या अभावीं **अविभक्त** असेल तर सोदर भ्राता अधिकारी. कारण, 'पुत्राभावेतु पत्नी स्यात् पत्यभावेतु सोदरः' असें **शंख**वचन पूर्वी सांगितलें आहे. **विभक्त** असेल तर कन्या अधिकारी. कारण, ती धनहारिणी आहे, व पूर्वी "अपुत्रस्यच०" असें **जाबाल**वचन सांगितलें आहे. त्यांत विवाहित व अविवाहित अशा असल्या तर विवाहितच अधिकारी. कारण, "संस्कृत ( विवाहित ) कन्येनें आईबापांचें आशौच, उदकदान व पिंडदान हें सर्व पुत्राप्रमाणें करावें; पण कन्येनें आईबापांचें श्राद्ध करणें तें सदा एकोद्दिष्ट करावें." असें **भरद्वाजानें** सांगितलें आहे. कन्येच्या अभावीं दौहित्र अधिकारी—कारण, तो जिंदगीचा वारस आहे. आणि "ब्रह्मचार्‍यानें आई, बाप, उपाध्याय, आचार्य, आणि मातामह यांचें और्ध्वदेहिक कर्म केलें तरी तो आपल्या व्रतापासून भ्रष्ट होत नाहीं." अशी **चंद्रिकेंत वृद्धमनूची** उक्ति आहे. आणि पुत्र व्रतस्थ ( ब्रह्मचारी ) असला तरी त्यानें जशी बापाची क्रिया करावी असें आहे, तशीच दौहित्रानेंही मातामहाची उदकदानादिक सर्व क्रिया करावी" असें **अपरार्कांत भविष्यपुराण**वचनही आहे. हें मातामहाचें और्ध्वदेहिक कर्म इस्टेट घेणारा असेल त्याला आवश्यक आहे, इतराला आवश्यक नाहीं, असें त्याच ठिकाणीं सांगतो **स्कंद**—"मातामहाची जिंदगी घेणारा जो दौहित्र त्यानें द्रव्याची निष्कृती ( फेड ) होण्यासाठीं मातामहांचें पूर्व उत्तर ( दहा दिवसांचे आंतलें व बाहेरचें ) श्राद्ध अवश्य करावें." ह्या वचनावरून, 'श्राद्धाविषयीं पुत्रीकृत दौहित्र

१ आसुरादिक अधर्मविवाह आणि ब्राह्मादिक धर्मविवाह हे विवाहप्रकरणीं सांगितले आहेत.

अधिकारी' असें देवयाज्ञिकानें सांगितलेलें तें परास्त ( खंडित ) झालें. आतां पत्नी व दौहित्र दोन्ही असतील तर धन घेणारी पत्नी असल्यामुळें तिनेंच पतीची क्रिया करावी.

दौहित्रभ्रातृपुत्रसत्त्वेविभक्तस्यदौहित्रः अविभागेभ्रातृपुत्रः भ्रातृतत्पुत्रसत्त्वेकनिष्ठश्चेत्भ्रातैव ज्येष्ठश्चेत्तत्पुत्रःकुर्यादितिदाक्षिणात्यग्रंथाः **हारलतादौ** तु भ्रातुर्भ्रातास्वयंचक्रेतद्भार्याचेन्नविद्यते तस्यभ्रातृसुतश्चक्रेयस्यनास्तिसहोदरइति **ब्राह्मोक्तेः** पत्नीकुर्यात्सुताभावेपत्न्यभावेसहोदरइतिकौर्माच्च ज्येष्ठभ्रातैवकुर्यान्नतत्पुत्रः यत्तुनानुजस्यतथाग्रजइतितत्कनिष्ठभ्रातृसत्त्वविषयम् **यच्चमनुः** सर्वेषामेकजातानामेकश्चेत्पुत्रवान्भवेत् सर्वांस्तांस्तेनपुत्रेणपुत्रिणोमनुरब्रवीदिति तत्सहोदराभावविषयमित्युक्तं 'एतेनपुत्रत्वातिदेशोयम् अतस्तस्मिन्सतिएकादशपुत्राःप्रतिनिधयोनकार्याः सएवपिंडदोंशहरश्चेति **वाचस्पतिमनुटीकाकल्पतरुरत्नाकरादयः**परास्ताः द्वादशपुत्राभावेपत्नीदुहितरइतियाज्ञवल्क्योक्तेश्च तस्माद्दत्तपुत्रप्रशंसेयमितिविज्ञानेश्वरः अविभक्तविषयंवा' **मदनरत्नेस्मृतिसंग्रहे** पुत्रःकुर्यात्पितुःश्राद्धंपत्नीचतदसन्निधौ धनहार्यथदौहित्रस्ततोभ्राताचतत्सुतः भ्रात्रोःसहोदरोभ्राताकुर्याद्दाहादितत्सुतः ततस्त्वसोदरोभ्राता तदभावेचतत्सुतइति भ्रातृपुत्राभावेक्रमेणपितृमातृस्नुषास्वसृतत्पुत्रादयः धनहारित्वात् भगिनीतत्सुतयोर्विशेषमाह**मदनरत्नेकात्यायनः** अनुजाअग्रजावापिभ्रातुःकुर्वीतसंस्क्रियाम् ततस्त्वसोदरातद्वत्क्रमेणतनयस्तयोः **अपरार्केकार्ष्णाजिनिः** पुत्रःशिष्योथवापत्नीपिताभ्रातास्नुषागुरुः स्त्रीहारीधनहारीचकुर्यात्पिंडोदकक्रियाम् **मार्कंडेयपुराणे** पुत्रोभ्राताचतत्पुत्रःपत्नीमातातथापिता वित्ताभावेतुशिष्यश्चकुर्वीरन्नौर्ध्वदेहिकम् तेनधनहारीएतद्भिन्नइतिकालादर्शः अत्रपाठक्रमोनविवक्षितः पूर्ववाक्येष्वथततःशब्दादिभिः श्रौतक्रमोक्तेः **अथजिह्वाया अथवक्षस**इतिवत् ॥

दौहित्र आणि भ्रातृपुत्र हे दोघे असतील तर विभक्ताची क्रिया दौहित्रानें करावी, आणि अविभक्ताची भ्रातृपुत्रानें करावी. भ्राता आणि भ्रातृपुत्र हे दोघे असतील तर कनिष्ठ भ्राता असल्यास त्यानें करावी, व तो ज्येष्ठ असेल तर त्याच्या पुत्रानें करावी, असें **दाक्षिणात्यग्रंथ** आहेत. **हारलतादि**कांत तर—"जर मृताची भार्या नसेल तर भ्रात्याची क्रिया भ्राता स्वतः करितो. ज्याचा सहोदर भ्राता नाहीं त्याची क्रिया भ्रात्याचा पुत्र करितो" ह्या **ब्राह्म**वचनावरून आणि "पुत्रांच्या अभावीं पत्नीनें करावी, पत्नीच्या अभावीं सहोदर भ्रात्यानें करावी" ह्या **कूर्मपुराण**वचनावरूनही कनिष्ठाची सुद्धां क्रिया ज्येष्ठ भ्रात्यानेंच करावी; त्याच्या पुत्रानें करूं नये असें आहे. आतां जें "कनिष्ठाची क्रिया अग्रजानें ( ज्येष्ठानें ) करूं नये." तें कनिष्ठ भ्राता असेल तर तद्विषयक समजावें. आतां जें **मनु** "एकापासून झालेल्या भ्रात्यांमध्यें एक जर पुत्रवान् होईल तर ते सारे भ्राते त्या पुत्रानें पुत्रवंत होतात, असें मनु सांगता झाला" हें मनूचें म्हणणें सहोदर भ्राता नसेल त्यावेळचें समजावें असें सांगितलें आहे. ह्या वरील वचनांनीं सहोदर भ्राता नसेल तर भ्रातृपुत्र अधिकारी, असें झाल्यामुळें 'ह्या मनुवचनानें भ्रातृपुत्राचेठायीं पुत्रत्वाचा अतिदेश ( आरोप ) केला आहे, म्हणून तो भ्रातृपुत्र असतां अकरा प्रकारचे पुत्र प्रतिनिधि करूं नयेत; कारण, तोच पिंड देण्यास व जिंदगी घेण्यास अधिकारी आहे' असें सांगणारे **वाचस्पति, मनुटीका, कल्पतरु, रत्नाकर इत्यादिक** ग्रंथ परास्त झाले. कारण, "बारा प्रकारच्या पुत्रांच्या अभावीं पत्नी, कन्या अधिकारी" असें **याज्ञवल्क्यानें**ही सांगितलें आहे. आणि ह्या वरील वचनांनीही दत्तकपुत्राची प्रशंसा केली आहे, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. अथवा हें वचन अविभक्ताविषयीं समजावें. **मदनरत्नांत स्मृतिसंग्रहांत**—"पित्याचें श्राद्ध पुत्रानें करावें. पुत्र जवळ नसेल तर पत्नीनें करावें. पत्नी नसेल तर इस्टेट घेणाऱ्या दौहित्रानें करावें. त्याच्या अभावीं भ्रात्यानें व भ्रातृपुत्रानें करावें. त्यांत सहोदर व असहोदर ( सापत्न ) असतील तर सहोदरानें दाहादिक कर्म करावें. सहोदराच्या अभावीं सहोदराच्या पुत्रानें करावें. त्याच्या अभावीं असहोदरानें ( सापत्नभ्रात्यानें ) करावें. त्याच्या अभावीं सापत्नभ्रातृपुत्रानें करावें." भ्रातृपुत्राच्या अभावीं अनुक्रमानें पिता, माता, स्नुषा, भगिनी, भगिनीपुत्र इत्यादिक अधिकारी होतात. कारण, ते जिंदगीचे वारस आहेत. भगिनी व भगिनीपुत्र यांविषयीं विशेष सांगतो **मदनरत्नांत कात्यायन**—"भगिनी कनिष्ठ असो किंवा ज्येष्ठ असो, तिनें आपल्या भ्रात्याची सत्क्रिया करावी. सोदर भगिनीच्या अभावीं सापत्न भगिनीनें तशीच क्रिया करावी. तिच्या अभावीं त्याच क्रमानें त्या दोन्ही भगिनींच्या पुत्रानें करावी." **अपरार्कांत कार्ष्णाजिनि**—"पुत्र, शिष्य, अथवा पत्नी, पिता, भ्राता, स्नुषा, गुरु, स्त्रीसंरक्षण करणारा, इस्टेट घेणारा यानें पिंड-उदकदानादिक क्रिया करावी." **मार्कंडेयपुराणांत**—"द्रव्य नसेल तर पुत्र, भ्राता, भ्रातृपुत्र, पत्नी, माता, पिता, आणि शिष्य यांनीं और्ध्वदेहिक कर्म करावें." या वचनांत 'वित्ताभाव

---

१ 'एतेन' यापासून 'अविभक्तविषयंवा' येथपर्यंत ग्रंथ एका प्रतींत नाहीं.

असतां' असें आहे म्हणून इस्टेट घेऊन क्रिया करणारा तो यांहून वेगळा समजावा, असें **कालादर्श** सांगतो. या वचनांत **पाठक्रम** घ्यावयाचा नाहीं, म्हणजे पुत्राच्या अभावीं भ्राता, त्याच्या अभावीं भ्रातृपुत्र असे अधिकारी समजावयाचे नाहींत. कारण, पूर्ववचनांमध्यें 'अथ-ततः' इत्यादिक पदांनीं **श्रौतक्रम** सांगितला आहे. जसें—"हृदयस्याग्रे अवद्यति अथ जिव्हाया अथ वक्षसः" ह्या वाक्यांत हृदयाचें पूर्वी अवदान सांगतलें, नंतर जिव्हेचें, नंतर वक्षाचें, ह्यांत क्रमबोधक 'अथ' हा शब्द आहे. ह्याप्रमाणें येथें 'अथ' इत्यादि शब्दांनीं बोधन केलेला क्रम घ्यावा.

**पृथ्वीचंद्रोदयेवृद्धमनुः** स्नुषास्वस्रीयतत्पुत्रज्ञातिसंबंधिबांधवाः पुत्राभावेतुकुर्वीरन्सपिंडांतंयथाविधि **मार्कंडेयपुराणे** पुत्राद्युत्सन्नबंधोश्चसखापिश्वशुरस्यच जामाताम्नेहवत्कुर्यादखिलंपैतृमेधिकम् **चंद्रिकायांवृद्धशातातपः** मातुलोभागिनेयस्यस्वस्रीयोमातुलस्यच श्वशुरस्यगुरोश्चैवसख्युर्मातामहस्यच एतेषांचैवभार्याणांस्वसुर्मातुःपितुस्तथा श्राद्धमेषांतुकर्तव्यमितिवेदविदोविदुः **शुद्धिविवेकेपृथ्वीचंद्रोदयेचब्राह्मे** दत्तानांवाप्यदत्तानांकन्यानांकुरुतेपिता चतुर्थेऽहनितास्तेषांकुर्वीरन्सुसमाहिताः दत्तावाग्दत्ताः मातामहानांदौहित्राःकुर्वंत्यहनिचापरे तेपितेषांप्रकुर्वंतिद्वितीयेहनिसर्वदा जामातुःश्वशुराश्चक्रुस्तेषांतेपिचसंयताः मित्राणांतदपत्यानांश्रोत्रियाणांगुरोस्तथा भागिनेयसुतानांचसर्वेषांत्वपरेहनि राज्ञोसतिसपिंडेतुनिरपत्येपुरोहितः मंत्रीवातदशौचंतुपुराचीर्त्वाकरोतिसः अत्रद्वितीयाहादौश्राद्धविधानमस्थिसंचयपरम् **कालादर्शे** दाहादिमंत्रवत्पित्रोर्विदध्यादौरसःसुतः तदभावेतुपौत्रश्चप्रपौत्रःपुत्रिकासुतः दौहित्रोधनहारीच भ्रातातत्पुत्रएवच पितामातास्नुषाचैवस्वसातत्पुत्रएवच सपिंडःसोदकोमातुःसपिंडश्चसहोदकः स्त्रीचशिष्यर्त्विगाचार्योजामाताचसखापिच उत्सन्नबंधोरिक्थेनकारयेदवनीपतिः **गौतमः** पुत्राभावेसपिंडामातृसपिंडाःशिष्याश्चदद्युस्तदभावेऋत्विगाचार्यौ यत्तु**चंद्रिकायांवृद्धशातातपः** प्रीत्याश्राद्धंप्रकर्तव्यंसर्वेषां वर्णलिंगिनामितितत्सवर्णविषयम् ब्राह्मणस्त्वन्यवर्णानांनकुर्यात्कर्मकिंचन कामाल्लोभाद्भयान्मोहात्कृत्वातज्जातितांव्रजेदिति**ब्राह्मोक्तेः** नब्राह्मणेनकर्तव्यंशूद्रस्याप्यौर्ध्वदेहिकं शूद्रेणवाब्राह्मणस्यविनापारशवात्कचिदिति**पारस्करोक्तेश्च** पारशवः ऊढशूद्रापुत्रः ॥

**पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धमनु**—"पुत्राच्या अभावीं स्नुषा, भागिनेय, त्याचा पुत्र, ज्ञाति, संबंधी, बांधवः ह्यांनीं सपिंडांत क्रिया यथाविधि करावी." **मार्कंडेय**पुराणांत—पुत्रादिक अधिकारी कोणीही नसतील तर सकल और्ध्वदेहिक कर्म स्नेहानें मित्रानेंही करावें, आणि श्वशुराचें जामातानें करावें." **चंद्रिकेंत वृद्धशातातप**—"भागिनेयाचें मातुलानें व मातुलाचें भागिनेयानें, श्वशुराचें जामात्यानें, गुरूचें शिष्यानें, मित्राचें मित्रानें, मातामहाचें दौहित्रानें, याप्रमाणें और्ध्वदेहिक करावें. तसेंच ह्यांच्या भार्याचें, ह्यांच्या भगिनींचें, ह्यांच्या मातेचें आणि ह्यांच्या पित्याचें श्राद्धादिक कर्म त्यानें त्यानें करावें, असें वेदवेत्ते सांगतात." **शुद्धिविवेकांत** आणि **पृथ्वीचंद्रोदयांत ब्राह्मांत**—"दत्ता ( वाग्दान केलेल्या ) अथवा अदत्ता अशा कन्यांचें पित्यानें करावें. आणि त्या कन्यांनीं समाधान अंतःकरणपूर्वक पित्रादिकांचें अस्थिसंचयनादिक कर्म चवथ्या दिवशीं करावें." ह्यांत दत्तापदाचा अर्थ वाग्दत्ता असा आहे. "मातामहांचें श्राद्ध ( अस्थिसंचयन ) दौहित्र दुसऱ्या दिवशीं करितात. ते मातामह देखील दौहित्रांचें ( अस्थिसंचयनादिक ) सर्वदा दुसऱ्या दिवशीं करितात. जामात्यांचें श्वशुर व श्वशुरांचें जामाते करितात. मित्र, मित्रांचीं अपत्यें, श्रोत्रिय, गुरु, भागिनेयांचे पुत्र, ह्या सर्वांचें अस्थिसंचयनादिक दुसऱ्या दिवशीं करितात. राजाला अपत्य नसतां सपिंडही कोणी नसेल तर पुरोहित किंवा मंत्री पूर्वी आशौच धरून नंतर त्याचें और्ध्वदेहिक कर्म करितो." ह्या वरील वचनांत दुसऱ्या वगैरे दिवशीं श्राद्धविधान केलें तें अस्थिसंचयनबोधक आहे. **कालादर्शांत** सांगतो—"आईबापांचें दाहादिक कर्म औरसपुत्रानें समंत्रक करावें. त्याच्या अभावीं पौत्र, त्याच्या अभावीं प्रपौत्र, त्याच्या अभावीं पुत्रिकापुत्र अधिकारी. त्याच्या अभावीं इस्टेट घेणारा दौहित्र, भ्राता, भ्रातृपुत्र, पिता, माता, स्नुषा, भगिनी, भगिनीपुत्र, आपला सपिंड, सोदक, मातेचा सपिंड, मातेचा सोदक, स्त्री, शिष्य, ऋत्विक्, आचार्य, जामाता, मित्र, हे अनुक्रमानें अधिकारी होतात. ह्यांपैकीं ज्याचे कोणी नाहींत त्याचें और्ध्वदेहिक कर्म, त्याच्याच द्रव्यानें दुसऱ्याकडून राजानें करवावें." **गौतम**—"पुत्राच्या अभावीं आपले सपिंड, मातृसपिंड, शिष्य यांनीं पिंडदानादिक करावें, त्यांच्या अभावीं ऋत्विक्

१ ज्या ठिकाणीं क्रमबोधक पदें अथ-ततः इत्यादिक श्रुत आहेत, त्या ठिकाणीं **श्रौतक्रम** समजावा. क्रमबोधक पदें नसतील त्या ठिकाणीं **पाठक्रम** समजावा. श्रौतक्रम असतां पाठक्रम घ्यावयाचा नाहीं. कारण, विशेष यत्नानें ( क्रमबोधक पदांनीं ) क्रम सुचविला आहे.

आणि आचार्य यांनीं पिंडादिक द्यावे." आतां जें **चंद्रिकेंत वृद्धशातातप** सांगतो की, "ब्राह्मणादिवर्णांच्या (जातींच्या) लक्षणांनीं युक्त असतील त्या सर्वांचें श्राद्ध श्रौतीनें करावें." हें वचन सवर्णविषयक आहे. म्हणजे मृताच्या जातीचा जो असेल त्यानें करावें. कारण, "ब्राह्मणानें अन्यवर्णाचें कांहीं कर्म करूं नये. कामानें, लोभानें, भयानें, किंवा मोहानें (अविचारानें) करील तर तो करणारा त्याच्या जातींत जाईल." असें **ब्राह्म**वचन आहे. आणि "शूद्राचें और्ध्वदेहिक कर्म ब्राह्मणानें करूं नये. अथवा पारशवावांचून इतर शूद्रानें ब्राह्मणाचें और्ध्वदेहिक करूं नये." असें **पारस्कर**वचन आहे. पारशव म्हणजे ब्राह्मणानें विवाहित शूद्रेचा पुत्र होय.

अत्रेदंतत्त्वम् सर्वत्रपुत्रादेःपूर्वस्याभावेपत्न्यादेरधिकारउक्तः तत्राभावोऽसन्निधिर्नाशश्चोच्यते अतएवपूर्वत्र असंनिधानेपूर्वेषामित्युक्तम् तत्रासन्निधौपत्न्यादेःसर्वाधिकारेप्राप्ते प्रोषितावसितेपुत्रःकालादपिचिरादपि एकादशाद्याःक्रमशोज्येष्ठस्यविधिवत्क्रियाः ज्येष्ठेनैवतुयत्कृतमित्याद्यैर्देशांतरेपवादात्पुत्रनाशएवपत्न्यादेःसपिंडनादौअधिकारः असन्निधौतुतत्पूर्वमेवनोर्ध्वं अतोऽनधिकारिणाभ्रात्रादिनाकृतमप्यकृतमेवेति पुनरावर्तनीयम् मासिकापकर्षोप्यावर्तनीयः एकादशाहमासिकानिनावर्तंते तज्ज्यायसापिकर्तव्यंसपिंडीकरणंपुनरितिववावृत्तिविधानाभावादितिकेचित् तन्न अस्यनिर्मूलत्वात् अतस्तदपिकनिष्ठकृतमावर्तते वृद्धिश्रौतपिंडपितृयज्ञार्थंतुकृतंनावर्तते नासपिंड्याग्निमान्पुत्रःपितृयज्ञंसमाचरेत् नपार्वणंनाभ्युदयंकुर्वन्नलभतेफलमिति वृद्धयुत्तरनिषेधनादिति भ्रातावाभ्रातृपुत्रोवेत्यादि**हारीतादि**वचोभ्यः कनिष्ठादेरप्यधिकारात् यथात्रज्येष्ठकर्तृकत्वबाधस्तथापुत्रकर्तृकत्वस्यापिबाधः सपिंडनेतुबहुवक्तव्यंतन्निर्णयेवक्ष्यामः ॥

## या अधिकाराविषयींचें तत्त्व सांगतों—

मृताच्या सर्वकर्माविषयीं पुत्रादिकांच्या अभावीं पत्न्यादिकांना अधिकार सांगितला आहे. त्या ठिकाणीं अभाव म्हणजे असंनिधि (समीप नसणें) आणि नाश होय. असें आहे म्हणूनच पूर्वोक्तवचनांत पूर्वीच्या अधिकाऱ्यांचें सांनिध्य नसतां परांना अधिकार, असें सांगितलें आहे. त्या वाक्यावरून पुत्रादिकांचें सांनिध्य नसेल त्या ठिकाणीं पत्न्यादिकांना सर्व अधिकार प्राप्त झाला; परंतु "पिता प्रवासांत मृत झाला असतां चिरकालानें जरी पुत्राला समजलें तरी त्यानें सर्व कर्म करावें. एकादशाहादिक सर्व क्रिया ज्येष्ठपुत्रानें अनुक्रमानें यथाशास्त्र कराव्या. सर्वांच्या मतानें ज्येष्ठपुत्रानें जें केलें तें सर्वांनीं केलें असें होतें." इत्यादिवचनांनीं देशांतरीं पुत्र असतां (संनिध नसतां) पत्न्यादिकांच्या अधिकाराविषयीं अपवाद (निषेध) आहे, म्हणून पुत्रांचा नाश असेल तरच पत्न्यादिकांना सपिंडीविषयीं वगैरे अधिकार आहे. आतां पुत्रादिक संनिध नसतील तर पूर्वे (एकादशाहापर्यंत) क्रियांविषयींच अधिकार. एकादशाहोत्तर क्रियांविषयीं पत्न्यादिकांना अधिकार नाहीं. असें आहे म्हणूनच अनधिकारी असे जे कनिष्ठ भ्रात्रादिक त्यांनीं केलें तरी अकृतच आहे, म्हणून ज्येष्ठ भ्रात्यानें पुनः करावें. त्याचप्रमाणें सपिंडीसाठीं अपकर्षानें करावयाचीं मासिकें त्यांची देखील ज्येष्ठानें पुनरावृत्ति करावी. कोणी म्हणतात—एकादशाहादिक मासिकांची आवृत्ति होत नाहीं; कारण, "तें सपिंडीकरण कनिष्ठानें केलें असलें तरी पुनः ज्येष्ठानेंही करावें." ह्या वचनानें सपिंडीकरणाची जशी आवृत्ति सांगितली, तशी मासिकांची आवृत्ति सांगितली नाहीं; असें जें कोणी म्हणतात, तें बरोबर नाहीं. कारण, त्यांचें तें म्हणणें निर्मूल (वचनरहित) आहे. म्हणून तें देखील कनिष्ठानें केलें असलें तरी ज्येष्ठानें पुनः करावें. विवाहादि वृद्धि, श्रौतपार्वणविधि आणि पिंडपितृयज्ञ यांसाठीं केलीं असतील तर त्यांची पुनः आवृत्ति होणार नाहीं. कारण, "साग्निक पुत्रानें सपिंडी केल्यावांचून पिंडपितृयज्ञ, पार्वणविधि आणि आभ्युदयिक (विवाहादिक मंगल) कर्म हीं करूं नयेत. केलीं असतां त्यांचें फळ मिळणार नाहीं." (ह्या वचनानें पूर्वी सपिंडी केलीच पाहिजे असें होतें.) वृद्धिश्राद्धानंतर सपिंडीकरण-मासिकादिकांचा निषेध आहे. (ह्यावरून ज्येष्ठानें पुनः करितां कामा नयेत असें होतें). "भ्राता वा भ्रातृपुत्रो वा" (ह्या वचनावरून इतरांनाही अधिकार आहे असें होतें) इत्यादिक **हारीतादि**वचनांनीं कनिष्ठादिकांना देखील अधिकार असल्यामुळें जसा ज्येष्ठाच्या कर्तृत्वाचा बाध केला, तसा पुत्राच्या कर्तृत्वाचा देखील बाध केला असें होतें. सपिंडीकरणाविषयीं बहुत सांगावयाचें आहे, तें सपिंडीनिर्णयाच्या वेळीं पुढें सांगूं.

अधिकारविशेषेणक्रियाव्यवस्थोक्ता**विष्णुपुराणे** पूर्वाःक्रियामध्यमाश्चतथाचैवोत्तराःक्रियाः त्रिप्रकाराःक्रियाह्येतास्तासांभेदाञ्छृणुष्वमे आदाहाद्द्वादशाहाच्चमध्येयाःस्युःक्रियानृप ताःपूर्वामध्यमामासिमास्येकोद्दिष्टसंज्ञिताः प्रेतेपितृत्वमापन्नेसपिंडीकरणादनु क्रियंतेयाःक्रियाःपुत्रैःप्रोच्यंतेतानृपोत्तराः पितृमातृसपिंडैश्चसमानसलिलैस्तथा तत्संघातगतैश्चैवराज्ञावाधनहारिणा पूर्वामध्याश्चकर्तव्याःपुत्राद्यैरेवचोत्तराः दौहि-

त्रैवर्णिकश्रेष्ठकार्यास्तत्तनयैस्तथा मृताहनितुकर्तव्याःस्त्रीणामप्युत्तराःक्रियाः दौहित्रतत्पुत्रयोर्धनहारिणोरिदम् एवमन्यस्यधनहर्तुः यश्चार्थहरःसपिंडदायीत्यापस्तंबोक्तेः प्रेतस्यप्रेतकार्याणिअकृत्वाधनहारकः वर्णानां यद्वधेप्रोक्तंतद्व्रतंप्रयतश्चरेदितिपृथ्वीचंद्रोदयेव्याघ्रपादोक्तेः मदनरत्नेस्कांदेपि मलमेतन्मनुष्याणांद्रविणंयत्प्रकीर्तितमित्युक्त्वा ऋषिभिस्तस्यनिर्दिष्टानिष्कृतिःपावनीपरा आदेहपतनात्तस्यकुर्यात्पिंडोदकक्रियामित्युक्तं क्रियानिबंधेकात्यायनः नचमातानचपिताकुर्यात्पुत्रस्यपैतृकम् नाग्रजश्चतथाभ्राताभ्रातॄणांतुकनीयसां पृथ्वीचंद्रोदयेबौधायनः पित्राश्राद्धंनकर्तव्यंपुत्राणांतुकथंचन भ्रात्राचैवनकर्तव्यंभ्रातॄणांचकनीयसाम् यदिस्नेहेनकुर्यातांसपिंडीकरणंविना गयायांतुविशेषेणज्यायानपिसमाचरेत् अन्याभावेपित्रादिरपिकुर्यात् उत्सन्नबांधवंप्रेतंपिताभ्राताथवाग्रजः जननीचापिसंस्कुर्यान्महदेनोन्यथाभवेदितिसुमंतूक्तेः ।

## आतां अधिकारविशेषानें क्रियाव्यवस्था सांगतो—

**विष्णुपुराणांत**—"पूर्वा, मध्यमा आणि उत्तरा, अशा ह्या क्रिया तीन प्रकारच्या आहेत; त्यांचे भेद सांगतों, श्रवण करा! प्रेतदाह झाल्यापासून द्वादशाहापर्यंत मध्यें होणाऱ्या ज्या क्रिया त्या **पूर्वक्रिया** होत. महिन्यामहिन्याचे ठायीं होणाऱ्या एकोद्दिष्टसंज्ञक क्रिया **मध्यम** होत. आणि सपिंडीकरणानंतर प्रेताला पितृत्व प्राप्त झालें असतां ज्या क्रिया पुत्र करितात, त्या **उत्तरक्रिया** म्हटल्या आहेत. पितृसपिंडांनीं, मातृसपिंडांनीं, पितृसमानोदकांनीं, मातृसमानोदकांनीं, अथवा त्यांच्या कुलांतील पुरुषांनीं, किंवा मृताचें द्रव्य घेऊन राजानें, मृताच्या पूर्वक्रिया व मध्यमक्रिया कराव्या. आणि उत्तरक्रिया पुत्रादिकांनींच कराव्या. अथवा दौहित्रांनीं किंवा दौहित्रतनयांनीं कराव्या. याचप्रमाणें स्त्रियांच्या देखील मृतदिवशीं उत्तरक्रिया कराव्या." दौहित्र व त्याचा पुत्र हे इस्टेट घेणारे असतील त्यांनाच हें सांगितलें आहे. याचप्रमाणें दुसरा कोणी द्रव्य घेईल तर त्यानेंही कराव्या; कारण, "जो मृताचें द्रव्य घेईल तो पिंड देईल." अशी **आपस्तंबाची** उक्ति आहे. आणि "प्रेताचीं प्रेतकार्यें न करितां जो त्याचें धन ग्रहण करितो त्यानें ब्राह्मणादिवर्णांचा वध केला असतां जें प्रायश्चित्त सांगितलें आहे तें प्रायश्चित्त करावें" अशी **पृथ्वीचंद्रोदयांत व्याघ्रपादाची** उक्ति आहे. **मदनरत्नांत स्कांदांतही**—"द्रव्य हें मनुष्यांना मळ ( पाप ) सांगितलें आहे" असें सांगून—"ऋषींनीं त्या मळाची अत्यंत पवित्र करणारी निष्कृति ( शुद्धि ) सांगितली आहे, ती अशी—आपला देह आहे तोंपर्यंत त्याची ( ज्याचें द्रव्य घेतलें त्याची ) पिंडोदकदानादि क्रिया करावी." असें सांगितलें आहे. **क्रियानिबंधांत कात्यायन**—"माता व पिता यानें पुत्राचें पैतृक ( और्ध्वदेहिक ) कर्म करूं नये. तसेंच ज्येष्ठभ्रात्यानें कनिष्ठभ्रात्याचें और्ध्वदेहिक करूं नये." **पृथ्वीचंद्रोदयांत बौधायन**—"पुत्रांचें श्राद्ध कधींही पित्यानें करूं नये. कनिष्ठभ्रात्यांचें श्राद्ध ज्येष्ठानें करूं नये. जर स्नेहानें ते ( पिता, ज्येष्ठभ्राता ) करितील तर सपिंडीकरणावांचून करावें. गयेमध्यें तर ज्येष्ठानें देखील विशेषतः करावें." अन्याच्या अभावीं पित्रादिकानें देखील करावें. कारण, "ज्याचा कोणी बांधव ( पुत्रादिक ) नाहीं अशा प्रेताचा, पित्यानें अथवा ज्येष्ठभ्रात्यानें किंवा मातेनें संस्कार करावा, हे त्या प्रेताचा संस्कार न करितील तर त्यांना मोठें पाप लागेल" अशी **सुमंतूची** उक्ति आहे.

ब्रह्मचारिणांतुशुद्धिविवेकेपृथ्वीचंद्रोदयेचब्राह्मे असमाप्तव्रतस्यापिकर्तव्यंब्रह्मचारिणः श्राद्धंतुमातापितृभिर्नतुतेषांकरोतिसः श्राद्धंमासिकाब्दिकादिसर्वंकार्यमित्यर्थः नत्वितिनिषेधोन्यसत्त्वे यत्तुछंदोगपरिशिष्टे नत्यजेत्सूतकेकर्मब्रह्मचारीस्वयंकचित् नदीक्षणात्परंयज्ञेनकृच्छ्रादितपश्चरन् पितर्यपिमृतेनैषांदोषोभवतिकर्हिचित् आशौचंकर्मणोंतेस्यात्र्यहंवाब्रह्मचारिणां यच्चयाज्ञवल्क्यः नब्रह्मचारिणःकुर्युरुदकंपतितास्तथेति तदप्यन्यसत्त्वे अन्याभावेतुब्रह्मचारिणापिकार्यं पूर्वोक्तवृद्धमनुवचनात् आचार्यपित्रुपाध्यायान्निर्हृत्यापिव्रतीव्रती संकटान्नंचनाश्नीयान्नचतैःसहसंवसेदितितेनैवोक्तेः ब्रह्मचारिणःशवकर्मणोव्रतान्निवृत्तिरन्यत्रमातापित्रोरितिवसिष्ठोक्तेः अत्राशौचमेकाहंवक्ष्यामः प्रागुपनयनान्मृतस्यतुपंचवर्षोत्तरंसपिंडीकरणवर्ज्यंषोडशश्राद्धादिसर्वंकार्यमित्युक्तंदेवजानीये असंस्कृतानांभूमौपिंडंदद्यात्संस्कृतानांकुशेष्वितिप्रचेतोवचनाच्च एतच्चाग्रेवक्ष्यामः ।

ब्रह्मचाऱ्यांचें तर **शुद्धिविवेकांत** आणि **पृथ्वीचंद्रोदयांत ब्राह्मांत** सांगतो—"ब्रह्मचाऱ्याचें व्रत समाप्त झालें नसून तो मृत होईल तर त्याचें श्राद्ध मातापितरांनीं करावें; पण मातापितरांचें श्राद्ध ( और्ध्वदेहिक ) तो ब्रह्मचारी करणार

---

१ मातापित्रोरुपाध्यायाचार्ययोरौर्ध्वदेहिकम् । कुर्वन्मातामहस्यापि व्रती न भ्रश्यते व्रतादितिचंद्रिकायां वृद्धमनूक्तेरित्यर्थः ।

नाहीं." या वचनांत श्राद्ध म्हणजे मासिक, आब्दिक वगैरे सर्व समजावें. आतां ब्रह्मचारी करणार नाहीं, हा जो निषेध तो दुसरा अधिकारी असतां समजावा. आतां जें **छंदोगपरिशिष्टांत**—"सूतकांत ( मृताशौचांत ) ब्रह्मचाऱ्यानें आपलें कर्म कधींही टाकूं नये. यज्ञामध्यें दीक्षा घेतल्यावर, तसेंच कृच्छ्रादि तप करीत असतां आशौच नाहीं, पिता जरी मृत झाला असेल तरी यांना कधींही दोष नाहीं. अथवा त्यांचें तें तें कर्म समाप्त झाल्यानंतर त्यांनीं आशौच धरावें. ब्रह्मचाऱ्यांनीं ब्रह्मचर्यव्रत समाप्त झाल्यानंतर तीन दिवस आशौच धरावें." आणि जें **याज्ञवल्क्य** सांगतो कीं, "ब्रह्मचाऱ्यांनीं मृताला उदक देऊं नये, तसेंच पतितांनींही देऊं नये." हें त्यांचें ( छंदोगपरिशिष्ट व याज्ञवल्क्य यांचें ) सांगणें अन्य अधिकारी असतां समजावें. दुसरा नसेल तर ब्रह्मचाऱ्यानें देखील मातापितरांचें कर्म करावें; कारण, अशाविषयीं पूर्वी **वृद्धमनूचें**[1] वचन सांगितलें आहे. आणि "आचार्य, पिता, उपाध्याय, यांचें प्रेत ब्रह्मचाऱ्यानें नेलें तरी तो व्रतापासून भ्रष्ट होत नाहीं, परंतु त्यानें आशौच्यांचें अन्न भक्षण करूं नये व त्यांच्याशीं स्पर्श करूं नये." असें त्यानेंच ( याज्ञवल्क्यानेंच ) सांगितलें आहे. तसेंच—"ब्रह्मचारी प्रेतकर्म करील तर तो व्रतापासून निवृत्त ( भ्रष्ट ) होतो, ही गोष्ट मातापितरांवांचून अन्य प्रेतकर्मांविषयीं समजावी" असें **वसिष्ठानें** सांगितलें आहे. प्रेतकर्मांविषयीं ब्रह्मचाऱ्याला आशौच एक दिवस आहे. तें पुढें ( आशौचप्रकरणांत ) सांगूं. पांच वर्षांनंतर उपनयनाच्या पूर्वी मृत झाला असतां त्याचें सपिंडीकरणरहित षोडशश्राद्धादिक सर्व कर्म करावें, असें **देवजानीयांत** सांगितलें आहे. आणि "ज्यांचा संस्कार झालेला नाहीं त्यांना भूमीवर पिंड द्यावा, संस्कार झालेल्यांना कुशांवर पिंड द्यावा" असें **प्रचेताचें**ही वचन आहे. हें पुढें ( आशौचप्रकरणीं ) सांगूं.

अविभक्तानांविशेषमाह**पृथ्वीचंद्रोदयेमरीचिः** बहवःस्युर्यदापुत्राःपितुरेकत्रवासिनः सर्वेषांतु मतंकृत्वाज्येष्ठेनैवतुयत्कृतं द्रव्येणचाविभक्तेनसर्वैरेवकृतंभवेत् ज्येष्ठस्यकर्तृत्वेपिसर्वेफलभागिनइत्यर्थः तेनयेब्रह्मचर्यपरान्नवर्जनादयःफलसंस्कारास्तेसर्वेषांभवंतीतिसिद्धम् संसृष्टिनामप्येवम् तुल्यत्वात् विभक्तानां विशेषमाह**उशनाः** नवश्राद्धंसपिंडत्वंश्राद्धान्यपिचषोडश एकेनैवतुकार्याणिसविभक्तधनेष्वपि **लघुहारीतः** सपिंडीकरणांतानियानिश्राद्धानिषोडश पृथङ्नैवसुताःकुर्युःपृथग्द्रव्याअपिकचित् ऊर्ध्वंसपिंडीकरणात्सर्वेकुर्युःपृथक्पृथक् **मदनरत्ने** विभक्तास्तुपृथक्कुर्युःप्रतिसंवत्सरादिकं एकेनैवाविभक्तेषुकृतेसर्वैस्तुतत्कृतम् एतेनाब्दिकादिष्वविभक्तानामनियमइतिवदन्**शूलपाणिः**परास्तः ।

## अविभक्तांना विशेष सांगतो—

**पृथ्वीचंद्रोदयांत मरीचि**—"जेव्हां बापाचे बहुत पुत्र असून ते एकत्र रहात असतील तेव्हां त्या सर्वांचें मत घेऊन ज्येष्ठ पुत्रानेंच समायिक द्रव्यानें जें और्ध्वदेहिक कर्म केलें तें सर्वांनीच केल्यासारखें होतें." म्हणजे ज्येष्ठानें केलें असलें तरी त्याचें फळ सर्वांना मिळतें, असा इत्यर्थ आहे, त्यामुळें ब्रह्मचर्य परान्नवर्जन इत्यादिक होणारे संस्कार ते सर्वांना होतात, असें सिद्ध झालें. संसृष्टि ( पूर्वी विभक्त असून नंतर एकत्र झालेले ) जे त्यांना देखील असेंच समजावें. कारण, ते यांच्यासारखेच आहेत. **विभक्तांना** विशेष सांगतो **उशना**—"भ्राते विभक्त असले तरी नवश्राद्ध ( दशाहांत होणारें ), सपिंडीकरण आणि षोडशश्राद्धें हीं एकानेंच करावीं." **लघुहारीत**—"पुत्र वेगवेगळे द्रव्य घेऊन राहणारे असले तरी त्यांनीं सपिंडीकरणापर्यंत होणारीं षोडश श्राद्धें कधींही वेगवेगळीं करूं नयेत. सपिंडीकरणानंतरचीं श्राद्धें सर्वांनीं वेगवेगळीं करावीं." **मदनरत्नांत** सांगतो—"विभक्त असतील त्यांनीं प्रतिसांवत्सरादिक श्राद्ध वेगवेगळें करावें. आणि अविभक्त असतील तर एकानेंच केलें असतां तें सर्वांनीं केल्यासारखें होतें" असें सांगितल्यामुळें 'आब्दिकादिश्राद्धाविषयीं अविभक्तांस—एकानेंच करावें असा नियम नाहीं. असें सांगणारा **शूलपाणि** परास्त ( खंडित ) झाला.

दत्तकस्तुजनकस्यपुत्राद्यभावेद्द्यान्नतत्सत्त्वे गोत्ररिक्थेजनयितुर्नभजेद्दत्रिमःसुतः गोत्ररिक्थानुगःपिंडोव्यपैतिददतःस्वधेति**मनूक्तेः** इदंजनकस्यपुत्रसत्त्वविषयम् एतच्च**प्रवरमंजर्यां कात्यायनलौगाक्षि**भ्यांस्पष्टमुक्तं अथयेदत्तकक्रीतकृत्रिमपुत्रिकापुत्राः परपरिग्रहेणानार्षेयाजातास्तेद्व्यामुष्यायणाभवंति यथाशौंगशैशिरीणांयानिचान्यान्येवंसमुत्पत्तीनिकुलानिभवंतीत्यादिनाद्वयोःपित्रोःप्रवरानुक्त्वोक्तम् अथयएषांस्वासु भार्यास्वपत्यंनस्याद्रिक्थंहरेयुःपिंडंचैभ्यस्त्रिपुरुषंदद्युर्येषुभयोर्नस्यादुभाभ्यामेवदद्युरेकस्मिन्श्राद्धेपृथगुद्दिश्यैकपिंडेद्वावनुकीर्तयेत्परिगृहीतारंचोत्पादयितारंचातृतीयात्पुरुषादिति **हेमाद्रौकार्ष्णाजिनिः** यावंतःपितृ-

---

[1] माता, पिता, उपाध्याय, आचार्य आणि मातामह यांचें और्ध्वदेहिक करणारा ब्रह्मचारी आपल्या ब्रह्मचर्यव्रतापासून भ्रष्ट होत नाहीं, असें चंद्रिकेंत वृद्धमनुवचन आहे.

वर्ग्याःस्युस्तावद्भिर्दत्तकादयः प्रेतानांयोजनंकुर्युःस्वकीयैःपितृभिःसह द्वाभ्यांसहाथतत्पुत्राःपौत्रास्त्वेकेनतत्समं चतुर्थपुरुषेछंदस्तस्मादेषत्रिपूरुषी साधारणेषुकालेषुविशेषोनास्तिवर्गिणाम् मृताहेत्वेकमुद्दिश्यकुर्युः श्राद्धंयथाविधीति अस्यार्थमाह **हेमाद्रिः** दत्तकादयःजनकपालकयोःकुलेप्रेतानांस्ववर्गीयैःसपिंडनंकुर्युः दत्तकानांपुत्रास्तुपितुर्दत्तकस्यपितृभ्यांजनकपालकाभ्यांस्वपितामहाभ्यांसपिंडनंकुर्युः तेषांपौत्राः स्वपितरंदत्तकेनपितामहेनतज्जनकेनचसपिंडयेयुः चतुर्थोपितत्कुलस्थएव तेषांप्रपौत्रस्तुदत्तकस्यप्रपितामहस्यपालककुलस्थं चतुर्थंयोजयेन्नवा छंदइच्छा दर्शमहालयादौतुद्वयोःपित्रोःपितामहयोःप्रपितामहयोर्वाश्राद्धंदेयं तत्रद्वयोःपित्राद्योःपृथक्पिंडदानंद्वयोरुद्देशेनैकोवेति **अत्रकेचित्** आवयोरयमितिपरिभाष्ययोदत्तस्तस्येदंद्वयोःपित्रोःश्राद्धं यस्त्वपरिभाष्यदत्तःसग्रहीतुरेव सपालकायैवदद्यादित्याहुः अत्रमूलंतएवप्रष्टव्याः ।

## आतां दत्तकादिकांविषयीं सांगतो—

दत्तकपुत्रानें तर जनक पित्याला पुत्रादिक नसतां त्याचें श्राद्धादिक करावें, पुत्रादि असतील तर त्याचें श्राद्धादि करूं नये. कारण, "दत्तक पुत्राला जनकपित्याचें गोत्र व द्रव्य प्राप्त होत नाहीं; गोत्र व धन यांना अनुसरून असणारा पिंड व स्वधाशब्द ( श्राद्ध ) तो पुत्र देणारास ( जनक पित्यास ) प्राप्त होत नाहीं" असें **मनूचें** वचन आहे. हें मनुवचन जनकाला पुत्र असतां समजावें. ह्या प्रकार **प्रवरमंजरींत कात्यायन** व **लौगाक्षि** यांनीं स्पष्ट सांगितला आहे; तो असा— "आतां जे दत्तक, क्रीत, कृत्रिम, व पुत्रिकापुत्र हे दुसऱ्यानें घेतल्यामुळें अनार्षेय ( प्रवररहित ) झाले ते द्व्यामुष्यायण ( द्विगोत्री ) होतात; जशीं-शौंगशैशिरींचीं[1] कुळें झालीं आहेत; त्याचप्रमाणें दुसरीं देखील अशींच उत्पन्न झालेलीं कुळें द्विगोत्र होतात." इत्यादि ग्रंथानें दोन्ही पित्यांचे प्रवर सांगून पुढें सांगितलें कीं, "आतां जर ह्यांना ( पित्यांना ) स्वकीय भार्यांचे ठायीं अपत्य नसेल तर ज्यांना नसेल त्यांचें द्रव्य ह्या दत्तकादिकांनीं घ्यावें, आणि त्यांना पिंड त्रिपुरुषपर्यंत द्यावा; जर दोन्ही पित्यांना ( जनक व पालक यांना ) अपत्य नसेल तर दोघांनाही पिंड द्यावा; एका श्राद्धांत दोघांचा वेगवेगळा उच्चार करून एकपिंडाचे ठायीं ग्रहीता व उत्पादयिता ह्या दोन्ही पित्यांचें अनुकीर्तन करावें. याप्रमाणें त्रिपुरुषपर्यंत करावें." **हेमाद्रींत कार्ष्णाजिनि**—"दत्तकादिकांनीं जितके पितृवर्गांतील असतील तितक्या स्वकीय पितरांसहवर्तमान प्रेतांचें संयोजन ( सपिंडन ) करावें. दत्तकादिकांच्या पुत्रांनीं आपल्या पित्यांचें ( दत्तकादिकांचें ) दोघां ( जनकपालकां ) सहवर्तमान सपिंडन करावें. दत्तकादिकांच्या पौत्रांनीं तर आपल्या पित्याचें ( दत्तकादिकांच्या पुत्राचें ) एकासह ( दत्तकादिसह ) सपिंडन करावें. चवथ्या पुरुषाचे ठायीं जशी इच्छा असेल त्याप्रमाणें ( दत्तकादि प्रपौत्रानें ) करावें; चवथ्या पुरुषास नियम नाहीं म्हणून ही त्रिपूरुषी आहे. साधारण जे काल ( अमावास्यादिक ) त्यांचे ठायीं जनकवर्गाचें किंवा पालकवर्गाचें करावें, याविषयीं विशेष सांगितला नाहीं. मृतदिवशीं मात्र जो मृत असेल त्या एकाच्या उद्देशानें यथाविधि श्राद्ध करावें." ह्या ( वर लिहिलेल्या अर्थाच्या ) **कार्ष्णाजिनि**वचनांचा अर्थ सांगतो **हेमाद्रि**—"दत्तकादिकांनीं जनक व पालक ह्या दोघांच्या कुळांत जे मृत असतील त्यांचें आपआपल्या वर्गांतील पितरांशीं सपिंडन करावें. दत्तकांच्या पुत्रांनीं तर आपला पिता जो दत्तक त्याचें, जनकपिता आणि पालकपिता म्हणजे आपले पितामह त्यांसहवर्तमान सपिंडन करावें. त्यांच्या ( दत्तकांच्या ) पौत्रांनीं आपल्या पित्याचें, दत्तक जो पितामह त्यासह आणि त्याच्या जनकासह सपिंडन करावें. चवथा देखील त्याच कुळांतला समजावा. दत्तकांच्या प्रपौत्रानें तर दत्तक जो प्रपितामह त्याला पालककुलस्थ चतुर्थ मिळवावा किंवा न मिळवावा. यांविषयीं त्याची इच्छा नियामक आहे. दर्श महालय इत्यादिकांचे ठायीं तर दोन पिते, दोन पितामह व दोन प्रपितामह यांना श्राद्ध द्यावें. ह्या वाक्यांत 'वा' आहे त्यानें विकल्प बोधित होतो. त्या श्राद्धांत दोन जे पित्रादिक त्यांच्या उद्देशानें वेगवेगळे पिंड द्यावे, अथवा दोघांच्या उद्देशानें एक पिंड द्यावा. असा हेमाद्रीनें केलेला अर्थ समजावा.[2] या ठिकाणीं **कोणी** असें म्हणतात कीं, 'ह्या दोघांचा हा' अशी बोली करून जो पुत्र दिला आहे त्याला, हें दोन पितरांना ( जनक पालकांना ) श्राद्ध द्यावें, म्हणून सांगितलें. जो पुत्र बोली केल्यावांचून दिलेला आहे, तो ग्राहकाचाच पुत्र होय म्हणून त्यानें पालकालाच ( ग्राहकालाच ) श्राद्ध द्यावें, असें कोणी सांगतात. तें असें सांगण्याविषयीं मूलवचन कोणतें आहे तें त्यांनाच विचारावें.

वस्तुतस्तुजनकस्यपुत्रपत्न्याद्यभावेदत्तकोद्वयोर्दद्यादन्यथापालकायैव प्रागुक्तकात्यायनवचनात् **मानवीय**मप्येतद्विषयमेव गोत्रंतुश्राद्धेपालकस्यैव विवाहादौतूभयोरित्यादिमत्कृत**प्रवरदर्पणे**ज्ञेयम् यस्तुमूल्य-

---

१ भारद्वाज गोत्रांतील शुंगापासून विश्वामित्र गोत्रांतील शैशिरीचे क्षेत्रांत झालेला जो ऋषि तो **शौंगशैशिरि** होय. हा द्विगोत्र म्हणजे भारद्वाज आणि विश्वामित्र ह्या दोन गोत्रांचा आहे. २ हेमाद्रीनें केलेल्या अर्थांत बरेच संशय आहेत. याकरितां जसा **देशाचार असेल त्याप्रमाणें करावें.**

क्रीतायांपरभार्यायांदास्यांचोत्पन्नःसबीजिनएवदद्यात् मूल्यंविनास्वयमुपनतायांतुक्षेत्रिणएव तदुक्तंपृथ्वी-चंद्रोदयेकौर्मे अनियोगात्सुतोयस्तुशुल्कतोजायतेत्विह प्रदद्याद्बीजिनेपिंडंक्षेत्रिणेतुततोन्यथेति क्षेत्रजादे-र्विशेषस्तुकलौतदभावान्नोच्यतइतिदिक् जारजानांविशेषमाहापरार्केनारदः जायंतेत्वनियुक्तायामेकेनब-हुभिस्तथा अरिक्थभाजस्तेसर्वेबीजिनामेवतेसुताः दद्युस्तेबीजिनेपिंडंमाताचेच्छुल्कतोहृता अशुल्कोपहृता-यांतुपिंडदावोढुरेवते ॥

वास्तविक म्हटलें तर जनकपित्याला पुत्र, पत्नी इत्यादिकांचा अभाव असतां दत्तकानें दोघांना ( जनकपालकांना ) श्राद्ध द्यावें, जनकाला पुत्रादिक असेल तर पालकालाच द्यावें. कारण, अशाविषयीं पूर्वी सांगितलेलें **कात्यायन**वचन आहे. आणि **मनु**वचन ( गोत्ररिक्थे० ) हेंही अशाविषयींच समजावें. श्राद्धामध्यें गोत्र तर पालकाचें घ्यावें. विवाहादिकांचे ठायीं तर दोघांचें घ्यावें, इत्यादिक विचार मीं केलेल्या **प्रवरदर्पणांत** आहे तो जाणावा. जो पुत्र द्रव्य देऊन विकत घेतलेल्या परस्त्रियेचे ठायीं आणि दासीचे ठायीं उत्पन्न झाला त्यानें, ज्याच्यापासून झाला असेल त्यालाच पिंड द्यावा. द्रव्य दिल्यावांचून आपण होऊन आलेल्या परस्त्रियेचेठायीं उत्पन्न झाला असेल त्यानें, ज्याची ती स्त्री असेल त्यालाच पिंड द्यावा. तो प्रकार सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत कौर्मांत**—"नियोगावांचून ( माझ्याठिकाणीं पुत्र उत्पन्न कर, असें सांगितल्यावांचून ) संभोगाचें मूल्य देऊन परस्त्रियेचेठायीं जो पुत्र उत्पन्न केला असेल त्यानें, ज्याच्या वीर्यापासून झाला असेल त्याला पिंड द्यावा. असें नसेल तर ज्याची ती स्त्री असेल त्याला त्या पुत्रानें पिंड द्यावा." क्षेत्रजादिकांचा विशेष प्रकार, कलियुगांत त्यांचा अभाव असल्यामुळें सांगत नाहीं. याप्रमाणें ही दिशा दाखविली आहे. जारापासून उत्पन्न झालेल्या पुत्रांचा विशेष-प्रकार **अपरार्कांत नारद** सांगतो—"नियोग न केलेल्या स्त्रियेचे ठायीं एकापासून किंवा बहुतांपासून पुत्र उत्पन्न होतात त्या सर्व पुत्रांना बापाचें ( ज्याची स्त्री त्याचें ) द्रव्य मिळणार नाहीं, तर ज्यांच्या बीजापासून झाले असतील त्यांचेच ते पुत्र होत. जर माता बापानें मूल्य देऊन ग्रहण केली आहे, तर तिच्या त्या पुत्रांनीं त्या बापाला ( ज्याचें बीज त्याला ) पिंड द्यावा. मूल्य दिल्यावांचून आपण होऊन आली असेल तर तिच्या त्या पुत्रांनीं ज्याची ती स्त्री त्यालाच पिंड द्यावा.

धर्मार्थश्राद्धकरणेफलमाह**चंद्रिकायांशातातपः** प्रीत्याश्राद्धंतुकर्तव्यंसर्वेषांवर्णलिंगिनाम् एवंकुर्व-न्नरःसम्यङ्महतींश्रियमाप्नुयात् गयायामपितत्रैव**ब्रह्मवैवर्ते** आत्मजोवाथवान्योपिगयाशीर्षेयदातदा यन्ना-म्नापातयेत्पिंडंतंनयेद्ब्रह्मशाश्वतम् एतच्चयदाफलभूमार्थिनाद्विस्त्रिर्वाक्रियतेतदाप्रेतशिलाश्राद्धवर्ज्यंकुर्यात्तस्यप्रे-तत्वविमोक्षार्थत्वात्तस्यचजातत्वादितिकेचिन् **वस्तुतस्तु**संन्यासिश्राद्धवदत्रापिसर्वंकार्यम् सांगेधिकारादि-तियुक्तंप्रतीमः संन्यस्तपित्रादिस्तुपितुःपित्रादिभ्यःसर्वश्राद्धेपुदद्यादित्युक्तंप्राक् वक्ष्यतेचजीवत्पितृकश्राद्धे ।

धर्मार्थ श्राद्ध केलें असतां त्याचें फळ **चंद्रिकेंत शातातप** सांगतो—"सर्व ब्राह्मणादिवर्णांचें श्राद्ध प्रीतीनें करावें. असें प्रीतीनें उत्तम प्रकारें श्राद्ध करणाऱ्या मनुष्याला मोठी संपत्ति प्राप्त होते." गयेंत देखील श्राद्ध केल्याचें फळ त्याच ग्रंथांत **ब्रह्मवैवर्तांत** सांगतो—"पुत्र अथवा दुसरा कोणीही गयाशीर्षाचे ठायीं ज्या वेळीं ज्याच्या नांवानें पिंडदान करील, त्या वेळीं त्याला तो शाश्वत अशा ब्रह्मपदाप्रत नेईल." हें गयाश्राद्ध जेव्हां फळ मोठें मिळावें अशा हेतूनें द्विवार किंवा त्रिवार करावयाचें असतें, तेव्हां प्रेतशिलाश्राद्ध वर्ज्य करून बाकीचें करावें. कारण, तें प्रेतशिलाश्राद्ध प्रेतत्वमोक्षासाठीं आहे, व तें पूर्वी एकवार झालेलें आहे, असें **कोणी** म्हणतात. वास्तविक म्हटलें तर संन्याशाच्या श्राद्धाप्रमाणें या ठिकाणीं देखील सर्व करावें. कारण, सांगकर्माविषयीं अधिकार आहे, असें हें योग्य आम्हीं समजतों. ज्याचा पिता संन्याशी आहे त्यानें तर सर्व श्राद्धांमध्यें आपल्या बापाच्या पितरांना पिंडादिक द्यावें; असें पूर्वी सांगितलें आहे. आणि जीवत्पितृकाच्या श्राद्ध-प्रकरणीं पुढेंही सांगूं.

अत्रस्त्रीशूद्राणांश्राद्धंमंत्रवर्ज्यंतूष्णींभवति स्त्रीणाममंत्रकंश्राद्धंतथाशूद्रासुतस्यच प्राग्द्विजाश्चव्रतादेशात्तेच-कुर्युस्तथैवतदिति **हेमाद्रौमरीचि**वचनात् अयमेवविधिःप्रोक्तःशूद्राणांमंत्रवर्जितः अमंत्रस्यतुशूद्रस्ययोमंत्रो-विप्रेणगृह्यतेइति**ब्राह्मोक्तेश्च** गृह्यतेसंबध्यते अस्यश्राद्धप्रकरणेपाठेपिपरिभाषात्वान्नप्रकरणेनसंकोचोयुक्तः तेनशूद्रस्यस्नानदानादावपिविप्रेणमंत्रपाठःकार्यः अमंत्रस्येतिविशेषणात्स्त्रियाअपीति**शूलपाणिः** यत्तुतेनो-क्तम् मंत्रजन्यनियमादृष्टसिद्धिस्तुनमस्कारेण अनुमतोस्यनमस्कारोमंत्रइति**गौतमोक्ते**रिति तन्न दृष्टद्वारे-वहिततत्प्राप्तिर्नस्वातंत्र्येण अन्यथानखविपूतेप्यवघातजन्यादृष्टार्थंसोपिक्रियेतेतियत्किंचिदेतत् तेनपितॄणांना-

सगोत्रतइत्यादौयत्रद्विजानामपिनाममंत्रउक्तस्तत्रप्रतिप्रसवमात्रार्थंयुक्तम् नतिलावपनादावपि **अत्रकेचित्** वैदिकमंत्रोविप्रस्य पौराणस्तुशूद्रैःपठनीयः नहिवेदेष्वधिकारःकचिच्छूद्रस्यविद्यते पुराणेष्वधिकारोमेदर्शितोब्राह्मणैरिहेतितत्रैवपाद्मोक्तेरित्याहुः **गौडा**अप्येवम् तन्न नाध्येतव्यमिदंशास्त्रंवृषलस्यतुसन्निधाविति **कौर्मे**पुराणनिषेधेनवेदस्यदूरापास्तत्वात् अध्येतव्यंब्राह्मणेनवैश्येनक्षत्रियेणच श्रोतव्यमेवशूद्रेणनाध्येतव्यंकदाचन श्रौतंस्मार्तंचवैधर्मंप्रोक्तमस्मिन्नृपोत्तम तस्माच्छूद्रैर्विनाविप्रंनश्रोतव्यंकदाचनेतितत्रैवपुराणाधिकारे **भविष्योक्तेश्च** एतेननाध्येतव्यमितिनिषेधोमंत्रेतरपुराणपरइतिश्रीदत्तादिमतमपास्तम् तेनपौराणमंत्राणामेवविप्रेणपाठोनवैदिकानामितिसिद्धम् द्विजस्त्रियस्तुसंकल्पमात्रंस्वयंकृत्वावैदिकमंत्रयुक्तंसर्वंब्राह्मणद्वाराकारयेयुरिति**प्रयोगपारिजातः** अतएवस्त्रीणामित्यकृतविवाहस्त्रीपरमिति**हेमाद्रि**राह अनुपनीतस्तुवैदिकमंत्रयुक्तंसर्वंस्वयमेवकुर्यादित्युक्तंप्राक् यत्तुप्राग्द्विजाश्चव्रतादेशादितितदशक्तविपयमचूडविषयंवेतिदिक् ।

## आतां स्त्रीशूद्रांविषयीं सांगतो—

स्त्रिया व शूद्र यांनीं करावयाचें श्राद्ध मंत्ररहित मुकाट्यानें ( केवळ तंत्रानें ) होतें. कारण, "स्त्रियांना श्राद्ध अमंत्रक आहे, तसेंच शूद्रापुत्रालाही अमंत्रक आहे. आणि उपनयन होण्याच्या पूर्वीचे जे द्विज( ब्राह्मणादिक ) त्यांनींही तें श्राद्ध तसेंच ( मंत्ररहित ) करावें" असें **हेमाद्रींत मरीचि**वचन आहे. आणि "हाच ( ब्राह्मणांना सांगितलेला ) विधि शूद्रांना मंत्रवर्जित सांगितला आहे. अमंत्रक जो शूद्र त्याचा मंत्र ब्राह्मणानें म्हणावा." असें **ब्राह्म**वचनही आहे. त्या वचनांत 'गृह्यते' याचा अर्थ संबद्ध होतो, असा आहे. हें वचन श्राद्धप्रकरणांत पठित असलें तरी परिभाषारूप असल्यामुळें श्राद्धप्रकरणांतच लागू होतें, असें म्हणणें योग्य नाहीं. तर इतर ठिकाणींही लागू होतें, म्हणून शूद्राच्या स्नान—दान इत्यादि कर्मांचे ठायीं देखील ब्राह्मणानें मंत्रपाठ करावा, असें आहे. वरील वचनांत 'अमंत्रस्य' असें विशेषण आहे, म्हणून मंत्ररहित ज्या स्त्रिया त्यांचाही मंत्र ब्राह्मणानें म्हणावा, असें **शूलपाणि** सांगतो. आतां जें त्या **शूलपाण्यानें** सांगितलें कीं, मंत्रापासून उत्पन्न होणारें जें नियमानें अदृष्ट ( अदृश्यफल ) त्याची सिद्धि तर त्या शूद्रादिकांना, नमस्कारानें होते. कारण, "त्या शूद्राला नमस्कारमंत्र हा सर्वांस अनुमत आहे" अशी **गौतमाची** उक्ति आहे. असें जें शूलपाण्याचें म्हणणें तें बरोबर नाहीं. कारण, दृष्टफलाच्या द्वारानेंच अदृष्टफलाची प्राप्ति होते, स्वातंत्र्यानें होत नाहीं. अर्थात् मंत्रोक्त कर्म स्मरून कर्म केलें असतां अदृष्टफलाची प्राप्ति होते, ती केवळ नमस्कारानें कशी होईल ? जर दृष्टफलावांचून स्वातंत्र्येंकरून अदृष्टाची प्राप्ति होत असेल, तर 'व्रीहीनवहंति' त्या वाक्यानें भात कांडून तांदूळ करून होमास घ्यावे असें सांगितलें आहे त्या ठिकाणीं नखांनीं सोलून तांदूळ झाले तरी, मुसळाच्या अवघातापासून उत्पन्न होणाऱ्या अदृष्टफलासाठीं, तोही मुसळाचा अवघात करावा, असें होईल ? म्हणून हें सांगणें काहीं तरी आहे. हें सांगणें योग्य नसल्यामुळें 'पितरांच्या नामगोत्रांचा उच्चार करून द्यावें' इत्यादि ज्या स्थळीं द्विजांना देखील नाममंत्र सांगितला आहे, त्या स्थळीं शूद्रादिकांना नाममंत्राचा निषेध येत होता, त्याचा प्रतिप्रसव ( बाध ) च करण्यासाठीं हें वचन युक्त आहे. तिलावाप करणें इत्यादि स्थळीं जो मंत्रनिषेध त्याचा बाध करण्यासाठीं हें वचन समजूं नये. या ठिकाणीं **कोणी** म्हणतात—वैदिकमंत्र ब्राह्मणाला आहे, पौराणमंत्र शूद्रांनीं म्हणावा. कारण, "वेदाविषयीं कोठेंही शूद्राला अधिकार नाहीं. पुराणाविषयीं मला ( शूद्रापुत्राला ) अधिकार ब्राह्मणांनीं येथें दाखविला आहे." अशी त्या ठिकाणींच ( हेमाद्रींत ) पाद्मोक्ति आहे, असें कोणी म्हणतात. **गौड** देखील असेंच म्हणतात. तें त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण, "हें शास्त्र शूद्राच्या संनिध म्हणूं नये" असा **कौर्मांत** पुराणाचा निषेध केल्यामुळें वेद तर दूरच राहिला. "हें शास्त्र ब्राह्मणानें म्हणावें; वैश्यानें व क्षत्रियानेंही म्हणावें; शूद्रानें केवळ ऐकावें, कधींही म्हणूं नये. हे राजा ! या ठिकाणीं श्रौत ( वैदिक ) आणि स्मार्त धर्म सांगितले आहेत; त्याकरितां कधींही ब्राह्मणावांचून शूद्रांनीं ऐकूं नये" असें त्याच ठिकाणीं पुराणाधिकारांत **भविष्य**वचनही आहे. असें सांगितल्यानें 'अध्ययन करूं नये, असा जो निषेध तो मंत्रावांचून इतर पुराणांविषयीं समजावा' असें श्रीदत्तादिकांचें मत अपास्त ( खंडित ) झालें. त्या वरील सांगण्यानें शूद्रादिकर्मांत पौराणमंत्रांचा ब्राह्मणानें पाठ करावा, वैदिकमंत्रांचा करूं नये, असें सिद्ध झालें. द्विजस्त्रियांनीं तर स्वतः केवळ संकल्प करून वैदिकमंत्रयुक्त सर्व कर्म ब्राह्मणांकडून करवावें, असें **प्रयोगपारिजात**कार सांगतो. स्त्रियांचें समंत्रक कर्म ब्राह्मणांकडून होतें, म्हणूनच 'स्त्रीणाममंत्रकं०' त्या वचनांतील 'स्त्रीणां' हें पद अविवाहित स्त्रियांचें बोधक आहे, असें **हेमाद्रि** सांगतो. अनुपनीत ( मुंज न झालेल्या ) पुत्रानें तर वैदिक मंत्रयुक्त सर्व कर्म स्वतःच करावें, असें पूर्वी सांगितलें. आतां जें 'प्राग्द्विजाश्च०' मुंजीच्या पूर्वी द्विजांनीं अमंत्र करावें, असें जें वरील मरीचिवचन हें शक्ति नसेल त्याविषयीं अथवा चूडाकर्म झालें नसेल त्याविषयीं समजावें, अशी ही दिशा दाखविली आहे.

शूद्रस्यतुसदामश्राद्धमेव सदाचैवतुशूद्राणामामश्राद्धंविधीयतइतिसुमंतूक्तेः **पृथ्वीचंद्रोदयेमात्स्येपि** एवंशूद्रोपिसामान्यंवृद्धिश्राद्धंचसर्वदा नमस्कारेणमंत्रेणकुर्यादामान्नवत्सदा तत्रैव**वृद्धपराशरः** आमान्नेनतुशूद्रस्यतूष्णींतुद्विजपूजनं कृत्वाश्राद्धंतुनिर्वाप्यसजातीनाशयेदथ सएव आमंशूद्रस्यपक्वान्नंपक्वमुच्छिष्टमुच्यते **हेमाद्रौभविष्ये** धर्मेप्सवस्तुधर्मज्ञायदिशूद्राःप्रकुर्वते अग्नौकरणमंत्रश्चनमस्कारोविधीयते आवाहनादिकर्तव्यंयथाशूद्रेणतच्छृणु देवानांदेवनाम्नातुपितॄणांनामगोत्रतः पिंडादीन्निर्वपेद्वीरनामतोगोत्रतस्तथा शूद्राणांगोत्राभावेपिकाश्यपंगोत्रंज्ञेयम् तस्मादाहुःसर्वाःप्रजाःकाश्यप्यइति**श्रुतेः** गोत्रनाशेतुकाश्यपइति**व्याघ्रपादोक्तेश्चेतिहेमाद्रिः** एवमन्यत्रगोत्राज्ञानेएवंतर्पणादिषुज्ञेयम् तत्रैव**भविष्ये** शूद्रस्तुगृहपाकेननपिंडान्निर्वपेत्तथा सक्तुमूलंफलंतस्यपायसंवाभवेत्स्मृतम् **गौतमः** अनुमतोस्यनमस्कारोमंत्रइति देवताभ्यःपितृभ्यश्चेत्ययंनमस्कारमंत्रइतिकेचित् **विज्ञानेश्वरोप्येवमाह हेमाद्रिस्तु** शूद्रोप्यमंत्रवत्कुर्यादनेनविधिनाबुधइति**मात्स्ये**मंत्रनिषेधान्नाममंत्रेणेत्याह **पृथ्वीचंद्रोदयेस्कांदे** राजकार्येनियुक्तस्यबंधनिग्रहवर्तिनः व्यसनेषुचसर्वेषुश्राद्धंविप्रेणकारयेत् यत्तु**भारते**राजधर्मेषु यवनाःकिरातागांधाराश्चीनाःशबरबर्बराः शकास्तुषाराःकंकाश्चपह्लवाश्चांध्रमद्रकाइत्युक्त्वा ब्रह्मक्षत्रप्रसूताश्चवैश्याःशूद्राश्चमानवाः कथंधर्मांश्चरिष्यंतिसर्वेविषयवासिनः इतिचोक्त्वा वेदधर्मक्रियाश्चैवतेषांधर्मोविधीयते पितृयज्ञास्तथाकूपाःप्रपाश्चशयनानिच दानानिचयथाकालंद्विजेभ्योविसृजेत्सदा तथा दक्षिणासर्वयज्ञानांदातव्याभूतिमिच्छता पाकयज्ञामहार्हाश्चकर्तव्याःसर्वदस्युभिरितिम्लेच्छादीनांश्राद्धविधानम् तदपिसजातीयभोजनद्रव्यदानादिपरंनतुश्राद्धपरमिति इतिश्रीनारायणभट्टसूरिसूनुरामकृष्णभट्टात्मजकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौअधिकारनिर्णयः ॥

## आतां शूद्रांचा श्राद्धविधि सांगतों—

शूद्राला तर सदा आमश्राद्धच आहे. कारण, "शूद्रांना तर सर्वकाळ आमश्राद्धच सांगितलें आहे." असें **सुमंतूचें** वचन आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत मात्स्यांतही** सांगतो—"ह्याप्रमाणें शूद्रानेंही सर्वदा सामान्यश्राद्ध व वृद्धिश्राद्ध हें नमस्कारमंत्रानें, आमान्नानें सर्वकाळ करावें." त्याच ठिकाणीं **वृद्धपराशर**—"शूद्रानें आमान्न देऊन ब्राह्मणांचें मंत्ररहित पूजन करून श्राद्ध समाप्त करून नंतर आपल्या ज्ञातीला भोजन घालावें." तोच **पराशर** सांगतो—"शूद्राचें आमान्न म्हणजे पक्वान्न होय आणि पक्वान्न म्हणजे उच्छिष्ट म्हटलें आहे." **हेमाद्रींत भविष्यांत** सांगतो—"धर्म जाणणारे व धर्माची इच्छा करणारे असले शूद्र जर श्राद्ध करीत असतील, तर त्यांना अग्नौकरणाविषयीं मंत्र नमस्कार सांगितला आहे. शूद्रानें आवाहनादिक कसें करावें, तें सांगतों, ऐक! देवांचें आवाहनादिक देवांच्या नामानें करावें, आणि पितरांचें नामगोत्रानें करावें. नांवाचा व गोत्राचा उच्चार करून पिंडादिक द्यावे." शूद्रांना गोत्राचा अभाव असला तरी काश्यपगोत्र जाणावें. कारण, "सर्व प्रजा कश्यपाच्या आहेत असें सांगतात" अशी **श्रुति** आहे. "गोत्र नसेल त्या ठिकाणीं काश्यप समजावें." अशी **व्याघ्रपादाचीही** उक्ति आहे, असें **हेमाद्रि** सांगतो. असेंच दुसऱ्या ठिकाणीं गोत्राचें ज्ञान नसेल तेथें समजावें. याचप्रमाणें तर्पणादिविषयीं समजावें. त्या ठिकाणींच **भविष्यांत** सांगतो—"शूद्रानें घरांत शिजविलेल्या अन्नानें पिंड देऊं नयेत. सातू ( जवांचें पीठ ), अथवा मूळें, फळें, पायस यांचे त्यानें पिंड द्यावे." **गौतम**—"ह्या शूद्राला नमस्कारमंत्र सांगितला आहे." 'देवताभ्यः पितृभ्यश्च' हा नमस्कारमंत्र असें केचित् म्हणतात. **विज्ञानेश्वरही** असेंच सांगतो. **हेमाद्रि** तर "शूद्रानेंही अमंत्रक ह्या ( पूर्वोक्त ) विधीनें करावें." ह्या **मत्स्यपुराण**वचनांत मंत्राचा निषेध असल्यामुळें नाममंत्रानें करावें, असें सांगतो. **पृथ्वीचंद्रोदयांत स्कांदांत**—"राजकार्याविषयीं नियुक्त ( आज्ञा केलेला ), तसाच बंदींत, अटकाव इत्यादिकांत असलेला, व कोणत्याही संकटांत असलेला त्यानें श्राद्ध ब्राह्मणाकडून करवावें." आतां जें **भारतांत राजधर्मांत**—"यवन, किरात, गांधार, चीन, शबर, बर्बर, शक, तुषार, कंक, पल्हव, आंध्र, मद्रक" असें सांगून "ब्राह्मण व क्षत्रिय यांपासून उत्पन्न झालेले तसेच वैश्य व शूद्र हे सर्व मनुष्य देशांमध्यें राहणारे आहेत, यांनीं कसे धर्म आचरण करावे?" असेंही बोलून पुढें सांगतो—"वेदप्रोक्त धर्म व क्रिया हा त्यांना धर्म सांगितला आहे. तो असा—त्यांनीं पितृयज्ञ ( श्राद्धें ) करावे, विहिरी बांधाव्या, पाणपोई घालाव्या, धर्मशाळा बांधाव्या, ब्राह्मणांस योग्य कालीं सर्वदा दानें द्यावीं, तसेंच सर्व यज्ञांची दक्षिणा त्यांनीं द्यावी, महायोग्य असे जे पाकयज्ञ ते त्या सर्व दस्यूंनीं ( म्लेच्छादिकांनीं ) करावे" ह्या वचनानें म्लेच्छादिकांना श्राद्ध सांगितलें आहे तेंही आपआपल्या ज्ञातीला भोजन, द्रव्यदान वगैरे करावें अशा अर्थाचें आहे, असें समजावें. श्राद्ध करावें, अशा अर्थाचें समजूं नये.

**इति श्रीनिर्णयसिंधौ अधिकारनिर्णये भाषाटीका समाप्ता ।**

**अथपितरः हेमाद्रौमात्स्यदेवलौ** नामगोत्रंपितॄणांतुप्रापकंहव्यकव्ययोः अग्निष्वात्तादयस्तेषामाधिपत्येव्यवस्थिताः नाममंत्रास्तदादेशाभवांतरगतानपि प्राणिनःप्रीणयंत्येवतदाहारत्वमागतान् देवोयदिपिताजातःशुभकर्मानुयोगतः तस्यान्नममृतंभूत्वादेवत्वेप्यनुगच्छति गांधर्वेभोगरूपेणपशुत्वेचतृणंभवेत् श्राद्धान्नं वायुरूपेणनागत्वेप्युपतिष्ठति पानंभवतियक्षत्वेराक्षसत्वेतथामिषम् दनुजत्वेतथामद्यंप्रेतत्वेरुधिरोदकम् मनुष्यत्वेन्नपानादिनानाभोगकरंभवेत् अत्रपित्रादिशब्दैर्जनकादीनामेवदेवतात्वमुच्यते नवस्वादीनाम् असावेततेइतियजमानस्यपित्रेइतिश**तपथश्रुतेः** यस्यपिताप्रेतःस्यात्सपित्रेपिंडंनिधायेति**विष्णवादिस्मृतेश्च** यत्तु**मनुदेवलौ** वसवःपितरोज्ञेयारुद्राज्ञेयाःपितामहाः प्रपितामहास्तथादित्याःश्रुतिरेषासनातनी **यच्च याज्ञवल्क्यः** वसुरुद्रादितिसुताःपितरःश्राद्धदेवताइति तदभेदध्यानार्थं यानितु**हेमाद्रौनंदिपुराणे** विष्णुःपितास्यजगतोदिव्योयज्ञःसएवच ब्रह्मापितामहोज्ञेयोह्यहंचप्रपितामहइति **यच्चभविष्ये** अनिरुद्धः स्वयंज्ञेयःप्रद्युम्नश्चपितास्मृतः संकर्षणस्तज्जनकोवासुदेवस्तुतत्पिता स्वयंकर्ता **यत्तुतत्रैव** प्रथमोवरुणोज्ञेयः प्राजापत्यस्तथापरः तृतीयोग्निःस्मृतःपिंडोह्येषपिंडविधिःस्मृतः **यच्चमनुः** सोमपानामविप्राणांक्षत्रियाणांहविर्भुजः वैश्यानामाज्यपानामशूद्राणांतुसुकालिनः **यच्चादित्यपुराणे** मासाश्चपितरोज्ञेयाऋतवश्चपितामहाः संवत्सरःप्रजानांचसुष्टेकःप्रपितामहः **यच्चनंदिपुराणे** अग्निष्वात्ताब्राह्मणानांपितरःपरिकीर्तिताः राज्ञांबर्हिषदोनामविशांकाव्याःप्रकीर्तिताः सुकालिनस्तुशूद्राणांव्यामाम्लेच्छांत्यजातिपु अत्रावाहनादिषुपित्रादयः समुच्चयेनविकल्पेनवायथाचारंतत्तद्देवतारूपेणवाच्याइति**हेमाद्र्यादयः** ॥

## आतां पितर सांगतो—

**हेमाद्रींत मात्स्य व देवल**—"पितरांस हव्य कव्य ( अन्नादिक ) प्राप्त करून देणारें त्यांचें नाम व गोत्र आहे. पितरांचे अधिकारी ( न्याय मनसुबा वगैरे व्यवस्था करणारे ) अग्निष्वात्तादि पितर आहेत. नाममंत्र हे त्या अग्निष्वात्तादिकांचे आदेश ( आज्ञा ) होत. ते नाममंत्र दुसऱ्या जन्मांत गेलेल्या देखील प्राण्यांस संतुष्ट करितात. कारण, नाममंत्राच्या योगानें तें श्राद्धान्न त्यांचा आहाररूप होतें, तें येणेंप्रमाणें—जर पिता आपल्या पुण्यकर्माच्या योगानें देव झाला, तर त्याला दिलेलें श्राद्धान्न तें अमृत होऊन देवपणींही त्याला प्राप्त होतें. गंधर्व झाला असेल तर श्राद्धान्न भोगरूपानें प्राप्त होतें. पशु झाला असेल तर तृण होऊन त्याला प्राप्त होतें. सर्प झाला असेल तर श्राद्धान्न वायुरूपानें प्राप्त होतें. यक्ष झाला असतां श्राद्धान्न पान होतें. राक्षस झाला असतां मांस होतें. दैत्य झाला असतां मद्य होतें. प्रेत झाला असतां रक्तोदक होतें. मनुष्य झाला असतां तें श्राद्धान्न अन्नपानादि अनेक भोग देणारें होतें." ह्या श्राद्धप्रकरणीं पिता इत्यादि शब्दांनीं जनकादिकांनाच देवतात्व सांगितलें आहे. वसु, रुद्र इत्यादिकांना देवतात्व नाहीं. कारण "हा पिंड, हें उदक तुला, हें सांगणें यजमानाच्या पित्याला" अशी **शतपथश्रुति** आहे. आणि "ज्याचा पिता मृत असेल त्यानें आपल्या पित्याला पिंड देऊन" अशी **विष्णु** इत्यादिकांची स्मृतिही आहे. अतां जें **मनु व देवल** सांगतात—"वसु हे पितर, रुद्र हे पितामह, आणि आदित्य हे प्रपितामह जाणावे, अशी सनातन श्रुति आहे." आणि जें **याज्ञवल्क्य** सांगतो— "वसु, रुद्र, आदित्य हे श्राद्धदेवता पितर आहेत" तें मनु देवल याज्ञवल्क्य यांचें सांगणें, पित्रादिकांचे ठायीं वस्वादिकांच्या अभेदाचें ध्यान करण्यासाठीं आहे. आतां जीं वचनें—**हेमाद्रींत नंदिपुराणांत**—"ह्या जगाचा पिता विष्णु, तोच दिव्य यज्ञ आहे. ब्रह्मा पितामह, आणि मी ( शिव ) प्रपितामह होय." आणि जें **भविष्यांत**—"अनिरुद्ध हा आपण ( यजमान ), प्रद्युम्न हा पिता, संकर्षण हा पितामह, आणि वासुदेव हा प्रपितामह." आतां जें तेथेंच सांगतो—"पिंडाविषयीं प्रथम ( देवता ) वरुण, दुसरा प्राजापत्य, तिसरा अग्नि, हा पिंडांचा विधि म्हटला आहे." आणि जें **मनु**—"ब्राह्मणाचे पितर सोमप, क्षत्रियांचे पितर हविर्भुज, वैश्यांचे पितर आज्यप, शूद्रांचे पितर सुकालि." आणि जें **आदित्यपुराणांत**—"मास हे पितर, ऋतु हे पितामह, संवत्सर हा सर्व प्रजांचा एक प्रपितामह होय." आणि जें **नंदिपुराणांत**—"ब्राह्मणांचे पितर अग्निष्वात्त, राजांचे पितर बर्हिषद, वैश्यांचे पितर काव्य, शूद्रांचे पितर सुकालि, म्लेच्छ व अंत्यज यांचे पितर व्याम होत." त्या नंदिपुराणादिवचनाची व्यवस्था—श्राद्धांत आवाहनादिकांत-पित्रादिकांचा उच्चार करून त्या त्या पितरांच्या देवतारूपानें देशाचारकुलाचाराप्रमाणें समुच्चयानें विष्णु, प्रद्युम्न इत्यादिकांचा उच्चार करावा, अथवा विकल्पानें विष्णवादिकांचा उच्चार करावा, असें **हेमाद्रि**प्रभृति ग्रंथकार सांगतात.

**हेमाद्रौब्राह्मे** पार्वणंकुरुतेयस्तुकेवलंपितृहेतुकम् मातामहंनकुरुतेपितृहासप्रजायते **धौम्यः** पितरोयत्रपूज्यंतेतत्रमातामहाध्रुवम् अविशेषेणकर्तव्यंविशेषान्नरकंव्रजेत् अस्यापवादमाह**कात्यायनः** कर्षूस-

मन्वितंमुक्त्वातथाद्यंश्राद्धषोडशम् प्रत्याब्दिकंचशेषेषुपिंडाःस्युःषडितिस्थितिः कर्षूसमन्वितंसपिंडीकरणम् दर्शादौसपत्नीकानामेवदेवतात्वम् स्वेनभर्त्रासमंश्राद्धंमाताभुंक्तेसुधासमं पितामहीचस्वेनैवतथैवप्रपितामहीति **तत्रैवोक्तेः चंद्रिकायांचतुर्विंशतिमते** क्षयाहंवर्जयित्वैकंस्त्रीणांनास्तिपृथक्क्रिया केचिदिच्छंतिनारीणांपृथक्श्राद्धंमहर्षयः अन्वष्टकासुवृद्धौचगयायांचक्षयेहनि अत्रमातुःपृथक्श्राद्धमन्यत्रपतिनासहेति**कात्यायनोक्तेश्च** अस्यनिर्मूलतांवदंतोगौडास्त्वज्ञाएव अत्रभागइत्यध्याहारः अन्यथासपतिकायैमात्रेइतिप्रयोगापत्तेः अत्रमातृशब्दोजनन्यामेवमुख्यः तेनसपत्नमातृभ्योनदद्यात् एवंपितामह्यादिशब्दैःपितृजनन्यादयएवोच्यंतेइतितत्सपत्नीभ्योनदेयमिति**हेमाद्रिः** कारुण्येनतुमहालयादौदेयमितिसएव ।

**हेमाद्रींत ब्राह्मांत**—"जो मनुष्य केवळ पिता, पितामह, प्रपितामह यांचेंच पार्वण करितो, मातामहादिकांचें करीत नाहीं, तो पितृघातक होतो." **धौम्य**—"ज्या ठिकाणीं पितरांची पूजा करावयाची त्या ठिकाणीं मातामहांचीही पूजा करावी. पितर व मातामह यांत भेद करील तर नरकास जाईल." त्याचा अपवाद सांगतो **कात्यायन**—"कर्षूनें युक्त असलेलें श्राद्ध, ( सपिंडीकरण ) पहिलीं षोडशश्राद्धें ( मासिकें ) आणि प्रतिसांवत्सरिक श्राद्ध हीं वर्ज्यकरून इतर श्राद्धांमध्यें पिंड सहा करावे, अशी शास्त्रमर्यादा आहे." दर्शादि श्राद्धांमध्यें पित्रादिकांना सपत्नीकांनाच देवतात्व आहे, म्हणून माता इत्यादिकांना पृथक् पिंड नाहीं. कारण, "माता आपल्या पतीबरोबर अमृताप्रमाणें श्राद्ध भक्षण करिते, पितामही आपल्या पतीबरोबर व प्रपितामही आपल्या पतीबरोबर सेवन करिते." असें त्याच ठिकाणीं हेमाद्रींत उक्त आहे. **चंद्रिकेंत चतुर्विंशतिमतांत**—"एक संवत्सर दिवस ( सांवत्सरिक ) वर्ज्य करून स्त्रियांना पृथक् श्राद्ध नाहीं, कोणी महर्षि स्त्रियांना पृथक् ( वेगळें ) श्राद्ध आहे असें म्हणतात. अन्वष्टका ( भाद्रपद कृष्ण नवमीस वगैरे होणाऱ्या ), वृद्धिश्राद्ध, गया, आणि मृतदिवस इतक्या ठिकाणीं मातेला पृथक् ( वेगळा ) भाग आहे. इतर ठिकाणीं पतीसहवर्तमान मातेला श्राद्ध प्राप्त होतें" असें **कात्यायन**वचनही आहे. हें वचन निर्मूल असें म्हणणारे गौड तर अज्ञच आहेत. "अत्र मातुः पृथक्" या वचनांत 'भागः' असा अध्याहार करावा. म्हणजे वेगळा भाग आहे असा अर्थ समजावा. असा अर्थ केला नाहीं तर मातेला प्राधान्य बोधित होऊन 'सपतिकायै मात्रे' असा प्रयोग प्राप्त होईल. या वरील वचनांत मातृशब्दानें जननीच घ्यावी, असें आहे म्हणून सापत्न मातेला श्राद्ध देऊं नये. याप्रमाणें पितामही इत्यादि शब्दांनीं पित्रादिकांच्या जननीच घ्यावयाच्या आहेत म्हणून त्यांच्या सपत्नींना देऊं नये, असें **हेमाद्रि** सांगतो. महालयादिकांत दयेनें सापत्नमाता इत्यादिकांस द्यावें, असें तोच ( हेमाद्रि ) सांगतो.

अथविश्वेदेवाः **हेमाद्रौशंखबृहस्पती** इष्टिश्राद्धेक्रतुदक्षौसत्यौनांदीमुखेवसू नैमित्तिकेकामकालौकाम्येचधुरिलोचनौ पुरूरवार्द्रवौचैवपार्वणेसमुदाहृतौ **तत्रैव** उत्पत्तिंनामचैतेषांनविदुर्येद्विजातयः अयमुच्चारणीयस्तैःश्लोकःश्रद्धासमन्वितैः आगच्छंतुमहाभागाविश्वेदेवामहाबलाः येअत्रविहिताःश्राद्धेसावधानाभवंतुते इति इष्टिश्राद्धंश्राद्धंप्रतिरुचिरित्युक्तमिति**कल्पतरुः** आधानादिकर्मांगमित्यन्ये नैमित्तिकमेकोद्दिष्टम् एकोद्दिष्टंतुयच्छ्राद्धंतन्नैमित्तिकमुच्यते इति**भविष्योक्तेः** एतद्यद्यपि एकोद्दिष्टंदैवहीनमितितत्रविश्वेदेवनिषेधस्तथापिनवश्राद्धेद्वादशमासिकेचकामकालौज्ञेयौ नवश्राद्धंदशाहानिनवमिश्रंतुषड्ऋतून् अतःपरंपुराणंवैत्रिविधं श्राद्धमुच्यते यस्मिन्नवेपुराणेवाविश्वेदेवानलेभिरे आसुरंतद्भवेच्छ्राद्धंवृषलमंत्रवर्जितमिति**बह्वृचपरिशिष्टात्** एतच्चबह्वृचानामेव तेषामेवोक्तेः अन्येषांतुनात्रविश्वेदेवाइति**कात्यायनोक्ते**स्तन्निषेधएवेति**पृथ्वीचंद्रोदयः** **अन्येतु**नैमित्तिकंसपिंडीकरणमाहुः **भविष्ये** यद्यप्येकोद्दिष्टंतच्छब्देनोक्तंतथापि तदप्यदैवं कर्तव्यमयुग्मान्भोजयेद्द्विजानितितत्रैवविश्वेदेवनिषेधात् यद्यपिसपिंडीकरणेंशतएकोद्दिष्टत्वंतथापि सपिंडीकरणश्राद्धंदेवपूर्वंनियोजयेदितिवचनात्तत्परत्वम् **हेमाद्रावादित्यपुराणे** विश्वेदेवौक्रतुर्दक्षःसर्वास्विष्टिषुकीर्तितौ नित्येनांदीमुखेश्राद्धेवसूसत्यौचपैतृके नवान्नलंभनेदेवौकामकालौसदैवहि अपिकन्यागतेसूर्येकाम्येच धुरिलोचनौ पुरूरवार्द्रवौचैवविश्वेदेवौतुपार्वणे कचिद्विश्वेदेवापवादमाह**हेमाद्रौशातातपः** नित्यंश्राद्ध-

---

१ इष्टिश्राद्ध म्हणजे गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन या तीन संस्कारांचें अंगभूत जें नांदीश्राद्ध तें आणि अग्न्याधान व सोमयाग यांचें अंगभूत जें नांदीश्राद्ध तें इष्टिश्राद्ध व कर्मांगश्राद्ध होय.

मवैवंस्याद्वेकोद्दिष्टंतथैवच मातुःश्राद्धंचयुग्मैःस्याददैवंप्राङ्मुखैःपृथक् योजयेद्देवपूर्वाणिश्राद्धान्यन्यानियत्नतः नांदीश्राद्धेभिन्नप्रयोगपक्षेमातुःश्राद्धमदैवमितिहेमाद्रिः ।

## आतां श्राद्धांत विश्वेदेव सांगतो—

**हेमाद्रींत शंख व बृहस्पति**—"इष्टिश्राद्धांत क्रतुदक्ष, नांदीश्राद्धांत सत्यवसु, नैमित्तिकश्राद्धांत कामकाल, काम्यश्राद्धांत धुरिलोचन, पार्वणश्राद्धांत पुरूरवार्द्रव याप्रमाणें विश्वेदेव होत." तेथेंच सांगतो—"ज्या ब्राह्मणांना या विश्वेदेवांची उत्पत्ति व नांव कळत नाहीं त्यांनीं श्रद्धायुक्त होऊन हा ( पुढील ) श्लोक म्हणावा" तो असा—"**आगच्छंतु महाभागा विश्वेदेवा महाबलाः ॥ ये अत्र विहिताः श्राद्धे सावधाना भवंतु ते ॥**" वरील वचनांत इष्टिश्राद्ध म्हणजे श्राद्धकालप्रकरणीं 'श्राद्धं प्रति रुचिश्चैव' या वचनानें विहित श्राद्ध तें समजावें, असें **कल्पतरु** सांगतो. आधानादिकांत कर्मांग जें श्राद्ध तें इष्टिश्राद्ध असें अन्य म्हणतात. नैमित्तिकश्राद्ध म्हणजे एकोद्दिष्ट होय. कारण, "जें एकोद्दिष्ट श्राद्ध तें नैमित्तिक म्हटलें आहे" असें **भविष्य**वचन आहे. जरी "एकोद्दिष्ट दैवहीन करावें" या वचनानें एकोद्दिष्टांत विश्वेदेवांचा निषेध केला आहे, तथापि नवश्राद्ध आणि द्वादशमासिकें या ठिकाणीं कामकाल विश्वेदेव समजावे. "दशाहांत करावयाचें श्राद्ध तें नवश्राद्ध, एकवर्षपर्यंत करावयाचें श्राद्ध तें नवमिश्र आणि वर्षानंतर करावयाचें तें पुराण याप्रमाणें तीन प्रकारचें श्राद्ध सांगितलें आहे. ज्या नवश्राद्धांत किंवा पुराणश्राद्धांत विश्वेदेवांना भाग मिळाला नाहीं तें श्राद्ध आसुर ( दैत्यांना प्रापक ) असें मंत्रवर्जित शूद्रतुल्य होतें" असें **बह्वृचपरिशिष्ट**वचन आहे. हा प्रकार ( नवश्राद्धांत विश्वेदेव असणें ) बह्वृचांनाच लागू आहे. कारण, त्यांनाच सांगितले आहेत, इतरांस तर "या ठिकाणीं विश्वेदेव नाहींत" या **कात्यायन**वचनानें विश्वेदेवांचा निषेधच आहे असें **पृथ्वीचंद्रोदय** सांगतो. दुसरे ग्रंथकार तर नैमित्तिक म्हणजे सपिंडीकरण श्राद्ध, असें सांगतात. जरी भविष्यवचनांत तच्छब्दानें एकोद्दिष्ट सांगितलें तथापि "तें एकोद्दिष्टही देवरहित करावें, अयुग्म ( १।३ ) अशा ब्राह्मणांना भोजन घालावें" या वचनानें त्याच ठिकाणीं विश्वेदेवांचा निषेध केला आहे. जरी सपिंडीकरणश्राद्ध अंशानें एकोद्दिष्ट आहे, म्हणून त्या ठिकाणीं विश्वेदेवांचा निषेध प्राप्त झाला, तरी "सपिंडीकरण श्राद्ध देवपूर्वक करावें" ह्या वचनानें तें विश्वेदेवयुक्त आहे. **हेमाद्रींत आदित्यपुराणांत**—"सर्व इष्टिश्राद्धांत क्रतुदक्ष हे विश्वेदेव, नांदीश्राद्धांत सत्यवसु, नवश्राद्धांत कामकाल, सूर्य कन्याराशिस्थ असतां जें महालय श्राद्ध व इतर काम्यश्राद्ध त्यांत धुरिलोचन, आणि पार्वणश्राद्धांत पुरूरवार्द्रव विश्वेदेव होत." क्वचित्स्थलीं विश्वेदेवांचा अपवाद सांगतो **हेमाद्रींत शातातप**—"नित्यश्राद्ध देवरहित करावें, तसेंच एकोद्दिष्ट ( सपिंडीकरणाच्या पूर्वी होणारें तें ) देवरहित होय. मातृश्राद्ध देवरहित आहे तें वेगळे दोन ब्राह्मण प्राङ्मुख बसवून करावें, इतर श्राद्धें देवपूर्वक करावीं." वरील वचनांत मातृश्राद्ध देवरहित सांगितलें तें नांदीश्राद्धाचा भिन्नप्रयोग करावयाचा त्यापक्षीं समजावें असें **हेमाद्रि** सांगतो. **इति श्राद्धदेवतानिर्णय.**

**अथविप्राः** तेचोत्तममध्यमाधमभेदेनत्रिविधाः तत्राद्याः **अत्रमदीयाःश्लोकाः** त्रिनाचिकेतस्त्रिमधुश्चबह्वृचोप्याथर्वणोयाजुषसामगौच षडंगविच्चत्रिसुपर्णवेत्ताप्यथर्वशीर्षोध्ययनेतरश्च शतायुवेदार्थविदौप्रवक्तास्याद्ब्रह्मचारीचतथाग्निचिच्च सीदद्वृत्तिःसत्यवाक्पूरुषैःस्वैर्मातापित्रोःपंचभिःख्यातवंशः पत्नीयुक्तोज्येष्ठसामापुराणवेत्तापुत्रीचेतिहासेष्वभिज्ञः योगीभिक्षुःसामगोब्रह्मवेत्तापंचाग्निश्चश्रोत्रियस्तत्सुतोवा शंभुध्यायीश्रीशपादाब्जसेवीपांथश्चैतेतूत्तमाःसंप्रदिष्टाः भिक्षुर्योगीपांथएतेत्वलभ्याभाग्याल्लब्धाश्चेत्तदाभोजनीयाः श्राद्धेविप्रेषूपविष्टेषुपश्चात्संप्राप्ताश्चेद्विप्रपंक्तौतुभोज्याः अत्रमूलंहेमाद्रौज्ञेयम् तत्रैवनारदः योवैयतीननादृत्य भोजयेदितरान्द्विजान् विजानन्वसतोग्रामेकव्यंतद्यातिराक्षसान् **दीपकलिकायांदक्षः** विनामांसेनमधुनाविनादक्षिणयाशिषा परिपूर्णंभवेच्छ्राद्धंयतिषुश्राद्धभोजिषु एतच्चज्ञानिविषयम् त्रिनाचिकेतस्त्रिसुपर्णोयजुर्वेदैकदेशौतद्व्रतेनतदध्यायिनौ यस्यसप्तपूर्वेसोमपाःसत्रिसुपर्णइति**बोपदेवः** त्रिमधुर्ऋग्वेदैकदेशः तदध्यायी केचिन्नाचिकेतंचयनंत्रिःकृतवानित्यर्थमाहुस्तद्धेमाद्रिविरुद्धम् **हेमाद्रौगौतमः** युवभ्योदानंप्रथमंपितृवयसइत्येके **मात्स्येमनुः** यश्चव्याकुरुतेवाचंयश्चमीमांसतेध्वरम् सामस्वरविधिज्ञश्चपंक्तिपावनपावनाः **कौर्मे** असमानप्रवरकोह्यसगोत्रस्तथैवच असंबंधीचविज्ञेयोब्राह्मणःश्राद्धसिद्धये **गारुडे** श्राद्धेषु-

---

१ नांदीश्राद्धाविषयीं तीन पक्ष आहेत ते असे–तीन दिवस तीन पार्वणें करावीं हा एक पक्ष. एक दिवशीं वेगवेगळीं तीन पार्वणें करावीं, हा दुसरा पक्ष. अथवा सहतंत्रानें पार्वणत्रय करावें हा तिसरा पक्ष. जेव्हां तीन पार्वणें वेगवेगळीं करावयाचीं तेव्हां मातृपार्वण देवरहित करावें, असा भाव.

विनियोज्यास्तेब्राह्मणाब्रह्मवित्तमाः येयोनिगोत्रमंत्रांतेवासिसंबंधवर्जिताः **मनुः** नमित्रंभोजयेच्छ्राद्धेधनैः-कार्योस्यसंग्रहः नारिंनमित्रंयोविद्यांत्तंतुश्राद्धेनिमंत्रयेत् द्वयोर्भ्रात्रोःश्राद्धेभोजनंनिषिद्धं पितृपुत्रौभ्रातरौद्वौ-निरग्निंगुर्विणीपतिम् सगोत्रप्रवरंचैवश्राद्धेषुपरिवर्जयेदितिश्राद्धदीपकलिकायांजातूकर्ण्योक्तेः ॥

## आतां श्राद्धाविषयीं ब्राह्मण सांगतो—

ब्राह्मण तीन प्रकारचे—उत्तम, मध्यम, आणि अधम. त्यांत पहिले ( उत्तम ) सांगतों—या ब्राह्मणांविषयीं मी ( कमलाकरभट्टानें ) केलेले **श्लोक**—"त्रिनाचिकेत व त्रिसुपर्ण ( हे यजुर्वेदांतील भाग आहेत त्यांचें व्रतपूर्वक अध्ययन करणारे ), त्रिमधु ( त्रिमधु म्हणून ऋग्वेदांतील एकदेश त्याचें अध्ययन करणारा ), ऋग्वेदी, अथर्वण वेद म्हटलेला, यजुर्वेद म्हटलेला, सामवेद म्हटलेला, वेदाचीं सहा अंगें जाणणारा, त्रिसुपर्णवेत्ता, अथर्वशीर्षाच्या अध्ययनाविषयीं रत, शतायु ( शंभर वर्षें वांचलेला ), वेदार्थवेत्ता, वेदार्थ सांगणारा, ब्रह्मचारी, अग्निचयन करणारा, उपजीविकारहित, सत्यवक्ता, मातृकुलांतील व पितृकुलांतील पांच पुरुषांनीं ज्याचा वंश प्रख्यात आहे तो, सपत्नीक, ज्येष्ठसामा ( सामवेदांतील ज्येष्ठसामभाग अध्ययन केलेला ), पुराणवेत्ता, पुत्रवान्, भारतादि इतिहास जाणणारा, योगाभ्यासी, संन्यासी, सामगान करणारा, ब्रह्मज्ञानसंपन्न, पांच अग्नि धारण करणारा, श्रोत्रिय ( वेदपारंगत ), श्रोत्रियाचा पुत्र, शंकराचें ध्यान करणारा, विष्णूच्या चरणकमलाची सेवा करणारा, पांथ ( मार्ग चालून आलेला ), हे ब्राह्मण उत्तम म्हणून सांगितले आहेत. भिक्षु, योगी आणि पांथ हे अलभ्य आहेत, भाग्यवशानें प्राप्त झाले तर त्यांना भोजन घालावें. श्राद्धामध्यें ब्राह्मण बसल्यानंतर जर हे प्राप्त झाले तर ब्राह्मणांच्या पंक्तीमध्यें यांना भोजन घालावें." ह्या श्लोकांचें मूळ हेमाद्रींत पाहावें. तेथेंच **नारद** सांगतो—"यति गांवांत राहात आहेत असें जाणून त्यांचा अनादर करून जो मनुष्य श्राद्धांत इतर ब्राह्मणाला भोजन घालतो, त्याचें तें श्राद्ध राक्षसांस प्राप्त होतें." **दीपकलिकेंत दक्ष**—"यतींना श्राद्धभोजन घातलें असतां मांसावांचून, मधावांचून, दक्षिणेवांचून व आशीर्वादावांचून श्राद्ध परिपूर्ण होतें." हें सांगणें यति ज्ञानी असतील तद्विषयक आहे. पूर्वश्लोकांतील त्रिनाचिकेत व त्रिसुपर्ण हे यजुर्वेदाचे एकदेश आहेत त्यांचें व्रतग्रहणपूर्वक अध्ययन करणारे समजावे. ज्याचे सात पूर्वज सोमपान केलेले तो त्रिसुपर्ण असें **बोपदेव** सांगतो. त्रिमधु म्हणून ऋग्वेदाचा एकदेश तो म्हणणारा. **केचित्** ग्रंथकार—नाचिकेताचें चयन त्रिवार करिता झाला तो त्रिनाचिकेत, असें म्हणतात, तें **हेमाद्री**विरुद्ध आहे. हेमाद्रींत **गौतम**—"तरुणांना दान प्रथम करावें. पित्याच्या वयाचा जो ब्राह्मण त्याला प्रथम द्यावें, असें कोणी म्हणतात." **मात्स्यांत** व **मनु**—"व्याकरणशास्त्रवेत्ता, यज्ञाची मीमांसा जाणणारा आणि सामवेदाचा स्वरविधि जाणणारा हे तिघे पंक्तिपावनांनाही पवित्र करणारे आहेत." **कौर्मांत**—"भिन्नप्रवरी, भिन्नगोत्री व संबंधरहित असे जे ब्राह्मण ते श्राद्धाविषयीं समजावे." **गारुडांत**—"योनिसंबंधी ( मातुल, श्वशुर, शालक इत्यादि ), गोत्रसंबंधी ( स्वगोत्रांतील ), मंत्रसंबंधी ( मंत्रदीक्षा दिलेले व घेतलेले ), आणि शिष्यत्वसंबंधी हे वर्ज्य करून इतर ब्रह्मवेत्ते ब्राह्मण श्राद्धाविषयीं योजावे." **मनु**—"मित्राला श्राद्धांत सांगूं नये, द्रव्य देऊन त्याला वश करावा. जो शत्रु नाहीं व मित्र नाहीं त्याला श्राद्धाचें आमंत्रण द्यावें." एका श्राद्धांत दोन भ्रात्यांना सांगण्याचा निषेध आहे; कारण, "पितापुत्र, दोन भ्राते, अग्निरहित, गर्भिणीपति, सगोत्र, सप्रवर, हे श्राद्धाविषयीं वर्ज्य करावे." असें श्राद्धदीपकलिकेंत **जातूकर्ण्या**चें वचन आहे.

**अथमध्यमाः हेमाद्रौकौर्मेगार्ग्यौ** नैकगोत्रेहविर्दद्याद्यथाकन्यातथाहविः अभावेह्यन्यगोत्राणामेकगोत्रांस्तुभोजयेत् अत्रकेचित्स्वशाखीयान्मुख्यानाहुः**पठंतिच** निमंत्रयीतपूर्वेद्युःस्वशाखीयान्द्विजोत्तमान् स्वशाखीयद्विजाभावेद्विजानन्यान्निमंत्रयेदिति इदंतुनिर्मूलत्वाद्धेमाद्रिणादूषितत्वाच्चोपेक्ष्यम् **मनुरपि** यत्नेनभोजयेच्छ्राद्धेब्राह्मणंवेदपारगं शाखांतगमथाध्वर्युंछंदोगंवासमाप्तिगम् एषामन्यतमोयस्यभुंजीतश्राद्धमर्चितः पितॄणांतस्यतृप्तिःस्याच्छाश्वतीसाप्तपौरुषी अत्र**मामकःश्लोकः** मातामहोमातुलभागिनेयदौहित्रजामातृगुरुस्वशिष्याः ऋत्विक्चयाज्यश्वशुरौस्वबंधुश्यालागुणाढ्यास्त्वनुकल्पभूताः बंधवोमातृष्वसृपितृष्वसृमातुलपुत्राइति**बोपदेवः** अत्रमूलं**हेमाद्रौ**ज्ञेयम् सगुणस्वस्त्रीयाद्यतिक्रमेदोषएव सप्तपूर्वान्सप्तपरान्पुरुषानात्मनासह अतिक्रम्यद्विजानेतान्नरकेपातयेत्खग संबंधिनस्तथासर्वान्दौहित्रंविट्पतिंतथा भागिनेयंविशेषेणतथाबंधुंखगाधिपेति**मदनरत्नेभविष्योक्तेः** अतएव**याज्ञवल्क्यो** ब्राह्मणप्रातिवेश्यानामेतदेवानिमंत्रणइतिगुण्यतिक्रमेदशपणंदंडमाह आसन्नमात्रपरमिदम् मूर्खेतुनदोषः ब्राह्मणातिक्रमोनास्तिमूर्खेवेदविवर्जितेज्वलंतमग्निमुत्सृज्यनहिभस्मनिहूयतेइति**कात्यायनोक्तेः** विप्रस्यापिदोषः अविद्वान्प्रतिगृह्णानो-

भस्मीभवतिदारुवदितिमनूक्तेः अपरार्केअत्रिः षड्भ्यस्तुपुरुषेभ्योऽर्वागश्राद्धेयास्तुगोत्रिणः षड्भ्यस्तुपरतोभोज्याःश्राद्धेस्युर्गोत्रजाअपि एतच्चब्राह्मणालाभे अपिशब्दात् असंभवेहेमाद्रौगौतमः शिष्यांश्चैकेसगोत्रांश्चभोजयेदूर्ध्वंत्रिभ्योगुणवतः आपस्तंबः ब्राह्मणान्भोजयेद्योनिगोत्रमंत्रांतेवास्यसंबंधिनः गुणहान्यांतुपरेषांसमुदितःसोदर्योपिभोजयितव्यः एतेनांतेवासिनोव्याख्याताइति अत्रविशेषमाहात्रिः पितापितामहोभ्रातापुत्रोवाथसपिंडकः नपरस्परमर्घ्याःस्युर्नश्राद्धेऋत्विजस्तथा ऋत्विक्पुत्रादयोप्येतेसकुल्याब्राह्मणाःस्मृताः वैश्वदेवेनियोक्तव्यायद्येतेगुणवत्तराः सगोत्राननियोक्तव्याःस्त्रियश्चैवविशेषतइति ।

## आतां मध्यम ब्राह्मण सांगतो—

**हेमाद्रींत कौर्म व गार्ग्य**—"एकगोत्रांत हवि ( श्राद्धान्न ) देऊं नये; कारण, जशी कन्या तसें हवि आहे. अन्यगोत्र्यांचा अभाव असेल तर एकगोत्रांनाही भोजन द्यावें." येथें कोणी आपल्या शाखेचे ब्राह्मण मुख्य आहेत असें म्हणतात व त्याविषयीं वचनही सांगतात—"पूर्वदिवशीं आपल्या शाखेचे उत्तम ब्राह्मण सांगावे, आपल्या शाखेचे न मिळतील तर इतर ब्राह्मण सांगावे." हें वचन निर्मूल असल्यामुळें व हेमाद्रीनें दूषित केल्यामुळें उपेक्षणीय आहे. **मनुही**—"श्राद्धाविषयीं प्रयत्नानें वेदपारंगत असा ब्राह्मण सांगावा; शाखाध्ययन केलेला यजुर्वेदी सांगावा; किंवा छंदोग समाप्त झालेला असा ब्राह्मण सांगावा. ज्याच्या श्राद्धांत ह्या तिघांपैकीं एक पूजित होऊन भोजन करील त्याच्या पितरांची सात पुरुषपर्यंत शाश्वत तृप्ति होईल." या ठिकाणीं मी ( कमलाकरानें ) केलेला **श्लोक**—"मातामह, मातुल, भगिनीपुत्र, कन्यापुत्र, जामाता, गुरु, शिष्य, ऋत्विक्, यज्ञ करणारा, श्वशुर, बंधु, शालक, हे गुणयुक्त असतील तर मध्यम होत." वरील श्लोकांतील बंधुशब्दानें माउसबंधु, आतेबंधु, व मामेबंधु हे घ्यावे, असें **बोपदेव** सांगतो. ह्या श्लोकाचें मूळ हेमाद्रींत पाहावें. गुणयुक्त अशा भागिनेयादिकांचा अतिक्रम केला ( न सांगितले ) तर दोषच आहे. कारण, "सारे संबंधी, दौहित्र, जामाता, भागिनेय आणि बंधु ह्या ब्राह्मणांचा अतिक्रम करील तर आपणासहवर्तमान सात पूर्वींच्या व सात पुढच्या पुरुषांस नरकांत पाडील." असें मदनरत्नांत **भविष्यवचन** आहे, म्हणूनच याज्ञवल्क्यानें "जवळच्या ब्राह्मणांना निमंत्रण केलें नाहीं तर हाच दंड" ह्या वचनानें गुणी ब्राह्मणाचा अतिक्रम झाला असतां दहा पण ( पैसे ) दंड सांगितला. हा भविष्योक्त दोष गुणवान् जवळ असतील तद्विषयक आहे. मूर्ख असतील तर दोष नाहीं. कारण, "मूर्ख वेदरहित असा असतां अतिक्रम केला तर दोष नाहीं; कारण, प्रदीप्त अग्नि टाकून भस्माचे ठिकाणीं होम करावयाचा नाहीं. अर्थात् वेदरहित तो भस्मासारखा होय." असें **कात्यायनवचन** आहे. अविद्वान् ब्राह्मणालाही दोष आहे. कारण, "अविद्वान् प्रतिग्रह करील तर काष्ठाप्रमाणें भस्मरूप होतो" असें **मनुवचन** आहे. **अपरार्कांत अत्रि**—"सहा पुरुषांच्या अलीकडचे स्वगोत्रज ब्राह्मण श्राद्धाला योग्य नाहींत. सहा पुरुषांच्या पलीकडचे गोत्रज असले तरी ते श्राद्धाला सांगावे." "गोत्रजा अपि" येथें अपिशब्द आहे त्यावरून ब्राह्मण न मिळतील तर गोत्रज सांगावे, असें होतें. ब्राह्मणांचा असंभव असतां **हेमाद्रींत गौतम**—"अन्य आचार्य असें सांगतात कीं, गुणवंत असे तीन पुरुषांच्या पलीकडचे गोत्रज व शिष्य हे श्राद्धाला सांगावे." **आपस्तंब**—"योनि, गोत्र, मंत्र, शिष्यत्व या संबंधांनीं रहित अशा ब्राह्मणांस भोजन घालावें; गुणी ब्राह्मण न मिळेल तर इतर ब्राह्मणांच्या समुदायांत सहोदर भ्रात्यालाही भोजन घालावें. येणेंकरून अंतेवासी म्हणजे शिष्य याचें स्पष्टीकरण झालें." येथें विशेष सांगतो **अत्रि**—"पिता, पितामह, भ्राता, पुत्र, अथवा सपिंड हे परस्पर पूजेला योग्य होत नाहींत. तसेच श्राद्धामध्यें ऋत्विज योग्य नाहींत. ऋत्विजांचे पुत्रादिक हे सकुल्य ब्राह्मण म्हटले आहेत. जर हे गुणवंत असतील तर यांना वैश्वदेवस्थानीं योजावे, सगोत्र ब्राह्मण सांगूं नयेत व विशेषेंकरून स्त्रियाही सगोत्र सांगूं नयेत."

**अथवर्ज्याः अत्रमामकाःश्लोकाः** वर्ज्यान्प्रवक्ष्येत्वथरोगिवैरिहीनाधिकांगान्कितवान्कृतघ्नान् नक्षत्रशास्त्रेणचजीवमानान्भैषज्यवृत्त्यापिचराजभृत्यान् संगीतकायस्थकुसीदवृत्त्यावेदत्रयेणापिकवित्ववृत्त्या देवार्चनेनापिचजीवमानान्स्वाध्यायदाराग्निसुतोज्झकाणान् दुर्वालखल्वाटकुनख्यधर्मिनटांश्चपौनर्भवकृष्णदंतान् अगारदाहीगरदःसमुद्रयायीचकुंडाश्यथकूटकारी बालांश्चयोध्यापयतेस्वपुत्रादवाप्तविद्यस्त्वथकुंडगोलौ अग्रेदिधिष्वाःपतिरस्यकर्तासोमक्रयीतैलिककेकराक्षौ युद्धाचार्यःपक्षिणांपोषकश्चस्रोतोभेत्तावृक्षसंरोपकश्च मेषाणांवामाहिषाणांचपुष्टयास्त्रीयस्त्रीषुप्रहितैर्यश्चजारैः जीवत्यध्येतुश्चदत्तानुयोगाद्द्रव्यप्राप्त्यैवेदमुद्धाटयन्तः ग्रामयाजिक्षुकेशविक्रयीस्तेनशिल्पिपितृवादकारकान् अर्थकामरतशूद्रयाजकश्मश्रुहीनजटिमुंडिनिर्घृणान् जन्यवैकवृत्तिरजस्वलस्वार्थपाकरतशापदायकान् क्लीबकुष्ठयतिविलोहितेक्षणान्कुब्जवामनमृषाभिशापिनः

पुत्रहीनमथकूटसाक्षिणंप्रातिहारिकमयाज्ययाजकं स्वात्मदातृपरिवेत्तृयाजकस्तेनहिंस्रकमुखान्विवर्जयेत् अत्र-मूलंहेमाद्रौपृथ्वीचंद्रोदयेचज्ञेयं **भारते**दानधर्मेषुश्राद्धवर्ज्यविप्राधिकारे कितवोभ्रूणहायक्ष्मीपशुपालोनिराकृतिः ग्राम्यप्रेष्योवार्धुषिकोगायकःसर्वविक्रयी सामुद्रिकोराजभृत्यस्तैलिकःकूटकारकः पित्राविवदमानश्चयस्यचोपपतिर्गृहे अभिशस्तस्तथास्तेनःशिल्पंयश्चोपजीवति पर्वकारश्चसूचीचमित्रध्रुक्पारदारिकः अव्रतानामुपाध्यायःकांडपृष्ठस्तथैवच श्वभिश्चयःपरिक्रामेद्यःशुनादष्टएवच परिवित्तिस्तथास्तेनोदुश्चर्मागुरुतल्पगः कुशीलवोदेवलकोनक्षत्रैर्यश्चजीवति ईदृशान्ब्राह्मणाञ्ज्ञेयाअपांक्तेयायुधिष्ठिर तथा ऋणकर्ताचयोराजन्यश्चवार्धुषिकोनरः कांडपृष्ठःस्वशाखांत्यक्त्वापरशाखयोपनीतः तदध्यायीच क्षत्रियवैश्यवृत्तौ **नारदस्तु** तस्यामेवतुयोवृत्तौब्राह्मणोवसतेरसान् कांडपृष्ठश्च्युतोमार्गात्सोपांक्तेयःप्रकीर्तितइत्याह **हारीतः** शूद्रापुत्राःस्वयंदत्तायेचैतेक्रीतकाःसुताः तेसर्वेमनुनाप्रोक्ताःकांडपृष्ठानसंशयः ।

## आतां वर्ज्य ब्राह्मण सांगतो—

येथें मी ( कमलाकरभट्टानें ) केलेले **श्लोक**—"वर्ज्य सांगतों—रोगी ( ज्वर-अतिसार-क्षय इत्यादि रोगयुक्त ), शत्रु, एखादा अवयव नसलेला, एखादा अवयव अधिक असलेला, कपटी, कृतघ्न ( मित्रद्रोही ,) ज्योतिषशास्त्रानें जीवन करणारा, वैद्यकीवर जीवन करणारा, राजसेवक, गायक, लेखक, व्याजबट्ट्यानें जीवन करणारा, वेदविक्रय करणारा, कवित्व करून निर्वाह करणारा, देवपूजा करून जीवन करणारा, अध्ययनत्याग करणारा, स्त्रीत्याग करणारा, अग्नित्याग करणारा, पुत्रत्याग करणारा, दुष्ट केशांचा, टक्कल पडलेला, कुत्सितनखी, अधर्मा, नट, पौनर्भव, ( द्विवारविवाहित स्त्रीचा पुत्र ), काळ्या दांतांचा, घर जाळणारा, विष घालणारा, समुद्रयान करणारा, कुंडाचें[1] अन्न खाणारा, खोटें करणारा, बालकांस शिकविणारा, आपल्या पुत्रापासून विद्या शिकलेला, कुंड, गोलें[2], अग्रेदिधिषूचा[3] पति, शस्त्रास्त्रें करणारा, सोमविक्रय करणारा, तेल गाळणारा, केकराक्ष, युद्धाचा आचार्य, पक्षिपोषक, जलप्रवाह फोडणारा, वृक्ष लावणारा, मेंढ्यांचा पोषक, महिषांचा पोषक, आपल्या स्त्रियांचे ठिकाणीं जारकर्मानें जीवन करणारा, शिष्यांपासून द्रव्य घेऊन जीवन करणारा, द्रव्यप्राप्तीसाठीं वेदघोष करणारा, गांवाचा उपाध्याय, पशुविक्रयी, केशविक्रयी, चोर, शिल्प करणारा, पित्याशीं वाद करणारा, द्रव्य काम यांत निमग्न असलेला, शूद्राचा याग करणारा, श्मश्रुरहित, जटाधारी, मुंडलेला, निर्दय, ज्याची स्त्री रजस्वला तो, आपल्याकरितांच पाक करणारा, शाप देणारा, नपुंसक, कुष्ठरोगी, अत्यंत लाल डोळे असलेला, कुबडा, खुजा, शब्दानें दोषी झालेला, पुत्रहीन, खोटी साक्ष देणारा, द्वारपाल, पतितादिकांचा याग करणारा, आपलें दान करणारा, परिवेत्त्याचा[4] याग करणारा, चोर, हिंसक इत्यादि ब्राह्मण वर्ज्य करावे." यांचें मूळ **हेमाद्रींत** व **पृथ्वीचंद्रोदयांत** पाहावें. **भारतांत दानधर्मांत** श्राद्धवर्ज्य विप्राधिकारी सांगतो—"कपटी, गर्भहत्या करणारा, क्षयरोगी, पशुपालक, स्वशाखाध्ययनरहित, गांवाचा दूत, वाणिज्य करणारा, गायक, सर्व विक्रय करणारा, सामुद्रिक करणारा, राजसेवक, तेल गाळणारा, खोटें करणारा, पित्याशीं विवाद करणारा, ज्याच्या स्त्रियेला दुसरा उपपति आहे तो, सुरापानादि मिथ्या दोष ठेवलेला, चोर, शिल्पकर्मानें जीवन करणारा, पेरें करणारा, सुई करणारा, मित्रद्रोही, परस्त्रीचेठायीं जाणारा, उपनयनरहितांचा उपाध्याय, कांडपृष्ठ, कुत्र्यांबरोबर फिरणारा, कुत्र्यानें दंश केलेला, परिवेत्त्याचा ज्येष्ठ अविवाहित भ्राता, चोर, कुष्ठी, गुरुपत्नीगामी, नर्तक, देवलक[5], जोशी, अशा प्रकारचे ब्राह्मण अपांक्तेय ( अपवित्र ) आहेत. तसेच ऋणकर्ता, वाणिज्यकारी हे वर्ज्य. कांडपृष्ठ म्हणजे आपली शाखा टाकून परशाखेनें उपनीत व त्या शाखेचें अध्ययन करणारा होय. **नारद** तर—"जो ब्राह्मण क्षत्रिय वैश्यवृत्ति पतकरून रसांचा व्यवहार करितो, तो मार्गापासून च्युत व अपांक्त असा कांडपृष्ठ होय" असें सांगतो. **हारीत**—"शूद्रेचे पुत्र आपलें आपण दान केलेले व विकत घेतलेले ते सारे पुत्र कांडपृष्ठ म्हणून मनूनें सांगितले आहेत."

अन्येपि**हेमाद्रौमात्स्ये** त्रिशंकून्बर्बरानांध्रान्चीनद्रविडकोंकणान् कर्णाटकांस्तथाभीरान्कालिंगांश्च विवर्जयेत् तत्रैव**सौरपुराणे** अंगवंगकलिंगांश्चसौराष्ट्रान्गुर्जरांस्तथा आभीरान्कौंकणांश्चैवद्राविडान्दाक्षिणायनान् आवंत्यान्मागधांश्चैवब्राह्मणांस्तुविवर्जयेत् **चंद्रिकायांयमः** काणाःकुब्जाश्चषंढाश्चकृतघ्नागुरुत-

---

१ भर्ता जीवंत असतां जारापासून झालेला तो कुंड. २ भर्ता मृत असतां जारापासून झाला तो गोलक. ३ ज्येष्ठ भगिनी अविवाहित असतां कनिष्ठेचा विवाह केला तर ती कनिष्ठा अग्रेदिधिषू. आणि ज्येष्ठा दिधिषु म्हटली आहे. ४ ज्येष्ठ भ्राता अविवाहित असतां कनिष्ठानें विवाह केला तर तो परिवेत्ता होतो. ५ द्रव्याच्या इच्छेनें नित्य देवपूजा तीन वर्षेंपर्यंत करणारा तो देवलक व देवस्वग्रहण करणारा तोही देवलक होय, तो सर्वकर्मांविषयीं वर्ज्य.

स्यमाः मानकूटास्तुलाकूटाःशिल्पिनोग्रामयाजकाः राजभृत्यांधबधिरमूकखल्वाटपंगवः वणिजोमधुहर्तारोग रदाग्निवनदाहकाः समयानांचभेत्तारःप्रदानेयेनिवारकाः प्रव्रज्योपनिवृत्ताश्चवृथाप्रव्रजिताश्चये यश्चप्रव्रजिताज्जातःप्रव्रज्यावसितश्चयः अवकीर्णीचवीरघ्नोगुरुघ्नःपितृदूषकः **श्राद्धकाशिकायांकात्यायनः** द्विनेग्नः कीलदुश्चर्मोशुक्लोतिकपिलस्तथा छिन्नोष्ठश्छिन्नलिंगश्चनैवकेतनमर्हति द्विनेग्नःपित्रोर्वंशेत्रिपुरुषंविच्छिन्नवेदाग्निः **हेमाद्रौमरीचिः** अविद्धकर्णःकृष्णश्चलंबकर्णस्तथैवच वर्जनीयाःप्रयत्नेनब्राह्मणाःश्राद्धकर्मणि **ब्राह्मे** मूकश्चपूतिनासश्चछिन्नांगश्चाधिकांगुलिः गलरोगीचगडुमानस्फुटितांगश्चसज्वरः षंढतूवरमंदांश्चश्राद्धेष्वेतान्विवर्जयेत् लंबकर्णंचाहतत्रैव**गोभिलः** हनुमूलादधःकर्णौलंबौतुपरिकीर्तितौ द्व्यंगुलौत्र्यंगुलौशस्ताविविशातातपोब्रवीत् चंद्रिकायां**यमः** द्व्यंगुलातीतकर्णस्यभुंजतेपितरोनतु पंढश्चात्र**चंद्रिकोक्तः**सप्तविधोग्राह्यः यथा षंढकोवातजःषंढःपंडःक्लीबोनपुंसकः कीलकश्चेतिसप्तैवक्लीबभेदाःप्रकीर्तिताः **पराशरमाधवीयेतु** चतुर्दशविधाउक्ताः तेपांस्वरूपाणितत्रैवज्ञेयानि ।

दुसरेही **हेमाद्रींत मात्स्यांत** सांगतो—"त्रिशंकूच्या देशांतील, वर्बरदेशांतील, आंध्र, चीन, द्रविड, कोंकणस्थ, कर्णाटकस्थ, आभीर आणि कालिंग हे वर्ज्य करावे." तेथेंच **सौरपुराणांत**—"अंग, वंग, कलिंग या देशांतील, सौराष्ट्र, गुर्जर, आभीर, कोंकण, द्राविड, दक्षिणदेशस्थ, आवंत्य, मागध, हे ब्राह्मण वर्ज्य करावे." **चंद्रिकेंत यम**—"काणे, कुबडे, षंढ, मित्रद्रोही, गुरुपत्नीगमन करणारे, खोटें माप करणारे, खोटें वजन करणारे, शिल्पकारी, गांवाचे यजन करणारे, राजसेवक, बहिरे, मुके, खल्वाट, पांगळे, वाणिज्य करणारे, मध चोरणारे, विष घालणारे, वन जाळणारे, शास्त्रनियमांचा भंग करणारे, दान करणाराचें निवारण करणारे, संन्यास घेऊन त्याचा त्याग करणारे, दांभिक संन्यासी, संन्याशापासून झालेला, संन्यास समाप्त केलेला, ब्रह्मचर्यव्रत दुष्ट झालेला, वीरहत्यारी, गुरुघातक, पितृदूषक, हे वर्ज्य." **श्राद्धकाशिकेंत कात्यायन**—"द्विनेग्न, अंगावर चर्मकीलकांनीं दुष्ट कानडी झालेला, अति पांढरा, अति कपिलवर्णा, ओंठ छिन्न झालेला, शिश्न छिन्न झालेला, असा ब्राह्मण निमंत्रणास योग्य नाहीं." **हेमाद्रींत मरीचि**—"ज्याचा कान टोंचलेला नाहीं तो, कृष्णवर्ण, ज्याचे कान लांब आहेत तो, हे ब्राह्मण श्राद्धकर्माविषयीं यत्नानें वर्ज्य करावे." **ब्राह्मांत**—"मुका, पूतिनास (ज्याच्या नाकांतून सतत पू येतो तो), अवयव छिन्न झालेला, अधिक अंगुलि असलेला, गलरोगी, गलगंड झालेला, अंग फुटलेला, ज्वरी, षंढ, योग्यकालीं श्मश्रु न आलेला, भाग्यहीन किंवा आळशी, हे ब्राह्मण श्राद्धाविषयीं वर्ज्य करावे." लंबकर्ण सांगतो तेथेंच **गोभिल**—"हनुवटीच्या मूळाच्या खालीं सुटलेले कर्ण ते लंब होत. दोन किंवा तीन अंगुळें असलेले कर्ण प्रशस्त आहेत, असें शातातप सांगता झाला." चंद्रिकेंत **यम**—"ज्याचे कान दोन अंगुलांपेक्षां अधिक खालीं आले त्याला दिलेलें अन्न पितर सेवन करीत नाहींत." येथें षंढ **चंद्रिकेंत** सांगितलेला सात प्रकारचा घ्यावा. तो असा—"षंढक, वातज, षंढ, पंड, क्लीब, नपुंसक, आणि कीलक, याप्रमाणें सात प्रकारचे षंढ सांगितले आहेत." **पराशरमाधवीयांत** तर चवदा प्रकारचे सांगितले आहेत, त्यांचीं स्वरूपें तेथेंच पाहावीं.

**चंद्रिकायांशातातपः** अग्निष्टोमादिभिर्यज्ञैर्येयजंत्यल्पदक्षिणैः तेपामन्नंनभोक्तव्यमपांक्तास्तेप्रकीर्तिताः एतच्चशक्तौसत्यां **अपरार्केभारते** अव्रतीकितवःस्तेनःप्राणिविक्रयकोपिवा पश्चाच्चेत्पीतवान्सोमंसोपिकेतनमर्हति **श्राद्धदीपकलिकायांयमः** अपत्नीकश्चवर्ज्यःस्यात्सपत्नीकोप्यनग्निकः **तत्रैवाश्वलायनः** प्रतिमाविक्रयंयोवैकरोतिपतितस्तुसः जीवनार्थंपरास्थीनिधृत्वातीर्थंप्रयातियः मातापित्रोर्विनासोपिपतितःपरिकीर्तितः तत्रैव**जातूकर्ण्यः** यत्रमातुलजोद्वाहीयत्रवावृषलीपतिः श्राद्धंनगच्छेत्तद्विप्राःकृतंयच्चनिरामिषं पितृपुत्रौभ्रातरौद्वौनिरग्निंगुर्विणीपतिम् सगोत्रप्रवरंचैवश्राद्धेपुपरिवर्जयेत् **बृहन्नारदीये** शंखंचक्रंमृदायस्तुकुर्यात्तप्तायसेनवा सशूद्रवद्बहिःकार्यःसर्वस्माद्द्विजकर्मणः शंखचक्राद्यंकनंचगीतनृत्यादिकंतथा एकजातेरयंधर्मोनजातुस्याद्द्विजन्मनः तेनयेतप्तमुद्रादिविधयस्तेशूद्रविषयाइति **पृथ्वीचंद्रोदये** शिवकेशवयोरंकान्शूलचक्रादिकान्द्विजः नधारयेतमतिमान्वैदिकेवर्त्मनिस्थितइत्या**श्वलायनोक्तेश्च** नृत्यंचोदराद्यर्थंनिषिद्धमितिश्री**धरस्वामी** अन्येपिनिषेधानिबंधेषुज्ञेयाइतिदिक् ।

१ मातापितरांच्या वंशांत तीन पुरुष वेद व अग्निरहित तो द्विनग्न होय.

**चंद्रिकेंत शातातप**—"अग्निष्टोमादिक यज्ञ अल्प दक्षिणा देऊन जे करितात त्यांचें अन्न खाऊं नये, ते अपांक्त म्हटले आहेत." हें सांगणें शक्ति असतां समजावें. **अपरार्कात भारतांत**—"ब्रह्मचर्यादिव्रतहीन, कपटी, चोर, प्राणिविक्रय करणारा, असा ब्राह्मण असून नंतर जर सोमपान करील तर तोही निमंत्रणास योग्य आहे." **श्राद्धदीपकलिकेंत यम**—"अपत्नीक वर्ज्य आहे. सपत्नीक असून अग्निरहित असेल तर तोही वर्ज्य आहे." तेथेंच **आश्वलायन**—"जो प्रतिमाविक्रय करितो तो पतित आहे. आपल्या जीविकेसाठीं मातापितरांवांचून दुसऱ्यांच्या अस्थि घेऊन जो तीर्थास जातो तोही पतित म्हटला आहे." तेथेंच **जातूकर्ण्य**—"जेथें मातुलकन्याविवाह केलेला आहे, किंवा जेथें शूद्रिणीचा पति आहे, आणि जें श्राद्ध आमिष( मांस )रहित आहे त्या श्राद्धांत भोजनास जाऊं नये. पितापुत्र, दोन भ्राते, अग्निरहित, गर्भिणीपति, सगोत्र आणि सप्रवर हे ब्राह्मण श्राद्धीं वर्ज्य करावे." **बृहन्नारदीयांत**—"जो ब्राह्मण अंगावर शंख चक्र मातीनें किंवा तापलेल्या लोखंडानें करील त्याला शूद्राप्रमाणें सर्व द्विजकर्मापासून दूर करावा. शंख चक्र इत्यादि चिन्हें करणें; गायन, नृत्य वगैरे करणें हा शूद्रजातीचा धर्म आहे, ब्राह्मणाचा धर्म नव्हे." यावरून तप्तमुद्रादि धारणाचे जे विधि ते शूद्रविषयक आहेत, असें **पृथ्वीचंद्रोदयांत** आहे. आणि "वैदिकमार्गाचेठायीं राहणाऱ्या विद्वान् ब्राह्मणानें शूल, चक्र इत्यादिक शिव विष्णु यांचीं चिन्हें धारण करूं नयेत" असें **आश्वलायन**वचनही आहे. नृत्य उदराकरितां निषिद्ध आहे असें **श्रीधरस्वामी** सांगतो. अन्यही निषेध निबंधांत आहेत ते पाहावे. ही दिशा दाखविली आहे.

अत्रविप्राणांग्राह्यत्वोक्त्यैवतद्वर्ज्यानांनिषेधेसिद्धेपुनर्वर्ज्यपरिगणनंनिषिद्धवर्ज्यनिर्गुणप्राप्त्यर्थमिति**विज्ञानेश्वरः** कुष्ठिकाणादेरपवादोहे**माद्रौवसिष्ठः** अपिचेन्मंत्रविद्युक्तःशारीरैःपंक्तिदूषणैः अदूष्यंतंयमःप्राह-पंक्तिपावनएवसः क्वचिद्विप्राणांजातिमात्रेणग्राह्यत्वमुक्तं **चंद्रिकायामाग्नेये** यदिपुत्रोगयांगच्छेत्कदाचित्कालपर्ययात् तानेवभोजयेद्विप्रान्ब्रह्मणायेप्रकल्पिताः ब्रह्मणाकृतसंस्थानाविप्राब्रह्मसमाःस्मृताः अमानुषागयाविप्राब्रह्मणायेप्रकल्पिताः तेषुतुष्टेषुसंतुष्टाःपितृभिःसहदेवताः **तत्रैव** नविचार्यंकुलंशीलंविद्याचतपएवच पूजितैस्तैस्तुसंतुष्टादेवाःसपितृगुह्यकाः गयायांनिर्गुणाअपितेएवभोज्याइति**हेमाद्रौ** अक्षय्यवटश्राद्धएवतन्नियमोनान्यत्रेति**त्रिस्थलीसेतौपितामहचरणाः पृथ्वीचंद्रोदयेपिपाद्मे** तीर्थेपुब्राह्मणंनैवपरीक्षेतकदाचन अन्नार्थिनमनुप्राप्तंभोज्यंतंमनुरब्रवीत् **स्कांदेपि** ब्राह्मणान्नपरीक्षेततीर्थक्षेत्रनिवासिनः **मनुः** नब्राह्मणंपरीक्षेतदैवेकर्मणिधर्मवित् पित्र्येकर्मणितुप्राप्तेपरीक्षेतप्रयत्नतः असंभवपरमेतदिति**मेधातिथिः हेमाद्रौव्यासः** गायत्रीमात्रसारोपिवरंविप्रःसुयंत्रितः नायंत्रितश्चतुर्वेदीसर्वाशीसर्वविक्रयी काणाःकूटाश्चकुब्जाश्चदरिद्राव्याधितास्तथा सर्वेश्राद्धेनियोक्तव्यामिश्रितावेदपारगैः ।

येथें ब्राह्मण ग्राह्य सांगितल्यावरूनच वर्ज्य ब्राह्मणांचा निषेध सिद्ध असतां पुनः वर्ज्य ब्राह्मण कोणते ते सांगितले हे कशाकरितां असें म्हणाल तर जेथें गुणी ब्राह्मण मिळत नाहींत तेथें निषिद्ध वर्ज्य करून निर्गुण असले तरी घ्यावे, असें समजण्याकरितां आहे, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. कुष्ठी (पांढऱ्या कोडाचा), काणा इत्यादिकांचा अपवाद सांगतो **हेमाद्रींत वसिष्ठ**—"मंत्रवेत्ता असून तो जरी शारीरपंक्तिदूषणांनीं युक्त आहे तथापि तो अदूष्य ( दूषणाला अनर्ह ) आहे असें यम सांगतो; कारण, तो ब्राह्मण पंक्तिपावनच आहे." क्वचित् स्थळीं जातीचा ब्राह्मण असला म्हणजे तो ग्राह्य होतो, असें सांगतो **चंद्रिकेंत अग्निपुराणांत**—"कालवशें कधींही जर पुत्र गयेस जाईल तर तेथें ब्रह्मदेवानें कल्पिलेले जे ब्राह्मण त्यांनाच भोजन घालावें. वेदानें ज्यांचें स्थान करून दिलें आहे ते ब्राह्मण ब्रह्मसमान आहेत, गयेंत ब्रह्मदेवानें कल्पिलेले जे ब्राह्मण ते अमानुष ( देवजातींतील ) आहेत, ते तुष्ट झाले असतां पितरांसह संपूर्ण देवता संतुष्ट होतात." तेथेंच सांगतो—"कुल, शील, विद्या व तप यांचा विचार करूं नये, त्यांची पूजा केली म्हणजे देव, पितर, गुह्यक हे संतुष्ट होतात." गयेंत निर्गुण असले तरी तेच ब्राह्मण श्राद्धास सांगावे, असें **हेमाद्रि** सांगतो. अक्षय्यवटश्राद्धविषयींच हा नियम आहे, इतरांविषयीं नाहीं, असें **त्रिस्थलीसेतु**ग्रंथांत पितामह ( नारायणभट्ट ) सांगतात. **पृथ्वीचंद्रोदयांत**ही **पाद्मांत**—"तीर्थांचेठायीं कधींही ब्राह्मणाची परीक्षा करूं नये, अन्नार्थी प्राप्त झाला असतां त्याला भोजन घालावें, असें **मनु** सांगता झाला." **स्कांदांत**ही—तीर्थाचेठायीं क्षेत्रस्थ ब्राह्मणांची परीक्षा करूं नये." **मनु**—"धर्मवेत्त्यानें दैवकर्माविषयीं ब्राह्मणाची परीक्षा करूं नये, पित्र्यकर्म प्राप्त असतां प्रयत्नानें ब्राह्मणाची परीक्षा करावी." 'ब्राह्मणाची परीक्षा करूं नये' हें सांगणें असंभवविषयक आहे असें **मेधातिथि** ( मनुटीकाकार ) सांगतो. **हेमाद्रींत व्यास**—"सुयंत्रित ( नियमानें वागणारा ) असा ब्राह्मण केवळ गायत्रीच म्हटलेला असला तरी तो श्रेष्ठ आहे. नियम सोडून वागणारा सर्व भक्षण करणारा व सर्व विक्रय करणारा असा चतुर्वेदी असला तरी तो योग्य नाहीं. काणे, कूट ( कपटी, अनृतकारी ), कुबडे, दरिद्री, व्याधियुक्त, हे सारे ब्राह्मण श्राद्धाचेठायीं वैदिकांत मिश्र करून बसवावे."

**अथविप्रनिमंत्रणम् चंद्रिकायांवाराहे** वस्त्रशौचादिकर्तव्यंश्वःकर्तास्मीतिजानता स्थानोपलेपनंकृत्वाततोविप्रान्निमंत्रयेत् दंतकाष्ठंचविसृजेद्ब्रह्मचारीशुचिर्भवेत् तत्रैव**प्रचेताः** दक्षिणंचरणंविप्रःसव्यंवैक्षत्रियस्तथा पादावादायवैश्योद्वौशूद्रःप्रणतिपूर्वकम् **बृहस्पतिः** उपवीतीततोभूत्वादेवार्थंतुद्विजोत्तमान् अपसव्येनपित्र्येथस्वयंशिष्योथवासुतः **प्रचेताः** सवर्णंप्रेषयेदाप्तंद्विजानांतुनिमंत्रणे **पृथ्वीचंद्रोदयेस्कांदे** राजकार्येनियुक्तस्यबंधनिग्रहवर्तिनः व्यसनेषुचसर्वेषुश्राद्धंविप्रेणकारयेत **चंद्रिकायांयमः** अभोज्यंब्राह्मणस्यान्नंवृषलेननिमंत्रितम् तथैववृषलस्यान्नंब्राह्मणेननिमंत्रितम् तत्रैव**पैठीनसिः** सप्तपंचद्वौवाश्रोत्रियान्निमंत्रयेत् **आश्वलायनसूत्रे** एकैकमेकैकस्यद्वौद्वौत्रींस्त्रीन्वावृद्धौफलभूयस्त्वं द्वाविविवृद्धिश्राद्धे **गौतमः** नवावरान्भोजयेद्युजोवायथोत्साहम् **याज्ञवल्क्यः** द्वौदैवेप्राक्त्रयःपित्र्येउदगेकैकमेववा मातामहानामप्येवंतंत्रंवावैश्वदेविकम **दीपकलिकायांपराशरः** संपत्तावर्थपात्राणामेकैकस्यत्रयस्त्रयः पित्रादेर्ब्राह्मणाःप्रोक्ताश्चत्वारोवैश्वदेविके **वृद्धयाज्ञवल्क्यः** दशैकंपंचवाविप्रानपार्वणेविनियोजयेत् अत्रवैश्वदेवेद्वौचतुरोवोपवेश्यपित्रादीनामेकैकस्यस्थानेएकंत्रीन्पंचसप्तनववोपवेशयेदितिनिष्कृष्णोर्थः **मनुः** द्वौदैवेपितृकृत्येत्रीनेकैकमुभयत्रवा भोजयेत्सुसमृद्धोपिनप्रसज्येतविस्तरे सत्क्रियांदेशकालौचशौचंब्राह्मणसंपदः पंचैतान्विस्तरोहंतितस्मान्नेहेतविस्तरम् **पृथ्वीचंद्रोदयेशातातपः** द्वौदैवेथर्वणौविप्रौप्राङ्मुखावुपवेशयेत् पित्र्येतूदङ्मुखांस्त्रींश्चबह्वृचाध्वर्युसामगान् अल्पशक्तौ**हेमाद्रौदेवलः** एकेनापिहिविप्रेणषट्पिंडंश्राद्धमाचरेत् षडर्घ्यानदापयेत्तत्रषड्भ्योदद्यात्तथाहविः **गोभिलः** यद्येकंभोजयेच्छ्राद्धेछंदोगंतत्रभोजयेत ऋचोयजूंपिसामानित्रितयंतत्रविद्यते ।

## आतां ब्राह्मणांचें निमंत्रण सांगतो—

**चंद्रिकेंत वाराहांत**—"उद्यां श्राद्ध करावयाचें असलें म्हणजे पूर्वदिवशीं वस्त्रें वगैरे धुवून वाळत घालावीं, घर सारवून स्वच्छ करावें, नंतर ब्राह्मणांस निमंत्रण द्यावें. दंतधावन काष्ठानें करूं नये. ब्रह्मचर्य धारण करून शुद्ध असावें." तेथेंच **प्रचेता**—"ब्राह्मणानें ब्राह्मणाच्या दक्षिणपादाला स्पर्श करून निमंत्रण सांगावें, क्षत्रियानें डाव्या पादाला स्पर्श करून सांगावें, वैश्यानें दोन्ही पादांना स्पर्श करून सांगावें आणि शूद्रानें नमस्कारपूर्वक निमंत्रण करावें." **बृहस्पति**—"स्वतः श्राद्धकर्त्यानें अथवा शिष्यानें किंवा पुत्रानें उपवीती करून देवांचे ब्राह्मण सांगावे, प्राचीनावीती करून पितरांचे ब्राह्मण सांगावे." **प्रचेता**—"ब्राह्मणांच्या निमंत्रणाविषयीं आपल्या जातीचा आप्त मनुष्य पाठवावा." **पृथ्वीचंद्रोदयांत स्कांदांत**—"राजकार्याविषयीं आज्ञा केलेला, बंदी अटकाव इत्यादिकांत राहिलेला, व इतर संकटांत असलेला त्यानें ब्राह्मणाकडून श्राद्ध करवावें." **चंद्रिकेंत यम**—"शूद्रानें निमंत्रण केलें असतां तें ब्राह्मणाचें अन्न अभोज्य ( भोजनाला अयोग्य ) होतें, तसेंच शूद्राचें अन्न ब्राह्मणानें निमंत्रण केलें असतां अभोज्य होतें." तेथेंच **पैठीनसि**—"सात, पांच किंवा दोन श्रोत्रिय ( वैदिक ) ब्राह्मण सांगावे." **आश्वलायनसूत्रांत**—"एकेक पितराला एकएक, दोनदोन, किंवा तीनतीन सांगावे. जितके अधिक सांगावे तितकें फल अधिक मिळतें." दोनदोन सांगितले ते वृद्धिश्राद्धांत समजावे. **गौतम**—"नवांपेक्षां अधिक सांगावे, अथवा जसा आपणास उत्साह असेल त्याप्रमाणें विषम सांगावे." **याज्ञवल्क्य**—"देवांविषयीं दोन ब्राह्मण प्राङ्मुख बसवावे, आणि पितरांविषयीं तीन ब्राह्मण उदङ्मुख बसवावे, अथवा देवांना एक व पितरांना एक असे बसवावे, मातामहपार्वणाला देखील असेच बसवावे. अथवा मातामहपार्वणाविषयीं पृथक् विश्वेदेव नकोत. तर तंत्रानें[1] विश्वेदेवांची सिद्धि होते." **दीपकलिकेंत पराशर**—"द्रव्यें, पात्रें यांची संपत्ति असेल तर एकएक पितराला तीनतीन ब्राह्मण सांगावे, आणि विश्वेदेवांना चार सांगावे." **वृद्ध याज्ञवल्क्य**—"पार्वणश्राद्धाचेठायीं अकरा अथवा पांच ब्राह्मण सांगावे." ह्या सर्व वचनांची कुटाकूट करून निष्पन्न झालेला अर्थ—वैश्वदेवस्थानीं दोन किंवा चार बसवून पित्रादिकांच्या एकेकाच्या स्थानीं एक, किंवा तीन, अथवा पांच, किंवा सात, अथवा नऊ बसवावे असा आहे. **मनु**—"सुसंपन्न असला तरी त्यानें देवांच्या स्थानीं दोन व पितरांच्या स्थानीं तीन असे ब्राह्मण सांगावे, अथवा दोहींकडे एक एक सांगावा, विस्ताराच्या प्रसंगांत पडूं नये; कारण, विस्तार केला असतां उत्तम कर्म होणें,' योग्यभूमि, अपराह्णादिकाल, शुद्धता आणि गुणी ब्राह्मण मिळणें ह्या पांचांचा विघात होतो, तस्मात् विस्तार करूं नये." **पृथ्वीचंद्रोदयांत शातातप**—"देवांकडे अथर्वणवेदी दोन ब्राह्मण प्राङ्मुख बसवावे. पितरांकडे ऋग्वेदी, यजुर्वेदी व सामवेदी हे तीन ब्राह्मण उदङ्मुख बसवावे."

१ एक कर्म बहुतांना उपयुक्त होतें त्यास तंत्र म्हटलें आहे. एक कर्म करतांना त्यास जोडून दुसरें करणें हेंही तंत्र होय.

अत्यंत अशक्ति असतां **हेमाद्रींत देवल**—"एका ब्राह्मणावरही सहा पिंडांचें श्राद्ध करावें, तेथें सहा पितरांना सहा अर्घ्य द्यावे, तसेंच सहा पितरांस अन्ननिवेदन करावें." **गोभिल**—"जर श्राद्धाविषयीं एक ब्राह्मण सांगावयाचा असेल तर तेथें छंदोग ब्राह्मण सांगावा; कारण, ऋचा, यजु आणि सामें हीं तीन त्या छंदोगाचे ठिकाणीं आहेत."

अत्रवैश्वदेवेविशेषमाहतत्रैव**वसिष्ठः** यद्येकंभोजयेच्छ्राद्धेदैवंतत्रकथंभवेत् अन्नंपात्रेसमुद्धृत्यसर्वस्यप्रकृतस्यच देवतायतनेकृत्वाततःश्राद्धंसमाचरेत् प्रास्येदग्नौतदन्नंतुदद्याद्वाब्रह्मचारिणे एतच्चसपिंडीकरणवर्ज्यंज्ञेयम् नत्वेवैकंसर्वेषांकाममनाद्येइत्या**श्वलायनोक्तेः** अस्यार्थउक्तो**नारायणवृत्तौ** आद्यंसपिंडीकरणंतद्वर्ज्येपुश्राद्धेपुकामंत्रयाणामेकंभोजयेत् सपिंडीकरणेतुनियतंत्रिभिर्भवितव्यमिति अनाद्येपार्वणवर्जितेवा अभोजनेआमहेमश्राद्धादौवा अन्नाभावेइतिव्याख्यांतरंतत्रैवज्ञेयम् **कारिकापि** दैवेपित्र्येथवैकैकंसापिंडीकरणंविनेति अत्रैकविप्रेसाग्नेर्विशेषमाह**पृथ्वीचंद्रोदयेप्रचेताः** एकस्मिन्नब्राह्मणेदैवेसाग्नेरग्निर्भवेत्सदा अनग्नेःकुशमुष्टिःस्याच्छ्राद्धकर्मणिसर्वतः सर्वथाविप्रालाभेतत्रैव**हेमाद्रौचसत्यव्रतः** निधायदर्भनिचयमासनेपुसमाहितः प्रैपानुप्रैपसंयुक्तंसर्वंश्राद्धंप्रकल्पयेत् अत्रानन्यभावात्सत्रेइवऋत्विक्कार्येयजमानविधौनदक्षिणेतिकेचित् तन्न अदृष्टार्थायादक्षिणायाःप्राप्तेः सर्वंतत्त्रिजटेतुभ्यंयच्चश्राद्धमदक्षिणमिति**पाद्मात्** विदध्याद्धौत्रमन्यश्चेद्दक्षिणार्धहरोभवेत् स्वयंचेदुभयंकुर्यादन्यस्मैप्रतिपादयेदिति**छंदोगपरिशिष्टाच्च** एवंयतिश्राद्धेपि **कात्यायनः** यज्ञवस्तुनिमुष्टौचस्तंभेदर्भवटौतथा दर्भसंख्यानविहिताधिष्ठरास्तरणेपुच मातृश्राद्धेतुविप्रालाभे सुवासिन्योपिभोजनीयाइत्याहा**परार्केवृद्धवसिष्ठः** मातृश्राद्धेतुविप्राणामलाभेपूजयेदपि पतिपुत्रान्विताभव्यायोपितोष्टौकुलोद्भवाइति अष्टावितिवृद्धिश्राद्धविषयं ।

त्या एकब्राह्मणाच्या श्राद्धांत विश्वेदेवांविषयीं विशेष सांगतो तेथेंच **वसिष्ठ**—"जर श्राद्धाचेठायीं एक ब्राह्मण सांगावयाचा तर तेथें देवकर्म कसें होईल? तें सांगतो—श्राद्धाविषयीं तयार केलेलें जें अन्न असेल त्यांतून सर्वप्रकारचें अन्न एका पात्रावर वाढून देवाच्यापुढें नेऊन ठेवावें, नंतर श्राद्ध यथाविधि करावें, नंतर देवापुढचें तें अन्न अग्नींत टाकावें अथवा ब्रह्मचाऱ्याला द्यावें." हा एका ब्राह्मणावर श्राद्धाचा प्रकार सपिंडीकरणव्यतिरिक्त श्राद्धाविषयीं समजावा. कारण, 'नत्वेवैकं सर्वेषां काममनाद्ये' असें **आश्वलायन**सूत्र आहे. त्या सूत्राचा अर्थ नारायणवृत्तींत सांगितला आहे तो असा—आद्य म्हणजे सपिंडीकरण त्यावांचून इतर श्राद्धांचेठायीं यथेच्छ ( इच्छेप्रमाणें ) तीन पितरांना एक ब्राह्मण सांगावा, सपिंडीकरणांत तर अवश्य तीन ब्राह्मण सांगावे. हा अनाद्यशब्दाचा अर्थ झाला. अथवा अनाद्य म्हणजे पार्वणवर्जित श्राद्ध त्या ठिकाणीं एकही सांगावा. किंवा अनाद्य म्हणजे भोजनरहित अशा आमश्राद्ध-हिरण्यश्राद्धादिकांत एकही सांगावा. अथवा अनाद्य म्हणजे अन्नाभाव असतां एक सांगावा ही अनाद्य शब्दाची इतर व्याख्या तेथें पहावी. **कारिका**ही "अथवा सपिंडीकरणावांचून इतर श्राद्धांत देवाविषयीं व पित्र्यकर्माविषयीं एकएक ब्राह्मण सांगावा." एका ब्राह्मणावर श्राद्ध कर्तव्य असतां साग्निकाला विशेष सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत प्रचेता**—"सर्वत्र श्राद्धकर्माचेठायीं एक ब्राह्मण सांगितला असतां साग्निकानें वैश्वदेवस्थानीं अग्नि योजावा आणि निराग्निकानें कुशमुष्टि योजावा." सर्वथा ब्राह्मण मिळाला नसतां तेथेंच ( पृथ्वीचंद्रोदयांत ) व **हेमाद्रींत सत्यव्रत**—"समाधान अंतःकरण करून आसनांचेठायीं दर्भनिचय ( कांहीं दर्भ ) ठेवून प्रैष अनुप्रैष ( वचन प्रतिवचन ) यांनीं युक्त असें सर्व श्राद्ध करावें." हेंच चटश्राद्ध होय. जसें-सत्रयागामध्यें ऋत्विजांचें कार्य यजमानांनीं करावयाचें आहे, व इतर ब्राह्मणांचा अभाव आहे म्हणून त्या ठिकाणीं दक्षिणा नाहीं, त्याप्रमाणें त्या चटश्राद्धामध्यें इतर ब्राह्मणांचा अभाव असल्यामुळें दक्षिणा नाहीं, असें **केचित्** म्हणतात. त्यांचें तें म्हणणें बरोबर नाहीं. कारण, अदृष्ट ( न दिसणाऱ्या ) फलासाठीं दक्षिणा पाहिजे असें आहे. "हे त्रिजटे राक्षसि, ज्या श्राद्धांत दक्षिणा नाहीं तें सर्व श्राद्ध तुला प्राप्त होवो." या **पद्मपुराण**वचनावरून दक्षिणारहित श्राद्ध राक्षसीला प्राप्त होतें, असें आहे. आणि "होत्याचें कर्म दुसरा करील तर त्याला अर्धी दक्षिणा मिळेल, आणि स्वतःच यजमान आपलें व होत्याचें अशीं दोन्ही कर्मे करील तर दक्षिणा दुसऱ्या ब्राह्मणाला द्यावी" असें **छंदोगपरिशिष्ट**वचनही आहे. याचप्रमाणें यतींना बसवून श्राद्ध करावयाचे ठिकाणींही समजावें. **कात्यायन**—"यज्ञाच्या वस्तु, दर्भमुष्टि, कुशस्तंब, दर्भवटु (चट), दर्भविष्टर आणि दर्भासन यांचेठिकाणीं दर्भ किती असावे त्यांची संख्या विहित नाहीं." मातेच्या श्राद्धांत तर ब्राह्मण मिळाले नसतां 'सुवासिनींनाही भोजन घालावें, असें सांगतों **अपरार्कांत वृद्धवसिष्ठ**—"मातृश्राद्धांत ब्राह्मण मिळाले नाहींत तर कुलीन पतिपुत्रयुक्त प्रौढ अशा आठ स्त्रियांचीही पूजा करावी." आठ सांगितल्या त्या वृद्धिश्राद्धाविषयीं आहेत.

१ सत्र म्हणून जो याग तो बहुतांनीं करावयाचा आहे, व त्यांत यजमान तेच ऋत्विज होतात, याकरितां दक्षिणा नाहीं.

**पाद्मेउत्तरखंडे** सकृदभ्यर्चितंलिंगंशालग्रामशिलांचयः पीठेसंस्थापयित्वातुश्राद्धंचकुरुतेनरः पितरस्तस्यतिष्ठंतिकल्पकोटिशतंदिवि **चंद्रिकायांमात्स्ये** पठन्निमंत्र्यनियमान्श्रावयेत्पैतृकान्बुधः अक्रोधनैःशौचपरैःसततंब्रह्मचारिभिः भवितव्यंभवद्भिश्चमयाचश्राद्धकारिणा **यत्तु मनुः** सर्वायासविनिर्मुक्तैःकामक्रोधविवर्जितैः भवितव्यंभवद्भिर्नःश्वोभूतेश्राद्धकर्मणीति तत्पूर्वेद्युर्निमंत्रणपरं नतदहः तत्रैव **देवलः** असंभवेपरेद्युर्वाब्राह्मणांस्तान्निमंत्रयेत् अज्ञातीनसमानार्षानयुग्मानात्मशक्तितः **कात्यायनः** अनिंद्येनामंत्रितोनापक्रामेत्केतनंगृह्यशक्तः ।

**पाद्मांत उत्तरखंडांत**—"पूजा केलेलें लिंग तसाच शालिग्राम आसनावर ठेवून जो मनुष्य एकवार श्राद्ध करितो त्याचे पितर शेंकडों कल्पकोटीपर्यंत स्वर्गाचेठायीं राहातात." **चंद्रिकेंत मात्स्यांत**—"ब्राह्मणांस निमंत्रण करून पितृसंबंधि नियम स्वतः पठण करून ब्राह्मणांकडून ऐकवावे" ते नियम—"क्रोधरहित शौचपर सतत ब्रह्मचर्य धारण करणारे असे तुम्हीं व्हा व मी श्राद्धकर्ताही तसाच होतों." आतां जें **मनु** सांगतो—"आमच्या उदयीक श्राद्धकर्माचेठायीं तुम्हीं सर्व आयासरहित व कामक्रोधविवर्जित असे व्हा." तें पूर्वदिवशीं निमंत्रणविषयक आहे, श्राद्धदिवशीं नव्हे. तेथेंच **देवल**—"पूर्वदिवशीं असंभव असतां श्राद्धदिवशीं ज्ञातिभिन्न समानप्रवररहित अयुग्म ( विषम ) अशा—आपल्या शक्तीप्रमाणें—ब्राह्मणांना निमंत्रण द्यावें." **कात्यायन**—"निर्दोष यजमानानें आमंत्रण दिलें व तें घेतल्यावर श्राद्धीं जाण्यास सशक्त असून त्या आमंत्रणाचा त्याग करूं नये."

**अथश्राद्धकर्तृभोक्तृनियमाः** तत्रनिमंत्रितविप्रत्यागेऽ**परार्केयमः** केतनंकारयित्वातुयोतिपातयतिद्विजम् ब्रह्महत्यामवाप्नोतिशूद्रयोनौचजायते आमंत्र्यब्राह्मणंयस्तुयथान्यायंनपूजयेत् अतिकृच्छ्रासुघोरासुतिर्यग्योनिषुजायते प्रमादात्त्यागेतु**हारीतः** प्रमादाद्विस्मृतंज्ञात्वाप्रसाद्यैनंप्रयत्नतः तर्पयित्वायथान्यायंसर्वंतत्फलमश्नुते प्रमादाभावेतु**नारायणः** एतस्मिन्नेनसिप्राप्तेब्राह्मणोनियतःशुचिः यतिचांद्रायणंकृत्वातस्मात्पापात्प्रमुच्यते **यमः** आमंत्रितस्तुयोविप्रोभोक्तुमन्यत्रगच्छति नरकाणांशतंगत्वाचांडालेष्वभिजायते तत्रैव**देवलः** पूर्वंनिमंत्रितोन्येनकुर्यादन्यप्रतिग्रहं भुक्त्वाहारोथवाभुंक्तेसुकृतंतस्यनश्यति यदिविप्रोविलंबेततदोक्त**मादित्यपुराणे** आमंत्रितश्चिरंनैवकुर्याद्विप्रःकदाचन देवतानांपितॄणांचदातुरन्नस्यचैवहि चिरकारीभवेद्द्रोहीपच्यतेनरकाग्निना **पृथ्वीचंद्रोदयेयमः** निमंत्रितस्तुयोविप्रोह्यध्वानंयातिदुर्मतिः भवंतिपितरस्तस्यतंमासंपांसुभोजनाः आमंत्रितस्तुयःश्राद्धेहिंसांवैकुरुतेद्विजः पितरस्तस्यतंमासंभवंतिरुधिराशनाः आमंत्रितस्तुयोविप्रोभारमुद्वहतेद्विजः पितरस्तस्यतंमासंभवंतिस्वेदभोजनाः निमंत्रितस्तुयोविप्रःप्रकुर्यात्कलहंयदि पितरस्तस्यतंमासंभवंतिमलभोजनाः ।

## आतां श्राद्धकर्ता व श्राद्धभोक्ता यांचे नियम सांगतो—

श्राद्धाचेठायीं निमंत्रण केलेल्या ब्राह्मणाचा त्याग केला असतां **अपरार्कांत यम**—"जो मनुष्य आमंत्रण देऊन त्या ब्राह्मणाचा त्याग करील त्यास ब्रह्महत्या दोष प्राप्त होतो व तो मनुष्य शूद्रयोनींत जातो. जो मनुष्य ब्राह्मणास आमंत्रण देऊन त्याची यथायोग्य पूजा करीत नाहीं, तो मनुष्य अतिकष्टदायक भयंकर अशा तिर्यग् ( पश्वादिकांचे ) योनींत उत्पन्न होतो." प्रमादानें त्याग केला असतां **हारीत**—"प्रमादानें ब्राह्मणाची विस्मृति झाली असें जाणून त्या ब्राह्मणाला प्रयत्नानें ( हात जोडून वगैरे ) प्रसन्न करून यथान्याय तृप्त करावा, म्हणजे ब्राह्मणभोजनाचें सर्व फळ मिळतें." प्रमाद नसून बुद्धिपूर्वक त्याग केला असेल तर **नारायण**—"हें ( ब्राह्मणत्यागरूप ) पातक प्राप्त असतां ब्राह्मणानें नियमित शुचिर्भूत होऊन यतिचांद्रायण[1] करावें, म्हणजे त्या पापापासून मुक्त होतो." **यम**—"जो ब्राह्मण एकीकडचें आमंत्रण घेऊन भोजनास दुसरीकडे जातो, तो शंभर नरकांत जाऊन चांडालयोनींत उत्पन्न होतो." तेथेंच **देवल**—"जो ब्राह्मण पूर्वीं एकाचें निमंत्रण घेऊन दुसऱ्याचा प्रतिग्रह करितो, अथवा पूर्वीं आहार भक्षण करून नंतर श्राद्धांत भोजन करितो त्याचें सुकृत नष्ट होतें." जर ब्राह्मणानें विलंब केला तर सांगतो **आदित्यपुराणांत**—"आमंत्रण केलेल्या ब्राह्मणानें कधींही विलंब करूं नये; विलंब करणारा ब्राह्मण देवता, पितर, दाता आणि अन्न इतक्यांचा द्रोही होऊन नरकरूप अग्नीनें पक्व होतो." **पृथ्वीचंद्रोदयांत यम**—"निमंत्रण केलेला जो दुष्टमति ब्राह्मण मार्गक्रमण करितो, त्याचे पितर तो महिना पांसु ( धूलि ) भोजन

१ चांद्रायणाचीं लक्षणें ग्रंथाच्या शेवटीं सांगावयाचीं आहेत, तीं तेथें पाहावीं.

करणारे होतात. जो श्राद्धास आमंत्रित ब्राह्मण हिंसा करितो त्याचे पितर तो महिना रक्तभोजी होतात. जो आमंत्रित ब्राह्मण भार वाहातो त्याचे पितर तो महिना खेदभोजी होतात. जो निमंत्रित ब्राह्मण कलह करील तर त्याचे पितर तो महिना मलभोजी होतात."

**शंखः** निमंत्रितस्तुयःश्राद्धेमैथुनंसेवतेद्विजः श्राद्धंदत्त्वाचभुक्त्वाचयुक्तःस्यान्महतैनसा मैथुनंऋतावपिनिषिद्धम् ऋतुकालेनियुक्तोवानैवगच्छेत्स्त्रियंक्वचित् तत्रगच्छन्नवाप्नोतिह्यनिष्टानिफलानितु इतितत्र**माधवीयेचवृद्धमनूक्तेः** श्राद्धंकरिष्यन्कृत्वावाभुक्त्वावापिनिमंत्रितः उपोष्यचतथाभुक्त्वानोपेयाच्चऋतावपि भोक्ष्यन्करिष्यन्श्वःश्राद्धंपूर्वरात्रौप्रयत्नतः व्यवायंभोजनंचापिऋतावपिविवर्जयेत्इतितत्रैवा**श्वलायनोक्तेश्च विज्ञानेश्वरेण**तुश्राद्धेऋतौगच्छतोपिनदोषइत्युक्तंतत्त्वगतिकगतित्वेज्ञेयम् **बृहस्पतिः** द्विनिशंब्रह्मचारीस्याच्छ्राद्धकृद्ब्राह्मणैःसह अन्यथावर्तमानौतुस्यातांनिरयगामिनौ पुनर्भोजनमध्वानंभारमायासमैथुनम् श्राद्धकृच्छ्राद्धभुक्चैवसर्वमेतद्विवर्जयेत् स्वाध्यायंकलहंचैवदिवास्वापंतथैवच यत्तु **श्राद्धकारिकायांपुराणसमुच्चये** कृत्वातुरुधिरस्रावंनविद्वान्श्राद्धमाचरेत् एकंद्वेत्रीणिवाविद्वान्दिनानिपरिवर्जयेत् इतितन्निर्मूलम् **पृथ्वीचंद्रोदयेयमः** पुनर्भोजनमध्वानंभाराध्ययनमैथुनम् संध्यांप्रतिग्रहंहोमंश्राद्धभोक्ताऽष्टवर्जयेत् इति संध्यानिषेधःप्रायश्चित्तात्पूर्वंज्ञेयः यथाहो**शनाः** दशकृत्वःपिबेदापोगायत्र्याश्राद्धभुक्द्विजः ततःसंध्यामुपासीतजपेच्चजुहुयादपि गौडास्तु सायंसंध्यांपरान्नंचछेदनंचवनस्पतेः अमावास्यांनकुर्वीतरात्रिभोजनमेवच द्यूतंचकलहंचैवसायंसंध्यांदिवाशयम् श्राद्धकर्ताचभोक्ताचपुनर्भुक्तिंचवर्जयेत् इति**कामधेनौवाराहाद्युक्तेः** श्राद्धकर्तुरपिसायंसंध्यानिषेधमाहुः शिष्टास्तुनिर्मूलत्वमाहुः होमनिषेधस्तुस्वविषयः सूतकेचप्रवासेचअशक्तौश्राद्धभोजने एवमादिनिमित्तेषुहावयेन्नतुहापयेत् इति**छंदोगपरिशिष्टात्** तत्रैवा**दित्यपुराणे** निमंत्रितस्तुनश्राद्धेकुर्याद्भार्यादिताडनम् **चंद्रिकायांप्रचेताः** श्राद्धभुक्प्रातरुत्थायप्रकुर्याद्दंतधावनम् श्राद्धकर्तानकुर्वीतदंतानांधावनंबुधः **हेमाद्रौजाबालिः** दंतधावनतांबूलेतैलाभ्यंगमभोजनम् रत्यौषधंपरान्नंचश्राद्धकृत्सप्तवर्जयेत् इति **विष्णुरहस्ये** श्राद्धोपवासदिवसेखादित्वादंतधावनम् गायत्र्याशतसंपूतमंबुप्राश्यविशुध्यति पुनर्भोजनमध्वानंयानमायासमैथुनम् दानप्रतिग्रहौहोमंश्राद्धभुक्त्वष्टवर्जयेत् **सोमोत्पत्तौ** वनस्पतिगतेसोमेयस्तुहिंस्याद्वनस्पतिम् घोरायांभ्रूणहत्यायांयुज्यतेनात्रसंशयः एतद्विहितेध्मादिव्यतिरेकेण वनस्पतिगतेसोमेऽनडुहोयस्तुवाहयेत् नाश्नन्तिपितरस्तस्यदशवर्षाणिपंचच वनस्पतिगतेसोमेमंथानंयस्तुकारयेत् गावस्तस्यप्रणश्यंतिचिरकालमुपस्थिताः वनस्पतिगतस्वरूपमाह **पृथ्वीचंद्रोदयेव्यासः** त्रिमुहूर्तंवसेदर्केत्रिमुहूर्तंवसेज्जले त्रिमुहूर्तंवसेद्गोषुत्रिमुहूर्तंवनस्पतौ **कलिकायांवृद्धमनुः** निमंत्र्यविप्रांस्तदहर्वर्जयेन्मैथुनंक्षुरं प्रमत्ततांचस्वाध्यायंक्रोधाशौचेतथानृतम् केचिन्निमंत्रणात्पूर्वंशुद्ध्यर्थंपूर्वेह्निक्षौरंकुर्वंति तत्रमूलंमृग्यम् **मरीचिः** पष्ठ्यांपर्वसुपक्षादौरिक्ताभद्रातिथिष्वपि पातेश्राद्धेव्रताहेचक्षौरंवर्ज्यंनिशासुच यदाकर्तुरशक्त्यातत्पुत्रशिष्यादिःश्राद्धंकरोतितदाकर्त्राप्रतिनिधिनाचप्रागुक्तनियमाःकार्याः नशक्नोतिस्वयंकर्तुंयदाह्यनवकाशतः श्राद्धंशिष्येणपुत्रेणतदान्येनापिकारयेत् नियमानाचरेत्सोपिनियतांश्चवसुंधरे यजमानोपितान्सर्वानाचरेत्सुसमाहितइति**हेमाद्रौवाराहोक्तेः** स्त्रियास्तु**पाद्मे** मुक्तकच्छातुयानारीमुक्तकेशीतथैवच हसतेवदतेचैवनिराशाःपितरोगताः **आश्वलायनः** श्राद्धेहिभोजयेद्दास्तौनबालानपियत्नतः प्राक्पिंडदानाद्गंधाद्यैर्नालंकुर्यात्स्वविग्रहम् वास्तौगृहे ।

**शंख**—"जो श्राद्धाचेठायीं आमंत्रण केलेला ब्राह्मण मैथुन करितो तो, तसेंच श्राद्ध करून मैथुन करितो किंवा श्राद्धास भोजन करून मैथुन करितो तो मोठ्या पापानें युक्त होतो." मैथुन ऋतुकालींदेखील निषिद्ध आहे. कारण, "श्राद्धास निमंत्रित ब्राह्मण असून ऋतुकालीं नियोगें[1] केलेला असला तरी त्यानें स्त्रीगमन कधींही करूं नये, स्त्रीगमन करणारास अनिष्ट फलें प्राप्त होतात" असें **पृथ्वीचंद्रोदयां**त व **माधवीयां**त **वृद्धमनु**वचन आहे. आणि "उद्यां श्राद्ध करावयाचें असतां

१ नियोग म्हणजे स्त्रीचेठायीं पुत्र उत्पन्न कर, असें जें श्रेष्ठांचें सांगणें तें होय.

पूर्वदिवशीं, अथवा श्राद्ध करून त्या दिवशीं, तसेंच ब्राह्मणानें निमंत्रण घेतल्यानंतर व श्राद्धभोजन केल्यानंतर, तसेंच उपोषण करून त्या दिवशीं व पारणा करून त्या दिवशीं ऋतुकालींही स्त्रीगमन करूं नये. दुसऱ्या दिवशीं श्राद्धभोजनास जाणारा, व श्राद्ध करणारा यानें पूर्वरात्रीं ऋतुकालींदेखील मैथुन व भोजन हें प्रयत्नानें वर्ज्य करावें." असें तेथेंच **आश्वलायन**वचनही आहे. **विज्ञानेश्वरानें** तर श्राद्धदिवशीं ऋतुकालीं स्त्रीगमन केलें तरी दोष नाहीं, असें सांगितलें तें, गमन केल्यावांचून गति नाहीं असें असेल त्याविषयीं समजावें. **बृहस्पति**—"श्राद्धकर्त्यानें ब्राह्मणांसहवर्तमान दोन रात्रीं ब्रह्मचर्य धारण करून असावें, श्राद्धकर्ता व ब्राह्मण हे दोघे ब्रह्मचर्यत्याग करतील तर नरकगामी होतील. श्राद्धकर्ता व भोक्ता यानें पुनः भोजन, मार्गक्रमण, भार वाहाणें, आयास, मैथुन हें सर्व वर्ज्य करावें. तसेंच वेदाध्ययन, कलह, दिवसा निद्रा हीं तशींच वर्ज्य करावीं." आतां जें **श्राद्धकारिकेंत पुराणसमुच्चयांत"** विद्वानानें रक्तस्राव करून श्राद्ध करूं नये, रक्तस्राव केल्यावर एक, दोन अथवा तीन दिवस वर्ज्य करावे" असें सांगितलें तें निर्मूल आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत यम**—"श्राद्धभोक्त्यानें, पुनर्भोजन, मार्गक्रमण, भार वाहाणें, अध्ययन, मैथुन, संध्या, प्रतिग्रह, होम, हीं आठ वर्ज्य करावीं." हा संध्यानिषेध प्रायश्चित्ताच्या पूर्वीं समजावा. कारण, **उशना** सांगतो—"श्राद्धभोक्त्या ब्राह्मणानें गायत्रीनें दाहावेळ उदकाचें अभिमंत्रण करून तें उदक प्राशन करावें, नंतर संध्या करावी, जप करावा, होमही करावा." **गौड** तर—"सायंसंध्या, परान्न, वनस्पतींचें छेदन आणि रात्रींभोजन हीं अमावास्येस करूं नयेत. श्राद्धकर्ता व भोक्ता यानें द्यूत, कलह, सायंसंध्या, दिवसा निद्रा आणि पुनर्भोजन हीं वर्ज्य करावीं" असें **कामधेनु**ग्रंथांत वराहादि वचन आहे. म्हणून श्राद्धकर्त्यालाही सायंसंध्यानिषेध सांगतात. शिष्ट तर हेंच वचन निर्मूल म्हणतात. पूर्वींच्या यमाच्या वचनांत होमनिषेध आहे तो स्वविषयक समजावा. कारण, "आशौचांत, प्रवासांत, सामर्थ्य नसतां, श्राद्धभोजन केलें असतां इत्यादि निमित्तांचे ठायीं दुसऱ्याकडून होम करवावा, होमत्याग करूं नये." असें **छंदोगपरिशिष्ट**वचन आहे. तेथेंच **आदित्यपुराणांत**—"श्राद्धाविषयीं निमंत्रित ब्राह्मणानें भार्यादिकांचें ताडण करूं नये." **चंद्रिकेंत प्रचेता**—"श्राद्धभोक्त्यानें प्रातःकालीं उठून दंतधावन करावें; श्राद्धकर्त्यानें दंतधावन करूं नये." **हेमाद्रींत जाबालि**—"श्राद्धकर्त्यानें दंतधावन, तांबूलभक्षण, तैलाभ्यंग, उपवास, सुरत, औषध, परान्न हीं सात वर्ज्य करावीं." **विष्णुरहस्यांत**—"श्राद्धदिवशीं व उपवासदिवशीं दंतधावन करणारा गायत्रीनें शंभरवेळां अभिमंत्रण केलेलें उदक प्राशन करून शुद्ध होतो. दुसऱ्यांदां भोजन, मार्ग चालणें, वाहनावर बसणें, आयास, मैथुन, दान, प्रतिग्रह, होम हीं आठ श्राद्धभोक्त्यानें वर्ज्य करावीं." सोमोत्पत्तिग्रंथांत—"सोम वनस्पतींत गेला असतां जो मनुष्य वनस्पतीची हिंसा करील तो घोर अशा भ्रूणहत्यापातकानें युक्त होईल, यांत संशय नाहीं." हा निषेध विहित जी इध्मादिकांसाठीं हिंसा ती वर्ज्य करून इतर हिंसाविषयक समजावा. "सोम वनस्पतींत गेला असतां जो बैलांकडून ओझें वाहवितो त्याचे पितर पंधरा वर्षे उपोषित राहतात. सोम वनस्पतींत गेला असतां जो मंथन करितो त्याच्या चिरकाल असलेल्या गाई नष्ट होतात." वनस्पतिगत गेलेल्या सोमाचें स्वरूप सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत व्यास**—"सोम सूर्यांत तीन मुहूर्त राहातो, उदकांत तीन मुहूर्त, गाईंत तीन मुहूर्त आणि वनस्पतींत तीन मुहूर्त राहातो." **कलिकेंत वृद्धमनु**—"ब्राह्मणांस निमंत्रण करून त्या दिवशीं मैथुन, क्षौर, प्रमाद, वेदाध्ययन, क्रोध, अशुचित्व, असत्य हीं वर्ज्य करावीं." केचित् पूर्वदिवशीं निमंत्रणाच्या पूर्वीं शुद्धीसाठीं क्षौर करितात, त्याविषयीं मूळ शोधावें. **मरीचि**—"षष्ठी, पर्वदिवस, प्रतिपदा, रिक्तातिथि, व्यतीपात, श्राद्धदिवस, व्रतदिवस आणि रात्र इतक्यांचेठायीं क्षौर वर्ज्य आहे." जेव्हां कर्त्याला शक्ति नसल्यामुळें त्याचा पुत्र, शिष्य इत्यादिक प्रतिनिधि श्राद्ध करितो तेव्हां पूर्वोक्त नियम कर्त्यानें व प्रतिनिधीनें दोघांनींही करावे; कारण, ज्या वेळीं स्वतः श्राद्ध करण्याविषयीं अशक्त असेल किंवा अवकाश नसेल त्या वेळीं श्राद्ध शिष्याकडून, पुत्राकडून व इतराकडूनही करवावें; श्राद्धाचे सर्व नियम श्राद्धकर्त्यानें ( प्रतिनिधीनें ) व यजमानानेंही आचरण करावे" असें **हेमाद्रींत वराह**वचन आहे. स्त्रियांविषयीं तर **पाद्मांत** सांगतो—"कच्छ सोडलेली, केश सोडलेली, हंसणारी व बोलणारी अशी स्त्री असेल तर पितर निराश होऊन जातात." **आश्वलायन**—"श्राद्धदिवशीं घरांत बालांना देखील भोजन घालूं नये. पिंडदान करण्याच्या पूर्वीं आपल्या देहाला गंधादिकांनीं अलंकार करूं नये."

**अथश्राद्धवस्तूनि** तत्रादौ**कुशाः पृथ्वीचंद्रोदयेदक्षः** समित्पुष्पकुशादीनांद्वितीयःपरिकीर्तितः अष्टधाभक्तेदिनेद्वितीयोभागइत्यर्थः तत्रैव**यमः** समूलस्तुभवेद्दर्भःपितॄणांश्राद्धकर्मणि मूलेनलोकान्जयतिशक्रस्यसुमहात्मनः **व्यासः** तर्पणादीनिकर्माणिपितॄणांयानिकानिचित् तानिस्युर्द्विगुणैर्दर्भैःसप्तपत्रैर्विशेषतः **शालंकायनः** सपिंडीकरणंयावदृजुदर्भैःपितृक्रिया सपिंडीकरणादूर्ध्वंद्विगुणैर्विधिवद्भवेत् **शंखः** अनंतर्गर्भिणंसाग्रंकौशंद्विदलमेवच प्रादेशमात्रंविज्ञेयंपवित्रंयत्रकुत्रचित् **हारीतः** पवित्रंब्राह्मणस्यैवचतुर्भिर्दर्भपिंजुलैः एकैकंन्यूनमुद्दिष्टंवर्णेवर्णेयथाक्रमम् **स्मृत्यर्थसारे** सर्वेषांवाभवेद्वाभ्यांपवित्रंग्रंथितंनवम् **रत्नावल्याम्** द्वयोस्तुपर्वणोर्मध्येपवित्रंधारयेद्बुधः **हेमाद्रौस्कांदे** अनामिकाधृतादर्भाह्येकानामिकयापिवा

द्वाभ्यामनामिकाभ्यांतुधार्येदर्भपवित्रके पवित्राभावेतुतत्रैव**सुमंतुः** समूलाग्रौविगर्भौतुकुशौद्वौदक्षिणेकरे सव्येचैवतथात्रीन्वैबिभृयात्सर्वकर्मसु **बौधायनः** हस्तयोरुभयोर्द्वौद्वावासनेपितथैवच दर्भग्रहणेमंत्रमाह- **शंखः** विरिंचिनासहोत्पन्नपरमेष्ठिनिसर्गेज नुदसर्वाणिपापानिदर्भस्वस्तिकरोभव **स्मृत्यर्थसारे** हुंफट्- कारेणमंत्रेणसकृच्छित्वासमुद्धरेत् **भारद्वाजः** प्रेतक्रियार्थंपित्रर्थमभिचारार्थमेवच दक्षिणाभिमुखश्छिद्या- त्प्राचीनावीतिकोद्विजः कुशाभावेऽ**परार्केसुमंतुः** कुशाःकाशाःशरोगुंद्रोयवादूर्वाथवल्वजाः गोकेशमुंज- कुंदाश्चपूर्वाभावेपरःपरः काशादौविशेषमाह**शंखः** काशहस्तस्तुनाचामेत्कदाचिद्विधिशंकया प्रायश्चित्तेन- युज्येतदूर्वाहस्तस्तथैवच **पृथ्वीचंद्रोदयेयमः** मासिमास्युद्धृतादर्भामासिमास्येवचोदिताः **षट्त्रिंश- न्मते** मासेनस्यादमावास्यादर्भोग्राह्योनवःस्मृतः **गृह्यपरिशिष्टे** येचपिंडाश्रितादर्भायैःकृतंपितृतर्पणं अमेध्याशुचिलिप्तायेतेपांत्यागोविधीयते **लघुहारीतः** पथिदर्भाश्चितौदर्भायेदर्भायज्ञभूमिषु स्तरणासनपिं- डेपुपट्कुशानपरिवर्जयेत् ब्रह्मयज्ञेचयेदर्भायेदर्भाःपितृतर्पणे हतामूत्रपुरीपाभ्यांतेपांत्यागोविधीयते **हेमाद्रौ** अन्यानिचपवित्राणिकुशदूर्वात्मकानिच हेमात्मकपवित्रस्यह्येकांनार्हंतिवैकलाम् ।

## आतां श्राद्धवस्तु सांगतो—

त्यांमध्यें आधीं **कुश** सांगतो—**पृथ्वीचंद्रोदयांत दक्ष**—"समिधा, फुलें, कुश इत्यादिक आणावयाचा काल दिवसाचा दुसरा भाग सांगितला आहे." दिवसाचे आठ भाग करून त्यांतील दुसरा भाग समजावा. तेथेंच **यम**—"पितरांच्या श्राद्धकर्माविषयीं समूळ दर्भ असावा. दर्भमूलाच्या योगानें महात्मा जो इंद्र त्याचे लोक प्राप्त होतात." **व्यास**—पितरांचीं जीं कांहीं तर्पणादिक कार्यें तीं द्विगुण दर्भांनीं करावीं, त्यांत विशेषतः सात पानांचे दर्भ असावे." **शालंकायन**—"सपिंडीकरणापर्यंत पितृक्रिया ऋजुदर्भांनीं करावी, सपिंडीकरणानंतर द्विगुण[1] दर्भांनीं पितृक्रिया यथाविधि होते." **शंख**—"जेथें कोठें पवित्र घ्यावयाचें तेथें आंत दर्भरहित साग्र प्रादेशमात्र अशा दोन दर्भांचें पवित्र समजावें." **हारीत**—"चार दर्भांचें पवित्र ब्राह्मणास सांगितलें आहे. क्षत्रियादि वर्णांना अनुक्रमानें एक एक दर्भानें न्यून पवित्र सांगितलें आहे." **स्मृत्यर्थसारांत**—"अथवा ब्राह्मणादि सर्व वर्णांना दोन दर्भांचें गांठ दिलेलें नवें पवित्र असावें." **रत्नावलींत**—"विद्वानानें दोन पेरांच्या मध्यभागीं पवित्र धारण करावें." **हेमाद्रींत स्कांदांत**—अनामिका म्हणजे कनिष्ठेजवळची अंगुली तींत दर्भपवित्र धारण करावें. एका अनामिकेंत धारण करावें किंवा दोन अनामिकांत दोन दर्भपवित्रें धारण करावीं." पवित्रांचा अभाव असेल तर तेथेंच **सुमंतु**—"सर्व कर्मांत मूळ व अग्र यांनीं युक्त गर्भरहित असे दोन कुश उजव्या हातांत धारण करावे आणि डाव्या हातांत तसेच तीन कुश धारण करावे." **बौधायन**—"दोन हातांमध्यें दोन दोन व तसेच आसनाचे ठायींही दोन दर्भ धारण करावे." दर्भग्रहणाविषयीं मंत्र सांगतो **शंख**—"**विरिंचिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गेज ॥ नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव.**" **स्मृत्यर्थसारांत**—"हुंफट्, या मंत्रानें एकवार कापून दर्भ घ्यावे." **भारद्वाज**—"प्रेतक्रियेसाठीं, पितृकर्मासाठीं व अभिचारा( जारणमारणा )करितां ब्राह्मणानें प्राचीनावीती करून दक्षिणेकडे मुख करून दर्भ कापावे." कुशांचा अभाव असतां **अपरार्कांत सुमंतु**—"कुश, काश ( कसई ), शर ( बाणतृण ), गुंद्र (गोंदणी गवत), जव, दूर्वा, लव्हाळा, गोकेश, मोळ आणि कुंद यांमध्यें पूर्वीच्या अभावीं पुढचे पुढचे घ्यावे." काशादिकांविषयीं विशेष सांगतो **शंख**—"हातांत काश ( कसई ) असतां आचमन करूं नये; कुशांप्रमाणें काश हातांत ठेऊन आचमनाचा विधि आहे अशा शंकेनें जर कधींही आचमन करील तर प्रायश्चित्ती होईल. तशाच दूर्वा हातांत असून आचमन करूं नये." **पृथ्वीचंद्रोदयांत यम**—"ज्या ज्या महिन्यांत दर्भ काढले असतील त्या त्या महिन्यांतच त्यांचा उपयोग सांगितला आहे." **षट्त्रिंशन्मतांत**—"महिन्यानें अमावास्येस नवे दर्भ काढावे, असें सांगितलें आहे." **गृह्यपरिशिष्टांत**—' जे दर्भ पिंडास लागले असतील, ज्या दर्भांनीं पितरांचें तर्पण केलें, ज्या दर्भांस अपवित्र अशुद्ध पदार्थ लागला असेल त्यांचा त्याग करावा." **लघुहारीत**—"मार्गांत पडलेले दर्भ, स्मशानांतील दर्भ, यज्ञभूमीवरचे दर्भ, आस्तरणाचे दर्भ, आसनाचे दर्भ, आणि पिंडाचे दर्भ हे सहा प्रकारचे दर्भ वर्ज्य करावे. ब्रह्मयज्ञाचे दर्भ, पितृतर्पणाचे दर्भ आणि मूत्रपुरीषांनीं दूषित दर्भ या सर्व दर्भांचा त्याग करावा." **हेमाद्रींत**—"कुश, दूर्वा इत्यादिकांचीं इतर पवित्रें सुवर्णपवित्राच्या षोडशांशाची बरोबरी करीत नाहींत."

**अथहविः**हेमाद्रौ**प्रचेताः** कृष्णमाषास्तिलाश्चैवश्रेष्ठाःस्युर्यवशालयः महायवाव्रीहियवास्तथैवच-

---

[1] द्विगुण म्हणजे द्विगुणभग्न ( मोडलेले ) होत.

मधूलिकाः कृष्णाःश्वेताश्चलोहाश्चप्राह्याःस्युःश्राद्धकर्मणि महायवावेणुबीजं मधूलिकायावनालाइतिहेमाद्रिः **कल्पतरुश्च भारते** वर्धमानतिलंश्राद्धमक्षय्यंमनुरब्रवीत् सर्वकामैःसयजतेयस्तिलैर्यजतेपितॄन् **चंद्रिकायांदेवलः** इष्टापूर्तेमृताहेचदर्शेवृद्ध्यष्टकासुच पात्रेभ्यस्तेषुकालेषुदेयंनैवकुभोजनं **सायणीये** अगोधूमंचयच्छ्राद्धंमाषमुद्गविवर्जितं तैलपक्वेनरहितंकृतमप्यकृतंभवेत् **हेमाद्रावत्रिः** अगोधूमंचयच्छ्राद्धंकृतमप्यकृतंभवेत् **तत्रैवब्राह्मे** यवैर्व्रीहितिलैर्माषैर्गोधूमैश्चणकैस्तथा संतर्पयेत्पितॄन्मुद्गैःश्यामाकैःसर्षपद्रवैः नीवारैर्हरिश्यामाकैःप्रियंगुभिरथार्चयेत् **हेमाद्रौकार्ष्णाजिनिः** यदिष्टंजीवतश्चासीत्तद्द्यात्तस्ययत्नतः सतृप्तोदुस्तरंमार्गंततोयातिनसंशयः **कलिकायामाश्वलायनः** कदल्यादिफलैःशस्तैर्मूलैरार्द्रादिकैरपि गोरसैर्मधुनादध्नाश्राद्धेसंतर्पयेत्पितॄन् कदल्याम्रफलादीनिश्राद्धेसंपादयेत्सुधीः ।

## आतां श्राद्धाविषयीं हवि सांगतो—

**हेमाद्रींत प्रचेता**—काळे उडीद, तीळ, जव, तांदूळ, महायव ( वेळूचें बीज ), व्रीहियव तसेच काळे पांढरे लोहवर्णाचे मधूलिक हे सर्व श्राद्धकर्माविषयीं श्रेष्ठ आहेत." मधूलिक म्हणजे यावनाल ( जोंधळे ) असें **हेमाद्रि व कल्पतरु** सांगतो. **भारतांत**—"ज्या श्राद्धांत तीळ वाढल्या प्रमाणांत असतात तें श्राद्ध अक्षय्य होतें, असें मनूनें सांगितलें आहे. ज्यानें तिलांनीं पितरांचा याग ( पूजा ) केला त्यानें इच्छिलेले सारे याग केले असें होतें." **चंद्रिकेंत देवल**—"इष्ट ( यज्ञकर्म ), पूर्त ( वापी, कूप, आराम, देवालय इत्यादि कर्म ), मृतदिवस, दर्श, वृद्धि ( विवाहादि ), अष्टका, ह्या कालांचे ठायीं ब्राह्मणांना कुभोजन ( निंद्यभोजन ) देऊं नये." **सायणीयांत**—"ज्या श्राद्धांत गव्हांचा पदार्थ नाहीं, उडीद व मूग नाहींत आणि तैलपक्व नाहीं तें श्राद्ध केलें तरी न केल्यासारखें होतें." **हेमाद्रींत अत्रि**—"ज्या श्राद्धांत गोधूम ( गहूं ) नाहींत तें श्राद्ध केलें असून न केल्यासारखें होय." तेथेंच **ब्राह्मांत**—"जव, व्रीहि ( भात ), तीळ, उडीद, गोधूम, चणे, मूग, सांवे, मोहरीचा कल्क यांनीं पितरांना तृप्त करावें; आणि देवभात, हरिसांवे, राळे यांनींही पितरांस तृप्त करावें." **हेमाद्रींत कार्ष्णाजिनि**—"जीवंत असतां पित्रादिकांला जो पदार्थ आवडता असेल तो पदार्थ मेल्यानंतर प्रयत्नानें त्याला द्यावा. तो प्राणी तृप्त झाला म्हणजे दुस्तर मार्गाचें उल्लंघन करून जातो, यांत संशय नाहीं." **कलिकेंत आश्वलायन**—"केळीं वगैरे प्रशस्त फळें, आलें इत्यादिक मुळें, गोरस, मध, दहीं यांनीं श्राद्धांत पितरांस तृप्त करावें; श्राद्धाचे ठायीं केळीं, आंबे इत्यादि फळें अवश्य मिळवावीं."

**हेमाद्रौपृथ्वीचंद्रोदयेचमार्कंडेयः** गोधूमैरिक्षुभिर्मुद्गैःसतीनैश्चणकैरपि श्राद्धेषुदत्तैःप्रीयंतेमासमेकंपितामहाः विदार्याचभरुंडैश्चतिलैःशृंगाटकैस्तथा कंचुकैश्चतथाकंदैःकर्कंधूबदरैरपि पालेवतैरारुकैश्चाक्षोटैःपनसैस्तथा काकोल्याक्षीरकाकोल्यातथापिंडालकैःशुभैः लाजाभिश्चसधानाभिस्त्रपुसैर्वारुचिर्भटैः सर्षपाराजशाकाभ्यामिंगुदैराजजंबुभिः प्रियालामलकैर्मुख्यैःफल्गुभिश्चतिलंटकैः वेत्रांकुरैस्तालकंदैश्चक्रिकाक्षीरिकावचैः लोचैःसमोचैर्लकुचैस्तथावैबीजपूरकैः मुंजातकैःपद्मफलैर्भक्ष्यभोज्यैश्चसंस्कृतैः रागखांडवचोष्यैश्चत्रिजातकसमन्वितैः दत्तैस्तुमासंप्रीयंतेश्राद्धेषुपितरोनृणाम् एषांकोशहेमाद्यादिव्याख्या वैद्यकाद्यनुसारेण मध्यदेशभाषयानामान्युच्यंते सतीनैःकलायैः कलायस्तुसतीनकइत्यमरः **बटुरीति**प्रसिद्धैः विदार्योतस्कंदेन **भरुंडं जलजं मकाणा**इतिश्राद्धमंजर्यां **भूकूष्मांड**मित्यन्ये शृंगाटकं**सिंघाडा** कंचुकःकंचनारः कंदःसूरणः अर्शोघ्नःसूरणःकंदइत्यमरः कर्कंधूःवन्यंसूक्ष्मंबदरं पालेवतंकोशातकी आरुकंअरुई अक्षोटं**अखरोटः** काकोलीक्षीरकाकोल्यौगौडेषुप्रसिद्धौ पिंडालकंसुथनी महाराष्ट्राणांमोहलकंदइतिप्रसिद्धं त्रपुसादयस्त्रयःकर्कटीभेदाः चिर्भटं**खर्बुजम्** सर्षपाइतिदीर्घश्छांदसः प्रियालंचिरौंजी फल्गुउदुंबरं तिलंटकंपटोलकं तालकंदःकंदविशेषः चक्रिकातिंतिणीबिंबा क्षीरिका**खीरिणी** मोचंकदलीफलं लकुचंवडहरम् मुंजातकंगौडदेशेप्रसिद्धं पद्मफलंगट्टा रागखांडवःपिप्पलीशुंठियुक्तस्तुमुद्गयूषस्तुखांडवः रागखांडवतांयातिशर्करासंयुतंतुतत् इत्युक्तःपानविशेषः त्रिजातंलवंगैलापत्रकाणि **मदनरत्नेकौर्मे** कालशाकंचवास्तूकंमूलकंकृष्णनालिका प्रशस्तानीतिशेषः ।

**हेमाद्रींत व पृथ्वीचंद्रोदयांत मार्कंडेय**—"गहूं, उंसाचे पदार्थ ( गूळ साखर ), मूग, वाटाणे, चणे, हे श्राद्धांत दिले असतां एक महिनाभर पितामह तृप्त होतात. विदारीकंद, भरुंड ( मकाणा किंवा भुईकोंहाळा ), शिंगाडे, कंचनारकंद, सूरण, मोठें बोर, सूक्ष्मबोर, घोंसाळें, आरुक ( अरुइ ), अक्रोड, फणस, काकोली व क्षीरकाकोली ह्या गौडांत प्रसिद्ध, पिंडालक ( महाराष्ट्रांत मोहलकंद म्हणून प्रसिद्ध ), लाह्या, धाना ( भर्जितयव ), त्रपुस ( कांकडी ), एर्वारु ( कर्कटीविशेष ), चिर्भट ( खर्बुज ), मोहरी, राजशाक, हिंगणबेट, मोठीं जांभळें, प्रियाल ( चिरोंजी, चारोळी ), आंवळे, फल्गु ( उदुंबर ), तिलंटक ( पटोल ), वेताचे अंकुर, तालकंद ( कंदविशेष ), चुक्रिका ( चिंच किंवा तोंडलीं ), क्षीरिका ( खिरणी ), वच, लोच, मोच ( केळें ), लकुच ( वडहर, ओंट ), महाळुंग, मुंजातक ( गौडदेशांत प्रसिद्ध ), पद्मफल ( गट्टा ), भक्ष्य ( लाडू वगैरे ), भोज्य ( अन्नादिक ) हे सारे घृत तैल इत्यादिकांनीं संस्कार केलेले, रागखांडव ( पिंपळी सुंठ यांनीं युक्त मुगांचा यूष ( कढण ) तो खांडव आणि तोच शर्करायुक्त रागखांडव होय ), चोष्य ( चोखून खाण्याचे पदार्थ ), दालचिनी, तमालपत्र, वेलची, हे पदार्थ दिले असतां एक महिनापर्यंत पितरांची तृप्ति होते." **मदनरत्नांत कौर्मांत**—"कालशाक, वास्तूक ( चंदनबटवा ), मुळा, कृष्णनालिका हीं प्रशस्त आहेत."

**हेमाद्रौपृथ्वीचंद्रोदयेचवायुपुराणे** कालशाकंमहाशाकंद्रोणशाकंतथार्द्रकं बिल्वामलकमृद्वीकापनसाम्रातदाडिमं चव्यंपालिवताक्षोटंखर्जूरंचकसेरुकं कोविदारश्चकंदश्चपटोलंबृहतीफलं पिप्पलीमरिचं चैवएलाशुंठीचसैंधवं शर्करागुडकर्पूरबदरीद्रोणपत्रकं **तथा** मधुकंरामठंचैवकर्पूरंगुडमेवच श्राद्धकर्मणि शस्तानिसैंधवंत्रपुसंतथा रामठंहिंगु कसेरुःकोविदारश्चतालकंदस्तथाबिसम् तमालंशतकंदश्चमध्वालुःशीतकंदकं कालेयंकालशाकंचसुनिषण्णंसुवर्चलं मांसंशाकंदधिक्षीरंचांबुवेत्रांकुरस्तथा कट्फलंकौंकणीद्राक्षातिंदुकंमोचमेवच अलाबुंग्रीवकंचारंकर्कंधुर्मधुसाह्वयम् वैकंकतंनारिकेलंशृंगाटकपरूपकं पिप्पलीमरिचेचैवपटोलंबृहतीफलं एवमादीनिचान्यानिस्वादूनिमधुराणिच नागरंचार्द्रकंदेयंदीर्घमूलकमेवचेति **तथा** शर्करा क्षीरसंयुक्ताःपृथुकानित्यमक्षयाः द्रोणशाकंगूमइतिप्रसिद्धम् मृद्वीकाद्राक्षा आम्रातंआंबाडाइतिप्रसिद्धोवृक्षःतत्फलंच पालिवतंजंबीरं पालिआलमितिगौडप्रसिद्धंवा खर्जूरंखजूरइतिप्रसिद्धम् कसेरुःजलजःकंदः कोविदारः कंचनारसदृशः तालकंदःतालमूली बिसंभसीडं शतकंदःशतावरी शालूकंसेरुकीतिप्रसिद्धम् कालेयंकरालसंज्ञःशाकः दारुहरिद्रावेति **पृथ्वीचंद्रोदयः** सुनिषण्णंकर्कटीसदृशंसुलटियाइतिगौडप्रसिद्धं सुवर्चलंशाकविशेषः कट्फलंश्रीपर्णीवृक्षफलं कौंकणीअम्लरसाद्राक्षा तिंदुकंडिंडिसमितिकैदेवः तिंदुफलंवाग्रीवकंफलविशेषः चारंक्षुद्रतालं मधुसाह्वयंमधुकपुष्पंफलंवा वैकंकतंचैंचीतिगौडख्यातम् परूपकंपरूसमितिप्रसिद्धम् नागरंशुंठी **पृथ्वीचंद्रोदयेब्राह्मे** आम्रमाम्रातकंबिल्वंदाडिमंबीजपूरकं प्राचीनामलकंक्षीरंनारिकेरंपरूपकं नारंगकंचखर्जूरंद्राक्षानीलकपित्थकम् एतानिफलजातानिश्राद्धेदेयानियत्नतः **मात्स्ये** अन्नंतुसदधिक्षीरंगोघृतंशर्करान्वितम् मासंप्रीणातिसर्वान्वैपितॄन्नित्याहकेशवः ।

**हेमाद्रींत व पृथ्वीचंद्रोदयांत वायुपुराणांत**—"कालशाक, महाशाक, द्रोणशाक, ( गूम असें प्रसिद्ध ), आलें, बेलफळ, आंवळा, द्राक्ष, फणस, आंबाडा, डाळिंब, चवक, पालिवत ( जंबीर किंवा पलिआल गौडप्रसिद्ध ), अक्रोड, खारीक, कसेरुक ( जलजकंद ), कोविदार, सुरण, पडवळ, डोर्लीफळ, पिंपळी, मिऱ्यें, वेलची, सुंठ, सैंधव, साखर, गूळ, कापूर, बोर, द्रोणपत्रक, तसेंच ज्येष्ठमध, हिंग, कापूर, गूळ, सैंधव, त्रपुस हीं श्राद्धकर्माविषयीं प्रशस्त आहेत. कसेरु, कोविदार ( कंचनारसदृश ), तालकंद ( तालमूली ), कमळाचा देंठ, तमालपत्र, शतकंद ( शतावरी ), मध्वालु, शीतकंदक ( शालूक, सेरुकी असा प्रसिद्ध ), कालेय ( कराल नांवाचा शाक किंवा दारुहळद ), कालशाक, सुनिषण्ण ( कांकडीसारखें सुलटिया म्हणून गौडप्रसिद्ध ), सुवर्चल ( शाकविशेष ), मांस, शाक, दहीं, दूध, उदक, वेत्रांकुर, कट्फल ( श्रीपर्णीवृक्षफळ ), कौंकणी ( आंबट द्राक्ष ), तिंदुक ( डिंडिस किंवा तिंदुफळ ), केळें, द्राक्ष, भोंपळा, ग्रीवक ( फलविशेष ), चारोळी, बोर, मधुसाह्वय ( मोहाचें फूल ), विकंकतफळ ( चैंची असें गौडप्रसिद्ध ), नारळ, शिंगाडे, परूपक ( फाळसा ), पिंपळी, मिऱ्यें, पडवळ, डोर्लीफळ हीं व दुसरीं जीं स्वादिष्ट मधुर असतील तीं श्राद्धांत प्रशस्त आहेत. सुंठ, आलें, लांबटमुळा हीं देखील प्रशस्त आहेत. दूध साखर घालून पोहे द्यावे." **पृथ्वीचंद्रोदयांत ब्राह्मांत**—"आंबा, आंबाडा, बेलफळ, डाळिंब, महाळुंग, प्राचीनामलक, क्षीर, नारळ, फालसा, नारिंग, खारीक, द्राक्ष, नील, कंवठ, हीं सारीं फळें श्राद्धांत मोठ्या यत्नानें द्यावीं." **मात्स्यांत**—"अन्न, दहीं, दूध, गोघृत, शर्करा हीं दिल्यानें सर्व पितरांना एक महिना तृप्त करितात, असें केशव सांगतो."

**याज्ञवल्क्यः** हविष्यान्नेनवैमासंपायसेनतुवत्सरम् मात्स्यहारिणकौरभ्रशाकुनच्छागपार्षतैः ऐणरौरववाराहशाशैर्मांसैर्यथाक्रमं मासवृद्ध्याभितृप्यंतिदत्तैरिहपितामहाः खड्गामिषंमहाशल्कंमधुमुन्यन्नमेवच लोहामिषंकालशाकंमांसंवार्ध्रीणसस्यच ( **निगमः** त्रिःपिबंत्विंद्रियक्षीणंश्वेतंवृद्धमजापतिम् वार्ध्रीणसंतुतंप्राहुर्याज्ञिकाःश्राद्धकर्मणि वार्ध्रीणसोजरच्छागइति**मेधातिथिः कात्यायनः** छागोस्रमेषानालभ्यशेषाणिक्रीत्वालब्ध्वावास्वयंमृतानांवाहृत्यपचेत् **कौर्मे** क्रीत्वालब्ध्वास्वयंवाथमृतानाहृत्यवाद्विजः दद्याच्छ्राद्धेप्रयत्नेनतदस्याक्षय्यमुच्यते) श्राद्धेदत्तस्यमांसस्याभक्षणेदोषमाह**मनुः** नियुक्तस्तुयथान्यायंयोमांसंनात्तिमानवः सप्रेत्यपशुतांयातिसंभवानेकविंशतिं अत्रबहुषुवचनेषुश्राद्धेमांसमधुनोःप्राशस्त्योक्तेः विनामांसेनयच्छ्राद्धंकृतमप्यकृतंभवेदिति**हेमाद्रौदेवलोक्तेः** यच्छ्राद्धंमधुनाहीनंतद्रसैःसकलैरपि मिष्टान्नैरपिसंयुक्तंपितॄणांनैवतृप्तये अणुमात्रमपिश्राद्धेयदिनस्याच्चमाक्षिकम् नामापिकीर्तनीयंस्यात्पितॄणांप्रीतयेततइति **हेमाद्रौब्राह्मोक्तेश्च** मांसमधुनोःश्राद्धेनियतत्वंगम्यते **गौडनिबंधेमात्स्यसुमंतू** मध्वभावेगुडोदेयःक्षीरस्यचतथादधि न लभ्यतेघृतंयत्रकुर्याद्घृतवतीजपं **श्राद्धकलिकायांनागरखंडे** कथंचिद्यदिविप्रेभ्योनदत्तंभोजनेमधु पिंडास्तुनैवदातव्याःकदाचिन्मधुनाविना **बृहत्पराशरस्तु**मांसंनिषेधति यस्तुप्राणिवधंकृत्वामांसैस्तर्पयते पितॄन् सविद्वान्चंदनंदग्ध्वाकुर्यादंगारविक्रयम् क्षिप्त्वाकूपेयथाकिंचिद्बालआदातुमिच्छति पतत्यज्ञानतःसोपिमांसेनश्राद्धकृत्तथा सएव सर्वथान्नंयदानस्यात्तदैवामिषमाश्रयेत् ब्राह्मणश्चस्वयंनाद्यात्तच्चश्वादिहतंयदि **भागवतेपि** नदद्यादामिषंश्राद्धेनचाद्याद्धर्मतत्त्ववित् मुन्यन्नैःस्यात्पराप्रीतिर्यथानपशुहिंसया तथेतिशेषः **अत्रकेचित्** मुन्यन्नंब्राह्मणस्योक्तंमांसंक्षत्रियवैश्ययोः मधुप्रदानंशूद्रस्यसर्वेषांवाविरोधियदिति**हेमाद्रौपुलस्त्यो**क्त्याव्यवस्थामाहुः ।

**याज्ञवल्क्य**—"श्राद्धांत हविष्यान्न दिल्यानें एक मासपर्यंत पितर तृप्त होतात. पायस दिल्यानें एक संवत्सरपर्यंत तृप्त होतात. मत्स्य, हरण, मेंढा, पक्षी, बोकड, पृषत, एण, रुरु, डुकर, ससा यांचें मांस श्राद्धांत दिल्यानें अनुक्रमानें एक एक महिना अधिक पितामहांची तृप्ति होते. खड्गामिष ( गेंड्याचें मांस ), महाशल्य ( साळई ), मध, मुनींचें अन्न ( नीवारादि ), लोहामिष, कालीं उत्पन्न शाक आणि वार्ध्रीणसाचें मांस हीं श्राद्धांत उक्त आहेत." ( निगम–"तीन अवयवांनीं उदक पिणारा इंद्रियें क्षीण झालेला श्वेतवर्ण वृद्ध असा जो बोकड त्याला याज्ञिक, श्राद्धकर्माविषयीं वार्ध्रीणस म्हणतात." वार्ध्रीणस म्हणजे जीर्ण झालेला छाग असें **मेधातिथि** सांगतो. **कात्यायन**—"छाग, मेष यांना मारून मांस घ्यावें, इतरांचें विकत घ्यावें किंवा स्वतः मिळवावें अथवा मृतांचें आणावें आणि पचन करावें." **कौर्मांत**—"द्विजानें विकत घेऊन किंवा स्वतः मिळवून अथवा मृतांचें आणून श्राद्धाचे ठायीं प्रयत्नानें मांस द्यावें, तें दिलें असतां अक्षय होतें." ) श्राद्धांत दिलेलें मांस ब्राह्मणानें भक्षण केलें नाहीं तर दोष सांगतो **मनु**—"यथान्यायानें दिलेलें मांस जो मनुष्य भक्षण करीत नाहीं तो मेल्यानंतर एकवीस जन्मपर्यंत पशु होतो." येथें बहुत वचनांमध्यें श्राद्धांत मांसाला व मधाला प्राशस्त्य सांगितलें आहे; आणि "मांसावांचून जें श्राद्ध तें केलें तरी न केल्यासारखें होतें" असें **हेमाद्रींत देवल**वचन आहे. तसेंच "जें श्राद्ध मधानें रहित तें सकल रसांनीं व मिष्टान्नांनीं जरी युक्त असलें तरी पितरांच्या तृप्तीकरितां होत नाहीं; म्हणून श्राद्धांत जर अल्पही मध नसेल तर पितरांच्या तृप्तीसाठीं मधाचें नांव तरी घ्यावें" असें **हेमाद्रींत ब्राह्म**वचनही आहे. यावरून श्राद्धांत मांस व मध हे नियमानें असावे असें सूचित होतें. **गौडनिबंधांत मात्स्य** व **सुमंतु**—"मधाच्या अभावीं गुड द्यावा, दुधाचे अभावीं दहीं द्यावें, जेथें घृत मिळत नाहीं तेथें घृतवती ऋचेचा जप करावा." **श्राद्धकलिकेंत नागरखंडांत**—"ब्राह्मणांना भोजनाविषयीं कसेंहीकरून जर मध दिला नाहीं तर पिंड तरी मधावांचून कधींही देऊं नयेत." **बृहत्पराशर** तर मांसाचा निषेध करितो.—"जो मनुष्य प्राणिवध करून मांसानें पितरांस तृप्त करितो तो शहाणा चंदन जाळून कोळसे विकतो. जसा बालक कांहीं वस्तु विहिरींत टाकून ती काढण्याविषयीं इच्छितो आणि न जाणतां विहिरींत पडतो, तसा मांसानें श्राद्ध करणारा समजावा." तोच सांगतो—"ज्या वेळीं सर्वथा अन्न मिळावयाचें नाहीं त्या वेळींच मांस घ्यावें, तें मांस कुत्रा इत्यादिकानें मारलेलें असेल तर ब्राह्मणानें स्वतः भक्षण करूं नये." **भागवतांत**ही—"श्राद्धांत आमिष देऊं नये, व धर्मतत्त्ववेत्त्यानें तें मांस भक्षणही करूं नये. जशी ऋषींच्या अन्नांनीं पितरांची परमप्रीति होते तशी पशुहिंसेनें होत नाहीं" असें आहे. ह्या मांसाविषयीं **केचित्ग्रंथकार**—"ब्राह्मणाला ऋष्यन्न सांगितलें, क्षत्रियवैश्यांना मांस सांगितलें

१ हा ग्रंथ पक्का प्रतींत नाहीं, यावरून तो मूळांतील नव्हे असें वाटतें.

आहे, मध हा शूद्राला सांगितला, अथवा जें विरुद्ध नसेल तें सर्वांना उक्त आहे," अशी **हेमाद्रिस्थ पुलस्त्यवचनावरून** व्यवस्था सांगतात.

**पृथ्वीचंद्रोदयस्तु** अक्षतागोपशुश्चैवश्राद्धेमांसंतथामधु देवराच्चसुतोत्पत्तिःकलौपंचविवर्जयेदिति- **निगमोक्तेः** वरातिथिपितृभ्यश्चपशूपाकरणक्रियेति कलिवर्ज्येषु**हेमाद्रावादिपुराणात्** मांसदानंत- थाश्राद्धेवानप्रस्थाश्रमस्तथेत्युक्त्वा इमान्धर्मान्कलियुगेवर्ज्यानाहुर्मनीषिणइति **बृहन्नारदीये**भिधानाच्च- मांसविधिःकलिव्यतिरिक्तविषयः कलौमांसनिषेधानांचदेशाचाराद्व्यवस्था तथाच**बृहन्नारदीये** श्राद्धंप्र- कृत्य यथाचारंप्रदेयंतुमधुमांसादिकंतथा देशाचाराःपरिग्राह्यास्तत्तद्देशीयजैर्नरैः अन्यथापतितोज्ञेयः **सर्व-** धर्मबहिष्कृतइति यस्मिन्देशेपुरेग्रामेत्रैविद्यैर्नगरेपिवा योयत्रविहितोधर्मस्तंधर्मंनविचालयेदिति**भृगूक्ते**श्चे- त्याह तन्न होलाकाधिकरणन्यायेनदेशविशेषव्यवस्थापकपदकल्पनायोगात् निरूपितंचैतत्पितामहचरणैर्मा- समीमांसायामितिदिक् ।

**पृथ्वीचंद्रोदय** तर—"अभुक्त कन्येचा पुनरुद्वाह, मधुपर्कांत गोवध, श्राद्धांत मांस, तसाच मध व दिरापासून पुत्रोत्पत्ति हीं पांच कर्में कलियुगांत वर्ज्य करावीं" असें **निगम**वचन आहे म्हणून आणि 'वर, अतिथि, पितर यांच्याकरितां पशुहिंसा' हें कलिवर्ज्यांत **हेमाद्रींत आदिपुराण**वचन आहे म्हणून आणि 'श्राद्धांत मांसदान, तसाच वानप्रस्थाश्रम' असें सांगून नंतर 'हे धर्म कलियुगांत वर्ज्य आहेत असें विद्वान् सांगतात' असें **बृहन्नारदीयांत**ही सांगितलें आहे म्हणून मांसविधि कलिव्यतिरिक्तविषयक आहे. कलियुगांत मांसनिषेधक वचनें आहेत त्यांची देशाचारावरून व्यवस्था समजावी; कारण, तेंच **बृहन्नारदीयांत** श्राद्धाचा उपक्रम करून सांगतो—"मधु, मांस इत्यादिक जसा आचार असेल तसें द्यावें, त्या त्या देशांतील मनुष्यांनीं त्या त्या देशाचे आचार ग्रहण करावे, देशाचाराविरुद्ध जो आचरण करितो तो पतित सर्वधर्मबहिष्कृत असा समजावा." आणि "ज्या देशांत, ज्या गांवांत अथवा ज्या नगरांत विद्वानांनीं जो धर्म विहित केला त्या धर्माचें उल्लंघन करूं नये" असें **भृगु**वचनही आहे, अशी **पृथ्वीचंद्रोदय** मांसनिषेधाची व्यवस्था सांगतो. तें बरोबर नाहीं. कारण, होलाकाधिकरणन्यायानें मांस अमुकदेशीं द्यावें व अमुकदेशीं देऊं नये अशी व्यवस्था करणाऱ्या पदाची कल्पना होत नाहीं. अर्थात् सर्वदेशविषयक निषेध समजावा. ह्याचें निरूपण पितामहचरणांनीं (**नारायण- भट्टांनीं**) मांसमीमांसेंत केलें आहे. मीं ही दिशा दाखविली आहे.

**मनुः** संवत्सरंतुगव्येनपयसापायसेनच वार्ध्रीणसस्यमांसेनतृप्तिर्द्वादशवार्षिकी त्रिःपिबंत्विंद्रियक्षीणंश्वेतं वृद्धमजापतिं वार्ध्रीणसंतुतंप्राहुर्याज्ञिकाःश्राद्धकर्मणि क्षीरादौविशेषमाह**हेमाद्रौसुमंतुः** पयोदधिघृतंचै- वगवांश्राद्धेपुपावनम् महिषीणांघृतंप्राहुःश्रेष्ठंनतुपयःक्वचित् **याज्ञवल्क्यः** संधिन्यनिर्दशावत्सागोपयःप- रिवर्जयेत् औष्ट्रमैकशफंस्त्रैणमारण्यकमथाविकम् **हेमाद्रौहारीतः** नवसूतायाःसप्तरात्रादित्येके दशरात्रा- दित्यपरे मासेनोपेयुषंभवतीतिधर्मविदः एतद्रजोभावपरं **देवलः** अजाविमहिषीणांतुपयःश्राद्धेषुवर्जयेत् विकारानपयसश्चैवमाहिषंतुघृतंहितम् तत्रैव**ब्राह्मे** माहिषंचामरंमार्गमाविकैकशफोद्भवम् स्त्रैणमौष्ट्रंपाचितं- चदधिक्षीरंत्यजेद्धृतम् सगुडंमरिचाक्तंतुतथापर्युषितंदधि जीर्णतक्रमपेतंचनष्टास्वादंचफेनवत् माहिषापवादो- **परार्के ब्राह्मे** देयंतक्रंतुसद्यस्कंनवनीतादनुद्धृतम् आरण्यमहिषीक्षीरंशर्करास्तुतिसंयुतम् मध्वक्तंतुहितंचैव- दद्यात्तदमृतंयतः स्तुतिःक्षीरशरः **श्राद्धकौमुद्यां**चैवम् यद्यपि **याज्ञवल्क्येन** अन्नंपर्युषितंभोज्यंस्ने- हाक्तंचिरसंस्थितम् अस्नेहाअपिगोधूमयवगोरसविक्रियाइति पर्युषितंदध्यादिभोज्यमुक्तम् तथापिगुडमरी- चाक्तस्यपर्युषितदोषोत्रोच्यतइति**हेमाद्रिः** तत्रैव**ब्राह्मे** कालशाकंतंदुलीयंवास्तुकंमूलकंतथा शाकमारण्यकं-

---

१ होलाकादिक शिष्टाचार व तद्विषयक हारीतादिस्मृतिविशेष विशेषदेशीं प्रमाण आहेत. सर्वदेशीं नाहींत; कारण, होलाकादिक आचार विशेषदेशीं दृष्ट आहेत. जसें—होलाकादिक प्राच्य करितात. वसंतोत्सव होलाका ( होळी ) आन्हीनैबुकादिक दाक्षिणात्य करितात. आपआपल्या कुलपरंपरागत करंज—अर्कादि स्थावरदेवतापूजनादिक हें आन्हीनैबुक म्हटलें आहे. उद्वृषभयज्ञादिक उदीच्य करितात. ज्येष्ठमासाच्या पौर्णिमेस वृषभांची पूजा करून त्यांस धांववावयाचें तो उद्वृषभयज्ञ होय. याप्रमाणें हारीतादिस्मृति विशेषदेशीं दृष्ट आहे यास्तव हे आचार त्या त्या देशींच प्रमाण आहेत सर्व देशीं नाहींत, असें म्हणाल तर तसें नाहीं; कारण, त्या शिष्टाचारावरून व स्मृतिवरून अनुमान केलेला जो वेद तो सर्वसाधारण असल्यामुळें ते आचारही सर्वत्र प्रमाण आहेत.

चैवदद्याच्छ्राद्धेषुनित्यशः तंदुलीयंसूक्ष्मपत्रमितिहेमाद्रिः महाराष्ट्राणांमाठइतिप्रसिद्धम् अरण्यकंफांजीचूचादितत्रैव दाडिमंमागधीचैवनागरार्द्रकतिंतिणी आम्रातकंजीरकंचकुबरंचैवयोजयेत् मागधीपिप्पली नागरंशुंठी कुबरंकुस्तुंबरंधणियाइतिप्रसिद्धम् **वायवीये** अगस्त्यस्यशिखास्ताम्राःकाषायाःसर्वएवच शिखानवपल्लवाः **प्रभासखंडे** आरामस्यतुसीमंताःकलायाःसर्वएवच सीमंताःनवपल्लवाः **कौर्मे** तमालंशतकंदंचमध्वालुःशीतकंदली मध्वालुःमोहलकंदः शीतकंदली राताळू इतिप्रसिद्धम् ।

**मनु**—"गाईचें दूध, पायस दिल्यानें एक वर्षपर्यंत पितरांची तृप्ति होते. वार्ध्रीणसाच्या मांसानें बारावर्षेपर्यंत पितरांची तृप्ति होते. तीन अवयवांनीं पिणारा ( उदक पीत असतां दोन कान पाण्याम लागतात तो ), इंद्रियक्षीण श्वेत वृद्ध असा बोकड त्यास याज्ञिक श्राद्धकर्माविषयीं वार्ध्रीणस म्हणतात." क्षीरादिकांविषयीं विशेष सांगतो हेमाद्रींत **सुमंतु**—"श्राद्धाचे ठायीं दूध, दहीं, तूप हीं गाईचीं पवित्र आहेत. महिषीचें घृत श्रेष्ठ आहे असें सांगतात, दूध श्रेष्ठ आहे असें कोठें नाहीं." **याज्ञवल्क्य**—"गर्भास जाणारी, व्याल्यावर दहा दिवस न झालेली, वत्सरहित अशा गाईचें दूध वर्ज्य करावें. उंटी, एकशफा ( घोडी इत्यादिक ) स्त्रिया, अरण्यांतील पशू, मेंढी यांचें दूध वर्ज्य करावें." **हेमाद्रींत हारीत**—"नवीन प्रसूत झालेलीस सात दिवस झाल्यावर ग्रहण करावें, असें कोणी म्हणतात. दहा दिवसांनंतर घ्यावें, असें दुसरे सांगतात." एक मासानंतर ग्रहण करण्यास योग्य असें धर्मवेत्ते सांगतात. हें रज असेल तर तद्विषयक आहे. **देवल**—"बकरी मेंढी आणि महिषी यांचें दूध श्राद्धांत वर्ज्य करावें आणि दुधाचे विकार ( दहीं, तक्र इत्यादिक ) तेही वर्ज्य करावे. महिषीचें घृत योग्य आहे." **तेथेंच ब्राह्मांत**—"महिषी, चमरी ( मृगविशेष ), मृगी, मेंढी, घोडी इत्यादिक एकशफी, स्त्रिया, उंटी, या सर्वांचें व याचना केलेलें असें दहीं, दूध, घृत हें वर्ज्य करावें. तसेंच गूळ मिऱ्यें घालून पर्युषित ( शिळें ) झालेलें दहीं टाकावें. फुटून निवळी झालेलें, स्वाद नष्ट झालेलें व फेंसयुक्त असें तक्र टाकावें." महिषीदुग्धादिविषयीं अपवाद सांगतो **अपरार्कांत ब्राह्मांत**—"सद्यः त्या वेळीं केलेलें ताक लोणी काढल्याशिवाय द्यावें. अरण्यांतील महिषींचें दूध वरची साय, साखर व मध हे मिश्र करून उत्तम झालेलें तें दूध द्यावें; कारण, तें अमृतासारखें आहे." **श्राद्धकौमुदींत**ही असेंच सांगितलें आहे. जरी **याज्ञवल्क्यानें**—"तैलादिक स्नेहांनीं मिश्रित असें अन्न फार वेळ राहून पर्युषित झालें तरी तें भोज्य ( भक्षणाला योग्य ) आहे आणि गहूं, जव, गोरस यांचे विकार पर्युषित ( शिळे ) असून स्नेहरहित असले तरी ते भोज्य आहेत." ह्या वचनानें पर्युषित दहीं वगैरे भोज्य आहे असें सांगितलें, तथापि गूळ मिऱ्यें यांनीं युक्त जें दहीं त्याला पर्युषितत्व ( शिळेपणाचा ) दोष येथें सांगितला आहे असें **हेमाद्रि** सांगतो. तेथेंच **ब्राह्मांत**—"कालशाक ( उन्हाळी ), तांदुळजा ( माठ ) वास्तुक ( चंदनबटुवा ), मुळा, आरण्यक शाक ( फांजीचूचादि ), हीं शाकें श्राद्धांत नित्य द्यावीं." तांदुळजा सूक्ष्मपानाचा घ्यावा असें **हेमाद्रि** सांगतो. तेथेंच—"डाळिंब, पिंपळी, सुंठ, आलें, चिंच, आंबाडा, जिरें, कोथिंबिर ( धणे ) हीं श्राद्धांत द्यावीं." **वायवीयांत**—"अगस्त्याचे तांबडे नवपल्लव, काषायरंगाचे सारे पल्लव श्राद्धास उक्त आहेत." **प्रभासखंडांत**—"उपवनांतील नवपल्लव, आणि गंडदूर्वा उक्त आहेत." **कौर्मांत**—"तमालपत्र, शतावरी, मध्वालु ( मोहलकंद ), शीतकंदली ( राताळू ), हीं श्राद्धास उक्त आहेत."

**अथवर्ज्यं मार्कंडेयपुराणे** यच्चोत्कोचादिनाप्राप्तंपतिताद्यदुपार्जितम् अन्यायकन्याशुल्कार्थंद्रव्यंचात्रविगर्हितं पित्रर्थंमेप्रयच्छस्वेत्युक्त्वायच्चाप्युपाहृतं **चंद्रोदयेशंखः** भूस्तृणंसुरसाशिग्रुपालंकीमृचुकंतथा कूष्मांडालाबुवार्ताककोविदारांश्चवर्जयेत् पिप्पलींमरिचंचैवतथावैपिंडमूलकम् कृतंचलवणंसर्वंवंशाग्रंचविवर्जयेत् राजमाषान्मसूरांश्चकोद्रवान्कोरदूषकान् लोहितान्वृक्षनिर्यासान्श्राद्धकर्मणिवर्जयेत् भूस्तृणंकाश्मीरदेशेप्रसिद्धं सुरसानिर्गुंडीति**माधवः** तुलसीति**पृथ्वीचंद्रोदयः** साचभक्ष्यत्वेननिषिद्धा नपुष्पत्वेनेति**गौडाः** पालंकीपालकइतिप्रसिद्धा मृचुकंजलजःशाकः ससुकमितिपाठेखदिरशाकइति**हेमाद्रिः** मरीचान्यार्द्राणीति**हेमाद्रिः** कृतलवणंसांभरभिन्नं सैंधवंलवणंचैवतथामानससंभवम् यच्चसामुद्रिकंभवेदिति **शूलपाणौ**पाठः पवित्रेपरमेह्येतेप्रत्यक्षेअपिनित्यशइति**वायवीयोक्तेः** मानसंसांभरम् यत्तु**भविष्यम्** तर्ज्येन्यादंतकाष्ठंचप्रत्यक्षंलवणंतथेति तत्रक्षारलवणंखारीतिप्रसिद्धंनिषिद्धं भुक्त्वातुक्षारलवणंत्रिरात्रंतुवनेवसेदिति**ब्राह्मोक्तेरितिशूलपाणिः** क्षीरलवणमितिपाठात् क्षीरमिश्रंलवणंनिषिद्धमिति**वाचस्पतिः** राजमाषाःरतराइतिप्रसिद्धाः कोरदूषकःवनकोद्रवः **चंद्रिकायांशंखः** पिंडालकंचतुंडीरंकरमर्दंचनालिकं कूष्मांडंबहुबीजानिश्राद्धेदत्वाव्रजत्यधः पिंडालकंमहाराष्ट्रेषुपेंडरमितिप्रसिद्धम् तुंडीरंबिंबीफलमितिकै-

कैदेवः करमर्दंकरवंदमितिप्रसिद्धं तत्रैव बिडालोच्छिष्टमाघ्रातंश्राद्धेयत्नेनवर्जयेत् कूष्मांडंमहिषीक्षीरमाढक्यो राजसर्षपाः चणकाराजमाषाश्चघ्नंतिश्राद्धंनसंशयः ।

## आतां श्राद्धाविषयीं वर्ज्य सांगतो—

**मार्कंडेयपुराणांत**—"भेट-नजराणा इत्यादि प्राप्त झालेलें, पतितापासून संपादन केलेलें, अन्यायानें मिळविलेलें, कन्येचें मूल्यरूप अशा प्रकारचें द्रव्य श्राद्धकर्माविषयीं निंद्य आहे. पितरांच्या श्राद्धाकरितां म्हणून मागून आणलेलें जें द्रव्य तेंही निंद्य आहे." **चंद्रोदयांत शंख** "भूस्तृण, सुरसा, शेकटा, पालंकी, मृचुक, कोंहाळा, भोपळा, वांगें, कोविदार हीं वर्ज्य करावीं. पिंपळी, मिऱ्यें, पिंडमूलक, कृत्रिम लवण, वेळूचे कोंब, राजमाष, मसुरा, कोद्रव ( हरीक ), कोरदूषक, आणि लोहित असे वृक्षाचे चीक हे सारे श्राद्धकर्माविषयीं वर्ज्य करावे." वरील कठिण पदांचा अर्थ–भूस्तृण काश्मीर देशांत प्रसिद्ध. सुरसा म्हणजे निर्गुंडी असें माधव म्हणतो, तुलसी असें **पृथ्वीचंद्रोदय** सांगतो. ती भक्ष्यत्वेंकरून निषिद्ध, पुष्पत्वेंकरून निषिद्ध नाहीं असें **गौड** सांगतात. पालंकी म्हणजे पालक म्हणून प्रसिद्ध आहे. मृचुक म्हणजे जलजशाक आहे. 'मृचुक' या ठिकाणीं 'ससुक' असा पाठ आहे, त्यापक्षीं खदिरशाक असें **हेमाद्रि** सांगतो. मिऱ्यें ओलीं निषिद्ध असें हेमाद्रि सांगतो. कृत्रिम लवण म्हणजे सांभर मिठाहून भिन्न समजावें: कारण, "सेंधेलोण, आणि सांभरमीठ हीं प्रत्यक्ष ( पदार्थांत मिश्र केल्यावांचून ) असलीं तरी नित्य परमपवित्र आहेत" असें **वायुपुराण**वचन आहे. ह्या वचनाच्या दुसऱ्या चरणीं 'यच्च सामुद्रिकं भवेत्' असा **शूलपाणि**ग्रंथांत पाठ आहे त्यापक्षीं समुद्रमीठही पवित्र आहे. आतां जें **भविष्य**वचन—"तर्जनी, दंतधावनकाष्ठ आणि प्रत्यक्ष लवण हीं निषिद्ध" असें आहे, तेथें प्रत्यक्ष लवण म्हणजे क्षारलवण खारी म्हणून प्रसिद्ध तें निषिद्ध होय; कारण, "क्षारलवण भक्षण केलें असतां त्रिरात्र अरण्यांत वास करावा" असें **ब्राह्म**वचन आहे असें **शूलपाणि** सांगतो. ह्या ब्राह्मवचनांत 'क्षीरलवणं' असा पाठ आहे म्हणून क्षीरमिश्रलवण निषिद्ध आहे, असें **वाचस्पति** सांगतो. राजमाष म्हणजे 'रतरा' म्हणून प्रसिद्ध आहेत. कोरदूषक म्हणजे वनांतील कोद्रु ( हरीक ). **चंद्रिकेंत शंख**—"पिंडालक, तुंडीर, करमर्द, नालिका, कूष्मांड, आणि बहुबीजफलें हीं श्राद्धांत दिलीं असतां अधोगतीस जातो." पिंडालक म्हणजे महाराष्ट्रांत पेंडूर म्हणून प्रसिद्ध. तुंडीर म्हणजे बिंबीफळ ( तोंडलें ) असें **कैदेव** सांगतो. करमर्द म्हणजे करवंद म्हणून प्रसिद्ध आहे. तेथेंच—"श्राद्धांत मांजरानें उष्टावलेला पदार्थ, हुंगलेला पदार्थ हा प्रयत्नानें वर्ज्य करावा. कोहाळा, महिषीदुग्ध, तुरी, राजसर्षप, चणे, आणि राजमाष हे श्राद्धाचा घात करितात, यांत संशय नाहीं."

**वृद्धपराशरः** करीरफलपुष्पाणिविडंगमरिचानिच जंभारिकासजंबीरासुपक्वंबीजपूरकम् जंब्वलाबू-निपिप्पल्यःपटोलंपिंडमूलकम् मसूरांजनपुष्पंचश्राद्धेदत्वापतत्यधः जंबूःसूक्ष्मं **माधवीयेचतुर्विंशति-मते** यावनालानकुलित्थांश्चवर्जयंतिविपश्चितः यावनालाजोंधळा अत्रयानिचणकादीनिविहितनिषिद्धानि तेषांविकल्पः अन्यथा श्यामाकैश्चणकैःशाकैर्नीवारैश्चप्रियंगुभिः गोधूमैश्चतिलैर्मुद्गैर्मासंप्रीणयतेपितॄनिति गोधूमैरिक्षुभिर्मुद्गैःसतीनैश्चणकैरपीति**हेमाद्रौकौर्मेविष्णुधर्मादि**विरोधःस्यात् पिप्पलीमरीचादेस्तुप्र-त्यक्षस्यनिषेधोनत्वन्यद्रव्यमिश्रस्य सौवीरतिक्तैर्लवणादिभिस्तुपाकस्यसिद्धिर्महतीहयैस्तु तद्बीजपूरान्मरि-चादियोगात्सिद्धंप्रदेयंनतुदुष्यतीहेति**पृथ्वीचंद्रोदयेवृद्धपराशरोक्तेः** तत्रैव दातुश्चयस्मिन्मनसोभि-लापःश्रद्धाभवेद्यत्रचदीयमाने श्राद्धेपुदेयंविधिवत्तदेवतद्दत्तमक्षय्यमितिब्रुवंति एतन्निषिद्धेतरविषयम् **चंद्रि-कायां** कृष्णधान्यानिसर्वाणिवर्जयेच्छ्राद्धकर्मणि नवर्जयेत्तिलांश्चैवमुद्गमाषांस्तथैवच **मात्स्ये** मसूरशण-निष्पावराजमाषकुसुंभिकाः पद्मबिल्वार्कधत्तूरपारिभद्राटरूपकाः नदेयाःपितृकार्येषुपयश्चाजाविकंतथा कोद्र-वोदारवरककपित्थमधुकातसी एतान्यपिनदेयानिपितृभ्यःश्राद्धमिच्छता निष्पावाःवल्लाः यत्तु**मार्कंडेयः** प्रियंगवःकोविदारानिष्पावाश्चात्रशोभनाइति तत्रनिष्पावःश्वेतशिंबीति**दानसागरे श्राद्धप्रकाशे**चोक्तम् बिल्वंचरक्तंनिषिद्धं जंबीरंरक्तबिल्वंचशालस्यापिफलंत्यजेदिति**ब्राह्मोक्तेः** पारिभद्रेनिंबतरुरित्यमरः **रक्तमं-दारइतिहेमाद्रिः** आटरूषोवासातत्पुष्पं उद्दारःकांचनारः मधुकंज्येष्ठीमध्विति**चंद्रिका** वरकावनमुद्गाः ।

**वृद्धपराशर**—"करीरवृक्षाचीं फलें व पुष्पें, वावडिंगें, मिऱ्यें, जंभारिका, जांभरें लिंबू, पक्व झालेलें महाळुंग, सूक्ष्म जांभूळ, भोंपळा, पिंपळी, पडवळ, पिंडमूलक, मसुरा, अंजन, पुष्प, हीं श्राद्धांत दिलीं असतां अधोगतीस जातो." **माधवीयांत चतुर्विंशतिमतांत**—"यावनाल ( जोंधळे ), आणि कुलित्थ हे विद्वान् वर्ज्य करितात." येथें श्राद्धप्रकरणांत जीं चणकादिक ( आदि शब्दानें अलाबू, पटोल इत्यादि ) विहित असून पुनः निषिद्ध आहेत त्यांचा विकल्प समजावा.

विकल्प न मानला तर "श्यामाक, चणकशाक, नीवार, राळे, गोधूम, तिल, मुग यांनीं एक महिना पितर तृप्त होतात आणि गोधूम, इक्षु, मूग, वाटाणा, चणे यांनींही मासपर्यंत तृप्ति होते" अशा **हेमाद्रीं**तील **कूर्मपुराण विष्णुधर्म** इत्यादि वचनांचा विरोध येईल. पिंपळी, मिऱ्यें इत्यादिक प्रत्यक्ष निषिद्ध आहेत, अन्यद्रव्यमिश्रित निषिद्ध नाहींत. कारण, "ज्या ठिकाणीं आंबट बोर, तिखट, लवण इत्यादिकांनीं उत्तम पाकसिद्धि होते; तेथें महाळुंग, मिऱ्यें इत्यादियोगानें सिद्ध केलेले पदार्थ द्यावे, ते दुष्ट होत नाहींत" असें **पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धपराशर**वचन आहे. तेथेंच—"ज्या पदार्थावर दात्याच्या मनाचा अभिलाष ( आवड ) असेल, व जो पदार्थ देण्याविषयीं श्रद्धा होईल तोच पदार्थ श्राद्धाचे ठायीं द्यावा, तें दान अक्षय्य होतें असें विद्वान् बोलतात." हें वचन निषिद्धपदार्थव्यतिरिक्त विषयक आहे. **चंद्रिकेंत**—"श्राद्धकर्मांत सारीं काळीं धान्यें वर्ज्य करावीं. तिल, मूग, उडीद हे कृष्ण असले तरी वर्ज्य करूं नयेत." **मात्स्यांत**—"मसुरा, तागाचें बीज, निष्पाव, राजमाष, कुसुंभिका, कमल, बेलफळ, रुई, धोतरा, पारिभद्र, आटरूषक हे पितृकार्यांत देऊं नयेत. तसेंच बकरीचें व मेंढीचें दूध देऊं नये. कोद्रव, उद्दार, वरक, कपित्थ, मधुक, जवस, श्राद्ध इच्छिणारानें हीं देखील पितरांना देऊं नयेत." कठिण शब्दांचा अर्थ १ निष्पाव म्हणजे वाल. आतां जे **मार्कंडेय** सांगतो कीं "प्रियंगु ( राळे ), कोविदार, आणि निष्पाव हे श्राद्धांत प्रशस्त" तेथें ( मार्कंडेयवचनांत ) निष्पाव म्हणजे श्वेतशिंबी असें **दानसागरांत** व **श्राद्धप्रकाशांत** उक्त आहे. २ रक्तबेलफळ निषिद्ध. कारण, "जंबीर, रक्तबेलफळ आणि शालाचें फळ हें टाकावें" असें **ब्राह्म**वचन आहे. ३ पारिभद्र म्हणजे कडूनिंब, असें **अमरांत** आहे. रक्तमंदार असें **हेमाद्रि** सांगतो. ४ आटरूषक म्हणजे अडुळसा त्याचें फूल. ५ उद्दार म्हणजे कांचनार. ६ वरक म्हणजे वनमूग. ७ मधुक म्हणजे ज्येष्ठीमध असें **चंद्रिका**कार सांगतो.

**हेमाद्रौब्रह्मांडे** आसनारूढमन्नाद्यंपादोपहतमेवच अमेध्यैर्जंगमैःस्पृष्टंशुष्कंपर्युषितंचयत् द्विःस्विन्नं परिदग्धंचतथैवाग्रावलेहितम् शर्कराकीटपाषाणैःकेशैर्यच्चाप्युपद्रुतम् पिण्याकंमथितंचैवतथातिलवणंचयत् सिद्धाःकृताश्चयेभक्ष्याःप्रत्यक्षलवणीकृताः वाससाचावधूतानिवर्ज्यानिश्राद्धकर्मणि द्विःस्विन्नंयत्सकृत्पाकेन भक्ष्यमपिहिंगुजीरकादिसंस्कारार्थंपुनःपच्यतेतद्वर्ज्यम् यत्तुतिक्तशाकान्नविकारादिद्विःपाकेनैवभक्षणार्हंतन्न निषिद्धं अग्रावलेहितमास्वादितपूर्वं पर्युषितस्यसदानिषेधेपिपुनर्वचनं अपूपाश्चकरंभाश्चधानावटकसक्तवः शाकंमांसमपूपंचसूपंकृसरमेवच यवागूःपायसंचैवयच्चान्यत्स्नेहसंयुतं सर्वंपर्युषितंभोज्यंभुक्तंचेत्परिवर्जये-दिति **माधवीये**यमोक्तवटकादेरपिपर्युषितस्यनिषेधार्थमितिच**चंद्रिकादयः** वर्ज्येषु**विश्वामित्रः** कपित्थंकुसुमंचैवनालिकेलंचपैनिकम् जंबूफलादिपक्वंचपिण्याकंतंदुलीयकम् **हेमाद्रौषट्त्रिंशन्मते** वर्ज्यामर्कटकाःश्राद्धेराजमाषास्तथैवच मर्कटकाः लांकाइतिप्रसिद्धाः **पैठीनसिः** वृंताकंनलिकापोतकुसुंभाश्मंतकानिच शाकानामभक्ष्याइति पोतंपोईइतिप्रसिद्धम् **मार्कंडेयः** वर्ज्याश्चाभिषवानित्यंशतपुष्पागवेधुकाः जंबीरकंफलंवर्ज्यंकोविदारश्चनित्यशः अभिषवःसूक्तमितिच**चंद्रिका** संधानकमिति**पृथ्वीचंद्रः** शतपुष्पा ओंवाइतिप्रसिद्धम् **शाट्यायनः** मारिषंनालिकाचैवरक्तायाचकलंबिका असुरान्नमिदंसर्वंपितॄणांनोपतिष्ठते मारिषं मध्यदेशेमरुसाइतिमहाराष्ट्रेषुराजगिराइतिप्रसिद्धं कलंबिकावेण्वाकृतिपत्रा तत्रैव गांधारिकापटोलानि-श्राद्धकर्मणिवर्जयेत् गांधारिकातंदुलीयमितिच**चंद्रिका** जवासाख्यादुरालभेति**कैदेवः** **भारते** हिंगुद्रव्येषुशाकेषुअलाबुंलशुनंतथा कुकुंडकान्यलाबूनिकृष्णंलवणमेवच पुनरलाबुग्रहणमुभयालाबुनिषेधार्थमिति **पृथ्वीचंद्रः** कुकुंडकंवर्तुलंछत्राकम् तत्रैव कुस्तुंबुरुंकलिंगोत्थंवर्जयेदाम्लवेतसम् ।

**हेमाद्रींत ब्रह्मांडपुराणांत**—"जें अन्नादिक आसनावर पडलेलें, पाय लागलेलें, अपवित्र अशा मार्जारादिकांनीं स्पृष्ट झालेलें, शुष्क, पर्युषित ( शिळें ), 'द्विःस्विन्न' ( दोन वेळां पक्व केलेलें ), करपलेलें, पूर्वी चाखून पाहिलेलें, वाळू, कीटक, पाषाण व केश यांनीं मिश्रित, पिण्याक ( पेंड ), घुसळलेलें, अतिखारट, जे तयार केलेले भक्ष्य प्रत्यक्ष लवणासारखे झाले ते, वस्त्रानें गाळलेले पदार्थ हे सारे श्राद्धकर्मांत वर्ज्य आहेत." द्विःस्विन्न म्हणजे जें एक वेळां पक्व केल्यानें भक्षणास योग्य असतांही हिंग, जिरें इत्यादि संस्काराकरितां पुनः पक्व करितात तें वर्ज्य होय. जें कडुशाक, अन्नविकृति इत्यादिक द्विवार पक्व केल्यानेंच भक्षणास योग्य होतें तें निषिद्ध नाहीं. पर्युषित सदा निषिद्ध असतां पुनः या वचनांत पर्युषित निषिद्ध सांगितलें याचा हेतु असा आहे कीं, "अपूप, करंभ, धाना ( भ्रष्टयव ), वटक, सातु, शाक, मांस, अपूप, सूप ( वरण ), खिचडी, यवागू, पायस आणि जें दुसरें स्नेहयुक्त असेल तें सारें पर्युषित भोज्य आहे; त्यांतील भक्षण केलेलें असेल तर वर्ज्य करावें." या माधवीय ग्रंथांतील यमवचनानें पर्युषित वटकादि भोज्य सांगितलें त्याचाही निषेध करण्यासाठीं

पुनः पर्युषित ग्रहण आहे, असें **चंद्रिकाकारादिक** म्हणतात. वर्ज्यांचे ठायीं **विश्वामित्र** सांगतो–कपित्थ, नारळाचें पुष्प, पैनिक, पिकलेलें जांभूळ वगैरे, पिण्याक (तिळकूट), तांदूळजा हीं वर्ज्य होत." **हेमाद्रींत षट्त्रिंशन्मतांत**—"श्राद्धांत मर्कटक (लांक), तसेंच राजमाष हे वर्ज्य होत." **पैठीनसि**—"वांगें, नलिका, पोत (पोई), कुसुंभ, अश्मंतक (आपटा) हीं शाकांमध्यें अभक्ष्य आहेत." **मार्कंडेय**—"अभिषव (सूक्त किंवा संधानक), शतपुष्पा (ओंवा), गवेधुका (कसईचें बीं, कसाड) हीं नित्यवर्ज्य आहेत. जंबीरफल आणि कोविदार (कांचन) हीं नित्य वर्ज्य होत." **शाठ्यायन**—"मारिष, नालिका, (कमलाचा दंड), लालकलंबिका (वेळूसारख्या पत्राची थोर मयाळ) हें सारें असुरांचें अन्न आहे, पितरांना प्राप्त होत नाहीं." १ मारिष म्हणजे मध्यदेशांत मरुसा म्हणतात. महाराष्ट्रांत राजगिरा म्हणून प्रसिद्ध. तेथेंच–"गांधारिका आणि पटोलें (पडवळ) हीं श्राद्धकर्मांत वर्ज्य करावीं." २ गांधारिका म्हणजे तांदुळजा असें चंद्रिकाकार म्हणतो. जवासा (धमासा) असें कैदेव म्हणतो. **भारतांत**—"पदार्थांत व शाकांत हिंग वर्ज्य करावा; तसाच अलाबु (भोंपळा), लसूण, कुकुंडक (वर्तुलछत्राक), अलाबु, आणि काळें मीठ हीं वर्ज्य करावीं" दोन वेळां 'अलाबु' याचें ग्रहण केलें आहे तें दोन प्रकारच्या अलाबूंचा (भोंपळयांचा) निषेध करण्यासाठीं आहे, असें **पृथ्वीचंद्र** म्हणतो. **तेथेंच**–"कालिंग देशांतील कुस्तुंबुरु (कोथिंबीर) आणि अम्लवेतस वर्ज्य करावें."

**हेमाद्रौब्राह्मे** वार्ताकंपंचशिंबंचलोमशानिफलानिच कलिंगंरक्तचारंचवीणाकंधृतचारकम् कपालं काचमारीचकरंजंपिंडमूलकम् गृंजनंचुक्रिकांचैवगाजरंजीवकंतथा वृंताकंश्वेतं कंडूरांश्वेतवृंताकंकुंभांडंचवि वर्जयेदिति**देवलोक्तेः** तेनकृष्णस्यानिषेधइति**चंद्रिकामाधवौ** वस्तुतस्तुसदाश्वेतनिषेधात्पुनःश्राद्धेनि षेधोऽयर्थः तेनभक्ष्यस्यकृष्णवृंताकस्यापिनिषेधार्थमिदमितिवयम् कंडूराकपिकच्छूः कुंभांडंवृत्तालाबुः पंचशिंबंवल्लमसूरराजमाषमठकुलित्थाः लोमशानिकपित्थानि रक्तचारंलोहितचारफलम् वीणाकंकृष्णदीर्घकर्कटी धृतचारकंचिरस्थितचारफलम् चारोलीतिप्रसिद्धं कपालंनारिकेलं काचंकचुवृक्षफलं मारीचंआर्द्रमरीचानि गृंजनंपलांडुभेदः पश्चिमदिशिप्रसिद्धः नतुगाजरम् तस्यपृथगुक्तेः **हेमाद्रिणातुगृंजनंगाजरमेवोक्तम् गौडश्राद्धकौमुद्यामप्येवं** तच्चिंत्यम् चुक्रिकाचिरकालशुक्तंपानकम् **चंद्रिकायांहारीतः** नवटप्लक्षोदुंबरशेलुदधित्थनीपमातुलिंगानिभक्षयेत् शेलुःश्लेष्मातकःभोकरसंज्ञः दधित्थंकपित्थं **स्मृतिसारे** क्षीरेतुलवणंदत्वाउच्छिष्टेपिचयद्घृतम् स्नानंरजकतीर्थेपुताम्रेगव्यंसुरासमम् **गौडनिबंधसागरेस्मृतिः** नारिकेरोदकंकांस्येताम्रपात्रेस्थितंमधु गव्यंचताम्रपात्रस्थंमद्यतुल्यंघृतंविना ताम्रपात्रेघृतंमांसंयच्चगव्यंघृतेतरत् आमिषंतुगवांमांसंदधिमद्यंपयोरजः द्रव्यांतरयुतंमांसंपयसासंयुतंदधि पयोनुद्धृतसारंचताम्रपात्रेनदुष्यति।

**हेमाद्रींत ब्राह्मांत**—"वृंताक (वांगें), पंचशिंब, लोमश (कंवठ), कलिंगड, रक्तचार (लोहितचारफल), वीणाक (लांबट काळी कांकडी), धृतचारक (चारोळी), कपाल (नारळ), काच (कचुकवृक्षफल), मारीच (ओलीं मिऱ्यें), करंज, पिंडमूलक, गृंजन, चुक्रिका, गाजर, जीवक हीं वर्ज्य होत." वृंताक श्वेत निषिद्ध. कारण, "कंडूरा (कुहिली), श्वेतवृंताक आणि कुंभांड (वर्तुल भोंपळा) वर्ज्य करावें." असें **देवल**वचन आहे. तेणेंकरून कृष्णवृंताकाचा निषेध नाहीं जसें **चंद्रिका** आणि **माधव** सांगतो. वास्तविक म्हटलें तर श्वेतवृंताकाचा सदा निषेध असल्यामुळें पुनः श्राद्धांत निषेध करण्याचें कारण नसून ज्यापेक्षां श्राद्धांत निषेध केला, त्यापेक्षां भक्ष्य असें जें कृष्णवृंताक त्याचाही श्राद्धांत निषेध आहे, असें आम्हीं (कमलाकरभट्ट) म्हणतों. पंचशिंब म्हणजे वाल, मसुरा, राजमाष, मठ, आणि कुलित्थ होत. गृंजन म्हणजे पलांडूची एक जात पश्चिमदेशांत प्रसिद्ध आहे. गाजर नव्हे. कारण, तें वेगळें सांगितलें आहे. **हेमाद्रीनें** गृंजन म्हणजे गाजरच सांगितलें. गौड**श्राद्धकौमुदींत**ही असेंच आहे. तें चिंत्य (प्रमाणशून्य होय). चुक्रिका म्हणजे मधुर द्रव पदार्थ चिरकाल राहून आंबट झालेला होय. **चंद्रिकेंत हारीत**—"वट, प्लक्ष (पायरी), उंबर, शेलु (भोंकर), कंवठ, नीप, महाळुंग हीं भक्षण करूं नयेत." **स्मृतिसारांत**—"दुधांत मीठ, उच्छिष्ट पदार्थांत घृत, रजकांच्या तीर्थांत स्नान, आणि ताम्रपात्रांत गोरस हें सुरातुल्य होतें." **गौडनिबंधसागरांत स्मृति**—कांस्यपात्रांत नारळाचें पाणी, ताम्रपात्रांत मध, आणि ताम्रपात्रांत घृतावांचून इतर गोरस हीं मद्यतुल्य होतात. ताम्रपात्रांत घृतावांचून इतर गोरस ठेवले असतां मांस, तुल्य होतात. ताम्रपात्रांत आमिष गोमांस होतें, दहीं मद्य होतें, आणि दूध रज होतें. अन्यद्रव्यानें युक्त मांस, दुधानें युक्त दहीं, आणि लोणी काढल्यावांचून दूध हीं ताम्रपात्रांत दुष्ट होत नाहींत."

**अथजलम् याज्ञवल्क्यः** शुचिगोतृप्तिकृत्तोयंप्रकृतिस्थंमहीगतं **वर्ज्यंजलमुक्तंहेमाद्रौब्राह्मे** दुर्गंधिफेनिलंक्षारंपंकिलंपल्वलोदकम् नभवेद्यत्रगोतृप्तिर्नक्तंयच्चाप्युपाहृतम्, यच्चसर्वार्थमुत्सृष्टंयच्चाभोज्य-

**निपानजम्** तद्वर्ज्यंसलिलंतातसदैवश्राद्धकर्मणि निपानोजलाशयः शुद्धितत्त्वे**शंखः** स्नानमाचमनंदानंदेवतापितृतर्पणं शूद्रोदकैर्नकुर्वीततथामेघाद्विनिःसृतैः **हेमाद्रावादित्यपुराणे** चिरंपर्युषितंवापिशूद्रस्पृष्टमथापिवा जाह्नव्याःस्नानदानादौपुनात्येवसदापयः **कात्यायनः** अपोनिशिनगृह्णीयान्नपिबेन्नकदाचन उद्धृत्याग्निमुपर्यग्नेर्धाम्नोधाम्नइतीरयेत् रजोदोषेतुप्रागुक्तं **नारदीये** त्यजेत्पर्युषितंपुष्पंत्यजेत्पर्युषितंजलम् नत्यजेज्जाह्नवीतोयंतुलसीबिल्वपङ्कजम् ।

## आतां उदक सांगतो—

**याज्ञवल्क्य**—"जेथें गाईची तृप्ति होत असते त्या ठिकाणचें भूमिगत न बिघडलेलें उदक शुद्ध आहे." वर्ज्य उदक सांगतो **हेमाद्रींत ब्रह्मांडपुराणांत**—"दुर्गंधयुक्त, फेंसयुक्त, खारट, गढूळ, अल्पसरोवरांतील, जेथें गाईची तृप्ति होत नाहीं तें व रात्रीं आणलेलें उदक वर्ज्य ज्या उदकाचा सर्वांकरितां उत्सर्ग केलेला नाहीं तें आणि अभोज्य जे शूद्रादिक त्यांच्या जलाशयांतील असलेलें उदक श्राद्धकर्माचे ठायीं सदा वर्ज्य करावें." **शुद्धितत्त्वांत शंख**—"स्नान, आचमन, दान, देव, आणि पितर यांचें तर्पण हीं कृत्यें शूद्रोदकांनीं करूं नयेत. तशींच पावसाच्या पाण्यानें करूं नयेत." **हेमाद्रींत आदित्यपुराणांत**—"भागीरथीचें उदक बहुत दिवस राहिलेलें असलें तरी अथवा शूद्रस्पृष्ट झालें तरी स्नानदानादिकर्माविषयीं सदा पवित्रच करणारें आहे." **कात्यायन**—"उदक रात्रीं आणूं नये. व रात्रीं कधींही पिऊं नये. प्याल्यावांचून गति नसेल तर अग्नीचा उद्धार ( प्रज्वलन ) करून त्याजवर उदक ठेऊन 'धाम्नो धाम्नो०' हा मंत्र म्हणून नंतर प्यावें." उदकाला रजोदोष असेल तर पूर्वी ( द्वितीयपरिच्छेदांत ) सांगितला आहे. **नारदीयांत**—"पर्युषित पुष्प टाकावें व पर्युषित उदक टाकावें. परंतु भागीरथीचें उदक, तुलसीपत्र, बिल्वपत्र, आणि कमल हीं पर्युषित टाकूं नयेत."

अन्यान्यपि**पृथ्वीचंद्रोदयेमात्स्ये** मध्याह्नःखड्गपात्रंचतथानेपालकंबलः रौप्यंदर्भास्तिलागावोदौहित्रश्चाष्टमःस्मृतः पापंकुत्सितमित्याहुस्तस्यसंतापकारिणः अष्टावेतेयतस्तस्मात्कुतपाइतिविश्रुताः **ब्राह्मे** यतित्रिदंडःकरुणाराजतंपात्रमेवच दौहित्रंकुतपःकालश्छागःकृष्णाजिनंतथा शस्तानीतिशेषः दौहित्रंखड्गपात्रमितिकल्पतरुः **अपरार्केस्मृत्यंतरे** अपत्यंदुहितुश्चैवखड्गपात्रंतथैवच घृतंचकपिलायागोर्दौहित्रमितिकीर्तितम् **ब्रह्मांडे** अमावास्यागतेसोमेयातुखादतिगौस्तृणम् तस्यागोर्यद्भवेत्क्षीरंतद्दौहित्रमुदाहृतम् **स्मृतिसंग्रहे** उच्छिष्टंशिवनिर्माल्यंवांतंचमृतकर्पटम् श्राद्धेसप्तपवित्राणिदौहित्रःकुतपस्तिलाः उच्छिष्टंवत्सस्यदुग्धमित्यर्थः शिवनिर्माल्यंगंगोदकं वांतंमधु मृतकर्पटंतसरीपट्टम् तिलेष्वापस्तंबः अटव्यांयेसमुत्पन्नाअकृष्टफलितास्तथा तेवैश्राद्धेपवित्राःस्युस्तिलास्तेनतिलास्तिलाः अभावेग्राम्याः गौराःकृष्णास्तथारण्यास्तथैव त्रिविधास्तिलाइतिब्राह्मोक्तेः ।

इतरही सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत मात्स्यांत**—"मध्याह्न, खड्गपात्र, नेपालकंबल ( शाल ), रौप्य, दर्भ, तिल, गाई, आठवा दुहितापुत्र, हे आठ कुतप आहेत; कारण, पापाला 'कु' म्हणजे कुत्सित म्हणतात. त्याला ताप ( नाश ) करणारे हे आठ पदार्थ आहेत म्हणून हे कुतप म्हटले आहेत." **ब्राह्मांत**—"त्रिदंडसंन्यासी, दया, रुप्याचें पात्र, दौहित्र, कुतपकाल ( आठवा मुहूर्त ), बोकड, आणि कृष्णाजिन हीं प्रशस्त आहेत." दौहित्र म्हणजे खड्गपात्र असें **कल्पतरु** सांगतो. **अपरार्कांत स्मृत्यंतरांत**—"कन्येचें अपत्य, खड्गपात्र, कपिलागाईचें घृत, यांना दौहित्र म्हटलें आहे." **ब्रह्मांडपुराणांत**—"अमावास्येच्या दिवशीं सोम तृणांत गेला असतां जी गाय तृण भक्षण करिते त्या गाईचें जें दूध तें दौहित्र म्हटलें आहे." **स्मृतिसंग्रहांत**—"उच्छिष्ट ( वत्सोच्छिष्टदुग्ध ), शिवनिर्माल्य ( गंगोदक ), वांत ( मध ), मृतकर्पट ( तसरीपट्ट ), दौहित्र, कुतप आणि तिल हे सात पदार्थ श्राद्धाविषयीं पवित्र होत." तिलांविषयीं **आपस्तंब**—"नांगरल्यावांचून अरण्यांत जे उत्पन्न झालेले ते तिल श्राद्धांत पवित्र आहेत. इतर तिल ते तिल नव्हत." त्यांच्या अभावीं ग्राम्य घ्यावेत; कारण, "गौर, कृष्ण आणि आरण्य ( अरण्यांत उत्पन्न ) असे तीळ तीन प्रकारचे." असें ब्राह्मवचन आहे.

**अथवर्ज्यानि चंद्रिकायांयमः** कुक्कुटोविड्वराहश्चकाकश्चाथबिडालकः वृषलीपतिश्चवृषलःषंढोवीरारजस्वला एतेतुश्राद्धकालेवैवर्जनीयाःप्रयत्नतः खंजःकाणःकुणिःश्वित्रीदातुःप्रेष्यकरस्तथा न्यूनांगोप्यतिरिक्तांगस्तमप्यपनयेत्ततः **वायवीये** अन्नंपश्येयुरेतेतुयदिवैहव्यकव्ययोः उत्सृष्टव्यंप्रधानार्थंसंस्कारस्त्वापदिस्मृतः **सुमंतुः** चांडालादिवीक्षितमन्नमभोज्यमन्यत्रसद्भस्महिरण्योदकस्पर्शात् तत्रैव**जमदग्निः** शुद्ध-

वत्योथकूष्मांड्यःपावमान्यस्तरत्समाः पूतेनवारिणादर्भैरन्नदोषमपानुदेत् **चंद्रोदये** पादुकोपानहौछत्रंचित्र-रक्तांबरंतथा रक्तपुष्पंचमार्जारंश्राद्धभूमौविवर्जयेत् **निर्णयदीपे** घंटानिनादोहयसंनिधानंशंबूकशंखंकद-लीदलंच उन्मत्तजात्यर्कहयारिजानिश्राद्धस्यवैगुण्यकराण्यमूनि हयारिजंमहिषीक्षीरादि ।

## आतां वर्ज्य सांगतो—

**चंद्रिकेंत यम**—"कोंबडा, गांवडुकर, कावळा, मार्जार, शूद्रिणीचा पति, शूद्र, नपुंसक, पतिपुत्ररहित स्त्री, रजस्वला, हे श्राद्धकालीं प्रयत्नानें वर्ज्य करावे. लुला, काणा, हात गेलेला, पांढऱ्या कोडाचा, चाकर, अंगविकल, अधिक अवयवाचा, यांना श्राद्धस्थानापासून दूर करावे." **वायवीयांत**—"हे पूर्वोक्त वृषलादिक जर देवपितरांचें अन्न पाहातील तर तें अन्न टाकावें. आपत्कालीं ( न पाहाण्यासारखें स्थल नसेल तर ) प्रधान अन्नाची शुद्धि करावी." **सुमंतु**—"चांडालादिकांनीं पाहिलेलें अन्न अभोज्य आहे. त्याजवर मृत्तिका, भस्म, सुवर्ण व उदक हीं टाकून शुद्ध केल्यावर तें भोज्य होतें." तेथेंच **जमदग्नि**—"शुद्धवती, कूष्मांडी आणि पवमानांतील तरत्समंदी या ऋचांनीं अभिमंत्रित उदक दर्भांनीं शिंपडून अन्नाचा दोष घालवावा." **चंद्रोदयांत**—"पादुका, उपानह ( जोडा ), छत्री, चित्र व रक्तवस्त्र, रक्तपुष्प आणि मार्जार हीं श्राद्धभूमीवर वर्ज्य करावीं." **निर्णयदीपांत**—"घंटेचा नाद, घोड्याचें सांनिध्य, शिंपला, शंख, केळीचें पान, धोतरा, जाई, रुई यांचीं फुलें हयारिजें[1] ( महिषीक्षीरादि ) हीं श्राद्धाला वैगुण्य उत्पन्न करणारीं आहेत."

**अथश्राद्धदिनकृत्यम् चंद्रोदयेउशनाः** गोमयोदकैर्भूमिभाजनशौचंकुर्यात् **पराशरः** कांजि-कंदधितक्रंचशृतंवाशृतमेवच पूर्वमेवनदातव्यमेकोद्दिष्टेथपार्वणे **हेमाद्रौपराशरः** गृहाग्निशिशुदेवानां ब्रह्मचारितपस्विनाम् तावन्नदीयतेकिंचिद्यावत्पिंडान्ननिर्वपेत् **कौर्मे** तिलानवकिरेत्तत्रसर्वतोबंधयेदजान् **तत्रैवदेवलः** तथैवयंत्रितोदाताप्रातःस्नात्वासहांबरः आरभेतनवैःपात्रैरन्नारंभंचबांधवैः अत्रात्मनेपदात्स्व-यमेवपाकःकार्यः अशक्तौपत्न्या तदभावेबांधवैः ततस्तानिपपाचाशुसीताजनकनंदिनीति**पाद्मलिंगादिति हेमाद्रिः श्राद्धदीपकलिकायामाश्वलायनः** समानप्रवरैर्मिश्रैःसपिंडैश्चगुणान्वितैः कृतोपकारि-भिश्चैवपाककार्यंप्रशस्यते **व्यासः** गृहिणीचैवसुस्नातापाकंकुर्यात्प्रयत्नतः निष्पन्नेषुचपाकेषुपुनःस्नानंसमाच-रेत् **पृथ्वीचंद्रोदयेब्राह्मे** रजस्वलांचपाखंडांपुंश्चलींपतितांतथा त्यजेच्छूद्रांतथावंध्यांविधवांचान्यगोत्र-जाम् व्यंगकर्णींचतुर्थाहःस्नातामपिरजस्वलाम् वर्जयेच्छ्राद्धपाकार्थममातृपितृवंशजाम् मातृपितृवंशजभिन्नां-त्यजेदित्यर्थः **स्मृतिसारे** नपाकंकारयेत्पुत्रीमन्यांवाप्यन्यगोत्रजाम मृतवंध्यांचगर्भघ्नींगर्भिणींचैवदुर्मुखीं ।

## आतां श्राद्धदिवशींचें कृत्य सांगतो—

**चंद्रोदयांत उशना**—"गोमय व उदक यांनीं भूमी, पात्रें इत्यादिकांची शुद्धि करावी." **पराशर**—"एकोद्दिष्टांत व पार्वणश्राद्धांत कांजी, दहीं, तक्र, आणि पक्व ( शिजविलेलें ) व अपक्व यांपैकीं कोणताही पदार्थ श्राद्ध होण्याच्या पूर्वीं कोणास देऊं नये." **हेमाद्रींत पराशर**—"श्राद्धदिवशीं जोंपर्यंत पिंडदान केलें नाहीं तोंपर्यंत गृहांतील अग्नि, बालक, देवता, ब्रह्मचारी ( मधुकरी ), तपस्वी यांना कांहीं देऊं नये." **कौर्मांत**—"श्राद्धभूमीवर तील टाकावे, चहूंकडे बोकड बांधावे." तेथेंच **देवल**—"श्राद्धकर्त्यानें प्रातःकालीं नियमित होऊन सचैल स्नान करून नवीं शुद्ध पात्रें घेऊन बांधवांसह-वर्तमान अन्नाच्या पाकाला आरंभ करावा." या वचनांत 'आरभेत' हें ( क्रियापद ) आत्मनेपद असल्यामुळें स्वतः पाक करावा, असें होतें. स्वतः करण्यास अशक्ति असेल तर पत्नीनें करावा. तिच्या अभावीं बांधवांनीं करावा. कारण, "तदनंतर जनकाची कन्या सीता अन्नाचा पाक लवकर करिती झाली" या **पद्मपुराणांतील** वचनानें स्त्रियांस पाकाधिकार सुचविलेला आहे, असें **हेमाद्रि** सांगतो. **श्राद्धदीपकलिकेंत आश्वलायन**—"सपिंड, सप्रवर, गुणी व उपकार केलेले अशा मनुष्यांनीं पाक करणें प्रशस्त आहे." **व्यास**—"स्त्रियेनें स्वच्छ स्नान करून मोठ्या यत्नानें उत्तम पाक करावा, सर्व पाक सिद्ध झाल्या-वर पुनः स्नान करावें." **पृथ्वीचंद्रोदयांत ब्राह्मांत**—"रजस्वला, पाखंडी, जारिणी, पतित, शूद्रा, वांझोटी, अन्य गोत्रांतली विधवा, जीचे कर्ण व्यंग आहेत ती, रजस्वला चतुर्थ दिवशीं स्नान केलेली, जी मातृवंशांतील किंवा पितृवंशांतील नव्हे ती, या स्त्रिया श्राद्धपाकाविषयीं वर्ज्य कराव्या." **स्मृतिसारांत**—"कन्या, अन्यगोत्रांतील स्त्री, मृतवंध्या ( जीचीं मुलें वांचत नाहींत ती ), गर्भहत्या करणारी, गर्भिणी, व दुर्मुखी यांच्याकडून पाक करवूं नये."

---

१ मूलप्रतींत हयारिज म्ह. महिषीक्षीरादि असें म्हटलें आहे; तथापि येथें हयारिजशब्दानें धत्तूरादि पुष्पसाहचर्येंकरून कण्हेरीचें पुष्प घ्यावें असें बरें वाटतें. कारण त्या कण्हेरीला हयमारक असें नांव आहे.

पाकभांडानितु**हेमाद्रौनागरखंडे** सौवर्णान्यथरौप्याणिकांस्यताम्रोद्भवानिच मार्तिक्यान्यपिभव्यानिनूतनानिदृढानिच तत्रैवा**दित्यपुराणे** पचेदन्नानिसुस्नातःपात्रेषुशुचिषुस्वयं स्वर्णादिधातुजातेषुमृन्मयेष्वपिवाद्विजः अच्छिद्रेष्वविलिप्तेषुतथानुपहतेषुच नायसेषुनभिन्नेषुदूषितेष्वपिकर्हिचित् पूर्वंकृतोपयोगेषुमृन्मयेषुनतुक्कचित् **वायुपुराणे** नकदाचित्पचेदन्नमयस्थालीषुपैतृकं अयसोदर्शनादेवपितरोपिद्रवंतिहि कालायसंविशेषेणनिंदंतिपितृकर्मणि फलानांचैवशाकानांछेदनार्थानियानितु महानसेपिशस्त्राणितेषामेवहिसन्निधिः इष्यतेनेतरस्यात्रशस्त्रमात्रस्यदर्शनं श्राद्धदेशेतुविदुषापितॄणांतृप्तिमिच्छता महानसेपियुक्तानामपिकार्यंनदर्शनम् **तत्रैव** पचमानस्तुभांडेषुभक्त्याताम्रमयेषुच समुद्धरतिवैघोरात्पितॄन्दुःखमहार्णवात् तैजसानामभावेतुपिठरेमृन्मयेपिच नवेशुचौप्रकुर्वीतपाकंपित्रर्थमादरात् तत्रैवा**दिपुराणे** पक्वान्नस्थापनार्थेतुशस्तंतेदारुजान्यपि दर्व्यादीन्यपिकार्याणियज्ञियैरपिदारुभिः **यमः** विवाहेप्रेतकार्येचमातापित्रोःक्षयेहनि नवभांडानिकुर्वीतयज्ञकालेविशेषतः ।

## आतां पाकाविषयीं भांडीं सांगतो—

**हेमाद्रींत नागरखंडांत**—"सोन्याचीं, रुप्याचीं, कांशाचीं, व तांब्याचीं पात्रें असावीं. नवीं दृढ ( न फुटणारीं ) चांगलीं अशीं मातीचींही पात्रें असावीं." तेथेंच **आदित्यपुराणांत**—"द्विजानें स्वच्छ स्नान करून शुद्ध अशा सुवर्णादि धातुपात्रांत अन्नांचा पाक स्वतः करावा, अथवा मृन्मयपात्रांत करावा. तीं पात्रें फुटकीं, इतर पदार्थानें लिप्त किंवा दूषित असूं नयेत. लोहपात्रें, फुटकीं, व दुष्ट अशा पात्रांत कधींही पाक करूं नये. पूर्वीं उपयोगांत आणलेल्या अशा मातीच्या पात्रांत कधींही पाक करूं नये." **वायुपुराणांत**—"लोहपात्रांत पितृसंबंधी अन्नाचा पाक कधींही करूं नये; कारण, लोहाच्या दर्शनानें पितर जातात. काळें लोखंड विशेषेंकरून पितृकर्माविषयीं निंद्य आहे. फळें शाका हीं कापण्याकरितां जीं शस्त्रें पाकशाळेंत असतील तींच असूं द्यावीं, पितर तृप्त व्हावे असें इच्छिणारानें श्राद्धप्रदेशीं इतर शस्त्रांचें दर्शन होऊं देऊं नये. पाकशाळेंत असलेल्या शस्त्रांचेंही दर्शन होऊं देऊं नये." तेथेंच सांगतो–"श्राद्धदिवशीं ताम्रमयपात्रांत भक्तीनें पाक करणारा घोरदुःखसागरापासून पितरांचा उद्धार करितो. धातुपात्रांचा अभाव असतां नव्या शुद्ध अशा मृन्मयस्थालीमध्यें पितरांकरितां मोठ्या आदरानें पाक करावा." तेथेंच **आदिपुराणांत**—"पक्व केलेलें अन्न ठेवण्यासाठीं लांकडाचीं पात्रेंही प्रशस्त आहेत. पळी वगैरे पात्रें देखील यज्ञिय ( यज्ञांत उक्त ) वृक्षांचीं करावीं." **यम**—"विवाह, प्रेतकार्य, मातापितरांचा मृतदिवस यांचे ठायीं नवीं पात्रें करावीं. यज्ञकालीं विशेषेंकरून नवीं करावीं."

अथपाकाग्निः **हेमाद्रौप्रजापतिः** औपासनेनान्नसिद्धिरग्नौकरणमेवच **पृथ्वीचंद्रोदयेंऽगिराः** शालाग्नौतुपचेदन्नंलौकिकेवापिनित्यशः यस्मिन्नग्नौपचेदन्नंतस्मिन्होमोविधीयते **मनुः** वैवाहिकेग्नौकुर्वीतगृह्यंकर्मयथाविधि पंचयज्ञविधानंचपक्तिंचान्वाहिकींद्विजः श्राद्धस्यगृह्यत्वंचोक्त**मपरार्केण** अत्रविशेषः**कर्मप्रदीपे** प्रातर्होमंतुनिर्वर्त्यसमुद्धृत्यहुताशनात् शेषंमहानसेकृत्वातत्रपाकंसमाचरेत् पाकांतेग्निंतमाहृत्यगृह्याग्नौतुपुनःक्षिपेत् ततोस्मिन्वैश्वदेवादिकर्मकुर्यादतंद्रितः तदभावेलौकिके ततःपचेयुरन्नानिनिर्वापानंतरंशनैः वैवाहिकेग्नावन्यत्रलौकिकेवापिसंयतइति**कलिकायांसंग्रहोक्तेः** पित्रर्थंनिर्वापंकृत्वेत्यर्थः अतएव**हेमाद्रौवायुपुराणे** पित्रर्थंनिर्वपेद्भूमौकूर्चेवादर्भसंस्कृते तत्रैव**पाद्ममात्स्ययोः** अग्निमान्निर्वपेत्पैत्रंचरुंवासम्मुष्टिभिः पितृभ्योनिर्वपामीतिसर्वंदक्षिणतोन्यसेत् चरुग्रहणान्नशाकादावितिहे**माद्रिः** पिंडपितृयज्ञार्थंपाकविषयोयंनिर्वापइतितुयुक्तं अयंचेतरेषामस्ति ।

## आतां पाक करण्याचा अग्नि सांगतो—

**हेमाद्रींत प्रजापति**—"औपासनाग्नीनें अन्नाचा पाक करावा व अग्नौकरणही त्यांतच करावें." **पृथ्वीचंद्रोदयांत अंगिरा**—"अग्निशाळेंतील अग्नीवर अथवा लौकिकाग्नीवर नित्यपाक करावा. ज्या अग्नीवर पाक केला असेल त्याच अग्नीवर त्याचा होम करावा." **मनु**—"गृह्यकर्म, पंचमहायज्ञ व दररोजचा पाक हें सर्व विवाहाग्नीवर यथाविधि करावें." श्राद्ध हें गृह्यकर्म आहे असें **अपरार्कानें** सांगितलें आहे. येथें विशेष सांगतो **कर्मप्रदीपांत**—"प्रातःकालीं होम करून नंतर त्या अग्नींतून अग्नि काढून चुलींत घालून त्याजवर पाक करावा. पाक झाल्यावर तो अग्नि पुनः गृह्याग्नींत नेऊन टाकावा. तदनंतर त्या अग्नींत वैश्वदेवादिकर्म निरालस्यपणानें करावें." त्याच्या अभावीं लौकिकाग्नींत करावें. कारण, "पितरांच्या उद्देशानें

निर्वाप करून नंतर विवाहाग्नीवर हळूहळू पाक करावा. अथवा लौकिकाग्नीवरही पाक करावा" असें कालिकेंत संग्रहवचन आहे. म्हणूनच हेमाद्रींत वायुपुराणांत सांगतो—"भूमीवर किंवा दर्भाच्या कूर्चावर पितरांच्या उद्देशानें निर्वाप करावा." तेथेंच पाद्मांत व मात्स्यांत—"साग्निकानें चरु करावयाच्या द्रव्याचा विषम मुष्टींनीं पितरांसाठीं 'पितृभ्यो निर्वपामि' ह्या मंत्रानें निर्वाप करावा. नंतर निर्वाप केलेलें सर्व द्रव्य दक्षिणेस ठेवावें." या वचनांत 'चरु' असें पद आहे म्हणून शाकादिकांविषयीं निर्वाप नाहीं, असें हेमाद्रि सांगतो. पिंडपितृयज्ञाच्या पाकाविषयीं हा निर्वाप असें म्हणणें युक्त आहे. हा औपासनाग्नीवर पाक इतर शाखींना आहे.

**आश्वलायनानांतु** गुरुणाभिमृताअन्यतोवापक्षीयमाणा अमावास्यायांशांतिकर्मकुर्वीरन्नित्यादिसूत्रेणपचनाग्नेस्त्यागमुक्त्वाइहैवायमितरोजातवेदाइत्यर्धर्चेनशमीमयीभ्यामरणिभ्यामग्निंमंथयेत्सपचनाग्निर्भवतीतिसूत्रेवृत्तौचोक्तेःपचनाग्नावेवपाकः **बौधायनेना**प्युक्तम् आहृतपचनाग्निमौपासनंवाभिप्रव्रजंतीति स्मार्ताग्नौपाकस्त्वन्यशाखाविषयइतिकेचित् वस्तुतस्तुपूर्वोक्तस्यसर्वाधानविषयत्वंयुक्तम् शिष्टाचारेपिनपचनोद्दश्यते **अंडविलाया**मपिसर्वाधानपक्षेवैश्वदेवंश्राद्धंचपचनेकुर्यादन्यथौपासनेइत्युक्तं अग्नौकरणंतु**प्रयोगपारिजातादिभि**राब्दिकादिसर्वश्राद्धेपुपिंडपितृयज्ञव्यतिषंगोक्तेर्लौकिकेपचनेवापाकेकृतेपिगृह्याग्नौपक्वचरुणैवकार्यमितिप्रतिभाति **मदनरत्ने**प्येवम् विधुरोत्सन्नाग्न्यादेस्तुपृष्ठोदिविविधानेनाग्निसंपादनमित्युक्तं **हरिहरभाष्ये** इतिपाकाग्निः ।

आश्वलायनांस तर "ज्यांचा गुरु ( पित्रादिक ) मृत असेल अथवा पुत्र, पशु, सुवर्ण इत्यादिक नष्ट झालीं असतील त्यांनीं अमावास्येस शांतिक कर्म करावें, तें असें—सूर्योदयाच्या पूर्वीं भस्मासहित अग्नि घेऊन 'क्रव्यादमग्निं प्रहिणोमि दूरं०' ह्या अर्ध ऋचेनें तो दक्षिण दिशेस टाकावा." ह्या सूत्रानें पचनाग्नीचा त्याग सांगून नंतर 'इहैवायमितरोजातवेदा०' ह्या अर्धर्चेनें अपराह्णकालीं शमीच्या अरणींनीं अग्नीचें मंथन करावें, तो पचनाग्नि होतो." असें गृह्यसूत्रांत व त्याच्या वृत्तींत सांगितलें आहे म्हणून, पचनाग्नीवरच त्यांचा पाक होतो. **बौधायनानें**ही सांगितलें कीं, "पचनाग्नि किंवा औपासनाग्नि ध्यावा." स्मार्ताग्नीवर पाक हा इतर शाखाविषयक आहे असें केचित् म्हणतात. वास्तविक म्हटलें तर पूर्वोक्त जो पचनाग्नीवर पाक हा सर्वाधानविषयक आहे. शिष्टाचारांतही पचनाग्नि दिसत नाहीं. **अंडविला**ग्रंथांतही सर्वाधानपक्षीं वैश्वदेव आणि श्राद्ध हें पचनाग्नीवर करावें. अन्यथा औपासनाग्नीवर करावें, असें सांगितलें आहे. आश्वलायनास अग्नौकरण तर, **प्रयोगपारिजातादि**ग्रंथकारांनीं आब्दिकादि सर्व श्राद्धांविषयीं पिंडपितृयज्ञव्यतिषंग[२] सांगितला आहे म्हणून लौकिकाग्नीवर किंवा पचनाग्नीवर पाक केला असला तरी गृह्याग्नीवर पक्व केलेल्या चरूनेंच करावें, असें वाटतें. **मदनरत्नांत**ही असेंच आहे. विधुर व उच्छिन्नाग्नि इत्यादिकांना 'पृष्ठोदिवि०' ह्या विधीनें अग्निसंपादन **हरिहरभाष्यांत** सांगितलें आहे. याप्रमाणें पाकाग्नीचा निर्णय समजावा.

**चंद्रिकायांमार्कंडेयः** अह्नःपट्सुमुहूर्तेषुगतेषुप्रयतान्द्विजान् प्रत्येकंप्रेषयेत्तेषांप्रदायामलकोदकम् **देवलः** ततोनिवृत्तेमध्याह्नेकृत्तरोमनखान्द्विजान् अभिगम्ययथान्यायंप्रयच्छेद्दंतधावनम् तैलमभ्यंजनंस्नानंस्नानीयंचपृथग्विधम् पात्रैरौदुंबरैर्दद्याद्वैश्वदेविकपूर्वकम् औदुंबरैस्ताम्रमयैः अत्रक्षौरामलकस्नानाविनिषिद्धतिथ्यादिव्यतिरिक्तविषयमिति**हेमाद्रिर्माधवश्च** यत्तु**चंद्रिकायांप्रचेताः** तैलमुद्वर्तनंस्नानंदद्यात्पूर्वाह्णएवच श्राद्धभुग्भ्योनखश्मश्रुच्छेदनंतुनकारयेदिति तन्निषिद्धतिथ्यादिविषयम् निषिद्धतिथ्याविषुप्रागुक्तं अभ्यंगेतु**कलिकायांकात्यायनः** तैलमुद्वर्तनंदेयंब्राह्मणेभ्यःप्रयत्नतः तैरभ्यंगश्चकर्तव्योवर्ज्यकालंनचिंतयेत् **अपरार्केप्रचेताः** स्नातोधिकारीभवतिदैवेपित्र्येचकर्मणि श्राद्धकृच्छुक्लवासाःस्यान्मौनीचविजितेंद्रियः **हेमाद्रौजाबालः** तांबूलंदंतकाष्ठंचस्नेहस्नानमभोजनम् रत्यौषधंपरान्नानिश्राद्धकर्ताविवर्जयेत् वस्त्रेविशेषमाहतत्रैव**भृगुः** नग्नःस्यान्मलवद्वासानग्नःकौपीनकेवलः द्विकच्छोनुत्तरीयश्चअकच्छोवस्त्रएवच नग्नःकाषायवासाःस्यान्नग्नश्चार्द्रपटःस्मृतः नग्नोद्विगुणवस्त्रःस्यान्नग्नोरक्तपटःस्मृतः नग्नस्तुछिन्नवस्त्रःस्यान्नग्नःस्यूतपटस्तथा ।

---

१ सारा स्मार्ताग्नि श्रौताग्नींत मिळवणें हें सर्वाधान म्हटलें आहे. आणि अर्धा स्मार्ताग्नि वेगळा ठेऊन अर्धा श्रौताग्नींत मिळवणें, हें अर्धाधान म्हटलें आहे. २ व्यतिषंग म्हणजे दोघांचें बरोबर अनुष्ठान करणें हें होय.

## आतां ब्राह्मणस्नानादि सांगतो—

**चंद्रिकेंत मार्कंडेय**—"दिवसाचे सहा मुहूर्त गेल्यावर ( बारा घटिका दिवसानंतर ) नियमित असलेल्या प्रत्येक ब्राह्मणाकरितां वांटलेली आंवळकाठी व उदक देऊन कोणासही पाठवावें." **देवल**—"तदनंतर मध्यान्हकाल निवृत्त झाला असतां श्मश्रु केलेल्या व रोमनख काढलेल्या ब्राह्मणांप्रत जाऊन यथान्यायानें दंतधावन द्यावें. नंतर वैश्वदेवपूर्वक सर्व ब्राह्मणांना अभ्यंगाकरितां तेल व ताम्रपात्रांनीं स्नान व स्नानीय उदक वेगवेगळें द्यावें." येथें क्षौर व आमलकोदकस्नानादिक सांगितलें तें निषिद्धतिथ्यादिव्यतिरिक्तविषयक आहे, असें **हेमाद्रि व माधव** सांगतो. आतां जें चंद्रिकेंत **प्रचेता** सांगतो कीं, "तैल, उटी, स्नान हें श्राद्धभोक्त्यांना पूर्वाह्णीं द्यावें. नख, श्मश्रु यांचें छेदन करवूं नये," तें निषिद्ध तिथि वार इत्यादि-विषयक आहे. निषिद्ध तिथि वगैरे पूर्वीं सांगितलें आहे. अभ्यंगाविषयीं तर **कलिकेंत कात्यायन**—"तैल आणि उद्वर्तन हें ब्राह्मणांना प्रयत्नानें द्यावें. त्यांनीं अभ्यंग करावा; वर्ज्य कालाचा विचार करूं नये." अपरार्कांत **प्रचेता**—"दैवपित्र्य-कर्माविषयीं स्नान केल्यावर अधिकारी होतो. श्राद्धकर्त्यानें शुक्ल वस्त्र परिधान करावें, मौनधारण करावें, जितेंद्रिय असावें." **हेमाद्रींत जाबाल**—"तांबूल, काष्ठानें दंतधावन, स्नेहयुक्त स्नान, उपवास, मैथुन, औषध, आणि परान्न हीं श्राद्धकर्त्यानें वर्ज्य करावीं." वस्त्राविषयीं विशेष सांगतो तेथेंच **भृगु**—"मळकट वस्त्र परिधान करणारा, केवळ कौपीन धारण करणारा, दोन कच्छ घालणारा, अंगावर वस्त्र नसलेला, कच्छरहित, वस्त्ररहित, काषायवस्त्रधारी, ओलें वस्त्र नेसलेला, दुरें वस्त्र नेसलेला, रंगविलेलें वस्त्र नेसणारा, चिकट वस्त्र परिधान केलेला आणि शिवलेलें वस्त्र परिधान केलेला हे सारे नग्न म्हटले आहेत."

ततःकर्ताऊर्ध्वपुंड्रंकुर्यात् जपेहोमेतथादानेस्वाध्यायेपितृकर्मणि तत्सर्वंनश्यतिक्षिप्रमूर्ध्वपुंड्रंविनाकृतमिति **हेमाद्रावुक्तेः** यज्ञोदानंजपोहोमःस्वाध्यायःपितृकर्मच वृथाभवतिविप्रेंद्राऊर्ध्वपुंड्रंविनाकृतमिति **बृहन्नारदीयात्** ऊर्ध्वंचतिलकंकुर्याद्दैवेपित्र्येचकर्मणीति**वृद्धपराशरोक्तेश्च अन्येतु**ऊर्ध्वपुंड्रंद्विजातीनामग्निहोत्रसमोविधिः श्राद्धकालेतुसंप्राप्तेकर्ताभोक्ताचतत्त्यजेत् वामहस्तेचदर्भास्तुगृहेरंगवलिंतथा ललाटेतिलकंदृष्ट्वा-निराशाःपितरोगताइति**संग्रहोक्तेः** ऊर्ध्वपुंड्रंत्रिपुंड्रंवाचंद्राकारमथापिवा श्राद्धकर्तानकुर्वीतयावत्पिंडान्ननिर्वपेदिति**विश्वप्रकाशे**वचनाच्चनकार्यमित्याहुः अत्राचाराद्व्यवस्था अतएव**बृहन्नारदीये** ऊर्ध्वपुंड्रंचतुलसींश्राद्धेनेच्छंतिकेचनेति ऊर्ध्वपुंड्रविधिर्विप्रविषयः निषेधःकर्तृपरइति**पृथ्वीचंद्रः यत्तुहेमाद्रौदेवलः** ललाटेपुंड्रकंदृष्ट्वास्कंधेमाल्यंतथैवच निराशाःपितरोयांतिदृष्ट्वाचवृषलीपतिमिति तद्गंधेनत्रिपुंड्रविषयम् प्राक्-पिंडदानाद्गंधाद्यैर्नालंकुर्यात्स्वविग्रहमित्याश्व**लायनोक्तेः** पुंड्रंवर्तुलमित्य**परार्केमदनरत्नेच पृथ्वीचंद्रस्तुपुंड्रंत्रिपुंड्रं** ऊर्ध्वंचतिलकंकुर्यान्नकुर्याद्वैत्रिपुंड्रकं निराशाःपितरोयांतिदृष्ट्वाचैवत्रिपुंड्रकमिति**बृहत्पराशरोक्तेः** भोक्तुस्तिर्यग्लेपोभवत्येव वर्जयेत्तिलकंभालेश्राद्धकालेचसर्वदा तिर्यगप्यूर्ध्वपुंड्रंवाधारयेत्तुप्रयत्नतइति**व्यासोक्ते**रित्याह **पृथ्वीचंद्रोदयेब्राह्मे** सदर्भेणतुहस्तेनयःकुर्यात्तिलकंबुधः आचम्यसविशुध्येतदर्भत्यागेनचैवहि श्राद्धारंभकालमाहा**परार्केगौतमः** आरभ्यकुतपेश्राद्धंकुर्यादारौहिणंबुधः विधिज्ञोविधिमास्थायरौहिणंतुनलंघयेत् एतदेकोद्दिष्टे पार्वणेतूक्तंमात्स्ये ऊर्ध्वंमुहूर्तात्कुतपाद्यन्मुहूर्तचतुष्टयं मुहूर्तपंचकंह्येतत्स्वधाभवनमिष्यते तथा मध्याह्नेसर्वदायस्मान्मंदीभवतिभास्करः तस्मादनंतफलदस्तत्रारंभोविशिष्यते ।

तदनंतर कर्त्यानें ऊर्ध्वपुंड्र करावा; कारण, "जप, होम, दान, स्वाध्याय, पितृकर्म यांविषयीं ऊर्ध्वपुंड्र केल्यावांचून जें कांहीं कर्म केलें असेल तें सारें तत्काल नष्ट होतें" असें **हेमाद्रींत** उक्त आहे. "यज्ञ, दान, जप, होम, स्वाध्याय ( अध्ययन ), पितृकर्म, हीं ऊर्ध्वपुंड्र धारण केल्यावांचून केलीं असतां व्यर्थ होतात" असें **बृहन्नारदीय**वचन आहे. आणि "दैव, पित्र्य कर्माविषयीं ऊर्ध्व तिलक करावा." असें **वृद्धपराशर**वचनही आहे. **अन्यग्रंथकार तर**—"ब्राह्मणांना ऊर्ध्वपुंड्र धारण करणें हा अग्निहोत्रतुल्य विधि आहे. श्राद्धकाल प्राप्त असतां कर्त्यानें व भोक्त्यानें तो ऊर्ध्वपुंड्र वर्ज्य करावा. वामहस्तांत दर्भ, घरांत रंगावलि, आणि ललाटावर तिलक हे पाहून पितर निराश होऊन जातात" असें **संग्रह**वचन आहे. श्राद्धकर्त्यानें जोंपर्यंत पिंडदान केलें नाहीं तोंपर्यंत ऊर्ध्वपुंड्र अथवा त्रिपुंड्र, अर्धचंद्राकार मस्तकावर करूं नये." असें **विश्वप्रकाशांत** वचनही आहे म्हणून ऊर्ध्वपुंड्र करूं नये असें सांगतात. याविषयीं ( दोन प्रकारचीं मतें आहेत म्हणून ) देशाचारानें व्यवस्था करावी. म्हणूनच **बृहन्नारदीयांत** सांगतो—"कोणी श्राद्धाचे ठायीं ऊर्ध्वपुंड्र आणि तुलसी इच्छीत नाहींत." ऊर्ध्वपुंड्राचा विधि ब्राह्मणाविषयीं आणि निषेध श्राद्धकर्त्याविषयीं समजावा, असें **पृथ्वीचंद्र** म्हणतो. आतां जें **हेमाद्रींत देवल** सांगतो—"श्राद्धांत ललाटावर पुंड्र ( तिलक ), स्कंधावर माल्य ( पुष्पमाला ), आणि शूद्रेचा पति यांना पाहून पितर निराश होऊन

जातात." हें सांगणें गंधानें त्रिपुंड्र केल्याविषयीं आहे. कारण, "पिंडदानाच्या पूर्वी गंधादिकांनीं आपल्या देहाला अलंकृत करूं नये" असें आश्वलायनवचन आहे. पुंड्र म्हणजे वर्तुल ( वाटोळा ) असें अपरार्कांत व मदनरत्नांत आहे. पृथ्वीचंद्र, तर-पुंड्र म्हणजे त्रिपुंड्र म्हणतो. कारण, "ऊर्ध्वतिलक करावा, त्रिपुंड्र करूं नये. कारण, त्रिपुंड्र पाहून पितर निराश होऊन जातात" असें बृहत्पराशरवचन आहे. श्राद्धभोक्त्याला गंधादिकांचा तिर्यक् ( आडवा ) लेप होतच आहे. कारण, "श्राद्धकालीं सर्वदा ललाटावर तिलक वर्ज्य करावा. आडवा किंवा ऊर्ध्वपुंड्र प्रयत्नानें धारण करावा" असें व्यासवचन आहे, असें ( पृथ्वीचंद्र ) सांगतो. पृथ्वीचंद्रोदयांत ब्राह्मांत—"जो मनुष्य दर्भयुक्त हस्तानें तिलक करील तो दर्भत्याग करून व आचमन करून शुद्ध होईल." श्राद्धारंभाचा काल सांगतो अपरार्कांत गौतम—"श्राद्धविधि जाणणाऱ्या विद्वानानें कुतप मुहूर्तावर श्राद्धाला आरंभ करून रौहिण मुहूर्तापर्यंत करावें, रौहिण मुहूर्तांचें उल्लंघन करूं नये." हें एकोद्दिष्टविषयीं समजावें. पार्वणाविषयीं सांगतो मात्स्यांत—"कुतप मुहूर्तापासून पुढचे चार मुहूर्त म्हणजे कुतप धरून झालेले जे पांच मुहूर्त त्या कालीं श्राद्ध करणें इष्ट आहे. तसेंच—ज्या कारणास्तव मध्यान्हकालीं सर्वदा सूर्य मंदासारखा होतो तस्मात् त्या मध्यान्हीं श्राद्धाचा आरंभ अनंत फल देणारा असल्यामुळें विशिष्ट आहे."

अथश्राद्धपरिभाषा **चंद्रिकायांकात्यायनः** दक्षिणंपातयेज्जानुंदेवान्परिचरन्सदा पातयेदितरंजानुंपितॄन्परिचरन्सदा **बौधायनः** प्रदक्षिणंतुदेवानांपितॄणामप्रदक्षिणं देवानामृजवोदर्भाःपितॄणां द्विगुणास्तथा **पृथ्वीचंद्रोदयेशंखः** आवाहनार्घ्यसंकल्पेपिंडदानान्नदानयोः पिंडाभ्यंजनकालेतुतथैवांजनकर्मणि अक्षय्यासनयोःपाद्येगोत्रंनामप्रकाशयेत् तत्रैव **परिशिष्टे** दक्षिणापिंडदानेचगंधधूपाक्षयेतथा संकल्पेचासनेदीपेअंजनाभ्यंजनेतथा अन्नार्घ्यदानायंतेपुगोत्रंनामचकीर्तयेत् **कलिकायांसंग्रहे** आसनावाहनेपाद्येअन्नदानेतथैवच अक्षय्येपिंडदानेचषट्सुनामानिकीर्तयेत् **मात्स्ये** संबंधंप्रथमंब्रूयाद्गोत्रंनामतथैवच पश्चाद्रूपंविजानीयात्क्रमएषसनातनः तत्रैव सकारेणतुवक्तव्यंगोत्रंसर्वत्रधीमता सकारःकुतपोज्ञेयस्तस्माद्यत्नेनतंवदेत् यथाकाश्यपसगोत्रेति पराशरसगोत्रस्यवृद्धस्यतुमहात्मनः भिक्षोःपंचशिखस्याहंशिष्यःपरमधार्मिकइति**मोक्षधर्मेषु**प्रयोगाच्च तेनगोत्रसगोत्रयोःपर्यायत्वाच्छाखाभेदाद्व्यवस्थेति**शूलपाणिः** एतदेषामाम्नातंतेषामेव **हेमाद्रौबृहत्प्रचेताः** गोत्रंस्वरांतंसर्वगोत्रस्याक्षय्यकर्मणि गोत्रस्तुतर्पणेप्रोक्तएवंदातानमुह्यति सर्वत्रैवपितःप्रोक्तःपितातर्पणकर्मणि पितुरक्षय्यकालेतुपित्र्येसंकल्पनेतथा शर्मन्नर्घ्यादिकेकार्ये शर्मातर्पणकर्मणि शर्मणोक्षय्यकालेतुपितॄणांदत्तमक्षयं स्वरांतंसंबुद्ध्यंतमिति**हेमाद्रिः** तत्रैव**चंद्रिकायां चस्मृत्यंतरे** गोत्रस्यत्वपरिज्ञानेकाश्यपंगोत्रमुच्यते यस्मादाहश्रुतिःसर्वाःप्रजाःकश्यपसंभवाः **यत्तुसत्याषाढः** अथाज्ञातबंधोःपुरोहितगोत्रेणाचार्यगोत्रेणवेति तद्विवाहपरम् नामोच्चारणेविशेषमाह**हेमाद्रौबौधायनः** शर्मांतंब्राह्मणस्योक्तंवर्मांतंक्षत्रियस्यतु गुप्तांतंचैववैश्यस्यदासांतंशूद्रजन्मनः पित्रादिनामाज्ञानेतत्रैव पृथिवीपतृपितावाच्यस्तत्पिताचांतरिक्षसत् अभिधानापरिज्ञानेदिविषत्प्रपितामहः पित्रादीनांनामयदापुत्रैर्नज्ञायतेतदा **आपस्तंबसूत्रेप्येवम्** एतदन्यशाखापरम् **आश्वलायनानांतू**क्तं तत्सूत्रे यदिनामान्यविद्वांस्ततपितामहप्रपितामहेतिब्रूयात् तत्**कारिकापि** नामानिचेन्नजानीयात्ततेत्यादिवदेत्क्रमात् ततेतिसंबंधमात्रपरम् तेनपितृव्यादावपितथेति**गौडाः** स्त्रीणांदांतंनामज्ञेयम् दांतंनामस्त्रीणामिति**पृथ्वीचंद्रोदयेगोभिलोक्तेः** केचिद्देवीशब्दांतमाहुः अन्येतुदेवीदाइतिद्वयोःसमुच्चयमाहुः ।

## आतां श्राद्धाची परिभाषा सांगतो—

**चंद्रिकेंत कात्यायन**—"देवांची परिचर्या ( पूजा ) करीत असतां सर्वदा उजव्या पायाचा जानु ( गुडघा ) भूमीवर टेंकावा. आणि पितरांची परिचर्या करणारानें वाम पायाचा गुडघा भूमीवर सर्वदा टेंकावा." **बौधायन**—"देवांचें कर्म प्रदक्षिण करावें, आणि पितरांचें कर्म अप्रदक्षिण करावें. देवांना दर्भ ऋजु असावे आणि पितरांना दर्भ द्विगुणभुग्न असावे." **पृथ्वीचंद्रोदयांत शंख**—"आवाहन, अर्घ्यदान, संकल्प, पिंडदान, अन्नदान, पिंडांचें अभ्यंजन व अंजन, अक्षय्योदक, आसन, आणि पाद्य इतक्या ठिकाणीं पितरांचें गोत्र नाम यांचा उच्चार करावा." तेथेंच **परिशिष्टांत**—"दक्षिणा, पिंडदान, गंध, धूप, अक्षय्योदक, संकल्प, आसन, दीप, अंजन, अभ्यंजन, अन्नदान, अर्घ्यदान यांचेठायीं गोत्र व नांव यांचा उच्चार करावा." **कलिकेंत संग्रहांत**—"आसन, आवाहन, पाद्य, अन्नदान, अक्षय्योदक, आणि पिंडदान या सहा

ठिकाणीं नांवांचा उच्चार करावा." **मात्स्यांत**—"पूर्वी संबंध बोलावा, नंतर गोत्र व नांव बोलावें, नंतर रूप जाणावें, हा अनादि क्रम आहे." **तेथेंच**—"विद्वानानें सर्वत्र ठिकाणीं सकारयुक्त गोत्राचा उच्चार करावा, सकार हा कुपत ( पापनाशक ) आहे म्हणून यत्नानें त्याचा उच्चार करावा." जसें—'काश्यपसगोत्र'. आणि "पराशरसगोत्र वृद्ध महात्मा पंचशिखा जो भिक्षु त्याचा मी परम धार्मिक शिष्य आहें." असा **मोक्षधर्मांत** प्रयोगही आहे. यावरून गोत्र व सगोत्र हे दोन शब्द पर्याय ( एकाचीं नांवें ) झाल्यामुळें शाखाभेदानें व्यवस्था करावी असें **शूलपाणि** सांगतो. हें सकारोच्चारण ज्यांना सांगितलें आहे त्यांनाच समजावें. **हेमाद्रींत वृद्धप्रचेता**—"सर्वत्र ठिकाणीं गोत्राचा उच्चार अकारांत 'काश्यपगोत्र' असा करावा. अक्षय्योदकाविषयीं 'अमुकगोत्रस्य' असा करावा. आणि तर्पणाविषयीं 'अमुकगोत्रः' असा करावा, असें करून श्राद्धकर्ता अविवेकी होत नाहीं. सर्वत्र ठिकाणीं 'पितः' असा उच्चार करावा. तर्पणाविषयीं 'पिता' असा करावा. अक्षय्य उदककालीं व संकल्पकालीं 'पितुः' असा उच्चार करावा. अर्घ्यादिकांविषयीं 'शर्मन्' असा उच्चार करावा. तर्पण कर्माविषयीं 'शर्मा' असा करावा. अक्षय्य उदककालीं 'शर्मणः' असा करावा. याप्रमाणें पितरांस दिलेलें दान अक्षय होतें." वरील वचनांत 'स्वरांत' असें पद आहे त्याचा अर्थ—संबुध्यंत होय, असें **हेमाद्रि** सांगतो. तेथेंच व चंद्रिकेंतही **अन्यस्मृतींत** सांगतो—"गोत्राचें ज्ञान नसेल तर काश्यपगोत्र सांगितलें आहे. कारण, सर्व प्रजा कश्यपापासून उत्पन्न आहेत असें श्रुति सांगते." आतां जें **सत्याषाढ** सांगतो कीं, "ज्याचें गोत्र अज्ञात आहे त्याचें कृत्य पुरोहितगोत्रानें किंवा आचार्यगोत्रानें करावें." तें विवाहविषयक आहे. नामोच्चारणाविषयीं विशेष सांगतो **हेमाद्रींत बौधायन**—"ब्राह्मणाच्या नांवाच्या अंतीं—'शर्मन्' असें लावावें; क्षत्रियाच्या नांवाच्या अंतीं 'वर्मन्' असें लावावें; वैश्याच्या नांवाच्या अंतीं 'गुप्त' असें लावावें; आणि शूद्राच्या नांवाच्या अंतीं 'दास' असें लावावें." पिता इत्यादिकांच्या नांवाचें ज्ञान नसेल तर तेथेंच सांगतो—"पिता इत्यादिकांचीं नांवें पुत्रादिकांना माहीत नसतील तेव्हां पित्याचें नांव 'पृथिवीषत्' घ्यावें; पितामहाचें नांव 'अंतरिक्षसत्' आणि प्रपितामहाचें नांव 'दिविषत्' असें समजावें." **आपस्तंबसूत्रांत**ही असेंच आहे, हें अन्यशाखाविषयक आहे. आश्वलायनांस तर त्याच्या सूत्रांत सांगतो—"जर नांवें जाणत नाहीं तर 'तत' 'पितामह' 'प्रपितामह' असें बोलावें." आश्वलायन **कारिकादि**—"जर नांवें जाणत नाहीं तर 'तत' इत्यादि अनुक्रमानें म्हणावें." 'तत' याचा अर्थ 'तात' आहे. हें पद सर्वसंबंधबोधक आहे, म्हणून ज्याचा संबंध असेल त्याचा उच्चार करावा: जसें—चुलत्याचें नांव माहीत नसतां उच्चार करतेवेळीं 'पितृव्य' असा उच्चार करावा. याचप्रमाणें इतरांविषयीं देखील समजावें, असें **गौड** सांगतात. स्त्रियांच्या नांवाच्या अंतीं 'दा' असें लावावें. कारण, "स्त्रियांचें नांव दांत आहे" असें पृथ्वीचंद्रोदयांत **गोभिल**वचन आहे. **केचित् ग्रंथकार** स्त्रियांच्या नांवाचे अंतीं 'देवी' शब्द लावावा, असें सांगतात. अन्य ग्रंथकार तर 'देवी दा' हे दोन्ही शब्द स्त्रियांच्या नांवाचे अंतीं लावावे, असें सांगतात.

**हेमाद्रौनारायणः** विभक्तिभिस्तुयत्किंचिद्दीयतेपितृदैवते तत्सर्वंसफलंज्ञेयंविपरीतंनिरर्थकम् **चंद्रिकास्मृत्यर्थसारयोश्चनारदीये** अक्षय्यासनयोःषष्ठीद्वितीयावाहनेतथा अन्नदानेचतुर्थीस्याच्छेषाःसंबुद्धयःस्मृताः यत्तु **व्यासः** चतुर्थीचासनेनित्यंसंकल्पेचविधीयते प्रथमातर्पणेप्रोक्तासंबुद्धिमपरेजगुरिति अत्रशाखाभेदाद्व्यवस्थेति**हेमाद्रिः हेमाद्रौभृगुः** अर्घ्यावनेजनंपिंडमन्नंप्रत्यवनेजनम् संबुद्धिंतत्रकुर्वीतशेषेषष्ठीविधीयते तत्रैवमातुर्विशेषो**नागरखंडे** मातर्मात्रेतथामातुरासनेकल्पनेक्षये गोत्रेगोत्रायैगोत्रायाः प्रथमाद्याविभक्तयः ।

**हेमाद्रींत नारायण**—"देवपितरांना श्राद्धाचेठायीं नांवाच्या अंतीं विभक्ति लावून जें कांहीं देतात तें सफल होतें; विभक्ति लावल्याशिवाय जें देतात तें निरर्थक होतें." **चंद्रिका** व **स्मृत्यर्थसार** यांत **नारदपुराणांत**—"अक्षय्योदक, आसन यांजविषयीं षष्ठी विभक्ति लावावी. आवाहनाविषयीं द्वितीया विभक्ति. अन्नादानाविषयीं चतुर्थी. बाकी सर्वत्र ठिकाणीं संबुद्धि विभक्ति समजावी." आतां जें **व्यास** सांगतो कीं, "आसन व संकल्प यांचे ठायीं नित्य चतुर्थी सांगितली आहे. तर्पणाविषयीं प्रथमा; इतर ठिकाणीं संबुद्धि सांगतात." या मतभेदाविषयीं शाखाभेदानें व्यवस्था, असें **हेमाद्रि** सांगतो. **हेमाद्रींत भृगु**—"अर्घ्य, पाद्य, पिंड, अन्नदान, प्रत्यवनेजन इतक्या ठिकाणीं संबुद्धि करावी, इतर ठिकाणीं षष्ठी सांगितली आहे."

**हेमाद्रौप्रभासखंडे** यज्ञोपवीतिनाकार्यंदैवंकर्मप्रदक्षिणं प्राचीनावीतिनाकार्यंपितृकर्माप्रदक्षिणं अनुपनीतस्त्रीशूद्रादेस्तूत्तरीयेणैवसव्यापसव्येज्ञेये तस्योपवीतस्थानीयत्वात् अपसव्यंक्रमाद्वसंकृत्वाकश्चित्सगोत्रइतिमाधवाचार्यवाचस्पतिः यत्तुकेचित् सदोपवीतिनाभाव्यमित्यस्यपुरुषार्थत्वात् प्राचीनावीतकालेप्युपवीतांतरेणतत्कार्यमेवेति तन्न विशेषबाधात् जप्यश्चूलिः सूक्तस्तोत्रजपंत्यक्त्वापिंडाघ्राणंचदक्षिणाम् आह्वानं-

स्वागतंचार्घ्यंविनाचपरिवेषणं विसर्जनंसौमनस्यमाशिषांप्रार्थनंतथा विप्रप्रदक्षिणांचैवस्वस्तिवाचनकंविना पितॄनुद्दिश्यकर्तव्यंप्राचीनावीतिनासदा **हेमाद्रौसंग्रहे** आदौविप्रांघ्रिशौचांतेभ्यर्चनेविकिरेकृते पिंडाभ्युप्यार्चयित्वाचविसर्ज्यब्राह्मणांस्तथा आचामेच्छ्राद्धकर्ताचस्थानेष्वेतेषुसप्तसु आद्यंतयोर्द्विराचामेच्छेषेषुतुसकृत्सकृत् तत्रैव श्राद्धारंभेवसानेचपादशौचार्चनांतयोः विकिरेपिंडदानेचषट्स्वाचमनमिष्यते **आश्वलायनः** दानाध्ययनदेवार्चाजपहोमव्रतादिकान् नकुर्याच्छ्राद्धदिवसेप्राग्विप्राणांविसर्जनात् एतन्नित्यवर्ज्यमितिबोपदेवः इदंविष्णुभिन्नदेवपरम् विष्णोर्निवेदितान्नेनयष्टव्यंदेवतांतरम् पितृभ्यश्चापितद्देयंतदानंत्यायकल्पते पितृशेषंतुयोदद्याद्धरयेपरमात्मने रेतोधाःपितरस्तस्यभवंतिक्लेशभागिन इति**स्कांदात्** पितरःसर्वमनुष्या विष्णुनाशितमश्नंतीति**श्रुतेः** यःश्राद्धकालेहरिभुक्तशेषंददातिभक्त्यापितृदेवतानाम् तेनैवपिंडांस्तुलसीविमिश्रानाकल्पकोटिंपितरस्तुतृप्ता इतिब्राह्मोक्तेश्चेति**श्रीधरस्वामिनृसिंहपरिचर्यादयः** एतत्सर्वंनिबंधविरोधान्निर्मूलं ।

**हेमाद्रींत प्रभासखंडांत**—“देवकर्म यज्ञोपवीती करून प्रदक्षिण करावें; पितृकर्म प्राचीनावीती करून अप्रदक्षिण करावें.” अनुपनीताला ( मौंजी न झालेल्यास ), व स्त्रिया शूद्र इत्यादिकांस उत्तरीय वस्त्रानेंच सव्य आणि अपसव्य जाणावें; कारण, तें उत्तरीय वस्त्र यज्ञोपवीतस्थानीं आहे. आणि “कोणी सगोत्रज क्रमानें वस्त्र अपसव्य करून” असें ब्राह्मवचनही आहे, असें **वाचस्पति** सांगतो. आतां जें **केचित्** म्हणतात कीं, “सर्वदा उपवीती असावी” हें सांगणें पुरुषार्थ आहे म्हणून प्राचीनावीतीकालीं देखील इतर यज्ञोपवीतानें उपवीती करावीच. तें बरोबर नाहीं. कारण, विशेषानें प्राचीनावीतीविधानानें सामान्य उपवीतीचा बाध होतो. **जमदग्नि**—“सूक्त म्हणणें, स्तोत्रजप, पिंडांचें आघ्राण, दक्षिणा, आवाहन, स्वागत, अर्घ्यदान, परिवेषण ( अन्न वाढणें ), विसर्जन, सौमनस्य, आशिषःप्रार्थना, ब्राह्मणप्रदक्षिणा, स्वस्तिशब्दाचा उच्चार इतक्या कर्मांवांचून इतर कर्में पितरांच्या उद्देशानें करावयाचीं तीं सर्वदा प्राचीनावीतीनें करावीं.” **हेमाद्रींत संग्रहांत**—“श्राद्धाच्या आरंभीं, ब्राह्मणपादप्रक्षालनानंतर, ब्राह्मणपूजेच्या अंतीं, विकिरदान केल्यावर, पिंडदानाचे अंतीं, पिंडपूजा केल्यावर, आणि ब्राह्मणविसर्जनाच्या अंतीं, ह्या सात स्थानीं श्राद्धकर्त्यानें आचमन करावें. आदीं व अंतीं द्विवार आचमन करावें, इतर ठिकाणीं एकवारच करावें.” तेथेंच—“श्राद्धाच्या आरंभीं, व शेवटीं, पादक्षालनाच्या अंतीं, ब्राह्मणपूजेच्या अंतीं, विकिराचे अंतीं, आणि पिंडदानाच्या अंतीं ह्या सहा स्थानीं आचमन करावें.” **आश्वलायन**—“श्राद्धाच्या दिवशीं ब्राह्मणविसर्जनाच्या पूर्वीं दान, अध्ययन, देवपूजा, जप, होम, आणि व्रतादिक हीं करूं नयेत.” हें नित्य वर्ज्य आहे, असें **बोपदेव** सांगतो. हें वचन विष्णुव्यतिरिक्त देवविषयक आहे. कारण, “विष्णूला निवेदन केलेल्या अन्नानें इतर देवतांचा याग ( पूजा ) करावा. पितरांनाही तेंच द्यावें, तें दान अनंत होतें. जो मनुष्य परमात्म्या हरीला पितृशेष देईल त्याचे पितर रेतभक्षण करणारे क्लेशभागी होतील.” असें **स्कांद**वचन आहे. “पितर व सर्व मनुष्य विष्णूनें भक्षण केलेलें अन्न भक्षण करितात” अशी **श्रुति** आहे. “जो मनुष्य श्राद्धकालीं विष्णूचें भुक्तशेष अन्न पितर व देवता यांना मोठ्या भक्तीनें देतो, व त्याच अन्नांत तुलसी मिश्र करून पिंडदान करितो त्याचे पितर कल्पकोटीपर्यंत तृप्त होतात” असें ब्राह्मवचनही आहे, असें **श्रीधरस्वामी, नृसिंहपरिचर्यादिक** सांगतात. हें सारें निबंधांचा ( हेमाद्र्यादिकांचा ) विरोध असल्यामुळें निर्मूल आहे.

अत्रविशेषो**हेमाद्रौविष्णुधर्मे** श्राद्धाहितुसमभ्यर्च्यनृवराहंजनार्दनं **शिवपुराणे** पूजयित्वाशिवंभक्त्यापितृश्राद्धंप्रकल्पयेत् पूर्वनिषेधस्तुविहितभिन्नपरः तथा**हेमाद्रौ** देवार्चादक्षिणांगादिःपादजान्वंसमूर्धसु शिरोंसजानुपादेषुवामांगादिचपैतृकं **कलिकायांस्मृत्यंतरे** श्राद्धारंभेतुयेदर्भाःपादशौचेविसर्जयेत् अर्चनादौतुयेदर्भाउच्छिष्टांतेविसर्जयेत् मार्जनादौतुयेदर्भाःपिंडोत्थानेविसर्जयेत् उत्तानादौतुयेदर्भादक्षिणांतेविसर्जयेत् प्रार्थनादौतुयेदर्भानमस्कारेविसर्जयेत् ऊहमाह**विष्णुः** मातामहानामप्येवंश्राद्धंकुर्याद्विचक्षणः मंत्रोहेनयथान्यायंशेषाणांमंत्रवर्जितं यथान्यायमिति यत्रबहुवचनांतःपितृशब्दस्तत्रसर्वपितृवाचित्वान्नोहः तत्रापिशुंधंतांपितरइत्यत्रोहएव सर्वपितृवाचित्वेउत्तरमंत्रद्वयवैयर्थ्यात् बहुवचनंतुनोह्यते प्रकृतावसमर्थत्वात्पाशानितिवत् ऋगंतेचनोहः तस्माद्दचंनोहेदितिनिषेधात् एकोद्दिष्टेप्येवम् प्रेतैकोद्दिष्टेत्वेकवन्मंत्रान्नूहेत्प्रेतैकोद्दिष्टेइति**विष्णूक्तेरूहः** अत्रबहुवचनस्याप्यूहोवचनात् वृद्ध्यादौतुविशेषंवक्ष्यामः शेषाणामितिपित्र्यान्येकोद्दिष्टेआवाहनादिमंत्रवर्ज्यंकार्यमिति**कल्पतरुः** ऊहयोग्यपितृपदवान्मंत्रएवतत्रनप्रयोज्यः नमः

**नापिपितृपदरहितःप्रयोज्यइतिशूलपाणिः** अर्थांतरंचोक्तंप्राक् **बह्वृचकारिकापि** अर्घ्यप्रदानमंत्रेतुमात्रादिपदमावपेत् शुंधंतामितिपित्रादौमात्रादिपदमावपेत् मातृश्राद्धेपिंडदानेयेचत्वामत्रान्वित्यत्रनोहइतिवृत्तिकृत् तथा मातुःश्राद्धेप्यनूहेनकुर्यात्पिंडानुमंत्रणम् दशादानमुपस्थानंतद्वत्कार्यमितिस्थितिः प्रवाहणमनूहेन तद्वत्प्राशनमिष्यते तथा आयंतुनस्तिलोसीतिउशंतस्त्वेतियानितु अनूह्यःपितृशब्दोत्रपितृसामान्यवाचकः आपस्तंबानांतुवक्ष्यते ।

येथें विशेष सांगतो **हेमाद्रींत विष्णुधर्मात**—"श्राद्धदिवशीं पुरुषश्रेष्ठ जनार्दनाची पूजा करून श्राद्ध करावें." **शिवपुराणांत**—"शिवाची पूजा भक्तीनें करून नंतर पितृश्राद्ध करावें." पूर्वींचा ( आश्वलायनवचनानें केलेला ) निषेध विहित जी विष्णुशिवपूजा तद्भिन्नविषयक आहे. **हेमाद्रींत**—"देवब्राह्मणांची पूजा उजव्या अंगाकडून पाय, जानु, अंस ( स्कंध ), मस्तक या क्रमानें करावी. पितृब्राह्मणांची पूजा वामांगाकडून मस्तक, स्कंध, जानु आणि पाय या क्रमानें करावी." **कलिकेंत स्मृत्यंतरांत**—"श्राद्धारंभींचे जे दर्भ ते पादक्षालनांतीं टाकावे. पूजादिकांविषयीं जे दर्भ ते उच्छिष्टांतीं टाकावे. मार्जनादिकांविषयीं जे दर्भ ते पिंडोत्थान झाल्यावर टाकावे. पात्राचे उत्तानादिकर्माविषयीं जे दर्भ ते दक्षिणादानांतीं टाकावे. प्रार्थनादिकांविषयीं जे दर्भ ग्रहण केले असतील ते नमस्कारांतीं टाकावे." **ऊह** सांगतो **विष्णु**—"याप्रमाणें मातामहांचें देखील यथायोग्य मंत्रांचा ऊह करून श्राद्ध करावें. शेषांचें (इतर पितृव्यादिकांचें) ऊहयोग्य मंत्रवर्जित श्राद्ध करावें." वचनांत 'यथान्याय' असें पद आहे त्याचा अर्थ—ज्या मंत्रांत बहुवचनांत पितृशब्द आहे तेथें तो सर्व पितरांचा वाचक असल्यामुळें त्याचा ऊह करूं नये. तशा प्रकारच्या मंत्रांमध्येंही 'शुंधंतां पितरः' या मंत्रांत ऊह करावाच; कारण, हा पितृशब्द सर्वपितृवाचक नाहीं. सर्वपितृवाचक मानला तर पुढचे जे मंत्र 'शुंधंतां पितामहाः' 'शुंधंतां प्रपितामहाः' हे व्यर्थ होतील. बहुवचनाचा तर ऊह करावयाचा नाहीं. कारण, प्रत्येकाच्या ठिकाणीं 'शुंधंतां पितरः' या मंत्रांत बहुवचन असमर्थ ( एकाचें अबोधक ) असल्यामुळें पूजार्थ बहुवचन सिद्ध आहे. तें तसेंच इतरत्रही ठेवावें. जसें—प्रकृतीच्या ठिकाणीं असमर्थ जो बहुवचनांत पाशमंत्र[1] त्याचा विकृतीच्या ठिकाणीं ऊह नाहीं, तद्वत्. याप्रमाणें 'मातरः शुंधंतां इत्यादि' प्रयोगही जाणावा. ऋचेच्या मंत्रांत ऊह नाहीं; कारण, 'ऋचेचा ऊह करूं नये' असा निषेध आहे. एकोद्दिष्ट श्राद्धांतही असेंच समजावें. प्रेताच्या एकोद्दिष्टश्राद्धांत तर "एकोद्दिष्टांत मंत्रांचा एकवचनांत ऊह करावा" असें **विष्णु**वचन आहे, म्हणून ऊह आहे. ह्या वचनावरून एकोद्दिष्टांत बहुवचनाचाही ऊह आहे. वृद्धिश्राद्धादिकाविषयीं तर विशेष पुढें सांगूं. ऊहविधायक पूर्वीच्या विष्णुवचनांत 'शेषाणां मंत्रवर्जितं' असें आहे त्याचा अर्थ—पितृव्य इत्यादिकांचें एकोद्दिष्ट कर्तव्य असतां आवाहनादि मंत्ररहित करावें, असें **कल्पतरु** सांगतो. ऊह करण्यास योग्य असें पितृपद ज्या मंत्रांत आहे त्या मंत्राचाच प्रयोग त्या ठिकाणीं करूं नये. म्हणजे ऊह करावयाचा नाहींच, आणि 'पितृ' या पदानें रहित असा मंत्रही म्हणावयाचा नाहीं. तर तसला मंत्रच येथें घ्यावयाचा नाहीं, असें **शूलपाणि** सांगतो. 'शेषाणां' याचा दुसरा अर्थ पूर्वी सांगितला आहे. **बह्वृचकारिका**ही—"मातेच्या श्राद्धांत अर्घ्यदानाच्या मंत्रांत 'पितः' इत्यादिस्थानीं 'मातः' इत्यादि योजावें. 'शुंधंतां' याच्या पुढें 'पितरः' इत्यादि स्थानीं 'मातरः' इत्यादि पद योजावें." मातृश्राद्धांत पिंडदानाचे ठिकाणीं 'येचत्वामत्रानु' या मंत्रांत ऊह करावयाचा नाहीं, असें **वृत्तिकार** सांगतो. तसेंच "मातेच्या श्राद्धांत पिंडानुमंत्रण, दशादान, उपस्थान, प्रवाहण, आणि प्राशन इतक्या ठिकाणीं ऊह करणें इष्ट नाहीं. तसेंच 'आयंतुनः पितरः०' 'तिलोसि०' 'उशंतस्त्वा०' या मंत्रांचा जो 'पितृ' शब्द आहे तो सर्व पित्रांचा वाचक असल्यामुळें त्याचा ऊह करावयाचा नाहीं." **आपस्तंबांना** तर पुढें सांगावयाचें आहे.

**हेमाद्रौमार्कंडेयः** स्नातःस्नातान्समाहूतान्स्वागतेनार्चयेत्पृथक् **कलिकायांनारदीये** प्रायश्चित्तविशुद्धात्मातेभ्योनुज्ञांप्रगृह्यच दद्याद्वैब्रह्मदंडार्थंहिरण्यंकुशमेवच तत्रैव**संग्रहे** तिथिवारादिकंज्ञात्वासंकल्प्यचयथाविधि प्राचीनावीतिनाकार्यंसर्वंसंकल्पनादिकं संबंधंप्रथमंब्रूयान्नामगोत्रेतथैवच वस्वादिरूपतांचापित्र्यपितृणामनुक्रमात् **चंद्रोदयेनारदीये** श्राद्धार्थंसमनुप्राप्तान्विप्रान्भूयोनिमंत्रयेत् **आपस्तंब**स्तुपूर्वेद्युर्निमंत्रणंपरेद्युर्द्वितीयंतृतीयमामंत्रणमित्याह यूयंमयानिमंत्रणीयाइतिनिवेदनरूपंआद्यं तद्विधिमाह**शौनकः**

---

१ ज्योतिष्टोमांत अग्नीषोमीय पशूचे ठिकाणीं एकवचनांत व बहुवचनांत असे दोन पाशमंत्र आहेत ते असे–'अदितिःपाशं प्रमुमोक्त्वेतम्' हा एक आणि 'अदितिः पाशान् प्रमुमोक्त्वेतान्' हा दुसरा मंत्र. प्रकृति अग्नीषोमीयपशु एक पशूची असल्यामुळें त्या ठिकाणीं बहुवचनांत पाशमंत्र जसा प्रयुक्त आहे त्याप्रमाणें विकृतीच्या ठिकाणींही बहुवचनांत पाशमंत्राचा प्रयोग होतो. पाश एक असला तरी त्यांच्या अवयवांचें बहुत्व पाशावर आरोपित करून बहुवचनाची उपपत्ति होते. याप्रमाणें एका व्यक्तीवर बहुवचनाचे प्रयोग व्यवहारांत बहुत येतात.

गृहीत्वामुकसंज्ञस्यामुकगोत्रस्यचामुके श्राद्धेतुवैश्वदेवार्थंकरणीयःक्षणस्त्वया इत्येवंश्राद्धकृद्ब्रूयादोंतथेतिवदे-त्तुसः श्राद्धस्यकर्तासंब्रूयात्तंप्राप्नोतुभवानिति सवदेत्प्राप्नवानीतिइतरस्तंप्रतिद्विजः देवौपार्वणेपुरूरवार्द्रवौ-वाच्यौ पित्रादेरप्यनेनैववृणीतविधिनाद्विजान् ततःकर्ताबह्वृचोऽनाहिताग्निःपिंडपितृयज्ञंपरिस्तरणादीध्माधा-नांतंकुर्यात् अर्धाधानिनोप्येवमितिप्रयोगपारिजातेपरिशिष्टेच भाष्यकारमतेआब्दिकेप्येवम् **वृत्तिकार**मतेनेदम् ।

**हेमाद्रींत मार्कंडेय**—"कर्त्यानें स्वतः स्नान करून, आलेल्या ब्राह्मणांचें वेगवेगळें स्वागतशब्दानें पूजन करावें." **कलिकेंत नारदीयांत**—"स्वतः प्रायश्चित्तानें शुद्ध होऊन ब्राह्मणांपासून अनुज्ञा घेऊन त्यांना ब्रह्मदंडार्थ हिरण्य व कुश द्यावे." तेथेंच **संग्रहांत**—"तिथि, वार, नक्षत्र इत्यादिक जाणून यथाविधि संकल्प करून पितरांचें सर्व संकल्पादिक प्राचीनावीतीनें करावें, तें असें—पूर्वीं संबंध उच्चारावा, नंतर नांव आणि गोत्र पुढें वसुरूप, रुद्ररूप इत्यादि, याप्रमाणें स्वपि-तरांचा अनुक्रमानें उच्चार करावा." **चंद्रोदयांत नारदीयांत**—"श्राद्धासाठीं प्राप्त झालेल्या ब्राह्मणांना पुनः निमंत्रण करावें." **आपस्तंब** तर—"पूर्वदिवशीं निमंत्रण, दुसऱ्यादिवशीं दुसरें निमंत्रण आणि तिसरें आमंत्रण" असें सांगतो. 'तुम्हाला निमंत्रण द्यावयाचें आहे' असें निवेदन करणें हें पहिलें निमंत्रण समजावें. निमंत्रणाचा विधि सांगतो **शौनक**—"दर्भ घेऊन 'अमुकशर्मणः अमुकगोत्रस्य अमुकश्राद्धे वैश्वदेवार्थं त्वया क्षणः करणीयः' असें श्राद्धकर्त्यानें म्हणावें. ब्राह्मणानें 'ओंतथा' असें म्हणावें. श्राद्धकर्त्यानें 'प्राप्नोतु भवान्' असें ब्राह्मणास बोलावें, ब्राह्मणानें 'प्राप्नवानि' असें बोलावें. पार्वणश्राद्धांत देव 'पुरूरवार्द्रव' बोलावे. पित्रादिकब्राह्मणांनाही त्याच विधीनें क्षण द्यावे." तदनंतर श्रौताग्निरहितबह्वृक्शाखी श्राद्धकर्ता असेल त्यानें पिंडपितृयज्ञ परिस्तरणापासून इध्माधानांत करावा. अर्धे आधान करणारालाही असेंच **प्रयोगपारिजातांत** व **परिशिष्टांत** सांगितलें आहे. भाष्यकाराच्या मतीं आब्दिक श्राद्धांतही असेंच आहे. वृत्तिकारमतानें हें समजावें.

**हेमाद्रौशंभुः** संमार्जितोपलिप्तेतुद्वारिकुर्वीतमंडले उदक्प्लवमुदीच्यंस्याद्दक्षिणंदक्षिणाप्लवम् **व्याघ्रः** उत्तरेक्षतसंयुक्तान्पूर्वाग्रान्विन्यसेत्कुशान् दक्षिणेदक्षिणाग्रांस्तुसतिलान्विन्यसेत्कुशान् तत्रैव**बौधायनः** चतुरस्रंत्रिकोणंचवर्तुलंचार्धचंद्रकं कर्तव्यमानुपूर्व्येणब्राह्मणादिषुमंडलम् तत्रैव**लौगाक्षिः** हस्तद्वयमितं कार्यंवैश्वदेविकमंडलम् दक्षिणेचचतुर्हस्तंपितॄणामंघ्रिशोधने **कलिकायांसंग्रहेतु** प्रादेशमात्रंदेवानांचतु-रस्रंतुमंडलं त्यक्त्वापडंगुलंतस्माद्दक्षिणेवर्तुलंतथेत्युक्तम् यत्तु**स्मृत्यंतरे** गर्तःपंचांगुलोविप्रेजानुमात्रोमही-भुजि प्रादेशमात्रोवैश्येचसाधिकःसतुशूद्रके तिर्यगूर्ध्वप्रमाणेनव्याख्यातोदैवपित्र्ययोः चतुरस्रंवर्तुलंचकथितं-गर्तलक्षणम् पादप्रक्षालनंप्रोक्तमुपवेश्यासनेद्विजान् तिष्ठंश्चेत्क्षालनंकुर्यान्निराशाःपितरोगताइति तत्समूलत्वे-मंडलाग्रेपृथक्ज्ञेयम् तत्रगोमये**हेमाद्रौभृगुः** अत्यंतजीर्णदेहायावंध्यायाश्चविशेषतः आर्तायानवसूतायान-गोर्गोमयमाहरेत् **मात्स्ये** अक्षताभिःसपुष्पाभिस्तदभ्यर्च्योपसव्यवत् विप्राणांक्षालयेत्पादावभिवंद्यपुनः-पुनः प्रत्यङ्मुखस्थितःकुर्याद्विप्रपादाभिषेचनं तत्रैव**भविष्ये** प्रक्षालयेद्विप्रपादान्शंनोदेवीरभीत्यृचा **पृथ्वी-चंद्रोदयेवृद्धवसिष्ठः** नकुशग्रंथिहस्तस्तुपाद्यंदद्याद्विचक्षणः **कलिकायांसंग्रहे** ततःप्रक्षालयेत्पादौ-भार्यास्रावितवारिणा तथा श्राद्धकालेयदापत्नीवामेनीरप्रदाभवेत् आसुरंतद्भवेच्छ्राद्धंपितॄणांनोपतिष्ठते तत्रैव नाथः प्रक्षालयेत्पादौकर्तापित्रादिकर्मसु पाद्यानंतरमर्घ्यमपिदद्यादिति**हेमाद्रिः** तत्रैव**लौगाक्षिः** मंडला-दुत्तरेदेशेदद्यादाचमनीयकं तत्रैव विधायक्षालनंतेषांद्विराचमनमिष्यते स्वयंचापिद्विराचामेद्विधिज्ञःश्रद्धया-न्वितः **हेमाद्रौनारदीये** यत्राचमनवारीणिपादप्रक्षालनोदकैः संगच्छंतेबुधाःश्राद्धमासुरंतत्प्रचक्षते ।

**हेमाद्रींत शंभु**—"संमार्जन करून गोमयानें उपलेपन केलेल्या गृहाच्या द्वारदेशीं दोन मंडलें करावीं, तीं अशीं—एक उत्तरेकडे करावें तें उदक्प्लव ( उदक्संस्थ ). दुसरें दक्षिणेकडे करावें तें दक्षिणाप्लव." **व्याघ्र**—"उत्तरेकडच्या मंडलावर अक्षतायुक्त पूर्वाग्र कुश टाकावे. दक्षिणेकडच्या मंडलावर तिलसहित दक्षिणाग्र दर्भ टाकावे." तेथेंच **बौधायन**—"ब्राह्म-णादिकाच्या ठिकाणीं जें मंडल करावयाचें तें चतुरस्र, त्रिकोण, वर्तुल आणि अर्धचंद्राकार असें अनुक्रमानें करावें." तेथेंच **लौगाक्षि**—"वैश्वदेवब्राह्मणाचे पाद धुण्यासाठीं जें मंडल तें दोनहस्तपरिमित करावें. आणि पितृब्राह्मणाचे पाद धुण्यासाठीं जें मंडल तें दक्षिणेस चतुर्हस्तपरिमित करावें." **कलिकेंत संग्रहांत** तर—"देवांचें मंडल प्रादेशमात्र चतुरस्र करावें. त्यापासून सहा अंगुळें टाकून त्याच्या दक्षिणेस वर्तुल मंडल तसेंच करावें." असें सांगितलें आहे. आतां जें इतर कर्मांत

सांगतो की—ब्राह्मणश्राद्धांत पंचांगुलप्रमाण गर्त ( खळगा ) करावा, क्षत्रियश्राद्धांत जानुप्रमाण, वैश्यश्राद्धांत प्रादेशमात्र आणि शूद्रश्राद्धांत त्याच्याहून किंचित् अधिक करावा. हें गर्ताचें प्रमाण उंचीचें व रुंदीचें समजावें. देवांचा गर्त चतुरस्र आणि पितरांचा गर्त वर्तुल, याप्रमाणें गर्तलक्षण सांगितलें आहे. आसनावर ब्राह्मणांना बसवून त्यांचें पादप्रक्षालन सांगितलें आहे. ब्राह्मण उभे करून त्यांचें पादप्रक्षालन करील तर पितर निराश होऊन जातात." हें स्मृत्यंतरवचन समूल असेल तर प्रत्येक मंडलाच्या अग्रभागीं वेगवेगळे गर्त समजावें. येथें गोमयाविषयीं **हेमाद्रींत भृगु** सांगतो—"अत्यंत वृद्ध झालेल्या वंध्या रोगपीडित व नवीन प्रसूत झालेल्या अशा गाईचें गोमय घेऊं नये." **मात्स्यांत**—"अपसव्य करून अक्षता व पुष्पें यांनीं त्या मंडलांची पूजा करून ब्राह्मणाचे पाद पुनःपुनः नमस्कार करून धुवावे. पश्चिमेकडे मुख करून ब्राह्मणांचे पाद धुवावे." तेथेंच **भविष्यांत**—"'शंनोदेवी०' ह्या मंत्रानें ब्राह्मणाचें पादक्षालन करावें." **पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धवसिष्ठ**—"कुश-पवित्रयुक्त हस्तानें पादप्रक्षालन करूं नये." **कलिकेंत संग्रहांत**—"भार्येनें उदक पायांवर घालून श्राद्धकर्त्यानें पादक्षालन करावें. तसेंच – ज्या श्राद्धांत पत्नी वामभागीं राहून उदक देते तें श्राद्ध आसुर होतें, पितरांना प्राप्त होत नाहीं." तेथेंच सांगतो—"पित्रादिकांच्या श्राद्धांत अधोभागीं पादप्रक्षालन करूं नये." पाद्यानंतर अर्घ्यही द्यावें, असें **हेमाद्रि** सांगतो. तेथेंच **लौगाक्षि**—"मंडलाच्या उत्तरप्रदेशीं आचमन द्यावें." तेथेंच—"ब्राह्मणांचें पादक्षालन झाल्यावर त्यांना दोन वेळां आचमन सांगितलें आहे. विधिज्ञ श्राद्धकर्त्यानेंही श्रद्धायुक्त होऊन दोन वेळां आचमन करावें." **हेमाद्रींत नारदीयांत**—"ज्या श्राद्धांत पादक्षालनोदक व आचमनोदक यांचा संसर्ग होतो, तें श्राद्ध आसुर होतें असें विद्वान् सांगतात."

**हेमाद्रौव्यासः** सव्येनैवासनंधृत्वादक्षिणेदक्षिणंकरं व्याहृतिभिःसमस्ताभिरासनेपूपवेशयेत् समाध्व-मितिचैवोक्त्वादक्षिणंजानुसंस्पृशन् आस्यतामितितान्ब्रूयादासनंसंस्पृशन्नपि **हेमाद्रौशातातपः** द्वौदैवे-थर्वणौविप्रौप्राङ्मुखावुपवेशयेत् पित्र्येतूदङ्मुखांस्त्रींश्चबह्वृचाध्वर्युसामगान् **याज्ञवल्क्यः** द्वौदैवेप्राक्त्र-यःपित्र्येउदगेकैकमेववा यत्तु**हेमाद्रौहारीतः** दक्षिणाग्रदर्भेषुप्राङ्मुखान्ब्राह्मणानभोजयेदुदङ्मुखानित्येके-इतितन्**मैत्रायणीय**विषयम् प्राङ्मुखान्भोजयेदुदङ्मुखानित्येकेइतितत्**परिशिष्टात्** विकल्पइति **हेमाद्रिः माधवीयेयमः** भिक्षुकोब्रह्मचारीवाभोजनार्थमुपस्थितः उपविष्टेष्वनुप्राप्तःकामंतमपिभोजयेत् **कौर्मे** अतिथिर्यस्यनाश्नातिनतच्छ्राद्धंप्रचक्षते विप्रनियमो**माधवीये** पवित्रपाणयःसर्वेतेचमौनव्रतान्विताः उच्छिष्टोच्छिष्टसंस्पर्शंवर्जयंतःपरस्परं तत्रासनानि**पृथ्वीचंद्रोदयेयमः** आसनंकुतपंदद्यादितरद्वापवित्रकं **हेमाद्रौचमत्कारखंडे** पितॄणांघटितंहैमंराजतंवापिचासनम् येनताम्रमयंदत्तमासनंपितृकर्मणि सर्वेदि-व्यासनारूढोनहिप्रच्यवतेदिवः **हेमाद्रौनागरखंडे** अयःशंकुमयंपीठंप्रदेयंनोपवेशने **कलिकायांसं-ग्रहे** क्षौमंदुकूलंनैपालमाविकंदारुजंतथा तार्णंपार्णंबृसींचैवविष्टरादिचविन्यसेत् अग्निदग्धान्यायसानिभ-ग्नानिचविवर्जयेत् **हेमाद्रौछागलेयः** पश्चाद्भागादुपक्रम्यप्राच्यांपंक्तिर्यथाभवेत् दक्षिणासंस्थिताह्येषापि-तॄणांश्राद्धकर्मणि **पुलस्त्यः** श्रीपर्णीवारुणीक्षीरीजंबुकाम्रकदंबकं सप्तमंबाकुलंपीठंपितॄणांदत्तमक्षयं **संग्रहे** शमीचकाश्मरीशेलुःकदंबोवारुणस्तथा पंचासनानिशस्तानिश्राद्धेदेवार्चनेतथा **कारिका** द्वौदैवेप्राङ्मुखौपि-त्र्येत्रीन्विप्रानुदगाननान् **पैठीनसिः** कुतपःश्राद्धवेलायांश्रोत्रियोयदिदृश्यते **आश्वलायनः** नीवीवा-सोदशांतेनस्वरक्षार्थंप्रबंधयेत् **वृद्धयाज्ञवल्क्यस्तु** दक्षिणेकटिदेशेतुतिलैःसहकुशत्रयं यत्तु**कातीयम्** नीवीकार्यादशागुप्तिर्वामकुक्षौकुशैःसहेति तद्वृद्धिश्राद्धे पितॄणांदक्षिणेपार्श्वेविपरीतातुदैविकइति **स्मृत्यंत-रात्** वामेदक्षिणेवेत्याचाराद्व्यवस्थेति**मदनपारिजाते** ।

**हेमाद्रींत व्यास**—"वामहस्तानें आसन धरून उजव्या हस्तानें ब्राह्मणाचा उजवा हात धरून समस्तव्याहृति उच्चारून 'समाध्वं' असें म्हणून दक्षिणजानूला व आसनाला स्पर्श करून 'आस्यतां' असें बोलून ब्राह्मणांना आसनावर बसवावें." **हेमाद्रींत शातातप**—"अथर्वणवेदी दोन ब्राह्मण देवांकडे प्राङ्मुख बसवावे. पितरांकडे बह्वृच, अध्वर्यु, सामवेदी असे तीन ब्राह्मण उदङ्मुख बसवावे." **याज्ञवल्क्य**—"देवांकडे दोन प्राङ्मुख, पित्रांकडे तीन उदङ्मुख किंवा दोहींकडे एकएक असे बसवावे." आतां जें **हेमाद्रींत हारीत** सांगतो कीं, "दक्षिणाग्रदर्भांचे ठायीं प्राङ्मुख ब्राह्मणांना भोजन घालावें, उदङ्मुखांना घालावें, असें कोणीएक म्हणतात" तें मैत्रायणीयविषयक आहे. कारण, 'प्राङ्मुखांना भोजन द्यावें, उदङ्मुखांना द्यावें असें कोणीएक म्हणतात' असें **मैत्रायणीयपरिशिष्ट** आहे. प्राङ्मुख किंवा उदङ्मुख हा विकल्प आहे, असें **हेमाद्रि**

सांगतो. **माधवीयांत यम**—"ब्राह्मण बसल्यावर संन्याशी किंवा ब्रह्मचारी भोजनासाठीं प्राप्त असेल तर त्याला यथेच्छ भोजन द्यावें." **कौर्मांत**—"ज्या श्राद्धांत अतिथि भोजन करीत नाहीं तें श्राद्ध म्हणत नाहींत." ब्राह्मणांचे नियम सांगतो **माधवीयांत**—"सारे ब्राह्मण हातांत पवित्रक घालून व मौनव्रत धारण केलेले असावे. त्यांनीं उच्छिष्टोच्छिष्टाचा संस्पर्श करूं नये." श्राद्धांत आसनें सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत यम**—"आसनास कुतप ( नेपालकंबल ) किंवा इतर पवित्र द्यावें." **हेमाद्रींत चमत्कारखंडांत**—"पितरांना सुवर्णानें किंवा रुप्यानें मढविलेलें आसन द्यावें. पितृकर्माविषयीं ज्यानें ताम्रमय आसन दिलें तो मृत झाल्यावर दिव्यासनावर आरूढ होऊन स्वर्गापासून च्युत होत नाहीं." **हेमाद्रींत नागरखंडांत**—"लोखंडाचे खिळे मारलेलें आसन ब्राह्मणास बसावयास देऊं नये." **कलिकेंत संग्रहांत**—"जवसानें केलेलें पाटाव, शालजोडी, कंबलासन, वृक्षाचा पाट, तृणासन, पर्णासन, बृसी ( व्रतींचें आसन ), विष्टर यांपैकीं कोणतेंही आसन बसावयास द्यावें. अग्नीनें दग्ध, लोखंडाचीं व फुटकीं अशीं आसनें वर्ज्य करावीं." **हेमाद्रींत छागलेय**—"श्राद्धकर्मांत दक्षिणेकडे बसवावयाची पितृब्राह्मणपंक्ति पश्चिमेस आरंभ करून पूर्वेस जाईल अशी बसवावी" **पुलस्त्य**—"शिवण, वारुण ( वायवर्णा ), क्षीरिवृक्ष ( वट, उंबर वगैरे ), जांभूळ, आंबा, कळंब, सातवा बकुळवृक्ष यांचें आसन पितरांस दिलें असतां अक्षय होतें." **संग्रहांत**—"श्राद्धांत व देवपूजेंत शमी, शिवण, भोंकर, कळंब, वायवर्णा, ह्या पांच वृक्षांचीं आसनें प्रशस्त आहेत." **कारिका**—"प्राङ्मुख दोन ब्राह्मण देवांकडे, आणि उदङ्मुख तीन ब्राह्मण पितरांकडे बसवावे." **पैठीनसि**—"श्राद्धकालीं श्रोत्रिय जर आलेला दिसेल तर तो कुतप ( पापनाशक ) आहे. अर्थात तो बसवावा." **आश्वलायन**—"आपल्या रक्षणाकरितां नेसलेलें वस्त्र त्याच्या शेवटांनीं घट्ट बांधावें." **वृद्ध याज्ञवल्क्य** तर—"दक्षिणकटिप्रदेशीं तिलासहित तीन कुश ठेवावे." आतां जें **कातीयांचें** सांगणें—"डाव्या कुशींत नेसलेल्या वस्त्राच्या दशा कुशांसह गुप्त कराव्या" तें वृद्धिश्राद्धांत समजावें. कारण, "पित्र्यकर्मामध्यें दक्षिणपार्श्वभागीं आणि दैविककर्मामध्यें वामपार्श्वभागीं" अशी **अन्यस्मृति** आहे. डाव्या किंवा उजव्या कटीस जसा आचार असेल तशी व्यवस्था करावी, असें **मदनपारिजातांत** आहे.

**आचार्यः** प्राणायामत्रयंकृत्वागायत्रीस्मरणंतथा श्राद्धंकर्तास्मीतिवदेद्द्विजैर्वाच्यंकुरुष्वच **ब्राह्मे** ततस्तिलान्गृहेतस्मिन्विकिरेच्चाप्रदक्षिणम् श्रद्धयापरयायुक्तोजपेदपहताइति **स्मृत्यर्थसारे** अपहताइति तिलान्विकीर्यउदीरतामित्यृचाप्रोक्षेत् **पराशरः** तद्विष्णोरितिमंत्रेणगायत्र्याचप्रयत्नतः प्रोक्षयेदन्नजातंतुशूद्रदृष्ट्यादिशुद्धये **हेमाद्रौब्रह्मांडे** श्राद्धभूमौगयांध्यात्वाध्यात्वादेवंगदाधरम् वस्वादींश्चपितॄन्ध्यात्वाततः श्राद्धंप्रवर्तते देवताभ्यःपितृभ्यश्चमहायोगिभ्यएवच नमःस्वाहायैस्वधायैनित्यमेवनमोनमः आदिमध्यावसानेषुत्रिरावृत्तंजपेद्बुधः पितरःक्षिप्रमायांतिराक्षसाःप्रद्रवंतिच तत्रैव**स्कांदे** तिलारक्षंत्वसुरान्दर्भारक्षंतुराक्षसान् पंक्तिंवैश्रोत्रियोरक्षेदतिथिःसर्वरक्षकः **वसिष्ठः** शुद्धवतीभिःकूष्मांडीभिःपावमानीभिश्चपाकादि प्रोक्षयेत् ।

**आचार्य**—"तीन प्राणायाम करून तसेंच गायत्री स्मरण करून 'श्राद्धं करिष्ये' असें बोलावें, ब्राह्मणांनीं 'कुरुष्व' असें बोलावें." **ब्राह्मांत**—"तदनंतर परमश्रद्धायुक्त होऊन 'अपहता०' या मंत्रानें त्या घरांत अप्रदक्षिण तिल टाकावे." **स्मृत्यर्थसारांत**—"'अपहता०' या मंत्रानें तिल टाकून 'उदीरता०' या ऋचेनें प्रोक्षण करावें." **पराशर**—"शूद्रादिकांनीं पाहिलेला वगैरे दोष जाण्याकरितां 'तद्विष्णो०' या मंत्रानें व गायत्रीनें मोठ्या यत्नानें सर्व अन्नाचें प्रोक्षण करावें." **हेमाद्रींत ब्रह्मांडपुराणांत**—"'श्राद्धभूमौ गयां ध्यात्वा०' हा मंत्र म्हणावा. 'देवताभ्यः पितृभ्यश्च०' ह्या मंत्राचा आदीं, मध्यें व अंतीं त्रिवार जप करावा. असें केल्यानें पितर लवकर येतात व राक्षस पळतात." तेथेंच **स्कांदांत**—"'तिला रक्षंत्वसुरान्०' हा मंत्र म्हणावा." **वसिष्ठ**—"शुद्धवती, कूष्मांडी व पावमानी ऋचांनीं पाकादिप्रोक्षण करावें."

**अथदेवार्चा** तत्रप्रत्युपचारमार्घांतयोरपोदद्यादित्युक्तं**वृद्धौस्मृत्यर्थसारेच हेमाद्रौब्राह्मे** आसनेष्वासनंदद्याद्वामेवादक्षिणेपिवा पितृकर्मणिवामेचदैवेदद्यात्तुदक्षिणे **प्रचेताः** आसनेष्वासनंदद्यान्नतुपाणौकदाचन धर्मोसीत्यथमंत्रेणगृह्णीयुस्तेतुतान्कुशान् धर्मोसिविशिराजाप्रतिष्ठितइतिमंत्रः **गालवः** दर्भानादायहस्ताभ्यांगृहीत्वादक्षिणेकरे दैवेक्षणःक्रियतांतुनिरंगुष्ठंकरंततः ओंतथेतिद्विजाब्रूयुस्तेप्राप्नोतुभवानिति कर्ताब्रूयात्ततोविप्रःप्राप्नवानीतिवैवदेत् **पृथ्वीचंद्रोदयेबृहन्नारदीये** यवैर्दर्भैश्चविश्वेषांदेवानामिदमासनं दत्वेतिभूयोदद्याद्धिदैवेक्षणइतिक्षणं तच्चषष्ठ्याचतुर्थ्यावाकार्यमितिसएव ततोर्घ्यंकल्पयेदितिमन्वादयः

१ पूर्वी जलप्रकरणीं आठ प्रकारचे कुतप सांगितले त्यांत नेपालकंबल आहे म्हणून तो द्यावा, असें वाटतें.

शौनकजयंताभ्यामर्घ्यरहितस्यदेवार्चनस्योक्तेः आश्वलायनानांदैवेऽर्घ्यदानंनेति**बोपदेवः** तन्न **परिशिष्ट-प्रयोगपारिजात**विरोधात् वृद्धिश्राद्धेतुदैवेऽप्यर्घ्यंदद्यात् देवेभ्योपिपृथग्दद्यादिहार्घ्यंश्रुतिचोदनादिति-**शौनकोक्तेः** ।

## आतां देवार्चा सांगतो—

श्राद्धांत प्रत्येक उपचाराला आदीं व अंतीं उदक द्यावें, असें **वृत्तीं**त व **स्मृत्यर्थसारां**त सांगितलें आहे. **हेमाद्रींत ब्राह्मांत**—"आसनावर वामभागीं किंवा दक्षिणभागीं दर्भरूप आसन द्यावें. पितरांकडे वामभागीं व देवांकडे दक्षिणभागीं द्यावें." **प्रचेता**—"आसनाचे ठायीं आसन द्यावें, हातांत कधींही देऊं नये. 'धर्मोऽसि विशिराजा प्रतिष्ठितः' या मंत्रानें ब्राह्मणांनीं ते आसनदर्भ घ्यावे." **गालव**—"दोन हातांनीं दर्भ घेऊन ब्राह्मणांच्या दक्षिण हस्तांत द्यावे, आणि त्याचा हात अंगुष्ठरहित धरून कर्त्यानें 'दैवे क्षणः क्रियतां' असें म्हणावें, ब्राह्मणांनीं 'ओंतथा' असें म्हणावें. तदनंतर कर्त्यानें 'प्राप्नोतु भवान्' असें म्हणावें. ब्राह्मणानें 'प्राप्नवानि' असें म्हणावें." **पृथ्वीचंद्रोदयांत बृहन्नारदीयांत**—"यव आणि दर्भ यांनीं 'विश्वेषां देवानामिदमासनं' असें म्हणून आसन देऊन पुनः 'दैवे क्षणः क्रियतां' असें म्हणून क्षण द्यावा." तें क्षणदान षष्ठी किंवा चतुर्थी विभक्तीनें करावें असें तोच सांगतो. नंतर अर्घ्य द्यावें, असें मन्वादिक सांगतात. शौनक आणि जयंत यांनीं अर्घ्यरहित देवार्चन सांगितलें आहे, म्हणून आश्वलायनांना देवांविषयीं अर्घ्यदान नाहीं असें **बोपदेव** सांगतो. तें बरोबर नाहीं; कारण, **परिशिष्ट** व **प्रयोगपारिजात** यांच्याशीं विरोध येतो. वृद्धिश्राद्धांत तर देवांसही अर्घ्य द्यावें. कारण, "येथें श्रुतीनें सांगितलें म्हणून देवांनाही पृथक् अर्घ्य द्यावें" असें **शौनक**वचन आहे.

**अथार्घ्यपात्रं पृथ्वीचंद्रोदयेमात्स्यपाद्मयोः** पात्रंवनस्पतिमयंतथापर्णमयंपुनः जलजंवापि कुर्वीततथासागरसंभवं **ब्राह्मे** सौवर्णताम्ररौप्याश्मस्फाटिकंशंखशुक्तयः भिन्नान्यपिहियोज्यानिपात्राणिपितृकर्मणि **हेमाद्रौप्रजापतिः** सौवर्णराजतंताम्रंखड्गंमणिमयंतथा यज्ञियंचमसंवापिअर्घ्यार्थंपूरयेद्बुधः अत्रविप्रैकत्वद्वित्वचतुष्ट्वादावर्घ्यपात्रेद्वेएव **मानवसूत्रे**तुद्वेवैश्वदेविकेत्रीणिपित्र्ये एकैकमुभयत्रवेत्युक्तम् तदेकविप्रपरं पात्रालाभपरंचेति**हेमाद्रिः मदनरत्ने**तुदैवेएकपात्रमुक्तं **पृथ्वीचंद्रोदयो**पित्रीणिपैतृकपात्राणिद्वेद्वेवैश्वदेविकइति**बृहत्पराशरोक्ते**र्द्वेएवेत्याह **बह्वृचा**नांतुदैवेविप्रद्वित्वेप्येकमर्घ्यपात्रंअर्धशोदद्यादित्युक्तं **परिशिष्टप्रयोगपारिजाते**च **कलिकायांहारीतः** दत्तमक्षय्यतांयातिखड्गेनार्घ्यंतुयत्कृतम् **वृद्धमनुः** मृन्मयंदारुजंपात्रमयःपात्रंचयद्भवेत् राजतंदैविकेकार्ये शिलापात्रंचवर्जयेत् **पुराणसमुच्चये** मृत्स्नाभवंतथाकांस्यमारक्तंजंतुसंभवम् त्रपुसीसलोहभवंसदापात्रंविवर्जयेत् तत्रैव अष्टांगुलंभवेत्पात्रंपितॄणांराजतंशुभं दशांगुलंतुदेवानांसौवर्णंशक्तितःकृतं स्थापयेदर्घ्यपात्रेद्वेन्युब्जेतत्रकुशोपरि द्वेद्वेपवित्रेविधिवत्पात्रयोश्चोपरिक्षिपेत् **यज्ञपार्श्वः** पवित्रेस्थेतिमंत्रेणपवित्रेछेदयेत्तुते ओषधीमंतरेकृत्वाअंगुष्ठांगुलिपर्वणोः स्पयेनकाष्ठेनलोहेननमृन्मयनखादिभिः **वसिष्ठः** तूष्णींप्रोक्ष्यांभसापात्रेकुर्यादूर्ध्वबिलेततः पूरयेत्पात्रयुग्मंतुकृत्वोपरिपवित्रके ।

## आतां अर्घ्यपात्र सांगतो.

**पृथ्वीचंद्रोदयांत मात्स्यांत** व **पाद्मांत**—"अर्घ्यपात्र वनस्पतीचें तसेंच पानाचें किंवा समुद्रांत उत्पन्न शंख शिंपा इत्यादिकांचें करावें." **ब्राह्मांत**—"सुवर्ण, ताम्र, रौप्य, पाषाण, स्फटिक, शंख, शुक्ति यांचीं पात्रें फुटलेलीं असलीं तरी तीं पितृकर्माविषयीं योजावीं." **हेमाद्रींत प्रजापति**—"सौवर्ण, राजत, ताम्र, खड्गपात्र, मणिमय, किंवा यज्ञांतील चमसपात्र यांतून कोणतेंही पात्र अर्घ्यासाठीं पाण्यानें भरावें." येथें ब्राह्मण एक, दोन किंवा चारही असले तरी अर्घ्यपात्रें दोनच असावीं. **मानवसूत्रांत** तर—"विश्वेदेवांकडे दोन, पितरांकडे तीन, किंवा दोहींकडे एक एक पात्र असावें" असें सांगितलें तें एक विप्र असतां व पात्राचा अभाव असतां समजावें, असें **हेमाद्रि** सांगतो. **मदनरत्नांत** तर—देवांविषयीं एक पात्र सांगितलें आहे. **पृथ्वीचंद्रोदय**ही "पितृपात्रें तीन आणि देवपात्रें दोन दोन असावीं" असें **बृहत्पराशर**वचन आहे म्हणून देवांकडे दोनच पात्रें असें सांगतो. **बह्वृचांना** तर—देवांकडे दोन ब्राह्मण असले तरी एक अर्घ्यपात्र अर्धें अर्धें द्यावें, असें **परिशिष्टांत** व **प्रयोगपारिजातांत** सांगितलें आहे. **कलिकेंत हारीत**—"खड्गपात्रानें अर्घ्य करून तें दिलें असतां अक्षय होतें." **वृद्धमनु**—"देवकार्याविषयीं मातीचें, काष्ठाचें, लोखंडाचें, रुप्याचें व पाषाणाचें

पात्र वर्ज्य करावें." **पुराणसमुच्चयांत**—"मृत्तिकापात्र, कांस्यपात्र, आरकूटपात्र, जंतूपासून उत्पन्न पात्र, कथिलाचें, शिशाचें व लोहाचें पात्र सदा वर्ज्य करावें." **तेथेंच**—"पितरांस रजताचें पात्र अष्टांगुलपरिमित करावें. देवांना सुवर्णाचें पात्र आपल्या शक्तीप्रमाणें दशांगुलपरिमित करावें. ब्राह्मणाच्या पुरोभागीं कुशांवर दोन पात्रें उपडीं ठेवावीं. त्या पात्रांवर यथाविधि दोन दोन पवित्रें ठेवावीं." **यज्ञपार्श्व**—"अंगुष्ठ व अंगुलि यांच्या पेरांत ओषधी मध्यें करून त्या पवित्रांचा छेद 'पवित्रेस्थ०' या मंत्रानें स्फ्य म्हणजे यज्ञांतील शस्त्रविशेष त्यानें, काष्ठानें किंवा लोहानें करावा. मृन्मयानें किंवा नखादिकांनीं करूं नये." **वसिष्ठ**—"मंत्रावांचून उदकानें त्या पात्रांचें प्रोक्षण करून नंतर तीं उताणीं करावीं, त्यांच्यावर पवित्रें ठेऊन तीं दोन्ही पात्रें उदकानें भरावीं."

**वृद्धपराशरः** पात्रद्वयमथार्घ्यार्थंतैजसंचैकवस्तुनः प्राङ्मुखोमरतीर्थेनशन्नोदेव्योदकंक्षिपेत् यवोसीतियवांस्तत्रतूष्णींपुष्पाणिचंदनं **मानवसूत्रे**सुमनसःप्रक्षिप्योत्पूययवानप्रक्षिप्येति यवोसीतिमंत्रः **पाद्मे** यवोसिधान्यराजोवावारुणोमधुमिश्रितः निर्णोदःसर्वपापानांपवित्रमृषिभिःस्मृतः राजोवावारुणोमधुसंयुत इतिपरिशिष्टपाठः **गोभिलेन**तु यवोसिसोमदेवत्यइतितिलमंत्रोत्रस्वाहायुक्तउक्तः **हेमाद्रौयमः** यवहस्तस्ततोदेवान्विज्ञाप्यावाहनंप्रति आवाहयेदनुज्ञातोविश्वेदेवासइत्यृचा **वृद्धपराशरः** ततःसव्यकरंन्यस्य विप्रदक्षिणजानुनि देवानावाहयिष्येहमितिवाचमुदीरयेत् आवाहयेत्यनुज्ञातोविश्वेदेवासआगत विश्वेदेवाः शृणुतेममितिमंत्रद्वयंपठेत् श्राद्धविशेषेविश्वेदेवानामज्ञानेहे**माद्रौबृहस्पतिः** उत्पत्तिंनामचैतेषांनविदुर्येद्विजातयः अयमुच्चारणीयस्तैर्मंत्रःश्रद्धासमन्वितैः आगच्छंतुमहाभागाविश्वेदेवामहाबलाः येअत्रविहिताःश्राद्धे सावधानाभवंतुते इदंचावाहनमर्घ्यपात्रासादनात्प्राक् **हेमाद्रिणोक्तम्** तत्रकातीयैःप्राक्कार्यंतथैवतत्सूत्रात् अन्यैस्तदुत्तरं **पृथ्वीचंद्रोदयेशंखः** मयवंपुष्पमादायचरणादिशिरोंतकं अर्चतेत्यर्चनंकुर्यादंतरेचोदकंतथा पित्र्येतुमूर्धादिपादांतं पादप्रभृतिमूर्धांतंदैविकेपूजनंभवेत् शिरःप्रभृतिपादांतंनमोवइतिपैतृके **इतिमदनरत्नेप्रचेतसोक्तेः** **कलिकायांसंग्रहे** तिष्ठन्कृतांजलिर्भूत्वापठेन्मंत्रौसमाहितः विश्वेदेवाःशृणुत इत्यागच्छंत्वपरंततः **हेमाद्रौजातूकर्ण्यः** ततोर्घ्यपात्रसंपत्तिंवाचयित्वाद्विजोत्तमान् तदग्रेचार्घ्यपात्रंतु स्वाहार्घ्याइतिविन्यसेत् **गार्ग्यः** दत्वाहस्तेपवित्रंचकृत्वापूजांचपादतः यादिव्याइतिमंत्रेणहस्तेष्वर्घ्यंविनिक्षिपेत् **संग्रहे** विश्वेदेवाइदंवोर्घ्यमितिदानंसमादिशेत् तदंतेस्वाहानमइतिवाच्यम् यादिव्याइतिमंत्रेणस्वाहाकारंनमोंतकमिति**हेमाद्रौनागरखंडात् अथर्वणसूत्रेतु** पाद्यमर्घ्यमाचमनीयमितिद्विजकरेनिनयेदित्यस्यैवत्रयमुक्तं **गभस्तिः** अर्घ्यंचपिंडदानंचस्वस्त्यक्षय्येतथैवच गंधपुष्पादिकंसर्वंहस्तेनैवतुदापयेत् प्रतिविंप्रंयादिव्येत्यावृत्तिः बह्वृचानांत्वनेनदत्तार्घ्यानुमंत्रणं ततःपात्रंदेवेभ्यःस्थानमसीतिन्युब्जमुत्तानंवाकार्यमिति**गारुडे**उक्तम् एतदापस्तंबानांनियतमन्येषांन ।

**वृद्धपराशर**—"अर्घ्यासाठीं एका वस्तूचीं दोन पात्रें असावीं, त्यांत 'शंनोदेवी०' या मंत्रानें देवतीर्थानें प्राङ्मुख होऊन उदक घालावें. 'यवोसि०' या मंत्रानें यव आणि मंत्ररहितपुष्पें व चंदन घालावें." **मानवसूत्रांत**—"पुष्पें टाकून उत्पवन करून यव टाकावे" असें आहे. 'यवोसि०' हा मंत्र पाद्मांत सांगतो तो असा—**'यवोसि धान्यराजो वा वारुणो मधुमिश्रितः। निर्णोदः सर्वपापानां पवित्रमृषिभिः स्मृतः'** या मंत्रांत 'वारुणो मधुसंयुतः' असा परिशिष्टाचा पाठ आहे. **गोभिलानें** तर "यवोसि सोमदेवत्यो०" हा तिलमंत्र येथें 'स्वाहा' शब्दानें म्हणावा, असें सांगितलें आहे. **हेमाद्रींत यम**—"तदनंतर हातांत यव घेऊन आवाहनाविषयीं देवांची अनुज्ञा मागून त्यांनीं अनुज्ञा दिल्यावर 'विश्वेदेवास०' या ऋचेनें आवाहन करावें." **वृद्धपराशर**—"तदनंतर ब्राह्मणाच्या उजव्या जानूवर आपला डावा हस्त ठेऊन 'देवान् आवाहयिष्येहम्' असें वाक्य उच्चारावें. ब्राह्मणानें 'आवाहय' अशी अनुज्ञा दिल्यावर 'विश्वेदेवास आगत०' 'विश्वेदेवाः शृणुतेमं०' हे दोन मंत्र म्हणावे." कोणत्या श्राद्धांत कोणते विश्वेदेव यांचें ज्ञान नसेल तर सांगतो **हेमाद्रींत बृहस्पति**—"जे ब्राह्मण विश्वेदेवांची उत्पत्ति व त्यांचें नांव जाणत नाहींत त्यांनीं श्रद्धायुक्त होऊन हा पुढील मंत्र म्हणावा, तो असा—**'आगच्छंतु०'**-" हें आवाहन अर्घ्यपात्रासादनाच्या पूर्वी **हेमाद्रीनें** सांगितलें. तें कात्यायनांनीं पूर्वी करावें. कारण, तसेंच त्यांचें सूत्र आहे. इतरांनीं अर्घ्यपात्रासादनानंतर करावें. **पृथ्वीचंद्रोदयांत शंख**—"यवसहित पुष्प घेऊन पायांपासून मस्तकापर्यंत 'अर्चत०' या मंत्रानें पूजन करावें, मध्यें उदक द्यावें." पितरांकडे मस्तकापासून पायांपर्यंत

करावें. कारण, "देवांचें पूजन पायांपासून मस्तकापर्यंत करावें, आणि पितरांचें पूजन मस्तकापासून पायांपर्यंत 'नमोवः०' या मंत्रानें करावें" असें **मदनरत्नांत प्रचेतसाचें** वचन आहे. **कलिकेंत संग्रहांत**—"उभे राहून हात जोडून समाहितपणानें दोन मंत्र म्हणावे, ते असे-'विश्वेदेवाः शृणुते०' हा एक व 'आगच्छंतु०' हा दुसरा." **हेमाद्रींत जातूकर्ण्य**—"तदनंतर अर्घ्यपात्र संपन्न झालें असें ब्राह्मणांकडून म्हणवून त्यांच्या पुढें 'स्वाहाऽर्घ्याः' असें म्हणून अर्घ्यपात्र ठेवावें." **गार्ग्य**—"पायांपासून मस्तकापर्यंत पूजा करून ब्राह्मणाच्या हातांत पवित्र देऊन 'या दिव्या०' ह्या मंत्रानें ब्राह्मणाच्या हातांवर अर्घ्य द्यावें." **संग्रहांत**—"-'विश्वेदेवा इदं वोऽर्घ्यं' असें म्हणून द्यावें." त्याच्या अंतीं 'स्वाहानमः' असें म्हणावें. कारण, "-'यादिव्या०' ह्या मंत्राच्या अंतीं 'स्वाहानमः' असें म्हणून द्यावें" असें **हेमाद्रींत नागरखंडांत** आहे. **अथर्वणसूत्रांत** तर "पाद्य, अर्घ्य, आचमनीय हें ब्राह्मणाच्या हातांत द्यावें" अशीं ह्या मंत्रालाच तीन सांगितली आहेत. **गभस्ति**—"अर्घ्य, पिंडदान, स्वस्ति, अक्षय्योदक, गंधपुष्पादिक हें सारें हस्तानेंच द्यावें." प्रतिब्राह्मणाला 'यादिव्या०' ह्या मंत्राची आवृत्ति करावी. **बह्वृचांनीं** तर-दिलेल्या अर्घ्याचें ह्या मंत्रानें अनुमंत्रण करावें. तदनंतर तें पात्र 'देवेभ्यः स्थानमसि०' ह्या मंत्रानें दक्षिणेस उपडें किंवा उताणें करावें असें **गरुडपुराणांत** सांगितलें आहे. हें आपस्तंबांना नियत आहे, इतरांस नियत नाहीं.

**हेमाद्रौविष्णुधर्मे** गंधैःपुष्पैश्चधूपैश्चवस्त्रैश्चाप्यथभूषणैः अर्चयेद्ब्राह्मणानशक्त्याश्रद्दधानःसमाहितः **पृथ्वीचंद्रोदयेमार्कंडेयः** चंदनागरुकर्पूरकुंकुमानिप्रदापयेत् **विष्णुः** चंदनकुंकुमकर्पूरागरुपद्मकान्यनुलेपनायेति **व्यासः** अपवित्रकरोगंधैर्गंधद्वारेतिपूजयेत् **कलिकायांस्मृतिः** गंधद्वारेतिवैगंधमायनेतेचपुष्पकं धूरसीत्यमुनाधूपमुद्दीप्यस्वेतिदीपकं युवंवस्त्राणिमंत्रेणवस्त्रंदद्यात्प्रयत्नतः आसनेस्वासनंब्रूयादर्घ्येस्त्वर्घ्यंद्विजोत्तमः सुगंधिश्चसुपुष्पाणिसुमाल्यानिसुधूपकः सुज्योतिश्चैवदीपेतुस्वाच्छादनमितिक्रमः विप्राणांगंधेनवर्तुलंत्रिपुंड्रंवानकार्यं **हेमाद्रौदेवलः** ललाटेपुंड्रकंदृष्ट्वास्कंधेमालांतथैवच निराशाःपितरोयांतिदृष्ट्वाचवृषलीपतिम् पुंड्रकंवर्तुलमित्यपरार्केमदनरत्नेच पुंड्रंत्रिपुंड्रंवर्तुलमर्धचंद्रंच ऊर्ध्वंचतिलकंकुर्यान्नकुर्याद्वैत्रिपुंड्रकं ऊर्ध्वंचतिलकंकुर्याद्दैवेपित्र्येचकर्मणि निराशाःपितरोयांतिदृष्ट्वाचैवत्रिपुंड्रकमितिवृद्धपराशरोक्तः तिर्यग्लेपोभवत्येव वर्जयेत्तिलकंभालेश्राद्धकालेचसर्वदा तिर्यगप्यूर्ध्वपुंड्रंवाधारयेत्तुप्रयत्नतइतिव्यासोक्तेरितिपृथ्वीचंद्रः यत्तुनारदीये ऊर्ध्वपुंड्रंचतुलसींश्राद्धेनेच्छंतिकेचनेतितन्नकर्तृपरम् **हेमाद्रौब्राह्मे** पूतिकंमृगनाभिंचरोचनंरक्तचंदनं कालेयकंतूग्रगंधंतुरुष्कंचापिवर्जयेत् कस्तूर्याविकल्पइतिहेमाद्रिः **वृद्धशातातपः** पवित्रंतुकरेकृत्वायःसमालभतेद्विजान् राक्षसानांभवेच्छ्राद्धंनिराशैःपितृभिर्गतैः पुष्पंतु**ब्राह्मे** जातीचंपकलोध्राश्चमल्लिकाबाणबर्बरी चूताशोकाटरूषंचतुलसीशतपत्रकं कुब्जकंतगरंचैवभृंगमारण्यकेतकी यूथिकामतिमुक्तंचश्राद्धेयोग्यानिभोद्विजाः कमलंकुमुदंपद्मंपुंडरीकंचयत्नतः इंदीवरंकोकनदंकल्हारंचनिवेदयेत् **हेमाद्रौवायुभविष्ययोः** सुकुमारैःकिसलयैर्यवदूर्वांकुरैरपि संपूजनीयाःपितरःश्रेयस्कामेनसर्वदा **स्कांदे** जातिश्चसर्वादातव्यामल्लिकाश्वेतयूथिका जलोद्भवानिसर्वाणिकुसुमानिचचंपकं तत्रैव**वृद्धमनुः** ननियुक्तःशिखावर्ज्यंमाल्यंशिरसिधारयेत् ।

**हेमाद्रींत विष्णुधर्मांत**—"समाहित व श्रद्धायुक्त होऊन गंध, पुष्प, धूप, वस्त्रें, भूषणें, यांनीं यथाशक्ति ब्राह्मणांची पूजा करावी." **पृथ्वीचंद्रोदयांत-मार्कंडेय**—"चंदन, अगरु, कर्पूर, केशर हीं द्यावीं." **विष्णु**—"चंदन, केशर, कापूर, अगरु, पद्मक हीं अंगास लावण्यास द्यावीं." **व्यास**—"हातांतील पवित्र काढून 'गंधद्वारां०' या मंत्रानें गंधांनीं पूजा करावी." **कलिकेंत स्मृति**—"-'गंधद्वारां०' या मंत्रानें गंध 'आयनेते०' या मंत्रानें पुष्प, 'धूरसि०' यानें धूप, 'उद्दीप्यस्व०' यानें दीप, 'युवंवस्त्राणि०' या मंत्रानें वस्त्र, याप्रमाणें द्यावें. आसन दिलें असतां ब्राह्मणानें 'स्वासनं' असें म्हणावें. अर्घ्य दिलें असतां 'अस्त्वर्घ्यं' असें म्हणावें. गंध दिला असतां 'सुगंधि' पुष्पें दिलीं असतां 'सुपुष्पाणि सुमाल्यानि' धूप दिला असतां 'सुधूपः' दीप दिला असतां 'सुज्योतिः' आच्छादन दिलें असतां 'स्वाच्छादनं' याप्रमाणें क्रम समजावा." विप्रांना गंधानें ललाटावर वर्तुल किंवा त्रिपुंड्र करूं नये. कारण, **हेमाद्रींत देवल** सांगतो—"ललाटावर पुंड्रक आणि स्कंधावर माला व वृषलीपति यांना पाहून पितर निराश होऊन जातात." या वचनांत पुंड्रक म्हणजे वर्तुल, असें **अपरार्कांत** व **मदनरत्नांत** सांगितलें आहे. पुंड्र म्हणजे वर्तुल, त्रिपुंड्र व अर्धचंद्राकार समजावा. कारण, "ऊर्ध्वतिलक करावा, त्रिपुंड्र करूं नये. दैवपित्र्यकर्माविषयीं ऊर्ध्वतिलक करावा, त्रिपुंड्रक पाहून पितर निराश होऊन जातात." असें **वृद्धपराशरवचन** आहे. गंधाचा आडवा लेप

होतच आहे. कारण, श्राद्धकालीं सर्वदा ललाटावर तिलक वर्ज्य करावा, आडवा लेप किंवा ऊर्ध्वपुंड्र प्रयत्नानें धारण करावा" असें **व्यास**वचन आहे, असें **पृथ्वीचंद्र** सांगतो. आतां जें **नारदीयांत**—"श्राद्धांत कोणी ऊर्ध्वपुंड्र व तुलसी इच्छीत नाहींत." तें सांगणें कर्तृविषयक आहे. **हेमाद्रींत ब्राह्मांत**—"पूतिक ( घाणेरा करंज ), कस्तूरी, गोरोचन, रक्तचंदन, कालेयक ( पीतचंदन ), उग्रगंध, तुरुष्क ( ऊद ) हे वर्ज्य करावे." कस्तूरीविषयीं विकल्प असें **हेमाद्रि** सांगतो. **वृद्धशातातप**—"जो मनुष्य हातांत पवित्र धरून ब्राह्मणाला [ गंध लावण्याकरितां ] स्पर्श करितो त्याचें श्राद्ध राक्षसांस प्राप्त होतें व पितर निराश होऊन जातात." श्राद्धास पुष्पें सांगतो **ब्राह्मांत**—"जाई, सोनचांफा, लोध्र, मल्लिका ( मोगरी ), बाण ( नीलवर्णकोरांटा ), बर्बरी ( तिळवण ), आम्र, अशोक, अडुळसा, तुलसी, कमल, कुब्जक, तगर, माका, अरण्यकेतकी, यूथिका ( जुई ), अतिमुक्त ( कुसरी, मधुमाधवी ), हीं पुष्पें श्राद्धाला योग्य आहेत. कमल, शुभ्रकमल, पुंडरीक, निळेंकमळ, रक्तकमळ, आणि कल्हार ( संध्याविकासी कमळ ), हीं श्राद्धांत द्यावीं." **हेमाद्रींत वायु** व **भविष्यपुराणांत**—"कल्याणेच्छु पुरुषानें कोमल पल्लव, जव, दूर्वांकुर यांनीं देखील पितरांची सर्वदा पूजा करावी." **स्कांदांत**—"सर्व प्रकारची जाई, मोगरी, श्वेतजुई, उदकापासून उत्पन्न सर्व पुष्पें, चंपक हीं पितरांस द्यावीं." तेथेंच **वृद्धमनु**—"ब्राह्मणानें शिखेवांचून मस्तकावर माला धारण करूं नये."

वर्ज्यानि**पृथ्वीचंद्रोदयेभविष्ये** केतकींतुलसीपत्रंबिल्वपत्रंचवर्जयेत् द्रोणंचकरवीरंचधत्तूरंकिंशुकंतथा माधवीयेस्मृत्यर्थसारेचतुलसीनिषिद्धा तुलसीनिषेधोनिर्मूलइति**हेमाद्रिः** समूलत्वेपिपिंडपरः तुलसीगंधमाघ्रायपितरस्तुष्टमानसाः प्रयांतिगरुडारूढास्तत्पदंचक्रपाणिनइति**प्रयोगपारिजातेपाद्मोक्ते**रिति**बोपदेवः वृद्धपराशरः** नजातीकुसुमैर्विद्वानबिल्वपत्रैश्चनार्चयेत् जपादिकुसुमंझिंटीरूपिकासकुरंटिका पुष्पाणिवर्जनीयानिश्राद्धकर्मणिनित्यशः **हेमाद्रौशंखः** उग्रगंधीन्यगंधीनिचैत्यवृक्षोद्भवानिच पुष्पाणिवर्जनीयानिरक्तवर्णानियानिच जलोद्भवानिदेयानिरक्तान्यपिविशेषतः **अंगिराः** नजातीकुसुमानिदद्यान्नकदलीपत्रमिति जात्यांविकल्पइति**हेमाद्रिः** निषेधःपिंडविषयः कुंदंशंभौचनोदद्यान्नोन्मत्तंगरुडध्वजे पिंडेजातींचनोदद्याद्देवींमर्कणनार्चयेदिति**वृद्धयाज्ञवल्क्योक्ते**रिति**बोपदेवः स्मृतिसारे** अगस्त्यंभृंगराजंचतुलसीशतपत्रिका चंपकंतिलपुष्पंचपडेतेपितृवल्लभाः केतकींकरवीरंचबकुलंकुंदकंतथा पाटलांचैवजातींचश्राद्धेयत्नेनवर्जयेत् केचित्पिंडेतुलसीमाहुः पितृपिंडार्चनंश्राद्धेयैःकृतंतुलसीदलैः प्रीणिताःपितरस्तैस्तुयावच्चंद्रार्कमेदिनीति**मार्कंडेयोक्तेः** ।

वर्ज्य पुष्पें सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत भविष्यांत**—"केतकी, तुलसीपत्र, बिल्वपत्र, द्रोणपुष्प, कण्हेर, धोतरा, पळस, हीं वर्ज्य करावीं." माधवीयांत आणि स्मृत्यर्थसारांत तुलसी निषिद्ध आहे. तुलसीचा निषेध निर्मूल असें **हेमाद्रि** सांगतो. तुलसीनिषेध समूल ( ऋषिप्रणीत ) असला तरी तो पिंडाविषयीं समजावा. कारण, "तुलसीगंध ग्रहण करून पितर संतुष्ट होऊन गरुडावर बसून विष्णूच्या पदास जातात." असें प्रयोगपारिजातांत **पाद्म**वचन आहे, असें **बोपदेव** सांगतो. **वृद्धपराशर**—"श्राद्धांत जाईच्या फुलांनीं व बिल्वपत्रांनीं पूजन करूं नये. जास्वंदीचीं वगैरे पुष्पें, पिंवळा कोन्हांटा व इतर कोन्हांटा हीं पुष्पें श्राद्धकर्मांत नित्य वर्ज्य करावीं." **हेमाद्रींत शंख**—"उग्र गंध असलेलीं पुष्पें, गंधरहित पुष्पें, समंद, ब्रह्मराक्षस वगैरे असलेल्या वृक्षांचीं पुष्पें, आणि रक्तवर्ण पुष्पें हीं वर्ज्य करावीं. पाण्यांत उत्पन्न झालेलीं रक्तवर्ण असलीं तरी तीं विशेषतः द्यावीं." **अंगिरा**—"जाईचीं पुष्पें व केळीचें पान हीं देऊं नयेत" जाईविषयीं विकल्प असें **हेमाद्रि** सांगतो. निषेध पिंडाविषयीं आहे. कारण, "शंभूला कुंद, विष्णूला धोतरा, आणि पिंडास जाई देऊं नये. देवीची पूजा रुईच्या फुलांनीं करूं नये" असें **वृद्धयाज्ञवल्क्य**वचन आहे, असें **बोपदेव** सांगतो. **स्मृतिसारांत**—"अगस्त्य, भृंगराज, तुलसी, शतपत्रिका ( कमल ), चंपक, तिलपुष्प हीं सहा प्रकारचीं पुष्पें पितरांस प्रिय आहेत. केतकी, कण्हेर, बकुल, कुंद, पाडळ, आणि जाई हीं श्राद्धाविषयीं यत्नानें वर्ज्य करावीं." **केचित्** ग्रंथकार पिंडाविषयीं तुलसी द्यावी, असें सांगतात. कारण, "ज्यांनीं श्राद्धांत तुलसीपत्रांनीं पितरांच्या पिंडांचें पूजन केलें त्यांनीं चंद्र, सूर्य व पृथ्वी आहे तोंपर्यंत पितर संतुष्ट केले." असें **मार्कंडेय**वचन आहे.

**धूपस्तत्रैवविष्णुधर्मे** धूपस्तुगुग्गुलुर्देयस्तथाचंदनसारजः अगरुश्चसकर्पूरस्तुरुष्कस्त्वकृतथैवच **विष्णुः** घृतमधुयुक्तंगुग्गुलुंश्रीखंडदेवदारुसरलादिदद्यादिति तत्रैव**देवलः** येहिप्राण्यंगजाधूपाहस्तवाताहताश्चये नतेश्राद्धेनियोक्तव्यायेचकेचोग्रगंधयः घृतंनकेवलंदद्याद्दुष्टंवातृणगुग्गुलुं दीपमाह**विष्णुः** घृतेन-

दीपोदातव्यस्तिलतैलेनवापुनः वसामेदोद्भवंदीपंप्रयत्नेनविवर्जयेत् **ब्राह्मे** कौशेयंक्षौमकार्पासंदुकूलमहतंतथा श्राद्धेष्वेतानियोदद्यात्कामानाप्नोतिचोत्तमान् **हेमाद्रौब्रह्मवैवर्ते** यज्ञोपवीतंदातव्यंवस्त्राभावेविजानता पितृभ्योवस्त्रदानस्यफलंतेनाश्नुतेखिलम् **तत्रैवपाद्मे** निष्क्रयोवायथाशक्तिवस्त्राभावेप्रदीयते अन्याम्यपिचदेयानि **तत्रैवकालिकापुराणे** धात्वादिनिर्मितारम्यादीपिकाःश्राद्धकर्मणि पितॄनुद्दिश्ययोदद्यात्सभवेद्भाजनंश्रियः योधूपदानपात्रंतुपात्रमारार्तिकस्यच दद्यात्पितृभ्यःप्रयतस्तस्यस्वर्गेक्षयागतिः **विष्णुधर्मे** यःकंचुकंतथोष्णीषंपितृभ्यःप्रतिपादयेत् ज्वरोद्भवानिदुःखानिसकदाचिन्नपश्यति स्त्रीणांश्राद्धेतुसिंदूरंदद्युश्चंडातकानिच निमंत्रिताभ्यःस्त्रीभ्योयेतेस्युःसौभाग्यसंयुताः **हेमाद्रावादित्यपुराणे** नकृष्णवर्णंदातव्यंनापिकार्पाससंभवं पितृभ्योनापिमलिनंनोपभुक्तंकदाचन नच्छिद्रितंनापदशंनधौतंकारुणापिच कार्पासनिषेधोन्यसंभवे **तत्रैव** पितॄन्सत्कृत्यवासोभिर्दद्याद्यज्ञोपवीतकं यज्ञोपवीतदानेनविनाश्राद्धंतुनिष्फलं एतद्यतिशूद्रस्त्रीश्राद्धेपिदेयमितिहेमाद्रिः ।

धूप तेथेंच सांगतो **विष्णुधर्मांत**—"गुग्गुळ, चंदनाचा साउ, अगरु, कापूर, ऊदवृक्षाची साल यांचा धूप द्यावा." **विष्णु**—"घृतमधुयुक्त असा गुग्गुळ, पांढरा चंदन, तेल्या देवदार, सरल इत्यादिकांचा धूप द्यावा." तेथेंच **देवल**—"प्राण्याच्या अंगापासून उत्पन्न झालेले, हातानें वारा घातलेले, आणि उग्रगंधि ते सारे धूप श्राद्धांत देऊं नयेत. धूपांत केवळ घृत देऊं नये, कचऱ्यानें दुष्ट असलेल्या गुग्गुळाचा धूप देऊं नये." दीप सांगतो **विष्णु**—"घृताचा दीप द्यावा, अथवा तिळांच्या तेलाचा द्यावा. चर्बी व मेद यांचा दीप प्रयत्नानें वर्ज्य करावा." वस्त्र सांगतो **ब्राह्मांत**—"रेशमी वस्त्र, पाटाव, कापसाचें वस्त्र, आणि दुकूल हीं नवीं वस्त्रें श्राद्धांत जो देतो त्याचे उत्तम मनोरथ पूर्ण होतात." **हेमाद्रींत ब्रह्मवैवर्तांत**—"पितरांना वस्त्राच्या अभावीं यज्ञोपवीत द्यावें, त्या योगानें वस्त्रदानाचें सारें फळ मिळतें." तेथेंच **पाद्मांत**—"वस्त्राच्या अभावीं यथाशक्ति वस्त्राचा निष्क्रय ( द्रव्य ) द्यावें." अन्यही देयपदार्थ सांगतो. तेथेंच **कालिकापुराणांत**—"चांदी, पितळ इत्यादि धातूंच्या सुंदर लावलेल्या समया श्राद्धकर्मांत जो पितरांच्या उद्देशानें देतो तो संपत्तीला पात्र होतो. जो धूपपात्र आणि आरार्तिक्य दीपपात्र पितरांस देईल त्याची स्वर्गांत अक्षय गति होईल." **विष्णुधर्मांत**—"जो मनुष्य पितरांस कंचुक ( बंडी ) व पागोटें देईल त्याला संतापजन्य दुःखें कधींही होणार नाहींत. स्त्रियांच्या श्राद्धांत निमंत्रण केलेल्या सुवासिनी स्त्रियांना जे सिंदूर आणि चंडातकें ( परकर वगैरे वस्त्रें ) देतील ते सौभाग्ययुक्त होतील." **हेमाद्रींत आदित्यपुराणांत**—"पितरांना काळें वस्त्र देऊं नये. कापसाचें देऊं नये. मलिन, पूर्वीं उपभोग केलेलें, छिद्र पडलेलें दशारहित आणि कोष्टयानें सुद्धां धुतलेलें कधींही देऊं नये." इतर वस्त्रांचा संभव असतां कार्पासवस्त्राचा निषेध समजावा. **तेथेंच**—"पितरांना वस्त्रांनीं सत्कार करून यज्ञोपवीत द्यावें, यज्ञोपवीत दिल्यावांचून श्राद्ध केलेलें निष्फळ होतें." हें यज्ञोपवीत यति ( संन्याशी ), शूद्र, स्त्रिया यांच्या श्राद्धांतही द्यावें, असें **हेमाद्रि** सांगतो.

**तत्रैवनृसिंहपुराणे** कमंडलुंताम्रमयंश्राद्धेषुप्रददातियः काष्ठेननिर्मितंवापिनारिकेलमथापिवा दद्यात् कमंडलुंश्राद्धेसश्रीमानभिजायते योमृत्तिकाविरचितान्श्राद्धेषुचघटान्शुभान् प्रदद्यात्करकान्वापिसोऽक्षयंविंदतेसुखं **तत्रैव** उपानच्छत्रवस्त्राणिभुक्तिपात्रंकमंडलुं शयनासनयानानिदर्पणव्यजनानिच अन्नंसुसंस्कृतंगंधांस्तांबूलंदीपचामरे पितृभ्योयःप्रयच्छेत्तुविष्णुलोकंसगच्छति **सौरपुराणे** चामरंतालवृंतंचश्वेतच्छत्रंचदर्पणं दत्वापितॄणामेतानिभूमिपालोभवेदिह **तत्रैवनंदिपुराणे** अलंकाराःप्रदातव्यायथाशक्तिहिरण्मयाः केयूरहारकटकमुद्रिकाकुंडलादयः तथा स्त्रीश्राद्धेषुप्रदेयाःस्युरलंकारास्तुयोषिताम् मंजीरमेखलादामकर्णिकाकंकणादयः आदर्शव्यजनच्छत्रशयनासनपादुकाः मनोज्ञाःपट्टवासाश्चसुगंधाश्चूर्णमुष्टयः अंगारधानिकाः शीतेयोगपट्टाश्चयष्टयः कटिसूत्राणिरौप्याणिमेखलाश्चैवकंबलाः कर्पूरादेश्चभांडानितांबूलायतनंतथा भोजनाधारयंत्राणिपतद्ग्राहांस्तथैवच तथांजनशलाकाश्चकेशानांचप्रसाधनं एतान्दद्यात्तुयःसम्यक्सोश्वमेधफलंलभेत् **स्कांदे** सौवर्णंराजतंवापिकांस्येनाप्यथनिर्मितं दत्वाभोजनपात्रंतुसम्राट्भवतिभूतले **वामनपुराणे** बंदीकृतास्तुयेकेचित्स्वयंवायदिवापरैः येनकेनाप्युपायेनयस्तान्मोचयतेनरः पितरस्तस्यगच्छंतिशाश्वतंपदमव्ययं **पराशरः** वाचयेत्परिपूर्णत्वंवासोदत्वाविधानतः ।

**तेथेंच नृसिंहपुराणांत**-"जो मनुष्य श्राद्धाचे ठायीं तांब्याचा कमंडलु, अथवा लांकडाचा, किंवा नारळाचा कमंडलु देतो तो मनुष्य श्रीमान् होतो. जो मनुष्य मातीचे सुंदर घट किंवा कमंडलु श्राद्धांत देतो त्याला अक्षय सुख प्राप्त होतें." तेथेंच—"जोडा, छत्री, वस्त्रें, भोजनपात्र, कमंडलु, शयन, आसन, वाहन, दर्पण, पंखा, उत्तम अन्न, गंध, तांबूल, दीप, चामर, हीं जो पितरांस देईल त्यास विष्णुलोक प्राप्त होईल." **सौरपुराणांत**—"चामर, पंखा, श्वेत छत्री, दर्पण, हीं पितरांस देईल तो येथें राजा होईल." तेथेंच **नंदिपुराणांत**—"केयूर ( बाहुभूषणें ), हार, कडीं, आंगठ्या, कुंडलें इत्यादि अलंकार यथाशक्ति सुवर्णाचे करून द्यावे." तसेंच सांगतो—"स्त्रियांच्या श्राद्धांत स्त्रियांना अलंकार द्यावे, ते येणें-प्रमाणें-नूपुरें, मेखला, सरी, कर्णिका ( तानवडें ), कंकण इत्यादि; आरसा, पंखा, छत्र, शयन, आसन, जोडा, सुंदर पत्रवल्लें, सुगंध चूर्णें, शीतकालीं शेगड्या, योगपट्ट, यष्टी ( काठी ), रुप्याचीं कटिसूत्रें, मेखला ( कमरपट्टा ), शाल, कर्पूरादिकांचीं पात्रें, पानसुपारीचें तबक, भोजनपात्रें ( ताटें ), पतद्ग्राह ( पिकदाणी ), डोळ्यांस अंजनाच्या शलाका, फणी, हीं जो उत्तम प्रकारें देईल त्याला अश्वमेधाचें फल प्राप्त होईल." **स्कांदांत**—"सुवर्णाचें किंवा रुप्याचें अथवा कांस्याचें केलेलें भोजनाचें ताट जो देतो तो भूमीवर सम्राट् ( राजा ) होतो." **वामनपुराणांत**-"जे कोणी मनुष्य आपण किंवा दुसऱ्यांनीं बंदींत घातले असतील त्यांना कोणत्याही उपायानें जो मनुष्य सोडवितो त्याचे पितर शाश्वत अक्षयपदास जातात." **पराशर**—"यथाविधि वस्त्र देऊन त्यांच्याकडून परिपूर्ण आहे असें म्हणवावें."

**नारदीये** देवैश्चसमनुज्ञातोयजेत्पितृगणंत्वथ तत्रपित्र्येआसनाद्यशेषमर्चनकांडंवैश्वदेविकंज्ञेयं विशेषस्तूच्यते तत्रासनेद्विगुणभुग्नाःकुशाः अत्रावाहनमासनात्पूर्वंवार्घ्यपूरणोत्तरंवाग्नौकरणोत्तरंवेतिस्मृतिषुपक्षा-उक्ताः तेषांशाखाभेदेनव्यवस्था द्वितीयपक्षएवबहुसंमतः तत्रार्घ्यमाह **आश्वलायनः** तैजसाश्ममयमृन्मयेषु-त्रिषुपात्रेष्वेकद्रव्येषुवादर्भांतर्हितेष्वपआसिच्य शंनोदेवीरभिष्टय इत्यनुमंत्रितासुतिलानावपति तिलोसिसो-मदेवत्योगोसवेदेवनिर्मितः प्रत्नवद्भिःप्रत्तःस्वधयापितॄनिमाल्लोकान्प्रीणयाहिनःस्वधानमइति अश्ममयंस्फा-टिकादि मृन्मयं हस्तकृतमेव कुलालचक्रनिष्पन्नमासुरंदैविकंनतत् तदेवहस्तघटितंदैविकंकेवलंतथेति **छंदोगपरिशिष्टात्** अन्यान्यपिपात्राणिपूर्वमुक्तानि **मनुः** अन्नाभावेद्विजाभावेयद्येकोब्राह्मणोभवेत् पात्राण्यासा-दयेत्रीणिनतुब्राह्मणसंख्यया दत्तकादेःकर्तुर्द्विपितृत्वादावपिवचनात्त्रीण्येवपात्राणीतिहरिहरः **माधवीये-बैजवापः** अर्घ्येपितॄणांत्रीण्येवकुर्यात्पात्राणिधर्मवित् एकस्मिन्वाबहुषुवाब्राह्मणेषुयथाविधि **हेमाद्रावप्येवं** अत्रानुमंत्रणंसकृत् तिलोसीत्यस्यप्रतिपात्रमावृत्तिःपितृशब्दस्यानूहश्चेति **वृत्तिकृत्** दर्भश्चत्रिगुणंपवित्रं तिस्रस्तिस्रःशलाकास्तुपितृपात्रेषुपार्वणे एकोद्दिष्टेशलाकैकांनिधायोदकमाहरेदिति **हेमाद्रौचतुर्विंशतिमतात्** तत्रैव **विष्णुः** दक्षिणाग्रदर्भेषुदक्षिणापवर्गंचमसेषुपवित्रांतर्हितेष्वपआसिंचेच्छंनोदेवीतिमंत्रेण-जलसेचनंबह्वृचभिन्नविषयं अत्रास्मिन्पक्षेप्रतिपात्रंमंत्रावृत्तिः ।

**नारदीयांत**—"देवांची आज्ञा घेऊन नंतर पितरांची पूजा करावी." पितरांकडे आसनादिक सारे पूजोपचार विश्वे-देवांकडे सांगितले ते समजावे, त्यांमध्यें विशेष आहे तो सांगतों-पितरांकडे आसनांचे ठायीं द्विगुण भुग्न ( मोडून ) कुश द्यावे. पितरांकडे आवाहन आसनाच्या पूर्वीं करावें, किंवा अर्घ्यपात्रपूरणोत्तर करावें, अथवा अग्नौकरणोत्तर करावें, असे आवाहनाचे तीन पक्ष स्मृतींत सांगितले आहेत, त्यांची शाखाभेदानें व्यवस्था समजावी. त्यांत दुसरा पक्षच ( अर्घ्यपात्र-पूरणोत्तर करणें हाच ) बहुतांना संमत आहे. पितरांकडे अर्घ्य सांगतो **आश्वलायन**—"तैजस ( सुवर्ण, रौप्य इत्यादि धातुनिर्मित ), अश्ममय ( स्फटिकादिकृत ), आणि मृन्मय अशीं तीन द्रव्यांचीं तीन अर्घ्यपात्रें करावीं; अथवा एका द्रव्याचीं ( पदार्थाचीं ) तीन पात्रें करावीं; त्या पात्रांत उदक घालून 'शंनो देवी॰' या मंत्रानें अनुमंत्रण करावें. नंतर त्या पात्रांत 'तिलोसि सोमदेवत्यो॰' या मंत्रानें तिल टाकावे." येथें सांगितलेलें मृन्मयपात्र हातानें केलेलेंच असावें; कारण, "कुंभाराचे चाकावर निष्पन्न झालेलें पात्र आसुर होतें तें दैविक होत नाहीं; तेंच केवळ हातानें घडलेलें दैविक होतें" असें **छंदोगपरिशिष्ट**-वचन आहे. इतरही पात्रें पूर्वीं ( वैश्वदेवप्रकरणीं ) सांगितलीं आहेत तीं घ्यावीं. **मनु**—"अन्नाच्या अभावीं ( अशक्ति असतां ) किंवा इतर ब्राह्मणांच्या अभावीं जरी एक ब्राह्मण असेल तरी अर्घ्यपात्रें तीन करावीं, ब्राह्मणांच्या संख्येइतकी पात्रसंख्या करूं नये." दत्तकादिक श्राद्धकर्ता असतां त्याचे दोन दोन पित्रादिक असले तरी स्मृतिवचनावरून तीनच पात्रें असावीं, असें **हरिहर** सांगतो. **माधवीयांत बैजवाप**—"एक ब्राह्मण किंवा बहुत ब्राह्मण असले तरी धर्मवेत्त्यानें पितरांच्या अर्घ्याविषयीं तीनच पात्रें यथाविधि करावीं." **हेमाद्रींत**ही असेंच आहे. येथें 'शंनोदेवी॰' या मंत्रानें अनुमंत्रण सांगितलें तें एकवार करावें. 'तिलोसि॰' या मंत्राची प्रत्येक पात्राला आवृत्ति करावी, त्या मंत्रांतील पितृशब्दाचा ऊह करा-

वयाचा नाहीं, असें **वृत्तिकार** सांगतो. पात्रांत दर्भ सांगितले ते त्रिगुण पवित्र असावे; कारण, "पार्वणश्राद्धांत पितृपात्रांचे ठायीं तीन तीन दर्भ आणि एकोद्दिष्टांत एकेक दर्भ ठेवून उदक घालावें" असें **हेमाद्रींत चतुर्विंशति**स्मृतिवचन आहे. **तेथेंच विष्णु**—"ब्राह्मणांच्या पुढें दक्षिणाग्र दर्भांवर दक्षिणापवर्गानें स्थापित पात्रांवर पवित्रें ठेऊन 'शंनोदेवी०' या मंत्रानें उदक घालावें." मंत्रानें उदक घालणें तें बह्वृचभिन्नविषयक आहे. मंत्रानें उदक घालणें या पक्षीं प्रतिपात्राला मंत्राची आवृत्ति करावी.

**कारिकायाम्** गंधपुष्पाणिचैतेषुपात्रेषुप्रक्षिपेदथ **ब्राह्मे** जलंक्षीरंदधिघृतंतिलतंडुलसर्षपान् कुशाग्रमधुपुष्पाणिदत्वाचामेत्ततःस्वयम् **जातूकर्ण्यः** ततोर्घ्यपात्रसंपत्तिंवाचयित्वाद्विजोत्तमान् तदग्रेचार्घ्यपात्राणिस्वधार्घ्याइतिविन्यसेत् ततस्तिलहस्तोविप्रसव्यजानौदक्षिणकरंन्यस्यावाहनंपृच्छेत् अत्रगोत्रसंबंधनामानिद्वितीयांतत्वंचप्रागुक्तम् **बैजवापगृह्ये** तिष्ठन्पितॄनावाहयिष्यामीत्यामंत्र्य **कौर्मे** अपसव्यंततः कृत्वापितॄणांदक्षिणामुखः आवाहनंततःकुर्यादुशंतस्त्वेत्यृचाबुधः आवाह्यतदनुज्ञातोजपेदायंतुनस्ततः अत्रसव्यस्यापिप्रागुक्तेर्विकल्पः अत्राद्यमंत्रावृत्त्याऽस्मत्पितरममुकशर्माणममुकगोत्रंवसुरूपमावाहयामीत्युक्त्वा-मूर्धादिपादांतंतिलान्विकीर्यायंतुनइतिसर्वांतेसकृज्जपेदिति**निबंधाः** अत्रोपवेशनसंवेशनपाद्यार्घ्याचमनीयान्यपिहेमाद्रिणोक्तानितान्यथर्ववेदिनांनियतानिनान्येषां तेषांचप्रपितामहादिपित्रंतंप्रातिलोम्येनसर्वःप्रयोगः।

**कारिकेंत**—"उदक घातल्यानंतर पात्रांत गंधपुष्पें घालावीं." **ब्राह्मांत**—"जल, दूध, दधि, घृत, तिल, तंडुल, सर्षप, कुशाग्रें, मध, पुष्पें हीं पात्रांत देऊन नंतर स्वतः आचमन करावें." **जातूकर्ण्य**—"तदनंतर 'अर्घ्यपात्रं सुसंपन्नं' असें ब्राह्मणांकडून म्हणवून ब्राह्मणांच्या अग्रभागीं 'स्वधार्घ्याः' असें म्हणून अर्घ्यपात्रें ठेवावीं." तदनंतर हातांत तिल घेऊन ब्राह्मणाच्या डाव्या जानूवर आपला दक्षिणहस्त ठेऊन आवाहनप्रश्न करावा. येथें आवाहनप्रश्नवाक्यांत गोत्र, संबंध, नांव यांचा उच्चार द्वितीयाविभक्तीनें करावा, असें पूर्वी ( देवावाहनप्रकरणीं ) सांगितलें आहे. **बैजवापगृह्यांत**—"उभें राहून 'पितॄन् आवाहयिष्यामि' असें आमंत्रण करून" **कौर्मांत**—"तदनंतर अपसव्य करून दक्षिणेकडे मुख करून 'उशंतस्त्वा०' या ऋचेनें पितरांचें आवाहन करावें. त्यांची अनुज्ञा घेऊन आवाहन करून तदनंतर 'आयंतुनः०' या मंत्राचा जप करावा." आवाहनाविषयीं पूर्वी सव्य सांगितलें आणि येथें अपसव्य सांगितलें म्हणून विकल्प समजावा. येथें पहिल्या ( उशंत० ) मंत्रावृत्तीनें 'अस्मत् पितरं अमुकशर्माणममुकगोत्रं वसुरूपमावाहयामि' असें म्हणून मस्तकापासून पादापर्यंत तिल टाकून सर्व पितरांचें आवाहन झाल्यावर शेवटीं 'आयंतुनः०' हा मंत्र एकवार जपावा, असें **निबंध**ग्रंथकार सांगतात. येथें उपवेशन, संवेशन, पाद्य, अर्घ्य, आचमनीय हीं देखील हेमाद्रीनें सांगितलीं आहेत, तीं अथर्ववेद्यांना नियत आहेत, इतरांस नाहींत. त्या अथर्ववेद्यांचा प्रपितामहापासून पित्यापर्यंत उलट उच्चार करून सर्व प्रयोग आहे.

**वाराहे** गंधपुष्पार्चनंकृत्वादद्याद्धस्तेतिलोदकं **गार्ग्यः** शिरस्तःपादतोवापिसम्यगभ्यर्चयेत्ततः ततः स्वधार्घ्याइतिपितृपितामहादिविप्राग्रेप्रत्येकंनिवेदयेदिति**कारिकायांवृत्तौच आश्वलायनः** प्रसव्येनेतरपाण्यंगुष्ठांतरेणोपवीतित्वाद्दक्षिणेनवासव्योपगृहीतेन पितरिदंतेअर्घ्यंपितामहेदंतेअर्घ्यंप्रपितामहेदंतेअर्घ्यमित्यपूर्वंताःप्रतिग्राहयिष्यन्सकृत्सकृत्स्वधाअर्घ्याइतिप्रसृष्टाअनुमंत्रयीत यादिव्याआपःपृथिविसंबभूवुर्या अंतरिक्ष्याउतपार्थिवीर्याः हिरण्यवर्णायज्ञियास्तानआपःशंस्योनाभवंतु अर्घ्यादिप्रागगंधादेर्यज्ञोपवीतमेव अर्घ्यदानात्प्रागन्याअपोदद्यात् यद्यप्यत्रसव्येनदक्षिणेनवार्घ्यंदद्यादित्युक्तंतथापिदक्षिणेनेत्यभिमतोर्थः **कारिकायांवृत्तौ**चैवम् पित्रादेस्त्रिभिःपात्रैर्दद्यात् पितुःस्थानेविप्रत्रयंचेदेकार्घ्यंविभज्यदद्यात् त्रयाणांस्वधाअर्घ्याइतिसकृत्प्रश्नः एवंपैतामहादावपि अन्यजलदानमर्घ्यमंत्राश्चप्रतिविप्रमावर्तंते तेषुगंधादौचप्रतिविप्रंपदार्थानुसमयःकांडानुसमयोवा पित्रादित्रयाणामेकविप्रपक्षेत्रिभिःपात्रैरेकस्यैवार्घ्यंदद्यादितिवृत्तिः **कारिकापि** स्वधार्घ्याइत्यपोर्घ्यास्ताउपवीतीनिवेदयेत् निवेदनात्प्राक्प्राचीनावीतमेवेत्यर्थः अर्घ्यसशेषमादायदक्षिणेनतुपाणिना सव्यहस्तगृहीतेननिनयेत्पितृतीर्थतः दत्वादत्वानिनीतास्तायादिव्याचानुमंत्रयेत् यत्तु यादिव्याइतिमंत्रेणहस्तेष्वर्घ्यंविनिक्षिपेदिति यच्च**वाराहे** तिलांबुनाचापसव्यंदद्यादर्घ्यादिकंद्विजइति यच्च**व्यासः** गोत्रसंबंधनामानिपितॄणामनुकीर्तयन् एकैकस्यतुविप्रस्यअर्घ्यपात्रंविनिक्षिपेदितितद्बह्वृचातिरिक्तविषयं ततआचामेत् एवंमातामहेष्वपि ।

**वाराहांत** "गंधपुष्पार्चन करून हातावर तिलोदक द्यावें." **गार्ग्य**—"मस्तकापासून किंवा पायांपासून उत्तम पूजन करावें." तदनंतर 'स्वधाऽर्घ्याः' असें म्हणून पिता, पितामह इत्यादि ब्राह्मणांच्या अग्रभागीं प्रत्येकाला निवेदन करावें, असें कारिकेंत व वृत्तींतही आहे. **आश्वलायन**सूत्र—"सारें पित्र्यकर्म अप्रदक्षिण करावें. पित्र्यकर्माविषयीं प्राचीनावीती असावी, कर्ता उपवीती आहे—ज्या हातानें कर्म करितो ( दक्षिणहस्तानें करो किंवा वामहस्तानें करो ) त्या स्कंधावर यज्ञोपवीत असतां प्राचीनावीती होतो; इतर स्कंधावर यज्ञोपवीत असतां उपवीती होतो असें आहे–येथें उपवीती असल्यामुळें कर्म प्राचीनावीतीनें होण्यासाठीं वामहस्ताच्या अंगुष्ठांगुलींच्या मध्यानें ( पितृतीर्थानें ) अर्घ्य द्यावें, हा इत्यर्थ आहे. अथवा वामहस्त शिष्टांनीं निंदित आहे म्हणून त्यानें प्रत्यक्ष देऊं नये, तर वामहस्तानें दक्षिणहस्त धरून त्या दक्षिणहस्तानें अर्घ्य द्यावें, तें असें–'पितरिदं ते अर्घ्यं, पितामहेदं ते अर्घ्यं, प्रपितामहेदं ते अर्घ्यं' ह्या तीन मंत्रांनीं पित्रादित्रयांना अनुक्रमानें अर्घ्य द्यावें. अर्घ्यदानाच्या पूर्वीं दुसरें उदक द्यावें. अर्घ्यदानाच्या पूर्वीं 'स्वधा अर्घ्याः' ह्या मंत्रानें पितृस्थानीं जे ब्राह्मण असतील त्या सर्वांना एकवार अर्घ्य निवेदन करावें, प्रत्येक ब्राह्मणाला करूं नये. याप्रमाणें पितामहस्थानीं व प्रपितामहस्थानीं असतील त्यांना एक एक वार अर्घ्य निवेदन करावें. इतर उदकदान व अर्घ्यमंत्र यांची मात्र प्रत्येक ब्राह्मणाला आवृत्ति आहे; निवेदनाची आवृत्ति नाहीं. निवेदन, इतर उदकदान व अर्घ्यदान यांविषयीं पदार्थानुसमय[1] किंवा कांडानुसमय समजावा. तसाच गंधपुष्पादि दानाविषयींही होय. हा प्रकार एक एक पितराला अनेक ब्राह्मण असतां समजावा. एक एक पितराला एक एक ब्राह्मण असेल तर एकेक पात्र एकेकाला निवेदन करून इतर उदक एकेकाला देऊन अर्घ्योदकही एकेकाला द्यावें. सर्वांना एक ब्राह्मण असेल तर तीन्ही पात्रें त्यालाच निवेदन करून पुनः पुनः इतर उदक देऊन त्यालाच तीन मंत्रांनीं तीन अर्घ्यें द्यावीं. ब्राह्मणांनीं हातांत घेऊन सोडलेलीं जीं अर्घ्योदकें त्यांचें 'या दिव्या आपः०' ह्या मंत्रानें अनुमंत्रण करावें." अर्घ्यदानाच्या पूर्वीं पात्रांत गंधपुष्पादिदान यज्ञोपवीतीनेंच करावें. येथें जरी वामहस्तानें किंवा दक्षिणहस्तानें अर्घ्य द्यावें, म्हणून सांगितलें तरी दक्षिणहस्तानें द्यावें हा अर्थ आचार्यांस मान्य आहे. **कारिकेंत** व **वृत्तींत**ही असेंच आहे. पितृस्थानीं तीन ब्राह्मण असतील तर एका अर्घ्याचा विभाग करून तिघांना द्यावें. तिघांना 'स्वधाअर्घ्याः' हा एकवार प्रश्न करावा. याप्रमाणें पितामहादिकांविषयींही समजावें. अन्य उदकदान व अर्घ्यमंत्र यांची प्रतिब्राह्मणाला आवृत्ति होते. याविषयीं व गंधादिदानाविषयीं प्रतिब्राह्मणाला पदार्थानुसमय किंवा कांडानुसमय समजावा. पित्रादित्रयस्थानीं एक ब्राह्मणपक्षीं तीन पात्रांनीं एकालाच अर्घ्य द्यावें, असें **वृत्तिकार** सांगतो. **कारिका**ही—"उपवीती करून 'स्वधा अर्घ्याः' या मंत्रानें तीं अर्घ्योदकें ब्राह्मणाला निवेदन करावीं, निवेदनाच्या पूर्वीं प्राचीनावीतीच असावी, हें तात्पर्य. वामहस्तानें गृहीत अशा दक्षिणहस्तानें सशेष अर्घ्य घेऊन पितृतीर्थानें ब्राह्मणाला द्यावें, देऊन स्रवूं लागलेल्या उदकांचें 'या दिव्या०' या ऋचेनें अनुमंत्रण करावें." आतां जें "-'या दिव्या०' या मंत्रानें हातांवर अर्घ्य द्यावें." आणि जें **वाराहांत**—"ब्राह्मणानें तिलोदक देऊन अपसव्यानें अर्घ्यादिक द्यावें." आणि जें **व्यास** सांगतो—"पितरांचें गोत्र, संबंध, नांव यांचें अनुकीर्तन करून एकेक ब्राह्मणाला अर्घ्यपात्र द्यावें." तें सारें बह्वृचातिरिक्तविषयक आहे. तदनंतर आचमन करावें. याचप्रमाणें मातामहांना देखील अर्घ्ये वगैरे द्यावीं.

**आश्वलायनः** संस्रवानसमवनीयताभिरद्भिःपुत्रकामोमुखमनक्ति संस्रवः शेपः संस्रवोहिपरिशिष्टोभवतीति**शतपथश्रुतेः** केचित्तुहस्तगलितांबुवदंति समवनीयांत्यद्वपात्रेपितृपात्रेआसिच्येतिवृत्तिः प्रथमेपात्रेसंस्रवान्समवनीयेति**कातीयसूत्राच ब्राह्मे**तुप्रतिबिंबावलोकनमुक्तं **स्कांदे**त्वायुःकामस्यनेत्रासेचनमुक्तं पित्र्यविप्रैःप्राङ्मुखस्यकर्तुरभिषेकःकार्यइतिकेचित् **आश्वलायनः** नोद्धरेत्प्रथमंपात्रंपितृणामर्घ्यपातितंआवृतास्तत्रतिष्ठंतिपितरःशौनकोब्रवीत् यावद्विप्रविसर्जनमितितुर्यपादेयमीयःपाठः **अत्रवृत्तिः** पितृपात्रंसमवनयनदेशान्नचालयेदाश्राद्धसमाप्तेः यस्मात्तत्रतृतीयपात्रेणावृताइति यद्वा प्रथमपात्रमेवन्यग्बिलंकुर्यादिति कामाभावेपीदमेवशेषप्रतिपादनं **हेमाद्रौकौर्मे** संस्रवांश्चततःसर्वान्पात्रेकुर्यात्समाहितः पितृभ्यःस्थानमसीतिन्युब्जंपात्रंनिधापयेत् **शूलपाणौ**यमस्तु पैतृकंप्रथमंपात्रंतस्मिन्पैतामहंन्यसेत् प्रपितामहंततोन्यस्यनोद्धरेन्नचचालयेदित्याह अथसंस्रवानानीयतृतीयेनाच्छाद्यन्युब्जीकुर्यादितिसर्वैकवाक्यतयार्थइतिकेचित् **अत्रिः** गंधादिभिस्तदभ्यर्च्यतृतीयेनापिधापयेत् पितृभ्यःस्थानमसीतिशुचौदेशे-चिंतेर्चयेत् अर्चनंन्युब्जीकृतेपितुल्यं न्युब्जमुत्तरतोन्यसेदितिप्रचेतसोक्तेः सर्वविप्रोत्तरतोन्यसेदिति-

१ एक पदार्थ गंधादिक सर्वांना देऊन नंतर दुसरे पुष्पादि पदार्थ त्याच क्रमानें सर्वांना देणें, हा पदार्थानुसमय. आणि ठिकाणीं सारे पदार्थ देऊन नंतर दुसऱ्या ठिकाणीं सारे पदार्थ देणें, हा कांडानुसमय.

**हेमाद्रिकल्पतरू** विप्रवामेइति**हलायुधः** कर्तुर्वामेइति**शूलपाणिः** उत्तानंविवृतंवापिपितृपात्रंनतद्भ-वेदित्य**ुशनसोक्तेर्**न्युब्जतैवसाधुः मातामहादिसंस्रवानपिपितृपात्रएवगृहीत्वाप्रयाजवत्तंत्रेणन्युब्जीकुर्या-दिति**शूलपाणिः** एकोद्दिष्टेतूहेनन्युब्जतेति**पितृभक्तौश्रीदत्तः यमोपि** स्पृष्टमुत्तानमन्यत्रनीतमुद्घा-टितंतथापात्रंदृष्ट्वाव्रजंत्याशुपितरस्तंशपंतिच वैश्वदेवेउत्तानमिति**मदनपारिजातः** ।

**आश्वलायन**—"संस्रव उदकें एकत्र करून त्या उदकांनीं पुत्रकाम असेल त्यानें मुखलेप करावा." संस्रव म्हणजे उर्वरित उदक. कारण, "संस्रव हा परिशेष असेल तो होतो" अशी **शतपथश्रुति** आहे. कोणी हातापासून गळालेलें उदक संस्रव म्हणतात. सूत्रांतील 'समवनीय' शब्दाचा अर्थ—पुढच्या दोन पात्रांतील उदक पितृपात्रांत घालून, असा वृत्तिकार सांगतो. "पहिल्या पात्रांत संस्रव मिळवून" असें **कातीयसूत्र**ही आहे. **ब्राह्मांत** तर–प्रतिबिंबाचें अवलोकन सांगितलें आहे. **स्कांदांत** तर–आयुष्यकामाला नेत्रासेचन सांगितलें आहे. पित्रांकडील ब्राह्मणांनीं प्राङ्मुख अशा श्राद्धकर्त्याला अभिषेक करावा, असें केचित् म्हणतात. **आश्वलायन**—पितरांना अर्घ्य पाडलेलें प्रथम पात्र उचलूं नये; कारण, त्या पात्राचे ठायीं आवृत होऊन पितर राहतात, असें शौनक सांगता झाला." 'नोद्धरेत्०' श्लोकाच्या चवथ्या चरणीं 'यावद्वि-प्रविसर्जनम्' असा यमवचनीं पाठ आहे. येथें **वृत्तिकार** सांगतो—पितृपात्र समवनयन( एकीकरण )देशाहून श्राद्ध समाप्त होईपर्यंत चाळवूं नये. कारण, त्या ठिकाणीं तिसऱ्या पात्रानें आवृत पितर राहतात. अथवा प्रथम पात्रच उपडें करावें. कोणती कामना नसतांही शेष उदकाची ही व्यवस्था समजावी. **हेमाद्रींत कौर्मांत**—"समाधानपूर्वक सर्व संस्रव एक पात्रांत करावें, 'पितृभ्यः स्थानमसि' या मंत्रानें पात्र उपडें घालावें." **शूलपाणींत यम** तर—"पित्याचें पहिलें पात्र त्यांत पितामहपात्र ठेवावें, नंतर प्रपितामहपात्र त्याजवर ठेऊन नंतर उचलूं नये व चाळवूंही नये." असें सांगतो. आतां सर्वांची एकवाक्यता करून असा अर्थ झाला कीं, सारे संस्रव एकत्र मिळवून तिसऱ्या पात्रानें आच्छादन करून उपडें करावें, असें केचित् म्हणतात. **अत्रि**—गंधादिकानें त्याचें पूजन करून तिसऱ्या पात्रानें आच्छादन करावें, नंतर पूजित शुद्ध देशावर 'पितृभ्यः स्थानमसि' या मंत्रानें त्या पात्राची पूजा करावी." उपडें केलें तरी पूजन समानच आहे. "उपडें करून उत्तरेकडे ठेवावें" असें **प्रचेतसाचें** वचन आहे म्हणून सर्व ब्राह्मणांच्या उत्तरेकडे ठेवावें, असें **हेमाद्रि** व **कल्पतरु** सांगतात. ब्राह्मणांच्या वामभागीं ठेवावें, असें **हलायुध** सांगतो. कर्त्याच्या वामभागीं असें **शूलपाणि** सांगतो. "उताणें किंवा विवृत ( उघडें ) असें पितृपात्र होऊं नये" असें **उशनसाचें** वचन आहे म्हणून उपडें करणें हेंच चांगलें. माता-महादिपात्रांतीलही संस्रव पितृपात्रांतच घेऊन प्रयाज यागांच्या तंत्राप्रमाणें एकतंत्रानेंच उपडें करावें, असें **शूलपाणि** सांगतो. एकोद्दिष्टांत तर 'पितृभ्यः०' या मंत्रांत ऊह करून उपडें करावें, असें **पितृभक्ति**ग्रंथांत **श्रीदत्त** सांगतो. **यमही**—"स्पर्श केलेलें, उताणें केलेलें, दुसऱ्या ठिकाणीं नेलेलें, उघडलेलें, असें पात्र पाहून पितर शीघ्र जातात व शाप देतात." विश्वेदेवांचें पात्र उताणें ठेवावें, असें **मदनपारिजात** सांगतो.

**बैजवापः** तस्योपरिकुशान्दत्वाप्रदद्याद्देवपूर्वकं गंधपुष्पाणिधूपंचदीपंवस्त्रोपवीतके अत्रगंधादेर्दैवेपि-त्र्येचपदार्थानुसमयस्य याज्ञवल्क्योक्तकांडानुसमयेनविकल्पोज्ञेयः बह्वृचानांतुसूत्रेदैवानुक्तेःकांडानुसमयएव अत्रप्राचीनावीतीनामगोत्रसंबुद्ध्याद्युक्तंप्रागन्यद्दैववत्तदंतेआचमनंच **हेमाद्रौकालिकापुराणे** निर्वर्त्य-ब्राह्मणादेशात्क्रियामेवंयथाविधि भाजनानिततोदद्याद्धस्तशौचंपुनःक्रमात् आदेशात्पात्राणिदद्यादित्यन्वयः तेनतत्रापिप्रश्नानुज्ञेज्ञेये **तत्रैवब्राह्मे** मंडलानिचकार्याणिनैवारैश्चूर्णकैःशुभैः गौरमृत्तिकयावापिभस्मनागोम-येनवा **भृगुः** भस्मनावारिणावापिकारयेन्मंडलंततः चतुःकोणंद्विजाग्र्यस्यत्रिकोणंक्षत्रियस्यतु मंडलाकृति वैश्यस्यशूद्रस्याभ्युक्षणंस्मृतं **बह्वृचपरिशिष्टेतु** दैवेचतुरस्रंपित्र्येवृत्तंमंडलंकृत्वाक्रमेणसयवान्सतिलांश्च-दर्भान्दद्यादित्युक्तं **मार्कंडेयः** यातुधानाःपिशाचाश्चक्रूरायेचैवराक्षसाः हरंतिरसमन्नस्यमंडलेनविवर्जितं ।

**बैजवाप**—"त्या पात्रावर कुश देऊन नंतर देवपूर्वक ब्राह्मणांना गंध, पुष्प, धूप, दीप, वस्त्र, यज्ञोपवीत हीं द्यावीं." या ठिकाणीं देवांकडे व पितरांकडे गंधादिकांचा पदार्थानुसमय सांगितला आणि याज्ञवल्क्यानें कांडानुसमय सांगितला म्हणून त्याचा विकल्प समजावा. बह्वृचांच्या सूत्रांत तर देव सांगितले नाहींत म्हणून त्यांना कांडानुसमयच आहे, असें सम-जावें. येथें गंधादिपूजेविषयीं प्राचीनावीती व नामगोत्रादिकांचा संबुद्धीनें उच्चार इत्यादिक पूर्वी सांगितलें आहे. इतर सारा विधि देवांप्रमाणें समजावा. पूजेच्या अंतीं आचमनही सांगितलें आहे. **हेमाद्रींत कालिका**पुराणांत—"याप्रमाणें यथा-विधि पूजनक्रिया करून ब्राह्मणांची आज्ञा घेऊन भोजनपात्रें मांडावीं, नंतर क्रमानें पुनः हातावर शुद्ध्यर्थ पाणी घालावें." वचनांत आज्ञा घेऊन पात्रें द्यावीं, असें सांगितल्यावरून येथेंही प्रश्न व अनुज्ञा पाहिजे असें होतें. तेथेंच **ब्राह्मांत**—

"नीवारां( तृणधान्यां )चीं बारीक चूर्णें करून त्यांनीं, किंवा गौरवर्ण मृत्तिकेनें अथवा भस्मानें किंवा गोमयानें मंडलें करावीं." **भृगु**—"भस्मानें किंवा उदकानें मंडल करावें. ब्राह्मणाचें मंडल चतुष्कोण, क्षत्रियाचें त्रिकोण, वैश्याचें मंडलाकृति आणि शूद्राचें अभ्युक्षण समजावें." **बह्वृचपरिशिष्टांत** तर—देवांकडे चतुरस्र आणि पितरांकडे वर्तुल असें मंडल करून क्रमानें यवसहित आणि तिलसहित दर्भ मंडलावर द्यावे, असें सांगितलें आहे. **मार्कंडेय**—"मंडलरहित पात्र असेल तर यातुधान, पिशाच आणि क्रूर राक्षस हे अन्नाचा रस हरण करितात."

**हेमाद्रौहारीतः** भूमावेवनिदध्यान्नोपरिपात्राणीति तानिचहेमाद्रावत्रिराह भोजनेहैमरौप्याणि दैवेपित्र्येयथाक्रमं **हारीतः** राजतपार्णताम्रकांस्यपात्राणिभोजनेइति तत्रैववाराहे सौवर्णानीहरौप्याणि कांस्यानितदसंभवे अन्यान्यपिहिकार्याणिदारुजान्यपिजानता नायसान्यपिकार्याणिपैत्तलानिनतुक्वचित् नच सीसमयानीहशस्यंतेत्रपुजान्यपि **अत्रिः** पंचाशत्पलिकंकांस्यंत्व्यधिकंभोजनायवै गृहस्थैस्तुसदाकार्यमभावे हेमरौप्ययोः पालाशेभ्योविनानस्युःपर्णपात्राणिभोजने **पृथ्वीचंद्रस्तु** कांस्यपात्रेहविर्दृष्ट्वानिराशाःपितरोगताइतिब्राह्मोक्तेःकांस्यपात्रनिषेधमाह **बोपदेवस्तुस्मृतिसंग्रहमुदाजहार** श्राद्धेपलाशपात्राणिमधुकोदुंबराणिच पारिकाकुटजप्लक्षक्रकचानिक्रमाज्जगुः कदलीचूतपनसजंबुपुन्नागचंपकाः अलाभेमुख्यपात्राणांग्राह्याःस्युःपितृकर्मणीति **हेमाद्रौ**तुकदलीपात्रनिषेधमाह**आंगिराः** नजातीकुसुमानिदद्यान्नकदलीपत्रमिति **क्रतुः** असुराणांकुलेजातारंभापूर्वपरिग्रहे तस्यादर्शनमात्रेणनिराशाःपितरोगताः एवंपात्राण्यासाद्यभस्ममर्यादांकृत्वाविप्रहस्तशोधनंकुर्यात् तत्रपिशंगरक्षाणोइतिमंत्रद्वयंकेचित्पठंति **मात्स्ये** अकृत्वाभस्ममर्यादांयःकुर्यात्पाणिशोधनं आसुरंतद्भवेच्छ्राद्धंपितॄणांनोपतिष्ठते तत्रैव**ब्रह्मांडे** प्रक्षाल्यहस्तपात्रादिपश्चादद्भिर्विधानवत् प्रक्षालनजलंदर्भैस्तिलैर्मिश्रंक्षिपेच्छुचौ मंडलोपरीतिहेमाद्रिः ।

**हेमाद्रींत हारीत**—"भोजनपात्रें भूमीवरच ठेवावीं, मध्यंतरीं ठेऊं नयेत." तीं पात्रें **हेमाद्रींत अत्रि** सांगतो—"भोजनाविषयीं देवांकडे व पितरांकडे अनुक्रमानें सोन्याचीं व रुप्याचीं पात्रें असावीं." **हारीत**—"भोजनाविषयीं रुपें, पानें, तांबें, कांस्य यांचीं पात्रें असावीं." तेथेंच **वाराहांत**—"श्राद्धांत सोन्याचीं, रुप्याचीं, कांशाचीं पात्रें असावीं, त्यांच्या अभावीं इतरही काष्ठाचीं करावीं. लोखंडाचीं व पितळेचीं कधींही करूं नयेत. तशींच शिशाचीं व कथलाचीं पात्रें प्रशस्त नाहींत." **अत्रि**—"गृहस्थांनीं सुवर्ण, रुपें यांच्या अभावीं बावन्न पल ( शास्त्रीय चार तोळ्यांचें एक पल या मानानें ) परिमित कांस्याचें पात्र सर्वदा भोजनाला करावें. पळसाच्या पानांवांचून इतर पानांचीं पात्रें भोजनास सांगितलीं नाहींत." **पृथ्वीचंद्र** तर—"कांस्यपात्रांवर हवि (अन्न) पाहून पितर निराश होऊन जातात" असें ब्राह्मवचन आहे म्हणून कांस्यपात्राचा निषेध सांगतो. **बोपदेव** तर **स्मृतिसंग्रह** सांगता झाला, तो असा—"पळस, मोह, उंबर, पारिका, कुडा, पाईर, क्रकच, यांचीं पात्रें श्राद्धाविषयीं सांगतात. पितृकर्माविषयीं मुख्यपात्रांच्या अभावीं केळ, आंबा, फणस, जांभूळ, नागचांफा, सोनचांफा यांचीं पात्रें घ्यावीं." **हेमाद्रींत** केळीचे पानाचा निषेध सांगतो. **अंगिरा**—"जाईचीं फुलें व केळीचें पान देऊं नये." **क्रतु**—"पूर्वी ज्या वेळीं केळ उत्पन्न झाली त्या वेळीं ती असुरांच्या कुळांत उत्पन्न झालेली आहे, तिच्या दर्शनमात्रानें पितर निराश होऊन जातात." याप्रमाणें पात्रें मांडून भस्माची मर्यादा करून ब्राह्मणाच्या हस्ताचें शोधन करावें. भस्ममर्यादेविषयीं 'पिशंग०' 'रक्षाणो०' हे दोन मंत्र केचित् म्हणतात. **मात्स्यांत**—"भस्ममर्यादा केल्यावांचून जो हस्तशोधन करितो त्याचें तें श्राद्ध आसुर होतें, पितरांना प्राप्त होत नाहीं." तेथेंच **ब्रह्मांडपुराणांत**—"यथाविधि उदकांनीं हस्तपात्रादिकांचें प्रक्षालन करून तें प्रक्षालनोदक दर्भतिलांनीं मिश्र असें शुद्ध भूमीवर टाकावें." मंडलावर टाकावें, असें **हेमाद्रि** सांगतो.

**अथाग्नौकरणं हेमाद्रौमार्कंडेयः** आहिताग्निस्तुजुहुयाद्दक्षिणाग्नौसमाहितः अनाहिताग्निश्चौपासने ऽग्न्यभावेद्विजेप्सुवा **वायवीये** आहृत्यदक्षिणाग्निंतुहोमार्थंवैप्रयत्नतः अग्न्यर्थंलौकिकंवापिजुहुयात्कर्मसिद्धये आहिताग्निःसर्वाधानी अर्धाधानीतुगृह्यएवेति**चंद्रिकापरार्कमिताक्षरामाधवादयः** तस्यापिदक्षिणमग्नौ लौकिकोगृह्यइतिहेमाद्रिः **कल्पतरुश्च** आद्यपक्षएवतुयुक्तःबहुसंमतश्च यद्यपिस्मार्ताग्नौकरणंश्रौतेदक्षिणाग्नौनयुक्तंतथापिवचनाद्भवतीति**हेमाद्रिचंद्रिकादयः** इदंदर्शश्राद्धएव आब्दिकादिषुतुसर्वाधानीपार्वणे अर्धाधानीगृह्येकुर्यादितिहेमाद्रिर्माधवादयश्च पक्षांतकर्मनिर्वर्त्यवैश्वदेवंचसाग्निकः पिंडयज्ञंततःकुर्यात्तोन्वाहार्यकंबुधइतिलौगाक्ष्यादिभिःक्रमोक्तेर्विहृतदक्षिणाग्निसत्त्वात् अतएवात्रवचनेसाग्निकः आहिताग्नि-

**उक्तोहेमाद्रिणा** एतदापस्तंबादीनामेव आश्वलायनस्याहिताग्नेःपाणावेवेतिवृत्तिः अर्धाधानिनःगृह्यएव-व्यतिषंगेणेति**प्रयोगपारिजातेपरिशिष्टेच** **बोपदेव**स्त्वाह होमशब्दःपिंडपितृयज्ञपरः पितृयज्ञेतु-जुहुयाद्दक्षिणाग्नौसमाहितः श्राद्धेत्वौपासनाग्नौतुनिरग्निर्लौकिकेनले अनग्निर्दूरभार्यश्चपार्वणेसमुपस्थिते संधा-यग्निंततःकुर्याद्धोममग्निंसमुत्सृजेदिति**त्रिकांडमंडनोक्तेः** श्राद्धेगृह्याग्नावेवेति लौकिकाग्न्यादिविधानंच-तैत्तिरीयादिविषयं **बह्वृच**स्यत्वनग्नेरपिपाणिहोमएव अग्निपाणीविनासूत्रेविधानांतरानुक्तेः अग्न्यभावेतुवि-प्रस्यपाणावेवोपपादयेदिति**मनूक्तेश्च वृत्ताव**प्येवम् ।

## आतां अग्नौकरण सांगतो—

**हेमाद्रींत मार्कंडेय—**"श्रौताग्नि धारण करणारानें दक्षिणाग्नीवर अग्नौकरणहोम करावा, श्रौताग्निरहितानें गृह्याग्नीवर होम करावा, आणि अग्नीच्या अभावीं ब्राह्मणाच्या हातावर किंवा उदकांत होम करावा." **वायवीयांत—**"होमाकरितां प्रयत्नानें दक्षिणाग्नि आहरण करून अथवा कर्मसिद्धि होण्याकरितां लौकिकाग्नी( गृह्याग्नी )वर होम करावा." वरील मार्कंडेय वचनांत 'आहिताग्नि' म्हणजे सर्वाधानी समजावा. अर्धाधानीनें गृह्याग्नीवरच अग्नौकरण करावें; असें **चंद्रिका, अपरार्क, मिताक्षरा, माधव** इत्यादिक ग्रंथकार सांगतात. अर्धाधानीला देखील दक्षिणाग्नींत होम आणि लौकिक म्हणजे गृह्याग्नि असें **हेमाद्रि** व **कल्पतरु** सांगतो. येथें पहिला पक्ष ( अर्धाधानीचा गृह्याग्नीवर होम ) हाच युक्त व बहुतांना संमतही आहे. जरी स्मार्त असें जें अग्नौकरण तें श्रौत अशा दक्षिणाग्नीवर युक्त नाहीं, तरी करावें असें वचन आहे म्हणून होतें, असें **हेमाद्रि, चंद्रिका** इत्यादिक सांगतात. हें दर्शश्राद्धाविषयींच समजावें. सांवत्सरादिक श्राद्धांत तर सर्वाधानीनें हस्तावर आणि अर्धाधानीनें गृह्याग्नीवर करावें असें **हेमाद्रि, माधव** इत्यादिक सांगतात. कारण, "साग्निकानें पक्षान्त कर्म ( अन्वाधान ) व वैश्वदेव करून नंतर पिंडपितृयज्ञ करून दर्शश्राद्ध करावें" असा **लौगाक्षि**प्रभृतींनीं क्रम सांगितला आहे म्हणून विहार केलेला दक्षिणाग्नि दर्शाचे ठिकाणीं असतो. म्हणूनच ह्या वचनांत साग्निक म्हणजे आहिताग्नि **हेमाद्री**नें सांगितला आहे. हें आपस्तंबादिकांनाच समजावें. आश्वलायनशाखी जो आहिताग्नी त्याचा हातावरच होम, असें **वृत्तिकार** सांगतो. अर्धाधानीचा गृह्याग्नीवरच व्यतिषंगानें ( सहप्रयोगानें ) होम असें **प्रयोगपारिजातांत** व **परिशिष्टांत** आहे. **बोपदेव** तर असें सांगतो कीं, वरील वायवीय वचनांत होम शब्द आहे तो पिंडपितृयज्ञाचा बोधक आहे. कारण, "पिंडपितृयज्ञांतील होम दक्षिणाग्नीवर करावा, श्राद्धांतील होम औपासनाग्नीवर करावा, निरग्निकानें लौकिकाग्नीवर करावा. अग्निरहितानें व ज्याची भार्या दूर आहे त्यानें पार्वणश्राद्ध प्राप्त असतां अग्निसंधान करून होम करून नंतर अग्नीचा उत्सर्ग ( त्याग ) करावा" असें **त्रिकांडमंडन**वचन आहे, म्हणून श्राद्धांत गृह्याग्नीवरच होम सांगितला आहे. निरग्निकाला लौकिकाग्नीचें वगैरे विधान हें तैत्तिरीयादिविषयक आहे. बह्वृचाचा तर निरग्निकाचाही हातावरच होम होतो. कारण, अग्नि व हस्त यांवांचून दुसरें विधान सूत्रांत सांगितलें नाहीं. आणि "अग्नीच्या अभावीं ब्राह्मणाच्या हस्तावर होम करावा" असें **मनु**वचनही आहे. **सूत्रवृत्तींत**-ही असेंच आहे.

कश्चित्साग्नेरपिपाणिहोमउक्तो**गृह्यपरिशिष्टे** अन्वष्टक्यंचपूर्वेद्युर्मासिमास्यथपार्वणं काम्यमभ्युदयेष्ट-म्यामेकोद्दिष्टंतथाष्टमं चतुर्ष्वाद्येषुसाग्नीनांवह्नौहोमोविधीयते पित्र्यब्राह्मणहस्तेस्यादुत्तरेषुचतुर्ष्वपीति एकोद्दि-ष्टंसपिंडीकरणं शुद्धेतन्निषेधात् **बह्वृचभाष्यकारा**स्तुसर्वैकोद्दिष्टेपुपाणिहोममाहुः इदंबह्वृचानामेव अत्रेदं तत्त्वम् स्थालीपाकेनसहपिंडार्थमुद्धृत्येतिसूत्रे नात्रापूर्वःस्थालीपाकश्चोद्यते सर्वश्राद्धेषुप्रसंगात्तेनानुवादोयमिति **वृत्तिकारोक्तेः**पार्वणेआर्थिकस्यानंगस्यव्यतिषंगस्यवार्षिकादिष्वनतिदेशादर्धाधानिनोपिपाणिहोमएवेतिवृ-**त्तिस्वरसः** एवंमासिकादावपि षोडशेमासिकेश्राद्धेसपिंडीकरणेतथा पाणावेवतुहोतव्यमन्यत्राग्नौतुहूय-तेइति**बोपदेवो**दाहृतवचनाच्च **भाष्यकारमते**तु सूत्रेस्थालीपाकेनेतिकरणत्वान्नित्यवच्छ्रवणाच्चपार्वणे सांगं ततःकाम्यादिषुतदभावेकार्यस्यपिंडदानस्याप्यभावः एतदेवानुसृत्यविकृतावपिवार्षिकादौव्यतिषंगउक्तः **प्रयोगपारिजातेपरिशिष्टेच** तेनैतन्मतेऽर्धाधानिनोग्नावेव वस्तुतस्तुस्थालीपाके सहशाखयाप्रस्तरं प्रहरतीतिवत्सहभावमात्रश्रुतेः पत्नीवतेत्वष्टुरुपलक्षणमिवनांगत्वम् तत्त्वेवानांगानुरोधेनप्रधानभूतपिंडदान-

१ सर्वाधानी म्हणजे सर्व गृह्याग्नि श्रौताग्नींत मिळविलेला. आणि अर्धाधानी म्हणजे अर्धा गृह्याग्नि श्रौताग्नींत मिळवून अर्धा गृह्याग्नि राखणारा तो होय.

**त्यागोयुक्तः तेनव्यतिषंगाभावेप्यग्नौहोमोभवतीतिबोपदेवः अनाहिताग्नेर्गृह्याग्निमतस्तुसर्वमतेग्नावेव वार्षि-कादौवृत्तिमतेव्यतिषंगोन अन्यमतेत्वस्ति अत्रयथाचारमनुष्ठेयं ।**

क्वचित् श्राद्धांत साग्निकालाही पाणिहोम **गृह्यपरिशिष्टांत** सांगितला आहे. तो असा-"अन्वष्टक्यश्राद्ध, पूर्वेद्युःश्राद्ध, मासिमासिश्राद्ध, पार्वणश्राद्ध, काम्यश्राद्ध ( पंचमीस पुत्रकामाला इत्यादि ), अभ्युदयश्राद्ध ( वृद्ध्यादिनिमित्त ), अष्टमी-श्राद्ध, आणि आठवें एकोद्दिष्ट. याप्रमाणें हीं आठ श्राद्धें आहेत त्यांमध्यें पहिल्या चार श्राद्धांत साग्निकांना अग्नींत होम सांगितला आहे. आणि पुढच्या चार श्राद्धांत ब्राह्मणांच्या हस्तावर होम सांगितला आहे." येथें एकोद्दिष्ट म्हणजे सपिंडीकरण समजावें. कारण, केवळ एकोद्दिष्टांत पाणिहोमाचा निषेध आहे. **बह्वृचभाष्यकार** तर सर्व एकोद्दिष्टांत पाणिहोम सांगतात. हें सांगितलेलें बह्वृचांनाच समजावें. येथें खरा प्रकार म्हणजे असा आहे कीं, "स्थालीपाकेन सह पिंडार्थमुद्धृत्य" या आश्वलायन सूत्राचे ठायीं 'या ठिकाणीं अपूर्व स्थालीपाक सांगत नाहीं. कारण, जर स्थालीपाक अपूर्व सांगितला तर सर्व श्राद्धांत स्थाली-पाकाची प्रसक्ति होईल, याकरितां पूर्वीं सिद्ध असलेल्या स्थालीपाकाचा येथें सूत्रकारानें अनुवाद केला आहे' असें **वृत्तिकारानें** सांगितलें आहे म्हणून पार्वणाचे ठायीं अंगभूत नसून आर्थिक प्राप्त झालेला जो व्यतिषंग ( उभयोः सहानुष्ठान ) त्याचा वार्षिकादि श्राद्धांत अतिदेश नाहीं म्हणून अर्धाधानीला देखील पाणिहोमच आहे, असें वृत्तीचें स्वारस्य समजावें. याप्रमाणें मासिकादिक श्राद्धांतही पाणिहोम समजावा; कारण, "षोडश मासिकश्राद्धें, सपिंडीकरण यांचे ठायीं हातावरच होम करावा; इतरत्र अग्नींत होम" असें **बोपदेवानें**ही वचन सांगितलें आहे. **भाष्यकाराच्या मतीं** तर-सूत्रांत 'स्थालीपाकेन' असें सांगितलें म्हणून स्थालीपाकाला करणत्व आहे व तो नित्यासारखा श्रुत आहे म्हणून पार्वणश्राद्धांत स्थालीपाक हा अंग आहे. काम्यादिक श्राद्धांत त्या स्थालीपाकाचा अभाव आहे म्हणून त्याचें कार्य जें पिंडदान त्याचाही अभाव आहे. यालाच अनुसरून पार्वणश्राद्धाची विकृतिरूप जें वार्षिकादिक श्राद्ध त्या ठिकाणीं देखील **प्रयोगपारिजातांत** व **परिशिष्टांत** व्यतिषंग सांगितला आहे. त्यावरून भाष्यकाराच्या मतीं अर्धाधानीला अग्नीवरच होम आहे. वास्तविक म्हटलें असतां जसें-'सह शाखया प्रस्तरं प्रहरति' या वाक्यानें पलाशशाखेसहवर्तमान प्रस्तराचा त्याग आहवनीय अग्नींत सांगितला आहे, तेथें शाखेला अंगत्व नाहीं, त्याप्रमाणें येथें स्थालीपाकाला सहभावमात्र श्रवण आहे. अंगत्व नाहीं. पात्नीवत म्हणून एक ग्रह ( सोमपात्र ) आहे, त्या ठिकाणीं जसें-सोमपानाविषयीं त्वष्टेचें उपलक्षण होत नाहीं, तसें येथेंही स्थालीपाकाला अंगत्व नाहीं. अथवा स्थाली-पाकाला अंगत्व मानलें तरी त्या अंगानुरोधानें ( अंगभूत स्थालीपाकाच्या अभावानें ) श्राद्धांत प्रधानभूत जें पिंडदान त्याचा त्याग करणें योग्य नाहीं. म्हणून व्यतिषंगाच्या अभावीं देखील अग्नींत होम होतो, असें **बोपदेव** सांगतो. आहिताग्नि नसून गृह्याग्निमान् त्याचा सर्वमतीं अग्नींतच होम. वार्षिकादिक श्राद्धांत वृत्तिकाराच्या मतीं व्यतिषंग नाहीं, इतरांच्या मतीं आहे. येथें जसा आचार असेल तसें करावें.

**आश्वलायनः** **उद्धृत्यघृताक्तमन्नमनुज्ञापयत्यग्नौकरिष्येकरवैकरवाणीतिवाप्रत्यभ्यनुज्ञाक्रियतांकुरुष्व-कुर्वित्यथाग्नौजुहोतियथोक्तंपुरस्तादिति व्यतिषंगपक्षेइदमितिवृत्तिः करवैकरवाणीत्यत्राग्नावित्यनुषंगः पुर-स्तात्पिंडपितृयज्ञे तच्चैवं मेक्षणेनावदायावदानसंपदा जुहुयात्सोमायपितृमतेस्वधानमोग्नयेकव्यवाहनायस्व-**

---

१ मार्गशीर्षादि चार महिन्यांच्या वद्य नवमीस होणारीं अन्वष्टक्यें. २ त्याच सप्तमीस होणारीं पूर्वेद्युःश्राद्धें. ३ हीं आठ श्राद्धें आश्व-लायन गृह्यसूत्राच्या चवथ्या अध्यायांत श्राद्धप्रकरणीं वृत्तीत सांगितलीं आहेत, तेथें पाहावीं. ४ वृत्तिकारानेंही एकोद्दिष्टांत पाणि-होम सांगितला आहे. ५ दर्शपूर्णमासप्रकरणीं सान्नाय्य हवीचा याग सांगितला आहे त्या ठिकाणीं पळसाची शाखा आणून तिनें गाईचें वत्स दूर करून दूध काढावें व त्या दुधाचें हवि करून याग करावा तो सान्नाययाग. तेथें वत्स दूर करण्याकरितां जी शाखा तिचा त्याग प्रस्तरासह आवाहनीयांत सांगितला म्हणजे ज्या वेळीं प्रस्तराचा त्याग त्या वेळीं शाखेचा त्याग या त्यागाला प्रतिपत्तिकर्म म्हणतात. प्रतिपत्ति म्हणजे काहींएक विशिष्टत्वबोधक संस्कार. जसें राजानें चर्वित तांबूलाचा सोन्याच्या पीकदाणींत त्याग, तद्वत. यावरून तो त्याग झाला नाहीं म्हणून क्रतूला वैगुण्य आहे अशी गोष्ट नाहीं. जर शाखेला अंगत्व असतें व तिचा त्याग झाला नाहीं तर वैगुण्य आलें असतें. पण येथें वत्स दूर करण्याविषयीं उपयुक्त जी शाखा तिला पुनः अंगत्व नाहीं, असें मीमांसकांनीं सांगितलें आहे. ६ पात्नीवत ग्रहाचे ठिकाणीं सोमभक्षणमंत्र आहे तो असा-"अग्ना ३ इ पत्नीवन्सजूर्देवेन त्वष्ट्रा सोमं पिब स्वाहा" या मंत्रांत पत्नीवान् जो अग्नि त्याला संबोधन करून त्वष्टा जो देव त्यासह सोमपान कर असें सांगितलें आहे म्हणून पत्नीवान् अग्नि जशी सोमपानाची देवता तशी त्वष्टाही आहे याकरितां पत्नीवतासह त्वष्टेचेंही उपलक्षण ( बोधन ) होतें, असें पूर्वपक्षी म्हणतो. सिद्धांती असें म्हणतो कीं, मंत्रांतील 'सजूः' ( सह ) या पदानें पानकालीं त्वष्टेचें सह अवस्थान ( स्थिति ) मात्र बोधित होतें; कारण, मंत्रांत त्याला संबोधन नाहीं व बरोबर आहे इतक्यानेंच त्याला पानकर्तृत्व संभवत नाहीं, म्हणून त्वष्टा त्या सोमाची देवता नाहीं; याकरितां त्याचें उपलक्षण ( बोधन ) होत नाहीं.

धानमइति स्वाहाकारेणवाग्निपूर्वंयज्ञोपवीतीमेक्षणमनुप्रहृत्येति अवदानसंपदाउपस्तरणाद्यपेक्षयेत्यर्थः व्यतिषंगपक्षे अतिप्रणीतेयंहोमोन्यथामुख्ये अतिप्रणीतेग्नाविध्ममुपसमाधायेतिबह्वृचपरिशिष्टात् केचित्तस्वरक्षोनिबर्हणार्थत्वान्मुख्येवदंति तदेतद्विरोधाच्चिंत्यम् प्रयोगपारिजातेप्येवम् शौनकः स्वाहाकारेणहोमेतु-भवेद्यज्ञोपवीतवान् तत्रप्रागग्नयेहुत्वापश्चात्सोमायहूयते अग्नौयज्ञोपवीत्येवप्रक्षिपेन्मेक्षणंततः छंदोगपरिशिष्टे अग्नौकरणहोमश्चकर्तव्यउपवीतिना अपसव्येनवाकार्योदक्षिणाभिमुखेनच कातीयानांत्वपसव्यमेव पिंडपितृयज्ञवत्हुत्वेतिसर्वातिदेशात् सव्यंतुछंदोगपरम् गोभिलेनैतदुत्तरमेवापसव्योक्तेः छंदोगाजुहुयुः-सव्येनापसव्येनयाजुषाइतिवृद्धयाज्ञवल्क्योक्तेश्च ।

**आश्वलायन**—"भात पात्रावर घेऊन त्याजवर घृत घालून 'अग्नौकरिष्ये' किंवा 'अग्नौकरवै' अथवा 'अग्नौकरवाणि' अशी ब्राह्मणांकडे अनुज्ञा मागावी; नंतर ब्राह्मणांनीं अनुक्रमानें 'क्रियतां' किंवा 'कुरुष्व' अथवा 'कुरु' अशी अनुज्ञा द्यावी. नंतर पूर्वीं ( पिंडपितृयज्ञांत ) सांगितल्याप्रमाणें अग्नींत होम करावा" व्यतिषंगपक्षीं हें अग्नौकरण, असें वृत्तिकार सांगतो. पूर्वीं सांगितलेलें तें असें—"मेक्षण म्हणजे भात घेण्याचें चमच्यासारखें लांकडाचें पात्र त्यानें अवदान घेऊन अवदानसंबंधी उपस्तरणादिक करून पुढील मंत्रांनीं होम करावा. ते मंत्र असे-'सोमाय पितृमते स्वधानमः' 'अग्नये कव्यवाहनाय स्वधानमः' या मंत्रांनीं होम करावा. अथवा 'स्वधा' शब्दाच्या स्थानीं 'स्वाहा' शब्द उच्चारून अग्नीला पूर्वीं व सोमाला नंतर होम करावा, त्या वेळीं यज्ञोपवीती असावी आणि मेक्षणाचें अग्नींत अनुप्रहरण (त्याग) करावें." व्यतिषंगपक्षीं अतिप्रणीत अग्नींत हा होम, अतिप्रणीत नसेल तर मुख्याग्नीवर होम; कारण, "अतिप्रणीत अग्नीवर इध्माचें उपसमाधान करून इत्यादि" असें **बह्वृचपरिशिष्टांत** आहे. **केचित् ग्रंथकार**—तो अतिप्रणीत अग्नि राक्षसांच्या नाशाकरितां आहे म्हणून मुख्याग्नीवर होम, असें सांगतात. तें केचिन्मत ह्या वरील परिशिष्टमतास विरुद्ध आहे. म्हणून चिंत्य ( मूलशून्य ) आहे. **प्रयोगपारिजातांत**ही असेंच आहे. **शौनक**—"स्वाहाकारानें होम करीत असतां यज्ञोपवीती असावी. व तेथें पूर्वीं अग्नीला होम करून पश्चात् सोमाला होम करावा. यज्ञोपवीती असूनच अग्नींत मेक्षणाचा प्रक्षेप करावा." **छंदोगपरिशिष्टांत**—"अग्नौकरणहोम उपवीतीनें करावा अथवा दक्षिणाभिमुख होऊन अपसव्यानें करावा." कातीयांना तर अग्नौकरणाविषयीं अपसव्यच आहे; कारण, 'पिंडपितृयज्ञवत् हुत्वा' ह्या पदानें पिंडपितृयज्ञाच्या सर्व धर्मांचा अतिदेश केलेला आहे. वरील वचनांत सव्य जें सांगितलें तें छंदोगविषयक आहे. कारण, **गोभिलानें**—अग्नौकरणोत्तरच अपसव्य सांगितलें आहे. आणि "छंदोगांनीं सव्यानें होम करावा व याजुषांनीं अपसव्यानें होम करावा" असें **वृद्धयाज्ञवल्क्य**वचनही आहे.

अथपाणिहोमः आश्वलायनः अभ्यनुज्ञायांपाणिष्वेववेति पिंडपितृयज्ञकल्पाभावेनाग्न्यभावेकाम्यादिष्वित्यर्थः तेनबह्वृचानामेकोद्दिष्टेपाणिहोमोभवत्येव निषेधोऽन्यपरः पाणिष्वितिबहुवचनात्सर्वविप्रपाणिषुहोमइतिवृत्तिः एवंमातामहेपि शौनकोपि सर्वेषामुपविष्टानांविप्राणामथपाणिषु विभज्यजुहुयात्सर्वंसोमायेत्यादिमंत्रतः यत्तुहेमाद्रौकात्यायनः पित्र्येयःपंक्तिमूर्धन्यस्तस्यपाणावनग्निकः हुत्वामंत्रवदन्येषां तूष्णींपात्रेषुनिक्षिपेदितितद्बह्वृचातिरिक्तानां यत्तुतत्रैवमात्स्ये अग्न्यभावेतुविप्रस्यपाणौवाथजलेपिवा अजकर्णेऽश्वकर्णेवागोष्ठेवाथशिलांतिकइति तत्तीर्थश्राद्धविषयं तद्यदापांसमीपेस्याच्छ्राद्धंज्ञेयोविधिस्तदेतितत्रैवकात्यायनोक्तेः निर्जलेऽजकर्णादौ यत्तुचंद्रोदयेयमः दैवविप्रकरेनग्निःकृत्वाग्नौकरणंद्विजइति तदभार्यपरम् अपत्नीकोयदाविप्रःश्राद्धंकुर्वीतपार्वणं पित्र्यविप्रैरनुज्ञातोविश्वेदेवेषुहूयतेइति तत्रैवकात्यायनोक्तेः हूयतेइतिछांदसोव्यत्ययः हेमाद्रौवायवीये विधुरोदैविकेकुर्याच्छेषंपित्र्येनिवेदयेत् दैवविप्रानेकत्वेतत्रैव वैश्वदेवेयदैकस्मिन्भवेयुर्भ्योदयोद्विजाः तदैकपाणौहोतव्यंस्याद्विधिर्विहितस्तदा सोप्याद्यः प्रथमंवानियम्येतेतिन्यायात् तेनमृतभार्यस्यदैवेहोमः अनुपनीतब्रह्मचार्यादेस्तुपित्र्ये अग्न्यभावःस्मृतस्तावद्यावद्भार्यानविंदतीतिहेमाद्रौजातूकर्ण्योक्तेः सभार्यैनष्टाग्नेरपिपित्र्यविप्रकरेइतिपृथ्वीचंद्रः उपवीतित्वेनदैवेहोमः प्राचीनावीतेनपित्र्ये यद्वासर्वत्रदैवपित्र्यकरयोर्विकल्पइतिहेमाद्रौमदनरत्नेपारिजातेच यदातुपितृमातामहयोर्दैवपित्र्यविप्रभेदस्तदाभेदेनपाणिहोमइत्यपरार्कचंद्रिकादयः यदातुदैवंतंत्रेणतदातंत्रेणसकृद्दैवपाणिहोमइतिकेचित् हेमाद्रिस्तु मातामहस्यभेदेपिकुर्यात्तंत्रेचसाग्निकइतिकातीयस्मृतेर्भेदमाह एवंपित्र्येपि माधवीयेप्येवं एवंसाग्नेरपिविदेशादौपाणिहोमोज्ञेयः यत्तुकर्केणाग्निंविनाश्राद्धमेव-

नास्तीत्युक्तम् तत्सपिंडीकरणवार्षिकाद्यकरणापत्तेर्यत्किंचिदेव यत्तुबृहन्नारदीये अनग्निर्दूरभार्यश्चपार्वणेस-मुपस्थिते भ्रातृभिःकारयेच्छ्राद्धंसाग्निकैर्विधिवद्द्विजाः क्षयाहदिवसेप्राप्तेस्वस्याग्निर्दूरगोयदि तथैवभ्रातरः-स्युश्चेल्लौकिकाग्नावितिस्थितिः औपासनाग्नौदूरस्थेसमीपेभ्रातरिस्थिते यद्यग्नौजुहुयाद्वापिपाणौवासहिपातकी औपासनाग्नौदूरस्थेकेचिदिच्छंतिसत्तमाः पाणावेवतुहोतव्यमितिनैतत्समंजसं तद्वृद्धानादरादुपेक्ष्यम् **हेमाद्रौयमः** अग्नौकरणवत्तत्रहोमोविप्रकरेभवेत् पर्युक्ष्यदर्भानास्तीर्ययतोह्यग्निसमोद्विजः मेक्षणेनकरेणवा-होमः मेक्षणप्रवरणंनेति**वृत्तिः स्मृतिरत्नावल्याम्** नानुज्ञापाणिहोमेस्यान्नस्तःपर्यूहनोक्षणे नाग्नेतमग्ना-दितिचनस्यातामिध्ममेक्षणे **कर्काचार्यो**प्येवमाह **माधवीयेचंद्रिकायां**चानुज्ञादिसर्वंभवतीत्युक्तं ।

## आतां पाणिहोम सांगतो—

**आश्वलायन**—"अथवा अभ्यनुज्ञा असतां हातावरच होम करावा" म्हणजे पिंडपितृयज्ञकल्पाच्या अभावानें अग्नीचा अभाव असतां अर्थात् काम्यादिक श्राद्धांत हातांवर होम करावा; असा ह्या आश्वलायनसूत्राचा अर्थ आहे. यावरून बह्वृचांना एकोद्दिष्टांत पाणिहोमच होतो. एकोद्दिष्टांत जो पाणिहोमनिषेध तो इतरविषयक आहे. सूत्रांत 'पाणिषु' असें बहुवचन आहे म्हणून सार्‍या ब्राह्मणांच्या हातांवर होम करावा, असें **वृत्तिकार** सांगतो. याचप्रमाणें मातामहपार्वणाचे ठायींही समजावें. **शौनक**ही—"सारे उपविष्ट ( बसलेले ) जे ब्राह्मण त्यांच्या हातांवर, अन्नाचा विभाग करून 'सोमाय०' इत्यादि मंत्रांनीं होम करावा." आतां जें **हेमाद्रींत कात्यायन** सांगतो कीं, "पित्र्यब्राह्मणांच्या पंक्तीत जो पहिला ब्राह्मण त्याच्या हातावर अनग्निकानें समंत्रक होम करावा, इतर ब्राह्मणांच्या पात्रांवर तूष्णीं ( मंत्रावांचून ) अन्न ठेवावें" तें बह्वृचातिरिक्तांना समजावें. आतां जें तेथेंच ( हेमाद्रींत ) **मात्स्यांत**—"अग्नीच्या अभावीं ब्राह्मणाच्या हातावर अथवा उदकांत किंवा बोकडाच्या कानांत किंवा घोड्याच्या कानांत अथवा गोठ्यांत किंवा दगडाच्या समीप होम करावा" तें तीर्थश्राद्धविषयक आहे. कारण, "जेव्हां उदकाच्या समीप श्राद्ध होईल तेव्हां तो विधि जाणावा" असें तेथेंच **कात्यायन**वचन आहे. निर्जलदेशीं अजकर्णादिकांत होम समजावा. आतां जें **चंद्रोदयांत यम** सांगतो कीं, "निरग्निक ब्राह्मणानें अग्नौकरण देवब्राह्मणाच्या हातावर करावें" तें भार्येच्या अभावविषयक आहे; कारण, "जेव्हां पत्नीरहित ब्राह्मण पार्वणश्राद्ध करील तेव्हां पित्र्यब्राह्मणांची अनुज्ञा घेऊन त्यानें विश्वेदेवब्राह्मणांच्या हातावर होम करावा" असें तेथेंच **कात्यायन**वचन आहे. वचनांत 'हूयते' हें कर्मणि क्रियापद छांदस ( आर्ष ) असल्यामुळें विपर्यासानें आलेलें आहे, तें कर्तरि समजावें. **हेमाद्रींत वायवीयांत**—"विधुरानें देवांकडे होम करावा, शेष अन्न पित्रांकडे निवेदन करावें." देवांकडे ब्राह्मण अनेक असतील तर तेथेंच सांगतो—"जेव्हां विश्वेदेवांकडे दोन-चार इत्यादिक ब्राह्मण असतील तेव्हां एकाच्या हातावर होम करावा, म्हणजे शास्त्रोक्त विधि होतो." तो ब्राह्मण पहिला समजावा; कारण, "प्रथम जो असेल त्याचा नियम करावा, कारणावांचून प्रथमाचा अतिक्रम करूं नये" असा न्याय ( जैमिनिसूत्र ) आहे. यावरून ज्याची भार्या मृत असेल त्याचा होम देवांकडे होतो, अनुपनीत व ब्रह्मचारी इत्यादिकांचा पित्रांकडे होम. कारण, जोंपर्यंत भार्या प्राप्त नाहीं तोंपर्यंत अग्नीचा अभाव, अर्थात् सर्वथा अग्न्यभाव नाहीं." असें **हेमाद्रींत जातूकर्ण्य**वचन आहे. भार्यायुक्त असून नष्टाग्नि असेल त्याचाही पित्र्यब्राह्मणांच्या हातांवर होम, असें **पृथ्वीचंद्र** सांगतो. उपवीतीनें देवांकडे होम आणि प्राचीनावीतीनें पित्रांकडे होम करावा. अथवा सर्वत्र देवांच्या व पितरांच्या ब्राह्मणांच्या हातांवर होमाचा विकल्प आहे, असें **हेमाद्रींत मदनरत्नांत** व **पारिजातांत**ही आहे. जेव्हां पितृपार्वणाच्या व मातामहपार्वणाच्या देवांचे ब्राह्मण व पितरांचे ब्राह्मण भिन्न असतील तेव्हां भेदानें ( वेगळेपणानें ) पाणिहोम होतो, असें **अपरार्क, चंद्रिका** इत्यादि ग्रंथकार सांगतात. जेव्हां दोन्ही पार्वणांच्या देवांचें तंत्र असेल तेव्हां तंत्रानें एकवारच पाणिहोम असें **केचित्** म्हणतात. **हेमाद्रि** तर—"मातामहांचा भेद असला तरी व तंत्र असलें तरी साग्निकानें होम भिन्न करावा." अशी **कातीय**स्मृति आहे म्हणून होमाचा भेद सांगतो. याचप्रमाणें पित्र्यब्राह्मणांकडेही समजावें. **माधवीयांत**ही असेंच आहे. याप्रमाणें साग्निकालाही परदेशीं वगैरे पाणिहोम समजावा. आतां जें **कर्कानें** 'अग्नीवांचून श्राद्धच नाहीं' असें सांगितलें तें सांगणें यत्किंचित् ( कांहीं तरी ) आहे; कारण, अग्नीवांचून श्राद्ध नसेल तर अनग्निकाला सपिंडीकरण वार्षिक इत्यादिकांचा अभाव प्राप्त होईल. आतां जें **बृहन्नारदीयांत** सांगतो कीं, "ज्याचा अग्नि नाहीं व ज्याची भार्या दूर आहे त्याला पार्वणश्राद्ध प्राप्त असतां त्यानें साग्निक भ्रात्यांकडून यथाविधि श्राद्ध करवावें. मातापितरांचा क्षयदिवस प्राप्त असून आपला अग्नि जर दूर आहे व भ्रातेही तसेच आहेत तर लौकिकाग्नीवर होम करावा, अशी शास्त्रमर्यादा आहे. जर औपासनाग्नि दूर आहे व समीप भ्राता आहे व त्याच्या अग्नीवर होम करील किंवा हातावर होम करील तर तो पातकी होतो. औपासनाग्नि दूर असतां केचित् विद्वान् 'हातावरच होम करावा' असें इच्छितात, पण हें चांगलें नाहीं." हें सारें मत वृद्धांनीं स्वीकारलें नाहीं म्हणून उपेक्ष्य ( अग्राह्य ) आहे. **हेमाद्रींत यम**—"हातावर होम करावा,

यांचा त्या वेळीं अग्नौकरणाप्रमाणें पर्युक्षणपरिस्तरण करून ब्राह्मणाच्या हातावर होम करावा; कारण, ब्राह्मण अग्नीसारखा आहे." मेक्षणानें किंवा हातानें होम करावा. मेक्षणाचें ग्रहण नाहीं, असें वृत्तिकार सांगतो. **स्मृतिरत्नावलींत**— "पाणिहोमाचे ठिकाणीं अनुज्ञा नाहीं, परिसमूहन व पर्युक्षण नाहीं, 'अग्नेतमद्य०' हा मंत्र नाहीं आणि इध्मा व मेक्षण हीं नाहींत." कर्काचार्यही असेंच सांगतो. **माधवीयांत** व **चंद्रिकेंत** पाणिहोमाचे ठायीं अनुज्ञा इत्यादिक सर्व आहे असें सांगितलें आहे.

**पाणिहोमेप्रश्नाद्याहापरार्केशौनकः** अनग्निश्चेदाज्यंगृहीत्वाभवत्स्वेवाग्नौकरणमितिपूर्ववत्तथास्त्विति **आश्वलायनः** यदिपाणिष्वाचांतेष्वन्यदन्नमनुदिशत्यन्नमन्नेसृष्टंदत्तमृभुकमिति पाणौहुतंपात्रेनिधायविप्रैराचम्यभोजनार्थमन्नेपरिविष्टेहुतशेषंपात्रेषुदद्यादित्यर्थः सृष्टप्रभूतं नैमित्तिकंचेदमाचमनं नहुतभक्षणनिमित्तम् अन्नंपाणितलेदत्तंपूर्वमश्नंत्यबुद्धयः पितरस्तेनतृप्यंतिशेषान्नंनलभंतिते यच्चपाणितलेदत्तंयच्चान्यदुपकल्पितं एकीभावेनभोक्तव्यंपृथग्भावोनविद्यतेइति**बह्वृचपरिशिष्टात् हेमाद्रा**वप्याचमनेहेत्वर्थवादउक्तः पाण्यास्योहिद्विजःस्मृतइति भाष्येत्वाचांतेषुभक्षितेषु चमुभक्षणेभक्षणोत्तरंचनाचमनं अग्निसाम्यात् पूर्वनिषेधस्तुसपिंडीकरणेज्ञेयः ददातिचोदितत्वात् नत्वत्र जुहोतिचोदितत्वादित्युक्तं नत्वेतद्बहुसंमतं यत्तु**बौधायनेन** तस्मिंस्तुप्राशितेदद्याद्यदन्नंप्रकृतंभवेदितिभक्षणमुक्तं तत्तच्छाखीयानामेवेति**हेमाद्रिः** तत्रैव**यमः** पित्र्यपाणिहुताच्छेषंपितृपात्रेषुनिक्षिपेत् अग्नौकरणशेषंतुनदद्याद्वैश्वदेविके एतदग्निहोमेपिसमं **कर्क**स्तुसूत्रेहुतशेषंदत्वेत्यविशेषात् सर्वविप्रेषुदद्यादित्याह तत्रैव**वृद्धवसिष्ठः** पित्र्यविप्रकरेहुत्वाशेषंपात्रेषुनिक्षिपेत् पिंडेभ्यःशेषयेत्किंचिन्नदद्याद्वैश्वदेविके ।

पाणिहोमाविषयीं प्रश्नादिक सांगतो **अपरार्कांत शौनक**—"अनग्निकानें आज्य ग्रहण करून पूर्वीप्रमाणें ( अग्नौकरणाप्रमाणें ) 'भवत्स्वेवाग्नौकरणं' इत्यादि प्रश्न करावा व ब्राह्मणांनीं अनुज्ञाही द्यावी." **आश्वलायन**—"जर हातावर होम केला तर ब्राह्मणांनीं हातावरचें अन्न पात्रांवर ठेऊन उठून आचमन करून बसल्यावर भोजनासाठीं पात्रांवर दुसरें अन्न वाढून झाल्यावर होम शेष राहिलेलें अन्न पात्रांवर वाढावें. व ब्राह्मण तृप्त होऊन शेष पात्रावर राहील असें अन्न वाढावें." येथें आश्वलायननांनीं आचमन सांगितलें हें नैमित्तिक आहे. हातावर हवन केलेल्या अन्नाचें भक्षण करून त्या भक्षणनिमित्तक आचमन नव्हे; कारण, "हातावर दिलेलें अन्न अबुद्धि ( अज्ञानी ) असतील ते पूर्वी भक्षण करितात. त्यांच्या त्या भक्षणानें पितर तृप्त होऊन पुढें दिलेलें अन्न पितरांस प्राप्त होत नाहीं. जें हातांवर दिलेलें अन्न तें व जें दुसरें दिलेलें अन्न तें एकत्र करून भोजन करावें; त्या दोन्हीं अन्नांचें पार्थक्य करूं नये" असें **बह्वृचपरिशिष्टानें** पूर्वी अन्नभक्षण निषिद्ध केलें आहे. **हेमाद्रींत**ही आचमनाविषयीं हेतुमूलक अर्थवाद ( स्तुतिरूप ) सांगितला आहे, तो असा—"ब्राह्मणाचा हात हेंच मुख असें सांगितलें आहे." **भाष्यांत** तर—'आचांतेषु' या सूत्रांतील पदाचा अर्थ-ब्राह्मणांनीं अन्न भक्षण केलें असतां दुसरें अन्न वाढावें, असा आहे. 'आचांतेषु' यांत 'चमु' धातूचा अर्थ भक्षण आहे. भक्षण केल्यावर आचमन नाहीं. कारण, ब्राह्मण अग्निसमान आहे. पूर्वी ( बह्वृचपरिशिष्टांत ) उक्त जो भक्षणाचा निषेध तो सपिंडीकरणांत समजावा. कारण, सपिंडीकरणांत 'ददाति' ह्या पदानें ब्राह्मणाच्या हातावर अन्न देण्यास सांगितलें आहे तें भक्षण करूं नये. या ठिकाणीं 'जुहोति' या पदानें होम सांगितला आहे म्हणून तें भक्षण करावें, असें ( भाष्यांत ) सांगितलें. हें मत बहुतांला संमत नाहीं. आतां जें **बौधायनानें** "हातावरचें अन्न प्राशन केलें असतां जें अन्न भोजनासाठीं केलेलें असेल तें द्यावें" असें भक्षण सांगितलें तें बौधायनशाखी असतील त्यांनाच समजावें, असें **हेमाद्रि** सांगतो. तेथेंच **यम**—"पित्र्य ब्राह्मणांच्या हातांवर होम करून शेष असलेलें अन्न पित्र्यपात्रांवर द्यावें. अग्नौकरणाचें शेष विश्वेदेवब्राह्मणांच्या पात्रांवर देऊं नये." हें सांगणें अग्निहोमाविषयींही समान आहे. **कर्काचार्य** तर—"सूत्रांत 'हुतशेष देऊन' असें सामान्य सांगितलें आहे म्हणून सर्व ब्राह्मणांच्या पात्रांवर द्यावें" असें सांगतो. तेथेंच **वृद्धवसिष्ठ**—"पित्र्यब्राह्मणांच्या हातांवर होम करून शेष राहिलेलें अन्न किंचित् पिंडांला देऊन बाकीचें पित्र्य ब्राह्मणांच्या पात्रांवर द्यावें, विश्वेदेवांच्या पात्रांवर देऊं नये."

**अथापस्तंबानांसूत्रे** उद्ध्रियतामग्नौचक्रियतामित्यामंत्रयते काममुद्ध्रियतांकाममग्नौचक्रियतामित्यतिसृष्टउद्धरेज्जुहुयाच्च नष्टाग्निविधुरादेर्विशेषो**बृहन्नारदीये** नष्टाग्निर्दूरभार्यश्चपार्वणेसमुपस्थिते संधायाग्निंततो

१ सपिंडीकरणांत असें सांगितलें आहे कीं, 'हुतशेषं पितृभ्यः पाणिषु ददाति' म्हणजे हुतशेष ब्राह्मणांच्या हातावर द्यावें.
२ येथें सूत्रकारानें असें सांगितलें कीं "अथाग्नौ जुहोति यथोक्तं पुरस्तादभ्यनुज्ञायां पाणिष्वेव वा" म्हणजे पूर्वी सांगितल्याप्रमाणें अग्नींत होम करावा, अथवा अनुज्ञा असेल तर हातावरच होम करावा.

होमंकृत्वातंविसृजेत्पुनः अयाश्चेतितत्कालेग्निंसंधायहुत्वात्यजेदित्यर्थः एतदापस्तंबानामेव पाणिहोमस्तुछंदो-गादीनां **विश्वप्रकाशे**ऽपि साग्निरौपासनेनाग्निरग्नौकुर्वीतलौकिके पाणौहोमंप्रशंसंतिनत्वापस्तंबशाखिनां स्नातकाविधुरावास्युर्यदिवाब्रह्मचारिणः अग्नौकरणहोमंतुकुर्युस्तेलौकिकेऽनले अयाश्चाग्नेमनोज्योतिरुद्बुध्यव्या-हृतीर्हुनेत् ततोनुज्ञातोग्नींधनाद्याज्यभागांतेयन्मेमातेत्याद्यैर्जुहुयात् तत्रसप्तान्नाहुतयःषडाज्यस्येतित्रयोदश व्यत्ययोवा यथा यन्मेमाताप्रलुलोभ० तन्मेरेतःपितावृंक्तां०, यास्तिष्ठंतीतिद्वाभ्याममुष्मैस्वाहेतिपितुर्नाम्ना-द्वौहोमौ यन्मेपितामहीप्रलुलोभ० तन्मेरेतःपितामहोवृंक्तां०, अंतर्दधेइतितन्नाम्नापितामहायद्वौ यन्मेप्रपि-तामहीप्रलुलोभ० तन्मेरेतःप्रपितामहोवृंक्तां०, अंतर्दधेऋतुभिरितितन्नाम्नाप्रपितामहायद्वौमातामहेषुतूहः यन्मेमातामही० तन्मेरेतोमातामहोवृंक्तां०, अन्यंमातामहाद्दधेइत्यादौ यन्मेमातुःपितामहीप्रलुलोभ० तन्मेरेतोमातुःपितामहोवृंक्तां०, अन्यंमातुःपितामहाद्दधे० यन्मेमातुःप्रपितामहीप्रलुलोभ० तन्मेरेतोमातुः-प्रपितामहोवृंक्तां०, अन्यंमातुःप्रपितामहाद्दधे०, सर्वत्राप्यमुष्माइत्यत्रकेतंतत्तन्नामयोज्यं **तद्गृह्यसंग्रहे** योज्यःपित्रादिशब्दानांस्थानेमातामहादिकः अन्नहोमेतथास्पर्शेजलपिंडादिदानके यन्मेमातामहीत्यादितत्रो-दाहरणंभवेत् ततोयेचेत्येकान्नाहुतिः ततःस्वाहापित्रेइत्याद्यैराज्यंहुत्वास्विष्टकृतंहुत्वासर्वभक्ष्यंकिंचिदादायोद-गुष्णंभस्मापोह्यतत्रतूष्णींस्वाहाकारेणजुहोति परिषेचनांतंस्थालीपाकवत् ।

## आतां आपस्तंबांचें अग्नौकरण सांगतो—

**आपस्तंबसूत्रांत**—"उद्ध्रियतां, अग्नौ च क्रियतां" अशी अनुज्ञा मागावी. नंतर ब्राह्मणांनीं 'काममुद्ध्रियतां, काम-मग्नौच क्रियतां' अशी अनुज्ञा दिल्यावर अन्नाचा उद्धार करावा, आणि होमही करावा." नष्टाग्नि, विधुर इत्यादिकांस विशेष सांगतो **बृहन्नारदीयांत**—"ज्याचा अग्नि नष्ट असेल त्यानें व भार्या दूर असेल त्यानें अग्नीचें संधान करून होम करून पुनः अग्नीचें विसर्जन करावें" म्हणजे 'अयाश्चा०' ह्या मंत्रानें त्या कालीं अग्निसंधान करून होम करून अग्नित्याग करावा. हें आपस्तंबांनाच समजावें. पाणिहोम तर छंदोगादिकांना आहे. **विश्वप्रकाशांत**ही—"साग्निकानें औपासनाग्नीवर अग्नौकरण करावें, निरग्निकानें लौकिकाग्नीवर करावें. आपस्तंबशाखींना पाणिहोम प्रशस्त, असें सांगत नाहींत. स्नातक ( समावर्तन केलेले ), विधुर अथवा ब्रह्मचारी यांनीं लौकिकाग्नीवर अग्नौकरणहोम करावा. 'अयाश्चाग्ने,' 'मनोज्योति०,' 'उद्बुध्य' या मंत्रांनीं व व्याहृतींनीं होम करून लौकिकाग्नि उत्पन्न करावा." तदनंतर ब्राह्मणांची अनुज्ञा घेऊन अग्निप्रज्वलनादिक आज्यभागांत करून 'यन्मे माता०' इत्यादि मंत्रांनीं होम करावा. तेथें सात अन्नाहुति आणि सहा आज्याहुति मिळून तेरा आहुति होतात. अथवा याच्या विपरीत म्हणजे सहा अन्नाहुति व सात आज्याहुति समजाव्या. त्या आहुति येणेंप्रमाणें—'यन्मे माता प्रलुलोभ चरत्यननुव्रता । तन्मे रेतः पिता वृंक्तां०, यास्तिष्ठंति' या दोन मंत्रांनीं 'अमुष्मैस्वाहा' असें म्हणून पित्याच्या नांवानें दोन होम ( आहुति ) द्यावे. 'यन्मेपितामही प्रलुलोभ० तन्मे रेतः पितामहो वृंक्तां०, अंतर्दधे पर्वतैः० रेतरन्यं पितामहाद्दधे स्वधानमः' या मंत्रांनीं पितामहाच्या नांवानें दोन होम. 'यन्मे प्रपितामही प्रलुलोभ० तन्मे रेतः प्रपितामहो वृंक्तां०, अंतर्दधे ऋतुभि० रन्यं प्रपितामहाद्दधे०' या मंत्रांनीं प्रपितामहाच्या नांवानें दोन होम. याप्रमाणें पितृपार्वणाचा होम समजावा. मातामहांचा होम कर्तव्य असतां मंत्रांत ऊह करावा. तो असा—'यन्मे मातामही प्रलुलोभ० तन्मे रेतो मातामहो वृंक्तां०, रन्यं मातामहा-द्दधे०' इत्यादि. 'यन्मे मातुःपितामहीं प्रलुलोभ० तन्मे रेतो मातुः पितामहो वृंक्तां०, अन्यं मातुः पितामहाद्दधे०' 'यन्मे मातुः प्रपितामही प्रलुलोभ० तन्मे रेतो मातुःप्रपितामहो वृंक्तां०, अन्यं मातुः प्रपितामहाद्दधे०' ह्या सर्व मंत्राचे ठिकाणीं त्याचें त्याचें नांव चतुर्थीविभक्त्यंत योजावें. त्यांच्या ( आपस्तंबांच्या ) **गृह्यसंग्रहांत**—"अन्नाचा होम, स्पर्श करणें, उदकदान व पिंडादिदान इतक्या ठिकाणीं पिता इत्यादि शब्दांच्या स्थानीं मातामह इत्यादिक शब्द योजावे. त्याचें उदाहरण—'यन्मेमातामही०' इत्यादिक आहे तदनंतर 'येच०' या मंत्रानें एक अन्नाहुति द्यावी. तदनंतर 'स्वाहा पित्रे.' इत्यादि मंत्रांनीं घृताचें हवन करून स्विष्टकृताचा होम करून नंतर सर्व भक्ष्य पदार्थ किंचित् घेऊन उत्तरेकडे उष्ण भस्म अपवाहन करून तेथें मंत्रावांचून स्वाहाकारानें होम करावा. नंतर परिषेकांत कर्म स्थालीपाका-प्रमाणें करावें.

अयमग्नौकरणहोमोमासिकश्राद्धएव तत्रस्मार्ताग्न्यभावेनकार्यमितिकेचित् कार्यमेवेतिबहवः अतएव सर्वाधानिनोहोमवर्जमासिकश्राद्धमुक्तंसुदर्शनभाष्ये महालयेतद्वदित्येके प्रकरणांतरत्वात् कर्मांतर-

त्वेनस्मार्तपार्वणवत्कार्यमितित्वस्मद्गुरवः आब्दिकादिषुतुस्मार्तपार्वणविधिरेव एवंमातृवार्षिकादिषु मासिश्राद्धविकृतावष्टकायांमातृश्राद्धेवैकृतहोमेनप्राकृतहोमबाधः अन्वष्टकासुमातृश्राद्धंनेतिभाष्ये तत्रापिश्राद्धांतरवत्क्रियमाणेतुयन्मेमातेत्यादौगुणत्वेपिमातृप्राधान्यंविवक्षितं मासिश्राद्धेनकल्पोव्याख्यातइतिसूत्रात् आग्नेय्येवमनोताकार्येमितिवचनादग्निशब्दस्येववैकृतदेवताभिधायित्वम् तेनामुष्माइत्यत्रामुकशर्मभ्यांपितृभ्यामित्यागूहःकार्यः तच्चमासिश्राद्धंजीवत्पित्रादिनाव्युत्क्रममृतपित्रादिनाचकार्यमित्युक्तंसुदर्शनभाष्ये तत्प्रकारस्तुवक्ष्यते मातापित्रोर्द्वित्वादौतुनोहः तस्मादृचंनोहेदितिनिषेधान् प्रकृतावूहाभावाच्चपत्नींसन्नह्येतिवत् उपदेशिमतेतूहः यथायन्मेमातरौप्रलुलोभतुश्चरंत्यावननुव्रतेइत्याद्यस्मत्पितृकृतमासिश्राद्धनिर्णयेज्ञेयमितिदिक् अन्यत्प्राग्वत् ।

हा अग्नौकरणहोम मासिकश्राद्धांतच आहे. तें अग्नौकरण स्मार्ताग्नीच्या अभावीं करूं नये, असें केचित् म्हणतात. करावेंच असें बहुत सांगतात. म्हणूनच सर्वाधानीला स्मार्ताग्नि नसल्यामुळें होमरहित मासिकश्राद्ध **सुदर्शनभाष्यांत** सांगितले आहे. महालयांत मासिकश्राद्धाप्रमाणें करावें, असें **कोणी** म्हणतात. महालयाचें प्रकरण भिन्न असल्यामुळें तें कर्म भिन्न आहे म्हणून स्मार्तपार्वणश्राद्धाप्रमाणें करावें असें **आमचे गुरु** सांगतात. आब्दिकादिक श्राद्धांविषयीं तर स्मार्त पार्वणाचाच विधि समजावा. याप्रमाणें मातेच्या वार्षिकादिश्राद्धांत समजावें. मासिश्राद्धाची विकृती अष्टकाश्राद्ध आहे त्या ठिकाणीं मातृश्राद्धांत, विकृति जी अष्टका तिच्या होमानें प्रकृतिभूत जें मासिश्राद्ध त्याच्या होमाचा बाध होतो. अन्वष्टकाश्राद्धांत मातृश्राद्ध नाहीं, असें भाष्यांत सांगितलें आहे. त्या अन्वष्टकाश्राद्धांतही इतर श्राद्धाप्रमाणें करावयाचें असेल तर 'यन्मेमाता०' इत्यादिक मंत्रांमध्यें मातेला गुणत्व ( अप्रधानत्व ) आहे तरी त्या ठिकाणीं मातेला प्रधानत्व विवक्षित आहे. कारण, 'मासिश्राद्धानें कल्पश्राद्धाचें व्याख्यान झालें' असें **सूत्र** आहे. 'आग्नेय्येव मनोताकार्या' (?) ह्या वचनानें अग्निशब्दाला जसें विकृतींतील देवतावाचकत्व आहे तसें-येथें मासिश्राद्धाची विकृति ज्या अष्टका त्यांतील जी देवता माता तिचा वाचक मंत्र होतो. त्या योगानें 'असुष्मै' या ठिकाणीं 'अमुकशर्मभ्यां पितृभ्यां' इत्यादिक ऊह करावा. तें प्रकृतिभूत मासिश्राद्ध जीवत्पितृकादिकानें व ज्याचे पित्रादिक व्युत्क्रमानें ( पितामह जीवंत असतां पिता मरणें या क्रमानें ) मृत आहेत त्यानें करावें, असें **सुदर्शनभाष्यांत** सांगितलें आहे. त्याचा प्रकार पुढें सांगूं. दोन माता, दोन पिते इत्यादिक असतां मंत्रांचा ऊह नाहीं; कारण, 'ऋचेचा ( मंत्राचा ) ऊह करूं नये' असा ऊहाचा निषेध आहे. आणि प्रकृति जी मासिश्राद्ध त्यांतही ऊह नाहीं. जसें—दर्शपूर्णमासप्रकरणीं 'पत्नीं सन्नह्य' असा मंत्र आहे. अर्थ पत्नीचें संनहन (बंधन) करून, असा आहे. एकपत्नीक यजमान असतां ठीकच आहे. पण द्विपत्नीक यजमान असला तरी पत्नीशब्दाविषयीं ऊह नाहीं, असें मीमांसेत सांगितलें आहे त्याप्रमाणें एथें मंत्रांत ऊह केल्यावांचून दोन मातेंचा होम होतो. **उपदेशी**च्या मतीं तर ऊह आहे. तो असा—"यन्मे मातरौ प्रलुलोभतुश्चरंत्यावननुव्रते" इत्यादिक आमच्या ( कमलाकरभट्टाच्या ) वडिलांनीं केलेल्या मासिश्राद्धनिर्णयांत पाहावा. ही दिशा दाखविली आहे. बाकीचें सर्व पूर्वी प्रमाणेंच समजावें.

**अथपरिवेषणं** तच्चोपवीत्येवाज्येनदेवपूर्वमामासुपक्वमितिपात्राण्युपस्तीर्यकुर्यादितिहेमाद्रिः **भारतेदानधर्मेपि** आज्याहुतिंविनानैवयत्किंचित्परिविष्यते दुराचारैश्चयद्भुक्तंतंभागंरक्षसांविदुः तत्रैव**शौनकः** विधिनादेवपूर्वंतुपरिवेषणमाचरेत् तत्रैव**धर्मः** फलस्यानंतताप्रोक्तास्वयंचपरिवेषणे तत्रैव**वायुभविष्ययोः** भार्ययाश्राद्धकालेतुप्रशस्तंपरिवेषणं **ब्रह्मांडे** नापवित्रेणनैकेनहस्तेननविनाकुशम नायसेनायसेनैवश्राद्धेतुपरिवेषयेत् **वसिष्ठः** आयसेनतुपात्रेणयदन्नंसंप्रदीयते भोक्ताविष्ठासमंभुंक्तेदाताचनरकंव्रजेत् **पैठीनसिः** सीसकायसरीतिपात्राण्ययज्ञियानि तत्रैव**हारीतः** सौवर्णराजताभ्यांचखड्गेनौदुंबरेणवा दत्तमक्षय्यतांयातिफल्गुपात्रेणवापुनः **कार्ष्णाजिनिः** दर्व्यादेयंघृतंचान्नंसमस्तव्यंजनानिच उदकंचैवपक्वान्नंनोदर्व्यातुकदाचन **यमः** पंक्त्यांविषमधातुश्चनिष्कृतिर्नैवविद्यते **पृथ्वीचंद्रोदयेपराशरः** सर्वदाचतिलाग्राह्याःपितृकृत्येविशेषतः भोज्यपात्रेतिलान्दृष्ट्वानिराशाःपितरोगताः **चंद्रिकायांवृद्धशातातपः** हस्तदत्तास्तुयेस्नेहालवणव्यंजनादयः पितॄणांनोपतिष्ठंतिभोक्ताभुंजीतकिल्बिषं घृतपात्रेविशेषोग्रंथांतरे ओदनेपरमान्नेचपात्रमासाद्यमुग्धधीः घृतेनपूरयेत्पात्रंतद्भूतंरुधिरंभवेत् घृतादिपात्राणिभूमौस्थापयेन्नभोजनपात्रइतिमदनरत्ने **संग्रहे** हस्तदत्तंतुनाभीयाल्लवणव्यंजनादिकम् अपक्वंतैलपक्वंचहस्तेनैवप्रदीयते ।

## आतां अन्नाचें परिवेषण सांगतो—

तें परिवेषण उपवीतीनेंच पूर्वी 'आमासुपक्व०' या मंत्रानें देवपूर्वक सर्वपात्रांना घृत **लावून नंतर करावें,** असें **हेमाद्रि** सांगतो. **भारतांत दानधर्मांत**ही—"पात्रांवर आज्य ( तूप ) लावल्याशिवाय **जें अन्न** वाढितात तें आणि दुराचारी ब्राह्मण जें भक्षण करितात तें हा सारा राक्षसांचा भाग आहे, असें सांगतात." **तेथेंच शौनक**—"सांगितलेल्या विधीनें पहिल्यानें देवांच्या पात्रांवर नंतर पितरांच्या पात्रांवर अन्न वाढावें. तेथेंच **धर्म—"स्वतः अन्न** वाढलें असतां फल अनंत प्राप्त होतें." तेथेंच **वायु व भविष्यपुराणांत**—"श्राद्धकालीं भार्येनें परिवेषण करणें ( **वाढणें** ) प्रशस्त आहे." **ब्रह्मांडांत**—"श्राद्धांत अपवित्र हस्तानें, एका हस्तानें व कुशरहित हस्तानें वाढूं नये." लोहपात्रांत **व** लोहपात्रानें वाढूं नये." **वसिष्ठ**—"लोहपात्रानें जें अन्न वाढतात तें अन्न भक्षण करणारा विष्ठातुल्य भक्षण करितो, **आणि** दाता नरकास जातो." **पैठीनसि**—"शिसें, लोखंड, पितळ यांचीं पात्रें यज्ञाला अयोग्य आहेत." तेथेंच **हारीत**—"सोनेंरुप्यांचीं पात्रें, खड्गपात्र, किंवा ताम्रपात्र, यांनीं वाढलेलें अथवा फल्गुपात्रानें वाढलेलें **अन्न** अक्षय होतें." **कार्ष्णाजिनि**—"घृत, अन्न, सार, व्यंजनें ( कोशिंबिरी वगैरे ) हीं पळीनें वाढावीं. उदक आणि पक्वान्न हें पळीनें कधींही वाढूं **नये."** **यम**—"एका पंक्तीत विषम ( एकास एक दुसऱ्यास एक असें ) वाढणारास निष्कृति ( पापमुक्ति, प्रायश्चित्त ) सांगितली नाहीं." **पृथ्वीचंद्रोदयांत पराशर**—"सर्वकालीं तिल ग्राह्य आहेत, पितृकृत्यांत विशेष ग्राह्य आहेत; **परंतु भोजनाच्या** पात्रांवर तिल दिसले असतां पितर निराश होऊन जातात." **चंद्रिकेंत वृद्धशातातप**—"स्नेह ( घृतादिक ), **लवण,** व्यंजनें ( कोशिंबिरी वगैरे ) इत्यादिक पदार्थ हातानें वाढले असतां ते पितरांस प्राप्त होत नाहींत, आणि **भोक्ता ब्राह्मण** पाप खातो." घृतपात्राविषयीं विशेष सांगतो **ग्रंथांतरांत**—"जो मूढ मनुष्य भातांत किंवा पायसांत पात्र ठेऊन **तुपानें** भरितो त्याचें तें तूप रुधिरतुल्य ( रक्तसदृश ) होतें." घृतादिकांचा पात्रें भूमीवर ठेवावीं, भोजनपात्रावर ठेऊं नयेत. **असें** **मदनरत्नांत** सांगितलें आहे. **संग्रहांत**—"लवण, चटण्या, कोशिंबिरी, मेतकूट वगैरे, हे पदार्थ हातानें **वाढलेले ब्राह्मणांनी** भक्षण करूं नयेत; अपक्व पदार्थ आणि तैलपक्व पदार्थ हे हातानें वाढावे."

पात्रालंभनमुक्तं**चतुर्विंशतिमते** उत्तानंदक्षिणंसव्यंनीचंपात्राण्युपस्पृशेन **याज्ञवल्क्यः** दत्वान्नं पृथिवीपात्रमितिपात्राभिमंत्रणम् कृत्वेदंविष्णुरित्यन्नेद्विजांगुष्ठंनिवेशयेत **बौधायनः** विप्रांगुष्ठेनानखेनानुदिशति पृथिवीतेपात्रंद्यौरपिधानंब्राह्मणस्यमुखेऽमृतेऽमृतंजुहोमि ब्राह्मणानांत्वाविद्यावतांप्राणापानयोर्जुहोम्यक्षितमसिमामेपितृणांक्षेष्ठाअमुत्रामुष्मिंल्लोकइति अत्र जुहोम्यग्रेस्वाहाशब्दः**कातीयसूत्रे**उक्तः पैत्रेस्वधाशब्दः अंगुष्ठेविशेषमाह**हेमाद्रौधौम्यः** परिवृत्यनचांगुष्ठंद्विजस्यान्नेनिवेशयेत तथा उत्तानेनतुहस्तेनद्विजांगुष्ठनिवेशनं यःकरोतिद्विजोमोहात्तद्वैरक्षांसिभुंजते तत्रैव**यमः** विष्णोहव्यंचकव्यंचब्रूयाद्रक्षस्वचक्रमात् दैवेपित्र्येचेत्यर्थः तत्रै**वात्रिः** संबंधनामगोत्राणिइदमन्नंततःस्वधा पितृक्रमादुदीर्येतिस्वसत्तांविनिवर्तयेत हस्तेनामुक्तमन्नाद्यमिदमन्नमुदीरयेत अत्रान्नदानेचतुर्थीस्यादित्यादिविशेषाःपूर्वमुक्ताः अत्रपूर्वोक्तमंत्रांतेपुरूरवार्द्रवसंज्ञकाविश्वेदेवादेवताइदमन्नंसपरिकरंहव्यंअयंब्राह्मणस्वाहवनीयार्थेदत्तंदास्यमानंचातृप्तेःगयेयंभूःगदाधरोभोक्ता इदमन्नंब्रह्मसौवर्णपात्रस्थमन्नमक्षय्यवटच्छायास्थंअमुकेभ्योविश्वेभ्योदेवेभ्यइदमन्नममृतरूपंपरिविष्टंपरिवेक्ष्यमाणंचातृप्तेःस्वाहानमोनममेति**बह्वृचपरिशिष्टेहेमाद्र्या**द्यनुमतःप्रयोगः एवंपित्र्येअमुकगोत्रवसुरूपादितत्तन्नामंज्ञेयम ततोयेदेवासइतिदैवेयेचेहपितरइतिपित्र्येकेचिज्जपंति ।

अन्न निवेदनाविषयीं पात्राचें आलंभन ( धरणें ) सांगतो **चतुर्विंशतिमतांत**—"पित्र्यपात्र दक्षिणहस्त उताणा **खालीं** व वामहस्त वर ठेऊन धरावा, आणि देवपात्र वामहस्त खालीं व दक्षिण हस्त वर ठेऊन धरावा." **याज्ञवल्क्य**—"**अन्न** वाढून 'पृथिवी ते पात्रं०' ह्या मंत्रानें पात्राचें अभिमंत्रण करून 'इदंविष्णु०' या मंत्रानें ब्राह्मणाचा अंगुष्ठ ( **आंगठा** ) अन्नावर ठेवावा." **बौधायन**—"ब्राह्मणाचा नखरहित अंगुष्ठ लावून निवेदन करावें." निवेदनमंत्र असा—'**पृथिवी ते** पात्रं द्यौरपिधानं ब्राह्मणस्य० अमुत्रामुष्मिंल्लोके'. या मंत्रांत प्रथम आलेल्या 'जुहोमि' या पदाच्या पुढें **कातीयसूत्रांत 'स्वाहा'** शब्द उक्त आहे. पित्रांकडे 'स्वधा' शब्द उच्चारावा. अंगुष्ठाविषयीं विशेष सांगतो **हेमाद्रींत धौम्य**—"**ब्राह्मणाचा** अंगुष्ठ फिरवून अन्नांत निवेशन करूं नये. तसेंच—जो यजमान अज्ञानेंकरून उताण्या हस्तानें अन्नांत ब्राह्मणाच्या **अंगुष्ठाचें** निवेशन करितो, त्याचें तें अन्न राक्षस खातात." **तेथेंच यम**—"देवांकडे 'विष्णो हव्यं रक्षस्व' व पित्रांकडे 'विष्णो **कव्यं रक्षस्व'** असें अनुक्रमानें म्हणावें." तेथेंच **अत्रि**—"पिता, पितामह इत्यादि क्रमानें संबंध, नांव, गोत्र यांचा **उच्चार करून 'इदमन्नं०'** इत्यादि म्हणून नंतर 'स्वधा' शब्द उच्चारावा, आणि अन्नावरची आपली सत्ता निवृत्त करावी, **अन्नादिकांवरचा हात**

न सोडतां 'इदमन्नं०' असें म्हणावें." या ठिकाणीं 'अन्नदानाविषयीं चतुर्थी करावी' इत्यादि विशेष पूर्वी सांगितले आहेत. एथें वर सांगितलेल्या बौधायनमंत्राच्या अंतीं 'पुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवा देवता॰ स्वाहा नमोनमम' असा मंत्र म्हणावा, हा प्रयोग **बह्वृचपरिशिष्ट, हेमाद्रि** इत्यादिकांस अनुमत आहे. याप्रमाणें पित्रांकडे अमुक नाम अमुकगोत्र अमुकरूप इत्यादि ज्याचें जें असेल त्याचें तें उच्चारावें. तदनंतर देवांकडे 'ये देवासो०' हा मंत्र, पितरांकडे 'येचेहपितरो०' हा मंत्र कोणी म्हणतात.

ततोछिद्रंवाचयेत् तत्रैव**प्रचेताः** आपोशनकरेविप्रेसंकल्प्याच्छिद्रभाषणात् निराशाःपितरोयांतिदेवैः सहनसंशयः **पारस्करः** संकल्प्यपितृदेवेभ्यःसावित्रीमधुमज्जपः श्राद्धंनिवेद्यापोशनंजुषप्रैषोथभोजनं निवेद्येतिब्रह्मार्पणंकृत्वेत्यर्थः अतएवबृ**हन्नारदीये**न्नत्यागमुक्त्वोक्तं दत्तंहविश्चतत्कर्मविष्णवेवैसमर्पयेदिति यत्तु- **कृत्यरत्नेकार्ष्णाजिनिः** अपसव्येनकर्तव्यंपितृकृत्यमशेषतः अन्नदानादृतेसर्वमेवंमातामहेष्वपीति तदप्येतत्परं तच्च ब्रह्मार्पणंब्रह्महविः हरिर्दाता चतुर्भिश्चेतिकेचित्पठंति **धर्मप्रदीपे** ततोन्नंपितृदेवेभ्यःसंकल्प्यच यथाविधि दत्तंयद्दास्यमानंचआतृप्तेर्नममेतिच तथा श्राद्धीयान्नस्यसंकल्पोभूमावेवप्रदीयते हस्तेषुदीयमानंतु- पितृणांनोपतिष्ठते वैश्वदेवस्यवामेतुपितृपात्रस्यदक्षिणे संकल्पोदकदानेस्यान्नित्यश्राद्धेयथारुचि **प्रचेताः** आपोशनंप्रदायाथसावित्रींत्रिर्जपेदथ मधुवाताइतितृचंमध्वित्येतत्रिकंतथा **मिताक्षरायांपारस्करः** संकल्प्य पितृदेवेभ्यःसावित्रीमधुमज्जपः श्राद्धंनिवेद्यापोशनंजुषप्रैषोथभोजनं गायत्रींत्रिःसकृद्वापिजपेद्व्याहृतिपूर्विकां मधुवाताइतितृचंमध्वित्येतत्रिकंतथा **याज्ञवल्क्यः** सव्याहृतिंचगायत्रींमधुवाताइतितृचं जप्त्वायथासुखं वाच्यंभुंजीरंस्तेपिवाग्यताः यथासुखंजुषध्वमितिवाच्यं **अत्रिः** असंकल्पितमन्नाद्यंपाणिभ्यांयदुपस्पृशेत् अभोज्यंतद्भवेदन्नंपितृणांनोपतिष्ठते अन्नंदत्तंनगृह्णीयाद्यावत्तोयंनसंपिबेत् आपोशनेविशेषमाह**स्मृतिसमुच्चये** आपोशनंवामभागेसुरापानसमंभवेत् दक्षभागेतुयःकुर्यात्सोमपानसमंभवेत् तथा पुनरापूर्यापोशनंसुरा पानसमंभवेत् **हेमाद्रावत्रिः** दत्तेवाप्यथवादत्तेभूमौयोनिक्षिपेद्बलिं तदन्नंनिष्फलंयातिनिराशैःपितृभिर्गतैः केचिदाज्येनकुर्वंति तन्न पायसेनतथाज्येनमाषान्नेनतथैवच नकुर्याद्बलिदानंतुओदनेनप्रकल्पयेदिति**स्मृतिसारे**निषेधात् **शंखः** श्राद्धेनियुक्तानभुंजानान्नपृच्छेल्लवणादितु उच्छिष्टाःपितरोयांतिपृच्छतोनात्रसंशयः ।

तदनंतर ब्राह्मणाकडून 'जायतां सर्वमच्छिद्रं' असें म्हणवावें. तेथेंच **प्रचेता**—"ब्राह्मणाच्या हातावर आपोशन असतां संकल्प केला ( उदक सोडलें ) किंवा अच्छिद्रभाषण करविलें तर देवांसह पितर निराश होऊन जातात." म्हणून हातावर उदक देऊन संकल्पादि करूं नये. **पारस्कर**—"देवपितरांला अन्नाचें उदक सोडून ब्रह्मार्पण करून गायत्री, मधुमतीऋचा यांचा जप करावा, नंतर ब्राह्मणांनीं आपोशन घ्यावें. नंतर कर्त्यानें 'जुषध्वं' असें म्हणावें. ब्राह्मणांनीं 'जुषामहे' असें म्हणून भोजन करावें." वचनांत 'निवेद्य' असें आहे त्याचा अर्थ–ब्रह्मार्पणकरून असा समजावा. म्हणूनच **बृहन्नारदीयांत**— अन्नाचें दान सांगून सांगितलें कीं, "दिलेलें हवि व तें सारें कर्म विष्णूला अर्पण करावें." आतां जें **कृत्यरत्नांत कार्ष्णाजिनि** सांगतो कीं, "अन्नदानावांचून बाकीचें सारें पितृकृत्य अपसव्यानें करावें, याप्रमाणें मातामहकृत्यही अपसव्यानें करावें, अन्नदान सव्यानें करावें". तें सव्यानें अन्नदान 'ब्रह्मार्पणं ब्रह्महविः०' 'हरिर्दाता०' 'चतुर्भिश्च०' या मंत्रांनीं **केचित्** करितात. **धर्मप्रदीपांत**—"तदनंतर देवपितरांला अन्नदानाचा यथाविधि संकल्प करून 'दत्तं यद्दास्यमानं चातृप्तेर्नमम' असें म्हणावें. तसेंच श्राद्धीय अन्नाच्या संकल्पाचें उदक भूमीवरच द्यावें, ब्राह्मणांच्या हातांवर दिलें तर पितरांला तें प्राप्त होत नाहीं. विश्वेदेवांच्या वामभागीं व पितृपात्रांच्या दक्षिणभागीं संकल्पोदकें द्यावीं. नित्यश्राद्धांत इच्छेप्रमाणें द्यावें." **प्रचेता**—"आपोशन देऊन गायत्रीचा त्रिवार जप करावा, 'मधुवाता०' या तीन ऋचा आणि 'मधु' हा शब्द त्रिवार म्हणावा" **याज्ञवल्क्य**—"व्याहृतींसह गायत्री व 'मधुवाता०' या तीन ऋचा जपून 'यथासुखं जुषध्वं' असें म्हणावें, ब्राह्मणांनीं वाणीचें नियमन करून भोजन करावें." **अत्रि**—"अन्नाचें संकल्पोदक सोडण्याच्या पूर्वी ब्राह्मण जर हातानें त्या अन्नाला स्पर्श करील तर तें अन्न अभोज्य होतें, पितरांस प्राप्त होत नाहीं. ब्राह्मणांनीं जोंपर्यंत आपोशन घेतलें नाहीं तोंपर्यंत दिलेलें अन्न घेऊं नये." आपोशनाविषयीं विशेष सांगतो **स्मृतिसमुच्चयांत**—"वामभागीं आपोशन सुरापानतुल्य होतें. दक्षिणभागीं आपोशन सोमपानतुल्य होतें. तसेंच हातावर उदक घेतल्यावर पुनः त्यांत उदक घालून आपोशन केलें असतां तें सुरापानतुल्य होतें." **हेमाद्रींत अत्रि**—"आपोशनोदक दिलेलें असो किंवा न दिलेलें असो, भूमीवर जो बलिदान करितो त्याचें तें अन्न निष्फल होतें, व पितर निराश होऊन जातात." कोणी आज्यानें बलिदान करितात. तें बरोबर नाहीं.

कारण, "पायसानें, आज्यानें तसेंच माषान्नानें बलिदान करूं नये. ओदनानें ( भातानें ) बलिदान करावें" असा स्मृति-सारांत आज्यानें बलिदानाचा सर्वत्र निषेध आहे. **शंख**—"श्राद्धाविषयीं नियुक्तब्राह्मण भोजन करीत असतां लवणादिकां-विषयीं त्यांना प्रश्न करूं नये, प्रश्न केला असतां उच्छिष्ट पितर जातात, यांत संशय नाहीं."

**कात्यायनः** अश्नत्सुजपेत्सव्याहृतिकांगायत्रींसकृत्त्रिर्वाराक्षोघ्नीःपौरुषंसूक्तमप्रतिरथमिति **हेमाद्रौ-सौरपुराणे** ऐंद्रंचपौरुषंसूक्तंश्रावयेद्ब्राह्मणांस्ततः **मात्स्यपाद्मयोः** ब्रह्मविष्ण्वर्करुद्राणांस्तोत्राणिवि-विधानिच इंद्रेशसोमसूक्तानिपावमानीश्चशक्तितः मंडलंब्राह्मणंतद्वत्प्रीतिकारिचयत्पुनः अभावेसर्वविद्यानां गायत्रीजपमाचरेत् **पृथ्वीचंद्रोदयेब्राह्मे** वीणावंशध्वनिंचाथविप्रेभ्यःसंनिवेदयेत् जपेच्चपौरुषंसूक्तंना-चिकेतत्रयंतथा त्रिमधुत्रिसुपर्णंचपावमानीर्यजूंषिच **हेमाद्रावत्रिः** हुंकारेणापियोब्रूयाद्धस्ताद्वापिवदेद्गुणान् भूतलाच्चोद्धरेत्पात्रंमुंचेद्धस्तेनवापिबेत् प्रौढपादोबहिःकच्छोबहिर्जानुकरोपिवा अंगुष्ठेनविनाश्नातिमुखशब्दे-नवापुनः पीतावशिष्टतोयानिपुनरुद्धृत्यवापिबेत् खादितार्धात्पुनःखादेन्मोदकानिफलानिच मुखेनवाधमेदन्नं-निष्ठीवेद्भाजनेपिवा इत्थमश्नन्द्विजःश्राद्धंहत्वागच्छत्यधोगतिं **जाबालिः** इष्टमुष्णंहविष्यंचदद्याद्दन्नंशनैः-शनैः **वृद्धशातातपः** अपेक्षितंयाचितव्यंश्राद्धार्थमुपकल्पितं नयाचतेद्विजोमूढःसभवेत्पितृघातकः यत्तु **यमः** श्राद्धेद्विजोनैवदद्यान्नयाचेन्नैवदापयेदिति तदसंपादितवस्तुविषयमितिहेमाद्रिः **हारीतः** ऊर्ध्वपाणि-श्चविहसन्सक्रोधोविस्मयान्वितः भुंजानस्तस्यतद्भुक्तेननतत्प्रीणातिवैपितॄन् **प्रचेताः** नस्पृशेद्वामहस्तेनभुंजानोन्नं-कदाचन नपादौनशिरोवस्तिनपदाभाजनंस्पृशेत् **शंखः** श्राद्धपंक्तौतुभुंजानोब्राह्मणोब्राह्मणंस्पृशेत् तदन्नम-त्यजन्भुक्त्वागायत्र्यष्टशतंजपेत् **उशनाः** भोजनंतुननिःशेषंकुर्यात्प्राज्ञःकथंचन अन्यत्रदध्नःक्षीराद्वाक्षौद्रा-त्सक्तुभ्यएवच **ब्राह्मे** नचाश्रुपातयेज्जातुनशुष्कांगिरमीरयेत् नचोद्वीक्षेतभुंजानान्नचकुर्वीतमत्सरम् ।

**कात्यायन**—"ब्राह्मण भोजन करीत असतां व्याहृतिसहित गायत्री एकवार किंवा त्रिवार जपावी. राक्षोघ्नी ऋचा, पुरुषसूक्त, अप्रतिरथ ( आशुःशिशानसूक्त ), यांचा जप करावा." **हेमाद्रींत सौरपुराणांत**—"'इंद्रासोमा०' हें सूक्त, पुरुषसूक्त हें ब्राह्मणाकडून ऐकवावें." **मात्स्यांत व पाद्मांत**—"ब्रह्मा, विष्णु, सूर्य, रुद्र यांचीं अनेक स्तोत्रें; इंद्र, ईश, सोम यांचीं सूक्तें; पवमानऋचा; ब्राह्मणमंडल; तसेंच पितरांची प्रीति करणारें असेल तें याचा जप करावा, सर्वांच्या अभावीं गायत्रीचा जप करावा." **पृथ्वीचंद्रोदयांत ब्राह्मांत**—"वीणा, वंश ( वेळूचें ) वाद्य हें ब्राह्मणाला भोजन करतेवेळीं ऐकवावें. पुरुषसूक्त, नाचिकेतत्रय, त्रिमधु, त्रिसुपर्ण, पावमानी आणि यजु यांचा जप करावा." **हेमाद्रींत अत्रि**—"जो ब्राह्मण 'हुं' असें देखील बोलतो; हातानें देखील पदार्थांचे गुण वर्णन करितो; भूमीवरून पात्र वर उचलून सोडतो; हातानें पितो; पाय सोडलेला, कच्छ बाहेर पडलेला, किंवा ढोपराचे बाहेर हात करून, अंगुष्ठावांचून चार बोटांनीं असा भोजन करितो; अथवा फूत्कारादि मुखशब्द करून भोजन करितो; पात्रांतील पाणी पिऊन उच्छिष्ट अवशिष्ट राहिलेलें पाणी पुनः घेऊन पितो; लाडू-फळें इत्यादिक अर्धीं खाऊन खालीं ठेवून तीं पुनः खातो; अन्नावर मुखानें वारा घालतो; अथवा पात्रावर थुंकतो; याप्रमाणें भोजन करणारा ब्राह्मण श्राद्धाचा घात करून अधोगतीस जातो." **जाबालि**—"वाढणारानें आवडणारे उन्हून पदार्थ हळू हळू वाढावे." **वृद्धशातातप**—"श्राद्धासाठीं उपकल्पित पदार्थांतून जो अपेक्षित असेल तो ब्राह्मणानें मागावा, जो मूढ ब्राह्मण मागत नाहीं, तो पितृघातक होतो." आतां जें **यम** सांगतो कीं, "श्राद्धांत ब्राह्मणानें देऊं नये, मागूं नये व देववूं नये." तें असंपादित पदार्थविषयक समजावें, असें **हेमाद्रि** सांगतो. **हारीत**—"हात वर करून, हंसत हंसत, क्रोध, आश्चर्य यांनीं युक्त होऊन, पाठ वांकवून असा जो ब्राह्मण भोजन करितो, त्याच्या त्या भोजनानें पितर तृप्त होत नाहींत." **प्रचेता**—"भोजन करीत असतां वामहस्तानें कधींही अन्नाला स्पर्श करूं नये. तसाच पाय, मस्तक, बस्ति ( नाभीच्या खालचा भाग ) याठिकाणीं वामहस्तानें स्पर्श करूं नये. पात्राला पाय लावूं नये." **शंख**—"श्राद्धपंक्तींत ब्राह्मण भोजन करीत असतां दुसऱ्या ब्राह्मणाला स्पर्श करील तर तें अन्न न टाकतां भोजन करावें आणि भोजनोत्तर अष्टशत गायत्री जप करावा." **उशना**—"ब्राह्मणानें दहीं, दूध, मध, सातू यांवांचून इतर अन्न निःशेष भोजन करूं नये; तर पात्रावर शेष राखावें." जेवीत असतां डोळ्यांतून पाणी कधींही काढूं नये, शुष्कवाणी बोलूं नये, इतर जेवणारांकडे पाहूं नये, व मत्सर करूं नये."

**यमः** स्वाध्यायंश्रावयेत्सम्यग्धर्मशास्त्राणिचैवहि **प्रचेताः** भुंजानेषुतुविप्रेषुऋग्यजुःसामलक्षणं जपे-दभिमुखोभूत्वापित्र्यंचैवविशेषतः यजूंषिचैवरुद्रंचराक्षोघ्नीऋचएवच राक्षोघ्नीःकृणुष्वपाजइत्याद्याः

**तत्रैवनिगमः** भुंजत्सुजपेत्पावमानीरुदीरतामध्वन्नवतीश्च अन्नवत्यःपितुंनुस्तोषमिति **पृथ्वीचंद्रोदये भरद्वाजः** भुंजानेषुतुविप्रेषुप्रमादात्स्रवतेगुदम् पादकृच्छ्रंततःकृत्वाअन्यंविप्रंनियोजयेत् क्षणपाद्यादि दत्वेत्यर्थः ।

**यम**—"स्वाध्याय ( वेद ) आणि धर्मशास्त्रें हीं ब्राह्मणाकडून ऐकवावीं." **प्रचेता**—"ब्राह्मण भोजन करीत असतां अभिमुख होऊन ऋग्, यजु, साम या वेदमंत्रांचा जप करावा, व पित्र्यसूक्तांचा विशेषेंकरून जप करावा. यजु, रुद्र, आणि राक्षोघ्नी ऋचा ( कृणुष्व०, रक्षोहणं० इत्यादिक ) ह्या म्हणाव्या." तेथेंच **निगम**—"ब्राह्मण भोजन करीत असतां पावमानी, उदीरता, मधुमती आणि अन्नवती ( पितुंनुस्तोषं० ) ह्या ऋचा म्हणाव्या." **पृथ्वीचंद्रोदयांत भरद्वाज**—"ब्राह्मण भोजन करीत असतां प्रमादानें गुदस्राव होईल तर पादकृच्छ्र प्रायश्चित्त करून इतर ब्राह्मणाची योजना क्षणपाद्यादि देऊन करावी."

**विप्रवमनेतत्रैवदक्षः** निमंत्रितस्तुयःश्राद्धेभोजनेमुखनिःसृते तदैवहोमंकुर्वीतस्वाग्नौविप्रःसमाहितः प्राणादिपंचभिर्मंत्रैर्यावद्द्वात्रिंशसंख्यया ब्राह्मणस्तुततःकृत्वाघृतप्राशनमाचरेत् **ऋग्विधानेतु** इंद्रायसामसूक्तेनश्राद्धविघ्नोयदाभवेत् अग्न्यादिभिर्भोजनेनश्राद्धंसंपूर्णमेवहीत्युक्तं अग्न्यादिभिरितिलौकिकाग्निस्थापनचरुनिर्वापाज्यभागांतेनामगोत्रपूर्वमग्नौपितॄनावाह्यसंपूज्यान्नत्यागंकृत्वाप्राणादिभिर्द्वात्रिंशदाहुतीर्हुनेदित्यर्थः भोजनेनपुनःश्राद्धेन तेनहोमःपुनःश्राद्धंचेतिपक्षद्वयमुक्तं सूक्तजपस्तूभयानुगतः **स्मृतिसंग्रहे** प्राधान्यंपिंडदानस्यभोजनस्यतदंगता अतोभुक्तिक्रियाहानौश्राद्धावृत्तिंनमन्वते पिंडदानोत्तरंवांतौहोमएवनावृत्तिः पिंडदानात् प्राग्वांतौतद्दिनेउपवासंकृत्वापरेद्युःपुनःश्राद्धंकार्यमित्यर्थः तत्रैव श्राद्धपंक्तौतुभुंजानोब्राह्मणोवमतेयदि लौकिकाग्निंप्रतिष्ठाप्यअर्चयेच्चहुताशनं तथा एकएवयदाविप्रोभोजनेछर्दितोयदि तदैवाग्निंसमाधायहोमंकुर्याद्यथाविधि द्वितीयपक्षे**ऋग्विधाने** भोजनोपक्रमादूर्ध्वंप्रक्रमात्पूर्वतोयदि श्राद्धविघ्नेपुनःकार्यंजपहोमौनतृप्तिदौ **स्मृतिसंग्रहे** अकृतेपिंडदानेतुभुंजानोब्राह्मणोवमेत् पुनःपाकात्तुकर्तव्यंपिंडदानंयथाविधि पिंडदानंश्राद्धं अकृतेपिंडदानेतुपितायदिवमेत्तदा पुनःपाकंप्रकुर्वीतश्राद्धंकुर्याद्यथाविधीतितत्रैवोक्तेः तथा पित्रर्थानांत्रयाणांचपिताचवमतेयदि तद्दिनेचोपवासःस्यात्पुनःश्राद्धंपरेहनि वमनेवाविरेकेवातद्दिनंपरिवर्जयेत् एषुवचनेषु मूलंचिंत्यं इदंमासिकाब्दिकविषयं दर्शादौतुवांतावामेनतदैवकार्यम् श्राद्धविघ्नेद्विजातीनामामश्राद्धंप्रकीर्तितं अमावास्यादिनियतंमाससंवत्सरादृतइति**मरीचिस्मृतेः** श्राद्धेपिंडदानमेवप्रधानमिति**कर्काचार्याः** तन्मतेदक्षोक्तोहोमएवनावृत्तिः विप्रभोजनमिति**मेधातिथिः** भोजनपिंडदानाग्नौकरणानीति**कपर्दिधूर्तस्वामिहेमाद्र्यादयः** तन्मतेपूर्वोक्तोनिर्णयः अन्नत्यागमात्रंप्रधानं भोजनंतुप्रतिपत्तिरूपमंगं अतोवांतौतद्धानेपिनावृत्तिरिति**गौडमैथिलादयः** तन्न श्राद्धस्ययागदानोभयरूपत्वात्संपूर्णदानाभावात् भोजनस्यांगत्वेपिसोमवमनेइवनैमित्तिकविधानमितियुक्तंप्रतीमः ।

ब्राह्मणाचें **वमन** झालें असतां तेथेंच **दक्ष**—"श्राद्धांत निमंत्रित ब्राह्मण भोजन करून ओकला असतां त्या वेळींच आपल्या अग्नींत 'प्राणाय स्वाहा' या पांच मंत्रांनीं बत्तीस आहुतींचा होम करावा. ब्राह्मणानें तर घृत प्राशन करावें." **ऋग्विधानांत** तर—"ज्या वेळीं श्राद्धांत विघ्न उत्पन्न होईल त्या वेळीं 'इंद्रायसाम०' सूक्त, अग्न्यादिकृत्यें आणि भोजन, यांनीं श्राद्ध संपूर्ण होतें." वचनांत 'अग्न्यादिभिः' असें पद आहे त्याचा अर्थ—लौकिकाग्निस्थापन, चरुनिर्वाप, आज्यभाग यांच्या अंतीं नामगोत्रपूर्वक अग्नीच्या ठिकाणीं पितरांचें आवाहन करून पूजन करून व अन्नत्याग करून प्राणादिमंत्रांनीं बत्तीस आहुति होम करावा, असा समजावा. 'भोजनेन' या पदाचा अर्थ—पुनः श्राद्धानें, असा आहे, तेणेंकरून होम आणि पुनःश्राद्ध असे दोन पक्ष सांगितले. सूक्तजप तर दोन्हींपक्षीं आहे. **स्मृतिसंग्रहांत**—"श्राद्धांत पिंडदान प्रधान आणि भोजन हें त्याचें अंग आहे, याकरितां भोजनक्रियेची हानि झाली तरी विद्वान् श्राद्धाची आवृत्ति मानीत नाहींत". याचें तात्पर्य—पिंडदानोत्तर वांति झाली असतां होमच, आवृत्ति नाहीं. पिंडदानाच्या पूर्वीं वांति झाली असतां त्या दिवशीं उपवास करून दुसऱ्या दिवशीं पुनः श्राद्ध करावें. तेथेंच—श्राद्धपंक्तींत भोजन करणारा ब्राह्मण जर ओकेल तर लौकिकाग्नीचें स्थापन करून अग्नीची पूजा करावी". तसेंच—"जर भोजन करतेवेळीं एकच ब्राह्मण ओकेल तर त्या वेळीं अग्निसंधान करून यथाविधि होम करावा." दुसरा पक्ष **ऋग्विधानांत** सांगतो—"भोजनोपक्रमानंतर प्रक्रमाच्या ( पिंडदानाच्या ) पूर्वीं जर श्राद्धविघ्न होईल तर पुनः श्राद्ध करावें; जप व होम यांनीं पितरांची तृप्ति होत नाहीं". **स्मृतिसंग्रहांत**—"पिंडदान न

केलें असतां भोजन करणारा ब्राह्मण ओकेल तर पुनः पाक करून यथाविधि पिंडदान ( श्राद्ध ) करावें." वचनांत 'पिंडदान' असें पद आहे त्याचा अर्थ—श्राद्ध होय; कारण, "पिंडदान न केलें असतां जर पितृस्थानाचा ब्राह्मण ओकेल तर पुनः पाक करून यथाविधि श्राद्ध करावें," असें तेथेंच सांगितलें आहे. तसेंच "पितरांकडच्या तीन ब्राह्मणांपैकीं जर पितृस्थानीय ब्राह्मण ओकेल तर त्या दिवशीं उपवास करून दुसऱ्या दिवशीं पुनः श्राद्ध करावें. वमन किंवा रेच ब्राह्मणांस झाले असतां तो दिवस वर्ज्य करावा." त्या दोन वचनांविषयीं मूल चिंत्य ( विचारणीय ) आहे. त्या दिवशीं उपवास करून दुसऱ्या दिवशीं श्राद्ध करणें हें मासिक, आब्दिक यांविषयीं आहे. दर्शादिश्राद्धांत वांति झाली असतां त्याच दिवशीं आमश्राद्ध करावें; कारण, "ब्राह्मणादिकांना श्राद्धविघ्न प्राप्त असतां आमश्राद्ध सांगितलें आहे. तें आमश्राद्ध मासिक किंवा सांवत्सरिक यांवांचून अमावास्यादि श्राद्धांविषयीं नियत ( निश्चित ) आहे." असें **मरीचि**वचन आहे. श्राद्धांत पिंडदानच प्रधान, असें **कर्काचार्य** सांगतात. त्यांच्या मतीं दक्षानें वर सांगितलेला होमच करावा; श्राद्धाची आवृत्ति ( पुनः श्राद्ध ) करूं नये. श्राद्धांत ब्राह्मणभोजन प्रधान असें **मेधातिथि** सांगतो. भोजन, पिंडदान, अग्नौकरण हीं तीन प्रधान, असें **कपर्दि, धूर्तस्वामि, हेमाद्रि** इत्यादिक सांगतात. त्यांच्या मतीं पूर्वोक्त निर्णय म्हणजे श्राद्धाची आवृत्ति समजावी. श्राद्धांत अन्नत्याग ( दान ) मात्र प्रधान. ब्राह्मण-भोजन हें प्रतिपत्तिरूप[2] अंग आहे, याकरितां वांति झाली किंवा भोजनाची हानि ( अभाव ) झाली तरी श्राद्धाची आवृत्ति नाहीं, असें **गौड, मैथिल** इत्यादिक सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, श्राद्ध हें याग-दान उभयरूपी आहे म्हणून मध्यें वांति झाली असतां संपूर्ण दानाचा अभाव आहे, याकरितां भोजनाला अंगत्व असलें तरी जसें—गोमवमन झालें असतां तन्निमित्तानें श्यामाकचरूचा याग सांगितला, तसें येथेंही नैमित्तिकविधान ( वमननिमित्तक होम-आवृत्ति इत्यादि ) युक्त समजतों.

अत्रेदंतत्त्वं वैश्वदेविकस्यवमनेहोमएव नावृत्तिः अंगत्वात् तच्चरक्षार्थत्वादिष्टिश्राद्धेकृतुदक्षावित्यादि-**स्मृतेश्च** तत्रजयानजुहुयादितिवत् पितामहादेरपितथा पितेत्युक्तेरिति**केचित्** तस्यापिप्रधानत्वात्पितृवदि-तितुयुक्तं सपिंडीकरणादौवार्षिकवत् सपिंडीकरणादीनियानिश्राद्धानिषोडश तत्रपिंडप्रधानत्वंप्रेतत्वविनिव-र्तकमिति**स्मृतेः** महैकोद्दिष्टादौतूभयप्राधान्यादावृत्तिरेव एकएवद्विजोभोज्यःपिंडोप्येकोविधीयतइति-**स्मृतेः** वृद्धिसंकल्पनित्यश्राद्धादौतुभोजनप्राधान्याद्वांतावावृत्तिरेव वृद्धिश्राद्धेविकल्पेनपिंडदानंबुधैःस्मृतं नित्यश्राद्धमदैवंस्यात्पिंडदानविवर्जितमिति**स्मृतेः** भुक्तिक्रियायाःप्राधान्यंश्राद्धेसंकल्पसंज्ञके तत्रैवपित्र्य-विप्रस्यतूपघातेपुनःक्रियेति**संग्रहोक्तेश्च** मघादावप्येवं तीर्थमहालयादौदर्शवदित्याशार्काद्यालोचनेनप्रतीमः।

ब्राह्मणवमनाविषयीं खरा प्रकार म्हटला म्हणजे असा कीं, विश्वेदेव ब्राह्मणानें वमन झालें असतां होमच करावा; आवृत्ति नाहीं. कारण, विश्वेदेव अंग आहे. तें अंग श्राद्धरक्षणार्थ आहे; कारण, इष्टिश्राद्धांत क्रतुदक्ष इत्यादि स्मृतीनेंही रक्षणार्थ सांगितले आहेत. ज्या कर्मानें ऋद्धि ( समृद्धि ) प्राप्त व्हावी अशी इच्छा असेल तेथें वैदिककर्मांत जयांचा[3] होम सांगितला आहे, त्याप्रमाणें येथें समजावें. पितामहस्थानच्या ब्राह्मणाचें वमन झालें असतांही आवृत्ति नाहीं; कारण, पूर्वीच्या स्मृति-संग्रहांतील वचनांत 'पिता ओकतो' असें सांगितलें आहे, असें केचित् म्हणतात. पितामहाला देखील प्रधानत्व असल्यामुळें पित्याप्रमाणें पुनरावृत्ति करणें हें योग्य आहे. सपिंडीकरणादि श्राद्धांत पित्र्यविप्राचें पिंडदानाच्या पूर्वीं वमन झालें असतां वार्षिकाप्रमाणें दुसऱ्या दिवशीं श्राद्ध करावें. अन्यथा होम करावा. कारण, "सपिंडीकरणादिक जीं षोडश श्राद्धें त्यांत प्रेतत्व-निवृत्ति करणारे असल्यामुळें पिंड प्रधान आहेत" असें **स्मृति**वचन आहे. महैकोद्दिष्टादिकांत भोजन व पिंडदान या दोघांना प्राधान्य असल्यामुळें वमन झालें असतां श्राद्धाची पुनरावृत्तीच समजावी. कारण, "महैकोद्दिष्टांत एकाच ब्राह्मणाला भोजन द्यावें, आणि पिंडही एकच करावा" या स्मृतीनें दोघांना प्राधान्य सांगितलें आहे. वृद्धिश्राद्ध, सांकल्पिकविधीनें श्राद्ध, नित्यश्राद्ध इत्यादिकांत भोजन प्रधान असल्यामुळें वांति झाली असतां आवृत्तीच करावी. कारण, "वृद्धिश्राद्धांत विकल्पानें पिंडदान सांगितलें आहे, आणि नित्यश्राद्ध देवरहित पिंडदानरहित होतें." या स्मृतीनें वृद्ध्यादिश्राद्धांत भोजनप्राधान्य सांगितलें आहे. आणि "सांकल्पिक श्राद्धांत भोजनक्रियेला प्राधान्य आहे, त्या ठिकाणीं पित्र्यब्राह्मणाचा उपघात ( वमन ) होईल तर पुनः श्राद्ध करावें" असें **संग्रह**वचनही आहे. मघादिश्राद्धांतही असेंच समजावें. तीर्थश्राद्ध, महालय इत्यादिकांत दर्शाप्रमाणें, असें **आशार्का**दि ग्रंथांच्या आलोचनानें समजतों.

**आश्वलायनः** तृप्तान्ज्ञात्वामधुमतीःश्रावयेदक्षन्नमीमदंतेतिचसंपन्नमितिपृष्ट्वायद्यदन्नमुपभुक्तंतत्तत् स्थालीपाकेनसहपिंडार्थमुद्धृत्यशेषंनिवेदयेत् अभिमतेनुमतेवेति अत्रगायत्रीमध्विवतित्रिकजपोपिज्ञेयः तृप्तान्-

---

१ येथें जुन्या प्रतींत 'एषु वचनेषु मूलं चिंत्यं' हा पाठ नाहीं. २ प्रतिपत्ति म्हणजे संस्काररूप दृष्ट अर्थ, जसें—राजानें चर्वित तांबूलाचें सोन्याच्या पिकदाणींत थुंकणें, म्हणजे विनियोग चांगल्या ठिकाणीं होणें, हें तात्पर्य. तें झालें नाहीं म्हणून वैगुण्य येतें अशी गोष्ट नाहीं. याला प्रतिपत्तिकर्म म्हणतात. ३ 'चित्तंचस्वाहा' इत्यादिक 'जया' श्रौतांत सांगितल्या आहेत.

बुध्वान्नमादायसतिलंपूर्ववज्जपेदितिप्रचेतसोक्तेः **व्यासः** तृप्ताःस्थेतितुपृष्टास्तेब्रूयुस्तृप्ताःस्मइत्यथ अभिमतेविप्रैःस्वीकर्तुमिष्टे **शौनकोपि** अन्नशेषैश्चकिंकार्यमितिपृच्छेततांस्ततः तेइष्टैःसहभोक्तव्यमितिप्रत्युक्तिपूर्वकं प्रदद्युःसकलंतस्मैस्वीकुर्युर्वायथारुचि श्राद्धविशेषेप्रश्नभेदमाह **हेमाद्रौविष्णुः** पित्र्येस्वदितमिति गोष्ठयांसुश्रुतं संपन्नमित्यभ्युदये दैवेरोचतमिति आयुष्यमितिस्वैरिषु स्वैरमिच्छाश्राद्धं **याज्ञवल्क्यः** अन्नमादायतृप्ताःस्थशेषंचैवानुमान्यच तदन्नंप्रकिरेद्भूमौदद्यादापःसकृत्सकृत् इदंचात्रविकिरदानमन्यशाखिनां आश्वलायनानांतुपिंडांतएवसूत्रकृतोक्तम् **कात्यायनस्तु** विकिरोत्तरंगायत्र्यादिजपंतृप्तिप्रश्नंचाह **हेमाद्रौ देवलः** ततःसर्वाशनंपात्रेगृहीत्वाविविधंबुधः तेषामुच्छेपणस्थानेविकिरंभुविनिक्षिपेत् **माधवीयेप्रचेताः** सार्ववर्णिकमादायये अग्नीतिभुविक्षिपेत् सचकुशेकार्यः दर्भेषुविकिरश्चयइत्युक्तेः मंत्रःकातीयःअग्निदग्धाश्चयेजीवायेप्यदग्धाःकुलेमम भूमौदत्तेनतृप्यंतुतृप्तायांतुपरांगतिमिति **अन्येतु** असोमपाश्चयेदेवायज्ञभागविवर्जिताः तेषामन्नंप्रदास्यामिविकिरंवैश्वदेविकमिति **हेमाद्रौगोभिलोक्तेन**दैवे असंस्कृतप्रमीतायेत्यागिन्योयाःकुलस्त्रियः दास्यामितेभ्योविकिरमन्नंताभ्यश्चपैतृकमित्य**ग्निपुराणोक्तेन**पित्र्येन्नंविकीर्य येअग्निदग्धाइत्युच्छिष्टपिंडंकुशोपरिपृथग्दद्यादित्याहुः **पृथ्वीचंद्रोदयेप्येवम् ब्राह्मे** ततःप्रक्षाल्यहस्तौचद्विराचम्यहरिंस्मरेत् **माधवीयेगौतमः** विकिरमुच्छिष्टैःप्रतिपादयेत् **हेमाद्रौव्यासः** उच्छिष्टैरेवविकिरंसदैवप्रतिपादयेत् **भृगुः** पिंडवत्प्रतिपत्तिःस्याद्विकिरस्येति**तौल्वलिः श्राद्धकारिकायाम्** यजमानस्यदासादीनुद्दिश्यद्विजसत्तम तस्मादन्नंत्यजेद्भूमौवामभागेषुपैतृके **मनुः** उच्छेषणंभूमिगतमजिह्मस्याशठस्यच दासवर्गस्यतत्पित्र्येभागधेयंप्रचक्षते ।

**आश्वलायन**—"ब्राह्मण तृप्त झालेले जाणून मधुमती ( मधुवाता० या तीन ऋचा ) आणि 'अक्षन्नमीमदंत०' ही एक ऋचा ब्राह्मणास ऐकवाव्या. त्यांना 'श्राद्धं संपन्नं' असें विचारून त्यांनीं 'सुसंपन्नं' असें म्हटल्यावर, जें जें अन्न ब्राह्मणांनीं भुक्त असेल त्या सर्वांतून थोडथोडें घेऊन-ज्या श्राद्धांत स्थालीपाक असेल तेथें स्थालीपाकांतील अन्न पिंडांसाठीं एकत्र करावें. जेथें स्थालीपाक नाहीं तेथें भुक्तशेष अन्नांतीलच-सर्व प्रकारचें अन्न पिंडांसाठीं घ्यावें. आणि शेष अन्न ब्राह्मणांना निवेदन करावें. ब्राह्मणांनीं स्वीकारावें किंवा 'इष्टैः सह भुज्यतां' अशी भोजनाविषयीं अनुज्ञा द्यावी." ब्राह्मण तृप्त झाल्यावर गायत्री आणि मधुत्रिक यांचाही जप समजावा. कारण, "तृप्त झालेले जाणून सतिलअन्न ग्रहण करून भोजनाच्या पूर्वीप्रमाणें जप करावा" असें **प्रचेतसाचें** वचन आहे. **व्यास**—"ब्राह्मणांना 'तृप्ताःस्थ' असा प्रश्न करावा, ब्राह्मणांनीं 'तृप्ताःस्मः' असें म्हणावें." **शौनक**ही—"ब्राह्मणांना 'अन्नशेषैः किं कार्यं' असा प्रश्न करावा, नंतर त्यांनीं 'इष्टैः सह भोक्तव्यं' असें प्रतिवचनपूर्वक सकल अन्न श्राद्धकर्त्याला द्यावें, अथवा त्यांची इच्छा असेल तर स्वीकारावें." कांहीं श्राद्धांत वेगवेगळे प्रश्न सांगतो **हेमाद्रींत विष्णु**—"पित्र्यश्राद्धांत 'स्वदितं' असा प्रश्न करावा. गोष्ठीश्राद्धांत 'सुश्रुतं' असा, अभ्युदयश्राद्धांत 'संपन्नं', दैविकश्राद्धांत 'रोचतं', ऐच्छिक श्राद्धांत 'आयुष्यं' असा प्रश्न करावा." **याज्ञवल्क्य**—"अन्न घेऊन 'तृप्ताःस्थ' असा प्रश्न करून शेषान्नाची-भोजनाविषयीं-अनुज्ञा घेऊन भूमीवर अन्नाचे विकिर द्यावे आणि विकिरांवर एक एक वेळां उदक द्यावें." हें येथें विकिरदान इतर शाखीयांना आहे. आश्वलायनांचें तर पिंडदानाच्या अंतींच सूत्रकारानें सांगितलें आहे. **कात्यायन** तर—विकिर दिल्यानंतर गायत्री इत्यादि जप आणि तृप्तिप्रश्न सांगतो. **हेमाद्रींत देवल**—"अनेक प्रकारचें सर्व अन्न पात्रांत घेऊन ब्राह्मणांच्या उच्छिष्टांजवळ भूमीवर विकिर द्यावा." **माधवीयांत प्रचेता**—"सर्व प्रकारचें अन्न घेऊन 'ये अग्नि०' या मंत्रानें भूमीवर विकिर द्यावा." तो विकिर कुशांवर द्यावा; कारण, "जो विकिर तो दर्भांवर देतात" असें सांगितलें आहे. याचा मंत्र कात्यायनप्रोक्त आहे तो असा—"अग्निदग्धाश्चये० परांगतिं." **अन्यग्रंथकार** तर—"असोमपाश्च० वैश्वदेविकं' या हेमाद्रींतील गोभिलोक्त मंत्रानें देवांकडे, आणि 'असंस्कृतप्रमीता० पैतृकम्' या अग्निपुराणोक्त मंत्रानें पित्रांकडे अन्नाचा विकिर देऊन 'ये अग्निदग्धा०' या मंत्रानें उच्छिष्टपिंड कुशांवर द्यावा" असें सांगतात. **पृथ्वीचंद्रोदयांत**ही असेंच आहे. **ब्राह्मांत**—"तदनंतर हस्तप्रक्षालन करून दोन वेळां आचमन करून हरिस्मरण करावें." **माधवीयांत गौतम**—"उच्छिष्टांसह विकिर टाकावा." **हेमाद्रींत व्यास**—"उच्छिष्टांसह देवांकडचा व पितरांकडचा विकिर टाकावा." **भृगु**—"पिंडांप्रमाणें विकिराचें प्रतिपादन ( त्याग ) होतें, असें **तौल्वलि** सांगतो." **श्राद्ध-**

१ अन्वष्टक्य ( मार्गशीर्षादि चार महिन्यांच्या वद्य नवमीस उक्तश्राद्धें ), पूर्वेद्युःश्राद्ध ( त्याच महिन्यांच्या वद्य सप्तमीस उक्तश्राद्धें ), मासिमासिश्राद्ध, पार्वण, या चार श्राद्धांत स्थालीपाक करून अग्नौकरण होम अग्नींत सांगितला आहे.

**कारिकेंत**—"पितरांच्या श्राद्धांत यजमानाच्या दासादिकांच्या उद्देशानें त्या अन्नांतून अन्न घेऊन पितरांच्या वामभागी भूमीवर द्यावें." **मनु**—"पितृकर्मांतील भूमिगत उच्छिष्ट हें निष्कपटी व सरळ मनाच्या दासवर्गाचा भाग आहे, असें ज्ञाते सांगतात."

**विष्णुः** उदङ्मुखेष्वाचमनमादौदद्यात्ततःप्राङ्मुखेषु पित्र्येदैवेचेत्यर्थः **शातातपः** विश्वेदेवनिविष्टानांचरमंहस्तधावनम् **हेमाद्रौवाराहे** हस्तंप्रक्षाल्ययश्चापःपिवेद्भुक्त्वाद्विजःसदा तदन्नमसुरैर्भुक्तंनिराशाः पितरोगताः **मरीचिः** हस्तंप्रक्षाल्यगंडूषंयःपिबेदविचक्षणः आसुरंतद्भवेच्छ्राद्धंपितृणांनोपतिष्ठते **तत्रैव-संग्रहे** पवित्रग्रंथिमुत्सृज्यमंडलेभुविनिक्षिपेत् हस्तादीन्क्षालयेद्विद्वान्शरावादौतुकुत्रचित् **व्यासः** तांबूलोद्गिरणंचैवगंडूषोद्गिरणंतथा कांस्यपात्रेतथाताम्रेनकुर्वीतकदाचन उष्णोदकैर्धान्यचूर्णैःकरौश्मश्रूणिशोधयेत् ।

**विष्णु**—"उत्तरेकडे मुख करून बसलेल्या ( पितरांकडच्या ) ब्राह्मणांस आचमन पूर्वी द्यावें. नंतर प्राङ्मुख ( देवांकडच्या ) ब्राह्मणांस द्यावें." **शातातप**—"विश्वेदेव ब्राह्मणांचें हस्तादिप्रक्षालन शेवटीं समजावें." **हेमाद्रींत वाराहांत**—"जो ब्राह्मण भोजन करून हस्तप्रक्षालन करून उदक प्राशन करील त्या ब्राह्मणानें भुक्त अन्न तें असुरांनीं भुक्त होऊन पितर निराश होऊन गेले, असें समजावें." **मरीचि**—"जो अज्ञानी ब्राह्मण हस्तप्रक्षालन करून गंडूष प्राशन करील त्यानें भुक्त तें श्राद्ध आसुर होतें, पितरांना प्राप्त होत नाहीं." तेथेंच **संग्रहांत**—"हातांतील पवित्रकाची ग्रंथि सोडून तें भूमीवर मंडलावर ठेवावें आणि कोठेंही शरावादिकांत हस्तादिकांचें क्षालन करावें." **व्यास**—"कांस्यपात्रांत किंवा ताम्रपात्रांत कधींही तांबूल व गंडूष थुंकूं नये. उष्णोदकांनीं, धान्याच्या चूर्णानें हात व श्मश्रु यांचें शोधन करावें."

**अथपिंडदानं** तच्चार्चनोत्तरमग्नौकरणोत्तरभोजनोत्तरंविकिरोत्तरंस्वधावाचनोत्तरंविप्रविसर्जनोत्तरंचेतिहेमाद्रौ**स्मृति**षुपक्षाउक्ताः तेषांशाखाभेदेनव्यवस्था प्रेतश्राद्धेपुपूर्वमन्येपुभोजनोत्तरमिति**चंद्रिका-माधवौ** सर्वत्रभोजनोत्तरमितिबहवः **आश्वलायनः** भुक्तवत्स्वनाचांतेपुपिंडान्निदध्यादाचांतेष्वेके भुक्तवत्स्वितिपूर्वनिषेधार्थं साग्निरतिप्रणीतसमीपेऽनग्निर्द्विजसमीपे **हेमाद्रौजातूकर्ण्यः** व्याममात्रंसमुत्सृज्यपिंडांस्तत्रप्रदापयेत् प्रसारितभुजांतरंव्यामः संकटेतु**व्यासः** अरत्निमात्रमुत्सृज्येति यत्तुतत्रैव सिकताभिर्मृदावापिवेदींदक्षिणनिम्नगेतितदन्यशाखिपरं **देवलः** ततस्तैरभ्यनुज्ञातोदक्षिणांदिशमेत्यच **चंद्रिकायां** पिंडनिर्वपणंकार्यंकुशाभावेविचक्षणैः काशेषुराजदूर्वासुपवित्रेपरमेहिते **आश्वलायनः** स्फ्येनरेखामुल्लिखेत् अपहताअसुरारक्षांसिवेदिषदइति तामभ्युक्ष्यसकृदाच्छिन्नैर्दर्भैरवस्तीर्यप्राचीनावीतीरेखांत्रिरुदकेनोपनयेच्छुंधंतांपितरःशुंधंतांपितामहाःशुंधंतांप्रपितामहाइतितस्यांपिंडान्निपृणीयात्पराचीनपाणिः पित्रेपितामहाय प्रपितामहायैतत्तेसौयेचत्वामत्रान्विति **हेमाद्रौपारस्करः** कराभ्यामुल्लिखेत्स्फ्येनकुशैर्वापिमहींद्विजः बह्वृचानांकरेणैव लेखाचाग्नेय्यभिमुखेति**वृत्तिः** दक्षिणाप्राचींवेदिमुद्धत्येत्यापस्तंबोक्तेश्च ।

## आतां पिंडदान सांगतो—

तें पिंडदान ब्राह्मणपूजनोत्तर, अग्नौकरणानंतर, ब्राह्मणभोजनानंतर, विकिरदानानंतर, स्वधाशब्दोच्चारानंतर किंवा विप्रविसर्जनानंतर करावें, असे सहा पक्ष स्मृतींत सांगितले आहेत, त्यांची शाखाभेदानें व्यवस्था समजावी. प्रेतश्राद्धांत पूर्वी आणि इतर श्राद्धांत ब्राह्मणभोजनोत्तर पिंडदान करावें, असें **चंद्रिका** आणि **माधव** सांगतात. सर्वत्र ठिकाणीं भोजनोत्तर पिंडदान, असें बहुत सांगतात. **आश्वलायन**—"ब्राह्मण जेवल्यानंतर आचमनाच्या पूर्वी म्हणजे उठण्याच्या पूर्वी पिंड द्यावे. हस्तप्रक्षालन करून आचमन केल्यावर पिंड द्यावे, असें कितीएक आचार्य सांगतात." त्या सूत्रांत 'भुक्तवत्सु' या पदानें भोजनाच्या पूर्वी देऊं नयेत, असें सुचविलें आहे. साग्निकानें अतिप्रणीत अग्नीच्या समीप पिंड द्यावे. अनग्निकानें ब्राह्मणांच्या समीप पिंड द्यावे. **हेमाद्रींत जातूकर्ण्य**—"ब्राह्मणांच्याजवळ एक वांवपर्यंत जागा सोडून पिंड द्यावे." इतकी जागा सोडणें अशक्य असेल तर **व्यास** सांगतो—"अरत्नि ( म्हणजे कनिष्ठांगुलिपासून हात ) परिमिति जागा सोडून द्यावे." आतां जें तेथें सांगतो कीं, "वाळूनें किंवा मृत्तिकेनें दक्षिणेकडे उतरती अशी वेदी करावी," तें अन्यशाखीयविषयक आहे. **देवल**—"तदनंतर ब्राह्मणांनीं अनुज्ञा दिल्यावर दक्षिणेकडे जाऊन **चंद्रिकेंत**—"कुशांच्या अभावीं काश, राजदूर्वा यांच्या ठिकाणीं पिंडदान करावें; कारण, ते काश ( कसाड ), राजदूर्वा परम पवित्र आहेत." **आश्वलायन**—"स्फ्य म्हणजे यज्ञांतील शस्त्रविशेष त्यानें रेखा काढावी आणि 'अपहता असुरा रक्षांसि वेदिषदः' या मंत्रानें सिंचें उदकानें अभ्युक्षण करून तिच्यावर एकदां कापलेले दर्भ पसरून प्राचीनावीती करून 'शुंधंतां पितरः' 'शुंधंतां पितामहाः' 'शुंधंतां

प्रपितामहाः' या तीन मंत्रांनीं तीन वेळां त्या रेखेवर उदक द्यावें. तदनंतर पितृतीर्थ खालीं केलेल्या हातानें 'पित्रे' 'पितामहाय' 'प्रपितामहाय' या तीन मंत्रांनीं व 'एतत्ते असौ ये चत्वामत्रानु' असें म्हणून त्या रेखेवर पिंड द्यावे." **हेमाद्रींत पारस्कर**—"भूमीवर हातांनीं, किंवा स्फ्यानें अथवा कुशांनीं रेखा काढावी." बहृचांनीं हातानेंच आग्नेयी-दिशाभिमुख रेखा काढावी, असें **वृत्तिकार** सांगतो. "दक्षिणा व प्राची यांच्या मध्यदिशेनुरूप वेदी उद्धरून" असें **आपस्तंबानें**ही सांगितलें आहे.

**देवलः** आवाहयित्वादर्भाग्रैस्तेषांस्थानानिकल्पयेत् तेष्वासीनेषुपात्रेणप्रयच्छेत्सतिलोदकं पराचीनेन निम्नपितृतीर्थेन **वायवीये** मधुसर्पिस्तिलयुतांस्त्रीनपिंडान्निर्वपेद्बुधः **त्रिस्थलीसेतौ** तिलमन्नंचपानीयं धूपंदीपंपयस्तथा मधुसर्पिःखंडयुक्तंपिंडमष्टांगमुच्यते **याज्ञवल्क्यः** सर्वमन्नमुपादायसतिलंदक्षिणामुखः उच्छिष्टसन्निधौपिंडान्दद्याद्वैपितृयज्ञवत् केचिन्पिंडेषुमाषान्वर्जयंति माषाःश्राद्धेपुवैग्राह्यावर्ज्याश्चैवाग्निपिंडयोः ब्राह्मणेषुयथामद्यंतथामाषोग्निपिंडयोरिति**स्मृतिसारात्** माषानसर्वत्रवैदद्यात्पिंडेग्नौचविवर्जयेदितिस्मृतेश्च अत्रमूलंचिंत्यं **हेमाद्रावपि**सर्वशब्दस्यप्रकृतार्थत्वात्सर्वान्नग्रहणमुक्तं अत्रशेषमन्नमनुज्ञाप्यसर्वमेकत्रोद्धृत्योच्छिष्टसमीपेदर्भेपुत्रींस्त्रीनपिंडानदद्यादिति**गोभिलसूत्रे**सर्वस्मात्प्रकृतादन्नात्पिंडान्मधुतिलान्वितानितिचशेषनियमात्तदभावेपिंडनिवृत्तिःप्राप्नोतीति**मैथिलवाचस्पती** तन्न तुषोपवापवत्परप्रयुक्तद्रव्यवत्त्वेप्यर्थकर्मत्वाद्गुणानुरोधेनप्रधानत्यागाच्चशेषलोपेपिद्रव्यांतरेणकार्यं अतोनेयंप्रतिपत्तिः किंतुप्रधानमित्युक्तंप्राक् अन्यथासपिंडीकरणादौसंयोजनादेःप्रधानस्यलोपापत्तेरितिदिक् ।

**देवल**—"पितरांचें आवाहन करून कुशाग्रांनीं त्यांचीं स्थानें कल्पावीं; नंतर ते पितर बसले आहेत असें समजून पात्रानें तिलसहित उदक द्यावें." **वायवीयांत**—"मधु, सर्पि, तिल यांनीं युक्त असे तीन पिंड द्यावे." **त्रिस्थलीसेतूंत**—"तिल, अन्न, पाणी, धूप, दीप, दूध, मध, तूप, यांनीं युक्त पिंड **अष्टांग** सांगितला आहे." **याज्ञवल्क्य**—"दक्षिणेकडे मुख करून तिलसहित सर्व प्रकारचें अन्न घेऊन पिंडपितृयज्ञाप्रमाणें उच्छिष्टांच्या संनिध पिंड द्यावे." कोणी पिंडांचेठायीं माष ( उडीद ) वर्ज्य करितात. कारण, "श्राद्धांचे ठायीं माष द्यावे; अग्नि व पिंड यांविषयीं वर्ज्य करावे, ब्राह्मणाला जसें मद्य तसा अग्नि व पिंड यांना माष समजावा" असें **स्मृतिसार**वचन आहे. आणि "सर्वत्र ठिकाणीं माष द्यावे पिंडाविषयीं व अग्नीविषयीं वर्ज्य करावे" अशी **स्मृति**ही आहे. या माषनिषेधकवचनाविषयीं मूल चिंत्य ( अनुपलब्ध ) आहे. **हेमाद्रींत**ही वरील याज्ञवल्क्य वचनांतील 'सर्व' हा शब्द प्रकृत अन्नाचा बोधक असल्यामुळें पिंडाविषयीं सर्व अन्न ग्रहण करावें, असें सांगितलें आहे. या ठिकाणीं "शेष अन्नाविषयीं ब्राह्मणांची अनुज्ञा घेऊन सर्व प्रकारचें अन्न एकत्र करून उच्छिष्टांच्या समीप दर्भांवर तीन तीन पिंड द्यावे" या **गोभिल**सूत्रांत "सर्व प्रकारच्या प्रकृत ( शेष ) अन्नापासून मध व तिल यांनीं युक्त पिंड करावे" या वचनानेंही पिंडाविषयीं शेष अन्नाचा नियम असल्यामुळें, शेषान्नाच्या अभावीं पिंडांची निवृत्ति ( अभाव ) प्राप्त आहे, असें **मैथिल** आणि **वाचस्पति** सांगतात, तें बरोबर नाहीं. कारण, जसा—श्रौतांत तुषांचा उपवाप ( कपालावर धारण ) हा पराविषयीं म्हणजे पुरोडाशश्रपणाविषयीं योजलेल्या कपालावरच होतो, त्या तुषोपवापाकरितां स्वतंत्र कपाल सांगितलें नाहीं, असें जरी आहे तरी तें अर्थकर्म ( अर्थ म्हणजे याग त्याला साधनरूप कर्म ) आहे. त्याप्रमाणें येथेंही भोजनाविषयीं उपयुक्त जें द्रव्य ( अन्न ) त्याच द्रव्यानें पिंडदान सांगितलें तरी तें पिंडदान अर्थकर्म अर्थ म्हणजे श्राद्ध त्याला साधनरूपकर्म आहे, म्हणून; व गुणाच्या अनुरोधानें ( शेषान्नानुरोधानें ) प्रधान अशा पिंडदानाचा त्यागही होत नाहीं, याकरितां शेष अन्न नसलें तरी इतर द्रव्यानें पिंडदान करावें. म्हणून हें पिंडदान प्रतिपत्तिकर्म नव्हे, तर प्रधानकर्म आहे, असें पूर्वी सांगितलें आहे. असें न मानलें तर सपिंडीकरणादिक श्राद्धांत प्रधान अशा संयोजनादिकाचा लोप प्राप्त होईल. अशी ही दिशा दाखविली आहे.

**अथपिंडप्रमाणं हेमाद्रावंगिराः** कपित्थबिल्वमात्रान्वापिंडान्दद्याद्विधानतः कुक्कुटांडप्रमाणान्वामलकैर्बदरैःसमानिति **तत्रैवधूम्रः** कपित्थस्यप्रमाणेनपिंडान्दद्यात्समाहितः तत्समंविकिरंदद्यात्पिंडांते-

---

१ 'कपालेषु श्रपयति' म्हणजे पुरोडाश कपालांत शिजवावा असें सांगितलें. 'पुरोडाशकपालेन तुषान् उपवपति' म्हणजे पुरोडाशाच्या कपालांत तुष ( कोंडा ) धारण करावा. नंतर 'रक्षसांभागोसि' या मंत्रानें ते कपालसहित तुष नैर्ऋतीदिशेस ठेवावे, असें सांगितलें आहे. पुरोडाशाविषयीं उपयुक्त कपाल तेंच तुषधारणाविषयीं प्रसंगानें सिद्ध होतें, अपूर्व कपाल तुषधारणाविषयीं सांगितलें नाहीं, तरी तें तुषधारण यज्ञांत राक्षसांचा भागरूप असल्यामुळें अर्थकर्म आहे. २ ब्राह्मणभोजनोत्तर वमनविचारप्रसंगीं प्रतिपत्तिकर्माचें स्वरूप सांगितलें आहे.

तुषडंगुले अंत्येष्टिपद्धतौ **भट्टास्तु** एकोद्दिष्टेसपिंडेतुकपित्थंतुविधीयते नारिकेलप्रमाणंतुप्रत्यब्देमासिकेतथा तीर्थेदर्शेचसंप्राप्तेकुक्कुटांडप्रमाणतः महालयेगयाश्राद्धेकुर्यादामलकोपममित्याहुः **कलिकायामाचार्यः** यत्रस्युर्बहवःपिंडास्तत्रबिल्वफलोपमाः यत्रचैकोभवेत्पिंडस्तत्रखर्जूरसन्निभः प्रेतपिंडस्तुदैर्घ्येणद्वादशांगुलउच्यतइति **वायवीये** पत्नीपिंडास्तुमद्दीयास्त्रिवर्गस्यसहायिनी **हेमाद्रौलौगाक्षिः** महालयेगयायांचप्रेतश्राद्धेदशाहिके पिंडशब्दप्रयोगःस्यादन्नमन्यत्रकीर्तयेत् **शाट्यायनिः** असावेतत्तइत्युक्त्वातदंतेचस्वधानमः असावित्यत्रसंबंधरूपगोत्रादिविशिष्टंपित्रादिनामसंबुद्ध्यंतमुक्त्वापुनश्चतुर्थ्यंतंतदंतेयंपिंडइदमन्नंवास्वधानमोनममेतिवदेदिति**हेमाद्रिः** पित्रादीनामज्ञानेत्वा**पस्तंबः** यदिनामानिनविद्यात्स्वधापितृभ्यःपृथिवीषद्भ्यइतिप्रथमंपिंडंदद्यात् स्वधापितृभ्योंतरिक्षसद्भ्यइतिद्वितीयं स्वधापितृभ्योदिविषद्भ्यइतितृतीयं एवंमातामहेषुमातृषुच बह्वृचानांतूक्तंप्राक् **कलिकायांस्मृतिः** यावदेवोच्चरेन्मंत्रंतावत्प्राणंनिरोधयेत् येषांतुगृह्योक्तेदर्शेमातुःश्राद्धंपृथगुक्तंतेषांपितृभ्यःपश्चिमेमातृभ्यस्तत्पश्चिमेमातामहीभ्यःपिंडादिदेयमिति**सांख्यायनः** अस्मिन्पक्षेतत्पश्चिमेमातामहीभ्योपिदद्यादिति**हेमाद्रिः** पूर्वासुपितृभ्योदद्यादपरासुस्त्रीभ्यइति**सूत्राच्च** एवं यत्रतीर्थमहालयादौ केचिदिच्छंतिनारीणांपृथक्श्राद्धंमहर्षयइति**चतुर्विंशतिमतात्** पित्रादिनवदैवत्यंतथाद्वादशदैवतमित्य**ग्निपुराणाच्च**मातृणांपृथगुक्तं यत्रवा आचार्यगुरुशिष्येभ्यःसखिज्ञातिभ्यएवच तत्पत्नीभ्यश्चसर्वाभ्यस्तथैवचजलांजलीन पिंडांस्तेभ्यःसदादद्यात्पृथग्भाद्रपदेनरः तीर्थेपुचैवसर्वेषुमाघमासेमघासुचेति**चतुर्विंशतिमते** दौहित्रपुत्रदाराश्चयेकनिष्ठाःसहोदराः निःसंतानामृतायेचतेभ्योप्यत्रप्रदीयतइति**भविष्ये** एकोद्दिष्टान्युक्तानितत्रापितत्पश्चिमेपिंडदानंज्ञेयं येषांनपृथक्कृतेःसपत्नीकाःपित्रादयोवाच्याः अन्वष्टकागयामातृश्राद्धंचैवमृतेहनि एकोद्दिष्टंतथामुक्त्वास्त्रीपुनान्यत्पृथग्भवेदिति**शंखोक्तेश्च** ।

## आतां पिंडांचें प्रमाण सांगतो—

**हेमाद्रींत अंगिरा**—"कपित्थफळाएवढे किंवा बेलफळाएवढे पिंड करून यथाविधि द्यावे. अथवा कोंबड्याच्या अंड्याएवढे किंवा आवळा, बोर यांच्याप्रमाणें पिंड द्यावे." तेथेंच **धूम्र**—"कपित्थफळाप्रमाणाचे पिंड द्यावे. आणि पिंडाच्या शेवटीं सहा आंगळांवर पितामहाचा अधिक द्यावा." अंत्येष्टिपद्धतींत **नारायणभट्ट** तर—"सपिंडींत व एकोद्दिष्टांत कपित्थाएवढा पिंड सांगितला आहे. सांवत्सरिकांत व मासिकांत नारळाएवढे पिंड द्यावे. तीर्थश्राद्धांत व दर्शश्राद्धांत कोंबड्याच्या अंड्याएवढे पिंड द्यावे. महालयांत व गयाश्राद्धांत आंवळ्यांप्रमाणें पिंड द्यावे." असें सांगतात. **कलिकेंत आचार्य**—"जेथें बहुत पिंड आहेत तेथें बेलफळाप्रमाणें पिंड करावे. जेथें एक पिंड तेथें खारकेएवढा करावा. प्रेतपिंडाची लांबी बारा अंगुळें सांगितली आहे."**वायवीयांत**—"धर्म, अर्थ, काम या त्रिवर्गाला सहायभूत अशा पत्नीनें पिंड करावे." **हेमाद्रींत लौगाक्षि**—"महालय, गया, दशाहांतील प्रेतश्राद्ध, इतक्या ठिकाणीं 'पिंड' या शब्दाचा प्रयोग आहे; इतर ठिकाणीं 'अन्न' असें म्हणावें." **शाट्यायनि**—"'असौ' किंवा 'एतत् ते' असें उच्चारून त्याच्या ( चतुर्थ्यंत नांवाच्या ) अंतीं 'स्वधानमः' असें उच्चारावें." 'असौ' या ठिकाणीं संबंध-रूप-गोत्र इत्यादिकयुक्त असें पिता इत्यादिकांचें नांव संबुद्धि-विभक्तीनें उच्चारून पुनः तसेंच पिता इत्यादिकांचें नांव चतुर्थी विभक्तीनें उच्चारून त्याच्या अंतीं 'अयं पिंडः, किंवा इदमन्नं स्वधानमोनमम' असें उच्चारावें, असें **हेमाद्रि** सांगतो. पिता इत्यादिकांचें नांव अज्ञात असेल तर सांगतो **आपस्तंब**—"जर कर्ता नांवें जाणत नाहीं तर 'स्वधापितृभ्यः पृथिवीषद्भ्यः' असें म्हणून प्रथमपिंड द्यावा. 'स्वधापितृभ्योंतरिक्षसद्भ्यः' असा दुसरा. आणि 'स्वधापितृभ्यो दिविषद्भ्यः' असा तिसरा पिंड द्यावा." याप्रमाणें मातामहपार्वणांत व मातृपार्वणांत समजावें. बह्वृचांना तर पिता, पितामह इत्यादि नांवानेंच द्यावें, असें पूर्वी सांगितलें आहे. **कलिकेंत स्मृति**—"जोंपर्यंत मंत्राचा उच्चार करीत आहे तोंपर्यंत प्राणरोध करावा." 'ज्यांच्या गृह्यसूत्रांत दर्शाचे ठायीं मातेचें श्राद्ध पृथक् सांगितलें आहे त्यांनीं पित्रादिकांच्या पश्चिमेस मात्रादिकांस पिंडादि द्यावें, त्याच्या पश्चिमेस मातामहींना द्यावें' असें **सांख्यायन** सांगतो. ह्या पक्षीं मातामहांच्या पश्चिमेस मातामहींनाही द्यावें,' असें **हेमाद्रि** सांगतो. आणि "पूर्वरेखांवर पितरांना द्यावें, आणि अपर ( पश्चिम ) रेखांवर स्त्रियांना द्यावें" असें सूत्रही आहे. याप्रमाणें जेथें तीर्थश्राद्ध, महालय इत्यादिकांत 'केचित् महर्षि स्त्रियांचें पृथक् श्राद्ध इच्छितात' ह्या **चतुर्विंशतिमतावरून**; आणि "पित्रादित्रय, मात्रादित्रय आणि मातामहादिसपत्नीकत्रय ह्या नऊ देवतांचें; तसेंच पित्रादित्रय, मात्रादित्रय मातामहादित्रय आणि मातामह्यादित्रय ह्या द्वादश दैवतांचें श्राद्ध करावें." ह्या **अग्निपुराणवचनावरून**ही मातांचें श्राद्ध पृथक् सांगितलें

तेथें; अथवा ज्या ठिकाणीं "आचार्य, गुरु, शिष्य, सखा, ज्ञाति, व त्यांच्या सर्व पत्नी यांना भाद्रपदमासीं, सर्व तीर्थांमध्यें, माघमासीं मघानक्षत्रावर वेगवेगळे जलांजलि व पिंडदान करावें" ह्या **चतुर्विंशतिमतांत**; तसेंच "कन्यापुत्र, पुत्र, स्त्रिया, कनिष्ठ सहोदर भ्राते आणि संतानरहित मृत झालेले त्यांनाही येथें पिंडादि देतात." ह्या **भविष्यपुराणांत** एकोद्दिष्टें सांगितलीं आहेत त्या ठिकाणींही त्यांच्या ( पित्रादिकांच्या ) पश्चिमेस पिंडदान जाणावें. ज्यांच्या सूत्रांत स्त्रियांना पृथक् पिंडदान सांगितलें नाहीं त्यांनीं पित्रादिक सपत्नीक उच्चारावे. "अन्वष्टका, गया, मृतदिवस या ठिकाणचें मातृश्राद्ध व एकोद्दिष्टश्राद्ध हीं वेगळून इतर ठिकाणीं स्त्रियांचें श्राद्ध पृथक् होत नाहीं" असें **शंख**वचनही आहे.

**मनुः** तेषुदर्भेषुतंहस्तंनिमृज्जेल्लेपभागिनां हस्तलेपाभावेपिहस्तंनिमृज्यादेवेति**मेधातिथिः विष्णुः**- अत्रपितरोमादयध्वमितिदर्भमूलेकरावघर्षणं **कलिकायांसुमंतुः** एकोद्दिष्टेषुवर्षासुदर्भलेपोनविद्यते सपिंडीकरणादौतुलेपःसर्वत्रशस्यते **मनुः** आचम्योदक्परावृत्यत्रिरायम्यशनैरसून् षड्ऋतूंश्चनमस्कुर्यात्पितॄने- वचमंत्रवत् उदकंनिनयेच्छेषंशनैःपिंडांतिकेपुनः त्रिःप्राणायामंकृत्वेतिमेधातिथिः अमंत्रंप्राणान्निरुध्येतिकर्कोद्याः मंत्रवत् वसंतायनमः नमोवःपितरइत्याद्यैः शेषंपूर्वावनयनशेषं **आश्वलायनः** निपृतानानुमंत्रये तात्रपितरोमादयध्वंयथाभागमावृषायध्वमिति सव्यावृदुदङ्ङावृत्ययथाशक्तिप्राणन्नासित्वाऽभिपर्यावृत्यामीमदंतपितरोयथाभागमावृषायीषतेतिचरोःप्राणभक्षंभक्षयेन्नित्यंनिनयनमिति नित्यग्रहणंशेषाभावेपिकुर्यादित्यर्थः **शौनकः** अथैषामत्रपितरइत्याद्येनानुमंत्रणं अमीमदंतेत्याद्येनमंत्रेणाप्यनुमंत्र्यतान् पिंडशिष्टचरोरन्नंकिंचिदाघ्रायतत्त्यजेत् प्रक्षाल्याचम्यशुंधंतामित्याद्यैरेवपूर्ववत् मंत्रैःपिंडेषुपानीयंनिषिंचेत्पितृतीर्थतः **व्याघ्रः** अद्भिःप्रक्षाल्यतत्पात्रंप्रतिपिंडंतुपूर्ववत् कृत्वावनेजनंकुर्यात्पिंडपात्रमधोमुखं एतत्कातीयादीनां ।

**मनु**–"पिंड दिल्यावर लेपभागी पितरांसाठीं पिंडांच्या दर्भांचे ठिकाणीं हात चोळावा." हाताला लेप नसला तरी हात चोळावाच, असें **मेधातिथि** सांगतो. **विष्णु**–"'अत्र पितरो मादयध्वं' असें म्हणून दर्भांच्या मुळांचे ठिकाणीं हस्त चोळावा." **कलिकेंत सुमंतु**—"एकोद्दिष्टांत व वर्षाऋतूंतील त्रयोदशीश्राद्धांत दर्भांना लेप सांगितला नाहीं. सपिंडीकरणादिक सर्व श्राद्धांत दर्भांना लेप लावणें प्रशस्त आहे." **मनु**—"उत्तरेकडे फिरून आचमन करून हळूहळू त्रिवार प्राणायाम करून 'वसंतायनमः' इत्यादिमंत्रांनीं सहा ऋतूंना आणि 'नमोवः पितर०' ह्या मंत्रानें पितरांना नमस्कार करावे. आणि पूर्वी पितृअर्घ्यपात्रांतील समवनयनशेष उदक पुनः पिंडांच्या समीप द्यावें." 'त्रिरायम्य' याचा अर्थ–त्रिवार प्राणायाम करून, असें **मेधातिथि** सांगतो. अमंत्रक प्राणांचा रोध करून असें **कर्कादिक** सांगतात. **आश्वलायन**—"दिलेल्या पिंडांचें 'अत्र पितरो मादयध्वं यथाभागमावृषायध्वं' या मंत्रानें अनुमंत्रण करावें. डावीकडून उत्तरेकडे वळून यथाशक्ति प्राणांचा, रोध करून पिंडांच्या अभिमुख फिरून 'अमीमदंत पितरो यथाभागमावृषायीषत' असें म्हणून पिंडांतील शेष अन्न अवघ्राण करून टाकावें, नंतर पिंडांवर नित्य उदक द्यावें." येथें ह्या आश्वलायनसूत्रांत 'नित्य' असें सांगितलें आहे, यावरून समवनयन शेष उदक नसलें तरी उदक द्यावें, असा इत्यर्थ समजावा. **शौनक**—"पिंड दिल्यावर 'अत्र पितर०' या मंत्रानें त्या पिंडांचें अनुमंत्रण करावें. 'अमीमदंत०' ह्या मंत्रानेंही त्या पिंडांचें अनुमंत्रण करून पिंड केलेल्या चरूंतील शेष किंचित् अन्न अवघ्राण करून तें टाकावें. नंतर हस्त प्रक्षालन करून आचमन करून 'शुंधंतां पितरः' इत्यादि मंत्रांनीं पिंड देण्याच्या पूर्वी उदक देण्यास सांगितल्याप्रमाणें पिंडांवर पितृतीर्थानें पाणी द्यावें." **व्याघ्र**—"पिंडांचें पात्र उदकानें प्रक्षालन करून त्या उदकानें पूर्वीप्रमाणें ( ब्राह्मणपादक्षालनाप्रमाणें ) प्रतिपिंडाचें क्षालन करून नंतर पिंडपात्र उपडें करावें." हें **कात्यायनादि**शाखीयांना समजावें.

**आचार्यः** ततःसम्यग्द्विराचम्यनीवींविस्रस्यवाग्यतः **आश्वलायनः** असावभ्यंक्ष्वासावंक्ष्वेतिपिंडेष्वभ्यंजनांजनेवासोदद्याद्दशामूर्णास्तुकांवापंचाशद्वर्षतायाऊर्ध्वंस्वंलोमैतद्वःपितरोवासोमानोतोन्यत्पितरोयुङ्ध्वमिति **श्राद्धचिंतामणौब्राह्मे** एतद्वःपितरोवासइतिजल्पन्पृथक्पृथक् अमुकामुकगोत्रैतत्तुभ्यंवासः- पठेद्बुधः इदंकातीयानां एतद्वइतिसूत्राणिप्रतिपिंडमितित**त्सूत्रात् हेमाद्रौब्राह्मे** श्रेष्ठमाहुस्त्रैककुदमंजनंनित्यमेवहि तैलंकृष्णतिलेभ्यश्चदद्यादभ्यंजनंहितं त्रैककुदंसुरमाइतिप्रसिद्धं अंजनप्राथम्यमापस्तंबादिविषयं तत्रैव**व्याघ्रः** गंधपुष्पाणिधूपंचदीपंचविनिवेदयेत् **देवलः** दक्षिणांसर्वभोगांश्चप्रतिपिंडंप्रदापयेत् भक्ष्याण्यपूपानिक्षूंश्चव्यंजनान्यशनानिच तत्रैव**शंखः** यत्किंचित्पच्यतेगेहेभक्ष्यंभोज्यमगर्हितं अनिवेद्यनभोक्तव्यंपिंडमूलेकथंचन एतत्सव्येनेतिकेचित् युक्तंत्वपसव्येन **मनुः** अवजिघ्रेत्तान्पिंडान्यथान्युप्तान्समाहितः

ततोनमोवःपितरइषइत्यादिनोपस्थानं **मात्स्ये** अथाचांतेषुचाचम्यवारिदद्यात्सकृत्सकृत् तिलपुष्पाक्षतान्पश्चादक्षय्योदकमेवच अत्रदैवेसव्यंपित्र्येत्वपसव्यमितिकर्कः परिभाषोक्तवचनात्सव्यमितियुक्तं अत्रशिवाआपःसंतुसौमनस्यमस्त्वित्यादिप्रयोगोज्ञेयः **मात्स्ये** नत्वाशीःप्रतिगृह्णीयाद्द्विजेभ्यःप्राङ्मुखोबुधः अघोराःपितरःसंतुसंत्वित्युक्तेपुनर्द्विजैः गोत्रंतथावर्धतांनस्तथेत्युक्तःसतैःपुनः दातारोनोभिवर्धतामन्नंचैवेत्युदीरयेत् स्वस्तिवाचनकंकुर्यात्पिंडानुद्धृत्यभक्तितः ।

**आचार्य**—"उदक दिल्यावर चांगलें दोन वेळ आचमन करून कमरेस बांधलेलें वस्त्र शिथिल करून वाणीचें नियमन करून असावें." **आश्वलायन**—"'असौ अभ्यंक्ष्व' असें म्हणून पिंडांस तेल लावावें. 'असौ अंक्ष्व' असें म्हणून अंजन ( काजळ ) लावावें. 'एतद्वः पितरो वासो मानोतोन्यत्पितरो युङ्ध्वं' असें म्हणून ऊर्णावस्त्राची दशा किंवा पन्नास वर्षांहून अधिक वयाच्या श्राद्धकर्त्यानें आपल्या अंगावरचें लोम हें वस्त्र म्हणून पिंडांस द्यावें." **श्राद्धचिंतामणींत ब्राह्मांत**—"'एतद्वः पितरो वासः' असें म्हणून वेगवेगळें 'अमुक नाम अमुक गोत्र एतत्तुभ्यं वासः' असें बोलावें." हें कातीयांना असें समजावें; कारण, "-'एतद्व०' या मंत्रानें प्रतिपिंडाला सूत्रें द्यावीं" असें त्यांचें सूत्र आहे. **हेमाद्रींत ब्राह्मांत**—"त्रैककुद ( सुरमा ) हें अंजन सर्वदा श्रेष्ठ आहे, असें सांगतात. आणि काळ्या तिळांचे तेलाचा अभ्यंग करावा, तो हितकारक आहे." या वचनांत अंजन प्रथम सांगितलें हें आपस्तंबादिविषयक समजावें. तेथेंच **व्याघ्र**—"गंध, पुष्पें, धूप, दीप हीं निवेदन करावीं." **देवल**—"दक्षिणा आणि सारे भोग हे प्रत्येक पिंडाला द्यावे. लाडू वगैरे भक्ष्य पदार्थ, अपूप, उंसाचे पदार्थ, चटण्या, कोशिंबिरी, व इतर खाण्याचे पदार्थ हे सारे पिंडांस द्यावे." तेथेंच **शंख**—"घरामध्यें जें कांहीं अनिंद्य असें भक्ष्य ( लाडू वगैरे ) व भोज्य ( अन्नादिक ) शिजविलेलें असेल तें पिंडांना निवेदन केल्यावांचून भक्षण करूं नये." हें सव्यानें करावें, असें **केचित्** म्हणतात. अपसव्यानें करणें योग्य आहे. **मनु**—"जसे पिंड दिले असतील त्या क्रमानें पिंडांचें अवघ्राण करावें." तदनंतर 'नमोवः पितर इषे०' इत्यादिमंत्रानें उपस्थान करावें. **मात्स्यांत**—"ब्राह्मणांनीं आचमन केल्यावर स्वतः आचमन करून त्यांच्या हातावर एक एक वेळां उदक द्यावें. नंतर तिळ, पुष्पें, अक्षता द्याव्या. तदनंतर अक्षय्योदक द्यावें." देवांकडच्या ब्राह्मणांस सव्यानें, व पितरांकडच्या ब्राह्मणांस अपसव्यानें द्यावें, असें **कर्क** सांगतो. श्राद्धपरिभाषेंत सांगितलेल्या वचनावरून सव्यानें द्यावें, हें योग्य आहे. येथें 'शिवा आपः संतु सौमनस्यमस्तु' इत्यादिप्रयोग जाणावा. **मात्स्यांत**—"पूर्वेकडे तोंड करून ब्राह्मणांपासून आशीर्वचन घेऊं नये. 'अघोराः पितरः संतु' असें कर्त्यानें म्हणावें. ब्राह्मणांनीं 'संत्वघोराः पितरः' असें म्हणावें. 'गोत्रं वर्धतां नः' असें कर्त्यानें म्हणावें. ब्राह्मणांनीं 'तथा' असें म्हणावें. कर्त्यानें 'दातारो नोभिवर्धतां, अन्नं च नो बहु भवेत्' इत्यादि म्हणावें. ब्राह्मणांनीं 'दातारो वोभिवर्धतां, अन्नं च वो बहुभवेत्' इत्यादि म्हणावें. नंतर भक्तानें पिंडांचा उद्धार करून स्वस्तिशब्दोच्चार ब्राह्मणाकडून करवावा."

स्वस्तिवाचनात्प्राक्पात्रचालनंकार्यं **हेमाद्रौबृहस्पतिः** भाजनेषुचतिष्ठत्सुस्वस्तिकुर्वंतियेद्विजाः तदन्नमसुरैर्भुक्तंनिराशैःपितृभिर्गतैः **जातूकर्ण्यः** पात्राणिचालयेच्छ्राद्धेस्वयंशिष्योथवासुतः नस्त्रीभिर्नचबालेननासजात्याकथंचन **याज्ञवल्क्यः** स्वस्तिवाच्यंततःकुर्यादक्षय्योदकमेवच तत्रैव**वृद्धशातातपः** पितृणांनामगोत्रेणकरेदेयंतिलोदकं प्रत्येकंपितृतीर्थेनअक्षय्यमिदमस्त्विति अत्रपष्ठीप्रागुक्ता तत्रैव**नागरखंडे** उत्तानमर्घ्यपात्रंतुकृत्वादत्वाचदक्षिणां हिरण्यंदेवतानांचपितृणांरजतंतथा **बृहस्पतिः** तस्मात्पणंकाकिणींवाफलंपुष्पमथापिवा प्रदद्याद्दक्षिणांयज्ञेतयासस्फलोभवेन अत्रपित्रुद्देशेनदक्षिणादानेअपसव्यं विप्रोद्देशेनसव्यमिति**माधवः** **कलिकायामाचार्यः** दद्याद्यज्ञोपवीतेयवतांबूलंदक्षिणांतथा **अत्रिः** वदेद्वतांस्ततोविप्रान्पित्रादिभ्यःस्वधोच्यतां **गोभिलः** अघोराःपितरःसंत्वित्युक्तेस्वधांवाचयिष्यइतिपृच्छतिपितृभ्यःस्वधोच्यतामित्युक्तेस्तुस्वधेत्युच्यमानेधारांदद्यादूर्जंवहंतीति **आपस्तंबेन**तुपुत्रान्पौत्रानभितर्पयंतीरित्यपिपरिषेचनेमंत्रउक्तः ।

ब्राह्मणांनीं स्वस्तिवाचन करण्याच्या पूर्वी उच्छिष्टपात्रांचें चालन करावें. कारण, **हेमाद्रींत बृहस्पति** सांगतो—"भोजनपात्रें तशींच असतां जे ब्राह्मण स्वस्तिवाचन करितात त्यांनीं भुक्त तें अन्न असुरांनीं भुक्त झाल्यामुळें पितर निराश होऊन जातात, असें समजावें." **जातूकर्ण्य**—"श्राद्धांतील ब्राह्मणांचीं उच्छिष्टपात्रें श्राद्धकर्त्यानें किंवा शिष्यानें अथवा पुत्रानें चाळवावीं. स्त्रियांनीं, बालकांनीं किंवा असजाति मनुष्यानें कधींही चाळवूं नयेत." **याज्ञवल्क्य**—"स्वस्तिवाचन केल्यावर अक्षय्योदक द्यावें." तेथेंच **वृद्धशातातप**—"पितरांच्या नांवांचा व गोत्रांचा उच्चार करून प्रत्येक ब्राह्मणाच्या

हातावर 'इदमक्षय्यमस्तु' असें म्हणून तिलोदक द्यावें." ह्या अक्षय्योदकदानाविषयीं पितरांच्या नांवादिकांची षष्ठीविभक्ती करावी, असें पूर्वी सांगितलें आहे. तेथेंच **नागरखंडांत**—"अर्घ्यपात्र उताणें करून देवांना सुवर्ण आणि पितरांना रजत दक्षिणा द्यावी." **बृहस्पति**—"ब्राह्मणांना पण ( तांब्याचा पैसा ) किंवा कवडी अथवा फल, पुष्प इत्यादि कांहींतरी श्राद्धयज्ञाचे ठिकाणीं दक्षिणा द्यावी; कारण, त्या दक्षिणेनें तो यज्ञ सफल होतो." येथें पितरांच्या उद्देशानें दक्षिणादान असतां अपसव्य आणि ब्राह्मणाच्या उद्देशानें दक्षिणादान असतां सव्य, असें **माधव** सांगतो. **कलिकेंत आचार्य**—"यज्ञोपवीतीनेंच तांबूल आणि दक्षिणा द्यावी." **अत्रि**—"तदनंतर त्या ब्राह्मणांना 'पित्रादिभ्यः स्वधोच्यताम्' असें सांगावें." **गोभिल**—"-'अघोरः पितरः संतु' असें म्हटल्यावर 'स्वधां वाचयिष्ये' असा ब्राह्मणांस प्रश्न करावा. अर्थात् 'वाच्यतां' असें उत्तर दिल्यावर कर्त्यानें 'पितृभ्यः स्वधोच्यतां' असें म्हटल्यावर ब्राह्मणांनीं 'अस्तु स्वधा' असें म्हटलें असतां 'ऊर्जं वहंती०' या मंत्रानें उदकधारा द्यावी." **आपस्तंबानें** तर 'पुत्रान् पौत्रानभितर्पयंतीः०' हाही मंत्र परिषेचनाविषयीं सांगितला आहे.

**आश्वलायनः** अथैतान्प्रवाहयेत् परेतनपितरःसोम्यासोगंभीरेभिःपथिभिःपूर्विणेभिः दत्वायाम्मभ्यंद्रविणेहभद्रंरयिंचनःसर्ववीरंनियच्छतेति **मात्स्ये** वाजेवाजेइतिजपन्कुशाग्रेणविसर्जयेन **प्रचेताः** स्वस्तिवाच्यंततःकृत्वापितृपूर्वविसर्जयेत् **आश्वलायनः** अन्नंप्रकीर्योपवीत्योंस्वधेतिविसृजेदस्तुस्वधेतिवा **ब्रह्मवैवर्ते** आमावाजेतिमंत्रंतुपठित्वाचप्रदक्षिणां द्वारोपांतेततःकृत्वासंयतःप्रविशेद्गृहं प्रांजलिश्चततःप्राहतान्विप्रान्सत्यवादिनः दातारोनोभिवर्धंतामन्नंचनइतिवह्निति एवमस्त्वितितेतंचकथयंतिसमाहिताः एतन्मंडलदेशेकार्यमितिहेमाद्रिः **मनुः** दातारोनोभिवर्धंतांवेदाःसंततिरेवच श्रद्धाचनोमाव्यगमद्बहुदेयंचनोस्त्विति **बौधायनः** अन्नंचनोबहुभवेदतिथींश्चलभेमहि याचितारश्चनःसंतुमाचयाचिष्मकंचनेति अत्रदातारोवोभिवर्धंतांलभध्वंयाचिढ्वमित्यादूहेनपठित्वाविप्रैःप्रतिवचनंकार्यमिति**सुदर्शनभाष्ये** स्वादुषंसदइति ब्राह्मणासःपितरइतिचमंत्रद्वयंपठंति **शौनकः** ब्राह्मणानथनिर्यातानपरीत्यत्रिःप्रदक्षिणं सस्त्रीकःस्वजनैःसार्धप्रणमेद्रचितांजलिः कनिष्ठप्रथमाज्येष्ठचरमाःस्युःप्रदक्षिणे **हेमाद्रौबृहस्पतिः** अद्यमेसफलंजन्मभवत्पादाब्जवंदनात् अद्यमेवंशजाःसर्वेयातावोनुग्रहाद्दिवं पत्रशाकादिदानेनक्लेशितायूयमीदृशाः तत्क्लेशजातंचित्तात्तुविस्मृत्यक्षंतुमर्हथ **प्रचेताः** विसृजेद्भक्तिसंयुक्तःसीमांतंचाप्यनुव्रजेत् ।

**आश्वलायन**—"परेतन पितरः सोम्यासो०" या मंत्रानें त्या पिंडांचें प्रवाहण करावें." **मात्स्यांत**—"वाजे वाजे० या मंत्राचा जप करीत कुशाग्रानें पितरांचें विसर्जन करावें." **प्रचेता**—"स्वस्तिवाचन करून पितरांचें पूर्वी व देवांचें मागाहून विसर्जन करावें." **आश्वलायन**—"अन्नाचा प्रकिर देऊन उपवतीनें 'ॐ स्वधा' किंवा 'अस्तुस्वधा' असें म्हणून विसर्जन करावें." **ब्रह्मवैवर्तात**—"आमावाज०' हा मंत्र म्हणून घराच्या द्वारांत प्रदक्षिणा करून नंतर नियमित होऊन घरांत जावें. तदनंतर सत्यवादी अशा त्या ब्राह्मणांस हात जोडून आशीर्वाद मागावे, ते असे–'दातारो नोभिवर्धंतां, अन्नं च नो बहुभवेत्' इत्यादि. तदनंतर ब्राह्मणांनीं समाधानपूर्वक 'एवमस्तु' असें त्याजप्रत बोलावें." ही आशीर्वादप्रार्थना ब्राह्मणाचे पाद धुण्यासाठीं मंडल केलें असेल त्या ठिकाणीं करावी, असें **हेमाद्रि** सांगतो. **मनु**—"दातारो नोभिवर्धंतां वेदाः संततिरेवच । श्रद्धा च नो माव्यगतम् बहुदेयं च नोस्तु" असें कर्त्यानें बोलावें. **बौधायन**—"अन्नं च नोबहुभवेदतिथींश्च लभेमहि । याचितारश्च नः संतु माच याचिष्म कंचन" असें कर्त्यानें बोलावें. येथें ब्राह्मणांनीं 'दातारोवोभिवर्धंतां' अशाप्रमाणें 'न'च्या ठिकाणीं 'व' शब्दाचा ऊह करून तसाच 'लभेमहि' या ठिकाणीं 'लभध्वं' 'याचिष्म' या ठिकाणीं 'याचिढ्वं' असा ऊह करून तींच वाक्यें म्हणून प्रतिवचन द्यावें, असें **सुदर्शनभाष्यांत** सांगितलेलें आहे. आणि 'स्वादुषंसदः०' 'ब्राह्मणासः पितरः०' हे दोन मंत्रही येथें पठण करितात. **शौनक**—"तदनंतर निघालेल्या ब्राह्मणांस स्त्री स्वजन यांसहवर्तमान त्रिवार प्रदक्षिणा करून हात जोडून नमस्कार करावा. प्रदक्षिणा करणें ती कनिष्ठानें प्रथम व ज्येष्ठानें शेवटीं करावी." **हेमाद्रींत बृहस्पति**—"-'अद्य मे सफलं जन्म०' हे दोन श्लोक म्हणावे." **प्रचेता**—"भक्तियुक्त होऊन ब्राह्मणाचें विसर्जन करावें आणि सीमेपर्यंत त्यांस पोंचवावयालाही जावें."

**अथपिंडप्रतिपत्तिः हेमाद्रौब्रह्मांडे** पिंडमग्नौसदादद्याद्भोगार्थीप्रथमंनरः पत्न्यैप्रजार्थीदद्याद्वैमध्यमंमंत्रपूर्वकं उत्तमांगतिमन्विच्छन्गोषुनित्यंप्रयच्छति आज्ञांप्रज्ञांयशःकीर्तिमप्सुपिंडंप्रवेशयेत् प्रार्थयन्दीर्घमायुष्यंवायसेभ्यःप्रयच्छति आकाशंगमयेदप्सुस्थितोवादक्षिणामुखः **आश्वलायनः** वीरंमेदत्तपितर-

इतिपिंडानांमध्यमंपत्नींप्राशयेदाधत्तपितरोगर्भंकुमारंपुष्करस्रजं यथायमरपाअसदिति **भर्त्रादत्तस्याधेना-** दायद्वितीयेनप्राशनं **आपस्तंबस्तु**दानेमंत्रमाह अपांत्वोषधीनांरसंप्राशयामिभूतकृतंगर्भंधत्स्वेतिमध्यमंपत्न्यै- प्रयच्छतीति प्राशनेपि यथेहपुरुषोअसदितितद्वितीयःपाठः अन्येषांतत्तच्छाखायांज्ञेयः **तत्रैवशंखः** पत्नीवामध्यमंपिंडमश्नीयादार्तवान्विता **कलिकायांछागलेयः** प्राचीनावीतिनामंत्र्यपत्नीःपिंडोविभज्यते प्रतिपत्न्यस्यमंत्रस्यकर्तव्यावृत्तिरत्रतु **माधवीयेविष्णुधर्मे** तीर्थश्राद्धेसदापिंडान्क्षिपेत्तीर्थेसमाहितः **याज्ञवल्क्यः** पिंडांस्तुगोजविप्रेभ्योदद्यादग्नौजलेपिवा **बृहस्पतिः** अन्यदेशगतापत्नीरोगिणीगर्भिणी- तथा तदातंजीर्णवृषभश्छागोवाभोक्तुमर्हति ।

## आतां पिंडांची प्रतिपत्ति (त्याग) सांगतो—

**हेमाद्रींत ब्रह्मांडपुराणांत**—"भोगाची इच्छा करणारानें पहिला पिंड अग्नीच्या ठिकाणीं सदा द्यावा. प्रजेची इच्छा करणारानें मध्यम पिंड मंत्रपूर्वक पत्नीला खाण्यासाठीं द्यावा. उत्तम गतीची इच्छा करणारानें गाईला खाण्यासाठीं पिंड द्यावा. आज्ञा चालावी, प्रज्ञा (बुद्धि) वाढावी, यश व कीर्ति व्हावी अशी इच्छा असेल त्यानें उदकांत पिंड सोडावा. दीर्घ आयुष्याची इच्छा करणारानें वायसांना पिंड द्यावा. अथवा उदकांत दक्षिणेकडे मुख करून उभा राहून पिंड आकाशांत टाकावा." **आश्वलायन**—"'वीरं मे दत्त पितरः' या मंत्रानें तीन पिंडांतील मध्यम पिंड पत्नीला भक्षणासाठीं द्यावा. भर्त्यानें दिलेला पिंड पत्नीनें ग्रहण करून 'आधत्त पितरो गर्भं कुमारं पुष्करस्रजं । यथायमरपा असत्' या मंत्रानें प्राशन करावा." **आपस्तंब** तर पिंडदानाविषयीं मंत्र सांगतो, तो असा—"'अपांत्वोषधीनां रसं प्राशयामि भूतकृतं गर्भं धत्स्व' या मंत्रानें मध्यमपिंड पत्नीला द्यावा. प्राशनाविषयीं मंत्र सांगतो, तो पूर्वोक्तच 'आधत्त पितरो०' हा समजावा. त्या मंत्रांत 'यथायमरपा असत्' या ठिकाणीं 'यथेह पुरुषो असत्' असा आपस्तंबाचा पाठ आहे. इतरांस त्यांच्या त्यांच्या शाखेंत मंत्र जाणावा. तेथेंच **शंख**— "ऋतुमती स्त्रियेनें मध्यम पिंड भक्षण करावा." **कलिकेंत छागलेय**—"अनेक पत्नी असतील त्यानें प्राचीनावीती करून पत्नींना बोलावून पिंडाचा विभाग करून प्रत्येक पत्नीला पिंडविभाग द्यावा. आणि या पूर्वोक्त मंत्राची प्रत्येक पत्नीविषयीं वेगवेगळी आवृत्ति करावी." **माधवीयांत विष्णुधर्मांत**—"तीर्थश्राद्धांत सर्वदा तीर्थांत पिंड टाकावे." **याज्ञवल्क्य**—"गाई, बकरे, ब्राह्मण यांस पिंड द्यावे, अथवा अग्नींत किंवा उदकांत टाकावे." **बृहस्पति**—"पत्नी अन्यदेशीं असेल किंवा रोगिणी अथवा गर्भिणी असेल तेव्हां तो पत्नीचा पिंड म्हातारा वृषभ किंवा बोकड यानें भक्षण करावा."

अथपिंडोपघाते**हेमाद्रौप्रायश्चित्तकांडेदेवलः** श्वसृगालखरैःपिंडःस्पृष्टोभिन्नःप्रमादतः कर्तुरायु- ष्यनाशःस्यात्प्रेतस्तंनोपसर्पति **जातूकर्ण्यः** पूर्वश्लोकांते तद्दोषपरिहारार्थंप्राजापत्यंप्रकल्पयेत् पुनःस्नात्वा- तदाकर्तापिंडंकुर्याद्यथाविधि काकस्पर्शेतुनदोषः पिंडोपघातंप्रक्रम्य धनस्यचविनाशःस्यात्काकस्पर्शादिकंवि- नेति तत्रैवश्लोके**गौतमोक्तेः स्मृतिदर्पणेऽत्रिः** मार्जारमूषकस्पर्शेपिंडेचद्विदलीकृते पुनःपिंडाःप्रदात- व्यास्तेनपाकेनतत्क्षणात् **बौधायनः** श्वचांडालादिभिःस्पृष्टःपिंडोयद्युपहन्यते प्राजापत्यंचरित्वाथपुनःपिं- डंसमाचरेत् **बोपदेवोप्येवमाह** अथदिनांतरेतुप्राजापत्यमात्रं शेषप्रतिपत्तित्वेनपिंडावृत्तौमानाभावादि- ति**मैथिलाः** तन्न सपिंडीकरणादौशेषनाशेसंयोजनादिलोपापत्तेः तेनवचनाद्गमनेइवात्रापितन्मात्रपिंडदा- नावृत्तिः अतएव नचनक्तंश्राद्धंकुर्वीतारब्धेवाभोजनमसमापनादित्यापस्तंबसूत्रम् रात्रौभोजनमात्रंपूर्वेद्युः कार्यं श्राद्धसमाप्तिस्तुपरदिनेएव समाप्तिपर्यंतंकर्तुरुपवासश्चेति**हरदत्तेन**व्याख्यातं तस्मात्पाकांतरेणपिंड- दानमात्रंकार्यं ।

## आतां पिंडाच्या उपघाता (नाशा) विषयीं सांगतो—

**हेमाद्रींत प्रायश्चित्तकांडांत देवल**—"कुत्रा, कोल्हा, गर्दभ यांनीं पिंडाला स्पर्श केला; किंवा प्रमादानें पिंड फुटला तर कर्त्याच्या आयुष्याचा नाश होतो, आणि प्रेत त्या पिंडाजवळ ग्रहण करण्यास जात नाहीं." **जातूकर्ण्य-पूर्व** श्लोकाच्या पुढें सांगतो—"त्या दोषाच्या परिहारासाठीं कर्त्यानें प्राजापत्य कृच्छ्र करावें. पिंडोपघात होईल त्या वेळीं कर्त्यानें स्नान करून पुनः यथाविधि पिंड करावे." काकस्पर्श झाला असेल तर दोष नाहीं. कारण पिंडोपघाताचा उपक्रम करून "काकस्पर्शादिकावांचून पिंडोपघात झाला असेल तर द्रव्याचा विनाश होईल" असें त्याच श्लोकावर **गौतमवचन आहे. स्मृतिदर्पणांत अत्रि**—"मार्जार, उंदीर यांचा पिंडास स्पर्श झाला किंवा पिंड फुटला तर तत्क्षणीं त्या पाकानें पुनः पिंड

करून घावे." **बौधायन**—"कुत्रा, चांडाल यांचा पिंडाला स्पर्श झाला किंवा पिंडाचा उपघात झाला तर प्राजापत्य कृच्छ्र आचरण करून पुनः पिंड करावे." **बोपदेवही** असेंच सांगतो. आतां दुसऱ्या दिवशीं प्राजापत्य कृच्छ्र मात्र करावें, पुनः पिंड करूं नये; कारण, पिंडत्याग हा शेषाचें प्रतिपत्तिरूप कर्म असल्यामुळें त्याचा उपघात झाला तरी पुनः पिंडांची आवृत्ति करण्याविषयीं प्रमाण नाहीं, असें **मैथिल** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, सपिंडीकरणादिकांचे ठायीं शेषनाश झाला असतां संयोजनादिकांचा लोप प्राप्त होईल. त्या कारणानें पुनः पिंड करण्याविषयीं वचन असल्यामुळें, वमन झालें असतां जशी भोजनाची आवृत्ति, तशी येथेंही तितक्याच पिंडदानधर्मांची आवृत्ति समजावी. म्हणूनच "रात्रीं श्राद्ध करूं नये, रात्रीं श्राद्धाला आरंभ केला तर ब्राह्मणभोजनसमाप्तीपर्यंत करावें" असें **आपस्तंबसूत्र** आहे, त्याची व्याख्या-'रात्रौ ब्राह्मणभोजन मात्र पूर्वदिवशीं करावें, श्राद्धसमाप्ति तर दुसऱ्या दिवशींच करावी, समाप्तीपर्यंत कर्त्यानें उपवास करावा,' अशी **हरदत्तानें** केली आहे. तस्मात् दुसऱ्या पाकानें पिंडदान मात्र करावें.

**अथपिंडनिषिद्धकालः** सचप्रायेणमहालयादिनिर्णयेपूर्वमुक्तः **हेमाद्रौबृहत्पराशरः** युगादिषुमघायांचविषुवत्ययनेतथा भरणीषुचकुर्वीतपिंडनिर्वपणंनहि **स्मृतिरत्नावल्यां** पुत्रेजातेव्यतीपातेग्रहणेचंद्रसूर्ययोः श्राद्धंकुर्यात्प्रयत्नेनपिंडनिर्वपणादृते तत्रैव**कात्यायनः** वृद्धेरनंतरंचैवयावन्मासःसमाप्यते तावत्पिंडान्नैवदद्यान्नकुर्यात्तिलतर्पणं **बौधायनः** संस्कारेपुतथान्येपुमासंमासार्धमेवच तथा भानौभौमेत्रयोदश्यांनंदाभृगुमघासुच पिंडदानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणं **त्रिस्थलीसेतौकार्ष्णाजिनिः** विवाहव्रतचूडासुवर्षमर्धंतदर्धकं उत्तरार्धंप्राग्वत् वृद्धिमात्रेतथान्यत्रपिंडदाननिराक्रिया कृतागर्गादिभिर्मुख्यैर्मासमेकंतुकर्मणां **हेमाद्रौज्योतिःपराशरः** विवाहेविहितेमासांस्त्यजेयुर्द्वादशैवहि सपिंडाःपिंडनिर्वापंमौंजीबंधेषडेवहि तत्रैव महालयेगयाश्राद्धेमातापित्रोःक्षयेहनि यस्यकस्यापिमर्त्यस्यसपिंडीकरणेतथा कृतोद्वाहोपिकुर्वीतपिंडनिर्वपणंसदेति मातापित्रोरितिक्षयाहविशेषणं हविरुभयत्ववदविवक्षितं तेनभ्रातृपितृव्यादिवार्षिकेपिपिंडदानंकार्यमितिकेचित् सपिंडीकरणंनवश्राद्धषोडशश्राद्धोपलक्षणार्थमिति**निर्णयामृते**उक्तं ।

## आतां पिंडांना निषिद्धकाल सांगतो—

तो निषिद्धकाल पूर्वी महालयादिनिर्णयप्रसंगीं बहुतेक सांगितला आहे. **हेमाद्रींत बृहत्पराशर**—"युगादिश्राद्धें, मघाश्राद्ध, विषुवायनश्राद्ध, अयनश्राद्ध, आणि भरणीश्राद्ध ( हीं श्राद्धें द्वितीयपरिच्छेदांत उक्त आहेत ) यांचे ठायीं पिंडदान करूं नये." **स्मृतिरत्नावलींत**—"पुत्र झाला असतां, व्यतीपात आणि चंद्र व सूर्यग्रहण इतक्या ठिकाणीं पिंडदानावांचून श्राद्ध करावें." तेथेंच **कात्यायन**—"वृद्धिकर्म झाल्यानंतर जोंपर्यंत महिना समाप्त होई तोंपर्यंत पिंड देऊं नये, व तिलतर्पण करूं नये." **बौधायन**—"संस्कारांचे ठायीं वृद्धिश्राद्ध असतां एकमहिना व इतर ठिकाणीं अर्धामहिनापर्यंत पिंडदान व तिलतर्पण करूं नये. तसेंच "रविवार, मंगळवार त्रयोदशी, नंदातिथि ( १ । ६ । ११ ), भृगुवार, मघानक्षत्र, यांचे ठायीं पिंडदान मृत्तिकास्नान आणि तिलतर्पण हीं करूं नयेत." **त्रिस्थलीसेतूंत कार्ष्णाजिनि**—"विवाह, उपनयन, चूडाकर्म, यांचे ठायीं अनुक्रमें एक वर्ष, सहा महिने, तीन महिनेपर्यंत पिंडदान, मृत्तिकास्नान आणि तिलतर्पण करूं नयेत. इतर ठिकाणीं कर्मसंबंधी वृद्धिश्राद्ध असतां एक महिनापर्यंत पिंडदानाचा निषेध गर्गादिक ऋषींनीं केला आहे." **हेमाद्रींत ज्योतिःपराशर**—"विवाह झाला असतां सपिंड पुरुषांनीं बारा महिने पिंडदान वर्ज्य करावें आणि मौंजीबंधन झालें असतां सहा महिने पिंडदान वर्ज्य करावें." तेथेंच-विवाह केला असला तरी महालय, गयाश्राद्ध, मातापितरांचा क्षयदिवस ( सांवत्सरिकश्राद्ध ) आणि कोणत्याही मनुष्याचें सपिंडीकरण इतक्या ठिकाणीं पिंडदान सर्वदा करावें." वरील अर्थांत 'क्षयदिवस' या पदाला 'मातापितरांचा' असें विशेषण दिलेलें आहे तें अविवक्षित ( अनावश्यक ) आहे, जसें-'हवीली' 'उभय' हें विशेषण अविवक्षित आहे तद्वत्. तेणेंकरून ( क्षयदिवसाला 'मातापितरांचा' असें विशेषण नसल्यामुळें ) भ्राता, पितृव्य इत्यादिकांच्या वार्षिकांतही पिंडदान करावें, असें **केचित्** म्हणतात. वरील वचनांतील 'सपिंडीकरण' या पदानें उपलक्षणेंकरून दशाहांतील नवश्राद्धें आणि षोडशश्राद्धें घ्यावीं, असें **निर्णयामृतांत** सांगितलें आहे.

---

१ प्रतिपत्तिकर्म अग्नौकरणप्रकरणीं सांगितलें आहे. २ 'पिंडयज्ञे च यज्ञे च सपिंड्यां दद्युरेव च । विकृत्यन्वष्टकादौ यत्र युक्तः पिंडविधिर्यत्र वा पूर्वेद्युःश्राद्धादौ पिंडपितृयज्ञविकृतित्वं तत्रापि न पिंडनिषेध उक्तः प्राक् इति' असा एका पुस्तकावर पाठ आहे. ३ दर्शपूर्णमासयागप्रकरणीं 'यस्योभयं हविरार्तिमार्च्छेत् ऐंद्रं पंचशरावमोदनं निर्वपेत्' याचा अर्थ-ज्याचें उभय ( दोन वेळचें ) हवि नष्ट होईल त्यानें इंद्राला पंचशराव ओदनाचा होम करावा. या ठिकाणीं हविरार्ति ( हविर्नाश ) हेंच पंचशरावओदनयागाला निमित्त आहे. उभय हें विशेषण अविवक्षित आहे तद्वत्.

क्षयाहेविशेषः**संग्रहे** मातापित्रोराब्दिकेतुविवाहादिषुसर्वदा तिलैःपिंडाःप्रदातव्याअन्यश्राद्धेविवर्जयेत् अत्रमूलंचिंत्यम् **रामकौतुके** नंदाश्वकामरव्यारभृग्वग्निपितृकालभे गंडेवैधृतिपातेचपिंडास्त्याज्याःसुते-प्सुभिः **विश्वरूपनिबंधे** तिथिवारप्रयुक्तोयोदोषोवैसमुदाहृतः सश्राद्धेतन्निमित्तेस्यान्नान्यश्राद्धेकदाचन अन्यत्तूक्तंप्राक् उच्छिष्टोद्वासनमाह**हेमाद्रौवसिष्ठः** श्राद्धेनोद्वासनीयानिउच्छिष्टान्यादिनक्षयात् श्च्योतं-तेवैसुधाधारास्ताःपिबंत्यकृतोदकाः **व्यासः** उच्छिष्टंनप्रमृज्यात्तुयावन्नास्तमितोरविः इदंगृहांतरसत्त्वे एकगृहेतु **मनुः** उच्छेषणंतुतत्तिष्ठेद्यावद्विप्राविसर्जिताः ततोगृहबलिंकुर्यादितिधर्मोव्यवस्थितः बलिर्वैश्वदे-वादिनित्यकर्मेति **मेधातिथिः ब्रह्मांडे** शूद्रायचानुपेतायश्राद्धोच्छिष्टंनदापयेत् तथा कामंदद्याच्चसर्वंतु-शिष्यायचसुतायच भोक्तुरितिशेषः **जातूकर्ण्यः** द्विजभुक्तावशिष्टंतुशुचिभूमौनिखानयेत् ।

क्षयाहाविषयीं विशेष सांगतो **संग्रहांत**—"विवाहादिक मंगलांमध्यें मातापित्यांचें आब्दिक प्राप्त असतां सर्वदा तिलांनीं पिंड द्यावे, इतरांच्या श्राद्धांत वर्ज्य करावे." या वचनाविषयीं मूल चिंत्य ( अनुपलब्ध ) आहे. **रामकौतुकांत**—"नंदा ( १।६।११ ), सप्तमी, त्रयोदशी, रविवार, भौमवार, भृगुवार, कृत्तिका, मघा, भरणी, गंडयोग, वैधृति, व्यतीपात इतक्या ठिकाणीं पुत्रेच्छु पुरुषानीं पिंड वर्ज्य करावे " **विश्वरूपनिबंधांत**—"तिथिवार प्रयुक्त जो पिंडदानाविषयीं दोष ( निषेध ) सांगितला तो दोष तिथि-वारनिमित्तक श्राद्धाचे ठायीं समजावा. इतर श्राद्धाचे ठायीं तो दोष नाहीं." इतर जें कांहीं सांगा-वयाचें तें पूर्वीं सांगितलें आहे. उच्छिष्टांचें उद्वासन ( काढणें ) सांगतो **हेमाद्रींत वसिष्ठ**—दिवस आहे तोंपर्यंत श्राद्धाचीं उच्छिष्टें ( उष्टी ) काढूं नयेत, कारण, त्या उच्छिष्टांपासून अमृतधारा गळत असतात, ज्या प्रेतांना उदक दिलेलें नसतें ते प्रेत त्या अमृतधारा प्राशन करितात " **व्यास**—"जोपर्यंत सूर्याचें अस्त झालें नाहीं तोंपर्यंत उच्छिष्ट काढूं नये." सूर्यास्त-पर्यंत उच्छिष्ट न काढणें हें इतर गृह असता समजावें. एकगृह असेल तर **मनु** सांगतो-"जोपर्यंत ब्राह्मणांचें विसर्जन करीत आहे तोंपर्यंत उच्छिष्ट राहतें; ब्राह्मणांचें विसर्जन केल्यावर उच्छिष्ट काढून गृहसंबंधी बलि ( वैश्वदेवादि ) करावा, असा धर्म व्यवस्थित आहे." वचनांत 'बलि' याचा अर्थ-वैश्वदेवादि नित्यकर्म, असा **मेधातिथि** सांगतो. **ब्रह्मांडपुरा-णांत**—"श्राद्धसंबंधी उच्छिष्ट शूद्राला व मुंज न झालेल्याला कोणाला-देनील तर-देऊं नये. तसेंच-श्राद्धभोक्त्यांच्या मुंज न झालेल्या शिष्याला व पुत्राला सर्व यथेच्छ द्यावें." **जातूकर्ण्य**—"ब्राह्मणांनी भोजन करून अवशिष्ट राहिलेलें उच्छिष्ट शुद्ध भूमींत पुरून टाकावें."

**अथवैश्वदेवादि** अत्र**मामकःश्लोकः** श्राद्धेनग्निककर्तृकेग्निकरणात्पश्चाज्जुहोतिर्बलिस्त्वंतेस्यादथ वाभवेद्विकिरतःपश्चात्पृथक्त्वेपचेः श्राद्धांतेत्वथवामहालयविधावूर्ध्वभुजेःस्यात्क्षयेत्वंतेमासुचमध्यतःशुभ-विधावादौतथासाग्निके अस्यार्थः साग्नेःपृथक्पाकेनसर्वत्रादौवैश्वदेवः पश्चांतंकर्मनिर्वर्त्यवैश्वदेवंचसाग्निकः पिंडयज्ञंततःकुर्यात्ततोन्वाहार्यकंबुधः पित्रर्थंनिर्वपेत्पाकंवैश्वदेवार्थमेवच वैश्वदेवंनपित्रर्थंनदार्शेवैश्वदेविकमिति **लौगाक्षिस्मृतेः** अत्रसाग्निकआहिताग्निरिति**हेमाद्रिः** श्राद्धात्प्रागेवकुर्वीतवैश्वदेवंतुसाग्निकः एकादशा-हिकंमुक्त्वातत्रह्यंतेविधीयतेइति**हेमाद्रौशालंकायनोक्तेश्च** तत्रैव**परिशिष्टे** संप्राप्तेपार्वणश्राद्धेएकोद्दि-ष्टेतथैवच अग्रतोवैश्वदेवःस्यात्पश्चादेकादशेहनि स्मार्ताग्निमतांतद्रहितानांवाग्नौकरणोत्तरंविकिरोत्तरंवाहो ममात्रंपृथक्पाकेन भूतयज्ञादितुश्राद्धांतएव अत्रमूलं**हेमाद्रिचंद्रिकादौ**स्पष्टं सर्वेषांश्राद्धांतेवातत्पाकेनवै-श्वदेवनित्यश्राद्धादीतितृतीयः श्राद्धंनिर्वर्त्यविधिवद्वैश्वदेवादिकंततः कुर्याद्भिक्षांततोदद्याद्धंतकारादिकंतथेति **पैठीनसिस्मृतेः** ततःश्राद्धशेषात् श्राद्धाद्धिश्राद्धशेषेणवैश्वदेवंसमाचरेदिति**चतुर्विंशतिमताच्च** एवं वैश्वदेवकालत्रयस्य**आशार्केशांखायनपरिशिष्ट**मुदाहृत्यैवंव्यवस्थोक्ता आदौवृद्धौक्षयेचांतेदर्शेमध्ये-महालये एकोद्दिष्टेनिवृत्तेतुवैश्वदेवोविधीयतइति बहुस्मृत्युक्तत्वात्सर्वेषांश्राद्धांतेएवेति**मेधातिथिस्मृति-रत्नावल्यादयो**बहवः ।

## आतां वैश्वदेवादि सांगतो—

येथें मी ( कमलाकरभट्टानें ) केलेला **श्लोक**—"श्राद्धाचे दिवशीं अनग्निकानें ( स्मार्ताग्निमान् व अग्निरहित यानें ) अग्नौकरणोत्तर पृथक् पाकानें वैश्वदेवाचा होम मात्र करावा, अथवा विकिरदानोत्तर वैश्वदेवहोममात्र करावा आणि भूतयज्ञादिक श्राद्धांतीं करावें. किंवा सर्वांनीं श्राद्धांतीं श्राद्धपाकानें वैश्वदेव, नित्यश्राद्ध इत्यादि करावें. महालयांत ब्राह्मणभोजनोत्तर करावा,

वार्षिकश्राद्धांत अंतीं, दर्शश्राद्धांत मध्यें, वृद्धिश्राद्धांत आधीं व साग्निकानें आधीं वैश्वदेव करावा." याचा स्पष्ट अर्थ-साग्निकानें वेगळ्या पाकानें सर्वत्र ठिकाणीं श्राद्धाचे आधीं वैश्वदेव करावा. कारण "साग्निकानें अन्वाधान व वैश्वदेव करून नंतर पिंडपितृयज्ञ करून नंतर दर्शश्राद्ध करावें. पितरांसाठीं निराळा पाक करावा व वैश्वदेवासाठीं निराळा करावा. वैश्वदेवाच्या पाकानें पितरांचें श्राद्ध करूं नये व पितरांच्या पाकानें वैश्वदेव करूं नये" अशी **लौगाक्षि**स्मृति आहे. येथें साग्निक म्हणजे अग्नीचें आधान केलेला होय, असें **हेमाद्रि** सांगतो. आणि "साग्निकानें श्राद्धाच्या पूर्वींच वैश्वदेव करावा. अकराव्या दिवशीं करावयाचें जें एकोद्दिष्ट तें सोडून हा नियम समजावा; कारण, त्या एकोद्दिष्टांत अंतीं वैश्वदेव सांगितला आहे" अशी **हेमाद्रींत शालंकायनाची** उक्तिही आहे. तेथेंच **परिशिष्टांत**—"पार्वणश्राद्ध, तसेंच एकोद्दिष्ट प्राप्त असतां पूर्वीं वैश्वदेव करावा आणि अकराव्या दिवशीं करावयाच्या श्राद्धांत अंतीं वैश्वदेव करावा." स्मार्ताग्निमानांनीं व तद्रहितांनीं अग्नौकरणोत्तर किंवा विकिरोत्तर वैश्वदेवहोममात्र वेगळ्या पाकानें करावा. भूतयज्ञादिक तर श्राद्धांतींच करावे. याचें मूळ **हेमाद्रि, चंद्रिका** इत्यादि ग्रंथांत स्पष्ट आहे. अथवा सर्वांनीं श्राद्धांतीं श्राद्धपाकानें वैश्वदेव, नित्यश्राद्ध इत्यादि करावें. हा तिसरा पक्ष होय. कारण, "यथाविधि श्राद्ध करून त्या श्राद्धशेष अन्नानें वैश्वदेव करावा, तदनंतर माधुकरी यांना भिक्षा द्यावी आणि हंतकारादिक करावा." असें **पैठनसिस्मृति**वचन आहे. आणि "श्राद्धदिवशीं श्राद्धशेषानें वैश्वदेव करावा" असें **चतुर्विंशति**स्मृतिवचनही आहे. याप्रमाणें वैश्वदेवाचे तीन काल सांगितले त्यांची व्यवस्था **आशार्क** ग्रंथांत **शांखायनपरिशिष्ट** घेऊन केली आहे, ती अशी-"वृद्धिश्राद्धांत आधीं, सांवत्सरिकांत अंतीं, दर्शांत व महालयांत मध्यें आणि एकोद्दिष्टांत अंतीं वैश्वदेव सांगितला आहे." बहुत स्मृतींनीं अंतीं सांगितल्यामुळें सर्वांनीं श्राद्धांतींच वैश्वदेव करावा, असें **मेधातिथि, स्मृतिरत्नावली** इत्यादिक बहुत ग्रंथकार सांगतात.

**बोपदेव**स्तुवृत्तिकारेणविसर्जनांतंश्राद्धमुक्त्वाउच्छेषणंत्विति पूर्वोक्तमनुवाक्योदाहरणाद्बह्वृचानांश्राद्धांतएव मध्यपक्षस्त्वन्यशाखापरइत्याह **हेमाद्रि**स्तुवृद्धावप्यंतेएववैश्वदेवमाह **कातीयानां**तुश्रौतस्मार्ताग्निमतामादावेकेनैवपाकेनेति**कर्कः** अन्येषामंते **तैत्तिरीयाणां**तुसाग्निकानांसर्वत्रादौवैश्वदेवःपंचयज्ञाश्चअंतेवेति**सुदर्शनभाष्ये**उक्तं अस्यपक्षद्वयस्यपूर्ववद्व्यवस्था **हेमाद्रौमार्कंडेयः** ततोनित्यक्रियांकुर्याद्भोजयेच्चततोतिथीन् ततस्तदन्नंभुंजीतसहभृत्यादिभिर्नरः ततःश्राद्धशेषात् नित्यक्रियांनित्यश्राद्धं तत्रपृथक्पाकेननैत्यकमिति तेनैवोक्तेः पाकैक्येविकल्पः ।

**बोपदेव** तर वृत्तिकारानें विसर्जनांत श्राद्ध सांगून 'उच्छेषणं तु तत्तिष्ठेत्०' हें पूर्वी उच्छिष्टप्रकरणीं सांगितलेलें मनुवचन सांगितल्यावरून बह्वृचांना श्राद्धांतींच वैश्वदेव उक्त आहे, असें होतें. श्राद्धामध्यें वैश्वदेव करावा हा पक्ष इतरशाखाविषयक आहे, असें ( बोपदेव ) सांगतो. **हेमाद्रि** तर वृद्धिश्राद्धांत देखील अंतींच वैश्वदेव सांगतो. श्रौताग्निमान् व स्मार्ताग्निमान् अशा **कातीयां**नीं तर श्राद्धाच्या पूर्वीं एकाच पाकानें वैश्वदेव करावा, असें **कर्क** सांगतो. इतरांनीं ( निरग्निकांनीं ) अंतीं करावा. **तैत्तिरियांनीं** तर साग्निकांनीं सर्वत्र ठिकाणीं श्राद्धाच्या आधीं वैश्वदेव आणि पंचमहायज्ञ करावे, अथवा अंतीं करावे असें **सुदर्शनभाष्यांत** सांगितलें आहे. ह्या दोन पक्षांची पूर्वींप्रमाणें व्यवस्था समजावी. **हेमाद्रींत मार्कंडेय**—"त्या श्राद्धशेषानें नित्यश्राद्ध करावें, आणि अतिथींना भोजन घालावें. तदनंतर त्या श्राद्धशेषाचाचें भृत्यादिकांसहवर्तमान भोजन करावें." येथें 'पृथक् पाकानें नित्यश्राद्ध करावें' असें त्यानेंच ( मार्कंडेयानेंच ) सांगितलें आहे म्हणून एकपाकाविषयीं विकल्प सिद्ध होतो.

**अथनित्यश्राद्धं हेमाद्रौव्यासः** एकमप्याशयेद्विप्रंपण्णामप्यन्वहंगृही अपीत्यनुकल्पः **प्रचेताः** नामंत्रणंनहोमंचनाह्वाननंनविसर्जनं नपिंडदानंविकिरंनदद्यादत्रदक्षिणां अत्र निर्दिश्यभोजयित्वातुकिंचिद्दत्वा विसर्जयेदितितेनैवोक्तेर्दक्षिणाविकल्पः यत्तु नित्यश्राद्धंदैवहीनंनियमादिविवर्जितं दक्षिणारहितंचैवदातृभोक्तृव्रतोज्झितमिति**काशीखंडे** तद्विप्राभावपरमिति**पृथ्वीचंद्रः भविष्ये** आवाहनंस्वधाकारंपिंडाग्नौकरणादिकं ब्रह्मचर्यादिनियमाविश्वेदेवानचैवहि दातृणामथभोक्तॄणांनियमोनचविद्यते एतद्दिवासंभवेरात्रावपिकार्यम् दिवोदितानिकर्माणिप्रमादादकृतानिवै यामिन्याःप्रहरंयावत्तावत्कर्माणिकारयेदिति**बृहन्नारदीयोक्तेः** रात्रौप्रहरपर्यंतंदिवाकृत्यानिकारयेत् ब्रह्मयज्ञंचसौरंचवर्जयित्वाविशेषतइति**पृथ्वीचंद्रधृतसंग्रहोक्तेश्च** नचदार्शिकाब्दिकाद्यपिरात्रौस्यादितिवाच्यं इष्टापत्तेः ( [1] तस्यतिथिसंबंधित्वात् संध्यारात्रौनकर्तव्यंश्राद्धंखलु-

---

१ हा कंसांतील ग्रंथ बाहेरचा आहे.

विचक्षणैरिति**विष्णवाद्यै**रात्रौनिषेधात् अतएवाल्पद्वादश्यां उषःकालेद्वयंकुर्यात्प्रातर्माध्याह्निकंतथेत्यादि-वाक्यैस्त्रयोदशीश्राद्धंनापकृष्यते भिन्नविषयत्वादित्युक्तं**मदनरत्ने** नित्यंत्वपकृष्यते अन्वहमित्युक्तेस्तिथि-सर्वाधिकाभावात् यथाच**सुदर्शनभाष्ये** परपक्षेपित्र्याणीतिनियमेपिनित्यश्राद्धत्वेसंवत्सरमित्यत्यंतसंयो-गेद्वितीयाबलाच्छुक्लपक्षेपीत्युक्तंतथारात्रावपि ) तथाच**माधवेन**प्रतिपत्करणेस्पष्टमुक्तं वयंचाग्रेवक्ष्यामः अस्यदिनेकरणेलोपएव रात्रौश्राद्धंनकुर्वीतेतिनिषेधादिति**पृथ्वीचंद्रोदयः** पात्राभावे**कौर्मे** उद्धृत्यवायथाश-क्तिकिंचिदन्नंप्रकल्पयेत् तत्प्रतिपत्तिमाह**विष्णुः** भिक्षुकाभावेअन्नंगोभ्योदद्यादग्नौवाप्रक्षिपेदिति **हेमाद्रौ नागरखंडे** नित्यश्राद्धंनकुर्वीतप्रसंगाद्यत्रसिध्यति श्राद्धांतरेकृतेन्यत्रनित्यत्वात्तन्नहापयेत् षड्दैवतेपृथक्-नेत्यर्थः ।

## आतां नित्यश्राद्ध सांगतो—

**हेमाद्रींत व्यास**—"गृहस्थाश्रम्यानें पिता इत्यादि सहा देवतांच्या उद्देशानें दररोज एका तरी ब्राह्मणाला भोजन घालावें." या वचनांत 'अपि' म्हणजे तरी असें म्हटल्यावरून हा अनुकल्प ( कनिष्ठ पक्ष ) आहे असें होतें. **प्रचेता**—"ह्या नित्यश्राद्धांत आमंत्रण ( क्षण ), अग्नौकरण, आवाहन, विसर्जन, पिंडदान, विकिर, आणि दक्षिणा हीं नाहींत." येथें "ब्राह्मणाला सांगून भोजन घालून कांहीं त्याला देऊन विसर्जन करावें" असें त्यानेंच ( प्रचेतानेंच ) सांगितलें यावरून दक्षि-णेचा विकल्प समजावा. आतां जें "नित्यश्राद्ध हें विश्वेदेवरहित, नियमादिवर्जित, दक्षिणारहित, आणि कर्ता व भोक्ता यांच्या नियमरहित असें आहे" असें **काशीखंडांत** सांगितलें तें ब्राह्मणाच्या अभावीं समजावें, असें **पृथ्वीचंद्र** सांगतो. **भविष्यपुराणांत**—"आवाहन, स्वधाशब्दोच्चार, पिंडदान, अग्नौकरण, ब्रह्मचर्यादि नियम, विश्वेदेव, आणि दात्याचे व भोक्त्या ब्राह्मणाचे नियम, हे सारे नित्यश्राद्धांत नाहींत." हें नित्यश्राद्ध दिवसा असंभव असेल तर रात्रीं देखील करावें. कारण, "दिवसा करण्यास सांगितलेलीं कर्मे प्रमादानें ( अवधान नसल्यामुळें ) दिवसा केलीं नसतील तर रात्रीचा प्रथम प्रहर आहे तोंपर्यंत तीं कर्मे करावीं" असें **बृहन्नारदीय**वचन आहे. आणि "रात्रीं प्रहरपर्यंत दिवसाचीं कृत्यें करावीं. ब्रह्मयज्ञ आणि सौर हीं दोन मात्र रात्रीं विशेषतः वर्ज्य करावीं" असें **पृथ्वीचंद्रानें** धरलेलें **संग्रह**वचनही आहे. **शंका**—नित्यश्राद्ध दिवसा न झालें तर रात्रीं सांगितलें नसें दर्शश्राद्ध, सांवत्सरिक इत्यादिकही रात्रीं होईल व तें अनिष्ट आहे ? असें म्हणूं नये; कारण, तें दर्श, सांवत्सरिक इत्यादि श्राद्ध दिवसा न झालें तर रात्रीं करणें इष्ट आहे. तेंच **माधवानें** प्रति-पत्करणग्रंथांत स्पष्ट सांगितलें आहे व आम्ही देखील पुढें ( क्षयादितिथिनिर्णयप्रसंगीं ) सांगूं. हें नित्यश्राद्ध दिवसा न केलें तर त्याचा लोपच होतो. कारण, "रात्रीं श्राद्ध करूं नये" असा निषेध आहे, असें **पृथ्वीचंद्रोदय** सांगतो. नित्यश्राद्धास पात्रा-( ब्राह्मणा )चा अभाव असतां सांगतो **कौर्मांत**—"यथाशक्ति कांहीं अन्न वाढून पितरांच्या उद्देशानें सोडावें." त्या अन्नाची प्रतिपत्ति ( त्याग ) सांगतो **विष्णु**—"तें अन्न भिक्षुकाला द्यावें. त्याच्या अभावीं गाईंना द्यावें, किंवा अग्नींत टाकावें." **हेमाद्रींत नागरखंडांत**—"सहा देवतांचें ( पित्रादित्रय व मातामहादित्रय यांचें ) इतर श्राद्ध केलें असतां त्याच्या प्रसंगानें नित्यश्राद्ध सिद्ध होतें म्हणून त्या दिवशीं नित्यश्राद्ध वेगळें करूं नये. इतर दिवशीं तें नित्य असल्यामुळें टाकूं नये."

**मात्स्ये** ततस्तुवैश्वदेवांतेसभृत्यसुतबांधवः भुंजीतातिथिसंयुक्तःसर्वंपितृनिषेवितं सर्वपर्वनिषिद्धंमांस-माषाद्यपीत्यर्थः एवंकृष्णैकादश्यादौगृहिणोपिभोजनम् अस्यवैधत्वेननिषेधाप्रवृत्तेः एवंग्रहणवेधेपि यस्त्वना-हिताग्नेरमाषममांसंव्रतयेदित्युक्तंतद्धेयमेव श्रौतत्वेनतस्यबलवत्त्वात् **देवलः** श्राद्धंकृत्वातुयोमर्त्योनभुंक्तेथ-कदाचन देवाहव्यंनगृह्णंतिकव्यानिपितरस्तथा शिवरात्र्येकादश्यादौत्ववघ्राणमेवेत्युक्तंप्राक् यत्रतूपवासो-नावश्यकस्तत्रैकभक्तमयाचितंवाकार्यमितिहेमाद्रिः **जातूकर्ण्यः** अहन्येवतुभोक्तव्यंकृतेश्राद्धेद्विजन्मभिः अन्यथाह्यासुरंश्राद्धंपरपाकेचसेविते ।

**मात्स्यांत**—"श्राद्ध केल्यानंतर वैश्वदेवाच्या अंतीं भृत्य, पुत्र, बांधव, अतिथि यांसहवर्तमान पितरांनीं सेवित जें अन्न तें सारें ( पर्वदिवशीं निषिद्ध असें मांस-माष इत्यादि सुद्धां ) भोजन करावें. याप्रमाणें कृष्णएकादशीसही गृहस्थाश्रम्यास भोजन सांगितलें आहे. हें श्राद्धशेषान्नभोजन विहित असल्यामुळें भोजननिषेधाची प्रवृत्ति होत नाहीं. याप्रमाणें ग्रहणाच्या वेधांतही भोजन करावें. आतां जें "अग्नीचें आधान करणारानें माष-मांस वर्जनरूपव्रत करावें" असें सांगितलें आहे, तें

१ याच्या पुढें-'तस्य तिथिसंबंधि०' याला आरंभ करून-'तथा रात्रावपि' एतत्पर्यंत ग्रंथ नवीन पुस्तकांत आढळतो. परंतु तो ग्रंथ प्राचीन पुस्तकांत नसल्यामुळें व विसंगत असल्यामुळें प्रक्षिप्त आहे असें वाटतें.

( माघ-मास ) त्यानें ( आहिताग्नीनें ) टाळावेंच. कारण, वर्जनरूपव्रत श्रौत ( श्रुतिविहित ) असल्यामुळें स्मार्त ( स्मृतिविहित ) अशा श्राद्धशेषभोजनापेक्षां प्रबळ आहे. **देवल**—"जो मनुष्य श्राद्ध करून भोजन करीत नाहीं, त्याचें हव्य ( देवांना दिलेलें हवि ) देव ग्रहण करीत नाहींत. आणि त्याचीं कव्यें ( पितरांस दिलेलीं ) पितर ग्रहण करीत नाहींत." शिवरात्रि, एकादशी इत्यादिकांचे ठायीं अवघ्राणच करावें, असें पूर्वी सांगितलें आहे. जेथें उपवास आवश्यक नाहीं तेथें एकभक्त किंवा अयाचित करावें, असें **हेमाद्रि** सांगतो. **जातूकर्ण्य**—"द्विजातींनीं श्राद्ध केलें असतां दिवसाचे ठायींच भोजन करावें. भोजन केलें नाहीं तर, आणि परकीय अन्नाचें भोजन केलें तर आसुर ( असुरांना प्राप्त होणारें ) श्राद्ध होतें."

श्राद्धशेषभोजनस्यक्वचिन्निषेधमाह**हेमाद्रौप्रायश्चित्तकांडेमार्कंडेयः** पित्रादीनामथाऽन्येषांश्राद्धशेषान्नभोजनम् व्रतिनांविधवानांचयतीनांचविगर्हितं अन्येभिन्नगोत्राः व्रतिनोब्रह्मचारिणः श्राद्धावशिष्टभोक्तारस्तेवैनिरयगामिनः सगोत्राणांसकुल्यानांज्ञातीनांचनदोषकृदितितत्रैवोक्तेः **तत्रैवजाबालिः** विप्रस्त्वन्यगृहेश्राद्धेशिष्टान्नंभोजनंचरेत् प्राजापत्यंविशुद्धिःस्याज्ज्ञातिगोत्रेनदोषकृत् यतीनांवपनंलक्षंप्रणवजपश्चेतितत्रैवोक्तं अस्यापवादमाहसएव श्वशुरस्यगुरोर्वापिमातुलस्यमहात्मनः ज्येष्ठभ्रातुश्चपुत्रस्यब्रह्मनिष्ठस्ययोगिनः एतेषांश्राद्धशिष्टान्नंभुक्त्वादोषोनविद्यते इतिकेचित्प्रशंसंतिमुनयस्तदसांप्रतं विशेषांतरंतत्रैवज्ञेयं **हेमाद्रौजाबालिः** तांबूलंदंतकाष्ठंचस्नेहस्नानमभोजनम् रत्यौषधपरान्नानिश्राद्धकर्ताविवर्जयेत् **पृथ्वीचंद्रोदयेआचार्यः** नशूद्रंभोजयेत्तस्मिन्गृहेयत्नेनतद्दिने श्राद्धशेषंनशूद्रेभ्यःप्रदद्यादखिलेष्वपि इतिजगद्गुरुनारायणभट्टसूनुरामकृष्णभट्टसुतकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौपार्वणश्राद्धम् ।

श्राद्धशेषभोजनाचा क्वचित् ठिकाणीं निषेध सांगतो **हेमाद्रींत प्रायश्चित्तकांडांत मार्कंडेय**—"भिन्नगोत्री पिता इत्यादिकांचे श्राद्धशेषान्नाचें भोजन ब्रह्मचारी, विधवा आणि संन्याशी यांना निंद्य आहे." वचनांत 'अन्येषां, याचा अर्थ भिन्नगोत्र्यांच्या' असा समजावा. कारण, "श्राद्धशेषभोजन करणारे ते नरकगामी होतात. सगोत्र, सकुल्य आणि ज्ञाति यांना श्राद्धशेषभोजन दोषकारक होत नाहीं" असें तेथेंच सांगितलें आहे. तेथेंच ( **हेमाद्रींत** ) **जाबालि**—"ब्राह्मण दुसऱ्याच्या घरीं श्राद्धांचें शेषान्न भोजन करील तर प्राजापत्य कृच्छ्रानें त्याची शुद्धि होईल. आपल्या ज्ञातींत, गोत्रांत श्राद्धशेषान्न दोषकारक नाहीं." यतींनीं श्राद्धशेषान्नभोजन केलें असतां वपन आणि एक लक्ष प्रणवजप करावा. म्हणजे शुद्धि होते, असें तेथेंच सांगितलें आहे. याचा ( श्राद्धशेषान्ननिषेधाचा ) अपवाद तोच सांगतो–"श्वशुर, गुरु, मातुल, ज्येष्ठभ्राता, पुत्र, आणि ब्रह्मनिष्ठ असा योगी यांचें श्राद्धशेषान्नभोजन केलें असतां दोष नाहीं. याप्रमाणें केचित् मुनि यांच्या श्राद्धशेषान्नाची प्रशंसा करितात, पण तें युक्त नाहीं." यासंबंधी इतर विशेष निर्णय तेथेंच जाणावा. **हेमाद्रींत जाबालि**—"तांबूल, काष्ठानें दंतधावन, अभ्यंगस्नान, उपवास, मैथुन, औषध आणि परान्न हीं श्राद्धकर्त्यानें वर्ज्य करावीं." **पृथ्वीचंद्रोदयांत आचार्य**—"श्राद्धदिवशीं त्या घरीं शूद्राला भोजन घालूं नये, सर्वांमध्येंही शूद्रांना श्राद्धशेष देऊं नये."

**इति श्रीनिर्णयसिंधूंतील पार्वणश्राद्धाची तरणिरूपा भाषाटीका समाप्त झाली.**

**अथानुकल्पाः** तत्रविप्रालाभे भोजयेदथवाप्येकंब्राह्मणंपंक्तिपावनं दैवेकृत्वातुनैवेद्यंपश्चात्तस्यतुनिर्वपेदितिशंखोक्तेरेकोविप्रःपूर्वमुक्तः विप्राभावेदर्भबटुः निधायवादर्भबटूनासनेषुसमाहितः प्रेषानुप्रेषसंयुक्तं विधानंप्रतिपादयेदिति**देवलोक्तेः** अशक्तावामश्राद्धं आपद्यनग्नौतीर्थेचप्रवासेपुत्रजन्मनि आमश्राद्धंप्रकुर्वीतभार्यारजसिसंक्रमेइति **कात्यायनोक्तेः पृथ्वीचंद्रोदयेजमदग्निः** यावत्स्यान्नाग्निसंयुक्तउत्सन्नाग्निरथापिवा आमश्राद्धंतदाकुर्याद्धस्तेग्नौकरणंभवेत् **कौर्मे** अनग्निरधनोवापितथैवव्यसनान्वितः आमश्राद्धं द्विजःकुर्याद्वृषलस्तुसदैवहि आहिताग्नौप्रवासस्थेतत्पत्नीगृहेदर्शेऋत्विगादिनाकारयेत् अमावास्यादिनियतं प्रोषितेधर्मचारिणी पत्यौतुकारयेन्नित्यमन्येनाप्यृत्विगादिनेतिल**घुहारीतो**क्तेरिति**पृथ्वीचंद्रोदयः** आदिपदमाब्दिकादिसर्वपार्वणपरमिति**शूलपाणिः सुमंतुः** पाकाभावेधिकारःस्याद्विप्रादीनांनराधिप अपत्नीनांमहाबाहोविदेशगमनादिभिः सदाचैवतुशूद्राणामामश्राद्धंविदुर्बुधाः **प्रचेताः** स्त्रीशूद्रःस्वपचश्चैवजातकर्मणिचाप्यथ आमश्राद्धंसदाकुर्याद्विधिनापार्वणेनतु स्वयंपचतीतिस्वपचः **विष्णूशनसौ** आत्मनोदेशकालाभ्यांविप्लवेसमुपस्थिते आपद्यनग्नौतीर्थेचप्रवासेपव्यसंभवे चंद्रसूर्यग्रहेचैवदद्यादामंविशेषतः नपक्वंभोजयेद्विद्वान्सच्छूद्रोपिकदाचन भोजयन्प्रत्यवायीस्यान्नचतस्यफलंलभेत् अत्रप्रवासतीर्थग्रहणादावामहेमश्राद्ध-

मेव पाकश्राद्धंतुनभवत्येवेतिहेमाद्रिरत्नावल्यादयः अपरार्कविज्ञानेश्वरादयस्तु पाकाभावेद्वि-जातीनामामश्राद्धंविधीयतइतिसुमंतूक्तेः साग्निकैर्निरग्निकैश्चप्रवासादौसर्वत्रपाकाभावेआमादिकार्यंनतु पाकसंभवेत्वन्नेनैवेत्याहुः अतएवपाकश्राद्धमुक्त्वा एतच्चानुपनीतोपिकुर्यात्सर्वेषुकर्मसु भार्याविरहितोप्येत-त्प्रवासस्थोपिनित्यशइतिमात्स्येनिरग्नेरपिपाकेनोक्तमितिशूलपाणिकल्पतरू एतच्छब्दःश्राद्धमात्रपरइ-त्यन्ये एकोद्दिष्टंतुकर्तव्यंपाकेनैवसदास्वयमितिलघुहारीतीयमपिसाग्नेरेव निरग्नेर्महैकोद्दिष्टमप्यामेन शूद्रस्यतुदशाहपिंडाद्यामेनेतिहलायुधः उत्सन्नाग्नीनांत्वामश्राद्धमेव पूर्वोक्तजमदग्निवाक्यात् मरीचिः श्राद्धविघ्नेद्विजातीनामामश्राद्धंप्रकीर्तितं अमावास्यादिनियतंमाससंवत्सराहते स्मृतिदर्पणे मृताहंचसपिं-डंचगयाश्राद्धंमहालयं आपन्नोपिनकुर्वीतश्राद्धमामेनकर्हिचित् ।

## आतां श्राद्धाचे अनुकल्प सांगतो—

श्राद्धाचेठायीं ब्राह्मण मिळत नसतील तर "अथवा देवांना नैवेद्य करून नंतर पंक्तिपावन अशा एका ब्राह्मणाला भोजन घालावें" असें **शंखवचन** आहे. म्हणून एक ब्राह्मण सांगावा, असें पूर्वी सांगितलें आहे. ब्राह्मणांच्या अभावीं दर्भबटु ( चट ) करावा. कारण, "समाहित अंतःकरणानें आमनाचेठायीं दर्भबटु ठेऊन वचन-प्रतिवचन यांनीं युक्त सर्व श्राद्धाचा विधि करावा" असें **देवल**वचन आहे. पक्वान्नश्राद्धाविषयीं शक्ति नसतां आमश्राद्ध करावें. कारण, "आपत्कालीं, विवाहाग्नीच्या अभावीं ( भार्याभावीं ), तीर्थांत, प्रवासांत, पुत्रजन्मकालीं, भार्या रजस्वला असतां आणि संक्रांतीस, इतक्या ठिकाणीं आमश्राद्ध करावें" असें **कात्यायन**वचन आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत जमदग्नि**—"जोंपर्यंत अग्नियुक्त झाला नाहीं ( विवाह झाला नाहीं ) तोंपर्यंत अथवा भार्या मृत झाल्यानें अग्नि उच्छिन्न झाला असेल त्या वेळीं आमश्राद्ध करावें, आणि हस्तावर अग्नौकरण करावें." **कूर्मपुराणांत**—"अग्निरहित, अथवा द्रव्यरहित, तसाच संकटयुक्त अशा द्विजानें आमश्राद्ध करावें. शूद्रानें तर सर्वदा आमश्राद्धच करावें." अग्निहोत्री प्रवासांत असतां त्याच्या पत्नीनें घरीं ऋत्विक् इत्या-दिकांकडून दर्शश्राद्ध करवावें. कारण, "पति प्रवासास गेला असतां पत्नीनें नियमित असें अमावास्यादिकश्राद्ध ऋत्विक् इत्या-दिकांकडून सदा करवावें" असें **लघुहारीत**वचन आहे, असें **पृथ्वीचंद्रोदय** सांगतो. या वचनांतील 'अमावास्यादि-' या आदिपदानें सांवत्सरिक इत्यादि सारें पार्वण समजावें, असें **शूलपाणि** सांगतो. **सुमंतु**—"परदेशगमन इत्यादि कारणांनीं पत्नीरहित अशा ब्राह्मणादिकांस पाकाच्या अभावीं आमश्राद्धाविषयीं अधिकार आहे. शूद्रांना तर विद्वानांनीं सर्वदा आमश्राद्धच सांगितलें आहे." **प्रचेता**—"स्त्रिया, शूद्र, व स्वतः पाक करणारा, यांनीं आणि सर्वांनीं जातकर्मसंस्कारांत सर्वदा पार्वणविधीनें आमश्राद्ध करावें." **विष्णु** व **उशना**—"देशाच्या योगानें व कालाच्या योगानें आपला विनाश झाला असतां, आपत्कालीं, अग्नि नसतां, तीर्थाचेठायीं, प्रवासांत, पत्नीच्या अभावीं, चंद्राच्या व सूर्याच्या ग्रहणांत विशेषेंकरून आमश्राद्ध करावें. सच्छूद्रानेंही ब्राह्मणांस कधीं पक्वान्नाचें भोजन घालूं नये; भोजन घालील तर तो दोषी होईल व त्यास भोजनाचें फळ मिळणार नाहीं." येथें प्रवास, तीर्थ, ग्रहण इत्यादिकांचेठायीं आमश्राद्ध व हिरण्यश्राद्धच होतें. पक्वान्नश्राद्ध तर होतच नाहीं; असें **हेमाद्रि, रत्नावली** इत्यादि ग्रंथकार सांगतात. **अपरार्क, विज्ञानेश्वर** इत्यादिक तर— "पाकाच्या अभावीं ब्राह्मणादिकांना आमश्राद्ध सांगितलें" अशा **सुमंतू**च्या वचनावरून साग्निकांनीं व निरग्निकांनीं प्रवासा-दिकांत सर्वत्र ठिकाणीं पाकाच्या अभावीं आमश्राद्ध वगैरे करावें. पाकाचा संभव असतां अन्नानेंच करावें, असें सांगतात. म्हणूनच पाकश्राद्ध सांगून "अनुपनीतानेंही सर्व कर्मांमध्यें हें ( पाक )श्राद्ध करावें, आणि भार्यारहितानें व प्रवासांत अस-णारानेंही हें पाकश्राद्ध सर्वदा करावें' असें **मत्स्यपुराणांत** निरग्निकाला देखील पाकानें श्राद्ध सांगितलें आहे, असें **शूलपाणि** व **कल्पतरु** हे सांगतात. वचनांतील 'एतत्' या शब्दानें सर्वप्रकारचें श्राद्ध समजावें, असें इतर **ग्रंथकार** सांगतात. "एकोद्दिष्ट तर सर्वदा स्वतः पाकानेंच करावें" हें **लघुहारीतानें** सांगितलेलेंही साग्निकालाच आहे. निरग्निकाला महैकोद्दिष्टही आमानेंच समजावें. शूद्राला तर दशाहांतील पिंड वगैरे आमानेंच समजावे, असें **हलायुध** सांगतो. ज्यांच्या भार्या मृत झाल्यानें अग्नि उच्छिन्न झाला असेल त्यांनीं आमश्राद्धच करावें; कारण, याविषयीं पूर्वी ( यावत्स्याज्जाग्नि० ) हें जमदग्नीचें वचन उक्त आहे. **मरीचि**—"द्विजांना पाकश्राद्धाविषयीं विघ्न प्राप्त असतां आमश्राद्ध सांगितलें आहे. जें श्राद्ध ज्या तिथीस नियमित ( अंतरित झालें असतां लुप्त होतें ) अशा अमावास्यादि श्राद्धाविषयीं हें आमश्राद्ध समजावें. मासिक, सांवत्सरिक यांविषयीं हें आमश्राद्ध समजूं नये." **स्मृतिदर्पणांत**—"सांवत्सरिक, सपिंडीकरण, गयाश्राद्ध आणि महा-लय हीं श्राद्धें आपत्कालींदेखील कधींही आमान्नानें करूं नयेत."

**हेमाद्रौव्यासः** आमंददतुकौंतेयदद्यादामंचतुर्गुणं द्विगुणंत्रिगुणंवापिनत्वेकगुणमर्पयेत् सिद्धान्नेतु-विधिर्यःस्यादामश्राद्धेप्यसौविधिः आवाहनादिसर्वस्यात्पिंडदानंचभारत दद्याद्यद्विजातिभ्यःशृतंवाशृत-

मेवषा तेनाग्नौकरणंकुर्यात्पिंडांस्तेनैवनिर्वपेत् पक्षांतरमाह सएव आमंददद्विकौंतेयतदामंद्विगुणंचरेत् त्रिगुणंचतुर्गुणंवापिनत्वेकगुणमर्पयेत् **स्मृत्यर्थसारे**सममप्युक्तं **षट्त्रिंशन्मते** आमश्राद्धंयदाकुर्यात्पिंडदानंकथंभवेत् गृहपाकात्समुद्धृत्यसक्तुभिःपायसेनवा पिंडान्दद्याद्यथालाभंतिलैःसहविमत्सरः **पृथ्वीचंद्रोदयेव्यासः** आमश्राद्धंयदाकुर्याद्विधिज्ञःश्राद्धदःसदा हस्तेग्नौकरणंकुर्याद्ब्राह्मणस्यविधानतः एतत्साग्नेर्निरग्नेःसदातत्सत्त्वात् यत्तु आमेनपिंडंदद्याच्चेद्विप्रान्पाकेनभोजयेत् पक्वेनकुरुतेपिंडमामान्नंयःप्रयच्छति तावुभौमनुजौप्रोक्तौनरकार्हौनसंशयइति तद्दर्शादिपरं देशाचाराद्व्यवस्थेतियुक्तं **मरीचिः** आवाहनेस्वधाकारेमंत्राऊह्याविसर्जने अन्यकर्मण्यनूह्याःस्युरामश्राद्धविधिःस्मृतः आवाहने हविषेअत्तवइत्यत्रस्वीकर्तवेइत्यूहः स्वधाकारेनमोवःपितरइषेइत्यत्रइषेपदस्थानेआमद्रव्यायेत्यूहः विसर्जनेवाजेवाजेइत्यत्रतृप्ताइतिस्थानेतर्प्स्यंततृप्यतेतिवोहः यद्यपितस्माद्दचंनोहेदितिऋच्यूहोनिषिद्धः तथापिवचनाद्भवति तृप्तिप्रश्नोवगाहश्चजुषप्रश्नोयथासुखं आमश्राद्धेभवेन्नैतदपोशानंचपंचमं अयंचानुवादः खलेवाल्यांछेदनादीनामिवार्थाभावाल्लोपसिद्धेः ।

**हेमाद्रींत व्यास**—"श्राद्धाचे ठायीं आमान्न देऊं द्या, पण तें आमान्न जितकें भोजनाला पाहिजे तितकेंच देऊं नये; तर चौपट, दुप्पट, अथवा तिप्पट द्यावें. पक्वान्नश्राद्धाविषयीं जो विधि सांगितला आहे; तोच विधि आमश्राद्धाविषयीं समजावा. आवाहन इत्यादि सर्व विधि व पिंडदान हें आमश्राद्धांत करावें. ब्राह्मणांस जें कांहीं पक्व किंवा अपक्व ( आम ) अन्न दिलें असेल त्यानेंच अग्नौकरण करावें, व पिंडही त्याच अन्नानें द्यावे." दुसरा पक्ष सांगतो-**तोच ( व्यास )**—"आम देणारा जो त्यानें तें दान दुप्पट, तिप्पट किंवा चौपट करावें. एकपट करूं नये." **स्मृत्यर्थसारांत** समही ( जितकें भोजनास पाहिजे तितकेंही ) आमदान सांगितलें आहे. **षट्त्रिंशन्मतांत**—"जेव्हां आमश्राद्ध करील तेव्हां पिंडदान कसें होईल ? तर घरांत शिजविलेलें अन्न, पीठ किंवा पायस यांतून जें मिळेल तें घेऊन तिलांसहित त्याचे पिंड करून ते द्यावे." **पृथ्वीचंद्रोदयांत व्यास**—"श्राद्धकर्ता जेव्हां आमश्राद्ध करील तेव्हां त्यानें ब्राह्मणाच्या हातावर यथाविधि अग्नौकरण करावें." हें साग्निकाला समजावें. निरग्निकाला सर्वदा ( पक्वान्नश्राद्धांतही ) ब्राह्मणांच्या हातावरच अग्नौकरण आहे. आतां जें "जो पक्वान्नानें ब्राह्मणांना भोजन घालील व आमानें पिंड देईल तो, आणि जो आमान्न ब्राह्मणांना देईल व पक्वान्नानें पिंड करील तो, हे दोन्ही मनुष्य नरकास जाण्यास योग्य आहेत, यांत संशय नाहीं." असें आमान्न ब्राह्मणांस दिल्यावर पक्वान्नपिंड निषेध सांगितला तो दर्श इत्यादि विषयक समजावा. देशाचारावरून व्यवस्था समजावी. हें योग्य आहे. **मरीचि**—"आवाहन, स्वधाकार, आणि विसर्जन इतक्या ठिकाणीं आलेल्या मंत्रांचा ऊह करावा. इतर ठिकाणीं ऊह करूं नये, हा आमश्राद्धविधि समजावा." आवाहनाचे ठिकाणीं 'पितॄन्हविषे अत्तवे' या मंत्रांत 'हविषे स्वीकर्तवे' असा ऊह समजावा. स्वधाकाराचे ठिकाणीं 'नमोवः पितर इषे०' या मंत्रांत 'इषे' या पदाच्या स्थानीं 'आमद्रव्याय' असा ऊह समजावा. विसर्जनाचे ठिकाणीं 'वाजेवाजे०' या मंत्रांत 'तृप्ता' या पदाच्या स्थानीं 'तर्प्स्यंत' किंवा 'तृप्यत' असा ऊह समजावा. जरी 'ऋचेचा ऊह करूं नये' ह्या वचनानें ऋचेचे ठायीं ऊह निषिद्ध आहे तरी, या ठिकाणीं करावा, या वचनानें ऊह होतो. "आमश्राद्धाचे ठायीं 'तृप्ताःस्थ' हा तृप्तिप्रश्न, अन्नांत अंगुष्ठमूलावगाहन, 'जुषध्वं' हा जुषप्रश्न 'यथासुखं' हें वाक्य, आणि आपोशन हीं पांच होत नाहींत." आमश्राद्धांत पक्वान्न नसल्यामुळें ह्या पांचांचा निषेध हा अपूर्व नाहीं, तर सिद्धाचा अनुवाद आहे. कारण, साद्यस्क्रनांवाचा एक याग आहे, त्या यागामध्यें खलेवाली यूप ( पशुबंधनस्तंभ ) सांगितला आहे. खलेवाली म्हणजे शेतकरी लोकांनीं खळ्यांत बैल बांधण्याकरितां पुरलेला जो स्तंभ ती खलेवाली होय. तिच्या ठिकाणीं पशुबंधनादिक यूपाचीं कार्यें सांगितलीं आहेत. तो स्तंभ शेतकऱ्यांनीं तासून वगैरे तयार केलेलाच असतो म्हणून त्या ठिकाणीं छेदनादिक कार्यें कर्तव्य नसल्यामुळें जसा त्यांचा लोप ( अभाव ) सिद्ध होतो, तसा येथें भोजन नसल्यामुळें तृप्त्यादिकांचा अभाव असल्यामुळें तृप्तिप्रश्नादिकांचा लोप सिद्ध झाला आहे.

**धर्मप्रदीपेतु** आमंचतुर्गुणंदद्यादथवाद्विगुणंतथा हेमचाष्टगुणंतद्वदामेहैमेप्यसौविधिः आमेहैमेतथानित्येनांदीश्राद्धेतथैवच व्यतीपातादिकेश्राद्धेनियमान्परिवर्जयेत् गृहपाकात्समुद्धृत्यसक्तुभिःपायसेनवा पिंडदानंप्रकुर्वीतआमेहैमेकृतेसति आमश्राद्धेचवृद्धौचप्रेतश्राद्धेतथैवच विकिरंनैवकुर्वीतमुनिःकात्यायनोब्रवीत् आमश्राद्धमनंगुष्ठमग्नौकरणवर्जितं तृप्तिप्रश्नविहीनंतुकर्तव्यंमानवैर्ध्रुवम् आवाहनाग्नौकरणंविकिरंपात्रपूरणं तृप्तिप्रश्नंनकुर्वीतआमेहैमेकदाचनेत्युक्तं एतच्च आवाहनंभवेत्कार्यमर्घ्यदानंतथैवचेति**हेमाद्रौभविष्यादिविरोधाच्चिंत्यम्** शाखांतरविषयंवास्तु विकिरोप्यामेनेतिहे**माद्रिः** शूद्रस्यतुतत्रैवोक्तम् अग्नौकरणमंत्र-

श्चनमस्कारोविधीयते अग्नयेकव्यवाहनायनमः सोमायपितृमतेनमइत्ययंमंत्रः **मात्स्ये** मंत्रवर्जंहिशूद्रस्यस-र्वमेवविधीयते एवंशूद्रोपिसामान्यंवृद्धिश्राद्धंचसर्वदा नमस्कारेणमंत्रेणकुर्यादामान्नवद्बुधः तच्चपूर्वाह्णेकार्यम् आमश्राद्धंतुपूर्वाह्णेएकोद्दिष्टंचमध्यतः पार्वणंचापराह्णेतुप्रातर्वृद्धिनिमित्तकमिति**हारीतोक्तेः** एतद्द्विजविषयं शूद्रकर्तृकंत्वपराह्णएव मध्याह्नात्परतोयस्तुकुतुपःसमुदाहृतः आमश्राद्धंतुतत्रैवपितॄणांदत्तमक्षयमितिसुमंतू-क्तेरित्यपरार्केहेमाद्रौचोक्तम् ॥

**धर्मप्रदीपांत**—"श्राद्धाचे ठायीं आम द्यावयाचें असतां जितकें अन्न भोजनाला लागतें त्याच्या चौपट आमान्न द्यावें, किंवा द्विगुणित द्यावें. हेम ( द्रव्य ) द्यावयाचें असतां तें आठपट द्यावें. आमश्राद्धांत जसा विधि तसा हेमश्राद्धांतही हा सर्व विधि समजावा. आमश्राद्ध, हेमश्राद्ध, नित्यश्राद्ध, नांदीश्राद्ध आणि व्यतीपातादिश्राद्ध यांचे ठिकाणीं नियम वर्ज्य करावे. आमश्राद्ध व हेमश्राद्ध केलें असतां घरांत शिजविलेल्या अन्नानें, पिठानें किंवा पायसानें पिंडप्रदान करावें. आमश्राद्धांत, वृद्धि-श्राद्धांत आणि प्रेतश्राद्धांत, विकिर देऊं नये, असें **कात्यायन**मुनि सांगता झाला. अन्नांत अंगुष्ठनिवेशन, अग्नौकरण, तृप्तिप्रश्न यांनीं विवर्जित असें आमश्राद्ध करावें. आवाहन, अग्नौकरण, विकिर, अर्घ्यपात्रपूरण, आणि तृप्तिप्रश्न हीं आम-श्राद्धांत व हेमश्राद्धांत करूं नयेत" असें ( धर्मप्रदीपांत ) सांगितलें आहे. "आवाहन तसेंच अर्घ्यदान करावें" असें **हेमा-द्रींत भविष्यपुराणादि**वचन आहे. त्याच्याशीं विरोध येतो म्हणून हें धर्मप्रदीपकारानें सांगितलेलें चिंत्य ( अनादरणीय ) आहे. अथवा इतर शाखाविषयक असो. आमश्राद्धांत विकिरही आमानें द्यावा, असें **हेमाद्रि** सांगतो. शूद्राला तर तेथेंच सांगितलें आहे. "शूद्राला अग्नौकरणाचा मंत्र नमस्कार सांगितला आहे" तो असा—'अग्नये कव्यवाहनाय नमः, सोमाय पि-तृमते नमः' हा मंत्र समजावा. **मात्स्यांत**—"शूद्राला मंत्रवर्जित सर्व श्राद्धविधि सांगितला आहे. इतरांप्रमाणें शूद्रानें देखील सामान्यश्राद्ध व वृद्धिश्राद्ध नमस्कारमंत्रानें आमश्राद्धाप्रमाणें सर्वदा करावें" तें आमश्राद्ध पूर्वाह्णीं करावें. कारण, "आमश्राद्ध पूर्वाह्णीं, एकोद्दिष्ट मध्याह्नीं, पार्वणश्राद्ध अपराह्णीं आणि वृद्धिनिमित्तक ( नांदीश्राद्ध ) प्रातःकालीं करावें," असें **हारीतवचन** आहे. हें द्विजांविषयीं समजावें. शूद्रानें करावयाचें श्राद्ध तर अपराह्णींच करावें. कारण, "मध्याह्नाच्या पुढें जो कुतुप मुहूर्त सांगितला आहे, त्या मुहूर्ताचेठायीं आमश्राद्ध करावें. त्या वेळीं पितरांस दिलेलें आमान्न अक्षय होतें" असें **सुमंतुवचन** आहे, असें **अपरार्कांत** व **हेमाद्रींत** उक्त आहे.

तदभावेहेमश्राद्धमाह **हेमाद्रौमरीचिः** आमान्नस्याप्यभावेतुश्राद्धंकुर्वीतबुद्धिमान् धान्याच्चतुर्गुणेनै-वहिरण्येनसुरोचिषा **धर्मः** आमंतुद्विगुणंप्रोक्तंहेमतद्वच्चतुर्गुणं **स्मृत्यर्थसारे** हिरण्यमष्टगुणंचतुर्गुणंसमंवा दद्यात् **हेमाद्रौभविष्ये** अन्नाभावेद्विजाभावेप्रवासेपुत्रजन्मनि हेमश्राद्धंसंग्रहेचतथास्त्रीशूद्रयोरपि **षट्-त्रिंशन्मते** तुर्यपादे वर्जयित्वाक्षयेहनीतिपाठः यस्यभार्यारजस्वलेतिव्यासपाठः पुत्रोत्पत्तौतुहेमनियम-माह **संवर्तः** पुत्रजन्मनिकुर्वीतश्राद्धंहेम्नैवबुद्धिमान् नपक्केननचामेनकल्याणान्यभिकामयन् **भविष्ये** गृहपाकात्समुद्धृत्यसक्तुभिःपायसेनवा पिंडदानंप्रकुर्वीतहेमश्राद्धेकृतेसति शूद्रस्तुगृहपाकेनपिंडान्निर्वपेत्तथा सक्तुमूलंफलंतस्यपायसंवाभवेत्स्मृतं हेमश्राद्धेपिंडदानंनेति**दिवोदासः स्मृत्यर्थसारे**तुविकल्पउक्तः तदा-शयंनविद्मः **षट्त्रिंशन्मते** नामंत्रणाग्नौकरणेविकिरोनैवदीयते तृप्तिप्रश्नोपिनैवात्रकर्तव्यःकेनचित्क्वचित् अत्र**मरीचिना** आमाभावेहेमविधानेनस्थानापत्त्याधर्मप्राप्तिःपूर्ववन्मंत्रोहःपूर्वाह्णकालताचज्ञेयेतिदिक् पूर्वो-क्त**धर्मप्रदीपोक्त**श्च ॥

## आमाच्या अभावीं हेमश्राद्ध सांगतो—

**हेमाद्रींत मरीचि**—"आमान्नाचा अभाव असेल तर धान्याच्या किंमतीच्या चौपट अशा उत्तम सुवर्णानें श्राद्ध करावें." **धर्म**—"आम दुप्पट व हेम चौपट सांगितलें आहे." **स्मृत्यर्थसारांत**—"सुवर्ण आठपट, चौपट, किंवा समान द्यावें." **हेमाद्रींत भविष्यांत**—"अन्नाच्या अभावीं, ब्राह्मणांच्या अभावीं, प्रवासांत, पुत्रजन्मकालीं, ग्रहणांत, इतक्या ठिकाणीं हेमश्राद्ध करावें. तसेंच स्त्रिया व शूद्र यांनाही हेमश्राद्ध सांगितलें आहे." या वचनांत 'तथा स्त्रीशूद्रयोरपि' या चवथ्या पादांत 'वर्जयित्वा क्षयेहनि' म्हणजे मृतदिवस वर्ज्य करून, असा **षट्त्रिंशन्मत**ग्रंथांत पाठ आहे. याच ठिकाणीं 'यस्य भार्या रजस्वला' म्हणजे ज्याची स्त्री रजस्वला आहे, असा **व्यासाचा** पाठ आहे. पुत्रजन्मकालीं हेमश्राद्धाचा नियम सांगतो **संवर्त**—"पुत्रजन्मकालीं हेमानेंच श्राद्ध करावें, कल्याण इच्छिणारानें पक्वान्नानें किंवा आमान्नानें श्राद्ध करूं नये." **भविष्यपुराणांत**—"हेमश्राद्ध केलें असतां घरांत शिजविलेल्या अन्नानें, पिठानें, किंवा पायसानें पिंडप्रदान करावें,

शूद्रानें तर शिजविलेल्या अन्नानें पिंडप्रदान करूं नये. त्या शूद्रानें पीठ, मुळें, फळें अथवा पायस यांचे पिंड करावे." हेमश्राद्धांत पिंडदान नाहीं, असें **दिवोदास** सांगतो. **स्मृत्यर्थसारांत** तर पिंडांचा विकल्प सांगितला आहे, त्याचा आशय समजत नाहीं. **षट्त्रिंशन्मतांत**—"हेमश्राद्धांत आमंत्रण ( क्षण ), अग्नौकरण, विकिर, आणि तृप्तिप्रश्न हे कोणीही करूं नयेत." **मरीचीनें** आमाच्या अभावीं हेमाचें विधान केल्यामुळें आमस्थानीं हेम प्राप्त झाल्यानें त्या आमश्राद्धाचे धर्म हेमश्राद्धांत प्राप्त झाल्यामुळें पूर्वीप्रमाणें ( आमश्राद्धाप्रमाणें ) या हेमश्राद्धांत मंत्रांचा ऊह आणि पूर्वाह्णकाल समजावा. ही दिशा दाखविली आहे. पूर्वी सांगितलेल्या धर्मप्रदीपाच्या वचनावरूनही आमश्राद्धाचे धर्म हेमश्राद्धांत समजावे.

**व्यासः** हिरण्यमामंश्राद्धीयंलब्धंयत्क्षत्रियादितः यथेष्टंविनियोज्यंस्याद्भुंजीयाद्ब्राह्मणात्स्वयं विप्रलब्धंभुंजीयात् क्षत्रियादिलब्धेतुयथेष्टविनियोगः तेनापिश्राद्धवैश्वदेवादिनकार्यं देवोद्देशेनत्यक्तस्यदेवतांतरायत्यागायोगादितिदेवयाज्ञिकः शूद्रलब्धेतूक्तंतत्रैवषट्त्रिंशन्मते आमंशूद्रस्ययत्किंचिच्छ्राद्धिकंप्रतिगृह्यते तत्सर्वंभोजनायालंनित्यनैमित्तिकेनचेति **शुद्धितत्त्वेंगिराः** शूद्रवेश्मनिविप्रेणक्षीरंवायदिवादधि निवृत्तेननभोक्तव्यंशूद्रान्नंतदपिस्मृतं शूद्राद्विप्रगृहेष्वन्नंप्रविष्टंतुसदाशुचि **पराशरः** तावद्भवतिशूद्रान्नंयावन्नस्पृशतिद्विजः द्विजातिकरसंस्पृष्टंसर्वंतन्नविरुध्यते **विष्णुपुराणे** संप्रोक्षयित्वागृह्णीयाच्छूद्रान्नंगृहमागतं **अंगिराः** पात्रांतरगतंग्राह्यंदुग्धंस्वगृहमागतं ।

**व्यास**—"क्षत्रिय, वैश्य यांपासून श्राद्धसंबंधीं जें द्रव्य व आमान्न प्राप्त झालें असेल त्याचा यथेच्छ विनियोग करावा. आणि ब्राह्मणापासून जें श्राद्धसंबंधी प्राप्त असेल तें स्वतः भक्षण करावें." ब्राह्मणापासून लब्ध असेल तें खावें, आणि क्षत्रियादिकांपासून लब्धाचा यथेच्छ विनियोग करावा, परंतु त्यानेंही श्राद्ध, वैश्वदेव इत्यादि करूं नये. कारण, देवतेच्या उद्देशानें दिलेल्याचा इतर देवतेला त्याग होत नाहीं, असें **देवयाज्ञिक** सांगतो. शूद्रापासून प्राप्त असतां तेथेंच **षट्त्रिंशन्मतांत** सांगतो—"शूद्रापासून जें कांहीं श्राद्धसंबंधी आमान्न ग्रहण करितो तें भोजनाविषयीं उपयोगांत आणावें, नित्यकर्मांत व नैमित्तिकांत त्याचा उपयोग करूं नये." **शुद्धितत्त्वांत अंगिरा**—"शूद्राच्या घरीं ब्राह्मणानें कर्म करून निघाल्यावर दूध किंवा दहीं भक्षण करूं नये. कारण, तेंही शूद्रान्नच म्हटलें आहे. शूद्रापासून ब्राह्मणाच्या घरीं आणलेलें अन्न सर्वदा शुद्ध आहे." **पराशर**—"जोंपर्यंत अन्नाला ब्राह्मणानें स्पर्श केला नाहीं तोंपर्यंत तें शूद्रान्न समजावें. ब्राह्मणाच्या हाताचा स्पर्श झाल्यावर सारें तें अन्न भक्षणाला विरुद्ध ( निषिद्ध ) होत नाहीं." **विष्णुपुराणांत**—"घरीं प्राप्त झालेलें शूद्रान्न प्रोक्षण करून ग्रहण करावें." **अंगिरा**—"शूद्रानें ब्राह्मणाच्या घरीं आणलेलें दूध ब्राह्मणानें दुसऱ्या पात्रांतून ग्रहण करावें."

सपिंडश्राद्धाशक्तावाह**हेमाद्रौसंवर्तः** समग्रंयस्तुशक्नोतिकर्तुंनैवेहपार्वणं अपिसंकल्पविधिनाकालेतस्य विधीयते पात्रेभोज्यस्यचान्नस्यत्यागःसंकल्पउच्यते **व्यासः** सांकल्पंतुयदाकुर्यान्नकुर्यात्पात्रपूरणं नावाहनाग्नौकरणेपिंडांश्चैवनदापयेत् पात्रमर्घ्यस्य समंत्रकावाहनस्यनिषेधः तूष्णींतुभवत्येवेति**हेमाद्रिः स्मृत्यर्थसारे** विकिरंतुनदातव्यमितितृतीयपादेपाठः **स्मृत्यंतरे** त्यजेदावाहनंचार्घ्यमग्नौकरणमेवच पिंडांश्चविकिराक्षय्येश्राद्धेसांकल्पसंज्ञके **हेमाद्रौवृद्धशातातपस्तु** पिंडनिर्वापरहितंयत्तुश्राद्धंविधीयते स्वधावाचनलोपोत्रविकिरस्तुनलुप्यतइत्याह **पृथ्वीचंद्रोदयेवसिष्ठः** आवाहनंस्वधाशब्दंपिण्डाग्नौकरणंतथा विकिरंपिंडदानंचसांकल्पेषड्विवर्जयेत् विकिरेविकल्पः **स्मृत्यंतरे** अंगानिपितृयज्ञस्ययदाकर्तुंनशक्नुयात् सतदावाचयेद्विप्रान्संकल्पात्सिद्धिरस्त्विति **छागलेयः** पिंडोयत्रनिवर्तेतमघादिषुकथंचन सांकल्पंतुतदाकार्यंनियमाद्ब्रह्मवादिभिः **कार्ष्णाजिनिः** मौंजीबंधाद्वत्सरार्धंवत्सरंपाणिपीडनात् पिंडान्सपिंडानोदद्युःप्रेतपिंडंविनात्रतु अस्यापवादःपित्रोराब्दिकादौपूर्वमुक्तः त्यक्ताग्नेरपिसांकल्पमुक्तंषट्त्रिंशन्मते अनग्निकोयदाविप्रउत्पन्नाग्निस्तथैवच तथावृद्धिषुसर्वासुसंकल्पश्राद्धमाचरेत् ।

## सपिंडक श्राद्धाविषयीं अशक्ति असतां सांगतो—

**हेमाद्रींत संवर्त**—"जो मनुष्य श्राद्धदिवशीं समग्र श्राद्ध करण्याविषयीं समर्थ होत नाहीं, त्यानें त्या कालीं संकल्पविधीनें श्राद्ध करावें. योग्य ब्राह्मणाला भोजन करण्याचें अन्न देणें, याला संकल्प असें म्हटलें आहे." **व्यास**—"जेव्हां मनुष्य संकल्पश्राद्ध करील तेव्हां अर्घ्यपात्रपूरण, आवाहन, अग्नौकरण, आणि पिंडदान हीं करूं नयेत." समंत्रक आवाहनाचा निषेध, मंत्ररहित आवाहन करावें, असें **हेमाद्रि** सांगतो. वरील वचनांत 'नावाहनाग्नौकरणे' या तिसऱ्या पादांत 'विकिरंतु

न दातव्यं' असा स्मृत्यर्थसारांत पाठ आहे. **स्मृत्यंतरांत**—''सांकल्पिकश्राद्धाचे ठायीं आवाहन, अर्घ्य, अग्नौकरण, पिंड-प्रदान, विकिर, अक्षय्योदक हीं वर्ज्य करावीं.'' **हेमाद्रींत वृद्धशातातप** तर—पिंडप्रदानरहित जें श्राद्ध सांगितलें आहे त्या ठिकाणीं स्वधाशब्दोच्चाराचा ( स्वधोच्यतां, याचा ) लोप ( अभाव ) होतो. विकिराचा लोप होत नाहीं'' असें सांगतो. **पृथ्वीचंद्रोदयांत वसिष्ठ**—''आवाहन, स्वधाशब्द, अर्घ्य, अग्नौकरण, विकिर आणि पिंडदान हीं सहा सांकल्पिकश्राद्धांत वर्ज्य करावीं.'' विकिराविषयीं विकल्प समजावा. **स्मृत्यंतरांत**—''जेव्हां श्राद्धाचीं अंगें करण्याविषयीं शक्ति नसेल तेव्हां 'संकल्पात्सिद्धिरस्तु' असें ब्राह्मणांकडून म्हणवावें.'' **छागलेय**—''जेथें मघादिश्राद्धांत पिंडांची निवृत्ति ( अभाव ) असेल तेथें ब्राह्मणांनीं नियमानें सांकल्पिकश्राद्ध करावें.'' **कार्ष्णाजिनि**—मौंजीबंधापासून सहा महिनेपर्यंत आणि विवाहापासून एक वर्षपर्यंत सपिंडांनीं श्राद्धांत पिंड देऊं नयेत. कोणी मृत असेल तर त्याच्या प्रेतपिंडाविषयीं निषेध नाहीं.'' या वचनाचा अपवाद, मातापितरांच्या वार्षिकादिश्राद्धांत पिंड द्यावे असें पूर्वी सांगितलें आहे. ज्याचा अग्नि नसेल त्यालाही सांकल्पिक-श्राद्ध **षट्त्रिंशन्मतांत** सांगितलें आहे तें असें—''अनग्निकानें व ज्याचा अग्नि उच्छिन्न असेल त्यानें, तसेंच सर्व प्रकारच्या वृद्धींत ( विवाहादिकांत ) सांकल्पिक श्राद्ध करावें.''

अशक्तौ**पृथ्वीचंद्रोदयेबृहन्नारदीये** द्रव्याभावेद्विजाभावेअन्नमात्रंतुपाचयेत् पैतृकेनतुसूक्तेनहोमं कुर्याद्विचक्षणः **देवलः** पिंडमात्रंप्रदातव्यमभावेद्रव्यविप्रयोः श्राद्धीयाहनिसंप्राप्तेभवेन्निरशनोपिवा **वृद्धवसिष्ठः** किंचिद्दद्यादशक्तस्तुउदकुंभादिकंद्विजे तृणानिवागवेदद्यात्पिंडान्वाप्यथनिर्वपेत् तिलदर्भैःपितॄन्वापितर्पयेत्स्नानपूर्वकं **हेमाद्रौभविष्ये** अग्निनावादहेत्कक्षंश्राद्धकालेसमागते तस्मिन्वोपवसेदह्निजपेद्वाश्राद्धसंहितां श्राद्धसंहिता समंत्रश्राद्धसंकल्पः **विष्णुवराहपुराणयोः** असमर्थोन्नदानस्यधान्यंमांसं स्वशक्तितः प्रदास्यतितिलान्वापिस्वल्पांवापिचदक्षिणां सर्वाभावेवनंगत्वाकक्षामूलप्रदर्शकः सूर्यादिलोकपालानामिदमुच्चैःपठिष्यति नमेस्तिवित्तंनधनंनचान्नंश्राद्धोपयोगिस्वपितॄन्नतोस्मि तृप्यंतुभक्त्यापितरोमयैतौभुजौकृतौवर्त्मनिमारुतस्य इत्येतत्पितृभिर्गीतंभावाभावप्रयोजनं यःकरोतिकृतंतेनश्राद्धंभवतिभारत **प्रभासखंडे** गत्वारण्यममानुष्यमूर्ध्वबाहुर्विरौत्यदः निरन्नोनिर्धनोदेवाःपितरोमानृणंकृथाः नमेस्तिवित्तंनधनंनभार्याश्राद्धंकथंवःपितरःकरोमि वनंप्रविश्येहतुतन्मयोच्चैर्भुजौकृतौवर्त्मनिमारुतस्य श्राद्धर्णमेतद्भवतांप्रदत्तं मह्यंदयध्वंपितृदेवताद्याः आख्यायचोत्क्षिप्यभुजौततोवैदिवाचरात्रिंसमुपोष्यतिष्ठेत् भवेत्सवैतेनकृतेनतेपामृणेनमुक्तःपितृदेवतानाम इत्यनुकल्पाः ।

शक्ति नसतां **पृथ्वीचंद्रोदयांत बृहन्नारदीयांत** सांगतो-''द्रव्याच्या अभावीं व ब्राह्मणांच्या अभावीं अन्नमात्र शिजवावें आणि पितृसूक्तानें होम करावा.' **देवल**—''श्राद्धदिवस प्राप्त झाला असतां द्रव्याच्या व ब्राह्मणाच्या अभावीं पिंड मात्र द्यावे, अथवा उपवास करावा.'' **वृद्धवसिष्ठ**—''श्राद्ध करण्याची शक्ति नसेल त्यानें स्नान करून कांहीं उदकुंभ वगैरे ब्राह्मणास द्यावा; अथवा गाईला तृण द्यावें. किंवा पितरांना पिंड द्यावे; किंवा तिळांनीं व दर्भांनीं पितरांचें तर्पण करावें.'' **हेमाद्रींत भविष्यांत**—''अथवा श्राद्धकाल प्राप्त असतां गवत रचून त्याला आग लावून तें जाळून टाकावें. किंवा त्या दिवशीं उपवास करावा. अथवा समंत्रक श्राद्धसंकल्पाचा जप करावा.'' **विष्णुवराहपुराणांत**—''अन्नदानाची शक्ति नसेल त्यानें आपल्या शक्तीप्रमाणें धान्य व मांस द्यावें, किंवा तिळ द्यावे अथवा अल्प दक्षिणा द्यावी. सर्वांच्या अभावीं अरण्यांत जाऊन सूर्यादिक लोकपालांना कांखा वर करून दाखवून हा ( पुढील ) श्लोक मोठ्यानें म्हणावा. **'न मेस्ति वित्तं न धनं न चान्नं श्राद्धोपयोगि स्वपितॄन्नतोस्मि । तृप्यंतु भक्त्या पितरो मयैतौ भुजौ कृतौ वर्त्मनि मारुतस्य'** याप्रमाणें हें पूर्वोक्त, द्रव्य असल्याचें व नसल्याचें प्रयोजन पितरांनीं सांगितलें तें जो करितो त्यानें श्राद्ध केलें असें होतें.'' **प्रभासखंडांत**—''मनुष्यरहित अशा अरण्यांत जाऊन बाहु वर करून असें रडावें कीं 'हे देव पितर हो! मी अन्नरहित निर्धन आहें, मला अनृणी करा' **'न मेस्ति वित्तं न धनं न भार्या श्राद्धं कथं वः पितरः करोमि । वनं प्रविश्येहतु तन्मयोच्चैर्भुजौ कृतौ वर्त्मनि मारुतस्य ॥ श्राद्धर्णमेतत् भवतां प्रदत्तं मह्यं दयध्वं पितृदेवताद्याः'** याप्रमाणें पठण करून भुजा वर करून तदनंतर तो दिवस व रात्र उपोषण करून रहावें. असें केल्यानें तो मनुष्य पितृदेवतांच्या ऋणापासून मुक्त होईल.'' याप्रमाणें श्राद्धाचे अनुकल्प समजावे.

**अथश्राद्धभोजनेप्रायश्चित्तं** दर्शेषट्प्राणायामाः वृद्धौत्रयः संस्कारेषुजातकर्मादिचूडांतेषुसांतपनं आद्येचांद्रंवा अन्यसंस्कारेषूपवासः सीमंतेचांद्रमितिविज्ञानेश्वरः आपदिनवश्राद्धैकादशाहेषुभोजनेषु

कायः द्वादशाहेऊनमासेचपादोनः द्विमासेत्रिपक्षेऊनषष्ठोनाब्दयोश्चार्धकृच्छ्रः[1] त्रिमासाद्याब्दिकांतेषुसपिंडनेचपादकृच्छ्रः उपवासोवा गुरुद्रव्यार्थभोजनेर्धं जपशीलेतदर्धं अनापदितूनमासांतेषुचांद्रंकायंवा द्विमासादौपादोनं त्रिमासादावर्धकायः आब्दिकेपादोनकायः पुनराब्दिकेएकाहः क्षत्रियादिश्राद्धेपुद्वित्रिचतुर्गुणानिज्ञेयानि चांडालसर्पश्वादिहतपतितक्लीबादिनवश्राद्धेचांद्रं आद्यमासिकांतेचांद्रंपराकश्च द्वादशाहादौपराकः द्विमासादावतिकृच्छ्रः त्रिमासादौकायः आब्दिकेपादः अभ्यासेसर्वंद्विगुणं आमहेमसंकल्पश्राद्धेपुतत्तदर्धानि यतिर्ब्रह्मचारीचोक्तप्रायश्चित्तंकृत्वात्रीनुपवासान्प्राणायामान्घृताशनंचाधिकंकृत्वाव्रतशेषंसमापयेत् अनापदिद्विगुणंदर्शादौदशगायत्रीमंत्रिताआपःपिबेत् षट्प्राणायामावा संस्कारेषुचौलेकृच्छ्रः सीमंतेचांद्रं अन्येषूपवासइतिदिक् अत्रमाधवमिताक्षरादौक्वचिद्विरोधोविषयभेदात्परिहार्यः एकादशाहेचांद्रंपुनःसंस्कारश्चेतिप्रायश्चित्तकांडे **हेमाद्रिः यत्तूशनाः** दशकृत्वःपिबेदापोगायत्र्याश्राद्धभुग्द्विजइतितदनुक्तप्रायश्चित्तश्राद्धपरमितिविज्ञानेश्वरः।

## आतां श्राद्धभोजनाविषयीं प्रायश्चित्त सांगतो—

दर्शश्राद्धाचे ठायीं भोजन केलें असतां सहा प्राणायाम करावे. वृद्धिश्राद्धांत भोजनीं तीन प्राणायाम. जातकर्मापासून चौलापर्यंत संस्कारांचे ठायीं भोजन केलें असतां सांतपनकृच्छ्र करावें. अथवा पहिल्या (जातकर्म) संस्कारांत चांद्रायण करावें. इतर संस्कारांचे ठायीं भोजनीं उपवास करावा. सीमंतसंस्काराचे ठायीं भोजनीं चांद्रायण असें **विज्ञानेश्वर** सांगतो. आपत्कालीं नवश्राद्ध व एकादशाहश्राद्ध यांचे ठायीं भोजनीं प्राजापत्यकृच्छ्र करावें. द्वादशाह व ऊनमासिक यांचे ठायीं भोजनीं पादन्यूनप्राजापत्यकृच्छ्र. द्विमासिक, त्रैपक्षिक, ऊनषण्मासिक आणि ऊनाब्दिक यांचे ठायीं अर्धकृच्छ्र. त्रैमासिकापासून आब्दिकापर्यंत श्राद्धांत व सपिंडीकरणांत भोजनीं पादकृच्छ्र किंवा उपवास करावा. गुरुला द्रव्य देण्यासाठीं भोजन केलें असतां अर्धें प्रायश्चित्त समजावें. नेहमीं जप करणाऱ्या ब्राह्मणास चतुर्थांश प्रायश्चित्त. आपत्ति नसतां ऊनमासिकापर्यंत श्राद्धांत भोजन केलें असतां चांद्रायण किंवा प्राजापत्य कृच्छ्र. द्विमासिक इत्यादिश्राद्धांत भोजनीं पादन्यून चांद्रायण किंवा प्राजापत्य. त्रैमासिकादिकांत अर्धप्राजापत्य. आब्दिकांत पादन्यून प्राजापत्य. अधिकमासप्रसंगीं पुनराब्दिक सांगितलें तेथें भोजनीं एकाह ( उपवास ). क्षत्रिय, वैश्य इत्यादिकांच्या श्राद्धांत हींच प्रायश्चित्तें द्विगुणित, त्रिगुणित, चतुर्गुणित अशीं समजावीं. चांडाल, सर्प, कुत्रा इत्यादिकांनीं मारलेल्याच्या नवश्राद्धांत आणि पतित, नपुंसक इत्यादिकांच्या नवश्राद्धांत भोजनीं चांद्रायण. यांच्या आद्यमासिकापर्यंत श्राद्धांत भोजनीं चांद्रायण व पराक. द्वादशाहादिश्राद्धांत पराक. द्विमासिक इत्यादिकांत अतिकृच्छ्र. त्रिमासिक इत्यादिकांत प्राजापत्य. आब्दिकांत पादकृच्छ्र. वारंवार भोजन केलें असतां सारें प्रायश्चित्त द्विगुणित समजावें. आमश्राद्ध, हेमश्राद्ध, सांकल्पिकश्राद्ध यांचे ठायीं त्याच्या त्याच्या निम्मे प्रायश्चित्तें समजावीं. संन्याशी व ब्रह्मचारी यानें श्राद्धीं भोजन केलें असतां वर सांगितलेलें प्रायश्चित्त करून तीन उपवास व प्राणायाम आणि घृतप्राशन अधिक करून शेष राहिलेलें व्रत समाप्त करावें. आपत्काल नसतां श्राद्धीं भोजन करील तर द्विगुणित प्रायश्चित्त समजावें. दर्शादिश्राद्धांत दशगायत्रींनीं अभिमंत्रण केलेलें उदकप्राशन करावें. अथवा सहा प्राणायाम करावे. संस्कारांचे ठायीं चौलांत कृच्छ्र-सीमंतांत चांद्रायण. इतर संस्कारांत उपवास ही दिशा समजावी. ह्या वर सांगितलेल्या प्रायश्चित्तांत क्वचित् स्थलीं माधव, मिताक्षरा इत्यादि ग्रंथांत विरोध येतो त्याचा परिहार विषयभेदानें करावा. एकादशाहश्राद्धांत भोजन केलें असतां चांद्रायण आणि पुनःसंस्कार करावा, असें प्रायश्चित्तकांडांत **हेमाद्रि** सांगतो. आतां जें **उशना** सांगतो कीं, "श्राद्धभोक्त्या ब्राह्मणानें गायत्रीनें दहा वेळां उदक अभिमंत्रण करून प्राशन करावें" असें तें, ज्या श्राद्धाविषयीं प्रायश्चित्त उक्त नाहीं तद्विषयक समजावें, असें **विज्ञानेश्वर** सांगतो.

**अथक्षयाहश्राद्धं** तत्स्वरूपमाह**हेमाद्रौव्यासः** मासपक्षतिथिस्पष्टेयोयस्मिन्म्रियतेहनि प्रत्यब्दंतुतथाभूतंक्षयाहंतस्यतंविदुः **नारदीये** पारणेमरणेनृणांतिथिस्तात्कालिकीस्मृता अत्रचांद्रमानंज्ञेयं आब्दिकेपितृकार्येचचांद्रोमासःप्रशस्यतइति**गर्गोक्तेः** मलमासमृतस्यतुसौरं मलमासमृतानांतुसौरंमानंसमाश्रयेदिति**हेमाद्रावुक्तेः** एतन्मृतमासस्यैवाधिक्येज्ञेयं **ब्राह्मे** प्रतिसंवत्सरंकार्यंमातापित्रोर्मृतेहनि पितृव्यस्याप्यपुत्रस्यभ्रातुर्ज्येष्ठस्यचैवहि अपुत्रस्येतिभ्रात्राप्यन्वयः ज्येष्ठस्येतिकनिष्ठस्यानावश्यकत्वार्थं **मदनरत्ने**-

---

१ कृच्छ्र, चांद्रायण इत्यादिकांचीं लक्षणें ग्रंथाच्या शेवटीं सांगूं.

**भविष्ये** सर्वेषामेवश्राद्धानांश्रेष्ठंसांवत्सरंमतम् तथा भोजकोयस्तुवैश्राद्धंनकरोतिखगाधिप मातापितृभ्यांसततंवर्षेवर्षेमृतेहनि सयातिनरकंघोरंतामिस्रंनामनामतः तच्च नानास्मृतिष्वेकोद्दिष्टंपार्वणंचोक्तं आद्यमाह**यमः** सपिंडीकरणादूर्ध्वंप्रतिसंवत्सरंसुतैः मात्रापित्रोःपृथक्कार्यमेकोद्दिष्टंमृतेहनि **व्यासः** एकोद्दिष्टंतुकर्तव्यंपित्रोश्चैवमृतेहनि एकोद्दिष्टंपरित्यज्यपार्वणंकुरुतेनरः अकृतंतद्विजानीयाद्भवेच्चपितृघातकः अंत्यमाह**शातातपः** सपिंडीकरणंकृत्वाकुर्यात्पार्वणवत्सदा प्रतिसंवत्सरंश्राद्धंछागलेनोदितोविधिः यःसपिंडीकृतंप्रेतंपृथक्पिंडेनियोजयेत् विधिघ्नस्तेनभवतिपितृहाचोपजायते अत्रौरसक्षेत्रजयोःपार्वणंदत्तकादीनामेकोद्दिष्टमित्येकःपक्षः साग्नेःपार्वणंनिरग्नेरेकोद्दिष्टमित्यपरः तद्दूषणं**मिताक्षरादौ**ज्ञेयं **कल्पतरुस्तु**साग्न्योरौरसक्षेत्रजयोः पार्वणं निरग्निकयोस्त्वेकोद्दिष्टमित्याह **अपरार्केप्येवं** दत्तकादयोदशपुत्रास्तुसाग्नयोनिरग्नयश्चैकोद्दिष्टमेवकुर्युः प्रत्यब्दंपार्वणेनैवविधिनाक्षेत्रजौरसौ कुर्यातामितरेकुर्युरेकोद्दिष्टंसुतादशेति **जातूकर्ण्योक्तेः** यदातुदत्तकस्यपितादर्शेमहालयेवामृतस्तत्रपार्वणैकोद्दिष्टयोर्विकल्पः वस्तुतस्तुसर्वेषांपार्वणैकोद्दिष्टयोर्व्रीहियववद्विकल्पः सचदेशाचारादव्यवस्थितइतिसर्वनिबंधसिद्धांतः अतएव**पृथ्वीचंद्रोदयेवृद्धपराशरः** मातापित्रोःपृथक्कार्यमेकोद्दिष्टंमृतेहनीत्युक्त्वाह देशधर्मंसमाश्रित्यवंशधर्मंतथापरे सूरयःश्राद्धमिच्छंतिपार्वणंचक्षयान्ह्यपीति तच्चकेवलपितॄणां नसपत्नीकानामिति**हेमाद्रिः** अत्रमातामहानकार्याः कर्पूसमन्वितंमुक्त्वातथाद्यंश्राद्धषोडशं प्रत्याब्दिकंचशेषेषुपिंडाःस्युःषडितिस्थितिरिति**कात्यायनोक्तेः** कर्पूसमन्वितंसपिंडनं यैरेकोद्दिष्टंक्रियतेतेषामपिक्वचिन्पार्वणमेव अमावास्यांक्षयोयस्यप्रेतपक्षेथवापुनः पार्वणंतस्यकर्तव्यंनैकोद्दिष्टंकदाचनेति **शंखोक्तेः** ।

## आतां क्षयाहश्राद्ध ( सांवत्सरिक ) सांगतों—

क्षयाहाचें स्वरूप सांगतो **हेमाद्रींत व्यास**—"मास, पक्ष, तिथि यांनीं स्पष्ट केलेल्या ज्या दिवशीं जो मनुष्य मृत होतो त्या मनुष्याचा प्रतिवर्षीं तसा मास, पक्ष, तिथि यांनीं स्पष्ट केलेला तो दिवस क्षयाह, असें सांगतात." **नारदीयांत**—"मनुष्यांच्या उपवासाच्या पारणांविषयीं आणि मरणाविषयीं तिथि घ्यावयाची ती त्या कालीं असलेली समजावी." येथें चांद्रमान समजावें. कारण, "सांवत्सरिक पितृकार्याचे ठायीं चांद्रमास प्रशस्त आहे" असें **गर्ग**वचन आहे. मलमासांत मृत झालेल्याचें सौरमान समजावें. कारण, "मलमासांत मृताचें सौरमान ग्रहण करावें" असें **हेमाद्रींत** वचन आहे. हें मान ज्या मासांत मृत असेल तो अधिक असतां समजावें. **ब्राह्मांत**—"प्रतिवर्षीं मातापितरांच्या मृतदिवशीं श्राद्ध करावें. पुत्ररहित अशा पितृव्याचें ( चुलत्याचें ) व पुत्ररहित ज्येष्ठभ्रात्याचेंही प्रतिवर्षीं श्राद्ध करावें." या वचनांत ज्येष्ठ भ्रात्याचें असें सांगितल्यावरून कनिष्ठाचें श्राद्ध अवश्यक नाहीं, असें सूचित होतें. **मदनरत्नांत भविष्यांत**—"सर्वश्राद्धांमध्यें सांवत्सरिक श्राद्ध श्रेष्ठ सांगितलें आहे. तसेंच भोजन करणारा जो मनुष्य मातापितरांचें प्रतिवर्षीं मृतदिवशीं श्राद्ध करीत नाहीं, तो तामिस्रनांवाच्या भयंकर नरकास जातो." तें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध अनेक स्मृतींमध्यें **एकोद्दिष्ट** आणि **पार्वण** असें दोन प्रकारचें सांगितलें आहे. पहिलें ( एकोद्दिष्ट ) सांगतो **यम**—"पुत्रानें सपिंडीकरणानंतर प्रतिवर्षीं मृतदिवशीं मातापितरांचें वेगवेगळें एकोद्दिष्ट श्राद्ध करावें." **व्यास**—"मातापितरांचें मृतदिवशीं एकोद्दिष्ट करावें. जो मनुष्य एकोद्दिष्ट वर्ज्य करून पार्वण करितो, त्यानें तें केलेलें श्राद्ध न केल्यासारखें समजावें, व तो मनुष्य पितृघातक होतो." दुसरें ( पार्वण ) सांगतो **शातातप**—"सपिंडीकरण करून प्रतिवर्षीं सदा पार्वणाप्रमाणें श्राद्ध करावें, हा विधि छागलानें सांगितला आहे. जो मनुष्य सपिंडीकरण केलेल्या प्रेतास पृथक् पिंडाचे ठायीं योजील, तो मनुष्य त्या कर्मानें विधिनाशक व पितृघातक होतो." येथें औरस व क्षेत्रज या दोन पुत्रांनीं पार्वण करावें, आणि दत्तक इत्यादि पुत्रांनीं एकोद्दिष्ट करावें, हा एक पक्ष. साग्निकानें पार्वण व निरग्निकानें एकोद्दिष्ट हा दुसरा पक्ष. ह्या दोन्ही पक्षांना दोष आहे, तो **मिताक्षरा** इत्यादि ग्रंथांतून जाणावा. **कल्पतरु** तर–साग्निक अशा औरस–क्षेत्रजांनीं पार्वण करावें, आणि निरग्निकांनीं एकोद्दिष्ट करावें,. असें सांगतो. **अपरार्कांतही** असेंच आहे. दत्तक इत्यादि दहा प्रकारचे पुत्र साग्निक असोत किंवा अग्निरहित असोत, त्यांनीं एकोद्दिष्टच करावें. कारण, "क्षेत्रज व औरस दोन पुत्रांनीं प्रतिवर्षीं पार्वणविधीनें श्राद्ध करावें. इतर दहा प्रकारच्या पुत्रांनीं एकोद्दिष्ट करावें" असें **जातूकर्ण्याचें** वचन आहे. जेव्हां दत्तकाचा पिता दर्शाचे ठायीं किंवा महालयांत मृत असेल तेव्हां तेथें पार्वणाचा व एकोद्दिष्टाचा विकल्प समजावा. वास्तविक म्हटलें तर सर्वांना पार्वण व एकोद्दिष्ट यांचा विकल्प आहे. जसा श्रौतांत हवनीय-

द्रव्याविषयीं [1]व्रीहि व यव यांचा विकल्प सांगितला आहे तद्वत्. त्या पार्वण-एकोद्दिष्टाच्या विकल्पाची देशाचारावरून व्यवस्था समजावी, म्हणजे ज्या देशीं पार्वणाचा आचार असेल त्या देशीं पार्वण आणि ज्या देशीत एकोद्दिष्टाचा आचार असेल तेथें एकोद्दिष्ट समजावें, हा सर्व निबंधांचा सिद्धांत आहे. म्हणूनच **पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धपराशर**—"मातापितरांचें मृतदिवशीं वेगवेगळें एकोद्दिष्ट करावें" असें बोलून सांगतो-"देशधर्माचा तसाच कुलधर्माचा आश्रय करून इतर विद्वान् मृतदिवशीं देखील पार्वणश्राद्ध इच्छितात." तें सांवत्सरिकश्राद्ध केवळ पिता इत्यादि तिघांचें समजावें. सपत्नीकांचें समजूं नये, असें **हेमाद्रि** सांगतो. या श्राद्धांत मातामह नाहींत. कारण, "कर्षूयुक्त ( सपिंडीकरण ), षोडशमासिकें आणि प्रतिसांवत्सरिक हीं वर्ज्य करून इतर श्राद्धांचे ठायीं सहा पिंड होतात, अशी शास्त्रमर्यादा आहे" **असें कात्यायन**वचन आहे. जे एकोद्दिष्ट करितात त्यांनाही क्वचित् ठिकाणीं पार्वण आहेच. कारण, "अमावास्येस किंवा पितृपक्षांत जो मृत झाला त्याचें पार्वण करावें, एकोद्दिष्ट करूं नये" असें **शंख**वचन आहे.

एवंसंन्यासिनोपि एकोद्दिष्टंयतेर्नोस्तित्रिदंडग्रहणादिह सपिंडीकरणाभावात्पार्वणंतस्यसर्वदेति**प्रचेतसोक्तेः वायवीये** संन्यासिनोप्याब्दिकादिपुत्रःकुर्याद्यथाविधि महालयेतुयच्छ्राद्धंद्वादश्यांपार्वणंहितत् **पृथ्वीचंद्रोदयेवृद्धपराशरः** संग्रामेसंस्थितानांचप्रेतपक्षेशशिक्षये तेषांपार्वणमेवोक्तंक्षयाहेपिचसत्तमैः चंद्रक्षयानाशकसंयुगेषुयःप्रेतपक्षेमृतवान्सपिंडः सपिंडितानामपिचाब्दिकानिभवंतितेषामिहपार्वणानि तथा भ्रातुर्ज्येष्ठस्यकुर्वीतज्येष्ठोभ्रातानुजस्यच दैवहीनंतुतत्कुर्यादितिधर्मविदब्रवीत् दैवहीनमेकोद्दिष्टं ज्येष्ठोभ्राता-नाद्यगर्भजः तथाचतत्रैव**शातातपः** अनाद्यगर्भज्येष्ठोपिभ्रातासद्भिर्निगद्यते ऋतेसपिंडनात्तस्यनैवपार्वण-माचरेत् आद्यगर्भेतुपार्वणमेकोद्दिष्टंवेत्यर्थः मातुस्तु**हेमाद्रौकात्यायनः** प्रत्यब्दंयोयथाकुर्यात्पुत्रःपित्रे सदाद्विजः तथैवमातुःकर्तव्यंपार्वणंचान्यदेववा यत्तुतेनैवोक्तं सपिंडीकरणादूर्ध्वंपित्रोरेवहिपार्वणं पितृव्य-भ्रातृमातृणामेकोद्दिष्टंसदैवत्विति तत्सापत्नमातृपरं यत्तु**वृद्धपराशरः** अपुत्रस्यपितृव्यस्यतत्पुत्रोभ्रातृजो-भवेत् सएवास्यतुकुर्वीतपिंडदानादिकक्रियां पार्वणंतेनकार्यंस्यात्पुत्रवद्भ्रातृजेनतु पितृस्थानेतुतंकृत्वाशेषंपूर्व-वदुच्चरेदिति तत्पितृवद्देशाचारवद्व्यवस्थितमिति**पृथ्वीचंद्रः श्राद्धदीपकलिकायांचतुर्विंशतिमते**तु पितृव्यभ्रातृमातृणांज्येष्ठानांपार्वणंभवेत् एकोद्दिष्टंकनिष्ठानांदंपत्योःपार्वणंमिथः अपुत्रस्यपितृव्यस्यभ्रा-तुश्चैवाग्रजन्मनः मातामहस्यतत्पत्न्याःश्राद्धंपार्वणवद्भवेदित्युक्तं तत्पत्न्याःकर्तृत्वेपिपार्वणमेव सर्वाभावेस्वयं-पत्न्यःस्वभर्तृणाममंत्रकं सपिंडीकरणंकुर्युस्ततःपार्वणमेवचेति**लौगाक्षिस्मृतेः** ततःपत्न्यपिकुर्वीतसापिंड्यं पार्वणंतथेति**सुमंतूक्तेश्चे**ति**निर्णयामृते**उक्तं अन्येत्वेतत्पाक्षिकपार्वणपरमाहुः अतएव भर्तुःश्राद्धंतुया-नारीमोहात्पार्वणमाचरेत् नतेनतृप्यतेभर्ताकृत्वातुनरकंव्रजेदितिवचनंक्षयाहेपाक्षिकैकोद्दिष्टप्रशंसार्थं नपार्व-णनिषेधार्थमित्युक्तं**त्रिस्थलीसेतौभट्टचरणैः** स्वभर्तृप्रभृतित्रिभ्यइत्यनेनविरोधाच्च ।

याप्रमाणें संन्याशाचेंही पार्वण समजावें. कारण, "संन्याशानें त्रिदंडग्रहण केल्यामुळें सपिंडीकरणाचा अभाव असल्यानें त्याला एकोद्दिष्ट नाहीं, त्याचें सर्वदा पार्वण करावें" असें **प्रचेतसाचें** वचन आहे. **वायवीयांत**—"संन्याशाचेंही सांवत्सरिकादिश्राद्ध पुत्रानें यथाविधि करावें. महालयांत करावयाचें तें द्वादशीस पार्वण करावें." **पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धपराशर**—"युद्धामध्यें मृत झालेल्यांचें पितृपक्षांत अमावास्येस पार्वणच सांगितलें आहे व मृतदिवशीं देखील पार्वणच करावें. अमावास्येस, अनशन ( अभक्षण ) व्रताचे ठायीं, युद्धांत, आणि पितृपक्षांत जे सपिंड मृत असतील त्यांचीं सपिंडीकरणें झालीं असतांही सांवत्सरिकें पार्वणें होतात. तसेंच ज्येष्ठ भ्रात्याचें कनिष्ठानें व कनिष्ठभ्रात्याचें ज्येष्ठभ्रात्यानें दैवहीन ( एकोद्दिष्ट ) श्राद्ध करावें, असें धर्मवेत्ता सांगता झाला." येथें ज्येष्ठभ्राता द्वितीयादिगर्भापासून झालेला समजावा. कारण, तसेंच तेथें **शातातप** सांगतो—"द्वितीयादिगर्भापासून झालेलाही ज्येष्ठभ्राता म्हटला आहे. त्याचें सपिंडीकरणावांचून पार्वण करूं नये." पहिल्या गर्भाचें तर पार्वण किंवा एकोद्दिष्ट, असा इत्यर्थ होय. मातेचें श्राद्ध तर **हेमाद्रींत कात्यायन** सांगतो-"जो पुत्र पित्याचें प्रतिवर्षी जसें करील तसेंच मातेचें पार्वण किंवा एकोद्दिष्ट करावें." आतां जें त्यानेंच ( कात्यायनानेंच ) सांगितलें

---

१ 'व्रीहिभिर्यजेत', 'यवैर्यजेत' अर्थ–एका वाक्यानें व्रीहींनीं होम करावा, असें सांगितलें व दुसऱ्या वाक्यानें यवांनीं होम करावा, असें सांगितलें आहे. हीं दोन्ही वेदवाक्यें प्रमाण असल्यामुळें इच्छेप्रमाणें पाहिजे त्या द्रव्यानें होम करावा, असें झाल्यानें, अर्थात् व्रीहींचा व यवांचा विकल्प सिद्ध झाला. त्याप्रमाणें येथें कित्येक स्मृतींनीं एकोद्दिष्ट व कित्येक स्मृतींनीं पार्वण सांगितल्यामुळें दोन्ही पक्षांच्या स्मृति प्रमाण मानून विकल्प समजावा.

की, "सपिंडीकरणानंतर मातापितरांचेंच पार्वण करावें. चुलता, भ्राता, माता यांचें सदा एकोद्दिष्ट करावें" या वचनांत मातेचें एकोद्दिष्ट सांगितलें तें सापत्नमातृविषयक होय. आतां जें **वृद्धपराशर** सांगतो की, "भ्रात्याचा पुत्र तोच पुत्ररहित अशा पितृव्याचा पुत्र होतो; त्याच भ्रातृपुत्रानें पितृव्याची पिंडदान वगैरे क्रिया करावी; पुत्राप्रमाणें भ्रात्याच्या पुत्रानें पार्वण करावें. पितृस्थानीं पितृव्याचा उच्चार करून इतर उच्चार पूर्वीप्रमाणें ( पित्याप्रमाणें ) करावा." असें पार्वण सांगितलें त्याची देशाचाराप्रमाणें व्यवस्था समजावी, असें **पृथ्वीचंद्र** सांगतो. **श्राद्धदीपकलिकेंत चतुर्विंशतिमतांत** तर-"पितृव्य, भ्राता, माता, हीं कर्त्यापेक्षां वयानें अधिक असतील तर त्यांचें पार्वण होतें. कनिष्ठ असतील तर एकोद्दिष्ट. पतीनें स्त्रियेचें व स्त्रियेनें पतीचें परस्पर पार्वण करावें. पुत्ररहित असा पितृव्य, ज्येष्ठभ्राता, मातामह आणि मातामही यांचें श्राद्ध पार्वणाप्रमाणें होतें" असें सांगितलें आहे. तें पत्नीनें करावयाचें असलें तरी पार्वणच. कारण, "सर्वांच्या अभावीं पत्नींनीं आपापल्या भर्त्यांचें सपिंडीकरण अमंत्रक करावें, तदनंतर पार्वणच करावें" असें **लौगाक्षिस्मृतिवचन** आहे. "इतरांच्या अभावीं पत्नीनेंही सापिंड्य व तसेंच पार्वण करावें" असें **सुमंतूचें** वचन आहे, असें **निर्णयामृतांत** सांगितलें आहे. इतर **ग्रंथकार** तर हें वचन एकपक्षीं पार्वणविषयक आहे, असें सांगतात. म्हणूनच "जी स्त्री अविचारानें भर्त्याचें पार्वणश्राद्ध करील, त्या श्राद्धानें भर्ता तृप्त होत नाहीं व तसें पार्वण करून ती नरकास जाईल" हें वचन मृतदिवशीं एकपक्षीं एकोद्दिष्टाचे प्रशंसेसाठीं आहे, पार्वणाच्या निषेधासाठीं नाहीं असें **त्रिस्थलीसेतूंत नारायणभट्टांनीं** सांगितलें आहे. आणि जर पार्वणनिषेधासाठीं म्हटलें तर "स्त्रियेनें आपला भर्ता, त्याचा पिता व पितामह या तिघांना श्राद्ध द्यावें" या वचनाशीं विरोधही येतो.

अपुत्राणांचाह**हेमाद्रावापस्तंबः** अपुत्रायेमृताःकेचित्स्त्रियोवापुरुषाश्चये तेषामपिचदेयंस्यादेकोद्दिष्टंनपार्वणं मित्रबंधुसपिंडेभ्यःस्त्रीकुमारिभ्यएवच दद्यान्मासिकंश्राद्धंसांवत्सरमतोन्यथा **पारिजातेतु** अन्यथापार्वणमित्युक्त्वासर्वत्रपार्वणमित्युक्तं एकोद्दिष्टवाक्यानितुतीर्थमहालयपराणीत्युक्तं **पृथ्वीचंद्रोदये-वृद्धगार्ग्यः** मातुःसहोदरायाचपितुःसहभवाचया तयोश्चनैवकुर्वीतपार्वणंपिंडनादृते **प्रचेताः** सपिंडीकरणादूर्ध्वमेकोद्दिष्टंविधीयते अपुत्राणांचसर्वेषामपत्नीनांतथैवच अपत्नीनांब्रह्मचार्यादीनां **मार्कंडेयपुराणे** प्रतिसंवत्सरंकार्यमेकोद्दिष्टंनरैःस्त्रियाः मृताहनियथान्यायंनृणांयद्वदिहोदितं नृणामितिदृष्टांतात् गोविप्रहतपाखंड्यादीनांसपिंडनाभावेपिसांवत्सरमेकोद्दिष्टंकार्यमेवेति**शूलपाणिः अत्रिवृद्धवसिष्ठौ** सपिंडीकरणादूर्ध्वंयत्रयत्रप्रदीयते भ्रात्रेभगिन्यैपुत्रायस्वामिनेमातुलायच पितृव्यगुरवेश्राद्धमेकोद्दिष्टंनपार्वणं **यत्तुजातूकर्ण्यः** पितृव्यभ्रातृमातॄणामपुत्राणांतथैवच मातामहस्यामुतस्यश्राद्धादिपितृवद्भवेदिति तदावश्यकत्वार्थंनतुपार्वणार्थमिति**हेमाद्रि** युक्तंत्वेवम मातुःपितरमारभ्यत्रयोमातामहाःस्मृताः तेषांतुपितृवच्छ्राद्धंकुर्युर्दुहितृसूनवइति**पुलस्त्योक्त**र्मातामहस्यपार्वणमेव तत्साहचर्यान्पितृव्यादीनतथा पितृव्यभ्रातृमातॄणामेकोद्दिष्टंनपार्वणमितिक्षयाहोक्तोपक्रमेपुलस्त्योक्तेश्चविकल्पः केचित्त्वापस्तंबादिवाक्यानि व्युत्क्रमाच्चप्रेतानांनैवकार्यासपिंडतेत्यस्यपितृव्यादिपरत्वादकृतसपिंडनपितृव्यादिपराणीत्याहुः मातासपत्नमाता एकोद्दिष्टंतुकनिष्ठपरमिति **पृथ्वीचंद्रोदये**प्येवम् विशेषस्त्वधिकारिनिर्णयेप्रागुक्तः केचित्पुत्रांतराभावेपिपितामहवार्षिकमप्यावश्यकम् पुत्राभावेचतत्पुत्रःपत्नीमातातथापिता वित्ताभावेपिसच्छिष्यःकुर्यात्तस्यौर्ध्वदेहिकमिति**मार्कंडेय**पुराणादित्याहुस्तन्न पौत्रेणैकादशाहादिकर्तव्यंश्राद्धषोडशमिति**कात्यायन**विशेषोक्तेः ।

पुत्ररहितांना सांगतो **हेमाद्रींत आपस्तंब** पुत्ररहित जे कोणी स्त्रिया किंवा पुरुष मृत असतील त्यांचेंही श्राद्ध करावें, तें एकोद्दिष्ट. पार्वण करूं नये. मित्र, बंधु, सपिंड, स्त्रिया, कुमारी यांचें मासिकश्राद्ध करावें. आणि सांवत्सरिक एकोद्दिष्ट करावें." **पारिजातांत** तर अन्यथा म्हणजे पार्वण असें सांगून सर्वत्र पार्वण, असें सांगितलें. एकोद्दिष्ट करावें म्हणून जीं वाक्यें आहेत तीं तीर्थश्राद्ध, महालय यांच्या विषयीं आहेत, असें सांगितलें आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धगार्ग्य**—"मावशी व आत्या यांचें श्राद्ध सपिंडीकरणावांचून पार्वण करूं नये." **प्रचेता**—पुत्ररहित व अपत्नीक ( ब्रह्मचारी इत्यादिक ) यांचें सपिंडीकरणानंतर एकोद्दिष्ट करावें." **मार्कंडेयपुराणांत**—"पुरुषांनीं स्त्रियांचें प्रतिवर्षी. मृतदिवशीं यथाविधि एकोद्दिष्ट करावें. जसें पुरुषांचें मृतदिवशीं श्राद्ध सांगितलें आहे तद्वत्." या वचनांत 'नृणां' म्हणजे पुरुषांचें, या दृष्टांतावरून गाई, ब्राह्मण यांनीं मारलेले व पाखंडी इत्यादिकांचें सपिंडीकरण नसलें तरी प्रतिसांवत्सरिक एकोद्दिष्ट करावेंच, असें **शूलपाणि** सांगतो. **अत्रि** आणि **वृद्धवसिष्ठ**—"भ्राता, भगिनी, पुत्र, स्वामी, मातुल, पितृव्य, गुरु यांना सपिंडीकरणानंतर ज्या ज्या ठिकाणीं श्राद्ध द्यावयाचें त्या त्या ठिकाणीं एकोद्दिष्ट द्यावें. पार्वण देऊं नये." आतां जें **जातूकर्ण्य** सांगतो की, "पितृव्य,

भ्राता, माता हे पुत्ररहित असतां आणि अपुत्र मातामह यांचें श्राद्धादिक पित्याप्रमाणें होईल" असें तें अवश्य करावें इतक्यासाठीं आहे. पार्वणासाठीं नाहीं, असें **हेमाद्रि** सांगतो. युक्त म्हटलें म्हणजे असें आह कीं, "मातेचा पिता आरंभ करून तिघे ( मातेचा पिता, पितामह व प्रपितामह ) मातामह म्हटले आहेत, त्यांचें श्राद्ध कन्यापुत्रानें पित्याप्रमाणें करावें." या **पुलस्त्य**वचनावरून मातामहाचें पार्वणच करावें. जातूकर्ण्यवचनांत मातामहांबरोबर पितृव्यादिक असल्यामुळें त्यांचें ( पितृव्यादिकांचें ) तसेंच करावें. आणि "पितृव्य, भ्राता, माता यांचें एकोद्दिष्ट करावें, पार्वण करूं नये" असेंही क्षयाहाच्या उपक्रमांत ( निर्णयारंभीं ) **पुलस्त्य**वचन असल्यामुळें पार्वणाचा विकल्प होतो. **केचित् ग्रंथकार तर—**पूर्वोक्त **आपस्तंब वृद्धगार्ग्य** इत्यादिकांचीं एकोद्दिष्ट विधायक वचनें "व्युत्क्रमानें ( उलट–म्हणजे वडील जीवंत असतां कनिष्ठ मरणें. या क्रमानें ) मृत असतील त्यांचें सपिंडीकरण करूं नये" हें वाक्य पितृव्य, भ्राता, माता इत्यादिविषयक असल्यामुळें ज्यांचें सपिंडीकरण झालेलें नाहीं, अशा पितृव्यादिविषयक ( आपस्तंबादिवचनें ) आहेत, असें सांगतात. ह्या वरील वचनांत माता म्हणजे सापत्नमाता समजावी. एकोद्दिष्ट तर कनिष्ठविषयक आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत** असेंच आहे. विशेष तर अधिकारिनिर्णयांत पूर्वी सांगितला आहे. **केचित् ग्रंथकार**—पुत्र नाहीं, पौत्र आहे, अशा स्थलीं त्या पौत्राला पितामहाचें सांवत्सरिकही आवश्यक आहे. कारण, "पुत्राच्या अभावीं पौत्रानें, पत्नीनें, मातेनें, पित्यानें, आणि द्रव्याच्या अभावीं देखील सच्छिष्यानें मृताचें और्ध्वदेहिक करावें," असें **मार्कंडेयपुराण**वचन आहे, म्हणून सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, "पौत्रानें एकादशाहादिक षोडश श्राद्धें करावीं" या **कातीयांत** विशेष ( षोडश श्राद्धें, असा ) सांगितला आहे.

**अथक्षयाहद्वैधेनिर्णयः** तत्रैकोद्दिष्टंमध्याह्नेकार्यं मध्याह्नश्चपंचधाविभक्तदिनतृतीयभागइतिमाधवः आमश्राद्धंतुपूर्वाह्णेएकोद्दिष्टंतुमध्यमे पार्वणंचापराह्णेतुप्रातर्वृद्धिनिमित्तकमिति **हारीतो**क्तौप्रातःशब्दसाहचर्यात् तत्रापिकुतपादिपुमुहूर्तद्वितयेज्ञेयं प्रारभ्यकुतपेश्राद्धंकुर्यादारौहिणंबुधः विधिज्ञोविधिमास्थायरौहिणंतुनलंघयेदिति**गौतमोक्ते**रेतत्परत्वात् रौहिणोनवमोमुहूर्तः **मैथिलाः श्राद्धकौमुदी**चैवम् अन्यथा ऊर्ध्वंमुहूर्तात्कुतपाद्यन्मुहूर्तचतुष्टयं मुहूर्तपंचकंह्येतत्स्वधाभवनमिष्यतइत्यादिविरोधात् **दीपिकापि** एकोद्दिष्टमुपक्रमेतकुतपइति **माधवीयेव्यासोपि** कुतपप्रथमेभागेएकोद्दिष्टमुपक्रमेत् आवर्तनसमीपेवातत्रैवनियतात्मवान् **पृथ्वीचंद्रोदये**प्येवं तेनकुतपादिरौहिणांतोमुख्यःकालः दिनद्वयेतद्व्याप्तौसमव्याप्तौचपूर्वा विषमव्याप्तावाधिक्येननिर्णयः अव्याप्तौपूर्वैव परविद्धायानिषेधात् साचपूर्वदिनेरौहिणलंघनापत्तेः-परैवेति**गौडाः** शुक्लकृष्णवशात्खर्वदर्पाद्यैर्वाव्यवस्थेत्यन्ये तन्न परविद्धानिषेधप्राबल्यात् अत्रमूलं**कालमाधवीये**ज्ञेयं ।

## आतां क्षयाह ( मृततिथि ) दोन दिवशीं असतां निर्णय सांगतो—

त्यांत एकोद्दिष्ट मध्याह्नीं करावें. मध्याह्न म्हणजे दिवसाचे पांच भाग करून त्यांतील तिसरा भाग होय, असें **माधव** सांगतो. कारण, "आमश्राद्ध पूर्वाह्णीं, एकोद्दिष्ट मध्याह्नीं, पार्वण अपराह्णीं आणि वृद्धिनिमित्तक श्राद्ध प्रातःकालीं करावें." या **हारीत**वचनांत 'प्रातः' हा शब्द आहे त्याच्याबरोबर असलेला मध्यमशब्दही तशाच भागाचा वाचक आहे. त्या मध्याह्नांतही कुतप व रौहिण या दोन मुहूर्तांत करावें: कारण, विधि जाणणारानें कुतपावर श्राद्ध आरंभून रौहिणमुहूर्तापर्यंत करावें. रौहिणाचें तर उल्लंघन करूं नये" हें **गौतम**वचन ह्या एकोद्दिष्टविषयक आहे. आठवा मुहूर्त कुतप आणि नववा रौहिण. **मैथिल** व **श्राद्धकौमुदीकार** हे असेंच ( गौतमवचन एकोद्दिष्टविषयक ) सांगतात. हें वचन एकोद्दिष्टविषयक मानलें नाहीं तर "कुतप व त्याच्या पुढचें चार मुहूर्त मिळून हे पांच मुहूर्त श्राद्धाला इष्ट आहेत" इत्यादि वचनांशीं विरोध येईल. **दीपिकाही—**"कुतपावर एकोद्दिष्ट आरंभावें." **माधवीयांत व्यासही—**"कुतपाच्या पहिल्या भागीं एकोद्दिष्टाचा उपक्रम करावा; अथवा आवर्तन कालाच्या ( मध्याह्नसंधीच्या ) जवळ कुतपावरच आरंभ करावा." **पृथ्वीचंद्रोदयांत**ही असेंच आहे. यावरून कुतपापासून रौहिण आहे तोंपर्यंत एकोद्दिष्टाचा मुख्य काल समजावा. दोन्ही दिवशीं संपूर्ण मुख्यकालव्यापिनी किंवा समव्यापिनी ( तिथि असतां ) पूर्वा घ्यावी. दोन दोन दिवशीं कमीजास्त व्याप्ति असेल तर जी अधिक व्याप्ति असेल ती तिथि घ्यावी. दोन्ही दिवशीं मुख्यकालव्याप्ति नसेल तर पूर्वाच घ्यावी. कारण, परतिथीनें विद्ध तिथि घेऊं नये, असा निषेध आहे. तो पुढें सांगावयाचा आहे. पूर्व दिवसाची घेतली असतां त्या तिथींत श्राद्ध होणें अवश्य आहे म्हणून रौहिणमुहूर्ताचें उल्लंघन होईल, याकरितां पराच घ्यावी, असें **गौड** सांगतात. शुक्लपक्ष व कृष्णपक्ष यावरून किंवा खर्व ( साम्य ) व दर्प ( वृद्धि ) इत्यादिकांवरून व्यवस्था समजावी. असें इतर **ग्रंथकार** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, परविद्धानिषेध प्रबळ आहे. याविषयीं मूल **कालमाधवीयांत** जाणावें.

पार्वणंत्वपराह्णेकार्यं पूर्वोक्तवचनात् मध्याह्नव्यापिनीयास्यात्सैकोद्दिष्टेतिथिर्भवेत् अपराह्णव्यापिनीया पार्वणेसातिथिर्भवेदिति **पृथ्वीचंद्रोदयेवृद्धगौतमोक्तेश्च** पूर्वेद्युरेवपरेद्युरेववापराह्णव्याप्तौसैवग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्तौतदस्पर्शेंशतःसमव्याप्तौवापूर्वैव विषमव्याप्तौत्वधिकाग्राह्या व्यपराह्णव्यापिनीस्यादाब्दिकस्य यदातिथिः महतीयत्रतद्विद्धांप्रशंसंतिमहर्षयइति**मरीचिस्मृतेः** दर्शंचपूर्णमासंचपितुःसांवत्सरंदिनं पूर्वविद्धामकुर्वाणोनरकंप्रतिपद्यतइत्य**पराकेंनारदोक्तेः** व्यहेप्यव्यापिनीचेत्स्यान्मृताहस्ययदातिथिः पूर्वविद्धाप्रकर्तव्यात्रिमुहूर्ताभवेद्यदीति**सुमंतूक्तेः** पूर्वस्यांनिर्वपेत्पिंडानित्यांगिरसभाषितमिति**हेमाद्रौ**पाठः तत्रैव**वृद्धमनुः** नद्व्यहव्यापिनीचेत्स्यान्मृताहस्यचयातिथिः पूर्वविद्धैवकर्तव्यात्रिमुहूर्ताचयाभवेत् **मदनरत्ने**प्येवं यत्तु **कार्ष्णाजिनिव्यासौ** अह्नोस्तमयवेलायांकलामात्रायदातिथिः सैवप्रत्याब्दिकेज्ञेयानापरापुत्रहानिदेतित्रिमुहूर्तस्तुतिः पूर्वेद्युःसायंत्रिमुहूर्ताभावेतुपरैव त्रिमुहूर्तानचेद्ग्राह्यापरैवकुतपेहिसेति **कालादर्शेगोभिलोक्तेः** **कालादर्शे**पि प्रत्याब्दिकेप्येवमेवतिथिर्ग्राह्यापराह्णिकी उभयत्रतथात्वेतुमहत्त्वेन विनिर्णयः समत्वेपूर्वविद्धैवह्यतथात्वेपिसायदि त्रिमुहूर्ताभवेत्सायंसर्वेष्टोयंविनिर्णयः अन्यत्रापि सायंतन्यपरत्रचेन्मृततिथिःसैवाब्दिकेमासिकेग्राह्यासाव्यपराह्णयोर्यदितदायत्राधिकासामता तुल्याचेदुभयापराह्णसमयेपूर्वानचेत्तुद्वयेपूर्वैवत्रिमुहूर्तगास्तसमयेनोचेत्परैवोचिता ।

पार्वण तर अपराह्णीं करावें. कारण, याविषयीं पूर्वी सांगितलेलें **हारीत**वचन आहे. आणि "जी मध्याह्नव्यापिनी ती एकोद्दिष्टाविषयीं तिथि घ्यावी. व जी अपराह्णव्यापिनी ती पार्वणाविषयीं तिथि समजावी" असें **पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धगौतमाचें** वचनही आहे. पूर्वदिवशींच किंवा परदिवशींच अपराह्णव्याप्ति असतां तीच घ्यावी. दोन दिवशीं संपूर्ण अपराह्णव्याप्ति असतां किंवा मुळींच अपराह्णव्याप्ति नसतां अथवा अंशानें सारखी व्याप्ति असतां पूर्वाच घ्यावी. विषम ( कमीजास्त ) व्याप्ति असतां अधिक असेल ती घ्यावी. कारण, "सांवत्सरिकाची तिथि ज्या वेळीं दोन दिवशीं अपराह्णव्यापिनी असेल त्या वेळीं अधिकव्यापिनी असेल तिची प्रशंसा महर्षि करितात" अशी **मरिचिस्मृति** आहे. "दर्शपूर्णमास याग, व बापाचें सांवत्सरिक हीं पूर्वविद्ध तिथीस न करणारा नरकास जातो" असें **अपरार्कांत नारद**वचन आहे. "सांवत्सरिकाची तिथि ज्या वेळीं दोन्ही दिवशीं अपराह्णव्यापिनी नाहीं, त्या वेळीं पूर्वदिवशीं सायंकालीं तीन मुहूर्त असेल तर ती पूर्वा करावी" असें **सुमंतु**वचन आहे. 'पूर्वविद्धा०' या ठिकाणीं 'पूर्वस्यां निर्वपेत् पिंडानित्यांगिरसभाषितं' असा **हेमाद्रींत** पाठ आहे. त्याचा अर्थ–'पूर्वतिथींत पिंड द्यावे, असें आंगिरस सांगतो' असा आहे. तेथेंच **वृद्धमनु**–"जी मृतदिवसाची तिथि दोन्ही दिवशीं अपराह्णव्यापिनी नसेल व सायंकालीं त्रिमुहूर्तव्यापिनी असेल ती पूर्वविद्धाच करावी." **मदनरत्नांत**ही असेंच आहे. आतां जें **कार्ष्णाजिनि** व **व्यास** सांगतो कीं, जेव्हां सूर्यास्तसमयीं कलामात्र तिथि असेल तेव्हां प्रतिसांवत्सरिकास तीच तिथि घ्यावी, परा घेऊं नये; कारण, परतिथि पुत्रहानि करणारी आहे ही पूर्वी सांगितलेल्या त्रिमुहूर्ताची स्तुति आहे. पूर्वदिवशीं सायंकालीं तीन मुहूर्त नसेल तर पराच घ्यावी. कारण, पूर्वदिवशीं सायंकालीं तीन मुहूर्त नसेल तर घेऊं नये, पराच घ्यावी; कारण, ती कुतपकालीं आहे," असें **कालादर्शांत गोभिल**वचन आहे. **कालादर्शांत**ही "प्रतिसांवत्सरिकांतही अशीच अपराह्णव्यापिनी असेल ती तिथि घ्यावी. दोन्ही दिवशीं अपराह्णव्यापिनी असेल तर अधिक ती घ्यावी. दोन दिवशीं समव्याप्ति असतां व मुळींच व्याप्ति नसतां जर सायंकाळीं त्रिमुहूर्त असेल तर ती पूर्वविद्धाच घ्यावी, हा निर्णय सर्वांना इष्ट आहे." **अन्यग्रंथांत**ही—दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं जर मृत तिथि असेल तर तीच प्रत्याब्दिकास व मासिकास घ्यावी, ती जर दोन्ही दिवशीं अपराह्णीं असेल तर अधिक असेल ती घ्यावी. दोन्ही अपराह्णीं समान असेल तर पूर्वा घ्यावी. दोन्ही दिवशीं अपराह्णीं नसेल व पूर्व दिवशीं सूर्यास्तसमयीं तीन मुहूर्त असेल तर ती पूर्वाच घ्यावी. सायंकालीं तीन मुहूर्त नसेल तर पराच योग्य आहे."

**माधवपृथ्वीचंद्रौतु** दिनद्वयेपराह्णव्याप्तौ अंशतःसमव्याप्तौचक्षयेपूर्वावृद्धौपरा खर्वदर्पौपरौपूज्यावित्युक्तेः अपराह्णद्वयव्यापिन्यतीतस्यचयातिथिः क्षयेपूर्वाचकर्तव्यावृद्धौकार्यातथोत्तरेति**बौधायनोक्तेः** क्षयाहस्यतिथिर्यातुअपराह्णद्वयेयदि पूर्वाक्षयेतुकर्तव्यावृद्धौकार्यातथोत्तरेति**बृहन्नारदीया**च्चेत्याहुः वृद्धिक्षयौचात्रपरतिथेर्नतुग्राह्यतिथेः तस्याःक्षयेपराह्णद्वयव्याप्तेरसंभवात् तदाह**माधवः** नग्राह्यतिथिगौवृद्धिक्षयावूर्ध्वतिथेस्तुताविति यत्तु**पृथ्वीचंद्रः** पूर्वोक्तवचनेषुयत्रसायाह्नास्तमययोगिनीतिथिरुक्ता तत्रापराह्णव्यापिनीज्ञेया सायाह्नस्त्रिमुहूर्तःस्यात्तत्रश्राद्धंनकारयेदिति **मात्स्यादौ**सायाह्ननिषेधात् यच्चत्रिमुहूर्ताविरुद्धं-

तच्छ्राद्धार्हापराह्णरूपत्रिमुहूर्तपरमित्याह तद्धेमाद्रिमदनरत्नकालादर्शादिग्रंथविरोधाल्लक्षणापत्तेश्च-चिंत्यम् तस्मात्पूर्वोक्तमेवसाधु ।

**माधव** आणि **पृथ्वीचंद्र** तर दोन्ही दिवशीं अपराह्णव्याप्ति आणि अंशानें समव्याप्ति असतां तिथि क्षय होणारी असेल तर पूर्वा आणि तिथि वृद्धि होणारी असेल तर परा घ्यावी. कारण, 'खर्व ( साम्य ) आणि दर्प ( वृद्धि ) हे पर योग्य आहेत' असें वचन आहे. "मृताहाची जी तिथि दोन दिवशीं अपराह्णव्यापिनी असेल ती क्षय असतां पूर्वा आणि वृद्धि असतां परा करावी" असें **बौधायनाचें** वचन आहे. आणि "मृताहाची तिथि जर दोन अपराह्णांत आहे तर क्षयगामिनी असतां पूर्वा आणि वृद्धिगामिनी असतां उत्तरा करावी" असें **बृहन्नारदीयांत**ही वचन आहे, असें सांगतात. येथें वृद्धि आणि क्षय हे परतिथीचे समजावे. ग्राह्यतिथीचे समजूं नयेत: कारण, ग्राह्यतिथि क्षयगामिनी असेल तर दोन दिवशीं संपूर्ण अपराह्णव्याप्ति संभवणार नाहीं. तेंच **माधव** सांगतो-"ग्राह्यतिथीचे वृद्धिक्षय समजूं नयेत. पुढच्या तिथीचे समजावे." आतां जें **पृथ्वीचंद्र** सांगतो कीं, 'जेथें पूर्वोक्त ( कार्ष्णाजिनि-व्यासादि ) वचनांत सायाह्नीं अस्तमयव्यापिनी तिथि सांगितली तेथें अपराह्णव्यापिनी समजावी. कारण, "सायाह्न काल तीन मुहूर्त आहे, त्या कालीं श्राद्ध करूं नये" असा **मत्स्यपुराणादि**कांत सायाह्नाचा निषेध आहे. आणि पूर्वोक्त सुमंतु इत्यादि वचनांत जें त्रिमुहूर्तादि तिथीचें ग्रहण सांगितलें तें श्राद्धाला योग्य जो अपराह्णरूप त्रिमुहूर्त तद्विषयक आहे, असें सांगतो. तें पृथ्वीचंद्राचें मत: **हेमाद्रि, मदनरत्न, कालादर्श** इत्यादि ग्रंथांशीं विरुद्ध असल्यामुळें आणि सायाह्न शब्दाची अपराह्णीं लक्षणा करूं लागेल म्हणून चिंत्य ( अनादरणीय ) आहे. तस्मात् पूर्वोक्त ( पूर्वदिवशीं सायंकालीं त्रिमुहूर्त नसेल तर परा इत्यादि ) निर्णयच बरोबर आहे.

यदाविघ्नवशाद्दिनेसांवत्सरंश्राद्धंनकृतंतदारात्रावपिकार्यं मृताहंसमतिक्रम्यचंडालेष्वभिजायतइति**मरीचिना**मृताहातिक्रमेदोषोक्तेः नचनक्तंश्राद्धंकुर्वीतारब्धेवाभोजनसमापनमित्यापस्तंबेनगौणकालोक्तेश्चेति **माधवः** आरब्धेश्राद्धेविघ्नवशाद्रात्रिभागेपतितेभोजनसमाप्त्यंतंरात्रौकार्यंशेषसमाप्तिःपरदिनेएवेति**हरदत्तः** ग्रहणदिनेवार्षिकप्राप्तौतद्दिनएवान्नेनामेनहेम्नावाकुर्यान नोत्तरदिनेइत्युक्तंप्राक्**ग्रहणनिर्णये** तच्चप्रथमाब्दिकंत्रयोदशेमलमासेकार्यमन्यथान प्रत्यब्दंद्वादशेमासिकार्यापिंडक्रियासुतैः क्वचित्त्रयोदशेपिस्यादाद्यंमुक्त्वातुवत्सरमितिल**घुहारीतोक्तेः** इदमंत्याधिकमासपरं द्वादशेत्रयोदशेवातीतइत्यर्थः तेनयत्रद्वादशमासिकंशुद्धमासेभवति तत्रत्रयोदशेधिकेएवाब्दिकंकार्यं यत्राधिकमध्येद्वादशंमासिकंतत्रतस्यद्विरावृत्तिंकृत्वाचतुर्दशेशुद्धएवप्रथमाब्दिकमिति**माधवीये हेमाद्रौ**चैवं द्वितीयाब्दिकंतुशुद्धमासएवनाधिकेनाप्युभयोः मलमासमृतानांतुयदासएवाधिकःस्यात्तदातत्रैवकार्यमन्यथाशुद्धएवेतिप्रागुक्तम् ।

जेव्हां कोणत्याही विघ्नाच्या योगानें दिवसा सांवत्सरिक श्राद्ध केलें नसेल तेव्हां तें रात्रींही करावें. कारण, "मृतदिवसाचें अतिक्रमण केलें तर चंडालांत जन्म होतो" असा **मरीचीनें** मृतदिवसाच्या उल्लंघनाविषयी दोष सांगितला आहे. "रात्रीं श्राद्ध करूं नये, व श्राद्धाला आरंभ केला तर ब्राह्मणभोजनापर्यंत करावें" या **आपस्तंब**वचनानें रात्री गौणकाल सांगितला आहे, असें **माधव** सांगतो. श्राद्धाला आरंभ केला असून विघ्नवशेंकरून रात्रि प्राप्त झाली असतां भोजनसमाप्तिपर्यंत रात्रीं करावें, शेषश्राद्धाची समाप्ति दुसऱ्या दिवशींच करावी, असें **हरदत्त** सांगतो. ग्रहणदिवशीं वार्षिक श्राद्ध प्राप्त असतां त्याच दिवशीं अन्नानें, आमानें किंवा हिरण्यानें करावें, दुसऱ्या दिवशीं करूं नये, असें पूर्वीं **ग्रहणनिर्णयां**त सांगितलें आहे. तें श्राद्ध प्रथमाब्दिक असेल तर मृतमासापासून तेरावा मलमास असतां त्या मलमासांत करावें. अन्यथा म्हणजे द्वितीयादि आब्दिक तेराव्या मलमासांत करूं नये. कारण, "प्रतिवर्षी बारावा मास गेल्यावर तेराव्याच्या प्रारंभीं पिंडदानक्रिया पुत्रांनीं करावी. क्वचित्स्थलीं ( तेरावा अधिकमास असतां ) प्रथमाब्दिक वर्ज्य करून द्वितीयादि आब्दिक तेरावा मास गेल्यावर चवदाव्याच्या प्रारंभीं करावें" असें **लघुहारीत**वचन आहे. हें वचन तेरावा अधिकमास असेल तद्विषयक आहे. तेणेंकरून जेथें द्वादश मासिक शुद्धमासांत होतें तेथें तेराव्या अधिकांतच प्रथमाब्दिक करावें. जेथें अधिकांत बारावें मासिक होतें म्हणजे मृतमास धरून बारावा मास अधिक येतो, तेथें त्या द्वादशमासिकाची मलांत व शुद्धांत दोन वेळ आवृत्ति करून चवदाव्या शुद्धमासांतच प्रथमाब्दिक करावें, असें **माधवीयांत** आहे. **हेमाद्रीं**तही असेंच आहे. द्वितीयादि आब्दिक तर शुद्धमासांतच करावें. अधिकांत किंवा दोन्ही मासांत करूं नये. मलमासांत मृत झालेल्यांचें तर जेव्हां तोच मास अधिक येईल तेव्हां त्या अधिकांतच करावें. अन्यथा शुद्धांतच करावें, असें पूर्वीं ( प्रथमपरिच्छेदांत ) सांगितलें आहे.

दर्शेवार्षिकंचेत्तदापूर्ववार्षिकंकृत्वाततःपिंडपितृयज्ञोदर्शश्राद्धंचेति**निर्णयदीपे**क्रमउक्तः **स्मृतिसारे**पि दर्शेक्षयाहेसंप्राप्तेकथंकुर्वंतियाज्ञिकाः आदौक्षयाहंनिर्वर्त्यपश्चाद्दर्शोविधीयतइति युक्तंत्वेवम् तद्वचनेमूलाभा-

वात् पिंडयज्ञंततःकुर्यात्ततोन्वाहार्यकंबुधइतिदर्शश्राद्धेपिंडपितृयज्ञानंतर्यात्तस्याब्दिकेप्यतिदेशात्प्राप्तेपितृयज्ञानंतरंवार्षिकंततोदर्शश्राद्धमिति व्यतिषंगस्तुनभवत्येव तस्यार्थिकत्वात् **कालादर्शेपि** निमित्तानियतिश्चात्रपूर्वानुष्ठानकारणमिति सर्वान्प्रत्यैकरूप्याभावात्क्षयाहनिमित्तस्यानियतत्वम् **देवजानीयेप्येवं** एवं मासिकादिष्वपिज्ञेयं प्रत्यब्दंयोयथाकुर्यात्सतान्यपीतिसर्वातिदेशात् मृताहेवृषोत्सर्गउक्तो **हेमाद्रौविष्णुधर्मे** अयनद्वितयेचैवमृताहेबांधवस्यच उत्सृजेन्नीलवृषभंकौमुद्याःसमुपागमे कौमुदीकार्तिकी ।

दर्शाच्या दिवशीं वार्षिक प्राप्त असेल तर पूर्वीं वार्षिक करून नंतर पिंडपितृयज्ञ आणि दर्शश्राद्ध करावें, असा **निर्णयदीपांत** क्रम सांगितला आहे. **स्मृतिसारांतही** "दर्शांत क्षयदिवस प्राप्त असतां याज्ञिक कसें करितात ? आधीं क्षयाहश्राद्ध करून नंतर दर्श करितात." युक्त म्हटलें तर असें आहे कीं, त्या निर्णयदीपाच्या वचनास मूलप्रमाण नाहीं. आणि "पिंडयज्ञ करून नंतर दर्शश्राद्ध करावें" या वचनानें दर्शश्राद्धाचेठायीं पिंडपितृयज्ञानंतरत्व सिद्ध झाल्यानें तें पिंडपितृयज्ञानंतरत्व अतिदेशानें ( प्रकृति दर्श व त्याची विकृति सांवत्सरिक, प्रकृतीप्रमाणें विकृति करावी अशा अर्थानें ) सांवत्सरिकाचे ठायींही प्राप्त असल्यामुळें पिंडपितृयज्ञानंतर सांवत्सरिक, नंतर दर्शश्राद्ध करावें. व्यतिषंग ( पितृयज्ञ व वार्षिक यांचें सहानुष्ठान ) तर होतच नाहीं; कारण, तो आर्थिक आहे. दर्शाच्या पूर्वीं वार्षिकाविषयीं वरील स्मृतिसाराचें वचन आहे. आणि **कालादर्शांतही** सांगतो–"दर्शापेक्षां पूर्वीं करण्याचें कारण, याचें ( सांवत्सरिकाचें ) निमित्त अनियमित आहे हें होय." सर्वांचें क्षयाहश्राद्धें दर्शाग नाहींत म्हणून क्षयाहनिमित्त अनियमित होय. **देवजानीयांतही** असेंच आहे. याचप्रमाणें मासिकादिकांविषयींही समजावें. कारण, 'प्रतिवर्षीं जो जसें करील त्यानें तीं ( मासिकादिक )ही तशींच करावीं' असा सर्वांचा अतिदेश केलेला आहे. मृतदिवशीं वृषोत्सर्ग सांगितला आहे **हेमाद्रींत विष्णुधर्मांत**—"दोन अयनीं ( दक्षिणायनीं व उत्तरायणीं ), बांधवाच्या मृतदिवशीं आणि कार्तिकी पौर्णिमेस नीलवृषभाचा उत्सर्ग करावा."

**अथशुद्धश्राद्धं दिवोदासीये** सपिंडीकरणादूर्ध्वंयावदब्दत्रयंभवेत् तावदेवनभोक्तव्यंक्षयेहनिकदाचन वर्षांतसपिंडनेप्येतत्तुल्यं मृताहनितुसंप्राप्तेयावदब्दचतुष्टयं बहिःश्राद्धंप्रकुर्वीतनकुर्याच्छ्राद्धभोजनं प्रथमेस्थीनिमज्जाचद्वितीयेमांसभक्षणं तृतीयेरुधिरंप्रोक्तंश्राद्धंशुद्धंचतुर्थकमिति **श्राद्धकारिकोक्तेः** शुद्धंकिंचिदितिज्ञेयं **स्मृत्यंतरे** सप्तत्रिंशच्चयोमासानश्राद्धेभुंक्तेतमोहतः सपंक्तिदूषितःपापःप्रेताशीचभवेत्तुसः तत्रप्रथमेब्देवर्षांतसपिंडनपक्षेमृताहात्पूर्वेह्निसपिंडनमब्दपूर्तिश्राद्धंचकृत्वापरेद्युर्वार्षिकंकुर्यादिति**स्मृत्यर्थसारे**उक्तं **हेमाद्रिस्तु**मृताहेसपिंडीकरणेनैववार्षिकसिद्धिः पूर्णेसंवत्सरेपिंडःषोडशःपरिकीर्तितः तेनैवचसपिंडत्वंतेनैवाब्दिकमिष्यतइतिवचनादित्याह इदमेवयुक्तं ।

## आतां शुद्ध श्राद्ध सांगतो—

**दिवोदासीयांत**—"सपिंडीकरणानंतर तीन वर्षें होत तोंपर्यंत वार्षिकश्राद्धांत कधींही भोजन करूं नये." वर्षांतीं सपिंडीकरण असतांही हा निषेध सारखाच ( तीन वर्षें पुढें ) आहे. कारण, "चार वर्षें होतपर्यंत मृतदिवस प्राप्त असतां बाहेर श्राद्ध करावें, व त्या श्राद्धांत भोजन करूं नये. प्रथमवर्षीं अस्थि व मज्जा, दुसऱ्या वर्षीं मांस आणि तिसऱ्या वर्षीं रक्त भक्षण केल्यासारखें होतें. चवथें श्राद्ध किंचित् शुद्ध होय" असें **श्राद्धकारिकेंत** वचन आहे. **इतर स्मृतींत**—"अज्ञानानें नष्टबुद्धि असलेला जो मनुष्य मृतमासापासून सदतीस मासपर्यंत श्राद्धांचे ठायीं भोजन करितो, तो पापी, प्रेतभक्षी व पंक्तिदूषित होतो." तेथें प्रथमवर्षीं वर्षांतीं सपिंडीकरण या पक्षीं मृतदिवसाच्या पूर्वदिवशीं सपिंडीकरण आणि अब्दपूर्तिश्राद्ध करून दुसऱ्या दिवशीं वार्षिक करावें, असें **स्मृत्यर्थसारांत** उक्त आहे. **हेमाद्रि** तर–मृतदिवशीं सपिंडीकरणानेंच वार्षिकाची सिद्धि होते; कारण, "पूर्ण संवत्सर झालें असतां सोळावा पिंड सांगितला त्यानेंच सपिंडत्व ( सपिंडीकरण ) आणि आब्दिक होतें" असें वचन आहे, असें सांगतो. हेंच युक्त आहे.

**अथक्षयाहाज्ञानेमरीचिः** श्राद्धविघ्नेसमुत्पन्नेअविज्ञातेमृतेहनि एकादश्यांतुकर्तव्यंकृष्णपक्षेविशेषतःइत्युक्तेःशुक्लैकादश्यामपि **बृहस्पतिः** नज्ञायतेमृताहश्चेत्प्रमीतेप्रोषितेसति मासश्चेत्प्रतिविज्ञातस्तद्दर्शेस्यात्तथाब्दिकं दिनमासौनविज्ञातौमरणस्ययदापुनः प्रस्थानमासदिवसौग्राह्यौपूर्वोक्तयादिशा **मदनरत्नेभविष्ये** मृताहंयोनजानातिमानवोविनतात्मज तेनकार्यममावास्यांश्राद्धंसांवत्सरंसदा दिनमेवतुजानातिमासंनैवतुयोनरः मार्गशीर्षेतथाभाद्रेमाघेवातद्दिनंभवेत् **निर्णयामृतेतु** यदामासोनविज्ञातोविज्ञातंदिनमे-

यतु तदाचाषाढकेमासिमाघेवातद्दिनंभवेत् इतिबृहस्पतिस्मृतेराषाढोप्युक्तः कालादर्शेपि मासाज्ञानेदिनज्ञानेकार्यमाषाढमाघयोरित्युक्तं हेमाद्रौप्रभासखंडे मृताहर्योर्नजानातिमासंवापिकथंचन तेनकार्यममावास्यांश्राद्धंमाघेऽथमार्गके भविष्ये मृतवार्ताश्रुतेर्ग्राह्यौतौपूर्वोक्तक्रमेणतु पूर्वोक्तेतिप्रस्थानदिनाज्ञानेमासज्ञानेचतद्दर्शे मासाज्ञानेदिनज्ञानेचमार्गौदाविविवच्छ्रवणदिनेपिज्ञेयमित्यर्थः श्रवणदिनमासाज्ञानेमाघमार्गदर्शेकार्यं पूर्वोक्तप्रभासखंडात् अतोत्रलोपइतिशूलपाण्युक्तंहेयं तिथितत्त्वेयमः गतस्यनभवेद्वार्तायावद्द्वादशवार्षिकी प्रेतावधारणंतस्यकर्तव्यंसुतबांधवैः यन्मासियदहर्यातस्तन्मासितदहःक्रिया विनाज्ञानंकुहूस्तस्यआषाढस्याथवाकुहूः ।

## आतां क्षयाहाचें ( मृत दिवसाचें ) अज्ञान असतां सांगतो—

**मरीचि**—"कोणत्याही कारणानें श्राद्धाला विघ्न उत्पन्न झालें असतां आणि मृतदिवसाचें अज्ञान असतां विशेषेंकरून कृष्णपक्षाच्या एकादशीस तें श्राद्ध करावें." या वचनांत विशेषेंकरून असें म्हटल्यावरून शुक्लएकादशीसही करावें. **बृहस्पति**—"प्रवासांत मृत असतां मृतदिवसाचें ज्ञान नसून महिन्याचें ज्ञान असेल तर त्या महिन्याच्या अमावास्येस वार्षिक श्राद्ध करावें. जेव्हां मरणदिवस आणि मरणमास यांचें ज्ञान नसेल तेव्हां त्या मनुष्यानें घरांतून प्रस्थान ज्या मासांत ज्या दिवशीं केलें असेल तो मास व तो दिवस पूर्वोक्त रीतीनें–म्हणजे मासज्ञान असून दिवसाचें अज्ञान असतां दर्श इत्यादि रीतीनें घ्यावा." **मदनरत्नांत भविष्यांत**—"ज्या मनुष्यास मृतदिवसाचें ज्ञान नसेल त्यानें सर्वदा अमावास्येस सांवत्सरिक करावें. दिवसाचें ज्ञान असून मासाचें ज्ञान नसेल त्यानें मार्गशीर्ष, भाद्रपद किंवा माघ या मासांत तो दिवस ( तिथि ) घ्यावा." **निर्णयामृतांत** तर–जेव्हां मासाचें ज्ञान नाहीं, दिवसाचें मात्र ज्ञान आहे तेव्हां आषाढांत किंवा माघांत तो दिवस घ्यावा." ह्या **बृहस्पति**स्मृतीवरून आषाढही सांगितला आहे. **कालादर्शांत**ही मासाचें अज्ञान व दिवसाचें ज्ञान असतां आषाढ व माघ यांत करावें" असें सांगितलें आहे. **हेमाद्रींत प्रभासखंडांत**—"ज्याला मृत दिवसाचें व मासाचें ज्ञान नसेल त्यानें माघांत अथवा मार्गशीर्षांत अमावास्येस श्राद्ध करावें." **भविष्यांत**—"मासाचें व दिवसाचें ज्ञान नसतां मृताची वार्ता ज्या मासांत व ज्या दिवशीं ऐकली असेल तो मास व तो दिवस पूर्वोक्त क्रमानें म्हणजे पूर्वी जसें प्रस्थानदिवसाचें अज्ञान असून प्रस्थानमासाचें ज्ञान असतां त्या मासाच्या अमावास्येस, मासाचें अज्ञान असून दिवसाचें ज्ञान असतां मार्गशीर्ष इत्यादिकांत सांगितलें; तसें–येथें वार्ताश्रवण झालेल्या मासदिवसांचे ठायीं जाणावें, असा इत्यर्थ होय. वार्ताश्रवणाचा दिवस व मास यांचें अज्ञान असतां माघ व मार्गशीर्ष यांच्या अमावास्येस करावें; कारण, याविषयीं पूर्वी हेमाद्रींत प्रभासखंडांतील वचन सांगितलें आहे. म्हणून 'येथें वार्ताश्रवणदिवसाचें वगैरे ज्ञान नसतां श्राद्धाचा लोप होतो' असें शूलपाणीनें सांगितलेलें त्याज्य आहे. **तिथितत्त्वांत यम**—"प्रवासांत गेलेल्याची वार्ता बारा वर्षे समजली नाहीं, म्हणजे त्याचा प्रेतसंस्कार पुत्रांनीं व बांधवांनीं करावा. ज्या महिन्यांत ज्या दिवशीं घरांतून गेलेला असेल त्या मासांत त्या दिवशीं त्याची क्रिया करावी. गेलेल्या दिवसाचें अज्ञान असतां अमावास्या घ्यावी. मासाचें व दिवसाचें अज्ञान असतां आषाढी अमावास्या घ्यावी."

**अथश्राद्धविघ्नेनिर्णयः** तत्रविप्रस्यनिमंत्रणोत्तरंसूतकेमृतकेचाशौचाभावः निमंत्रितेषुविप्रेषुप्रारब्धे श्राद्धकर्मणि निमंत्रणाद्धिविप्रस्यस्वाध्यायाद्विरतस्यच देहेपितृषुतिष्ठत्सुनाशौचंविद्यतेकचिदितिब्राह्मोक्तेः कर्तुस्तुविष्णुराह व्रतयज्ञविवाहेषुश्राद्धेहोमेर्चनेजपे आरब्धेसूतकंनस्यादनारब्धेतुसूतकं श्राद्धेप्रारंभस्तेनैवोक्तः प्रारंभोवरणंयज्ञेसंकल्पोव्रतसत्रयोः नांदीमुखंविवाहादौश्राद्धेपाकपरिक्रियेति माधवीयेब्राह्मेपि श्राद्धादौपितृयज्ञेचकन्यादानेचनोभवेत् मिताक्षरायांस्मृत्यंतरेसद्यःशौचंप्रकृत्य यज्ञेसंभृतसंभारेविवाहेश्राद्धकर्मणीति तिथितत्त्वादिगौडग्रंथास्तुनिमंत्रणोत्तरंकर्तुर्भोक्तुश्चनाशौचं निमंत्रणोत्तरंश्राद्धेप्रारंभःस्यादितिस्मृतिरितिविष्णूक्तेः यत्तुश्राद्धेपाकपरिक्रियेति तद्दर्शश्राद्धविषयमित्याहुः दातृगृहेमरणादौ ब्राह्मेऽप्युक्तं भोजनार्धेतुसंभुक्तेविप्रैर्दातुर्विपद्यते गृहेइतिशेषः यदाकश्चित्तदोच्छिष्टंशेषंत्यक्त्वासमाहिताः आचम्यपरकीयेनजलेनशुचयोद्विजाइति अस्यश्राद्धविषयत्वंहेमाद्रिणोक्तं पृथ्वीचंद्रोदयेप्येवं ममतुप्रतिभाति इदंविवाहादिविषयं नतुश्राद्धविषयं तत्पदाभावात् विवाहोत्सवयज्ञेष्वित्युपक्रम्य भुंजानेषुतुविप्रेष्वंतरामृतसूतके अन्यगेहोदकाचांताःसर्वेतेशुचयःस्मृताइति षट्त्रिंशन्मतैकवाक्यात् निमंत्रितेषुविप्रे-

षुप्रारब्धेश्राद्धकर्मणीतिपूर्वोक्तविरोधाच्च श्राद्धेतुयद्यपि**विष्णुना**पाकोत्तरमशौचाभावउक्तस्तथापिकर्तुरेवसः भोक्तुर्दोषोस्त्येव अपिदातृगृहीत्रोश्चसूतकेमृतकेतथा अविज्ञातेनदोषःस्याच्छ्राद्धादिषुकथंचन विज्ञातेभोक्तुरे-वस्यात्प्रायश्चित्तादिकंक्रमात् इति**माधवीयेब्राह्मोक्तेः** आदिशब्देनाशौचमुच्यते तथाह**विष्णुः** ब्राह्म-णादीनामाशौचे यःसकृदेवान्नमश्नातितस्यतावदाशौचंयावत्तेषामाशौचव्यपगमेप्रायश्चितंकुर्यादिति यत्तु देहे-पितृषुतिष्ठत्सुनाशौचंविद्यतेकचिदितिब्राह्मंतच्छ्राद्धकालीनस्यनिषेधकंनतदुत्तरकालीनस्य **शुद्धिदीपस्तु**नि-मंत्रितेष्वित्यामश्राद्धपरं भोजनार्धेष्वित्यादित्वन्नश्राद्धपरमित्याह ।

## आतां श्राद्धाला सूतकादि विघ्न प्राप्त असतां निर्णय सांगतो—

ब्राह्मणांना निमंत्रण दिल्यावर त्याच्या सपिंडांत जनन किंवा मरण झालें तरी त्यास आशौच नाहीं. कारण, "ब्राह्मणांना निमंत्रण देऊन श्राद्धकर्माला आरंभ झाला असतां निमंत्रणाच्या योगानें वेदाध्ययन बंद करणाऱ्या ब्राह्मणाच्या अंगावर पितर येऊन राहिले असतां त्या ब्राह्मणाला कोणतेंही आशौच नाहीं" असें **ब्राह्म**वचन आहे. श्राद्धकर्त्याला तर **विष्णु** सांगतो— "व्रत, यज्ञ, विवाह, श्राद्ध, होम, पूजा, जप, यांचा आरंभ केला असतां सूतक नाहीं. आरंभ केला नसेल तर सूतक प्राप्त होतें." श्राद्धाचा प्रारंभ कोणता तो त्यानेंच (विष्णूनें) सांगितला आहे, तो असा—"यज्ञाचा प्रारंभ ऋत्विग्वरण समजावा. व्रत आणि सत्र यांचा प्रारंभ संकल्प होय. विवाहादि मंगलकर्माचा प्रारंभ नांदीश्राद्ध होय. आणि श्राद्धाचा प्रारंभ पाकक्रिया होय. **माधवीयांत ब्राह्मांत**ही -"श्राद्धादिकर्मांत, पित्याच्या और्ध्वदेहिकांत व कन्याविवाहांत आशौच होत नाहीं." **मिताक्षरेंत इतर स्मृतींत**—सद्यःशौच प्रकरण चाललें असतां सांगतो—"सर्व सामग्री संपादन केलेल्या अशा यज्ञांत, विवाहांत आणि श्राद्धकर्मांत आशौच प्राप्त असतां सद्यःशौच ( तात्काल शुद्धि ) होते." **तिथितत्त्वादि गौडग्रंथ** तर—ब्राह्मणांना निमंत्रण दिल्यानंतर कर्त्याला व भोक्त्याला आशौच नाहीं. कारण, "ब्राह्मणनिमंत्रण झाल्यावर श्राद्धाला प्रारंभ होतो, अशी स्मृति आहे." असें **विष्णु**वचन आहे. आतां जें श्राद्धाचे ठायीं पाकक्रिया हा प्रारंभ, असें पूर्वी सांगितलें तें दर्शश्राद्ध-विषयक आहे, असें सांगतात. श्राद्धकर्त्याच्या घरीं कोणी मृत वगैरे असतां **ब्राह्मांत** सांगितलें आहे तें असें—"ब्राह्मणांनीं अर्ध भोजन केलें असतां जेव्हां दात्याच्या ( यजमानाच्या ) घरांत कोणी मरेल तर त्या वेळीं ब्राह्मणांनीं शेष उच्छिष्ट टाकून पात्रावरून उठून दुसऱ्या उदकानें आचमन केलें असतां ते ब्राह्मण शुद्ध होतात." हें वचन श्राद्धविषयक आहे, असें **हेमाद्रीनें** सांगितलें आहे. **पृथ्वीचंद्रोदयां**तही असेंच आहे. मला तर असें वाटतें कीं, हें वचन विवाहादिविषयक आहे. श्राद्ध-विषयक नाहीं; कारण, या वचनांत श्राद्धपद नाहीं. असें मानलें असतां, विवाहोत्सव, यज्ञ यांचा उपक्रम करून "ब्राह्मण भोजन करीत असतां मध्यंतरीं मृताशौच व जननाशौच प्राप्त असतां ब्राह्मणांनीं उठून दुसऱ्या घरांतील उदकानें आचमन करावें, म्हणजे ते सारे शुद्ध होतात." या **षट्त्रिंशन्मताशीं** एकवाक्यता ( समान अर्थ ) होते. आणि वरील वचन श्राद्धविषयक मानलें तर ब्राह्मणाला निमंत्रण दिलें व श्राद्धकर्माला आरंभ केला असतां आशौचाचा अभाव" म्हणून सांगितलें त्याच्याशीं विरोधही येतो. श्राद्धाचे ठायीं जरी विष्णूनें पाक झाल्यानंतर आशौच नाहीं म्हणून सांगितलें तरी तें कर्त्यालाच समजावें. भोक्त्याला दोष आहेच. कारण, "श्राद्धादिकर्मामध्यें कर्ता व भोक्ता यांना सूतकाचें व मृतकाचें ज्ञान नसतां मुळींच दोष नाहीं, ज्ञान असेल तर भोक्त्यालाच दोष आहे, म्हणून त्यानें अनुक्रमानें प्रायश्चित्तादिक करावें" असें **माधवीयांत ब्राह्म**वचन आहे. या वचनांत 'प्रायश्चित्तादिकं' यांत 'आदि' शब्द आहे त्यानें आशौच समजावें. तेंच आशौच **विष्णु** सांगतो—"ब्राह्मणादिकांच्या आशौचांत जो एकवारच अन्न भक्षण करितो त्याला, जितकें त्या ब्राह्मणादिकांस आशौच तितकें समजावें. आशौच गेल्यानंतर प्रायश्चित्त करावें." आतां जें "अंगावर पितर आले असतां कोणतेंही आशौच नाहीं" असें पूर्वी ब्राह्मवचन सांगितलें तें श्राद्धकालीं आशौचाचा निषेध करणारें आहे. श्राद्धोत्तर आशौचाचा निषेध करणारें नव्हे. **शुद्धिदीप** तर 'निमंत्रितेषु०' हें ब्राह्मवचन आमश्राद्धविषयक आहे. 'भोजनार्धे तु०' हें ब्राह्मवचन सिद्धान्नश्राद्ध-विषयक आहे, असें सांगतो.

प्रायश्चित्तंत्वाह**मार्कंडेयः** भुक्त्वातुब्राह्मणाशौचेचरेत्सांतपनंद्विजः एतत्कामतः **अभ्यासेशंखः** ब्राह्मणस्यतथाभुक्त्वामासमेकंव्रतीभवेदिति **अज्ञानात्तुछागलेयः** एकाहंचत्र्यहंपंचसप्तरात्रमभोजनम् ततःशुचिर्भवेद्विप्रःपंचगव्यंपिबेन्नरइति वर्णक्रमेणेदम् अभ्यासेतुद्वैगुण्यमित्यपि**मिताक्षरामाधवीया**-दौज्ञेयं मिताक्षरामाधवादौतुश्राद्धेकर्तुर्भोक्तुश्चसर्वथादोषाभावउक्तः आशौचमध्येश्राद्धदिनप्राप्तौतु**माधवी**-**येकालादर्शेचऋष्यशृंगः** देयेपितृणांश्राद्धेतुआशौचंजायतेयदा आशौचेतुव्यतिक्रांतेतेभ्यःश्राद्धंप्रदीयते **श्राद्धचिंतामणौज्योतिषे** प्रतिसांवत्सरंश्राद्धमाशौचात्पतितंचयत् मलमासेपितत्कार्यमितिभागुरिस्मा-

षितं आशौचांत्यदिनत्वेननिमित्तत्वादित्यर्थः एतन्मासिकादिपरं नदार्शिकादौ अतएव**सुदर्शनभाष्ये** अपरपक्षेपित्र्याणीतिनियमात् कृष्णपक्षश्राद्धलोपेप्रायश्चित्तमेव नतुगौणकालेकरणं तच्चोपवासः वेदोदितानांनित्यानांकर्मणांसमतिक्रमे स्नातकव्रतलोपेचप्रायश्चित्तमभोजनमिति**मनूक्त**रित्युक्तं आशौचेतुप्रायश्चित्तमपिनमुख्यकालेअनधिकारात् ।

वरील वचनांत सांगितलेलें प्रायश्चित्त तें सांगतो **मार्कंडेय**—"ब्राह्मणाच्या आशौचांत ब्राह्मणानें आपल्या इच्छेनें भोजन केलें असतां सांतपन कृच्छ्र करावें." आशौचांत वारंवार भोजन केलें असतां **शंख** सांगतो—"ब्राह्मणाच्या आशौचांत पुनःपुनः भोजन केलें असतां एक मास व्रत ( कृच्छ्र ) करावें." अज्ञानानें भोजन केलें असतां सांगतो **छागलेय**— "ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्या आशौचांत ब्राह्मणानें न जाणून भोजन केलें असतां अनुक्रमानें एक दिवस, तीन दिवस, पांच दिवस, आणि सात दिवस उपवास करून पंचगव्य प्राशन करावें, म्हणजे तो शुद्ध होतो." याप्रमाणें वारंवार भोजन केलें असतां द्विगुणित प्रायश्चित्त करावें, इत्यादिप्रकार **मिताक्षरा, माधवीय** इत्यादि ग्रंथांतून जाणावा. **मिताक्षरा, माधव** इत्यादि ग्रंथांत तर श्राद्धाचे ठायीं कर्त्याला व भोक्त्याला सर्वथा दोष नाहीं, असें सांगितलें आहे. आशौचामध्यें श्राद्धदिवस प्राप्त असेल तर **माधवीयांत** व **कालादर्शांत ऋष्यशृंग** सांगतो—"पितरांचें श्राद्ध कर्तव्य असतां जेव्हां आशौच प्राप्त होईल तेव्हां आशौच समाप्त झाल्यानंतर पितरांना श्राद्ध द्यावें." **श्राद्धचिंतामणींत ज्योतिषांत**—"मलमासांत पडलेलें सांवत्सरिक आणि पूर्वमासांतील श्राद्ध आशौचामुळें मलमासांत प्राप्त झालेलें तें मलमासांतही करावें, असें भागुरिमुनीचें सांगणें आहे." आशौचसमाप्ति मलमासांत असल्यामुळें तो दिवस श्राद्धाला निमित्त आहे असा भाव. हें वचन मासिक, वार्षिक यांविषयीं आहे. दर्शादिविषयीं नाहीं. म्हणूनच **सुदर्शनभाष्यांत**—"कृष्णपक्षांत पितृकर्मे करावीं." अशा नियमावरून कृष्णपक्षांतील श्राद्धाचा लोप असतां प्रायश्चित्तच करावें; गौणकालीं करणें नाहीं. तें प्रायश्चित्त उपवास होय. कारण, "वेदविहित अशा नित्यकर्माचा अतिक्रम ( लोप ) झाला असतां आणि स्नातकाच्या व्रतांचा लोप असतां त्याला प्रायश्चित्त उपवास होय" असें **मनूचें** वचन आहे, असें सांगितलें आहे. अमावास्येस आशौच असेल तर प्रायश्चित्तही नाहीं. कारण, मुख्यकालीं श्राद्धाचा अधिकार नाहीं.

आशौचांतेऽसंभवेतु**व्यासः** श्राद्धविघ्नेसमुत्पन्नेत्वंतरामृतसूतके अमावास्यांप्रकुर्यात्तैशुद्धावेकेमनीषिणः **हेमाद्रौषट्त्रिंशन्मते**पि मासिकेचाब्दिकेत्वह्निसंप्राप्तेमृतसूतके वदंतिशुद्धौतत्कार्यंदर्शेचापिविचक्षणाः **गोभिलः** देयेप्रत्याब्दिकेश्राद्धेअंतरामृतसूतके आशौचानंतरंकुर्यात्तन्मासेंदुक्षयेतथा **मरीचिः** श्राद्धविघ्नेसमुत्पन्नेप्यविज्ञातेमृतेहनि एकादश्यांतुकर्तव्यंकृष्णपक्षेविशेषतः विशेषतइत्युक्तेःशुक्लैकादश्यामपि आशौचेतरविघ्नेएतदिति**माधवपृथ्वीचंद्रौ** यत्त्व**त्रिः** तदहश्चेत्प्रदुष्येतकेनचित्सूतकादिना सूतकानंतरंकुर्यात्पुनस्तदहरेवचेतितत्पूर्वकालाभावेज्ञेयं एतदाब्दिकेतरश्राद्धपरं यच्च**देवलः** एकोद्दिष्टेतुसंप्राप्तेयदिविघ्नःप्रजायते मासेन्यस्मिंस्तिथौतस्मिन्श्राद्धंकुर्यात्प्रयत्नतइतितदपिमासिकपरमिति**मदनरत्नेहेमाद्रौ**च इदमपिपूर्वकालासंभवे व्याध्यादौविस्मरणेचैवंज्ञेयं ।

सांवत्सरिकादिकांचा आशौचांतीं असंभव असेल तर **व्यास** सांगतो—"श्राद्धामध्यें आशौच प्राप्त होऊन श्राद्धाला विघ्न उत्पन्न झालें असतां तें श्राद्ध अमावास्येस करावें. कोणी विद्वान् शुद्धी झाल्यावर करावें असें सांगतात." **हेमाद्रींत षट्त्रिंशन्मतांत**ही—"मासिक व वार्षिक यांच्या दिवशीं आशौच प्राप्त असतां शुद्धि झाल्यावर तें श्राद्ध करावें, असें सांगतात. दर्शासही करावें, असें विद्वान् सांगतात." **गोभिल**—"प्रतिवार्षिक श्राद्ध कर्तव्य असतां मध्यें आशौच प्राप्त होईल तर आशौचानंतर करावें. तसेंच त्या महिन्याच्या दर्शास करावें. **मरीचि**—"श्राद्धाला विघ्न प्राप्त असतां आणि मृतदिवसाचें ज्ञान नसतां एकादशीस करावें. कृष्णपक्षांत विशेषेंकरून करावें." विशेषतः असें सांगितल्यावरून शुक्ल एकादशीसही करावें. आशौचावांचून इतर विघ्न असतां हें वचन आहे, असें **माधव** आणि **पृथ्वीचंद्र** हे सांगतात. आतां जें **अत्रि**— "कोणत्याही सूतकादिकारणामुळें तो श्राद्ध दिवस जर दुष्ट होईल तर सूतकानंतर पुनः तो दिवस ( तिथि ) येईल तेव्हांच करावें." असें सांगतो, तें पूर्वी सांगितलेल्या कालाचा ( आशौचांत्य दिवस व दर्श यांच्या ) अभावीं समजावें. हें वचन वार्षिकव्यतिरिक्त ( मासिकादि ) श्राद्धविषयक आहे. आतां जें **देवल**—"एकोद्दिष्ट प्राप्त असतां जर विघ्न उत्पन्न होईल तर दुसऱ्या मासांत त्या तिथीस श्राद्ध करावें." हें वचनही मासिकविषयक आहे, असें **मदनरत्नांत** आणि **हेमाद्रींत** आहे. हेंही वचन पूर्वोक्तकालाच्या असंभवीं समजावें. व्याधि वगैरे उत्पन्न होऊन श्राद्ध राहिलें असतां व विस्मरण झालें असतां असेंच जाणावें.

**अथभार्यारजोदर्शने**तत्रदार्शिकमामेनकार्यं श्राद्धविघ्नेद्विजातीनामामश्राद्धंप्रकीर्तितं अमावास्यादि-नियतंमाससंवत्सराहते इति**हेमाद्रौहारीतोक्तेः व्याघ्रपादोऽपि** आर्तवेदेशकालानांविप्लवेसमुपस्थिते आमश्राद्धंद्विजैःकार्यंशूद्रःकुर्यात्सदैवहीति **दीपिकापि** दर्शेतुभार्यार्तवेह्यामश्राद्धविधिंप्रवासिविधुराद्याश्चा-चरेयुर्द्विजाः वस्तुतस्तु पाकाभावेद्विजातीनामामश्राद्धंविधीयतइति**सुमंतूक्तेः** पाककर्त्रंतरसत्त्वेऽन्नेनान्य-थामेनेतियुक्तं मासिकानिसपिंडानिअमावास्यातथाब्दिकं अन्नेनैवतुकर्तव्यंयस्यभार्यारजस्वलेति**कलिकायां**-वचनाच्च **कालादर्शे**तुस्त्रियारजोदर्शनेदर्शश्राद्धंपंचमेहनीतिपक्षांतरमुक्तं **पारिजातेऽ**प्येवं एवंमहालय-युगादावपि ।

## आतां श्राद्धदिवशीं भार्या रजस्वला असतां सांगतो—

भार्या रजस्वला असतां दर्शश्राद्ध आमान्नानें करावें. कारण, "द्विजातींना श्राद्धविघ्न प्राप्त झालें असतां आमश्राद्ध सांगितलें आहे. मासिक, सांवत्सरिक वर्ज्य करून अमावास्यादिश्राद्धविषयक हें सांगणें आहे" असें **हेमाद्रींत हारीत**वचन आहे. **व्याघ्रपादही**—"भार्येला ऋतु प्राप्त असतां, देश व काल यांचा विनाशगमय असतां द्विजांनीं आमश्राद्ध करावें. शूद्रानें तर सदा आमश्राद्धच करावें." **दीपिकाही**—"दर्शाचे ठायीं भार्या रजस्वला असतां आमश्राद्ध करावें. आणि प्रवासी, भार्यारहित इत्यादिकांनीं देखील आमश्राद्धविधि करावा." वास्तविक म्हटलें तर "पाकाच्या अभावीं द्विजांना आमश्राद्ध सांगितलें आहे" ह्या **सुमंतु**वचनावरून पाककर्ता दुसरा कोणी असतां अन्नानें करावें. पाक करणारा कोणी नसेल तर आमानें करावें, हें युक्त आहे. आणि "ज्याची भार्या रजस्वला असेल त्यानें सपिंडीकरण, मासिकें अमावास्याश्राद्ध, व आब्दिक, हीं अन्नानेंच करावीं." असें **कलिकेंत** वचनही आहे. **कालादर्शांत** तर—स्त्रियेला रजोदर्शन असतां दर्शश्राद्ध पांचव्या दिवशीं करावें, असा निराळा पक्ष सांगितला आहे. **पारिजातां**तही असेंच आहे. याप्रमाणें महालय, युगादिक यांचे ठायींही समजावें.

आब्दिकंतुरजोदर्शनेपितद्दिनेएवकार्यं पुष्पवत्स्वपिदारेषुविदेशस्थोऽप्यनग्निकः अन्नेनैवाब्दिकंकुर्याद्धेम्नावा-मेननकचिदिति**माधवीये लौगाक्षिस्मृतेः मरीचिरपि** अनग्निकःप्रवासीचयस्यभार्यारजस्वला आमश्राद्धंप्रकुर्वीतनतत्कुर्यान्मृतेहनि **कार्ष्णाजिनिः** आपन्नोऽप्याब्दिकंनैवकुर्यादामेनकुत्रचित् अन्नेनतद-मायांवाकृष्णेवाहरिवासरे **प्रयोगपरिजाते** रजस्वलायांभार्यायांक्षयाहंयःपरित्यजेत् सवैनरकमाप्नोतिया-वदाभूतसंप्लवं मासिकानिसपिंडंचअमावास्यातथाब्दिकं अन्नेनैवतुकर्तव्यंयस्यभार्यारजस्वला **देवयाज्ञिकनिबंधेऽपि** भर्तुःश्राद्धंपंचमेह्निकुर्याद्भार्यारजस्वला पुत्रःपित्रोःप्रकुर्वीतमृताहनिशुचिर्यतः **कालादर्शेऽपि** रजस्वलांगनोनग्निर्विदेशस्थोथवाब्दिके दर्शादाविवनामेनत्वन्नेनश्राद्धमाचरेत् अन्यत्रापि विदेशकोवाविगता-ग्निकोवारजस्वलायामपिधर्मपत्न्यां श्राद्धंमृताहेविदधीतपाकैर्नामेनहेम्नानतुपंचमेह्नि एवंमासिकेपि यत्तु **मरीचिः** आब्दिकेसमनुप्राप्तेयस्यभार्यारजस्वला पंचमेऽहनितच्छ्राद्धंनतत्कुर्यान्मृतेहनि **माधवीये** श्राद्धंत-दानकर्तव्यंकर्तव्यंपंचमेहनीत्युत्तरार्धं तदपुत्रस्त्रीकर्तृकश्राद्धविषयं अपुत्रातुयदाभार्यासंप्राप्तेभर्तुराब्दिके रज-स्वलाभवेत्सातुकुर्यात्तत्पंचमेहनीतिश्लोक**गौतमोक्तेः** दैवेकर्मणिपित्र्येवापंचमेहनिशुद्ध्यतीति**प्रभासखं-डाच्च** नन्वशुचित्वादेवतत्रपंचमेहन्यर्थाच्छ्राद्धंप्राप्तमितिवचनंव्यर्थं मैवं गर्भिणीसूतिकादिश्चकुमारीवान्यरो-गिणी यदाशुद्धातदान्येनकारयेत्प्रयतास्वयमिति **हेमाद्रौभविष्योक्तेः** अनुपनीतस्त्रीशूद्राश्चश्राद्धमृत्विजा-कारयेयुःस्वयंवामंत्रकंकुर्युरिति**स्मृत्यर्थसारा**च्चान्यद्वाराकरणनिवृत्त्यर्थत्वात्तस्य त्वदुक्तदिशाआशौचानंतरं श्राद्धकर्तव्यतावदेकवाक्यवैयर्थ्याच्च अतःप्रागुक्त**मरीच्युक्तेः**पत्नीपंचमेहनीतियुक्तं यत्तुसप्ताहात्पितृदे-वानांभवेद्योग्याव्रतार्चनेइतितद्रजोनिवृत्तिपरमिति**हेमाद्रि**भिन्नसर्वनिबंध**सिद्धांतः** ।

वार्षिक तर भार्येला रजोदर्शन असतांही त्याच दिवशीं करावें. कारण, "स्त्रिया रजस्वला असतांही, प्रवासांत असला तरी आणि अग्निरहित असला तरी, त्यानें सांवत्सरिक अन्नानेंच करावें. हिरण्यद्वारा किंवा आमानें कधींही करूं नये" असें **माधवीयांत लौगाक्षीचें** वचन आहे. **मरीचिही**—"अग्निरहित, प्रवासी, व ज्याची भार्या रजस्वला असेल त्या सर्वांनीं आमश्राद्ध करावें. पण तें आमश्राद्ध मृतदिवशीं ( सांवत्सरिक ) करूं नये." **कार्ष्णाजिनि**—"आपत्कालीं देखील आब्दिकश्राद्ध आमान्नानें कधींही करूं नये. अन्नानें त्या दिवशीं करण्यास सवड नसेल तर त्या मासाच्या अमावास्येस किंवा कृष्ण एकादशीस

**अन्नानें करावें." प्रयोगपारिजातांत**—"भार्या रजस्वला असतां जो मनुष्य पितरांच्या मृतदिवसाचा परित्याग करील ( श्राद्ध करणार नाहीं ) तो मनुष्य सर्व भूतांचा प्रलय होईपर्यंत नरकांत पडतो. मासिक,' सपिंडीकरण, दर्श, आणि वार्षिक हीं श्राद्धें ज्याची भार्या रजस्वला असेल त्यानें अन्नानेंच करावीं." **देवयाज्ञिकनिबंधांत**ही—"रजस्वला स्त्रियेनें भर्त्याचें श्राद्ध पांचव्या दिवशीं करावें. पुत्रानें मातापितरांचें श्राद्ध मृतदिवशीं करावें. कारण, माता रजस्वला असली तरी तो शुद्ध आहे." **कालादर्शांत**ही—"ज्याची भार्या रजस्वला तो, अग्निरहित, प्रवासी, यांनीं दर्शादिकश्राद्धाप्रमाणें संवत्सरदिवशीं आमान्नानें श्राद्ध करूं नये. तर अन्नानें करावें." **इतर एका ग्रंथांत**ही—"विदेशस्थ असो किंवा अग्निरहित असो अथवा धर्मपत्नी रजस्वला असो, मातापितरांच्या मृतदिवशीं श्राद्ध पाकानें करावें. आमश्राद्ध किंवा हिरण्यश्राद्ध करूं नये. आणि पांचव्या दिवशींही करूं नये." याप्रमाणें मासिकाविषयींही समजावें. आतां जें **मरीचि**—"सांवत्सरिक प्राप्त असतां ज्याची भार्या रजस्वला होईल त्यानें पांचव्या दिवशीं श्राद्ध करावें. मृतदिवशीं करूं नये" या वचनाचें उत्तरार्ध 'श्राद्धं तदा न कर्तव्यं कर्तव्यं पंचमेहनि' असें माधवीयांत आहे. हें मरीचिवचन पुत्ररहित स्त्रियेनें करावयाच्या श्राद्धाविषयीं आहे. कारण, "भर्त्याचें सांवत्सरिक प्राप्त असतां भार्या पुत्ररहित असून रजस्वला होईल तर तिनें तें श्राद्ध पांचव्या दिवशीं करावें." असें **श्लोकगौतम**वचन आहे. आणि "दैवकर्माविषयीं व पित्र्यकर्माविषयीं स्त्री पांचव्या दिवशीं शुद्ध होते" असें **प्रभासखंडीं** वचनही आहे. **शंका**—स्त्री रजस्वला असतां अशुचि असल्यामुळेंच अर्थात् पांचव्या दिवशीं श्राद्ध प्राप्त झालें. म्हणून त्याविषयीं वचनाचें कारण नाहीं. **समाधान**—"गर्भिणी, प्रसूत झालेली, कुमारी अथवा रोगिणी अशी स्त्री जेव्हां अशुद्ध ( कर्माला अयोग्य ) असेल तेव्हां तिनें दुसऱ्याकडून कर्म करवावें, कर्माला योग्य असेल तर तिनें स्वतः करावें असें **हेमाद्रींत भविष्य**वचन आहे. आणि "मुंज न झालेला, स्त्रिया, शूद्र यांनीं श्राद्ध ऋत्विजांकडून करवावें, अथवा स्वतः अमंत्रक करावें" असें **स्मृत्यर्थसारांत** वचनही आहे. यावरून स्त्री रजस्वला असतां तिनें इतरांकडून श्राद्ध करवावें, असें प्राप्त झालें; त्याची निवृत्ति ( निषेध ) करण्यासाठीं तें गौतमादिवचन आहे. या गौतमादिवचनाची 'आशौचानंतर श्राद्ध करावें' याच्याशीं एकवाक्यता करावी, असें म्हटलें तर शंकाकाराच्या रीतीनें ती एकवाक्यताही व्यर्थ होईल. म्हणून पूर्वोक्त मरीचिवचनावरून पत्नीनें पांचव्या दिवशीं करावें, असें योग्य आहे. आतां जें "सात दिवसांनंतर पितर व देव यांच्या व्रताविषयीं व पूजेविषयीं योग्य होते" तें ज्या स्त्रीचें रज निवृत्त झालें नसेल तीविषयीं आहे. हा **हेमाद्री**वांचून इतर सर्व निबंधांचा **सिद्धांत** आहे.

**हेमाद्रि**स्तुश्राद्धादौस्त्रियासहैवाधिकारात्तस्यांरजोदुष्टायांतन्निवृत्तेरेकभार्येणपंचमेहनिकार्यं प्रागुक्त**मरीच्युक्तेः** भार्यांतरसत्त्वेतुपुष्पवत्स्वपीतिवचनात्तद्दिनेएवेत्याह **दीपिकापि** भार्यर्तौसतिपंचमेचदिवसेस्याद्वार्षिकंमसिकंपक्वान्नैर्बहुभार्यकस्त्वधिकृतेपत्न्यंतरेतिष्ठति कुर्यात्तद्द्वितयंस्वमुख्यदिवसेइति तच्चिंत्यंसहाधिकारः सहत्वश्रुत्यावाएकफलभाक्त्वेनवापाककर्तृत्वेनवा **नाद्यः** तदभावात् पाणिग्रहणाद्धिसहत्वंकर्मस्वित्यस्याग्निसाध्यकर्मविषयत्वात् आब्दिकस्यचनिरग्नेरपिपाकेनैवोक्तेःस्मार्ताग्निसाध्यत्वानियमात्तामपरुध्येति पूर्वोक्तवचनसत्त्वाच्च कथंचभार्यांतरसत्त्वेधिकारः ज्येष्ठयानविनेतरेतिनियमात् ज्येष्ठापरत्वेचतेनैवसिद्धेर्वचनवैयर्थ्यात् **नद्वितीयः** अविभक्तभ्रातृष्वेकस्याऽशुचित्वेन्यस्यानधिकारापत्तेः **नतृतीयः** प्रवासनिर्देशसूतिकारोगिण्यादिष्वप्यकरणापत्तेः आरभेतनवैःपात्रैरन्नारंभंचबांधवैरितिदेवलोक्तावात्मनेपदात्स्वस्यबांधवानांचपाककर्तृत्वोक्त्याविरोधाच्च ततस्तानिपपाचाशुसीताजनकनंदिनीति**पाद्मादि**लिंगात्प्राशस्त्यंभार्यापाकस्योच्येत नतत्कस्याप्यनिष्टं तेनैतद्वचनंयुक्त्याद्यभावात् पूर्वोक्तवचोविरोधाच्चयत्किंचिदेव यदपि श्राद्धीयाहनि संप्राप्तेयस्यभार्यारजस्वला श्राद्धंतत्रनकर्तव्यंकर्तव्यंपंचमेहनीति**श्लोकगौतम**पाठोन्यथादर्शितः**माधवीये** चतद्वशात्पक्षांतरमुक्तं तेनापिनाभिप्रेतार्थसिद्धिः यस्यप्रेतस्येत्यर्थात् तेनात्र**हेमाद्रि**र्भ्राम्यतीतिबहुवक्तव्येपि विस्तरभीतेर्नोच्यते ।

**हेमाद्रि** तर—श्राद्धादिकांविषयीं स्त्रीसहवर्तमानच पुरुषाला अधिकार असल्यामुळें ती स्त्री आर्तवानें दुष्ट असतां त्या आर्तवाची निवृत्ति झाल्यानंतर ज्याची एक भार्या असेल त्यानें पूर्वोक्त **मरीचि**वचनावरून पांचव्या दिवशीं करावें. इतर भार्या असेल तर 'पुष्पवत्स्वपि०' या पूर्वोक्त **लौगाक्षि**स्मृतीवरून त्याच दिवशीं करावें, असें सांगतो. **दीपिका**ही—"भार्या ऋतुमती असतां पांचव्या दिवशीं वार्षिक, मासिक पक्वान्नांनीं करावें. ज्याच्या बहुत स्त्रिया असतील त्याची इतर स्त्री अधिकारी असतां तीं दोन्ही श्राद्धें आपापल्या मुख्य दिवशीं करावीं." हें हेमाद्रि व दीपिका यांचें मत चिंत्य, ( युक्तिशून्य ) आहे. कारण, पुरुषाला सहाधिकार ( पत्नीबरोबर अधिकार ) हेमाद्रीनें सांगितला, तो वचनांत 'सह' या शब्दाच्या श्रवणानें सांगितला, किंवा दोघे ( स्त्रीपुरुष ) एकफलभागी असल्यामुळें सांगितला. अथवा स्त्री पाक करणारी आहे म्हणून सांगितला.

पहिला पक्ष नाहीं. कारण, वचनांत 'सह' शब्द नाहीं. 'विवाहापासून कर्मांचे ठायीं सहत्व आहे' हें वचन गृह्याग्नीनें साध्य होणारीं जीं कर्में त्यांविषयीं आहे. आब्दिकश्राद्ध निरग्निकाला देखील पाकानें सांगितलें आहे; म्हणून स्मार्ताग्निसाध्य आहे, असा नियम नाहीं. आणि 'त्या क्रियेला गृहांतरीं ठेऊन' या अर्थाचें पूर्वीं ( हेमाद्रींत ) वचनही सांगितलेलें आहे. सहाधिकार असेल तर इतर भार्या असतांही कसा अधिकार येईल? कारण, 'ज्येष्ठ पत्नीबरोबरच अधिकार, इतरांबरोबर नाहीं' असा नियम आहे. इतर भार्या म्ह० ज्येष्ठा शुद्ध असतां असें म्हटलें तर त्या पूर्वोक्त नियमानेंच सिद्धि असल्यामुळें त्याविषयीं वचन ( पुष्पवत्स्वपि, पत्न्यंतरे इत्यादि ) व्यर्थ होईल , दुसरा पक्ष ( दोघे एकफलभागी असल्यामुळें सहाधिकार हा ) नाहीं. कारण, भ्राते अविभक्त असतां एकाला अशुचित्व असेल तर इतराला अधिकार प्राप्त होणार नाहीं. कारण, ते सारे भ्राते श्राद्धापासून झालेल्या एकफलाचे भागी आहेत. तिसरा पक्ष ( स्त्री पाक करणारी असल्यामुळें सहाधिकार हा ) ही नाहीं. कारण, आपण प्रवासांत आहे ( पत्नीजवळ नाहीं ) किंवा पत्नी दहा दिवसांपुढची सूतिका आहे अथवा रोगिणी वगैरे आहे अशा वेळीं देखील श्राद्ध करूं नये, असें प्राप्त होईल. आणि "बांधवांसह नव्या पात्रांनीं पाकाला आरंभ करावा" या देवलवचनांत 'आरभेत' हें आत्मनेपद असल्यामुळें स्वतः श्राद्धकर्त्याला व बांधवांना पाककर्तृत्व सांगितल्यानें विरोधही येतो. "तदनंतर जनककन्या सीता पाक करिती झाली" या पद्मपुराणादिवचनाच्या अर्थावरून भार्येनें केलेला पाक प्रशस्त सांगितला आहे, म्हणून तें वचन कोणालाही ( इतरांनींही पाक करावा, असें म्हणणाऱ्यांनाही ) अनिष्ट नाहीं. तेणेंकरून 'हें पंचम दिवशीं करावें' अशा अर्थाचें दीपिकावचन युक्ति, मूलवचन इत्यादिकांचा अभाव असल्यामुळें कांहीं तरी आहे, असें समजावें. आतां जें श्राद्ध-दिवस प्राप्त असतां ज्याची भार्या रजस्वला असेल त्यानें त्या दिवशीं श्राद्ध करूं नये, पांचव्या दिवशीं करावें" हा श्लोक गौतमवचनाचा पाठ वेगळा ( येथें पूर्वी दाखविला आहे तसा ) असून माधवीयांत निराळा ( वर लिहिल्याप्रमाणें ) दाखविला, व त्यावरून पक्षांतर ( निराळा पक्ष, पांचव्या दिवशीं करावें हें ) सांगितलें. तेणेंकरून देखील इष्ट अर्थाची सिद्धि होत नाहीं: कारण, 'यस्य भार्या रजस्वला' या वचनाचा अर्थ— ज्या मृताची भार्या रजस्वला असेल त्याचें श्राद्ध तिनें त्या दिवशीं करूं नये, असा समजावा. यावरून येथें हेमाद्रि अप्रसिद्ध आला. यावर पुष्कळ बोलावयाचें आहे तरी विस्तार होईल म्हणून बोलत नाहीं.

**अथान्वारोहणेनिर्णयः लौगाक्षिः** मृताहनिसमासेनपिंडनिर्वपणंपृथक् नवश्राद्धंचदंपत्योरन्वारोहणएवतु समासेनतंत्रेण द्विपितृकश्राद्धवनद्वयोरेकःपिंडोविप्रश्च पिंडशब्दःश्राद्धपरः नवश्राद्धंपृथगिति-**हेमाद्रिपृथ्वीचंद्रौ** अत्रमृताहनीत्येकत्वात्दिनभेदेदिनैक्येवामृततिथेरेकत्वेकालैक्यंकर्त्रैक्यंपाकैक्यंच एकचित्यधिरोहेतुतिथिरेकैवजायते एकपाकेनपिंडैक्येद्वयोर्गृह्णीततामनी इति**स्मृत्यंतराच अंत्येष्टिपद्धतौ भट्टै**रप्युदाहृतं अन्वारोहेतुनारीणांपत्युश्चैकोदकक्रिया पिंडदानक्रियातद्वच्छ्राद्धंप्रत्याब्दिकंतथा नवश्राद्धानिसर्वाणिसपिंडीकरणंपृथक् एकएववृषोत्सर्गोगौरेकात्रदीयतेइति तिथिभेदेतुवार्षिकंपृथगेव तथावार्षिकेसमासविधानादन्यत्रसर्वत्रपृथक्त्वेप्राप्ते नवश्राद्धमेवपृथगितिपरिसंख्ययान्यत्रपृथगुक्तेष्वपिवार्षिकषोडशश्राद्धतीर्थसपिंडनान्वष्टक्यादिषुसमासएवेति**मदनपारिजातनिर्णयामृतादयः** अतःसमासविधिबलात् ज्येष्ठपुत्रस्यकर्तृत्वेसापत्नमातुरन्वारोहणेतत्पुत्रसत्यपितद्वार्षिकादिकमविभक्तःसापत्नपुत्रएवज्येष्ठःकुर्यान्नौरसः वक्ष्यमाण**पृथ्वीचंद्रादि**मतेतु औरसएवमातुःपृथक्कुर्यात् एवंबह्वीष्वपिमातृषुज्ञेयं **त्रिस्थलीसेतौ**पितामहचरणैरप्येवमुक्तम् यत्तु**गार्ग्यः** एकचित्यांसमारूढौदंपतीनिधनंगतौ पृथक्श्राद्धंतयोः कुर्यादोदनंचपृथक्पृथक् ओदनंपिंडः तन्नवश्राद्धविषयं यत्तु**भृगुः** यासमारोहणंकुर्याद्भर्तुश्चित्यांपतिव्रता तांमृताहनिसंप्राप्तेपृथक्पिंडेनियोजयेत् प्रत्यब्दंचनवश्राद्धंयुगपत्तुसमाचरेत् तत्रेपांवार्षिकमेकोद्दिष्टमुक्तंतद्विषयं प्रत्यब्दंचमृताहनीत्यन्वयः नवश्राद्धंयुगपदिति दर्शेवर्गद्वयवदेकतंत्रेणपृथगित्यर्थमाह **हेमाद्रिः** एतन्मृततिथिभेदविषयमिति**पृथ्वीचंद्रनिर्णयामृताद्याः देवयाज्ञिको**प्येवम् **पराशरमाधवस्तु**गार्ग्यभृग्वादिवचनात्**लौगाक्षिवा**क्येसमासेनपाकादितंत्रैक्येनदर्शेवर्गद्वयवत्पृथक्श्राद्धंकुर्यात् नवश्राद्धंचतथेत्याह ।

## आतां अन्वारोहणा( सहगमना )विषयींचा निर्णय सांगतो—

**लौगाक्षि**—"अन्वारोहण ( पत्नीचें सहगमन ) असतां दंपतींचें मृतदिवशीं पिंडनिर्वपण म्हणजे श्राद्ध तंत्रानें करावें. जसें—दत्तकादिकाला दोन पित्यांचें श्राद्ध तंत्रानें सांगितलें त्याप्रमाणें येथें दोघांना एक पिंड व एक ब्राह्मण योजून श्राद्ध

करावें. या **वचनांतील** 'पिंड' **शब्दाचा अर्थ** श्राद्ध हा आहे. आणि नवश्राद्ध हें दोघांचें पृथक् करावें," असा त्या वचनाचा **अर्थ हेमाद्रि व पृथ्वीचंद्र** करितात. या वचनांत 'मृताहनि' असें एकवचन आहे त्यावरून दोघांचा मृतदिवस भिन्न असो किंवा एक असो दोघांची मृततिथि एक असली म्हणजे दोघांच्या श्राद्धाचा काल एक, कर्ता एक आणि पाक एक समजावा. "एका चितीवर दोघांचें अधिरोहण असतां दोघांची मृततिथि एकच होते. एका पाकानें एका पिंडावर दोघांचीं नांवें घ्यावीं." असें **इतर स्मृतीचें** वचनही आहे. **अंत्येष्टिपद्धतींत नारायणभट्टांनीं** देखील सांगितलें आहे,-"सहगमन असतां स्त्रियांची व पतीची उदकदानक्रिया एक व तशीच पिंडदानक्रिया एक. आणि प्रतिवार्षिक श्राद्धही तसेंच होतें. सारीं **नवश्राद्धें व सपिंडीकरण हीं** पृथक् होतात. वृषोत्सर्ग एक व त्या ठिकाणीं गोप्रदान एक समजावें." दोघांची मृततिथि भिन्न असतां वार्षिक श्राद्ध निरनिराळेंच करावें. वरील लौगाक्षिवचनानें वार्षिकाचे ठायीं तंत्राचें विधान केल्यावरून इतर सर्व श्राद्धांना पृथक्त्व ( वेगळेपणा ) प्राप्त असतां 'नवश्राद्धं पृथक्' हें वचन व्यर्थ होऊन 'नवश्राद्धच पृथक् करावें' अशा परिसंख्येनें ( नियमानें ), इतर ग्रंथीं पृथक् सांगितलेल्याही वार्षिक-षोडशश्राद्ध-तीर्थश्राद्ध-सपिंडीकरण-अन्वष्टक्य इत्यादि श्राद्धांत तंत्रच करावें, असें **मदनपारिजात, निर्णयामृत** इत्यादि ग्रंथकार सांगतात. त्या तंत्रविधीच्या बलानें ज्येष्ठ पुत्र कर्ता असून त्याच्या सापत्न मातेचें सहगमन असतां तिचा औरस पुत्र असला तरी दोघे अविभक्त असतील तर तिचें वार्षिकादिक श्राद्ध ज्येष्ठ सापत्न पुत्रानेंच करावें, औरस पुत्रानें करूं नये असें झालें. पुढें सांगावयाच्या **पृथ्वीचंद्रादिकांच्या** मतीं तर औरस पुत्रानेंच मातेचें श्राद्ध पृथक् करावें. बहुत माता असतांही असेंच जाणावें. **त्रिस्थलीसेतूंत** पितामहचरणांनीं ( नारायणभट्टांनीं ) देखील असेंच सांगितलें आहे. **आतां जें गार्ग्य**—"दोघे भार्यापती मृत होऊन एका चितीवर गेले असतां त्यांचें श्राद्ध पृथक् करावें. पिंडही पृथक् द्यावा" असें सांगतो, तें वचन नवश्राद्धविषयक आहे. आतां जें **भृगु**—"जी पतिव्रता स्त्री भर्त्याच्या चितीवर आरोहण करील तिला प्रतिवर्षी मृतदिवस प्राप्त असतां पृथक् पिंड द्यावा. आणि नवश्राद्ध दोघांचें एकदम करावें" असें सांगतो, तें ज्यांचें वार्षिकश्राद्ध एकोद्दिष्ट सांगितलें त्यांविषयीं समजावें. या वचनांत 'नवश्राद्धं युगपत्' म्हणजे—दर्शाचे ठिकाणीं जसें, पितृवर्ग व मातामहवर्ग या दोन वर्गांचें श्राद्ध एका तंत्रानें पृथक् होतें तसें-हें नवश्राद्ध एकतंत्रानें पृथक् करावें, असा अर्थ **हेमाद्रि** सांगतो. हें वचन दंपतींची मृततिथि भिन्न असतां तद्विषयक आहे, असें **पृथ्वीचंद्र, निर्णयामृत** इत्यादिक सांगतात. **देवयाज्ञिक**ही असेंच सांगतो. **पराशरमाधव** तर-**गार्ग्य, भृगु** इत्यादिकांच्या वचनांवरून लौगाक्षिवाक्यांतील 'समासेन' म्हणजे पाकादिकांचें एक तंत्र करून-जसें दर्शाचे ठायीं दोन वर्गांचें ( पितृवर्ग व मातामहवर्ग यांचें ) पृथक् श्राद्ध होतें तसें-येथें ( दंपतींचें ) पृथक् श्राद्ध करावें. नवश्राद्धही तसेंच करावें, असें सांगतो.

**पृथ्वीचंद्रचंद्रिकादयस्तु** द्वयोरेकपिंडदानंलौगाक्षिवचनंचापद्विषयं पृथक्पिंडदानंतुमुख्यःकल्पः तदाह **वृद्धपराशरः** आरुह्यभर्तुश्चितिमंगनायाप्राप्नोतिमृत्युंखलुसत्त्वयुक्ता एकादशाहेतुतयोर्विधेयंश्राद्धंपृथक्स्वर्गमपेक्ष्यसद्भिः एकत्वमिच्छंतिमतिप्रहीणाएकादशाहादिषुयेनृनार्योः तेस्वर्गमार्गंविनिहत्यकुर्युःस्त्रीसत्वघातान्नरकाधिवासं भर्त्रासहमृतायातुनाकलोकमभीप्सती सार्हेच्छ्राद्धंपृथक्पिंडान्नैकत्वंतुस्मृतंतयोः पृथगेवहिकर्तव्यंश्राद्धमेकादशाहिकं यानिश्राद्धानिसर्वाणितान्युक्तानिपृथक्पृथक् **विश्वादर्शेपि** मातुर्गयाष्टकावृद्धिमृताहेषुमहालये श्राद्धंकुर्यात्पृथग्दैवंतंत्रंचानुगतावपि एकचित्यांसमारुह्यमृतयोरेकबर्हिषि पित्रोःपिंडान्पृथग्दद्यात्पिंडंत्वापत्सुतत्सुत **इत्यग्निस्मृते**रित्याहुः यत्तु**षट्त्रिंशन्मते** एकत्वंसागताभर्तुःपिंडेगोत्रेचसूतके नपृथक्पिंडदानंतुतस्मात्पत्नीषुविद्यते इतितद्दर्शादिपरं **चंद्रप्रकाशेपि** एकचित्यांसमारूढौदंपतीप्रमृतौयदि पृथक्श्राद्धंप्रकुर्वीतपत्युरेवक्षयेहनि मृतानामपिभृत्यानांभार्याणांपतिनासह पूर्वकस्यमृतस्यादौद्वितीयस्यततःपुनः तंत्रेणश्रपणंकृत्वाश्राद्धंस्वामिक्षयेहनि तृतीयस्यततःकुर्यात्संनिपातेष्वयंक्रमइति ।

**पृथ्वीचंद्र, चंद्रिका** इत्यादिक तर-दोघांना एक पिंड देणें व त्याविषयीं लौगाक्षीनें सांगितलें तें आपत्तिविषयक आहे. पिंडदान पृथक् करावें, हा मुख्य कल्प आहे. तें सांगतो **वृद्धपराशर**—"जी धैर्ययुक्त स्त्री भर्त्याच्या चितीवर आरोहण करून मृत होते त्या स्त्रीपुरुषांचें अकराव्या दिवशीं श्राद्ध स्वर्गप्राप्ति व्हावी म्हणून पृथक् करावें. जे मंदमति नर त्या स्त्रीपुरुषांचें एकादशाहादिकांत एक श्राद्ध करितात ते नर तिच्या स्वर्गमार्गाचा विघात करून स्त्रियेच्या सत्वाचा घात केल्यामुळें नरकवास करितील. जी स्वर्गलोकाची इच्छा करणारी स्त्री भर्त्यासहवर्तमान मृत झाली ती पृथक् श्राद्धाला व पृथक् पिंडांना योग्य होते. त्या स्त्रीपुरुषांचें एक श्राद्ध कोठें सांगितलें नाहीं. त्यांचें एकादशाहिक श्राद्ध वेगळेंच करावें. जीं श्राद्धें करावयाचीं तीं सारीं वेगवेगळीं करावीं." **विश्वादर्शांतही**—"सहगमन असतांही गया, अष्टका, वृद्धि, मृतदिवस, महालय, यांचे ठिकाणीं मातेचें श्राद्ध पृथक् करावें व विश्वेदेवांचें तंत्र करावें. एका चितीवर आरोहण करून मृत झालेल्या मातापित-

रांना त्यांच्या पुत्रानें पृथक् पिंड द्यावे. आपत्कालीं एक पिंड द्यावा" अशी **अग्निस्मृति आहे**, असें सांगतात. आतां **षट्‌त्रिंशन्मतांत**—"स्त्रियेचा विवाह झाल्यावर पिंड, गोत्र व सूतक हें भर्त्याचें व तिचें एक होतें; म्हणून पत्नींना पृथक् पिंडदान नाहीं" असें सांगितलें, तें दर्शादिश्राद्धविषयक आहे. **चंद्रप्रकाशांत**ही—"जर एका चितीवर आरोहण करून आयापती मृत होतील तर पतिमरणदिवशींच दोघांचें पृथक् श्राद्ध करावें. स्वामीसहवर्तमान दास मृत होतील व पतीसहवर्तमान स्त्रिया मृत होतील तर स्वामीच्या मृतदिवशीं तंत्रानें पाक करून पूर्वी मृत असेल त्याला आधीं, पश्चात् मृत असेल त्याचें नंतर, तिसऱ्याचें त्याच्यानंतर श्राद्ध करावें. एका दिवशीं प्राप्त झालेल्या श्राद्धांविषयीं हा क्रम समजावा."

सहगमनेसर्वत्रश्राद्धार्थमेकपाकइत्याह **मदनरत्नेप्रचेताः** एकचित्यांसमारूढौम्रियेतेदंपतीयदि तंत्रेणश्रपणंकुर्यात्पृथक्पिंडंसमावपेत् **पृथ्वीचंद्रोदयेप्येवं** अत्रभर्तुराशौचमध्येऽन्यदिनेस्त्रीमरणेपतिमरणदिनगणनयाशौचपिंडदानैकादशाहादिकार्यं नात्रपक्षिणीवृद्धिः मृतंपतिमनुव्रज्यपत्नीचेदनलंगता नतत्रपक्षिणीकार्यापैतृकादेवशुद्ध्यति पुत्रोन्योवाग्निदस्तस्यास्तावदेवाशुचिस्तयोः नवश्राद्धंसपिंडंचयुगपत्तुसमापयेदिति **षडशीतिमतात्** यदानारीविशेदग्निंप्रियस्यप्रियवांछया तदाशौचंविधातव्यंभर्त्राशौचक्रमेणहीतिलघु**हारीतोक्तेश्च** भर्त्राशौचोत्तरमन्वारोहणेतुत्र्यहमाशौचं ऋग्वेदवादात्साध्वीस्त्रीनभवेदात्मघातिनी त्र्यहाशौचेनिवृत्तेतुश्राद्धंप्राप्नोतिशास्त्रतइति**ब्राह्मोक्ते**रिति **पृथ्वीचंद्रापरार्कौ** एतदन्वारोहणएव नत्वेकचितौ ऋग्वेदवादःइमानारीरविधवेत्यादिः एतदसवर्णापरमित्यन्ये ।

सहगमन असतां सर्वत्र श्राद्धासाठीं एक पाक, असें सांगतो **मदनरत्नांत प्रचेता**—"जर एका चितीवर आरोहण करून दंपती मृत होतील तर तंत्रानें पाक करावा, आणि पृथक् पिंड द्यावा." **पृथ्वीचंद्रोदयांत**ही असेंच आहे. सहगमन असतां भर्त्याच्या आशौचामध्यें भर्तृमरणाच्या इतर दिवशीं स्त्री मृत झाली असेल तर पति मृत झालेल्या दिवसापासून गणना करून आशौच, पिंडदान, एकादशाहादि कृत्य करावें. मातेच्या मरणनिमित्तानें पक्षिणी अधिक आशौच धरावें, असें पुढें आशौचप्रकरणीं सांगावयाचें आहे, तें अधिक पक्षिणी आशौच येथें (सहगमनीं) नाहीं. कारण, "मृत झालेल्या पतीच्या मागाहून जाऊन पत्नी जर अग्निप्रवेश करील तर तेथें पक्षिणी अधिक आशौच करूं नये. पित्याच्याच आशौचानें पुत्र शुद्ध होतो. तिला अग्नि देणारा पुत्र किंवा दुसरा कोणी असेल तो त्या पतीच्या आशौचापर्यंतच अशुचि होतो. त्या दोघांचें नवश्राद्ध आणि सपिंडीकरण एकदम समाप्त करावें" असें **षडशीति** स्मृतिवचन आहे. आणि "जेव्हां स्त्री पतीचें प्रिय करावें, अशा इच्छेनें अग्नींत प्रवेश करील तेव्हां भर्त्याच्या आशौचक्रमानें स्त्रियेचें आशौच करावें" असें **लघुहारीत**वचनही आहे. पतीचें आशौच समाप्त झाल्यावर अनुगमन करील तर तीन दिवस आशौच आहे. कारण, "ऋग्वेदाच्या (इमा नारीरविधवा० इत्यादिका) वादा वरून अनुगमन करणारी पतिव्रता स्त्री आत्मघातकी होत नाहीं. तीन दिवस आशौच झाल्यानंतर शास्त्रावरून ती श्राद्ध पावते." असें **ब्राह्म**वचन आहे, असें **पृथ्वीचंद्र व अपरार्क** सांगतात. हें वचन अनुगमनाविषयींच समजावें. एकचितीवर सहगमनाविषयीं समजूं नये. हें वचन असमानवर्णाच्या स्त्रीविषयीं आहे, असें **इतर ग्रंथकार** सांगतात.

**स्मार्तगौडा**स्तु देशांतरमृतेपत्यौसाध्वीतत्पादुकाद्वयमित्युपक्रम्य**ब्राह्मे** त्र्यहाशौचेतुनिर्वृत्तेइत्युक्तेर्भर्त्राशौचोत्तरमन्वारोहणेत्र्यहः सहगमनेतुपूर्णंदशाहादि पिंडास्तुदशापिसहैव तथाच**जनकशूलपाणिशुद्धितत्त्वधृतव्यासः** संस्थितंपतिमालिंग्यप्रविशेद्याहुताशनं तस्याःपिंडादिकंज्ञेयंक्रमशःपतिपिंडवत् अन्वितापिंडदानंतुयथाभर्तुर्दिनेदिने तदन्वारोहिणीयस्मात्सामृतानात्मघातिनीति**विष्णूक्तेश्च** पृथक्चितौतुभर्त्राशौचमध्येतदूर्ध्वंवासत्यांत्र्यहेणदशपिंडाः अन्वितायाःप्रदातव्यादशपिंडास्त्र्यहेणतु स्वाम्याशौचेव्यतीतेतुतस्याःश्राद्धंप्रदीयतइतितत्रैव**पैठीनसिस्मृतेः** भर्त्राशौचोत्तरंमृतौतुचतुर्थेह्निश्राद्धं शूलपाणिनात्विदमग्निपुराणीयत्वेनोक्तं युद्धहतस्यसद्यःशौचेत्वन्वारोहणेत्रिरात्रं एकचितौतुसंस्थितंपतिमितिप्रागुक्त**व्यासोक्तेः**सद्यःशौचमित्याहुः अन्यसपिंडाशौचमध्येविदेशमृतान्वारोहणंत्वनाशंक्यमेव शुचितायाअंगत्वात् अन्येतुरजोवत्याःसूतिकायाश्चानुगमननिषेधादितराशौचस्यानिषेधः अन्यथाप्रत्यक्षभर्तृमरणेकागतिरित्याहुः तन्मूलवचनंविनाचिंत्यमेव **स्मृत्यर्थसारेपि** सहगमनेसर्वत्रश्राद्धपिंडादौपाकैक्यंकालैक्यंकर्त्रैक्यंचेति यातुपतिमुद्दिश्याऽन्यकालेऽन्यतिथावन्वारूढातस्याःश्राद्धंतत्क्षयतिथौकार्यंनभर्तृतिथौ पारणेमरणेनृणांतिथि-

स्तात्कालिकीस्मृतेतिस्कांदात् तिथिरेकैवजायतइत्यादिवचनाच्चेतिमदनरत्नपारिजातपृथ्वीचंद्रादयः अन्येतुतस्याःपतिमरणेनमृतप्रायत्वात् सहाग्रतःपृष्ठतोवातद्भक्त्याम्रियतेयदि तस्याःश्राद्धंप्रदातव्यं पृथक्पत्युःक्षयेहनीतिस्मृत्यंतरात् अग्रतःपृष्ठतोवापितद्भक्त्याम्रियतेयदि तस्याःश्राद्धंसुतैःकार्यंपत्युरेवक्षयेहनीतिपुराणसमुच्चयाच्चभर्तृतिथावेवेत्याहुः अत्रमूलंचिंत्यं अत्रविशेषोहेमाद्रौस्मृत्यंतरे मातामंगलसूत्रेणम्रियतेयदितद्दिने उद्दिश्यविप्रपंक्तौतांभोजयेच्चसुवासिनीम् ।

**स्मार्तगौड तर**—"देशांतरीं पति मृत असतां साध्वी स्त्रियेनें पतीच्या दोन पादुका ग्रहण करून" असा उपक्रम करून "तीन दिवस आशौच निवृत्त झालें असतां श्राद्ध यावें" असें ब्राह्मांत सांगितल्यावरून भर्त्याच्या आशौचानंतर अनुगमन असतां तीन दिवस आशौच. सहगमन असतां संपूर्ण दशाहादि आशौच. पिंड तर दहाही पतीबरोबरच द्यावे. तसेंच सांगतो **जनकशूलपाणि** व **शुद्धितत्त्व** यांत **व्यास**—"जी स्त्री मृत झालेल्या पतीस आलिंगन करून अग्नींत प्रवेश करील तिला पतिपिंडाप्रमाणें अनुक्रमानें पिंडादिक द्यावें." आणि "सहगमन करणाऱ्या स्त्रियेला पिंडदान जसें तिच्या भर्त्याला प्रतिदिवशीं करावयाचें तसें करावें. ती स्त्री पतीच्या बरोबर जाऊन मृत झाली आहे, म्हणून आत्मघातिनी होत नाहीं." असें **विष्णु**-वचनही आहे. भर्त्याच्या आशौचामध्यें किंवा नंतर स्त्रियेची पृथक् चिती असेल तर तीन दिवसांत दहा पिंड द्यावे. कारण "अनुगमन करणाऱ्या स्त्रियेला तीन दिवसांत दहा पिंड द्यावे. पतीचें आशौच निवृत्त झाल्यानंतर श्राद्ध द्यावें." असें तेथेंच **पैठीनसि** स्मृतिवचन आहे. भर्त्याच्या आशौचानंतर मृत असेल तर तिला चवथ्या दिवशीं श्राद्ध द्यावें **शूलपाणीनें** तर हें वचन अग्निपुराणांतील सांगितलें आहे. युद्धांत मृत झालेल्याचें सद्यःशौच ( तत्काल शुद्धि ) होतें. अन्वारोहण असतां त्रिरात्र आशौच. दंपतींची एकचिती असतां 'संश्लिष्टं पतिमालिंग्य०' ह्या वर सांगितलेल्या **व्यासवचना**वरून स्त्रियेचें सद्यःशौच होतें. असें ( **स्मार्तगौड** ) सांगतात. विदेशांत मृत झालेल्या पतीशीं अन्वारोहण इतर सपिंडांच्या आशौचामध्यें असेल तर, असें आशंकूं नये; कारण, अन्वारोहणाविषयीं शुचित्व हें अंग आहे. **इतर ग्रंथकार** तर—रजस्वला व सूतिका यांना सहगमनाचा निषेध असल्यामुळें इतरांच्या आशौचाचा निषेध नाहीं. इतराशौचाचा निषेध मानला तर प्रत्यक्ष भर्ता मेला असतां आशौचाची गति काय ? असें सांगतात. या इतर ग्रंथकारांच्या मतास मूलवचन नसल्यामुळें तें मत चिंत्य ( उपेक्षणीय )च आहे. **स्मृत्यर्थसारांत**ही—सहगमन असतां सर्वत्र ठिकाणीं श्राद्ध, पिंड इत्यादिकांत पाक एक, काल एक आणि कर्ताही एकच. जी स्त्री पतीच्या उद्देशानें अन्य कालीं अन्यतिथीस अन्वारूढ झाली ( सती गेली ) तिचें श्राद्ध तिच्या मृततिथीस करावें. पतीच्या मृततिथीस करूं नये. कारण, "उपवासाची पारणा व मरण यांचे ठायीं तत्कालीं तिथि असेल ती घ्यावी" असें **स्कंद**पुराणवचन आहे. आणि "एकचितीवर आरोहण केलें असतां तिथि एकच होते" इत्यादि वचनही आहे, असें **मदनरत्न, पारिजात, पृथ्वीचंद्र** इत्यादिक सांगतात. **अन्य ग्रंथकार** तर—ती स्त्री पति मेल्यानें मृतप्राय झाल्यामुळें "पतीच्या भक्तीनें त्याच्या बरोबर किंवा पूर्वी अथवा मागाहून जर स्त्री मरेल तर तिचें श्राद्ध पतीच्या मृत दिवशीं पृथक् करावें." ह्या स्मृत्यंतरवचनावरून; आणि "पतीच्या पूर्वी किंवा मागाहून पतीच्या भक्तीनें जर स्त्री मरेल तर तिचें श्राद्ध पुत्रांनीं पतीच्याच मृतदिवशीं करावें" ह्या **पुराणसमुच्चय**वचनावरूनही पतीच्या मृततिथीसच करावें, असें सांगतात. याविषयीं मूलवचन चिंत्य ( अनुपलब्ध ) आहे. येथें विशेष सांगतो **हेमाद्रींत स्मृत्यंतरांत**—"माता मंगळसूत्रासह ( सुवासिनी ) मृत होईल तर तिच्या मृतदिवशीं श्राद्धीयब्राह्मणांच्या पंक्तींत तिच्या उद्देशानें सुवासिनीला भोजन घालावें."

**अथश्राद्धसंपातेनिर्णयः** अत्रपित्रोर्मृततिथ्यैकत्वेमरणक्रमेणदर्शेवर्गद्वयवत्तंत्रेणश्राद्धंकुर्यात् पौर्वापर्याज्ञानेतुपितृपूर्वकंकुर्यादितिहेमाद्रिः माधवादयस्तुपित्रोःश्राद्धेसमंप्राप्तेनवेपर्युषितेपिवा पितृपूर्वंसुतःकुर्यादन्यत्रासंनियोगतइतिकार्ष्णाजिनिस्मृतेः सर्वत्रपितृपूर्वंभिन्नप्रयोगमाहुः पार्वणैकोद्दिष्टयोःसंपाते माधवीयेजाबालिः यद्येकत्रभवेयातामेकोद्दिष्टंचपार्वणं पार्वणंत्वभिनिर्वर्त्यएकोद्दिष्टंसमाचरेत् गृहदाहादिनायुगपन्मरणेभृगुः एककालेगतासूनांबहूनामथवाद्वयोः तंत्रेणश्रपणंकृत्वाकुर्याच्छ्राद्धंपृथक्पृथक् पूर्वकस्यमृतस्यादौद्वितीयस्यततःपुनः तृतीयस्यततःकुर्यात्सन्निपातेष्वयंक्रमः ऋष्यशृंगः भवेद्यदिसपिंडानां युगपन्मरणंतदा संबंधासत्तिमालोच्यतत्क्रमाच्छ्राद्धमाचरेत् गारुडे एकेनैवतुपाकेनश्राद्धानिकुरुतेत्रहि विकिरंत्वेकतःकुर्यात्पिंडान्दद्यात्पृथक्पृथक् अत्रानुगमनेचदाहसपिंडनादौविशेषंवक्ष्यामः अत्रिः बहूनामथवाद्वाभ्यांश्राद्धंचेत्स्यात्समेहनि तंत्रेणश्रपणंकृत्वापृथक्श्राद्धानिकारयेत् पुलस्त्यः महालयेगयाश्राद्धेगतासूनांक्षयेहनि तंत्रेणश्रपणंकृत्वाश्राद्धंकुर्यात्पृथक्पृथक् इदंचपृथक्पाकेनभिन्नश्राद्धाशक्तौ पृथक्पाकेनसंबंधासत्त्या-

**श्राद्धभेदस्तुमुख्यःपक्षः** एकस्मिन्नेवदिनेश्राद्धद्वयंप्राप्तंयदातदा चरेदेवपुरावर्षात्पितुर्मातुश्चतत्सुतः एकस्मिन्यः करोत्यह्निद्वयोःश्राद्धंयदाद्विजः तदापूर्वमृतस्यादौकृत्वास्नात्वायथाविधि पश्चात्पश्चान्मृतस्यैवपृथक्पाकैः समाचरेत् नैकस्मिन्दिवसेश्राद्धंत्रयाणांकुत्रचिद्द्विजः एकःकुर्यात्तथाप्राप्तेअन्योभ्रातासमाचरेत् भ्रातर्यविद्यमानेतुतत्परेह्निसमाचरेत् अन्यथाश्राद्धहंतास्याच्छ्राद्धसंकरकृद्भवेत् **इत्याश्वलायनोक्तेरितिपृथ्वीचंद्रः।**

## आतां श्राद्धसंपात ( अनेक श्राद्धें एक दिवशीं प्राप्त ) असतां निर्णय सांगतो—

त्यांत मातेची व पित्याची मृततिथि एक असतां मरणाच्या क्रमानें ( पूर्वी मृताचा पूर्वी उद्देश करून ) जसें-दर्शाचे ठायीं पितृवर्ग व मातामहवर्ग या दोघांचें तंत्र होतें तसें तंत्रानें श्राद्ध करावें. पूर्वी कोण मृत झालें व नंतर कोण याचें ज्ञान नसेल तर पितृपूर्वक श्राद्ध करावें, असें **हेमाद्रि** सांगतो. **माधव** इत्यादिक तर-"आईबापांचें नवश्राद्ध किंवा पुराणश्राद्ध एका दिवशीं प्राप्त असतां पुत्रानें पितृपूर्वक करावें. बरोबर मृत नसतील त्यांविषयीं हा नियम नाहीं" ह्या **कार्ष्णाजिनि** स्मृतीवरून सर्वत्र पितृपूर्वक भिन्न प्रयोगानें करावें, असें सांगतात. पार्वण व एकोद्दिष्ट यांचा संपात असतां **माधवीयांत जाबालि**—"एकोद्दिष्ट आणि पार्वण हीं दोन श्राद्धें जर एक दिवशीं प्राप्त होतील तर पार्वण करून नंतर एकोद्दिष्ट करावें." घर जळणें इत्यादि कारणांनीं अनेक मनुष्य एकदम मृत झाले असतां **भृगु**—"एककालीं बहुत किंवा दोन मृत झाले असतां तंत्रानें ( एकदम ) पाक करून वेगवेगळें श्राद्ध करावें. त्यांमध्यें पूर्वी मृतानें पूर्वी करावें. पश्चात् मृताचें नंतर करावें. तिसऱ्याचें तदनंतर करावें. श्राद्धांचा संपात ( अनेक श्राद्धें एककालीं प्राप्त ) असतां हा क्रम समजावा." **ऋष्यशृंग**—"जेव्हां सपिंडांचें एकदम मरण असेल तेव्हां संबंधसामीप्य पाहून त्या क्रमानें श्राद्ध करावें." **गारुडांत**—"एकाच पाकानें अनेक श्राद्धें करितो तेव्हां त्या श्राद्धांत विकिर एका ठिकाणीं देऊन वेगवेगळे पिंड द्यावे." एककालीं अनेक मरतील त्या ठिकाणीं आणि अनुगमनाचे ठायीं दाह, सपिंडीकरण इत्यादिकांविषयीं विशेष निर्णय पुढें सांगूं. **अत्रि**—"बहुतांचें अथवा दोघांचें श्राद्ध एक दिवशीं प्राप्त असेल तर तंत्रानें एक पाक करून श्राद्धें वेगवेगळीं करावीं." **पुलस्त्य**—"महालयांत, गयेंत आणि मृतदिवशीं तंत्रानें एक पाक करून बहुत मृतांचें वेगवेगळें श्राद्ध करावें." एक पाकानें पृथक् श्राद्ध करणें हें वेगवेगळ्या पाकानें भिन्न भिन्न श्राद्ध करण्याविषयीं शक्ति नसतां समजावें. संबंधसामीप्य पाहून भिन्न भिन्न पाकानें भिन्न श्राद्ध करणें हा मुख्य पक्ष आहे. कारण, "पित्याचें व मातेचें अशीं दोन श्राद्धें एका दिवशीं जेव्हां प्राप्त होतील तेव्हां तीं वर्षाच्या आंतील असतील तरी त्यांच्या पुत्रानें करावींच. जो द्विज एका दिवशीं दोघांचीं श्राद्धें करीत असेल तेव्हां त्यानें पूर्वी मृताचें आधीं यथाविधि श्राद्ध करून स्नान करून नंतर पश्चात् मृताचें पृथक् पाकानें श्राद्ध करावें. एका द्विजानें ( ब्राह्मणादिकानें ) तिघांचें श्राद्ध कोठेंही करूं नये. एका दिवशीं तिघांचें श्राद्ध प्राप्त असतां इतर भ्रात्यानें तें तिसरें श्राद्ध करावें. भ्राता नसेल तर तें तिसरें श्राद्ध दुसऱ्या दिवशीं करावें. अन्यथा म्हणजे एका दिवशीं तिघांचें श्राद्ध करील तर श्राद्धसंकरकारी श्राद्धाचा घात करणारा होईल" असें **आश्वलायन**वचन आहे, असें **पृथ्वीचंद्र** सांगतो.

**कात्यायनः** द्वेबहूनिनिमित्तानिजायेरन्नेकवासरे नैमित्तिकानिकार्याणिनिमित्तोत्पत्त्यनुक्रमात् **जाबालिः** श्राद्धंकृत्वातुतस्यैवपुनःश्राद्धंनतद्दिने नैमित्तिकंतुकर्तव्यंनिमित्तानुक्रमोदयं **कालादर्शे** नित्यदार्शिकयोश्चोदकुंभमासिकयोरपि दार्शिकस्ययुगादेश्चदार्शिकालभ्ययोगयोः दार्शिकस्यचमन्वादेःसंपातेश्राद्धकर्मणः प्रसंगादितरस्यापिसिद्धेरुत्तरमाचरेत् अस्यदेवताभेदेपवादमाह**सएव** नित्यस्यचोदकुंभस्यनित्यमासिकयोरपि दर्शस्यचोदकुंभस्यदर्शमासिकयोरपि नित्यस्यचाब्दिकस्यापिदार्शिकाब्दिकयोरपि युगाद्याब्दिकयोश्चैवमन्वाद्याब्दिकयोस्तथा प्रत्याब्दिकस्यचालभ्ययोगेपुविहितस्यच संपातेदेवताभेदाच्छ्राद्धयुग्मंसमाचरेत निमित्तानियतिश्चात्रपूर्वानुष्ठानकारणं पित्रोस्तुपितृपूर्वत्वंसर्वत्रश्राद्धकर्मणि **माधवीयेस्मृतिसंग्रहे** काम्यतंत्रेणनित्यस्यतंत्रंश्राद्धस्यसिध्यति ।

**कात्यायन**—"एक दिवशीं दोन किंवा बहुत श्राद्धादिकांचीं निमित्तें प्राप्त होतील तर ज्या क्रमानें निमित्त उत्पन्न असेल त्या क्रमानें तीं नैमित्तिक कर्में करावीं." **जाबालि**—"एकदां एकाचें श्राद्ध करून पुनः त्या दिवशीं त्याचेंच श्राद्ध होत नाहीं. नैमित्तिक असेल तर तें, निमित्त उत्पन्न असेल त्या क्रमानें करावें." **कालादर्शांत**—"नित्यश्राद्ध व दर्श, उदकुंभश्राद्ध व मासिक, दर्श व युगादिश्राद्ध, दर्श व अलभ्ययोगनिमित्तक श्राद्ध, दर्श व मन्वादिक श्राद्ध, अशीं दोन दोन श्राद्धें एक दिवशीं प्राप्त असतां पुढच्या श्राद्धाच्या प्रसंगानें पूर्वश्राद्धाची देखील सिद्धि होते, ती अशी कीं, दर्शानें नित्यश्राद्धसिद्धि, मासिकानें उदकुंभसिद्धि इत्यादि होते म्हणून पुढचें श्राद्ध करावें." संपाताच्या देवता भिन्न असतां अपवाद तोच सांगतो—

"नित्यश्राद्ध व उदकुंभ, नित्यश्राद्ध व मासिक, दर्श व उदकुंभ, दर्श व मासिक, नित्यश्राद्ध व आब्दिक, दर्श व आब्दिक, युगादिश्राद्ध व आब्दिक, मन्वादिक व आब्दिक, प्रत्याब्दिक व अलभ्ययोगनिमित्तक यांचा संपात ( हीं दोन दोन एक दिवशीं प्राप्त ) असतां देवतांचा भेद असल्यामुळें दोन श्राद्धें करावीं. ज्या श्राद्धाचें निमित्त नियत ( ठरींव ) नसेल तें श्राद्ध पूर्वी करावें. मातेचें व पित्याचें श्राद्ध एक दिवशीं प्राप्त असतां सर्वत्र ठिकाणीं पित्याचें पूर्वी करावें." **माधवीयांत स्मृतिसंग्रहांत**—"काम्यश्राद्धाच्या तंत्रानें नित्यश्राद्धाचें तंत्र सिद्ध होतें."

**अथश्राद्धांगतर्पणम् पारिजातेपृथ्वीचंद्रोदयेचगर्गः** पूर्वंतिलोदकंकृत्वाअमाश्राद्धंतुकारयेत् प्रत्यब्देनभवेत्पूर्वंपरेऽहनितिलोदकं पक्षश्राद्धेहिरण्येचअनुव्रज्यतिलोदकं नचनित्यतर्पणस्यायंपरेह्न्युत्कर्षः नतुश्राद्धांगतर्पणमस्तीतिवाच्यं यस्तर्पयतितान्विप्रःश्राद्धंकृत्वापरेहनि पितरस्तेनतृप्यंतिनचेत्कुप्यंतिवैभृशमितिगर्गेणफलनिंदार्थवादाभ्यामंगत्वेनोक्तेः श्राद्धप्रक्रमाद्वार्षिकं **बृहन्नारदीये**प्याब्दिकंप्रक्रम्य परेद्युः श्राद्धकृन्मर्त्योयोनतर्पयतेपितॄन् तस्यतेपितरःक्रुद्धाःशापंदत्वाव्रजंतिहि पितृशब्दश्चश्राद्धेज्यवर्गपरः तेनतर्पणस्यपशुपुरोडाशयागवत्प्रस्तरप्रहरणवच्चेष्टदेवतासंस्कारकता तेनाब्दिकेदिनेनित्यंस्वपित्रादितर्पणंकार्यमेव श्राद्धांगभूतस्यैवपरेद्युरुक्तेः **तदुक्तं** प्रत्यब्दांगंतिलंदद्यान्निषिद्धेपिपरेहनि वर्गैकस्यवचोयेषामन्येषांतुविवर्जयेत ।

## आतां श्राद्धांगतर्पण सांगतो—

**पारिजातांत** आणि **पृथ्वीचंद्रोदयांत गर्ग**—"अमावास्येस पूर्वी तिलोदक देऊन नंतर श्राद्ध करावें. प्रतिसांवत्सरिक श्राद्धांत पूर्वी तिलोदक नाहीं, दुसऱ्या दिवशीं तिलोदक द्यावें. पक्षश्राद्धांत व हिरण्यश्राद्धांत श्राद्ध झाल्यावर ब्राह्मणांस पोंचवून नंतर तिलोदक द्यावें." आतां कोणी असें म्हणेल कीं, 'नित्यतर्पण करावयाचें तेंच सांवत्सरिकांत ह्या गर्गवचनानें दुसऱ्या दिवशीं करावें म्हणून सांगितलें आहे. नित्यतर्पणावांचून निराळें श्राद्धाचें अंगभूत तर्पण नाहीं.' तर तसें त्याला म्हणतां येणार नाहीं; कारण, "जो ब्राह्मण श्राद्ध करून दुसऱ्या दिवशीं त्या पितरांना तर्पण करितो, त्या तर्पणानें पितर तृप्त होतात. त्यानें तर्पण केलें नाहीं तर पितर अत्यंत कुपित होतात." या **गर्ग**वचनानें तर्पण करणाराला फल व न करणाराची निंदा असे दोन अर्थवाद[1] सांगितल्यावरून तर्पण हें श्राद्धाचें अंग आहे असें होतें. श्राद्धाच्या उपक्रमावरून ह्या वचनांतील श्राद्ध वार्षिक होय. **बृहन्नारदीयांत**ही-आब्दिकश्राद्धाचा उपक्रम करून सांगतो-"जो श्राद्ध करणारा मनुष्य दुसऱ्या दिवशीं पितरांचें तर्पण करीत नाहीं, त्याचे ते पितर क्रुद्ध होऊन शाप देऊन जातात." या वचनांतील 'पितृ' हा शब्द श्राद्धांत पूज्य वर्गाचा बोधक आहे. यावरून तर्पण हें इष्ट देवतेला ( पूज्य पित्रादिकांना ) एक प्रकारचा संस्कार करणारें आहे. जसें—ज्योतिष्टोमाचा अंगभूत जो अग्नीषोमीय पशुयाग त्या ठिकाणीं असें आहे कीं, 'अग्नीषोमीयं पशुपुरोडाशमेकादशकपालं निर्वपति' याचा अर्थ-अग्नीषोमदेवताक पशुपुरोडाशयाग एकादशकपालांत निर्वाप करून करावा. तेथें पशुयागाची जी देवता अग्नीषोम तिलाच हा पुरोडाशयागसंस्कार आहे. हा प्रकार जैमिनीयन्यायमाला अध्याय १० पाद १ अधिकरण ९ या ठिकाणीं विवेचन करून सांगितला आहे. तसें-श्राद्धाच्या ज्या देवता त्यांनाच हें तर्पण संस्कार करणारें आहे. आणि पूर्वी अग्नौकरणप्रकरणीं प्रस्तरप्रहरण सांगितलें आहे तसेंही हें तर्पण समजावें. तेणेंकरून प्रतिसांवत्सरिकाच्या दिवशीं पित्रादिकांचें नित्यतर्पण करावेंच. कारण, श्राद्धाचें अंगभूत जें तर्पण तेंच दुसऱ्या दिवशीं सांगितलें आहे. तेंच सांगतो—"प्रतिवार्षिकाचें अंगभूत तिलतर्पण, तर्पणाला निषिद्ध अशाही दुसऱ्या दिवशीं द्यावें. तें ज्या वर्गाचें श्राद्ध असेल त्या वर्गाला द्यावें, इतरांना वर्ज्य करावें."

**कश्चिद्विशेषमाहगर्गः** कृष्णेभाद्रपदेमासिश्राद्धंप्रतिदिनंभवेत् पितॄणांप्रत्यहंकार्यंनिषिद्धाहेपितर्पणं तर्पणंतिलतर्पणं निषिद्धाहेपीत्युक्तेः सकृन्महालयेश्वःस्यादष्टकास्वंतएवहि अत्रसप्तमीनिर्देशात्अंगितास्फुटैव तत्रजयान्जुहुयात् मंद्रंप्रायणीयायांमंद्रंप्रातःसवनेइत्यादिवत् अस्यापवादो**बृहन्नारदीये** वृद्धिश्राद्धेसपिंड्यांचप्रेतश्राद्धेनुमासिके संवत्सरविमोकेचनकुर्यात्तिलतर्पणं तदयमर्थः दर्शेविप्रनिमंत्रणोत्तरंपाकारंभोत्तरंवाश्राद्धप्रयोगस्यारब्धत्वात् ब्रह्मयज्ञोत्तरंनित्यतर्पणेनैवश्राद्धांगतर्पणस्यतंत्रेणप्रसंगेनवासिद्धिः ततः पूर्ववैश्वदेवोत्तरंवाब्रह्मयज्ञकरणेश्राद्धांगतर्पणंपृथक्कार्यं पित्रोर्वार्षिकेतुनित्यतर्पणंतिलवर्ज्यंकार्यं नैवश्राद्धदिनेकुर्यात्तिलैस्तुपितृतर्पणं श्राद्धंकृत्वापराह्णेचतर्पणंतुतिलैःसहेतिवचनात् सप्तम्यांभानुवारेचमातापित्रोर्मृतेहनि तिलैर्यस्तर्पणंकुर्यात्सभवेत्पितृघातकइति **स्मृतिरत्नावल्यांवृद्धमनूक्तेश्च** अत्रनित्यतिलतर्पणेतिलमात्रनिषेधोनतु-

---

१ स्तुति किंवा निंदा बोधक जें वाक्य तो अर्थवाद होय.

तर्पणस्य तिलैरित्यस्यवैयर्थ्यापत्तेः यत्तुकातीयम् उपरागेपितुःश्राद्धेपातेमायांचसंक्रमे निषिद्धेपिहिसर्वत्र-तिलैस्तर्पणमाचरेदिति ततूपरेद्युःश्राद्धांगतर्पणविषयमितिकेचित् श्राद्धाशक्तस्यतत्स्थानापन्नतर्पणविषयमि-तियुक्तं सकृन्महालयेपरेद्युस्तर्पणं अष्टकासुतुसप्तम्यष्टमीश्राद्धयोरंतेतदैववर्गद्वयस्य अन्वष्टक्येतुमातृवर्गस्यापि तीर्थश्राद्धेदर्शवत् माघ्यादिष्वष्टकावदंते अनेकश्राद्धसंपातेतुयदितत्प्रसंगसिद्धिःतदातदीयमेवतर्पणं तंत्रत्वेतु-श्राद्धसमसंख्यत्वेआदावंतेवा विषमसंख्यायांबह्वनुरोधइति तस्माच्छ्राद्धांगतर्पणंसिद्धम् ।

क्वचित्स्थलीं विशेष सांगतो **गर्ग**—"भाद्रपदमासीं कृष्णपक्षांत प्रतिदिवशीं पितरांचें श्राद्ध होतें त्या ठिकाणीं निषिद्ध-दिवशीं देखील प्रत्यहीं पितरांचें तर्पण करावें." या वचनांत 'निषिद्ध दिवशीं देखील' असें म्हटलें आहे, म्हणून तर्पण म्हणजे तिलतर्पण समजावें. "सकृन्महालयीं ( भाद्रपदकृष्णपक्षीं एकवार महालय करावयाचा त्यापक्षीं ) दुसऱ्या दिवशीं तिलतर्पण. अष्टकाश्राद्धांत श्राद्धाच्या अंतींच तिलतर्पण करावें." या वचनांत 'सकृन्महालये', 'अष्टकासु' अशी सप्तमी विभक्ति केली आहे यावरून सकृन्महालय इत्यादिश्राद्ध अंगि व तर्पण हें त्याचें अंग, असें स्पष्ट होतें. जसें–श्रौतांत 'येन कर्मणेत्सेंत् तत्र जयान् जुहुयात्' हें वाक्य कोणत्याही यज्ञप्रकरणावांचून पठित आहे. त्याचा अर्थ—ज्या कर्मानें समृद्धि व्हावी, अशी इच्छा असेल त्या कर्मात जयाहोम करावा. या वाक्यांत 'तत्र' या सप्तमी विभक्तीवरून त्या कर्माचें जयाहोम अंग आहे, असें होतें. व जसें–प्रायणीय इष्टीचे ठायीं मंद स्वर सांगितला. प्रातःसवनांतही मंद स्वर सांगितला आहे. ते जसे–'प्रातः-सवने' इत्यादि सप्तमीवरून प्रातःसवनाचा मंद स्वर अंग आहे तसेंच हें तर्पण श्राद्धाचें अंग होय. या तिलतर्पणाचा **अप-वाद बृहन्नारदीयांत**—"वृद्धिश्राद्ध, सपिंडीकरण, प्रेतश्राद्ध, अनुमासिक, संवत्सरविमोकश्राद्ध ( अब्दपूर्तिश्राद्ध ) इतक्या ठिकाणीं तिलतर्पण करूं नये." त्या वरील सर्व तर्पणवचनाचा भावार्थ असा—दर्शाचे ठायीं ब्राह्मणनिमंत्रण झाल्यावर किंवा पाकारंभ झाल्यानंतर श्राद्धप्रयोगाला आरंभ झाल्यामुळें ब्रह्मयज्ञोत्तर करावयाचें जें नित्यतर्पण त्यानेंच श्राद्धांगतर्पणाची तंत्रानें किंवा प्रसंगानें सिद्धि होते. विप्रनिमंत्रणाच्या किंवा पाकारंभाच्या पूर्वी ब्रह्मयज्ञ केला असतां अथवा श्राद्धांतीं वैश्वदेव झाल्यावर ब्रह्मयज्ञ असतां श्राद्धांग तर्पण निराळें करावें. मातापितरांच्या वार्षिक श्राद्धाचे दिवशीं नित्यतर्पण तिलरहित करावें. कारण, "श्राद्धाच्या दिवशीं तिलांनीं पितृतर्पण करूं नये. श्राद्ध करून अपराह्णीं तिलतर्पण करावें" असें वचन आहे. आणि "सप्तमी, भानुवार, व आईबापांचे मृतदिवस यांचे ठायीं जो मनुष्य तिलांनीं तर्पण करील तो पितरांचा घात करणारा होईल" असें **स्मृतिरत्नावलींत वृद्धमनूचें** वचनही आहे. नित्य तिलतर्पण करीत असेल तर येथें तिलांचा मात्र निषेध आहे. तर्पणाचा निषेध नाहीं. तर्पणाचा निषेध मानला तर वचनांत 'तिलैः' हें पद व्यर्थ होईल. आतां जें **कातीयवचन**—"चंद्र-सूर्य-ग्रहण, बापाचें श्राद्ध, व्यतीपात, अमावास्या, संक्रांति यांचे ठायीं तर्पणाला निषिद्ध दिवस असतांही तिलांनीं तर्पण करावें" असें आहे, तें दुसऱ्या दिवशीं श्राद्धांगतर्पणविषयक आहे, असें केचित् म्हणतात. श्राद्धाविषयीं अशक्त असेल त्याला श्राद्धाच्या स्थानीं तर्पण सांगितलें आहे त्याविषयीं हें कातीयवचन आहे, असें म्हणणें युक्त आहे. सकृन्महालयाचे ठायीं दुसऱ्या दिवशीं तर्पण करावें. अष्टकांमध्यें सप्तमीश्राद्धांत व अष्टमीश्राद्धांत त्याच वेळीं अंतीं दोन वर्गांचें ( पितृवर्ग व माता-महवर्ग यांचें ) तर्पण करावें. अन्वष्टक्यांत मातृवर्गाचेंही करावें. तीर्थश्राद्धांत दर्शाप्रमाणें करावें. माघ्यावर्षादिकश्राद्धांत अष्टकाप्रमाणें अंतीं करावें. अनेक श्राद्धांचा संपात असतां एक श्राद्धानें इतरांची प्रसंगसिद्धि असेल तर ज्यांचें श्राद्ध केलें असेल त्यांचेंच तर्पण करावें. विरुद्धतर्पणाच्या श्राद्धांचें तंत्र असतां श्राद्धांची समसंख्या असेल तर आधीं किंवा अंतीं करावें. विषमसंख्या असेल तर बहुत श्राद्धांच्या अनुरोधानें तर्पण करावें. तस्मात् श्राद्धांगतर्पण सिद्ध झालें.

तद्विधिः**संग्रहे** स्नात्वातीरंसमागत्यउपविश्यकुशासने संतर्पयेत्पितृन्सर्वान्स्नात्वावस्त्रंचधारयेत् तर्प-णोत्तरंनित्यस्नानंकृत्वेत्यर्थः अपसव्यंततःकृत्वासव्यंजान्वाच्यभूतले नामगोत्रस्वधाकारैर्द्वितीयांतेनतर्पयेत् अत्रवस्वादिरूपतोक्तास्**मृत्यर्थसारे** वसुरुद्रादितिसुतान्श्राद्धार्थेतर्पयेत्पितृन् तत्रबह्वृचानांदक्षिणेनैव अना-देशेदक्षिणंप्रतीयादिति**सूत्रात्** अत्रप्रत्यंजलिमंत्रावृत्तिः निर्वापवत्तत्संध्यार्घ्यदानवच्च द्रव्यभेदात् अवघा-तवेदिप्रोक्षणादौतुद्रव्यैकत्वान्नमंत्रावृत्तिः **केचित्तु**परिव्याणमंत्रवत्क्रियमाणानुवादित्वेनकरणत्वाभावात्स-कृदिच्छंति तन्न तत्रापूपद्रव्यैक्यात्परवीरसीतिकरणीभूतमंत्रांतरसत्त्वादन्यतरेणव्यवधानापत्त्योभयोःकर-णत्वायोगात् कर्त्रभेदेनविकल्पायोगाच्चक्रियमाणानुवादित्वंनत्वत्रतथेति**बौधायनादि**वचनात्करणत्वमेव-तेनावृत्तिरेवयुक्ता एवंनित्येपि यत्तु**संग्रहे**नाम्नापठंति पित्रोःक्षयाहेसंप्राप्तेयःकुर्यान्नित्यतर्पणं आसुरंतद्भवे-च्छ्राद्धंतत्तोयंरुधिरंभवेत् सर्वदातर्पणंकुर्याद्ब्रह्मयज्ञपुरःसरं मृताहेनैवकर्तव्यंकृतंचेन्निष्फलंभवेत् तत्समूलत्वे-सतितिलविषयं यच्चपठंति **कपिलः** मन्वादिषुयुगाद्यासुदर्शेसंक्रमणेषुच पौर्णमास्यांव्यतीपातेवृद्यात्पूर्वं-

तिलोदकं अर्धोदयेगजच्छायेषष्ठीषुचमहालये भरण्यांचमघाश्राद्धेतदंतेतर्पणंविदुः **शौनकः** मातापित्रोर्मृताहेचपरेहनितिलोदकं कारुण्यश्राद्धविषयेसद्योदद्यात्तिलोदकं एतन्निर्मूलं ।

## तर्पणाचा विधि सांगतो—

**संग्रहांत**—"तीर्थाच्या उदकांत स्नान करून तीरास जाऊन दर्भासनावर बसून साऱ्या पितरांचें तर्पण करावें. नंतर नित्यस्नान करून दुसरें वस्त्र परिधान करावें." तर्पणाचा प्रकार—"अपसव्य करून डावा गुडघा भूमीवर टेंकून पितरांचें नांव गोत्र यांचा द्वितीयाविभक्तीनें उच्चार करून त्याच्या पुढें स्वधा शब्द उच्चारून तर्पण करावें." या तर्पणाच्या ठिकाणीं वसु इत्यादिरूपांचा उच्चार **स्मृत्यर्थसारांत** सांगितला आहे तो असा—"वसु, रुद्र, आदित्य अशा पितरांचें श्राद्धाचे ठायीं तर्पण करावें" बह्वृचांना दक्षिण हस्तानेंच तर्पण. कारण, "ज्या ठिकाणीं कोणता हस्त घ्यावा हें सांगितलें नाहीं त्या ठिकाणीं दक्षिणहस्त समजावा" असें सूत्र आहे. ह्या तर्पणाच्या ठिकाणीं प्रत्येक अंजलीला मंत्राची ( स्वधानमस्तर्पयामि, इत्यादिकांची ) आवृत्ति करावी. कारण, जशी चरुद्रव्याच्या निर्वापाचे ठिकाणीं प्रत्येक निर्वापाला द्रव्य भिन्न असल्यामुळें मंत्रांची आवृत्ति आहे. तसेंच संध्येंतील प्रत्येक अर्घ्याला उदकरूप द्रव्य भिन्न असल्यामुळें मंत्राची आवृत्ति आहे तशी येथें प्रतिवेळीं द्यावयाचें उदक भिन्न असल्यामुळें मंत्राची आवृत्ति आहे. व्रीहींचा अवघात ( कुटन ), अग्निहोत्र्याच्या वेदीचें प्रोक्षण इत्यादि ठिकाणीं द्रव्य एक असल्यामुळें प्रतिवेळीं मंत्राची आवृत्ति नाहीं. **केचित्** विद्वान तर—जसा परिव्याणमंत्र ( गुंडाळण्याचा मंत्र ) करावयाचें जें कर्म ( गुंडाळणें ) त्याचा अनुवादक असल्यामुळें करण होत नाहीं, तसा हा तर्पणाचा मंत्र करावयाचें जें अंजलिदानरूप कर्म त्याचा अनुवादक असल्याकारणानें करण होत नाहीं म्हणून तर्पणाचा मंत्र एकवार उच्चारावा, असें इच्छितात. तें बरोबर नाहीं. कारण, परिव्याणमंत्राचे ठिकाणीं अपूपरूप द्रव्य एक असल्यामुळें व त्या ठिकाणीं 'परिवीरसि०' असा दुसरा मंत्रही आहे म्हणून एका क्रियेला दोन करणें संभवत नाहींत. कारण, करण म्हणजे क्रियेला साक्षात् अत्यंत उपकारक होय; तें दोघांना आणावयास लागलें असतां क्रियेच्या व करणाच्या मध्यें दुसरें करण पडल्यामुळें त्याचें व्यवधान येतें मग अशा ठिकाणीं एकाला कोणाला तरी करणत्व मानावयाचें खरें, पण अमुकालाच मानावें, असें प्रमाण नसल्यामुळें एकाला मानिलें तर दुसऱ्याला कां न मानावें, असा विरोध येत असल्यामुळें दोघांनाही मानूं नये. असें होतें. आतां एकवार एकाला करणत्व आणि एकवार दुसऱ्याला करणत्व असा विकल्प म्हणूं ? तर तसेंही म्हणतां येत नाहीं. कारण, दोघांचा कर्ता एक आहे. अर्थात् त्या परिव्याण मंत्राला करणत्व नाहीं. तर तो क्रियमाणाचा अनुवादक आहे. या ठिकाणीं ( तर्पणाच्या ठिकाणीं ) जो मंत्र तो, द्रव्य भिन्न असल्यामुळें क्रियमाण जें अंजलिदानरूप कर्म त्याचा अनुवादक नाहीं; अशा **बौधायना**दिकांच्या वचनावरून करणत्वच आहे. तेणेंकरून प्रत्येक अंजलीला मंत्राची आवृत्ति करणें युक्त आहे. याप्रमाणें नित्यतर्पणाविषयीं देखील समजावें. आतां जें **संग्रहांत** श्राद्धाचें नांव घेऊन सांगतात—"मातापितरांचा मृतदिवस प्राप्त असतां जो मनुष्य नित्यतर्पण करील त्याचें तें श्राद्ध आसुर ( असुरांना प्राप्त ) होतें, आणि त्यानें दिलेलें उदक रुधिर होतें. ब्रह्मयज्ञांतील तर्पण सर्वदा करावें, मातापितरांच्या मृतदिवशीं करूं नये. केलें तर निष्फल होईल." हें मूल वचन असेल तर तिलसहित तर्पणविषयक समजावें. आतां जें वचन सांगतात कीं, **कपिल**—"मन्वादिक, युगादिक, दर्श, संक्रान्ति, पौर्णमासी, आणि व्यतीपात यांचे ठिकाणीं श्राद्धाच्या पूर्वी तिलोदक द्यावें. अर्धोदयपर्व, गजच्छाया, षष्ठी, महालय, भरणी आणि मघाश्राद्ध यांचे ठायीं श्राद्धाच्या अंतीं तर्पण सांगतात." **शौनक**—"मातापितरांचा मृत दिवस असतां दुसऱ्या दिवशीं तिलोदक द्यावें. कारुण्यानें केलेल्या श्राद्धाविषयीं तत्कालीं तिलोदक द्यावें." हीं वचनें निर्मूल आहेत.

**अथतिलतर्पणनिषेधः गार्ग्यः** भानौभौमेत्रयोदश्यांनंदाभृगुमघासुच पिंडदानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणं **स्मृत्यर्थसारे** विवाहव्रतचूडासुवर्षमर्धंतदर्धकं अर्धंतदेव वृद्धौसत्यांचतन्मासिनेत्याहुस्तिलतर्पणं **हेमाद्रौमरीचिः** सप्तम्यांरविवारेचगृहेजन्मदिनेतथा निशासंध्यासुपुत्रार्थीनकुर्यात्तिलतर्पणं **यत्तु संग्रहे** नंदायांभार्गवदिनेकृत्तिकासुमघासुच भरण्यांभानुवारेचगजच्छायाह्वयेतथा अयनद्वितयेचैवमन्वादिषुयुगादिषु पिंडदानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणमिति तच्चिंत्यं पानीयमप्यत्रतिलैर्विमिश्रंदद्यात्पितृभ्यःप्रयतोमनुष्यइत्यादिविरोधात् अत्रापवादः**पृथ्वीचंद्रोदये** तीर्थेतिथिविशेषेचगंगायांप्रेतपक्षके निषिद्धेपिदिने कुर्यात्तर्पणंतिलमिश्रितं **स्मृत्यर्थसारेपि** तिथितीर्थविशेषेषुकार्यंप्रेतेचसर्वदेति **गोभिलः** तिलाभावेनिषिद्धाहेसुवर्णरजतान्वितं तदभावेनिषिंचेत्तुदर्भमंत्रेणवापुनः पतितस्यतिलोदकंवक्ष्यामः ।

---

१ जसें—'अग्नये त्वा जुष्टं निर्वपामि' इत्यादिमंत्राची प्रतिनिर्वापाला आवृत्ति आहे.

## आतां तिलतर्पणाचा निषेध सांगतो—

**गार्ग्य**—"रविवार, भौमवार, त्रयोदशी, नंदा ( १।६।११ या तिथि ), भृगुवार, मघानक्षत्र, यांचे ठायीं पिंडदान, मृत्तिकास्नान आणि तिलतर्पण करूं नये." **स्मृत्यर्थसारांत**—"विवाह, उपनयन, चौल हे संस्कार झाले असतां अनुक्रमानें एक वर्ष, अर्धे वर्ष आणि तीन महिनेपर्यंत पिंडदानादिक करूं नयेत. वरील विवाहादिव्यतिरिक्त वृद्धिश्राद्ध झालें असतां त्या मासांत तिलतर्पण करूं नये, असें सांगतात." **हेमाद्रींत मरीचि**—"सप्तमी, रविवार, घर, जन्मदिवस, रात्र, संध्याकाळ यांचे ठिकाणीं पुत्रार्थीनें तिलतर्पण करूं नये." आतां जें **संग्रहांत**—"नंदा ( १।६।११ या तिथि ), भृगुवार, कृत्तिकानक्षत्र मघा, भरणी, भानुवार, गजच्छाया, दक्षिणायन व उत्तरायण, मन्वादिक, युगादिक, इतक्या ठिकाणीं पिंडदान मृत्तिकास्नान आणि तिलतर्पण करूं नये" असें सांगितलें, तें चिंत्य ( उपेक्षणीय ) आहे. कारण, "येथें ( मन्वादिकांचे ठायीं ) मनुष्यानें पितरांना तिलमिश्रित पाणी तरी द्यावें" इत्यादि वचनाशीं विरोध येतो. निषेधापवाद **पृथ्वीचंद्रोदयांत** सांगतो— तीर्थाचे ठायीं, विशेष तिथि असतां, गंगेचे ठायीं, आणि पितृपक्षांत निषिद्ध दिवशीं देखील तिलमिश्रित तर्पण करावें." **स्मृत्यर्थसारांत**—"विशेष तिथि आणि विशेष तीर्थ प्राप्त असतां आणि कोणी मृत असतां सर्वदा तिलतर्पण करावें." **गोभिल**—"तिलांच्या अभावीं व निषिद्ध दिवशीं सोनें रुपें यांनीं युक्त उदकानें तर्पण करावें. सोनें रुपें यांच्या अभावीं दर्भ व मंत्र यांनीं उदक द्यावें." पतिताला तिलोदक पुढें ( आशौचप्रकरणीं ) सांगू.

**अथवृद्धिश्राद्धं** तन्निमित्तंपृथ्वीचंद्रोदयेब्राह्मे जन्मन्यथोपनयनेविवाहेपुत्रकस्यच पितृन्नांदीमुखान्नामतर्पयेद्विधिपूर्वकं देवव्रतेषुचाधानयज्ञपुंसवनेषुच नवान्नभोजनेस्नानेऊढायाःप्रथमार्तवे देवारामतडागादिप्रतिष्ठामृत्सवेषुच राजाभिषेकेबालान्नभोजनेवृद्धिसंज्ञकान् वनस्थाद्याश्रमंगच्छन्पूर्वेद्युःसद्यएववा पितृन्पूर्वोक्तविधिनातर्पयेत्कर्मसिद्धये **विष्णुपुराणे** यज्ञोद्वाहप्रतिष्ठासुमेखलाबंधमोक्षयोः पुत्रजन्मवृषोत्सर्गेवृद्धिश्राद्धंसमाचरेत् तत्रैव नामकर्मणिबालानांचूडाकर्मादिकेनथेत्युक्तेर्निष्क्रमान्नप्राशनयोर्नश्राद्धमितिमैथिलाः तन्न पूर्वोक्तविरोधात् नानिष्ट्वेतिनिषेधाच्च सुतोत्पत्तौतथाश्राद्धेअन्नप्राशनिकेतथेति**राजमार्तंडाच्च** यत्तु**छंदोगपरिशिष्टं** सूर्येंद्वोःकर्मणीयेचतयोःश्राद्धंनविद्यतेइति तत्तेषामेवेति**कल्पतरुः** **बह्वृचकारिकायां** स्यादाभ्युदयिकंश्राद्धंवृद्धिपूर्तेषुकर्मसु पुंसःसवनसीमंतचौलोपनयनेष्विह विवाहेचानलाधेयप्रभृतिश्रौतकर्मणि इदंश्राद्धंप्रकुर्वंतिद्विजावृद्धिनिमित्तकं अन्यैःषोडशसंस्कारश्रावण्यादिष्वपीष्यते वाप्यारामाप- नादौतुकुर्युःपूर्तनिमित्तकं **वोपदेवकालादर्शौ** सीमंतव्रतचौलनामकरणान्नप्राशनोपनयनस्नानाधानविवाहयज्ञतनयोत्पत्तिप्रतिष्ठासुच पुंसूत्यावसथप्रवेशनसुताद्यास्यावलोकाश्रमस्वीकारक्षितिपाभिषेकदयितागर्तौच- नांदीमुखं यत्तु**कामधेनौ** जलाशयप्रतिष्ठायांवृषोत्सर्गादिकर्मसु वत्सरमभ्यंतरेपित्रोर्वृषस्योत्सर्गकर्मणि वृद्धिश्राद्धंनकुर्वीततदन्यत्रसमाचरेदिति तत्रजलाशयेवृद्धिश्राद्धस्यनिषेधोनतुकर्मांगस्येति**केचित् अन्येत्व**स्यनिर्मूलतामाहुः **श्राद्धकौमुद्यांनिर्णयामृतेचमात्स्ये** अन्नप्राशेचसीमंतेपुत्रोत्पत्तिनिमित्तके पुंसवेचनिषेकेचनववेश्मप्रवेशने देववृक्षजलादीनांप्रतिष्ठायांविशेषतः तीर्थयात्रावृषोत्सर्गेवृद्धिश्राद्धंप्रकीर्तितं इदंचावश्यकं वृद्धौनतर्पितायेवैपितरोगृहमेधिभिः तद्धीनमफलंज्ञेयमासुरोविधिरेवसइति**शातातपोक्तेः** अत्रश्राद्धत्रयंमएवाह मातृश्राद्धंतुपूर्वंस्यात्पितॄणांतदनंतरं ततोमातामहानांचवृद्धौश्राद्धत्रयंस्मृतम् ।

## आतां वृद्धिश्राद्ध सांगतो—

वृद्धिश्राद्धाचें निमित्त **पृथ्वीचंद्रोदयांत ब्राह्मांत**—"पुत्राचें जन्म, उपनयन आणि विवाह यांचे ठिकाणीं नांदीमुख पितरांचें विधिपूर्वक तर्पण ( श्राद्ध ) करावें. देवांचीं व्रतें, अग्नीचें आधान, यज्ञ, पुंसवनसंस्कार, नवान्नभोजन, समावर्तनसंस्कार, स्त्रियेला प्रथम रजोदर्शन, देव–आराम–तलाव इत्यादिकांची प्रतिष्ठा, उत्सव, राजाभिषेक, बालांचें अन्नप्राशन यांचे ठायीं वृद्धिसंज्ञक पितरांचें श्राद्ध करावें. वानप्रस्थादिक आश्रम घेणारानें पूर्व दिवशीं किंवा त्याच दिवशीं पितरांचें पूर्वोक्त विधीनें श्राद्ध करावें." **विष्णुपुराणांत**—"यज्ञ, विवाह, देवादिकांची प्रतिष्ठा, मौंजीबंधन, सोडमुंज, पुत्रजन्म, आणि वृषोत्सर्ग यांचे ठायीं वृद्धिश्राद्ध करावें." तेथेंच—"बालांच्या नामकर्माचे ठायीं व चूडाकर्मादिकांत श्राद्ध करावें" असें सांगितल्यावरून निष्क्रमण व अन्नप्राशन यांचे ठायीं श्राद्ध करूं नये, असें **मैथिल** सांगतात, तें बरोबर नाहीं. कारण पूर्वी सांगितलेल्या ब्राह्मवचनाशीं विरोध येतो. व "पितरांचें यजन केल्यावांचून कोणतेंही कर्म करूं नये" असा शातातपानें निषेध

केला आहे. आणि पुत्रोत्पत्तीच्या ठिकाणीं तसेंच अन्नप्राशनांत जें श्राद्ध" असें **राजमार्तंड**वचनही आहे. आतां जें **छंदोगपरिशिष्ट**—"सूर्यचंद्रांचीं जीं कर्में त्यांचेठायीं वृद्धिश्राद्ध नाहीं." तें त्या छंदोगांनाच समजावें, असें **कल्पतरु** सांगतो. **बह्वृचकारिकेंत**—"वृद्धिकर्म आणि पूर्त ( तलावादि ) कर्म यांचे ठायीं आभ्युदयिक श्राद्ध होतें. तें असें—पुंसवन, सीमंत, चौल, उपनयन, विवाह, अग्न्याधान इत्यादि श्रौतकर्में, यांचे ठायीं हें श्राद्ध वृद्धिनिमित्तक करितात. इतर ब्राह्मण षोडशसंस्कार, श्रावणी इत्यादिकर्म यांचे ठायीं देखील करितात. वापी, कूप, तडाग इत्यादिकांच्या उद्यापनादि कर्मामध्यें पूर्तनिमित्तक करितात." **बोपदेव व कालादर्श**—"सीमंत, व्रत, चौल, नामकरण, अन्नप्राशन, उपनयन, समावर्तन, आधान, विवाह, यज्ञ, पुत्रोत्पत्ति, देवादिप्रतिष्ठा, पुंसवन, गृहप्रवेश, पुत्रादिकांचें मुखावलोकन, वानप्रस्थादि आश्रम ग्रहण करणें, राजाभिषेक, स्त्रियेला प्रथम रजोदर्शन, इतक्या ठिकाणीं नांदीमुख श्राद्ध करावें." आतां जें **कामधेनु**ग्रंथांत—"जलाशयाची ( तलावादिकांची ) प्रतिष्ठा, वृषोत्सर्गादि कर्में, आणि मातापितरांचें प्रथमवर्षाचे आंत वृषोत्सर्गकर्म यांचे ठायीं वृद्धिश्राद्ध करूं नये, इतर ठिकाणीं करावें." त्यांत जलाशयाचे ठायीं वृद्धिश्राद्धाचा निषेध, कर्मांगश्राद्धाचा निषेध नाहीं, असें **केचित्** ग्रंथकार म्हणतात. **इतरग्रंथकार** तर हें वचन निर्मूल म्हणतात. **श्राद्धकौमुदींत** आणि **निर्णयामृतांत मात्स्यांत**—"अन्नप्राशन, सीमंत, पुत्रोत्पत्ति, पुंसवन, गर्भाधान, नवीनगृहप्रवेश, देव-वृक्ष-जलाशय-इत्यादिकांची प्रतिष्ठा, तीर्थयात्रा आणि वृषोत्सर्ग यांचे ठायीं विशेषेंकरून वृद्धिश्राद्ध सांगितलं आहे." हें वृद्धिश्राद्ध आवश्यक आहे. कारण, वृद्धिकर्माचे ठायीं ज्यांनीं पितरांची तृप्ति केली नाहीं, त्यांचें तें कर्म पितृतृप्तिहीन झाल्यामुळें निष्फल जाणावें. श्राद्धरहित तो आसुर विधि होय" असें **शातातप**वचन आहे. ह्या वृद्धिश्राद्धांत तीन श्राद्धें तोच सांगतो—"मातृत्रयीचें श्राद्ध पूर्वी, नंतर पितृत्रयीचें, तदनंतर मातामहत्रयीचें श्राद्ध. याप्रमाणें वृद्धिकर्माचे ठायीं तीन श्राद्धें सांगितलीं आहेत.

तत्कालमाह**पृथ्वीचंद्रोदयेगार्ग्यः** मातृश्राद्धंतुपूर्वेद्युःकर्माहनितुपैतृकम् मातामहंचोत्तरेद्युर्वृद्धौ श्राद्धत्रयंस्मृतं अत्राप्यशक्तौसएव पृथक्दिनेष्वशक्तश्चेदेकस्मिन्पूर्ववासरे श्राद्धत्रयंप्रकुर्वीतवैश्वदेवंतुतांत्रिकमिति **वृद्धमनु**रपि अलाभेभिन्नकालानांनांदीश्राद्धत्रयंबुधः पूर्वेद्युर्वैप्रकुर्वीतपूर्वाह्णेमातृपूर्वकं अत्रमहत्सुपूर्वेद्युस्तदहरल्पेष्वितिगृह्य**परिशिष्टा**द्व्यवस्थाज्ञेया तच्चप्रातरेव पार्वणंचापराह्णेतुप्रातर्वृद्धिनिमित्तकमिति **शातातपोक्तेः** अत्रप्रातःशब्दःसार्धप्रहरपरः प्रहरोप्यर्धसंयुक्तःप्रातरित्यभिधीयतइतिगार्ग्योक्तेरिति-**पृथ्वीचंद्रः** इदंचपुत्रजन्मातिरिक्तविषयं तदाहात्रिः पूर्वाह्णेवैभवेद्वृद्धिर्विनाजन्मनिमित्तकं पुत्रजन्मनि कुर्वीतश्राद्धंतात्कालिकंबुधइति एतदनियतनिमित्तपरं नियतेपुनिमित्तेपुप्रातर्वृद्धिनिमित्तकं तेपामनियतत्वेतुतदानंतर्यमिष्यतइति**लौगाक्षिस्मृतेः** आधानांगंनांदीश्राद्धंत्वपराह्णएव आमश्राद्धंतुपूर्वाह्णेसिद्धान्नेनतुमध्यतः पार्वणंचापराह्णेतुवृद्धिश्राद्धंतथाग्निकमिति**निर्णयामृतेगालवोक्तेः** नांदीमुखाह्वयंप्रातराग्निकंत्वपराह्णत इति**विष्णूक्तेश्च** ।

त्या तीन श्राद्धांचे काल सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत गार्ग्य**—"वृद्धिकर्माच्या पूर्व दिवशीं मातृश्राद्ध करावें. वृद्धिकर्माचे दिवशीं पितृश्राद्ध करावें. कर्माच्या उत्तर दिवशीं मातामहांचें श्राद्ध. याप्रमाणें वृद्धिकर्मात तीन श्राद्धें सांगितलीं आहेत." ह्या तीन श्राद्धांविषयीं देखील अशक्ति असतां तोच सांगतो—"वेगवेगळ्या तीन दिवशीं श्राद्धाविषयीं शक्ति नसेल तर वृद्धिकर्माच्या पहिल्या एका दिवशीं तीन श्राद्धें करावीं. त्या ठिकाणीं विश्वेदेवांचें तंत्र करावें." **वृद्धमनुही**—"वेगवेगळे काल सांपडत नसतील तर तीन्ही नांदीश्राद्धें वृद्धिकर्माच्या पूर्वदिवशीं मातृश्राद्धपूर्वक पूर्वाह्णीं करावीं." मोठ्या कर्मांमध्यें पूर्वदिवशीं व अल्प कर्मांमध्यें त्याच दिवशीं वृद्धिश्राद्ध करावें" ह्या **गृह्यपरिशिष्टाच्या** वचनावरून येथें व्यवस्था जाणावी. तें वृद्धिश्राद्ध प्रातःकालींच करावें. कारण, "पार्वणश्राद्ध अपराह्णीं आणि वृद्धिनिमित्तक श्राद्ध प्रातःकालीं" असें **शातातप**वचन आहे. ह्या वचनांतील 'प्रातः' हा शब्द दीड प्रहर कालाचा बोधक आहे. कारण, "दीड प्रहराला प्रातः असें म्हटलें आहे" असें **गार्ग्य**वचन आहे, म्हणून **पृथ्वीचंद्र** सांगतो. वृद्धिनिमित्तक प्रातः करावें, हें सांगणें पुत्रजन्मातिरिक्तविषयक आहे. तेंच **अत्रि** सांगतो—"जन्मनिमित्तावांचून इतर वृद्धिश्राद्ध पूर्वाह्णीं होतें. पुत्र जन्म असतां तत्कालीं वृद्धिश्राद्ध करावें." वृद्धिश्राद्धाचीं निमित्तें नियत ( ठरीव उत्पन्न ) नसतील तद्विषयक हें वचन आहे. कारण, "नियमित निमित्तांचे ठायीं वृद्धिश्राद्ध प्रातःकालीं करावें. आणि निमित्तें नियमित नसतील तर निमित्तोत्पत्तीच्या नंतर वृद्धिश्राद्ध करावें" असें **लौगाक्षि**स्मृतिवचन आहे. आधानाचें अंगभूत जें वृद्धिश्राद्ध तें अपराह्णींच करावें. कारण, "आमश्राद्ध पूर्वाह्णीं, सिद्धान्नानें मध्याह्णीं, पार्वणश्राद्ध अपराह्णीं, आणि अग्निनिमित्तक वृद्धिश्राद्ध तेंही अपराह्णीं करावें" असें **निर्णयामृतांत गालव**वचन आहे. "नांदीमुखसंज्ञक श्राद्ध प्रातःकालीं करावें. आणि अग्निनिमित्तक अपराह्णीं करावें" असें **विष्णु**वचनही आहे.

इदंचमातृपितृमातामहादिक्रमेणनवदैवत्यंकार्यं तत्रमातामहाःसपत्नीकाः **वृद्धप्रमातामहप्रमातामहमातामहानांसपत्नीकानामितिपृथ्वीचंद्रोदयेगारुडे**गद्यरूपेणपाठात् **हेमाद्रौशंखः** नांदीमुखेसत्यवसूसंकीर्त्यौवैश्वदेविके **वृद्धपराशरः** नांदीमुखेभ्योदेवेभ्यःप्रदक्षिणकुशासनं पितृभ्यस्तन्मुखेभ्यश्चप्रदक्षिणमिति स्मृतिः यत्तु**वृद्धवसिष्ठः** नांदीमुखेविवाहेचप्रपितामहपूर्वकं नामसंकीर्तयेद्विद्वानन्यत्रपितृपूर्वकं यच्च **स्मृत्यर्थसारे** वृद्धमुख्यास्तुपितरोवृद्धिश्राद्धेषुभुंजतइति यच्च**गारुडे**व्युत्क्रमप्रतिपादनं तच्चशाखांतरविषयं पितृभ्यःपितामहेभ्यःप्रपितामहेभ्यइति**बह्वृचपरिशिष्टे**कात्यायनेनचानुलोम्याम्नानात् **पृथ्वीचंद्रोदये**प्येवं यत्तुकेचिद्वृद्धपदंपित्रादिषुप्रयुंजते तन्न अनस्मद्वृद्धशब्दानामरूपाणामगोत्रिणाम् अनाम्नामतिलाद्यैश्चनांदीश्राद्धंतुसव्यवदितिपृथ्वीचंद्रोदयेसंग्रहोक्तेः** नचनिषेधादेवविधिःकल्प्यतइतिवाच्यम् प्रौष्ठपदीश्राद्धे-प्रपितामहात्परेषांवृद्धपित्रादीनांदेवतात्वान्नांदीश्राद्धत्वसाम्येनेहापितत्प्राप्तौनिषेधात् गोत्रनामादिनिषेधस्तु शुभार्थीप्रथमांतेनवृद्धौसंकल्पमाचरेदित्युपक्रम्यानस्मद्वृद्धशब्दानामित्युक्तेःसंकल्पश्राद्धपरः सपिंडकेतुसर्वंभवतीति**प्रयोगपारिजातात्** गोत्रनामभिरामंत्र्यपितृभ्योर्घ्यंप्रदापयेदिति**छंदोगपरिशिष्टे**तद्विधानात् यत्तु**ब्राह्मे** पितापितामहश्चैवतथैवप्रपितामहः त्रयोह्यश्रुमुखाह्येतेपितरःपरिकीर्तिताः तेभ्यःपूर्वतरायेचप्रजावंतःसुखैधिताः तेतुनांदीमुखानांदीसमृद्धिरितिकथ्यतइति यच्च**मार्कंडेयपुराणे** येस्युःपितामहादूर्ध्वंतेतुनांदीमुखाःस्मृताइतितज्जीवत्पित्रादित्रिककर्तृकवृद्धिश्राद्धविषयं तेनतस्येदमावश्यकं यत्तु**विष्णुः** पितरिपितामहेप्रपितामहेचजीवतिनैवकुर्यादिति तद्दर्शादिविषयमिति**कल्पतरुः मदनपारिजाते**प्येवं **हेमाद्रि**स्तुनांदीमुखानांश्राद्धंतुकन्यागशिगतेरवौ पौर्णमास्यांतुकर्तव्यंवराहवचनंयथेति प्रौष्ठपदीश्राद्धैकवाक्यत्वात्तत्रैवपूर्वपांदेवतात्वमित्याह अत्रसत्यवसूविश्वेदेवावित्युक्तंप्राक् यत्तु**शातातपः** मातुःश्राद्धंतुयुग्मैःस्याददैवंप्राङ्मुखैःपृथगिति तद्भिन्नप्रयोगमातृश्राद्धपरं यच्च**मार्कंडेयपुराणे** विश्वेदेवविहीनंतुकेचिदिच्छंतिमानवाइति तद्भिन्नप्रयोगमातृश्राद्धभिन्नश्राद्धद्वयेविश्वेदेवविकल्पार्थं प्रयोगैक्येतुदेवनियमइति **हेमाद्रिः** ।

हें वृद्धिश्राद्ध मातृत्रय, पितृत्रय आणि मातामहत्रय अशा क्रमानें नऊ देवतांचें करावें. त्यांत मातामह सपत्नीक घ्यावे. कारण, "वृद्धप्रमातामह, प्रमातामह, मातामह यांचें सपत्नीकांचें करावें" असें **पृथ्वीचंद्रोदयांत गारुडांत** गद्य ( फक्किका ) रूपानें सांगितलें आहे. **हेमाद्रींत शंख**—"नांदीमुखश्राद्धांत विश्वेदेव सत्यवसू म्हणावे." **वृद्धपराशर**—"नांदीमुख देवांना कुशासन प्रदक्षिण द्यावें. आणि नांदीमुख पितरांनाही प्रदक्षिणच द्यावें, अशी स्मृति आहे." आतां जें **वृद्धवसिष्ठ**—"नांदीमुखांत व विवाहांत प्रपितामहपूर्वक त्रयीच्या नांवाचा उच्चार करावा. इतर ठिकाणीं पितृपूर्वक त्रयीच्या नांवाचा उच्चार करावा." आणि जें **स्मृत्यर्थसारांत**—"वृद्धिश्राद्धाचे ठायीं प्रपितामहाच्या पुढचे वृद्धप्रपितामहादिक पितर श्राद्ध सेवन करितात." आणि जें **गरुडपुराणांत**—उलट क्रमानें ( प्रपितामह, पितामह, पिता अशा क्रमानें ) पितर घेतले आहेत तें सारें इतरशाखाविषयक आहे. कारण, "पितृभ्यः पितामहेभ्यः प्रपितामहेभ्यः" असें **बह्वृचपरिशिष्टांत** व **कात्यायनानें**ही अनुलोम ( सरळ ) क्रमानें वृद्धिश्राद्धाच्या देवता सांगितल्या आहेत. **पृथ्वीचंद्रोदयांत**ही असेंच आहे. आतां जें केचित् ग्रंथकार–पिता इत्यादिकांचे ठिकाणीं 'वृद्ध' या पदाचा प्रयोग करितात तें बरोबर नाहीं. कारण, "अस्मच्छब्द, वृद्धशब्द, वस्त्रादिरूप, गोत्र, आणि नांव यांनीं विवर्जित अशा पितरांचें तिलादिवर्जित द्रव्यांनीं सव्यानें नांदीश्राद्ध करावें" असें **पृथ्वीचंद्रोदयांत संग्रह**वचन आहे. आतां या वचनानें नांदीश्राद्धांत 'वृद्ध' शब्दाचा निषेध केलेला आहे त्यावरून 'वृद्ध' या शब्दाचा उच्चार करावा, अशा विधीची कल्पना करूं; कारण, विधीवांचून निषेध संभवत नाहीं; असें कोणी म्हणेल तर तसें म्हणूं नये. प्रौष्ठपदीश्राद्धांत प्रपितामहाच्या पूर्वीचे वृद्धप्रपितामहादिक देवता असल्यामुळें नांदीश्राद्धाच्या साम्यानें येथेंही वृद्धशब्दाची प्राप्ति असतां त्याचा निषेध केला आहे. आतां गोत्र, नांव इत्यादिकांचा निषेध केला त्याची प्राप्ति कोठें आहे ? असें म्हणाल तर—"कल्याणार्थी असेल त्यानें वृद्धीच्या ठिकाणीं सांकल्पिक श्राद्ध करावें" याचा उपक्रम करून 'अनस्मद्वृद्धशब्दानां' हें वरील निषेधक वचन सांगितल्यामुळें तो गोत्र, नांव इत्यादिनिषेध सांकल्पिकश्राद्धविषयक आहे. सपिंडक वृद्धिश्राद्धांत सर्व ( गोत्रनामादिक ) होतें, असें **प्रयोगपारिजातांत** सांगितलें आहे. "गोत्र, नांव यांनीं आमंत्रण ( उच्चार ) करून पितरांना अर्घ्य द्यावें" ह्या **छंदोगपरिशिष्ट**वचनात गोत्रनामाचें विधान आहे.

आतां जें **ब्राह्मांत**—"पिता, पितामह, आणि प्रपितामह हे तीन पितर अश्रुमुख आहेत. त्यांच्या पूर्वींचे जे प्रजावंत सुखानें वाढलेले ते नांदीमुख होत. कारण, नांदी म्हणजे समृद्धि म्हटली आहे." आणि जें **मार्कंडेयपुराणांत**—"जे पितामहाच्या पूर्वींचे ते नांदीमुख म्हटले आहेत." अशीं तीं दोन्ही वचनें ज्याची पितृत्रयी जीवंत असेल त्यानें करावयाच्या नांदीश्राद्धविषयक आहेत. तेणेंकरून त्या जीवत्पित्रादित्रिकाला हें नांदीश्राद्ध ( वृद्धप्रपितामहादिकांचें श्राद्ध ) आवश्यक आहे. आतां जें **विष्णु**—"पिता, पितामह, व प्रपितामह हे जीवंत असतां श्राद्ध करूं नये" तें दर्शादिक श्राद्धविषयक आहे, असें **कल्पतरु** सांगतो. **मदनपारिजातांत**ही असेंच आहे. **हेमाद्री तर**—"सूर्य कन्याराशीस गेला असतां पौर्णमासीस ( प्रौष्ठपदीस ) नांदीमुखपितरांचें श्राद्ध करावें, असें वराहवचन आहे." या वचनानें सांगितलेल्या प्रौष्ठपदी श्राद्धाशीं वरील ब्राह्मादि वचनाची एकवाक्यता ( एक अन्वय ) केल्यावरून त्या प्रौष्ठपदी श्राद्धांतच वृद्धप्रपितामहादिक देवता आहेत, असें सांगतो. नांदीश्राद्धांत सत्यवसू विश्वेदेव, असें पूर्वी श्राद्धदेवताप्रकरणीं सांगितलें आहे. आतां जें **शातातप**—"मातेचें श्राद्ध तर प्राङ्मुख दोन ब्राह्मणांनीं देवरहित पृथक् होतें." या वचनांत देव नाहींत असें सांगितलें तें वेगळ्या प्रयोगानें मातेचें श्राद्ध करावयाचें त्या पक्षीं समजावें. आणि जें **मार्कंडेयपुराणांत**—"केचित् मनुष्य वृद्धिश्राद्ध विश्वेदेवरहित इच्छितात" असें सांगितलें तें, तीन्ही पार्वणांचीं तीन श्राद्धें भिन्नभिन्न प्रयोगानें करावयाच्या पक्षीं मातृपार्वणावांचून इतर पार्वणाच्या दोन श्राद्धांत विश्वेदेवांचा विकल्प होण्याकरितां समजावें. एक प्रयोगानें तिघांचें श्राद्ध असतां विश्वेदेव आहेतच, असें **हेमाद्रि** सांगतो.

एतच्चमातृपूजापूर्वकंकार्यं अकृत्वामातृयागंतुयःश्राद्धंपरिवेषयेत् तस्यक्रोधसमाविष्टाहिंसामिच्छंतिमातरइति**शातातपोक्तेः कौर्मे**पि पुष्पैर्धूपैःसनैवेद्यैर्गंधाद्यैर्भूषणैरपि पूजयित्वामातृगणंकुर्याच्छ्राद्धत्रयंबुधइति**छंदोगपरिशिष्टे** कर्मादिषुतुसर्वेषुमातरःसगणाधिपाः पूजनीयाःप्रयत्नेनपूजिताःपूजयंतिनाः प्रतिमासुचशुद्धासुलिखितावापटादिषु अपिवाक्षतपुंजेषुनैवेद्यैश्चपृथग्विधैः कुड्यलग्नांवसोर्धारांसप्तधारांघृतेनतु कारयेत्पंचधारांवानातिनीचांनचोच्छ्रितां आयुष्याणिचशांत्यर्थंजप्त्वातत्रसमाहितः षड्भ्यःपितृभ्यस्तदनुश्राद्धदानमुपक्रमेत् अत्रसर्वेष्वितिग्रहणाद्ग्रहयज्ञतद्विकारेष्वपिनित्यंश्राद्धं नानिष्ट्वातुपितॄन्श्राद्धेकर्मकिंचित्समाचरेदिति **शातातपोक्तेश्च** इयंचवसोर्धारातच्छाखीयानांनियताऽन्येषांत्वनियता बह्वल्पंवास्वगृह्योक्तमित्युक्तेः करणेत्वभ्युदयः यन्नाम्नातंस्वशाखायामित्युक्तेः आयुष्याणिआनोभद्राइत्यादीनि षड्भ्यइतिमात्रादित्रिकोपलक्षणमिति**पृथ्वीचंद्रोदयः** छंदोगानांषड्दैवत्यमन्येषांनवदैवत्यमित्या**शार्कः** ममतुमतं कोकिलमतानुसारिणांमातृमातामहप्रमातामहाइतिमात्रासहैवमातामहश्राद्धकरणात् तद्विषयमिदंषड्भ्यइति ।

हें नांदीश्राद्ध पूर्वी मातांची पूजा करून नंतर करावें. कारण, "मातांची पूजा केल्यावांचून जो श्राद्ध करील त्याजवर माता क्रोधाविष्ट होऊन त्याचा नाश इच्छितात" असें **शातातप**वचन आहे. **कौर्मांत**ही—"पुष्प, धूप, नैवेद्य, गंधादिक उपचार, भूषणें, यांनीं मातृगणाची पूजा करून नंतर तीन श्राद्धें करावीं." **छंदोगपरिशिष्टांत**—"सर्वकर्मामध्यें गणाधिपसहित मातांची पूजा करावी. कारण, त्यांची पूजा केली असतां त्या आपली पूजा ( उत्कर्ष ) करितात. सुवर्णादिधातूंच्या शुद्ध प्रतिमा, किंवा वस्त्रादिकांवर काढलेल्या आकृति अथवा अक्षतांचे पुंज ( राशि ) यांजवर नानाविध नैवेद्यादिकांनीं मातांची पूजा करावी. भिंतीवर वसोर्धारा करावी, ती अशी—तुपानें सात किंवा पांच धारा फार उंच किंवा फार नीच न होतील अशा कराव्या. मातृगणाच्या पूजासमयीं शांतीसाठीं आयुष्यसूक्तें ( आनोभद्रा इत्यादिक ) जपून नंतर सहा पितरांचें श्राद्ध करण्यास आरंभ करावा." या छंदोगपरिशिष्टवचनांत 'सर्वेषु' असें पद आहे, त्यावरून ग्रहयज्ञ व ग्रहयज्ञाच्या विकृति यांचे ठायीं देखील श्राद्ध नित्य आहे. आणि "श्राद्धाचे ठायीं पितरांची पूजा केल्यावांचून कोणतेंही कर्म करूं नये" असें **शातातप**वचनही आहे. ही वर सांगितलेली वसोर्धारा छंदोगशाखीयांना नित्य आहे, इतरांना नित्य नाहीं. कारण, "बहुत किंवा अल्प आपल्या गृह्यांत उक्त असेल तें केल्यानें सर्व केल्यासारखें होतें" असें सांगितलें आहे. केलें तर अभ्युदय ( उत्कर्ष ) आहे. कारण "आपल्या शाखेंत उक्त नसून अविरुद्ध असेल तें परशाखीय घ्यावें" असें आहे. वचनांत 'सहा पितरांचें श्राद्ध' असें म्हटलें तें मात्रादि तीनत्रयींचें उपलक्षण ( बोधक ) आहे, असें **पृथ्वीचंद्रोदय** सांगतो. छंदोगांचें श्राद्ध सहा देवतांचें, इतरांचें नऊ देवतांचें, असें **आशार्क** सांगतो. माझें ( कमलाकरभट्टाचें ) तर मत असें आहे कीं, कोकिलमतानुसाऱ्यांना 'मातृमातामहप्रमातामहाः' या प्रकारें मातेसहच मातामहश्राद्ध सांगितलें आहे, तद्विषयक हें सहा पितरांचें श्राद्ध सांगितलें आहे.

**मातरस्तत्रैवोक्ताः** गौरीपद्माशचीमेधासावित्रीविजयाजया देवसेनास्वधास्वाहामातरोलोकमातरः धृतिःपुष्टिस्तथातुष्टिरात्मदेवतयासह गणेशेनाधिकाह्येतावृद्धौपूज्याश्चतुर्दश मातरोलोकमातरइति सर्वविशे-

षणं तेनचतुर्दशत्वं यदाषोडशेतिपाठस्तदादेवतांतरं **चंद्रिकायांचतुर्विंशतिमतेत्वन्याउक्ताः** तिस्रः पूज्याःपितुःपक्षेतिस्रोमातामहेतथा इत्येतामातरःप्रोक्ताःपितुर्मातुःस्वसाष्टमी आसांजीवनेप्रत्यक्षपूजनं मृतानांत्वक्षतपुंजेष्विति**हेमाद्रिः** ब्रह्माण्याद्यास्तथासप्तदुर्गाक्षेत्रगणाधिपान् वृद्ध्यादौपूजयित्वातुपश्चान्नांदीमुखान्पितॄन् मातृपूर्वान्पितॄन्पूज्यततोमातामहानपि मतामहीस्ततःकेचिद्युग्माभोज्याद्विजातयइति अत्रद्वादशदैवतम्यदेशाचाराद्व्यवस्था ब्रह्माण्याद्याः ब्राह्मीमाहेश्वरीचैवकौमारीवैष्णवीतथा वाराहीचतथेंद्राणीचामुंडासप्तमातरइत्य**परार्के**उक्ताः अत्रचौलादीनांयौगपद्येतंत्रतोक्ता**छंदोगपरिशिष्टे** गणशःक्रियमाणानांमातृभ्यःपूजनंसकृत् सकृदेवभवेच्छ्राद्धमादौनपृथगादिषु मातृभ्यइतिषष्ठ्यर्थेचतुर्थी गणशःएकानेकपुत्राणांसंस्कारेष्वेकदिनेदेशकालकर्त्रैक्यादित्यर्थः तथा असकृद्यानिकर्माणिक्रियेरन्कर्मकारिभिः प्रतिप्रयोगंनैवस्युर्मातरःसगणाधिपाः कर्मावृत्तावपिकुत्रश्राद्धंकार्यंकचनेत्युक्तं**तत्रैव** आधानेहोमयोश्चैववैश्वदेवेतथैवच बलिकर्मणिदर्शेचपूर्णमासेतथैवच नवयज्ञेचयज्ञज्ञावदंत्येवंमनीषिणः एकमेवभवेच्छ्राद्धमेतेषुनपृथक्पृथक् एतेषुप्रतिप्रयोगंनावर्ततेकिंत्वादौ एतद्भिन्नेसोमयागादौप्रतिप्रयोगमावर्ततेएवश्राद्धमित्यर्थः ।

सर्व कर्मांत मातांची पूजा सांगितली, त्या माता तेथेंच सांगितल्या आहेत. त्या अशा—"गौरी, पद्मा, शची, मेधा, सावित्री, विजया, जया, देवसेना, स्वधा, स्वाहा, धृति, पुष्टि, तुष्टि, आणि आत्मदेवता ह्या चवदा माता म्हणजे लोकमाता यांची गणेशासह वृद्धिकर्मांत पूजा करावी." श्लोकांत 'मातरो लोकमातरः' हें पद सर्वांचें विशेषण आहे म्हणून चवदा होतात. जेव्हां 'चतुर्दश' येथें 'षोडश' असा पाठ असेल तेव्हां 'मातरः लोकमातरः' ह्या दोन निराळ्या देवता समजाव्या. **चंद्रिकेंत चतुर्विंशति**मतांत तर दुसऱ्या माता सांगितल्या आहेत त्या अशा—"पित्याकडच्या तीन, मातामहाकडच्या तीन, आत्या आणि आठवी मावशी ह्या जीवंत असतां त्यांची प्रत्यक्ष पूजा करावी. मृत असतां अक्षतपुंजांवर करावी, असें **हेमाद्रि** सांगतो. अशाच ब्राह्मी इत्यादिक सात माता, दुर्गा, क्षेत्रपाल, गणाधिप त्यांची वृद्ध्यादिकर्मांत पूजा करून नंतर नांदीमुख पितरांची पूजा करावी. ती अशी—पूर्वी मातृत्रयी नंतर पितृत्रयी तदनंतर मातामहत्रयी यांची पूजा करावी. तदनंतर मातामहीत्रयीचीही पूजा करावी. असें केचित् म्हणतात. प्रत्येक त्रयीला दोन दोन ब्राह्मणांना भोजन घालावें." येथें श्राद्धांत बारा देवता सांगितल्या त्यांची देशाचारावरून व्यवस्था जाणावी. ब्राह्मी इत्यादिक माता येणेंप्रमाणें—ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी, व चामुंडा ह्या सात माता **अपरार्कांत** उक्त आहेत. चौल इत्यादिक संस्कार एककालीं करावयाचे असतां मातृपूजनाचें व वृद्धिश्राद्धाचें तंत्र ( एकवार अनुष्ठानानें सर्वोपयोगी होणें ) **छंदोगपरिशिष्टांत** सांगतो—"एक पुत्राचे अनेक संस्कार किंवा अनेक पुत्रांचे अनेक संस्कार एक दिवशीं एक देशीं एक कालीं एककर्त्यानें करावयाचे असतां मातांचें पूजन एकवार आधीं करावें. वृद्धिश्राद्धही एकवार आधीं करावें. प्रत्येक कर्माच्या आधीं नाहीं." तसेंच "कर्म करणारे वारंवार जीं कर्में करितात त्या ठिकाणीं प्रत्येक प्रयोगाला गणाधिपसहित मातांची पूजा नाहीं." कर्माची आवृत्ति असतांही कोठें श्राद्ध करावें व कोठें करूं नये, तें तेथेंच सांगितलें आहे, तें असें—"आधान, सायंप्रातर्होम, वैश्वदेव, बलिकर्म, दर्शयाग, पूर्णमासयाग, नवयज्ञ, यांचे ठिकाणीं विद्वान् असें सांगतात कीं, आधीं एकच श्राद्ध होतें, प्रत्येक प्रयोगाला श्राद्धाची आवृत्ति नाहीं." यावांचून इतर सोमयागादिकांत प्रत्येक प्रयोगाला वृद्धिश्राद्धाची आवृत्ति होतेच असा भाव.

क्वचिदादावपिनिषेधमाह**सएव** नाष्टकासुभवेच्छ्राद्धंनश्राद्धेश्राद्धमिष्यते नसोष्यंतीजातकर्मप्रोषितागतकर्मसु विवाहादिःकर्मगणोयउक्तोगर्भाधानंशुश्रुमोयस्यचांते विवाहादावेकमेवात्रकुर्याच्छ्राद्धंनादौकर्मणःकर्मणःस्यात् सोष्यंत्याआसन्नप्रसवायाः सोष्यंतीमभ्युक्ष्येत्युक्तंकर्म **कात्यायनो**क्तस्यश्राद्धस्यपाकप्राधान्यात्तस्यच जातश्राद्धेनदद्यात्तुपक्वान्नंब्राह्मणेष्वपीतिनिषेधान्नजातकर्मणिनांदीश्राद्धमित्य**ाशार्कः** आमान्नेनवाकार्यमित्यपितेनैवोक्तं **गौडास्तु** जातकर्मण्येवनिषेधः पुत्रजन्मनिमित्तकंतुकार्यमेव जन्मन्यथोपनयनेइ**त्युक्तेः** नैमित्तिकमथोवक्ष्येश्राद्धमभ्युदयात्मकं पुत्रजन्मनितत्कार्यंजातकर्मसमंनरैरिति**मार्कंडेयपुराणा**च्चेत्याहुः **हारलतायांश्राद्धविवेके**चैवं एतेनजातकर्मणिकालांतरेश्राद्धनिषेधोनपुत्रजन्मदिनेइतिवाचस्पतिमतंपरास्तं अत्रनिषेककालेइतिवचनात् गर्भाधानेननिषेधः निषेककालेसोमेचसीमंतोन्नयनेतथा ज्ञेयंपुंसवनेश्राद्धंकर्मांगंविधिवत्कृतमिति **पारस्करः** प्रोषितेति प्रोष्यैत्यगृहानुपतिष्ठतेपुत्रंदृष्ट्वाजपतीतिविहितंकर्म विवाहादिः

**गर्भाधानांतोयोगृहप्रवेशचतुर्थीकर्मादिकर्मसमूहउक्तःसूत्रकारेण तत्रापिप्रतिकर्मनेत्यर्थः अन्येपिहलाभियोगाद्योपवादविषयास्तत्रैवज्ञेयाः अप्रचारान्नोच्यंते ।**

क्वचित्स्थलीं आधीं देखील निषेध तोच सांगतो—"अष्टकाश्राद्धांचे ठायीं श्राद्ध होत नाहीं. कारण, श्राद्धाचे ठायीं श्राद्ध इष्ट नाहीं. प्रसूतिकाल जवळ आलेल्या गरोदर स्त्रियेचें कर्म, जातकर्म, प्रवासास जाऊन आल्यावर करावयाचें कर्म इतक्या ठिकाणीं वृद्धिश्राद्ध नाहीं. विवाह आदिकरून गर्भाधानापर्यंत जीं कर्में सांगितलीं, त्या कर्मांत विवाहाच्या आधीं एकच श्राद्ध करावें. प्रत्येक कर्माच्या आधीं श्राद्ध करूं नये." सोष्यंती म्हणजे प्रसूतिकाल जवळ असलेली स्त्री, तिचें कर्म तिला अभ्युक्षण करून वगैरे सांगितलेलें आहे तें समजावें. **कात्यायनानें** सांगितलेलें श्राद्ध पाकप्रधान असल्यामुळें त्याचा जातकर्माचे ठायीं ब्राह्मणाला देखील पक्वान्न देऊं नये" या वचनानें निषेध केला असल्यामुळें जातकर्मांत नांदीश्राद्ध नाहीं, असें **आशार्क** सांगतो. अथवा आमान्नानें करावें, असेंही त्यानेंच ( आशार्कानेंच ) सांगितलें आहे. **गौड** तर—वरील वचनानें जातकर्माचे ठायींच नांदीश्राद्धाचा निषेध. पुत्रजन्मनिमित्तक करावेंच. कारण, "पुत्रजन्मकालीं, व उपनयनांत श्राद्ध करावें." असें वचन आहे. आणि "आतां नैमित्तिक आभ्युदयिक श्राद्ध सांगतो, तें श्राद्ध मनुष्यांनीं जातकर्माप्रमाणें पुत्रजन्मसमयीं करावें" असें **मार्कंडेयपुराण**वचन आहे, असें सांगतात. **हारलतेंत** व **श्राद्धविवेकांत**ही असेंच आहे. येणेंकरून ( जातकर्मांत श्राद्धनिषेध केल्यानें ) 'कालांतरीं जातकर्म करावयाचें असतां तेथें श्राद्धाचा निषेध, पुत्रजन्मदिवशीं श्राद्धनिषेध नाहीं. असें **वाचस्पतीचें** मत खंडित झालें. "गर्भाधान, सोमयाग, सीमंतोन्नयन, पुंसवन, यांचे ठायीं कर्मांगश्राद्ध यथाविधि करावें" या **पारस्कर**वचनावरून गर्भाधानांत श्राद्धाचा निषेध नाहीं. वरील वचनांत 'प्रोषितागतकर्म' याचा अर्थ—'प्रवासांतून घरीं येऊन पुत्राला पाहून जप करावा' इत्यादि विहित कर्म समजावें. अन्यही हलाभियोग इत्यादिक श्राद्धाच्या अपवादाचे विषय आहेत, ते तेथेंच पहावे, त्यांचा प्रचार नसल्यामुळें ते येथें सांगत नाहीं.

**अत्राधिकारिणः विष्णुपुराणे** जातस्यजातकर्मादिक्रियाकांडमशेषतः पितापुत्रस्यकुर्वीतश्राद्धंचाभ्युदयात्मकं अत्र**केचित्** जीवत्पितुःसाग्नेरेववृद्धिश्राद्धेधिकारः नतुनिरग्नेः नजीवत्पितृकःकुर्याच्छ्राद्धमग्निमृतेद्विजः येभ्यएवपितादद्यात्तेभ्यःकुर्वीतसाग्निकः पितामहेप्येवमेवकुर्याज्जीवतिसाग्निकः साग्निकोपिन कुर्वीतजीवतिप्रपितामहे इतिचंद्रिकायां**सुमंतूक्ते**रित्याहुः **प्रयोगपारिजाते**प्यनाहिताग्निर्नकुर्यादितीदंव्याख्यातं तन्न अनग्निकोपिकुर्वीतजन्मादौवृद्धिकर्मणि येभ्यएवपितादद्यात्तानेवोद्दिश्यतर्पयेदिति**हारीतोक्तेः सौमंतवं**तुवृद्धिश्राद्धभिन्नश्राद्धपरमित्युक्तं**मदनरत्ने** श्राद्धपदंपिंडपितृयज्ञपरमिति**पृथ्वीचंद्रोदयः निर्णयामृते**तुहारीतीयेऽनग्निकोनाहिताग्निरभिप्रेतः पूर्ववचनेतुसाग्निकःश्रौताग्निःस्मार्ताग्निश्चोच्यते तेनोभयाग्निहीनस्यनेत्युक्तं तन्न पूर्वोक्तदिशागतिसंभवेनग्निपदस्यस्मार्ताग्निपरत्वेमानाभावात् वक्ष्यमाणनित्यानित्यसंयोगविरोधात् पितरोजनकस्येज्यायावद्व्रतमनाहितं समाहितव्रतःपश्चात्स्वान्यजेतपितामहानिति **पृथ्वीचंद्रोदयेयम**वचोविरोधाच्च **अपरार्कोपि** समावर्तनेब्रह्मचारीस्वयमेवनांदीश्राद्धंकुर्यादित्याह अतः पूर्वमेवसाधु **बोपदेवोप्येव**माह यत्तुमतं जीवत्पितुःपुत्रनामकर्मादौनवृद्धिश्राद्धं **हारीतीये** जन्मादावित्यादिशब्देनतत्प्राप्तावपि उद्वाहेपुत्रजननेपित्र्येष्ट्यांसौमिकेमखे तीर्थेब्राह्मणआयातेषडेतेजीवतःपितुरिति **मैत्रायणीयपरिशिष्टे**उद्वाहएवतस्योपसंहारात् एवंयत्रतुसंस्कारादिपदंतदप्युद्वाहादिपरमेवेति तन्न उद्वाहपदस्यस्वविवाहपरत्वस्यापिसंभवात् पुत्रविवाहपरत्वेमानाभावात् नामकर्मणिबालानांचूडाकर्मादिकेतथेत्यादिभिर्नित्यश्राद्धस्यचौलाद्यंगत्वावगतौनित्यानित्यसंयोगविरोधाच्च अतोजन्मादाविति**सर्वसंस्कारसंग्रहः** तथा**कात्यायनः** स्वपितृभ्यःपितादद्यात्सुतसंस्कारकर्मसु पिंडानोद्वाहनात्तेषांतस्याभावेतुतत्क्रमात् सुतानांचौलादिसंस्कारेषुपितास्वपितृभ्यःपिंडान्श्राद्धं पिंडदोऽशहरश्चैषामिति**दर्शनात्** ओद्वहनाद्विवाहपर्यंतंदद्यात् विवाहश्चप्रथमः नांदीश्राद्धंपिताकुर्यादाद्येपाणिग्रहेबुधः अतऊर्ध्वंप्रकुर्वीतस्वयमेवतुनांदिकमिति**स्मृतेः** तस्यपितुरभावेतत्क्रमात् असंस्कृतास्तुसंस्कार्याभ्रातृभिःपूर्वसंस्कृतैरितियःकर्तृक्रमःतेनक्रमेणज्येष्ठभ्रात्रादिर्दद्या-

---

१ विवाहानंतर गृहप्रवेश, चतुर्थीकर्म इत्यादिक सूत्रकारानें सांगितलेल्या कर्मांत प्रत्येक कर्माला नांदीश्राद्ध नाहीं.

दिति **चंद्रिकादयः हेमाद्रिस्तुतस्यपितुरभावेयःपितृव्यमातुलादिःसंस्कुर्यात्सतत्क्रमात्संस्कार्यपितृक्रमा॰** **द्दद्यान्नतुस्वपितृभ्यइतिव्याचख्यौ** ।॰

## आतां वृद्धिश्राद्धाविषयीं अधिकारी सांगतो—

**विष्णुपुराणांत**—"झालेल्या पुत्राचे सारे जातकर्मादि संस्कार आणि अभ्युदयात्मक श्राद्ध ( वृद्धिश्राद्ध ) हे सारे बापानें करावे." येथें **केचित्** ग्रंथकार, जीवत्पिता साग्निक असेल तर त्यालाच वृद्धिश्राद्धाविषयीं अधिकार, निरग्निकाला नाहीं. कारण, "अग्नि असल्यावांचून जीवत्पितृकानें श्राद्ध करूं नये, पिता ज्यांचें श्राद्ध करीत असेल त्यांचें श्राद्ध साग्निक जीवत्पितृकानें करावें. पितामह जीवंत असतां असेंच श्राद्ध साग्निकानें करावें. प्रपितामह जीवंत असतां साग्निकानें देखील श्राद्ध करूं नये" असें **चंद्रिकेंत सुमंतु**वचन आहे, असें सांगतात. **प्रयोगपारिजातांत**ही ज्यानें अग्नीचें आधान केलें नाहीं त्यानें हें वृद्धिश्राद्ध करूं नये, असें ह्या वरील सुमंतुवचनाचें व्याख्यान केलें आहे, तें बरोबर नाहीं. कारण, "अग्निरहितानें देखील पुत्रजन्म इत्यादि वृद्धिकर्मांत श्राद्ध करावें. ज्या पितरांना बाप श्राद्ध देतो त्यांचाच उद्देश करून पुत्रानें तृप्ति करावी" असें **हारीत**वचन आहे. वरील सुमंतूचें वचन तर वृद्धिश्राद्धावांचून इतरश्राद्धविषयक आहे, असें **मदनरत्नांत** सांगितलें आहे. वरील सुमंतुवचनांत 'श्राद्ध' या पदानें पिंडपितृयज्ञ समजावा, असें **पृथ्वीचंद्रोदय** सांगतो. **निर्णयामृतांत** तर—वरील हारीतवचनांतील 'अनग्निक' या पदानें ज्यानें अग्नीचें आधान केलें नाहीं तो समजावा. सर्वथा अग्निरहित समजूं नये, अर्थात् स्मार्ताग्निमान् होय. सुमंतूच्या वचनांतील साग्निक शब्दानें श्रौताग्नि व स्मार्ताग्नि समजावा. तेणेंकरून दोन्ही प्रकारच्या अग्निरहिताला वृद्धिश्राद्ध नाहीं, असें सांगितलें आहे. तें बरोबर नाहीं. कारण, पूर्वोक्त रीतीनें ( सुमंतुवचन वृद्धिश्राद्धव्यतिरिक्तश्राद्धविषयक इत्यादि रीतीनें ) दोन्ही वचनांची गति ( अविरोध ) होत असतां 'अनग्निक' या पदानें स्मार्ताग्निक घेण्याविषयीं प्रमाण नाहीं. पुढें सांगावयाच्या रीतीनें नित्य व अनित्य अशा वृद्धिश्राद्धांचा एकत्र ठिकाणीं विरोध येईल. आणि निरग्निक जीवत्पितृकाला अधिकार नसेल तर "जोंपर्यंत ब्रह्मचर्यव्रत प्राप्त झालें नसेल तोंपर्यंत जनकाचे पितरांची पूजा करावी. ब्रह्मचर्यव्रत घेतल्यानंतर आपल्या पितामहांनें स्वतः पूजन करावें" असें **पृथ्वीचंद्रोदयांत** यमाचें वचन आहे त्याचा विरोधही येईल. **अपरार्क**ही—"समावर्तनाचे ठायीं ब्रह्मचाऱ्यानें स्वतःच नांदीश्राद्ध करावें, असें सांगतो. या कारणास्तव पूर्वी जें सांगितलें ( अनग्निकानेंही करावें ) तेंच चांगलें आहे **वोपदेवा**नेंही असेंच सांगितलें आहे. आतां जें मत असें आहे कीं, जीवत्पित्याला पुत्राच्या नामकर्मादिकांत वृद्धिश्राद्ध नाहीं. वरील हारीतवचनांत 'जन्मादौ' येथील आदिपदानें नामकर्मादिकांत तें प्राप्त झालें तरी "विवाह, पुत्रोत्पत्ति, पित्र्येष्टि, सोमयाग, तीर्थ, आणि विद्वान श्राद्धयोग्य ब्राह्मणाचें आगमन, हे सहा काल जीवत्पितृकाला श्राद्धाचे आहेत." ह्या **मंत्रपरिशिष्टांत,** आदिपदानें प्राप्त झालेल्या संस्कारांचा संकोच करून फक्त विवाहच घ्यावा, असें सांगितलें आहे. याप्रमाणें ज्या ठिकाणीं संस्कारादिपद आहे तें देखील विवाहादिबोधकच आहे. तें मत बरोबर नाहीं. कारण, वरील परिशिष्टांतील 'उद्वाह' या पदानें आपला ( कर्त्याचा ) ही विवाह घेतां येईल. पुत्रविवाह घेण्याविषयीं प्रमाण नाहीं, म्हणून वर सांगितलेला उपसंहार ( संकोच ) करितां येत नाहीं. आणि "बालांच्या नामकर्मांत तसेंच चूडाकर्मादिकांत वृद्धिश्राद्ध करावें" इत्यादि वचनांवरून चौलादिक संस्कारांचें अंगभूत नित्यश्राद्ध आहे, असें बोधन झालें असतां ह्या वचनानें सांगितलेलें नित्य व वरील वचनानें सांगितलेलें अनित्य अशा नित्य व अनित्य वृद्धिश्राद्धांचा एकत्र कर्त्याचे ठायीं विरोधही प्राप्त होईल. म्हणून वरील हारीतवचनांतील 'जन्मादौ' या पदानें सान्या संस्कारांचें ग्रहण होतें. तसेंच **कात्यायन** सांगतो—"पुत्रांच्या विवाहापर्यंत संस्कारकर्मामध्यें पित्यानें आपल्या पितरांना पिंड ( श्राद्ध ) द्यावें. पित्याच्या अभावीं त्याच क्रमानें पितरांना इतर कर्त्यानें द्यावें" या कात्यायनवचनाचा अर्थ—पुत्रांच्या चौलादिक संस्कारांत पित्यानें पिंड म्हणजे श्राद्ध द्यावें. 'पिंड देणारा व जिदगी घेणारा इत्यादि मनुवचनांत 'पिंड' या शब्दाचा अर्थ 'श्राद्ध' होत आहे. 'ओद्वाहनात्' म्हणजे विवाहपर्यंत द्यावें, येथें विवाह म्हणजे प्रथम समजावा; कारण, "पहिल्या विवाहांत नांदीश्राद्ध पित्यानें करावें. प्रथम विवाह झाल्यानंतर नांदीश्राद्ध स्वतःच करावें" अशी स्मृति आहे. 'तस्याभावे तु तत्क्रमात्' म्हणजे पित्याच्या अभावीं "ज्या भ्रात्यांचा संस्कार झाला नसेल त्यांचा संस्कार, पूर्वी संस्कार केलेल्या भ्रात्यांनीं करावा" असा जो कर्त्याचा क्रम त्या क्रमानें ज्येष्ठ भ्राता इत्यादिकांनीं नांदीश्राद्ध द्यावें असें **चंद्रिका इत्यादि ग्रंथकार** सांगतात. **हेमाद्रि** तर-पित्याच्या अभावीं पितृव्य, मातुल इत्यादिक जो कोणी संस्कार करील त्यानें त्या क्रमानें म्हणजे संस्कार करावयाचा जो माणवक ( मुलगा ) त्याच्या पितृक्रमानें द्यावें. कर्त्यानें आपल्या पितरांना देऊं नये. असें व्याख्यान करिता झाला.

**समावर्तनस्यापिविवाहप्राचीनसुतसंस्कारत्वात्पितैवनांदीश्राद्धंकुर्यात् तदभावेज्येष्ठभ्रात्रादिः तदभावेस्वयमेवकुर्यात् उपनयनेनकर्माधिकारस्यजातत्वात् एवमाद्यविवाहेपीतिपृथ्वीचंद्रोदयचंद्रिकादयः मदनरत्नेप्येवं** यदातुपितरिसंन्यस्तेप्रोषितेपतितेवाधर्मार्थंतत्पुत्रमन्यःसंस्कुर्यात्तदा **संस्कार्यपितुःपित्रादि-**

भ्योदद्यात् पितरोजनकस्येज्यायावद्व्रतमनाहितं समाहितव्रतःपश्चात्स्वान्यजेतपितामहानितिपृथ्वीचंद्रोदयेयमोक्तेः जीवत्पितृकस्यविशेषमाहकात्यायनः वृद्धौतीर्थेचसंन्यस्तेतातेचपतितेसति येभ्यएवपितादद्यात्तेभ्योदद्यात्स्वयंसुतइति यत्तुबह्वृचपरिशिष्टे जीवत्पितासुतसंस्कारेपुमातृमातामहयोःकुर्यात् तस्यां जीवत्यांमातामहस्यैवेतितत्तच्छाखीयानामेवेतिदिक् स्मृतितत्त्वादिगौडग्रंथेषुतु जीवन्मातृकःपितामह्यादिभ्योवृद्धौदद्यात् जीवंतमतिदद्याद्वाप्रेतायान्नोदकेद्विजइतिकात्यायनोक्तेः जीवेतस्मिन्सुताःकुर्युः पितामह्यासहैवतु तस्यांचैवतुजीवत्यांतस्याःश्वश्र्वेतिनिश्चयइतिहारीतोक्तेश्चेत्युक्तं तस्मिन्भर्तरि दाक्षिणात्यास्तुपूर्वोक्तस्यसपिंडीकरणादिविषयत्वात् जीवेत्तुयदिवर्गाद्यस्तंवर्गंतुपरित्यजेदितिवचनात्तद्वर्गस्यलोपएवेत्याहुः यत्तुचंद्रिकायांपारस्करः निषेककालेसोमेचसीमंतोन्नयनेतथा ज्ञेयंपुंसवनेश्राद्धंकर्मांगंविधिवच्चतदिति तत्रगर्भाधानादौकर्मांगं जातकर्मादावुक्तंतुवृद्धिश्राद्धंपृथगेव विधिवदित्युक्तेः गौडनिबंधे मात्स्ये अन्नप्राशेचसीमंतेपुत्रोत्पत्तिनिमित्तके पुंसवेचनिषेकेचनववेश्मप्रवेशने वेदव्रतेजलादीनांप्रतिष्ठायांतथैवच तीर्थयात्रावृषोत्सर्गेवृद्धिश्राद्धंप्रकीर्तितं अत्रभूतनिमित्तानांवृद्धित्वम् भाविनिमित्तानामंगत्वं वृद्धिशब्दस्तद्धर्मातिदेशार्थइतिगौडाः अन्येतुनिषेकादौकर्मांगवृद्धिश्राद्धयोःसमुच्चयमाहुः नांदीश्राद्धसंज्ञातूभयानुगता ।

समावर्तन देखील विवाहाच्या पूर्वींचा पुत्राचा संस्कार असल्यामुळें पित्यानेंच नांदीश्राद्ध करावें, त्याच्या अभावीं ज्येष्ठ भ्राता इत्यादिकानें, ज्येष्ठ भ्राता इत्यादिकांच्या अभावीं स्वतःच मुलानें नांदीश्राद्ध करावें. कारण, उपनयन झाल्यानें कर्माचा अधिकार त्यास झालेला आहे. याप्रमाणें पहिल्या विवाहांतही समजावें, असें **पृथ्वीचंद्रोदय, चंद्रिका** इत्यादि ग्रंथकार सांगतात. **मदनरत्नांतही** असेंच आहे. जेव्हां पित्यानें संन्यास घेतला असेल किंवा पिता परदेशीं गेला असेल अथवा पतित असेल तेव्हां त्याच्या पुत्राचा संस्कार धर्मार्थ इतर कोणी करील त्या वेळीं संस्कार करावयाच्या मुलाच्या पित्याचा पिता इत्यादिकांस संस्कारकर्त्यानें नांदीश्राद्ध द्यावें. कारण, "जोंपर्यंत ब्रह्मचर्यव्रत प्राप्त झालें नसेल तोंपर्यंत जनकाच्या ( पित्याच्या ) पितरांची संस्कारकर्त्यानें पूजा करावी. ब्रह्मचर्यव्रत प्राप्त झाल्यानंतर त्यानें स्वतः आपल्या पितामहादिकांचें पूजन करावें." असें **पृथ्वीचंद्रोदयांत यम**वचन आहे. जिवत्पितृकाला विशेष सांगतो **कात्यायन**—"वृद्धिश्राद्धांत, तीर्थश्राद्धांत, बाप संन्यास घेतलेला किंवा पतित असतां ज्या पितरांना पिता श्राद्ध देईल त्या पितरांना पुत्रानें स्वतः श्राद्ध द्यावें." आतां जें **बह्वृचपरिशिष्टांत**—"जिवत्पितृकानें पुत्राच्या संस्कारांत माता व मातामह यांना श्राद्ध द्यावें. माता जीवंत असतां मातामहालाच श्राद्ध द्यावें." असें सांगितलें, तें त्या बह्वृचशाखीयांनाच समजावें. ही दिशा आहे. **स्मृतितत्त्व** इत्यादिक **गौडग्रंथांत** तर—जीवन्मातृकानें पितामही इत्यादिकांना वृद्धिश्राद्ध द्यावें. कारण, "जीवंत असलेल्यास सोडून प्रेताला अन्न व उदक द्यावें." असें **कात्यायन**वचन आहे. आणि भर्ता जीवंत असतां पुत्रांनीं पितामहीसह श्राद्ध द्यावें. पितामही जीवंत असतां तिच्या सासूसह श्राद्ध द्यावें" असें **हारीत**वचनही आहे, असें सांगितलें आहे. **दाक्षिणात्य** तर—पूर्वोक्त वचन सपिंडीकरणादिविषयक असल्यामुळें "ज्या वर्गाचा ( त्रयीचा ) पहिला जीवंत असेल त्या वर्गाचा त्याग करावा" या वचनावरून त्या वर्गाचा लोपच ( अभावच ) होतो असें सांगतात. आतां जें **चंद्रिकेंत पारस्कर**—गर्भाधान, सोमयाग, सीमंतोन्नयन, आणि पुंसवन यांचे ठायीं विधीप्रमाणें तें कर्मांग श्राद्ध समजावें" तें गर्भाधानादिकांत कर्मांग आणि जातकर्मादिकांत सांगितलेलें वृद्धिश्राद्ध तर वेगळेंच आहे. कारण, वचनांत 'विधिवत्' विधीप्रमाणें असें सांगितलें आहे. **गौडनिबंधांत मात्स्यांत**—"अन्नप्राशन, सीमंत, पुत्रोत्पत्तिनिमित्त, पुंसवन, गर्भाधान, नव्या गृहांत प्रवेश, वेदांचीं व्रतें, उदकादिकांची ( तलाव इत्यादिकांची ) प्रतिष्ठा, तीर्थयात्रा, आणि वृषोत्सर्ग इतक्या ठिकाणीं वृद्धिश्राद्ध सांगितलें आहे." यामध्यें असें समजावें कीं, वृद्धिश्राद्धाचीं निमित्तें पूर्वीं झालेलीं असतील तेथें वृद्धिश्राद्ध, आणि निमित्तें पुढें व्हावयाचीं असतील तेथें कर्मांगश्राद्ध होय. सर्वांना वृद्धिश्राद्ध म्हटलें आहे तें त्या वृद्धिश्राद्धाच्या धर्माचा अतिदेश करण्यासाठीं समजावें, असें **गौड** सांगतात. **इतर ग्रंथकार** तर—गर्भाधानादिकांत कर्मांगश्राद्ध आणि वृद्धिश्राद्ध हीं दोन्ही करावीं, असें सांगतात. **नांदीश्राद्ध** ही संज्ञा ( नांव ) तर दोघांनाही आहे.

**अथेतिकर्तव्यता पृथ्वीचंद्रोदयेवृद्धपराशरः** मालत्याःशतपत्र्यावामल्लिकाकुब्जयोरपि केतक्याःपाटलायावादेयामालानलोहिताः श्राद्धेमालानिषेधस्यायमपवादः तथा सुवेषभूषणैस्तत्रसालंकारैस्तथानरैः कुंकुमाद्यनुलिप्तांगैर्भोज्यंतुब्राह्मणैःसह स्त्रियोपिस्युस्तथाभूतागीतनृत्यादिहर्षिताः **हेमाद्रौब्राह्मे**

कुशस्थानेचदूर्वाःस्युर्मंगलस्याभिवृद्धये कुशाअपिवक्ष्यंते **छंदोगपरिशिष्टे** प्रातरामंत्रितान्विप्रान्युग्मानुभयनस्तथा उभयतःदैवेपित्र्येच वैश्वदेवेद्वौविप्रौपित्रादीनामेकैकस्यद्वौद्वावितिविंशतिः त्रिकेवाद्वावित्यष्टौविप्राः अत्रविप्रालाभेस्त्रियोपिभोज्याइत्या**हाशार्केवृद्धवसिष्ठः** मातृश्राद्धेतुविप्राणामलाभेपूजयेदपि पतिपुत्रान्विताभव्यायोपितोष्टौकुलोद्भवाः मातृत्रिकेचतस्रः मातामहीत्रिकेचेत्यष्टाविति**हेमाद्रिः** अत्रपित्र्येप्राङ्मुखाविप्राः पाद्येपित्र्येचतुरस्रंमंडलमिति**जयंतः हेमाद्रौब्राह्मे** विप्रान्प्रदक्षिणावर्तंप्राङ्मुखानुपवेशयेत् **छंदोगपरिशिष्टे** गोत्रनामभिरामंत्र्यपितृभ्योर्घ्यंप्रदापयेत् नात्रापसव्यकरणंनपित्र्यंतीर्थमिष्यते ज्येष्ठोत्तरकरान्युग्मान्कराग्रग्रपवित्रकान् कृत्वार्घ्यंसंप्रदातव्यंनैकैकस्यात्रदीयते पित्रादेर्द्वौद्वौविप्रौतयोर्दक्षिणहस्तौ संयोज्यप्रथमोपवेशितविप्रकरोपरितंत्रेणद्वयोरर्घ्यंदद्यादित्यर्थः **बह्वृचकारिकायांतु** दत्तार्घ्यस्यैकदेशात्स्यादर्घ्यदानंप्रतिद्विजं आवृत्तिरपिमंत्रस्यप्रतिब्राह्मणमिष्यते प्रतिद्विजंपृथक्कुर्यान्निवीत्यर्घ्यानुमंत्रणमित्युक्तं मधुमध्वितियस्तत्रत्रिर्जपोशितुमिच्छतां गायत्र्यानंतरंस्तोत्रंमधुमंत्रविवर्जितं नचाश्नत्सुजपेदत्रकदाचित्पितृसूक्तकं तथा संपन्नमितितृप्ताःस्थप्रश्नस्थानेविधीयते सुसंपन्नमितिप्रोक्तेशेषमन्नंनिवेदयेत् अक्षय्योदकदानंचअर्घ्यदानवदिष्यते षष्ठ्यैवनियतंकुर्यान्नचतुर्थ्याकदाचन ।

## आतां नांदीश्राद्धाची इतिकर्तव्यता ( करण्याचा प्रकार ) सांगतो—

**पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धपराशर**—"जाई, कमल, मोगरी, कुब्ज, केवडा, आणि पाटला यांच्या फुलांच्या माला घाव्या. तांबड्या फुलांच्या देऊं नयेत." श्राद्धांत मालेचा निषेध आहे त्याचा हा अपवाद होय. तसेंच त्या नांदीश्राद्धांत ब्राह्मणासहित पुरुषांनीं चांगले वेष, भूषणें व अलंकार धारण करावे; केशर, चंदन इत्यादिक अंगास लावावीं. स्त्रियांनीं देखील अलंकार, भूषणें वगैरे धारण करून गायन, नृत्य इत्यादिकांनीं आनंदित असावें." **हेमाद्रींत ब्रह्मांडपुराणांत**—"मंगलाच्या अभिवृद्धीसाठीं कुशांच्या स्थानीं दूर्वा घाव्या." कुश देखील पुढें आम्हीं सांगूं. **छंदोगपरिशिष्टांत**—"प्रातःकालीं देवांकडे व पितरांकडे दोन दोन ब्राह्मण सांगावे." विश्वेदेवस्थानीं दोन ब्राह्मण आणि पिता इत्यादि एकेकास दोन दोन ब्राह्मण, असे वीस ब्राह्मण सांगावे. अथवा एकेका त्रयीला दोन दोन असे आठ ब्राह्मण सांगावे. या श्राद्धांत ब्राह्मणांच्या अभावीं स्त्रियांसही भोजन घालावें, असें सांगतो **आशार्कांत वृद्धवसिष्ठ**—"मातेच्या श्राद्धांत ब्राह्मणांच्या अभावीं पतिपुत्रवती भव्य ( चांगल्या ) अशा आठ कुलीन स्त्रियांची पूजा करावी." येथें आठ सांगितल्या त्या अशा—मातृत्रयीला चार आणि मातामहीत्रयीला चार मिळून आठ असें **हेमाद्रि** सांगतो. या श्राद्धांत पितरांकडे प्राङ्मुख ब्राह्मण बसवावे. पाद्याचे ठायीं पितरांकडे मंडल चतुरस्र करावें, असें **जयंत** सांगतो. **हेमाद्रींत ब्राह्मांत**—"प्राङ्मुख ब्राह्मणांना दक्षिणसंस्थ बसवावें." **छंदोगपरिशिष्टांत**—"गोत्र नांव यांचा उच्चार करून पितरांना अर्घ्य द्यावें. येथें अपसव्य करणें नाहीं व पितृतीर्थही इष्ट नाहीं. हातांत पवित्रक घातलेल्या पित्रादिस्थानीं बसलेल्या दोन दोन ब्राह्मणांचे दक्षिण हस्त पहिल्या ब्राह्मणाचा वर व दुसऱ्याचा खालीं अशा रीतीनें जोडून पहिल्या ब्राह्मणाच्या हातावर तंत्रानें दोघांना अर्घ्य द्यावें. प्रत्येकाला निरनिराळें अर्घ्य देऊं नये." **बह्वृचकारिकेंत** तर—"दिलेल्या अर्घ्याच्या एकदेशानें प्रत्येक ब्राह्मणाला अर्घ्यदान करावें. प्रत्येक ब्राह्मणाला मंत्राची आवृत्तीही करावी. निवीतीनें अर्घ्यानुमंत्रण प्रत्येक ब्राह्मणाला निरनिराळें करावें" असें सांगितलें आहे. "श्राद्धांत ब्राह्मणभोजनाच्या वेळीं 'मधु मधु' या मंत्राचा त्रिवार जो जप सांगितला त्याच्या स्थानीं गायत्रीजप आणि मधुमंत्रवर्जित स्तोत्रजप करावा. या वृद्धिश्राद्धांत ब्राह्मण जेवीत असतां कधींही पितृसूक्ताचा जप करूं नये." तसेंच-"-'तृप्ताःस्थ' या प्रश्नस्थानीं 'संपन्नं' असा प्रश्न करावा. ब्राह्मणांनीं 'सुसंपन्नं' असें सांगितल्यानंतर शेष ( उरलेल्या ) अन्नाचें त्यांस निवेदन करावें. अक्षय्योदकदान अर्घ्यदानाप्रमाणें करावें. तें अक्षय्योदकदान षष्ठीविभक्तीनेंच करावें. चतुर्थीविभक्तीनें कधींही करूं नये."

**चंद्रोदयेब्राह्मे** पठेच्छकुनिसूक्तंतुस्वस्तिसूक्तंशुभंतथा नांदीमुखान्पितॄन्भक्त्यासांजलिश्चसमाह्वयेत् तथा शाल्यन्नंदधिमध्वक्तंबदराणियवांस्तथा मिश्रीकृत्वातुचतुरःपिंडान्श्रीफलसंनिभान् दद्यान्नांदीमुखेभ्यश्च पितृभ्योविधिपूर्वकं द्राक्षामलकमूलानियवांश्चविनियोजयेत् तान्येवदक्षिणार्थंतुदद्याद्विप्रेषुसर्वदा **तत्रैवचतुर्विंशतिमते** द्वौद्वौचाभ्युदयेपिंडावेकैकस्मैविनिक्षिपेत् एकंनाम्नापरंतूष्णींदद्यात्पिंडान्पृथक्पृथक् **वसिष्ठः** प्राङ्मुखोदेवतीर्थेनप्राक्कूलेषुकुशेषुच दत्वापिंडान्नकुर्वीतपिंडपात्रमधोमुखं नांदीमुखेभ्यःपितृभ्यःस्वाहेतिवा

पिंडदानमंत्रइति **वृत्तिः** अत्रपिंडाःकृताकृताइत्युक्तंतत्रैव**भविष्ये** पिंडनिर्वपणंकुर्यान्नवाकुर्याद्विचक्षणः वृद्धिश्राद्धेमहाबाहोकुलधर्मानवेक्ष्यतु **छागलेयः** अग्नौकरणमर्घ्यंचावाहनंचावनेजनं पिंडश्राद्धेप्रकुर्वीत पिंडहीनेनिवर्तते तेनात्रभोजनस्यैवप्रधानत्वाद्यदिविप्रस्यवमनंतदातस्यैवपार्वणस्यपुनरावृत्तिरितिसिद्धं अत्र-सांकल्पेविशेषः **योगपारिजातेसंग्रहे** शुभार्थीप्रथमांतेनवृद्धौसांकल्पमाचरेत् नपष्ठ्यायदिवाकुर्यान्महा-दोषोभिजायते नामगोत्रादिनिषेधोप्यत्रैव नतुसपिंडकश्राद्धइतिसएव ।

**चंद्रोदयांत ब्राह्मांत**—"शुभकारक अशा शकुनिसूक्ताचा व स्वस्तिसूक्ताचा जप करावा. नांदीमुखपितरांना भक्तीनें हात जोडून आव्हान करावें" तसेंच "दहीं, मध यांनीं युक्त भात, बोरें, यव हे सारे पदार्थ मिश्र करून त्यांचे नारळासारखे चार पिंड करून ते नांदीमुख पितरांना विधिपूर्वक द्यावे. त्यांत द्राक्षें, आंवळे, मुळें, आणि यव यांचा विनियोग करावा. ब्राह्मणांना दक्षिणेसाठीं सर्वदा तींच ( द्राक्षादिक ) द्यावीं." तेथेंच **चतुर्विंशतिमतांत**—"नांदीश्राद्धांत एक एक पितराला दोन दोन पिंड द्यावे. एक पिंड नांवानें व दुसरा उच्चारावांचून द्यावा, असे वेगवेगळे पिंड द्यावे." **वसिष्ठ**–"पूर्वेकडे अग्र करून ठेवलेल्या कुशांवर पूर्वेकडे तोंड करून पिंड द्यावे. पिंडाचें पात्र उपडें करूं नये." अथवा 'नांदीमुखेभ्यः पितृभ्यः स्वाहा' हा पिंडदानाचा मंत्र असें **वृत्तिकार** सांगतो. या श्राद्धांत पिंड कृताकृत ( करावे किंवा न करावे ) असें सांगितलें आहे. तेथेंच **भविष्यांत**—"वृद्धिश्राद्धचे ठायीं कुलधर्माचें अवलोकन करून पिंडदान करावें किंवा न करावें." **छागलेय**—"अग्नौकरण, अर्घ्यदान, आवाहन, पाद्य, हीं सपिंडक श्राद्धांत करावीं. पिंडरहित श्राद्धांत वर्ज्य करावीं." तेणेंकरून ह्या श्राद्धांत भोजनालाच प्राधान्य असल्यामुळें जर ब्राह्मणाला वमन झालें असेल तर त्याच पार्वणाची पुनः आवृत्ति करावी, असें सिद्ध झालें. येथें सांकल्पश्राद्धांत विशेष सांगतो—**प्रयोगपारिजातांत संग्रहांत**—"कल्याणार्थी यानें वृद्धिकर्मामध्यें प्रथमाविभक्तीनें सांकल्पिक श्राद्ध करावें. षष्ठीविभक्तीनें करूं नये. जर षष्ठीविभक्तीनें करील तर मोठा दोष उत्पन्न होईल." नाम, गोत्र, इत्यादिकांचा निषेधही सांकल्पश्राद्धांतच आहे, सपिंडकांत नाहीं, असें तोच सांगतो.

**अत्रायंक्रमः** नांदीश्राद्धेदैवेक्षणःक्रियतामितिद्वौयुगपन्निमंत्र्य ओंतथेतिविप्राभ्यांयुगपदुक्ते प्राप्नुतां भवंतौप्राप्नुवावइतिवैश्वदेववत्पित्र्येचद्विवचनांतेनविप्रद्वयेप्रयोगंकुर्यात् आहिताग्निस्तु **हेमाद्रौब्राह्मे** योग्नौ-तुविद्यमानेपिवृद्धौपिंडान्ननिर्वपेत् पतंतिपितरस्तस्यनरकेसचपच्यते **बह्वृचपरिशिष्टे** द्वौदर्भौपवित्राणिच-त्वारि शंनोदेवीत्यनुमंत्रितासुयवानावपति यवोसिसोमदेवत्योगोसवेदेवनिर्मितः प्रत्नवद्भिःप्रत्तःपुष्ट्यानांदी-मुखान्पितॄनिमांल्लोकान्प्रीणयाहिनःस्वाहेति स्वाहार्घ्याइतिपृच्छति विश्वेदेवाइदंवोअर्घ्यंनांदीमुखाःपितरइति यथालिंगमर्घ्यदानंगंधादिदानंद्विर्द्विः पाणौहोमोग्नयेकव्यवाहनायस्वाहासोमायपितृमतेस्वाहेत्यतोदेवाअवंतुन इत्यंगुष्ठग्रहणं पावमानीःशंवतीरैंद्रीरप्रतिरथंचश्रावयेन्मधुवाताऋचःस्थानेउपास्मैगायतेतिपंचमधुमतीः श्रावयेदक्षन्नमीमदंतेतिचपष्ठींभुक्तशेषेणैकैकस्यद्वौद्वौपिंडौदद्यादिति **चंद्रिकायांवृद्धवसिष्ठः** पितृप्रश्नेतु-संपन्नंदैवेरुचितमित्यपि दधिकर्कंधुमिश्राश्चपिंडाःकार्यायथाक्रमं **कात्यायनः** त्यमूपुवाजिनमितिविप्रांश्चवि-सर्जयेत् नांदीमुखाःपितरःप्रीयंतामित्यक्षय्यस्थानेस्वधांवाचयिष्यइत्यस्यस्थानेनांदीमुखान्पितॄन्वाचयिष्येइति-नस्वधांप्रयुंजीतेति अत्रसाग्निरनग्निर्वादौवैश्वदेवंकुर्यात् आदौवृद्धौक्षयेचांतेदर्शेमध्येमहालये एकोद्दिष्टेनिवृत्ते-तुवैश्वदेवोविधीयतइत्या**शार्केशांखायनपरिशिष्टात् हेमाद्रौ**तु शेपमन्नमनुज्ञाप्यवैश्वदेवक्रियांततः श्राद्धाहिश्राद्धशेषेणवैश्वदेवंसमाचरेदिति**चतुर्विंशति**मतान्नांदीश्राद्धेप्यंतेवैश्वदेवउक्तः **बह्वृचाना**मपि-वृत्त्यालोचनात्तथैवपूर्वोक्तंतुयेपांपरिशिष्टंतद्विपयमन्यविषयंवाज्ञेयं अत्रश्राद्धांगतर्पणंनेत्युक्तंप्राक् इतिश्रीजग-द्गुरुनारायणभट्टात्मजरामकृष्णभट्टसूनुकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौवृद्धिश्राद्धम् ।

## नांदीश्राद्धाचा क्रम असा—

**'नांदीश्राद्धे दैवेक्षणः क्रियतां' असें म्हणून दोन ब्राह्मणांना एकदम क्षण देऊन 'ओं तथा' असें दोन्ही ब्राह्मणांनीं एकदम म्हटलें असतां कर्त्यानें 'प्राप्नुतां भवंतौ' असें म्हणावें. नंतर ब्राह्मणांनीं 'प्राप्नुवाव' असें म्हणावें. विश्वेदेवप्रयोगाप्रमाणें पितरांकडे दोन ब्राह्मणांचे ठायीं द्विवचनानें प्रयोग करावा. अग्निहोत्र्याला सांगतो—हेमाद्रींत ब्रह्मपुराणांत—"अग्नि विद्यमान असतांही जो वृद्धिश्राद्धांत पिंडदान करीत नाहीं त्याचे पितर नरकांत पडतात, व तो नरकांत पक्क होतो." बह्वृचपरिशिष्टांत—"दोन दर्भांचीं पवित्रें चार असावीं. 'शंनोदेवी' या मंत्रानें अर्घ्यपात्रांतील उदक अनुमंत्रण करून 'यवोसि**

गोमदेवत्यो गोमवेदेवनिर्मितः । प्रजवद्भिः प्रत्तः पुष्प्या नांदीमुखान् पितॄनिमांल्लोकान् प्रीणयाहि नः स्वाहा' या मंत्रानें अर्घ्यपात्रांत यव टाकावे. 'स्वाहाऽर्घ्याः' असा प्रश्न करावा. 'विश्वेदेवा इदंवोर्घ्यं', 'नांदीमुखाः पितर इदंवोर्घ्यं' याप्रमाणें जसें पुल्लिंग किंवा स्त्रीलिंग असेल त्याप्रमाणें ऊह करून अर्घ्यदान करावें. गध पुष्पें इत्यादिकांचें दान दोन दोन वेळां करावें. 'अग्नये कव्यवाहनाय स्वाहा', 'सोमाय पितृमते स्वाहा' या मंत्रांनीं ब्राह्मणाच्या हातावर होम करावा. 'अतो देवा अवंतुनो' या मंत्रानें अन्ननिवेदनसमयीं अंगुष्ठ धरावा. पावमानी ऋचा, शंवती, ऐंद्री व अप्रतिरथ हीं सूक्तें ब्राह्मणांकडून ऐकावीं. 'मधुवाता०' या ऋचांच्या स्थानीं 'उपास्मै गायता०' ह्या पांच ऋचा व सहावी 'अक्षन्नमीमदंत०' ह्या सहा ऋचा ऐकवाव्या. ब्राह्मणांनीं भोजन करून शेष उरलेल्या अन्नाचे पिंड करून एकएकाला दोन दोन पिंड द्यावे." चंद्रिकेंत वृद्धवसिष्ठ—"तृप्तिप्रश्नाचे ठायीं 'संपन्नं' असा प्रश्न करावा. देवांकडे 'रुचितं' असाही करावा. दहीं व बोरें यांनीं मिश्रित अन्नाचे पिंड करून अनुक्रमानें द्यावे." कात्यायन—"वाजेवाजे॰" या मंत्रानें ब्राह्मणांचें विसर्जन करावें. अक्षय्योदकस्थानीं 'नांदीमुखाः पितरः प्रीयंतां' असें म्हणून उदक द्यावें. 'स्वधां वाचयिष्ये' याच्या स्थानीं 'नांदीमुखान् पितॄन् वाचयिष्ये' असें म्हणावें. स्वधाशब्दाचा उच्चार करूं नये." नांदीश्राद्धदिवशीं साग्निक असो किंवा निरग्निक असो आधीं वैश्वदेव करावा. कारण, "वृद्धिश्राद्धांत आधीं, वार्षिकांत अंतीं, दर्शांत व महालयांत मध्यें, एकोद्दिष्टांत श्राद्ध झाल्यावर वैश्वदेव सांगितला आहे." असें आश्वलायन शांखायनपरिशिष्ट आहे. हेमाद्रींत तर—"शेष उरलेल्या अन्नाची अनुज्ञा घेऊन नंतर वैश्वदेव करावा. श्राद्धदिवशीं श्राद्धशेषानें वैश्वदेव करावा" असें चतुर्विंशतिमतांत—वचन आहे. म्हणून नांदीश्राद्धांतही अंतीं वैश्वदेव सांगितला आहे. बहुतांना देशील सूत्रवृत्ति पाहिल्यावरून तसेंच ( अंतीं वैश्वदेव ) आहे. पूर्वीं सांगितलेलें आधीं वैश्वदेव करावा तें तर ज्यांचें परिशिष्ट तसें आहे त्यांच्याविषयीं किंवा इतरांच्या विषयीं समजावें. येथें ( नांदीश्राद्धांत ) श्राद्धांगतर्पण नाहीं, असें पूर्वी ( तर्पणप्रकरणीं ) सांगितलें आहे.

इति निर्णयसिंधौ वृद्धिश्राद्धे महाराष्ट्रीका समाप्ता.

**अथजीवत्पितृकश्राद्धं** तत्रानेकपक्षादृश्यंते जीवंतंपितरंभोजयित्वापरयोःश्राद्धंकुर्यादित्येकः होमांतमेवकुर्यादित्यन्यः होमांतःपितृयज्ञःस्याज्जीवेपितरिजानतः पितरंभोजयित्वावापिंडान्निपृणुयात्परावितियज्ञपार्श्वोक्तेः यदिजीवत्पितानदद्यादाहोमात्कृत्वाविरमेदित्यापस्तंबोक्तेश्च जीवतांपिंडानग्नौहुत्वापरेभ्योदेयमित्यपरः जुहुयाज्जीवेभ्यइत्याश्वलायनोक्तेः जीवतामजीवतांचपिंडदानमितीतरः जीवतामजीवतांवादेयमेवेतिहिरण्यकेतुरितिनिगमात् तस्माज्जीवत्पिताकुर्याद्द्वाभ्यामेवनसंशयइतिभविष्योक्तेद्वाभ्यामेवेत्यन्यः एतेपक्षाःकलौनिषिद्धाः प्रत्यक्षमर्चनंश्राद्धंनिषिद्धंमनुरब्रवीत् पिंडनिर्वपणंचापिमहापातकसंमितमितिपृथ्वीचंद्रोदयेभविष्योक्तेः चंद्रिकाप्येवं तस्मात्पितरिजीवतिश्राद्धानारंभएवेत्येकः पक्षः सपितुःपितृकृत्येषुअधिकारोनविद्यतइतिकात्यायनोक्तेः जीवेपितरिवैपुत्रःश्राद्धकालंविवर्जयेदितिहारीतोक्तेश्च पितुःपित्रादिभ्योदद्यादितिसिद्धांतः ध्रियमाणेतुपितरिपूर्वेषामेवनिर्वपेदितिमनूक्तेः पितुःपितृभ्योवादद्यात्सपितेत्यपराश्रुतिरितिकात्यायनोक्तेश्च अयंबहुसंमतःपक्षः अन्येशाखाभेदेनज्ञेयाः एवंजीवन्मातामहेनाप्यूहेनकार्यं मातामहानामप्येवंश्राद्धंकुर्याद्विचक्षणः मंत्रोहेनयथान्यायंशेषाणांमंत्रवर्जितमितिविष्णूक्तेः एवंमात्रादिकस्यापितथामातामहादिकेऽतिपृथ्वीचंद्रोदयेग्निपुराणाच्च पितरिजीवतितुस्वमातरिमृतायामपिपितुरेवमातृमातामहयोःकुर्यात येभ्यएवपितादद्यादितिवक्ष्यमाणवचनादिति पितामहचरणाः मदनरत्नेतुजीवत्पितास्वमातृमातामहयोर्दद्यादित्युक्तं कालादर्शेप्येवं मृतेतुपितरिजीवन्मातृकःपितामह्यादिभ्योवृद्धौदद्यादितिस्मृतितत्त्वादिगौडग्रंथाः दाक्षिणात्यास्तु पितृवर्गेमातृवर्गेतथा मातामहस्यच जीवेत्तुयदिवर्गाद्यस्तंवर्गंतुपरित्यजेदितिवचनात्तद्वर्गत्यागएवेत्याहुः ।

## आतां जीवत्पितृकानें करावयाचें श्राद्ध सांगतो—

याचे अनेक पक्ष स्मृतींमध्यें दिसतात ते असे—जीवंत असलेल्या पित्याला भोजन घालून इतरांचें ( पितामह व प्रपितामह यांचें ) श्राद्ध करावें, हा एक पक्ष. होमापर्यंतच श्राद्ध करावें, हा दुसरा पक्ष. कारण, "पिता जीवंत असतां होमापर्यंत पितृयज्ञ करावा. अथवा पित्याला भोजन घालून इतरांना पिंड द्यावे" असें यज्ञपार्श्वाचें वचन आहे. आणि "जर जीवत्पितृक असेल तर पिंड देऊं नये, होमापर्यंत करून समाप्त करावें" असें आपस्तंबवचनही आहे. जीवंतांचे पिंडांचा अग्नींत होम करून इतरांना द्यावे, हा तिसरा पक्ष; कारण, "जीवंतांना अग्नींत होम करावा" असें आश्वलायन-

वचन आहे. जीवंतांना व मृतांना पिंडदान करावें, हा **चवथा** पक्ष. कारण, "जीवंतांना व मृतांना द्यावेंच, असें हिरण्यकेतु सांगतो" असें **निगम**वचन आहे. "तस्मात् कारणात् जीवत्पित्यानें दोघांचेंही श्राद्ध करावें, यांत संशय नाहीं" असें **भविष्य**वचन आहे, म्हणून दोघांनाच श्राद्ध द्यावें, हा **पांचवा** पक्ष. हे पक्ष कलियुगांत निषिद्ध आहेत. कारण, "श्राद्धाचे ठायीं प्रत्यक्ष पिता इत्यादिकांचें पूजन निषिद्ध आहे, असें मनूनें सांगितलें आहे. तसेंच प्रत्यक्ष पिता इत्यादिकांना पिंड देणें हेंही महापातकासारखें आहे" असें **पृथ्वीचंद्रोदयांत** भविष्यवचन आहे. **चंद्रिका**ही अशीच आहे. तस्मात् पिता जीवंत असतां श्राद्धारंभच करूं नये, हा एक पक्ष आहे. कारण, "सपितृकाला पितृकृत्याविषयीं अधिकार नाहीं" असें **कात्यायन**वचन आहे. आणि "पिता जीवंत असतां पुत्रानें श्राद्धकाल वर्ज्य करावा" असें **हारीन**वचनही आहे. पित्याच्या पित्रादिकांना श्राद्ध द्यावें, हा **सिद्धांत** होय. कारण, "पिता जीवंत असतां पूर्व पितरांनाच श्राद्ध द्यावें" असें **मनु**वचन आहे. आणि "सपितृकानें पित्याच्या पितरांना द्यावें, अशी दुसरी श्रुति आहे" असें **कात्यायनानें**ही सांगितलें आहे. हा पक्ष बहुतांना संमत ( मान्य ) आहे. इतर पक्ष शाखाभेदानें जाणावे. याप्रमाणें ज्याचा मातामह जीवंत असेल त्यानें देखील ऊह करून प्रमातामहादिकांचें श्राद्ध करावें. कारण, "मातामहांचें देखील असेंच मंत्राचा ऊह करून यथाविधि श्राद्ध करावें. इतरांचें मंत्रवर्जित ( अमंत्रक ) करावें" असें **विष्णु**वचन आहे. आणि "याप्रमाणें मातृत्रयीचेंही करावें. तसेंच मातामहादिकांचेंही करावें" असें **पृथ्वीचंद्रोदयांत अग्निपुराण**वचनही आहे. पिता जीवंत असतां व कर्त्याची माता मृत असली तरी पित्याच्याच मातृत्रयीचें व मातामहांचें करावें. कारण, "ज्यांना पिता देतो त्यांना पुत्रानें स्वतः द्यावें" ह्या पूर्वे सांगाव याच्या वचनावरून, असें पितामहचरण ( नारायणभट्ट ) सांगतात. **मदनरत्नांत** तर—जीवत्पितृकानें आपली माता व मातामह यांना द्यावें, असें सांगितलें आहे. **कालादर्शांत**ही असेंच आहे. पिता मृत असेल व माता जीवंत असेल तर पितामही इत्यादिकांना वृद्धिश्राद्धांत द्यावें, असें स्मृतितत्त्व इत्यादिक **गौडग्रंथ** आहेत. **दाक्षिणात्य** तर—"पितृवर्गात, मातृवर्गात, तसेंच मातामहवर्गात ज्या वर्गाचा आद्य ( पहिला ) जीवंत असेल तो वर्ग वर्ज्य करावा" या वचनावरून त्या वर्गाचा त्यागच आहे, असें सांगतात.

एवंपतितसंन्यस्तपितृकादेरपिज्ञेयं वृद्धौतीर्थेचसंन्यस्तेनातेचपतितेसति येभ्यएवपितादद्यात्तेभ्योदद्यात्स्वयंसुतइतिषट्त्रिंशन्मतात्संन्यस्तेजीवतीत्यर्थः मृतेतुसंन्यस्तेतदाद्यवदेयं मृतेपिपरेभ्यएवेतिगौडाः कात्यायनोपि ब्राह्मणादिहतेनातेपतितेसङ्गवर्जिते व्युत्क्रमाच्चमृतेदेयंयेभ्यएवददात्यसौ अयंचसंन्यस्तपित्रादेरविशेषात्सर्वश्राद्धेधिकारः एतत्त्रिदंडिपरं एकादशाहपार्वणवार्षिकाद्यपितस्यैव अहन्येकादशेप्राप्तेपार्वणंतुविधीयतेइत्युक्त्वा त्रिदंडग्रहणादेवप्रेतत्वंनैवजायतेइत्युशनसाविशेषोक्तेः ब्राह्मणादिहतेइत्यादिनिषेधस्त्वेकदंडादिपरः अतःपरमहंसानांवार्षिकादिकमपिनकार्यमितिशूलपाणिश्राद्धतत्त्वादयोगौडग्रंथाः इदमेवतुयुक्तं यत्तुहेमाद्रौकौंडिन्यः दर्शश्राद्धंगयाश्राद्धंश्राद्धंचापरपक्षिकं नजीवत्पितृकःकुर्यात्तिलैस्तर्पणमेवचेतितत्संन्यस्तपित्राद्यतिरिक्तविषयं मैत्रायणीयपरिशिष्टे उद्वाहेपुत्रजननेपित्र्येष्ट्यांसौमिकेमखे तीर्थेब्राह्मणआयातेषडेतेजीवतःपितुः तत्रैव महानदीषुसर्वासुतीर्थेषुचगयामृते जीवत्पितापिकुर्वीतश्राद्धंपार्वणधर्मवत् गयामृतेइतिमातृव्यतिरिक्तविषयं अन्वष्टक्यंगयाप्राप्तौसत्यांयच्चमृतेहनि मातुःश्राद्धंसुतःकुर्यात्पितर्यपिचजीवतीतितत्रैवोक्तेः गयाप्राप्तौप्रासंगिक्यां गयांप्रसंगतोगत्वामातुःश्राद्धंसमाचरेदितिवचनात् तेनमृतमातृकोगयायांतत्पार्वणमात्रंकुर्यात् तज्जीवनेतुतीर्थश्राद्धमपिनेतिकालादर्शस्मृतिदर्पणादयः अन्येतुगत्वाश्राद्धंनेतिनिषेधार्थः सामान्यतःप्राप्तंतीर्थश्राद्धंभवत्येवगयायामित्याहुः ।

याप्रमाणें ज्याचा पिता पतित किंवा संन्यास घेतलेला वगैरे असेल त्यालाही असेंच समजावें. कारण, "जीवत्पितृकानें वृद्धिश्राद्धांत व तीर्थश्राद्धांत आणि पिता संन्यास घेतलेला किंवा पतित असतां ज्या पितरांना पित्यानें श्राद्ध द्यावयाचें त्यांना स्वतः पुत्रानें द्यावें" असें **षट्त्रिंशत्स्मृति**वचन आहे. संन्यास घेतलेला पिता मृत असेल तर तो पहिल्यानें धरूनच श्राद्ध द्यावें. मृत असला तरी पूर्वीच्यांनाच द्यावें, त्याला नाहीं, असें **गौड** सांगतात. **कात्यायन**ही — "पिता, ब्राह्मण, गाई इत्यादिकांनीं मारला गेला, पतित ( महापातकी ) झाला, त्यानें संन्यास घेतला किंवा उलट क्रमानें ( पितामह जीवंत असतां ) मृत झाला, असा असेल तर ज्या पितरांना पित्यानें श्राद्ध द्यावयाचें त्यांना पुत्रानें द्यावें." ज्याचा पिता संन्यस्त वगैरे झाला असेल त्याला जो श्राद्धाविषयीं अधिकार सांगितला तो अमुक श्राद्धाविषयीं, असें विशेष सांगितलें नसल्यामुळें सर्व श्राद्धांविषयीं तो आहे. हें सांगणें त्रिदंडी संन्याशाविषयीं आहे. अकराव्या दिवशीं पार्वणश्राद्ध आणि वार्षिकादिक श्राद्ध हें देखील त्या त्रिदंडीलाच आहे. कारण, "अकरावा दिवस प्राप्त असतां पार्वण करावें" असें सांगून "त्रिदंडाचें ग्रहण केल्यानेंच त्याला

प्रेतत्व प्राप्त होत नाहीं." असें **उशनसानें** विशेष सांगितलें आहे. 'ब्राह्मणादिहतेताते०' ह्या **कात्यायनानें** जो **निषेध** केला तो एकदंडी वगैरे संन्याशी यांना आहे. म्हणूनच परमहंसांचें वार्षिकादिकही करूं नये, असें **शूलपाणी, श्राद्धतत्त्व** इत्यादिक गौडग्रंथ आहेत. हेंच युक्त आहे. आतां जें **हेमाद्रींत कौंडिन्य**—"जीवत्पितृकानें दर्शश्राद्ध, गयाश्राद्ध, महालय, हीं करूं नयेत; व तिलांनीं तर्पणही करूं नये" असें निषेधक वचन तें ज्याचा पिता संन्याशी वगैरे नसेल त्याविषयीं आहे. संन्याशी वगैरे नसतां श्राद्धाधिकार कसा? असें म्हणाल तर सांगतो—**मैत्रायणीयपरिशिष्टांत**—"विवाह, पुत्रोत्पत्ति, पितृयज्ञ, सोमयाग, तीर्थ आणि श्राद्धयोग्य ब्राह्मणाचें आगमन, हे सहा काल जीवत्पितृकाला श्राद्धाचे आहेत. तेथेंच "सर्व महानद्या, गयेवांचून इतर तीर्थें, यांचे ठायीं जीवत्पितृकानें देखील पार्वणश्राद्धाच्या धर्मानें श्राद्ध करावें." गयेवांचून असें जें म्हटलें तें मातृव्यतिरिक्तविषयक आहे; कारण, "पिता जीवंत असतांही अन्वष्टक्य श्राद्ध, गयातीर्थ प्राप्त असतां, आणि मृतदिवशीं ( संवत्सरदिवशीं ) मातेचें श्राद्ध पुत्रानें करावें" असें तेथेंच सांगितलें आहे. गयातीर्थप्राप्ति इतर प्रसंगानें होईल तर करावें. मुद्दाम त्याकरितां जाऊन करूं नये. कारण, "प्रसंगानें गयेस गेला असतां तेथें मातेचें श्राद्ध करावें" असें वचन आहे. यावरून असें सूचित होतें कीं, ज्याची माता मृत असेल त्यानें गयेचे ठायीं तिचें पार्वण मात्र करावें, ती माता जीवंत असेल तर तीर्थश्राद्धही करूं नये, असें **कालादर्श, स्मृतिदर्पण** इत्यादिक ग्रंथकार सांगतात. **इतर ग्रंथकार** तर—'गयामृते' या निषेधाचा अर्थ-गयेस जाऊन श्राद्ध करूं नये, असा आहे. सामान्यतः प्राप्त झालेलें तीर्थश्राद्ध गयेचे ठायीं होतेच आहे, असें सांगतात.

यदातुपितुःप्रतिनिधित्वेनगयांयातितदायजमानस्यपितृपितामहप्रपितामहाइत्येवंश्राद्धं तत्रमातुःपितृपत्नीभ्येनैकोद्दिष्टंकृत्वामातृत्वेनपुनःपार्वणंकुर्यादिति**त्रिस्थलीसेतौ** तत्रफल्गुविष्णुपदाक्षय्यवटेष्वेवेति**केचित्** आद्यांतएवेत्यन्ये मध्यमांतइत्यपरे संकोचेहेत्वभावात्तत्रत्यसर्वश्राद्धानिमातुःकार्याणीतियुक्तंप्रतिभाति यत्तु **मदनपारिजाते** नजीवत्पितृकःकुर्याच्छ्राद्धमग्निमृतेद्विजः येभ्यएवपितादद्यात्तेभ्यःकुर्वीतसाग्निकइति **सुमंतूक्तेः**साग्नेरेवजीवत्पितृकस्यतीर्थादिश्राद्धमुक्तं साग्नेरपिमैत्रायणीयशाखीयस्यैवनान्येषाम् षडेतेजीवतःपितुरितितत्परिशिष्टएवोक्तेरिति**रत्नावलीदिवोदासाद्याः** तदयुक्तं **सौमंतवचं**पिंडपितृयज्ञविषयं संन्यस्तपित्राद्यतिरिक्तविषयंवेति**पृथ्वीचंद्रोदयोक्तेः** वृद्धौतीर्थेचेत्यादेःसाधारण्येनान्यापितथात्वाच्च तथानिरग्नेरपिनांदीश्राद्धमुक्तंप्राक् एवंपितामहजीवनेपिज्ञेयं विशेषःपितृकृत**जीवत्पितृकनिर्णये**ज्ञेयः ।

जेव्हां पित्याचा प्रतिनिधि होऊन पुत्र गयेस जाईल तेव्हां 'यजमानस्य पितृपितामहप्रपितामहाः' असा उच्चार करून श्राद्ध करावें. त्या वेळीं मृतमातृकानें मातेचें पितृपत्नीत्वेंकरून एकोद्दिष्ट करून मातृत्वेंकरून पुनः पार्वण करावें, असें **त्रिस्थलीसेतु** ग्रंथांत आहे. तें मातृश्राद्ध फल्गुनदी, विष्णुपद आणि अक्षय्यवट यांचे ठायींच करावें, असें **केचित्** म्हणतात. पहिल्या श्राद्धाच्या ठायींच करावें, असें अन्य म्हणतात. मध्यम श्राद्धाच्या ठायीं करावें, असें इतर म्हणतात. श्राद्धाचा संकोच करण्याविषयीं प्रमाण नसल्यामुळें तेथील सारीं श्राद्धें मातेचीं करावीं, हें युक्त वाटतें. आतां जें **मदनपारिजातांत**—"जीवत्पितृकानें अग्नि नसतां श्राद्ध करूं नये. ज्या पितरांना पिता श्राद्ध देतो, त्यांनाच साग्निकानें द्यावें" या **सुमंतु**वचनावरून जीवत्पितृक साग्निक असता त्याला तीर्थादि श्राद्ध सांगितलें आहे. साग्निकाला देखील मैत्रायणीयशाखेचा असेल त्यालाच, इतरांना नाहीं. कारण, हे सहा काळ श्राद्धाचे जीवत्पितृकाला आहेत" असें त्यांच्याच परिशिष्टांत उक्त आहे, असें **रत्नावली, दिवोदास** इत्यादिक ग्रंथकार सांगतात. तें अयुक्त आहे. कारण, वरील **सुमंतु**वचनानें केलेला निषेध पिंडपितृयज्ञविषयक किंवा ज्याचा पिता संन्यस्त वगैरे नसेल तद्विषयक आहे, असें **पृथ्वीचंद्रोदयानें** सांगितलें आहे. आणि 'वृद्धिश्राद्धांत, तीर्थश्राद्धांत, पिता संन्यस्त वगैरे असता' हें पूर्वोक्त वचन सर्वसाधारण असल्यामुळें हें ( महानदीषु सर्वासु० इत्यादि वर सांगितलेलें ) ही तसेंच सर्वसाधारण आहे. तसेंच निरग्निकालाही जीवत्पितृकाला वृद्धिश्राद्ध पूर्वी सांगितलें आहे. पितामह जीवंत असतांही असेंच समजावें. विशेष निर्णय माझ्या ( कमलाकरभट्टाच्या ) पित्यानें केलेल्या **जीवत्पितृकनिर्णय**-ग्रंथांतून जाणावा.

अथपितामहेजीवतिमृतेचपितरि यद्यपि पितामहोवातच्छ्राद्धंभुंजीतेत्यत्रवीन्मनुरितिमनुनाजीवतःपितामहस्यभोजनमुक्तं तथापिप्रत्यक्षार्चनस्यपूर्वंनिषिद्धत्वात्पितामहंविहायपितृप्रपितामहवृद्धप्रपितामहेभ्योदेयं पितायस्यनिवृत्तःस्याज्जीवेच्चापिपितामहः पितुःसनामसंकीर्त्यकीर्तयेत्प्रपितामहमिति**मनूक्तेः अयमेवसर्वसंमतःपक्षः** यत्तु**छंदोगपरिशिष्टे** पितामहेध्रियमाणेपितुःप्रेतस्यनिर्वपेत् पितुस्तस्यचवृत्तस्यजीवेच्चेत्प्रपितामहइतिएकपुरुषंद्विपुरुषंवापार्वणमाहतत्तीर्थपितृयज्ञपरं वृद्धौपूर्वोक्तमेव एवंपूर्वयोर्मृतयोः प्रपितामहे

जीवतिपितृमात्रेमृतेपरयोर्जीवतोश्चवृद्धप्रपितामहादिभ्योज्ञेयं जीवंतमतिदद्याद्धाप्रेतायान्नोदकेद्विजइतिका**त्यायनोक्तेश्च** एतत्सर्वंमनसिकृत्वाह**हेमाद्रौविष्णुः** पितरिजीवतियःश्राद्धंकुर्याद्येषांपिताकुर्यात्तेषां पितरिपितामहेचजीवतियेषांपितामहः पितरिपितामहेप्रपितामहेचजीवतिनैवकुर्यात् यस्यपिताप्रेतःस्यात्सपित्रेपिंडंनिधायपितामहात्पराभ्यांद्वाभ्यांदद्यात् यस्यपितामहःप्रेतःस्यात्सतस्मैपिंडंनिधायप्रपितामहात्पराभ्यांदद्यात् यस्यपितापितामहश्चप्रेतौस्यातांसताभ्यांपिंडौदत्वापितामहपितामहायदद्यात् मातामहानामप्येवंश्राद्धंकुर्याद्विचक्षणः मंत्रोहेनयथान्यायंशेषाणांमंत्रवर्जितमिति अत्रपितृवन्मातामहेजीवतितत्पित्रादिभ्यः यथातत्रत्रिषुजीवत्सुनैवकुर्यात्तथात्रापीत्यादिसर्वमतिदेश्यम् एवंमातृजीवनेपीति**शूलपाणिकालादर्शौ** तन्न येभ्य एवेत्यादौयच्छब्दादेर्व्यक्तिविशेषवाचित्वेनतदप्रसंगादितिदिक् उत्तरार्धंव्याख्यातंप्राक् यत्त्वत्र**विज्ञानेश्वरेणोक्तं** पित्रेपिंडंनिधायेतिपितुरेकोद्दिष्टविधिनाश्राद्धंकृत्वाप्रपितामहादिभ्यःपार्वणंकुर्यात् तद्व्युत्क्रममृतसपिंडीकरणाभावपक्षेसपिंडीकरणस्थानापन्नंज्ञेयं व्युत्क्रमात्तुप्रमीतानांनैवकार्यासपिंडतेति**वचनात्** दर्शादौतुपितुरेकोद्दिष्टमेवकार्यम् नजीवंतमतिददातीति**श्रुतेः** जीवेत्पितामहोयस्यपिताचांतरितोभवेत् पितुरेकस्यदातव्यमेवमाहुर्मनीषिणइति**यज्ञपार्श्वोक्तेः** पितामहेजीवतिवैपितर्येवसमापयेदिति**हारीतोक्तेश्च** **शिष्टास्तु** व्युत्क्रमात्तुप्रमीतानांनैवकार्यासपिंडता यदिमातायदिपिताभर्तानेपविधिःस्मृत इति**माधवीयेस्कांदोक्ते**र्व्युत्क्रममृतसपिंडीकरणाभावःपितृव्यादिविषयइत्याहुः एषविधिर्निषेधरूपः ।

आतां पितामह जीवंत असून पिता मृत झाला असतां जरी "त्या श्राद्धांत पितामहाला भोजन घालावें" ह्या **मनु**वचनानें जीवंत पितामहाला भोजन सांगितलें आहे तरी प्रत्यक्ष वडिलांचें पूजन पूर्वी निषिद्ध म्हणून सांगितलें असल्यामुळें पितामह वर्ज्य करून पिता, प्रपितामह व वृद्धप्रपितामह यांना श्राद्ध द्यावें: कारण, ज्याचा पिता मृत असेल आणि पितामह जीवंत असेल त्यानें पित्याचें नांव घेऊन प्रपितामहाचें नांव घ्यावें" असें **मनू**चें वचन आहे. हाच पक्ष सर्वांना मान्य आहे. आतां जें **छंदोगपरिशिष्टांत**—"पितामह जीवंत असतां मृत झालेल्या पित्याचें श्राद्ध करावें. प्रपितामह जीवंत असेल आणि पिता व पितामह मृत असतील तर त्या दोघांचें श्राद्ध करावें असें एक पुरुषाचें व दोन पुरुषांचें पार्वण सांगितलें आहे, तें तीर्थश्राद्ध-पिंडपितृयज्ञविषयक आहे. वृद्धिश्राद्धांत पूर्वी सांगितलें तेंच समजावें. याप्रमाणें पिता व पितामह मृत असून प्रपितामह जीवंत असेल अथवा पिता मात्र मृत असून पितामह व प्रपितामाह जीवंत असतील तर वृद्धप्रपितामहादिकांना श्राद्ध द्यावें, असें समजावें. कारण, "जीवंत असेल त्याला सोडून प्रेताला अन्न व उदक द्विजानें द्यावें" असें **कात्यायन**वचनही आहे. हा वर सांगितलेला सर्व प्रकार मनांत धरून सांगतो **हेमाद्रींत विष्णु**-"पिता जीवंत असतां जो श्राद्ध करील त्यानें ज्यांचें पिता श्राद्ध करितो त्यांचें करावें. पिता व पितामह जीवंत असतां ज्याचें पितामह करितो त्यांचें करावें. पिता, पितामह व प्रपितामह तिघे जीवंत असतील तर त्यानें श्राद्धच करूं नये. ज्याचा पिता मृत असेल त्यानें पित्याला पिंड देऊन पितामहाच्या पूर्वीच्या दोघांना द्यावें. ज्याचा पितामह मृत असेल त्यानें त्या पितामहाला पिंड देऊन प्रपितामहाच्या पूर्वीच्यांना द्यावे. ज्याचा पिता व पितामह दोघे मृत असतील त्यानें त्या दोघांना पिंड देऊन पितामहाच्या प्रपितामहाला द्यावा. ज्याचा पितामह मृत असेल त्यानें त्याला पिंड देऊन प्रपितामहाच्या पूर्वीच्या दोघांना द्यावें. मातामहांचें देखील असेंच मंत्राचा ऊह करून यथाविधि श्राद्ध करावें. इतरांचें अमंत्रक करावें." येथें ( मातामहश्राद्धांत ) पित्याप्रमाणें मातामह जीवंत असतां त्याच्या पित्रादिकांना द्यावें. जसें ते पिता इत्यादिक तिघे जीवंत असतां श्राद्ध करूं नये तसें येथेंही ( मातामहत्रयींतही ) करूं नये इत्यादिक सर्वांचा अतिदेश ( हवाला ) जाणावा. माता जीवंत असतांही असेंच समजावें, असें **शूलपाणि** व **कालादर्श** सांगतात, तें बरोबर नाहीं. कारण, "येभ्य एव पिता दद्यात्तेभ्यो दद्यात्स्वयं सुतः" इत्यादि वाक्यांतील 'येभ्यः' इत्यादि शब्द विशेष व्यक्तींचे ( पुरुषांचे ) वाचक असल्यामुळें त्या वचनाची माता-पितामही इत्यादिकांवर प्रसक्तीच येत नाहीं. उत्तरार्धाची ( मंत्रोहेन यथान्यायं ) ह्या अर्ध श्लोकाची व्याख्या पूर्वी ( पार्वणश्राद्धप्रकरणीं ) केली आहे. आतां जें येथें ( जीवत्पितृकादिश्राद्धप्रकरणीं ) **विज्ञानेश्वरानें** सांगितलें आहे कीं, "पित्याला पिंड देऊन' म्हणजे पितामह जीवंत असतां पित्याचें एकोद्दिष्टविधीनें श्राद्ध करून प्रपितामहादिकांचें पार्वण करावें" असें, तें उलट क्रमानें ( वडील जीवंत असून पुत्र मरणें अशा क्रमानें ) मृतांचें सपिंडीकरण करावयाचें नाहीं, या पक्षीं सपिंडीकरणाच्या स्थानीं समजावें. कारण, "उलट क्रमानें मृतांचें सपिंडीकरण करूं नये." असें वचन आहे. दर्शादिश्राद्धांत तर पित्याचें एकोद्दिष्टच करावें. कारण, "जीवंत असेल त्याचें उल्लंघन करून पूर्वीच्यास देऊं नये" अशी **श्रुति** आहे. ज्याचा पितामह जीवंत असून पिता मृत असेल त्यानें एकट्या पित्याला श्राद्ध द्यावें, असें विद्वान् सांगतात." असें **यज्ञपार्श्वाचें** वचन आहे. आणि "पितामह

जीवंत असतां पित्याच्या ठिकाणीं श्राद्ध समाप्त करावें" असें **हारीताचें** वचनही आहे. **शिष्ट** तर—"उलट क्रमानें मृत झाले असतील त्यांचें सपिंडीकरण करूं नये. जर माता, किंवा पिता, अथवा भर्ता मृत असेल तर त्यांचे ठायीं हा सपिंडीकरण निषेध नाहीं" असें **माधवीयांत स्कंद**वचन असल्यामुळें उलट क्रमानें मृत झालेल्यांचें सपिंडीकरण नाहीं म्हणणें हें पितृव्य-ज्येष्ठ भ्राता इत्यादिविषयक समजावें, असें सांगतात.

त्रिपुजीवत्सु**विष्णुराह** त्रिपुजीवत्सुनैवकुर्यादितितद्दर्शादिविषयं नांदीश्राद्धंतुपरेभ्यस्त्रिभ्योभवत्येवेति**कल्पतरुः पृथ्वीचंद्रोदयस्तु** दद्यात्त्रिभ्यःपरेभ्यस्तुजीवेत्तत्रितयंयदीति**मनूक्तेः**सर्वत्रविकल्पः सचदेशाचारात्र्यवतिष्ठतइत्याह **सुदर्शनभाष्येतु**मासिकश्राद्धंजीवत्पित्रादिनाव्युत्क्रममृतपित्रादिनाचकार्यमेवेत्युक्तं **मदनरत्नेकतुः** अष्टकादिपुसंक्रांतौमन्वादिपुयुगादिपु चंद्रसूर्यग्रहेपातेस्वेच्छयालभ्ययोगतः जीवत्पितानैवकुर्याच्छ्राद्धंकाम्यंतथाखिलं अन्येविशेषाःश्रीपितृकृत**जीवत्पितृकनिर्णये**भट्टकृत**त्रिस्थलीसेतौ**चज्ञेयाः इतिश्रीभट्टकमलाकरकृतेनिर्णयसिंधौजीवत्पितृकादिश्राद्धम् ।

आतां तिघे जीवंत असतां **विष्णु** सांगतो—"पिता इत्यादिक जीवंत तिघे असतां श्राद्ध करूं नये." असें तें दर्शश्राद्धविषयक समजावें. नांदीश्राद्ध तर पूर्वीच्या तिघांना ( वृद्धप्रपितामहादिकांना ) द्यावें, असें **कल्पतरु** सांगतो. **पृथ्वीचंद्रोदय** तर—"पिता इत्यादिक त्रयी जीवंत असेल तर पूर्वीच्या तिघांना द्यावें" असें **मनु**वचन असल्यामुळें सर्व श्राद्धांचे ठायीं विकल्प समजावा. त्याची ( विकल्पाची ) देशाचारावरून व्यवस्था समजावी, असें सांगतो. **सुदर्शनभाष्यांत** तर—ज्याचे पिता इत्यादिक जीवंत असतील व उलट क्रमानें मृत असतील त्यानें मासिक श्राद्ध करावेंच, असें सांगितलें आहे. **मदनरत्नांत कतु**—"अष्टका इत्यादिक श्राद्धें, संक्रांति, मन्वादि तिथि, युगादि तिथि, चंद्रसूर्यग्रहण, व्यतीपात, अलभ्ययोग इतक्या ठिकाणीं जीवत्पितृकानें आपल्या इच्छेप्रमाणें करावें. सारें काम्यश्राद्ध जीवत्पितृकानें करूं नयेच." इतर विशेष, पित्यानें केलेल्या **जीवत्पितृकनिर्णयांत** व नारायणभट्टांनीं केलेल्या **त्रिस्थलीसेतूंत** जाणावे.

इति जीवत्पितृकादिश्राद्धाची महाराष्ट्रटीका समाप्त झाली.

**अथविभक्ताविभक्तनिर्णयः पृथ्वीचंद्रोदयेमरीचिः** बहवःस्युर्यदापुत्राःपितुरेकत्रवासिनः सर्वेषांतुमतंकृत्वाज्येष्ठेनैवतुयत्कृतं द्रव्येणचाविभक्तेनसर्वैरेवकृतंभवेत् ज्येष्ठस्यकर्तृत्वेपिसर्वेफलभागिनइत्यर्थः तेनयेब्रह्मचर्यादिनियमास्तेफलिसंस्कारत्वात्सर्वैःकार्याः एवंसंसृष्टिनामपि तुल्यत्वात **मिताक्षरायांनारदः** भ्रातॄणामविभक्तानामेकोधर्मःप्रवर्तते विभागेसतिधर्मोपिभवेत्तेषांपृथक्पृथक् **बृहस्पतिरपि** एकपाकेनवसतांपितृदेवद्विजार्चनं एकंभवेद्विभक्तानांतदेवस्याद्गृहेगृहे अत्रयद्यप्यविशेषश्रवणात् ब्रह्मयज्ञसंध्यादिष्वप्यविभक्तानांपृथङ्निषेधःप्राप्नोतितथापिद्रव्यसाध्यश्राद्धवैश्वदेवादिष्वेवसः द्रव्यस्यानेकस्वामिकत्वेनैकस्यव्ययेनधिकारात यानितुद्रव्यासाध्यनिमंत्रजपोपवाससंध्याब्रह्मयज्ञपारायणादीनिनित्यनैमित्तिककाम्यानितेपुपृथगेवाधिकारः द्रव्यव्ययाभावेनुमत्यनपेक्षणात् द्रव्येणचाविभक्तेनेत्यस्याविषयत्वात् पृथगप्येकपाकानांब्रह्मयज्ञोद्विजातिनां अग्निहोत्रंसुरार्चाचसंध्यानित्यंभवेत्तथेति**प्रयोगपारिजातेआश्वलायनस्मृतेश्च** अग्निहोत्रशब्दोग्निसाध्यश्रौतस्मार्तनित्यकर्मपरः तेष्वप्यन्यानुमत्यैवाधिकारेणन्यायसाम्यात् पितृश्राद्धादिपुतुल्यफलेपुनित्येष्वनुमतिंविनाप्येकस्याधिकारः एकोपिस्थावरेकुर्याद्दानाध्ययनविक्रयं आपत्कालेकुटुंबार्थेधर्मार्थेचविशेषतइति**वचनात्** धर्मार्थेवश्यकर्तव्येपितृश्राद्धादाविति **विज्ञानेश्वरः केचित्त्वविभक्तानामपिपृथक्पाकत्वेदेशांतरेचदार्शिकाब्दिकयोःपृथक्त्वमाहुः** भ्रातॄणामविभक्तानांपृथक्पाकोभवेद्यदि वैश्वदेवादिकंश्राद्धंकुर्युस्तेवैपृथक्पृथक् इति**हारीतोक्तेः** अविभक्तेनपुत्रेणपितृमेधोमृताहनि **देशांतरेपृथक्कार्योदर्शश्राद्धंतथैवचेतियमोक्तेश्चेति** तत्रमूलंचिंत्यं तदयमर्थः पंचमहायज्ञमध्येदेवभूतपितृमनुष्ययज्ञानन्यानुमत्याज्येष्ठएवकुर्यात् होमाप्रदानरहितंनभोक्तव्यंकदाचन अविभक्तेपुसंसृष्टेष्वेकेनापिकृतंकृतमिति**व्यासोक्तेश्च** यस्यतुज्येष्ठेनाकृतेवैश्वदेवेन्नंसिध्येत्तेनतूष्णीमग्नौकिंचिक्षिप्त्वाभोक्तव्यं **यस्यत्वेषामप्रतोन्नंसिध्येत्सनियुक्तमग्नौकृत्वाग्रेन्नाह्मणायदत्वाभुंजीतेत्यविभक्ताधिकारेपृथ्वीचंद्रोदयेगोभिलोक्तेः** ।

## आतां विभक्ताविभक्तांचा निर्णय सांगतो—

**पृथ्वीचंद्रोदयांत मरीचि**—"जेव्हां पित्याचे बहुत पुत्र एके ठिकाणीं ( अविभक्त ) असतील तेव्हां सर्वांच्या मतानें सामायिक द्रव्य खर्च करून ज्येष्ठानेंच केलेलें श्राद्धादि कर्म सर्वांनीं केल्यासारखें होतें, म्हणजे ज्येष्ठ कर्ता असला तरी त्या कर्माचें फल ( पुण्य वगैरे ) सर्वांना प्राप्त होतें." यावरून ब्रह्मचर्य इत्यादिक नियम हे ज्यांना फल प्राप्त व्हावयाचें त्यांचे संस्कार असल्यामुळें ते सर्वांनीं करावे, असें होतें. पूर्वीं विभक्त असून नंतर एकत्र झाले असतील त्यांनाही असेंच समजावें. कारण ते अविभक्तासारखेच आहेत. **मिताक्षरेंत नारद**—"अविभक्त अशा भ्रात्यांचा एक धर्म प्रवृत्त होतो. द्रव्याचा विभाग झाला असतां धर्म देखील वेगवेगळा होतो." **बृहस्पती**ही—"एके ठिकाणीं पाक करून जेवण करणारे अशा बंधूंचें श्राद्धकर्म, देवपूजा, ब्राह्मणभोजन हें सारें एक होतें. विभक्त असतील त्यांचें आपापल्या घरीं वेगवेगळें होतें. या वचनांत पितृकर्म, देवपूजा इत्यादि कर्म अविभक्तांचें एक होतें, वेगळें नाहीं, असें सामान्यतः सांगितल्यावरून जरी ब्रह्मयज्ञ, संध्या इत्यादि देखील वेगळीं करूं नयेत, असा निषेध प्राप्त झाला तरी द्रव्याच्या खर्चानें होणारीं अशीं श्राद्ध वैश्वदेव इत्यादि कर्मे त्यांनाच तो ( वेगवेगळें करूं नये हा ) निषेध समजावा. कारण, द्रव्य अनेकांचें असल्यामुळें तें खर्च करण्याविषयीं एकाला अधिकार नाहीं. जीं कर्मे करण्याविषयीं द्रव्याची जरूर नाहीं अशीं—मंत्राचा जप, उपवास, संध्या ब्रह्मयज्ञ, वेदपारायण इत्यादिक नित्य-नैमित्तिक-काम्य कर्मे त्यांच्याविषयीं प्रत्येकाला वेगवेगळा अधिकार आहे. कारण द्रव्याचा खर्च नसला म्हणजे इतरांच्या अनुमोदनाची अपेक्षा नसल्यामुळें 'द्रव्येण चाविभक्तेन.' ( सामायिक द्रव्य खर्च करून ) हें वरील मरीचिवचन एथें प्राप्त होत नाहीं. आणि "एकपाकानें भोजन करून राहाणाऱ्या द्विजांचे ब्रह्मयज्ञ, अग्निहोत्र, देवपूजा आणि संध्या हीं नित्य वेगवेगळीं होतात" असें **प्रयोगपारिजातांत आश्वलायनस्मृति**वचनही आहे. या वचनांतील 'अग्निहोत्र' या शब्दानें अग्नीनें साध्य होणारीं अशीं श्रौत व स्मार्त नित्य कर्मे समजावीं. कारण जसा अग्निहोत्राविषयीं इतरांच्या अनुमोदनानें अधिकार प्राप्त होतो, तसा इतर अग्निसाध्यकर्माविषयीं देखील इतरांच्या अनुमोदनानें अधिकार असल्यामुळें अग्निहोत्र व इतर अग्निसाध्य कर्मे यांविषयीं न्याय समान आहे. आतां सर्वांना समान फल देणारीं अशीं जीं पिता इत्यादिकांचीं श्राद्धादिक नित्यकर्मे त्यांविषयीं इतरांच्या अनुमतीवांचून देखील एकाला अधिकार प्राप्त होतो. कारण, "आपत्कालीं कुटुंबपोषणासाठीं आणि धर्मासाठीं एका बंधूनें देखील स्थावरपदार्थाचें दान आणि विक्रय विशेषकरून करावा" असें वचन आहे. 'धर्मार्थ' याचा अर्थ—अवश्य कर्तव्य पितृश्राद्धादिकांविषयीं, असा **विज्ञानेश्वर** सांगतो. **केचित् ग्रंथकार** तर—भ्राते अविभक्त असूनही स्वदेशीं त्यांचा पाक वेगवेगळा होत असतां आणि ते देशांतरीं असतां दर्श आणि वार्षिक वेगवेगळें होतें, असें सांगतात. कारण, "अविभक्त अशा भ्रात्यांचा पाक वेगवेगळा होत असेल तर त्यांनीं वैश्वदेवादिकर्म आणि श्राद्ध वेगवेगळें करावें" असें **हारीत**वचन आहे. आणि "अविभक्त अशा पुत्रानें देशांतरीं बापाच्या मृतदिवशीं सांवत्सरिक पृथक् करावें, दर्शश्राद्धही तसेंच करावें." असें **यम**वचनही आहे. ह्या वचनाविषयीं मूल चित्य ( अनुपलब्ध ) आहे. वरील सर्व वचनांचा भावार्थ असा—पंचमहायज्ञामध्यें देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, आणि मनुष्ययज्ञ हे चार यज्ञ इतरांच्या अनुमतीनें ज्येष्ठानेंच करावे. कारण, यांविषयीं वर आरंभीं मरीचिवचन आहे. आणि "होम, आणि अग्रदान ( अन्नांतील वरील अन्नाचें दान ) केल्यावांचून कधींही भोजन करूं नये. भ्राते अविभक्त असतां अथवा विभक्त होऊन नंतर एकत्र झाले असतां तें एकानें जरी केलें तरी सर्वांनीं केलें असें होतें" असें **व्यास**वचनही आहे. ज्येष्ठ भ्रात्यानें वैश्वदेव केला नसतां ज्याचें अन्न सिद्ध होईल त्यानें मंत्रावांचून अग्नींत थोडें टाकून भोजन करावें. कारण, "ह्या बंधूंमध्यें ज्याचें अन्न वैश्वदेवाच्या पूर्वीं सिद्ध होईल त्यानें नियमानें अग्नींत टाकून अग्र ( पहिलें थोडें अन्न ) ब्राह्मणाला देऊन नंतर भोजन करावें" असें अविभक्ताधिकारीं **पृथ्वीचंद्रोदयांत गोभिल**वचन आहे.

**आश्वलायन**स्तुपाकपार्थक्येपृथक्त्वंतदेकत्वेऽपृथक्त्वमाह वसतामेकपाकेनविभक्तानामपिप्रभुः एकस्तुचतुरोयज्ञान्कुर्याद्भागयज्ञपूर्वकान् अविभक्ताविभक्तावापृथक्पाकाद्विजातयः कुर्युःपृथक्पृथग्यज्ञान्भोजनात्प्राग्दिनेदिनइति ब्रह्मयज्ञसंध्यास्नानतर्पणादितूक्तहेतोःपृथगेव देवपूजातूक्तवचनद्वयादेकत्रपृथग्वा दर्शग्रहणश्राद्धादित्वेकस्यैव तीर्थश्राद्धाद्यपियुगपत्सर्वेषामविभक्तानांप्राप्तावेकस्यभेदेनप्राप्तौभिन्नं गयाश्राद्धेप्येवं एष्टव्याबहवःपुत्राःशीलवंतोगुणान्विताः तेषांतुसमवेतानांयद्येकोपिगयांव्रजेत् तारिताःस्मोवयंतेनसयातिपरमांगतिमिति**हेमाद्रौकौर्मोक्तेः** काम्येपिदानहोमादावन्यानुमत्यैवाधिकारः द्रव्यासाध्यजपादौतांविनापि **अपरार्केपैठीनसिः** विभक्तैस्तुपृथक्कार्यंप्रतिसंवत्सरादिकं एकेनैवाविभक्तेषुकृतेसर्वैस्तुतत्कृतम् सांवत्सरात्पूर्वाणिमासिकान्येकत्रैव तदाह**लघुहारीतः** सपिंडीकरणांतानियानिश्राद्धानिषोडश पृथङ्नैवसुताःकुर्युःपृथग्द्रव्याअपिक्वचित् सपिंडनंमासिकोपलक्षणं अर्वाक्संवत्सराज्ज्येष्ठःश्राद्धंकुर्यात्समेत्यतु ऊर्ध्वंसपिंडी-

करणात्सर्वेकुर्युःपृथक्पृथगितिव्यासोक्तेः **उशनाः** नवश्राद्धंसपिंडत्वंश्राद्धान्यपिचषोडश एकेनैवतुकार्याणिसंविभक्तधनेष्वपि मघात्रयोदशीश्राद्धंत्वविभक्तानामपिपृथगित्युक्तंप्राक् **यत्तुवृद्धवसिष्ठः** मासिकंचवृषोत्सर्गंसपिंडीकरणंतथा ज्येष्ठेनैवप्रकर्तव्यमाब्दिकंप्रथमंतथेति तन्निर्मूलं **बह्वृचपरिशिष्टे**नवश्राद्धंसहदद्युः ।

**आश्वलायन**—तर पाक वेगळा असेल तर वैश्वदेवादिक वेगळें करावें. एक असेल तर एक करावें, असें सांगतो—"विभक्त असून देखील एकत्र पाक करून राहणाऱ्या बंधूंचे ब्रह्मयज्ञ आहे पूर्वी ज्यांच्या असे देवयज्ञादिक चार यज्ञ एकानें करावे. भ्राते विभक्त असोत किंवा अविभक्त असोत ते भोजनाचा पाक वेगळा करीत असतील तर त्यांनीं प्रतिदिवशीं भोजनाच्या पूर्वी वेगवेगळे यज्ञ करावे." ब्रह्मयज्ञ, संध्या, स्नान, तर्पण इत्यादि कर्म तर वर सांगितलेल्या हेतूस्तव ( द्रव्याचा खर्च नसल्याकारणास्तव ) वेगवेगळेंच करावें. देवपूजा तर सांगितलेल्या दोन प्रकारच्या ( बृहस्पतिवचनानें एकत्र, आश्वलायनवचनानें पृथक् ) वचनावरून एकत्र किंवा पृथक् करावी. दर्श, ग्रहणांतील श्राद्ध इत्यादिक तर एकानेंच करावें. तीर्थश्राद्धादिकही सान्या अविभक्त भ्रात्यांना एकदम प्राप्त असतां एकालाच अधिकार. भिन्न भिन्न प्राप्त असतां भिन्न भिन्न करावें. गयाश्राद्धांतही असेंच समजावें. कारण, "पितर म्हणतात—सुशील गुणवंत असे बहुत पुत्र इच्छावे. त्यांमध्यें एकादा तरी गयेस जाईल आणि आम्हांला तारील व तो परम गतीस जाईल" असें **हेमाद्रींत कौर्म**वचन आहे. काम्यनिक अशा दान-होम इत्यादिकांविषयीं देखील इतरांच्या संमतीनें अधिकार आहे. द्रव्याच्या खर्चावांचून होणाऱ्या जपादिकांविषयीं इतरांच्या संमतीवांचूनही अधिकार आहे. **अपरार्कांत पैठीनसि**—विभक्तांनीं प्रतिसांवत्सरादिक श्राद्ध वेगवेगळें करावें. अविभक्त असतां एकानेंच केलें म्हणजे सर्वांनीं तें केलें असें होतें." संवत्सराच्या पूर्वीचीं मासिकें एकत्र करावीं. तेंच सांगतो **लघुहारीत**—"पुत्र विभक्त झालेले असले तरी त्यांनीं आईबापांचीं सपिंडीकरणापर्यंत होणारीं जीं षोडशश्राद्धें तीं कधींही वेगवेगळीं करूंच नयेत" या वचनांत सपिंडीकरण हें मासिकांचें बोधक आहे. कारण, "संवत्सराच्या आंत पडलेलें श्राद्ध ( मासिक ) सारे भ्राते एकत्र मिळून ज्येष्ठानें करावें. सपिंडीकरणानंतर ( वर्षानंतर ) सर्वांनीं वेगवेगळें करावें" असें **व्यास**वचन आहे. **उशना**—"बंधु विभक्त झाले असतांही नवश्राद्ध, सपिंडीकरण, आणि षोडशमासिकें हीं एकानेंच करावीं." मघात्रयोदशीश्राद्ध तर अविभक्तांनीं देखील वेगवेगळें करावें, असें पूर्वी ( द्वितीयपरिच्छेदांत ) सांगितलें आहे. आतां जें **वृद्धवसिष्ठ**—"मासिक, वृषोत्सर्ग, सपिंडीकरण, आणि प्रथमाब्दिक हीं ज्येष्ठानेंच करावीं असें सांगतो, तें निर्मूल आहे. **बह्वृचपरिशिष्टांत**—"नवश्राद्ध सर्वांनीं एकत्र मिळून द्यावें" असें आहे.

**अथतीर्थश्राद्धं** तत्रयद्यप्यस्मत्पितामहकृतत्रिस्थलीसेतुरेवजागर्तितथापिकिंचिदुच्यते तत्रयात्रायां महाग्निर्वासपत्नीकोगच्छेत्तीर्थानिसंयतः प्रायश्चित्तार्थं‍तु तीर्थंपत्नीविरहितोपिवा यज्ञेष्वनधिकारीवायश्चवामंत्रसाधकइति**कौर्मा**दिवचनात्साग्निःसपत्नीकस्यैवाधिकारः **भारते** ब्राह्मणःक्षत्रियोवैश्यःशूद्रोवाराजसत्तम नवियोनिंव्रजत्येतत्स्नानात्तीर्थमहात्मनः **स्कांदे** विधवाधर्मेषु स्नानंदानंतीर्थयात्रांविष्णुनामग्रहंमुहुः एतत्पुत्राद्यनुमत्यैव सधवायाःपत्यामहैवेतिप्रागुक्तं **काशीखंडे** मातुःपितुःक्षेप्तुमनास्तथास्थिसुतस्तुकुर्यात्खलुतीर्थयात्रां तद्विधिः**स्कांदे** तीर्थयात्रांचिकीर्षुःप्राग्विधायोपोषणंगृहे गणेशंचपितॄन्विप्रान्साधून्शक्त्याप्रपूज्यच कृतपारणकोहृष्टोगच्छेन्नियमधृक्पुनः आगत्याभ्यर्च्यचपितॄन्यथोक्तफलभाग्भवेत् उपवासात्प्राग्मुंडनंचकार्यं प्रयागेतीर्थयात्रायांपितृमातृवियोगतः कचानांवपनंकुर्याद्वृथानविकचोभवेदिति**विष्णूक्तेः** प्रायश्चित्तार्थयात्रायांगंगायांचेत्यन्ये **केचित्तुहेमाद्रौभारते** केशश्मश्रुनखादीनांवपनंनचशस्यते अतोनकार्यंवपनंगयाश्राद्धार्थिनांसदा येभारतेस्मिन्नपितृकर्मतत्पराःसंधार्यकेशानतिभक्तिभाविताः ऋणक्षयार्थंपितृतीर्थमागतास्तेषामृणंसंक्षयमेष्यतिध्रुवमितिनिषेधात्गयायात्रांगंवपनंनकार्यमित्याहुः वस्तुतस्तु गयाधिकरणकस्यैवायंनिषेधः ननुयात्रांगस्य श्राद्धार्थिनेत्युक्तेः विशालंविरजंगयामित्यनेनैकवाक्यत्वाच्च श्राद्धंचपद्मनवद्वादशदैवतंवाघृतेनकार्यं गच्छेद्देशांतरंयस्तुश्राद्धंकुर्यात्ससर्पिषेति**विष्णुपुराणात्** यात्रांगवृद्धिश्राद्धोक्तेश्च ।

## आतां तीर्थश्राद्ध सांगतो—

त्या तीर्थश्राद्धाविषयीं जरी आमच्या आजोबांनीं ( नारायणभट्टांनीं ) केलेला त्रिस्थलीसेतु ग्रंथ जागृत आहे तरी येथें अल्प सांगतों. तीर्थाच्या यात्रेविषयीं अधिकार "साग्निक असेल तर पत्नीसह तीर्थास जावें. अथवा पत्नीविरहितानें प्रायश्चित्तासाठीं

तीर्थास जावें. अथवा यज्ञाविषयीं अनधिकारी असेल त्यानें किंवा मंत्र साध्य करावयाचा असेल त्यानें तीर्थास जावें" त्या **कूर्मपुराणा**दिवचनावरून सामिकाला पत्नीसहच आहे. **भारतांत**—"ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, अथवा शूद्र यांनीं तीर्थांत स्नान केलें असतां ते वाईट योनींत जात नाहींत." **स्कांदांत विधवाधर्मात**—"स्नान, दान, तीर्थयात्रा आणि वारंवार विष्णुनामग्रहण विधवेनें करावें." हें पुत्रादिकांच्या अनुमतीनेंच करावें. सुवासिनीला पतीसहच अधिकार, असें पूर्वी सांगितलें आहे. **काशीखंडांत**—माता व पिता यांच्या अस्थि तीर्थांत टाकण्याकरितां पुत्रानें तीर्थयात्रा करावी." त्या तीर्थयात्रेचा विधि सांगतो **स्कांदांत**—"तीर्थयात्रा करावयाची म्हणजे पूर्वी घरीं उपवास करून गणपति, पितर, ब्राह्मण, साधु यांची यथाशक्ति पूजा करून नंतर पारणा करून नियम धारण करून मोठ्या हर्षानें तीर्थास जावें. नंतर परत आल्यावर पितरांची पूजा करावी, म्हणजे तीर्थयात्रेचें संपूर्ण फल प्राप्त होतें." उपवासाच्या पूर्वी मुंडनही करावें. कारण, "प्रयागाचे ठायीं तीर्थयात्रेचे ठायीं, पिता व माता मृत असतां केशांचें वपन करावें, परंतु मस्तकावरील सर्वकेशरहित होऊं नये." असें **विष्णु**वचन आहे. प्रायश्चित्तार्थ यात्रेचे ठायीं आणि गंगेचे ठायीं हें वपन, असें कितीएक ग्रंथकार सांगतात. **केचित् ग्रंथकार** तर–**हेमाद्रींत भारतांत**—"केश, श्मश्रु, नखें इत्यादिकांचें वपन करणें प्रशस्त नाहीं; म्हणून गयाश्राद्ध करणारानें वपन सदा करूं नये. या भरतखंडांत जे पितृकर्माविषयीं तत्पर अतिभक्तीनें युक्त असे असून पितृऋणापासून मुक्त होण्यासाठीं केश धारण करून पितृतीर्थास येतील ते पितृऋणापासून निश्चयानें मुक्त होतील." या वचनानें वपनाचा निषेध असल्यामुळें गयायात्रेचें अंगभूत वपन करूं नये, असें सांगतात. वास्तविक म्हटलें तर हा वपनाचा निषेध गयेचे ठायींच आहे. यात्रेच्या अंगभूत वपनाचा निषेध नाहीं. कारण वरील वचनांत गयाश्राद्धार्थी असेल त्यानें करूं नये, असें सांगितलें आहे. आणि 'विशालं विरजं गयां' या क्षेत्रांत वपन करूं नये, ह्याची ह्याच प्रकरणीं पुढें सांगावयाच्या वचनाशीं एकवाक्यताही होते. निघण्याच्या वेळीं श्राद्ध सांगितलें तें सहा, नऊ किंवा बारा देवतांचें घृतानें करावें. कारण, "जो देशांतरीं जाण्याविषयीं निघेल त्यानें घृतानें श्राद्ध करावें" असें **विष्णुपुराण**वचन आहे. आणि यात्रेचें अंगभूत वृद्धिश्राद्धही सांगितलें आहे.

श्राद्धंचपारणादिनएव उपोष्यरजनीमेकांप्रातःश्राद्धंविधायच गणेशंब्राह्मणान्नत्वाभुक्त्वाप्रस्थितवान्सुधीरितिस्कांदलिंगात् **गौडनिबंधेगौतमः** तीर्थयात्रासमारंभेतीर्थात्प्रत्यागमेपिच वृद्धिश्राद्धंप्रकुर्वीतबहुसर्पिःसमन्वितं वृद्धिपदंतद्धर्मार्थं श्राद्धोत्तरंयात्रासंकल्पइति **भट्टाः वायवीये** उद्यतस्तुगयांगंतुंश्राद्धंकृत्वाविधानतः विधायकार्पटीवेषंग्रामंगत्वाप्रदक्षिणम् ततोग्रामांतरंगत्वाश्राद्धशेषस्यभोजनं घृतस्यभोजनं तच्च क्रोशमध्ये श्राद्धोत्तरंक्रोशगमननिषेधात् ततःप्रतिदिनंगच्छेत्प्रतिग्रहविवर्जितः गयायामेवतन्नान्यत्रेति**केचित्** **हेमाद्रिस्तु** गयायांश्राद्धदिनेएवप्रस्थानं तीर्थांतरेतुश्राद्धोत्तरदिनइत्याह **प्रभासखंडे** यश्चान्यंकारयेच्छक्त्यातीर्थयात्रांनरेश्वरः स्वकीयद्रव्ययानाभ्यांतस्यपुण्यंचतुर्गुणं यात्रामध्येआशौचेरजसिवाशुद्धिपर्यंतंस्थित्वा तदंतेगच्छेत् मार्गवैषम्येत्वदोषः यात्रामध्येतीर्थांतरप्राप्तौश्राद्धादिकार्यमेव वाणिज्याद्यर्थंगतेनतु मुंडनोपवासादिनकार्यमितिप्रयागसेतौ**भट्टाः** वस्तुतस्तुतत्रापिमुंडनोपवासश्राद्धादिकार्यं अर्धंतीर्थफलंतस्ययःप्रसंगेनगच्छतीतित्रि**ब्राह्मोक्तेः स्कांदे** द्विर्भोजनंतृतीयांशंहरेत्तीर्थफलस्यच वाणिज्यंत्रींस्तथाभागान्हंतिसर्वंप्रतिग्रहः यानंधर्मंचतुर्थांशंछत्रोपानहमेवचेत्युत्तरार्धपाठांतरम् ।

श्राद्ध करणें तें पारणादिवशींच करावें. कारण, "एक दिवस उपोषण करून प्रातःकालीं श्राद्ध करून गणेश, ब्राह्मण यांना नमस्कार करून भोजन करून तो विद्वान् प्रस्थान करिता झाला" असें **स्कांदांत** पारणादिवशीं श्राद्ध केल्याचें बोधक वचन आहे. **गौडनिबंधांत गौतम**—"तीर्थयात्रेच्या आरंभीं आणि तीर्थाहून आल्यावर बहुत घृतानें युक्त असें वृद्धिश्राद्ध करावें." येथें वृद्धिश्राद्ध असें म्हटलें आहे. तें या श्राद्धांत वृद्धिश्राद्धाचे धर्म यावे म्हणून आहे. श्राद्ध झाल्यानंतर यात्रेचा संकल्प करावा, असें **नारायणभट्ट** सांगतात. **वायवीयांत**—"गयेस जाण्याविषयीं उद्युक्त झाला असेल त्यानें यथाविधि श्राद्ध करून कापडी लोकांचा वेष करून ग्रामाला प्रदक्षिणा करून नंतर दुसऱ्या गांवास जाऊन तदनंतर श्राद्धशेष घृताचें भोजन करावें." येथें श्राद्धशेषघृताचें भोजन सांगितलें तें एका कोशाच्या आंत समजावें; कारण, श्राद्ध केल्यानंतर एक कोश जाण्याचा निषेध आहे. "तदनंतर कोणाचाही प्रतिग्रह वर्ज्य करून प्रतिदिवशीं गमन करावें." हें सर्व गयेच्या यात्रेविषयींच आहे, इतरांविषयीं नाहीं, असें **केचित्** म्हणतात. **हेमाद्रि** तर—गयेच्या यात्रेविषयीं श्राद्धदिवशींच प्रस्थान करावें. इतर तीर्थांविषयीं तर श्राद्धाच्या दुसऱ्या दिवशीं करावें, असें सांगतो. **प्रभासखंडांत**—"जो राजा आपलें द्रव्य आणि वाहन दुसऱ्यास देऊन त्याच्या कडून तीर्थयात्रा यथाशक्ति करवील त्याला त्या यात्रेचें पुण्य चौपट प्राप्त होईल." यात्रेमध्यें आशौच किंवा स्त्री रजस्वला होईल तर शुद्धीपर्यंत राहून शुद्धी झाल्यावर पुढें जावें. मार्ग बिकट

असेल ( राहण्यासारखा नसेल ) तर नाहीं राहिलें तरी दोष नाहीं. यात्रेमध्यें अन्यतीर्थ प्राप्त असतां श्राद्धादिक करावेंच. व्यापार वगैरे करण्यासाठीं जाणारानें तर॰ मुंडन-उपवास वगैरे करूं नये, असें **प्रयोगसेतूंत भट्ट** सांगतात. वास्तविक म्हटलें तर व्यापारादिकासाठीं जाणारानें देखील मुंडन, उपवास, श्राद्ध इत्यादि करावें. कारण, "जो इतर कार्याच्या प्रसंगानें तीर्थास जातो त्याला तीर्थाचें पुण्य अर्धें प्राप्त होतें" असें ब्राह्मवचन आहे. **स्कन्दपुराणांत**—"यात्रेंत दररोज द्विवार भोजन केलें असतां तीर्थफलाचा तिसरा हिस्सा कमी होतो. व्यापार केला असतां तीर्थफलाचे तीन भाग कमी होतात. आणि प्रतिग्रह केला असतां तीर्थाचें फल सारें नष्ट होतें." या वचनाच्या उत्तरार्धांत 'यानं धर्मचतुर्थांशं छत्रोपानहमेव च' असें पाठांतर आहे. त्याचा अर्थ-वाहन, छत्र, जोडा हें घेतलें असतां धर्माचा ( पुण्याच्या ) चतुर्थांश कमी होतो.

अत्रनदीषु**विशेषः** मार्गांतरानदीप्राप्तौस्नानादिपरपारतः अर्वागेवसरस्वत्याएषमार्गगतोविधिः यत्तु पितॄनतर्पयित्वातुनदीस्तरतियोनरः तस्यासृक्पानकामास्तेभवंतिभृशदुःखिताइतितत्सरस्वतीपरम् **शंखः** तीर्थंप्राप्यानुषंगेणस्नानंतीर्थेसमाचरेत् स्नानजंफलमाप्नोतितीर्थयात्राकृतंनतु **सएव** नस्रवंतीमतिक्रामेदनवसिच्य तीर्थप्राप्तौतु**प्रभासखंडे** यानानितुपरित्यज्यभाव्यंपादचरैर्नरैः लुठित्वालोठनींतत्रकृत्वाकार्पटिकाकृतिं कृत्वेतिगृहान्निर्गमसमयेकरणेइदं प्रथमंचालयेत्तीर्थंप्रणवेनजलंशुचि अवगाह्यततःस्नायाद्यथावन्मंत्रयोगतः मंत्रश्च**प्रभासखंडे** नमोस्तुदेवदेवायशितिकंठायदंडिने रुद्रायचापहस्तायचक्रिणेवेधसेनमः सरस्वतीचसावित्रीवेदमातागरीयसी सन्निधात्रीभवत्वत्रतीर्थेपापप्रणाशिनीति मंत्रवत्स्नानंचवपनोत्तरंकार्यं पूर्वमावाहनंतीर्थेमुंडनंतदनंतरं ततःस्नानादिकंकुर्यात्पश्चाच्छ्राद्धंसमाचरेदित्युक्तेः यत्तु गत्वास्नानंप्रकुर्वीतवपनंतदनंतरमितितन्मुशलस्नानपरं **काशीखंडे** तीर्थोपवासःकर्तव्यःशिरसोमुंडनंतथा उपवासेतत्रैवोक्तं यदह्नितीर्थप्राप्तिःस्यात्तदह्नःपूर्ववासरे उपवासःप्रकर्तव्यःप्राप्तेह्निश्राद्धदोभवेत् अत्र उपवासंततःकुर्यात्तस्मिन्नहनिसुव्रतइति प्राप्तिदिनेपूपवासोक्तेर्विकल्पः मुंडनेतु**स्कांददेवलौ** मुंडनंचोपवासश्चसर्वतीर्थेष्वयंविधिः वर्जयित्वाकुरुक्षेत्रंविशालंविरजंगयां विरजंलोणारइतिप्रसिद्धम् महातीर्थपरःसर्वतीर्थशब्दः ।

यात्रेंत नद्यांच्या ठिकाणीं विशेष सांगतो—"मार्गामध्यें नदी प्राप्त असतां स्नान-संध्या वगैरे कर्म परतीरास करावें. आणि सरस्वतीनदीच्या पूर्वतीरासच करावें, हा मार्गगमनाचा विधि समजावा." आतां जें "जो मनुष्य अलीकडे पितरांचें तर्पण केल्यावांचून नदी उतरून पलीकडे जातो, त्याचे पितर अत्यंत दुःखी होऊन त्याच्या रक्तपानाची इच्छा करितात." असें वचन तें सरस्वतीविषयक आहे. **शंख**—"इतर कार्याच्या अनुषंगानें तीर्थ प्राप्त असतां तीर्थाचें ठायीं स्नान करावें, म्हणजे स्नानाचें फल त्याला प्राप्त होतें. तीर्थयात्रेचें फल त्याला प्राप्त होत नाहीं." **तोच शंख**—"वाहाणाऱ्या नदींत स्नान केल्यावांचून पुढें जाऊं नये." तीर्थ प्राप्त आलें असतां सांगतो **प्रभासखंडांत**—"तीर्थ जवळ आलें असतां त्या ठिकाणीं वाहनांतून खालीं उतरून जमिनीवर लोळून पायांनीं चालूं लागावें. आणि कापडी लोकांचा वेष ग्रहण करावा." कर्पटीवेष ग्रहण करणें हें घरांतून निघते वेळीं करावें. "प्रथमतः तीर्थाचें शुद्ध उदक प्रणवाचा उच्चार करून हातानें चाळवावें. नंतर बुडी मारून यथाविधि मंत्र म्हणून स्नान करावें." मंत्र सांगतो **प्रभासखंडांत**—"नमोस्तु देवदेवाय शितिकंठाय दंडिने । रुद्राय चापहस्ताय चक्रिणे वेधसे नमः । सरस्वती च सावित्री वेदमाता गरीयसी । संनिधात्री भवत्वत्र तीर्थे पापप्रणाशिनी" हें समंत्रक स्नान वपन केल्यानंतर करावें. कारण, "तीर्थाचे ठायीं पूर्वी आवाहन तदनंतर मुंडन व मुंडन केल्यावर स्नानादिक करावें, पश्चात् श्राद्ध करावें" असें सांगितलें आहे. आतां जें "तीर्थास जाऊन स्नान करून नंतर वपन करावें" असें स्नानानंतर वपन सांगितलें तें मुसलस्नानविषयक आहे. **काशीखंडांत**—"तीर्थोपवास करावा आणि तसेंच मस्तकाचें मुंडन करावें." उपवासाविषयीं तेथेंच सांगतो—"ज्या दिवशीं तीर्थ प्राप्त होईल त्याच्या पूर्व दिवशीं उपवास करावा, आणि तीर्थ प्राप्त झालेल्या दिवशीं श्राद्ध करावें" या वचनानें पूर्व दिवशीं उपवास सांगितला आणि एथें ( काशीखंडांत ) "तदनंतर त्या दिवशीं व्रती होऊन उपवास करावा." या वचनानें तीर्थप्राप्तिदिवशीं उपवास सांगितल्यावरून विकल्प समजावा. मुंडनाविषयीं तर **स्कान्द व देवल** सांगतात—"कुरुक्षेत्र, विशाल, विरज ( लोणार ) आणि गया हीं वर्ज्य करून इतर सर्वतीर्थांचे ठायीं ( प्रसिद्ध महातीर्थांचे ठायीं ) मुंडन आणि उपवास हा विधि आहे."

अत्रविशेषः**स्मृत्यंतरे** ऊर्ध्वमब्दाद्विमासोनात्पुनस्तीर्थंव्रजेद्यदि मुंडनंचोपवासंचततोयत्नेनकारयेत् तदातद्वपनंशस्तंप्रायश्चित्तमृतेद्विजेतिपाठः प्रयागेप्रतियात्रंतुयोजनत्रयइष्यते क्षौरंकृत्वातुविधिवत्ततःस्नायात्सितासिते तथाच**बृहस्पतिः** क्षौरंनैमित्तिकंकार्यंनिषेधेसत्यपिध्रुवं पित्रादिमृतिदीक्षासुप्रायश्चित्तेथतीर्थके

**अपरार्केस्कांदे** उदङ्मुखःप्राङ्मुखोवावपनंकारयेत्सुधीः केशश्मश्रुलोमनखान्युदक्संस्थानिवापयेत् इदं-प्रयागेसधवानामपिसमूलंभवतीति**भट्टाः** युक्तंतु सर्वान्केशान्समुद्धृत्यछेदयेदंगुलद्वयं एवमेवहिनारीणांश-स्यतेवपनक्रियेति तच्चाकृतचूडानांनकार्यमिति**केचित्** तत्त्वंतुनैमित्तिकत्वात्पित्रादिमृतवत्कार्यमेवेति तदपि-प्रयागेनित्यं नान्यत्र तच्चयतिभिस्तीर्थेपिऋतुसंधिष्वेवकार्यंनान्यदा कक्षोपस्थशिखावर्जमृतुसंधिषुवापयेदिति-**स्मृतेः** इदंजीवत्पितृकेणापितीर्थेकार्यं नच मुंडनंपिंडदानंचेतिदक्षवचनेननिषेधः विनातीर्थंविनायज्ञंमाता-पित्रोर्मृतिंविना योवापयतिलोमानिसपुत्रःपितृघातकइतिस्मृत्यातत्संकोचात् तदपिप्रयागेप्रतियात्रमन्यतीर्थे-आद्ययात्रायामेवेति**शिष्टाः** ततःस्नानम् ।

मुंडन व उपवासाविषयीं विशेष सांगतो **स्मृत्यंतरांत**—"एकवार तीर्थास जाऊन सर्व विधि करून पुनः दहा महिन्यां-नंतर जर त्याच तीर्थास जाइल तर मुंडन आणि उपवास प्रयत्नानें करावे." याच्या उत्तरार्धांत 'तदा तद्वपनं शस्तं प्रायश्चित्त-मृते द्विजः' असा पाठ आहे; त्याचा अर्थ–"तेव्हां प्रायश्चित्तावांचून वपन करणें प्रशस्त आहे.", "प्रयागाचे ठायीं तीन योजनांत प्रत्येक यात्रेला यथाविधि क्षौर करून नंतर गंगायमुनेच्या संगमांत स्नान करावें" तेंच **बृहस्पति** सांगतो—"माता व पिता यांचें मरण, दीक्षा, प्रायश्चित्त आणि तीर्थ हीं निमित्तें प्राप्त झालीं असतां इतर कारणांनीं क्षौराचा निषेध असला तरी नैमि-त्तिक क्षौर करावें." **अपरार्कांत स्कांदांत**—"उत्तरेकडे किंवा पूर्वेकडे मुख करून बसून वपन करवावें. केश, श्मश्रु, लोम, नखें हीं दक्षिणेकडून उत्तरेकडे कापवीत आणवावीं." हें वपन प्रयागांत सुवासिनीला देखील मूळापासून होतें, असें **नारायणभट्ट** सांगतात. युक्त म्हटलें म्हणजे "सारे केश वर एके ठिकाणीं धरून दोन अंगुळें कापावे, असेंच स्त्रियांचें वपन करणें प्रशस्त आहे." तें वपन ज्यांचें चूडाकर्म झालें नसेल त्यांचें करूं नये, असें **केचित्** म्हणतात. **खरा प्रकार** म्हटला तर हें वपन नैमित्तिक असल्यामुळें पिता वगैरे मृत असतां जसें करावयाचें तसें करावेंच. तेंही प्रयागांत नित्य आहे, इतर ठिकाणीं नाहीं. तें वपन संन्याश्यांनीं तीर्थाचे ठायीं देखील ऋतूंच्या संधीचे ठायींच करावें, अन्यकालीं करूं नये. कारण, "कांखा, उपस्थ आणि शिखा वर्ज्य करून ऋतुसंधीचे ठायीं वपन करावें" अशी **स्मृति** आहे. हें वपन जीवत्पितृकानें देखील तीर्थाचे ठायीं करावें. आतां "मुंडन, पिंडदान, आणि सर्व प्रेतकर्म हीं जीवत्पितृकानें करूं नयें" या दक्षवचनानें वपनाचा ( मुंडनाचा ) निषेध प्राप्त झाला, असें कोणी म्हणेल तर तसें नाहीं; कारण, "तीर्थावांचून, यज्ञावांचून, आईबापांच्या मरणावांचून जो केशांचें वपन करितो तो पितृघातक होतो" या स्मृतीनें त्या वरील वचनाचा संकोच ( तीर्थादिकांविषयीं अप्रवृत्ति ) होतो. तें वपनही प्रयागाचे ठायीं प्रत्येक यात्रेला करावें, इतर तीर्थाचे ठायीं पहिल्या यात्रेलाच करावें. असें **शिष्ट** सांगतात. वपन झाल्यानंतर स्नान करावें.

परार्थेतु**मार्कंडेयपुराणे** मातरंपितरंजायांभ्रातरंसुहृदंगुरुं यमुद्दिश्यनिमज्जेतअष्टमांशंलभेत्ततः **पैठी-नसिः** प्रतिकृतिंकुशमयींतीर्थवारिणिमज्जयेत् मज्जयेच्चयमुद्दिश्यसोष्टभागफलंलभेत ततस्तर्पणश्राद्धे **पृथ्वी-चंद्रोदयेब्रह्मदेवीपुराणकाशीखंडादिषु** अकालेप्यथवाकालेतीर्थेश्राद्धंचतर्पणं अविलंबेनकर्तव्यं नैवविघ्नंसमाचरेत् **मात्स्ये**पितृणांचैवतर्पणमितितुर्यपादः तत्रदेवताःमहालयेप्रागुक्ताः **शंखदेवलौ** तीर्थ-द्रव्योपपत्तौचनकालमवधारयेत् पात्रंचब्राह्मणंप्राप्यसद्यःश्राद्धंसमाचरेत् **हारीतः** दिवावायदिवारात्रौभु-क्तोवोपोषितोपिवा नकालनियमस्तत्रगंगांप्राप्यसरिद्वरां **भारते** भुक्तोवाप्यथवाभुक्तोरात्रौवायदिवादिवा पर्वकालेथवाकालेशुचिर्वाप्यथवाशुचिः यदैवदृश्यतेतत्रनदीचत्रिपथाप्रिय प्रमाणंदर्शनंतस्मान्नकालस्तत्रकारणं आशौचेपिकार्यं विवाहदुर्गयज्ञेषुयात्रायांतीर्थकर्मणि नतत्रसूतकंतद्वत्कर्मयज्ञादिकारयेदिति**पैठीनसिस्मृतेः** तदानीमकरणेत्वाशौचांतेएवकुर्यात् **प्रभासखंडे** नवारंनचनक्षत्रंनकालस्तत्रकारणं यदैवदृश्यतेतीर्थंतदा-पर्वसहस्रकं मलमासेपिकार्यं नित्यनैमित्तिकेकुर्यात्प्रयतःसन्मलिम्लुचे तीर्थश्राद्धंगजच्छायांप्रेतश्राद्धंतथैव-चेति**बृहस्पतिस्मृतेः** ।

दुसऱ्याकरितां स्नान करावयाचें असतां सांगतो **मार्कंडेयपुराणांत**—"माता, पिता, पत्नी, भ्राता, मित्र, गुरु यांमध्यें ज्याच्या उद्देशानें स्नान करील त्याला त्या स्नानाचें अष्टमांश फल प्राप्त होतें." **पैठीनसि**—"ज्याची कुशमय प्रतिमा करून तीर्थोदकांत बुडवील आणि ज्याच्या उद्देशानें बुडी मारील त्याला अष्टमांश फल प्राप्त होतें." स्नान केल्यानंतर तर्पण व श्राद्ध सांगतो **पृथ्वीचंद्रोदयांत** ब्रह्मपुराण, देवीपुराण, काशीखंड इत्यादिकांत–"तीर्थ प्राप्त असतां श्राद्धाचा व तर्पणाचा काल असो किंवा नसो श्राद्ध व तर्पण लवकर करावें, त्याविषयीं विघ्न ( अवकाश ) करूं नये." या वचनाच्या चवथ्या पादीं

'पितृणां चैव तर्पणं' म्हणजे पितरांचें तर्पण लवकर करावें, असा **मत्स्यपुराणांत** पाठ आहे. त्याविषयीं देवता पूर्वी महालयप्रकरणीं सांगितल्या आहेत. **शंख व देवल**—"तीर्थ व द्रव्यांची उपपत्ति असली म्हणजे काल पाहूं नये. पात्रभूत ब्राह्मण प्राप्त असतां तत्काल श्राद्ध करावें." **हारीत**—"सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ अशी गंगा प्राप्त झाली असतां दिवस असो किंवा रात्र असो, भोजन केलेला असो अथवा उपोषित असो, त्या ठिकाणीं कालाचा नियम नाहीं." **भारतांत**—"भोजन केलेला असो किंवा उपोषित असो, दिवस असो किंवा रात्र असो, पर्वकाल असो किंवा नसो, शुचि असो किंवा अशुचि असो, ज्या वेळीं भागीरथीचें दर्शन होईल तो काल सर्व कर्मांचा होय. कारण, त्या ठिकाणीं भागीरथीचें दर्शन हेंच प्रमाण म्हणजे स्नानादिकाला कारण आहे. काल कारण नाहीं." आशौचांतही करावें. कारण, "विवाह, किल्ला, यज्ञ, यात्रा, तीर्थांतील कर्म, इतक्या ठिकाणीं सूतक नाहीं. त्याचप्रमाणें यज्ञादिकर्मांमध्यें सूतक नसल्यामुळें तें यज्ञादिकर्म करावें" अशी **पैठनसिस्मृति** आहे. आशौच असतां तीर्थदर्शनकालीं स्नानश्राद्धादि कर्म केलें नसेल तर आशौच समाप्तीनंतरच करावें. **प्रभासखंडांत**—"वार नक्षत्र, काल हे तीर्थाचे ठायीं स्नान-श्राद्धादिकांला कारण नाहींत. ज्या वेळीं तीर्थाचें दर्शन होतें त्या वेळीं हजार पर्वे आहेत." मलमासांतही करावें. कारण, "नित्य, नैमित्तिक, तीर्थश्राद्ध, गजच्छाया, आणि प्रेतश्राद्ध हीं मलमासांतही करावीं." अशी **बृहस्पति**स्मृति आहे.

एतच्चाशौचेकृतभोजनस्यरात्रौवास्नानश्राद्धादिकमाकस्मिकतीर्थप्राप्तावामहेमश्राद्धविषयंग्रहणादिवत् नतुबुद्धिपूर्वमाशौचादौतीर्थप्राप्तिःकार्या मलमासेतुमासद्वयेतीर्थश्राद्धंकार्यमिति**चंद्रिकायां** **देवीपुराणे** श्राद्धंचतत्रकर्तव्यमर्घ्यावाहनवर्जितं **हेमाद्रौ** अर्घ्यमावाहनंचैवद्विजांगुष्ठनिवेशनं तृप्तिप्रश्नंचविकिरंतीर्थश्राद्धेविवर्जयेत् **भविष्ये** आवाहनंविसृष्टिश्चतत्रतेषांनविद्यते आवाहनंनतीर्थेस्यान्नार्घ्यदानंतथाभवेत् आहूताःपितरस्तीर्थेकृतार्घ्याःसंतिवैयतः अग्नौकरणंचनेति**रत्नावल्यां** अत्रषड्दैवतेश्राद्धेपिमात्रादीनांपिंडमात्रंदेयं हविःशेषंततोमुष्टिमादायैकैकमादृतः क्रमशःपितृपत्नीनांपिंडनिर्वपणंचरेदितितीर्थोपक्रमे**देवलो**क्तेरिति**पृथ्वीचंद्रः** ततःसामान्यपिंडंदद्यात ततःपिंडमुपादायहविषःसंस्कृतस्यच ज्ञातिवर्गस्यसर्वस्यसामान्यंपिंडमुत्सृजेदितितेनैवोक्तेः **पाद्मे** तीर्थश्राद्धंप्रकुर्वीतपक्वान्नेनविशेषतः आमान्नेनहिरण्येनकंदमूलफलैरपि ।

आशौचांत स्नान-श्राद्धादिक सांगितलें हें आणि भोजन केल्यावर रात्रीं स्नान-श्राद्धादिक सांगितलें हें अकस्मात् एकाएकी तीर्थ प्राप्त असतां आमश्राद्ध-हिरण्यश्राद्धविषयीं समजावें. जसें ग्रहणांत आमहिरण्यश्राद्ध सांगितलें तद्वत्. आशौचादिक असतां बुद्धिपूर्वक तीर्थास जाऊं नये. मलमासांत सांगितलें तें तर-मलमास असतां मलमास व शुद्धमास या दोहोंत तीर्थश्राद्ध करावें, असें **चंद्रिकेंत** सांगितलें आहे. **देवीपुराणांत**—"तीर्थाचे ठायीं अर्घ्य आणि आवाहनरहित श्राद्ध करावें." **हेमाद्रींत**—"अर्घ्य, आवाहन, अन्नांत ब्राह्मणाच्या अंगुष्ठाचें निवेशन, तृप्तिप्रश्न आणि विकिर हे तीर्थश्राद्धांत वर्ज्य करावे." **भविष्यपुराणांत**—"पितरांचें आवाहन आणि विसर्जन हें तीर्थश्राद्धांत नाहीं. तीर्थांत आवाहन आणि अर्घ्यदान होत नाहीं; कारण, तीर्थाचे ठायीं आवाहन केलेले व अर्घ्य दिलेले असे पितर असतात" अग्नौकरणही नाहीं, असें **रत्नावलीग्रंथांत** आहे. एथें ( तीर्थाचे ठायीं ) सहा देवतांच्या श्राद्धांतही माता इत्यादिकांला पिंड मात्र द्यावा. कारण, "पिता इत्यादिकांस पिंड दिल्यावर शेष अन्नांतील एक एक मुष्टि घेऊन आदरपूर्वक अनुक्रमानें पितृपत्नींला पिंडदान करावें" असें तीर्थाच्या उपक्रमांत **देवलाचें** वचन आहे, असें **पृथ्वीचंद्र** सांगतो. तदनंतर सामान्य पिंड द्यावा. कारण, "तदनंतर त्या संस्कार केलेल्या शेष अन्नाचा पिंड करून सार्‍या ज्ञातिवर्गाला सामान्य पिंड द्यावा." असें त्यानें ( देवलानें ) सांगितलें आहे. **पद्मपुराणांत**—"तीर्थश्राद्ध विशेषेकरून पक्वान्नानें करावें. आमान्नानें, हिरण्यानें, अथवा कंद-मूल-फलें यांनीं देखील करावें."

पिंडद्रव्याणि**देवीपुराणेहेमाद्रौब्राह्मेच** सक्तुभिःपिंडदानंचसंयावैःपायसेनवा कर्तव्यमृषिभिःप्रोक्तंपिण्याकेनगुडेनवा पिंडानांतीर्थप्रक्षेपएवनान्याप्रतिपत्तिरित्युक्तंप्राक् एतच्चाविधवयाऽपुत्रयाकार्यं नसपुत्रयेत्युक्तंप्राक् सपुत्रयानकर्तव्यंभर्तुःश्राद्धंकदाचनेति**स्मृतेश्च** अनुपनीतेनापिकार्यं एतच्चानुपनीतोपिकुर्यात्सर्वेषुपर्वस्विति**पाद्मे**तीर्थश्राद्धमुपक्रम्योक्तेः एतच्चजीवत्पितृकेणापिकार्यमित्युक्तंप्राक् यतिनातुनकार्यं नकुर्यात्सूतकंभिक्षुःश्राद्धपिंडोदकक्रियां त्यक्तंसंन्यासयोगेनगृहधर्मादिकंव्रतं गोत्रादिचरणंसर्वंपितृमातृकुलंधनमिति**स्मृतेः** गयायांतूक्तं**वायवीये** दंडंप्रदर्शयेद्भिक्षुर्गयांगत्वानपिंडदः दंडंस्पृष्ट्वाविष्णुपदेपितृभिःसहमुच्यते गयायांधर्मपृष्ठेचकूपेयूपेवटेतथा दंडंप्रदर्शयन्भिक्षुःपितृभिःसहमुच्यते **कृत्यरत्नेप्रभासखंडे**

**तीर्थेचेत्प्रतिगृह्णातिब्राह्मणोवृत्तिदुर्लभः दशांशमर्जितंदद्यादेवंकुर्वन्नहीयते इति विशेषांतराणिभट्टकृतत्रिस्थलीसेतौज्ञेयानीतिदिक् इतिकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौतीर्थश्राद्धविधिःसमाप्तः ॥**

पिंडांचीं द्रव्यें सांगतो—**देवीपुराणांत** आणि **हेमाद्रींत ब्रह्मपुराणांत**—"सातूचें पीठ, अथवा गव्हांचा चिरा, किंवा पायस ( दुधाचे विकार ), अथवा तिळकूट, किंवा गूळ यांचे पिंड करून ते द्यावे, असें ऋषींनीं सांगितलें आहे." पिंड तीर्थांतच टाकावे, दुसरीकडे टाकूं नयेत, असें पूर्वीं ( पार्वणश्राद्धप्रकरणीं ) सांगितलें आहे. हें तीर्थश्राद्ध निपुत्रिक विधवेनें करावें. सपुत्रिक विधवेनें करूं नये, असें पूर्वीं सांगितलें आहे. आणि जिला पुत्र असेल तिनें भर्त्याचें श्राद्ध कधींही करूं नये" अशी **स्मृति**ही आहे. ज्याचें मौंजीबंधन झालें नाहीं त्यानेंही करावें; कारण, "हें अनुपनीतानें देखील सर्व पर्वांचे ठायीं करावें" असें **पद्मपुराणांत** तीर्थश्राद्धाचा उपक्रम ( आरंभ ) करून सांगितलें आहे. हें तीर्थश्राद्ध जीवत्पितृकानें देखील करावें. असें पूर्वीं सांगितलें आहे. तीर्थश्राद्ध संन्याश्यानें तर करूं नये; कारण, "संन्याश्यानें सूतक ( आशौच ), श्राद्ध, पिंडदान, उदकदान, हीं करूं नयेत. कारण, संन्यास ग्रहण केल्यानें गृहस्थाश्रमाचे धर्म इत्यादिक, व्रत, गोत्रप्रवर, पितृकुल, मातृकुल व द्रव्य या सर्वांचा त्यानें त्याग केला आहे." अशी **स्मृति** आहे. गयेचे ठायीं तर **वायवीयांत** सांगितलें आहे, तें असें—"संन्याश्यानें गयेंत जाऊन दंड दाखवावा; पिंड देऊं नयेत. विष्णुपदाचे ठायीं दंडाचा स्पर्श करून तो पितरांसह मुक्त होतो. गया, धर्मपृष्ठ, कूप, यूप आणि अक्षयवट यांचे ठायीं दंड दाखवून संन्याशी पितरांसह मुक्त होतो." **कृत्यरत्नांत प्रभासखंडांत**—"ब्राह्मण उपजीविका चालत नसल्यामुळें तीर्थाचे ठायीं जर प्रतिग्रह करील तर त्यानें मिळविलेल्या द्रव्यांतून दहावा अंश इतरांस द्यावा, असें करणारा स्वधर्मापासून च्युत होत नाहीं." तीर्थासंबंधीं इतर विशेष **नारायणभट्टांनीं** केलेल्या **त्रिस्थलीसेतुग्रंथांत** पाहावे अशी ही दिशा दाखविली आहे. **इति श्रीनिर्णयसिंधौ तीर्थश्राद्धविधीची महाराष्ट्टीका समाप्त झाली.**

इति श्रीनिर्णयसिंधौ तृतीयपरिच्छेदे श्राद्धप्रकरणं समाप्तम् ॥

---

## अथाशौचप्रकरणंप्रारभ्यते ।

नारायणात्मजश्रीमद्रामकृष्णस्यसूनुना । कमलाकरसंज्ञेनाशौचंनिर्णीयतेधुना ॥ १ ॥

**मरीचिः** आचतुर्थाद्भवेत्स्रावःपातःपंचमषष्ठयोः अतऊर्ध्वंप्रसूतिःस्याद्दशाहंसूतकंभवेत् **बृहत्पराशरः** गर्भस्रावेतुनैरुक्तारात्रयोमाससंमिताः स्रावंगर्भस्यविद्वांसोमासादर्वाक्चतुर्थकात् पातमूर्ध्वंवदंत्येकेत-त्राधिकंतुसूतकं स्रावेमातुस्त्रिरात्रंस्यात्सपिंडाशौचवर्जनं पातेमातुर्यथामासंसपिंडानांदिनत्रयं अत्रसर्वत्रमूलं **मिताक्षरायां**ज्ञेयं अत्रमासत्रयेत्रिरात्रंस्यादित्यनुवादः रजस्वलात्वेनैवतत्सिद्धेः यद्यप्यनेनचतुर्थमासेपि-त्रिरात्रंप्राप्नोति तथापि षण्मासाभ्यंतरंयावद्गर्भस्रावोभवेद्यदि तदामाससमैस्तासांदिवसैःशुद्धिरिष्यते **इत्या-दिपुराणात्** रात्रिभिर्मासतुल्याभिर्गर्भस्रावेविशुध्यतीति**मनूक्तेः** गर्भस्रावेयथामासमचिरेतूत्तमेत्र्यह इ-ति**मरीच्युक्ते**श्चतूरात्रंज्ञेयं अचिरेत्रिमासमध्ये उत्तमेब्राह्मणे अत्रसपिंडानांस्नानं सद्यःशौचंसपिंडानांगर्भ-स्यपतनेसतीति**तत्रैवोक्तेः** एतदाचतुर्थमासात्पातेत्रिदिनस्योक्तेः अकारणायाःशुद्धेरसंभवात् सद्यःपदं-स्नानपरं एवमग्रेपि गर्भस्रावेस्नानमात्रंपुरुषस्येति**वृद्धवसिष्ठोक्तेः** पुरुषस्येतिसपिंडोपलक्षणंपूर्वोक्तवच-नात् आचतुर्थमासंसपिंडानांनस्नानंकिंतुपुंसएव पातेत्रिदिनंनिर्गुणपरं गुणवतस्तु अजातदंतेतनयेशिशौग-र्भच्युतेतथा सपिंडानांतुसर्वेषामेकरात्रमशौचकमिति**यमोक्ते**रेकाहइति**मदनपारिजातः** ।

## आतां आशौचप्रकरणाला प्रारंभ करितो—

नारायणभट्टांचा पुत्र जो श्रीमान् रामकृष्णभट्ट त्याचा पुत्र कमलाकरभट्ट आतां आशौचाचा निर्णय करितो ॥ १ ॥

**मरीचि**—"गरोदर स्त्रियेचा चार महिन्यांच्या आंत कोणत्याही कारणानीं गर्भरूप शुक्रशोणितांचा स्राव होतो त्याला **स्राव** असें म्हणतात. पांचव्या व साहाव्या महिन्यांत कोणत्याही कारणांनीं कठिण झालेला शुक्रशोणितरूपी गर्भ पडतो म्हणून त्याला **पात** असें म्हणतात. सातव्या महिन्यापासून पुढें कधींही गर्भ स्वस्थानापासून बाहेर आला असतां त्याला **प्रसूति** असें म्हणतात. प्रसूति झाली असतां सूतक ( प्रसूतिनिमित्तक आशौच ) दहा दिवस असतें." **बृहत्पराशर**—"गर्भस्राव

असतां गर्भाला जितके महिने झाले असतील तितके दिवस त्या स्त्रियेला आशौच. कितीएक विद्वान् चार महिन्यांच्या आंत गर्भाचा स्राव असें म्हणतात. चार महिन्यांच्या पुढें पात असें म्हणतात. तो पात असतां आशौच अधिक आहे. गर्भाचा स्राव असतां त्या गर्भाच्या मातेला त्रिरात्र ( तीन दिवस ) आशौच आहे व सपिंडांला आशौच नाहीं. गर्भाचा पात असतां जितक्या महिन्यांचा गर्भ असेल तितके दिवस मातेला आशौच. व सपिंडांना तीन दिवस आशौच." या सर्वांविषयींचें मूळ **मिताक्षरेंत** पाहावें. या वरील वचनांत स्राव असतां मातेला त्रिरात्र असें सांगितलें तें अनुवाद ( **सिद्धाचें कथन** ) आहे, अपूर्व सांगितलेलें नाहीं; कारण, ती स्त्री रजस्वला असल्यामुळें तीन दिवस आशौच सिद्धच आहे. जरी '**स्रावे मातु-स्त्रिरात्रं**' ह्या वचनानें चवथ्या मासीं देखील त्रिरात्र आशौच प्राप्त होतें तरी "सहा महिने पूर्ण होईपर्यंत जर गर्भस्राव होईल तर त्या वेळीं माससमान दिवसांनीं त्या स्त्रियांची शुद्धि होते" ह्या **आदिपुराण**वचनावरून आणि "गर्भस्राव असतां मास-तुल्य रात्रींनीं ( दिवसांनीं ) स्त्री शुद्ध होते" ह्या **मनु**वचनावरून आणि "ब्राह्मणाचे ठायीं गर्भस्राव असतां जितक्या मासांचा गर्भ असेल तितके दिवस स्त्रियेला आशौच. तीन महिन्यांचा गर्भ असेल तर तीन दिवस आशौच आहे" ह्या **मरीचि**वचनावरूनही चवथ्या मासीं चार दिवस आशौच समजावें. एथें सपिंडांना स्नान समजावें. कारण, "गर्भाचें पतन असतां सपिंडांना सद्यःशौच ( सद्यःशुद्धि ) आहे" असें तेथेंच ( मिताक्षरेंत ) सांगितलें आहे. हें सद्यःशौच चतुर्थमासपर्यंत होय; कारण, वरील बृहत्पराशरवचनांत चतुर्थमासानंतर पात असतां तीन दिवस सांगितलें आहे. कारणावांचून शुद्धीचा असंभव असल्यामुळें वरील वचनांतील 'सद्यः' या पदानें स्नान समजावें. याप्रमाणें पुढेंही जेथें 'सद्यः' पद असेल तेथें स्नान समजावें. 'सद्यः' या पदानें स्नान समजावें, असें वर सांगितलें याचें कारण, "गर्भस्राव असतां पुरुषाला स्नान मात्र आहे" असें **वृद्धवसिष्ठ**वचन आहे. पूर्वी सांगितलेल्या 'सद्यःशौचं सपिंडानां' ह्या वचनावरून ह्या वृद्धवसिष्ठवचनांतील 'पुरुषस्य' हें पद सपिंडांचें उपलक्षण ( बोधक ) आहे. चतुर्थमासपर्यंत गर्भस्राव असतां सपिंडांना स्नान नाहीं; तर पुरुषालाच ( गर्भजनन-कालाचें ) स्नान आहे. वरील बृहत्पराशरवचनानें पाताविषयीं त्रिदिन आशौच सांगितलें तें निर्गुणाला आहे. गुणवंताला तर "दंत उत्पन्न होण्याच्या पूर्वी पुत्र मृत असतां, तसेंच गर्भपात असतां, सर्व सपिंडांना एक रात्र आशौच आहे" ह्या **यम**-वचनावरून एकाह आशौच, असें **मदनपारिजात** सांगतो.

सप्तममासादिदशाहं एतत्सर्ववर्णविषयं तुल्यंवयसिसर्वेषामतिक्रांतेतथैवचेति **व्यासोक्तेः पराशरः** जातेविप्रोदशाहेनद्वादशाहेनभूमिपः वैश्यःपंचदशाहेनशूद्रोमासेनशुध्यति **संवर्तः** जातेपुत्रेपितुःस्नानंस-चैलंतुविधीयते माताशुध्येद्दशाहेनस्नानात्तुस्पर्शनंपितुः पुत्रपदात्कन्योत्पत्तौनपितुःस्नानमिति**हारलतायां** तन्न पुत्रपदस्य पौत्रीमातामहस्तेनेतिकन्यायामपिप्रयोगात् यत्तु**तत्रैवोक्तम्** सूतकेतुमुखंदृष्ट्वाजातस्यजन-कस्ततः कृत्वासचैलंस्नानंतुशुद्धोभवतितत्क्षणात् इत्या**दित्यपुराणा**न्मुखदर्शनोत्तरमेवपितुःस्नानमिति तन्न विदेशेमुखदर्शनावध्यस्पृश्यतापत्तेः मुखदर्शनोत्तरंपुनःस्नानार्थमिदमिति **स्मार्तगौडाः** तन्न मूलैक्ये-नस्नानमात्रपरत्वात् इदंसर्ववर्णसमं सूतिकासर्ववर्णेषुदशरात्रेणशुध्यति ऋतौचनपृथक्शौचंसर्ववर्णेष्वयं-विधिरिति **हारलतायांप्रचेतसोक्तेः** यत्तु**ब्राह्मे** ब्राह्मणीक्षत्रियावैश्याप्रसूतादशभिर्दिनैः गतैःशूद्रा-चसंस्पृश्यात्रयोदशभिरेवचेति**प्रयोगपारिजातेपारस्करः** द्विजातेःसूतिकायास्यात्सादशाहेनशुध्यति त्रयोदशेह्निसंप्राप्तेशूद्राशुध्यत्यसंशयइति तदस्पृश्यत्वपरम् ।

सातव्या महिन्यापासून पुढें दहा दिवस आशौच. हें सर्व वर्णांला समजावें. कारण, "सर्ववर्णांला तुल्य आशौच आहे. अतिक्रांत असतांही तसेंच आहे" असें **व्यास**वचन आहे. **पराशर**—"उत्पत्ति झाली असतां ब्राह्मण दहा दिवसांनीं, क्षत्रिय बारा दिवसांनीं, वैश्य पंधरा दिवसांनीं, आणि शूद्र एका महिन्यानें शुद्ध होतो." **संवर्त**—"पुत्र झाला असतां पित्याला सचैल ( वस्त्रसहित ) स्नान सांगितलें आहे. माता दहा दिवसांनीं शुद्ध होते. स्नान केल्यावर पिता इतरांना स्पर्श करण्याविषयीं शुद्ध होतो." ह्या वचनांत 'पुत्र' असें पद असल्यामुळें कन्येची उत्पत्ति असतां पित्याला स्नान नाहीं, असें **हारलतेंत** सांगितलें आहे. तें बरोबर नाहीं. कारण, पुत्राच्या ( कन्येच्या ) पुत्रानें मातामह पौत्री होतो, अशा अर्थाच्या 'पौत्री मातामहस्तेन' ह्या **मनु**वचनावरून पुत्रपदाचा प्रयोग कन्येचेठायीं देखील आहे. आतां जें तेथेंच सांगितलें की, "जननाशौच असतां जनक ( पिता ) उत्पन्न झालेल्या अपत्याचें मुख पाहून नंतर सचैल. स्नान करून तत्क्षणीं शुद्ध होतो" ह्या **आदित्यपुराणा**वरून मुखदर्शनोत्तरच पित्याला स्नान, असें, तें बरोबर नाहीं. कारण, परदेशीं पिता असेल तर त्याला मुखदर्शनापर्यंत अस्पृश्यत्व प्राप्त होईल. हें वचन मुखदर्शनोत्तर पुनःस्नानासाठीं आहे, असें **स्मार्तगौड** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, अशुचिलाचें मूळ दोन्ही ठिकाणीं एक ( अपत्योत्पत्ति ) असल्यामुळें उत्पत्तीचें सामान्य स्नान घ्यावयाचें आहे. हें

१ येथपासून मदनपारिजाताचें मत समजावें. अन्यथा वरील 'अत्र सपिंडानां स्नानं' इत्यादि ग्रंथाचा विरोध येईल.

दशाह आशौच सर्व वर्णांना ( ब्राह्मणादिकांना ) समान आहे. कारण, सर्ववर्णांमध्यें सूतिका ( बाळंतीण ) दहा दिवसांनीं शुद्ध होते. तिची रजस्वलासंबंधानें वेगळी शुद्धि नाहीं. साऱ्या वर्णांमध्यें हा विधि समजावा" असें **हारलतेंत प्रचेताचें** वचन आहे. आतां जें **ब्राह्मांत**—"ब्राह्मणी, क्षत्रिया, आणि वैश्या ह्या स्त्रिया प्रसूत झाल्या असतां दहा दिवस गेल्यानें शुद्ध होतात. आणि शूद्रा तेरा दिवस गेल्यावर स्पर्श करण्यास योग्य होते." असें सांगितलें तें, आणि **प्रयोगपारिजातांत पारस्कर**—"द्विजातीची ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, यांची ) जी सूतिका ती दहा दिवसांनीं शुद्ध होते. तेरावा दिवस प्राप्त झाला असतां शूद्रा शुद्ध होते यांत संशय नाहीं" असें सांगतो तें शूद्रेला अस्पृश्यत्वाविषयीं समजावें.

**अंगिराः** सूतकेसूतिकावर्जंसंस्पर्शोननिषिध्यते संस्पर्शेसूतिकायास्तुस्नानमेवविधीयते नाशौचंसूतकं पुंसःसंसर्गंचेन्नगच्छति रजस्तत्राशुचिर्ज्ञेयंतच्चपुंसिनविद्यते संसर्गोमैथुनं स्पर्शइत्यन्ये मातुरेवसूतकं तांस्पृशतश्चेति**हारलतायांसुमंतूक्ते**रिति तन्न संस्पर्शेसूतिकायास्तुस्नानमेवविधीयतइतिस्नानमात्रोक्तेः सौमंतवचनस्यस्नानपर्यंतमस्पृश्यत्वमात्रबोधकत्वात् एवकारोबालस्पृश्यत्वार्थः **माधवस्तु** यस्तैःसहसपिंडोपिप्रकुर्याच्छयनासनं बांधवोवापरोवापिसदशाहेनशुध्यतीतिबृ**हस्पतिस्मृतेः** शयनासनादिरूपंसंसर्गमाह **पराशरः** यदिपत्न्यांप्रसूतायांद्विजःसंपर्कमृच्छति सूतकंतुभवेत्तस्ययदिविप्रःषडंगवित् पितृवत्सापत्नमातुः-प्राक्स्नानादस्पृश्यत्वम् सूतिकास्पर्शेतुयावदाशौचं अन्यास्तुमातरस्तद्वत्तद्गृहंनत्रजंतिचेदिति**ब्राह्मोक्ते**रिति-**शुद्धितत्त्वादयः** तन्न तद्गृहंगत्वासूतिकांयदिनस्पृशंतितदास्पृश्याः अन्यथानेतिनस्यार्थः ।

**अंगिरा**—"जननाशौचांत सूतिका वर्ज्य करून इतर सपिंडांला स्पर्शाचा निषेध नाहीं. सूतिकेला स्पर्श केला असतां स्नानच सांगितलें आहे, सूतिकेशीं पुरुषानें संसर्ग जर केला नसेल तर पुरुषाला प्रसूतिनिमित्तक आशौच ( अस्पृश्यत्व ) नाहीं. कारण, त्या ठिकाणीं अशुचि रज आहे, तें पुरुषाचे ठायीं नाहीं." या वचनांत 'संसर्ग' या शब्दानें मैथुन समजावें. इतर ग्रंथकार संसर्ग म्हणजे स्पर्श असें म्हणतात. कारण, "मातेलाच सूतक आहे आणि तिला स्पर्श करणारालाही आहे" असें **हारलतेंत सुमंतु**वचन आहे. हें इतर ग्रंथकारांचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण "सूतिकेचा स्पर्श झाला असतां स्नानच सांगितलें आहे" ह्या अंगिरावचनानें स्पर्श असतां स्नानच सांगितलें, आशौच सांगितलें नाहीं. सुमंतूचें वचन स्पर्श असतां स्नानापर्यंत स्पर्शाला योग्य नाहीं, इतक्याचेंच बोधक आहे, आशौचबोधक नाहीं. सुमंतुवचनांतील 'एव'कारानें बाल स्पृश्य आहे. असें सुचविलें आहे. **माधव** तर—"सपिंड असो किंवा बांधव असो अथवा दुसरा कोणी असो त्या आशौचवंतांसह निजणें, बसणें इत्यादि जो करील तो दहा दिवसांनीं शुद्ध होतो" ह्या **बृहस्पति**स्मृतीवरून शयन-आसनरूप संसर्ग, असें सांगतो. **पराशर**—"पत्नी प्रसूत असतां षडंग वेदवेत्ता ब्राह्मण जर तिच्याशीं संपर्क करील तर त्याला सूतक ( प्रसूतिनिमित्तक आशौच ) प्राप्त होईल." उत्पन्न झालेल्या अपत्यनिमित्तानें स्नानाच्या पूर्वीं पित्याला जसें अस्पृश्यत्व ( स्पर्शाला अयोग्यत्व ) तसें सापत्नमातेलाही स्नानाच्या पूर्वीं अस्पृश्यत्वरूप आशौच आहे. सापत्नमाता सूतिकेला स्पर्श करील तर आशौचपर्यंत तिला अस्पृश्यत्व आहे. कारण, "इतर माता जर सूतिकाघरांत न जातील तर त्यांना पित्याप्रमाणें अस्पृश्यत्वरूप आशौच आहे" असें **ब्राह्म**वचन आहे, असें **शुद्धितत्त्वादि** ग्रंथकार सांगतात. सापत्नमातेला स्नानाच्या पूर्वीं अस्पृश्यत्व हें त्यांचें सांगणें बरोबर नाहीं. कारण, त्या ब्राह्मवचनाचा अर्थ-सापत्नमाता सूतिकेच्या घरांत जाऊन त्या सूतिकेला जर स्पर्श न करतील तर त्या स्पर्शयोग्य आहेत. आणि स्पर्श करतील तर त्या स्पर्शाला योग्य नाहींत-असा आहे.

कर्मानधिकारमाह**पैठीनसिः** सूतिकांपुत्रवतींविंशतिरात्रेणकर्माणिकारयेन्मासेनस्त्रीजननीं इदमाशौचोत्तरं अन्यथाशूद्राःसपिंडानामाशौचेतदभावःस्यात् विध्यनुवादविरोधश्च एतच्चसोमयागादिश्रौतभिन्नपरं प्रजातायाश्चदशरात्रादूर्ध्वंस्नानादिति**कात्यायनोक्तेः व्यासः** प्रथमेदिवसेषष्ठेदशमेचैवसर्वदा त्रिष्वेतेषुनकुर्वीतसूतकंपुत्रजन्मनि पुत्रशब्दोपत्यमात्रपरः **ब्राह्मे** देवाश्चपितरश्चैवपुत्रेजातेद्विजन्मनां आयांतितस्मात्तदहःपुण्यंषष्ठंचसर्वदा जननेविशेषःप्रागुक्तः ।

कर्माविषयीं अनधिकार सांगतो **पैठीनसि**—"पुत्र झालेली सूतिका असेल तर तिच्याकडून वीस दिवस झाल्यानंतर कर्में करवावीं. आणि कन्या झालेली सूतिका असेल तर तिच्याकडून एक महिन्यानंतर कर्में करवावीं." हा वीस दिवस व एक महिना जो सूतिकेला अनधिकार सांगितला तो, आशौचोत्तर समजावा. अन्यथा म्हणजे आशौचाचे दहा दिवस धरून जर वीस दिवस व तीस दिवस अनधिकार म्हटला तर शूद्रस्त्री सूतिका असेल तर तिच्या सपिंडांनीं एक महिना आशौच असतां त्या सूतिकेला अनधिकाराचा अभाव ( अधिकार ) प्राप्त होईल. आणि 'शूद्रो मासेन शुध्यति' या पूर्वोक्त **पराशरवचनानें**

शूद्रेला एक मासपर्यंत जननाशौचाचें विधान असल्यामुळें अनधिकार सिद्ध असतां त्या **पैठीनसिवचनाचें** अनुवाद ( सिद्धार्थ-कथन ) केला असें म्हटलें म्हणजे विधायक वचनानें एक मास अनधिकार आणि अनुवादक वचनानें वीस दिवस अनधिकार असें झाल्यामुळें त्या दोघांचा विरोधही प्राप्त झाला. हा पैठीनसिवचनानें सांगितलेला अनधिकार सोमयागादिश्रौतकर्मव्यतिरिक्तविषयक आहे. कारण, "सूतिकेला दशरात्रानंतर स्नानानें अधिकार आहे" असें **कात्यायनवचन** आहे. **व्यास**—"अपत्याचें जन्म झालें असतां प्रथमदिवस, सहावा दिवस आणि दहावा दिवस ह्या तीन दिवसांचेठायीं सर्वदा आशौच धरूं नये." **ब्राह्मांत**—"द्विजातींना पुत्र झाला असतां देव आणि पितर येतात म्हणून तो दिवस आणि सहावा दिवस सर्वदा पुण्यकारक आहे." जननाविषयीं विशेष ( जातकर्मादि ) पूर्वी सांगितला आहे.

अत्र**प्रयोगपारिजातः** पुंप्रसवेदशाहः स्त्र्यपत्येतुत्र्यहः पुंजन्मनिसपिंडानांदशाहाच्छुद्धिरिष्यते त्र्यहादेकोदकानांचएकाहंसूतकंक्वचित् स्त्रीजन्मनिसपिंडानांसोदकानांत्र्यहाच्छुचिः स्त्रीषुत्रिपुरुषंज्ञेयंसपिंडत्वंद्विजोत्तमा इत्य**ग्निस्मृते**रित्याह **मेधातिथिरपि** अप्रत्तानांतुस्त्रीणांत्रिपुरुषीविज्ञायते इतिवासिष्ठमुक्त्वाशौचेएवैतद्विवाहेतुविधिर्दर्शितएवेत्याह अन्येतुत्रिपुरुषसापिंड्यस्यकानीनकन्यापरत्वमाहुः अप्रत्तानांतथास्त्रीणांसापिंड्यंसाप्तपौरुषं प्रत्तानांभर्तृसापिंड्यंप्राहदेवःप्रजापतिरितिकौ**र्म**विरोधाच्च **अत्रेदंतत्त्वम्** पंचमात्सप्तमाद्धीमान्यःकन्यामुद्वहेद्द्विजः गुरुतल्पीसविज्ञेयइत्यादिविरोधात्त्रिपुरुषंप्रकरणान्मरणाशौचपरम् **वासिष्ठे** तदग्रेउदकदानोक्तेः तेनकन्याप्रसवेपिसाप्तपौरुषंदशरात्रमेव नचकन्यापुत्रकृतंप्रसवेबलाबलंकाप्युक्तं **अग्निस्मृति**स्त्वनुकल्पोविगीतावेतिसर्व**सिद्धांतः** अन्यथात्रिपुरुषसपिंडानामष्टमादिसोदकानांचत्र्यहसाम्यायोगात् चतुर्थादिसप्तमांतानांचकिमपिनस्यात् तेनकन्याप्रसवेदशाहएव किंच स्त्रीजन्मोद्देशेनत्रिपुरुषंसापिंड्यंतेषांचत्रिरात्रमित्यनेकार्थविधिःकथंस्यात् **वाक्यभेदापत्तेः** नचचतुर्थादीनांसोदकत्वं क्वापिसिद्धं तेनत्रिपुरुषंचतुर्थादीनांचस्त्रीजन्मनिसोदकत्वंविधायपुनस्तेषांत्रिरात्राशौचविधौविध्यनुवादविरोधोवाक्यभेदद्वयंचेत्यसंवादार्थास्मृतिर्हेया ।

त्या जननाशौचाविषयीं **प्रयोगपारिजात**—पुत्र झाला असतां दहा दिवस आणि कन्या झाली असतां तीन दिवस आशौच. कारण, "पुरुष जन्म असतां दहा दिवसांनीं सपिंडांची शुद्धि होते. समानोदकांची तीन दिवसांनीं शुद्धि होते. आणि कोणाला एकाह आशौच आहे. कन्याजन्म असतां सपिंड व समानोदक यांची तीन दिवसांनीं शुद्धि होते. स्त्रियांविषयीं सापिंड्य त्रिपुरुष जाणावें" अशी **अग्निस्मृति** आहे, असें सांगतो. **मेधातिथि** देखील—"अविवाहित स्त्रियांना त्रिपुरुष सापिंड्य सांगितलें आहे" हें **वसिष्ठ**वचन सांगून आशौचाविषयीं हें वचन, विवाहाविषयीं तर विधि दाखविला आहेच, असें सांगतो. **इतर ग्रंथकार** तर-अविवाहित कन्येपासून उत्पन्न कन्येविषयीं त्रिपुरुष सापिंड्य आहे, असें सांगतात. यावरून इतर कन्यांना त्रिपुरुष सापिंड्य नाहीं. आणि इतर कन्यांविषयीं त्रिपुरुष सापिंड्य मानलें तर "अविवाहित स्त्रियांना सापिंड्य साप्तपौरुष आहे. आणि विवाहित स्त्रियांना पतीचें सापिंड्य आहे, असें देव प्रजापति सांगतो" ह्या **कूर्म**पुराणवचनाशीं विरोधही येतो. ह्या सापिंड्याविषयींचा खरा प्रकार असा आहे कीं, कन्याविषयीं त्रिपुरुष सापिंड्य मानलें असतां "जो विद्वान् पांचव्या किंवा सातव्यापासून कन्येशीं विवाह करील तो गुरुपत्नीगमन करणारा समजावा" इत्यादि वचनाशीं विरोध येत असल्यामुळें त्रिपुरुष सापिंड्य हें प्रकरणावरून मरणाशौचाविषयीं समजावें. विवाहाविषयीं समजूं नये. कारण, मेधातिथीनें सांगितलेल्या वसिष्ठवचनांत पुढें उदकदान सांगितलें आहे. यावरून कन्येची उत्पत्ति झाली असली तरी सात पुरुष सपिंडांना दहा दिवसच जननाशौच आहे. कन्याप्रसूति निर्बळ आणि पुत्रप्रसूति प्रबळ असें कोठेंही सांगितलें नाहीं. वर सांगितलेली **अग्निस्मृति** तर—अनुकल्प ( अधमपक्ष ) किंवा लोकनिंद्य आहे, हा सर्वांचा सिद्धांत आहे. अन्यथा म्हणजे अग्निस्मृति स्वीकारली तर त्रिपुरुष सपिंडांना आणि आठव्यापासून पुढील समानोदकांना सारखें तीन दिवस आशौच सांगितलें तें युक्त नाहीं. आणि त्याच स्मृतीवरून चतुर्थ पुरुषापासून सप्तम पुरुषापर्यंत कांहींच आशौच येणार नाहीं. यावरून कन्येची उत्पत्ति असतां दशाहच आशौच. आणखी ती स्मृति स्वीकारली असतां त्या स्मृतीनें स्त्रीजन्माच्या उद्देशेंकरून त्रिपुरुष सापिंड्याचें विधान आणि त्या त्रिपुरुष सपिंडांना त्रिरात्र आशौचाचें विधान, असा अनेकार्थक विधि कसा होईल ? कारण, तसा विधि केला तर 'स्त्रीषु त्रिपुरुषं सापिंड्यं, तेषांच सपिंडानां त्रिरात्रं आशौचं' म्हणजे स्त्रियांचा जन्म असतां त्रिपुरुष सापिंड्य समजावें. सपिंडांना त्रिरात्र आशौच समजावें, अशीं भिन्न वाक्यें होतील. आणि चवथ्या पुरुषापासून पुढच्यांना समानोदकत्व कोठेंही सांगितलेलें नाहीं; म्हणून त्याच वचनानें स्त्रीजन्माविषयीं त्रिपुरुष सापिंड्याचें विधान आणि चतुर्थादिकांस समानोदकत्वाचें विधान करून पुनः त्यांना त्रिरात्र आशौचाचें विधान केलें असतां विधिवाक्याचा व अनुवादवाक्याचा विरोध येतो आणि दोन वाक्यभेद होतात. म्हणून असंगत असलेली ती अग्निस्मृति त्याज्य आहे.

**अथमृताशौचंहारीतः** जातमृतेमृतजातेवासपिंडानांदशाहमितिस्वाशौचपरं जातमृतेनालच्छेदोर्ध्वं यावन्नछिद्यतेनालंतावन्नाप्नोतिसूतकं छिन्नेनालेततःपश्चात्सूतकंतुविधीयतइति**जैमिन्युक्तेः** नाड्यांछिन्नायामाशौचमिति**हारीतोक्तेश्च** एतन्मृताशौचपरमेव जननाशौचंतु नालच्छेदोत्कर्षेपिजननाद्येव मृतजातेनालच्छेदाभावात् षष्ठीपूजाद्युत्कर्षापत्तेश्च तेननाडीछेदात्प्राङ्मातुःस्पर्शेपिनदोपइति**शुद्धितत्त्वोक्तिः** परास्ता नाभिच्छेदात्प्राङ्मृतौतु**बृहन्मनुः** जीवन्जातोयदिततोमृतःसूतकएवतु सूतकंसकलंमातुःपित्रादीनांत्रिरात्रकं इदंचप्रसवाशौचमेव शावनिमित्तंस्नानमात्रं प्राङ्नामकरणात्सद्यःशौचमिति**शंखोक्तेः** ।

## आतां मृताशौच सांगतो—

**हारीत**—"मूल उपजून मेलें अथवा मरून उपजलें असतां दहा दिवस आशौच" हें वचन आपल्या आशौचाविषयीं आहे. मुलाच्या निमित्तानें आशौचाविषयीं मूल उपजून मृत असतां नालच्छेदानंतर आशौच. कारण, "जोंपर्यंत नालच्छेद झाला नाहीं तोंपर्यंत सूतक प्राप्त होत नाहीं. नालच्छेद झाल्यानंतर सूतक सांगितलें आहे" असें **जैमिनि**वचन आहे. आणि "नाडीच्छेद झाला असतां आशौच" असें **हारीत**वचनही आहे. नालच्छेदानंतर आशौच सांगितलें हें मृताशौचविषयकच आहे. जननाशौच तर नालच्छेद पुढें होणारा असला तरी उत्पन्न झाल्यापासून आहे. नालच्छेदाच्या पूर्वी जननाशौच नाहीं, असें म्हटलें तर मरून उपजलेल्या मुलाचें नालच्छेदन नसल्यामुळें जननाशौच प्राप्त होणार नाहीं. आणि नालच्छेदाच्या पूर्वी जातकर्मादि करावयाचें म्हणून आशौच नाहीं, असें म्हटलें तर षष्ठीपूजनादिकालपर्यंतही आशौच प्राप्त होणार नाहीं. जननापासून आशौच आहे, असें सांगितल्यानें 'नाडीच्छेदाच्या पूर्वी मातेला स्पर्श केला असतांही दोष नाहीं' अशी **शुद्धितत्त्वाची** उक्ति खंडित झाली. नाभिच्छेदाच्या पूर्वी मृत असेल तर सांगतो **बृहन्मनु**—"जर जीवंत उत्पन्न होऊन नंतर जननाशौचांतच मेला तर मातेला संपूर्ण आशौच. आणि पिता इत्यादिकांना त्रिरात्र आशौच" हें जननाशौचच समजावें. मरणनिमित्तक स्नानमात्र आहे. कारण, "नामकरणाच्या पूर्वी सद्यःशौच ( स्नान )" असें **शंख**वचन आहे.

अत्र**कश्चि**दाह नामकरणमाशौचांतकालोपलक्षणं आशौचव्यपगमेनामधेयमिति**विष्णूक्तेः** आशौचेचव्यतिक्रांतेनामकर्मविधीयते इति**मनूक्तेश्च**नाम्नोनियतकालत्वात् नचनामधेयंदशम्यांतुद्वादश्यांवापिकारयेत् पुण्येतिथौमुहूर्तेवानक्षत्रेवागुणान्वितइति**मनूक्ते**रनियतकालत्वम् दशम्यामतीतायांविप्रः द्वादश्यामतीतायांक्षत्रियः वैश्यःषोडशे शूद्रएकत्रिंशेइत्यपिज्ञेयं पुण्यइत्याद्यनुकल्पः तेननाम्नःकालोपलक्षणं एवंदंतजननेपिदंतजन्मसप्तमेमासीत्यु**पनिषदि**नियतकालत्वात् चौलेतुनकालोपलक्षणम् प्रथमेब्देतृतीयेवाकर्तव्यंश्रुतिचोदनादिति**मनूक्तेः** ततःसंवत्सरेपूर्णेचूडाकर्मविधीयते द्वितीयेवातृतीयेवाकर्तव्यंस्मृतिदर्शनादिति**यमोक्तेश्च** तस्यानियतकालत्वादिति **तन्मंदं** चौलवन्नामदंतजननयोरपिस्वरूपेणनिमित्तत्वोपपत्तेस्तद्विशिष्टकालानुवादेवाक्यभेदात् सप्तममासादर्वाग्दंतजननेतदभावप्रसंगाच्च यस्तूपनिषद्दर्शनेननिर्णयंकुर्यात् सनूनंशतायुःपुरुषइतिश्रुतेरर्वाक्पितृमरणेतदंत्यकर्मापित्यजेत् ननुकालानुपलक्षणेनामोत्कर्षेतदभावेवास्नानमात्राच्छुद्धिःस्यात् ततःकिम् अस्तु अत**एवोक्तं** आदंतजन्मनःसद्यइति साचविष्णुवचनाद्दाहाभावविषयेतिवक्ष्यामः त्रिवर्षादावपिस्यादितिचेत् न दाहदंतादिनिमित्तैर्विशेषाशौचैःपूर्वस्यबाधात् **तदुक्तं** पूर्वाबाधेननोत्पत्तिरुत्तरस्यहिसिध्यतीति जननाद्दशरात्रेव्युष्टेशतरात्रेसंवत्सरेचेति**परिशिष्टे** द्वादश्यामपरेरात्र्यांमासेपूर्णेतथापरे अष्टादशेहनितथावदंत्यन्येमनीषिणइति **भविष्येच** नाम्नःकालानियमाच्च नचप्राथम्याद्दशरात्रेतीतेइतिमुख्यःकालः अन्यस्त्वनुकल्पइतिवाच्यम् चौलेपितथापत्तेः नचदंतजननकालानुपलक्षणेसदंतजातमृतस्यदाहैकाहप्रसंगः दशाहेनबाधात् नामकरणोत्तरमेवदाहप्रवृत्तेः दशाहाभ्यंतरेबालेप्रमीतेतस्यबांधवैः शावाशौचंनकर्तव्यंसूत्याशौचंविधीयतेइति**बृहन्मनूक्तेश्च** आशौचंदाहोपलक्षणं सूतकवदिति**पारस्करोक्तेः** **यत्तुविष्णुः** अनिवृत्तेदशाहेतुपंचत्वंयदिगच्छति सद्यएवविशुद्धिःस्यान्नप्रेतंनोदकक्रियेति तदपिप्रेताशौचनिषेधार्थंनतुसद्यस्त्वपरं वाक्यभेदात् किंचनामकालात्प्राङ्मृतस्यस्नानम् तदुत्तरंत्वेकाहादि नामकालेत्वेकादशाहेमृतस्यनकिमपिस्यात् अथशंखवचनेल्यब्लोपेपंचमीतदाप्रागितिनोपपद्येत नाम्निवापिकृतेसतीति**मन्वादि**विरोधात् कृतनाम्नइति**माधवमिताक्षरा**दिविरोधान्नकालोपलक्षणंकापीतिदिक् ।

येथें कश्चित् ( कोणी एक ) असें सांगतो कीं, नामकरण या पदानें उपलक्षणेंकरून आशौचसमाप्तीचा काल समजावा. कारण, "आशौच समाप्त झालें असतां नामकरण करावें" या **विष्णु**वचनावरून आणि "आशौच गेलें असतां नामकरण करावें" या **मनू**च्या वचनावरूनही नामकरणाचा नियमित काल आहे. आतां असें म्हणूं कीं, "नामकरण दहाव्या किंवा बाराव्या रात्रीं करावें, अथवा पुण्यतिथि व मुहूर्तावर किंवा गुणयुक्त नक्षत्रावर करावें" या **मनु**वचनावरून नामकरणाचा काल अनियमित आहे. तर तसें नाहीं; कारण, त्या मनुवचनाचा अर्थ असा कीं, दहावी रात्र गेली असतां ब्राह्मणानें करावें. बारावी गेली असतां क्षत्रियानें करावें. याचप्रमाणें सोळाव्या दिवशीं वैश्यानें व एकतिसाव्या दिवशीं शूद्रानें असेंही आपापल्या आशौचोत्तर जाणावें. पुण्यतिथि मुहूर्तावर इत्यादि सांगितलें तो अनुकल्प आहे. यावरून आशौचोत्तर काल झाला. अनियत नाहीं, म्हणून नामकरण हें नामकरणकालाचें उपलक्षण झालें. याचप्रमाणें दंतजननही दंतोत्पत्तीच्या कालाचें उपलक्षण ( बोधक ) आहे. म्हणजे दंतजननशब्दानें दंतोत्पत्तीचा काल घ्यावा. कारण, "दंतांची उत्पत्ति सातव्या मासीं होते" या उपनिषदांत दंतजन्माचा काल नियमित सांगितला आहे. याप्रमाणें चौलाविषयीं कालाचें उपलक्षण नाहीं. कारण, "पहिल्या वर्षी किंवा तिसऱ्या वर्षी श्रुतीनें सांगितल्यावरून चौल करावें" या **मनु**वचनावरून, आणि "संवत्सर पूर्ण झालें असतां चूडाकर्म सांगितलें आहे. अथवा दुसऱ्या किंवा तिसऱ्या वर्षी करावें, कारण, अशी स्मृति आहे" या **यम**वचनावरूनही चौलाचा काल अनियमित आहे. हें कश्चित् ( कोणी एकाचें ) मत मंद ( असार, पोकळ ) आहे. कारण, चौल जसें आशौचाविषयीं स्वरूपानें ( स्वतः ) निमित्त आहे तसेंच नामकरण व दंतजनन यांना देखील स्वरूपानें निमित्तत्व उपपन्न ( युक्त ) असतां तद्युक्त कालाचा अनुवाद ( कथन ) केला तर वाक्यभेदरूप दोष प्राप्त होईल. तो असा-वरील शंखवचनांत-'नामकरणात्प्राक् सद्यःशौचं, तच्च आशौचोत्तरं' अशीं दोन वाक्यें करावयास लागतील. याप्रमाणें दंतजननाविषयीं समजावें. आणि सातव्या महिन्याच्या आंत दंत उत्पन्न असतां दंतोत्पत्तिनिमित्तक सांगितलेलें आशौच प्राप्त होणार नाहीं. 'सातव्या मासीं दंतोत्पत्ति होते' या उपनिषदावरून जो आशौचाचा निर्णय करील तो "पुरुष शतायु आहे" या **श्रुती**वरून शंभरवर्षांच्या आंत बाप मेला असतां त्याचें अंत्यकर्म करणार नाहीं. **शंका**-नामकरणानें कालाचें उपलक्षण केलें नाहीं, आणि नामकरण पुष्कळ दिवसांनीं केलें किंवा मुळींच केलें नाहीं; म्हणजे नामकरण नसल्यामुळें पुष्कळ दिवसांचा मृत झाला तरी स्नानमात्रानें शुद्धि होईल. **समाधान.** स्नानमात्रानें शुद्धि झाली तर काय होईल. असो. म्हणूनच सांगितलें आहे कीं, 'दंतोत्पत्तीपर्यंत सद्यःशुद्धि आहे.' ती सद्यःशुद्धि **विष्णु**वचनावरून दाहाच्या अभावीं आहे, असें पुढें सांगूं. आतां ती स्नानमात्रानें शुद्धि तीन वर्षांचा वगैरे मृत असेल त्या ठिकाणीं देखील होईल, असें म्हणाल तर त्या ठिकाणीं दाह, दंतजनन इत्यादि निमित्तक विशेष आशौचांनीं पूर्वीच्या अल्प आशौचाचा ( सद्यःशौचादिकांचा ) बाध होईल. तेंच सांगितलें आहे-'पूर्वीच्याचा बाध केल्यावांचून पुढच्याची सिद्धि होत नाहीं.' आणि पूर्वी कश्चिन्मतवाल्यानें सांगितलें कीं, नामकरणाचा काल नियमित आहे, तोही नाहीं. कारण, "उत्पन्न झाल्यापासून दहा दिवस, शंभर दिवस किंवा एक वर्ष गेल्यावर नामकरण करावें." असें **परिशिष्टांत** आहे. आणि "बाराव्या रात्रीं ( दिवशीं ) करावें, असें कोणी सांगतात; मास पूर्ण झाल्यावर करावें, असें इतर सांगतात. अठराव्या दिवशीं करावें, असें अन्य विद्वान सांगतात" असें **भविष्य**पुराणांतही आहे, म्हणून नामकरणाच्या कालाचा नियमही नाहीं. आतां असें म्हणूं कीं, प्रथम सांगितल्यामुळें दहावा दिवस गेल्यावर जो काळ तो नामकरणाचा मुख्य काळ आहे. इतर काळ अनुकल्प आहे. असें म्हणतां कामा नये; कारण, चौलाविषयीं देखील तसेंच प्राप्त होईल. आतां कश्चिन्मताप्रमाणें दंतजनन शब्दानें कालाचें उपलक्षण केलें नाहीं तर दंतरहित उत्पन्न होऊन तो मेला असतां त्याचा दाह व एकाह आशौच प्राप्त होईल! असें म्हणूं नये. कारण, मृताशौचारंभीं **हारीता**नें दशाह आशौच सांगितलें त्यानें एकाहाचा बाध होईल. नामकरणोत्तरच दाहाची प्रवृत्ति आहे, पूर्वी नाहीं. कारण, "दहा दिवसांच्या आंत बालकें मृत असतां त्याचें बांधवांनीं मृताशौच करूं नये, जननाशौच करावें" असें **बृहन्मनू**चें वचनही आहे. या वचनांत मृताचें आशौच म्हणजे उपलक्षणेंकरून दाह समजावा. कारण, 'सूतकाप्रमाणें करावें' असें **पारस्करा**चें वचन आहे. आतां जें **विष्णु**-"दहा दिवसांच्या आंत जर मूल मरेल तर सद्य शुद्धि होते; प्रेतसंस्कार व उदकदान क्रिया होत नाहीं" असें सद्यःशौच सांगितलें तें देखील मृताशौचाच्या निषेधासाठीं सांगितलें. सद्यःशुद्धि होते असा याचा अभिप्राय नाहीं. कारण, वाक्यभेद होईल. तो असा-'दशाहाभ्यंतरे मृतं न संस्कुर्यात्, तस्य च सद्यःशुद्धिः' अशीं भिन्न वाक्यें होतील. आणि नामकरणदिवसाच्या पूर्वी मृताचें स्नान, नामकरणदिवसोत्तर एकाह इत्यादि आशौच, व नामकरणाच्या अकराव्या दिवशीं कांहींच आशौच प्राप्त होणार नाहीं. आतां 'प्राक् नामकरणात्' या पूर्वोक्त **शंख**वचनांत ल्यबंत अव्ययाचा लोप करून पंचमी झाली आहे. ती अशी 'नामकरणं व्याप्य' म्हणजे नामकरणदिवस व्यापून, असा अर्थ केला असतां 'प्राक्' हें पद सयुक्तिक लागत नाहीं. आणि "नामकरण केलें असतां" अशा **मनु** इत्यादि वचनाशीं विरोध येतो म्हणून व "नाम केलेल्याचें आशौच" असें **माधव, मिताक्षरा** इत्यादि ग्रंथांत सांगितलें आहे त्याच्याशींही विरोध येत असल्यामुळें कोठेंही कालाचें उपलक्षण नाहीं. ही दिशा दाखविली आहे.

**नामोत्तरंदंतोत्पत्तेःप्राग्दाहेसत्यहः** अदंतजातेतनयेशिशौगर्भच्युतेतथा सपिंडानांतुसर्वेषामहोरात्रमशौचकमितियमोक्तेः दाहाभावेतुस्नानमात्रं अदंतजातेप्रेतेसद्यएवनास्याग्निसंस्कारइति**विष्णुना**दाहाभावेतदुक्तेः आदंतजन्मनःसद्यइति**याज्ञवल्कीयाच्च** दाहविकल्पंचाह**लौगाक्षिः** तूष्णीमेवोदकंकुर्यात्तूष्णींसंस्कारमेवच सर्वेषांकृतचूडानामन्यत्रापीच्छयाद्वयं अन्यत्राकृतचूडे अत्रचूडाकरणंतृतीयवर्षरूपकालोपलक्षणार्थमिति**मेधातिथिहरदत्तौ मनुरपि** नात्रिवर्षस्यकर्तव्याबांधवैरुदकक्रिया जातदंतस्यवाकुर्युर्नाम्निवापिकृतेसतीति उदकंदाहोपलक्षणं दंतोत्पत्त्यनंतरंप्राक्त्रिवर्षातान्मृतेहः दंतजातेप्यकृतचूडेत्वहोरात्रेणशुद्धिरिति **विष्णूक्तेः** त्रिवर्षोर्ध्वंकृतचूडेऽकृतचूडेवाप्रागुपनयनात्त्र्यहः यद्यप्यकृतचूडोवैजातदंतस्तुसंस्थितः तथापिदाहयित्वैनमाशौचंत्र्यहमाचरेदिति**अंगिरसोक्तेः** ( अकृतायामपिचूडायांत्रिवर्षोर्ध्वंदाहादिनियतं नात्रिवर्षस्येतिवचनात् कृतायांवर्षत्रयात्प्रापितंतूष्णीमेव ) अत्रजातदंतत्वमुद्देश्यविशेषणत्वादविवक्षितं दाहयित्वेत्यप्यनुवादः उभयविधौवाक्यभेदात् त्रिवर्षात्प्राक्चूडाभावेग्निदानेत्र्यहस्तदभावेविष्णूक्तेरेकाहइति**माधवः** यत्तु **कश्चिदाह** अत्रत्रिवर्षविषयादस्मादेवार्थात्त्रिवर्षोर्ध्वमपितत्सिद्धिः **विज्ञानेश्वरो**क्तंचत्रिवर्षोर्ध्वमकृतचूडाविषयत्वंचिंत्यम् जातदंतपदवैयर्थ्यादिति तत्तुच्छं दाहस्याविधेयत्वात् नृणामकृतचूडानामशुद्धिर्नैशिकीस्मृतेति**मनूक्ते**स्त्रिवर्षोर्ध्वमेकाहापत्तेरर्थात्त्र्यहासिद्धेः त्वयाप्यग्रेतथांगीकारात्पदवैयर्थ्यस्यसाम्याद्वाक्यार्थाज्ञानाच्चेत्यलंमिताक्षरार्थानभिज्ञदूषणेन प्रथमवर्षादौकृतचूडस्यसदात्र्यहः निवृत्तचूडकानांतुत्रिरात्राच्छुद्धिरिष्यतइति**मनूक्तेः** एतत्सर्वंप्रागुक्तंसपिंडानां ।

नामकरणोत्तर दंतोत्पत्तीच्या पूर्वीं दाह केला असतां एक दिवस आशौच. कारण, "दंत उत्पन्न होण्याच्या पूर्वीं पुत्र मेला असतां तसाच गर्भापासून बाहेर आलेला बालक मृत असतां सर्व सपिंडांना अहोरात्र आशौच" असें **यम**वचन आहे. दाह नसेल तर स्नानमात्र आहे. कारण, "दंत उत्पन्न होण्याच्यापूर्वीं बालक मृत असतां सद्यःच शुद्धि होते, त्याचा अग्निसंस्कार नाहीं" ह्या **विष्णु**वचनानें दाहाच्या अभावीं सद्यःशौच ( स्नान मात्र ) सांगितलें आहे. आणि "दंतजन्मापर्यंत सद्यःशौच" असें **याज्ञवल्क्याचें**ही वचन आहे. दाहाविषयीं विकल्प सांगतो **लौगाक्षि**—"चूडाकर्म ( चौल ) केलेल्या सर्व बालकांना उदक अमंत्रक द्यावें आणि संस्कारही अमंत्रकच करावा. चूडाकर्म न केलेल्यांना हीं दोन्ही ( उदकदान व संस्कार ) इच्छेस वाटलीं तर करावीं, किंवा न करावीं." येथें चूडाकर्म म्हणजे उपलक्षणानें तृतीयवर्षरूप काल समजावा, असें **मेधातिथि** व **हरदत्त** सांगतात. **मनुही**—"**तीन वर्षें** ज्याला झालीं नाहींत त्याची बांधवांनीं उदकक्रिया करूं नये. अथवा ज्याला दांत आले आहेत त्याची, नामकरण केलें असतां उदकक्रिया करावी." येथें उदक म्हणजे उपलक्षणानें दाह समजावा. दंतोत्पत्तीनंतर तीन वर्षांच्या आंत मृत असतां एक दिवस आशौच. कारण, "दांत उत्पन्न असून चूडाकर्म केलें नसतां एका दिवसानें शुद्धि होते" असें **विष्णु**वचन आहे. तीन वर्षांनंतर चूडाकर्म केलेलें असो किंवा नसो मुंज होण्याच्या पूर्वीं मृत असतां तीन दिवस आशौच. कारण, "दांत उत्पन्न झालेला असून जरी चूडाकर्म केलेलें नसतां मृत झाला असेल तरी त्याचा दाह करून तीन दिवस आशौच करावें" असें **अंगिरसाचें** वचन आहे. ( चूडाकर्म केलेलें नसलें तरी तीन वर्षांनंतर दाहादिकर्म निश्चित आहे. कारण, 'नात्रिवर्षस्य०' असें **मनु**वचन आहे. चूडाकर्म केलें असतां लौगाक्षिवचनानें प्राप्त झालेलें अमंत्रकच आहे. ) ह्या अंगिरसाचे वचनांत 'जातदंत' हें उद्देश्याचें ( मृताचें ) विशेषण असल्यामुळें अविवक्षित आहे. आणि 'दाहयित्वा' म्हणजे दाह करून, हा अनुवाद आहे. कारण, दाह आणि त्र्यह आशौच या दोघांचें विधान केलें तर वाक्यभेद होईल, तो असा-'मृतं दहेत्, आशौचं च त्र्यहं चरेत्' अशीं भिन्न दोन वाक्यें होतील. या वचनाचें तात्पर्य-तीन वर्षांच्या पूर्वीं दाह केला तर तीन दिवस आशौच. दाह न केला तर पूर्वोक्त विष्णुवचनावरून एकाह आशौच, असें **माधव** सांगतो. आतां जें कश्चित् ( कोणी एक ) सांगतो कीं, 'त्रिवर्षविषयक असें जें हें अंगिरसाचें वचन त्यावरूनच त्रिवर्षानंतरही अर्थात् त्याची ( दाहाची व त्र्यहआशौचाची ) सिद्धि होते. **विज्ञानेश्वरानें** सांगितलेलें जें त्रिवर्षानंतर चूडाकर्म झालेलें नसेल तद्विषयक हें वचन आहे, तें चिंत्य ( अयुक्त ) आहे. कारण, त्रिवर्षोर्ध्वविषयक हें वचन मानलें तर 'जातदंत' हें पद व्यर्थ होईल.' असें कश्चित् सांगतो तें तुच्छ आहे. कारण, या वचनांत दाहाचें विधान नसल्यामुळें "चूडाकर्म न झालेल्या मनुष्यांचें आशौच एक दिवस सांगितलें आहे" ह्या मनुवचनावरून त्रिवर्षानंतरचें एक दिवस आशौच प्राप्त असल्यामुळें, या वचनानें वर तूं सांगितलेली 'अर्थात् तीन दिवस आशौचाची सिद्धि होत नाहीं. तूं ( कश्चिन्मतकारानें ) देखील पुढें तसेंच स्वीकारि-

---

१ हा कंसांतला ग्रंथ लेखी प्रतींत नाहीं.

लेलें आहेस. पद व्यर्थ होईल म्हणून सांगितलेंस तें तुलाही सारखेंच आहे. वाक्यार्थाचें ज्ञानही तुला नाहीं, विज्ञानेश्वरानें केलेल्या मिताक्षरेचा अर्थ न समजून दूषण दिलेंस इतकें सांगणें पुरे आहे. प्रथम वर्षादिकांत चूडाकर्म झालें असतां सर्वदा तीन दिवस आशौच. कारण, "ज्यांचें चूडाकर्म झालें असेल त्यांचें आशौच तीन दिवस इष्ट आहे" असें मनुवचन आहे. हें सारें पूर्वी सांगितलेलें आशौच सपिंडांना समजावें.

मातापित्रोस्तुदशाहोर्ध्वंमृतेसर्वत्रत्रिरात्रं बालानामजातदंतानांत्रिरात्रेणशुद्धिरितिकश्यपोक्तेः बैजिकादभिसंबंधादनुरुंध्यादघंत्र्यहमितिमनूक्तेश्च शुद्धितत्त्वादयोगौडास्तु अजातदंतमरणेपित्रोरेकाहमिष्यते दंतजातेत्रिरात्रंस्याद्यदिस्यातांतुनिर्गुणावितिकौर्मात्काश्यपंशूद्रपरं अनूढानांतुकन्यानांतथावैशूद्रजन्मनामितित्र्यहानुवृत्तौशंखोक्तेः त्रिरात्रंतुभवेच्छूद्रेषण्मासेपिशिशौमृतइतिमत्स्यसूक्ताच्च दंतजातेशूद्रेतुपंचाहः यथाहांगिराः शूद्रेत्रिवर्षान्न्यूनेतुमृतेशुद्धिस्तुपंचभिः अतऊर्ध्वंमृतेशूद्रेद्वादशाहोविधीयते षड्वर्षांतमतीतोयःशूद्रःसंम्रियतेयदि मासिकंतुभवेच्छौचमित्यांगिरसभाषितमिति यत्तुअनूढभार्यःशूद्रस्त्वितिशंखोक्तंमासाशौचंतत्सगुणशूद्रपरम् निर्गुणेत्वनूढभार्येशूद्रेत्रिवर्षोर्ध्वंद्वादशाहः षडब्दोर्ध्वंमासः षडब्दात्प्रागपिकृतोद्वाहेमासइत्याहुः एतत्तुल्यंवयसिसर्वेषामितिविरोधाच्छिष्टविगानाच्चनादर्तव्यमितिविज्ञानेश्वरादयः दाक्षिणात्यानांतथैव अन्यदेशेप्रागुक्तमितिगौडाः एवंकन्यास्वपि तास्वप्यजातदंतासुपित्रोरेकरात्रमितिमाधवः यत्तुविज्ञानेश्वरेणोक्तं ऊनद्विवर्षेउभयोःसूतकंमातुरेवहीतियाज्ञवल्क्योक्तेः गर्भस्थेप्रेतेमातुर्दशाहंजातउभयोः कृतेनाम्निसोदराणांचेतिपैंग्योक्तेश्च पित्रोःसोदराणांचदशाहमस्पृश्यत्वमितितन्नेदानींप्रचरति अतएवस्मृत्यर्थसारेतन्नादृतं कन्यासुचौलात्प्राङ्मृतौस्नानं अचूडायांतुकन्यायांसद्यःशौचंविधीयतइत्यापस्तंबोक्तेः इदंत्रिपुरुषमध्ये अप्रत्तानांतुस्त्रीणांत्रिपुरुषीविज्ञायतइतिवसिष्ठोक्तेः इदंवाग्दानोत्तरमितिगौडाः अप्रत्तानांतथास्त्रीणांसापिंड्यंसाप्तपौरुषमितिवचनात् ।

दहा दिवसांनंतर मृत असतां आईबापांना तर सर्वत्र तीन दिवस आशौच. कारण, "दांत उत्पन्न न झालेल्या बालकाचें तीन दिवस आशौच" असें कश्यपाचें वचन आहे. आणि "बीजाचा संबंध असल्यामुळें तीन दिवस अशुद्धि होते" असें मनुवचनही आहे. शुद्धितत्त्व इत्यादि गौडग्रंथकार तर-"दंत उत्पन्न होण्याच्या पूर्वी मृत असतां आईबापांना एक दिवस आशौच. दांत उत्पन्न झाले असतां जर आई बाप निर्गुण असतील तर त्यांना तीन दिवस आशौच." ह्या कौर्मवचनावरूनच पूर्वोक्त कश्यपवचन शूद्राविषयीं आहे. कारण, "अविवाहित ज्या कन्या तसेंच शूद्र यांचें तीन दिवस आशौच" असें शंखवचन आहे. आणि "सहा महिन्यांचें मूल मृत असलें तरी शूद्राला तीन दिवस आशौच होतें" असें मत्स्यसूक्तवचनही आहे. दंत उत्पन्न झालेला मृत असतां शूद्राला तर पांच दिवस आशौच, असें अंगिरा सांगतो-"तीन वर्षांच्या आंतील शूद्र मृत असतां पांच दिवसांनीं शुद्धि होते. तीन वर्षांनंतरचा शूद्र मृत असतां बारा दिवस आशौच. सहा वर्षांच्या पुढचा शूद्र मरेल तर एक महिना त्याचें आशौच होतें, असें अंगिरसाचें सांगणें आहे." आतां जें अविवाहित शूद्राचें एक महिना आशौच शंखानें सांगितलें तें गुणवंतशूद्रविषयक आहे. निर्गुण असून अविवाहित शूद्र मृत असेल तर तीन वर्षांनंतर बारा दिवस. सहा वर्षांनंतर एक महिना. सहा वर्षांच्या पूर्वी देखील विवाह केलेला असेल तर एक महिना आशौच असें सांगतात. हें गौडमत "वयाच्या निमित्तानें उक्त आशौच सर्वांना ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांना ) समान आहे" या वचनाशीं विरोध येत असल्यामुळें आणि शिष्टांनीं निंदित असल्यामुळें ग्रहण करण्यास योग्य नाहीं, असें विज्ञानेश्वर इत्यादि ग्रंथकार सांगतात. दाक्षिणात्य शूद्रांना तसेंच ( वयोनिमित्तक सर्वांना समानच ) आहे. इतर देशांतील शूद्रांना पूर्वोक्त समजावें, असें गौड सांगतात. वर सांगितलेलें दशाहानंतर मृत असतां मातापितरांना तीन दिवस आशौच तें तसेंच कन्याविषयीं देखील समजावें. कन्या दांत उत्पन्न होण्याच्या पूर्वी मृत असतील तर आईबापास एक दिवस आशौच, असें माधव सांगतो. आतां जें विज्ञानेश्वरानें सांगितलें कीं, "दोन वर्षांच्या आंतील मृत असतां आईबाप या दोघांना आशौच, आणि प्रसूतिनिमित्तक मातेलाच आशौच" ह्या याज्ञवल्क्यवचनावरून आणि "गर्भस्थ मृत असतां मातेला दशाह आशौच, उत्पन्न झालेला मृत असतां आईबाप या दोघांना दहा दिवस, आणि नामकरण केलेला मृत असतां मातापितरांना आणि सहोदर भ्रात्यांनाही दहा दिवस आशौच" ह्या पैंगीच्या वचनांवरूनही आईबापांना आणि सहोदर भ्रात्यांनाही दहा दिवस अस्पृश्यत्वरूप आशौच, असें सांगितलें तें सांप्रतकालीं प्रचारांत नाहीं. म्हणूनच स्मृत्यर्थसारांत तें स्वीकारिलेलें नाहीं. चौलाच्या पूर्वी कन्या मृत असतां स्नान. कारण, "चूडाकर्म न केलेली कन्या मृत असतां सद्यःशौच सांगितलें आहे" असें आपस्तंबवचन आहे. हें आशौच तीन पुरुषांमध्यें समजावें. कारण, "अविवाहित कन्यांचें त्रिपुरुष सापिंड्य सांगितलें आहे" असें वसिष्ठ-

वचन आहे. हें सापिंड्य वाग्दानोत्तर समजावें, असें **गौड** सांगतात. कारण, "अविवाहित स्त्रियांचें सात पुरुष सापिंड्य आहे" असें वचन आहे.

चौलोत्तरंवाग्दानात्पूर्वंतास्वेकाहः अविशेषेणवर्णानामर्वाक्संस्कारकर्मणः त्रिरात्रात्तुभवेच्छुद्धिःकन्यास्वह्नाविधीयतइत्यं**गिरसा** त्रिरात्रविषयेह्नोविधानात् अतःशूद्रस्योपनयनस्थानीयविवाहात्पूर्वंत्रिरात्रं विवाहोत्कर्षेतुषोडशाब्दमध्येत्रिरात्रमेवेत्य**परार्काद्याः** शूद्रेतुनिर्गुणेत्र्यब्दोर्ध्वंपंचाहः षडब्दोर्ध्वंविवाहाभावेपि-द्वादशाहइति**गौडाः** सगुणानांषोडशाब्दोर्ध्वंतुविवाहाभावेपिपूर्णाशौचंवक्ष्यते तदुत्तरंप्राग्विवाहाद्भर्तृकुलेपि-तृकुलेचसप्तपुरुषावधित्रिरात्रं अवारिपूर्वंप्रत्तातुयानैवप्रतिपादिता असंस्कृतातुसाज्ञेयात्रिरात्रमुभयोःस्मृतमि-ति**मरीच्युक्तेः रत्नाकरेशुद्धितत्त्वेचशंखः** पितृवेश्मनियानारीरजःपश्यत्यसंस्कृता तस्यांमृतायांना-शौचंकदाचिदपिशाम्यति यावज्जीवमाशौचमिति**वाचस्पतिमिश्राः ।**

चौलानंतर वाग्दानाच्या पूर्वी कन्यांविषयीं एक दिवस आशौच. कारण, "सर्व वर्णांची, संस्कार करण्याच्या पूर्वी मृत असतां तीन दिवसांनीं शुद्धि आणि कन्या मृत असतां एका दिवसानें शुद्धि होते." या **अंगिरसा**च्या वचनानें त्रिरात्राविषयीं एका दिवसाचें विधान आहे. या वचनावरून, शूद्राचा उपनयनस्थानीं विवाह असल्यामुळें त्याचें विवाहाच्या पूर्वी त्रिरात्र आशौच. विवाह लांबला असतां सोळा वर्षांच्या आंत मृत असतां त्रिरात्रच आशौच, असें **अपरार्कादि**क ग्रंथकार सांगतात. निर्गुण शूद्र असेल तर तीन वर्षांनंतर पांच दिवस आशौच. सहा वर्षांनंतर विवाह नसेल तर बारा दिवस आशौच, असें गौड सांग-तात. शूद्र गुणवंत असतील तर सोळा वर्षांनंतरही विवाह नसला तरी संपूर्ण आशौच पुढें सांगूं. स्त्रियांचें वाग्दानोत्तर विवाहाच्या पूर्वी पितृकुलांत आणि पतिकुलांतही सात पुरुषांपर्यंत त्रिरात्र आशौच. कारण, "जीचें दान वाणीनें केलेलें असून उदकपूर्वक झालेलें नाहीं ती कन्या असंस्कृत ( संस्काररहित ) म्हणून समजावी. ती मृत असतां दोन्ही कुलांत त्रिरात्र आशौच सांगितलें आहे" असें **मरीचि**वचन आहे. **रत्नाकरांत** व **शुद्धितत्त्वांत शंख**-"जी स्त्री बापाच्या घरीं अविवाहित असून रजस्वला होईल ती मृत असतां तिचें आशौच कधींही शांत होत नाहीं." मातापिता जीवंत आहेत तोंपर्यंत आशौच, असें **वाचस्पतिमिश्र** सांगतात.

अथानुपनीतेकिंचिदुच्यते नाम्नःपूर्वंखननमेव तदूर्ध्वंवर्षत्रयात्पूर्वंचौलाभावेऽग्न्युदकदानविकल्पः नात्रि-वर्षस्यकर्तव्याबांधवैरुदकक्रिया जातदंतस्यवाकुर्युर्नाम्निवापिकृतेसतीति**मनूक्तेः** उदकक्रिया साहचर्याद्दाहो-पलक्षणं खननेतुनान्यदौर्ध्वदेहिकं ऊनद्विवर्षंनिखनेन्नकुर्यादुदकंततइति**याज्ञवल्क्योक्तेः** उदकमंत्यकर्म-परमित्य**परार्कः यमः** ऊनद्विवार्षिकंप्रेतंघृताक्तंनिखनेद्भुवि यमगाथांगायमानोयमसूक्तमनुस्मरन् **माध-वीयेब्राह्मेपि** स्त्रीणांतुपतितोगर्भःसद्योजातोमृतोथवा अजातदंतोमासैर्वामृतःपञ्चिर्गतैर्बहिः वस्त्राद्यैर्भूषितं कृत्वानिक्षिपेत्तंतुकाष्ठवत् खनित्वाशनकैर्भूमौसद्यःशौचंविधीयते **अलंकरण**मपिवक्ष्यते कृतचूडस्यतुत्रि-वर्षात्प्रागूर्ध्वंवाग्न्युदकदानंनियतं यत्तु**वसिष्ठः** ऊनद्विवर्षेप्रेतेगर्भपतनेवासपिंडानांत्रिरात्रमितितत्प्रथमाब्दचू-डापरं वर्षत्रयादूर्ध्वमकृतचूडस्यापिनियतम् वर्षत्रयोर्ध्वंउपनयनात्पूर्वंचतूष्णीमग्न्युदकदानम् तूष्णीमेवोदकं कुर्यात्तूष्णींसंस्कारमेवचेतिपूर्वोक्त**लौगाक्षिस्मृतेः** पिंडदानमपिकार्यम् असंस्कृतानांभूमौपिंडंदद्यात् संस्कृ-तानांकुशेष्विति**प्रचेतसोक्तेः** उदकदानंसपिंडैःकृतचूडस्येति**गौतमोक्तेः** उदकग्रहणमौर्ध्वदेहिकपरमिति **हरदत्तः** द्वादशाद्वत्सरादर्वाक्पौगंडमरणेसति सपिंडीकरणंनस्यादेकोद्दिष्टानिकारयेदिति **हरदत्तधृत-देवलोक्तेश्च मरीचिरपि** प्रेतपिंडंबहिर्दद्याद्दर्भमंत्रविवर्जितमिति एतदनुपनीतपरमिति**विज्ञानेश्वरः** अत्रचूडैवपूर्वावधिःपूर्ववाक्येषुतद्ग्रहणात् उदकग्रहणस्योपलक्षणत्वाद्दाहःपूर्वावधिरिति**केचित्** द्वादशाद्वत्स-रादित्यनुपनीतद्विजानूढशूद्रविषयं त्र्यहाशौचेपिंडदानविधिमाह**पारस्करः** प्रथमेदिवसेदेयास्त्रयःपिंडाः-समाहितैः द्वितीयेचतुरोदद्यादस्थिसंचयनंतथा त्रींस्तुदद्यात्तृतीयेह्निवस्त्रादिक्षालयेत्ततइति ।

## आतां अनुपनीताविषयीं थोडें सांगतों—

नामकरणाच्या पूर्वी मृताचें खननच करावें ( पुरावेंच ). नामकरणानंतर तीन वर्षांच्या आंत चौल झालेलें नसतां दाह व उदकदान यांचा विकल्प आहे. कारण, "तीन वर्षांच्या आंतील मृताची उदकक्रिया ( दाहादिकक्रिया ) करूं नये. अथवा दांत

उत्पन्न झालेले असून नामकरण केलेलें असेल तर करावी." असें मनुवचन आहे. खनन केलें असेल तर दुसरें त्याचें और्ध्व-देहिक कर्म नाहीं. कारण, "दोन वर्षांचे आंत मृत असेल त्याला भूमींत पुरावें, त्याला उदक देऊं नये" असें याज्ञवल्क्याचें वचन आहे. या वचनांत 'उदक' म्हणजे अंत्यकर्म समजावें, असें **अपरार्क** सांगतो. **यम**—"दोन वर्षांच्या आंतील मृत असतां यमसूक्ताचें स्मरण करून यमाची गाथा गायन करीत त्या प्रेतावर घृत घालून तें प्रेत भूमींत पुरावें." **माधवीयांत ब्राह्मांतही** "स्त्रियांचा गर्भ पतित झाला, अथवा उत्पन्न होऊन तत्काल मृत झाला किंवा दांत उत्पन्न न झालेला सहा महिन्यांचा बालक मृत झाला तर त्याला बाहेर नेऊन वस्त्रादिकांनीं भूषित करून काष्ठाप्रमाणें त्याला भूमींत पुरून सद्यःशौच ( स्नान ) करावें." त्याला अलंकारही पुढें सांगूं. चौल झालेला तीन वर्षांच्या पूर्वींचा किंवा पुढचा असला तरी त्याला दाह व उदकदान निश्चित आहे. आतां जें **वसिष्ठ**—"दोन वर्षांच्या आंतील बालक मृत असतां किंवा गर्भपात असतां सपिंडांना त्रिरात्र आशौच असें सांगतो तें पहिल्या वर्षीं चौल झालें असेल तद्विषयक आहे. तीन वर्षांनंतर चौल झालें नसलें तरी त्रिरात्र आशौच नियमित आहे. तीन वर्षांनंतर उपनयनाच्या पूर्वीं मंत्रवर्जित दाह व उदकदान करावें. कारण, "अमंत्रक उदक द्यावें व संस्कारही अमंत्रक करावा" अशी पूर्वीं सांगितलेली **लौगाक्षिस्मृति** आहे. पिंडदानही करावें. कारण "संस्कार न झालेल्यांना भूमीवर पिंड द्यावा, संस्कार झालेल्यांना कुशांवर पिंड द्यावा" असें **प्रचेतसाचें** वचन आहे. "चौलकर्म केलें असेल त्याला सपिंडांनीं ( बांधवांनीं ) उदकदान करावें." असें **गौतम**वचन आहे. येथें उदक म्हणजे और्ध्वदेहिक कर्म, असें **हरदत्त** सांगतो. आणि "बाराव्या वर्षांच्या आंत पौगंडवयामध्यें बालक मृत असतां त्याचें सपिंडीकरण होत नाहीं. एकोद्दिष्ट करावें" असें **हरदत्तानें** उक्त **देवल**वचनही आहे. **मरीचि**ही—"दर्भ व मंत्ररहित प्रेतपिंड बाहेर द्यावा" हें वचन मौंजी न झालेल्याविषयीं आहे, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. येथें म्हणजे पिंडदानाविषयीं चूडाकर्म व पहिला अवधि म्हणजे चूडकर्मानंतर पिंडदान करावें; कारण, पूर्वींच्या **गौतम**वचनांत चूडाकर्माचें ग्रहण आहे. उदकग्रहण दाहाचें उपलक्षण असल्यामुळें पिंडदानाला दाह पहिला अवधि आहे, असें **केचित्** म्हणतात. वरील देवलवचनांत 'द्वादशात् वत्सरात्' म्हणजे बारावर्षांच्या आंत, असें सांगितलें तें मौंजी न झालेले द्विज आणि अविवाहित शूद्र यांच्या विषयीं आहे. तीन दिव-सांचें आशौच असतां पिंडदानाचा विधि सांगतो—**पारस्कर**—पहिल्या दिवशीं तीन पिंड द्यावे. दुसऱ्या दिवशीं चार पिंड आणि अस्थिसंचयश्राद्ध करावें. आणि तीन पिंड तिसऱ्या दिवशीं द्यावे. नंतर वस्त्रादि क्षालन करावें."

अत्र**देवयाज्ञिक**निबंधेविशेषः शिशुरादंतजननाद्बालःस्याद्यावदाशिखः कथ्यतेसर्वशास्त्रेषुकुमारोमौंजिबंधनात आपंचवर्षात्कौमारंपौगंडोनववत्सरः तथा गर्भनष्टेक्रियानास्तिदुग्धंदेयंशिशौमृते पयःपायसंक्षीरंदद्याद्बालविपत्तितः एकादशंद्वादशाहंवृषोत्सर्गविधिंविना तथा यत्रप्रमीयतेबालस्तत्रप्रायःप्रदीयते किंचित्समानवयसांसंस्कृत्यान्नंयथाविधि भक्ष्यंभोज्यंचदातव्यंतथाचसुखभक्षिका तद्वस्त्राणिप्रदेयानिसोपानत्कानितत्समे कुमाराणांचबालानांभोजनंवस्त्रवेष्टनं यच्चोपजीवतेबालस्तत्तद्विप्रायदीयते तथा भूमिनिक्षेपणंबालेआवर्षद्वयमाशिखं ततःपरंखरश्रेष्ठदेहदाहोयथाविधि अचूडेप्यूर्ध्वंखननिवृत्त्यर्थमावर्षद्वयमिति प्रागपिकृतचूडस्यतन्निवृत्त्यर्थमाशिखमिति तथा चूडाकर्मणिसंजातेविपत्तिस्तुयदाभवेत सूतकांतेप्रकर्तव्यंवृषस्योत्सर्जनंतथा तत्रदाहःप्रकर्तव्यउदकंतत्रनिश्चितं श्राद्धानिषोडशापिस्युःसपिंडीकरणंविना इदंपंचवर्षोत्तरं जन्मतःपंचवर्षाणिभुंक्तेदत्तमसंस्कृतं पंचवर्षाधिकेबालेविपत्तिर्यदिजायते वृषोत्सर्गादिकंकर्मकर्तव्यमुदकंततः अहन्यहनि संप्राप्तेकुर्याच्छ्राद्धानिषोडश पायसेनगुडेनैवपिंडंदद्याद्यथाक्रमं उदकुंभप्रदानंचपददानानियानिच दीपदानानि यत्किंचित्पंचवर्षाधिकेसदा कर्तव्यंतुखगश्रेष्ठत्वनतार्वाक्प्रेततृप्तये स्वाहाकारेणैवकार्याण्येकोद्दिष्टानिषोडश ऋजुदर्भैस्तिलैःशुक्लैःप्राचीनावीतिनातथेपि तत्रैवोक्तेः **अत्रमूलंचिंत्यम्** वार्षिकादितुनभवत्येव सपिंडनाभावेपितृत्वायोगात् वचनाभावाच्च ।

येथें ( बालकाविषयीं ) **देवयाज्ञिक** निबंधांत विशेष सांगतो—"दंतोत्पत्तीपर्यंत बालकाला शिशु म्हणतात. तदनंतर शिखा राखणेंपर्यंत **बाल** असें म्हणतात. त्याच्यापुढें मौंजीबंधन होईपर्यंत सर्व शास्त्रांत **कुमार** असें म्हटलें आहे. पांच वर्षांपर्यंत कुमार आणि नऊ वर्षांपर्यंत पौगंड असें म्हणतात." तसेंच-गर्भ पतन झाला असतां कोणतीही क्रिया नाहीं. शिशु मृत असतां दूध द्यावें. बाल मृत असतां दूध व पायस द्यावें. एकादशाह व द्वादशाहकृत्य आणि वृषोत्सर्गविधि करूं नये." तसेंच "ज्या ठिकाणीं बाल मृत होतो त्याठिकाणीं समानवयाच्या मुलांना किंचित् अन्न संस्कार करून यथाविधि भक्ष्य-भोज्य आणि सुखभक्षिका हीं द्यावीं. त्याचीं वस्त्रें त्याचा जोडा हीं सारीं त्याच्या समान वयाच्या मुलास द्यावीं. कुमार व बाल यांना भोजन व त्याची बंडी वगैरे वस्त्रें सर्व द्यावीं. जें जें तो बालक वापरीत असेल तें तें ब्राह्मणाला द्यावें." तसेंच-दोन वर्षांच्या

आंतील व शिखाराखणेपर्यंत बालक मृत असतां त्याला भूमींत पुरावें. त्याच्या पुढें यथाविधि दाह करावा." दोन वर्षांच्या नंतर चौल झालेलें नसलें तरी खनन ( भूमींत पुरणें ) करूं नये, असें होण्यासाठीं, 'दोन वर्षांच्या आंतील असें म्हटलें आहे. दोन वर्षांच्या आंत चौल झालें असतां मृत असेल तर खनन करूं नये, असें सुचविण्याकरितां शिखाराखणेंपर्यंत असें सांगितलें आहे. तसेंच "चौल झालेलें असतां जेव्हां बालक मृत होईल तेव्हां सूतकाच्या अंतीं वृषोत्सर्ग करावा. त्याचा दाह व उदकदान निश्चयानें करावें. सपिंडीकरणावांचून षोडशमासिकें करावीं." हें सांगणें पांच वर्षांनंतरचें समजावें. कारण, जन्मापासून पांच वर्षांपर्यंत मृत असतां संस्काररहित दिलेलें अन्न भक्षण करितो. पांच वर्षांहून अधिक वयाचा बालक जर मृत असेल तर वृषोत्सर्गादिक कर्म करावें. उदकदान करावें. आणि मासिक श्राद्धांचे दिवस प्राप्त असतां षोडशमासिकें करावीं. पायसाचे व गुळाचे अनुक्रमानें पिंड द्यावे. उदकुंभ द्यावा. आणि जीं पददानें व दीपदानें सांगितलीं आहेत तीं सारीं, पांच वर्षांहून अधिक वयाचा उपनयन होण्याच्या पूर्वी मृत असतां त्याच्या तृप्तीसाठीं करावीं. तसेंच प्राचीनावीती करून ऋजु दर्भांनीं पांढऱ्या तिळांनीं स्वाहाकारमंत्रानेंच षोडश मासिकें एकोद्दिष्टें करावीं" असें तेथेंच सांगितलेलें आहे. याविषयीं मूल चिंत्य( अनुपलब्ध ) आहे. वार्षिकादिक श्राद्ध होतच नाहीं. कारण, सपिंडीकरण नसल्यामुळें पितृत्व येत नाहीं. आणि करण्याविषयीं वचनही नाहीं.

**दिवोदासीये** अव्रतेनिधनंप्राप्तेविप्रादौशूद्रजातिवत् क्रियाःसर्वाःसमुद्दिष्टाःसपिंडीकरणंविना उदकंपिंडदानंचकृतचूडेविधीयतइति स्त्रीणांतूद्वाहात्प्रागुदकपिंडदानविकल्पः स्त्रीणांचैकेप्रत्तानामिति**गौतमोक्तेः** स्त्रीशूद्राश्चसधर्माणइतिवचनाच्छूद्रेप्येवं एतद्वयोनिमित्ताशौचंसर्ववर्णसमं तुल्यंवयसिसर्वेषामतिक्रांतेतथैवचेति **व्याघ्रपादोक्तेः** यानितु निर्वृत्तचूडकेविप्रेत्रिरात्राच्छुद्धिरिष्यतेइति निवृत्तेक्षत्रियेषड्भिर्वैश्येनवभिरुच्यते शूद्रेत्रिवर्षन्यूनेतुमृतेशुद्धिस्तुपंचभिः अतऊर्ध्वंमृतेशूद्रेद्वादशाहोविधीयते षड्वर्षांतमतीतेतुशूद्रेमासमशौचकमित्यांगिरसादीनि तानिशिष्टविगानान्नादर्तव्यानीति**विज्ञानेश्वरमदनपारिजातादयः** तेनैतद्वशाच्छूद्राणांव्यवस्थाप्रागुक्ताहेयैव तुल्यंवयसिसर्वेषामितिदाक्षिणात्यपरं अन्यदेशेकौर्मोक्ताव्यवस्थेति**शुद्धितत्त्वे** ।

**दिवोदासीयांत**—"ब्राह्मणादिक उपनयन झालेलें नसून मृत असतां सपिंडीकरणावांचून इतर सर्व क्रिया शूद्रजातीप्रमाणें कराव्या. चौल झालें असेल तर उदकदान व पिंडदान करावें." स्त्रियांना तर विवाहाच्या पूर्वी उदक व पिंडदान यांचा विकल्प आहे. कारण, "अविवाहित स्त्रियांना उदक व पिंडदान करावें असें कित्येक विद्वान् सांगतात" असें **गौतम**वचन आहे. "स्त्रिया व शूद्र समानधर्मी आहेत" या वचनावरून शूद्रालाही असेंच समजावें. हें वयाच्या निमित्तानें सांगितलेलें आशौच सर्व वर्णांना ( ब्राह्मणादिकांना ) समान आहे. कारण, "वयाच्या निमित्तानें उक्त आशौच सर्वांना तुल्य आहे. तसेंच अतिक्रांत ( दशाहादि मुख्य आशौच दिवस होऊन गेल्यावर समजलेलं ) आशौचही सर्वांना समान आहे" असें **व्याघ्रपादाचें** वचन आहे. आतां जीं "चौल झालेल्या ब्राह्मणाच्या आशौचाची तीन दिवसांनीं शुद्धि होते. चौल झालेल्या क्षत्रियाची सहा दिवसांनीं आणि वैश्याची नऊ दिवसांनीं शुद्धि होते. तीन वर्षांहून कमी वयाचा शूद्र मृत असतां पांच दिवसांनीं शुद्धि, तीन वर्षांच्या पुढें शूद्र मृत असतां बारा दिवस आशौच करावें. सहा वर्षे होऊन गेलेला शूद्र मृत असतां एक महिना आशौच करावें" अशीं आंगिरसादिकांचीं वचनें तीं शिष्टांनीं निंदित असल्यामुळें अग्राह्य आहेत, असें **विज्ञानेश्वर, मदनपारिजात** इत्यादिक सांगतात. तेणेंकरून या वचनांवरून पूर्वी सांगितलेली शूद्रांची व्यवस्था त्याज्यच आहे. 'तुल्यं वयसि सर्वेषां' हें वचन दाक्षिणात्यविषयक आहे. इतर देशांत कूर्मपुराणांतील व्यवस्था समजावी, असें **शुद्धितत्त्व**ग्रंथांत आहे.

**अथजात्याशौचं** तच्च द्विजपुंसामुपनयनोर्ध्वंप्रवर्तते त्रिरात्रमाव्रतादेशाद्दशरात्रमतःपरं क्षत्रस्यद्वादशाहानिविशःपंचदशैवतु त्रिंशद्दिनानिशूद्रस्यतदर्धंन्यायवर्तिनइति**याज्ञवल्क्योक्तेः** यत्तुसएवत्रिरात्रंदशरात्रंवाशावमाशौचमिष्यतइत्याह तत्रदशाहेत्रिरात्रमस्पृश्यत्वं एकदिनोत्पन्नेआशौचद्वयेदशाहमस्पृश्यत्वं मरणंयदितुल्यंस्यान्मरणेनकथंचन अस्पृश्यंतुभवेद्गोत्रंसर्वमेवसबांधवमित्यं**गिरसोक्तेः** दशाहाशौचपरत्वेदशरात्रमतःपरमित्यनेनपौनरुक्त्यापत्तेरिति**शुद्धिविवेकादयः** स्मृतिभेदात्त्रिरात्रंदशरात्रंवेतिविकल्पायोगाच्च यस्तुपुत्राणांवेदानध्याप्यवृत्तिंविदधातितत्राह**आश्वलायनः** द्वादशरात्रंमहागुरुषुदानाध्ययनेवर्जयेरन्निति अत्रयावदुदकनिषेधोवास्पृश्यत्वमात्रंवा नतुकर्मानधिकारः एकादशाहांते**वैश्वदेवोक्तेः** एकादशा-

हिकेमुक्त्वातत्रश्चंतेविधीयतइति शुद्धितत्त्वेतु त्रयःपुरुषस्यातिगुरवोभवंति मातापिताचार्यश्चेति विष्णूक्तेः पित्रादयोमहागुरवः भर्ताप्युक्तोरामायणे पतिर्बंधुर्गतिर्भर्तादैवतंगुरुरेवच शातातपः पतिरेकोगुरुः स्त्रीणांसर्वस्याभ्यागतोगुरुः एकपदमूढानांपितृमातृनिषेधार्थं सोदकानांत्रिरात्रं त्र्यहात्तूदकदायिनइतिमनूक्तेः अग्निपुराणे सपिंडतातुपुरुषेसप्तमेविनिवर्तते समानोदकभावस्तुनिवर्तेतचतुर्दशे जन्मनामस्मृतेर्वैकेतत्परंगोत्रमुच्यते बृहस्पतिः दशाहेनसपिंडास्तुशुध्यंतिप्रेतसूतके त्रिरात्रेणसकुल्यास्तुस्नात्वाशुध्यंतिगोत्रजाः ।

## आतां ब्राह्मणादि जातीचें आशौच सांगतो—

तें जातिनिमित्तक आशौच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या पुरुषांना मौंजीबंधनानंतर प्रवृत्त होतें. कारण, "उपनयनापर्यंत तीन दिवस, उपनयनोत्तर ब्राह्मणाला दहा दिवस, क्षत्रियाला बारा दिवस, वैश्याला पंधरा दिवस, शूद्राला तीस दिवस आशौच आणि न्यायानें वागणाऱ्या शूद्राला ( वर सांगितलेल्याच्या ) अर्धें आशौच समजावें" असें याज्ञवल्क्यवचन आहे. आतां जें तोच ( याज्ञवल्क्य )-"तीन दिवस किंवा दहा दिवस मृताशौच करावें" असें सांगतो, त्यांत दहा दिवसांच्या आशौचांत तीन दिवस अस्पृश्यत्व, आणि एका दिवशीं दहा दिवसांचीं दोन आशौचें उत्पन्न असतां दहा दिवस अस्पृश्यत्व समजावें. कारण, "जर एक मरण दुसऱ्या मरणानें समान होईल ( दोन एका दिवशीं मृत होतील ) तर त्या ठिकाणीं बांधवांसहित सारे गोत्रज अस्पृश्य होतील." असें अंगिरसाचें वचन आहे. त्या याज्ञवल्क्यवचनाचा असा अर्थ न करितां हें वचन दशाहाशौचविषयक मानलें तर 'दशरात्रमतःपरं' त्या वरील याज्ञवल्क्यवचनानें पुनरुक्तिः ( पुनः सांगितलें ) हा दोष प्राप्त होईल, असें शुद्धिविवेकादिक ग्रंथकार सांगतात. स्मृतिभेदानें त्रिरात्र किंवा दशरात्र करावें, असा विकल्पही करितां येत नाहीं. कारण, स्मृति एक आहे. जो पिता पुत्रांना वेद पढवून त्यांची उपजीविका करितो, त्याविषयीं सांगतो आश्वलायन—"महागुरु मृत झाले असतां बारा दिवसपर्यंत दान व अध्ययन वर्ज्य करावें." याठिकाणीं जितकें सांगितलें तितक्याचाच ( दानाध्ययनाचाच ) बारा दिवस निषेध किंवा स्पृश्यत्वाचा निषेध समजावा. कर्माचा अनधिकार नाहीं. कारण, अकराव्या दिवशीं वैश्वदेव सांगितला आहे. 'अकराव्या दिवशीं श्राद्धांतीं वैश्वदेव सांगितला आहे' असें पूर्वी शालंकायनवचन सांगितलें आहे. शुद्धितत्त्वांत तर-"पुरुषाचे तीन अति गुरु होतात-माता, पिता आणि आचार्य" या विष्णुवचनावरून पिता इत्यादिक महागुरु आहेत. स्त्रियेला भर्ताही गुरु रामायणांत सांगितला आहे—"पति हा बंधु, गति ( शरण ), भर्ता ( पोषणकर्ता ), दैवत आणि गुरु आहे." शातातप-"स्त्रियांचा पति एकच गुरु आहे. सर्वांचा गुरु अतिथि आहे." या वचनांत 'एक' पद आहे तें विवाहित स्त्रियांचा पिता व माता गुरु नाहीं, असा समज करण्याकरितां आहे. समानोदकांना ( सातपुरुषांच्या पलीकडच्यांना ) त्रिरात्र आशौच. कारण, "समानोदक तीन दिवसांनीं शुद्ध होतात" असें मनुवचन आहे. अग्निपुराणांत—"सातव्या पुरुषाला सपिंडता ( सापिंड्य ) निवृत्त होतें. समानोदकपणा तर चवदाव्या पुरुषाला निवृत्त होतो, म्हणजे आपण धरून सात पुरुषांपर्यंत सपिंड. आठव्यापासून तेरापर्यंत समानोदक. कित्येक विद्वान् म्हणतात त्या पुरुषांचें जन्म व नांव यांचें स्मरण आहे तोंपर्यंत समानोदक समजावे, त्याच्या पुढचे गोत्रज म्हटले आहेत." बृहस्पति—"मृतसूतक असतां दहा दिवसांनीं सपिंड शुद्ध होतात. सकुल्य ( समानोदक ) तीन दिवसांनीं शुद्ध होतात. आणि गोत्रज स्नानानें शुद्ध होतात."

स्त्रीशूद्रयोस्तुविवाहोर्ध्वंजात्याशौचं वैवाहिकोविधिःस्त्रीणामौपनायनिकःस्मृतइत्युक्तेः दत्तानांभर्तुरेवहि स्वजात्युक्तमशौचंस्यान्मृतकेजातकेतथेति माधवीयेब्राह्माच्च शूद्रस्यविवाहाभावेपिषोडशवर्षोर्ध्वंमासः अनूढभार्यःशूद्रस्तुषोडशाद्वत्सरात्परं मृत्युंसमधिगच्छेच्चेन्मासात्तस्यापिबांधवाः शुद्धिंसमधिगच्छंतिनात्रकार्याविचारणेत्यपरार्केशंखोक्तेः निर्णयामृतमदनपारिजातादौत्वन्यथोक्तम् हारीतः आमौंजीबंधनाद्विप्रःक्षत्रियश्चधनुर्ग्रहात् आप्रतोदग्रहाद्वैश्यःशूद्रोवस्त्रद्वयग्रहात् धनुःप्रतोदावष्टमेब्दे द्वादशेवस्त्रद्वयमिति मेधातिथिस्तु त्रिरात्रमाव्रतादेशादित्यत्रव्रतंकालोपलक्षणार्थं सचकालःस्वकीयः सर्वेषांचाष्टमवर्षरूपः तेनचतुर्णामपिवर्णानामुपनयनाभावेप्यष्टमादूर्ध्वंपूर्णमेवाशौचं तत्रापिप्रागष्टमाच्छिशवःप्रोक्ताइति स्मृत्यंतरादूर्ध्वंसंपूर्णमर्वाक्त्रिरात्रं येप्याषोडशाद्भवेद्बालइत्याहुः तेषामप्यष्टमादूर्ध्वंशूद्रेमासएव ऊर्ध्वमष्टभ्योवर्षेभ्यःशुद्धिःशूद्रस्यमासिकीतिवचनादित्याह हारलताशुद्धितत्त्वादिगौडग्रंथेष्वप्युक्तं अनुपनीतो-

**विप्रइत्युक्त्वा** म्रियतेयत्रतत्रस्यादाशौचंत्र्यहमेवहीति द्विजन्मनामयंकालस्त्रयाणांतुषडाब्दिकइत्यादि**पुराणो-क्ते**रुपनयनंकालोपलक्षणं षडब्दपदंमासत्रयाधिकपरं गर्भाष्टमेष्टमेवाब्दइत्युक्तेः यत्तु**जाबालः** व्रतचूडा-द्विजानांचप्रतीतिषुयथाक्रमं दशाहत्र्यहएकाहैः शुध्यंत्यपिहिनिर्गुणाइति द्विजादंताः इदंप्रतीतिष्वित्युक्तेःपं-चाब्दोपनीतपरमिति तदेतन्नाद्रियंते**वृद्धाः** ।

स्त्रिया व शूद्र यांना तर विवाहोत्तर हें जातीचें आशौच आहे. कारण, स्त्रियांना उपनयनस्थानीं विवाहविधि सांगितला आहे." असें वचन आहे. आणि "विवाहित स्त्रियांना भर्त्याचेच जातीला सांगितलेलें आशौच मृतकाविषयीं व उत्पत्तीविषयीं समजावें." असें **माधवीयांत ब्राह्म**वचनही आहे. शूद्राचा विवाह झाला नसला तरी सोळा वर्षांनंतर एक महिना आशौच. कारण, अविवाहित शूद्र जर सोळा वर्षांनंतर मरेल तर त्याचेही बांधव एका महिन्यानें शुद्ध होतात, याविषयीं संशय नाहीं." असें **अपरार्कांत शंख**वचन आहे. **निर्णयामृत, मदनरत्न, पारिजात** इत्यादिकांत तर निराळें सांगितलें आहे. तें असें-**हारीत**-"मौंजीबंधनानें ब्राह्मण, धनुष्यग्रहणानें क्षत्रिय, चाबूकग्रहणानें वैश्य, दोन वस्त्रें ग्रहणानें शूद्र हे संस्कृत होतात. धनुष्यग्रहण व चाबूकग्रहण आठव्या वर्षीं होतें. आणि शूद्रानें दोन वस्त्रें ग्रहण करणें तीं बाराव्या वर्षीं करावीं." यावरून तें तें ग्रहण केल्यावर पूर्ण आशौच. **मेधातिथि** तर-'त्रिरात्रमाव्रतादेशात्' ह्यावरील याज्ञवल्क्यवचनांतील 'व्रत' शब्दानें व्रताचा ( उपनयनाचा ) काल घ्यावा. तो काल सर्वांचा ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचा ) आठवें वर्ष होय. तेणेंकरून चारही वर्णांचें उपनयन झालें नसलें तरी आठव्या वर्षांनंतर मृत असतां संपूर्णच आशौच आहे. त्यांतही "आठव्या वर्षाच्या पूर्वी शिशु म्हटले आहेत" ह्या इतर स्मृतीवरून आठव्या वर्षांनंतर संपूर्ण आशौच व त्याच्या पूर्वी मृत असतां त्रिरात्र आशौच. जे कोणी सोळा वर्षेपर्यंत बाल असें म्हणतात त्यांच्या मतीं देखील आठव्या वर्षांनंतर शूद्राचें एक महिनाच आशौच. कारण, "आठ वर्षांनंतर मृत शूद्राची एकामहिन्यानें शुद्धि होते" असें वचन आहे, असें सांगतो. **हारलता-शुद्धितत्त्व** इत्यादि गौड ग्रंथांतही सांगितलें आहे कीं उपनयन न झालेला ब्राह्मण असें सांगून "जेथें ( ज्या कुलांत ) मरेल तेथें तीन दिवस आशौच. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तिघांचा हा सहा वर्षांपर्यंत तीन दिवस आशौचाचा काल आहे." ह्या **आदिपुराण**वचनावरून उपनयन म्हणजे उपनयनाचा काल समजावयाचा आहे. सहा वर्षें म्हणजे सहा वर्षें अधिक तीन महिने समजावें. कारण, "उपनयन गर्भापासून आठव्या वर्षी किंवा जन्मापासून आठव्या वर्षी असें सांगितलें आहे. आतां जें **जाबालि**—"उपनयनाची प्रतीति ( ज्ञान ) असतां मृत असेल तर दहा दिवसांनीं, चौलाची प्रतीति असतां मृत असेल तर तीन दिवसांनीं आणि दंतांची प्रतीति असतां मृत असेल तर एका दिवसानें निर्गुण असेल तरी शुद्ध होतात." प्रतीति( ज्ञान ) असतां असें म्हटलें आहे म्हणून हें वचन पांच वर्षांचा उपनयन झालेला असेल तद्विषयक आहे, असें सांगितलें आहे, तें **वृद्ध** स्वीकारीत नाहींत.

यानितु **पराशरः** एकाहाद्ब्राह्मणःशुध्येद्योग्निवेदसमन्वितः त्र्यहात्केवलवेदस्तुद्विहीनोदशभिर्दिनैः केवलवेदःकेवलश्रौताग्नेरप्युपलक्षणं अयंसंकोचोहोमाध्ययनपरएव नतुसंध्यादावितिहारलतायांअं-गिराः सर्वेषामेववर्णानांसूतकेमृतकेतथा दशाहाच्छुद्धिरेतेषामितिशातातपोब्रवीत् **देवलः** आशुच्यंदश-रात्रंतुसर्वेषामपरेविदुः निधनेप्रसवेचैवपश्यंतःकर्मणःक्षयं अत्यंतोत्कृष्टस्यकर्महानोपीडावतोविप्रपरिचर्या-परशूद्रस्यदशरात्रमिति**हारलतायां दक्षः** सद्यःशौचंतथैकाहस्त्र्यहश्चतुरहस्तथा षड्दशद्वादशाहश्चपक्षो-मासस्तथैवच मरणांतंतथाचान्यद्दशपक्षास्तुसूतके **मिताक्षरायांस्मृत्यंतरे** चतुर्थेदशरात्रंस्यात्षण्नि-शाःपुंसिपंचमे षष्ठेचतुरहाच्छुद्धिःसप्तमेत्वहरेवतु इत्यादीनितान्यापदनापद्गुणवद्गुणवद्विषयाणि देशांतर-भेदाद्वाज्ञेयानि सद्यःशौचादिषडहांताःपक्षायायावरादिपराः अत्रमरणांतंजननादिनिमित्ताद्भिन्नम् शिष्टवि-गानाभ्नादर्तव्यानीति**विज्ञानेश्वरः** अस्नात्वाचाप्यहुत्वाचअदत्त्वाश्नंस्तथाद्विजः एवंविधस्यविप्रस्यसर्वदा-सूतकंभवेदिति**दक्षोक्त्या** अन्यपूर्वायस्यगेहेभार्यास्यात्तस्यनित्यशः आशौचंसर्वकार्येषुदेहेभवतिसर्वदेति **ब्राह्मादिवशाद्व्यवस्थेत्यपरार्कमदनपारिजातादयः** ।

आतां जीं वचनें **पराशर**—"जो ब्राह्मण अग्नि ( श्रौताग्नि व स्मार्ताग्नि ) आणि वेद यांनीं युक्त असेल तो एका दिवसानें शुद्ध होईल. केवळ वेदानें युक्त असेल तो तीन दिवसांनीं शुद्ध होईल. आणि जो अग्नि व वेद यांनीं रहित तो दहा दिवसांनीं शुद्ध होईल." या वचनांत 'केवल वेद' या शब्दानें उपलक्षणेंकरून केवळ श्रौताग्निही घ्यावा. हा आशौचाचा संकोच होम व

---

१ 'सप्तमेतु दिनत्रयात्' असें पाठांतर आहे.

अध्ययन यांविषयींच आहे. संध्यादिकर्माविषयीं नाहीं, असें **हारलतेंत** सांगितलें आहे. **अंगिरा**—"ब्राह्मणादि चारही वर्णांचें सूतक ( जननाशौच ) व मृताशौच असतां त्यांची दहा दिवसांनीं शुद्धि होते, असें **शातातप** सांगतो." **देवल**—"जनन तसेंच मरण असतां अवश्य कर्माचा क्षय होत आहे असें पाहणारे इतर विद्वान् ब्राह्मणादि चारही वर्णांना दहा दिवस आशौच सांगतात." शूद्राला दहा दिवस आशौच सांगितलें हें अत्यंत उत्कृष्ट असून कर्माची हानि झाली असतां दुःख पावणारा असा ब्राह्मणाची सेवा करणारा जो शूद्र त्याविषयीं समजावें, असें **हारलतेंत** सांगितलें आहे. **दक्ष**—"सद्यः- शौच, एक दिवस, तीन दिवस, चार दिवस, सहा दिवस, दहा दिवस, बारा दिवस, पंधरा दिवस, एक महिना आणि मरण- पर्यंत असे आशौचाचे दहा पक्ष आहेत." **मिताक्षरेंत इतर स्मृतींत**—"चवथ्या पुरुषाला दहा दिवस, पांचव्या पुरुषाला सहा दिवस, सहाव्या पुरुषाला चार दिवस, आणि सातव्या पुरुषाला एकच दिवस आशौच." इत्यादिक वचनें आहेत, तीं आपत्ति, आपत्ति नसणें, गुणवंत, निर्गुणी, यांच्याविषयीं समजावीं. अथवा देशांतरभेदानें जाणावीं. सद्यःशौच आरंभ करून सहा दिवस आशौच यापर्यंत जे पांच पक्ष आशौचाचे सांगितले ते यायावर[1] इत्यादिकांविषयीं आहेत. एथें मरणांत आशौच सांगितलें हें जननादि आशौचव्यतिरिक्त आहे. अशीं वरील वचनें तीं शिष्टांनीं निंदित असल्यामुळें स्वीकारूं नयेत, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. "स्नान केल्यावांचून, होम केल्यावांचून व दान दिल्यावांचून भोजन करणारा असा जो ब्राह्मण त्याला सर्वदा सूतक असतें" या **दक्ष**वचनानें; आणि "पुनर्विवाह झालेली पत्नी ज्याच्या घरांत असेल त्याला सर्व कार्यामध्यें नित्य आशौच व त्याच्या देहाला सर्वदा आशौच" या ब्राह्मादि वचनावरून मरणांत आशौचाची व्यवस्था समजावी, असें **अपरार्क, मदनपारिजात** इत्यादिक सांगतात.

**माधवस्तु** वृत्तस्वाध्यायसापेक्षमघसंकोचनंतथेतिकलिवर्ज्येषूक्तेः दशाहएवविप्रस्यसपिंडमरणेसति कल्पांतराणिकुर्वाणःकलौभवतिकिल्बिषीति**हारीतो**क्तेश्च न्यूनाशौचपक्षायुगांतरविषयाः मरणांतादिप- क्षास्तुनिंदार्थवादः अन्यथा नामधारकविप्रस्तुदशाहंसूतकीभवेदितिविरोधःस्यादित्याह यत्तु**देवलः** दशा- हादित्रिभागेनकृतेसंचयनेक्रमात् अंगस्पर्शनमिच्छंतिवर्णानांतत्त्वदर्शिनइति पूर्णाशौचेस्पृश्यतामाह यच्चानु- पनीतातिक्रांताशौचेत्रिरात्रादौ**तेनैवोक्तं** स्वाशौचकालाद्विज्ञेयंस्पर्शनंतुत्रिभागतइति तदपियुगांतरेषु अस्थि- संचयनादूर्ध्वमंगस्पर्शनमेवचेति**माधवीये**कलौतन्निषेधात् यत्तु**हारलतायां** चतुर्थेहनिकर्तव्यःसंस्पर्शो ब्राह्मणस्यत्विति**प्रचेतसो**क्तेर्त्र्यहैकाहाशौचेपिचतुर्थाहएवांगस्पर्शइति तन्न देवलादिवशेनास्यदशाहगोचर- त्वात् येतुवर्णसंकरजामूर्धावसिक्ताद्यास्तेषामाशौचविशेषःकलौनोपयुक्तइतिनोच्यते प्रतिलोमजानांनाशौचं मलापकर्षणार्थंतुस्नानमात्रमिति**विज्ञानेश्वरः माधवस्तु** शौचाशौचेप्रकुर्वीरन्शूद्रवर्णस्यसंकराइति **ब्राह्मो**क्तेःशूद्रवदाह **हारलतायाम**प्येवम् ।

**माधव** तर—"विहित कर्मानुष्ठान व वेदाध्ययन यांच्या योगानें आशौचाचा संकोच करणें हें कलींत निषिद्ध आहे" असें कलिवर्ज्यांत सांगितल्यामुळें; आणि "सपिंड मृत असतां ब्राह्मणाला दहा दिवसच आशौच आहे. इतर पक्ष करणारा कलियुगांत दोषी होतो" या **हारीत**वचनावरूनही दहा दिवसांपेक्षां न्यून आशौचाचे जे पक्ष सांगितले ते इतर युगांविषयीं आहेत. कलियुगांत नाहींत. मरणांतादि पक्ष सांगितला तो निंदारूप अर्थवाद आहे. असें न म्हटलें तर "नामधारक ( अर्थात् ब्रह्मकर्मरहित ) ब्राह्मणानें दहा दिवस सूतक धरावें" या वचनाचा विरोध येईल, असें सांगतो. आतां जें **देवल**—"दशाहादिक आशौचाचे तीन भाग करून तिसरा भाग होऊन गेल्यावर अस्थिसंचयन झालें असतां तत्त्वद्रष्टे विद्वान् त्या आशौचवाल्यांचा अंगस्पर्श इच्छितात" असें पूर्ण आशौच असतां स्पृश्यत्व सांगतो आणि जें अनुपनीताचे व अतिक्रांताचे त्रिरात्रादिक आशौचाविषयीं **त्यानेंच** ( देवलानें ) सांगितलें कीं, "आपल्या आशौचकालाचे तीन भाग करून तिसरा भाग गेल्यावर स्पर्श करावा" असें, तेंही कलीवांचून इतर युगांत समजावें. कारण, "अस्थिसंचयनानंतर अंगस्पर्श निषिद्ध आहे" या वचनानें **माधवीयांत** कलियुगांत त्याचा ( स्पर्शाचा ) निषेध केला आहे. आतां जें **हारलतेंत**—"चवथ्या दिवशीं ब्राह्मणाचा स्पर्श करावा" या **प्रचेतसाचे** वचनावरून तीन दिवसांचें व एका दिवसाचें आशौच असलें तरी चवथ्या दिवशींच अंगस्पर्श करावा, असें सांगितलें आहे. तें बरोबर नाहीं. कारण, वरील देवलादि वचनानुरोधानें हें प्रचेतसाचें वचन दशाहाशौचविषयक इतर युगांत आहे. जे वर्णसंकरापासून उत्पन्न झालेले मूर्धावसिक्त इत्यादिक त्यांना विशेष आशौच कलियुगांत उपयुक्त नसल्यामुळें येथें सांगत नाहीं. प्रतिलोमज जे ( उत्तम वर्णाची स्त्री व कनिष्ठ वर्णाचा पुरुष यांपासून उत्पन्न ) त्यांना आशौच नाहीं. मळ जाण्याकरितां स्नान मात्र आहे, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. **माधव** तर—"संकर

---

१ प्रतिदिवशीं धान्याची याचना करून निर्वाह करणारा अग्निहोत्री तो यायावर.

जातीचे मनुष्यांनीं शौच व आशौच हें शूद्रांस सांगितलेलें करावें" या ब्राह्मवचनावरून शूद्रप्रमाणें सांगतो. हारलतेंतही असेंच आहे.

दत्तक्रीतकृत्रिमादिपुत्रेषु अहीनवर्णगासुस्त्रीषुचसपिंडत्वेपि प्रसवेमरणेचपूर्वापरपित्रोर्भर्तुश्चत्रिरात्रमेव नदशाहादि अनौरसेषुपुत्रेषुजातेषुचमृतेषुच परपूर्वासुभार्यासुप्रसूतासुमृतासुचेतित्रिरात्रानुवृत्तौ **विष्णूक्तेः** सपिंडानांत्वेकाहः परपूर्वासुभार्यासुपुत्रेषुकृतकेषुच भर्तृपित्रोस्त्रिरात्रंस्यादेकाहस्तुसपिंडतइति **माधवीये-हारीतोक्तेः** सूतकेमृतकेचैवत्रिरात्रंपरपूर्वयोः एकाहस्तुसपिंडानांत्रिरात्रंयत्रवैपितुरिति **मरीच्युक्तेश्च** **शंखः** अनौरसेषुपुत्रेषुभार्यास्वन्यगतासुच परपूर्वासुचस्त्रीषुत्रिरात्राच्छुद्धिरिष्यते परपूर्वापुनर्भूः इदंसवर्णासु हीनवर्णासुतु **शंखलिखितौ** परपूर्वासुभार्यासुपुत्रेषुकृतकेषुच नानध्यायोभवेत्तस्यनाशौचंनोदकक्रिया **ब्राह्मेपि** आशौचंतुत्रिरात्रंस्यात्समवर्णेषुनिश्चितं यत्तु **षडशीतौ** अन्यपूर्वावरुद्धासुत्रिदिनाच्छुद्धिरिष्यते तास्वेवानन्यपूर्वासुपंचाहोभिर्विशुध्यतीति तत्रपंचाहेमूलंचिंत्यम् यत्तु **याज्ञवल्क्यः** अनौरसेषुपुत्रेषुभार्यास्वन्यगतासुचेत्येकाहमाह तदसन्निधौज्ञेयम् यदापितुरेकाहस्तदासपिंडानांस्नानं अन्याश्रितेषुदारेषुपरपत्नीसुतेषुच गोत्रिणःस्नानशुद्धाःस्युस्त्रिरात्रेणैवतत्पितेति **प्रजापत्युक्तेः** पितेतिवोढुरुपलक्षणं तथोपक्रमात् यत्तुदत्तकेपालकप्रतियोगिकपुत्रत्वात्पूर्वपितुर्नत्रिरात्रं पूर्वसंबंधनिवृत्तेश्चनदशाहादीतिकश्चित् तन्न जनकेपि बैजिकादभिसंबंधादनुरुंध्यादघंत्र्यहमितिवाचनिकाशौचस्यानिवार्यत्वात् ।

दत्तक, क्रीत ( विकत घेतलेला ), कृत्रिम इत्यादिक पुत्र; हीन वर्णाशीं न जाणाऱ्या अशा स्त्रिया; यांचें सापिंड्य असतांही यांच्या ठिकाणीं जनन व मरण झालें असतां पहिल्या व दुसऱ्या मातापितरांना आणि पतीला तीन दिवसच आशौच. दशाहादिक नाहीं. कारण, "औरसावांचून इतर पुत्रांचे ठायीं उत्पत्ति व मरण असतां, पूर्वीं एकाच्या असून नंतर दुसऱ्याच्या झालेल्या स्त्रिया त्या प्रसूत किंवा मृत झाल्या असतां त्रिरात्र आशौच." असें **विष्णु**वचन आहे. सपिंडांना तर एक दिवस आशौच. कारण, "पूर्वीं एकाच्या असून नंतर दुसऱ्याच्या झालेल्या स्त्रिया, कृतक (केलेले) पुत्र यांच्या ठिकाणीं जनन किंवा मरण असतां पती व आईबाप यांना तीन दिवस आणि सपिंडांना एकदिवस आशौच" असें **माधवीयांत हारीत**वचन आहे. आणि "जनन व मरण असतां पूर्वीच्यांना व पुढच्यांना तीन दिवस आशौच. जेथें पित्याला तीन दिवस तेथें सपिंडांना एक दिवस आशौच." असें **मरीचि**वचनही आहे. **शंख**—"औरसभिन्न पुत्र, व्यभिचारिणी स्त्रिया, आणि परपूर्वा ( पुनर्विवाहित ) अशा स्त्रिया यांच्या ठिकाणीं जनन किंवा मरण असतां तीन दिवसांनीं शुद्धि होते." हें वचन आपल्या समान वर्णाच्या स्त्रियांविषयीं आहे. हीन वर्णाच्या स्त्रियांविषयींतर सांगतात—**शंख** व **लिखित**—"परपूर्वा भार्या ( कमी जातीच्या दुसऱ्याच्या स्त्रिया आपण ठेवलेल्या ), आणि पुत्र नसून पुत्रासारखे केलेले यांच्या ठिकाणीं जनन किंवा मरण असतां वेदाध्ययनाला अनध्याय होत नाहीं. त्याचें आशौच नाहीं व उदकदानक्रियाही नाहीं." **ब्राह्मांत**ही—"समान वर्णाचे ठायीं तीन दिवस आशौच निश्चित आहे." आतां जें **षडशीतींत**—"ज्यांचा पूर्वीं अन्य पति होता त्या स्त्रिया आपण अवरोधून ठेवल्या असतां त्यांत जनन किंवा मरण असेल तर तीन दिवसांनीं शुद्धि होते. ज्यांचा पूर्वीं अन्यपति नाहीं अशा स्त्रिया आपण अवरोधून ठेवल्या असून त्यांत जनन व मरण असेल तर पांच दिवसांनीं शुद्धि होते." या वचनांत पांच दिवसांविषयीं मूल चिंत्य (अनुपलब्ध) आहे. आतां जें **याज्ञवल्क्य**—"औरसभिन्न पुत्र, परगामिनी भार्या, यांचे ठिकाणीं जनन व मरण असतां एकदिवस आशौच" असें सांगतो तें संनिध नसतां समजावें. जेव्हां पित्याला व पतीला एक दिवस सांगितलें तेव्हां सपिंडांना स्नान समजावें. संनिध असतां पित्याला व पतीला तीन दिवस. कारण, "परगामिनी स्त्रिया, दुसऱ्यांच्या पत्नीचे पुत्र यांचे ठिकाणीं जनन व मरण असतां गोत्रज स्नानशुद्ध होतात, व पिता आणि पति हे तीन दिवसांनींच शुद्ध होतात" असें **प्रजापति**वचन आहे. वचनांत 'पिता' या शब्दानें पतीही घ्यावा. कारण, दोघांचा उपक्रम आहे. आतां जें 'दत्तक हा पालक पित्याचा पुत्र असल्यामुळें पहिल्या ( जनक ) पित्याला त्याचें तीन दिवस आशौच नाहीं. आणि पहिला संबंध निवृत्त ( सुटला ) असल्यामुळें दहा दिवस वगैरे नाहीं' असें कोणी म्हणतो, तें बरोबर नाहीं. कारण, जनक पित्याला देखील "बीजसंबंध असल्यामुळें तीन दिवस अघ ( आशौच ) होईल" या मनुवचनानें प्राप्त झालेल्या आशौचाचें निवारण होणार नाहीं.

पितृमरणेपिदत्तकादीनांत्रिरात्रं **शुद्धितत्त्वेब्राह्मे** दत्तकश्चस्वयंदत्तःकृत्रिमःक्रीतएवचेत्युपक्रम्य सूतकेमृतकेचैवत्र्यहाशौचस्यभागिनइत्युक्तेः **स्मृतिकौमुद्यांहारलतायामप्येवं** दत्तकस्यपुत्रपौत्राणां

जननेमरणेवासपिंडानामेकाहः **बीजिनश्चेतिगौतमेन**साप्तपौरुषसापिंड्योक्तेः सपिंडानांचैकाहस्योक्तत्वात् सपिंडेतुपुत्रीकृतेदशाहएव तत्राकांक्षाभावात् सपिंडत्वेनदशाहप्राबल्याच पूर्वापरभर्तुरुत्पन्नयोःपुत्रयोस्त्वा-ह**माधवीयेमरीचिः** मातुरैक्याद्विपितृकौभ्रातरावन्यगोत्रजौ एकाहंसूतकेतत्रत्रिरात्रंमृतकेतयोरितिदिक्।

पिता मेला तरी दत्तक इत्यादि पुत्रांना तीन दिवस आशौच. कारण, **शुद्धितत्त्वांत ब्राह्मांत** "दत्तक, आपण होऊन दिलेला, कृत्रिम पुत्र, विकत घेतलेला" असा उपक्रम करून सांगतो–"जनन व मरण असतां हे पुत्र तीन दिवस आशौचाचे भागी आहेत" असें सांगितलें आहे. **स्मृतिकौमुदींत हारलतेंत**ही असेंच आहे. दत्तकाच्या पुत्रपौत्रांचें जनम किंवा मरण असतां सपिंडांना एक दिवस आशौच. कारण, दत्तकाचे बीजी ( जनक ) कुलामध्येंही सात पुरुषपर्यंत सापिंड्य **गौतमानें** सांगितलें आहे व सपिंडांना एक दिवस आशौच वर सांगितलें आहे. सपिंडांतला दत्तक इत्यादि पुत्र असेल तर त्याचें दहा दिवसच आशौच. कारण, तो सपिंड असल्यामुळें त्याविषयीं किती आशौच अशी आकांक्षा होत नाहीं. आणि वरील वचनांनीं तीन दिवस इत्यादि आशौच प्राप्त झालें तरी सपिंड म्हणून दशाह आशौच जें सांगितलें तें त्या त्र्यहादि आशौचापेक्षां प्रबलही आहे. पहिल्या व दुसऱ्या भर्त्यापासून उत्पन्न पुत्रांना सांगतो **माधवीयांत मरीचि**–"माता एक असतां तिच्या ठिकाणीं भिन्न गोत्री अशा दोन पुरुषांपासून उत्पन्न दोन पुत्र ते परस्पर भ्राते होतात. त्यांमध्यें जनन असतां एक दिवस आणि मरण असतां तीन दिवस परस्पर आशौच समजावें." ही दिशा समजावी.

ऊढकन्यानांतु**विष्णुराह** संस्कृतासुस्त्रीषुनाशौचंपितृपक्षे तत्प्रसवमरणेचेत्पितृगृहेस्यातांतदैकरात्रंत्रि-रात्रंचेति प्रसवेएकरात्रंमरणेत्रिरात्रमिति**विज्ञानेश्वरापरार्कौ माधवस्तु** प्रसवेपित्रिरात्रंपित्रोः एक-रात्रंभ्रात्रादिबंधुवर्गस्य दत्तानारीपितुर्गेहेसूयेताथम्रियेतवा तद्बंधुवर्गस्त्वेकेनशुचिस्तज्जनकस्त्रिभिरिति**ब्राह्मो-क्ते**रित्याह यत्तु**कश्चिदाह** पक्षपदेनभ्रातरोगृह्यंते वाक्यांतरेणभगिनीमृतौत्रिरात्रोक्तेरिति त**च्चिंत्यम्** तदभावादेतद्विरोधाच्च भ्रातुःप्रसवेएकाहः मृतौत्रिरात्रमिति**केचित्** युक्तातुपक्षिणी परस्परंमृतौभ्रातृभ-गिन्योःपक्षिणीभवेदिति**ब्राह्मात्** भ्रातृभिन्नानामेकाहः वर्गोक्तेः इतरेषांतुयथाविधीतिवक्ष्यमाणवचनाच्च यत्तुप्रधानगृहेमृतौपित्रोःपूर्णंभ्रातुस्त्र्यहइतिकश्चित् सनिर्मूलत्वान्नाशौचंपितृपक्षेइत्येतद्विरोधाच्च**भ्रांतः** दत्ता-नारीपितुर्गेहेप्रधानेसूयतेयदा म्रियतेवानदातस्याःपिताशुध्येत्त्रिभिर्दिनैरिति**कल्पतरौशुद्धितत्त्वेच** पति-गृहेप्रसवेतुपित्रादीनामाशौचंनास्ति मृतौपित्रोस्त्रिरात्रमस्त्येव प्रत्ताप्रत्तासुयोषित्सुसंस्कृतासंस्कृतासुच माता-पित्रोस्त्रिरात्रंस्यादितरेषांयथाविधि अजातदंतासुपित्रोरेकरात्रमिति**माधवीये शंखकार्ष्णाजिनि-स्मृतेः** बैजिकादभिसंबंधादित्युक्तेश्च **स्मृत्यर्थसारेप्येवं**।

विवाहित कन्यांचें तर **विष्णु** सांगतो–"विवाहित स्त्रियांचें आशौच पितृपक्षांत ( पितृकुलांत ) नाहीं. त्या विवाहित कन्या बापाच्या घरीं प्रसूत किंवा मृत होतील तर एक दिवस आणि तीन दिवस आशौच होतें." प्रसूत असतां एक दिवस आणि मृत असतां तीन दिवस, असें **विज्ञानेश्वर व अपरार्क** सांगतात. **माधव** तर–प्रसूत असतांही आईबापांस तीन दिवस आणि भ्राता इत्यादि बंधुवर्गाला एक दिवस. कारण, "विवाहित कन्या पित्याच्या घरांत प्रसूत होईल किंवा मरेल तर तिचा बंधुवर्ग एका दिवसानें व तिचा बाप तीन दिवसांनीं शुद्ध होतो" असें **ब्राह्म**वचन आहे, असें सांगतो. आतां जें कोणी एक सांगतो कीं, 'विष्णुवचनांतील 'पितृपक्षे' या पदानें भ्राते घ्यावे, अर्थात् भ्रात्यांना त्रिरात्र समजावें. कारण, इतर वाक्यानें भगिनी मृत असतां त्रिरात्र सांगितलें आहे' तें चिंत्य ( अयुक्त ) आहे. कारण, इतर वाक्यानें त्रिरात्र म्हणतो तें इतर वाक्य नाहीं. आणि त्या **ब्राह्म**वचनाशीं विरोधही येतो. पित्याच्या घरीं प्रसूत असेल तर भ्रात्याला एक दिवस, आणि मृत असेल तर तीन दिवस, असें **केचित्** म्हणतात. परंतु पक्षिणी युक्त आहे. कारण, "भ्राता व भगिनी मृत असतां परस्प-रांला पक्षिणी आशौच होतें" असें **ब्राह्म**वचन आहे. भ्रात्याहून इतरांना एक दिवस आशौच. कारण, वरील ब्राह्मवचनांत बंधुवर्ग एक दिवसानें शुद्ध होतो, असें म्हटलें आहे. आणि माता व पिता यावांचून इतरांला यथाविधि म्हणजे जसें सांगितलें असेल तसें आशौच, असें पुढें सांगावयाचें वचनही आहे. आतां जें–बापाच्या मुख्य घरीं कन्या मृत असतां आईबापांना पूर्ण ( दहा दिवस ) आशौच. आणि भ्रात्याला तीन दिवस, असें कोणीएक सांगतो, त्याचें तें सांगणें निर्मूल असल्यामुळें व 'नाशौचं पितृपक्षे' या वरील विष्णुवचनाशीं विरोधही येत असल्यामुळें तो भ्रांतिष्ठ झाला, असें समजावें. "दिलेली कन्या पित्याच्या मुख्य घरीं जेव्हां प्रसूत होईल किंवा मरेल तेव्हां तिचा पिता तीन दिवसांनीं शुद्ध होईल" असें **कल्पतरूंत व शुद्धितत्त्वांत**ही आहे. कन्या पतीच्या घरीं प्रसूत असतां पिता इत्यादिकांना आशौच नाहीं. मृत असेल तर तीन दिवस

आशौच आहेच. कारण, "दिलेल्या व न दिलेल्या, संस्कार केलेल्या व संस्काररहित अशा कन्या मृत असतां आईबापांना तीन दिवस व इतरांना यथाविधि ( जसें उक्त असेल तसें ) आशौच समजावें. ज्यांना दंत उत्पन्न झाले नाहींत त्यांचें आई-बापाला एकदिवस आशौच" असें **माधवीयांत शंख** व **कार्ष्णाजिनि**स्मृतिवचन आहे. आणि "बीजसंबंध असल्यामुळें तीन दिवस" असें मनुवचनही उक्त आहे. **स्मृत्यर्थसारांत**ही असेंच आहे.

**माधवस्तु**इदंत्रिरात्रंजातदंतपरम् दंतोत्पत्तेःप्रागेकरात्रंपित्रोः सद्यस्त्वप्रौढकन्यायांप्रौढायांवासरा-च्छुचिः प्रदत्तायांत्रिरात्रेणदत्तायांपक्षिणीभवेदितिपु**लस्त्योक्ते**रन्यत्रकन्यामृतौपित्रोःपक्षिणीत्याह **षड-शीतावपि** पितृगेहादितोन्यत्रयदिपुत्रीप्रमीयते पक्षिणीतत्रपित्रोःस्यान्नान्येपामितिनिश्चयइति ग्रामांतरेइ-यमिति**स्मृत्यर्थसारे** भ्रातुस्तुपक्षिणी श्वशुरयोर्भगिन्यांचमातुलान्यांचमातुले पित्रोःस्वसरितद्वच्चपक्षिणीं-क्षपयेन्निशामिति **वृद्धबृहस्पतिस्मृतेः शुद्धितत्त्वेकौर्मे** आदंतात्सोदरेसद्यआचूडादेकरात्रकम् आप्र-दानात्त्रिरात्रंस्याद्दशरात्रमतःपरं पित्रोर्मृतौस्त्रीणांत्रिरात्रं पित्रोरुपरमेस्त्रीणामूढानांतुकथंभवेत् त्रिरात्रेणैवशु-द्धिःस्यादित्याहभगवान्यमइति**माधवीयेवृद्धमनूक्तेः** इदंदशाहांतः ऊर्ध्वंतुपक्षिणी भ्रातुर्भगिनीगृहेत-स्यावातद्गृहेमृतौत्रिरात्रमन्यत्रतुपक्षिणीतिषडशीतावुक्तं **ब्राह्मेपि** परस्परमृतौभ्रातृभगिन्योःपक्षिणीभवेत् मातुलाशौचवत्पुत्र्याःपितृव्याशौचमिष्यतइति **शिष्टास्त्व**स्यनिर्मूलत्वात्पितृव्येस्नानमात्रमाहुः ।

**माधव** तर-हें तीन दिवस आशौच दांत उत्पन्न झालेल्या कन्यांविषयीं आहे. दांत उत्पन्न होण्याच्या पूर्वी आईबापांना एक दिवस. कारण, "अप्रौढ ( लहान ) कन्येविषयीं सद्यःशौच, प्रौढ असेल तर एक दिवसानें शुद्धि, दांत उत्पन्न झालेली असेल तर तीन दिवसांनीं शुद्धि, आणि दिलेली असेल तर पक्षिणी आशौच होतें." ह्या **पुलस्त्य**वचनावरून पित्याच्या घरावांचून इतर ठिकाणीं कन्या मृत असतां आईबापांला पक्षिणी आशौच, असें सांगतो. **षडशीतींत**ही-"बापाच्या घरा-वांचून इतर ठिकाणीं जर कन्या मृत होईल तर आईबापांना पक्षिणी आशौच. इतरांना नाहीं, असा निश्चय आहे." ही पक्षिणी अन्यगांवीं मृत असतां समजावी, असें **स्मृत्यर्थसारांत** आहे. भ्रात्याला तर पक्षिणी. कारण, "सासू, सासरा, बहीण, मातुलाची पत्नी, मातुल, आत्या व मावशी यांचें आशौच पक्षिणी करावें" अशी **वृद्धबृहस्पति**स्मृति आहे. **शुद्धितत्त्वांत कौर्मांत**-"दांत उत्पन्न होईपर्यंत सोदराविषयीं सद्यःशौच. चौल होईपर्यंत एकरात्र. विवाहांत तिचें दान होईपर्यंत त्रिरात्र. याच्यापुढें पतिकुलांत दहा दिवस." आईबाप मृत असतां स्त्रियांना तीन दिवस आशौच. कारण, "आई-बाप मृत असतां ऊढ स्त्रियांना आशौच कसें होईल ? तीन दिवसांनींच शुद्धि होईल, असें भगवान् यम सांगतो" असें **माधवीयांत वृद्धमनुवचन** आहे. हें दहा दिवसांच्या आंत समजलें असतां आहे. दहा दिवसांनंतर समजेल तर आईबापांचें कन्येला पक्षिणी आशौच. बहिणीच्या घरीं भाऊ मृत असतां अथवा बंधूच्या घरीं बहीण मृत असतां एक-मेकांना तीन दिवस. इतर ठिकाणीं मृत असतां पक्षिणी, असें **षडशीतिस्मृतींत** सांगितलें आहे. **ब्राह्मांत**ही-"भाऊ व बहीण हीं मृत असतां परस्परांचें परस्परांला पक्षिणी आशौच. मातुलाच्या आशौचाप्रमाणें ( पक्षिणी ) पितृव्याचें ( चुल-त्याचें ) आशौच कन्येनें करावें." **शिष्टतर** हें वचन निर्मूल असल्यामुळें पितृव्याविषयीं स्नान मात्र सांगतात.

**त्रिंशच्छ्लोक्यां** प्रेतेष्वाचार्यमातामहदुहितृसुतश्रोत्रियर्त्विक्सयाज्यस्वस्त्रीयेषुत्रिरात्रंत्रिदिवसमशुचिः सोदकस्तूभयत्र पक्षिण्याशौचमृत्विक्दुहितृसुतसहाध्यायिबंधुत्रयांतेवासिश्वश्रूसुमित्रश्वशुरभगिनिकाभागिने-यप्रयाणे मातामह्यांचपित्रोःस्वसरिचविरतौमातुलेमातुलान्यांचाथोसज्योतिरेवस्वविषयनृपतौग्रामनाथेचनष्टे शिष्योपाध्यायबंधुत्रयगुरुतनयाचार्यभार्यासगोत्रानूचानश्रोत्रियेषुस्वगृहपरमृतौमातुलेचैकरात्रं रात्रिंसब्रह्म-चारिण्यथतुकथमपिस्वल्पसंबंधयुक्तेस्नानंवासोयुतंस्यादिदमपिसकलंसर्ववर्णेषुतुल्यमिति अत्रमूलं**मिताक्ष-रादौ**स्पष्टं दौहित्रभागिनेययोरुपनीतयोस्त्रिरात्रं अनुपनीतयोःपक्षिणी संस्थितेपक्षिणींरात्रिंदौहित्रेभगिनी-सुते संस्कृतेतुत्रिरात्रंस्यादितिधर्मोव्यवस्थितइति**वृद्धमनूक्तेः** संस्कृतेदाहेन तेनदाहेत्रिरात्रंनान्यथेति **गौडाः** तन्न विशेषवैयर्थ्यात् मातुलादौसन्निधिविदेशाभ्यांपक्षिण्येकाहयोर्व्यवस्था **मनुः** त्रिरात्रमाहुरा-शौचमाचार्येसंस्थितेसति तस्यपुत्रेचपत्न्यांचदिवारात्रमितिस्थितिः श्रोत्रियेस्वगृहेमृतेत्रिरात्रं श्रोत्रियेतूपसंप-न्नेत्रिरात्रमशुचिर्भवेदिति**स्मृतेरितिमाधवः** एकग्रामीणेत्वेकाहः ऋत्विक्षुबह्वल्पकालश्रौतस्मार्तयाजनपरे-त्रिरात्रैकरात्रेज्ञेये यद्यपिकर्मकुर्वतएषवाचकःशब्दोभवतीति**शंबराचार्यैः**कर्ममध्येऋत्विक्त्वमुक्तम् तथा-

पिकर्मण्याशौचनिषेधात्तदुत्तरमेवैतज्ज्ञेयं **गौडास्तु** समानोदकानांत्र्यहोगोत्रजानामहःस्मृतं मातृबंधौगुरौ मित्रेमंडलाधिपतौतथेति**जाबालोक्ते**र्मातृबंधुष्वेकाहमाहुः शिष्येस्वोपनीतेत्र्यहः शिष्यसतीर्थ्यब्रह्मचारिषुक्रमेणत्रिरात्रमहोरात्रमेकाहइति**माधवीयेबौधायनोक्तेः** अन्यत्रतु**मनुः** मातुलेपक्षिणींरात्रिंशिष्यर्त्विक्बांधवेषुचेति बंधुत्रयंआत्मपितृष्वसृमातृष्वसृमातुलपुत्राः पितुःपितृष्वसृमातृष्वसृमातुलपुत्राः मातुःपितृष्वसृमातृष्वसृमातुलपुत्राश्चेति**विज्ञानेश्वरः** अत्रपक्षिणी पितृष्वस्रादिकन्यानामूढानांत्वेकाहः तद्बंधुवर्गस्त्वेकेनेतिपूर्वोक्त**ब्राह्मात् यत्तुषडशीत्यां** एवंपित्रोर्भगिन्यौयेयेपितामहयोस्तथा येमातामहयोश्चैव भगिन्यौतत्प्रजाश्रयाः मातुलाःस्वस्यपित्रोश्चपत्न्यश्चैषांप्रजाश्रयाः भ्रातरश्चेतिसर्वेषुपक्षिणीस्वगृहेत्र्यहम् एवं श्वशुरजामातृदौहित्रविपदिस्मृतं **यच्चयमः** जामातरिमृतेशुद्धिस्त्रिरात्रेणोभयोःस्मृता पक्षिणीशालकानांस्यादितिशातातपोब्रवीत् इतितन्निर्मूलत्वा**न्मिताक्षरादि**विरोधाच्चोपेक्ष्यम् ।

**त्रिंशच्छ्लोकींत**—"आचार्य, मातामह ( आईचा बाप ), कन्येचा पुत्र, श्रोत्रिय, ऋत्विज, यजमान, बहिणीचा पुत्र हे आपल्या घरीं मृत असतां तीन दिवस आशौच. समानोदक हा दोन्ही ठिकाणीं ( आपल्या घरीं व परगृहीं कोठेंही ) मृत असतां तीन दिवस आशौच. ऋत्विज, कन्यापुत्र, सहाध्यायी ( बरोबर अध्ययन करणारा ), तीन प्रकारचे बंधु, शिष्य, सासू, मित्र, सासरा, वहीण, बहिणीचा पुत्र, मातामही ( आईची आई ), आत्या, मावशी, मावळा, मावळ्याची पत्नी, हे मृत असतां पक्षिणी आशौच. आपल्या देशाचा राजा, ग्रामाचा अधिपति हे मृत असतां सज्योति आशौच. शिष्य, उपाध्याय, तीन प्रकारचे बंधु, गुरुपुत्र, आचार्य, पत्नीगोत्रज, अनूचान ( गुरुपासून सांगवेदाचें अध्ययन केलेला ), श्रोत्रिय, आणि मातुल हे आपल्या घरावांचून इतर ठिकाणीं मृत असतां एकदिवस आशौच. स्वाध्यायी ब्रह्मचारी मृत असतां एकरात्र आशौच. मरणाराचा कसाही अल्प संबंध असला तरी वस्त्रसहित स्नान करावें. हें सारें आशौच ब्राह्मणादिक चारी वर्णांना समान आहे." याविषयीं मूलवचनें **मिताक्षरा**दि ग्रंथांत स्पष्ट आहेत. दौहित्र व भगिनीपुत्र हे मुंज झालेले मृत असतील तर तीन दिवस. मुंज झालेले नसतील तर पक्षिणी. कारण, "दौहित्र, आणि बहिणीचा पुत्र हे मृत असतां पक्षिणी आशौच. हे संस्कार केलेले मृत असतील तर तीन दिवस आशौच, असा धर्म व्यवस्थित आहे." असें **वृद्धमनु**वचन आहे. या वचनांत संस्कार म्हटला तो दाहानें संस्कार केलेला असेल तर तीन दिवस आशौच. दाह नसेल तर आशौच नाहीं, असें **गौड** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, संस्कार केलेला असेल तर हें विशेष सांगणें व्यर्थ होईल. वरील वचनांत मातुल, शिष्य, तीन प्रकारचे बंधु इत्यादिकांनें पक्षिणी व एक दिवस सांगितलें तें संनिध असतां पक्षिणी आणि विदेशीं असतां एक दिवस, अशी व्यवस्था समजावी. **मनु**—"आचार्य मृत असतां तीन दिवस आशौच असें सांगतात. आचार्याचा पुत्र व पत्नी मृत असतां एक दिवस आशौच, अशी मर्यादा आहे." श्रोत्रिय घरीं मृत असतां तीन दिवस. कारण, "श्रोत्रिय मृत असतां तीन दिवस आशौच करावें" अशी **स्मृति** आहे, असें **माधव** सांगतो. एका गांवांत मृत असतां एक दिवस. ऋत्विज मृत असतां त्यानें श्रौत स्मार्ताचें यजन बहुत काळ केलें असेल तर त्रिरात्र, आणि अल्पकाळ केलें असेल तर पक्षिणी समजावें. जरी कर्म करीत असलेला जो विप्र त्याचा वाचक ऋत्विक् शब्द आहे म्हणून **शंकराचार्यांनीं** कर्मामध्यें त्यांना ऋत्विक् म्हणावें, नंतर ते ऋत्विक् नाहींत, असें सांगितलें तरी कर्मामध्यें आशौचाचा निषेध असल्यामुळें कर्म झाल्यावरच हें आशौच जाणावें. **गौड** तर—"समानोदकांचें आशौच तीन दिवस, गोत्रजांचें एक दिवस, मातेचा बंधु, गुरु, मित्र, व राजा हे मृत असतां एक दिवस" या **जावालि**वचनावरून मातृबंधूंना एक दिवस सांगतात. आपण उपनयन केलेला शिष्य मृत असतां तीन दिवस. कारण, "शिष्य, सतीर्थ्य ( ज्यांचा गुरु एक ते परस्पर ), ब्रह्मचारी, हे मृत असतां अनुक्रमानें तीन दिवस, रात्रदिवस, एक दिवस आशौच" असें **माधवीयांत बौधायन**वचन आहे. इतर शिष्य मृत असेल तर सांगतो **मनु**—"मातुल, शिष्य, ऋत्विक्, बांधव हे मृत असतां पक्षिणी आशौच." तीन प्रकारचे बंधु म्हणजे आत्मबंधु, पितृबंधु, व मातृबंधु समजावे; ते असे–आपल्या आत्याचा पुत्र, आपल्या मावशीचा पुत्र, आपल्या मातुलाचा पुत्र हे आत्मबंधु. पित्याच्या आत्याचा पुत्र, पित्याच्या मावशीचा पुत्र, पित्याच्या मातुलाचा पुत्र हे पितृबंधु. मातेच्या आत्याचा पुत्र, व मातेच्या मावशीचा पुत्र, व मातेच्या मातुलाचा पुत्र हे मातृबंधु होत; असें **विज्ञानेश्वर** सांगतो; हे मृत असतां पक्षिणी आशौच. आत्या, मावशी इत्यादिकांची विवाहित कन्या मृत असतां एक दिवस आशौच. कारण, 'तिचा बंधुवर्ग एका दिवसानें शुद्ध होतो' असें पूर्वी उक्त **ब्राह्म**वचन आहे. आतां जें **षडशीतींत**—"याप्रमाणें ज्या आईबापांच्या[1] भगिनी, पितामह पितामहींच्या भगिनी, मातामह मतामहींच्या भगिनी, आणि त्यांच्या प्रजा (अपत्यें), आपले व आईबापांचे मातुल व त्यांच्या पत्नी आणि प्रजा

---

१ तीन प्रकारचे बंधु येथेंच पुढें विज्ञानेश्वरोक्त लिहिलेले आहेत, ते पाहावे. २ पक्षिणी म्हणजे दिवसा असेल तर तो दिवसरात्र आणि पुढचा दिवस. रात्रीं असेल तर ती रात्र पुढचा दिवस आणि दुसरी रात्र यास पक्षिणी असें म्हणतात.

( अपत्यें ), हे सारे भ्राते ( बंधु ) आहेत, हे मृत असतां पक्षिणी आशौच. आपल्या घरीं मृत असतील तर तीन दिवस आशौच. याप्रमाणें श्वशुर, जामाता, व दौहित्र हे मृत असतां समजावें." आणि जैं‌ध्यम—"जामाता मृत असतां दोघांची ( श्वशुर व सासू यांची ) तीन दिवसांनीं शुद्धि होते. शालकांची ( पत्नीच्या भ्रात्यांची ) पक्षिणीनें शुद्धि होते, असें शातातप सांगता झाला." असें सांगतो तें निर्मूल असल्यामुळें व **मिताक्षरा** इत्यादि ग्रंथांशीं विरोध येत असल्यामुळें उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे.

**मदनपारिजातेविष्णुः** असपिंडेस्ववेश्मनिमृतएकरात्रं अत्र**हरदत्तः** अंतःशवेचेत्यापस्तंबसूत्रतःशवेग्रामेधनुःशतादर्वागन्नमभोज्यं दीपमुदकुंभंवोपनिधायतुभुंजीतयदिसमानवंशंनगृहमेवंसूतिकायामित्याह प्रधानगृहमृतौतु गृहेयस्यमृतःकश्चिदसपिंडःकथंचन तस्याप्यशौचंविज्ञेयंत्रिरात्रंनात्रसंशयइत्यं**गिरसोक्तमितिमाधवः** एतेन त्रिरात्रमसपिंडेषुस्वगृहेसंस्थितेषुचेति **कौर्म**व्याख्यातं **शुद्धितत्त्वेबृहन्मनुः** श्वशूद्रपतिताश्चांत्यामृताश्चेद्विजमंदिरे शौचंतत्रप्रवक्ष्यामिमनुनाभाषितंयथा दशरात्राच्छुनिमृतेमासाच्छूद्रेभवेच्छुचिः द्वाभ्यांतुपतितेगेहमंत्येमासचतुष्टयात् अत्यंत्येवर्जयेद्गेहमित्येवंमनुरब्रवीत् अंत्योम्लेच्छः अत्यंत्यःश्वपाकइति**वाचस्पतिः** तत्रैव**यमः** द्विजस्यमरणेवेश्मविशुध्यतिदिनत्रयात् **संवर्तः** गृहशुद्धिंप्रवक्ष्यामिअंतःस्थशवदूषिते प्रोत्सृज्यमृन्मयंभांडंसिद्धमन्नंतथैवच गोमयेनोपलिप्याथछागेनघ्रापयेद्बुधः ब्राह्मणैर्मंत्रपूतैश्च हिरण्यकुशवारिभिः सर्वमभ्युक्षयेद्वेश्मततःशुध्यत्यसंशयम् **बृहद्विष्णुः** ग्राममध्यगतोयावच्छवस्तिष्ठतिकस्यचित् ग्रामस्यतावदाशौचंनिर्गतेशुचितामियात् गृहेपश्वादौमृतेप्येवं ।

**मदनपारिजातांत विष्णु**—"आपल्या घरीं सपिंडव्यतिरिक्त मृत असतां एकदिवस आशौच." येथें **हरदत्त**-'आंत शव असतां' या आपस्तंबसूत्रावरून गांवांत शव असतां शंभर धनुष्यांच्या आंत तें शवगृह असेल तर अन्न भोजन करूं नये. तें शवगृह आपल्या समान वंशांतील नसेल तर दीप किंवा उदकुंभ मध्यें ठेऊन भोजन करावें. सूतिकेविषयींही असेंच समजावें, असें सांगतो. मुख्य घरीं असपिंड मृत असेल तर-"ज्याच्या घरीं कोणी असपिंड मरेल त्यालाही आशौच तीन दिवस, याविषयीं संशय नाहीं." असें अंगिरसानें सांगितलेलें करावें, असें **माधव** सांगतो. येणेंकरून "आपल्या घरीं असपिंड मृत असतां तीन दिवस आशौच" ह्या **कौर्म**वचनाचें व्याख्यान झालें. **शुद्धितत्त्वांत बृहन्मनु**—"ब्राह्मणाच्या घरीं कुत्रा, शूद्र, पतित आणि अंत्य हे मृत असतील तर त्याविषयीं जसें मनूनें सांगितलें तसें सांगतो-कुत्रा मृत असतां दहा दिवसांनीं घर शुद्ध होतें. शूद्र मृत असतां एक महिन्यानें शुद्ध होतें. पतित मृत असतां दोन महिन्यांनीं घर शुद्ध होतें. अंत्य ( म्लेच्छ ) मृत असतां चार महिन्यांनीं घर शुद्ध होतें. अत्यंत्य मृत असतां घर वर्ज्य करावें, असें मनु सांगता झाला." अत्यंत्य म्हणजे चांडाल, असें **वाचस्पति** सांगतो. तेथेंच **यम**—"घरांत ब्राह्मण मृत असतां तीन दिवसांनीं घर शुद्ध होतें." **संवर्त**—"आंत शव राहून दूषित झालेल्या घराची शुद्धि सांगतो-मातीचीं भांडीं टाकून तसेंच शिजलेलें अन्न टाकून गोमयानें सारवून बोकडाकडून हुंगवावें. ब्राह्मणांनीं मंत्रांनीं पवित्र केलेलें असें सुवर्ण व कुशयुक्त उदक घेऊन साऱ्या घराला प्रोक्षण करावें, म्हणजे घर शुद्ध होतें यांत संशय नाहीं." **बृहद्विष्णु**—"कोणाचाही शव गांवांमध्यें जोंपर्यंत राहिलेला आहे तोंपर्यंत गांवाला आशौच. शव गेलें असतां गांव शुद्ध होतो." घरांत पशु इत्यादिक मृत असतांही असेंच समजावें.

यत्तु**माधवीयेप्रचेतसा**मातृष्वस्रादिषुत्रिरात्रमुक्तं मातृष्वसामातुलयोःश्वश्रूश्वशुरयोर्गुरोः मृतेचर्त्विजियाज्येचत्रिरात्रेणविशुध्यतीति **गुरु**राचार्यः ऋत्विक्कुलागतः तत्स्वगृहमृतौज्ञेयं श्वशुरयोरन्यत्रमृतावपि सन्निधौत्रिरात्रम् असन्निधौपक्षिणी देशांतरेएकरात्रम् वक्ष्यमाण**विष्णूक्ते**रिति**माधवगौडादयः** अन्यत्रतुमातृष्वस्रादिषु पित्रोःस्वसरितद्वश्चपक्षिणींक्षपयेन्निशामिति**वृद्धमनूक्तम्** यत्तु**वृद्धमनुः** भगिन्यां संस्कृतायांतुभ्रातर्यपिचसंस्कृते मित्रेजामातरिप्रेतेदौहित्रेभगिनीसुते शालकेतत्सुतेचैवसद्यःस्नानेनशुध्यतीति तद्भ्रातृदौहित्रादौदेशांतरेशालकसुतजामात्रोःस्वदेशेज्ञेयं शालकेतुस्वदेशेएकाहः आचार्यपत्नीपुत्रोपाध्याय मातुलश्वशुरश्वश्रूश्वशुर्यसहाध्यायिशिष्येष्वेकरात्रमिति**माधवीयेविष्णूक्तेः** **हरदत्तीयेदशश्लोक्या**मप्येवं श्वशुर्यःशालकः देशांतरेस्नानम् श्वशुरयोर्देशांतरेएकाहः **जाबालः** एकोदकानांतुत्र्यहोगोत्रजानामहःस्मृतं सर्वत्रमूल्याभावेपिक्रियाकर्तुर्दशाहः गुरोःप्रेतस्यशिष्यस्तुपितृमेधंसमाचरेत् प्रेताहारैःसमंतत्रदशरात्रेणशुध्यतीति**मनूक्तेः** शिष्यइत्युपलक्षणं निरन्वयेसपिंडेतुमृतेसतिदयान्वितः तदशौचंपुराधीत्वा-

कुर्यात्तुपितृवत्क्रियामितिमाधवीये **ब्राह्मोक्तेः दिवोदासीये** सगोत्रोवासगोत्रोवायोग्निंदद्यात्सखेनरः सोपिकुर्यान्नवश्राद्धंशुध्येच्चदशमेहनि यत्रैकविषयेपक्षिण्येकाहादिपक्षद्वयमुक्तं तत्रसन्निधिविदेशमैत्र्यादिकृता व्यवस्था ।

आतां जें **माधवीयांत प्रचेतसानें** मावशी इत्यादिकांचें तीन दिवस सांगितलें–"मावशी, मातुल, सासू, सासरा, गुरु ( आचार्य ), ऋत्विज ( कालपरंपरागत ) आणि यजमान हे मृत असतां तीन दिवस आशौच" असें तें आपल्या घरीं मृत असतां जाणावें. सासू सासरा हे अन्यत्र ठिकाणीं मृत असले तरी संनिध असतां तीन दिवस. असंनिध असतां पक्षिणी. देशांतरीं मृत असतां एक दिवस, असें पुढें सांगावयाच्या **विष्णु**वचनावरून समजावें, असें **माधव, गौड** इत्यादिक सांगतात. मावशी इत्यादिक आपल्या घरावांचून इतर ठिकाणीं मृत असतील तर "आईबापांची बहीण मृत असतां पक्षिणी आशौच" हें **वृद्धमनूनें** उक्त समजावें. आतां जें **वृद्धमनु**—"संस्कार केलेली बहीण, संस्कार केलेला भ्राता, मित्र, जामाता, दौहित्र, बहिणीचा पुत्र, शालक, व शालकपुत्र हे मृत असतां सद्यःस्नानानें शुद्धि होते" असें सांगतो तें भ्राता, दौहित्र इत्यादिक देशांतरीं मृत असतां समजावें. शालकपुत्र व जामाता हे स्वदेशीं मृत असतां समजावें. शालक स्वदेशीं मृत असेल तर एक दिवस. कारण, "आचार्यपत्नी, आचार्यपुत्र, उपाध्याय, मातुल, सासू, सासरा, शालक, सहाध्यायी, आणि शिष्य हे मृत असतां एक दिवस" असें **माधवीयांत विष्णु**वचन आहे. **हरदत्ता**च्या ग्रंथांत **दशश्लोकींत**ही असेंच सांगितलें आहे. श्वशुर्य म्हणजे शालक तो देशांतरीं मृत असतां स्नान. सासू, सासरा हे देशांतरीं मृत असतां एक दिवस. **जाबाल**—"समानोदकांना ( आठव्या पुरुषापासून पुढच्यांना ) तीन दिवस, आणि गोत्रजांना एक दिवस आशौच." मूल्य घेतल्यावांचून देखील अंत्यकर्म करणाराला दहा दिवस आशौच. कारण, "मृत झालेल्या गुरूचें शिष्यानें त्याच्या सपिंडांसह वर्तमान राहून पैतृक कर्म ( अंत्यकर्म ) करावें. तो अंत्यकर्म करणारा शिष्य दहा दिवसांनीं शुद्ध होतो" असें **मनु**वचन आहे. या वचनांत 'शिष्य' हें उपलक्षण आहे. कारण, "संततिरहित असा सपिंड मृत असेल तर दयायुक्त होऊन त्याचें आशौच पूर्वी आचरण करून त्या सपिंडाची क्रिया पित्याप्रमाणें करावी." असें **माधवीयांत ब्राह्म**वचन आहे. **दिवोदासीयांत**—"सगोत्र किंवा असगोत्र जो कोणी मृताला अग्नि देईल त्यानें देखील नवश्राद्ध करावें; आणि तो दहाव्या दिवशीं शुद्ध होईल." जेथें एकाविषयीं पक्षिणी व एक दिवस आशौच असे दोन पक्ष सांगितले आहेत तेथें संनिधि व असंनिधि, मैत्री इत्यादिकांवरून व्यवस्था समजावी.

**त्रिंशच्छ्लोक्याम्** वानप्रस्थेयतौचोपरमतिकुलजेपंढकेवाप्लवःस्याद्गोपिद्वोविप्रगुप्त्यैमृतवतितुदिनंयुद्धविद्धेतुसद्यः अत्रमूलं **माकरे**स्पष्टम् युद्धमूर्ध्निमृतस्यस्नानं उशनसाहवेशस्त्रैःक्षत्रधर्महतस्यच सद्यःसंतिष्ठते यज्ञस्तथाशौचमितिस्थितिरितिमनूक्तेः यज्ञोंत्यकर्मसर्वतदेवेत्यर्थः यत्तु **भारतेराजधर्मेषु** अशोच्योहिहतःशूरःस्वर्गलोकेमहीयते नह्यन्नमुदकंतस्यनस्नानंनाप्यशौचकमितिश्राद्धादिनिषेधःसपुत्राद्यभावपरः अतएवतत्रकर्णादीनांश्राद्धमुक्तम् अन्येतुदशपिंडनिषेधमाहुर्यतिवत् यत्तु **पराशरः** आहवेपिहतानांचएकरात्रमशौचकमिति तद्युद्धक्षतेनकालांतरमृतेज्ञेयम् असन्निधौस्नानमिति **माधवः शुद्धितत्त्वेग्निपुराणे** दंष्ट्रिभिःशृंगिभिर्वापिहताम्लेच्छैश्चतस्करैः येस्वाम्यर्थेहतायांतिराजन्स्वर्गंनसंशयः सर्वेषामेववर्णानांक्षत्रियस्यविशेषतः यत्तु **बृहस्पतिः** डिंबाहवेविद्युताचराज्ञागोविप्रपालने सद्यःशौचंमृतस्याहुत्र्यहंचान्येमहर्षयः तच्छस्त्रं विनापराङ्मुखहतेचत्रिरात्रं गजावध्येहतेसद्यःशौचमन्यत्रत्रिरात्रं तत्रैव **व्याघ्रः** क्षतेनम्रियतेयस्तुतस्याशौचंभवेद्द्विधा आसप्ताहात्त्रिरात्रंस्याद्दशरात्रमतःपरं शस्त्राघातेत्र्यहादूर्ध्वंयदिकश्चित्प्रमीयते आशौचंप्राकृतंतस्यसर्ववर्णेषुनित्यशः शस्त्राघातेक्षतंविना शवस्पर्शेतु **हारीतः** शवस्पृशोग्रामंनप्रविशेयुरानक्षत्रदर्शनाद्रात्रौचेदादित्यस्य यत्तु **मनुः** अह्नाचैकेनरात्र्याचत्रिरात्रैरेवचत्रिभिः शवस्पृशोविशुध्यंतित्र्यहात्तूदकदायिनइति अहोरात्र्याचेत्यहोरात्रमित्युक्तं त्रिभिस्त्रिरात्रैरितिनवरात्रमेवंदशरात्रमित्यर्थः तत्तदन्नाशनेतद्गृहवासेनापविच्छेयं **अंगिराः** आशौचंयस्यसंसर्गादापतेद्गृहमेधिनः क्रियास्तस्यनलुप्यंतेगृह्याणांचनतद्भवेत् ।

**त्रिंशच्छ्लोकींत**—"आपल्या कुलांतील कोणी वानप्रस्थ, संन्याशी व नपुंसक मृत असेल तर स्नान करावें. स्त्री, गाई, ब्राह्मण यांच्या संरक्षणाकरितां कोणी मृत असेल तर एक दिवस आशौच करावें. युद्धामध्यें शस्त्रानें विद्ध होऊन मृत असेल तर सद्यःशुद्धि ( स्नान ) होते." याविषयीं मूलवचन **आकर** ग्रंथांत स्पष्ट आहे. समरांगणांत मृत असेल तर स्नान. कारण, "युद्धामध्यें शस्त्रांनीं एकमेकांस मारीत असतां क्षात्रधर्मानें मृत असेल तर तत्काल यज्ञ होतो, व तसेंच तत्काल

शुद्धि होते" असें मनुवचन आहे. यज्ञ म्हणजे सर्व अंत्यकर्म त्या वेळींच होतें, असा अर्थ आहे. आतां जो **भारतांत राजधर्मांत**—"युद्धामध्यें शूर मेला असतां त्याचा शोक करूं नये; कारण, तो स्वर्गलोकामध्यें पूज्य होतो. त्याला अन्न व उदक द्यावयास नको. त्याच्या निमित्तानें स्नान व आशौच नाहीं" असा श्राद्धादिकांचा निषेध सांगितला, तो पुत्रादिकांचा अभाव असतां समजावा. म्हणून तेथें कर्णादिकांचें श्राद्ध सांगितलें आहे. **इतर ग्रंथकार** तर-संन्याशाप्रमाणें दशपिंडांचा निषेध सांगतात. आतां जें **पराशर**—"युद्धामध्यें मृतांचें देखील एक दिवस आशौच" असें सांगतो. तें युद्धांत क्षत होऊन कालांतरीं मृत असतां समजावें. असंनिध असतां स्नान असें **माधव** सांगतो. **शुद्धितत्त्वांत अग्निपुराणांत**—"चारही वर्णांमध्यें जे कोणी आपल्या स्वामीसाठीं झटत असतांना व्याघ्र, महिष, म्लेच्छ, तस्कर ( चोर ) इत्यादिकांनीं मारले असतील ते स्वर्गास जातात, यांत संशय नाहीं. आणि अशा हेतूकरितां क्षत्रिय मृत असेल तर तो विशेषेंकरून स्वर्गास जातो." आतां जें **बृहस्पति**—"लुटारू लोकांच्या लढाईंत; विजेनें; राजानें; गाई, ब्राह्मण यांच्या संरक्षणाविषयीं जो मृत असेल त्याचें सद्यःशौच ( स्नान ) होतें. इतर ऋषि तीन दिवस आशौच असें सांगतात" तें युद्धास पराङ्मुख झालेला शस्त्रावांचून मृत असतां तीन दिवस समजावें. राजानें मारण्यास योग्य अशाला मारलें असतां सद्यःशौच. इतरांविषयीं तीन दिवस. तेथेंच **व्याघ्र**—"शस्त्रानें क्षत होऊन जो मरतो त्याचें आशौच दोन प्रकारचें होतें. सात दिवसांच्या आंत मरेल तर तीन दिवस. सात दिवसांनंतर मरेल तर दहा दिवस आशौच. शस्त्रानें क्षत झाल्यावांचून तीन दिवसानंतर कोणी मरेल तर चारही वर्णांमध्यें प्राकृत ( इतर मृतांसारखें ) आशौच सर्वदा समजावें." शवाला स्पर्श केला तर सांगतो. **हारीत**—"शवाला स्पर्श करणारांनीं नक्षत्रदर्शन होईपर्यंत गांवांत प्रवेश करूं नये. रात्रीं स्पर्श करितील तर सूर्यदर्शनापर्यंत गांवांत प्रवेश करूं नये." आतां जें **मनु**—"शवाला स्पर्श करणारे एका दिवसानें आणि तीन त्रिरात्रांनीं मिळून दहा दिवसांनीं शुद्ध होतात. उदक देणारे ( समानोदक ) तीन दिवसांनीं शुद्ध होतात." असें दहा दिवस आशौच सांगतो, तें आशौचांचें अन्न-भक्षण करीत असतां व त्यांच्या घरीं रहात असतां आणि आपत्काल नसतां समजावें. **अंगिरा**—"ज्या गृहस्थाश्रम्याला इतराच्या संसर्गानें आशौच प्राप्त होईल त्याच्या क्रिया ( कर्में ) लुप्त होत नाहींत. कारण, तें आशौच गृह्यकर्मांना नाहीं."

**अथनिर्हाराद्याशौचम्** स्नेहेनसवर्णनिर्हारेतदन्नाशनेतद्गृहवासेचदशाहः तदन्नानशनेतद्गृहवासे-त्र्यहः गृहावासेन्नाभक्षणेचैकाहः भृतिग्रहणेननिर्हारेदाहेचतज्जात्याशौचं यदिनिर्हरतिप्रेतंप्रलोभाक्रांतमानसः दशाहेनद्विजःशुध्येद्द्वादशाहेनभूमिपः मासार्धेनचवैश्यस्तुशूद्रोमासेनशुध्यतीति**कौर्मोक्तेः** विजातीयनिर्हारेतुशवजातीयमाशौचं अत्रभृतिग्रहेद्विगुणं अवरश्चेद्वरंवर्णवरोवाप्यवरंयदि वहेच्छवंतदाशौचंद्रव्यार्थेद्विगुणंभवेदिति**व्याघ्रोक्तेः** कौर्ममेतदिति**गौडाः** दाहेप्येवं यत्तु**ब्राह्मे** योसवर्णंतुमूल्येननीत्वाचैवदहेन्नरः आशौचंतुभवेत्तस्यप्रेतजातिसमंनृपेति तदापद्विज्ञेयं सोदकनिर्हारेतुदशाहइति**माधवः** अलंकरणेतु**शंखः** कृच्छ्रपादोऽसपिंडस्यप्रेतालंकरणेकृते अज्ञानादुपवासःस्यादशक्तौस्नानमिष्यते धर्मार्थमनाथसवर्णहरणेक्रियाकरणेचद्विजस्यानंतयज्ञफलं स्नानंप्राणायामोग्निस्पर्शश्चेति**माधवीये** अग्निदेप्येवं प्रेतसंस्पर्शसंस्कारैर्ब्राह्मणोनैवदुष्यति वोढाचैवाग्निदाताचसद्यःस्नात्वाविशुध्यतीत्य**परार्के वृद्धपराशरोक्तेः** मातुलत्वादिसंबंधेत्रिरात्रं असंबंधिद्विजान्वहित्वादहित्वाचसद्यःशौचंसंबंधेत्रिरात्रमिति**पैठीनसिस्मृतेः** ।

## आतां प्रेत निर्हरणादिकांचें आशौच सांगतो—

स्नेहाच्या योगानें आपल्या जातीचें प्रेत नेलें असतां त्याचें अन्न भक्षण करून त्याच्या घरीं वास करील तर दहा दिवस आशौच. त्याचें अन्न भक्षण न करितां त्याच्या घरीं वास करील तर तीन दिवस आशौच. त्याच्या घरीं वासही करीत नाहीं व अन्नही भक्षण करीत नाहीं तर एक दिवस आशौच. द्रव्य घेऊन प्रेत नेईल व त्याचा दाह करील तर आपल्या जातीचें आशौच समजावें. कारण, "द्रव्यलोभानें जर प्रेत नेईल तर ब्राह्मण दहा दिवसानीं शुद्ध होईल, क्षत्रिय बारा दिवसांनीं, वैश्य पंधरा दिवसांनीं, आणि शूद्र एका महिन्यानें शुद्ध होतो" असें **कौर्म**वचन आहे. भिन्न जातीचें प्रेत नेईल तर प्रेताच्या जातीचें आशौच. भिन्न जातीचें प्रेत नेण्याविषयीं मजुरी घेईल तर दुप्पट आशौच. कारण, "कमी जातीचा मनुष्य उत्तम जातीच्या प्रेताला वाहील अथवा उत्तम जातीचा मनुष्य कमी जातीच्या प्रेताला वाहील तर त्या प्रेताच्या जातीचें आशौच त्याला प्राप्त होईल. आणि द्रव्यासाठीं वाहील तर दुप्पट आशौच होईल." असें **व्याघ्र**वचन आहे. हें कौर्मवचन असें **गौड** म्हणतात. दाहाविषयीं देखील असेंच समजावें. आतां जें **ब्राह्मांत**—"जो मनुष्य दुसऱ्या जातीच्या प्रेताला मजुरीनें नेऊन दहन करील त्याला प्रेताच्या जातीसारखें आशौच होईल." येथें दुप्पट सांगितलें नाहीं, तें आपत्कालीं समजावें. समानोदक प्रेताचें निर्हरण केलें तर दहा दिवस आशौच, असें **माधव** सांगतो. प्रेताला अलंकार करील तर सांगतो **शंख**—"अस-

पिंडाच्या प्रेताला अलंकार करील तर पादकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. अज्ञानानें करील तर उपवास करावा. उपवासाविषयीं शक्ति नसेल तर स्नान करावें. धर्मासाठीं अनार्थ अशा समानवर्णाच्या प्रेताचें निर्हरण व क्रिया करील तर द्विजाला अनंत यज्ञाचें फल प्राप्त होतें. स्नान, प्राणायाम व अग्निस्पर्श करावा म्हणजे शुद्धि होते, असें **माधवीयांत** सांगितलें आहे. अग्नि देणाऱ्याविषयीं देखील असेंच समजावें. कारण, "प्रेताचा स्पर्श व संस्कार केल्यानें ब्राह्मण दोषी होत नाहीं. प्रेत वाहणारा व अग्नि देणारा तत्काल स्नान करून शुद्ध होतो" असें **अपरार्कांत वृद्धपराशर**वचन आहे. मातुल इत्यादिसंबंधी प्रेत असेल तर तीन दिवस आशौच. कारण, "संबंधरहित अशा द्विजांचीं प्रेतें वाहून व जाळून सद्यःशौच होतें. संबंधी प्रेत असेल तर तीन दिवस आशौच." अशी **पैठीनसि**स्मृति आहे.

**गौतममिताक्षरायांवृद्धात्रिः** सूतकाद्द्विगुणंशावंशावाद्द्विगुणमार्तवं आर्तवाद्द्विगुणासूतिस्ततोपिशवदाहकः अत्रपूर्वेणोत्तरनिवृत्तिरित्यर्थः **विष्णुः** मृतंद्विजंनशूद्रेणहारयेन्नशूद्रंद्विजेन **देवलः** ब्रह्मचारीनकुर्वीतशववाहादिकक्रियाम यदिकुर्याच्चरेत्कृच्छ्रंपुनःसंस्कारमेवच **याज्ञवल्क्यः** आचार्यपित्रुपाध्यायानिर्हृत्यापिव्रतीव्रती अनुगमनेतुसपिंडेनदोषः विहितंहिसपिंडानांप्रेतनिर्हरणादिकं तेषांकरोतियःकश्चित्तस्याधिक्यंनविद्यतइतिद्**देवलोक्तेः** दोषःस्यात्त्वसपिंडस्यतत्रानाथक्रियांविनेति**हारीतोक्तेश्च** समोत्कृष्टवर्णेतु**माधवीयेकण्वः** अनुगम्यशवंबुद्ध्यास्नात्वास्पृष्ट्वाहुताशनं सर्पिःप्राश्यपुनःस्नात्वाप्राणायामैर्विशुध्यतीति हीनवर्णेतु क्षत्रियेहः वैश्येपक्षिणी शूद्रेत्रिरात्रम् क्षत्रियस्यवैश्येहः शूद्रेपक्षिणी वैश्यस्यशूद्रेहरिति**विज्ञानेश्वरः माधवस्तु** विप्रस्यवैश्येद्व्यहः क्षत्रस्यशूद्रेप्येवं अन्यत्प्राग्वत स्नानाग्निस्पर्शघृताशनानिसर्वत्रेत्याहहीनवर्णस्यदाहौर्ध्वदेहिककरणेतु **ब्राह्मे** ब्राह्मणोहीनवर्णस्यनकुर्यादौर्ध्वदेहिकं कामाल्लोभात्तथामोहात्कृत्वातज्जातितांव्रजेत् **मनुः** व्रात्यानांयाजनंकृत्वापरेषामंत्यकर्मच अभीचारमहीनंचत्रिभिःकृच्छ्रैर्व्यपोहति परेषांसर्ववर्णानांहीनेपुतद्द्वैगुण्यत्रैगुण्यचातुर्गुण्यादूह्यम ।

**गौतममिताक्षरेंत वृद्धअत्रि**—"जननाशौचापेक्षां मृताशौचाचा दोष दुप्पट आहे. मृताशौचाहून आर्तवाचा दोष दुप्पट आहे. आर्तवाहून सूतिकेचा दोष दुप्पट. आणि सूतिकेहून शवदाहकाचा दोष दुप्पट आहे." यांत पूर्व आशौचानें पुढच्याची निवृत्ति होत नाहीं, असें तात्पर्य. **विष्णु**—"मृत झालेल्या द्विजाला शूद्राकडून नेववूं नये. व शूद्राला द्विजाकडून नेववूं नये." **देवल**—"ब्रह्मचाऱ्यानें प्रेत वाहणें वगैरे कर्म करूं नये; जर करील तर प्रायश्चित्तार्थ प्राजापत्यकृच्छ्र व पुनःसंस्कार करावा." **याज्ञवल्क्य**—"आचार्य, पिता आणि उपाध्याय यांच्या प्रेताला नेऊनही ब्रह्मचारी आपल्या व्रतापासून भ्रष्ट होत नाहीं." सपिंडप्रेताला अनुगमन केलें तर दोष नाहीं. कारण, "सपिंडांना प्रेताचें वाहणें वगैरे शास्त्रविहित आहे. जो कोणी सपिंडप्रेताचें वाहणें वगैरे करितो त्याला अधिक दोष नाहीं" असें **देवल**वचन आहे. "अनाथप्रेतक्रियेवांचून असपिंडाच्या प्रेताचें वाहणें वगैरे करील तर दोष आहे." असें **हारीत**वचनही आहे. आपल्या समानजातीचा किंवा उत्कृष्ट जातीचा प्रेत असेल तर सांगतो **माधवीयांत कण्व**—"बुद्धिपूर्वक प्रेताशीं अनुगमन करील तर स्नान करून अग्निस्पर्श करून घृतप्राशन करून पुनः स्नान करून प्राणायाम करावे, म्हणजे शुद्ध होतो." हीन जातीच्या प्रेताशीं अनुगमन करील तर क्षत्रियाच्या प्रेताविषयीं एक दिवस; वैश्यप्रेताविषयीं पक्षिणी; शूद्रप्रेताविषयीं तीन दिवस. वैश्यप्रेताविषयीं क्षत्रियाला एक दिवस. शूद्राच्या प्रेताविषयीं पक्षिणी. शूद्रप्रेताविषयीं वैश्याला एक दिवस. असें **विज्ञानेश्वर** सांगतो. **माधव** तर-ब्राह्मणाला वैश्याविषयीं दोन दिवस. क्षत्रियाला शूद्राविषयींही दोन दिवस आशौच. बाकीचें सारें पूर्वी सांगितल्याप्रमाणें समजावें. स्नान, अग्निस्पर्श व घृतप्राशन हीं सर्वत्र आहेतच असें सांगतो. हीन जातीच्या प्रेताचा दाह, और्ध्वदेहिक कर्म उत्तम जातीचा मनुष्य करील तर सांगतो **ब्राह्मांत**-"ब्राह्मणानें हीन जातीच्या प्रेताचें और्ध्वदेहिक ( अंत्यकर्म ) करूं नये. कामाच्या योगानें किंवा लोभानें अथवा अविचारानें करील तर त्याच्या जातींत जाईल." **मनु**-"उपनयनादि संस्काररहितांचें होम पूजा इत्यादि कर्म; सर्व जातींच्या मनुष्यांचें अंत्यकर्म; समान किंवा उत्तम जातीच्या मनुष्यांचें अभिचार ( जारण, मारण ) कर्म हीं केलीं असतां तीन प्राजापत्य कृच्छ्रांनीं शुद्ध होतो." आपल्याहून हीन जातीचें करील तर क्षत्रियाचें केलें असतां द्विगुणित प्रायश्चित्त. वैश्याचें केलें तर त्रिगुणित. शूद्राचें करील तर चतुर्गुणित इत्यादि तर्कानें जाणावें.

**अथरोदने** समोत्तमवर्णयोःसंचयनात्पूर्वंसचैलस्नानमूर्ध्वमाचमनं हीनवर्णेषुतुसंचयात्प्राक्सचैलमूर्ध्वं स्नानमात्रं विप्रस्यक्षत्रवैश्यविषयेतुब्राह्मे अस्थिसंचयनेविप्रोरोतिचेत्क्षत्रवैश्ययोः तदास्नातःसचैलस्तुद्वितीयेहनिशुध्यति कृतेतुसंचयेविप्रःस्नानेनैवशुचिर्भवेत् क्षत्रस्यवैश्येप्येवं शूद्रेतुसंचयात्प्राक्विप्रस्यत्रिरात्रं क्षत्र-

वैश्ययोर्द्विरात्रं ऊर्ध्वंतुद्विजानामेकाहः शूद्रस्यशूद्रेस्पर्शविनासंचयात्पूर्वमेकाहः ऊर्ध्वंसज्योतिरितिमाधवीयेज्ञेयम् शुद्धितत्त्वेपारस्करस्तु अस्थिसंचयनादूर्ध्वंमासंयावद्विजातयः दिवसेनैवशुध्यंतिवाससांक्षालनेनच सजातेर्दिवसेनैवत्र्यहात्क्षत्रियवैश्ययोरित्युक्तं सपिंडानांरोदननिर्हारादावदोषइत्युक्तंप्राक् विज्ञानेश्वरस्तु मृतस्यबांधवैःसार्धंकृत्वातुपरिदेवनम् वर्जयेत्तदहोरात्रंदानश्राद्धादिकर्मचेतिपारस्करोक्तेः सर्वत्रैकरात्रमाह ।

## आतां रोदनाविषयीं सांगतो—

समान वर्णाच्या व उत्तम वर्णाच्या प्रेताविषयीं अस्थिसंचयनाच्या पूर्वी रोदन केलें असतां वस्त्रसहित स्नान करावें. अस्थिसंचयनानंतर रोदन केलें असतां आचमन करावें. हीन वर्णाच्या प्रेताविषयीं अस्थिसंचयनाच्या पूर्वी रोदन केलें असतां वस्त्रसहित स्नान करावें. अस्थिसंचयनानंतर करील तर स्नान मात्र करावें. ब्राह्मणाला क्षत्रिय–वैश्याविषयीं तर सांगतो **ब्राह्मांत**–"क्षत्रिय व वैश्य यांचेविषयीं अस्थिसंचयन करावयाचें असतां ब्राह्मण जर रोदन करील तर वस्त्रसहित स्नान करून दुसऱ्या दिवशीं शुद्ध होतो. संचयन केलें असतां ब्राह्मण रोदन करील तर स्नानानेंच शुद्ध होईल." वैश्याविषयीं क्षत्रियालाही असेंच समजावें. शूद्राविषयीं अस्थिसंचयनाच्या पूर्वी रोदन केलें असतां ब्राह्मणाला तीन दिवस. क्षत्रिय वैश्यांना दोन दिवस आशौच. अस्थिसंचयनानंतर शूद्राविषयीं रोदन करणाऱ्या ब्राह्मणादिकांना एक दिवस आशौच. शूद्राविषयीं शूद्र स्पर्श केल्यावांचून अस्थिसंचयनाच्या पूर्वी रोदन करील तर एक दिवस अस्थिसंचयनानंतर रोदन करील तर सज्योति आशौच. असें **माधवीयांत** जाणावें. **शुद्धितत्त्वांत पारस्कर** तर–"अस्थिसंचयनानंतर एक मास होईपर्यंत कधींही ब्राह्मणादिक रोदन करितील तर एक दिवस आशौच धरून वस्त्रांचें क्षालन करून शुद्ध होतील. सजातीय प्रेताविषयीं रोदन करील तर एका दिवसानेंच शुद्ध होतात. क्षत्रिय व वैश्य यांच्याविषयीं रोदन करील तर तीन दिवसांनीं शुद्ध होईल" असें सांगतो, असें सांगितलें आहे. सपिंडांना रोदन, निर्हरण इत्यादिकांविषयीं दोष नाहीं, असें पूर्वी सांगितलें आहे. **विज्ञानेश्वर** तर–"मृताच्या बांधवांसहवर्तमान रोदन केलें असतां त्या दिवशीं दान, श्राद्ध इत्यादि कर्म वर्ज्य करावें" त्या **पारस्कर** वचनावरून सर्वांविषयीं एक दिवस आशौच सांगतो.

**अथाशौचान्नभक्षणेविष्णुः** ब्राह्मणादीनामाशौचे यःसकृदेवान्नमश्नातितस्यतावदाशौचंयावत्तेषामाशौचव्यपगमेप्रायश्चित्तमिति **अज्ञानेत्वंगिराः** अंतर्दशाहेभुक्त्वान्नंसूतकेमृतकेपिवा अस्याशौचंभवेत्तावद्यावदन्नंप्रजत्यधः प्रायश्चित्तंत्वमत्याविप्रस्यवर्णक्रमेणैकाहत्र्यहपंचाहसप्ताहोपवासाः दशविंशतिःषष्टिःशतंचप्राणायामाः पंचगव्याशनंच अभ्यासेद्विगुणं आपदितुप्राणायामशतंपंचशतमष्टशतमष्टसहस्रंगायत्रीजपश्च मत्यापदितुसवर्णाशौचेत्रिरघमर्षणंगायत्र्यष्टसहस्रंच क्षत्रियाशौचेउपवासस्तत्र वैश्याशौचेत्रिरात्रोपवासश्च शूद्राशौचेकृच्छ्रः क्षत्रवैश्ययोः पंचशतमष्टशतंगायत्रीजपः उत्तमेपुशूद्रस्यसर्वत्रस्नानं मत्यानापदिविप्रस्यवर्णेषुसांतपनकृच्छ्रमहासांतपनचांद्राणि अभ्यासेतुमासिकद्वैमासिकषाण्मासिकत्रैमासिकानीत्यादिमाधवीयादौज्ञेयम् ।

## आतां आशौचांचे अन्नभक्षणाविषयीं सांगतो—

**विष्णु**–"ब्राह्मणादिकांना आशौच असतां जो एकवारच त्यांचें अन्न भक्षण करितो त्याला, त्यांचें आशौच असेल तोंपर्यंत आशौच समजावें. आशौच गेल्यावर त्यांचें अन्न भक्षण करणारानें प्रायश्चित्त करावें." अज्ञानानें भक्षण केलें तर सांगतो **अंगिरा**–"जननाशौचांत किंवा मृताशौचांत दहा दिवसांचे आंत अन्न भक्षण केलें असतां जोंपर्यंत तें अन्न शौचमार्गानें पडून गेलें नाहीं तोंपर्यंत त्याला आशौच होतें." वरील वचनांत आशौचसमाप्तीनंतर प्रायश्चित्त सांगितलें तें असें–जर ब्राह्मण आशौचवंत अशा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचें अन्न साहजिक भक्षण करील तर त्यानें अनुक्रमानें एक दिवस, तीन दिवस, पांच दिवस, सात दिवस उपवास करावा. आणि तसेंच अनुक्रमानें दहा, वीस, साठ, शंभर प्राणायाम करावे. आणि शेवटीं पंचगव्य प्राशन करावें. पुनःपुनः भक्षण करील तर वर सांगितलेलें द्विगुणित करावें. आपत्कालीं साहजिक भक्षण करील तर अनुक्रमानें शंभर प्राणायाम, पांचशें, आठशें, आठ हजार गायत्रीजप करावा. आपत्कालीं समान वर्णाच्या आशौचांत बुद्धिपूर्वक ( मुद्दाम होऊन ) अन्न भक्षण करील तर त्रिवार अघमर्षण करून आठ हजार गायत्रीजप करावा. ब्राह्मण

१ दिवसा मरण असतां रात्रीं स्नानानें शुद्धि आणि रात्रीं मरण असतां दिवसा स्नानानें शुद्धि, हें सज्योति होय.

क्षत्रियाच्या आशौचांत बुद्धिपूर्वक अन्न भक्षण करील तर त्यानें उपवास आणि आठ हजार गायत्रीजप करावा. वैश्याशौचांत अन्न भक्षण करील तर तीन दिवस उपवास आणि आठ हजार गायत्रीजप. शूद्राशौचांत क्षत्रिय वैश्यांस प्राजापत्य कृच्छ्र आणि पांचशें व आठशें गायत्रीजप. उत्तम वर्णाच्या आशौचांनें अन्न शूद्र भक्षण करील तर त्याला सर्वत्र स्नान सांगितलें आहे. आपत्काल नसून ब्राह्मणादिवर्णांच्या आशौचांचें अन्न ब्राह्मण बुद्धिपूर्वक भक्षण करील तर त्याला अनुक्रमें सांतपन, कृच्छ्र, महासांतपन, चांद्रायण हीं प्रायश्चित्तें आहेत. आपत्काल नसतां ब्राह्मण पुनःपुनः बुद्धिपूर्वक ( मुद्दाम होऊन ) ब्राह्मणादिकांचें अन्न भक्षण करील तर अनुक्रमानें एक मास कृच्छ्र, दोन मास कृच्छ्र, तीन मास कृच्छ्र, सहा मास कृच्छ्र इत्यादिक **माधवीयांत** जाणावें.

अथदासस्यस्वदास्युत्पन्नस्यसपिंडमृतौस्नानमात्रेणस्वामिकार्येस्पृश्यत्वम् भक्तदासस्यत्र्यहोर्ध्वं सद्यःस्पृश्योगर्भदासोभक्तदासस्त्र्यहाच्छुचिरिति**स्मृत्यंतरोक्तेः** मूल्यकर्मकराःशूद्रादासीदासस्तथैवच स्नानेशरीरसंस्कारेगृहकर्मण्यदूषिताइति**शातातपोक्तेश्च** एतत्स्नानस्यसाध्यतत्कार्यमात्रे अन्यत्रमासाद्याशौचमस्त्येव एवंदास्यामपि सूतिकायास्तस्याअस्पृश्यत्वमपिमासमात्रं दासीदासश्चसर्वोवैयस्यस्यवर्णस्ययोभवेत् तद्वर्णस्यभवेच्छौचंदास्यामासस्तुसूतकमित्य**ंगिरसोक्तेः पड्शीतावपि** स्वामिशौचेनदासाद्याःस्पृश्या मासात्तुकर्मसु योग्याःस्युर्मासतोदासीसूतौचेत्स्पृश्यतामियात् दत्तदासादीनांस्वसपिंडमरणादौस्वाम्याशौचसमसंख्यादिनोर्ध्वमत्यपिमासाद्याशौचेस्वामिकार्येस्पृश्यतेति**हरदत्तः** दासांतेवासिभृतकाःशिष्याश्चैकत्रवासिनः स्वामितुल्येनशौचेनशुध्यंतिमृतसूतकइति**बृहस्पतिस्मृतेः** दासश्चात्र गृहजातस्तथाक्रीतोलब्धोदायादुपागतः अन्नकालभृतस्तद्वदाहितःस्वामिनाचयः मोक्षितोमहतश्चर्णाद्युद्धप्राप्तःपणेजितः तवाहमित्युपगतःप्रव्रज्यावसितःकृतः भक्तदासश्चविज्ञेयस्तथैववडवाहृतः विक्रेताचात्मनःशास्त्रेदासाःपंचदशस्मृताइति **नारदोक्तेषु** गर्भभक्तदासौविनाज्ञेयाः वडवादासीतयाहृतः तामुद्वाह्यदासोजातइत्यर्थः अंतेवास्यपितेनैवोक्तः स्वशिल्पमिच्छन्नाहर्तुंबांधवानामनुज्ञया आचार्यस्यवसेदंतेकृत्वाकालंसुनिश्चितं आचार्यःशिक्षयेदेनंस्वगृहेदत्तभोजनमिति शिष्यस्तत्तुल्योविद्यार्थी दासादेःस्वामिनस्सपिंडमरणेतु**विष्णुः** पत्नीनां दासानामानुलोम्येनस्वामितुल्यमाशौचंमृतेस्वामिन्यात्मीयमिति प्रतिलोमदासानामाशौचाभावः वर्णानामानुलोम्येनदास्यंनप्रतिलोमतइति**याज्ञवल्क्योक्तेः** ।

## आतां दासांविषयीं आशौच सांगतो—

आपल्या दासीचे ठायीं उत्पन्न जो दास त्याचा सपिंड मृत असतां स्वामिकार्याविषयीं त्याला ( दासाला ) स्नानानें स्पृश्यत्व येतें. भक्तानें आलेला जो दास त्याचा सपिंड मृत असतां तीन दिवसांनीं स्वामिकार्याविषयीं स्पृश्यत्व येतें. कारण, "दासीचे ठायीं झालेला जो गर्भदास तो सद्य. ( स्नान करून ) स्पृश्य होतो, आणि भक्त आलेला जो दास तो तीन दिवसांनीं शुद्ध होतो" असें **इतर स्मृतीचें** वचन आहे. आणि "मूल्य ( मजुरी ) घेऊन कर्म करणारे शूद्र, दासी आणि दास हे स्नानाविषयीं, शरीरास तेल उटी वगैरे लावण्याविषयीं आणि घरांतील कामाविषयीं दूषित नाहींत" असें **शातातपवचनही** आहे. हें दासांना सांगितलेलें सद्यःशौच दुसऱ्याला न होणाऱ्या अशा त्याच्याच कार्याविषयीं समजावें. इतर कर्माविषयीं एक मास वगैरे आशौच आहेच. याप्रमाणें दासीविषयीं देखील समजावें. दासी प्रसूत असेल तर तिला अस्पृश्यत्व एक महिनापर्यंत आहेच. कारण, "दासी व दास हा सर्व ज्या वर्णाचा जो असेल त्या वर्णाचें त्याला आशौच होतें आणि दासीला तर एक महिना जननाशौच होतें" असें **अंगिरसाचें** वचन आहे. **पड्शीतींतही**—"दासादिकांना आशौच प्राप्त असतां स्वामीच्या आशौच दिवसांनी ते दासादिक स्पृश्य होतात. आपल्या कर्माविषयीं एका महिन्यानें योग्य होतात. दासी प्रसूत असेल तर एका महिन्यानें ती स्पर्शाला योग्य होते." दत्तदासादिकांच्या सपिंडाचें मरण वगैरे असेल तर त्यांना एक मास वगैरे आशौच असलें तरी स्वामीच्या आशौचाइतक्या दिवसांनंतर स्वामिकार्याविषयीं त्यांना स्पृश्यत्व आहे, असें **हरदत्त** सांगतो. कारण, "दास, अंतेवासी[2], भृतक ( मजुरीनें काम करणारे ), शिष्य हे स्वामीबरोबर एकत्र राहाणारे असून त्यांना मृताशौच प्राप्त असतां स्वामीच्या तुल्य आशौचानें शुद्ध होतात" असें **बृहस्पतिस्मृतिवचन** आहे. येथें दास कोणते ते सांगतो—"घरीं उत्पन्न झालेला, विकत घेतलेला, मिळालेला, दायापासून ( वडिलार्जित जिंदगींतून ) प्राप्त झालेला, भोजनसमयीं भोजन देऊन पोषण केलेला, त्याच्या पूर्ण स्वामीनें ठेवलेला, मोठ्या ऋणापासून मुक्त केलेला, युद्धांत प्राप्त

१ सांतपन, कृच्छ्र इत्यादिकांचीं लक्षणें या ग्रंथाच्या शेवटीं पहावीं.　२ अंतेवासी पुढें जवळच सांगितला आहे.

झालेला, पणांत जिंकलेला, 'तुझा मी आहें' असें म्हणून आलेला, सर्वस्व त्याग करून प्राप्त झालेला, दास असा केलेला, भक्त असून दास झालेला, दासीशीं विवाह करून झालेला, आपण विकून घेणारा, असे शास्त्रामध्यें पंधरा दास सांगितले आहेत." ह्या नारदानें सांगितलेल्या दासांमध्यें गर्भदास आणि भक्तदास हे दोन वर्ज्य करून बाकीचे दास वरील बृहस्पतिवचनांत घ्यावे. वडवा म्हणजे दासी तिच्याशीं विवाह करून झालेला जो दास तो वडवाहृत होय. अंतेवासीदेखील कोणता तो त्यानेंच ( नारदानें ) सांगितला, तो असा–"वडिलांच्या आज्ञेनें आपलें कसब शिकण्यासाठीं अमुक कालपर्यंत राहावयाचें असा कालाचा निश्चय करून आचार्याच्या जवळ राहील, व आचार्य त्याला आपल्या घरीं भोजन घालून कसब शिकवील, तो अंतेवासी होय." शिष्य म्हणजे त्याच्यासारखाच विद्यार्थी होय. दास, पत्नी यांचा स्वामी ( यजमान ) किंवा यजमानाचा सपिंड मृत असेल तर सांगतो **विष्णु**–"[1]अनुलोमानें विवाहित पत्नी व [2]अनुलोमानें उत्पन्न दास यांना यजमानाचा सपिंड मृत असतां यजमानाच्या बरोबर आशौच होतें. यजमान मृत असतां आपल्या जातीचें आशौच." [3]प्रतिलोमदासांना आशौच नाहीं. कारण, "ब्राह्मणादि वर्णांच्या अनुलोमानें उत्पन्न असतील ते दास होतील. प्रतिलोमानें उत्पन्न ते दास होत नाहींत." असें **याज्ञवल्क्य**वचन आहे.

अथरात्रौजननेमरणेवारात्रिंत्रिभागांकृत्वाद्यभागद्वयेचेत्पूर्वदिनं अंत्येतूत्तरमिति**मिताक्षरायां** यत्तुप्रागर्धरात्रात्प्राग्वासूर्योदयात्पूर्वदिनमित्युक्तं तत्रदेशाचारतोव्यवस्था सर्वंचाशौचमाहिताग्नेर्दाहंतद्भिन्नस्यमरणमारभ्यज्ञेयम् अनग्निमतउत्क्रांतेराशौचादिद्विजातिषु दाहादग्निमतोविद्याद्विदेशस्थेमृतेसतीति **पैठीनसिस्मृतेः** साग्निराहिताग्निःआहिताग्निश्चेत्प्रवसन्म्रियेतपुनःसंस्कारंकृत्वाशववदाशौचमिति**वसिष्ठेविशेषोक्तेः** दाहादेवतुकर्तव्यंयस्यवैतानिकोविधिरिति**ब्राह्माच्च** यत्तु **धूर्तस्वामिनारामांडारेण**चोक्तं आहिताग्नेरपिमरणाद्येवदशरात्रं दशाहंशावमाशौचमितिमरणनिमित्तत्वात्तस्य यत्तु दाहादेवतस्याशौचमुक्तम् तत्संस्कारनिमित्ताशौचंपृथगेव तेनगृह्याग्नेःसंस्कारांगंत्रिरात्रं श्रौताग्नेस्तुदशरात्रं मरणनिमित्तंतूभयोर्दशाहं दाहात्प्रागपीति तदेतद्वचनविरोधात्पूर्वस्यैवोत्कर्षान्मूलकल्पनालाघवाच्चचिंत्यम् ।

## आतां आशौचाविषयीं रात्रीचा निर्णय सांगतो—

रात्रीं जनन किंवा मरण असतां रात्रीचे तीन भाग करून पहिल्या दोन भागांत जनन व मरण असेल तर पहिला दिवस समजावा. तिसऱ्या भागांत जनन किंवा मरण असेल तर उत्तर दिवस धरावा, असें **मिताक्षरेंत** सांगितलें आहे. आतां जें अर्धरात्रीच्या पूर्वी असेल तर किंवा सूर्योदयाच्या पूर्वी असेल तर पहिला दिवस, असें सांगितलें आहे, त्याविषयीं देशाचारावरून व्यवस्था जाणावी. सारें आशौच आहिताग्नि ( अग्नीचें आधान केलेला ) मृत असेल तर त्याच्या दाहापासून समजावें. आधानरहित मृत असेल तर त्याच्या मरणापासून समजावें. कारण, "ब्राह्मणादिकांमध्यें अग्निरहित असा परदेशांत मृत असतां त्याच्या प्राणोत्क्रमणापासून आशौच वगैरे समजावें. आणि श्रौताग्निमान् मृत असतां त्याचा दाह झालेल्या दिवसापासून आशौच वगैरे समजावें" असें **पैठीनसि**स्मृतिवचन आहे. या वचनांत अग्निमान् म्हणजे आहिताग्नि समजावा. कारण, "आहिताग्नि जर प्रवासांत मृत होईल तर पुनः संस्कार करून शवाप्रमाणें आशौच धरावें" असें **वसिष्ठस्मृतींत** आहिताग्नि, असें विशेष सांगितलें आहे. आणि "ज्याचे श्रौताग्नि आहेत त्याचें आशौच दाह झालेल्या दिवसापासूनच करावें" असें **ब्राह्म**वचनही आहे. आतां जें **धूर्तस्वामीनें** व **रामांडारानें** सांगितलें कीं, आहिताग्नीला देखील मरणदिवसापासूनच दहा दिवस. कारण, "शवनिमित्तक आशौच दहा दिवस" या **मनु** इत्यादि वचनांवरून मरणनिमित्तक तें आशौच असल्यामुळें मरणदिवसापासूनच धरावें. आतां जें दाह केलेल्या दिवसापासूनच आशौच सांगितलेलें तें संस्काराचें अंगभूत आशौच निराळेंच आहे. तेणेंकरून गृह्याग्नियुक्ताला संस्कारांग आशौच तीन दिवस. आणि श्रौताग्निमंताला संस्कारांग आशौच दहा दिवस. मरणनिमित्तक आशौच दोघांनाही दहा दिवस. तें दाहाच्या पूर्वी देखील आहे, असें सांगितलें, तें त्यांचें ( धूर्तस्वामी व रामांडार यांचें ) मत, ह्या वरील वचनाशीं विरोध येत असल्याकारणानें; पूर्वींचेंच आशौच पुढें दाहानंतर धरणें होत असल्यामुळें; आणि असें मानून व्यवस्था होत असतां स्वतंत्र निराळें आशौच मानण्याविषयीं मूलवचनाची कल्पना करावयास नको, हें लाघव येत असल्यामुळें, ( त्यांचें मत ) चिंत्य ( अग्राह्य ) आहे.

---

१ उत्तम वर्णाचा पुरुष व कनिष्ठ वर्णाची स्त्री यांचा विवाह तो अनुलोमविवाह. जसें–ब्राह्मण पुरुष व क्षत्रिय, वैश्य यांची कन्या. २ उत्तम वर्णाच्या पुरुषापासून कनिष्ठ वर्णाच्या स्त्रियेचेठायीं झालेला तो अनुलोम दास होय. ३ उत्तम वर्णाच्या स्त्रियेचे ठायीं कनिष्ठ वर्णाच्या पुरुषापासून उत्पन्न तो प्रतिलोम दास होय.

**अथातिक्रांताशौचं** तत्राशौचमध्येजननादौज्ञातेतच्छेषेणशुद्धिः विगतंतुविदेशस्थंश्टणुयाद्योह्यनिर्दशं यच्छेषंदशरात्रस्यतावदेवाशुचिर्भवेदिति**मनूक्तेः** अत्रकेचिदेतत्पुत्रातिरिक्तविषयं तेषांत्वाशौचमध्येश्रवणे-पितदाद्येव दशाहादि पितरौचेन्मृतौस्यातांदूरस्थोपिहिपुत्रकः श्रुत्वातद्दिनमारभ्यदशाहंसूतकीभवेदित्यस्य-सर्वापवादत्वादित्याहुः तन्न ज्ञातमरणस्यनिमित्तत्वात् अनभिमतउत्क्रांतेरित्यादिविरोधाच्च **स्मृत्यर्थसारेपि** जननेमरणेवाप्रथमदिनादूर्ध्वंज्ञातेपुत्रादीनांशेषेणैवशुद्धिरिति **षडशीतावपरार्के**चैवं दशाहादूर्ध्वंज्ञातेतु-**वृद्धवसिष्ठः** मासत्रयेत्रिरात्रंस्यात्षण्मासेपक्षिणीतथा अहस्तुनवमादर्वागूर्ध्वंस्नानेनशुध्यति जननेत्वतिक्रां-ताशौचंनास्त्येव नाशुद्धिःप्रसवाशौचेव्यतीतेषुदिनेष्वपीति**देवलोक्तेः** पितुःस्नानंतत्रापिभवत्येव निर्दशंज्ञाति-मरणंश्रुत्वापुत्रस्यजन्मच सवासाजलमाप्लुत्यशुद्धोभवतिमानवइति**मनूक्तेः** तच्चातिक्रांताशौचंदशाहादिजा-त्याशौचविषयं नत्वनुपनीतादिनिमित्तत्रिरात्रादौ उपनीतेतुविषमंतस्मिन्नेवातिकालजमिति**व्याघ्रोक्तेः** निर्दशंज्ञातिमरणं अतिक्रांतेदशाहेत्विति**मनूक्तेश्च** **माधवीयेदेवलस्तु** आत्रिपक्षात्त्रिरात्रंस्यात्षण्मासा-त्पक्षिणीततः परमेकाहमावर्षादूर्ध्वंस्नातोविशुध्यतीत्याह तत्रापदनापद्विषयत्वेनव्यवस्था इदंचैकदेशे ।

## आतां अतिक्रांत आशौच सांगतो—

जननाशौच व मृताशौच उत्पन्न होऊन तें दहा दिवसांचे आंत समजलें तर आशौचाचे जितके दिवस राहिले असतील तितक्या दिवसांनीं शुद्धि होते. कारण, "परदेशांत मृतसपिंडाला जो दहा दिवसांचे आंत श्रवण करील त्याला दहा दिवसांचे शेष दिवस जितके असतील तितकेच दिवस आशौच होतें" असें **मनु**वचन आहे. येथें **केचित् ग्रंथकार**–हें वचन पुत्रातिरिक्तविषयीं आहे. पुत्रांना तर आशौचामध्यें ( दहा दिवसांचे आंत ) जरी मातापितृमरण ऐकूं आलें तरी त्या ऐकि-लेल्या दिवसापासूनच दशाह आशौच वगैरे समजावें. कारण, "आईबाप मृत झाले आणि पुत्र दूर देशीं आहे तरी श्रुत झालेल्या दिवसापासून दहा दिवस आशौच धरावें" हें वचन सर्व वचनांचा अपवाद ( बाधक ) आहे, असें सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, जाणलेलें मरण आशौचाविषयीं निमित्त आहे. हें जाणलेलें मरण दहा दिवसांनंतरही असतें, म्हणून दुसरा हेतु सांगतो–"परदेशांत अग्निरहित मृत असतां त्याचें आशौचादिक प्राणोत्क्रमणापासून समजावें." त्या वर सांगित-लेल्या **पैठीनसि**स्मृति इत्यादिकांचा विरोधही येतो. **स्मृत्यर्थसारांत**ही जनन किंवा मरण प्रथम दिवसाच्या पुढें समजलें असतां पुत्रादिकांची शेषदिवसांनीच शुद्धि होते. **षडशीतींत** व **अपरार्कांत**ही असेंच आहे. दहा दिवस होऊन गेल्यावर समजलें तर सांगतो **वृद्धवसिष्ठ**-"तीन महिन्यांचे आंत समजलें असतां तीन दिवस. सहा महिन्यांच्या आंत समजलें असतां पक्षिणी. नऊ महिन्याच्या आंत समजलें तर एक दिवस. नऊ महिने होऊन गेल्यावर समजेल तर स्नानानें शुद्ध होतो." जननाशौचाविषयीं तर अतिक्रांत आशौच नाहींच. कारण, "जननाशौचाचे दिवस गेल्यावर आशौच नाहीं" असें **देवल**वचन आहे. तें जननाशौच अतिक्रांत असलें तरी पित्याला स्नान सांगितलें आहेच. कारण, "दहा दिवस होऊन गेल्यावर ज्ञातीचें ( सपिंडाचें ) मरण समजलें व दहा दिवस झाल्यावर पुत्राचें जन्म समजलें तर वस्त्रासहित स्नान करून मनुष्य शुद्ध होतो" असें **मनु**वचन आहे. तें अतिक्रांताशौच दशाहादिक जातीच्या आशौचाविषयीं समजावें. उपनयनादिक नसलेल्या निमित्तानें प्राप्त झालेलें जें त्रिरात्र-एकरात्र इत्यादि आशौच त्याविषयीं अतिक्रांताशौच नाहीं. कारण, "उपनयन झालेला मृत असतां त्याच्याचविषयीं वर्णनिमित्त विषमाशौच व अतिक्रांताशौच आहे" असें **व्याघ्र**वचन आहे. आणि "ज्ञातिमरण दहा दिवसांनंतर समजलें असतां वस्त्रसहित स्नान करून मनुष्य शुद्ध होतो" हें वर सांगितलेलें, तसेंच "दहा दिवस अतिक्रांत असतां०" असें मनुवचनही आहे. **माधवीयांत देवल** तर–"दहा दिवसांनंतर तीन पक्षांचे आंत समजेल तर तीन दिवस. सहा महिन्यांच्या आंत समजेल तर पक्षिणी. सहा महिन्यांच्या पुढें वर्षाच्या आंत समजेल तर एक दिवस. वर्षानंतर समजेल तर स्नान करून शुद्ध होतो" असें सांगतो. या वचनांत तीन पक्षांनंतर पक्षिणी व पूर्वीच्या वृद्धवसिष्ठवचनांत तीन महिन्यांनंतर पक्षिणी सांगितलें. तसेंच या वचनांत वर्षापर्यंत एक दिवस. व पूर्वीच्या वृद्धवसिष्ठवच-नांत नवममासानंतर स्नान सांगितलें त्यांमध्यें आपत्काल व अनापत्काल पाहून व्यवस्था करावी. हें त्रिरात्रादि आशौच एकदेशीं मृताचें समजावें.

**देशांतरेतुस्नानमात्रं देशांतरमृतंश्रुत्वाक्लीबेवैखानसेयतौ मृतेस्नानेनशुध्यंतिगर्भस्रावेचगोत्रिणइति परा-शरोक्तेरितिविज्ञानेश्वरः स्नानंवत्सरांते अर्वाक्त्रिपक्षात्त्रिनिशंषण्मासाच्चदिवानिशं अहःसंवत्सरादर्वा-ग्देशांतरमृतेष्वपीतिविष्णूक्तेरितिमाधवः इदंसपिंडानां देशांतरेस्नानंसोदकानामितियुक्तं कश्यपंतांबु-**

**बृहस्पतिः** महानद्यंतरंयत्रगिरिर्वाव्यवधायकः वाचोयत्रविभिद्यंतेतद्देशांतरमुच्यते देशांतरंवदंत्येकेषष्टियोजनमायतं चत्वारिंशद्वदंत्यन्येत्रिंशदन्येतथैवचेति एतत्सर्वंमातापितृभिन्नविषयं तयोस्तु पितरौचेदितिपूर्वपैठीनसिवाक्यात्सदापूर्णमेवदशाहादि **स्मृत्यर्थसारे**पि मातापितृमरणेदूरदेशेपिसंवत्सरोर्ध्वमपिपुत्रोदशाहादिकंपूर्णमाशौचंकुर्यात् स्त्रीपुंसयोःपरस्परंसपत्नीषुचैवमिति **शुद्धितत्त्वादयोगौडा**स्तु ऊर्ध्वसंवत्सरादाद्याद्बंधुश्चेच्छ्रूयतेमृतः भवेदेकाहमेवात्रतच्चसंन्यासिनांनत्विति**देवलोक्तेः** पित्रोरब्दमध्येत्रिरात्रमूर्ध्वमेकाहः बंधुर्मातापिताभर्ताच पूर्वोक्तदशाहस्तुकलिंगादिदेशपरइत्याहुः तेबंधुपदस्यपित्रादिपरत्वेमानाभावादुपेक्ष्याः सापत्नमातुस्तु**दक्षः** पितृपत्न्यामपेतायांमातृवर्जंद्विजोत्तमः संवत्सरेव्यतीतेपित्रिरात्रमशुचिर्भवेत हीनवर्णमातृषुसपत्नीषुचैवमिति**स्मृत्यर्थसारे केचित्**पितुःपत्न्यांप्रमीतायामौरसेतनयेतथेति **ब्राह्मोक्ते**स्त्वौरसेपीदमाहुः **षडशीता**वप्येवं एतत्सर्ववर्णतुल्यं तुल्यंवयसिसर्वेषामतिक्रांतेतथैवचेति **व्याघ्रोक्तेः।**

देशांतरीं मृत असतां दहा दिवसांनंतर समजेल तर स्नान मात्र आहे. कारण, "देशांतरीं सपिंड मृत झालेला समजलें असतां; व नपुंसक, वैखानस, संन्याशी हे मृत झाले असतां त्यांचे गोत्रज स्नान करून शुद्ध होतात. आणि गर्भस्राव झाला असतां गोत्रज स्नानानें शुद्ध होतात" असें **पराशर**वचन आहे, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. देशांतरीं मृत असला तरी वर्षानंतर स्नान. कारण, "तीन पक्षांच्या आंत समजेल तर तीन दिवस; सहा महिन्यांच्या आंत दिवसरात्र; वर्षाच्या आंत एक दिवस; हें देशांतरीं मृतांविषयीं देखील समजावें" असें **विष्णु**वचन आहे, असें **माधव** सांगतो. हें माधवानें सांगितलेलें सपिंडांना समजावें. देशांतरीं मृत असतां समानोदकांना ( आठव्यापासून पुढच्यांना ) स्नान हें युक्त आहे. देशांतराचें लक्षण सांगतो **बृहस्पति**-"महानदी किंवा मोठा पर्वत मध्यें असून भाषेचा ज्या ठिकाणीं भेद होतो, तें देशांतर म्हटलें आहे. साठ योजनें ( २४० कोश ) दूर झालें म्हणजे देशांतर, असें कितीएक म्हणतात. इतर विद्वान् चाळीस योजनें दूर म्हणजे देशांतर म्हणतात. दुसरे विद्वान् तीस योजनें दूर असलें म्हणजे देशांतर म्हणतात." तीन दिवस आशौच सांगितलें हें सारें मातापिता यांहून इतरांविषयीं आहे. माता व पिता यांचें तर "जर मातापिता मृत असून पुत्र दूर असला तरी श्रुत झालेल्या दिवसापासून दहा दिवस सूतक धरावें" या पूर्वी सांगितलेल्या **पैठीनसि**वचनावरून सर्वदा ( कालांतरीं देखील ) संपूर्णच दशाहादि आशौच समजावें **स्मृत्यर्थसारांत**ही-माता व पिता मृत असतां पुत्र दूर देशीं असला तरी वर्षानंतर समजलें तरी त्यानें दशाहादिक पूर्ण आशौच करावें. याचप्रमाणें पतीचें स्त्रियेनें व स्त्रियेचें पतीनें आणि सवतीनें सवतीचें देशांतरीं व कालांतरींही पूर्ण दशाहादि आशौच करावें, असें सांगितलें आहे. **शुद्धितत्त्व इत्यादि गौड**ग्रंथ तर-"बंधु मृत झालेला एक वर्ष होऊन गेल्यावर जर समजेल तर त्याचें आशौच एक दिवसच होतें. तें संन्याशांना नाहीं." ह्या **देवल**वचनावरून मातापितरांचें वर्षाच्या आंत तीन दिवस. वर्षानंतर एक दिवस. या वचनांत बंधु म्हणजे माता, पिता व भर्ता समजावा. पूर्वी सांगितलेलें दशाह आशौच तर कलिंग इत्यादि देशाविषयीं समजावें, असें सांगतात. तेथें बंधु या पदाचा माता पिता इत्यादि अर्थ करण्याविषयीं प्रमाण नसल्यामुळें त्यांचें तें मत उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे. सापत्न मातेला तर सांगतो **दक्ष**-"माता वर्ज्य करून दुसरी बापाची पत्नी मृत असतां एक वर्ष होऊन गेल्यावर समजलें तरी तीन दिवस आशौच धरावें." आपल्यापेक्षां कमी जातीच्या माता व सवती यांविषयीं देखील असेंच समजावें, असें **स्मृत्यर्थसारांत** सांगितलें आहे. **केचित् ग्रंथकार**-"बापाची पत्नी मृत असतां, तसाच औरस पुत्र मृत असतां" ह्या **ब्राह्म**वचनावरून औरस पुत्राचें देखील असें समजावें, असें सांगतात. **षडशीतींत**ही असेंच आहे. हें अतिक्रांताशौच ब्राह्मणादि चारी वर्णांना समान आहे. कारण, "वयोनिमित्तक आशौच आणि अतिक्रांत आशौच हें सर्व वर्णांना समान आहे" असें **व्याघ्र**वचन आहे.

**अथाशौचसंपातेउच्यते** तत्रशावेशावंसूतकेसूतकं शावेसूतकंसूतकेशावंवा तत्राप्युत्तरंकालतः पूर्वेणसमंन्यूनमधिकंचेतिद्वादशभेदाः यदैकदिनेसमंन्यूनमधिकंवाशौचद्वयंतत्रतंत्रेणान्यसिद्धिः द्वयोरेककालत्वात् यदातुद्वितीयादिदिनेषूत्तरंसजातीयंशावेजननंवासमकालंन्यूनकालंवापरंस्यात्तदाषट्सुपक्षेषुपूर्वशेषेण शुद्धिः अंतराजन्ममरणेशेषाहोभिर्विशुध्यतीति**याज्ञवल्कयोक्तेः** अंतराज्ञातेइत्यर्थः ज्ञातस्यैवजननादेर्निमित्तत्वात् पूर्वाशौचोत्तरंतन्मध्योत्पन्नेज्ञातेतूत्तरमेवकार्यम् **शुद्धितत्त्वे**प्युक्तं पूर्वाशौचांतरुत्पन्नंसमानं लघुवानिमित्तंतत्कालादुपरिश्रुतंस्वाशौचहेतुरेव अज्ञातंतुन अविज्ञातेनदोषःस्याच्छ्राद्धादिषुकथंचनेत्यस्याशौचसांकर्येपिप्रवृत्तेः तेनाज्ञानाद्वृषोत्सर्गादौकृतेपश्चाज्ज्ञातेपिनावृत्तिरिति **माधवीयेयमोपि** जननेजननंचे-

त्स्यान्मरणेमरणंतथा पूर्वशेषेणशुद्धिःस्यादुत्तराशौचवर्जनं अत्रकेचिदंतर्दशाहेस्यातांचेत्पुनर्मरणजन्मनी तावत्स्यादशुचिर्विप्रोयावत्तत्स्यादनिर्दशमितिमनुपराशराद्यैर्दशाहग्रहणात्पूर्णाशौचएवपूर्वशेषेणशुद्धिः त्र्यहाद्यल्पाशौचसंपातेतूत्तरेणैवशुद्धिरित्याहुः हरदत्तोप्येवमाह गौडाअप्येवं तन्न याज्ञवल्क्यादिवशेनदशाहस्यतुल्यकालाशौचोपलक्षणत्वात् समानाशौचसंपातेप्रथमेनसमापयेत् असमानंद्वितीयेनधर्मराजवचोयथेतिमाधवीयेशंखोक्तेः अपरार्कमिताक्षरादिविरोधाच्च ।

## आतां आशौचसंपाताविषयीं सांगतो—

आशौचसंपाताचे भेद बारा होतात, ते असे–१ मृताशौचांत सममृताशौच, २ मृताशौचांत न्यूनमृताशौच, ३ मृताशौचांत अधिकमृताशौच, ४ जननाशौचांत समजननाशौच, ५ जननाशौचांत न्यूनजननाशौच, ६ जननाशौचांत अधिकजननाशौच, ७ मृताशौचांत समजननाशौच, ८ मृताशौचांत न्यूनजननाशौच, ९ मृताशौचांत अधिकजननाशौच, १० जननाशौचांत सममृताशौच, ११ जननाशौचांत न्यूनमृताशौच, १२ जननाशौचांत अधिकमृताशौच. याप्रमाणें बारा भेद समजावे. ज्या वेळीं एका दिवशीं दोन आशौचें समान दिवसांचीं उत्पन्न होतील किंवा एक कमी व एक अधिक अशीं दोन उत्पन्न होतील त्या वेळीं एक आशौच धरल्यानें तंत्रेंकरून इतराची सिद्धि होते. कारण, दोन्ही आशौचांचा काल एक आहे. ज्या वेळीं पूर्वी एक आशौच असतां दुसऱ्या–तिसऱ्या इत्यादि दिवशीं त्याच जातीचें ( पूर्वीचें मृताशौच असेल तर मृताशौच, जननाशौच असेल तर जननाशौच ) उत्पन्न होईल अथवा मृताशौचांत जननाशौच उत्पन्न होईल, व तें नंतर उत्पन्न झालेलें आशौच पहिल्या आशौचाशीं समान कालाचें किंवा न्यूनकालाचें असेल तर सहा भेदांमध्यें ( मृताशौचांत सममृताशौच, मृताशौचांत न्यूनमृताशौच, जननाशौचांत समजननाशौच, जननाशौचांत न्यूनजननाशौच, मृताशौचांत समजननाशौच, मृताशौचांत न्यूनजननाशौच या पक्षांमध्यें ) पहिल्या आशौच समाप्तीनें दुसऱ्या आशौचाची शुद्धि होते. कारण, आशौचामध्यें जनन किंवा मरण होईल तर पहिल्या आशौचाच्या शेषदिवसांनीं शुद्धि होते'' असें याज्ञवल्क्यवचन आहे. पहिल्या आशौचामध्यें दुसऱ्या आशौचाचें ज्ञान झालें असतां पूर्वीच्यानें दुसऱ्याची शुद्धि असा अर्थ त्या वचनाचा आहे. कारण, जाणलेलें जनन व मरण हेंच आशौचाविषयीं निमित्त आहे. पहिल्या आशौचांत उत्पन्न झालेलें आशौच, पहिलें आशौच संपल्यावर समजेल तर दुसरें केलेंच पाहिजे. शुद्धितत्त्वांतही सांगितलें आहे—पहिल्या आशौचामध्यें समान किंवा अल्प आशौच उत्पन्न झालें असून पहिल्या आशौचाचे समाप्तीनंतर समजेल तर तें आपल्या आशौचाला कारण आहेच; म्हणजे निवृत्ति होत नाहीं. त्याचें ज्ञान नसेल तर आशौच नाहीं. कारण, ''आशौच अज्ञात असेल तर श्राद्धादिकर्माविषयीं दोष नाहीं'' हें वचन ह्या आशौचसंपातांतही प्रवृत्त होतें. तेणेंकरून ( ज्ञानापूर्वी दोष नसल्यामुळें ) आशौचज्ञान नसतांना वृषोत्सर्गादिक कर्म केलें, नंतर आशौचाचें ज्ञान झालें तरी पूर्वीच्या कर्मांची ( वृषोत्सर्गादिकाची ) आवृत्ति ( पुनःकरण ) होत नाहीं. माधवीयांत यमही—''जननाशौचांत जननाशौच, मरणाशौचांत मरणाशौच प्राप्त असतां पूर्वीच्या आशौचाच्या शेषानें शुद्धि होते, दुसरें आशौच वर्ज्य करावें.'' येथें केचित् विद्वान्–''दशाह आशौचामध्यें दुसरें जनन किंवा मरण उत्पन्न होईल तर जोंपर्यंत तें पहिलें दशाह आशौच आहे तोंपर्यंत ब्राह्मण अशुचि होतो.'' अशा वचनामध्यें मनु–पराशर इत्यादिकांनीं 'दशाह' या पदाचें ग्रहण केल्यामुळें पूर्ण आशौचांतच पहिल्या शेषानें शुद्धि होते. तीन दिवसांच्या वगैरे अल्प आशौचांचा संपात असेल तर दुसऱ्या आशौचानेंच शुद्धि होते, असें सांगतात. हरदत्त असेंच सांगतो. गौडही असेंच सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, याज्ञवल्क्यादिवचनानुरोधानें मनु–पराशरादिवचनांतील 'दशाह' हें पद तुल्यकालीन आशौचाचें उपलक्षण ( बोधक ) आहे. म्हणजे समान कालाच्या पहिल्या आशौचानें समान कालाचें दुसरें आशौच निवृत्त होतें, असा भाव. ''समान आशौचांचा संपात असतां पहिल्या आशौचानें दुसरें आशौच समाप्त करावें, असमान आशौचांचा संपात असतां दुसऱ्या आशौचानें समाप्त करावें, असें यमधर्माचें वचन आहे'' असें माधवीयांत शंखवचन आहे. आणि अपरार्क, मिताक्षरा इत्यादिकांचा विरोधही येतो.

यदातुसूतकेशावंसमंन्यूनमधिकंवातदानपूर्वशेषाच्छुद्धिः तदाहांगिराः सूतकेमृतकंचेत्स्यान्मृतकेत्वथसूतकं तत्राधिकृत्यमृतकंशौचंकुर्यान्नसूतकं षट्त्रिंशन्मते शावाशौचेसमुत्पन्नेसूतकंतुयदाभवेत् शावेनशुध्यतेसूतिर्नसूतिःशावशोधनी चतुर्विंशतिमतेपि मृतेनशुध्यतेजातंनमृतंजातकेनतु अतोयदावशाहजननमध्येतदंतेवात्र्यहादिशावंतदापूर्वेणशुद्धावपितन्निमित्तमस्पृश्यत्वंभवत्येव मरणोत्पत्तियोगेतुगरीयोमरणंभवेदितिकौर्माच्च गौतमव्याख्यायांवृद्धात्रिरपि सूतकाद्विगुणंशावंशावाद्विगुणमार्तवं आर्तवाद्विगुणासूतिस्ततोपिशवदाहकः अत्रपूर्वपूर्वेणनोत्तरोत्तरनिवृत्तिरस्पृश्यत्वाधिक्यादित्यर्थः षडशीतावपि कमात्-

बहुसूतिस्तुन्यूनशावविशोधनीति रात्रिशेषादौवर्धितद्वित्रिदिनैरागंतुकैःसूतेर्बहुत्वंनस्वभावेन अतस्तत्रन्यूनशावस्यापिनपूर्वेणशुद्धिरितिवक्तुंस्वभावेत्युक्तं **ब्राह्मेपि** नागंतुकैरथाहोभिराशौचमपनुद्यते नचपातनिमित्तेनशावस्यान्यस्यशोधनमिति **एवंनवपक्षाः** यदात्र्यहाद्यल्पाशौचमध्येसजातीयंविजातीयंवादीर्घकालमुत्तरंतदाप्युत्तरंपूर्णकार्यं नपूर्वेणशुद्धिः स्वल्पाशौचस्यमध्येतुदीर्घाशौचंभवेद्यदि नचपूर्वेणशुद्धिःस्यात्स्वकालेनैवशुध्यतीत्युशनसोक्तेः तेनत्र्यहादिशावमध्येदशाहादिसूतकेपिनपूर्वेणशुद्धिरित्यपरार्कः शावनिमित्तमस्पृश्यत्वंचभवत्येव **शुद्धिविवेकेतु** शावेनशुध्यतेसूतिरितिप्रागुक्तेः तत्राप्युत्तराशौचनिवृत्तिरुक्ता तन्न उत्तरस्यकालाधिक्येनबलवत्त्वात् **माधवीयेयमोपि** अघवृद्धिमदाशौचंपश्चिमेनसमापयेत् यथात्रिरात्रे प्रक्रांतेदशाहंप्रविशेद्यदि आशौचंपुनरागच्छेत्तत्समाप्यविशुध्यति **हारीतोपि** गुरुणालघुशुध्येत्तुलघुनानैवतद्गुर्विति गुरुत्वंलघुत्वंचकालकृतमेव पूर्वानुरोधात् एतद्धरदत्तेनस्पष्टमुक्तं **मिताक्षरायामप्येवं** यत्तु अघानांयौगपद्येतुज्ञेयाशुद्धिर्गरीयसा मरणोत्पत्तियोगेतुगरीयोमरणंभवेदिति **हारीतकौर्मादि** तत्रास्पृश्यत्वाभिप्रायंशावस्यगुरुत्वंज्ञेयम् ।

ज्या वेळीं जननाशौचांत मृताशौच समकालीन किंवा न्यूनकालीन अथवा अधिककालीन प्राप्त होईल त्या वेळीं पूर्वीच्या जननाशौचाच्या शेषानें उत्तराशौचाची शुद्धि होत नाहीं. तें सांगतो **अंगिरा**–"जर जननाशौचांत मृतक उत्पन्न झालें अथवा मृतकांत जनन उत्पन्न झालें तर त्या ठिकाणीं मृतक धरून शुद्धि करावी. जननाशौच धरून शुद्धि करूं नये." **षट्त्रिंशन्मतांत**–"ज्या वेळीं मृताशौचांत जननाशौच उत्पन्न होईल त्या वेळीं मृताशौचानें जननशौच जातें. जननाशौचानें मृताशौच जात नाहीं." **चतुर्विंशतिमतांत**ही–"मृताशौचानें जननाशौच शुद्ध होतें. जननाशौचानें मृताशौच शुद्ध होत नाहीं. म्हणून ज्या वेळीं दहा दिवसांचे जननाशौचामध्यें किंवा त्याच्या अंतीं तीन दिवसांचे वगैरे मृताशौच प्राप्त होईल तेव्हां पूर्वीच्या जननाशौचानें शुद्धि झाली तरी मृताशौचनिमित्तानें अस्पृश्यत्व आहेच. आणि "मरण व उत्पत्ति यांचा योग असतां त्यांमध्यें मरण गुरु ( अधिक ) आहे" असें **कूर्मपुराणा**चें वचनही आहे. **गौतम**व्याख्येंत **वृद्धात्रि**ही सांगतो–"जननाशौचाहून मृताशौच दुप्पट दोषी आहे. मृताशौचाहून दुप्पट स्त्रियांचें आर्तव दोषी आहे. आर्तवाहून दुप्पट सूतिका दोषी आहे. सूतिकेहून प्रेतदाहक अधिक दोषी आहे." यांत पहिल्या पहिल्यानें पुढच्या पुढच्याची निवृत्ति होत नाहीं. कारण, पुढच्या पुढच्याला अस्पृश्यत्व दोष अधिक आहे, असा भाव. **षडशीतींत**ही–"स्वभावानें बहुत असलेलें सूतिकेचें आशौच न्यून असलेल्या मृताशौचाचें शोधन करितें." या वचनांत 'स्वभावानें बहुत असलेलें सूतिकेचें आशौच' असें म्हणण्याचें कारण, आशौचाच्या दहाव्या रात्रीं दुसरें आशौच प्राप्त असतां पहिल्या आशौचाचे दोन किंवा तीन दिवस वाढवून तितक्या दिवसांनीं दुसऱ्या आशौचाची निवृत्ति होते असें पुढें सांगावयाचें आहे, त्याप्रमाणें ज्या ठिकाणीं सूतिकेच्या आशौचाचे दिवस वाढवून सूतिकाशौच बहुत झालें असेल त्या ठिकाणीं वाढविलेल्या बहुत अशा पहिल्या सूतिकाशौचानें अल्प अशाही मृताशौचाची निवृत्ति होत नाहीं, असें सांगण्याकरितां स्वभावानेंच बहुत असलेलें सूतिकाशौच अल्प मृताशौचाचें शोधक म्हणून सांगितलें, असें समजावें. **ब्राह्मांत**ही–"आगंतुक ( वाढविलेल्या ) दिवसांनीं–अर्थात् तिसरें–आशौच जात नाहीं. गर्भपातनिमित्तक आशौचानें इतर मृताशौचाची शुद्धि होत नाहीं." याप्रमाणें पहिले सहा पक्ष आणि जननाशौचांत सम, न्यून, व अधिक मृताशौचाचे हे तीन पक्ष मिळून नऊ पक्षांची व्यवस्था सांगितली. ज्या वेळीं तीन दिवस, पक्षिणी इत्यादि अल्प आशौचामध्यें त्याच जातीचें (मृताशौचांत मृताशौच इत्यादि) किंवा भिन्न जातीचें दुसरें आशौच अधिक दिवसांचें प्राप्त होईल त्या वेळींही दुसरें आशौच संपूर्ण करावें. पहिल्या आशौचानें दुसऱ्याची शुद्धि होत नाहीं. कारण, "जर स्वल्प आशौचामध्यें दीर्घ आशौच उत्पन्न होईल तर पूर्व अल्प आशौचानें दुसऱ्या दीर्घ आशौचाची शुद्धि होत नाहीं. तर आपल्या कालानेंच त्या दीर्घाशौचाची शुद्धि होते" असें **उशनसाचें** वचन आहे. तेणेंकरून तीन दिवसांचें वगैरे मृताशौचांत दशाहादिक जननाशौच उत्पन्न झालें तरी पहिल्या आशौचानें शुद्धि होत नाहीं, असें **अपरार्क** सांगतो. मृताशौचनिमित्तक अस्पृश्यत्व होतच आहे. **शुद्धिविवेकांत** तर—"मृताशौचानें जननाशौच शुद्ध होतें, असें पूर्वी उक्त षट्त्रिंशन्मताच्या वचनावरून अल्प मृताशौचांतही अधिक जननाशौचाची निवृत्ति सांगितली आहे, तें बरोबर नाहीं. कारण, दुसऱ्या आशौचाचा काल अधिक असल्यामुळें तें प्रबळ आहे. **माधवीयांत यमही**—"अधिक दिवसांचें आशौच पूर्वीच्या आशौचांत समाप्त करूं नये. जसें–तीन दिवसांचें आशौच प्राप्त असतां त्यांत जर दहा दिवसांचें आशौच उत्पन्न झालें तर तें आशौच प्राप्त होतें, तें समाप्त झाल्यावर शुद्ध होतो." **हारीतही**–"गुरु आशौचानें लघु आशौचाची शुद्धि होते. लघु आशौचानें गुरूची शुद्धि होत नाहीं." या वचनांत पूर्वीच्या अनुरोधानें गुरु व लघु हें कालानें केलेलेंच समजावें. हा प्रकार हरदत्तानें स्पष्ट सांगितला आहे. **मिताक्षरेंत**ही असेंच आहे. आतां जें "अनेक आशौचें एक काळीं प्राप्त होतील तर गुरु आशौचानें लघु आशौचाची

शुद्धि जाणावी. मृताशौच व जननाशौच यांचा योग झाला असेल तर त्यामध्यें मृताशौच गुरु आहे" असें हारीत-कौर्मादिवचन आहे, त्यांत अस्पृश्यत्वामुळें मृताशौचाला गुरुत्व सांगितलें आहे, असें समजावें.

क्वचिदल्पकालेनापिदीर्घकालाशौचनिवृत्तिमाहदेवलः परतःपरतोशुद्धिरघवृद्धौविधीयते स्याच्चेत्पंचमादह्नःपूर्वेणैवात्रशिष्यते अस्यार्थः अघवृद्धौदीर्घाशौचे परतोशुद्धिः परमाशौचं यदिपूर्वाशौचमुत्तरस्यपंचमदिनात्परतोनुवर्ततेतदापूर्वेणैवशुद्धिः पूर्वस्योत्तराशौचार्धाधिककालव्यापित्वेपूर्वशेषाच्छुद्धिरित्यर्थः यथाषष्ठमासेगर्भपातनिमित्तषडहाशौचमध्येदशाहपातेपूर्वेणोत्तरनिवृत्तिः यथावा त्र्यहमध्येस्रावपातनिमित्तचतुरहपंचाहयोरितिकश्चित् तन्न दशाहावधिपूर्वशेषशुध्यावेदकवाक्यविरोधात् षष्ठादिदिनेपूर्णाशौचमंत्यरात्रौतुद्व्यहइत्यनौचित्याच्च अस्मद्गुरवस्तुपंचतमादह्नआशौचंततोन्यूनंत्र्यहादिचेत्स्यादस्मिन्विषयेपूर्वेणैवाशुद्धिःशिष्यते दशाहादिरात्रिशेषेत्र्यहादिपातेत्र्यहाद्यल्पाशौचानांपरस्परंरात्रिशेषेसंपातेचनद्व्यहादिवृद्धिरित्यर्थमाहुः क्वचित्पूर्वशेषेणशुद्धेरपवादमाहगौतमः रात्रिशेषेसतिद्वाभ्यांप्रभातेतिसृभिरिति प्रभातेंत्ययामेरात्रिशेषेद्व्यहाच्छुद्धिर्यामशेषेशुचिस्त्र्यहादितिशातातपोक्तेः इदंशावांतेसूतकपातेसजातीयेवातुल्यं अत्र केचित् रात्रिशब्दःअहोरात्रपरः अहःशेषेद्वाभ्यांप्रभातेतिसृभिरितिशंखलिखितोक्तेः अथयदिदशरात्राःसन्निपतेयुराद्यंदशरात्रमाशौचमानवमाद्दिवसादतऊर्ध्वंद्विरात्रेण व्युष्टायांत्रिरात्रेणेतिबौधायनोक्तेः पुनःपातेदशाहात्प्राक्पूर्वेणसहगच्छति दशमेह्निपतेद्यस्याहर्द्वयात्सविशुध्यतीति प्रभातेतुत्रिरात्रेणदशरात्रेष्वयंविधिरितिदेवलोक्तेश्च नवमदशमशब्दौचोपांत्यांत्यदिनपरौ तेनक्षत्रियादावपितथेत्याहुः माधवीयेप्येवम्।

क्वचित् स्थलीं अल्पकालीन आशौचानेंही दीर्घकाल आशौचाची निवृत्ति सांगतो. **देवल**—"पहिल्या आशौचांत दुसरें दीर्घ आशौच प्राप्त असतां पहिल्यानें दुसरें जात नाहीं. जर पहिलें आशौच दुसऱ्या आशौचाच्या पांचव्या दिवसाच्या पुढें अनुवृत्त असेल तर पहिल्या आशौचानेंच त्या दीर्घ आशौचाची शुद्धि होते." म्हणजे पहिलें आशौच दुसऱ्या आशौचाच्या निम्मेपेक्षां पुढें गेलें असेल तर पहिल्या आशौचाच्या शेषानें शुद्धि होते, हा इत्यर्थ होय. जसें-सहाव्या महिन्यांत गर्भपात होऊन तन्निमित्तक सहा दिवसांच्या आशौचामध्यें दुसरें दहा दिवसांचें आशौच प्राप्त असेल तर पहिल्या आशौचानें दुसऱ्याची निवृत्ति होते. अथवा तीन दिवसांच्या आशौचामध्यें स्राव-पातनिमित्तक चार-पांच दिवसांचें आशौच प्राप्त असतां त्या तीन दिवसांच्या आशौचानें त्या चार-पांच दिवसांच्या आशौचाची निवृत्ति होते; असें **कोणीएक** सांगतो. तें हें कोणीएकानें सांगितलेलें देवलमत बरोबर नाहीं. कारण, या अर्थानें असें झालें कीं, पहिलें आशौच दुसऱ्या आशौचाला अर्धापेक्षा अधिक व्यापील तर म्हणजे पहिल्या दहा दिवसांच्या आशौचांत पांचव्या दिवसाचे आंत दुसरें दहा दिवसांचें प्राप्त होईल तर पहिल्यानें दुसऱ्याची निवृत्ति होईल असें झालें. म्हणून पूर्वी सांगितलेल्या "दहा दिवसांचे आंत दुसरें आशौच प्राप्त असतां पहिल्यानें दुसऱ्याची निवृत्ति होते" या **मनु** इत्यादिकांच्या वचनाशीं विरोध येतो. आणि या देवलवचनानें, सहाव्या-सातव्या इत्यादि दिवशीं दुसरें आशौच प्राप्त असतां निवृत्ति होत नाहीं, तर दुसरें पूर्ण आशौच धरावें, असें झालें. व पुढें सांगावयाच्या **शातातप-देवल**—इत्यादि वचनांनीं पहिल्या आशौचाच्या शेवटच्या रात्रीं दुसरें प्राप्त असतां दोन दिवस आशौच, असें झालें तें अनुचितही आहे. **आमचे गुरु तर**—वरील देवलवचनाचा अर्थ-पांचव्या दिवसाचे आंतील म्हणजे तीन दिवसांचें वगैरे आशौच दहा दिवसांच्या आशौचांत पडलें तर पहिल्या आशौचानें अशुद्धि राहते, आणि दशाहादि आशौचाच्या शेवटच्या रात्रीं तीन दिवसांचें आशौच पडलें तर आणि दोन्ही तीन दिवसांच्या वगैरे अल्प आशौचांचा संपात शेवटच्या रात्रीं पडला तर दोन-तीन दिवसांची वृद्धि होत नाहीं, असा अर्थ करितात. क्वचित्स्थलीं पूर्वशेषानें शुद्धीचा अपवाद सांगतो **गौतम**—"पहिल्या आशौचाची रात्रि शेष असतां दुसरें आशौच समजलें तर दोन दिवसांनीं शुद्धि होते. आणि प्रभातकालीं म्हणजे रात्रीच्या शेवटच्या प्रहरीं समजलें तर तीन दिवसांनीं शुद्धि होते." या वचनांत प्रभात म्हणजे शेवटचा प्रहर समजावा; कारण, "रात्रिशेष असेल तर दोन दिवसांनीं शुद्धि आणि रात्रीचा एक प्रहर शेष असतां समजेल तर तीन दिवसांनीं शुद्धि होते" असें **शातातपवचन** आहे. हें सांगणें मृताशौचाच्या अंतीं जननाशौच समजलें असतां किंवा मृताशौचाच्या अंतीं मृताशौच व जननाशौचाच्या अंतीं जननाशौच समजलें असतां समान आहे. येथें **केचित् ग्रंथकार**—या गौतमवचनांतील 'रात्रि' शब्द दिवसरात्रीचा बोधक आहे. कारण, "पहिलें आशौच एक दिवस शेष असून दुसरें समजेल तर दोन दिवसांनीं शुद्धि व प्रभातकालीं समजेल तर तीन दिवसांनीं शुद्धि" असें **शंखलिखितवचन** आहे. "पहिलें आशौच दहा दिवसांचें असून त्यामध्यें नऊ दिवसांचे आंत दुसरें दहा दिवसांचें आशौच पडलें तर तें संपतें. नऊ दिवसांच्या पुढें दहाव्या दिवशीं दुसरें दहा दिवसांचें

आशौच पडलें तर दोन दिवसांनीं शुद्धि होते. पहांटेस पडेल तर तीन दिवसांनीं शुद्धि होते." असें **बौधायन**वचन आहे. "दहाव्या दिवसाचे आंत पुनः दुसरें आशौच पडेल तर पहिल्या आशौचाच्या बरोबर दुसरें जातें. ज्याला दुसरें आशौच पहिल्याच्या दहाव्या दिवशीं पडेल तो दोन दिवसांनीं शुद्ध होतो. प्रभातकालीं पडेल तर तीन दिवसांनीं शुद्ध होतो. दहा दिवसांच्या आशौचांविषयीं हा विधि समजावा" असें **देवल**वचनही आहे. वरील वचनांत 'नवम' या शब्दानें आशौचाचे शेवटच्या दिवसाजवळचा दिवस समजावा. आणि 'दशम' या शब्दानें आशौचाचा शेवटचा दिवस समजावा. तेणेंकरून क्षत्रिय–वैश्य इत्यादिकांच्या बारा व पंधरा दिवसांच्या आशौचांतही तसेंच समजावें, असें ( केचित् ) सांगतात. **माधवाच्या** ग्रंथांतही असेंच आहे.

**अन्येत्वाहुः** अंतर्दशाहेस्यातांचेत्पुनर्मरणजन्मनी तावत्स्यादशुचिर्विप्रोयावत्तत्स्यादनिर्दशमितिमनु-**पराशरा**द्यैर्दशमदिनेनोत्तरस्यशुद्धेरुक्तत्वात् विरोधःस्पष्टएव विरोधेच यद्वैकिंचनमनुरवदत्तद्भेषजं कलौ-**पाराशरस्मृति**रित्यनेनपूर्ववचसांबाधः अतएव**वाचस्पतिना**तेषामनाकरत्वमुक्तं साकरत्वेपिजाति-मात्रविप्रादिविषयं देशांतरविषयंवा युगांतरविषयंवास्तु तेन**गौतमीये** रात्रिशब्दो नाहोरात्रपरः रात्रिमा-त्रावशिष्टेइति**मिताक्षरोक्ते**श्च नकुकविकृतेरिवान्यथाव्याख्यायुक्ता **माधवस्तु** अनिर्गतदशाहमिति पूर्व-स्वग्रंथविरोधादुपेक्ष्यइति **अस्मत्पितृचरणास्तुबौधायनीये** आनवमाद्दिवसादिति द्वितीयाशौचस्य-नवमंदिनंप्रथमस्यदशममेवाह त्र्यहादिवृद्धेःपूर्वशेषापवादत्वात्तस्यचन्यायतोद्वितीयदिनादेवप्रवृत्तेः अतऊ-र्ध्वमितिदशमरात्रिपरं **शंखलिखितोक्तौदेवलोक्तौ**चाह शेषेदशमेह्निचातीतेरात्रौपतेदित्यर्थः दश-म्यांपितानामकुर्यादितिवत् तेननमन्वाद्यैर्विरोधोनापिमिताक्षराद्यैरित्याहुः **अपरार्केनिर्णयामृतस्वर-सोप्येवं** यत्तुतत्रैव**ब्राह्मे** आद्यंभागद्वयंयावत्सूतकस्यतुसूतकं द्वितीयंपततित्वाद्यात्सूतकाच्छुद्धिरिष्यते अतऊर्ध्वंद्वितीयात्तुसूतकांताच्छुचिःस्मृतः एवमेवविचार्यस्यान्मृतकेमृतकांतरं मृतकस्यांतरेयत्रसूतकंप्रतिप-द्यते सूतकस्यांतरेवाथमृतकंयत्रविद्यते मृतकांतेभवेत्तत्रशुद्धिर्वर्णेषुसर्वशइति अस्यार्थस्**तत्रैवोक्तः** पूर्वा-शौचचरमाहोरात्रस्यदिनरूपेआद्यभागद्वयेन्याशौचपातेपूर्वेणशुद्धिः भागद्वयोर्ध्वंरात्रौ सूतकांतेद्वितीया-त्पूर्वभिन्नात्सूतकांताहृत्र्यहादिरूपाच्छुद्धिरिति **अपरार्के**त्वाशौचकालंत्रेधाविभज्यनिर्गुणविषयत्वेनेदमुक्तं अस्यवचनस्यनिर्मूलत्वोक्तिरज्ञोक्तिरेव अतःपूर्वाशौचांत्यरात्रावन्याशौचेहोरात्रद्वयमधिकंरात्रेरंत्ययामेतुदिन-त्रयमिति**भट्टचरणोपदिष्टःपंथाः** एतत्संपूर्णाशौचसंपातेएव रात्रिशेषेत्रिरात्रादिसंपातेतुपूर्वशेषेणै-वशुद्धिः द्विरात्रादिवृद्धेःपूर्ववाक्यैर्दशाहविषयत्वादपवादाभावेशेषशुद्धेरेवसामान्यतःप्रवृत्तेः **षडशी-तौतु**दशाहांतेत्र्यहपातेपिद्वित्रिदिनवृद्धिरुक्ता रात्रिशेषेयदाशौचंपूर्वोनधिकमापतेत् ऊर्ध्वंदिनद्वयंपूर्वोद्याम-शेषेदिनत्रयमिति अनधिकंसमंन्यूनंवा तत्तुच्छं निर्मूलत्वादंतेपक्षिण्यादिपातेपिद्विरात्रादिवृद्ध्यापत्तेश्च पूर्वा-शौचांतर्वर्धितद्वित्रिदिनमध्येधिकाशौचांतरपातेतुवर्धितस्याल्पत्वादधिकेनैवशुद्धिः नचवर्धितस्यपूर्वशेषत्वंशं-कनीयं रात्रिशेषपूर्वशेषशुद्ध्यपवादेनैमित्तिकावृत्तिन्यायोज्जीवनात् अपवादाभावेउत्सर्गस्यप्राप्तेः ।

**इतर ग्रंथकार** तर असें सांगतात कीं, "दहा दिवसांचे आंत पुनः मरण किंवा जनन उत्पन्न झालें तर जोंपर्यंत पहिल्याचे दहा दिवस संपले नाहींत तोंपर्यंत ब्राह्मण अशुद्ध होतो" ह्या **मनु–पराशर**–इत्यादिकांच्या वचनांनीं दहाव्या दिवशीं समजेल तर दुसऱ्या आशौचाची शुद्धि सांगितल्यामुळें पूर्ववचनांचा व यांचा विरोध स्पष्टच आहे. विरोध आला असतां "जें कांहीं मनु सांगता झाला तें भेषज ( हित ) आहे," "कलियुगांत पराशरस्मृति प्रमाण आहे" या वाक्यांनीं पूर्वीच्या **शंखलिखितादि**वचनांचा बाध होतो. म्हणूनच **वाचस्पतीनें** तीं वचनें आकरांत ( निबंधांत ) नाहींत असें सांगितलें. आकरांत असलीं तरी जातीचेच केवळ ब्राह्मणादिक असतील त्यांविषयीं, किंवा देशांतराविषयीं अथवा इतर युगां-विषयीं असोत. तेणेंकरून वरील गौतमाच्या वचनांतील 'रात्रि' शब्द दिवसरात्रीचा बोधक नाहीं. आणि शेवटची रात्र केवळ अवशेष असेल तर, असें **मिताक्षरें**तही सांगितलें आहे. कुत्सित कवीच्या कृतीप्रमाणें अन्यथा ( इतर रीतीची ) व्याख्या युक्त नाहीं. **माधव** तर–दहा दिवस गेले नाहींत तों समजेल तर, ह्या पूर्वीच्या त्याच्याच ग्रंथाशीं विरोध असल्यामुळें तो उपेक्षणीय ( अप्रमाण ) आहे. **आमचे वडील ( रामकृष्णभट्ट )** तर–वरील **बौधायन**वचनांत 'आनवमाद्दिवसात्' म्हणजे दुसऱ्या आशौचाचा नववा दिवस तोच पहिल्या आशौचाचा दहावा दिवस सांगितला आहे. कारण, दहाव्या दिवसानंतर

दोन वगैरे दिवसांची वृद्धि सांगितली ती पूर्वी सांगितलेल्या पहिल्या शेषानें निवृत्तीचा अपवाद आहे. तें दुसरें आशौच पहिल्या आशौचाच्या दुसऱ्या दिवसापासूनच प्रवृत्त झालें आहे. म्हणून त्याचें तात्पर्य असें कीं, पहिल्या आशौचाच्या दहाव्या दिवशीं दुसऱ्या आशौचाचे नऊ दिवसांपर्यंत कोणताही दिवस पडेल तर पहिल्यानें दुसऱ्याची निवृत्ति होते. त्याच्या पुढें म्हणजे पहिल्याच्या दहाव्या रात्रीं पडेल तर दोन दिवसांनीं शुद्धि असें समजावें. शंखलिखितवचनांतील 'शेष' शब्द आणि देवलवचनांतील 'दशमेऽह्नि' यांचा अर्थ-दहावा दिवस जाऊन रात्रीं दुसरें आशौच पडेल तर दोन दिवसांची वृद्धि होते, असा समजावा. जसें दहाव्या रात्रीं पित्यानें मुलाचें नांव ठेवावें, या वाक्यांत दहावी रात्र गेली असतां अकराव्या दिवशीं असा अर्थ करितात तसा येथें करावा. असा अर्थ केल्यानें **मनु-पराशर**-इत्यादि वचनांशीं विरोध येत नाहीं. आणि **मिताक्षरा** इत्यादि ग्रंथांशींही विरोध येत नाहीं, असें सांगतात. **अपरार्कांत निर्णयामृताचें** स्वारस्यही असेंच आहे. आतां जें तेथेंच **ब्राह्मांत** सांगतो—"जननाशौचाच्या पहिल्या दोन भागांत दुसरें जननाशौच पडलें असतां पहिल्या जननाशौचानें शुद्धि होते. दोन भागांच्या पुढें दुसरें पडलें तर दुसरें समाप्त झाल्यावर शुद्धि होते. मृताशौचांत मृताशौच पडेल तर असेंच समजावें. ज्या ठिकाणीं मृताशौचांत जननाशौच किंवा जननाशौचांत मृताशौच पडेल त्या ठिकाणीं मृताशौच समाप्त झाल्यावर सर्ववर्णांची शुद्धि होते" या वचनांचा अर्थ तेथेंच असा केला आहे कीं, 'पहिल्या आशौचाच्या शेवटच्या रात्रि-दिवसाचे दिवसरूपी पहिल्या दोन भागांत इतर आशौच पडलें असतां पहिल्या आशौचानें शुद्धि होते. दोन भाग गेल्यावर रात्रीं इतर सूतक पडलें असतां प्रथमसूतकव्यतिरिक्त असें जें दोन-तीन दिवस वाढविलेलें सूतक तें समाप्त झाल्यावर शुद्धि होते.' **अपरार्कांत** तर-आशौचकालाचे तीन भाग करून निर्गुणाला हें सांगितलें, असें सांगितलें आहे. हें वचन निर्मूल म्हणणारे अज्ञच समजले पाहिजेत. या कारणास्तव वर केलेल्या अर्थावरून पहिल्या आशौचाच्या शेवटच्या रात्रीं इतर आशौच पडलें असतां दोन अहोरात्र अधिक आशौच करावें. शेवटच्या रात्रीच्या शेवटच्या प्रहरीं पडेल तर तीन दिवस अधिक आशौच करावें, हा **भट्टांनीं** सांगितलेला मार्ग आहे. दोन, तीन दिवस वाढवून आशौच सांगितलें हें संपूर्ण (दहा दिवसांचें) आशौच पडेल तरच आहे. शेवटच्या रात्रीं तीन दिवसांचें वगैरे अल्प आशौच पडेल तर पहिल्या शेषानेंच शुद्धि होते. कारण, दोन-तीन दिवसांची वृद्धि सांगितली ती पूर्वींच्या ( देवलादिकांच्या ) वचनांवरून दहा दिवसांच्या आशौचाविषयीं आहे. म्हणून पडलेल्या तीन दिवसांच्या आशौचाविषयीं दोन दिवस वाढवावे इत्यादिक अपवादवाक्य नसतां पूर्वींच्या **याज्ञवल्क्यादि**वचनांनीं सांगितलेली शेषानें शुद्धि तीच सामान्यतः प्रवृत्त होते. **षडशीतींत** तर-दहा दिवसांच्या आशौचाच्या अंतीं तीन दिवसांचें आशौच पडलें तरी दोन-तीन दिवसांची वृद्धि ( अधिक आशौच ) सांगितली आहे. कारण, "पहिल्या आशौचाची रात्रि शेष असतां पहिल्या आशौचाच्या समान किंवा न्यून आशौच पडेल तर पहिल्या आशौचापेक्षां अधिक दोन दिवस आशौच. आणि एक प्रहर रात्र शेष असतां पडेल तर तीन दिवस आशौच करावें." हें षडशीतिमत तुच्छ आहे. कारण, हें सांगणें मूलवचनरहित आहे. आणि या रीतीनें म्हटलें म्हणजे पक्षिणी इत्यादि आशौच पडलें तरी दोन-तीन दिवसांची वृद्धि ( अधिक ) प्राप्तही होईल. पहिल्या दहा दिवसांच्या आशौचाच्या अंतीं इतर आशौच पडल्यामुळें वाढविलेले जे दोन-तीन दिवस त्यांमध्यें अधिक ( दहा दिवसांचें वगैरे ) आशौच तिसरें प्राप्त झालें असेल तर वाढविलेलें आशौच अल्प असल्यामुळें अधिक प्राप्त झालेल्या आशौचानेंच शुद्धि होते. आतां वाढविलेलें आशौच पहिल्या आशौचाचा शेष आहे, म्हणून त्यानें तिसऱ्याची निवृत्ति होईल, अशी शंका करूं नये. कारण, रात्रिशेष असतां दोन दिवस आशौचवृद्धि करावी, हें वचन पूर्वशेषशुद्धीचा अपवाद असल्यामुळें वाढविलेल्या आशौचास पूर्वशेषत्व नाहीं, म्हणून निमित्ताची ( मरणादिकाची ) आवृत्ति असतां नैमित्तिक जें आशौच त्याची आवृत्ति होते त्या न्यायाचें येथें उज्जीवन झालें. वर्धित आशौचानें इतराचे शुद्धीविषयीं अपवाद नसल्यामुळें उत्सर्ग ( पूर्वी सांगितलेल्या आशौचविधि ) वाक्याचीच प्रवृत्ति होते.

अपवादांतरमाह **शंखः** मातर्यग्रेप्रमीतायामशुद्धौम्रियतेपिता पितुःशेषेणशुद्धिःस्यान्मातुःकार्यातुपक्षिणी पादत्रयंस्पष्टम् तुर्यस्यत्वयमर्थः पित्राशौचमध्येमातृमृतौपित्राशौचांतेमातुःपक्षिणीमधिकांकुर्यादिति अत्राशुद्धावित्युक्तेरात्महादेःपितुराशौचाभावान्मातृमरणेनपक्षिणी किंतुपूर्णमेवाशौचं इयंचपक्षिणीतृतीयादिदिनपरानाद्यदिनद्वये प्रतिनिमित्तनैमित्तिकावृत्तिन्यायापवादत्वादिति **पितृचरणाः** सपिंडाद्याशौचेनमातापित्रोराशौचापगमोनास्त्येव एवंभर्तुरपि इयंचपक्षिणीदशमदिनात्पूर्वंमातृमरणेज्ञेया दशम्यांरात्रौतत्प्रभातेवामातृमरणेत्र्यहत्र्यहसमुच्चितापक्षिणीतिकश्चित् तन्न संख्यांतरोपजननापत्त्यात्र्यहादिश्रुतिबाधापत्तेः अतएवैकादेयापद्देयाइत्यादौश्रुतसंख्याबाधापत्तेःसमुच्चयोनिरस्तोद्वादशे गुरुणिलघोरंतर्गतेः गुरुणालघुशुध्येदित्युक्तेश्च ।

दुसरा अपवाद सांगतो **शंख**—"माता प्रथम मृत असतां आशौचामध्यें पिता मृत होईल तर मातेच्या शेष आशौचानें पित्याच्या आशौचाची शुद्धि होते. आणि पित्याच्या आशौचामध्यें माता मृत असेल तर पित्याच्या आशौचाचे अंतीं

मातेचें पक्षिणी आशौच अधिक करावें." या वचनांत 'अशुद्धींत मृत असेल' असें म्हटलें आहे म्हणून आत्महत्या वगैरे करणारा जो पिता त्याचें आशौच नसल्यामुळें माता मृत असेल तर पक्षिणीच अधिक नाहीं, तर मातेचें पूर्ण आशौच करावें. ही मातेची अधिक पक्षिणी सांगितली ती पित्याच्या तिसऱ्या दिवसापासून पुढें मृत असेल तर समजावी. पहिल्या दोन दिवशीं मृत असेल तर अधिक पक्षिणी नाहीं. कारण, प्रत्येक निमित्ताला नैमित्तिकाची (आशौचाची) आवृत्ति करावी, असा जो न्याय त्याचा अपवाद आशौच संपात वचनें आहेत, असें **पितृचरण** सांगतात. सपिंडादिकांच्या आशौचानें मातापितरांचें आशौच जात नाहींच. याप्रमाणें पतीचेंही आशौच इतराशौचानें जात नाहींच. अधिक पक्षिणी सांगितली ही दहा दिवसांचे आंत माता मृत असतां समजावी. पित्याच्या आशौचाचे दहाव्या रात्रीं किंवा पहांटेस माता मृत असतां दोन दिवस किंवा तीन दिवस अधिक धरून आणि पक्षिणी धरावी, असें कोणी **एक** सांगतो. तें बरोबर नाहीं. कारण, आशौचाचे दिवसांस इतर संख्येची (साडेतीन किंवा साडेचार दिवसांची) उत्पत्ति प्राप्त झाल्यामुळें वचनांत तीन दिवस इत्यादि श्रुतसंख्येचा बाध होईल, तो होतां कामा नये; म्हणूनच आधानप्रकरणीं 'एका देया, षट् देयाः, द्वादश देयाः' असें वाक्य आहे त्या ठिकाणीं एक देऊन सहा दिल्या तर वाक्यांत श्रुत जी एकत्व, षट्त्व इत्यादि संख्या तिचा बाध होईल म्हणून समुच्चयाचा (एक देऊन सहा देणें इत्यादिकांचा) निरास (निषेध) जैमिनिसूत्रांच्या बाराव्या अध्यायांत केला आहे. आणि गुरु आशौचांत लघु आशौच अंतर्गत झाल्यानें गुरु आशौचानें लघूची शुद्धि होते, असें पूर्वी सांगितलेंही आहे.

यदानारीविशेदग्निंप्रियस्यप्रियवांछया तदाशौचंविधातव्यंभर्त्राशौचक्रमेणहीति**पृथ्वीचंद्रोदयेलघुहारीतोक्तेः** तत्रैव**षडशीतिमतेपि** मृतंपतिमनुव्रज्यपत्नीचेदनलंगता नतत्रपक्षिणीकार्यापैतृकादेवशुध्यति पुत्रोन्योवाग्निदस्तस्यास्तावदेवाशुचिस्तयोः नवश्राद्धंसपिंडंचयुगपत्तुसमापयेत् गृहीताशौचानांपुत्राणांपितुःसंस्कारेमातुःसपिंडस्यवामरणेनायंनिर्णयः अतिक्रांतकालाद्विद्यमाननिमित्तस्यबलवत्त्वात् द्वादशवर्षोत्तरसंस्काराशौचमध्येसपिंडमरणेप्येवं यत्तु **अपरार्केब्राह्मे** ऋग्वेदवादात्साध्वीस्त्रीनभवेदात्मघातिनी त्र्यहाशौचेतुनिर्वृत्तेश्राद्धंप्राप्नोतिशास्त्रवदिति तद्भर्तुराशौचोत्तरमन्वारोहणेत्रिरात्राशौचपरमिति**पृथ्वीचंद्रः** ब्राह्मणादेःक्षत्रियाद्यनुगमनेल्पाशौचपरमित्य**परार्कः शुद्धितत्त्वादयोगौडास्तु** भर्तुराशौचोत्तरमन्वारोहणेत्रिरात्रं सहगमनेतुसंपूर्णम् युद्धहतस्यसद्यःशौचेन्वारोहणेब्राह्मोक्तेस्त्रिरात्रत्वात् भर्तुरपित्र्यहेणापिंडदानं एकचितौतुसद्यःशौचमित्याहुः अन्यत्प्रागुक्तम् ।

मातेचें अन्वारोहण (सतीगमन) असेल तर पक्षिणी नाहीं. कारण, "पतीचें प्रिय करावें, अशा इच्छेनें ज्या वेळीं पत्नी अग्नींत प्रवेश करील त्या वेळीं पतीच्या आशौचक्रमानें पत्नीचें आशौच करावें" असें **पृथ्वीचंद्रोदयांत लघुहारीत**वचन आहे. तेथेंच **षडशीतिमतांत**ही—"मृत झालेल्या पतीच्या मागाहून जाऊन पत्नी जर अग्नींत प्रवेश करील तर त्या ठिकाणीं पुत्रानें मातेचें पक्षिणी आशौच अधिक करूं नये. तो पित्याचे आशौचानेंच शुद्ध होतो. तिला अग्नि देणारा पुत्र किंवा दुसरा कोणी असेल तो पित्याच्या आशौचापर्यंतच अशुचि होतो. त्या दोघांचें नवश्राद्ध व सपिंडीकरण एकदम समाप्त करावें." पूर्वी पुत्रांनीं पित्याचें आशौच धरलें असून पित्याचा संस्कार करतेवेळीं आशौच धरावयाचें त्या वेळीं माता किंवा सपिंड मृत असेल तर त्याविषयीं हा (पित्याच्या आशौचांत इतरांचें संपतें हा) निर्णय नाहीं. कारण, अतिक्रांत आशौचनिमित्तापेक्षां विद्यमान आशौचनिमित्त बलिष्ठ आहे. बारावर्षांनंतर संस्काराच्या आशौचामध्यें सपिंड मरण असतांही असेंच समजावें. आतां जें **अपरार्कांत ब्राह्मांत**—"ऋग्वेदाच्या वादावरून (इमानारीरविधवा० इत्यादिकावरून) अन्वारोहण (सतीगमन) करणारी साध्वी स्त्री आत्मघातकी होत नाहीं. तीन दिवसांचें आशौच समाप्त झाल्यावर यथाशास्त्र तिला श्राद्ध प्राप्त होतें" असें तीन दिवस आशौच सांगितलें, तें भर्त्याचें आशौच संपल्यावर स्त्रियेनें अन्वारोहण केलें असतां त्रिरात्र आशौचविषयक आहे, असें **पृथ्वीचंद्र** सांगतो. ब्राह्मणादिपतीला क्षत्रियादिक स्त्रियेनें अनुगमन केलें असतां अल्प आशौचाविषयीं हें वचन आहे, असें **अपरार्क** सांगतो. **शुद्धितत्त्व** इत्यादिक **गौड** तर—पतीचें आशौच संपल्यावर स्त्रियेचें अन्वारोहण असतां तीन दिवस आशौच. सहगमन असतां संपूर्ण आशौच. पति युद्धांत मृत असतां त्याचें सद्यःशौच असून पत्नीनें अन्वारोहण केलें असतां वरील ब्राह्मवचनानें तीन दिवस आशौच सांगितल्यामुळें भर्त्याला देखील तीन दिवसांनंतर पिंडदान करावें, दोघांची एक चिति असेल तर सद्यःशौच करावें, असें सांगतात. अन्वारोहण केलेलीचा इतर विषय (श्राद्धादि प्रकार) पूर्वी श्राद्धप्रकरणीं सांगितला आहे.

पूर्वशेषेणशुद्धेरपवादांतरमुक्तंषडशीत्यां पूर्वाशौचेनयाशुद्धिःसूतकेमृतकेचसा सूतिकामग्निदंहित्वा शेषस्यचतुतानपि **निर्णयामृते स्मृतिसंग्रहेपि** इयंविशुद्धिरुदितासूतिकामग्निदंविना इदंमूल्येनदाह-

करणे मातुलादिसंबंधेनदाहमात्रकरणेतुत्रिरात्रमेवेत्युक्तंप्राक् **वृद्धात्रिः** सूतकाद्विगुणंशावंशावाद्विगुणमार्तवं आर्तवाद्विगुणासूतिस्ततोपिशवदाहकः तथाशौचसंपाते नशावजननिमित्तकार्यप्रतिबंधः आशौचेतुसमुत्पन्नेपुत्रजन्मयदाभवेत् कर्तुस्तात्कालिकीशुद्धिःपूर्वाशौचेनशुध्यतीति**प्रजापतिस्मृतेः** आशौचेतुद्विविधेपि**शातातपः** अंतर्दशाहेजननात्पश्चात्स्यान्मरणंयदि प्रेतमुद्दिश्यकर्तव्यंपिंडदानंयथाविधि प्रारब्धेप्रेतपिंडेतुमध्येचेज्जननंभवेत् तथैवाशौचपिंडांस्तुशेषान्दद्याद्यथाविधि मातुःपक्षिणीमध्येपितुरेकादशाहंकुर्यात् आद्यंश्राद्धमशुद्धोपिकुर्यादेकादशेहनीतिस्मृतेः **केचित्त्विदंक्षत्रियादिपरम्** विप्रादेस्त्वाशौचांतरएकादशाहश्राद्धंनेत्याहुः अतएव**विज्ञानेश्वरेण** दशमंपिंडमुत्सृज्यरात्रिशेषेशुचिर्भवेदिति शुचित्वंमहैकोद्दिष्टांगविप्रनिमंत्रणपरमितिवदतातत्रशुद्धेरंगत्वंदर्शितं एवंवृषोत्सर्गशय्यादानादावपि **दैवयाज्ञिकेनत्वाशौचांत**रेपिभवत्येवेत्युक्तम् ।

पहिल्या आशौचशेषानें शुद्धि सांगितली तिचा दुसरा अपवाद सांगतो **षडशीतींत**—"जननाशौचाविषयीं व मृताशौचाविषयीं पहिल्या आशौचाच्या शेषानें शुद्धि सांगितली ती सूतिका, प्रेताला अग्नि देणारा व मृताचे पुत्र यांना वर्ज्य करून इतराविषयीं समजावी." **निर्णयामृतांत स्मृतिसंग्रहांत**ही—"ही शुद्धि सूतिका व अग्नि देणारा यांवांचून इतरांची सांगितली आहे." अग्नि देणाराला पूर्ण आशौच सांगितलें हें मूल्य घेऊन दाह करणाराविषयीं आहे. मातुलादि संबंध असल्यामुळें दाह मात्र केला असेल तर तीन दिवसच आशौच, असें पूर्वी सांगितलें आहे. **वृद्धात्रि**—"जननाशौचाहून मृताशौच द्विगुणित दोषी आहे. मृताशौचाहून स्त्रियांचें आर्तव द्विगुणित आहे. आर्तवाहून सूतिका द्विगुणित आहे. आणि सूतिकेहून शवदाहक अधिक दोषी आहे" तसेंच आशौचांचा संपात असतां जनन व मरण यांच्या निमित्तानें होणाऱ्या कार्याचा प्रतिबंध होत नाहीं. कारण, "आशौच उत्पन्न असतां जेव्हां पुत्रजन्म होईल तेव्हां जातकर्मादि कर्त्याची तात्कालिक शुद्धि होते, म्हणजे तो कर्ता पहिल्या आशौचानें शुद्ध होतो" अशी **प्रजापति**स्मृति आहे. दोन्ही प्रकारच्या आशौचांत तर **शातातप** सांगतो—"जननानंतर दहा दिवसांच्या आंत मरण होईल तर प्रेताचा उद्देश करून यथाविधि पिंडदान करावें. प्रेतपिंडाला आरंभ केला असतां मध्यें जर जनन होईल तर तसेंच शेष राहिलेले प्रेतपिंड यथाविधि द्यावे." मातेचें अधिक पक्षिणी आशौच म्हणून सांगितलें, त्या ठिकाणीं मध्यें पित्याचें एकादशाह श्राद्ध करावें. कारण, "पहिलें श्राद्ध अकराव्या दिवशीं अशुद्ध असेल तरी त्यानें करावें" अशी **स्मृति** आहे. **केचित् विद्वान्** तर—हें स्मृतिवचन क्षत्रियादिविषयक आहे. ब्राह्मणादिकाचें तर दुसऱ्या आशौचांत एकादशाह श्राद्ध होत नाहीं, असें सांगतात म्हणूनच **विज्ञानेश्वरानें** "कर्ता दहावा पिंड देऊन शेवटच्या रात्रीं शुद्ध होतो" या वचनानें सांगितलेलें शुचित्व हें अकराव्या दिवशीं महैकोद्दिष्टाला ब्राह्मणाचे निमंत्रणाविषयीं आहे, असें सांगितल्यानें त्या श्राद्धाविषयीं शुद्धि हें अंग आहे, असें दर्शविलें आहे. याप्रमाणें वृषोत्सर्ग, शय्यादान इत्यादिकाविषयीं शुद्धि असली पाहिजे असें झालें. **दैवयाज्ञिकानें** तर—अकराव्या दिवशीं इतर आशौच असलें तरी एकादशाह श्राद्ध होतच आहे, असें सांगितलें आहे.

**अथाशौचापवादः** सचपंचधा कर्तृतः कर्मतः द्रव्यतः मृतदोषतः विधानाच आद्योब्रह्मचारियत्यादिषु नैष्ठिकानांवनस्थानांयतीनांब्रह्मचारिणां नाशौचंकीर्तितंसद्भिःपतितेचतथामृतइति**कौर्मोक्तेः** तुर्यपादेशावेवापितथैवचेति**देवल**पाठः आशौचमंत्यकर्मोपलक्षणं ब्रह्मचारीनकुर्वीतशववाहादिकाःक्रियाः यदिकुर्याच्चरेत्कृच्छ्रंपुनःसंस्कारमेवचेति**देवलोक्तेः** एतन्मपित्राद्यतिरिक्तविषयं आचार्यंस्वमुपाध्यायंमातरंपितरंगुरुं निर्हृत्यतुव्रतीप्रेतंनव्रतेनवियुज्यतइति**मनूक्तेः** **हारीतः** मातापित्रोस्तुयत्प्रोक्तंव्रतचारीतुपुत्रकः व्रतस्थोपिहिकुर्वीतपिंडदानोदकक्रियाम् भवत्यशौचंनैवास्यनैवाग्निस्तस्यलुप्यते स्वाध्यायंचप्रकुर्वीतपूर्ववद्विधिदर्शितं **संवर्तः** अन्यगोत्रोपसंबंधःप्रेतस्याग्निंददातियः पिंडंचोदकदानंचसदशाहंसमाचरेत् निर्हरणमंत्यकर्मपरं एवंमातामहस्य यथाव्रतस्थोपिसुतःपितुःकुर्यान्नृक्रियांनृप तथामातामहस्यापिदौहित्रःकर्तुमर्हतीत्यपरार्के**भविष्योक्तेः** मातापित्रोरुपाध्यायाचार्ययोरौर्ध्वदेहिकं कुर्वन्मातामहस्यापिव्रतीनभ्रश्यतेव्रतादितिका**लादर्शोच** तत्रांत्यकर्मनिमित्तमस्पृश्यत्वंदशाहमस्त्येव सगोत्रोवासगोत्रोवायोग्निंदद्यात्सखेनरः सोपिकुर्यान्नवश्राद्धंशुध्येत्तुदशमेहनीतिदि**वोदासोक्त**वचनात् अतएव ब्रह्मचारिणःशवकर्मणोव्रतान्निवृत्तिरन्यत्रमातापित्रोर्गुरोश्चेति**गौतमीये**व्रतनिवृत्तेरेवपर्युदासोनाशौचस्य संध्यादिकर्मलोपस्तुनास्ति [illegible]

**कर्मब्रह्मचारीस्वकंकचिदितिछंदोगपरिशिष्टात्** पित्रोर्गुरोर्विपत्तौतुब्रह्मचार्यपियःसुतः सव्रतश्चापिकुर्वीत-अग्निपिंडोदकक्रियां तेनाशौचंनकर्तव्यंसंध्याचैवनलुप्यते अग्निकार्यंचकर्तव्यंसायंप्रातश्चनित्यशइति **चंद्रिकायांसंवर्तोक्तेश्च** अत्रकर्मानधिकाररूपाशौचनिषेधएव **अपरार्कमाधवादयस्तु**एकाहमाशौचमाहुः आचार्यंवाप्युपाध्यायंगुरुंवापितरंचवा मातरंवास्वयंदग्ध्वाव्रतस्थस्तत्रभोजनं कृत्वापततिनोतस्मात्प्रेतान्नंतत्र-भक्षयेत् अन्यत्रभोजनंकुर्यान्नचतैःसहसंवसेत् एकाहमशुचिर्भूत्वाद्वितीयेह्निशुध्यतीति**ब्राह्मोक्तेः** तदन्न-भोजनेतुप्रायश्चित्तंपुनरुपनयनमाशौचंच ।

## आतां आशौचाचा अपवाद सांगतो—

त्या आशौचापवादाचे प्रकार पांच, ते असे—१ कितीएक कर्त्यांना आशौच नाहीं. २ कितीएक कर्मांविषयीं आशौच नाहीं. ३ कितीएक द्रव्यांविषयीं ( पदार्थांविषयीं ) आशौच नाहीं. ४ कितीएक मृतदोषांनीं आशौच नाहीं. ५ कितीएक विधानांनीं आशौच नाहीं. या पांचांमध्यें पहिला प्रकार ब्रह्मचारी, यती इत्यादिकांविषयीं आहे. कारण, "नैष्ठिक ( नियम धारण करून जपादि कर्मे करणारे ), वानप्रस्थ, संन्यासी, ब्रह्मचारी, यांना विद्वानांनीं आशौच सांगितलें नाहीं. आणि पतित मृत असतां त्याचें आशौच नाहीं." असें **कौर्म**वचन आहे. या वचनाच्या चवथ्या पादांत 'शावे वापि तथैवच' असा **देवला**चा पाठ आहे. अर्थ—'जननांत किंवा मृतकांत त्यांना आशौच नाहीं.' या वचनांत 'आशौच' हें अंत्यकर्माचें उपलक्षण ( बोधक ) आहे. कारण, "ब्रह्मचाऱ्यानें शववाहणें इत्यादि क्रिया करूं नयेत. जर तो करील तर कृच्छ्रप्रायश्चित्त व पुनः संस्कार करावा." असें **देवल**वचन आहे. ब्रह्मचाऱ्यानें प्रेतकर्म करूं नये, हें पिता इत्यादिव्यतिरिक्तांविषयीं समजावें. कारण, "आचार्य, आपला उपाध्याय, माता, पिता, गुरु यांचें प्रेत ब्रह्मचाऱ्यानें नेऊनही तो आपल्या व्रतापासून भ्रष्ट होत नाहीं" असें **मनु**वचन आहे. **हारीत**—"ब्रह्मचर्यव्रताचरण करणाऱ्या पुत्रानें व्रतस्थ असूनही मातापितरांचें शास्त्रविहित जें पिंडदान-उदकदान इत्यादि कर्म तें करावें, त्याला आशौच नाहीं व त्याचा अग्निही लुप्त होत नाहीं. पूर्वीप्रमाणें विधीनें सांगितलेलें वेदाध्ययनही त्यानें करावें." **संवर्त**—"जो अन्यगोत्री प्रेताला अग्नि देतो व पिंडदान, उदकदान करितो त्यानें दहा दिवस आशौच करावें." वरील मनुवचनांत प्रेताचें निर्हरण ( नेणें ) सांगितलें तेणेंकरून अंत्यकर्म समजावें. याप्रमाणें ब्रह्मचाऱ्यानें मातामहाचें करावें. कारण, "पुत्र व्रतस्थ असूनही जशी पित्याची क्रिया करितो, तशी दौहित्र व्रतस्थ असूनही मातामहाची देखील क्रिया करण्याविषयीं योग्य आहे." असें **अपरार्कांत भविष्य**वचन आहे. आणि "माता, पिता, उपाध्याय, आचार्य, आणि मातामह यांचें और्ध्वदेहिक ( अंत्यकर्म ) करणारा ब्रह्मचारी आपल्या व्रतापासून भ्रष्ट होत नाहीं." असें **कालादर्शांचें** वचनही आहे. तें कर्म करीत असतां ब्रह्मचाऱ्याला अंत्यकर्मनिमित्तक अस्पृश्यत्व दहा दिवस आहेच. कारण, "सगोत्र किंवा असगोत्र जो अग्नि देईल त्यानेंच नवश्राद्ध करावें, व तो दहाव्या दिवशीं शुद्ध होईल." असें **दिवोदासानें** उक्त वचन आहे. ब्रह्मचाऱ्याला दहा दिवस अस्पृश्यत्व आहे म्हणूनच "अंत्यकर्म करणाऱ्या ब्रह्मचाऱ्याची ब्रह्मचर्यव्रतापासून निवृत्ति होते. माता, पिता व गुरु यांचें कर्म करणाराची व्रतापासून निवृत्ति होत नाहीं." ह्या **गौतम**वचनांत व्रतनिवृत्तीचाच निषेध केला आहे. आशौचाचा निषेध केला नाहीं. संध्यादि नित्यकर्माचा लोप तर होत नाहीं. कारण, "सूतकामध्यें ब्रह्मचाऱ्यानें आपलें कर्म कधींही टाकूं नये" असें **छंदोगपरिशिष्ट**वचन आहे. आणि माता, पिता, गुरु हे मृत असतां जो पुत्र ब्रह्मचारी उत्तमव्रत धारण करणारा असेल त्यानेंही अग्निसंस्कार, पिंडदान, उदकदान इत्यादि क्रिया करावी. त्यानें आशौच करूं नये, व त्याच्या संध्येचा लोपही होत नाहीं. त्यानें दररोज सायंकालीं व प्रातःकालीं अग्निकार्य करावें" असें **चंद्रिकेंत संवर्त**वचनही आहे. येथें कर्मांविषयीं अनधिकार उत्पन्न करणाऱ्या आशौचाचाच निषेध केला आहे. **अपरार्क-माधव** इत्यादिक तर—एक दिवस आशौच सांगतात. कारण, "व्रतस्थ असून आचार्य, किंवा उपाध्याय, अथवा गुरु किंवा पिता, अथवा माता यांना स्वतः दग्ध करून त्यांच्यांत भोजन करील तर तो पतित होईल, यास्तव त्या ठिकाणीं प्रेतान्न भक्षण करूं नये. दुसऱ्या ठिकाणीं भोजन करावें. त्यांच्या बरोबर वास करूं नये. त्यानें असें केल्यानें तो एक दिवस अशुचि होऊन दुसऱ्या दिवशीं शुद्ध होतो" असें **ब्राह्म**वचन आहे. त्या आशौचवंतांचें अन्न भक्षण करील तर प्रायश्चित्त, पुनः उपनयन, आणि आशौच हीं करावीं.

**दिवोदासादयस्तु ब्राह्मोक्तेः**प्रथमेऽह्निसंध्यादिलोपः ब्रह्मचारीयदाकुर्यात्पिंडनिर्वपणंपितुः तावत्कालमशौचंस्यात्पुनःस्नात्वाविशुध्यतीति**प्रजापति**वचनात् द्वितीयाहादौपिंडदानकालेएवास्पृश्यत्वमात्रं नान्यदित्याहुः दशाहमस्पृश्यत्वेपिकर्मांगस्नानविधानार्थमेतदितियुक्तं अंत्यकर्माकरणेतु ब्रह्मचारिणःपित्रादिमरणेप्याशौचाभावएवसोपिब्रह्मचर्यकालएव समावर्तनोत्तरंतुपूर्वमृतानांत्र्यहाशौचंभवत्येव आदिष्टीनोदकं-

कुर्यादाव्रतस्यसमापनात् समाप्तेतूदकंदत्वात्रिरात्रमशुचिर्भवेदितिमनूक्तेः तत्रापिविकल्पः पितर्यपिमृतेनैषांदोषोभवतिकर्हिचित् आशौचंकर्मणोंतेस्याञ्र्यहंवाब्रह्मचारिणामिति छंदोगपरिशिष्टात् तथाकृतजीवच्छ्राद्धेनकिमप्याशौचंनकार्यमितिहेमाद्रिः शुद्धितत्त्वेकौर्मे सद्यःशौचंसमाख्यातंदुर्भिक्षेचाप्युपद्रवे डिंबाहववहतानांचविद्युतापार्थिवैर्द्विजैः उपद्रवेत्यंतमरके उपसर्गमृतेचैवसद्यःशौचंविधीयतइतिपराशरोक्तेः उपसर्गोत्यंतमरकइतिशूलपाण्यनिरुद्धभट्टादयः याज्ञवल्क्योपि आपद्यपिचकष्टायांसद्यःशौचं विधीयतइति मरणसमयेपिनाशौचं तथाचशुद्धिरत्नाकरेदक्षः स्वस्थकालेत्विदंसर्वंसूतकंपरिकीर्तितम् आपद्गतस्यसर्वस्यसूतकेपिनसूतकं अतःसतिवैराग्येसंन्यासोप्यातुरस्यभवतीतिकेचित् ।

**दिवोदास** इत्यादिक तर-वर सांगितलेल्या ब्राह्मवचनावरून पहिल्या दिवशीं संध्यादि कर्मांचा लोप होतो. कारण, "ज्या वेळीं ब्रह्मचारी पित्याला पिंडप्रदान करील तावत्कालपर्यंत त्याला आशौच आहे. पुनः स्नान करून तो शुद्ध होतो" या **प्रजापति**वचनावरून दुसऱ्या दिवशीं वगैरे पिंडदानकालींच अस्पृश्यत्वरूपच आशौच, अन्यकालीं आशौच नाहीं, असें सांगतात. दहा दिवस अस्पृश्यत्व असतांही कर्मांगस्नान सांगण्याकरितां हें वचन आहे, असें म्हणणें युक्त आहे. अंत्यकर्म करणारा नसेल तर ब्रह्मचाऱ्याला पिता इत्यादि मृत असतांही आशौच नाहींच व तें ब्रह्मचर्यकालींच नाहीं. समावर्तन ( सोडमुंज ) केल्यानंतर पूर्वी मेलेल्यांचें तीन दिवस आशौच येतच आहे. कारण, "ब्रह्मचाऱ्यानें आपलें व्रत समाप्त होई-तोंपर्यंत मृत झालेल्यांना उदक देऊं नये. व्रत समाप्त झाल्यावर उदक देऊन तीन दिवस आशौच धरावें." असें **मनुवचन** आहे. समावर्तनोत्तरही आशौचाचा विकल्प आहे. कारण, "पिता देखील मृत असतां ब्रह्मचाऱ्यांना कधींही दोष ( आशौच ) नाहीं. अथवा ब्रह्मचाऱ्यांना कर्माच्या अंतीं तीन दिवस आशौच आहे" असें **छंदोगपरिशिष्टवचन** आहे. तसेंच ज्यानें जीवच्छ्राद्ध ( पिता जीवंत असतां त्याचें श्राद्ध करणें तें ) केलें असेल त्यानें देखील आशौच धरूं नये. असें **हेमाद्रि** सांगतो. **शुद्धितत्त्वांत कौर्मांत**—"दुष्काळांत मेलेल्यांचें; उपद्रवांत ( महामारी, प्लेग इत्यादिकांनीं अतिशय मरकांत ) मृतांचें; युद्धांत मृतांचें; विजेनें, राजांनीं व ब्राह्मणांनीं मारलेल्यांचें सद्यःशौच ( तत्कालशुद्धि ) सांगितलें आहे." या वचनांत 'उपद्रव' म्हणजे अत्यंत मरक समजावें. कारण, "उपसर्गांत मृत असतां सद्यःशौच सांगितलें आहे" असें **पराशर**वचन आहे. उपसर्ग म्हणजे अत्यंत मरक, असें **शूलपाणि, अनिरुद्धभट्ट** इत्यादिक सांगतात. **याज्ञवल्क्य**ही—"अतिशय कष्ट देणारी आपत्ति प्राप्त असतांही सद्यःशौच सांगितलें आहे." मरणसमयीं देखील आशौच नाहीं, तेंच सांगतो **शुद्धिरत्नाकरांत दक्ष**—"हें सारं सूतक ( आशौच ) स्वस्थकालीं सांगितलें आहे. आपत्तीनें ग्रस्त झालेल्या सर्व मनुष्यांला सूतकांतही सूतक नाहीं." या वचनावरून वैराग्य उत्पन्न झालेलें असतां सूतकांत आतुराला संन्यासही होतो, असें **केचित्** म्हणतात.

अथकर्मतः त्रिंशच्छ्लोक्यां तत्तत्कार्येपुमंत्रिव्रतिनृपनृपवद्दीक्षितर्त्विक्स्वदेशभ्रंशापत्स्वप्यनेकश्रुतिपठनभिषक्कारुशिल्प्यातुराणां संप्रारब्धेपुदानोपनयनयजनश्राद्धयुद्धप्रतिष्ठाचूडातीर्थार्थयात्राजपपरिणयनाद्युत्सवेष्वेतदर्थं नाशौचमितिशेषः मंत्रीअन्नसत्रवान् मुख्यसत्रस्यदीक्षितपदात्सिद्धेः व्रतीअनंतव्रतादिनियमवान् नव्रतिनांव्रतेइतिविष्णूक्तेः प्रचेताः कारवःशिल्पिनो वैद्यादासीदासास्तथैवच राजानोराजभृत्याश्चसद्यःशौचाःप्रकीर्तिताः कारवःसूपकाराद्याः शिल्पिनश्चैलनिर्णेजकाद्याः आतुरस्यव्याधिनाशार्थेदानादौतुलादानादेःप्रारंभोनांदीश्राद्धंसंकल्पोवा यजनंतडागोत्सर्गकोटिहोमादिः लघुविष्णुः व्रतयज्ञविवाहेपु श्राद्धेहोमेर्चनेजपे आरब्धेसूतकंनस्यादनारब्धेतुसूतकं प्रारंभोवरणंयज्ञेसंकल्पोव्रतसत्रयोः नांदीश्राद्धंविवाहादौश्राद्धेपाकपरिक्रियेति पाकस्यपरिसमंतात्क्रियापाकप्रोक्षणमिति शुद्धिप्रदीपः तन्मंदं रूढेर्योगाद्बलत्वात् तीर्थेतिआशौचेआकस्मिकतीर्थप्राप्तौ विवाहदुर्गयज्ञेपुयात्रायांतीर्थकर्मणि नतत्रसूतकंतद्वत्कर्मयज्ञादिकारयेदिति पैठीनसिस्मृतेः अत्रविशेषःप्रागुक्तः जपःपुरश्चरणादिः स्तोत्रपाठःअविच्छेदेन संकल्पितहरिवंशश्रवणादिश्च अतएवोक्तंब्राह्मे . गृहीतनियमस्यापिनस्यादन्यस्यकस्यचिदिति एवंदेवपूजापि मदनपारिजातेयमोपि शिवविष्ण्वर्चनंदीक्षायस्यचाग्निपरिग्रहः श्रौतकर्माणिकुर्वीतब्राह्मणःशुद्धिमवाप्नुयात् गौडशुद्धितत्त्वेमंत्रमुक्तावल्यां जपोदेवार्चनविधिःकार्योदीक्षान्वितैर्नरैः नास्तिपापंयतस्तेषांसूतकंवायतात्मनाम् राघवभट्टीयेनारदः अथसूतकिनःपूजांवक्ष्याम्यागमचोदिताम् आरब्धमितिंचनिर्दंत-

मानस्याक्रिययातुवै बाह्यपूजाक्रमेणैवध्यानयोगेनपूजयेत् यदिकामोनचेत्कामीनित्यंपूर्ववदाचरेत् यत्तुनृसिंहकल्पे सदामंत्रजपंमुक्त्वायदिस्यादशुचिर्नरः मनसावहितस्तत्रस्मरेन्मंत्रंनतूच्चरेत् तन्मूत्राद्याशौचपरं रामार्चनचंद्रिकायां अशुचिर्वाशुचिर्वापिगच्छंस्तिष्ठन्स्वपन्नपि मंत्रैकस्मरणोविद्वान्मनसैवसदाभ्यसेत् कालनियमाभावेतुहेयमेव उत्सवोरथयात्रादिः एषुनाशौचं अयंचाशौचाभावोनन्यगतित्वेआर्तौचज्ञेयः अत्रमूलमाकरेस्पष्टम् ।

## आतां कितीएक कर्मांविषयीं आशौच नाहीं, तो प्रकार सांगतो—

**त्रिंशच्छ्लोकींत**—"अन्नसत्री, व्रती, राजा, राजसेवक, दीक्षित ( यज्ञदीक्षा घेतलेला ), ऋत्विक्, स्वदेशाचा विनाश, आपत्काल, अनेक वेदपठण, वैद्य, स्वयंपाकी ( आचारी ), धोबी वगैरे, आतुर ( रोगग्रस्त ), यांचे ठिकाणीं त्यांच्या त्यांच्या कर्मांविषयीं आशौच नाहीं. मोठें दान, उपनयन, कोटिहोम वगैरे, श्राद्ध, युद्ध, देवादिप्रतिष्ठा, चूडाकर्म, तीर्थयात्रा, जप, विवाह आणि उत्सव हीं कर्में आरंभिलीं असतां त्या त्या कर्मांविषयीं आशौच नाहीं." ह्या श्लोकांत 'सत्री' म्हणजे अन्नसत्रवान् समजावा. कारण, यज्ञांतील जें मुख्यसत्र त्याविषयीं 'दीक्षित' या पदानें आशौच नाहीं हें सिद्ध झालें आहे. व्रती म्हणजे अनंतव्रतादिनियमयुक्त समजावा; कारण, 'व्रतींना व्रताविषयीं आशौच नाहीं' असें **विष्णु**वचन आहे. **प्रचेता**—"कारु ( स्वयंपाकी वगैरे ), शिल्पी ( धोबी वगैरे ), वैद्य, दासी, दास, राजे, आणि राजसेवक यांना सद्यःशौच सांगितलें आहे." आतुराला व्याधिनाशाकरितां दानादिकांविषयीं आशौच नाहीं. दानादिकांचा प्रारंभ असतां आशौच नाहीं, तो प्रारंभ नांदीश्राद्ध किंवा संकल्प समजावा. यजन म्हणजे तडागाचा उत्सर्ग, कोटिहोम इत्यादि समजावें. **लघुविष्णु**-"व्रत, यज्ञ, विवाह, श्राद्ध, होम, पूजा, जप, हीं आरंभ केलीं असतां सूतक नाहीं. आरंभ केलीं नसतील तर सूतक आहे. यज्ञाचा प्रारंभ म्हणजे ऋत्विग्वरण होय. व्रत व सत्र यांचा संकल्प हा प्रारंभ होय. विवाहादिकर्मांत नांदीश्राद्ध हा प्रारंभ. आणि श्राद्धाचा प्रारंभ म्हणजे पाकपरिक्रिया होय." पाकाची आसमंतात्क्रिया म्हणजे पाकप्रोक्षण, असें **शुद्धिप्रदीप** सांगतो, तें सांगणें मंद आहे. कारण, रूढीपेक्षां व्युत्पत्तीनें अर्थ करणें निर्बल आहे. तीर्थाच्या ठिकाणीं आशौच नाहीं तें असें-आशौचांत अकस्मात् तीर्थ प्राप्त असतां आशौच नाहीं. कारण, "विवाहांत, दुर्गांत, यज्ञांत, यात्रेचे ठायीं तीर्थकर्मांविषयीं सूतक नाहीं. तसेंच यज्ञादिकर्मांविषयीं सूतक नाहीं. तें तें कर्म करावें" असें **पैठीनसि**स्मृतिवचन आहे. तीर्थाविषयींचा विशेष निर्णय पूर्वी श्राद्धप्रकरणीं सांगितला आहे. जप म्हणजे पुरश्चरणादिक व सतत स्तोत्रपाठ आणि संकल्प करून श्रवण करण्याचा हरिवंशादिक समजावा. म्हणूनच **ब्राह्मांत** सांगतो-"इतर कोणी मनुष्यानें नियम घेतला असेल तर त्यालाही आशौच नाहीं." देवपूजादिकांविषयींही असेंच समजावें. **मदनपारिजातांत यम**ही-"ज्याला शिवविष्णूच्या पूजेची दीक्षा आहे व ज्यानें अग्न्याधान केलें आहे, त्यानें तीं कर्में करावीं, आशौच असेल तर स्नान केला म्हणजे तो शुद्ध होतो." **गौडशुद्धितत्त्वांत मंत्रमुक्तावलींत**-"दीक्षा घेतलेल्या मनुष्यांनीं जप व देवपूजा करावी. कारण, नियम धारण करणाऱ्या त्या मनुष्यांना पातक किंवा सूतक नाहीं." **राघवभट्टीयांत नारद**-"आतां सुतक्याला आगमोक्त पूजा सांगतों. सुतक्यानें स्नान करून नित्यकर्म ( संध्या ) करून निष्काम असेल तर दररोज करावयाच्या बाह्य पूजेच्या अनुक्रमानें मनानें ध्यान करून मानसपूजा करावी. सकाम असेल तर सुतकाच्या पूर्वीप्रमाणें नित्य करावी." आतां जें **नृसिंहकल्पांत**-"जर मनुष्य अशुचि असेल तर त्या वेळीं सर्वदा मंत्राचा जप टाकून समाधानपूर्वक मनानें मंत्राचें स्मरण करावें, उच्चार करूं नये." असा मंत्रोच्चाराचा निषेध केला तो मूत्रादिकानें प्राप्त झालेल्या आशौचाविषयीं आहे. **रामार्चनचंद्रिकेंत**-"विद्वान् मनुष्य अशुचि असो किंवा शुचि असो, त्यानें चालत असतां, उभें राहत असतां किंवा निजत असतां मंत्राचेंच स्मरण करीत असून मनानेंच सर्वकाळ अभ्यास करावा." ज्या कर्मांविषयीं काळाचा नियम नसेल असलें कर्म आशौचांत टाकावेंच. वरील त्रिंशच्छ्लोकीच्या वचनांत उत्सव म्हटला तो रथयात्रा इत्यादिक समजावा. यांचेठायीं आशौच नाहीं. हा वर त्रिंशच्छ्लोकींत सांगितलेला आशौचाचा अभाव त्या त्या करून तें तें कर्म केल्यावांचून दुसरी गति नसेल त्या वेळीं आणि एक प्रकारची पीडा असेल त्या वेळीं जाणावा. याविषयीं मूलवचनें **आकरांत** स्पष्ट आहेत.

अत्रदीक्षितस्यअवभृथात्पूर्वमेवाशौचाभावः तदादित्वाशौचमस्त्येव तेनवैतानोपासनाःकार्याइतिवैतानत्वेप्यवभृथादिनभवत्येव अतएवोक्तंमाधवीयेब्राह्मे तद्वद्गृहीतदीक्षस्यत्रैविद्यस्यमहामखे स्नानंत्ववभृथेयावत्तावत्तस्यनसूतकमिति वैतानोपासनाःकार्याइत्यनेनैवसिद्धेऋत्विजांदीक्षितानांचेतिपुनर्दीक्षितग्रहणंयजमानेस्वयंकर्तृत्वार्थंस्नानप्राप्त्यर्थंवेतिविज्ञानेश्वरः वस्तुतस्तुदीक्षणीयासंस्कृतस्यप्रागवभृथात्कर्मप्राप्त्यर्थं दीक्षितग्रहणं तेनततःपूर्वंनिषेधएव यत्तु प्रारंभोवरणंयज्ञइतितदृत्विक्परं तथाचछंदोगपरिशिष्टे नदी-

क्षिण्याःपरंयज्ञेनकृच्छ्रादितपश्चरन्निति **शुद्धितत्त्वेप्येवम्** ऋत्विजांचमधुपर्कोत्तरमाशौचाभावः गृहीत-मधुपर्कस्ययजमानात्तुऋत्विजः पश्चादशौचेपतितेनभवेदितिनिश्चयइति**ब्राह्मात्** अतएव**रामांडारः** चतु-र्णांवरणपक्षेन्येषामाशौचेन्यआगमयितव्याइत्याह एवंस्मार्तेपितुलाकोटिहोमादौमधुपर्केसतिदोषाभावोज्ञेयः यत्तु प्रारंभोवरणंयज्ञइतितत्रापिमधुपर्कांतंज्ञेयं तेनाधानेष्टिपशुबंधादौतदभावादन्येभवंतीतिसिद्धं ।

येथें दीक्षिताला आशौचाचा अभाव सांगितला तो अवभृथस्नानाच्या पूर्वींच समजावा, अवभृथस्नान धरून पुढच्या कर्मा-विषयीं आशौच आहेच. तेणेंकरून "श्रुतीनें सांगितल्यावरून श्रौताग्नींच्या उपासना कराव्या" या वचनानें श्रौताग्निसंबंधी कर्म करावें असें झालें तरी, अवभृथ धरून पुढचीं कर्मे होतच नाहींत. म्हणूनच **माधवीयांत ब्राह्मांत** असें सांगितलें कीं, "मोठ्या यज्ञाविषयीं ज्यानें दीक्षा घेतली आहे त्याला अवभृथस्नानावधिक कर्मांमध्यें सूतक नाहीं." "सूतकांत सूतक नाहीं, श्रौताग्नीच्या उपासना कराव्या" या **याज्ञवल्क्य**वचनावरून दीक्षिताला आशौच नाहीं, असें सिद्ध झालें असून पुनः 'ऋत्वि-जांना व दीक्षितांना आशौच नाहीं' या वचनांत दीक्षितग्रहण केलें हें अशाकरितां कीं, दीक्षिताला आशौच नसल्यामुळें स्वतः कर्तृत्व बोधन करण्याकरितां किंवा स्नान प्राप्त नाहीं तें प्राप्त होण्याकरितां आहे, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. वास्तविक म्हटलें तर दीक्षणीयासंस्कारानें ज्याला संस्कार केलेला आहे त्याला सूतकांत अवभृथाच्या पूर्वींचीं कर्में प्राप्त होण्या-करितां दीक्षितग्रहण आहे. तेणेंकरून दीक्षणीयासंस्कार नसेल तर निषेधच आहे. आतां जें "यज्ञाला प्रारंभ म्हणजे ऋत्वि-ग्वरण होय, तें झाल्यावर सूतक नाहीं" असें सांगितलें तें ऋत्विजांविषयीं समजावें. तोच प्रकार **छंदोगपरिशिष्टांत** सांगतो–"यज्ञामध्यें दीक्षणीयासंस्कार झाल्यावर पुढें सूतक नाहीं. कृच्छ्र, चांद्रायण इत्यादि तप करणाराला आशौच नाहीं." **शुद्धितत्त्वांत**ही असेंच आहे. ऋत्विजांनाही मधुपर्क झाल्यावर आशौच नाहीं. कारण, "यजमानापासून ज्यानें मधुपर्क घेतला आहे त्याला नंतर आशौच प्राप्त असतां तें त्याला आशौच होत नाहीं, असा निश्चय आहे" असें **ब्राह्मवचन आहे.** म्हणूनच **रामांडार**–"चार ऋत्विजांचें वरण केलें असेल त्यापैकीं एकांना आशौच असेल तर दुसरे बोलवावे" असें सांगतो. ही श्रौतकर्माविषयीं व्यवस्था सांगितली. याप्रमाणें तुलादान, कोटिहोम इत्यादि स्मार्तकर्मांमध्येंही मधुपर्क झाला असतां ऋत्विजांना दोष नाहीं. आतां जें यज्ञाला प्रारंभ ऋत्विग्वरण असें सांगितलें, तेथेंही तें ऋत्विग्वरण मधुपर्कांत सम-जावें. मधुपर्क झाल्यावांचून आशौचाभाव नाहीं, असें झाल्यानें; आधानेष्टि, पशुबंध इत्यादि कर्मांमध्यें मधुपर्क नसल्यामुळें सूतक प्राप्त असतां दुसरे ऋत्विज होतात, असें सिद्ध झालें.

अपवादांतरमाह**याज्ञवल्क्यः** वैतानोपासनाःकार्याःक्रियाश्चश्रुतिचोदनात् तत्रत्यागमात्रेस्नानोत्तरं स्वयंकर्तृत्वं श्रौतेकर्मणितत्कालंस्नातःशुद्धिमवाप्नुयादिति**स्मृतेः** त्यागातिरिक्तेतुश्रौतेस्मार्तेचान्यस्यैवकर्तृत्वं सूतकेमृतकेचैवअशक्तौश्राद्धभोजने प्रवासादिनिमित्तेषुहावयेन्नतुहापयेदिति**बृहस्पत्युक्तेः** नित्यानिनिवर्तेरन्वैतानवर्जंशालाग्नौचैकेन्यएतानिकुर्युरिति**पैठीनसिस्मृतेश्चे**ति**विज्ञानेश्वरः** एकग्रहणंपूजार्थं तेनस्मार्तं कार्यमेवेति**हारलतायां दाक्षिणात्यास्तु**विकल्पमाहुः **अपरार्कादिनिबंधास्तु** श्रौतंसर्वंस्वयंकार्यं स्मार्तेतुत्यागातिरिक्तेन्यस्यैवकर्तृत्वं त्यागमात्रेतुस्वस्य कर्मवैतानिकंकार्यंस्नानोपस्पर्शवान्स्वयमिति**हारीतोक्तेः** दर्शंचपूर्णमासंचकर्मवैतानिकंचयत् सूतकेपित्यजन्मोहात्प्रायश्चित्तीयतेद्विजइति**मरीच्युक्तेः** जन्महान्यो-र्वितानस्यकर्मत्यागोनविद्यते शालाग्नौकेवलोहोमःकार्यएवान्यगोत्रजैरिति**जाबालोक्तेश्चे**त्याहुः **आशार्के**-प्येवं **याज्ञिका**अप्येवं सूतकेतुसमुत्पन्नेस्मार्तकर्मकथंभवेत् पिंडयज्ञंचरुंहोममसगोत्रेणकारयेदिति**जातूक-र्ण्योक्तेश्च** चरुःस्मार्तस्थालीपाकः श्रवणाकर्मादिश्चेति**विज्ञानेश्वरः** प्रारब्धंतुसपिंडेनापिकार्यं नचतत्क-र्मकुर्वाणःसनाभ्योप्यशुचिर्भवेदिति**मनूक्तेः छंदोगपरिशिष्टेपि** होमःश्रौतेतुकर्तव्यःशुष्काम्नेनफलेनवा अकृतंहावयेत्स्मार्तेतदभावेकृताकृतं अकृतंव्रीह्यादि कृताकृतंतंडुलादि स्मार्तहोमादौतुविकल्पोज्ञेयः शाला-ग्नौचैकइतिप्रागुक्तेः यदाकरणंतदान्यद्वारा ।

दुसरा अपवाद सांगतो **याज्ञवल्क्य**–"सूतक प्राप्त असलें तरी श्रुतीनें सांगितल्यामुळें श्रौताग्नींच्या उपासना व तत्संबंधी क्रिया कराव्या." त्यांत त्यागाविषयीं मात्र स्नान केल्यावर स्वतः यजमानाला कर्तृत्व येतें. कारण, "सूतक प्राप्त असतां श्रौत-कर्माविषयीं तत्काल स्नान करून शुद्ध होतो" असें **स्मृतिवचन** आहे. त्यागावांचून इतर श्रौत व स्मार्त कर्माविषयीं अन्याचेंच कर्तृत्व आहे. कारण, "जननाशौचांत, मृताशौचांत, अशक्ति असतां, श्राद्धभोजन केलें असतां, आणि आपण प्रवासादिकांस गेलें असतां दुसऱ्याकडून होम करवावा. होमावांचून दिवस घालवूं नये" असें **बृहस्पतिवचन** आहे. आणि "श्रौतकर्मांवांचून इतर नित्यकर्में सूतकांत वर्ज्य होतात, हीं नित्य कर्में शालाग्नीवर ( गृह्याग्नीवर ) इतरांनीं करावीं, असें कित्येक आचार्य

सांगतात" अशी **पैठीनसिस्मृती**ही आहे, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. या वचनांत 'एके' पद पूजेसाठीं आहे, विकल्पासाठीं नाहीं; त्यामुळें स्मार्तकर्म करावेंच, असें **हारलतेंत** सांगितलें आहे. **दाक्षिणात्य** तर-स्मार्तकर्माविषयीं विकल्प सांगतात. **अपरार्क** इत्यादि निबंधकार तर-सारें श्रौतकर्म यजमानानें स्वतः करावें. त्यागव्यतिरिक्त स्मार्तकर्माविषयीं तर सूतकामध्यें अन्यालाच कर्तृत्व आहे. त्यागाविषयीं मात्र यजमानाला कर्तृत्व आहे. कारण, "सूतकांत स्नान, आचमन करून स्वतः श्रौतकर्म करावें" असें **हारीत**वचन आहे. "दर्शपूर्णमासयाग व दुसरें श्रौतकर्म असेल तें सूतकामध्यें देखील जो अज्ञानानें टाकील तो प्रायश्चित्ताला योग्य होतो" असें **मरीचि**वचन आहे. आणि "जनन व मरण झालें असतां श्रौतकर्माचा त्याग होत नाहीं. स्मार्तकर्माचा अन्यगोत्रजांनीं शालाग्नीवर केवळ होम करावाच" असें **जाबाल**वचनही आहे, असें सांगतात. **आशार्कातही** असेंच आहे. **याज्ञिक**ही असेंच सांगतात. कारण, "सूतक उत्पन्न झालें असतां स्मार्तकर्म कसें होईल ! पिंडपितृयज्ञ, चरु आणि होम अन्यगोत्रजाकडून करवावा" असें **जातूकर्ण्य**वचनही आहे. या वचनांत 'चरु' म्हणजे स्मार्त स्थालीपाक आणि श्रवणाकर्मादिक समजावा, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. आरंभिलेलें कर्म असेल तर सूतकांत सपिंडानें देखील करावें. कारण, "आरंभिलेलें कर्म करणारा सपिंड देखील अशुचि होत नाहीं" असें **मनु**वचन आहे. **छंदोगपरिशिष्टांत**ही-"श्रौतांतील होम शुष्क अन्नानें किंवा फलानें करावा. स्मार्तकर्मांतील होम व्रीह्यादिकांचा करावा, त्यांच्या अभावीं तंडुलादिकांचा करावा." स्मार्तहोमादिकांविषयीं तर विकल्प जाणावा. कारण, "शालाग्नौ चैके" असें पूर्वी **पैठीनसिस्मृति**वचन सांगितलें आहे. करावयाचा असेल तर अन्यद्वारा करावा, स्वतः करूं नये.

**अत्रेदंतत्त्वं** येषांबह्वृचादीनांद्वादशरात्रमहोमेपिनाग्निविच्छेदःतैर्नकार्यं तैत्तिरीयाद्यैःकार्यं त्रिरात्रमहूयमानोग्निर्लौकिकःसंपद्यतेइति**सुदर्शनभाष्ये**वचनात् समारूढेत्वग्नौतेनापिनकार्यम् किंतुपुनराधानमेव समारोपप्रत्यवरोहयोराशौचापवादाभावादनन्यकर्तृकत्वाच्च अन्यथापुनराधानमपिस्यात् **यत्त्वाश्वलायनः** तौचापिसूतकेशावेपर्वणीष्टिंमहापदि पुष्पवत्यांचभार्यायांनकुर्यातांकदाचन स्मार्ताग्निःसूतकेशावेस्वयंनजुहुयाद्द्विजः श्रौताग्निस्तुसकृद्धुत्वासमाप्तेवास्वयंहुनेदिति तदपिसमारूढपरम् तदाहसएव स्मार्ताग्निरात्मनोन्येषामभावेसूतकादिषु समारोप्यतदंतेषुविहृत्यजुहुयात्स्वयमिति तथाच**मनुः** प्रत्यूहेन्नाग्निषुक्रियाइति वैश्वदेवस्यत्वग्निसाध्यत्वेपिवचनान्निवृत्तिः विप्रोदशाहमासीतवैश्वदेवविवर्जितइति**संवर्तोक्तेः** यद्यपि पंचयज्ञविधानंतुनकुर्यान्मृतजन्मनोरितितेनै**वोक्तेः**पूर्वनिषेधोव्यर्थस्तथाप्यापस्तंबादीनांवैश्वदेवस्यपंचयज्ञभिन्नत्वात्पृथङ्निषेधः **हरदत्त**स्त्वाशौचेपिबह्वृचैर्वैश्वदेवःकार्यः तस्यद्वावनध्यायौयदात्माशुचिर्यद्देशइतिब्रह्मयज्ञस्यैवाशौचेविशिष्यनिषेधात् ।

होमाविषयींचा **खरा प्रकार** म्हणजे असा कीं, ज्या बह्वृचादिकांचा (ऋग्वेद्यादिकांचा) बारा दिवसपर्यंत होम केला नाहीं तरी अग्नीचा विच्छेद होत नाहीं त्यांनीं सूतकांत होम करूं नये. तैत्तिरीयादिकांनीं करावा. कारण, "तीन दिवस होम केला नाहीं तर तो अग्नि लौकिक ( इतर अग्नीसारखा ) होतो" असें **सुदर्शनभाष्यांत** वचन आहे. अग्नीचा समारोप केलेला असेल तर तैत्तिरीयानें देखील करूं नये. तर पुनः आधानच करावें. कारण, अग्नीचा समारोप व प्रत्यवरोह यांविषयीं आशौचाचा अपवाद नाहीं, म्हणजे आशौचांत समारोप व प्रत्यवरोह करण्याविषयीं वचन नाहीं. आणि ते समारोप प्रत्यवरोह दुसऱ्याकडून करितांही येत नाहींत. जर ते दुसऱ्याकडून करितां येतील तर दुसऱ्याकडून पुनराधानही होईल. आतां जें **आश्वलायन**-"जननाशौच किंवा मृताशौच असतां, मोठी आपत्ति प्राप्त असतां, भार्या रजस्वला असतां, पर्वकालीं इष्टि कधींही करूं नये. स्मार्ताग्निमान् असेल त्यानें जननाशौचांत व मृताशौचांत स्वतः होम करूं नये. श्रौताग्निमान् असेल त्यानें प्रथमतः एकवार होम करावा अथवा सूतक समाप्त झाल्यावर स्वतः होम करावा." या वचनानें सूतकांत स्वतः होम करूं नये म्हणून सांगितलें आहे, तें देखील समारोपबोधक आहे, तें तोच ( आश्वलायन ) सांगतो-"स्मार्ताग्निमंतानें सूतकादिकांत आपला किंवा इतरांचा अभाव असतां अग्नीचा समारोप करून सूतकांतीं प्रत्यवरोह करून स्वतः होम करावा." तसेंच **मनु** सांगतो-"अग्नीच्या ठिकाणीं क्रियांचा विघात करूं नये." वैश्वदेव तर अग्नीवरच होणारा असला तरी वचनानें त्याची निवृत्ति होते, तें वचन असें-"सूतक असतां ब्राह्मणानें दहा दिवस वैश्वदेवरहित असावें" असें **संवर्त**वचन आहे. जरी "मृताशौचांत व जननाशौचांत पंचमहायज्ञ करूं नयेत" असें त्यानेंच सांगितल्यावरून वैश्वदेवाचा निषेध झाला असतां वर सांगितलेला निषेध व्यर्थ आहे, तरी तो व्यर्थ नाहीं. कारण, आपस्तंबादिकांचा वैश्वदेव पंचयज्ञांहून भिन्न असल्यामुळें पंचयज्ञांच्या निषेधानें वैश्वदेवाचा निषेध होत नाहीं. म्हणून निराळा वैश्वदेवाचा निषेध सांगितला आहे. **हरदत्त** तर आशौचांत देखील बह्वृचांनीं वैश्वदेव करावा. कारण, "ब्रह्मयज्ञाचे दोन अनध्याय. शरीर अशुद्ध असणें हा एक अनध्याय, व देश अशुचि हा दुसरा अनध्याय." या सूत्रानें आशौचांत ब्रह्मयज्ञाचाच विशेषेंकरून निषेध केला आहे.

संध्यादीनामप्यपवादमाहापरार्के **पुलस्त्यः** संध्यामिष्टिंचरुंहोमंयावज्जीवंसमाचरेत् नत्यजेत्सूतकेवापित्यजन्गच्छेदधोद्विजः सूतकेमृतकेचैवसंध्याकर्मसमाचरेत् मनसोच्चारयेन्मंत्रान्प्राणायाममृतेद्विजः यत्तुचंद्रिकायां**जाबालः** संध्यापंचमहायज्ञानैत्यकंस्मृतिकर्मच तन्मध्येहापयेत्तेषांदशाहांतेपुनःक्रियेति यच्च **संवर्तः** सूतकेकर्मणांत्यागःसंध्यादीनांविधीयते यच्च**विष्णुपुराणं** सर्वकालमुपासातुसंध्ययोःपार्थिवेष्यते अन्यत्रसूतकाशौचविभ्रमातुरभीतितइति तत्पूर्णसंध्यापरं अर्घ्यांतामानसीसंध्याकुशवारिविवर्जितेति**शुद्धिदीपे**च्यवनोक्तेः **पैठीन**सिस्त्वर्घ्येमंत्रोच्चारणमाह सूतकेसावित्र्यांजलिंप्रक्षिप्यसूर्यंध्यायन्नमस्कुर्यात् **प्रयोगपारिजातेभरद्वाजोपि** सूतकेमृतकेकुर्यात्प्राणायाममंत्रकं तथामार्जनमंत्रांस्तुमनसोच्चार्यमार्जयेत् गायत्रींसम्यगुच्चार्यसूर्यायार्घ्यंनिवेदयेत् मार्जनंतुनवाकार्यमुपस्थानंनचैवहि ग्रहणेश्राद्धादावप्याशौचापवादमाह**व्याघ्रः** स्मार्तकर्मपरित्यागोराहोरन्यत्रसूतकेइति **लैंगेपि** सूतकेमृतकेचैवनदोषोराहुदर्शने तावदेवभवेच्छुद्धिर्यावन्मुक्तिर्नदृश्यते **प्रयोगपारिजातेबृहस्पतिः** कन्याविवाहेसंक्रांतौसूतकंनकदाचन **वृद्धशातातपः** यदाभोजनकालेतुअशुचिर्भवतिद्विजः भूमौनिक्षिप्यतंग्रासंस्नात्वाविप्रोविशुध्यति भक्षयित्वातुतंग्रासमहोरात्रेणशुध्यति अशित्वासर्वमेवान्नंत्रिरात्रेणविशुध्यति इदमविशेषात्सूतकादिपरमपीति **शुद्धितत्त्वेशूलपाणौच।**

संध्यादिकर्माविषयीं देखील अपवाद सांगतो-**अपरार्कांत पुलस्त्य**-"संध्या, इष्टि, चरु, होम, हे जोंपर्यंत जीवंत आहे तोंपर्यंत करावे. सूतकामध्येंही ते टाकूं नयेत. टाकणारा द्विज अधोगतीस जातो. जननांत व मृतकांत संध्याकर्म करावें. मंत्रांचा उच्चार मनानें करावा. प्राणायाममंत्रांचा उच्चार मनानेंही करूं नये." आतां जें **चंद्रिकेंत जाबाल**-"संध्या पंचमहायज्ञ, आणि नित्यस्मृतिकर्म, हें सूतकामध्यें वर्ज्य करावें. आशौचांतीं पुनः तें कर्म करावें." आणि जें **संवर्त**-"सूतकांमध्यें संध्यादिकर्मांचा त्याग सांगितला आहे." आणि जें **विष्णुपुराण**-"दोन्ही संध्यांची सार्वकाल उपासना इष्ट आहे. परंतु सूतक, आशौच, विभ्रम, रोग, भीति यांमध्यें संध्योपासना इष्ट नाहीं." या तीन्ही वचनांनीं सांगितलेला संध्येचा निषेध तो संपूर्ण संध्येविषयीं आहे. कारण, "कुश, उदक यांनीं वर्जित मानससंध्या अर्घ्यांपर्यंत करावी" असें **शुद्धिदीपांत च्यवन**वचन आहे. **पैठीनसि** तर अर्घ्याविषयीं मंत्रोच्चार सांगतो-"सूतकामध्यें गायत्रीमंत्रानें अर्घ्य देऊन सूर्याचें ध्यान करून नमस्कार करावा." **प्रयोगपारिजातांत-भरद्वाज**ही "जननांत व मृतकांत अमंत्रक प्राणायाम करावा. मार्जनाचे मंत्रांचा मनानें उच्चार करून मार्जन करावें. गायत्रीचा चांगला उच्चार करून सूर्याला अर्घ्य द्यावें. अथवा मार्जन करूं नये. उपस्थानही करूं नये." ग्रहणांत श्राद्धादिकर्माविषयीं देखील आशौचाचा अपवाद सांगतो **व्याघ्र**-"राहुदर्शनावांचून इतर वेळीं सूतकांमध्यें स्मार्तकर्माचा परित्याग होतो." **लिंगपुराणांत**ही-"जननांत व मृतकांत राहुदर्शनीं ( ग्रहणांत ) दोष नाहीं. जननादि सूतकांत जोंपर्यंत ग्रहणमुक्ति झाली नाहीं तोंपर्यंतच शुद्धि आहे." **प्रयोगपारिजातांत बृहस्पति**-"कन्याविवाहाचेठायीं व संक्रांतीचेठायीं कधींही सूतक नाहीं." **वृद्धशातातप**-"जेव्हां ब्राह्मण भोजनसमयीं अशुचि होतो, तेव्हां तो तोंडांतील ग्रास भूमीवर टाकून स्नान करून तो ब्राह्मण शुद्ध होतो. तो ग्रास भक्षण करील तर एक दिवसानें उपवास करून शुद्ध होईल. पात्रावरचें सारें अन्न भक्षण करील तर तीन दिवसांनीं उपवास करून शुद्ध होईल." या वचनांत अमुक कारणानें अशुचि, असें विशेष न सांगितल्यामुळें सूतकादि अशुचीविषयीं देखील हें वचन आहे, असें **शुद्धितत्वांत** व **शूलपाणिग्रंथांत** सांगितलें आहे.

**अथद्रव्यनः मरीचिः** लवणेमधुमांसेचपुष्पमूलफलेषुच शाककाष्ठतृणेष्वप्सुदधिसर्पिःपयःसुच तिलौषधाजिनेचैवपक्कापक्केस्वयंग्रहः पण्येषुचैवसर्वेषुनाशौचंमृतसूतके स्वयमेवस्वाम्यनुज्ञयाग्राह्यं नतद्धस्तादित्यर्थः क्रयेतुतद्धस्तादपिनदोषः पक्कंलड्डुकादि अपक्कंतंडुलादि एतदन्नसत्रपरं अन्नसत्रेप्रवृत्तानामाममन्नमगर्हितं भुक्त्वापक्कान्नमेतेषांत्रिरात्रंतुव्रतीभवेदित्यं**गिरसोक्तेः** पक्कान्नमोदनादि नतुभक्ष्यं **षट्त्रिंशन्मते** उभाभ्यामपरिज्ञातेसूतकंनैवदोषकृत् एकेनापिपरिज्ञातेभोक्तुर्दोषमुपावहेत् विवाहोत्सवयज्ञेषुत्वंतरामृतसूतके परैरन्नंप्रदातव्यंभोक्तव्यंचद्विजोत्तमैः भुंजानेषुतुविप्रेषुत्वंतरामृतसूतके अन्यगेहोदकाचांताःसर्वेतेशुचयःस्मृताः **बृहस्पतिः** विवाहोत्सवेयात्मुक्त्वा पूर्वसंकल्पितान्नेषुनदोषःपरिकीर्तितः **षडशीतौ** संसर्गाद्यस्यवाशौचंयस्यातिक्रांतकालता तदीयस्यपदार्थस्यनाशौचंविद्यतेक्वचित् **शुद्धितत्त्वे** शुध्येदित्यनुवृत्तौ **विष्णुः** प्रोक्षणेनपुस्तकमिति।

**आतां कितीएक द्रव्यांविषयीं आशौच नाहीं, तो प्रकार सांगतो—मरीचि**-"मीठ, मध, मांस, पुष्पें, मुळें, फळें, शाका, काष्ठें, तृण, पाणी, दहीं, तूप, दूध, तिल, औषध, अजिन ( चर्म ), पक्क ( लाडू वगैरे ), अपक्क ( तांदूळ वगैरे ) हे पदार्थ सुतक्यापासून स्वतः आपल्या हातानें घ्यावे. सुतक्याच्या हातानें घेऊं नयेत. विकत घेणें असेल तर सुतक्यापासून विकत घेण्याच्या पदार्थाविषयीं अशुद्धि नाहीं म्हणजे त्याच्या हातानें घेतले तरी दोष नाहीं" पक्कापक्क सांगितलें हें अन्नसत्राविषयीं आहे. कारण, "आशौचांत अन्नसत्र्यांचें आमान्न निंदित नाहीं. सुतक्या अन्नसत्र्यांचें पक्कान्न ( ओदनादिक ) भोजन करील तर तीन दिवस व्रत ( कृच्छ्र ) करावें" असें **अंगिरसाचें** वचन आहे. येथें पक्कान्न म्हणजे ओदनादिक समजावें, लाडू वगैरे भक्ष्य समजूं नये. **षट्त्रिंशन्मतांत**-"दात्याला व भोक्त्याला सुतकाचें ज्ञान नसेल तर दोष नाहीं. दोघांपैकीं एकाला जरी ज्ञान असेल तरी भोजन करणाराला दोष प्राप्त होईल. विवाह, उत्सव, यज्ञ यांमध्यें जर सूतक प्राप्त होईल तर इतरांनीं ( अन्यगोत्र्यांनीं ) अन्न द्यावें आणि ब्राह्मणश्रेष्ठांनीं तें भोजन करावें. ब्राह्मण भोजन करीत असतां मध्यें यजमानाला सूतक प्राप्त होईल तर, त्या ब्राह्मणांनीं उठून दुसऱ्या घरांतील उदकानें आचमन करावें, म्हणजे ते सारे ब्राह्मण शुद्ध आहेत." **बृहस्पति**-"विवाह, उत्सव, यज्ञ इत्यादि वरील वचन सांगून पुढें सांगतो-पूर्वीं संकल्पित अन्नांविषयीं दोष सांगितला नाहीं." **षडशीतींत**-"ज्याला दुसऱ्याच्या संसर्गानें आशौच असेल किंवा ज्याला अतिक्रांत आशौच प्राप्त असेल, त्याच्या पदार्थाविषयीं कोठेंही आशौच नाहीं." **शुद्धितत्त्वांत विष्णु**-"पुस्तक प्रोक्षणानें शुद्ध होतें."

**अथमृतदोषे हेमाद्रौषट्त्रिंशन्मते कौर्मेच** व्यापादयेद्यआत्मानंस्वयमभ्युदकादिभिः विहितं तस्यनाशौचंनापिकार्योदकक्रिया शवदर्शनंयावदाशौचमस्त्येव हतानांनृपगोविप्रैरन्वक्षंचात्मघातिनामिति **याज्ञवल्क्योक्तेः शुद्धितत्त्वेकौर्मे** सद्यःशौचंसमाख्यातंशापादिमरणेतथा आदिपदादभिचारहते **भविष्ये** स्वेच्छयामरणेविप्राच्छृंगिदंष्ट्रिसरीसृपैः अंत्यांत्यजविषोद्बंधैरात्मनाचैवताडनैः पाखंडमाश्रिताश्चैवमहापातकिनस्तथा स्त्रियश्चव्यभिचारिण्यआरूढपतितास्तथा नतेषांस्नानसंस्कारौनश्राद्धंनसपिंडनं **गौतमः** प्रायोनाशकशस्त्राग्निविषोदकोद्बंधनप्रपतनैश्चेच्छतामिति नाशौचमितिशेषः **अंगिराः** चंडालादुदकात्सर्पाद्ब्राह्मणाद्वैद्युतादपि दंष्ट्रिभ्यश्चपशुभ्यश्चमरणंपापकर्मणां उदकंपिंडदानंचप्रेतेभ्योयत्प्रदीयते नोपतिष्ठतितत्सर्वमंतरिक्षेविनश्यति **षट्त्रिंशन्मतेप्येवं ब्राह्मेपि** शृंगिदंष्ट्रिनखव्यालविषवह्निक्रियाजलैः व्यालीगजः सुदूरात्परिहर्तव्यःकुर्वन्क्रीडांमृतस्तुयः नागानांविप्रियंकुर्वन्हतश्चाप्यथविद्युता निगृहीतःस्वयंराज्ञाचौर्यदोषेणकुत्रचित् परदारान्हरंतश्चद्वेषात्तुपतिभिर्हताः असमानैश्चसंकीर्णैश्चंडालाद्यैश्चविग्रहं कृत्वातैर्निहतास्तद्वच्चंडालादीन्समाश्रिताः शस्त्राग्निगरदाश्चैवपाखंडाःक्रूरबुद्धयः क्रोधात्प्रायंविषंवह्निंशस्त्रमुद्बंधनंजलं गिरिवृक्षप्रपातंचयेकुर्वंतिनराधमाः कुशिल्पजीविनोयेचसूनालंकारधारिणः मुखेभगास्तुयेकेचित्क्लीबप्रायानपुंसकाः ब्रह्मदंडहतायेचयेचापिब्राह्मणैर्हताः महापातकिनोयेचपतितास्तेप्रकीर्तिताः पतितानांनदाहःस्यान्नांत्येष्टिर्नास्थिसंचयः नचाश्रुपातःपिंडोवाकार्यंश्राद्धादिकंक्वचित् एतानिपतितानांतुयःकरोतिविमोहितः तप्तकृच्छ्रद्वयेनैवतस्यशुद्धिर्नचान्यथा ।

**आतां कितीएक मृतदोषाविषयीं आशौच नाहीं, तो प्रकार सांगतो-हेमाद्रींत षट्त्रिंशन्मतांत** व **कौर्मांत**-"जो मनुष्य आपणाला अग्नि, उदक इत्यादिकांनीं मारील त्याचें आशौच सांगितलें नाहीं व त्याची उदकक्रियाही करूं नये." मृत झाल्यापासून शवदर्शन होईपर्यंत आशौच आहेच. कारण, "राजा, गाई, ब्राह्मण यांनीं मारलेल्याचें आणि आत्मघातक्यांना प्रत्यक्ष पाहिलें असतां त्यांचें आशौच नाहीं" असें **याज्ञवल्क्य**वचन आहे. **शुद्धितत्त्वांत कूर्मपुराणांत**-"शाप इत्यादि कारणानें मरण आलें असतां सद्यःशौच ( स्नानानें शुद्धि ) सांगितलें आहे." या वचनांतील आदिपदानें जारणमारणक्रियेनें मरण असतांही सद्यःशौच समजावें. **भविष्यांत**-"बुद्धिपूर्वक स्वेच्छेनें शस्त्र, विष, उदक इत्यादिकेंकरून मरण आलें असतां; तसेंच ब्राह्मण, शृंगी ( महिषादिक ), दंष्ट्री ( व्याघ्रादिक ), सर्प, म्लेच्छ, चंडाल, विष, उद्बंधन, आपलें आपण ताडन करून घेणें यांनीं मरण आलें असतां; पाखंडी, पंचमहापातकी, व्यभिचारिणी असून पति, गर्भ इत्यादिकांचा घात करणाऱ्या स्त्रिया या सर्वांना मरण आलें असतां; त्यांचें स्नान नाहीं, संस्कार नाहीं, श्राद्ध नाहीं व सपिंडीकरण नाहीं." **गौतम**-"मरणाच्या इच्छेनें, बहुत उपवास, शस्त्र, अग्नि, विष, उदक, उद्बंधन, ( टांगून घेणें ), पर्वतादिकांवरून उडी घेणें इत्यादि कारणांनीं मृत असतां त्यांचें आशौच नाहीं." **अंगिरा**-"चंडाल, उदक, सर्प, ब्राह्मण, वीज, आणि दाढांचे पशु यांनीं पापकर्म्यांना मरण प्राप्त होतें. उदक व पिंडदान जें प्रेतांना देतात, तें यांना प्राप्त होत नाहीं. मध्येंच नष्ट होतें." **षट्त्रिंशन्मतांतही असेंच आहे. ब्राह्मांतही**-"शृंगी, दाढांचे पशु, नखांचे पशु, गज, विष,

अग्नि, उदक यांच्याशीं क्रीडा करीत असून जो मृत असेल त्याला दूर वर्ज्य करावा. नागांचा ( सर्पांचा ) द्वेष करीत असून त्यांनीं मारलेला; वीज पडून मेलेला; कोठेंही चौर्य केल्यामुळें स्वतः राजानें ताडनादि करून मारलेला; परस्त्रिया हरण करीत असतां त्यांच्या पतींनीं द्वेषानें मारलेला; आपल्या असमान संकीर्ण जातींच्या व चंडालादिकांच्या बरोबर युद्ध करून त्यांनीं मारलेले; तसेंच चंडालादिकांचा आश्रय करून राहिलेले; शस्त्रांनीं लोकांचा घात करणारे; घरें वगैरे जाळणारे; विष घालणारे; पाखंडी; जे क्रूरबुद्धीचे अधम मनुष्य क्रोधाच्या योगानें अनशन ( उपवास ), विष, अग्नि, शस्त्र, उद्बंधन, उदकप्रवेश, पर्वतावरून किंवा वृक्षावरून उडी टाकणें, हीं करितात; जे निंद्य शिल्पकर्मानें उपजीवन करणारे; पशुवधसंबंधीं अलंकार धारण करणारे; जे मुखयोनि नपुंसक; ब्रह्मदंडानें ( शापादिकानें ) मृत झालेले; ब्राह्मणांनीं मारलेले; आणि पंचमहापातकी हे सारे पतित म्हटले आहेत. पतितांचा दाह नाहीं, अस्थिसंचयन नाहीं; त्यांच्यासंबंधानें अश्रुपात ( रडणें ), पिंडदान किंवा श्राद्धादि कर्म हें कोठेंही नाहीं. जो अविचारी मनुष्य पतितांचीं दाहादि कर्में करितो त्याची शुद्धि दोन तप्तकृच्छ्रांनीं होते; यावांचून त्याची शुद्धि होत नाहीं."

एतद्बुद्धिपूर्वंसर्वेषांकरणेतु**माधवीयेवसिष्ठः** यआत्मत्यागिनांकुर्यात्स्नेहात्प्रेतक्रियांद्विजः सतप्तकृच्छ्रसहितंचरेच्चांद्रायणव्रतं अज्ञानेतु कृत्वाग्निमुदकंस्नानंसंस्पर्शंवहनंकथां रज्जुच्छेदाश्रुपातंचतप्तकृच्छ्रेणशुध्यतीतिज्ञेयं प्रत्येकंबुद्धिपूर्वेएतदिति**मदनपारिजातः** प्रत्येकंतुस्पर्शाश्रुणो**र्मिताक्षरायां** तच्छवंकेवलंस्पृष्टमश्रुवापतितंयदि पूर्वोक्तानामकारीचेदेकरात्रमभोजनं एकरात्रंतुनाभीयात्त्रिरात्रंबुद्धिपूर्वकमिति**माधवीये** उत्तरार्धं अन्येषुतु**संवर्तः** एषामन्यतमंप्रेतंयोवहेत्तदहेत्तवा कटोदकक्रियांकृत्वाकृच्छ्रंसांतपनंचरेत् अज्ञानेत्वर्धं एतदनाहिताग्नेः आहिताग्नेःकृच्छ्रएवेति**माधवः मिताक्षरायां** आत्मनस्त्यागिनांनास्तिपतितानांतथाक्रिया तेषामपितथागंगातोयेसंस्थापनंहितम् ।

हीं पतितांचीं दाहादिक सारीं कर्में बुद्धिपूर्वक करील तर सांगतो **माधवीयांत वसिष्ठ**–"जो द्विज आत्मत्याग करणाऱ्या मनुष्यांची प्रेतक्रिया स्नेहानें करील त्यानें तप्तकृच्छ्रसहित चांद्रायणव्रत करावें." अज्ञानानें करील तर "आत्मत्यागी मनुष्यांना अग्निदान, उदकदान, स्नान, स्पर्श, वाहणें, कथा, रज्जुच्छेद, अश्रुपात हीं केलीं असतां तप्तकृच्छ्रानें शुद्ध होतो" असें जाणावें. अग्निदानादि बुद्धिपूर्वक केले असतां प्रत्येकाला हें तप्तकृच्छ्रप्रायश्चित्त असें **मदनपारिजात** सांगतो. स्पर्श व अश्रुपात या प्रत्येकाला **मिताक्षरेंत** सांगतो–"त्या आत्मघातक्यांच्या शवाला केवळ स्पर्श केला किंवा अश्रु ढाळले आणि पूर्वोक्त दाहादिक न करणारा त्यानें एक दिवस उपवास करावा." या वचनाचें उत्तरार्ध **माधवीयांत** असें–"एक दिवस भोजन करूं नये. बुद्धिपूर्वक करील तर तीन दिवस भोजन करूं नये." स्पर्श व अश्रुपात यावांचून इतरांविषयीं तर **संवर्त** सांगतो–"वर सांगितलेल्या कोणचांही प्रेत जो वाहील किंवा जाळील, प्रेतोदकक्रिया करील त्यानें सांतपन कृच्छ्र करावें." न जाणून करील तर अर्धें प्रायश्चित्त. हें मृत आहिताग्नि नसेल त्याचें समजावें. आहिताग्नीचें कृच्छ्रच आहे, असें **माधव** सांगतो. **मिताक्षरेंत**–"आत्मत्यागी मनुष्यांची तशीच पतितांची और्ध्वदेहिक क्रिया नाहीं. त्यांचें प्रेत गंगोदकांत टाकणें हितकारक आहे."

आहिताग्नेस्तुविशेषो**हेमाद्रौभविष्ये** वैतानंप्रक्षिपेदप्सुआवसथ्यंचतुष्पथे पात्राणितुदहेदग्नौसाग्निकेपापकर्मणि **छंदोगपरिशिष्टेपि** महापातकसंयुक्तोदैवात्स्यादग्निमान्यदि पुत्रादिःपालयेदग्नीन्युक्त आदोषसंक्षयात् प्रायश्चित्तंनकुर्याद्यःकुर्वन्वाम्रियतेयदि गृह्यंनिर्वापयेच्छ्रौतमप्स्वस्येत्सपरिच्छदं पात्राणिदग्ध्वाद्विप्रायदहेदप्स्वेववाक्षिपेत् **माधवीयेपराशरः** आहिताग्निर्मृतोविप्रश्चंडालेनात्मघातकः दहेत्तंब्राह्मणं विप्रोलोकाग्नौमंत्रवर्जितं प्राजापत्यंचरेत्पश्चाद्विप्राणामनुशासनात् दग्ध्वास्थीनिपुनर्गृह्यक्षीरेणक्षालयेत्ततः स्वेनाग्निनास्वमंत्रेणपृथगेनंपुनर्दहेत् **हेमाद्रौतु** दाहयित्वाशवंतेषांशूद्रैरविधिपूर्वकमित्युक्तं एतत्सर्पादिनामरणेज्ञेयं तांस्तेप्रेत्याभिगच्छंतियेकेचात्महनोजनाइतिश्रुतावात्महननेएवदोषोक्तेः प्रमादमरणेत्वाशौचादिसर्वंभवत्येव तदा**हांगिराः** अथकश्चित्प्रमादेनम्रियेताग्न्युदकादिभिः तस्याशौचंविधातव्यंकर्तव्याचोदकक्रिया **ब्राह्मेपि** प्रमादादपिनिःशंकस्त्वकस्माद्विधिचोदितः शृंगिदंष्ट्रिनखिव्यालविषविद्युज्जलादिभिः चंडालैरथवाचोरैर्निहतोवापिकुत्रचित् तस्यदाहादिकंकार्यंयस्मान्नपतितस्तुसद्विति प्रमादमरणेत्रिरात्रमाशौचमिति **गौडाःशुद्धितत्त्वादयः** दशाहादीतिदा**क्षिणात्याः** अस्यापवादो**हेमाद्रौभविष्ये** प्रमादादिच्छया-

वापिनकुर्यात्सर्पतोमृते नागपूजांविनानकुर्यादित्यर्थः **बौधायनोपि** बुद्धिपूर्वात्महंतॄणांक्रियालोपोविधीयते क्रियांत्यकर्म ।

आहिताग्निप्रेताला तर विशेष सांगतो **हेमाद्रींत भविष्यांत**-"अग्निमान् पापकर्मी मृत झाला असतां त्याचे श्रौताग्नि उदकांत टाकावे. गृह्याग्नि चवाठ्यावर टाकावा. आणि अग्निसंबंधी पात्रें अग्नींत जाळावीं." **छंदोगपरिशिष्टांत**ही-"जर साग्निक ब्राह्मण दुष्टबुद्धीनें महापातकी होईल तर प्रायश्चित्तादिकानें दोष क्षीण होत तोंपर्यंत त्याच्या पुत्रादिकानें अग्नीचें पालन करावें. प्रायश्चित्तादिकानें दोष क्षीण होईपर्यंत तो प्रायश्चित्त करणार नाहीं, अथवा प्रायश्चित्त करीत असतां मरेल तर त्यानें गृह्य विझवून श्रौताग्नि सामग्रीसह उदकांत टाकावे. पात्रें ब्राह्मणाला द्यावीं, किंवा जाळावीं अथवा उदकांतच टाकावीं." **माधवीयांत पराशर**-"आहिताग्नि ब्राह्मण चांडालानें मारला जाईल किंवा आत्मघातानें मरेल तर त्याच्या प्रेताचा ब्राह्मणानें अमंत्रक दाह करून नंतर ब्राह्मणांच्या आज्ञेनें प्राजापत्य कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. त्याचें प्रेत जाळून अस्थि घेऊन त्या दुधानें धुवून श्रौताग्नीनें निराळा अस्थींचा पुनः दाह करावा." **हेमाद्रींत** तर-"त्याचें प्रेत शूद्रांनीं विधिरहित जाळावें" असें सांगितलें आहे. हा सर्व प्रकार गर्वादिकेंकरून मरण आलें असतां जाणावा. कारण, "जे कोणी आत्महत्यारी जन आहेत ते मेल्यावर अंधतामिस्र लोकाप्रत जातात" या श्रुतींत आत्म्याचा घात केला असतांच दोष सांगितला आहे. प्रमादानें मृत असेल तर आशौचादिक सारें कृत्य होतच आहे. तें सांगतो **अंगिरा**-"आतां कोणी प्रमादानें अग्नि, उदक इत्यादिकांनीं मरेल तर त्याचें आशौच करावें, त्याची उदकदानादिक सारी क्रिया करावी." **ब्राह्मांत**ही-"सावधपणा नसल्यामुळें अथवा निःशंकपणानें अकस्मात् प्रारब्धानें प्रेरित होऊन शृंगयुक्त पशु, दाढायुक्त पशु, नखी, हत्ती, विष, विद्युल्लता, उदक, चंडाल, चोर, इत्यादिकांची गांठ पडून त्यांनीं मारला जाईल अथवा इतर कारणांनीं कोठेंही मरेल तर त्याचें दाहादिक कर्म करावें; कारण, तो पतित नाहीं." प्रमादानें मरण असतां तीन दिवस आशौच करावें, असें **गौड-शुद्धितत्त्वादि** ग्रंथकार सांगतात. दशाहादिक आशौच करावें, असें **दाक्षिणात्य** सांगतात. याचा अपवाद **हेमाद्रींत भविष्यांत**-"प्रमादानें अथवा इच्छेनें सर्पापासून मृत असेल तर नागपूजा केल्यावांचून और्ध्वदेहिक करूं नये." **बौधायन**ही-"बुद्धिपूर्वक आत्महत्या करणारांचें अंत्यकर्म करूं नये."

तत्रदुर्मरणनिमित्तंदानादिकार्यं तच्च**विश्वप्रकाशादौशातातपीयेच** व्याघ्रेणनिहतेविप्रेविप्रकन्यांविवाहयेत् सर्पदष्टेनागबलिर्देयःसर्पश्चकांचनः चतुर्निष्कमितंहैमंगजंदद्याद्गजैर्हते राज्ञाविनिहतेदद्यात्पुरुषंतुहिरण्मयं चौरेणनिहतेधेनुंवैरिणानिहतेवृषं वृषेणनिहतेदद्याद्यथाशक्त्यातुकांचनं शय्यामृतेप्रदातव्याशय्यातूलीसमन्विता निष्कमात्रसुवर्णस्यविष्णुनासमधिष्ठिता शौचहीनेमृतेचैवद्विनिष्कंस्वर्णजंहरिं संस्कारहीनेचमृतेकुमारमुपनाययेत् निष्कत्रयंस्वर्णमितंदद्यादश्वंहयाहते शुनाहतेक्षेत्रपालंस्थापयेन्निजशक्तितः सूकरेणहतेदद्यान्महिषंदक्षिणान्वितं कृमिभिश्चमृतेदद्याद्गोधूमान्पंचखारिकाः वृक्षंवृक्षहतेदद्यात्सौवर्णंवस्त्रसंयुतं शृंगिणानिहतेदद्याद्वृषभंवस्त्रसंयुतं शकटेनहतेदद्याद्रव्यंसोपस्करान्वितं भृगुपातमृतेचैवप्रदद्याद्धान्यपर्वतं अग्निनानिहतेकार्यमुदपानंस्वशक्तितः दारुणानिहतेचैवकर्तव्यासदनेसभा शस्त्रेणनिहतेदद्यान्महिषींदक्षिणान्वितां अश्मनानिहतेदद्यात्सवत्सांगांपयस्विनीं विषेणचमृतेदद्यान्मेदिनींहेमनिर्मितां उद्बंधनेनचमृतेकपिंकनकनिर्मितं मृतेजलेनवरुणंहैमंदद्याद्द्विनिष्कजं विषूचिकामृतेस्वादुभोजयेच्चशतंद्विजान् घृतधेनुःप्रदातव्याकंठान्नकवलेमृते कासरोगेणचमृतेअष्टकृच्छ्रव्रतंचरेत् अतिसारमृतेलक्षंगायत्र्याःप्रयतोजपेत् शाकिन्यादिग्रहग्रस्तेजपेद्रुद्रंयथोदितं विद्युत्पातेननिहतेविद्यादानंसमाचरेत् अंतरिक्षमृतेकार्यंवेदपारायणंतथा सच्छास्त्रपुस्तकंदद्यादस्पृश्यस्पर्शतोमृते पतितेचमृतेकुर्यात्प्राजापत्यांस्तुषोडश मृतेचापत्यरहितेकृच्छ्राणांनवतिंचरेत् एवंकृते विधानेतुविदध्यादौर्ध्वदेहिकं ।

वर सांगितलेल्या दुष्टमरणानें मृत असतां त्या दुर्मरणाच्या निमित्तानें दानादिक करावें. तें दानादिक **विश्वप्रकाशादिकांत व शातातपीयांत** सांगतो-"व्याघ्रानें ब्राह्मण मारिला असतां ब्राह्मणकन्येचा विवाह करावा. सर्पानें दंश करून मृत असतां नागबलि करावा. आणि सुवर्णाचा सर्प करून ब्राह्मणास द्यावा. हत्तींनीं मारला असतां चार निष्कपरिमित सुवर्णाचा हत्ती करून ब्राह्मणास द्यावा. राजानें मारला असतां सुवर्णाचा पुरुष करून द्यावा. चोरानें मारला असतां धेनु द्यावी. शत्रूनें मारला असतां वृषभ द्यावा. वृषभानें मारला असतां यथाशक्ति सुवर्ण द्यावें. शय्येवर मेला असतां तूली ( सळई )- युक्त व निष्कमात्र सुवर्णाची विष्णुप्रतिमा वर बसवून शय्या द्यावी. शौचरहित असून मृत असतां दोन निष्कांची सोन्याची

हरिप्रतिमा करून ती यावी. संस्काररहित मृत असतां ब्राह्मणाच्या मुलाचें उपनयन करवावें. अश्वानें मारला असतां तीन निष्क सुवर्णाचा अश्व यावा. कुत्र्यानें मारला असतां आपल्या शक्तीप्रमाणें क्षेत्रपालाची स्थापना करावी. डुकरानें मारला असतां दक्षिणासहित महिष यावा. कृमींनीं मृत असतां पांच खारीपरिमित गोधूम यावे. वृक्षानें मृत असतां सुवर्णाचा वृक्ष वस्त्रासहित यावा. शृंगीनें मृत असतां वस्त्रयुक्त वृषभ यावा. गाडीनें मृत असतां उपस्कर ( साहित्य ) सहित कांहीं द्रव्य यावें. पर्वताच्या शिखरावरून पडून मृत असतां धान्याचा पर्वत करून तो यावा. अग्नीनें मृत असतां आपल्या शक्तीप्रमाणें कूप ( विहीर ) करून त्याचा उत्सर्ग करावा. काष्ठानें मृत असतां धर्मार्थ सभा करावी. शस्त्रानें मृत असतां दक्षिणासहित महिषी यावी. पाषाणानें मृत असतां दूध देणारी सवत्स गाई यावी. विषानें मृत असतां सुवर्णनिर्मित भूमि यावी. उद्बंधनानें मृत असतां सुवर्णनिर्मित वानर यावा. उदकानें मृत असतां दोन निष्क सुवर्णाची वरुणाची मूर्ति करून ती यावी. पटकीनें मृत असतां शंभर ब्राह्मणांना गोड भोजन घालावें. घशामध्यें अन्नाचा घांस लागून मृत असतां घृताची धेनु यावी. खोकल्यानें मृत असतां आठ कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. अतिसारानें मृत असतां गायत्रीचा लक्ष जप करावा. शाकिनी, डाकिनी इत्यादि ग्रहांनीं पीडित होऊन मृत असतां रुद्राचा जप करावा. वीज पडून मृत असतां विद्येचें दान करावें. अंतरिक्षांत मृत असतां वेदपारायण करावें. अस्पृश्यांच्या स्पर्शानें मृत असतां उत्तम शास्त्राचें पुस्तक यावें. पतित मृत असतां सोळा प्राजापत्य कृच्छ्र करावे. अपत्यरहित मृत असतां नव्वद कृच्छ्र करावे. असें दानादिविधान केल्यावर त्याचें और्ध्वदेहिक कर्म करावें.

तथाविधमरणेपिनदोषः तदाहतुर्**मनुवृद्धगार्ग्यौ** वृद्धःशौचमृतेलुप्तप्रत्याख्यातभिषक्क्रियः आत्मानंघातयेद्यस्तुभृग्वग्न्यनशनांबुभिः तस्यत्रिरात्रमाशौचंद्वितीयेत्वस्थिसंचयः तृतीयेतूदकंदत्वाचतुर्थेश्राद्धमाचरेदिति **हेमाद्रौविष्णुधर्मेपि** नरस्तुव्याधिरहितोनत्यजेदात्मनस्तनुं असूर्यानामतेलोकाअंधेनतमसावृताः तांस्तेप्रेत्याभिगच्छंतियेकेचात्महनोजनाः अरिष्टैर्गतमनोज्ञात्वामृत्युकालमुपस्थितं व्याधितोभिषजात्यक्तःपूर्णेवायुषिचात्मनः यथायुगानुसारेणसंत्यजेदात्मनस्तनुं तस्मिन्कालेतनुत्यागात्यथेष्टंफलमाप्नुयात् आयुषस्तुपुराहृष्टंमरणंब्राह्मणस्यच नेति**गौडाना**मपपाठः उत्तरार्धेसंगतेः क्षत्रियस्यतुसंग्रामेमृतेभर्तरियोषितः **अपरार्केब्रह्मगर्भः** योजीवितुंनशक्नोतिमहाव्याध्युपपीडितः सोभ्युदकंमहायात्रांकुर्वन्नत्रनदुष्यति अत्रोक्तवक्ष्यमाणवचोनिचयात्प्रयागातिरिक्तेऽचिकित्स्यरोगाद्युपहतानामधिकारः सोपिजीर्णवानप्रस्थस्यैवेति**विज्ञानेश्वरदेवयाज्ञिकादयः** अतएव**मिताक्षरादौ**भृगुपातानशनादिकंवानप्रस्थस्यैवोक्तं **मनुरपि** आसांमहर्षिचर्याणांत्यक्त्वान्यतमयातनुं वीतशोकभयोविप्रोब्रह्मभूयायकल्पतइति तेनान्यत्रापितद्विषयतैव मूलैक्यादितिकेचित् तन्न वानप्रस्थमरणेआशौचनिषेधात् तेनग्रहस्थादिपरमेवेदं तेनयतेर्नाधिकारः काम्येनधिकाराच्च नैमित्तिकत्वेत्वकरणेदोषोनित्यताचस्यात् प्रयागेत्वरोगिणांरोगिणांच यत्तु शूद्राश्चक्षत्रियावैश्या अंत्यजाश्चतथाधमाः एतेत्यजेयुःप्राणान्वैव अयित्वाद्विजंनृप पतित्वाद्ब्राह्मणस्तत्रब्रह्महाचात्महाभवेदिति तन्निर्मूलमिति**भट्टाः नत्वेवंतु हेमाद्रौव्रतकांडे**लिखनात्निर्मूलत्वंचिंत्यमेव प्रक्रमात्तुपतित्वेतिभृगुपातमात्रपरंयुक्तं ब्राह्मणस्याप्यनुज्ञातमितिवक्ष्यमाणविरोधाच्च यत्त्**वादित्यपुराणे** अब्राह्मणोवास्वर्गादिमहाफलजिगीषया प्रविशेज्ज्वलनंनोयंकरोत्यनशनंतथेति तत्प्रयागातिरिक्तपरमिति**केचित् हेमाद्रौ**त्वेतदग्रे प्रयागवटशाखाग्रादित्युक्तेर्ब्राह्मणस्यप्रयागेपिनेतिप्रतीयते ।

तसेंच शास्त्रविहित जलादि मरणाविषयींही दोष नाहीं. तें सांगतात **मनु व वृद्धगार्ग्य**—"वृद्ध झालेला पापी नसून अपरिहार्य रोगांनीं पीडलेला असा जो मनुष्य मोठा पर्वताचा कडा, अग्नि, अनशन ( उपवास ), उदक यांनीं आपल्या देहाचा घात करील त्याचें तीन दिवस आशौच धरावें. दुसऱ्या दिवशीं अस्थिसंचयन करावें. तिसऱ्या दिवशीं उदक देऊन चवथ्या दिवशीं श्राद्ध करावें." **हेमाद्रींत विष्णुधर्मांत**ही—"व्याधिरहित मनुष्यानें आपल्या देहाचा त्याग करूं नये. जे कोणी आत्मघातकी मनुष्य ते अंधतमानें आवृत असे जे सूर्यरहित लोक त्या लोकांस जातात. अरिष्टांनीं ( मरणसूचक चिन्हांनीं ) आपणास मृत्युकाल प्राप्त झाला असें जाणून अथवा पूर्ण आयुष्य असतांही व्याधिग्रस्त होऊन वैद्यांनीं सोडला असें जाणून युगानुरोधेंकरून आपल्या देहाचा त्याग करावा. अशा कालीं देहत्याग केल्यानें यथेष्ट फल प्राप्त होतें. आयुष्य संपण्याच्या पूर्वी ब्राह्मणाला मरण, वर सांगितल्याप्रमाणें आहे. क्षत्रियाला युद्धामध्यें आणि स्त्रियांना भर्ता मृत असतां मरण सांगितलें आहे." या वचनांत 'मरणं ब्राह्मणस्य न' असा **गौडांचा** पाठ तो अशुद्ध आहे. कारण, तशा पाठानें उत्तरार्धाची संगति होत नाहीं. **अपरार्कांत ब्रह्मगर्भ**—"जो मनुष्य मोठ्या व्याधीनें पीडित होऊन जीवंत राहाण्याविषयीं समर्थ होत नाहीं तो मनुष्य

अग्निप्रवेश किंवा उदकप्रवेश अथवा महायात्रा करीत असतां दोषी होत नाहीं." येथें पूर्वी सांगितलेल्या व पुढें सांगावयाच्या वचनसमुदायावरून प्रयागावांचून इतर ठिकाणीं मरण्याविषयीं अपरिहार्य 'रोगादिकांनीं पीडितांना अधिकार आहे, तो जीर्ण झालेल्या वानप्रस्थालाच आहे, असें **विज्ञानेश्वर, देवयाज्ञिक** इत्यादिक सांगतात. म्हणूनच **मिताक्षरादि** ग्रंथांत मोठ्या कड्यावरून पतन, अनशन इत्यादिक वानप्रस्थालाच सांगितलें आहे. **मनुही**-"ह्या सांगितलेल्या महर्षींच्या आचरणांतून कोणत्याही एका आचरणानें देहाचा त्याग करणारा ब्राह्मण शोकभयरहित होऊन ब्रह्मत्व पावतो." हा प्रकार वानप्रस्थाला सांगितला आहे, त्यावरून प्रयागातिरिक्त ठिकाणीं देखील मरणाविषयीं अनुज्ञा वानप्रस्थालाच आहे. कारण, त्या वचनांनीं सांगितलेल्या व यानें सांगितलेल्या तनुत्यागाचें मूल एक आहे, असें **केचित्** म्हणतात. तें बरोबर नाहीं. कारण, वानप्रस्थ मृत असतां आशौचाचा निषेध आहे. तेणेंकरून गृहस्थादिविषयकच हें मरण आहे. म्हणून ह्या मरणाविषयीं संन्याशाला अधिकार नाहीं. आणि काम्यकर्माविषयीं संन्याशाला अधिकारही नाहीं. हें मरण काम्य नसून नैमित्तिक ( रोगादिनिमित्तानें ) आहे, असें म्हटलें तर केलें नाहीं म्हणजे दोष प्राप्त होईल आणि नित्यही होईल. प्रयागांत मरण्याविषयीं तर रोगरहितांना व रोग्यांनाही अधिकार आहे. आतां जें "शूद्र, क्षत्रिय, वैश्य, अंत्यज, तसेच अधम यांनीं प्राणत्याग करावा. ब्राह्मणानें करूं नये. तेथें उदकांत ब्राह्मण पडेल तर ब्रह्महत्यारी व आत्महत्यारी होईल" असें वचन तें निर्मूल आहे, असें **भट्ट** सांगतात. **खरा प्रकार** म्हटला म्हणजे **हेमाद्रींत** व्रतकांडांत हें वचन लिहिलेलें असल्यामुळें निर्मूल म्हणणें चिंत्य ( हेतुशून्य ) आहे. पूर्वीच्या उपक्रमावरून 'पतिला' हें पर्वताच्या पतनस्थानावरून पडण्याविषयींच आहे, असें म्हणणें युक्त दिसतें. या वचनावरून प्रयागांत मरण्याविषयीं ब्राह्मणाला अधिकार नाहीं, असें होत नाहीं. आणि तसें मानलें तर ब्राह्मणाला देखील तीर्थाचे ठायीं प्राणमोक्षाची अनुज्ञा आहे" ह्या पुढें सांगावयाच्या **विवस्वानाच्या** वचनाशीं विरोधही येतो. आतां जें **आदित्यपुराणांत**-"ब्राह्मणभिन्न असेल त्यानें स्वर्गादिक मोठ्या फलाच्या इच्छेनें अग्निप्रवेश किंवा उदकप्रवेश करावा. तसेंच अनशन ( उपवास ) करावें" या वचनानें ब्राह्मणाला उदकप्रवेश वर्ज्य केला आहे. तो प्रयागातिरिक्तविषयक आहे, असें **केचित्** म्हणतात. **हेमाद्रींत** तर-या वचनाच्या पुढें 'प्रयागांतील वटाच्या शाखाग्रावरून देहत्याग करितो' असें सांगितल्यावरून करणारा वरील वचनांतील अब्राह्मण, असें झाल्यानें प्रयागांतदेखील ब्राह्मणाला अधिकार नाहीं असें प्रतीतीस येतें.

**माधवीयेपरार्केचादित्यपुराणे** दुश्चिकित्स्यैर्महारोगैःपीडितस्तुपुमानपि प्रविशेज्ज्वलनंदीप्तंकरोत्यनशनंतथा अगाधतोयराशिंचभृगोःपतनमेवच गच्छेन्महापथंवापितुषारगिरिमादरात् प्रयागवटशाखाग्राद्देहत्यागंकरोतिच स्वयंदेहविनाशस्यकालेप्राप्तेमहामतिः उत्तमान्प्राप्नुयाल्लोकान्नात्मघातीभवेत्क्वचित् महापापक्षयात्स्वर्गेदिव्यान्भोगान्समश्नुते एतेषामधिकारस्तुसर्वेषांसर्वजंतुषु नराणामथनारीणांसर्ववर्णेषुसर्वदा ईदृशंमरणंयेषांजीवतांकुत्रचिद्भवेत् आशौचंस्यात्त्र्यहंतेषांवज्रानलहतेतथा वाराणस्यांम्रियेद्यस्तुप्रत्याख्यातभिषक्क्रियः काष्ठपाषाणमध्यस्थोजाह्नवीजलमध्यगः अविमुक्तोन्मुखस्तस्यकर्णमूलगतोहरः प्रणवंतारकंब्रूते नान्यथाकुत्रचित्क्वचित् **हेमाद्रौचैवं** अत्रप्राप्तेकालेइत्युक्तेरप्राप्तमरणकालायाःस्त्रियाःअन्वारोहणेसंपूर्णमेवाशौचं **पृथ्वीचंद्रस्तु**त्रापित्र्यहमाह **शुद्धितत्त्वादिगौडग्रंथे**ष्वप्येवम् ।

**माधवीयांत व अपरार्कांत आदित्यपुराणांत**-"अत्यंत कष्टसाध्य किंवा असाध्य महारोगांनीं पीडलेला पुरुषही प्रदीप्त अग्नीमध्यें प्रवेश करितो; अनशन ( उपवास ) करितो; मोठ्या डोहांत उडी घेतो; पर्वतावरून उडी घेतो; अथवा हिमाचलाच्या मोठ्या ( ऋषि इत्यादिकांनीं सेवित ) अशा मार्गास जातो; मरणसमय प्राप्त असतां प्रयागांतील वटाच्या शाखाग्रावरून स्वतः देहत्याग करितो, त्याला उत्तम लोक प्राप्त होतात. तो आत्मघातकी कधींही होत नाहीं. महापातकाचा क्षय होऊन स्वर्गामध्यें त्याला दिव्यभोग प्राप्त होतात. ह्या वर सांगितलेल्या मरणांचा अधिकार सर्व प्राण्यांना आणि सर्व वर्णांच्या पुरुषांना व स्त्रियांना सर्वकाल आहे. अशा प्रकारचें मरण कोणत्याही ठिकाणीं ज्या मनुष्यांना प्राप्त होईल त्यांचें आशौच तीन दिवस होतें. तसेंच विजेच्या अग्नीनें मृत असतां समजावें. वैद्यांनीं सोडलेला असा जो मनुष्य वाराणसीमध्यें काष्ठ व पाषाण यांच्या मध्यभागीं भागीरथीच्या उदकामध्यें जाऊन मृत होईल त्याच्या कानाजवळ भगवान् शंकर जाऊन तारक प्रणवाचा उपदेश करितो. इतर ठिकाणीं कोठेंही तारकप्रणवाचा उपदेश नाहीं." **हेमाद्रींत**ही असेंच सांगितलें आहे. येथें वरील वचनांत 'मरणसमय प्राप्त असतां' असें म्हटलें आहे, म्हणून स्त्रियेचा मरणकाल प्राप्त नसून तिनें पतीच्या मागाहून अन्वारोहण ( अनुगमन ) केलें असतां तिचें संपूर्णच आशौच करावें. **पृथ्वीचंद्र** तर अनुगमनांतही तीन दिवस आशौच सांगतो, **शुद्धितत्त्व** इत्यादिक गौडग्रंथांतही असेंच सांगितलें आहे.

एतच्चवृद्धादिमरणंकलौनिषिद्धं भृग्वग्निपतनैश्चैववृद्धादिमरणंतथेति **माधवेनपृथ्वीचंद्रेणचकलिवर्ज्ये**षूक्तेः नचाश्रयाद्युक्तनिषेधः विशिष्टोद्देशेवाक्यभेदात् नचकलौवानप्रस्थाश्रमनिषेधादेवसिद्धेर्मरणनिषेधो-

व्यर्थइतिवाच्यं सर्ववर्णेष्वित्यादिभिस्तन्निषेधस्यापिप्राप्तेः काम्यंभवत्येव येवैतन्वंविसृजंतीतिश्रुतेःस्मृत्या-संकोचायोगात् नचेयंस्वाभाविकमृत्युपरा धीरपदोक्तेः मात्स्यभारतादिषु नलोकवचनात्तातनवेदवच-नादपि मतिरुत्क्रमणीयातेप्रयागमरणंप्रतीत्युक्तेः अतएवविष्णुधर्मेरोग्यादिमरणमुक्त्वोक्तं यथायुगानु-सारेणसंत्यजेदात्मनस्तनुमितिकाश्यामप्युक्तं मात्स्ये अग्निप्रवेशंयेकुर्युरविमुक्तेविधानतः प्रविशंतिमुखंते-मेनिःसंदिग्धंवरानने हेमाद्रौविवस्वान् सर्वेंद्रियवियुक्तस्यस्वव्यापाराक्षमस्यच प्रायश्चित्तमनुज्ञातमग्निपा-तोमहापथः धर्मार्जनासमर्थस्यकर्तुःपापांकितस्यच ब्राह्मणस्याप्यनुज्ञातंतीर्थेप्राणविमोक्षणं अपरार्केप्येवं सहगमनंकलौभवत्येव कलौनान्यागतिःस्त्रीणांसहानुगमनादृतइतिब्रह्मवैवर्तात् एतेनमरणांतिकप्रायश्चित्तं काशीखंडादौ चातुर्वर्ण्यस्यतनुत्यागविधयश्चयुगांतरपराएव ।

हें वर मनु व वृद्धगार्ग्य इत्यादिकांनीं सांगितलेलें वृद्धादिमरण कलियुगांत निषिद्ध आहे. कारण, "भृगुवरून (पर्वताच्या कड्यावरून) उडी घेणें, अग्नींत उडी टाकणें या कर्मांनीं सांगितलेलें वृद्धादिमरण तसेंच म्हणजे कलियुगांत निषिद्ध आहे" असें माधवानें व पृथ्वीचंद्रानें कलिवर्ज्यांत सांगितलें आहे. आतां असें कीं, त्या वचनांत भृगुपतन व अग्निपतन यांनीं सांगितलेलें जें वृद्धादिमरण तें कलियुगांत निषिद्ध, असें सांगितल्यामुळें तितक्याचाच निषेध, इतर वृद्धादि-मरणाचा निषेध नाहीं, असें म्हणूं? तर असें म्हणतां येत नाहीं. कारण, भृगु-अग्निपतनविशिष्ट (युक्त) वृद्धादिमरणाचा उद्देश करून निषेधाचें विधान केलें असतां वाक्यभेदरूप दोष येतो, तो असा—भृग्वग्निपतनांनीं वृद्धादिमरण सांगितलें आहे, तें कलींत निषिद्ध आहे, अशीं दोन वाक्यें होतात. आतां असें म्हणूं कीं, कलींत वानप्रस्थाश्रमाचा निषेध असल्यामुळेंच मरणाचा निषेध सिद्ध असून पुनः मरणाचा निषेध निराळा सांगितला तो व्यर्थ आहे? तर असें म्हणतां येणार नाहीं. कारण, 'सर्ववर्णेषु सर्वदा' इत्यादि वचनांनीं वानप्रस्थाश्रमरहिताला देखील वृद्धादिमरण प्राप्त आहे, म्हणून त्याचा निराळा निषेध केला आहे. कामनिक मरण होतच आहे. कारण, 'ये वै तन्वं १ विसृजंति धीराः' अशी श्रुति आहे. अर्थ-भागीरथी व यमुना या दोन नद्यांचा संगम ज्या ठिकाणीं होतो, तेथें स्नान करणारे स्वर्गास जातात. व जे धीर मनुष्य तेथें देहत्याग करितात ते मोक्षास जातात. श्रुति स्मृतीपेक्षां प्रबळ असल्यामुळें या श्रुतीचा कलींत देहत्यागनिषेधक स्मृतीनें संकोच (म्हणजे श्रुति कलिव्यतिरिक्त विषयक आहे असा) करितां येत नाहीं. आतां ही श्रुति प्रयागाचेठायीं ज्याला स्वाभाविक (बुद्धिपूर्वक नव्हे) मृत्यु प्राप्त असेल त्याविषयीं आहे? असें म्हणतां येत नाहीं. कारण, श्रुतीमध्यें 'धीराः' म्ह० मरणाविषयीं न भिणारे, असें पद आहे. स्वाभाविक मृत्यूविषयीं हें पद लागत नाहीं. मत्स्यपुराण, भारत इत्यादिकांत सांगतो—"कोणी एक मनुष्य दुसऱ्याला म्हणतो-प्रयागमरणाविषयीं जी तुझी बुद्धि झाली आहे ती लोकांच्या सांगण्यावरून नाहीं आणि वेदवचनावरूनही झालेली नाहीं" असें सांगितलें आहे. कामनिक मरणाचा कलींत निषेध नाहीं म्हणूनच विष्णुधर्मांत-रोगी इत्यादिकांचें मरण सांगून पुढें सांगितलें कीं, "जसें ज्या युगांत सांगितलें आहे त्याप्रमाणें आपल्या तनूचा त्याग करावा" या वचनानें काशींतही मरण सांगितलें आहे. मात्स्यांत-"शिव म्हणतात-अविमुक्तक्षेत्रांत जे विधीनें अग्निप्रवेश करितील ते माझ्या मुखांत प्रवेश करितील, यांत संदेह नाहीं." हेमाद्रींत विवस्वान्-"ज्याचीं सारीं इंद्रियें पराधीन होऊन आपल्या (देहाच्या) व्यापाराविषयीं असमर्थ असेल त्याला प्रायश्चित्त अग्नींत प्रवेश हा मोठा मार्ग शास्त्रानें सांगितला आहे. पापयुक्त असून धर्मसंपादन करण्याविषयीं असमर्थ अशा ब्राह्मणालाही तीर्थांत प्राणत्यागाची शास्त्रानें अनुज्ञा दिली आहे." अपरा-र्कांतही असेंच आहे. स्त्रियांना सहगमन कलियुगांत होतच आहे. कारण, "कलियुगांत स्त्रियांना सहगमनावांचून दुसरी गति नाहीं." असें ब्रह्मवैवर्तवचन आहे. यावरून मरणांतिक प्रायश्चित्त सांगितलेलें तें आणि काशीखंडादिग्रंथांत चारही वर्णांना देहत्यागाचे सांगितलेले विधि ते सारे इतर युगांविषयीं समजावे.

प्रयागेपित्रिस्थलीसेतौस्कांदे यथाकथंचित्तीर्थेस्मिन्प्राणत्यागंकरोतियः तस्यात्मघातदोषोनप्राप्नुयाद-दीप्सितान्यपि पाद्मेविष्णुः देहत्यागंतथाधीराःकुर्वंतिममसन्निधौ मत्तनुंप्रविशंत्येवनपुनर्जन्मनेनराः कौर्मे व्याधितोयदिवादीनःक्रुद्धोवापिभवेन्नरः गंगायमुनमासाद्ययस्तुप्राणान्परित्यजेत् ईप्सितांल्लभतेका-मान्वदंतिमुनिपुंगवाः तथा यागतिर्योगयुक्तस्यसत्त्वस्थस्यमनीषिणः सागतिस्त्यजतःप्राणान्गंगायमुनसंगमे वाराहे तत्रयोमुंचतिप्राणान्वटमूलेपुसुंदरि सर्वलोकानतिक्रम्यममलोकंप्रपद्यते तथा अकामोवासकामो-वावटमूलेपुसुंदरि शीघ्रंप्राणान्प्रमुंचेतयदीच्छेत्परमांगतिं तथा पंचयोजनविस्तीर्णेप्रयागस्यतुमंडले व्यवस्थि-तान्पुरुषान्सप्तभविष्यांश्चचतुर्दश नरस्तारयतेसर्वान्यस्तुप्राणान्परित्यजेत् ब्राह्मे [illegible]

**प्रयागेविष्णुतत्परः तनुंत्यजतिवैमाघेतस्यमुक्तिर्नसंशयः दुष्कृतोपिदुराचारोब्रह्महत्यादिपातकी हरिंध्यात्वा-त्यजेद्देहंप्रायशोमुक्तिमान्भवेत् भविष्योत्तरे समाःसहस्राणितुसप्तवैजलेदशैकमग्नौपतनेचषोडश महाह-वेषष्टिरशीतिगोग्रहेअनाशकेभारतचाक्षयागतिः इतिसामान्यतोपिफलं एवमन्येपिविधयोज्ञेयाः यत्तुगौडाः प्रयागादिमरणंब्राह्मणभिन्नविषयमित्याहुस्तद्दूषणंपितामहचरणैःप्रयागविधौकृतमितिनात्रोच्यते ।**

प्रयागांत कामनिकमात्र कलींत होतें असें सांगतो **त्रिस्थलीसेतूंत स्कांदांत**-"ह्या प्रयागतीर्थांत कसाही जो प्राणत्याग करितो त्याला आत्मघाताचा दोष नाहीं व तो ईप्सितफलें पावतो." **पद्मपुराणांत विष्णु**—"माझ्या संनिध जे धीर मनुष्य देहत्याग करितात ते माझ्या देहांत प्रवेश करितातच. त्यांना पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं." **कौर्मांत**—"व्याधिष्ट अथवा दीन किंवा क्रुद्ध झालेला जो मनुष्य गंगा व यमुना यांच्या संगमाजवळ येऊन प्राणत्याग करील त्याचे अभीष्ट मनोरथ पूर्ण होतील, असें ऋषिश्रेष्ठ सांगतात." तसेंच "विद्वान् सत्त्वस्थ योग्याला जी गति प्राप्त होते ती गति गंगा व यमुना नदीच्या संगमांत प्राणत्याग करणाराला प्राप्त होते." **वाराहांत**-"तेथें वटमूलाचेठायीं जो प्राणांचा त्याग करितो तो सर्व लोकांचा अतिक्रम करून माझ्या लोकास प्राप्त होतो." तसेंच-"अकाम असो किंवा सकाम असो जर परमगतीची इच्छा करील तर वटमूलांचे ठायीं शीघ्र प्राणत्याग करावा. प्रयागाच्या पांच योजनें विस्तीर्ण अशा मंडलामध्यें जो प्राणांचा परित्याग करील तो मनुष्य पूर्वींच्या सात पुरुषांना व पुढच्या चवदा पुरुषांना तारितो." **ब्राह्मांत**—"जो विष्णुतत्पर मनुष्य विष्णूच्या चरण-कमलाचें ध्यान करून माघमासीं प्रयागाचे ठायीं देहाचा त्याग करितो त्याला मुक्ति होते, यांत संशय नाहीं. दुष्ट कर्म करणारा दुराचारी ब्रह्महत्या इत्यादि महापातक करणाराही मनुष्य हरीचें ध्यान करून देहत्याग करील त्याला फारकरून मुक्ति प्राप्त होईल." **भविष्योत्तरपुराणांत**—"उदकांत देहत्याग करणाराला सात हजार वर्षेंपर्यंत उत्तम गति होते. अग्नींत देहत्याग करणाराला अकरा हजार वर्षें गति होते. भृगुपात करणाराला सोळा हजार वर्षें गति होते. मोठ्या युद्धांत देहत्याग करणाराला साठ हजार वर्षें गति होते. गाईच्या ग्रहणनिमित्तक युद्धांत प्राणत्याग करणाराला ऐशीं हजार वर्षें गति होते. अनाशकक्षेत्रांत देहत्याग करणाराला अक्षय गति होते." असें सामान्यतःही प्राणत्यागाला फल सांगितलें आहे. याप्रमाणें इतरही प्राणत्याग-विधि जाणावे. आतां जें **गौड**-प्रयागादिकांचे ठायीं मरण सांगितलें तें ब्राह्मणांहून इतरविषयक आहे, असें सांगतात, त्याचें दूषण आमच्या पितामहांनीं ( नारायणभट्टांनीं ) प्रयागविधींत केलें आहे, म्हणून येथें सांगत नाहीं.

**अत्रदशाहमाशौचं त्रिरात्रस्यप्राप्तकालगोचरत्वादितिभट्टाः युक्तंतुत्रिरात्रं दिवोदासीयेप्येवं शुद्धितत्त्वेपिकाश्यपः अनशनमृतानामशनिहतानामग्निजलप्रविष्टानांभृगुसंग्रामदेशांतरमृतानांजातदं-तानांचत्रिरात्रमिति एवंमरणांतप्रायश्चित्तेपि पूर्वोक्तश्चात्महादेर्दाहाशौचादिनिषेधस्तदानीमेव वत्सरांतेतु सर्वमौर्ध्वदेहिकंकुर्यात् गोब्राह्मणहतानांचपतितानांतथैवच ऊर्ध्वसंवत्सरात्कुर्यात्सर्वमेवौर्ध्वदेहिकमिति हेमाद्रौषट्त्रिंशन्मतात् एवंम्लेच्छीकृतानामपिगयाश्राद्धमपिकार्यं ब्रह्महाचकृतघ्नश्चगोघातीपंचपा-तकी सर्वेतेनिष्कृतिंयांतिगयायांपिंडपातनादित्यग्निपुराणात् एवंब्राह्मेपि क्रियतेपतितानांतुगतेसंवत्सरे क्वचित् देशधर्मप्रमाणत्वाद्गयाकूपेस्वबंधुभिः मार्तंडपादमूलेवाश्राद्धंहरिहरौस्मरन् सूर्यपदइत्यर्थः ।**

ह्या शास्त्रविहित मरणाचेठायीं सपिंडांनीं दहा दिवस आशौच धरावें. कारण, पूर्वी त्रिरात्र आशौच सांगितलें तें ज्याला मरणसमय प्राप्त असून मृत असेल तद्विषयक आहे, असें **भट्ट** सांगतात. योग्य म्हटलें म्हणजे त्रिरात्र आशौच करावें. **दिवोदासीयांत**ही असेंच आहे. **शुद्धितत्त्वांतही काश्यप**-"अनशन ( उपवास ) करून मृतांचें; विजेनें मृतांचें; अग्नींत व उदकांत प्रवेश करणारांचें; भृगुपतन, युद्ध, परदेश यांचेठायीं मृतांचें; आणि ज्या मुलांना दंत उत्पन्न झाले आहेत त्यांचें त्रिरात्र आशौच करावें." मरणांत प्रायश्चित्तांतही असेंच समजावें. आत्मघातकी, पतित इत्यादि मनुष्यांचा दाह, आशौच वगैरे करूं नये, ह्मणून जो पूर्वी निषेध सांगितला तो त्या वेळींच समजावा. एक वर्ष झाल्यावर त्या मृतांचें सारें और्ध्वदेहिक ( अंत्यकर्म ) करावें. कारण, "गाई, ब्राह्मण यांनीं मारलेले, व पतित यांचें सर्व और्ध्वदेहिक कर्म एक वर्ष गेल्यावर करावें" असें **हेमाद्रींत षट्त्रिंशन्मत**वचन आहे. बाटून म्लेच्छ केलेल्यांचेंही असेंच समजावें. वर सांगित-लेल्या आत्मघातक्यादिकांचें गयाश्राद्धही करावें. कारण, "ब्रह्महत्या करणारा, कृतघ्न, गोहत्या करणारा, पंचमहापातकी यांच्या नांवानें गयेंत पिंडप्रदान केल्यानें ते सारे पातकरहित होतात" असें **आदित्यपुराण**वचन आहे. असें **ब्राह्मांत**ही सांगतो—"पतितांचें मरून संवत्सर गेलें असतां क्वचित् कालीं देशधर्मप्रमाण मानून मृताचे बंधु गयाकूपाचे ठायीं किंवा सूर्यपदाचे ठायीं हरिहरांचें स्मरण करून श्राद्ध करितात."

**तत्रवर्षमध्येकृत्यमुक्तमपरार्केवायुपुराणे शुक्लपक्षेतुद्वादश्यांकुर्याच्छ्राद्धंतुवत्सरं द्वादशाहानिवाकुर्या-**

च्छुक्लेचप्रथमेहनि **छागलेयः** नारायणबलिःकार्योलोकगर्हाभयान्नरैः तथातेषांभवेच्छौचंनान्यथेत्यब्रवीद्यमः **व्यासः** नारायणंसमुद्दिश्यशिवंवायत्प्रदीयते तस्यशुद्धिकरंकर्मतद्भवेन्नैतदन्यथेति सचात्मघातादिप्रायश्चित्तंकृत्वाकार्यः तदुक्तं**हेमाद्रौषट्त्रिंशन्मते** कृत्वाचांद्रायणंपूर्वंक्रियाकार्यायथाविधि नारायणबलिःकार्योलोकगर्हाभयान्नरैः पिंडोदकक्रियाःपश्चाद्वृषोत्सर्गादिकंचयत् एकोद्दिष्टानिकुर्वीतसपिंडीकरणंतथा **दिवोदासीयेवृद्धशातातपस्तु** पतितेचमृतेशुद्ध्यैप्राजापत्यांस्तुषोडश मृतेचापत्यरहितेकृच्छ्राणांनवतिंचरेदित्याह इदंप्रायश्चित्तार्हपित्रादिविषयं इंद्रियैरपरित्यक्तायेचमूढाविषादिनः घातयंतिस्वमात्मानंचांडालादिहताश्चये तेषांपुत्राश्चपौत्राश्चदययासमभिप्लुताः यथाश्राद्धंप्रतन्वंतिविष्णुनामप्रतिष्ठितं तथातेसंप्रवक्ष्यामिनमस्कृत्यस्वयंभुवइतिहेमाद्रौतेनैवोक्तेः तत्रैव**बौधायनोपि** नारायणबलिंव्याख्यास्यामः [ चंडालादुदकात्सर्पाद्ब्राह्मणाद्वैद्युतादपि । दंष्ट्रिभ्यश्चपशुभ्यश्चमरणंपापकर्मणां । विषशस्त्ररज्जुपाषाणाद्देशांतरमृतेवा ] अभिशस्तपतितसुरापात्मत्यागिनांब्राह्मणहतानांचद्वादशवर्षाणित्रीणिवाकुर्वीतेति ।

जलादिमृत इत्यादिकांविषयीं तेथें वर्षाभर्ये कृत्य सांगतो **अपरार्कांत वायुपुराणांत**—"संवत्सरपर्यंत शुक्लपक्षांत द्वादशीस श्राद्ध करावें. अथवा शुक्लपक्षाच्या प्रथम दिवशीं बारा दिवसांचें कृत्य करावें." **छागलेय**-"लोकापवादाच्या भीतीनें मनुष्यांनीं नारायणबलि करावा. असें केलें असतां त्यांची शुद्धता होते, अन्यथा शुद्धि होत नाहीं, असें यम सांगता झाला." **व्यास**—"नारायणाचा उद्देश करून किंवा शिवाचा उद्देश करून जें कांहीं कर्म करितो त्याचें तें कर्म शुद्धिकारक होतें. अन्यथा शुद्धिकारक होत नाहीं." तो नारायणबलि आत्मघातादि प्रायश्चित्त करून नंतर करावा. तें सांगतो **हेमाद्रींत षट्त्रिंशन्मतांत**—"पूर्वी चांद्रायण करून नंतर यथाविधि क्रिया करावी. लोकनिंदेच्या भयानें मनुष्यांनीं नारायणबलि करावा. नंतर पिंडदान, उदकदान इत्यादि क्रिया, वृषोत्सर्गादिकर्म, एकोद्दिष्टें, आणि सपिंडीकरण हीं करावीं." **दिवोदासीयांत वृद्धशातातप** तर पतित मृत असता त्याच्या शुद्धीकरितां सोळा प्राजापत्यकृच्छ्र करावे. अपत्यरहित मृत असतां नव्वद कृच्छ्र करावे" असें सांगतो. हें प्रायश्चित्त प्रायश्चित्ताला योग्य असा जो पिता इत्यादिक मृत असेल तद्विषयक आहे. कारण, "जे मूढ इंद्रियांनीं पराधीन झालेले नसून विषादिकें करून आपल्या देहाचा घात करितात व जे चांडालादिकांनीं मारले जातात त्यांचे पुत्र किंवा पौत्र दयायुक्त होऊन विष्णुनामयुक्त ज्या विधीनें श्राद्ध करितात तो विधि ब्रह्मदेवाला नमस्कार करून तुला सांगतो." असें **हेमाद्रींत** त्यानेंच सांगितलें आहे. तेथेंच **बौधायन**ही-"नारायणबलि सांगतो-अभिशस्त ( लोकापवादानें दूषित ), पतित, सुरापी, आत्महत्यारी, आणि ब्राह्मणांनीं मारलेला यांचें द्वादश वर्षें किंवा तीन वर्षें प्रायश्चित्त करून तो करावा."

**गृह्यपरिशिष्टेतु** चंडालादित्यानुक्त्वा दग्ध्वाशरीरंप्रेतस्यसंस्थाप्यास्थीनियत्नतः प्रायश्चित्तंतुकर्तव्यंपुत्रैश्चांद्रायणत्रयमित्युक्तं **मदनरत्नेब्राह्मे** प्रमादादपिनिःशंकस्त्वकस्माद्विधिचोदितः चांडालैर्ब्राह्मणैश्चौरैर्निहतोयत्रकुत्रचित तस्यदाहादिकंकार्यंयस्मान्नपतितस्तुसः चांद्रायणंतप्तकृच्छ्रद्वयंतस्यविशुद्धये यद्वाकृच्छ्रान्पंचदशकृत्वातुविधिनादहेत बुद्धिपूर्वंमृतानांतुत्रिंशत्कृच्छ्रंसमाचरेदित्युक्तं **स्मृतिरत्नावल्यांतु** द्विगुणंप्रायश्चित्तंकृत्वार्वागप्यब्दात्सर्वंकार्यमित्युक्तं आत्मनोघातशुद्ध्यर्थंचरेच्चांद्रायणद्वयं तप्तकृच्छ्रचतुष्कंच त्रिंशत्कृच्छ्राणिवापुनः अर्वाक्संवत्सरात्कुर्याद्दहनादियथोदितं कृत्वानारायणबलिमनित्यत्वात्तदायुषइति इदंचात्मवधनिमित्तंतज्जातिवधप्रायश्चित्तेनसमुच्चितंकार्यं अतएव**बौधायनेनोक्तं** द्वादशवर्षाणित्रीणिवेति **मदनपारिजातेस्मृत्यर्थसारेच** ब्रह्महादीनांतद्योग्यंप्रायश्चित्तंकृत्वानारायणबलिःकार्यइत्युक्तं एवंम्लेच्छीकृतानामपि यत्तु**कश्चिदाह** पुत्रकृतेनप्रायश्चित्तेनपितुःपापनाशेमानाभावः आत्मघातेतुवचनादस्तु महापातकेतुकथंस्यादिति सःस्वयमेवात्मवधप्रायश्चित्तस्यजातिवधनिमित्तेनसमुच्चयंवदन्हृदयशून्यएव नहिजातिवधनिमित्तंपुत्रैःकार्यमितिवचनमस्ति पुत्रकर्तृकसर्वप्रायश्चित्तादिविप्लवापत्तेः प्रागुक्तबौधायनवचनाच्चेतिदिक् इदंप्रायश्चित्तार्हाणामेव प्रायश्चित्तानर्हाणांतुपतितोदकमात्रंकार्यमितिकेचित् **मदनपारिजातादिस्वरसो**प्येवं वस्तुतस्तुतदर्हानर्हयोर्वचनेनुपादानादविशेषात्तत्रापिनारायणबलिर्गयाश्राद्धंचेतियुक्तम् ।

---

१ हा कंसांतील ग्रंथ एका लेखी जुन्या प्रतींत आहे, बऱ्याच प्रतींत नाहीं.

**गृह्यपरिशिष्टांत** तर—'चंडालादुदकात्' इत्यादिक सांगून-"प्रेताचें शरीर जाळून त्याच्या अस्थि प्रवाहानें ठेऊन पुत्रांनीं तीन चांद्रायणें प्रायश्चित्त करावें," असें सांगितलें आहे. **मदनरत्नांत ब्राह्मांत**-"प्रमादानें अथवा निःशंकपणानें अकस्मात् दैवानें प्रेरित होऊन चांडालांनीं, ब्राह्मणांनीं अथवा चोरांनीं कोठेंही मारला जाईल त्याचें दाहादिकर्म करावें; कारण, तो पतित नाहीं. त्याच्या शुद्धीकरितां चांद्रायण व दोन तप्तकृच्छ्रें करावीं अथवा पंधरा कृच्छ्र करून यथाविधि दाह करावा. बुद्धिपूर्वक मृतांचे तीस कृच्छ्र करावे" असें सांगितलें आहे. **स्मृतिरत्नावलींत** तर-दुष्पट प्रायश्चित्त करून प्रथम वर्षाच्या आंत देखील सारें कर्म करावें, असें सांगितलें आहे. तें असें—"आत्महत्येची शुद्धि होण्याकरितां दोन चांद्रायणें आणि चार तप्तकृच्छ्रें अथवा तीस कृच्छ्रें करून संवत्सराच्या आंत नारायणबलि करून यथोक्त दाहादिकर्म करावें. कारण, कर्त्याचें आयुष्य अनित्य आहे." हें आत्महत्यानिमित्तक प्रायश्चित्त व जातिवधनिमित्तक प्रायश्चित्त अशीं मिळून दोन करावीं. म्हणूनच वर सांगितलेल्या वचनांत द्वादशवर्षें किंवा तीन वर्षें, असें **बौधायना**नें सांगितलें आहे. **मदनपारिजातांत** व **स्मृत्यर्थसारांत**—ब्रह्महत्यादिकरणारांचें त्या पापाला योग्य प्रायश्चित्त करून नारायणबलि करावा, असें सांगितलें आहे. बाटवून म्लेच्छ केलेल्या मनुष्यांचेंही असेंच समजावें. आतां **जैं कोणीएक** सांगतो कीं, 'पुत्रानें केलेल्या प्रायश्चित्तानें पित्याच्या पापाचा नाश होण्याविषयीं प्रमाण नाहीं. आत्मघाताविषयीं तर पुत्रानें केलेल्या प्रायश्चित्तानें पित्रादिकांच्या पापाचा नाश, वर सांगितलेल्यावचनावरून असो. परंतु महापातकाविषयीं नाश कसा होईल? असें म्हणणारा तो स्वतःच आत्मवधप्रायश्चित्त व जातिवधप्रायश्चित्त हीं दोन समुच्चयानें करावीं, असें सांगणारा असल्यामुळें त्याचें अंतःकरणच ठिकाणावर नाहीं, असें समजलें पाहिजे. जातिवधनिमित्तक पुत्रांनीं करावें, असें वचन आहे काय? नाहीं. मग असें म्हटलें तर पुत्रांनीं करावयाच्या सर्व प्रायश्चित्तादिकांचा विप्लव ( विनाश ) प्राप्त होईल! आणि महापातकादिविषयीं वर सांगितलेलें बौधायनवचनही आहे. ही दिशा दाखविली आहे. हा सर्व प्रकार प्रायश्चित्ताला योग्य असतील त्यांनाच समजावा. प्रायश्चित्ताला योग्य नसतील त्यांना तर पतितोदक मात्र करावें; असें **केचित्** म्हणतात. **मदनपारिजात** इत्यादि ग्रंथांचें स्वारस्यही असेंच आहे. वास्तविक म्हटलें तर प्रायश्चित्ताला योग्य व अयोग्य असें वचनांत विशेष नसल्यामुळें प्रायश्चित्ताला अयोग्य मृत असतील त्यांविषयीं देखील नारायणबलि व गयाश्राद्ध करावें, हें युक्त आहे.

पतितोदकविधिस्तु पित्राद्यतिरिक्तविषयइत्यपरे सयथा**हेमाद्रौब्राह्मे** पतितस्यतुकारुण्याद्यस्तृप्तिंकर्तुमिच्छति सहिदासींसमाहूयसर्वगांदत्तवेतनां अशुद्धघटहस्तांतांयथावृत्तंब्रवीत्यपि हेदासिगच्छमूल्येनतिलानानयसत्वरं तोयपूर्णंघटंचेमंसतिलंदक्षिणामुखी उपविष्टातुवामेनचरणेनततःक्षिप कीर्तयेःपातकीसंज्ञांत्वं पिबेतिमुहुर्वदेः निशम्यतस्यवाक्यंसालब्धमूल्याकरोतितत् एवंकृतेभवेत्तृप्तिःपतितानांचनान्यथेति इदंचमृताहेकार्यं पतितस्यदासीमृताह्नियदाघटमपवर्जयेदेतावतायमुपचरितोभवतीति**मदनरत्नेविष्णूक्तेः** इदं चात्मत्यागिविषयं आत्मत्यागिनःपतितास्तेनाशौचोदकभाजःस्युरित्युपक्रम्यविष्णुनाएतस्याभिधानादिति **गौडाः यत्तुकश्चिदाह** यःपतितोघटस्फोटेनबांधवैर्बहिष्कृतस्तद्विषयाणिक्रियानिषेधवाक्यानि जीवत्येवतस्मिन्नंत्यकर्मणःकृतत्वात्तत्पुनःकरणाभावादिति स बंधुत्यागेनजातवैराग्यस्यकृतप्रायश्चित्तस्याप्यकरणापत्ते**र्मिताक्षरादिविरोध**मपश्यन्मूर्खइत्युपेक्षणीयः नचकृतघटस्फोटस्यसंग्रहविधिर्नेतिवाच्यं **मनुना**कृतघटस्फोटस्यत्यागमुक्त्वा प्रायश्चित्तेतुचरितेपूर्णंकुंभमपांनवं तेनैवसार्धंप्रास्येयुःस्नात्वापुण्येजलाशयइत्युक्तेः अन्यथाप्रायश्चित्तमात्रेएतत्प्रसंगात् अतोघटस्फोटेनबहिष्कृतस्यापिपित्रादेरब्दांतेनारायणबलिः निषेधास्तु पितृव्यादिपराइतित**त्त्वं केचि**त्तुनारायणबलौकृतेप्यंत्यकर्मसपिंडनवर्जंकार्यम् गोब्राह्मणहतानांचपतितानांतथैवच व्युत्क्रमाच्चप्रमीतानांनैवकार्यासपिंडतेतिवचनात् ब्राह्मणादिहतेतातेपतितेसंगवर्जितइति**श्राद्धप्रकारोक्तेश्चे**त्याहुः तेहे**माद्रि**स्थपूर्वोक्तषट्त्रिंशन्मतविरोधान्निर्मूलत्वाच्छ्राद्धप्रकारस्यवृद्धिश्राद्धविषयत्वादुपेक्ष्याः ।

पतितोदकाचा विधि तर पिता इत्यादि व्यतिरिक्तविषयक आहे, असें **इतर ग्रंथकार** सांगतात. तो **पतितोदकविधि** असा—**हेमाद्रींत ब्राह्मांत**—"जो मनुष्य दयेच्या योगानें पतिताची तृप्ति करण्याविषयीं इच्छित असेल त्यानें सर्वांशीं गमन करणाऱ्या दासीस बोलावून तिला मूल्य ( मजुरी ) देऊन अशुद्ध घागर तिच्या हातांत देऊन तिला सांगावें कीं, हे दासि, तुला मजुरी देऊन सांगतों तें कर, सत्वर जाऊन तिळ आण आणि ही घागर पाण्यानें भरून आण, नंतर दक्षिणेकडे तोंड करून बसून डाव्या पायानें तिलसहित ही घागर उपडी कर, व उपडी करतेवेळीं पातक्याचें नांव घेऊन 'अमुकसंज्ञक प्रेत पिब पिब' असें वारंवार बोल! याप्रमाणें हें वाक्य तिनें ऐकून मूल्य घेऊन सांगितल्याप्रमाणें तें करावें. असें केलें

असतां पतितांची तृप्ति होते. अन्यथा पतितांची तृप्ति होत नाहीं." हें पतितोदकदान मृतदिवशीं करावें. कारण, "पतिताच्या मृतदिवशीं जेव्हां दासी घट लवंडील तेव्हां तितक्यानें पतित तृप्त झाल्यासारखा होतो" असें **मदनरत्नांत विष्णुवचन** आहे. हें आत्मघातकीविषयीं आहे; कारण, "आत्मत्यागी जे पतित त्यांचें आशौच व उदक नाहीं" असा उपक्रम करून विष्णूनें हें वरील वचन सांगितलें आहे, असें **गौड** सांगतात. आतां जें **कश्चित्** ( कोणीएक ) असें सांगतो कीं, 'ज्या पतिताला घटस्फोट करून बांधवांनीं बहिष्कृत केला असेल त्याविषयीं वरील क्रियानिषेधक वाक्यें आहेत. कारण, तो जीवंत असतांच त्याचें अंत्यकर्म केलेलें असल्यामुळें पुनः अंत्यकर्म करण्याचें कारण नाहीं' तो मूर्ख आहे. कारण, घटस्फोट करून आप्तांनीं त्याग केल्यामुळें वैराग्य उत्पन्न होऊन ज्यानें प्रायश्चित्त केलें असेल त्याचेंही अंत्यकर्म करावयास नको, असें प्राप्त झाल्यानें **मिताक्षरादि** ग्रंथांचा विरोध पहात नसल्यामुळें तो मूर्ख समजून त्याचें मत उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे. एकवार अंत्यकर्म करून घटस्फोट केल्यावर तो पुनः आपल्या जातींत येत नाहीं, म्हणून त्याचें पुनः अंत्यकर्म नको, असें म्हणतां कामा नये; कारण, **मनूनें** घटस्फोट केलेल्याचा त्याग ( बहिष्कार ) सांगून नंतर "त्यानें आपल्या पापाचें प्रायश्चित्त केलें असतां त्याच्या बंधूंनीं त्या पाप्यासहवर्तमान पुण्योदकांत स्नान करून उदकानें भरलेला पूर्ण नवा घट घेऊन सोडावा" असें सांगितलें आहे. हें वचन ज्याचा घटस्फोट केला असेल त्याला जातींत येण्याविषयीं समजलें पाहिजे. असें न समजलें तर सान्या प्रायश्चित्तांत त्याचा ( पूर्ण घटोदकत्यागाचा ) प्रसंग येईल. म्हणून घटस्फोट करून बहिष्कृत केलेल्या देखील पित्रादिकांचा वर्षांतीं नारायणबलि करावा. निषेध तर पितृव्यादिविषयक आहेत, हें सत्य समजावें. **केचित्** ग्रंथकार तर—नारायणबलि केला तरी सपिंडीकरणवर्जित अंत्यकर्म करावें. कारण, "गाई व ब्राह्मण यांनीं मारलेल्यांचें, पतितमृतांचें, आणि उलट क्रमानें ( वडील जीवंत असून पुत्र मरणें या क्रमानें ) मृतांचें सपिंडन करूं नये" असें वचन आहे. आणि "ब्राह्मणादिकांनीं मारलेला, पतित किंवा सर्वसंग त्याग करणारा असा पिता असतां सपिंडन करूं नये." असें **श्राद्धप्रकार**वचनही आहे, असें सांगतात. त्यांचें तें मत पूर्वोक्त **हेमाद्रीं**तील षट्त्रिंशन्मताशीं विरुद्ध होत असल्यामुळें व मूलरहित असल्यामुळें आणि श्राद्धप्रकार वृद्धिश्राद्धविषयक असल्यामुळें उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे.

नारायणबलिस्तु**हेमाद्र्या**द्यनुसारेणोच्यते तत्रादौ**क्रियानिबंधेगारुडे**तर्पणमुक्तं कार्यंपुरुषसूक्तेन मंत्रैर्वावैष्णवैरपि दक्षिणाभिमुखोभूत्वाप्रेतंविष्णुमितिस्मरन् अनादिनिधनोदेवःशंखचक्रगदाधरः अक्षय्यः पुंडरीकाक्षःप्रेतमोक्षप्रदोभवेति शुक्लैकादश्यांदेशकालौसंकीर्त्यामुकगोत्रस्यामुकस्यदुर्मरणात्मघातजदोषनाशार्थंऔर्ध्वदेहिकसंप्रदानत्वयोग्यतासिद्ध्यर्थंनारायणबलिंकरिष्यइतिसंकल्प्य ब्रह्माणंविष्णुंशिवंयमंप्रेतंचपंचकुंभेषु विष्णुःस्वर्णमयःकार्योरुद्रस्ताम्रमयस्तथा ब्रह्मारौप्यमयस्तत्रयमोलोहमयोभवेत् प्रेतोदर्भमयःकार्यइतिदेवप्रकल्पनेति**गारुडोक्ता**सुसर्वासुहैमीषुवाप्रतिमासुषोडशोपचारैःपुरुषसूक्तेनाभ्यर्च्याग्निंप्रतिष्ठाप्यचरुंपुरुषसूक्तेनप्रत्यृचंनारायणायेदमितिहुत्वादेवानामग्रेदक्षिणाग्रदर्भेषुविष्णुरूपंप्रेतंस्मरन्नामगोत्राभ्यांमधुघृततिलयुतान्दशपिंडान्यज्ञोपवीत्येवामुकगोत्रामुकशर्मन्प्रेतविष्णुरूपायंतेपिंडउपतिष्ठतामितिदत्वापुरुषसूक्तेनाभिमंत्र्यतेनैवशंखोदकेनाभिषिच्याभ्यर्च्यामुकशर्माणममुकगोत्रंविष्णुरूपंप्रेतंतर्पयामीतिपुरुषसूक्तेनप्रत्यृचंतर्पयित्वा एकमामान्नंब्रह्मादिपंचभ्योदद्यात् मंत्रस्तु ब्रह्मविष्णुमहादेवायमश्चैवसकिंकरः बलिंगृहीत्वाकुर्वंतुप्रेतस्यचशुभांगतिमिति **मिताक्षरायां**तुहोमबल्यादिनोक्तं ततःप्रतिदैवतंत्रिविधंफलंशर्करामधुगुडघृतानिचनिवेद्य पिंडानभ्यर्च्यनद्यांक्षिप्त्वारात्रौनवसप्तपंचवाविप्रान्निमंत्र्योपोषितोजागरंकृत्वाश्वोभूतेपुनर्विष्णुंयमंसंपूज्यैकोद्दिष्टविधिनाश्राद्धपंचकंकरिष्यइत्युक्त्वाविष्णुयमप्रेतान्स्मरन्विप्रानुपवेश्यप्रेतस्थानेचैकंविष्णुंस्मरन् पाद्यावाहनार्घ्ययुतंतृप्तिप्रश्नांतंकृत्वोल्लेखनादिकृत्वान्नशेषेणविष्णवेब्रह्मणेशिवाययमायसपरिवारायचतुरःपिंडान्दत्वाप्रेतनामगोत्रेस्मृत्वाविष्णुनाम्नापंचमंदत्वाभ्यर्च्याचांतेभ्योदक्षिणांदत्वैकंप्रेतंस्मृत्वाविशेषतःसंतोष्यविप्रैःप्रेतायेदंतिलोदकमुपतिष्ठतामितिसतिलमुदकंदापयित्वाभुंजीतेति अत्रविशेषांतरं**भट्टकृतांत्येष्टिपद्धतौ**ज्ञेयं ।

नारायणबलि तर **हेमाद्रि** इत्यादि ग्रंथांच्या अनुरोधानें सांगतो—त्यांत पूर्वी **क्रियानिबंधांत गरुडपुराणांत** तर्पण सांगितलें आहे तें असें—"दक्षिणाभिमुख होऊन प्रेताला विष्णु असें स्मरून पुरुषसूक्तानें किंवा विष्णुमंत्रांनींही तर्पण करावें. आणि '**अनादिनिधनो देवः शंखचक्रगदाधरः । अक्षय्यः पुंडरीकाक्षः प्रेतमोक्षप्रदो भव**' हा मंत्र म्हणून पाणी सोडावें. शुक्लपक्षाच्या एकादशीस देशकालांचें संकीर्तन करून 'अमुकगोत्रस्य अमुकस्य० करिष्ये' असा संकल्प करून पांच कुंभांचे ठायीं ब्रह्मा, विष्णु, शिव, यम, प्रेत या पांचांचें आवाहन करावें; तें असें–"विष्णु सुवर्णाचा, रुद्र

ताम्राचा, ब्रह्मा रुप्याचा, यम लोहाचा, व प्रेत दर्भाचा करावा, अशी देवांची कल्पना समजावी." ह्या **गारुडांत** सांगितलेल्या प्रतिमांवर किंवा साऱ्या सोन्याच्या करून त्यांजवर आवाहनादिषोडशोपचारांनीं पुरुषसूक्तानें पूजा करून अग्निप्रतिष्ठापन करून पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें 'नारायणाय इदं' असा त्याग करून चरूचा होम करून स्थापन केलेल्या देवांच्या अग्रभागीं दक्षिणाग्रदर्भांवर विष्णुरूपी प्रेताचें स्मरण करून यज्ञोपवीतीनेंच नांव आणि गोत्र यांचा उच्चार करून मधुघृततिलयुक्त दहा पिंड द्यावे; ते असे–'अमुकगोत्रामुकशर्मन् प्रेत विष्णुरूपायं ते पिंड उपतिष्ठतां' असें म्हणून ते पिंड देऊन पुरुषसूक्तानें त्यांचें अभिमंत्रण करून पुरुषसूक्तानेंच शंखोदकानें अभिषेक करून पूजा करून 'अमुकशर्माणममुकगोत्रं विष्णुरूपं प्रेतं तर्पयामि' असें म्हणून पुरुषसूक्तानें प्रत्येक ऋचेनें तर्पण करून एक आमान्न ब्रह्मादिक पांचांना द्यावें. त्याचा **मंत्र**—"**ब्रह्मविष्णुमहादेवा यमश्चैव सकिंकरः। बलिं गृहीत्वा कुर्वंतु प्रेतस्य च शुभां गतिं.**" **मिताक्षरेंत** तरहोम, **बलि** इत्यादिक सांगितलें नाहीं. तदनंतर प्रत्येक देवतेला तीन प्रकारचें फल, शर्करा, मध, गूळ, घृत हीं निवेदन करून पिंडांची पूजा करून ते नदींत टाकून त्या रात्रीं नऊ, सात किंवा पांच ब्राह्मणांना दुसऱ्या दिवसाचें निमंत्रण देऊन उपोषित असून जागरण करून दुसऱ्या दिवशीं पुनः विष्णुयमांची पूजा करून 'एकोद्दिष्टविधिना श्राद्धपंचकं करिष्ये' असा संकल्प करून विष्णु, ब्रह्मा, शिव, यम, प्रेत यांचें स्मरण करून ब्राह्मणांना बसवून प्रेतस्थानीं एक ब्राह्मण विष्णुस्मरण करून बसवून पाद्य आवाहन-अर्घ्य सहित तृप्तिप्रश्नापर्यंत करून पिंडांकरितां उल्लेखनादिक करून उरलेल्या शेष अन्नानें विष्णु, ब्रह्मा, शिव, सपरिवार यम यांना चार पिंड देऊन प्रेताचें नांव व गोत्र स्मरण करून विष्णूचे नांवानें पांचवा पिंड देऊन पूजा करून ब्राह्मणांनीं आचमन करून त्यांना दक्षिणा देऊन प्रेतस्थानीं बसलेल्या एका ब्राह्मणाला विशेषेंकरून संतोष करून ब्राह्मणांकडून 'प्रेताय इदं तिलोदकमुपतिष्ठतां' असें म्हणवून तिलसहित उदक देववून नंतर आपण भोजन करावें. यांत इतर विशेष **नारायणभट्टांनीं** केलेल्या अंत्येष्टिपद्धतींतून जाणावा.

सर्पहतेतुवर्षपर्यंतंपूर्वेऽह्न्येकभक्तंपूर्वंशुक्लपंचम्यामुपवासंनक्तंवाकृत्वापिष्टमयंनागमनंतवासुकिशंखपद्मकंबलकर्कोटकाश्वतरधृतराष्ट्रशंखपालकालियतक्षककपिलेतिनामभिः प्रतिमासंसंपूज्यपायसेनविप्रान्संभोज्यवत्सरांतेहैमंनागंगांचदत्वानारायणबलिंकुर्यात् **मूलंतुहेमाद्रौज्ञेयं** **बौधायन**सूत्रेसर्पमृतानांनमोस्तुसर्पेभ्यइतितिस्रआहुतीर्हुत्वोदकेमृतानांसमुद्रायवयुनायहुत्वेति क्रियांकुर्यादितिशेषः **व्यासः** सौवर्णभारनिष्पन्नंनागंकृत्वातथैवगां व्यासायदत्वाविधिवत्पितुरानृण्यमाप्तवान् **हेमाद्रौभविष्ये** पंचम्यांपन्नगंहैमंस्वर्णेनैकेनकारयेत् क्षीराज्यपात्रमध्यस्थंपूज्यविप्रायदापयेत् प्रायश्चित्तमिदंप्रोक्तंनागदष्टस्यशंभुनेति **अपरार्केस्मृत्यंतरेपि** तदैवशुध्यतिप्रेतोनारायणबलौकृते योददातिक्रियापिंडंतस्मैप्रेतायवैसुतः तस्यैवाशौचमुद्दिष्टंत्र्यहमेवनसंशयः विष्णुश्राद्धसमाप्तौतुत्रयोदश्यांदिनत्रयं आशौचंपिंडदःकुर्यान्नतुतद्बंधुगोत्रजाः यस्यवैमृत्युकालेतुव्युच्छिन्नासंततिर्भवेत् सवसेन्नरकेनित्यंपंकमग्नःकरीयथेत्युपक्रम्य बलिंनारायणंकुर्यात्तस्योद्देशेनभक्तिमानितिगारुडोक्तेरपुत्रस्यापिपद्मयाद्यैःकार्यइत्युक्तं**देवयाज्ञिकेन** ।

सर्पानें मारलेला असेल तर एक वर्षपर्यंत शुक्लपंचमीच्या पूर्वदिवशीं एकभक्तव्रत करून शुक्लपंचमीचे दिवशीं उपवास किंवा नक्त करून पिठाचा नाग करावा, आणि अनंत, वासुकि, शंख, पद्म, कंबल, कर्कोटक, अश्वतर, धृतराष्ट्र, शंखपाल, कालिय, तक्षक, कपिल, या बारा नांवांनीं प्रत्येक महिन्यांत एकएकानांवानें त्या नागांची पूजा करून पायसानें ब्राह्मणांस भोजन घालून वर्षाच्या अंतीं सुवर्णाचा नाग व गाई ब्राह्मणाला देऊन नारायणबलि करावा. याचीं मूलवचनें **हेमाद्रींत** पाहावीं. **बौधायन**सूत्रांत—"सर्पानें मृत झालेल्यांस 'नमोस्तुसर्पेभ्यः' या मंत्रानें तीन आहुती देऊन, उदकांत मृत झालेल्यांना 'समुद्राय वयुनाय' या मंत्रानें होम करून नंतर क्रिया करावी" असें सांगितलें आहे. **व्यास**—"कोणीएकानें एकभार[1] सुवर्णाचा नाग करून तो व गाई व्यासाला यथाविधि देऊन तो पित्याच्या ऋणांतून मुक्त झाला." **हेमाद्रींत भविष्यांत**–"पंचमीस एक कर्ष सुवर्णाचा नाग करून दूध तूप यांच्या पात्रांत ठेऊन पूजा करून ब्राह्मणाला द्यावा, सर्पानें दंश केलेल्यास हें प्रायश्चित्त शंकरानें सांगितलें आहे." **अपरार्कांत स्मृत्यंतरां**तही–"नारायणबलि केला असतां त्यावेळींच प्रेत शुद्ध होतो. त्या प्रेताला जो पुत्र श्राद्धपिंड देतो त्यालाच आशौच तीन दिवस सांगितलें आहे, यांत संशय नाहीं. विष्णुश्राद्ध ( नारायणबलि ) त्रयोदशीस समाप्त झाल्यावर पिंड देणारानें ( श्राद्धकर्त्यानें ) तीन दिवस आशौच करावें, त्याच्या इतर बांधवांनीं आशौच करूं नये." "ज्याच्या मृत्युसमयीं संतति विच्छिन्न होईल तो नित्य नरकांत वास करील. जसा कर्दमांत मग्न झालेला हत्ती असतो तसा तो नरकांत मग्न झालेला असतो" असा उपक्रम करून सांगतो—"त्याच्या-

---

१ पांच गुंजा=१ मासा. १६ मासे=१ कर्ष. ४ कर्ष=१ पल. २००० पलें=भार.

विषयीं भक्तिमान् असेल त्यानें संततिरहित मृताच्या उद्देशानें नारायणबलि करावा" असें ब्रह्मपुराणांत सांगितल्यावरून निपुत्रिकाचाही पत्नी इत्यादिकांनीं नारायणबलि करावा, असें देवयाज्ञिकानें सांगितलें आहे.

**अथविधानादाशौचाभावः** यथा यतियुद्धमृतादिषु त्रयाणामाश्रमाणांचकुर्याद्दाहादिकाःक्रियाः यतेःकिंचिन्नकर्तव्यंनचान्येषांकरोतिसइतिब्राह्मात् **उशनाः** एकोद्दिष्टंनकुर्वीतयतीनांचैवसर्वदा अहन्येकादशेप्राप्तेपार्वणंतुविधीयते सपिंडीकरणंतेषांनकर्तव्यंसुतादिभिः त्रिदंडग्रहणादेवप्रेतत्वंनैवजायते तत्संस्कारंवक्ष्यामः **दत्तात्रेयः** एकोद्दिष्टंजलंपिंडमाशौचंप्रेतसत्क्रियां नकुर्याद्वार्षिकादन्यद्ब्रह्मीभूतायभिक्षवे वार्षिकादितिपूर्वभाविमासिकादिनिषेधोनतुदर्शादेः संन्यासिनोप्याब्दिकादिपुत्रःकुर्याद्यथाविधीतिवायवीयोक्तेः **पृथ्वीचंद्रोदयेप्रजापतिः** अहन्येकादशेप्राप्तेपार्वणंतुविधीयते सपिंडीकरणंतस्यनकर्तव्यं सुतादिभिः एषुसपिंडनादिनिषेधानुवादेनपार्वणोक्तेस्तत्स्थानापन्नत्वंपार्वणस्यगम्यते नगिरागिरेतिब्रूयादैरं कृत्वोद्गेयमितिवत् इदंवार्षिकादिविधानंचत्रिदंडिनामेव एकदंडिपरमहंसादीनांतुनकिमपिकार्यं पूर्वोक्तोशनोवाक्येत्रिदंडिग्रहणादितिशूलपाण्यादयोगौडाः त्रिदंडिशब्देनमनोदंडादिदंडत्रयोक्तेः यस्यैतेनियतादंडाःसत्रिदंडीतिचोच्यतइतिस्मृतेः ।

## आतां विधानेंकरून आशौच नाहीं, तो प्रकार सांगतो—

तो असा-संन्याशी मृत, युद्धांत मृत इत्यादिकांचें आशौच नाहीं. कारण, "तीन आश्रमांच्या ( ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ यांच्या ) दाहादिक क्रिया कराव्या. संन्याशाचें कांहीं करूं नये, व तो संन्याशी इतरांचें कांहीं कर्म करीत नाहीं." असें ब्राह्मवचन आहे. **उशना**—"यतींचें सर्वकाळीं एकोद्दिष्ट करूं नये. अकराव्या दिवशीं पार्वण करावें. पुत्रादिकांनीं संन्याशाचें सपिंडीकरण करूं नये. त्रिदंड ग्रहण केल्यानेंच त्याला प्रेतत्व येतच नाहीं." त्याचा संस्कार पुढें सांगूं. **दत्तात्रेय**—"ब्रह्मरूपी झालेल्या संन्याशाला वार्षिकावांचून इतर एकोद्दिष्ट, उदक, पिंड, आशौच आणि प्रेतक्रिया हीं कांहीं करूं नयेत." या वचनानें वर्षाच्या आंत होणाऱ्या मासिकादिकांचा निषेध केला आहे; दर्शादिकांचा निषेध नाहीं. कारण, "संन्याशाचेंही आब्दिकादि श्राद्ध पुत्रानें यथाविधि करावें" असें **वायुपुराणांतील** वचन आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत प्रजापति**—"संन्याशाचें पुत्रादिकांनीं सपिंडीकरण करूं नये. अकरावा दिवस प्राप्त असतां पार्वणश्राद्ध करावें." या वरील वचनांत सपिंडीकरण-एकोद्दिष्ट यांच्या निषेधाचा अनुवाद ( कथन ) करून पार्वण सांगितल्यावरून त्यांच्या ( सपिंडनादिकांच्या ) स्थानीं पार्वण आहे, असें समजण्यांत येतें. जसें-ज्योतिष्टोमयज्ञांत असें सांगितलें आहे कीं, 'यज्ञायज्ञावो अग्नये गिरागिरा च दक्षसे' या ऋचेच्या सामाचें गान करावें. त्या गानाविषयीं ब्राह्मणांत असें सांगितलें आहे कीं, 'न गिरागिरेति ब्रूयात्, ऐरंकृत्वोद्गेयं' म्हणजे वरील ऋचेंत 'गिरागिरा' असें गान करूं नये, तर गकाररहित 'इरा' असें करून गान करावें. मग गातेवेळीं 'इरा' याच्यापूर्वीं "आ, य्, इ" हे तीन वर्ण लावून 'आयीरायीरा' असें गान करावें, असें आहे. तें जसें-'गिरागिरा' याच्या स्थानीं 'आयीरायीरा' हें गान तसें येथें सपिंडीकरणादि स्थानीं पार्वण आहे, असें समजावें. हें एकादशाहीं पार्वण व वरील वचनानें सांगितलेलें वार्षिकादि विधान त्रिदंडीसंन्याशांसच समजावें. एकदंडी-परमहंस इत्यादिकांचें तर कांहींही करूं नये. कारण, पूर्वी वर सांगितलेल्या **उशना** वाक्यांत त्रिदंडग्रहण, असें पद आहे, असें **शूलपाणि** इत्यादि **गौड** सांगतात. कारण, 'त्रिदंड' या शब्दानें मनोदंड, देहदंड, वाग्दंड, हे तीन दंड सांगितले आहेत. कारण, "ज्याला हे तीन दंड नियत आहेत तो त्रिदंडी, असा म्हटला आहे." अशी **स्मृति** आहे.

**बौधायनः** नारायणबलिश्चास्यकर्तव्योद्वादशेहनि अस्यपार्वणेनसमुच्चयोज्ञेयः तंचसएवाह कृत्वाविष्णोर्महापूजांपायसंविनिवेदयेत् अग्नौकृत्वातुतच्छेषंव्याहृतीभिःसमाहितः यतीन्गृहस्थान्साधून्वानिमंत्र्याद्यादशावरान् अभ्यर्च्यगंधपुष्पाद्यैर्मंत्रैर्द्वादशनामभिः संभोज्यहव्येनान्येनदक्षिणांचनिवेदयेत् त्रयोदशंद्विजश्रेष्ठमात्मानंसंयतेंद्रियं विष्णुंयथातथाभ्यर्च्यपाद्याद्यैश्चविधानतः दद्यात्पुरुषसूक्तेनगंधपुष्पादिकंक्रमात् वस्त्रालंकरणादीनियथाशक्तिप्रदापयेत् उच्छिष्टसन्निधौतस्यदर्भानास्तीर्यभूतले भूर्भुवःस्वःस्वधायुक्तंतस्मैदद्याद्बलित्रयं अश्वमेधसहस्रस्यवाजपेयशतस्यच तत्फलंलभतेदेवयःकरोतियतिक्रियाम् ।

**बौधायन**—"या ( संन्याशाच्या ) बाराव्या दिवशीं नारायणबलि करावा." नारायणबलि व पार्वण दोन्हीं करावीं. तो नारायणबलि तोच ( बौधायन ) सांगतो—"विष्णूची महापूजा करून पायस नैवेद्य अर्पण करावा. या पायसांतील शिल्लक

अग्नींत व्याहृतींनीं होम करावा. बारापेक्षां अधिक यति, गृहस्थ अथवा साधू यांना निमंत्रण द्यावें. आणि त्यांची विष्णूच्या द्वादश नांवांनीं व मंत्रांनीं गंधपुष्पादिकेंकरून पूजा करावी. दुसऱ्या उत्तम अन्नानें त्या ब्राह्मणांना भोजन घालून दक्षिणा द्यावी. आत्मवेत्ता जितेंद्रिय असा तेरावा श्रेष्ठ ब्राह्मण सांगून विष्णूप्रमाणें त्याची पाद्यादिकांनीं यथाविधि पूजा करून पुरुषसूक्तानें अनुक्रमेंकरून गंधपुष्पादिक द्यावें. त्याला वस्त्रें, अलंकार यथाशक्ति द्यावे. त्याच्या उच्छिष्टाजवळ भूमीवर दर्भ पसरून व्याहृतींनीं व स्वधाशब्दानें त्याला तीन बलि ( पिंड ) द्यावे. जो पुरुष याप्रमाणें संन्याशाची क्रिया करितो त्याला सहस्र अश्वमेधांचें व शंभर वाजपेयांचें फल प्राप्त होतें."

**शौनकस्तु** शौनकोहंप्रवक्ष्यामिनारायणबलिंपरं चंडालादुदकात्सर्पाद्ब्राह्मणाद्वैद्युतादपि दंष्ट्रिभ्यश्चपशुभ्यश्चरज्जुशस्त्रविषाश्मभिः देशांतरमृतानांचमृतानांवान्यसाधनैः जीवच्छ्राद्धमृतानांचकनिष्ठानांतथैवच यतीनांयोगिनांपुंसामन्येषांमोक्षकांक्षिणां पुण्यायाघक्षयार्थायद्वादशेहनिकारयेत् द्वादश्यांश्रवणेब्दांतेपंचम्यांपर्वणोस्तुवेत्युक्त्वा पूर्वोक्तंसर्वंविधिमुक्त्वातोदेवेतिषड्भिः पुरुषसूक्तेनप्रत्यृचंपायसंहुत्वाकेशवादिद्वादशनामभिस्तद्रूपिणेपित्रेद्वादशविप्रान्संभोज्यतैरेवद्वादशपिंडान्दद्यादित्यधिकमाह युद्धमृतेतुप्रागुक्तं कृतजीवच्छ्राद्धमृतेसपिंडैराशौचादिकार्यंनवा तदुक्तं**हेमाद्रौलैंगे** मृतेकुर्यान्नकुर्याद्वाजीवन्मुक्तोयतःस्वयं कालंगतेद्विजेभूमौखनेद्वापिदहेतवा पुत्रकृत्यमशेषंचकृत्वादोषोनविद्यते जीवत्यपिविशेषस्तत्रैवोक्तः नित्यंनैमित्तिकंयत्तुकुर्याद्वासंत्यजेतवा बांधवेपिमृतेतस्यनैवाशौचंविधीयते सूतकंचनसंदेहःस्नानमात्रेणशुध्यति एतद्योगिविषयम् योगमार्गरतोपिचेतितस्याप्युक्तेः तथाहिताग्नौप्रोषितमृतेतदस्थिदाहात्पूर्वंपुत्रादीनामाशौचंसंध्यादिकर्मलोपश्चनास्ति अनग्निमतउत्क्रांतेराशौचादिद्विजातिषु दाहादग्निमतोविद्याद्विदेशस्थेमृतेसतीति**स्मृतेः** आहिताग्नेर्दाहात्प्रागपिदशाहः संस्कारांगंचभिन्नोदशाहइतिधूर्त**स्वामीरामांडार**श्च तच्चिंत्यं मूलैक्याद्वचोविरोधाच्च एतत्प्रागुक्तम् ।

**शौनक** तर–"मी शौनक दुसरा नारायणबलि सांगतों—चंडाल, उदक, सर्प, ब्राह्मण, वीज, दाढांचे पशु, रज्जु, शस्त्र, विष, पाषाण यांनीं मृत; देशांतरीं मृत; इतर साधनांनीं मृत; जीवंतश्राद्ध करून मृत; कनिष्ठ मृत; संन्याशी मृत; योगी मृत; व इतर मोक्षेच्छु मृत; यांचे पुण्योत्पत्तीकरितां व पातकनाशाकरितां बाराव्या दिवशीं नारायणबलि करावा. अथवा वर्षांतीं द्वादशीस, श्रवण नक्षत्रावर, पंचमीस किंवा पर्वावर नारायणबलि करावा." असें सांगून पूर्वीं सांगितलेला सर्व विधि सांगून 'अतोदेवा०१' या सहा ऋचांनीं व पुरुषसूक्तानें प्रत्येक ऋचेनें पायसाचा होम करून केशवादिक बारा नांवांनीं तद्रूपी पित्याच्या उद्देशानें बारा ब्राह्मणांना भोजन घालून त्याच नांवांनीं बारा पिंड द्यावे. इतकें वरच्याहून अधिक सांगतो. युद्धमृताचें पूर्वीं सांगितलें आहे. जीवंतश्राद्ध केलेला मेला असतां त्याचें आशौचादिक सपिंडांनीं करावें, किंवा न करावें. तें सांगितलें आहे-**हेमाद्रींत लिंगपुराणांत**–"जीवच्छ्राद्ध केलेला मृत असतां त्याचें अंत्यकर्म करावें अथवा न करावें. कारण, तो स्वतः जीवन्मुक्त आहे. असा ब्राह्मण मृत्यूप्रत गेला असतां भूमींत पुरावा किंवा दहन करावा. पुत्रानें कर्तव्य सारें त्याचें कृत्य केलें असतां दोष नाहीं." तो जीवंत असतांही विशेष तेथेंच सांगितला आहे—"जें त्याचें नित्यनैमित्तिक कर्म तें त्यानें करावें किंवा टाकावें. त्याचा बांधव मृत असतांही त्याला त्याचें आशौच नाहींच, व जननाशौचही नाहीं, यांत संशय नाहीं. तो स्नानानेंच शुद्ध होतो." हें लिंगपुराणवचन योग्याविषयीं आहे. कारण, "योगमार्गरतानेंही आशौचादिक करूं नयेत" या वचनानें त्यालाही आशौचाभाव सांगितला आहे. तसाच आहिताग्नि ( अग्निहोत्री ) प्रवासांत मृत असतां त्याच्या अस्थिदाहाच्या पूर्वीं पुत्रादिकांना आशौच व संध्यादिकर्मलोप नाहीं. कारण, "अग्निरहित ब्राह्मण परदेशांत मृत असतां मृत दिवसापासून आशौचादि करावें. आणि आहिताग्नि परदेशांत मृत असतां त्याच्या समंत्रक दाह दिवसापासून आशौचादि करावें." अशी **पैठीनसि** स्मृति पूर्वीं सांगितली आहे. आहिताग्नीचें दाहाच्या पूर्वीं देखील दशाह. आणि संस्कारांग दशाह, तें निराळें, असें **धूर्तस्वामी व रामांडार** सांगतात, तें चिंत्य ( अप्रमाण ) आहे. कारण, दोनीं आशौचांचें मूल एक आहे. आणि ब्राह्मादिवचनविरोधही येतो. हा प्रकार पूर्वीं अतिक्रांताशौचाजवळ सांगितला आहे.

अत्रदेहस्थैवसंभवेदाहः आहिताग्नौविदेशस्थेमृतेसतिकलेवरं निर्धयेंनाग्निभिर्यावत्तदीयैरपिदह्यतइति ब्राह्मोक्तेः तदभावे**छंदोगपरिशिष्टे** विदेशमरणेस्थीनिआहृत्याभ्यज्यसर्पिषा दाहयेदूर्णयाच्छाद्यपात्रन्यासादिपूर्ववत् अस्थ्नामलाभेपर्णानिशकलान्युक्तयावृता दाहयेदस्थिसंख्यानिततःप्रभृतिसूतकं **हेमाद्रौ** बह्वृचपरिशिष्टे कुर्यात्त्वयंमेतंदर्भैस्त्रिशतषष्टिभिः पालाशीभिःसमिद्भिर्वासंख्याचैवंप्रकीर्तिता अस्थिद्ये

चत्वारिंशच्छिरस्थानेग्रीवायांचदशैवतु बाह्वोश्चैवशतंदद्याद्विंशतिंचतथोरसि उदरेविंशतिंदद्यात्त्रिंशतंकटिदेशयोः ऊर्वोश्चैवशतंदद्यात्त्रिंशतंजानुजंघयोः पादांगुलीषुदशवैएषाचप्रेतकल्पना **मदनरत्नेयज्ञपार्श्वः** शिरस्यशीत्यर्धंदद्याद्ग्रीवायांचदशैवतु बाह्वोश्चैकशतंदद्याद्दशचैवांगुलीषुच उरसित्रिंशतंदद्याद्विंशतिंजठरोदरे द्वादशार्धंवृषणयोरष्टार्धंशिश्नएवतु ऊर्वोश्चैकशतंदद्यात्त्रिंशतंजंघयोर्द्वयोः पादांगुलीषुद्वेदद्यादेतत्प्रेतस्यकल्पनम् मस्तकेनारिकेलंतुअलाबुंतालुकेतथा पंचरत्नंमुखेन्यस्यजिह्वायांकदलीफलं चक्षुषोस्तुकपर्दौद्वौनासिकायांतुकालकं कर्णयोर्ब्रह्मपत्राणिकेशेवटप्ररोहकाः नालकंकमलानांतुअन्त्रस्थानेविनिक्षिपेत् मृत्तिकातुवसाधातुर्हरितालकगंधकौ शुक्रेतुपारदंदद्यात्पुरीषेपित्तलंतथा संधीषुतिलपिष्टंतुमांसंस्याद्यवपिष्टकं मधुस्याल्लोहितस्थाने त्वचास्थानेमृगत्वचा स्तनयोर्जंबीरेदेयेनासायांशतपत्रकं कमलंनाभिदेशेस्याद्वृंताकेवृषणाश्रिते लिंगेचरक्तमूलंतुपरिधानंदुकूलकं गोमूत्रंगोमयंगंधंसर्वौषध्यादिसर्वतइति ।

परदेशांत मृत आहिताग्नीचें शरीर राहील तर ठेऊन त्याच्याच श्रौताग्नीनें दाह करावा. कारण, "आहिताग्नि परदेशांत मृत असतां त्याचें शरीर जोंपर्यंत त्याचे अग्नींनीं दाह होईल तोंपर्यंतही ठेवावें" असें ब्राह्मवचन आहे. शरीराच्या अभावीं सांगतो **छंदोगपरिशिष्टांत**—"परदेशांत मृत असतां त्याच्या अस्थि आणून त्यांना घृताचा अभ्यंग करून दर्भांनीं आच्छादित करून त्याच्या सभोंवतीं पात्रें वगैरे ठेऊन शरीराप्रमाणें दाह करावा. अस्थि मिळत नसतील तर अस्थींचे संख्येइतकीं पर्णशकलें उक्त रीतीनें ठेऊन दाह करावा, आणि त्या दिवसापासून सूतक धरावें." **हेमाद्रींत षट्त्रिंशन्मतांत**—"तीनशें साठ दर्भ घेऊन त्या दर्भांचा प्रेत करावा. अथवा पळसाच्या समिधा ( पानाचे देंठ ) तीनशें साठ घेऊन त्यांचा प्रेत करावा. ही संख्या सांगितली आहे." **भविष्यांत** "मस्तकस्थानीं ४०, मानेस १०, दोन बाहूंना १००, उरःस्थानीं २०, उदरस्थानीं २०, कटिप्रदेशीं ३०, मांड्यांचेठायीं १००, जानु व जंघा यांच्या स्थानीं ३० पादांगुलींत १० अशा पळसाच्या समिधा ठेऊन प्रेतकल्पना करावी." **मदनरत्नांत यज्ञपार्श्व**—"मस्तकावर ४०, मानेस १०, दोन बाहूंना १००, अंगुलींत १०, उराचेठायीं ३०, उदरावर २०, वृषणास ६, शिश्नावर ४, मांड्यांस १००, जंघांला ३०, पायांच्या अंगुलींस २, ही प्रेताची कल्पना समजावी. मस्तकस्थानीं नारळ, टाळूचे ठायीं भोपळा, मुखांत पंचरत्नें, जिव्हास्थानीं केळें, नेत्रस्थानीं दोन कवडे, नाकांत तिलपत्र, कर्णस्थानीं ब्रह्मपत्रें ( पळसपत्रें ), केशस्थानीं वडाच्या पारंब्या, अंत्रस्थानीं कमलांचें नाल योजावें. चर्बीच्या स्थानीं माती, धातुस्थानीं हरताळ व गंधक, शुक्रस्थानीं पारा द्यावा. विष्ठास्थानीं गोमय, संधिस्थानीं तिलपिष्ट, मांसस्थानीं यवांचें पीठ, रक्तस्थानीं मध, त्वचास्थानीं मृगचर्म, स्तनस्थानीं लिंबू, नासास्थानीं शतपत्र ( कमलविशेष ), नाभिस्थानीं कमल, वृषणस्थानीं वांगीं, शिश्नस्थानीं रक्तमुळा, अंगावर रेशमीवस्त्र, गोमूत्र, गोमय, गंध आणि सर्व ओषधि सर्वत्र देऊन प्रेत कल्पना करावी."

इदंनिरग्नेरपि तत्रैव**वृद्धमनुः** प्रोषितस्यतथाकालोगतश्चेद्द्वादशाब्दिकः प्राप्तेत्रयोदशेवर्षेप्रेतकार्याणिकारयेत् **बृहस्पतिः** यस्यनश्रूयतेवार्तायावद्द्वादशवत्सरात् कुशपत्रकदाहेनतस्यस्यादवधारणा **भविष्ये** पितरिप्रोषितेयस्यनवार्तानैवचागमः ऊर्ध्वंपंचदशाद्वर्षात्कृत्वातत्प्रतिरूपकं कुर्यात्तस्यतुसंस्कारंयथोक्तविधिनाततः तदादीन्येवसर्वाणिप्रेतकर्माणिकारयेत् द्वादशाब्दप्रतीक्षापितृभिन्नविषयेति**मदनरत्ने**उक्तं **गृह्यकारिकायांतु** तस्यपूर्ववयस्कस्यविंशत्यब्दोर्ध्वतःक्रिया ऊर्ध्वंपंचदशाब्दात्तुमध्यमेवयसिस्मृता द्वादशाद्वत्सरादूर्ध्वमुत्तरेवयसिस्मृता चांद्रायणत्रयंकृत्वात्रिंशत्कृच्छ्राणिवासुतैः कुशैःप्रतिकृतिंदग्ध्वाकार्याशौचादिकाक्रिया इत्युक्तं **पराशरः** देशांतरगतोनष्टस्तिथिर्नज्ञायतेयदि कृष्णाष्टमीह्यमावास्याकृष्णाचैकादशीचया उदकंपिंडदानंचतत्रश्राद्धंचकारयेत् इदंमासज्ञाने ।

वर सांगितलेला हा प्रकार निरग्निकाला ही तेथेंच सांगतो **वृद्धमनु**—"प्रवासास गेल्यावर वार्ता न समजल्यावांचून बारा वर्षें जाऊन तेरावें वर्ष प्राप्त असतां प्रेतकार्य करावीं." **बृहस्पति**—"बारावर्षें पर्यंत ज्याची वार्ता श्रुत होत नाहीं त्याची कुशपलाश प्रतिकृति करून दाह करावा, हा निश्चय आहे." **भविष्यांत**—"पिता प्रवासाला गेला असतां त्याची वार्ता किंवा त्याचें आगमन पंधरावर्षांपर्यंत नसेल तर पंधरावर्षांनंतर त्याचें प्रतिरूपक करून त्याचा यथाविधि संस्कार करावा. त्या संस्कारदिवसापासूनच त्याचीं सारीं प्रेतकर्में करावीं." बारावर्षें प्रतीक्षा सांगितली ती पित्याहून इतरांविषयीं समजावी, असें मदनरत्नांत सांगितलें आहे. **गृह्यकारिकेंत** तर—"पूर्ववयाचा प्रवासांत जाऊन वार्ता न समजेल तर वीस वर्षांनंतर त्याची क्रिया करावी. मध्यमवयाचा असेल तर पंधरावर्षांनंतर क्रिया करावी. उत्तरवयाचा गेला असेल तर बारावर्षांनंतर क्रिया करावी. पुत्रांनीं तीन

-कांडयमें किंवा तीस कृच्छ्र प्रायश्चित्त करून कुशांनीं प्रतिकृति करून त्याचा दाह करून आशौचादिक क्रिया करावी." असें सांगितलें आहे. **पराशर**-"देशांतरीं जाऊन नष्ट झाला असेल व त्याची तिथि कोणती ती समजली नसेल तर कृष्ण अष्टमी, अमावास्या, कृष्णएकादशी यांतील घ्यावी. आणि त्या तिथीस उदक, पिंडदान व श्राद्ध करावें" हें मृत झालेल्या महिन्याचें ज्ञान असतां समजावें.

तत्राहिताग्नेःपूर्णाशौचं अनाहिताग्नेस्तुत्रिरात्रं अनाहिताग्नेर्देहस्तुदाह्योगृह्याग्निनास्वयं तदभावेपलाशानां वृंतैःकार्यःपुमानपि वेष्टितव्यस्तथायत्नात्कृष्णसारस्यचर्मणा ऊर्णासूत्रेणबध्वातुप्रलेप्तव्योयवैस्तथा सुपिष्टैर्जलसंमिश्रैर्दग्धव्यश्चतथाग्निना असौस्वर्गायलोकायस्वाहेत्युक्त्वासबांधवैः एवंपर्णशरंदग्ध्वात्रिरात्रमशुचिर्भवेदितिब्राह्मोक्तेः इदंत्रिरात्रंनदशाहमध्येदाहे तत्र प्रोषितेकालशेषःस्यादित्युक्तेः किंतुतदूर्ध्वं तत्रपत्नीपुत्रयोः पूर्वमगृहीताशौचयोर्दशाहाद्येव गृहीताशौचयोस्तुत्रिरात्रं पत्नीमृतौभर्तुश्चैवं सपत्न्योश्चैवमितिस्मृत्यर्थसारे अन्यसपिंडानांतुसर्वत्रपर्णशरदाहेत्रिरात्रं तदाहांगिराः देशांतरमृतंश्रुत्वानाशौचंचेत्कथंचन गृहीतमितिशेषः कालात्ययेपिकुर्वीतदाहकालेदिनत्रयमिति **स्मृत्यर्थसारे**तु गृहीताशौचानांस्नानमात्रमुक्तं **बहृच परिशिष्टेपि** अथातीतसंस्कारः सचेदंतर्दशाहंस्यात्तत्रैवसर्वंसमापयेदूर्ध्वमाहिताग्नेर्दाहात्सर्वमाशौचंकुर्यादन्येषुपत्नीपुत्रयोःपूर्वमगृहीताशौचयोःसर्वमाशौचं गृहीताशौचयोःकर्मांगंत्रिरात्रमिति **षडशीतावप्येवं विश्वादर्शे**तुप्रतिकृतिदहनेत्वग्निदेस्यात्रिरात्रमित्युक्तं द्वादशवर्षादिप्रतीक्षोत्तरंदाहेतुपुत्रादीनांसर्वेषां त्रिरात्रमिति**कल्पतरुदिवोदासादयः** ।

या ठिकाणीं आहिताग्नीचें पूर्ण आशौच करावें, अनाहिताग्नि असेल तर त्याचें आशौच तीन दिवस करावें. कारण, "अनाहिताग्नीचा देह गृह्याग्नीनें दग्ध करावा. देह मिळाला नसेल तर पळसाच्या पानांच्या देंठांनीं पुरुषाची आकृति करावी. त्याच्या सभोंवतीं कृष्णसारमृगाचें कातडें गुंडाळावें. ऊर्णासूत्रानें बांधून पाण्यामध्यें जव बारीक वाटून त्याजवर लेप करावा. नंतर गृह्याग्नीनें प्रेताप्रमाणें त्याच्या बांधवांनीं 'असौ स्वर्गाय लोकाय स्वाहा' असें म्हणून त्याचा दाह करावा. याप्रमाणें पर्णशरदाह करून तीन दिवस आशौच करावें" असें **ब्राह्म**वचन आहे. हें तीन दिवस आशौच दहा दिवसांचे आंत दाह असतां समजूं नये. कारण, प्रवासांत मृत झालेला दहा दिवसांचे आंत समजलें असतां शेष ( उरलेले ) दिवस आशौच" असें सांगितलें आहे. तर दहादिवसांनंतर असेल तर तीन दिवस समजावें. त्यांमध्यें पत्नी व पुत्र यांनीं पूर्वी आशौच धरलें नसेल तर त्यांना दशाहादिच आशौच. पूर्वी आशौच धरलेलें असेल तर तीन दिवस समजावें. पत्नी मृत असतां भर्त्यालाही असेंच समजावें. सवतीलाही असेंच समजावें असें **स्मृत्यर्थसारांत** सांगितलें आहे. इतर सपिंडांना तर पर्णशर दाह केला असतां सर्व ठिकाणीं त्रिरात्र आशौच. तें सांगतो **अंगिरा**-"देशांतरीं मृत झालेला श्रवण करून आशौच कसेंतरी धरलें नसेल तर कालांतरीं देखील दाहकालीं तीन दिवस आशौच करावें." **स्मृत्यर्थसारांत** तर-पूर्वी आशौच धरलें असेल त्यांना स्नान मात्र सांगितलें आहे. **बहृचपरिशिष्टांत**ही-"आतां अतीत संस्कार सांगतों-तो जर दहा दिवसांचे आंत असेल तर दहा दिवसांतच सर्व कृत्य समाप्त करावें. दहा दिवसांच्या पुढें आहिताग्नीचा दाह असेल तर दाहदिवसापासून पुढें सारें पूर्ण आशौच करावें. आहिताग्नि व्यतिरिक्तांचा दहा दिवसांचे पुढें दाह असेल तर पत्नीपुत्रांनीं पूर्वी आशौच धरलें नसल्यास सारें ( पूर्ण ) आशौच. पूर्वी धरलेलें असल्यास कर्मांग त्रिरात्र आशौच." **षडशीतींत**ही असेंच आहे. **विश्वादर्शांत** तर-प्रतिकृतीचा ( पर्णशराचा ) दाह असतां दाह करणाराला त्रिरात्र आशौच, असें सांगितलें आहे. प्रवासांत गेलेल्याचीं बारा वर्षें वगैरे प्रतीक्षा पूर्वी सांगितली आहे, ती केल्यावर दाह केला असतां पुत्रादिकांना व इतर सर्वांना त्रिरात्र आशौच, असें **कल्पतरु, दिवोदास** इत्यादिक सांगतात.

**अथप्रेतसंस्कारेकालः हेमाद्रौगार्ग्यः** प्रत्यक्षशवसंस्कारेदिनंनैवविशोधयेत् आशौचमध्येसंस्कारेदिनंशोध्यंतुसंभवे आशौचविनिवृत्तौचेत्पुनःसंस्क्रियतेमृतः संशोध्यैवदिनंग्राह्यमूर्ध्वंसंवत्सराद्यदि प्रेतकार्याणिकुर्वीतश्रेष्ठंतत्रोत्तरायणं कृष्णपक्षश्चतत्रापिवर्जयेत्तुदिनत्रयं **वाराहे** चतुर्थाष्टमगेचंद्रेद्वादशेचविवर्जयेत् प्रेतकृत्यंव्यतीपातेवैधृतौपरिघेतथा करणेविष्टिसंज्ञेचशनैश्चरदिनेतथा त्रयोदश्यांविशेषेणजन्मतारात्रयेतथा जन्मदशमैकोनविंशानिजन्मताराः **भारते** नक्षत्रेतुनकुर्वीतयस्मिञ्जातोभवेन्नरः नप्रौष्ठपदयोःकार्यं तथाग्नेयेचभारत दारुणेषुचसर्वेषुप्रत्यरेचविवर्जयेत् **काश्यपः** भरण्यार्द्रामघाश्लेषामूलंह्यिचरणानिच प्रेत-

कृत्येतिदुष्टानिधनिष्ठाद्यंपंचकं फल्गुनीद्वितयंरोहिण्यनूराधापुनर्वसू अषाढेद्वेविशाखाचभानिद्विचरणानिच ज्योतिर्नारदः चतुर्दशीतिथिंनंदांभद्रांशुक्रारवासरौ सितेज्ययोरस्तमयंद्व्यंघ्रिभंविषमांघ्रिभं शुक्लपक्षंचसंत्यज्यपुनर्दहनमुत्तमं वसूत्तरार्धतःपंचनक्षत्रेषुत्रिजन्मसु पौष्णब्राह्मर्क्षयोश्चैवदहनात्कुलनाशनं अस्यापवादः माहतत्रैवबैजवापः प्रेतस्यसाक्षाद्दग्धस्यप्राप्तेत्वेकादशेहनि नक्षत्रतिथिवारादिशोधनीयंनकिंचन युगमन्वादिसंक्रांतिदर्शेप्रेतक्रियायदि दैवादापतितातत्रनक्षत्रादिनशोधयेत् विश्वप्रकाशेपि गुरुभार्गवयोर्मौढ्येपौषमासेमलिम्लुचे नातीतःपितृमेधःस्याद्गयांगोदावरींविना दानमपितत्रैवोक्तं भद्रायांभूमिदानंस्यात्त्रिपादर्क्षेहिरण्यदः वारेषुतत्तद्वर्णंतुवासोदानंविधीयते धनिष्ठापंचकमृतेपंचरत्नानिदापयेत् एकाशीतिपलंकांस्यं तदर्धंवातदर्धकं नवषट्त्रिपलंवापिदद्याद्विप्रायशक्तितइत्यलंप्रसंगेन ।

## आतां प्रेतसंस्काराविषयीं काल सांगतो—

**हेमाद्रींत गार्ग्य**—"प्रत्यक्ष शवाचा संस्कार करावयाचा असतां दिवस शोधूं नये. अशौचामध्यें संस्कार कर्तव्य असतां चांगला दिवस सांपडत असेल तर घ्यावा. आशौचाची निवृत्ति झाल्यावर जर मृताचा संस्कार कर्तव्य असेल तर दिवस शोधूनच घ्यावा. एक वर्ष होऊन गेल्यावर संस्कार कर्तव्य असेल तर उत्तरायण व कृष्णपक्ष घ्यावा. त्या कृष्णपक्षांतही तीन दिवस वर्ज्य करावे." **वाराहांत**—"राशीस चवथा, आठवा आणि बारावा चंद्र असतां प्रेतकृत्य वर्ज्य करावें. तसेंच व्यतीपात, वैधृति, परिघ, विष्टिकरण, शनिवार, त्रयोदशी, हीं वर्ज्य करावीं. जन्मनक्षत्र, व त्यापासून दहावें आणि एकोणिसावें नक्षत्र प्रेतकृत्याविषयीं विशेषेंकरून वर्ज्य करावें." **भारतांत**—"जन्मनक्षत्र, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, कृत्तिका, हीं व सारीं दारुण नक्षत्रें ( मूळ, आश्लेषा, ज्येष्ठा, आर्द्रा ), आणि प्रत्यरतारा हीं वर्ज्य करावीं." **काश्यप**—"भरणी, आर्द्रा, मघा, आश्लेषा, मूळ, द्विपाद नक्षत्रें ( मृग, चित्रा, धनिष्ठा ), आणि धनिष्ठादि पंचक हीं प्रेतकृत्याविषयीं अतिदुष्ट आहेत. पूर्वा, उत्तरा, रोहिणी, अनुराधा, पुनर्वसु, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, विशाखा, आणि द्विपाद नक्षत्रें हीं वर्ज्य करावीं." **ज्योतिर्नारद**—"चतुर्दशी, नंदा ( प्रतिपदा, षष्ठी, एकादशी ), भद्रा ( द्वितीया, सप्तमी, द्वादशी ) ह्या तिथि; शुक्र व भौमवार; शुक्र गुरु यांचें अस्त; द्विपाद नक्षत्रें; व विषमपाद नक्षत्रें आणि शुक्लपक्षः हीं वर्ज्य करून पुनः दाह करावा. धनिष्ठानक्षत्राचें उत्तरार्ध व शततारकादि चार नक्षत्रें, तीन जन्मनक्षत्रें ( जन्मनक्षत्र, त्यापासून दहावें व एकोणिसावें नक्षत्र ), रेवती, रोहिणी या नक्षत्रांवर दाह केला असतां कुलाचा नाश होतो. पुनर्दाहादि निषिद्ध नक्षत्रादिकांचा अपवाद सांगतो तेथेंच **बैजवाप**—"प्रत्यक्ष प्रेताचें दहन केलें असतां अकराव्या दिवशीं त्याचे कर्माविषयीं नक्षत्र, तिथि, वार यांचा कोणताही निषेध नाहीं. आणि दैववशेंकरून युगादि मन्वादि तिथि, संक्रांति, दर्श याचे ठायीं जर प्रेतक्रिया पडेल तर नक्षत्रादिकांचा विचार करूं नये." **विश्वप्रकाशांत**ही—"गुरुशुक्रांचें अस्त, पौषमास, मलमास, यांचेठायीं अतीत प्रेतक्रिया, गया व गोदावरी यांवांचून इतर ठिकाणीं होत नाहीं." दानही तेथेंच सांगितलें आहे—"भद्रातीथींचेठायीं मृत असतां भूमिदान करावें. त्रिपाद नक्षत्रावर मृत असतां सुवर्ण द्यावें. निषिद्ध वारांचेठायीं मृत असतां त्यांच्या त्यांच्या वर्णाचें वस्त्र द्यावें. धनिष्ठापंचकावर मृत असतां पंचरत्नें द्यावीं. एक्याणेंशीं पलें ( ८० गुंजा म्ह० १ कर्ष. ४ कर्ष म्ह० १ पल. ) किंवा त्याच्या अर्धें अथवा चतुर्थांश, किंवा नऊ पलें, सहा पलें अथवा तीन पलें परिमित कांसें ब्राह्मणाला यथाशक्ति द्यावें." आतां आशौचप्रसंगानें इतर सांगणें पुरे करितों.

**हेमाद्रौवृद्धमनुः** अमृतंमृतमाकर्ण्यकृतंयस्यौर्ध्वदेहिकं प्रायश्चित्तमसौस्मार्तंकृत्वाग्नीनादधीतच जीवन्यदिसमागच्छेद्घृतकुंभेनिमज्ज्यतं उद्धृत्यस्नापयित्वास्यजातकर्मादिकारयेत् द्वादशाहंव्रतचर्यांत्रिरात्रमथवास्यतु स्नात्वोद्वहेततांभार्यामन्यांवातदभावतः अग्नीनाधायविधिवद्व्रात्यस्तोमेनवायजेत् अथेंद्राग्नेनपशुना गिरिंगत्वाचतत्रतु इष्टिमायुष्मतींकुर्यादीप्सितांश्चक्रतूंस्ततः अनाहिताग्नेस्तुचरुः मृतवार्ताश्रवणेत्वाश्वलायनः सुरभयएववयस्मिन्जीवेमृतशब्दइति यस्यतुजीवतएवमृतिवार्तांश्रुत्वास्त्रियासहगमनंकृतं तदातद्वैधमेव भर्तुर्मरणज्ञानस्यैवनिमित्तत्वात् प्रमादस्यगौरवेणायुक्तत्वाच्चेतिकेचित् तन्न मरणज्ञानस्यनिमित्तत्वेतीतानागतयोरपितत्स्यापत्तेः भर्तुर्वैधदाहाभावेनतस्याःसहगमनाभावाच्च तस्मादाशौचवज्ज्ञातमरणस्यैवनिमित्तत्वं न चात्रतदस्ति परंकाम्यंमरणमस्तु अतआत्महननदोषोस्तीतितातपादाः ।

## जीवंताचें प्रेतकर्म केलें असतां सांगतो—

**हेमाद्रींत वृद्धमनु**-"जीवंत असून मृत झाला असें बांधवांनीं ऐकून ज्याचें और्ध्वदेहिक ( अंत्यकर्म ) केलें असेल त्यानें स्मार्त प्रायश्चित्त करून अग्नीचें आधान करावें. बांधवांनीं अंत्यकर्म केल्यावर तो आला असतां त्याला घृतकुंभांत बुडवून बाहेर काढून स्नान घालून त्याचे जातकर्मादि संस्कार करावे. बारा दिवस ब्रह्मचर्यव्रत करावें, अथवा त्रिरात्र करावें. नंतर समावर्तन करून त्या पहिल्या भार्येशीं विवाह करावा, तिच्या अभावीं इतर भार्येशीं विवाह करावा. यथाविधि अग्नीचें आधान करावें. अथवा व्रात्यस्तोमानें यजन करावें. अथवा इंद्राग्निदेवतांचा पशुयाग करावा. पर्वतावर जाऊन आयुष्मती इष्टि करावी. नंतर ईप्सित यज्ञ करावे." अनाहिताग्नीला चरुयाग सांगितला आहे. नमृताचें मृतवार्ताश्रवण झालें तर सांगतो **आश्वलायन**—"जो जीवंत असतां त्याविषयीं मृतशब्द हा कामधेनूच आहे." जो पुरुष जीवंत असतांच त्याची मरणवार्ता श्रवणकरून पत्नीनें सहगमन केलें तर तें सहगमन विधिविहितच आहे. कारण, भर्त्याचें मरणज्ञान हें सहगमनाला निमित्त आहे. पतीच्या ठिकाणीं व शास्त्राच्या ठिकाणीं तिचें गौरव असल्यामुळें प्रमादानें सहगमन झालें असें म्हणणें अयुक्तही आहे, असें **केचित्** म्हणतात, तें बरोबर नाहीं. कारण, मरणाचें ज्ञाननिमित्त, असें झालें असतां मरण झाल्यावर कांहीं दिवसांनीं त्याचें ज्ञान झालें असतां त्या ठिकाणीं, आणि मरणाच्या पूर्वी मरणज्ञान झालें असतां त्या ठिकाणींही मरणज्ञानाला निमित्तत्व प्राप्त होईल! आणि भर्त्याचा विधिविहित दाह नसल्यामुळें तिच्या सहगमनाचा अभावही आहे. तस्मात् आशौचाप्रमाणें जाणलेलें जें मरण तेंच सहगमनाला निमित्त आहे. तें जाणलेलें मरण एथें नाहीं. म्हणून सहगमन नाहीं. दुसरें कामनिक मरण असो. म्हणून तिला आत्महत्येचा दोष आहे, असें आमचे **तातपाद** ( वडील ) सांगतात.

तथासर्पसंस्कारेकृतेत्रिरात्रमाशौचंतद्विधिंचाह**शौनकः** अथवक्ष्यामिसर्पस्यसंस्कारविधिमुत्तमं सिनीवाल्यांपौर्णमास्यांपंचम्यांवापिकारयेत् कृतसर्पवधोविप्रःपूर्वजन्मनिवायदि वधंप्रख्यापयेत्पापीचरेत्कृच्छ्रांश्चतुर्दश विप्रायलोहदंडंचतन्मूल्यंवापिदापयेत् **मूल्यमाह** निष्कत्रयंद्विनिष्कंवानिष्कमेकंकनीयसं अनुमत्यादिकर्तॄणांनिष्कमर्धंतदर्धकं इदंस्वर्णरूप्ययोःशक्त्याज्ञेयं **संस्कारमाह** प्रियंगुव्रीहिगोधूमैस्तिलपिष्टेनवापुनः कृत्वासर्पाकृतिंशूर्पेनिधायप्रार्थयेदहिं एहिपूर्वमृतःसर्पअस्मिन्पिष्टेसमाविश संस्कारार्थमहंभक्त्याप्रार्थयामिसमाहितः वस्त्रोपवीतगंधाद्यैःसंपूज्यचहरेद्बहिः कुर्यात्संस्कारसंकल्पंप्राणायामपुरःसरं यज्ञोपवीतिनाकार्यंसर्पसंस्कारकर्मतु लौकिकाग्निंप्रतिष्ठाप्यसमिदाधानमाचरेत् ततोग्नेरग्निदिग्भागेभूमिंसंप्रोक्ष्यवारिभिः चितिंकृत्वाथसंस्तीर्यकुशैराग्नेयकाग्रकैः पर्युक्ष्याग्निंपरिस्तीर्यपरिषिच्यसमर्चयेत् कृत्वेध्माधानमाघारौचक्षुषीचयथाविधि सर्पंगृहीत्वायत्नेनचितिमारोपयेत्सुधीः स्रुवेणजुहुयादाज्यमग्नौव्याहृतिभिस्त्रिभिः सर्पास्येजुहुयादाज्यं व्याहृत्याचसमग्रया आज्यशेषंस्रुवेणैवसर्पदेहेनिषेचयेत् चमसस्थैर्जलैःसर्पंव्याहृत्याभ्युक्ष्यपाणिना अग्नेरक्षाणइत्यनयासर्पायाग्निंप्रदापयेत् उपतिष्ठेद्दह्यमानंनमोस्तुसर्पमंत्रतः ज्ञानतोऽज्ञानतोवापिकृतःसर्पवधोमया पूर्वजन्मनिवासर्पतत्सर्वंक्षंतुमर्हसि क्षीराज्येनततश्चाग्निंप्रोक्ष्यव्याहृतिभिर्जलैः नास्थिसंचयनंकुर्यात्स्नात्वाचस्वगृहंव्रजेत् ब्रह्मचर्यादिकंकार्यंत्रिरात्राशौचमिष्यते सचैलंतुचतुर्थेन्हिस्नात्वाविप्रान्समर्चयेत् सर्पोनंतस्तथाशेषःकपिलोनागएवच कालिकःशंखपालश्चभूधरश्चेतिनामभिः गंधपुष्पाक्षतैर्धूपदीपाद्यैरर्चयेद्द्विजान् घृतपायसभक्ष्यैश्चद्विजानष्टौतुभोजयेत् एवंकृतेविधानेनसर्पसंस्कारकर्मणि सर्पहिंसाकृतात्पापान्मुच्यतेनात्रसंशय इति इतिसर्पसंस्कारः ।

तसेंच सर्पाचा संस्कार केला असतां त्रिरात्र आशौच आणि त्याचा विधि सांगतो **शौनक**—"आतां सर्पाचा उत्तम संस्कारविधि सांगतों-तो संस्कार चंद्रदर्शनयुक्त अमावास्येस, पौर्णमासीचे दिवशीं किंवा पंचमीस करावा. ज्यानें सर्पाचा वध याजन्मीं किंवा पूर्वजन्मीं केला असेल त्यानें तो केलेला वध लोकांस सांगून त्या योगानें आपण पातकी असें समजून चवदा कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. ब्राह्मणाला लोहदंड किंवा लोहदंडाचें मूल्य द्यावें." **मूल्य** सांगतो-"लोहदंडाचें मूल्य तीन निष्क उत्तम, दोन निष्क मध्यम, व एक निष्क कनिष्ठ हें मूल्य प्रत्यक्ष सर्प मारणाराला समजावें. मारण्याविषयीं अनुमति वगैरे देणाराला एक निष्क, अर्धा निष्क अथवा पाव निष्क लोहदंडाचें मूल्य समजावें." हें मूल्य सुवर्णाचें किंवा रुप्याचें आपल्या शक्तीनें जाणावें. संस्कार सांगतो-"राळे, व्रीहि, गोधूम, किंवा तीळ यांच्या पिठानें सर्पाची आकृति करून शूर्पांत ठेऊन सर्पाची प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र-'एहि पूर्वमृतः सर्प अस्मिन् पिष्टे समाविश । संस्कारार्थमहं भक्त्या प्रार्थयामि समाहितः' अशी प्रार्थना करून वस्त्र, उपवीत, गंध इत्यादि उपचारांनीं त्याची पूजा करून बाहेर न्यावा. नंतर प्राणायाम करून संस्काराचा

संकल्प करावा. सर्पसंस्कार कर्म यज्ञोपवीतीनें करावें. नंतर लौकिकाग्नीची प्रतिष्ठा करून समिधा द्यावी. तदनंतर अग्नीचे आग्नेयी दिशेस उदकानें भूमीचें प्रोक्षण करून चिति करून आग्नेयी दिशेस अग्रें करून कुश पसरावे. नंतर अग्नीचें परिसमूहन, परिस्तरण, पर्युक्षण करून पूजन करावें. नंतर इध्माधान, आघारहोम व चक्षुषीहोम यथाविधि करून यजमानें (अपूल) तो सर्प घेऊन चितीवर ठेवावा. नंतर अग्नीमध्यें स्रुवानें तीन व्याहृतींनीं आज्यहोम करावा. नंतर सर्पाच्या मुखांत समस्त व्याहृतीनें आज्यहोम करावा. स्रुवानेंच शेष आज्य सर्पाच्या देहावर घालावें. चमसपात्रांतील उदकांनीं व्याहृतिमंत्रानें सर्पावर अभ्युक्षण करून 'अग्नेरक्षाण' ह्या ऋचेनें सर्पाला अग्नि द्यावा. तो सर्प जळत असतां 'नमोस्तु सर्प०' ह्या मंत्रानें त्याचें उपस्थान करावें. तदनंतर 'ज्ञानतोऽज्ञानतो वापि कृतः सर्पवधो मया। पूर्वजन्मनि वा सर्प तत्सर्वं क्षंतुमर्हसि' अशी प्रार्थना करून तदनंतर दूध घृतानें व उदकानें व्याहृतींनीं अग्नीचें प्रोक्षण करून अस्थिसंचयन करूं नये, तर स्नान करून आचमन करून घरीं यावें, ब्रह्मचर्यादि नियम करावे. तीन दिवस आशौच धरावें. चवथ्या दिवशीं वस्त्रसहित स्नान करून ब्राह्मणांची पूजा करावी. सर्प, अनंत, शेष, कपिल, नाग, कालिक, शंखपाल, भूधर या नांवानीं गंध, पुष्प, अक्षता, धूप, दीप, इत्यादि उपचारांनीं ब्राह्मणांची पूजा करावी. घृत, पायस, भक्ष्य (लाडू वगैरे), या पदार्थांनीं आठ ब्राह्मणांना भोजन घालावें. सर्पाचें संस्कारकर्म ह्या विधानानें केलें असतां सर्पहिंसेपासून उत्पन्न झालेल्या पापापासून मुक्त होतो, यांत संशय नाहीं."

## इति सर्पसंस्कार.

कश्चित्तुजीवतोप्यंत्यकर्माशौचंचकार्यं यथा प्रायश्चित्तानिच्छोःपतितस्यघटस्फोटे पतितस्योदकंकार्यंसपिंडैर्बांधवैःसह निंदितेहनिसायाह्नेज्ञात्यृत्विग्गुरुसन्निधौ दासीघटमपांपूर्णंपर्यस्येत्प्रेतवत्सदा अहोरात्रमुपासीरन्नाशौचंबांधवैःसहेतिमनूक्तेः निंदितेरिक्तादौ अपरार्केवसिष्ठोपि वेदविप्लावकशूद्रयाजकोत्तमवर्णवर्गपतितास्तेषांपात्रनिनयनमपात्रसंस्कारात्कृत्स्नंपात्रमादायदासोऽसवर्णपुत्रोवाबंधुरसद्दशोवागुणहीनः सव्येनपादेनप्रवृत्ताग्रान्दर्भान्लोहितान्वोपस्तीर्यापःपूर्णपात्रमस्मैनिनयेन्निनेतारंचास्यप्रकीर्णकेशाज्ञातयोन्वालभेरन्नपसव्यंकृत्वागृहेपुस्वैरमापद्येरन्नतऊर्ध्वंतेनतंधर्मयेयुस्तद्धर्माणस्तंधर्मयंतइति उत्तमवर्णाब्राह्मणादयः तेषांवर्गःसमूहस्तस्मात्पतिताब्रह्महादयः अपात्रसंस्कारःकुत्सितपात्रसमूहः प्रवृत्ताग्राःछिन्नाग्राः स्वैरंयथेच्छंधर्मादिकार्यंकुर्युः अस्माद्वचनसामर्थ्यात्पात्रनिनयनात्प्राक्पतितज्ञातीनांधर्मकार्येष्वधिकारोनास्तीत्यपरार्कः तस्य विद्यागुरुयोनिसंबंधांश्चसन्निपात्यसर्वाण्युदकादिप्रेतकार्याणिकुर्युः पात्रंचास्यविपर्यस्येयुर्दासःकर्मकरोवावकरादमेध्यंपात्रमानीयदासीघटात्पूरयित्वादक्षिणामुखःपदाविपर्यस्येदमुमनुदकंकरोमीतिनामग्राहंसर्वेन्वालभेरन् प्राचीनावीतिनोमुक्तशिखाअपउपस्पृश्यग्रामंप्रविशेयुरितिगौतमोक्तेश्च उदकादीत्युक्तेर्दाहनिवृत्तिः प्रेतकार्याण्येकादशाहश्राद्धांतानि दास्याहृतांबुघटोदासीघटः तेनोदकेनामेध्यपात्रंपूरयित्वादासादिर्न्युब्जंवामपादेनकुर्यादितिहरदत्तः अत्रनामग्राहवचनमुदकादिप्रेतकार्यतद्वर्जनत्वार्थं तेनतत्तूष्णींभवति एतच्चप्रायश्चित्तानिच्छोः तस्यगुरोर्बांधवानांराज्ञश्चसमक्षंदोषानभिख्याप्यतमनुभाष्यपुनःपुनराचारं... तिसयद्येवमप्यनवस्थितमतिःस्यात्ततोस्यपात्रंविपर्यस्येदितिशंखोक्तेः जीवंतमेवोद्दिश्यपिंडोदकं... श्राद्धादित्यपरार्कः।

**कश्चित्स्थलीं जीवंताचेंही अंत्यकर्म व आशौच करावें**, तें असें-प्रायश्चित्त न इच्छिणारा जो पतित त्याचा घटस्फोट केला असतां जीवंत असतांही त्याचें अंत्यकर्म व आशौच करावें. कारण, "निंदित अशा रिक्तादि तिथीचे दिवशीं सायंकाळीं ज्ञाति, ऋत्विक्, गुरु यांच्या संनिध पतिताच्या सपिंडांनीं बांधवांसह पतिताला उदकदान करावें. तें असें-उदकानें भरलेला घट दासीकडून आणवून लवंडवावा, आणि त्या वेळीं बांधवांसह सपिंडांनीं प्रेताप्रमाणें एक अहोरात्र त्याचें आशौच करावें." असें **मनुवचन** आहे. **अपरार्कांत वसिष्ठही**-"वेद बुडविणारे, बहुत शूद्राचा याग करणारे, ब्रह्महत्यादि महापातक करणारे असे जे पतित त्यांचें पात्रनिनयन करावें, तें असें-दास किंवा संकर जातीचा मनुष्य, अथवा गुणरहित अयोग्य असा बांधव यानें निंदित अशा पात्रसमूहांतून एक पात्र घेऊन तें उदकानें पूर्ण भरून अग्रें तोडलेले दर्भ किंवा लोहित (तृणविशेष) पसरून त्यांजवर तें पात्र वामपादानें पतिताच्या उद्देशेंकरून लवंडवावें. पतिताच्या ज्ञातींनीं केश सोडून अपसव्य करून पात्र लवंडणाराला स्पर्श करावा. हें पात्रनिनयन होय. पात्रनिनयनानंतर सर्व ज्ञातींनीं आपल्या घरीं धर्मादिकार्य यथेच्छ आचरण करावें." पात्रनिनयनानंतर धर्मादि कार्य करावें, असें सांगितल्यावरून पात्रनिनयनाच्या पूर्वी पतिताच्या ज्ञातींस धर्मकार्याविषयीं अधिकार नाहीं, असें **अपरार्क** सांगतो. "पतिताच्या ज्ञातींनीं पतिताचे विद्यासंबंधी, गुरुसंबंधी, आणि योनि-

संबंधी यांना जमवून उदकदानादिक सारीं प्रेतकार्यें करावीं. व त्यांनीं त्याजकरितां पात्र उलथें करावें. -तें असें-दासानें किंवा चाकरानें उकीरड्यावरून अपवित्र पात्र आणून, दासीनें मातीच्या घागरींतून आणलेल्या उदकानें तें पात्र पूर्ण भरून दक्षिणेकडे मुख करून तें पात्र डाव्या पायानें उलथें करावें. आणि पतिताचें नांव घेऊन 'अमुं अनुदकं करोमि' असें म्हणावें. सारे ज्ञातींनीं प्राचीनावीती करून शिखा सोडून त्याला ( उलथें पात्र करणाऱ्या दासादिकाला ) स्पर्श करावा. नंतर सर्व ज्ञातींनीं स्नान करून गांवांत जावें" असें **गौतमाचें**ही वचन आहे. उदकदानादिक करावीं, असें सांगितल्यानें दाहाची निवृत्ति झाली. प्रेतकार्यें म्हणजे एकादशाहश्राद्धांत समजावीं. दासीनें आणलेल्या घागरींतील उदकानें अशुद्ध पात्र भरून दासादिकानें तें पात्र डाव्या पायानें पालथें करावें, असें **हरदत्त** सांगतो. या वचनांत 'नामग्रहण करून' असें सांगितलें तें उदकादिक प्रेतकार्याविषयीं नाम वर्ज्य करण्याकरितां आहे म्हणून उदकादिक प्रेतकार्य नांव घेतल्यावांचून होतें. हा घटस्फोटविधि प्रायश्चित्त न इच्छिणाराचा आहे, असें समजावें. कारण, "त्या पतिताचा गुरु, बांधव व राजा यांच्या समक्ष त्याचे दोष प्रख्यात करून त्याला 'आचार ग्रहण कर' असें वारंवार सांगितलें असतांही त्याची बुद्धि जर स्थितीवर येत नसेल तर त्याला पात्र उलथें करावें" असें शंखवचन आहे. म्हणजे जीवंताचा उद्देश करून पिंड, उदक, आणि श्राद्ध हीं त्याच्या नांवानें द्यावीं, असें **अपरार्क** सांगतो.

कृतप्रायश्चित्तस्यघटस्फोटेकृतेपिसंग्रहविधिमाह**गौतमः** यस्तुप्रायश्चित्तेनशुध्येत्तस्मिन्शुद्धेशातकुंभमयं पात्रंपुण्यह्रदात्पूरयित्वास्रवंतीभ्योवाततएनमुपस्पर्शयेयुरथास्मैतत्पात्रंदद्युस्तत्सप्रतिगृह्यजपेच्छांताद्यौःशांता-पृथिवीशांतंविश्वमंतरिक्षंयोरोचनस्तमिहगृह्णामीत्येतैर्यजुर्भिःपावमानीभिस्तरत्समंदीभिःकूष्मांडैश्चाज्यंजुहुयाद्धिरण्यंदद्याद्गांचाचार्याय यस्यतुप्राणांतिकंप्रायश्चित्तंसमृतःशुध्येत्सर्वाण्येवतस्मिन्नुदकादीनिप्रेतकर्माणिकुर्यु-रेतदेवशांत्युदकंसर्वेषूपपातकेष्विति घटस्फोटोत्तरंप्राणांतिकप्रायश्चित्तेकृतेतुमृतएवशुध्येन्नतत्रसंग्रहविधिः अतस्तेनविनापिप्रेतकर्मकुर्यादित्यर्थः उपपातकेष्वपिघटस्फोटेकृतेएवंकार्यमित्यर्थः **याज्ञवल्क्यः** चरित-व्रतआयातेनिनयेरन्नवंघटं जुगुप्सेरन्नचाप्येनंसंवसेयुश्चसर्वशः कृतघटस्फोटस्यैवायंपरिग्रहविधिरिति**मि-ताक्षरायामपरार्केच** अन्यथाप्रायश्चित्तमात्रेएतत्प्रसंगात् **मनुरपि** घटस्फोटमुक्त्वा निवर्तेरंश्चतस्त-स्मात्संभाषणसहासनैरित्युक्त्वा प्रायश्चित्तेतुचरितेपूर्णकुंभमपांनवं तेनैवसार्धंप्राश्नीयुःस्नात्वापुण्येजलाशये इतितच्छब्दप्रयुक्त **अपरार्केवसिष्ठोपि** पतितानांचरितव्रतानांप्रत्युद्धारोऽथाप्युदाहरंति अग्रेभ्युद्धर-तांगच्छेत्क्रीडन्निवहसन्निव पश्चात्पातयतांगच्छेच्छोचन्निवरुदन्निवेत्याचार्यमातृपितृहंतारस्तत्प्रसादादपगत-पापाएषातेषांप्रत्यापत्तिः पूर्णह्रदात्प्रवृत्ताद्वासकांचनंपात्रंमाहेयंवाद्भिःपूरयित्वापोहिष्ठीयाभिरेनमद्भिरभिषिं-चेयुः सर्वएवाभिषिक्तस्यप्रत्युद्धारःपुत्रजन्मनाव्याख्यातइति प्रत्युद्धारःपरिग्रहः तत्रोद्धरतांहसन्निवाग्रेसरः-स्यात् पातयतांघटस्फोटंकुर्वतांशोचन्निवपश्चाद्गच्छेत् मातापित्रादिहंतॄणांपरिग्रहोनकार्यः तत्प्रसादेसतिचीर्ण-व्रतानांकार्यः प्रवृत्तनिर्झरः पुत्रजन्मनेत्यभिषेकोत्तरंजातकर्मादयःसंस्काराःपुत्रजन्मवत्कार्याइत्य**परार्को**-व्याचख्यौ अतएव**विज्ञानेश्वरो** घटेपवर्जितेज्ञातिमध्यस्थोयवसंगवां प्रदद्यात्प्रथमंगोभिःसत्कृतस्यहिस-त्क्रियेत्यत्रगवांभक्षणाभावेपुनर्व्रतंचरेदित्येतत्प्रकृतेएवंचरितव्रतविधौविशेषोयमितिवदन्घटस्फोटोत्तरंपरिग्र-हएवैतन्नसर्वत्रेत्याह तस्मात्कृतेपिघटस्फोटेप्रायश्चित्तंपरिग्रहविधिःपुनःसंस्काराभवंतीतिसिद्धं तथाजीवच्छ्रा-द्धेकृते **हेमाद्रौबौधायनः** तत्राशौचंदशाहंस्यादित्यलंप्रसंगेन ।

## कृतघटस्फोटाचा संग्रहविधि—

घटस्फोट केला असतांही त्यानें प्रायश्चित्त केलें असतां त्याचा संग्रहविधि सांगतो **गौतम**-"जो प्रायश्चित्तानें शुद्ध होईल तो शुद्ध झाला असतां सुवर्णाचें उत्तम पात्र पुण्यकारक डोहांतून किंवा नदींतून भरून आणून त्याच्याकडून स्नान करवून तदनंतर तें पात्र त्याच्याजवळ द्यावें. त्यानें तें घेऊन '**शांता द्यौः शांता पृथिवी शांतं विश्वमंतरिक्षं यो रोचनस्तमिह गृह्णामि**' या यजूंचा जप करावा. पावमानी ऋचा, तरत्समंदी ऋचा यांनीं त्या उदकाचें अभिमंत्रण करावें. कूष्मांडमंत्रांनीं त्यानें आज्यहोम करावा. आचार्याला हिरण्य द्यावें आणि गाय द्यावी. ज्याला प्राणांतिक प्रायश्चित्त असेल तो मेला असतां शुद्ध होतो, म्हणून त्याचीं उदकदानादिक सारीं प्रेतकार्यें करावीं. साऱ्या उपपातकांविषयीं हेंच शांत्युदक समजावें." वरील वचनाचा भाव-घटस्फोटोत्तर प्राणांतिक प्रायश्चित्त केलें असेल तर मृत झाला असतांच शुद्ध होतो.

त्याविषयीं संग्रहविधि नाहीं. म्हणून संग्रहविधि केल्यावांचूनही त्याचें प्रेतकर्म करावें. उपपातकांविषयींही घटस्फोट केला असतां असें करावें, असा इत्यर्थ आहे. **याज्ञवल्क्य**–"प्रायश्चित्त करून आला असतां त्याच्या ज्ञातींनीं नवा घट भरून आणून सर्वांनीं तें उदक घ्यावें. त्यानें वाईट कर्म पूर्वी केल्यामुळें त्याची निंदा करूं नये. त्याच्याशीं सर्व व्यवहार करावे." ज्याचा घटस्फोट केला असेल त्याचाच या वचनानें सांगितलेला हा परिग्रहविधि आहे, असें **मिताक्षरेंत** व **अपरार्कांत** आहे. असें नसेल तर प्रत्येक प्रायश्चित्तांत याचा प्रसंग येईल. **मनुही** घटस्फोट सांगून "तदनंतर त्याच्याशीं संभाषण, एकत्र बसणें वगैरे सर्व व्यवहार बंद करावे" असें सांगून नंतर "त्यानें प्रायश्चित्त आचरण केलें असतां त्यासहवर्तमान सर्वांनीं पुण्यजलाशयांत स्नान करून नवा कुंभ उदकांनीं भरून आणून त्यासह तें उदक प्राशन करावें." या वचनांत 'त्यासह' असें **मनु** सांगता झाला. **अपरार्कांत वसिष्ठही**—"पतितांनीं प्रायश्चित्त केलें असतां त्यांचा प्रत्युद्धार (परिग्रह) करावा. आणि असेंही सांगतात-ज्ञाति परिग्रह करीत असतां त्यांच्या अग्रभागीं क्रीडा करीत हंसत असल्याप्रमाणें जावें. आणि घटस्फोट करणाऱ्यांच्या मागाहून शोक करीत, रोदन करीत असल्याप्रमाणें जावें. आचार्य, माता, पिता यांना मारणारे जे असतील त्यांनीं त्या आचार्यादिकांचा प्रसाद संपादन करून पापरहित झाले असतील तर त्यांचा परिग्रह असा-सुवर्णाचें किंवा मृन्मय पात्र पूर्ण डोहांतून अथवा झऱ्यांतून भरून आणून त्या उदकांनीं "आपोहिष्ठा" या ऋचांनीं त्याजवर अभिषेक करावा. अभिषेक केल्यावर त्याचा सर्व परिग्रह पुत्रजन्माप्रमाणें समजावा." माता, पिता इत्यादिकांना मारणारांचा परिग्रह करूं नये. त्यांचा प्रसाद झाला असतां प्रायश्चित्त केल्यावर परिग्रह करावा. पुत्रजन्मानें व्याख्यात म्हणजे अभिषेक झाल्यानंतर जातकर्मादिक संस्कार पुत्रजन्माप्रमाणें करावे, असें व्याख्यान **अपरार्क** करिता झाला. वर सांगितलेला परिग्रह घटस्फोटोत्तर आहे म्हणूनच **विज्ञानेश्वर**–"घटस्फोट केला असतां प्रायश्चित्त करून येईल तर ज्ञातींच्यामध्यें राहून गाईंना तृण द्यावें. कारण, पूर्वी गाईंनीं शुद्धि केलेल्याची शुद्धि करावयाची आहे." या ठिकाणीं गाईंनीं तृण भक्षण केलें नाहीं तर पुनः प्रायश्चित्त करावें. हें प्रकरण चाललें असतां–केलेल्या प्रायश्चित्ताविषयीं असा हा विशेष विचार आहे, असें बोलणारा **विज्ञानेश्वर** घटस्फोटोत्तर परिग्रहाविषयींच हा विधि आहे, सर्वत्र नाहीं, असें सांगतो. तस्मात् घटस्फोट केला असतांही त्याला प्रायश्चित्त, परिग्रहविधि आणि पुनःसंस्कार हे होतात, असें सिद्ध आहे. तसेंच जीवच्छ्राद्ध केलें असतां **हेमाद्रींत बौधायन**–"त्या ठिकाणीं दहा दिवस आशौच होतें." आतां हें प्रसंगानें सांगणें पुरे करितों.

एवंसापवादेआशौचेउक्तेप्रतिशाखंभिन्नेप्यंत्यकर्मणिसाधारणंकिंचिदुच्यते **तत्राधिकारिणः**प्रागुक्ताः सर्वाभावेधर्मपुत्रोवाकार्यः अपुत्रेणसुतःकार्योयादृक्तादृक्प्रयत्नतः पिंडोदकक्रियाहेतोर्नामसंकीर्तनायचेति **व्यास**वचनात् **गृह्यपरिशिष्टे** असगोत्रःसगोत्रोवायदिस्त्रीयदिवापुमान् प्रथमेहनियोदद्यात्सदशाहंसमापयेत् दद्यात्पिंडमितिशेषः **भविष्ये** यत्राद्योदीयतेपिंडस्तत्रसर्वंसमापयेत् **ब्राह्मेपि** प्रथमेहनियोदद्यात्प्रेतायान्नंसमाहितः अन्नंनवसुचान्येपुमएवप्रददात्यपि **विज्ञानेश्वरादयस्तु केचित्तु** अग्निंदद्यादितिव्याचक्षते सगोत्रोवासगोत्रोवायोग्निंदद्यात्सखेनरः सोपिकुर्यान्नवश्राद्धंशुध्येत्तुदशमेहनीति**दिवोदासीये** वचनाच्च ।

## आतां अंत्यकर्म सांगतो—

याप्रमाणें आशौच व आशौचाचा अपवाद सांगितला. अंत्यकर्म प्रत्येक शाखेचें वेगवेगळें आहे तरी त्याविषयीं सर्वसाधारण कर्म किंचित् सांगतों–त्या अंत्यकर्माविषयीं अधिकारी पूर्वी श्राद्धप्रकरणीं सांगितले आहेत. अथवा सर्वांच्या अभावीं धर्मपुत्र करावा. कारण, "निपुत्रिकानें पिंड–उदकदान इत्यादि क्रियेसाठीं व आपलें नांव सांगण्यासाठीं प्रयत्नानें जसा मिळेल तसा पुत्र करावा" असें **व्यास**वचन आहे. **गृह्यपरिशिष्टांत**–"असगोत्री किंवा सगोत्री, स्त्री किंवा पुरुष जो प्रथम दिवशीं पिंड देईल त्यानें दहा दिवस पिंड द्यावे." **भविष्यांत**–"ज्या ठिकाणीं पहिला पिंड दिला असेल त्या ठिकाणीं सारे पिंड समाप्त करावे." **ब्राह्मांत**ही–"प्रेताला पहिल्या दिवशीं जो अन्न देईल तोच इतर नऊ दिवसही अन्न देतो." **विज्ञानेश्वर** इत्यादिक तर-**केचित्** तर वरील गृह्यपरिशिष्टवचनांत 'जो अग्नि देईल त्यानें दशाह कर्म समाप्त करावें' असें व्याख्यान करितात. आणि "सगोत्र किंवा भिन्नगोत्री जो मनुष्य अग्नि देईल त्यानेंच नवश्राद्ध करावें, व तो दहाव्या दिवशीं शुद्ध होईल" असें **दिवोदास** ग्रंथांत वचनही आहे.

**तत्रैव दृष्ट्वास्थानस्थमासन्नमधोन्मीलितलोचनं भूमिष्ठंपितरंपुत्रोयदिदानंप्रदापयेत् तद्विशिष्टंगयाश्राद्धादश्वमेधशतादपि तानियथा मोक्षंदेहिहृषीकेशमोक्षंदेहिजनार्दन मोक्षधेनुप्रदानेनमुकुंदःप्रीयतांममेति मोक्षधेनुमंत्रः ऐहिकामुष्मिकंयच्चसप्तजन्मार्जितंऋणं तत्सर्वंशुद्धिमायातुगामेतांददतोममेति ऋणधेनोः आ-**

जन्मोपार्जितंपापंमनोवाक्कायकर्मभिः तत्सर्वंनाशमायातुगोप्रदानेनकेशवेति **पापधेनोः भारते** शुक्लपक्षे दिवाभूमौगंगायांचोत्तरायणे धन्यास्तातमरिष्यंतिहृदयस्थेजनार्दने **हेमाद्रौवाराहे** व्यतीपातोथसंक्रांति-स्तथैवग्रहणंरवेः पुण्यकालास्तदासर्वेयदामृत्युरुपस्थितः **व्यासः** आसन्नमृत्युनादेयागौःसवत्सातुपूर्ववत् तदभावेतुगौरेवनरकोत्तारणायवै तदायदिनशक्नोतिदातुंवैतरिणींतुगां शक्तोन्यउक्तगांदत्वादद्याच्छ्रेयोमृतस्यतु ।

तेथेंच सांगतो-"आसन्न मरण झालेला, अर्धे डोळे उघडणारा, भूमीवर असलेला अशा पित्याला पाहून जर त्याचा पुत्र दान देईल तर तें दान गयाश्राद्धाहून व शंभर अश्वमेधांहूनही अधिक आहे." तीं दानें अशीं-'मोक्षं देहि हृषीकेश मोक्षं देहि जनार्दन । मोक्षधेनुप्रदानेन मुकुंदः प्रीयतां मम' या मंत्रानें **मोक्षधेनु**दान. 'ऐहिकामुष्मिकं यच्च सप्तजन्मार्जितं ऋणम् । तत्सर्वं शुद्धिमायातु गामेतां ददतो मम' या मंत्रानें **ऋणधेनु**दान. 'आजन्मोपार्जितं पापं मनोवाक्कायकर्मभिः । तत्सर्वं नाशमायातु गोप्रदानेन केशव' या मंत्रानें **पापधेनु**दान. **भारतांत** "शुक्लपक्षांत दिवसा भूमीवर गंगातीरीं उत्तरायणांत भगवान् जनार्दन हृदयांत ध्यान केलेला असतां जे मरतात ते धन्य ( पुण्यवंत ) होत." **हेमाद्रींत वाराहांत**-"ज्या वेळीं मृत्यु प्राप्त होईल त्या वेळीं व्यतीपात, संक्रांति, चंद्रसूर्यांचें ग्रहण इत्यादि जे पुण्यकाल ते सारे आहेत, असें समजावें." **व्यास**-"ज्याला मृत्यु समीप आला असेल त्यानें सवत्सगाईचें दान पूर्वीप्रमाणें ( चांगल्या प्रकृतींत करावयाचें तसें ) करावें. सवत्सगाईच्या अभावीं नरकापासून तरण्याकरितां वैतरणीगाईच द्यावी. त्या वेळीं जर वैतरणीगाई देण्याविषयीं तो असमर्थ असेल तर दुसऱ्यानें उक्त गाई देऊन त्याचें श्रेय मृताला द्यावें."

**मदनरत्नेजातूकर्ण्यः** उत्क्रांत्यादीनिदानानिदशदद्यान्मृतस्यतु गोभूतिलहिरण्याज्यवासोधान्यगुडानिच रौप्यंलवणमित्याहुर्दशदानान्यनुक्रमात् एतानिदशदानानिनराणांमृत्युजन्मनोः कुर्यादभ्युदयार्थंतुप्रेतेपिहिपरत्रवै **ब्राह्मे** ताम्रपात्रंतिलैःपूर्णंप्रस्थमात्रैर्द्विजायतु सहिरण्यंचयोदद्यात्श्रद्धावित्तानुसारतः सर्वपापविशुद्धात्मालभतेगतिमुत्तमां उत्क्रांतिवैतरिण्यौचदशदानानिचैवहि प्रेतेपिकृत्वातंप्रेतंशवधर्मेणदाहयेत् तत्रैव**परिशिष्टे** म्रियमाणस्यकर्णेतुपुण्यमंत्रान्जपेत्ततः **क्रियानिबंधेगारुडे**त्वष्टौदानान्युक्तानि तुलसीसन्निधौकृत्वाशालग्रामशिलांतथा तिलालोहंहिरण्यंचकार्पासंलवणंतथा सप्तधान्यंक्षितिर्गावएकैकंपावनंस्मृतमिति दशदानवैतरिणीधेनूत्क्रांतिधेनुदानादिभट्टकृतांत्येष्टिपद्धतौज्ञेयं कर्तांत्यकर्माधिकारार्थंत्रीन्कृच्छ्रान्कुर्यादितितत्रैवोक्तं अत्र**देवयाज्ञिके**नमुमूर्षोर्मधुपर्कदानमुक्तं तदुक्तं**वाराहे** दृष्ट्वासुविह्वलंह्येनंयममार्गानुसारिणं प्रयाणकालेतुनरोमंत्रेणविधिपूर्वकं मधुपर्कंत्वरन्गृह्यइमंमंत्रमुदाहरेत् ॐगृहाणचेमंमधुपर्कमाद्यंसंसारनाशनकरंह्यमृतेनतुल्यं नारायणेनरचितंभगवत्प्रियाणांदाहेचशांतिकरणंसुरलोकपूज्यं अनेनैवतुमंत्रेणदद्याच्चमधुपर्ककम् नरस्यमृत्युकालेतुपरलोकसुखावहम् ।

**मदनरत्नांत जातूकर्ण्य**-"मृताचीं उत्क्रांतिधेनु इत्यादिक दशदानें करावीं. तीं अशीं-गाई, भूमि, तिल, हिरण्य, आज्य, वस्त्र, धान्य, गुळ, रौप्य, लवण, हीं अनुक्रमें दशदानें, असें सांगतात. हीं दशदानें मनुष्यांच्या मरणसमयीं व जन्मसमयीं करावीं. आणि मृत झाला असतां ही परलोकीं अभ्युदयाकरितां करावीं." **ब्राह्मांत**-"जो मनुष्य श्रद्धेनें द्रव्यानुसारेंकरून ताम्रपात्र घेऊन तें प्रस्थपरिमित तिलांनीं पूर्ण भरून सुवर्णसहित ब्राह्मणाला देईल तो सर्व पातकांनीं रहित ( शुद्ध ) होऊन उत्तम गतीस जातो. उत्क्रांतिधेनु, वैतरणी आणि दश दानें मृत झाल्यावर देखील करून नंतर त्या प्रेताचा शवधर्मानें यथाविधि दाह करावा." तेथेंच **परिशिष्टांत**-"मरणाराचे कानामध्यें पुण्यकारक मंत्रांचा जप करावा." **क्रियानिबंधांत गारुडांत** तर आठ दानें सांगितलीं आहेत. तुलसीसंनिध शालग्राम शिला करून तिळ, लोह, हिरण्य, कापूस, लवण, सप्त धान्यें, भूमि, गाई हें एक एक दान पावन करणारें आहे." दशदानें, वैतरणीधेनुदान, उत्क्रांतिधेनुदान इत्यादि भट्टांनीं केलेल्या **अंत्येष्टिपद्धतीं**तून जाणावीं. कर्त्यानें अंत्यकर्माधिकारासाठीं तीन कृच्छ्र करावे, असें तेथेंच ( अंत्येष्टिपद्धतींत ) सांगितलें आहे. एथें मुमूर्षूला ( मरणाराला ) **देवयाज्ञिकानें** मधुपर्कदान सांगितलें आहे, तें **वाराहांत** सांगतो-"यममार्गास अनुसरणारा विव्हल झालेला असा मनुष्य पाहून त्याच्या मनुष्यानें प्रयाणकालीं मंत्रानें यथाविधि त्वरेनें मधुपर्क घेऊन पुढें सांगावयाचा मंत्र म्हणावा. 'गृहाण चेमं मधुपर्कमाद्यं० सुरलोकपूज्यं' ह्या मंत्रानें मनुष्याच्या मृत्युकालीं परलोकीं सुखकर असा मधुपर्क द्यावा."

**अथदुर्मरणेदिवोदासीये** चंडालादिमृतेविप्रेत्वंतरिक्षमृतेपिवा कृच्छ्रातिकृच्छ्रचांद्रैस्तुशुद्धिस्तत्रप्रकीर्तिता **दूर्वेजानीयेजाबालिः** शूद्रेणदग्धोयोविप्रोनलभेच्छाश्वतींगतिं प्रायश्चित्तंप्रकुर्वीतब्राह्मणःपापशुद्धये

चांद्रायणंपराकंचप्राजापत्यंविशोधनं **गृह्यकारिकायां** उदक्यासूतिकावापियदिप्रेतंस्पृशंतिहि तस्यैषविधि-रादिष्टोवात्स्येनैवमहात्मना एषःसूतिकोक्तः **मदनरत्नेस्मृत्यंतरे** ऊर्ध्वोच्छिष्टाधरोच्छिष्टोभयोच्छिष्टेतथै-वच अस्पृश्यस्पर्शनेचैवखट्वादिमरणेपिच श्वानक्रव्यादसंस्पर्शेक्रिमिकीटोद्भवेपिच एतद्दोषानुसारेणप्रायश्चि-त्तंसमाचरेत् कृच्छ्रांस्त्रिषट्पंचदशांश्चांद्रत्रयमथापिवा शुद्ध्यैतदानींसंपाद्यशवधर्मेणदाहयेत् **गृह्यकारि-कायां** खट्वायांमरणेचैवत्रींस्त्रीन्कृच्छ्रान्प्रकल्पयेत् सप्तांत्यजैस्तुसंस्पृष्टोमृतोदैवात्कथंचन एकत्रिंशताकृच्छ्रै-स्तुशुद्धिरुक्तामनीषिभिः कुणपेत्वर्धदग्धेतुचितास्पृष्टांत्यजादिभिः तत्स्पर्शनेदूषणंचत्रिभिःकृच्छ्रैर्विशुध्यति **धर्मप्रदीपे** चांडालसूतिकोदक्यास्पृष्टेप्रेतेतथैवच तस्यपापविशुद्ध्यर्थंकृच्छ्रान्पंचदशाचरेदित्युक्तं **मनुः** अस्वर्ग्याह्याहुतिःसास्याच्छूद्रसंपर्कदूषिता अत्रापिकृच्छ्रत्रयं अस्पृश्यस्पर्शनेचैवेत्युक्तेः ।

## आतां दुर्मरणाविषयीं सांगतो—

**दिवोदासीयांत**-"ब्राह्मण चंडालादिकांनीं मारला असतां अथवा अंतरिक्षांत मृत असतां त्याची शुद्धि कृच्छ्र, अति-कृच्छ्र व चांद्रायण यांनीं सांगितली आहे." **देवजानीयांत जाबालि**-"शूद्रानें दग्ध केलेला जो ब्राह्मण त्याला शाश्वत गति प्राप्त होत नाहीं, म्हणून त्याच्या पापाची शुद्धि होण्याकरितां चांद्रायण, पराककृच्छ्र, व प्राजापत्य हें प्रायश्चित्त करावें." **गृह्यकारिकेंत**-"उदक्या ( रजस्वला ) अथवा सूतिका जर प्रेताला स्पर्श करितील तर त्याला वात्स्य ऋषीनें हा विधि ( सूतिकेला सांगितलेला ) सांगितला आहे." **मदनरत्नांत स्मृत्यंतरांत**-"ऊर्ध्वोच्छिष्ट, अधरोच्छिष्ट, उभयोच्छिष्ट यांजविषयीं; अस्पृश्यांचा स्पर्श झाला असतां; खट्वा, मंचक इत्यादिकांवर मरण असतां; कुत्रा व इतर आममांसभक्षकप्राणी यांचा स्पर्श झाला असतां; कृमि, कीट यांच्या योगानें मरण झालें असतां; त्या दोषानुरोधानें प्रायश्चित्त करावें. तें असें-तीन कृच्छ्र, सहा कृच्छ्र, पंधरा कृच्छ्र, अथवा तीन चांद्रायणें, त्या वेळीं शुद्धीकरितां संपादन करून नंतर प्रेताचा शवधर्मानें दाह करावा." **गृह्यकारिकेंत**-"खट्वेचे ठायीं मरण असतां तीन तीन ( नऊ ) कृच्छ्र करावे. रजकादि सात प्रकारच्या अंत्यजांनीं स्पर्श केलेला असून दैववशानें मृत झाला तर त्याची शुद्धि विद्वानांनीं एकतीस कृच्छ्रांनीं सांगितली आहे. प्रेत अर्धें दग्ध असतां त्या चितेला अंत्यजांनीं स्पर्श केला तर त्यांच्या स्पर्शाचा दोष तीन कृच्छ्रांनीं जातो." **धर्मप्रदीपांत**-"चांडाल, सूतिका, रजस्वला, यांनीं प्रेताला स्पर्श केला असतां त्याच्या पापशुद्ध्यर्थ पंधरा कृच्छ्र करावे" असें सांगितलें आहे. **मनु**-"शूद्रसंपर्कानें दूषित झालेल्या प्रेताची आहुति स्वर्गप्राप्तीला अयोग्य होते." येथेंही ( शूद्रस्पर्श असतां ) तीन कृच्छ्र करावे. कारण, वरील स्मृत्यंतरांत 'अस्पृश्य स्पर्श असतां' असें सांगितलें आहे.

तत्रैवकर्मप्रदीपे रात्रौवारात्रिशेषेवाम्रियंतेचेद्द्विजातयः दाहंकृत्वायथान्यायंद्वौपिंडौनिर्वपेत्सुतः रज-स्वलागर्भिण्यादिमृतौतुवक्ष्यामः **निर्णयामृतेपारिजातेयमः** संध्यायांवातथारात्रौदाहःपाथेयकर्मच नवश्राद्धंचनोकुर्यात्कृतंनिःफलतांव्रजेत् एतद्दिनमृतस्यरात्रिनिषेधार्थं यत्तु**स्कांदे** यदिरात्रौदहेत्तस्यसमाप्ति-र्दहनस्यतु परेह्न्युदितेसूर्येकार्यातस्योदकक्रिया दग्धस्यतुनैवकार्यारात्रौजातूदकक्रियेति तन्निर्मूलं रात्रिमृत-स्यतुतत्रैव**संग्रहे** रात्रौदग्ध्वातुपिंडांतंकृत्वावपनवर्जितं वपनंनेष्यतेरात्रौश्वस्तनीवपनक्रियेति वपनंतुप्रातः तच्चसर्वैःपुत्रैःकार्यं गंगायांभास्करक्षेत्रेमातापित्रोर्गुरोर्मृतौ आधानेसोमयागेचवपनंसप्तसुस्मृतमिति**मिता-क्षरायांस्मृतेः** मरणस्यानंगित्वान्नैमित्तिकमिदम् तदेवसंग्रहवचनेनपरेशुरुत्कृष्यतेतीर्थवत् तेनकस्यचिद्दा-हांगत्वोक्तिश्चिंत्या **मदनरत्नेगालवः** प्रथमेह्निकर्तव्यंवपनंचानुभाविनां प्रेतस्यकेशश्मश्रवादिवापयित्वा-थदाहयेत् आशौचांतेतुपुनःकार्यं विधिबलात् **मदनपारिजातेप्येवं** तेनसर्वस्यास्यनिर्मूलत्वोक्तिरज्ञोक्तिरेव **स्मृतिरत्नावल्याम्** शवंरात्र्युषितंचेत्त्रींन्कृच्छ्रान्कृत्वादहेत्सुतः **मदनरत्नेंगिराः** ऊर्ध्वोच्छिष्टाधरो-च्छिष्टेंतरिक्षमृतेपिवा कृच्छ्रत्रयंप्रकुर्वीतआशौचेमरणेपिच ।

तेथेंच **कर्मप्रदीपांत**-"रात्रीं किंवा रात्रिशेष असतां पहांटेस जर द्विजाति ( ब्राह्मणादिक ) मृत होतील तर यथाविधि त्यांचा दाह करून पुत्रानें दोन पिंड द्यावे." रजस्वला, गर्भिणी इत्यादिकांच्या मरणाविषयीं तर पुढें सांगूं. **निर्णयामृतांत पारिजातांत यम**-"संध्याकाळीं व रात्रीं दाह, पाथेयकर्म, आणि नवश्राद्ध करूं नये, तें केलें असतां निष्फल होतें." हें वचन दिवसा मृताचे रात्रीं दाहादि निषेधार्थ आहे. आतां जें **स्कांदांत**-"जर रात्रीं दाह केला तर त्या दाहाची समाप्ति

१ कृच्छ्रादिकांचीं लक्षणें ग्रंथाच्या शेवटीं सांगूं.

दुसऱ्या दिवशीं सूर्योदय झाल्यावर करावी. व त्याची उदकदानक्रिया सूर्योदयोत्तर करावी. दग्धाची रात्रीं उदकदानक्रिया कधींही करूं नये" असें वचन तें निर्मूल आहे. **आतां रात्रीं मृताचें सांगतो** 'तेथेंच **संग्रहांत**-"रात्रीं मृताचा रात्रीं दाह करून वपनवर्जित पिंडदानांत कर्म करावें. वपन रात्रीं इष्ट नाहीं. वपनक्रिया दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं करावी." वपन प्रातःकालीं तें सर्व पुत्रांनीं करावें. कारण, "गंगा, भास्करक्षेत्र, माता, पिता, व गुरु यांचा मरणसमय, आधान आणि सोमयाग ह्या सातांच्या ठिकाणीं वपन ( क्षौर ) सांगितलें आहे." असें **मिताक्षरेंत** स्मृतिवचन आहे. वपनाचें मरण अंगि होत नाहीं, म्हणून मरणाचें वपन अंग नव्हे, तर हें वपन मरणनिमित्तक असल्यामुळें नैमित्तिक आहे. तेंच वरील संग्रहाच्या वचनानें दुसऱ्या दिवशीं करावें म्हणून सांगितलें; तीर्थांत जसें सांगितलें तद्वत्. यावरून कोणी एकानें दाहाचें वपन हें अंग असें सांगितलें, तें चिंत्य (अयुक्त) आहे. **मदनरत्नांत गालव**-"पुत्रादिकांनीं प्रथमदिवशीं वपन करावें. प्रेताचे केश श्मश्रु इत्यादिकांचें वपन करवून दाह करावा." आशौचांतीं तर पुनः वपन करावें. कारण, विधीनें सांगितलें आहे. **मदनपारिजातां**तही असेंच आहे. यावरून हें सर्व निर्मूल म्हणणारे अज्ञ आहेत. **स्मृतिरत्नावलींत**-"शव रात्रीं राहिलें असेल तर पुत्रानें तीन कृच्छ्र करून दाह करावा." **मदनरत्नांत अंगिरा**-"ऊर्ध्वोच्छिष्ट व अधरोच्छिष्टा-विषयीं अथवा अंतरिक्षमरण असतां त्याविषयीं आणि आशौचांत मरण असेल तर त्याविषयींही तीन कृच्छ्र करावे."

अथसाग्नेर्विशेषः **कारिकायां** कृष्णपक्षेप्रमीयेतयद्यह्निप्रातराहुतीः शेषास्तुजुहुयाद्दर्शपर्यंताःपक्षहोमवत् प्रतिपत्प्रातर्होमांताइत्यर्थः यद्याहिताग्निरपरपक्षेम्रियेताहुतिभिरेनंपूर्वपक्षेहरेयुरित्या**श्वलायनोक्तेः** तदानीमेवजुहुयात्सायंकालाहुतीरपि सायंम्रियेतचेत्सायमाहुतीर्जुहुयादथ तदानीमेवजुहुयात्प्रातःकालाहुतीरपि सकृद्गृहीतमंत्रेष्टंभिन्नतंत्रंचहोमयोः दार्शंचापिप्रकुर्वीतस्थालीपाकंतदैवतु **छंदोगपरिशिष्टे** हुतायांसायमाहुत्यांदुर्बलश्चेद्गृहीभवेत् प्रातर्होमस्तदैवस्याज्जीवेच्चसपुनर्नवा इदंशुक्लपक्षपरं दुर्बलोमुमूर्षुः **त्रिकांडमंडनः** दर्शेष्टिंचतदाकुर्यादिष्टिर्येदिनसंभवेत् देवतानांप्रधानानामेकैकस्यहुनेत्पृथक् पुरोनुवाक्यायाज्याभ्यां चतुरात्तघृताहुतीः तथा अग्न्यावरण्योरारूढेप्रमीयेतपतिर्यदि प्रेतंस्पृष्ट्वामथित्वाग्निंजप्त्वाचोपावरोहणं घृतंचद्वादशोपात्तंतूष्णींहुत्वाशवक्रिया विच्छिन्नश्रौताग्नेर्मृतौतुप्रेताधानंतत्रैवोक्तं प्रेतंस्वाग्न्यालयेक्षिप्त्वामथिताग्न्यानलेरणी सन्निधायारणीमंथेद्यस्येतियजुषाततः यस्याग्नयोजुह्वतोमांसकामाःसंकल्पयंतेयजमानमांसं जायंतुतेहविषेसादितायस्वर्गलोकमिमंप्रेतंनयंत्वितिमंत्रतः प्रणीयपावकंतूष्णींद्वादशोपात्तसर्पिषा तूष्णींहुत्वाततःकुर्यात्प्रेतेमाल्यादिक्रियां नष्टेष्वग्निष्वथारण्योर्नाशेस्वामीम्रियेतचेत् आहरेदरणिद्वंद्वंमनोज्योतिर्ऋचाततः ।

## आतां साग्निकाला विशेष सांगतो—

**कारिकेंत**-"जर आहिताग्नि कृष्णपक्षांत दिवसा प्रातः मरेल तर दर्शपर्यंत शेष प्रातराहुतींचा होम पक्षहोमाप्रमाणें करावा." दर्शपर्यंत म्हणजे प्रतिपत्प्रातर्होमापर्यंत करावा. कारण, "जर आहिताग्नि कृष्णपक्षांत मरेल तर त्याच्या शुक्लपक्षापर्यंत आहुति द्यावा" अशी **आश्वलायनाची** उक्ति आहे. आणि त्याच वेळीं सायंकालाहुतींचा देखील होम करावा. सायंकालीं मरेल तर सायंकालाच्या आहुतींचा होम करावा. आणि त्याच वेळीं प्रातःकालाहुतींचाही होम करावा. ह्या दोनी वेळच्या आहुती वेगवेगळ्या एकदम घेऊन त्यांचा होम करावा. म्हणजे प्रातःकालाच्या शेष आहुति एकदम घेऊन होम करावा. तसाच "सायंकालाच्या आहुति एकदम घेऊन होम करावा. आणि दर्शस्थालीपाकही त्याच वेळीं करावा." **छंदोगपरिशिष्टांत**-"सायंकालच्या आहुतीचा होम केला असतां जर यजमान दुर्बळ ( मुमूर्षु ) होईल तर त्याच वेळीं प्रातःकालचा होम करावा. नंतर तो जगेल तर पुनः प्रातःकालचा होम करावा किंवा न करावा." हें वचन शुक्लपक्षाविषयीं आहे. **त्रिकांडमंडन**-"दर्शेष्टि त्या वेळीं करावी. जर इष्टि न संभवेल तर स्रुचेच्या ठिकाणीं चार वेळ घृताहुती घेऊन पुरोनुवाक्या व याज्या मंत्रांनीं प्रधानदेवतांना वेगवेगळा एक एक होम करावा." तसेंच "अग्नीचा अरणींत आरोह केला असतां जर पति मरण पावेल तर प्रेताला स्पर्श करून अग्नीचें मंथन करून व जप करून अग्नीचें अवरोहण करावें. नंतर बारा वेळ घृत घेऊन मंत्ररहित हवन करून नंतर प्रेतक्रिया करावी." श्रौताग्नि विच्छिन्न झालेला मृत असेल तर प्रेताधान तेथेंच सांगितलें आहे-"प्रेत अग्निशालेंत ठेऊन दोनी अरणी संनिध ठेऊन 'यस्याग्नयो० प्रेतं नयंतु' ह्या यजु मंत्रानें मंथन करून अग्नीचें अग्निकुंडांत प्रणयन करून बारा वेळ आज्य घेऊन मंत्ररहित हवन करून त्या अग्नीनें दाहादि करावें. अग्नि नष्ट झाले असून अरणींचा नाश झाला असतां स्वामी मृत होईल तर 'मनोज्योति०' या ऋचेनें दोन अरणी आणाव्या."

**यज्ञपार्श्वः** यजमानेचितारूढेपात्रन्यासेकृतेसति वर्षाद्यभिहतेवह्नौकथंकुर्वंतियाज्ञिकाः तदर्धदग्धकाष्ठेनमंथनंतत्रकारयेत् तच्छेषालाभतोन्येनदग्धशेषेणवापुनः हुत्वाज्यंलौकिकेवह्नौहुतशेषंदहेत्तुवा अन्या-

मिषुसत्सुपर्णशरैःशरीरोत्पत्तिः शरीरेवासतिप्रेताधानेनाग्युत्पत्तिः उभयाभावेतुप्रेताधानेऽनधिकाराद्दाहादि-संस्कारलोपः उदकदानाद्येवकार्यमितिकेशवीकारशतद्वयीप्रमुखाः तन्न निषेकाद्याःश्मशानांतास्तेषांवै-मंत्रतःक्रियाइतिविरोधात् क्रियालोपगतायेचेतिनिषेधात्तदभावेपलाशानांवृंतैःकार्यःपुमानपीत्यभावेविधान-स्याग्यभावेपिसाम्याच्च तेनप्रेताहुत्यभावेपिस्विष्टकृद्द्रव्यांतरोक्तेरदृष्टार्थत्वात् प्रेताधानंदाहोपिभवत्येव प्रतिकृ-तेरग्नीनांचप्रेताधानप्रयोजकत्वाश्रुतेः ।

**यज्ञपार्श्व**–"यजमान चितेवर ठेऊन त्याजवर यज्ञपात्रें ठेऊन अग्नि लावला असून तो अग्नि वर्षादिकेंकरून नष्ट झाला असतां याज्ञिक कसें करितात ? त्या ठिकाणीं अर्धदग्ध काष्ठांनीं मंथन करून अग्नि करावा. मंथनकाष्ठें दग्ध होऊन शेष न मिळतील तर इतर दग्धशेष काष्ठानें अग्नि करावा. अथवा लौकिकाग्नीवर आज्यहोम करून हुतशेषाचा दाह करावा." येथें असें आलें कीं, श्रौताग्नि असतां शरीर नसेल तर पर्णशरांनीं शरीराची उत्पत्ति होते. शरीर असतां अग्नि नसेल तर प्रेताधानानें अग्नि उत्पन्न होतो. अग्नि व शरीर दोनीं नसतील तर प्रेताधानाविषयीं अधिकार नसल्यामुळें दाहादिक संस्कारांचा लोप होतो. उदकदानादिच करावें, असें **केशवीकार, शतद्वयीप्रमुख** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, "गर्भाधानापासून स्मशानांत जाईपर्यंत सर्व त्याच्या क्रिया मंत्रानें होतात" या वचनाचा विरोध येतो. 'क्रियालोप झालेले जे' या वचनानें क्रियालोपाचा निषेध केला आहे. आणि "देहाच्या अभावीं पळसाच्या पानांच्या देंठांनीं पुरुष करावा" या पूर्वोक्त ब्राह्मवचनानें देहाच्या अभावीं पर्णशराचें विधान केलें तें अग्नि नसतांही समानच आहे. तेणेंकरून, प्रेताहुतीचा अभाव असतांही स्विष्टकृताचें निराळें द्रव्य सांगितलें आहे तें अदृष्ट फलाकरितां असल्यामुळें प्रेताधान आणि दाह होतच आहेत. प्रतिकृति ( पर्णशर ) आणि श्रौताग्नि हे प्रेताधानाला प्रयोजक नाहींत, असें नाहीं.

पत्न्याअप्येवं दाहयित्वाग्निहोत्रेणस्त्रियंवृत्तवतींपतिरितियाज्ञवल्क्योक्तेः यत्तु द्वितीयांचैवयोभार्यां-दहेद्वैतानिकाग्निभिः जीवंत्यांप्रथमायांतुसुरापानसमंस्मृतमितितदाधानेसहानधिकृताविषयमितिविज्ञाने-श्वरः मदनरत्नेब्राह्मेपि आहिताग्न्योश्चदंपत्योर्यस्त्वादौम्रियतेभुवि तस्यदेहःसपिंडैश्चदग्धव्यस्त्रिभिरग्नि-भिः पश्चान्मृतस्यदेहस्तुदग्धव्योलौकिकाग्निना अनाहिताग्निदेहस्तुदाह्योगृह्याग्निनाद्विजैः त्रिकांडमंडन-स्तुविकल्पमाह ज्येष्ठायांविद्यमानायांद्वितीयायैस्त्वयोपिते काम्यंनित्याग्निहोत्रंवानकथंचित्प्रयच्छति स्त्रीमात्र-मविशेषेणदग्ध्वान्येवैदिकाग्निभिः विवाह्यादधतेयद्वाधानमेवास्तिचेद्वधूरिति ।

पत्नीलाही असेंच समजावें. कारण, "चांगल्या वर्तनाचे स्त्रियेचा पतीनें अग्निहोत्रानें दाह करावा." असें **याज्ञवल्क्य**-वचन आहे. आतां जें "जो पुरुष प्रथमपत्नी जीवंत असतां दुसऱ्या पत्नीला श्रौताग्नीनें दग्ध करील त्याचें तें कर्म सुरापान-समान आहे." असा पत्नीचा दाहनिषेध केला तो आधानाविषयीं सहाधिकार न पावलेल्या पत्नीविषयीं आहे, असें **विज्ञाने-श्वर** सांगतो. **मदनरत्नांत ब्राह्मांत**ही–"अहिताग्नि स्त्रीपुरुषांमध्यें जो आदीं मृत होईल त्याचा देह सपिंडांनीं तीन अग्नींनीं दग्ध करावा. पश्चात् मृत असेल त्याचा देह लौकिकाग्नीनें दग्ध करावा. अनाहिताग्नीचा देह गृह्याग्नीनें दग्ध करावा." **त्रिकांडमंडन** तर विकल्प सांगतो–"ज्येष्ठ स्त्री विद्यमान असतां कनिष्ठ स्त्रियेला काम्य किंवा नित्य अग्निहोत्र द्यावयाचें नाहीं. इतर विद्वान् कोणतीही स्त्री मृत असो तिला श्रौताग्नीनें दग्ध करून स्त्री नसेल तर विवाह करून आधान करितात. अथवा स्त्री असेल तर आधानच करितात."

**अत्रेदंतत्त्वं** साग्नेःपत्नीमृतौद्वौपक्षौ पुनर्विवाहेच्छायांपूर्वाग्निभिर्दहेदित्येकःपक्षः भार्यायैपूर्वमारिण्यै-दत्वाग्नीनंत्यकर्मणि पुनर्दारक्रियांकुर्यात्पुनराधानमेवचेतिमनूक्तेः दाहयित्वाग्निहोत्रेणस्त्रियंवृत्तवतींपतिरि-तियाज्ञवल्क्योक्तेश्च पुनर्विवाहाशक्तौनिर्मंथ्येनतांदग्ध्वापूर्वाग्निष्वेवाग्निहोत्रेष्ट्यादिकार्यमित्यन्यः आह्ना-र्येणाहिताग्निंपत्नींचेत्याश्वलायनोक्तेः भरद्वाजोपि निर्मंथ्येनपत्नीमिति पूर्वाग्न्येकदेशेनदहेदितियज्ञ-पार्श्वदेवयाज्ञिकादयः यानिच तस्मादपत्नीकोप्यग्निहोत्रमाहरेदितिश्रुतिः विष्णुः छंदोगपरि-शिष्टंच मृतायामपिभार्यायांवैदिकाग्निंनहित्यजेत् उपाधिनापितत्कर्मयावज्जीवंसमाचरेत् उपाधिर्दर्भकुशप-त्न्यादिः अन्येकुशमयींपत्नींकृत्वातुगृहमेधिनः अग्निहोत्रमुपासंतेयावज्जीवमनुव्रताइत्यपरार्केस्मृत्यंतरात् कात्यायनोपि रामोपिकृत्वासौवर्णींसीतांपत्नींयशस्विनीं ईजेबहुविधैर्यज्ञैःसहभ्रातृभिरच्युतइत्यादीनि

तानिपूर्वाग्निष्वेवाग्निहोत्रादिपराणि नत्वपत्नीकस्याधानार्थानि क्रतुविधीनामाधानाप्रयोजकत्वात् अपत्नीकस्याधानाप्रवृत्तिरिति **मानवपरिशिष्टाच्च**सोमोनभवत्येव अपत्नीकोप्यसोमपइतिश्रुतेः यत्तु **भरद्वाजापस्तंबसूत्रं** दारकर्मणियद्यशक्तआत्मार्थमग्न्याधेयमिति अस्यार्थः पुनर्विवाहाशक्तौयदग्न्याधेयंपूर्वकृतमस्तितदात्मार्थमेव नपत्न्यैदद्यादिति **ब्राह्मणभाष्यापरार्काशार्करामांडारा**दितत्त्वमप्येवं **त्रिकांडमंडन**स्तुपक्षद्वयमाह अन्येप्यपत्नीकस्याधानमाहुस्तदाशयंनविद्मः **वृद्धयाज्ञवल्क्यः** आहिताग्निर्यथान्यायंदग्धव्यस्त्रिभिरग्निभिः अनाहिताग्निरेकेनलौकिकेनापरोजनः **क्रतुः** एवंवृत्तांसवर्णांस्त्रींद्विजातिःपूर्वमारिणीं दाहयेदग्निहोत्रेणयज्ञपात्रैश्चधर्मवित **कारिकायाम्** पत्नीमपिदहेदेवंभर्तुःपूर्वंमृतायदि अनग्निकांदहेदेवंकपालेनहविर्भुजा ।

याचें तत्त्व असें कीं, साग्निकाला पत्नी मृत असतां दोन पक्ष आहेत–पुनः विवाहाची इच्छा असेल तर पहिल्या अग्नींनीं पत्नीचा दाह करावा हा एक पक्ष. कारण, "पूर्वीं मरणाऱ्या स्त्रियेला अंत्यकर्माचेठायीं अग्नि देऊन पुनः विवाह करावा व पुनः आधानही करावें" असें **मनु**वचन आहे. "सुशील स्त्रियेचा पतीनें अग्निहोत्रानें दाह करावा." असें **याज्ञवल्क्य**वचनही आहे. पुनः विवाहाविषयीं सामर्थ्य नसेल तर मंथन करून अग्नि उत्पन्न करून तिचा दाह करून पहिल्या अग्नीवरच अग्निहोत्र, इष्टि इत्यादि करावें, हा दुसरा पक्ष. कारण, "आहिताग्नीनें आहार्य अग्नीनें पत्नीचा दाह करावा" असें **आश्वलायन** वचन आहे. **भरद्वाजही**–"मंथन केलेल्या अग्नीनें पत्नीचा दाह करावा" पूर्व अग्नींतून थोडा घेऊन पत्नीचा दाह करावा, व पहिले अग्नि ठेवावे, असें **यज्ञपार्श्व, देवयाज्ञिक** इत्यादिक सांगतात. आतां जी "तस्मात् कारणात् अपत्नीकानें देखील अग्निहोत्र करावें" अशी **श्रुति** आहे. **विष्णु** व **छंदोगपरिशिष्ट**–"भार्या मृत असतांही श्रौताग्नि टाकूं नये. तें अग्निहोत्रसंबंधी कर्म उपाधीनेंही यावज्जीवपर्यंत करावें." उपाधि म्हणजे सुवर्ण, कुश यांची पत्नी होय. कारण, "इतर गृहस्थ कुशमयी पत्नी करून यावज्जीवपर्यंत अग्निहोत्राची उपासना करितात" असें **अपरार्कांत स्मृत्यंतर**वचन आहे. **कात्यायनही**–"रामानेंही सुवर्णाची सीता पत्नी करून भ्रात्यांसहवर्तमान बहुतप्रकारच्या यज्ञांनीं यजन केलें." इत्यादिक वचनें तीं पूर्व अग्नीचे ठायींच अग्निहोत्रादिविषयक आहेत. अपत्नीकाला आधान करावयास सांगण्याकरितां नाहींत. यज्ञ सांगितल्यावरून आधान करावें असें नाहीं. आणि "अपत्नीकाची आधानाविषयीं प्रवृत्ति नाहीं" असें **मानवपरिशिष्टही** आहे. सोमयाग होत नाहींच. कारण, "अपत्नीक तोही असोमप ( सोमपान न करणारा ) आहे" अशी **श्रुति** आहे. आतां जें **भरद्वाजापस्तंब**सूत्र–"जर भार्याकरण्याविषयीं अशक्त असेल तर आपल्याकरितां अग्न्याधान आहे." त्याचा अर्थ असा–पुनः विवाहाविषयीं अशक्त असेल तर जें अग्न्याधान पूर्वीं केलेलें आहे तें आपल्याकरितांच ठेवावें, पत्नीला देऊं नये. **ब्राह्मणभाष्य, अपरार्क, आशार्क, रामांडार** इत्यादि ग्रंथांचें तत्त्वही असेंच आहे. **त्रिकांडमंडन** तर दोन पक्ष सांगता झाला. **अन्य**ही ग्रंथकार अपत्नीकाला आधान सांगतात, त्यांचा आशय समजत नाहीं. **वृद्धयाज्ञवल्क्य**–"आहिताग्नीचा तीन अग्नींनीं यथाशास्त्र दाह करावा. अनाहिताग्नीचा एक ( गृह्य ) अग्नीनें दाह करावा. इतर मनुष्याचा लौकिकाग्नीनें दाह करावा." **क्रतु**–"चांगल्या वर्तनाची सवर्णा ( आपल्या वर्णाची ) स्त्री पूर्वीं मृत असतां तिचा दाह धर्मवेत्त्या द्विजानें अग्निहोत्रानें व यज्ञपात्रांनीं करावा." **कारिकेंत**–"पत्नी जर भर्त्याच्या आदीं मृत होईल तर तिलाही अशीच अग्निहोत्रानें दग्ध करावी. अग्निरहित असेल ती कपालाग्नीनें दग्ध करावी."

**आशौचप्रकाशेक्रतुः** विधुरंविधवांचैवकपालस्याग्निनादहेत् ब्रह्मचारीयतीचैवदहेदुत्तपनाग्निना तुषाग्निनाचदग्धव्यःकन्यकाबालएवच अग्निवर्णंकपालंतुकृत्वातत्रविनिक्षिपेत् करीषादिततोवह्निर्जातोयः सकपालजः अनुपनीतेयद्यपिजातारण्यग्निःकैश्चिदुक्तस्तथापितस्यकलौनिषिद्धत्वोक्तेरयमेवज्ञेयः **स्मृत्यंतरे** गृहस्थोब्रह्मचारीचविधुरोविधवाःस्त्रियः औपासनश्चोत्तपनस्तुषाग्निस्तुकपालजः **उत्तपनस्तु** दर्भाग्नेरग्निंतुप्रज्वाल्यपुनर्दर्भैस्तुसंयुतः पुनर्दर्भैस्तृतीयोग्निरेषउत्तपनःस्मृतः **यमः** यस्यानयतिशूद्रोग्निंतृणकाष्ठहवींषिच प्रेतत्वंचसदातस्यसचाधर्मेणलिप्यते **देवलः** चंडालाग्निरमेध्याग्निःसूतिकाग्निश्चकर्हिचित् पतिताग्निश्चिताग्निश्चनशिष्टग्रहणोचितः **मनुः** दक्षिणेनमृतंशूद्रंपुरद्वारेणनिर्हरेत् पश्चिमोत्तरपूर्वैस्तुयथासंख्यंद्विजातयः अत्रप्रातिलोम्येनक्रमः पूर्वामुखस्तुनेतव्योब्राह्मणोबांधवैर्गृहात् उत्तराभिमुखोराजावैश्यःपश्चान्मुखस्तथा दक्षिणाभिमुखःशूद्रोनिर्हर्तव्यःस्वबांधवैरित्या**दिपुराणादित्यपरार्के**ः तेनत्रिंशच्छ्लोक्युक्तोनुलोमक्रमोहेयः **आश्वलायनः** ज्येष्ठप्रथमाःकनिष्ठजघन्याआगच्छेयुः ।

**आशौचप्रकाशांत ऋतु**–"विधुर आणि विधवा यांचा कपालाग्नीनें दाह करावा. ब्रह्मचारी व यति यांचा उत्तपनाग्नीनें दाह करावा. कन्या व बालक यांचा तुषाग्नीनें दाह करावा. कपाल अग्नीसारखें लाल करून त्यांत गोंवरी वगैरे घालून झालेला जो अग्नि तो कपालाग्नि होय." अनुपनीताविषयीं जरी जातारणीसंबंधी अग्नि कित्येकांनीं सांगितला आहे तरी तो कलियुगांत निषिद्ध सांगितल्यामुळें हाच ( तुषाग्निच ) जाणावा. **स्मृत्यंतरांत**–"गृहस्थाला औपासनाग्नि, ब्रह्मचाऱ्याला उत्तपनाग्नि, विधुर व विधवा स्त्रिया यांना तुषाग्नि तोच कपालाग्नि होय." उत्तपनाग्नि असा–"दर्भाचीं अग्रें प्रज्वलित करून पुनः दुसरे दर्भ त्याजवर पेटवावे. नंतर त्याजवर पुनः दर्भ पेटवून तिसऱ्या दर्भाचा जो अग्नि तो उत्तपन म्हटला आहे." **यम**–"ज्याचा अग्नि, तृणें, काष्ठें आणि हवि हीं शूद्र आणतो त्याला सर्वदा प्रेतत्व असतें, व तो शूद्र अधर्मानें लिप्त होतो." **देवल**–"चांडालाग्नि, अशुद्धअग्नि, सूतिकाग्नि, पतिताग्नि, आणि चितेचा अग्नि हे शिष्टांना ग्रहण करण्यास उचित नाहींत." **मनु**–"मृतशूद्राला नगराच्या दक्षिणेकडच्या द्वारानें स्मशानांत न्यावा. नगराच्या पश्चिम द्वारानें वैश्यास न्यावा. उत्तर द्वारानें क्षत्रियास न्यावा. आणि ब्राह्मणाला नगराच्या पूर्व द्वारानें स्मशानांत न्यावा." या वचनांत शूद्र, वैश्य, क्षत्रिय, ब्राह्मण असा प्रतिलोम ( उलट ) क्रम आहे. कारण, "मृत झालेला ब्राह्मण बांधवांनीं घरांतून पूर्वाभिमुख न्यावा. क्षत्रिय उत्तराभिमुख न्यावा. वैश्य पश्चिमाभिमुख न्यावा. आणि शूद्र बांधवांनीं दक्षिणाभिमुख न्यावा" असें **आदिपुराण**वचन आहे, असें **अपरार्क** सांगतो. यावरून **त्रिंशच्छ्लोकींत** अनुलोम क्रम सांगितला तो त्याज्य आहे. **आश्वलायन**–"स्मशानांत जातेवेळीं ज्येष्ठ प्रथम व कनिष्ठ मागाहून असे जावे."

**आधानोत्तरंद्वितीयविवाहेकृतेयजमानमरणेश्रौतस्मार्ताग्न्योःसंसर्गः बौधायनसूत्रे अथयद्याहिताग्निर्द्वेभार्येविंदेतप्राक्संयोगान्म्रियेतौपासनंसंपरिस्तीर्याज्यंविलाप्यचतुर्गृहीतंगृहीत्वासमिद्वत्यग्नौजुहोति संमितंसंकल्पेथामितिमिंदाहुतीर्व्याहृतीश्चहुत्वाथैतमग्निमयंतेयोनिर्ऋत्वियइतिसमिधिसमारोप्यगार्हपत्येसमिधमभ्यादधातिभवतंनःसमनसावितिगार्हपत्यआज्यंविलाप्यचतुर्गृहीतंगार्हपत्येजुहोत्यग्नावग्निश्चरतिप्रविष्टइत्यपरंचतुर्गृहीत्वाचित्तिःस्रुगितिसंग्रहंजुहोत्यथगार्हपत्येस्रुवाहुतीर्जुहोतिब्राह्मणएकहोतेतिदशभिरथप्राचीनावीत्यन्वाहार्यपचनेजुहोतियेसमानायेसजाताइतिद्वाभ्यामथतत्रैवस्रुवाहुतिंजुहोत्यग्नयेकव्यवाहनायस्विष्टकृतेस्वधानमःस्वाहेत्यथयज्ञोपवीतीद्वादशगृहीतेनस्रुचंपूरयित्वापुरुषसूक्तेनाहवनीयेजुहोत्यथस्रुवाहुतीर्जुहोत्यग्नयेविविचयेस्वाहाग्नयेव्रतपतयेग्नयेपवमानायाग्नयेपावकायाग्नयेशुचयेस्वाहाग्नयेपथिकृतेस्वाहाग्नयेतंतुमतेग्नयेवैश्वानरायेत्यथचतुर्गृहीतंजुहोतिमनोज्योतिरित्यतऊर्ध्वंपैतृकंकर्मप्रतिपद्यतेइति ।**

आधानोत्तर दुसरा विवाह केला असतां यजमान मरेल तर श्रौताग्नि व स्मार्ताग्नि यांचा संसर्ग करावा. तो असा–**बौधायनसूत्रांत**–"आतां आहिताग्नीनें दोन भार्या केल्या व त्यांच्या अग्नींचा संयोग होण्यापूर्वी जर यजमान मृत होईल तर त्याच्या औपासनाग्नीला परिस्तरण करून आज्य ऊन करून चार वेळां स्रुचींत घेऊन प्रज्वलित अग्नींत होम करावा. व मिंदाहुती व व्याहृती यांचा होम करून नंतर त्या अग्नीचा 'अयंतेयोनिर्ऋत्विय०' ह्या मंत्रानें समिधेवर समारोप करून गार्हपत्य अग्नींत ती समिध 'भवतं नः समनसौ०' ह्या मंत्रानें द्यावी. नंतर गार्हपत्यांत घृत ऊन करून चार वेळां घेऊन 'अग्नावग्निश्चरतिप्रविष्ट०' ह्या मंत्रानें गार्हपत्यांत होम करावा. पुनः चार वेळां घृत घेऊन 'चित्तिःस्रुग्०' या मंत्रानें संग्रह होम करावा. नंतर 'ब्राह्मण एक होता०' ह्या दहा मंत्रांनीं गार्हपत्यांत स्रुवाहुतींचा होम करावा. नंतर प्राचीनावीती करून 'येसमाना', 'येसजाता' ह्या दोन मंत्रांनीं अन्वाहार्यपचनाग्नींत होम करावा. नंतर तेथेंच 'अग्नयेकव्यवाहनाय स्विष्टकृते स्वधानमः स्वाहा, ह्या मंत्रानें स्रुवाहुतीचा होम करावा. नंतर यज्ञोपवीती करून बारा वेळ घृत घेऊन स्रुचा भरून पुरुषसूक्तानें आहवनीयांत होम करावा. नंतर स्रुवाहुतींचा होम करावा. तो असा–'अग्नये विविचये स्वाहा, अग्नये व्रतपतये स्वाहा, अग्नये पवमानाय, अग्नये पावकाय, अग्नये शुचयेस्वाहा, अग्नये पथिकृतेस्वाहा, अग्नये तंतुमते, अग्नये वैश्वानराय, नंतर चार वेळां घृत घेऊन 'मनोज्योति०' या मंत्रानें होम करावा. इतकें झाल्यावर और्ध्वदेहिक कर्म प्राप्त होतें तें करावें."

**आहिताग्नौविदेशमृतेपथिकृतीष्टिर्मृताग्निहोत्रंतद्दाहःपात्रयोजनंचकल्पसूत्रादिभ्योस्मत्पितामहकृतपद्धतेश्च ज्ञेयमितिबहुवक्तव्येप्युपरम्यते स्मार्ताग्नेस्तुउक्तं मदनरत्नेछंदोगपरिशिष्टेच दुर्बलंस्नापयित्वाशुद्धचैलाभिसंवृतं दक्षिणाशिरसंभूमौबर्हिष्मत्यांनिवेशयेत् घृतेनाभ्यक्तमाप्लाव्यशुद्धवस्त्रोपवीतिनं चंदनोक्षितसर्वांगंसुमनोभिर्विभूषयेत् हिरण्यशकलान्यस्यक्षिप्त्वाछिद्रेषुसप्तसु मुख्येष्वथापिधायैनंनिर्हरेयुःसुतादयः आमपात्रेन्नमादायप्रेतमग्निपुरःसरं एकोनुगच्छेत्तस्याधमर्धपथ्युत्सृजेद्भुवि ऊर्ध्वमाद्दहनंकार्यमासीनोदक्षिणामुखः**

सव्यंजान्वाच्यशनकैःसतिलंपिंडदानवत् अथपुत्रादिराप्लुत्यकुर्याद्दारुचयंमहत् तत्रोत्तानंनिपात्यैनंदक्षिणाशिरसंमुखे आज्यपूर्णस्रुवंदद्याद्दक्षिणाग्रांनसिस्रुचं पादयोरधरांप्राचीमरणीमुरसीतरां पार्श्वयोःशूर्पचमसौसव्यदक्षिणयोःक्रमात् मुसमेतुन्यसेन्न्युब्जमंतरूर्वोरुलूखलं चात्रोविलीढमत्रैवअग्नयेरप्ययंविधिः अपसव्येन कृत्वैतद्वाग्यतःपितृदिङ्मुखः अथाग्निंसव्यमावृत्कोदद्याद्दक्षिणतःशनैः अस्मात्त्वमधिजातोसित्वदयंजायतांपुनः असौस्वर्गायलोकायस्वाहेतिपरिकीर्तयेत् तथा एवमेवाहिताग्नेश्चपात्रन्यासादिकंभवेत् कृष्णाजिनादिकंचात्रविशेषोध्वर्युचोदितः तत्रैव अनयैवावृतानारीदग्धव्यायाव्यवस्थिता अग्निप्रदानमंत्रोस्यानप्रयोज्यइति स्थितिः इदंछंदोगानामेव पात्रन्यासोक्तेरुत्तानदेहत्वंसाग्निपरं निरग्निस्तुपुमानधोमुखः स्त्रीतूत्तानादाह्यासगोत्रजैर्गृहीत्वातुचितामारोप्यतेशवः अधोमुखोदक्षिणादिक्चरणस्तुपुमानिति उत्तानदेहानारीतुसपिंडैरपिबंधुभिरित्यादिपुराणादितिशुद्धितत्त्वहारलतादयः उत्तरशिरस्त्वंसामगेतरपरं वाराहेत्वग्निदानेऽन्योमंत्रः कृत्वातुदुष्कृतंकर्मजानतावाप्यजानता मृत्युकालवशंप्राप्यनरंपंचत्वमागतं धर्माधर्मसमायुक्तंलोभमोहसमावृतं दहेयंसर्वगात्राणिदिव्यांल्लोकानसगच्छतु ज्वलमानंमहावह्निंशिरःस्थानेप्रदापयेत् चतुर्वर्णेषुसंस्थानमेवंभवतिपुत्रके ।

आहिताग्नि विदेशांत मृत असतां पथिकृति इष्टि, मृताचें अग्निहोत्र, त्याचा दाह, पात्रयोजना हें सारें कल्पसूत्रादिकांतून व आमच्या पितामहांनीं केलेल्या पद्धतींतून जाणावें, मी पुष्कळ सांगावयाचें आहे तरी पुरे करितों. स्मार्ताग्नीला तर सांगतो **मदनरत्नांत** व **छंदोगपरिशिष्टांत**-"मृताला स्नान घालून शुद्ध वस्त्रानें वेष्टित करून दक्षिणेकडे मस्तक करून कुशयुक्त भूमीवर ठेवावा. घृत अंगाला लावून स्नान घालून शुद्ध वस्त्र व उपवीत घालून सर्वांगावर चंदन शिंपून पुष्पांनीं भूषित करावा. प्रेताच्या मुख, नासिका, कर्ण, डोळे या सात छिद्रांत सुवर्णाचे तुकडे घालून नंतर त्याला आच्छादित करून पुत्रादिकांनीं स्मशानांत न्यावा. अग्नि पुढें व त्याच्या मागाहून प्रेत न्यावें. अपक्व पात्रांत अन्न घेऊन एकानें प्रेताच्या मागाहून जावें. त्यांतील अर्धें अन्न अर्ध्यामार्गांत टाकावें पुढचें दहनापर्यंत कृत्य दक्षिणेकडे तोंड करून बसून डावा गुडघा भूमीवर टेंकून पिंडदानाप्रमाणें तिलसहित करावें. प्रेत स्मशानांत नेल्यावर पुत्रादिकांनीं स्नान करून काष्ठांचा मोठा ढीग रचावा. त्या काष्ठांवर प्रेत उताणें दक्षिणदिशेस मस्तक करून ठेवावें. प्रेताच्या मुखांत घृतानें पूर्ण भरलेला स्रुवा द्यावा. नाकांत दक्षिणेस अग्र करून स्रुचा द्यावी. खालची अरणी दोन पायांवर द्यावी. उरावर वरची अरणी द्यावी. डाव्या पार्श्वभागीं सूप आणि उजव्या पार्श्वभागीं चमसपात्र द्यावें. मांड्यांच्या मध्यभागीं खालीं तोंड केलेलें उखळ ठेवावें. (१)······················ वाणीचें नियमन करून दक्षिणदिशेस मुख करून हें सारें प्राचीनावीतीनें करावें नंतर दक्षिणदिशेकडे अग्नि लावून अप्रदक्षिण हळूहळू अग्नि सभोंवतीं लावावा व मंत्र म्हणावा तो असा-'अस्मात्त्वमधिजातोसि त्वदयं जायतां पुनः । असौ स्वर्गाय लोकाय स्वाहा' याचा उच्चार करावा." तसेंच-"अग्निहोत्र्याच्या प्रेतावर पात्रें ठेवणें वगैरे कृत्य असेंच समजावें. याच्या प्रेतावर कृष्णाजिन वगैरे विशेष अध्वर्यूनें सांगितला असेल तो समजावा. तेथेंच-सुशील जी स्त्री तिचा दाह अशाच रीतीनें करावा. स्त्रियेच्या दाहाविषयीं अग्निदानमंत्राचा प्रयोग करूं नये, अशी शास्त्रमर्यादा आहे." हें वचन छंदोगांचे शाखेलाच लागू आहे. पात्रांचें स्थापन सांगितल्यामुळें प्रेतशरीर उताणें असावें, हें अग्निमान् असेल त्याजविषयीं समजावें. निरग्निक असेल तर पुरुष अधोमुख, आणि स्त्री उताणी जाळावी. कारण, "गोत्रजांनीं पुरुष शव घेऊन अधोमुख करून दक्षिणदिशेस पाय करून चितेवर ठेवावा. आणि सपिंड व बांधव यांनीं स्त्रियेचा देह उताणा करून चितेवर ठेवावा" असें **आदिपुराण**-वचन आहे, असें **शुद्धितत्त्व, हारलता** इत्यादि ग्रंथकार सांगतात. उत्तर दिशेस मस्तक करणें हें सामगव्यतिरिक्तांस समजावें. **वाराहांत** तर अग्निदानाविषयीं दुसरा मंत्र सांगितला आहे, तो असा-'कृत्वा तु दुष्कृतं कर्म जानता वाप्यजानता । मृत्युकालवशं प्राप्य नरं पंचत्वमागतं । धर्माधर्मसमायुक्तं लोभमोहसमावृतं । दहेयं सर्वगात्राणि दिव्यान् लोकान् स गच्छतु ।' "पेटणारा मोठा अग्नि मस्तकस्थानीं द्यावा. चारी वर्णांच्या प्रेतांविषयीं अशी व्यवस्था होते."

अत्र**क्रियानिबंधेगारुडे**षट्पिंडदानमुक्तं मृतस्योत्क्रांतिसमयेषट्पिंडान्क्रमशोददेत् मृतिस्थानेतथा द्वारिचत्वरेताक्ष्यंकारणात् विश्रामेकाष्ठचयनेतथासंचयनेचषट् तथा आदौदेयास्तुषट्पिंडादशदेयादशाहिकाः स्थानेचार्धपथेतीतेचितायांशवहस्तके श्मशानवासिभूतेभ्यःषष्ठंसंचयनेतथा ततः त्वंभूतकृज्जगद्योनेस्त्वंलोकपरिपालकः उक्तःसंहारकस्तस्मादेनंस्वर्गंमृतंनय इत्यग्निंदत्वाऽस्मात्त्वमितिमंत्रेणाधेदग्धेआज्याहुतिरुक्ता आहिताग्नौ**पराशरः** शम्यांशिश्नेविनिक्षिप्यअरणीमुष्कयोरपि जुहूंचदक्षिणेहस्तेवामेतूपभृतंन्यसेत् शिश्नेतूलू-

खलंदद्यात्पृष्ठेचमुसलंन्यसेत् उरसिक्षिप्यदृषदंतंडुलाज्यतिलान्मुखे श्रोत्रेचप्रोक्षणींदद्यादाज्यस्थालींचचक्षुषोः कर्णेनेत्रेमुखेघ्राणेहिरण्यशकलंन्यसेत् अग्निहोत्रोपकरणमशेषंतत्रनिक्षिपेत् ।

या स्थळीं **क्रियानिबंधांत गारुडांत** सहा पिंडांचें दान सांगितलें आहे-"मृताच्या प्राणोत्क्रमणसमयीं सहा पिंड क्रमानें द्यावे. ते असे-मरणस्थानीं, घराच्या द्वारांत, चवाठ्यावर, विश्रांति करण्याच्या स्थळीं, काष्ठांचा ढीग केला असेल त्या ठिकाणीं, आणि संचयनाचे ठिकाणीं, असे सहा पिंड द्यावे." तसेंच-"पहिल्या दिवशीं सहा पिंड द्यावे. आणि दहा दिवसांचे दहा पिंड द्यावे. मरणस्थानीं, अर्ध्या मार्गांत, चितेचे ठायीं, शवाच्या हातावर, स्मशानवासी भूतांसाठीं इतक्या ठिकाणीं एक एक पिंड देऊन सहावा पिंड संचयनाचे ठिकाणीं द्यावा." तदनंतर-'त्वं भूतकृज्जगद्योने त्वं लोकपरिपालकः । उक्तः संहारकस्तस्मादेनं स्वर्गं मृतं नय.' ह्या मंत्रानें अग्नि देऊन अर्धदग्ध झालें असतां 'अस्मात्त्वं०' ह्या मंत्रानें आज्याहुति सांगितली आहे. अग्निहोत्र्याविषयीं **पराशर** सांगतो-"शिश्नाचेठायीं शमी ठेवावी. दोन अरणी दोन वृषणांवर ठेवाव्या. दक्षिण हस्तांत जुहू आणि वामहस्तांत उपभृत् ठेवावी. शिश्नाचे ठायीं उखळ व पाठीवर मुसळ ठेवावें. उरावर पाषाण, मुखांत तांदूळ, आज्य व तिल घालावे. कर्णाचे ठायीं प्रोक्षणी द्यावी. नेत्रांवर आज्यस्थाली ठेवावी. कानांत, नेत्रांत, मुखांत आणि नाकांत सुवर्णाचे तुकडे ठेवावे. याप्रमाणें अग्निहोत्राचीं सारीं उपकरणें त्या प्रेतावर ठेवावीं."

**प्रचेताः** स्नानंप्रेतस्यपुत्राद्यैर्वस्त्राद्यैःपूजनंततः नग्नदेहंदहेन्नैवकिंचिद्देयंपरित्यजेत् **यमः** प्रेतंदहेच्छुभैर्गंधैःस्नापितंस्रग्विभूषितं **आश्वलायनसूत्रे** संस्थितेप्रेतालंकारान्कुर्वंतिकेशश्मश्रुलोमनखानिवापयंतिनलदेनानुलिंपंतिनलदमालांप्रतिमुंचंतीति **माधवीयेब्राह्मे** दरिद्रोपिनदग्धव्योनग्नःकस्यांचिदापदि तथा निःशेषस्तुनदग्धव्यःशेषंकिंचित्त्यजेन्नरः दाहकालेग्निनाशेतु **मदनरत्नेयज्ञपार्श्वः** यजमानेमृतेकापिचितादौवाप्रवेशिते वर्षाद्यभिहतेग्नौतुकथंप्रेतविकल्पना शेषंदग्ध्वाप्रदग्धेषुनिर्मथ्यैवतुकारयेत् अथपर्णशरादिदाहेनाग्निनाशेपश्चात्तद्देहलाभे**मदनरत्नेब्राह्मे** अथपर्णशरेदग्धेपात्रन्यासेकृतेसति गतेष्वग्निषुतद्देहोयदृच्छ्यैवलभ्यते क्वचित् तदार्धदग्धकाष्ठानितानिनिर्मथ्यतंदहेत् यद्यर्धदग्धकाष्ठंतुतदीयंवैनलभ्यते तदातदस्थिखंडंतुनिक्षिप्तव्यं महाजले ।

**प्रचेता**-"पुत्रादिकांनीं प्रेताला स्नान घालून तदनंतर वस्त्रादिकांनीं पूजन करावें. नग्न देहाचें दहन करूं नये. कांहीं देय टाकावें." **यम**-"शुभकारक गंधोदकांनीं प्रेताला स्नान घालून मालांनीं भूषित करून त्याचा दाह करावा." **आश्वलायनसूत्रांत**-"मृत झाला असतां प्रेताला अलंकार करितात. त्याचे केश, श्मश्रु, लोम व नखें यांचें वपन करितात. त्याला वाळ्याची उटी लावितात. व वाळ्याची माळ घालितात." **माधवीयांत ब्राह्मांत**-"दरिद्री असून कोणतीही आपत्ति असली तरी नग्नाचा ( वस्त्ररहिताचा ) दाह करूं नये. तसेंच निःशेष दाह करूं नये, शेष कांहीं तरी टाकावें." दाहकालीं अग्नि नष्ट झाला असतां **मदनरत्नांत यज्ञपार्श्व** सांगतो-"यजमान मृत असून त्याला चितेवर ठेविला असतां पर्जन्यादिकेंकरून अग्नि नष्ट झाला असेल तर प्रेताची व्यवस्था कशी करावी? मंथन करून अग्नि करावा. यज्ञोपकरणें दग्ध होऊन प्रेत अदग्ध असेल तरी मंथन करूनच अग्नि करावा." आतां पर्णशरादि दाह करून अग्नि नष्ट झाला असून पश्चात् देह मिळाला असतां **मदनरत्नांत ब्राह्मांत**-"आतां पर्णशर दाहाच्या वेळीं पात्रें वगैरे सर्व जाळून अग्नि नष्ट झाले असून पश्चात् जर त्याचा देह क्वचित् मिळेल तर अर्धीं दग्ध काष्ठें मंथन करून त्या अग्नीनें देहाचा दाह करावा. तत्संबंधीं अर्धदग्धकाष्ठ जर न मिळेल तर त्या वेळीं त्याच्या अस्थींचा तुकडा मोठ्या उदकांत टाकावा."

दंपत्योरेकदामृतौविशेषमाह**आपस्तंबः** तथैवप्रेतेसहैवपितृमेधोद्विवचनलिंगान्मंत्रान्संधारयंति पितृमेधो दाहांतंकर्म दाहांतमेकतंत्रत्वमिति**बौधायनोक्तेः** अस्थिसंचयनमप्येकं उदकपिंडदानादिपृथगेव सहगमनेप्येवं तदाह**मदनरत्नेभाष्यार्थसंग्रहकारः** एककालमृतौभार्याभर्तारौचयदिचेत्तयोः तंत्रेणदहनंकुर्यात्पिंडश्राद्धंपृथक्पृथक् एककालेमृतौजायापतीयदितदापितुः विभज्याग्निक्रियांकुर्यादितियत्तदसांप्रतं दाहांतमेकतंत्रत्वमितियाज्ञिकसंमतं मृतंपतिमनुव्रज्ययानारीज्वलनंगता अस्थिसंचयनांतेस्याभर्तुःसंस्कारएवहि कीकसानांतुसंस्कारोन्यायसिद्धोपियोमतः एककालेमृतेप्येवंकीकसानांविधिःस्मृतः नवश्राद्धंसपिंडांतंभिन्नकालमृतौयथा **कपर्दिकारिकापि** मृतेभर्तरितद्दाहात्प्राक्पत्नीम्रियतेयदि पत्यांवाप्राक्प्रमीतायां दाहादर्वाक्पतिर्मृतः तत्रतंत्रेणदाहःस्यान्मंत्रेपुद्वित्वमूह्यते कीकसानांतुसंस्कारःपृथगेवतयोर्भवेत् एकाहमृत्यौ

**युगपन्नवश्राद्धादिकंतयोः मृतंपतिमनुव्रज्यपत्नीचेदनलंगता तत्रापिदाहस्तंत्रेणपृथगस्थिक्रियाभवेत् अस्थिसंचयनपृथक्त्वेविकल्पः सहगमनेसर्वत्रपाकैक्यमाह प्रचेताः एकचित्यांसमारूढौम्रियेतेदंपतीयदि तंत्रेणश्रपणंकुर्यात्पृथक्पिंडंसमाचरेत् ।**

दंपती एका वेळीं मृत असतां विशेष सांगतो **आपस्तंब**-"दंपती असेच मृत असतां पितृमेध ( दाहांत कर्म ) दोघांचें बरोबरच होतें. या ठिकाणीं मंत्रांचा द्विवचनेंकरून उच्चार करितात." या वचनांत पितृमेध म्हणजे दाहांत कर्म होय. कारण, "दाहांतकर्माचें एकतंत्र करावें" असें **बौधायन**वचन आहे. अस्थिसंचयनही दोघांचें एकच आहे. उदक, पिंडदान इत्यादि वेगवेगळेंच करावें. स्त्रियेचें सहगमन असतांही असेंच समजावें, तें सांगतो **मदनरत्नांत भाष्यार्थसंग्रहकार**— "भार्या आणि पति दोघे असामी जर एककालीं मृत होतील तर त्या दोघांचा दाह तंत्रानें करावा. पिंडदान व श्राद्ध वेगवेगळें करावें. जर एककालीं भार्या व पति मृत असतील तर त्या वेळीं अग्नीचा विभाग करून पित्याची क्रिया करावी, असें जें मत तें अयुक्त आहे." दाहांतकर्म एकतंत्रानें करावें, हें याज्ञिकांना संमत आहे. "मृत झालेल्या पतीच्या मागांहून जाऊन जी पत्नी अग्निप्रवेश करिते तिचा अस्थिसंचयनापर्यंत संस्कार भर्त्याच्याच संस्कारांत होतो, निराळा नाहीं. अस्थींचा संस्कार न्यायसिद्ध जो तोही एककालीं मृत असतांही असाच विधि सांगितला आहे. नवश्राद्ध व सपिंडीकरणापर्यंत भिन्नकालीं मृत असतां जसें होतें तसें एककालीं मृत असतांही होतें." **कपर्दिकारिका**ही—"भर्ता मृत असतां त्याच्या दाहापूर्वी जर पत्नी मृत होईल तर अथवा पत्नी पूर्वी मृत असतां तिच्या दाहाच्या पूर्वी जर पति मृत होईल तर त्या दोघांचा तंत्रानें दाह होतो. मंत्रांचे ठिकाणीं द्विवचनाचा ऊह करावा. त्या दोघांचा अस्थींचा संस्कार वेगवेगळाच होतो. एक दिवशीं दोघे मृत असतां त्या दोघांचें नवश्राद्धादिक एकदम होतें. मृत झालेल्या पतीच्या मागांहून जाऊन पत्नी जर अग्नींत प्रवेश करील तर त्या वेळीं देखील दाह तंत्रानें होतो. व अस्थिक्रिया वेगवेगळी होईल." ह्या वरील वचनावरून अस्थिसंचयन वेगळें करण्याविषयीं विकल्प होतो. सहगमन असतां सर्वत्र ठिकाणीं पाक एक सांगतो **प्रचेता**-"एक चितीवर आरोहण करून दंपती ( स्त्री व पुरुष ) मृत होतील तर तंत्रानें पाक करून वेगवेगळा पिंड द्यावा."

**अथोदकदानं वसिष्ठः** शरीरमग्नौसंयोज्यानवेक्षमाणाअपोभ्यवयंतिसव्योत्तराभ्यांपाणिभ्यामुदकक्रियांकुर्वंत्ययुग्मं **आपस्तंबः** मातुश्चयोनिसंबंधेभ्यःपितुश्चासप्तमात्पुरुषाद्यावतांवासंबंधोज्ञायतेतेषांप्रेतेषूदकक्रियेति **याज्ञवल्क्यः** सप्तमाद्दशमाद्वापिज्ञातयोभ्युपयंत्यपः अपनःशोशुचदघमनेनपितृदिङ्मुखाः सकृत्प्रसिंचंत्युदकंनामगोत्रेणवाग्यताः सप्तमाद्दशमाद्वादिवसादर्वागिति **विज्ञानेश्वरः कातीयास्तु** सप्तमाद्दशमाद्वापुरुषादित्याहुः सप्तमाद्दशमाद्वापुरुषात्समानग्रामवासेयावत्संबंधमनुस्मरेयुरिति **पारस्करोक्तेः** मंत्रस्नानांगमेवेति **हेमाद्रिः प्रचेताः** प्रेतस्यबांधवायथावृद्धमुदकमवतीर्यनोद्धर्षयेयुरुदकांतेप्रसिंचेयुरपसव्ययज्ञोपवीतवाससोदक्षिणामुखाब्राह्मणस्योदङ्मुखाःप्राङ्मुखाश्चराजन्यवैश्ययोः सएव नदीकूलंततोगत्वेत्युक्त्वा सचैलस्तुततःस्नात्वाशुचिःप्रयतमानसः पाषाणंततआदायविप्रेदद्याद्दशांजलीन् द्वादशक्षत्रियेदद्याद्वैश्येपंचदशस्मृताः त्रिंशच्छूद्रायदातव्यास्ततस्तुप्रविशेद्गृहं ततःस्नानंपुनःकार्यंगृहशौचंचकारयेत् प्रेतस्नानेविशेषः **शुद्धितत्त्वे आदित्यपुराणे** आदौवस्त्रंचप्रक्षाल्यतेनैवाच्छादितस्ततः कर्तव्यंतैःसचैलंतुस्नानंसर्वमलापहं पूर्वपरिहितंवस्त्रंप्रक्षाल्यपुनःपरिधायस्नायादित्यर्थः अपनइतिमंत्रेणवामहस्तानामिकयाजलालोडनं अवतरणेवृद्धपुरःसरत्वोक्तेर्यथाबालंपुरस्कृत्येतिबौधायनीयंजलादुत्थानपरमिति **हारलतादयः आश्वलायनः** सव्यावृतोव्रजंत्यनीक्षमाणायत्रोदकमवहद्भवतितत्प्राप्यसकृदुन्मज्ज्यैकांजलिमुत्सृज्यतस्यगोत्रंनामगृहीत्वेति प्रचेतसान्वहमंजलित्रयमप्युक्तं त्रिःप्रसेकंकुर्युःप्रेतस्तृप्यत्विति तथा दिनेदिनेंऽजलीन्पूर्णान्प्रदद्यात्प्रेतकारणात् तावद्वृद्धिश्चकर्तव्यायावत्पिंडःसमाप्यते एकवृद्धिस्त्रिकवृद्धिर्वेत्यर्थः **मदनरत्ने भरद्वाजगृह्ये** तुद्विकवृद्धिरप्युक्ता आशौचांतंप्रदद्यात्तुप्रेतपुत्रस्तिलांजलीन् प्रथमेह्निसकृद्दद्यात्पिंडयज्ञावृतादिवा त्रींश्चदद्याद्द्वितीयेह्नितृतीयेपंचएवच चतुर्थेसप्तसंख्यांस्तुपंचमेनवचोत्सृजेत् षष्ठेह्निचैकादशकाःसप्तमेतुत्रयोदश अष्टमेपंचदशकानवमेदशसप्तच एकोनविंशतिंचाप्रेशतांजलिमतंस्मृतं केचिद्दशांजलीन्प्रोचुःकेचिदाहुःशतांजलीन् पंचपंचाशतंप्रथमेदेशाल्लोकव्यवस्थया ।

## आतां उदकदान सांगतो—

**वसिष्ठ**—"प्रेताला अग्नि देऊन त्याजकडे न पाहतां उदकाजवळ जातात, आणि डाव्या व उजव्या दोन हातांनीं उदकांजलि विषम देतात." **आपस्तंब**—"मातेचे योनिसंबंधीं व पित्याचे सात पुरुषांचे आंतील सपिंड अथवा मातेचा व पित्याचा संबंध ज्यांचा माहीत असेल ते मृत असतां त्यांना उदकदान करावें." **याज्ञवल्क्य**—"सातव्या किंवा दहाव्या दिवसाचे आंत ज्ञाति दक्षिणदिशेस मुख करून 'अपनः शोशुचदघं०' या मंत्रानें उदकाजवळ जातात व नामगोत्राचा उच्चार करून एकवार उदक देतात." याज्ञवल्क्यवचनांत 'सप्तमात् दशमात् वा' याचा अर्थ—सातव्या किंवा दहाव्या दिवसाचे आंत, असा **विज्ञानेश्वर** सांगतो. **कातीय** तर-सातव्या किंवा दहाव्या पुरुषाचे आंतील जे मृत असतील त्यांना, असा अर्थ करितात. कारण, "सातव्या किंवा दहाव्या पुरुषापर्यंत एका गांवांत वास असतां जोंपर्यंत संबंधाचें स्मरण असेल तोंपर्यंत मृतांना उदक द्यावें." असें **पारस्कर**वचन आहे. उदकदान हें मंत्रस्नानाचें अंगच आहे, असें **हेमाद्रि** सांगतो. **प्रचेता**—"प्रेताचे बांधवांनीं वृद्धांना पुढें करून सर्वांनीं उदकांत उतरून त्या ठिकाणीं उदक उडवूं नये; उदकाचे कडेस येऊन यज्ञोपवीत व वस्त्रें अपसव्य ( उजव्या खांद्यावर ) करून दक्षिणदिशेस मुख करून ब्राह्मणाला उदक सेचन करावें. उत्तरेस मुख करून क्षत्रियाला व पूर्वेस मुख करून वैश्याला उदक सेचन करावें." तोच **प्रचेता**—तदनंतर नदीच्या तीरीं जाऊन असें बोलून सांगतो—"तदनंतर वस्त्रसहित स्नान करून शुद्ध होऊन अंतःकरण स्वस्थ करून त्या ठिकाणांतून पाषाण ( दगड ) घेऊन त्याजवर ब्राह्मणाला दहा अंजलि द्यावे. क्षत्रियाला बारा द्यावे. वैश्याला पंधरा द्यावे. शूद्राला तीस द्यावे. तदनंतर घरांत प्रवेश करावा. तदनंतर पुनः स्नान करून गृहशुद्धि करावी." प्रेतस्नानाविषयीं विशेष सांगतो-**शुद्धितत्त्वांत आदित्यपुराणांत**—"पूर्वी परिधान केलेलें वस्त्र धुवून तें परिधान करून पुत्रादिकांनीं सर्व मलनाशक सचैल स्नान करावें." 'अपनःशोशुचदघं०' या मंत्रानें डाव्या हाताच्या अनामिका अंगुलीनें उदकाचें आलोडन करावें. वरील **प्रचेताचे** वचनांत 'वृद्धपूर्वक उदकांत उतरावें' असें सांगितल्यावरून, **बौधायन**वचनांत 'बालकाला पुढें करून' असें सांगितलें तें उदकांतून वर येण्याविषयीं समजावें, असें **हारलता** इत्यादि ग्रंथकार सांगतात. **आश्वलायन**—"प्रेताला अग्नि देऊन त्याला डावीकडे करून त्याजकडे न पाहतां ज्या ठिकाणीं उदक स्थिर आहे त्या ठिकाणीं जाऊन एकदां बुडी मारून त्या प्रेताचे नामगोत्राचा उच्चार करून एक अंजलि द्यावा." **प्रचेतानें** दररोज तीन अंजलिही सांगितले आहेत-प्रेतस्तृप्यतु, असें म्हणून तीन वेळा पाणी द्यावें. तसेंच "दररोज प्रेताकरितां पूर्ण अंजलि द्यावे. जोंपर्यंत पिंड ( दहावा ) समाप्त होईं तोंपर्यंत दररोज एक एक किंवा तीन तीन अंजलि वाढवावे." **मदनरत्नांत भरद्वाजगृह्यांत** तर-दोन दोन अंजलिही वाढवावे, असें सांगितलें आहे—"आशौच समाप्त होईपर्यंत प्रेतपुत्रानें तिलांजलि द्यावे. प्रथम दिवशीं एक अंजलि द्यावा. दुसऱ्या दिवशीं तीन अंजलि द्यावे. तिसऱ्या दिवशीं पांच द्यावे. चवथ्या दिवशीं सात द्यावे. पांचव्या दिवशीं नऊ द्यावे. सहाव्या दिवशीं अकरा द्यावे. सातव्या दिवशीं तेरा द्यावे. आठव्या दिवशीं पंधरा द्यावे. नवव्या दिवशीं सतरा द्यावे. दहाव्या दिवशीं एकोणीस द्यावे. याप्रमाणें शंभर अंजलि द्यावे असें मत आहे. कितीएक पंडित दहा अंजलि सांगतात. कितीएक शंभर अंजलि सांगतात. इतर पंडित पंचावन्न अंजलि सांगतात. हे आपापल्या शाखेंत उक्त व्यवस्थेनें सांगतात."

**छंदोगपरिशिष्टे** अथानवेक्षयन्पापःसर्वेंचैवशवस्पृशः गोत्रनामपदांतेसुतर्पयामीत्यनंतरं दक्षिणाग्रान्कुशान्कृत्वासतिलंतुपृथक्पृथक् **विष्णुपुराणे** सपिंडीकरणंयावदृजुदर्भैःपितृक्रिया सपिंडीकरणादूर्ध्वंद्विगुणैर्विधिवद्भवेत् **रामायणे** इदंपुरुषशार्दूलविमलंदिव्यमक्षयं पितृलोकेषुपानीयंमद्दत्तमुपतिष्ठतां दानवाक्येविकल्पः **याज्ञवल्क्यः** कामोदकंसखिप्रत्तास्वस्रीयश्वशुरार्त्विजां कामइच्छा प्रेततृप्तीच्छायांदेयमन्यथानेत्यर्थः **शंखपारस्करौ** आचार्येचैवंमातामहयोश्चस्त्रीणांचाप्रत्तानांकुर्वीरंस्ताश्चतेषामितिद्विवचनात् मातामह्याअपि **शंखलिखितौ** उदकक्रियाकामंश्वशुरमातुलयोःशिष्येसहाध्यायिनिराजनिचेति **वृद्धमनुः** क्लीबाद्यानोदकंकुर्युस्तेनात्रात्याविधर्मिणः गर्भभर्तृद्रुहश्चैवसुराप्यश्चैवयोषितः **याज्ञवल्क्यः** नब्रह्मचारिणः कुर्युरुदकंपतितास्तथा **षडशीतौ** स्वीयाचारादपिभ्रष्टाःपतितायेचदूषिताः नकुर्युरुदकंतेवैतेभ्योप्यन्येनचैवहि **मदनरत्नेहारीतः** पतितानामवृद्धानांचरंतीनांचकामतः प्रत्तानांचैवकन्यानांनिवर्त्यासलिलक्रिया **अपरार्केशंखलिखितौ** अपपात्रितस्यरिक्थपिंडोदकानिव्यावर्तंते अपपात्रितःकृतघटस्फोटः तस्यापिसंग्रहविधौकृतेआशौचोदकादिकुर्यादेवेत्याशौचप्रकाशः ।

**छंदोगपरिशिष्टांत**—"प्रेताला अग्नि दिल्यानंतर प्रेतपुत्रानें व प्रेताला स्पर्श करणाऱ्या सर्वांनीं प्रेताच्या गोत्रनामांचा उच्चारांतीं 'तर्पयामि' असें म्हणून कुशांचीं अग्रें दक्षिणदिशेस करून तिलसहित वेगवेगळें तर्पण करावें." **विष्णुपुराणांत**—

"सपिंडीकरणापर्यंतची पितृक्रिया सरळ दर्भांनीं करावी. सपिंडीकरणानंतरची पितृक्रिया द्विगुणभुग्न दर्भांनीं करावी, ती यथाशास्त्र होते." **रामायणांत**–"हे पुरुषश्रेष्ठ ! इदं विमलं दिव्यं अक्षयं पानीयं मद्दत्तं पितृलोकेषु उपतिष्ठतां" असें उदकदानाचें वाक्य सांगितलें आहे, व वरील वचनांत उदकदानाचें वाक्य नाहीं, म्हणून दानवाक्याविषयीं विकल्प आहे. **याज्ञवल्क्य**–"मित्र, विवाहित कन्या वगैरे, भगिनीपुत्र, श्वशुर, ऋत्विज हे मृत असतां त्यांची तृप्ति व्हावी अशी इच्छा असेल तर त्यांना उदक द्यावें. इच्छा नसेल तर देऊं नये." **शंख** व **पारस्कर**–"आचार्य, मातामह व मातामही यांनाही मातापितरांप्रमाणें उदक द्यावें. अविवाहित स्त्रियांनाही उदक द्यावें. अविवाहित स्त्रियांनींही त्यांना द्यावें." या वचनांत 'मातामहयोः' असें द्विवचन असल्यामुळें मातामहीलाही द्यावें. **शंख** व **लिखित**–"श्वशुर, मातुल, शिष्य, सहाध्यायी, व राजा यांना उदकदान देणाराचे इच्छेवर आहे." **वृद्धमनु**–"नपुंसक इत्यादिकांनीं उदक देऊं नये. तसेंच चोर, उपनयन-संस्काररहित, विरुद्धधर्मी यांनीं आणि गर्भहत्या करणाऱ्या, भर्तृहत्या करणाऱ्या, मद्यपी अशा स्त्रियांनीं उदकदान करूं नये." **याज्ञवल्क्य**—"ब्रह्मचारी आणि पतित यांनीं उदकदान करूं नये." **षडशीतींत**—"आपल्या आचारापासून भ्रष्ट झालेले, पतित व जे इतर दोषानें दुष्ट झालेले त्यांनीं उदक देऊं नये; आणि त्यांनाही इतरांनीं उदक देऊं नये." **मदनरत्नांत-हारीत**—"पतित झालेल्या स्त्रिया, व तरुण असून यथेच्छ आचरण करणाऱ्या अशा स्त्रिया आणि विवाहित कन्या यांना उदकदान करूं नये." **अपरार्कांत शंख व लिखित**—"ज्याचा घटस्फोट केला असेल त्याला जिंदगीचा विभाग, पिंडदान, व उदकदान हीं निवृत्त होतात म्हणजे हीं देऊं नयेत." अपपात्रित म्हणजे घटस्फोट केलेला होय. त्याचा संग्रहविधि केला असतां त्याचेंही आशौचादिक करावेंच, असें **आशौचप्रकाश** सांगतो.

**अथाशौचेनियमाः याज्ञवल्क्यः** इतिसंश्रुत्यगच्छेयुर्गृहंबालपुरःसराः विदश्यनिंबपत्राणिनियताद्वारिवेश्मनः आचम्याग्न्यादिसलिलंगोमयंगौरसर्षपान् प्रविशेयुःसमालभ्यकृत्वाश्मनिपदंशनैः प्रवेशनादिकंकर्मप्रेतसंस्पर्शिनामपि क्रीतलब्धाशनाभूमौस्वपेयुस्तेपृथक्क्षितौ इदंचाद्येह्नि **वसिष्ठः** आद्येप्रस्तरेगृहमनश्नंतआसीरन्क्रीतोत्पन्नेनवावर्तेरन् **शुद्धितत्त्वेबैजवापः** शमीमालभंतेशमीपापंशमयत्विति अश्मानमश्मेवस्थिरोभूयासमिति अग्निमग्निर्नःशर्मयच्छत्विति ज्योतिषअंतरागामजमुपस्पृशंतः क्रीत्वालब्ध्वावान्यगेहादेकान्नमलवणमेकरात्रंदिवाभुंजीरंस्त्रिरात्रंचकर्मोपरमणं क्रीताद्यशनमुपवासाशक्तस्य **आश्वलायनस्तु** नैतस्यांरात्र्यामन्नंपचेरंस्त्रिरात्रमक्षारालवणाशिनःस्युर्द्वादशरात्रंवेत्याह अशक्तौ**रत्नाकरेआपस्तंबः** भार्याःपरमगुरुसंस्थायांचाकालभोजनानिकुर्वीरन् यदामृतिःपरदिनेतावत्कालमित्यर्थः **बृहस्पतिः** अधःशय्यासनादीनामलिनाभोगवर्जिताः अक्षारलवणान्नाःस्युर्लब्धक्रीताशनास्तथा भोगोभ्यंगतांबूलादिः क्षाराःपरिभाषायामुक्ताः यत्तु**मार्कंडेयपुराणे** तैलाभ्यंगोबांधवानामंगसंवाहनंचयत् तेनचाप्यायतेजंतुर्यच्चाश्नंतिस्वबांधवाः प्रथमेह्नितृतीयेचसप्तमेनवमेतथा वस्त्रत्यागंबहिःस्नानंकृत्वादद्यात्तिलोदकमिति तदंत्यदिनपरं आशौचांते तिलकल्कैःस्नातागृहंप्रविशेयुरिति**विष्णूक्तेः** **विष्णुपुराणे**त्वस्थिसंचयनोर्ध्वंभोगोप्युक्तः शय्यासनोपभोगस्तुसपिंडानामपीष्यते अस्थिसंचयनादूर्ध्वंसंयोगस्तुनयोषिताम् ।

## आतां आशौचांत नियम सांगतो—

**याज्ञवल्क्य**–"याप्रमाणें सांत्वनवचनें श्रवण करून बालकाला पुढें करून घरीं जावें. घराच्या द्वारांत उभें राहून निंबपत्रें चावून आचमन करून अग्नि, उदक, गोमय, पांढरे सर्षप यांना स्पर्श करून दगडावर पाय ठेऊन घरांत प्रवेश वगैरे करावा. हें कर्म प्रेताला स्पर्श करणारे त्यांचेंही आहे. अन्न विकत घेऊन भोजन करावें. आणि भूमीवर पृथक् पृथक् शयन करावें." हें अन्न विकत घेऊन भोजन करणें पहिल्या दिवशीं समजावें. कारण, **वसिष्ठ**—"प्रथम दिवशीं घरांत उपवास करून दर्भशय्येवर राहावें. अथवा विकत घेतलेलें अन्न भक्षण करून राहावें." **शुद्धितत्त्वांत बैजवाप**—'शमी पापं शमयतु' या मंत्रानें शमीला स्पर्श करितात. 'अश्मेव स्थिरोभूयासं' या मंत्रानें दगडाला स्पर्श करितात. 'अग्निर्नः शर्म यच्छतु' यानें अग्नीला स्पर्श करितात. ज्योति मध्येंकरून गाई व बोकड यांना स्पर्श करून अन्न विकत घेऊन किंवा दुसऱ्याच्या घरांतून मिळवून एक प्रकारचें अन्न लवणरहित एक दिवस दिवसा भोजन करून रहावें. तीन दिवस सारीं कर्में बंद करावीं." अन्न विकत घेऊन वगैरे भोजन करणें हें उपवासाविषयीं अशक्त असेल त्याविषयीं आहे. **आश्वलायन** तर–"त्यांनीं त्या दिवशीं घरांत अन्न शिजवूं नये. तीन दिवस क्षार व लवणरहित अन्न भोजन करावें. अथवा बारा दिवस क्षार लवणरहित भोजन करून असावें" असें सांगतो. वर सांगितल्याप्रमाणें राहण्याची शक्ति नसेल तर सांगतो—**रत्नाकरांत आप-**

स्तंब–"परमगुरु ( भर्ता इत्यादिक ) मृत असतां भार्यादिकांनीं कालीं भोजन करूं नये. म्हणजे ज्या वेळीं मृत असेल त्याच्या दुसऱ्या दिवशीं त्या वेळपर्यंत भोजन करूं नये." **बृहस्पति**–"भूमीवर निजावें व बसावें. दीन व मलिन असावें. अभ्यंग, तांबूल इत्यादिकांचा उपभोग करूं नये. क्षार व लवणरहित अन्न भोजन करावें. तसेंच दुसऱ्याकडून मिळालेलें व विकत घेतलेलें अन्न भक्षण करावें." क्षार व्रतप्रकरणाचे परिभाषेंत प्रथमपरिच्छेदांत सांगितले आहेत. आतां जें **मार्कंडेयपुराणांत**–"बांधवांचा तैलाभ्यंग व जें अंगांचें संवाहन आणि जें बांधव भक्षण करितात त्या योगानेंही मृत झालेला जीव गृद्धिंगत होतो. पहिल्या दिवशीं, तिसऱ्या दिवशीं, सातव्या व नवव्या दिवशीं वस्त्रांचा त्याग व बाहेर स्नान करून तिलोदक द्यावें" या वचनांत तैलाभ्यंग वगैरे सांगितला तो शेवटच्या ( आशौचसमाप्तीच्या ) दिवशीं समजावा. कारण, "आशौचाचे शेवटीं तिलांचा कल्क अंगास लावून स्नान करून घरांत प्रवेश करावा." असें **विष्णु**वचन आहे. **विष्णुपुराणांत** तर–अस्थिसंचयनोत्तर शय्यादिभोगही सांगितला आहे. "अस्थिसंचयनानंतर सपिंडांना शय्या, आसन इत्यादिकांचा भोगही इष्ट आहे. स्त्रीसंग तर इष्ट नाहीं."

**भारते** तिलान्ददतुपानीयंदीपंददतुजाग्रतु ज्ञातिभिःसहभोक्तव्यमेतत्प्रेतेषुदुर्लभं **मनुः** मांसाशनंचनाश्नीयुःशयीरंश्चपृथक्क्षितौ **देवजानीयेकारिकायां** लवणक्षारमाषान्नापूपमांसानिपायसं वर्जयेद्दाहृतान्नेषुबालवृद्धातुरैर्विना उपवासोगुरौप्रेतेपत्न्याःपुत्रस्यवाभवेत् **मरीचिः** प्रथमेह्नितृतीयेचसप्तमेदशमेत्तथा ज्ञातिभिःसहभोक्तव्यमेतत्प्रेतेषुदुर्लभं भोजनंचदिवैव दिवाचैवतुभोक्तव्यममांसंमनुजर्षभेति**विष्णुपुराणात्** क्रीत्वालब्ध्वावादिवान्नमश्नीयुरिति**पारस्करो**क्तेश्च **मदनरत्नेहारीतः** पाणिषुमृन्मयेषुपर्णपुटकेषुवाश्नीरन् **देवजानीयेब्राह्मे** आशौचमध्येयत्नेनभोजयेत्स्वगोत्रजान् अंत्यदिनेतु**मदनरत्नेब्राह्मे** यस्ययस्यतुवर्णस्ययद्यत्स्यात्पश्चिमंत्वहः सतत्रगृहशुद्धिंचवस्त्रशुद्धिंकरोत्यपि अंत्यकर्मकालीनवस्त्रयोस्तुतत्रैवोक्तं ग्रामाद्बहिस्ततोगत्वाप्रेतस्पृष्टेतुवाससी अंत्यानामाश्रितानांचत्यक्त्वास्नानंकरोत्यथेति **शंखः** दानंप्रतिग्रहोहोमःस्वाध्यायःपितृकर्मच प्रेतपिंडक्रियावर्ज्यमाशौचेविनिवर्तते **काठकगृह्ये** यत्रप्राणोत्क्रमस्तत्रान्वहंमहावलिंकुर्यादिति**पारस्करः** तदानीमेववस्त्रंतंडुलंदीपंकांस्यभाजनंप्रेतायदद्यात् **आशौचप्रकाशेभरद्वाजः** वासोन्नंचजलंकुंभंप्रदीपंकांस्यभाजनं नग्नप्रच्छादनेश्राद्धेब्राह्मणायनिवेदयेत् **भृगुः** तिलोदकंतथापिंडान्नग्नप्रच्छादनादिकं रात्रौनकुर्यात्संध्यायांयदिकुर्यान्निरर्थकम् ।

**भारतांत**–'प्रेतांना तिल व पाणी द्यावें. दीप द्यावा. जागावें. ज्ञातींसह भोजन करावें. हें प्रेतांना दुर्लभ आहे.' **मनु**–"आशौचांत मांस भक्षण करूं नये. व भूमीवर वेगवेगळें शयन करावें." **देवजानीयांत कारिकेंत**–"बालक, वृद्ध, रोगी यांवांचून इतरांनी दुसऱ्याकडून आणलेल्या अन्नामध्यें देखील लवण, दुग्ध, माषान्न ( उडदाचें अन्न ), अपूप, मांस, पायस, हीं वर्ज्य करावीं. पिता मृत असतां पत्नी व पुत्र यांना उपवास सांगितला आहे." **मरीचि**–"प्रथम दिवशीं, तिसऱ्या दिवशीं, सातव्या व दहाव्या दिवशीं ज्ञातीसह भोजन करावें. हें प्रेतांना दुर्लभ आहे." भोजन दिवसासच सांगितलें आहे. "दिवसासच मांसवर्जित भोजन करावें" असें **विष्णुपुराण**वचन आहे. आणि "दुसऱ्याकडून विकत घेऊन किंवा मिळालेलें अन्न दिवसा भोजन करावें" असें **पारस्कर**वचनही आहे. **मदनरत्नांत हारीत**–"हातावर अन्न घेऊन किंवा मातीच्या पात्रांत अथवा पानाच्या पत्रावळींत अन्न घेऊन भक्षण करावें." **देवजानीयांत ब्राह्मांत**–"आशौचामध्यें प्रयत्नानें आपल्या गोत्रजांना भोजन घालावें." शेवटच्या दिवशीं तर सांगतो **मदनरत्नांत ब्राह्मांत**–"ज्या ज्या ब्राह्मणादि वर्णाचा जो जो दिवस आशौच समाप्तीचा असेल त्या दिवशीं त्यानें गृहशुद्धि आणि वस्त्रांची शुद्धि करावी." अंत्यकर्मकालीं असलेल्या वस्त्रांविषयीं तेथेंच सांगितलें आहे—"तदनंतर आशौचसमाप्तिदिवशीं गांवाच्या बाहेर जाऊन प्रेताला स्पृष्ट झालेलीं वस्त्रें आणि पुढचीं धारण केलेलीं वस्त्रें टाकून देऊन नंतर स्नान करावें." **शंख**–"दान, प्रतिग्रह, होम, वेदाध्ययन आणि प्रेतक्रियेवांचून इतर पितृकर्में हीं आशौचांत निवृत्त ( बंद ) होतात." **काठकगृह्यांत**–"ज्या ठिकाणीं प्राणोत्क्रमण झालें असेल त्या ठिकाणीं दररोज महाबलि करावा." **पारस्कर**–"त्या वेळींच वस्त्र, तंदुल, दीप, आणि कांस्यपात्र हीं प्रेताला द्यावीं." **आशौचप्रकाशांत भरद्वाज**—"वस्त्र, अन्न, उदक, कुंभ, दीप, कांस्यपात्र हीं नग्नप्रच्छादन श्राद्धाचे ठायीं ब्राह्मणाला द्यावीं." **भृगु**–"तिलोदक, पिंड, नग्नप्रच्छादनादिक कर्म, हीं रात्रीं व संध्याकाळीं करूं नयेत; केलीं तर निरर्थक होतील."

**अथप्रेतपिंडः** यद्यपिहेमाद्रौपारस्करेण ब्राह्मणेदशपिंडास्तुक्षत्रियेद्वादशस्मृताः वैश्येपंचदशप्रोक्ताःशूद्रेत्रिंशत्प्रकीर्तिताइत्युक्तं तथापि प्रेतेभ्यःसर्ववर्णेभ्यःपिंडान्दद्याद्दशैवत्विति तेनैवोक्तेः सर्वेषांदशैव

**ज्ञेयाः मदनरत्नेप्येवं तथाचहेमाद्रौब्राह्मपाद्मयोः** जात्युक्ताशौचतुल्यांस्तुवर्णानांक्वचिदेवहि देशधर्मान्पुरस्कृत्यप्रेतपिंडानवपत्यपीत्युक्त्वाविप्रान्येषुदशमपिंडोत्कर्षउक्तः देयस्तुदशमःपिंडोराज्ञांवैद्वादशेहनि वैश्यानांवैपंचदशेदेयस्तुदशमस्तथा शूद्रस्यदशमःपिंडोमासेपूर्णेह्दिदीयतेइति युद्धमृतादेःसद्यःशौचेत्र्यहादौचते- नैवोक्तं सद्यःशौचेप्रदातव्याःसर्वेपियुगपत्तथा त्र्यहाशौचेप्रदातव्यःप्रथमेह्न्येकएवहि द्वितीयेहनिचत्वारस्तृतीयेपंचचैवहि त्र्यहेप्रकारांतरंप्रागुक्तं **शातातपः** आशौचस्यचह्रासेपिपिंडान्दद्याद्दशैवतु तत्रैकपात्रेसकृत्पक्त्वादशपिंडान्दद्यात् उत्तरीयशिलापात्रकर्तृद्रव्यविपर्यये पूर्वदत्ताञ्जलीन्दद्यात्पूर्वपिंडांस्तथैवचेति **गृह्यकारिकायां**पात्रविपर्ययेदोषोक्तेः शिलाविपर्ययेघटस्फोटादेर्नावृत्तिः अक्षाभ्यंजनादिपदकर्मणः एकहायनीनयनवदप्रयोजकत्वात् तद्वच्चात्रलौकिकग्रहणं केचित्तु नवान्यादायभांडानिआरुकंचरुकंतथेति**प्रचेतसोक्तेः** पात्रानेकत्वमाहुः क्रियाकर्तुर्नाशेन्येनशेषःसमापनीयः एवंक्रियाप्रवृत्तानांयदिकश्चिद्विपद्यते तद्बंधुनाक्रियाकार्यासर्वैर्वासहकारिभिरितिशु**द्धितत्त्वेबृहस्पतिस्मृतेः** पत्न्याःकर्तृत्वेरजोदर्शनेचतदंतेकुर्यात् शावाद्द्विगुणमार्तवमित्युक्तेः आशौचांतेआर्तवेकर्तुरस्वास्थ्येवान्येनक्रियासर्वावर्तनीया कर्तुर्विपर्ययात् कालातिक्रमयोगाच्च ।

## आतां प्रेताचे पिंड सांगतो—

जरी **हेमाद्रींत पारस्करानें**—"ब्राह्मणाला दहा पिंड, क्षत्रियाला बारा, वैश्याला पंधरा आणि शूद्राला तीस पिंड सांगितले आहेत" असें सांगितलें तरी-"सर्व जातीच्या प्रेतांना दहाच पिंड द्यावे" असें त्यानेंच ( पारस्करानें ) सांगितल्यावरून सर्वांना दहाच पिंड समजावे. **मदनरत्नांत**ही असेंच आहे. तसेंच **हेमाद्रींत ब्राह्मांत व पाद्मांत**-"जातीला सांगितलेल्या आशौचदिवसाइतके पिंड क्षत्रियादिकांना क्वचितच ठिकाणीं देतात. देशधर्मांना अनुसरूनही प्रेतपिंड देतात" असें सांगून ब्राह्मणव्यतिरिक्तांना दहावा पिंड शेवटच्या दिवशीं सांगितला तो असा-"क्षत्रियांना दहावा पिंड बाराव्या दिवशीं द्यावा. वैश्यांना दहावा पिंड पंधराव्या दिवशीं द्यावा. शूद्रांना दहावा पिंड महिना पूर्ण झाल्यावर शेवटच्या दिवशीं द्यावा." युद्धांत मृताचें वगैरे सद्यःशौच असतां व तीन दिवसांचें वगैरे आशौच असतांही त्यानेंच सांगितलें आहे-"सद्यःशौचांत सारे पिंड एकदम द्यावे. तीन दिवसांचे आशौचांत पहिल्या दिवशीं एकच पिंड द्यावा. दुसऱ्या दिवशीं चार द्यावे. तिसऱ्या दिवशीं पांच द्यावे." तीन दिवसांचे आशौचांत दुसरा प्रकार पूर्वी ( अनुपनीताशौचप्रकरणीं ) सांगितला आहे. **शातातप**-"आशौच कमी असलें तरी पिंड दहाच द्यावे." त्या ठिकाणीं एका पात्रांत एकवार पाक करून दहा पिंड द्यावे. कारण, "उत्तरीयवस्त्र, उदकदान, शिला, पात्र, कर्ता, द्रव्य ( तांदूळ वगैरे ) यांचा विपर्यास ( बदल ) झाला असतां पूर्वीं दिलेले उदकांजलि, व पूर्वीं दिलेले पिंड द्यावे." असा **गृह्यकारिकेंत** पाकपात्राच्या विपर्यासाविषयीं दोष सांगितला आहे. शिलेचा विपर्यय झाला तरी घटस्फोटादिकाची आवृत्ति नाहीं. कारण, जसें-ज्योतिष्टोमांत सोमक्रयाविषयीं सांगितलें आहे-'एकहायन्या क्रीणाति' म्हणजे एक वर्षाच्या गाईनें सोम विकत घ्यावा. सोम विकत घेण्यासाठीं एक वर्षाची ती गाई आणतेवेळी अध्वर्यूनें तिच्या मागाहून जाऊन तिचें सातवें पद अंजलीनें धरून तत्संबंधी धूळ घेऊन ती अंजनांत मिश्र करून सोम आणण्याच्या शकटाचे आंखांत तें अंजन घालावें, असें सांगितलें आहे. तेथें सोमक्रयाकरितां जसें गाईचें आनयन तसें आंखांचें अंजनरूप जें पदकर्म त्याकरितांही गाईचें आनयन आहे, म्हणून तें पदकर्म आनयनाचें प्रयोजक झालें, असें पूर्वपक्षी ( शंकाकार ) म्हणतो. सिद्धांतकर्ता असें सांगतो-'एकहायन्या क्रीणाति' या वरील वचनांत 'एकहायन्या' या तृतीयाविभक्तीनें सोम विकत घेण्याकरितांच गाईचें आनयन सूचित झालें आहे, म्हणून आनयनाचा प्रयोजक सोमक्रयच आहे. गाईचें आनयन ( आणणें ) पदकर्माकरितां कोठेंही वेदांत नाहीं, म्हणून तें पदकर्म अप्रयोजक आहे. तसा-येथें घटस्फोट शिलेचा अप्रयोजक आहे, म्हणून लौकिकशिला ग्रहण करावी. **केचित्** ग्रंथकार तर-"आरुक व चरुक अशीं नवीं भांडीं ग्रहण करून" ह्या **प्रचेतसाचे** वचनावरून पात्रें अनेक असावीं, असें सांगतात. क्रियाकर्त्याचा नाश झाला असतां अन्यानें शेषक्रिया समाप्त करावी. कारण, "याप्रमाणें क्रियेविषयीं प्रवृत्त झालेल्यामध्यें जर कोणी मृत होईल तर त्याच्या बंधूनें क्रिया करावी. अथवा सहकारी जे सर्व त्यांनीं क्रिया करावी" अशी **शुद्धितत्त्वांत बृहस्पति**स्मृति आहे. स्त्री कर्त्री असून ती रजस्वला झाली असतां शुद्ध झाल्यावर तिनें क्रिया करावी. कारण, 'मृताशौचाहून आर्तवदोष दुप्पट आहे' असें पूर्वीं सांगितलें आहे. आशौचसमाप्तीच्या दिवशीं स्त्री कर्त्री असून तिला आर्तव असतां अथवा कर्त्याची प्रकृति बिघडली असतां इतरानें सर्व क्रियेची आवृत्ति करावी. कारण, कर्त्याचा विपर्यय ( बदल ) झाला आहे. शुद्ध झाल्यावर किंवा प्रकृति स्वस्थ झाल्यावर क्रिया करावी, असें म्हटलें तर क्रियेच्या कालाचा अतिक्रमही होईल.

**वाराहे** स्थंडिलेप्रेतभागंतुदद्यात्पूर्वाह्ण एवतु कृत्वातुपिंडसंकल्पंनामगोत्रेणसुंदरि **मरीचिः** प्रेतपिंडंबहि र्दद्याद्दर्भमंत्रविवर्जितं प्रागुदीच्यांचरुंकृत्वास्नातःप्रयतमानसः दर्भवर्जनमनुपनीतपरं असंस्कृतानांभूमौपिंडं दद्यात्संस्कृतानांकुशेष्वितिप्रचेतसोक्तेः **मिताक्षरायांस्मृत्यंतरे** भूमौमाल्यंपिंडंपानीयमुपलेवादद्युः **हारीतः** अकृतचूडायेबालायेचगर्भाद्विनिःसृताः मृताअनुपनीतायेअनूढाअपिकन्यकाः येमृताश्चाप्य संस्कारास्तेभ्योभूमौप्रदीयते **पैठीनसिः** शालीनांसक्तुभिर्वापिपिण्याकैर्वापिनिर्वपेत् **शुनःपुच्छः** फल- मूलैश्चपयसाशाकेनचगुडेनच तिलमिश्रंतुदर्भेषुपिंडंदक्षिणतोहरेत् तूष्णींप्रसेकंपुष्पंचधूपंदीपंतथैवच शाली- नांसक्तुभिर्वापिशाकैर्वाप्यथनिर्वपेत् प्रथमेहनियद्द्रव्यंतदेवस्याद्दशाहिकं **मदनरत्नेमात्स्ये** तैजसंमृन्मयं वाथपात्रंसंशोध्ययत्नतः लौकिकाग्नावधिश्रित्यपचेदन्नंघृतप्लुतं स्नात्वाथतिलसंमिश्रंप्रदद्याद्दर्भसंस्तरे ।

**वाराहांत**—"प्रेताच्या नामगोत्रानें पिंडाचा संकल्प करून पूर्वाह्णींच स्थंडिलाचे ठायीं प्रेताला भाग ( पिंड ) द्यावा." **मरीचि**—"स्नान करून स्वच्छ होऊन ईशान्यदिशेस चरू शिजवून दर्भ व मंत्रवर्जित असा प्रेतपिंड बाहेर द्यावा." दर्भ- वर्जित सांगितला तो मौंजी न झालेल्याविषयीं समजावा. कारण, "मौंजीसंस्कार न झालेल्यांस भूमीवर पिंड द्यावा. संस्कार झालेल्यांस कुशांवर पिंड द्यावा" असें **प्रचेतसाचें** वचन आहे. **मिताक्षरेंत स्मृत्यंतरांत**–"भूमीवर किंवा दगडावर पुष्प, पिंड व पाणी द्यावें." **हारीत**–"चूडाकरण न झालेले बालक, गर्भापासून गळालेले, मुंज झाल्यावांचून मृत, विवाह न झालेल्या कन्या, व जे संस्कार झाल्यावांचून मृत त्यांना भूमीवर पिंडादि देतात." **पैठीनसि**—"तांदुळांचे पिठाचे किंवा पिण्याकाचे ( तिलकुटाचे ही ) पिंड द्यावे." **शुनःपुच्छ**–"फलें, मूलें, दूध, शाक, गूळ यांचा पिंड तिलमिश्र करून दक्षिणेकडे दर्भांवर द्यावा. उदक, पुष्प, धूप, दीप हे मंत्ररहित द्यावे. शालींच्या पिठाचे अथवा शाकांचे पिंड द्यावे. प्रथम दिवशीं पिंडांचें जें द्रव्य असेल तेंच द्रव्य दहा दिवस असावें." **मदनरत्नांत मात्स्यांत**–"ताम्रादि धातूंचें किंवा मातीचें पात्र उत्तम शुद्ध करून लौकिकाग्नीवर चढवून त्यांत अन्न पचन करून त्यांत घृत घालून नंतर स्नान करून त्याचा तिलमिश्र पिंड दर्भमुष्टीवर द्यावा."

**शुद्धितत्त्वेदेवजानीयेच ब्राह्मे** प्रथमेहनियोदद्यात्प्रेतायान्नंसमाहितः अन्नंनवसुचान्येषुसएवप्रद- दात्यपि मृन्मयंभांडमादायनवंस्नातःसुसंयतः तंडुलप्रसृतिंतत्रत्रिःप्रक्षाल्यपचेत्स्वयं सपवित्रैस्तिलैर्मिश्रंकृमि- केशविवर्जितं द्वारोपांतेततःक्षिप्त्वाशुद्धांवागौरमृत्तिकां भूपृष्ठेसंस्तरेद्दर्भान्याम्याग्रान्देशसंभवान् ततोऽवनेजनं दद्यात्संस्मरन्गोत्रनामनी तिलसर्पिर्मधुक्षीरैःसंसिक्तंतत्समेवहि दद्यात्प्रेतायपिंडंतुदक्षिणाभिमुखःस्थितः अर्घैः पुष्पैस्तथाधूपैर्दीपैस्तोयैश्चशीतलैः ऊर्णातंतुमयैःशुद्धैर्वासोभिःपिंडमर्चयेत् दिवसेदिवसेदेयःपिंडएवंक्रमेणतु सद्यःशौचेप्रदातव्याःसर्वेपियुगपत्तथा त्र्यहाशौचेपिदातव्यास्त्रयःपिंडाःसमाहितैः द्वितीयेचतुरोदद्यादस्थिसं- चयनंतथा त्रींस्तुदद्यात्तृतीयेह्निवस्त्रादिक्षालयेत्ततः दशाहेपिचदातव्यःप्रथमेत्वेकएवहि एकस्तोयांजलिस्त्वेवं- पात्रमेकंचदीयते द्वितीयेद्वौतृतीयेत्रीनित्याद्युक्त्वा एवंस्युःपंचपंचाशत्तोयस्यांजलयःक्रमात् तोयपात्राणिता- वंतिसंयुक्तानितिलादिभिरिति पात्रंकुंभः अत्राहःपदमहोरात्रपरं तेनरात्रावपिदेयइति**गौडाः**. दिवसपदा- द्रात्रौनेति**मैथिलाः** सएवेत्युक्तेः सपिंडेनदशपिंडेप्रक्रांतेपुत्रागमेपिसनदद्यात् असगोत्रःसगोत्रोवेतिप्रा- **गुक्तेः** दाहकर्तैवदशाहंकुर्यादिति**मिताक्षरायां शुद्धितत्त्वेवायवीयेपि** असगोत्रःसगोत्रोवायदिस्त्री यदिवापुमान् यश्चाग्निदाताप्रेतस्यपिंडंदद्यात्सएवहीति तत्रैव पूरकेणतुपिंडेनदेहोनिष्पद्यतेयतः कृतस्यकरणा योगात्पुनर्नावर्ततेक्रिया **शुद्धिप्रकाशेवायवीयेपि** निवर्तयतियोमोहात्क्रियामन्यनिवर्तिताम् विधिघ्नस्त- नभवतिपितृहाचोपजायते तस्मात्प्रेतक्रियायेनकेनापिचकृतायदि नतांनिवर्तयेत्प्राज्ञःसतांधर्ममनुस्मरन्निति **आदिपुराणे** पितृशब्दंस्वधांचैवनप्रयुंजीतकर्हिचित् अनुशब्दंतथाचेहप्रयत्नेनविवर्जयेत् उपतिष्ठतामयंपिंडः प्रेतायेतिसमुच्चरेत् **क्रियानिबंधे व्यासः** प्रेतायपिंडंदत्वातुततोभीयादिनात्यये **भविष्ये** ओदनामि- षसक्तूनांशाकमूलफलादिषु प्रथमेहनियद्दद्यात्तद्दद्यादुत्तरेहनि गृहद्वारिश्मशानेवातीर्थेदेवगृहेपिवा यत्राद्ये- दीयतेपिंडस्तत्रसर्वंसमापयेत् ।

**शुद्धितत्त्वांत व देवजानीयांत ब्राह्मांत**—"प्रथम दिवशीं प्रेताला जो मनुष्य अन्न देईल त्यानेंच इतर नऊ दिवस अन्न ( पिंडादि ) द्यावें. स्नान करून नियमित होऊन मातीचें भांडें नवें घेऊन त्यांत एक पसा तांदूळ तीन वेळां धुवून स्वतः ( कर्त्यानें ) शिजवावे. त्यांत कृमि व केश असूं नयेत. व पवित्रकें आणि तिल असावेत. तदनंतर घराच्या द्वारदेशांत शुद्ध माती किंवा गौर माती ( गोपीचंदन ) भुईवर ठेऊन तिजवर दक्षिणेकडे अग्रें केलेले आपल्या देशांत उत्पन्न असे दर्भ ठेऊन नंतर मृताचे गोत्रनांवाचें स्मरण करून दक्षिणदिशेच्या समोर राहून पाद्योदक द्यावें. तिल, तूप, मध व दूध यांनीं मिश्रित असा ऊनऊन पिंड करून तो प्रेताला द्यावा. नंतर अर्घ्य, पुष्पें, धूप, दीप, शीत उदक, आणि शुद्ध अशीं ऊर्णावस्त्रें यांनीं पिंडाची पूजा करावी. या क्रमानें प्रतिदिवशीं पिंड द्यावा. सद्यःशौचांत सारेही पिंड एकदम द्यावे. तीन दिवसांचे आशौचांत पहिल्या दिवशीं तीन पिंड द्यावे. दुसऱ्या दिवशीं चार द्यावे. आणि अस्थिसंचयन श्राद्धही करावें. तिसऱ्या दिवशीं तीन पिंड द्यावे. नंतर वस्त्रादिकांचें क्षालन करावें. दहा दिवसांचे आशौचांत प्रथमदिवशीं एकच पिंड द्यावा. तसाच एक उदकांजलि द्यावा. व एक पात्र द्यावें. दुसऱ्या दिवशीं दोन उदकांजलि, तिसऱ्या दिवशीं तीन उदकांजलि, 'असें सांगून' अनुक्रमानें उदकांजलि एकंदर पंचावन्न होतात. तितकींच उदकाचीं पात्रें तिलादिकांनीं युक्त अशीं द्यावीं." येथें पात्रें म्हणजे कुंभ समजावे. ह्या वरील वचनांत 'अहः' हें पद दिवसरात्रीचें बोधक आहे, म्हणून रात्रीं देखील द्यावा, असें **गौड** सांगतात. वरील वचनांत 'दिवसे दिवसे' असें आहे, म्हणून रात्रीं देऊं नये, असें **मैथिल** सांगतात. ह्या वरील वचनांत 'पहिल्या दिवशीं देईल त्यानेंच इतर नऊदिवस द्यावें' असें सांगितल्यावरून सपिंड पुरुषानें दशाह पिंड देण्यास आरंभ केला असतां नंतर पुत्र आला तरी त्या पुत्रानें देऊं नये. कारण, 'असगोत्र किंवा सगोत्र असेल त्यानेंच द्यावे' असें पूर्वीं ( अंत्यकर्मारंभीं गृह्यपरिशिष्टवचन ) सांगितलें आहे. दाहकर्त्यानेंच दशाहकर्म करावें, असें **मिताक्षरेंत** सांगितलें आहे. **शुद्धितत्त्वांत वायवीयांत**ही–"असगोत्रांतील किंवा सगोत्रांतील, स्त्री असो किंवा पुरुष असो जो प्रेताला अग्नि देईल त्यानेंच प्रेताला पिंडही द्यावे." तेथेंच–"ज्या कारणास्तव पूरकपिंडानें देह निष्पन्न होतो, एकदां केलेलें पुनः करणें होत नाहीं, म्हणून क्रियेची आवृत्ति होत नाहीं." **शुद्धिप्रकाशांत वायवीयांत**ही–"जो मनुष्य अन्यानें केलेली क्रिया अविचारानें पुनः करितो त्या करण्यानें तो विधिघातक होतो व पितृघातकही होतो. तस्मात् कारणात् कोणीही क्रिया केली असली तरी संतांचा धर्म स्मरण करून ती क्रिया पुनः करूं नये." **आदिपुराणांत**–"येथें 'पितृ' शब्द आणि 'स्वधा' शब्द यांचा कधींही उच्चार करूं नये. आणि 'अनु' शब्द प्रयत्नानें वर्ज्य करावा. 'प्रेताय अयं पिंड उपतिष्ठतां' असा उच्चार करावा." **क्रियानिबंधांत व्यास**–"प्रेताला पिंड देऊन नंतर दिवसाचे अंतीं भोजन करावें." **भविष्यांत**–"भात, आमिष, सातू, शाक, मूळें, फळें, यांतील पहिल्या दिवशीं जें देईल तें पुढच्या दिवसांत द्यावें. घराच्या द्वारांत, अथवा श्मशानांत, किंवा तीर्थाचे ठिकाणीं किंवा देवालयांत ज्या ठिकाणीं प्रथम दिवशीं पिंड दिला असेल त्या ठिकाणीं सर्व दशाहकृत्य समाप्त करावें."

**ब्राह्मे** शिरस्त्वाद्येनपिंडेनप्रेतस्यक्रियतेसदा द्वितीयेनतुकर्णाक्षिनासिकाश्चसमासतः गलांसभुजवक्षांसितृतीयेनयथाक्रमं चतुर्थेनतुपिंडेननाभिलिंगगुदानिच जानुजंघेतथापादौपंचमेनतुसर्वदा सर्वमर्माणिषष्ठेनसप्तमेनतुनाडयः दंतलोमान्यष्टमेनवीर्यंतुनवमेनच दशमेनतुपूर्णत्वंतृप्तताक्षुद्विपर्ययइति **याज्ञवल्क्येनतु** पिंडयज्ञावृतादेयंप्रेतायान्नंदिनत्रयमित्युक्तं अत्रफलतारतम्यंज्ञेयमिति**विज्ञानेश्वरः** तेनत्र्यहाशौचपरत्वंदेवयाज्ञिकोक्तंचिंत्यं आशौचस्यचह्रासेपिपिंडान्दद्याद्दशैवत्विति वचनाच्च दिनत्रयावश्यकत्वार्थमिति**हारलतादयः**।

**ब्राह्मांत**—"पहिल्या पिंडानें प्रेताचें मस्तक उत्पन्न होतें. दुसऱ्या पिंडानें कान, डोळे, व नाक हीं नियमानें होतात. तिसऱ्या पिंडानें गळा, स्कंध, भुज, आणि वक्षस्थळ हीं उत्पन्न होतात. चवथ्या पिंडानें नाभि, लिंग व गुद हीं होतात. पांचव्या पिंडानें गुडघे, जांघा आणि पाय हे होतात. सहाव्या पिंडानें शरीरांतील सारीं मर्में उत्पन्न होतात. सातव्या पिंडानें नाडी होतात. आठव्या पिंडानें दांत व लोम होतात. नवव्या पिंडानें वीर्य ( शुक्र ) उत्पन्न होतें. दहाव्या पिंडानें सर्व परिपूर्णता, तृप्ति, क्षुधा व क्षुधानाश हीं होतात." **याज्ञवल्क्यानें** तर–"पिंडयज्ञाच्या रीतीनें प्रेताला तीन दिवस अन्न द्यावें" असें सांगितलें आहे. ह्या वचनांत फलाचें तारतम्य जाणावें, म्हणजे अधिक दिवस दिलें असतां अधिक फल अल्पदिवस दिलें असतां अल्पफल, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. अर्थात् हें वचन पिंडातिरिक्त अन्नविषयक आहे. तेणेंकरून, तीन दिवसांचे आशौचाविषयीं हें वचन आहे, असें **देवयाज्ञिकानें** सांगितलें तें चिंत्य ( युक्तिशून्य ) आहे. आणि "आशौच कमी झालें तरी पिंड दहाच द्यावे" असेंही वचन आहे. याज्ञवल्क्यवचनांत दहा पिंड द्यावे, असें नाहीं, म्हणून दशाहाशौचविषयक म्हणतां येत नाहीं. तीन दिवस अन्न अवश्य द्यावें, असें सांगण्याकरितां हें वचन आहे, असें **हारलता** इत्यादि ग्रंथकार सांगतात.

**शातातपः** जलमेकाहमाकाशेस्थाप्यंक्षीरंचमृन्मये **पारस्करः** मृन्मयेतांरात्रिंक्षीरोदकेविहायसिनिदध्युः प्रेतात्रस्नाहीत्युदकंपिबचेदमितिक्षीरं इदंरात्रावेवेति**गौडाः गारुडेतु** अपक्वेमृन्मयेपात्रेदुग्धंदद्याद्दिनत्रयमित्युक्तं **हेमाद्रौपाद्मे**तुदशाहमुक्तं तस्मान्निधेयमाकाशेदशरात्रंपयोजलं सर्वतापोपशांत्यर्थमध्वश्रमविनाशनं **देवजानीयेकारिकायां** तत्रप्रेतोपकृतयेदशरात्रमखंडितं कुर्यात्प्रदीपंतैलेनवारिपात्रंच मार्तिकं भोज्याद्भोजनकालेतुभक्तमुष्टिंचनिर्वपेत् नामगोत्रेणसंबुद्ध्याधरित्र्यांपितृयज्ञवत् **शातातपः** भूलोकात्प्रेतलोकंतुगंतुंश्राद्धंसमाचरेत् तत्पाथेयंहिभवतिमृतस्यमनुजस्यतु ।

**शातातप**—"एक दिवस उदक आकाशांत ठेवावें, आणि दूध मातीच्या भांड्यांत ठेवावें." **पारस्कर**—त्या पहिल्या रात्रीं मातीच्या पात्रांत दूध व पाणी आकाशांत ठेवावें. तें असें-'प्रेत, अत्र स्नाहि' असें म्हणून उदक ठेवावें. 'पिब चेदं' असें म्हणून दूध ठेवावें." हें रात्रींच ठेवावें, असें **गौड** सांगतात. **गरुडपुराणांत** तर-"अपक्क अशा मातीच्या पात्रांत तीन दिवस दूध द्यावें" असें सांगितलें आहे. **हेमाद्रींत पाद्मांत** तर दहा दिवस ठेवावें, असें सांगितलें आहे-"तस्मात् कारणात् सर्व तापाच्या शांतीकरितां व मार्गश्रमनाशाकरितां दहा दिवस आकाशांत दूध व पाणी ठेवावें." **देवजानीयांत कारिकेंत**-"त्या ठिकाणीं प्रेताला उपकार होण्याकरितां दहा दिवस अखंडित तेलाचा दीप करावा. आणि उदकपात्र मातीचें ठेवावें. आणि भोजनकालीं अन्नांतून मूठभर भात घेऊन त्या प्रेताचे नामगोत्राचा संबुद्धीनें उच्चार करून भूमीवर पितृयज्ञाप्रमाणें द्यावा." **शातातप**—"मृत झालेल्या मनुष्याला भूलोकापासून प्रेतलोकास जाण्याकरितां श्राद्ध करावें, तें त्यास पाथेय ( मार्गांत प्राप्त ) होतें."

**अथदशाहमध्येदर्शपातेनिर्णयः भविष्ये** प्रवृत्ताशौचतंत्रस्तुयदिदर्शंप्रपद्यते समाप्यचोदकंपिंडान्स्नानमात्रंसमाचरेत् **ऋष्यशृंगः** आशौचमंतरादर्शोयदिस्यात्सर्ववर्णिनां समाप्तिंप्रेततंत्रस्यकुर्यादित्याहगौतमः. **पैठीनसिः** आद्येंदावेवकर्तव्याप्रेतपिंडोदकक्रिया द्विरेंदवेतुकुर्वाणःपुनःशावंसमश्नुते मातापित्रोस्तु**श्लोकगौतमः** अंतर्दशाहेदर्शश्चेत्तत्रसर्वंसमापयेत् पित्रोस्तुयावदाशौचंदद्यात्पिंडाञ्जलाञ्जलीन् इदमपित्र्यहमध्येदर्शपाते तदूर्ध्वंदर्शेतुपित्रोरपितंत्रंसमाप्यमेव पित्रोराशौचमध्येतुयदिदर्शःसमापतेत् तावदेवोत्तरंतंत्रंपर्यवस्येत्र्यहात्परमिति**गालवोक्तेः** अन्येपांतुत्र्यहमध्येपिसमाप्तिरिति**पराशरमाधवीये-निर्णयामृतेचोक्तं कालादर्शेपि** दर्शोदशाहमध्येस्यादूर्ध्वंतंत्रंसमापयेत् त्रिरात्रादुत्तरंपित्रोर्मृताविति-विनिश्चयः **मदनपारिजाते**तुगालवीयमापदनौरसपुत्रादिविषयं त्र्यहोर्ध्वमपिपित्रोर्नतंत्रसमाप्तिरित्युक्तं **मदनरत्ने**प्येवं ममतुदेशाचाराद्व्यवस्थेतिप्रतिभाति ।

## आतां दहा दिवसांमध्यें दर्श प्राप्त असतां निर्णय सांगतो—

**भविष्यांत**—"आशौचांतील कर्माला आरंभ केला असून जर मध्यें दर्श प्राप्त होईल तर दहा दिवसांचें उदक व पिंड यांची समाप्ति करून स्नान मात्र दहाव्या दिवसानंतर करावें." **ऋष्यशृंग**-"ब्राह्मणादि सर्व वर्णांना आशौचामध्यें जर दर्श प्राप्त होईल तर प्रेतकृत्याची समाप्ति करावी, असें गौतम सांगतो." **पैठीनसि**-"पहिल्या चंद्रांतच ( मृत झाल्यावेळीं जो चंद्र होता तो आहे तोंपर्यंतच ) प्रेताची पिंड-उदकदान क्रिया करावी. दोन चंद्रांत जो प्रेतक्रिया करितो त्याला पुनः मृताशौच प्राप्त होतें." मातापित्याविषयीं तर सांगतो **श्लोकगौतम**-"आशौचाचे दहा दिवसांचे आंत जर दर्श प्राप्त होईल तर त्या दिवशीं सर्व प्रेतकृत्य समाप्त करावें. मातापितरांचें तर जोंपर्यंत आशौच असेल तोंपर्यंत पिंड आणि उदकांजलि द्यावे." या वचनांत दर्शानंतरही पिंड सांगितले. हेंही तीन दिवसांचे आंत दर्श पडला असतां समजावें. तीन दिवसांनंतर दर्श पडेल तर मातापितरांचेंही प्रेततंत्र समाप्त करावेंच. कारण, "मातापितरांच्या आशौचामध्यें जर दर्श पडेल व तीन दिवस होऊन गेले असतील तर तितक्यांतच पुढची क्रिया समाप्त करावी." असें **गालववचन** आहे. माता व पिता यांवांचून इतरांची क्रिया तर तीन दिवसांमध्येंही समाप्त करावी, असें **पराशरमाधवीयांत** आणि **निर्णयामृतांत** सांगितलें आहे. **कालादर्शांत**ही-"दहा दिवसांमध्यें दर्श असेल तर पुढचें तंत्र समाप्त करावें. मातापितरांचे मरणाविषयीं तीन दिवसांनंतर दर्श पडेल तर पुढच्या तंत्राची समाप्ति करावी, असा शास्त्रनिश्चय आहे." **मदनपारिजातांत** तर-तीन दिवसांपुढें दर्श पडेल तर मातापितरांचे तंत्राची समाप्ति करावी, असें जें गालवानें सांगितलें तें आपत्काल-औरसव्यतिरिक्त पुत्र इत्यादिविषयक आहे. तर तीन दिवसांपुढेंही दर्श पडला तरी मातापितरांचे तंत्राची समाप्ति होत नाहीं, असें सांगितलें आहे. **मदनरत्नांत**ही असेंच आहे. मला तर देशाचाराप्रमाणें व्यवस्था करावी, असें वाटतें.

**अथास्थिसंचयः** तत्राश्वलायनेनचकृष्णपक्षेएकादशीत्रयोदशीदर्शेषुअषाढाफल्गुनीप्रोष्ठपदाभिन्नर्क्षे-उक्तं तदाशौचमध्येऽसंभवेतदूर्ध्वंचप्रागब्दात्करणेज्ञेयं आशौचमध्येतु**मदनरत्नेसंवर्तः** प्रथमेह्नितृतीयेवा-सप्तमेनवमेतथा अस्थिसंचयनंकार्यंदिनेतद्गोत्रजैःसह **छंदोगपरिशिष्टेतु** अपरेद्युस्तृतीयेवाअस्थिसंचयनं भवेदिति द्वितीयेप्युक्तं **विष्णुकात्यायनौ** संचयनंचतुर्थ्यामिति **माधवीयेयमः** भौमार्कमंदवारेषुति-थियुग्मेविवर्जयेत् वर्जयेदेकपादर्क्षेद्विपादर्क्षेस्थिसंचयं प्रदातृजन्मनक्षत्रेत्रिपादर्क्षेविशेषतः **ब्राह्मे** चतुर्थे ब्राह्मणानांतुपंचमेहनिभूभृतां नवमेवैश्यजातीनांशूद्राणांदशमात्परं दशमेहनीतिवापाठः **शौनकः** पला-शेष्वस्थिदाहेषसद्यःसंचयनंभवेत् काम्यमरणेतुतस्यत्रिरात्रमाशौचम् द्वितीयेत्वस्थिसंचयइत्युक्तं **अंगिराः** प्रेतीभूतंतथोद्दिश्ययःशुचिर्नकरोतिचेत् देवतानांतुयजनंतंशपंत्यथदेवताः तद्विधिःस्वस्वसूत्रे**भट्टकृतौ**चज्ञेयः

## आतां अस्थिसंचय सांगतो—

तें अस्थिसंचयन **आश्वलायनानें**—कृष्णपक्षांत एकादशी, त्रयोदशी व दर्श यांचे ठायीं पूर्वाषाढा, उत्तराषाढा, पूर्वा फल्गुनी, उत्तरा फल्गुनी, पूर्वा भाद्रपदा, उत्तरा भाद्रपदा ह्यावांचून इतर नक्षत्रांवर करावें, असें सांगितलें आहे, तें आशौचामध्यें असंभव असतां आशौचानंतर वर्षाच्या आंत करणें असेल तर समजावें. आशौचामध्यें तर सांगतो **मदनरत्नांत संवर्त**-प्रथम दिवशीं ( दाह केलेल्या दिवशीं ) किंवा तिसऱ्या दिवशीं अथवा सातव्या व नवव्या दिवशीं दिवशा गोत्रजांसह अस्थिसंचयन करावें." **छंदोगपरिशिष्टांत** तर-"दुसऱ्या दिवशीं किंवा तिसऱ्या दिवशीं अस्थिसंचयन होतें" असें दुसऱ्या दिवशीं देखील सांगितलें आहे. **विष्णु** व **कात्यायन**-संचयन चवथ्या दिवशीं असें सांगतात. **माधवीयांत यम**-"भौम, रवि, मंद ह्या वारीं; आणि युग्मतिथीस अस्थिसंचयन वर्ज्य करावें. एकपाद व द्विपाद नक्षत्रांवर अस्थिसंचयन वर्ज्य करावें. कर्त्याच्या जन्मनक्षत्रावर व त्रिपादनक्षत्रावर विशेषेंकरून वर्ज्य करावें." **ब्राह्मांत**-चवथ्या दिवशीं ब्राह्मणाचें अस्थिसंचयन करावें. पांचव्या दिवशीं राजांचें करावें. वैश्यांचें नवव्या दिवशीं करावें. आणि शूद्रांचें अस्थिसंचयन दहाव्या दिवसाच्या पुढें करावें" अथवा दहाव्या दिवशीं करावें, असें पाठांतर आहे. **शौनक**-"पर्णशरदाह आणि अस्थिदाह असतां सद्यः ( तत्काळीं ) अस्थिसंचयन होतें." काम्य मरण असेल तर त्याचें तीन दिवस आशौच आणि दुसऱ्या दिवशीं अस्थि-संचयन; असें सांगितलें आहे. **अंगिरा**-"जो मनुष्य शुचि असून प्रेताच्या उद्देशेंकरून देवतांचें यजन करीत नाहीं त्याला देवता शाप देतात." त्याचा विधि आपापल्या सूत्रांत व भट्टांनीं केलेल्या अंत्येष्टिपद्धतींत जाणावा.

**हेमाद्रौनागरखंडे** त्रीणिसंचयनस्यार्थेतानिवैशृणुसांप्रतं यत्रस्थानेभवेन्मृत्युस्तत्रश्राद्धंप्रकल्पयेत् ए-कोद्दिष्टंततोमार्गेविश्रामोयत्रकारितः ततःसंचयनस्यार्थेतृतीयंश्राद्धमिष्यते **अपरार्केमदनरत्नेचब्राह्मे** सद्यःशौचेतथैकाहेसद्यःसंचयनंभवेत् त्र्यहाशौचेतृतीयेह्निकर्तव्यस्त्वस्थिसंचयः तत्रैव श्मशानदेवतायागं चतुर्थेदिवसेचरेत् मृन्मयेषुचभांडेषुकुंभेषुरुचकेषुवा सुपकैर्भक्ष्यभोज्यैश्चपायसैःपानकैस्तथा फलैर्मूलैर्वनो-त्थैश्चपूज्याःक्रव्याददेवताः धूपोदीपस्तथामाल्यमर्घ्यंदेयंत्वरान्वितैः तत्रपात्राणिपूर्णानिश्मशानाग्रेःसमंततः निवेदयद्भिर्वक्तव्यंतैःसर्वैरनहंकृतैः नमःक्रव्यादमुख्येभ्योदेवेभ्यइतिसर्वदा येत्रश्मशानेदेवाःस्युर्भगवंतः सनातनाः तेस्मत्सकाशाद्गृह्णंतुबलिमष्टांगमक्षयं प्रेतस्यास्यशुभांल्लोकान्प्रयच्छंतुचशाश्वतान् अस्माकमायुरा-रोग्यंसुखंचददतांचिरं एवंकृत्वाबलीन्सर्वान्क्षीरेणाभ्युक्ष्यवाग्यतः एवंदत्वाबलिंचैवदद्यात्पिंडत्रयंबुधः एकं श्मशानवासिभ्यःप्रेतायैवतुमध्यमं तृतीयंतत्सखिभ्यश्चदक्षिणासंस्थमादरात् ततोयज्ञियवृक्षोत्थांशाखामादा-यवाग्यतः प्रेतस्यास्थीनिगृह्णातिप्रधानांगोद्भवानिच शिरसोवक्षसःपाण्योःपार्श्वाभ्यांचैवपादतः पंचगव्येन संस्नाप्यक्षौमवस्त्रेणवेष्टयच प्रक्षिप्यमृन्मयेभांडेनवेसाच्छादनेशुभे अरण्येवृक्षमूलेवाशुद्धेसंस्थापयत्यपि गृही-त्वास्थीनितद्भस्मनीत्वातोयेविनिक्षिपेत् ततःसंमार्जनंभूमेःकर्तव्यंगोमयांबुभिः पूजांचपुष्पधूपाद्यैर्बलिभिः पूर्ववत्क्रमादिति ।

**हेमाद्रींत नागरखंडांत**—"अस्थिसंचयनाकरितां तीन श्राद्धें सांगतों तीं ऐक ! ज्या स्थानीं मरण होईल तेथें श्राद्ध एकोद्दिष्ट करावें. तदनंतर मार्गामध्यें जेथें विश्रांति घेतली असेल तेथें एकोद्दिष्ट करावें. तदनंतर अस्थिसंचयनाकरितां तिसरें श्राद्ध करावें." **अपरार्कांत व मदनरत्नांत ब्राह्मांत**-"सद्यःशौचांत व एक दिवसाच्या आशौचांत सद्यः अस्थिसंचयन

होतें. तीन दिवसांचे आशौचांत तिसऱ्या दिवशीं अस्थिसंचयन करावें." तेथेंच-"श्मशानांतील देवतांचा याग ( बलिदानादि ) मातीच्या भांड्यांत किंवा रुचक कुंभांत चवथ्या दिवशीं करावा. तो असा-लाडू, भात, पायस, पन्हीं, वनांतील फळें, मूळें यांनीं राक्षस देवतांची पूजा करावी. धूप, दीप, पुष्प, अर्घ्य हीं त्वरेनें द्यावीं. त्या ठिकाणीं वरील पदार्थांनीं भरलेलीं मातीचीं वगैरे पात्रें श्मशानासमीपच्या आसमंताद्भागीं सर्वांनीं ( पुत्रादिकांनीं ) निवेदन करून अहंकाररहित होऊन पुढील प्रार्थनावाक्य म्हणावें-तें असें—'नमः क्रव्यादमुख्येभ्यो देवेभ्य इति सर्वदा । येऽत्र श्मशानो देवाः स्युर्भगवंतः सनातनाः । तेऽस्मत्सकाशात् गृह्णंतु बलिमष्टांगमक्षयं । प्रेतस्यास्य शुभान् लोकान् प्रयच्छंतु च शाश्वतान् । अस्माकमायुरारोग्यं सुखं च ददतां चिरं ।' याप्रमाणें प्रार्थना करून सर्व बलींवर दूध घालून वाणीचें नियमन करून बलि देऊन तीन पिंड द्यावे. ते असे-एक पिंड श्मशानवासियांना द्यावा. प्रेताला मध्यम ( दुसरा ) पिंड द्यावा. तिसरा पिंड प्रेतसखीला द्यावा. हे उत्तरेकडून दक्षिणेकडे अनुक्रमें देत जावे. तदनंतर यज्ञिय ( उंबर, पळस इत्यादि ) वृक्षांची शाखा घेऊन प्रेताच्या प्रधान अंगांच्या अस्थि घ्याव्या. त्या अशा-मस्तकाच्या, वक्षस्थलाच्या, हाताच्या, बरगड्यांच्या, व पायांच्या घ्याव्या. त्या अस्थि पंचगव्यानें धुवून रेशमी वस्त्रानें वेष्टून मातीच्या नव्या चांगल्या भांड्यांत ठेऊन त्याच्यावर आच्छादन घालून अरण्यांत किंवा वृक्षाच्या बुंधांत चांगल्या शुद्ध जागेवर पुरून ठेवाव्या. इतर अस्थि व त्या ठिकाणची राख भरून पाण्यांत नेऊन टाकावी. तदनंतर गोमय व उदक यांनीं ती भूमी सारवून टाकावी. तदनंतर पुष्प, धूप इत्यादि उपचारांनीं व बलींनीं पूर्वीप्रमाणें अनुक्रमें पूजाही करावी."

**अथतीर्थेस्थिक्षेपविधिः** तत्रैव तत्स्थानाच्छनकैर्नीत्वाकदाचिज्जाह्नवीजले कश्चित्क्षिपतिसत्पुत्रो दौहित्रोवासहोदरः मातृकुलंपितृकुलंवर्जयित्वानराधमः अस्थीन्यन्यकुलस्थस्यनीत्वाचांद्रायणंचरेत् तत्रैव **ब्रह्मांडपुराणे** अस्थीनिमातापितृपूर्वजानांनयंतिगंगामपियेकथंचित् सद्बांधवस्यापिदयाभिभूतास्तेषांतुतीर्थानिफलप्रदानि स्नात्वाततःपंचगव्येनसिक्त्वाहिरण्यमध्वाज्यतिलैश्चयोज्य ततस्तुमृत्पिंडपुटेनिधायपश्यन्दिशंप्रेतगणोपरूढां नमोस्तुधर्मायवदेत्प्रविश्यजलंसमेप्रीतइतिक्षिपेच्च उत्थायभास्वंतमवेक्ष्यसूर्यंसदक्षिणांविप्रमुखायदद्यात् एवंकृतेप्रेतपुरस्थितस्यस्वर्गेगतिःस्यात्तुमहेंद्रतुल्या **यमः** गंगातोयेषुयस्यास्थिक्षिप्यतेशुभकर्मणः नतस्यपुनरावृत्तिर्ब्रह्मलोकात्सनातनात् **तथा** अस्तंगतेगुरौशुक्रेतथामासेमलिम्लुचे गंगायामस्थिनिक्षेपंनकुर्यादितिगौतमः दशाहांतर्नदोषः दशाहस्यांतरेयस्यगंगातोयेस्थिमज्जति गंगायांमरणंयादृक्ताहक्फलमवाप्नुयादिति **मदनरत्नेवृद्धमनूक्तेः** ।

## आतां तीर्थांत अस्थिप्रक्षेपाचा विधि सांगतो.

तेथेंच-"कोणी सत्पुत्र किंवा दौहित्र अथवा सहोदर भ्राता यानें त्या अस्थि ठेवलेल्या स्थानापासून घेऊन हळू हळू नेऊन भागीरथीच्या उदकांत कधीं तरी टाकाव्या. मातृकुल व पितृकुल वर्ज्य करून इतर कुलाच्या अस्थि कोणी मनुष्य नेईल तर त्या अधमानें चांद्रायण प्रायश्चित्त करावें." तेथेंच **ब्रह्मांडपुराणांत**-"जे गंगेस माता, पिता व त्यांचे पूर्वज यांच्या अस्थि कशातरी ( मोठ्या यत्नानें ) नेतात, आणि दयायुक्त होऊन उत्तम बांधवांच्याही नेतात, त्यांना तीर्थें फल देणारीं होतात. गंगेजवळ अस्थि नेल्यावर स्नान करून अस्थींवर पंचगव्य शिंपून सुवर्ण, मध, तूप व तिळ हे त्या अस्थींत मिळवून नंतर मातीचे गोळ्यांत त्या अस्थि ठेऊन दक्षिण दिशेकडे पहात उदकांत प्रवेश करून 'नमोस्तु धर्माय, स मे प्रीतः' असें म्हणून उदकांत अस्थि टाकाव्या. नंतर उदकांतून बाहेर येऊन सूर्याला पाहून ब्राह्मणश्रेष्ठाला दक्षिणा द्यावी. याप्रमाणें केलें असतां प्रेतनगरांत राहिलेला जो प्राणी त्याला स्वर्गांत इंद्रतुल्य गति (स्थान) मिळते." **यम**-"ज्या पुण्यवान् प्राण्याचे अस्थि गंगेच्या उदकांत टाकतात, त्या प्राण्याची सनातन ब्रह्मलोकापासून पुनः आवृत्ति (मागें येणें) होत नाहीं." तसेंच-"गुरु व शुक्र यांचें अस्त असतां तसेंच मलमासांत गंगेच्या ठायीं अस्थि टाकूं नयेत, असें **गौतम** सांगतो." दहा दिवसांचे आंत टाकण्याविषयीं हा गुरुशुक्रास्तादि दोष नाहीं. कारण, "ज्याचें अस्थि दहा दिवसांचे आंत गंगोदकांत पडतें त्याला गंगेचेठायीं मरण आलें असतां जसें फळ तसें फळ मिळतें" असें **मदनरत्नांत वृद्धमनूचें** वचन आहे.

**शौनकः** शौनकोहंप्रवक्ष्यामिअस्थिक्षेपविधिंक्रमात् आदौग्रामाद्बहिर्गत्वास्नानंकुर्यात्सचैलकं प्रोक्षयेत्पंचगव्येनभुवंमंत्रैर्विचक्षणः गायत्र्याद्यैःपंचगव्यमंत्रैर्निखातास्थिभूमिंप्रोक्षेदित्यर्थः उपसर्पादिभिर्मंत्रैःप्रार्थनंखननंतथा मृत्तिकोद्धरणंचास्थांग्रहणंचयथाक्रमं उपसर्पेतिचतुर्भिर्मंत्रैःक्रमेणप्रार्थनाविज्ञेयं स्नात्वास्थिशुद्धिंकुर्वीतएतोन्विंद्रेतिसूक्ततः स्पृष्ट्वास्पृष्ट्वाततःस्नानंपंचगव्येनशुध्यति दशस्नानानिकुर्वीततत्तन्मंत्रैर्विचक्षणः गोमूत्रंगोमयंक्षीरंदधिसर्पिःकुशोदकं भस्ममृन्मधुवारीणिमंत्रतस्तानिवैदश कुशैःसंमार्जयेदस्थीन्यतोदेवेतिसं-

त्तः एतोन्विंद्रंशुचीवेतिनतमंहइतीतिच पावमानीर्ममाग्नेचरुद्रसूक्तंयथाक्रमं एतैःकुशैर्मार्जनम् हेमश्राद्धं ततःकुर्यात्पितॄनुद्दिश्ययत्नतः पिंडदानंप्रकुर्वीतततश्चतिलतर्पणं अस्थिक्षेपांगंचेदं अजिनंकंबलादर्भागोकेशाः-शाणमेवच भूर्जपत्रंताडपत्रंसप्तधावेष्टनंस्मृतं हैमंचमौक्तिकंरौप्यंप्रवालंनीलकंतथा निक्षिपेदस्थिमध्येतुशुद्धि-र्भवतिनान्यथा ततोहोमंप्रकुर्वीततिलाज्येनविचक्षणः उदीरतेतिसूक्तेनहुनेदष्टोत्तरंशतं ततोगत्वाक्षिपेत्तीर्थे-स्पर्शदोषोनविद्यते मूत्रंपुरीषाचमनंकुर्वन्नास्थीनिधारयेत् अत्रदशदानंवैतरणीऋणमोक्षपापधेनुदानमुक्तं **दिवोदासीयेकाशीखंडे** धनंजयोपिधर्मात्मामातृभक्तिपरायणः आदायास्थीन्यथोमातुर्गंगामार्गस्थितोभवत् पंचगव्येनसंस्नाप्यतथापंचामृतेनवै यक्षकर्दमलेपेनक्षिप्त्वापुष्पैःप्रपूज्यच आवेष्ट्यनेत्रवस्त्रेणततःपट्टांबरेणच ततःसुरसवस्त्रेणततोमांजिष्ठवाससा नेपालकंबलेनाथमृदाचाथविशुद्धया ताम्रसंपुटकेकृत्वामातुरंगान्यथोवहेत् **व्यासः** पट्टवस्त्रंचकौशेयंमांजिष्ठंश्वेतवस्त्रकं कंबलंशाणपट्टंचअजिनंचतथोत्तरं एषांविकल्पः अन्यश्चात्रविशेष**स्त्रिस्थलीसेतौदिवोदासीये**चज्ञेयः संचयनोत्तरंश्राद्धमाह**आश्वलायनः** श्राद्धमस्मैदद्युरिति **स्मृत्यर्थसारे**संचयनेकृतेमनुष्यलोकात्प्रेतलोकंगच्छतःपाथेयश्राद्धमामेनकार्यमिति अनुपनीतस्यनसंचयनं ।

**शौनक**-"मी शौनक अस्थि टाकण्याचा विधि अनुक्रमानें सांगतों-आधीं गांवाचे बाहेर जाऊन वस्त्रसहित स्नान करावें. गायत्री इत्यादिक पंचगव्याच्या मंत्रांनीं पृथक् पंचगव्यानें अस्थि पुरून ठेवलेल्या भूमीचें प्रोक्षण करावें 'उपसर्प०' ह्या चार मंत्रांनीं अनुक्रमानें भूमीची प्रार्थना, खणणें, माती उपसणें, आणि अस्थिग्रहण करणें हीं एक एक मंत्रानें करावीं. नंतर स्नान करून अस्थींची शुद्धि करावी ती अशी-अस्थींना स्पर्श करून 'एतोन्विंद्रं.' ह्या सूक्तानें पंचगव्येंकरून पुनः पुनः स्नान करावें. नंतर पुनः स्पर्श करून स्पर्श करूनच त्या त्या मंत्रांनीं दशस्नानें करावीं. तीं अशीं-गोमूत्र, गोमय, क्षीर, दहीं, घृत, कुशोदक, भस्म, मृत्तिका, मध व शुद्धोदक यांनीं दहा स्नानें त्या त्या मंत्रानें करावीं. नंतर पुढच्या मंत्रांनीं अस्थींवर कुशांनीं मार्जन करावें. ते मंत्र येणेंप्रमाणें-अतोदेवा. १ ऋचा, एतोन्विंद्रं. ३ ऋ०, शुचीवो. ३ ऋ०, नतमंहो०१ सूक्त, इति वा इति मे० १ सूक्त, स्वादिष्ठया. १० ऋ०, ममाग्नेवर्चो. ९ ऋ०, कद्रुद्राय. ९ ऋ०, ह्या मंत्रांनीं कुशांनीं मार्जन करावें. तदनंतर ज्याच्या अस्थी असतील त्याच्या उद्देशानें हिरण्यश्राद्ध करावें. पिंडदान करून तिलतर्पण करावें." हें श्राद्ध अस्थिप्रक्षेपाचें अंगभूत आहे. "अजिन, कंबल, दर्भ, गोकेश, तागाचें वस्त्र, भूर्जपत्र, ताडपत्र, यांनीं अस्थींवर सात वेष्टनें करावीं. सोनें, मोतीं, रुपें, प्रवाल, नीलमणि हीं अस्थींमध्यें घालावीं, म्हणजे अस्थींची शुद्धि होते, यावांचून शुद्धि होत नाहीं. तदनंतर 'उदीरतां.' ह्या सूक्तानें तिलघृताहुतींचा अष्टोत्तरशतसंख्याक होम करावा. तदनंतर अस्थि घेऊन जाऊन तीर्थांत टाकाव्या, म्हणजे स्पर्शदोष नाहीं. मूत्र, पुरीष, आचमन करतेवेळीं अस्थि जवळ घेऊं नयेत." येथें दशदानें, वैतरणी, ऋणधेनु, मोक्षधेनु, पापधेनु यांचीं दानें सांगितलीं आहेत. **दिवोदासीयांत काशीखंडांत**-"धर्मात्मा असा धनंजयही मातेच्या भक्तीविषयीं तत्पर होत्साता मातेच्या अस्थि घेऊन गंगेच्या मार्गास गेला. त्या वेळीं त्यानें पंचगव्यानें व पंचामृतानें अस्थि धुवून यक्षकर्दमाचा लेप करून फुलांनीं पूजा करून सूक्ष्मवस्त्रानें वेष्टन करून नंतर पट्टवस्त्रानें, नंतर सुरसवस्त्रानें, नंतर मंजिष्ठेनें रंगविलेल्या वस्त्रानें, नंतर शालवस्त्रानें वेष्टन करून नंतर शुद्ध माती वर लावून तांब्याच्या संपुष्टांत त्या अस्थि ठेवून त्या मातेच्या अस्थि वाहता झाला." **व्यास**-"पट्टवस्त्र ( पाटाव ), रेशमीवस्त्र, मंजिष्ठेनें रंगविलेलें वस्त्र, शुभ्रवस्त्र, धाबळी, तागाचें वस्त्र, आणि शेवटीं कृष्णाजिन, यांनीं वेष्टन करावें." यांचा विकल्प समजावा. येथें इतर विशेष **त्रिस्थलीसेतूंत** आणि **दिवोदासीयांत** जाणावा. अस्थिसंचयनोत्तर श्राद्ध सांगतो **आश्वलायन**-"ज्याचें अस्थिसंचयन असेल त्याला श्राद्ध द्यावें." **स्मृत्यर्थसारांत**-संचयन केलें असतां मनुष्यलोकापासून प्रेतलोकास जाणाऱ्या प्राण्याला पाथेयश्राद्ध आमान्नानें करावें, असें सांगितलें आहे. मुंज न झालेल्याचें संचयन नाहीं.

**अथनवश्राद्धंपृथ्वीचंद्रोदयेगिराः** प्रथमेह्नितृतीयेचपंचमेसप्तमेतथा नवमैकादशेचैवतन्नवश्राद्धमुच्यते **शिवस्वामी** नवश्राद्धानिपंचाहुराश्वलायनशाखिनः आपस्तंबाःषडित्याहुर्विभाषावितरेषुहि पंच-एकादशाहिकंविना मरणाद्विषमेषुदिनेष्वेकैकंनवश्राद्धंकुर्यादानवमाद्यदिनवमंविच्छिद्येतैकादशेतत्कुर्यादिति **मदनरत्नेबौधायनोक्तेः भविष्ये** नवसप्तविशांराज्ञांनवश्राद्धान्यनुक्रमात् आद्यंतयोर्वर्णयोस्तुषडित्याहुर्महर्षयः **हेमाद्रौवृद्धवसिष्ठः** अलब्ध्वातुनवश्राद्धंप्रेतत्वान्नैवमुच्यते अर्वाक्तुद्वादशाहस्यलब्ध्वातरतिदुष्कृतं अतःषडेव एतान्येवविषमश्राद्धानीत्युच्यंते **नागरखंडेतु** पंचमेसप्तमेतद्वदष्टमेनवमेतथा दशमै-

कादशेचैवनवश्राद्धानितानिचेत्युक्तं **कात्यायनस्तु** चतुर्थेपंचमेचैवनवमैकादशेतथा यदत्रदीयतेजंतोस्त-न्नवश्राद्धमुच्यते प्रथमेसप्तमेचैवेत्याद्यपादे**व्यासपाठः** बह्वृचानांतु नवश्राद्धंदशाहानिनवमिश्रंतुषड्ऋतुनि-त्युक्तं **नारायणवृत्तौ दीपिकायां** अथतनुयादाद्येचतुर्थेदिनेश्राद्धंपंचमसप्तमाष्टनवदिग्रुद्रेषुयुग्मद्विजैः प्रथमेह्नितृतीयेह्निपंचसप्तनवस्वपि द्वौद्वौपिंडौप्रदातव्यौशेषेष्वेकंतुविन्यसेत् एकोविषमश्राद्धेवयवपिंडश्चैक-इतिद्वावित्यर्थः अत्रशाखाभेदाद्व्यवस्था ।

## आतां नवश्राद्ध सांगतो—

**पृथ्वीचंद्रोदयांत अंगिरा**–"पहिल्या दिवशीं, तिसऱ्या, पांचव्या, सातव्या, नवव्या आणि अकराव्या दिवशीं करावयाचें श्राद्ध तें नवश्राद्ध म्हटलें आहे." **शिवस्वामी**–"आश्वलायनशाखी नवश्राद्धें पांच सांगतात. आपस्तंबशाखी नवश्राद्धें सहा सांगतात. इतर शाखीयांना पांच किंवा सहा असा विकल्प समजावा." पांच सांगितलीं तीं अकराव्या दिवसाचें वर्ज्य करून समजावीं. कारण, "मरणदिवसापासून नवव्या दिवसापर्यंत विषम दिवसांचेठायीं एक एक नवश्राद्ध करावें, जर नवव्या दिवशीं श्राद्ध होणार नाहीं तर तें अकराव्या दिवशीं करावें" असें **मदनरत्नांत बौधायन**वचन आहे. **भविष्यांत**–"वैश्यांचीं नवश्राद्धें नऊ होतात. क्षत्रियांचीं सात होतात. ब्राह्मणांचीं व शूद्रांचीं नवश्राद्धें सहा होतात, असें महर्षि सांगतात." **हेमाद्रींत वृद्धवसिष्ठ**–"प्रेताला नवश्राद्ध मिळालें नाहीं तर तो प्रेतत्वापासून मुक्त होत नाहीं. बाराव्या दिवसाचे आंत नवश्राद्ध मिळालें म्हणजे तो प्राणी दुष्कृत तरून जातो." ह्या वचनावरून सहाच नवश्राद्धें होतात. हींच विषमश्राद्धें म्हटलीं आहेत. **नागरखंडांत** तर–"पांचव्या, सातव्या, आठव्या, नवव्या, दहाव्या आणि अकराव्या दिवशीं होतात तीं नवश्राद्धं होत" असें सांगितलें आहे. **कात्यायन** तर–"चवथ्या, पांचव्या, नवव्या, अकराव्या दिवशीं जें प्राण्याला दिलें जातें तें नवश्राद्ध म्हटलें आहे." या वचनांतील प्रथमपादांत 'प्रथमे सप्तमे चैव' असा व्यासाचा पाठ आहे. **बह्वृचांना** तर–"दशाहांतील श्राद्धें नवश्राद्धें, सहा ऋतूंतील ( एका वर्षांतील ) तीं नवमिश्र श्राद्धें" असें **नारायणवृत्तींत** सांगितलें आहे. **दीपिकेंत**–"नंतर पहिल्या दिवशीं, चवथ्या दिवशीं, पांचव्या, सातव्या, आठव्या, नवव्या, दहाव्या, अकराव्या या दिवशीं युग्म ब्राह्मण सांगून श्राद्ध करावें. पहिल्या, तिसऱ्या, पांचव्या, सातव्या आणि नवव्या दिवशीं दोन दोन पिंड द्यावे. इतर दिवशीं एक एक पिंड द्यावा." विषमश्राद्धाचा एक पिंड आणि अवयवपिंड एक असे मिळून दोन पिंड विषमदिवशीं समजावे, असा भाव. ह्या नवश्राद्धांविषयीं अशीं अनेक मतें आहेत त्यांची शाखाभेदानें व्यवस्था समजावी.

**अपरार्केभविष्ये** नवश्राद्धंत्रिपक्षंचषण्मासंमासिकानिच नकरोतिसुतोयस्तुतस्याधःपितरोगताः **वाराहे** गतोसिदिव्यलोकंत्वंकृतांतविहितात्पथः मनसावायुभूतेनविप्रेत्वाहंनियोजये पूजयिष्यामिभोगै-स्त्वामेवंविप्रंनिमंत्रयेत् आवाहनेपितत्रैव इहलोकंपरित्यज्यगतोसिपरमांगतिं मनसावायुभूतेनविप्रेत्वाहंनि-योजयइति तत्रैव**बह्वृचपरिशिष्टे** अनूदकमधूपंचगंधमाल्यविवर्जितं नवश्राद्धममंत्रंचपिंडोदकविवर्जितं उदकमर्घ्यः पिंडोदकंशुंधंतांपितरइत्यवनेजनादि एकोद्दिष्टेपुसर्वेपुनस्वधानाभिरम्यतां नाग्नौकरणमंत्रश्चएकं-याथतिलोदकं अनपत्येपुसर्वेपुनस्वधानाभिरम्यतां स्वस्त्यस्तुविसृजेदेवंसकृत्प्रणववर्जितं एकोद्दिष्टस्यपिंडेतु-अनुशब्दोनविद्यते पितृशब्दंनकुर्वीतपितृहाचोपजायते सपिंडनात्प्रागितिहे**माद्रिः** तेन नचस्वधांप्रयुंजीत-प्रेतश्राद्धेदशाहिके इति**ऋष्यशृंगोक्तौ** दशाहिकोक्तेरेकादशाहेस्वधाप्रयोगएवेतिहारलतापरास्ता ।

**अपरार्कांत भविष्यांत**–"नवश्राद्धें, त्रैपक्षिक, ऊनषाण्मासिक, आणि मासिकें हीं जो पुत्र करीत नाहीं त्याचे पितर अधोलोकीं जातात." **वाराहांत**–"गतोसि दिव्यलोकं त्वं कृतांतविहितात्पथः । मनसा वायुभूतेन विप्रे त्वाहं नियोजये । पूजयि-ष्यामि भोगैस्त्वां' असें म्हणून ब्राह्मणाला निमंत्रण द्यावें." आवाहनाविषयींही तेथेंच सांगतो–"इहलोकं परित्यज्य गतोसि पर-मांगतिं । मनसा वायुभूतेन विप्रेत्वाहं नियोजये ।' असें म्हणून आवाहन करावें." तेथेंच **बह्वृचपरिशिष्टांत**–"अर्घ्यरहित, धूपरहित, गंधपुष्पवर्जित, मंत्ररहित आणि पिंडोदक ( शुधंतां पितर इत्यादि ) वर्जित असें नवश्राद्ध होतें. सर्व एकोद्दिष्टांत विसर्जनाचा स्वधाशब्द आणि 'अभिरम्यतां' आणि अग्नौकरणाचा मंत्र हीं नाहींत. एक तिलोदक आहे. अपत्यरहित मृत असतील त्यांच्या श्राद्धाचे ठायीं 'स्वधा' आणि 'अभिरम्यतां' हे शब्द नाहींत. प्रवणरहित एकवार 'स्वस्त्यस्तु' असें म्हणून विसर्जन करावें. एकोद्दिष्ट श्राद्धाचे पिंडप्रदानांत "अनु" हा शब्द नाहीं आणि 'पितृ' ह्या शब्दाचा उच्चार करूं नये. या वरील शब्दांचा उच्चार करील तर पितृघातक होतो." हा स्वधाशब्दादिकांचा निषेध सपिंडीकरणाचे पूर्वी आहे, असें **हेमाद्रि** सांगतो. तेणेंकरून ( सपिंडीच्या पूर्वी निषेध असल्यामुळें ) "दहा दिवसांचे आंतील प्रेतश्राद्धांत 'स्वधा'

प्रयोग करूं नये" या कृष्णभट्टाचे वचनांत 'दशाहिके' म्ह० दहा दिवसांचे आंतील असें म्हटलें आहे, म्हणून अकराव्या दिवशीं 'स्वधा' याचा प्रयोग ( उच्चार ) आहेच, असा जो हारलताग्रंथ तो खंडित झाला.

रत्नावल्यां आशिषोद्विगुणादर्भाजयाशीःस्वस्तिवाचनं पितृशब्दःस्वसंबद्धःशर्मशब्दस्तथैवच पात्रालंभोऽवगाहश्चउल्मुकोल्लेखनादिकं तृप्तिप्रश्नश्चविकिरःशेषप्रश्नस्तथैवच प्रदक्षिणाविसर्गश्चसीमांतगमनंतथा अष्टादशपदार्थांश्चप्रेतश्राद्धेविवर्जयेत् अत्रस्वधापितृनमःशब्दानांतिलोसीतिमंत्रेप्रेतशब्दोहेनतूष्णींवातिलावपनम् तूष्णीमर्घ्यदानं अमुष्मैस्वाहेतिप्रेतनाम्नापाणिहोमः नाम्नाएकःपिंडः निनयनमंत्रेऊहः अनुमंत्रणादित्वमंत्रकं अभिरम्यतामितिविसर्जनं एवंनवश्राद्धवर्जैकोद्दिष्टेषु नवश्राद्धेत्वमंत्रकंसर्वमितिनारायणवृत्तिः क्रियानिबंधे उत्तानंस्थापयेत्पात्रमेकोद्दिष्टेसदाबुधः न्युब्जंतुपार्वणेकुर्यात्तस्योपरिकुशान्न्यसेत् नवश्राद्धंगृहेकुर्योद्भार्यायत्राग्नयोपिवा सपिंडीकरणांतानिप्रेतश्राद्धानियानिवै तानिस्युर्लौकिकेवह्नावित्याहत्वाश्वलायनः इदंसंभवेन्नेनकार्यं नवश्राद्धेषुयच्छिष्टंगृहपर्युषितंचयत् दंपत्योर्भुक्तशेषंचनतद्भुंजीतकर्हिचिदित्यंगिरोवचनलिंगात् द्वाभ्यांतदातुकृच्छ्राभ्यांशुद्धिःस्यात्तुविवेकिनामितिब्राह्मेउक्तं विघ्नेतुनिर्णयामृतेकण्वः नवश्राद्धंमासिकंचयद्यदंतरितंभवेत् तत्तदुत्तरसातंत्र्यादनुष्ठेयंप्रचक्षते हेमाद्रौगालवः शावेतुसूतकंचेत्स्यान्निशायांचमृतौतथा नवश्राद्धानिदेयानियथाकालंयथाक्रमं निशायामाशौचांतेत्र्यहवृद्धौ अन्वारोहणेतु नवश्राद्धानिसर्वाणिसपिंडीकरणंपृथक् एकएववृषोत्सर्गोगौरेकातत्रदीयते ।

रत्नावलींत-"आशीर्वाद ( आयुः प्रजां० इत्यादि ), द्विगुणभुग्न ( मोडलेले ) दर्भ, जयाशीः ( दातारोवो० इत्यादि ), ब्राह्मणाकडून 'स्वस्ति' शब्द म्हणविणें, पितृशब्द ( स्वधा, पितृ, नमः हे शब्द ), आपल्या संबंधाचा शब्द, शर्मन शब्द, अन्ननिवेदनसंबंधी पात्रस्पर्श, अन्नांत अंगुष्ठमूलनिवेशन, औपासनाग्नींतून प्रदीप्त उल्मुक आग्नेय दिशेस नेणें व त्या दोन अग्नींच्या मध्यें आग्नेयाभिमुख रेखा काढणें वगैरे अग्नौकरणतंत्र, तृप्तिप्रश्न, विकिर, शेषान्नाचा प्रश्न, प्रदक्षिणा, विसर्जन, आणि ब्राह्मणाला सीमेपर्यंत पोंचविणें, हे अठरा पदार्थ प्रेतश्राद्धांत वर्ज्य करावे." या प्रेतश्राद्धांत स्वधापितृनम शब्दांनीं युक्त जो 'तिलोसिसोम०' मंत्र त्यांत त्या शब्दांचा उच्चार न करितां प्रेतशब्दाचा ऊह करून तिल टाकावे. अथवा मंत्रावांचून तिल टाकावे. अर्घ्यदानही अमंत्रक करावें. 'अमुष्मैस्वाहा' या मंत्रेंकरून प्रेताचे नांवानें ब्राह्मणाचे हातावर अग्नौकरणहोम करावा. प्रेताचे नांवानें एक पिंड द्यावा. निनयनमंत्रांत ऊह करावा. अनुमंत्रण इत्यादिक सर्व अमंत्रक होतें. 'अभिरम्यतां' असें म्हणून विसर्जन करावें. याप्रमाणें नवश्राद्धभिन्न एकोद्दिष्टांत समजावें. नवश्राद्धांत तर सारें अमंत्रक होतें असें नारायणवृत्तिकार सांगतो. क्रियानिबंधांत-"एकोद्दिष्टांत सर्वदा पात्र उताणें स्थापन करावें. पार्वणश्राद्धांत पात्र उपडें ठेवावें. आणि त्याजवर कुश ठेवावे. ज्या ठिकाणीं भार्या किंवा अग्नि आहेत त्या ठिकाणीं घरीं नवश्राद्ध करावें. सपिंडीकरणापर्यंत जीं प्रेतश्राद्धें तीं लौकिकाग्नीवर होतात, असें आश्वलायन सांगतो." हें नवश्राद्ध अन्नानें होण्याचा संभव असेल तर अन्नानें करावें. कारण, "नवश्राद्धांत शेष राहिलेलें, घरांत पर्युषित ( शिळें ) असलेलें, व स्त्रीपुरुषांनीं भोजन करून शेष राहिलेलें असें अन्न कधींही भक्षण करूं नये" हें अंगिराचें वचन अन्नानें करण्याविषयीं बोधक आहे. "त्या नवश्राद्धांतील भोजन केलें असतां दोन कृच्छ्रांनीं विवेक्यांची शुद्धि होते" असें ब्राह्मांत सांगितलें आहे. नवश्राद्धाला विघ्न आलें असेल तर सांगतो निर्णयामृतांत कण्व-"नवश्राद्ध आणि मासिक जें जें अंतरित होईल तें तें पुढच्या श्राद्धाच्या सहतंत्रानें करावें, असें सांगतात." हेमाद्रींत गालव-"मृताशौचांत जननाशौच असलें तरी आणि आशौचाचे शेवटचे रात्रीं मृत असतां दोन दिवसांची आशौचवृद्धि असतां नवश्राद्धें आपापल्याकालीं अनुक्रमानें करावीं." स्त्रियेचें अनुगमन असेल तर "सारीं नवश्राद्धें आणि सपिंडीकरण हीं वेगवेगळीं होतात. त्या ठिकाणीं वृषोत्सर्ग एकच होतो. गाई एक द्यावी."

आशौचांत्यदिनेकार्यमुक्तं ब्राह्मे यस्ययस्यतुवर्णस्ययद्यत्स्यात्पश्चिमंत्वहः सतत्रवस्त्रशुद्धिंचगृहशुद्धिंकरोत्यपि समाप्यदशमंपिंडंप्रेतस्पृष्टेतुवाससी अंत्यानामाश्रितानांचत्यक्त्वास्नानंकरोतिच श्मश्रुलोमनखानांच यस्त्याज्यंतज्जहात्यपि गौरसर्षपकल्केनतिलकल्केनसंयुतं शिरःस्नानंततःकृत्वातोयेनाचम्यवाग्यतः वृषभंगांसुवर्णंचस्पृष्ट्वाशुद्धोभवेन्नरः क्रियानिबंधेगृह्यकारिकायां अत्रपिंडत्रयंदद्युस्तत्सखिभ्यस्तथादिमं प्रेतायमध्यमंतद्वत्तृतीयंचयमायवै तथा कर्त्रात्रप्रार्थिताःसंतोज्ञातिसंबंधिबांधवाः दद्युरभ्यंगतःपूर्वंत्रींश्चान्धर्मोदकाञ्जलीन् पूर्ववन्नामगोत्राभ्यांनियमोनेहकश्चन मदनरत्नेविष्णुहारीतौ आशौचांतेकृतश्मश्रुकर्माणस्तिलकल्कैःसर्षपकल्कैर्वास्नाताःशुक्लवाससोगृहंप्रविशेयुस्तत्रशांतिकंकृत्वाब्राह्मणपूजनंकुर्युरिति ।

आशौचसमाप्तिदिवशीं कृत्य सांगतो-**ग्रंथांत**-"ज्या ज्या ब्राह्मणादि वर्णाचा जो जो आशौचसमाप्तीचा दिवस असेल त्या दिवशीं वस्त्रांची शुद्धि आणि घराची शुद्धि त्यानें करावी. दहावा पिंड समाप्त केल्यावर प्रेताला स्पर्श केलेलीं वस्त्रें आणि अंत्य-कर्माचे ठायीं धारण केलेलीं वस्त्रें टाकून स्नान करावें. श्मश्रु, लोम, नखें जीं काढावयाचीं तीं काढून टाकावीं. तदनंतर पांढरे सर्षप व तिळ वाटून अंगास व मस्तकास लावून मस्तकावरून स्वच्छ स्नान करून आचमन करून वाणीचें नियमन करून वृषभ, गाई, सुवर्ण यांना स्पर्श करून मनुष्यानें शुद्ध व्हावें." **क्रियानिबंधांत गृह्यकारिकेंत**-"या दिवशीं तीन पिंड द्यावे, ते असे-प्रेतसखींना प्रथम पिंड द्यावा. दुसरा पिंड प्रेताला द्यावा. तिसरा पिंड यमाला द्यावा." **तसेंच-कर्त्यानें ज्ञाति,** संबंधी, बांधव यांना प्रार्थनापूर्वक सांगितल्याकरून त्यांनीं अभ्यंग करण्याच्या पूर्वी धर्मोदकाचे तीन तीन अंजलि द्यावे. पूर्वी-प्रमाणें ( प्रथमदिवसाप्रमाणें ) नामगोत्राचा उच्चार करून द्यावे. या ठिकाणीं कोणताही नियम नाहीं." **मदनरत्नांत विष्णु व हारीत**-"आशौच समाप्त झाल्यावर श्मश्रुकर्म करून तिळ वाटून किंवा सर्षप वाटून अंगास लावून स्नान करून शुभ्र वस्त्रें नेसून घरांत जावें आणि त्या ठिकाणीं शांतिकर्म करून ब्राह्मणाचें पूजन करावें."

**देवलः** दशमेहनिसंप्राप्तेस्नानंग्रामाद्बहिर्भवेत् तत्रत्याज्यानिवासांसिकेशश्मश्रुनखानिच **अपरार्के बृहस्पतिः** नवमेवाससांत्यागोनखरोम्णांतथांतिमे तत्रैव**व्यासः** आशौचांत्यदिनेक्षौरंजनन्यांचगुरौमृते एतत्प्रेताल्पवयसामित्याह**आपस्तंबः** अनुभाविनांचपरिवपनमिति अनुभाविनःकनिष्ठाइति **विज्ञानेश्वर-रत्नाकराद्यः** आशौचमनुभवतांपुंसांसर्वाशौचेतुमुंडनं आज्ञयानरपतेर्द्विजन्मनांदारकर्ममृतसूतकेषुच बंधमोक्षमखदीक्षणेष्वपिक्षौरमिष्टमखिलेषुचोडुपु इति**रत्नमालोक्ते**र्जननाशौचेपीति**शुद्धितत्त्वाद्यः** अत्रदेशाचारतोव्यवस्था परि शिखावर्जं केशश्मश्रुनखलोमानिवापयीतशिखावर्जमिति**गोभिलोक्तेः य-त्त्वापस्तंबः** नसमावृत्तावपेयुरन्यत्रविहारादित्येके विहारोदर्शादियागः तेनविनासमावृत्तागृहस्थानवपेयुरि-त्यर्थः यच्च वृथाछिनत्तियःकेशान्तमाहुर्ब्रह्मघातिनमिति तत् केशश्मश्रुधारयतामग्र्याभवतिसंततिरिति**दानध-र्मोक्त**काम्यपरं अनुभाविनःपुत्रादयइत्येके पुत्रःपत्नीचवपनंकुर्यादंतेयथाविधि पिंडदानोचितोन्योपिकुर्या-दित्थंममाहित **इत्यपरार्केव्यासोक्तेः** यत्तु**मिताक्षरायां** द्वितीयेहनिकर्तव्यंक्षुरकर्मप्रयत्नतः तृती-येपंचमेवापिदशमेवाप्रदानत इति आप्रदानतइतिचतुर्थादीनि तत्प्रथमदिनेसंभवेज्ञेयं अलुप्तकेशोयःपूर्वंसो-त्रकेशान्प्रवापयेत् द्वितीयेह्नितृतीयेह्निपंचमेसप्तमेपिवा यावच्छ्राद्धंप्रदीयेतताव दित्यपरंमतमितिमाधवीये **मद-नरत्नेचबौधायनोक्तेः मदनपारिजाते**तु दशमेप्रथमेचसमुच्चयउक्तः यत्तु दशमंपिंडमुत्सृज्यरात्रि-शेषेशुचिर्भवेदिति तदेकादशाहश्राद्धांगविप्रनिमंत्रणार्थंज्ञेयं ।

**देवल**-"दहावा दिवस प्राप्त असतां गांवाच्या बाहेर स्नान करावें. त्या ठिकाणीं वस्त्रें टाकून द्यावीं. आणि केश, श्मश्रु, नखें हीं काढून टाकावीं." **अपरार्कांत बृहस्पति**-"नवव्या दिवशीं वस्त्रें टाकावीं. नखें, केश हे शेवटच्या दिवशीं टाकावे." तेथंच **व्यास**-"आशौचाचे शेवटच्या दिवशीं क्षौर करावें. आणि माता व पिता मृत असतां क्षौर करावें." हें क्षौर प्रेताहून अल्पवयाचे असतील त्यांना आहे, असें सांगतो **आपस्तंब**-"अनुभावींना परि शिखा वर्ज्य वपन आहे." अनुभावि म्हणजे प्रेताहून कनिष्ठ, असें **विज्ञानेश्वर, रत्नाकर**-इत्यादि सांगतात. "आशौच अनुभविणाऱ्या पुरुषाला सर्व आशौचांत मुंडन आहे. राजाची क्षौराविषयीं आज्ञा असेल त्या वेळीं, विवाह कर्तव्य असतां त्या वेळीं, मृताशौचांत, जनना-शौचांत, बंदींतून मुक्तसमयीं, यज्ञादि दीक्षेच्या वेळीं सर्व नक्षत्रांवर ब्राह्मणादिकांना क्षौर इष्ट आहे" **रत्नमालेच्या** वचना-वरून जननाशौचांतही क्षौर करावें, असें **शुद्धितत्त्वादि**ग्रंथकार सांगतात. ह्या क्षौराविषयीं देशाचारावरून व्यवस्था जाणावी. वरील आपस्तंबवचनांत 'परि' याचा-शिखावर्ज्य, असा अर्थ आहे. कारण, "शिखा वर्ज्य करून केश, श्मश्रु, नखें, लोम यांचें वपन करवावें." असें **गोभिलाचें** वचन आहे. आतां जें **आपस्तंब**-"समावर्तन केलेल्यांनीं ( गृहस्थांनीं ) विहारा-हून इतर दिवशीं वपन करूं नये, असें कितीएक सांगतात." विहार म्हणजे दर्शादियाग त्यावांचून समावर्तन केलेल्या गृह-स्थांनीं वपन करूं नये, असा अर्थ होय. आणि जें-"वृथा केशांचें छेदन करितो त्याला ब्रह्मघातक म्हणतात" असें सांगितलें आहे, तें "केश, श्मश्रु धारण करणाऱ्यांची संतति श्रेष्ठ होते" असें **दानधर्मांत** सांगितलेल्या काम्य केशादिधारणाविषयीं आहे, असें समजावें. वरील आपस्तंबवचनांत 'अनुभावी' म्हणजे पुत्रादिक असें कितीएक सांगतात. कारण, "पुत्र व पत्नी यांनीं आशौचांतीं यथाविधि वपन करावें. पिंडदान करण्याविषयीं इतर जो कोणी योग्य असेल त्यानेंही असें करावें." असें **अपरार्कांत** व्यासवचन आहे. आतां जें **मिताक्षरेंत**-"दुसऱ्या दिवशीं प्रयत्नानें क्षौर करावें. तिसऱ्या दिवशीं, पांचव्या दिवशीं अथवा दहाव्या दिवशीं करावें." असे चार इत्यादिक क्षौरदिवस सांगितले ते प्रथम दिवशीं असंभव असेल तर

जाणावें. कारण, "ज्यानें पहिल्या दिवशीं केशवपन केलें नसेल त्यानें ह्या 'पुढच्या' दिवशीं केशवपन करावें. दुसऱ्या दिवशीं, तिसऱ्या दिवशीं, पांचव्या दिवशीं अथवा सातव्या दिवशीं जोंपर्यंत श्राद्ध देत आहे तोंपर्यंत क्षौर करावें, असें दुसरें मत आहे" असें **माधवीयांत** आणि **मदनरत्नांत बौधायन**वचन आहे. **मदनपारिजातांत** तर-दहाव्या दिवशीं आणि प्रथम दिवशीं दोन्ही दिवशीं क्षौर करावें, असें सांगितलें आहे. आतां जें "दहावा पिंड देऊन त्या रात्रीं शुचि व्हावें" असें सांगितलें आहे, यावरून दहाव्या दिवशीं शुद्धि होते, असें कोणी म्हणूं नये. कारण, ती शुद्धि अकराव्या दिवशीं करावयाचें जें श्राद्ध त्याचें अंगभूत जें ब्राह्मणनिमंत्रण त्याच्यापुरतीच आहे, असें जाणावें.

**अथैकादशाहः मनुः** विप्रःशुद्ध्यत्यपःस्पृष्ट्वाक्षत्रियोवाहनायुधे वैश्यःप्रतोदंरश्मीन्वायष्टिंशूद्रःकृतक्रियः **शुद्धितत्त्वेदेवलः** अघाहःसुनिवृत्तेषुसुस्नाताःकृतमंगलाः आशौचाद्विप्रमुच्यंतेब्राह्मणान्स्वस्तिवाच्यच **याज्ञवल्क्यः** मृतेहनितुकर्तव्यंप्रतिमासंतुवत्सरं प्रतिसंवत्सरंचैवआद्यमेकादशेहनि क्षत्रियाद्यैराशौचेप्येकादशेह्निश्राद्धंकार्यम् आद्यंश्राद्धमशुद्धोपिकुर्यादेकादशेहनि कर्तुस्तात्कालिकीशुद्धिरशुद्धःपुनरेवसइति**हेमाद्रौशंखोक्तेः पैठीनसिः** एकादशेह्नियच्छ्राद्धंतत्सामान्यमुदाहृतं चतुर्णामपिवर्णानांसूतकंतुपृथक्पृथक् **यत्तुमरीचिः** आशौचांतेततःसम्यक्पिंडदानंसमाप्यते ततःश्राद्धंप्रदातव्यंसर्ववर्णेष्वयंविधिरिति तत्सर्ववर्णानांदशाहाशौचपरं **यत्तुविष्णुः** अथाशौचापगमइति **यच्चगौडग्रंथेहारीतः** श्वोभूतेएकोद्दिष्टंकुर्यात् **यच्चबैजवापः** ऊर्ध्वंदशम्याअपरेद्युरिति तद्विप्रविषयं एतेनदशमपिंडोत्कर्षपक्षेअवयवपिंडासमाप्तौकथमेकादशाहेश्राद्धमितिमूर्खोक्तिःपरास्ता वचनादाशौचमध्यइवतत्राप्यविरोधात् ।

## आतां एकादशाहकृत्याचा निर्णय सांगतो—

**मनु**-"ब्राह्मण स्नानादि केल्यावर उदकाला स्पर्श करून शुद्ध होतो. क्षत्रिय वाहनाला व आयुधाला स्पर्श करून शुद्ध होतो. वैश्य चाबूक किंवा पशु बांधण्याची वगैरे दोरी यांना स्पर्श करून शुद्ध होतो. आणि शूद्र काठीला स्पर्श करून शुद्ध होतो." **शुद्धितत्त्वांत देवल**-"आशौचाचे दिवस गेले असतां मंगल ( अभ्यंगादि ) करून स्वच्छ स्नान करून आणि ब्राह्मणाकडून स्वस्तिवाचन करवून आशौचापासून मुक्त होतात." **याज्ञवल्क्य**-"वर्षपर्यंत प्रतिमासीं मृत दिवशीं श्राद्ध करावें. तदनंतर प्रतिवर्षी मृत दिवशीं करावें. आद्यमासिक अकराव्या दिवशीं करावें." क्षत्रियादिकांनीं आशौच असतांही अकराव्या दिवशीं श्राद्ध करावें. कारण, "पहिलें श्राद्ध अशुद्ध असला तरी त्यानें अकराव्या दिवशीं करावें. कर्त्याची तात्कालिक ( त्या श्राद्धापुरती ) शुद्धि होते. पुनः तो अशुद्धच आहे." असें **हेमाद्रींत शंख**वचन आहे. **पैठीनसि**-"अकराव्या दिवशीं जें श्राद्ध तें चारही वर्णांना सामान्य सांगितलें आहे. आशौच तर चार वर्णाला वेगवेगळें आहे." आतां जें **मरीचि**-"आशौचाचे शेवटच्या दिवशीं पिंडदान उत्तम रीतीनें समाप्त करावें. तदनंतर श्राद्ध करावें. सर्व वर्णाविषयीं हा विधि आहे." असें सांगतो तें सर्व वर्णाला दहा दिवस आशौच अशा पक्षीं आहे. आतां जें **विष्णु**-"नंतर आशौच दूर झालें असतां श्राद्ध करावें" असें सांगतो. आणि जें **गौडग्रंथांत हारीत**-"अकराव्या दिवशीं एकोद्दिष्ट करावें" असें सांगतो. आणि जें **बैजवाप**-"दहाव्या रात्रीच्या नंतर दुसऱ्या दिवशीं शुद्ध झाल्यावर करावें." ह्या वचनांनीं आशौच समाप्तीनंतर श्राद्ध सांगितलें तें ब्राह्मणविषयक आहे. क्षत्रियादिकांचें आशौचांतही होतें, यावरून क्षत्रियादिकांचा दहावा पिंड आशौचसमाप्तीच्या दिवशीं म्हणजे क्षत्रियाचा बाराव्या दिवशीं, वैश्याचा पंधराव्या, आणि शूद्राचा तिसाव्या दिवशीं द्यावा, या पक्षीं अवयवपिंडांची समाप्ति झाल्याशिवाय अकराव्या दिवशीं श्राद्ध कसें करावें, असें मूर्खानें सांगितलेलें खंडित झालें. वचनावरून आशौचांत जसें करावयाचें तसें अवयवपिंडांची समाप्ति नसतांही करण्याविषयीं विरोध नाहीं.

**भविष्ये** एकादशभ्योविप्रेभ्योदद्यादेकादशेहनि भोजनंतत्रवैकस्मैब्राह्मणायमहात्मने **यत्तुमात्स्ये** एकादशेहनितथाविप्रानेकादशैवतु क्षत्रादिःसूतकांतेतुभोजयेदयुजोद्विजानिति तद्रुद्रगणश्राद्धपरमिति**मदनपारिजातः गौडास्त्वस्माद्वचनात्** क्षत्रियादीनामाशौचांतएवेत्याहुः **रामायणेपि** समतीतेदशाहेतुकृतशौचोयथाविधि चक्रेद्वादशिकंश्राद्धंत्रयोदशिकमेवच द्वादशिकंद्वादशाहेननिर्वर्त्यंत्रयोदशाहश्राद्धं त्रयोदशिकंचतुर्दशाहविधेयंसपिंडनपाथेयादि क्षत्रियाणांद्वादशाहाशौचेत्रयोदशेमहैकोद्दिष्टंचतुर्दशेसपिंडनम् द्विविधवाक्यादेकादशाहाशौचांतयोर्विकल्पइत्येके सद्यःशौचादौयुद्धहतादेरेकादशाहे अन्येषामाशौचांतइति **वयं कौर्मे** एकादशेह्निकुर्वीतप्रेतमुद्दिश्यभावतः द्वादशेवाह्निकर्तव्यमनिंद्येप्यथवाहनि निंद्यंप्रेतक्रियाकाल-

युक्तं एकादशेतुननिषेधइत्युक्तंप्राक् **बृहस्पतिः** वस्त्रालंकारशय्यादिपितुर्यद्वाहनादिकं गंधमाल्यैःसमभ्यर्च्यश्राद्धभोक्तेतदर्पयेत् श्रोत्रियाभोजनीयास्तुनवसप्तत्रयोदश ज्ञातयोबांधवानिःस्वास्तथाचातिथयोपरे **देवयाज्ञिकनिबंधे** एकादशसुविप्रेषुप्रेतमावाह्यभोजयेत् तत्राद्यायचशय्यादिदद्यादाद्यमितिस्मृतं **विष्णुः** एकवन्मंत्रानूहेत्तैकोद्दिष्टे बहुवचनांतानेकवचनांतान्वदेदित्यर्थः एतद्दृष्टार्थत्वे ।

**भविष्यांत**–"अकराव्या दिवशीं अकरा ब्राह्मणांना भोजन द्यावें. अथवा एका महात्म्या ब्राह्मणाला भोजन द्यावें." आतां जें **मात्स्यांत** "अकराव्या दिवशीं अकराच ब्राह्मणांना भोजन घालावें. क्षत्रियादिकांनीं सूतकांतीं अयुग्म ब्राह्मणांना भोजन घालावें." असें सांगितलें तें रुद्रगणश्राद्धविषयक आहे, असें **मदनपारिजात** सांगतो. **गौड** तर–ह्या वचनावरून क्षत्रियादिकांनीं आशौचांतींच आद्य मासिक करावें, असें सांगतात. **रामायणांत**ही–"दहावा दिवस गेला असतां यथाविधि शुद्धि करून द्वादशिक आणि त्रयोदशिक श्राद्ध करिता झाला." द्वादशिक म्हणजे बारा दिवसांनीं करावयाचें तें, अर्थात् बारा दिवस होऊन गेल्यावर तेराव्या दिवशीं सांगितलेलें समजावें. त्रयोदशिक म्हणजे तेरा दिवस होऊन गेल्यावर चवदाव्या दिवशीं करावयाचें सपिंडन, पाथेय इत्यादिक समजावें. क्षत्रियांना बारा दिवस आशौच असतां तेराव्या दिवशीं महैकोद्दिष्ट आणि चवदाव्या दिवशीं सपिंडीकरण सांगितलें आहे. हें रामायणवचन व वरील मात्स्यवचन अशा दोनीं प्रकारच्या वचनांवरून अकराव्या दिवशीं व आशौचांतीं करण्याचा विकल्प आहे, असें कितीएक विद्वान् सांगतात. युद्धांत मृत इत्यादिकांचें सद्यःशौच वगैरे असतां अकराव्या दिवशीं करावें. इतरांचें आशौचांतीं करावें, असें आम्हीं ( कमलाकरभट्ट ) सांगतों. **कौर्मांत**–"अकराव्या दिवशीं प्रेताचा उद्देश करून श्राद्ध करावें. अथवा बाराव्या दिवशीं करावें. किंवा निंद्य नसेल अशा दिवशीं करावें." निंद्य म्हणजे प्रेताच्या क्रियेचा काल जो असेल त्या दिवशीं करूं नये. अकराव्या दिवशीं हा निषेध नाहीं, असें पूर्वीं ( शंखवचनावरून ) सांगितलें आहे. **बृहस्पति**–"पित्याचीं वस्त्रें, अलंकार, शय्या, वाहन इत्यादिक जें असेल तें गंधपुष्पादिकांनीं पूजित करून श्राद्धभोक्त्या ब्राह्मणाला अर्पण करावें. नऊ, सात किंवा तेरा श्रोत्रिय ब्राह्मणांना भोजन घालावें. ज्ञाति, बांधव, दरिद्री व अतिथि यांनाही भोजन घालावें." **देवयाज्ञिकनिबंधांत**–"अकरा ब्राह्मणांवर प्रेताचें आवाहन करून त्यांना भोजन घालावें. त्यांत पहिल्या ब्राह्मणाला शय्या इत्यादि द्यावें. तें आद्य श्राद्ध म्हटलें आहे." **विष्णु**–"एकोद्दिष्टांत बहुवचनांत मंत्रांचा एकवचनांत ऊह करावा. जसा–( प्रत्नवद्भिः प्रत्तः प्रेतमिमान्लोकान्प्रीणयाहिनः ) असा ऊह अर्घ्यपात्राच्या मंत्रांत करावा. हा ऊह बहुवचनाचा अर्थ प्रेताविषयीं अनन्वित असेल त्या ठिकाणीं समजावा.

अस्यविघ्नेगौणकालमाह**हेमाद्रौबौधायनः** एकोद्दिष्टंश्चएवस्याद्द्वादशेहनिवापुनः अतऊर्ध्वमयुग्मेषुकुर्वीताहःस्वशक्तितः अर्धमासेथवामासिकऋतौसंवत्सरेपिवेति तत्रैव**लघुहारीतः** एकोद्दिष्टंतुकुर्वीतपाकेनैव सदास्वयं अभावेपाकपात्राणांतदहःसमुपोषणम **गोभिलः** ब्राह्मणंभोजयेदाद्येहोतव्यमनलेथवा पुनश्चभोजयेदेकंद्विरावृत्तिर्भवेदिति एतदाद्यमासिकाब्दिकयोःसिद्ध्यर्थमिति**भट्टाः** तेनमहैकोद्दिष्टंषोडशश्राद्धाद्भिन्नमेव अतएवाद्यंसर्वैकोद्दिष्टप्रकृतिभूतमेकादशाइति**विज्ञानेश्वरः** अन्येत्वाद्यमासिकाब्दिकयोराद्यमेकादशेहनीतिनियमादभेदमाहुः द्वयोस्तंत्रत्वबाधार्थं**गोभिलीय**मित्यन्ये युद्धहतादौतु**हेमाद्रौपृथ्वीचंद्रोदयेपैठीनसिः** सद्यःशौचेपिदातव्यंप्रेतस्यैकादशेहनि सएवदिवसस्तस्यश्राद्धशय्यासनादिषु एवमेकाहादौ अतोत्रद्वितीयेह्न्येकादशाहंवदन् **हौडुः शूलपाणिः स्मार्तगौड**श्चपरास्तः एतेनाद्यमेकादशेहनीत्याशौचानंतरदिनपरमिति**विष्णूक्तेः** प्रागुक्तशंखादिवचनानांचानाकरत्वादितिवदंतः**कल्पतरुवाचस्पति**प्रमुखाः .सर्वमहानिबंधविरोधादुपेक्ष्याः **उशनाः** त्र्यहाशौचेपिकर्तव्यमाद्यमेकादशेहनि अतीतविषयेसद्यस्त्र्यहोर्ध्वंवातदिष्यते ।

ह्या एकोद्दिष्टाला विघ्न असतां गौणकाल सांगतो **हेमाद्रींत बौधायन**–"एकोद्दिष्ट अकराव्या दिवशींच होतें. अथवा बाराव्या दिवशीं होतें. त्या वेळीं न होईल तर याच्या पुढें विषम दिवशीं आपल्या शक्तीप्रमाणें करावें. अथवा पंधराव्या दिवशीं अथवा महिन्याच्या दिवशीं किंवा ऋतूच्या दिवशीं किंवा संवत्सरदिवशीं करावें." तेथेंच **लघुहारीत**–"स्वतः पाक करूनच सर्वदा एकोद्दिष्ट करावें. पाकाच्या पात्रांचा अभाव असेल तर त्या दिवशीं उपोषण करावें." **गोभिल**–"पहिल्या एकोद्दिष्ट श्राद्धांत ब्राह्मणाला भोजन घालावें. अथवा अग्नींत होम करावा. पुनः एका ब्राह्मणाला सांगून श्राद्ध करून भोजन घालावें. या ठिकाणीं श्राद्धाची द्विवार आवृत्ति होते." या वचनानें सांगितलेली दुसरी आवृत्ति आद्य मासिक आणि आद्याब्दिक यांच्या सिद्धीकरितां आहे, असें **भट्ट** सांगतात. त्यावरून महैकोद्दिष्ट हें षोडशमासिकांहून वेगळेंच आहे. म्हणूनच पहिलें एकोद्दिष्ट

हें सर्व एकोद्दिष्टांचें प्रकृतिभूत आहे, असें **विज्ञानेश्वर** सांगतो. **इतर ग्रंथकार** तर–"आद्यमेकादशेऽहनि" या वरील **याज्ञवल्क्य**वचनानें अकराव्या दिवशीं, असा नियम केल्यावरून आद्य मासिक व आद्याब्दिक यांचा अभेद ( एकरूपत्व ) सांगतात. **दुसरे ग्रंथकार**–या दोघांचें तंत्र होईल त्याचा बाध करण्यासाठीं वरील **गोभिला**चें वचन आहे, असें सांगतात. युद्धांत वगैरे मृत असेल तर सांगतो **हेमाद्रींत पृथ्वीचंद्रोदयांत पैठीनसि**–"सद्यःशौच असलें तरी प्रेताला अकराव्या दिवशीं श्राद्ध द्यावें. कारण, त्याच्या श्राद्ध, शय्या, आसन इत्यादिकांविषयीं तोच दिवस आहे." याचप्रमाणें एक दिवसाच्या वगैरे आशौचांत समजावें. असें आहे म्हणून सद्यःशौचादिकांत दुसऱ्या दिवशीं एकादशाहकृत्य, असें सांगणारा **ढौंढु**, **शूलपाणि व स्मार्तगौड** खंडित झाला. यावरून ( सद्यःशौच, एकाहाशौच इत्यादिकांतही अकराव्या दिवशीं एकादशाहकृत्य सांगितल्यावरून ) 'आद्यमेकादशेऽहनि' हें वरील याज्ञवल्क्यवचन आशौचानंतरच्या दिवसाविषयीं आहे. कारण, 'अथाशौचापगमे' असें **विष्णु**वचन आहे. आणि वर सांगितलेलीं **शंखा**दिकांचीं वचनें आकरांत नाहींत, असें सांगणारे **कल्पतरु-वाचस्पति**—प्रमुख ग्रंथकार सर्व महानिबंधग्रंथांचा विरोध असल्यामुळें उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहेत. **उशना**–"तीनदिवसांचे आशौचांतही आद्यश्राद्ध अकराव्या दिवशीं करावें. अतिक्रांताशौचाविषयीं सद्यः करावें किंवा तीन दिवसांनंतर करावें."

**याज्ञवल्क्यः** एकोद्दिष्टंदैवहीनमेकार्घ्यैकपवित्रकं आवाहनाग्नौकरणरहितंत्वपसव्यवत् उपतिष्ठतामित्यक्षय्यस्थानेविप्रविसर्जने अभिरम्यतामितिवदेयुस्तेभिरताःस्महेइति अग्नौकरणनिषेधोन्यपरः बह्वृचानांसर्वैकोद्दिष्टेषुतद्भवत्येवेत्युक्तंप्राक् स्वदितमितितृप्तिप्रश्नइति**कात्यायनः** प्रथमेपात्रेसंस्रवानित्यस्यतृतीयेनापिधानस्यचबाधान्नपात्रन्युब्जतेति**शूलपाणिः** **प्रचेताः** नात्रपात्रालंभोनाशिषःप्रार्थयेत् अत्रविशेषो**हेमाद्रौ वाराहे** श्मश्रुकर्मतुकर्तव्यंनखच्छेदस्तथैवच स्नपनाभ्यंजनेदद्याद्विप्रायविधिपूर्वकं **तथा** उपवेश्यासने भद्रेछत्रंतत्रप्रकल्पयेत् पश्चादुपानहौदद्यात्सर्वाण्याभरणानिच **विष्णुः** दक्षिणांतंश्राद्धमुक्त्वादत्ताक्षय्योदकेषुच चतुरंगुलपृथ्वीस्तावदंतरालास्तावदधःखातावितस्त्यायतास्तिस्रःकर्पूःकुर्यात् कर्पूणांसमीपेग्निमाधायपरिस्तीर्यैकैकस्मिन्नाहुतित्रयंजुहुयात् सोमायपितृमतेस्वधानमोग्नयेकव्यवाहनाययमायांगिरस्वतेइतिस्थानत्रयेप्राग्वत्पिंडनिर्वपणंदधिमधुघृतमांसैःकर्पूत्रयंपूरयित्वैतत्तइतिजपेत् शेषंनवश्राद्धवत् अत्रसाग्नेरप्यंतेवैश्वदेवइत्युक्तंप्राक् इदंदशाहकर्त्रापुत्रेणवाकार्यमित्युक्तं **क्रियानिबंधेगृह्यकारिकायां** तिलोसिप्रेतदेवत्यः प्रेतंलोकान्हिनोंतकं मंत्रमुक्त्वातिलानेवंप्रक्षिपेदर्घ्यपात्रतः दक्षिणामुदकुंभंचमान्नंदत्वातथैवगां तस्मैदद्याद्भुक्तशेषंतद्भांडान्यपिभाजनं विप्राभावेग्नावेकोद्दिष्टं अग्नौपायसंश्रपयित्वाज्यभागांतेतदग्नेश्राद्धप्रयोगंकृत्वाग्नौप्रेतमावाह्यगंधाद्यैःसंपूज्यपृथिवीतेपात्रमित्यादिनान्नंसंकल्प्योदीरतामवरइत्यष्टाभिश्चतुरावृत्ताभिर्द्वात्रिंशदाहुतीर्हुत्वापिंडदानादिश्राद्धंसमापयेदिति **याज्ञवल्क्यः** एतत्सपिंडीकरणमेकोद्दिष्टंस्त्रियाअपि ।

**याज्ञवल्क्य**—"एकोद्दिष्ट देवरहित असतें. एक अर्घ्य व एक पवित्रकानें करावें. आवाहन व अग्नौकरण करूं नये. तें देवरहित असल्यामुळें सर्व एकोद्दिष्टकृत्य अपसव्यानें करावें. अक्षय्योदकस्थानीं 'अक्षय्योदकमुपतिष्ठतां' असें म्हणावें. ब्राह्मणविसर्जनाविषयीं 'अभिरम्यतां' असें म्हणावें. 'अभिरताः स्मः' असें ब्राह्मणाचें प्रतिवचन आहे." अग्नौकरणाचा निषेध इतर शाखांविषयीं आहे. बह्वृचांना सर्व एकोद्दिष्टांत अग्नौकरण होतें, असें पूर्वीं सांगितलें आहे. 'स्वदितं' असा तृप्तिप्रश्न करावा, असें **कात्यायन** सांगतो. एकोद्दिष्टांत अर्घ्यपात्र एक असल्यामुळें इतर पात्रांतील प्रथम पात्रांत संस्रव सांगितले, त्यांचा व तिसऱ्या पात्रानें आच्छादन सांगितलें त्याचा बाध होत असल्यामुळें, पात्र उपडें घालूं नये, असें **शूलपाणि** सांगतो. **प्रचेता**—"अन्ननिवेदनसमयीं पात्र धरणें नाहीं, व आशीर्वादांची प्रार्थना करूं नये." एकोद्दिष्टांत विशेष सांगतो **हेमाद्रींत वाराहांत**—"ब्राह्मणाचें श्मश्रुकर्म व नखच्छेद करावा. आणि त्याला यथाविधि स्नान व अभ्यंग द्यावा." तसेंच–"ब्राह्मणाला चांगल्या आसनावर बसवावें, छत्री द्यावी, पश्चात् जोडा द्यावा. आणि सर्व आभरणें ( अलंकार वगैरे ) द्यावीं." **विष्णु**–दक्षिणांत श्राद्ध सांगून "अक्षय्योदक दिल्यावर चार अंगुळें रुंद व तितकेच खोल एक वीत लांब असे तीन कर्षू म्हणजे खळगे करावे. कर्षूंच्या समीप अग्निस्थापन करून परिस्तरण करून एक एकावर तीन तीन आहुतींचा होम करावा. 'सोमाय पितृमते स्वधानमः, अग्नये कव्यवाहनाय स्वधानमः, यमाय अंगिरस्वते स्वधानमः' या मंत्रांनीं होम करावा. तीन स्थानीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें पिंड द्यावे. दधि, मधु, घृत व मांस यांनीं ते तीन कर्षू पूर्ण भरून 'एतत्ते०' या मंत्राचा जप करावा." अवशेष सर्व प्रयोग नवश्राद्धाप्रमाणें करावा. येथें साग्निकाचाही अंतीं वैश्वदेव, असें पूर्वी ( श्राद्धवैश्वदेवप्रकरणीं ) सांगितलें आहे. हें श्राद्ध दशाहकृत्य कर्त्यानें किंवा पुत्रानें करावें, असें सांगितलें आहे. **क्रियानिबंधांत गृह्यकारिकेंत**—

"तिलोसि प्रेतदेवत्यः' असा ऊह करावा. आणि 'प्रन्नवद्भिः प्रत्तः प्रेतमिमान् लोकान् प्रीणयाहिनः' असा मंत्र म्हणून अर्घ्यपात्रांत तिल टाकावे. दक्षिणा, अन्नसहित उदकुंभ आणि गाई ब्राह्मणाला देऊन, भुक्तशेष अन्न, त्याचीं भांडीं, व इतर पात्र हीं द्यावीं." ब्राह्मणाच्या अभावीं अग्नीवर एकोद्दिष्ट करावें, तें असें-अग्नीवर पायस शिजवून आज्यभागांच्या अंतीं अग्नीच्या अग्रभागीं श्राद्धप्रयोग करून अग्नीवर प्रेताचें आवाहन करून गंधादिकांनीं पूजा करून 'पृथिवी ते पात्रं०' या मंत्रानें अन्नाचा संकल्प करून 'उदीरतां०' ह्या आठ ऋचांच्या चार आवृत्तींनीं बत्तीस आहुतींचा होम करून पिंडदानादिक श्राद्ध समाप्त करावें. **याज्ञवल्क्य**-"हें सपिंडीकरण व एकोद्दिष्ट क्रियेचेंही करावें."

**अथवृषोत्सर्गः** सचनित्यकाम्यः नकरोतिवृषोत्सर्गंसुतीर्थेवाजलांजलिम् नददातिसुतोयस्तुपितुरुच्चारएवसः उच्चारःपुरीषं एष्टव्याबहवःपुत्रायद्येकोपिगयांव्रजेत् यजेतवाश्वमेधेननीलंवावृषमुत्सृजेदितिमात्स्यकौर्मोक्तेः एकादशेह्निप्रेतस्ययस्यनोत्सृज्यतेवृषः प्रेतत्वंसुस्थिरंतस्यदत्तैःश्राद्धशतैरपीतिषट्त्रिंशन्मतेनिंदाश्रुतेः एवंकृत्वाह्यवाप्नोतिफलंवाजिमखोदितं यमुद्दिश्योत्सृजेन्नीलंसलभेतपरांगतिं वृषोत्सृष्टःपुनात्येवदशातीतान्दशापरानितिदेवीपुराणेभविष्यादौफलश्रुतेश्च अयंद्वादशाहेउक्तो भविष्ये चैत्र्यांवापितृतीयायांवैशाख्यांद्वादशेह्निवेति विष्णुधर्मेतुमृताहेप्युक्तः विषुवद्वितयेचैवमृताहेबांधवस्यचेति अयंगृहेनकार्यः नगृहेमोचयेन्नीलंकामयन्पुष्कलंफलमितिकालिकापुराणात् कामधेनौ वत्सराभ्यंतरेपित्रोर्वृषस्योत्सर्गकर्मणि वृद्धिश्राद्धंनकुर्वीततदन्यत्रसमारभेत् तल्लक्षणंतुब्राह्मे लोहितोयस्तुवर्णेनमुखेपुच्छेचपांडुरः श्वेतःखुरविषाणाभ्यांसनीलोवृषउच्यते श्वेतवर्णस्यमुखादीनिश्यामानिश्यामस्यवाश्वेतानियस्यसोपिनीलउक्तोमात्स्यादौ देवीपुराणे चतस्रोवत्सिकाभद्राद्वेवासंभवतोपिवा यत्तुपठंति वृषोत्सर्जनवेलायांवृषाभावःकथंचन मृद्भिःपिष्टैश्चदर्भैर्वावृषंकृत्वाविमोचयेत् नशक्यतेवृषोत्सर्गोहोमंवातत्रकारयेदिति तन्निर्मूलं तद्विधिर्हेमाद्रौभट्टकृतौचज्ञेयः अत्रदेवयाज्ञिकेनवृषोत्सर्गात्पूर्वंपुरुषसूक्तेनविष्णुरूपिप्रेतोद्देशेनविष्णुतर्पणमुक्तं तत्रमूलंचिंत्यं ।

## आतां वृषोत्सर्ग सांगतो—

तो वृषोत्सर्ग नित्य आणि काम्य आहे. कारण, "जो पुत्र वृषोत्सर्ग करीत नाहीं, किंवा उत्तम तीर्थांत पितरांना उदकांजलि देत नाहीं, तो पित्याचा उच्चार ( पुरीष, मल ) च आहे. बहुत पुत्रांची इच्छा करावी. कारण, त्यांतील एक पुत्र तरी गयेस जाईल, अथवा अश्वमेध याग करील, किंवा नीलवृषाचा उत्सर्ग करील." असें **मात्स्यांत** व **कौर्मांत** वचन आहे. "ज्या प्रेताच्या उद्देशानें अकराव्या दिवशीं वृषोत्सर्ग केलेला नसेल त्याला शेंकडों श्राद्धें दिलीं तरी त्याचें प्रेतत्व सुस्थिर राहतें." असें **षट्त्रिंशन्मतांत** वृषोत्सर्ग नसल्याचें निंदाश्रवण आहे. म्हणून तो नित्य होय. "याप्रमाणें वृषोत्सर्ग केला असतां करणाराला अश्वमेधाचें फल प्राप्त होतें. ज्याच्या उद्देशानें वृषोत्सर्ग केला असेल त्याला उत्तमगति होते. उत्सर्ग केलेला वृष पूर्वींचे दहा व पुढचे दहा पुरुषांना पवित्र करितो" असें **देवीपुराणांत** व **भविष्यादि** पुराणांत फल सांगितलें आहे, यावरून तो काम्य होय. हा वृषोत्सर्ग बाराव्या दिवशीं सांगितला आहे. **भविष्यांत**-"चैत्राचे तृतीयेस किंवा वैशाखतृतीयेस अथवा बाराव्या दिवशीं वृषोत्सर्ग करावा." **विष्णुधर्मांत** मृतदिवशींही सांगितला आहे—"दोनीं विषुवायनसंक्रांतींस आणि बांधवाच्या मृतदिवशीं करावा." हा ( वृषोत्सर्ग ) घरीं करूं नये. कारण, "पुष्कळ फल इच्छिणारानें घरीं नीलवृषोत्सर्ग करूं नये" असें **कालिकापुराण** आहे. **कामधेनूंत**-"वर्षाच्या आंत मातापितरांच्या वृषोत्सर्गकर्मामध्यें वृद्धिश्राद्ध करूं नये. तें इतर वृषोत्सर्गांत करावें." वृषाचें लक्षण सांगतो-**ब्राह्मांत**-"ज्याचा सर्व शरीराचा वर्ण लोहित ( लाल ) आहे, मुख व पुच्छ पांढरीं आहेत, आणि खुर व शृंगें हीं शुभ्र आहेत त्याला नीलवृष असें म्हटलें आहे." ज्याच्या शरीराचा वर्ण शुभ्र असून मुख, पुच्छ, खुर, शृंगें हीं श्यामवर्ण आहेत तो किंवा शरीराचा वर्ण श्याम आणि मुखादिक शुभ्र आहेत तोही नीलवृष, असें **मत्स्यपुराणादिकांत** सांगितलें आहे. **देवीपुराणांत**—"चार किंवा दोन पाड्या असाव्यात. दोन न मिळतील तर एक तरी असावी." आतां जें कोणी बोलतात कीं, "वृषोत्सर्गसमयीं वृषाचा अभाव असेल तर मातीचा, पिठाचा किंवा दर्भांचा वृष करून त्याचा उत्सर्ग करावा. अथवा ज्या ठिकाणीं वृषोत्सर्ग होण्यास शक्य नसेल त्या ठिकाणीं होम करावा" असें, तें निर्मूल ( मूलरहित ) आहे. त्या वृषोत्सर्गाचा विधि **हेमाद्रींत** व **नारायणभट्टींत** जाणावा. या ठिकाणीं देवयाज्ञिकानें वृषोत्सर्गाच्या पूर्वीं पुरुषसूक्तानें विष्णुरूपी प्रेताच्या उद्देशानें विष्णुतर्पण सांगितलें आहे त्याविषयीं मूल चिंत्य ( अनुपलब्ध ) आहे.

**पारस्कर:** सव्येनपाणिनापुच्छंसमालंब्यवृषस्यतु दक्षिणेनापआदायसतिलाःसकुशास्ततः प्रेतगोत्रंसमुच्चार्यअमुकस्मैइतिब्रुवन् वृषएषमयादत्तस्तंतारयतुसर्वदा सहेमसतिलंभूमावित्युच्चार्यविनिक्षिपेत् **तथा** विधारयेन्नतंकश्चिन्नचकश्चनवाहयेत् नदोहयेत्वताधेनूर्नचकश्चनबंधयेत् स्त्रीषुविशेषःसंग्रहे पतिपुत्रवतीनारीभर्तुरग्रेमृतायदि वृषोत्सर्गंनकुर्वीतगांदद्यात्पयस्विनीं पतिपुत्रयोःसाहित्यंविवक्षितं अन्वारोहणेपिगोदानमेवेत्युक्तंप्राक् आशौचांतरेपिवृषोत्सर्गाद्यमासिकशय्यादिदद्यादेवेत्युक्तं **क्रियानिबंधेस्मृत्यंतरे** सूतकेमृतकेचैवद्वितीयंमृतकंयदि पिंडदानंप्रकुर्वीतवृषोत्सर्गंतथैवच नहन्यात्सूतकेकर्मद्वादशैकादशाहिकं शुद्धोवायदिवाऽशुद्धःकुर्यादेवाविचारयन्निति ।

**पारस्कर**—"वृषाचें पुच्छ डाव्या हातानें धरून उजव्या हातांत तिलकुशसहित उदक घेऊन प्रेतगोत्राचा उच्चार करून 'अमुकस्मै वृष एष मया दत्तस्तं तारयतु सर्वदा' असा उच्चार करून सुवर्णतिलसहित उदक भूमीवर सोडावें." तसेंच-"त्या सोडलेल्या वृषभाला कोणीं धरूं नये. त्याच्याकडून भार वाहवूं नये. सोडलेल्या पाड्यांचें ( गाईचें ) कोणी दूध काढूं नये व बांधूं नयेत." स्त्रियांविषयीं विशेष सांगतो **संग्रहांत**-"पतिपुत्रयुक्त अशी स्त्री भर्त्याच्या आधीं मृत होईल तर तिला वृषोत्सर्ग करूं नये. त्याच्या स्थानीं दूध देणारी गाई द्यावी." एथें पति व पुत्र जीवंत असतील तर हा वृषोत्सर्गनिषेध समजावा. स्त्रियेचें अनुगमन असतांही गोप्रदानच करावें, असें पूर्वी सांगितलें आहे. दुसरें आशौच असलें तरी वृषोत्सर्ग, आद्य मासिक, शय्या इत्यादि द्यावेंच, असें सांगितलें आहे, **क्रियानिबंधांत स्मृत्यंतरांत**-"जननाशौचांत किंवा मृताशौचांत दुसरें मृताशौच असलें तरी पिंडदान व वृषोत्सर्ग करावा. सूतकांत द्वादशाहिक व एकादशाहिक कर्म टाकूं नये. शुद्ध असो किंवा अशुद्ध असो, विचार न करितां सर्व कृत्य करावेंच."

अत्र**पददानमुक्तंदेवजानीयेगारुडे** एकादशाहंप्रक्रम्य तदाह्निदीयतेसर्वैर्द्वादशाहेविशेषतः पदानि सर्ववस्तूनिवरिष्ठानित्रयोदश योददातिमृतस्येहजीवतोप्यात्महेतवे सुखीभूत्वामहामार्गेवैनतेयसगच्छति **तथा** आसनोपानहौछत्रंमुद्रिकाचकमंडलुः भोजनंभोजनाधारोवस्त्राण्यष्टविधंपदं **तथा** भाजनासनदानेनमुद्रिकाभोजनेनच आज्ययज्ञोपवीतेनपदंसंपूर्णतांव्रजेत् महिषीरथगोदानात्सुखीभवतिनिश्चितं सर्वोपस्करयुक्तानिपदान्यत्रत्रयोदश योददातिमृतस्येहजीवन्नप्यात्महेतवे सगच्छतिपरंस्थानंमहाकष्टविवर्जितः त्रयोदशपदानीत्थंप्रेतायैकादशेहनि दातव्यानियथाशक्तितेनासौप्रीणितोभवेत् अन्नंचैवोदकंचैवोपानहौचकमंडलुः छत्रंवस्त्रंतथायष्टिंलोहदंडंतथाष्टमं अग्नीष्टिकांचदीपंचतिलांस्तांबूलमेवच चंदनंपुष्पदानंचोपदानानिचतुर्दश योश्वंरथंगजंवापिब्राह्मणेप्रतिपादयेत् स्वमहिम्नोनुसारेणतत्तत्सुखमवाप्नुयादिति अत्रमूलंचिंत्यं ।

अकराव्या दिवशीं पददान सांगितलें आहे. **देवजानीयांत गारुडांत** एकादशाहाचा उपक्रम करून सांगतो "अकराव्या दिवशीं सर्व मनुष्य वरिष्ठ सर्ववस्तुरूप पदें तेरा देतात. बाराव्या दिवशीं विशेषकरून देतात. जो मनुष्य मृताच्या उद्देशानें पदें देतो किंवा आपण जीवंत असतां आपल्याकरितां देतो तो मृत झालेला, प्रेताच्या मोठ्या मार्गांत सुखी होऊन जातो." तसेंच-"आसन, उपानह, ( जोडा ), छत्री, मुद्रिका, कमंडलु, भोजन ( अन्न ), भोजनपात्र, वस्त्रें हें आठ प्रकारचें पद होतें." तसेंच-"भोजनपात्र, आसन, मुद्रिका, भोजन, घृत आणि यज्ञोपवीत यांच्या दानानें पद संपूर्ण होतें. महिषी, रथ आणि गाई यांच्या दानानें निश्चयानें सुखी होतो. जो मनुष्य सर्व साहित्यांनीं युक्त अशीं तेरा पदें अकराव्या दिवशीं मृताच्या उद्देशानें देतो; किंवा जीवंत असून आपल्या उद्देशानें देतो तो महाकष्टरहित होऊन उत्तम स्थानाला जातो. याप्रमाणें तेरा पदें मृताला अकराव्या दिवशीं यथाशक्ति द्यावीं, त्या पददानांनीं तो प्राणी संतुष्ट होतो. अन्न, उदक, उपानह, कमंडलु, छत्री, वस्त्र, काठी, लोहदंड, शेगडी, दीप, तिल, तांबूल, चंदन आणि पुष्पें हीं चवदा उपदानें आहेत. जो मनुष्य आपल्या शक्तीला अनुसरून अश्व, रथ किंवा हत्ती ब्राह्मणाला देईल त्याला तें तें सुख प्राप्त होईल." याविषयीं मूलवचन चिंत्य ( अनुपलब्ध ) आहे.

**अथशय्यादानं हेमाद्रौभविष्ये** तस्माच्छय्यांसमासाद्यसारदारुमयींदृढां दंतपत्रचितांरम्यांहेमपट्टैरलंकृतां हंसतूलीप्रतिच्छन्नांशुभगंडोपधानिकां प्रच्छादनपटीयुक्तांगंधधूपादिवासितां तस्यांसंस्थापयेद्धैमंहरिंलक्ष्म्यासमन्वितं अत्रहरिस्थानेप्रेतं उच्छीर्षकेघृतभृतंकलशंपरिकल्पयेत् तांबूलंकुंकुमक्षोदकर्पूरागरुचंदनं दीपिकोपानहौछत्रंचामरासनभाजनं पार्श्वेषुस्थापयेद्भक्त्यासप्तधान्यानिचैवहि शयनस्थस्यभवतियद-

न्यदुपकारकं भृंगारकरकाद्यंतुपंचवर्णवितानकं **मंत्रस्तु** यथानकृष्णशयनंशून्यंसागरजातया शय्याममाप्य-शून्यास्तुतथाजन्मनिजन्मनि यस्मादशून्यंशयनंकेशवस्यशिवस्यच अर्धतदेव दत्वैवंतस्यसकलंप्रणिपत्यविस-र्जयेत् एकादशाहेपितथाविधिरेषप्रकीर्तितः विशेषंचात्रराजेंद्रकथ्यमानंनिशामय तेनोपभुक्तंयत्किंचिद्वस्त्रवा-हनभाजनं यद्यदिष्टंचतस्यासीत्तत्सर्वंपरिकल्पयेत् तमेवपुरुषंहैमंतस्यांसंस्थापयेत्तदा पूजयित्वाप्रदातव्यामृत-शय्यायथोदिता **पाद्मे** मृतकांतेद्वितीयेह्निशय्यांदद्यात्सलक्षणां कांचनंपुरुषंतद्वत्फलवस्त्रसमन्वितं संपूज्य-द्विजदांपत्यंनानामणिविभूषितं उपवेश्यतुशय्यायांमधुपर्कंततोवदेत् रजतस्यतुपात्रेणदधिदुग्धसमन्वितं अस्थिलालाटिकंगृह्यसूक्ष्मंकृत्वासपायसं भोजयेद्द्विजदांपत्यंविधिरेषसनातनः एषएवविधिर्दृष्टःपार्वतीयै-र्द्विजोत्तमैः एतत्प्रतिग्रहेतत्रैवोक्तम् गृहीतायांतुतस्यांवैपुनःसंस्कारमर्हति **शय्यादानफलंभविष्ये** स्वर्गे-पुरंदरपुरेसूर्यपुत्रालयेतथा सुखंवसत्यसौजंतुःशय्यादानप्रभावतः आभूतसंप्लवंयावत्तिष्ठत्यातंकवर्जितमिति ।

## आतां शय्यादान सांगतो—

**हेमाद्रींत भविष्यांत**—"सागाच्या लांकडाची दृढ ( मजबूत ) अशी शय्या ( पलंग ) तयार करावी. तिला हस्ति-दंतांचीं पत्रें बसवावीं. सोन्याच्या पट्या माराव्या. ती शुभ्र वस्त्रानें आच्छादित असावी. तिच्या बाजूचे दंड चांगले गुळगुळीत असावे. उशी चांगली असावी. वरती पलंगपोस घातलेला असावा. गंध, धूप यांचा तिला वास द्यावा. लक्ष्मीसहित हरीची मूर्ति सुवर्णाची करून त्या शय्येवर ठेवावी. ही मूर्ति ठेवणें इतरवेळीं आहे. अकराव्या दिवशीं हरिमूर्तीच्या स्थानीं प्रेताची मूर्ति ठेवावी. उशाकडे तुपाचा भरलेला कलश ठेवावा. तांबूल, केशर वाटलेलें, कापूर, अगरु, दिवा, जोडा, छत्री, चवरी, आसन, पात्र हीं मोठ्या भक्तानें शय्येवर बाजूस ठेवावीं. आणि सप्त धान्यें ठेवावीं. शयनावर असतां जें इतर कांहीं अवश्य पाहिजे असतें म्ह० झारी, कमंडलु इत्यादिक तें असावें. आणि पांचरंगी चांदवा त्या शय्येला असावा. त्या शय्यादानाचा मंत्र-'यथा न कृष्णशयनं शून्यं सागरजातया । शय्या ममाप्यशून्यास्तु तथा जन्मनि जन्मनि । यस्मादशून्यं शयनं केशवस्य शिवस्य च । शय्या ममाप्यशून्यास्तु तथा जन्मनि जन्मनि ।' याप्रमाणें ब्राह्मणाला सर्व देऊन नमस्कार करून विसर्जन करावें. हा विधि इतर वेळीं शय्यादानाचा सांगितला आहे, तसाच अकराव्या दिवशीं देखील शय्यादानाचा हाच विधि आहे. हे राजा! अकराव्या दिवशीं विशेष आहे तो सांगतो श्रवण कर! मृत झालेल्यानें जें कांहीं वस्त्र, वाहन, पात्र वगैरे उपभुक्त असेल तें आणि त्याला जें जें इष्ट असेल तें सारें ब्राह्मणाला द्यावें. तोच मृत झालेला पुरुष सुवर्णाचा करून त्या वेळीं त्या शय्येवर स्थापन करावा. त्याची पूजा करून व ब्राह्मणाची पूजा करून अशी सांगितली आहे तशी मृतशय्या द्यावी." **पद्मपुराणांत**-"मृताशौचाच्या शेवटीं दुसऱ्या दिवशीं सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त अशी शय्या द्यावी. सुवर्णाचा पुरुष करून फल, वस्त्रें यांनीं सहित तो द्यावा. ब्राह्मणाचे दंपतीची पूजा करून नानाप्रकारच्या मण्यांनीं त्यांना भूषित करून शय्येवर बसवून तदनंतर मधुपर्क रुप्याच्या पात्रानें दधिदुग्धयुक्त द्यावा. प्रेताचे ललाटाचें अस्थि ( हाड ) घेऊन बारीक चूर्ण करून तें पायसांत टाकून ब्राह्मणाचे दंपतीला भोजन घालावें. हा विधि सनातन आहे. हाच विधि पर्वतीय ब्राह्मणश्रेष्ठांनीं सांगितला आहे." या शय्येचा प्रतिग्रह केला असता तेथेंच सांगितलें आहे-"ती शय्या घेतली असतां पुनः संस्कार करण्याला पात्र होतो." शय्यादानाचें फल सांगतो **भविष्यांत**-"शय्यादानाच्या प्रभावानें तो प्राणी स्वर्गामध्यें इंद्राचे नगरींत, तसाच यमाच्या घरीं सुखानें वास करितो. भूतांचा प्रलय होई तावत्कालपर्यंत दुःखांनीं रहित होत्साता राहतो."

**अथोदकुंभः हेमाद्रौस्मृतिसमुच्चये** एकादशाहात्प्रभृतिघटस्तोयान्नसंयुतः दिनेदिनेप्रदातव्यो-यावत्संवत्सरंसुतैः **लौगाक्षिः** यस्यसंवत्सरादर्वाक्सपिंडीकरणंभवेत् मासिकंचोदकुंभंचदेयंतस्यापिवत्सरं उत्तरार्धे तस्याप्यन्नंसोदकुंभंदद्यात्संवत्सरंद्विजे इति**याज्ञवल्क्यपाठः** सपिंडनापकर्षेप्यपकर्षप्राप्तेबाधक-मिदमिति**शूलपाणिः** तन्न प्रकृतिविकाराभावेनतदंतन्यायाविषयत्वात् **मात्स्ये** यावदब्दंचयोदद्यादुदकुंभं-विमत्सरः प्रेतायान्नसमायुक्तंसोश्वमेधफलंलभेत् केचित्त्रयोदशाहमारभ्याहुस्तन्निर्मूलं **देवयाज्ञिकः** सपिं-डनापकर्षेसंवत्सरंयावदुदकुंभंअर्वागेवदद्यान्नोर्ध्वं प्रेतलोकगतस्यान्नंसोदकुंभंप्रयच्छतेतिगो**विंदराजधृत-विष्णूक्तेः** अन्नंचैवस्वशक्त्यातुसंख्यांकृत्वाब्दिकावधि दातव्यंब्राह्मणेस्कंदघटादौनिष्कयंतुवा **अपिश्राद्ध**-

१ हा विधि महाराष्ट्र देशांतील शिष्ट स्वीकारीत नाहींत. ज्या देशांत तो आचार असेल त्या ठिकाणीं असो, असें धर्मसिंधु-कार लिहितात.

शतैर्दत्तैरुदकुंभंविनानराः दरिद्रादुःखिनस्तातभ्रमंतिचभवार्णवे तेनापकृष्यदातव्यंप्रेतस्याप्युदकुंभकमिति- **गोभिलभाष्येस्कांदाच्च** सपिंडनात्प्रागेवतस्यविधानादूर्ध्वंनिषेधादित्याह तन्न उदकुंभेपार्वणविधानानुपपत्तेरेवंव्याख्यायांमानाभावान्मिताक्षरादिविरोधाच्च वचनंयदिसमूलंतदावृद्धावपकर्षविधत्ते प्रेतश्राद्धानिसर्वाणिसपिंडीकरणंतथेति **हेमाद्रौशाट्यायनोक्तेः** तस्याप्यन्नंसोदकुंभमिति**याज्ञवल्क्य**- विरोधाच्च ।

## आतां उदकुंभ सांगतो—

**हेमाद्रींत स्मृतिसमुच्चयांत**—"पुत्रांनीं अकराव्या दिवसापासून संवत्सरपर्यंत दररोज उदक व अन्न यांनीं युक्त घट द्यावा." **लौगाक्षि**-ज्याचें सपिंडीकरण वर्षाचे अंतीं होईल त्याला देखील मासिक आणि उदकुंभश्राद्ध वर्षपर्यंत द्यावें." या वचनाचे उत्तरार्धांत 'तस्याप्यन्नं सोदकुंभं दद्यात्संवत्सरं द्विजे' असा **याज्ञवल्क्याचा** पाठ आहे. अर्थ–त्याला देखील उदकुंभसहित अन्न संवत्सरपर्यंत ब्राह्मणांच्या ठिकाणीं द्यावें. वर्षांतीं करावयाचें सपिंडीकरणाचा अपकर्ष करून वर्षाचे आंत केलें असतां उदकुंभाचा अपकर्ष प्राप्त झाला, त्याचें बाधक हें वचन आहे असें **शूलपाणि** सांगतो. तें बरोबर नाहीं. कारण, 'तदंतमपकर्षे स्यात्' म्हणजे ज्याचा अपकर्ष सांगितला असेल तदंत जीं कर्में त्यांचा अपकर्ष करावा, हा जैमिनीचा सूत्रन्याय प्रकृतींत सांगितलेल्या कर्मांचा विकृतींत अपकर्ष करण्याकरितां आहे. या ठिकाणीं प्रकृतिकर्म आणि विकृतिकर्म नसल्यामुळें त्या न्यायाचा येथें विषय नाहीं. **मात्स्यांत**-"जो पुरुष मत्सररहित होऊन वर्षपर्यंत प्रेताला अन्नसहित उदक देईल त्याला अश्वमेधाचें फल प्राप्त होईल." **केचित्** ग्रंथकार-तेराव्या दिवसापासून उदकुंभ द्यावा, असें सांगतात, तें मूलरहित आहे. **देवयाज्ञिक**-सपिंडीकरणाचा अपकर्ष असतां संवत्सरपर्यंत द्यावयाचे उदकुंभ ते सपिंडीकरणाच्या पूर्वींच द्यावे; सपिंडीकरणानंतर देऊं नयेत. कारण, "प्रेतलोकास गेलेल्या प्राण्यास उदकुंभसहित अन्न द्यावें." असें **गोविंदराजानें** धरलेलें **विष्णु**वचन आहे. आणि "आपल्या शक्तीप्रमाणें एकवर्षपर्यंत लागणाऱ्या अन्नाची संख्या करून ब्राह्मणाला द्यावें. घटादिक द्यावें. तें घटादिक देण्याविषयीं अशक्य असेल तर निष्क्रय द्रव्य द्यावें. शेंकडों श्राद्धें केलीं तरी उदकुंभावांचून प्राणी दरिद्री व दुःखी होऊन भवसागरांत भ्रमण करितात, त्यामुळें प्रेताला अपकर्ष करूनही उदकुंभ द्यावा." असें **गोभिलभाष्यांत स्कांद**वचनही आहे, म्हणून सपिंडीकरणाच्या पूर्वींच उदकुंभाचें विधान आहे, सपिंडीकरणानंतर निषेध आहे, असें सांगतो. तें बरोबर नाहीं. कारण, उदकुंभाचे ठायीं पार्वणाचें विधान केलें आहे त्याची उपपत्ति होणार नाहीं. वरील वचनाची-सपिंडीच्या पूर्वींच विधान व नंतर निषेध-अशी व्याख्या करण्याविषयीं प्रमाण नाहीं. आणि तसें म्हटलें तर **मिताक्षरा इत्यादि** ग्रंथांचा विरोधही येतो. तें स्कांदादिवचन जर समूल असेल तर, वृद्धिश्राद्ध कर्तव्य असतां उदकुंभांचा अपकर्ष करावा, असें सांगतें. कारण, "सारीं प्रेतश्राद्धें आणि सपिंडीकरण यांचा अपकर्ष करावा" असें **हेमाद्रींत शाट्यायन**वचन आहे. आणि सपिंडीकरणानंतर करावयाचीं नाहींत असें म्हटलें तर 'तस्याप्यन्नं सोदकुंभं०' ह्या वर सांगितलेल्या **याज्ञवल्क्य**वचनाशीं विरोधही येतो.

**मदनरत्नेगौतमः** अदैवंपार्वणंश्राद्धंसोदकुंभमधर्मकं कुर्यात्प्रत्याब्दिकाच्छ्राद्धात्संकल्पविधिनान्वहं अधर्मकंब्रह्मचर्यादिनियमहीनं एतन्मासिकवदेकोद्दिष्टंपार्वणंवाकार्यं **अपरार्क**स्तु सपिंडीकरणेवृत्तेपृथक्त्वंनोपपद्यते पृथक्त्वेतुकृतेपश्चात्पुनःकार्यासपिंडतेतिल**घुहारीतोक्ता**वपि तस्याप्यन्नंसोदकुंभंदेयंसंवत्सरंद्विजेइति **याज्ञवल्कीये**तस्येत्येकत्वोक्तेः सपिंडनोत्तरमप्येकोद्दिष्टमेवेत्याह अत्रपिंडदानंकृताकृतं अहरहरन्नमस्मैब्राह्मणायोदकुंभंचदद्यात्पिंडमप्येकेनिपृणंतीति**हेमाद्रौपारस्करोक्तेः** श्राद्धाशक्तौपिंडमात्रमिति **गौडाः** तन्न अपिशब्दबाधापत्तेः **हारीतः** मृतेपितरिवैपुत्रःपिंडमब्दंसमाचरेत् अन्नंकुंभंचविप्रायप्रेतनिर्देशधर्मतः प्रेतशब्दोच्चारणेनेति**हलायुधः** यद्वाप्रेतस्यनिर्देशोयत्रतदेकोद्दिष्टंतद्धर्मकमित्यर्थः अत्राशौचांतदिनाद्यब्दांतंयावद्वत्सरापूर्तेःशौचंनाधिकारिविशेषणं तेनमृतिदिनमारभ्यैवतत्कार्यमिति**केचित्** तन्न **हेमाद्रिधृत**वचोविरोधात् मध्येआशौचादिनाबाधेतुलोपएवदार्शवत् तथाप्रथमाब्देदीपदानमुक्तं**देवजानीये गारुडे** प्रत्यहंदीपकोदेयोमार्गेतुविषमेनरैः यावत्संवत्सरंवापिप्रेतस्यसुखलिप्सया प्राङ्मुखोदङ्मुखंदीपंदेवागारेद्विजालये कुर्याद्याम्यमुखंपित्र्येअद्भिःसंकल्प्यसुस्थितं ।

**मदनरत्नांत गौतम**—"सांवत्सरिकश्राद्धापर्यंत दररोज उदकुंभश्राद्ध देवरहित पार्वण अधर्मक ( ब्रह्मचर्यादि नियमरहित ) असें संकल्पविधीनें करावें." हें श्राद्ध मासिकाप्रमाणें एकोद्दिष्ट किंवा पार्वण करावें. **अपरार्क** तर-"सपिंडी

करण झालें असतां पृथक् करणें योग्य नाहीं. पृथक् केलें असतां पुनः सपिंडन करावें" असें **लघुहारीतानें** सांगितलें तरी "त्यालाही वर्षपर्यंत उदकुंभसहित अन्न ब्राह्मणाच्या ठिकाणीं द्यावें." ह्या **याज्ञवल्क्य**वचनांत 'तस्य' त्यालाही, असें एकवचन असल्यामुळें सपिंडीकरणानंतरही एकोद्दिष्टच करावें, असें सांगतो. ह्या उदकुंभश्राद्धांत पिंडदान कृताकृत आहे. कारण, "दररोज प्रेताच्या उद्देशानें ब्राह्मणाला अन्न आणि उदकुंभ द्यावा. कितीएक विद्वान् पिंडही देतात" असें **हेमाद्रींत पारस्कर**वचन आहे. श्राद्धाविषयीं शक्ति नसेल तर पिंडच द्यावे, असें **गौड** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, 'पिंडमपि' 'पिंडही' ह्या अपिशब्दाचा बाध होईल. **हारीत**–"पिता मृत असतां पुत्रानें वर्षपर्यंत पिंड द्यावा. प्रेतनिर्देशधर्मानें अन्न आणि उदकुंभ ब्राह्मणाला द्यावा." प्रेतनिर्देशधर्मतः म्हणजे प्रेतशब्दोच्चारण करून, असें **हलायुध** सांगतो. अथवा प्रेताचा निर्देश ज्यांत आहे तें एकोद्दिष्ट होय, त्याच्या धर्मानें करावें, असा अर्थ समजावा. येथें आशौचसमाप्तीच्या दिवसापासून वर्षाच्या शेवटच्या दिवसापर्यंत संवत्सराची पूर्तता होत नाहीं म्हणून अधिकारी याला शुद्ध हें विशेषण करावयाचें नाहीं. तेणेंकरून अशुद्ध असला तरी मृत दिवसापासून आरंभ करून हें उदकुंभश्राद्ध करावें, असें **केचित्** म्हणतात. तें बरोबर नाहीं. कारण, वरील **हेमाद्रीनें** धरलेल्या **स्मृतिसमुच्चय**वचनाशीं विरोध येतो. मध्यें आशौचादिकानें उदकुंभश्राद्धाचा बाध झाला असतां दर्शादिश्राद्धाप्रमाणें लोपच होतो. तसेंच प्रथमवर्षी दीपदान सांगितलें आहे—**देवजानीयांत गारुडांत**- "प्रेताला विषम मार्गांत सुख व्हावें म्हणून दररोज संवत्सरपर्यंत दीप द्यावा. देवालयांत व ब्राह्मणाच्या घरीं उदकानें संकल्प करून पूर्वेस मुख करून व उत्तरेस मुख करून दीप ठेवावा. आणि पित्र्य कर्मामध्यें दक्षिणेस मुख करून दीप ठेवावा."

**अथमासिकानि** तानिचकृत्वैवसपिंडनंकार्यं तथा**गोभिललौगाक्षी** श्राद्धानिषोडशादत्वानैवकुर्यात्सपिंडनं श्राद्धानिषोडशापाद्यविदधीतसपिंडनं तानित्वाह **जातूकर्ण्यः** द्वादशप्रतिमास्यानिआद्यंषाण्मासिकंतथा त्रैपक्षिकाब्दिकेचेतिश्राद्धान्येतानिषोडश आद्यषाण्मासिकाब्दिकशब्दाःऊनमासिकोनषष्ठोनाब्दिकपराः **हेमाद्रौ**तुसपिंडीकरणंचैवइत्येतत्श्राद्धषोडशमित्युत्तरार्धेपाठः तदा आद्यमूनमासिकंद्वादशाहे षाण्मासिकंऊनषष्ठोनाब्दिकेइत्यर्थः **कात्यायन**स्त्वन्यथाह द्वादशप्रतिमास्यानिआद्यंषाण्मासिकेतथा सपिंडीकरणंचैवइत्येतच्छ्राद्धषोडशम् एकाहेनतुषण्मासायदास्युरपिवात्रिभिः न्यूनःसंवत्सरश्चैवस्यातांषाण्मासिकेतदा द्विवचनादूनषष्ठोनाब्दिकेइत्यर्थमाह**पृथ्वीचंद्रः व्यास**स्त्वन्यथाह द्वादशाहेत्रिपक्षेचषण्मासेमासिकाब्दिके श्राद्धानिषोडशैतानिसंस्मृतानिमनीषिभिः द्वादशाहपदमूनमासिकपरं तस्यद्वादशाहेप्युक्तेरिति **कालादर्शः मदनरत्नेब्राह्मे**त्वन्यथोक्तं नृणांतुत्यक्तदेहानांश्राद्धाःषोडशसर्वदा चतुर्थेपंचमेचैवनवमैकादशेतथा ततोद्वादशभिर्मासैःश्राद्धाद्वादशसंख्ययेति चतुर्थादीनिदिनानि **भविष्ये**त्वन्यथोक्तं अस्थिसंचयनंश्राद्धंत्रिपक्षेमासिकानितु रिक्तयोश्चतथातिथ्योःप्रेतश्राद्धानिषोडशेतिरिक्तयोस्तिथ्योरित्यूनषष्ठोनाब्दिकपरमिति**हेमाद्रिः** अत्रदेशकुलशाखाभेदाद्व्यवस्थेतिसर्व**निबंधाः गालवः** ऊनषाण्मासिकंषष्ठेमासेवाप्यूनमासिकं त्रैपक्षिकंत्रिपक्षेस्यादूनाब्दंद्वादशेतथा ऊनमासिकेतु**गोभिलः** मरणाद्द्वादशाहेस्यान्मास्यूनेवोनमासिकं **मदनरत्नेकालादर्शेच श्लोकगौतमः** एकद्वित्रिदिनैरूनेत्रिभागेनोनएववा श्राद्धान्यूनाब्दिकादीनिकुर्यादित्याह**गौतमः क्रियानिबंधेक्रतुस्तु** सार्धएकादशेमासेसार्धेवैपंचमेतथा ऊनाब्दमूनषण्मासंभवेतांश्राद्धकर्मणीत्युक्तं तत्रमूलंचिंत्यम् ।

## आतां मासिकें सांगतो—

तीं मासिकें करूनच सपिंडन करावें. तेंच सांगतात **गोभिल** व **लौगाक्षि**—"षोडश श्राद्धें ( मासिकें ) केल्यावांचून सपिंडीकरण करूं नयेच. षोडश श्राद्धें करून नंतर सपिंडीकरण करावें." तीं षोडश मासिकें सांगतो **जातूकर्ण्य**-"बारा महिन्यांचीं बारा, ऊनमासिक, ऊनषाण्मासिक, त्रैपक्षिक आणि ऊनाब्दिक अशीं हीं सारीं मिळून सोळा श्राद्धें होतात." या वचनांत 'आद्यं' ह्म० ऊनमासिक. 'षाण्मासिक' ह्म० ऊनषष्ठमासिक. 'आब्दिक' ह्म० 'ऊनाब्दिक' असें समजावें. **हेमाद्रींत** तर-वरील जातूकर्ण्यवचनाच्या उत्तरार्धांत 'सपिंडीकरणं चैव इत्येतच्छ्राद्धषोडशम्' असा पाठ आहे. त्यावेळीं आद्य ह्म० ऊनमासिक तें बाराव्या दिवशीं करावें. आणि षाण्मासिक म्हणजे ऊनषष्ठ व ऊनाब्दिक होय. **कात्यायन** तर निराळें सांगतो-"प्रत्येक महिन्याचीं बारा, आद्यमासिक, षाण्मासिकें, सपिंडीकरण हीं सोळा श्राद्धें होतात. सहा महिने

एक दिवसानें किंवा तीन दिवसांनीं होणारे असतील तेव्हां आणि संवत्सर एक दिवसानें किंवा तीन दिवसांनीं न्यून असेल तेव्हां तीं षाण्मासिक श्राद्धें होतात." या वचनांत 'षाण्मासिके' असें द्विवचन असल्यामुळें ऊनषष्ठ आणि ऊनाब्दिक हीं दोन समजावीं, असा अर्थ सांगतो **पृथ्वीचंद्र. व्यास** तर वेगळेंच सांगतो—"बाराव्या दिवशीं, तीन पक्ष होतील त्या दिवशीं, साहाव्या मासांत, बारामासांत होणारीं आणि आब्दिक हीं सोळा श्राद्धें विद्वानांनीं सांगितलीं आहेत." या वचनांत 'द्वादशाहे' असें पद आहे, त्यानें त्या दिवशीं होणारें ऊनमासिक समजावें. कारण, ऊनमासिक बाराव्या दिवशीं देखील सांगितलें आहे, असें **कालादर्श** सांगतो. **मदनरत्नांत ब्राह्मांत** तर दुसऱ्या रीतीनें सांगितलें आहे–"मृत झालेल्या मनुष्याचीं षोडश श्राद्धें सर्वदा करावीं. तीं अशीं–चवथ्या दिवशीं, पांचव्या, नवव्या, अकराव्या दिवशीं हीं चार होतात. आणि तदनंतर बारा महिन्यांचीं बारा श्राद्धें होतात." **भविष्यांत** तर निराळेंच सांगितलें आहे—"अस्थिसंचयनश्राद्ध, त्रैपक्षिक, मासिकें, आणि रिक्त म्हणजे न्यून तिथींना दोन, अशीं प्रेतश्राद्धें सोळा होतात." रिक्त तिथींना म्हणजे ऊनषष्ठ आणि ऊनाब्दिक समजावीं, असें **हेमाद्रि** सांगतो. असे षोडशश्राद्धांविषयीं मतभेद आहेत त्यांची व्यवस्था देशाचार, कुलाचार व शाखाभेद यांवरून करावी, असें सारे **निबंधकार** सांगतात. **गालव**–"ऊनषाण्मासिक सहाव्या मासांत, ऊनमासिक पहिल्या मासांत, त्रैपक्षिक तीन पक्षांचे ठायीं, आणि ऊनाब्दिक बाराव्या मासांत, अशीं होतात." ऊनमासिका-विषयीं तर सांगतो **गोभिल**—"मरणदिवसापासून बाराव्या दिवशीं किंवा मास पूर्ण झाला नसतां ऊनमासिक करावें." **मदनरत्नांत व कालादर्शांत श्लोकगौतम**–"पहिला महिना एक दिवसानें किंवा दोन दिवसांनीं अथवा तीन दिवसांनीं न्यून असतां ऊनमासिक करावें. असेंच सहावा मास एक, दोन किंवा तीन दिवसांनीं न्यून असतां ऊनषाण्मासिक करावें. तसेंच बारावा मास एक, दोन किंवा तीन दिवसांनीं न्यून असतां ऊनाब्दिक करावें. अथवा त्या त्या मासाच्या त्रिभागानें तो तो महिना न्यून असतां तें तें करावें, असें गौतम सांगतो." **क्रियानिबंधांत, ऋतु** तर "साडे अकरा महिन्यांनीं ऊनाब्दिक होतें. आणि साडे पांचमहिन्यांनीं ऊनषाण्मासिक होतें" असें सांगतो, असें सांगितलें, त्याविषयीं मूल चिंत्य (अनुपलब्ध) आहे.

ऊनेषुवर्ज्यान्याह**मरीचिः** द्विपुष्करेचनंदासुसिनीवाल्यांभृगोर्दिने चतुर्दश्यांचनोनानिकृत्तिकासुत्रिपुष्करे **ज्योतिषे** त्रिपादर्क्षतिथिर्भद्राभौमेज्यरविभिःसह तदात्रिपुष्करोयोगोद्वयोर्योगेद्विपुष्करः **गालवः**-त्रिभिर्वादिवसैरूनेत्वेकेनद्वितयेनवा आद्यादिषुचमासेषुकुर्यादूनाब्दिकादिकम् एकन्यूनपक्षेपंचम्यांमृतस्यतृतीयायांत्रिभिर्न्यूनेप्रतिपदिद्व्यूनेद्वितीयायामितिकेचित् **माधव**स्तु पाण्मासिकाब्दिकेश्राद्धेस्यातांपूर्वेद्युरेवतु मासिकानिस्वकीयेतुदिवसेद्वादशेपिवेति**पैठीनसि**वाक्येऊनषण्मासिकंसप्तममासगतमृताहात्पूर्वेद्युःकार्यं ऊनाब्दिकंतुद्वितीयाब्देमृताहदिनात्पूर्वेद्युःकार्यमित्यर्थमाह पूर्वेद्युर्मृताहादित्यर्थः मासिकानिस्वकीयेतुदिवसेइत्युक्तेः इदमेवयुक्तं **मदनरत्नेप्येवं याज्ञवल्क्यः** मृतेहनितुकर्तव्यंप्रतिमासंतुवत्सरं प्रतिसंवत्सरंचैवमाद्यमेकादशेहनि अत्राद्यमासिकमाब्दिकंचैकादशेहीति**निर्णयामृतादयः** ब्राह्मणंभोजयेदाद्येहोतव्यमनलेथवा पुनश्चभोजयेद्विप्रंद्विरावृत्तिर्भवेदितीति**गोभिली**यंचतद्विपयमाहुः **अन्ये**तुमासपक्षतिथिस्पष्टेइत्यादिविरोधादाब्दिकंवर्षांतेएव मासिकंतुमासादौ द्विरावृत्तिस्तुएकादशाहिकाद्यमासिकपरा **देवयाज्ञिको**-प्येवमाह **लौगाक्षि**रपि मासादौमासिकंकार्यमाब्दिकंवत्सरेगते आद्यमेकादशेकार्यमधिकेत्वधिकंभवेत् **दीपिकायांतु** आद्यंरुद्रमितेर्कसंमितदिनेवास्यादित्युक्तं **गौडा**स्तुमृततिथ्यवधिकेएकदिनाधिके मास-संवत्सरपदंगौणं पूर्णेब्देइतिईषदसमाप्तपरत्वमिति**शूलपाणिः** तेनद्वितीयादिमासादावाद्यमासिकादिति तन्मौर्ख्यंकृतं।

ऊनमासिक, ऊनषाण्मासिक व ऊनाब्दिक यांविषयीं वर्ज्य सांगतो **मरीचि**–"द्विपुष्करयोग, नंदातिथि ( १।६।११ ). चतुर्दशीयुक्त अमावास्या, भृगुवार, चतुर्दशी, कृत्तिकानक्षत्र, आणि त्रिपुष्करयोग यांचे ठायीं ऊन श्राद्धें करूं नयेत." त्रिपुष्कर व द्विपुष्कर योग यांचें लक्षण-**ज्योतिषांत**–"त्रिपाद नक्षत्र, भद्रा तिथि ( २।७।१२ ) आणि भौम, गुरु; रवि हे वार यांपैकीं तिथि, वार, नक्षत्र या तिघांचा योग असतां त्रिपुष्कर योग होतो. आणि दोघांचा योग असतां द्विपुष्कर योग होतो." **गालव**–"प्रथम मास, सहावा मास, व बारावा मास हे, तीन दिवसांनीं किंवा दोन दिवसांनीं अथवा एक दिवसानें न्यून असतां अनुक्रमें ऊनषाण्मासिक व ऊनाब्दिक होतात." हीं एक दिवसानें न्यून असतां त्या पक्षीं पंचमीस मृताचें तृतीयेस ऊनमासिकादि होतें. तीन दिवसांनीं न्यून असतां त्यापक्षीं पंचमीस मृताचें प्रतिपदेस ऊनमासिकादि श्राद्ध. आणि दोन दिवसांनीं न्यून असतां त्या पक्षीं पंचमीस मृताचे द्वितीयेस ऊनमासिकादि होतें, असें **केचित्** विद्वान् सांगतात.

**माधव** तर–"ऊनषाण्मासिक आणि ऊनाब्दिक हीं श्राद्धें पूर्व दिवशींच होतात. आणि इतर मासिकें आपापल्या दिवशीं किंवा बाराव्या दिवशीं होतात." या **पैठीनसि**वाक्याचा–ऊनषाण्मासिक सातव्या मासाच्या मृत तिथीच्या पूर्व दिवशीं करावें. ऊनाब्दिक दुसऱ्या वर्षाच्या मृतदिवसाच्या पूर्वदिवशीं करावें, असा अर्थ सांगतो. पूर्वदिवशीं म्हणजे मृतदिवसाच्या पूर्व दिवशीं समजावें. कारण, मासिकें आपापल्या दिवशीं ( मृतदिवशीं ) करावीं; असें सांगितलें आहे. अर्थात् पूर्वेद्युः म्हणजे त्याच्या पूर्व दिवशीं समजावें. हेंच युक्त आहे. **मदनरत्नांत**ही असेंच आहे. **याज्ञवल्क्य**–"संवत्सरपर्यंत प्रत्येक मासीं मृतदिवशीं करावें. याप्रमाणें प्रत्येक वर्षी मृतदिवशीं करावें. आणि आद्य अकराव्या दिवशीं करावें." या ठिकाणीं आद्य मासिक आणि आब्दिक अकराव्या दिवशीं, असा अर्थ **निर्णयामृत** इत्यादिक ग्रंथकार सांगतात. आणि "आद्यश्राद्धांत ब्राह्मणाला भोजन घालावें किंवा श्राद्धान्नाचा अग्नींत होम करावा. पुनः दुसऱ्या ब्राह्मणाला भोजन घालावें, याप्रमाणें येथें श्राद्धाची द्विरावृत्ति होते." हें **गोभिलाचें** वचन याविषयींच ते ( निर्णयामृतादिक ) सांगतात. **इतर ग्रंथकार** तर–"मास, पक्ष, तिथि यांनीं स्पष्ट केलेल्या ज्या दिवशीं जो मृत असेल त्याचा तो क्षयदिवस आहे, त्या दिवशीं करावें" या **व्यासा**दिवचनाचा विरोध असल्यामुळें आब्दिक श्राद्ध वर्षांतींच करावें. मासिक तर मासाच्या आद्यतिथीस करावें. वरील गोभिलवचनांत द्विरावृत्ति सांगितली ती एकादशाहिक व आद्यमासिक यांविषयीं समजावी. देवयाज्ञिकही असेंच सांगतो. **लौगाक्षि**ही–"मासाच्या आरंभीं मासिक करावें. आणि संवत्सर गेल्यावर आब्दिक करावें. आद्य अकराव्या दिवशीं करावें. अधिक मासांत अधिक होतें." **दीपिकेंत** तर–"आद्य अकराव्या दिवशीं किंवा बाराव्या दिवशीं होतें" असें सांगितलें आहे. **गौड** तर–मृततिथीपासून पुढच्या मासाच्या मृततिथीपर्यंत एक मास व एक दिवस होतो. एका दिवसानें अधिक मासाला मास शब्द गौण ( लाक्षणिक ) आहे. याप्रमाणें दुसऱ्या वर्षाच्या मृततिथीपर्यंत एक वर्ष व एक दिवस होतो त्या ठिकाणींही संवत्सर पद गौण आहे. 'पूर्ण अब्द असतां' असें जें वाक्य तें किंचिन्न्यून वर्षबोधक आहे, असें **शूलपाणि** सांगतो. तेणेंकरून दुसऱ्या वगैरे मासाच्या आधीं ( पूर्वदिवशीं ) आद्यमासिक वगैरे होतात. तें म्हणणें मूर्खपणाचें आहे.

अशक्तौतु**हारीतः** मुख्यंश्राद्धंमासिमासिअपर्याप्तावृतुंप्रति द्वादशाहेनवाभोज्याएकाहेद्वादशापिवा ऋतुंप्रतिद्वेद्वेइत्यर्थः यदापितुर्मरणात्रयोविंशतितमेदिनेदर्शोवृद्धिर्वास्यात्तदाद्वादशदिनेषुद्वादशमासिकानिकार्याणीत्यर्थः त्रैपक्षिकंतुपक्षेतीतेमृताहेकार्यं त्रैपक्षिकंभवेद्वृत्तेत्रिपक्षेतदनंतरमिति**भविष्योक्तेरितिमदनरत्ने** उक्तं **पृथ्वीचंद्रकालादर्शनिर्णयामृतादयस्तु** ऊनान्यूनेषुमासेषुविषमाहेसमेपिवा त्रैपक्षिकंत्रिपक्षेस्यान्मृताहेत्वितराणित्विति **कार्ष्णाजिनिस्मृतेः** पूर्वत्रवृत्तेप्रवृत्तेइत्यर्थमाहुः तेतदनंतरशब्दविरोधात्त्रैपक्षिकद्वितीयमासिकयोःसंकरापत्तेरेवंव्याख्यायांमानाभावाच्चोपेक्ष्याः त्रिपक्षसपिंडनेत्वेवंशब्दाभावादधिकरणत्वमेवज्ञेयं यत्तु**क्रियानिबंधेगारुडे** त्रैपक्षिकंत्रिपक्षेतुप्रवृत्तेविषमेदिने मासिकान्यपिचोनानिअष्टाविंशतिमेदिनेइति तन्निर्मूलम् ।

प्रतिमासीं करण्याला शक्ति नसेल तर सांगतो **हारीत**–"महिन्यामहिन्याला श्राद्ध मुख्य आहे, म्हणजे प्रत्येक ऋतूला दोन दोन श्राद्धें पडतात; तीं करण्याविषयीं अशक्ति असेल तर बाराव्या दिवसापासून तेविसावे दिवसापर्यंत दररोज एकेक श्राद्ध करावें. अथवा एक दिवशीं बारा ब्राह्मणांना भोजन घालावें." याचा अर्थ–ज्या वेळीं पित्याचे मरणदिवसापासून तेविसाव्या दिवशीं दर्श किंवा वृद्धि श्राद्ध असेल त्या वेळीं बारा दिवस बारा मासिकें करावीं, असा आहे. त्रैपक्षिक तर तीन पक्ष झाल्यावर मृतदिवशीं करावें. कारण, "तिसरा पक्ष झाला असतां तदनंतर त्रैपक्षिक होतें" असें **भविष्यवचन** आहे, असें **मदनरत्नांत** उक्त आहे. **पृथ्वीचंद्र, कालादर्श, निर्णयामृत** इत्यादिक तर–"ऊनश्राद्धें ऊनमासांचेठायीं विषम दिवशीं किंवा सम दिवशीं होतात. त्रैपक्षिक तिसऱ्या पक्षांत होतें. इतर मासिकें मृतदिवशीं होतात." या **कार्ष्णाजिनि** स्मृतीवरून वरील भविष्यवचनांत 'तिसरा पक्ष वृत्त म्हणजे प्रवृत्त असतां' असा अर्थ करितात. त्यांच्या त्या अर्थाला त्याच भविष्यवचनांतील 'तदनंतरं' या शब्दाचा विरोध येत असल्यामुळें; आणि तसा अर्थ केला असतां त्रैपक्षिक आणि द्वितीयमासिक यांचा काल एक असल्याकारणानें संकर प्राप्त झाल्यामुळें; आणि अशी व्याख्या करण्याविषयीं प्रमाण नसल्यामुळेंही त्यांची व्याख्या उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे. तिसऱ्या पक्षांत सपिंडन करावें, असें सपिंडीकरणप्रकरणीयवचन आहे त्या ठिकाणीं तर 'तदनंतर' अशा अर्थाचा शब्द नसल्यामुळें 'तिसऱ्या पक्षांत' असाच अर्थ समजावा. आतां जें **क्रियानिबंधांत गारुडांत**–"त्रिपक्ष प्रवृत्त असतां विषम दिवशीं त्रैपक्षिक होतें. मासिकें आणि ऊनश्राद्धें हीं अठ्ठाविसाव्या दिवशीं होतात" असें वचन, तें निर्मूल आहे.

**स्मृतिरत्नावल्यां** द्वादशाहेयदाकुर्यात्पितुःपुत्रःसपिंडनं एकादशेह्निकुर्वीतप्रेतश्राद्धानिषोडश **पैठीनसिः** सपिंडीकरणादर्वाक्कुर्वन्श्राद्धानिषोडश एकोद्दिष्टविधानेनकुर्यात्सर्वाणितानितु सपिंडीकरणादूर्ध्वं

यदाकुर्यात्तदापुनः प्रत्यब्दंयोयथाकुर्यात्तथाकुर्यात्सतान्यपि **मदनरत्नेकात्यायनः** श्राद्धमग्निमतःकार्यं दाहादेकादशेहनि ध्रुवाणितुप्रकुर्वीतप्रमीताहनिसर्वदा ध्रुवाणित्रैपक्षिकादूर्ध्वानि **क्रियानिबंधेगारुडे** त्रिपक्षात्पूर्वतःसाग्नेर्भवेत्संस्कारवासरे ऊर्ध्वंमृतदिनेनग्नेःसर्वाण्येवमृताहतः एतानिचयदासपिंडनात्पूर्वंयुगपत्कुर्यात्तदादेशकालकर्त्रैक्येतंत्रत्वादेकःपाकइतिकेचित् पाकभेदइति**भट्टचरणाः** अत्र**केचि**दाहुः देशकालकर्तृदैवतैक्येतंत्रत्वात् श्राद्धकालातिक्रमापत्तेर्द्वादशाहेथसर्वाणिसंक्षेपेणसमापयेत् तान्येवतुपुनःकुर्यात्प्रेतशब्दंनकारयेत् इति**कात्यायनोक्ते**र्नैकःश्राद्धद्वयंकुर्यात्समानेहनिकुत्रचिदित्यस्यदैवतैक्यपरत्वेप्यत्रतत्सत्त्वात् श्राद्धंकृत्वातुतस्यैवपुनःश्राद्धंनकारयेदिति**जाबाल्युक्तेः** षोडशसंख्यायाश्चवाजपेयेप्राजापत्ययागसप्तदशत्ववत्सान्नाय्ययागद्वित्ववच्चदर्शपातसंक्रांतिश्राद्धवत्युगपदनुष्ठानेप्युपपत्तेराद्यमासिकाद्यूनाब्दिकांतेषुषोडशश्राद्धेषुक्षणःक्रियतामित्येवंप्रयोगेणैकोविप्रःपिंडोर्घ्यश्चेति **विरुद्धविधिविध्वंसे**प्येवं तन्मंदं द्वादशाहेनवाभोज्याएकाहेद्वादशापिवेति**हेमाद्रौहारीत**वचोविरोधात् तेनविप्रभेदात्पिण्डार्घ्याद्यपिभिन्नमितिसिद्धम् ।

**स्मृतिरत्नावलींत**–" ज्या वेळीं पुत्र पित्याचें सपिंडन बाराव्या दिवशीं करील त्या वेळीं सोळा प्रेतश्राद्धें ( मासिकें ) अकराव्या दिवशीं त्यानें करावीं." **पैठीनसि**–"सपिंडीकरणाच्या पूर्वीं सोळा श्राद्धें करीत असतां तीं सारीं एकोद्दिष्टविधीनें करावीं. ज्या वेळीं सपिंडीकरणानंतर पुनः करील त्या वेळीं तीं श्राद्धें जसें प्रतिसांवत्सरिक करावयाचें तशीं करावीं." **मदनरत्नांत कात्यायन**–"अग्निमान् जो असेल त्याचें श्राद्ध दाहदिवसापासून अकराव्या दिवशीं करावें. त्रैपक्षिकाच्या पुढचीं श्राद्धें सर्वदा मृतदिवशीं करावीं." **क्रियानिबंधांत गारुडांत**–"साग्निकाचें त्रैपक्षिकाचे पूर्वीचें श्राद्ध संस्कार-( दाह ) दिवशीं होतें. आणि त्रैपक्षिकाच्या पुढचें श्राद्ध मृतदिवशीं होतें. अनग्निकाचीं सारींच श्राद्धें मृतदिवशीं होतात." हीं श्राद्धें ज्या वेळीं सपिंडीच्या पूर्वीं एकदम करील त्या वेळीं देश, काल व कर्ता एक असतां तंत्र होत असल्यामुळें एक पाक करावा, असें **केचित्** विद्वान् सांगतात. पाकभेद करावा, असें **भट्टचरण** ( नारायणभट्ट ) सांगतात. येथें **केचित्** ग्रंथकार असें सांगतात कीं; देश, काल, कर्ता व देवता हीं एक असलीं म्हणजे तंत्र होत आहे: एक दिवशीं न केलीं तर श्राद्धकालांचा अतिक्रम होत आहे; "बाराव्या दिवशीं सारीं श्राद्धें संक्षेपानें समाप्त करावीं. व तींच श्राद्धें पुनः करावीं, त्या वेळीं प्रेतशब्दाचा उच्चार करूं नये" ह्या **कात्यायन**वचनानें एक दिवशीं करण्यास सांगितलीं आहेत; "एकानें एक दिवशीं कधींही दोन श्राद्धें करूं नयेत" हें निषेधक वचन एक देवतेच्या श्राद्धाविषयीं असलें तरी या ठिकाणीं अनेकांची एक देवता असल्यामुळें तो निषेध येत आहे; "एक वेळां श्राद्ध करून पुनः त्याचेंच श्राद्ध करूं नये" ह्या **जाबालि**वचनानें एकवार करून नंतर त्या दिवशीं करण्याचा निषेध केला आहे; ह्या वरील सर्व वचनावरून एक दिवशीं तंत्रानें करावीं, असें होत आहे. आतां षोडश ( सोळा ) संख्येची उपपत्ति कशी ? असें म्हणाल तर, वाजपेय यज्ञांत 'सप्तदश प्राजापत्यान् पशून् आलभेत' असें **श्रुति**वचन आहे. म्हणजे सतरा प्रजापतिदेवताक पशूंचे याग करावे. या ठिकाणीं जशी सतरा ह्या संख्येची उपपत्ति होते तशी; आणि सान्नाय हवीचे याग दोन करावे, या ठिकाणीं दोन संख्येची उपपत्ति होते तशी; व दर्श, व्यतीपात आणि संक्रांति एक दिवशीं प्राप्त असतां तीन श्राद्धांचें एकदम अनुष्ठान जसें होतें तशी एकदम अनुष्ठानानें सोळा श्राद्धांची उपपत्ति होत आहे म्हणून, 'आद्यमासिकाद्यूनाब्दिकांतेषु षोडशश्राद्धेषु क्षणः क्रियतां' अशा प्रयोगानें श्राद्धें करावीं. त्यांत एक ब्राह्मण असावा, एक पिंड व एक अर्घ्य द्यावा, असें सांगतात. **विरुद्धविधिविध्वंस**ग्रंथांतही असेंच आहे. हें सांगणें मंद आहे. कारण, यांनीं एक ब्राह्मण वगैरे सांगितला आहे त्याला "बारा दिवस बारा ब्राह्मणांना भोजन घालावें, किंवा एक दिवशीं बारा ब्राह्मणांना भोजन घालावें" असें वर सांगितलेल्या **हेमाद्रीं**तील **हारीत**वचनाशीं विरोध येतो. या वचनावरून ब्राह्मण अनेक असल्यामुळें पिंड, अर्घ्य इत्यादिकही अनेक होतात, असें सिद्ध झालें आहे.

एतानिद्वादशाहादौसपिंडनात्पूर्वंकृतान्यपिवृद्धिंविनापकर्षेपुनःस्वकालेकार्याणि यस्यसंवत्सरादर्वाक्सपिंडीकरणंकृतं मासिकंचोदकुंभंचदेयंतस्यापिवत्सरमिति**मदनरत्नेऽगिरसोक्तेः** नचेदंमासिकानामपकर्षविधत्ते किंतुसपिंडनोर्ध्वंस्वकालेनुष्ठानमेवेतिवाच्यं श्राद्धानिषोडशादत्त्वानतुकुर्यात्सपिंडतामितिविरोधात् यस्यसंवत्सरादर्वाग्विहितातुसपिंडता विधिवत्तानिकुर्वीतपुनःश्राद्धानिषोडशेति**माधवीयेगोभिलोक्तेश्च** अर्वाक्संवत्सराद्यस्यसपिंडीकरणंकृतं षोडशानांद्विरावृत्तिंकुर्यादित्याहगौतमइतितत्रैव**गालवोक्तेः** षोडशत्वंचैकादशाहसपिंडनपक्षे तत्राद्यमासिकस्यकालसत्त्वात् अन्यपक्षेषुयथासंभवंज्ञेयं **यत्नुदीपिकायाम्**

अनुमासिकानितुचरेत्तान्येवसापिंड्यतःपश्चाद्द्वादशेत्युक्तेरूनानांनपुनःकृतिरित्युक्तं तदेतद्विरोधाश्चिंत्यम् यत्तु **गौडाः** सपिंडीकरणांतातुज्ञेयाप्रेतक्रियाबुधैरिति**शातातपो**क्तेर्मासिकानांप्रेतत्वविमोक्षार्थत्वात्सपिंडनापकर्षेतदंतन्यायेनतेषामप्यपकर्षान्मासिकानांनपुनः**कृतिः** यत्तु मासिकंचोदकुंभंचेतिलौगाक्ष्यादिवचनं तन्निर्मूलं समूलत्वेपिदार्शपरंचेत्याहुः तेउक्तवक्ष्यमाणवचोनिबंधविरोधान्मूर्खाइत्युपेक्ष्याः यत्तु**मिताक्षरायां**सपिंडनोर्ध्वंस्वकालेएवकार्याणि अपकर्षस्त्वनुकल्पइत्युक्तं तदपिपूर्वविरोधाश्चिंत्यं तेनवृद्धिंविनापकर्षे पुनःकृतिः अर्वाक्संवत्सराद्यस्यसपिंडीकरणंभवेत् प्रेतत्वमिहतस्यापिज्ञेयंसंवत्सरंनृपेत्य**ग्निपुराणात्** वृद्धिनिमित्तापकर्षेत्वस्त्येवतन्निवृत्तिः अन्यथावृद्ध्यसंभवादिति**शूलपाणिः** ।

हीं षोडशश्राद्धें बाराव्या वगैरे दिवशीं सपिंडनाच्या पूर्वी केलीं असलीं तरी वृद्धिकर्मावांचून त्यांचा अपकर्ष झाला असतां पुनः त्यांच्या कालीं तीं करावीं. कारण, "ज्याचें सपिंडीकरण संवत्सराचे आंत केलें असेल त्याला देखील मासिक व उदकुंभश्राद्ध हें संवत्सरपर्यंत द्यावें" असें **मदनरत्नांत अंगिरसाचें** वचन आहे. आतां या वचनानें मासिकांचा अपकर्ष सांगितला नाहीं, तर सपिंडीकरणानंतर स्वकालीं करावींच असें सांगितलें म्हणून अपकर्ष करण्याचें कारण नाहीं, असें कोणी म्हणूं नये. कारण, तसें म्हटलें तर "षोडशश्राद्धें केल्यावांचून सपिंडीकरण करूं नये" या वचनाचा विरोध येईल. आणि "ज्याचें सपिंडीकरण संवत्सराचे आंत केलें असेल त्याचीं तीं षोडशश्राद्धें पुनः यथाविधि करावीं" असें **माधवीयांत गोभिल**वचनही आहे. "ज्याचें सपिंडीकरण संवत्सराचे आंत केलें असेल त्याच्या षोडशश्राद्धांची द्विरावृत्ति करावी, असें गौतम सांगतो." असें तेथेंच **गालवाचें** वचन आहे. षोडशश्राद्धांची द्विरावृत्ति सांगितली ती अकराव्या दिवशीं सपिंडीकरणपक्षीं समजावी. कारण, त्या दिवशीं आद्यमासिकाचा काल आहे, त्यासहित सर्वांचा अपकर्ष होऊन केलेलीं असल्यामुळें सर्वांची पुनरावृत्ति समजावी. इतर दिवशीं सपिंडीकरणपक्षीं जितक्यांचा अपकर्ष केला असेल तितक्यांची पुनरावृत्ति समजावी. आतां जें **दीपिकेंत**—"सपिंडीकरणानंतर तींच अनुमासिकें बारा पुनः करावीं." असें सांगितलें आहे, म्हणून ऊनश्राद्धें पुनः करूं नयेत असें सांगितलें तें दीपिकेचें सांगणें वरील गोभिलादिवचनांशीं विरुद्ध असल्यामुळें चिंत्य म्हणजे प्रमाणशून्य आहे. आतां जें **गौड**—"सपिंडीकरणापर्यंत जी क्रिया ती प्रेतक्रिया जाणावी" या **शातातप**वचनावरून मासिकें प्रेतत्वाची मुक्ति करणारीं असल्यामुळें सपिंडीचा अपकर्ष केला असतां 'तदंतमपकर्षे स्यात्' म्हणजे ज्याचा अपकर्ष सांगितला असेल तदंत जीं कर्में त्यांचा अपकर्ष होतो, या **जैमिनि**सूत्रन्यायानें मासिकांचाही अपकर्ष असल्यामुळें त्या मासिकांची पुनरावृत्ति होत नाहीं. आतां जें "मासिक व उदकुंभ संवत्सरपर्यंत द्यावें" असें पूर्वी सांगितलें तें वचन निर्मूल आहे. समूल आहे, असें म्हटलें तरी दर्शश्राद्धविषयक समजावें, असें ( गौड ) सांगतात. त्यांचें तें सांगणें पूर्वी सांगितलेल्या व पुढें सांगावयाच्या वचनांशीं व निबंधग्रंथांशीं विरुद्ध असल्यामुळें मूर्खत्व असें समजून तें उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे. आतां जें **मिताक्षरेंत**—सपिंडीकरणानंतर आपल्या कालींच करावीं, अपकर्ष करणें हा अनुकल्प ( कनिष्ठपक्ष ) आहे, असें सांगितलें तेंही पूर्वी सांगितलेल्या वचनाशीं विरुद्ध असल्यामुळें चिंत्य आहे. तेणेंकरून वृद्धीवांचून अपकर्ष केला असतां पुनः करावीं. कारण, "ज्याचें सपिंडीकरण संवत्सराचे आंत होईल त्यालाही संवत्सरपर्यंत प्रेतत्व आहे" असें **अग्निपुराण**वचन आहे. वृद्धिनिमित्तानें अपकर्ष केला असेल तर त्या मासिकांची निवृत्ति आहेच. निवृत्ति केल्यावांचून वृद्धीचा असंभव आहे, असें **शूलपाणि** सांगतो.

**कार्ष्णाजिनिः** सपिंडीकरणादर्वागपकृष्यकृतान्यपि पुनरप्यपकृष्यंतेवृद्ध्युत्तरनिषेधनात् निषेधंचाह **कात्यायनः** निर्वर्त्यवृद्धितंत्रंतुमासिकानिनतंत्रयेत् अयातयाममरणंनभवेत्पुनरस्त्विति द्विरनुष्ठानंचोक्तरेषामेव नपूर्वेषांस्वस्वकालकृतानां तदाह**माधवीयेकार्ष्णाजिनिः** अर्वागब्दाद्यत्रयत्रसपिंडीकरणंकृतं तदूर्ध्वमासिकानांस्याद्यथाकालमनुष्ठितिः **हेमाद्रौशाट्यायनिः** प्रेतश्राद्धानिशिष्टानिसपिंडीकरणंतथा अपकृष्यापिकुर्वीतकर्तुंनांदीमुखंद्विजः वृद्धिंविनापकर्षेदोषमाह**उशनाः** वृद्धिश्राद्धविहीनस्तुप्रेतश्राद्धानियश्चरेत् सश्राद्धीनरकेघोरेपितृभिःसहमज्जतीति आधानेपकर्षमाह**हेमाद्रावुशनाः** पितुःसपिंडीकरणं वार्षिकेमृतिवासरे आधानाद्युपसंप्राप्तावेतत्प्रागपिवत्सरात् विशेषस्तूक्तोविवाहनिर्णये **कण्वः** नवश्राद्धं मासिकंचयद्यदंतरितंभवेत् तत्तदुत्तरसातंत्र्यादनुष्ठेयंप्रचक्षते **गारुडेपि** आपदाद्यकृतंयत्तुकुर्यादूर्ध्वं मृताहनि ।

**कार्ष्णाजिनि**—"सपिंडीकरणाच्या पूर्वी अपकर्ष करून केलीं असलीं तरीं वृद्धिकर्म आलें असतां पुनः अपकर्ष करून करावीं, कारण, वृद्धिकर्मानंतर त्या श्राद्धांचा निषेध आहे." निषेध सांगतो **कात्यायन**—"वृद्धिकर्म करून नंतर आब्दिकें

करूं नयेत. कारण, वृद्धिकर्म केल्यावर पुनः याचें मरण अयातयाम ( ताजें, प्रेतश्राद्ध ग्रहण करणारें ) होत नाहीं." द्विरावृत्ति सांगितली ती सपिंडीच्या पुढच्याचीच समजावी. आपापल्या कालीं केलेल्या पूर्वींच्यांची नाहीं; तें सांगतो **माधवीयांत कार्ष्णाजिनि**-"वर्षाच्या आंत ज्या ज्या कालीं सपिंडीकरण केलें असेल त्याच्या पुढील मासिकांनें आपापल्या कालीं पुनः अनुष्ठान करावें." **हेमाद्रींत शाठ्यायनि**-"द्विजानें अवशेष राहिलेलीं प्रेतश्राद्धें तसेंच सपिंडीकरण हीं नांदीमुख ( नांदीश्राद्धयुक्तकर्म ) करण्याकरितां अपकर्ष करूनही करावीं." वृद्धीवांचून अपकर्ष केला असतां दोष सांगतो **उशना**-"जो मनुष्य वृद्धिश्राद्धावांचून प्रेतश्राद्धांचा अपकर्ष करितो, तो श्राद्ध करणारा घोर नरकांत पितरांसह बुडतो." आधान कर्तव्य असतां अपकर्ष सांगतो **हेमाद्रींत उशना**-"पित्याचें सपिंडीकरण वर्षाच्या मृतदिवशीं होतें. आधानादिक प्राप्त असतां हें सपिंडीकरण संवत्सराचे पूर्वीं देखील होतें." विशेष निर्णय तर विवाहनिर्णयप्रसंगीं सांगितला आहे. **कण्व**-"नवश्राद्ध आणि मासिक जें जें अंतरित असेल तें तें उत्तर ( पुढील ) श्राद्धाच्या सहतंत्रानें करावें, असें विद्वान् सांगतात." **गारुडांत**ही-"आपत्ति वगैरे असल्यामुळें जें केलें नसेल तें पुढच्या मृततिथीस करावें."

**अथसपिंडीकरणं माधवीयेहारीतः** यातुपूर्वामावास्यायामृताहाद्दशमीभवेत् सपिंडीकरणंतस्यांकुर्यादेवसुतोग्निमान् मृताहादूर्ध्वंदशमीएकादशीत्यर्थः सपिंडीकरणंकुर्यात्पूर्ववच्चाग्निमान्सुतः परतोदशरात्राच्चेत्कुहूरब्दोपरीतरइति**कार्ष्णाजिनिस्मृतेः** आहिताग्नेस्तेनविनाश्रौतपिंडपितृयज्ञासिद्धेः तदाह **गालवः** सपिंडीकरणात्प्रेतेपैतृकंपदमास्थिते आहिताग्नेःसिनीवाल्यांपितृयज्ञःप्रवर्तते **मदनरत्नेप्रजापतिः** नासपिंड्याग्निमान्पुत्रःपितृयज्ञंसमाचरेत् **अपरार्केकात्यायनः** एकादशाहंनिर्वर्त्यपूर्वंदर्शाद्यथाविधि प्रकुर्वीताग्निमान्विप्रोमातापित्रोःसपिंडतां आशौचांतप्रथमदर्शयोर्मध्येकस्मिंश्चिदहनीत्यर्थः पित्रादीनां सपत्नीकानांदेवतात्वेनमातुरपिप्राग्दर्शात्सपिंडनंयुक्तमित्य**परार्कः** एवंपितामहादेरपिसपिंडनंप्राग्दर्शात्कार्यं तेनविनापार्वणायोगात् द्वादशाहेवाकार्यम् साग्निकस्तुयदाकर्ताप्रेतश्चानग्निमान्भवेत् द्वादशाहेभवेत्कार्यंसपिंडीकरणंसुतैरिति**गोभिलोक्तेः** साग्नेःप्रेतस्यतुत्रिपक्षे प्रेतश्चेदाहिताग्निःस्यात्कर्तानग्निर्यदाभवेत् सपिंडीकरणंतस्यकुर्यात्पक्षेतृतीयकइति**सुमंतूक्तेः मदनरत्नेलघुहारीतोपि** अनग्निस्तुयदावीरभवेत्कुर्यात्तदागृही प्रेतश्चेदग्निमांस्तुस्यात्त्रिपक्षेवैसपिंडनं द्वयोःसाग्नित्वेद्वादशाहएव साग्निकस्तुयदाकर्ताप्रेतोवाप्यग्निमान्भवेत् द्वादशाहेतदाकार्यंसपिंडीकरणंपितुरितितेनैवोक्तेः ।

## आतां सपिंडीकरण सांगतो—

**माधवीयांत हारीत**-"जी अमावास्येच्या पूर्वींची आणि मृत दिवसाहून पुढची दशमी म्हणजे मृतदिवस धरून अकरावी तिथि असेल त्या तिथीस अग्निमान् ( श्रौताग्नि धारण करणाऱ्या ) पुत्रानें पित्याचें सपिंडीकरण करावें." "अग्निमान् पुत्रानें मृतदिवसाहून दहा दिवसांचे पुढें अमावास्या असेल तर दहा दिवसांनंतर सपिंडीकरण करावें, इतरानें ( अनग्निकानें ) वर्षानंतर सपिंडीकरण करावें." अशी **कार्ष्णाजिनि**स्मृति आहे, म्हणून अकराव्या दिवशीं सपिंडीकरण करावें. सपिंडीकरण केल्यावांचून आहिताग्नीचा श्रौत पिंडपितृयज्ञ सिद्ध होत नाहीं. तें सांगतो **गालव**-"सपिंडीकरणापासून प्रेताला पितृत्व प्राप्त झालें असतां आहिताग्नीचा अमावास्येस पितृयज्ञ प्रवृत्त होतो." **मदनरत्नांत प्रजापति**-"अग्निमान् पुत्रानें सपिंडी केल्यावांचून पिंडपितृयज्ञ करूं नये." **अपरार्कांत कात्यायन**-"अग्निमान् ब्राह्मणानें दर्शाच्या पूर्वीं एकादशाहकृत्य यथाविधि करून नंतर मातापितरांचें सपिंडन करावें." आशौचसमाप्तीचा दिवस आणि प्रथम दर्श यांच्यामध्यें कोणत्याही दिवशीं सपिंडन करावें, असा अर्थ समजावा. पिंडपितृयज्ञांत पित्रादिक सपत्नीक देवता असल्यामुळें मातेचेंही दर्शाच्या पूर्वीं सपिंडीकरण युक्त आहे, असें **अपरार्क** सांगतो. याप्रमाणें पितामहादिकांचेंही दर्शाच्या पूर्वीं सपिंडन करावें. कारण, पितामहावांचून पार्वण होत नाहीं. अथवा बाराव्या दिवशीं सपिंडन करावें. कारण, "जेव्हां कर्ता अग्निमान् असेल आणि प्रेत अग्निरहित असेल त्या वेळीं बाराव्या दिवशीं पुत्रांनीं सपिंडीकरण करावें" असें **गोभिल**वचन आहे. साग्निक प्रेताचें तर तिसऱ्या पक्षांत करावें. कारण, "ज्या वेळीं प्रेत आहिताग्नि ( श्रौताग्निमान् ) असून कर्ता अग्निरहित असेल त्या वेळीं त्याचें सपिंडीकरण तिसऱ्या पक्षीं करावें" असें **सुमंतु**वचन आहे. **मदनरत्नांत लघुहारीत**ही-"ज्या वेळीं गृहस्थाश्रमी कर्ता अग्निरहित असेल आणि मृत झालेला अग्निमान् असेल त्या वेळीं त्याचें सपिंडीकरण तिसऱ्या पक्षीं करावें." दोन्ही अग्निमान् असतील तर बाराव्या दिवशींच करावें. कारण, "ज्या वेळीं कर्ता अग्निमान् आणि प्रेतही अग्निमान् असेल त्या वेळीं त्या मृतपित्याचें सपिंडीकरण बाराव्या दिवशीं करावें" असें त्यांतेंच सांगितलें आहे.

द्वयोरनग्निमत्त्वेतु **भविष्ये** सपिंडीकरणंकुर्याद्यजमानस्त्वनग्निमान् अनाहिताग्नेःप्रेतस्यपूर्णेब्देभरतर्षभ द्वादशेहनिषण्मासेत्रिपक्षेवात्रिमासिवा एकादशेपिवामासिमंगलस्याप्युपस्थितौ **कात्यायनगोभिलौ** यदहर्वावृद्धिरापद्येतेति तच्चवृद्धिदिनेएवेति**वाचस्पतिः** तन्न प्रातर्वृद्धिनिमित्तकमितिनियमात्सपिंडनस्यचा-पराह्णकालीनत्वेनपूर्वत्वबाधापत्तेः वृद्धिदिनेतत्पूर्वदिनेवेति**श्रीदत्तः** **स्मार्तगौडस्तु**वृद्धिपूर्वःवर्षांत्यक्षण:सपिंडनस्यप्रेतत्वनाशेसहकारी तेनपरेद्युर्विघ्नाद्वृद्ध्यभावेपितत्कर्तव्यतानिश्चयसहितमेवकालांतरक्रियमा-णवृद्धिपूर्वक्षणसहकृतंप्रेतत्वनाशकमित्याह तन्न अकालेकृतस्यफलाजनकत्वात् एतेननिमित्तनिश्चयवतएवा-धिकारात् वृद्ध्यभावेपिनक्षतिरितिमिश्रोक्तिःपरास्ता वृद्धिपूर्वदिनस्यचकालस्यांगत्वेननिमित्तत्वाभावात् तेन-पुनःकार्यमित्य**न्ये** **मदनरत्नेपुलस्त्यः** निरग्निकःसपिंडत्वंपितुर्मातुश्चधर्मतः पूर्णेसंवत्सरेकुर्याद्वृद्धिर्वायद्दहर्भवेत् **चतुर्विंशतिमते** सपिंडीकरणंचाब्देसंपूर्णेभ्युदयेपिवा द्वादशाहेतुकेषांचिन्मतंचैकादशेतथा ।

दोघे अग्निरहित असतील तर सांगतो **भविष्यांत**–"यजमान ( कर्ता ) अग्निरहित असून प्रेत अग्निरहित असेल त्या वेळीं त्याचें सपिंडीकरण पूर्ण वर्षांतीं करावें. अथवा बाराव्या दिवशीं किंवा सहाव्या मासीं अथवा तिसऱ्या पक्षीं किंवा तिसऱ्या मासीं, अथवा अकराव्या मासीं किंवा मंगलकार्य उपस्थित असतां सपिंडीकरण करावें." **कात्यायन व गोभिल**–"अथवा ज्या दिवशीं वृद्धिश्राद्ध प्राप्त होईल त्या दिवशीं करावें." तें वृद्धिप्रयुक्त सपिंडीकरण वृद्धिदिवशींच करावें, असें **वाचस्पति** सांगतो. तें बरोबर नाहीं. कारण, वृद्धिश्राद्ध प्रातःकालीं करावें, असा नियम असल्यामुळें व सपिंडीकरणाचा अपराह्णकाल असल्यामुळें सपिंडीकरण पूर्वी झालें पाहिजे, त्याचा बाध होईल. वृद्धिश्राद्धदिवशीं किंवा त्याच्या पूर्व दिवशीं सपिंडीकरण करावें, असें **श्रीदत्त** सांगतो. **स्मार्त गौड** तर–सपिंडीकरणाला प्रेतत्वनाशरूप कार्य करण्याविषयीं वृद्धिकर्माचा पूर्वक्षण आणि वर्षाचा अंत्यक्षण हा सहकारी आहे. तेणेंकरून, दुसऱ्या दिवशीं विघ्नाच्या योगानें वृद्धिकर्म झालें नाहीं तरी वृद्धिकर्म करावयाच्या निश्चयानें सहितच कालांतरीं होणाऱ्या वृद्धीचा पूर्वक्षण प्रेतत्वनाशाविषयीं सपिंडनाला सहकारी होतो, असें सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, अकालीं केलेलें सपिंडन प्रेतत्वनाशरूप फल उत्पन्न करीत नाहीं. येणेंकरून, निमित्ताच्या ( वृद्धिकर्माच्या ) निश्चयवंतालाच अधिकार असल्यामुळें वृद्धिकर्म जरी झालें नाहीं तरी दोष नाहीं. कारण, वृद्धिकर्माचा निश्चय आहे, असें **मिश्राचें** सांगणें खंडित झालें. कारण, वृद्धिपूर्वदिनरूप जो काल तो सपिंडीकरणाला अंग असल्यामुळें त्या पूर्वदिनरूप कालाचा अभाव असल्यामुळें सपिंडीकरणरूप कर्म अंगहीन झालें. त्यामुळें तें सपिंडीकरण पुनः करावें, असें **इतर विद्वान्** सांगतात. **मदनरत्नांत पुलस्त्य**–"निरग्निकानें पित्याचें व मातेचें सपिंडीकरण पूर्ण वर्षांतीं करावें. अथवा ज्या दिवशीं वृद्धिकर्म असेल त्या दिवशीं करावें." **चतुर्विंशतिमतांत**–"सपिंडीकरण संपूर्ण वर्षाचे ठायीं करावें. किंवा आभ्युदयिक ( वृद्धिकर्म ) प्राप्त असतां करावें. कितीएकांचें मत बाराव्या दिवशीं, तसेंच अकराव्या दिवशीं सपिंडन करावें, असें आहे.

**पृथ्वीचंद्रोदयेबौधायनः** अथसपिंडीकरणंत्रिपक्षेवातृतीयेवामासिपष्ठेचैकादशेवाद्वादशेवाद्वादशा-हेचेति एतत्प्रक्रमे**विष्णुः** मासिकार्थंद्वादशाहंश्राद्धंकृत्वात्रयोदशेह्निवाकुर्यान्मंत्रवर्जंहिशूद्राणांद्वादशेह्निसंव-त्सराभ्यंतरेयद्यधिमासोभवेत्तदामासिकार्थंदिनमेकंवर्धयेदिति आशौचोत्तरंद्वादशस्वहःसुमासिकानितेष्वेवा-द्यपष्ठद्वादशदिनेपूनमासिकादीनिकृत्वात्रयोदशेह्निसपिंडनंकुर्यात् अधिमासेतुचतुर्दशेह्निकुर्यात् शूद्रस्त्रयोदशे-द्वादशेह्नीत्यस्यमासिकांत्यदिनपरत्वादितिपृ**थ्वीचंद्रः** **पैठीनसिः** संवत्सरांतेसंसर्जननवमेमासीत्येके अत्रसाग्नेरनग्नेर्वोक्तकालाभावेत्रिपक्षादिसंवत्सरांताअनुकल्पाज्ञेयाः **कल्पतरुस्त्व**ग्नेवृद्धिनिश्चयएवसर्वेपक-र्षप्रकाराइत्याह तन्न यदहर्वेतिस्वातंत्र्यश्रुतेः यद्यपिवृद्धिनिमित्तोपकर्षोनिरग्नेरेवोक्तस्तथापिसाग्नावपिज्ञेयः उक्तकालासंभवेवर्षांतादिगौणकालवद्वृद्धेरपिप्राप्तेः वक्ष्यमाण**गोभिल**वचनात् अयातयाममरणंनभवेत्पुन-रस्त्वितिदोषश्रुत्यविशेषाच्च **अपरार्कपृथ्वीचंद्रादि**स्वरसोप्येवं अत्रवृद्धिपदंचूडोपनयनविवाहमात्रप-रम् सीमंतादौतुवृद्धिश्राद्धलोपएवेत्या**चार्यचूडामणिः** पुंसवनाद्यन्नप्राशनान्तेष्वावश्यकेष्वपकर्षइति **श्राद्धविवेकः** **श्रुतिसागरेपिबृहस्पतिः** प्रत्यवायोभवेद्यस्मिन्नकृतेवृद्धिकर्मणि तन्निमित्तंसमाकृष्य पित्रोःकुर्यात्सपिंडनं गर्भाधानस्यकृत्वंतरेपिसंभवात् अन्यश्राद्धंपरान्नंचगंधमाल्यंचमैथुनमितिवृद्धवचनेनप्रथ-माब्देमैथुननिषेधाच्च नतत्रापकर्षइति**श्राद्धकौमुद्यादयः** तन्न ऋतुस्नातांतुयोभार्यामितिनिषेधादुपपत्त्या-

येवपर्वाण्याद्याश्चतस्रश्चवर्जयेदितिमैथुनेदोषाभावाच्च पितामहमरणेपौत्रस्यवृद्धौनापकर्षः तस्यमहागुरुत्वाभावात् तत्रतदूर्ध्वेभ्योवृद्धिश्राद्धमितिश्राद्धचंद्रिका तन्न भ्रातात्वेत्यादौतदभावेप्यपकर्षोक्तेः तेननिर्देशोप्युपलक्षणम् ।

**पृथ्वीचंद्रोदयांत बौधायन**-"आतां सपिंडीकरण तिसऱ्या पक्षीं, किंवा तिसऱ्या मासीं, अथवा सहाव्या मासीं, किंवा अकराव्या मासीं, अथवा बाराव्या मासीं, किंवा बाराव्या दिवशीं करावें." सपिंडीकरणाचा उपक्रम चालला असतां सांगतो **विष्णु**-"बारा दिवस बारा मासिकश्राद्धें करून तेराव्या दिवशीं करावें; शूद्राचें मंत्ररहित बाराव्या दिवशीं करावें. संवत्सरामध्यें जर अधिक मास असेल तर मासिकाकरितां एक दिवस वाढवावा." याचा अर्थ-आशौच समाप्तीनंतर बारा दिवस बारा मासिकें आणि त्यांत पहिल्या, सहाव्या व बाराव्या दिवशीं ऊनमासिक, ऊनषाण्मासिक व ऊनाब्दिक हीं करून तेराव्या दिवशीं सपिंडन करावें. वर्षामध्यें अधिक मास असेल तर चवदाव्या दिवशीं सपिंडन करावें. शूद्रानें तेराव्या दिवशीं करावें. बाराव्या दिवशीं असें जें म्हटलें तें मासिकांच्या अंत्यदिवशीं असें आहे, असें **पृथ्वीचंद्र** सांगतो. **पैठीनसि**-"वर्षांतीं सपिंडीकरण होतें. नवव्या मासांत करावें, असें कितीएक सांगतात." ह्या सपिंडीकरणाविषयीं साग्निकाला किंवा अग्निरहिताला वर सांगितलेल्या मुख्य कालांच्या अभावीं त्रिपक्ष इत्यादिक संवत्सरापर्यंत अनुकल्प ( कनिष्ठ ) काल जाणावे. **कल्पतरु** तर-पुढें वृद्धिकर्माचा निश्चय असतांच सारे अपकर्षप्रकार आहेत, असें सांगतो. तें बरोबर नाहीं. कारण, "अथवा ज्या दिवशीं वृद्धि प्राप्त होईल त्या दिवशीं सपिंडन अपकर्ष करून करावें" असें **कात्यायन** व **गोभिल** यांच्या वर सांगितलेल्या वचनावरून वृद्धिनिमित्तक अपकर्ष स्वतंत्र सांगितला आहे. जरी वृद्धिनिमित्तक अपकर्ष निरग्निकालाच सांगितला आहे तरी तो साग्निकालाही जाणावा. कारण, वर सांगितलेल्या ( एकादशाहादि ) मुख्य कालाच्या असंभवीं वर्षांत इत्यादिक गौणकाल जसे साग्निकाला प्राप्त होतात तसा वृद्धिकर्मरूप कालही त्याला प्राप्त होतो. ते गौणकाल पुढें सांगावयाच्या **गोभिला**च्या वचनावरून साग्निकाला प्राप्त होतात. आणि "वृद्धिकर्म केल्यावर प्रेतश्राद्ध करून मरण ताजें करूं नये" ह्या **कात्यायन**वचनानें वृद्धिश्राद्धानंतर प्रेतश्राद्ध केलें असतां मरण ताजें होतें, हा दोष निरग्निकालाच आहे असें नाहीं, तर साग्निकालाही आहे. **अपरार्क, पृथ्वीचंद्र** इत्यादि ग्रंथांचें स्वारस्यही असेंच आहे. ह्या अपकर्षप्रकरणीं 'वृद्धि' या पदानें चौल, उपनयन, आणि विवाह हीं तीनच संस्कारकर्में समजावीं. सीमंतादि संस्कारांमध्यें तर वृद्धिश्राद्धाचा लोपच होतो, असें **आचार्यचूडामणि** सांगतो. पुंसवनादिक अन्नप्राशनांत आवश्यक संस्कारांमध्यें अपकर्ष करावा, असें **श्राद्धविवेक** सांगतो. **श्रुतिसागरांतही बृहस्पति**-"जें वृद्धिकर्म केलें नसतां प्रत्यवाय ( दोष ) उत्पन्न होईल त्या निमित्तानें मातापितरांचें सपिंडन अपकर्ष करून करावें." गर्भाधान इतर ( पुढील ) ऋतुदर्शनीं देखील होण्याचा संभव असल्यामुळें, आणि "इतरांचें श्राद्धभोजन, परान्न, गंधमाल्यांचा उपभोग आणि मैथुन हीं करूं नयेत." ह्या **देवल**वचनानें प्रथम वर्षांत मैथुनाचा निषेध केल्यामुळेंही त्या गर्भाधानाविषयीं सपिंडीचा अपकर्ष करूं नये, असें **श्राद्धकौमुदी** इत्यादि ग्रंथकार सांगतात, तें बरोबर नाहीं. कारण, "जो मनुष्य ऋतुस्नात भार्येप्रत संनिध असतां गमन करीत नाहीं त्याला भ्रूणहत्यादोष प्राप्त होतो." या वचनानें मैथुन न करण्याचा निषेध आहे. आणि "पर्वदिवस व पहिल्या चार रात्री वर्ज्य करून ऋतुकालीं गमन करणारा ब्रह्मचारीच असतो." या वचनानें मैथुनाविषयीं दोषही नाहीं. पितामह मृत असून पौत्राला वृद्धिकर्म करावयाचें असतां त्याचे सपिंडीकरणाचा अपकर्ष होत नाहीं. कारण, तो पितामह महागुरु नाहीं. त्या ठिकाणीं ( पितामहमरणसमयीं ) त्या पितामहाच्या पूर्वींच्यांचें वृद्धिश्राद्ध करावें, असें **श्राद्धचंद्रिका**कार सांगतो. तें बरोबर नाहीं. कारण, भ्राता मृत असतां, इत्यादि स्थलीं महागुरूचा अभाव असतां अपकर्ष सांगितला आहे. त्यावरून महागुरूचा निर्देश केला तो पितामहादिकांचें उपलक्षण ( बोधक ) आहे.

**व्याघ्रः** आनंत्यात्कुलधर्माणांपुंसांचैवायुषःक्षयात् अस्थितेश्चशरीरस्यद्वादशाहःप्रशस्यते एतदाशौचांतोपलक्षणं सर्वेषामेववर्णानामाशौचांतेसपिंडनमिति**निर्णयामृतेकात्यायनोक्तेः** सर्वेषामितित्रैवर्णिकपरं शूद्राणांत्वाशौचमध्ये मंत्रवर्जंहिशूद्राणांद्वादशेहनिकीर्तितमिति**विष्णूक्तेः** एतदर्शश्राद्धकारिशूद्रविषयमित्यपरार्केकल्पतरौच **वृद्धमनुः** द्वादशेहनिविप्राणामाशौचांतेतुभूभुजाम् वैश्यानांतुत्रिपक्षाद्वाथवास्यात्सपिंडनं ।

**व्याघ्र**-"सपिंडीकरण लवकर न केलें तर कुलधर्म अनंत आहेत त्यांना नड येईल म्हणून, आणि पुरुषांचे आयुष्याचा क्षय असल्यामुळें शरीर स्थिर नाहीं, म्हणूनही सपिंडीकरणाला बारावा दिवस प्रशस्त आहे." बारावा दिवस प्रशस्त असें सांगणें हें आशौचसमाप्तीचें उपलक्षण ( बोधक ) आहे. कारण, "सान्याच वर्णांचें सपिंडन आशौचांतीं होतें" असें **निर्णयामृतांत कात्यायनवचन** आहे. ह्या वचनांत 'सर्वेषां' हें पद ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ह्या तीन वर्णांचें बोधक आहे.

शूद्रांचें तर आशौचामध्यें सपिंडन होतें." कारण, "शूद्रांचें बाराव्या दिवशीं अमंत्रक सपिंडन सांगितलें आहे" - असें विष्णुवचन आहे. हें वचन दर्शश्राद्ध करणाऱ्या शूद्राविषयीं आहे, असें अपरार्कांत व कल्पतरूंत सांगितलें आहे. वृद्धमनु—"अथवा ब्राह्मणांचें बाराव्या दिवशीं, क्षत्रियांचें आशौचांतीं, वैश्यांचें तिसऱ्या पक्षीं वगैरे सपिंडन होतें."

**निर्णयामृतेगोभिलः** द्वादशाहादिकालेषुप्रमादादननुष्ठितं सपिंडीकरणंकुर्यात्कालेषूत्तरभाविषु इदंसाग्नेरुक्तकालासंभवेगौणकालविधानार्थमितिमदनपारिजातः **मदनरत्नेप्येवं ऋष्यशृंगः** सपिंडीकरणंश्राद्धमुक्तकालेनचेत्कृतं रौद्रेहस्तेचरोहिण्यांमैत्रभेवासमाचरेत् **कालादर्शेपि** एकादशेद्वादशेह्नित्रिपक्षेवात्रिमासिवा षष्ठेचैकादशेवाब्देसंपूर्णेवाशुभागमे सपिंडीकरणस्येत्थमष्टौकालाःप्रकीर्तिताः साग्नौकर्तर्युभावाद्यौप्रेतेसाग्नौतृतीयकः अनग्नेस्तुद्वितीयाद्याःसप्तकालामुनीरिताः रोहिणीरौद्रहस्तेषुमैत्रभेवापितच्चरेत् **नारदसंहितायांतु** सपिंडीकरणंकार्यंवत्सरेवार्धवत्सरे त्रिमासेवात्रिपक्षेवामासिवाद्वादशेह्निवेत्युक्तं वत्सरेतीतेज्ञेयम् ततःसपिंडीकरणंवत्सरात्परतःस्थितमिति**भविष्योक्तेः** पितुःसपिंडीकरणंवत्सरादूर्ध्वतःस्थितमिति**नागरखंडोक्तेः** पितुःसपिंडीकरणंवार्षिकेमृतिवासरेइत्यु**शनसोक्तेश्च** पूर्णेसंवत्सरेपिंडःषोडशःपरिकीर्तितः तेनैवचसपिंडत्वंतेनैवाब्दिकमिष्यतइति**हेमाद्रौ**वचनाच्च अस्यानाकरत्वोक्तिर्मूर्खोक्तिरेव यत्तु पूर्णेसंवत्सरेकुर्यात्सपिंडीकरणंसुतः एकोद्दिष्टंचतत्रैवमृताहनिसमापयेदिति **धवलनिबंधे जाबाल्युक्तेः** पुत्रःसपिंडनंकृत्वाकुर्यात्स्नानंसचैलकम् एकोद्दिष्टंततःकुर्यात्कुतपंनविचारयेदिति **स्वल्पमात्स्योक्ते**श्चाब्दिकंतद्दिनेपुनःकार्यमिति**केचित्** तेनिर्मूलत्वाद्धेमाद्रिविरोधाच्चोपेक्ष्याः षोडशत्वंचसपिंडनस्यषोडशश्राद्धांतर्भावपक्षे **स्मृत्यर्थसारेतु** वर्षांत्यदिनेसंवत्सरविमोक्षश्राद्धंसपिंडनंचकृत्वापरेद्युर्मृताहेवार्षिकंकार्यमित्युक्तं **गौडा**अप्येवमाहुः तत्पूर्वविरोधाच्चिंत्यम् ॥

**निर्णयामृतांत गोभिल**—"द्वादशाह इत्यादि कालांचे ठायीं प्रमादेंकरून सपिंडीकरण राहिलें असतां पुढें सांगितलेल्या कालांचे ठायीं सपिंडीकरण करावें." हें वचन साग्निकाला ( श्रौताग्निमंताला ) उक्तकालाचा असंभव असतां गौणकाल सांगण्याकरितां आहे, असें **मदनपारिजात** सांगतो. **मदनरत्नांत**ही असेंच आहे. **ऋष्यशृंग**-"सपिंडीकरणश्राद्ध उक्तकालीं जर केलें नसेल तर आर्द्रा, हस्त, रोहिणी व अनुराधा या नक्षत्रांवर करावें." **कालादर्शांत**ही-"अकरावा दिवस, बारावा दिवस, तिसरा पक्ष, तिसरा मास, सहावा मास, अकरावा मास, वर्ष पूर्ण झाल्यावरचा दिवस, आणि इतर शुभदिवस, हे सपिंडीकरणाचे आठ काल सांगितले आहेत. अग्निमान् कर्ता असतां पहिले दोन काळ; मृत झालेला अग्निमान् असतां तिसरा काळ; आणि अनग्निकाला दुसरा धरून सात काल सपिंडीकरणाचे मुनींनीं सांगितले आहेत. अथवा रोहिणी, आर्द्रा, हस्त, व अनुराधा ह्या नक्षत्रांवरही सपिंडन करावें." **नारदसंहितेंत** तर-"सपिंडीकरण संवत्सर झालें असतां करावें. अथवा अर्ध्या वर्षीं किंवा तिसऱ्या मासीं अथवा तिसऱ्या पक्षीं किंवा पहिल्या मासांत अथवा बाराव्या दिवशीं करावें" असें सांगितलें आहे. या वचनांत 'वत्सरे' याचा अर्थ—वर्ष होऊन गेलें असतां, असा समजावा. कारण, "तदनंतर सपिंडीकरण वर्षाच्या पुढें आहे." असें **भविष्य**वचन आहे. "पित्याचें सपिंडीकरण वर्ष होऊन गेल्यानंतर आहे" असें **नागरखंडाचें** वचनही आहे. "पित्याचें सपिंडीकरण वर्षाच्या मृतदिवशीं होतें" असें **उशनसाचें** वचनही आहे. आणि "वर्ष पूर्ण झालें असतां जो सोळावा पिंड ( श्राद्ध ) सांगितला आहे, तेणेंकरूनच सपिंडत्व येतें व त्यानेंच आब्दिकही होतें" असें **हेमाद्रींत** वचनही आहे. हें वचन आकरांत नाहीं, असें म्हणणें मूर्खाचेंच आहे. आतां जें "संवत्सर पूर्ण झालें असतां पुत्रानें सपिंडीकरण करावें, आणि एकोद्दिष्टही त्याच मृतदिवशीं समाप्त करावें" ह्या **धवलनिबंधांतील जाबालि**वचनावरून; आणि "पुत्रानें सपिंडन करून सचैल स्नान करावें, आणि तदनंतर एकोद्दिष्ट करावें, कुतुपकालाचा विचार करूं नये" ह्या **स्वल्पमात्स्य**वचनावरूनही वर्षाच्या मृतदिवशीं सपिंडन करून त्याच दिवशीं पुनः आब्दिक करावें, असें **केचित्** ग्रंथकार म्हणतात. त्यांचें तें म्हणणें मूलरहित असल्यामुळें आणि **हेमाद्रीशीं** ( 'पूर्णे संवत्सरे पिंडः' या वरील वचनाशीं ) विरुद्धही असल्यामुळें उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे. वरील **हेमाद्रीचे** वचनांत सोळावा पिंड ( श्राद्ध ) तेंच सपिंडन सांगितलें तें षोडशश्राद्धांत सपिंडन आहे त्यापक्षीं समजावें. **स्मृत्यर्थसारांत** तर-वर्षाच्या शेवटच्या दिवशीं संवत्सरविमोक्षश्राद्ध व सपिंडन करून दुसऱ्या दिवशीं मृत तिथीस वार्षिक करावें, असें सांगितलें आहे. गौडही असेंच सांगतात. तें पूर्वी सांगितलेल्या **भविष्यादि**वचनाशीं विरुद्ध असल्यामुळें चिंत्य ( प्रमाणशून्य ) आहे.

तत्रपुत्रेसतिनान्यःकुर्यात् श्राद्धानिषोडशादत्वानतुकुर्यात्सपिंडतां प्रोषितावसितेपुत्रःकालादपिचिरादपीतिवायवीयोक्तेः षोडशश्राद्धानांवर्षादूर्ध्वंकालाभावेपितान्यदत्वानकुर्यात् किंतुदत्वैव तानियदिकनिष्ठभ्रात्रादिनाकृतानितदासपिंडनमेवकुर्यादित्यपरार्कः सपिंडनेतुकनिष्ठानांनैवाधिकारइत्यर्थः तत्रैव अज्ञानादथवामोहान्नकृताचेत्सपिंडता तत्रापिविधिवत्कार्याकालादपिचिरादपि तेष्वपिज्येष्ठस्यैवाधिकारः ज्येष्ठेनजातमात्रेणपुत्रीभवतिमानवइतिमनूक्तेः अपरार्केप्रचेताअपि एकादशाद्याःक्रमशोज्येष्ठस्तुविधिवत्क्रियाः कुर्यान्नैकैकशःश्राद्धमाब्दिकंतुपृथक्पृथक् मरीचिः सर्वेषांतुमतंकृत्वाज्येष्ठेनैवतुयत्कृतम् द्रव्येणचाविभक्तेन सर्वैरेवकृतंभवेत् यत्तु वाचस्पतिशूलपाणिभ्यामुक्तं द्रव्यदानानुमत्यभावेकनिष्ठैःपृथक्कार्यमिति तन्न एवकारस्यतदभावेपिपृथक्करणाभावार्थत्वात् अंधादेरिवज्येष्ठेसतिकनिष्ठानामनधिकाराच्च अतस्तेषांप्रत्यवायमात्रं आहिताग्निःकनिष्ठस्तुकुर्यादेव अन्यथापितृयज्ञासिद्धेः एवमावश्यकवृद्धावपिकनिष्ठोन्यःसपिंडोवा कुर्यात् भ्रातावाभ्रातृपुत्रोवासपिंडःशिष्यएवच सहपिंडक्रियांकृत्वाकुर्यादभ्युदयंततः तथैवकाम्यंयत्कर्मवत्सरात्प्रथमाद्दते इतिमदनरत्नेलघुहारीतवचनात् वृद्ध्यनंतरंप्रथमाब्दमध्येपिकाम्यंकुर्यात् वृद्ध्यभावेतुप्रथमाब्दादूर्ध्वमेवेत्यर्थः काम्योक्तेरनावश्यकेष्टापूर्तादौनापकर्षः एतद्भ्रातृपुत्रादिसंस्कारेप्राप्ताधिकारस्यनांदीश्राद्धाधिकारार्थं अभ्युदयपदंचनांदीश्राद्धनिमित्तकर्ममात्रपरमितिहेमाद्रिः तेनज्येष्ठेदेशांतरस्थेकनिष्ठःसपिंडनंविनैववृद्धिंकृत्वापुत्रसंस्कारंकुर्यादितिश्रीदत्तोक्तिःपरास्ता भ्रातृशिष्याद्युक्तेर्नांदीश्राद्धेज्यदेवतामात्रपरोपकर्षइत्यपास्तं अस्यक्रममात्रपरत्वाद्वृद्धिकर्तैवसपिंडनंकुर्यादितिननियमइतिगौडाः अतएवकन्यायामातृमरणेभ्रात्रासपिंडनेकृतेपितुर्नाधिकारः ।

तें सपिंडीकरण पुत्र असतां दुसऱ्यानें करूं नये. कारण, "प्रवासांत मृत असतां पुत्रानें चिरकालानें देखील षोडश श्राद्धें केल्यावांचून सपिंडीकरण करूं नये" असें वायुपुराणांतील वचन आहे. याचा अर्थ-सोळा श्राद्धांचा वर्षानंतर काल नसला तरी तीं केल्यावांचून सपिंडीकरण करूं नये; तर तीं श्राद्धें करूनच सपिंडन करावें. तीं जर कनिष्ठ भ्राता इत्यादिकानें केलीं असतील तर सपिंडनच ज्येष्ठानें करावें, असें अपरार्क सांगतो. सपिंडनाविषयीं तर कनिष्ठांना अधिकार नाहींच, असा अर्थ समजावा. तेथेंच-"अज्ञानानें किंवा मोहाच्या योगानें जर सपिंडीकरण केलें नसेल तर चिरकालानें देखील यथाशास्त्र सपिंडन करावें." त्या षोडशश्राद्धाविषयीं देखील ज्येष्ठ पुत्रालाच अधिकार आहे. कारण, "ज्येष्ठ पुत्र झाल्यानेंच मनुष्य पुत्रवान् होतो" असें मनुवचन आहे. अपरार्कांत प्रचेताही-"एकादशाहादिक क्रिया ज्येष्ठानें यथाविधि अनुक्रमानें कराव्या. प्रत्येकानें करूं नयेत. आब्दिकश्राद्ध तर प्रत्येकानें वेगवेगळें करावें." मरीचि—"ज्येष्ठानेंच सर्व भ्रात्यांचें मत घेऊन सामायिक द्रव्य खर्च करून जें कर्म केलें तें सर्वांनीं केलेंच असें होतें." आतां जें वाचस्पति व शूलपाणि यांनीं सांगितलें कीं, 'द्रव्य आणि अनुमोदन कनिष्ठांनीं दिलें नसेल तर त्यांनीं वेगळें कर्म करावें.' असें सांगितलें तें बरोबर नाहीं. कारण, त्या मरीचिवचनांत 'सर्वैरेव' येथें 'एव' हें पद आहे, त्याचा अर्थ-द्रव्यादिक न दिलें तरी त्या सर्वांनींच तें केलें, अर्थात पृथक् करूं नये, असा आहे. आणि श्रौतकर्माविषयीं अंधादिकाला जसा अधिकार नाहीं तसा ज्येष्ठ भ्राता असतां कनिष्ठ भ्रात्यांना अधिकारही नाहीं. म्हणून त्यांना कर्म झालें नाहीं किंवा अनुमोदन वगैरे दिलें नसेल तर दोष मात्र प्राप्त होईल. आहिताग्नि कनिष्ठ असेल तर त्यानें करावेंच. तें केल्यावांचून पिंडपितृयज्ञाची सिद्धि होत नाहीं. याप्रमाणें आवश्यक वृद्धिकर्म असतांही कनिष्ठानें किंवा इतर सपिंडानें करावें. कारण, "भ्राता किंवा भ्रात्याचा पुत्र, अथवा सपिंड किंवा शिष्य यानें सपिंडनक्रिया करून तदनंतर आभ्युदयिक ( वृद्धिकर्म ) करावें. तसेंच जें काम्यकर्म असेल तेंही करावें. प्रथमवर्षी काम्यकर्माकरितां अपकर्ष करूं नये." असें मदनरत्नांत लघुहारीतवचन आहे. याचा अर्थ-वृद्धिकर्मानंतर प्रथम वर्षामध्येंही काम्यकर्म करावें. वृद्धिकर्म केलें नसेल तर प्रथमवर्षानंतरच काम्यकर्म करावें, असा आहे. काम्यकर्म प्रथम वर्षानंतर करावें, असें सांगितल्यावरून, आवश्यक नसलेलें यज्ञदानादिकर्म व वापी-कूप-तडाग इत्यादिकर्म, त्याविषयीं कनिष्ठादिकानें अपकर्ष करूं नये. हें वचन, भ्रातृपुत्रादिकांचे संस्काराविषयीं ज्याला अधिकार प्राप्त असेल त्याला नांदीश्राद्धाच्या अधिकाराकरितां आहे. या वचनांत 'अभ्युदय' असें पद आहे त्याचा अर्थ-नांदीश्राद्धाला निमित्त असलेलें सर्व कर्म, असा हेमाद्रि सांगतो. तेणेंकरून ( अभ्युदयनिमित्तक भ्राता इत्यादिकांना अधिकार सांगितल्यावरून ) ज्येष्ठ देशांतरीं असतां कनिष्ठानें सपिंडन केल्यावांचूनच वृद्धिश्राद्ध करून पुत्राचा संस्कार करावा, असें श्रीदत्तानें सांगितलेलें खंडित झालें. त्या वचनांत भ्राता, शिष्य इत्यादिकांना अधिकार सांगितल्यावरून, नांदीश्राद्धांत येणाऱ्या ज्या देवता ( पिता इत्यादिक )

त्यांच्या सपिंडनाचा मात्र अपकर्ष करावा, असें मत तें खंडित झालें. हें वचन भ्रात्यानें, त्याच्या अभावीं भ्रातृपुत्रानें सपिंडन करावें इत्यादि क्रमाचें मात्र बोधक असल्यामुळें वृद्धिकर्त्यानेंच सपिंडन करावें, असा नियम नाहीं, असें गौड सांगतात. म्हणूनच कन्येची माता मृत असतां कन्येच्या भ्रात्यानें सपिंडन केलें असतां तिच्या पित्याला कन्यादानाविषयीं अधिकार आहे.

**शूलपाणि**स्तु महागुरौप्रेतभूतेवृद्धिकर्मनयुज्यतइतिनिषेधात् मृतस्यभ्रात्रादिःसपिंडनंकृत्वातत्पुत्रकन्यादेरभ्युदयंकुर्यान्नतुस्वपुत्रसंस्कारे संस्कार्यपितुःसपिंडनंविनावृद्धौदेवतात्वाभावादित्याह तन्न देवताप्रयुक्तापकर्षस्यनिरस्तत्वात् वृद्धिंविनाकनिष्ठेनकृतेतु विदेशस्थेनज्येष्ठेनपुनःकार्यम् यवीयसाकृतंकर्मप्रेतशब्दंविहायतु तज्ज्यायसापिकर्तव्यंसपिंडीकरणंपुनरिति **स्मृतेः** ज्येष्ठेनवाकनिष्ठेनसपिंडीकरणेकृते आद्यपादे मातापित्रोःकनिष्ठेनेतिवापाठः देशांतरगतानांचपुत्राणांतुकथंभवेत् श्रुत्वातुवपनंकार्यंदशाहांततिलोदकम् ततःसपिंडीकरणंकुर्यादेकादशेहनि द्वादशाहेनकर्तव्यमितिशातातपोब्रवीदितिवचनाच्चेति **भट्टाः सिंगाभट्टीये**प्येवम् पूर्ववचनेऽत्रचमूलंचिंत्यम् **स्मृत्यर्थसारेतु** विभक्ताऋद्धिकामाश्चेत्पुत्राःपृथक्सपिंडीकरणंकुर्युरित्युक्तम् अत्रदत्तकस्यतत्पुत्रादीनांविशेषःप्रागुक्तः **केचित्तु** वृद्धिंविनापिकनिष्ठस्यसपिंडनमाहुः मातापित्रोर्मृतेःकालेज्येष्ठेदेशांतरस्थिते कनिष्ठेनप्रकर्तव्यंसपिंडीकरणंतथेति**कार्ष्णाजिनिस्मृतेः** गतेचारोधितेज्येष्ठेपित्रावाप्रेषितेसति पण्मासान्ननिवर्तेततदाकार्यंकनीयसा **संवर्तः** पुनःसपिंडीकरणंश्राद्धंपार्वणवच्चरेत् अर्घ्यसंयोजनंनैवपिंडसंयोजनंनचेति तेषांवचसांनिर्मूलत्वात्प्रोषितावसितेपुत्रइत्यादिविरोधाच्चोपेक्ष्याः ।

**शूलपाणि** तर—"महागुरु ( पिता ) प्रेतरूप असतां वृद्धिकर्म योग्य होत नाहीं" असा निषेध असल्यामुळें मृताच्या भ्राता इत्यादिकानें सपिंडन करून त्याच्या ( मृताच्या ) पुत्रकन्यादिकांचें अभ्युदय कर्म करावें. आपल्या पुत्राच्या संस्काराविषयीं ह्या निषेधावरून सपिंडन करूं नये. आणि संस्कार करावयाचे जे पुत्रादिक त्यांच्या पित्याचें सपिंडन झाल्यावांचून वृद्धिश्राद्धांत त्याला ( पित्याला ) देवतात्व येत नाहीं, असें सांगतो. तें बरोबर नाहीं. कारण, नांदीश्राद्धांत येणाऱ्या ज्या देवता त्यांच्या सपिंडनाचा मात्र अपकर्ष, तो वर खंडित केला आहे. वृद्धिकर्मावांचून कनिष्ठानें अपकर्ष केला असेल तर परदेशांत असलेल्या ज्येष्ठानें पुनः करावें. कारण, "कनिष्ठानें केलेलें सपिंडीकरणरूप कर्म तें पुनः प्रेतशब्द वर्ज्य करून ज्येष्ठानेंही करावें" अशी **स्मृति** आहे. ज्येष्ठानें किंवा कनिष्ठानें सपिंडीकरण केलें असतां ( येथें 'मातापित्रोः कनिष्ठेन' असें पाठांतर आहे त्याचा अर्थ—मातापितरांचे कनिष्ठानें सपिंडीकरण केलें असतां ) देशांतरीं गेलेल्या पुत्रांचें कसें होईल ? देशांतरीं गेलेल्या पुत्रांनीं पितृमरण श्रवण करून वपन करावें. दहा दिवस तिलोदक द्यावें. तदनंतर अकराव्या दिवशीं सपिंडीकरण करावें. बाराव्या दिवशीं करूं नये, असें **शातातप** सांगता झाला." असें वचनही आहे असें **भट्ट** सांगतात. **सिंगाभट्टीयांत**ही असेंच आहे. वरील स्मृतिवचन व हें वचन यांविषयीं मूल चिंत्य ( अनुपलब्ध ) आहे. **स्मृत्यर्थसारांत** तर—विभक्त असून समृद्धीची इच्छा करणारे जर पुत्र असतील तर त्यांनीं वेगवेगळें सपिंडीकरण करावें, असें सांगितलें आहे. येथें ( सपिंडीकरणाविषयीं ) दत्तकाला व त्याच्या पुत्रादिकांना विशेष निर्णय पूर्वी ( श्राद्धाधिकारिनिर्णयप्रसंगीं ) सांगितला आहे. **केचित्** विद्वान् तर-वृद्धिकर्मावांचूनही कनिष्ठाला सपिंडनाचा अधिकार सांगतात. कारण, "मातापितरांच्या मरणसमयीं ज्येष्ठ पुत्र देशांतरीं असतां कनिष्ठानें सपिंडीकरण करावें" अशी **कार्ष्णाजिनि**स्मृति आहे. "ज्येष्ठ पुत्र देशांतरीं गेला असतां, अथवा बंदींत असतां किंवा बापानें पाठविला असतां सहा महिनेपर्यंत जर आला नाहीं तर त्या वेळीं कनिष्ठानें करावें." **संवर्त**—"पुनः सपिंडीकरणश्राद्ध पार्वणाप्रमाणें करावें. अर्घ्याचें संयोजन करूं नये व पिंडाचेंही संयोजन करूं नये." त्या **केचित्** विद्वानांनीं सांगितलेलीं हीं वचनें निर्मूल असल्यामुळें, आणि वर सांगितलेलें 'प्रोषितावसिते पुत्रः' हें **वायवीय**वचन व **मनु, प्रचेता** इत्यादिकांचीं वचनें यांच्याशीं विरोध येत असल्यामुळेंही त्या केचित् विद्वानांचें मत उपेक्षणीय ( अग्राह्य ) आहे.

व्युत्क्रममृतौ**हेमाद्रौब्राह्मे** मृतेपितरियस्याथविद्यतेचपितामहः तेनदेयास्त्रयःपिंडाःप्रपितामहपूर्वकाः तेभ्यश्चपैतृकःपिंडोनियोक्तव्यस्तुपूर्ववत् मातर्यथमृतायांचविद्यतेचपितामही प्रपितामहीपूर्वस्तुकार्यस्तत्राप्ययंविधिः एवंप्रपितामहजीवनेतत्पित्रादिभिर्ज्ञेयम् तदाह**सुमंतुः** त्रयाणामपिपिंडानामेकेनापिसपिंडने पितृत्वमश्नुतेप्रेतइतिधर्मोव्यवस्थितः यत्तु व्युत्क्रमात्तुप्रमीतानांनैवकार्यासपिंडतेतितन्मातापितृभर्तृभिन्नविषयम् व्युत्क्रमेणमृतानांनसपिंडीकृतिरिष्यते यदिमातायदिपिताभर्तानैषविधिःस्मृतइति**माधवीये स्कांदोक्तेः मदनरत्नाद्रौ**चैवम् अत्रप्रपितामहादिभिःपितुःसपिंडनेकृतेपितामहेमृतेवत्सपिंडनेसपिंड-

स्तेनसहपितुःसपिंडनंकार्यमितिहेमाद्रिर्मतमाह अन्येनैतन्मन्यंते तत्त्वंतुपितुःसपिंडनाभावेपितामहेन सहपुनःकार्यंनतत्सत्त्वे त्रयाणामपिपिंडानामेकेनापिसपिंडने पितृत्वमश्नुतेप्रेतइतिधर्मोव्यवस्थितइतिविष्णुधर्मोक्तेः पितामहेप्रपितामहेवापुत्रांतरैरसंस्कृतेप्यसंस्कृताभ्यामेवपितुःसपिंडनंकुर्यात् असंस्कृतौनसंस्कार्यौपूर्वौपौत्रप्रपौत्रकैः पितरंतत्रसंस्कुर्यादितिकात्यायनोब्रवीदितिछंदोगपरिशिष्टात् असंस्कृतौदाहाद्यैरितिकेचित् असपिंडीकृताविंतितुनत्त्वम् अतएवोक्तंतत्रैव पापिष्टमपिशुद्धेनशुद्धंपापकृतापिवा पितामहेनपितरंसंस्कुर्यादितिनिश्चयः पापिष्टमकृतसपिंडनं नतुपतितादि अभिशस्तपतितभ्रूणघ्नाःस्त्रियश्चातिचारिणीर्नसंसृजेदितिबैजवापोक्तेः पापकर्मिणोनसंसृजेरन्निति गौतमोक्तेश्चेत्युक्तंनिर्णयामृते ।

उलट क्रमानें मरण असेल तर सांगतो **हेमाद्रींत ब्राह्मांत**—"ज्याचा पितामह जीवंत असून पिता मृत असेल त्यानें प्रपितामहादि तिघांना तीन पिंड देऊन त्या तीन पिंडांत पित्याचा पिंड पूर्वीप्रमाणें ( पितामह मृत असतां जसा मिळवावयाचा तसा ) मिळवावा. आतां माता मृत असतां पितामही जीवंत असेल तर त्या ठिकाणींही प्रपितामही इत्यादिकांना तीन पिंड देऊन असाच विधि करावा." याप्रमाणें प्रपितामह जीवंत असतां त्याच्या पित्रादिकांशीं पित्याचें संयोजन जाणावें. तें सांगतो **सुमंतु**–"तीन पिंडांमध्यें देखील कोणत्याही एका पिंडाबरोबर सपिंडन केलें तरी प्रेताला पितृत्व प्राप्त होतें, असा धर्म व्यवस्थित आहे." आतां जें "उलट क्रमानें मृत झालेल्यांचें सपिंडन करूं नये" असें सांगितलें आहे तें माता, पिता, भर्ता यांवांचून इतरविषयक आहे. कारण, "उलट क्रमानें ( वडील जीवंत असतां पुत्र मरणें अशा क्रमानें ) मृत झालेल्यांचें सपिंडीकरण इष्ट नाहीं, जर माता किंवा पिता अथवा भर्ता असेल तर त्या ठिकाणीं हा निषेध नाहीं" असें **माधवीयांत स्कांद**वचन आहे. **मदनरत्नादिकांन**ही असेंच आहे. ह्या उलट क्रमानें मरणस्थलीं प्रपितामहादिकांशीं पित्याचें सपिंडन केलें असतां नंतर पितामह मृत झाला व त्याचें सपिंडन केलें असतां पुनः त्या पितामहाबरोबर पित्याचें सपिंडन करावें, असें मत **हेमाद्रि** सांगतो. **इतर** ग्रंथकार तें मत मानीत नाहींत. याचा खरा प्रकार म्हटला म्हणजे, पित्याचें सपिंडन पूर्वी केलें नसेल तर पितामहाचें सपिंडन झाल्यावर पुनः पित्याचें सपिंडन करावें. पित्याचें सपिंडन केलें असेल तर पुनः त्याचें सपिंडन करूं नये. कारण, "तीन पिंडांमध्यें देखील कोणत्याही एकाशीं सपिंडन केलें तरी प्रेताला पितृत्व प्राप्त होतें, असा धर्म व्यवस्थित आहे" हें वरील **सुमंतु**वचन **विष्णुधर्मांत** उक्त आहे. पितामह किंवा प्रपितामह याचा त्यांच्या इतर पुत्रांनीं संस्कार केला नसेल तरी असंस्कृतांबरोबरच पित्याचें सपिंडन करावें. कारण, "पिता व प्रपितामह हे असंस्कृत असतां त्यांचा पौत्रप्रपौत्रांनीं संस्कार करूं नये. त्यांच्याशीं पित्याचा संस्कार करावा, असें कात्यायन सांगता झाला." असें **छंदोगपरिशिष्ट**वचन आहे. या वचनांत 'असंस्कृत' म्हणजे दाहादिकांनीं संस्कार न झालेले, असें **केचित्** म्हणतात. परंतु सपिंडी न झालेले, असा खरा अर्थ आहे. म्हणूनच तेथेंच सांगितलें आहे कीं, "पिता पापिष्ट म्हणजे सपिंडी न झालेला असला किंवा शुद्ध म्हणजे सपिंडी झालेला असला तरी त्याचा सपिंडी झालेल्या किंवा न झालेल्याही पितामहाबरोबर संस्कार ( संयोजन ) करावा, असा निश्चय आहे." या वचनांत 'पापिष्ट' म्हणजे सपिंडी न झालेला समजावा. पतितादिक समजूं नये. कारण, "अभिशस्त ( लोकापवादानें दूषित ), पतित, गर्भघातक, आणि व्यभिचारिणी स्त्रिया यांचें संयोजन करूं नये" असें **बैजवाप**वचन आहे. आणि "पापकर्म्यांचें संसर्जन करूं नये" असें **गौतम**वचनही आहे, असें **निर्णयामृतांत** सांगितलें आहे.

पूर्वयोःपुत्राभावेतुपौत्रःकुर्यादेव पितामहःपितुःपश्चात्पंचत्वंयदिगच्छति पौत्रेणैकादशाहादिकर्तव्यं श्राद्धषोडशम् नैतत्पौत्रेणकर्तव्यंपुत्रवांश्चेत्पितामहः पितुःसपिंडतांकृत्वाकुर्यान्मासानुमासिकमितिकात्यायनोक्तेः अपरार्केशूलपाणौचैवम् तेनसपिंडनस्यानित्यत्वादकृतसपिंडनयोरेवपार्वणानुप्रवेशइति मूर्खोक्तिःपरास्ता कृतेसपिंडीकरणेप्रेतःपार्वणभाग्भवेदिति हारीतविरोधाच्च केचित्पुत्रांतराभावेपितामहवार्षिकमप्याहुः तन्न श्राद्धषोडशमितिनियमात् इच्छयाभवत्येव पितामहस्यचेद्द्यादेकोद्दिष्टंनपार्वणमिति वाचस्पतिधृतगर्गोक्तेः त्रयाणांयौगपद्येतुप्राधान्यात्पितुःसपिंडनंकृत्वापूर्वयोःकुर्यात् पितामहेमृतेदशाहांतःपितुर्मृतौपितुःसंस्कारंकृत्वापितामहस्यपुनःसर्वमावर्तयेत् वृत्तेदशाहेनैवम् अशक्त्यापित्रानुज्ञातेन पौत्रेणपितामहश्राद्धेप्रक्रांतेपितृमृतौतदाशौचंवहन्नेवपौत्रःपितामहकर्मकुर्यात्प्रक्रांतत्वादिति मदनपारिजातपृथ्वीचंद्रौ यत्तु उत्तरात्रितयरौद्ररोहिणीयाम्यसर्पपितृभेषुचाग्निभे श्मश्रुकर्मसकलंचवर्जयेत्प्रेतकार्यमपिबुद्धिमान्नर इतिसपिंडनप्रकरणेपाठान्मुख्यकालेनिषिद्धर्क्षेसपिंडनापकर्षः सर्वकालेषुतद्वत्त्वेतद्वर्ज्यान्येव

पूर्वोक्तब्राह्मोक्तानिषोडशश्राद्धानिकार्याणीति **वाचस्पतिमिश्राः** तन्न अस्यपरिभाषात्वेनवाक्यात्सावकाश-कर्मपरत्वात् अस्यप्रेतमात्रदैवत्याभावाच्च ।

पितामह व प्रपितामह यांना पुत्र नसेल तर पौत्रानें सपिंडन करावेंच. कारण, "पित्याच्या पश्चात् जर पितामह मरेल तर त्याचीं पौत्रानें एकादशाहादिक षोडश श्राद्धें करावीं. पितामहाला जर दुसरा पुत्र असेल तर हें एकादशाहादिक कृत्य पौत्रानें करूं नये. पित्याचें सपिंडन करून प्रतिमासीं अनुमासिक करावें." असें **कात्यायन** वचन आहे. **अपरार्कांत** व **शूलपाणिग्रंथांत**ही असेंच आहे. तेणेंकरून ( पौत्रानें करावें, असें सांगितल्यावरून ), सपिंडन अनित्य असल्यामुळें पितामह-प्रपितामहांचें सपिंडन झाल्यावांचूनच त्यांचा पार्वणांत प्रवेश होतो, असें मूर्खानें सांगितलेलें खंडित झालें. आणि तसें म्हटलें तर "सपिंडीकरण केलें असतां प्रेत पार्वणभागी होतो" ह्या **हारीत**वचनाशीं विरोधही येतो. **केचित्** विद्वान् पितामहाला दुसरा पुत्र नसेल तर त्याचें वार्षिकही करावें, असें सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, वरील वचनांत षोडशश्राद्धें करावीं, असा नियम केला आहे. आपल्या इच्छेनें करावयाचें असेल तर होईलच. कारण, "पितामहाचें जर करावयाचें असेल तर एकोद्दिष्ट करावें. पार्वण करूं नये" असें **वाचस्पतीनें** धरलेलें **गर्ग**वचन आहे. पिता इत्यादि तिघांचें एकदम सपिंडन प्राप्त असतां पित्याचें मुख्य असल्यामुळें पित्याचें सपिंडन करून नंतर पितामह-प्रपितामहांचें करावें. पितामह मृत असतां दशाहांत पिता मृत असेल तर पित्याचा संस्कार करून पितामहाच्या सर्व कृत्याची पुनरावृत्ति[1] करावी. दशाह होऊन गेल्यावर पिता मृत असेल तर पितामहाच्या कृत्याची पुनरावृत्ति नाहीं. पित्याला शक्ति नसल्यामुळें त्यानें पुत्राला कर्म करावयास सांगितल्यावरून पौत्रानें पितामहाचें दशाह कृत्यास आरंभ केला असतां मध्यें पिता मृत होईल तर पित्याचें आशौच धारण करूनच पौत्रानें पितामहाचें कर्म करावें. कारण, त्यानें त्या कर्मास आरंभ केल्यामुळें दोष नाहीं, असें **मदनपारिजात** व **पृथ्वीचंद्र** सांगतात. आतां जें "उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, आर्द्रा, रोहिणी, भरणी, आश्लेषा, मघा, कृत्तिका, ह्या नक्षत्रांवर सकल श्मश्रुकर्म वर्ज्य करावें. आणि प्रेतकार्यही विद्वानानें वर्ज्य करावें." हें वचन सपिंडनप्रकरणीं पठित असल्यामुळें मुख्यकालीं निषिद्ध नक्षत्र असतां सपिंडनाचा अपकर्ष करावा. सर्व कालांचे ठायीं निषिद्ध नक्षत्र असेल तर सपिंडन वर्ज्य करून पूर्वी सांगितलेलीं ब्राह्मांतील षोडशश्राद्धें करावीं, असें **वाचस्पतिमिश्र** सांगतात. तें बरोबर नाहीं. कारण, हें परिभाषारूप वाक्य असल्यामुळें अवकाश असलेल्या कर्माविषयीं आहे. आणि ह्या सपिंडनाची प्रेतच केवळ देवता आहे, असें नाहीं म्हणूनही सपिंडनविषयीं तें वचन लागू होत नाहीं.

**अथस्त्रीषूच्यते हेमाद्रौबृहस्पतिः** भर्तृगोत्रेणनाम्नाचमातुःकुर्यात्सपिंडनम् यत्तु**भविष्ये** पितृगोत्रंसमुत्सृज्यनकुर्याद्भर्तृगोत्रतइतितदासुरादिविवाहोढापरं आसुरादिविवाहेषुपितृगोत्रेणधर्मविदिति-**वृद्धशातातपोक्तेः** तच्चानेकवचनेषु पितामह्यापत्यामातामहेनवासहोक्तं तत्रव्यवस्थोक्ता**भविष्ये** जीवत्पितापितामह्यामातुःकुर्यात्सपिंडनं प्रमीतपितृकःपित्रातत्पित्रापुत्रिकासुतः तत्पित्रामातुःपित्रा **लौगाक्षिः** पितामह्यादिभिःसार्धंमातरंतुसपिंडयेत पितरिध्रियमाणेतुतेनैवोपरतेसति **शंखः** मातुःसपिंडीकरणं-कथंकार्यंभवेत्सुतैः पितामह्यादिभिःसार्धंसपिंडीकरणंस्मृतं येनकेनापिमातुःसापिंड्येयत्रान्वष्टकादौमातुः-श्राद्धंपृथगुक्तं तत्रपितामह्यासहकार्यं नांदीमुखेष्टकाश्राद्धेगयायांचमृतेहनि पितामह्यादिभिःसार्धंमातुःश्राद्धं-समाचरेदिति**शातातपोक्तेः** अपुत्रायांतु**पैठीनसिः** अपुत्रायांमृतायांतुपतिःकुर्यात्सपिंडनं श्वश्र्वादि-भिःसहैवास्याःसपिंडीकरणंभवेत् यत्तु**लघुहारीतः** पुत्रेणैवतुकर्तव्यंसपिंडीकरणंस्त्रियाः पुत्राभावेपतिःकुर्यात्तदभावेपुनस्त्व-न्येभ्रातृपुत्रादयोपियेइति यच्च **मार्कंडेयपुराणे** सपिंडीकरणंस्त्रीणांपुत्राभावेनविद्यतइति तत्पुत्रपत्यभावे-ज्ञेयं अत्रसपत्नीपुत्रोपिज्ञेयः बह्वीनामेकपत्नीनामेकाचेत्पुत्रिणीभवेत् सर्वास्तास्तेनपुत्रेणप्राहपुत्रवतीर्मनुरिति-**मनूक्तेः**तत्परत्वात् यत्तु **शातातपः** मृतेपितरिमातुस्तुनकार्यासहपिंडता पितुरेवसपिंडत्वेतस्याअपिकृ-तंभवेदितितदशक्तपरं केषांचिद्वामतमिति**हेमाद्रिः** ।

## आतां स्त्रियांविषयीं सांगतो—

**हेमाद्रींत बृहस्पति**—"मातेचें सपिंडन भर्त्याच्या गोत्रानें व तिच्या नांवानें करावें." आतां जें **भविष्यांत**—"स्त्रियेचें सपिंडन पित्याचें गोत्र टाकून भर्त्याच्या गोत्रानें करूं नये" असें सांगितलें तें आसुरादि विवाहानें विवाहित स्त्रीविषयक आहे. कारण, "आसुरादि विवाहानें विवाहित स्त्रियांविषयीं पित्याच्या गोत्रानें करावें." असें **वृद्धशातातपवचन**

१ येथें पुनरावृत्ति सांगितली ती पूर्वी पित्यानें कर्म केलेलें असल्यामुळें समजावी.

आहे. तें सपिंडीकरण अनेक वचनांमध्यें अनेक प्रकारानें म्हणजे पितामहीसह, पतीसह, किंवा मातामहामह सांगितलें आहे. त्याविषयीं व्यवस्था भविष्यांत सांगितली आहे ती अशी-"जीवत्पितृकानें मातेचें सपिंडन पितामहीबरोबर करावें. मृतपितृकानें आपल्या पित्यासह मातेचें सपिंडन करावें. पुत्रिकापुत्रानें मातेचें सपिंडन तिच्या पित्याशीं ( मातामहाबरोबर ) करावें." लौगाक्षि-"पिता जीवंत असतां पितामही इत्यादिकांसह मातेचें सपिंडन करावें." आणि पिता मृत असतां त्यासहच करावें." शंख-"मातेचें सपिंडीकरण पुत्रांनीं कसें करावें? पितामही इत्यादिकांसह सपिंडीकरण सांगितलें आहे." मातेचें सपिंडन कोणाबरोबरही केलें असलें तरी ज्या अन्वष्टक्यादिश्राद्धांत मातेचें श्राद्ध पृथक् सांगितलें आहे, त्या ठिकाणीं तें पितामहीबरोबर करावें. कारण, "वृद्धिश्राद्धांत, अष्टकाश्राद्धांत, गयेचेठायीं आणि मृतदिवशीं इतक्या ठिकाणीं मातेचें श्राद्ध पितामही इत्यादिकांसह करावें." असें शातातपवचन आहे. स्त्री निपुत्रिक असेल तर सांगतो पैठीनसि "पुत्ररहित स्त्री मृत असेल तर तिचें सपिंडन पतीनें करावें. सासूबरोबर हिचें ( निपुत्रिक स्त्रियेचें ) सपिंडन होतें." आतां जें लघुहारीत-"स्त्रियेचें सपिंडीकरण पुत्रानेंच करावें. पुरुषाचें सपिंडन तर पुत्राच्या अभावीं जे कोणी भ्रातृपुत्रादिक अधिकारी असतील त्यांनींही करावें." आणि जें मार्कंडेय पुराणांत-"पुत्रांच्या अभावीं स्त्रियांचें सपिंडन होत नाहीं." असें सांगितलें तें पुत्र व पति यांच्या अभावीं जाणावें. या सपिंडीकरणाविषयीं सापत्नपुत्रही अधिकारी आहे. कारण, "एकाच्या बहुत पत्न्या असून त्यांमध्यें एक जर पुत्रवती होईल तर त्या पुत्रानें त्या सर्व स्त्रिया पुत्रवती होतात, असें मनु सांगतो." हें मनुवचन सापत्नपुत्राला सपिंडीकरणाचा अधिकारबोधक आहे. आतां जें शातातप-"पिता मृत असेल तर मातेचें सपिंडन करूं नये. कारण, पित्याचेंच सपिंडन केलें असतां तिचेंही सपिंडन केल्यासारखें होतें." असें सांगितलें तें सपिंडनाला सामर्थ्य नसेल त्याविषयीं आहे. अथवा तें कितीएकांचें मत आहे. असें हेमाद्रि सांगतो.

अन्वारोहणेतुभर्त्रैवसापिंड्यं मृतायानुगतानाथंमातेनमहपिंडतां अर्हतिस्वर्गवासंचयावदाभूतसंप्लवमिति शातातपोक्तेः पत्याचैकेनकर्तव्यंसपिंडीकरणंस्त्रियाः सामृतापिहितेनैक्यंगतामंत्राहुतिव्रतैरितियमोक्तेश्च अत्रैकशब्दःपितामह्यादिपक्षनिवृत्त्यर्थः पतिपदंवर्गपरं सपिंडनस्यपार्वणैकोद्दिष्टरूपत्वादितिमाधवकल्पतरुमदनरत्नादयः अन्येतुभर्त्रैवैकेनाहुः स्वेनभर्त्रासहैवास्याःसपिंडीकरणंभवेदित्येवकारश्रवणात् पृथ्वीचंद्रोदयेपिविकल्पउक्तः इदंतुतत्त्वं यदाहेमाद्र्यादिमतेद्वयोरेकःपिंडस्तदावर्गेणसह यदामाधवपृथ्वीचंद्रादिमतेपृथक्पिंडस्तदैकेनपत्यैकवचनाच्चैकेनापि अतोमातृपिंडमसपिंडीकृतेनैवपतिपिंडेनसंयोज्यैकीकृतंपिंडद्वयंतत्पित्रादिभिःसंयोजयेत् अंत्यपक्षएवयुक्तः स्मृत्यर्थसारेतु अन्वारोहणेनैकदिनमरणेस्त्रियाःपृथक्सपिंडनंनास्ति भर्तुःकृतेस्त्रियाअपिकृतंभवतीत्युक्तंतन्मतांतरमस्तु इदंब्राह्मादिविवाहेपुज्ञेयं।

मातेचें अनुगमन असेल तर भर्त्यासहच सपिंडन होतें. कारण, "जी स्त्री भर्त्याच्या मागाहून जाऊन मृत झाली ती त्या भर्त्यासह सापिंड्याला योग्य होते व ती भूतांचा प्रलय होइपर्यंत पतीसह स्वर्गवासालाही योग्य होते." असें शातातपवचन आहे. आणि "स्त्रियेचें सपिंडीकरण एकापतीसह करावें. कारण, ती मृत झाली तरी समंत्रक आहुति व व्रतें यांहीं करून पतीशीं ऐक्य पावली आहे." असें यमवचनही आहे. या वचनांत 'एकेन' हें पद वरील वचनानें पितामहीत्रयाबरोबर जें सपिंडीकरण सांगितलें त्या पक्षाची निवृत्ति करण्याकरितां आहे. आणि 'पत्या' ह्याचा अर्थ-पतिवर्गासह असा समजावा. कारण, सपिंडीकरण हें पार्वण व एकोद्दिष्टरूप आहे, असें माधव, कल्पतरु, मदनरत्न इत्यादि ग्रंथकार सांगतात. इतर ग्रंथकार तर एका भर्त्याबरोबरच सपिंडन सांगतात. कारण, "स्त्रियेचें सपिंडीकरण स्वकीय भर्त्यासहच होतें" या वचनांत 'एव'-काराचें श्रवण आहे. पृथ्वीचंद्रोदयांतही विकल्प ( पतीसह किंवा पतिवर्गासह करावें असा विकल्प ) सांगितला आहे. याचा खरा प्रकार म्हटला म्हणजे असा आहे कीं, ज्या वेळीं हेमाद्रि इत्यादिकांच्या मतीं अन्वारोहण असतां दोघांना ( स्त्रीपुरुषांना एक पिंड सांगितला आहे त्या वेळीं ( त्यापक्षीं ) पतिवर्गासह सपिंडीकरण समजावें, ज्या वेळीं माधव, पृथ्वीचंद्र इत्यादिकांच्या मतीं दोघांना वेगवेगळा पिंड सांगितला आहे त्या वेळीं ( त्यापक्षीं ) पतीच्या पिंडाबरोबर मिळवावा. आणि वरील यमवचनांतही 'पत्या एकेन' असें सांगितल्यावरूनही एक सपिंडाबरोबरही सपिंडीकरण होतें. या कारणास्तव पित्याच्या पिंडाचें संयोजन करणाच्या पूर्वी मातेचा पिंड त्यांत मिळवून त्या दोन पिंडांचा एक पिंड करून नंतर पितामहादिपिंडांशीं त्याचें संयोजन करावें. या वरील दोन पक्षांमध्यें दुसरा पक्ष ( माधवादिकांनीं सांगितलेला ) च युक्त आहे. स्मृत्यर्थसारांत तर-अनुगमनेंकरून एकदिवशीं स्त्री मृत असतां तिचें पृथक् सपिंडन नाहीं. भर्त्याचें सपिंडन केलें असतां स्त्रियेचेंही केल्यासारखें होतें, असें सांगितलें आहे. तें निराळें मत असो. हें सपिंडीकरण ब्राह्मादिविवाह असतां समजावें.

आसुरादिषुतुशातातपः तन्मात्रातत्पितामह्यातच्छ्वश्र्वावासपिंडनं आसुरादिविवाहेषुविप्रानांयोषितां

१—ही मतें पूर्वी श्राद्धप्रकरणीं अन्वारोहणनिर्णयप्रसंगीं सांगितलीं आहेत. २ ब्राह्म, दैव, प्राजापत्य, आर्ष हे चार समजावे.

भवेत् मातामह्यामातुःपितामह्यातत्प्रपितामह्याचेत्यर्थः **सुमंतुः** पितापितामहेयोज्यःपूर्णेसंवत्सरेसुतैः माता-मातामहेतद्वदित्याहभगवान्शिवः इदमासुरादिपरंपुत्रिकापुत्रपरंचोक्तंप्राक् **हेमाद्रिस्तु**ब्राह्माद्दिष्वपिसर्वत्र देशभेदाद्विकल्पमाह अतःगुर्जरेषुकोकिलमतानुसारिणांमातृमातामहप्रमातामहाइतिश्राद्धप्रयोगःसपिंडनंच-दृश्यते **हेमाद्रावापस्तंबोपि** कोकिलस्ययथापुत्राअन्यसंचयजीविनः पुष्टास्तेस्वकुलंयांतिएवंनारीमृता-सती यदपि **विज्ञानेश्वरो** मातामहेनमातुःसापिंड्येपितृश्राद्धवन्मातृश्राद्धंनित्यमित्याह यच्चवृद्धिश्राद्धेछं-**दोगपरिशिष्टं** षड्भ्यःपितृभ्यस्तदनुश्राद्धदानमुपक्रमेदिति तदेतद्विषयमेव मातुःपृथक्श्राद्धाभावात् अतएवहेमाद्रौभविष्ये मातुःसपिंडनंप्रक्रम्य उदितेनुदितेचैवहोमभेदोयथाभवेत् तथाकुलक्रमायातमा-चारंचचरेद्बुधइत्युक्तं अस्यवृद्धावपवादमाहतत्रैव**व्याघ्रपात्** कुर्यान्मातामहश्राद्धंसर्वदामातृपूर्वकं विधि-ज्ञोविधिमास्थायवृद्धौमातामहादिवत **केचि**देतत्पुत्रिकापुत्रपरमाहुः ।

आसुरादिविवाह असतील तर सांगतो **शातातप**–"आसुरादि विवाहानें विवाहित स्त्रियांचें सपिंडन तिच्या ( मातेच्या ) मातृपितामहीप्रपितामहींबरोबर होतें." **सुमंतु**–"पिता मृत होऊन पूर्ण संवत्सर झालें असतां पुत्रांनीं त्याचें पितामहाशीं संयोजन करावें. त्याप्रमाणें मातेला मातामहाचे ठायीं संयोजन करावें, असें भगवान् शंकर सांगतात." हें वचन आसुरादि-विवाहविषयक व पुत्रिकापुत्रविषयक आहे, असें पूर्वी सांगितलें आहे. **हेमाद्रि** तर–ब्राह्मादिक सर्वविवाहांमध्यें देशभेदानें विकल्प सांगतो. म्हणून गुर्जरदेशांत कोकिलमताला अनुसरणारांना 'मातृमातामहप्रमातामहाः' असा उच्चार करून श्राद्धप्रयोग व सपिंडन दिसत आहे. **हेमाद्रींत आपस्तंबही**–"कोकिलाचे जसे पुत्र अन्यांनीं केलेल्या संचयानें उपजीवन करून पुष्ट होऊन ते आपल्या कुलांत येतात. तशी मृत झालेली स्त्री आपल्या कुलांत येते." आतां जें **विज्ञानेश्वर**–मातामहाबरोबर मातेचें सपिंडन केलें असतां पितृश्राद्धाप्रमाणें मातेचें श्राद्ध नित्य आहे, असें सांगतो तें, आणि जें वृद्धिश्राद्धाविषयीं **छंदोगपरिशिष्ट**–"तदनंतर सहा पितरांना श्राद्धदानाचा उपक्रम करावा" असें आहे तें ह्या ( कोकिलमता ) विषयींच आहे. कारण, मातेचें पृथक् ( मातामहावांचून ) श्राद्ध नाहीं. मातेचें मातामहाशीं सपिंडन आहे म्हणूनच **हेमाद्रींत भविष्यांत**–मातेच्या सपिंडनाचा उपक्रम करून "उदिते जुहोति, अनुदिते जुहोति" अशा दोन वाक्यांवरून कितीएक सूर्योदयोत्तर होम करितात, कितीएक अनुदय असतां होम करितात. ते जसे कुलपरंपरागत आहेत तसें कुलपरंपरेनें आलेल्या आचाराचें आचरण करावें" असें सांगितलें आहे. याचा वृद्धिश्राद्धांत अपवाद सांगतो तेथेंच **व्याघ्रपात्**–"विधि जाणणारानें विधीचा आश्रय करून सर्वदा मातामहश्राद्ध मातृपूर्वक करावें आणि वृद्धिश्राद्धांत मातामहपूर्वक करावें. अर्थात् मातामहश्राद्ध मातृपूर्वक करूं नये." **केचित्** विद्वान् हें वचन पुत्रिकापुत्रविषयक सांगतात.

पत्युःसापिंड्यमाह**लौगाक्षिः** सर्वाभावेस्वयंपत्न्यःस्वभर्तॄणाममंत्रकम सपिंडीकरणंकुर्युस्ततःपार्वणमे-वचेति यत्तु**वचनं** अपुत्रस्यपरेतस्यनैवकुर्यात्सपिंडतामिति यच्च**आपस्तंबः** अपुत्रायेमृताःकेचित्पुरुषावा-स्त्रियोपिवा तेषांसपिंडनाभावादेकोद्दिष्टंनपार्वणमिति तत्पुत्रोत्पादनविधिप्रशंसार्थमिति**माधवः** सपिंडीक-रणादूर्ध्वमेकोद्दिष्टंविधीयते अपुत्राणांचसर्वेषामपत्नीनांतथैवचेति**हेमाद्रौप्रचेतसोक्तेश्च अन्येतु**द्विवि-धवाक्यदर्शनाद्विकल्पमाहुः **स्मृत्यर्थसारेपि** ब्रह्मचारिणामपत्न्यानांचसपिंडनंनास्ति तेषांसदैकोद्दिष्ट-मेव व्युत्क्रममृतानांसापिंड्यंकार्यंनवा केचित्सर्वत्रसपिंडनमाहुरिति अपुत्रेव्युत्क्रममृतेविशेषो**रेणुकारि-कायां** भ्रातावाभ्रातृपुत्रोवासपिंडःशिष्यएववा सपिंडीकरणंकुर्यात्पुत्रहीनेमृतेसति सर्वबंधुविहीनस्यपत्नी-कुर्यात्सपिंडतां ऋत्विजंकारयेद्वापिपुरोहितमथापिवा श्वसुरादादितिमृतैःकार्यातेषांसपिंडता व्युत्क्रमाच्चप्रमी-तायेतद्विनाप्रेततास्ध्रुवं पुनःसपिंडनंतेषांकुर्यात्प्रेतेपितामहइति अत्रमूलमृग्यं यतीनांसपिंडनंनास्ति किंत्वेका-दशेह्निपार्वणंकार्यं तदपित्रिदंडिनः एकदंड्यादीनांतदपिनेत्युक्तंप्राक् दंडग्रहणात्पूर्वंमृतेतुदाहादिसपिंडनांतं सर्वंकार्यमिति**भट्टचरणाः** ।

पतीचें सपिंडीकरण सांगतो **लौगाक्षि**–"सर्व कर्त्यांच्या अभावीं पत्नीनें स्वतः आपल्या भर्त्याचें सपिंडीकरण अमंत्रक करावें. तदनंतर पार्वणही करावें" आतां जें **वचन**–"निपुत्रिक मृताचें सपिंडन करूं नयेच.' आणि जें **आपस्तंब**–"जे कोणी पुरुष किंवा स्त्रिया निपुत्रिक मृत असतील त्यांचें सपिंडन नसल्यामुळें एकोद्दिष्ट करावें. पार्वण करूं नये" असें सांगितलें तें पुत्र उत्पन्न करण्याच्या विधीचे स्तुतीकरितां आहे, असें **माधव** सांगतो. अर्थात् हें वचन सपिंडनाचें निषेधक नाहीं,

म्हणून **लौगाक्षिवचनानें** सपिंडन करावें असें झालें. आणि "सर्व निपुत्रिक व पतिरहित स्त्रिया यांचें सपिंडीकरणानंतर एकोद्दिष्ट सांगितलें आहे" असें **हेमाद्रींत प्रचेतसाचें** वचनही आहे. यावरून निपुत्रिकांचें सपिंडीकरण आहे. **इतर विद्वान्** तर-करावें व न करावें, अशीं दोन प्रकारचीं वाक्यें दृष्टीस पडतात म्हणून विकल्प सांगतात. **स्मृत्यर्थसारांत**ही-"ब्रह्मचारी व अपत्यरहित यांचें सपिंडन नाहीं, त्यांचें सर्वदा एकोद्दिष्टच आहे. उलट क्रमानें मृतांचें सपिंडन करावें किंवा न करावें. **किती एक विद्वान्** सर्वांचें सपिंडन सांगतात, असें सांगितलें आहे. निपुत्रिक मृत असतां व उलट क्रमानें मृत असतां विशेष सांगतो **रेणुकारिकेंत**-"पुत्रहीन मृत असतां भ्राता किंवा भ्रात्याचा पुत्र, अथवा सपिंडांतील पुरुष, किंवा शिष्य यानें त्याचें सपिंडन करावें. सर्वांनीं रहित जो मृत असेल त्याचें सपिंडन पत्नीनें स्वतः करावें. किंवा पत्नीनें ऋत्विजाकडून किंवा उपाध्यायाकडून करवावें. जे उलट क्रमानें मृत असतील त्यांचें सपिंडन वसु, रुद्र, आदित्य यांच्याशीं करावें. कारण, सपिंडन केलें नाहीं तर प्रेतत्व जात नाहीं, असा निश्चय आहे. उलटक्रमानें मृतांचे पितामह मृत असतां त्याच्याशीं पुनः सपिंडन करावें." ह्या वचनाविषयीं मूल शोधावें. उपलब्ध नाहीं. संन्याशांचें सपिंडन नाहीं. तर अकराव्या दिवशीं पार्वण करावें. तें देखील त्रिदंडी जे असतील त्यांचें करावें. एकदंडी वगैरे जे संन्याशी त्यांचें पार्वण देखील नाहीं. असें पूर्वीं सांगितलें आहे. दंड ग्रहण करण्याचे पूर्वीं मृत असेल तर दाहादिक सपिंडनापर्यंत सर्व कृत्य करावें, असें **भट्टचरण-( नारायणभट्ट )** सांगतात.

सपिंडनविधिमाह**बैजवापः** समाप्तेसंवत्सरेचत्वार्युदपात्राणिप्रयुनक्त्येकंप्रेतायत्रीणिपितृभ्यःप्रेतपात्रं पितृपात्रेष्वासिंचतियेसमानाइतिद्वाभ्यामेवंपिंडोऽथाभिमृशत्येषवोनुगतःप्रेतःपितरस्तंददामिवः शिवंभवतुशेषाणांजायंतांचिरजीविनः समानीवःसंगच्छध्वंसंवदध्वमिति यद्यपि तच्चापिदेवरहितमेकार्घ्यैकपवित्रकं नैवाग्नौकरणंतत्रतच्चावाहनवर्जितमिति**मार्कंडेयेनोक्तं** तथापि सपिंडीकरणंश्राद्धंदेवपूर्वंनियोजयेदित्यादिविरोधा**द्विकल्पः** प्रेतांशेवाज्ञेयम अत्रकामकालौविश्वेदेवावपीत्युक्तप्राक् **मैत्रायणीयपरिशिष्टे** पित्र्यविप्रकरेहोमःसाग्नेरपिभवेदिह यत्तु**गोभिलः** अनुक्तकालेप्यपितुव्युत्क्रमेणमृतावपि आमेनवापिसापिंड्यंहेम्नावापिप्रकल्पयेदिति तदापदिमातृपितृभिन्नपरम् आपन्नोपिनकुर्वीतश्राद्धमामेनकर्हिचिदितितेनैवोक्तेः **शुद्धितत्त्वेकामधेनौचलघुहारीतः** सपिंडीकरणंयावत्प्रेतश्राद्धंतुषोडशं पक्वान्नेनैवकर्तव्यंसामिषेणद्विजातिभिः **विश्वप्रकाशे** प्रेतःसपिंडनादूर्ध्वंपितृलोकेनुगच्छति कुर्यात्तस्यतुपाथेयंद्वितीयेह्निसपिंडनात् **स्मृत्यर्थसारेप्येवं** ततोवृद्धिश्राद्धंकुर्यात् एतन्मलमासेपिकार्यं अधिमासेनकर्तव्यंश्राद्धमाभ्युदयंतथा तथैवकाम्यंयत्कर्मवत्सरात्प्रथमादृतइति**हेमाद्रौहारीतोक्तेः** इतिभट्टकमलाकरकृतेनिर्णयसिंधौ-सपिंडीकरणं ।

सपिंडनविधि सांगतो **बैजवाप**-"संवत्सर समाप्त झाल्यावर सपिंडनश्राद्ध करावें, तें असें-चार अर्घ्यपात्रें करावीं, एक अर्घ्यपात्र प्रेताला आणि तीन पितरांना, ( पितामहादिकांना ) असावीं. 'ये समाना०' ह्या दोन मंत्रांनीं प्रेतपात्रोदक-पितरांच्या पात्रांत मिळवावें. याप्रमाणें वरील मंत्रांनीं प्रेतपिंड पितामहादिकांच्या पिंडांत मिळवावा. नंतर त्यांना स्पर्श करून पुढील मंत्र म्हणावे. ते मंत्र-'एष वोनुगतः प्रेतः पितरस्तं ददामि वः । शिवं भवतु शेषाणां जायंतां चिरजीविनः ।' समानीव० संगच्छध्वं० ह्या दोन मंत्रांनीं स्पर्श करावा." जरी "तें सपिंडीश्राद्ध देवरहित, एक अर्घ्यानें व एकपवित्रकानें युक्त आहे. त्यांत अग्नौकरण नाहीं व आवाहन नाहीं." असें **मार्कंडेयानें** सांगितलें आहे तरी "सपिंडीकरण श्राद्ध देवपूर्वक करावें" इत्यादि वचनांशीं विरोध येत असल्यामुळें विकल्प समजावा. अथवा **मार्कंडेय** वचनानें सांगितलेला देवराहित्य-एकार्घ्यादि विधि प्रेताच्या एकोद्दिष्टाकडे समजावा. सपिंडीकरण श्राद्ध पार्वण-एकोद्दिष्टरूप आहे. त्यांत कामकाल विश्वेदेव आहेत, असेंही पूर्वीं श्राद्धप्रकरणीं सांगितलें आहे. **मैत्रायणीयपरिशिष्टांत**-"ह्या सपिंडन श्राद्धांत साग्निकाचाही पित्र्य ब्राह्मणांच्या हातांवर अग्नौकरणहोम होतो." आतां जें **गोभिल**-"उक्त काल नसला तरी व्युत्क्रमानें ( उलट क्रमानें ) मरण असलें तरी सपिंडीकरण श्राद्ध आमान्नानेंही करावें किंवा हिरण्यद्वाराही सपिंडीकरण करावें." तें आपत्कालीं माता पिता यांहून इतरविषयक आहे. कारण, "आपत्काल प्राप्त असला तरी मातापितरांचें श्राद्ध आमानें कधींही करूं नये" असें त्यानेंच ( गोभिलानेंच ) सांगितलें आहे. **शुद्धितत्त्वांत** व **कामधेनुग्रंथांत लघुहारीत**-"सपिंडीकरणापर्यंत जीं सोळा प्रेतश्राद्धें तीं ब्राह्मणांनीं आमिष ( मांसान्न ) सहित पक्वान्नानेंच करावीं." **विश्वप्रकाशांत**-"प्रेत सपिंडनानंतर पितृलोकास जातो, त्याला सपिंडनाच्या दुसऱ्या दिवशीं पाथेयश्राद्ध करावें." **स्मृत्यर्थसारांत**ही असेंच सांगितलें आहे. तदनंतर वृद्धिश्राद्ध करावें. हें सपिंडनश्राद्ध मलमासांतही करावें. कारण, "अधिक मासांत श्राद्ध करूं नये, तसेंच आभ्यु-

दयिक कर्म ( विवाहादि ) मलमासांत करूं नये, आणि काम्यकर्म मलमासांत करूं नये. हा निषेध प्रथम वर्षांतील श्राद्धाला समजूं नये." असें **हेमाद्रींत हारीतवचन** आहे.

## इति निर्णयसिंधौ महाराष्ट्रीयटीकायां सपिंडीकरणम्.

**अथप्रथमाब्देनिषिद्धानि हेमाद्रौ** स्नानंचैवमहादानंस्वाध्यायंचाग्नितर्पणम् प्रथमेब्देनकुर्वीतमहागुरुनिपातने अग्नितर्पणंलक्षहोमादि नत्वाधानम् तत्तु प्रथमाब्देभवत्येव तदाह**हेमाद्रावुशनाः** पितुःसपिंडीकरणंवार्षिकेमृतिवासरे आधानात्मुपसंप्राप्तावेतत्प्रागपिवत्सरात् अन्यत्तर्पणमिति**शुद्धितत्त्वे**पाठः आदिपदंवृद्धिनिमित्तनित्यकर्मपरं **दिवोदासीये** महातीर्थस्यगमनमुपवासव्रतानिच संवत्सरंनकुर्वीतमहागुरुनिपातने इदं**श्राद्धकौमुद्यां**देवीपुराणस्थमुक्तं **गौडनिबंधेमात्स्ये** सपिंडीकरणादूर्ध्वंप्रेतःपार्वणभुग्भवेत् वृद्धीष्टापूर्तयोग्यश्चगृहस्थश्चसदाभवेत वर्षांतसपिंडनाभावेनाधिकारीत्यर्थः गृहस्थःसपिंडोपीत्यर्थः अतएव प्रेतकर्माण्यनिर्वर्त्यचरेन्नाभ्युदयक्रियां आचतुर्थंततःपुंसिपंचमेशुभदंभवेदिति**ज्योतिषे**उक्तं **माधवीये देवलः** प्रमीतौपितरौयस्यदेहस्तस्याशुचिर्भवेत नदैवंनापिवापित्र्यंयावत्पूर्णोनवत्सरः इदंवर्षांतसपिंडनपरं तथैवकाम्यंयत्कर्मवत्सरात्प्रथमादृतइति**लघुहारीता**द्येकवाक्यत्वात् वृद्धिनिमित्तापकर्षेतुकाम्यादिभवत्येवेति**गौडाः** पित्र्यंसपिंडनम् अतएव**लौगाक्षिः** अन्येपांप्रेतकार्याणिमहागुरुनिपातने कुर्यात्संवत्सरादर्वाक्श्राद्धमेकंतुवर्जयेत् दाहाद्येकादशाहांतंकार्यं तत्राशौचांतरस्याप्रतिबंधकत्वात् आद्यंश्राद्धमशुद्धोपिकुर्यादेकादशेहनीत्युक्तेश्च एकंसपिंडनं ।

## आतां प्रथम वर्षी निषिद्ध सांगतो—

**हेमाद्रींत**–"महागुरु ( पिता ) मृत असतां स्नान ( समावर्तन ), महादान, वेदाध्ययन, आणि अग्नितर्पण हीं प्रथमवर्षी करूं नयेत." या वचनांत अग्नितर्पण म्हणजे लक्षहोमादिक समजावें. आधान समजूं नये. तें आधान तर प्रथमवर्षी होतच आहे. तें सांगतो **हेमाद्रींत उशना**–"पित्याचें सपिंडीकरण वर्षाच्या मृतदिवशीं करावें. आधानादिक प्राप्त असतां वर्षाच्या आंत देखील हें सपिंडीकरण होतें." वरील वचनांत 'अग्नितर्पणं' या ठिकाणीं 'अन्यत्तर्पणं' असा **शुद्धितत्त्वांत** पाठ आहे. त्याच्या अर्थ–इतरांचें तर्पण, असा आहे. वरील उशनाचे वचनांत 'आधानादि' या 'आदि' पदानें वृद्धिश्राद्धाला निमित्त जें नित्य कर्म तें घ्यावें. **दिवोदासीयांत**–"महागुरु ( पिता ) मृत असतां महातीर्थाची यात्रा, उपवासव्रतें हीं संवत्सरपर्यंत करूं नयेत." हें वचन **श्राद्धकौमुदींत** देवीपुराणांतील म्हणून सांगितलें आहे. **गौडनिबंधांत मात्स्यांत**– "सपिंडीकरणानंतर प्रेत पार्वणभागी होतो. नंतर गृहस्थ वृद्धिकर्म, यज्ञादिकर्म, वापीकूपादिकर्म यांविषयीं योग्य होतो." वर्षांतीं सपिंडन केलें नसेल तर त्या वृद्ध्यादि कर्माविषयीं अधिकारी नाहीं, असा अर्थ समजावा. गृहस्थ म्हणजे सपिंडही समजावा. पुत्रच समजूं नये. म्हणूनच "प्रेतकर्म केल्यावांचून चार पुरुषांचे आंत आभ्युदयिक ( वृद्धिनिमित्तक ) क्रिया करूं नये. पांचव्या पुरुषाला कल्याणकारक होईल. म्हणजे हा निषेध नाहीं." असें **ज्योतिषग्रंथांत** सांगितलें आहे. **माधवीयांत देवल**–"ज्याचे माता पिता मृत असतील त्याचा देह अशुचि होतो, म्हणून जोंपर्यंत संवत्सर पूर्ण झाला नाहीं तोंपर्यंत देवकर्म किंवा पित्र्यकर्म त्यानें करूं नये." हें वचन वर्षांतीं सपिंडनपक्षाविषयीं आहे. वर्षाचे आंत सपिंडन केलें असेल तर हा निषेध नाहीं. कारण, "वृद्धिश्राद्धानंतर प्रथम वर्षामध्येंही काम्य करावें, वृद्धि नसेल तर काम्य कर्म प्रथम वर्षानंतरच करावें" ह्या पूर्वी सांगितलेल्या **लघुहारीतादि**वचनांशीं एकवाक्यता ( एकसंबंध ) होत आहे. वृद्धिनिमित्तानें सपिंडनाचा अपकर्ष असेल तर काम्यादिक कर्मे प्रथम वर्षांत होतच आहेत, असें **गौड** सांगतात. वरील देवलवचनांत 'पित्र्यकर्म' म्हणजे सपिंडन समजावें. म्हणूनच **लौगाक्षि**–"पिता मृत असतां संवत्सराचे आंत इतरांचीं प्रेतकार्ये ( दाहादि एकादशाहांत कर्मे ) करावीं, एक सपिंडनश्राद्ध मात्र वर्ज्य करावें." दाहादिक एकादशाहांत करावीं. कारण, त्यांविषयीं इतर आशौचाचा प्रतिबंध नाहीं. आणि 'आद्यश्राद्ध अशुद्ध असला तरी अकराव्या दिवशीं करावें' असेंही पूर्वी सांगितलें आहे.

पत्न्यादौत्वपवादमाह**माधवीयेऋष्यशृंगः** पत्न्याःपुत्रस्यतत्पुत्रभ्रात्रोस्तत्तनयेपुच स्नुपायास्तथोश्च पित्रोश्चसंघातमरणंयदि अर्वागब्दान्मातृपितृपूर्वंसापिंड्यमाचरेत **लौगाक्षिः** पत्नीपुत्रस्तथापौत्रोभ्रातातत्पुत्रकाअपि पितरौचयदैकस्मिन्म्रियेरन्वासरेतदा आद्यमेकादशेकुर्यात्त्रिपक्षेतुसपिंडनं **धवलनिबंधे**

महागुरुनिपातेतुप्रेतकार्यंयथाविधि कुर्यात्संवत्सरादर्वागेकोद्दिष्टंनपार्वणं **भृगुः** मातावैवतथाभ्राताभार्या-पुत्रस्तथास्नुषा एषांमृतौचरेच्छ्राद्धमन्यस्यनपुनःपितुः एतदपिसपिंडनपरम् पितुर्मृतावन्यस्यश्राद्धंनाचरेदि-त्यर्थः **शुद्धितत्त्वेदेवलः** अन्यश्राद्धंपरान्नंचगंधमाल्यंचमैथुनं वर्जयेद्गुरुपातेतुयावत्पूर्णोनवत्सरः **पार-स्करभाष्येबृहस्पतिः** पितर्युपरतेपुत्रोमातुःश्राद्धान्निवर्तते मातर्यपिचवृत्तायांपितृश्राद्धादृतेसमं समं पितरंविनान्यश्राद्धंनेत्यर्थः **शुद्धितत्त्वेदेवलः** महागुरुनिपातेतुकाम्यंकिंचिन्नचाचरेत् आर्त्विज्यंब्रह्मचर्यं-चश्राद्धंदेवक्रियांतथा एतत्सापिंडनात्प्रागितिकेचित् तदुत्तरमपीत्यन्ये **श्राद्धकौमुद्यांकालिकापुराणे**-पूर्वार्धे विशेषतःशिवपूजांप्रमीतपितृकोनरः यावद्वत्सरपर्यंतंमनसापिनचाचरेत **केचित्तु** पित्रोरब्द-मशौचंस्यात्षण्मासंमातुरेवच त्रैमासिकंतुभार्यायास्तदर्धंभ्रातृपुत्रयोरितिस्**मृतेः** सापत्नमातुरब्दार्धमाहुः **श्राद्धकौमुदीकारस्तु** द्वयोरेवमहागुर्वोरब्दमेकमशौचकं नान्येषामधिकाशौचंस्वजातिविहितात्किलेति-समूलजातूकर्ण्यविरोधान्निर्मूलमाह ।

पत्नी इत्यादिकांच्या सपिंडनाविषयीं अपवाद सांगतो **माधवीयांत ऋष्यशृंग**-"पत्नी, पुत्र, पौत्र, भ्राता, भ्रात्याचा पुत्र, स्नुषा, भगिनी आणि माता, पिता यांना एकदम मरण प्राप्त होईल तर वर्षाचे आंत मातापिता यांचें सपिंडन पूर्वी करून नंतर सर्वांचें करावें." **लौगाक्षि**-"पत्नी, पुत्र, पौत्र, भ्राता, भ्रात्याचे पुत्र, आणि माता व पिता हे ज्या वेळीं एका दिवशीं मृत होतील त्या वेळीं त्यांचें आद्यश्राद्ध अकराव्या दिवशीं करावें आणि तिसऱ्या पक्षांत सपिंडन करावें." **धवल-निबंधांत**-"महागुरु ( पिता ) मृत असेल तर एका वर्षाचे आंत इतरांचें प्रेतकार्य एकोद्दिष्ट यथाविधि करावें. पार्वण करूं नये." **भृगु**-"पिता मृत असेल तर माता, भ्राता, भार्या, पुत्र, स्नुषा यांचें श्राद्ध प्राप्त असतां करावें. इतरांचें श्राद्ध करूं नये." हें वचनही सपिंडनाविषयींच आहे. **शुद्धितत्त्वांत देवल**-"पिता मृत असेल तर जोंपर्यंत पूर्ण वर्ष झालें नाहीं तोंपर्यंत इतरांचें श्राद्ध, परान्न, गंधमाल्यांचा उपभोग व मैथुन वर्ज्य करावें." **पारस्करभाष्यांत बृहस्पति**-"पूर्वी माता मृत असून नंतर पिता मृत असेल तर पुत्रानें मातेचें श्राद्ध करूं नये. पित्याच्या नंतर माता मृत असेल तर पित्याच्या श्राद्धावांचून इतरांचें श्राद्ध करूं नये." **शुद्धितत्त्वांत देवल**-"महागुरु ( पिता ) मृत असेल तर कोणतेंही काम्यकर्म करूं नये. तसेंच दुसऱ्याचा ऋत्विक्पणा, ब्रह्मचर्य ( वेदाध्ययनव्रत ), श्राद्ध, आणि दैविक कर्म हें करूं नये." हें सपिंडनाच्या पूर्वी करूं नये असें **केचित्** म्हणतात. सपिंडनानंतरही करूं नये, असें **अन्य विद्वान्** सांगतात. **श्राद्धकौमुदींत कालिकापुराणांत** पूर्वार्धी-"ज्याचा पिता मृत असेल त्यानें विशेषेंकरून शिवपूजा संवत्सरपर्यंत मनानेंही आचरण करूं नये." **केचित्** विद्वान् तर-"पित्याचें आशौच वर्षपर्यंत, मातेचें सहा महिने, भार्येचें तीन महिने, भ्राता व पुत्र यांचें दीड महिना आशौच." **या स्मृतीवरून** सापत्न मातेचें सहामहिने आशौच सांगतात. **श्राद्धकौमुदीकार** तर-"दोन जे महागुरु ( माता व पिता ) यांचेंच एक वर्ष आशौच, इतरांचें आपल्या जातीच्या आशौचाहून अधिक आशौच नाहीं." ह्या समूल अशा **जातूकर्ण्यवचनाशीं** विरोध येत असल्यामुळें वरील **स्मृति**वचन मूलरहित आहे, असें सांगतो.

**हेमाद्रौभविष्ये** गयाश्राद्धंमृतानांतुपूर्णेत्वब्देप्रशस्यते **त्रिस्थलीसेतौगारुडे** तीर्थश्राद्धंगयाश्राद्धं-श्राद्धमन्यच्चपैतृकं अब्दमध्येनकुर्वीतमहागुरुविपत्तिषु इदंवृद्ध्यर्थसपिंडनाभावे वृद्धौसपिंडनापकर्षेब्दमध्ये-पिदर्शादिकार्यमेव पितुःसपिंडनंकृत्वाकुर्यान्मासानुमासिकमिति **छंदोगपरिशिष्टात्** सपिंडीकरणादू-र्ध्वंप्रेतःपार्वणभुग्भवेदिति**मात्स्यात्** ततःप्रभृतिवैप्रेतःपितृसामान्यमश्नुते विंदतेपितृलोकंचततःश्राद्धंप्रव-र्ततेइति**हारीताच्चेति****शूलपाणिः** **यत्तुकातीयं** सपिंडीकरणादूर्ध्वंनदद्यात्प्रतिमासिकं एकोद्दिष्टविधा-नेनदद्यादित्याहशौनकइति तत्रैकोद्दिष्टविधिनानदद्यादित्यन्वयः तुर्यपादेनपार्वणेविकल्पउक्तः **ब्रह्मवैवर्ते** उद्वाहश्चोपनयनंप्रथमेब्देमहीपते कृतेसपिंडनेप्यूर्ध्वमस्थांचोद्धरणंत्यजेत् तथापिकर्तुमिच्छंतित्रीणिचैतानि-वैसुताः मासिकान्यवशिष्टानिचापकृष्यचरेत्पुनः ।

**हेमाद्रींत भविष्यांत**-"मृत झालेल्यांचें गयाश्राद्ध वर्ष पूर्ण झाल्यावर प्रशस्त आहे." **त्रिस्थलीसेतूंत गारुडांत**-"महागुरु मृत असतील तर तीर्थश्राद्ध, गयाश्राद्ध व इतर पैतृकश्राद्ध एक वर्षामध्यें करूं नये." हा निषेध वृद्धीकरितां सपिंडन केलें नसेल तर समजावा. वृद्धिश्राद्धाविषयीं सपिंडनाचा अपकर्ष असेल तर वर्षामध्येंही दर्शादि श्राद्ध करावेंच. कारण, "पित्याचें सपिंडन करून प्रतिमासीं होणारें श्राद्ध करावें" असें **छंदोगपरिशिष्ट**वचन आहे. "सपिंडीकरणानंतर प्रेत पार्वणभोगी होतो" असें **मात्स्यवचन** आहे आणि "सपिंडीकरण झाल्यापासून पुढें प्रेताला पितृत्वधर्म प्राप्त होतो आणि

पितृलोकही प्राप्त होतो म्हणून त्याचें श्राद्ध प्रवृत्त होतें." असें **हारीत**वचनही आहे, असें **शूलपाणि** सांगतो. आतां **जें कातीय**–"सपिंडीकरणानंतर प्रतिमासिकें देऊं नये. एकोद्दिष्टविधीनें द्यावें, असें शौनक सांगतो" **असें वचन** त्यांत **'प्रति-**मासिक एकोद्दिष्टविधीनें देऊं नये' असा अन्वय करावा. या वचनांतील चवथ्या पादानें 'द्यावें असें शौनक सांगतो' **असें** सांगितल्यावरून अर्थात् इतर सांगत नाहींत असें झाल्यानें पार्वणाविषयीं विकल्प उक्त झाला. **ब्रह्मवैवर्तांत**–"प्रथम वर्षांत सपिंडन केल्यानंतरही विवाह, मौंजीबंधन आणि अस्थींचा उद्धार ( तीर्थांत प्रक्षेप ) हीं वर्ज्य करावीं, असें **आहे** तरी हीं तीन कृत्यें करण्याविषयीं पुत्र इच्छितात. त्यांनीं अवशिष्ट राहिलेलीं मासिकें पुनः अपकर्षानें करून तीं विवाहादि कृत्यें **करावीं.**"

**अत्रेदंतत्त्वं** वृद्धिंविनार्वागपिसपिंडनापकर्षेपिपितृत्वप्राप्तिर्वर्षांतएव कृतेसपिंडीकरणेनरःसंवत्सरात्परं प्रेतदेहंपरित्यज्यभोगदेहंप्रपद्यतइति**विष्णुधर्मोक्तेः** अर्वाक्संवत्सराद्यस्यसपिंडीकरणंभवेत् प्रेतत्वमपितस्यापिविज्ञेयंवत्सरंनृपेत्य**ग्निपुराणाच्च** तेनतत्सत्त्वेपिवृद्धिदैवपित्र्येष्वनधिकारः वृद्धिनिमित्तेत्वनंतरमेव अर्वाक्संवत्सराद्वृद्धौपूर्णेसंवत्सरेपिवा येसपिंडीकृताःप्रेतानतेषांतुपृथक्क्रियेति **शातातपोक्तेः** तथैवकाम्यमितिहे**माद्रि**धृत**हारीता**दिवशाच्चैवमिति तथा अस्थिक्षेपंगयाश्राद्धंश्राद्धंचापरपक्षिकम् प्रथमेब्देनकुर्वीतकृतेपितुःसपिंडने । अस्यापवादः । अस्थिक्षेपंगयाश्राद्धंश्राद्धंचापरपक्षिकं प्रथमेब्देपिकुर्वीत यदिस्याद्भक्तिमान्सुतः भक्तयास्येश्राद्धंतद्भाननिति**मदनपारिजातादयः** अन्येयथाश्रुतमाहुः तत्त्वंतु यदीदंसमूलंतदावृद्धिंविनापकर्षेपूर्वं वृद्धयर्थेतुपरमितियोज्यं पतितानांगयायांविशेषो**ब्राह्मे** क्रियतेपतितानांचगतेसंवत्सरेक्कचित् देशधर्मप्रमाणत्वाद्गयाश्राद्धंस्वबंधुभिः ।

यांविषयींचा **खरा प्रकार** म्हणजे असा आहे कीं, वृद्धकर्मावांचून वर्षाच्या आंत जरी सपिंडनाचा अपकर्ष केला तरी प्रेताला पितृत्वाची प्राप्ति वर्षांतीच होते. कारण, "सपिंडीकरण केलें असतां मनुष्य वर्षाच्या पुढें प्रेतदेह टाकून भोगदेह पावतो" असें **विष्णुधर्मांत** वचन आहे. आणि "ज्याचें सपिंडीकरण संवत्सराचे आंतही झालें असेल त्याला देखील प्रेतत्व संवत्सरपर्यंत जाणावें" असें **अग्निपुराण**वचनही आहे. तेणेंकरून ( प्रेतत्व असल्यामुळें ) सपिंडीकरण झालें तरी वृद्धि देव-पित्र्यकर्माविषयीं अधिकार नाहीं. वृद्धिनिमित्तक अपकर्ष असेल तर सपिंडीकरणानंतर अधिकार आहेच. कारण, "प्रथम वर्षाच्या आंत वृद्धि कर्तव्य असतां अथवा संवत्सर पूर्ण झालें असतां ज्या प्रेतांचें सपिंडीकरण केलें असेल त्याची पृथक् क्रिया ( प्रेतत्वप्रयुक्त एकोद्दिष्ट ) नाहीं." असें **शातातप**वचन आहे. आणि "प्रथमवर्षावांचून इतर आभ्युदयिक व काम्यकर्म अधिक मासांत करूं नये." या वर सांगितलेल्या **हेमाद्रीनें** धरलेल्या **हारीत**वचनावरूनही असें समजावें. तसेंच "पित्याचें सपिंडन केलें असलें तरी तीनांत अस्थिप्रक्षेप, गयाश्राद्ध आणि अपरपक्षश्राद्ध ( महालय ) हीं प्रथमवर्षी करूं नयेत.' याचा **अपवाद**–"अस्थिक्षेप, गयाश्राद्ध आणि महालय हीं जर पुत्र भक्तिमान् असेल तर त्यानें प्रथमवर्षीही करावीं." 'भक्तिमान्' याचा अर्थ–भक्ति नावाचें श्राद्ध ज्यानें केलें असेल त्यानें करावीं, असें **मदनपारिजातादिक** सांगतात. इतर ग्रंथकार वर सांगितल्याप्रमाणें अर्थ सांगतात. खरें म्हटलें तर जर हीं वचनें समूळ असतील तर वृद्धीवांचून सपिंडनाचा अपकर्ष असतां पहिलें वचन, आणि वृद्धीकारितां अपकर्ष असतां दुसरें वचन, असें योजावें. पतितांचा गयेंत विशेष सांगतो. **ब्राह्मांत**–"पतितांना मरून वर्ष होऊन गेल्यावर कधींतरी त्यांच्या बंधूंनीं देशधर्मप्रमाणावरून गयाश्राद्ध करावें."

**अथविधानानि** तत्रपंचकमृते**मदनरत्नेगारुडे** आदौकृत्वाधनिष्ठार्धमेतन्नक्षत्रपंचकं रेवत्यंतंसदादूष्यमशुभंदाहकर्मणि अवश्यचमसमीपेतुक्षेप्तव्याःपुत्तलास्तदा दर्भमयास्तुचत्वारऋक्षमंत्राभिमंत्रिताः ततोदाहःप्रकर्तव्यस्तैश्चपुत्तलकैःसह सूतकांतेततःपुत्रैःकार्यशांतिकपौष्टिकं पंचकेपुमृतोयोवैनगतिंलभतेनरः तिलांश्चैवहिरण्यंचतमुद्दिश्यघृतंददेत् **क्रियानिबंधे** भाजनोपानहौछत्रंहेममुद्रांचवाससी दक्षिणादीयते विप्रेसर्वपातकमोचनी **मदनरत्नेगार्ग्यः** यदिभद्रातिथीनांस्याद्वानुभौमशनैश्चरैः त्रिपादर्क्षैश्चसंयोगोद्वयोर्योगेद्विपुष्करः द्वित्रिपुष्करयोगेतुमृतिर्मृत्यंतरावहा दहनेमरणेचैवत्रिगुणंस्यात्त्रिपुष्करे **खननेप्येवमेव-स्यादेतद्दोषोपशांतये** तिलपिष्टैर्यवैर्वापिशरीरंकारयेत्ततः शूर्पेनिधायालंकृत्यदाहयेत्पतृकोपरि **तद्दाहेमंत्रमाह बौधायनः** अस्मात्त्वमितिमंत्रेणतिलपिष्टंप्रदाहयेत् द्वित्रिपुष्करयोर्दोषास्त्रिभिःकृच्छ्रैर्व्यपोहति **वासवेमरणं-चेत्स्याद्गृहेवापिपुनर्मृतिः सुवर्णदक्षिणांदद्यात्कृष्णवस्त्रमथापिवा वासवंधनिष्ठा कुंभमीनस्थितेचंद्रेमरणंयस्य-**

**जायते नतस्योर्ध्वगतिर्दृष्टासंततौनशुभंभवेत्** नतस्यदाहःकर्तव्योविनाशस्त्वेवजंतुषु अथवातद्दिनेकार्योदाहस्तुविधिपूर्वकं धनिष्ठापंचकेजीवोमृतोयदिकथंचन त्रिपुष्करेयाम्यभेवाकुलजान्मारयेद्ध्रुवं तत्रानिष्टविनाशार्थंविधानंसमुदीर्यते दर्भाणांप्रतिमाःकार्याःपंचोर्णासूत्रवेष्टिताः यवपिष्टेनानुलिप्रास्ताभिःसहशवंदहेत् प्रेतवाहःप्रेतसखःप्रेतपःप्रेतभूमिपः प्रेतहर्तापंचमस्तुनामान्येतानिचक्रमात् अत्रप्रतिमागंधपुष्पैःपूजयित्वाप्रथमांशिरसि द्वितीयांनेत्रयोः तृतीयांवामकुक्षौ चतुर्थींनाभौ पंचमींपादयोर्न्यस्यतदुपरिनामभिर्घृतंहुत्वायमायसोमंत्र्यंबकमितिमंत्राभ्यांप्रत्येकंतास्वाज्यंहुनेदिति **भट्टाः** सूतकांतेततःपुत्रःकुर्याच्छांतिकपौष्टिकं कांस्यपात्रस्थितंतैलंवीक्ष्यदद्याद्द्विजन्मने ब्रह्मविष्णुमहेशेंद्रवरुणप्रीतयेततः माषमुद्गयवव्रीहिप्रियंग्वादिप्रयच्छति स्वर्णदानंरुद्रजाप्यंलक्षहोमोद्विजार्चनं गोभूदानंपडंशेनकुर्याद्दोषोपशांतये ।

## आतां विधानें सांगतो—

### त्यांत प्रथमतः पंचकांत मृताचें विधान सांगतो.

**मदनरत्नांत गारुडांत**-"धनिष्ठा नक्षत्राच्या उत्तरार्धापासून रेवतीपर्यंत जीं पांच नक्षत्रें तीं सदा दुष्ट आहेत व दाहकर्माविषयीं अशुभ आहेत. त्यांजवर मरण आलें असतां दर्भाचे पुत्तलक म्हणजे पुतळे चार करून त्या नक्षत्रांच्या मंत्रांनीं अभिमंत्रित करून शवाचे समीप ठेऊन त्या पुतळ्यांसह दाह करावा. तदनंतर सूतकांतीं पुत्रांनीं शांतिक पौष्टिक कर्मे करावें. जो मनुष्य पंचकांत मृत असेल त्याला गति प्राप्त होत नाहीं, म्हणून त्याच्या उद्देशानें तिल, सुवर्ण आणि घृत हीं ब्राह्मणांस द्यावीं." **क्रियानिबंधांत**-"भाजन, जोडा, छत्र, सुवर्णमुद्रिका, दोन वस्त्रें, आणि दक्षिणा हीं ब्राह्मणांस द्यावीं; हीं सर्व पातकापासून मुक्त करणारीं आहेत." **मदनरत्नांत गार्ग्य**-"भद्रा तिथि ( २।७।१२ ); रवि, भौम व शनि हे वार; आणि त्रिपाद नक्षत्रें ( कृत्तिका, पुनर्वसु, उत्तरा, विशाखा, उत्तराषाढा, पूर्वाभाद्रपदा ); ह्या तिघांचा ( तिथिवारनक्षत्रांचा ) योग असतां त्रिपुष्करयोग होय. आणि दोघांचा योग असतां द्विपुष्करयोग होय. द्विपुष्कर योगावर किंवा त्रिपुष्कर योगावर मरण झालें असतां दुसरें मरण होतें. त्रिपुष्कर योगावर दहन व मरण असतां उक्त फल त्रिगुणित होतें. खननाविषयींही ( प्रेत पुरण्याविषयींही ) असेंच समजावें. या दोषाच्या शांतीकरितां तिलांच्या पिठाचें किंवा जवांच्या पिठाचें शरीर करून तें सुपांत ठेऊन त्याला अलंकार करून प्रेतावर ठेऊन त्याचा दाह करावा." त्याच्या दाहाविषयीं मंत्र सांगतो **बौधायन**-"अस्मात्त्वं०" ह्या मंत्रानें त्या तिलपिष्टादिकाचा दाह करावा. द्विपुष्करावर व त्रिपुष्करावर मरणाचा दोष तीन कृच्छ्रांनीं जातो. धनिष्ठा नक्षत्रावर मरण होईल तर त्या घरामध्यें पुनः मरण होतें, याकरितां ब्राह्मणाला दक्षिणासहित सुवर्णदान करावें. किंवा कृष्णवस्त्र द्यावें. कुंभ व मीन राशीस चंद्र असतां ज्याला मरण प्राप्त होतें, त्याला ऊर्ध्वगति दिसत नाहीं व त्याच्या संततीला कल्याण होत नाहीं. त्याचा दाह शास्त्रावांचून करूं नये. अथवा त्या दिवशीं विधिपूर्वक दाह करावा. जर प्राणी धनिष्ठापंचकावर मृत होईल किंवा त्रिपुष्कर योगावर अथवा भरणी नक्षत्रावर मृत होईल तर आपल्या कुलांतील प्राण्यांना तो मारील, असा निश्चय समजावा. त्या ठिकाणीं अनिष्टनाशाकरितां विधान सांगतो-दर्भाच्या पांच प्रतिमा कराव्या त्यांना ऊर्णासूत्रानें वेष्टन करावें. जवांच्या पिठानें त्यांना लेप करावा त्या प्रतिमांसह प्रेताचा दाह करावा. त्या प्रतिमांचीं अनुक्रमें नांवें सांगतो-प्रेतवाह, प्रेतसख, प्रेतप, प्रेतभूमिप, आणि प्रेतहर्ता अशीं समजावीं. या नांवांनीं गंधपुष्पांनीं त्यांची पूजा करून प्रेताच्या मस्तकावर पहिली ठेवावी, दुसरी नेत्रांवर, तिसरी वामकुक्षीवर, चवथी नाभीवर, पांचवी पायावर अशा ठेऊन त्यांजवर पूर्वोक्त नाममंत्रांनीं घृताचा होम करून 'यमायसोमं०' 'त्र्यंबकं०' ह्या दोन मंत्रांनीं प्रत्येक त्या प्रतिमांवर आज्याचा होम करावा, असें **नारायणभट्ट** सांगतात. "तदनंतर सूतकांतीं पुत्रानें शांतिक व पौष्टिक कर्म करावें. कांस्यपात्रांत तिळांचें तेल घेऊन त्यांत आपलें प्रतिबिंब पाहून ब्राह्मणाला तें द्यावें. तदनंतर ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, इंद्र, वरुण यांच्या प्रीतीकरितां उडीद, मूग, जव, व्रीहि ( भात ), प्रियंगु ( राळे ) इत्यादिकांचें दान करावें. सुवर्णदान, रुद्रजप, लक्षहोम, ब्राह्मणभोजन, गोदान, भूमिदान हीं सहा दोषशांतीकरितां करावीं."

**अपरार्के** धनिष्ठापंचकमृतेपंचरत्नानितन्मुखे प्रास्याहुतित्रयंतत्रहुनेद्वहवपामिति ततोनिर्हरणंकुर्यादेषसाग्नेर्विधिःस्मृतः इतरंनिखनेद्वजलेवाप्रतिपादयेत् त्रिपादर्क्षमृतेतद्वद्धिरण्यशकलंमुखे तस्यपिष्टमयंकुर्यात्पुरुषत्रितयंततः होमःप्रतिमुखंकुर्यात्तथावहवपामिति कार्ष्णायसंचकार्पासंकुसुंभंप्रतिपाद्यच निर्यात्यसाग्निंसंस्कुर्याद्दव्यग्नौषान्यमुत्सृजेत् **तत्रैव** कनकंहीरकंनीलंपद्मरागंचमौक्तिकं पंचरत्नमिदंप्रोक्तमृषिभिःपूर्वदर्शिभिः रत्नानांचाप्यभावेतुस्वर्णकर्षार्धमेवच सुवर्णस्याप्यभावेतुआज्यंज्ञेयंविचक्षणैः **मदनरत्नेप्येवं** तथा

एकाशीतिपलंकांस्यंतदर्धंवातदर्धकं नवषट्त्रिपलंवापिदद्याद्विप्रायशक्तितः तथान्यत्र स्वगृह्योक्तविधानेन-कृत्वाग्नेःस्थापनंततः अन्वाधानंनिर्वपणंदेवतानांतथाहुतिः यमायधर्मराजायमृत्यवेचांतकायच वैवस्वताय-कालायसर्वभूतक्षयायच औदुंबरायदध्नायनीलायपरमेष्ठिने वृकोदरायचित्रायचित्रगुप्तायवैक्रमात् विधिना-श्रपणंकृत्वाएकैकामाहुतिंहुनेत् कृष्णांगांकृष्णवस्त्रंचहैमनिष्कसमन्वितां दद्याद्विप्रायशांतायप्रीतोभवतुमेयमः त्रिपादर्क्षेऽप्येतदेव **अपरार्के** पुनर्वसूत्तराषाढाकृत्तिकोत्तरफाल्गुनी पूर्वाभाद्राविशाखाचज्ञेयमेतत्त्रिपादभं **मयूरचित्रेगर्गः** मृतःस्मशानंयोनीतउपजीवतिमानवः गृहेयस्यप्रविष्टोसौतिष्ठेदथकदाचन अचिरान्मृत्यु-मायातिहृतदारपरिग्रहः तत्रशांतिंप्रवक्ष्यामिधर्मराजमतंयथा सक्षीराणांघृताक्तानामग्नेर्हुत्वामुखेबुधः औदुं-बरीणांविधिवत्ततःशांतिःकृताभवेत् सावित्र्यष्टसहस्रेणक्षीरशांतिंचकारयेत् कपिलांतिलकांस्यंचहुतांतेभूरि-दक्षिणेति ।

**अपरार्कांत**-"धनिष्ठापंचकावर मृत असतां प्रेताच्या मुखांत पंचरत्नें घालून 'वहवपां०' या मंत्रानें तीन आहुति द्याव्या, तदनंतर प्रेत न्यावें. हा अग्निमान असेल त्याचा विधि समजावा. अग्निरहित असेल तो पंचकावर मृत असतां त्याला भूमींत पुरावा किंवा उदकांत टाकावा. त्रिपाद नक्षत्रावर मृत असेल तरी तसेंच सुवर्णाचा तुकडा मुखांत घालून त्याला तीन प्रतिमा पिठाच्या कराव्या, आणि 'वहवपां०' या मंत्रानें प्रतिमुखांत तीन आहुतींचा होम करावा. काळें लोखंड, कापूस, कुसुंभ हें ब्राह्मणाला देऊन प्रेताला नेऊन सांग्निक प्रेताचा संस्कार करावा. निरग्निकाला भूमींत पुरावा किंवा अग्नींत टाकावा." तेथेंच-"सुवर्ण, हिरा, नीलमणि, पद्मराग आणि मोतीं यांना पूर्वेकर्षीनीं पंचरत्नें म्हटलीं आहेत. रत्नाच्या अभावीं अर्धकर्ष ( अर्धतोळा ) सोनें द्यावें. अथवा सोन्याच्या अभावीं घृत द्यावें." **मदनरत्नांतही** असेंच आहे. तसेंच-"एक्याऐशीं पळें कांस्य, किंवा त्याच्या अर्धे अथवा चतुर्थांश ( एक्याऐंशीं कर्ष ), किंवा नऊ पळें, सहा पळें अथवा तीन पळें ( बारा कर्ष ), आपल्या शक्तीप्रमाणें ब्राह्मणाला द्यावें." तसेंच **इतर ग्रंथांत** "आपल्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधीनें अग्निस्थापन करून यम, धर्मराज, मृत्यु, अंतक, वैवस्वत, काल, सर्वभूतक्षय, औदुंबर, दध्न, नील, परमेष्ठी, वृकोदर, चित्र, चित्रगुप्त ह्या चवदा देवतांचें अनुक्रमानें अन्वाधान करून चरुद्रव्याचा निर्वाप करून चरूचें यथाविधि श्रपण ( पचन ) करून त्या वरील देवतांना 'यमाय, धर्मराजाय, मृत्यवे, अंतकाय, वैवस्वताय, कालाय, सर्वभूतक्षयाय, औदुंबराय, दध्नाय, नीलाय, परमेष्ठिने, वृकोदराय, चित्राय, चित्रगुप्ताय, यांच्या पुढें 'स्वाहा' शब्द लावून एकएक आहुतीचा होम करावा. निष्कपरिमित सुवर्णसहित कृष्ण गाई व कृष्ण वस्त्र शांत अशा ब्राह्मणाला 'प्रीतो भवतु मे यमः' असें म्हणून द्यावें." त्रिपाद नक्षत्रावर मृत असतांही हेंच विधान करावें. **अपरार्कांत**-"पुनर्वसु, उत्तराषाढा, कृत्तिका, उत्तराफल्गुनी, पूर्वाभाद्रपदा, विशाखा हीं त्रिपाद नक्षत्रें जाणावीं." **मयूरचित्रांत गर्ग**-"जो मृत मनुष्य स्मशानांत नेलेला जीवंत झाला असेल तो ज्याच्या घरांत प्रवेश करील व राहील त्याचे स्त्री-पुत्र नष्ट होऊन तो लवकर मरेल. त्या ठिकाणीं धर्मराजाचे मताप्रमाणें शांति सांगतो-उंबराच्या समिधा दुधांत व तुपांत भिजवून गायत्रीमंत्रानें आठ हजार होम करावा. म्हणजे शांति होते. होमानंतर कपिला गाई, तिल, कांस्यपात्र आणि पुष्कळ दक्षिणा हीं द्यावीं."

**अथब्रह्मचारिमृतौशौनकः** ब्रह्मचारिमृतौरीतिंकथयामिसमासतः तत्रावकीर्णदोषस्यप्रायश्चित्तंप्र-शांतये द्वादशाब्दंषडब्दंवात्र्यब्दंशक्त्याथवाचरेत् स्नातकोब्रह्मचारीचनिधनंप्राप्नुयाद्यदि संयोज्यचार्कविधि-नासंयोज्यौतौततःपरं देशकालौस्मृत्वा अमुकगोत्रामुकनाम्नोमृतस्यब्रह्मचारिणोव्रतविसर्गंकरिष्यइत्युक्त्वाहे-म्नानांदीश्राद्धंकृत्वाग्निंप्रतिष्ठाप्याघारांतेचतसृभिर्व्याहृतिभिरग्नयेव्रतपतयेव्रतानुष्ठानसंपादनायविश्वेभ्योदेवे-भ्यश्चाज्यंहुत्वास्विष्टकृदादिसमाप्यपुनर्देशकालौस्मृत्वार्कविवाहंकरिष्यइत्युक्त्वाहेम्नानांदीश्राद्धंकृत्वार्कशाखां-शवंचहरिद्रयालिप्त्वापीतसूत्रेणवस्त्रयुग्मेनचावेष्ट्याग्निंप्रतिष्ठाप्याघारांतेग्नयेबृहस्पतयेविवाहविधियोजकायच यस्मैत्वंकामकामायेतिकामायव्याहृतिभिश्चाज्यंहुत्वास्विष्टकृदादिसमाप्यार्कशाखांशवंचदहेत् **विधानमा-लायां** येषांकुलेब्रह्मचारीनिधनंप्राप्नुयाद्यदि तत्कुलंक्षयमाप्नोतिसोपिदुर्गतिमाप्नुयात् मृतस्यम्रियमाणस्य षडब्दंव्रतमादिशेत् त्रिंशद्भ्योब्रह्मचारिभ्योदद्यात्कौपीनकान्नवान् हस्तमात्रान्कर्णमात्रान्दद्यात्कृष्णाजिना-निच पादुकाच्छत्रमाल्यानिगोपीचंदनमेवच मणिप्रवालमालाश्चभूषणादिसमर्पयेत् एवंकृतेविधानेचविघ्नः-कोपिनजायते अत्रमूलंमृग्यम् ।

## आतां ब्रह्मचारी मृत असतां सांगतो—

**शौनक**-"ब्रह्मचारी मृत असतां संक्षेपानें व्यवस्था सांगतो-त्या ठिकाणीं प्रथमतः ब्रह्मचर्यव्रत नष्ट झाल्याबद्दलचें प्रायश्चित्त करावें. तें असें—द्वादशाब्द, षडब्द, त्र्यब्द अथवा आपल्या शक्तीप्रमाणें करावें. स्नातक ( समावर्तन करून विवाहाला योग्य झालेला ) आणि ब्रह्मचारी हे जर मृत होतील तर त्यांचा अर्कविवाह करून नंतर त्यांचा दाह करावा." त्याचा प्रकार—देशकालांचें संकीर्तन करून 'अमुकगोत्रामुकनाम्नो मृतस्य ब्रह्मचारिणो व्रतविसर्गं करिष्ये' असा संकल्प करून हिरण्यद्वारा नांदीश्राद्ध करून अग्निप्रतिष्ठापन करून आघारहोमाच्या अंतीं चार व्याहृतिमंत्रांनीं आज्यहोम करून व 'अग्नये व्रतपतये स्वाहा' 'अग्नये व्रतानुष्ठानफलसंपादनाय स्वाहा' 'विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा' ह्या मंत्रांनीं तीन आज्याहुतींचा होम करून स्विष्टकृदादिक सर्व समाप्त करून पुनः देशकालांचें संकीर्तन करून 'अर्कविवाहं करिष्ये' असा संकल्प करून हिरण्यद्वारा नांदीश्राद्ध करून रुईची शाखा व प्रेत यांना हळद लावून पिंवळ्या सूत्रानें आणि दोन वस्त्रांनीं गुंडाळून अग्निस्थापन करून आघारहोमाच्या अंतीं 'अग्नये स्वाहा, बृहस्पतये स्वाहा, विवाहविधियोजकाय स्वाहा, यस्मै त्वं कामकामाय०' ह्या मंत्रानें, आणि व्यस्तसमस्तव्याहृतींनीं आज्यहोम करून स्विष्टकृदादिक सर्व होमकृत्य समाप्त करून रुईची शाखा व प्रेत यांचा दाह करावा." **विधानमालेंत**-"ज्यांच्या कुलांत ब्रह्मचारी मरेल तर तें कुल नाश पावतें आणि त्यालाही दुर्गति प्राप्त होते, म्हणून मृत झाल्यावर किंवा मरणार असतां षडब्दव्रत प्रायश्चित्त करावें. तीस ब्रह्मचाऱ्यांना नवीं कौपीनें ( लंगोट्या ) द्यावीं, त्या लंगोट्या एक हात लांब किंवा ह्या कानाहून त्या कानाइतक्या लांब द्यावा. कृष्णाजिनें द्यावीं. खडावा, छत्रें व पुष्पें, गोपीचंदन, मणि, पोंवळीं यांच्या माळा, आणि भूषणें इत्यादिक द्यावीं, असें विधान केलें असतां कोणतेंही विघ्न ( अरिष्ट ) होत नाहीं." याविषयीं मूळ वचन सांपडत नाहीं.

**कुष्ठिमृतौतुयमः** मृतस्यकुष्ठिनोदेहंनिखनेद्गोष्ठभूमिषु वासरत्रितयंपश्चादुद्धृत्यान्यत्रतंदहेत् नगंगाप्लवनंकार्यंनिक्षेपेविधिरुच्यते षडब्दव्रतपूर्णेनविधिनात्वंकृतुंचरेत ततोस्थिसंचयंतस्यगंगायांप्रक्षिपेत्सुधीः मासिमासिततःकुर्यान्मासिश्राद्धानिपार्वणान इत्येतत्कुष्ठिमरणेकथितंशास्त्रकोविदैः **शुद्धितत्त्वेभविष्ये** शृणुकुष्ठगणंविप्रउत्तरोत्तरतोगुरुं विचर्चिकातुदुश्चर्माचचर्मीयस्तृतीयकः विकर्चूव्रणताम्रौचकृष्णश्वेतेतथाष्टकमित्युक्त्वा मृतेतुप्रापयेत्तीर्थमथवातरुमूलकं नपिंडंनोदकंकार्यंनचदानक्रियांचरेत षण्मासीयस्त्रिमासीयोमृतःकुष्ठीकदाचन यदिस्नेहाच्चरेद्दाहंयतिचांद्रायणंचरेत् अकृतप्रायश्चित्तकुष्ठ्यादिदाहइदंप्रायश्चित्तं अतएवकुनख्यादिवत्कुष्ठिनोपिद्वादशरात्रं**शूलपाणिनोक्तं** अतएवान्यदीयकुष्ठिनामरणांतमाशौचमुक्तं**कौर्मे** क्रियाहीनस्यमूर्खस्यमहारोगिणएवच यथेष्टाचरणस्याहुर्मरणांतमशौचकम महारोगास्तु वातव्याध्यश्मरीकुष्ठमेहोदरभगंदराः अर्शांसिग्रहणीत्यष्टौमहारोगाःप्रकीर्तिताइति ।

## कुष्ठीमृताविषयीं सांगतो—

**यम**-"कुष्ठी मृत असतां त्याचें प्रेत गाईच्या गोठ्यांत पुरून तीन दिवस ठेवावें. नंतर काढून दुसऱ्या ठिकाणीं त्याचा दाह करावा. कुष्ठ्याचें प्रेत गंगेंतून वाहवूं नये, त्याच्या अस्थिनिक्षेपाविषयीं विधि सांगतों-त्यानें षडब्दप्रायश्चित्त पूर्ण करून विधीनें प्रेतसंस्कार करावा. तदनंतर त्याचें अस्थिसंचयन करून गंगेंत त्या अस्थि टाकाव्या. तदनंतर महिन्यामहिन्याला मासिकश्राद्धें पार्वणविधीनें करावीं. असा हा प्रकार कुष्ठिमरणाविषयीं शास्त्रवेत्त्यांनीं सांगितला आहे." **शुद्धितत्त्वांत भविष्यांत**-"उत्तरोत्तर अधिक दोषी असे कुष्ठाचे प्रकार सांगतों, श्रवण कर. विचर्चिका, दुश्चर्मा, चर्मीय, विकर्चू, व्रणकुष्ठ,[1] ताम्रकुष्ठ, कृष्णकुष्ठ आणि श्वेतकुष्ठ, अशीं आठ कुष्ठें आहेत." असें सांगून पुढें सांगतो-"या आठांपैकीं कुष्ठरोगी मृत असतां त्याचा देह तीर्थांत टाकावा; अथवा वृक्षाच्या खालीं पुरावा. त्याला पिंड देऊं नये, उदक देऊं नये, व त्याच्या उद्देशानें दानही करूं नये. सहा महिने किंवा तीन महिने कुष्ठ असलेला रोगी जर मृत होईल व त्याचा स्नेहानें कोणी दाह करील तर दाहकर्त्यानें यतिचांद्रायण प्रायश्चित्त करावें." ज्या कुष्ठ्यादिरोग्यानें प्रायश्चित्त केलें नसेल त्याच्या दाहाविषयीं हें प्रायश्चित्त समजावें. सर्व कुष्ठ्यांच्या दाहाविषयीं हें प्रायश्चित्त नाहीं म्हणूनच कुनखी ( नखें कुजलेला ) याच्या दाहाप्रमाणें कुष्ठ्याच्या दाहाविषयीं देखील बारा दिवसांचें ( प्राजापत्य ) प्रायश्चित्त **शूलपाणीनें** सांगितलें आहे. म्हणूनच दुसऱ्याच्या कुष्ठिरोग्याचे मरणांत आशौच सांगितलें आहे, **कूर्मपुराणांत**-"क्रियारहित, मूर्ख, महारोगी आणि यथेच्छ आचरण करणारा यांचें मरणांत आशौच सांगतात." महारोग तर-"वातव्याधि, अश्मरी ( मूतखडा ), कुष्ठ, मेह, उदर, भगंदर, मुळव्याध, संग्रहणी हे आठ महारोग सांगितले आहेत."

१ वातव्याधि वगैरे हे आठ महारोग वैद्यकांत वाग्भटांनीं सांगितले आहेत. पण या ठिकाणीं महारोग्याची क्रिया करणारास

**रजस्वलायास्तुवृद्धशातातपः** रजस्वलायाःप्रेतायाःसंस्कारादीनिनाचरेत् ऊर्ध्वंत्रिरात्रात्स्नातांताञ्शवधर्मेणदाहयेत् अतःप्रक्षाल्यकाष्ठवद्दग्ध्वात्र्यहोर्ध्वंदहेत् संकटेतु**मदनरत्नेस्मृत्यंतरे** उदक्यासूतिकावापिमृतास्याद्यदितांतदा आशौचेत्वनतिक्रांतेदाहयेदंतरायदि उद्धृतेनतुतोयेनस्नापयित्वातुमंत्रतः आपोहिष्ठेतितिसृभिर्हिरण्यवर्णाश्चतसृभिः पवमानानुवाकेनयदंतीतिचसप्तभिः ततोयज्ञपवित्रेणगोमूत्रेणाथतेद्विजाः स्नापयित्वान्यवसनेनाच्छाद्यशवधर्मतः दाहादिकंततःकुर्यात्प्रजापतिवचोयथा यज्ञपवित्रमापोअस्मानिति **मिताक्षरायां** पंचभिःस्नापयित्वातुगव्यैःप्रेतांरजस्वलां वस्त्रांतरावृतांकृत्वादाहयेद्विधिपूर्वकं **गृह्यकारिकायां** अंतरिक्षमृतायेचवह्न्यावप्सुप्रमादतः उदक्यासूतिकानारीचरेच्चांद्रायणत्रयं ततोयवपिष्टेनानुलिप्याष्टोत्तरशतंशूर्पोदकैःसंस्नाप्यभस्मगोमयमृत्कुशोदकपंचगव्यशुद्धोदकैरापोहिष्ठापावमानीभिःसंस्नाप्यान्यवस्त्रेवृतेदहेदिति**भट्टाः** ।

## रजस्वलेच्या मरणाविषयीं सांगतो—

**वृद्ध शातातप**—"रजस्वला मृत असतां तिचा संस्कार ( समंत्रक दाह ) वगैरे करूं नये. तीन दिवसांनंतर स्नान केल्यावर समंत्रक दाह करावा." तीन दिवसांचे आंत समंत्रक दाह नाहीं म्हणून तिचें शरीर धुवून काष्ठाप्रमाणें जाळून तीन दिवसांनंतर अस्थींचा समंत्रक दाह करावा. संकट असेल तर **मदनरत्नांत स्मृत्यंतरांत**–"रजस्वला अथवा सूतिका जर मृत असेल व त्या वेळीं त्यांनें आशौच ( अशुचित्व ) समाप्त नसेल व त्या अशुचित्वांत त्यांचा दाह करावयाचा असेल तर आणलेल्या उदकानें त्यांस स्नान घालून नंतर ब्राह्मणांनीं 'आपोहिष्ठा०' ह्या तीन ऋचांनीं, 'हिरण्यवर्णा०' या चार ऋचांनीं, 'पवमानः०' या अनुवाकानें, 'यदंति०' ह्या सात ऋचांनीं, 'आपोअस्मान०' या मंत्रानें स्नान घालून गोमूत्रानें स्नान घालून दुसरें वस्त्र नेसवून व आच्छादन घालून शवाच्या धर्मानें दाहादिक करावें, असें प्रजापतीचें वचन आहे." **मिताक्षरेंत**–"रजस्वला मृत असतां तिला पंचगव्यांनीं स्नानें घालून वस्त्रानें आच्छादित करून तिचा यथाविधि दाह करावा." **गृह्यकारिकेंत**–"अंतरिक्षांत मृत झालेले, अग्नींत व उदकांत प्रमादानें मृत झालेले, रजस्वला व सूतिका ( बाळंतीण ) मृत झालेली स्त्री यांना तीन चांद्रायणें प्रायश्चित्त करावें." तदनंतर जवांचें पीठ अंगाला लावून सुपांतून आणलेल्या उदकानें एकशें आठ स्नानें घालून भस्मस्नान, गोमयस्नान, मृत्तिकास्नान, कुशोदकस्नान, पंचगव्याचें स्नान आणि शुद्धोदकाचें स्नान घालून नंतर 'आपोहिष्ठा०, पावमानी०' या मंत्रांनीं स्नान घालून अन्य वस्त्र नेसवून नंतर दाह करावा, असें **भट्ट** सांगतात.

अत्र**प्रायश्चित्तमाहबौधायनः** उदक्यासूतिकामृत्यौचरेच्चांद्रायणत्रयमिति सूतिकायास्तु**मिताक्षरायां** सूतिकायांमृतायांतुकथंकुर्वंतियाज्ञिकाः कुंभेसलिलमादायपंचगव्यंक्षिपेत्ततः पुण्यर्ग्भिरभिमंत्र्यापोवाचाशुद्धिंलभेत्ततः तेनैवस्नापयित्वातुदाहंकुर्याद्यथाविधि अब्लिंगाभिर्मंत्रिताभिर्वामदेव्याभिरेवच अन्यैश्चवारुणैर्मंत्रैःसंस्नाप्यविधिनादहेत **गृह्यकारिकायां** सूतिकामरणेप्राप्तेसर्वौपध्यनुलेपनं असूतकीतुसंस्पृष्टःशूर्पाणांतुशतंक्षिपेत प्रायश्चित्तविशेषस्तत्रैव सूतिकातुयदासाध्वीविस्नातामरणंगता त्रिवर्षपूर्णपर्यंतंशुध्येत्कृच्छ्रेणसर्वदा **इदंचाद्यत्र्यहे** सूतिकातुयदानारीरजसातुपरिप्लुता म्रियेतचेत्तुसानारीद्विवर्षंकृच्छ्रमाचरेत् **इदंद्वितीयत्र्यहे** सूतिकातुयदासाध्वीविस्नातामरणंगता अब्दंकृच्छ्रेणशुध्येतद्व्यासस्यवचनंयथा **इदंतृतीयत्र्यहे** अत्राशक्तौपक्षांतरमुक्तंतत्रैव सूतिकातुयदानारीविस्नातामरणंगता त्रिपणवदिनादर्वागेकाब्देनविशुध्यति **ऊर्ध्वंतु** सूतिकातुयदानारीप्राणांश्चैवपरित्यजेत मासमेकावधिंयावत्त्रिभिःकृच्छ्रैर्विशुध्यति ।

यांच्याविषयीं प्रायश्चित्त सांगतो **बौधायन** "रजस्वला व सूतिका मृत असेल तर तीन चांद्रायणें करावीं." सूतिकेला तर सांगतो **मिताक्षरेंत**–"सूतिका मृत असेल तर याज्ञिक कसें करितात ? कुंभांत उदक घेऊन त्यांत पंचगव्य टाकून पुण्यकारक वेदमंत्रांनीं त्या उदकाचें अभिमंत्रण करून त्यानेंच स्नान घालून ब्राह्मणांच्या मुखांतून शुद्धि झाली असें म्हणवून नंतर यथाविधि दाह करावा. आपोहिष्ठा०; वामदेव्य, आणि वरुणदेवताक मंत्र यांनीं स्नान घालून यथाविधि दाह करावा." **गृह्यकारिकेंत**–"सूतिका मृत असतां सर्व औषधी वाटून तिच्या अंगास लावाव्या. सूतकी नसेल त्यानें स्पर्श करून शंभर

---

मरणांत आशौच सांगितलें आहे; तर येथें महारोग शब्दानें वातव्याधि म्हणजे वातरक्त घेतां येईल. पण, या श्लोकांतील सारे घेतले तर अश्मरी, मेह, इत्यादि रोग्यांच्या क्रियेचा निषेध होईल म्हणून याचा विद्वानांनीं विचार करावा.

सुपें पाणी तिच्या अंगावर ओतावें." प्रायश्चित्ताविषयीं विशेष सांगतो तेथेंच–"साध्वी स्त्री बाळंतीण असून स्नान केल्यावांचून जेव्हां मृत होईल त्या वेळीं त्र्यब्दकृच्छ्र प्रायश्चित्तानें तिची शुद्धि होईल." हें प्रायश्चित्त पहिल्या तीन दिवसांत मृत असतां समजावें. "ज्या वेळीं सूतिका स्त्री रजानें भरलेली असून ती मरेल त्या वेळीं दोन वर्षे कृच्छ्र प्रायश्चित्तानें तिची शुद्धि होते." हें दुसऱ्या तीन दिवसांत मृत असतां समजावें. "ज्या वेळीं सूतिका स्त्री स्नान केल्यावांचून मृत होईल त्या वेळीं ती एक वर्ष कृच्छ्र प्रायश्चित्तानें शुद्ध होईल, असें व्यासाचें वचन आहे." हें प्रायश्चित्त तिसऱ्या तीन दिवसांत मृत असतां समजावें. ह्या प्रायश्चित्ताविषयीं अशक्ति असतां दुसरा पक्ष तेथेंच सांगितला आहे तो असा–"ज्या वेळीं सूतिका स्त्री स्नान केल्यावांचून तीन, सहा, नऊ दिवसांचे आंत मृत होईल तेव्हां ती एक अब्द ( वर्ष ) कृच्छ्रानें शुद्ध होईल. नऊ दिवसांपुढें एक मासपर्यंत सूतिका स्त्री जेव्हां प्राणत्याग करील तेव्हां ती तीन कृच्छ्रांनीं शुद्ध होते."

**गर्भिणीमृतौमदनरत्नेशौनकः** गर्भिण्युदक्यासंस्कारंशिशुसंस्कारमेवच प्रवक्ष्यामिसमासेनशौनकोहं द्विजन्मनां गर्भिणीमरणेप्राप्तेगोमूत्रेणजलैःसह आपोहिष्ठादिभिर्मंत्रैःप्रोक्ष्यभर्तासमाश्रितः प्रेतंश्मशानेनीत्वाथोलिख्यसव्योदरंततः पुत्रमादायजीवंश्चेत्स्तनंदत्वासुतायतु यस्तेस्तनःशशयइत्यृचाग्रामेनिधायच उदरंचाव्रणंकुर्यात्पृषदाज्येनपूर्यच मृद्भस्मकुशगोमूत्रैरापोहिष्ठादिभिस्त्रिभिः स्नाप्यचाच्छाद्यवासोभिःशवधर्मेणदाहयेत् तत्रैव**षडशीतिमते**गद्यानि गर्भिण्यांमृतायांदक्षिणाशिरसंनिधायतस्यानाभिरंध्रात्सव्यमुदरंचतुरंगुलंहिरण्यगर्भःसमवर्ततेतिछित्त्वागर्भश्चेदप्राणस्तंप्रक्षाल्यनिखनेत्सयदिजीवन् जीवत्वंममपुत्रकेत्युक्त्वाक्षेत्रियेत्वेतिपंचभिःस्नापयित्वा हिरण्यमंतर्धायभूमौनिधायव्याहृतिभिरभिमंत्र्ययस्तेस्तनःशशयइतिस्तनंपाययित्वाशिशुं ग्रामंप्रापयेत् गर्भछेदस्थलेशतायुधायेतिपंचाहुतीर्हुत्वाप्राणायस्वाहापूष्णेस्वाहेत्यनुवाकाभ्यांव्याहृत्यावाज्यंहुत्वाभिन्नमुदरंसूत्रेणसंग्रथ्यघृतेनानुलिप्यब्राह्मणायतिलान्गांभूमिंसुवर्णंदद्यादथयथोक्तेनकल्पेनदहेत् **बौधायने**नतुशतायुधायेतिपंचहोमानंतरंप्रयासाययासायवियासायसंयासायोद्यासायशुचेशोकायतप्यतेतपत्यैब्रह्महत्यायैसर्वस्मैइतिस्वाहांतैराहुतयोप्यधिकाउक्ताः **गृह्यकारिकायां** यदागर्भवतीनारीसशल्यासंस्थिताभवेत् कुक्षिंभित्त्वाततःशल्यंनिर्हरेद्यदिजीवति प्रमीतंनिखनेत्तंतुप्रायश्चित्तमतःपरं सात्रयस्त्रिंशताकृच्छ्रैःशुध्यतेशल्यदोषतः सगर्भदहनेतस्यावर्णजंवधपातकं प्रायश्चित्तंचरित्वातुशुध्यंतिपापकारिणः दग्ध्वातुगर्भसंयुक्तांत्रिरब्दंकृच्छ्रमाचरेत् ।

## गर्भिणीच्या मरणाविषयीं सांगतो—

**मदनरत्नांत शौनक**–"मी शौनक ब्राह्मणांच्या गर्भिणीचा व रजस्वलेचा संस्कार, आणि शिशुसंस्कार संक्षेपानें सांगतों. गर्भिणी स्त्री मृत असतां गोमूत्र व उदक यांनीं 'आपोहिष्ठा०' इत्यादि मंत्रांनीं प्रोक्षण करून प्रेत श्मशानांत नेऊन भर्त्यानें शस्त्र घेऊन तिचें डावीकडचें उदर फाडून गर्भाशयांतून गर्भ काढून घेऊन तो गर्भ जीवंत असेल तर, 'यस्तेस्तनः शशय०' ह्या ऋचेनें पुत्राचे मुखांत स्तन देऊन पुत्राला गांवांत नेऊन ठेवावा. फाडलेले उदरांतील आंतडीं जागच्याजागीं बसवून त्यांत दधियुक्त घृत घालून तें उदर व्रणरहित करावें, नंतर मृत्तिका, भस्म, कुशोदक, गोमूत्र यांनीं व 'आपोहिष्ठा' या तीन ऋचांनीं शुद्धोदकानें स्नान घालून वस्त्रांनीं आच्छादित करून प्रेतधर्मानें दाह करावा." तेथेंच **षडशीतिमतांतील** गद्यें–( फक्किकारूप वचनें )—"गर्भिणी मृत असतां तिला दक्षिणदिशेस मस्तक करून ठेवून तिच्या नाभीच्या वाम बाजूचें उदर 'हिरण्यगर्भः समवर्तता.' या मंत्रानें चार अंगुलें फाडून त्यांतून गर्भ काढून तो जर मृत असेल तर त्याला धुवून पुरावें. तो जर जीवंत असेल तर 'जीवतां मम पुत्रक' असें म्हणून 'क्षेत्रियेत्वा' ह्या पांच मंत्रांनीं स्नान घालून सुवर्ण अंतरित करून भूमीवर ठेवावा आणि व्याहृतींनीं अभिमंत्रण करून 'यस्तेस्तनः शशय०' ह्या मंत्रानें स्तन पाजवून नंतर शिशु गांवांत पोंचवावा. गर्भस्थानाच्या छेदाचे ठिकाणीं 'शतायुधाय०' ह्या मंत्रांनीं पांच आहुति होम करून 'प्राणायस्वाहा, पूष्णेस्वाहा' ह्या दोन अनुवाकांनीं किंवा व्याहृतिमंत्रांनीं आज्यहोम करून फाडलेलें उदर सूत्रानें चांगलें बांधून घृताचा लेप देऊन ब्राह्मणांना तिल, गाई, भूमि, सुवर्ण यावें. नंतर यथोक्तविधीनें त्या प्रेताचा दाह करावा." **बौधायनानें** तर–वर सांगितलेले 'शतायुधाय०' हे पांच होम केल्यानंतर 'प्रयासाय, यासाय, वियासाय, संयासाय, उद्यासाय, शुचे, शोकाय, तप्यते, तपत्यै, ब्रह्महत्यायै, सर्वस्मै' ह्या स्वाहाकारांत मंत्रांनीं अधिक आहुति सांगितल्या आहेत. **गृह्यकारिकेंत**–"ज्या वेळीं गर्भिणी स्त्री गर्भ आंत राहून मृत होईल त्या वेळीं तिची कुक्षि फाडून उदरांतून गर्भ बाहेर काढावा. जर जिवंत असेल ( तर विधिपूर्वक स्वीकार करावा. ) मृत असेल तर तो भूमींत पुरून टाकावा, नंतर प्रायश्चित्त करावें. तेहतीस कृच्छ्र

प्रायश्चित्तानें ती स्त्री शल्यदोषापासून शुद्ध होते. गर्भसहित स्त्रियेचें दहन केलें असतां ज्या जातीचा गर्भ असेल त्या जातीच्या वधाचें पातक प्राप्त होतें. दहन करणारे पापकारी प्रायश्चित्त करून शुद्ध होतात. गर्भयुक्त स्त्रियेचा दाह केला असतां तीन अब्दकृच्छ्र प्रायश्चित्त करावें."

**अथान्वारोहणंस्त्रीणामात्मनोभर्तुरेवच सर्वपापक्षयकरंनिरयोत्तारणायच अनेकस्वर्गफलदंमुक्तिदंचतथैवच जन्मांतरेचसौभाग्यधनपुत्रादिवृद्धिदं देशकालौस्मृत्वाऽरुंधतीसमाचरत्वस्वर्गलोकमहीयमानत्वमनुष्यलोमसंख्याब्दावच्छिन्नस्वर्गवासभर्तृसहितचतुर्दशेंद्रावच्छिन्नकालिकक्रीडमानत्वमातृपितृश्वशुरकुलत्रयपूतत्वब्रह्मघ्नमित्रघ्नकृतघ्नपतिपूतत्वपत्यवियोगकामाभर्तृज्वलच्चितारोहणंकरिष्ये अनुगमनेतुफलमुल्लिख्योन्वारोहणंकरिष्यइत्युक्त्वा हरिद्राकुंकुमांजनादियुतशूर्पाणिसुवासिनीभ्योदद्यात् मंत्रस्तु लक्ष्मीनारायणोदेवोबलसत्त्वगुणाश्रयः गाढंसत्त्वंचमेदेयाद्वाणकैःपरितोषितः सोपस्कराणिशूर्पाणिवाणकैःसंयुतानिच लक्ष्मीनारायणप्रीत्यैसत्त्वकामाददाम्यहं अग्नेःसमीपमागत्यपंचरत्नानिपल्लवे नीलांजनंतथावध्वामुखेमुक्ताफलंन्यसेत् ततोग्निप्रार्थनंकृत्वामंत्रेणानेनमिश्रितं स्वाहासंश्लेषनिर्विण्णसर्वगोत्रहुताशन सत्त्वमार्गप्रदानेननयमांभर्तुरंतिकं ततोग्नावाज्येनाग्नयेतेजोधिपतयेविष्णवेसत्त्वाधिपतये कालायधर्माधिपतये पृथिव्यैलोकाधिष्ठात्र्यैअद्भ्योरसाधिष्ठात्रीभ्यः वायवेबलाधिपतयेआकाशायसर्वाधिपतयेकालायधर्माधिष्ठात्रे अद्भ्यःसर्वसाक्षिणीभ्यः ब्रह्मणेवेदाधिपतये रुद्रायस्मशानाधिपतयेचहुत्वाग्निंप्रदक्षिणीकृत्य दृषदमुपलांचसंपूज्यपुष्पांजलिंगृहीत्वाग्निंप्रार्थयेत् त्वमग्नेसर्वभूतानामंतश्चरसिसाक्षिवत् त्वमेवदेवजानीषेनविदुर्योनिमानुषाः अनुगच्छामिभर्तारंवैधव्यभयपीडिता सत्त्वमार्गप्रदानेननयमांभर्तुरंतिकं मंत्रमुच्चार्यशनकैःप्रविशेच्चहुताशनं गौडास्तु इमानारीरविधवाइति ॐ इमाःपतिव्रताःपुण्याःस्त्रियोयायाःसुशोभनाः सहभर्तुःशरीरेणसंविशंतुविभावसुं इतिचविप्रःपठेदित्याहुः कातरांतु प्रेतोत्तरेसुप्तांदेवरःशिष्योवाउदीर्ष्वेतिद्वाभ्यामुत्थापयेत् एतन्महिमा मिताक्षरादौज्ञेयः ।**

## आतां स्त्रियांचें अन्वारोहण ( सहगमन ) सांगतो—

"स्त्रियांचें अन्वारोहण आपल्या व पतीच्या सर्व पापाचा नाश करणारें आहे, आणि नरकापासून तारणारें आहे. अनेक स्वर्गांतील फलें व मुक्ति देणारें, जन्मांतरीं ( पुढील जन्मांत ) सौभाग्य, धन, पुत्र इत्यादि वृद्धि करणारें असें आहे." देशकालांचें संकीर्तन करून 'अरुंधतीसमाचरत्व० करिष्ये' असा संकल्प करावा. अनुगमन असेल तर वरील सर्व संकल्पाचा उच्चार करून 'अन्वारोहणं करिष्ये' असा संकल्प उच्चारावा. नंतर हळद, कुंकू, अंजन इत्यादियुक्त शूर्पें सुवासिनींना द्यावीं. **दानमंत्र**—"लक्ष्मीनारायणो देवो० सत्त्वकामाददाम्यहं" हे दोन मंत्र सुवासिनींना वायनें देण्याचे होत. "नंतर अग्नीच्या जवळ येऊन पंचरत्नें व नील अंजन वस्त्राचे पदरास बांधून तोंडांत मोतीं घालावें. "स्वाहासंश्लेषनिर्विण्णसर्वगोत्रहुताशन । सत्त्वमार्गप्रदानेन नय मां भर्तुरंतिकम्' ह्या मंत्रानें अग्नीची प्रार्थना करून तदनंतर अग्नींत मंत्रांनीं आज्याचा होम करावा. ते मंत्र—'अग्नये तेजोधिपतये स्वाहा, विष्णवे सत्त्वाधिपतये स्वाहा, कालाय धर्माधिपतये स्वाहा, पृथिव्यै लोकाधिष्ठात्र्यै स्वाहा, अद्भ्यो रसाधिष्ठात्रीभ्यः स्वाहा, वायवे बलाधिपतये स्वाहा, आकाशाय सर्वाधिपतये स्वाहा, कालाय धर्माधिष्ठात्रे स्वाहा, अद्भ्यः सर्वसाक्षिणीभ्यः स्वाहा, ब्रह्मणे वेदाधिपतये स्वाहा, रुद्राय स्मशानाधिपतये स्वाहा' या मंत्रांनीं आज्याचा होम करून अग्नीला प्रदक्षिणा करून पाषाण व उपला यांची पूजा करून हातांत पुष्पांजलि घेऊन अग्नीची प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र—'त्वमग्ने सर्वभूतानां० भर्तुरंतिकं ह्या दोन मंत्रांचा उच्चार करून हळू हळू अग्नींत प्रवेश करावा.' **गौड** तर—'इमानारीरविधवा.' हा मंत्र आणि 'इमाः पतिव्रताः पुण्याः स्त्रियो यायाः सुशोभनाः । सहभर्तुः शरीरेण संविशंतु विभावसुं' हा मंत्र ब्राह्मणानें म्हणावा, असें सांगतात. **भित्री असेल** तिला प्रेताचे उत्तरेस निजलेलीस दिरानें किंवा शिष्यानें 'उदीर्ष्वातः०' ह्या दोन मंत्रांनीं उठवावी. ह्या अन्वारोहणाचा ( सहगमनाचा ) महिमा **मिताक्षरादि** ग्रंथांतून जाणावा.

**पृथ्वीचंद्रोदयेस्कांदे** अनुव्रजतिभर्तारंगृहात्पितृवनंमुदा पदेपदेश्वमेधस्यफलंप्राप्नोत्यनुत्तमं **यमस्त्वंगिराः** यास्त्रीब्राह्मणजातीयामृतंपतिमनुव्रजेत् सास्वर्गमात्मघातेननात्मानंनपतिंनयेदिति **यच्चव्याघ्रपात्** नम्रियेतस्वयंभर्त्राब्राह्मणीशोककर्शिता नब्रह्मगतिमाप्नोतिमरणादात्मघातिनीतितत्पृथक्चितिपरं पृथक्चितिंसमारुह्यनविप्रागंतुमर्हति अन्यासांचैवनारीणांस्त्रीधर्मोयंपरःस्मृतइत्युशनसोक्तेः ।

**पृथ्वीचंद्रोदयांत स्कांदांत**–"घरापासून स्मशानांत मोठ्या हर्षानें पतीच्या मागाहून जाणारी स्त्री पावलापावलाला अश्वमेधयज्ञाचें उत्तम फल पावते." आतां जें **अंगिरा**–"जी ब्राह्मणजातीची स्त्री मृत झालेल्या पतीला अनुगमन करिते ती आत्मघातानें आपल्याला व पतीला स्वर्गास नेत नाहीं." आणि जें **व्याघ्रपाद्**–"शोकानें कृश झालेल्या ब्राह्मणी स्त्रियेनें भर्त्यासह स्वतः मरूं नये. कारण, मरणानें आत्मघातकी होऊन ब्रह्मगति पावत नाहीं." असें निषेधक वचन तें पृथक्चितेविषयक आहे. कारण, "ब्राह्मणी स्त्री पृथक्चितेवर आरोहण करून जाण्यास योग्य होत नाहीं. ब्राह्मणीवांचून इतर स्त्रियांना पृथक्चितीवर आरोहण करणें हा उत्तम स्त्रीधर्म सांगितला आहे." असें **उशनसाचें** वचन आहे.

पृथक्चितिस्तुक्षत्रियादिपरा तद्विधि**र्ब्राह्मे** देशांतरेमृतेपत्यौसाध्वीतत्पादुकाद्वयं निधायोरसिसंशुद्धाप्रविशेज्जातवेदसं ऋग्वेदवादात्साध्वीस्त्रीनभवेदात्मघातिनी त्र्यहाशौचेनिवृत्तेतुश्राद्धंप्राप्नोतिशास्त्रवत् इमानारीरविधवाइतिऋग्वेदवादः त्र्यहाशौचमन्वारोहणपरमितिस्मार्ताः निषेधवाक्यानिप्रायश्चित्तार्थंमृतेनपतितेनवासहमरणनिषेधपराणीत्यप्याहुः अस्थिदाहेपलाशदाहेवानपृथक्चितिदोषः अंगत्वेनस्थानापन्नत्याद्वाशरीरतुल्यत्वात् यत्तु ब्रह्मघ्नोवाकृतघ्नोवामित्रघ्नोवाभवेत्पतिः पुनात्यविधवानारीतमादायमृतातुयेतिहारीतीयं तत्पतितदाहादिनिषेधेनसहगमनस्यदूरतोपास्तत्वादर्थवादमात्रमितिपृ**थ्वीचंद्रः** जन्मांतरीयपापवतासहमरणेनोद्धारइति**स्मार्तगौडाः शुद्धितत्त्वेव्यासः** दिनैकगम्यदेशस्थासाध्वीचेत्कृतनिश्चया नदहेत्स्वामिनंतस्यायावदागमनंभवेत् तत्रैव**भविष्ये** तृतीयेह्निउदक्यायामृतेभर्तरिवैद्विजाः तस्यानुमरणार्थायस्थापयेदेकरात्रकं एकांचितांसमासाद्यभर्तारंयानुगच्छति तद्भर्तुर्यःक्रियाकर्तासतस्याश्चक्रियांचरेत् एतद्दशाहांतरम यश्चाग्निदाताप्रेतस्यपिंडंदद्यात्सएवहीति**वायवीयोक्तेः आपस्तम्बः** चितिभ्रष्टातुयानारीमोहाद्विचलिताभवेत् प्राजापत्येनशुध्येततस्माद्वैपापकर्मणः **तथा** अन्वारोहेतुनारीणांपत्युश्चैकोदकक्रियां पिंडदानक्रियांतद्वच्छ्राद्धंप्रत्याब्दिकंतथा अन्वारोहेकृतेपत्न्याःपृथक्पिंडांस्तिलांजलीन पृथक्शिलेनकुर्वीतदद्यादेकशिलेतथा अन्यत्प्रागुक्तं ।

पृथक्चिती तर क्षत्रियादिविषयक आहे. त्या पृथक्चितीचा विधि सांगतो **ब्राह्मांत**—"पति देशांतरीं मृत असतां शुद्ध पतिव्रता स्त्रियेनें त्याच्या दोन पादुका उरावर घेऊन अग्नींत प्रवेश करावा. ऋग्वेदाच्या वादानें अग्नींत प्रवेश करणारी साध्वी स्त्री आत्मघातकी होत नाहीं. तीन दिवस आशौच झाल्यावर ती शास्त्रानें सांगितलेलें श्राद्ध पावते." ऋग्वेदवाद म्हणजे 'इमानारीरविधवा०' हा समजावा. तीन दिवस आशौच सांगितलें हें अन्वारोहणविषयक आहे, असें **स्मार्त** सांगतात. अंगिरादिकांचीं निषेधक वचनें तीं प्रायश्चित्तार्थ मृत झालेल्या किंवा पतित मृत झालेल्या पतींसह मरणाचीं निषेधक आहेत, असेंही सांगतात. पतीच्या अस्थींचा दाह किंवा पर्णशराचा दाह असतां पृथक्चितीचा दोष नाहीं. कारण, अस्थींचा दाह असेल तर अस्थि ह्या पतीचें अंग आहे. पर्णशरदाह असेल तर पर्णशर हा शरीरस्थानीं आहे म्हणून ते दोन्ही दाह पतिशरीरसमान आहेत. आतां जें "ब्रह्मघातक किंवा कृतघ्न अथवा मित्रद्रोही असा पति असेल तरी जी सुवासिनी स्त्री त्या पतीला घेऊन मरते ती त्याला पवित्र करिते." असें **हारीताचें** वचन तें सहगमन करणाऱ्या स्त्रियांच्या स्तुतीविषयीं मात्र आहे. कारण, ब्रह्मघ्नादिकांच्या दाहादि कर्मांचा निषेध असल्यामुळें सहगमन तर दूरच राहिलें आहे, असें **पृथ्वीचंद्र** सांगतो. जन्मांतरीं पाप केलेल्या पतीसह मरण केलें असतां त्या पापापासून पतीचा उद्धार करिते. असा वरील हारीतवचनाचा भावार्थ, असें **स्मार्तगौड** सांगतात. **शुद्धितत्त्वांत व्यास**—"एक दिवसानें जाण्यास योग्य इतक्या लांबीवर स्त्री असेल व तिचा सहगमनाविषयीं निश्चय झालेला असेल तर ती जोंपर्यंत येईल तोंपर्यंत तिच्या पतीचा दाह करूं नये." **तेथेंच भविष्यांत**–"रजस्वलेच्या तिसऱ्या दिवशीं तिचा भर्ता मृत होईल तर तिच्या सहगमनाकरितां एक रात्र प्रेत ठेवावें. जी स्त्री एकचितीवर आरोहण करून पतीबरोबर जाते तिच्या पतीची क्रिया करणारानें तिचीही क्रिया करावी." हा प्रकार दशाहांतील आहे. कारण, "जो प्रेताला अग्नि देतो त्यानेंच त्याला पिंड द्यावा" असें **वायवीय** वचन आहे. **आपस्तंब**–"जी स्त्री अविचारानें चंचलचित्त होऊन चितीपासून बाहेर येईल ती त्या पापकर्मापासून प्राजापत्य कृच्छ्रानें शुद्ध होईल." तसेंच–"अन्वारोहण असतां स्त्रियांची व पतीची उदकदानक्रिया एक होते. तशीच पिंडदानक्रिया एक आणि प्रतिसांवत्सरिक श्राद्धही एकच होतें. पत्नीनें अन्वारोहण केलें असतां पृथक् पिंड व पृथक् शिलेवर तिलांजलि देऊं नयेत. एका शिलेवर (दगडावर) द्यावे." इतर निर्णय पूर्वी सांगितला आहे.

इदंगर्भिणीबालापत्यासूतिकारजस्वलाव्यभिचारिणीभिर्नकार्यं स्वैरिणीनांगर्भिणीनांपतितानांचयोषितां नास्तिपत्याग्निसंवेशःपतितोहितथाउभावितिमदनरत्नेस्मृतिसंग्रहोक्तेः मदनरत्नेबृहस्पतिःबाल-

संवर्धनंमुक्त्वाबालापत्यानगच्छति व्रतोपवासनियतारक्षेद्गर्भंचगर्भिणी तृतीयपादेरजस्वलासूतिकाचेति **पृथ्वीचंद्रोदयेगौडीयशुद्धितत्त्वे**चपाठः तत्रैव**बृहन्नारदीयेपि** बालापत्याचगर्भिण्योह्यदृष्टऋतव-स्तथा रजस्वलाराजसुतेनारोहंतिचितांसुताः अत्र पतिव्रतासासंदीप्तंप्रविशेद्याहुताशनमिति**भारता**दृग्वेदवा-दात्साध्वीस्त्रीनि**ब्राह्माच्च**पतिव्रतानामेवाधिकारोनदुर्वृत्तानां यत्तु अवमत्यचयाःपूर्वंपतिंदुष्टेनचेतसा वर्त-तेयाश्चसततंभर्तॄणांप्रतिकूलतः तत्रानुमरणंकालेयाःकुर्वंतितथाविधाः कामात्क्रोधाद्भयान्मोहात्सर्वाःपूता-भवंत्युतेति**भारतं** तत्कैमुतिकन्यायेनस्तावकमिति**पृथ्वीचंद्रः** ब्राह्मण्याएकचितिरेवनपृथक्चितिः क्षत्रि-यादीनांपृथगेकावेति **कल्पतरुरत्नाकरमदनपारिजातादयः शुद्धिचिंतामणौ**चैवं तत्रान्वारो-हणेभर्तुःशौचमध्येतदूर्ध्वंवाकृते त्रिरात्रमध्येएवदशपिंडाः सहगमनेतुभर्तुःशौचतुल्यमाशौचंपिंडदानंच अन्विताया:प्रदातव्यादशपिंडाह्न्यहेणतु स्वाम्याशौचेव्यतीतेतुतस्याःश्राद्धंप्रदीयते इति **शुद्धितत्त्वेशूल-पाणौ**च**पैठीनसि**स्मृतेः संस्थितंपतिमालिंग्यप्रविशेद्याहुताशनं तस्याःपिंडादिकंदेयंक्रमशःपतिपिंडव-दिति **शूलपाणिशुद्धितत्त्वधृतव्यासोक्तेः** अन्यत्प्रागुक्तं यदातुरजस्वलापिपत्नीमृतेपत्यौदेशकालव-शात्तदैवानुगच्छति नशुद्धिंप्रतीक्षते तत्रविधिः**देवयाज्ञिकनिबंधे** यदास्त्रियामुदक्यायांपतिःप्राणान्स-मुत्सृजेत् द्रोणमेकंतंडुलानामवहन्याद्विशुद्धये मुसलाघातैस्तदसृक्स्रवतेयोनिमंडलात् विरजस्कामन्यमा-नास्वेचित्तेतदसृक्क्षयं दृष्ट्वाशौचंप्रकुर्वीतपंचमृत्तिकयापृथक् त्रिंशद्विंशतिर्दशचगवांदत्वात्वहःक्रमात् विप्रा-णांवचनाच्छुद्धासमारोहेद्धुताशनं नारीणांसरजस्कानामियंशुद्धिरुदाहृता अत्रश्राद्धादौनिर्णयःपूर्वमुक्तः इति-श्रीभट्टकमलाकरकृतेनिर्णयसिंधावंत्यकर्मनिर्णयः ।

हें अन्वारोहण गर्भिणी, जिचें मूल लहान असेल ती, बाळंतीण, रजस्वला, व्यभिचार करणारी ह्या स्त्रियांनीं करूं नये. कारण, "व्यभिचारिणी, गर्भिणी आणि पतित अशा स्त्रियांना पतीसह अग्निप्रवेश नाहीं. कारण, ह्या स्त्रिया जर पतीसह अग्निप्रवेश करतील तर दोन्ही पतित होतील" असें **मदनरत्नांत स्मृतिसंग्रह**वचन आहे. **मदनरत्नांत बृहस्पति**-"जिचें मूल लहान असेल ती मुलाचें पालनपोषण टाकून जात नाहीं. तिणें व्रत व उपवास यांविषयीं तत्पर असावें. गर्भिणीनें गर्भाचें संरक्षण करावें." 'व्रतोपवासनियता' या स्थानीं 'रजस्वला सूतिकाच' असा **पृथ्वीचंद्रोदयांत व गौडांचे शुद्धितत्त्वांत** पाठ आहे. तेथेंच **बृहन्नारदीयांत**ही-"जिचें मूल लहान आहे ती, गर्भिणी, ऋतु प्राप्त न झालेली, रजस्वला, राजकन्या ह्या पतीच्या चितीप्रत आरोहण करीत नाहींत." अन्वारोहण व सहगमन यांविषयीं "जी स्त्री पतिव्रता असेल तिनें अग्नींत प्रवेश करावा." ह्या **भारत**वचनावरून आणि ऋग्वेदवादानें "पतिव्रता स्त्री आत्मघातकी होत नाहीं." या **ब्राह्म**वचनावरूनही पतिव्रतांनाच अधिकार आहे. दुष्टवर्तनाच्या स्त्रियांना अधिकार नाहीं. आतां जें "ज्या स्त्रिया पूर्वी दुष्ट चित्तानें पतीचा अपमान करून सतत पतीच्या प्रतिकूल वर्तन करितात, तशा प्रकारच्या ज्या स्त्रिया पतीच्या मरणकालीं अनुगमन करितात, मग त्या कामानें करोत किंवा क्रोधानें अथवा भयानें किंवा अविचारानें करोत त्या सर्व पवित्र होतात." असें **भारतांतील** वचन तें कैमुतिकन्यायेंकरून ( प्रतिकूल वर्तन करणाऱ्यादेखील पवित्र होतात, मग अनुकूल वर्तन करणाऱ्या सुशील पवित्र होतील हें काय सांगावें, या न्यायानें ) सहगमनाची स्तुति करणारें आहे असें **पृथ्वीचंद्र** सांगतो. ब्राह्मणी स्त्रियेची एकचितीच होते. पृथक्चिति नाहीं. क्षत्रियादिस्त्रियांची पृथक्चिति किंवा एकचिति होते, असें **कल्पतरु, रत्नाकर, मदनपारिजात** इत्यादि ग्रंथकार सांगतात. **शुद्धिचिंतामणींत**ही असेंच आहे. त्यांत भर्त्याच्या आशौचामध्यें किंवा आशौचोत्तर अन्वारोहण ( अस्थि किंवा पर्णशराबरोबर गमन ) केलें असतां तीन दिवसांमध्येंच दहा पिंड द्यावे. सहगमन केलें असतां भर्त्याच्या आशौचाइतकेंच आशौच व पिंडदानही समजावें. कारण, "अनुगमन ( अस्थ्यादिबरोबर गमन ) करणाऱ्या स्त्रियेला तीन दिवसांत दहा पिंड द्यावे. पतीचें आशौच संपल्यावर तिला श्राद्ध द्यावें." अशी **शुद्धितत्त्वांत व शूलपाणींत पैठीनसि** स्मृति आहे. मृत झालेल्या पतीला आलिंगन करून जी स्त्री अग्निप्रवेश करील तिला पतिपिंडाप्रमाणें अनुक्रमानें पिंडादिक द्यावें." असें **शूलपाणि व शुद्धितत्त्व** यांनीं धरलेलें **व्यासवचन आहे.** इतर निर्णय पूर्वीं सांगितला आहे. ज्या वेळीं पत्नी रजस्वला असूनही पति मृत झाला असतां देशकालानुरोधानें त्या वेळींच जाण्याविषयीं इच्छिते, आपल्या शुद्धीपर्यंत राहत नाहीं, त्याठिकाणीं विधि सांगतो **देवयाज्ञिकनिबंधांत**—"ज्या वेळीं स्त्री रजस्वला असतां पति मृत होईल त्या वेळीं तिणें एक द्रोण ( अदमण ) परिमित तांदूळ मुसळानें सडावे. मुसळाच्या आघातांनीं तिच्या योनिद्वारांतून रक्ताचा स्राव होतो. तो रक्तस्राव पाहून आपल्या चित्तांत रजोरहित आपण झालों असें मानून

पंचमृत्तिकांनीं वेगवेगळी शुद्धि करून पहिला दिवस असेल तर तीस गाई, दुसरा दिवस असेल तर वीस गाई, तिसरा दिवस असेल तर दहा गाई ब्राह्मणांस देऊन ब्राह्मणाकडून शुद्ध असें म्हणवून अग्नींत प्रवेश करावा. रजस्वला स्त्रियांची ही शुद्धि सांगितली आहे." याविषयीं श्राद्धादिकांचा निर्णय पूर्वी सांगितला आहे.

**इति श्रीनिर्णयसिंधौ अंत्यकर्मनिर्णयाची महाराष्ट्रीका समाप्ता.**

अग्निप्रवेशाशक्तौतु**विष्णुः** मृतेभर्तरिब्रह्मचर्यंतदन्वारोहणंचेति **ब्रह्मवैवर्ते** सहानुगमनंशस्तंवैधव्यस्याथपालनं यत्तुतत्रैव कलौनान्यागतिःस्त्रीणांसहानुगमनाद्दतइतितत्ब्रह्मचर्याशक्यत्वपरं तथाच**मनुः** ब्रह्मचर्यंचरेद्वापिप्रविशेद्वाहुताशनं **काशीखंडेपि** पत्यौमृतेपियायोपिद्वैधव्यंपालयेत्क्वचित् सापुनःप्राप्यभर्तारंस्वर्गलोकंसमश्नुते अनुयातिनभर्तारंयदिदैवात्कथंचन तत्रापिशीलंसंरक्षेच्छीलभंगात्पतत्यधः तद्वैगुण्यादपिस्वर्गात्पतिःपततिनान्यथा तस्याःपिताचमाताचभ्रातृवर्गस्तथैवच ।

## स्त्रियांना अग्निप्रवेशाविषयीं अशक्ति असतां सांगतो—

**विष्णु**—"भर्ता मृत असतां स्त्रियांना ब्रह्मचर्यधारण आणि पतीगह गमन असे दोन प्रकार सांगितले आहेत." **ब्रह्मवैवर्तांत**—"स्त्रियांना सहगमन किंवा वैधव्याचें पालन ( संरक्षण ) प्रशस्त आहे." आतां जें **तेथेंच**—"कलियुगांत सहगमनावांचून स्त्रियांना दुसरी गति नाहीं." असें सांगतो तें ब्रह्मचर्य धारणाविषयीं अशक्तिविषयक आहे. तसेंच सांगतो **मनु**—"स्त्रियेनें पति मृत असतां ब्रह्मचर्य आचरण करावें, किंवा अग्निप्रवेश करावा." **काशीखंडांत**ही—"जी कोणी स्त्री पति मृत असतां वैधव्याचें संरक्षण करील ती पुनः पतीला पावून स्वर्गलोकास जाते. जर दैवयोगानें कोणत्याही रीतीनें भर्त्याबरोबर गमन करणार नाहीं तर त्या अवस्थेमध्यें तिनें आपल्या शीलाचें ( सद्वर्तनाचें ) संरक्षण करावें. सद्वर्तनाच्या भंगानें नरकांत पडते. तिच्या असद्वर्तनाच्या योगानेंही पति स्वर्गापासून च्युत होतो, अन्यथा स्वर्गापासून च्युत होत नाहीं. तिचा पिता, माता आणि भ्राते हे देखील तिच्या असद्वर्तनानें स्वर्गापासून भ्रष्ट होतात."

**अथविधवाधर्माः मदनरत्नेस्कांदे** विधवाकबरीबंधोभर्तृबंधायजायते शिरसोवपनंतस्मात्कार्यंविधवयासदा एकाहारःसदाकार्योनद्वितीयःकदाचन मासोपवासंवाकुर्याच्चांद्रायणमथापिवा पर्यंकशायिनीनारीविधवापातयेत्पतिं नैवांगोद्वर्तनंकार्यंस्त्रियाविधवयाक्वचित् गंधद्रव्यस्यसंभोगोनैवकार्यस्तयापुनः तर्पणंप्रत्यहंकार्यंभर्तुस्तिलकुशोदकैः तत्पितुस्तत्पितुश्चापिनामगोत्रादिपूर्वकम् इदमपुत्रापरमिति-**मदनपारिजातः** नाधिरोहेदनड्वाहंप्राणैःकंठगतैरपि कंचुकंनपरीदध्याद्वासोनविकृतंवसेत् वैशाखेकार्तिकेमाघेविशेषनियमंचरेत् **प्रचेताः** तांबूलाभ्यंजनंचैवकांस्यपात्रेचभोजनं यतिश्चब्रह्मचारीचविधवाचविवर्जयेत् श्राद्धादौतुविशेषःप्रागुक्तः यत्तु**बौधायनः** संवत्सरंप्रेतपत्नीमधुमांसंविवर्जयेत् अधःशयीतषण्मासानितिमौद्गल्यभाषितमितितदसवर्णापरमित्य**परार्कः** ।

## आतां विधवेचे धर्म सांगतो—

**मदनरत्नांत स्कांदांत**—"विधवेचा केशबंध पतीच्या बंधाला कारण होतो, या कारणास्तव विधवेनें सदा मस्तकाचें वपन करावें. सर्वकाल एकवार भोजन करावें. दुसऱ्या वेळीं कधींही भोजन करूं नये. एक महिना उपवासव्रत करावें किंवा चांद्रायण करावें. विधवा स्त्री पलंगावर शयन करील तर पतीचा अधःपात करील. विधवा स्त्रियेनें कधींही अंगाचें उद्वर्तन ( सुगंधिक चूर्ण वगैरे लावून धुणें ) करूं नये. विधवेनें सुगंधि पदार्थाचा उपभोग करूं नये. तिलसहित कुशोदकांनीं दररोज पति, त्याचा पिता व पितामह यांचें नाम, गोत्र इत्यादि उच्चार करून तर्पण करावें. हें तर्पण अपुत्र जी विधवा तिला सांगितलें आहे, असें **मदनपारिजात** सांगतो. प्राण जात असले तरी तिनें बैलावर बसूं नये. कंचुकी धारण करूं नये. रंगविलेलें वस्त्र नेसूं नये. वैशाखांत, कार्तिकांत व माघांत विशेष नियम धारण करावे." **प्रचेता**—"तांबूल, अभ्यंग, कांशाच्या पात्रांत भोजन हीं संन्यासी, ब्रह्मचारी व विधवा यांनीं वर्ज्य करावीं." विधवेनें करावयाच्या श्राद्धाचा विशेषनिर्णय पूर्वी ( द्वितीयपरिच्छेदांत वगैरे ) सांगितला आहे. आतां जें **बौधायन**—"मृताच्या पत्नीनें एक वर्षपर्यंत मध व मांस वर्ज्य करावें. सहा महिने भूमीवर शयन करावें. असें मौद्गल्य ऋषीचें सांगणें आहे." असें सांगतो तें भिन्न जातीच्या स्त्रीविषयीं आहे, असें **अपरार्क** सांगतो.

**अथसंन्यासः याज्ञवल्क्यः** वनाद्गृहाद्वाकृत्वेष्टिंसार्ववेदसदक्षिणां प्राजापत्यांतदंतेतानग्नीनारोप्यचात्मनि अधीतवेदोजपकृत्पुत्रवानन्नदोग्निमान् शक्त्याचयज्ञकृन्मोक्षेमनःकुर्यात्तुनान्यथा एतदाश्रमसमुच्चयपक्षे **जाबालश्रुतौ**त्वन्येपिपक्षाउक्ताः यदिचेतरथाब्रह्मचर्यादेवप्रव्रजेद्गृहाद्वनाद्वाअथपुनरव्रतीवास्नातकोवाऽस्नातकोवोत्सन्नाग्निकोवायदहरेवविरजेत्तदहरेवप्रव्रजेदिति **अंगिराः** प्रव्रजेद्ब्रह्मचर्याद्वाप्रव्रजेच्चगृहादपि वनाद्वाप्रव्रजेद्विद्वानातुरोवाथदुःखितः आतुरोमुमूर्षुः दुःखितश्चौरव्याघ्रादिभीतः **भारते** आतुराणांचसंन्यासेनविधिर्नैवचक्रिया प्रेषमात्रंसमुच्चार्यसंन्यासंतत्रपूरयेत् **जाबालश्रुतावपि** यद्यातुरःस्यान्मनसावाचावासंन्यसेदिति अत्रविप्रस्यैवाधिकारः ब्राह्मणाःप्रव्रजंतीतिजाबाल**श्रुतेः** आत्मन्यग्नीन्समारोप्यब्राह्मणःप्रव्रजेद्गृहादिति**मनूक्ते**श्चेति**विज्ञानेश्वरादयः वृद्धयाज्ञवल्क्योपि** चत्वारोब्राह्मणस्योक्ताआश्रमाःश्रुतिचोदिताः क्षत्रियस्यत्रयःप्रोक्ताद्वावेकोवैश्यशूद्रयोरिति **माधवस्तु** ब्राह्मणःक्षत्रियोवाथवैश्योवाप्रव्रजेद्गृहादिति**कौर्माद्यु**क्तेर्वर्णत्रयस्याप्यधिकारः पूर्ववाक्यंतुकाषायदंडादिनिषेधार्थं मुखजानामयंधर्मोयद्विष्णोर्लिंगधारणम् राजन्यवैश्ययोर्नेतिदत्तात्रेयमुनेर्वचः इति**बौधायनोक्ते**रिति पक्षांतरमाह **तत्त्वं**तुकुटीचकादिपरमेतदिति योपिसंन्यासंपलपैतृकमितिकलौनिषेधःसोपित्रिदंडादिपरइत्युक्तंप्राक् ।

## आतां संन्यास सांगतो—

**याज्ञवल्क्य**—"वेदाध्ययन केलेला, जप करणारा, पुत्रवान्, लोकांना अन्न देणारा, अग्नि धारण करणारा, आपल्या शक्तीप्रमाणें यज्ञ करणारा अशा मनुष्यानें वानप्रस्थाश्रमांत किंवा गृहस्थाश्रमांत प्राजापत्य इष्टी करून त्या इष्टींत सर्वस्व दक्षिणा देऊन नंतर त्या अग्नींचा आपल्या ठिकाणीं समारोप करून मोक्षाविषयीं मन करावें. अन्यथा करूं नये." हें वचन सारे आश्रम करावे ह्यापक्षीं आहे. **जाबालश्रुतींत** तर दुसरेही पक्ष सांगितले आहेत, ते असे—"जर सर्व आश्रम शक्य नसतील तर ब्रह्मचर्याश्रमांतच संन्यास घ्यावा. अथवा गृहस्थाश्रमांत किंवा वानप्रस्थाश्रमांत, मग तो व्रतधारण करणारा असो किंवा नसो, स्नातक असो किंवा अस्नातक असो, ज्यादिवशीं विरक्ती होईल त्याचदिवशीं संन्यस्त व्हावें." **अंगिरा**—"विद्वानानें ब्रह्मचर्याश्रमांतही संन्यास घ्यावा. अथवा गृहस्थाश्रमांतही घ्यावा. किंवा वानप्रस्थाश्रमांत घ्यावा. अथवा मरणावस्थेंत घ्यावा. किंवा दुःखित म्हणजे चोर, व्याघ्र इत्यादिकांनीं भीत झालेला त्यानें घ्यावा." **भारतांत**—"आतुरांच्या ( मरणारांच्या ) संन्यासाविषयीं विधि नाहीं आणि क्रिया ( कर्म ) ही नाहीं. त्या ठिकाणीं प्रेषाचा मात्र उच्चार करून संन्यासविधि पुरा करावा." **जाबालश्रुतींत**ही—"जर आतुर असेल तर मनानें किंवा वाणीनें संन्यास घ्यावा." संन्यासाविषयीं ब्राह्मणालाच अधिकार आहे. कारण, "ब्राह्मण संन्यस्त होतात." अशी **जाबालश्रुति** आहे. आणि "ब्राह्मणानें आपल्या ठिकाणीं अग्नींचा समारोप करून गृहस्थाश्रमांतून निघून जावें म्हणजे संन्यास घ्यावा." असें **मनु**वचनही आहे, असें **विज्ञानेश्वर** इत्यादि ग्रंथकार सांगतात. **वृद्धयाज्ञवल्क्य**ही—"ब्राह्मणाला चार आश्रम श्रुतीनें सांगितले आहेत. क्षत्रियाला तीन आश्रम सांगितले आहेत. वैश्याला दोन आणि शूद्राला एक आश्रम सांगितला आहे." **माधव** तर "ब्राह्मण, क्षत्रिय अथवा वैश्य यानें गृहस्थाश्रमांतून संन्यास घ्यावा." ह्या **कौर्मादि**वचनावरून तीन वर्णांनाही अधिकार आहे. वरील वृद्धयाज्ञवल्क्याचें वचन तर काषायवस्त्र, दंड इत्यादिकांच्या निषेधासाठीं आहे. कारण, "विष्णूचीं चिन्हें धारण करणें हा धर्म ब्राह्मणांचा आहे. क्षत्रिय वैश्यांचा नाहीं, असें **दत्तात्रेय**मुनींचें वचन आहे." असें **बौधायन** सांगतो, म्हणून हा दुसरा पक्ष असें ( माधव ) सांगतो. **खरा प्रकार** म्हटला तर हें वचन कुटीचक इत्यादि संन्यासांचें क्षत्रिय-वैश्यांला निषेधक आहे. आणि जो 'संन्यासंपलपैतृकं' या वचनानें कलियुगांत संन्यासाचा निषेध सांगितला आहे तो देखील त्रिदंडादिविषयक आहे, असें पूर्वी ( कलिवर्ज्यप्रकरणीं ) सांगितलें आहे.

सचसंन्यासश्चतुर्धेत्याह**हारीतः** कुटीचकोबहूदकोहंसश्चैवतृतीयकः चतुर्थःपरमोहंसोयोयःपश्चात्सउत्तमः **आद्यः** पुत्रादिनाकुटींकारयित्वा तत्रगृहेवावसन् काषायवासाः शिखोपवीतत्रिदंडवान् बंधुपुत्रगृहेवाभुंजानआत्मज्ञोभवेत् एतदत्यंताशक्तपरम् **द्वितीयस्तु**बंधूनहित्वासप्तागाराणिभैक्षंचरन् पूर्वोक्तवेषःस्यात् **हंसस्तु**पूर्वोक्तवेषोप्येकदंडः एकंतुवैणवंदंडंधारयेन्नित्यमादरादिति**स्कांदात् विष्णुरपि** यज्ञोपवीतंदंडंचवस्त्रंजंतुनिवारणम् तावान्परिग्रहःप्रोक्तोनान्योहंसपरिग्रहः **चतुर्थोपि स्कांदे** परमहंसस्त्रिदंडंचरज्जुंगोवालनिर्मिताम् शिखांयज्ञोपवीतंचनित्यंकर्मपरित्यजेत् अयमप्येकदंडएव येतुशिखोपवीतादित्यागनिषेधा-

स्तेकुटीचकादिपराः यत्तु **मेधातिथिः** यावन्नस्युस्त्रयोदंडास्तावदेकेनवर्तयेदिति तदपितत्परमेव यच्चा**त्रिः** चतुर्धाभिक्षवःप्रोक्ताःसर्वेचैवत्रिदंडिनइति तद्वाग्दंडादिपरंनयष्टिपरम् वाग्दंडोथमनोदंडःकर्मदंडस्तथैवच यस्यैतेनियतादंडाःसत्रिदंडीतिचोच्यते इति**मनूक्तेः** तस्मात्परमहंसस्यैकदंडएव सोप्यविदुषः विदुषस्तु-सोपिनास्ति नदंडंनशिखांनाच्छादनंचरतिपरमहंसइति**महोपनिषदुक्तेः** ज्ञानमेवास्यदंडइतिवाक्यशे-षाच्च यत्तु **यमः** काष्ठदंडोधृतोयेनसर्वाशीज्ञानवर्जितः सयातिनरकान्घोरान्महारौरवसंज्ञितानिति तद्वैरा-ग्यंविनाजीवनार्थसंन्यासपरं एकदंडंसमाश्रित्यजीवंतिबहवोनराः नरकेरौरवेघोरेकर्मत्यागात्पतंतितइति-**स्मृतेः** यच्चा**श्वमेधिके** एकदंडीत्रिदंडीवाशिखामुंडितएववा काषायमात्रसारोपियतिःपूज्योयुधिष्ठिरेति तस्यापिपूर्वोक्तव्यवस्थाज्ञेया ।

तो संन्यास चार प्रकारचा आहे, असें सांगतो **हारीत**—"कुटीचक, बहूदक, हंस आणि परमहंस असे चार प्रकारचे संन्यास आहेत. जो पुढचा पुढचा तो तो पूर्वीच्यापेक्षां उत्तम उत्तम समजावा." **पहिला प्रकार**—पुत्रादिकांकडून पर्ण-कुटी करवून तींत राहणारा किंवा घरांत राहणारा, काषायवस्त्र धारण करणारा, शिखा यज्ञोपवीत व तीन दंड धारण करणारा, आपल्या बांधवांकडे किंवा घरीं भोजन करून राहणारा असें असून आत्मज्ञान संपादन करावें, हा कुटीचक होय. हा प्रकार अत्यंत अशक्ताविषयीं आहे. **दुसरा प्रकार**—आपल्या बांधवांना टाकून सात घरें भिक्षा मागून निर्वाह करणारा, वर सांगितलेल्या कुटीचकाचा वेष धारण करणारा असा असून आत्मज्ञान संपादावें, हा बहूदक होय. **तिसरा प्रकार**—हंस, याचा वेष बहूदकाप्रमाणेंच असतो. पण दंड एक असतो. कारण, "वेळूचा एक दंड आदरानें नित्य धारण करावा." असें **स्कांद**वचन आहे. **विष्णु**ही—"यज्ञोपवीत, दंड, जंतु निवारण करणारें वस्त्र, इतका परिग्रह सांगितला आहे. दुसरा परि-ग्रह हंसाला नाहीं." **चवथा प्रकार**ही सांगतो **स्कांदांत**—"परमहंसानें तीन दंड, गाईच्या केशांची दोरी, शिखा, यज्ञोपवीत आणि नित्यकर्म हीं टाकावीं." यालाही एक दंडच आहे. आतां जे शिखा, यज्ञोपवीत इत्यादि त्यागांचे निषेध आहेत ते निषेध कुटीचक, बहूदक, हंस यांच्याविषयीं आहेत. आतां जें **मेधातिथि**—"जोंपर्यंत तीन दंड झाले नाहींत तोंपर्यंत एकदंडानें वर्तन करावें" असें सांगतो; तें देखील कुटीचकादिविषयक आहे. आतां जें **अत्रि**—"चार प्रकारचे संन्याशी सांगितले आहेत, ते सारे त्रिदंडी आहेत" असें सांगतो; तें वाग्दंडादिविषयक आहे. वेणुदंडाविषयीं नाहीं. कारण, "वाग्दंड, मनोदंड, कर्मदंड हे तीन दंड ज्याला निश्चित आहेत तो त्रिदंडी असा म्हटला आहे." असें **मनु**वचन आहे. तस्मात् परमहंसाला एक दंडच आहे. तोही ब्रह्मज्ञानरहितालाच आहे. ब्रह्मज्ञान्याला तर तोही नाहीं. कारण, "परमहंसाला दंड नाहीं, शिखा नाहीं, आच्छादन नाहीं, असा परमहंस संचार करितो." असें **महोपनिषदांत** सांगितलें आहे. आणि ज्ञानच याला दंड, असें शेवटींही सांगितलें आहे. आतां जें **यम**—"काष्ठाचा दंड धारण करणारा, सर्व भक्षण करणारा, ज्ञानवर्जित तो महाभयंकर अशा महारौरव नरकांप्रत जातो" असें सांगतो, तें वैराग्य असल्याशिवाय जीवनासाठीं जो संन्यास त्याविषयीं आहे. कारण, "एका दंडाचा आश्रय करून जीवन करणारे बहुत मनुष्य आहेत यांनी आपल्या कर्माचा त्याग केल्यामुळें ते भयंकर अशा रौरव नरकांत पडतात." अशी **स्मृति** आहे. आतां जें **अश्वमेधपर्वांत**—"एकदंडी असो किंवा त्रिदंडी असो, शेंडी काढलेला असो किंवा नसो मुख्यत्वेंकरून काषाय वस्त्र मात्र ग्रहण करणारा असा जो यति ( संन्याशी ) तो पूज्य आहे." असें सांगितलें आहे त्याची देखील वर सांगितलेली व्यवस्था म्हणजे हें वचन ज्ञान्याविषयीं आहे, असें समजावें.

**अथतद्विधिः बौधायनः** कृत्वाश्राद्धानिसर्वाणिपित्रादिभ्योष्टकंपृथक् वापयित्वाचकेशादीन्मार्जये-न्मातृकाइमाः सर्वाणीतिस्वस्यनवश्राद्धषोडशश्राद्धादिकृत्वेत्यर्थः **स्मृत्यर्थसारेपि** एकोद्दिष्टविधानेनकुर्या-च्छ्राद्धानिषोडश अग्निमान्पार्वणेनैवविधिनानिर्वपेत्स्वयमिति **कात्यायनः** कृच्छ्रांस्तुचतुरःकृत्वापावनार्थ-मनाश्रमी आश्रमीचेत्तप्तकृच्छ्रंतेनासौयोग्यतांव्रजेत् **बौधायनः** सदैवमार्षकंदिव्यंपित्र्यंमातृकमानुषे भौतिकंचात्मनश्चांतेअष्टौश्राद्धानिनिर्वपेत् अत्रक्रममाह**हेमाद्रौशौनकः** देवश्राद्धेब्रह्मविष्णुमहेश्वरादे-वताः आर्षेदेवर्षिब्रह्मर्षिक्षत्रर्षयः देवर्षिक्षत्रर्षिमनुष्यर्षयोवा मरीच्यादिऋषयइति**संन्यासपद्धतौ**तच्चिं-त्यम् **दिव्येवसुरुद्रादित्याः मानुषेसनकसनंदनसनातनाः भूतश्राद्धे**पृथिव्यादिभूतानिचक्षुरादिकरणा-निचतुर्विधोभूतग्रामश्चेतितिस्रः पित्र्येपित्रादित्रयोमातामहाश्च मातृकेमात्रादयस्तिस्रः आत्मश्राद्धेआत्मपितृ-पितामहादेवताः आत्मश्राद्धंपरमात्मदैवतमिति**संन्यासपद्धतौ**तच्चिंत्यं सर्वत्रनांदीमुखत्वंविशेषणंज्ञेयं

सर्वत्रापिंडदानं युग्माविप्राः दक्षक्रतूसत्यवसूवाविश्वेदेवौअन्यन्नांदीश्राद्धवदितिहेमाद्रिः **स्मृत्यर्थसारे** केशश्मश्रु लोमनखंवापयित्वोपकल्पयेत् दंडंजलपवित्रंचशिक्यंपात्रंकमंडलुं आसनंकौपीनमाच्छादनंकंथां- पादुकेइति दशपंचवा एतच्चपूर्वेद्युर्नांदीमुखंकृत्वापरेद्युःपुण्याहवाचनंकृत्वाकार्यमितिशौनकः ।

## आतां संन्यासाचा विधि सांगतो—

**बौधायन**–"सर्व श्राद्धें म्हणजे आपलीं नव श्राद्धें, षोडश मासिकें इत्यादिक करून आणि आठ पित्रादिक श्राद्धें वेगळीं करून केशादिकांचें वपन करून पुढें सांगावयाच्या मातृकांचें मार्जन करावें." **स्मृत्यर्थसारांत**ही–"एकोद्दिष्टाच्या विधीनें आपलीं षोडश ( सोळा ) श्राद्धें स्वतः करावीं. श्रौताग्निमान् असेल त्यानें पार्वणविधीनेंच स्वतः करावीं." **कात्यायन**– "आश्रमरहित असेल त्यानें आपल्या शुद्धीकरितां चार कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. ब्रह्मचर्यादि आश्रमयुक्त असेल त्यानें तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. तेणेंकरून त्याला संन्यास घेण्याची योग्यता प्राप्त होते." **बौधायन**–"दैव, आर्ष, दिव्य, पित्र्य, मातृक, मानुष, भौतिक आणि अंतीं आत्मश्राद्ध ( आपलें ) अशीं आठ श्राद्धें करावीं." या आठ श्राद्धांचा क्रम सांगतो **हेमाद्रींत शौनक**–"देवश्राद्धांत ब्रह्मा, विष्णु, महेश्वर ह्या देवता. आर्ष ( ऋषींचे ) श्राद्धांत देवर्षि, ब्रह्मर्षि, क्षत्रर्षि हे देवता. अथवा देवर्षि, क्षत्रर्षि, मनुष्यर्षि देवता समजाव्या. मरीचि इत्यादि ऋषि देवता असें **संन्यासपद्धतींत** आहे, तें चिंत्य ( प्रमाणशून्य ) होय. दिव्यश्राद्धांत वसु, रुद्र, आदित्य देवता. मनुष्यश्राद्धांत सनक, सनंदन, सनातन देवता. भूतश्राद्धांत पृथिव्यादि भूतें, चक्षुरादि करणें, चार प्रकारचा भूतग्राम ह्या तीन देवता. पितृश्राद्धांत पिता, पितामह, प्रपितामह आणि मातामह, मातुःपितामह, मातुःप्रपितामह ह्या देवता. मातृकश्राद्धांत माता, पितामही, प्रपितामही ह्या देवता. आत्मश्राद्धांत आत्मा ( आपण ), पिता, पितामह ह्या देवता. आत्मश्राद्धांत परमात्मा देवता असें **संन्यासपद्धतींत** आहे तें चिंत्य ( अप्रमाण ) आहे. सर्वत्रठिकाणीं नांदीमुख हें त्या देवतांना विशेषण समजावें. सर्वत्र पिंडदान आहे. दोन दोन ब्राह्मण असावेत. दक्षक्रतू अथवा सत्यवसू विश्वेदेव. इतर सर्व विधि नांदीश्राद्धाप्रमाणें समजावा, असें **हेमाद्रि** सांगतो. **स्मृत्यर्थसारांत**–"केश, श्मश्रु, लोम, नखें वपन करवून नंतर दंड, जल, पवित्र, शिंकें, पात्र, कमंडलु, आसन, कौपीन, आच्छादन, कंथा, दोन खडाव हीं दहा किंवा पांच संपादन करावीं." हें केशवपनादि पूर्वदिवशीं नांदीश्राद्ध करून दुसऱ्या दिवशीं पुण्याहवाचन करून नंतर करावें, असें **शौनक** सांगतो.

**बौधायनः** त्रीन्दंडानंगुलीस्थूलानवैणवानमूर्धसंमितान एकादशनवद्वित्रिचतुःसप्तान्यपर्वकान् वेष्टि- तान्कृष्णगोवालरज्वातुचतुरंगुलान् एकोवातादृशोदंडोगोवालमदृशोभवेत् अनग्निरग्निमुत्पाद्यनित्येनविधि- नाततः पृष्ठोदिविविधानेनेत्यर्थः स्वाग्नावेवाग्निमान्कुर्यादपवर्गोक्तमादितः आज्यंपयोदधीत्येतत्रिवृद्वाजल- मेववा ॐभूरित्यादिनाप्राश्यरात्रिंचोपवसेत्ततः अथादित्यास्तसमयात्पूर्वमग्नीन्विहृत्यसः आज्यमग्नौगा- र्हपत्येसंस्कृत्यैतेनचस्रुचा पूर्णयाहवनीयेतुजुहुयात्प्रणवेनतत ब्रह्मान्वाधानमेतत्स्यादग्निहोत्रेहुतेततः संस्ती- र्यगार्हपत्यस्यदर्भानुत्तरतोत्रतु पात्राण्यासादयेदर्भेपुब्रह्मायतनएवतु जागृयाद्रात्रिमेतांतुयावद्ब्राह्मोमुहूर्तकः अग्निहोत्रंस्वकालेतुहुत्वाप्रातस्ततनंतत: इष्टिंवैश्वानरींकुर्यात्प्राजापत्यामथापिवा **जाबालश्रुतौ**तद्धैकेप्राजा- पत्यामेवेष्टिंकुर्वंतितनत्तथानकुर्यादाग्नेयीमेवकुर्यात्पश्चात्रैधातवीयामेवकुर्यादित्युक्तं तेनात्रविकल्पः **अत्राहुः** त्रेताग्नेःप्राजापत्या तद्वाक्यशेषेग्नीनितिबहुत्वश्रुतेः एकाग्नेस्त्वाग्नेयीति अनाहिताग्नेरिष्टिस्थानेवैश्वानरआग्नेयो- वाचरुरिति**माधवः कात्यायनः** आत्मन्यग्नीन्समारोप्यवेदिमध्यस्थितोहरिं ध्यात्वाद्दित्वनुज्ञातोगुरु- णाप्रैषमीरयेत् **कपिलः** विधिवत्प्रैषमुक्त्वाथत्रिरुपांशुत्रिरुच्चकैः अभयंसर्वभूतेभ्योमत्तःस्वाहेत्यपोभुवि निनीयदंडशिक्यादिगृहीत्वाथबहिर्व्रजेत् **बौधायनः** सखेमेत्यादिनादंडयेनदेवाःपवित्रकं यदस्यपारे- शिक्यंतुपात्रंव्याहृतिभिस्तथा युवासुवासाःकौपीनंगृहीत्वाबांधवांस्त्यजेत् ।

**बौधायन**–"अंगुलीएवढे स्थूल पायांपासून मस्तकापर्यंत पोंचणारे असे वेळूचे तीन दंड असावेत. त्यांना अकरा, नऊ, दोन, तीन, चार, किंवा सात अशीं पेरें असावींत. ते दंड काळ्या गाईच्या केशांचे दोरीनें चार अंगुलें वेष्टिलेले असावेत. अथवा वर सांगितल्याप्रमाणें एक दंड गाईच्या केशांसारखा असावा. अनग्निकानें 'पृष्टोदिवि॰' या विधीकरून अग्नि उत्पन्न करून त्या अग्नीवर पूर्वीपासून सर्व संन्यासाचें कृत्य करावें. अग्निमान् असेल त्यानें आपल्या अग्नीवरच सर्व कृत्य करावें. आज्य, दूध, दहीं, हीं एकत्र मिश्र करून घेऊन किंवा उदकच घेऊन 'ॐ भूः सावित्रीं प्रविशामि तत्सवितुर्व- रेण्यं' इत्यादि मंत्रांनीं प्राशन करून त्या दिवशीं उपवास करावा. नंतर सूर्यास्ताचे पूर्वी अग्नि प्रज्वलित करून गार्हपत्य

अग्नीवर आज्याचा संस्कार करून त्या आज्यानें स्रुची पूर्ण भरून प्रणवानें आहवनीय अग्नींत होम करावा. हें ब्रह्मान्वाधान होय. तदनंतर अग्निहोत्राचा होम केल्यावर गार्हपत्य अग्नीच्या उत्तरेस दर्भ पसरून त्यांजवर पात्रांचें आसादन करून आपण ब्रह्याच्या स्थानींच बसून ती रात्र जागरण करावें. जों ब्राह्ममुहूर्त ( पहांट ) येईल तोंपर्यंत जागें असावें. नंतर स्नानादि करून प्रातःकालचा अग्निहोत्रहोम योग्यकालीं करून वैश्वानरेष्टि अथवा प्राजापत्येष्टि करावी.'' **जाबालश्रुतींत**-''किती एक प्राजापत्याच इष्टि करितात, तें तसें करूं नये, आग्नेयीच करावी. पश्चात् त्रैधातवीया करावी.'' असें सांगितलें आहे. त्यावरून या ठिकाणीं विकल्प सिद्ध झाला. या स्थळीं विद्वान् असें सांगतात कीं, 'तीन अग्नि ज्याला आहेत त्याला प्राजापत्या इष्टि उक्त आहे. कारण, त्याच्या वाक्यशेषांत 'अग्नीन्' असें बहुवचन श्रुत आहे. एक अग्नि ज्यानें धारण केला असेल त्याला आग्नेयी इष्टि समजावी.' आहिताग्निभिन्नाला इष्टीच्या स्थानीं वैश्वानर किंवा अग्निदेवताक चरु उक्त आहे, असें **माधव** सांगतो. **कात्यायन**-''आपल्या ठिकाणीं अग्नींचा समारोप करून वेदीच्यामध्यें राहून हृदयांत हरीचें ध्यान करून गुरूची अनुज्ञा घेऊन प्रैषाचा उच्चार करावा.'' **कपिल**-''तीन वेळां नीच स्वरानें व तीन वेळां उच्च स्वरानें यथाविधि प्रैषाचा उच्चार करून नंतर 'अभयं सर्वभूतेभ्यो मत्तः स्वाहा' असें म्हणून भूमीवर उदकांजलि देऊन दंड, शिकें इत्यादि आपली सामग्री घेऊन बाहेर जावें.'' **बौधायन**-'सखेमे०' इत्यादि मंत्रानें दंड घ्यावा. 'येन देवाः०' या मंत्रानें पवित्रक घ्यावें. 'यदस्य-पारे०' या मंत्रानें शिकें घ्यावें. व्याहृतींनीं पात्र घ्यावें. 'युवासुवासाः०' या मंत्रानें कौपीन घ्यावें. याप्रमाणें घेऊन बांधवांचा त्याग करावा.''

**अथक्रमः** तत्रसंन्यासेधिकारसिद्ध्यर्थंस्वस्यनवश्राद्धषोडशश्राद्धसपिंडनानि साग्निःपार्वणान्यनग्निस्त्वेकोद्दिष्टविधिनाकृत्वानाश्रमीचेत्कृच्छ्रचतुष्टयमन्यस्तुतप्तकृच्छ्रंकृत्वोदगयनेएकादश्यांद्वादश्यांवा साग्निरमावास्यायांपौर्णमास्यांचतुर्दश्यांवायथापर्वणिप्राजापत्यास्यात् तत्रदेशकालौस्मृत्वापरमहंसादिसंन्यासग्रहणंकरिष्यइतिसंकल्प्य गणेशंसंपूज्यपुण्याहंवाचयित्वामातृकापूजांवृद्धिश्राद्धंचकृत्वास्तमयात्प्रागौपासनंसमिध्याहिताग्निस्तुगार्हपत्यं विधुरोग्निहोत्रीतु**त्रिकांडमंडनो**क्तदिशाकुशपत्न्यासहपवमानेष्ट्यंतपूर्णाहुत्यंतंवाधानंकुर्यात् ब्रह्मचारीचेल्लौकिकेविधुरश्चेद्व्याहृतिभिःप्रणवेनचाग्निमादायान्वग्निरुपसामित्यानीयपृष्ठोदिवीतिनिधायतेनैवसमिध्य तत्सवितुस्त्वांसवितुर्विश्वानिदेवइतितिस्रःसमिधोभ्यादध्यात् एवमग्नौसिद्धेकक्षोपस्थवर्ज्यंवपनंकृत्वा पयोदधियुत्माज्यमपोवा ॐ भूःसावित्रींप्रविशामितत्सवितुर्वरेण्यमितिप्राश्याचम्य पुनरादाय ॐभुवःसावित्रींप्रविशामिभर्गोदेवस्यधीमहीतिद्वितीयं ॐस्वःसावित्रींप्रविशामिधियोयोनःप्रचोदयादितितृतीयंसमस्तयाचतुर्थं ॐभूर्भुवःस्वःसावित्रींप्रविशामि०तत्सवि०यात्इति **संन्यासपद्धतौ**तुत्रिवृदसीतिप्रथमं प्रवृदसीतिद्वितीयं विवृदसीतितृतीयंप्राश्यापःपुनंत्वितिजलंप्राश्यसावित्रीप्रवेशउक्तः ततः आहवनीयंविहृत्यब्रह्माणमुपवेश्याज्यंसंस्कृत्य चतुर्द्वादशवागृहीत्वा समित्पूर्वमोंस्वाहापरमात्मनइदमितिहुत्वोपवसेत् ततःसायंहोमंवैश्वदेवंचकृत्वा अग्नेरुदक्कुशानास्तीर्यदंडादीनिदशपंचवासाद्यब्रह्मासनेकृष्णाजिनोपविष्टोरात्रौजागरंकृत्वाप्रातर्होमानंतरंप्राजापत्यांवैश्वानरींवाकृत्वाऋत्विग्भ्यःसर्वस्वंब्रह्मणेचमधुपूर्णंतैजसपात्रंदत्वा दारुपात्राण्याहवनीयेश्ममृन्मयानिचजलेक्षिपेत् कृष्णाजिनंत्वाददीत **अनाहिताग्नि**स्तुवैश्वानरमाग्नेयंवाचरुंहुत्वापात्राण्यग्नौक्षिप्त्वा भूर्भुवःस्वरित्यपःस्पृष्ट्वातरत्समंदीतिजप्त्वाविप्रान्संभोज्यपुण्याहंवाचयित्वात्रवावपनंकृत्वाहैमरूप्यकुशजलैःस्नात्वापुरुषायचरुंकृत्वाप्राणायस्वाहेतिपंचाज्याहुतीर्हुत्वापुरुषसूक्तेनप्रत्यृचमाज्यंचरुंचजुहुयात् ।

## आतां संन्यास घेण्याचा क्रम सांगतो—

प्रथमतः संन्यासाविषयीं अधिकार सिद्ध होण्यासाठीं आपलीं नव श्राद्धें, षोडश श्राद्धें ( मासिकें ) व सपिंडन हीं साग्निकानें पार्वणविधीनें व निरग्निकानें एकोद्दिष्टविधीनें करून अनाश्रमी असेल तर त्यानें चार कृच्छ्र व इतरानें तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त करून उत्तरायणांत एकादशीस किंवा द्वादशीस संन्यास ग्रहण करावा. साग्निकानें अमावास्येस किंवा पौर्णमासीस किंवा चतुर्दशीस ज्या रीतीनें पर्वाचे ठायीं प्राजापत्या इष्टि होईल त्या रीतीनें संन्यासग्रहणाचा आरंभ करावा. तो असा-त्या दिवशीं देशकालांचें संकीर्तन करून 'परमहंसादिसंन्यासग्रहणंकरिष्ये' असा संकल्प करून गणपतीची पूजा करून पुण्याहवाचन करून मातृकापूजा आणि वृद्धिश्राद्ध करून सूर्यास्ताच्या पूर्वी औपासनाग्नीला प्रज्वलित करून; आहिताग्नीनें गार्हपत्याग्नीचें

प्रज्वलन करून; विधुर अग्निहोत्र्यानें तर **त्रिकांडमंडनानें** सांगितलेल्या रीतीनें दर्भांचे पत्नीसह पवमान इष्टीपर्यंत व पूर्णाहुतीपर्यंत आधान करावें; ब्रह्मचारी असेल तर त्यानें लौकिक अग्नीवर सर्व करावें; विधुरानें तर व्याहृतींनीं किंवा प्रणवानें अग्नि घेऊन 'अन्वग्निरुषसां०' या मंत्रानें आणून 'पृष्टोदिवि०' या मंत्रानें ठेवून त्याच मंत्रानें प्रज्वलित करून 'तत्सवितु०, तांसवितु०, विश्वानिदेव०' ह्या तीन मंत्रांनीं तीन समिधा द्याव्या. याप्रमाणें अग्नि सिद्ध झाला असतां काखेंतील व उपस्थावरील केश वर्ज्य करून इतर केशांचें वपन करून दूध दहीं मिश्रित घृत किंवा उदक घेऊन 'ॐभूः सावित्रीं प्रविशामि तत्सवितुर्वरेण्यं' या मंत्रानें प्राशन करून आचमन करून पुनः घेऊन 'ॐभुवः सावित्रीं प्रविशामि भर्गोदेवस्य धीमहि' असें म्हणून दुसरें प्राशन करावें. 'ॐस्वः सावित्रीं प्रविशामि धियोयोनः प्रचोदयात्' असें म्हणून तिसरें प्राशन करावें. 'ॐभूर्भुवः स्वः सावित्रीं प्रविशामि तत्सवितु० यात्' अशी सारी गायत्री म्हणून चवथें प्राशन करावें. हा सावित्रीप्रवेश होय. **संन्यासपद्धतींत** तर 'त्रिवृदसि' असें म्हणून प्रथम प्राशन, 'प्रवृदसि' यानें दुसरें, 'विवृदसि' यानें तिसरें प्राशन करून 'आपः पुनंतु०' यानें उदक प्राशन करून नंतर सावित्रीप्रवेश सांगितला आहे. तदनंतर आहवनीय अग्नीला प्रज्वलित करून ब्रह्म्याला बसवून आज्यसंस्कार करून चार वेळ किंवा बारा वेळ आज्य स्रुचींत घेऊन पूर्वी समिध देऊन 'ॐ स्वाहा परमात्मने इदं' ह्या मंत्रानें हवन करून उपवास करावा. तदनंतर सायंकालचा होम व वैश्वदेव करून अग्नीच्या उत्तरेकडे कुश पसरून त्यांजवर दंड, कमंडलु, कौपीन, आच्छादन, कंथा, पादुका हीं पांच किंवा शिक्यादि मिळून दहा हीं ठेवून ब्रह्मासनाचे ठायीं कृष्णाजिनावर बसून रात्रीं जागरण करून प्रातःकालचा होम केल्यानंतर प्राजापत्या किंवा वैश्वानरी इष्टि करून ऋत्विजांस सर्वस्व देऊन ब्रह्म्याला मधानें पूर्ण भरलेलें रूप्यादि धातुपात्र देऊन काष्ठाचीं पात्रें असतील तीं आहवनीय अग्नींत टाकून पाषाणाचीं व मातीचीं असतील तीं उदकांत टाकावीं. कृष्णाजिन आपण घ्यावें. ज्यानें अग्नीचें आधान केलें नसेल त्यानें वैश्वानर किंवा आग्नेय चरूचा होम ( स्थालीपाक ) करून पात्रें अग्नींत टाकून 'भूर्भुवःस्वः' यानें उदक स्पर्श करून 'तरत्समंदी०' याचा जप करून विप्रांना भोजन घालून अथवा एथें पुण्याहवाचन करून वपन करून हेम, रुपें, कुश यांनीं युक्त उदकानें स्नान करून पुरुषदेवताक चरु करून 'प्राणायस्वाहा' ह्या पांच मंत्रांनीं पांच आज्याहुती देऊन पुरुषसूक्ताचे प्रत्येक ऋचेनें आज्याचा व चरूचा होम करावा.

**अत्रविरजाहोमंकेचिदाहुः** यथोक्तं**शिवगीतासु** जुहुयाद्विरजामंत्रैःप्राणापानादिभिस्ततः अनुवाकांतमेकाग्रःसमिदाज्यचरून्पृथक् आत्मन्यग्नीन्समारोप्ययातेअग्नेतिमंत्रतः भस्मादायाग्निरित्याद्यैर्विमृज्यांगानिसंस्पृशेत् पापैर्विमुच्यतेसत्यंमुच्यतेनात्रसंशयः **यथा** प्राणापानव्यानोदानसमानामेशुध्यंतांज्योतिरहंविरजाविपाप्माभूयासꣳस्वाहा सर्वत्रलिंगोक्तदेवताभ्यइदमितित्यागः वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिह्वाघ्राणरेतोबुद्ध्याकूतिसंकल्पामेशुध्यंतांज्योतिरहं० । त्वक्चर्ममांसरुधिरमेदोमज्जास्नायवोस्थीनिमेशुध्यंतांज्योतिरहं० । शिरःपाणिपादपार्श्वपृष्ठोरूदरजंघाशिश्नोपस्थपायवोमेशुध्यंतांज्योतिरहं० । उत्तिष्ठपुरुषहरितपिंगललोहितदेहिदेहिदापयितामेशुध्यं० । पृथिव्यापस्तेजोवायुराकाशोमेशुध्यंतांज्योति० । शब्दस्पर्शरूपरसगंधामेशुध्यंतांज्योति० । मनोवाक्कायकर्माणिमेशुध्यंतां० । अव्यक्तभावैरहंकारैर्ज्योति० । आत्मामेशुध्यंतां० । अंतरात्मामेशुध्यंतां० । परमात्मामेशुध्यंतां० । क्षुधेस्वाहा क्षुत्पिपासायस्वाहा विविध्यैस्वाहा ऋग्विधानायस्वाहा कषोत्कायस्वाहा क्षुत्पिपासामलांज्येष्ठामलक्ष्मींनाशयाम्यहं अभूतिमसमृद्धिंचसर्वांनिर्णुदमेपाप्मानꣳस्वाहा अन्नमयप्राणमयमनोमयविज्ञानमयानंदमयात्मामेशुध्यंतांज्योति० । ततःस्विष्टकृदादिहुत्वाब्रह्मणेहिरण्यमाज्यपात्रंधेनुंचदत्वासंमासिंचंत्वित्युपतिष्ठेत अत्रकेचिदनग्नेःसावित्रीप्रवेशंपूर्णाहुतिंचाहुः ।

एथें विरजाहोम **केचित्** सांगतात. जसें **शिवगीतेंत** सांगतो-"एकाग्र चित्तानें साऱ्या अनुवाकाच्या प्राणापानादिक विरजामंत्रांनीं समिधा, आज्य, चरु यांचा वेगवेगळा होम करावा. तदनंतर 'याते अग्ने यज्ञियातनू०' या मंत्रानें आपल्या ठिकाणीं अग्नींचा समारोप ( ज्वालाप्राशन ) करून 'अग्नि०' इत्यादि मंत्रांनीं भस्म घेऊन भस्म अंगाला लावून स्पर्श करावा. असें केल्यानें पापापासून खरोखर मुक्त होऊन मोक्ष पावतो यांत संशय नाहीं." ते विरजामंत्र असे-'प्राणापानव्यानोदानसमानामेशुध्यंतां ज्योतिरहं विरजा विपाप्माभूयासꣳस्वाहा । प्राणादिभ्यइदं.' असा मंत्रांतील देवतांना सर्वत्र त्याग करावा. 'वाङ्मनश्चक्षु० । वागादिभ्यइदं.' 'त्वक्चर्ममांस० । त्वगादिभ्यइदं' 'शिरःपाणिपाद० । शिर आदिभ्यइदं,' 'उत्तिष्ठपुरुष हरित० । पुरुषादिभ्य इदं,' 'पृथिव्यापस्तेजो० । पृथिव्यादिभ्य इदं,' 'शब्दस्पर्श० । शब्दादिभ्य इदं,' 'मनोवाक्कायकर्माणि० । मनआदिकर्मभ्य इदं,' 'अव्यक्तभावैरहंकारैर्ज्योति० । अव्यक्तादिभ्य इदं,' 'आत्मामेशुध्यंतां० । आत्मने इदं,' अंतरात्मामेशुध्यंतां० । अंतरात्मने इदं,' 'परमात्मामेशुध्यंतां० । परमात्मने इदं,' 'क्षुधेस्वाहा क्षुधे इदं,' 'क्षुत्पिपासायस्वाहा क्षुत्पिपासाय इदं,'

विविध्यैस्वाहा । विविध्यै इदं,' 'ऋग्विधानाय स्वाहा ऋग्विधानाय इदं,' 'कषोत्काय स्वाहा कषोत्काय इदं,' 'क्षुत्पिपासामलां-ज्येष्ठा० स्वाहा । अग्नय इदं,' 'अन्नमयप्राणमय० स्वाहा, अन्नमयादिभ्य इदं.' याप्रमाणें समित्, चरु, आज्य यांनीं प्रत्येक द्रव्याच्या आहुती देऊन नंतर स्विष्टकृत् इत्यादि होम करून ब्रह्मयाला हिरण्य, आज्यपात्र व धेनु देऊन 'संमार्गिंचंतु०' या मंत्रानें उपस्थान करावें. केचित् विद्वान् अनग्निकाला या ठिकाणीं सावित्रीप्रवेश व पूर्णाहुति सांगतात.

ततोयातेअग्नेयज्ञियातनूरितित्रिस्त्रिरेकैकंजिघ्रन्नात्मन्यग्नीन्समारोप्यगुरवेसर्वस्वंदत्वायोब्रह्माणंविदधाति पूर्वंयोवैवेदांश्चप्रहिणोतितस्मै तंहदेवमात्मबुद्धिप्रकाशंमुमुक्षुर्वैशरणमहंप्रपद्यइत्युपस्थाय दक्षिणंजान्वाच्यपा-दावुपसंगृह्याधीहिभगवोब्रह्मेतिवदेत् ततोगुरुरात्मानंब्रह्मरूपंध्यात्वाशंखंद्वादशप्रणवैरभिमंत्र्यतेनशिष्यमभि-षिच्यशंनोमित्रइतिशांतिंपठित्वातच्छिरसिहस्तंदत्वापुरुषसूक्तंजप्त्वाममव्रतेहृदयंतेदधामीतिचजप्त्वोदङ्मु-खःप्रणवार्थमनुसंदधद्दक्षिणेकर्णेप्रणवमुपदिश्यतदर्थंचपंचीकरणाद्यवबोध्यअयमात्माब्रह्मतत्त्वमसिप्रज्ञानंब्र-ह्मेत्याद्युपदिशेत् तदर्थंचवदेत् ततोनामदद्यात् ततःशिष्यस्तेनोपदिष्टोहरिंस्मरन्नूर्ध्वबाहुस्तिष्ठन्देवान्साक्षिणः-कृत्वा ॐ भूर्भुवःस्वःसंन्यस्तंमयेतित्रिरुपांशुत्रिरुच्चैस्त्रिरत्युच्चैश्चोक्त्वाजलसमीपंगत्वास्नात्वाअभयंसर्वभूते-भ्योमत्तःस्वाहेतित्रिरंजलिंक्षिप्त्वायुवासुवासाइतिकाषायंकौपीनंवासश्चपरिधायसखेमांगोपायेतिमुख्यंवैणवं-पालाशंबैल्वमौदुंबरंवादंडंगृह्णीयात् अत्रपुत्रकामोगृहस्थःशंखेनपुरुषसूक्तेनदंडमभिषिच्यदद्यादित्याचारः ततःशिखामुत्पाट्य ॐ भूःस्वाहेत्यप्सुजलेवाहुत्वातथैवोपवीतंहुत्वायेनदेवाःपवित्रेणेतिजलपवित्रंयदस्यपार-इतिशिक्यंसावित्र्याकमंडलुंसप्तव्याहृतिभिःभोजनपात्रमिदंविष्णुरित्यासनंबृसींवागृहीत्वा ॐभूस्तर्पयामीति-व्यस्तसमस्ताभिर्महर्नमइतितर्पयित्वाभूःस्वधोंभुवःस्वधोंस्वःस्वधोंभूर्भुवःस्वर्महर्नमःस्वधेतिपितॄंस्तर्पयित्वो-दुत्यंचित्रंतच्चक्षुर्हंसःशुचिषन्नमोमित्रस्येतिस्नात्वासुरभिमतीभिरापोहिष्ठेतिहिरण्यवर्णाभिःपावमानीभिर्व्याहृ-तिभिश्चमार्जयित्वाष्टोत्तरशतवारमघमर्षणंप्राणायामांश्चकृत्वाॐभूर्भुवःसुवरितिचपठित्वा नमःसवित्रइति-सूर्यंचोपस्थायपुनःस्नात्वाजंघेक्षालयित्वा ॐमितिब्रह्मोमितीदंसर्वमोमितिब्रह्मवाएपज्योतिर्यएपवेदोयएपतप-तिवेद्यमेवैतद्यएषवेदोयदवनमस्तीतिजपित्वाष्टसहस्रंगायत्रींजपेदिति ।

तदनंतर 'याते अग्नेयज्ञियातनू०' या मंत्रानें प्रत्येक अग्नीची ज्वाला त्रिवार त्रिवार प्राशन करून आपल्या ठिकाणीं अग्नींचा समारोप करून गुरूला सर्वस्व देऊन 'यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं० प्रपद्ये' असें उपस्थान करून दक्षिणजानु भुईवर टेकून गुरूचे पाय धरून 'अधीहिभगवोब्रह्म' असें बोलावें. तदनंतर गुरूनें आपलें ब्रह्मरूपाचें ध्यान करून बारा प्रणवांनीं शंखोदकाचें अभिमंत्रण करून तें उदक शिष्यावर शिंपून 'शंनोमित्र०' ही शांति पठण करून शिष्याचे मस्तकावर हस्त ठेऊन पुरुषसूक्ताचा जप करून 'ममव्रतेहृदयंतेदधामि' याचाही जप करून उत्तरेकडे मुख करून प्रणवाच्या अर्थाचें अनु-संधान करून उजव्या कानांत प्रणवाचा उपदेश करून त्याचा अर्थ पंचीकरणादिविचार त्याला जाणवून 'अयमात्माब्रह्म, तत्त्वमसि, प्रज्ञानं ब्रह्म' इत्यादि उपदेश करावा. आणि त्या उपनिषद्वाक्यांचा अर्थही सांगावा. तदनंतर शिष्याला नांव ठेवावें. तदनंतर शिष्यानें गुरूनें सांगितल्याप्रमाणें हरीचें स्मरण करून वर भुजा करून उभा राहून देवांना साक्षी करून 'ॐ भूर्भुवः स्वः संन्यस्तं मया' असें त्रिवार हळू, त्रिवार उच्च व त्रिवार अतिउच्च स्वरानें बोलून उदकाचे समीप जाऊन 'अभयं सर्वभूतेभ्यो मत्तः स्वाहा' असें म्हणून तीन अंजलि देऊन 'युवासुवासा०' या मंत्रानें काषाय वस्त्र व कौपीन परिधान करून 'सखेमागोपाय' असें म्हणून मुख्य वेळूचा त्याच्या अभावीं पळसाचा, बेलाचा किंवा उंबराचा दंड घ्यावा. याठिकाणीं पुत्रेच्छु गृहस्थानें शंखानें पुरुषसूक्त मंत्रानें दंडावर अभिषेक करून तो द्यावा, असा आचार आहे. तदनंतर शिखा उपटून 'ॐभूः स्वाहा' असें म्हणून अग्नींत किंवा उदकांत टाकून तसेंच यज्ञोपवीताचें हवन करून 'येनदेवाः पवित्रेण०' या मंत्रानें जल पवित्र, 'यदस्यपारे०' या मंत्रानें शिक्य, गायत्री मंत्रानें कमंडलु, सप्तव्याहृतींनीं भोजनपात्र, 'इदंविष्णु०' या मंत्रानें आसन किंवा बृसी घेऊन 'ॐभूस्तर्पयामि' अशा व्यस्त व समस्त व्याहृतींनीं 'महर्नमः' असें म्हणून तर्पण करून ॐ भूःस्वधा, ॐभुवःस्वधा, ॐस्वः स्वधा, ॐ भूर्भुवः स्वर्महर्नमः स्वधा' असें पितरांचें तर्पण करून 'उदुत्यं०, चित्रं०, तच्चक्षु०, हंसःशुचिषत्०, नमोमित्रस्य०' या मंत्रांनीं स्नान करून सुरभिमती, आपोहिष्ठा, 'हिरण्यवर्णा, पावमानी व्याहृति' या मंत्रांनीं मार्जन करून एकशें आठ वेळ अघमर्षण आणि तितकेच प्राणायाम करून 'ॐभूर्भुवःसुवः' याचें पठण करून 'नमः सवित्रे०' या मंत्रानें सूर्याचें उपस्थान करून पुनः स्नान करून जंघा धुवून 'ॐम्' 'ब्रह्मोम्' 'इदं सर्वमोम्' 'ब्रह्म वा एष ज्योतिर्य एष वेदो य एष तपति वेद्यमेवैतद्य एष वेदो यदवनमस्ति' याचा जप करून अष्टसहस्र गायत्रीजप करावा.

**अथयतिधर्माः** प्रातरुत्थायब्रह्मणस्पतेइतिजपित्वादंडादीनिमृदंचनिधायमूत्रपुरीषयोर्गृहस्थचतुर्गुणं शौचंकृत्वाचम्यपर्वद्वादशीवर्ज्यंप्रणवेनदंतधावनंकृत्वा तेनैवमृदाबहिःकटिंप्रक्षाल्यजलतर्पणवर्ज्यंस्नात्वाजंघेप्रक्षाल्यवस्त्रादीनिगृहीत्वामार्जनांतंकृत्वाकेशवादिनमोंतनामभिस्तर्पयित्वाॐभूस्तर्पयामीत्यादिव्यस्तसमस्तव्याहृतिभिर्महर्जनस्तर्पयामीतितर्पयेत् ॐभूःस्वाहेतिस्वाहाशब्दांतैःस्वधाशब्दांतैश्चैभिरेवपुनस्तर्पयेदितिकेचित् ततआचम्यांजलिनाप्रणवेनजलमादायव्याहृतिभिरुद्धृत्यगायत्र्यात्रिःक्षिप्त्वागायत्रींजपेत् उदितेसूर्येप्रणवेन व्याहृतिभिर्वार्घ्यंत्रिर्दत्वा मित्रस्यचर्षणीत्याद्यैःपूर्वोक्तसौरीभिरिदंविष्णुस्त्रिर्देवोब्रह्मजज्ञानमितिचोपस्थायसर्वभूतेभ्योनमइतिप्रदक्षिणमावर्तते ततोनत्वा आदित्यायविद्महेसहस्राक्षायधीमहि तन्नःसूर्यःप्रचोदयादितित्रिर्जपेत् एवंत्रिकालंविष्णुपूजांब्रह्मयज्ञंचकुर्यात् ।

## आतां यतिधर्म सांगतों—

संन्याशानें पहांटेस उठून 'ब्रह्मणस्पते०' याचा जप करून दंडादिक पदार्थ आणि मृत्तिका ठेऊन मूत्रपुरीषांविषयीं गृहस्थाहून चतुर्गुणित शौच ( शुद्धि ) करून आचमन करून पर्वदिवस व द्वादशी वर्ज्य करून इतर दिवशीं प्रणवानें दंतधावन करून प्रणवानेंच माती लावून कमरेचा बाहेरचा भाग धुवून जलतर्पणरहित स्नान करून जांघा धुवून नंतर वस्त्रादिक घेऊन मार्जनापर्यंत कृत्य करून 'केशवाय नमः' अशा नमोंत नामांनीं तर्पण करून 'ॐभूस्तर्पयामि' याप्रमाणें व्यस्त व समस्त व्याहृतींनीं 'महर्जनस्तर्पयामि' येथपर्यंत तर्पण करावें. **केचित्** विद्वान्—'ॐभूः स्वाहा, ॐभुवः स्वाहा' अशा स्वाहाशब्दांत व्याहृतिमंत्रांनीं तर्पण करून स्वधाशब्दांत त्याच मंत्रांनीं पुनः तर्पण करावें, असें सांगतात. तदनंतर आचमन करून प्रणवानें अंजलीनें उदक घेऊन व्याहृतिमंत्रांनीं वर करून गायत्रीमंत्रानें त्रिवार टाकून गायत्रीचा जप करावा. सूर्योदय झाला असतां प्रणवानें किंवा व्याहृतिमंत्रांनीं तीन वेळां अर्घ्य देऊन 'मित्रस्यचर्षणी०' इत्यादिक पूर्वी सांगितलेल्या सूर्यदेवतामंत्रांनीं, व इदंविष्णु०, त्रिर्देवः०, ब्रह्मजज्ञानं०, या मंत्रांनीं उपस्थान करून 'सर्वभूतेभ्योनमः' असें म्हणून प्रदक्षिण फिरावें. तदनंतर नमस्कार करून 'आदित्याय विद्महे सहस्राक्षाय धीमहि । तन्नः सूर्यः प्रचोदयात्' याचा त्रिवार जप करावा. याप्रमाणें त्रिकाल विष्णुपूजा आणि ब्रह्मयज्ञ करावा.

**अथभिक्षा** विधूमेसन्नमुसलेव्यंगारेभुक्तवज्जने कालेपराह्णभूयिष्ठेनित्यंभिक्षांयतिश्चरेदित्युक्तेकालेउद्वयमितिचतसृभिरादित्यमुपस्थायतेनैक्यंध्यात्वा आकृष्णेनेतिप्रदक्षिणंकृत्वायेतेपंथानइतिजप्त्वायोसौविष्ण्वाख्यआदित्येपुरुषोंतर्हृदिस्थितः सोहंनारायणोदेवइतिध्यात्वाप्रणम्यतम् त्रिदंडंदक्षिणेत्वंगेततःसंधायबाहुना पात्रंवामकरेक्षिप्त्वाश्लेपयेद्दक्षिणेनत्वितिबौधायनोक्तदिशात्रीन्पंचसप्तवागृहान्गत्वाभवत्पूर्वंभिक्षांयाचित्वापूर्णमसिपूर्णमेभूयाइत्यागत्यशुचिरन्नंप्रोक्ष्य ॐभूःस्वधानमइत्यादिव्यस्तसमस्तव्याहृतिभिःसूर्यादिदेवेभ्योभूतेभ्यश्चभूमौक्षिप्त्वाभुक्त्वाप्रणवेनषोडशप्राणायामान्कुर्यादितिसंक्षेपः **गौतमव्याख्यायांभृगुः** यतिहस्तेजलंदत्वाभैक्ष्यंदद्यात्पुनर्जलं भैक्षंपर्वतमात्रंस्यात्तज्जलंसागरोपमं अत्रसर्वत्रमूलं**माधवापरार्कमदनरत्नस्मृत्यर्थसारादौ**ज्ञेयम ।

## आतां भिक्षा सांगतों

"लोकांच्या घरांतून धूर येईनासा झाला, मुसळाचे आघात बंद झाले, चुलींत निखारे नाहींसे झाले, सर्वांनीं भोजन केलें, अशा अपराण्हप्राय कालीं यतीनें नित्य भिक्षा मागावी." त्या **मनूनें** सांगितलेल्या कालीं 'उद्वयं०' त्या चार ऋचांनीं आदित्याचें उपस्थान करून आदित्य व आपण एक आहे, असें ध्यान करून 'आकृष्णेन०' त्या मंत्रानें प्रदक्षिणा करून 'येते पंथानः०' याचा जप करून "जो हा विष्णुरूपी पुरुष सूर्यमंडलामध्यें आहे तोच हृदयांत असलेला नारायण देव मी आहें, असें ध्यान करून त्याला नमस्कार करून नंतर उजव्या अंगावर त्रिदंड घेऊन बाहूनें तो धरून वामहस्तांत पात्र घेऊन उजवा हात त्यास लावून" या **बौधायनानें** सांगितलेल्या प्रकारानें तीन, पांच किंवा सात घरीं जाऊन 'भवान्भिक्षांददातु' अशा रीतीनें भवच्छब्दपूर्वक भिक्षा मागून 'पूर्णमसि पूर्णमेभूयाः' या मंत्रानें अभिमंत्रण करून येऊन शुद्ध त्या अन्नाचें प्रोक्षण करून 'ॐभूः स्वधानमः' इत्यादिक व्यस्त व समस्त व्याहृतींनीं सूर्यादि देवांना आणि भूतांना भूमीवर अन्न ठेऊन भोजन करून नंतर प्रणवानें सोळा प्राणायाम करावे, असा हा प्रकार थोडक्यांत सांगितला आहे. **गौतमाच्या व्याख्येंत भृगु**–"संन्याशी भिक्षेस आला असतां संन्याशाच्या हातांत उदक देऊन नंतर भिक्षा द्यावी आणि पुनः उदक

द्यावें. असें दिलें असतां दिलेली भिक्षा पर्वतासारखी होते आणि उदक सागरासारखें होतें." या सर्वाविषयींचीं मूळ वचनें **माधव, अपरार्क, मदनरत्न, स्मृत्यर्थसार** इत्यादिकांत पहावीं.

**कण्वः** एकरात्रंवसेद्ग्रामेनगरेपंचरात्रकं वर्षाभ्योन्यत्रवर्षासुमासांस्तुचतुरोवसेत् **जाबालश्रुतौ** शून्यागारदेवगृहतृणकुटीवल्मीकवृक्षमूलकुलालशालाग्निहोत्रगृहनदीपुलिनगिरिकुहरनिर्झरस्थंडिलेष्वनिकेतनइति **मात्स्ये** अष्टौमासान्विहारःस्याद्यतीनांसंयतात्मनां एकत्रचतुरोमासान्वार्षिकान्निवसेत्पुनः अविमुक्तप्रविष्टानांविहारस्तुनविद्यते **अत्रिः** भिक्षाटनंजपस्नानंध्यानंशौचंसुरार्चनं कर्तव्यानिषडेतानिसर्वथानृपदंडवत् मंचकंशुक्लवस्त्रंचस्त्रीकथांलौल्यमेवच दिवास्वापंचयानंचयतीनांपतनानिषट् आसनंपात्रलोभश्चसंचयःशिष्यसंग्रहः दिवास्वापोवृथाजल्पोयतेर्बंधकराणिषट् **दक्षः** नाध्येतव्यंनवस्तव्यंनश्रोतव्यंकथंचन यतिपात्राणिमृद्वेणुदार्वलाबुमयानिच **मदनरत्नेअत्रिः** पित्रर्थंकल्पितंपूर्वमन्नंदेवादिकारणात् वर्जयेत्तादृशींभिक्षांपरबाधाकरींतथा **बृहस्पतिः** नतीर्थवासीनित्यंस्यान्नोपवासपरोयतिः नचाध्ययनशीलःस्यान्नव्याख्यानपरोभवेत् एतद्वेदार्थभिन्नपरम् **अत्रिः** स्नानंगुरार्चनंध्यानंप्राणायामोबलिस्तुतिः भिक्षाटनंजपःसंध्यांत्यागःकर्मफलस्यच एतेयतिधर्माइत्यर्थः अन्येपि**माधवमिताक्षरादौज्ञेयाः यतिधर्मसमुच्चये** नस्नानमाचरेद्भिक्षुःपुत्रादिनिधनेश्रुते पितृमातृक्षयंश्रुत्वास्नात्वाशुद्ध्यतिसांबरः ।

**कण्व**-"संन्याशानें वर्षाकालावांचून इतरकालीं एका गावांत एक दिवस राहावें. आणि एका नगरांत पांच दिवस राहावें, जास्ती राहूं नये. वर्षाकालीं एक ठिकाणीं चार महिने राहावें." **जाबालश्रुतींत**-"शून्यगृह, देवालय, तृणकुटी, वारूळ असलेलें वृक्षाचें मूळ, कुंभाराची शाळा, अग्निहोत्राचें घर, नदीचें वाळवंट, पर्वताची गुहा, पाण्याचा झरा असलेलें स्थान, आणि स्थंडिल यांचेठायीं संन्याशानें वास करूं नये." **मात्स्यांत**-"संन्याशांनीं इंद्रियें स्वाधीन ठेऊन आठ महिने फिरावें. आणि वर्षाकालाचे चार महिने एका स्थानीं वास करावा. अविमुक्तक्षेत्र वाराणसी त्या ठिकाणीं जे गेले असतील त्यांनीं दुसऱ्या ठिकाणीं फिरूं नये." **अत्रि**-"भिक्षेला फिरणें, जप, स्नान, ध्यान, शौच, देवपूजा, हीं सहा कृत्यें संन्याशांनीं राजाज्ञेप्रमाणें अवश्य करावीं. मंचकावर निद्रा, शुक्लवस्त्रपरिधान, स्त्रियांच्या गोष्टी, लौल्य (चंचल स्वभाव किंवा कोणत्याविषयीं आकांक्षा असणें), दिवसा निद्रा, वाहन हीं सहा कृत्यें संन्याशांना पतन करणारीं आहेत. आसनाचा लोभ, पात्रांचा लोभ, संचय करणें, शिष्य जमविणें, दिवसा निद्रा, योग्य कारणावांचून फार बोलणें, हीं सहा कृत्यें संन्याशाला बंध करणारीं आहेत." **दक्ष**-"संन्याशानें कोणत्याही ग्रंथाचें अध्ययन करूं नये. कोणत्याही ठिकाणीं एकत्र वास करूं नये. कोणाच्याही गोष्टी व कथाभाग श्रवण करीत असूं नये. संन्याशाचीं पात्रें मातीचीं, वेळूचीं, काष्ठाचीं व पांढऱ्या दुधभोंपळ्याचीं असावींत. ताम्रादि धातूंचीं संन्याशांनीं वापरूं नयेत." **मदनरत्नांत अत्रि**-"पूर्वी पितरांसाठीं तयार केलेल्या अन्नाची, आणि देवादिकांसाठीं तयार केलेल्या अन्नाची, भिक्षा संन्याशानें वर्ज्य करावी. तशीच ज्या भिक्षेपासून दुसऱ्यास पीडा होईल अशा तऱ्हेची भिक्षा संन्याशानें वर्ज्य करावी." **बृहस्पति**-"संन्याशानें नित्य तीर्थाचे ठिकाणीं वास करूं नये. फार उपवास करूं नयेत. सतत अध्ययन करूं नये. आणि सतत व्याख्यान करूं नये." या वचनानें व्याख्यानाचा निषेध केला हा वेदार्थव्यतिरिक्तविषयक आहे. **अत्रि**-"स्नान, देवपूजा, ध्यान, प्राणायाम, बलिस्तुति, भिक्षाटन, जप, संध्या आणि केलेल्या कर्मांच्या फलाचा त्याग हीं संन्याशानें नित्य करावीं." हे संन्याशाचे धर्म समजावे. दुसरेही संन्याशाचे धर्म आहेत ते **माधव, मिताक्षरा** इत्यादि ग्रंथांतून जाणावे. **यतिधर्मसमुच्चयांत**-"संन्याशानें पुत्रादिकांचें मरण श्रवण केलें असतां स्नान करण्याचें कारण नाहीं. माता व पिता यांचें मरण श्रुत झालें असतां संन्याशी वस्त्रसहित स्नान करून शुद्ध होतो."

**अथयतिसंस्कारःस्मृत्यर्थसारे** सर्वसंगनिवृत्तस्यध्यानयोगरतस्यच नतस्यदहनंकार्यंनाशौचंनोदकक्रिया **तथा** कुटीचकंतुप्रदहेत्पूरयेत्तुबहूदकम् हंसोजलेतुनिक्षेप्यःपरहंसंप्रपूरयेत् पालाशमूलेनदीतीरेन्यत्रवागंधपुष्पालंकृतंशवंवाद्यघोषेणनीत्वा दंडमात्रंव्याहृतिभिःखात्वासप्तव्याहृतिभिस्त्रिःप्रोक्ष्य दर्भानास्तीर्य नवघटेपंचरत्नोदकंक्षिप्त्वा नारायणःपरंब्रह्मेत्यभिमंत्र्यतेनैवसंस्नाप्याष्टाक्षरेणवस्त्रगंधपुष्पधूपदीपादीन्दत्वाविष्णोहव्यंरक्षस्वेतिशवंगर्तेनिधायेदंविष्णुरितिदक्षिणहस्तेदंडं यदस्यपारेइतिसव्येशिक्यं येनदेवाःपवित्रेणेति मुखेजलपवित्रंसाविञ्योदरेपात्रंभूमिःभ्रमेतिगुह्येकमंडलुंनिधायचित्तिःस्रुगितिदशहोत्राभिमंत्रयेदितिविश्वादर्शटीकायांस्मृत्यर्थसारेच **बृहच्छौनकस्तु** यतिंपुरुषसूक्तेनस्नापयित्वावटंततः प्रणवेनाष्टवारंतं

प्रोक्षयेदथसर्वतः विष्णोहव्यंरक्षस्वेतियजुषाप्रणवेनच गर्तेप्रेतंविनिक्षिप्येदंविष्णुर्विचक्रमे इतिमंत्रेणदंडंतु दद्यादक्षिणहस्तके मूर्धानंभूर्भुवःस्वश्चेत्युक्त्वाशंखेनभेदयेत् गर्तंपुरुषसूक्तेनलवणेनप्रपूरयेत् सृगालश्वादिरक्षार्थंसम्यग्गर्तंप्रपूरयेदिति ।

## आतां यतिसंस्कार सांगतो.

**स्मृत्यर्थसारांत**-"सर्वसंग परित्याग केलेला, ध्यानयोगाविषयीं तत्पर असलेला असा जो संन्यासी त्याचा दाह करूं नये, आशौच धरूं नये आणि त्याची तिलोदकदानादिक्रिया करूं नये. तसेंच-कुटीचक जो संन्यासी त्याचा दाह करावा. बहूदकाला पुरावा. हंसास उदकामध्यें टाकावा. आणि परमहंसास उत्तम प्रकारें पुरावा." पळसाच्या मुळाशीं किंवा नदीतीरावर अथवा दुसऱ्या चांगल्या पवित्र ठिकाणीं संन्याशाचें प्रेत गंध, पुष्पें यांनीं अलंकृत करून वाद्यघोषानें नेऊन त्या ठिकाणीं व्याहृतिमंत्रांनीं दंडप्रमाण खळगा खणून सप्तव्याहृतिमंत्रांनीं त्रिवार त्याचें प्रोक्षण करून त्यांत दर्भ पसरून नव्या मृन्मय कलशामध्यें पंचरत्नें व उदक घालून 'नारायणः परंब्रह्म' या मंत्रानें त्याचें अभिमंत्रण करून त्याच उदकानें प्रेताला स्नान घालून अष्टाक्षरमंत्रानें वस्त्र, गंध, पुष्पें, धूप, दीप हे उपचार अर्पण करून 'विष्णो हव्यं रक्षस्व' या मंत्रानें त्या खळग्यांत प्रेत ठेऊन 'इदंविष्णु०' या मंत्रानें प्रेताच्या दक्षिण हस्तांत दंड, 'यदस्यपारे०' या मंत्रानें वाम हस्तांत शिक्य, 'येन देवाः पवित्रेण०' या मंत्रानें मुखांत जलपवित्र, गायत्रीमंत्रानें उदरावर पात्र, 'भूमिःश्वभ्र०' या मंत्रानें गुह्याचे ठिकाणीं कमंडलु ठेऊन 'चित्तिः स्रुक्०' या दशहोतृमंत्रानें अभिमंत्रण करावें, असें **विश्वादर्शटीकेंत** आणि **स्मृत्यर्थसारांत** सांगितलें आहे. **बृहच्छौनक** तर-"संन्याशाला पुरुषसूक्तानें स्नान घालून गर्त (खळगा) केला असेल त्याला प्रणव मंत्रानें आठवेळ चहूंकडे प्रोक्षण करावें. 'विष्णो हव्यं रक्षस्व' या यजूनें व प्रणवमंत्रानें गर्ताचे ठिकाणीं प्रेत ठेऊन 'इदंविष्णुर्विचक्रमे०' या मंत्रानें दक्षिण हस्तांत दंड द्यावा. 'भूर्भुवःस्वः' असें म्हणून शंखानें मस्तकभेद करावा. पुरुषसूक्त म्हणून मीठ घालून गर्त भरावा. कोल्हा, कुत्रा इत्यादिकांपासून रक्षण होण्यासाठीं मृत्तिका, पाषाण वगैरे घालून चांगल्या रीतीनें मजबूत गर्त भरून टाकावा."

**कुटीचकस्यतुदाहः**कार्यः यथासर्वंप्राग्वत्कृत्वाग्निंप्रज्वाल्यसाग्नेर्दक्षिणकरेउपावरोहेत्यवरोह्यनिर्मथ्यवागर्तेचितिंकृत्वाग्निनाग्निःसमिध्यतइत्यग्निंदत्वा सावित्र्याप्रणवेनवादहेत् ततोष्टशतंप्रणवं नारायणःपरंब्रह्मेतिजप्त्वासशिरःप्रणवव्याहृत्यागायत्र्यातद्भस्मास्थीनितीर्थेक्षिप्त्वास्नानाच्छुचिः नास्यान्यदौर्ध्वदेहिकम् त्रिदंडग्रहणादेवप्रेतत्वंनैवजायतइति**उशनःस्मृतेः** एकादशेह्निपार्वणंतदपित्रिदंडिनः हंसपरमहंसादीनांपार्वणादिकमपिनकार्यमिति**शूलपाणिः श्राद्धचिंतामणौदत्तात्रेयः** एकोद्दिष्टंजलंपिंडमाशौचंप्रेतसत्क्रियाम् नकुर्याद्वार्षिकादन्यद्ब्रह्मीभूतायभिक्षवे प्रेतक्रिययैकोद्दिष्टनिषेधेसिद्धेपुनस्तद्ग्रहणमाब्दिकपरं तेनतत्पार्वणमेव त्रिदंडिनांद्वादशेनारायणबलिः तद्विधिरन्यश्चविशेषःप्रागुक्तइत्यलंबहुना ।

कुटीचक[1] संन्याशाचा तर दाह करावा, तो असा-वर सांगितल्याप्रमाणें प्रेत नेऊन खळगा खणून अग्नि प्रज्वलित करून साग्निक संन्याशाच्या दक्षिण हस्तांत 'उपावरोह०' या मंत्रानें अवरोहण करून किंवा निर्मथन करून गर्ताचे ठिकाणीं चिति करून 'अग्निनाग्निः समिध्यते०' या मंत्रानें अग्नि देऊन गायत्रीमंत्रानें किंवा प्रणवमंत्रानें दहन करावें. नंतर प्रणवाचा व 'नारायणः परंब्रह्म' याचा अष्टशत जप करून प्रणव, व्याहृति, गायत्री, गायत्रीशिर या मंत्रांनीं ती राख आणि अस्थि तीर्थांत टाकून स्नान करून कर्ता शुद्ध होतो. संन्याशाची दुसरी और्ध्वदेहिकक्रिया नाहीं. कारण, "संन्याशानें त्रिदंड ग्रहण केल्यामुळेंच त्याला प्रेतत्व प्राप्त होत नाहीं." असें **उशनसाचें** स्मृतिवचन आहे. अकराव्या दिवशीं पार्वण श्राद्ध आहे, तें देखील त्रिदंडी संन्याशाचें आहे. हंस, परमहंस इत्यादिकांचें पार्वणादिक कोणतेंही कर्म करूं नये, असें **शूलपाणि** सांगतो. **श्राद्धचिंतामणींत दत्तात्रय**-"ब्रह्मीभूत जो संन्यासी त्याचें एकोद्दिष्ट, उदकदान, पिंड, आशौच, प्रेतसत्क्रिया, इत्यादि कोणतेंही कर्म करूं नये. वार्षिकश्राद्ध मात्र करावें." या वचनांत प्रेतक्रियेच्या निषेधानें एकोद्दिष्टाचा निषेध सिद्ध झाला असतां पुनः एकोद्दिष्टाचा वेगळा निषेध केला तो अशाकरितां कीं, वार्षिक श्राद्ध एकोद्दिष्ट करूं नये, असें सुचविण्याकरितां आहे. यावरून तें वार्षिक श्राद्ध पार्वणच करावें. त्रिदंडी संन्याशांचा बाराव्या दिवशीं नारायणबलि करावा. त्या नारायणबलीचा विधि आणि दुसरा विशेष प्रकार पूर्वी सांगितला आहे, आतां बहुत सांगणें पुरे करितों.

एवंनिरूपितमिदंगहनंतुधर्मतत्त्वंविचार्यवचनैश्चनयैश्चसम्यक् तद्दोषदृष्टिमपहायविवेचनीयंविद्वद्भिरित्य-

---

१ कुटीचक, बहूदक, हंस आणि परमहंस यांचीं लक्षणें याच ग्रंथांत संन्यासप्रकरणाच्या आरंभीं सांगितलीं आहेत.

**विरतंप्रणतोस्मितेषु १ मयासद्वासद्वायदिह्गदितंमंदमतिनाकिमेतच्छक्यंवाध्यवसितुमपिस्वल्पमतिना तदेवं-यत्किंचिद्गदितमिह विख्यातमहिमाप्रतापोयंसर्वोविकसतितुपित्रोश्चरणयोः २ योभाट्टतंत्रगणनार्णवकर्णधारः शास्त्रांतरेषुनिखिलेष्वपिमर्मभेत्ता योत्रश्रमः किलकृतःकमलाकरेणप्रीतोमुनास्तुसुकृतीबुधरामकृष्णः ३ श्री-भट्टरामेश्वरसूरिसूनुश्रीभट्टनारायणसूरिसूनोः श्रीरामकृष्णस्यसुतःकृतीमंव्यधान्निबंधंकमलाकराख्यः ४ नानानिर्णयवत्त्वान्निर्णयसिंधुःप्रोच्यतांविबुधाः निर्णयसरोजवत्त्वान्निर्णयकमलाकरोप्यस्तु ५ वसुऋतुऋतु-भूमितेगतेब्देनरपतिविक्रमतोथयातिरौद्रे तपसिशिवतिथौसमापितोयंरघुपतिपादसरोरुहेर्पितश्च ६ जगति सकलविद्यासिंधुमुष्टिंधयानांपरभणितिपरीक्षायुज्यतेसज्जनानां तदिहममनिबंधेदूषणंभूषणंवायदिभवतिविद-ग्धैस्तद्ध्यवश्यंविमृश्यम् ७ इतिश्रीमत्पदवाक्यप्रमाणपारावारपारीणश्रीमद्रामेश्वरभट्टसूरिसूनुनारायणभट्ट-सुतविद्वन्मुकुटहीरांकुरश्रीरामकृष्णभट्टात्मजदिनकरभट्टानुजकमलाकरभट्टकृतेनिर्णयसिंधौतृतीयपरिच्छेदः समाप्तः ॥** ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

"हें फार गहन धर्माचें तत्त्व ऋषींच्या वचनांनीं आणि मीमांसेच्या न्यायांनीं चांगला विचार करून याप्रमाणें निरूपण केलें आहे. विद्वानांनीं दोषदृष्टी सोडून त्याचें चांगलें विवेचन करावें, म्हणून त्या विद्वानांच्या ठिकाणीं मी सतत नम्र आहें. १ मंदमति असा जो मी ( कमलाकरभट्ट ) यानें या ग्रंथामध्यें जें कांहीं चांगलें किंवा वाईट सांगितलें तें स्वल्पमति अशा माझ्या मनांत आणण्यास तरी शक्य आहे काय ? तर जें कांहीं यत्किंचित् सांगितलें हा सारा मातापित्यांच्या चरणकमलांचा विख्यातमहिमाप्रताप विकसित होत आहे. २ कमलाकरानें जो या ग्रंथाचे ठिकाणीं श्रम केला आहे त्या श्रमानें, जो मीमांसा-सागरामध्यें पोहणारा इतकेंच नव्हे, तर दुसऱ्यास तरविणारा, आणि इतर साऱ्या शास्त्रांचींही मर्म भेदन करणारा अर्थात् तत्त्व-जाणणारा असा धन्य पंडित रामकृष्णभट्ट संतुष्ट असो. ३ पंडित रामेश्वरभट्टाचा पुत्र पंडित नारायणभट्ट, त्याचा पुत्र राम-कृष्णभट्ट, त्या रामकृष्णभट्टाचा पुत्र जो विद्वान् कमलाकरभट्ट त्यानें हा निबंध रचिला आहे. ४ हे पंडित हो ! नानाप्रकारच्या शास्त्रार्थांचे निर्णय या निबंधांत आहेत म्हणून या निबंधास **निर्णयसिंधु** असें म्हणा. आणि शास्त्रार्थाचे निर्णय हींच कमलें यांत असल्यामुळें **निर्णयकमलाकर** हेंही नांव याला असो. ५ कमलाकरभट्ट म्हणतो विक्रमशकाचीं १६६८ वर्षें गेल्यावर रौद्र संवत्सराच्या माघ चतुर्दशीस हा निबंध ( निर्णयसिंधु ) समाप्त केला आणि तो श्रीरामचंद्राच्या चरणकमलाचेठायीं अर्पणही केला. ६ ह्या जगामध्यें सकल विद्यासागराला अंजलीनें प्राशन करणाऱ्या अशा सज्जनांना दुसऱ्याच्या उक्तींची परीक्षा करणें योग्य आहे, म्हणून ह्या माझ्या ग्रंथामध्यें जें कांहीं दूषण किंवा भूषण असेल त्याचा विद्वानांनीं अवश्य विचार करावा. ७ **इतिश्री नवरे इत्युपाभिधेन बाबाजीभट्टात्मजेन कृष्णशर्मणा विरचिता निर्णयसिंधौ भाषाटीका समाप्ता.**



## अथ कृच्छ्रादिलक्षणानि-मदनमहार्णवे—

तत्र पादरूपकृच्छ्रस्वरूपापरिज्ञानेप्राजापत्यस्वरूपस्यज्ञातुमशक्यत्वात्प्रथमंपादकृच्छ्रलक्षणमभिधीयते **याज्ञवल्क्यः** एकभक्तेननक्तेनतथैवायाचितेनच उपवासेनचैवायंपादकृच्छ्रः प्रकीर्तितः एकभक्तंनामदिवैवोदितमध्याह्नकालेउक्तनियमैरेककालकृतभोजनम् नक्तंतु सूर्यास्तमयानंतरमुक्तकालेसकृत्कृतभोजनम् दिवावारात्रौवा अप्रार्थितोपनतस्यसकृद्भोजनमयाचितम् दिवैवाप्रार्थितोपनतभोजनमित्यपरे स्वकीयस्यवापरकीयस्यवान्नस्ययाचनंयस्मिन्नविद्यतेतद्व्रतमयाचितम् । दिवारात्रावप्यभोजनमुपवासः एवंच चतुरहःसाध्यःपादकृच्छ्रः एकभक्तादौचग्राससंख्यानियमः **पराशरेणोक्तः** । सायंतुद्वादशग्रासाःप्रातःपंचदशस्मृताः चतुर्विंशतिरायाच्याःपरंनिरशनंस्मृतमिति । सायंनक्ते प्रातरेकभक्ते **आपस्तंबस्तु** प्रकारांतरेणाह सायंद्वाविंशतिर्ग्रासाःप्रातःषड्विंशतिःस्मृताः । चतुर्विंशतिरायाच्याःपरेनिरशनात्रयः । कुक्कुटांडप्रमाणाःस्युर्यथावास्यंविशेत्सुखमिति । अनेनानयोश्चपक्षयोःशक्त्यपेक्षयाविकल्पः **आपस्तंबस्तु** चतुर्धाप्राजापत्यकृच्छ्रंविभज्य वर्णानुक्रमेणपादकृच्छ्रव्यवस्थामाह । त्र्यहंनिरशनंपादःपादश्चायाचितंत्र्यहम् । सायंत्र्यहंतथापादःप्रातःपादस्तथात्र्यहम् । प्रातःपादंचरेच्छूद्रःसायंवैश्यस्यदापयेत् । अयाचितंतुराजन्येत्रिरात्रंब्राह्मणेस्मृतम् । प्रातःपादएकभक्तत्रयं । सायंपादोनक्तत्रयम् । अयाचितं अयाचितत्रयम् । त्रिरात्रंउपवासत्रयं । अयाचितपादउपवासश्चेतिपादद्वयंमिलित्वार्धकृच्छ्रः नक्तपादरहितमवशिष्टंपादत्रयंपादोनकृच्छ्रः अतएवाह**आपस्तंबः** सायंप्रातर्विनार्धस्यात्पादोनंनक्तवर्जितमिति अर्धकृच्छ्रस्यप्रकारांतरमप्याहसएव सायंप्रातस्तथैकैकंदिनद्वयमयाचितम् । दिनद्वयंचनाश्नीयात्कृच्छ्रार्धंतद्विधीयते । इतिपादकृच्छ्रादिलक्षणम् ।

## आतां कृच्छ्रादिकांचीं लक्षणें सांगतो-मदनमहार्णवांत—

त्यांत पादकृच्छ्राचें स्वरूप समजल्याशिवाय प्राजापत्यकृच्छ्राचें स्वरूप ( लक्षण ) समजावयाचें नाहीं, म्हणून प्रथम पादकृच्छ्राचें लक्षण सांगतो. **याज्ञवल्क्य**-"पहिल्या दिवशीं एकभक्त, दुसऱ्या दिवशीं नक्त, तिसऱ्या दिवशीं अयाचित, आणि चवथ्या दिवशीं उपवास, याप्रमाणें चार दिवस केलें असतां पादकृच्छ्र होतो." एकभक्त म्हणजे दिवसासच मध्यान्हीं सांगितलेल्या भोजनकालीं शास्त्रांत सांगितलेल्या नियमांनीं युक्त होऊन अहोरात्रांतून एकवेळां भोजन करणें हें होय. नक्त म्हणजे सूर्यास्तानंतर सांगितलेल्या भोजनकाळीं एकवार भोजन करणें होय. अयाचित म्हणजे मागितल्यावांचून कोणी आणून दिलेल्या अन्नाचें दिवसा किंवा रात्रीं एकवेळां भोजन करणें होय. कोणी आणून दिलेल्या अन्नाचें दिवसाच भोजन करणें हें अयाचित, असें इतर सांगतात. स्वकीय किंवा परकीय अन्नाची याचना ज्यांत नाहीं तें व्रत अयाचित होय. दिवसा आणि रात्रीं देखील भोजन न करणें याचें नांव उपवास. याप्रमाणें चार दिवसांनीं साध्य करावयाचा तो पादकृच्छ्र होतो. एकभक्त, नक्त, अयाचित यांविषयीं ग्रासांची संख्या सांगतो **पराशर**-"नक्तास १२ ग्रास सांगितले आहेत, एकभक्तास १५ ग्रास, अयाचितास २४ ग्रास आणि उपवास म्हणजे निरशन होय." **आपस्तंब** तर दुसऱ्या प्रकारानें सांगतो-"नक्तास बावीस ग्रास, एकभक्तास सव्वीस ग्रास, अयाचितास चोवीस ग्रास, पुढचे तीन दिवस निरशन. ते ग्रास कोंबड्याच्या अंड्याएवढे असावे, म्हणजे जेवढा ग्रास केला असतां आयासावांचून तोंडांत जाईल तेवढा करावा." ग्रासांची संख्या पराशरानें वेगळी सांगितली, आणि आपस्तंबानें निराळी सांगितली यांतून कोणती घ्यावी, असें म्हटलें तर व्रत करणारानें शक्ति पाहून त्या शक्तीप्रमाणें योग्य असेल ती घ्यावी. **आपस्तंब** तर प्राजापत्यकृच्छ्राचे चार भाग करून ब्राह्मणादि चार वर्णांना अनुक्रमानें एक एक पादकृच्छ्र सांगतो, तो असा-"तीन दिवस निरशन करणें हा एक पाद, तीन दिवस अयाचित करणें हा एक पाद, तीन दिवस नक्त करणें हा एक पाद, तीन दिवस एकभक्त करणें हा एक पाद. एकभक्तपाद शूद्रानें करावा, नक्तपाद वैश्यानें करावा, अयाचितपाद क्षत्रियानें करावा, आणि निरशनपाद ब्राह्मणानें करावा. अयाचितपाद आणि निरशनपाद हे दोन मिळून अर्धकृच्छ्र होतो. नक्तपाद वेगळून बाकीचे तीन पाद मिळून पादोन ( पाऊण ) कृच्छ्र होतो. म्हणूनच सांगतो **आपस्तंब**-"नक्त व एकभक्त हे दोन पाद वेगळून बाकीचे दोन पाद अर्धकृच्छ्र होतो." आणि नक्तपाद वेगळून बाकीचे तीन पाद पादोनकृच्छ्र होतो." अर्धकृच्छ्राचा दुसरा प्रकार तोच सांगतो-"एक दिवस एकभक्त, एक दिवस नक्त, दोन दिवस अयाचित, आणि दोन दिवस उपवास, मिळून अर्धकृच्छ्र होतो. याप्रमाणें पादकृच्छ्रादिकांचीं लक्षणें समजावीं.

**अथप्राजापत्यकृच्छ्रलक्षणम् याज्ञवल्क्यः** यथाकथंचित्त्रिगुणःप्राजापत्योयमुच्यते । अत्रायमित्यनेनसर्वनाम्ना एकभक्तेननक्तेनतथैवायाचितेनच । उपवासेनचैवायंपादकृच्छ्रःप्रकीर्तितइतिस्वोक्तः पादकृच्छ्रःपरामृश्यते । यथाकथंचिदित्यनेनचत्वारःपक्षाउपात्ताः एकभक्तादीनामानुलोम्येनस्वस्थानविवृद्धिरित्येकःपक्षः तद्यथा एकभक्तत्रयंनक्तत्रयमयाचितत्रयमुपवासत्रयंचेतिक्रमेणैकभक्तादीनांत्रयाणांकरणमानुलोम्येनस्वस्थानविवृद्धिरित्युच्यते यदाह **मनुः** त्र्यहंप्रातस्त्र्यहंसायंत्र्यहमद्यादयाचितम । त्र्यहंपरंचनाश्नीयात्प्राजापत्यंचरन्द्विजः । प्रातिलोम्येनस्वस्थानविवृद्धिरितिद्वितीयःपक्षः उपवासत्रयमयाचितत्रयंनक्तत्रयमेकभक्तत्रयमितिप्रातिलोम्येनस्वस्थानविवृद्धिः अमुंपक्षमाह **वसिष्ठः** प्रातिलोम्यंचरेयुरिति । दंडकलितवदावृत्तिरितितृतीयःपक्षः एकभक्तनक्तायाचितोपवासान्क्रमेणैकैकंकृत्वापुनरेकभक्तादीननुक्रमेणावर्तयेत् इयमावृत्तिर्दंडकलितवदावृत्तिरित्युच्यते एवंत्रिरावृत्तौप्राजापत्यकृच्छ्रंभवति अमुमपिपक्षंवसिष्ठएवाह अहःप्रातरहर्नक्तमहरेकमयाचितम । अहःपराकंतत्रैकमेवंचतुरहौपरौ । पराकशब्दउपवासपरः तथा अनुग्रहार्थंविप्राणांमनुर्धर्मभृतांवरः बालवृद्धातुरेष्वेवंशिशुकृच्छ्रमुवाचहेति पूर्वोक्तपक्षत्रयमध्ये अन्यतमपक्षपक्षीकारेण वक्ष्यमाणजपहोमविवर्जनेनाचरणंचतुर्थःपक्षः एतंपक्षमाह **अंगिराः** तस्माच्छूद्रंसमासाद्य सदाधर्मपथेस्थितम् । प्रायश्चित्तंप्रदातव्यंजपहोमविवर्जितमिति इतिप्राजापत्यकृच्छ्रलक्षणं ।

## आतां प्राजापत्यकृच्छ्राचें लक्षण सांगतो.

**याज्ञवल्क्य**—"हा वर सांगितलेला पादकृच्छ्र कसा तरी तिप्पट केला असतां तो प्राजापत्य होतो." कसा तरी तिप्पट केला असतां, असें सांगितल्यावरून चार पक्ष उत्पन्न झाले, ते असे–सांगितलेल्या अनुक्रमानें एकभक्तादिकांची तिप्पट करणें हा एक पक्ष. तो असा–तीन दिवस एकभक्त, तीन दिवस नक्त, तीन दिवस अयाचित, आणि तीन दिवस उपवास, हा एक प्राजापत्य होतो. हा मनु सांगतो–"प्राजापत्य करणारानें तीन दिवस एकभक्त, तीन दिवस नक्त, तीन दिवस अयाचित, आणि तीन दिवस उपवास करावे." आतां उलट क्रमानें तिप्पट करावी, म्हणजे दुसरा पक्ष होय. तो असा–तीन दिवस उपवास, तीन दिवस अयाचित, तीन दिवस नक्त, तीन दिवस एकभक्त. हा पक्ष सांगतो **वसिष्ठ**–"प्रतिलोमक्रमानें प्राजापत्य करावा." दंडकलितवत् आवृत्ति करणें हा तिसरा पक्ष, तो असा–एकभक्त, नक्त, अयाचित, उपवास हे एक एक दिवस करून पुनः त्याच क्रमानें दोन वेळां करावे, या आवृत्तीस दंडकलितवत् आवृत्ति म्हटली आहे. याप्रमाणें या तीन आवृत्ति झाल्या ( म्हणजे १२ दिवस झाले ) म्हणजे प्राजापत्य कृच्छ्र होतो. हाही पक्ष वसिष्ठ सांगतो–"एक दिवस एकभक्त, एक दिवस नक्त, एक दिवस अयाचित, आणि एक दिवस उपवास, असे चार दिवस झाले. याप्रमाणें पुढेंही चार चार दिवस दोन वेळां करावे, धर्म जाणणाऱ्या श्रेष्ठ मनूनें ब्राह्मणाच्या अनुग्रहासाठीं बालक, वृद्ध, आतुर यांस हा शिशुकृच्छ्र सांगितला आहे." कृच्छ्रास उक्त जे जपहोम ते वेगळून वरती सांगितलेल्या तीन पक्षांपैकीं कोणत्याही एक पक्षाचें आचरण करणें तो चवथा पक्ष होय. हा पक्ष सांगतो **अंगिरा**–"सर्वकाल धर्ममार्गी वर्तन करणाऱ्या अशा शूद्रास कोणत्याही कारणामुळें कृच्छ्रादि प्रायश्चित्त सांगावयाचें तें जपहोमविरहित कृच्छ्रादि सांगावें." याप्रमाणें प्राजापत्याचें लक्षण समजावें.

## अथातिकृच्छ्रलक्षणम्—

**मनुः** एकैकंग्रासमश्नीयात्त्र्यहाणित्रीणिपूर्ववत् । त्र्यहंचोपवसेदित्थमतिकृच्छ्रंचरन्द्विजः । त्रीणित्र्यहाणिनवदिनानि पूर्ववत् एकभक्तादिकाले तन्नियमयुक्तःसन्नित्यर्थः **याज्ञवल्क्यः** अयमेवातिकृच्छ्रःस्यात्पाणिपूरान्नभोजनः । अयमेवपूर्वोक्तप्राजापत्यधर्मकएव अयंतुविशेषः एकभक्तनक्तायाचितदिनेषु पाणिपूरणमात्रंप्रसृतिपूरणमात्रमन्नंभुंजीत नतुपूर्वोक्तद्वाविंशत्यादिग्रासानिति अत्रच पाणिपूरणान्नमात्रमेव विधेयं नतुभोजनम् अतोयेषुदिनेषुप्राजापत्येभोजनंप्राप्तंतदनुवादेनपाणिपूरणताविधीयतेइति नोपवासदिनेषु पाणिपूरान्नभोजनप्राप्तिः । मनुयाज्ञवल्क्योक्तग्रासपाणिपूरान्नमात्रभोजनयोःशक्त्यपेक्षोविकल्पः पापापेक्षोवा अतिकृच्छ्रपादादिव्यवस्थाप्राजापत्यवदेवद्रष्टव्या इत्यतिकृच्छ्रलक्षणम् ।

## आतां अतिकृच्छ्रलक्षण सांगतो.

**मनु**—"पूर्वी प्राजापत्यकृच्छ्रास सांगितल्याप्रमाणें नियमयुक्त होऊन एकभक्त, नक्त, अयाचित यांच्या भोजनसमयीं

नऊ दिवस एक एक ग्रास भक्षण करावा, आणि पुढचे तीन दिवस उपवास करावा, म्हणजे हा अतिकृच्छ्र होतो." **याज्ञवल्क्य**–"प्राजापत्यकृच्छ्रास ज्या दिवशीं ज्या धर्मानें जसें भोजन सांगितलें आहे त्या दिवशीं त्या धर्मानें तसें भोजन, हातांत राहील तितक्या अन्नानें भोजन करणें हा अतिकृच्छ्र होतो." या कृच्छ्रांत सारे धर्म प्राजापत्याचे आहेत; विशेष काय तो इतकाच कीं, एकभक्त, नक्त, अयाचित या दिवशीं पसाभर अन्न खावें, प्राजापत्यांत सांगितलेले ग्रास खाऊं नयेत. यावरून उपवासाच्या दिवशीं पसाभर देखील अन्न खावयाचें नाहीं. यांत मनूनें सांगितलेलें एकग्रासमात्र भोजन आणि याज्ञवल्क्यानें सांगितलेलें पसाभर अन्नाचें भोजन यांची व्यवस्था शक्ति पाहून किंवा पाप पाहून करावी. अतिकृच्छ्राचे पादादिकांची व्यवस्था प्राजापत्याप्रमाणेंच समजावी.

**अथकृच्छ्रातिकृच्छ्रः** तत्र**गौतमः** अब्भक्षस्तृतीयःसकृच्छ्रातिकृच्छ्रइति । द्वादशरात्रमित्यनुवर्तते अतोद्वादशरात्रमुदकेनैववर्तनम् नान्नेनेत्युक्तंभवति । **यमः** एकैकंपिंडमश्नीयात्त्र्यहंकल्येत्र्यहंनिशि । अयाचितंत्र्यहंपिंडंवायुभक्षस्त्र्यहंपरम् । अतिकृच्छ्रंचरेदेतत्पवित्रंपापनाशनम् । चतुर्विंशतिरात्रंतुनियतात्माजितेंद्रियः । कृच्छ्रातिकृच्छ्रंकुर्वीतएकस्थानेद्विजोत्तमः । कल्येप्रातः एकभक्तकालेइतियावत् । एकस्थाने इति एकयत्नेनपूर्वोक्तद्वादशाहसाध्यातिकृच्छ्रयोरेकःकृच्छ्रातिकृच्छ्रोभवतीत्यर्थः । **याज्ञवल्क्यः** कृच्छ्रातिकृच्छ्रःपयसादिवसानेकविंशतिं । यमेनतुचतुर्विंशतिरात्रसाध्येकृच्छ्रातिकृच्छ्रेभोजनदिनेष्वेकैकग्रासमात्रविधानाद्दुग्धभोजनेपिपत्रपुटिकादिभिर्ग्रासपरिमाणंकृत्वैकग्रासपर्याप्तंदुग्धमश्नीयात् । एवंकर्तुमशक्तश्चेत्कृच्छ्रप्रकृतिभूतप्राजापत्योक्तरीत्यासायंतुद्वादशग्रासाइत्यादिग्रासमसंख्ययातावद्दुग्धंपातव्यं भोजनदिनेषुगौतमाद्युक्तकृच्छ्रातिकृच्छ्रपक्षेषुशक्त्यपेक्षयाविकल्पः इतिकृच्छ्रातिकृच्छ्रलक्षणम् ।

## आतां कृच्छ्रातिकृच्छ्र सांगतो.

**गौतम**–"बारा दिवस केवळ उदक भक्षण करून राहणें; अन्न खावयाचें नाहीं, तो कृच्छ्रातिकृच्छ्र होय." **यम**–"अतिकृच्छ्र करणारानें दोनप्रहरीं एकभक्तकालीं एक एक ग्रास तीन दिवस भक्षण करावा. रात्रीं नक्तकालीं एक एक ग्रास तीन दिवस भक्षण करावा. तीन दिवस अयाचितानें एक एक ग्रास भक्षण करावा. आणि तीन दिवस वायुभक्षण करून राहावें. हा अतिकृच्छ्र पवित्र करणारा व पापनाश करणारा आहे. यास नियमानें जितेंद्रिय होऊन चोवीस दिवस राहावें, म्हणजे दोन अतिकृच्छ्र एकापुढें एक असे करावे म्हणजे तो एक कृच्छ्रातिकृच्छ्र होतो, असा फलितार्थ." **याज्ञवल्क्य**–"एकवीस दिवस दूध भक्षण करून राहणें तो कृच्छ्रातिकृच्छ्र होतो." या याज्ञवल्क्यानें सांगितलेल्या कृच्छ्रातिकृच्छ्रांत, दूध किती भक्षण करावें? व तें कोणत्या दिवशीं? असें कोणी म्हणेल तर सांगतो–यमानें सांगितलेल्या कृच्छ्रातिकृच्छ्रांत चोवीस दिवसांमध्यें भोजनदिवसांत एक एक ग्रासच सांगितल्यामुळें या ठिकाणीं दुग्धभक्षण सांगितलें तरी ग्रासपरिमित दुधाचें प्रमाण करून एक एक ग्रासप्रमाणानें दुग्ध भक्षण करावें. असें करण्याविषयीं अशक्त असेल तर सर्व कृच्छ्राची प्रकृति जो प्राजापत्य कृच्छ्र त्याच्या रीतीनें नक्त भोजनाचे बारा ग्रास इत्यादि जे ग्रास असतील तितकें दूध भोजनदिवसांचे ठायीं प्यावें. ह्या कृच्छ्रातिकृच्छ्रांत गौतमानें एक पक्ष ( केवळ उदकावर वर्तन ) सांगितला. यमानें चोवीस दिवसांचा सांगितला. आणि याज्ञवल्क्यानें एकवीस दिवसांचा सांगितला. ह्या तीन पक्षांतून ज्याची जशी शक्ति असेल त्यानें तो पक्ष घ्यावा.

इति कृच्छ्रातिकृच्छ्रः

**अथतप्तकृच्छ्रः याज्ञवल्क्यः** तप्तक्षीरघृतांबूनामेकैकंप्रत्यहंपिबेत् । एकरात्रोपवासश्चतप्तकृच्छ्र उदाहृतः अयंचदिनचतुष्टयसाध्यःकृच्छ्रः **मिताक्षरायांतु** अयंमहातप्तकृच्छ्रइत्युक्तम् । तप्तकृच्छ्रस्तुद्विरात्रसाध्यइत्यप्युदीरितम् । तप्तक्षीरघृतांबुभिःसमस्तैरेकदिनंवर्ततएकाहउपवासइतिद्व्यहसाध्यत्वंतप्तकृच्छ्रस्येति । तप्तकृच्छ्रंचरन्विप्रोजलक्षीरघृतानिलान् । प्रतित्र्यहंपिबेदुष्णान्सकृत्स्नायीसमाहितः । प्रतित्र्यहंपिबेदितिजलादीन्प्रत्येकंत्र्यहंत्र्यहंपिबेदित्यर्थः अयंचद्वादशरात्रसाध्यःकृच्छ्रः । जलादिपरिमाणमाह**पराशरः** अपांपिबेत्तुत्रिपलंद्विपलंतुपयःपिबेत् । पलमेकंपिबेत्सर्पिस्त्रिरात्रंचोष्णमारुतमिति । त्रिरात्रमुष्णोदकस्यबाष्पंपिबेदित्यर्थः त्रिरात्रमितिपूर्वत्राप्यन्वेति अतःअपांत्रिपलंत्रिरात्रंपिबेदित्येवंयोज्यम् । प्रकारांतरेणाप्याहतप्तकृच्छ्रं**पराशरः** षट्पलंतुपिबेदंभस्त्रिपलंतुपयःपिबेत् । पलमेकंपिबेत्सर्पिस्तप्तकृच्छ्रंविधीयते । अत्रजलादिकमुष्णमेवग्राह्यम् ।

## आतां तप्तकृच्छ्र सांगतो.

**याज्ञवल्क्य**-"कढत दूध एक दिवस, कढत तूप एक दिवस, कढत पाणी एक दिवस प्यावें आणि एक दिवस उपवास करावा. याप्रमाणें हें चार दिवस केलें असतां हा तप्तकृच्छ्र होतो." **मिताक्षरेंत** तर हा महातप्तकृच्छ्र म्हणून सांगितलें आहे. आणि तप्तकृच्छ्र तर दोन दिवसांनीं होतो, असेंही मिताक्षरेंत सांगितलें आहे. त्याचा प्रकार असा-दूध, तूप, पाणी हे तीनही पदार्थ तापवून एक दिवस प्राशन करून राहावें. आणि एक दिवस उपवास करावा. म्हणजे हा तप्तकृच्छ्र दोन दिवसांनीं साध्य होतो. अन्य प्रकारानें सांगतो-"तप्तकृच्छ्र करणाऱ्या ब्राह्मणानें एकवार स्नान करून समाधान अंतःकरणानें तीन दिवस उष्णोदक प्यावें. तीन दिवस उष्ण दूध प्यावें. तीन दिवस उष्ण तूप प्यावें. तीन दिवस उष्णवायु प्यावा." हा कृच्छ्र बारा दिवसांनीं साध्य होतो. या ठिकाणीं उदकादिकांचें प्रमाण सांगतो **पराशर**-"तीन पलें ( १२ कर्ष ) उदक प्यावें दूध दोन पलें ( ८ कर्ष ) प्यावें. तूप एक पल ( ४ कर्ष ) प्यावें. आणि तीन दिवस उष्णवायु ( उष्णोदकाची वाफ ) प्यावा. वरती सांगितलेले पदार्थ तीन तीन दिवस प्यावे. तप्तकृच्छ्राचा दुसरा प्रकार सांगतो **पराशर**-"उदक सहा पलें ( २४ कर्ष ), दूध तीन पलें ( १२ कर्ष ), तूप एक पल ( ४ कर्ष ), याप्रमाणें प्यावें म्हणजे तप्तकृच्छ्र होतो." हे उदकादिक पदार्थ उष्णच घ्यावे.

**अथसांतपनम् याज्ञवल्क्यः** कुशोदकंतुगोःक्षीरंदधिमूत्रंशकृद्घृतम् । प्राश्यापरेह्न्युपवसेत्कृच्छ्रं सांतपनंचरन्नित्य**पराार्क**पाठः मिताक्षरापाठस्तु गोमूत्रंगोमयंक्षीरंदधिसर्पिःकुशोदकमिति गोमूत्रादीनिषडप्येकीकृत्यपीत्वाऽऽहारांतररहितःसंस्तिष्ठेत् परेद्युरुपवसेदितिदिनद्वयसाध्यःकृच्छ्रः याज्ञवल्क्येनोत्तरश्लोके- गोमयादीनांपृथक्पृथक्षट्सुदिनेषुप्राशनविधानादत्रमिलितानामेकदिनएवप्राशनंगम्यते **पराशरः** गोमूत्रं- गोमयंक्षीरंदधिसर्पिःकुशोदकं । निर्दिष्टंपंचगव्यंतुपवित्रंकायशोधनमिति । गोमूत्रंताम्रवर्णायाःश्वेतायाश्चापि गोमयम् । पयःकांचनवर्णायानीलायाश्चतथादधि । घृतंचकृष्णवर्णायाःसर्वंकापिलमेववा । अलाभेसर्ववर्णानांपंचगव्येष्वयंविधिः । गोमूत्रेमाषकास्त्वष्टौगोमयस्यतुषोडश । क्षीरस्यद्वादशप्रोक्तादध्नस्तुदशकीर्तिताः । गोमूत्रवद्घृतस्येष्टास्तदर्धंतुकुशोदकम् । गायत्र्यादायगोमूत्रंगंधद्वारेतिगोमयम् । आप्यायस्वेतिचक्षीरंदधि- क्राव्णेतिवैदधि । तेजोसिशुक्रमित्याज्यंदेवस्यत्वाकुशोदकम् । पंचगव्यमृचापूतंहोमयेदग्निसंनिधौ । सप्तपत्रास्तुयेदर्भाअच्छिन्नाग्राःशुकत्विषः । एतैरुद्धृत्यहोतव्यंपंचगव्यंयथाविधि । इरावतीइदंविष्णुर्मानस्तोकेच- शंवती । एताभिश्चैवहोतव्यंहुतशेषंपिबेद्द्विजः । प्रणवेनसमालोड्यप्रणवेनाभिमंत्र्यच । प्रणवेनसमुद्धृत्यत- त्पिबेत्प्रणवेनतु । मध्यमेनपलाशस्यपद्मपत्रेणवापिवेत् स्वर्णपात्रेणताम्रेणब्रह्मतीर्थेनवापुनः । यत्त्वगस्थिगतं पापंदेहेतिष्ठतिमानवे । ब्रह्मकूर्चोपवासस्तुदहत्यग्निरिवेंधनमिति । याज्ञवल्क्योक्तदिनद्वयसाध्यसांतपनमेव- ब्रह्मकूर्चइतिब्रह्मकूर्चोपवासइतिचाभिधीयते । विज्ञानेश्वरस्तुपूर्वेद्युरुपोष्यापरेद्युरुक्तरीत्यापंचगव्यप्राशनं ब्रह्मकूर्चइतिमन्यते ।

## आतां सांतपन सांगतो—

**याज्ञवल्क्य**-"कुशोदक, गाईचें दूध, गोदधि, गोमूत्र, गोमय, गोघृत हीं प्राशन करून दुसऱ्या दिवशीं उपवास करावा, म्हणजे सांतपन कृच्छ्र होतो." असा **अपरार्क**ग्रंथांत पाठ आहे. **मिताक्षरे**चा पाठ तर गोमूत्र, गोमय, क्षीर, दधि, घृत, आणि कुशोदक" असा आहे. एक दिवशीं गोमूत्रादिक सहाही द्रव्यें एकत्र करून प्यावीं, आणि दुसरा कोणताही आहार केल्यावांचून त्या दिवशीं राहावें. दुसऱ्या दिवशीं उपवास करावा. याप्रमाणें दोन दिवसांनीं साध्य होणारा हा कृच्छ्र आहे. याज्ञवल्क्यानें पुढच्या श्लोकांत ( महासांतपनलक्षणांत ) गोमयादिक सहा द्रव्यें वेगवेगळीं सहा दिवस प्राशन करण्यास सांगितल्यामुळें या ठिकाणीं एकत्र मिळवून एक दिवसच प्राशन करावीं, असें सुचविल्यासारखें होतें. **पराशर**-"गोमूत्र, गोमय, क्षीर, दधि, घृत, कुशोदक हें पंचगव्य म्हटलें आहे. हें पवित्र असून शरीर शुद्ध करणारें आहे. ताम्रवर्ण गाईचें गोमूत्र, पांढऱ्या गाईचें गोमय, पिंवळ्या गाईचें दूध, निळ्या गाईचें दहीं, काळ्या गाईचें घृत घ्यावें. अशा वर्णांच्या गाईचे हे पदार्थ न मिळतील तर सारे पदार्थ कपिल गाईचे घ्यावे. गोमूत्र आठ मासे घ्यावें, गोमय १६ मासे घ्यावें, दूध १२ मासे घ्यावें, दहीं १० मासे घ्यावें, घृत ८ मासे घ्यावें, सर्वांच्या निम्मे कुशोदक घ्यावें. गायत्रीमंत्रानें गोमूत्र घ्यावें, 'गंधद्वारां०' मंत्रानें गोमय घ्यावें. 'आप्यायस्व०' मंत्रानें दूध घ्यावें. 'दधिक्राव्णो०' या मंत्रानें दहीं घ्यावें. 'तेजोसिशुक्रं०' या मंत्रानें घृत घ्यावें. 'देवस्यत्वा०' या मंत्रानें कुशोदक घ्यावें. या मंत्रांनीं पवित्र केलेल्या पंचगव्याचा अग्नींत होम करावा.

सात पानांचे अच्छिन्नाग्र पोपटाच्या वर्णाचे असे दर्भ घेऊन त्या दर्भांनीं पंचगव्याचा अग्नींत यथाविधि 'इरावती०' 'इदं विष्णु०' 'मानस्तोके०' 'शंवती०' या ऋचांनीं होम करावा. आणि होम करून शेष असलेलें पंचगव्य ब्राह्मणानें प्राशन करावें. प्रणवानें आलोडन करून प्रणवानें अभिमंत्रण करून प्रणवानें उद्धृत करून तें प्रणवानें प्राशन करावें. पळसाच्या मधल्या पानानें किंवा कमलपत्रानें प्यावें. अथवा सुवर्णाच्या किंवा तांब्याच्या पात्रानें अथवा ब्रह्मतीर्थानें[1] प्यावें. प्राशनाचा मंत्र–'यत्त्वगस्थिगतं पापं देहे तिष्ठति मानवे । ब्रह्मकूर्चोपवासस्तु दहत्यग्निरिवेन्धनम्.' याज्ञवल्क्यानें सांगितलेलें दोन दिवसांनीं साध्य होणारें सांतपन, त्यालाच ब्रह्मकूर्च आणि ब्रह्मकूर्चोपवास म्हणतात. विज्ञानेश्वर तर–पूर्वदिवशीं उपवास करून दुसऱ्या दिवशीं, सांगितलेल्या रीतीनें पंचगव्य प्राशन करणें, याला ब्रह्मकूर्च असें मानितो.

**मरीचिः** देवताःसंप्रवक्ष्यामिआनुपूर्व्येणयस्ययाः । वरुणोदेवतामूत्रेगोमयेहव्यवाहनः सोमःक्षीरेद-ध्निवायुर्घृतेरविरुदाहृतः । गोमूत्रंताम्रवर्णायाःश्वेतायास्त्वथगोमयम् । पयःकांचनवर्णायानीलायास्त्वथवा-दधि । घृतंवैकृष्णवर्णायाविभक्तंवर्णगोचरम् । उदकंसर्ववर्णंतुतस्यवर्णोनगृह्यते । गोमूत्रस्यपलंग्राह्यमंगुष्ठा-र्धंतुगोमयम् । क्षीरस्यत्रिपलंग्राह्यंपलमेकंकुशोदकम् । आपोहिष्ठेतिवालोड्यउद्धृत्यप्रणवेनतु । अग्नयेस्वा-हासोमायस्वाहेंद्रायेदंविष्णुर्मानस्तोकेगायत्र्याप्रजापतेनत्वदेतानित्यग्नौजुहुयात् । नदीप्रस्रवणेतीरेरहस्येनि-र्ऋतेतथा । शुक्लवासाःपवित्रात्माअहोरात्रोपितःपिबेत् । पालाशेनचपत्रेणबिल्वपत्रेणवापिबेत् । तृतीयंता-म्रपात्रंवाब्रह्मपात्राणितानिवै । प्रतिमासंपौर्णमास्याममावास्यांचवापिबेत् । ब्रह्महापरदारीचयेचान्येस्थिगता-मलाः । ब्रह्मकूर्चोदहेत्सर्वंयथाग्निस्तृणमेवतु । **जाबालः** गोमूत्रंगोमयंक्षीरंदधिसर्पिःकुशोदकम् । एकैकं प्रत्यहंपीत्वात्वहोरात्रमभोजनम् । कृच्छ्रःसांतपनोनामसर्वपापप्रणाशन इति । एतज्जाबालोक्तंसप्ताहसाध्यं सांतपनम् । इति सांतपनलक्षणम । **अथयतिसांतपनम् शंखः** एतदेवत्र्यहाभ्यस्तंयतिसांतपनं स्मृतम् । एतदेवेत्यनेनमिश्रितंपंचगव्यंपरामृश्यते तत्पंचगव्यंदिनत्रयमाहारांतरनिरपेक्षेणपिबेदित्यर्थः इति-यतिसांपतनलक्षणम् ।

**मरीचि**–"ज्याच्या ज्या देवता आहेत त्या अनुक्रमानें सांगतों–गोमूत्रांत देवता वरुण, गोमयांत हव्यवाहन, दुधांत सोम, दह्यांत वायु, घृतांत रवि होय. ताम्र गाईचें गोमूत्र, शुभ्र गाईचें गोमय, पिंवळ्या गाईचें दूध, निळ्या गाईचें दहीं, काळ्या गाईचें घृत, या प्रत्येकाचे वेगवेगळे वर्ण असावे. उदक सर्व वर्णांचें आहे. कारण, त्याचा वर्ण कोणताही समजत नाहीं. गोमूत्र पलपरिमित ( ४ कर्ष ) घ्यावें, गोमय अर्ध्या अंगुष्ठाइतकें घ्यावें, दूध तीन पलें ( १२ कर्ष ) घ्यावें, कुशोदक एक पल ( ४ कर्ष ) घ्यावें, 'आपोहिष्ठा०' ह्या मंत्रानें आलोडन करून प्रणवानें उद्धृत करून 'अग्नयेस्वाहा' 'सोमाय०' 'इंद्राय०' 'इदंविष्णु०' 'मानस्तोके०' गायत्री, 'प्रजापतेनत्वदेता०' ह्या मंत्रांनीं त्या पंचगव्याचा अग्नींत होम करावा. नदीच्या प्रवाहाजवळ तीरावर एकांत स्थलीं अहोरात्र उपवास करून शुक्लवस्त्र परिधान करून पवित्र होऊन तें पंचगव्यप्राशन करावें. पळसाच्या पानानें किंवा बेलाच्या पानानें अथवा ताम्रपात्रानें तें प्राशन करावें. तीं ब्रह्मपात्रें म्हटलीं आहेत. प्रत्येक मासाच्या पौर्णिमेस किंवा अमावास्येस तें पंचगव्य प्राशन करावें. ब्रह्महत्या करणारा, परस्त्रीगमन करणारा यांचीं पापें; व दुसरीं जीं अस्थिगत पापें त्या सर्वांना हा ब्रह्मकूर्च ( उपोषणपूर्वक पंचगव्यप्राशन ) जाळून टाकितो, जसा अग्नि तृणास जाळितो तद्वत्." **जाबाल**–"गोमूत्र, गोमय, क्षीर, दधि, घृत, कुशोदक हीं एकेक प्रत्यहीं प्राशन करून अहोरात्र उपवास करावा, म्हणजे सांतपन कृच्छ्र होतो; हा कृच्छ्र सर्व पापांचा नाश करणारा आहे." हें जाबालानें सांगितलेलें सात दिवसांनीं साध्य होणारें सांतपन समजावें. इति सांतपनलक्षण. आतां **यतिसांतपन.** शंख–"मिश्रित पंचगव्य तीन दिवस प्राशन करून राहावें. दुसरा कोणताही आहार करूं नये, म्हणजे तें यतिसांतपन होय."

**अथमहासांतपनम् याज्ञवल्क्यः**–पृथक्सांतपनद्रव्यैःपडहःसोपवासकः । सप्ताहेनतुकृच्छ्रोयं महासांतपनःस्मृतः गोमूत्रगोमयक्षीरदधिघृतकुशोदकानिसांतपनद्रव्याणिएकैकस्मिन्दिनेएकैकंपिबेत् । सप्तमदिनउपवासः एतानिकुशोदकादिप्राशनादीनिआहारांतरनिवर्तकानि एवमन्यत्रापि । **यमः** त्र्यहंपिबे-त्तुगोमूत्रंत्र्यहंवैगोमयंपिबेत् । त्र्यहंदधित्र्यहंसर्पिस्त्र्यहंक्षीरंततःशुचिः । महासांतपनंह्येतत्सर्वपापप्रणाश-

[1] 'अंगुल्यग्रेतीर्थं दैवं स्वल्पांगुल्योर्मूले कायं । मध्येंगुष्ठांगुल्योः पित्र्यं मूलेत्वंगुष्ठस्य ब्राह्मं' अर्थ–अंगुलींच्या अग्रभागीं देवतीर्थ, कनिष्ठिका व अनामिका यांच्या मुळांत प्रजापतितीर्थ, अंगुली व आंगठा यांच्या मध्यें पितृतीर्थ आणि आंगठ्याच्या मुळांत ब्राह्मतीर्थ होय. अमर.

नम् । एतत्पंचदशाहसाध्यम् **जाबालः** षण्णामेकैकमेतेषांत्रिरात्रमुपयोजयेत् । त्र्यहंचोपवसेदंत्यंमहासांतपनंविदुरिति । षण्णांपूर्वोक्तगोमूत्रादीनां अयमेकविंशतिरात्रसाध्योमहासांतपनकृच्छ्रः । इतिमहासांतपनलक्षणम् ।

## आतां महासांतपन सांगतो.

**याज्ञवल्क्य**-"गोमूत्र, गोमय, दूध, दहीं, घृत, आणि कुशोदक हीं सांतपन द्रव्यें होत. यांपैकीं एकएक एकएका दिवशीं प्यावें, दुसरें कांहीं खाऊं नये, आणि सातव्या दिवशीं उपवास करावा, म्हणजे महासांतपन होतें." याज्ञवल्क्यानें 'कुशोदक, गोक्षीर, गोदधि, गोमूत्र, गोमय, गोघृत असा क्रम धरला आहे. हें कुशोदकादिकांचें प्राशन सांगितलें तें इतर आहाराचें निवर्तक आहे. असेंच दुसऱ्या ठिकाणीं कोठें सांगेल तेथेंही आहार वर्ज्य समजावा. यम—"तीन दिवस गोमूत्र प्यावें, तीन दिवस गोमय, तीन दिवस दहीं, तीन दिवस घृत, आणि तीन दिवस दूध प्यावें म्हणजे शुद्ध होतो. हें महासांतपन कृच्छ्र सर्व पापांचा नाश करणारें आहे." हें कृच्छ्र पंधरा दिवसांनीं साध्य आहे. **जाबाल**—"गोमूत्र, गोमय, गोदूध, गोदधि, गोघृत, आणि कुशोदक ह्या सहा द्रव्यांपैकीं एकएक तीनतीन दिवस प्राशन करून राहावें, आणि पुढें तीन दिवस उपवास करावा, म्हणजे तो महासांतपन होतो." हा एकवीस दिवसांनीं साध्य होणारा महासांतपन कृच्छ्र आहे. इति महासांतपनम्.

**अथपराकः याज्ञवल्क्यः** द्वादशाहोपवासेनपराकःपरिकीर्तितः । इतिपराकलक्षणम् ।

आतां पराक सांगतो **याज्ञवल्क्य**—"बारा दिवस उपवास केल्यानें पराक होतो." इति पराकः.

**अथयावकव्रतम् शंखः** गोपुरीषाद्यवान्नंचमासंनित्यंसमाहितः । व्रतंतुयावकंकुर्यात्सर्वपापापनुत्तये । गोर्भक्षणार्थंयवान्दत्वातदनंतरंगोमयमध्यनिःसृतान्यवान्गृहीत्वातैर्यवैश्चरुवत्पक्त्वातेनान्नेनैकभक्तनक्तानिकुर्वन्मासंनयेत् । एतद्यावकव्रतमित्युच्यते पूर्ववदेवयवानादायगोमूत्रेपाकंविधायपूर्ववदेवमासवर्तनेनगोमूत्रयावकव्रतमित्युच्यते अतएवाह**योगियाज्ञवल्क्यः** आतृप्तेश्चाशयित्वागांगोधूमान्यवमिश्रितान् । गोमयोत्थांश्चसंगृह्यपचेद्गोमूत्रयावकमिति । इतियावकव्रतलक्षणंगोमूत्रयावकव्रतलक्षणंच ।

## आतां यावकव्रत सांगतो.

**शंख**—गाईला यव चारावे, नंतर गाईच्या शेणांतून यव निघतील ते घेऊन ते शिजवून त्या अन्नानें एकभक्त, नक्त इत्यादि करून एक महिना काढावा, म्हणजे त्याला यावकव्रत म्हणतात." याचप्रमाणें गाईच्या शेणांतून यव घेऊन ते गोमूत्रांत शिजवून पूर्वीप्रमाणें त्याजवर निर्वाह करून एक मास घालविला म्हणजे त्याला गोमूत्रयावक व्रत म्हणतात. म्हणूनच सांगतो **योगियाज्ञवल्क्य**—"यवमिश्रित गोधूम गाईला तृप्त होईपर्यंत चारावे, नंतर त्या गाईच्या गोमयांतून ते ग्रहण करून गोमूत्रांत पचवून खावे, म्हणजे तें गोमूत्रयावक होतें." इति यावकव्रतं गोमूत्रयावकव्रतं च.

**अथपयोव्रतम्** तत्र कृच्छ्रातिकृच्छ्रःपयसादिवसानेकविंशतिमितियाज्ञवल्क्योक्तप्रकारेणमासमेकग्रासमात्रपरिपूर्णपयसावर्तनंपयोव्रतमित्युच्यते यस्मिन्व्रतेयेनद्रव्येणशरीरवर्तनंक्रियतेतद्व्रतंतेनव्यपदिश्यते अतएव**मार्कंडेयः** पत्रैर्मतःपत्रकृच्छ्रःपुष्पैस्तत्कृच्छ्रउच्यते । मूलकृच्छ्रःस्मृतोमूलैस्तोयकृच्छ्रोजलेनत्विति । इतिपयोव्रतम् ।

**आतां पयोव्रत सांगतो**—"केवळ दुधानें एकवीस दिवस वर्तन केलें असतां तो कृच्छ्रातिकृच्छ्र होतो." ह्या याज्ञवल्क्योक्त प्रकारानें एक मासपर्यंत अन्नाच्या एक ग्रास परिमित दुग्धानें वर्तन करणें हें पयोव्रत म्हटलें आहे. ज्या व्रतांत ज्या द्रव्यानें शरीराचें वर्तन ( निर्वाह ) केलें जातें त्या व्रतास तें नांव मिळतें. म्हणूनच **मार्कंडेय** सांगतो—"पत्रांनीं ( पर्णांनीं ) जो होतो तो पत्रकृच्छ्र. पुष्पांनीं ( पुष्पभक्षणानें ) जो होतो तो पुष्पकृच्छ्र. मूळांनीं जो होतो तो मूलकृच्छ्र. आणि उदकानें केला जातो तो उदककृच्छ्र होय." इति पयोव्रतम्.

**अथचांद्रायणम् गौतमः**अथातश्चांद्रायणंतस्योक्तोविधिःकृच्छ्रइति कृच्छ्रेप्राजापत्यकृच्छ्रेइत्यर्थः तथा तिष्ठेदहनिरात्रावासीतक्षिप्रकामःसत्यंवदेदनार्यैर्नसंभाषेतरौरवयोधाजयेनित्यंप्रयुंजीतअनुसवनमुदकोपस्पर्शनमापोहिष्ठेतिचतसृभिःपवित्रवतीभिर्मार्जयेत्हिरण्यवर्णाःशुचयइत्यष्टाभिःअथोदकतर्पणम् नमोहमा-

यमंहमायधून्वनेतापसायपुनर्वसवेनमोमौंज्यायौर्म्यायवसुविंदायसर्वविंदायनमःपारायसुपारायमहापाराय-पारयिष्णवेनमो रुद्रायपशुपतयेमहतेदेवायत्र्यंबकायैकचरायाधिपतयेहरायशर्वायेशानायोग्रायवज्रिणेघृणि-नेकपर्दिनेनमःसूर्यादित्यायनमोनीलग्रीवायशितिकंठायनमःकृष्णायपिंगलायनमोज्येष्ठायश्रेष्ठायवृद्धायेंद्रायह-रिकेशायोर्ध्वरेतसेनमःसत्यायपावकायपावकवर्णायकामायकामरूपिणेनमोदीप्तायदीप्तरूपिणेनमस्तीर्णायती-र्णरूपिणेनमःसौम्यायपशुपुरुषायमहापुरुषायमध्यमपुरुषायोत्तमपुरुषायब्रह्मचारिणेनमश्चंद्रललाटायकृत्ति-वाससेनमइत्येतदेवादित्योपस्थानमेताएवाज्याहुतयइत्यादि अस्यार्थः तिष्ठेदहनिरात्रावासीतक्षिप्रकाम इति यस्तुप्राजापत्यादिकृच्छ्रद्वयापनोद्यात्पापात्क्षिप्रमेकेनैवकृच्छ्रेणविमुक्तोभविष्यामीत्येवंकामयते अयमहन्याव-श्यककर्माविरुद्धेषुकालेषुतिष्ठेत् । रात्रावासीत । तथा रौरवयोधाजयेसामनीनित्यकर्माविरोधिकालेषुप्रयुंजीत पठेत् । पुनानःसोमधारयेत्यस्यामृचिदुहानऊधइत्यस्यामृचिचतृचत्वेनगीयमानेसामनीरौरवयोधाजयेअभि-धीयेते अनुसवनमुदकोपस्पर्शनम् संध्यात्रयेस्नानंत्रिषवणस्नानमित्यर्थः हिरण्यवर्णाइत्यष्टाभिरपिमार्जनमेव एतच्चमार्जनंस्नानानंतरम् अथोदकतर्पणम् उदकतर्पणमित्यनेनअत्रजलएवतर्पणंनस्थलइतिगम्यते तत्रमंत्राः नमोहमायेत्येवमादयःकृत्तिवाससेनमइत्येतदंताः अत्रमंत्रसंदर्भस्यादावंतेचनमःशब्दश्रवणान्मंत्रादौमंत्रांते-चनमःशब्दोभवतितथाचैवंमंत्रप्रयोगःनमोहमायमंहमायधून्वनेतापसायपुनर्वसवेनमइतिएवंनमोमौंजाये-त्यारभ्यसर्वविंदायनमइत्येकोमंत्रःएवमुत्तरत्रापिद्रष्टव्यम् । एतैस्त्रयोदशमंत्रैस्तर्पणंकुर्यात् । ततश्चएतदेवा-दित्योपस्थानमितिएतदेवमंत्रजातमादित्योपस्थानंआदित्योपस्थानसाधनम् कार्यकारणयोरभेदोपचारः तर्पणा-नंतरमेतैरेवमंत्रैरादित्योपस्थानंकुर्यादित्यर्थः एताएवाज्याहुतयइतिएतैरेवमंत्रैराज्यहोमःकर्तव्यइत्यर्थः अयंच-होमोलौकिकाग्निंप्रतिष्ठाप्यकार्यः ।

## आतां चांद्रायण सांगतो.

**गौतम**—"आतां चांद्रायणव्रत सांगतो-त्याचा विधि करावयाचा तो प्राजापत्यकृच्छ्रांत सांगितला आहे. तो असा-जो मनुष्य, प्राजापत्यादिक दोन कृच्छ्रांनीं घालवावयाचें पाप प्राजापत्यादिक एकाच कृच्छ्रानें घालविण्याविषयीं इच्छीत असेल त्या मनुष्यानें तो कृच्छ्र असा करावा कीं, स्नानसंध्यादिक नित्य कृत्यें व कृच्छ्राचीं अंगभूत होमादिकृत्यें वेळच्यावेळीं करून बाकीच्या राहिलेल्या कालीं दिवसा उभें राहावें, आणि रात्रीं बसून राहावें, सत्य भाषण करावें, असत्य बोलूं नये, अनार्या-बरोबर भाषण करूं नये, आणि नित्यकर्म होऊन अवशेष राहिलेल्या कालीं रौरव आणि योधाजय ह्या दोन सामांचा पाठ करावा. 'पुनानः सोमधारया०' ह्या ऋचेचे ठायीं आणि 'दुहानऊध०' ह्या ऋचेचे ठायीं तीन ऋचांनीं गान करावयाचीं जीं सामें तीं रौरव व योधाजय म्हटलीं आहेत. त्रिकाळ स्नान करावें. 'आपोहिष्ठा०' ह्या चार ऋचांनीं आणि 'हिरण्यवर्णाः शुचयः०' ह्या आठ ऋचांनीं मार्जन करावें. आतां उदकतर्पण सांगतो-उदकतर्पण तें उदकांत राहून तर्पण करावें. त्या तर्प-णाचे **मंत्र** सांगतो-मंत्राच्या आदीं व अंतीं नमःशब्दाचा प्रयोग करावा. तो असा-'नमोहमाय मंहमाय धून्वने तापसाय पुनर्वसवे नमः' 'नमो मौंज्यायौर्म्याय वसुविंदाय सर्वविंदाय नमः' 'नमः पाराय सुपाराय महापाराय पारयिष्णवे नमः' 'नमो रुद्राय पशुपतये महते देवाय त्र्यंबकायैकचरायाधिपतये हराय शर्वायेशानायोग्राय वज्रिणे घृणिने कपर्दिने नमः' 'नमः सूर्या-यादित्याय नमः' 'नमो नीलग्रीवाय शितिकंठाय नमः' 'नमः कृष्णाय पिंगलाय नमः' 'नमो ज्येष्ठाय श्रेष्ठाय वृद्धायेंद्राय हरिके-शायोर्ध्वरेतसे नमः' 'नमः सत्याय पावकाय पावकवर्णाय कामाय कामरूपिणे नमः' 'नमो दीप्ताय दीप्तरूपिणे नमः' 'नमस्ती-र्णाय तीर्णरूपिणे नमः' 'नमः सौम्याय पशुपुरुषाय महापुरुषाय मध्यमपुरुषायोत्तमपुरुषाय ब्रह्मचारिणे नमः' 'नमश्चंद्रललाटाय कृत्तिवाससे नमः' ह्या तेरा मंत्रांनीं तर्पण करावें. तर्पणानंतर त्याच तेरा मंत्रांनीं आदित्याचें उपस्थान करावें. नंतर त्याच मंत्रांनीं आज्यहोम करावा. हा होम लौकिकाग्नीची स्थापना करून त्याजवर करावा.

एवमथातश्चांद्रायणंतस्योक्तोविधिःकृच्छ्रइत्यनेनसाधारणधर्मानतिदिश्यचांद्रायणेविशेषधर्मानाह । तप-नंत्रतंचरेच्छ्वोभूतांपौर्णमासीमुपवसेदाप्यायस्वसंतेपयांसिनवोनवइत्येताभिस्तर्पणमाज्यहोमोहविषश्चानुमंत्र-णमुपस्थानंचंद्रमसोयद्देवादेवहेडनमितिचतसृभिर्जुहुयात्देवकृतस्येतिचांतेसमिद्भिरोंभूर्भुवःस्वर्महर्जनस्तपः-सत्यंयशःश्रीरूर्जिडोजःपुरुषोधर्मःशिवइत्येतैर्ग्रासानुमंत्रणंप्रतिमंत्रंनमःस्वाहेतिवासर्वान्ग्रासप्रमाणमास्याबि-

कारेणभैक्षसक्तुकणयावकशाकपयोदधिघृतमूलफलोदकानिहवींष्युत्तरोत्तरंप्रशस्तानिपौर्णमास्यांपंचदशग्रासान्भुक्त्वाएकापचयेनापरपक्षमश्नीयात्अमावास्यामुपोष्यैकोपचयेनपूर्वपक्षंविपरीतमेकेषामेषचांद्रायणोमासएतदाप्त्वातिपापोविपाप्मासर्वमेनोहंतिद्वितीयमाप्त्वादशपूर्वान्दशापरानात्मानंचपंक्तिंपुनातिसंवत्सरंचंद्रमसःसलोकतामाप्नोतीति । अस्यार्थः तपनंव्रतंचरेत्तापयतिपापमितितपनं वपनंव्रतंचरेदितिपाठेव्रतंचांद्रायणंवपनपूर्वकं अयमर्थः यदाप्रायश्चित्तनिमित्तंचांद्रायणंतदावपनपूर्वकंचरेदिति । एतेननिमित्तमंतरेणसुकृतार्थंचांद्रायणाचरणेवपनंनास्तीत्युक्तंभवति श्वोभूतांपौर्णमासींव्रतोपक्रमतिथिंश्वोभूतांनिरीक्ष्यपूर्वतिथौचतुर्दश्यामुपवसेदित्यर्थः आप्यायस्वेत्यादिभिर्नवोनवइत्यंतैर्मंत्रैस्तर्पणंचंद्रमसःकृत्वैतैरेवत्रिभिर्मंत्रैराज्यहोमंविधायततोहविरनुमंत्र्यैतैरेवमंत्रैः पश्चादेतैरेवचंद्रमसउपस्थानंकुर्वीत ततोयद्देवादेवहेडनमितिचतसृभिर्देवकृतस्येतिचैत्यनयाचसमिद्भिर्यज्ञियकाष्ठोद्भवाभिर्जुहुयात् कदाअंतेपूर्वोक्तोपस्थानांते । अथानंतरंतिथिसंख्याकान्ग्रासान्कृत्वातान् ॐ भूर्भुवःस्वरित्यादिमंत्रैरभिमंत्रयीत ॐभूः । भुवः । स्वः । महः । जनः । तपः । सत्यं । यशः । श्रीः । ऊर्क् । इट् । ओजः । पुरुषः । धर्मः । शिवः । इतिमंत्रविभागः अत्रप्रतिमंत्रंमंत्रांतेनमःस्वाहेतिवाप्रयुंजीत । प्रणवादिस्वःपर्यंतानामव्ययत्वेननमःस्वाहायोगेपिनचतुर्थीविभक्तिश्रवणम् । महाप्रभृतिषुचतुर्थीश्रवणंभवति महसेनमःमहसेस्वाहेतिवा । एवमन्यत्रापि । जनाय । तपसे । सत्याय । यशसे । श्रियै । ऊर्जे । इषे । ओजसे । पुरुषाय । धर्माय । शिवायेति । ग्रासप्रमाणमास्याविकारेणआस्यस्यमुखस्यव्यादानेनयावदन्नंमुखंप्रविशतितावदन्नंग्रासप्रमाणंभवतीत्यर्थः चतुर्दश्यामुपोषितस्यपौर्णमास्यादितिथिषुग्रासंख्यानियममाह पौर्णमास्यांपंचदशग्रासानित्यादिनापूर्वपक्षमित्यंतेन । एतच्च

**पिपीलिकामध्यंचांद्रायणम् ।**

याप्रमाणें हे प्राजापत्य कृच्छ्रांत सांगितलेले धर्म चांद्रायणांत करावे, असे साधारण धर्म सांगून चांद्रायणाचे विशेष धर्म सांगतो–'तपनं व्रतं चरेत्' म्हणजे पापाला तापविणारें असें व्रत चांद्रायण करावें.' 'वपनं व्रतं चरेत्' असा पाठ आहे, त्या वेळीं वपनपूर्वक व्रत म्हणजे चांद्रायण करावें, असा अर्थ होतो. म्हणजे ज्या वेळीं प्रायश्चित्तनिमित्तानें चांद्रायण करावयाचें असेल त्या वेळीं वपन करून तें करावें. आणि निमित्तावांचून सुकृतासाठीं करावयाचें असेल त्या वेळीं वपन करूं नये, असा भाव. व्रताचे आरंभाची तिथि पौर्णिमा उद्यां आहे, असें पाहून पूर्वदिवशीं चतुर्दशीस उपवास करावा. 'आप्यायस्व०' 'संतेपयांसि०' 'नवोनवो०' ह्या तीन मंत्रांनीं चंद्राचें तर्पण करून ह्याच तीन मंत्रांनीं आज्यहोम करून तदनंतर ह्याच तीन मंत्रांनीं हवीचें अभिमंत्रण करून ह्याच तीन मंत्रांनीं चंद्राचें उपस्थान करावें. तदनंतर 'यद्देवादेवहेडनं०' ह्या चार ऋचांनीं आणि 'देवकृतस्य०' ह्या ऋचेनें यज्ञियवृक्षाच्या समिधांचा होम करावा. हा समिधांचा होम पूर्वोक्त उपस्थान झाल्यावर करावा. नंतर जी तिथि असेल तिच्या संख्येइतके ग्रास करून पुढील मंत्रांनीं त्यांचें अभिमंत्रण करावें. ते मंत्र येणेंप्रमाणें— ॐ भूः । ॐभुवः । ॐस्वः । ॐमहः । ॐजनः । ॐतपः । ॐसत्यं । ॐयशः । ॐश्रीः । ॐऊर्क् । ॐइट् । ॐओजः । ॐपुरुषः । ॐधर्मः । ॐशिवः । ह्या प्रत्येक मंत्राच्या शेवटीं 'नमः' किंवा 'स्वाहा' याचा प्रयोग करावा. यावरून असे मंत्र म्हणावे कीं, 'ॐभूः स्वाहा' 'ॐभुवः स्वाहा' 'ॐस्वः स्वाहा' 'ॐमहसे स्वाहा' 'ॐजनाय स्वाहा' 'ॐतपसे स्वाहा' 'ॐसत्याय स्वाहा' 'ॐयशसे स्वाहा' 'ॐश्रियै स्वाहा' 'ॐऊर्जे स्वाहा' 'ॐइषे स्वाहा' 'ॐओजसे स्वाहा' 'ॐपुरुषाय स्वाहा' 'ॐधर्माय स्वाहा' 'ॐशिवाय स्वाहा.' ग्रासांचें प्रमाण—मुख पसरून जितकें अन्न आयासावांचून तोंडांत जाईल तितक्या अन्नाचा एक ग्रास होतो. ग्रासांचीं द्रव्यें सांगतो—भिक्षान्न, सातू, कण्या, यवान्न, शाक, दूध, दहीं, घृत, मुळें, फळें, उदक हीं हविष्यानें उत्तरोत्तर प्रशस्त आहेत. यांतून कोणत्या द्रव्याचे ग्रास घ्यावयाचे असतील त्याचे पौर्णिमेस पंधरा ग्रास भक्षण करावेत. प्रतिपदेस चवदा, द्वितीयेस तेरा, याप्रमाणें प्रत्येक तिथीस एक एक कमी करून कृष्णपक्ष घालवावा. आणि अमावास्येस उपवास करून शुद्धप्रतिपदेस एक, द्वितीयेस दोन, याप्रमाणें एक एक वाढवून पौर्णिमेस पंधरा ग्रास भक्षण करावेत. हें **पिपीलिकामध्य चांद्रायण** होय.

**अथयवमध्यमाह**—विपरीतमेकेषामिति । अस्मिन्यवमध्यचांद्रायणेअमावास्यायामुपवासःप्रतिपदादितिथिषुएकैकग्रासोपचयः पौर्णमासीमभिव्याप्य पुनःकृष्णपक्षादितिथिष्वमावास्यावधिकासुएकैकग्रासापचयः अमावास्यायामुपवासइतिक्रमःअत्रग्रासग्रहणकालश्चंद्रोदयः । अभिमंत्रणमंत्रविकल्पादयश्चाग्रेकृच्छ्र-

साधारणेतिकर्तव्यताकथनसमयेनिरूपयिष्यंते । **याज्ञवल्क्यः** तिथिवृद्ध्याचरेत्पिंडानशुक्लेशिख्यंडसंमिताम् । एकैकंह्रासयेत्कृष्णेपिंडंचांद्रायणंचरेत् । इंदुक्षयेनभुंजीतएषचांद्रायणोविधिः । तिथिवृद्ध्या प्रथमद्वितीयादि चंद्रकलायुक्तप्रतिपद्द्वितीयादितिथिवृद्ध्या चरेत्भक्षयेत् । शुक्लेशुक्लपक्षे । शिख्यंडसंमितान्मयूरांडप्रमाणान् । चांद्रायणंह्रासवृद्धिभ्यांचंद्रस्यायनंचरणमिवचरणंयस्मिन्कर्मणितच्चांद्रायणम् संज्ञायांदीर्घः इतिपिपीलिकामध्य**यवमध्यचांद्रायण**लक्षणम् ।

## आतां यवमध्य चांद्रायण सांगतो.

"कित्येकांच्या मतीं हें चांद्रायण विपरीत करावें, ह्मणजे अमावास्येस उपवास करून शुक्लप्रतिपदादि तिथीचे ठायीं एक एक तिथीला एक एक ग्रास वाढवीत जावा, ते पौर्णिमेपर्यंत वाढवून पुनः कृष्णप्रतिपदेपासून प्रत्येक तिथीला एक एक ग्रास कमी करीत यावा, आणि अमावास्येस उपवास करावा, म्हणजे हें यवमध्यचांद्रायण होतें. ग्रासभक्षणाचा काल चंद्रोदय आहे. ग्रासांच्या अभिमंत्रणाचे दुसरे मंत्रही आहेत. तो प्रकार पुढें कृच्छ्रसाधारणेतिकर्तव्यता सांगावयाच्या प्रसंगीं सांगूं. अतिपापी असेल त्यानें हें चांद्रायणव्रत केलें असतां पापरहित होऊन सर्व पातकांचा नाश होतो. दुसरें चांद्रायण केलें असतां दहा पूर्वींचे व दहा पुढचे पुरुष, आपणासह आणि पंक्ति यांना पवित्र करितो. आणि एकवर्षपर्यंत केलें असतां त्याला चंद्राचें सालोक्य प्राप्त होतें." **याज्ञवल्क्य**-"चांद्रायण करणारानें शुक्ल पक्षांत चंद्राची एक एक कला जसजशी वाढत जाते तसतशा प्रतिपदाद्वितीयादि तिथींचे ठायीं एकएका वृद्धीनें ग्रास भक्षण करावे. ते ग्रास मोराच्या अंड्याएवढे असावे. त्याचप्रमाणें कृष्णपक्षांत चंद्राच्या कलेप्रमाणें एक एक ग्रास उतरीत यावा. आणि चंद्रक्षयदिवशीं ( अमावास्येस ) उपवास करावा. हा चांद्रायणाचा विधि होय." ज्या कर्मांत चंद्राच्या अयना ( चरणा, संचारा ) प्रमाणें चरण म्हणजे भक्षण आहे तें कर्म चांद्रायण म्हटलें आहे. इति पिपीलिकामध्ययवमध्यचांद्रायणम्.

**अथयतिचांद्रायणादीनि । याज्ञवल्क्यः ।** यथाकथंचित्पिंडानांचत्वारिंशच्छतद्वयम् । मासेनैवोपभुंजीतचांद्रायणमथापरम । पिंडानांचत्वारिंशदधिकशतद्वयंमासेनोपभुंजीत कथं यथाकथंचित् । अत्रायंक्रमः । दिनेदिनेअष्टौग्रासानभुंजीत अथवानक्तंचतुरोदिवाचतुरइतिअथवैकस्मिन्दिनेचतुरोऽपरस्मिन्द्वादश । उतैकरात्रमुपोष्यापरस्मिन्षोडश । यद्वादिनद्वयमुपोष्यतृतीयदिनेचतुर्विंशतिःइत्यादिप्रकाराणांमध्येशक्त्यपेक्षयाभुंजीतेति । अत्रतिथ्यपेक्षयाग्रासनियमोनास्ति । उपक्रमस्तुशुक्लकृष्णप्रतिपदोरन्यत्र । यस्तुनैरंतर्येणैवंविधचांद्रायणानुष्ठानंकरोतितस्यतिथिवृद्धिह्रासवशेनकदाचिन्द्वितीयादिष्वारंभोभवतितत्रनदोषः चंद्रगत्यनुसरणमंतरेणत्रिंशद्दिनात्मकसावनमासानुष्ठेयत्वात् । अस्मिंश्चांद्रायणेपूर्वप्रक्रांतमेकादश्युपवासादिनलुप्यते तिथिनियमेनग्रासनियमाभावात् । यत्रतुतिथिनियमेनग्रासनियमस्तत्रपूर्वप्रक्रांतमुपवासादिकमन्येनकारयेत् एवंवप्रकारेपुक्वचन**मनुना**विशेषसंज्ञादर्शिता । अष्टावष्टौसमश्नीयात्पिंडान्मध्यंदिनेस्थिते । नियतात्माहविष्यस्ययतिचांद्रायणंचरन् । चतुरःप्रातरश्नीयात्पिंडान्विप्रःसमाहितः । चतुरोऽस्तमितेसूर्येशिशुचांद्रायणंचरेत् । यथाकथंचित्पिंडानांतिस्रोशीतीःसमाहितः । मासेनाश्नन्हविष्यस्यचंद्रस्यैतिसलोकतामिति । **यमः** त्रींस्त्रीन्पिंडान्समश्नीयान्नियतात्मादृढव्रतः । हविष्याम्नस्यवैमासमृषिचांद्रायणंस्मृतमिति । इतियतिचांद्रायणादीनि ॥

## आतां यतिचांद्रायणादिक सांगतो.

**याज्ञवल्क्य**-"जसे कसेतरी एका महिन्यांत दोनशें चाळीस (२४० ) ग्रास भक्षण करावे, म्हणजे दुसरें एक प्रकारचें चांद्रायण होतें." याचा क्रम असा-प्रतिदिवशीं आठ आठ ग्रास भक्षण करावे; अथवा रात्रीं चार आणि दिवसा चार ग्रास भक्षण करावे; अथवा एक दिवशीं चार आणि दुसऱ्या दिवशीं बारा; किंवा एक दिवस उपवास करून दुसऱ्या दिवशीं सोळा; अथवा दोन दिवस उपवास करून तिसऱ्या दिवशीं चोवीस इत्यादि प्रकारांमध्यें आपल्या शक्तीप्रमाणें ग्रास भक्षण करावे. या चांद्रायणाचे ठायीं तिथींवर ग्रासांचा नियम नाहीं. आरंभ करणें तो शुक्ल प्रतिपदेस किंवा कृष्णप्रतिपदेस करावा. जो मनुष्य निरंतर याप्रमाणें चांद्रायण करतो त्याचा आरंभ, तिथीची वृद्धि किंवा क्षय होऊन एकादेवेळीं द्वितीयादि तिथींचे ठायीं होतो, त्या विषयीं दोष नाहीं. कारण, चंद्राच्या गतीप्रमाणें दिवस न धरितां तीस दिवसांचा जो सावन मास तो धरून त्याप्रमाणें या चांद्रायणाचें अनुष्ठान करावयाचें आहे. पूर्वी आरंभिलेल्या एकादश्यादिव्रतोपवास ह्या यतिचांद्रायणादिकांचे

ठायीं मोडत नाहीं. कारण, या ठिकाणीं तिथींना अनुसरून ग्रासाचा नियम नाहीं. ज्या ठिकाणीं ( पिपीलिकामध्यादिकांच्या ठायीं ) तिथीच्या नियमानें ग्रासांचा नियम सांगितला आहे त्या ठिकाणीं पूर्वी आरंभिलेलें दुसरें उपवासादि व्रत दुसऱ्या करून करावें. हे वर सांगितलेले जे चांद्रायणाचे प्रकार त्यांच्या विषयींच कित्येकांना **मनूनें** विशेष संज्ञा सांगितली आहे, ती अशी—"दोनप्रहरीं हविष्याचे आठ आठ ग्रास भक्षण करावे, म्हणजे **यतिचांद्रायण** होतें. ब्राह्मणानें समाधानपूर्वक दिवसा चार ग्रास आणि रात्रीं चार ग्रास भक्षण करावे, म्हणजे **शिशुचांद्रायण** होतें. एका महिन्यांत जसे कसेतरी २४० ग्रास भक्षण करावे, म्हणजे चंद्राचें सालोक्य प्राप्त होतें." **यम**–"इंद्रियें जिंकून, दृढ व्रत धारण करून एक मासपर्यंत हविष्यान्नाचे तीन तीन ग्रास भक्षण करावे, म्हणजे ऋषिचांद्रायण होतें." **इति यतिचांद्रायणादि.**

**अथकृच्छ्रचांद्रायणेतिकर्तव्यता याज्ञवल्क्यः** कुर्यात्रिषवणस्नायीकृच्छ्रंचांद्रायणंतथा । पवित्राणिजपेत्पिंडान्गायत्र्याचाभिमंत्रयेत् । त्रिषवणस्नानंचतप्तकृच्छ्रव्यतिरेकेण । तप्तकृच्छ्रेतुमनुनासकृत्स्नायीसमाहितइतिविशेषाभिधानात् । पवित्राणिसूक्तानिचाघमर्षणंदेवकृतशुद्धवत्यस्तरत्समंदीत्यादिवसिष्ठादिप्रदर्शितानिऋग्यजुःसामसुव्यवस्थितानियथाशाखंजपेत् अविरुद्धेषुकालेषु पिंडानग्रासान्प्रत्येकंगायत्र्याचाभिमंत्रयेत् ग्रासानुमंत्रणेगौतमोक्तैरोंभूरित्यादिमंत्रैःसहगायत्र्याविकल्पः एवंजपादिष्वप्येककार्याणांमंत्राणांविकल्पःभिन्नकार्याणांतुसमुच्चयइतिविवेकः । **मनुः** महाव्याहृतिभिर्होमःकर्तव्यःस्वयमन्वहम् । अहिंसासत्यमक्रोधमार्जवंचसमाचरेत् । त्रिरह्नस्त्रिर्निशायांतुसवासाजलमाविशेत् । स्त्रीशूद्रपतितांश्चैवनाभिभाषेतकर्हिचित् । स्थानासनाभ्यांविहरन्नशक्तोधःशयीतवा । ब्रह्मचारीव्रतीचस्याद्गुरुदेवद्विजार्चकः । सावित्रींचजपेन्नित्यंपवित्राणिचशक्तितः । सर्वेष्वेवव्रतेष्वेवंप्रायश्चित्तार्थमादृतइति । त्रिरह्नइत्यादि दिवात्रिःरात्रौत्रिरितियदत्रषट्सुसवनेषुस्नानंतच्छक्तविषयं । एवंन्यूनाधिकस्नानान्यन्यान्यपिशक्ताशक्तापेक्षयातानि ।

## आतां कृच्छ्रचांद्रायणांची इतिकर्तव्यता सांगतो.

**याज्ञवल्क्य**—"कृच्छ्र व चांद्रायण करीत असतां त्रिकाळ स्नान करावें, पवित्र सूक्तांचा जप करावा, आणि भक्षण करावयाचे ग्रास गायत्रीमंत्रानें अभिमंत्रित करावे." त्रिकाल स्नान सांगितलें तें तप्तकृच्छ्र व्यतिरिक्त करून समजावें. कारण, तप्तकृच्छ्राचे ठिकाणीं तर **मनूनें** एकवार स्नान करावें, असा विशेष सांगितला आहे. पवित्र सूक्तें सांगितलीं तीं–अघमर्षण, देवकृत, शुद्धवतीऋचा, तरत्समंदी इत्यादिक वसिष्ठादि ऋषींनीं दाखविलेलीं ऋग्वेदांतील, यजुर्वेदांतील, सामवेदांतील आपल्या शाखेप्रमाणें त्यांचा जप करावा. यांचा जप कोणत्या वेळीं करावा असें म्हणाल तर नित्यकर्म होऊन अवशेष राहिलेल्या काळीं करावा. येथें याज्ञवल्क्यानें ग्रासांचें अभिमंत्रण गायत्रीनें सांगितलें, आणि पूर्वी **गौतमानें** 'ॐभूः' इत्यादि मंत्रांनीं सांगितलें यावरून गायत्रीचा व त्या मंत्रांचा विकल्प समजावा. याप्रमाणें एककार्यमंत्रांच्या जपादिकांविषयीं विकल्प होय. आणि भिन्नकार्यमंत्रांचा समुच्चय होय. **मनु**–"सर्वव्रतांचे ठायीं आदरपूर्वक करावयाचें सांगतो-महाव्याहृतिमंत्रांनीं दररोज स्वतः होम करावा; हिंसा वर्ज्य करावी; सत्य भाषण करावें; क्रोध वर्ज्य करावा; आर्जव ( सरळपणा ) ठेवावें; दिवसा तीन वेळां आणि रात्रीं तीन वेळां उदकांत प्रवेश करून स्नान करावें; स्त्रिया, शूद्र आणि पतित यांच्याशीं कधींही भाषण करूं नये; सर्व काळ उभें राहून किंवा बसून असावें; अशक्त असेल त्यानें भूमीवर पडावें; ब्रह्मचर्य व्रत धारण करावें; नित्य गुरु, देव आणि ब्राह्मण यांची पूजा करावी; यथाशक्ति गायत्रीचा जप आणि पवित्रसूक्तांचा जप करावा; हे नियम सर्व व्रतांचे ठायीं पापनिरसनाकरितां आदरपूर्वक करावे." या मनुवचनांत दिवसा तीन वेळां आणि रात्रीं तीन वेळां जें स्नान सांगितलें तें सशक्ताला समजावें. याप्रमाणें कमी किंवा अधिक जीं स्नानें इतर ठिकाणीं सांगितलीं आहेत तीं अशक्ताला व सशक्ताला समजावीं.

**जाबालः** आरंभेसर्वकृच्छ्राणांसमाप्तौचविशेषतः । आज्येनैवहिशालाग्नौजुहुयाद्व्याहृतीःपृथक् । श्राद्धं कुर्याद्व्रतांतेचगोहिरण्यादिदक्षिणा । स्त्रीणांहोमोनदातव्यःपंचगव्यंतथैवच । **पराशरः** स्त्रीशूद्रस्यतुशुद्ध्यर्थं प्राजापत्यंसमाचरेत् पंचगव्यंतुकुर्वीतस्नात्वापीत्वाशुचिर्भवेत् । स्त्रीशूद्रयोःपंचगव्यस्यविहितप्रतिषिद्धत्वाद्विकल्पः । जाबालेनशालाग्नौहोमंविधायस्त्रीणांहोमोनदातव्यइतिनिषेधात्गृह्याग्न्यावेवहोमनिषेधः अतश्चस्त्रीशूद्रयोरपिब्राह्मणद्वारालौकिकाग्नौभवत्येव । अयंचहोमोंगहोमः नतुकृच्छ्रप्रत्याम्नायभूतप्रधानहोमः । आरंभेसर्वकृच्छ्राणांसमाप्तौचविशेषतः । आज्येनैवहिशालाग्नौजुहुयाद्व्याहृतीःपृथक् इतिजाबालेनविशेषाभिधा-

नात्। कृच्छ्रप्रत्याम्नायभूतयोस्तुप्रधानयोर्जपहोमयोःस्त्रीशूद्रयोर्नाधिकारः। **तथाचांगिराः** तस्माच्छूद्रंसमासाद्यसदाधर्मपथेस्थितम्। प्रायश्चित्तंप्रदातव्यंजपहोमविवर्जितम्। अत्रशूद्रशब्दःस्त्र्युपलक्षणार्थः तयोः समानधर्मत्वात्। **वैशंपायनः** स्नानंद्विकालमेवस्यात्त्रिकालंवाद्विजन्मनः। **शंखः** एकवासाआर्द्रवासालघ्वाशीस्थंडिलेशयइति। **हारीतः** अवरंशुद्धवतीभिःस्नात्वाघमर्षणमंतर्जलेजपित्वाधौतमहतंवासःपरिधायसाम्नासौम्येनादित्यमुपतिष्ठेतेति।

**जाबाल**—"सर्व कृच्छ्रांच्या आरंभीं व समाप्त झाल्यावर शालाग्नीवर ( गृह्याग्नीवर ) वेगवेगळ्या व्याहृतिमंत्रांनीं आज्याचाच होम करावा; व्रताच्या शेवटीं श्राद्ध करावें; गाई, सुवर्ण इत्यादि दक्षिणा द्यावी. स्त्रियांना होम सांगूं नये, आणि तसेंच पंचगव्य देऊं नये." **पराशर**—"स्त्रिया व शूद्र यांच्या शुद्धीसाठीं त्यांनीं प्राजापत्य कृच्छ्र करावें; आणि पंचगव्य करून स्नान करून तें पिऊन त्यांनीं शुद्ध व्हावें." स्त्रिया व शूद्र यांस या पराशरवचनानें पंचगव्य विहित असल्यामुळें आणि वरील जाबालानें प्रतिषिद्ध असल्यामुळें पंचगव्याचा त्यांना विकल्प समजावा. स्त्रिया व शूद्र यांस जाबालानें जो होमनिषेध सांगितला तो गृह्याग्नीवर होमनिषेध समजावा. लौकिकाग्नीवर ब्राह्मणाकडून स्त्रिया व शूद्र यांचा होम होतच आहे. हा स्त्रिया व शूद्र यांस सांगितलेला होम कृच्छ्रांगहोम समजावा. कृच्छ्रप्रतिनिधि जो प्रधानहोम तो समजूं नये. कारण, वरील जाबालवचनानें विशेष अंगहोम सांगितला आहे. कृच्छ्राचे प्रतिनिधिभूत जे जप व होम त्यांविषयीं त्यांना अधिकार नाहीं. तें सांगतो. **अंगिरा**—"धर्ममार्गी राहाणारा शूद्र आला असतां त्याला जप होम वर्ज्य करून कृच्छ्रादि प्रायश्चित्त सांगावें." या ठिकाणीं शूद्रशब्द आहे तो स्त्रीचें उपलक्षण असल्यामुळें स्त्रियेलाही असेंच समजावें. कारण स्त्रिया, व शूद्र यांचे धर्म समान आहेत. **वैशंपायन**—कृच्छ्रादि व्रत करीत असतां दोन्ही कालीं ( प्रातःकाळीं व सायंकाळीं ) स्नान करावें. अथवा तीन्ही कालीं करावें." **शंख**—"व्रती यानें एक वस्त्र धारण करावें, ओलें वस्त्र धारण करावें. लघु अन्नाचा अल्प आहार करावा, स्थंडिलाचे ठिकाणीं शयन करावें." **हारीत**—शुद्धवती ऋचांनीं स्नान करून उदकांत राहून अघमर्षणसूक्ताचा जप करून नवें धुनलेलें वस्त्र परिधान करून सौम्य सामानें आदित्याचें उपस्थान करावें.

**षट्त्रिंशन्मते** जपहोमादियत्किंचित्कृच्छ्रोक्तंसंभवेन्नचेत्। सर्वंव्याहृतिभिःकुर्याद्गायत्र्याप्रणवेनचेति। **शंखः** एकवासाश्चरेद्भिक्षांस्नात्वावासोनपीडयेत्। गायत्र्यादशसाहस्रमाह्निकंजपउच्यते। **बौधायनः** अहतंवासोवसीतसावित्रीव्याहृतीश्चजपेदष्टसहस्रकृत्वः। ॐकारमादितःकृत्वारूपेरूपेतथांततः। भूमौ वीरासनेयुक्तःकुर्याज्जप्यंसुसंयतः। आसीनःशल्यविद्धोवापिबेद्गव्यंपयःसकृत्। गव्यस्यपयसोलाभेगव्यमेव भवेद्दधि दध्नोलाभेभवेत्तक्रंतक्राभावेतुयावकं। एषामन्यतमंयत्तुउत्पद्येतचतत्पिबेत्। शल्यविद्धोवेति वाशब्द उपमार्थे। शल्यविद्धइवनिश्चलःसन्नासीनःपयःपिबेदित्यर्थः **यमः** अंगुल्यग्रेस्थितंपिंडंगायत्र्याचाभिमंत्रितम्। प्राश्याचम्यपुनःकुर्यादन्यस्याप्यभिमंत्रणम्। येतुप्राणाग्निहोत्राधिकारिणस्तेषामापोशनकर्मानंतरंप्राणाहुतयोपिपंचभिर्ग्रासैर्भवंति। तत्रचपूर्वोक्तप्रणवगायत्र्याद्यन्यतमैर्मंत्रैर्ग्रासानभिमंत्र्यप्राणायस्वाहेत्यादिभिर्मंत्रैःप्राणाग्नौहोमःकार्यः यदात्वेकदात्रिचतुरोवाग्रासास्तत्रबौधायनोक्तोविशेषोग्राह्यः तद्यथा अश्नीयात्प्राणायेतिप्रथममपानायेतिद्वितीयंव्यानायेतितृतीयमुदानायेतिचतुर्थंसमानायेतिपंचमम्। यदाचत्वारस्तदाद्वाभ्यांप्रथमं। यदात्रयस्तदाद्वाभ्यांद्वाभ्यांपूर्वौ। यदाद्वौतदाद्वाभ्यामेवोत्तरमेकंसर्वैरिति। अस्यार्थः यदाचत्वारोग्रासाभक्ष्यंतेतदाद्य द्वितीयाभ्यांमंत्राभ्यांप्रथमंग्रासंग्रसेत तृतीयेनद्वितीयंचतुर्थेनतृतीयंपंचमेनचतुर्थं। यदात्रयस्तदाद्यद्वितीयाभ्यां प्रथमंतृतीयचतुर्थाभ्यांद्वितीयंपंचमेनतृतीयं। यदाद्वौतदाप्रथमतआरभ्यत्रिभिःप्रथममत्ति। द्वाभ्यांद्वितीयं। यदात्वेकस्तदासर्वैरेवतंग्रसेदिति। **हारीतः** चांद्रमसंचरुंश्रपयित्वानवोनवइतिहुत्वा ज्योत्स्नायांचरुशेषान्पिंडान्साविव्याभिमंत्रितान्प्राश्नीयादिति। ज्योत्स्नाशब्देनचचंद्रोदयोलक्ष्यते तेनार्धरात्रावपिभोजने दोषोनास्ति। **शंखः** आर्द्रामलकमात्रास्तुग्रासाइंदुव्रतेस्मृताः। तथैवाहुतयस्तत्रशौचार्थंचैवमृत्तिकाः॥ इतिकृच्छ्रचांद्रायणसाधारणेतिकर्तव्यता॥

**षट्त्रिंशन्मतांत**—"कृच्छ्राचे ठिकाणीं जें कांहीं जप होमादि कृत्य सांगितलें आहे तें त्या मंत्रांनीं तसें करण्यास अशक्त असेल तर तें सारें व्याहृतिमंत्रांनीं, गायत्रीमंत्रानें आणि प्रणवानें करावें." **शंख**—"एक वस्त्र धारण करून भिक्षेस

जावें, स्नान केल्यावर वस्त्र पिळूं नये, गायत्रीमंत्राचा दहा हजार जप हें त्याचें आन्हिक ( दिवसाचें कर्म ) सांगितलें आहे." **बौधायन**–"नवें धुतलेलें वस्त्र परिधान करावें, गायत्री आणि व्याहृति यांचा आठ हजार जप करावा; भूमीवर वीरासन घालून बसावें आणि प्रत्येक मंत्राच्या आदीं व अंतीं ॐकार लावून त्या गायत्रीचा जप करावा; एकादे शल्यानें विद्ध जसा असतो तसा झाला असतां बसून एक वेळां गाईचें दूध प्यावें; गाईचें दूध न मिळेल तर गाईचेंच दहीं प्यावें दहीं न मिळेल तर गाईचें ताक प्यावें; ताक न मिळेल तर जवांचें पीठ प्यावें. यांपैकीं जें मिळेल तें प्यावें." **यम**—"अंगुलीवर ग्रास घेऊन गायत्रीमंत्रानें त्याचें अभिमंत्रण करून त्याचें प्राशन करून आचमन करून पुनः दुसऱ्या ग्रासाचें अभिमंत्रण करावें." जे प्राणाहुतीचे अधिकारी ( ब्राह्मणादिक ) असतील त्यांचें आपोशन झाल्यानंतर प्राणाहुति देखील पांच ग्रासांनीं होतात. त्या ठिकाणीं पूर्वी सांगितलेल्या गायत्र्यादिकांपैकीं कोणत्याही मंत्रांनीं ग्रासांचें अभिमंत्रण करून 'प्राणाय स्वाहा' इत्यादि मंत्रांनीं पांच ग्रासांच्याच प्राणाहुति घ्याव्या. जेव्हां एकवेळीं तीन किंवा चार ग्रास घ्यावयाचे असतील त्या वेळीं बौधायनानें सांगितलेला विशेष घ्यावा, तो असा–'प्राणायस्वाहा' या मंत्रानें प्रथम ग्रास भक्षण करावा, 'अपानाय स्वाहा' या मंत्रानें दुसरा, 'व्यानाय स्वाहा' या मंत्रानें तिसरा, 'उदानाय स्वाहा' या मंत्रानें चवथा, 'समानाय स्वाहा' या मंत्रानें पांचवा ग्रास भक्षण करावा. जेव्हां चार ग्रास असतील तेव्हां 'प्राणाय, अपानाय' या दोन मंत्रांनीं प्रथम ग्रास भक्षण करावा. तिसऱ्या मंत्रानें दुसरा ग्रास, चवथ्या मंत्रानें तिसरा ग्रास, पांचव्या मंत्रानें चवथा ग्रास भक्षावा. जेव्हां तीन ग्रास असतील तेव्हां पहिल्या व दुसऱ्या मंत्रानें पहिला ग्रास, तिसऱ्या व चवथ्या मंत्रानें दुसरा ग्रास, आणि पांचव्या मंत्रानें तिसरा ग्रास भक्षावा." जेव्हां दोन ग्रास असतील तेव्हां पहिल्या तीन मंत्रांनीं पहिला ग्रास भक्षावा. आणि पुढच्या दोन मंत्रांनीं दुसरा भक्षावा. जेव्हां एक ग्रास भक्षावयाचा असेल तेव्हां पांचही मंत्रांनीं तो भक्षावा." **हारीत**—"चंद्रदेवतात्र चरु शिजवून 'नवो नवो०' ह्या मंत्रानें त्याचा होम करून अवशेष राहिलेल्या चरूचे पिंड ( ग्रास ) करून ज्योत्स्नेंत ( चंद्रिकेंत ) गायत्री-मंत्रानें त्यांचें अभिमंत्रण करून ते प्राशन करावे." या वचनांत ज्योत्स्नाशब्दानें चंद्रोदय घ्यावा, म्हणून चंद्रोदयवेळीं भोजन करावें, असें झालें. या योगानें अर्धरात्रीं देखील भोजन केलें तरी दोष नाहीं. **शंख**–"चांद्रायणाचे ठायीं ग्रास करावयाचे ते ओल्या आंवळ्याएवढे करावे. त्या ठिकाणीं होमाहुतींचें प्रमाण तेवढेंच समजावें. आणि शौचासाठीं मृत्तिकेचे गोळे करावयाचे तेही तेवढेच करावे."

**इति कृच्छ्रचांद्रायणांची साधारण इतिकर्तव्यता समाप्त.**